*महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ यांच्यातर्फे अनुदान-प्राप्त ग्रंथ*

# प्राचीन भारतीय स्थलकोश

( वैदिक साहित्य, कौटिलीय अर्थशास्त्र, पाणिनीय व्याकरण, वाल्मीकि रामायण, महाभारत, पुराणे, मध्ययुगीन संस्कृत आणि शब्दकोश साहित्य, तसेच पर्शियन, ग्रीक, बौद्ध, जैन, चिनी आणि शिलालेख साहित्य यांमध्ये निर्दिष्ट भौगोलिक स्थलांची साधार माहिती देणारा ग्रंथ )



## प्रथम खंड



महामहोपाध्याय विद्यानिधि

डॉ. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव



पुरस्कार :

श्री. यशवंतरावजी चव्हाण

गृहमंत्री, भारत




शके १८९१ ] [ इ. स. १९६९

भारतीय चरित्रकोश मंडळ, पुणे ४

PRACHEEN BHARATIYA STHALAKOSHA (Vol. I)

(Encyclopedia of Ancient Indian Geography, in Marathi)

by M. M. Dr. Sidheshwar Shastri Chitrao

Published by Bharatiya Charitrakosha Mandal, Poona 4

किंमत ४० रुपये



किंमत ४० रुपये

प्रकाशक :
विनायक सिद्धेश्वरशास्त्री चित्राव,
कार्यवाह, भारतीय चरित्रकोश मंडळ,
१२०६ अ/४५, जंगली महाराज रस्ता, पुणे ४

मुद्रक :
ह. म. गद्रे,
साधना प्रेस,
४३०-४३१ शनिवार पेठ, पुणे ३०




गृहमंत्री, भारत

# पुरस्कार

महाराष्ट्राचे सुविख्यात प्राच्यविद्यापंडित म. म. डॉ. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांनी अनेक वर्षे ज्ञानसाधना करून तयार केलेला 'प्राचीन भारतीय स्थलकोश' हा प्राचीन भारतीय भूगोलाचा ज्ञानकोश प्रकाशित होत आहे, ही आनंदाची गोष्ट आहे. भारताच्या सुमारे ५००० वर्षांच्या अखंड इतिहासातील महत्त्वाच्या घडामोडींचे स्थलज्ञान शास्त्रीजींनी मराठी वाचकांना या ग्रंथरूपाने सादर केले आहे.

प्राचीन भूगोलासारख्या सकृद्दर्शनी रुक्ष आणि कालबाह्य वाटणाऱ्या विषयामध्ये भारताच्या सांस्कृतिक व प्रादेशिक एकात्मतेच्या दृष्टीने बहुमोल साधनसामुग्री असल्याच्या भावनेतून प्रस्तुत ग्रंथाची निर्मिती झाली आहे. या ग्रंथातील माहिती आणि विचारपरंपरा वाचकांना प्रेरक आणि उद्बोधक ठरेल, अशी मला आशा आहे.

नवी दिल्ली
दिनांक २७-११-६९

(यशवंतराव चव्हाण)

# ऋणनिर्देश

गेल्या ३० वर्षांहून अधिक काळ अखंडपणे ध्यानीमनी, अध्ययनमननात, तसेच चिंतनात असलेला ' प्राचीन भारतीय स्थलकोश ' हा प्राचीन भारतीय भूगोलाचा ज्ञानकोश मराठी वाचकांस सादर करताना आज मनास अतीव समाधान वाटत आहे.

सन १९६१ च्या पानशेत जलप्रलयामध्ये या ग्रंथाचे संपूर्ण हस्तलिखित वाहून गेले. इंद्रायणीतून वर आलेल्या तुकोबारायांच्या अभंगांप्रमाणे हा ग्रंथ जनताजनार्दनाच्या साह्याने पुन्हा एकवार तरून येईल, असे आश्वासन माझे सुहृद तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी त्यावेळी दिले होते. ते आज अक्षरशः खरे होत आहे. या कामी ज्यांचे हस्ते परहस्ते साह्य झाले, त्या साऱ्यांचा मी अंतःकरणपूर्वक आभारी आहे.

पानशेत जलप्रलयामध्ये संपूर्णतः वाहून गेलेल्या या ग्रंथाचे पुनर्लेखन आणि पुनर्मुद्रण महाराष्ट्र सरकारच्या महसूल खात्याच्या, तसेच महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ, आणि शिक्षा मंत्रालय, भारत सरकार यांच्या आर्थिक साह्यानेच करणे शक्य झाले. हा ग्रंथ त्याच्या मूळ स्वरूपात प्रकाशित होण्याबाबत महाराष्ट्राचे त्या वेळचे मुख्यमंत्री माननीय श्री. यशवंतरावजी चव्हाण, आणि महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळाचे अध्यक्ष तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांनी विशेष पुढाकार घेतला. त्या उभयतांचा मी अंतःकरणपूर्वक ऋणी आहे.

महाराष्ट्राचे मान्यवर नेते आणि भारताचे गृहमंत्री श्री. यशवंतरावजी चव्हाण यांच्या हस्ते प्रस्तुत ग्रंथाचे प्रकाशन होत आहे. आपल्या भारतव्यापी कार्यक्रमातून वेळात वेळ काढून ते या प्रकाशनसमारंभास उपस्थित राहिले, तसेच प्रस्तुत ग्रंथाचा मुक्तकंठाने गौरव करणारा पुरस्कार त्यांनी लिहिला, याबद्दल मी त्यांचा अत्यंत आभारी आहे.

या ग्रंथाच्या निर्मितिकार्यात भारतीय चरित्रकोश मंडळाचे कार्याध्यक्ष श्री. पांडुरंग जयराव चिन्मुळगुंद आय. सी. एस्., उपाध्यक्ष श्री. रघुनाथ केशव खाडिलकर, पूर्तिमंत्री, भारत, तसेच मंडळाचे सन्माननीय सदस्य डॉ. गणेश रंगनाथ धडफळे, श्री. के. पां. जोशी वकील, डॉ. ना. कृ. भिडे आणि पं. वसंत अ. गाडगीळ यांच्या सल्लामसलतीचे बहुमोल साह्य झाले आहे. त्या सर्वांचा मी अंतःकरणपूर्वक आभारी आहे.

या ग्रंथाच्या संशोधनकार्यात, लेखनात, तसेच मुद्रणात चरित्रकोश मंडळाचे श्री. विनायक चित्राव, सौ. विद्या चित्राव, आणि कुमारी शैलजा देशमुख यांनी विशेष परिश्रम घेतले आहेत. टॉलेमीच्या ग्रंथातील भौगोलिक माहिती माझे पत्रकार मित्र श्री. चंद्रकांत साखळकर यांनी संकलित करून दिली आहे. ग्रंथाची मुद्रणप्रत सिद्ध करण्याचे कार्य श्री. अरुण कन्हेरकर आणि कुमारी सुरेखा देशमुख यांनी केले. माझ्या या सहकाऱ्यांच्या अविश्रांत परिश्रमांमुळेच ग्रंथ आज या स्वरूपात प्रसिद्ध होत आहे.

ग्रंथाच्या मुद्रणाच्या कामी साधना प्रेसचे व्यवस्थापक श्री. प्रभाकर सिद्ध आणि फोरमन श्री. दत्तोबा टिबे, तसेच आनंद प्रेसचे व्यवस्थापक श्री. य. गो. जोशी आणि त्यांचा कामगारवर्ग यांचे विशेष साह्य झाले आहे. त्यांचा मी आभारी आहे.

पुणे,
त्रिपुरी पौर्णिमा,
शके १८९१
२३-११-१९६९

सिद्धेश्वरशास्त्री चित्राव

# कोश कसा पहावा ?

(१) या कोशामध्ये वेद, उत्तरकालीन वैदिक साहित्य, पाणिनीय व्याकरण, कौटिलीय अर्थशास्त्र, वाल्मीकि रामायण, महाभारत, पुराणे, तसेच मध्ययुगीन काव्य आणि शब्दकोश साहित्य या वैदिक-पौराणिक परंपरेच्या ग्रंथांतील, तसेच पर्शियन, ग्रीक, बौद्ध, जैन, चिनी, शिलालेख आदि पूरक साहित्यातील स्थलनामांचे सविस्तर विवरण अकारादि क्रमाने दिले आहे. प्रादेशिक भूगोलाचे शिलालेखादि साहित्य उपलब्ध न होणाऱ्या काश्मीर प्रांताच्या बाबतीत राजतरंगिणी आणि तदुत्तरकालीन इतिहासग्रंथांचा उपयोग आम्ही केला आहे.

(२) प्रस्तुत ग्रंथातील 'प्राचीन' संज्ञेची व्याप्ती आम्ही स्थूलमानाने भारताच्या सांस्कृतिक इतिहासातील सिंधु-संस्कृतीच्या उदयापासून मुसलमानी आक्रमणापर्यंत (इ. स. पू. २९००–इ. स. ९००) स्वीकारली आहे. परंतु प्राचीन साहित्यातील स्थलनामांची उत्तरकालीन माहिती, स्थापत्य, शिल्प आणि उत्खननावशेष जागच्याजागी नमूद करून हे स्थलवर्णन अद्ययावत बनविण्याचा प्रयत्न आम्ही केला आहे.

(३) विभिन्न आधारभूत ग्रंथांतील स्थलवर्णनविषयक माहिती नमूद करीत असतांना त्यांचे प्राचीनत्व आणि उपलब्ध प्रतींची विश्वसनीयता हे दोन निकष आम्ही स्वीकारले आहेत. त्या दृष्टीने विभिन्न स्थलांची माहिती वैदिक परंपरेतील ग्रंथांपासून सुरू करून, क्रमाने उत्तरकालीन साहित्याचा मागोवा घेण्याची पद्धती आम्ही हेतुतः अवलंबिली आहे. प्राचीन भूगोलविषयक साहित्याचे सविस्तर मूल्यमापन प्रस्तुत ग्रंथाच्या प्रास्ताविकात आम्ही केले आहे. तेथे निर्देशिलेल्या विभिन्न ग्रंथांचा कालानुक्रम आणि गुणवैशिष्ट्ये स्थलवर्णनांमध्ये आम्ही काटेकोरपणे पाळली आहेत. प्राचीन ग्रांथिक माहितीतील परस्परविरोध जेथल्या तेथे नमूद करून ग्रंथातील स्थलवर्णनात अधिकात अधिक सुसूत्रता आणण्याचा प्रयत्न आम्ही केला आहे.

(४) या कोशग्रंथात प्राचीन बृहत्तर भारतातील देश, जनपदे, लोकसमूह, राज्यविभाग, नगरे, ग्रामे, पर्वत, नद्या, समुद्र, वने, तीर्थस्थाने, तसेच पृथ्वीचे विभिन्न उपविभाग आदींची माहिती सर्वप्रथम वैदिक संदर्भ, आणि तदनंतर पाणिनीय व्याकरण, वाल्मीकि रामायण, महाभारत, बौद्ध आणि जैन साहित्य, टॉलेमी, चिनी साहित्य आणि मध्ययुगीन साहित्य अशा क्रमाने ग्रथित केले आहे.

(५) कोशातील हरेक स्थलाची माहिती प्राचीन साहित्यात निर्दिष्ट भौगोलिक स्थान, आधुनिक भौगोलिक स्थान, स्थलवैशिष्ट्य, नामांतरे, नामव्युत्पत्ती, आधुनिक स्थानासंबंधीची मतांतरे, प्राचीन साहित्यातील विभिन्न निर्देश, स्थापत्यावशेष, आणि उत्खननावशेष अशा क्रमाने दिली आहे. तीर्थस्थानांच्या वर्णनात तीर्थोपासनेचा इतिहास, आख्यायिका, मंदिरस्थापत्य वर्णन, उपासनाविधी, यात्रापरंपरा अशा क्रमाने माहिती दिली असून, आवश्यक तेथे वाल्मीकि रामायण, महाभारत, पौराणिक साहित्यातील मूळ संस्कृत श्लोक आणि त्यांचा मराठी अनुवाद दिला आहे. विषयाच्या विशेष स्पष्टीकरणासाठी आवश्यक तेथे परिपत्रकेहि दिली आहेत. त्यांची सूची ग्रंथाच्या अखेरीस दिली आहे.

(६) स्थलनामांचा सर्वसम्मत पाठ स्थलवर्णनाच्या प्रारंभी जाड ठशामध्ये दिला असून, विभिन्न ग्रथांतील त्याची नामांतरे स्थलवर्णनाच्या द्वितीय परिच्छेदात सुस्पष्टपणे नमूद केली आहेत. मुख्य स्थलवर्णन हे नेहमीच सर्वसम्मत पाठाच्या स्थानी दिले असून, अन्य नामांतरांच्या स्थानी ते मुख्य स्थलनामाचे नामांतर असल्याचा संक्षिप्त उल्लेख केला आहे.

(७) कोशातील निम्म्याहून अधिक आधारग्रंथ संस्कृतभाषीय असल्याने, तसेच त्या साहित्यातील स्थलनामांचा पाठ बहुशः सर्वत्र प्रामाणिक असल्याचे सिद्ध झालेले असल्याने ते पाठ आम्ही स्वीकृत केले आहेत. जेथे असे पाठ उपलब्ध झाले नाहीत, तेथे उपलब्ध पाली, चिनी, ग्रीक, पार्शियन अथवा स्थानिक स्थलनामपाठ आम्ही स्वीकारले आहेत. भारतातील ज्या गुफा, स्थापत्य, शिल्प, उत्खनन अथवा तीर्थस्थानांची प्राचीन ग्रंथनिविष्ट नावे

उपलब्ध होत नाहीत, तेथे आधुनिक स्थलनामांखाली त्यांची माहिती दिली आहे (जसे–अजंटा, मोहेंजोदरो, हरप्पा, अरिकमेडु ).

(८) कोशाचे बहुतांशी सारे आधारग्रंथ संस्कृतभाषीय असल्याने, त्यामधील वर्णानुक्रम संस्कृत पद्धतीचाच ठेवला आहे. संस्कृत भाषेमध्ये क 'च', 'ट', व 'त', 'प' वर्गांतील अक्षरापूर्वीचे अनुस्वार हे त्या त्या वर्गातील अनुनासिक होत असल्यामुळे (जसे–अकरभण्ड, अङ्ग ), ते अनुनासिक समजूनच त्यांचा क्रम लावला आहे. स्थलवर्णनारंभीची त्यांची शीर्षकेहि त्याच पद्धतीने छापली आहेत. मात्र स्थलांच्या मजकुरातील त्यांचे नामोल्लेख मुद्रणाच्या सोयीसाठी सानुस्वार पद्धतीने (जसे–अकरभंड, अंग ) दिले आहेत.

य, र, ल, व, श, ष, स या अक्षरांच्या अगोदर येणारे अनुस्वार (जसे–संवरण ), तसेच श, ष, स, ह आदि अक्षरांच्या अगोदर येणारी विसर्गयुक्त स्थलनामे त्या त्या वर्णाच्या प्रारंभी प्रथम अनुस्वार आणि नंतर विसर्ग अशा क्रमाने दिली आहेत. 'क्ष' आणि 'ज्ञ' आद्याक्षरांनी युक्त स्थलांचा समावेश अनुक्रमे 'क' आणि 'ज' वर्णांच्या शेवटी त्यांचे जोडाक्षर म्हणून केला आहे.

(९) एकाच नावाच्या अनेक स्थलांची माहिती कालक्रमाने अथवा त्या स्थलाच्या महत्त्वानुसार २, ३, ४ असे आकडे घालून मुख्य स्थलानंतर दिली आहे.

देश आणि राजधानी जेव्हा एकाच नावाची असेल (जसे–कपिशा ), तेव्हा त्यांचे वर्णन प्रथम देश आणि नंतर राजधानी अशा क्रमाने स्वतंत्रपणे दिले आहे.

(१०) कोशग्रंथातील माहिती आणि विवरण यांची पुनरावृत्ती टाळण्यासाठी अथवा दोन विशिष्ट स्थलांमधील परस्परसंबंध सूचित करण्यासाठी जरूर तेथे 'विशिष्ट स्थल पहा' असे सुचविले आहे.

(११) या ग्रंथासाठी उपयोजिलेले आधारग्रंथ, त्यांच्या आवृत्त्या, तसेच त्यांचे संक्षेप यांची माहिती ग्रंथाच्या प्रारंभी दिली आहे.

(१२) कोशग्रंथातील प्रमुख स्थलांची, विषयांची आणि परिपत्रकांची सूची ग्रंथाच्या अखेरीस दिली आहे. अधिक माहिती आणि शुद्धिपत्रहि तेथेच दिले आहे. संदर्भसोयीसाठी आधुनिक आणि पुरातन स्थलांची सांगड घालणारी स्वतंत्र आधुनिक स्थलसूचीहि दिली आहे.

(१३) हाताळणीच्या सोयीसाठी हा कोशग्रंथ दोन खंडांमध्ये विभाजित केला आहे. प्रथम खंडात 'ण' वर्णाच्या अखेरीपर्यंतची स्थले असून, उर्वरित स्थले द्वितीय खंडात दिली आहेत.

(१४) या ग्रंथात सर्वत्र महाराष्ट्र साहित्य परिषदेने पुरस्कारिलेल्या शुद्धलेखन नियमांचा उपयोग केला आहे. त्यामध्ये सुचविल्याप्रमाणे संस्कृतभाषीय शब्द त्यांच्या मूळ स्वरूपात कायम ठेवले आहेत.

卐卐卐卐卐卐卐卐卐卐卐卐卐卐卐卐卐

माझे परम पूजनीय मातापिता

कै. रंगो वामन धडफळे

आणि

कै. सौ. सत्यभामाबाई धडफळे

यांच्या पवित्र स्मृतीस

卐卐卐卐卐卐卐卐卐卐卐卐卐卐卐卐卐

# प्रा स्तां वि क

## विषयानुक्रम

- पार्श्वभूमी
- प्राचीन भूगोलाच्या अध्ययनाचे सांस्कृतिक महत्त्व
- प्राचीन भूगोलाध्ययनातील समस्या
- प्राचीन भौगोलिक अध्ययनाची साधने

१. वैदिक – पौराणिक परंपरा
(वैदिक साहित्य, कौटिलीय अर्थशास्त्र, पाणिनीय व्याकरण, वाल्मीकि रामायण, महाभारत, पुराणे, मध्ययुगीन संस्कृत आणि शब्दकोश साहित्य)

२. पूरक साहित्य
(पर्शियन, ग्रीक, बौद्ध, जैन, चिनी आणि शिलालेख साहित्य)

- प्रादेशिक भूगोल
- भारतीय स्थापत्य आणि शिल्प परंपरा
- जगदुत्पत्ती
- सप्तद्वीपा पृथ्वी
- पृथ्वीरचनेतील पर्वतांचे महत्त्व
- पृथ्वीरचनेतील नद्यांचे महत्त्व
- भारतवर्ष
- भारतवर्षाचे जनपदात्मक विभाजन
- भारतवर्षातील नगरे व ग्रामे
- भारतवर्षातील तीर्थे
- भारतवर्षातील मार्ग
- बृहत्तर भारत

卐 卐 卐

# प्रास्ताविक

**River Ganges is a symbol of India's age-long Culture...ever-changing, ever-flowing, and yet ever the same.**

— *Testament of Pandit Jawaharlal Nehru*

( नित्यनूतन आणि चिरप्रवाही राहूनहि अंतर्यामीची एकात्मता अबाधित ठेवणारी गंगा नदी पुरातन भारतीय संस्कृतीचे प्रतीक आहे ).



## पार्श्वभूमी

**प्राचीन भारतीय भूगोलाचा ज्ञानकोश**— इतिहासाध्ययनास प्राणभूत अशा व्यक्तिचरित्र, भूगोल आणि कालनिर्णय या तीन आधारशिलांपैकी देशाच्या सांस्कृतिक एकात्मतेच्या दृष्टीने सर्वाधिक महत्त्वपूर्ण अशा प्राचीन भूगोलाचा प्रस्तुत ज्ञानकोश मराठी वाचकांना सादर करण्यात मनास कृतकृत्यतेचे समाधान वाटत आहे. प्रांत, भाषा, धर्म आदींसंबंधीच्या संकुचित अभिनिवेशाच्या आवर्तात अन्य प्रांतीयांप्रमाणेच मराठी मन आज हेलकावे खात आहे. या संकुचित मतभेदांच्या अतीत अशा विराट भारतवर्षाचे पाच हजार वर्षांहून अधिक कालपर्यंत अशिया खंडाच्या कानाकोपऱ्यात भुजा फैलावणारे सांस्कृतिक मानचित्र साकल्याने सादर करण्याच्या तीन तपे मनीमानसी बाळगलेल्या स्वप्नातून प्रस्तुत ग्रंथाची निर्मिती झाली आहे. पृथ्वीचे साम्राज्य आणि स्वर्गाचे वैभव तुच्छ मानून ' आसेतु हिमाचल 'च नव्हे, तर आशिया खंडाचा सारा प्रदेश **' कृण्वन्तो विश्वमार्यम् '** च्या सांस्कृतिक घोषणेने दुमदुमविणाऱ्या विश्वव्यापी भारतीय संस्कृतीचे दर्शन घडविण्याचा नम्र प्रयत्न प्रस्तुत ग्रंथात आम्ही केला आहे. त्याचे यशापयश वाचकांनीच ठरवावयाचे आहे.

सुमारे ३७ वर्षांपूर्वी आम्ही प्रकाशित केलेल्या ' प्राचीन चरित्रकोश ' ग्रंथात वेद पुराणादि साहित्यातील प्राचीन भारतीय व्यक्तिचरित्रविषयक साधनसामुग्री कोशरूपाने आम्ही सादर केली. प्राचीन भारतीय भूगोलाचा प्रस्तुत ज्ञानकोश ही एका अर्थाने ' प्राचीन चरित्रकोशा 'चेच महत्त्वपूर्ण उपांग आहे.

प्राचीन भारतीय भूगोल हा अत्यंत महत्त्वाचा, परंतु अवाढव्य असा विषय आहे. वेद, महाभारत, पुराणे यांसारखे हिंदू धर्मग्रंथ, बौद्ध आणि जैन धार्मिक साहित्य, पाणिनीय व्याकरण, चिनी प्रवासवर्णने, शिलालेख, ताम्रपट, धर्मशास्त्र, उत्खननशास्त्र, स्थापत्यशास्त्र, नाणकशास्त्र अशा अनेक ज्ञानशाखा त्यामध्ये अंगभूत असून, त्या प्रत्येकीमध्ये गेल्या १५० वर्षांत विपुल संशोधनकार्य झाले आहे. या साऱ्यांमधून प्राचीन भारताचे सुसंबद्ध भौगोलिक दर्शन घडविणे हे अत्यंत कष्टाचे व जिकिरीचे काम असून ते यथाशक्य करण्याचा प्रयत्न प्रस्तुत ग्रंथात आम्ही केला आहे. अशा तऱ्हेचे काही फुटकळ कोश इंग्रजीमध्ये उपलब्ध असले ( उदा. नंदलाल डेकृत ' जिऑग्रफिकल डिक्शनरी ऑफ एन्शन्ट इंडिया ', स. १९२२; विमलाचरण लॉकृत ' हिस्टॉरिकल जिऑग्रफी ऑफ एन्शन्ट इंडिया, स. १९५४ ), तरी ज्ञानकोशाच्या धर्तीवर प्राचीन भूगोलविषयक समग्र माहिती सादर करण्याचा भारतीय भाषेतील हा पहिलाच प्रयत्न आहे असे नम्रपणाने म्हणावेसे वाटते.

**व्याप्ती** —प्रस्तुत ग्रंथाच्या ' प्राचीन भारतीय स्थलकोश ' नावातील ' प्राचीन ' आणि ' भारतीय ' या दोन्ही उपाधी शब्दशः नव्हे तर व्यापक अर्थाने उपयोजिल्या आहेत. ' प्राचीन चरित्रकोशा 'त ' प्राचीन ' संज्ञेची कालमर्यादा वेद-पुराणांच्या कालापासून चंद्रगुप्त मौर्यापर्यंत ( इ. स. पू. २५००–३०० ) आम्ही स्वीकारली होती. अनंत आणि कालमर्यादातीत प्राचीन भारतीय भौगोलिक स्थलांच्या प्रस्तुत कोशात ही मर्यादा ढोबळ मानाने सद्यःकालपर्यंत विस्तारणे आम्हास भाग पडले आहे. मात्र भारतावरील मुसलमानी आक्रमणाच्या पूर्वकालातील ( इ. स. १० वे शतक ) इतिहासप्रसिद्ध स्थलांचा आजतागायत इतिहास सादर करणे प्रस्तुत ग्रंथाचे प्रमुख उद्दिष्ट आहे. त्यानंतरच्या काळात महत्त्व पावलेल्या मध्ययुगीन स्थलांचा परामर्श आम्ही घेतलेला नाही.

' प्राचीन ' शब्दाप्रमाणेच ' भारतीय ' संज्ञेची आम्हास

अभिप्रेत असणारी व्याख्या ' बृहद्भारतीय ' म्हणजे मध्य आणि आग्नेय आशियातील ज्या ज्या देशात भारतीय संस्कृतीचा प्राचीन काळी विस्तार झाला त्या प्रदेशांशी निगडित आहे. संकुचित भारतवर्ष असा अर्थ आम्ही हेतुतःच स्वीकारलेला नाही.

**स्थलकोशाचा हेतू**— प्राचीन भूगोलविषयक साहित्यामधून कल्पनारम्य भाग वेगळा काढून ऐतिहासिक, सांस्कृतिक आणि राजकीय दृष्टया महत्त्वपूर्ण अशी सुवर्णतुल्य भौगोलिक साधनसामुग्री वाचकांना सुबोध भाषेत सादर करणे हा प्रस्तुत ' स्थलकोशा 'चा प्रमुख हेतू आहे. ज्यांचे महत्त्व शतकानुशतके अबाधित राहिले आहे, अथवा उत्खनन, स्थापत्यशास्त्र, आणि शिलालेखांच्या साह्याने ज्यांची कालनिर्णयसहित शास्त्रशुद्ध ओळख आज पटू शकते, त्याच भौगोलिक स्थलांचा परामर्श आणि विवेचन प्रस्तुत ग्रंथात आम्ही केले आहे. याचे उलट ज्यांची ओळख आज पटू शकत नाही, त्या पौराणिक, बौद्ध आणि जैन साहित्यातील लक्षावधी तीर्थांना आम्ही दुय्यम मानले आहे.

## प्राचीन भूगोलाच्या अध्ययनाचे सांस्कृतिक महत्त्व

**खंडप्राय देश**—वांशिक, भौगोलिक, भाषिक, प्राकृतिक आदि सर्वच दृष्टींनी भारत हा खंडप्राय, आणि म्हणूनच शतखंडित देश आहे. दर पाच-पन्नास मैलांवर येथे नवे हवामान, नवी बोलीभाषा आणि नवे आचार-विचार प्रत्ययास येतात. कश्मीर–पंजाबचा हिममय प्रदेश, राजस्थान आणि बलुचिस्तानचा वालुकामय प्रदेश, गंगा-यमुना आणि कावेरी-गोदावरी नद्यांच्या खोऱ्यांचा सुपीक प्रदेश, माळव्याचा मैदानी प्रदेश, आणि दख्खनचा पठारी प्रदेश असे परस्परविरोधी भूविभाग या देशामध्ये एकमेकांस भिडलेले दिसतात. बंगाल, कोंकण, केरळ प्रांतातील अतिरिक्त पर्जन्यवृष्टी, तराई प्रदेशातील दलदल आणि तामीळनाडमधील उष्णता यांमुळे या प्रदेशातील आचार-विचारांमध्ये जमीन-अस्मानाची तफावत पडते. शतकानुशतके आर्य संस्कृतीचा बालेकिल्ला बनलेला उत्तर भारत आणि या संस्कृतीपासून दीर्घकाळ वंचित झालेला पूर्व आणि दक्षिण भारत यांमधील सांस्कृतिक विभेद पूर्वापार प्रसिद्ध आहेत.

**सांस्कृतिक एकात्मता**—सर्वच दृष्टींनी शतखंडित भारतवर्षाला एकात्म संस्कृतिबंधामध्ये गोवण्याची महनीय कामगिरी भारतीय तीर्थक्षेत्रांनी आणि पवित्र म्हणून पूजिल्या जाणाऱ्या नदी-पर्वतांनी बजावली आहे. हिंदू, बौद्ध आणि जैन धार्मिक साहित्यात धर्मक्षेत्रे म्हणून वर्णिलेल्या या तीर्थस्थानांनी भारताच्या एकात्मतेचे बीजारोपण करून तिचे प्रयत्नपूर्वक संवर्धन केले. ही एकात्मता केवळ आसेतु हिमाचलच नव्हे, तर पश्चिमेस अफगाणिस्तानापर्यंत आणि पूर्वेस आग्नेय आशियातील मलाया, कांबोडिया आदि देशांपर्यंत भारतीय तीर्थक्षेत्रांनी प्रस्थापित केली. संस्कृतीचे आणि धर्माचे हे राज्य तलवारीच्या राज्यापेक्षाहि अधिक बलवत्तर ठरून शतकानुशतके त्याची महती टिकून राहिली. शंकराचार्यांनी भारताच्या चार टोकांस स्थापन केलेली बदरीनाथ, द्वारका, रामेश्वर आणि जगन्नाथपुरी ही चार धामे, शिवोपासनेची बारा ज्योतिर्लिंगे, देवी उपासनेची एकावन्न शक्तिपीठे, गणेश उपासनेचे अष्टविनायक, दक्षिण भारतातील शिवोपासनेची पंचमहाभूतात्मक शिवलिंगे, अथवा बुद्धजीवनाशी संबंधित स्थानी अशोकाने बांधलेले सहस्रावधी स्तूप ही सारी धार्मिक स्थाने भारतीय एकात्मतेची मानचिह्ने आहेत. धर्मप्रसाराच्या भावनेतून उत्पन्न झालेली ही सारी धर्मक्षेत्रे उत्तरकालात भारतीय संस्कृतीचा आणि एकात्मतेचा मूलाधार बनली. हा मूलाधार निष्ठापूर्वक जतन करणारे ऋषिमुनींचे महाभारत, पुराणादि ग्रंथ भारतीयांचे धर्मग्रंथ बनले. या नव्या स्थित्यंतरात गंगादि नद्या भारताच्या माता बनल्या; हिमालयादि पर्वत भारतीयांचा पिता बनले; आणि भारताच्या एका टोकाहून दुसऱ्या टोकापर्यंत श्रद्धापूर्वक केली जाणारी मुक्तिप्रद तीर्थक्षेत्रांची तीर्थयात्रा भारतीयांच्या जीवनाचे ' श्रेयस् ' ( अंतिम साध्य ) बनले.

**भौगोलिक स्थलांचे सांस्कृतिक महत्त्व**—भारतीय संस्कृतीशी एकरूप झालेल्या नद्या, पर्वत, नगरे आणि विभिन्न पंथांची मंदिरस्थाने ही व्यापक अर्थाने प्राचीन भारतीय भूगोलाच्या ज्ञानकोशाचा खरा विषय असल्याची आमची मनोमन श्रद्धा आहे. इतिहासाचे बाह्यांग राजाराण्यांची नावे आणि जन्ममृत्यूंच्या सनावळी यांनी बनत असले, तरी विभिन्न देशांचा आत्मिक इतिहास सांस्कृतिक उत्कर्षापकर्षाशी संबंधित असल्याचे तत्त्व आज सर्वमान्य झाले आहे. हीच गोष्ट प्राचीन भूगोलाची असून, या भूगोलाचे प्राकृतिक भूगोल आणि ऐतिहासिक व सांस्कृतिक

भूगोल असे दोन स्वतंत्र उपविभाग सांगता येतील. विभिन्न नद्यांची नामावली, त्यांची लांबीरुंदी अथवा त्यांनी सिंचिलेला प्रदेश हा प्राकृतिक भूगोल प्राचीन भारतीय भूगोलाचे बाह्यांग असून, या नद्यांशी संबंधित भारतीय संस्कृतीचा शतकानुशतकांचा इतिहास हा या भूगोलाचा आत्मा आहे. या आत्म्याचा शोध हे प्राचीन भारतीय भूगोलाचे अंतिम साध्य आहे. प्राचीन भारतीय संस्कृतीच्या अन्वेषणाच्या, तसेच सांस्कृतिक एकात्मतेच्या संशोधनाच्या श्रद्धेतून प्रस्तुत भौगोलिक ज्ञानकोशाची निर्मिती झाली आहे.

**अज्ञात सांस्कृतिक विश्व**—भारतीय संस्कृतीच्या दृष्टिकोनातून प्राचीन साहित्यातील नद्या, पर्वत, देश आदींचे भौगोलिक वर्णन तपासून पाहण्यास प्रारंभ केल्यानंतर आजपर्यंत अज्ञात असलेले एक नवे विश्व दृष्टिपथात येते. नद्या–पर्वत, तसेच शतकानुशतके विजन आणि ओसाड भूगर्भात विसावलेले चिरविस्मृत स्थापत्यावशेष नव्या तेजोमय वाणीने आपला इतिहास सांगू लागतात. या इतिहासाची भाषा श्रद्धेची आणि भावनेची आहे. ती समजून घेण्यास तशाच श्रद्धेची आणि तादात्म्यतेची आवश्यकता आहे. ही तादात्म्यता प्रस्तुत ग्रंथामध्ये कितपत साधली आहे, हे वाचकांनीच ठरवावयाचे आहे.

महाभारत, वाल्मीकि रामायण, पौराणिक, तसेच बौद्ध आणि जैन साहित्य या भारतीयांच्या धर्मग्रंथांतील देवता, व्यक्ती अथवा भौगोलिक स्थले यांच्या वर्णनात भारतीय संस्कृतिप्रसाराची दृष्टी प्रामुख्याने असून, त्या ग्रंथांचे सारे निवेदन या एकाच मानबिंदूभोवती केंद्रित झालेले आहे. त्या साहित्यांचे नव्या शास्त्रीय दृष्टीने परिशीलन करणाऱ्या पाश्चात्य अभ्यासकांना या ग्रंथांचे ऐतिहासिक आणि सांस्कृतिक महत्त्व ध्यानात आलेले असले तरी त्यामधील भारतीय सांस्कृतिक एकात्मतेचा प्रतिपाद्य विषय त्यांना पुरेसा उमगलेला नाही. मनःशांतीच्या प्राप्तीसाठी देशाच्या कानाकोपऱ्यातील तीर्थस्थानांची धौम्य ऋषींसमवेत यात्रा करणारा, अथवा लोमश आणि अंगिरस् ऋषींच्या द्वारा या तीर्थांचे माहात्म्य श्रवण करणारा युधिष्ठिर, गौतम बुद्धाच्या पदचिह्नांचा मागोवा घेत अफगाणिस्तानपासून पूर्व भारतापर्यंतच्या साऱ्या प्रदेशाची यात्रा करणारा सम्राट अशोक, अथवा बौद्धधर्मद्वेष्ट्या मध्य आशियातील आणि बौद्धधर्मपरित्यक्त भारतवर्षातील बौद्ध तीर्थांच्या यात्रेसाठी दहा वर्षांहून अधिक काळ रानेवने तुडविणारा ह्युएन्त्संग यांचे श्रद्धासामर्थ्य पाश्चात्य अभ्यासकांच्या अनुभूतिकक्षेबाहेरचे आहे. अत्याधुनिक इतिहाससंशोधनाच्या आणि उत्खननशास्त्राच्या साधनांनी या स्थलांचा शोध पाश्चात्य अभ्यासकांनी लावला असला तरी भारतीय जनमानसाच्या उपासनापरंपरेतील आणि सांस्कृतिक आकृतिबंधातील या स्थलांचे महत्त्व नव्या पिढीतील भारतीय वाचकांना पटवून देण्यासाठी व्यास–वाल्मीकि ऋषींच्या परंपरेतील नव्या इतिहासकाराची आवश्यकता आहे. नव्या अभ्यासकांचा विचक्षण, डोळस आणि शास्त्रशुद्ध दृष्टिकोन, आणि जुन्या परंपरागत ग्रंथांतील श्रद्धापूर्ण सांस्कृतिक तन्मयता यांचा मेळ घालण्याचा प्रयत्न प्राचीन भारतीय भूगोलाच्या प्रस्तुत ज्ञानकोशात आम्ही केला आहे.

**सांस्कृतिक एकात्मतेच्या समस्या** — मनु-याज्ञवल्क्य-पुरस्कृत चातुर्वर्ण्यपद्धतीमुळे वांशिक आणि भौगोलिक दृष्ट्या विभागलेला भारतवर्ष सांस्कृतिक दृष्टीनेहि दुभंगला गेल्याचा, तसेच भारतातील चातुर्वर्ण्य हा येथील हिंदू संस्कृतीच्या विनाशाचे मूळ कारण असल्याचा सिद्धांत अर्नोल्ड टॉयनबी यांनी आपल्या 'स्टडी इन हिस्टरी' या सुविख्यात ग्रंथात ल्युक्रेटियस आणि व्होल्टेयर या तत्त्वज्ञांच्या मताधारे मांडला आहे. व्होल्टेयर यांच्या मते धर्मतत्त्वांचा आत्यंतिक पुरस्कार हे मानवी जीवनातील बहुतांशी साऱ्याअनर्थांचे मूळ असून, टॉयनबी यांच्या मते जित लोकांचा संपूर्ण उच्छेद करू न शकणारे नवागत जेते जातिसंस्थेचा सोयीस्करपणे आश्रय घेतात. अमेरिकेतील अथवा दक्षिण आफ्रिकेतील श्वेतवर्णीय जेते आणि कृष्णवर्णीय निग्रो-जमातींचे ध्रुवीकरण जित आणि जेत्यांच्या परस्पर संबंधांतूनच झाले असून, भारतातील ज्ञातिसंस्थेची निर्मितीहि अमेरिका आणि दक्षिण आफ्रिकेप्रमाणेच मूलतः वांशिक आहे.

या ज्ञातिसंस्थेला उत्तरकालात दिलेल्या धार्मिक आवरणामुळे ती अधिक कडवी आणि समाजहितविरोधी बनली असून, धर्माच्या नावाखाली आणि धर्मपीठांच्या आशीर्वादाने फोफावलेली भारतातील ज्ञातिसमस्या जगातील अन्य कोणत्याहि देशापेक्षा भयानक बनली आहे. या देशातील अस्पृश्यताहि या समस्येचाच एक विराट बाह्य आविष्कार आहे.

टॉयनबी यांच्या मते भारतातील चातुर्वर्ण्यप्रधान ज्ञातिसंस्थेविरुद्ध बंडाचे निशाण उभारण्याचा प्राचीनतम प्रयत्न वर्धमान महावीर आणि गौतम बुद्धाने (इ. स. पू. ५००) केला. भारतातील समस्त दलित आणि अब्राह्मण समाजाला नवी अस्मिता प्रदान करण्याचा बौद्ध आणि जैन धर्मांचा प्रयत्न यशस्वी

होता, तर भारतातील ज्ञातिसंस्थेचे संपूर्ण उच्चाटन त्याच-वेळी झाले असते. परंतु सिंधु संस्कृतिविनाशानंतर भारतातील वैश्विक आर्य धर्माचा वारसा स्वतःस समन्वयवादी म्हणविणाऱ्या आर्य संस्कृतिप्रधान हिंदु धर्माकडे आल्याने पुरातन ज्ञातिसंस्थेला नवे जीवदान मिळाले. हिंदुधर्म-प्रस्थापित या नव्या समाजव्यवस्थेत ज्ञातिव्यवस्थेची पकड अधिक पक्की होऊन तिला धार्मिकतेचे नवे वलय चढविण्यात आले. शीखधर्मसंस्थापक गुरु नानक ( स. १४६९–१५३८ ), ब्राह्मो समाजाचे जनक राजा राममोहन रॉय ( स. १७७२–१८३३ ) आदि समाजसुधारकांनी मुस्लीम आणि ख्रिश्चन धर्मतत्त्वांच्या साह्याने ज्ञातिसंस्थेविरुद्ध बंड पुकारण्याचा प्रयत्न केला. परंतु देशव्यापी ज्ञातिसंस्थेचे समूळ उच्चाटन करणे त्यांस साधले नाही. इंग्रजी राज्यकाली सरकारी नोकऱ्या आणि व्यापारामध्ये ब्राह्मण आणि वैश्य लोकांना नवे प्राधान्य प्राप्त होऊन, उच्च-कनिष्ठ ज्ञातींमधील दुरावा अधिक प्रखर झाला. महात्मा गांधींच्या अस्पृश्यता-विरोधी चळवळीमुळे अस्पृश्यांच्या समस्येकडे साऱ्या देशाचे लक्ष वेधले. परंतु समाजातील समस्त जाती समपातळीवर आणणे त्यांस साध्य झाले नाही.

भारतवर्षातील या नानाविध वांशिक, भाषिक, सांस्कृतिक आणि जातीय विभेदांमुळे राजकीय दृष्ट्या एकसूत्री, एकतंत्री आणि एकात्म साम्राज्य येथे कधीच निर्माण होऊ शकले नाही. क्वचित् प्रसंगी उत्पन्न झालेली अशी साम्राज्ये दीर्घकालपर्यंत टिकली नाहीत. भारतवर्षाच्या सुमारे २५०० वर्षांच्या ज्ञात इतिहासात सम्राट अशोक, गुप्त सम्राट चंद्रगुप्त, मोगल सुलतान औरंगजेब आणि इंग्रज अशी चारच देशव्यापी साम्राज्ये उत्पन्न झाली असून, त्यांचा एकूण कालखंड केवळ ४०० वर्षांचा आहे.

**टॉयनबी यांच्या विवेचनातील एकांगीपणा—** भारतीय लोकांचे चातुर्वर्ण्यात्मक विभाजन हा या देशाच्या सांस्कृतिक एकात्मतेच्या मार्गातील अडसर असल्याचा प्रो. अर्नोल्ड टॉयनबी यांचा सिद्धांत कोणाहि सुबुद्ध विचारवंतास सहज पटण्यासारखा असला, तरी या विशिष्ट भारतीय समस्येची सर्वांगीण पार्श्वभूमी त्यांना समजली नसल्याने त्यांचे उपरोक्त विवेचन काहीसे एकांगी झाले आहे. वैदिककालीन भारतातील चातुर्वर्ण्यप्रधान समाजरचना जित आणि जेते यांच्या परस्पर संघर्षातून उत्पन्न झाली असली, तरी उत्तरकालीन वाहतुकीच्या आणि प्रवासाच्या साधनांच्या अभावामुळे अनुवंशिकतेचे नवे दुष्ट पटल तिच्यावर चढले. प्रारंभी आपत्प्रसंग म्हणून स्वीकारलेल्या या अनुवंशिकताप्रधान चातुर्वर्ण्यात्मक समाजरचनेचा काच महाभारतकाली दळणवळणाची साधने नव्याने उपलब्ध झाली, तसा क्रमाक्रमाने कमी होत गेला. समाजातील ब्राह्मणांप्रमाणेच क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र या अन्यवर्णीयांनाहि मोक्षाचा अधिकार असल्याचा सिद्धांत महाभारतात हिरिरीने पुरस्कारिला असून, समाजाच्या चारहि वर्णांमध्ये ज्ञानी ऋषी उत्पन्न होत असल्याचे, आणि त्यांची ज्ञानसंपदा सर्व समाजास ग्राह्य असल्याचा संदेश उपनिषदांमध्ये आढळतो.

कौटिलीय अर्थशास्त्र आणि पाणिनीची अष्टाध्यायी ( इ. स. पू. ३ रे शतक ) यांमध्ये हिरिरीने पुरस्कारिलेल्या जनपदात्मक समाजरचनेत समाजातील हरएक जातीजमातीला राज्यशासनात समान अधिकार असल्याचे लोकशाही तत्त्व काटेकोरपणे अवलंबिलेले दिसते.

महाभारतोत्तर मध्ययुगीन काली भारतामध्ये नव्याने उदयास आलेल्या सरंजामशाहीमुळे पाणिनि आणि कौटिल्यप्रणीत लोकशाही समाजरचना अस्तंगत झाली आणि अनुवंशिक चातुर्वर्ण्याच्या क्रमशः शिथिल होत जाणाऱ्या दास्यशृंखला पुन्हा दृढ होऊन त्यांच्या जोडीला लष्करी आणि आर्थिक सत्ता स्वतःकडे ठेवणारा शासक आणि वणिक् हे नवे वर्ग उत्पन्न झाले. सरंजामशाही समाजव्यवस्थेमध्ये अपरिहार्यपणे उत्पन्न होणारी शासकीय, आर्थिक आणि धार्मिक विषमता ही प्राचीन आणि मध्ययुगीन भारतातील दलित वर्गाची खरी समस्या असून, समाजातील राजसत्ता, अर्थसत्ता आणि धार्मिक सत्ता स्वतःकडे केंद्रित करणाऱ्या मूठभर लोकांनी बहुसंख्य समाजाला या तिन्ही गोष्टींपासून वंचित करण्याचा प्रयत्न अन्य सरंजामशाही देशांप्रमाणेच मध्ययुगीन भारतात घडला. यांपैकी धार्मिक सत्तेच्या विकेंद्रीकरणाचा हिरिरीचा प्रयत्न आद्य शंकराचार्यांनी भारताच्या सर्व भागात केला असून, भारतातील जगन्नाथपुरी, द्वारका, पंढरपुर आदि क्षेत्रांचे बहुजन समाजाला मुक्तद्वारसदृश स्वरूप या धार्मिक विकेंद्रीकरणाचे द्योतक आहे. हे विकेंद्रीकरण पुरेशा प्रमाणात झाले नाही, हा भारतीय समाजजीवनाचा सर्वात मोठा दोष असून, मध्ययुगीन परकीय आक्रमणांमुळे देशातील या सरंजामशाहीची पकड अधिकाधिक पक्की होत गेली. परिणामी राजकीय आणि आर्थिक सत्तेप्रमाणेच धार्मिक सत्तेपासूनहि बहुजनसमाज वंचित राहिला.

# प्राचीन भूगोलाध्ययनातील समस्या

**भूगोलाचे संशोधन** — प्राचीन भारतीय भूगोलाचे अंतिम ध्येय देशाच्या सांस्कृतिक इतिहासाशी संलग्न असले, तरी त्याचा मूलारंभ महाभारत, पुराणादि प्राचीन वाङ्मयातील, तसेच ग्रीक, चिनी आणि अरब प्रवाश्यांच्या प्रवासवर्णनातील देश, लोकसमूह, नद्या पर्वतादिकांची सांगड आधुनिक स्थलांशी घालण्याने होतो. प्राचीन ग्रंथातील भौगोलिक स्थलांची आधुनिक स्थलांशी ही सांधमोड प्राचीन भूगोलविषयक संशोधनातील अवघड आणि नाजूक समस्या असून, साऱ्या जगातील भूगोलशास्त्रज्ञांनी तिचा जटिलपणा मान्य केला आहे. याबाबतीत निर्विवाद आणि खात्रीशीर पद्धती अद्यापहि सापडलेली नाही.

प्राचीन भारतातील स्थलनामांची संस्कृत आणि प्राकृतभाषीय नावे प्राचीन साहित्यात उपलब्ध असून, त्यांचे उच्चारहि विभिन्न ग्रंथात विभिन्न प्रकारे दिलेले आढळतात. ग्राचे उल्लेख ग्रीक आणि चिनी प्रवाश्यांच्या प्रवासवर्णनात या स्थानांची त्या त्या भाषेतील अपभ्रष्ट रूपे आढळतात. मुसलमानी राज्यकाळी अनेक स्थलांना पर्शियन नावे प्राप्त झाली. या साऱ्यांमधून मूळ प्राचीन स्थलनामांचा शोध घेणे अत्यंत जिकिरीचे काम होऊन बसते.

प्राचीन स्थलनामांप्रमाणेच भारतातील आधुनिक स्थलनामांच्या उच्चारणाच्या बाबतीतहि प्रांतभेद, जातिभेद आणि भाषाभेदानुसार एकाच स्थलाची अनेक नावे प्रचारात दिसतात. उदा. एकाच दक्षिण भारतीय स्थलाचे तामीळ, तेलुगु, मल्याळम् आणि इंग्रजी भाषेतील उच्चार विभिन्न असून, त्यातहि पुन्हा या स्थलांच्या सरकारी दप्तरातील आणि लोकप्रचारातील नावांमध्ये तफावत दिसते. अर्वाचीन काळातील अनेक नावे संस्कृतप्रचुरतेचा बुरखा चढवून प्राचीनतेचा आभास निर्माण करतात. या साऱ्या समस्यांवर आधुनिक ग्रामनामांची शास्त्रशुद्ध प्रांतनिहाय ग्रामसूची करणे हाच एक उपाय आहे. तशा सूच्या बहुतांशी प्रांतात अद्यापहि उपलब्ध नाहीत. याबाबतीत गौरवास्पद अपवाद महाराष्ट्र राज्याचा असून, या राज्यामधील आधुनिक ग्रामनामांची प्रामाणिक, शास्त्रशुद्ध आणि सालेख सूची महाराष्ट्राचे भूतपूर्व जनगणनाधिकारी श्री. भुजंगराव कुलकर्णी, आय. ए. एस्. यांनी तयार केली आहे.

प्राचीन भारतातील भौगोलिक स्थलांच्या विभिन्न नामांतरांच्या या गलबल्यात सकृद्दर्शनी नामसादृश्याच्या आधारे केलेली प्राचीन-अर्वाचीन स्थलांची सांधमोड हास्यास्पद बनत असल्याचे सर अलेक्झांडर कनिंगहॅम यांच्या प्रारंभीच्या संशोधनीवरून दिसते. या विशिष्ट समस्येच्या सोडवणुकीसाठी अत्याधुनिक भाषाशास्त्रीय सिद्धांतांचे साह्य घेणे क्रमप्राप्त असल्याचे आता सिद्ध झाले आहे. प्राचीन ग्रंथांच्या कालक्रमाचा निश्चित आलेख डोळ्यासमोर असल्यास विशिष्ट स्थलाचे प्राचीनतम नाव कोणते आणि उत्तरकालीन अपभ्रष्ट रूप कोणते याचा उलगडा भाषाशास्त्राच्या दृष्टीने होऊ शकतो.

**अन्य स्थित्यंतरे** — नामांतराप्रमाणेच अन्य अनेक भौगोलिक, राजकीय आणि सांस्कृतिक स्थित्यंतरे भौगोलिक स्थलांच्या बाबतीत सदैव होत असतात. कालाच्या ओघात जातीजमाती संपूर्णपणे नष्ट होऊन त्यांचे नावहि बाकी रहात नाही. नद्यांच्या बदलत्या पात्रांमुळे जुनी गावे नष्ट होऊन नवी उदयास येतात. समृद्ध बंदरे अनेक कारणांनी स्थलांतरित होतात. या साऱ्या स्थित्यंतरांचा आलेख लक्षात न घेता केलेली भौगोलिक स्थाननिश्चिती पत्त्यांच्या बंगल्याप्रमाणे तकलादू बनते.

अशा तऱ्हेने प्राचीन भारतीय भूगोलाचा सांगाडा भाषाशास्त्राच्या साह्याने उभा राहू शकत असला, तरी देशाच्या इतिहासाशी संलग्न असणारे त्याचे रक्तमांस, आणि संस्कृतिधनाने परिपुष्ट होणारा त्याचा आत्मा भाषाशास्त्राच्या पुस्तकी पांडित्यातून गवसू शकत नाही. उदा० बिहारमधील राजगृह गावाच्या परिसरातील पाच टेकड्यांना इतिहासाच्या विभिन्न काळी विभिन्न नावे का प्राप्त झाली, याचे स्पष्टीकरण भाषाशास्त्र देऊ शकत नाही. त्यासाठी प्राचीन भारतीय साहित्य, उत्खननशास्त्र, शिलालेख, नाणी आदि इतिहाससंशोधनाच्या समस्त साधनांचें साह्य घ्यावे लागते. विशिष्ट स्थलाचा समग्र राजकीय आणि सांस्कृतिक इतिहास लक्षात घेतल्याखेरीज त्या स्थलाचे नाव, काल आणि महत्त्व यथायोग्यपणे समजत नाही, हे तत्त्व आज सर्वमान्य झाले असून, त्यामधूनच ऐतिहासिक आणि सांस्कृतिक भूगोल या नव्या शास्त्राचा उदय झाला आहे.

**कनिंगहॅम यांचे संशोधन**—प्राचीन ऐतिहासिक साधनांच्या भौगोलिक अध्ययनाची परंपरा भारतात सर अलेक्झांडर कनिंगहॅम (स. १८१४–१८९३) यांनी सुरू केली. त्यांचे पूर्वी कर्नल विल्फोर्ड यांनी या दिशेने अल्प प्रयत्न केले असले, तरी कनिंगहॅम यांनी प्राचीन भूगोलविषयक संशोधनाला प्रथमच देशव्यापी स्वरूप देऊन

' एन्शन्ट जिऑग्रफी ऑफ इंडिया ' ( स. १८७१ ) हा युगप्रवर्तक ग्रंथ लिहिला.

कनिंगहॅम यांच्या पूर्वीचे भारतातील प्राचीन भूगोल-विषयक संशोधन पढीक पुस्तकी पांडित्याच्या स्वरूपाचे असून, तत्कालीन विद्वानांना भारतीय स्थलांची अथवा त्या सभोवतालच्या भौगोलिक परिस्थितीची काहीच कल्पना नसल्याने त्यांचे हातून प्राथमिक स्वरूपाच्या हास्यास्पद चुका होत असत. उदा. मि. ट्रोयर यांच्या राजतरंगिणीच्या आद्य फ्रेंच अनुवादामध्ये भारतातील अनेक सामान्य वस्तुनामांना देशनाम म्हणून संबोधिले आहे ( व्हिएन्ना, ओरि. जर्नल, स. १८९८, पृ. ६७ ). याचे उलट भारतातील प्रांतिक, वांशिक आणि दैशिक मर्यादांचे, तसेच भौगोलिक परिस्थितीचे अवधान न ठेवता, केवळ नामसादृश्यावर अवलंबून राहिल्याने लॅसेनकृत ' इन्डिशे अल्टर्थुस्कुंदे ' ग्रंथातील संशोधन सदोष बनले आहे. राजतरंगिणीमध्ये निर्देशिलेली काश्मीरातील अनेक स्थले त्यांनी लाहोर, पूर्व अफगाणिस्तान, राजस्थान प्रांतात नेऊन सोडली आहेत ( उदा. लोहर देश = आधु. लाहोर; कंपना देश = पूर्व अफगाणिस्तान; लवन्य लोकसमूह = राजस्थानातील सांभर सरोवर ).

प्राचीन भौगोलिक संशोधकांच्या या पुस्तकी कार्यपद्धतीत आमूलाग्र क्रांती करून कनिंगहॅम यांनी ही सारी परिस्थिती बदलली. देशकालपरिस्थितीची साग्र माहिती आणि प्राचीन साहित्यातील विस्मृतप्राय, दुर्घट आणि दुर्गम भौगोलिक स्थलांचे प्रत्यक्ष निरीक्षण करण्याचा दुर्दम्य उत्साह या नव्या आयुधांनी त्यांनी भारतातील अनेक अज्ञात प्राचीन स्थलांवर नवा प्रकाश टाकला, आणि ह्युएन्त्संग, राजतरंगिणीमध्ये निर्देशिलेल्या अनेक प्राचीन स्थलांची ओळख सद्यःस्थितीच्या संदर्भात करून दिली. काश्मीरातील पुराणाधिष्ठान, ज्येष्ठेश्वर, मार्तंड, पद्मपुर, शंकरपुर ( आधु. पत्तन ), खोनमुश, तसेच त्या देशाच्या सरहद्दीवरील राजपुरी, वल्लापुर, चंपा, काष्ठवाट आदि स्थलांचा त्यांनी ह्युएन्त्संग, राजतरंगिणी आणि अल्बेरुणी यांमधील माहितीचा मेळ घालून शोध लावला. याचे उलट उपलब्ध प्राचीन भौगोलिक साहित्याच्या आधारे प्राचीन भारताचा परिपूर्ण राजकीय इतिहास लिहिण्याचा दुर्मिळ प्रयत्न डॉ. हेमचंद्र रॉयचौधरी यांनी ' पोलिटिकल हिस्टरी ऑफ एन्शन्ट इंडिया ' ( कलकत्ता युनिव्हर्सिटी, स. १९२७) ग्रंथात केला आहे.

**ऐतिहासिक भूगोल**— भूगोलशास्त्रज्ञांच्या दृष्टिकोनातून केलेल्या प्राचीन ऐतिहासिक साधनांच्या संशोधनाला, तसेच विभिन्न देशातील स्थलनामनिश्चितीला ' ऐतिहासिक भूगोल ' असे नवे नामाभिधान प्रो. ई. जी. टेलर यांनी सुचविले आहे. त्यांच्या मते भूगोलशास्त्राची उपलब्ध अध्ययनपद्धती ऐतिहासिक साधनसामुग्रीला लावणे हे ऐतिहासिक भूगोलशास्त्राचे प्रमुख उद्दिष्ट असून, प्राचीन भौगोलिक सफरींचा वृत्तांत, विभिन्न देशांच्या बदलत्या सरहद्दींचा इतिहास, तसेच भौगोलिक परिस्थितिजन्य ऐतिहासिक घटनांचे अध्ययन या साऱ्यांचा समावेश यामध्ये होतो.

प्रस्तुत ग्रंथात ऐतिहासिक भूगोलाची हीच व्यापक व्याख्या आम्ही स्वीकारली असून, प्राचीन भारतीय साहित्यातील ऐतिहासिक साधनांची भौगोलिक दृष्ट्या समीक्षा करून त्यामधून प्राचीन बृहत्तर भारताच्या भूगोलाचे साकल्याने दर्शन घडविण्याचा प्रयत्न आम्ही केला आहे. एका विराट इतिहासपरंपरेचा अंशभाग अशा प्राचीन भौगोलिक साधनांचे परिशीलन करीत असता प्राचीन भारताच्या इतिहासाच्या आणि संस्कृतीच्या अध्ययनास यावच्छक्य हातभार लावण्याचे व्यापक उद्दिष्ट आम्ही डोळ्यासमोर ठेवले आहे.

**ऐतिहासिक भूगोलाचे महत्त्व**—ऐतिहासिक भूगोलाध्ययन हा इतिहाससंशोधनाचा अविभाज्य भाग असल्याचे तत्त्व आज सर्वमान्य झाले आहे. बदलत्या भौगोलिक परिस्थितीमुळे इतिहासास अनेक वेळा नवे वळण लागत असून, डोळस भौगोलिक अध्ययनाने इतिहासाचे मर्म समजण्यासहि बहुमोल साह्य होते. भारतासदृश प्रदीर्घ इतिहासाच्या पुरातन देशात तर भौगोलिक अध्ययनावाचून इतिहाससंशोधनकार्य पुरे होऊच शकत नाही. भारतवर्षाच्या गेल्या ३००० वर्षांच्या इतिहासात अनेक राज्ये उदयास येऊन नष्ट झाली, अनेक धर्म उत्पन्न होऊन काळाच्या ओघात विलीन झाले, अनेक संस्कृती उत्पत्ती-स्थिती-लयाच्या निसर्गनियमानुसार उत्पन्न होऊन नाश पावल्या. या साऱ्या क्षणभंगुर आणि बदलत्या ऐतिहासिक चलच्चित्रांमध्ये चिरस्थायी आणि न बदलणारा एकच दुवा म्हणजे भारताचा प्राचीन भूगोल होय. जगातील नागरी संस्कृतीची आद्य जननी अशी सिंधु संस्कृती, वैदिक ऋचांच्या तालावर जन्मलेली आर्य संस्कृती, भारतातील पहिले साम्राज्य म्हणून सुविख्यात असणारे मौर्य साम्राज्य, तसेच सुजल-सुफल आर्यावर्ताची राखरांगोळी करणारी वायव्य भारतातील परदेशी

आक्रमणे आदींचे निरीक्षण सर्वसाक्षी स्थितप्रज्ञतेने करणारे हिमालयादि पर्वत आणि गंगा-सिंधु आदि नद्या हे खऱ्या अर्थाने भारताचे मानदंड आहेत. या अचल पर्वतांनी आणि नित्यप्रवाही नद्यांनी स्वत: अपरिवर्तनीय राहून सृष्टिचक्रनियमन करणाऱ्या नियतीप्रमाणे भारताचा इतिहास घडविला आहे. प्राचीन भारतीय भूगोलाचे हे गुह्यतम ज्ञान वाचकांना करून देण्याच्या प्रेरणेतून प्रस्तुत ग्रंथाची रचना झाली आहे. कारण अशा विचक्षण भौगोलिक अध्ययनातून भविष्यकालीन ध्येयधोरणांचे मार्गदर्शन मिळू शकेल अशी आमची श्रद्धा आहे.

संस्कृतींच्या उदयास्ताप्रमाणेच मनुष्यमात्रांचे व्यक्तिमत्त्व आणि स्वभावधर्म घडविण्यामध्येहि भौगोलिक परिस्थितीचा फार मोठा वाटा असतो. दक्षिण भारतातील धाडसी, कष्टाळू आणि काटक लोक आग्नेय आशियात भारतीय वसाहती स्थापितात, तर याचे उलट अतिसुबत्तेमुळे सुखासीन बनलेले उत्तर भारतीय लोक हरएक परदेशी आक्रमणापुढे मान तुकवितात, ही एकच गोष्ट भौगोलिक परिस्थितीमुळे एकाच देशातील लोकांमध्ये केवढा मोठा फरक पडतो हे दर्शविण्यास पुरेशी आहे.

शास्त्रीय संशोधनाच्या साह्याने निसर्गाचे नियमन करण्याचे कामी सध्या आपण पुष्कळ यश मिळविले आहे. तरी देखील उत्तर भारतातील नद्यांचे अनर्थकारी पूर, अथवा वरुणराजाच्या अवकृपेमुळे पडणारे देशव्यापी दुष्काळ याबाबतीत आपण पूर्वीइतकेच हतबल आहोत. भारताबाहेरील जगातहि कमीअधिक प्रमाणात हीच परिस्थिती आहे. मध्य आफ्रिकेतील वाळवंट, तसेच पश्चिम अमेरिका आणि आफ्रिका या देशांतील जमिनीची धूप आज प्रत्यही वाढत आहे. जगाची धान्यकोठारे म्हणून सुविख्यात असणाऱ्या कॅनडा, दक्षिण रशिया आदि देशातील पर्जन्यमान आज कमी होत आहे. या या साऱ्या नैसर्गिक आपत्तींचा जागतिक इतिहासावर काय परिणाम होईल, हे सांगणे कठीण आहे ( जिऑग्रफी बिहाइंड हिस्टरी, पृ. ११ ).

शास्त्रीय युगातील व्यक्तिमात्रांची निसर्गासमोरची ही अगतिकता पाहिली म्हणजे ज्या प्राचीन काळी मनुष्य निसर्गाचा गुलाम होता, त्या काळी भौगोलिक परिस्थितीचा व्यक्ती आणि राष्ट्रजीवनावर केवढा मोठा परिणाम होत असेल याची कल्पना येते, आणि प्राचीन ऐतिहासिक घटनामालिकेच्या दृश्य पटाआड बदलत्या नैसर्गिक परिस्थितीचा एक अदृश्य पट विणला असल्याची खात्री पटते.

अशा व्यापक दृष्टिकोनातून युरोपच्या प्राचीन इतिहासाचे अध्ययन करण्याचे अनेक प्रयत्न आजवर झाले असले तरी प्राचीन भारतीय इतिहासाच्या भौगोलिक अध्ययनाचे तसे प्रयत्न फारच क्वचित झाले आहेत. तसा अल्पसा प्रयत्न प्रस्तुत ग्रंथात आम्ही केला आहे.

# प्राचीन भौगोलिक अध्ययनाची साधने

## ( १ ) वैदिक–पौराणिक परंपरा

**वैदिक–पौराणिक परंपरा** — भारतीयांच्या ऋग्वेदादि वैदिक साहित्यापासून पौराणिक साहित्यापर्यंत प्राचीन भूगोलविषयक ज्ञानाच्या उत्क्रांतीची एक अखंड परंपरा आढळते. मध्य आशियातील भटक्या आर्य लोकांनी वायव्य भारत, पंजाब आणि गंगा नदीच्या खोऱ्यात, तसेच सिंधु आणि सरस्वती नद्यांच्या काठी आपल्या ग्रामीण वसाहती सर्वप्रथम स्थापिल्या, आणि त्यांच्या केंद्रबिंदूतूनच **'कृण्वन्तो विश्वमर्यम्'** ( सारे विश्व आर्य संस्कृतीमय बनवा ) या युयुत्सु घोषणेनुसार पूर्व भारत, मध्यभारत, आणि दक्षिण भारत अशा क्रमाने साऱ्या भारतात ते पसरले. हे वसाहतीकरण चालू असतानाच 'ग्राम' आणि 'पुर' ( दुर्ग ) निवासी कृषिप्रधान आणि ग्रामीण आर्य लोकांनी ब्राह्मण ग्रंथकाली नगरे आणि जनपदे यांनी युक्त नव्या नागरी संस्कृतीचा पाया घातला. प्रारंभी गंगा-यमुना नद्यांच्या दुआबाला उद्देशून उपयोजिलेली 'आर्यावर्त' ही संज्ञा उत्तरकालात साऱ्या भारत वर्षाला प्रयुक्त केली जाऊ लागली. महाभारतकाली भारतवर्षाच्या उत्तरेकडील मध्य आशियाचा प्रदेश भारतीय वसाहतकारांना ज्ञात झाला, आणि पौराणिक काली या भौगोलिक ज्ञानात उत्तरोत्तर भर पडून सप्तखंडात्मक सप्तद्वीपा पृथ्वीची कल्पना उत्क्रांत झाली.

**भौगोलिक ज्ञानाची उत्क्रांती** —भारतीय आर्यांच्या उपरोक्त वसाहतीकरणाशी संलग्न असे भारतवर्ष, आशियाखंड आणि जग यासंबंधीचे क्रमशः प्रगल्भ

भौगोलिक ज्ञान ऋग्वेदादि वैदिक साहित्य, ब्राह्मण ग्रंथादि ऋग्वेदोत्तर वैदिक साहित्य, वाल्मीकि रामायण, महाभारत आणि पुराणे यांमध्ये आढळते. वैदिक ज्ञानविज्ञान आणि संस्कृतीपरंपरेचा वारसा अभिमानाने मिरविणाऱ्या या साहित्यात प्राचीन भारतीय भूगोलविषयक ज्ञानाच्या उत्क्रांतीचे अखंड चित्रण दिसते. बौद्ध साहित्य, जैन साहित्य, मेगॅस्थिनेस, अरियन, प्लिनी, टॉलेमी आदि ग्रीक भूगोलकार, फाहियेन्, ह्युएन्त्संग, मार्को पोलो यांसारखे विदेशी प्रवासी; प्राचीन, मध्ययुगीन आणि अर्वाचीन शिलालेख साहित्य, विभिन्न स्थापत्यपरंपरा आदि साहित्यसंभारातून, तसेच अल्बेरुणी, अबुल फजल, इब्न बतूता यांसारख्या मुसलमान इतिहासकारांच्या इतिहासग्रंथांतून प्राचीन आणि मध्ययुगीन भारतीय भूगोलाची विपुल सामुग्री आढळत असली, तरी त्यामधील भौगोलिक ज्ञान हे विभिन्न धर्म आणि संस्कृतिपरंपरांशी संलग्न आणि म्हणूनच संकीर्ण स्वरूपाचे आहे. वैदिक परंपरेतील ग्रंथांचे पूरक साहित्य म्हणूनच केवळ त्याचा उपयोग होऊ शकतो.

**मर्यादा**—वैदिक-पौराणिक साहित्यातील प्रासंगिक स्वरूपाच्या भौगोलिक माहितीत परस्परविरोध, कल्पनारम्यता आणि अतिशयोक्ती हे दोष प्रकर्षाने आढळतात. शतकानुशतकांच्या कालमर्यादेत विभिन्न ग्रंथकारांनी लिहिलेल्या या साहित्यातील भारताच्या विभिन्न भागांचे ज्ञान एकसारखे दिसत नाही (उदा. वाल्मीकि रामायणातील दक्षिण भारताचे आणि महाभारतातील पूर्व भारताचे सदोष वर्णन). त्यामुळे या साहित्यातील भौगोलिक माहिती विचक्षणपणे पारखून घ्यावी लागते.

वैदिक आणि पौराणिक साहित्याचे काव्यमाध्यम हेहि अचूक आणि शास्त्रीय भौगोलिक माहिती नमूद करण्याच्या दृष्टीने निरुपयोगी आहे. अल्बेरुणीने म्हटल्याप्रमाणे छंदांच्या बेडीमध्ये जखडलेल्या काव्यमाध्यमात मोघम, निरर्थक आणि संशयास्पद अर्थाचे अनेक शब्द पादपूरणार्थ वापरावे लागतात. त्यामुळेच शास्त्रीय ग्रंथरचना काव्यमाध्यमात करण्याची भारती पद्धतीय अयोग्य वाटते (अल्बेरुणी, १·१८).

वैदिक आणि पौराणिक परंपरेच्या ग्रंथातील प्राचीन भौगोलिक माहितीचे आणि तत्संबंधीच्या उत्क्रांतीचे संक्षिप्त विवरण खाली दिले आहे.

**ऋग्वेदात**—भारतीय आर्यांच्या या प्राचीनतम धर्मसूक्तसंग्रहात साहसाची उपजत आवड आणि निसर्गसौंदर्याने बेभान होणारी काव्यात्म मनोवृत्ती ही आदर्श भूगोलकारास अत्यावश्यक गुणवैशिष्ट्ये प्रकर्षाने आढळतात. हरएक निसर्गचमत्कार, तसेच पृथ्वीमधील हरएक नदी, पर्वत अथवा वृक्ष यांमध्ये परमेश्वरी साक्षात्कार शोधण्याच्या भारतीय मनोवृत्तीचा मूलारंभ या ग्रंथात असून, त्यामुळेच प्रतिपाद्य ऐतिहासिक घटनांची पार्श्वभूमी म्हणून केलेले त्यामधील भौगोलिक वर्णन महत्त्वपूर्ण बनले आहे.

विभिन्न नैसर्गिक चमत्कारांचे देवता म्हणून स्तवन करणाऱ्या या ग्रंथात (इ. स. पू. २०००) इंद्र-वृत्र युद्ध, दिवोदास-शंबर युद्ध, कुत्स-शुष्ण युद्ध, सुदासकृत दाशराज्ञ युद्ध, वैदिक ऋषिमंडळातील पूर्वजांचे पराक्रम, आर्य लोकांचा इतिहास, पण्यापहृत धेनूंचे अंगिरसकृत विमोचन आदि ऐतिहासिक घटनांचे वर्णन आढळते. या वर्णनाच्या ओघात भारतवर्षातील, तसेच भारतवर्षाबाहेरील विभिन्न देशांची निसर्गवैशिष्ट्ये, भौगोलिक परिसीमा, त्यांमधील लोकसमूह यांचे प्रासंगिक वर्णन, तसेच पृथ्वी, अंतरिक्ष, समुद्र यांच्या प्राकृतिक भूगोलासंबंधीचे सिद्धांतहि तेथे संग्रहित केले आहेत.

या प्रासंगिक भूवर्णनासमवेतच जगदुत्पत्तिशास्त्रासंबंधीचे (कॉस्मोगॉनी) काही महत्त्वपूर्ण सिद्धांतहि ऋग्वेदात असून, ते मूलाधार मानूनच पौराणिक साहित्यातील जगदुत्पत्तीचे, तसेच सप्तद्वीपा पृथ्वीचे भौगोलिक वर्णन (कॉस्मोग्राफी) केलेले आढळते. ऋग्वेदातील जगदुत्पत्तीविषयक सिद्धांतांचे सविस्तर समालोचन आम्ही जगदुत्पत्तीसंबंधीच्या उपविभागात स्वतंत्रपणे केले आहे. या जगदुत्पत्तिसिद्धांताचा अंगभूत भाग म्हणून वादळी वारे, मेघ आणि पर्जन्यवृष्टी आदींची कारणमीमांसा, सूर्य-चंद्रादि ग्रहांची परिभ्रमणे, ऋतुचक्र, दिवसरात्र, सूर्यचंद्रांची ग्रहणे आदि नैसर्गिक चमत्कारांचे मूलगामी विवरणहि ऋग्वेदात आढळते.

**देशविभाग**—ऋग्वेदात सुचविलेली भारताची देशविभाजनपद्धती त्यामधील जगदुत्पत्तीच्या सिद्धांताइतकीच महत्त्वाची आहे. देशाच्या सीमा भूगोलकाराच्या फूटपट्टीने, नकाशावरील उभ्या-आडव्या अक्षांश-रेखांशांनी, अथवा सम्राटांच्या तलवारींनी पडत नसून, सांस्कृतिक दृष्ट्या एकात्म अशा लोकसमूहांच्या वसाहतींनी बनत असल्याचा मूलभूत भौगोलिक सिद्धांत ऋग्वेदातच आढळतो. तत्काली ज्ञात असणाऱ्या भारतवर्षाच्या वायव्य-भारत, पंजाब आणि गंगा-यमुना खोरे विभागांचे लोक-

समूहात्मक विभाजनहि तेथे आढळते ( भारतवर्षाचे जनपदात्मक विभजन पहा ).

**पर्वत–नद्या**—वयव्य भारत, पंजाब आणि गंगा-यमुना खोरे प्रदेशातील लोकसमूहांशी संबंधित हिमवंत ( ऋ. १०·१२१·४ ) आणि मुंजवत् ( ऋ. १०·३४·१ ) पर्वतांचा, तसेच निम्नलिखित नद्यांचा निर्देश ऋग्वेदात आढळतो :—१. गंगा; २. यमुना; ३. सरस्वती; ४. शुतुद्री; ५. परुष्णी; ६. असिक्नी; ७. मरुद्वृधा; ८. वितस्ता; ९. आर्जिकीया; १०. सुषोमा; ११. सिंधु; १२. त्रिष्टामा; १३. सुसर्तु; १४. रसा; १५. श्वेत्या; १६. कुभा; १७. गोमती; १८. क्रुमु; १९. मेहत्नु; २०. सरयू; २१. दृषद्वती ( ऋ. ५·५३·९; १०·६४·६; ७५·५–६ ). या नद्यांपैकी दृषद्वती, गंगा आणि यमुना नद्यांचा निर्देश ऋग्वेदात फक्त एकदाच आढळतो. त्यावरून ऋग्वेदकार या नद्यांशी कमी परिचित असावेत.

उपरोक्त नद्यांचे एकूण तीन उपविभाग ऋग्वेदात कल्पिले असून ( ऋ. १०·६४·९ ), सरस्वती ( ऋ. १०·७५·५ ), सिंधु ( ऋ. १०·७५·६ ), आणि सरयू ( ऋ. ५·५३·९ ) नद्यांना त्यांचे प्रमुख मानले आहे. पौराणिक साहित्यातहि उत्तर भारतातील नदीनामांचा हाच क्रम कटाक्षाने कायम ठेवला आहे.

**वसाहतीकरण**—मानवी वसाहतीकरण आणि नैसर्गिक परिस्थिती यांच्या परस्परसंबंधांबाबत ऋग्वेदात मूलगामी विचार प्रकट केले असून, निसर्गाचा वरदहस्त प्राप्त करण्यासाठी करावयाच्या उपाययोजनांना तेथे यज्ञप्रक्रियेचा भाग मानले आहे. भूगर्भातील धन मनुष्यप्राण्याला उपलब्ध करून देणारी कृषिविद्या, पशुसंवर्धन, भूमिसिंचक कालवे, तसेच मानवी जीवनाला स्थैर्य आणि समृद्धी प्रदान करणारे उद्योगधंदे, वाहतूक, घरे आणि वसाहती, आहारशास्त्र, कपडे, व्यक्तिमात्रातील सामाजिक संबंध यांचा परामर्श या ग्रंथात घेतला आहे. तेथे सूत्ररूपाने कथन केलेल्या आद्य तत्त्वांचे विकसित स्वरूप उत्तरकालीन पौराणिक साहित्यात आढळते,

**हवामान**—ऋग्वेद सूक्तकारांच्या निसर्गासंबंधीच्या अभिजात चौकस वृत्तीचा परिपाक त्यांच्या हवामानविषयक सिद्धांतातहि दिसतो. ऋग्वेदमते पृथ्वीसभोवतीच्या हवापटलाचे ( रजस् ) ‘ दिव्य ’, ‘ अंतरिक्षीय ’ आणि ‘ पार्थिव ’ ( ऋ. ४·५३·३ ); अथवा ‘उत्तम’ ( उत्स ), ‘परम’, आणि ‘गुह्य’ असे तीन ( ऋ. १०·४५·२-३ ) उपविभाग असून, त्यांमध्ये भ्रमण करणाऱ्या आकाशीय वायूचे गतिभेदानुसार वायु, मरुत् आणि रुद्र हे तीन प्रकार बनतात. ऋग्वेदातील हवापटलासंबंधीची ही उपपत्ती आधुनिक हवामानशास्त्रीय हवापटलस्तरांच्या सिद्धांतांशी तंतोतंत जुळते. पर्जन्यवृष्टीची कारणे, मेघांचे विभिन्न प्रकार, तसेच हवामानभेदानुसार पडणारे पृथ्वीचे विभिन्न उपविभाग यांचे सूत्रमय विवरणहि ऋग्वेदात आढळते. पौराणिक साहित्यकाली या बाबतीत फारच थोडे नवे संशोधन झाले असून, तेथे वैदिक साहित्यातील माहितीच पुनरावृत्त आढळते.

**ऋग्वेदोत्तर वैदिक साहित्यात**— यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद हे तीन वेदग्रंथ, तसेच ब्राह्मण, आरण्यक, उपनिषद् आणि कल्पसूत्र या अन्य ऋग्वेदोत्तर वैदिक साहित्यापैकी अथर्ववेद, ब्राह्मण आणि सूत्रग्रंथातील भौगोलिक निर्देश महत्त्वाचे असून, उत्तरकालीन पौराणिक साहित्यात त्यांचे पडसाद आढळतात. नागरी संस्कृतीची प्रतिष्ठापना हे या काळाचे प्रमुख वैशिष्ट्य आहे ( भारतवर्षातील नगरे आणि ग्रामे उपविभाग पहा ).

**खगोलशास्त्रीय सिद्धांत**—पृथ्वीचा आकार, सूर्य–चंद्रादि ग्रहांचे गतिचक्र, सूर्य आणि विषुववृत्त यांचा परस्परसंबंध, चंद्रकलांची वृद्धी आणि क्षय, दिग्देवता, दिवसरात्र, वर्ष आणि काल यांची परिमाणे यांसंबंधीचे मूलभूत सिद्धांत ऋग्वेदोत्तर वैदिक साहित्यात असून, त्याचेच विकसित आणि विस्तारित रूप पौराणिक साहित्यात आढळते.

**पर्वत**—ऋग्वेदातील हिमवंत आणि मुंजवत् पर्वतांच्या जोडीला तैत्तिरीय आरण्यक आणि कल्पसूत्रात ‘ महामेरु ’ या नव्या पर्वताचा निर्देश असून, उत्तरकालीन पौराणिक साहित्यातील सप्तद्वीपा पृथ्वीची आणि तीमधील पर्वतांची मांडणी या पर्वतास पृथ्वीचा केंद्रबिंदू मानून केली आहे. अथर्ववेद आणि शतपथ ब्राह्मणात ‘ नावप्रभ्रंशन ’ नामक पर्वताचा निर्देश पृथ्वीवरील जलप्रलयाच्या संदर्भात केला असून ( अ. वे. १९·३९·८; श. ब्रा. १·८·१–१० ), मैत्रायणी संहिता आणि काठक संहितांमध्ये त्रिशिखरयुक्त ‘ त्रिककुभ ’ ( अथर्ववेद, शतपथ ब्राह्मण–‘ त्रिककुंद् ’ ) पर्वताचा निर्देश आढळतो.

तैत्तिरीय आरण्यकात मैनाक आणि क्रौंच पर्वतांचा निर्देश असून, दक्षिण भारतातील पर्वताचा ( विंध्य पर्वत ) निर्देश सर्वप्रथम कौषीतकि उपनिषदात आढळतो ( कौ. उ. ११·१३ ). वसिष्ठ धर्मसूत्रामध्ये आणि मनुस्मृतीमध्ये विंध्य पर्वताचा सुस्पष्ट निर्देश प्रथमच आढळत असून

( व. ध. १·९; मनु. ११·२१ ), कल्पसूत्रमते तत्कालीन आर्य देशाची दक्षिण परिसीमा पारियात्र पर्वताने बनली होती.

**नद्या**—संहिता आणि उपनिषद्साहित्यात ऋग्वेदातील नदीनामावलीस नवा शास्त्रशुद्धपणा आणला असून, शतपथ ब्राह्मण आणि ऐतरेय ब्राह्मणात भारतातील पश्चिमवाहिनीं सात नद्यांची, आणि बृहदारण्यक उपनिषदात भारतातील पूर्ववाहिनी नद्यांची नामावली आढळते. अथर्ववेद आणि शतपथ ब्राह्मण यांमध्ये वारणावती ( अ. वे. ४·७·१ ) आणि सदानीरा ( आधु. गंडक; श. ब्रा. १·४·१·१४ ) या नव्या नद्यांचा निर्देश प्रथमच आढळतो.

**पाणिनीय व्याकरण साहित्यात**—लौकिक संस्कृत भाषेचा सुविख्यात व्याकरणकार पाणिनि याने लिहिलेली 'अष्टाध्यायी' ( इ. स. पू. ५०० ) हा संस्कृत भाषेचा श्रेष्ठतम व्याकरणग्रंथ असून, त्यामध्ये तत्कालीन भारतातील विभिन्न देश, पर्वत, समुद्र, वने, नद्या, जनपदे, नगरे, ग्रामे आदि सुमारे ५०० भौगोलिक स्थानांची अत्यंत बारकाईने आणि शास्त्रीय पद्धतीने नोंद आढळते. या ग्रंथावरील काशिका, न्यास, पदमंजरी आदि वृत्ति, कात्यायनाचे वार्तिक, पतंजलीचे व्याकरणमहाभाष्य, तसेच भर्तृहरि, कैयट, नागेश आदींचे भाष्यग्रंथ यामुळे या ग्रंथाची उपयुक्तता वाढली असून, वेदोत्तरकालीन आणि पुराणपूर्वकालीन ( इ. स. पू. ५०० ) भारतीय इतिहासाचा आणि भूगोलाचा श्रेष्ठतम प्रमाणग्रंथ तो मानला जातो. या काळातील भूगोलाची इतकी शास्त्रशुद्ध माहिती अन्य कोणत्याहि ग्रंथात आढळत नाही.

**अष्टाध्यायी**—पाणिनीच्या या आठ अध्यायांच्या आणि बत्तीस 'पादां'च्या ( उपअध्याय ) ग्रंथात एकूण ३९९५ सूत्रे, तसेच 'अइउण' आदि चौदा माहेश्वर सूत्रे आहेत. लौकिक संस्कृत भाषेस व्याकरणबद्ध करण्याच्या उद्देशाने पाणिनीने लिहिलेल्या 'अष्टाध्यायी'त संस्कृत भाषेची भौगोलिक मर्यादा वायव्य भारतातील गंधार देशापासून आसाम ( सूरमस ) देशातील सरमा नदीपर्यंत आणि उत्तरेकडील कश्मीर-कांबोज देशांपासून दक्षिण भारतातील गोदावरी नदीकाठच्या अश्मक देशापर्यंत मानली आहे. वायव्य भारतातील सिंधु नदीकाठच्या शलातुर गावी जन्मलेल्या पाणिनीला सुदूरवर्ती सूरमस, कलिंग, अश्मक, कच्छ, सौवीर देशांचे, तसेच तेथील शासनपद्धतीचे आणि लोकसमूहाचे सूक्ष्म ज्ञान होते, ही एकच गोष्ट तत्कालीन भारताच्या प्रगल्भ सांस्कृतिक अवस्थेची द्योतक मानावी लागेल.

**शुद्ध पाठ**—दोन हजार पाचशे वर्षांच्या दीर्घ कालावधीनंतरहि पाणिनीच्या 'अष्टाध्यायी'चा शुद्धतम पाठ, तसेच तिचा शब्दार्थ आज उपलब्ध होतो. वैदिक संहितांचा अपवाद वगळता या ग्रंथाइतका शुद्ध पाठ प्राचीन साहित्यात अन्यत्र आढळत नाही. शब्दप्रामाण्याइतकाच अर्थप्रामाण्यावरहि पाणिनीय परंपरेचा कटाक्ष असल्याने अनेक ठिकाणी दुर्बोध आणि विवाद्य अर्थाच्या वैदिक संहितेतूनहि इतिहाससाधन या नात्याने अष्टाध्यायीचे महत्त्व अधिक मानण्यात येते.

**पाणिनीच्या अष्टाध्यायीत**— या ग्रंथात भारतवर्षातील सुमारे ४८ जनपदे, ७ पर्वत, ११ नद्या, ६ वने, आणि ४४ ग्रामांचा निर्देश आढळतो. महाभारत आणि पौराणिक साहित्यातील भौगोलिक स्थलनामांचा सर्वाधिक शुद्ध पाठ या ग्रंथात आढळत असल्याने प्राचीन स्थलनामांच्या नामनिश्चितीच्या दृष्टीने या नामावलीचा अतिशय उपयोग होतो. या माहितीपैकी जनपदनामावलीसंबंधीची सूत्रे सर्वाधिक महत्त्वाची असून, महाभारत आणि बौद्ध साहित्यनिर्दिष्ट महाजनपदकालीन भारतवर्षावर ( इ. स.पू. १०००–५०० ) त्यायोगे महत्त्वपूर्ण प्रकाश पडतो. तत्संबंधीचे सविस्तर विवरण जनपदात्मक भारतवर्षाच्या स्वतंत्र विभागात आम्ही केले आहे.

**अष्टाध्यायीचे पुनरुत्थान**— केवळ शब्दसिद्धीच्या दृष्टीने पाणिनीय व्याकरणाचे अध्ययन करण्याची परंपरा अगदी अलिकडच्या काळापर्यंत रूढ होती. अष्टाध्यायीचे ऐतिहासिक आणि सांस्कृतिक दृष्टीने अध्ययन केले असता इ. स. पू. ६ व्या शतकातील भारतीय इतिहासावर आणि लोकजीवनावर महत्त्वपूर्ण प्रकाश पडू शकेल, हे तत्त्व कै. डॉ. वासुदेवशरण आग्रवाल यांनी सर्वप्रथम प्रस्थापित केले. त्यांनी लिहिलेला 'पाणिनिकालीन भारतवर्ष' हा ग्रंथ या विशिष्ट दृष्टीने अद्वितीय मानला जातो. पाणिनीय व्याकरणातील वायव्य भारत आणि पंजाब प्रदेशातील स्थलांचे, तसेच तत्कालीन ग्रीक आणि पौराणिक साहित्यातील स्थलांशी त्यांच्या साधर्म्याचे शास्त्रशुद्ध विवेचन या ग्रंथात आढळते.

**पाणिनीच्या गणपाठात**— कालदृष्ट्या पाणिनीच्या अष्टाध्यायीहून पूर्वकालीन ( पतञ्जलि. १·३४ ), परंतु परंपरेने पाणिनीच्या अष्टाध्यायीच्या अंगभूत अशा

या ग्रंथात विशिष्ट व्याकरणशास्त्रीय नियम लागू पडणाऱ्या विभिन्न शब्दांचे आणि संज्ञांचे संकलन आढळते.

या ग्रंथात ६४० भौगोलिक स्थलनामांचा निर्देश असून, त्यामध्ये ३५ जनपदे, ४३ विषय ( राज्यविभाग ), ३३ संघ ( लोकसमूह ), २४ पर्वत, वने व नद्या, आणि ५०५ ग्रामे व नगरे यांचा समावेश आढळतो. यापैकी एकट्या 'चातुरार्थिक' आणि 'संकलादि' गणद्वयामध्ये २३९ आणि ३२ ग्रामांचा निर्देश असून, पाणिनीच्या अष्टाध्यायीतील निम्नलिखित बारा सूत्रांमध्ये गणपाठातील या स्थलनामांचा सूत्रमय भाषेत निर्देश आढळतो :–१. संकल (४.२.७५); २. सुवास्तु ( ४.२.७७ ); ३. चातुरार्थिक ( ४.२.८० ); ४. वरण ( ४.२.८२ ); ५. उत्कर ( ४.२.९० ); ६. नड ( ४.२.९१ ); ७. कत्रि ( ४.२.९५ ); ८. नदी ( ४.२.९७ ); ९. काशि ( ४.२.११६ ); १०. धूम ( ४.२.१२७ ); ११. कर्की ( ६.२.८७ ); १२. चिहण ( ६.२.१२५ ).

पाणिनीच्या गणपाठातील ५०५ ग्रामांपैकी बहुतांशी सारी ग्रामे पश्चिमेस वक्षु नदी आणि पूर्वेस यमुना नदी यांच्या दरम्यानच्या वायव्य भारतान्तर्गत 'वाहीक' ( आधु. पंजाब ) आणि 'उत्तरापथ' ( आधुनिक वायव्य भारत ) देशातील असून, त्यानंतरच्या सिकंदरकालीन ग्रीक साहित्यातील ( इ. स. पू. ३ रे शतक ) वायव्य भारतान्तर्गत ग्रामसंख्येशी ती तंतोतंत जमते. स्ट्रॅबोच्या मते झेलम आणि बियास नद्यांच्या खोऱ्यातील मालव, क्षुद्रक आदि नऊ विशाल देशांमध्ये ५०० मोठी नगरे असून, मेगॅस्थिनेसच्या मते त्यापैकी एकट्या अभिसार ( ग्रीक–ग्लुचुकायन ) देशात ५–१० हजार लोकसंख्येची सुमारे ३७ नगरे होती.

महाभारत, पुराणादि संस्कृत ग्रंथकारांना अज्ञात अशा वायव्य भारत आणि पंजाबातील ग्रामनामांचा विशुद्ध संस्कृत पाठ पाणिनीच्या गणपाठात आढळत असल्याने इ. स. पू. १०००–५०० काळातील वायव्य भारत आणि पंजाबच्या प्राचीन भूगोलाच्या दृष्टीने त्याचे महत्त्व अद्वितीय मानले जाते. त्यामधील अनेक ग्रामे भौगोलिक दृष्ट्या अद्याप अज्ञात असली, तरी उत्खननादि संशोधनाने त्यांची ओळख यथावकाश पटू शकेल. काशिका, चंद्र, जैनेंद्र, शाकटायन, कातंत्र, वर्धमान, भोज, हेमचंद्र, आदींच्या उत्तरकालीन भाष्यग्रंथांच्या तुलनात्मक अध्ययनाने डॉ. अग्रवाल यांनी सिद्ध केलेला पाणिनीच्या गणपाठातील स्थलनामांचा संशोधित पाठ प्रस्तुत ग्रंथात आम्ही उपयोजिला आहे.

**पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यात** — पाणिनीच्या अष्टाध्यायीच्या या सुविख्यात भाष्यग्रंथात ( इ. स. पू. २०० ) शास्त्रशुद्ध भौगोलिक ज्ञानाची पाणिनीय परंपरा पुढे चालविली आहे. या ग्रंथकाली शक-यवनांच्या आक्रमणामुळे वायव्य भारतातील बाह्लीक आणि गंधार देश राजकीय आणि सांस्कृतिक दृष्टीने भारतापासून विलग झाल्यामुळे ते तेथे आर्यावर्ताच्या आणि प्रौढ संस्कृत भाषेच्या सीमेबाहेरचे मानले आहेत. पतंजलीच्या काळी आर्यावर्ताची सीमा पश्चिमेस आदर्श पर्वत आणि पूर्वेस कालकवन अशी म्हणजे पाणिनिकालीन आर्यावर्ताहून खूपच संकुचित झाली होती ( पतञ्जलि. १.४७५; ३.१७४ ).

**कौटिलीय अर्थशास्त्रात** — मेगॅस्थिनेसच्या 'इंडिका' ग्रंथाशी समकालीन ( इ. स. पू. ३०० ) अशा या राजनीतिशास्त्रविषयक ग्रंथात राज्यसंपादन आणि राज्यसंचालनाशी संबंधित ( अर्थशास्त्र ) परराष्ट्रीय, युद्धशास्त्रीय, आर्थिक, व्यापारी, न्यायविषयक विषयांचा परामर्श आढळतो. ग्रामाची आणि राज्यविभागाची स्थापना, किल्ल्याची बांधणी, किल्ल्यामधील विभिन्न इमारती आदि भौगोलिक विषयांची मूलगामी चर्चाहि तेथे आढळते. या ग्रंथात चर्चिलेले प्रमुख राज्यशास्त्रविषय पुढीलप्रमाणे होत :–१. विनयाधिकारिक ( राजाचे आदर्श आचरण ); २. अध्यक्षप्रचार ( सरकारी अधिकाऱ्यांचे कर्तव्य ); ३. धर्मस्थीय ( न्यायविधी ); ४. कंटकशोधन ( राज्याची अंतर्गत सुव्यवस्था ); ५. योगवृत्त ( फितुरीचा बंदोबस्त ); ६. मंडलयोनि ( राजा, अमात्य आदि प्रकृतींची गुणवैशिष्ट्ये ); ७. षाड्गुण्य ( परराष्ट्रीय राजकारण ); ८. व्यसनाधिकारिक ( राजाच्या व्यसनांचा प्रतिकार ); ९. अभियास्यत्कर्म ( युद्धसिद्धता ); १०. सांग्रमिक ( युद्धशास्त्र ); ११. संघवृत्त ( राज्यातील विभिन्न संघटना ); १२. आबलीयस ( बलाढ्य शत्रूंचा प्रतिकार ); १३. दुर्गलंभोपाय ( दुर्गविजय ); १४. औपनिषदिक ( गुप्तचर विद्या ); १५. 'तंत्रयुक्ति ( राज्यशासनतंत्र' ).

राजा, अमात्य, राजपुरुष, आदींपासून कोष्टी, धोबी, गुलाम आदि समाजाच्या हर स्तरातील व्यक्तींच्या आचारविचारांचे या ग्रंथांत दिलेले नियम सर्वसामान्यजनांसाठी 'चाणक्यसूत्रे' नामक अन्य एका ग्रंथात संक्षेपाने ग्रथित केले आहेत.

या ग्रंथाची भाषाशैली आपस्तंब, बौधायन सूत्रांसदृश असून त्यामधील 'प्रकृति' ( सम्राट ), 'युक्त' ( सरकारी अधिकारी ), 'तत्पुरुष' ( सेवक ), 'अयुक्त'

( बिनसरकारी अधिकारी ) आदि संज्ञा अशोक शिलालेखासदृश आणि पाणिनीय व्याकरणपूर्वकालीन आहेत. राज्यातील साऱ्या भूमीचे स्वामित्व राजाकडे असून, तिच्या उपभोगाचा अधिकार तो प्रजेस देत असल्याची या ग्रंथातील विचारसरणी मेगॅस्थिनेसच्या ' इंडिका ' सदृश आहे.

वात्सायनाचे कामसूत्र, तसेच विशाखदत्त, दंडिन्, बाण आदींच्या ग्रंथात, तसेच मल्लिनाथ, मेधातिथि आदींच्या भाष्यग्रंथात या ग्रंथातील अनेक उतारे उद्धृत केले असून, दशकुमार चरितमते तत्कालीन राजकुमारांच्या पाठ्यपुस्तकात त्यांचा समावेश होत असे.

**वात्स्यानाच्या कामसूत्रात**—या ग्रंथातील ( स. ३०० ) कामपुरुषार्थाचे आचारशास्त्र, शृंगाररसशास्त्र आणि भारताच्या विभिन्न देशविभागातील कामशास्त्रविषयक आचारविचार या तीन उपविभागांपैकी (उपाधी), तिसऱ्या भागात अवंती, मालव, अपरांत, सौराष्ट्र, महाराष्ट्र, आंध्र आदि पश्चिम आणि दक्षिण भारतातील कामशास्त्रीय आचारविचारांचे, आणि ' ईश्वरकामित ' ( सम्राटांची भोगतृष्णा ) नामक अध्यायात आंध्र राजांचे वर्णन आढळते. या ग्रंथातील ' नागरकवृत्त ' नामक अध्यायात ' नागर ' नामक नगराचा निर्देश असून, यशोधरभाष्यमते येथे पाटलिपुत्राचा आणि अन्य अभ्यासकांच्या मते राजस्थानमधील नगर नावाचा निर्देश अभिप्रेत आहे.

**वाल्मीकि रामायणात**—ब्राह्मण ग्रंथांच्या पूर्वकालीन ऐतिहासिक कथाभाग ग्रथित करणारा हा ग्रंथ रचनादृष्ट्या त्या साहित्याहून खूपच उत्तरकालीन आहे. त्यामधील वाल्मीकिविरचित भाग ( अयोध्या, अरण्य, किष्किंधा, सुंदर आणि युद्धकांड ) महाभारताच्या आद्य मध्यवर्ती भागापेक्षा पूर्वकालीन असला, तरी त्याच्या उपलब्ध प्रक्षिप्त संस्करणात महाभारतातील बराच भाग पुनरुद्धृत आढळतो ( उदा. अयोध्या कांडातील अ. १०० = महाभारत सभापर्व. अ. ५ ).

**रामायणकालीन जग**—या ग्रंथातील नद्या-पर्वतांच्या, तसेच काशी, अयोध्या, हिमालय, गंगा, चित्रकूट आदि भौगोलिक स्थलांच्या वर्णनावरून रामायणकालीन ज्ञात जग आग्नेय आशियाच्या भूप्रदेशापुरते मर्यादित दिसते. तत्संबंधी सविस्तर विवरण प्रास्ताविकातील सप्तद्वीपा पृथ्वीच्या विभागात आम्ही केले आहे.

**रामायणकालीन भारतवर्ष**—या ग्रंथातील ' राम–वालिन् संवाद ' मते रामायणकालीन या ज्ञात पृथ्वीवर ( भारतवर्ष ), तसेच तीमधील अरण्यपर्वतांवर इक्ष्वाकु राजांचे राज्य होते. या ग्रंथातील 'दशरथ-कैकेयी संवादा'त ( वा. रा. अयो. १०.३८१ ) इक्ष्वाकु साम्राज्यातील निम्नलिखित देशांचा निर्देश आढळतो:––१. सिंधु; २. सौवीर; ३. सौराष्ट्र; ४. दक्षिणापथ; ५. वंग; ६. अंग; ७. मगध; ८. काशि; ९. कोसल. या प्रदेशावरील इक्ष्वाकु राजांचे राज्य एकसत्ताक पद्धतीचे नसून, चक्रवर्ती सार्वभौमत्वाच्या स्वरूपाचे असावे.

दशरथाच्या राजसूय यज्ञसमयी वसिष्ठ ऋषींनी उत्तर भारतातील मिथिला, काशि, केकय, अंग, सिंधु, सौवीर देशांना, तसेच दक्षिण भारतातील काही राजांना पाचारिले होते ( वा. रा. बा. १३·१८ ). रामाच्या यौवराज्याभिषेकाच्या वेळी दशरथाने भारताच्या पूर्व, उत्तर, पश्चिम आणि दक्षिण भागातील राजांना आमंत्रिले होते ( वा. रा. अयो. ३·२४ ). भारताच्या विभिन्न भागांची वाल्मीकि रामायणातील ही सारी माहिती अत्यंत त्रुटित, भौगोलिक दृष्ट्या अनिश्चित आणि काही अभ्यासकांच्या मते प्रक्षिप्त स्वरूपाची आहे.

विश्वामित्र ऋषींनी रामलक्ष्मणांसमवेत केलेल्या अयोध्या-मिथिला प्रवासाच्या संदर्भात उत्तर प्रदेशातील अयोध्या आणि उत्तर बिहारमधील सिद्धाश्रम आणि मिथिला यांच्या दरम्यानच्या भौगोलिक स्थलांचे रेखीव वर्णन आढळते. याचे उलट रामाच्या यौवराज्याभिषेकसमयी भरताने केकय ( आधु. पंजाब ) देशातील गिरिव्रज या आजोळच्या गावाहून अयोध्येप्रत केलेल्या प्रवासाच्या संदर्भात केकय-अयोध्या मार्गावरील वायव्य भारतातील जनपदांचे आणि भौगोलिक स्थलांचे वर्णन आढळते.

रामाच्या वनवासकाली अयोध्या→चित्रकूट ( अलाहाबादच्या ६० मैल नैर्ऋत्येस )→दंडकारण्य→पंपा→किष्किंधा→लंका( आधु. सिलोन ) अशा मार्गाने त्याने केलेल्या प्रवासाच्या वर्णनात उत्तर आणि दक्षिण भारतातील अनेक भौगोलिक स्थानांचे वर्णन आढळते. याच्या उलट रावणाने रथमार्गाने केलेल्या लंका-मारीच-आश्रम प्रवासवर्णनात दक्षिण भारतातील अनेक राज्यांचा निर्देश आढळतो.

रामायणातील उपरोक्त भौगोलिक वर्णनांपैकी उत्तर भारतातील स्थलवर्णन बरेचसे यथातथ्य असले तरी दक्षिण भारताच्या द्वीपकल्पीय भागाचे वर्णन सांगोवांगी स्वरूपाचे, सदोष आणि चुकीचे दिसते. उदा. या ग्रंथमते राम दंडकारण्यातून महेंद्र पर्वतालगतच्या लंकेस गेला. वस्तुतः महेंद्र पर्वत आणि सिलोन यांमध्ये शेकडो मैलांचे

अंतर आहे. अशी यांच्या मते विंध्य आणि महेंद्र पर्वतांना परस्परसंलग्न मानण्याची चूक वाल्मीकि ऋषींनी येथे केली आहे. उत्तर आणि दक्षिण भारतांना जोडणारा विंध्य पर्वतीय मार्ग, पंचवटी-पंपासरोवर मार्ग, तसेच लंका आदींची या ग्रंथातील वर्णनेहि कल्पनारम्य स्वरूपाची आहेत.

रामायणकालीन भौगोलिक स्थलांचा सविस्तर परामर्श एन्. दास यांच्या 'जिऑग्रफी ऑफ एशिया बेस्ड् ऑन रामायण' या ग्रंथात घेतला असून, रामाच्या वनवास-मार्गाचे भौगोलिक विवेचन पार्गिटर यांनी केले आहे (जे. आर. ए. एस्. स. १८९४; पृ. २३१).

महाभारतात—चतुर्वेदांचे सार जनसामान्यांना कथन करण्याच्या प्रतिज्ञेतून लिहिलेला हा ग्रंथ खऱ्या अर्थाने प्राचीन भारतीय ज्ञानविज्ञान, तसेच सांस्कृतिक, नैतिक आणि धार्मिक शिक्षणाचा ज्ञानकोश आहे. सकृद्दर्शनी महाकाव्य स्वरूपात लिहिलेल्या या ग्रंथात शतकानुशतकातील विभिन्न ग्रंथकारांच्या काव्यरचनांचा समावेश आढळतो. महाभारताच्या १८ पर्वांची एकूण श्लोकसंख्या १ लाखापेक्षा अधिक असून, या ग्रंथाच्या उपसंहारभूत हरिवंशात सुमारे १६००० श्लोक आहेत. या ग्रंथाची कलकत्ता, मुंबई आणि कुंभकोणम् अशी तीन संस्करणे उपलब्ध असून, त्याची संशोधित आवृत्ती पुण्याच्या भांडारकर इन्स्टिट्यूटने स. १९६७ मध्ये प्रकाशित केली आहे.

पूर्वकालीन अन्य ग्रंथांच्या तुलनेने महाभारताचे वैशिष्ट्य असे की प्राचीन जग आणि भारतवर्ष यासंबंधीची उपलब्ध सारी माहिती एकत्रितपणे देणारे अनेक स्वतंत्र अध्याय या ग्रंथात असून, त्यायोगे तो प्राचीन भारतीय भूगोलाचे ज्ञानभांडार बनला आहे.

प्राचीन भारतीय भूगोलाच्या दृष्टीने महाभारतातील सर्वाधिक महत्त्वाचा अध्याय भीष्मपर्वातील संजयकृत भारतवर्षवर्णनाचा (म. भी. ९) असून, त्यामध्ये तत्कालीन भारतवर्षातील विभिन्न देश, जनपदे, पर्वत, नद्या, मार्ग आदींची विस्तृत माहिती आढळते. कोणता देश भारताच्या निश्चित कोणत्या भागात आहे, तसेच विभिन्न स्थलांमध्ये निश्चित अंतर किती होते, याचे पुरेसे दिग्दर्शन तेथे नसले, तरी दिशाभेद आणि ज्ञात स्थलांशी सांगड या द्विविध उपायांनी त्यांमधील बहुतांशी अज्ञात स्थलेहि आज ओळखता येतात.

महाभारत सभापर्वातील 'उपायनपर्व' नामक उपपर्वात (म. स. २२) युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयी भारतातील विभिन्न लोकसमूहांनी त्यास अर्पिलेल्या उपायनांचे वर्णन आढळते. या अध्यायातील भारतवर्षाच्या विभिन्न जनपदांची आणि लोकसमूहांची विभागशः मांडणी भीष्मपर्वातील देशनामावलीपेक्षा अधिक शास्त्रशुद्ध असून, विभिन्न जनपदातील निसर्गसंपत्तीचे आणि निर्माण होणाऱ्या वस्तूंचे यथातथ्य दिग्दर्शन त्यामध्ये आढळते.

युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या दिग्विजयसत्रात अर्जुन, भीम, नकुल आणि सहदेव या चार पांडव बंधूंनी केलेल्या उत्तर, पूर्व, पश्चिम आणि दक्षिण भारताच्या दिग्विजयवर्णनात भारतवर्षाच्या चतुर्दिशांकडील जनपदांचे वर्णन असून, युधिष्ठिराच्या अश्वमेध यज्ञसमयीच्या अर्जुनाच्या दिग्विजयवर्णनात जनपदांचे हे वर्णन पुन्हा आढळते. आदिपर्वातील अर्जुनाच्या प्रथम वनवासाच्या वर्णनात भारताच्या चतुर्भागातील तीर्थस्थानांचे वर्णन असून, पांडवांच्या वनवाससमयीच्या धौम्य, अंगिरस् आणि लोमश ऋषींच्या तीर्थयात्रावर्णनात तत्कालीन भारतातील विभिन्न तीर्थांचे पुन्हा एकवार विवरण आढळते. महाभारत उद्योगपर्वात, तसेच त्यानंतरच्या भीष्म, द्रोण, कर्ण आदि भारतीय युद्धसंबंधीच्या पर्वात या युद्धामध्ये सहभागी देशांच्या आणि लोकसमूहांच्या नावांच्या रूपाने तत्कालीन भारतवर्षातील जनपदांचा आणि लोकसमूहांचा पुन्हा एकवार नामोल्लेख आढळतो.

**महाभारतकालीन जग**—वाल्मीकि रामायणकाली सर्वप्रथम प्रस्थापित झालेल्या द्वीपात्मक पृथ्वीकल्पनेचे उत्क्रांत स्वरूप महाभारतातील पृथ्वीवर्णनात आढळते. त्याचे सविस्तर विवेचन प्रास्ताविकातील सप्तद्वीपा पृथ्वीच्या विभागात आम्ही केले आहे.

**महाभारताच्या भौगोलिक भागाचा टीकाग्रंथ**—कर्नल विल्फोर्ड यांच्या मते बंगालच्या सुलतान हुसेनशहाच्या (स. १४९३–१५१८) पौलस्त्य नामक मांडलिक राजाने महाभारतातील भौगोलिक भागावरील एक टीकाग्रंथ लिहवून घेतला (इंडि. अँटि. २०.४१८–४१९).

**बृहत्संहितेत**—वरहमिहिराचा हा खगोल आणि ग्रहज्योतिषशास्त्रीय ग्रंथ (इ. स. ६ वे शतक), तसेच ब्रह्मगुप्त, आर्यभट्ट, भास्कराचार्य, भट्टिल, उत्पल, विजयनंदि आदींचे ज्योतिषशास्त्रीय ग्रंथ हे पौराणिक साहित्यातील पृथ्वी आणि जग यांच्या रचनेसंबंधीचे मार्गदर्शक ग्रंथ असून, भारतवर्षातील देशविभागांसंबधी माहिती देणाऱ्या समस्त पौराणिक साहित्यामध्ये 'बृहत्संहिता' सर्वाधिक महत्त्वपूर्ण आहे. त्यामधील भारतवर्षान्तर्गत देशविभागांची आणि

लोकसमूहांची नामावली सर्वाधिक शुद्ध, शास्त्रीय, आणि संपूर्ण आहे. या ग्रंथाची डॉ. कर्नसंपादित सर्वाधिक शुद्ध आवृत्ती ' बिब्लोथिका इंडिका 'मध्ये ( स. १८६५ ) प्रकाशित झाली आहे.

**पृथ्वी आणि भारतवर्ष** — पृथ्वी आणि भारतवर्षाचा आकार, तसेच त्यांचे उपविभाग आदींसंबंधीच्या पौराणिक साहित्यातील साऱ्या ज्योतिषशास्त्रीय कल्पना वैदिक साहित्यानुसारी असल्या, तरी उत्तरकालात बृहत्संहितेतील ज्योतिषशास्त्रीय कल्पनांची जोड त्यास दिलेली दिसते. ( उदा. पृथ्वी हा विश्वमालिकेतील एक ग्रह असल्याची कल्पना ). अशा तऱ्हेने वैदिक साहित्यातील विश्व, पृथ्वी आदींच्या उत्पत्तीसंबंधीचे परंपरागत ज्ञान आणि वराहमिहिरादि ज्योतिषशास्त्रकारांचे सिद्धांत यांचा समन्वय पौराणिक साहित्यात साधला आहे. विष्णु पुराणातील सूर्य आणि त्याचे गतिचक्र, दिवसरात्रींची कालमर्यादा, ग्रहमंडलाची रचना, आकाशीय चंद्राची भ्रमणकक्षा, ध्रुवताऱ्याचे, तसेच ग्रहमंडलातील विभिन्न ग्रहांचे वर्णन बृहत्संहितानुसारी असून, अन्य पुराणांतहि विश्व आणि पृथ्व्युत्पत्तीच्या संदर्भात या साऱ्या विषयांचा परामर्श आढळतो. यावरून परंपरागत धर्मज्ञान आणि इतिहास ग्रथित करणाऱ्या पौराणिक साहित्यावरील ज्योतिषशास्त्राचा प्रचंड प्रभाव ध्यानी येतो.

**कूर्मविभाग** — भारतातील विभिन्न देशांवरील आणि लोकसमूहांवरील अशुभ ग्रहग्रस्त नक्षत्रांच्या दुष्परिणामांचे दिग्दर्शन करण्यासाठी बृहत्संहितेत नवविभागात्मक भारतवर्षाचे विवरण केले आहे. या ग्रंथातील ही माहिती ' पराशरतंत्र ' ( इ. स. १ ले शतक ) नामक पूर्वकालीन ज्योतिषग्रंथाच्या आधारे पुनरुद्धृत केली असून, मार्कंडेय पुराण कूर्मविभागात बृहत्संहितेतील या नामावलीचे अनुकरण आढळते. भारतवर्षाच्या बृहत्संहितानुसारी नवविभागांचे सविस्तर विवरण प्रास्ताविकातील भारतवर्ष विभागात आम्ही केले आहे.

**पूर्वपरंपरा** — आज अनुपलब्ध असणाऱ्या पराशरतंत्रातील देशनामावली बृहत्संहितेच्या उत्पल भाष्यात उपलब्ध असून ( विजगापट्टम् संस्कृत सिरीज्, स. १८९५ ), या पूर्वकालीन ग्रंथातील देशनामांचे अनेक अशुद्ध आणि प्रक्षिप्त पाठ बृहत्संहितेत शुद्ध करून घेतलेले दिसतात ( जसे उमारण्य–धर्मारण्य, लेपमांडव्य–मांडव्य, उत्तमज्योतिष–उपज्योतिष ). यावरून बृहत्संहितानिर्मित सुसंस्कारित भौगोलिक ज्ञानपरंपरेमुळे ' पराशरतंत्रा 'चा लोकांना उत्तरकालात विसर पडला असावा. बृहत्संहितेतील नामावली तपासून पाहण्यासाठी केवळ पराशरतंत्र नामावलीचा उपयोग सध्या होतो.

**भौगोलिक स्थले** — बृहत्संहितेमधील नद्या, पर्वत, देश,लोकसमूहादिकांचे विवरण, तसेच पौराणिक स्थलनामांशी त्यांची सांगड घालण्याचा प्रयत्न फ्लीट यांनी ' टोपोग्राफिकल लिस्ट ऑफ दी बृहत्संहिता ' नामक लेखामध्ये केला आहे ( इंडि. अँटि. २२.१६९–१९५ ). त्यांचे मते पौराणिक साहित्यातील ' पर्वताश्रयिन् ' आदि संदिग्ध देशनामांच्या उलगड्याच्या दृष्टीने बृहत्संहिता देशनामावली महत्त्वपूर्ण असून, भारताचे दिशावर विभाजन या ग्रंथात कसोशीने पाळले असल्यामुळे ज्ञात देशांच्या आधारे अज्ञात देशांचा शोध तेथे सहज लावता येतो. उदा. या ग्रंथांतील सिंध, बाह्लीक, पह्लव, यवन आदि 'उदीच्य' लोकांच्या एकत्र निर्देशावरून (बृ. सं. १८.६), हे सारे लोक वायव्य भारतात निवास करीत असल्याचे निर्णायकपणे सिद्ध होते.

तथापि बृहत्संहितेमधील अनेक भौगोलिक निर्देश चुकीचे असल्याने त्याआधारे प्राचीन भारताचा नकाशा तयार करणे शक्य होत नाही. उदाहरणार्थ या ग्रंथमते कच्छ आणि गिरिनगर ही स्थले दक्षिण भारतात असून, रैवतक पर्वत मात्र नैर्ऋत्य भारतात दर्शविला आहे. वस्तुतः रैवतक पर्वत हा गिरिनगराच्या ( आधु. जुनागढ ) नजिक कच्छच्या दक्षिणेस आहे.

बृहत्संहितेमधील देशनामांचे एकत्र निर्देशहि अनेक ठिकाणी भारताच्या भौगोलिक विभाजनाच्या दृष्टीने चुकीचे दिसतात. उदाहरणार्थ या ग्रंथात 'आर्जुनायन' आणि 'यौधेय' या उत्तर भारतातील, ' कौरव ' या मध्यदेशातील आणि 'प्रागीश 'या पूर्व भारतातील लोकांचा एकत्र निर्देश आढळतो ( बृ. सं. ४.२५ ). याच ग्रंथात् अन्यत्र ( बृ. सं. १६.२२ ) आर्जुनायन, यौधेय, त्रैगर्त, पौरव, वार्टधान या उत्तर भारतातील, अंबष्ठ या पूर्व भारतातील, पारद या पश्चिम भारतातील आणि सारस्वत आणि मत्स्य या मध्यप्रदेशातील लोकांचा एकत्र निर्देश आढळतो. यावरून या ग्रंथातील संकीर्ण देशनामांच्या एकत्र निर्देशांवरून त्यांच्या भौगोलिक स्थानांची निश्चिती करणे दोषास्पद ठरते.

**मार्कंडेय पुराणात**— या ग्रंथातील अष्टविभागात्मक भारतवर्षातील देशांच्या आणि लोकसमूहांच्या दोन स्वतंत्र नामावलींपैकी कूर्मविभाग नामक नामावली बृहत्संहितानुसारी आणि अन्य नामावली वायुपुराणानुसारी आहे. त्यामुळेच पराशरतंत्र, बृहत्संहिता आणि मार्कंडेय पुराण

( कूर्मविभाग ) हे एकाच भौगोलिक परंपरेतील ग्रंथ मानले जातात.

**पौराणिक साहित्यात** — प्राचीन भारतवर्षातील परंपरागत देवताशास्त्र, तत्त्वज्ञान, इतिहास, भूगोल, धर्मशास्त्र, तसेच विश्वरहस्यासंबंधीचे ज्ञानधन जनसामान्यांप्रत पोहोचविण्याच्या प्रेरणेने लिहिलेले पौराणिक साहित्य धार्मिक आणि सांस्कृतिक दृष्ट्या वाल्मीकि रामायण आणि महाभारताच्या परंपरेतील, आणि रचनादृष्ट्या त्यांच्यापेक्षा उत्तरकालीन आहे. वैदिक साहित्यातील सूत्रबद्ध ज्ञानविज्ञानाचे आणि धार्मिक आणि सांस्कृतिक विचारांचे सोपपत्तिक विवेचन त्यामध्ये आढळते.

विष्णुमते प्राथमिक आणि उत्तरकालीन जगदुत्पत्ती, देवदेवता आणि राजांच्या वंशावली, तसेच विभिन्न मन्वंतरांचा आणि राजवंशांचा इतिहास हे पुराणांचे प्रमुख प्रतिपाद्य विषय होत :—

**सर्गश्च प्रतिसर्गश्च वंशो मन्वंतराणि च ।**
**सर्वेष्वेतेषु कथ्यन्ते वंशानुचरितं च यत् ॥**

( विष्णु ३·६·२५ ).

पुराणांचे हे वर्णन विष्णु, मत्स्य, वायु पुराणांना पूर्णांशाने, आणि अन्य काही पुराणांना अंशत: लागू पडत असून, उर्वरित पुराणे या चौकटीबाहेरची आहेत.

**भौगोलिक माहिती**—पौराणिक साहित्यातील बहुतांशी सारी भौगोलिक माहिती जगदुत्पत्तिशास्त्र आणि जगदुत्पत्तिइतिहासविषयक त्यांच्या पहिल्या दोन विभागांत ( लक्षण ) असून, विश्व आणि पृथ्वी यांची उत्पत्ती, पृथ्वीतील समुद्र, सप्तद्वीपे आणि त्यांमधील विभिन्न पर्वत, देश आणि लोकसमूह, तसेच खगोलशास्त्रीय भूगोल आदींचा परामर्श त्यामध्ये आढळतो. याच्या उलट त्यांच्या इतिहासविषयक अध्यायात भारतवर्षातील विभिन्न देश, लोकसमूह, नद्या, पर्वत आदींचा परामर्श आढळतो. पौराणिक जग आणि भारतवर्षविषयक या ज्ञानधनामुळे हे साहित्य प्राचीन भूगोलविषयक ज्ञानाचे भांडार बनते.

**शैली**—व्यासशिष्य रोमहर्षण सूत आणि त्याचा शिष्य शौनक यांच्या गुरुशिष्यसंवादाच्या स्वरूपात कथन केलेल्या पौराणिक साहित्यात प्राचीन भारतातील विभिन्न ऐतिहासिक घटना, भूवर्णन, निसर्गवैशिष्ट्य, तसेच तत्त्वज्ञान हे प्रतिपाद्य विषय विभिन्न व्यक्तिमात्रांच्या जीवनाख्यायिकांच्या स्वरूपात ग्रथित केले आहेत. सामान्यजनांच्या कल्पनाशक्तीला चालना देऊन पौराणिक तत्त्वज्ञानाच्या मूलाधारस्वरूप वेदमहाभारतादि ग्रंथांच्या पठणाची प्रेरणा देणे, हे या पौराणिक शैलीचे प्रमुख उद्दिष्ट दिसते.

जनमानसातील परंपरागत इतिहास ग्रथित करण्याचा पौराणिक साहित्याचा प्रयत्न होमर आणि फिरदौसी यांच्या परंपरेतीलच असला, तरी त्यामधील ऐतिहासिकतेसंबंधीचा कटाक्ष पूर्वोक्त दोन ग्रंथांपेक्षा अव्वल दर्जाचा आहे. सुगमता आणि रोचकता यासाठी प्राचीन इतिहासाचे पुनर्संस्करण त्यांनी केले असले, तरी त्यामधील इतिहासाचा धागा सहसा तुटत नाही. याचे उलट राजदरबारींच्या भाटांच्या शैलीने लिहिलेल्या आणि ऐतिहासिकतेच्या बाह्यावरणाखाली अनेक कल्पनारम्य घटना कोंबणाऱ्या होमर आणि फिरदौसीच्या काव्यग्रंथांत इतिहासाचे सुवर्णकण शोधणे दुष्कर बनते.

**भौगोलिक ज्ञानाचा विकास**—प्रारंभीच्या काही पुराणांच्या तुलनेने वायु, मार्कंडेय, स्कंद, ब्रह्माण्ड, वराह, मत्स्य आणि भागवत या उत्तरकालीन पुराणांतील भारतवर्ष आणि जग यासंबंधीचे ज्ञान अधिक विस्तृत दिसते. बृहद्भारतीय देशातील दिग्विजय, भारताच्या उत्तर आणि दक्षिण सीमारेषेपलीकडील प्रदेशांचे राजनैतिक संबंध, तसेच तीर्थयात्रेच्या निमित्ताने सुरू झालेल्या देशाच्या दुर्गम भागातील वाढता संचार आदींचे पडसाद या उत्तरकालीन पुराणात दिसतात. अष्टादश पुराणांतील भौगोलिक माहितीच्या गुणावगुणांची तौलनिक माहिती निम्नलिखित परिपत्रकात दिली आहे ( परिपत्रक पाहा ).

**पौराणिक भूवर्णनाची वैगुण्ये**—भूगोलाची पाठ्यपुस्तके म्हणून पुराणांचे लेखन झाले नसल्याने त्यामधील प्रासंगिक आणि संकीर्ण स्वरूपाच्या भौगोलिक माहितीतील तर्कसंगती प्रयत्नपूर्वक शोधावी लागते. याच्या उलट उत्तरकालीन पौराणिक साहित्यातील भौगोलिक माहिती प्रक्षिप्त मजकूर, विभिन्न देवतोपासनांचे अवडंबर, तसेच जगदुत्पत्तीच्या तत्त्वज्ञानात्मक भागाला दिलेल्या देवतामाहात्म्याच्या नव्या अनैतिहासिक कलाटणीमुळे सदोष बनली आहे.

**भूगोलवाचक संज्ञा**—पौराणिक साहित्यात ‘ भूगोल ’ अर्थाच्या निम्नलिखित संज्ञा आढळतात :—१. भुवनकोश; २. भुवनसागर; ३. भुवनखंड; ४. त्रैलोक्यदर्पण; ५. क्षेत्रसमास. भागवतमते ‘ भूगोलकाची वैशिष्ट्ये, नावे आणि लक्षणे ’ म्हणजे ‘ भुवनकोश ’ होय ( **भूगोलक विशेषं नामरूपमान लक्षणतो; भा. ५·१६·१** ).

**सप्तद्वीपा पृथ्वी**—वाल्मीकि रामायण आणि महा-

# पौराणिक साहित्यातील भौगोलिक माहिती

| जगदुत्पत्ती | भौगोलिक माहिती | वैशिष्ट्य |
|---|---|---|
| | **( १ ) वायु पुराण** | |
| प्रक्रिया आणि उपोद्‌घात पादात जगदुत्पत्ती आणि सृष्टिकल्पांची माहिती. | भारतातील देशनामावली सर्वाधिक शुद्ध आणि प्राचीनतम. भूगोलखंडात ( अ. ३४–४८ ) जंबूद्वीप, मेरु पर्वताच्या परिसरातील पर्वत, सरोवरे, पर्वतीय खोरी, वसाहती, उगम पावणाऱ्या नद्या; देवकूट, कैलास, हिमवत , निषध, पारिजात, जारुधि पर्वत; तसेच भारत, केतुमाल, भद्राश्व, किंपुरुष वर्षे; भारतवर्षाचे उपविभाग, दक्षिणेकडील बेटे, सप्तद्वीपे आदींची माहिती. | भूगोलखंडाची रचना उपलब्ध पुराणात प्राचीनतम. |
| | **( २ ) मार्कंडेय पुराण** | |
| अन्य पुराणासदृश जगदुत्पत्तिवर्णन. | नवखंडात्मक भारतवर्षाचा निर्देश, परंतु वर्णन मात्र परंपरागत सप्तखंडात्मक भारतवर्षाप्रमाणे ( ५७ ). कूर्मविभागात (५८) कूर्मचक्रात्मक भारतवर्षाचे बृहत्संहितानुसारी वर्णन. भौगोलिक स्थानांचा सुस्पष्ट निर्देश. भारतवर्षाची द्वितीय देशनामावली वायु पुराणानुसारी. | महाभारताचा पुरवणी ग्रंथ ( इ. स. ९ वे शतक ). वायु, मत्स्य, ब्रह्माण्ड पुराणांसदृश रचना. |
| | **( ३ ) भागवत** | |
| पाचव्या स्कंधात ( अ. १-२६ ) प्रियव्रत, आग्नीध्र आणि ऋषभवर्ष; सप्तद्वीपा पृथ्वी; जंबूद्वीप आणि गंगा नदी; तसेच स्वर्, भूवर्, पाताल, नरकलोक, आणि सूर्य, ग्रह, तारे यांचे वर्णन. | पृथ्वी आणि भारताचे भौगोलिक वर्णन अन्य पुराणांपेक्षा निराळ्या परंपरेतील आणि संक्षिप्त. लोकसमूहवर्णन नाही. | वैष्णव पुराण. |
| | **( ४ ) ब्रह्माण्ड पुराण** | |
| — | प्रक्षिप्त भागातील भौगोलिक माहिती वायुपुराणानुसारी, आणि वायुपुराणाच्या खालोखाल विश्वसनीय. | अपूर्ण पुराण. केवळ काँही खंड आणि माहात्म्य अध्याय उपलब्ध. बराच भाग प्रक्षिप्त ( स. १०३० ). |
| | **( ५ ) विष्णु पुराण**<br>( विष्णुधर्मोत्तर पुराण ) | |
| प्रथम दोन भागात पृथ्वी, सप्तद्वीपे आणि सप्तसमुद्रांची उत्पत्ती आदि वर्णन; तसेच खगोलशास्त्रीय सिद्धांत; समुद्रांची भरती–ओहोटी (अ. २–१२ ). | भारतवर्षाचे वर्णन ( अ. ३ ) | पुराणांचे पाच प्रतिपाद्य विषय ( पंचलक्षणे ) शास्त्रशुद्धपणे ग्रथित करणारे एकमेव पुराण. विष्णुधर्मोतर पुराण विष्णुपुराणाचा भाग ( इ. स. ७ वे शतक ). |

| जगदुत्पत्ती | भौगोलिक माहिती | वैशिष्ट्य |
|---|---|---|
| | **( ६ ) मत्स्य पुराण** | |
| अन्य पुराणानुसारी ग्रहताऱ्यांची आणि समुद्राच्या भरतीओहोटीची माहिती (अ. १२४-१२८); पृथ्वीवर्णन ( अ. १२३ ). | भुवनकोश अध्यायात ( ११३–१२३ ) जंबूद्वीप, भारतवर्ष, किंपुरुष, हरि, इलावृत वर्षे; तपोवन, ऐरावती नदी; हिमालय पर्वतातील गुफा, आश्रम, वृक्ष आणि पक्षी; नद्या; तसेच शक, कुश, क्रौंच, गोमेद व पुष्कर द्वीपे; सप्तद्वीपा पृथ्वीतील वृक्ष. भारतातील देशनामावली वायु पुराणावरून पुनरुद्धृत. | महाभारत आणि विष्णु व पद्म पुराणानुसारी. |
| | **( ७ ) ब्रह्म पुराण** | |
| जगदुत्पत्ती; मन्वंतरांचा इतिहास; कृष्णापूर्वीच्या राजघराण्यांचा इतिहास. | विश्ववर्णन; भारतातील देशनामावली मार्कंडेय पुराणावरून पुनरुद्धृत. | जगन्नाथस्वरूपी कृष्णाच्या माहात्म्यपर पुराण; 1/3 भाग ओरिसातील जगन्नाथपुरीच्या वर्णनपर. |
| | **( ८ ) पद्म पुराण** | |
| प्रथम ( आदि ) खंडात विष्णु पुराणानुसारी जगदुत्पत्तीचे वर्णन. | — | द्वितीय ( भूमि ) खंडात (अ. १–१२७ ) भारतातील विभिन्न तीर्थांचे माहात्म्य. जैन आणि म्लेंच्छांचा निर्देश ( रचनाकाल–इ. स. १२–१६ वे शतक); राजस्थानमधील अजमेर येथील तीर्थे. |
| | **( ९ ) स्कंद पुराण** | |
| — | भारतवर्षातील देश आणि लोकसमूहवर्णन मार्कंडेय आणि वायु पुराणानुसारी | अपूर्ण पुराण; केवळ काही संहिता ( अध्याय ), खंड आणि माहात्म्य उपलब्ध. काशी खंडात १५००० श्लोक; उत्कल खंडात ओरिसातील, तसेच ब्रह्मोत्तर, रेवा, आणि हिमवत् खंडात भारताच्या विभिन्न भागातील तीर्थांचे माहात्म्य. |
| | **(१०) वराह पुराण** | |
| — | — | वैष्णव तीर्थ माहात्म्यपर पुराण; मथुरामाहात्म्यात मथुरा येथील तीर्थवर्णन. |
| | **( ११ ) गरुड पुराण** | |
| जगदुत्पत्तीचे संक्षिप्त वर्णन | वामन पुराणानुसारी विस्तृत भारतवर्षवर्णन | कालदृष्ट्या सर्वाधिक उत्तरकालीन पुराण; बहुतांशी भागांत सूर्यदेवतेच्या व्रतवैकल्यां चेवर्णन. |

| जगदुत्पत्ती | भौगोलिक माहिती | वैशिष्ट्य |
|---|---|---|
| | (१२) वामन पुराण | |
| जगदुत्पत्तीचे परंपरागत वर्णन. | भारतवर्षातील जनपदवर्णन अन्य पुराणांहून वेगळे. आंध्र आणि तुरुष्क लोकांचा निर्देश. | हिमालयातील केदारेश्वर, बदरिकाश्रम, आणि कुरुक्षेत्रातील स्थाणुतीर्थांचे वर्णन. |
| | (१३) कूर्म पुराण | |
| — | जनपदनामावली विष्णु पुराणानुसारी. नदीनामावली वायु पुराणानुसारी. | अल्बेरुणीच्या ( इ. स. १०३० ) काली रचना. |
| | (१४) लिंग पुराण | |
| सृष्टीचे आणि कृष्णापर्यंतच्या राजांचे संक्षिप्त वर्णन. | — | बहुतांशी भागात शिवोपासनेच्या आणि व्रतांच्या आख्यायिका. |
| | (१५) ब्रह्मवैवर्त पुराण | |
| — | भौगोलिक वर्णन विष्णु आणि अग्नि पुराणानुसारी. | कृष्णजन्म नामक चतुर्थ खंडात वृंदावन आणि गोकुळ क्षेत्रांचे वर्णन. |
| | (१६) अग्नि पुराण | |
| पृथ्वी आणि विश्ववर्णनात्मक अध्याय विष्णु पुराणावरून पुनरुद्धृत. | — | गयामाहात्म्य; विष्णूच्या दशावतारांपैकी राम आणि कृष्णावताराची माहिती. रामायण आणि महाभारतानुसारी; गया प्रदेशातील तीर्थे. |
| | (१७) नारद पुराण | |
| जगदुत्पत्ती आणि प्राचीन भूवर्णन अपुरे आणि चुकीचे. | — | गोवध आणि धर्मलंड (मुसलमान) लोकांचा निर्देश ( रचनाकाल १६-१७ वे शतक ) |
| | (१७) भविष्य पुराण | |
| जगदुत्पत्ती आणि पृथ्वीवर्णन वायु पुराणानुसारी. | — | कलियुगातील राजघराण्यांचे वायु पुराणानुसारी वर्णन; शकद्वीपनिवासी मग (इराणमधील मघ) लोकांचा निर्देश; मध्ययुगीन पुराण. |

भारतात निर्देशिलेली सप्तद्वीपा पृथ्वीची कल्पना पौराणिककाली परिणत अवस्थेस पोहोचली असून, भौगोलिक दृष्ट्या पौराणिक साहित्यातील हे वर्णन सर्वाधिक महत्त्वाचे मानण्यात येते. त्याचे सविस्तर विवरण प्रास्ताविकातील सप्तद्वीपा पृथ्वीच्या विभागात आम्ही केले आहे.

**भारतवर्ष-वर्णन**—मत्स्य, वायु, विष्णु आदि पुराणांत भारतवर्षाच्या चतुर्दिशात्मक चार आणि मध्यवर्ती एक अशा एकूण पाच उपविभागांचे महाभारतानुसारी

वर्णन आढळते. मार्कंडेय आणि ब्रह्माण्ड पुराणात सप्तखंडात्मक कुमारी द्वीपाचा ( भारतवर्ष ) सुस्पष्ट निर्देश असला ( मार्कं. ५८; ब्रह्माण्ड. ३६·४४ ), तरी तेथेहि पंचविभागात्मक भारतवर्षाचे ओढूनताणून सात विभाग केल्याचे स्पष्टपणे दिसते. बृहत्संहितानुसारी मार्कंडेय पुराण कूर्मविभागात मात्र भारताचे शास्त्रशुद्ध नऊ उपविभाग वर्णिले आहेत. स्कंद पुराणाच्या माहेश्वर खंडात भरतखंडाचे ७२ प्रांत आणि त्यांची ग्रामसंख्या वर्णिली आहे ( स्कन्द. माहेश्वर. कौ. ३९ ). पौराणिक साहित्यातील भारतवर्षवर्णनाची सविस्तर समीक्षा प्रास्ताविकातील भारतवर्षाच्या विभागात आम्ही केली आहे.

**पौराणिक संशोधन**—इलियड आदि पाश्चात्य महाकाव्यांप्रमाणे सकृद्दर्शनी अतिशयोक्ती, परस्परविरोध आणि विसंगती यांनी भरलेल्या पौराणिक साहित्यात मौर्यपूर्वकालीन भारतवर्षाच्या परंपरागत इतिहासाचे सुवर्णकण साठविले असल्याचे एफ. ई. पार्गिटर यांनी सर्वप्रथम सिद्ध केले. उपलब्ध अठरा पुराणातील अतिशयोक्तींचे आणि परस्परविसंगतीचे बाह्यावरण दूर करून, आणि विभिन्न राजवंशांची आणि भारतवर्षान्तर्गत लोकसमूहांची सुसंगत माहिती संकलित करून त्याआधारे त्यांनी पौराणिक साहित्यात ग्रथित केलेल्या महाभारतकालापासून चंद्रगुप्त मौर्यापर्यंतच्या कालखंडातील परंपरागत इतिहास आणि भूगोलाकडे अभ्यासकांचे लक्ष वेधले. त्यांचे हे संशोधन मार्कंडेय पुराणाच्या सटीक इंग्रजी अनुवादात (स. १९०४), आणि ‘ एन्शन्ट इंडियन हिस्टॉरिकल ट्रॅडिशन ’ ( स. १९२२ ), या इंग्रजी ग्रंथात ग्रथित केले आहे. अलिकडच्या काळातील उत्खननान्ती पार्गिटर यांची प्राचीन भूगोलासंबंधीची बहुतांशी अनुमाने खरी ठरली असून, परंपरागत साहित्याचे महत्त्व प्रस्थापित करण्याचे पार्गिटर यांचे युगकार्य अभ्यासकांनी मान्य केले आहे. उत्तरकालातील ग्रांथिक, तसेच उत्खननादि संशोधनाचे सारे श्रेय अशा तऱ्हेने अप्रत्यक्ष रीत्या त्यांच्याकडे जाते.

बृहत्संहिता आणि वायु पुराणपरंपरेतील विभिन्न लोकसमूहांचे तुलनात्मक विवेचन डॉ. शशिभूषण चौधरी यांच्या ‘ एथनिक सेटलमेंट्स इन् एन्शन्ट इंडिया ’ ( स. १९५५ ) ग्रंथात केले असून, पौराणिक साहित्यातील विभिन्न लोकसमूहनामे वायु पुराण आणि बृहत्संहिता या मूलवर्ती ग्रंथातील पाठभेदात्मक रूपे असल्याचे डॉ. चौधरी यांनी सिद्ध केले आहे. विभिन्न पुराणातील लोकसमूहनामावलींना एकसूत्रीपणा आणण्याच्या दृष्टीने त्यांचे हे संशोधन महत्त्वाचे आहे.

पौराणिक साहित्यातील लोकसमूहांच्या वसाहतीकरणाचे मूलगामी भूगोलशास्त्रीय विवेचन प्रो. एस्. मुजफ्फर अली यांच्या ‘ जिऑग्रफी ऑफ पुराणाज् ’ ( स. १९६६ ) ग्रंथात आढळते. पौराणिक साहित्यातील ‘ द्वीप ’, ‘ सागर ’, ‘ खंड ’ आदि संज्ञांचा रूपकात्मक अर्थ स्वीकारल्यास पौराणिक सप्तद्वीपा पृथ्वीच्या सकृद्दर्शनी कल्पनारम्य वर्णनात नवी सुसंगती उत्पन्न होत असल्याचे प्रो. अली यांनी निर्णायकपणे सिद्ध केले आहे. वैदिक कालापासून बीजरूपाने प्रारंभ झालेले भारतवर्ष, सप्तद्वीपा पृथ्वी, आणि जगदुत्पत्तीविषयक सिद्धांत पौराणिक काली परिणत अवस्थेस पोहोचल्याचा त्यांचा सिद्धांतहि महत्त्वपूर्ण आहे. मानवी वसाहतीकरण, नद्यांचे बदलते प्रवाह, आणि भारतवर्षाचा प्राकृतिक भूगोल अवगत असणाऱ्या भूगोलशास्त्रज्ञाने केलेले पौराणिक साहित्याचे भौगोलिक विश्लेषण या नात्याने त्यांचे सारेच संशोधन महत्त्वपूर्ण आहे.

**कालनिर्णय**—भाषाशास्त्रीय आणि ऐतिहासिक साधनसामुग्रीच्या आधारे विभिन्न पुराणांच्या कालनिर्णयांचा यशस्वी प्रयत्न डॉ. हाजरा आणि डॉ. सरकार यांनी केला असला ( हाजरा, स्टडीज् इन् पुराणिक रेकॉर्डस्, स. १९४०; सरकार, स्टडीज् इन् जिऑग्रफी इन् एन्शंट इंडिया, स. १९६० ), तरी या साहित्यातील भौगोलिक माहितीच्या विकासाच्या आधारे त्यांच्या कालनिर्णयाचा प्रयत्न आजवर कोणी केला नाही. तो होणे जरूर आहे.

**नीलमत पुराणात**—या पुराणाचा $\frac{2}{3}$ भाग कश्मीर देशाच्या उत्पत्तीच्या विभिन्न आख्यायिका, तसेच नील नामक कश्मीराधिपती नागराजकथित विभिन्न उपासनाप्रकार आणि व्रतवर्णनांनी व्यापला असून ( आख्यायिका श्लोक. १–३६६; व्रते-श्लोक. ३६७–८९९ ), उर्वरित भागात ( श्लोक. ९००–१४०४ ) कश्मीरातील विभिन्न तीर्थांची माहिती आढळते ( ‘ भारतवर्षातील तीर्थस्थाने ’ विभाग पहा ).

या पुराणाचे उपलब्ध संस्करण इ. स. ६–७व्या शतकातील असून, त्यामधील प्रक्षिप्त भागातील भौगोलिक माहितीहि अविकृत आहे.

**काव्यमीमांसेत**—राजशेखरकृत या ग्रंथात ( इ. स. १० वे शतक ) बृहत्संहिता आणि वायु पुराणपरंपरेहून स्वतंत्र परंपरेतील भारतवर्षाची माहिती ग्रथित केलेली

आढळते. या ग्रंथातील भौगोलिक स्थलांचे विवरण बडोद्याचे श्री. सी. डी. दलालकृत 'आयडेंटिफिकेशन ऑफ प्लेसनेम्स् इन् काव्यमीमांसा' ग्रंथात आढळते.

**भरताच्या नाट्यशास्त्रात**—बृहत्संहिता आणि वायु पुराणपरंपरेहून स्वतंत्र भौगोलिक माहिती देणाऱ्या या ग्रंथात भारतवर्षाचे नऊहून अधिक उपविभाग मानले आहेत.

**बृहत्कथेत**--या ग्रंथात ( इ. स. पू. ६ वे शतक ) भारतवर्षातील, तसेच भारतवर्षाबाहेरील अनेक देशांचे आणि द्वीपांचे वर्णन आढळते. डॉ. श्री. व्यं. केतकर यांच्या 'प्राचीन महाराष्ट्र' (सातवाहन पर्व) ग्रंथातील 'उदयनकालीन जग' संज्ञक प्रकरणात या ग्रंथातील भौगोलिक स्थलांची सूची दिली असून, प्रा. मधुसूदन फडके यांनी 'बृहत्कथेतील भारतवर्ष' नामक माहितीपूर्ण लेख लिहिला आहे ( नवभारत २०·११ ).

**कालिदासाच्या ग्रंथात** — कालिदासाच्या रघुवंशातील ( इ. स. ५ वे शतक ) रघूच्या दिग्विजयवर्णनात ( रघु. ४ ), तसेच मेघदूतातील मेघाच्या उज्जयिनी – हिमालय प्रवासवर्णनात ( मेघ. पूर्व. २४–२६ ) तत्कालीन भारतवर्षाची महत्त्वपूर्ण भौगोलिक माहिती आढळते.

कालिदासाच्या ग्रंथातील सप्तद्वीपा पृथ्वी आणि मेरु पर्वत यांचे वर्णन पौराणिक साहित्यानुसारी असून, भारतवर्षान्तर्गत हिमालय पर्वतातील खनिज आणि वनस्पतिज संपत्ती, तसेच त्यामधील किरात, उत्सवसंकेत आदि लोकांचे सविस्तर वर्णन तेथे आढळते. कालिदासाच्या ग्रंथातील भूगोलाचे सविस्तर विवरण हरणचंद्र चकलदार यांच्या 'जिऑग्रफी ऑफ कालिदास' ग्रंथात ( स. १९६३ ) आढळते.

**भास्कराचार्यकृत गोलाध्यायात**— मराठवाड्यातील बीड गावच्या भास्कराचार्यलिखित (स.१११४-११९०) 'सिद्धांतशिरोमणि' नामक ग्रंथाचे 'गणिताध्याय' आणि 'गोलाध्याय' नामक दोन उपविभाग असून, त्यापैकी 'गोलाध्याया'मध्ये ज्योतिर्गणित, ग्रहगणित, पृथ्वीवर्णन, गोलीयत्रिकोणमिती आदि ज्योतिर्गणितीय समस्यांचा विचार प्राचीन भारतीय भूगोलाच्या पार्श्वभूमीवर केला आहे. या ग्रंथातील भूगोलविषयक पन्नास श्लोकांमध्ये सृष्टीची उत्पत्ती भूपृष्ठवर्णन, अक्षवृत्ते-रेखावृत्ते, मेरुपर्वत, पृथ्वीचे भाग, विषुववृत्ताच्या दक्षिणेकडील सहा द्वीपे, पृथ्वीतील महासागर, पर्वत, नद्या, तसेच भारतवर्षवर्णन आदि विषयांचा परामर्श आढळतो. उत्तर अमेरिकेतील मेक्सिको आणि यूकाटान, तसेच दक्षिण भारतातील पेरु आणि पॅटागोनिया आदि भाग भास्कराचार्यांना परिचित दिसतात.

**अन्य संस्कृत साहित्यात**-- श्रीहर्षकृत 'नैषधीय चरित्र' ( ५·५०;९८ ), दंडिनकृत 'दशकुमारचरित' ( उच्छ्वास. ६ ), बाणभट्टकृत 'हर्षचरित' ( उच्छ्वास ६–७ ), धोयीकृत 'पवनदूत' ( २७ ),तसेच बिल्हणकृत 'विक्रमांकदेवचरित' आदि संस्कृत ग्रंथांतहि महत्त्वपूर्ण भौगोलिक माहिती आढळते.

**मध्ययुगीन संस्कृत साहित्यात** -- इ. स. १३ व्या-१७ व्या शतकातील काही दुर्मिळ संस्कृतभाषीय भौगोलिक ग्रंथांचे संशोधन कर्नल विलफोर्ड यांनी केले आहे ( एशि. रिसर्चेस. ४·३७३–४७० ). त्यांनी निर्देशिलेले मध्ययुगीन भौगोलिक ग्रंथ पुढीलप्रमाणे होत :- ( १ ) **क्षेत्रसमास**-- संपूर्णतः भौगोलिक स्वरूपाच्या या पौराणिक ग्रंथाची एक प्रत पाटण्याच्या बिज्जल राजाच्या आज्ञेवरून स. १६४८ मध्ये नकलण्यात आली होती; (२) **मुंजप्रतिदेशव्यवस्था**-- 'भोजप्रतिदेशव्यवस्था' नामक भौगोलिक ग्रंथाचे मुंज राजाच्या आज्ञेवरून तयार केलेले पुनर्संस्करण; ( ३ ) **भुवनसागर**-- विजयनगरच्या बुक्क राजाच्या आज्ञेवरून वि. सं. १३४१ मध्ये हा तयार करण्यात आला; ( ४ ) **विक्रमसागर** — याचा निश्चित रचनाकाल आणि रचनाकर्ता अज्ञात आहे; ( ५ ) **भविष्य पुराणान्तर्गत भुवनकोश**-- या पौराणिक ग्रंथाचे एक परिवर्धित संस्करण स. १५५० मध्ये तयार करण्यात आले.

उपरोक्त सारे ग्रंथ सध्या अनुपलब्ध असले, तरी तत्संबंधीची सविस्तर माहिती बर्जेस यांनी अन्य एका स्वतंत्र लेखात दिली आहे ( इंडि. अँटि. २०. ४१८–४१९ ).

**मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात**—मध्ययुगीन संस्कृत शब्दकोश साहित्यात ( इ. स. ११-१२ वे शतक ) भारतातील विभिन्न देशनामांचे समानार्थक शब्द दिले असून, देशनामांची नामांतरे समजून घेण्याच्या दृष्टीने ते महत्त्वाचे आहेत. मात्र देशांच्या नामांतरांव्यतिरिक्त अन्य कोणतेहि विवरण या ग्रंथात आढळत नाही. यापैकी विशेष महत्त्वाचे शब्दकोश पुढीलप्रमाणे होत ( परिपत्रक पहा ).

उपरोक्त तीन शब्दकोशांपैकी पूर्वकालीन भौगोलिक ज्ञानपरंपरा निष्ठेने जतन करणारा 'अभिधानचिंतामणि' भौगोलिक दृष्ट्या सर्वाधिक महत्त्वाचा आहे. 'त्रिकांडशेष' ग्रंथ 'अभिधान'च्याच अनुकरणाने लिहिला असला तरी 'मध्यदेश' आणि 'पूर्वदेशा' संबंधीच्या परस्परविरोधी आणि घोटाळ्याच्या माहितीमुळे तो सदोष बनला आहे.

'वैजयंती कोशा'मध्ये 'अभिधान' आणि 'त्रिकांड-

## मध्ययुगीन शब्दकोश साहित्य

| ग्रंथ | ग्रंथकार | रचनाकाल | रचनास्थल |
|---|---|---|---|
| १. वैजयंती | यादवप्रकाश | इ. स. ११ वे शतक | कांजीवरम् |
| २. अभिधानचिंतामणि | हेमचंद्र | स. ११५० | गुजरात |
| ३. त्रिकांडशेष | पुरुषोत्तमदेव | स. ११५९ | ओरिसा |

शेष' यांना अपरिचित अशा निम्नलिखित देश-नामांतरांचा निर्देश आढळतो :—१. भौरिक–समतट; २. गंधार–दिहंड, ३. संभाल–शूरसेन; ४. अवंती–तक्ष-शिला ( वैजयन्ती. ९; २४·३१ ). याच कोशात अन्यत्र मेकल आणि कोशल देशांचा समावेश अपरांत ( पाश्चात्य ) मध्ये, शाल्व देशाचा समावेश प्राच्य देशात, आणि शूर-सेन देशाचा समावेश उदीच्य देशात केला आहे ( वैजयन्ती. २४; ३२; ३७ ). यावरून त्या देशांच्या भौगोलिक स्थानांची सुस्पष्ट कल्पना कोशकर्त्याला नसावी. अशा दोषांमुळेच तो 'अभिधान' च्या तुलनेने कमी प्रतीचा मानण्यात येतो.

# प्राचीन भौगोलिक अध्ययनाची साधने

## ( २ ) पूरक साहित्य

वैदिक आणि पौराणिक परंपरेतील ग्रंथांना पूरक अशी भौगोलिक माहिती सिकंदरच्या आक्रमणकालीन ग्रीक साहित्य, बौद्ध आणि जैन साहित्य, चिनी प्रवाश्यांची प्रवासवर्णने, प्राचीन आणि मध्ययुगीन शिलालेखसाहित्य, राजतरंगिणीसारखे प्रादेशिक इतिहासग्रंथ, आणि विभिन्न स्थापत्यपरंपरांमधून उपलब्ध होते. या साहित्याचे संक्षिप्त विवरण खाली दिले आहे.

**पर्शियन राज्यकाली** — भारतासंबंधीचा प्राचीनतम विदेशी निर्देश मिलेटस् ग्रामनिवासी ग्रीक भूगोलवेत्ता हिके-टेअस् ( इ. स. पू. ५४९–४८६ ) च्या ग्रंथात असून, त्याचे काळी पर्शियन ( इराणी ) साम्राज्याची पूर्व सीमा सिंधू नदीने बनत असे. या नदीतीरनिवासी गंधारी लोकांचा तसेच त्यानजिकच्या पर्वतीय लोकांचा निर्देश त्याच्या ग्रंथात आढळतो ( केंब्रिज हिस्टरी. १.३९४ ). पर्शियन सम्राट डेरियसच्या पर्सेपोलिस आणि नक्ष-इ-रुस्तुम शिला-लेखमते ( इ. स. पू. ४८६ ) सिंधु नदीच्या खोऱ्यातील पंजाब आणि सिंधु देश त्याकाळी पर्शियन साम्राज्यात समाविष्ट होत असत ( रॉलिन्सन, हिरोडोटस. २.४०३; ४·२०७ ).

डेरियस आणि क्सेर्क्सेसकालीन भारतवर्षाचे सविस्तर वर्णन हिरोडोटसच्या ( इ. स. ४८४–४३१ ) ग्रंथात आढळते. हिकेटेअसच्या ग्रंथाधारे लिहिलेल्या हिरोडोटसच्या ग्रंथात डेरियसकालीन भारत आणि इराण यांच्या परस्पर-संबंधांवर, तसेच डेरियसच्या शिलालेखातील अनेक संकीर्ण निर्देशांवर महत्त्वपूर्ण प्रकाश पडतो ( केंब्रिज हिस्टरी. १·३२९ ). त्याचे मते भारत हा समृद्ध लोकवस्तीचा देश असून, इ. स. पू. ३२५–३०० च्या दरम्यान वायव्य भारत आणि पंजाबात अनेक छोटी गणराज्ये अस्तित्वात होती. क्तेसियस नामक अन्य एका भूगोलकाराने इ. स. पू. ३९८ मध्ये भारतवर्णनाचा एक ग्रंथ लिहिला होता. परंतु त्यामध्ये भौगोलिक माहितीपेक्षा कल्पनारम्य दंतकथांचेच आधिक्य आहे.

**सिकंदरस्वारीसंबंधीच्या ग्रीक साहित्यात**—सिकंदरच्या स्वारीसमवेत ( इ. स. पू. ३२७–३२३ ) भारतात आलेल्या निअर्चोस, टॉलेमी आदि ग्रंथकारांनी त्याच्या भारतस्वारीचे सविस्तर वर्णन ग्रीक भाषेत लिहून युरोपातील लोकांना भारतभूमीचा सर्वप्रथम परिचय करून दिला ( केंब्रिज हिस्टरी, १·३९० ). हे सारे ग्रंथ आज नाहीसे झाले असले. तरी स्ट्रॅबो, जस्टिनस, प्लिनी, क्रिटस, कर्टियस आणि अरि-यन आदि उत्तरकालीन ग्रंथकारांनी त्याआधारे लिहिलेले सिकंदरस्वारीच्या वर्णनाचे ग्रंथ आज उपलब्ध आहेत. त्यांपैकी ग्रीक अधिकारी अरियनकृत 'इंडिका' ( इ. स. २ रे

शतक ) नामक अव्वल दर्जाच्या ग्रंथात ह्यदस्पेस् ( आधु. झेलम) आणि ह्यफसिस् (आधु. बियास) नद्यांच्या पलीकडील भारतवर्षाचे वर्णन प्रथमच आढळते. त्या तुलनेने कर्टियस्‌चा ग्रंथ दुय्यम प्रतीचा आहे. जे. डब्ल्यू. मॅक्रिंडल यांच्या 'अलेक्झांडर्स इन्व्हेजन' ( स. १८९३ ), आणि 'एन्शंट इंडिया अॅज डिस्क्राइब्ड बाय अर्ली क्लासिकल रायटर्स' ( स. १९०१ ) या दोन ग्रंथांत सिकंदरकालीन ग्रीक साहित्याचा समग्र अनुवाद आणि परामर्श आढळतो.

सिकंदरस्वारीसंबंधीच्या ग्रीक साहित्यात इ. स. पू. ३२७-३२४ कालीन वायव्य भारत आणि पंजाबातील जनपदांचे आणि नगरांचे यथातथ्य वर्णन आढळते. तत्कालीन इतिहासकारांच्या चक्षुर्वैसत्यम् माहितीवर आधारलेल्या या साहित्यातील स्थलांचा महाभारत, पुराणादि ग्रंथातील उदीच्य भारतीय स्थलांशी मेळ बसत नसला, तरी पाणिनीय व्याकरणातील स्थलांशी त्यांची सांगड घालता येते. या विशिष्ट दृष्टीने कै. वासुदेवशरण अग्रवाल यांचा 'पाणिनिकालीन भारतवर्ष' ग्रंथ विशेष महत्त्वाचा असून, वायव्य भारत आणि पंजाबच्या भूवर्णनाच्या दृष्टीने पाणिनि आणि ग्रीक साहित्य हे महाभारत, पुराणांपेक्षा अधिक विश्वसनीय असल्याचे आता सिद्ध झाले आहे.

**स्ट्रॅबोच्या ग्रंथात** — सिकंदरच्या आक्रमणाप्रमाणेच पर्थियन सम्राट मेनँडर ( मिलिंद, इ. स. पू. २ रे शतक ) आणि डेमिट्रिओस ( दत्तमित्र, इ. स. पू. १९० ) यांच्या बॅक्ट्रियासम्राट युक्रेतिदेसवरील आक्रमणाचे वर्णन करणाऱ्या या ग्रंथमते सिंध आणि ह्यदस्पेस ( आधु. झेलम ) नद्यांच्या दरम्यानच्या तक्षिला येथे समृद्ध आणि सुस्थिर राज्य होते. केकय, गंदरै ( गंधार ), मौसिकनोस्, पोर्तिकनोस आदि वायव्य भारतातील देशांचा निर्देशहि या ग्रंथात असून, त्यांपैकी 'गंदरै' म्हणजे 'गंधार' हे समीकरण संशयास्पद वाटते. कारण सिकंदरकालीन अन्य ग्रीक साहित्यात गंधार देशाचा निर्देश आढळत नाही.

**अरियनच्या ग्रंथात**—या ग्रंथकाराच्या 'इंडिका' नामक त्रिखंडात्मक ग्रंथात ( इ. स. २ रे शतक ) सिकंदरच्या निअर्कोस आदि सहप्रवाशांच्या वर्णनाच्या आधारे इ. स. पू. ४ थ्या शतकातील भारताचे प्रमाणभूत आणि प्रामाणिक वर्णन आढळते. या ग्रंथाच्या प्रथम भागात मेगॅस्थिनेस आणि इरॅटोस्थेनेस यांच्या ग्रंथाधारे भारतवर्षाचे सर्वसामान्य वर्णन, दुसऱ्या भागात निअर्कोसने सिकंदरसमवेत सिंधू नदीपासून पसितिग्रिसपर्यंत केलेल्या प्रवासाचा वृत्तांत, आणि तिसऱ्या भागात एकाकीपणामुळे निर्मनुष्य बनलेल्या पृथ्वीच्या दक्षिण भागाचे ( दक्षिण भारत ) वर्णन आढळते. अरियनच्या मते सिंधू नदीच्या पश्चिमेस अस्तकेनोइ ( हास्तिनायन ) आणि अस्सकेनोइ ( आश्वकायन ) लोक असून, त्या नदीच्या पूर्वेस सप्त-लोकसमूहयुक्त खरा भारतवर्ष सुरू होत असे. भारतवर्षाचे क्षेत्रफळ, तसेच त्यामधील नद्या, लोकसमूह आदींची माहितीहि तेथे आढळते.

**प्लिनीच्या ग्रंथात**—या ग्रंथकाराच्या 'नॅचरल हिस्टरी' नामक दशखंडात्मक ग्रंथापैकी तीन ते सहा भागांमध्ये भारतवर्षाचा भूगोल आणि लोकसमूह यांची माहिती असून, त्यापैकी प्रासंगिक लोकवर्णन विशेष महत्त्वाचे आहे.

**इरॅटोस्थेनेसच्या ग्रंथात**—या ग्रंथकाराच्या भूगोलशास्त्र-विषयक ग्रंथातहि सिकंदरस्वारीच्या साहित्याधारित भारत-वर्णन आढळते.

**मेगॅस्थिनेसच्या ग्रंथात**— सिकंदरमृत्यूनंतर २० वर्षांनी मौर्यदरबारी आलेल्या सीरिया आणि ईजिप्त देशांच्या वकिलांनी लिहिलेले भारतवर्णनपर बहुतांशी ग्रंथ नष्ट झाले असले, तरी त्यापैकी मगॅस्थिनेसने लिहिलेल्या 'इंडिका' मधील काही उतारे उपलब्ध आहेत. त्यांची संकलित आवृत्ती श्वानबेक यांनी स. १८४६ मध्ये, आणि इंग्रजी अनुवाद मॅक्रिंडल यांनी स. १८७७ मध्ये प्रकाशित केला.

भारतातील दीर्घकालीन वास्तव्यामुळे मेगॅस्थिनेसच्या ग्रंथात भारत देश, त्यामधील लोक, नद्या, शहरे, भूमीची सुपीकता, वन्य प्राणी, अश्व, गज, वृक्ष, जातीजमाती, लोकांचे व्यवसाय, तत्त्वज्ञानी लोक, ब्राह्मण, बौद्ध श्रमण आदींचे सविस्तर वर्णन आढळते. संद्रकोत्तोस ( चंद्रगुप्त मौर्य ) राजाशी त्याची अनेक वेळा मुलाखत झाली असून, अरियनच्या मते पोरोस ( पोरस ) राजालाहि तो भेटला होता.

**पेरिप्लसमध्ये**— स. ८५ कालीन भारताच्या समुद्रवर्ती प्रदेशाचे आणि त्यामधील बंदरांचे चक्षुर्वैसत्यम् वर्णन 'पेरिप्लस ऑफ दि इरिथ्रियन सी' या अनामिक ग्रंथकारकृत ग्रीक ग्रंथात आढळते. या ग्रंथाचा मॅक्रिंडल-कृत इंग्रजी अनुवाद उपलब्ध असून ( इंडि. अॅंटि. ८.१०७ ), त्यांच्या, तसेच 'एनसायक्लोपिडिआ ब्रिटानिका' मते स. ८०-८९ हा या ग्रंथाचा रचनाकाल असावा ( ए. ब्रि. २०.९४ ). अन्य काही अभ्यासकांच्या मते प्लिनी या ग्रीक इतिहासकाराच्या काळी ( सं. २३–७९ ) या ग्रंथाची रचना झाली असावी.

हिंदी महासागरातील व्यापाराच्या संदर्भग्रंथभूत अशा

'पेरिप्लस' मध्ये रक्तसमुद्र, पर्शियन सामुद्रधुनी आणि आफ्रिकेचा किनारा या पश्चिमेकडील देशांपासून पूर्वेस इंडोनेशिया (ईस्ट इंडीज) पर्यंतच्या इ. स. १ ल्या शतकातील सागरी व्यापाराचे सविस्तर वर्णन आढळते. या ग्रंथमते ईजिप्तहून सोमालीलँड आणि भारताप्रत जस्त, आणि भारत आणि ईजिप्तमधून रोमप्रत हस्तिदंत निर्यात होत असे. वायव्य भारतान्तर्गत शक राज्यकाली भारतातील अनेक नगरे 'मिन्नगर' नावाने सुविख्यात असून, त्या साम्राज्याच्या विनाशानंतर ती पुन्हा एकवार भारतीय नावांनी ओळखली जाऊ लागली.

पेरिप्लसमध्ये भारतवर्षातील सिंधु, मैस (मही), नम्मदुस (नर्मदा) आदि नद्यांचे, बॅरिगझ (भारुकच्छ), ओजेने (उज्जयिनी), तगर (तेर), सुप्पार (शूर्पारक), कल्लिअनें (कल्याण) आदि व्यापारी बाजारपेठांचे, तसेच स्यरस्त्रेने (सुराष्ट्र), अरकोसी (कंदाहार), गंदरै (गंधार), पंडियन (पांड्य) आदि देशांचे सविस्तर वर्णन आढळते. त्यांपैकी बहुतांशी समुद्रवर्ती बंदरांची आणि नगरांची ओळख पटत असून, काही बंदरे आज नामशेष झाली आहेत.

भारताच्या द्वीपकल्पीय भागाच्या अंतर्भागातील स्थलांचे पेरिप्लसमधील वर्णन ऐकीव माहितीवर आधारित, आणि म्हणूनच भौगोलिक दृष्ट्या चुकीचे दिसते. उदा. या ग्रंथमते पैठण गाव भडोचपासून २० दिवस प्रवासाच्या अंतरावर होते. वस्तुतः ते भडोचच्या २०० मैल आग्नेयेस आहे. पेरिप्लसमते तगर हे दक्षिण भारतीय बाजारपेठेचे गाव पैठणपासून १० दिवसांच्या प्रवासाच्या अंतरावर पूर्वेस होते. वस्तुतः ते (आधु. तेर) पैठणच्या आग्नेयेस आहे (जे. आर. ए. एस्., स. १९०१ ; पृ. ५२६).

टॉलेमीच्या ग्रंथात—सुविख्यात ग्रीक गणितज्ञ, ज्योतिर्विद आणि भूगोलकार टॉलेमीच्या (स. १२७-१६१) या भारत आणि दक्षिण आशिया भूगोलविषयक ग्रंथाचा (रचनाकाल इ. स. ५०; एनसायक्लोपिडिआ ब्रिटानिका. २०.८७) विवेचक इंग्रजी अनुवाद मॅक्रिंडल यांनी केला आहे (इंडि. अँटि. १३.३१३–४११).

टॉलेमीच्या अष्टविभागात्मक भूगोलग्रंथात भारतवर्षाचे विभिन्न जलसंचय प्रदेशांच्या अनुरोधाने सिंधु, गंगा आणि ब्रह्मपुत्रा नदीखोऱ्यांचे तीन उपविभाग कल्पिले असून, त्यांमधील देश, नगरे, नद्या, पर्वत, टेकड्यांचे, तसेच भारतवर्षातील सात प्रमुख पर्वतांचे, आणि त्यांमध्ये उगम पावणाऱ्या नद्यांचे वर्णन त्याने केले आहे.

'एनसायक्लोपिडिआ ब्रिटानिका' मते टॉलेमीचे प्राचीन भूगोलविषयक ज्ञान भूमध्य समुद्राच्या परिसरातील प्रदेशापुरते मर्यादित असून, दक्षिण आशियासंबंधी त्यास प्रत्यक्ष अशी काहीहि माहिती नव्हती (ए. ब्रि. २०.८७). त्याचे भारतवर्णन प्रवासी व्यापाऱ्यांच्या आणि खलाशांच्या ऐकीव माहितीवर आधारले असल्याने ते कधी यथातथ्य, तर कधी संदिग्ध, अतिशयोक्त आणि चुकीचे दिसते.

भूगोलकार टॉलेमीने तत्कालीन दक्षिण आशिया आणि भारतवर्षातील ज्ञात स्थले नकाशामध्ये अक्षांश-रेखांशासहित टिपण्याचा प्रयत्न केला आहे. परंतु त्याबाबतीतहि प्रवाश्यांनी अंदाजाने सांगितलेल्या अंतरावर आणि प्रवासकालावर विसंबल्यामुळे, तसेच काल आणि अंतरमापनाची साधने त्याचेकाळी आजच्याइतकी प्रगल्भ नसल्यामुळे त्याने सुचविलेली विभिन्न स्थलांची स्थाने, तसेच त्यांचे अक्षांक्ष-रेखांश बहुतांशी प्रसंगी चुकले आहेत.

टॉलेमीने गृहीत धरलेले विषुववृत्त आणि कर्कवृत्त वास्तव स्थानापासून दूरवर्ती असल्याने पृथ्वीच्या पूर्वगोलार्धातील त्याचे अक्षांश प्रत्यक्षाहून ७° ने कमी भरतात. विषुववृत्तस्थानी हरएक अक्षांश आणि रेखांशांच्या दरम्यान वस्तुतः ६० मैलांचे (६०० स्टेडिया) अंतर असताना टॉलेमी ते ५० मैल (५०० स्टेडिया) धरतो. त्यामुळे ५०० मैल अंतरावरील स्थले टॉलेमीच्या नकाशात १०° अक्षांश अंतरावर, म्हणजे १०० मैल कमी स्थानी टिपलेली दिसतात.

असे असले तरी, टॉलेमीच्या ग्रंथामुळे पौराणिक साहित्यातील अनेक माहिती पडताळून पाहता येत असून, त्याच्या माहितीच्या आधारे कर्नल यूल यांनी तयार केलेला प्राचीन भारताचा नकाशा स्मिथ यांच्या 'हिस्टॉरिकल ॲटलास ऑफ एन्शन्ट जिऑग्रफी' मध्ये प्रकाशित करण्यात आला आहे.

मॅक्रिंडल यांच्या अनुवादात टॉलेमीच्या ग्रंथातील आशिया आणि भारतासंबंधीच्या ६–७ व्या भागांची विस्ताराने चर्चा केली असली, तरी त्याच्या ग्रंथातील भूगोलासंबंधीचा दृष्टिकोन (१), भूमध्य समुद्रातील स्थले (२-६) ही प्रकरणेहि महत्त्वपूर्ण आहेत.

**बौद्ध साहित्यात**—इ. स. पू. ३–इ. स. २ रे शतक कालातील बौद्ध साहित्य प्राचीन भारतीय इतिहास, भूगोल आणि संस्कृतीच्या अध्ययनाच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण आहे. बुद्धकालापासून अशोकाच्या राज्यकालापर्यंतच्या

भारतवर्षाचे, तसेच तत्कालीन महाजनपदांच्या उत्पत्तीचे, परिवर्धनाचे, तसेच विनाशाचे प्रामाणिक चित्रण बौद्ध अंगुत्तर निकाय आदि ग्रंथांमध्ये उपलब्ध होते. या जनपदांचे सविस्तर विवेचन प्रास्ताविकातील ' भारतवर्षाचे जनपदात्मक ' विभाजन उपविभागात आम्ही केले आहे.

बौद्धधर्मीयांचे धार्मिक सिद्धांत विनय, सुत्त आणि अभिधम्म या तीन पिटकांमध्ये ( त्रिपिटक ) समाविष्ट असून, त्यांपैकी पहिल्या ग्रंथसमूहाची रचना बुद्धपरिनिर्वाणानंतर राजगृह गावी भरलेल्या प्रथम बौद्धधर्मपरिषदेत झाली.

त्रिपिटकांपैकी विनय पिटकामध्ये ' सुत्तविभंग, ' ' महावग्ग ', ' चुल्लवग्ग ' आदि ग्रंथ, आणि सुत्तपिटकामध्ये ' दीघनिकाय ' ; ' मज्झिमनिकाय ' ; ' संयुत्तनिकाय; ' ' अंगुत्तरनिकाय ' ; ' खुद्दकनिकाय ' हे ग्रंथ समाविष्ट होतात. ' खुद्दपाठ ' ; ' धम्मपद; ' ' उदान ' ; ' सुत्तनिपात ' ; ' विमानवत्थु ' ; ' थेरगाथा; ' ' जातक ' ; ' अपादान ' ; ' बुद्धवंस ' आदि ग्रंथ खुद्दनिकायचेच भाग मानले जातात. या ग्रंथाच्या ' स्थविर ' ( थेर ) आणि ' सर्वास्तिवादिन् ' सांप्रदायाच्या लोकांनी तयार केलेल्या अनुक्रमे पाली आणि तिबेटी व चिनी आवृत्त्या आज उपलब्ध आहेत.

बौद्ध संघाचे नियम आणि धार्मिक सिद्धांतविषयक उपरोक्त ग्रंथात तत्कालीन मध्यदेशान्तर्गत ( गंगा नदीचे खोरे ) विभिन्न जनपदे आणि नगरातील बौद्धधर्मप्रसाराचे प्रासंगिक, परंतु महत्त्वपूर्ण विवेचन आढळते. दैनंदिन जीवनातील चिरपरिचित दृष्टांतांच्या साह्याने गहनगूढ धर्मतत्त्वांचे विवेचन करण्यावर गौतम बुद्धाचा विशेष कटाक्ष असल्याने या ग्रंथात तत्कालीन भारतातील कृषिकार, व्यापारी, श्रेष्ठी आणि शिल्पकार आदींच्या जीवनासंबंधी महत्त्वपूर्ण निर्देश आढळतात.

त्रिपिटकांपैकी ' अभिधम्म पिटकां'मध्ये गौतम बुद्धाच्या धर्मवचनांचा आणि धर्मांशांचा संग्रह असल्याचे परंपरेने मानण्यात येते. परंतु स्थविरवादी आणि सर्वास्तिवादी सांप्रदायाच्या' अभिधम्म पिटकां'मध्ये परस्परविरोधी मते आढळत असल्याने ते ग्रंथ ' निकाय ' ग्रंथोत्तर ( इ. स. पू. ३ रे शतक ) असण्याची शक्यता अधिक वाटते. भर्हुत आणि सांची येथील शिलालेखांमध्ये निकाय ग्रंथातील वचनांचा निर्देश असून, अशोकाच्या आज्ञालेखांतहि या साहित्याचे पडसाद आढळतात. अशोकाच्या राज्यकालीन तृतीय धर्मपरिषदेमध्ये रचलेल्या ' कथावत्थु ' मध्येहि या ग्रंथाचा निर्देश आढळतो.

निकाय ग्रंथांपैकी गौतम बुद्धाच्या विभिन्न बोधिसत्त्व अवतारासंबंधीच्या 'जातक' ग्रंथात इसवी सन पूर्वकालीन भारतातील सामाजिक परिस्थितीचे, तसेच तत्कालीन भारतातील भौगोलिक स्थलांचे विवरण आढळते. बुद्धघोषविरचित निकाय ग्रंथांचे भाष्यग्रंथ, तसेच सिलोनच्या इतिहासासंबंधीचे ' महावंश ' आणि ' दीपवंश ' ग्रंथ भौगोलिक आणि सांस्कृतिक दृष्टीने महत्त्वपूर्ण आहेत.

सुत्तपिटकान्तर्गत बौद्ध धर्मविवेचनासंबंधीचे शंकासमाधान करणाऱ्या ' मिलिंदपन्हो ' या इंडोग्रीक सम्राट मेनँडर ( मिलिंद, इ. स. पू. २ रे शतक ) राजाशी संबंधित ग्रंथात वायव्य भारतातील बौद्ध स्थलांचा निर्देश आढळतो.

उपरोक्त बौद्धधर्मीय साहित्यात हिंदू आणि जैनधर्मीय धार्मिक साहित्याप्रमाणेच अतिशयोक्ती, परस्परविरोधी विधाने आदि दोष आढळत असले, तरी बौद्ध धर्माच्या जन्मभूमीभूत बिहार प्रांताचे, आणि त्यामधील बुद्धजीवनाशी संबंधित स्थलांचे सविस्तर आणि भौगोलिक दृष्ट्या यथायोग्य वर्णन तेथे आढळते. बुद्धजीवनाशी संबंधित निम्नलिखित आठ प्रमुख यात्रास्थलांचे या साहित्यातील वर्णनहि महत्त्वाचे आहे :–१. लुंबिनी (बुद्धजन्मस्थान); २. बोधिगया ( बुद्ध परमज्ञानप्राप्तिस्थान ); ३. सारनाथ (धर्मचक्रप्रवर्तनस्थान ); ४. श्रावस्ती (तीर्थंकर चमत्कारदर्शनस्थान); ५. राजगृह (हस्तिदमनस्थान); ६. वैशाली ( बुद्धनिवासस्थान ); ७. कुशीनारा ( बुद्ध परिनिर्वाणस्थान ); ८. सांकाश्य ( बुद्ध स्वर्गावतरणस्थान ).

उपरोक्त पालीभाषीय ग्रंथांच्या तुलनेने संस्कृतभाषीय बौद्धधर्मग्रंथ ( इ. स. ६–१२ वे शतक ) भौगोलिक दृष्ट्या कमी महत्त्वाचे असून, त्यापैकी ' महावस्तु ', ' ललितविस्तर ' आणि ' बुद्धचरितकाव्य ' मध्ये बुद्धचरित्राच्या, ' बोधिसत्त्वावदान कल्पलता ' मध्ये गौतम बुद्धाच्या पूर्वजन्माच्या, तसेच ' अशोकावदान ' मध्ये सम्राट अशोकजीवनासंबंधीच्या आख्यायिका आढळतात.

उपरोक्त बौद्ध संस्कृत साहित्य भौगोलिक दृष्ट्या महत्त्वपूर्ण अशा इ.. स. ६ व्या शतकात रचले असले, तरी त्यामधील देशस्थितीचे भौगोलिक वर्णन मात्र शतकानुशतकांपूर्वीचे, म्हणजे गौतमबुद्धाच्या कालातील आहे. समकालीन भारतातील देशविभाग, नगरे, नद्या, पर्वत आदींची; सुवर्णभूमी ( आधु. दक्षिण ब्रह्मदेश ), जावा, सुमात्रा, कंबूज आदि बृहद्भारतीय वसाहतींची; अथवा

बौद्ध भिक्षूंच्या चीन आणि मध्य आशियातील प्रवासवर्णनांची माहिती देण्याऐवजी बुद्धकालीन भारतवर्षाचे कल्पनारम्यवर्णन ते विस्ताराने देतात. समकालीन भूगोलाचा गंध नाही, आणि बुद्धकालीन भूगोलाची पुरेशी माहिती नाही, अशा चमत्कारिक परिस्थितीमुळे या ग्रंथातील भौगोलिक वर्णन निरुपयोगी बनते. त्यामध्ये निर्देशिलेले 'रत्नद्वीप' आणि खंडद्वीप हे देश, 'बंधुमती' आणि 'पुण्यवती' ही नगरे, तसेच त्रिशंकु आणि ' धूमनेत्र ' हे पर्वत प्राचीन साहित्यात अन्यत्र कोठेहि आढळत नाहीत. त्यावरून ते कल्पनारम्य असावेत.

**चिनी प्रवाश्यांची प्रवासवर्णने**—उत्तर भारतीय बौद्ध स्थानांसंबंधीची ( इ. स. ५–७ वे शतक ) महत्त्वपूर्ण माहिती चिनी प्रवाश्यांच्या प्रवासवर्णनांमध्ये उपलब्ध होते. अन्य विदेशी साहित्याप्रमाणे ते सांगोवांगी माहितीवर आधारित, अतिशयोक्त आणि विपर्यस्त नसून, चक्षुर्वैसत्यम् माहितीच्या आधारे लिहिले आहेत. अन्य बौद्ध साहित्यासमवेत चीनमध्ये त्यांचे शतकानुशतके श्रद्धापूर्वक जतन करण्यात आले आहे.

**महत्त्व**—फाहियेन् आणि ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात तत्कालीन भारतातील ( इ. स. ६–७ वे शतक ) धार्मिक, व्यापारी, तसेच राजकीय परिस्थितीचे यथातथ्य चित्रण असून, उत्तरकालीन पौराणिक साहित्यावरहि त्यांचा प्रभाव दिसतो. उदा. वायु आणि मत्स्य पुराणातील भद्राश्व आणि केतुमाल वर्षांची ( आधु. चीन, आग्नेय आशिया आणि अमूदरिया नदीकाठचा मध्य आशियाचा प्रदेश ) माहिती, तसेच भारतवर्षातील काही नवी जनपदनामे या प्रवासवर्णनांवरून घेतलेली दिसतात.

**पूर्वपीठिका**—इ. स. १ ल्या शतकात बौद्ध धार्मिक साहित्याचा चीनमध्ये प्रथम प्रवेश होऊन, त्यामधूनच भारतातील बौद्ध तीर्थांच्या यात्रेची नवी ऊर्मी चिनी लोकांमध्ये उत्पन्न झाली. इ-त्सिंग् ( स. ६७० ) च्या मते स. १७० मध्ये बोधिगया येथील महाबोधि वृक्षाच्या दर्शनार्थ भारतात आलेल्या २० चिनी यात्रेकरूंच्या स्मृत्यर्थ श्रीगुप्त राजाने तेथे ' चीन मंदिर ' संज्ञक मंदिर बांधले होते.

**प्रवाश्यांची नामावली**—भारतात आलेले प्रमुख चिनी प्रवासी आणि त्यांच्या प्रवासवर्णनांची वैशिष्ट्ये पुढीलप्रमाणे होत :—

## भारतात आलेले चिनी प्रवासी

| प्रवासी | प्रवासस्थळे आणि वैशिष्ट्ये |
|---|---|
| १. चु–सि–हिंग् ( स. २९० ) | खोतान |
| २. फा–सिंग् ( स. ३०० ) | उत्तर भारत |
| ३. चि-इ आणि हो-युन् | बोधिगया येथे शिलालेख ( जे. आर. ए. एस्. १३.५५२ ) |
| ४. फाहियेन् ( स. ४०० ) | उपलब्ध प्रवासवर्णनात प्राचीनतम. बौद्ध धर्मग्रंथ गोळा करण्यासाठी वै राजघराण्याचा प्रतिनिधी म्हणून खोतानमार्गे पेशावर आणि नगरहारपर्यंत भारतप्रवेश. १७० ग्रंथ चीनला नेले. |
| ५. सुंग्–युम् आणि वें–सँग् ( स. ५१८ ) | |
| ६. ह्युएन्त्संग् ( स. ६२९–६४५ ) | उपलब्ध प्रवासवर्णनात सर्वोत्कृष्ट; वायव्य, उत्तर, पूर्व आणि मध्य भारतातील बौद्ध स्थळांचे प्रामाणिक वर्णन. |
| ७. वँग–ह्युएन्–त्से ( स. ६४३ ) | नेपाळ, मगध, गृध्रकूट टेकडी, महाबोधि, तिबेट; त्यापैकी गृध्रकूट आणि महाबोधि शिलालेख; मगध राजाला पकडून चीनला नेले. |
| ८. इ–त्सिंग् ( स. ६७३ ) | — |
| ९. उ–काँग् ( इ. स. ८ वे शतक ) | — |

**फाहियेनूचे प्रवासवर्णन** -- उपलब्ध चिनी प्रवासवर्णनात 'शिह' ( शाक्यपुत्र ) फाहियेनूचे ( स. ४०० ) 'फो-को-कि' नामक प्रवासवर्णन प्राचीनतम असून, भारतातील प्राचीन बौद्ध ग्रंथांच्या प्राप्त्यर्थ तो स. ३९९ मध्ये भारतास आला, आणि स. ४१३ मध्ये मायदेशी परतला त्याच्या प्रवासवर्णनाचा आद्य फ्रेंच अनुवाद स. १८३६ मध्ये अबेल रेम्सत् यांनी प्रसिद्ध केला.

फाहियेनूचे प्रवासवर्णन ह्युएन्त्संगच्या तुलनेने त्रोटक आणि कमी चौकस आहे. त्यामध्ये उपयोजिलेले 'योजन' हे अंतराचे परिणामहि संदिग्ध असून, प्राचीन उत्तर भारत, मगध आदि देशांत त्याची व्याप्ती भिन्न असे.

**ह्युएन्त्संगचे प्रवासवर्णन** -- भारतात आलेल्या चिनी प्रवाश्यांमध्ये ह्युएन्त्संगचे 'सि-यु-कि' हे प्रवासवर्णन सर्वाधिक विस्तृत आणि सर्वोत्कृष्ट आहे. ह्युएन्त्संग हा प्रतिष्ठाप्राप्त प्रकांड पंडित, विचक्षण निरीक्षक आणि तपशीलवार प्रवासवृत्तलेखक असल्याने इ. स. ७ वे शतककालीन भारतवर्षातील बौद्ध स्थलांचे व्यासंगी वर्णन त्याच्या प्रवासवर्णनात आढळते. त्याच्या प्रवासाचा मुख्य हेतू बौद्ध धर्मविषयक शंकासमाधान हाच असल्याने भारतातील अनेक लुप्तप्राय तीर्थस्थानांचे साग्र आणि ऐतिहासिक चित्रण तो करतो. आपल्या प्रवासवर्णनाच्या अखेरीस त्याने म्हटल्याप्रमाणे, हरएक देशाची निसर्गवैशिष्ट्ये, भौगोलिक सीमारेषा, हवामान आणि लोकाचार त्याने यथाशक्य अचूकपणे नमूद केले आहेत. देशोदेशीच्या आचारविचारांवर उच्चभ्रू शेरे मारण्याचा मोह त्याने टाळला असून, हरएक देशाची वैशिष्ट्ये त्याने विचक्षणपणे टिपली आहेत ( वॉटर्स, २.३०५ ).

**भारतप्रवासाचा कालानुक्रम** — स. ६२९ मध्ये चीनहून निघालेला ह्युएन्त्संग १४ वर्षांच्या भारतप्रवासानंतर स. ६४५ मध्ये मायदेशी परतला. भारतातील महत्त्वपूर्ण बौद्ध स्थळी अनेक महिने निवास करून, तसेच वर्षाकालीन चार महिने मननचिंतनात व्यतीत करून त्याने आपला प्रवास केला. वुई-लिह् लिखित ह्युएन्त्संगच्या जीवनचरित्रात त्याच्या प्रवासवर्णनाची तारीखवार माहिती दिली आहे. या साऱ्या गोष्टी जमेस धरून स्मिथ यांनी सुचविलेले ह्युएन्त्संगच्या भारतप्रवासाचे संभाव्य वेळापत्रक पुढीलप्रमाणे आहे ( परिपत्रक पहा ).

**प्रवासमार्ग** — मध्य आशियातील तुर्फान→इस्सिकुल→ताश्कंद मार्गाने भारतास आलेला ह्युएन्त्संग पामीर→काशगर→खोतान या मध्य आशियातील अन्य मार्गाने

## ह्युएन्त्संगच्या भारतप्रवासाचे वेळापत्रक

| वर्ष | मुक्काम | मुक्काम काल |
|---|---|---|
| स. ६३० | कपिश ( शालाक बौद्धमठ ) | ३ महिने |
| स. ६३१-६३२ | कश्मीर | २ वर्षे |
| स. ६३३ | पूर्व पंजाब (चीनभुक्ति) | १४ महिने |
| स. ६३४ | जालंधर | ४ महिने |
| स. ६३५ | बिजनौर ( मतिपुर ) | ८ महिने |
| स. ६३६ | कान्यकुब्ज ( भद्रविहार ) | ३ महिने |
| स. ६३७ | बिहार ( नालंदा बौद्धमठ ) | १५ महिने |
| स. ६३८ | बिहार ( हिरण्य पर्वत ) | १ वर्ष |
| स. ६३९ | कृष्णा नदीकाठचे धनकटक | ४ महिने |
| स. ६४० | दक्षिण भारत ( कांचीपुर) | ४ महिने |
| स. ६४१ | महाराष्ट्र (नासिक) | काही महिने |
| स. ६४२ | पर्वत ( जम्मू ) | २ महिने |
| स. ६४३ | नालंदा | ६ महिने |
| स. ६४३ | उत्तर प्रदेश ( पिलोशन ) | २ महिने |
| स. ६४४ | खोतान | ८ महिने |

चीनला परतला. महायानपंथीय सूत्रग्रंथांचे १२४ ग्रंथ, तसेच अन्य ५२४ बौद्ध ग्रंथ त्याने बावीस घोड्यांवर लादून चीनला नेले. चिनी सम्राट तै-त्सुंग्च्या आज्ञेवरून त्याने निम्नलिखित ६५७ बौद्ध ग्रंथांचे चिनी भाषेत भाषांतर केले :-(१) महायानपंथीय सूत्र आणि शास्त्र ग्रंथ-४१६; ( २ ) स्थविरसूत्र-१४; ( ३ ) महासांघिकसूत्र १५; ( ४ ) महिशासक सूत्र-२२; ( ५ ) सम्मतियसूत्र—१५; ( ६ ) काश्यपीयसूत्र—१७; ( ७ ) धर्मगुप्तसूत्र ४२: ( ८ ) सर्वास्तिवादिनसूत्र—६७; ( ९ ) यिन्-लुन् ( तर्कशास्त्रग्रंथ )-३६; ( १० ) शेंग-लुन् ( भाष्यग्रंथ )—१३. यापैकी ७५ ग्रंथ चिनी त्रिपिटकात समाविष्ट आहेत.

**आधुनिक अनुवाद** — ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनाचा आद्य फ्रेंच अनुवाद एम्. ज्युलियन यांनी ( स. १८५७ ) आणि इंग्रजी अनुवाद रेव्ह. सॅम्युअल बील यांनी 'बुद्धिस्ट रेकॉर्डस ऑफ दी वेस्टर्न वर्ल्ड' (स. १८८४)

नावाने केला. या प्रवासवर्णनाचा विवेचक अनुवाद थॉमस वॉटर्स ( स. १९०१ ) यांनी केला.

**वैशिष्टये**—आपल्या भौगोलिक स्थलवर्णनात स्थल-नाम, तसेच अन्य स्थानाच्या संदर्भातील त्याची दिशा-आणि अंतर या गोष्टी ह्युएन्त्संग कटाक्षाने नमूद करतो. यापैकी स्थलनामे आणि दिशावर्णन याबाबतीत त्याची माहिती अचूक असून, दोन स्थलांमधील अंतर मात्र अनेक वेळा चुकलेले दिसते. त्याने वर्णिलेले दोन देशां-मधील अंतर हे राजधानीच्या गावामधील असल्याचे लक्षात घेतल्यास अंतराच्या बाबतीतील हे घोटाळे बऱ्याच अंशी कमी होतात. राजधानी हा देशाचा मध्यबिंदू कल्पून त्याचे प्रवासवर्णन लिहिले असून, कोणत्याहि देशातील राजधानीच्या गावी प्रथम जाऊन तेथील राजास आपले ओळखपत्र सादर करण्याची त्याची पद्धती असे.

**देशनामे**—राजधानीच्या नावावरून देशनाम सिद्ध करण्याची ह्युएन्त्संगने अवलंबिलेली पद्धती बहुतांशी प्राचीन भारतीय देशनामांच्या बाबतीत यथायोग्य असली, तरी काही दुर्मिळ ठिकाणी त्याचा हा होरा चुकतो ( जसे–उत्तर कोशल देश–श्रावस्ती नगरी ). उप-लब्ध देशनामांचे संस्कृतभाषीय रूप कटाक्षाने स्वीकारून त्याचे चिनी रूप तो देतो ( जसे–श्रावस्ती–शि–लो–फ–शि–ति = फाहियेन्–सावत्थि–शे–वै ). संस्कृत देशनामाविषयाच्या या अभिनिवेशात कधीकधी प्रचारात नसलेल्या देशनामांचा प्रयोगहि तो अट्टाहासाने करतो. ( जसे–चीनभुक्ति = आधु. फिरोजपुर प्रदेश ). त्याच्या प्रवासवर्णनातील बौद्ध आणि हिंदू देवमंदिरांतील उपा-सकांची संख्या ही मंदिरांच्या सेवेकऱ्यांची असून सामान्य उपासकांचा निर्देश तेथे अभिप्रेत नसतो. बौद्ध मंदिरातील सेवेकरी मठाच्या आवासातच रहात असल्याने हिंदू मंदि-रांच्या बाबतीतहि हीच पद्धती त्याने स्वीकारली आहे.

ह्युएन्त्संगने जातीने भेट दिलेल्या स्थलांचा निर्देश त्याने ' हिंग ' उपाधीने केला असून, सांगोवांगी माहितीच्या आधारे त्याने केलेल्या स्थलवर्णनाच्या प्रारंभी त्याच्या टीकाकारांनी ' यि ' ( संशयास्पद ) उपाधी लावली आहे. हे लक्षात घेतले असता त्याच्या प्रवासवर्णनातील विश्व-सनीय–अविश्वसनीय भाग लक्षात येऊ शकतो.

**वैगुण्ये**—ह्युएन्त्संग हा बौद्ध तीर्थस्थलांबाबत एकाग्र-चित्त असल्याने अन्य स्थलांबाबत त्याची दृष्टी उपेक्षेची अथवा कुचेष्टेची दिसते. बौद्ध धर्म हा जगातील सर्वश्रेष्ठ धर्म असल्याच्या अहंकारी धारणेतून भारताचे निरीक्षण तो करतो.

आपले सारे प्रवासवर्णन चीनमध्ये परत गेल्यानंतर स्मृतीच्या आधारे ह्युएन्त्संगने लिहिल्यामुळे दोन स्थलां-तील त्याची अंतरे नेहेमी चुकतात. सपाट प्रदेशातील सरळ रस्त्यावर त्याचे ५ ली = १ मैल हे परिमाण अचूक ठरत असले, तरी मध्य आशियातील डोंगराळ प्रदेशात, अथवा दक्षिण भारतातील जंगलमय प्रदेशातील त्यांची अंतरे अतिशयोक्त दिसतात. उदा. कांचीपुर आणि मलय-कूट यांच्या दरम्यान ६०० मैलांचे अंतर तो सांगतो. वस्तुत: ते १५० मैलांचे आहे. सांगोवांगी माहितीवर विसंबल्यानेहि या घोटाळ्यात भर पडते. उदा. ओरिसा-मधील चरित्रपुर आणि सिलोन यांच्या दरम्यान ४ हजार मैलांचे अंतर असल्याचे तो लिहितो.

ह्युएन्त्संगने आपला सारा प्रवास राजरस्त्याने न करता कधीकधी आडवळणाच्या मार्गाने केला असून, आपल्या पायी प्रवासात प्रतीत झालेल्या अंतराचे अंदाजी आकडे त्याने नमूद केले आहेत. हे लक्षात न घेतल्याने, तसेच ह्युएन्त्संगचे प्रत्येक अंतराचे आकडे शब्दश: घेतल्याने कनिंगहॅम यांची अनेक अनुमाने हास्यास्पद बनली आहेत. ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनातील देशांची क्षेत्रफळेहि ऐकीव माहितीवर आधारित, आणि म्हणूनच अतिशयोक्त आहेत.

**जैन साहित्यात**—बौद्ध साहित्याप्रमाणेच जैन आगम साहित्यहि ( इ. स. पू. ४–इ. स. ६ वे शतक ) भौगोलिक दृष्टया महत्त्वपूर्ण असून, त्यामध्ये प्रत्येकी १२ अंगे व उपांगे, १० प्रकीर्ण, ६ छेदसूत्रे, आणि १ नंदीसूत्र आदींना समावेश होतो.

वर्धमान महावीरकालीन एकहि जैन ग्रंथ आज विशुद्ध स्वरुपात उपलब्ध नाही. जैनधर्मीय परंपरेनुसार १४ पर्वा-मध्ये संकलित केलेल्या महावीरकालीन विभिन्न जैन शिक्षा महावीराच्या मृत्यूनंतर १६० वर्षांनी ( इ. स. पू. ३०७ ) पाटलिपुत्र येथे भरलेल्या प्रथम जैन भिक्षुपरिषदेत पुनः-संकलित करण्यात आल्या. स. ३७३ च्या सुमारास पडलेल्या भयंकर दुष्काळामुळे खंडित झालेली जैन शिक्षांची परंपरा पुन्हा सुरू करण्यासाठी मथुरा येथे स्कंदिल नामक आचार्यांच्या नेतृत्वाखाली आणि वलभी येथे नागार्जुनसूरी यांच्या नेतृत्वाखाली, दोन स्वतंत्र जैन परिषदा भरविण्यात आल्या. त्यांमधूनच दोन स्वतंत्र संप्रदायांच्या जैन धर्म-ग्रंथांची निर्मिती झाली. या मतभेदांचे निराकरण करण्या-साठी स. ५२६ मध्ये देवर्धिगणि क्षमाश्रमणाच्या नेतृत्वा-

खाली वलभी येथे भरलेल्या अन्य एका धर्मसभेने जैन आगम ग्रंथांना प्रथमच ग्रंथनिबद्ध केले. परंतु तेथेहि दोन सांप्रदायांमध्ये मतैक्य होऊ शकले नाही.

उपरोक्त पुनःसंस्करणामुळें जैन आगम ग्रंथातील महावीरकालीन मूलभाग अथवा शुद्ध पाठ शोधणे दुष्कर बनते. भाष्यकार नंदीच्या मते 'नायाधम्मकहा' नामक आगम ग्रंथात ३३ कोटी पदे हवीत. परंतु प्रत्यक्षात ती कितीतरी कमी भरतात. भाष्यकार अभयदेवाच्या मते आगम ग्रंथांचा पाठ अनेक ठिकाणी अशुद्ध आणि दुर्बोध असून त्यामधील 'दिठ्ठिवाय', 'पंचकप्प', 'महापरिण्ण' आदि अनेक महत्त्वाचा भाग आज लुप्त झाला आहे. श्रेणिक अजातशत्रु, उदयन, प्रद्योत आदि थोड्या राजांचा अपवाद वगळता त्यामध्ये निर्देशिलेले अन्य सारे राजे काल्पनिक आहेत.

अशा तऱ्हेने बहुतांशी उपलब्ध जैन साहित्य बौद्ध आणि हिंदू साहित्याच्या तुलनेने उत्तरकालीन, प्रक्षिप्त, अतिरंजित आणि कल्पनारम्य स्वरूपाचे असून, त्यामधील अनेक महत्त्वाचे ग्रंथ अद्याप मुद्रित स्वरूपात उपलब्ध नाहीत. त्यांचे उत्तरकालीन पुनःसंस्करण जैन धर्माची जन्मभूमी आणि महावीराच्या कर्मभूमीभूत बिहारपासून सुदूर अंतरावरील गुजरातमध्ये झाले आहे. त्यामुळे तत्संबंधीचे या ग्रंथातील निर्देश अस्पष्ट आणि मोघम आहेत. त्यामध्ये निर्देशिलेले भारतवर्षान्तर्गत अनेक देश, नद्या, पर्वत आदीहि कल्पनारम्य आहेत.

तत्रापि काही प्रमुख जैन धर्मग्रंथातील भौगोलिक माहिती निर्विवादपणे महत्त्वपूर्ण आहे. 'जंबुदीवपण्णत्ती' या जैनधर्मीयांच्या सहाव्या उपांग ग्रंथात जंबूद्वीपाची सात वर्षे, तसेच भारतवर्षाचे सविस्तर वर्णन असून, त्यामधील जैनधर्मीय तीर्थांचे वर्णन जिनप्रभसूरीच्या 'विविधतीर्थकल्प' ग्रंथाइतकेच महत्त्वपूर्ण आहे. मात्र त्यामधील सत्य आणि कल्पितमिश्रित भौगोलिक माहिती पारखून घेणे आवश्यक आहे.

जैन 'भगवतीसूत्र' आणि 'कल्पसूत्र' या वर्धमान महावीराच्या जीवनाशी संबंधित ग्रंथांत त्याच्या चरणस्पर्शपुनीत तीर्थांचा निर्देश असून, 'नायाधम्मकहा' मध्ये त्याच्या शिक्षा ग्रथित केल्या आहेत. 'उवासगदसौ' ग्रंथात जैन भिक्षुजीवनाचे विवरण असून, 'आचारांग' आणि 'उत्तराध्ययन' ग्रंथ भाषाशास्त्रीय दृष्टीने महत्त्वाचे आहेत. या तसेच 'भगवतीविहायपण्णत्ती'; 'तिलोयपण्णत्ती', 'अंतगदसौ', 'पण्हावागरनैयम्', 'विवागसूय', 'आवश्यकसूय', 'निरयावलिय-सूय' 'पण्णवणा' 'लोकविभाग' 'ओव वैय-सूय' आदि जैन ग्रंथांत महत्त्वपूर्ण भौगोलिक माहिती आढळते.

जैन आगम साहित्यावरील 'निज्जुति', 'भास', 'चुण्णि' आदि भाष्यकारांचे मध्ययुगीन भाष्यग्रंथ त्यामधील प्राचीनतम आख्यायिकांमुळे (वृद्ध व्याख्यान) महत्त्वपूर्ण बनले आहेत. आगम ग्रंथांच्या यथार्थ ज्ञानासाठी त्यांचा उपयोग होतो.

जैन आगम साहित्यातील भौगोलिक स्थानांचे विवरण डॉ. जगदीशचंद्र जैन यांच्या 'इंडिया ॲट दी टाईम ऑफ जैन कल्पसूत्राज्', तसेच डॉ. भोगीलाल सांडेसरा यांच्या 'जैन आगम साहित्यमां गुजरात' ग्रंथात आढळते.

**देशनामावली** —'जैन 'प्रज्ञापना' ग्रंथात भारतातील प्रमुख देशांची नामावली दिली असून, नेमिचंद्रकृत 'प्रवचनसारोद्धार प्रकरणा'त या देशांच्या राजधान्यांची गावे, तसेच 'रत्नसार' नामक अन्य एका ग्रंथात त्यांमधील ग्रामसंख्या दिली आहे. या नामावलीचे सविस्तर विवरण प्रास्ताविकातील 'भारतवर्षाच्या जनपदात्मक विभाजना'च्या विभागात आम्ही केले आहे.

**जैनतीर्थे** —या तीर्थांची सविस्तर माहिती जैन धार्मिक साहित्य आणि शिलालेखात असून, त्यापैकी श्वेतांबरपंथीय तीर्थांचे संशोधन प्रा. विद्याधर जोहरापुरकर यांच्या 'तीर्थवंदनसंग्रह' ग्रंथांत केले आहे. इ.स.५ व्या–१८ व्या शतकातील सुमारे ४० संस्कृत, प्राकृत, अपभ्रंश, हिंदी आणि गुजराती दिगंबरपंथीय मुद्रित आणि हस्तलिखित ग्रंथांतील जैन तीर्थविषयक निर्देश त्यामध्ये एकत्र केले आहेत. त्यापैकी इ. स. ५ व्या–१० व्या शतकातील ग्रंथकार आणि त्यांचे ग्रंथ पुढीलप्रमाणे होत (परिपत्रक पहा).

**प्रमुख जैन तीर्थे**—जैन साहित्यातील ६२ प्रमुख तीर्थांपैकी २१ तीर्थे तीर्थंकरांशी संबंधित असून, त्यापैकी कैलास, श्रावस्ती, मिथिला, आणि भद्रिला या तीर्थांची जैन यात्रापरंपरा आज नष्ट झाली आहे. अन्य तीर्थे आज प्रचारात आहेत. ४१ तीर्थंकरेतर तीर्थांपैकी शत्रुंजय, तुंगी, मेंढ्रगिरी, गजपंथ आणि राजगृह हे पर्वत, आणि उज्जयिनी, तेर, मणिमत् (तारंगा), वंशगिरि (कुंथलगिरि) ही तीर्थे सध्या प्रचारात असून, अन्य तीर्थे स्मृतिशेष झाली आहेत.

जैन तीर्थंकरांशी संबंधित तीर्थस्थाने श्वेतांबर आणि दिगंबर पंथीयात सारखीच पवित्र असून, सध्या श्वेतांबरपंथीय

## प्राचीन दिगंबरपंथीय जैन ग्रंथकार

| ग्रंथकाराचे नाव | काल | ग्रंथाचे नाव | तीर्थनिर्देश |
|---|---|---|---|
| १. समंतभद्र | इ. स. ५ वे शतक | स्वयंभूस्तोत्र | |
| २. यतिवृषभ | ,, ५ ,, ,, | तिलोयपण्णत्ती | |
| ३. पूज्यपाद | ,, ६ ,, ,, | निर्वाणभक्ति | भारतातील ६२ जैनतीर्थांचे वर्णन (५ तीर्थंकर जन्मस्थाने; १६ तीर्थंकर निर्वाणस्थाने; ४१ अन्य तीर्थस्थाने ). |
| ४. रविषेण | ,, ७ ,, ,, | पद्मचरित ( पद्मपुराण ) | |
| ५. जटासिंहनंदि | ,, ७ ,, ,, | वरांगचरित | |
| ६. जिनसेन | ,, ८ ,, ,, | हरिवंश पुराण | |
| ७. गुणभद्र | ,, ९ ,, ,, | उत्तर पुराण | |
| ८. हरिषेण | ,, १० ,, ,, | बृहत्कथाकोश | |

म्हणून सुविख्यात असणाऱ्या शंखेश्वर, चारूप, अझारा, नलेड्डु, डभोई आणि वडाली आदि स्थानांचा निर्देश मध्ययुगीन दिगंबरपंथीय ग्रंथांतहि आढळतो. याचे उलट सध्या दिगंबरपंथीय म्हणून सुविख्यात असणाऱ्या मुक्तागिरि, हुलगिरि, बावनगज आदि तीर्थांचा निर्देश मध्ययुगीन श्वेतांबरपंथीय ग्रंथांत आढळतो. त्यावरून उभय पंथांचे लोक या तीर्थांना पवित्र मानत असावेत.

**शिलालेख साहित्यात**—पौराणिक, बौद्ध आणि जैन साहित्यातील भौगोलिक माहितीहून वेगळ्या धर्तीची, म्हणजेच विशिष्ट स्थानाच्या राजकीय भूगोलाची माहिती शिलालेख साहित्यात उपलब्ध होते. या विशिष्ट दृष्टीने इ. स. पू. ३ ऱ्या शतकापासून उपलब्ध होणारे शिलालेख आणि ताम्रपट साहित्य भारताच्या प्रादेशिक भूगोलाध्ययनासाठी सर्वाधिक महत्त्वपूर्ण मानण्यात येते. कश्मीरचा अपवाद वगळता भारतातील बहुतांशी प्रांतांमध्ये असे शिलालेख आणि ताम्रपट उपलब्ध झाले असून, त्यापैकी सम्राट अशोकाचे भारताच्या विभिन्न भागात विखुरलेले आज्ञालेख, खारवेलाचा हाथीगुंफा शिलालेख, रुद्रदामनाचा जुनागढ शिलालेख आणि समुद्रगुप्ताचा अलाहाबाद प्रशस्तिलेख विशेष उल्लेखनीय आहेत. त्यावरून त्या राजाच्या साम्राज्याच्या परिसीमांची, तसेच त्यांनी जिंकलेल्या तत्कालीन भारतातील देशांची महत्त्वपूर्ण माहिती मिळते.

शिलालेखातील भौगोलिक माहिती अन्य कोणत्याहि प्राचीन साहित्याहून अधिक शास्त्रशुद्ध असून, वर्ण्य देश, ग्राम आदींच्या चतुःसीमा, शिलालेखाचा काल, शिलालेखरचनाकाली विशिष्ट भौगोलिक स्थान निश्चित कोठे होते, याचा निर्णायक पुरावा तेथे उपलब्ध होतो ( उदा. बंगालच्या पाल राजांच्या शिलालेखातील विहारसंबंधीचे भौगोलिक निर्देश ). म्हणूनच संस्कृत साहित्यातील ( शास्त्रग्रंथ ) भौगोलिक माहितीइतकेच महत्त्व शिलालेख साहित्यास प्राप्त होते.

**शिलालेखप्रकार**—प्रो. बूलर यांचे मते उपलब्ध शिलालेख साहित्याचे निम्नलिखित तीन उपविभाग पडतात :— ( १ ) **प्रतिष्ठाशासन स्तंभलेख** ( मंदिरे, राजवाडे आदींच्या रचनाप्रसंगीचे शिलालेख ); ( २ ) **वस्तुशासन शिलालेख** ( भूमि–द्रव्यादिकांचे दानलेख ); ( ३ ) **प्रशस्तिपट्ट** अथवा **प्रशस्तिलेख** ( राजे, तीर्थे आदींचे प्रशस्तिलेख ).

**वैगुण्ये**—शिलालेख साहित्यातील बहुतांशी माहिती चिरस्थायी भूगोलापेक्षा अस्थायी अशा राजकीय भूगोलाची असून, बदलत्या राजकीय परिस्थितीनुसार ही माहितीहि एकसारखी बदलत जाते. त्यामुळेच परस्परविरोध, असंबद्धता असे अनेक दोष या साहित्यात दिसतात. राज्यकारभाराच्या सोयीसाठी निर्मिलेल्या 'मंडल', 'भुक्ति', 'विषय' आदि उपविभागवाचक संज्ञा एकाच भूप्रदेशाला उद्देशून शिलालेख उपयोजितात. त्यामुळे कोणत्याहि देशाच्या भौगोलिक सीमा ठरविण्यासाठी शिलालेख साहित्य निरुपयोगी ठरून परंपरागत साहित्याचे साह्य तेथे अपरिहार्यपणे घ्यावे लागते. उदा. सोरो ताम्रपटात कलिंग देशान्तर्गत उत्तर तोसल प्रदेशाचा निर्देश 'विषय' आणि 'देश' अशा परस्परविरोधी उपाधींनी केला असून, कधी हा 'देश' ओड्र विषयात समाविष्ट असल्याचा, तर कधी

ओड्र विषय उत्तर तोसल देशाचा भाग असल्याचा निर्देश तेथे आढळतो. याच ताम्रपटात अन्यत्र कधी सरेफ आहार वरुकाण विषयामध्ये समाविष्ट असल्याचा, तर कधी सरेफ विषय उत्तर तोसल देशात समाविष्ट असल्याचाहि निर्देश आढळतो. एकाच शिलालेखातील या परस्परविरोधी माहितीमुळे कोणता देशविभाग लहान आणि कोणता मोठा यांचा काहीच उलगडा होत नाही.

**प्रादेशिक राजकीय भूगोल**—डॉ. सांकलिया यांच्या मते शिलालेख साहित्यातील परस्परविरोधाचा हा दोष विभिन्न प्रांतांचे उपलब्ध सारे शिलालेख एकसंधपणे तपासले असता दूर होऊन प्रादेशिक भूगोलाच्या संशोधनाचे एक महत्त्वपूर्ण दालन त्यामागे खुले होते. गुजरातमधील चालुक्य ( सोळंकी ) राजांच्या इ. स. १२–१३ व्या शतकातील सुमारे शंभर शिलालेखांची तपासणी करून, या काळातील गुजरातच्या प्रादेशिक भूगोलासंबंधी 'हिस्टॉरिकल जिऑग्रफी ऑफ गुजरात' (स. १९४९) हा महत्त्वपूर्ण ग्रंथ त्यांनी लिहिला आहे. याच धर्तीचे महाराष्ट्र, मध्यप्रदेश राजस्थान, उत्तर प्रदेश, तसेच चोल आणि पल्लवकालीन दक्षिण भारत आदींच्या प्रादेशिक भूगोलाचे शोधप्रबंध डॉ. सांकलिया यांच्या मार्गदर्शनाखाली डेक्कन कॉलेजमध्ये तयार करण्यात आले आहेत.

**ब्राह्मी शिलालेखात**—वायव्य भारतातील तक्षशिलेपासून पूर्व भारतातील पाटलिपुत्रपर्यंत, आणि ओरिसामधील धौलीपासून आंध्र प्रदेशातील मस्किपर्यंतच्या प्रदेशातील अशोकाच्या उपलब्ध ३३ शिलालेखांपैकी वायव्य भारतातील शहाबाझगढी आणि मानसेहरा या दोन खरोष्ट्री शिलालेखांचा अपवाद वगळता अन्य सारे ब्राह्मी लिपीत आहेत. यावरून या शिलालेखकाळी भारताच्या बहुतांशी भागात ब्राह्मी लिपी प्रचारात असावी ( अशोक शिलालेख-स्थले पहा ). स. १८३७ मध्ये जेम्स प्रिन्सेप यांनी शतकानुशतके अनाकलनीय असणाऱ्या या लिपीचे सर्वप्रथम निर्वाचन केले.

अशोकाच्या उपरोक्त शिलालेखांव्यतिरिक्त भारताच्या विभिन्न भागात इ. स. पू. ३ रे—इ. स. ४ थे शतक काळातील सुमारे १३५३ ब्राह्मी, बौद्ध आणि जैन शिलालेख उपलब्ध झाले आहेत. त्यापैकी कलिंगराज खारवेलाचा हाथीगुंफा शिलालेख, महाक्षत्रप रुद्रदामनाचा जुनागढ शिलालेख, गौतमीपुत्र शातकर्णीचा नासिक शिलालेख, तसेच मथुरा, सांची, भर्हुत आणि अमरावती स्तूपानजिकचे शिलालेख विशेष सुविख्यात आहेत. भारतातील उपलब्ध ब्राह्मी शिलालेखांची सूची प्रो. एच्. ल्यूडर्स यांनी संकलित केली असून ( एपि. इंडि. १०·१–२२६ ), तीमध्ये निर्देशिलेली ब्राह्मी शिलालेखांची प्रमुख उपलब्धिस्थाने, आणि तत्रस्थ शिलालेखसंख्या पुढीलप्रमाणे होत :— १. सांची ( ५०७ ); २. भर्हुत ( २१६ ); ३. मथुरा ( १३३ ); ४. अमरावती ( १२० ); ५. कान्हेरी ( ५० ); ६. जुन्नर ( ३४ ); ७. कुडा ( २९ ); ८. नासिक ( २७ ); ९. कार्ले ( २३ ); १०. बेसनगर ( १६ ); ११. बोधिगया ( १५ ); १२. भट्टिप्रोलु ( ११ ); १३. उदयगिरि ( ९ ); १४. नाणेघाट ( ९ ); १५. सारनाथ ( ८ ); १६. भाजे; १७. पितळखोरा ( ७ ); १८. महाड ( ३ ); १९. अजंटा ( ३ ); २०. जग्गयपेटा ( ३ ); २१. नागार्जुनि टेकडी ( ३ ); २२. जुनागढ ( २ ); २३. बेडसा ( २ ).

उपरोक्त शिलालेखांपैकी भर्हुत येथील शिलालेख प्रो. ल्यूडर्स आणि ई. वाल्डश्मिड्ट यांनी स्वतंत्रपणे संपादिले आहेत ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २·२ ). बौद्ध गुफालेखातील ब्राह्मी शिलालेखांचे संपादन जेम्स बर्जेस यांनी 'बुद्धिस्ट केव्ह टेम्पल्स' ग्रंथात केले आहे ( आर्कि. सर्व्हे. वे. इं. ४; स. १८८१ ).

**खरोष्ट्री शिलालेखात** – मौर्य साम्राज्याच्या विनाशानंतर वायव्य भारताचे अधिराज बनलेल्या यवन, शक आणि पह्लव लोकांनी खोदलेले सुमारे ४५ शिलालेख ( इ. स. पू. ३ रे शतक-इ. स. ५ वे शतक ) वायव्य भारतात आढळतात. या शिलालेखांचे संपादन प्रो. स्टेन कोनौ यांनी केले आहे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २·१ ).

**गुप्त शिलालेखात** — इ. स. ५ व्या शतकातील गुप्त सम्राटांचे १६ शिलालेख ( स. ४०१–४६६ ), तसेच या राजांशी समकालीन अशा परिव्राजक, मौखरि आणि वाकाटकवंशीय, तसेच उच्छकल्प, वलभी, शरभपुर, मगध, आणि कनौजदेशीय राजांचे शिलालेख फ्लीटं यांनी संपादित केले आहेत ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३ ). त्यापैकी समुद्रगुप्ताचा अलाहाबाद प्रशस्तिलेख ( इ. स. ४ थे शतक ) सर्वाधिक महत्त्वाचा आहे.

**कलचुरि-चेदि शिलालेखात** — स. २४८ मध्ये सुरू झालेल्या कलचुरि-चेदि संवतातील स. २५८–१२१७ च्या दरम्यानचे मध्यप्रदेशातील आभीर, त्रैकूटक, कलचुरि, गुर्जर, सेंद्रक, चालुक्यवंशीय राजांचे; तसेच त्रिपुरी, सरयूपार, रतनपुर, रायपुर येथील उत्तरकालीन कलचुरि राजांचे सुमारे १२३ शिलालेख डॉ. वा. वि. मिराशी यांनी संपादित केले आहेत ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४·१–२ ).

त्यायोगे कलचुरि- चेदि राज्यकालीन मध्य भारताच्या भूगोलावर महत्त्वपूर्ण प्रकाश पडतो.

**बनावट ताम्रपट** — समुद्रगुप्त आदि राजांच्या नावाने उत्तरकालात खोदलेले अनेक बनावट ताम्रपट उपलब्ध झाले आहेत. या ताम्रपटात निर्देशिलेली ग्रामे अथवा त्यांमधील जमीन बळकावणे हा त्यांचा हेतू असला तरी त्यांमधील भौगोलिक माहिती खरीच असते. त्यामुळे प्राचीन भूगोलाच्या दृष्टीने खऱ्या ताम्रपटाइतकाच त्यांचा उपयोग होतो.

**मुद्रालेख** — नालंदा येथील बौद्ध विहाराला देणगी देणाऱ्या ग्रामांची नावे नमूद करणाऱ्या अनेक मुद्रा नालंदा येथे उपलब्ध झाल्या आहेत. अशाच तऱ्हेच्या काही मुद्रा वैशाली येथील उत्खननातहि सापडल्या आहेत.

**नाणी** — शिलालेखांप्रमाणेच इंडो-ग्रीक, गुप्त, शक, तोमर, चौहान, कलचुरि आदि राजवंशांच्या उपलब्ध नाण्यांवरूनहि महत्त्वपूर्ण भौगोलिक माहिती उपलब्ध होते. इंडो-ग्रीक राजांच्या नाण्यांच्या अक्षरवाटिकांच्या आधारेच प्रिन्सेप यांनी खरोष्ट्री लिपीचे निर्वाचन केले. सर अलेक्झांडर कनिंगहॅम, जॉन ॲलेन, व्हाइटहेड, व्हिन्सेन्ट स्मिथ, डॉ. वा. वि. मिराशी यांनी या क्षेत्रात महत्त्वपूर्ण कामगिरी केली आहे. यापैकी ॲलेन यांच्या गुप्त राजवंशांच्या नाण्यांची सूची (स. १९१४) विशेष महत्त्वपूर्ण आहे.

# प्रादेशिक भूगोल

**प्रादेशिक भूगोल** — प्रादेशिक भूगोलाचे सर्वाधिक महत्त्वपूर्ण साहित्य शिलालेख, ताम्रपट, मुद्रालेख आणि नाणी यांमध्ये उपलब्ध होत असल्याचा निर्देश वर आलाच आहे. अन्य प्रादेशिक साहित्याचा परामर्श प्रस्तुत विभागात आम्ही घेतला आहे.

**राजतरंगिणी** — कश्मीरमधील शिलालेख साहित्याचा अभाव कल्हणकृत राजतरंगिणी ( स. ११४९ ) या इतिहासग्रंथाने पूर्णांशाने भरून निघतो. या ग्रंथाचा सटीक आणि चिकित्सक अनुवाद सर ऑरेल स्टाइन यांनी केला असून ( स. १९०० ), राजतरंगिणीमधील प्रासंगिक भौगोलिक निर्देशांवरून प्राचीन कश्मीरचा संपूर्ण भूगोल पुनर्घटित करण्याचे कार्य त्यांनी केले आहे.

**बूलर यांचा सिद्धांत** — कश्मीरातील नीलमत पुराण, हरचरितचिंतामणि हे परंपरागत धार्मिक ग्रंथ, आणि राजतरंगिणी आदि इतिहासग्रंथ भौगोलिक दृष्ट्या परस्परपूरक असल्याचा, तसेच कश्मीरच्या प्राचीन भूगोलाच्या परिपूर्ण ज्ञानासाठी त्यांचा साकल्याने अभ्यास होणे जरूर असल्याचा सिद्धांत प्रो. जॉर्ज बूलर यांनी 'कश्मीर रिपोर्ट'मध्ये सर्वप्रथम प्रस्थापित केला. स्टाइनकृत राजतरंगिणीविषयक संशोधन या सिद्धांताचेच दृश्य रूप होय.

**राजतरंगिणीमधील भौगोलिक माहिती**— कश्मीरच्या आणि त्यामधील वितस्ता ( आधु. झेलम ) नदीच्या उत्पत्तीच्या विभिन्न आख्यायिका, तसेच कश्मीरातील प्रमुख तीर्थांची नामावली ( राज. १·२५–३८ ) राजतरंगिणीमध्ये एकत्रितपणे दिली असली, तरी त्यामधील अन्य भौगोलिक माहिती इतिहासकथनाच्या ओघात प्रसंगवशात् सांगितली आहे. या वर्णनात कश्मीरातील प्रमुख देशविभाग, नगरे, नद्या, पर्वत आणि तीर्थे यांची संस्कृत नावे, त्यांची नामव्युत्पत्ती, तसेच तत्संबंधीच्या आख्यायिकांचे साक्षेपी आणि चक्षुर्वैसत्यम् वर्णन आढळते. स्टाइन यांच्या मते राजतरंगिणीमधील भौगोलिक स्थलवर्णनाचे निम्नलिखित तीन उपविभाग आहेत :–

**( १ ) तीर्थक्षेत्रे** — कश्मीरातील बहुतांशी साऱ्या सुविख्यात तीर्थांचा इतिहास राजतरंगिणीच्या प्रास्ताविक भागात असून, त्याच्या ऐतिहासिक कथाभागाच्या ४–८ अध्यायातहि कश्मीरातील विभिन्न तीर्थयात्रावर्णने, तसेच या तीर्थांच्या परिसरातील ऐतिहासिक घटनांचे वर्णन आढळते ( प्रास्ताविकातील 'भारतवर्षातील तीर्थस्थाने' विभाग पहा ).

**( २ ) नगरे आणि ग्रामे** — कश्मीरच्या विभिन्न राजवंशांच्या इतिहासकथनाच्या ओघात त्या राजांनी स्थापिलेल्या नगरांची, मंदिरांची आणि इमारतींची माहिती कल्हणाने दिली असून, त्यापैकी पहिल्या अध्यायातील खोनमुष, गोधरा, समंगासा, लोलोर, जालोर आदि गावांच्या स्थापनेचा इतिहास कल्पनारम्य आहे. हा एक अपवाद वगळला, तर अन्य साऱ्या नगरांच्या स्थापनेचा कल्हणाने दिलेला इतिहास उपलब्ध शिलालेखांच्या ( राज. १·१५ ) आणि स्थानिक परंपरांच्या अध्ययनाने लिहिला आहे. त्याचे मते कश्मीरातील बहुतांशी 'पुर' अंत्यशब्दयुक्त नगरे संस्थापक राजांच्या नावांवरूनच ओळ-

खली जात असत ( जसे कुशाण राजवंशस्थापित हुष्कपुर, कनिष्कपुर, जुष्कपुर ही नगरे, तसेच कश्मीरातील अभिमन्युपुर, प्रवरपुर, पद्मपुर, अवंतिपुर, जयपुर आदि अन्य नगरे ). नगरांची ही नामकरणपद्धती मुसलमानी आणि शीख राज्यकालातहि तशीच चालू राहिली ( जसे– झैनपुर, शहाबुद्दीनपुर, मुहंमदपुर, रणवीरसिंघपुर ).

राजतरंगिणीमते नगरांप्रमाणेच विभिन्न राजांनी बांधलेली शैव आणि वैष्णव मंदिरे, तसेच हिंदु आणि बौद्ध मठहि त्या राजांच्या नावांवरूनच ओळखले जात असत ( जसे–प्रवरेश्वर आणि रणवीरेश्वर ही शिवमंदिरे; मुक्तस्वामिन्, अवंतिस्वामिन् आणि भीमकेशव ही विष्णुमंदिरे; दिद्दामठ, सुभटामठ, नंदामठ, लोठिकामठ, चक्रमठ हे हिंदु मठ; तसेच जयेंद्र विहार, चंकण विहार, अमृतभवन आणि स्कंदभवन हे बौद्ध मठ ). कालांतराने विशिष्ट नगरास अथवा मुहल्ल्यासहि तेच नाव प्राप्त होत असे ( राज. ३·९; ४·१९२; ६·१३७; ३०० ).

कश्मीरातील विभिन्न नगरे, त्यांच्या भौगोलिक चतुःसीमा, तसेच त्यामधील इमारतींचे साद्यंत वर्णन कल्हण देतो. या विशिष्ट दृष्टीने कश्मीरच्या ललितादित्य राजाच्या क्षणिक लहरीने राजधानी बनलेल्या परिहासपुर नगराचे ( राज. ३·३३९-३४९ ), जयापीडस्थापित जयपुर आणि द्वारवती या जोडनगरांचे ( राज. ४·५०६–५११ ), तसेच प्रबोधपुर नगराचे राजतरंगिणीमधील वर्णन उल्लेखनीय आहे.

**( ३ ) प्रासंगिक भौगोलिक निर्देश**—कश्मीरातील राजघराण्यांच्या इतिहासकथनाच्या ओघात संबंधित भौगोलिक स्थलांचे महत्त्वपूर्ण निर्देश राजतरंगिणीमध्ये आढळतात. यापैकी भूतकालीन स्थलांच्या तुलनेने ७-८ व्या अध्यायातील समकालीन भौगोलिक स्थलवर्णन अधिक यथातथ्य आहे. या विशिष्ट दृष्टीने कश्मीरच्या लोहर घराण्याच्या काळातील अगणित अंतर्गत बंडाळ्यांशी, तसेच सरहद्दीवरील परकीय आक्रमणांशी संबंधित लोहर ( राज. ४·१७७ ), गोपाद्रि ( राज. ८·११०४–१११० ), क्षिप्तिका ( राज. ८·७३२ ) आदि स्थलवर्णने उल्लेखनीय आहेत.

**भौगोलिक अचूकता**—कल्हणाच्या भौगोलिक अचूकतेचे प्रातिनिधिक उदाहरण कश्मीरराज अवंतिवर्मनकृत वितस्ता नदीच्या प्रवाहनियंत्रणाच्या वर्णनात आढळते ( राज. ५-८४–१३१ ). तेथे वर्णिलेल्या सिंधु आणि वितस्ता नद्यांच्या जुन्या आणि नव्या संगमस्थानांची माहिती शतकानुशतकांच्या कालावधीनंतरहि नकाशावर अचूकपणे टिपता येते.

कश्मीरच्या इतिहासातील निम्नलिखित युद्धांची आणि वेढ्यांची वर्णनेहि भौगोलिक अचूकतेचे वस्तुपाठ मानली जातात:—१. सुस्सलाच्या राज्यकालातील श्रीनगरचे विभिन्न वेढे ( राज ८·७२९; १०६० ); २. सुस्सलाच्या राज्यकालातील गोपाद्रि टेकडीवर लढाई ( राज. ८·१०९९–१११५ ); ३. लोहर किल्ल्याचा वेढा ( राज. ८·१८१२–१८८० ); ४. शिरःशिला किल्ल्याचा वेढा ( राज. ८·२४९२ ). यांपैकी कश्मीरच्या सीमेबाहेरील दुर्गम स्थानी असणारा शिरःशिला दुर्ग आजहि दुर्लंघ्य मानला जातो.

**अंतरे**—कधी मैलांच्या, तर कधी गजलींच्या परिमाणात दिलेली राजतरंगिणीतील अंतरे नेहमीच अचूक असतात ( राज. १·२६४; ५·१०३; ७·३९३ ). या दृष्टीने या ग्रंथातील निम्नलिखित मार्गवर्णने उल्लेखनीय आहेत :—१. वितस्ता खोऱ्यातील रस्ता (राज. ५·२२५); २. तोशमैदान घाटातील रस्ता ( राज. ७·१४० ); ३. पीर पंत्साल घाटातील रस्ता ( राज. ७·५५८ ); ४. मार्तंड देवस्थानाचा रस्ता ( राज. ७·७१५ ). एकाच नावाच्या दोन स्थलांतील विभेदहि या ग्रंथात सुस्पष्टपणे नमूद केला आहे ( उदा. विभिन्न ज्येष्ठरुद्र तीर्थांचे वर्णन; राज. १·११३; १२४; ५·१२३ ).

कश्मीरचे हवामान, विभिन्न लोकसमूह, वंश आदींसंबंधीची राजतरंगिणीतील माहितीहि परिपूर्ण असून, त्यामुळेच हा ग्रंथ भारतातील सर्वोत्कृष्ट प्रादेशिक इतिहासग्रंथ बनला आहे.

**संस्कृत स्थलनामे**— राजतरंगिणीमध्ये निर्देशिलेली नगरे, नद्या, पर्वत, खिंडी आदींची बहुतांशी सारी संस्कृत नावे सरकारी दप्तरातून घेतली आहेत. या ग्रंथाच्या काळी संस्कृत हीच कश्मीरची शासकीय आणि वाङ्मयीन भाषा असून, संस्कृतोद्भव अपभ्रंश भाषा लोकभाषा म्हणून प्रचारात होती. आधुनिक कश्मीरी भाषा अपभ्रंश भाषेचेच उत्तरकालीन रूप असून, संस्कृत→अपभ्रंश→कश्मीरी→अशा क्रमाने कश्मीरातील बहुतांशी सारी आधुनिक स्थलनामे व्युत्पन्न झाली असावीत. या विशिष्ट दृष्टीने राजतरंगिणीतील संस्कृत स्थलनामे ही शास्त्रशुद्ध आणि प्राचीनतम मानावी लागतील. मात्र मूळच्या अपभ्रंशभाषीय एकाच स्थलनामाची विभिन्न संस्कृतभाषीय रूपे बनविल्याची

काही अपवादात्मक उदाहरणेहि या ग्रंथात आढळतात ( जसे—भलेरक = बालेरक; घोरमूलक = गौरमूलक ).

**श्रीकंठचरित**—कल्हणाच्या समकालीन मंक कवीकृत या काव्यग्रंथाच्या तिसऱ्या अध्यायात कश्मीरची, तसेच त्याच्या प्रवरपुर नामक राजधानीची माहिती आढळते ( श्रीकण्ठ. ३·१०–२४ ). जोनराजाने या ग्रंथावर भाष्य लिहिले आहे.

**विक्रमांकदेवचरित**—कश्मीरच्या कलश ( स. १०६३–१०८९ ) राजाशी समकालीन अशा बिल्हण कविकृत या ऐतिहासिक काव्यग्रंथाच्या १८ व्या अध्यायात कश्मीरच्या निसर्गसौंदर्याचे, तसेच श्रीनगरच्या आग्नेयेकडील खोनमुष नामक स्वतःच्या जन्मग्रामाचे काव्यमय, परंतु भौगोलिक दृष्ट्या अचूक वर्णन आढळते ( विक्रमाङ्क. १८·७० ). या भौगोलिक माहितीची समीक्षा बूलर यांनी या ग्रंथाच्या प्रस्तावनेत केली आहे ( बूलर, विक्रमाङ्क. पृ. ७ ).

**लोकप्रकाश**—कश्मीरी कवी क्षेमेंद्रकृत ( इ. स. ११ वे शतक ) या ग्रंथात कश्मीरी परगण्यांची प्राचीनतम नामावली दिली असून, दुसऱ्या आणि चौथ्या अध्यायात कश्मीरातील काही प्राचीन आणि मध्ययुगीन स्थलनामांचा संमिश्र निर्देश आढळतो ( जसे-जैननगर; जोनराज. ११५३;आलाभदेनपूर=अल्लाउद्दीनपुर; श्रीवर.४·३१८). यावरून यामधील बराच भाग प्रक्षिप्त असावा. या ग्रंथातील भौगोलिक निर्देशांची सूची वेबर यांनी प्रकाशित केली आहे ( इंडिशे स्टूडियेन. १८·२८९–४१२ ).

**समयमातृका**—कश्मीरी कवी क्षेमेंद्रकृत ( इ. स. ११ वे शतक ) या गणिका-निषेधपर काव्यग्रंथात कश्मीरातील अनेक प्राचीन स्थलांची, तसेच पंचालधारा ( आधु. पीर पंत्साल ) खिंडीची दुर्मिळ भौगोलिक माहिती आढळते ( समय. २·९० ). त्या खिंडीतून चालणाऱ्या मिठाच्या व्यापाराचा, तसेच वितस्ता खोऱ्यातील कृत्याश्रम नामक बौद्ध विहाराचा निर्देशहि या ग्रंथात आढळतो ( समय. २·६१ ).

**जोनराजकृत राजतरंगिणी** — स. ११४९–१४५९ काळातील कश्मीरचा इतिहास ग्रथित करणाऱ्या राजतरंगिणीच्या या पुरवणीग्रंथात जयसिंहापासून कोटा राणीपर्यंतच्या हिंदु राजवटीचा इतिहास अत्यंत संक्षिप्तपणे ( ३०९ श्लोक ) दिला असून, ग्रंथाचा उर्वरित भाग कश्मीरचा सुलतान झैनुल अबिदीनच्या वर्णनपर आहे. मुसलमानी राज्यकालीहि अबाधित राहिलेल्या कश्मीरातील संस्कृतप्रचुर स्थलांचे या ग्रंथातील वर्णन कल्हणकृत 'राजतरंगिणी-' तील स्थलवर्णनाशी पूरक आहे. या विशिष्ट कालखंडात अंतर्गत यादवीमुळे उतरणीस लागलेल्या कश्मीरातील हिंदु विद्वत्परंपरेचे कश्मीराबाहेरील जगाची यत्किंचितहि माहिती नसणारा जोनराज हा स्वतःच एक प्रतीक आहे. वायव्य भारतातील पुरुषपुर गावाचा निर्देश 'पुरुषवीर' या चुकीच्या नावाने तो करतो.

**जैन राजतरंगिणी** — जोनराजशिष्य श्रीवरकृत स. १४५९–१४८६ पर्यंतच्या कश्मीरच्या या इतिहासग्रंथास झैनुल अबिदीन सुलतानाच्या नावावरून 'जैन राजतरंगिणी' नाव प्राप्त झाले. या मुसलमानी कालखंडातहि कश्मीरातील बहुतांशी स्थलनामांची संस्कृत नावे कायम राहिल्याने राज्य मुसलमानांचे, आणि स्थलनामे मात्र संस्कृत असा प्रकार या ग्रंथात सर्वत्र आढळतो.

कल्हणाच्या राजतरंगिणीतील भौगोलिक स्थलवर्णनाचे अनेक श्लोक श्रीवराने पुनरुद्धृत केले असले, तरी कश्मीरातील अनेक स्थलांची प्राचीन नावे त्यास अनवगत दिसतात. उदा. 'महासरित्' ( आधु. मार ), 'सिद्धपथ' ( आधु. सेदौ ) आणि 'मार्तंड' ( आधु. बवन) या तीन सुविख्यात स्थानांची नावे त्याच्या ग्रंथात 'मारी', 'सिद्धादेश' आणि 'भवन' अशी दिली आहेत ( श्रीवर १·४४०; ३·३५४; ४·२०३ ).

**राजावलि-पताका** ( चतुर्थ इतिहास )— प्राज्यभट्ट आणि शुककृत स. १४८६-१५८६ पर्यंतच्या कश्मीरच्या या इतिहासग्रंथात कश्मीरातील प्राचीन स्थलनामांचा अधिकाधिक लोप झाला असून, राजभाषा आणि लोकभाषा या उभय नात्यांनी संस्कृतचे उच्चाटन झाल्याचा हा परिणाम असावा. कश्मीरातील प्राचीन कृत्याश्रम, राजपुरी, लोहर, आणि चक्रधर या स्थानांचा निर्देश या ग्रंथात 'किचाश्रम', 'राजवीर', 'लुहरिन' आणि 'चक्राधार' या आधुनिक वळणाच्या नावांनी आढळतो.

**प्रादेशिक संशोधन**—विभिन्न प्रांतांतील स्थानिक भाषा, परंपरा आणि इतिहासविद् विद्वानांनी आपापल्या प्रांताच्या प्राचीन भूगोलाविषयी अनेक महत्त्वपूर्ण ग्रंथ अलिकडच्या काळात लिहिले आहेत. परंपरागत प्राचीन साहित्यातील भौगोलिक माहितीचे अनेक निखळलेले दुवे विशिष्ट प्रांताची संस्कृती आणि प्राचीन इतिहासाच्या आधारे साधण्याचा प्रयत्न या प्रादेशिक भूगोलविषयक संशोधनग्रंथात आढळतो. अशा ग्रंथांमध्ये बौद्ध धर्माच्या जन्मभूमीभत अशा बिहारसंबंधी डॉ. मिथिलाशरण पांडे

यांनी लिहिलेला 'हिस्टॉरिकल जिऑग्रफी अँड टोपोग्राफी ऑफ एन्शंट बिहार' (स. १९६३) हा ग्रंथ नमुनेदार असून, बिहारमधील प्रमुख ऐतिहासिक स्थलांचे, तसेच अवशेषस्थानांचे मूलगामी विवेचन त्यामध्ये आढळते.

अशाच तऱ्हेचे अन्य महत्त्वपूर्ण प्रादेशिक संशोधनग्रंथ पुढीलप्रमाणे होतः— १. हिस्टरी ऑफ सिव्हिलिझेशन ऑफ दी पीपल ऑफ आसाम (डॉ. प्रतापचंद्र चौधरी, स. १९५९); २. हिस्टरी ऑफ साऊथ इंडिया (डॉ. के. ए. नीलकंठशास्त्री, स. १९५८); ३. हिस्टरी ऑफ कोशल (डॉ. विशुद्धानंद पाठक, स. १९६३); ४ अर्ली हिस्टरी ऑफ वैशाली (डॉ. योगेंद्र मिश्रा, स. १९६२); ५. हिस्टॉरिकल जिऑग्रफी ऑफ गुजरात (डॉ. हसमुख सांकलिया, स. १९४९); ६. हिस्टॉरिकल जिऑग्रफी ऑफ डेक्कन (डॉ. एस्. मुळे, स. १९५४); ७. हिस्टॉरिकल जिऑग्रफी ऑफ मध्य प्रदेश (डॉ. एस्. गोखले, स. १९६०); ८. हिस्टॉरिकल जिऑग्रफी ऑफ राजस्थान (डॉ. के. एल्. लेले, स. १९६२); ९. हिस्टॉरिकल जिऑग्रफी ऑफ उत्तर प्रदेश (डॉ. एम्. एम्. माथुर, स. १९६३); १०. हिस्टॉरिकल जिऑग्रफी ऑफ साऊथ इंडिया (डॉ.टी. के. शेषाद्रि, स. १९६३).

## भारतीय स्थापत्य आणि शिल्पपरंपरा

**स्थापत्यपरंपरा**—प्राचीन भारतीय भूगोलविषयक अध्ययनाच्या ग्रांथिक साधनांइतकीच महत्त्वपूर्ण साधनसामुग्री प्राचीन भारतीय स्थापत्य आणि शिल्पावशेषांमध्ये उपलब्ध होते. परंपरागत प्राचीन भूगोलविषयक अध्ययनामध्ये या साधनसामुग्रीचा समावेश केला जात नसला, तरी ऐतिहासिक आणि सांस्कृतिक भूगोलाच्या दृष्टीने त्यांचे महत्त्व निर्विवाद आहे. प्राचीन भूगोलविषयक संकीर्ण आणि विस्कळीत ग्रांथिक निर्देशांना स्थलकालादिकांच्या एकसंध आणि अखंड परंपरेमध्ये बसविण्याचे महत्त्वपूर्ण कार्य प्राचीन स्थापत्य आणि शिल्पावशेष करतात. या विशिष्ट दृष्टीने कोणत्याहि प्राचीन स्थलाशी संबंधित नद्या, पर्वतादिकांचे आणि ग्रांथिक संदर्भांचे विवरण हा विशिष्ट स्थलाचा सांगाडा मानल्यास, त्या स्थली उपलब्ध होणारे उत्खननावशेष, तसेच स्थापत्य आणि शिल्पावशेष हा त्यांचा अविनाशी आत्मा समजावा लागेल. भारतीयांच्या महाभारत, पुराणादि ग्रंथांमध्ये वर्णिलेले देश, नगरे यांची वर्णने भाकडकथांच्या स्वरूपाची नसून, त्यामध्ये इतिहासाचे सुवर्णकण भरपूर असल्याची प्रचीती स्थापत्य आणि शिल्पावशेषांच्या अध्ययनाने येते. या विशिष्ट दृष्टीने या अवशेषांच्या अध्ययनाला, तसेच तत्संबंधित ऐतिहासिक पुरातत्त्वशास्त्राला ऐतिहासिक भूगोलाच्या संशोधनामध्ये विशेष महत्त्व प्राप्त होते.

**प्रागैतिहासिक भूगोल**—पूर्वकालीन अश्मयुगातील (इ. स. पू. ३ लाख) काही अवशेष महाराष्ट्रातील नासिकनजिकच्या गंगावाडी येथे उपलब्ध झाले असून, उत्तरकालीन अश्मयुगाचे अवशेष गोदावरी नदीकाठच्या नंदुर, मधमेश्वर, निफाड, कोपरगाव आदी गावी सापडले आहेत. अहमदनगर जिल्ह्यातील जरासंध नगर (आधु. जोर्वे), तसेच गंगा नदीचा जलसंचय प्रदेश, आणि छोटा नागपुर पठारात ताम्रयुगीन अवशेष (इ. स. पू. ५०००) सापडले आहेत. आग्नेय राजस्थानातील आहार, माळव्यातील नवदतोली, पूर्व भारतातील कैमूर पर्वतश्रेणी, काश्मीरातील बुर्झ होम, तसेच दक्षिण भारतातील आलमगीरपुर आणि अत्रंजीखेरा येथे अनेक महत्त्वपूर्ण प्रागैतिहासिक अवशेष उपलब्ध झाले आहेत. या अवशेषांची संक्षिप्त माहिती त्या त्या स्थलनामावर आम्ही दिली आहे.

**ऐतिहासिक पुरातत्त्वशास्त्र**—स. १७८४ मध्ये कलकत्ता येथे सर विल्यम जोन्स यांच्या नेतृत्वाखालील एशियाटिक सोसायटीच्या स्थापनेने भारतीय पुरातत्त्वशास्त्राच्या संशोधनास प्रारंभ झाला. आशियाखंडातील स्थापत्यावशेष, कला आणि साहित्य यांच्या अध्ययनाने इतिहाससंशोधनास हातभार लावणे हा या संस्थेचा प्रमुख हेतू होता. कलकत्ता येथील सरकारी टांकसाळीचे एक अधिकारी आणि सोसायटीचे सेक्रेटरी जेम्स प्रिन्सेपकृत ब्राह्मी आणि खरोष्ट्री लिपींचे निर्वाचन (स. १८३४; १८३७) ही कलकत्ता एशियाटिक सोसायटीची सर्वात मोठी कामगिरी होय. ब्राह्मी लिपीतील शिलालेखकर्ता अशोक आणि ग्रीक राजा अँतिओकस् (तृतीय) आणि टॉलेमी फिलॅडेल्फोस् यांचे समकालीनत्व प्रिन्सेप यांनी सिद्ध करून, प्राचीन भारतीय इतिहासाच्या कालगणनेची मुहूर्तमेढ रोवली.

स. १८६१ मध्ये तत्कालीन भारत सरकारने भारतीय पुरातत्त्वअध्ययनाचे नवे खाते सुरू करून सर अलेक्झांडर कनिंगहॅम यांना त्यांचे प्रमुख नेमले. ह्युएन्त्संग आणि फाहियेन्‌निर्दिष्ट उत्तर आणि मध्य भारतातील अनेक बौद्ध स्थानांचे उत्खनन करून तत्संबंधीचे वृत्तांत कनिंगहॅम यांनी स. १८६०–१८८४ च्या दरम्यानच्या वार्षिक पुरातत्त्वशास्त्रीय अहवालात ( अर्किऑलॉजिकल सर्व्हे ऑफ इंडिया ) प्रसिद्ध केले.

स. १८८५ मध्ये कनिंगहॅम यांच्या निवृत्तीनंतर स्थापत्य-शास्त्रीय उत्खननाऐवजी स्थापत्यावशेषांच्या वर्णनावर पुरातत्त्व खात्याने अधिक भर दिला. उत्तर भारतातील बौद्ध स्तूप, आंध्र प्रदेशातील अमरावती आणि जग्गयपेटा येथील स्तूप, आणि गुजरातमधील मुसलमानी स्थापत्यावशेषांचे सविस्तर वर्णन जेम्स बर्जेस यांनी, तसेच दक्षिण भारतातील स्थापत्यावशेषांचे वर्णन अलेक्झांडर री आणि रॉबर्ट सेवेल यांनी प्रकाशित केले. दक्षिण भारतातील शिलालेखांचे संपादन आणि संकलन डॉ. हुल्ट्झ यांनी 'साऊथ इंडियन इन्स्क्रिप्शन्स'मध्ये केले.

स. १९०१ मध्ये लॉर्ड कर्झन यांच्या राज्यकाली सर जॉन मार्शल यांच्या नेतृत्वाखाली भारतीय पुरातत्त्व खात्याची पुनर्घटना करण्यात येऊन, भारतीय स्थापत्यावशेषांच्या संरक्षणाचा नवा कायदा करण्यात आला. याच काळात उत्खनन, शिलालेखवाचन, नाणकशास्त्रीय अध्ययन, स्थापत्यशास्त्रीय संशोधन या साऱ्या ज्ञानशाखा देशाच्या राजकीय आणि सांस्कृतिक इतिहासाध्ययनाची साधने असल्याची एक कल्पना प्रस्थापित होऊन पुरातत्त्वशास्त्रीय संशोधनाला नवी सुसूत्रता प्राप्त झाली. गौतम बुद्ध आणि महावीरकालीन महाजनपदकाल ( इ. स. पू. ३०० ) हा या शास्त्राचा प्रारंभबिंदु परंपरेने मानण्यात येतो.

**प्रमुख उत्खनने** — उत्खननाच्या साह्याने ज्यांचे प्राचीनत्व निर्णायकपणे सिद्ध झाले आहे, अशी भारतातील प्रमुख उत्खननस्थले पुढीलप्रमाणे होत. कंसातील आकडे उत्खननाच्या वर्षाचे आहेत :—

**( १ ) उत्तर भारत** — १. मथुरा ( स. १८९२; १९५४ ); २. पिप्रावा ( स. १८९८ ); ३. वैशाली ( स. १९०३; १९१३ ); ४ कुशीनारा ( स. १८७६; १९०४ ); ५. लौरिया नंदनगढ ( स. १९०५; १९३५ ); ६. श्रावस्ती ( स. १९०७; १९१० ); ७. पाटलिपुत्र ( स. १९१२; १९२६; १९५१ ); ८ बिथभयपट्टन ( स. १८७४; १९१० ); ९. सारनाथ ( स. १८४८; १९०४; १९२८ ); १०. राजगृह ( स. १९५० ); ११. अहिच्छत्र ( स. १८६२; १९४० ) १२. हस्तिनापुर ( स. १९५० ); १३. कौशांबी ( स. १९५७ ); १४. वाराणसी ( स. १९५७ ); १५. अत्रंजीखेरा.

**(२) पश्चिम भारत**— १. विराटपुर ( स. १९३६; १९६२ ); २. शाकंभरी ( स. १८८५; १९३६ ); ३. रायरा ( स. १९३८ ); ४. मध्यमिका ( स. १८७२; १९१९; १९६२ ); ५. द्वारका ( स. १९६३ ); ६. भारुकच्छ ( स. १९५९ ); ७. उज्जयिनी ( स. १९५५; १९५८ ); ८. ऐरिकिण ( स. १९६० ).

**( ३ ) पूर्व भारत**— १. तोसलि ( स. १९४८ ); २. ताम्रलिप्ती ( स. १९५४ ); ३. चंद्रकेतुगढ ( स. १९५६ ); ४. रत्नगिरि ( स. १९५७; १९६० ).

**( ४ ) दक्षिण भारत**— १. अरिकमेडु (स. १९३७); २. धरणीकोट ( स. १९६२ ). ३. कावेरीपट्टनम् ( स. १९६३ ); ४. ब्रह्मपुरी ( स. १९४५ ); ५. नासिक ( स. १९५५ ); ६. नागार्जुनिकोंड ( स. १९५४ ).

**महाभारतकालीन उत्खननावशेष**—महाभारत आणि पौराणिक ग्रंथातील भारतीय इतिहासपरंपरेला आणि पार्गिटर यांच्या तत्संबंधीच्या कालनिर्णयाला डॉ. बी. बी. लाल यांनी हस्तिनापुर, वाराणसी, इंद्रप्रस्थ, प्रयाग आदि स्थानी केलेल्या उत्खननामुळे नवी पुष्टी मिळाली. आर्यपूर्वकालीन अनार्य संस्कृतीचे अवशेष सर जॉर्ज मार्शल यांना सिंधु खोऱ्यातील मोहेंजोदरो आणि हरप्पा येथे सापडले असले ( स. १९२७ ), तरी भारतीय आर्य संस्कृतीच्या प्रतीकभूत अशा महाभारतकालीन आर्यांची ( इ. स. पू. ९ वे–७ वे शतक ) रंगविलेली तपकिरी मृत्तिकापात्रे डॉ. लाल यांनाच सर्वप्रथम कौरवराजधानी हस्तिनापुर येथे सापडली. उत्तरकालात महाभारतनिर्दिष्ट विभिन्न स्थानांच्या उत्खननातहि अशीच मृत्तिकापात्रे पुन्हा सापडली. त्यायोगे पार्गिटर आणि सर मॉर्टिमर व्हीलर यांनी पूर्वीच सुचविलेल्या इ. स. पू. १५०० आणि १२०० या आर्यांच्या भारत–प्रवेश आणि भारतीय युद्धाच्या कालनिर्णयास पुष्टी मिळाली. या विशिष्ट दृष्टीने डॉ. के. एन्. दीक्षित आणि डॉ. सांकलिया यांनी केलेली अहिच्छत्र आणि माहिष्मती ( आधु. माहेश्वर ) नगरांची उत्खननेहि महत्त्वाची आहेत.

हस्तिनापुर धर्तीची महाभारतकालीन मृत्तिकापात्रे, तसेच लोखंडी अवजारे ( इ. स. पू. १०२५ ) उत्तर प्रदेशान्तर्गत इटावा जिल्ह्यातील अत्रंजीखेरा येथे, तसेच उत्तर आणि पूर्व राजस्थान, पंजाब, उत्तर प्रदेश आणि मध्य

प्रदेशाच्या काही भागात सापडली असून, त्या आधारे गंगा–यमुना दुआबातील महाभारतकालीन संस्कृती या साऱ्या भागात पसरली असावी. भारतातील लोखंडाचा उपयोगहि याच काळात सुरू झाला असावा. या विशिष्ट स्तरातील चिनी मातीच्या पात्रांच्या अभावावरून ही संस्कृती अर्धनागरी असून, येथील बहुसंख्य लोक शेतीचा, तसेच पशुपालनाचा आणि शिकारीचा व्यवसाय करीत असावेत.

**मौर्यकालीन उत्खननावशेष** — उपरोक्त महाभारतकालीन संस्कृतीमध्ये महाजनपदकाली ( इ. स. पू. ६ वे शतक ), तसेच मौर्यकालीन सुसंघटित आणि आर्थिक दृष्ट्या सुसंपन्न साम्राज्यकाली फार मोठे स्थित्यंतर घडून आल्याचे तत्कालीन भारतव्यापी नाण्यांवरून आणि एकाच लिपीतील शिलालेखांवरून दिसते. देशव्यापी, तसेच आंतरराष्ट्रीय व्यापाराचे एक नवे युग या काळात उत्पन्न होऊन समाजातील बहुसंख्य लोक तटबंदीयुक्त नगरात निवास करू लागले.

या काळातील काळी चकचकीत एन्. बी. पी. मृत्तिकापात्रे विहार आणि उत्तर प्रदेशातील राजगृह, पाटलिपुत्र, वाराणसी आणि कौशांबी येथे, तसेच या देशाच्या सरहद्दीवरील मध्यप्रदेश, पंजाब, राजस्थानधील उत्खननात विपुल संख्येने सापडली असून, त्यावरून हे प्रदेश मौर्यकालीन नागरी संस्कृतीचे बालेकिल्ले असावेत. महाराष्ट्र, आंध्र प्रदेश, ओरिसा आणि पश्चिम बंगालमधील व्यापारी आणि धार्मिक महत्त्वाच्या स्थानी ही मृत्तिकापात्रे अधूनमधून सापडली असून, त्यावरून या प्रदेशांशी या संस्कृतीचा प्रासंगिक व्यापारी अथवा धार्मिक संबंध असावा.

**शुंग आणि सातवाहन उत्खननावशेष**— मौर्योत्तर काली उत्तर भारत आणि दख्खन प्रदेशात उदयास आलेल्या शुंग आणि सातवाहन राज्यकाली भारतात यवन, शक, पह्लव आदि अनेक विदेशी संस्कृतिप्रवाहांचे संमिश्रण होऊन त्यांना भारतीय संस्कृतीमध्ये सामावून घेण्यात आले. देशाच्या विभिन्न भागात व्यापाऱ्यांच्या संघटना स्थापन होऊन व्यापाराची वाढ झाली, आणि त्यासाठी नवनवीन नाणी पाडण्यात येऊ लागली. महाभारत, वाल्मीकि रामायणादि ग्रंथाना नवे बांधेसूद स्वरूप याच काळात प्राप्त झाले. देशाच्या या सर्वांगीण आर्थिक आणि सांस्कृतिक समृद्धीचे, तसेच वाढत्या प्रादेशिक अस्मितेचे मनोज्ञ दर्शन या काळातील उत्खननावशेषांमध्ये घडते.

**गुप्त उत्खननावशेष**—सातवाहनोत्तर गुप्त राज्यकालीन सांस्कृतिक पुनरुत्थानाच्या प्राचीन साहित्यातील वर्णनास या काळातील उत्खननावशेषांमुळे पुष्टी मिळते. सारनाथ, नालंदा, पाटलिपुत्र, अहिच्छत्र, कौशांबी येथील समृद्ध स्थापत्यावशेष, तसेच गुप्त राजांच्या सुवर्णमुद्रा, सालंकृत मृत्तिकापात्रे आणि टेराकोट्टा मृत्तिकाशिल्पे यांवरून गुप्तयुग हे भारतीय संस्कृतीचे सुवर्णयुग असल्याची खात्री पटते.

**मध्ययुगीन उत्खननावशेष**—मध्ययुगीन साहित्य आणि स्थापत्याद्वारे या काळाची परिपूर्ण माहिती उपलब्ध होत असल्याने या काळातील उत्खनने विशेष करण्यात आली नाहीत. तत्रापि सामान्य जनांचे दैनंदिन आयुष्य समजण्याच्या दृष्टीने त्यांची आवश्यकता आहे.

इतिहासाच्या विभिन्न काळातील सामान्य जनांच्या सांस्कृतिक जीवनासंबंधीचे, तसेच शास्त्रीय प्रगतीसंबंधीचे अपुरे ज्ञान हे भारतीय पुरातत्त्वशास्त्राचे प्रमुख वैगुण्य असून, त्या विशिष्ट दृष्टीने पद्धतशीर उत्खनने होणे जरूर आहे.

**भारतीय स्थापत्यपरंपरा**—भारतीय स्थापत्य आणि शिल्पकलेचे अवशेष ऋग्वेदपूर्वकालीन सिंधु संस्कृतीच्या कालापासून ( इ. स. पू. २९०० ) उपलब्ध होतात. त्या कालापासून मुसलमानी साम्राज्याच्या अंतापर्यंत ( स. १७५० ) भारतीय स्थापत्यकलेची सुमारे ४६५० वर्षांची अखंड परंपरा दिसून येते. भारतातील सर्व प्रांतांनी, आर्य, अनार्य, आणि सिंधु संस्कृतींनी, तसेच हिंदु, बौद्ध, जैन व मुस्लीम धर्मांनी या स्थापत्य आणि शिल्पपरंपरेस आपापल्या परीने हातभार लावला असून, त्यामधूनच या परंपरेचा समृद्ध पट तयार झाला आहे. भारतीय स्थापत्यपरंपरेच्या या समृद्धीकरणास हातभार लावणाऱ्या प्रमुख स्थापत्यपरंपरा कालानुक्रमे पुढीलप्रमाणे होत:—१. सिंधु संस्कृती ( इ. स. पू. २९००–१९०० ); २. आर्य स्थापत्यकला ( इ. स. पू. १३००–१००० ); ३. मौर्य स्थापत्यकला ( इ. स. पू. ६००–१०० ); ४. सातवाहन स्थापत्यकला ( इ. स. पू. १००–इ. स. १०० ); ५. कुशाण स्थापत्यकला ( इ. स. १००–२०० ); ६. गंधार स्थापत्यकला ( इ. स. १–६०० ); ७. गुप्त स्थापत्यकला ( इ. स. ३००–७५२ ); ८. पश्चिम चालुक्य स्थापत्यकला ( इ. स. ५००–९०० ); ९. ओरिसा स्थापत्यकला ( इ. स. ७००–१००० ); १०. कश्मीर स्थापत्यकला ( इ. स. ७००–१००० ); ११. प्रतिहार-हैहय स्थापत्यकला ( इ. स.

७००–९०० ); १२. पल्लव स्थापत्यकला ( इ. स. ६००–७०० ); १३. चोल स्थापत्यकला ( इ. स. ९००–१००० ); १४. पाल-सेन स्थापत्यकला ( इ. स. ९००–११०० ); १५. चंदेल स्थापत्यकला ( इ. स. १०००–११०० ); १६. होयसाळ स्थापत्यकला ( इ. स. ११००–१२०० ); १७. पांड्य स्थापत्यकला ( इ. स. १२००–१३०० ); १८. विजयनगर स्थापत्यकला ( इ. स. १३००–१५५० ); १९. मुसलमानी स्थापत्यकला ( इ. स. ११००–१७५० ).

उपरोक्त स्थापत्यपरंपरांचे सविस्तर विवरण प्रस्तुत ग्रंथाच्या अखेरीस 'भारतीय स्थापत्यकलापरंपरा' या स्वतंत्र परिशिष्टात आम्ही केले आहे. भारतीय आणि बृहद्भारतीय स्थापत्यस्थलांचा कालानुक्रम आणि समकालीनत्व नमूद करणारे परिपत्रक प्रास्ताविकाच्या अखेरीस दिले आहे. विराट भारतीय कलापरंपरेचे आकलन होण्यासाठी वाचकांस ते उपयुक्त वाटेल असा भरंवसा वाटतो.

## जगदुत्पत्ती

**जगदुत्पत्ती**—पृथ्वीची उत्पत्ती, विश्वातील अन्य ग्रहांशी तिचे परस्परसंबंध, तसेच आकाशीच्या ग्रहांचे तिच्या भौगोलिक स्थितीवर होणारे परिणाम आदींचे भौगोलिक, तत्त्वज्ञानपर आणि आध्यात्मिक विवेचन वैदिक आणि पौराणिक साहित्यात आढळते. या साहित्यकारांच्या अध्यात्मप्रवण मनाला भौतिक पृथ्वीवर्णनापेक्षाहि विश्वाच्या अंशभागस्वरूप पृथ्वीच्या परमात्मनकृत निर्मितीच्या रहस्यात अधिक गोडी असल्याचे स्पष्ट दिसते.

बहुतांशी साऱ्या पुराणांचा प्रथमाध्याय वैदिक साहित्यानुसारी जगदुत्पत्तिविषयक चर्चेस वाहिला असून, त्यापैकी पृथ्वीनिर्मितीची मूलभूत द्रव्ये आणि जगदुत्पत्तीची प्रक्रिया हे विषय भौगोलिक दृष्ट्या महत्त्वाचे आहेत. पौराणिक साहित्यमते पृथ्वीनिर्मिती पूर्वकालीन मूल द्रव्यातून झाली, की परमेश्वराने ती शून्यातून उत्पन्न केली ही जगदुत्पत्तीची मुख्य समस्या असून, पृथ्वीनिर्मितीच्या अन्य साऱ्या समस्या तिच्या शाखाभूत आहेत. या समस्येसंबंधीची प्राचीनतम अनुमाने वैदिक साहित्यात असून, उत्तरकालीन इराणी, ग्रीक, हिब्रू, बौद्ध, खिस्ती आणि मुस्लीम धर्मग्रंथांमध्ये त्यांचे अनुकरण दिसते.

**विभिन्न सिद्धांत**—वैदिक साहित्यात जगदुत्पत्तीसंबंधीचे दैवी निर्मिती, यांत्रिक निर्मिती, पैतृक निर्मिती आणि आध्यात्मिक निर्मिती असे निम्नलिखित चतुर्विध सिद्धांत आढळतात:—

( १ ) **दैवी निर्मिती**—ऋग्वेदमते सृष्टिनिर्मितीसमयी स्थपतिस्वरूप ( कारागीर ) विभिन्न देवांनी विभिन्न कार्ये वाटून घेऊन आणि सृष्टिरचनेसाठी आवश्यक ती आद्य तत्त्वे एकत्र करून ( ऋ. १०·१३० ), त्यांच्या द्रवीभूत रसायनाने सृष्टीची निर्मिती केली ( ऋ. १०·७२·२ ). ऋग्वेदात अन्यत्र सृष्टीरूपी विशाल गृहाच्या रचनेतील विभिन्न अवस्थांचे वर्णन दिले असून, सृष्टिपूर्वकालीन चराचर वस्तूंच्या आदिकर्त्या विश्वकर्मन् नामक देवस्थपतीने धूलिकणांच्या कच्च्या मालापासून सृष्टीरूपी गृहाची निर्मिती केली ( ऋ. १०·८१·८२ ), देवपदोत्पन्न धूलिसेवातून ( ऋ. १०·७२ ), अथवा श्रीविष्णूच्या पदक्षेपत्रयोत्पन्न धूलिकणातून (ऋ. १·२२·१७) पृथ्वीची निर्मिती झाल्याचा निर्देशहि ऋग्वेदात अन्यत्र आढळतो.

(२) **यांत्रिक निर्मिती**— ऋग्वेदरचनेच्या अंतिम पर्वातील या सिद्धांतानुसार विश्वकेंद्रस्वरूप आदिपुरुषशरीराच्या देहयज्ञातून ( शतधा विदीर्ण होण्याच्या प्रक्रियेतून ) पृथ्वी, आकाश, वायु, चंद्र, सूर्य आणि पंचमहाभूतांची निर्मिती झाली.

(३) **पैतृक निर्मिती** — या सिद्धांतमते पृथ्वी आणि स्वर्गरूपी मातापित्यांपासून सृष्टिनिर्मिती झाली असून, सृष्टीमधीले हे आद्य युगुल अग्नि ( ऋ. १·६·७·३; ६·७·७ ); इंद्र-सोम ( ऋ. ६·४७·४; ७२·७ ), सूर्य( ऋ. १·११५·१ ), इंद्र ( ऋ. ८·३·६; ३६·४; ७८·५ ); रुद्र ( श्वे. उ. ३·२; ६·९ ) आदि देवतांनी निर्मिले. पृथ्वी आणि स्वर्गरूपी युगुलाने सर्वप्रथम आत्मन्स्वरूपी, आदिकर्त्या सूर्याची निर्मिती केली. कालांतराने त्या सूर्याने वायु, पृथ्वी आणि स्वर्ग व्यापून टाकला ( ऋ. १·१५१·१ ). उत्तरकालीन वैदिक साहित्यात प्रजापति आणि विश्वकर्मन्-स्वरूपी सूर्यास सृष्ट्युत्पत्तीच्या सुवर्णमय अंड्याची, आणि अनादि अनंत परमात्म्याची उपमा दिली आहे.

ऐतरेय उपनिषद्मते अनादि अनंत आत्मन्स्वरूपी परमात्मन्पासून उत्पन्न झालेल्या वैश्विक व्यक्तीने समस्त सृष्टीची निर्मिती केली. विश्वनिर्मितीच्छू आत्मन्ने आधि-

दैविक जलराशींची, दैवी प्रकाशयुक्त स्वर्गाची, तसेच जलराशियुक्त पृथ्वीची निर्मिती करून, स्वनिर्मित वैश्विक पुरुषाकडे आणि अन्य देवांकडे अनुक्रमे उत्तरकालीन सृष्टिनिर्मितीची आणि तिच्या नियंत्रणाची कामगिरी सोपविली. सृष्टीतील क्षुधा-तृष्णादि वासना, तसेच समस्त जड पदार्थ आत्मन्‌नेच निर्मिले ( ऐ. उ. २·१·२–९ ).

(४) **आध्यात्मिक निर्मिती** — ऋग्वेदातील नासदीय (सृष्टिनिर्माण) सूक्तमते सृष्टीच्या प्रारंभकाली साऱ्या विश्वात एक पोकळी असून तेथे 'सत्' आणि 'असत्', अंतरिक्ष आणि आकाश, तसेच दिवस आणि रात्र काहीच अस्तित्वात नव्हते. या पोकळीमध्ये रुजलेल्या एका स्वयंभू बीजापासून सर्वप्रथम 'काम' ( सृष्टिनिर्मितीची लालसा ), आणि नंतर सृष्टीतील पंचमहाभूते निर्माण झाली. त्यायोगे पृथ्वी मनुष्यवस्तीस योग्य बनली ( ऋ. १०·१२९ ). सृष्टिनिर्मितिप्रेरक उष्णतेचा निर्देश येथे सृष्टिनिर्मितीचे स्वयंभू बीज अशा रूपकाने केला असावा.

नासदीय सूक्तातील सृष्टिनिर्मितीच्या सिद्धांताचे सविस्तर विवरण बृहादारण्यक उपनिषदात असून, या उपनिषद्‌मते सृष्ट्यारंभकाली मृत्यूने शरीरप्राप्त्यर्थ केलेल्या उपासनेतून जलाची निर्मिती झाली. कालांतराने घनीभूत झालेल्या या जलावरील फेसातून पृथ्वीचे बाह्यावरण तयार होऊन त्यापासून मृत्यूने अग्नि आणि प्रकाश यांची, आणि नंतर स्वशरीरापासून आदित्य ( सूर्य ) आणि वायूंची निर्मिती केली.

छांदोग्य उपनिषद्‌मते सृष्ट्यारंभकाली 'असत्' चे 'सत्' मध्ये रुपांतर होऊन क्रमशः परिवर्धनाने त्याचे एक अंडे बनले. एक वर्षपर्यंत तसेच राहिल्यानंतर हे अंडे रौप्य आणि सुवर्णखंडात विभाजित होऊन त्यापासून अनुक्रमे पृथ्वी आणि स्वर्ग निर्माण झाले. या अंड्यावरील जाड आणि पातळ कवचांपासून अनुक्रमे पर्वत आणि मेघ उत्पन्न झाले. अंड्यातील सूक्ष्म रक्तवाहिन्या नद्या आणि त्यामधील द्राव समुद्र बनले ( छां. उ. ६·३२–३३ ).

**समालोचन** -- सृष्टीच्या प्रारंभकालीन जलमय अवस्थेबाबत, तसेच प्रजापति नामक बीज ( देवता ) चराचर सृष्टीचे निर्माणकर्ते असल्याबाबत वैदिक आणि वैदिकोत्तर साहित्यात एकमत दिसते ( ऋ. १०·१२१·७ ). अन्य वैदिक साहित्यमते 'हिरण्यगर्भ' ( सोन्याचे अंडे ) संज्ञक बीजाच्या अंतर्भागातील अग्नीमुळे ( उष्णता ) स्वर्गपृथ्वीतील चराचर वस्तूंची निर्मिती झाली.

**ब्राह्मण साहित्यात** -- ऐतरेय ब्राह्मणमते सृष्टिनिर्माणेच्छू प्रजापतीने सर्वप्रथम द्यावापृथ्वी आणि अंतरिक्ष निर्मिले. उत्तरकालात या त्रैलोक्यांच्या मननातून प्रजापतीनेच अग्नि, वायु व आदित्यांची आणि या त्रिमहाभूतांच्या मननातून ऋग्वेद, यजुर्वेद आणि सामवेदाची निर्मिती केली ( ऐ. ब्रा. ५·३२ ). उष्णतेच्या प्रादुर्भावापासून सृष्ट्युत्पत्ती झाल्याची कल्पना कौषीतकि ब्राह्मणात अधिक स्पष्टपणे सांगितली असून, या ग्रंथामते तपःसिद्ध प्रजापतीच्या अंतर्यामीच्या उष्णतेपासून अग्नि, वायु, आदित्य, चंद्रमा आणि उषा आदि देवता निर्माण झाल्या. आपल्या या नवजात अपत्यांना प्रजापतीने तपःसाधनेच्या साह्याने सृष्टिविस्तार करण्याची आज्ञा दिली ( कौ. ब्रा. ६·१ ).

**बायबलमध्ये** -- वैदिक साहित्यातील जगदुत्पत्तीच्या कल्पना पौराणिक साहित्यात, तसेच जगातील विभिन्न धर्मग्रथांमध्ये पुनरुद्धृत दिसतात. ज्यू आणि ख्रिस्ती लोकांच्या 'जुना करार' ( ओल्ड टेस्टामेंट ) मते देवाने सर्वप्रथम निराकार आणि तमोव्याप्त पोकळीयुक्त पृथ्वी आणि स्वर्ग निर्मिले. सृष्टिनिर्मितीच्या या प्रक्रियेसाठी जलपृष्ठसंचारी देवात्म्याने सर्वप्रथम ( पहिल्या दिवशी ) प्रकाश निर्माण करून, आणि त्यापासून अंधार विभक्त करून रात्र, तसेच सकाळ आणि संध्याकाळ निर्मिली. त्यानंतर दुसऱ्या दिवशी ईश्वराने सृष्टिव्यापी जलापासून अंतरिक्ष, स्वर्ग, पृथ्वी आणि समुद्र निर्मिले. तिसऱ्या दिवशी त्याने पृथ्वीवरील गवत, वनस्पती, फळझाडे, आणि चौथ्या दिवशी दिवसरात्रनियंत्रक स्वतंत्र प्रकाश निर्मिले. पाचव्या आणि सहाव्या दिवशी त्याने पक्षी, मासे आणि सरपटणाऱ्या, तसेच मनुष्यादि अन्य प्राण्यांची निर्मिती केली ( जुना करार. १·१·३१ ).

परमेश्वराने पहिल्या दिवशी शून्यातून ( असत् ) विश्वाचा पसारा निर्माण करून, पृथ्वी, स्वर्ग, अग्नि, जल व प्राणिसृष्टी क्रमाने निर्मिल्याची जुन्या करारातील कल्पना वैदिक साहित्यातील जगदुत्पत्तिवर्णनासदृश आहे. येथे वर्णिलेला सृष्टिनिर्मितीपूर्वीचा जड वस्तूचा अभाव, तसेच प्रारंभिक अवस्थेतील निराकार आणि पोकळीयुक्त पृथ्वी वैदिक साहित्यातील यांत्रिक जगदुत्पत्तीच्या सिद्धांतासदृश आहे. भूमी आणि जल परस्परांपासून पुरेसे विभक्त न झाल्यामुळे, अथवा हवा आणि अग्नि अपुऱ्या घनावस्थेतील असल्यामुळे याकाळी पृथ्वी आकाररहित भासत असावी.

**कुराणमध्ये**—या ग्रंथातील जगदुत्पत्तीचे वर्णन जुन्या करारासदृश असले, तरी परमात्म्याच्या ( अल्ला ) सृष्टिनिर्मितीप्रेरणेतून विश्वाचा पसारा निर्माण झाल्याची कल्पना तेथे नव्याने आढळते. या ग्रंथमते अल्लाने आधाररहित

स्वर्ग आणि पृथ्वी सहा ( दोन ) दिवसात निर्मिली असून ( अल्-कुराण. १०·४ ). सूर्य-चंद्रांना त्यानेच कार्यान्वित केले ( अल्-कुराण. ११·७ ). पृथ्वीच्या भूभागातून डोकावणाऱ्या टेकड्या त्यानेच निर्मिल्या आणि धूम्रप्रयात स्वर्गाला आणि पृथ्वीला त्यानेच कावूत आणले. सप्तस्वर्गांची निर्मिती करून त्यांच्या शासनाची व्यवस्था त्याने लावून दिली ( अल्-कुराण. ४१·९–१२ ). कुराणातील उपरोक्त वर्णनात अल्लाचा एक दिवस एक वर्षाचा मानला असून, ही विशिष्ट कल्पना पौराणिक साहित्यातील ब्रह्मदेवाच्या दिवसासदृश दिसते.

कुराणातील उपरोक्त वर्णनामध्ये सृष्टिचक्रापासून अल्ला अलिप्त असल्याचा, अथवा या चक्रामध्ये तो विलीन झाल्याचा वैकल्पिक अन्वयार्थ मुस्लीम तत्त्वज्ञांनी आणि सुफी सांप्रदायिकांनी लावला आहे.

**बौद्ध साहित्यात**—उत्पत्ती आणि लय यांच्या पुनरावृत्त चक्रातून समस्त सृष्टी भ्रमण करीत असल्याची या साहित्यातील कल्पना वैदिक साहित्यातील जगदुत्पत्तितत्त्वज्ञानासदृशच आहे. मात्र या प्रक्रियेतील परमेश्वरी नियंत्रण निरीश्वरवादी बौद्ध धर्मास मान्य नसून या धर्ममते निसर्गनियमानुसार चक्रनेमिक्रमाने पृथ्वीची निर्मिती होत असते. दीघनिकाय मते सृष्टिलयानंतर तीमधील पुण्यात्मे दीप्तिलोकात ( अभस्सर ) मनोरूपाने स्थलांतरित होऊन दीर्घकालपर्यंत तेथील सुख अनुभवितात. कालांतराने तृतीय स्वर्गाच्या ( अभस्सर ) खालच्या अंगास ब्रह्मदेवाची नवी विजन सृष्टी उत्क्रांत होताच दीप्तिलोकातील नष्टपुण्य पुण्यात्मे तेथे पुनरावतार घेऊन ती मनुष्यव्याप्त बनवितात ( दीघ. ३.२८ ).

**पौराणिक साहित्यात**— वैदिक परंपरेतील जगदुत्पत्तीच्या सिद्धांतांना या साहित्यात महाभारत आणि वाल्मीकि रामायणाच्या साह्याने नवे योजनाबद्ध आणि सर्वंकष स्वरूप दिले आहे. पुराणांच्या प्रारंभीच्या जगदुत्पत्तिविषयक भागातील ( लक्षण ) सर्ग आणि प्रतिसर्ग नामक अध्यायात 'प्रकृती' ( ओबडधोबड जड पदार्थ ) पासून चराचर सृष्ट्युत्पत्तीचे, तसेच सृष्टीच्या तात्पुरत्या विनाशानंतरच्या तिच्या पुनरुत्थानाचे वर्णन आढळते.

पौराणिक साहित्यमते प्राथमिक आणि उत्तरकालीन सृष्टिनिर्मिती-चक्रनेमिक्रमाने पुन:पुन्हा होत असून, ब्रह्मदेवाच्या आयुष्याच्या अंतिम क्षणी ( प्राथमिक सृष्टि-विलय ) अविनाशी आत्म्याचा अपवाद वगळता सृष्टीतील समस्त चराचर वस्तू आणि महाभूते निराकार जड पदार्थात ( प्रकृती ) विलीन होतात. यानंतरच्या काळातील नवजात उत्तरकालीन सृष्टीतील कनिष्ठ प्राणी आणि लोक हरएक कल्पांती ( ब्रह्मदेवाच्या दिवसाच्या अखेरीस ) विनष्ट होतात. तथापि तिचे मूळ रूप आणि तीमधील ऋषी आणि देव अबाधित राहातात. उत्पत्ती, स्थिती आणि लय यांनी बनलेले अनंत आणि चिरंतन विश्वचक्र, तसेच आत्मा ( पुरुष ) आणि जड पदार्थ ( प्रधान ) यांचे चिरंतन सहजीवन, हे दोन सिद्धांत पौराणिक साहित्यातील जगदुत्पत्तीचे मूलाधार आहेत.

**प्राथमिक जगदुत्पत्ती**— पौराणिक साहित्यमते जगदुत्पत्तीच्या प्रारंभी अगम्य, अनादि आणि अनंत आत्मा केवळ अस्तित्वात असून, पृथ्वी-आकाश, तसेच रात्र–दिवस यापैकी काहीच अस्तित्वात नव्हते. उत्तरकालात या आत्म्यापासून सृष्टीतील ब्रह्मन् आणि जड पदार्थ ( प्रधान ) उत्पन्न झाले. विष्णुमते सृष्ट्यारंभकाली भगवान विष्णु आणि त्याच्या 'काल' संज्ञक रूपाने सांधले गेलेले 'प्रधान' आणि 'पुरुष' असे तिघेच अस्तित्वात होते. सृष्ट्यारंभी सर्वप्रथम उत्पन्न झालेल्या पंचमहाभूतांनी स्वनिर्मित गुणधर्म आणि शक्तिसंचयाच्या साह्याने परस्परात सम्मीलित होऊन पृथ्वीचा जडगोलक तयार केला. आत्मन्‌ आणि बुद्धीच्या प्रेरणेने या जडगोलकाचे सृष्टीच्या जलराशीवर विसावलेल्या चैतन्यमय अंड्यामध्ये ( हैम, हिरण्य ) रूपांतर झाले. कालांतराने हे अंडे फुग्याप्रमाणे फुगून श्रीविष्णूचे निवासस्थान बनले ( विल्सन, विष्णु. २-१२ ).

विष्णुमते उपरोक्त अंड्यामध्ये पृथ्वीतील सप्त द्वीपे, सप्त समुद्र आणि पर्वत, आकाशातील ग्रहनक्षत्रे, तसेच समस्त देव, राक्षस आणि मनुष्यगण विसावले होते. या अंड्याच्या सभोवती एकापेक्षा दसपटीने जाड अशी सात नारिकेलफलसदृश कठीण कवचे असून, त्यांपैकी आतील चार जल, वायू, अग्नि आणि आकाश यांनी, आणि पाचवे पंचमहाभूतांच्या जन्मदात्या अहंकाराने बनले होते. प्रज्ञा आणि अनादि अनंत परमेश्वराने पृथ्वीचे सहावे आणि सातवे आवरण बनले होते ( विल्सन, विष्णु. २·१८–१९ ). विष्णु पुराणातील हे पंचमहाभूतोत्पन्न जगदुत्पादक अंड्याचे वैदिक साहित्यानुसारी वर्णन अन्य पुराणातहि पुनरुद्धृत आढळते.

अली यांच्या मते पौराणिक 'हैम' आणि 'जल' म्हणजे अनुक्रमे सुवर्णप्रभ, प्रकाशमान उष्णता, आणि वाफ असून, पौराणिक साहित्यातील हे जगदुत्पत्तीचे वर्णन उष्ण आणि प्रकाशमान गोलकापासून पृथ्वीची उत्पत्ती

झाल्याच्या अत्याधुनिक शास्त्रीय उपपत्तीशी तंतोतंत जुळते.

**पाश्चात्य साहित्यात**--प्राचीन सीरिया, ईजिप्त,पर्शिया, आणि ग्रीस देशातील साहित्यातहि अंड्यापासून पृथ्वीची उत्पत्ती झाल्याच्या पौराणिक कल्पनेचा पुनरुच्चार आढळतो. ग्रीक साहित्यातील 'ऑर्फियस्' अंडे, तसेच दिओन्निसस् देशातील सृष्टीच्या आदितत्त्वस्वरूप अंड्याची उपासना या विशिष्ट दृष्टीने उल्लेखनीय आहे.

**विश्वचक्र**—पौराणिक साहित्यमते उत्पत्ती, स्थिती आणि लययुक्त विश्वचक्र हे जगदुत्पत्तीचा केंद्रबिंदू आहे. विष्णुमते ब्रह्मदेवाच्या दिनान्ती स्वर्ग, पृथ्वी, पाताल आणि अंतराळ हे चार लोक प्रलयंकर अग्नीमध्ये भस्मसात होऊन, त्यांचे अक्राळविक्राळ, बाष्पमय आणि द्रवमय समुद्रात रूपांतर होते. या काळरात्री ब्रह्मदेवरूपी विष्णु निद्रिस्त होऊन, दुसऱ्या दिवशी विश्वाच्या नवनिर्मितीस प्रारंभ करतो. अशा दिवसरात्रींनी ब्रह्मदेवाचे एक वर्ष, आणि अशा १०० वर्षांनी ब्रह्मदेवाचे आयुष्य बनते. ब्रह्मदेवाच्या आयुष्यातील प्रथमार्ध (परार्ध) 'पद्म' नामक महाकल्पकाली समाप्त झाला असून, द्वितीयार्धातील 'वराह' नामक प्रथम कल्प (दिवस) सध्या चालू आहे (विल्सन, विष्णु. ३·२५).

पौराणिक साहित्यमते कृत, त्रेता, द्वापर आणि कलियुगांनी बनलेला ब्रह्मदेवाचा एक दिवस (कल्प) ४३२० दशलक्ष वर्षांचा असून, त्याच्या अखेरीस नित्य स्वरूपाचा, आणि परार्धाच्या अखेरीस मूलभूत स्वरूपाचा प्रलय होतो. जयचंद्र यांच्या मते पौराणिक साहित्यातील ब्रह्मदेवदिनाची कालमर्यादा अतिशयोक्त असून, हा दिन अंदाजे २५७० वर्षांचा असावा.

**प्रलय**–पौराणिक साहित्यमते नित्य प्रलयाच्या जलदुर्भिक्ष्य, अग्निप्रलय आणि जलप्रलय अशा तीन अवस्था असून, विष्णुमते ब्रह्मदेवाच्या दिनांती सारी पृथ्वी श्रांत, आणि क्षुधाग्रस्त मानवी प्रजा मृत होते. सूर्याच्या सप्तकिरणांमध्ये प्रविष्ट झालेला भगवान विष्णु पृथ्वीवरील, तसेच प्राणिमात्रांच्या शरीरातील जल शोषून घेऊन सारी पृथ्वी शुष्क बनवितो. तदनंतर सूर्यकिरणांची प्रखरता तिपटीने वाढून, आणि साऱ्या त्रैलोक्यात आगीचे लोळ उठून तिच्या प्रखर अग्निजिह्वा आकाश आणि अंतरिक्षास भिडतात. सारे विश्व भस्मसात होऊन त्यामधून उठणाऱ्या निबिड धूम्राभ्रांनी त्रैलोक्यात एक शतकपर्यंत पर्जन्यवृष्टी होऊन त्यायोगे पृथ्वीवर जलप्रलय होतो (विल्सन, विष्णु. ३.६३२).

**उत्तरकालीन सृष्टिनिर्मिती**—पौराणिक साहित्यातील प्राथमिक आणि प्रलयोत्तर सृष्टिनिर्मितीचे वर्णन एकसारखेच असून, विष्णुमते 'महत्', 'तन्मात्र' आणि 'ऐंद्रीयक' (इंद्रिय-संवेदना) संज्ञक गुणत्रयाच्या निर्मितीनंतर भगवान विष्णु पृथ्वीतील खनिजधातू, वनस्पती, वृक्ष, वेली, गवत आदि जडवस्तू, पशुपक्षी, देवदेवता, राक्षस, आणि अखेरीस अर्यकश्रोत् (मनुष्यप्राणी) क्रमशः निर्माण करतो (विल्सन, विष्णु. ५·३४).

वायुमते ब्रह्मदेवाच्या रात्रीच्या परिसमाप्तीनंतर तो वायुरूपाने जलामध्ये संचार करीत तेथे दडलेला पृथ्वीचा स्थिर भाग वराहरूप धारण करून बाहेर काढतो. या स्थिर द्रवभागातून तो नद्या आणि समुद्र, आणि घन भागातून गिरिपर्वत आदि निर्मितो (वायु. ८·१–१७).

**पाश्चात्य साहित्यात**—पौराणिक साहित्यातील विश्वचक्राची आणि तदनुषंगिक अग्नि अथवा जलनिर्मित विश्वप्रलयाची कल्पना ग्रीक,खाल्डियन,तसेच अयोनियन साहित्यात पुनरुद्धृत आढळते. सुविख्यात ग्रीक तत्त्वज्ञ ॲरिस्टॉटल आणि प्लेटो यांनीहि विश्वाच्या जन्म आणि पुनर्जन्माची (पॅलिओजेनेसिस्) कल्पना शिरोधार्य मानली आहे. त्यांचे मते विश्वप्रलयाचे हे परिणाम चंद्राच्या अधोभागीच्या पृथ्वीलोकावर अधिक जाणवत असून, चंद्राच्या अधोभागातील सृष्टी (पौराणिक-महालोक, देवलोक) त्यापासून अलिप्त राहाते.

जुना करार आणि कुराणमते पृथ्वीलोकीचे प्रलयचक्र जलप्रपातजन्य असून, मध्ययुगीन साहित्यात हीच कल्पना पुनरुद्धृत आढळते. त्यामानाने अग्निजन्य प्रलयाचा निर्देश तेथे कमी आढळतो. मध्ययुगीन तत्त्वज्ञांच्या मते विभिन्न पर्वतांतील शंखशिंपल्यांच्या अवशेषांवरून तो भाग जलप्रलयकाली पाण्यात बुडला असल्याच्या अनुमानास पुष्टी मिळते.

पौराणिक साहित्यातील विश्वाण्डाची कल्पना जर्मन तत्त्वज्ञ कांटच्या (इ. स. १८ वे शतक) ग्रंथात पुनरुद्धृत असून, त्याच्या मते विश्वारंभीच्या थंडगार आणि अचल अभ्रस्वरूपी जड सृष्टीतील भूमिकण गुरुत्वाकर्षणाने एकमेकांवर आपटून, आणि त्यामध्ये उष्णता आणि गती उत्पन्न होऊन, विश्वाच्या जड गोलकाचे धगधगीत गतिमान गोलकात रूपांतर झाले. या गोलकाच्या मध्यरेषेतून विभिन्न भूखंड बाहेर फेकले जाऊन थंड झाल्यानंतर त्यामधून ग्रह-तारे आणि पृथ्वीची निर्मिती झाली. मध्यवर्ती फिरत्या

गोलकाचा सूर्य बनला. कांट यांची ही अनुमानपरंपरा पदार्थविज्ञानशास्त्राच्या दृष्टीने असंभव असली, तरी पौराणिक जगदुत्पत्तीच्या सिद्धांताचे अनुकरण तीमध्ये स्पष्टपणे दिसते.

## सप्तद्वीपा पृथ्वी

**सप्तद्वीपा पृथ्वी**—पृथ्वीच्या सात प्रमुख उपविभागांचे, तसेच त्यांमधील समुद्र, पर्वत, देशविभाग ( वर्ष ), नद्या, वृक्ष, लोकसमूह आणि त्यांचे आचारविचार यांचे सविस्तर विवरण वाल्मीकि रामायण, महाभारत आणि पौराणिक साहित्यात आढळते. भारतवर्षाबाहेरील जगाची माहिती वाल्मीकि रामायणकाली सर्वप्रथम उपलब्ध झाल्याचे, आणि तीमध्ये क्रमाने भर पडत पौराणिक काली सप्तद्वीपा पृथ्वीचे यथातथ्य भौगोलिक ज्ञान भारतीयांना प्रथमच झाल्याचे पौराणिक साहित्यातील सप्तद्वीपा पृथ्वीच्या वर्णनावरून दिसते. या साहित्यातील हे पृथ्वीवर्णन कल्पनारम्य असल्याचे अगदी अलिकडच्या काळापर्यंत मानण्यात येत असे. परंतु आधुनिक संशोधनांती या वर्णनातील भौगोलिक यथातथ्यता पूर्णांशाने सिद्ध झाली असून, हे सप्तद्वीपात्मक विभाजन पौराणिक साहित्यकारांच्या परिणत भौगोलिक प्रज्ञेचा साक्षात्कार मानले जाते.

**वाल्मीकि रामायणात**—भारतवर्षाच्या पूर्वेकडील विभिन्न देशांचे प्राचीनतम वर्णन या ग्रंथातील वानरकृत पूर्व दिशावर्ती सीताशोधाच्या संदर्भात आढळत असून, तेथे सप्त उपराज्ययुक्त यवद्वीप ( आधु. जावा ), सुवर्ण-रूप्यक द्वीप ( सुवर्णभूमि, आधु. बोर्निओ–सुमात्रा ), पुष्करद्वीप ( जपान, मांचूरिया आणि आग्नेय सैबेरिया ), लंका ( सिलोन ), चीन ( चीन ), पञ्चचीन ( तिबेट ) आदि मेरु पर्वताच्या पूर्वेकडील देशांचा आणि ‘ जलोद सागरा’चा ( पुष्करद्वीपासभोवतालचा समुद्र ) निर्देश आढळतो ( वा. रा. कि. ४२·३८ ). कालदृष्ट्या महा-भारतपूर्वकालीन असे हे वर्णन आग्नेय आशियात प्रत्यक्ष जाऊन आलेल्या प्रवाशांच्या माहितीवर आधारलेले दिसते.

**रामायणकालीन जग**—आग्नेय आशियाच्या तुलनेने अन्य पृथ्वीचे वाल्मीकि रामायणातील वर्णन अत्यंत त्रुटित आणि संक्षिप्त दिसते. या ग्रंथमते उत्तर कुरु देशाच्या उत्तरेस उत्तर समुद्र असून, जंबूद्वीपाच्या पूर्वेस क्षार समुद्र ( आधु. बंगालचा उपसागर ), दुग्ध समुद्र, रक्त समुद्र आणि शुद्धजल समुद्र क्रमाने पसरले होते. जंबूद्वीपाच्या ( आधु. भारतवर्ष ) पश्चिमेस मेरु आणि पारियात्र पर्वत असून, या द्वीपाच्या उत्तरेस आणि दक्षिणेस प्रत्येकी पाच, आणि पश्चिमेस चार पर्वतश्रेणी होत्या. या द्वीपाच्या पूर्वेस कूटशाल्मलि नामक द्वीप आणि दोन पर्वतश्रेणी होत्या.

**महाभारतात**—वाल्मीकि रामायणकाली सर्वप्रथम प्रस्थापित झालेल्या द्वीपात्मक पृथ्वीकल्पनेचे उत्क्रांत स्वरूप महाभारतातील पृथ्वीवर्णनात आढळते. पृथ्वीच्या विभिन्न द्वीपातील पर्वत, वर्षे, नद्या, समुद्र, आदींची नामावली महाभारतकालीच सर्वप्रथम सुनिश्चित झाली असून, नवो-पलब्ध माहितीसह त्यांची पुनर्रचना करण्याचा प्रयत्न पौराणिक साहित्यात आढळतो. अशा तऱ्हेने पृथ्वीच्या आलेखनाच्या वाल्मीकि रामायणाने केलेल्या मूलारंभाला निश्चितता आणण्याचे काम महाभारताने, आणि परि-पूर्णता आणण्याचे काम पौराणिक साहित्याने केलेले दिसते.

महाभारतमते मध्यवर्ती मेरु पर्वतासभोवती ( आधु. पामीर पठार ) चतुःसमुद्रांनी अंशतः वेष्टित अशी जंबू, उत्तर कुरु, केतुमाल, आणि भद्राश्व ही चार द्वीपे विकसित कमलपुष्पाच्या पाकळ्यांप्रमाणे पसरली होती ( म. भी. ६·१३ ). पौराणिक साहित्यात सप्तद्वीपा पृथ्वीचा भाग मानलेल्या प्लक्ष, शाल्मलि आणि कुशद्वीपांना महाभारतातील चतुर्द्वीपा पृथ्वीच्या वर्णनात जंबूद्वीपाचेच उपविभाग मानले आहे. यावरून पृथ्वीचे विभिन्न उप-विभाग महाभारतकाळी अस्पष्टपणे ज्ञात असले, तरी त्यांची सप्तद्वीपात्मक मांडणी त्यांना अवगत नसावी.

**वैगुण्ये**—महाभारतात अन्यत्र धृतराष्ट्राच्या विनंती-वरून सप्तद्वीपा पृथ्वीची माहिती प्रतिज्ञापूर्वक सांगणारा संजय प्रत्यक्षात केवळ पाचच द्वीपांची माहिती सांगतो. शकद्वीप हे दुग्धसमुद्रवेष्टित असल्याची माहिती आवर्जून सांगत असता मध्यवर्ती जंबूद्वीपाच्या निश्चित कोणत्या दिशेला ते आहे, हे तो सांगत नाही (म. भी. ११·१०). पृथ्वीतील घृत, जल, दधि आणि सुरा समुद्रांचा मोघम निर्देश तो करीत असला, तरी कुश, शाल्मलि आणि क्रौंच द्वीपांच्या संदर्भात त्यांची भौगोलिक स्थाने त्यास अनवगत दिसतात. पृथ्वीतील द्वीपांचा आकार उत्तरेकडे क्रमाने मोठा होत गेल्याचे संजयास ज्ञात असले ( म. भी. ११·३ ), तरी त्यानंतरच्याच एका श्लोकात परंपरेने उत्तर दिशानुवर्ती मानलेले पुष्कर संज्ञक सहावे द्वीप

पृथ्वीच्या मध्यभागी असल्याचे हास्यास्पद विधान तो करतो. यावरून पृथ्वीच्या सप्तद्वीपांच्या भौगोलिक स्थानाची सुनिश्चित कल्पना महाभारतकाली नसावी.

**द्वीपसंख्या** -- महाभारतात सप्तद्वीपांचा मोघम निर्देश क्वचित असला ( म. आ. ७५.१९ ), तरी पृथ्वीच्या तेरा ( म. आर. ३.५२; १३४.२०; द्रो. ७०.१५ ), तसेच अठरा ( म. शां. १४.२५ ) द्वीपांचा निर्देशहि तेथे आढळतो. अर्जुनाच्या उत्तर दिग्विजयसमयी भद्राश्व, केतुमाल आणि उत्तर कुरु वर्षांच्या विजयानंतर त्याने समुद्रकिनाऱ्यापलीकडील अनेक द्वीपे आणि अंतर्द्वीपे जिंकल्याचा निर्देश महाभारतात आढळतो. यावरून पृथ्वीची वर्तुलाकृती द्वीपरचना त्या काळी ज्ञात नसावी. पृथ्वीची द्वीपे समुद्रवेष्टित असल्याचे महाभारतकारांस ज्ञात असले, तरी या समुद्रांचे बंदिस्त वलय द्वीपांभोवती असल्याचे भौगोलिक ज्ञान त्यांस नसावे. त्यामुळेच तेथे निर्देशिलेली द्वीपे बेटे अथवा दुआब असण्याची शक्यता अधिक वाटते.

**जैन साहित्यात** -- महाभारतातील कमलपुष्पाकृती चतुर्द्वीपा पृथ्वी, आणि पौराणिक साहित्यातील वर्तुलाकृती सप्तद्वीपा पृथ्वी यांच्या संधिकालातील पृथ्वीवर्णन जैन साहित्यात आढळते. या साहित्यमते जंबूद्वीपाच्या उभय अंगास प्रत्येकी दोन द्वीपे आणि दोन समुद्र वर्तुलाकृती पसरले होते.

**पौराणिक साहित्यात** -- पौराणिक साहित्यातील सप्तद्वीपा पृथ्वीच्या वर्णनात महाभारतातील कमलपुष्पाकृती द्वीपांची मध्यवर्ती कल्पना कायम ठेवून पृथ्वीतील सात द्वीपे आणि त्यांशी संबंधित समुद्र, पर्वतादींची माहिती भौगोलिक दृष्ट्या परिपूर्ण बनविली आहे. जंबूद्वीपाच्या ( आधु. आशियाखंड ) दक्षिण टोकानजिकच्या भारतवर्षाचे, तसेच पश्चिम आणि पूर्वेकडील भद्राश्व ( आधु. उत्तर चीन ) आणि केतुमाल ( आधु. उत्तर अफगाणिस्तान ) वर्षाचे भौगोलिक दृष्ट्या अत्यंत अचूक वर्णन तेथे आढळते (वायु. ४०.१-२४; ४३.१-३८). या वर्णनात उरल पर्वत आणि कॅस्पियन समुद्रापासून येनि-से नदीपर्यंतच्या, तसेच तिएन्-शन् पर्वतापासून आर्क्टिक समुद्रापर्यंतच्या विस्तृत भूभागातील पर्वत, देश आणि नद्यांची भौगोलिक दृष्ट्या बिनचूक माहिती प्रथमच आढळते. विसाव्या शतकाच्या प्रारंभापर्यंत सर्वस्वी अज्ञात समजल्या जाणाऱ्या या प्रदेशाचे पौराणिक साहित्यातील वर्णन अद्वितीय असून, त्या तुलनेने मेरु पर्वताच्या ( आधु. पामीर पठार ) उत्तरेकडील उत्तर जंबूद्वीपाचे त्यातील वर्णन त्रुटित आणि संक्षिप्त आहे.

सप्तद्वीपा पृथ्वीच्या पौराणिक वर्णनात विलक्षण एकवाक्यता असून, परंपरेने चालत आलेले पृथ्वीविषयक ज्ञान साक्षेपाने जतन करण्याचा, तसेच प्रत्यक्ष निरीक्षणाने, तसेच प्रादेशिक दळणवळणाने उपलब्ध झालेली नवी माहिती अंतर्भूत करण्याचा शास्त्रशुद्ध प्रयत्न तेथे दिसतो.

**व्याख्या** — विष्णुमते ' जेथे मनुष्यास पायाने जाता येते असा ' भूर्लोक ' म्हणजे ' पृथ्वी ' असून ( विष्णु. २.७.१६ ), सूर्यचंद्रांनी प्रकाशित होणारा समुद्र, नद्या, पर्वत आदींनी युक्त सारा भूभाग तीमध्ये समाविष्ट होत असे ( विष्णु. २.७.३ ).

उपरोक्त व्याख्येतील ' मानवी पदक्षेपयुक्त ' हे पृथ्वीचे वर्णन भौगोलिक दृष्ट्या विशेष महत्त्वाचे असून, पौराणिक साहित्यातील सप्तद्वीपा पृथ्वीच्या विवरणात ही व्याख्या कटाक्षाने पाळली आहे. मानवी वसाहतीस अयोग्य अशी वाळवंटे, तसेच दलदलीचे आणि हिममय प्रदेश तेथे टाळले आहेत. या विशिष्ट दृष्टीने पौराणिक पृथ्वीवर्णन हे अरबी साहित्यातील ' रुब्-अल्-ममूर ' ( मानवी वसाहतयोग्य पृथ्वी ) शी तंतोतंत जुळते.

**स्वरूपवर्णन** — पौराणिक साहित्यातील पृथ्वीचे स्वरूपवर्णनहि मानवी वसाहतीच्या कल्पनेशी मिळतेजुळते असेच आहे. पद्ममते आसमुद्र पसरलेली पंचमहाभूतनिर्मित कामधेनुतुल्य पृथ्वी सृष्टीतील मनुष्यमात्रांना जन्म देऊन आणि त्यांचे पोषण करून त्यांच्या समस्त कामना पूर्ण करते. तिच्या ठायी उत्पन्न होणाऱ्या नानाविध बीजांनी सृष्टीला स्थैर्य प्राप्त होते ( पद्म. भूमि. २८.७०-७५ ).

**उत्क्रांती** — पृथ्वीचा समस्त भूप्रदेश सात द्वीपे, हवामानाचे सात पट्टे, सात समुद्र आणि सात अंतरिक्षे यांमध्ये विभागल्याचा आद्य निर्देश वाल्मीकि रामायण आणि महाभारतामध्ये आढळत असला, तरी या कल्पनेस शास्त्रशुद्ध भौगोलिक स्वरूप पौराणिक साहित्यातच सर्वप्रथम प्राप्त झालेले दिसते. या साहित्यमते पृथ्वीची सप्तद्वीपे मध्यवर्ती जंबूद्वीपाभोवती एकाहून एक मोठ्या होत जाणाऱ्या वर्तुलांच्या स्वरूपात पसरली असून, ती परस्परांपासून सात समुद्रांनी विभाजित झाली आहेत. वायुमते पृथ्वीच्या सात द्वीपांत प्रत्येकी सात वर्षे आणि तितकेच वर्षपर्वत असून, त्यांच्या पद्धतशीर मांडणीने सलग पृथ्वीची निर्मिती झाली आहे. चंद्र, सूर्य आदि ग्रह, तसेच त्यांची नियत स्थाने हा या ब्रह्मदेवविरचित विराट सृष्टीचाच एक भाग आहे ( वायु. ८.१५-१७ ).

द्वीपाची व्यापक व्याख्या—' समुद्र, नदी, सरोवर आदि जलाशयांनी दोन अथवा तीन बाजूंनी वेष्टिलेला भूभाग ' अशा अर्थाने ' द्वीप ' ( पर्शियन–' दुआब '; अरबी–' जेझिर ' ) या संज्ञेचा प्रयोग परंपरेने करण्यात येतो. या विशिष्ट मर्यादित अर्थाहून अधिक व्यापक अर्थ पौराणिक द्वीपकल्पनेमध्ये अभिप्रेत दिसतो. नदीसमुद्रादि जलसंचयानेच नव्हे, तर वाळवंट, दलदल, पर्वत, घनदाट अरण्य आदि दुर्लंघ्य सीमांनी विभाजित झालेल्या भू-प्रदेशाला तेथे ' द्वीप ' म्हटले आहे. बव्हंशी वालुकार्णवाने ( वालुकासमुद्र ) मर्यादित झालेल्या जंबूद्वीपान्तर्गत मर्यादा पर्वतांना तेथे ' आसमुद्र ' उपाधी लावली आहे. अरबी साहित्यातहि ' जेझिर ' ( द्वीप )च्या या व्यापक व्याख्येचे अनुकरण केले असून, पाण्याप्रमाणेच वाळवंटाने दुर्लंघ्य बनलेल्या प्रदेशाला ( उदा. वाळवंटवेष्टित ओएसिस्, अथवा नदी आणि वाळवंट यांच्या दरम्यानचा आधु. अल्जीरिया देश ) तेथे द्वीप म्हटले आहे.

उत्तरकालीन पौराणिक साहित्यात नैसर्गिक परिस्थिती अथवा हवामानामुळे विभक्त बनलेल्या भूभागांना ' द्वीप ' म्हणण्याची पद्धती रूढ झाली. त्यामुळे ' द्वीप ' शब्दाचा मूळचा भूगोलशास्त्रीय अर्थ नाहीसा होऊन कोणत्याहि सुसंघटित मानवी वसाहतीला ही संज्ञा लावण्यात येऊ लागली.

अशा व्यापक दृष्टिकोनातून पौराणिक पृथ्वीच्या सप्त-द्वीपांचे, आणि तीमधील समुद्र, पर्वत, नद्यादिकांचे संशोधन केले असता, तीमधील बहुतांशी साऱ्या द्वीपांची यथायोग्य ओळख पटू शकते. यासंबंधीचे आजवरचे सारे संशोधन पौराणिक सप्तद्वीपान्तर्गत पर्वतमालिका आणि नद्या अनु-मान धपक्याने पृथ्वीच्या कोणत्या ना कोणत्या तरी भागात बसवून त्या आधारे करण्यात आले आहे. वरवरच्या नाम-सादृश्याखेरीज अन्य कोणताहि आधार या अनुमानास नसल्याने ही सारी संशोधनपद्धती अशास्त्रीय, आणि सत्या-न्वेषणाच्या दृष्टीने निरुपयोगी वाटते.

अली यांच्या मते समुद्रवेष्टित ' भूभाग ' अशा मर्या-दित अर्थाऐवजी वैशिष्ट्यपूर्ण हवामान आणि वनस्पतींच्या भौगोलिक पार्श्वभूमीवर संबंधित झालेली मानवी वसाहत ' असा व्यापक अर्थ गृहित धरल्यास पौराणिक सप्तद्वीपांचा शोध अधिक यथायोग्यपणे लागू शकेल.

पृथ्वीच्या कोणत्याहि भागातील मानवी वसाहतीकरण हे प्रामुख्याने त्या देशाचे हवामान आणि वनस्पती यांवर अवलंबून असते, हे लक्षात घेता अली यांची ही अनुमानपरंपरा अभिनव वाटते. त्याआधारे पौराणिक सप्त-द्वीपांची स्थाननिश्चिती त्यांनी निम्नप्रकारे सुचविली आहे :— १. **जंबूद्वीप** ( आधु. मध्य आशिया ); २. **प्लक्षद्वीप** ( आधु. भूमध्य सामुद्रिक प्रदेश ); ३. **कुशद्वीप** ( आधु. इराण, इराक आणि त्यानजिकचा वालुकामय प्रदेश ); ४. **शाल्मलिद्वीप** (आधु. मादागास्कर आदि आफ्रिकेच्या पूर्व किनाऱ्यावरील देश ); ५. **क्रौंचद्वीप** ( आधु. कृष्ण समुद्राच्या किनाऱ्यावरील प्रदेश ); ६. **शकद्वीप** ( आधु. आग्नेय आशियातील मलाया, सयाम, इंडोचायना आणि दक्षिण चीन ); ७. **पुष्करद्वीप** (आधु. जपान, मांचूरिया आणि आग्नेय सैबेरिया ).

**वैगुण्ये**—पौराणिक साहित्यातील सप्तद्वीपा पृथ्वीचे वर्णन हजारो वर्षांपूर्वीचे असून, त्यानंतरच्या काळात पृथ्वीच्या विभिन्न भागांचे हवामान, वनस्पती, नद्या या मानवी वसाहतींना स्थायीभावभूत भूवैशिष्ट्यांमध्ये अनेक ठिकाणी आमूलाग्र बदल झाले आहेत. त्यामुळे या द्वीपांचे आणि तत्रस्थ लोकसमूहांचे संभाव्य भौगोलिक स्थान तर्काने सांगणे आज केवळ शक्य आहे. त्यामध्ये शास्त्रीय काटेकोरपणा असंभव आहे.

**विदेशी साहित्यात**—पौराणिक साहित्यातील सप्त-द्वीपा पृथ्वीकल्पनेचे पडसाद अरबी, पर्शियन, ग्रीक आणि चिनी साहित्यात आढळतात. प्लिनीच्या मते पृथ्वीचा भू-भाग हवामानाच्या सात पट्ट्यांमध्ये विभागला असून ( प्लिनी, ६ ), अरबी साहित्यातहि हीच कल्पना पुनरुद्-धृत आढळते. सूर्य आणि विषुववृत्ताच्या विभिन्न कोनांच्या ( ग्रीक–' क्लिम् ' ) आधारे हवामानाचे पट्टे ( क्लिम्→ इराणी ' इकिलिम '→ इंग्रजी ' क्लायमेट ' ) आखण्याची कल्पना ग्रीकांनी सर्वप्रथम शोधून काढली, आणि इराणी आणि भारतीय भूगोलकारांनी तिचे अनुकरण केले.

पर्शियन साहित्यातहि सप्तविभागात्मक ( किश्वर ) पृथ्वीचे वर्णन असून, तिच्या ' खोनेरेत्स्–बामी ' नामक मध्यवर्ती भूभागामध्ये ( पौराणिक–जंबूद्वीप ) तेथे इराण वर्झ्, कंग्दिझ्, जमगर्द, कश्मीर आदि देशांचा समावेश केला आहे.

झेंद अवेस्तामते पृथ्वीचे सात प्रमुख भाग पुढीलप्रमाणे होत :—१. ताझी ( अरबस्तान ); २. इराण (पर्शिया); ३. मझेंद्रन् ( स्लाव देश ); ४. तुरान ( तुर्कस्तान ); ५. रुम् ( रोमन साम्राज्य ); ६. सिंद आणि इंडिया ( भारत ); ७. चिनीस्तान ( चीन ) ( अवेस्ता. १·३०; २·३५७; ३६३; ४०९ ).

शाहनामा ग्रंथात पृथ्वीच्या सात प्रमुख विभागांची ( किश्वन ) नावे पुढीलप्रमाणे दिली आहेत :—१. चीन; २. इंडिया; ३. तुरान ( अमूदरिया नदीच्या उत्तरेकडील तुर्क वसाहती ); ४. रोमन साम्राज्य; ५. आफ्रिका; ६. स्लाव देश; ७. इराण. उपरोक्त दोन्ही नामावलीतील रोमन साम्राज्याच्या निर्देशावरून त्या इसवी सनानंतरच्या असाव्यात.

**अरबी साहित्यात**—या साहित्यातील सप्तद्वीपा पृथ्वीच्या पर्शियन साहित्यानुसारी वर्णनात दिवस आणि रात्र यांच्या कालमर्यादेत ½ तासाचा फरक असणारे विषुववृत्त हा पृथ्वीचा मध्यबिंदू कल्पिला असून, त्याच्या उभय अंगास समांतर असे सात हवामानाचे पट्टे आखले आहेत. अबुल फिदाच्या मते या पट्ट्यांचा आरंभ आणि अखेर अनुक्रमे १२° आणि ५०° उत्तर येथे होत असे.

**चिनी साहित्यात**—अबू झैदच्या मते तत्कालीन चिनी साहित्यात पृथ्वीचे निम्नलिखित पाच भाग मानले जात असत :—१. इराक ( बगदाद; पृथ्वीच्या मध्यभागी ); २. चीन; ३. तुर्की साम्राज्य; ४. भारतवर्ष ( हत्तींचा देश ); ५. रोमन साम्राज्य ( सुंदर लोकांचा देश ) ( मसूदी, मुरुज-अल्-धाब्. १·७० ).

फो-कौ-कु नामक चिनी ग्रंथमते बौद्धोत्तर काली त्सिग्-लिंग् पर्वत ( आधु. पामीर पठार ) हा पृथ्वीचा मध्य-बिंदू मानीत असून, त्याच्या परिसरात पृथ्वीचे निम्न-लिखित चार प्रमुख भूभाग होते :—१. पूर्वेस—चीन; २. दक्षिणेस—भारत; ३. पश्चिमेस—पर्शिया ( मौल्यवान वस्तूंचा देश ); ४. उत्तरेस—तुर्की साम्राज्य ( अश्वांचा देश ) ( फो-कौ-कु. पृ. ८३ ).

## पृथ्वीरचनेतील पर्वतांचे महत्त्व

**पृथ्वीला स्थैर्य**—पृथ्वीच्या भव्य रचनेकडे नजर टाकली असता त्यामधील नद्यापर्वतांचे अस्तित्व प्रथमदर्शनीच डोळ्यात भरते. पृथ्वीवरील सर्वाधिक स्थिर वस्तू पर्वत होय. नद्यांच्या स्वरूपात व स्थानात बदल होतो. पण पर्वतांच्या बाबतीत नद्यांइतका जलद फरक पडत नाही. त्या अर्थानेच पर्वताना संस्कृतमध्ये ' भूधर ' म्हटले आहे.

संस्कृत साहित्यमते पृथ्वीरूपी शरीरामध्ये पर्वत हे अस्थींसदृश व नद्या रक्तवाहिन्यांसदृश असून, वृक्षवनस्पती हे तिच्या शरीरावरचे केस, आणि मृत्तिकादि पदार्थ तिची त्वचा आहेत. या रूपकावरून पर्वतांचे पृथ्वीच्या रचनेतील महत्त्व ध्यानात येते. पृथ्वीरचनेला पर्वतांनी पक्केपणा आणला असून, ज्या भागात पर्वत नाहीत, त्या भागात भूकंपादि उलथापालथ अधिक होते, तसेच तेथील नद्यांचे प्रवाहहि अधिक अस्थिर असतात ( उदा. उत्तर भारतातील गंगा-यमुना खोरे ). प्रारंभी ठिसूळ, मृदु आणि लिबलिबित असलेल्या पृथ्वीला पर्वतांमुळे दृढता आणि स्थैर्य प्राप्त झाल्याचे भूगर्भशास्त्रीय संशोधनाने निर्णायकपणे सिद्ध झाले आहे. त्यामुळेच पृथ्वीवर पर्वत निश्चित केव्हा निर्माण झाले, हे अद्यापहि ज्ञात नसले. तरी त्यांच्या निर्मितीमुळे पृथ्वीला स्थैर्य प्राप्त झाले, याविषयी शंका वाटत नाही.

विष्णु पुराणातील एका आख्यायिकेत पर्वतांना पृथ्वीचे सांधे म्हटले आहे. या ग्रंथमते असुरपीडित आणि श्री-विष्णुशरणागत पृथ्वीने स्वतःचे पर्वतरूपी सांधे असुरांनी खिळखिळे केल्याची तक्रार केली. स्वतःचे हे सांधे स्थिर करण्याची, तसेच स्वमाथ्यावरील असुरांचा भार नाहीसा करण्याची प्रार्थना तिने श्रीविष्णूला केली ( विष्णु. ५·१·५६ ).

**पर्वताचे पंख** – वैदिक, तसेच पौराणिक साहित्यमते पुरातनकाली पर्वतांना असणारे पंख इंद्राने वृत्रयुद्धसमयी वज्राच्या साह्याने तोडले. या पंखच्छेदनसमयी मैनाक पर्वत समुद्रात लपून बसल्याने त्याचे पंख बचावले ( का. सं. ३६·७; मै. सं. १·१०·१३ ). काही अभ्यासकांच्या मते वर्षाकाली विद्युत्पातामुळे कोसळणाऱ्या पर्वतीय कड्यांचा रूपकात्मक निर्देश येथे अभिप्रेत असून, पृथ्वी जेव्हा मृदू आणि ढिली होती, त्या काळाचे वर्णन येथे केले आहे. उत्तरकालात पृथ्वीवरील पर्वत दृढ बनल्यानंतर त्यांचे कडे कोसळणे बऱ्याच अंशी कमी झाले. तत्रापि हिमालयात आणि दक्षिण अमेरिकेत अशा तऱ्हेचे अपघात आजहि अधूनमधून घडतात.

**पर्वतांचे प्रकार**—पर्वत अर्थाचे ' गिरि ', पर्वत ', ' अचल ', ' शिलोच्चय ', ' गंडिका ' ( टेकडी ) असे अनेक शब्द प्राचीन साहित्यात समानार्थक म्हणून उप-योजिले असले, तरी मूलतः हे सारे शब्द भिन्न अर्थाचे असावेत. वायु पुराणातील जगदुत्पत्तीच्या वर्णनात ' अचल ', ' पर्वत ', ' गिरि ', ' शिलोच्चय ' हे स्वतंत्र पर्वतप्रकार मानले आहेत. या ग्रंथमते ब्रह्मदेवाची रात्र संपल्यानंतर वायुरूपाने जलामध्ये संचार करीत असता, त्यास जलगर्भात सापडलेला पृथ्वीचा स्थिर भाग त्याने वराहरूप धारण करून बाहेर काढला. तदनंतर पृथ्वीमधील द्रवभाग नदी-

समुद्रादिकांच्या रूपाने विभक्त करून, आणि घनभाग वितळवून त्यांमधून त्याने विभिन्न पर्वतप्रकारांची निर्मिती केली: याप्रसंगी पृथ्वीचा तो चलनवलन न करणारा भाग 'अचल', पर्वयुक्त भाग 'पर्वत', नदीजलयुक्त भाग 'गिरि', आणि उतरंडीसदृश एकावर एक रचलेला भाग 'शिलोच्चय' संज्ञक पर्वतप्रकार बनले ( वायु. ८·१–१७ ).

ब्रह्माण्डमते 'विभिन्न उपविभागयुक्त ( शिखर ) पर्वत-विशेष' म्हणजे 'पर्वत' असून, 'उपविभागरहित अखंड पर्वत' म्हणजे गिरि ( डोंगर ) होय—

अपर्वाणस्तु गिरयः पर्वभिः पर्वताः स्मृताः।

( ब्रह्माण्ड. १९·१३·७; वायु. ४९·१३२ ).

वाल्मीकि रामायणमते पर्वतातील खोल गुफा 'बिल' अथवा 'रंध्र' नावांने ओळखली जात असे ( जसे— 'ऋक्षबिल', 'क्रौंचरंध्र'; वा. रा. कि. ५० ). राजतरंगिणीमते पर्वताच्या उतारावरील चराऊ रानास 'मठिका' म्हणत असून ( राज. ७·११८२ ), पर्वतीय खिंडीस 'संकट' म्हणत असत ( राज. ८·१६७४ ). मेघदूतमते पर्वतीय पठारास 'माल' ( आधु. माळरान ) म्हणत असत ( मेघ. १·१६ ).

पाणिनीच्या अष्टाध्यायीत पर्वतांशी संबंधित अशा 'हिमानी' ( हिमनदी; ४·१४९ ), 'हिमश्रथ' (पर्वतीय हिमाचे आर्द्रीकरण; ६·४·२९ ), उपत्यका' ( पर्वताचा पायथा; ५·२·३४ ), 'अधित्यका' (पठार; ५·२·३४) आदि संज्ञांचा निर्देश आढळतो.

लौकिक भाषेत ठिसूळ दगडाचा पर्वत 'गिरि' नावाने आणि एकसंध दगडाचा पर्वतविशेष 'पर्वत' नावाने ओळखला जातो. उदा. हिमालय हा 'गिरि' असून, सह्य हा 'पर्वत' आहे. परंतु आज या साऱ्या व्याख्या व्यवहारातून गेल्या असून, त्यामुळेच त्यांमधील सूक्ष्म भेद निश्चितपणे सांगता येत नाही. ब्रह्माण्ड पुराणातहि सप्तद्वीपा पृथ्वीतील प्रमुख पर्वतांची नावे सांगतांना 'पर्वत' आणि 'गिरि' संज्ञा समानार्थक म्हणून उपयोजिल्या आहेत. ( प्लक्षद्वीपे तु गोमेदः पर्वतः... . क्रौञ्चद्वीपे गिरि क्रौञ्चः ब्रह्माण्ड. १९·१३८–१३९ ).

तत्रापि भारतातील बहुतांशी भाषांमध्ये पर्वत, पर्वत-शिखर, टेकडी अशा विभिन्न अर्थांच्या निम्नलिखित संज्ञा आजहि प्रचारात दिसतात ( परिपत्रक पहा ).

**पर्वतदोहन**—अथर्ववेद आणि ब्रह्म पुराणातील असुर, पितर, आणि मनुष्यकृत पृथ्वीदोहनाच्या वर्णनात पर्वतांच्या प्रतिनिधीभूत मेरु पर्वताने पृथ्वीदोहन करून रत्ने, महौषधी, धातू प्राप्त केल्याचा रूपकात्मक निर्देश आढळतो. भागवतमते पृथु वैन्य राजाने पर्वतगर्भातील औषधी, रस, सुवर्णादि धातू, तसेच रत्ने प्राप्त करण्याची कला मनुष्यमात्रांना शिकविली, आणि अशा तऱ्हेने नव-जात मानवी संस्कृतींचा तो उद्गाता बनला ( भा. ४·१८ ).

**पर्वतांचे उपयोग**—पृथु वैन्यकृत पर्वतदोहनाच्या उपरोक्त आख्यायिकेत पर्वतांच्या उपयोगांचे ढोबळ मनाने वर्णन आढळत असले, तरी मानवी वसाहतीकरणाच्या

## विभिन्न भारतीय भाषांतील पर्वतीय संज्ञा

| मराठी | तामीळ | तेलगु | मल्याळम | कन्नड | तुलु |
|---|---|---|---|---|---|
| पर्वत | मलै | मल | मल | मले | मले |
| — | वरै | — | वर | बरे | बरे |
| पर्वतशिखर | कोट्टु | कोडु | कोट्टु | कोडु | — |
| — | कोट्टुमुटि | — | कोट्टुमुटि | — | — |
| टेकडी | कुन्रु | कोंड | कुन्नु | गुड्डु | गुड्डे |
| लहान टेकडी | पोरै | — | पोर | बेट्ट | बोट्ट |
| गुफा | वंक | वोक्क | वंकु | बांगु | बांगु |
| — | अलै | लाग | अला | — | — |
| डोंगराळ प्रदेश | कुरिचि | कुर्चि | कुरिचि | कुर्चि | कुर्चि |

सीमारेखनाच्या दृष्टीने पर्वतांचे महत्त्व त्याहूनहि अधिक उल्लेखनीय आहे. प्राचीन भारतीय जनपदांच्या, तसेच वसाहतींच्या नैसर्गिक सरहद्दी. पर्वतांनी आणि नद्यांनी बनल्या असून, पर्वतांचे संरक्षण आणि नद्यांचे जलसिंचन असल्याखेरीज कोणतीहि मानवी वसाहत सुस्थापित होऊ शकत नसल्याची प्रचीती पुनःपुन्हा येते. नद्यांच्या किनाऱ्यांवर सुस्थापित झालेल्या विशाल आणि समृद्ध वसाहतींना पर्वतांचे रक्षण नसेल, तर परकीय आक्रमणामुळे स्थलांतर किंवा विनाशाचा धोका त्यांना पत्करावा लागतो. पंजाबातील सिंधु नदीच्या पूर्व किनाऱ्यावरील शूद्र, सौवीर आणि आभीर वसाहतींच्या अशा स्थलांतरांचे अनेक निर्देश महाभारत, काव्यमीमांसा, पुराणे, अरबी आणि ग्रीक साहित्यात पुनःपुन्हा आढळतात. टॉलेमीच्या ग्रंथातहि सोद्रै ( शूद्रक ) आणि 'अबिरिय' ( आभीर ) वसाहतींचे पुनःपुन्हा स्थलांतर झाल्याचे दिसते. याचे उलट पर्वतांचे सुळके आणि वाळवंटे यांनी संरक्षिलेल्या दुर्गम मानवी वसाहती भौगोलिक दृष्ट्या अधिक सुस्थिर असल्याचे वायव्य भारतातील मक्रान, बलुचिस्तान आणि वझिरीस्तान प्रदेशातील पर्वतीय वसाहतींवरून दिसते ( उदा. पौराणिक साहित्यातील दरद–ग्रीक 'दरदै'; औरस–ग्रीक 'अर्स'; लंपाक–ग्रीक 'लंबतै' ).

**तीर्थस्थाने**—सृष्टिसौंदर्ययुक्त पर्वतीय स्थानी मनःशांती-प्रीत्यर्थ निवास करण्याची पद्धती प्राचीन काळापासून रूढ असून, त्यासाठीच अनेक दुर्गम पर्वतांमध्ये तीर्थक्षेत्रांची स्थापना केलेली दिसते. शिवाची द्वादश ज्योतिर्लिंगे, नासिक जिल्ह्यातील सप्तशृंग, कर्नाटकातील रेणुकागिरि ( आधु. यल्लम्मा डोंगर ), सह्य पर्वतातील महाबळेश्वर, विंध्य पर्वतातील अमरकंटक आणि विंध्यवासिनी देवी, तसेच हिमालयातील कैलास, बदरीनाथ आणि केदारनाथ ही पर्वतीय तीर्थांची प्रमुख उदाहरणे होत. महाराष्ट्रातील कऱ्हे पठारावरील जेजुरी, देवगिरि येथील कार्तिकस्वामी, अयोध्येनजिकचा मणिपर्वत आणि मथुरेनजिकचा गोवर्धन, तसेच मद्रास राज्यातील तिरुपति ही तीर्थे छोट्या टेकड्यांवर स्थापिली आहेत. हिमालयातील गौरीशंकर आणि कांचनगंगा, विंध्य पर्वतातील रामगिरि, तसेच सह्य पर्वतातील कळसूबाई ही पर्वतशिखरेहि तीर्थस्थाने म्हणून सुविख्यात आहेत.

**तपस्यास्थाने** — पर्वतीय घळ्यांमध्ये तपस्या करण्याची पद्धती प्राचीन काळापासून रूढ असून, रामदास स्वामींचे तपस्यास्थानस्वरूप अनेक घळ्या महाराष्ट्रात आहेत. त्यापैकी भोर नजिकच्या एका घळीमध्ये त्यांनी दासबोध ग्रंथाची रचना केली. वानप्रस्थाश्रमासाठी हिमालय पर्वतात जाण्याची प्रथा महाभारतकालापासून रूढ असून, तत्संबंधीचे सविस्तर वर्णन युधिष्ठिरादि पांडवांच्या महाभारतान्तर्गत स्वर्गारोहण पर्वात आढळते.

**पर्वतमाहात्म्ये**—पौराणिक साहित्यात नदीमाहात्म्याच्या तुलनेने पर्वतमाहात्म्ये कमी आढळतात. यावरून तीर्थ या नात्याने पर्वतांना नद्यांपेक्षा दुय्यम महत्त्व असावे. हिमालयाच्या वर्णनपर काही अध्याय मत्स्य पुराणात असले, तरी त्यात सृष्टिसौंदर्याचे, तसेच हिमालयातील भौगोलिक स्थानांचे वर्णन आहे. निव्वळ माहात्म्य नाही ( मत्स्य. ११७–१२१ ). पौराणिक साहित्यात अन्यत्र जंबूद्वीप-वर्णनाचे उपांग म्हणून हिमालयातील वर्षपर्वत व मर्यादा-पर्वतांची कल्पनारम्य माहिती आढळते.

विष्णुधर्मोत्तर पुराणात विभिन्न पर्वतांत सापडणाऱ्या रत्नांचे, तसेच हत्तींचे गुणवर्णन आढळते. परंतु त्याचा पडताळा अन्य पुराणात सापडत नाही.

स्कंद पुराणात 'अरुणाचलमाहात्म्य', 'अर्बुदाचल-माहात्म्य', 'सह्याद्रिखंड', 'केदारखंड' आदि पर्वत-माहात्म्यपर प्रकरणात त्या त्या पर्वतावरील तीर्थक्षेत्रांचे वर्णन आढळते. 'सह्याद्रि पुराण' व 'विंध्य पुराण' आदि ग्रंथांचा निर्देशहि प्राचीन साहित्यात आढळतो. परंतु हे दोन्ही ग्रंथ सध्या अनुपलब्ध आहेत.

**खिंडी**—पर्वतातील खिंडी ( संस्कृत–द्रोणी; हिंदी–दून; पहाडी–ज्योत ) लष्करी दृष्टीने विशेष महत्त्वाच्या असून, काश्मीरातील अशा कितीतरी खिंडींचे रेखीव वर्णन कल्हणाच्या 'राजतरंगिणी' मध्ये आढळते. हिमालयातील खैबर, पालन, बोलन, आणि सह्याद्रीतील पावन, गणेश आदि अनेक खिंडी, तसेच त्यांना जोडून असणारे घाट ( पर्वतीय मार्ग ) आजहि सुविख्यात आहेत. विंध्य पर्वताचा भेडाघाट, अरवलीचा हळदीघाट, सह्य पर्वतातील नाणेघाट, कात्रजघाट आणि बोरघाट हे घाट सर्वपरिचित आहेत.

**गुफा आणि शिलालेख**—बौद्ध, हिंदु आणि जैन-धर्मीय गुफा आणि स्तूप, तसेच अशोक, खारवेल, रुद्रदामन आदि राजांच्या शिलालेखांमुळे त्या त्या पर्वतांना ऐतिहासिक महत्त्व प्राप्त होते. मात्र महाराष्ट्रातील एलापूर ( आधु. वेरूळ ), त्रिरश्मि ( आधु. त्र्यंबक ), कृष्णगिरि ( आधु. कान्हेरी ), आणि बिहारमधील खलातिक ( आधु.

बराबर ) टेकड्यांचा अपवाद वगळता गुफाशिल्पयुक्त अन्य पर्वतांची प्राचीन नावे सध्या उपलब्ध नाहीत.

धार्मिक दानधर्माचे कृत्य अनामिक राखण्याच्या पुरातन भारतीय परंपरेनुसार गुफा खोदणाऱ्या व्यक्तीचे नाव, काल, तसेच पर्वताचे नाव यासंबंधीचा काहीहि शिलालेखीय निर्देश हिंदु, बौद्ध आणि जैनधर्मीय गुफांमध्ये आढळत नाही. या गुफांचा कालहि त्यांच्या स्थापत्य आणि शिल्पशैलींच्या आधारे अंदाजाने ठरवावा लागतो. अजंटा, भाजे, नाणेघाट, बेडसा येथील प्रासंगिक गुफालेखातहि पर्वताचे आणि दात्याचे नाव कटाक्षाने टाळलेले दिसते. कैलाससदृश उत्तुंग गुफेचे कर्तृत्व राष्ट्रकूट राजा कृष्णच्या अन्यत्र आढळणाऱ्या प्रशस्तिलेखावरून शोधावे लागते. त्यामुळे या पर्वतांच्या आधु. नावांनीच त्यांमधील गुफा सध्या ओळखल्या जातात ( जसे–कार्ले, भाजे, पितळखोरे, अजंटा ). प्रस्तुत ग्रंथातील या गुफांची माहितीहि आधुनिक नावांनीच देणे आम्हास भाग पडले आहे.

•महाराष्ट्रातील सह्य पर्वतश्रेणीतील कृष्णवर्णीय पहाड गुफाशिल्पासाठी अनुकूल असल्याने तेथे सर्वाधिक कोरीव गुफा आढळतात:

**शिलालेखयुक्त पर्वत**—पर्वतीय गुफांच्या तुलनेने शिलालेखयुक्त पर्वतांची नावे अधिक संख्येने उपलब्ध होतात. रुद्रदामन शिलालेखयुक्त ‘ ऊर्जयत् ’ ( आधु. गिरनार ), सातवाहन शिलालेखयुक्त ‘ गोवर्धन ’ ( आधु. नासिक ), खारवेल शिलालेखयुक्त ‘ उदयगिरि ’, तसेच अशोक शिलालेखयुक्त ‘ खेपिंगल ’ ( आधु. जौगड ), ‘ खलातिक ’ ( आधु. बराबर ) हे पर्वत त्या दृष्टीने उल्लेखनीय आहेत.

**पर्वतांचे प्रकार**—पौराणिक साहित्यमते भारतवर्ष आणि सप्तद्वीपा पृथ्वीतील पर्वतांचे भौगोलिक दृष्ट्या निम्नलिखित सात प्रकार होते :—१. मर्यादा पर्वत; २. वर्ष पर्वत; ३. विष्कंभ पर्वत; ४. केसर पर्वत; ५. कुलाचल; ६. रत्न पर्वत; ७. महापर्वत. मात्र या पर्वतविशेषांच्या भौगोलिक व्याख्येसंबंधी विभिन्न पुराणांत मतभेद आढळतात

सप्तद्वीपा पृथ्वीतील विभिन्न द्वीपांमधील ‘ उपविभागांची ( वर्ष ) नैसर्गिक मर्यादा सूचित करणारे पर्वत ’ म्हणजे ‘ मर्यादा पर्वत ’ असावेत. महाभारतात ‘ वर्ष ’ संज्ञक देशविभागाची व्याख्या ‘ मर्यादा पर्वतांच्या दरम्यानचा देश ’ अशी दिली आहे ( म. भी. ६·६ नीलकंठ ). या विशिष्ट अर्थाने जंबूद्वीपान्तर्गत नील, श्वेत, शृंगवत् या ‘ मेरुउत्तर ’; निषध, हेमकूट आणि हिमवत् या ‘ मेरुदक्षिण ’; आणि माल्यवत् आणि गंधमादन या अनुक्रमे ‘ मेरुपूर्व ’; आणि ‘ मेरुपश्चिम ’ मर्यादा पर्वतांचा निर्देश पौराणिक साहित्यात आढळतो. या पर्वतांच्या अंतर्भागात इलावृत, केतुमाल आणि भद्राश्व ही तीन वर्षे, आणि बहिर्भागात भारतवर्ष, केतुमाल, भद्राश्व आणि उत्तर कुरु ही चार वर्षे कमलदलाप्रमाणे पसरली होती.

स्कंद पुराणात ‘ मर्यादा पर्वत ’ ही संज्ञा ‘ विशेष पवित्र पर्वत ’ अशा अर्थाने निम्नलिखित पर्वतांना उद्देशून उपयोजिली आहे :—१. हिमवत् २. हेमकूट; ३. निषध ( स्कन्द. माहेश्वर. वै. ३७·४१; ५४-५५ ).

भागवत आणि ब्रह्माण्ड पुराणात उपरोक्त मर्यादा पर्वतांनाच ‘ वर्षपर्वत ’ म्हटले असून या उभय, संज्ञा तेथे समानार्थक मानल्या आहेत. याचे उलट मत्स्य, विष्णुधर्मोत्तरादि पुराणात मेरु पर्वतासभोवतालच्या नील, निषध, माल्यवत् आणि गंधमादन या चारच निर्मनुष्य पर्वतांना ‘ मर्यादा पर्वत ’ अथवा ‘ विष्कंभ पर्वत ’ म्हटले आहे ( मत्स्य. १३·२६; ११३·३६; मार्क. ५१·१९; विष्णुधर्म. १·७·९ ). विष्णु पुराणातहि ‘ विष्कंभ पर्वतां’ची हीच व्याख्या दिली असली, तरी मेरु पर्वताच्या सभोवतालच्या या कदंब–पिप्पलवृक्षयुक्त पर्वतविशेषांची नामावली मात्र तेथे पूर्वेस–मंदर; दक्षिणेस–गंधमादन; पश्चिमेस-विपुल; आणि उत्तरेस–सुपार्श्व अशी दिली आहे. मेरु पर्वताच्या दूरवर्ती नील, श्वेत, निषध, हेमकूट, माल्यवत् आणि गंधमादन पर्वतांना तेथे ‘ मर्यादा पर्वत ’, आणि त्रिशृंग आणि जारुधि पर्वतांना तेथे ‘ वर्षपर्वत ’ म्हटले आहे.

**विष्णुधर्मोत्तर पुराणात**—या पुराणात उपरोक्त आठ वर्षपर्वतांपैकी माल्यवत् आणि गंधमादन पर्वतांना वगळून, आणि श्वेत पर्वताऐवजी मेरूचा अंतर्भाव करून; अन्य पाच वर्षपर्वतांना ‘ कुल पर्वत ’ म्हटले आहे. या ग्रंथमते जंबुद्वीपातील सहा कुल पर्वत पुढीलप्रमाणे होत :—१. मेरु; २. नील; ३. शृंगवत्; ४. निषध; ५. हेमकूट; ६. हिमवत् ( विष्णुधर्म. १·७·३). याचे उलट पद्म पुराणात पूर्व-पश्चिम आसमुद्र पसरलेल्या हिमवत्, हेमकूट, निषध, नील, श्वेत, आणि शृंगवत् या वर्ष पर्वतांना ‘ रत्न पर्वत ’ म्हटले आहे ( पद्म. आदि. ३·२०–२१ ).

**कूर्म पुराणात**—या पुराणात जंबूद्वीपातील महामेरु पर्वताला ‘ मध्य पर्वत ’ म्हटले असून, हिमवत् आणि गंधमादन पर्वतांना ‘ दक्षिण पर्वत ’; नील आणि सुपार्श्व

पर्वतांना 'उत्तर पर्वत'; मंदर पर्वताला 'पूर्व पर्वत'; विपुल पर्वताला 'पश्चिम पर्वत', आणि शृंगिन् पर्वताला 'विष्कंभ पर्वत' म्हटले आहे (कूर्म. पूर्व. ४५·६-३९; ४०; भविष्यः मध्य. ४·६-२१).

**केसर पर्वत**—उपरोक्त पर्वतांच्या जोडीला मेरु पर्वताच्या परिसरातील वीस 'केसर पर्वतां' चा निर्देशहि विष्णु पुराणात आढळतो (विष्णु. २·२·२०-४०). मात्र या पर्वतप्रकारांची व्याख्या तेथे आढळत नाही.

**कुलाचल**—सप्तद्वीपा पृथ्वीतील सात वर्षपर्वतांच्या जोडीला विभिन्न वर्षातील प्रत्येकी सात 'कुलपर्वतां'ची (सप्त कुलाचल) नामावली पौराणिक साहित्यात आढळते (अग्नि. १०८·३२). उदा. हिमवत् हा भारतवर्षाचा 'वर्षपर्वत' असून, मार्कंडेयमते महेंद्र, मलय, सह्य, शुक्तिमत् (सुदामन्), ऋक्षवत् (गंधमादन, अंजनाचल, हेम), विंध्य आणि पारियात्र हे या वर्षाचे 'कुल पर्वत' आहेत (मार्कं. ५७·१०). पूर्व, दक्षिण आणि पश्चिम अशा क्रमाने त्यांची नामावली तेथे दिली असून, उत्तर भारतातील पर्वत तेथे कटाक्षाने टाळले आहेत. क्वचित् ठिकाणी केलेला हिमवत् पर्वताचा अंतर्भाव अज्ञानमूलक आहे. प्रत्येक वर्षातील कुलपर्वतांची संख्या सातच असली, तरी भद्राश्व वर्षाचे मात्र केवळ पाचच कुलपर्वत दिले आहेत (मार्कं. ५९).

'विभिन्न लोकसमूहांचा (कुल) आश्रयदाता पर्वत' अशा अर्थाने या पर्वतास हे नाव प्राप्त झाले असावे. उदा. भारतवर्षातील कुलपर्वतांशी संबंधित लोकसमूह पुढीलप्रमाणे होत:-१. महेंद्र (कलिंग लोक); २. मलय (पांड्य लोक); ३. सह्य (अपरांत लोक); ४. शुक्तिमत् (भल्लाट लोक); ५. ऋक्ष (माहिष्मती नगरवासी लोक); ६. विंध्य (क्षाटव्य लोक); ७. पारियात्र (निषाद लोक).

अन्य अभ्यासकांच्या मते 'मूलतः एकाच पर्वतश्रेणीच्या (कुल) विभिन्न शाखा' असा अर्थ या संज्ञेमध्ये अभिप्रेत आहे. उदा. भारतवर्षातील सात कुलपर्वत दक्षिण भारतातील (कुमारीद्वीप) विंध्य पर्वताच्या शाखाभूत आहेत. त्यापैकी शुक्तिमत्, ऋक्ष, आणि पारियात्र ही विंध्य पर्वताच्या विभिन्न शाखांची नावे असून, महेंद्रहि दूरान्वयाने विंध्य पर्वताचाच उपविभाग आहे. याचे उलट मलय पर्वत हा बालाघाटने विभक्त झालेला सह्य पर्वताचा शाखापर्वत आहे.

**क्षुद्र पर्वत**—विभिन्न वर्षातील कुलपर्वतांच्या उपपर्वतांचा निर्देश पौराणिक साहित्यात 'क्षुद्र पर्वत' नावाने केला असून, 'कुलपर्वतांच्या नजिकचे पर्वत' (भूधराः ये समीपगाः) अशी त्यांची व्याख्या तेथे आढळते.

**पर्वतनामे**—पौराणिक साहित्यातील बहुतांशी पर्वतनामे भौगोलिक वैशिष्ट्याची (जसे-उंची, रंग, शिखरसंख्या आकार, अरण्य, बर्फ) द्योतक दिसतात. तत्संबंधीची विशेष प्रातिनिधिक उदाहरणे पुढीलप्रमाणे होत:—
(१) **शिखरसंख्या**—१. सहस्रशिखर; २. शतशृंग; ३. हेमशृंग; ४. त्रिशृंग; ५. कनकशृंग; (२) **पर्वतांचा रंग**—१. मयूर; २. नील; ३. श्वेत; (३) **प्राणीसदृश आकृतिमान**—१. वराह; २. वृषभ.

**वैदिक साहित्यात**—या साहित्यात पर्वतांची तुलना मेघांशी केली असून, वैदिक शब्दकोशात (निघंटु) 'पर्वत' आणि 'गिरि' शब्द मेघवाचक मानले आहेत. यावरून वैदिक आर्य भारतातील पर्वतांशी परिचित असावेत. पर्वतातून नद्या उत्पन्न झाल्याचा, तसेच तेथे अनेक हिंस्र प्राणी राहात असल्याचा निर्देश वैदिक साहित्यात अनेक ठिकाणी असला, तरी पर्वतांची विशेषनामे तेथे विशेष आढळत नाहीत. हिमवत् (हिमवंत) पर्वताचा निर्देश ऋग्वेदात असला (ऋ. १०·१२१·४), तरी त्याच्या विस्ताराची माहिती तेथे आढळत नाही. मूजवत् पर्वताचा, आणि त्यामध्ये होणाऱ्या 'मौजवत' सोमाचा निर्देश ऋग्वेदात आढळतो (ऋ. १०·३४·१). अथर्ववेदमते हा पर्वत गंधार आणि बाह्लीक देशांपलीकडे होता (अ. वे. ५·२२; तै. सं. १·८·६·२). वैदिक साहित्यमते हिमवत् पर्वतातील त्रिकूट शिखरानजिकच्या त्रिककुद् (त्रिककुभ्) शिखरावर 'त्रैककुद' अथवा 'यामुन' नामक अंजन तयार होत असे. यावरून हिमालयाच्या त्रिककुद् आणि यामुन उपविभागांशी वैदिक आर्य परिचित असावेत. काही अभ्यासकांच्या मते 'ऊर्जयंति (आधु. गिरनार) पर्वतनामाचा निर्देश ऋग्वेदात असून, रुद्रदामनाच्या जुनागढ शिलालेखात (इ. स. पू. १५०) निर्देशिलेले 'ऊर्जयत्' हे त्याचेच अपभ्रष्ट रूप होय.

**उत्तरकालीन वैदिक साहित्यात**—शतपथ ब्राह्मणमते सृष्टिप्रलयानंतर मनूची नौका उत्तरगिरीच्या (हिमालय) मनोरवसर्प (पौराणिक-प्रभ्रंशन = काश्मीरातील आधु. मनोरवसर्पण तीर्थ) शिखरास लागली (श. ब्रा. १·८·१·६). तैत्तिरीय आरण्यकात सुदर्शन, क्रौंच आणि मैनाक या वैश्रवण-नगरयुक्त पर्वत त्याचा निर्देश आढळतो (तै. आ. १·३१). त्यांपैकी क्रौंच आणि मैनाक हे पौराणिक साहित्यमते हिमालय पर्वतान्तर्गत पर्वत असून,

'सुदर्शन' हे 'मेरु'चे वैकल्पिक नाव होते. तैत्तिरीय आरण्यकमते महामेरु पर्वत कश्यप नामक अष्टम सूर्याचे चिरकालीन निवासस्थान आणि भ्रमणस्थान होता. यावरून 'महामेरु' आणि 'सुमेरु' ही एकाच पर्वताची नावे असावीत. कौषीतकि उपनिषदात 'उत्तरगिरि' (हिमालय) आणि 'दक्षिणगिरि' (विंध्य) पर्वतांचा निर्देश आढळतो.

**पाणिनीच्या अष्टाध्यायीत**—या ग्रंथात हिमालय पर्वताच्या 'उपगिरि' (हिमालयाच्या पायथ्यानजिकचा तराई प्रदेश) आणि 'बहिर्गिरि' (बृहत् आणि लघु हिमालय) संज्ञक उपविभागांचा निर्देश असून (पा. सू. ५·४·११२), त्यापैकी बहिर्गिरीचे 'बहिर्गिरि' (लघु हिमालय). आणि 'अंतर्गिरि' (बृहत् हिमालय) संज्ञक दोन स्वतंत्र उपविभाग महाभारतात वर्णिले आहेत (म. स. २७·३). यावरून हिमालयश्रेणीचे 'लघु हिमालय' आणि 'बृहत् हिमालय' हे उपविभाग महाभारतकाली सर्वप्रथम ज्ञात झाले असावेत.

**वायव्य भारतातील पर्वत** — अफगाणिस्ताननिवासी पाणिनीच्या ग्रंथात वायव्य सरहद्द प्रांतातील पर्वतांची तपशीलवार माहिती आढळते.

अफगाणिस्तानपासून बलुचिस्तानपर्यंत उत्तर-दक्षिण पसरलेल्या 'किंशुलकागिरि' (आधु. मक्रान पर्वत); 'शाल्वकागिरि (आधु. हाला पर्वत), 'अंजनागिरि' (वैदिक त्रिककुद् = आधु. सुलेमान पर्वत), 'भंजनागिरि' (आधु. कोहेबाबा पर्वत), 'लोहितागिरि' (काशिका – रोहितागिरि; आधु. हिंदुकुश पर्वत), आणि 'कुक्कुटागिरि' (इराणी – उपरिश्येन; ग्रीक – परोपमिसस्) पर्वतांचा निर्देश पाणिनीच्या गणपाठात आढळतो (पा. सू. ६·३·११७). काही अभ्यासकांच्या मते सिंधु नदीच्या पश्चिमेकडील हे सारे पर्वत त्या नदीमुळे विभक्त झालेले हिमालय पर्वताचेच भाग होत. या पर्वतांची संक्षिप्त माहिती खाली दिली आहे:—

**(१) किंशुलकागिरि** — उपरोक्त पर्वतांपैकी किंशुलकागिरि पर्वतनामाचे अस्पष्ट पडसाद मक्रान पर्वताच्या परिसरातील आधु. हिंगुलाज नदी आणि तीर्थ, तसेच हिंगुल देश या स्थलनामात दिसतात. 'हिंगुल' हे 'किंशुल'चे प्राकृत रूप असून, या पर्वतातील लाल हिंगुलामुळे या परिसरास कात्यायनाच्या काळी 'पारद' नामांतर प्राप्त झाले होते. कात्यायनाच्या वार्तिकात 'पारदायन', 'पारदायनी' या तद्धित रूपांचा निर्देश असून, हिंगुल पर्वतान्तर्गत हिंगुलाज तीर्थातील हिंगुला देवी (पौराणिक महामाया अथवा कोट्टरी देवी=शक- नना देवी=मुसलमानानी) आजहि आरक्तवर्णीय मानली जाते. सध्या हा सारा प्रदेश पाकिस्तानात गेला असला, तरी अगदी अलिकडेपर्यंत हिंदु यात्रेकरू या देवीच्या दर्शनास जात असत. तंत्रचूडामणिमते भारतातील बावन्न शक्तिपीठांमध्ये या देवीची गणना होत असे. पौराणिक साहित्यातहि या देवीचा निर्देश असून (ब्रह्मवै. कृष्णजन्म. ७६·२१; देवीभा. ८·२८·१), स्कंद पुराणात हिंगुला देवीमाहात्म्याचा एक स्वतंत्र अध्याय होता. मात्र सध्या तो अनुपलब्ध आहे.

**(२) शाल्वकागिरि** — सिंध आणि बलुचिस्तान यांच्या सीमेवर उत्तर-दक्षिण पसरलेल्या हाला पर्वतास पाणिनीच्या अष्टाध्यायीत 'शाल्वकागिरि' म्हटले असून, त्याचे आधु. 'हाला' हे नावहि 'शाल्वक'चेच अपभ्रष्ट रूप आहे.

**(३) त्रिककुद् पर्वत** — सुलेमान (प्राचीन अंजनागिरि) आणि त्याशी समांतर शिनगर आणि टोबा काकड पर्वतश्रेणी वैदिक आणि पाणिनीय व्याकरणकाली 'त्रिककुद्' (शब्दश: अर्थ—त्रिशिखरयुक्त) नावाने सुविख्यात असून (अ. वे. ४·९·१०; पा. सू. ५·४·१४७), महाभारतमते त्यामधील 'त्रैककुद अंजन' वाहीक देशातील सौंदर्यवती स्त्रिया स्वत:च्या तेजस्वी नेत्रांमध्ये घालीत असत (म. क. ४४·१८). आजहि सुलेमानी सुरमा (सौवीरांजन) पंजाब आणि सिंधमध्ये सुविख्यात असून, 'उत्तर सिंध (सौवीर) मार्गे भारतात येणारे' अशा अर्थाने त्यास हे नाव प्राप्त झाले असावे. अन्य अभ्यासकांच्या मते अथर्ववेदातील त्रिककुद् (उत्तर पंजाब आणि काश्मीर यांच्या सरहद्दीवरील यमुना नदीचा उगमस्थानभूत आधु. त्रिकोर पर्वत) हा पाणिनीय 'त्रिककुद्' पर्वताहून वेगळा असून, त्यामधील अंजन 'यामुन अंजन' नावाने सुविख्यात होते.

**(४–५) भंजनागिरि आणि लोहितागिरि** — मध्य अफगाणिस्तानान्तर्गत काबूल प्रदेशातील कोहेबाबा आणि हिंदुकुश या दक्षिण–पश्चिम आणि उत्तर–पूर्व पर्वतश्रेणींना पाणिनीने 'भंजनागिरि' आणि 'लोहितागिरि' म्हटले आहे. त्यांपैकी सुलेमान आणि हिंदुकुश यांच्या दरम्यानचा कोहेबाबा पर्वत अफगाणिस्तानच्या जलसिंचनाच्या दृष्टीने महत्त्वाचा असून, हिंदुकुश पर्वतामध्ये काशिका ग्रंथकाली 'रोहितगिरीय' नामक पर्वतीय आयुधजीवी लोक राहात असत (पा. सू. ४·३·९१). महाभारतमते या लोकांच्या दहा गणांना अर्जुनाने काश्मीर-

विजयानंतर जिंकले होते (म. स. २७.१७). रोहितगिरि पर्वतावरील अफगाण लोक आणि अफगाणिस्तान देश मध्ययुगीन काली अनुक्रमे 'रोहिले' आणि 'रोह' नावाने सुविख्यात होऊन त्यांनी व्यापलेला उत्तर प्रदेशाचा भाग 'रोहिलखंड' नावाने प्रसिद्ध झाला.

(६) **कुक्कुटागिरि** — अफगाणिस्तानातील बल्ख (प्राचीन बाह्लीक) देशाच्या दक्षिणेकडील कोहेबाबा पर्वताच्या पश्चिमेकडील आणि हेरात (प्राचीन सरयू) नदीशी समांतर उपरिशिअन पर्वतश्रेणीला पाणिनीच्या अष्टाध्यायीत 'कुक्कुटागिरि' म्हटले आहे. या पर्वताचे ग्रीक साहित्यातील 'परोपमिसस्' हे नामांतरहि इराणी 'उपरिश्येन'चेच अपभ्रष्ट रूप होय.

**अन्य पर्वत**—पाणिनीच्या अष्टाध्यायीत अन्यत्र 'विदूर' (आधु. सातपुडा) पर्वताचा निर्देश असून (पा. सू. ४·३·८४). पतंजलीच्या व्याकरणमहाभाष्यमते वैदूर्य मण्यांसाठी सुविख्यात असणारा हा पर्वत 'वालवाय' वैकल्पिक नावाने ओळखला जात असे. येथे सापडणाऱ्या या पर्वतातील कच्च्या मण्यांना (वैकटिक) नजिकच्याच विदूर (आधु. बेदर) गावी पैलू पाडीत असल्याने त्या नगरनामावरूनच यास हे नाव प्राप्त झाले असावे.

**पौराणिक साहित्यात** — या साहित्यात भारतवर्षातील निम्नलिखित पर्वतांचा प्रासंगिक निर्देश आढळतो :— १. अंजननाथ (हिम); २. अर्बुद (अबू); २–अ. इंद्रकील; ३. उज्जयन्त (गिरनार); ४. ऋक्ष; ५. ऋषभ (हिम); ६. ऋष्यमूक; ७. कामगिरि; ८. कूटशैल; ९. कुटक (दक्षिण); १०. कोलाहल; ११. कोकणक; १२. कृष्णगिरि (सह्य, हिम); १३. गोमंत; १४. गोवर्धन (सह्य); १५. गंधमादन; १६. चकोर; १७. चित्रकूट; १८. तुंगप्रस्थ; १९. दर्दुर (मलय); २०. देवगिरि; २१. नाग; २२. निषध; २३. नील; २४. पुष्पगिरि (सह्य); २५. पांडव; २६. पांडर; २७. पातंधम; २८. पारियात्र; २९. भैरव (मध्य); ३०. मल; ३१. मलय; ३२. मंदर (मगध); ३३. मैनाक (हिम); ३४. रैवत (गिरनार); ३५ वातंधम; ३६. वेंकट (सह्य); ३७. वैजयन्त (वनवासी); ३८. वैद्युत (हिम); ३९. वैभ्राज (हिम); ४०. वैहार (गिरिव्रज); ४१. शुक्तिमत्; ४२. श्रीशैल (महेंद्र); ४३. सह्य; ४४. सुरस; ४५. सिंह (वेंकट).

उपरोक्त पर्वतांपैकी कृष्ण (आधु. कान्हेरी), गोमंत, गोवर्धन, देवगिरि, पुष्पगिरि, वेंकटगिरि, वैजयंत आणि सिंहगिरि हे सह्य पर्वताचे उपविभाग असून, श्रीशैल हा महेंद्र पर्वताचा, आणि नाग (आंध्र प्रदेशातील आधु. नागार्जुनि टेकड्या) हा मलय पर्वताचा उपविभाग आहे. याचे उलट नीलाचल (आसाममधील नरकासुराचे निवासस्थान) हा हिमालय पर्वताचा उपविभाग आहे. 'उज्जयंत' आणि 'रैवत' ही दोन्ही आधु. 'गिरनार' पर्वताची नामांतरे आहेत.

उपरोक्त पर्वतनामांखेरीज हिमालय पर्वतातील 'वराह' (काश्मीर हिमालयातील आधु. वराहमूल, 'महादेव' काश्मीर), 'नाटकाचल' (कामरूप), गिरिव्रज नगराच्या परिसरातील टेकड्यांचा (बिहार), तसेच मलय पर्वतातील चंद्रागिरि, चंडक, चंडी, शबर आदि पर्वतांचा निर्देश पौराणिक साहित्यात आढळतो. त्या मानाने विंध्य पर्वतान्तर्गत पर्वतांचा निर्देश तेथे विशेष आढळत नाही (अपवाद - अमरकंटक). सह्य, विंध्य, मलय, महेंद्र पर्वतांची विभागशः पुरातन नावे पौराणिक साहित्यात उपलब्ध असून, मध्ययुगीन शब्दकोश साहित्यातहि भारतवर्षातील पर्वतांची विस्तृत नामावली आढळते. या साऱ्या साहित्याचे विभागशः पृथःक्करण होणे आवश्यक आहे.

## पृथ्वीरचनेतील नद्यांचे महत्त्व

**नद्यांचे महत्त्व**— पावसाचे पाणी डोंगरमाथ्यावरून समुद्राप्रत नेऊन सोडणाऱ्या नद्यांना पृथ्वीरचनेत महत्त्वपूर्ण स्थान आहे. सृष्टीतील पंचमहाभूतांपैकी जल आणि वायू हे निसर्गतःच गतिमान आहेत. त्यामुळे कोणत्याहि बदलत्या नैसर्गिक परिस्थितीमध्ये नदीजल आणि वायू वहातच राहातात. नियमाने येणारा पावसाळा आणि पर्जन्यजलाचा सृष्टीला पुरवठा करणारे नदीजल सृष्टीच्या ऋतुचक्राचा केंद्रबिंदू आहे. सपाट प्रदेशातून वाहणाऱ्या जीवनदायिनी गंगादि नद्या स्वतःच्या बारमाही जलपुरवठ्याने तत्रस्थ जीवन समृद्ध बनवितात. याचे उलट डोंगराळ प्रदेशातील नद्यांचे पाणी लवकर निचरून जात असल्याने तेथील बारमाही जलपुरवठ्यासाठी कृत्रिम उपाय योजावे लागतात. पर्वत आणि नद्यांच्या अभावी विशिष्ट प्रदेशातील पर्जन्यमानहि कमी होऊन त्या तिहेरी दुश्चक्राची परिणती तो

प्रदेश ओसाड होण्यात होते. म्हणून अनादि कालापासून नद्यांचे भौगोलिक आणि सांस्कृतिक महत्त्व सर्वमान्य असून, त्यांना कृतज्ञतापूर्वक 'देवता' अथवा 'लोकमाता' म्हटले आहे.

**देवतास्वरूप नद्या**—ऋग्वेदात सिंधु, सरस्वती आदि नद्यांना देवता मानून त्यांचे स्तवन केले असून, त्यांना तेथे मानवांच्या पोषणकर्त्या मानले आहे ( सिन्धुमिवावर्नाः महीः; ऋ. ५·११·५ ). वैदिक संस्कृती ही स्वभावतः नदीमातृक असून, आपले सारे जीवन नद्यांवर अवलंबून असल्याची जाणीव वैदिक लोकांमध्ये मनोमन बाणली होती. हीच श्रद्धा उत्तरकालीन वैदिक आणि पौराणिक साहित्यातहि अंगिकारलेली दिसते.

या ग्रंथात नदीवाचक 'एनी' ( ऋ. ५-५३-७ ), 'सिंधु', 'स्रवत्', 'नदी' आदि संज्ञांचा निर्देश असून, 'सिंधु' ही संज्ञा तेथे विशेषनाम, तसेच नदीवाचक सामान्यनाम अशा उभय अर्थांनी उपयोजिली आहे. नदीजलाच्या कालव्याला ऋग्वेदात 'कुल्या' म्हटले असून ( ऋ. ३-४५-३ ), महाभारत अंगिरस्यात्रेत 'कुल्या' नामक पवित्र नदीचा निर्देश आढळतो ( म. अनु. २५-२६ ).

**सृष्टिरचनेतील माहात्म्य** — शरीरपोषक पोषणद्रव्ये मानवी शरीरास पुरविणाऱ्या रक्तवाहिन्यांप्रमाणे नद्या सृष्टीचे भरणपोषण करतात. म्हणूनच सृष्टीचे स्थैर्यदाते पर्वत हे तिच्या अस्थी आणि नद्या तिच्या रक्तवाहिन्या मानल्या जातात. रानोमाळ भटकणारा वन्य मनुष्यप्राणी नद्यांच्या काठीच प्रथम सुस्थिर झाला आणि त्यांच्या आश्रयानेच लहानमोठी ग्रामे आणि नगरे वसवून त्याने ग्रामीण आणि नागरी संस्कृतीचा पाया घातला. अगणित वेळा नद्यांच्या पुरांनी मानवी वसाहती आणि नगरे उद्ध्वस्त होऊनहि मनुष्यप्राणी नदीतीरांचा त्याग करू शकत नाही. तो तेथेच येतो. जंगलातील हिंस्र पशूंचाहि नदीजलावाचून निभाव लागत नाही. म्हणूनच रात्रीअपरात्री केव्हातरी ते नदीकाठी येऊन जातात. नवी वस्ती उभारणारा मानव वस्तीपासून नदी किती लांब आहे, याची प्रथम चौकशी करतो. असे हे जीवनदायिनी नदीचे सृष्टिरचनेतील माहात्म्य आहे.

**मानवाच्या प्राथमिक गरजांची परिपूर्ती**—अन्न आणि जल या मानवाच्या प्राथमिक गरजांची प्रत्यक्षाप्रत्यक्ष परिपूर्ती नदीजलानेच होते. कारण अन्न हेहि पर्जन्य आणि नदीजल यांच्या आश्रयानेच उत्पन्न होऊ शकते. या विराट सृष्टिचक्रात पर्जन्य आणि पर्जन्योद्भव नद्या नसत्या तर जमिनीवर हिरवा अंकुर उगवला नसता आणि प्रलयकालसदृश आग ओकणाऱ्या पृथ्वी, आकाश आणि अंतरिक्षात प्राणी आणि मानवी सृष्टी दग्ध झाली असती. उत्तर अमेरिका, मध्य आशिया देशातील असे वालुकामय निर्जल प्रदेश पाहिल्यानंतर देवतास्वरूप नद्यांनी मानवावर केवढे मोठे उपकार केले आहेत याची कल्पना येते.

**मानवी वसाहतीकरण**—मानवी वसाहतीकरण, मानवसमूहांच्या हालचाली, तसेच बहुतांशी वाहतूक आणि जलपुरवठा नद्यांच्या अनुषंगाने होत असल्याने पौराणिक साहित्यातील सारे देशवर्णन आणि लोकवर्णन पर्वत आणि नद्या यांच्या संदर्भात केले आहे. बहुतांश साऱ्या प्राचीन मानवी वसाहती नद्यांचे काठी अथवा खोऱ्यांमध्ये असून, मनुष्यवस्तीने गजबजलेल्या नदीतीरावरील समृद्ध वसाहतींचे प्रत्ययकारी वर्णन पौराणिक साहित्यात आढळते. याचे उलट वाळवंट, हिमाच्छादित आणि दुर्गम चढणीचा प्रदेश, अरण्ये आणि दलदलीचे प्रदेश आदि मानवी वसाहतीस अयोग्य स्थलांचे वर्णन या साहित्यात कटाक्षाने टाळले आहे. व्यापारी हमरस्ते आणि नदीजलसमृद्ध भूमीवर वैदिक आणि पौराणिक भटक्या जमातींचे वसाहतीकरण झाले असून, गंगा, सिंधु आदि भारतीय नद्या त्या बाबतीत अग्रेसर दिसतात. या नद्या ओलांडण्यासाठी प्राचीन काळी बोटीचे पूल ( नौक्रम ) अस्तित्वात असून ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २·१·२·१६० ), राजतरंगिणीमध्ये त्यास 'नौसेतु' ( = कानडी 'सेतवे' ) म्हटले आहे ( राज. ३·३५४ ).

**भारतीय वसाहतीकरण**—प्राचीन भारतीय वसाहतींचा विस्तार आणि भौगोलिक विभाजनाच्या कामी उत्तर भारताच्या मैदानी प्रदेशातील विशाल, जलसंपन्न आणि विस्तीर्ण नद्यांनी महत्त्वपूर्ण कामगिरी बजावली आहे. नद्यांच्या दुआबातील अथवा नदीतीरावरील 'कूल' ( शब्दशः अर्थ–'नदीतीरावरील' ) अंत्यशब्दयुक्त अनेक जनपदांचा निर्देश काशिका ग्रंथात आढळतो. ( कुभाकूल – आधु. काबूल; गोमतीकूल – गोमल ). प्राचीन भारतातील अन्य प्रमुख नदीतीरवर्ती जनपदे खाली दिली आहेत :–

**( १ ) नद्यांच्या दुआबातील देश–१.** केकय (झेलम–चिनाब दुआब ); २. मद्र ( चिनाब- रावी दुआब ); ३. मल्ल ( रावी–बियास दुआब ); ४. त्रिगर्त ( बियास-सतलज दुआब ) ५. कुरु ( सतलज– गंगा दुआब ); ६. पंचाल ( गंगा–गोग्रा दुआब ); ७. कोशल ( गोग्रा- राप्ती दुआब);

८. विदेह ( राप्ती-कोशी दुआब ); ९. पुंड्र ( यमुना-ब्रह्मपुत्रा दुआब); १०. वंग (गंगा-पद्मा-भागीरथी दुआब).

**(२) नदीतीरावरील देश–१. पटच्चर** ( आधु. बांदा जिल्हा ;यमुना नदीचा दक्षिण किनारा); २. **काशी** (आधु. वाराणसी; गंगा नदीचा उत्तर किनारा ); ३. **कुंतल** ( आधु. चुनार; गंगा नदीचा दक्षिण किनारा; ४. **मगध** ( आधु. पाटणा; गंगा नदीचा दक्षिण किनारा ); ५. **प्राग्ज्योतिष** ( ब्रह्मपुत्रा नदीचा डावा किनारा ); ६. **अंग** ( आधु. भागलपूर जिल्हा; ( गंगा नदीचा दक्षिण किनारा ); ७. **वीतिहोत्र** ( मध्य नर्मदा नदीचा उत्तर किनारा ).

**(३) नद्यांच्या उभय किनाऱ्यांवरील देश—१. शूरसेन** ( आधु. मथुरा; यमुना नदी ); २. **हारहूर** ( आधु. हेरात; हरी रुद् नदी ); ३. **दरद** ( आधु. गिल्जिट; गिल्जिट नदी ); ४. **चीन** ( आधु. लडाख; सिंधु नदी ); ५. **कश्मीर** ( आधु. श्रीनगर; झेलम नदी ); ६. **कुलूत** ( आधु. कुलु खोरे; बियास नदी ); ७. **कोलवन** ( आधु. नासिक जिल्हा; गिरणा नदी ); ८. **मुरल** ( आधु. पश्चिम भारत; मुरला नदी ); ९. **माहीय** ( मही नदी ); १०. **सारस्वत** ( आधु. पाटणा; सरस्वती नदी ); ११. **आर्बुद** ( आधु. पालनपुर-सिरोही; बनास नदीचा उगम ); १२. **माहिषक** ( कावेरी नदीचा वरचा भाग ); १३. **चोल** ( कावेरी नदीचा मध्यभाग ); १४. **कावेर** ( कावेरी नदीचे मुख ); १५. **मूषिक** ( आधु. हैद्राबाद; मूसी नदी ); १६. **मौलिक** ( गोदावरी नदीचा वरचा भाग ); १७. **अश्मक** ( गोदावरी नदीचा मध्यभाग ); १८. **आंध्र** ( गोदावरी, आणि कृष्णा नद्यांचा त्रिभुज प्रदेश ); १९. **विदर्भ** ( वर्धा नदी ); २०. **त्रिपुर** ( नर्मदा नदीचा वरचा भाग ); २१. **विदिशा** ( बेस नदी ); २२. **दशार्ण** ( धसन् नदीचा वरचा आणि मधला भाग ); २३. **निषध** ( ग्वाल्हेर प्रदेशातील नर्वाड जिल्हा; कालीसिंध नदीचा वरचा आणि मधला भाग ); २४. **तुंडीकेर** ( नर्मदा नदीचा वरचा भाग ).

**वसाहतीतील स्थित्यंतरे**—नदीच्या बदलत्या प्रवाहामुळे अथवा शुष्क पात्राने एकेकाळचा सुजल सुफल भूप्रदेश निर्जल आणि विजन बनल्याची अनेक उदाहरणे भारत-वर्षाच्या प्राचीन भूगोलात आढळतात. वैदिककाळी अरबी समुद्रास मिळणारी सरस्वती नदी लुप्त होताच राजस्थानचा समृद्ध प्रदेश वालुकामय बनला. सिंधु, सरस्वती आदि नद्यांच्या बदलत्या पात्रांमुळे मुसलमानी काळापर्यंत समृद्ध म्हणून सुविख्यात असलेल्या ' कच्छ 'चे क्षारमय आणि रेताड ' कच्छच्या रणा 'त रूपांतर झाले.

स्थापत्यशास्त्रीय साधनांनी नदीप्रवाहाला अपेक्षित दिशेप्रत वळवून स्वतःचे राज्य समृद्ध बनविल्याच्या आख्यायिकाहि पौराणिक साहित्यात आढळतात. या विशिष्ट दृष्टीने तिबेट देशानुगामी पूर्ववाहिनी गंगा नदीला दक्षिण-वाहिनी बनवून उत्तर प्रदेशाचा सारा प्रदेश समृद्ध बन-विणाऱ्या भगीरथ राजाची पौराणिक आख्यायिका विशेष महत्त्वाची आहे. अवर्षणाच्या प्राणसंकटामुळे पिढ्यान्‌पिढ्या दग्ध झालेल्या सहस्रावधी सगरपुत्रांचा ( सगर राजाच्या प्रजेचा ) भगीरथाने गंगावतरणाच्या साह्याने उद्धार केला.

**नूतन देशनिर्मिती** — जलनिमज्जित भूप्रदेशातील जल नदीप्रवाहाच्या साह्याने निथळून टाकून भारतवर्षातील विभिन्न भूभाग वसाहतयोग्य बनविल्याच्या अनेक आख्या-यिका वैदिक आणि पौराणिक साहित्यात आढळतात. जल-निरोधक वृत्राचे पारिपत्य करून पृथ्वीतील जलप्रवाह विमुक्त करण्याच्या ऋग्वेदातील इंद्रपराक्रमाचे वर्णन, अथवा जल-निमज्जित पृथ्वी देवांनी समुद्रातून बाहेर काढल्याची पौरा-णिक आख्यायिका या विशिष्ट दृष्टीने महत्त्वपूर्ण आहेत. नीलमत आणि राजतरंगिणीमते वितस्ता ( आधु. झेलम ) नदीच्या खोऱ्यातील सती सरोवरनिमज्जित कश्मीर देश कश्यपांनी वितस्ता नदी प्रवाहित करून आणि सती सरो-वरातील पाण्याचा निचरा करून मनुष्यवस्तीयोग्य बनविला. कश्यपांच्या नावावरूनच या देशास ' कश्यपमीर ' ( कश्मीर ) नाव प्राप्त झाले.

नेपाळमाहात्म्यमते हिमालयीन टेकड्यांमधील नेपा-ळचा जलमय प्रदेशहि कौशिकी, गंडकी, बाग्मती त्रिशूलगंगा आदि नद्यांना प्रवाहित करून वसाहतयोग्य बनविण्यात आला. पौराणिक् साहित्यमते नर्मदा नदीकाठच्या ' अनूप ' ( शब्दशः अर्थ–पाणथळ प्रदेश ) देशाच्या ( राजधानी–माहिष्मती ) हैहयराज कार्तवीर्य अर्जुनाने त्या नदीचे पाणी सातपुडा आणि विंध्य पर्वतातून प्रवाहित करून ती वसाहतयोग्य बनविला. ' अनूप ' या भौगोलिक उपाधीने ओळखले जाणारे छोटे-मोठे देश भारताच्या सर्व भागात आजहि आढळतात. उदा. बिहारमधील आधु. पूर्णिया आणि सहर्स प्रदेश.

महाभारतमते आधु. राजस्थानमधील ' उज्जालक ' ( शब्दशः अर्थ—पाण्यातून वर आलेला, देश ) देशातील धुंधु राक्षसास ठार मारून आणि तेथील क्षारमय जलाचा निचरा करून इक्ष्वाकुवंशीय कुवलाश्व राजाने हा प्रदेश वसाहतयोग्य बनविला. सागरपुत्र जालंधर ( पंजाबातील

आधु. कांग्रा ) देशाबाबतहि अशीच आख्यायिका प्रचलित असून, पौराणिक साहित्यमते शिवाने स्वनिर्मित पर्वताच्या ( आधु. ज्वालामुखी पर्वत ) साह्याने जालंधरास नष्ट केले. या दैत्याचा बियास-सतलज दुआबात अडकलेला पाठीचा भाग 'जालंधरपीठ' ( त्रिगर्त, कांग्रा, नगरकोट ) नावाने सुविख्यात झाला.

**धरणांची निर्मिती** – नदीप्रवाह विमुक्त करण्याप्रमाणेच धरणे आणि बंधाऱ्यांच्या साह्याने तो बंदिस्त केल्याचे, आणि त्यामधील जल कृषिकार्यार्थ वापरल्याचे निर्देशहि प्राचीन साहित्यात आढळतात. रुद्रदामनच्या जुनागढ शिलालेखात चंद्रगुप्त मौर्याने गिरनार पर्वतानजिक पलाशिनी नदीवर बांधलेल्या सुदर्शन तलावाचा निर्देश आढळतो. याचे उलट कश्मीरच्या राजांनी वितस्ता नदीवर बांधलेल्या बंधाऱ्यांची आणि कालव्यांची सविस्तर माहिती राजतरंगिणीमध्ये आढळते.

**नदीतीरावरील राजधान्या** – नदीखोऱ्यांतील देशांच्या अथवा लोकसमूहांच्या राजधान्याहि नदीतीरावरील उंचवट्याच्या स्थानीच वसविण्यात येत असत. पुराच्या पाण्याची भीती असलेला नदीतीरावरील सखल प्रदेश टाकून एक, दोन, अथवा तीन बाजूंनी नदीवेष्टित उंच जागी ही राजधानीची नगरे वसविण्यात येत.

नदीतीरावरील अशा 'तीर' अंत्यशब्दयुक्त अनेक नगरनामांचा निर्देश पाणिनीच्या अष्टाध्यायीत ( कास्तीर; पा. सू. ६·१·१५५ ), पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यात ( कास्तीर; करवतीर; वायसतीर; पतञ्जलि. ४·२·१०४ ), आणि काशिका ग्रंथात ( काकतीर; पल्वलतीर ) आढळतो.

प्राचीन भारतातील प्रमुख नदीतीरस्थापित राजधान्या पुढीलप्रमाणे होत :—१. **पुष्कलावती** ( गंधारराजधानी; सुवास्तु-कुभासंगम ); २. **शाकल** ( मद्रराजधानी; आपगा नदी ); ३. **इंद्रप्रस्थ** (कुरुराजधानी; यमुना नदीचा उजवा किनारा ); ४. **हस्तिनापुर** ( कुरुराजधानी; गंगा नदीचा उजवा किनारा ); ५. **मथुरा** ( शूरसेनराजधानी; यमुना नदीचा उजवा किनारा ); ६. **अहिच्छत्र** ( उत्तर पंचालराजधानी; रामगंगा नदीचा उजवा किनारा); ७. **कांपिल्य** ( दक्षिण पंचालराजधानी; गंगा नदीचा उजवा किनारा ); ८. **अयोध्या** ( कोशलराजधानी; सरयू नदीचा उजवा किनारा ); ९. **साकेत** ( कोशलराजधानी; सरयू नदीचा उजवा किनारा ); १०. **श्रावस्ती** ( उत्तर कोशलराजधानी; सरयू नदीचा उजवा किनारा ); ११. **कौशांबी** ( वत्सराजधानी; यमुना नदी ); १२. **काशी** (काशिराजधानी; गंगा नदीचा डावा किनारा ); १३. **पाटलिपुत्र** ( मगधराजधानी; गंगा नदीचा डावा किनारा ); १४. **चंपा** ( अंगराजधानी; गंगा नदीचा डावा किनारा ); १५. **वैशाली** ( वृजिराजधानी; गंगा नदीचा डावा किनारा ); १६. **ताम्रलिप्ती** ( ताम्रलिप्तिकराजधानी; ब्रह्मपुत्रा नदीचा डावा किनारा ); १७. **पौदन्य** ( अश्मकराजधानी; गोदावरी नदी ); १८. **प्रतिष्ठान** ( मूलकराजधानी; गोदावरी नदी); १९. **कुंडिनपुर** (विदर्भराजधानी; पुस नदीचा उजवा किनारा ); २०. **मदुराई** ( पांड्यराजधानी; वैगईनदीचा उजवा किनारा ); २१. **भृगुकच्छ** ( भृगुकच्छराजधानी; नर्मदा नदी ); २२. **शूर्पारक** ( अपरांतराजधानी; तापी नदी ); २३. **माहिष्मती** ( दक्षिण अवंतीराजधानी; नर्मदा नदी ); २४. **उज्जयिनी** ( अवंतीराजधानी; क्षिप्रा नदी ); २५. **त्रिपुरी** ( त्रिपुरीराजधानी; नर्मदा नदी ); २६. **विदिशा** ( विदिशाराजधानी; वेत्रवती नदी ); २७. **विराटपुर** ( मत्स्यराजधानी; सबी नदी ); २८. **कुशावती** ( मल्लराजधानी; गंडकी नदी ).

**व्याख्या** – पाण्याच्या लहानमोठ्या प्रवाहांना 'निर्झर' 'ओहोळ', 'ओढा' 'नाला', 'नदी', 'महानदी', 'नद', आदि अनेक नावे संमिश्रपणे दिली जात असली, तरी पौराणिक साहित्यमते दहा मैल अथवा त्याहून अधिक अखंडपणे वाहणारा जलप्रवाह म्हणजे नदी होय–

**धनुःसहस्राण्यष्टौ च, गतिर्यासां न विद्यते ।**
**न ता नदीशब्दवहाः, गर्तास्ताः परिकीर्तिताः ॥**

( आठ हजार धनूंहून कमी लांबीचा आणि गतीचा प्रवाह नदी नसून 'गर्ता' होय ).

उपरोक्त व्याख्येतील १ धनु = ४ हात = ६' फूट असून, या परिमाणानुसार नदीची किमान लांबी ४८७००' = ९$\frac{१}{११}$ मैल अपेक्षित दिसते. विभिन्न प्राण्यांमुळे, तसेच अन्य संपर्काने दूषित बनलेले जल विशिष्ट मर्यादेपलीकडे वहात गेल्याने पुन्हा शुद्ध बनते, या तत्त्वास अनुसरून नदीची व्याख्या येथे केली आहे. कमी मर्यादेत वाहणाऱ्या ओढ्यांमध्ये अशुद्धता अधिक असून, भूमिगत रसायनांचा संग्रहहि त्यामध्ये तिळमात्र नसतो. त्यामुळे स्नानपानादिकांना ते, तसेच तत्सम अन्य प्रवाह निषिद्ध मानले असून, नदी हीच केवळ त्या कामी शुद्ध मानली आहे—

**गृहेषुत्वधमं स्नानं, वापीकूपेषु मध्यमम् ।**
**उत्तमं पुष्करे स्नानं, नद्यां चैवोत्तमोत्तमम् ॥**
**( पद्म. उत्तर. ३६·४·५ ).**

( घरातील स्नान कमी प्रतीचे असून, विहिरीतील स्नान मध्यम, पुष्करिणीतील उत्तम, आणि नदीस्नान श्रेष्ठतम होय ).

**नद्यांचे प्रकार**—वाहत्या पाण्यांच्या विभिन्न प्रकारांपैकी अल्प मर्यादेत वाहणारा प्रवाह 'ओढा' नावाने, आणि कृत्रिम, तात्कालिक आणि अशुद्ध प्रवाह 'नाला' नावाने ओळखला जातो. हे उभय प्रवाहप्रकार लोकांची तात्पुरती गरज भागवीत असले, तरी स्नानपानादिकांसाठी त्यांचा उपयोग निषिद्ध मानतात.

ओढे आणि नाल्यांच्या दीर्घ प्रवाहयुक्त अशा नद्यांचे बारमाही आणि पावसाळी असे दोन प्रकार असून, त्यापैकी पावसाळी नद्यांचे पाणी अशुद्ध आणि रोगजंतुयुक्त असते. ते वापरल्याने महामारी आदि साथीचे रोग होऊन गावेच्या गावे ओसाड पडत असत.

बारमाही नद्यांचे 'उपनद्या' आणि 'महानद्या' असे दोन प्रकार असून, समुद्रापर्यंत वहात न जाता मध्येच अन्य नदीस मिळणारी नदी 'उपनदी', आणि आसमुद्र वहात जाणारी नदी 'महानदी' नावाने ओळखली जाते. भारतातील गंगा, गोदावरी, कृष्णा, कावेरी, तापी, नर्मदा या महानद्या असून, कुभा ( आधु. काबूल ), वितस्ता ( आधु. झेलम ), चंद्रभागा ( आधु. चिनाब ), यमुना, गंडकी व भीमा या उपनद्या होत. तथापि पौराणिक साहित्यात गौरवदर्शक म्हणून अनेक उपनद्यांनाहि 'महानदी' म्हटले आहे.

'नद'ची व्याख्या प्राचीन साहित्यात आढळत नसली, तरी रौद्र प्रवाहाच्या आणि खळखळत्या पाण्याच्या प्रमाथी जलप्रवाहांना ही संज्ञा लावण्यात परंपरेने येते. त्यामधील जल अशुद्ध आणि स्नानापानादिकांसाठी निरुपयोगी असून, त्यांच्या काठी तीर्थक्षेत्रे नसतात. त्यामुळेच त्यांचे माहात्म्यहि पौराणिक साहित्यात आढळत नाही. प्राचीन साहित्यमते सिंधु, शोण, ब्रह्मपुत्रा, दामोदर, वर्णु, भिद्य, उद्ध्य हे भारतातील प्रमुख 'नद' होत.

**बदलते महत्त्व**—बदलत्या कालमानानुसार, तसेच भौगोलिक परिस्थितीनुसार नद्यांचे महत्त्व कमीअधिक झाल्याचे दिसते. उदा. ऋग्वेदात सर्वश्रेष्ठ भारतीय नदी म्हणून स्तविलेल्या सरस्वती नदीचा मागमूसहि आज आढळत नाही. स्थानिक लोककथा आणि संतमहंत यांनी माहात्म्य प्रदान केलेल्या अनेक नद्याहि भारताच्या सर्व भागात आढळतात ( उदा. संत ज्ञानेश्वर आणि तुकाराम यांनी अमर बनविलेली महाराष्ट्रातील इंद्रायणी नदी ).

**प्रवाहाचे रासायनिक परिणाम**—'नदी वेगेन शुद्ध्यति' या पौराणिक तत्त्वानुसार नदीला प्रवाहाने, तसेच पाण्याच्या वेगाने विशेष शुद्धता आणि पावित्र्य प्राप्त होते. ज्या भूमीतून नदी वहात जाते, तीमधील अनेक क्षार आणि रासायनिक द्रव्ये नदीजलामध्ये मिसळून त्यायोगे त्यामध्ये अनेक गुण अथवा दोष उत्पन्न होतात. नदीजलामध्ये मिसळणाऱ्या पदार्थांचे हे प्रमाण नदीप्रवाहाचा वेग, ऋतुमान, जमिनीचा कमीअधिक मृदुपणा, आणि विशेषत: नदीप्रवाहाची लांबी यावर अवलंबून असते. नदीजलाच्या या संक्रमणात जड पदार्थ खाली बसतात, खाद्यपदार्थ जीवजंतूंकडून खाल्ले जातात, आणि मानवी जीवनोपयोगी क्षारपदार्थ मात्र पाण्यात विरघळून जातात. या भूमिज, खनिज आणि वनस्पतिज क्षारपदार्थांचे संमिश्रण होण्यास नदी दीर्घकालपर्यंत विशुद्ध स्वरूपात वाहणे आवश्यक असते.

**अशुद्ध प्रवाह**—आधुनिक नागरी जीवनातील मोठ्या शहरांचा मैला आणि कारखान्यांच्या सांडपाण्यामुळे नदीजलाचे पावित्र्य नष्ट होते. पर्वतीय प्रदेशातून वाहणाऱ्या नदीची निखळ शुद्धता सपाट प्रदेशातून वाहणाऱ्या वालुकाकणमिश्रित आणि तत्रस्थ असंख्य वालुकाकण मिसळलेल्या नदीजलात असत नाही. म्हणूनच हरिद्वारपर्यंतची हिमालयोद्भवा गंगा, हरिद्वारपासून प्रयागपर्यंतची मैदानी प्रदेशातील गंगा, आणि बिहार आणि पश्चिम बंगालमधून वाहणारा तिचा अंतिम भाग यांमध्ये जमीनअस्मानाचे अंतर दिसते. या कारणानेच पुराणांतरी वर्णिलेली पवित्र गंगा फक्त हरिद्वारपूर्वीच पहावयास मिळते.

**वर्षाकालीन नद्या**—वर्षाकाली सभोवतालच्या प्रदेशातील काळीतांबडी माती मिसळून नदीजल गढूळ बनत असल्याने पौराणिक साहित्यात वर्षाकालीन नद्या अपवित्र, आणि त्यामधील जलपान निषिद्ध मानले आहे. गंगा, सिंधु आदि वालुकामय प्रदेशातील नदीजलामध्ये वर्षाचे बारा महिने सूक्ष्म वालुकाकण असून, ते कायम गढूळ असते. नदीजलाच्या या विशिष्ट दोषामुळेच 'वस्त्रपूतं जलं पिबेत्' ( नदीजल वस्त्राने गाळून प्यावे ) हा धर्मशास्त्रीय दंडक उत्पन्न झाला असावा.

**पावित्र्य**—कोणत्याहि नदीचे पावित्र्य तिच्या प्रवाहाच्या लांबीप्रमाणेच तिच्या उगमाचे आणि संगमाचे स्थान, प्रवाहाचा प्रदेश, प्रवाहाची दिशा, तसेच तिच्याकाठच्या ऐतिहासिक घटनांवरून ठरते. ऋषिमुनींच्या तपस्येने आणि यज्ञाने प्राप्त झालेले पावित्र्य, देवमंदिरे

आणि ऋषिमुनींच्या आश्रमस्थानामुळे आलेले स्थान-माहात्म्य, तसेच पूर्वापार अवलोकनाने आढळलेली वैशिष्ट्ये या साऱ्यांचा संकलित परिणाम म्हणजे त्या त्या नदीचे माहात्म्य होय. पौराणिक साहित्यमते आकाशातील विशिष्ट ग्रहयोगांमुळेहि विभिन्न नदीजलांमध्ये कमीअधिक पावित्र्य उत्पन्न होत असून, त्यायोगे नदीचे माहात्म्य द्विगुणित होते.

**नदीस्नान** — नदीच्या विभिन्न भागातील कमीअधिक शुद्धतेमुळे तिच्या काठच्या श्रेष्ठ-कनिष्ठ तीर्थासंबंधीचा पौराणिक दंडक उत्पन्न झाला. पौराणिक परंपरेनुसार गंगा ही कनखल येथे, सरस्वती ही कुरुक्षेत्रात, आणि नर्मदा ही मात्र उगमापासून संगमापर्यंत सर्वत्र एकसारखीच पवित्र मानली आहे—

**पुण्या कनखले गङ्गा, कुरुक्षेत्रे सरस्वती ।**
**ग्रामे वा यदि वारण्ये, पुण्या सर्वत्र नर्मदा ॥**

( पद्म. आदि. १३·६ ).

पौराणिक साहित्यमते मोक्षप्रद यमुना नदी मथुरा येथे सर्वाधिक पुण्यप्रद आहे—

**यमुना मोक्षदा प्रोक्ता, मथुरासङ्गता यदि ।**
**मथुरायां च कालिन्दी, पुण्याधिकविवर्धिनी ॥**

( पद्म. आदि. २९·४६ ).

पद्ममते यमुना आणि सरस्वती अनुक्रमे सात आणि तीन दिवसांच्या स्नानाने, आणि गंगा नदी केवळ दर्शनाने भक्तांचे सारे पाप नष्ट करते—

**त्रिभिः सारस्वतं तोयं, सप्ताहेन तु यामुनम् ।**
**सद्यः पुनाति गाङ्गेयं, दर्शनादेव नारद ॥**

( पद्म. आदि. १३·७ ).

**पर्वकाल** — पवित्र नद्यांमध्ये सुमुहूर्तावर शुचिर्भूतपणे आणि विधिपूर्वक स्नानादि धर्मकृत्ये केल्याने नदीस्नानाचे पुण्य द्विगुणित होते. भारतीय परंपरेनुसार मनसाधिष्ठित धर्मविधींसाठी देश, काल, परिस्थिती, शरीर आदींची पूर्ण अनुकूलता असल्याशिवाय पुण्यसंचय आणि मनःशांती लाभत नाही. या दृष्टीने विशिष्ट पर्वकाली ( अनुकूल काली ) करावयाच्या नदीस्नानाचे महत्त्व पौराणिक साहित्यात पुनः-पुन्हा वर्णिले आहे. आकाशीय चंद्रसूर्यांच्या विशिष्ट स्थितीचा परिणाम सृष्टीतील चराचर वस्तूंवर, तसेच मानवी शरीरांवर होत असल्याने (जसे—सागराची भरती, ओहोटी ), ग्रहांच्या विशेष अनुकूल क्षणी ( पर्वकाल ) नदीस्नान पवित्र मानले आहे.

अमावास्या, पौर्णिमा, मकरसंक्रांत, सूर्य-चंद्रग्रहण हे नित्याचे पर्वकाल असून, गजच्छाया, महोदय, अर्धोदय, कपिलाषष्ठी, सिंहस्थ, कुंभ हे विशेष ग्रहयोगावर आधारित दुर्मिळ पर्वकाल होत. त्यापैकी सिंहस्थ पर्वणी विशेष महत्त्वाची असून, पौराणिक साहित्यमते सिंह राशीस गुरु आला असता समस्त तीर्थे गोदावरी नदीच्या उगमाशी, तसेच कन्या आणि कुंभ राशीस गुरु आला असता ही तीर्थे कृष्णा आणि गंगा-यमुना संगमस्थानी ( प्रयाग ) अवतरतात. या संदर्भातच त्र्यंबक ( गोदावरी-उगमस्थान ), प्रयाग, उज्जयिनी, हरिद्वार आदि तीर्थांचे माहात्म्य पौराणिक साहित्यात वर्णिले आहे.

**नद्यांचे उगम**—प्राचीन साहित्यमते नद्यांच्या विभिन्न अंगोपांगांपैकी उगमस्थाने सर्वाधिक पवित्र होत. या दृष्टीने दुर्लंघ्य पर्वतीय स्थानीची विभिन्न नदी–उगमस्थाने प्रयत्नपूर्वक शोधून तेथे मंदिरे, पादुका, गोमुखी, जलकुंडे, बांधल्याचे दृश्य भारतात सर्वत्र दिसते. नर्मदा, भीमा, कृष्णा,गोदावरी,गंगा, कोयना, सावित्री आदि नद्यांची उगम-स्थाने या दृष्टीने विशेष महत्त्वाची आहेत. अमरकंटक पर्वत (नर्मदा), त्र्यंबक ( गोदावरी ), महाबळेश्वर ( कृष्णा ), गंगोत्री (गंगा), जम्नोत्री ( यमुना ) या पूर्वापार सुविख्यात उगमस्थान - तीर्थांचे दर्शन भारताच्या सर्व भागातील यात्रेकरू आजहि प्रत्यही घेतात.

**सरोवरात उगम**—पौराणिक साहित्यमते हरेक नदी पर्वतीय सरोवरात उगम पावत असून, हे सरोवर जेथे दिसत नाही, तेथे ते भूपृष्ठाच्या अंतर्भागात असते. नदी-उगमाची ही सरोवरे पर्वतांच्या पायथ्याशी असून, पर्वतीय उतारावरून वहात येणारे पावसाचे अथवा हिमनद्यांचे जल या सरोवरात एकत्र होते.

**भूगर्भीय मार्ग**—पौराणिक साहित्यमते स्वतःच्या प्रवाह-मार्गातील पर्वतादि अडथळे विभिन्न नद्या भूगर्भीय मार्गांनी ओलांडू शकतात. त्यामुळेच पर्वताच्या एका बाजूकडील सरोवर दुसऱ्या बाजूस उगम पावणाऱ्या नदीचे उगमस्थान बनू शकते. तसेच मार्गातील सरोवरात अथवा पर्वतीय गुफेत विलीन झालेली नदी सरोवराच्या अथवा गुफेच्या अन्य टोकास पुन्हा अवतीर्ण होते.

**चुकीची उगमस्थाने**—विभिन्न नद्यांच्या उगमस्थानांचा शोधप्रयत्न पौराणिक साहित्यात केला असला, तरी काही ठिकाणी ते अयशस्वी झाले आहेत. उदा. वक्षु ( आधु. अमूदरिया ) नदी वक्षु आणि पंजखोरा नद्यांच्या संगमाने, गंगा नदी भागीरथी आणि अलकनंदा नद्यांच्या संगमाने, तसेच तारीम नदी यारकंद आणि काशगर नद्यांच्या

संगमांने बनत असल्याचा भौगोलिक दृष्ट्या चुकीचा निर्देश तेथे आढळतो. परंतु जगातील नाईल, ब्रह्मपुत्रा, वक्षु आदि बहुतांशी मोठ्या नद्यांच्या उगमांचे निश्चित शोध इ. स. १९-२० व्या शतकातच लागले आहेत हे लक्षात घेता त्यांची ही चूक क्षम्य वाटते.

**पर्वतांची स्थाननिश्चिती**— विभिन्न नद्यांच्या उगमस्थानाच्या पौराणिक वर्णनामुळे अनेक प्राचीन पर्वतांची स्थल आणि मर्यादानिश्चिती करता येते. उदा. गोदावरी, कृष्णा आणि कावेरी नद्या सह्य पर्वतोद्भवा असल्याच्या पौराणिक वर्णनावरून हा विशिष्ट भाग प्राचीन सह्य पर्वतात समाविष्ट असल्याचे समजते. ऋक्ष, शुक्तिमत्, पारियात्र आदि भौगोलिक दृष्ट्या विवाद्य पर्वतांच्या बाबतीत हे मार्गदर्शन विशेष महत्त्वाचे वाटते.

पौराणिक साहित्यातील हिमालय पर्वतोद्भवा नद्यांची नामावली चक्षु नदीने प्रारंभ होऊन लोहिता नदीने संपत असून, तीमध्ये इक्षु, इरावती, कुहू ( कुभा ), कौशिकी, गंगा, गोमती, चंद्रभागा, दृषद्वती, देविका, यमुना, लोहिता, वितस्ता, विपाशा, सरयू, सरस्वती, सिंधु आदि सुमारे वीस नद्यांचा अंतर्भाव आढळतो. त्यावरून सुलेमान पर्वतापासून लुशाई टेकड्यांपर्यंत ( अराकान ) पौराणिक हिमालयाची व्याप्ती दिसते.

**स्थित्यंतरे**—दुर्दैवाने पौराणिक साहित्यातील अनेक नद्यांची आज ओळख पटत नाही. नामांतरे झाल्यामुळे, पाणी आटल्यामुळे, अथवा भौगोलिक स्थित्यंतरामुळे त्यापैकी अनेकींचा ठावठिकाणाहि आज लागत नाही. त्यामुळे नद्यांचा पत्ता नाही, आणि पर्वतांची माहिती नाही अशी दुरवस्था अनेकदा उत्पन्न होते. पावसाचे प्रमाण बदलल्याने जुन्या नद्यांची पात्रे कोरडी पडल्याची, अथवा ती बदलल्याची अनेक उदाहरणे पहावयास मिळतात. या विशिष्ट दृष्टीने अचल पर्वतांच्या तुलनेने नद्या अधिक स्थित्यंतरक्षम असून उत्तर भारतातील मैदानी प्रदेशामध्ये ही स्थित्यंतरे अधिक प्रकर्षाने जाणवतात.

**प्रवाहस्थित्यंतरे**—नद्यांच्या प्रवाहस्थित्यंतरांचे प्रमाण सपाट वालुकामय प्रदेशामध्ये अधिक प्रकर्षाने दिसते. उदा. मध्य आशियातील अरल समुद्रास मिळणारी आधु. अमूरिया ( प्राचीन वक्षु ) इ. स. पू. १ ल्या शतकात काश्यप ( आधु. कॅस्पियन ) समुद्रास मिळत असे. अरब आक्रमणकाली दक्षिण पंजाबातून वहाणाऱ्या हक्रा (वाहिंदा) नदीचे शुष्क पात्र केवळ बाकी आहे. सिंधु संस्कृतीच्याकाळी मोहेंजोदरो नगराजवळून वहाणारी सिंधु नदी आज त्या स्थानापासून कितीतरी दूर गेली आहे. सिंधु आणि गंगा नद्यांच्या मुखानजिकचा भाग गेल्या काही शतकात शेकडो मैलांनी सरकला आहे. प्रयाग येथील गंगा नदीचा प्रवाह प्रतिवर्षी बदलताना दिसतो. दरभंग्यानजिक वहाणाऱ्या कमला संज्ञक दोन पुरातन स्वतंत्र नद्या आज एक झाल्या आहेत.

**प्रवाहाची दिशा**—नद्यांच्या उगमस्थानाइतकेच महत्त्व त्यांच्या प्रवाहाच्या दिशेला असून, नदीने आपल्या उगमस्थानाच्या दिशेने घेतलेले ३६०° चे तात्पुरते वळण विशेष पवित्र मानतात. उदा. पश्चिमवाहिनी सरस्वती नदी जेथे पूर्वेकडे वळते ( प्राचीसरस्वती ), अथवा दक्षिणवाहिनी गंगा नदी जेथे उत्तरेस वळते ( उत्तरगंगा ), तेथे स्नान, निवास आणि पितृश्राद्धादि धार्मिक विधी पुण्यप्रद मानतात.

नदीचे उगम आणि संगमस्थान यांच्या दरम्यानचे मध्यवर्ती स्थान 'नाभिस्थान' अथवा 'नाभिक्षेत्र' नावाने सुविख्यात असून ( उदा. गोदावरी नदीकाठचे नांदेड ), दोन नद्यांच्या संगमाच्या दरम्यानच्या त्रिकोणी भागास 'पृथ्वीजघन' म्हणतात ( उदा. प्रयाग येथील गंगा-यमुनासंगम ).

**संगम**—दोन अथवा तीन पवित्र नद्यांचा संगम ( संभेद, नि. २.२४ ) चढत्या श्रेणीने पवित्र मानण्यात येतो. भारतातील बहुताशी सारी संगमतीर्थे 'पृथ्वीजघना' च्या त्रिकोणी भागात असून, त्यापैकी एकच किनारा परंपरेने अधिक पवित्र मानतात ( उदा. प्रयाग येथील गंगा-यमुना संगमाचा उजवा किनारा ). नदीसंगमाचे नामकरणहि लहान नदीचे नाव प्रथम अशा क्रमाने देतात ( उदा. गंगा-यमुना संगम ).

**प्रयागक्षेत्रे**—तीन नद्यांचे संगमस्थान 'त्रिवेणी' नावाने सुविख्यात असून, गंगा, यमुना आणि सरस्वती नद्यांच्या त्रिवेणी संगमाचे अलाहाबाद येथील प्रयागक्षेत्र वेदकालापासून सुविख्यात आहे ( वराह. १४४; रघु. १३.५४ ). ऋग्वेद परिशिष्टात तत्संबंधी निम्नलिखित ऋचा आढळते —

**सितासिते सरिते यत्र सङ्गथे, तत्राप्लुतासो दिवमुत्पतन्ति ।**
**ये वै तन्वं वि सृजन्ति धीरास्ते जनासो अमृतत्वं भजन्ते ॥**

( श्वेतजला गंगा आणि कृष्णजला यमुना यांच्या संगमस्थानी स्नानकर्त्या साधकाला स्वर्गप्राप्ती आणि देहविसर्जक भक्ताला मोक्ष आणि अमरत्व मिळते ).

गुरुचरित्रमते महाराष्ट्रातील कोल्हापुरपासून ४ मैलां-

वरील कासारी ( प्रयाग ) येथे कासारी, कुंभी, तुळसी, भोगावती आणि पंचगंगा नद्यांचा ‘ पंचवेणी संगम ’ असून ( गुरु. १८·१५–१९ ), भारतातील अन्य प्रमुख त्रिवेणी संगम पुढीलप्रमाणे होतः—१. गंडकी-देविका-ब्रह्मपुत्रा संगम ( वराह. १४४ ); २. वराहक्षेत्रान्तर्गत तामोर-अरुणा-सुनकोशी संगम; ३. पश्चिम बंगालमधील मुक्तवेणीक्षेत्रान्तर्गत सरस्वती हुगळी-यमुना संगम.

‘ पंचप्रयाग ’ सामूहिक नावाने सुविख्यात असणारी गंगा नदीच्या हिमालयातील पाच प्रमुख उपनद्यांची संगमस्थाने पुढीलप्रमाणे होतः—१. देवप्रयाग ( अलकनंदा–भागीरथी संगम ); २. रुद्रप्रयाग ( अलकनंदा-मंदाकिनी संगम ); ३. कर्णप्रयाग ( अलकनंदा-पिंडरगंगा संगम ); ४. नंदप्रयाग ( अलकनंदा-नंदा संगम ); ५. विष्णुप्रयाग ( अलकनंदा-विष्णुगंगा संगम ).

याशिवाय भारतातील प्रांतोप्रांती स्थानिक ‘प्रयागक्षेत्रे’ असून, त्यापैकी महाराष्ट्रातील कराडनजिकचा कृष्णा-कोयना नद्यांचा ‘ प्रीतिसंगम ’ वैशिष्ट्यपूर्ण आहे. समोरासमोर येऊन दृढालिंगन देणाऱ्या विहिणींप्रमाणेच येथे दोन नद्या एकत्र येतात.

**सागरसंगम**—नदीतीरावरील अन्य महत्त्वपूर्ण तीर्थे सागरसंगमानजिक ( मुख ) असून, गंगा, सिंधु, कृष्णा, गोदावरी नद्यांच्या मुखांनजिकच्या तीर्थांचे माहात्म्य पौराणिक साहित्यात आढळते. ऋग्वेदातहि नदी-सागरसंगमाचा अनेक वेळा निर्देश असून ( ऋ. १·७१·७; १६३·१; १९०·७ ), पाणिनींच्या मते नदीच्या मुखानजिकचा प्रदेश ‘ वक्त्र ’ नावाने ओळखला जात असे ( जसे—सिंधुवक्त्र; इंद्रवक्त्र; पा. सू. ४·२·१२६ ). सागरसंगमापासून नदीउगमापर्यंत करावयाची उलटी तीर्थयात्रा ( प्रत्यक्स्त्रोत ) पापक्षालनार्थ प्रायश्चित्त म्हणून करीत असून, प्रभासपट्टण येथील सरस्वती-सागर संगमापासून उगमापर्यंतच्या बलरामाच्या अशा यात्रेचे वर्णन महाभारतात आढळते.

**अन्य वैशिष्ट्ये**—धार्मिक माहात्म्यकथनाच्या मिषाने विभिन्न नद्यांची भूगर्भशास्त्रीय वैशिष्ट्येहि पौराणिक साहित्यात ग्रथित केलेली आढळतात ( उदा. नर्मदा नदीतील गणेशाकृती अथवा शिवलिंगाकृती दगड; गंडकी नदीतील शाळिग्राम ).

**उपनद्या**—पौराणिक साहित्यात विभिन्न उपनद्यांनी बनलेली नदी एक अखंड नदी मानलेली दिसते. त्यामुळेच कोणत्याहि उपनदीचा स्वतंत्र नामोल्लेख न करता तिच्या उगमस्थानभूत पर्वतावर मुख्य नदी अवतीर्ण होत असल्याचा रूपकात्मक निर्देश पुराणे करतात ( उदा. उपनद्यांच्या संख्याभेदानुसार मार्गातील दोन तीन विभिन्न पर्वतांवर विशिष्ट नदी अवतरत असल्याचा पौराणिक निर्देश ). भौगोलिक आणि सांस्कृतिक दृष्ट्या महत्त्वपूर्ण अशा उपनद्यांचा निर्देश पौराणिक साहित्यात उपनदी म्हणून नव्हे, तर स्वतंत्र नदी म्हणून आढळतो. उदा. विदिशा आणि उज्जयिनी नगरानजिकच्या वेत्रवती आणि शिप्रा नद्यांचा निर्देश पौराणिक साहित्यात आढळत असला, तरी त्या चर्मण्वती आणि कालिंदी नद्यांच्या उपनद्या असल्याचा उल्लेख तेथे आढळत नाही.

पर्वतश्रेणीच्या उभय अंगांस समांतर वहाणाऱ्या नद्यांच्या अथवा सरोवरांच्या बाबतीतहि एकाच नदीचे वा सरोवराचे हे पर्वतविभाजित उपविभाग असल्याची वर्णनपद्धती पुराणे अवलंबितात ( उदा. सिरदरिया आणि इर्त्यश् नद्या; तारिम् आणि सीता नद्या; कर-कुल् आणि किझिल्-सु नद्या; गिल्जिट् नदी आणि मानस सरोवर ).

**चिनी-पर्शियन साहित्यात**—उपरोक्त नदीवर्णन पद्धतीचे अनुकरण चिनी आणि पर्शियन साहित्यातही आढळते. ह्युएनत्संगच्या मते येन्-त्से ( आधु. लोप् नोर् ) नामक क्षारमय समुद्रात विलीन होणारी सीता नदी भूगर्भीय मार्गाने त्सिह-शी ( आधु. लौ–चौ ) पर्वतानजिक अवतरत असल्याने तो पर्वत पीत नदीचे उगमस्थान मानीत असत. ( बील, पृ. ९९ ). पर्शियन साहित्यमते मविस पर्वताच्या पूर्व भागात उगम पावणारी ‘ वजक् ’ ( सीता ) नदी खोतान आणि शकौर प्रदेशातून वहात जात एका दलदलीच्या प्रदेशात ( आधु. लोप्-नोर् सरोवर ) लुप्त होते. तेथून कुच, कुर्ष आणि फर्जकलि प्रदेशातून वहात जाऊन अखेरीस ती पूर्व समुद्रास मिळते ( खुदूद् पृ. ७० ).

**नदीनामे**—नदीनामांच्या बाबतीत विभिन्न पुराणात कमालीचा परस्परविरोध असून, गंगा हे नदीनाम कधी मुख्य प्रवाहाला, तर कधी अलकनंदा आणि भागीरथी संज्ञक तिच्या उपनद्यांना उद्देशून तेथे प्रयुक्त केले आहे. एकच नदी विभिन्न नावांनी, तसेच विभिन्न नद्या एकाच नावाने ओळखण्याचा घोटाळाहि तेथे अनेक वेळा आढळतो. उदा. हरेक पवित्र नदीला तेथे ‘ गंगा ’ म्हटले असून, हिमालयोद्भवा मुख्य गंगेच्या जोडीला ‘ पैनगंगा ’; वैनगंगा ’, ‘ रामगंगा ’, ‘ कृष्णगंगा ’, ‘ विष्णुगंगा ’ आदि अनेक गंगा नद्यांचा निर्देश तेथे आढळतो. इतकेच नव्हे,

तर सप्तद्वीपा पृथ्वीतील हर एक मोठ्या आणि पुण्यदायिनी नदीला तेथे 'गंगा' म्हटले आहे.

सरयू, रामगंगा, काली, धौली, कोशी, शारदा ही नावेहि एकापेक्षा अधिक हिमालयोद्भवा नद्यांना पौराणिक साहित्यात दिलेली आहेत. उदा. कुमाऊँमधील काली नदीची एक उपनदी, तसेच अलकनंदा नदीची एक उपनदी 'धौली' नावाने सुविख्यात असून, 'शारदा' हे नदीनाम 'काली' नदीचे नामांतर म्हणून, तसेच कश्मीरातील एक नदीनाम म्हणून तेथे प्रयुक्त केले आहे. चिनी साहित्यातहि 'किझिल्-सू' हे नदीनाम अलई खोऱ्यातील दोन विरुद्ध दिशेच्या नद्यांना उद्देशून वापरले आहे.

नदीनामाबाबतची ही गोंधळाची स्थिती आजहि कायम असून, पामीर पठारातील नद्यांना त्यांच्या दरेक वळणानंतर देशभेदानुसार नवे नाव प्राप्त होते. उदा. 'चित्रळ', 'अस्नार', 'यासीन', 'कुणार', 'मुस्तज' ही एकाच अमूदरिया नदीची नावे असून 'ताशकुर्घान्', 'तघ्दुम्बश्', 'दंगुबश्', 'सारिकोल', 'करत्-चुकोर', 'तिस्नफ्', 'चिराघ्-तौ', 'अल्मलिघ्' ही एकाच सिरदरिया नदीच्या विभिन्न भागांची नावे आहेत. लडाखमध्ये सिंधु आणि सतलज नद्यांची 'कर्नाली', 'गोग्रा', 'शारदा', 'कुरियाली' आदि नावे प्रचारात असून, तिबेटी भाषेत त्यांची याहूनहि अन्य नावे प्रचारात दिसतात.

**वैदिक साहित्यात** — या साहित्यातील सुमारे पन्नास नद्यांपैकी फक्त पंधरा आज निश्चितपणे ओळखता येतात. अन्य नद्यांच्या नावातील विलक्षण फेरबदलामुळे त्यांचे आधुनिक नाव आणि भौगोलिक स्थान कळत नाही. जेथे भौगोलिक नावे कायम आहेत, तेथे प्रवाहात बदल झाले आहेत. वैदिक आर्यांच्या आशियाव्यापी संचारात आशियाखंडातील चिरपरिचित नदीनामे भारतवर्षातील अनेक नव्या नद्यांना त्यांनी दिली. त्यामुळे वैदिक साहित्यातील सरस्वती, सरयू, गोमती, यमुना आदि नद्यांच्या भौगोलिक स्थानाविषयी नवी शंका उत्पन्न होते.

**पाणिनीय व्याकरणात** — या ग्रंथात वायव्य भारत आणि पंजाबातील सुमारे पंधरा नद्यांचा निर्देश असून, त्यापैकी सुवास्तु (४·२·७७), सिंधु (४·७·९३), सरयू (६·४·१७४) आणि विपाशा (४·२·७४) या चार नद्यांचा अपवाद वगळता अन्य सार्‍या नद्या वैदिक साहित्याहून नव्या आहेत. त्याने निर्देशिलेल्या अजिरवती (आधु. राप्ती; ६·३·११९), देविका (पंजाबातील आधु. देग; ७·३·१), शरावती (कुरुक्षेत्रातील आधु. घग्गर. ६·३·१२०), रथस्या (पंचाल देशातील आधु. रामगंगा; ६·१·५७), चर्मण्वती (आधु. चंबळ; ८·२·१२) या नद्याहि भौगोलिक दृष्ट्या महत्त्वपूर्ण आहेत. याखेरीज गंगा–शोण, गंगा-यमुना, उद्ध्य–इरावती, भिद्य–इरावती आदि जोडनद्यांचा निर्देशहि तो करतो.

पाणिनीच्या मते सरयू (पश्चिम अफगाणिस्तानातील आधु. हरी रुद्) नदीकाठचे पदार्थ (सरय्वां भव) 'सारव' नावाने सुविख्यात असून, पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यात देविका नदीकाठच्या तांदळाचा (देविकाकुलाः शालयः) निर्देश आढळतो. आजहि या नदीकाठचा वसुमती तांदूळ सुविख्यात आहे.

पाणिनीच्या मते सिंधु नदीच्या पूर्वेकडील सिंधु-सागर दुआबाचा प्रदेश 'सिंधु जनपद' नावाने सुविख्यात असून (पा. सू. ४·३·९३), आधु. सिंध प्रांत सौवीर नावाने ओळखला जात असे (पा. सू. ४·१·१४८). त्याचे मते पंजाबातील 'चंद्रभागा' (आधु. चिनाब) हेच नदीनाम व्याकरणदृष्ट्या शुद्ध असून, 'चंद्राभागा' रूपात नद्येतर भौगोलिक स्थानांचा निर्देश अभिप्रेत आहे.

**पौराणिक साहित्यात** — वैदिक, पाणिनीय आणि पौराणिक साहित्याच्या तौलनिक अध्ययनात पौराणिक काळी काही जुन्या नद्यांना नवी नावे प्रचारात आल्याचे, काही जुनी नावे तशीच कायम राहिल्याचे, काही जुनी नावे नव्या नद्यांना दिल्याचे, तसेच काही नदीनामे प्रथमच प्रचारात आल्याचे ध्यानी येते. या विशिष्ट दृष्टीने निम्नलिखित पाठभेदांचे तौलनिक अध्ययन करण्यासारखे आहे:—

**१. महेंद्र पर्वतोद्भवा नद्या** — १. अचला (अबला); २. इक्षुदा (इक्षका, इक्षुला); ३. ऋषिकुल्या (ऋतुकुल्या); ४. वंशकरा (वंशधरा).

**(२) मलय पर्वतोद्भवा नद्या** — १. ऋतुमाला (शतमाला, कृतमाला).

**(३) सह्य पर्वतोद्भवा नद्या** — १. कृष्णा (कृष्णवेणा, कृष्णवेणी, कृष्णवेण्या), २. वेणा (वेणी, वेण्या, वैणी); ३. भीमरथी (भैमरथी).

**(४) विंध्यपाद पर्वतोद्भवा नद्या** — १. अंतःशिला (अंतःशिवा); २. तापी (तपती); ३. क्षिप्रा (शिप्रा); ४. दुर्गा (दुर्गमा; दुर्गंधा); ५. विन्ना (वेणा, वेण्या, वेणी, वेणवा).

**(५) शुक्तिमत् पर्वतोद्भवा नद्या** — १. पलाशिनी

( उत्पलावती, पाशिनी ); २. मंदवाहिनी ( मंदगा, मंदगामिनी ).

( ६ ) ऋक्ष पर्वतोद्भवा नद्या — १. चित्रोत्पला ( चित्रोपला ); २. तमसा ( तामसी ); ३. पिप्पली ( पिप्पलीश्रोणी, पिप्पला ); ४. महानद ( महानदी ); ५. विमला ( विशाला ); ६. श्येनी ( श्रोणी ).

**शिलालेख साहित्यातील नद्या** — वैदिक आणि पौराणिक साहित्यात न आढळणाऱ्या शतावधी नद्यांचा निर्देश शिलालेख साहित्यात असून, त्यापैकी अनेकांचा आज शोधहि लागत नाही. क्षहरात क्षत्रप नहपानाच्या नासिक शिलालेख क्र. १० मध्ये भारताच्या पश्चिम समुद्रकिनऱ्या, वरील वर्णाशा, इबा, पारदा, दमणगंगा, तापी, करबेनादाहनूका आदि नद्यांच्या निर्देश आढळतो. रुद्रदामनच्या जुनागढ शिलालेखात ऊर्जयत् ( आधु. गिरनार ) पर्वतोद्भवा 'सुवर्णसिकता' (आधु. सोनरेखा) आणि 'पलाशिनी' नद्यांचा निर्देश आढळतो. यापैकी सुवर्णसिकता नदीचा निर्देश स्कंदगुप्ताच्या जुनागढ शिलालेखात 'सिकताविलासिनी' नावाने केला असून, या नदीची 'सुवर्णसिकता', 'सिकताविलासिनी' आणि 'सोनरेखा' ही नामास्थित्यंतरे भाषाशास्त्रीय दृष्टीने महत्त्वाची आहेत.

अशोकाच्या आज्ञालेखात दक्षिण भारतातील 'तंबपणी' ( ताम्रपर्णी ) नदीचा निर्देश आढळतो. परंतु तेथे दक्षिण भारत आणि सिलोनमधील 'ताम्रपर्णी' संज्ञक नदीद्वयापैकी निश्चित कोणत्या नदीचा निर्देश अभिप्रेत आहे ते समजत नाही.

# भारतवर्ष

**भारतवर्षाची उत्क्रांती** — 'उत्तरेस हिमालय पर्वत, दक्षिणेस समुद्र, पश्चिमेस यवन आणि पूर्वेस किरातांच्या दरम्यानचा नऊ सहस्र योजने विस्ताराचा भूप्रदेश' अशी 'भारतवर्षा'ची व्याख्य पौराणिक साहित्यात सर्वत्र आढळते—

**उत्तरं यत्समुद्रस्य, हिमाद्रेश्चैव दक्षिणम् ।**
**वर्षं तत्भारतं नाम, भारती यत्र संततिः ॥**
**नवयोजनसाहस्रो, विस्तारोऽस्य महामुने ।**
( विष्णु. २·३·१०२ )

**पूर्वे किराता यस्यान्ते, पश्चिमे यवनास्तथा**
( मार्क. ५४·८ ).

भारतवर्षाची उपरोक्त व्याख्या कात्यायनाचे वार्तिक आणि मेगॅस्थिनेस यांच्या काळी ( इ. स. ४ थे शतक ) सर्वप्रथम प्रस्थापित झाली असून, उत्तरेस हिमालय पर्वतापासून दक्षिणेस पांड्य देशापर्यंतच्या भूभागाला तेथे प्रथमच 'भारतवर्ष' म्हटले आहे.

रॉयचौधरी यांच्या मते वैदिक साहित्यातील 'सप्तसिंधु देश', मनु याज्ञवल्क्यकालीन 'आर्यावर्त' देश, तसेच डॅरियस आणि हिरोडोटसकालीन 'हिंदुस्' ( इंडिया ) देश यामध्ये भारतवर्षातील पंजाब खोरे, गंगा खोरे आणि सिंधु खोरे या मर्यादित प्रदेशांचा समावेश होत असे. इ. स. पू. ४ थ्या शतकात ( कात्यायन वार्तिक, मेगॅस्थिनेस ) उत्तरेस हिमालयापासून दक्षिणेस पांड्य देशापर्यंतचा विस्तीर्ण भूप्रदेश भारतीय वसाहतकारांना ज्ञात होऊन या नवज्ञात भूप्रदेशाचे 'भारतवर्ष' ( जंबुद्वीप ) हे नवे नामकरण करण्यात आले. महाभारतात दक्षिण भारतातील पांड्य देशाचा, तसेच बंगालच्या उपसागराकडील द्वीपकल्पांचा समावेश भारतवर्षात केला आहे.

**मनुस्मृतीमध्ये**— या ग्रंथमते भारतातील आर्यांच्या वसाहतीकरणाची ( भारतवर्षाची ) व्याप्ती निम्न क्रमाने परिवर्धित झाली :–१. **ब्रह्मावर्त** ( सरस्वती–दृषद्वती दुआबाचा प्रदेश ); २. **ब्रह्मर्षि देश** (गंगा-यमुना दुआबातील कुरुक्षेत्र, मत्स्य, पांचाल, शूरसेन प्रदेश ); ३. **मध्य देश** ( उत्तरेस हिमवत्, दक्षिणेस विंध्य, पश्चिमेस विनशन, आणि पूर्वेस प्रयाग यांच्या दरम्यानचा उत्तर भारताचा प्रदेश ); ४. **आर्यावर्त** ( पश्चिमेस सिंधु सागर, आणि पूर्वेस बंगालचा उपसागर यांच्या दरम्यानचा उत्तर भारताचा प्रदेश ); ५. **यज्ञीय देश** ( कृष्णपृष्ठ मृगाच्या भ्रमणाने पुनीत झालेला भारतवर्ष ).

**बृहत्तर भारत**—अशोकादि सम्राटांनी आपल्या साम्राज्याची वायव्य परिसीमा भारतवर्षाबाहेरील हिंदुकुश पर्वतापर्यंत, आणि आग्नेय परिसीमा आग्नेय आशियातील जावा-सुमात्रादि बेटांपर्यंत परिवर्धित केली. त्याआधारेच पौराणिक साहित्यात बंगालचा उपसागर आणि अरबी समुद्रातील काही द्वीपे भारतवर्षान्तर्गत नवद्वीपांमध्ये समाविष्ट केली आहेत. इ–त्सिंगच्या प्रवासवर्णनमतेहि ( इ. स. ७ वे शतक ) अशोकाचे साम्राज्य ( जंबूद्वीप = भारतवर्ष )

फुनान्च्या ( आधु. सयाम–कांबोडिया ) उत्तरेस, आणि चीनच्या पश्चिमेस पसरले होते ( इ-त्सिंग्, पृ. १४; १३६ ).

पौराणिक काली सप्तद्वीपा वसुमतीची कल्पना प्रसृत होऊन, आणि पूर्वकाली भारतवर्षापुरती मर्यादित असणारी जंबूद्वीपाची व्याप्ती आशियाखंडाइतकी विस्तृत बनविण्यात येऊन भारतवर्ष हा त्या विशाल द्वीपाचा एक छोटासा उपविभाग मानण्यात येऊ लागला ( ब्रह्माण्ड. ३३·४४ ).

**आकार**—पौराणिक साहित्यात भारतवर्षाचा आकार 'अर्धचंद्राकृती', 'त्रिकोणी', 'शंख्याकृती ', 'आयताकृती', अथवा ' सज्जधनुषाकृती ' अशा बहुविध प्रकारे वर्णिला आहे. या देशाची हिमालयाच्या उत्तरेकडील सरहद्द अंतर्गोल असल्याबद्दल पौराणिक साहित्यात सर्वत्र एकवाक्यता असून, विंध्याच्या दक्षिणेकडील द्वीपकल्पाचा आकार, तसेच वायव्य सरहद्दीवरील उत्तर अफगाणिस्तानचा आकार यासंबंधी मात्र विभिन्न पुराणात मतभिन्नता आहे. त्याचेच पडसाद भारतवर्षाच्या आकारासंबंधीच्या मतांतरांमध्ये उमटले असावेत. टॉलेमीच्या भारतवर्णनात भारतवर्षाचा द्वीपकल्पीय भाग संपूर्णतः वगळला असून, गंगा नदीच्या दुआबापासून मक्रान वाळवंटापर्यंतच्या सरळ रेषेत तेथे भारतवर्षाची दक्षिण सरहद्द कल्पिली आहे.

**भारतवर्षाचे उपविभाग**— भारतवर्षाचे दोन, चार, पाच, सात आणि नऊ विभागात्मक विभाजन सुचविणाऱ्या विभिन्न उपपत्ती महाभारत, पौराणिक साहित्य आणि बृहत्संहितेत आढळतात. भारतवर्षाच्या विभिन्न भागांचे नवोपलब्ध भौगोलिक ज्ञान अंतर्भूत करण्यासाठी या वाढत्या श्रेणीच्या उपविभागांची रचना उत्तरकालात झाली असावी. विकसित भौगोलिक ज्ञानाचे प्रतीकभूत अशा या विभिन्न उपपत्ती पुढीलप्रमाणे होत :—

**(१) द्विविभागात्मक भारतवर्ष**—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते भारतवर्षातील नगरांचे ' उदीच्य ग्राम ' ( वायव्य भारतातील ग्रामे; पा. सू. ४·२·१०९ ), आणि ' प्राच्य ग्राम ' ( पूर्व भारतातील ग्रामे; पा. सू. ७·३·१४ ), असे दोन उपविभाग असून, त्यापैकी ' उदीच्य ग्रामां ' मध्ये ' वाहीक ग्राम ' ( वाहीक देशातील ग्रामे; पा. सू. ४·२·११७ ), आणि तदंगभूत ' उशीनर ग्राम ' नामक पोटविभाग होता.

**(२) चतुर्विभागात्मक भारतवर्ष**—वाल्मीकि रामायणातील सुग्रीवाच्या सीताशोधाच्या संदर्भात भारताचे चतुर्दिशात्मक विभाजन सूचित केले असून, भारतवर्षातील तत्कालीन देशांची आणि नद्यांची विभागशः माहिती तेथे आढळते. गंगेपासून ताम्रपर्णीपर्यंतच्या नद्यांचा, तसेच उत्तर आणि दक्षिण भारतातील विभिन्न जनपदांचा निर्देश तेथे आढळतो. त्यापैकी पांड्य देशाच्या 'कवाट' नामक राजधानीचा निर्देश दक्षिण भारतातील आर्य वसाहतीकरणाच्या दृष्टीने महत्त्वाचा आहे ( वा. रा. कि. ४१·१९ ).

**( ३ ) पंचविभागात्मक भारतवर्ष**—महाभारत, तसेच मत्स्य, वायु आणि विष्णु पुराणात भारतवर्षाचे चतुर्दिशात्मक चार, आणि मध्यवर्ती एक असे एकूण पाच विभाग वर्णिले आहेत. ही पद्धती उत्तरकालीन सप्त आणि नव विभागात्मक विभाजनाच्या तुलनेने कमी शास्त्रीय परंतु अधिक सहजसुलभ आहे.

विष्णुमते भारतवर्षाचे पाच प्रमुख विभाग आणि त्यामध्ये समाविष्ट देश पुढीलप्रमाणे होत:—**१. मध्य देश** ( कुरु आणि पांचाल देश ); **२. पूर्व देश** ( कामरूप ); **३. दक्षिण देश** ( पुंड्र, कलिंग आणि मगध ); **४. पश्चिम देश** ( सौराष्ट्र, शूर, आभीर, अर्बुद, करूष, मालव, सौवीर, सैंधव ); **५. उत्तर प्रदेश** ( हूण, शाल्व, शाकल, अंबष्ठ, पारसीक, रामठ ( विल्सन, विष्णु. २·२·३ ).

भारतवर्षाच्या पंचभेदात्मक विभाजनाचा प्राचीनतम निर्देश अथर्ववेदात ( अ. वे. १९·१७·१–९ ), आणि ऐतरेय ब्राह्मणात ( ऐ. ब्रा. ८·१४ ) असून, उत्तरकालीन ब्राह्मण आणि बौद्ध साहित्यात, राजशेखराच्या काव्यमीमांसेत, तसेच ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात त्याचे अनुकरण आढळते. बौधायनाच्या धर्मसूत्रातहि या पद्धतीचा अस्पष्ट निर्देश आढळतो.

उपरोक्त ग्रंथांपैकी काव्यमीमांसेतील पंचविभागात्मक भारतवर्षाचे वर्णन बृहत्संहिता आणि वायु पुराणाहून स्वतंत्र परंपरेतील असून, त्या विभागांतील उत्कल, सुह्म, निषध, कश्मीर, अंग, वंग, पुंड्र, बाह्लीक, पंचाल आणि शूरसेन देशांची सविस्तर माहिती तेथे आढळते. ( काव्यमी. ३; १७ ).

**( ४ ) सप्तविभागात्मक भारतवर्ष**—मार्कंडेय आणि ब्रह्माण्ड पुराणात सप्तखंडात्मक कुमारी द्वीपाचा सुस्पष्ट निर्देश असला ( मार्कं. ५८; ब्रह्माण्ड. ३६·४४ ), तरी पूर्वकालीन पुराणांतील भारतवर्षाचे पाच भागच इथे सात भागात बसविल्याचे स्पष्टपणे दिसते. याचे उलट वायु आणि मार्कंडेय पुराणात भारतवर्षाचे नऊ उपविभाग सांगून त्यामध्ये परंपरागत सप्तविभाग ओढून ताणून बसविले

आहेत ( मार्कं. ५७ ). या ग्रंथात निर्देशिलेले भारतवर्षाचे सप्तखंड पुढीलप्रमाणे होत :—१. मध्य देश; २. उदीच्य देश; ३. प्राच्य देश; ४. दक्षिणापथ; ५. अपरांत; ६. विंध्य पर्वतीय देश; ७. पर्वताश्रयी देश ( हिमालय प्रदेश ).

**भारतवर्षवर्णन**— भारतवर्षातील देश आणि लोकसमूहांचे वायु पुराणातील वर्णन प्राचीनतम आणि सर्वोत्कृष्ट असून, ब्रह्माण्ड आणि मार्कंडेय पुराणातील देशनामावली ही सर्वांशाने वायु पुराणानुसारी आहे. त्यापैकी ब्रह्माण्ड पुराणातील काही पाठ सदोष आणि चुकीचे असून ( जसे—वायु–' नासिक ' = ब्रह्माण्ड–'मैंडिक' ), मार्कंडेय पुराणातील नामावली वायु पुराण नामावलीची सुधारलेली आवृत्ती आहे. मात्र मार्कंडेय पुराणातील ही वायु पुराणानुसारी नामावली याच ग्रंथाच्या कूर्मविभागातील बृहत्संहितानुसारी नामावलीहून सर्वस्वी भिन्न आहे. उदा. नैर्ऋत्य भारतातील देशनामावली वायु आणि मार्कंडेय पुराणात आढळत नसली, तरी बृहत्संहितानुसारी कूर्मविभागात मात्र ती आढळते. ब्रह्म पुराणातील भारतवर्षान्तर्गत देशनामावली मार्कंडेय पुराणानुसारी आहे.

मत्स्य पुराणातील भारतवर्षान्तर्गत देशनामावली वायु पुराणावरून जशीच्या तशी उचलली असल्याने तिला स्वतःचे महत्त्व नाही. याचे उलट पद्म पुराणातील देशनामावली परस्परविरोधी, आणि म्हणूनच निरुपयोगी आहे.

**गुणवैशिष्टये**—पौराणिक साहित्यातील भारतवर्षवर्णनामध्ये परंपरागत भौगोलिक माहितीची सांगड नवोपलब्ध माहितीशी घालून ती सर्वसमावेशक करण्याचा शास्त्रशुद्ध प्रयत्न आढळतो. उदा. या ग्रंथातील उदीच्य देशांच्या नामावलीत यवन, शक, पह्लव, हूण आणि तुरुष्क लोकसमूहांचा एकत्र निर्देश असला, तरी त्यापैकी यवन लोक इ. स. पू. २ ऱ्या शतकात, हूण इ. स. ५ व्या शतकात आणि तुरुष्क ( तुर्क ) ई. स. १० व्या शतकात भारतात सर्वप्रथम आले. परंपरा आणि नवसंशोधन यांची सांगड घालण्याच्या पौराणिक साहित्याच्या या कटाक्षामुळे प्राचीन भारतीय भूगोलाची सर्वाधिक महत्त्वपूर्ण साधने ती बनली आहेत.

**( ५ ) नवविभागात्मक भारतवर्ष**—पराशरतंत्र, बृहत्संहिता आणि मार्कंडेय पुराण कूर्मविभाग यांमध्ये भारतवर्षाचा आकार पूर्व दिशाभिमुख जलस्थित कूर्मसदृश कल्पिला असून, या कूर्मशरीराचे आठ दिशांचे आठ, आणि पाठीचा मध्यवर्ती असे नऊ विभाग ( भेद, वर्ग ) वर्णिले आहेत.

बृहत्संहितेतील कूर्मविभागात ( अ. १४ ) भारतातील विभिन्न देशांवरील आणि लोकसमूहांवरील अशुभ ग्रहग्रस्त नक्षत्रांच्या दुष्परिणामांचे दिग्दर्शन करण्यासाठी नवविभागात्मक भारतवर्षाचे विवरण केले आहे. सत्तावीस नक्षत्रांच्या नऊ उपविभागांना अनुलक्षून मनुष्यवस्तीस योग्य पृथ्वीचेहि ( भारतवर्षाचे ) नऊ विभाग तेथे कल्पिले असून, त्यापैकी मध्यदेश ( पांचाल ) नामक उपविभाग भरतखंडाच्या मध्यभागी, आणि निम्नलिखित नऊ उपविभाग तेथे मध्यदेशाभोवती वर्तुलाकृती वर्णिले आहेत :— १. **पूर्व देश** ( मगध ); २. **आग्नेय देश** ( कलिंग ); ३. **दक्षिण देश** ( अवंती ); ४. **नैर्ऋत्य देश** ( आनर्त आणि सिंधुसौवीर ); ५. **पश्चिम देश** ६. **उदीच्य देश** ( मद्र ); ७. **उत्तर देश**; ८. **ईशान्य देश** ( कुलिंद )

भौगोलिक दृष्ट्या सातपुडा पर्वताच्या उत्तरेकडील भारतवर्षाचे वर्णन उपरोक्त कूर्मविभागात असून, निम्नलिखित भूभागांचा निर्देश तेथे अभिप्रेत दिसतो :— १. गंगा नदीचे खोरे; २. काबूल नदीचे खोरे; ३. गोदावरीच्या उगमापर्यंतचा पश्चिम समुद्रकिनाऱ्यापर्यंतचा प्रदेश; ४. कलिंग ( आधु. ओरिसापर्यंतचा पूर्व समुद्रकिनाऱ्यापर्यंतचा प्रदेश) ५. सातपुडा पर्वतापर्यंतचा मध्य भारताचा मैदानी प्रदेश.

**कालिदासाच्या ग्रंथात** — कालिदासकृत बृहत्संहितानुसारी साहित्यातहि भारतवर्षाचे नऊ उपविभाग गृहीत धरले असून, त्यापैकी उत्तर कोसल, साकेत, शूरसेन, प्रतिष्ठान, काशी, विदेह, मगध, अंग, सुह्म, वंग, कलिंग, पांड्य, मलय, केरल, अपरांत, अनूप, पारसिक, हूणा कांबोज, कामरूप, मालव आदि देशांचे वर्णन त्याच्य, ग्रंथात आढळते.

**बहात्तर उपविभाग** —– स्कंद पुराणाच्या माहेश्वर खंडान्तर्गत कौमारिका खंडात भारतवर्षाचे बहात्तर उपविभाग वर्णिले आहेत. या वर्णनात बृहत्संहितेतील नवविभागात्मक भारतवर्षाची रचना मूलतः स्वीकृत केली असून, या उपविभागांचे प्रत्येकी आठ छोटे विभाग तेथे कल्पिले आहेत. गुजरातमधील खंबायतच्या आखातासभोवतालच्या प्रदेशास तेथे ' कौमारिका खंड ' म्हटले आहे. या ग्रंथमते शतशृंग राजाच्या कौमारिका नामक कन्येने स्वतःच्या आठ भावांच्या बहात्तर पुत्रांमध्ये हे उपविभाग वाटले होते. या नामावलीतील 'जहाहुति' (जाजाहुति), 'डाहल', 'तोमर', 'वरेंदुक',

'गुर्जरात्र,' 'मेवाड' आदि देशनामांवरून इ. स. ८ व्या शतकानंतर तिची रचना झाली असावी.

**देशनामावली** — उपरोक्त ग्रंथात निर्देशिलेले भारत वर्षाचे बहात्तर उपविभाग, आणि त्यांची ग्रामसंख्या पुढील-प्रमाणे होय. या नामावलीतील ७५ नामांपैकी तीन प्रक्षिप्त आहेत:— १. नीवृत् ( ४ कोटी ); २. वालाक ( १ कोटी ५० लक्ष ); ३. पुरसाहणक ( १ कोटी २५ लक्ष ); ४. अंधल (४ लक्ष); ५. नेपाल ( १ लक्ष ); ६. कान्यकुब्ज ( ३६ लक्ष ); ७. गाजणक ( ७२ लक्ष ); ८ गौड ( १८ लक्ष ) ९. कामरूप ( ९ लक्ष ); १०. डाहल ( ९ लक्ष ) ; ११. कांतिपूर ( ९ लक्ष ); १२. माचिपूर ( ९ लक्ष ); १३. ओड्डियाण ( ९ लक्ष ); १४. जालंधर ( ९ लक्ष ); १५. लोहपूर ( ९ लक्ष ); १६. पांबीपूर ( ७ लक्ष; ) १७. रटराज ( ७ लक्ष ); १८. हरिआल ( ५ लक्ष ); १९. द्रड ( ३ लक्ष ५० हजार ) २०. बंभणवाहक ( ३ लक्ष ५० हजार ); २१. नीलपूरक ( २१ हजार ); २२. मलविषय ( १ लक्ष); २३. नरेंदु ( १ लक्ष २५ हजार ); २४. अतिलांगल ( १ लक्ष २५ हजार ); २५. मालव ( १८ लक्ष ९२ हजार ); २६. सयंभर ( १ लक्ष २५ हजार ); २७. मेवाड ( १ लक्ष २५ हजार ); २८. बागुरि ( ८० हजार ); २९. गुर्जरात्र ( ७० हजार ); ३०. पांड्य ( ७० हजार ); ३१. जहाहुति ( ४२ हजार ); ३२. काश्मीर ( ६८ हजार ); ३३. कोंकण ( ३६ हजार ); ३४. लघु कोंकण ( १ हजार ४४० ); ३५. सिंध ( १० हजार ) ३६. कच्छ ( १ हजार ४४० ); ३७. सौराष्ट्र ( ५५ हजार ); ३८. कुरु ( ६४ हजार ); ३९. जय ( १ लक्ष ५० हजार ); ४०. विदर्भ ( ५ लक्ष ); ४१ मूलस्थान ( २५ हजार ); ४२. लाड ( २१ हजार ); ४३. अतिसिंधु ( १० हजार ); ४४. अश्वमुख ( १० हजार ); ४५. एकपाद ( १० हजार ) ४६. सूर्यमुख ( १० हजार ); ४७. एकबाहु ( १० हजार ); ४८. संजायु ( १० हजार ); ४९ शिवनामा ( १० हजार ), ५०. कालहव्यंजन ( १० हजार ); ५१. लिंगोद्भव ( १० हजार ); ५२. भद्र ( १० हजार ), ५३. देवभद्र ( १० हजार ); ५४. वर्धमान ( १४ हजार ); ५५. सिंहल ( १० हजार ); ५६. पांडु देश ( ३६ हजार); ५७. भयानक ( १ लक्ष ); ५८. यावन ( ४० हजार ); ५९. चट ( ३६ हजार ); ६०. विराटक ( ३६ हजार ); ६१. यमकोटि ( ३६ हजार ); ६२. रामक ( १८ कोटी ); ६३. तोमर ( १ लक्ष २५ हजार ); ६४. कर्नाट ( १ लक्ष २५ हजार ); ६५. युगल ( १ लक्ष २५ हजार ); ६६. स्त्रीराज्य ( ५ लक्ष ); ६७. पुलस्त्यविषय ( १० लक्ष ); ६८ कांबोज ( १० लक्ष ); ६९. कोशल ( १० लक्ष ); ७०. बाल्हिक ( ४ लक्ष ); ७१. लंका ( ३६ हजार ); ७२. मागध ( ६६ हजार ); ७३. पांगु देश ( ६० हजार ); ७४. वरेंदुक ( ३० हजार ); ७५. पक्षबाहु ( ४ हजार ) ( स्कन्द. माहेश्वर. कौ. ३९ ).

**भारतवर्षाचे नवखंड**—भास्कराचार्यांच्या सिद्धांतशिरोमणीमध्ये, तसेच मार्कंडेय आणि वायु पुराणात भारतवर्षाच्या नऊ परस्परागम्य समुद्रवेष्टित खंडांचा निर्देश आढळतो ( सिद्धान्त. ३·४१; मार्कं. ५०·७५; वायु. ४५·७८ ). या द्वीपांच्या भौगोलिक स्थानांविषयी मध्ययुगीन आणि अर्वाचीन अभ्यासकात विभिन्न मतांतरे असून, कनिंगहॅम यांच्या मते बृहत्तर भारतान्तर्गत आग्नेय आशियातील ब्रह्मदेश, मलाया, जावा, सुमात्रा, सिलोन आदि देशांचा निर्देश येथे अभिप्रेत असावा. परंतु भारताच्या दक्षिणेकडील बेटांची स्वतंत्र नामावली वायु पुराणात दिली असल्याने त्यांचा हा तर्क यथायोग्य वाटत नाही ( वायु. ४८ ).

अली यांच्या मते गंगा नदीच्या मध्यवर्ती खोऱ्यापासून नद्या, सरोवरे, घनदाट अरण्ये, वाळवंट, दलदल, दुर्लंघ्य पर्वत आदि नैसर्गिक सरहद्दींनी विभक्त झालेल्या भारतवर्षाच्याच आठ विभिन्न उपविभागांचा निर्देश येथे अभिप्रेत आहे. सप्तद्वीपा पृथ्वीच्या पौराणिक वर्णनाप्रमाणेच येथेहि ' सागरवेष्टित द्वीप ' ही संज्ञा ' नैसर्गिक अडथळा ' अशा लाक्षणिक अर्थाने उपयोजिली आहे. उदा. वायव्य भारतातील मक्रान प्रदेशाच्या एका बाजूस समुद्र, दुसऱ्या बाजूस सिंधु नदी, आणि अन्य दोन बाजूंस ओसाड वाळवंट आहे. भारतातील सिंधु आणि ब्रह्मपुत्रा नद्यांची खोरी, पूर्व आणि पश्चिम समुद्रकिनारे, तसेच दक्षिणेकडील द्वीपकल्पीय भाग या ना त्या भौगोलिक कारणाने गंगा खोऱ्यापासून विभक्त झाले आहेत. अशा व्यापक अर्थानेच त्यांना पौराणिक साहित्यात ' खंड ' म्हटले असावे.

अली याच्या उपरोक्त अनुमानानुसार पौराणिक साहित्यातील नवखंडांची भौगोलिक स्थाने पुढीलप्रमाणे होत :— **१. इंद्र द्वीप** ( ब्रह्मपुत्रा खोऱ्याचा पूर्वेकडील भाग ); **२. कशेरुमत् द्वीप** ( गोदावरी आणि महानदी त्रिभुज प्रदेशाच्या दरम्यानच्या पूर्व किनाऱ्याचा भाग); **३. ताम्रवर्ण द्वीप** ( कावेरी नदीच्या दक्षिणेकडील भारतीय द्वीपकल्प );

४. गभस्तिमत् द्वीप ( नर्मदा आणि गोदावरी नद्यांच्या दरम्यानचा डोंगराळ प्रदेश ); ५. नाग द्वीप ( नर्मदा आणि गोदावरी नद्यांच्या दरम्यानचा विंध्य–सातपुडा पर्वतांचा, आणि छोटा नागपूर पठाराचा प्रदेश ); ६. सौम्य द्वीप ( सिंधु नदीच्या पश्चिमेकडील समुद्रकिनारीचा प्रदेश ); अ. कटाह द्वीप ( वामन आणि गरुड पुराण; आधु. काठेवाड); ७. गंधर्व द्वीप (सिंधु नदीच्या पश्चिमेकडील गंधार देश); ७. अ. सिंहल द्वीप ( वामन आणि गरुड पुराण; आधु. सिलोन ); ८. वारुण द्वीप ( अरबी समुद्राच्या पश्चिम किनारीचा प्रदेश ); ९. कुमारी द्वीप ( गंगा नदीचे खोरे ).

# भारतवर्षाचे जनपदात्मक विभाजन

**जनपदात्मक देशविभाजन** — भारतवर्षाच्या खंडप्राय आकारमानामुळे, तसेच येथील अठरापगड लोकांच्या सांस्कृतिक, भाषिक, भौगोलिक, आणि आचारविचारांच्या विभेदांमुळे या देशाच्या प्रादेशिक एकात्मतेची समस्या अनादि कालापासून अत्यंत बिकट बनली आहे. एक महाराष्ट्राचेच उदाहरण घेतले, तर पश्चिम समुद्रकिनारीचा कोकण, दख्खन पठारमाथ्यावरील पश्चिम महाराष्ट्र, कृष्णा नदीच्या खोऱ्यातील मराठवाडा, आणि मध्यप्रदेशाच्या निकटवर्ती विदर्भ असे त्याचे पाच प्रमुख भौगोलिक आणि सांस्कृतिक भाग दिसतात. त्यातहि नवजात औद्योगीकरणामुळे मुंबईसारखे नागरी विभाग सांस्कृतिक दृष्ट्या महाराष्ट्राच्या अन्य ग्रामीण प्रदेशांहून अलग बनतात.

**सांस्कृतिक अस्मिता** — कोणत्याहि राज्याचे 'मंडल' ( इलाखा ), 'विषय' (जिल्हा), 'आहार' (तालुका) असे राज्यविभाग पुरातन कालापासून अस्तित्वात असले, तरी राज्यकारभाराच्या सोयीसाठी केलेली ही विभागणी उघड उघड कृत्रिम स्वरूपाची असून, त्यामधील विभिन्न लोकांची सांस्कृतिक अस्मिता आणि वेगळेपण यांचा विचार केलेला नसतो. उदा. ब्रिटीश राज्यकालातील मुंबई इलाख्यात सिंध, गुजरात, पश्चिम महाराष्ट्र आणि उत्तर कर्नाटक या पाच विभिन्न प्रांतांचे कोंडाळे राज्यकारभाराच्या सोयीसाठी एकत्र करण्यात आले होते. त्यापैकी सिंध हा स्वातंत्र्योत्तर कालात पश्चिम पाकिस्तानात गेला असून, अन्य चार उपविभागांचे स्वतंत्र भाषिक प्रांत बनले आहेत.

**जनपद म्हणजे संघराज्य** — भारतवर्षातील विभिन्न लोकसमूहांची सांस्कृतिक अस्मिता आणि या देशाची प्रादेशिक एकात्मता एकसमयावच्छेदकरून अबाधित ठेवण्यासाठी पाणिनीच्या अष्टाध्यायीत, कौटिलीय अर्थशास्त्रात, बौद्ध साहित्यात, तसेच महाभारत–पुराणादि ग्रंथात जनपदात्मक समाजरचनेचा तोडगा सुचविला आहे. वांशिक, भाषिक आणि सांस्कृतिक दृष्ट्या एकात्म अशा लोकसमूहांचे स्वायत्त संघराज्य म्हणजे जनपद होय. राजकीय दृष्टीने ही जनपदे कधी स्वतंत्र, तर कधी अन्य साम्राज्यात समाविष्ट असली, तरी त्यांच्या सांस्कृतिक एकात्मतेमुळे त्यांचे अस्तित्व शतकानुशतके अभंग रहात असे. अशा ५५ भारतीय जनपदांचा निर्देश पाणिनीच्या अष्टाध्यायीत, आणि २५० जनपदांचा निर्देश महाभारतात आढळतो. स्वातंत्र्योत्तर काळात करण्यात आलेली भारतांची भाषावार प्रांतरचना हा देशाच्या जनपदात्मक विभाजनाचाच एक नवा आविष्कार आहे.

मूलतः ग्रीक नगरराज्यानुसारी अशा जनपद राज्याची कल्पना वैदिक ग्रंथांनी सर्वप्रथम भारतात आणली, आणि कौटिलीय अर्थशास्त्र, पाणिनीय व्याकरण आणि बौद्ध साहित्याने त्यास नवी प्रतिष्ठा प्राप्त करून दिली. स्वकीयांची, तसेच परकीयांची नवनवीन जनपदे स्थापन करणे, हे राजाचे आद्य कर्तव्य असल्याचा सुस्पष्ट निर्देश कौटिलीय अर्थशास्त्रात आढळतो—

**भूतपूर्वमभूतपूर्वं वा जनपदं परदेशापवाहनेन ।**
**स्वदेशाभिष्यन्दवमनेन वा निवेशयेत् ॥**

( कौ. अ. २·१·१ ).

भाषिक आणि सांस्कृतिक एकात्मतेच्या चौकटीत एकत्र आलेले जनपदात्मक लोकसमूह स्वतःच्या, तसेच देशाच्या एकात्मतेस साह्य करतात, तसेच या लोकसमूहांची भावनिक एकात्मता भौगोलिक विभेदावर मात करू शकते, असा प्राचीन जनपदरचनाकारांचा मूलभूत समाजशास्त्रीय सिद्धांत आहे. उदा. महाराष्ट्र हा केवळ मराठी भाषिक लोकांचाच देश आहे, असे नव्हे, तर पंढरपूरच्या विठोबाची अथवा जेजुरीच्या खंडोबाची उपासना करणाऱ्यांचा, ज्ञानेश्वर-तुकारामादि संतांच्या अनुयायांचा, आणि छत्रपती शिवाजी महाराजांना प्रातःस्मरणीय विभूती मानणाऱ्यांचा देश आहे.

या चौकटीत बसणारा हरएक मराठीभाषीय मनुष्य हा महाराष्ट्राचा सन्माननीय नागरिक आहे. या प्रदेशाच्या भौगोलिक विभेदावर मात करणारा हा भावनिक स्नेहसंबंध आम्ही शतकानुशतके जतन करीत आलो असून, त्यामुळेच महाराष्ट्र हे एक स्वतंत्र जनपद बनले आहे. बदलत्या राजकीय परिस्थितीतहि येथून पुढे शतकानुशतके ते तसेच राहील.

**प्रादेशिक विकास**---स्वतःच्या साम्राज्यातील विभिन्न उपविभागांच्या समतोल विकासासाठी त्यांचे लोकसमूहात्मक गट ( जनपदे ) पाडून स्थानिक लोकांच्या साह्याने त्याचा विकास साधणे क्रमप्राप्त ठरत असल्याचे तत्त्व प्राचीन काळापासून सर्वमान्य झाले आहे. ग्रीक साहित्यातील नगर-राज्यांची; पाणिनि, महाभारतादि ग्रंथातील जनपदांची; मध्ययुगीन काळातील ग्रामपंचायतींची; आणि स्वातंत्र्योत्तर काळातील जिल्हापरिषद आणि पंचायत राज्यांची कल्पना समाजातील विभिन्न लोकसमूहांचा समतोल विकास साधण्याच्या दृष्टीने निर्माण झाली आहे. राज्यातील विभिन्न लोकसमूहांनी आपापल्या विभागाचा विभागीय विकास करावा, आणि राज्यसरकारने या विकासाची रूपरेषा केवळ ठरवून राज्यातील विभिन्न भागांच्या विकासाचा समतोलपणा अबाधित ठेवावा, अशी या विकासयोजनांची पूर्वापार पद्धती दिसते. असा समतोल विकास जेथे होत नाही, तेथे प्रादेशिक असंतोषाच्या उग्र समस्या उत्पन्न होतात. महाराष्ट्र राज्यात विदर्भ, मराठवाडा, कोकण आणि पश्चिम महाराष्ट्र असे ठळक प्रादेशिक विभाग असूनहि, प्रादेशिक असंतोषाचे स्वरूप येथे अत्यल्प आहे, हे या राज्याच्या समतोल विकासाचे द्योतक मानावे लागेल.

**महाजनपदयुग**—इ. स. पू. १०००–५०० हा भारतीय इतिहासातील कालखंड ' जनपद अथवा महाजनपदयुग ' नावाने सुविख्यात असून, त्याकाळी उत्तर भारताचा सारा प्रदेश सांस्कृतिक आणि सामाजिक दृष्टीने एकात्म अशा विभिन्न जनपदांनी व्यापला होता. जन्मदात्या मातेहूनहि श्रेष्ठ अशा मातृभूमीची कल्पना जनपदांच्या संदर्भातच भारतात प्रथम उदित झाली, आणि तेथील लोक अभिमानाने स्वतःस ह्या जनपदरूपी पृथ्वीचे पुत्र म्हणवून घेऊ लागले ( **माता भूमिः पुत्रो अहं पृथिव्याः; अ. वे. १२·१·१२** ). मातृभूमीविषयीच्या या नव्या भावनोद्रेकामुळे विभिन्न जनपदांमध्ये नवचैतन्य, सामाजिक सुव्यवस्था, तसेच नैतिक व धार्मिक आचरणाचे नवे आदर्श उत्पन्न झाले. भारतवर्षासंबंधीची राष्ट्रीय भावना आणि अस्मिता या देशात जनपदवासीयांच्या मातृभूमीविषयक प्रेमातूनच विकसित झाली. जनपदकालीन भारतवर्षाच्या राजकीय, सांस्कृतिक आणि सामाजिक जीवनाचे सर्वाधिक प्रमाणभूत आणि प्रामाणिक चित्रण पाणिनीय व्याकरण साहित्यात आढळते.

**धार्मिक आणि भाषिक क्रांती**—पाणिनीय व्याकरणमते भारतीय संस्कृतीचा सर्वांगीण विकास आणि प्रादेशिक एकात्मता, तसेच तत्रस्थ विभिन्न वर्णांना नियत जीवनक्षेत्रामध्ये आपापला विकास साधण्याची गुरुकिल्ली जनपदात्मक समाजरचनेने उपलब्ध करून दिली. तत्कालीन धार्मिक जीवनातील यज्ञप्रधान वैदिक तत्त्वज्ञान आणि सर्वसामान्य जनातील यक्ष-नाग, भूत पिशाच्चादिकांची उपासना या दोहोंचा समन्वय आणि भावनिक मिलाफ या समाजव्यवस्थेने घातला. वैदिक साहित्यातील उच्चभ्रू संस्कृत, आणि जनसामान्यांच्या अगणित लोकभाषांच्या समन्वयातून नव्या पाणिनीय संस्कृत भाषेचा विकास या काळात झाला. त्यायोगे विभिन्न भारतीय लोकसमूहांमधील भाषिक दुरावा नाहीसा होऊन नवी भावनिक एकात्मता, तसेच संस्कृत भाषेच्या शाखाभूत प्राकृत आदि लोकभाषांचा विकास झाला.

**सामाजिक क्रांती** – धर्म आणि भाषा याप्रमाणेच आर्थिक क्षेत्रातहि जनपदात्मक समाजरचनेने कृषिप्रधान ग्रामीण, आणि वाणिज्य व शिल्पप्रधान नागरी अशा परस्परपूरक द्विविध समाजरचनेची उभारणी करून क्रांती घडवून आणली. या काळातील समृद्ध शिल्पकृतींचा निर्देश यास्काचार्य आणि पाणिनि यांनी ' जानपदी ' नावाने केला असून, तत्कालीन शिल्पकारांच्या समृद्ध जीवनाचे वर्णन बौद्ध जातक साहित्यात आढळते.

**शैक्षणिक क्रांती** – जनपदकालीन चरण नामक पाठशालापद्धतीने देशाच्या शैक्षणिक जीवनामध्ये क्रांती केली. हरेक आचार्यांच्या शिष्योपशिष्यांनी गावोगाव जाऊन साऱ्या जनपदांमध्ये पाठशाळांचे जाळे विणले. हरेक गावात काठक आणि कालापक संहितांचे पठण सुरू झाले, ( **ग्रामे ग्रामे काठकं कालापकं च प्रोच्यते** ). ज्ञानाच्या या सार्वत्रिक प्रसाराने देशातील साहित्यास नवा बहर आला. ब्राह्मणग्रंथ, आरण्यक, उपनिषद्, श्रौतसूत्र, धर्मसूत्र, गृह्यसूत्र, व्याकरण, छंद, प्रातिशाख्य, महाभारत, वाल्मीकि रामायण, दर्शनशास्त्र आदि प्राचीन भारतातील श्रेष्ठतम साहित्य या काळातच उत्पन्न झाले. जनपदकालीन साहित्यनिर्मितीचा

हा अनावर उद्रेक ग्रीसमधील नगरराज्यकालीन साहित्योद्रेकाशी तंतोतंत जुळतो.

नैतिक दृष्टीने आदर्श सदाचरणी जीवनाचा नवा उच्चांक भारतीय समाजाने या काळी गाठला. श्रद्धा, मेधा प्रज्ञा, तप, अध्ययन, दीक्षा, सत्य, धर्म आदि सत्त्वगुणांच्या आचरणाच्या बाबतीत समाजातील हरेक व्यक्तिमात्रामध्ये चढाओढ लागली. उपनिषत्कालीन केकयराज अश्वपतिकृत स्वप्रजाजनांचे निम्नलिखित वर्णन तत्कालीन समाजस्थितीचे द्योतक मानावे लागेल :—

**न मे स्तेनो जनपदे, न कदर्यो, न मद्यपः :**
**नानाहिताग्निर्नाविद्वान्, न स्वैरी स्वैरिणी कुतः ॥**

( छां. उ. ५. ११·४; मै. उ, १·४ ).

( माझ्या राज्यामध्ये धनलोभी, चोर, मद्यपी, अग्निहोत्र न करणारा, अविद्वान, स्वैराचारी असा एकहि स्त्रीपुरुष नागरिक नाही ).

**नवसमाजरचनेचा क्रांतिकारक प्रयोग —** भारतातील विभिन्न जनपदांच्या भौगोलिक सीमारेषा याच काळी सुनिश्चित होऊन, त्यांचा क्षत्रिय शासक वर्ग ' जनपदिन् ' नावाने सुविख्यात झाला. समाजातील विभिन्न वर्ग (गोत्र) सुसंघटित झाले. विभिन्न जनपदांतील स्त्रीपुरुषांची व्यक्तिनामेहि जनपदभेदानुसार विभिन्न बनली. समाजातील हरेक समष्टीच्या विकासाला वाव मिळून विभिन्न गोत्र, चरण, संघ, शिल्पकार सुसंघटितपणे स्वतःचा विकास करून घेऊ लागले, आणि त्याचीच परिणती उत्तरकालात विभिन्न जातीजमातीं निर्माण होण्यात झाली. पाणिनीय व्याकरणातील ' एकक्त ', ' श्रेणिकृत, ' ' पूगकृत ', ' क्षत्रियकृत ', ' ब्राह्मणकृत ' आदि विभिन्न शब्दप्रयोगांमध्ये समाजातील विभिन्न जातीजमातींना सुसंघटित होण्याचा आदेश असून, अशा विभिन्न संघटनाच्या ' संहति ' ( एकीकरण ) ने विराट भारतवर्षाची निर्मिती तेथे वर्णिली आहे. स्वतःचा स्वायत्त विकास करणाऱ्या, परंतु अंतर्यामी एकात्म ध्येयधारणांच्या स्नेहरज्जूंनी बद्ध अशा भारतीय संघराज्याचे मानचित्र तेथे अभिप्रेत असून, नवसमाजरचनेचा हा क्रांतिकारक प्रयोग ही जनपदप्रधान समाजरचनेची सर्वात मोठी सांस्कृतिक कामगिरी होय.

वैदिककालीन लोकसमूहप्रधान ( संघ ) समाजरचनेतून उत्स्फूर्त झालेली जनपदात्मक समाजरचना ( इ. स. पू. १०००–५०० ) भारतीय सांस्कृतिक आणि सामाजिक जीवनातील एक सुवर्णयुग असून, कालांतराने तीमध्ये अनेक स्थित्यंतरे होऊनहि तिचे मूलस्वरूप अबाधित राहिले. परिणामी ग्रीसमधील नगरराज्यांपेक्षा भारतीय जनपदराज्यांचा सांस्कृतिक प्रभाव अधिक महत्त्वपूर्ण आणि चिरकालीन ठरला.

**जनपद आणि लोकसमूह नामांची एकात्मता —** पाणिनीच्या मते जनपदसंस्थापक लोकसमूहनामावरून जनपदनामे सिद्ध होत असून, त्यामुळेच त्याचा नेहमी बहुवचनी निर्देश असे ( जसे–पंचालाः ). उत्तरकालात लोकसमूहांची नावे मागे पडून जनपदनामेच अधिक सुविख्यात झाली. त्यामुळेच ' पंचाल 'ची व्युत्पत्ती पाणिनीने ' पंचाल जनपदवासी लोक ' अशी देऊन येथील पूर्वकालीन क्षत्रिय अधिराज ' पंचालाः ' नावाने सुविख्यात असल्याची पुस्ती जोडली आहे. अग्रवाल यांच्या मते एकराज जनपदांचे संघराज्यात परिवर्तन झाल्याचा हा परिणाम असावा.

जनपदनामे आणि लोकसमूहनामे यांची एकात्मता दर्शविणारी महाभारत आणि पौराणिक साहित्यातील काही प्रमुख उदाहरणे खाली दिली आहेत. तीमधील कंसाबाहेरील नाव लोकसमूहाचे आणि कंसातील नाव जनपदाचे आहे.— **१. काशी** ( काशि ); **२. अवंती** ( अवंती; आधु. पश्चिम माळवा पठार ); **३. कालतोय** ( कलात ); **४. गांधार** ( गंधार; आधु. काबूल नदीचे खालचे खोरे आणि सॉल्टरेंज पठार ); **५. बर्बर** ( बर्बर; आधु. सिंधु नदीचा त्रिभुज प्रदेश ); **६. तुषार** ( तुखार; आधु. तोची खोरे ); **७. लंपाक** ( लम्घान ). **८. काश्मीर** ( कश्मीर ); **९. कुलूत** ( कुलु ); **१०. मलद** ( मालद; आधु. पश्चिम बंगाल ); **११. प्राग्ज्योतिष** ( प्राग्ज्योतिष; आधु. ब्रह्मपुत्रा खोरे ); **१२. ताम्रलिप्तिक** ( ताम्रलिप्ती; आधु. ताम्लुक ); **१३. मगध** ( मगध; गंगा नदीच्या दक्षिणेकडील आधु. बिहार ); **१४. नासिक्य** ( नासिक ); **१५. कच्छिय** ( कच्छ ); **१६. सौराष्ट्र** ( सौराष्ट्र ); **१७. अर्बुद** ( अर्बुद; आधु- अबू पर्वत ); **१८. केरळ** ( केरळ ); **१९. कुमार** ( कन्याकुमारी ); **२०. महाराष्ट्र** ( महाराष्ट्र ); **२१. कलिंग** ( कलिंग ); **२२. विदर्भ** ( विदर्भ ); **२३. मालव** ( मालव, आधु. माळवा पठार ) **२४. मेकल** ( मेकल ); **२५. उत्कल** ( उत्कल; आधु. ओरिसा ); **२६. तोषल** ( तोसली, आधु. ओरिसा ).

**देशनामांचे प्रकार —** लोकसमूहांच्या नावांप्रमाणेच त्यांच्या वसाहतस्थानाच्या भौगोलिक वर्णनावर आधारित अनेक देशनामप्रकार पाणिनीने वर्णिले असून, त्यापैकी

विशेष उल्लेखनीय पुढीलप्रमाणे होत :— १. 'कच्छ' अंत्यशब्दयुक्त समुद्रकाठचे देश ( जसे—दारुकच्छ; पिपलीकच्छ; पा. सू. ४·२·१२६ ); २. 'अग्नि' अंत्यशब्दयुक्त क्षारयुक्त प्रदेश ( जसे—विभुजाग्नि; कांडाग्नि; पा.सू.४·२·१२६ ); ३. 'कूल' अंत्यशब्दयुक्त नदीकाठचे देश ( जसे—कुभाकूल; गोमतीकूल; पा. सू. ६·२·१२६ ); ४. 'गर्त' अंत्यशब्दयुक्त विवरयुक्त देश ( जसे—त्रिगर्त; चक्रगर्त; पा. सू. ४·२·१२६ ); ५. 'पारे' आद्याक्षरयुक्त नदीपलीकडचे देश ( पारेविशोक; पारेवितस्त; राज. ६·१३०; ७·१६०७ ).

**ऋग्वेदातील लोकसमूह**—या ग्रंथात वायव्य भारत, पंजाब आणि गंगा-यमुना खोऱ्यातील अनु, द्रुह्यु, पूरु, तुर्वसु, यदु हे पंचजन, तसेच दाशराज्ञ युद्धात भाग घेणारे अलिन, भलानस, पक्थ, वृषिण आणि शिबि हे अन्य पाच लोकसमूह ( ऋ. ७·१८·७ ) प्रामुख्याने वर्णिले आहेत. त्याशिवाय क्रिवि ( पौराणिक पांचाल ), मूजवंत, आर्जिक, गंधारी, भरत, तृत्सु, आणि उशीनर या आर्य, तसेच कीकट, पारावत, सिम्यु आणि पणि या अनार्य लोकसमूहांचा निर्देशहि या ग्रंथात आढळतो.

**ऋग्वेदोत्तर वैदिक साहित्यात** — या ग्रंथकाळी झालेल्या आर्य संस्कृतीच्या विस्तारामुळे, तसेच नव्या वसाहतीकरणामुळे ऋग्वेदात न उल्लेखिलेल्या निम्नलिखित नव्या लोकसमूहांचा निर्देश या साहित्यात आढळतो :—१. कुरु आणि पांचाल ( का. सं. ३·२; बृ. उ. ६·१·१; छां. उ. ५·३१ ); २. वश ( ऐ. ब्रा. ८·१४ ); ३. काशि; ४. कोसल; ५. विदेह ( बृ. उ. ३·८·२; पं. ब्रा. २५. १०·१७ ); ६. मगध ( श. ब्रा. १·४·१·१०; अ. वे. ५·२२·१९ ); ७. अंग ( अ. वे. ५·२२·१४ ); ८. पुंड्र ( ऐ. ब्रा. ७·८ ); ९. वंग ( ऐ. आ. २·१·१ ); १०. मत्स्य ( श. ब्रा. १३·५·४·९ ). ११. सुत्वन ( ऐ. ब्रा. ८·१४ ); १२. पुलिंद ( ऐ. ब्रा. ७·१८ ); १३. विदर्भ ( ऐ. ब्रा. ७·३४ ); १४. अंध्र ( ऐ. ब्रा. ७·१८ ); १५–१६. शबर, मूतिब ( ऐ. ब्रा.७·१८ ); १७-१९. कलिंग, अवंती, सौराष्ट्र ( बौ. ध. १·१·२· १३–१५ ).

उपरोक्त लोकसमूहांच्या नावांवरूनच कालांतराने त्या त्या वसाहतींची देशनामे सिद्ध होऊन प्राचीन इतिहासात ती अमर झाली ( उदा. काशि, विदर्भ, अंग जनपदे ). बौद्ध, जैन आणि पौराणिक साहित्यातील भारताच्या सोळा महाजनपदांची कल्पनाहि या लोकसमूहांवरूनच उत्क्रांत झाली.

**नागरी संस्कृतीचा विकास** — महाभारत आणि पौराणिक काळी राजकीय, सांस्कृतिक आणि धार्मिक दृष्ट्या प्रगल्भ झालेल्या भारतवर्षात अनेक सुप्रतिष्ठित राज्यविभाग, राजधान्या, लष्करी ठाणी आणि तीर्थस्थाने निर्माण झाली. परंतु या बदलत्या परिस्थितीतहि वैदिककालीन लोकसमूहप्रधान समाजरचना तशीच कायम राहिली. महाभारतात निर्देशिलेली जनपदे एका अर्थाने पूर्वापार वैदिक वसाहतीच होत्या. या लोकसमूहप्रधान समाजरचनेच्या आधारे झालेल्या भारताच्या आर्थिक, सामाजिक आणि सांस्कृतिक प्रगतीचे, ब्राह्मण, क्षत्रिय आदि ज्ञातींच्या पराक्रमांचे, तसेच उद्योगधंद्याच्या विकासाचे प्रतिबिंब उत्तरकालीन वैदिक साहित्यात, तसेच महाभारतात दिसते.

**जनपदनामावली** — मध्य आशियातील कंबोजपासून दक्षिण भारतापर्यंत, तसेच पश्चिम भारतातील सिंधुसौवीर, आणि कच्छपासून पूर्व भारतातील अंग, वंग, कलिंग आणि सूरमसपर्यंत पसरलेल्या भारतवर्षान्तर्गत सुमारे २५० जनपदांची नामावली महाभारत भीष्मपर्वात आढळते. महाभारत कर्णपर्वमते कौरव, पांचाल, शाल्व, मत्स्य, नैमिष, चेदि, शूरसेन, मगध, कोशल, अंग, गंधार आणि मद्रक हे लोकसमूह आणि जनपदे त्याकाळी विशेष पुढारलेली होती. पौराणिक साहित्यातील भुवनकोशात भारतातील १७५ जनपदांची नामावली आढळते ( वायु. ४५; मत्स्य. ११४; ब्रह्माण्ड. ४९; वामन. १३; मार्क. ५७ ).

**बौद्ध साहित्यात**—भारतातील विभिन्न जनपदांपैकी सोळा मोठी जनपदे बौद्धकाळी 'महाजनपद' नावाने ओळखली जात असून, अंगुत्तर निकायमते त्यांची नावे पुढीलप्रमाणे होती :-१. अंग; २. मगध; ३. काशि; ४. कोशल; ५. वज्जि ( वृजि ); ६. मल्ल; ७. वत्स; ८. चेदि; ९. कुरु; १०. पंचाल; ११. मत्स्य; १२. शूरसेन; १३. अश्मक; १४. अवंती; १५. गंधार; १६. कंबोज ( अङ्गुत्तर. १·२१३; ४·२५२; २५६; २६० ). यापैकी वायव्य भारतातील गंधार आणि कंबोज जनपदांचा अपवाद वगळता, अन्य सारी मध्यप्रदेशात ( गंगा-यमुना खोरे ) होती. त्यापैकी मगध, वत्स, कोशल आणि अवंती जनपदे सर्वाधिक बलाढ्य होती.

दीघ निकायमध्ये अश्मक, अवंती, गंधार आणि कंबोज ही चार जनपदे वगळून, अन्य बारा महाजनपदांचा निर्देष आढळतो ( दीघ. २·२०२ ). चुल्लनिद्देसमधील जनपद-

नामावलीमध्ये 'कलिंग'चा अंतर्भाव नव्याने केला असून, गंधारऐवजी 'योन' ( यवन ) चा निर्देश तेथे आढळतो ( चुल्ल. २·३७ ). इंद्रीय जातकात भारतातील निम्नलिखित जनपदांचा निर्देश आढळतो :– १. सुरट्ठ ( सुराष्ट्र ); २. लंबचूलक; ३. अवंती; ४. दक्षिणापथ; ५. दंडकारण्य; ६. कुंभवती नगर; ७. अरंजरगिरि ( जा. ३·४६३ ).

बौद्ध साहित्यात अन्यत्र कलिंग ( राजधानी–दंतपुर ) अश्मक ( राजधानी–पौदन्य ); अवंति ( राजधानी-माहिष्मती ); सौवीर ( राजधानी-रोरूक ); विदेह ( राजधानी-मिथिला ); अंग ( राजधानी-चंपा ); काशी ( राजधानी–वाराणसी ) या सात जनपदांचा निर्देश आढळतो.

बौद्ध साहित्यात निर्देशिलेल्या षोडश महाजनपदांव्यतिरिक्त अन्य अनेक जनपदे त्याकाळी अस्तित्वात होती. कोशलच्या उत्तरेस आणि मल्लच्या वायव्येस 'शाक्य' जनपद ( आधु. नेपाळ, तराई; राजधानी–कपिलवस्तु ) असून, त्यानजिकच 'कोलिय' ( राजधानी–रामग्राम ), 'मोरिय' ( राजधानी-पिप्पलीवन ), 'बुलि' (राजधानी–अल्लकप्प ), 'भर्ग' (राजधानी-सुंसुमार), 'कलाम' ( राजधानी-केसपुत्त ) आदि जनपदे होती. गंधार, कुरु आणि मत्स्य यांच्या दरम्यान उत्तरेस केकय, मद्रक, त्रिगर्त आणि यौधेय, आणि दक्षिणेस सिंधुसौवीर, शिबि आणि अंबष्ठ जनपदे होती.

महावस्तूमध्ये षोडश महाजनपदांची सुस्पष्ट नामावली नसली ( महा. २·२ ), तरी या ग्रंथमते गौतम बुद्धाने अंग, मगध, वज्जि, मल्ल, काशि, कोशल, चेदि, वत्स, मत्स्य, शूरसेन, कुरु, पंचाल, शिबि, दशार्ण, अस्सक, अवंती या भारतातील सोळा मोठ्या देशांमध्ये बौद्ध धर्माचा प्रसार केला होता ( महा. १·३४ ). 'गंधार' आणि 'कंबोज' या परंपरागत नावांऐवजी येथे 'शिबि' आणि 'दशार्ण' या नव्या जनपदनामांचा अंतर्भाव दिसतो.

**जैन साहित्यात**—बौद्ध साहित्याहून उत्तरकालीन अशा जैन भगवतीसूत्रामध्ये भारतातील निम्नलिखित षोडश महाजनपदांची नामावली आढळते :—१. अंग; २ बंग ( वंग ); ३. मगह ( मगध ); ४. मलय; ५. मालव; ६. अच्च; ७. वच्च ( पाली-वंश ); ८. कोच्च; ९. पाढ; १०. लाढ ( राढ ); ११. बज्जि ( पाली-वज्जि ); १२. मोलि ( मल्ल ); १३. काशी; १४. कोसल; १५. अवह ( अवाह ); १६. सुमुत्तर ( सुह्मोत्तर ).

जन 'प्रज्ञापनी' ग्रंथात भारतातील २६ प्रमुख जनपदांची, आणि नेमिचंद्रकृत 'प्रवचनसारोद्धार–प्रकरण' ग्रंथात त्यांच्या राजधान्यांची नावे आढळतात. या दोहोंच्या तौलनिक परिशीलनाने डॉ. किर्फेल यांनी संकलित केलेली जैन साहित्यकालीन जनपदांची आणि त्यांच्या राजधान्यांची नावे पुढीलप्रमाणे होत :—१. मगध ( राजगृह, रायगिह ); २. अंग ( चंपा ); ३. वंग ( ताम्रलिप्ती, तामलित्ति ); ४. कलिंग ( कांचनपुर, कंचण ); ५. काशि ( बाणारसि ); ६. कोशल ( साकेत, साएय ); ७. कुरु ( गजपुर, गय ); ८. कुशार्थ ( सौरिक, सेरिपुर ); ९. पंचाल ( कांपिल्य ); १०. जंगल ( अहिच्छत्र ); ११. सौराष्ट्र ( द्वारवती; बारवई ); १२. विदेह ( मिथिला ); १३. वच्छ ( कौशांबी ); १४. शांडिल्य ( नंदिपुर ); १५. मलय ( भद्दिलपुर ); १६. वत्स ( वैराटपुर; बैराड, वच्छा ), १७. वरण ( अच्छापुरी ); १८. दशार्ण ( मृत्तिकावती, मत्तिआवई ); १९. चेदि ( शुक्तिमती; सोत्तिआवई ); २०. सिंधु ( वीतभय, वीभय ); २१. सौवीर ( मथुरा, महुरा ); २२. शूरसेन ( पापा, पावा ); २३. भृंग ( मासपुरी ); २४. कुणाल ( श्रावस्ती, सावत्थी ); २५. लाट ( कोटिवर्ष, कोडीवरिस ); २६. केकय ( श्वेतंबिका, सीविया ).

जैन 'हरिवंश पुराण', आणि 'महा पुराण' यांमध्ये अनुक्रमे १८ आणि ५३ जनपदांचा निर्देश असून, 'निशीथ चूरणि' ग्रंथात भारतवर्षातील १० महाराजधान्यांचा निर्देश आढळतो.

**पाणिनीय व्याकरणात**—बौद्ध साहित्यातील षोडश जनपदांपैकी नऊ जनपदांचा आणि बारा जानपदीय राजधान्यांचा निर्देश पाणिनीय व्याकरणात असून, या साहित्यमते भारताच्या प्राच्य आणि उदीच्य ( पौराणिक मध्य आणि प्राच्य देश ) भागात तत्काली निम्नलिखित एकराज ( राजशासित ) जनपदे होती :—१. कंबोज; २. गांधारि; ३. मद्र; ४. साल्वेय; ५. साल्व; ६. कलकूट; ७. कुरु; ८. प्रत्यग्रथ; ९. कोसल; १०. अजाद; ११. कुंति; १२. अवंति; १३. अश्मक; १४. काशि; १५. मगध; १६. कलिंग; १७. सूरमस; १८. सौवीर; १९. अंबष्ठ. पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यात विदेह, पंचाल, अंग, दार्व, नीप या अन्य पाच एकराज जनपदांचा निर्देश आढळतो.

उपरोक्त राजशासित जनपदांच्या जोडीला अन्य अनेक लोकशासित पर्वताश्रयी संघराज्ये पाणिनीच्या काळी अस्तित्वात असून ( आयुधजीविभ्यश्छ: पर्वते ), त्यापैकी त्रिगर्त, गब्दिका, युगंधर, कालकूट, भरद्वाज लोकसमूह कुलू–कांगडापासून डेहराडून–गढवाल कुमाऊँपर्यंतच्या पर्वतात;

आणि अभिसार, उरशा, दार्व, दरद, चित्रक, गंधार, कपिशा, बाह्लीक, मुंजायन, कंबोज, लंपाक, हारहूण संघ वायव्य भारतातील सिंधु नदीपासून कंबोज देशापर्यंतच्या पर्वतात निवास करीत असत.

**जोड जनपदे**—भौगोलिक दृष्ट्या एकमेकांनजिकची जनपदे पाणिनीच्या काळी संयुक्त नावाने ओळखली जात असत (जसे-अवंती-अश्मक; कुंति-सुराष्ट्र; चिंति-सुराष्ट्र; पा. सू. ६·२·३७). गोपथ ब्राह्मणात कुरु-पंचाल, अंग-मगध; काशि-कोशल; शाल्व-मत्स्य; शवस-उशीनर आदि जोड देशांचा निर्देश आढळतो (गो. ब्रा. १·२·१०). बृहदारण्यक उपनिषदात, तसेच पाणिनीच्या गणपाठात कुरु-पंचाल जोडदेशाचा निर्देश असून (बृ. उ. ३·१; पा. सू. ४·१·८६), महाभारत-काळी त्या दोघांचे संयुक्त राज्य (राजधानी–हस्तिनापुर) बनले. बौद्ध महावस्तूमध्ये अंग-मगध आणि शिबि-दशार्ण जोडदेशांचा निर्देश असून (महा. १·३४), महाभारतात सिंधु–सौवीर (शां. १०१·३), मद्र–गांधार (स. ४४·४७), वसाति-मौलेय (स. ५१·५२), दरद-दार्व (स. ५१·१३), शूर–वैयमक (स. ५१·५३), नीप–अनूप (स. ५१·२४), माद्रेय–जांगल (भी. ९·३९) आदि जोडदेशांचा निर्देश आढळतो. बौद्ध जातकात मद्र–केकय जोडदेशाचा निर्देश असून (जा. ६·२८०), अन्य प्राचीन साहित्यात दार्व–अभिसार, कपिश–कंबोज, गंधार–केकय, विदेह–मगध, मद्र–केकय, शिबि–उशीनर, चेदि–वत्स, मत्स्य-शूरसेन, वृजि–मल्ल आदि जोडदेशांचा निर्देश आढळतो.

**व्याख्या** — काशिका ग्रंथमते 'जनपद' म्हणजे 'ग्रामांचा समुदाय' असून (**ग्रामसमुदायो जनपदः**; काशिका. ४·२ १). येथे 'ग्राम' मध्ये नगरांचाहि अंतर्भाव दिसतो. कारण पाणिनिकालीन जनपदांमध्ये अनेक नगरे अस्तित्वात होती.

**भारतवर्षाचा केंद्रबिंदू** — सांस्कृतिक, राजकीय, भौगोलिक आणि भाषिक दृष्टींनी एकात्म (सजनपद; पा. सू. ६·३·८५) असे 'जनपद' (राष्ट्र) हे पाणिनिकालीन भारतवर्षाचा केंद्रबिंदू असून, ग्रीक पुरराज्यातील 'एक्रोपोलिस' (दुर्गाकृती नगर) सदृश तटबंदीयुक्त नगर हे या जनपदाचे केंद्रस्थान असे.

**ग्रीसमधील नगरराज्यांशी साम्य** — भारतातील जनपदांची घटना ग्रीसमधील पर्वतीय नगरराज्यांसदृश (इ. स. पू. ५००) होती. पर्वतीय खोऱ्यातील छोट्या, स्वायत्त आणि राजधानीप्रधान ग्रीक नगरराज्यांपैकी अथेन्स आणि स्पार्टा राज्यांनी अन्य नगरराज्ये स्वतःमध्ये सामावून विशाल साम्राज्ये स्थापिली. भारतातील मगध, कोसल, मद्र, गंधार आदि जनपदांचे महाजनपदांमध्ये रूपांतर याच पद्धतीने झाले होते.

**विभेद** — भारतीय जनपदे ग्रीसच्या तुलनेने अधिक विशाल भूप्रदेशामध्ये पसरली असून, त्यांचा राजकीय आणि सांस्कृतिक प्रभाव अधिक दीर्घकालीन आणि राष्ट्रीय एकात्मताकारक ठरला. भारतीय जनपदे ग्रीक नगरराज्यां-प्रमाणे पर्वतवेष्टित नसून, त्यांच्या सीमा (तदवधि) अन्य जनपदांनीच ग्रस्त बनत असत (**तदवधिरपि जनपद एवं गृह्यते न ग्रामः**; पा. सू. ४·२·१२४). त्यामधील ग्रामांना नगराइतकेच महत्त्व असून, जनपदाधिपती क्षत्रिय त्यामध्ये निवास करीत असत. त्यांचे 'जनपद' हे नावहि जानपद (ग्रामीण) संस्कृतिनिदर्शकच होते.

**जनपद कल्पनेचा विकास** — वैदिक साहित्यात 'जन-पद' संज्ञेचा निर्देश आढळत नाही. याचे उलट ऐतरेय ब्राह्मणात उत्तर कुरु आणि उत्तर मद्र जनपदांचा (ऐ. ब्रा. ८·१४), तसेच जैमिनीय, तैत्तिरीय आणि गोपथ ब्राह्मणात 'जनपद' संज्ञेचा निर्देश आढळतो. यावरून ब्राह्मणयुगाच्या अंतिम कालात जनपद राज्यपद्धतीचा उदय झाला असावा. पाणिनीच्या मते जागोजाग भटकणारे 'जन' (भटकी टोळी; ग्रीक 'गेनोस'), त्यांच्या विभाजनाने उत्पन्न होणारी 'कुले' (भटक्या टोळीतील कुटुंब; ग्रीक 'फ्रटे-रिस्'), या कुलांनी स्थापिलेले 'जनपदिन्' (लोकसमूह; ग्रीक 'फुले') आणि 'जनपदिन्'नी अनुकूल जागी वस-विलेले जनपद (राज्य; ग्रीक– 'पोलिस') हे जनपदस्थाप-नेच्या उत्क्रांतीचे टप्पे असत.

**क्षत्रियांचे अधिराज्य** — काशिकामते जनपदसंस्थापक आद्य क्षत्रिय कुले 'जनपदिन्' (**जनपदस्वामिनः क्षत्रियाः**) नावाने सुविख्यात असून, तेच जनपदांचे अधिराज असत. त्यांची ही अधिसत्ता त्यांच्या लोकसंख्येवर (कुलसंख्या) अवलंबून असल्याने ती ते हरप्रयत्नाने कायम ठेवीत. जातकमते लिच्छवि आणि चेदि जनपदांमध्ये ७७०७ आणि ६००० क्षत्रिये कुले होती.

पाणिनीच्या काळी बहुतांशी जनपदे राजशासित असून, त्यामधील राजे आणि लोक जनपदनामास 'अञ्' प्रत्यय लागून बनलेल्या तद्धित रूपांनी ओळखले जात असत (जसे–पञ्चाल – पाञ्चाल; पा. सू. ४·१·१६८). कात्यायनाच्या मते पाणिनीचा हा नियम राजशासित जनपदा-

तील क्षत्रियांनाच लागू असून, तेथील ब्राह्मण लोक याहून विभिन्न नावांनी ओळखले जात असत (जसे–पंचालि, वैदेहि).

**उपविभाग**—पाणिनीच्या मते जनपदांचे उपविभाग आणि तेथील लोक दिशावाचक संज्ञांनी ओळखले जात असत (जसे–पूर्व पंचाल, अपर पंचाल, दक्षिण पंचाल उपविभाग; आणि पूर्वमद्र आणि अपरमद्र लोक; पा. सू. ७·३·१३). यापैकी समस्त पंचाल जनपदाशी संबंधित वस्तू 'सर्वपांचालक' आणि उपविभागांशी संबंधित वस्तू 'अर्धपांचालक' नावाने ओळखल्या जात असत (पा. सू. ७·३·१२). जनपदांचा पूर्व, दक्षिण, पश्चिम आणि उत्तर दिशांकडील भाग 'पूर्वार्ध', 'दक्षिणार्ध' आदि नावांनी सुविख्यात असून, त्यांच्या सांस्कृतिक जीवनाचा विकास (जनपदैकदेश) समस्त जनपदांसमवेत (सर्वजनपद), तसेच स्वतंत्रपणे (पौर्वार्धिक, दाक्षिणार्धिक; पा. सू ४·३·७) होत असे. यावरून सांस्कृतिक दृष्ट्या एकात्म जनपदांच्या उपविभागांना स्वायत्त विकासाची संधीहि देण्यात येत असावी.

**मातृभूमीविषयी प्रेम** — वांशिक दृष्ट्या एकात्म (सावित्रीपुत्रक; पा. सू. ५·३·११६) आणि एकाच आद्य वसतिस्थानाच्या (अभिजन; पा. सू. ४·३·९०) जानपद लोकांना आपले जनपद आणि तेथील राजा यांविषयी अपार भक्ती वाटत असे. पाणिनीच्या मते असा जनपद-भक्त नागरिक जनपदनामसाधित बहुवचनी विशेषणाने ओळखला जात असे (जसे–अंग→ आंगक; पा. सू. ४·३·१००). मातृभूमी ही जन्मदात्या मातेहून श्रेष्ठतर असल्याच्या ग्रीक नागरिकांच्या नगरराज्यासंबंधीच्या भावनेचे पडसाद अथर्ववेदात आढळतात.

**धर्म** – जनपदकाली वैदिककालीन कर्मकांडप्रधान धर्माची जागा ग्रीक नगरराज्यासदृश सदाचरण, नीती, आणि परमेश्वराविषयीची श्रद्धा यांवर आधारित नव्या समाजाभिमुख (धारणा) आणि सदाचारप्रधान धर्माने घेतली. पाणिनीच्या '**धर्मं चरति धार्मिकः**' (धार्मिक लोक समाजोद्धारक धर्माचे आचरण करतात; पा. सू. ४·४·४१) या सूत्रात, तसेच महाभारतातील निम्नलिखित श्लोकात धर्माचा हाच व्यापक अर्थ अभिप्रेत आहे—

**नमो धर्माय महते, धर्मो धारयति प्रजाः।**
(म. उ. १३७·९).

**प्रज्ञेची उपासना**—उच्च श्रेणीच्या बुद्धिवादाची (प्रज्ञा) उपासना हे जानपद संस्कृतीचे अन्य एक वैशिष्ट्य असून, महाभारतमते असे प्रज्ञोपासक नागरिक 'प्राज्ञ' नावाने ओळखले जात असत (म. शां. ६७·२७). पाणिनीच्या अष्टाध्यायीमते समाजाचे विनयसंपन्न (वैनयिक) आचरण आदर्श समाजजीवनाचे अधिष्ठान असून (पा. सू. ५·४·३४; म. शां. ६४·४), महाभारतमते 'सौराज्य' (सुस्थिर राज्ययुक्त) आणि 'राजन्वत्' (आदर्श राजायुक्त) समाजातील नागरीकच असे आचरण करू शकत असत. या दोहोंच्या अभावी समाजात अराजक माजत असे (म. शां. ६८·६१).

**जनपद संस्कृती** — अथर्ववेदात पृथ्वीला विभिन्न धर्म आणि भाषाधारिणी म्हटले असले (अ. वे. १२·१·४५), तरी जनपदजीवनामध्ये भाषा, धर्म, आणि आर्थिक जीवनाची एकात्मता काटेकोरपणे पाळली जाई. शासनव्यवस्थेच्या बाबतीत हरएक जनपद स्वायत्त असले तरी भाषा, संस्कृती आणि धर्म यांमधील विभेद तेथे निषिद्ध मानला जाई. 'एककृत', 'श्रेणिकृत', 'पूगकृत' आदि विभिन्न शासनपद्धती त्याकाळी अस्तित्वात असल्या (पा. सू. २·२·५९), तरी एक देश, एक भाषा हे सूत्र हरएक जनपदात कटाक्षाने पाळले जाई (जसे–दरद–पैशाची भाषा; शूरसेन–व्रज भाषा; कोशल–अवधी भाषा; मगध–मागधी भाषा). जनपदातील स्थानिक भाषेमध्ये बौद्ध धर्मप्रसार करण्याची, तसेच तेथील यक्ष नागादींच्या उपासना अबाधित ठेवण्याची आज्ञा गौतम बुद्धाने दिली होती. कुरु आणि वृजि जनपदांतील सामाजिक आणि सांस्कृतिक वैशिष्ट्यांना पाणिनीय व्याकरणात 'कुरुगार्हपतम्' आणि 'वृजिगार्हपतम्' म्हटले आहे.

**चरितार्थांची साधने** — प्रज्ञा आणि हस्तकौशल्य या व्यक्तिगुणाधारित उपजीविकासाधनांना पाणिनीच्या अष्टाध्यायीत 'जानपदी वृत्ति' म्हटले असून (पा. सू. ४.१·४२), यास्काचार्यांच्या मते जानपदकाली कलाप्राविण्य आणि शास्त्रज्ञानामुळे सामाजिक प्रतिष्ठेचा लाभ होत असे (नि. १·५). प्रज्ञा आणि हस्तकौशल्यासंबंधीच्या या सर्वसमावेशक धोरणामुळे जनपदकाली शास्त्रकलादिकांचा अभूतपूर्व उद्रेक होऊन ही संस्कृती वैदिक संस्कृतीसदृश श्रेष्ठ बनली.

वैदिक साहित्येतर ज्ञानविज्ञानाची उपासना हे जानपद संस्कृतीचे प्रमुख वैशिष्ट्य असून, होमरकृत महाकाव्यांच्या परंपरागत अध्ययनाचा त्याग करून नवनवीन तत्त्वज्ञानशाखांचे, तसेच शिल्पकलांचे अध्ययन करणाऱ्या ग्रीक नागरिकांप्रमाणेच जानपद नागरिकांनी वैदिक साहित्येतर

बौद्ध, जैन तत्त्वज्ञानांचे अध्ययन आरंभिले. उपनिषदे, महाभारत आदि ग्रंथांचे प्रणयनहि याच काळात झाले.

**परचक्र-निवारण**—ग्रीक राज्यांप्रमाणेच भारतीय जनपदांमध्येहि परकीय आक्रमणांच्या निवारणार्थ युद्धसज्जता हे हरएक नागरिकाचे कर्तव्य मानले जाई. महाभारतात जनपदरक्षणार्थ (जनपदगुप्ति) उपयुक्त अशा 'दुर्ग', 'गुल्म', 'पुर', 'शाखानगर', 'आराम', 'उद्यान' 'नगरोपवन', 'आपण', 'विहार', 'सभा', 'आवसथ', 'चत्वर', 'राष्ट्र', 'बलमुख्य', 'सस्याभिहार', 'संक्रम', 'प्रकंठी', 'आकाशजननी', 'कडंगद्वारक', 'द्वार', 'शतघ्नी', 'भांडागार', 'आयुधागार', 'धान्यागार', 'अश्वागार', 'गजागार', 'बलाधिकरण' आदि नानाविध वास्तुविशेषांचा निर्देश आढळतो (म. शां. ६९.१–७१). या ग्रंथमते जनपद आणि नगर यांचे रक्षण हरएक स्त्री–पुरुष नागरिकाचे प्राप्त कर्तव्य मानले जात असे (म. शां. ६९.६३). सिकंदरच्या आक्रमणकाली जनपदांच्या सभापालाने युद्धसज्जतेचा इशारा करताच सहस्रावधी नागरिक सभाभवनस्थानी उपस्थित झाल्याचे वर्णन आढळते.

**राज्यशासन प्रकार**—जनपद राज्यांमध्ये 'राजशासित' (राजन्य, राजाधीन, एकाधीन; पा. सू. ६. २.३४) आणि 'संघशासित' (गण, संघ, अवयव, गणाधीन; पा. सू. ४.१.६१), अशा द्विविध शासनपद्धती अस्तित्वात असून त्यापैकी 'राजशासित' जनपदांचे राज्य राजा मंत्रिमंडळ आणि प्रजामंडळाच्या सल्ल्याने करीत असे (परिषद्‌वल; पा. सू. ५.२.११२; संधिमिश्र; पा. सू. ६.२.१५४). पाणिनीच्या मते गणाधीन जनपदांचे सुमारे ५० प्रकार असून (पा. सू. २.१.५९), त्यापैकी 'उत्सेधजीवी' (लूटमारीचा व्यवसाय करणारे), व्रात (पूग) लोकांच्या टोळ्या राजशासनाच्या दृष्टीने सर्वाधिक अप्रगत अवस्थेत होत्या. वायव्य भारतातील 'आयुधजीवी' संघराज्यातील पर्वतीय लोक (पा. सू. ४.२;१४३.५.३.५१) भाडोत्री सैनिकाचा पेशा करीत असत. महाभारतमते कृष्णाच्या वृष्णि सैन्यामध्ये १८ सहस्र व्रात सैनिक असून (म. स. १३.५५); ग्रीक नगरराज्यातील सहस्रावधी भाडोत्री सैनिक सिकंदरच्या सैन्यात सामील होते.

**राज्यशासन**—पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यमते जनपदातील राज्यशासनसभा (परिषद) विभिन्न राजांच्या नावाने सुविख्यात असून (जसे– चंद्रगुप्तसभा, पुष्पमित्रसभा), जातकमते तिचे ५०० सदस्य असत. जनताप्रतिनिधी, तसेच समाजातील प्रतिष्ठित आणि विद्वान लोकांचा तीमध्ये समावेश असे. संघराज्यातील परिषदेचे नेतृत्व मूर्धाभिषिक्त क्षत्रियांकडे (राजन्य) असून, महाभारतमते सुभद्राहरणाच्या संकटप्रसंगी वृष्णि–अंधक गणराज्यातील भोज, वृष्णि, अंधक आदि क्षत्रिय भोजन अर्धवट टाकून सभास्थानी आले होते (म. आ. २१२.१२).

पाणिनीच्या अष्टाध्यायीमते वयात आलेला सैनिकीशिक्षाप्राप्त 'कवचहर' क्षत्रियकुमार (पा. सू. ३.२.१०) सभापात्र (सभेय; सभ्य; पा. सू. ४.४.१०५) बनत असून, ग्रीक नगरराज्यातील सभांमध्येहि हाच नियम होता. आपापल्या कुलांचे प्रतिनिधित्व करणारे युवक 'राजा' गौरवोपाधीने सुविख्यात असून (म. स. १४.२), जातकमते लिच्छवि गणराज्यात अशा तऱ्हेचे ७७०७ राजे होते (जा. ६.५११). या राजांपैकी सुमारे २०००–३००० लोक सभेस उपस्थित असून, विशेष महत्त्वाच्या निर्णयार्थ ६००० प्रतिनिधींची गणसंख्या आवश्यक असे. अग्रवाल यांच्या मते अथर्ववेदातील ६००० सभासदयुक्त देवसभेचा निर्देश संघराज्यातील सभेसहि लागू पडतो (अ. वे. ११५.२). ग्रीक नगरराज्यातहि हेच नियम असून, अथेन्स येथील नगरराज्यातील (इ. स. पू. ४३१) ४२,००० नागरिकांपैकी प्रत्यक्षात २०००–३००० लोकच सभास्थानी उपस्थित असत. विशेष महत्त्वाच्या ठरावास ६००० नागरिकांच्या 'समग्रजन' सभेची मान्यता लागे.

**भौगोलिक उपविभाग**—पौराणिक साहित्यान्तर्गत भारतवर्षातील जनपदांचे भौगोलिक दृष्ट्या निम्नलिखि तीन भौगोलिक उपविभाग दिसतात :—

**(१) मैदानी प्रदेशातील जनपदे**—उत्तर भारतातील गंगा आणि सिंधु नद्यांची खोरी, तसेच पूर्व आणि पश्चिम समुद्रकिनारीच्या मैदानात पौराणिक भारतवर्षापैकी मध्य, उदीच्य, प्राच्य आणि अपरांत जनपदे होती. या जनपदांपैकी निम्नलिखित जनपदे सांस्कृतिक आणि राजकीय दृष्ट्या विशेष पुढारलेली होती :—(१) **मध्य देश**—१. मत्स्य; २. काशि; ३. कोशल; ४. कुरु; ५. पांचाल; ६. शाल्व; ७. शूरसेन; (२) **उदीच्य देश**—१. बाह्लीक; २. गंधार; ३. सिंधु; ४. सौवीर; ५. मद्र; ६. कैकेय; (३) **प्राच्य देश**—१. वृजि–विदेह; २. मगध; ३. अंग; ४, वंग; ५ सुह्म; (४) **अपरांत**—१. सौराष्ट्र. याचे उलट उदीच्य देशान्तर्गत हिमालय पर्वतातील पर्वतीय जनपदे, कुलूत (आधु. कुलू खोरे) आणि खश

लोकसमूह, तसेच अपरांत देशातील अर्बुद लोकांचे पर्वतीय जनपद सांस्कृतिक दृष्ट्या मागासलेले होते.

**( २ ) भारताच्या द्वीपकल्पीय प्रदेशातील जनपदे** — यामध्ये मुख्यत्वेकरून दखवन पठाराचा समावेश असून, पौराणिक दक्षिणापथ देशान्तर्गत जनपदे त्यामध्ये होती. त्यापैकी पांड्य, केरल, महाराष्ट्र, कलिंग, अश्मक, आणि अंध्र जनपदे सांस्कृतिक दृष्ट्या विशेष पुढारलेली होती.

**( ३ ) भारताच्या पर्वतीय प्रदेशातील जनपदे** — हिमालय पर्वत, तसेच विंध्य, अरवली, छोटा नागपूर टेकड्यांतील पौराणिक आणि विंध्य पर्वतीय जनपदांचा समावेश यांमध्ये असून, त्यापैकी उत्कल, दशार्ण, त्रिपुर, विदिशा आणि अवंती ही विंध्य पर्वतीय जनपदे सांस्कृतिक दृष्ट्या पुढारलेली होती. याचे उलट मेकल, निषध, हंसमार्ग, तामस ही वन्य आणि अन्य सारी पर्वतीय जनपदे मागासलेली होती.

# भारतवर्षातील नगरे आणि ग्रामे

**नगरे आणि ग्रामे** — पाणिनीच्या अष्टाध्यायीतील 'कापिशी', 'तक्षशिला', 'शाकल', 'हस्तिनापुर', 'सांकाश्य' आदि भारतीय नगरांच्या निर्देशावरून त्याचे काळी नगररचना आणि वास्तुशास्त्र बरेच प्रगत झाले असावे. महाभारत आदिपर्वमते युधिष्ठिराने इंद्रप्रस्थ नगरस्थापनासमयी त्या नगराच्या 'परिखा', 'प्राकार', 'राजप्रासाद', 'गोपुर', 'चत्वर', 'वीथी' आदींची आखणी ( नगरमापन ) वास्तुविद्याचार्यांच्या ( पाली–वत्थुविद्याचरिय; जा. १·२९७; ४·३२३ ) साह्याने केली होती ( म. आ. १९९·२७–२९; ३१ ). द्वादश वर्षे अखंड नगरनिवासाने शूद्रत्व येत असल्याचा निर्देश महाभारतात अन्यत्र आढळतो ( म. आश्व. परि. १·४·३२९०; ३२९५ ).

**नागरी संस्कृतीचा विकास**—ऋग्वेदात 'ग्राम' आणि 'पुर' ( गढी अथवा किल्ला ) यांचा निर्देश अनेकदा आढळत असला, तरी 'नगर' ( शहर ) या ग्रामनामप्रकाराचा निर्देश ब्राह्मण साहित्यात प्रथमच आढळतो. यावरून ऋग्वेदकाली छोट्या ग्रामांमधून रहाणारे लोक ब्राह्मणग्रंथकाली विशाल नगरांमध्ये राहू लागले असावेत. ब्राह्मण साहित्यात निर्देशिलेली भारतातील प्रमुख नगरे पुढीलप्रमाणे होत :–१. आसंदीवत् ( ऐ. ब्रा. ८·२१ ); २. कंपिल ( वा. सं. २३.१८; श. ब्रा. १३·२·८·३ ); ३. परिचक्रा ( श. ब्रा. १३·५·४·७ ); ४. कौशांबी ( श. ब्रा. १२·२·२·१३ ).

**नागरी संस्कृतीची प्रतिष्ठापना**—पौराणिक साहित्यमते पृथ्वीचा आद्य राजा पृथु वैन्याने भारतवर्षातील कृषी आणि नागरी संस्कृतीची प्रतिष्ठापना केली. त्याचे पूर्वी पृथ्वीतील लोक पशुपक्ष्यांप्रमाणे इतस्ततः भ्रमण करून, आणि प्राणिमात्रांची हत्या करून उदरनिर्वाह करीत असत. त्यामुळे पृथ्वीतील प्राणिसृष्टीचा क्षय होऊ लागला. हा क्षय थांबविण्यासाठी पृथूने कृषिव्यवस्थेच्या रूपाने उदरनिर्वाहाचा नवा मार्ग मनुष्यजातीस दाखविला. रानोमाळ भटकणाऱ्या रानटी लोकांना वसाहतीकरणाची नवी कला शिकवून पृथूने 'ग्राम', 'पुर', 'पत्तन', 'दुर्ग', 'घोष', 'व्रज', शिबिर', 'आकर', 'खेट', 'खर्वट' आदि नानाविध वसाहतप्रकारांची निर्मिती केली. या वसाहतींचे हिंसक प्राणी, चोर, तसेच शारीरिक आधिव्याधींपासून रक्षण करून त्याने पृथ्वीतील द्विपाद आणि चतुष्पाद प्राण्यांचे जीवन सुखी आणि समृद्ध बनविले ( भा. ४·१८ ).

**'नगर' अर्थाचे शब्द**—पाणिनीच्या अष्टाध्यायीत 'मोठे शहर' अशा अर्थाने 'नगर' अथवा 'पुर' संज्ञेचा प्रयोग केला असून ( पा. सू. ४·२·१२२; १४२ ), त्याचे मते भारताच्या 'प्राच्य' ( पूर्व ) आणि 'उदीच्य' ( वायव्य ) भागांमध्ये अशा तऱ्हेची अनेक नगरे त्याचेकाळी अस्तित्वात होती. प्राच्य भारतातील 'महानगर,' 'नवनगर', 'कास्तीर', 'अजस्तुंद' आदि नगरांचा निर्देश त्याचे ग्रंथात आढळतो.

पाणिनीच्या अष्टाध्यायीत 'नगर' आणि 'ग्राम' या विभिन्न अर्थाच्या भौगोलिक संज्ञा मानल्या असल्या ( पा. सू. ७·३·१४ ), तरी त्या दोहोंची शास्त्रशुद्ध व्याख्या तेथे आढळत नाही. याच ग्रंथात अन्यत्र नगर आणि ग्राम या संज्ञा समानार्थक मानल्या असून त्याहून छोट्या व्याप्तीची गावे ( कुत्सितग्राम ) 'घोष' ( पा. सू. ६·२·८५ ) 'स्थल' ( पा. सू. ६·२·१२६ ) आणि 'खेट' ( पा. सू. २·२·१२६='मालक' नानार्थ. २ ) नावांनी ओळखली जात असत. इ. स. पू. ३२७ च्या खरोष्ट्री शिलालेखातहि 'नगर' आणि

' पुर ' समानार्थक मानले आहेत (कॉर्पस्. इन्स्क्रि. २·१. २·१२).

उत्तरकालीन साहित्यात ' नगर ' आणि ' ग्राम ' संज्ञा अनुक्रमे ' महानगर ' आणि ' छोटे गाव ' अशा अर्थाने उपयोजिल्या असून, या उभय संज्ञांचे निम्नलिखित पाठभेदहि तेथे आढळतात :—

(१) **' नगर'चे पाठभेद—१. नग्रर** ( कनिष्काचा स. १२८ चा शाहजी - की - ढेरी करंडक लेख; कॉर्पस्. इन्स्क्रि. २·१·२·१३६ ); २. **णार** ( शिवसेन क्षत्रपाचा पंजाब ताम्रमुद्रिका खरोष्ट्री शिलालेख; कॉर्पस्. इन्स्क्रि. २·१·२·१०३ ); ३. **पत्तन** ( म. आश्व. परि. १·४·३२९० ); ४. **संवाह** ( पतञ्जलि. ३·३२१ ). प्राचीन साहित्यात अन्यत्र ' मठ ', ' आश्रम ' ' ऊर ' ( तामीळ ), ' शाला ', ' कोट्ट ', कुंडल ', ' वाट ', ' कंथा ', ' प्रस्थ ' यांचाहि ' नगर ' अर्थाने प्रयोग आढळतो ( पा. सू. ६·२·१२४ ).

( २ ) **' ग्राम ' चे पाठभेद—१. ग्रम** ( याकुबि खरोष्ट्री शिलालेख; कॉर्पस्. इन्स्क्रि. २·१·२·१३२ ); २. **गाम** ( भर्हुत शिलालेख; ल्यूडर्स सूची. क्र. ७६४; सांची शिलालेख; ल्यूडर्स सूची. क्र. २०३ ); ३. **पद्र** ( वड्र, स. १६८ चा शकरदर्रा खरोष्ट्री शिलालेख; कॉर्पस्. इन्स्क्रि. २·१·२·१६० ).

**नगरप्रकार**—प्राचीन साहित्यात निम्नलिखित नगरप्रकारांचा निर्देश आढळतो :—१. ' ह्रद ' अंत्यशब्दयुक्त तलावाकाठची गावे ( जसे—दाक्षिह्रद, पा. सू. ४·२·१४२ ); २. ' कंथा ' अंत्यशब्द-युक्त वायव्य भारतातील गावे ( जसे—चिहणकंथ; पा. सू. ६·२·१२४ ); ३. ' प्रस्थ ' अंत्यशब्दयुक्त कुरु देशातील गावे ( जसे—कर्कीप्रस्थ, शमीप्रस्थ; पा. सू. ४·२·११०;१२२ ); ४. 'निवास' संज्ञक भरभराटीची गावे ( पतञ्जलि ४·३·८९ ); ५. 'संग्रहण' संज्ञक दशग्रामा-न्तर्गत मध्यवर्ती ग्राम ( पतञ्जलि ३·३२१ ); ६. ' पौर ' नामक नगरप्रकार ( कौ. अ. २०·१३ ); ७. ' मुर ' नामक दुर्गप्रकार ( कौ. अ. १·१६·१२ ); ८. 'स्थानीय' नामक आठशे ग्रामान्तर्गत मध्यवर्ती नगर ( कौ. अ. ९३·११० ); ९. ' खर्वट ' संज्ञक पुराच्या ½ व्याप्तीचे ग्राम ( मार्कं. ४६·४५ ); १०. ' नगर ' संज्ञक अठरा-पगड वस्तीचे बाजारपेठेचे गाव ( मार्कं. ४६·४४ ); ११. ' पुर ' संज्ञक नद्यांच्या दुआबातील गाव ( मार्कं. ४६·४४ ); १२. ' वसति ' संज्ञक परदेशस्थ लोकांचे तात्पुरत्या वस्तीचे गाव ( मार्कं. ४६·४८ ), १३. ' शाखानगर ' नामक राजधानीबाहेरील सैन्यतळाचे गाव ( मार्कं. ४६·४६ ); १४. ' निवेश ' संज्ञक शत्रु-मुलखातील लष्करी तळाचे गाव ( वा. रा. कि. ४३·२४; म. स. १३·६१५ ); १५. ' निगम ' संज्ञक बाजारपेठेचे गाव ( जा. १·३४७ ); १६. ' बहिनगर ' नामक उपनगराचे गाव ( जा. १५१; तेलगु–' पेट्टा ' = कानडी 'पेटे' = संस्कृत–'पेठ' = मराठी–'पेठा'); १७. ' संनिवेश ' नामक तात्पुरत्या वस्तीचे गाव ( उदान. ७·९ ); १८. ' पत्तन ' संज्ञक सागरी बाजारपेठेचे गाव ( जसे—श्रीरंगपट्टण, मच्छलीपट्टण ); १९. ' पल्ली ' संज्ञक वन्य वस्तीचे गाव ( शुक्र. १·१९३ ); २०. ' नाडु ' संज्ञक ग्रामसमूह ( एपि. कर्ना. ८·४७७ ); २१. ' स्कंधावार ' संज्ञक लष्करी ठाण्याचे गाव ( पाल राजांचा शिलालेख; एपि. इंडि. १७·३१० ); २२. ' पुर ' अंत्यशब्दयुक्त राजस्थापित नगरे ( जसे—हुष्कपुर, कनिष्कपुर, प्रवरपुर, जयापीडपुर, मिहिरपुर; स्टाइन, राज. २·३६८ ).

**व्याख्या**—पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यावरील कैयट भाष्यमते ' प्राकार आणि परिखा ' युक्त ( दुर्गसदृश तटबंदी ), तसेच ' श्रेणी आणि धर्मसंपन्न लोकसमूह-स्थान ' म्हणजे नगर असून ( **प्राकारपरिखाऽन्वितं श्रेणी-धर्मयुक्तसंस्थानं नगरम्** ), कृषिकारांची वसाहत ' ग्राम ' संज्ञेने ओळखली जात असे ( **कर्षकपुरुषप्रधानो** देशः ग्राम; कैयट. ७·३·१४ ). बौद्ध महापरिनिब्बान सुत्तातहि हीच व्याख्या दिली असून, या ग्रंथमते पाटलि-पुत्र नगरासभोवतालची परिखा ( खंदक ) गौतमघाट संज्ञक पुलाने ओलांडून, गौतम बुद्ध गौतमद्वार नामक प्रवेश-द्वाराने त्या नगराप्रत गेला होता ( दीघ. २·८६ ). यशोधरकृत वात्सायन कामसूत्रभाष्यमते आठशे ग्रामांचे मध्यवर्ती व्यवहारस्थान म्हणजे नगर असून ( **अष्टशत ग्राममध्ये व्यवहारस्थानं नगरम्** ), मार्कंडेयमते अनेक ज्ञातींचे आणि कारागिरांचे देवपूजित निवासस्थान आणि व्यापारी विनिमयस्थान म्हणजे नगर होय.

मार्कंडेयमते स्वकष्टार्जित संपत्तीने समृद्ध बनलेल्या कृषिकारांनी आणि शूद्रांनी शेतामध्ये वसविलेली वसाहत म्हणजे ग्राम असून ( मार्कं. ४६.४७ ), हस्तिन् राजाच्या स. ५०८ च्या सुमरा स्तंभलेखमते ग्रामांचा प्रमुख ' ग्रामिक ' नावाने ओळखला जात असे. मराठीभाषीय ' पाटील ', गुजरातीभाषीय ' पटेल ', आणि कानडी-

भाषीय ' गौड ' हे समानार्थक शब्द आहेत ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३·२१·१२ ). गुप्तसम्राट जीवितगुप्त ( द्वितीय ) च्या देव बरणार्क शिलालेखात ' ग्रामप्रमुख ' अशा अर्थाने ' भोजक ' वैकल्पिक संज्ञेचा निर्देश असून, ग्रामहिशेबनिसास तेथे ' तलवाटक ' ( आधु. तलाठी ) म्हटले आहे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३·२·२१७ ).

**व्याप्ती**—प्राचीन साहित्यात सर्वत्र ग्रामांची व्याप्ती सुस्पष्टपणे निर्देशिली असली, तरी नगरांच्या व्याप्तीचा सुस्पष्ट निर्देश तेथे आढळत नाही. पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यमते लोकसंख्येच्या परिमाणाने नगर आणि ग्राम यांमधील विभेदाची चिकित्सा करणे व्यर्थ आहे ( पतञ्जलि. ७·३·१४ ). शुक्रनीतिमते एक कोस मनुष्यवसाहतीचा भाग म्हणजे ग्राम होय ( **भवेत् क्रोशात्मको ग्रामः**; शुक्र. १·१९३ ). कौटिलीय अर्थशास्त्रमते कृषिकार आणि शूद्र यांच्या १००–५०० गृहांचा समूह म्हणजे ग्राम होय.

अग्रवाल यांच्या मते पाणिनीच्या काळी पूर्व भारतातील ग्रामे छोट्या लोकवस्तीची असून, तेथील नगरे खऱ्या अर्थाने मोठी शहरे होती. याचे उलट वाहीक ( वायव्य भारत आणि पंजाब ) देशात दहा हजार वस्तीची नगरसदृश ग्रामे अस्तित्वात असून, ग्रीक साहित्यमते अशी पाचशेहून अधिक ग्रामे सिकंदराच्या काळी या भागात होती. पूर्व आणि वायव्य भारतातील परिभाषाविभेदामुळेच पाणिनीने भारतातील ग्रामनामांचे ' पूर्वग्राम ' आणि ' वाहीक-उदीच्य ग्राम ' असे दोन उपविभाग वेगळे मानले आहेत. या दोन उपविभागांपैकी वाहीक आणि उदीच्य ग्रामांची माहिती पाणिनीला विशेष असल्याने त्यांचे सविस्तर विवेचन त्याच्या ग्रंथात आढळते.

**ग्रामस्थापना** — कौटिलीय अर्थशास्त्रमते परदेशी लोकांना सन्मानपूर्वक पाचारून ( **परदेशापवाहनेन** ), अथवा स्वराज्यातील दाट वस्तीच्या भागातील लोक स्थलांतरित करून ( **स्वदेशाभिष्यन्दवमनेन** ), नव्या ग्रामांची स्थापना अथवा ओसाड गावाची पुनःस्थापना करण्यात येई, ( **भूतपूर्वं अभूतपूर्वं वा** ), त्याचे काळी हरएक ग्राम सरासरी १००–५०० शेतकरी अथवा शूद्र कुटुंबांचे असून, त्याची व्याप्ती १-२ कोस म्हणजे स्थानिक नागरिकांना सुसंघटितपणे आत्मरक्षण करण्याइतपत सुटसुटीत असे. गावांच्या सीमारेषा नदी, पर्वत, वने, निवडुंग ( गृष्टि ); गुंफा, बंधारे ( सेतुबंध ) आदींनी, अथवा शाल्मलि, शमी, आणि क्षीरवृक्षांनी आखण्यात येत असून, नूतनस्थापित ग्रामांना राजा करांच्या बाबतीत सवलती देत असे.

उपरोक्त ग्रामांच्या रक्षणासाठी दहा, दोनशे, चारशे आणि आठशेंचे स्वतंत्र गट पाडून, त्यांच्या रक्षणार्थ ' संग्रहण ', ' खार्वाटिक ', ' द्रोणमुख ' आणि 'स्थानीय' संज्ञक दुर्ग बांधण्यात येत. याचे उलट राज्याच्या सीमारक्षणासाठी ' अंतपाल ' नामक सरहद्दरक्षकांच्या नेतृत्वाखाली स्वतंत्र दुर्ग असत. राज्याच्या अंतर्भागाचे रक्षण ' वागुरिक ' ( द्वाररक्षक ), ' शाबर ' ( धनुर्धर ), ' पुलिंद ' ( शिकारी ), ' चंडाल ' आणि ' अरण्यचर ' ( वन्य जमाती ) आदि लोक करीत.

**व्यापारी गांवे**— उपरोक्त ग्रामांच्या जोडीला राज्यातील विभिन्न खाणी, कारखाने, इमारती लाकडांची वनेपशुसंवर्धन आणि व्यापारी केंद्रस्थानी नवे रस्ते आणि जलमार्ग तयार करून बाजारपेठांची नवी गावे ( पुण्यपत्तन ) वसविण्यात येत असत. अरण्ये, इमारती आणि खाणी या राज्याच्या उत्पन्नांच्या प्रमुख साधनांचे रक्षण, परिवर्धन आणि व्यवस्थापन हा या नगरस्थापनेचा प्रमुख हेतू असे. या नगरांच्या पाणीपुरवठ्यासाठी विभिन्न जलाशय ( सेतु ) खोदण्यात येत असून, ते काम स्वयंस्फूर्तीने करणाऱ्या ग्रामस्थांना राजा भूमी, इमारती लाकूड आदींचे साह्य करीत असे. तीर्थक्षेत्रे ( पुण्यस्थान ) आणि उपवनांच्या रचनेच्या बाबतीतहि राजदरबारी उदार धोरण असे. या सहकारी ( सामूहिक ) बांधकामात ( संभूय सेतुबंध ) भाग घेऊ न शकणारा ग्रामस्थ आपले नोकर आणि बैलजोड्या या कामासाठी पाठवी. कामावर असेपर्यंतचा त्यांच्या योगक्षेमाचा खर्च राजा करी.

**ग्रामरचना** – पाणिनिकालीन ग्रामे वने, मुरमाड प्रदेश ( कठिन ), नद्या, जंगल आणि पर्वतमय प्रदेश ( प्रस्तार ), आदींनी वेढिली असून ( पा. सू. ४·४·७२ ); त्यामधील कृषिकारांच्या गवती छप्परयुक्त झोपड्या ( छदि; पा. सू. ५·१·१३ ) ' कुटिर ' नावाने ओळखल्या जात असत ( पा. सू. ५·३·८८ ). त्यापैकी प्रत्येकीत स्वतंत्र कुटुंब ( गार्हपत ) निवास करीत असून, हा झोपड्यांचा समूह ' वसति ' नावाने ओळखला जाई ( पा. सू. ४·४·१०४ ). ग्रामांमध्ये नागरिकांसाठी ' कूप ' असून ( पा. सू. ३·३·७४ ), कूपप्रक्षालकांना ' उदगाह ' ( उदकगाह ) म्हणत असत ( पा. सू. ६·३·७ ). विभिन्न ग्रामांचा समूह ' ग्रामता ' सामूहिक नावाने ओळखला जाई.

ग्रामांच्या बहिर्भागात निम्नलिखित भूमिप्रकार विखुर-

लेले असत:–१. सीत्य (नांगरटीखालील शेतजमीन; पा. सू. ४·४·९१); २. गोचर (गायराने; पा. सू. ३·३·११९); ३. वंश कठिन (वृक्षराजी; पा. सू. ४·४·७२); ४. सरपत आणि मुंज वृक्षांची जंगले; ५. औषधी वनस्पतींची वने (ओषधि; पा. सू. ८·४·६); ६. ऊषर (उजाड जमीन; पा. सू. ५·२·१०७).

पाणिनीच्या काळी शेतजमीन आणि तिचे मोजणी-अधिकारी 'क्षेत्र' आणि 'क्षेत्रकर' नावाने सुविख्यात असून (धान्यानां भवने क्षेत्रे; पा. सू. ३·२·२१; ५·२·१), 'कांड' नामक परिमाणामध्ये शेतजमिनीचे क्षेत्रफळ (क्षेत्रभक्ति) सांगितले जाई (जसे–द्विकांडा क्षेत्रभक्तिः; पा. सू. ४·१·२३). पेरणीच्या बियाणाच्या परिभाषेतहि कधीकधी शेतजमीन मोजली जाई. जलसिंचनसुलभ शेतजमीनींच्या (केदार) समूहाला 'कैदार्य' म्हणत (पा. सू. ४·२·४०).

शेतांची मालकी विभिन्न शेतकऱ्यांकडे असली, तरी गावाच्या सामायिक मालकीच्या गायरानांमध्ये साऱ्या ग्रामस्थांचे पशु (ग्राम्य पशुसंघ) चरत असत (पा. सू. १·२·७३). गावाबाहेर सामायिक मालकीचे गौळवाडे (गोष्ठ; व्रज) असून (पा. सू. ३·३·११९; ५·२·१८), त्यामध्ये 'गोपाल' आणि 'तंतिपाल' अनुक्रमे गाई आणि शेळ्या-मेंढ्या चारीत असत (पा. सू. ६·२·७८). गोपालांच्या वस्त्यांना 'घोष' म्हणत (पा. सू. ६·२·८५). गावातील गुरांचे गोठे नवनवीन गायरानांच्या शोधात एकसारखे हलवीत असून, उजाड पडलेल्या पूर्वकालीन गोठयांना 'गौष्ठीन' म्हणत असत (पा. सू. ५·२·१८). गावासभोवतालच्या शेतजमीनीबाहेर वन्य जमाती (आरण्य) आणि वन्य पशुयुक्त (आरण्यक) अरण्ये असून (पा. सू. ४·२·१२९), तेथेहि गावातील गुराखी गुरे चरावयास नेत असत. अशा तऱ्हेचे तृणयुक्त अरण्य 'गोष्पद' (पा. सू. ६·१·१४५) नावाने आणि चारा संपुष्टात आलेले अरण्य 'आशितंगवीन' नावाने ओळखले जाई (काशिका. ५·४·७). जनावरांना चरण्यास निरुपयोगी घनदाट अरण्यास 'अगोष्पद' म्हणत.

यावरून पाणिनिकालीन ग्रामरचना सध्याप्रमाणेच मध्यभागी मनुष्यवस्ती आणि त्याचे बाहेर कचरापट्टी, गुरांचे गोठे (गोष्ठ) आणि शेतजमीन (क्षेत्र) अशी असावी.

**भूमिदान**—कौटिलीय अर्थशास्त्रमते राज्यातील भूमी, तसेच मच्छीमारी, जलवाहतूक (सेतु), भाजीपाल्याचा व्यापार (हरित-पण्य) राजाच्या मालकीचा (स्वाम्यम्) असून, तो ते सत्पात्र प्रजाजनास देई. राज्यातील ऋत्विज (यज्ञवेत्ते), पुरोहित आणि वेदविद् लोकांना करमुक्त (अदंडकराणि) 'ब्रह्मदेय' जमिनी दान दिल्या जात असून, सरकारी अधिकारी, हिशेबनीस, ग्रामसेवक (गोप), स्थानिक अधिकारी, पशुवैद्य (अनीकस्थ), वैद्य, अश्वरक्षक आणि राजदूतांना राजा इनाम जमिनी देत असे. त्यांच्या विक्रीचा अथवा गहाणवटीचा अधिकार मात्र त्यांना नसे.

राज्यातील सुपीक भूमी राजा करदात्या नागरिकांना (करद) आयुर्मर्यादेच्या भोगवटयासाठी (एक पुरुषिकाणि) कृषिकार्यार्थ देत असून, नापीक भूमी कृषियोग्य बनविणाऱ्यांना ती कायमची देण्यात येई. करदात्या कृषिकारास बियाणे, गाई-बैल, रोख पैसे, तसेच अन्य तऱ्हेच्या सवलती (अनुग्रहपरिहार) राजा देई. याचे उलट सुपीक भूमीची आबाळ करणाऱ्या शेतकऱ्याची जमीन राजा अन्य कृषिकारास, भूमिहीन मजुरास (ग्रामभृतक), अथवा व्यापाऱ्यास (वैदेहक) देई.

**ग्रामव्यवस्था**—कौटिलीय अर्थशास्त्रमते ग्रामातील गुलाम (दास), नोकरचाकर (आहितक), तसेच अनाथ (बाल), वयस्क, दीनदुबळ्या आणि रोगी लोकांच्या योगक्षेमाची, तसेच तेथील अनाथ बालकांच्या आणि देवस्थानांच्या जमिनी कसण्याची जबाबदारी ग्रामस्थांची असून, मुलाबाळांच्या चरितार्थाची व्यवस्था न करता संन्यासी बनणाऱ्या (परिव्राजयत) ग्रामस्थाला कडक शासन करण्यात येई. ग्रामामध्ये स्थानिक लोक, व्यापारी आणि संन्यासी यांनाच प्रवेश असे. ग्रामामध्ये स्वतंत्र नाट्यगृहे अथवा क्रीडागृहे बांधण्यास राजा शक्यतो विरोध करी. परदेशस्थ कलावंत, नर्तक, गायक, विदूषक (वाग्जीवन), आणि शाहीर (कुशीलव) लोकांना कृषिकारांच्या दैनंदिन जीवनात व्यत्यय आणण्यास बंदी असे. भरमसाट कर, सक्तीची लष्करभरती, तसेच कृषियोग्य जनावरांची चोरी, वाघ–सिंह, विषारी जीवाणू आणि रोगराई आदि कृषिकार्यास विघातक गोष्टींपासून राजा कृषिकारांचे रक्षण करी.

**वने**—कौटिलीय अर्थशास्त्रमते ग्रामांच्या बाहेर स्वतंत्र गायराने; तसेच वेदविद्यारत ब्राह्मणांची अध्ययनाची, तपस्येची, तसेच सोमवल्ली निष्पादनाची, त्या त्या ब्राह्मणांच्या गोत्रनामावरून ओळखली जाणारी स्वतंत्र वने असत. त्यानजिकच राजाच्या मृगयेसाठी संवर्धिलेली फलपुष्प आणि समृद्ध जलाशययुक्त वने असत. या खंदक आणि एकाकी प्रवेशद्वाररक्षित वनात नखे आणि

दात काढलेले वाघ ( व्याल ), हत्ती, तसेच अन्य श्वापदे ( मार्गायुक ) मृगयार्थ पाळलेले असून, समस्त नागरिकांच्या उपयोगासाठी असेच अन्य एक मृगयावन राज्याच्या सरहद्दीवर असे. अर्थोत्पत्तिकारक वन्य वनस्पतींची स्वतंत्र वने, तसेच त्यापासून रसायने बनविणारे स्वतंत्र कारखानेहि असत.

कौटिल्याच्या काळी गजदलाला लष्करी दृष्टीने विशेष महत्त्व असून, रानटी हत्ती पकडून त्यांना माणसाळविण्याकाठी राज्यामध्ये हस्त्याधिकारीनियंत्रित स्वतंत्र 'हस्तिवने' असत. राज्यातील वन्य हत्तींना ठार मारणाऱ्यास देहदंडाची सजा असे. कलिंग, अंग, करूष आदि पूर्व भारतीय देशातील हत्ती सर्वोत्कृष्ट, दशार्णादि पश्चिम भारतीय देशातील हत्ती दुय्यम प्रतीचे, आणि सौराष्ट्र आणि पंचजन देशातील हत्ती कनिष्ठ प्रतीचे मानले जात असत. तथापि पुरेशा शिक्षणाने कोणताहि हत्ती युद्धक्षम बनू शकत असे.

**दुर्ग** — कौटिलीय अर्थशास्त्रमते राज्याच्या सरहद्दीवर परचक्रनिवारणार्थ निम्नलिखित चतुर्विध दुर्ग बांधले जात असत :— १. **औदक** ( नदीच्या वेटातील अथवा सखल भूवेष्टित जागेतील जलदुर्ग ); २. **पार्वत** ( पर्वतीय रस्त्यावरील अथवा गुफेमधील डोंगरी किल्ला ); ३. **धान्वन** ( जलहीन आणि निष्पर्ण वाळवंटातील वालुकादुर्ग ); ४. **वनदुर्ग** ( दलदल आणि काटेरी झुडुपांच्या प्रदेशातील वन्य दुर्ग ). या दुर्गप्रकारांपैकी 'जलदुर्ग' आणि 'पर्वतीय दुर्ग'. जनपदान्तर्गत दाट लोकवस्तीच्या प्रदेशाच्या रक्षणार्थ, आणि 'वालुकादुर्ग' आणि 'वनदुर्ग' सुदूर आणि निर्जन सरहद्दीच्या रक्षणार्थ, अथवा राजाचे आश्रयस्थान म्हणून उपयोगी असत.

**तटबंदीयुक्त नगरे** — कौटिलीय अर्थशास्त्रमते जनपदांच्या धनोत्पादनाची केंद्रस्थानभूत तटबंदीयुक्त नगरे वास्तुशास्त्रज्ञांनी निरीक्षणान्ती सुयोग्य म्हणून सुचविलेल्या स्थानी ( भूमिशोधन; जा. ६·४४८ ) स्थापिण्यात ( नगरमापन ) येत. नद्यांची संगमस्थाने, तलावांचे अथवा सरोवरांचे किनारे त्यासाठी हेतुतः निवडण्यात येत असून, उपलब्ध जागेच्या वर्तुलाकृती, आयताकृती अथवा चौरसाकृती आकारानुसार संकल्पित नगरांचे आकृतिमान ठरे. नगराच्या सभोवती कालवे खोदून हुकुमी पाणीपुरवठ्याची; तसेच विभिन्न जलमार्गांच्या आणि स्थलमार्गांच्या साह्याने परिसरातील नानाविध विक्रियोग्य वस्तूंच्या आयातीची आणि विक्रीची व्यवस्था तेथे करण्यात येई.

कौटिलीय अर्थशास्त्रमते नगरस्थापनेची ( दुर्गविधान, पुरसंनिवेश ) 'परिखा' ( खंदक ), 'प्राकार' ( तटबंदी ), आणि 'द्वार' ही प्राथमिक अंगे असून, नगररचनेचा प्रारंभ हा नेहमीच परिखानिर्मितीने होत असे. पाणिनि आणि कौटिल्यकालीन दुर्गसदृश नगरांच्या ( पुर ) रक्षणासाठी ( नगरगुप्ति ) खंदक आणि तटबंदी आवश्यक असून, पाणिनीच्या मते या दुर्गनगरांबाहेरील खंदकांच्या जागेस 'पारिखेयी भूमी' म्हणत असत. काशिकामते नगरासभोवतालच्या तीन खंदकांची, आणि त्यांच्या अंतर्भागातील तटबंदीची भूमी अनुक्रमे 'पारिखेयी भूमी' आणि 'प्राकारिय देश' नावाने सुविख्यात असून, संरक्षणसिद्धतेच्या दृष्टीने तिची निवड करण्यात येई.

**परिखा** — कौटिलीय अर्थशास्त्रमते दुर्गराजधानीभोवती चौदा, बारा आणि दहा दंड ( १ दंड = ६′ ) रुंदीचे, आणि सात, सहा आणि पाच दंड खोलीचे तीन खंदक ( एकूण रुंदी – ३८ दंड ) प्रत्येकी एक दंड अंतरावर खोदण्यात येत असत. काशिकामते या खंदकांची खोली 'द्विपुरुष' ( १०½′ ), अथवा 'त्रिपुरुष' ( १५¾′ ) असे. उदकजातकमते दुर्गनगरासभोवतालचे हे तीन खंदक 'उदकपरिखा', 'कर्दमपरिखा,' आणि 'शुष्कपरिखा' नावाने सुविख्यात असून, कौटिलीय अर्थशास्त्रमते त्यामध्ये जानुभंजनी नामक खुंट्या, त्रिशूळ, अंधःकारमय विवरे, काटे, सुसरी, कमलवेल, लोखंडी खिळे, तसेच विषारी पाणी, चिखल आणि अग्निज्वाला आदि शत्रुप्रतिबंधक साधनांचा उपयोग करीत असत.

**मृत्तिकामय तटबंदी** — खंदकाच्या खोदाईतून निघणारी माती नगराच्या तटबंदीच्या ( प्राकार ) विटा पाडण्यासाठी, तसेच मुख्य तटबंदीबाहेरील मृत्तिकामय कच्चा तट उभारण्यासाठी उपयोगात आणीत. या मृत्तिकामय बाह्य तटाला कौटिलीय अर्थशास्त्रात 'पांसु' (वप्र ), आणि मध्ययुगीन साहित्यात 'धूळकोट' म्हटले. आहे. मथुरा आदि प्राचीन नगरांभोवती असा तट आजहि आढळतो. कौटिलीय अर्थशास्त्रमते खंदकापासून २४′ अंतर्भागातील हा मृत्तिकामय तट ( उंची–३६′; रुंदी–७२′ ) तळाशी चौरसाकृती ( ऊर्ध्वचय ), मध्यभागी बहिर्गोल ( कुंभकुक्षिक ), आणि माथ्याशी निमुळता ( मंचपृष्ठ ) असून, त्याच्या चहुबाजूंस निवडुंग आणि विषारी वेली सोडलेल्या असत. चिखल थापून बनविलेला हा तट हत्ती अथवा बैल नाचवून मजबूत बनवीत.

**प्राकार आणि देवपथ** — उपरोक्त मृत्तिकामय तट-

बंदीच्या अंतर्भागात 'प्राकार' नामक विटांची तटबंदी ( उंची १४'–७२'; रुंदी– २१'–३६' ) बांधण्यात येई. त्यासाठी वापरल्या जाणाऱ्या पक्क्या विटा 'प्राकारीय इष्टका' नावाने ओळखल्या जात. कात्यायनाच्या वार्तिकात 'प्राकार' ( तटबंदी ) आणि 'प्रासाद' ( राजप्रासाद ) हे नगराचे दोन प्रमुख भाग मानले असून ( पा. सू. ६·३·१२२ ), बौद्ध जातकमते प्राकाराची सरासरी उंची १८ हात (अट्ठारस हत्थ प्राकार) असे. आजहि दुर्गतटबंदी तेवढ्याच उंचीची बांधण्यात येते.

दुर्गतटबंदीच्या उत्तुंग भिंतींच्या शिरोभागी, आणि दर्शनी कंगोऱ्यांच्या ( इंद्रकोश ) अंतर्भागात कोणताहि रथ ( रुंदी–१२' ) लीलेने जाऊ शकेल असा विटांचा अथवा शिलाखंडांचा विस्तीर्ण मार्ग ( देवपथ ) असे ( कौ. अ. २·३ ). आगीच्या भयामुळे लाकडाचा उपयोग तेथे करीत नसत. पाणिनीच्या गणपाठमते 'आकाशगामी देवपथसदृश उत्तुंग' अशा अर्थाने त्यास हे नाव प्राप्त झाले होते ( **देवपथ इव देवपथः**; पा. सू. ५·३·१०० ).

देवपथाच्या दर्शनी भागी प्रत्येकी ३० दंड अंतरावर निरीक्षणस्तंभ ( अट्टालक ), आणि 'प्रतोली' नामक दोन मजली इमारती, तसेच धनुर्धारी पहारेकऱ्यांची 'इंद्रकोष' नामक छोटी खोली असे. या खोलीच्या बहिर्भागात बाहेरील परिसराच्या निरीक्षणासाठी छोटी छिद्रे असत. तटबंदीवर चढण्यासाठी 'चार्या' नामक स्वतंत्र जिना ( रुंदी- ६' ) असून, शत्रुबाणांपासून सुरक्षित अशा 'प्रधावितिका' नामक छोट्या खोल्या, तसेच शत्रूंवर बाणप्रक्षेपणार्थ 'निष्कुहद्वार' नामक छोटी छिद्रे तटबंदीमध्ये असत. प्रतोलीच्या तळमजल्यात विहीर, दिवाणखाने ( शाला ), आणि सीमागृहे, आणि दुसऱ्या मजल्यावर जनानखाना, आणि उत्तमागार नामक वास्तू असत.

अष्टाध्यायीच्या भाष्यग्रंथात पाटलिपुत्र नगराच्या प्राकारातील 'प्रतोली', 'अट्टालक', 'इंद्रकोष', 'देवपथ' आदि उपविभागांचा निर्देश असून, या ग्रंथमते शुंग राज्यकालीन सुकोशला ( अयोध्या ) राजधानीची रचना याच नगराच्या अनुकरणाने केली होती ( पा. सू. ४·३·६६ ).

**नगरद्वार** -- जातकमते प्राचीन नगरतटबंदीमध्ये चार प्रवेशद्वारे ( नगरद्वार ) असून (जा. १·२६२; ३·४१४ ), कौटिलीय अर्थशास्त्रमते दुर्गाच्या अंतर्भागातील पूर्वपश्चिम तीन आणि उत्तर-दक्षिण तीन अशा सहा राजरस्त्यांना जोडणारी बारा प्रवेशद्वारे असत. ब्रह्मन्, इंद्र, यम, सेनापती आदि देवतांची नावे त्यास दिली जात. चार हत्ती एका वेळी जाऊ शकतील अशी ही विशाल प्रवेशद्वारे ( रुंदी– ४८' ) विस्तीर्ण चौथऱ्यावर सहा स्तंभांच्या आधारे ( उंची–४५'–५४' ) बांधलेली असत. त्यांच्या स्तंभांचा निम्मा भाग भूमीमध्ये गाडला असून, वरच्या $\frac{१}{२}$ भागात शिरोभूषण असे. त्यास तीन अथवा पाच तक्त्यांचा दरवाजा असून, त्याच्या तळाशी नित्य वापरासाठी एक दिंडी दरवाजा असे.

पाणिनीच्या मते उपरोक्त नगरद्वारांमधून बाहेर पडणारा रस्ता ज्या नगराप्रत जात असे, त्याचे नाव त्यास दिले जाई ( अभिनिष्क्रामति द्वारम्; पा. सू. ४·३·८६ ). उदा. कान्यकुब्ज नगराच्या चतुर्द्वारांपैकी मथुरा नगराप्रत जाणाऱ्या नगरद्वारास 'माथुरद्वार' म्हणत. आजहि नगरद्वारांचे नामकरण याच पद्धतीने करीत असून, मथुरा नगराचे भरतपुर दिशाभिमुख द्वार 'भरतपुर द्वार' नावाने ओळखले जाते.

कौटिलीय अर्थशास्त्रात दुर्गाच्या 'पुष्करिणीद्वार', 'कुमारीपुरद्वार', 'मुंडकद्वार' आदि अन्य द्वारप्रकारांचाहि निर्देश आढळतो. या प्रवेशद्वारांमध्ये कालव्यांच्या साह्याने जलवाहतुकीची व्यवस्था असून, नानाविध कच्च्या मालाची, तसेच विभिन्न शस्त्रास्त्रांची वाहतूक त्यामधून जमिनीवरील, जलमार्गीय, तसेच भूमिगत गुप्तमार्गांनी केली जात असे.

**राजप्रासाद**—परिखा आणि प्राकार यांच्या निर्मितीनंतर नगरातील मध्यवर्ती स्थली ( प्रासादीया भूमी ) काष्ठमय राजप्रासाद आणि राजसभा बांधण्यात येई. त्यासाठी उपयोजिलेले इमारती लाकूड 'प्रासादीय दारु' नावाने सुविख्यात असून, जातकमते वास्तुशास्त्रज्ञ या लाकडाची स्वतः जंगलात जाऊन निवड करीत असत.

**दुर्गनगरातील अन्य वास्तू**—कौटिलीय अर्थशास्त्रमते दुर्गाच्या मध्यबिंदूच्या उत्तरेस आणि चातुर्वर्णीयांच्या निवासस्थानाच्या मध्यभागी राजप्रासादाची उत्तराभिमुख अथवा पूर्वाभिमुख इमारत असून, दुर्गाच्या अंतर्भागातील एकूण भूमीपैकी $\frac{१}{६}$ भूमी त्याने व्यापलेली असे. राजप्रासादांच्या विभिन्न दिशांना नगरातील निम्नलिखित वास्तुविशेष असत :— (परिपत्रक पहा ).

कौटिलीय अर्थशास्त्रमते दुर्गनगरांच्या विभिन्न कोपऱ्यात कारागिरसंघटनांची निवासस्थाने, तसेच भूमिदेवतांची मंदिरे असत. खंदकापासून १०० धनू अंतर्भागात अन्य अनेक देवमंदिरे आणि तीर्थस्थाने असून, विभिन्न दिशांना दिग्देवतांची मंदिरे असत.

## कौटिलीय अर्थशास्त्रकालीन नगररचना

| दिशा | वास्तुविशेष |
|---|---|
| १. ईशान्येस | राजपुरोहित आणि मंत्रीजनांची निवासस्थाने, यज्ञशाला आणि जलपुरवठा केंद्र |
| २. आग्नेयेस | पाकशाला, कोठी, धनागार, हिशेबनीस कचेरी, छोटे कारखाने, आणि हत्तीखाना |
| ३. पूर्वेस | अत्तरे, धान्य, मद्य आदींची दुकाने; कारागीर आणि क्षत्रिय लोकांची निवासस्थाने |
| ४. नैर्ऋत्येस | वन्य वस्तूंची आणि दारुगोळ्यांची कोठारे; उंट, गर्दभ आदींचे तबेले |
| ५. दक्षिणेस | व्यापार, कारखाने, सैन्य आदींचे अधीक्षक; तांदूळ, मद्य, मांस आदींची दुकाने; वेश्या, संगीतकार आणि वैश्य लोकांची निवासस्थाने |
| ६. वायव्येस | रथादि वाहनांचे तबेले; विभिन्न दुकाने आणि रुग्णालये |
| ७. पश्चिमेस | लोकरीं आणि सुती कापड, वेळूच्या चटया, शस्त्रास्त्रे आदींचे कारखाने; शूद्र लोकांची निवासस्थाने |
| ८. ईशान्येस | धनागार; अश्वधेनूंचे तबेले व गोठे |
| ९. उत्तरेस | राजमंदिर; रत्नकारागीर, ब्राह्मण लोकांची निवासस्थाने |
| १०. मध्यभागी | अपराजित, अप्रतिहत, जयंत, वैजयंत, शिव, वैश्रवण, अश्विनीकुमार, मदिरादेवी आदि देवतांची मंदिरे |

नगराची दहन अथवा दफनभूमी दुर्गाच्या उत्तरेस अथवा पूर्वेस, आणि उच्चवर्गीयांची स्वतंत्र दहनभूमी दुर्गाच्या दक्षिणेस असे. चांडाळ आणि पाखंडी लोक दफनभूमीच्या पलीकडे निवास करीत असत. शेतमजुरांच्या स्वतंत्र वस्त्या शेतानजिक असत.

नगरातील हरएक दहा घरांमध्ये स्वतंत्र विहीर असून, धान्य, साखर, औषधे, भाजीपाला, गवत, मांस, जळण, कोळसा, कापड, लाकूड आणि शस्त्रास्त्रे यांचा वर्षानुवर्षे पुरेल एवढा साठा तेथे असे. पुनःपुन्हा तपासणीने हा साठा सदैव ताजा ठेवला जाई.

नगरातील हत्ती, घोडदळ आणि रथदळावर, तसेच दुर्ग, नगररक्षक आणि नगरकारागिरीच्या कामी एकापेक्षा अधिक अधिकाऱ्यांची नेमणूक करून फंदफितुरीचा धोका टाळीत असत. फंदफितुरी करणाऱ्या ' बाहिरिकां 'ना दुर्गाबाहेरील खेड्यांमध्ये हद्दपार केले जाई ( कौ. अ. २·४ ).

पाणिनिकालीन नगरांमध्ये ' गृहशाला ', ' आपण ' ( बाजार ), ' राजसभा ', ' कोष्ठागार ' ( कोठारे ), ' भांडागार ' ( भांडारे ), ' प्रेक्षागार ' ( नाट्यगृहे ) आदि वास्तुविशेष असत ( पा. सू. ४·२·८०; ४·७० ).

**सैन्यतळ**—कौटिलीय अर्थशास्त्रमते तत्कालीन सैन्यतळाची (सेनामुख = वाकाटक शिलालेख–'वासक') रचना बहुंशी दुर्गनगरासदृशच असून, सेनापती ( नायक ), सुतार ( वर्धकि ), आणि ज्योतिष्यांनी ( मौहूर्तिक ) मुक्रर केलेल्या वर्तुलाकृती, आयताकृती अथवा चौरसाकृती जागेत चार प्रवेशद्वारे, सहा रस्ते आणि नऊ उपविभागयुक्त सैन्यतळ उभारण्यात येई. खंदक, तटबंदी आणि निरीक्षणस्तंभांनी वेष्टिलेल्या या तळाच्या नऊ उपविभागांपैकी उत्तरेकडील भागात राजशिबिर ( १००० × ५०० धनू ) आणि अंतःपुर असे. राजशिबिराच्या समोर देवमंदिर, उजव्या बाजूस हिशेबखाते आणि डाव्या बाजूस राजाच्या दिमतीतील अश्व आणि गजशाळा असत.

राजशिबिराच्या १०० धनू दक्षिणेकडील चार अर्धवर्तुलाकृती उपविभागांपैकी प्रथम भागात मुख्य मंत्री आणि राजपुरोहितांची निवासस्थाने, मुदपाकखाना आणि शस्त्रागार असून, दुसऱ्या विभागात सेनापती आणि त्याचे निवडक सैन्य, अश्व आणि रथदळ असे. तिसऱ्या उपविभागात कामगार ( विष्टी ), व्यापारी, वेश्या असून, त्याबाहेरील चौथ्या उपविभागात शिकारी, गुप्तहेर, शरीररक्षक यांची निवासस्थाने असत. राजाच्या शरीररक्षकांची १८ दले आळीपाळीने राजरक्षणाचे काम करीत असून, गुप्तहेरांच्या कामांचे तासहि असेच वाटून देत असत. सैन्यतळामध्ये मद्यपान, जुगार आदींना, तसेच परवानगी-

शिवाय बाहेर जाण्यास बंदी असे. युद्धभूमीतून पळून येणाऱ्या सैनिकांना 'शून्यपाल' नामक अधिकारी शासन करीत असे.

आगेकूच करणाऱ्या सैन्याच्या अग्रभागीचे गुप्तहेर, अधिकारी (प्रशास्तृ), सुतार आणि कामगार नव्या सैन्यतळांच्या उभारणीचे, तसेच विहिरी खोदण्याचे काम करीत असत (कौ. अ. १०·१).

**उजाड झालेली गावे**—पाणिनीच्या अष्टाध्यायीत, तसेच बौधायन धर्मसूत्रात उजाड झालेल्या ग्रामांना (शून्यग्राम, विनष्टग्राम) 'अर्म' म्हटले असून (पा. सू. ६·२·९०–९१; बौ. श्रौ. ९·१; ३), ऋग्वेदात, तसेच यजुर्वेदात ही संज्ञा भग्नावशेषयुक्त उजाड स्थानांना उद्देशून उपयोजिली आहे (ऋ. १·१३३·३; वा. सं. ३०·११; तै. ब्रा. ३·४·१·९). तांड्य ब्राह्मणात 'स्थूलार्म' नामक सरोवराचा (तां. ब्रा. १०·१८), आणि पाणिनीच्या अष्टाध्यायीत 'भ्रतार्म', 'अधिकार्म', 'संजीवार्म', 'मद्रार्म', 'अश्मार्म', 'कंजलार्म' आदि ग्रामांचा निर्देश आढळतो (पा. सू. ६२·९०–९१).

**मार्कंडेय पुराणात**—या ग्रंथमते तत्कालीन नगरासभोवती (व्याप्ती ८ × १ कोस) उंच तट आणि खंदक असून, ते पूर्वेस आणि उत्तरेस उतरते असे. त्याच्या प्रवेशद्वारी शुद्ध कळकाची बेटे असत. राजधानीच्या तटाबाहेरील सैन्यतळात (शाखानगर) मांडलिक आणि मंत्री निवास करीत असून (मार्कं. ४६·४३), नगराच्या अंतर्भागातील राजसेनेच्या अधिकृत तळास 'शिबिर' म्हणत.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते तत्कालीन भारतवर्षातील नगरे आणि छोटी ग्रामे आयताकृती, रुंद आणि उंच विटांच्या तटबंदीच्या आत बांधली असून, त्यामधील अरुंद आणि नागमोडी रस्त्यांच्या दोन्ही अंगांस नानाविध दुकाने आणि पथिकगृहे असत. खाटिक, कोळी, कलावंत आणि मांग आदि अस्पृश्य लोकांची घरे गावाच्या सीमेबाहेर असत. नगरातील घरे लाकडाची अथवा बांबूची असून, त्यांच्या भिंतींना दोन्ही अंगांस मातीचा गिलावा असे. नगरातील उत्तुंग प्रमुख लाकडी सभामंडपावर सपाट लाकडी तक्तपोशी आणि कच्ची अथवा पक्की कौले असून, त्यांच्या भिंतींना चुन्याचा गिलावा केलेला असे.

ग्रामीण घरांची छते तृणाच्छादित आणि जमिनी शेणाने सारविलेल्या असत. तत्कालीन आयताकृती बौद्ध मठाच्या चार कोपऱ्यांत चार भव्य मनोरे आणि अंतर्भागात एकाहून एक उंच असे तीन सभामंडप असून, त्यांच्या तुळयांवर नाजूक नक्षीकाम असे. सभामंडपाच्या भिंती, दरवाजे आणि खिडक्या चित्रविचित्र रंगांनी रंगविलेल्या असून, भिक्षूंच्या खोल्या बाहेरून अनलंकृत आणि आतून सुखसोयीयुक्त असत. मठातील मुख्य सभामंडपाचे प्रवेशद्वार आणि मुख्य देवतामूर्ती पूर्वाभिमुख असत.

राजाच्या राजवाड्यापासून बौद्ध भिक्षुगृहापर्यंत सर्वत्र काथ्यांनी विणलेली आसने प्रचारात असून, राजवाड्यातील रेशीमवेष्टित आणि मौक्तिकखचित राजसिंहासनहि अशाच तऱ्हेचे असे. या लाकडी सिंहासनाच्या दर्शनी भागी विविध नक्षीकाम असे (वॉटर्स, १·१४७–१४८).

**प्राचीन भारतातील नगरे**—प्राचीन भारतातील नगरे, राजधान्या, तीर्थक्षेत्रे, बंदरे, आदींचे विस्कळीत निर्देश पौराणिक साहित्यात असून, तत्संबंधीची साद्यंत माहिती तत्कालीन संस्कृत, बौद्ध आणि जैन साहित्यात, तसेच चिनी प्रवाश्यांच्या प्रवासवर्णनात उपलब्ध होते. या संदिग्ध माहितीमध्ये एकवाक्यता आणण्याचा प्रयत्न कनिंगहॅम, लॉ, सरकार आदि संशोधकांनी केला आहे.

प्राचीन भारतातील बहुतांशी राजधान्या नदीतीरावरील उंचवट्यावर असून, त्यांचा सविस्तर परामर्श प्रास्ताविकातील नद्यांच्या विभागात, तसेच तीर्थक्षेत्रांचा परामर्श तीर्थांच्या विभागात आम्ही घेतला आहे.

**बंदरे**—राजकीय महत्त्वाच्या राजधान्यांइतकेच महत्त्व विदेशी व्यापाराच्या केंद्रस्थानभूत बंदरांना दिले जात असे. प्राचीन भारतवर्षाच्या पूर्व आणि पश्चिम किनाऱ्यावरील प्रमुख बंदरे पुढीलप्रमाणे होती:— (१) **पूर्व किनारा**–१. रामपाल (गंगा नदीचा त्रिभुज प्रदेश); २. ताम्रलिप्ती; ३. दंतपुर; ४. कावेरीपट्टणम्; ५. कोल्कै; (२) **पश्चिम किनारा**–१. पुरम्; २. तिरुवंजिकुल; ३. चंदौर; ४. शूर्पारक; ५. भृगुकच्छ; ६. वलभी; ७. द्वारवती.

इ. स. २ ऱ्या–३ ऱ्या शतकातील पर्शिया, रोम आदि पाश्चात्य देशांच्या समृद्ध व्यापारकाली पश्चिम किनाऱ्यावरील बंदरे महत्त्वाची मानली जात. उत्तरकालात (इ. स. ८–९ व शतक) आग्नेय आशियातील मलाया द्वीपकल्प, ईस्ट इंडीज, चीन आदि देशांशी भारताचा विदेशी व्यापार प्रस्थापित झाल्यानंतर पूर्व किनाऱ्यावरील बंदरांना नवे महत्त्व प्राप्त झाले. मध्ययुगीन काली (इ. स. १२–१३ वे शतक) पश्चिम किनाऱ्यावरील केरळमधील बंदरे व्यापारी दृष्ट्या महत्त्वाची बनली.

**अन्य नगरे**—उपरोक्त नगरप्रकारांखेरीज लष्करी महत्त्वाची ठाणी आणि व्यापारी हमरस्त्यावरील गावे असे दोन नगरप्रकार प्राचीन भारतात अस्तित्वात होते. त्यापैकी व्यापारी हमरस्त्यावरील गावांचा परामर्श प्रास्ताविकातील मार्गांच्या विभागात आम्ही घेतला आहे. लष्करी महत्त्वाची गावे कश्मीर आणि वायव्य सरहद्द प्रांतात विशेष असून, त्यांची माहिती प्रस्तुत ग्रंथात जागच्या जागी दिली आहे.

# भारतवर्षातील तीर्थे

**तीर्थांची व्याख्या** — स्कंदमते शरीराच्या विभिन्न भागातील पवित्रतम दक्षिणहस्त अथवा दक्षिण कर्णाप्रमाणेच पृथ्वीच्या विभिन्न भागांतील पवित्रतम भाग म्हणजे 'तीर्थे' होत. निसर्गाचे चमत्कृतिपूर्ण वैशिष्ट्य, जलप्रवाहाचे वैचित्र्य, अथवा वैभव, तसेच ऋषिमुनींचे निवासस्थान अशा त्रिविध स्थानी तीर्थांची निर्मिती होते. स्वतःच्या निसर्गवैशिष्ट्याने अथवा स्थानमाहात्म्यामुळे भक्ताच्या ठायी पवित्र विचारांची निर्मिती करणे, हे तीर्थांचे प्रमुख वैशिष्ट्य असून ( स्कन्द. काशी. ६·४३–४४ ), भारताच्या सर्व प्रांतात, तसेच हिमालयाच्या पायथ्यानजिकच्या नेपाळ, कुमाँऊ, कांग्रा, उड्डियान, आणि स्वात प्रदेशात शिव, विष्णु, गणेश आदींच्या स्वयंभू स्थानांचे शतकानुशतके तीर्थ म्हणून पूजन केले जाते. देवतात्मा हिमालयाच्या पायथ्यानजिकच्या कश्मीरात भारतातील सर्वाधिक तीर्थे आढळतात.

**तीर्थप्रकार**—ऋग्वेदात नदीजल विशेष पवित्र मानले असून, भारतातील काही नद्या तेथे विशेष पवित्र मानल्या आहेत. या ग्रंथातील ७ व्या मंडलातील जलदेवतेच्या सुविख्यात सूक्तात 'जलदेवता आमचे रक्षण करोत' (**ता आपो देवीरिह मामवन्तु**) असे पालुपद आढळते ( ऋ. ७·४९·१-४ ). ऋग्वेदमते जलदेवता भक्ताच्या शरीरशुद्धीप्रमाणेच त्यांचे पापक्षालन करीत असून ( ऋ. १०·९·८ ), तैत्तिरीय संहितामते सृष्टीतील समस्त देवता जलामध्येच निवास करतात ( **आपो वै सर्वा देवताः**; तै. सं. ६·८·३ ). अथर्ववेदातहि पवित्र आणि पुण्यकारक जलांना सुखसमृद्धीसाठी आवाहिले आहे ( अ. वे. १·३३·१ ).

नद्यांप्रमाणेच पर्वतांची खोरी, तसेच नद्यांच्या उतारांना आणि संगमस्थानांनाहि ऋग्वेदात पवित्र मानले आहे ( ऋ. १·४६·८; ८·६·२८ ). इंद्रासमवेत ( ऋ. १·१२२·३; १३२·६ ), तसेच स्वतंत्रपणे ( ऋ. ६·४९·१४ ) पर्वत देवतेचे आवाहन तेथे केले असून, अथर्ववेदात त्रिककुद् पर्वतापासून प्राप्त होणाऱ्या अंजनाला 'पिशाचविमोचक' मानले आहे (अ. वे. ४·९·९). धर्मसूत्र साहित्यात भारतातील समस्त पर्वत, नद्या, सरोवरे, ऋषिमुनींची आश्रमस्थाने आणि देवतामंदिरे यांना तीर्थ मानले असून ( गौ. ध. १९·१४; वसिष्ठ. ध. २२·१२; बौ. ध. ३·१०·१२ ), वायुमते समस्त समुद्रगामिनी नद्या आणि समुद्र तीर्थ होत ( वायु. ७७·११७ ). सुवास्तु नदीकाठच्या एका तीर्थाचा ( तुग्वन् ) निर्देश ऋग्वेदात आढळतो ( ऋ. ८·१९·३७ ).

ऋग्वेदात अन्यत्र अरण्यांना तीर्थ मानले असून ( ऋ. १०·१४६ ), वामन पुराणात कुरुक्षेत्रातील सात विमोचक अरण्यांचा निर्देश आढळतो ( वामन. ३४·३–५ ).

**महाभारतात**—या ग्रंथात यज्ञ आणि तीर्थयात्रा या उपासनाप्रकारांमध्ये तीर्थयात्रा श्रेष्ठ मानली आहे. नानाविध यज्ञसाहित्यांच्या साह्याने करावयाचे यज्ञ समाजातील राजेरजवाडे आणि श्रीमंत यांनाच शक्य आहेत. म्हणून निर्धनांना खर्चिक यज्ञमार्गाचा त्याग करून पुण्यकारक तीर्थोपासनामार्गाचा अवलंब करण्यास तेथे सांगितले आहे ( म. आर. ८२·१३–१७ ). विष्णुधर्मोत्तरमते तीर्थक्षेत्रे समाजातील साऱ्या जातींच्या आणि वर्णांच्या लोकांना सारखीच पुण्यकारक असतात ( विष्णुधर्म. ३·२७३·९ ).

**तीर्थांचे प्रकार** — ब्रह्म पुराणात तीर्थांचे 'दैव' ( देवनिर्मित ), 'आसुर' ( असुरसंबंधित, उदा. गया ), 'आर्ष' ( ऋषिस्थापित, उदा. प्रभास, नरनारायण ), आणि 'मानुष' ( मनुष्यनिर्मित, उदा. अंबरीष, मनु, कुरु ) असे चतुर्विध प्रकार वर्णिले आहेत ( ब्रह्म. ७०·१६–१९ ). पद्म पुराणात तीर्थांचे 'भौम' ( पृथ्वीवरील ), आणि 'मनसाधिष्ठित' ( अहिंसा, सत्य, आस्तेय आदि गुणसमुच्चय ) असे द्विविध प्रकार वर्णिले असून ( पद्म. उत्तर. २३७; स्कन्द. काशी. ६ ), या ग्रंथमते त्या दोहोंच्या सम्मीलनाने मनुष्यमात्रास मोक्ष प्राप्त होतो. 'पद' ( परमेश्वराची चरणचिह्ने ) नामक अन्य एक तीर्थप्रकार पौराणिक साहित्यात वर्णिला आहे ( जसे—गया येथील विष्णुपद ).

महाभारत आणि पौराणिक साहित्यात अन्यत्र तीर्थक्षेत्रांचे माहात्म्य सविस्तरपणे वर्णिले आहे ( म. आर. ८२·१५३; कूर्म. उत्तर. ३५–४४; पद्म. आदि. २४–२८; ३८–३९; नृसिंह. ६५–६६; अग्नि. १०९; नीलमत. १२३१ – १४४८ ).

स्कंदमते ' पुष्करिणी ' ही नदीतीर्थाइतकीच पवित्र असून, ' २०० हात लांबी-रुंदीचा जलाशय ' अशी तिची व्याख्या तेथे केली आहे ( द्विशतहस्ताः पुष्करिण्यः; स्कन्द. काशी. ९७·६७ ). याचे उलट पर्वतातील जिवंत प्रवाहयुक्त जलाशयास ' सरस् ' ( सरसी ) म्हणत असत ( पतञ्जलि. १·७३ ).

**तीर्थसाहित्य** — पौराणिक साहित्यात भारतातील अगणित तीर्थांचा निर्देश आढळतो. मत्स्यमते भारतातील पृथ्वी, अंतरिक्ष आणि आकाश यांमध्ये ३½ कोटी तीर्थे असून, ती सारी गंगा नदीभोवती केंद्रित झाली आहेत ( मत्स्य. ११०·७; नारद. उत्तर. ६३·५३–५४; पद्म. पाताल. ८९·१६–१७; क्रिया. २०·१५० ). वामनमते भारतात ३½ कोटी शिवलिंगे आहेत ( वामन. ४६·५३ ). ब्रह्ममते भारतात अगणित तीर्थे आणि मंदिरे असून ( ब्रह्म. २५·७–८ ), महाभारत आरण्यकपर्वमते नैमिष आणि पुष्कर ही पृथ्वी आणि अंतरिक्ष लोकातील, आणि कुरुक्षेत्र हे त्रैलोक्यातील श्रेष्ठ तीर्थ आहे ( म. आर. ८३·२०२ ).

महाभारत आणि पौराणिक साहित्यात भारतातील विभिन्न तीर्थांसंबंधी सुमारे ४० हजार श्लोक आढळतात. महाभारतातील आरण्यक पर्व आणि शल्यपर्वात तीर्थयात्रेसंबंधी ३९०० श्लोक असून ( म. आर. ८२–१५६; श. ३५–५४ ), ब्रह्म पुराणातील एकूण १३७८३ श्लोकांपैकी निम्मा भाग ( ६७०० श्लोक ) तीर्थवर्णनात्मक आहे. पद्म पुराणाच्या प्रथम पाच खंडातील ३१००० श्लोकांपैकी ४००० श्लोक तीर्थवर्णनाचे आहेत. वराह पुराणातील ९६१४ श्लोकांपैकी ३१८२ श्लोक तीर्थवर्णनपर असून, त्यांपैकी १४०० श्लोक एकट्या मथुरावर्णनाचे आहेत. मत्स्य पुराणातील १४००२ श्लोकांपैकी १२०० श्लोक तीर्थवर्णनात्मक आहेत.

**महाभारतान्तर्गत तीर्थयात्रा**—या ग्रंथात निम्नलिखित तीर्थयात्रा-प्रकरणे आढळतात :—१. अर्जुनाचा प्रथम वनवास ( आ. २०५–२१३ ); २. अर्जुनकृत सुभद्राहरण ( आ. २११–११२ ); ३. अर्जुनाचा द्वितीय वनवास ( आर. ३९. ·१६–२६ ); ४. पुलस्त्य तीर्थयात्रा ( आर. ८०–८३ ); ५. धौम्य तीर्थयात्रा ( आर. ८४–८८ ); ६. बलरामाची सरस्वतीतीरयात्रा ( श.२९. ५३ ); ७. अंगिरस् तीर्थयात्रा ( अनु. २५·७–७१ ).

**पौराणिक तीर्थमाहात्म्य**—या साहित्यातील विशेष उल्लेखनीय तीर्थमाहात्म्ये पुढीलप्रमाणे होत :–

**(१) स्कंद पुराण**—१. अयोध्या ( वैष्णव. अयोध्या. १–१० ); २. अरुणाचल ( माहेश्वर. अरुणाचल. १·१–१३; २·१–२४ ); ३. अर्बुदाचल ( प्रभास. अर्बुदाचल. १–६३ ); ४. अवन्ती ( आवन्त्य. अ. १·५·१–७१ ); ५. काशी ( काशी. १·१–५०; २·५१–१०० ); ६. केदार ( माहेश्वर. केदार. १–३५ ); ७. चतुरशीति लिङ्ग (आवन्त्य.अ. च. लिं. १–८४); ८. जगन्नाथक्षेत्र ( वैष्णव. जगन्नाथ. १–४९ ); ९. द्वारका ( प्रभास. द्वारका. १–४४ ); १०. धर्मारण्य ( ब्राह्म. धर्मारण्य १–४० ); ११. प्रभासक्षेत्र ( प्रभास. प्रभासक्षेत्र. १–३६५ ); १२. बदरिकाश्रम ( वैष्णव. बदरी. १–८ ); १३. रेवा (आवन्त्य. रेवा. १–२३२); १४. वस्त्रापथक्षेत्र ( प्रभास. वस्त्रापथ. १–१९ ); १५. वेङ्कटाचल ( वैष्णव. वेङ्कटाचल. १–४० ); १६. सेतू ( ब्राह्म. सेतू. १–५२ ); १७. हाटकेश्वर ( नागर. १–२७९ ).

स्कंद पुराण काशीखंडातील ९७ व्या 'काशीलिंगावली' नामक अध्यायात काशी येथील प्रमुख शिवलिंगांची नामावली दिली आहे. या पुराणान्तर्गत नेपाळक्षेत्रमाहात्म्यातील काही श्लोक सांकृत्यायन यांनी उद्धृत केले आहेत ( सांकृत्यायन, कुमाऊँ. पृ. ९८ ).

**( २ ) पद्मपुराण** — १. कालिन्दी ( उत्तर. १९५ –२१८ ); २. कृष्णवेण्या ( उत्तर. ११३ ) ३. गङ्गा; ( पद्म. ब्रह्म. ६०; पाताल. ( २ ); ४. गण्डिका ( गण्डकी, उत्तर. ७६ ); ५. नर्मदा ( आदि. १३–२५ ); ६. प्रयाग ( आदि. ४१–४४; उत्तर. २५); ७. यमुना ( आदि. ४५ ); ८. वाराणसी ( आदि. ३३–३७ ); ९. वितस्ता ( आदि. २५ ); १०. वेत्रवती ( उत्तर. १३० ); ११. शूकरक्षेत्र ( उत्तर. १२१ ); १२. श्रीशैल ( उत्तर. २० ); १३. साभ्रमती ( उत्तर. १३१–१७० ); १४. हरिद्वार ( उत्तर. २१–२३ ).

**( ३ ) ब्रह्म पुराण**—१. अवन्ति ( ४३–४४ ); २. एकाम्रकक्षेत्र ( ४१ ); ३. कोणादित्य ( २८ ); ४. गौतमी ( गोदावरी; ७०–१७५ ); ५. पुरुषोत्तमक्षेत्र ( ४५–५१ ); ६. विरजक्षेत्र ( ४२ ).

**(४) मत्स्य पुराण**—१. नर्मदा ( १८६–१९४ )

२. प्रयाग ( १०३–१११ ); ३. वाराणसी ( १८१–१८५ ).

**( ५ ) नारद पुराण उत्तरखंड**— १. अवन्तिकाक्षेत्र ( ७८ ); २. कामाक्षी ( ६९ ); ३. कामोदा ( ६८ ); ४. काशी ( ४८–४९; ५१ ); ५. कुरुक्षेत्र ( ६४–६६ ); ६. गया ( ४४–४७ ); ७. गौतमाश्रम (७२); ८. जगन्नाथक्षेत्र ( ५२–५५ ); ९. नर्मदातीर्थ (७७); १०. पुरुषोत्तमक्षेत्र ( ५३–६१ ); ११. पुष्करक्षेत्र ( ७१ ); १२. प्रभासक्षेत्र ( ७० ); १३. बदरिक्षेत्र ( ६७ ); १४. मथुरा ( ७९ ); १५. वृन्दावन (८०); १६. रामेश्वर ( ७६ ).

**( ६ ) वराह पुराण**—१. कुब्जाम्रक ( १२६ ); २. कोकामुख ( १२२; १४० ); ३. कृष्णगङ्गा–कालञ्जर ( १७५–१७६ ); ४. गण्डकी ( १४६ ); ५. गोकर्ण ( २१३–२१६ ); ६. गोकर्ण–सरस्वती ( १७० ); ७. गोदावरी ( ६५–६६ ); ८. गोनिष्क्रमण ( १४७ ); ९. चक्र तीर्थ; सोम तीर्थ ( १३७ ); १०. देविका ( ३७ ); ११. द्वारका ( १४९ ); १२. धर्मराजपुर ( १९६ ); १३. ध्रुव तीर्थ ( १८० ); १४. बदरिकाश्रम ( १४१ ); १५. बदरी ( १४३ ); १६. मथुरा ( १५२–१७६ ); १७. मन्दार ( १४३ ); १८. रुरुक्षेत्र ( १४६ ); १९. लोहार्गल ( १५१ ); २०. शालग्राम ( १४५ ); २१. सानन्दूर ( १५० ); २२. सुमनोगन्ध ( १२३ ); २३. स्तुतस्वामिन् (१४८); २४. सोमेश्वरादि लिङ्ग ( १४४ ); २५. सौकरव (१३८–१३९ ); २६. हृषीकेश ( १४८ ).

**( ७ ) अग्नि पुराण**—१. गङ्गा ( ११० ); २. गया ( ११४–११७ ); ३. नर्मदा ( ११३ ); ४. प्रयाग ( ११८ ); ५. वाराणसी ( ११२ ).

**( ८ ) कूर्म पुराण**—१. नर्मदा ( पूर्व. ३६; उत्तर. ४०–४२ ); २. प्रयाग (पूर्व. ३६); ३. वाराणसी ( पूर्व. ३१–३५ ).

**( ९ ) वामन पुराण**—१. कुरुक्षेत्र ( २२–५२ ); २. प्रह्लाद तीर्थयात्रा ( ८३–८५ ).

**(१०) वायु पुराण**—१. गया ( १०५–११२ ).

**(११) भागवत**—१. बलराम तीर्थयात्रा ( १०·७८–७९ ).

**(१२) नीलमत पुराण**—१. वितस्ता ( १४८९–१६०८ ).

शिव पुराणात द्वादश ज्योतिर्लिंगस्थानांचे, तसेच गणेश पुराणात अष्ट विनायकस्थानांचे वर्णन आढळते.

**कश्मीरातील तीर्थे**—कश्मीरातील तीर्थांची सविस्तर माहिती नीलमत पुराण ( इ. स. ६ वे शतक ), आणि हरचरितचिंतामणि ( इ. स. १२ वे शतक ) मध्ये असून, त्यापैकी नीलमत पुराणातील ९००–१४०४ श्लोकांमध्ये कश्मीरातील निम्नलिखित तीर्थांची माहिती आढळते:– १. नागतीर्थे ( जलाशय; श्लोक. ९००–९७५ ); २. महापद्म सरोवर ( श्लोक. ९७६–१००८ ); ३. शिवतीर्थे ( श्लोक. १००९–१०४८ ); ४. भूतेश्वरमाहात्म्य ( श्लोक. १०४९–११४८ ); ५. कपटेश्वरमाहात्म्य ( श्लोक. ११४९–११६८ ); ६. विष्णु तीर्थे ( श्लोक. ११६९–१२४८ ); ७. नदीसंगमतीर्थे ( श्लोक. १२४९–१२७८ ); ८. अन्य तीर्थस्थाने ( श्लोक. १२७९–१३७१ ); ९. वितस्तामाहात्म्य ( श्लोक. १३७२–१४०४ ).

उपरोक्त अध्यायांपैकी नीलनाग ( आधु. वेरांग ) ने प्रारंभ होऊन, वराहमूल दरीनजिक समाप्त होणारे वितस्तातीरानुगामी तीर्थवर्णन ( श्लोक. १२७९–१३७१ ) भौगोलिक दृष्ट्या महत्त्वाचे असून, या यात्रांपरिक्रमेतील प्रमुख तीर्थांची माहिती तेथे आढळते.

**राजतरंगिणीमध्ये**—या ग्रंथाच्या प्रास्ताविक भागात कश्मीरातील निम्नलिखित तीर्थांचा इतिहास आढळतो :—१. पापसूदन आणि त्रिसंध्य झरे; २. सरस्वती सरोवर; ३. स्वयंभूक्षेत्र; ४. नंदीक्षेत्र; ५. शारदाक्षेत्र; ६. तीर्थधरक्षेत्र; ७. विजयेश्वर तीर्थ.

या ग्रंथाच्या पहिल्या तीन अध्यायांत निम्नलिखित तीर्थांचे विवरण आढळते —१. सोदरनिर्झर ( १·१२३ ); कृत्याश्रम विहार ( १·१३१ ); ३. श्रीनगरी येथील ज्येष्ठरुद्र मंदिर ( १·११३; १२४ ); ४. सुश्रवस् नाग ( १·२०३ ); ५. तक्षक नागयात्रा ( १·२२० ); ६. ईशेश्वर मंदिर ( २·१३४ ); ७. रणस्वामिन् मंदिर ( ३·४३९ ). कल्हणकृत हे सारे वर्णन चक्षुर्वैसत्यम् असल्याने ( राज. ८·२४९२ ), ते भौगोलिक दृष्ट्या महत्त्वाचे आहे.

**हरचरितचिंतामणिमध्ये**—कश्मीरातील तीर्थवर्णनपर या जयद्रथकृत काव्यग्रंथातील शिवावताराच्या बत्तीस आख्यायिकांपैकी आठ कश्मीरातील शिवतीर्थसंबंधीच्या आहेत. त्या आधारे कल्हणोत्तरकालातील शिवतीर्थाख्यायिकांचा प्रामाणिक इतिहास, तसेच नीलमत पुराणातील

सूत्रमय भौगोलिक निर्देशांचे स्पष्टीकरण उपलब्ध होते. या ग्रंथातील ९४ अध्यायांचा 'कपटेश्वरमाहात्म्य' नामक आदर्श माहात्म्यग्रंथ स्वतंत्रपणे प्रकाशित करण्यात आला आहे. या ग्रंथातील स्थलनामांचा कोश स्टाइन यांनी संपादित केला आहे (स. १८९७).

**देवीउपासना तीर्थे** — मत्स्य पुराणात भारतातील देवीस्थानांचे सविस्तर वर्णन असून (मत्स्य. १३), शाक्त लोकांच्या 'शक्तिसंगमतंत्र' (इ. स. १६–१७ वे शतक), आणि 'तंत्रचूडामणि' ग्रंथात भारतातील विभिन्न शक्तिपीठस्थानांचे वर्णन आढळते. यापैकी शक्तिसंगमतंत्रातील शाक्तपीठांचे सविस्तर विवरण डॉ. दिनेशचंद्र सरकार यांनी एका स्वतंत्र लेखात (सरकार, प्राचीन भूगोल. पृ. ६८–१०९), तसेच 'शाक्तपीठाज्' नामक इंग्रजी ग्रंथात केले आहे.

छप्पन्न शक्तिपीठांच्या संदर्भात भारतातील छप्पन्न देशविभागांचे विवरण 'शक्तिसंगमतंत्रा'त आढळते. परंतु तेथे वर्णिलेल्या विभिन्न देशांच्या भौगोलिक मर्यादा वास्तवापेक्षा कधी आकुंचित तर कधी फारच विस्तृत दिसतात. देशविभागांचे अचूक भौगोलिक वर्णन तेथे फारच क्वचित आढळते (इंडि. कल्चर. ८·३३–३४).

**अन्य तीर्थवर्णनसाहित्य**—भारतातील विभिन्न तीर्थासंबंधीचे पौराणिक माहात्म्यसाहित्यावर आधारित अनेक मध्ययुगीन ग्रंथ उपलब्ध आहेत. त्यांपैकी प्राचीनतम अशा लक्ष्मीधरकृत 'तीर्थकल्पतरु'च्या (स. १११०–११२०) निम्म्या भागात वाराणसी आणि प्रयाग तीर्थांचे, आणि 'तीर्थविवेचन कांड' नामक उर्वरित भागात पुष्कर, पृथूदक, कोकामुख, बदरिकाश्रम, केदार आदि तीर्थांचे वर्णन आढळते. 'नृसिंहप्रसाद' (तीर्थसार; स. १५००) ग्रंथात महाराष्ट्र आणि दक्षिण भारतातील सेतुबंध, पुंडरीकक्षेत्र (आधु. पंढरपुर), गोदावरी, कृष्णा–वेण्या, नर्मदा आदि तीर्थांचे विवरण आढळते. नारायण भट्टकृत 'त्रिस्थलीसेतू' (स. १५५०–१५८०) ग्रंथाचा ⅔ पेक्षा अधिक भाग वाराणसीक्षेत्राच्या माहात्म्यपर असून, उर्वरित ⅓ भागात प्रयाग आणि गया क्षेत्रांचे माहात्म्य वर्णिले आहे. याखेरीज अन्य प्रमुख तीर्थवर्णनपर ग्रंथ पुढीलप्रमाणे होत :—१. हेमाद्रिकृत 'चतुर्वर्गचिंतामणि' (अनुपलब्ध, स. १२६०–१२७०); २. वाचस्पतिकृत 'तीर्थचिंतामणि' (स. १४५०–१४८०); ३. तोडरानंद ग्रंथान्तर्गत 'तीर्थसौख्य' (स. १५६५–१५८९); ४. रघुनंदनकृत 'तीर्थयात्राविधितत्त्व' (स. १५२०–१५७०); ५. मित्रमिश्रकृत 'तीर्थप्रकाश' (स. १६१०–१६४०) ६. भट्टोजीकृत 'त्रिस्थलीसेतुसारसंग्रह' (स. १६२५); ७. नागेशकृत 'तीर्थेन्दुशेखर'; ८. अनंतभट्टकृत 'तीर्थरत्नाकर' (हस्तलिखित).

माध्व आचार्य वादिराजांच्या भारताच्या चतुर्भागातील तीर्थयात्रेचे वर्णन 'तीर्थप्रबंध' नामक ग्रंथात आढळते. भारतातील तीर्थांचे विभागशः वर्णन करणाऱ्या या अद्वितीय ग्रंथाचे 'पश्चिम प्रबंध' (९९ श्लोक), 'उत्तर प्रबंध' (४६ श्लोक), 'पूर्व प्रबंध' (४३ श्लोक), आणि 'दक्षिण प्रबंध' (४७ श्लोक) असे चार उपविभाग आहेत.

**तीर्थसाहित्याची वैगुण्ये** —पौराणिक साहित्य आणि तदाधारित मध्ययुगीन तीर्थविषयक ग्रंथांतील भारतीय तीर्थासंबंधीची माहिती भौगोलिक दृष्ट्या खरी असली, तरी त्यामधील माहात्म्यपर मजकूर अतिशयोक्ती आणि विसंगतिदोषांनी डागाळलेला दिसतो. 'इहलोकीच्या आणि परलोकीच्या समस्त कामना पूर्ण करणारे' अशी उपाधी भारतातील बहुशी साऱ्या तीर्थांना पौराणिक साहित्य लावते, आणि ब्रह्महत्त्येपासून गोहत्त्येपर्यंतची सारी पातके त्यांच्या स्नानाने दूर होत असल्याचा निर्वाळा देते (मत्स्य. १८२·१७). यज्ञ, दान, तप आदींचे सारे पुण्य विशिष्ट तीर्थांच्या स्नानाने प्राप्त होत असल्याचे, तसेच तेथे गेल्यानंतर अन्य कोणत्याहि तीर्थस्थानी जाण्याची आवश्यकता नसल्याचे पुराणे नाटकी आत्मविश्वासाने सांगतात (मत्स्य. १८१·२३; अग्नि. ११२·३). या माहात्म्यविषयक अतिशयोक्तीमुळे पौराणिक साहित्यातील तीर्थासंबंधीची भौगोलिक माहिती विचक्षणपणे शोधून काढणे दुष्कर बनते.

**माहात्म्यग्रंथ**—पौराणिक साहित्याधारे उत्तरकालात लिहिलेल्या माहात्म्यग्रंथांत विशिष्ट तीर्थासंबंधीच्या पौराणिक आख्यायिका, तसेच तेथे करावयाचे यात्राविधी, श्राद्धविधी, तसेच परिक्रमा यांचे सविस्तर वर्णन आढळते. प्राचीन स्थलवर्णनाच्या दृष्टीने या माहात्म्यग्रंथांची समीक्षा करण्याची आवश्यकता डॉ. बूलर यांनी सर्वप्रथम प्रतिपादिली, आणि काश्मीरातील सुमारे सोळा उपलब्ध माहात्म्यग्रंथ त्यांनी या विशिष्ट दृष्टीने संपादन केले.

भारतातील विभिन्न तीर्थांचे माहात्म्य वर्णन करणारे काही विशेष उल्लेखनीय माहात्म्यग्रंथ पुढीलप्रमाणे होत :— १. विद्यापतिकृत 'गंगावाक्यावलि' (स. १४००–१४५०); २. सुरेश्वराचार्यकृत 'काशी

मृतिमोक्ष–विचार '; ३–४ रघुनंदनकृत 'गयाश्राद्धपद्धति' आणि 'पुरुषोत्तमक्षेत्रतत्त्व'.

कश्मीरातील 'वितस्तामाहात्म्य,' 'शारदामाहात्म्य,' 'हरमुकुटमाहात्म्य,' 'सुरेश्वरमाहात्म्य,' 'वराहक्षेत्र-माहात्म्य,' 'अमरनाथमाहात्म्य', 'ईशेश्वरमाहात्म्य' आदि माहात्म्यग्रंथांचा निर्देश स्टाइन यांनी केला आहे. भारतातील अन्य तीर्थांचेहि स्थानिक माहात्म्यग्रंथ उपलब्ध आहेत.

भारतातील उपलब्ध माहात्म्यग्रंथांपैकी बहुतांशी ग्रंथ गेल्या एक–दोन शतकांतील ( इ. स. १७ व्या शतकानंतरचे ) असले, तरी तीर्थासंबंधीची परंपरागत पौराणिक माहिती आणि स्थलवर्णन त्यामध्ये प्रामाणिकपणे पुनरुद्धृत आढळते. भूगोलाची स्वतंत्र पुस्तके लिहिण्याची पद्धती ज्या काळीं रूढ नव्हती, त्या काळचे दुर्मिळ भूवर्णन या ग्रंथात असून, प्राचीन पौराणिक ग्रंथांशी शंभर टक्के इमान राखणारे अनेक माहात्म्यग्रंथ आढळतात ( उदा. कश्मीरातील 'शर्वावतार', 'मार्तंडमाहात्म्य,' 'विजयेश्वरमाहात्म्य' ).

**ऐतिहासिक दृष्टीचा अभाव**—काही दुर्मिळ माहात्म्य-ग्रंथांचा अपवाद वगळता अन्य साऱ्या माहात्म्यांत पौराणिक साहित्यातील अतिशयोक्तीचा दोष शतगुणित झाल्याचे, आणि प्राचीन भौगोलिक माहिती लुप्त झाल्याचे दिसून येते. बहुतांशी सारे माहात्म्यकार महाभारत, पुराणादि ग्रंथातील भौगोलिक परंपरांच्या बाबतीत अनभिज्ञ असून, आधुनिक स्थलनामांना बनावट संस्कृत नावे देण्याचा आणि या बनावट नावांना पोषक अशी बनावट आख्यायिका नमूद करण्याचा अनैतिहासिक प्रयत्न माहात्म्यग्रंथांत अनेक ठिकाणी आढळतो. वितस्तामाहात्म्यात निर्देशिलेली कश्मीरातील काही सुविख्यात तीर्थांची बनावट संस्कृत नावे पुढीलप्रमाणे होत ( परिपत्रक पहा ).

विशिष्ट तीर्थांची यात्रापरिक्रमा बदलणे, नवी बनावट तीर्थे उत्पन्न करणे, आणि तत्संबंधी बनावट आख्यायिका तयार करणे, आदि असूक्त प्रकारहि माहात्म्यग्रंथांत अनेकदा आढळतात ( उदा. कश्मीरातील शारदा तीर्थ ). भारतीय माहात्म्यग्रंथ क्षेत्रस्थानातील असंस्कृत, अनभिज्ञ आणि धनलोभी पुरोहितवर्गाच्या ताब्यात शतकानुशतके राहिल्याची ही परिणती मानावी लागेल.

## वितस्तामाहात्म्यातील बनावट तीर्थनामे

| प्राचीन नाव | आधुनिक नाव | वितस्तामाहात्म्य |
|---|---|---|
| १. नीलनाग | वेरनाग | वीरनाग |
| २. जयवन | झेवन | यवनी |
| ३. पुराणाधिष्ठान | पंद्रेठाण | पादद्दष्टिक, पद्दष्टि |
| ४. माक्षिकस्वामिन् | मायसुम् | मायासीमा |
| ५. महासरित् | मार | मारी |
| ६. हुष्कपुर | उष्कूर | उषःकरण |
| ७. भूतेश्वर | बुथिशेर | बोधेश्वर |
| ८. सुश्रवस् नाग. | सुश्रम नाग | सुश्रम नाग |

**तीर्थक्षेत्रांची समस्या** — भारतातील तीर्थस्थानांच्या आणि तत्संबंधीच्या प्राचीन परंपरांच्या रक्षणाची कामगिरी विश्वस्तपणे सोपविलेला क्षेत्रस्थानीचा पुरोहित वर्ग गेली काही शतके प्राचीन ऐतिहासिक परंपरांविषयी अज्ञ आणि बेफिकीर बनला आहे. देशातील संस्कृत भाषेचे आणि प्राचीन परंपरेचे ज्ञान जसजसे कमी होत आहे, तशी आमच्या पुरातन तीर्थस्थानांच्या सांस्कृतिक संरक्षणाची जबाबदारी अधिक बिकट होत चालली आहे. लक्षावधी भारतीयांच्या श्रद्धेय अशा तीर्थस्थानांच्या, तसेच तत्रस्थ मंदिरांच्या रक्षणाइतकेच महत्त्वाचे असे हे सांस्कृतिक कार्य आहे.

भारतीय तीर्थांसंबंधीच्या परंपरागत आस्तिक्य बुद्धीला धक्का न लावता ऐतिहासिक भूमिकेतून त्यांचे मूल्यमापन करण्याचा यथाशक्य प्रयत्न प्रस्तुत ग्रंथात आम्ही केला आहे. वैदिक आणि पौराणिक साहित्यातील तीर्थनामे आणि विवरण आम्ही ग्राह्य मानले असून, त्याशी जुळता तेवढाच माहात्म्यग्रंथातील भाग आम्ही उद्धृत केला आहे. विभिन्न तीर्थांसंबंधीच्या स्थानिक परंपराहि त्यामधील अतिशयोक्तीचा भाग वगळून आम्ही जेथल्या तेथे नमूद केल्या आहेत.

डॉ. पां. वा. काणे यांच्या 'हिस्टरी ऑफ धर्मशास्त्र' ( खंड ४ ) मध्ये भारतातील तीर्थयात्रापरंपरेचे सविस्तर विवेचन, तसेच प्रमुख तीर्थांचा कोश ( पृ. ७३०–८२५ ) दिला आहे.

# भारतवर्षातील मार्ग

**भारतवर्षातील मार्ग** – मानवी इतिहासाच्या प्रारंभापासून भ्रमणशीलता आणि स्थलांतर हा मनुष्यस्वभावाचा स्थायीभाव असून, त्यामधूनच दूरवर्ती प्रदेशातील खुष्कीच्या आणि जलवाहतुकीच्या मार्गांचा शोध आणि निर्मिती झाली. मनुष्यप्राण्याला आवश्यक ते अन्न आणि जल नदीकाठी उपलब्ध होत असल्याने सारे प्राचीन मार्ग नदीतीरानुगामी असून, उत्तरकालीन नागरी संस्कृतीमध्ये उत्पन्न होणारी नवजात नगरे आणि त्यांना जोडणारे रस्तेहि नदीतीराने अथवा नदीप्रवाहामधून गेलेले दिसतात.

**पर्वतीय मार्ग**—पर्वतीय प्रदेशातील सोयिस्कर मार्ग आणि त्यांना जोडणाऱ्या खिंडी ( 'संकट'; राज ८·१६७४ ), फारच थोड्या असल्याने त्यांमध्ये कमी फेरफार झालेले दिसतात. याचे उलट मैदानी प्रदेशात मनुष्य मन मानेल तसा प्रवास करू शकत असल्याने त्याच्या पाऊलवाटेमधून उत्तरकालात अनेक नवे रस्ते उत्पन्न होतात.

**मार्गवाचक संज्ञा**— पाणिनीच्या अष्टाध्यायीत 'परिवाहकं मार्ग' अशा अर्थाने 'वह' संज्ञेचा प्रयोग असून ( पा. सू. ४·२·१२२ ), त्या नावाचे 'पीलुवह', 'फल्गुनीवह', 'ऋषीवह', पिंडवह, 'मुनीवह', 'दारुवह' आदि मार्ग त्याचे काळी अस्तित्वात होते.

**मार्गप्रकार** – ऋग्वेदात मरुतांच्या संचाराच्या 'अपथ' 'विपथ' 'अंतःपथ' आणि 'अनुपथ' नामक चतुर्विध पथप्रकारांचा निर्देश आढळतो ( ऋ. ५·५२·१० ). पाणिनीच्या मते नगरातील रस्ते 'संचर' नावाने सुविख्यात असून ( पा. सू. ३·३·११९ ), कौटिलीय अर्थशास्त्रात 'वणिक्पथ', 'वारिपथ', 'स्थलपथ', 'नदीपथ', 'कूलपथ', 'संयानपथ', 'दक्षिणापथ', 'चक्रपथ', 'पादपथ', 'खरपथ', 'उष्ट्रपथ', 'राजमार्ग', 'रथमार्ग', 'द्रोणमुख' आदि नानाविध पथप्रकारांचा निर्देश आढळतो ( कौ. अ. २·४ ). दरबारी मानकरी ( वल्लभ ), कामगार लोक ( कार्मिक ), दरवडेखोर, जनावरे तसेच सरहद्दसंरक्षक शिपायांपासून हे मार्ग रक्षिण्याची जबाबदारी राजाची असे ( कौ. अ. २·३ ). या पथप्रकारांपैकी रथमार्गांचा निर्देश वाल्मीकि रामायण आणि महाभारतात 'रथ्या' नावाने आढळतो.

संस्कृत शब्दकोश साहित्यात दहा धनू ( ४० फूट ) रुंदीच्या 'घंटापथ' नामक राजमार्ग प्रकाराचा, तसेच 'उपनिष्करण' नामक नगरराजमार्गाचा निर्देश आढळतो. अमरकोशात 'शृंगारक', 'रथ्या', 'प्रतोली', 'विशिखा' आदि ग्रामीण मार्गप्रकारांचा ( ग्राममध्यमार्ग ), आणि नानार्थ रत्नमालामध्ये 'पारिप्लव' नामक 'उतरणीच्या मार्गाचा ( क्रमनीचमहीभाग ) निर्देश आढळतो ( नानार्थ. १०४१ ). मध्ययुगीन 'शुक्रनीति' ग्रंथात मार्गरचनेचे सविस्तर विवरण आढळते ( शुक्र. १·३४-३५ ).

**मृत्तिकामय रचना** – प्राचीन भारतीय मार्गांपैकी राजमार्ग हे विटांचे आणि अन्य सारे मार्ग चिखलाचे असावेत.

**मार्गांची रुंदी** – कौटिलीय अर्थशास्त्रमते तत्का विभिन्न पथप्रकारांची रुंदी निम्नप्रकारे असे :—

| पथप्रकार | रुंदी |
|---|---|
| १. राजमार्ग | ४८ फूट |
| २. चारशे आणि आठशे ग्राम समूहाप्रत जाणारे माग ( द्रोणमुख, स्थानीय ) | |
| ३. व्यापारी मार्ग ( संयानीय ) | |
| ४. राष्ट्रपथ | |
| ५. लष्करी ठाण्यांचे मार्ग ( व्यूह ) | |
| ६. स्मशानपथ | |
| ७. रथमार्ग ( रथ्या ) | २४ फूट |
| ८. सेतुपथ | |
| ९. वनपथ | |
| १०. हस्तिवनाप्रत जाणारे मार्ग ( हस्तिपथ ) | १२ फूट |
| ११. गुरांचा मार्ग ( पशुपथ ) | |
| १२. छोटा रथमार्ग | $7\frac{1}{2}$ फूट |
| १३. छोट्या गुरांचे मार्ग (क्षुद्र पशुपथ) | ६ फूट |
| १४. मनुष्यपथ | |

**मार्गनामे**— पाणिनीच्या मते नगरद्वारांच्या नामांप्रमाणेच मार्गनामेहि त्यांच्या अंतिम मुक्कामावरून ( मर्यादा )

पडत असत ( तद् गच्छति पथिदूतयोः; पा. सू. ४·३·८५). उदा. मथुरा गावी येऊन मिळणारे चारहि रस्ते 'माथुरपथ' या एकाच नावाने ओळखले जात असत.

पाणिनीच्या मते मार्गातील विभिन्न मुक्कामांच्या ( विश्रामस्थल ) अगोदरचा भाग ' अवर ' नावाने, आणि तदनंतरचा भाग ' पर ' नावाने ओळखला जात असे. उदा. साकेत–पाटलिपुत्र मार्गावरील कौशांबी या विश्रामस्थलाच्या अगोदरचा साकेत––कौशांबी भाग ' अवर ' असून, कौशांबी–पाटलिपुत्र भाग ' पर ' होय ( पा. सू. ३·३·१३६ ).

लांबच्या मार्गातील विश्रामस्थले ' आहार ' ( भोजस्थल ) वैकल्पिक नावाने सुविख्यात असून, दोन नगरांतील अंतर कधीकधी आहारांच्या परिमाणातहि सांगितले जाई ( पा. सू. भाष्य. ३·३·१३६ ).

**मौर्यकालीन राजरस्ते**— पौराणिक आणि बौद्धकाली सारा भारत देश विभिन्न जनपदांमध्ये ( छोटी राज्ये ) विभागला असल्याने, तसेच त्या काळी दळणवळणाची प्रगत साधने उपलब्ध नसल्याने देशव्यापी राजमार्ग फारच थोडे असून, विभिन्न राज्यांना जोडणारे छोटे रस्ते बहुसंख्य होते.

मौर्यकालीन एकतंत्री साम्राज्याच्या उदयानंतर आसेतुहिमाचल पसरलेल्या राजरस्त्यांची आवश्यकता प्रथमच उत्पन्न झाली. कौटिलीय अर्थशास्त्र आणि अरियनच्या ग्रंथात या नव्या पथप्रकारास ' राजमार्ग ' म्हटले असून ( कौ. अ. २·४; अरियन, इंडिका. २·१·७ ), प्राचीन इंग्लंडमधील ' किंग्ज हायवे ' सदृश तो असावा.'मध्यवर्ती राजसत्तेतर्फे निर्मिलेला मार्ग ' अशा अर्थाने त्यास हे नाव प्राप्त झाले असावे.

ग्रीक साहित्यमते मौर्य राज्यकालीन राजरस्त्याच्या दर दहा ' स्टेडियां 'वर अंतर आणि परिसरातील छोट्या मार्गांची माहिती देणारा मैलाच्या दगडासदृश स्तंभ असे ( स्ट्रॅबो, १४·१·५०–५२; पृ. ७०७–७०९ ). अशोकाच्या आज्ञालेखमते या मार्गावर त्याने पांथस्थांच्या क्षुधाशमनार्थ अनेक कूप आणि सुशीतल वृक्ष (मार्गद्रुम = वाडिक्या ), तसेच दर मजलीच्या ( = ८ कोस ) अंतरावर विश्रामशालाहि बांधल्या होत्या ( कॉर्पस्. इन्स्क्रि. १· १३५ ). परंतु या साऱ्या सोयी मौर्य साम्राज्यसदृश मोठ्या राज्यांपुरत्या मर्यादित असून, भारताच्या उत्तरकालीन अशांत राजकीय अवस्थेत रस्त्यांची ही सुस्थिती कमी झाली असावी.

**प्राचीन भारतीय मार्ग**—प्राचीन भारतातील विभिन्न मार्गांची सविस्तर माहिती पाणिनीची अष्टाध्यायी, वाल्मीकि रामायण, महाभारत आदि ग्रंथांत उपलब्ध असली, तरी त्यांपैकी राजमार्ग कोणते, आणि क्वचित दळणवळणाचे पायरस्ते कोणते, याची निश्चित कल्पना येत नाही. फाहियेन् आणि ह्युएन्त्संगसारखे प्रवासीहि मुख्य राजरस्ता सोडून अनेकवेळा पाऊलवाटांचा उपयोग करीत असल्याने त्यांच्या प्रवासवर्णनाचा राजपथनिश्चितीच्या दृष्टीने उपयोग होत नाही. पौराणिक आणि जैन साहित्यात मार्गांचा निर्देश फारच क्वचित आढळतो.

प्राचीन भारतीय मार्गांची सर्वाधिक महत्त्वपूर्ण माहिती बौद्ध साहित्यात असून, कोणत्याहि मार्गाचे आरंभस्थान, अंतिम स्थान, तसेच त्यामधील नगरांचे सविस्तर विवरण तेथे आढळते. मात्र प्राचीन काळी शास्त्रशुद्ध आलेखनविद्या अस्तित्वात नसल्याने बौद्ध साहित्यातील रस्त्यांचेहि निश्चित आलेखन करणे शक्य होत नाही. त्यासाठी स्थानिक भौगोलिक ज्ञान आणि कल्पनाशक्ती यावरच विसंबावे लागते.

**मार्गनिश्चितीचा निकष** –– प्रवासासाठी सर्वात नजिकचा, सोयिस्कर आणि कमी धोक्याचा मार्ग स्वीकारण्याकडे मानवाचा ओढा असल्याने काही विशेष कारणाखेरीज आपला परंपरागत प्रवासमार्ग तो बदलत नाही. म्हणूनच प्राचीन मार्गनिश्चितीसमयी त्या भागातील प्रचलित मार्गाशी तो ताडून बघणे फलप्रद ठरते. उदा. पाणिनीच्या अष्टाध्यायीतील उत्तरापथ देशान्तर्गत पाटलिपुत्र→ वाराणसी→ कौशांबी → साकेत → मथुरा → शाकल → तक्षशिला → पुष्कलावती → कपिशा आदि राजधान्यांना वायव्य भारतातील बाह्लीक देशाशी जोडणारा ' उत्तरपथ ' ( पा. सू. ५·१·७७ ) आधु. ' ग्रँड ट्रंक रोड 'शी, तसेच सिकंदरच्या आक्रमणकालीन ' नॉर्दर्न रूट 'शी तंतोतंत जुळतो. अरियनच्या ग्रंथात याच मार्गाचा निर्देश ' पुरुषपुर→ पाटलिपुत्र→ ताम्रलिप्ती मार्ग ' नावाने केला असून, वायव्य भारतातून गंगा नदीच्या खोऱ्यातील लष्करी आक्रमणे याच लष्करीदृष्ट्या महत्त्वाच्या रस्त्याने होत असत ( अरियन, इंडिका. २·१·७ ).

**प्रमुख हमरस्ते**–– प्राचीन भारतातील अन्य प्रमुख राजरस्ते पुढीलप्रमाणे होते :—

( १ ) **पुष्कलावती-श्रावस्ती मार्ग**—हिमालय पर्वताच्या पायथ्याजवळील तराईचा दलदलीचा प्रदेश कटाक्षाने टाळणारा, तसेच हिमालयोद्भवा नद्या दुर्लंघ्य बनण्यापूर्वी त्यांना ओलांडणारा हा मार्ग वर्षाचे बारा महिने चालू असे.

( २ ) **इंद्रप्रस्थ-ताम्रलिप्ती मार्ग**— गंगा नदीच्या दक्षिणेकडील हा मार्ग अतिविशाल ‘ उत्तरपथ ’ ( आधु. ग्रँड ट्रंक रोड ) चा उपविभाग होता.

( ३ ) **इंद्रप्रस्थ-उज्जयिनी मार्ग**—मध्य प्रदेश आणि गंगा नदीचे खोरे यांना जोडण्याचे कार्य हा मार्ग करीत असे.

( ४ ) **कौशांबी–विदिशा मार्ग**—पश्चिम भारत आणि गंगा नदीचे खोरे यांना जोडण्याचे कार्य हा मार्ग करीत असे.

( ५ ) **ताम्रलिप्ती–कन्याकुमारी मार्ग** — भारताच्या पूर्व किनाऱ्यावरून दक्षिणेकडे जाणारा हा रस्ता गंगा नदीचे खोरे आणि दक्षिण भारत यांना जोडण्याचे कार्य करीत असे. गोदावरी, कृष्णा आणि कावेरी यांच्या खोऱ्यांप्रत जाण्यासाठी तीन छोटे उपरस्ते यामधून दख्खन पठाराच्या रोखाने पश्चिमेकडे फुटत असत. महाभारतात निर्देशिलेला ‘ निषध-दक्षिणापथ मार्ग ’ हाच असावा.

**सिकंदर–आक्रमणमार्ग** —इ. स. पू. ३२७-३२३ च्या दरम्यान वायव्य भारतावर आक्रमण. करणाऱ्या सिकंदरचा आक्रमणमार्ग पुढीलप्रमाणे होता :— निकाइया नगर —> कपिशा —> अश्वक —> नीसा —> गंधार—> मशकावती नगर —> महावन —> वरणा नगर —> पुष्कलावती —> इरावती नगर —> ऐरावती नगर —> उद्‌भांडपुर —> सिंधु नदी—> तक्षशिला देश व नगर—> उरशा —> अभिसार —> भागल —> केकय देश —> निकाइया नगर —> मद्र देश —> ग्लुचुकायन देश —> अद्रिज —> अरिष्ठ —> कठ —> शाकल —> सौभूति—> शिबि —> अग्रश्रेणी —> क्षुद्रक —> मालव —> यौधेय—> अंबष्ठ —> खत्रिय —> वसाति —> शौद्रेय —> मसूरकर्ण —> मुचिकर्ण —> प्रोष्ठि —> शंभु—> ब्राह्मणनगर—> पाटल —> बॅबिलोन.

**वाल्मीकि रामायणात** – या ग्रंथात निम्नलिखित मार्गांचा निर्देश आढळतो:— **१. विश्वामित्र आश्रम—मिथिला मार्ग** ( विश्वामित्र ऋषींनी राम–लक्ष्मणांसमवेत सीतास्वयंवरार्थ केलेल्या प्रवासाच्या संदर्भात; वा. रा. बा. २३-४७); **२. अयोध्या–दंडकारण्य मार्ग** ( श्रीरामाच्या वनवासयात्रेच्या संदर्भात; वा. रा. अयो. ४९ ); **३. केकय–अयोध्या मार्ग** ( रामाच्या वनवासगमनानंतर भरताने आजोळच्या गावाहून केलेल्या प्रवासाच्या संदर्भात; वा. रा. अयो. ७०–७१); **४. लंका–अयोध्या विमान-मार्ग** ( रामाच्या अयोध्या–प्रत्यागमन यात्रेच्या संदर्भात; वा. रा. यु. १२३ ); **५. अयोध्या–वाल्मीकि आश्रम मार्ग** ( सीतात्यागाच्या संदर्भात; वा. रा. उ. ६५ ).

उपरोक्त मार्गांपैकी बिहारमधील बक्सर प्रदेशातून जाणारा ‘ विश्वामित्र आश्रम–मिथिला मार्ग ’ बौद्ध साहित्यात ‘ वैशाली–मिथिला मार्ग ’ वैकल्पिक नावाने सुविख्यात असून, ह्युएनत्संग याच मार्गाने वैशालीहून मिथिलेस आणि तेथून पुढे नेपाळात गेला होता.

**जलवाहतूक**— वाल्मीकि रामायणातील ऋष्यशृंग–आख्यानामध्ये ऋष्यशृंग आश्रम–चंपा नगर यांच्या दरम्यानच्या कोशी आणि गंगा नद्यांतील जलवाहतुकीचा निर्देश आढळतो ( वा. रा. बा. १० ). अंगराजधानी चंपा नगरातील विदेशव्यापार गंगा नदीमधूनच होत असून, कालांतराने या नदीचा प्रवाह त्या गावापासून दूर गेल्याने त्या नगराचे महत्त्व कमी झाले. जातकात चंपा —> पाटलिपुत्र —> वाराणसी —> प्रयाग —> इंद्रप्रस्थ गावांच्या दरम्यानच्या गंगा- यमुना नद्यांतील जलवाहतुकीचा निर्देश आढळतो ( जा. ६·४४७ ). धर्मपाल राजाच्या खालिमपुर ताम्रपटात पाटलिपुत्र येथील गंगा-शोण नद्यांच्या संगमस्थानी नांगरून पडलेल्या व्यापारी गलबतांच निर्देश आढळतो.

**महाभारतात**—या ग्रंथात उत्तर भारतातील कुरुराजधानी हस्तिनापुर व पांडवराजधानी इंद्रप्रस्थ देशाच्या विभिन्न भागांशी जोडणाऱ्या मार्गांचा निर्देश आढळतो. त्यांपैकी विशेष उल्लेखनीय पुढीलप्रमाणे होत :— **१. वारणावत-कांपिल्य मार्ग** ( लाक्षागृहदाहानंतरच्या द्रौपदी स्वयंवराच्या संदर्भात; म. आ. १३९–१४५ ); **२. रैवतक–इंद्रप्रस्थ मार्ग** ( अर्जुनकृत सुभद्राहरणाच्या संदर्भात; म. आर. ५८·२०–२२ ); **३. कुरु–मगध मार्ग** ( भीमसेनकृत मगधराज जरासंधदमनाच्या संदर्भात; म. स. २०·२४–३० ); **४. निषध–विदर्भ–दक्षिणापथ मार्ग** ( नलोपाख्यानाच्या संदर्भात; म. आर. ५८·२०–२२ ); **५. द्वैतवन–मत्स्य मार्ग** ( मत्स्यराज विराटाच्या प्रवासाच्या संदर्भात; म. वि. ५·१–६ ); **६. उपप्लव्य–हस्तिनापुर मार्ग** ( पांडवांच्या स्वराजधानीगमनाच्या संदर्भात; म. उ. ( २.१८–२० ); **७. हस्तिनापुर कुरुक्षत्रमार्ग** ( शरशय्याधिष्ठित भीष्मोपदेशश्रवणाच्या संदर्भात; दृषद्वती आणि ओघवती नद्या ओलांडून; म. शां. ५०·७; ५८·३० ).

**निषध–दक्षिणापथ मार्ग** — उपरोक्त मार्गांपैकी नलोपाख्यानात निर्देशिलेला ‘ निषध-दक्षिणापथ मार्ग ’ उत्तर भारत-दक्षिण भारत दळणवळणाच्या दृष्टीने विशेष महत्त्वाचा

असून, तो संभवतः ऋक्षवत् पर्वत —> अवंती नगर —> दक्षिण कोसल —> तापी नदी —> विदर्भमार्गे दक्षिणापथाप्रत जात असावा ( म. आर. ५८·२०–२२ ). महाभारतमते विंध्यमार्गे दक्षिणापथाप्रत जाणारा हा मार्ग द्यूतामध्ये विगतराज्य निषधराज नलाने तापी नदीच्या उत्तर किनाऱ्यावरुन दमयंतीस दाखविला होता. येथे अस्पष्टपणे सूचित केलेला विदर्भाच्या दक्षिणेकडील देश म्हणजे बऱ्हाणपुरनजिकच्या सातपुडा पर्वतखिंडीनजिकचा आधु. गविलगढ ( चिखलदरा पठार ) आणि अशीरगढ दुर्गांचा प्रदेश असावा.

यावरुन महाभारतकालीन निषध–दक्षिणापथ मार्ग तापी नदी ओलांडून सातपुड्याच्या खिंडीतून बऱ्हाणपुरमार्गे महाराष्ट्राप्रत येणाऱ्या आधु. मुंबई-दिल्ली लोहमार्गासदृश असावा. या लोहमार्गाच्या पूर्वेकडील वाशिम, वेरूळ, अंजटा या इतिहासप्रसिद्ध स्थलांवरून हा मार्ग बऱ्हाणपुर -> मराठवाडा -> खानदेशमार्गे महाराष्ट्राप्रत येत असावा. मुसलमानांच्या दक्षिणेकडील आणि मराठ्यांच्या उत्तरेकडील स्वाऱ्या याच मार्गाने झाल्या होत्या.

**अन्य उत्तर भारत-दक्षिण भारत मार्ग**— गंगा खोऱ्यातील अयोध्येपासून पूर्व समुद्रकिनारीच्या रस्त्याने पाटलिपुत्र —> ताम्रलिप्ती —> महानदी खोरे —> छत्तिसगढच्या मैदानातील रायपुर प्रदेश असा उत्तर आणि दक्षिण भारतास जोडणारा एक मार्गहि प्राचीन काळी अस्तित्वात होता. प्राचीन मगध, पश्चिम कलिंग, ईशान्य महाराष्ट्र आणि दक्षिण कोशल देशांना जोडणाऱ्या याच मार्गाने अगस्त्य आणि दाशरथि राम दक्षिण भारतात आले होते. दमयंतीवियुक्त नल राजा याच मार्गाने अयोध्याधिपती ऋतुपर्णाच्या आश्रयार्थ गेला असून, याच मार्गाने त्याने त्याला वैदर्भी दमयंतीच्या लुटुपुटीच्या स्वयंवरास आणले होते. अशोकाचे कलिंगआक्रमण याच मार्गाने झाले असून, याच मार्गातील ‘ पाटलिपुत्र-ताम्रलिप्ती ’ मार्गाने पश्चिमेस वळून समुद्रगुप्ताने महाकांतार देशाच्या व्याघ्र राजाचा पराजय केला होता. विजयनगरच्या कृष्णदेवरायाने स. १५१३ मध्ये ओरिसा प्रांतातील आपला दिग्विजय याच मार्गाने केला होता.

बौद्ध साहित्यात बावरी भिक्षूचा प्रवासमार्ग म्हणून निर्देशिलेला ‘ पाटलिपुत्र-प्रतिष्ठान मार्ग ’ संभवतः हाच असून (सुत्त. पृ. २१२–२१३), सुत्तनिपातमते हा रस्ता श्रावस्ती—> कौशांबी—> विदिशा—> उज्जयिनीमार्गे प्रतिष्ठान नगरास जात असे. मौर्य-शुंग राज्यकाली हा रस्ता राजकीय आणि व्यापारी दृष्टीने विशेष महत्त्वाचा असून, इ. स. पू. ११५ मध्ये शक सम्राट मेनँडरचे मध्यभारतावरील आक्रमणहि भर्हुत स्तूपस्थानमार्गे जाणाऱ्या याच रस्त्याने झाले होते.

उपरोक्त मार्गाच्या एकूण तीन उपशाखा असून, त्यांपैकी एक बंगाल, आणि मगध ( दक्षिण बिहार ) देशातून जगन्नाथपुरी ( ओरिसा ) —> कोणार्क -> चिल्का सरोवर—> गोदावरी नदीचे मुखमार्गे तामीळ प्रदेशाप्रत जात असे. आधु. बंगाल-मद्रास लोहमार्ग याच रस्त्याने जात असून, त्याची पुरीनजिक पश्चिमेकडे वळणारी एक शाखा नागपूरमार्गे महाराष्ट्रात येते.

उत्तर भारत-दक्षिण भारत मार्गाची अन्य एक शाखा नर्मदेच्या पूर्वेकडील महानदीच्या खोऱ्यातून विंध्य पर्वतातील भेडाघाट आणि नर्मदा नदी ओलांडून रायपुर -> जबलपुरमार्गे बऱ्हाणपुर येथे येत असे. याच रस्त्याची तृतीय शाखा महानदी खोऱ्याच्या पूर्वेकडील छत्तिसगढ पर्वतावरुन वैनगंगा व वर्धा दुआबात उतरत असून, अयोध्या, बिहार, बंगाल, ओरिसा प्रांतांतील लोक याच मार्गाने महाराष्ट्रात आणि तेलंगणात येत असत. नागपूरकर भोसलेहि याच मार्गाने बंगालमध्ये गेले होते.

भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरील गुजराथ आणि सह्य पर्वताला जोडणारा अन्य एक रस्ता प्राचीन काळी अस्तित्वात असून, त्याची एक शाखा सह्याद्री घाट ओलांडून महाराष्ट्रात, आणि अन्य शाखा पश्चिम समुद्रकिनाऱ्याने कोकण प्रदेशातून दक्षिणेस थेट कन्याकुमारीपर्यंत जात असे. या रस्त्याचे उत्तरेकडील टोक कच्छच्या रणातून सिंधु नदीच्या तीरापर्यंत जात असून, याच मार्गाने काठेवाडचे राजे मरु देश ओलांडून सिंधमध्ये, आणि सिंधचे राजे गुजरातमध्ये लष्करी आक्रमण करीत असत.

**दिग्विजयवर्णन**—युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या पांडव बंधुचतुष्टयाच्या निम्नलिखित दिग्विजयांचा निर्देश महाभारतात आढळतो :—१. अर्जुनकृत उत्तरदिग्विजय ( म. स. २३–२५ ); २. भीमकृत पूर्वदिग्विजय ( म. स. २६–२७ ); ३. सहदेवकृत दक्षिणदिग्विजय ( म. स. २८ ); ४. नकुलकृत पश्चिमदिग्विजय ( म. स. २३–२५ ). या दिग्विजयवर्णनावरुन दक्षिणेतील पांड्य, आंध्र, केरल देशांपासून उत्तरेकडील कश्मीर, श्वेत पर्वत, किंपुरुष, गंधर्व, आणि हरि वर्षापर्यंत युधिष्ठिराचे सार्वभौमत्व प्रस्थापित झाले असावे. परंतु त्यांपैकी किती प्रवास राजरस्त्यांनी, आणि किती आडवळणाच्या मार्गांनी

झाला, याचा उलगडा होत नाही. युधिष्ठिराच्या अश्वमेध दिग्विजयसमयी हस्तिनापुराहून निघालेला अर्जुन भारतवर्षाच्या पूर्व, दक्षिण, पश्चिम, वायव्य भागातील देश क्रमशः जिंकून गंधारमार्गे स्वराजधानीस परतला होता ( म. आश्व. ७३–८६ ).

**तीर्थयात्रा मार्ग**—महाभारतात भारतवर्षातील निम्नलिखित तीर्थयात्रा-मार्गांचे वर्णन आढळते :— १. **हिमालय–शतशृंग पर्वत मार्ग** ( पांडु राजाने आक्रमिलेला; म. आ. ११०·४२–४५ ); २. **अर्जुन प्रथम वनवास मार्ग** ( पूर्व–दक्षिण भारतमार्गाने; म. आ. २०५–२१२ ); ३. **लंका-गोकर्ण मार्ग** ( रावण प्रवास; म. आ. २६१-५३ ); ४. **अर्जुन द्वितीय वनवास मार्ग** ( हिमालय पर्वतान्तर्गत; म. आर. ३९·१६–२८; ४४; ४९ ); ५. **धौम्य तीर्थयात्रा मार्ग** ( म. आर. ८४–८८ ); ६. **लोमश तीर्थयात्रा मार्ग** ( म. आर. ८९·१७३ ); ७. **गंधमादन–द्वैतवन मार्ग** ( म. आर. १७३·१७; १७४·२१ ); ८. **कुरुक्षेत्र–कैलास मार्ग** (अर्जुन पाशुपतप्राप्त्यर्थ; म. द्रो. ५७·२३–३४ ); ९. **मिथिला–व्यासाश्रम मार्ग** ( शुकाचार्य प्रवासाच्या संदर्भात; म. शां ३१२–३१५ ); १०. **शुक सूर्यलोकगमन मार्ग** (म. शां.३१८–३२० ); ११. **अंगिरस् तीर्थयात्रा मार्ग** ( म. अनु. ९४ ).

**पौराणिक साहित्यात**— भागवतात हस्तिनापुर ( कुरुराजधानी )–द्वारका ( कृष्णराजधानी ) हमरस्त्याचा निर्देश अनेक वेळा आढळतो ( भा. १·१०·३४–३५; ७१·२१–२२ ). महाभारतमते हा मार्ग पंचनद→आभीर→कुरुक्षेत्रमार्गे इंद्रप्रस्थास जात असून, श्रीकृष्ण निर्याणानंतर यादव स्त्री-परिवारासह अर्जुन याच मार्गाने इंद्रप्रस्थास गेला होता ( म. मौ. ८ ). महाराष्ट्रातील करवीरपुर–गोमंतगिरि मार्गाचा निर्देश हरिवंशात आढळतो ( ह. वं. २·३९·५५–६४ ).

**बौद्ध साहित्यात** — या साहित्यकाली मगधराजधानी पाटलिपुत्र हे पूर्व भारतातील सर्वप्रमुख सांस्कृतिक आणि राजकीय केंद्र असून, त्यापासून अनेक हमरस्ते विभिन्न गावांप्रत फुटत असत. त्यांपैकी ‘ पाटलिपुत्र–ताम्रलिप्ती मार्ग ’ व्यापारी दृष्टीने विशेष महत्त्वाचा असून, मौर्यकालीन अतिविशाल ‘ ताम्रलिप्ती-पुरुषपुर मार्गा ’चा तो भाग होता. गंगा नदीमार्गे जाणाऱ्या या रस्त्यात खुष्कीचा प्रवास फारच थोडा होता. महावंशमते बोधिगया येथील बोधिवृक्षाची शाखा याच मार्गाने सिलोनला नेली होती ( महा. १९·६ ).

**व्यापारी मार्ग**— ताम्रलिप्ती हे तत्कालीन भारतातील प्रमुख व्यापारी बंदर असून, त्यास वाराणसी, चंपा, राजगृह, आदि बाजारपेठांशी जोडणारे व्यापारी रस्ते बौद्धकाली अस्तित्वात होते. याचे उलट पाटलिपुत्र नगराला पूर्वकालीन मगधराजधानी राजगृहशी जोडणारा ‘ पाटलिपुत्र–राजगृह मार्ग ’ अतिविशाल ‘ वैशाली–राजगृह मार्गा ’ मध्ये अंगभूत होता. याच मार्गाने फाहियेन् पाटलिपुत्राहून राजगृहास गेला होता. पाटलिपुत्र–गया मार्गाचा निर्देश ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात आढळतो ( आर्कि. सर्व्हे. ८·४८–५१ ).

पूर्व भारतातील वैशाली हे तत्कालीन भारतातील अन्य एक महत्त्वाचे नगर असून, वायव्य भारतातील तक्षशिला आणि पुरुषपुर नगरांशी त्यास जोडणारा एक हमरस्ता अस्तित्वात होता (सुत्त. १०·१३). या रस्त्यांपैकी वैशाली–कुशीनगर मार्गाने गौतम बुद्ध अनेक वेळा गेला असून, फाहियेन्ने आपला प्रवासहि याच मार्गाने केला होता. वैशालीहून मध्य भारतातील माहिष्मती नगराप्रत उज्जयिनीमार्गे जाणारा, तसेच राजगृह आणि वाराणसी गावाप्रत जाणारे अन्य दोन स्वतंत्र व्यापारी रस्ते तत्काली अस्तित्वात असून, त्यांपैकी वैशाली–राजगृह रस्त्याने ह्युएन्त्संग तैलढक गावी, आणि गंगातीरानुगामी ‘ वैशाली-वाराणसी मार्गा ’ने तो वाराणसीहून वैशालीस गेला होता. ‘ वैशाली-मिथिला ’, तसेच ‘ वैशाली–पावा ’ मार्गांचा निर्देशहि बौद्ध साहित्यात आढळतो ( दीघ. २·१२२–१२६; सुत्त. पृ. १९४ ).

विदेहराजधानी मिथिलेहून चंपा आणि श्रावस्ती गावांप्रत जाणारे स्वतंत्र रस्ते बौद्धकाली असून, ‘ चंपा–राजगृह ’, ‘ राजगृह–तक्षशिला ’, ‘ गया–राजगृह ’ मार्गांचा निर्देशहि बौद्ध साहित्यात आढळतो ( विनय. पृ. २६७; २८० ). बौद्ध साहित्यमते कपिलवस्तु आणि वैशाली गावावरून राजगृहास जाणारा ‘ श्रावस्ती–राजगृह मार्ग ’ तत्काली अस्तित्वात असून ( विनय. २·१५९ ), ‘ श्रावस्ती–वाराणसी ’ ( मज्झिम १·४७३; विनय. पृ. ३५० ), तसेच ‘ श्रावस्ती–साकेत ’ ( विनय. पृ. २५६ ) मार्गहि प्रचारात होते. यापैकी ‘ श्रावस्ती–साकेत मार्ग ’ अठेचाळीस मैलांचा असून, ‘ राजगृह–तक्षशिला मार्गा ’–मध्ये तो अंगभूत होता.

**सातवाहन राज्यकाली** — महाराष्ट्रातील प्रतिष्ठान

( आधु. पैठण ), आणि पश्चिम समुद्रकिनाऱ्यावरील कल्याण यांना जोडणारा, आणि अजंटा→ वेरूळ→कार्ले→ भाजे आदि बौद्ध गुफास्थानावरून जाणारा एक व्यापारी हमरस्ता सातवाहनकाली अस्तित्वात असून, तो नाणे-घाटातून सह्य पर्वत ओलांडत असे.

**चिनी प्रवाश्यांचा प्रवासमार्ग** — इ. स. ४५० मध्ये भारतात आलेल्या चिनी प्रवासी फाहियेन्चा प्रवासमार्ग निम्नप्रकारे होता :–मध्य चीन → गोबीचे वाळवंट → हिंदुकुश पर्वत → उत्तर भारत → ताम्रलिप्ती बंदर ( बंगाल ) →(समुद्रमार्गे) सिलोन → चीन, याचे उलट ह्युएन्त्संगच्या प्रवासाचा मार्ग निम्नप्रकारे होता :— चीन → असर्तु → कु–चिह → इस्सिककुल → ताश्कंद → समरकंद → कुंदुझ → पेशावर → भारत → कुंदुझ→ बल्ख → काशगर → यारकंद → लोप नोर → गोबीचे वाळवंट → चीन.

**मध्ययुगीन मार्ग** — इ. स. १६ व्या शतकात 'विजयनगर- विजापुर' संज्ञक हमरस्ता अस्तित्वात असून, स. १५६५ मध्ये विजयनगर आणि दक्षिण भारतातील चार मुसलमानी सुलतानांच्या दरम्यानचे तालिकोट हे युद्धस्थान याच मार्गावर होते. चोल राजा राजराज ( तृतीय ) च्या स. १२३१ च्या तिरुवेंडिपुरम् शिलालेखात दक्षिण भारतातील 'श्रीरंगम्-शेंडमंगलम् मार्गा'चा निर्देश आढळतो.

वर उल्लेखिलेल्या प्राचीन मार्गांचे सविस्तर विवरण आम्ही प्रस्तुत ग्रंथांत जागच्याजागी दिले आहे.

## बृहत्तर भारत

**आशियाचा सांस्कृतिक केंद्रबिंदू** — इ. स. ५ व्या शतकानंतर अनेक शतकेपर्यंत भारतवर्ष हा आशिया खंडाचा सांस्कृतिक केंद्रबिंदू बनल्याचे प्राचीन भूगोलाच्या अध्ययनावरून स्पष्टपणे दिसते. पश्चिमेला इराण व अफगाणिस्तान; उत्तरेला मध्य आशिया, तिबेट व चीन; पूर्वेला ब्रह्मदेश, आसाम, इंडो-चीन व इंडोनेशिया; आणि दक्षिणेला सिलोन या विस्तीर्ण भूप्रदेशावर भारताचे सांस्कृतिक आणि व्यापारी वर्चस्व, तसेच वसाहती प्रस्थापित झाल्या होत्या. भारतीयांचे हे आशियाव्यापी सांस्कृतिक वर्चस्व आणि वसाहतीकरण हा प्राचीन भारतीय भूगोलान्तर्गत उज्ज्वल अध्याय 'बृहत्तर भारत' नावाने ओळखला जातो. या प्रदेशातील भारतीय वळणाच्या समृद्ध स्थापत्य आणि शिल्पावशेषांवरून, तसेच संस्कृत शिलालेखांवरून बृहत्तर भारताच्या व्याप्तीची आणि समृद्धीची कल्पना येते.

**वसाहतीकरणाचे प्राचीन निर्देश**— आशिया खंडाच्या विभिन्न भागांतील भारतीयांच्या उपरोक्त वसाहतींचा काहीहि निर्देश परंपरागत भारतीय ग्रंथांत अथवा पौराणिक साहित्यात आढळत नाही. इतकेच नव्हे, तर अशा सागरी प्रवासाचा आणि अभारतीयांशी ( म्लेंच्छ ) वर्णसंकराचा स्मृतिसाहित्यात सुस्पष्ट निषेध आढळतो.

अशा प्रतिकूल सामाजिक वातावरणात स्मृतिसाहित्यातील परदेशगमनाच्या निषेधाला न जुमानता भारतीय समाजातील एक वर्ग सागरप्रवास आणि विदेशी व्यापार करीत असल्याचा अस्पष्ट पुरावा कौटिलीय अर्थशास्त्र-कालापासून (इ. स. पू. ४ थे शतक ) उपलब्ध होतो. या ग्रंथमते तत्कालीन आदर्श राजे राज्याबाहेर नवनवीन वसाहतींची स्थापना करून स्वराज्यातील अधिक लोकवस्तीची सोय लावीत असत. मेगॅस्थिनेसच्या मते चंद्रगुप्त मौर्याचे नौकानयनाचे आणि सागरी जलवाहतुकीचे स्वतंत्र आरमार खाते होते. सातवाहन राजांच्या नौकाचिह्नांकित नाण्यांवरून दक्षिण भारताच्या भूप्रदेशाप्रमाणेच सागरावरहि त्यांचे अधिराज्य असावे. समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद प्रशस्तिलेखमते (स. ४५०) भारतवर्षाच्या समस्त द्वीपांवर त्याचे अधिराज्य होते. चोल राजांच्या शिलालेखमते ( इ. स. ११ वे शतक ) आग्नेय आशियातील सुमात्रा आणि मलाया द्वीपकल्पाचा बराच भाग त्यांनी नाविक आक्रमणाने जिंकला होता.

**व्यापारी जलवाहतूक**—उपरोक्त संकीर्ण निर्देशांवरून भारतीयांच्या आशिया खंडातील वसाहतीकरणाचा मूलारंभ इ. स. पू. ३ ऱ्या–४ थ्या शतकात झाला असला, तरी त्यानंतर कित्येक शतके धाडसी नाविक व्यापाऱ्यांच्या सागरी साहसापुरतेच हे संबंध मर्यादित राहिले असावेत. या दळणवळणास राजनैतिक नाविक आक्रमणाचे स्वरूप चोल राज्यकालापर्यंत ( इ. स. ११ वे शतक ) प्राप्त झाले नव्हते. इतकेच नव्हे तर, त्यांची ही नाविक आक्रमणाची परंपरा उत्तरकालीन अन्य कोणाहि राजाने पुढे चालविली नाही.

**व्यापारी संबंध**—वैयक्तिक लाभासाठी धोक्याचा आणि जिकिरीचा सागरी प्रवास अंगिकारणाऱ्या भारतीय व्यापाऱ्यांच्या अनेक आख्यायिका बृहत्कथा ( इ. स. पू.

३–४ थे शतक ), बौद्ध जातक, जैन ' समराइच्च-कहा ' आदि ग्रंथांत आढळतात. सागरी व्यापाराच्या साह्यानें धनसंपत्ती प्राप्त करू इच्छिणारे साहसी व्यापारी, राजपुत्र अथवा हद्दपार राजे हे या आख्यायिकांचे नायक असून, त्यांचा नानाविध आपदायुक्त सागरी प्रवास हा त्यांचा कथाविषय आहे. पाचशे गलबतांसह सुवर्णद्वीपास ( आधु. इंडो-चीन आणि इंडोनेशिया ) गेलेल्या नागदत्त नामक व्यापाऱ्याची कथा ' कथाकोशा ' त दिली असून, बौद्ध मिलिंदपन्हो, आणि निद्देसमते भारत आणि सुवर्णभूमी-मध्ये अशी सागरी जलवाहतूक नियमितपणे चालू असे.

**वसाहतीकरण**—उपरोक्त व्यापाऱ्यांच्या अनुकरणानें आग्नेय आशियात गेलेल्या भारतातील हद्दपार राज-कुमारांनी आणि राजांनी उत्तरकालात तेथे स्वतःची राज्ये स्थापिली. तेथे गेलेल्या हिंदु आणि बौद्ध धर्मप्रसार-कांनी भारतीय धर्मांचा आणि संस्कृतीचा प्रसार केला. त्या देशातील प्रचलित आख्यायिकांत भारतातील विजनवासी आणि धर्मगुरुप्रेरित क्षत्रिय राजकुमारांनी या वसाहतींची स्थापना केल्याचे सूत्र पुनः पुन्हा आढळते.

**व्यापारी मार्ग**—भारतास आग्नेय आशियाशी जोडणारे खुष्कीचे, तसेच सागरी मार्ग प्राचीन काळापासून प्रचारात होते. यापैकी उत्तर ब्रह्मदेश आणि यूनानमार्गे चीनला जाणारा खुष्कीचा मार्ग इ. स. पू. २ ऱ्या शतकापासून अस्तित्वात असून, तत्कालीन चिनी साहित्यमते चिनी व्यापारी याच रस्त्याने उत्तर भारत -> अफगाणिस्तानमार्गे बॅक्ट्रियास जात असत. इ-त्सिंगच्या प्रवासवर्णनमते याच हमरस्त्याने भारताप्रत आलेल्या वीस चिनी यात्रेकरूंसाठी एका भारतीय राजाने ( इ. स. ३-४ थे शतक ) एक मंदिर बांधले होते. दक्षिण ब्रह्मदेश, इंडो-चीन आदि देशांप्रत जाणारे उपरस्ते यापासून फुटत असून, किय-तन् नामक चिनी ग्रंथकाराने निर्देशिलेला अनाम-भारत मार्ग यापैकीच एक असावा. ब्रह्मी साहित्यमते पूर्व भारत आणि ब्रह्मदेश यांना आराकान पर्वतमार्गे जोडणारा अन्य एक हमरस्ताहि प्राचीन काळी अस्तित्वात होता.

**सागरी मार्ग**—भारतास आग्नेय आशियातील विभिन्न बंदरांशी जोडणारा एक सागरी मार्ग प्राचीन काळी अस्तित्वात होता. पेरिप्लस आणि टॉलेमीच्या मते भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरील भडोच, आणि पूर्व किनाऱ्यावरील ताम्रलिप्ती बंदरांच्या दरम्यान अनेक बंदरे अस्तित्वात असून, त्यामधून मलाया द्वीपकल्पाप्रत निघालेली भारतीय गलबते प्रथम ओरिसामधील गंजम जिल्ह्यातील आधु. गोपालपुरनजिकच्या पलौर बंदरात येत. तेथून मलाया द्वीपकल्पाच्या मार्गे ती मलाक्का सामुद्रधुनीतून ईस्ट-इंडीज आणि इंडो-चीन द्वीपकल्पाच्या पूर्व किनाऱ्या-प्रत जात. हा मार्ग इंडो–चीन द्वीपकल्पाला वळसा घालून जात असल्याने अनेक प्रवासी क्राच्या भूशिरात उतरून, आणि तकुआ-पा आणि चैय गावांच्या दर-म्यानचा मलाया द्वीपकल्पाचा चिंचोळा भाग खुष्कीच्या मार्गानें ओलांडून पूर्व किनाऱ्यावरील बँडनच्या सामुद्र-धुनीत पोहोचत. या भागात आजहि भारतीय वळणाचे लोक, आणि स्थापत्यावशेष आढळतात.

**अन्य जलमार्ग**—उपरोक्त जलमार्गांच्या जोडीला अंदमान आणि निकोबारच्या दरम्यानच्या मार्गानें, तसेच निकोबारच्या दक्षिणेकडील मार्गानें तामिळनाडहून मलाया द्वीपकल्पातील तकुआ-पा आणि केदह बंदराप्रत जाणारे भारतीय सागरी हमरस्तेहि प्राचीन काळी अस्तित्वात होते. आंध्र प्रदेशातील व्यापारी दक्षिण ब्रह्मदेशातील नॅव्हॉय बंदरापर्यंत सागरी मार्गानें, आणि नंतर तीन पॅगोडा घाटाच्या खुष्कीच्या मार्गानें मेनाम त्रिभुज प्रदेशा-तील कन्बुरी नदीकाठच्या पोंग्-तुक् आणि प्र-पथोम् बंदरा-प्रत जात. या त्रिभुज प्रदेशाच्या उत्तरेकडील मौलमैन बंदराहून मेनाम नदीकाठच्या रहेंग गावाप्रत, आणि तेथून पुढे मेनाम नदीखोऱ्यातून सि-तेप् गावानजिकच्या पठारी मार्गानें मेकाँग नदीच्या खोऱ्याप्रत जाता येत असे.

**आग्नेय आशियातील वसाहती**—या प्रदेशातील भारतीय वसाहती आधु. ब्रह्मदेश, ईस्ट-इंडीज आणि इंडो-चीन द्वीपकल्प आदि बेटांमध्ये होत्या. या वसाहतींचा द्वीपकल्पीय प्रदेश भारत आणि चीनपासून मध्य आशिया-तील योमा संज्ञक उत्तर-दक्षिण पर्वतश्रेणीनें विभक्त झाला असून, ब्रह्मदेश हा इरावदी, चिंद्विन, सित्तांग आणि साल्वीन नद्यांच्या खोऱ्यात, आणि सयाम आणि कांबोडिया अनुक्रमे मेनाम आणि मेकाँग नद्यांच्या खोऱ्यात होते. साल्वीन आणि मेकाँग नद्यांच्या दरम्यान उत्तर सयाम, तसेच मेनाम आणि अन्य छोट्या नद्यांच्या दरम्यान मध्य सयाम असून, क्राच्या भूशिरापर्यंतच्या मलाया द्वीपकल्पाच्या प्रदेशास दक्षिण सयाम म्हणत. भौगोलिक दृष्ट्या मात्र सयामच्या सामुद्रधुनीपासून सिंगापुरच्या खाडीपर्यंतचा सारा प्रदेश म्हणजे मलाया द्वीपकल्प होय.

उत्तर, मध्य आणि दक्षिण सयाम द्वीपकल्पांच्या पूर्व-समुद्रपट्टीवर ( आधु. अनाम, सरासरी रुंदी ७० मैल ) चंपा नामक भारतीय वसाहत असून, अनाम आणि

सयामच्या दरम्यानच्या मेकाँग नदीच्या खोऱ्यातील आधु. लाओस, कांबोडिया आणि कोचीन-चीनमध्ये कंबूज संज्ञक भारतीय साम्राज्य होते. मेकाँग नदी आणि तोन्ले-सप् सरोवरांच्या संगमस्थानीचा अंकोर प्रदेश त्या साम्राज्याचा बालेकिल्ला होता.

इंडो-चीनचा सर्वात दक्षिणेकडील जिह्वाकृती भाग मलाया द्वीपकल्प नावाने सुविख्यात असून, त्याच्या पश्चिमेस हिंदी महासागर, आणि पूर्वेस दक्षिण चीन समुद्र आहे. मलाया द्वीपकल्पाच्या दक्षिणेस आणि पश्चिमेस मलाक्का सामुद्रधुनी आणि सुमात्रा बेट असून, सुमात्राच्या आग्नेयेस यवद्वीप ( आधु. जावा), बलिद्वीप ( आधु. बाली ) आदि बेटांची अखंड रांग आहे. बलिद्वीपाच्या उत्तरेस कलिमंथन (आधु. बोर्निओ) बेट असून, त्याच्या उत्तरेस इंडोनेशियाची सुमारे सहा हजार छोटी बेटे आहेत. इंडो-चीन आणि इंडोनेशियाचा हा सारा प्रदेश प्राचीन काळी ' सुवर्णभूमि ' नावाने ओळखला जात असे.

**वसाहतीकरणाची प्रक्रिया** — कोणत्याहि राजसत्तेचा पाठिंबा नसताना हरहुन्नरी भारतीय खलाश्यांनी केलेले आग्नेय आशियाचे वसाहतीकरण हा एक ऐतिहासिक चमत्कार मानावा लागेल. स्वतःच्या लष्करी कौशल्याने, श्रेष्ठ संस्कृतीच्या आभासाने, अथवा जडीबुटीच्या वैद्यकीय ज्ञानाने दोन चार गलबतांच्या कप्तानाने अथवा राजकुमाराने रानटी देशातील स्थानिक राजकन्येशी विवाह करून त्या बेटाचा राजा बनावयाचे, असा परीकथासदृश बनाव आग्नेय आशियातील बहुतांशी भारतीय वसाहतींच्या बाबतीत दिसतो. कोचीन-चीन आणि दक्षिण कंबोडियातील स्थानिक परंपरेनुसार व्यापारी नौकेतून आलेल्या इ. स. ३ ऱ्या शतकातील एका देवप्रेषित ब्राह्मण-कुमाराने स्थानिक राणीला लष्करी कौशल्याने प्रभावित करून या देशात ' फुनान् ' संज्ञक राज्य स्थापिले. कंबूज देशातील एका शिलालेखमते ( स. ६७५ ) कौंडिन्य नामक ब्राह्मणाने तद्देशीय सोमा नामक नाग राजकन्येशी विवाह करून या देशाची आणि भवपुर नामक राजधानीची स्थापना केली. याच देशातील अन्य एका आख्यायिकामते कौंडिन्य हा इंद्रप्रस्थ देशाचा हद्दपार राजकुमार होता. मलाया द्वीपकल्पीय आख्यायिकामते मगधराज अशोकवंशीय एक हद्दपार राजकुमार दंतपुरहून मलाया सामुद्रधुनीप्रत येत असता, बोट फुटून तो नजिकच्या प्रदेशास लागला, आणि तेथेच त्याने लिगोर राज्यांची स्थापना केली. जावा बेटातील आख्यायिकामते गुजरातेतील बंदरातून ( भडोच ) जलप्रवासार्थ निघालेल्या हस्तिनापुरच्या राजकुमाराने यवद्वीपाच्या भारतीय वसाहतीची स्थापना केली. ब्रह्मी लोकसाहित्यमते कपिलवस्तुनिवासी अभिराज नामक शाक्य राजपुत्राने उत्तर ब्रह्मदेशावर ससैन्य आक्रमण करून, आणि इरावदी नदीकाठी संकिस्स ( सांकाश्य ) नामक नगर स्थापून तो या देशाचा राजा बनला.

**अन्य वसाहती** — उपरोक्त वसाहतींच्या जोडीला भारतीयांच्या अन्य संकीर्ण वसाहतींसंबंधीच्या अनेक आख्यायिकाहि आग्नेय आशियात प्रचलित आहेत. पेगुदेशीय आख्यायिकामते कृष्णा-गोदावरी दुआबातील नाविक वसाहतकारांनी इरावदी नदीच्या त्रिभुज प्रदेशात भारतीय वसाहत स्थापून ते ब्रह्मदेशातील थतोन आणि पेगु राज्यांचे अधिराज बनले. जावा देशातील आख्यायिकामते कलिंग देशातील लोकांनी यवद्वीपातील छोट्या वसाहती स्थापिल्या.

चिनी साहित्यमते मलाया द्वीपकल्पात इ. स. ४-५ व्या शतकात १००० ब्राह्मण आणि ५०० ' हु ' (वैश्य) कुटुंबांची 'तुएन्–सिएन् ' नामक समृद्ध भारतीय व्यापारी वसाहती अस्तित्वात असून, फुनान् नामक भारतीय वसाहतीची ती मांडलिक होती. तेथील बहुतांशी स्थानिक मुलींनी भारतीय ब्राह्मणांशी विवाह केले असून, तेथील बहुसंख्य लोक हिंदु धर्मानुयायी होते. व्यापाराच्या निमित्ताने प्रथम प्रवेश, आणि नंतर धर्मप्रसार हा भारतीय वसाहतीकरणाचा क्रम दिसतो.

**कालनिर्णय**—डॉ. रमेशचंद्र मुजुमदार यांच्या मते फुनान् ही आग्नेय आशियातील सर्वाधिक प्राचीन भारतीय वसाहत असून ( इ. स. १ ले शतक ), इंडो-चीन देशान्तर्गत खन्ह-होअ प्रांतातील व्हो–चन्ह गावी या वसाहतीच्या श्रीमार राजाचा ( इ. स. २ रे शतक ) संस्कृत शिलालेख सापडला आहे. टॉलेमीच्या ग्रंथात ( इ. स. २ रे शतक), तसेच 'निद्देस' नामक बौद्ध ग्रंथात ब्रह्मदेशापासून जावापर्यंतच्या प्रदेशातील भारतीय वळणाच्या अनेक स्थलनामांचा निर्देश असून, चिनी साहित्यमते 'ये–तिऔ' ( यवद्वीप ) देशाच्या तिऔ–पिएन् ( देववर्मन् ) राजाने स. १३२ मध्ये चिनी राजदरबारात आपला वकील पाठविला होता. वाल्मीकि रामायणातहि यवद्वीपाचा निर्देश आढळतो ( वा. रा. कि. ४०.२८–२९).

ब्रह्मदेशात इ. स. २ ऱ्या शतकातील एक ब्राह्मी शिलालेख सापडला असून, इ. स. ३ ऱ्या शतकातील

चिनी साहित्यमते मध्य प्रदेशातील लिन्-यँग् नामक भारतीय बौद्ध वसाहतीत एक लाख कुटुंबे आणि हजारो बौद्ध भिक्षू रहात असत. लिअँग राजघराण्याच्या चिनी इतिहासमते (इ. स. ६ वे शतक) मलाया द्वीपकल्पात इ. स. २ ऱ्या शतकात लँग-य नामक संस्कृतप्रधान भारतीय वसाहत होती. सुमात्रा, जावा बेटांत, तसेच सयाम, अनाम आदि देशांत अमरावती शैलीच्या बुद्धप्रतिमा (इ.स. २–३ रे शतक) सापडल्या असून, त्यावरून इ.स. १ ल्या शतकात उत्तरेस ब्रह्मदेशापासून दक्षिणेस जावा आणि आग्नेयेस अनामपर्यंत भारतीय वसाहती सुस्थापित झाल्या असाव्यात.

**भारत–चीन व्यापारी संबंध**— भारत–चीन व्यापारी संबंध इ. स. पू. २ ऱ्या शतकात प्रस्थापित झाले असले, तरी इ. स. १ ल्या शतकापर्यंत चिनी गलबते केवळ उत्तर अनामपर्यंतच येऊ शकत असत. तेथून पुढील वाहतूक भारतीय गलबते करीत असून, या दूरवर्ती सफरीमध्येच इंडो–चीन आणि इंडोनेशिया बेटांचा प्रथम परिचय भारतीय नाविकांस झाला असावा.

इ. स. १ ल्या शतकात एका वेळी ६००–७०० उतारूंची वाहतूक करणारी गलबते इराणच्या अनुकरणाने भारतवर्षात तयार होऊ लागल्यानंतर भारतातील हिंदु वसाहतकार सर्वप्रथम आग्नेय आशियात गेले असावेत. चिनी साहित्यमते इ. स. १ल्या शतकात हिंदी महासागरातील नौकानयनयोग्य मोठी गलबते चीन देशात तयार होत नसून, आशियातील रानटी लोकांच्या गलबतातून युरोप–चीन मालवाहतूक चालू असे. युरोपमध्ये जाणारे चिनी सामान आणि प्रवासी याच विदेशी गलबतातून जात असत. यावरून युरोप आणि इराणमधील नौकानयन आणि मोसमी वाऱ्यांचे ज्ञान (स. ४२) दक्षिण भारतीय लोकांनी आत्मसात केल्यानंतर, आग्नेय आशियातील वसाहतीकरणाचा श्रीगणेशा झाला असावा.

**उत्खननावशेष** — सयामच्या सामुद्रधुनीपासून १६ मैलांवरील, आणि कोचीन-चीनच्या पश्चिमेकडील ओक्-इओ गावी इंडो-चीनमधील प्राचीनतम भारतीय नगराचे (इ. स. २ रे शतक) उत्खननावशेष (२ × १ मैल) सापडले आहेत. या स्थानी भारतीय शैलीची मृत्तिकापात्रे, मणी हिंदु देवताचिह्नांकित शिशाचे ताईत, हिंदु अक्षरपंक्तियुक्त सुवर्णालंकार, तसेच संस्कृत शिलालेख आणि ग्रीक–हिंदु शैलीची अनेक कॉर्नेलियन शिल्पे सापडली आहेत.

डॉ. मुजुमदार यांचे मते हे सारे अवशेष उत्तर अश्मयुगीन (निओलिथिक) काळातील असून, येथील लोक अश्मयुगीन अवस्थेत असतानाच भारतीय वसाहतीची स्थापना येथे झाली असावी. अनाममधील स-ह्युन्ह, कांबोडियातील सम्रोंग्-सेउ, आणि मलाया द्वीपकल्पातील कुअला सोलिंग्सिंग् गावीहि असेच अवशेष सापडले आहेत.

**अश्मयुगीन संस्कृती**—आग्नेय आशियातील विभिन्न भारतीय वसाहतीतील अश्मयुगीन उत्खननावशेषांवरून भारतीय वसाहतीकरणाच्या काळी येथील लोक भारतातील खश, मुंड आदि आदिवासी लोकांप्रमाणे वन्य अवस्थेत असावेत. त्यांची भाषा भारतातील अनार्य लोकांप्रमाणेच असून, शिकार, मच्छिमारी, पशुपालन आदि कला त्यांस अवगत असाव्यात. बांबूच्या घरात रहाणारे हे लोक झाडांच्या सालींची वल्कले परिधान करीत असावेत. समुद्रकिनारीच्या वास्तव्यामुळे नौकानयनाचे प्राथमिक ज्ञान त्यांस असावे. अशा तऱ्हेने भारतातील आर्य वसाहतीकरणाची पुनरावृत्ती करूनच आग्नेय आशियातील भारतीय वसाहतींची स्थापना झाली असावी. चिनी साहित्यमते फुनान्मधील नग्न आदिवासी स्त्री-पुरुषांना भारतीयांनी वस्त्रविद्या शिकविली. परंतु हे उदाहरण अपवादात्मक स्वरूपाचे असावे. जावामधील संस्कृती तत्कालीन भारतापेक्षा प्रगत अवस्थेत असल्याचे डच अभ्यासकांचे अनुमानहि असंभव वाटते.

**धर्म**—उपलब्ध शिलालेखांवरून आग्नेय आशियातील भारतीय वसाहतींमध्ये बौद्ध धर्मापेक्षा हिंदु धर्माचे प्राबल्य अधिक असावे.

**आद्य वसाहतकार**—दक्षिण भारतातील मलबार आणि कॉरोमँडल किनाऱ्यावरील लोक, तसेच उत्तर भारतातील ताम्रलिप्ती (आधु. तामलुक्) बंदराच्या परिसरातील लोक आग्नेय आशियातील भारतीय वसाहतींचे अग्रदूत असावेत. टॉलेमी आणि पेरिप्लसच्या काळी बहुतांशी सारे नौकानयन समुद्रकिनाऱ्याच्या प्रदेशातून होत असल्याने, दक्षिण भारतातील बोटीहि प्रथम ताम्रलिप्ती येथे येऊन नंतर मलाया द्वीपकल्पाप्रत जात असत. त्यामुळेच भारतीय दक्षिण भारतातून परस्पर आग्नेय आशियाप्रत जाण्याची शक्यता कमी वाटते. त्या भागातील भारतीय वसाहतींची नावे, तसेच तेथील स्थापत्य उत्तर आणि दक्षिण भारतीय संमिश्र धर्तीचे आहे.

**मध्य आशियात**—मध्य आशियातील कपिशा (आधु. काफिरीस्तान), खोतान, गझनी, जागुड, हुपियान, अंदराब, कुंदुझ आदि देशांतील बौद्ध मठांच्या ह्युएन्त्संगकृत

वर्णनावरून त्या प्रदेशात इ. स. ६–७ व्या शतकात बौद्ध संस्कृतीचे प्राबल्य असावे. वायव्य भारतातील मक्रान किनारा, बलुचिस्तान, वझिरीस्तान आदि पर्वतीय प्रदेश, तसेच उत्तर भारतातील काबूल नदीचा जलसंचय प्रदेश, तसेच सिंधु नदीच्या पश्चिम, आणि पूर्व किनाऱ्यावरील सारा प्रदेश तत्कालीन भारतवर्षात समाविष्ट होत असे. भारतवर्षाच्या अफगाणिस्तानातील या वसाहतीकरणाचे सारे श्रेय अशोकाने या प्रदेशात हिरीरीने केलेल्या बौद्ध धर्मप्रसारास द्यावे लागेल. इ. स. १०–११ व्या शतकात मुसलमानी राजसत्ता आणि संस्कृतीचे आक्रमण येईपर्यंत येथील बौद्ध धर्माचे प्राबल्य अबाधित होते. म्हणूनच आग्नेय आशियान्तर्गत भारतीय वसाहती हिंदु धर्म-प्रधान, आणि मध्य आशियातील भारतीय वसाहती बौद्ध धर्मप्रधान अशी भौगोलिक विभागणी सुस्पष्टपणे दिसते.

**बृहत्तर भारतातील कलाविकास** — प्राचीन भारतीय कलाविकासाच्या संदर्भात बृहत्तर भारतातील स्थापत्य आणि शिल्पकलेचा कालानुक्रम विशद करणारे परिपत्रक खाली दिले आहे. भारतीय आणि बृहद्भारतीय कला-विकासांचा क्रम आणि परस्परसंबंध याची सुस्पष्ट कल्पना त्यावरून येऊ शकेल:—

## भारतीय आणि बृहद्भारतीय कलाविकासाचा कालानुक्रम

| काल | भूमध्य आणि नैर्ऋत्य आशिया | भारत | बृहत्तर भारत ( आग्नेय आशिया ) |
|---|---|---|---|
| इ. स. पू. ९०० – २७०० | १. मेसापोटेमिया–लगश राजवंश<br>२. ईजिप्त–पिरॅमिड्स | अग्नि संस्कृती | — |
| इ. स. पू. २५०० – २४०० | — | १. सिंधु संस्कृती – मोहेन्जोदारो, हरप्पा<br>२. ऋग्वेदरचना | — |
| इ. स. पू. १५०० – १४०० | १. बॅबिलोन–कसाईट राजवंश<br>२. उत्तर मेसापोटेमिया–मितन्नि राज्य | १. सिंधु संस्कृतीचा अंत<br>२. आर्यांचे भारत–आगमन<br>३. ऋग्वेदरचना | — |
| इ. स. पू. १२०० | १. हिटाइट साम्राज्याचा अंत<br>२. ट्रोजन युद्ध | १. भारतीय युद्ध<br>२. ऋग्वेद संहितीकरण | — |
| इ. स. पू. ६०० | अकेमेनियम साम्राज्य आणि ग्रीक कलेचा उदय | १. मगध – बिंबिसार राजा (इ.स. पू. ५४४ – ४९३ ); राजगृह नगरस्थापना;<br>२. गौतम बुद्ध<br>३. डॅरियसचा वायव्य भारतविजय | १. सिलोन – अनुराधपुर नगर-स्थापना |
| इ. स. पू ५०० | — | १. बुद्धपरिनिर्वाण ( इ. स. पू. ४८६ )<br>२. मगध – अजातशत्रु राजा ( इ. स. पू. ४९३ - ४६२ ); पाटलि-पुत्र स्थापना<br>३. उज्जयिनी नगरस्थापना | — |

| काल | भूमध्य आणि नैर्ऋत्य आशिया | भारत | बृहतर भारत ( आग्नेय आशिया ) |
|---|---|---|---|
| इ. स. पू. ४०० | सिकंदरचे भारत आक्रमण | मगध – चंद्रगुप्त मौर्य ( इ. स. पू. ३१३ - ३०० ); पाटलिपुत्र येथे मौर्यराजधानी ( इ. स. पू. ३२३–१८७ ) | — |
| इ. स. पू. ३०० | पर्शियन साम्राज्य ( इ. स. पू. २४७ ) | १. मगध – सम्राट अशोक ( इ. स. पू. २७३ - २३६ ); स्तूप; स्तंभ; बराबर आणि नागार्जुनि गुफा; धौली हस्तिप्रतिमा. २. वैशाली – स्तंभ | १. सिलोन – अशोकाचा धर्मप्रचार २. नेपाळ – स्तूप |
| इ. स. पू २०० | — | १. शुंग राजघराणे ( इ. स. पू. १८७-१७५ )–भर्हुत स्तूप २. कलिंग – शिशुपालगढ नगरस्थापना ३. सांची – स्तूपपरिवर्धन | सिलोन – दुत्थगामनिनिर्मित मिहिंतले आणि अनुराधपुर स्तूप ( इ. स. पू. १६१–१३७ ) |

| काल | उत्तर भारत | दक्षिण भारत | बृहत्तर भारत ( आग्नेय आशिया ) |
|---|---|---|---|
| इ. स. पू. १०० | १. कण्व राज्यकाल ( इ. स. पू. ७५-३० )–बोधिगया स्तूप वेदिका २. कलिंग – खारवेलकृत उदयगिरि गुफा ३. इंडो – शककला – स्कर्हढेरी; हारिती देवी; बिमरान शरीरावशेष करंडक ४. मथुरा – शिल्प | दख्खन – सातवाहन राजवंशकृत भाजे, कान्हेरी, अजंठा ( गुफा ९-१० ) गुफा; सांची तोरणे | १. कंबूज – फुनान् साम्राज्य २. अनुराधपुर – रुवनवेलि आणि अभयगिरि स्तूप |
| इ. स. ० | १. मथुरा– अमोहिनी आणि होली भित्तिशिल्पे २. इंडो–पार्थियन कला –तक्षिला नगरस्थापना; गंधार कलेचा आरंभ | सातवाहन कला – बेडसा, औरंगाबाद, कान्हेरी, कार्ले, पितळखोरे गुफा; आंध्र स्तूप; बेग्राम हस्तिदंती शिल्प; पोंम्पै लक्ष्मीप्रतिमा | — |
| इ. स. १०० | १. कुशाण कला – गंधार स्तूप आणि शिल्प; कनिष्ककृत शाहजी-की-ढेरी स्तूप; मीरान भित्तिशिल्पे २. मथुरा – शिल्पपरंपरा आरंभ | सातवाहन कला – नासिक पांडवलेणे; कार्ले, जुन्नर, जुनागढ, अमरावती, नागार्जुनिकोंड, अरिकमेडु बौद्धशिल्प | १. सिलोन, जावा, कांबोडिया– अमरावती परंपरेतील शिल्पे २. सयाम – द्वारवती नगरस्थापना |

| काल | उत्तर भारत | दक्षिण भारत | बृहत्तर भारत |
|---|---|---|---|
| इ. स. २०० | १. कुशाण साम्राज्याचा अंत – गंधार कलेची प्रगती<br>२. मथुरा – उत्तरकालीन शिल्प-परंपरा | १. इक्ष्वाकु कला – नागार्जुनि-कोंड, जग्गयपेठ्ठा स्तूप | — |
| इ. स. ३०० | १. अफगाणिस्तान – गंधार शिल्प<br>२. गुप्त कलेचा परमोत्कर्ष – समुद्रगुप्त ( स. ३२८–३७६ ) निर्मित मंदोर स्तंभ; चंद्रगुप्त ( द्वितीय; स. ३७६–४१४ ) निर्मित उदयगिरि गुफा; उदयपुर मंदिर | दख्खन – तेर आणि चेझर्ल बौद्ध मंदिरे | १. सिलोन – अनुराधपुर नगराचा परमोत्कर्ष; महासेननिर्मित ईअेतवन स्तूप; अन्य स्तूपांचे परिवर्धन<br>२. पूर्व तुर्कस्तान – मीरान नगराचे परिवर्धन |
| इ. स. ४०० | १. गंधार कला – हिद्दा, आखनूर, पुष्कुर<br>२. काश्मीर – हार्वन मंदिरे<br>३. गुप्त कला – चंद्रगुप्ताचा उज्जैन विजय ( स. ४००–४०९ ); कुमारगुप्त (द्वितीय; स. ४१५–७५५) निर्मित नाचना-कुठारा, भुमरा, देवगढ, मुकुंददर्रा, नगरी मंदिरे<br>४. बौद्धशिल्प – मीरपुर खास स्तूप, बाघ गुफा, सारनाथ बुद्ध-प्रतिमा, मनियार मठ | दख्खन – अजंटा गुफा क्र. १६-१७ ( हरिषेण ) | १. सिलोन – सिगिरिय भित्ति-चित्रे; गुप्त शिल्पकृती आणि ब्रॉंझ मूर्तींची आयात |
| इ. स. ५०० | १. गंधार कला – बामियान; तारीम खोऱ्यातील स्थापत्य<br>२. गुप्त कला – बोधिगया, भीतर-गाव, सिरपुर मंदिरे; अजंटा, घटोत्कच, वेरूळ, जोगेश्वरी आणि औरंगाबाद गुफा; साम-ळाजी मातृका; मंदसोर स्तंभ; नालंदा | दख्खन – ऐहोळे येथील लाडखान, कोंतकुडी, दुर्गा, महाकूटेश्वर मंदिरे; बादामी येथील गुफा क्र. ३; मलेगित्ति शिव मंदिर; बादामी दुर्गातील मंदिरे | १. कंबूज – साम्राज्याची स्थापना<br>२. चंपा – भारतीय वसाहत<br>३. द्वारवती – शिल्प<br>४. नेपाळ — मानदेव भित्तिशिल्पे<br>५. जपान – बौद्ध धर्माचा प्रथम-प्रवेश |

| काल | उत्तर भारत | दक्षिण भारत | बृहत्तर भारत ( आग्नेय आशिया ) |
|---|---|---|---|
| इ. स. ६०० | १. गंधार कला – फोंदुकिस्तान, मिंकओइ<br>२. उत्तरकालीन गुप्त कला—हर्षवर्धन ( स. ६०६ – ६४७ ). निर्मित भीनमाळ, ब्रह्मोर, जगेश्वर, नालंदा स्थापत्य<br>३. ओरिसा - परशुरामेश्वर मंदिर | १. दख्खन – पुलकेशिन् ( प्रथम; स. ६१०-६४२ ) निर्मित ऐहोळे, बादामी, वेरूळ ( गुफा ५–९ ), औरंगाबाद, अजंटा ( गुफा १-५; २१-२७ ), घारापुरी, गोप गुफा<br>२. दक्षिण भारत – पल्लव राजवंशनिर्मित दलवानूर, भैरवकोंड, उदौलि, शित्तनवाशल, मामल्लपुरम्, कांची ( कैलासनाथ ) मंदिरे | १. मलाया आणि सुमात्रा — श्रीविजय साम्राज्यस्थापना<br>२ तिबेट—बौद्ध धर्माचा प्रथम प्रवेश ( स. ६३८ ); ल्हासा येथील आद्य बौद्ध मंदिर ( स. ६५१ )<br>३. जावा—चंदि पवोन, मेंदुत्, सरि मंदिरे |
| इ. स. ७०० | १ उत्तर कालीन गुप्त कला – कनोजराज यशोवर्मन (स.७००-७५२ ) निर्मित ग्वाल्हेर ( तेलीका मंदिर ), बजौरा, मसूर मंदिरे<br>२. बंगाल – पाल राजवंशनिर्मित बोधिगया, पहाडपुर, नालंदा मंदिरे<br>३. ओरिसा – नलतगिरि<br>४. प्रतिहार कला – ओसियान, जगत्सुख, पठारी मंदिरे<br>५. कश्मीर – ललितदित्य ( स. ७२५-७५६ ) निर्मित पंद्रेठाण, परिहासपुर, मार्तंड, मलोत, वंगाथ, बूनियार मंदिरे | १. दख्खन — पत्तदकल ( स. ७४६–७४७), वेरूळ (दशावतार, कैलास ) मंदिरे<br>२. दक्षिण भारत—कांची ( वैकुंठ पेरुमाल मंदिर ) | जावा—बोरोबुदुर आणि कलसन्-मंदिरे |
| इ. स. ८०० | १. बंगाल-ओरिसा – नालंदा, पहाडपुर, बैताल देऊळ मंदिरे<br>२. कश्मीर – अवंतिपुर, पाटण<br>३. प्रतिहार कला – ओसियान, ग्वाल्हेर, देवगढ, खजुराहो ( चौसष्ट योगिनी ) मंदिरे<br>४. सिंध – ब्राह्मणाबाद | १. दख्खन — वेरूळ (लंकेश्वर,) मालखेड मंदिरे | १. सिलोन-पोलोन्नुरुव राजधानी<br>२. जावा — चंदी प्लौसन, सेवु, परंबनम् मंदिरे<br>३. ब्रह्मदेश — पगान राजधानी स्थापना<br>४. नेपाळ — नेपाळी संवताचा प्रारंभ ( स. ८८० ); नेपाळी कला |

| काल | उत्तर भारत | दक्षिण भारत | बृहत्तर भारत ( आग्नेय आशिया ) |
|---|---|---|---|
| इ. स. ९०० | १. बंगाल — बहुलारा, वेगुनिय मंदिरे<br>२. ओरिसा — भुवनेश्वर (लिंगराज)<br>३. प्रतिहार कला — चंबा, जोगेश्वर, मोधेरा मंदिरे<br>४. चंदेल कला – खजुराहो ( लक्ष्मणेश्वर ) मंदिरे<br>५. चाहमान कला — विशालपुर, बिजोलिय मंदिरे<br>६. कश्मीर — दिद्दा राणी ( स. ९५८–१००३ )<br>७. नैर्ऋत्य आशिया – गझनीचा मुहंमद ( स. ९९८–१०३० ) | १. दख्खन — वेरूळ ( कैलास ); मालखेड उद्ध्वस्त (स. ९७२), श्रवणबेलगोल ( गोमतेश्वर )<br>२. दक्षिण भारत — चोल कला, एरंबूर, श्रीनिवासनल्लूर, कोदंबाल्लूर, कलुगमलै मंदिरे | १. कंबूज — अंकोर राजधानी स्थापना; बखेंग्, बंतै-श्री, फ्नोम् क्रोन मंदिरे |
| इ. स. १००० | १. बंगाल — पाल राजवंशाचे पुनरुत्थान<br>२. कश्मीर — हिंदु कलापरंपरेचे अंतिम पुनरुत्थान<br>३. रजपूत कला – खजुराहो, महोबा, चंदेरी, बिल्हरी, सोहागपुर, नाग्दा, अजमेर, ग्वाल्हेर (सास-बहू ), अनहिलवाडे, सिद्धपुर, मोधेरा, अबू, उदयपुर, नीलकंठेश्वर, ऊना मंदिरे<br>४. ओरिसा — जगन्नाथपुरी | १. शिलाहार कला — अंबरनाथ, सिन्नर मंदिरे<br>२. पश्चिम चालुक्य कला — हवेरी ( सिद्धेश्वर ) मंदिर<br>३. चोल कला – तंजावर, बृहदीश्वर, गंगैकोंडशोलापुरम्, तिरुभवनम् दाराशुरम् मंदिरे | १. कंबूज – लोबपुरी आणि लाओस येथे साम्राज्यवर्धन; बपुओन्, फिमिअनकस् मंदिरे<br>२. चंपा — बिन्ह–दिह राजधानी<br>३. ब्रह्मदेश — पगान (आनंद मठ)<br>४. तिबेट — सस्क्य बौद्ध मठ |
| इ. स. ११०० | १. सेन राजे — लक्ष्मणावती नगर; बौद्ध मठांचा नाश<br>२. रजपूत कला — महोबा, कुंभरिय, जालोर, नाग्दा, चितोडगढ, तरंगा, गिरनार, पलिताना, सोमनाथ मंदिरे<br>३. उत्तर भारत – मुसलमानी आक्रमण ( स. ११९२ ); कुतुबमीनार ( स. ११९९ ) | १. पश्चिम चालुक्य कला – इत्तगि, लक्कुंदि ( काशीविश्वेश्वर ), कुरवत्ति, गदग मंदिरे<br>२. होयसाळ कला — बेलूर, हलेबीड ( होयसलेश्वर ) मंदिरे<br>३. चोल कला — पुरातन मंदिरांचा जीर्णोद्धार आणि परिवर्धन | १. सिलोन — पराक्रमबाहुनिर्मित पोलोन्नुरुव येथील गल विहार; वत दागे मंदिरे<br>२. कंबूज — अंकोरवात् येथील बपुओन, बंतैश्री, बेंग मेअलिआ मंदिरे; चाम राजाद्वारा अंकोरवात् उद्ध्वस्त<br>३. चंपा — बिन्ह दिह येथील उत्तरकालीन मंदिरे |

| काल | उत्तर भारत | दक्षिण भारत | बृहत्तर भारत ( आग्नेय आशिया) |
|---|---|---|---|
| इ. स. १२०० | १. **ओरिसा**—कोणार्क<br>२. **रजपूत कला**— किराडु, ओसियान, जालोर, नाडोल, अबू, डभोई, मोधेरा मंदिरे<br>२. **मुसलमानी कला** — दिल्ली, अजमेर, मुलतान | १. **दख्खन**—देवगिरि, वारंगळ, सोमनाथपुर मंदिरे<br>२. **दक्षिण भारत**— पांड्य कला | १. **जावा**—सिंग-सॅ मंदिरे<br>२. **कंबूज**—अंकोरवात्‌ची पुनर्बांधणी; बयोन, चंदी किदल् मंदिरे<br>३. **ब्रह्मदेश**—पगान ( महाबोधि मंदिर ); कुबलईखान-आक्रमण ( स. १२८७ ) |
| इ. स. १३०० | १. **हिंदु शिल्प**—अबू मंदिरे<br>२. **दिल्ली**–तुघ्लकाबाद,फिरोजशहा कोटला, निजामुद्दीन; तैमूरलंग आक्रमण ( स. १३९८ ) | १. **विजयनगर** — स्थापना (स. १३३६ ); कांची ( कामाक्षी मंदिर )<br>२. **दख्खन**-मुसलमानी आक्रमण ( स. १३०६-१३२६ ); गुलबर्गा येथील मशिदी | १. **जावा**-अयुथिया नगरस्थापना<br>२. **ब्रह्मदेश**—अवा राजधानी |
| इ. स. १४०० | १. **राजपुतान**—राणा कुंभद्वारा रजपूत कलेचे पुनरुज्जीवन ( चितोडगढ, रणकपूर, अबू मंदिरे )<br>२. **दिल्ली**—मेहरौली; लोदी मशीद<br>३. **कश्मीर** — सुल्तान झैनुल अबिदीन<br>४. **माळवा**—धार, मांडू<br>५. **गुजरात**–अहमदाबाद स्थापना ( स. १४१९ ) | १. **दख्खन**–बीदर (स. १४२८); अहमदनगर ( स. १४९० ) स्थापना | १. **कंबूज**— सयामी लोकांद्वारा अंकोर उद्ध्वस्त<br>२. **तिबेट**—तारी-ल्हन्-पो बौद्ध मठ ( स. १४४५ ) |
| इ. स. १५०० | १. **ग्वाल्हेर**—मान मंदिर<br>२. **दिल्ली**—पुराना किल्ला | १. **विजयनगर** — विजयनगर स्थापत्यातील बहुतांशी इमारती; कांची- ( एकाम्रनाथ ), चिदंबरम् (उत्तर गोपुर) | १. **बाली**— मजपहित राजवटीचा अंत<br>२. **कंबूज**—फ्नोम्- पेन्ह राजधानी<br>३. **सयाम**–अयुथिया कलापरंपरा |
| इ. स. १५५० | १. **राजस्थान**— अंबर ( स. १५६९ ), बिकानेर ( स. १५९२) स्थापना; पूर्वकालीन रजपूत कला<br>२. **मुसलमानी कला**— हुमायून कबर; फत्तेपुर सिक्री; आग्रा | १. **विजयनगर** — नाश ( स. १५६५); ताडपत्री (श्रीराम); वेल्लूर ( स. १५६० ); चिदंबरम् ( सभामंडप ); श्रीरंगम् ( स. १५९० ) मंदिरे<br>२. **मुसलमानी स्थापत्य**—विजापुर; हैद्राबाद | १. **सिलोन**—कँडी राजधानी<br>२. **नेपाल**–उपलब्ध मंदिरस्थापत्य ( इ. स. १६–१९ शतक) |

| काल | उत्तर भारत | दक्षिण भारत | बृहत्तर भारत |
|---|---|---|---|
| इ. स. १६०० | १. **राजस्थान** —अंबर राजवाडा (स. १६२७); उदयपुर राजवाडा (स. १६२८); राजस्थानी चित्रकला<br>२. **कश्मीर** — शालिमार बाग (स. १६२०)<br>३. **मुसलमानी कला** — दिल्ली येथील लाल किल्ला आणि जुम्मा मशीद; आग्रा (ताजमहाल) | १. **नायक कला**–मदुरा, चंद्रगिरि, त्रिचनापल्ली (जंबूकेश्वर), रामेश्वरम् मंदिरे<br>२. **मुसलमानी कला**–दौलताबाद; विजापुर (गोल घुमट) | १. **तिबेट**—ल्हासा येथीलपो राजवाडा |
| इ. स. १६५० | १. **उदयपुर**—जगन्नाथ मंदिर<br>२. **कुलू**—मंदिरस्थापत्य<br>३. **मुसलमानी कला**—लाहोर | १. **तंजोर**—मराठा राज्य (स. १६७७)<br>२. **मुसलमानी कला**–औरंगाबाद राजवाडा | |
| इ. स. १७०० | १. **मुसलमानी स्थापत्य**— दिल्ली येथील उत्तरकालीन मशिदी; सफ्दरजंग मुकबरा; लखनौ स्थापना<br>२. **जोधपुर आणि उदयपुर** — राजवाडे; जयपुरस्थापना (स. १७२८)<br>३. **कांग्रा चित्रकला** — प्रारंभ (स. १७७५) | **मुसलमानी स्थापत्य**—गोवळकोंडा, श्रीरंगपट्टम् राजवाडे | **सयाम**—अयुथिया नगराचा विनाश (स १७५७); बँकॉक राजधानी स्थापना |
| इ. स. १८०० | १. **अमृतसर**—सुवर्ण मंदिर<br>२. **कलकत्ता, मुंबई** — ब्रिटिश स्थापत्य | — | **ब्रह्मदेश**—राजधानी मंडाले (अमरपुर) |

## फलश्रुती

**सांस्कृतिक भूगोल** — वैदिक-पौराणिक परंपरा, बौद्ध, जैन, चिनी, ग्रीक आणि शिलालेख साहित्य, तसेच प्रादेशिक इतिहासग्रंथांत विखुरलेले प्राचीन भूगोलविषयक साहित्य हे भारतीय संस्कृतीच्या आणि एकात्मतेच्या मध्यबिंदूभोवती केंद्रित झाल्याचे उपरोक्त विवेचनावरून ध्यानी येईल. पाच हजार वर्षांच्या भारतीय संस्कृतेतिहासाच्या या आत्म्याचा शोध हे प्राचीन भारतीय भूगोलाचे प्रमुख उद्दिष्ट आम्ही मानतो. या एका विशिष्ट दृष्टिकोनातूनच प्राचीन साहित्यातील सप्तद्वीपा पृथ्वी, भारतवर्षवर्णन, भारतातील देशविभाग, नद्या, पर्वत, तीर्थें, मार्ग, नगरे, तसेच बृहत्तर भारत आदींचे विवेचन प्राचीन भूगोलाच्या प्रस्तुत ज्ञानकोशात आम्ही केले आहे.

प्राकृतिक आणि ऐतिहासिक भूगोलाहूनहि अधिक व्यापक अशा प्राचीन भारताच्या सांस्कृतीक भूगोलाचा शोध हे प्रस्तुत ग्रंथाचे उद्दिष्ट आम्ही योजिले आहे. भूगोल म्हणजे नद्या-पर्वतांचा फूटपट्टी घेऊन मांडलेला हिशेब नव्हे, तर त्या त्या नदीचे खोरे अथवा पर्वताचा परिसर कोणत्या गुणांची खाण आहे, त्या ठिकाणाचे

वा भूभागाचे काय वैशिष्ट्य आहे, त्या वैशिष्ट्याचे तेथील भूभागावर, तसेच तेथील मानवी समाजावर काय परिणाम होत आले आहेत, ते जाणून घेणे होय. उदा. महाराष्ट्रातील प्रतिष्ठान ( आधु. पैठण ) नगर हे भौगोलिक दृष्ट्या कोणत्या अक्षांश-रेखांशावर आहे, यापेक्षाहि सांस्कृतिक दृष्ट्या ते शककर्त्या शालिवाहनाच्या राजधानीचे आणि संत एकनाथ महाराजांच्या कर्मभूमीचे गाव आहे, यास अधिक महत्व आहे. भारतातील विभिन्न स्थलांच्या भूवैशिष्ट्यांप्रमाणेच त्यांच्या या सांस्कृतिक इतिहासाचा आणि वैशिष्ट्यांचा शोधप्रयत्न प्रस्तुत ग्रंथात आम्ही केला आहे. भाषिक, प्रांतिक, धार्मिक आदि संकुचित अभिनिवेशाच्या अतीत अशा विराट भारतवर्षाचे, आणि स्थलकालातीत भारतीय संस्कृतीचे नवे दर्शन त्यायोगे वाचकांना होऊन त्यांच्या सांस्कृतिक अस्मितेच्या कक्षा रुंदावतील, अशी आम्हास खात्री वाटते. देशाच्या भावनिक आणि राष्ट्रीय एकात्मतेचा मार्गहि अशा व्यापक दृष्टिकोनातूनच गवसू शकेल, अशी आमची श्रद्धा आहे.

**राष्ट्रीय एकात्मतेसाठी सांस्कृतिक भूगोलाध्ययन —** भारताच्या राष्ट्रीय एकात्मतेची समस्या स्वातंत्र्योत्तर काळात विशेष जाणवू लागली आहे. देशातील विचारवंत, शिक्षणशास्त्रज्ञ, तसेच राजकारणी पुरुष त्यासाठी हरतऱ्हेचे प्रयत्न आज करीत आहेत. भारतवर्षाच्या सांस्कृतिक भूगोलाच्या अध्ययनातून प्राप्त होणारा व्यापक दृष्टिकोन हाच या समस्येवर एक तोडगा असल्याची आमची मनोमन खात्री झाली आहे. देशाच्या राष्ट्रीय एकात्मतेच्या दिंडीमध्ये संस्कृतीच्या ध्वजा खांद्यावर घेतलेला सांस्कृतिक भूगोलकार अग्रभागीचा पायीक ठरणार आहे. सांस्कृतिक इतिहासाप्रमाणेच सांस्कृतिक भूगोलाचे बाळकडू आमच्या शालेय आणि विश्वविद्यालयीन विद्यार्थ्यांना दिल्याने देशाच्या सांस्कृतिक आणि भावनिक एकात्मतेचे स्वप्न साकार होऊ शकेल. या विशिष्ट दृष्टीने सांस्कृतिक इतिहासाप्रमाणेच सांस्कृतिक भूगोलाचा शैक्षणिक अभ्यासक्रमात समावेश होणे जरूर आहे.

**प्रास्ताविकातील विषयविवेचन —** प्राचीन भारतीय भूगोलाच्या ज्ञानकोशात समाविष्ट होऊ न शकणारी, परंतु तत्संबंधीची भूमिका आणि पार्श्वभूमी विशद करणारी माहिती आम्ही 'प्रास्ताविका'त दिली आहे. प्राचीन भूगोलाच्या अध्ययनाचे सांस्कृतिक महत्त्व, तत्संबंधीच्या समस्या, त्याच्या अध्ययनाची विभिन्न ग्रांथिक साधनसामुग्री, प्रादेशिक भूगोल, तसेच प्राचीन भारतीय सांस्कृतिक भूगोलाच्या अंगभूत अशा भारतीय स्थापत्य आणि शिल्पपरंपरांचे संक्षिप्त विवेचन आम्ही 'प्रास्ताविका'त केले आहे. प्राचीन भारतीय भूवर्णनाशी संबंधित जगदुत्पत्ती, सप्तद्वीपा पृथ्वी, पृथ्वीरचनेतील पर्वतांचे आणि नद्यांचे महत्त्व, भारतवर्षवर्णन आणि त्याचे जनपदात्मक विभाजन, भारतवर्षातील नगरे, ग्रामे, तीर्थे आणि मार्ग, तसेच बृहत्तर भारत आदींचे तात्त्विक विवेचन 'प्रास्ताविका'मध्ये आम्ही विस्ताराने केले आहे. कोशातील स्थलवर्णनाचे मर्म समजण्यास त्याचे साह्य होईल असा आम्हास भरंवसा वाटतो.

**प्राचीन स्थलकोशाचे वैशिष्ट्य—** प्राचीन भारताच्या प्रस्तुत ज्ञानकोशात विभिन्न स्थलांची ग्रांथिक, पारंपारिक, स्थापत्यशास्त्रीय, शिलालेखीय, धर्मशास्त्रीय, उत्खननशास्त्रीय अशी सर्वांगीण माहिती देण्याचा प्रयत्न आम्ही केला आहे. केवळ मराठी भाषेतच नव्हे, तर इंग्रजी, अथवा अन्य कोणत्याहि भारतीय भाषेत असा प्रयत्न आजवर झाला नाही, असे नम्रपणे म्हणावेसे वाटते. प्राचीन भारतीय भूगोलाची उपांगभूत तीर्थे, नद्या, पर्वत, जैन-बौद्ध तीर्थे, लेणी, शिलालेख, ताम्रपट आदींचे विपुल संकीर्ण संशोधन भारतात गेल्या दीडशे वर्षांत झाले असले, तरी भारताच्या सुमारे पाच हजार वर्षांच्या विराट सांस्कृतिक भूगोलाच्या आकृतिबंधामध्ये हे सारे भौगोलिक साहित्य जागच्या जागी बसविण्याचा प्रयत्न आजवर कोणी केला नाही. तो आम्ही यथाशक्य केला आहे.

**सर्वसमावेशक विवेचन—** प्राचीन भारतीय भूगोलाशी संबंधित सर्व साधनांचा साकल्याने विचार करून विभिन्न भौगोलिक स्थलांची माहिती चालू काळापर्यंत भिडविण्याचा प्रयत्न आम्ही केला आहे. त्यामुळे कोशातील प्रत्येक स्थल निर्जीव न रहाता बोलके बनले आहे. स्थलकोशातील स्थलवर्णनात ग्रंथ, पंथ, धर्म, संप्रदाय, प्रांत, राजकीय सत्ता आदींच्या संकुचित मर्यादा अथवा अभिनिवेश आम्ही हेतुतःच टाळला आहे. उत्कर्ष, वैभव, अपकर्ष आणि विनाश या सामान्य व्यक्तिजीवनातील निसर्गचक्रास सकृद्दर्शनी निर्जीव वाटणारी भौगोलिक स्थलेहि अपवाद नसतात,याची जाणीव आम्ही ठेवली आहे. त्यामुळेच शतकानुशतके विभवशिखरावर असणाऱ्या गंगा, यमुनादि नद्यांइतक्याच आत्मीयतेने आज संपूर्णतः विजन आणि शुष्क बनलेल्या सरस्वती नदीचे, आणि राजकीय स्थित्यंतरामुळे भारतास पारख्या झालेल्या सिंधु नदीचे वर्णन आम्ही केले आहे. लक्षावधी भारतीय यात्रेकरूंचे

श्रद्धास्थान बनलेल्या काशी-रामेश्वरादि तीर्थांइतक्याच सविस्तरपणे शतकानुशतके ओसाड पडलेल्या बौद्ध धर्मीयांच्या लुंबिनीवन, बोधिगया, सारनाथ आदि तीर्थांचा परामर्श आम्ही घेतला आहे. त्यामुळे अनादि कालापासून सद्यःकालापर्यंत महत्त्व पावलेल्या भौगोलिक स्थलांचे वैशिष्ट्य तन्मयतेने वर्णन करणे आम्हास शक्य झाले आहे.

भारताचे मानदंड— भौगोलिक स्थलांच्या नैसर्गिक गुणवैशिष्ट्यांवर राजकीय सत्ता अथवा काल मात करू शकत नाही, हे त्रिकालाबाधित तत्त्व अनेक भौगोलिक स्थलांच्या बाबतीत आम्हास निर्णायकपणे सिद्ध करता आले आहे. व्यक्तिमात्रांप्रमाणे भौगोलिक स्थले मर्त्य आणि सीमित आयुष्याची नसून, त्यांच्या नैसर्गिक वैशिष्ट्यांमुळे इतिहासाच्या विभिन्न कालखंडातील राज्यशासक, धर्मसंस्थापक, पराक्रमी पुरुष अथवा तत्त्वज्ञ यांना तेथे पुनःपुन्हा धाव घेणे भाग पडते. सिंधु नदी, कुरुक्षेत्र, काशी, विंध्य पर्वत, कृष्णा आणि गोदावरी नद्या ही इतिहासप्रसिद्ध भौगोलिक स्थले या विशिष्ट दृष्टीने भारताचे खरेखुरे मानदंड आहेत. भारतीयांचे तत्त्वज्ञान, संस्कृती, धर्म, स्थापत्य, शिल्प, मूर्तिविज्ञान आणि आशियाव्यापी सांस्कृतिक श्रेष्ठत्व त्यांमधूनच उत्पन्न झाले आहे. विष्णु पुराणात वर्णिल्याप्रमाणे भारतवर्ष हा स्वर्गाहूनहि श्रेष्ठ देश त्यामुळे बनलाआहे—

गायन्ति देवाः किल गीतकानि,
धन्यास्तु ते भारतभूमिभागे ।
स्वर्गापवर्गास्पदमार्गभूते,
भवन्ति भूयः पुरुषाः सुरत्वात् ॥
( विष्णु. २·३·२४ ).

( स्वर्ग आणि मोक्षप्रद भारतवर्षात जन्मणारे मनुष्यजन देवांहूनहि अधिक भाग्यवान असल्याची कवने साक्षात देव गातात ).

卐 卐 卐

# प्रमुख आधारग्रंथ

‘ प्राचीन भारतीय स्थलकोश ’साठी उपयोजिलेल्या प्रमुख संस्कृत, बौद्ध जैन, संस्कृत शब्दकोश, इंग्रजी, हिंदी, मराठी आधारग्रंथांची, आणि इंग्रजी संशोधनपत्रिकांची, तसेच तत्प्रीत्यर्थ आम्ही उपयोजिलेल्या संक्षेपांची विभागशः माहिती खाली दिली आहे. या आधारग्रंथांच्या तुलनात्मक गुणावगुणांचे सविस्तर विवरण ‘ प्रास्ताविका’तील ‘ प्राचीन भौगोलिक अध्ययनाची साधने’ विभागात ( पृ. ७ – ३४ ) आम्ही केले आहे.

## ( १ ) संस्कृत आधारग्रंथ

| संक्षेप | संपूर्ण नाव | संस्करण |
|---|---|---|
| अग्नि. | अग्नि पुराण | आनंदाश्रम, पुणे |
| अध्या. रा. | अध्यात्म रामायण | गोरखपुर |
| अ. प्रा. | अथर्वप्रातिशाख्य | व्हिट्ने प्रत |
| अ. रा. | अद्भुत रामायण ( उत्तर कांड ) | मोदवृत्त प्रेस, ( तृतीय आवृत्ती ) |
| अ. वे. | अथर्ववेद | — |
| अभिधान. | अभिधानचिंतामणि | — |
| आदि. | आदि पुराण | श्रीवेंकटेश्वर प्रेस |
| आप. ध. | आपस्तंब धर्मसूत्र | विद्यामुद्राक्षरशाला, कुंभकोणम् |
| आप. श्रौ. | आपस्तंब श्रौतसूत्र | क्रिस्टल संस्करण |
| आ. रा. | आनंद रामायण | — |
| —सार. | १ सारकांड | |
| —यात्रा. | २ यात्राकांड | |
| —याग. | ३ यागकांड | |
| —विलास. | ४ विलासकांड | |
| —जन्म. | ५ जन्मकांड | |
| —विवाह. | ६ विवाहकांड | |
| —राज्य. | ७ राज्यकांड | |
| — १ | —( पूर्वार्ध ) | |
| — २ | —( उत्तरार्ध ) | |
| —मनोहर. | ८ मनोहरकांड | |
| —पूर्ण. | ९ पूर्णकांड | |
| आश्व. गृ. | आश्वालायन गृह्यसूत्र | निर्णयसागर प्रेस |
| आश्व. श्रौ. | आश्वलायन श्रौतसूत्र | आनंदाश्रम, पुणे |
| आ. ब्रा. | आर्षेय ब्राह्मण | बर्नेल प्रत |
| ई. उ. | ईशावास्य उपनिषद् | अष्टेकर मंडळी, पुणे |
| ऋ. | ऋग्वेद | मॅक्स मूलर ( द्वितीय आवृत्ती ) |
| ऋ. प्रा. | ऋग्वेदप्रातिशाख्य | मॅक्स मूलर संस्करण |
| ऐ. आ. | ऐतरेय आरण्यक | आनंदाश्रम |
| ऐ. उ. | ऐतरेय उपनिषद् | आनंदाश्रम |
| ऐ. ब्रा. | ऐतरेय ब्राह्मण | आनंदाश्रम |
| क. उ. | कठ उपनिषद् | अष्टेकर मंडळी |
| का. सं. | काठक संहिता | लिप्झिक, स. १९१२ |
| का. सू. | वात्स्यायन कामसूत्र | चौखंबा संस्कृत सीरीज |
| कापि. सं. | कापिष्ठल संहिता | — |
| कालिका. | कालिका पुराण | श्रीवेंकटेश्वर प्रेस |
| काव्यमी. | राजशेखरकृत काव्यमीमांसा | गायकवाड ओरि. सीरीज |

| संक्षेप | संपूर्ण नाव | संस्करण |
|---|---|---|
| काशिका. | काशिका | |
| कूर्म. | कूर्म पुराण | श्रीवेंकटेश्वर प्रेस |
| के. उ. | केन उपनिषद् | — |
| कै. उ. | कैवल्य उपनिषद् | — |
| कौ. सू. | कौशिकसूत्र | अमेरिकन ओरि. सोसायटी |
| कौ. अ. | कौटिलीय अर्थशास्त्र | — |
| कौ. उ. | कौषीतकि उपनिषद् | — |
| खा. गृ. | खादिर गृह्यसूत्र | --- |
| खा. श्रौ. | खादिर श्रौतसूत्र | म्हैसूर सीरीज |
| गणेश. | गणेश पुराण | मोदवृत्त प्रेस |
| गरुड. | गरुडपुराण | श्रीवेंकटेश्वर प्रेस |
| ग. सं. | गर्ग संहिता | " |
| गो. गृ. | गोभिल गृह्यसूत्र | — |
| गो. ब्रा. | गोपथ ब्राह्मण | बिब्लिओथिका इंडिका |
| गौ. गृ. | गौतम गृह्यसूत्र | आनंदाश्रम |
| गौ. ध. | गौतम धर्मसूत्र | " |
| छां. उ. | छांदोग्य उपनिषद् | " |
| जै. अ. | जैमिनि अश्वमेध | पुराण-प्रकाशन मंडळ, वाई |
| जै. उ. ब्रा. | जैमिनीय उपनिषद् ब्राह्मण | लाहोर, स. १९२१ |
| जै. गृ. | जैमिनि गृह्यसूत्र | पंजाब संस्कृत सीरीज |
| —१ | —पूर्वार्ध | |
| —२ | —उत्तरार्ध | |
| जै.ब्रा. | जैमिनीय ब्राह्मण | — |
| तां. ब्रा. | तांड्य ब्राह्मण (पंच-विंश, अथवा प्रौढ ब्राह्मण) | |
| तिथि. | तिथितत्त्व चिंतामणि | चौखंबा संस्कृत सीरीज |
| तै. आ. | तैत्तिरीय आरण्यक | आनंदाश्रम |
| तै. उ. | तैत्तिरीय उपनिषद् | आनंदाश्रम |
| तै. प्रा. | तैत्तिरीय प्रातिशाख्य | म्हैसूर सीरीज |
| तै. ब्रा. | तैत्तिरीय ब्राह्मण | आनंदाश्रम |
| तै. सं. | तैत्तिरीय संहिता | आनंदाश्रम |
| दशकुमार. | दशकुमार चरित | — |
| दे. भा. | देवी भागवत | — |
| द्रा. श्रौ. | द्राह्यायण श्रौतसूत्र | — |
| ना. उ. | नारायण उपनिषद् | आनंदाश्रम |

| संक्षेप | संपूर्ण नाव | संस्करण |
|---|---|---|
| नारद | नारद पुराण | श्रीवेंकटेश्वर प्रेस |
| —१ | —पूर्व भाग | — |
| —२ | —उत्तर भाग | — |
| नि. | निरुक्त | श्रीवेंकटेश्वर प्रेस, |
| नृसिंह. | नृसिंह पुराण | गोपाळ नारायण प्रेस, |
| पतञ्जलि. | पतंजलि व्याकरण महाभाष्य | किलहॉर्न संस्करण, मुंबई |
| पद्म. | पद्म पुराण | श्रीवेंकटेश्वर प्रेस |
| —आदि. | १ आदिखंड | |
| —भूमि. | २ भूमिखंड | |
| —ब्रह्म. | ३ ब्रह्मखंड (स्वर्ग) | |
| —पाताल. | ४ पातालखंड | |
| —क्रिया. | ५ क्रियाखंड (सृष्टिखंड) | |
| —उत्तर. | ६ उत्तरखंड | |
| पं. ब्रा. | पंचविंश ब्राह्मण | |
| परा. मा. | पराशर माधवीय | निर्णयसागर प्रेस, मुंबई |
| पा. गृ. | पारस्कर गृह्यसूत्र | गुजरात प्रेस, मुंबई |
| पा. सू. | पाणिनिसूत्र | — |
| प्र. उ. | प्रश्न उपनिषद् | आनंदाश्रम |
| बा. भा. | राजशेखरकृत बालभारत | निर्णयसागर प्रेस, मुंबई |
| बृ. उ. | बृहदारण्यक उपनिषद् (काण्व) | — |
| बृ. सं. | बृहत्संहिता | कर्न संस्करण |
| बृहद्दे. | बृहद्देवता | मॅक्डोनेल संस्करण |
| ब्रह्म. सू. | ब्रह्मसूत्र | — |
| बौ. ध. | बौधायन श्रौतसूत्र | — |
| ब्रह्म. | ब्रह्म पुराण | आनंदाश्रम, पुणे |
| ब्रह्मवै. | ब्रह्मवैवर्त पुराण | आनंदाश्रम, पुणे |
| —१ | —ब्रह्मखंड | |
| —२ | —प्रकृति खंड | |
| —३ | —गणपति खंड | |
| —४ | —कृष्णजन्म खंड | |
| ब्रह्माण्ड. | ब्रह्माण्ड पुराण | श्रीवेंकटेश्वर प्रेस, मुंबई |
| —१ | —प्रक्रिया पाद | |
| —२ | —अनुषंग पाद | |
| —३ | —उपोद्घात पाद | |
| —४ | —उपसंहार पाद | |

# प्रमुख आधारग्रंथ

| संक्षेप | संपूर्ण नाव | संस्करण |
|---|---|---|
| भवि. | भविष्य पुराण | श्रीवेंकटेश्वर प्रेस, मुंबई |
| –ब्राह्म. | —ब्राह्मपर्व | |
| –मध्यम. | —मध्यपर्व | |
| –प्रति. | —प्रतिसर्गपर्व | |
| –उत्तर. | —उत्तरपर्व | |
| भवि. उ. | भविष्योत्तर पुराण | श्रीवेंकटेश्वर प्रेस, मुंबई |
| भा. | भागवत पुराण | निर्णयसागर प्रेस, श्रीधरी आणि विजय-ध्वजी टीका, गोरख–पुर संस्करण |
| भा. श्रौ. | भारद्वाज श्रौतसूत्र | — |
| भा. सा. | भारतसावित्री | चित्रशाळा प्रेस |
| म. | महाभारत | भांडारकर संहिता |
| –आ. | १–आदिपर्व | ( या संहितेतील पाठभेदात्मक श्लोक |
| –स. | २–सभापर्व | *चिह्नाने दाखविले आहेत ). |
| –आर. | ३–आरण्यकपर्व | ( महाभारताच्या |
| –वि. | ४–विराटपर्व | कुंभकोणम्, कलकत्ता, |
| –उ. | ५–उद्योगपर्व | मुंबई आणि चित्रशाळा, |
| –भी. | ६–भीष्मपर्व | प्रेस या संस्करणांचा |
| –द्रो. | ७–द्रोणपर्व | उपयोग क्वचित |
| –क. | ८–कर्णपर्व | केला आहे. यापैकी |
| –श. | ९–शल्यपर्व | चित्रशाळा संस्करणात |
| –सौ. | १०–सौप्तिकपर्व | नीलकंठ चतुर्धर टीका |
| –स्त्री. | ११–स्त्रीपर्व | उपलब्ध आहे. |
| –शां. | १२–शांतिपर्व | अनुशासनपर्वाचे |
| –अनु. | १३–अनुशासनपर्व | सारे संदर्भ चित्रशाळा |
| –आश्व. | १४–आश्वमेधिकपर्व | संस्करणाचे |
| –आश्र. | १५–आश्रमवासिकपर्व | आहेत ). |
| –मौ. | १६–मौसलपर्व | |
| –महा. | १७–महाप्रस्थानिकपर्व | |
| –स्व. | १८–स्वर्गारोहणपर्व | |
| मत्स्य. | मत्स्य पुराण | आनंदाश्रम, पुणे |
| मां. उ. | मांडूक्य उपनिषद् | |
| मा. गृ. | मानव गृह्यसूत्र | — |
| मार्क. | मार्कंडेय पुराण | मोदवृत्त प्रेस, आणि पार्गिटर इंग्रजी अनुवाद |

| संक्षेप | संपूर्ण नाव | संस्करण |
|---|---|---|
| मा. श्रौ. | मानव श्रौतसूत्र | — |
| मिताक्षरा | मिताक्षरा | याज्ञवल्क्य स्मृतीवर आधारित |
| मुं. उ. | मुंडक उपनिषद् | आनंदाश्रम, पुणे |
| मुद्‌गल. | मुद्‌गल पुराण | हस्तलिखित |
| मै. उ. | मैत्री उपनिषद् | — |
| मै. सं. | मैत्रायणी संहिता | — |
| याज्ञ. | याज्ञवल्क्यस्मृति | निर्णयसागर प्रेस, मुंबई |
| यो. वा. | योगवासिष्ठ | — |
| र. वं. | रघुवंश | निर्णयसागर प्रेस, मुंबई |
| राज. | राजतरंगिणी | सर ऑरेल स्टाइन |
| रेणुका. | रेणुकामाहात्म्य | हस्तलिखित |
| ला. श्रौ. | लाट्यायन श्रौतसूत्र | वाल्मीकि प्रेस, कलकत्ता |
| लिंग. | लिंग पुराण | श्रीवेंकटेश्वर प्रेस |
| व. ध. | वसिष्ठ धर्मसूत्र | — |
| वं. ब्रा. | वंश ब्राह्मण | कलकत्ता |
| वराह. | वराह पुराण | श्रीवेंकटेश्वर प्रेस |
| –१ | –पूर्वार्ध | |
| –२ | –उत्तरार्ध | |
| वामन. | वामन पुराण | श्रीवेंकटेश्वर प्रेस, |
| वायु. | वायु पुराण | आनंदाश्रम, पुणे |
| वा. रा. | वाल्मीकि रामायण | |
| –बा. | १ बालकांड | |
| –अयो. | २ अयोध्याकांड | |
| –अर. | ३ अरण्यकांड | |
| –कि. | ४ किष्किंधाकांड | |
| –सुं. | ५ सुंदरकांड | |
| –यु. | ६ युद्धकांड | |
| –उ. | ७ उत्तरकांड | |
| वा. श्रौ. | वाराह श्रौतसूत्र | — |
| वा. सं. | वाजसनेय संहिता | महीधर उवट भाष्य, निर्णयसागर प्रेस |
| विष्णुधर्म. | विष्णुधर्मोत्तर पुराण | श्रीवेंकटेश्वर प्रेस |
| वै. श्रौ. | वैखानस श्रौतसूत्र | — |
| श. ब्रा. | शतपथ ब्राह्मण ( माध्यंदिन ) | वेबर संस्करण अनुवाद जे. एगलिंग ( सेक्रेड बुक्स ऑफ दि ईस्ट ) |

| संक्षेप | संपूर्ण नाव | संस्करण |
|---|---|---|
| शा. | अभिज्ञान-शाकुंतल | निर्णयसागर प्रेस, मुंबई |
| शां. आ. | शांखायन आरण्यक | आनंदाश्रम, पुणे |
| शां. गृ. | शांखायन गृह्यसूत्र | ओल्डेनबर्ग ( सेक्रेड बुक्स ऑफ दि ईस्ट ) |
| शां. ब्रा. | शांखायन ब्राह्मण | — |
| शां. श्रौ. | शांखायन श्रौतसूत्र | — |
| शिव. | शिवपुराण | श्यामकाशी प्रेस, मथुरा |
| –विद्या. | ( १ ) विद्येश्वर संहिता | |
| –रुद्र. | ( २ ) रुद्र संहिता | |
| –सृ. | १. सृष्टिखंड | |
| –स. | २. सतीखंड | |
| –पा. | ३. पार्वतीखंड | |
| –कु. | ४. कुमारखंड | |
| –यु. | ५. युद्धखंड | |
| –शत. | —( ३ ) शतरुद्रसंहिता | |
| –कोटि. | —( २ ) कोटिरुद्रसंहिता | |
| –उमा. | —( ५ ) उमासंहिता | |
| –सृ. | १ पूर्वार्ध | |
| –स. | २ उत्तरार्ध | |
| –कैलास. | —( ६ ) कैलाससंहिता | |
| –वायवीय. | —( ७ ) वायवीयसंहिता | |
| शु. प्रा. | शुक्लयजुर्वेद प्रातिशाख्य | चौखंबा संस्कृत सीरीज |
| श्वे. उ. | श्वेताश्वतर उपनिषद् | आनंदाश्रम, पुणे |
| ष. ब्रा. | षड्विंश ब्राह्मण | — |
| स. गृ. | सत्याषाढ गृह्यसूत्र | — |
| स. श्रौ. | सत्याषाढ श्रौतसूत्र | आनंदाश्रम |
| सा. वे. | सामवेद | — |
| सांब. | सांबपुराण | श्रीवेंकटेश्वर प्रेस |
| सू. सं. | सूतसंहिता | आनंदाश्रम, पुणे |
| स्कंद. | स्कंदपुराण | |
| –माहेश्वर | ( १ ) माहेश्वर खंड | |
| –१ | १ केदार खंड | |
| –२ | २ कौमारिका खंड | |

| संक्षेप | संपूर्ण नाव | संस्करण |
|---|---|---|
| –३ | ३ अरुणाचलमाहात्म्य | |
| | –१ पूर्वार्ध | |
| | –२ उत्तरार्ध | |
| –वैष्णव | ( २ ) वैष्णव खंड | |
| –१ | १ वेंकटाचलमाहात्म्य | |
| –२ | २ जगन्नाथक्षेत्रमाहात्म्य | |
| –३ | ३ बदरिकाश्रममाहात्म्य | |
| –४ | ४ कार्तिकमासमाहात्म्य | |
| –५ | ५ मार्गशीर्षमासमाहात्म्य | |
| –६ | ६ श्रीमद्भागवतमाहात्म्य | |
| –७ | ७ वैशाखमासमाहात्म्य | |
| –८ | ८ अयोध्यामाहात्म्य | |
| –९ | ९ वासुदेवमाहात्म्य | |
| –ब्राह्म. | ( ३ ) ब्राह्मखंड | |
| –१ | १ सेतुमाहात्म्य | |
| –२ | २ धर्मारण्य खंड | |
| –३ | ३ ब्रह्मोत्तर खंड | |
| –काशी. | ( ४ ) काशी खंड | |
| –१ | १ पूर्वार्ध | |
| –२ | २ उत्तरार्ध | |
| –आवन्त्य. | ( ५ ) आवन्त्य खंड | |
| –१ | १ अवंतीक्षेत्रमाहात्म्य | |
| –२ | २ चतुरशीतिलिंगमाहात्म्य | |
| –३ | ३ रेवाखंड | |
| –नागर. | ( ६ ) नागर खंड | |
| –प्रभास. | ( ७ ) प्रभास खंड | |
| –१ | १ प्रभासक्षेत्रमाहाम्य | |
| –२ | २ वस्त्रापक्षेत्रमाहात्म्य | |
| –३ | ३ अर्बुदाचलमाहात्म्य | |
| –४ | ४ द्वारकामाहात्म्य | |
| स्मृतिचं. | स्मृतिचंद्रिका | — |
| ह. वं. | हरिवंश | चित्रशाळा प्रेस, पुणे |
| –१ | १ हरिवंशपर्व | |
| –२ | २ विष्णुपर्व | |
| –३ | ३ भविष्यपर्व | |

## ( २ ) बौद्ध आधारग्रंथ

| संक्षेप | संपूर्ण नाव | संस्करण |
|---|---|---|
| अङ्गुत्तर. | अंगुत्तर निकाय ( ५ खंड ) | पाली टेक्स्ट सोसायटी |
| अङ्गुत्तर अट्ठ | अंगुत्तर भाष्य (मनोरथ पूरणि, २खंड) | कोलंबो ( सिलोन ) |
| अपादान. | अपादान ( २ खंड ) | पाली टेक्स्ट सोसायटी |
| अपादानअट्ठ. | अपादान भाष्य | कोलंबो. |
| अवदान. | अवदान शतक | बिब्लिओथिका बुद्धिका |
| उदान. | उदान | पाली टेक्स्ट सोसायटी |
| उदान अट्ठ. | उदान भाष्य | पाली टेक्स्ट सोसायटी |
| कथावत्थु. | कथावत्थु | पाली टेक्स्ट सोसायटी |
| खुद्दक. | खुद्दक पाठ भाष्य | पाली टेक्स्ट सोसायटी |
| चरिय. | चरिय पिटक | पाली टेक्स्ट सोसायटी |
| चरिय अट्ठ. | चरिय पिटक भाष्य | कोलंबो |
| चुल्ल. | चुल्लनिद्देस | पाली टेक्स्ट सोसायटी |
| चूल. | चूलवंश ( २ खंड ) | पाली टेक्स्ट सोसायटी |
| जा. | जातक ( ५ खंड ) | फॉसबॉल संस्करण |
| थेर. | थेरगाथा | पाली टेक्स्ट सोसायटी |
| थेर. अट्ठ. | थेरगाथा भाष्य ( २ खंड ) | कोलंबो |
| दिव्यावदान. | दिव्यावदान | कॉवेल संस्करण |
| दीघ. | दीघ निकाय ( ३ खंड ) | पाली टेक्स्ट सोसायटी |
| दीघ. अट्ठ. | दीघ निकाय भाष्य ( सुमंगलविलासिनी, ३ खंड ) | पाली टेक्स्ट सोसायटी |
| दीप. | दीपवंश | ओल्डेनबर्ग संस्करण |
| धम्मपद अट्ठ. | धम्मपद अट्ठकथा ( ५ खंड ) | पाली टेक्स्ट सोसायटी |
| पेतवत्थु. | पेतवत्थु | पाली टेक्स्ट सोसायटी |
| पेतवत्थु अट्ठ. | पेतवत्थु भाष्य | पाली टेक्स्ट सोसायटी |
| बुद्ध. | बुद्धवंश | पाली टेक्स्ट सोसायटी |
| बुद्ध. अट्ठ. | बुद्धवंश भाष्य | कोलंबो |
| मज्झिम. | मज्झिम निकाय ( ३ खंड ) | पाली टेक्स्ट सोसायटी |
| मज्झिम. अट्ठ. | मज्झिम निकाय भाष्य ( पपंच सूदनी, २ खंड ) | कोलंबो |
| महा. | महावंश | गैगर |
| महा. अट्ठ. | महावंश भाष्य | पाली टेक्स्ट सोसायटी |
| महानिद्देस. | महानिद्देस (२ खंड) | पाली टेक्स्ट सोसायटी |
| महावस्तु. | महावस्तु (३ खंड) | सेनार्ट संस्करण |
| मिलिन्द. | मिलिन्द पन्हो | ट्रेंक्नेर संस्करण |
| ललित. | ललितविस्तर | लेफ्मान संस्करण |
| विनय. | विनय पिटक (५ खंड) | ओल्डेनबर्ग संस्करण |
| विमान. | विमानवत्थु | पाली टेक्स्ट सोसायटी |
| विमान. अट्ठ. | विमानवत्थु भाष्य | पाली टेक्स्ट सोसायटी |
| विसुद्धि मग्ग. | विसुद्धि मग्ग (२खंड) | पाली टेक्स्ट सोसायटी |
| समन्त. | समन्त पासादिका ( ४ खंड ) | पाली टेक्स्ट सोसायटी |
| संयुत्त. | संयुत्त निकाय ( ५ खंड ) | पाली टेक्स्ट सोसायटी |
| संयुत्त. अट्ठ. | संयुत्त निकाय भाष्य ( सध्धम्म संग ) | पाली टेक्स्ट सोसायटी |
| सासन. | सासनवंस | पाली टेक्स्ट सोसायटी |
| सुत्त. | सुत्तनिपात | पाली टेक्स्ट सोसायटी |
| सुत्त. अट्ठ. | सुत्तनिपात भाष्य ( २ खंड ) | पाली टेक्स्ट सोसायटी |

## ( ३ ) जैन आधारग्रंथ

| संक्षेप | संपूर्ण नाव | संस्करण |
|---|---|---|
| उत्तराध्ययन. | उत्तराध्ययनसूत्र | कार्पेंटियर |
| उदयकीर्ति. | तीर्थवंदना | |
| उवास. | उवासगदसौ | होर्नुल |
| गुणकीर्ति. | तीर्थवंदना | — |
| गुणभद्र. | उत्तर पुराण | — |
| जम्बूदीव. | जंबूदीवपण्णत्ती | — |

## जैन आधारग्रंथ

| संक्षेप | संपूर्ण नाव | संस्करण |
|---|---|---|
| | | जीवराज जैन ग्रंथमाला |
| जिनसेन. | हरिवंश पुराण | — |
| जयसागर. | तीर्थजयमाला | — |
| ज्ञानसागर. | सर्वतीर्थवंदना | — |
| ती. सं. | तीर्थवंदनसंग्रह | जीवराज जैन ग्रंथमाला |
| पूज्यपाद. | निर्वाणभक्ति | — |
| भगवती. | भगवतीसूत्र | धनपतसिंग संस्करण |
| मदनकीर्ति. | शासन चतुस्त्रिंशिका | — |
| यति-वृषभ. | तिलोयपण्णत्ती | — |
| | (खंड १–२) | जीवराज जैन ग्रंथमाला |
| रविषेण. | पद्म पुराण | — |
| लोकविभाग. | लोकविभाग | जीवराज जैन ग्रंथमाला |
| विविधतीर्थ. | विविधतीर्थकल्प | सिंघी जैनग्रंथमाला |
| श्रुतसागर. | बोधप्राभृत टीका | — |
| सुमतिसागर. | जम्बूद्वीप जयमाला | — |
| हरिषेण. | बृहत्कथाकोश | — |

## ( ४ ) संस्कृत शब्दकोश आधारग्रंथ

| संक्षेप. | संपूर्ण नाव | संस्करण |
|---|---|---|
| अभिधान. | अभिधानचिंतामणि | — |
| अभिरत्न. | अभिरत्नकोश | — |
| अमर. | अमरकोश | — |
| उणादि. | उणादि कोश | — |
| औणादिक. | औणदिक कोश | — |
| देशिना. | देशिनामालाकोश | — |
| कल्पद्रु. | कल्पद्रुकोश | — |
| कवि. | कविजीवनकोश | — |
| त्रिकाण्ड. | त्रिकाण्डशेषकोश | — |
| नानार्थ. | नानार्थसंग्रहकोश | — |
| नामसंग्रह. | नामसंग्रहकोश | — |
| पर्याय. | पर्यायमुक्तावलिकोश | — |
| मंख. | मंखकोश | — |
| मेदिनी. | मेदिनीकोश | — |
| लिङ्गानुशासन. | लिंगानुशासनकोश | — |
| विश्वलोचन. | विश्वलोचनकोश | — |
| वैजयन्ती. | वैजयन्तीकोश | — |
| शब्दरत्न. | शब्दरत्न भांडारकोश | — |
| शारदीय. | शारदीयकोश | — |
| शाश्वत. | शाश्वतकोश | — |
| शीलोञ्छ. | शीलोञ्छकोश | — |
| हारावली. | हारावलीकोश | — |

## ( ५ ) इंग्रजी आधारग्रंथ


( 1 ) **Alberuni's India**— Edward Sachau, 1964, Bombay

( 2 ) **Alexander's Invasion**— J.W. Macrindle

( 3 ) **Altindische Leben**— H. Zimmer, 1879, Berlin

( 4 ) **Ancient Geography of India**—Alexander Cunningham; Edited by S. N. Mujumdar

( 5 ) **Ancient India**—E. J. Rapson

( 6 ) **Ancient India**—S. K. Aiyangar

( 7 ) **Ancient India as described by Ptolemy**— J. W. Mcrindle

( 7-a) **Ancient Indian Colonisation of S. E. Asia**—Dr. R. C. Majumdar

( 8 ) **Ancient Indian Historical Tradition**— F. E. Pargiter, Delhi

( 9 ) **Antiquities of Orissa**—Rajendralal Mitra

( 10 ) **Antiquities of Kathiawad and Cutch**— James Burgess

( 11 ) **Ashok**— Vincent Smith

( 12 ) **Barhaspatya Arthashastra**— F. W. Thomas

( 13 ) **Bharhut**— Dr. B. M. Barua

( 14 ) **Buddhist Cavetemples and their Inscriptions**—James Burgess

( 15 ) **Buddhist India**— T. W. Rhys Davids

( 16 ) **Buddist Records of the Western World**—Samuel Beal

( 17 ) **Cambridge History of India— Vol. I**– E. G. Rapson, 1922, Cambridge

( 18 ) **Carmiachel Lectures** ( 1918; 1921 )— D. R. Bhandarkar

( 19 ) **Catalogue of Coins**—Vincent Smith

( 20 ) **Coins of India**—Alexander Cunningham

( 21 ) **Colas**—K. A. Neelakantha Shastri

( 22 ) **Corpus Inscriptionum Indicarum** ( Vols. I-IV )—Edited by A. Cunningham, Sten Konow, H. Luders, J. F. Fleet, V. V. Mirashi

(23-24) **Dictionary of Pali Proper Names** ( **Vol. 1-2** )—G. P. Malalsekar, 1960, London

( 25 ) **Dynasties of Kali Age**—F. R. Pargiter

( 26 ) **Early History of India**— Vincent Smith

( 27 ) **Early History of the Deccan**—R. G. Bhandarkar

( 28 ) **Eastern India**—Martin

( 29 ) **Ethnic Settlements of Ancient India**— Sashi Bhushan Chudhari

( 30 ) **Geographical and Economic Studies in the Mahabharata—Upayana Parva**—Dr. Motichandra

( 31 ) **Geographical Data in Sanskrit Lexicons**—M. M. Patkar

( 32 ) **Geographical Dictionary of Ancient and Medeaval India**— N. L. Dey

( 33 ) **Geography of the Early Buddhism**— Dr. B. C. Law

( 34 ) **Geography of the Puranas**—Dr. S. Mujaffar Ali

( 35 ) **Gupta Coins**—Allen

( 36 ) **Historical Geography of Ancient India**—Dr. B. C. Law

( 37 ) **Historical Geography of Bihar**— Dr. M. S. Pandey

( 38 ) **Historical Geography of Gujerat**— Dr. H. D. Sankalia

( 39 ) **Historical Inscriptions of South India**— Robert Sewell

( 40 ) **History and Culture Indian People** (Vol. I-IV) —General Editors -A. D. Pusalkar and R. C. Majumdar.

( 41 ) **History of Important Ancient Towns in Gujerat**—Dr. A. S. Altekar

( 42 ) **History of Dharmashastra** ( **Vols. I-V** ) —Dr. P. V. Kane

( 43 ) **History of Indian and Eastern Architecture**—James Fergusson

( 44 ) **History of Indian Architecture**— Hermann Goetz

( 45 ) **History of Kosala**—Dr K. P. Pathak

( 46 ) **History of Vaishali**—Dr. V.N. Mishra

( 47 ) **Holy Places of India**—Dr. B. C. Law

( 48 ) **Immortal India** ( **Vols. I-V** )—J. H. Dave

( 48 ) **Index to the Names in the Mahabharata**—S. Sorenson, 1960, Delhi

( 50 ) **India as described by Early Greek Writers**—B. N. Puri

( 51 ) **Indian Architecture** ( Buddhist and Hindu Period )—Percy Brown

( 52 ) **Indica**—Arrian

( 53 ) **Indological Studies** ( **Vol. I-IV** )— Dr. B. C. Law

( 54 ) **Jain Sutras** ( **Vols. I-II** )—Hermann Jacobi

( 55 ) **Jainism in Rajasthan**—Dr. Kailaschandra Jain

( 56 ) **Jainism in South India and Some Jain Epigraphs**—Dr. P. B. Desai
( 57 ) **Kautilya's Arthashastra**—R. Shamshastri
( 58 ) **Life of Huen Tsang**—Samuel Beal
( 59 ) **Life of the Buddha**—Rockhill
( 60 ) **List of Southern Inscriptions**— A. Kielhorn
( 61 ) **Manuel of Buddhism**—Spence Hardy
( 62 ) **Markandeya Purana** ( English Translation with notes )— F. R. Pargiter
( 63 ) **Mountains of India**—Dr. B. C. Law
( 64 ) **Mysore and Coorg From Inscriptions**—Rice
( 65 ) **Names of Indian Towns in the Geography of Ptolemy**—Jean Prizulski
( 66 ) **Natural History**—Pliny
( 67 ) **On Yuan Chwang's Travels in India**—Thomas Watters
( 68 ) **Periplus of Erythrian Sea**—Schoff
( 69 ) **Personality of India**—Dr. Subba Rao
( 70 ) **Political History of Ancient India**—Dr. H. C. Roy Chowdhary
( 71 ) **Prehistory and Protohistory of Ancient India**— Dr. H. D. Sankalia
( 72 ) **Purana Index**—H. V. R. Dikshitar
( 73 ) **Puranic Dynastries of Kali Age**—F. E. Pargiter
( 74 ) **Records of the Buddhist Religion**—I-tsing
( 75 ) **Review of Indological Research in Last 75 Years**—Edited by P. J. Chinmulgund and Dr. V. V. Mirashi
( 76 ) **Rivers of India**—Dr. B. C. Law
( 77 ) **Sakta Pithas**— Dr. D. C. Sircar
( 78 ) **South Indian Inscriptions**—Hultz
( 79 ) **Studies in Epics and Puranas**—A. D. Pusalkar
( 80 ) **Studies in Indian Antiquities**—Dr. H. C. Roy Choudhary
( 81 ) **Studies in the Geography of Ancient and Medieval India**—Dr. D. C. Sircar
( 82 ) **Studies in the Upapuranas**—Dr. R. C. Hazra
( 83 ) **Studies in the Puranic Records on Hindu Rites and Customs**—Dr. R. C. Hazra
( 84 ) **Temples of Andhra Pradesh**— N. Ramesh
( 85 ) **Temples of Bihar**— P. C. Roy Choudhary
( 86 ) **Temples of Maharashtra**—Dr. M. S. Mate
( 87 ) **Temples of Tamilnad**—R. K. Dass
( 88 ) **Travels of Fa-Hien**—Legge
( 89 ) **Twenty-five Hundred Years of Buddhism**—Edited by Dr. P. V. Bapat
( 90 ) **Tribes of Ancient India**—Dr. B. C. Law
( 91 ) **Vaishnavism and Saivism**—Dr. R. G. Bhandarkar
( 92 ) **Vedic Index** ( Vols. I-II )—Dr. A. A. Macdonell and Dr. A. B. Keith
( 93 ) **Vedic Mythology**—Dr. A. A. Macdonell
( 94 ) **Vedische Studien**—R. Pischel and K. F. Geldner
( 95 ) **Visnu Purana ( English Translation with notes )**—H. H. Wilson.

---

## ( ६ ) इंग्रजी संशोधन पत्रिका

ABORI —Annals of the Bhandarkar Oriental Research Institute
AI —Ancient India
ARASI —Annual Report of the Archaeological Survey of India
ASI —Archaelogical Survey of India—Annual Report
ASR —Archaeological Survey Reports
BG —Bombay Gazetteer
FC —Epigraphca Carnatica
EI —Epigraphca Indica
IA —Indian Antiquary
IC —Indian Culture
IHQ —Indian Historical Quarterly
Ind. Cult. —Indian Culture
JAHRS —Journal of the Andhra Historical Research Society
JBBRAS —Journal of the Bombay Branch of Royal Asiatic Society
JBRS —Journal of the Bihar Research Society
JGRS —Journal of the Gujerat Research Society
JNSI —Journal of the Numismatic Society of India
JOR —Journal of Oriental Research
JRAS —Journal of the Royal Asiatic Society
PO —Poona Orientalist
SBE —Sacred Books of the East

## ( ७ ) हिंदी आधारग्रंथ

( १ ) **इतिहासप्रवेश** – जयचंद्र विद्यालंकार, १९५७
( २ ) **ऐन्-इ-अकबरी** – अबुल फजल
( ३ ) **जैन कल्पसूत्रकालीन भारत**–डॉ. जगदीशचंद्र जैन
( ४ ) **पाणिनिकालीन भारतवर्ष** – डॉ. वासुदेवशरण अग्रवाल
( ५ ) **प्राकृत साहित्य का इतिहास** – डॉ. जगदीशचंद्र जैन, १९६०, वाराणसी
( ६ ) **प्राचीन मुद्रा** – आर. डी. बानर्जी
( ७ ) **बौद्ध संस्कृति** – राहुल सांकृत्यायन
( ८ ) **महाभारत की नामानुक्रमणिका** – गीता प्रेस, गोरखपुर
( ९ ) **मार्कंडेय पुराण–एक सांस्कृतिक अध्ययन** – डॉ. वासुदेवशरण अग्रवाल, १९६१, इलाहाबाद
(१०) **रामकथा** – रे. फादर कामिल बुल्के, १९६२, प्रयाग
(११) **वेदधरातल** – गिरीशचंद्र अवस्थी
(१२) **वाल्मीकि रामायण कोश** – रामकुमार राय
(१३) **वैदिक वाङ्मय का इतिहास** – पं. भगवद्दत्त

## ( ८ ) मराठी आधारग्रंथ

( १ ) **उपनिषद्रहस्य** – डॉ. रा. द. रानडे, पुणे
( २ ) **ओरायन ऊर्फ आर्यांचे मूलस्थान** – लो. बा. गं. टिळक
( ३ ) **कलचुरि नृपति आणि त्यांचा काल** – डॉ. वा. वि. मिराशी, नागपुर
( ४ ) **गीतारहस्य** – लो. बा. गं. टिळक
( ५ ) **पुराणनिरीक्षण** – त्र्यं. गु. काळे, पुणे
( ६ ) **बृहत्तर भारत** – प्रा. र. शं. गुप्ते
( ७ ) **भारत स्थलादर्श** – धोंडो बाळकृष्ण सहस्रबुद्धे, स. १८८९

(८) भारतवर्षीय प्राचीन चरित्रकोश – म. म. डॉ. सिद्धेश्वरशास्त्री चित्राव, स. १९६८, पुणे
(९) भारतीय ज्योतिषशास्त्राचा इतिहास – शं. बा. दीक्षित, पुणे
(१०) महाभारताचा उपसंहार – चिं. वि. वैद्य, पुणे
(११) महाराष्ट्रातील उत्खननस्थळे – डॉ. शां. भा. देव
(१२) महाराष्ट्रातील खेड्यांची व शहरांची वर्णक्रमी – मु. आ. कुलकर्णी, आय्. ए. एस्.
(१३) महाराष्ट्रीय ज्ञानकोश – डॉ. श्री. व्यं. केतकर
(१४) रामायणसमालोचना – महाराष्ट्रिय, पुणे
(१५) वाकाटक नृपति आणि त्यांचा काल – डॉ. वा. वि. मिराशी, नागपूर
(१६) संशोधनमुक्तावलि – डॉ. वा. वि. मिराशी, नागपूर
(१७) सह्याद्रि – स. आ. जोगळेकर
(१८) स्थानपोथी – डॉ. वि. भि. कोलते, नागपूर

卐 卐 卐

# प्राचीन भारतीय स्थलकोश

## अ



**अंशुधान** (ग्राम) भरताच्या केकय–अयोध्या प्रवास-वर्णनात निर्देशिलेले एक नगर (वा. रा. अयो. ७१.९).

या गावानजीक भरताने भागीरथी नदी ओलांडली आणि तेथून पुढे तो याच नदीच्या काठावर असलेल्या प्राग्वट गावी जाऊन पोहोचला (केकय-अयोध्या मार्ग पहा).

**अंशुमती** (नदी)—ऋग्वेदात निर्देशिलेली एक पवित्र नदी (ऋ. ८.९६.१३). इंद्राने या नदीच्या काठावर कृष्ण नामक असुराचा त्याच्या दहा हजार सेनेसह वध केला. हा कृष्णासुर या नदीच्या काठावरील एका बेटावर रहात असे. त्यावेळी इंद्राने बृहस्पतीसह त्याचेवर आक्रमण करून त्यास ठार मारले.

बृहद्देवतेमध्ये— या ग्रंथाच्या मते ही नदी कुरु देशात होती (बृहद्दे. ६.११०). देव-वृत्रयुद्धात वृत्राच्या भीतीने सोम देवांपासून पळाला. तेव्हा अंशुमती नदीच्या काठी देवांनी सोमाला पकडले व त्याचे प्राशन केले (बृहद्दे. ६. ९१८–९३५). या प्रसंगाचे रूपकात्मक वर्णन करीत असता सोमाचा निर्देश ऋग्वेदात 'कृष्ण द्रप्स' (काळा थेंब) असुर म्हणून करण्यात आला असावा (ऋ. ८.९६.१४–१५). परंतु सायणाचार्यांच्या मते बृहद्देवतेमधील ही कथा अविश्वसनीय स्वरूपाची आहे.

२. यमुना नदीचे नामांतर (वा. रा. अयो. ५५.५). वनवासास जातेसमयी दाशरथी रामाने प्रयागनजीक या नदीचे दर्शन घेतले होते.

अंशुमतीचा शब्दशः अर्थ 'खळाळत्या लाटांनी युक्त' असा होतो. प्रयाग येथील गंगा-यमुना नद्यांच्या संगमाजवळ यमुना नदीचे पाणी उसळ्या घेत मागे येते. या दृश्यास अनुलक्षून वाल्मीकि रामायणात यमुना नदीचे विशेषण म्हणून 'अंशुमती' हे नाव उपयोजिले असावे.

३. स्कंद पुराणात निर्देशिलेली प्रभासक्षेत्रान्तर्गत एक नदी (स्कन्द. प्रभास. १.३४४.३).

**अओर्नोस** (दुर्गस्थान)— सिकंदरस्वारीशी संबंधित ग्रीक साहित्यात निर्देशिलेले सिंधु नदीच्या किनाऱ्यावरील एक दुर्गस्थान. पाणिनीच्या अष्टाध्यायीत निर्देशिलेला वरण देश तो हाच असावा (स्मिथ, पृ. ५८; वरण पहा).

**अकद्र** (नगर)-- टॉलेमीच्या ग्रंथात निर्देशिलेले सयामच्या आखातातील (अक्षांश ४°-४५′ उत्तर; रेखांश १६७° पूर्व) एक नगर. यूल यांच्या मते अरब साहित्यात निर्देशिलेले कद्रंज गाव ते हेच असून, सयामच्या आखा-ताच्या पूर्व किनाऱ्यावर वसलेले आधु. 'चांतिबोन' गाव ते हेच असावे.

**अकरभण्ड** (ग्राम)--सिलोनमधील एक ग्राम. हे ग्राम 'कित्तिसिरिराजसीह' (कीर्तिश्रीराजसिंह) राजाने गौतम बुद्धाच्या दंतावशेषमंदिराच्या योगक्षेमाकरिता दान म्हणून दिले होते (चूल. २३).

**अकर्दम** ( तीर्थ )— तमसा नदीच्या काठावरील सुविख्यात तीर्थस्थान. वाल्मीकि ऋषींचा आश्रम याच नदीच्या काठावर होता ( वा. रा. बा. २.४–५; तमसा पहा ).

**अकर्ममोचन** ( कूप ) —उत्तर प्रदेशातील सत्यव्रत तीर्थान्तर्गत ( = आधु. संभळ) एक पवित्र कूप. हा जमदग्नि कूपाजवळ आहे. या स्थानी अकर्ममोचन नामक अन्य एक तीर्थहि असून ते पुष्पदंत तीर्थाजवळ आहे ( ती. ९४ ).

**अक्रिनि** ( देश )-- ह्युएन्त्संगच्या मते तंगीज सरोवरानजीक वसलेल्या अग्नि देशाचे चिनीभाषीय नामांतर ( वॉटर्स, १.४४; अग्नि पहा ).

**अकिमय** ( देश )—सप्तगंगा नामक सात नद्यांपैकी पूर्वेकडे वहात जाणाऱ्या पावनी नदीच्या काठी वसलेला एक देश ( ब्रह्माण्ड. १८.५७ ).

**अकेसिनेस्** ( नदी ) —ग्रीक साहित्यात निर्देशिलेले असिक्नी (= चंद्रभागा = पंजाबातील आधु. चिनाब ) नदीचे नामांतर ( झीमर, अल्टिंडिशे लेबेन १२; असिक्नी पहा ).

**अकोलास्थान** ( नगर )-- माळव्याच्या देवपाल राजाच्या इ. स. १२२५ च्या मांधाता ताम्रपटात निर्देशिलेले एक नगर. विदर्भातील आधु. अकोला गाव ते हेच होय.

या गावच्या परावसुगोत्रीय गोसल नामक ब्राह्मणाचा निर्देश उपरोक्त ताम्रपटात आढळतो (एपि. इंडि. ९.१०७).

**अकोल्ल** ( तीर्थ )-- नर्मदा नदीकाठावरील एक तीर्थस्थान ( कूर्म. उत्तर. ४१.६३; ६५ ). स्कंद पुराणात निर्देशिलेले अंकोल तीर्थ ते बहुधा हेच असावे ( स्कन्द. आवन्त्य. ३.२३०.७०–९६ ).

**अक्रूर** ( क्षेत्र )-- मथुरामाहात्म्यात निर्देशिलेले एक तीर्थस्थान ( वराह. १५५.७१ ). मथुरा आणि वृंदावनाच्या दरम्यान एका छोट्या खेड्याच्या स्वरूपात ते आजहि अस्तित्वात आहे.

२. ( घाट ) यमुना-तीरावरील सुविख्यात पवित्र घाट. व्रजमंडल यात्रेच्या परिक्रमेमध्ये या तीर्थस्थानाचा समावेश असून, अक्रूराला येथे स्नान करीत असता विश्वरूप दर्शन झाले असे मानण्यात येते ( ती. १०४ ).

३. ( तीर्थ ) द्वारकामाहात्म्यात निर्देशिलेले एक तीर्थस्थान ( स्कन्द. प्रभास. ४. १६.३८ ).

**अक्रूरेश** ( तीर्थ )-नर्मदा नदीच्या काठी वसलेले एक तीर्थस्थान ( नारद. २.९७.१५ ).

२. ( शिवलिंग ) अवंतिक्षेत्रान्तर्गत एक शिवस्थान ( नारद. २.७८.२४; स्कन्द. आवन्त्य. १.२६.३५ ).

**अक्रूरेश्वर** ( देश व नगर )-- शिलालेख साहित्यात निर्देशिलेला गुजरात राज्यातील एक देशविभाग. भडोच जिल्ह्यातील अंकलेश्वर तालुक्याचा प्रदेश या देशविभागात समाविष्ट होत असावा. आधुनिक काळी पश्चिम रेल्वेच्या सुरत–बडोदा मार्गावर अंकलेश्वर हे एक रेल्वे-स्थानक असून ते भडोचपासून ५ मैल अंतरावर नर्मदा नदीच्या दक्षिण किनाऱ्यानजीक वसले आहे. अलिकडच्या काळात येथे उपलब्ध झालेल्या पेट्रोलच्या साठ्यामुळे या गावास नवे महत्त्व प्राप्त झाले आहे.

स्थानिक समजुतीनुसार प्राचीन काळी नर्मदा नदीचा प्रवाह या गावाजवळून वहात असे. परंतु उत्तरकालात भृगु ऋषींनी तपश्चर्या करून ही नदी या गावापासून थोडया अंतरावर असणाऱ्या आपल्या आश्रमस्थानी ओढून नेली. आधुनिक काळी नर्मदा नदीचा प्रवाह या गावापासून ३ मैल अंतरावरून वहात असताना दिसतो.

**पौराणिक साहित्यात**—मत्स्य पुराणामध्ये नर्मदानदी-काठी वसलेल्या ' अंकोल ' नामक तीर्थस्थानाचा निर्देश आढळतो ( मत्स्य. १९१. ११८–१२२ ). अंकोल हे अक्रूरेश्वराचेच नामांतर होय असे मानण्यात येते.

**शिलालेख साहित्यात**—निम्नलिखित शिलालेखात आणि ताम्रपटात अक्रूरेश्वर देशविभागाचा निर्देश आढळतो:—

१. **गुर्जर राजा दद्द ( द्वितीय ) याचा इ. स. ६२९ मधील कैरा ताम्रपट**--अक्रूरेश्वर विषयातील शिरीषपद्रक ( आधु. सिसोद्र ) गाव दान म्हणून दिल्याचा निर्देश या ताम्रपटात आढळतो ( कॉर्पस् इन्स्क्रि. ४.१.५९ ).

२. **दद्द ( द्वितीय ) याचा इ. स. ६३४ मधील कैरा ताम्रपट**--या ताम्रपटात शिरीषपद्रक गावाचे दानपत्र केलेले आढळते ( कॉर्पस् इन्स्क्रि. ४.१.६८ ).

३. **चहमाण राजा भर्तृवृद्ध याचा इ. स. ७३६ मधील हंचोटे ताम्रपट**—अक्रूरेश्वर विषयातील अर्जुनदेवीग्राम नामक ग्राम दान म्हणून दिल्याचा निर्देश या ताम्रपटात आढळतो ( एपि. इंडि. १२.२०१ ).

**मंदिरे**—या स्थानी असणाऱ्या हिंदु देवमंदिरांमध्ये निम्नलिखित मंदिरे विशेष उल्लेखनीय मानली जातात:—

१. **मांडव्येश्वर मंदिर**—स्थानिक समजुतीनुसार मांडव्य ऋषींचा आश्रम अक्रूरेश्वर येथे असून, त्या भूतपूर्व आश्रमाच्या जागी येथील मांडव्येश्वराचे मंदिर बांधण्यात आले आहे.

२. अक्रूरेश्वर मंदिर--येथील अक्रूश्वराचे मंदिर सुविख्यात असून त्यानजीक झिरकुंड आणि रणछोडजीचे मंदिर बांधले आहे.

३. रामकुंड तीर्थ--हे तीर्थ शांडिल्य ऋषींची तपस्विनी कन्या शांडिली हिच्यासाठी या स्थानी अवतीर्ण झाले असे मानण्यात येते.

**जैन तीर्थस्थान**--एक पुरातन तीर्थस्थान या नात्याने अंकलेश्वर नगराचा निर्देश जैन साहित्यात सर्वत्र आढळतो. इ. स. २ ऱ्या शतकात पुष्पदंत आणि भूतबलि नामक जैन आचार्यांनी गिरनार पर्वतामध्ये षट्खण्डागमचे अध्ययन केल्यानंतर ते एक वर्षपर्यंत या नगरात येऊन राहिले होते ( षट्खण्डागम टीका धवला. १.७१ ).

इ.स. १५ व्या शतकामध्ये सेनागणाचे भट्टारक श्रुतवीर या नगराहून भडोच येथे गेले होते आणि तेथे सुलतान महंमदशहाच्या दरबारात त्यांनी सन्मान प्राप्त केला होता ( भट्टारक सांप्रदाय पृ. ३० ). इ. स. १६०० मध्ये मूलसंघ बलात्कारगणाचे भट्टारक वादिचंद्र यांनी या नगरामध्ये संस्कृतभाषीय 'यशोधर चरिता'ची रचना केली होती ( जैन साहित्य और इतिहास पृ. ३८८ ).

या गावी चिंतामणि पार्श्वनाथाचे एक आणि अन्य तीन जैन मंदिरे आजहि आढळत असून, जैनांचे पश्चिम भारतातील ते एक प्रमुख यात्रास्थान मानले जाते.

**अक्षपादेश** ( लिंग )—काशी येथील एक शिवलिंगस्थान ( स्कन्द. काशी. १.९७:१७४ ).

**अक्षप्रपतन** ( तीर्थ )—एक तीर्थस्थान. या तीर्थामधील नेमिहंसपथ नामक स्थानी कृष्णाने गोपति आणि तालकेतु नामक असुरांचा वध केला ( म. स. परि. १. २१.१५५३ ).

महाभारतात अन्यत्र महेंद्र पर्वतशिखर व इरावती नदी यांच्याशी या स्थानाचा संबंध दर्शविला आहे ( म. स. परि. १.२१.१५५०-१५५५ ).

**अक्षमाला** ( नदी )—तापीमाहात्म्यात निर्देशिलेले तापी नदीचे नामांतर ( तापीमाहात्म्य ).

**अक्षमालेश्वर** ( लिंग )—प्रभासक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंगस्थान ( स्कन्द. प्रभास १.१२९ ).

**अक्षय** ( देश )--वाल्मीकि रामायणात निर्देशिलेला पूर्व भारतातील एक देश ( वा. रा. कि. ४०.२६ ).

**अक्षय ( अक्षयकरण ) वट** ( पवित्र वटवृक्ष )--प्रयाग येथे गंगायमुना नद्यांचे संगमावर असलेला पवित्र वटवृक्ष. महाभारत-रामायणादि ग्रंथात वृक्षांना देवतास्वरूप मानण्याची अनेक उदाहरणे आढळून येतात. 'अक्षयवट' हा या परंपरेतीलच एक महत्त्वपूर्ण वृक्ष दिसून येतो.

अलाहाबाद येथील किल्ल्याच्या अंतर्भागात वसलेल्या सभामंडपाच्या समोरील बाजूस आजहि हा वटवृक्ष अस्तित्वात असलेला दिसतो. अलाहाबाद येथील अक्षयवटाचे हे स्थान अशोक आणि समुद्रगुप्ताच्या सुविख्यात स्तंभाच्या उत्तर दिशेस आणि एलनबरो बराकींच्या पूर्व दिशेस आहे.

**नामव्युत्पत्ती**—ह्युएन्त्संग आणि कनिंगहॅम 'अक्षय वट'ची व्युत्पत्ती 'कधीहि नष्ट न होणारा वटवृक्ष' अशी करतात. परंतु येथे केल्या जाणाऱ्या पुण्यकर्माचे फळ कधीहि क्षीण होत नाही, म्हणून यसि 'अक्षयवट' म्हणत असल्याचा निर्देश महाभारतात आढळतो ( **अक्षयं यत्र वै फलम्**; म. आर. ४७७* ).

पुराणात या वृक्षाचा निर्देश सर्वत्र 'वट' अशा सामान्य नामाने केलेला आढळतो. महाभारतात केवळ एकाच ठिकाणी 'अक्षयवट' असा स्पष्ट निर्देश केला आहे ( म. आर. ९३.१३ ).

**पौराणिक साहित्यात**--अग्नि, कूर्म, पद्म आदि पुराणात या वटवृक्षाचे माहात्म्य वर्णिलेले आहे ( अग्नि. १११.१३; कूर्म. १.३७.८-९; पद्म. सृ. ४३. ११; उ. २५.७ ). नारदपुराणान्तर्गत वृंदावनमाहात्म्यात निर्देशिलेले तीर्थहि बहुधा हेच असावे ( नारद. २.८५. ७० ). या वृक्षाच्या बुंध्याजवळील संगमावर जो देहत्याग करतो त्यास विष्णु ( रुद्र ) लोकाची प्राप्ती होते असे निर्देश पौराणिक साहित्यात सर्वत्र आढळतात. वनवासास प्रस्थान करतेवेळी दाशरथी रामाने या वृक्षाचे दर्शन घेतले होते ( वा. रा. अयो. ५५.५ ).

या तीर्थस्थानाचा निर्देश 'अक्षय्यवट' (पद्म. सृ. ३८.२); 'अक्षय्यकरणवट' ( म. आर. ८५.८ ) या नावांनीहि केलेला आढळतो.

**महाभारतात**--एक तीर्थस्थान म्हणून या वटवृक्षाचा निर्देश महाभारतात निम्नलिखित ठिकाणी आढळतो:-- १. पुलस्त्य-तीर्थयात्रेत ( म.आर. ८२.७२ ); २. लोमश-तीर्थयात्रेत ( म. आर. ८३.१३ ); ३. धौम्य-तीर्थयात्रेत ( म. आर. ८५.८ ).

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**--या वृक्षाचे सविस्तर वर्णन ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात आढळते. त्यामध्ये प्रयाग गावाच्या मध्यभागी असलेल्या एका हिंदु देव-

मंदिराच्या समोरील अंगास हा वृक्ष होता आणि त्याच्या पायथ्याशी पुण्यप्राप्तीच्या हेतूने आत्मबलिदान केलेल्या अनेक भक्तांच्या अस्थि विखुरलेल्या होत्या, अशी माहिती दिली आहे. त्याचे काळी प्रयाग गाव गंगायमुना नद्यांचे संगमापासून १ मैल अंतरावर वसले होते.

ह्युएन्त्संग स्वतः बौद्धधर्मीय असल्याने अक्षयवटानजीक हिंदुधर्मीयांकडून केल्या जाणाऱ्या आत्मबलिदानाची कल्पना त्यास पसंत नाही असे दिसते. म्हणूनच या वटवृक्षावर वास्तव्य करणाऱ्या एका नरमांसभक्षक राक्षसाची कल्पनारम्य कथा त्याने वर्णिली आहे. येथे येणाऱ्या भक्तांचे मनात आत्महत्त्येचे कुविचार या राक्षसामुळे उत्पन्न होत असत, असे ह्युएन्त्संगचे म्हणणे आहे. या वृक्षाचे दैवी सामर्थ्याबाबत भ्रमनिरास झालेल्या एका ब्राह्मणपुत्राची कथाहि त्याने सविस्तरपणे वर्णन केली आहे ( वॉटर्स, पृ. ३६३ ).

या साऱ्या वर्णनावरून ह्युएन्त्संगच्या काळीहि हा वृक्ष हिंदुधर्मीयात पवित्र मानला जात असे, असे दिसते.

**सद्यःस्थिती**--ह्युएन्त्संगने वर्णिलेल्या मंदिराच्या अवशेषांच्या समोरच्या अंगास भूमिगत अवस्थेत हा वृक्ष पहावयास मिळतो. या वृक्षाच्या दर्शनास जाण्यासाठी पायऱ्या उतरून आत भूभागात जावे लागते. तेथे प्राचीन मंदिराचा खालचा भाग आणि वटवृक्ष पहावयास सापडतो. मंदिराचा वरचा भाग आज विनष्ट झालेला आहे. कनिंगहॅम यांचे मते हा वृक्ष आणि मंदिर ही दोन्ही प्राचीन काळी जमिनीच्या वर होती. परंतु भोवतालची माती ढासळून आज ही दोन्ही जमिनीत गाडली गेली आहेत.

**अकबराच्या राज्यकालात**--सोळाव्या शतकात लिहिल्या गेलेल्या रशिदुद्दिनच्या ' जमिउ-त्तवारिख 'मध्ये अक्षयवटावरून गंगायमुना नद्यांचे संगमात देहत्याग करणाऱ्या भक्तगणाचा निर्देश आढळतो. त्यावरून हा वृक्ष आणि संगम यांच्या दरम्यान ह्युएन्त्संगच्या काळी अस्तित्वात असणारा एक मैलाचा वाळूचा पट्टा मध्यंतरीच्या काळात वाहून गेला असावा असे दिसते.

याच काळात ह्युएन्त्संगकालीन प्राचीन प्रयाग शहरहि विनष्ट झाले. या नगराच्या प्राचीन अवशेषांवर अकबराने इ. स. १५७२ मध्ये अलाहाबादचा सुविख्यात किल्ला बांधला. तेव्हापासून येथून देहत्याग करण्याची प्रथा बंद पडली.

**जैन तीर्थस्थान**—या वटवृक्षाखाली जैनांचा प्रथम तीर्थंकर ऋषभदेव याने तपस्या केली होती. या कारणाने जैनधर्मीय लोकहि अक्षयवटास पवित्र मानतात.

२. गयेच्या पंचक्रोशीतील एक तीर्थस्थान. हे विष्णुपद-तीर्थापासून अर्धा मैल अंतरावर आहे. जलप्रलयाच्या वेळी बालकाच्या रूपाने विष्णूने या ठिकाणी वास्तव्य केले होते ( वायु. १०५.४५; १०९.१६; १११.७९–८२ ).

महाभारतात आणि पुराणान्तर्गत 'गयामाहात्म्या'त या तीर्थाचा निर्देश आढळतो ( नारद. २. ४४.५४; अग्नि. ११५.७०; म. आर. ८४.८३; ९५.१४; पद्म. सृ. ३८.२ ).

गयेतील अक्षयवटाचे हे स्थान ब्रह्मसरोवरानजीक वसले असून, तेथील वटवृक्ष चार भिंतींनी वेष्टिलेल्या विस्तृत आणि पक्क्या अशा अंगणामध्ये स्थापित केला आहे. या अंगणाच्या उत्तरेला वृद्धप्रपितामहेश्वराचे मंदिर असून पश्चिमेला रुक्मिणीसरोवर आहे. अक्षयवटाच्या उत्तरेस अंगणाच्या अंतर्भागात वटेश्वर महादेवाचे मंदिर आहे.

३. नर्मदा नदीकाठचे एक तीर्थस्थान. पुलस्त्याने येथे तप केले होते ( ब्रह्मवै. ३.३३.३०–३२ ). पुलस्त्य-यात्रेत ( म. आर. ८२.७२ ), तसेच लोमश-तीर्थयात्रेत याचा निर्देश आहे ( म. आर. ८३.१३ ).

४. गोदावरी नदीकाठचे तीर्थस्थान. हे प्रणीता–गोदा-संगमाजवळ कोठेतरी वसले असावे (ब्रह्म. १६१.६६–६७).

५. ( तीर्थ ) अवंतिक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( स्कन्द. आवन्त्य. १. ५९.५ ).

६. ( तीर्थ ) तापी नदीकाठचे तीर्थस्थान ( तापी-माहात्म्य ६१ ).

**अक्षयलिङ्गेश्वर** ( मंदिर )— दक्षिण भारतातील कीवरूळ गावचे सुविख्यात तीर्थस्थान. या ठिकाणी चोल राजा राजराज ( तृतीय ) याचा इ. स. १२२६ मधील शिलालेख सापडला आहे ( एपि. इंडि. ८.२६७ ).

**अक्षय्यकरण वट**-- प्रयाग येथील अक्षयवटाचे नामांतर ( म. आर. ८५.८; अक्षयवट पहा ).

**अक्षरेश** ( तीर्थ )--नर्मदा नदीकाठचे तीर्थस्थान ( नारद. २.७७.२२ ).

**अक्षरेश्वर** ( तीर्थ )--तापी नदीकाठचे तीर्थस्थान ( तापीमाहात्म्य. १८ ).

**अक्षवाल** ( नगर )--कश्मीरचा राजा अक्ष याने स्थापिलेले कश्मीरातील सुविख्यात नगर ( राज. १.३३८ ). कुटहार परगण्यातील दल सरोवरासाठी सुविख्यात असणारे आधु. अचबल गाव ( अक्षांश ७५.° १७′ उत्तर; रेखांश

३३.° ४१′ पूर्व ) ते हेच होय. स्टाइन यांच्या मते अक्ष राजाच हस्ते या नगराची स्थापना झाल्याचा राजतरंगिणी-तील निर्देश कल्पनारम्य आहे ( स्टाइन, राज. १.७९ ).

सरोवर--या गावी असणाऱ्या 'अक्षिपाल नाग' नामक निसर्गरमणीय सरोवराचा निर्देश नीलमत पुराणात आढळतो ( नीलमत. ९१७ ). या झऱ्याचा निर्देश ऐन्-इ-अकबरी मध्ये 'अच्छदल' या नावाने करण्यात आला असून, त्याच्या सभोवताली उभारलेल्या बागेमध्ये मोगल बादशहा अनेक वेळा येऊन रहात असल्याची माहिती तेथे दिली आहे ( ऐ. अ. २.३५८ ).

आजहि हे स्थान निसर्गरमणीय सरोवरांसाठी प्रसिद्ध आहे ( बर्नियर, प्रवासवर्णन पृ. ४१३ ).

**अक्षिदाहिका** ( ग्राम )--वनमालवर्मदेवाच्या इ. स. ९ व्या शतकातील पर्वतीय ताम्रपटात निर्देशिलेले प्राग्ज्योतिष ( आधु. गौहत्ती प्रदेश ) देशातील एक ग्राम. हे गाव हपोसग्रामाच्या सरहद्दीवर बसले असल्याचा निर्देश उपरोक्त ताम्रपटात आढळतो ( एपि. इंडि. २९.१५२ ).

**अक्षिपाल नाग** ( सरोवर )--कश्मीरातील अक्षवाल ( आधु. अचबल ) गावी असणारा सुविख्यात पवित्र जलाशय ( नीलमत. ९१७; अक्षवाल पाहा ).

**अक्षोटक** ( वन )--जंबुद्वीपान्तर्गत कुरुवर्षातील मेरु पर्वतावर वसलेले एक वन ( वायु. ३८.६९ ).

**अखण्ड–गौतमी** ( नदी )--तेलगु चोड राजा अण्णदेवाच्या राजमहेंद्री ताम्रपटात निर्देशिलेले गोदावरी नदीचे नामांतर. आपल्या सप्तगोदावरी नामक सात उप-शाखांमध्ये विभागण्याच्या अगोदर गोदावरी नदीचे पात्र अखंड-गौतमी या नावाने ओळखले जात असावे.

या नदीच्या काठी पट्टेशम् हे ग्राम वसले असल्याचा निर्देश उपरोक्त ताम्रपटात आढळतो ( एपि. इंडि. २६.४१; गोदावरी पहा ).

**अखण्डसर** (लिंग)--अवंतिक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंग-स्थान ( स्कन्द. आवन्त्य. १.६८.३४ ).

**अखण्डेश्वर** (लिंग)--अवंतिक्षेत्रान्तर्गत खंडेश्वर शिव-लिंगाचे नामांतर (स्कन्द. आवन्त्य. १.६८.३५; खण्डेश्वर पहा ).

**अखरौद** ( ग्राम )--त्रिपुरी येथील कलचुरि राजा जयसिंह याच्या इ. स. ११६७ मधील जबलपुर ताम्रपटात निर्देशिलेले मध्य भारतान्तर्गत एक गाव. अगरा ( जबलपुर-पासून २० मैल ईशान्येस वसलेले आधु. अगरिया ) गावानजीक हे गाव वसले असल्याचा निर्देश उपरोक्त ताम्रपटात आढळतो ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.३२७ ).

**अख्नूर** ( ग्राम )--कश्मीरातील बौद्ध मंदिरस्थान. इ. स. ५ व्या शतकातील गोथिक वळणाच्या गंधार शिल्पशैलीचे प्रातिनिधिक उदाहरण या नात्याने येथे सापडलेल्या चुन्यात कोरलेल्या छोट्या मूर्ती विशेष महत्त्वाच्या मानण्यात येतात ( गोएट्झ, पृ. ७७ ).

**अगरा** ( ग्राम )—त्रिपुरी येथील कलचुरि राजा जय-सिंह याच्या इ. स. ११६७ मधील जबलपुर ताम्रपटात निर्देशिलेले मध्य भारतान्तर्गत एक गाव. जबलपुरपासून २० मैल ईशान्येस असलेले सिहोरा तहसिलीतील आधु. अगरिया गाव ते हेच असावे.

चंद्रग्रहणप्रसंगी रेवा ( आधु. नर्मदा ) नदीमध्ये स्नान केल्यानंतर हे गाव दान म्हणून दिल्याचा निर्देश उपरोक्त ताम्रपटात आढळतो ( कॉर्पस्. इन्क्रि. ४.१.३२६ ).

**अगरु** ( वन )—वायु पुराणात निर्देशिलेले कुरु देशा-न्तर्गत एक वन. चंद्रकांत आणि सूर्यकांत नामक दोन पर्वतांच्या दरम्यानच्या भागात हे वन वसले होते ( वायु. ४५. ३१ ).

**अगलस्सोइ** ( लोकसमूह ) — सिकंदरआक्रमणाशी संबंधित ग्रीक साहित्यात निर्देशिलेले वायव्य भारतातील 'अंगलौकिक' या लोकसमूहाचे नामांतर ( स्मिथ, पृ. ९७; अंगलौकिक पहा ).

**अगस्तिकाग्रहार** ( ग्राम )--मैत्रक राजा ध्रुवसेन ( द्वितीय ) याच्या इ. स. ६३९ च्या नोगावा ताम्रपटात निर्देशिलेले मध्य भारतातील एक गाव. या गावच्या अग्निस्वामिन् नामक पराशरगोत्रीय ब्राह्मणाला जमीन दान दिल्याचा निर्देश या ताम्रपटात आढळतो ( एपि. इंडि. ८.१८९ ).

**अगस्तीश्वरम्** ( ग्राम )—कन्याकुमारीपासून ३॥ मैल अंतरावर वसलेले एक गाव. हे गाव कोचीन राज्यातील त्रिवेंद्रम् जिल्ह्यात वसले आहे ( एपि. इंडि. २६.२७४ ).

**अगस्त्य–आश्रम** ( आश्रमस्थान ) -- अगस्त्य ऋषींच्या आश्रमाची स्थाने कन्याकुमारीपासून कश्मीरपर्यंत भारताच्या विभिन्न भागांमध्ये आज दाखविली जातात. इतकेच नव्हे तर भारताच्या बाहेरहि आग्नेय आशियातील देशात 'अगस्त्य-आश्रम', 'अगस्त्यभवन', 'अगस्त्य-पर्वत', 'अगस्त्यपुरी' अशा अगस्त्य ऋषींच्या नावाशी संबंधित अनेकानेक भौगोलिक स्थलांचा निर्देश आढळतो. 'अगस्त्य संहिता', 'अगस्त्य गीता', 'सकलाधिकार'

आदि संस्कृत ग्रंथांची, तसेच 'अगत्तियम्' नामक तामीळ भाषेतील आद्य व्याकरणग्रंथाची रचना अगस्त्य ऋषींनी केली असे मानण्यात येते.

**पार्श्वभूमी**--अगस्त्य ऋषींच्या जीवनचरित्रविषयक महाभारत, रामायण आणि पुराणातील बहुतांशी साऱ्या कथा दक्षिण हिंदुस्थान आणि सिलोनशी संबंधित दिसून येतात (वा. रा. अर. ११.७८-८४; ब्रह्म. ८४.८; ११८.६; रघु. ४.४४; मत्स्य. ६१.५१). 'दक्षिण भारताचा विजेता' (वा. रा. यु. ११७.१४) आणि 'स्वामी' (ब्रह्म. ११८.२; १५८.११; ह. वं. ११७. ६५९१) अशा नात्याने अगस्त्याचा निर्देश प्राचीन वाङ्मयात सर्वत्र आढळतो.

अगस्त्य ऋषींच्या नावाशी संबंधित स्थल, काल आदि दृष्टीने सुदूरपणे वसलेल्या या साऱ्या स्थळांची संगती कशी काय लावायची ही एक मोठीच समस्या आहे. अशा स्थितीत ही सारी स्थळे वैदिक ऋचांचा प्रणयिता आणि विदर्भ राजकन्या लोपामुद्रा हिचा पती याने स्थापन केलेली स्थळे होत असे मानणाऱ्या जुन्या पद्धतीच्या परंपरागत पंडितांपासून दक्षिण भारतामध्ये आर्य संस्कृतीचा प्रसार करणारा अगस्त्य ऋषी ही एक कल्पनारम्य व्यक्ती होती, असे मानणाऱ्या आधुनिक विद्वानांपर्यंत अनेक तऱ्हेचे मतप्रवाह या प्रकरणी आढळून येतात.

**नीलकंठशास्त्री यांच्या मते**—या साऱ्या मतमतांतरांमध्ये प्रा. नीलकंठशास्त्री यांची अनुमानपरंपरा अधिक तर्कशुद्ध आणि व्यवहार्य वाटते. त्यांच्या मते—

१. उत्तर भारतातील आर्य लोकांच्याद्वारा दक्षिण भारताच्या वसाहतीकरणाचा प्रारंभ इ. स. पू. १००० च्या सुमारास झाला, असे पाणिनीची 'अष्टाध्यायी', कात्यायनाचे 'वार्तिक', 'कौटिलीय अर्थशास्त्र', 'बौधायनाचे धर्मसूत्र' तसेच बौद्ध 'सुत्तनिपात' आदि ग्रंथांवरून दिसते. दक्षिण भारताच्या या वसाहतीकरणाचे कार्य मौर्य राज्यकालाच्या थोड्या पूर्वी म्हणजे इ. स. पू. ३०० च्या सुमारास पुरे झाले असावे.

२. आर्य लोकांनी केलेल्या दक्षिण भारताच्या या वसाहतीकरणामध्ये अगस्त्य ऋषींचा आणि त्यांच्या शिष्यपरिवाराचा फार मोठा हात असावा असे ऋग्वेद, महाभारत, पुराणे आणि तामीळ साहित्य यामधील निर्देशांवरून दिसते. ऋग्वेदातील अनेक ऋचांचा प्रणेता असणारा ऋग्वेदकालीन अगस्त्य ऋषी हा एक अत्यंत विद्वान आणि कर्तबगार गृहस्थ असून तापसी जीवन आणि गृहस्थजीवन यांचा आदर्श समन्वय अगस्त्याने साधला होता असे ऋग्वेदातील निर्देशांवरून दिसते.

अगस्त्य ऋषींचा विदर्भ राजकन्या लोपामुद्रा हिच्याशी विवाह; मणिमती येथील इल्वल आणि वातापि यांचे दमन (वा. रा. अर. ११.५५; पद्म. पा. १९.१६०; २२. १४४); विंध्य पर्वताचे दमन (ब्रह्म. ११८२-८; म. आर. १०४); समुद्रप्राशन या साऱ्या पौराणिक आख्यायिकांवरून अगस्त्य ऋषींच्याद्वारा करण्यात आलेल्या दक्षिण भारताच्या वसाहतीकरणाच्या अनुमानास पुष्टी मिळते. अगस्त्याची समुद्रप्राशनाची आख्यायिका म्हणजे दक्षिण समुद्र ओलांडून आग्नेय आशियातील मलाया, जावा आदि देशांमध्ये आर्यांनी केलेल्या वसाहतीकरणाचे रूपकात्मक वर्णन होय असे काही अभ्यासक मानतात.

वाल्मीकि रामायणातहि अगस्त्य ऋषींचा आश्रम जनस्थान आणि पंचवटी यांच्यानजीक वसला असल्याचा निर्देश आढळतो. दक्षिण भारतातहि अगस्त्य ऋषी हे तामीळ भाषेचे आद्य व्याकरणकार मानण्यात येत असून त्रावणकोर प्रदेशातील तिनेवेल्लि जिल्ह्यातील 'मलयकूट' (पोदियिल) पर्वतावर अगस्त्य ऋषींचा आश्रम होता असे आजहि मानण्यात येते.

३. उपरोक्त साऱ्या ग्रांथिक निर्देशांवरून दक्षिण भारताचा आद्य वसाहतकार आणि या प्रदेशामध्ये आर्य संस्कृतीचा प्रसार करणारे अगस्त्य ऋषी ही एक ऐतिहासिक व्यक्ती होती असे स्पष्ट दिसते. अगस्त्य ऋषींच्या या ऐतिहासिक कामगिरीमुळे दक्षिण भारताच्या वसाहतीकरणाचे ते आद्य सूत्रधार मानण्यात येऊ लागले आणि अशा तऱ्हेने अगस्त्योत्तर काळातील दक्षिण भारतातील, तसेच आग्नेय आशियान्तर्गत बृहत्तर भारतातील सारे वसाहतकार स्वतःस अगस्त्य ऋषींच्या परंपरेतील म्हणवून घेऊ लागले.

यातूनच अगस्त्य ऋषींची शिष्यपरंपरा आणि दक्षिण भारतातील विभिन्न आश्रमस्थाने उत्पन्न झाली. ही सारी आश्रमस्थाने एका व्यक्तीने स्थापन केलेली नसली तरी एकाच व्यक्तीच्या प्रेरणेमधून उत्पन्न झालेली आहेत. भारताच्या आणि बृहत्तर भारताच्या विभिन्न भागांमध्ये विखुरलेल्या अगस्त्य ऋषींच्या नावाशी संबंधित अशा आश्रमस्थलांचे, नगरांचे, पर्वतांचे आणि अन्य भौगोलिक स्थानांचे स्पष्टीकरण हे असे आहे.

**वैमानिक अगस्त्य**—अगस्त्याजवळ एक विमान असून त्यामधून दक्षिण भारताच्या साऱ्या प्रदेशात, तसेच समुद्रा-

पलीकडील द्वीपात तो संचार करीत असल्याचा निर्देश पद्म पुराणात आढळतो. तारक, कमलाक्ष आदि राक्षस समुद्रात राहून दक्षिण भारतातील लोकांना त्रास देत. त्यामुळे समुद्रप्रवास हा अत्यंत धोक्याचा बनला होता. यावर तोडगा म्हणून समुद्र पार करण्यासाठी अगस्त्याने एक विमान तयार केले आणि त्याद्वारा समुद्र पार करून देश जिंकले ( पद्म. सृ. २२.४–४२ ).

उपरोक्त आख्यायिकेतहि अगस्त्योत्तर काळामध्ये आर्यांची वसाहत सातासमुद्रापलीकडे पसरली असल्याचा, तसेच या साऱ्या वसाहतींना अगस्त्य ऋषी विमानाच्या साह्याने भेट देत असल्याचा स्पष्ट संकेत मिळतो.

आश्रमस्थाने––प्राचीन साहित्यामध्ये निर्देशिलेल्या अगस्त्य ऋषींच्या आश्रमस्थानांचे आणि अगस्त्य ऋषींच्या नावाशी संबंधित अशा अन्य तीर्थस्थानांचे भौगोलिक दृष्ट्या तीन ठळक भाग असल्याचे दिसून येतेः––[ अ ] दक्षिण भारतातील आश्रमस्थाने; [ ब ] पश्चिम भारतातील आश्रमस्थाने; [ क ] उत्तर भारतातील आश्रमस्थाने.

**[ अ ] दक्षिण भारतातील आश्रमस्थाने**––या आश्रमस्थानांमध्ये निम्नलिखित स्थाने विशेष महत्त्वाची मानण्यात येतातः––

**१. मलय पर्वत**––अगस्त्य ऋषींच्या ‘ मलय ’ पर्वतावरील आश्रमाचा निर्देश पौराणिक साहित्यात अनेक ठिकाणी आढळतो ( मत्स्य.. ६१.३७; पद्म. सृ. २२; वा. रा. कि. ४१. १५–१६ ). त्रावणकोर प्रदेशान्तर्गत तिनेवेल्लि जिल्ह्यातील ताम्रपर्णी नदीचे उगमस्थान असणाऱ्या ‘ अगस्त्यकूट ’ ( अगस्त्यमलै = तामीळ ‘ पोदियिल ’ = दक्षिण पर्वत ) पर्वतावर अगस्त्य ऋषींचा आश्रम वसला होता असा निर्देश तामीळ साहित्यात आढळतो. दाक्षिणात्य शिलालेख साहित्यातहि याच कल्पनेचा पुनरुच्चार आढळतो ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. ३.१४४; ४६४ ). या कारणाने तामीळ साहित्यामध्ये अगस्त्य ऋषींचा निर्देश ‘ पोदियिलचा संत ’ अशा नावाने केला आहे. पश्चिम घाटाचे दक्षिणतम टोक प्राचीन काळी ‘ पोदियिल पर्वत ’ या नावाने ओळखले जात असून टॉलेमीच्या ग्रंथात या पर्वताचा निर्देश ‘बेत्तिगो’ या नावाने केलेला आढळतो.

ब्रह्माण्डमते अगस्त्य ऋषींचा हा आश्रम द्रविड देशामध्ये कृतमाला नदीच्या काठी औद्भिंद पर्वतावर होता. अगस्त्य आणि परशुराम यांची येथे भेट झाली होती. येथे विष्णुपद, नागकुंड, सप्तर्षिस्थान, सरस्वती, अग्निहोत्र कुंडत्रय आदि तीर्थस्थाने होती (ब्रह्माण्ड. ३.३५.१६-४५).

स्थानिक समजुतीनुसार अगस्त्य ऋषी या पर्वतावर आजहि वास्तव्य करीत असल्याचे मानण्यात येते ( काल्डवेल, द्रविडीयन ग्रामर, प्रस्तावना पृ. १०८; भासकृत अविमारक. अंक ४ ).

तामीळ भाष्यकार ‘ नच्चिनार्क्किनियर ’ ( इ. स. १४०० ) याने दिलेल्या माहितीप्रमाणे पूर्वकाली दक्षिण भारताच्या प्रदेशामध्ये रावण धुमाकूळ घालीत असे. एकदा हा असुरराज पोदियिल पर्वतावर अगस्त्य ऋषींच्या दर्शनार्थ आला असताना अगस्त्याने त्यास लंका द्वीपामध्ये स्थलांतरीत होण्याची आणि इतःपर दक्षिण भारतातील लोकांना त्रास न देण्याची सूचना दिली होती ( नीलकंठशास्त्री, साऊथ इंडिया पृ. ७३ ).

**२. पंचवटी**––वाल्मीकि रामायणामध्ये नासिक आणि पंचवटी यांच्या परिसरात वसलेल्या अगस्त्य ऋषींच्या आश्रमाचा निर्देश आढळतो. नासिकपासून २४ मैल आग्नेयेस असणाऱ्या आधु. अगस्तिपुरी येथे अथवा नासिकच्या पूर्वेस वसलेल्या अकोला गावी वाल्मीकि रामायणात निर्देशिलेला अगस्त्य ऋषींचा आश्रम वसला असावा असे मानण्यात येते. प्रवरा नदीच्या पलीकडच्या अंगास अहमदनगर जिल्ह्यातील अकोला गावापासून १ मैल अंतरावर अगस्त्य ऋषींचे मंदिर आजहि आढळून येते.

वाल्मीकि रामायणात दिलेल्या माहितीप्रमाणे जनस्थान आणि पंचवटी या स्थानानजीक हा आश्रम वसला असून सुतीक्ष्ण ऋषींच्या आश्रमापासून हा आश्रम ५ योजने अंतरावर आणि अगस्त्य ऋषींच्या भावाच्या आश्रमापासून ( अगस्त्यभ्रातुराश्रम ) दक्षिणेस १ योजन अंतरावर वसला होता (वा. रा. अर. ११.३८–४२; रघु. १३.३६).

या आश्रमामाध्ये ब्रह्मा, अग्नि, विष्णु, इंद्र, सूर्य, सोम, भग, कुबेर, धाता, विधाता, वायु, नागराज, अनंत, गायत्री, अष्टवसु, पाशहस्त वरुण, कार्तिकेय, आणि धर्म या विभिन्न देवतांच्या स्थापनेसाठी विभिन्न आसनांची योजना करण्यात आली होती ( वा. रा. अर. १२.१७–२१ ). आपल्या आध्यात्मिक शक्तीने अगस्त्य ऋषींनी साऱ्या राक्षसांचे दमन केले होते. त्यामुळे राक्षसांच्या प्रदेशात हा आश्रम वसलेला असूनहि त्यांचे उपद्रवापासून तो अलिप्त असे.

सीता आणि लक्ष्मण यांच्यासह वनवासी राम अगस्त्य ऋषींच्या आश्रमात आला, त्यावेळी अगस्त्य ऋषी उपासनाविधीमध्ये गुंतले होते. त्यांनी रामाचे मनःपूर्वक स्वागत केले आणि रामास सोने आणि हिरे यांनी भूषविलेले सुंदर धनुष्य, अमोघ बाण, अक्षय तूणिर, तसेच सोन्याच्या म्यानाने युक्त खड्ग आदि आयुधे प्रेमपूर्वक अर्पण केली ( वा. रा. अर. १२.३१–३५ ).

**३. रामाच्या सेतूनजीक**—पांड्य देशामध्ये रामाच्या सेतूनजीक वसलेल्या अन्य एका अगस्त्याश्रमाचा निर्देश महाभारतात आढळतो ( म. आ. १३०.४ ). अर्जुनाच्या प्रथम वनवासात (म. आ. २०८.३), धौम्य-यात्रेत (म. आर. ८६.१० ), तसेच लोमश–तीर्थयात्रेत (म. आर. ११८.४) या आश्रमस्थानांचा निर्देश आढळतो. त्यापैकी लोमश-तीर्थयात्रेत हा आश्रम नारी-तीर्थानजीक वसला असल्याची माहिती आढळते.

योगिनीतंत्रातहि या आश्रमाचा निर्देश आढळतो ( योगिनी. २.७.८ ). बलरामाने या आश्रमस्थानास भेट दिली होती.

नारद पुराणाच्या सेतुमाहात्म्यातहि या आश्रमस्थानाचा निर्देश केलेला दिसून येतो ( नारद. २.७६.१२ ). एक तीर्थस्थान या नात्याने पांड्य देशातील अगस्त्य आणि वरग ही दोन तीर्थे दक्षिण भारतात विशेष सुविख्यात होती असे या निर्देशावरून दिसते.

**४. दुर्जया नदीच्याकाठी**––महाभारतातील लोमश ऋषींच्या यात्रावर्णनात या आश्रमस्थानाचा निर्देश केला असून मणिमती नगरजवळील या स्थानी अगस्त्याने वातापि राक्षसाचा वध केला होता (म. आर. ९४.१–४).

**५. गोकर्ण महाबळेश्वरानजीक**––या ठिकाणी असणाऱ्या अगस्त्य-आश्रमाचा निर्देश महाभारतात आढळतो ( म. आर. ८८.१३ ).

**६. दक्षिण भारतातील कुंजरकुंज**––मध्य जावामध्ये उपलब्ध झालेल्या इ. स. ७३२ मधील एका शिलालेखामध्ये दक्षिण भारतातील 'कुंजरकुंज' नामक अगस्त्याश्रमाच्या एका स्थानाचा निर्देश केला असून, त्या स्थानी असणाऱ्या एका मंदिराबरहुकूम असे एक शिवमंदिर मध्य जावा देशामध्ये बांधल्याचा निर्देश आढळतो ( सांकृत्यायन, बौद्ध संस्कृति पृ. ९० ).

**७. महाराष्ट्रातील कोल्हापूर गावानजीक**—या स्थानी अगस्त्य ऋषींचा एक आश्रम वसला होता अशी स्थानिक समजूत आढळते ( डे, पृ. २ ).

**८. मद्रास राज्यातील वेदारण्य नामक रेल्वेस्थानकानजीक**––या स्थानी वेदपुरीश्वर नामक एक शिवमंदिर असून, या स्थानी प्राचीन काळी अगस्त्य ऋषींच्या आश्रमाचे स्थान होते अशी स्थानिक समजूत आढळते ( डे, पृ. २ ).

[ ब ] **पश्चिम भारतातील आश्रमस्थाने**—या प्रदेशातील निम्नलिखित आश्रमस्थानांचा निर्देश प्राचीन साहित्यात आढळतो:—

**१. पुष्कर तीर्थाजनीक**––सरस्वती नदीच्याकाठी अगस्त्य ऋषींचा एक आश्रम वसला होता असे महाभारतातील निर्देशावरून दिसते ( म. आर. १९.१९८; पद्म. सृ. १२.४ ). विष्णुस्मृतीमध्ये स्वामीस्थानानजीक वसलेले हे तीर्थस्थान श्राद्धयोग्य असल्याचा निर्देश आढळतो ( विष्णुस्मृति. ८५.२९ टीप ).

**२. गुजराथमधील प्रभासक्षेत्रामध्ये**— प्रभासक्षेत्रातील एक तीर्थस्थान या नात्याने अगस्त्याश्रमाचा निर्देश स्कंद पुराणात आढळतो (स्कन्द. प्रभास. १. २२६–२८९).

**३. गुजराथमधील हाटकेश्वरक्षेत्रामध्ये**— हाटकेश्वर–क्षेत्रातील एक तीर्थस्थान या नात्याने अगस्त्याश्रमाचा निर्देश स्कंद पुराणात आढळतो ( स्कन्द. नागर. ३३ ).

[ क ] **उत्तर भारतातील आश्रमस्थाने**—या प्रदेशातील निम्नलिखित आश्रमस्थानांचा निर्देश प्राचीन साहित्यात आढळतो:—

**१. गढवाल प्रदेशामध्ये**––या प्रदेशातील रुद्रप्रयागपासून १२ मैल अंतरावर अगस्त्यमुनि नामक एक ग्राम आढळून येते. या स्थानी अगस्त्य ऋषींचा एक आश्रम प्राचीन काळी वसला होता असे मानण्यात येते.

पद्म पुराणात दिलेल्या माहितीप्रमाणे हे स्थान 'धर्मारण्य' अशा वैकल्पिक नावाने ओळखले जात असे (पद्म. स्व. ६.५–७ ). हे वैकल्पिक नाव धारण करणारा भारतातील हा एकमेव अगस्त्यआश्रम होय ( डे, पृ. २ ).

**२. उत्तर प्रदेशामध्ये**—संकाश्य ( आधु. संकिस ) गावापासून १ मैल वायव्येस आणि इटाह गावापासून ४० मैल नैर्ऋत्येस सराई–आघात नामक स्थानी अगस्त्य ऋषीचे प्राचीन आश्रमस्थान असल्याचे स्थानिक लोकात मानले जाते (फ्यूरर, मॉन्युमेंटल अँटिक्विटीज ऑफ उत्तर प्रदेश).

**३. काशी येथे**—स्कंद पुराण काशीखंडामध्ये अगस्त्याश्रम नामक एक तीर्थस्थान काशी येथे असल्याचा निर्देश आढळतो ( स्कन्द. काशी. १.५ ).

४. प्रयागनजीक––महाभारतात प्रयागनजीकच्या एका अगस्त्याश्रमाचा निर्देश आढळतो ( म. आर. ८७.२० ).

**अगस्त्य ऋषींशी संबंधित अन्य तीर्थस्थाने––** अगस्त्याश्रमाव्यतिरिक्त अगस्त्य ऋषींच्या नावाशी संबंधित अशा अन्य अनेक तीर्थस्थानांचा निर्देश पौराणिक आणि अन्य साहित्यात आढळतो. अगस्त्य ऋषींचे व्यक्तिमाहात्म्यसूचक या नात्याने भारतातील या विभिन्न स्थानांचे महत्त्व विशेष वाटते.

या तीर्थस्थानांचे निम्नलिखित दोन ठळक भाग पडतात– ( १ ) भारतवर्षान्तर्गत तीर्थस्थाने; ( २ ) बृहत्तरभारतीय तीर्थस्थाने.

[ १ ] भारतवर्षान्तर्गत तीर्थस्थाने––या तीर्थस्थानांची नामावली अकारादि क्रमाने खाली दिली आहे:––

( १ ) **अगस्त्य–आश्रवन**––प्रभासक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( स्कन्द. प्रभास. १.३४६.१ ).

( २ ) **अगस्त्यकुंड**––हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक जलकुंड म्हणून स्कंद पुराणात याचा निर्देश आढळतो ( स्कन्द. नागर ५२.१; ११३ ).

२. गयामाहात्म्यात निर्देशिलेले एक तीर्थस्थान ( वायु. १०८.४५ ).

३. ( अगस्तिकुंड ) काशीक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( स्कन्द. काशी. ६१.१७७–१८०; ९७.२४६ ).

४. दक्षिण भारतात रामाच्या सेतूनजीक वसलेले एक तीर्थस्थान ( स्कन्द. ब्राह्म. १.१६.१७ ).

५. तामीळ प्रांतात मायावरम् येथील मंदिराच्या अंतर्भागात चौकोनी आकाराची एक विहीर असून ती अगस्त्यकुंड याच नावाने ओळखली जाते ( ती. ३६० ).

( ३ ) **अगस्त्य ( मुनि ) ग्राम**––रुद्रप्रयाग-केदारनाथ मार्गावर हे वसले असून येथे अगस्त्याचे एक मंदिर आढळून येते ( ती. ५४ ).

( ४ ) **अगस्त्यजन्मस्थान**—गंगा नदीकाठच्या कलश तीर्थावर अगस्त्याचा जन्म झाला होता ( नारद. २.४. ८७; ४१.४४ ).

( ५ ) **अगस्त्यतीर्थ**––स्कंदपुराण काशीखंडात काशी येथील एक तीर्थस्थान या नात्याने या तीर्थाचा निर्देश आढळतो ( स्कन्द. काशी. ८३.१०६ ).

२. पांड्य देशातील एक तीर्थस्थान ( म. आर. ८६. १० ).

३. ( अगस्त्यपद )––गयाक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान. ( अग्नि. ११५.५२; ११६.३; वायु. १११.५३ ).

( ६ ) **अगस्तिदुर्ग**––नासिक जिल्ह्यातील सुविख्यात दुर्गस्थान. मनमाड-अंकाई मार्गावर असणारा अंकाईचा सुविख्यात किल्ला तो हाच होय.

( ७ ) **अगस्त्यपर्वत**— महाभारतान्तर्गत धौम्ययात्रेत निर्देशिलेला भारताच्या पूर्व भागातील एक पर्वत. हा कालंजर पर्वताचा उपपर्वत मानण्यात येतो ( म. आर. ८५.१६ पाठ ).

२. ( अगस्त्यकूट )––ताम्रपर्णी नदीचे उगमस्थान असणारा मद्रास राज्यान्तर्गत तिनेवेल्लि जिल्ह्यातील एक पर्वत. अगस्त्य ऋषींचे आश्रमस्थान या नात्याने हा पर्वत स्थानिक लोकात सुविख्यात आहे.

( ८ ) **अगस्तिभवन**––सानंदूरक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान. ' सानंदूर–माहात्म्या 'त याचा निर्देश आहे ( वराह. १५०.५२ ).

( ९ ) **अगस्त्यभ्रातुराश्रम**––हा आश्रम जनस्थान आणि पंचवटी या स्थानाच्या परिसरात अगस्त्य ऋषींच्या आश्रमापासून १ योजन अंतरावर वसला होता ( वा. रा. अर. ११.३८; ४२ ).

( १० ) **अगस्त्यमृत्युस्थान**––महाभारतान्तर्गत ' लोमश तीर्थयात्रे 'त गया येथील ब्रह्मसर सरोवरानजीक अगस्त्याचा मृत्यु झाल्याचा निर्देश आढळतो ( म. आर. ९३.१३ ).

( ११ ) **अगस्त्य–लोपामुद्रा विवाहस्थान** ( सिंधोर्महत्तीर्थ )—अगस्त्याची पत्नी लोपामुद्रा विदर्भ देशाची राजकन्या असली तरी या दोहोंचा विवाह सिंधु नदीच्या काठी असलेल्या ' सिंधोर्महत्तीर्थ ' या स्थानी झाला, असे महाभारतातील निर्देशावरून दिसते––

एतत् सिन्धोर्महत्तीर्थं यत्रागस्त्यमरिंदमम् ।
लोपामुद्रा समागम्य भर्तारमवृणीत वै ॥

( म. आर. १३०.६ )

( १२ ) **अगस्त्यवट**––महाभारतात निर्देशिलेला हिमालय प्रदेशान्तर्गत एक पवित्र वटवृक्ष. अर्जुनाच्या प्रथम वनवासात एक तीर्थस्थान या नात्याने या वटवृक्षाचा निर्देश आढळतो ( म. आर. २०७.२ ).

( १३ ) **अगस्त्य–शिष्याश्रम**— तृणसोमाग्नि नामक अगस्त्य ऋषींच्या शिष्याचा हा आश्रम देवसभागिरि नामक पर्वतावर वसला असून, महाभारतान्तर्गत धौम्याच्या दक्षिण यात्रेत या स्थानाचा निर्देश आढळतो ( म. आर. ८६.१४ ).

(१४) **अगस्त्यसरस्** — महाभारतातील पुलस्त्य ऋषींच्या यात्रेत या सरोवराचा निर्देश आढळतो (म. आर. ८०.६३). पाठभेद–'अगस्त्यतीर्थ'.

(१५) **अगस्तिस्थान**--दक्षिण भारतान्तर्गत तंजोर जिल्ह्यामध्ये नेलोर गावी हे स्थान वसलेले आढळते (ती. ३६८).

(१६) **अगस्त्येश्वर** (तीर्थ)--नर्मदा नदीकाठचे मंदिरस्थान (पद्म. सृ. १८.१६; मत्स्य. १९१.१५; स्कन्द. आवन्त्य. ३.६३).

२. अगत्तियाणपल्लि येथील सुविख्यात मंदिरस्थान. या मंदिरात चोल राजा राजराज (तृतीय) याचा इ. स. १२१८ मधील एक शिलालेख सापडला आहे (एपि. इंडि. ८.२६७).

३. मध्य प्रदेशात नर्मदा नदीच्या उत्तर किनाऱ्यावर रावेर गावानजीक वसलेले सुविख्यात मंदिरस्थान. अगस्त्य ऋषींनी येथे विंध्य पर्वताला त्याची वाढ होण्यापासून रोखले होते. या घटनेच्या स्मृत्यर्थ या स्थानी अगस्त्येश्वर शिवाचे एक मंदिर बांधले आहे. याशिवाय रावेर गावामध्ये केदारेश्वर नामक अन्य एक शिवमंदिर असून ते शांडिल्य ऋषींनी स्थापिले असे मानण्यात येते (ती. ४३२).

४. दक्षिण भारतातील तिरुच्छुणाई या गावचे सुविख्यात मंदिरस्थान. येथील अगस्त्येश्वराच्या मंदिरात पांड्य राजा जटावर्मन् कुलशेखराचे इ. स. १२१६ आणि १२१७ मधील दोन शिलालेख सापडले आहेत (एपि. इंडि. ८.२७५).

५. वाराणसी येथील शिवमंदिरस्थान (कृत्यकल्पतरु तीर्थविवेचन. पृ. ११६).

६. अवंतिक्षेत्रान्तर्गत एक शिवस्थान (नारद. २.७८. ३३; स्कन्द. आवन्त्य. १.२०.६; ३५.६).

[२] **बृहत्तरभारतीय तीर्थस्थाने**—आग्नेय आशियातील बृहत्तर भारतीय देशांमध्ये अगस्त्य ऋषींच्या मूर्ती, मंदिरे आदि स्थापन केली गेली होती, असे तत्कालीन साहित्यातील आणि शिलालेखातील निर्देशांवरून दिसते. यापैकी विशेष उल्लेखनीय मंदिरे पुढीलप्रमाणे होतः —

(१) **पूर्व जावा**--या देशातील दिनया-नत्रात गावी आढळणाऱ्या इ. स. ७६० मधील एका शिलालेखात देवसिंह नामक राजाने या स्थानी अगस्त्य ऋषींची काळ्या पाषाणाची मूर्ती स्थापन केल्याचा निर्देश आढळतो (सांकृत्यायन, बौद्ध संस्कृति पृ ९१).

(२) **मध्य जावा**--या देशामध्ये अगस्त्य ऋषींची पूजा राजपुरोहित या नात्याने केली जात असून, राजदेवतेइतकेच या राजपुरोहित-देवतेला तेथे महत्त्व दिले जात असे. या देशातील अगस्त्याचा पूजाविधी दक्षिण भारतातील 'कुंजरकुंज' या अगस्त्याश्रमस्थानामधून अनुसृत करण्यात आला होता (सांकृत्यायन, बौद्ध संस्कृति पृ. १६९).

(३) **कंबुज** (आधु. कंबोडिया)--या देशाचा राजा यशोवर्मन् (इ. स. ८८९-९०९) याच्या एका शिलालेखात त्याची आई इंद्रदेवी ही आर्य देशातील वेदवेदांगपंडित अगस्त्य नामक ब्राह्मणवंशातील असल्याचा निर्देश आढळतो (सांकृत्यायन, बौद्ध संस्कृति पृ.१७३).

**अगस्त्यमलै** (पर्वत)—दक्षिण भारतातील त्रावणकोर प्रदेशातील एक टेकडी. तामीळ साहित्यात या टेकडीचा निर्देश 'पोदियिल' या नावाने केला असून ताम्रपर्णी (आधु. ताम्रावरी) नदी याच पर्वतापासून उगम पावते (इंपि. गॅझे. १.४६). तिनेवेल्लि जिल्ह्यातील ही टेकडी 'अगस्त्य-कूट' अशा वैकल्पिक नावाने ओळखली जात असून ती मलय पर्वताचा भाग समजला जात असे.

या पर्वतातून उगम पावल्यानंतर अनेकानेक धबधब्यांच्या साह्याने ताम्रपर्णी नदी मद्रास राज्यातील तिरुनेल्वेलि जिल्ह्यातील पापनाशम् या स्थानी प्रथम मैदानावर येते. या नदीच्या धबधब्यांपैकी बाणतीर्थम् येथील एक आणि पापनाशम् येथील पाच धबधबे विशेष सुविख्यात मानण्यात येतात.

**अगासग्राम** (जैनतीर्थ)—गुजरातमधील सुविख्यात जैन तीर्थस्थान. हे स्थान खेडा जिल्ह्यातील आनंद गावापासून आठ मैल अंतरावर वसले असून राजचन्द्र नामक जैन साधूच्या स्मरणार्थ येथे एक जैन देवालय आणि श्रीराजचन्द्र आश्रम नामक एक आश्रमस्थान बांधले आहे (ती. ४२७).

**अगैयारु** (नदी)--शिलालेख साहित्यात निर्देशिलेली दक्षिण भारतातील एक नदी. मांदोट्टम् गावावरून ही नदी वाहात असे (साऊथ इंडि. इन्स्क्रि. २.६२).

**अगलदेव** (गुफास्थान)--जैन साहित्यात निर्देशिलेले मराठवाड्यातील धाराशिव (आधु. उस्मानाबाद) या जैन गुफास्थानाचे नामांतर (ती. सं. पृ. १५२; धाराशिव पहा).

**अगलव चेतिय** (बौद्धमंदिर)--फाहियान्च्या प्रवासवर्णनात निर्देशिलेले आलवि (मध्य प्रदेशातील आधु. नेवल) गावचे बौद्धमंदिर. आलवक नामक

यक्ष या बौद्ध मंदिरामध्ये निवास करीत असे ( फाहियान, १७; आलवि पहा ).

**अग्नि** ( देश )--ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात निर्देशिलेला मध्य आशियातील एक देश. चीनमधून मध्य आशियाच्या मार्गाने भारतात यावयास निघालेल्या ह्युएन्त्संगचा पहिला मुक्काम 'कौ-चँग' (आधु. तुर्फान गावच्या परिसरातील प्रदेश ) देशामध्ये आणि दुसरा मुक्काम अग्नि देशामध्ये (=आधु. कारा शहराच्या परिसरातील प्रदेश ) झाला.

'अ-कि-नि' या नावाने या देशाचा निर्देश ह्युएन्त्संगने केलेला असून या देशाची राजधानी अन्य चिनी ग्रंथांत दिलेल्या माहितीप्रमाणे 'येन्-कि' ( =बग्रश सरोवराच्या उत्तरेस वसलेले आधु. कारा शहर ) गावी वसली होती.

या देशाच्या राजधानीच्या गावी ह्युएन्त्संग केवळ एक रात्र राहिला आणि दुसऱ्या दिवशी सकाळी त्याने आपला पुढील मार्ग आक्रमिण्यास सुरुवात केली. त्याने 'तॅन्' ( आधु. खैदु ) नदी ओलांडली आणि काही टेकड्या आणि खोरी ओलांडून तो 'कु-चिह' (आधु. कूच ) देशास जाऊन पोहोचला.

**देशवर्णन**—ह्युएन्त्संगने दिलेल्या माहितीप्रमाणे अग्नि देश पूर्व-पश्चिम १०० मैल लांब असून त्याची उत्तर-दक्षिण रुंदी ८० मैल होती. या देशाचे राजधानीचे गाव १॥ मैल क्षेत्रफळाचे होते. आधु. बग्रश सरोवरापासून फारच थोड्या अंतरावर हे गाव वसले होते.

हा देश सर्व बाजूंनी पर्वतांनी वेष्टिलेला असून त्यामधील रस्ते अत्यंत खड्या चढणीचे होते. या देशामध्ये अनेक जलप्रपात असून त्यामधून काढलेल्या काल्व्यांचा शेतीच्या कामासाठी उपयोग होत असे. येथील शेतामध्ये लाल बाजरी ( मिलेट ), गहू, खजूर, द्राक्षे, आदि पिके निघत असत.

**देशवर्णन**--येथील हवा सौम्य आणि उत्तेजक असून लोक सज्जन आणि अभिमानी होते. त्यांची लिपी थोड्याफार फरकाने भारतासारखीच होती. ते सुताचे आणि लोकरीचे कपडे वापरीत असत. लांबच लांब केस त्यांच्या डोक्यावर असून कोणत्याही प्रकारचे शिरस्त्राण ते वापरीत नसत. त्यांच्या नित्याच्या व्यवहारात सोने, चांदी आणि तांबे यांच्या नाण्यांचा उपयोग ते करीत असत. येथील राजा शूर असला तरी लष्करी डावपेचाच्या बाबतीत अनभिज्ञ होता. या देशाची अक्षरबद्ध अशी राज्यघटना नसून तेथे पूर्वकालीन इतिहासहि लिहिलेला नव्हता.

**बौद्धमठ**--या देशात हीनयानपंथीय सर्वास्तिवादिन् संप्रदायाचे १० बौद्ध मठ असून त्यामध्ये २००० बौद्ध भिक्षु रहात असत. या धर्ममठातील 'सूत्र' आणि 'विनय' ग्रंथांची अध्ययनपद्धती आणि तत्संबंधित धर्मग्रंथ भारतासदृशच होते. या मठातील आचार्य हे सदाचारसंपन्न असले तरी ते जेवणामध्ये मांस भक्षण करीत असत.

या देशातील सर्वात प्रमुख बौद्ध मठ 'अरण्य विहार' हा असून इ. स. ५८५ मध्ये धर्मगुप्त हा चीन देशास जात असता काही काळ या विहारात थांबला होता ( बील, १. ८७-८८ ).

२. ( तीर्थ ) प्रयाग येथे यमुना नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर वसलेले तीर्थस्थान ( मत्स्य. १०८.२७; ११०.४; पद्म. सृ. ४५. २७ ).

३. वाराणसीक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( कूर्म. पूर्व. २७.७; स्कन्द. काशी. ८४.७३; पद्म. सृ. ३७.७ ).

४. गौतमी ( गोदावरी ) नदीकाठचे एक तीर्थस्थान ( ब्रह्म. ९८.१; १००.२ ).

५. गौतमी ( गोदावरी ) नदीकाठचे अन्य एक तीर्थस्थान ( ब्रह्म. १२५. ५३ ).

६. ( कुंड ) कुरुक्षेत्रान्तर्गत सरस्वती नदीकाठचे एक तीर्थस्थान ( म. आर. ८१.११९ ). भृगु ऋषींच्या शापाने भयग्रस्त झालेला अग्नि या स्थानी असणाऱ्या शमीवृक्षात लपून बसला. तेव्हा देवांनी त्याचा पाठलाग करून त्यास शोधून काढले ( म. श. ४६. १२-२०; वामन. ५१.५२; वराह. तीर्थविवेचन पृ. २१५; पद्म. सृ. २७.२७ ).

७. ( तीर्थ ) पश्चिम भारतान्तर्गत साभ्रमती नदीच्याकाठी वसलेले तीर्थस्थान ( पद्म. उ. १३४.१. ).

८. कुब्जाम्रकक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान. येथील जल ऊष्णकाळात शीत आणि शीतकाळात ऊष्ण असे (वराह. १२६.६९; ७७ ).

९. अर्बुद ( आधु. आबू ) पर्वतावरील एक तीर्थस्थान ( स्कन्द. प्रभास. ३.३०.१ ).

१०. नर्मदा नदीकाठचे एक तीर्थस्थान ( नारद. २. ७७.१७ ). मध्य भारतातील नर्मदा नदीच्याकाठी सेमरदा नामक गावाच्या समोरच्या अंगास छोटा बरदा नामक एक गाव आहे. स्थानिक समजुतीनुसार या स्थानी अग्नीने तपश्चर्या केली होती. म्हणूनच नारद पुराणात निर्देशिलेले अग्नितीर्थ ते हेच असावे अशी शक्यता वाटते.

११. पश्चिम भारतातील प्रभासक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान (नारद. २.७०.८). स्कंद पुराणाच्या मते हे तीर्थस्थान सरस्वती-समुद्र संगमानजीक वसले होते (स्कन्द. प्रभास. १.३५). यावरून प्रभासपट्टण (आधु. पाटण) गावानजीकचा समुद्र अग्नितीर्थ या नावाने ओळखला जात असे, असे दिसते.

आजहि हे स्थान पवित्र मानण्यात येत असून तेथील समुद्रस्नान पुण्यकारक मानण्यात येते. येथील स्नानानंतर यात्रेकरू 'प्राची-त्रिवेणी' तीर्थामध्ये स्नान करण्यासाठी जातात.

१२. कश्मीरातील वितस्ता (आधु. झेलम) नदीकाठचे तीर्थस्थान (नीलमत. ४९५).

१३. दक्षिण भारतान्तर्गत समुद्रसेतूनजीकचे तीर्थस्थान (नारद. २.७६.१४; स्कन्द. ब्राह्म. १.२२). दक्षिण भारतातील महत्त्वपूर्ण तीर्थस्थान या नात्याने पौराणिक साहित्यात अन्यत्रहि या तीर्थस्थानाचा निर्देश आढळतो (नीलमत. १४६६; पद्म. सृ. २७.२७).

१४. ऊष्ण जलाने युक्त असे बदरिकाश्रमान्तर्गत एक तीर्थस्थान (स्कन्द. वैष्णव. ३.३).

१५. पश्चिम भारतातील हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान (स्कन्द. नागर. ९०.६४; ९१).

**अग्निकन्यापुर** (नगर)—महाभारतान्तर्गत अंगिरस्-तीर्थयात्रेत निर्देशिलेले अग्निपुर (= माहिष्मती) नगराचे नामांतर (म. अनु. २५.४३; अग्निपुर पहा).

**अग्निकुल** (लोकसमूह)—'चांद राइसा' आदि मध्ययुगीनकालीन राजस्थानी ग्रंथात निर्देशिलेले दक्षिण राजपुतान्यातील लोकसमूहांचे सामूहिक नाव. दक्षिण राजपुतान्यातील आबू पर्वतावर असणाऱ्या धगधगत्या अग्निकुंडामधून या लोकसमूहांचा जन्म झाला, म्हणून त्यांस 'अग्निकुल' असे नाव प्राप्त झाले. या लोकसमूहांमध्ये निम्नलिखित चार रजपूत जमातींचा समावेश होत असे:—

१. परमार (आधु. पवार); २. प्रतिहार (आधु. परिहार); ३. चाहमान (आधु. चौहान); ४. सोळंकी.

राजपुतान्यातील उपरोक्त चार जमाती या एकमेकांशी फार पुरातन काळापासून नातेसंबंधाने संबंधित असल्याच्या ऐतिहासिक सत्याचा रूपकात्मक निर्देश उपरोक्त आख्यायिकेत करण्यात आला असावा.

अन्य काही अभ्यासकांच्या मते दक्षिण राजपुतान्यामध्ये स्थायिक झालेल्या शक, हूण आदि परदेशीय लोकांना अग्नीच्या साक्षीने पवित्र करून घेण्याच्या विधीचा आणि अशा तऱ्हेने हिंदु चातुर्वर्ण्यव्यवस्थेमध्ये त्यांना सम्मीलित करून घेण्याच्या प्रयत्नाचा निर्देश येथे अभिप्रेत असावा (स्मिथ, अर्ली हिस्टरी पृ. ४२८).

**अग्निखेट** (देश)—पश्चिम भारतान्तर्गत ब्रह्मखेटक (आधु. गुजराथ) देशाचे त्रेतायुगातील नामांतर (ब्रह्मखेटक पहा).

**अग्निगुण्डुल** (ग्राम)—दक्षिण भारतातील कृष्णा जिल्ह्यातील विनुकोंड या तालुक्याच्या गावापासून ९ मैल उत्तरेस वसलेले गाव. या गावी शिवाचे एक आणि तिरुमलदेवाचे एक अशी दोन प्राचीन देवालये आढळतात. वीरभद्राचे अन्य एक देवालयहि येथे आढळते.

या गावाच्या पूर्वेस असणाऱ्या कोतुकोंड नामक टेकडीवर एका प्राचीन किल्ल्याचे अवशेष आढळतात (सेवेल, मद्रास पृ. ६५).

**अग्निजिह्ववेताल** (वेतालस्थान)—काशी येथील एक वेतालस्थान (स्कन्द. काशी. ६८.७३).

**अग्निधारा** (तीर्थ)—गया येथील एक तीर्थस्थान (अग्नि. ११६.३१). महाभारतान्तर्गत पुलस्त्य-यात्रेमध्ये या तीर्थाचा निर्देश आढळतो (म. आर. ८२.१२७).

२. (कुंड) बिहारमधील एक पवित्र जलकुंडस्थान. हे स्थान राजगृह येथील गृध्रकूट पर्वतापासून ४ मैल पूर्वेस वसले असून तेथील गरम पाण्याचे कुंड आजहि सुविख्यात मानले जाते (ती. १६८).

**अग्निपुर** (नगर)— अंगिरस्-तीर्थयात्रेत निर्देशिलेले मध्य प्रदेशातील 'माहिष्मती' नगराचे नामांतर (म. अनु. २५.४३). 'अग्निकन्यापुर' अशा वैकल्पिक नावाने हे गाव ओळखले जात असून ते एक पवित्र तीर्थस्थान मानले जात असे (माहिष्मती पहा).

रघुवंशात दिलेल्या सहदेव-दिग्विजयाच्या वर्णनातहि या नगराचा निर्देश आढळतो (रघु. ६.४२).

**अग्निपुरी** (तीर्थ)—काशीक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान (स्कन्द. काशी. १०).

**अग्निप्रभक्षेत्र** (तीर्थ)—गंडकी नदीच्याकाठी वसलेल्या सालग्रामक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान. येथील पाणी उन्हाळ्यात थंड आणि हिवाळ्यात ऊष्ण असते (वराह. १४५.५९).

**अग्निवर्णेश्वर** (लिंग)—काशी येथील ज्येष्ठेश्वरानजीक वसलेले एक शिवलिंगस्थान (स्कन्द. काशी. ६५.१४).

**अग्निवेश्य** (देश)—एक जनपद. या देशातील लोक भारतीय युद्धात कौरवपक्षात सामील असून क्रौंचव्यूहात

भीष्माच्या डाव्या बाजूस त्यांची योजना करण्यात आली होती ( म. भी. ४६. ५१ ).

**अग्निशिरस्** (तीर्थ )--महाभारतान्तर्गत धौम्य-तीर्थयात्रेत निर्देशिलेले यमुना नदीच्याकाठी वसलेले एक तीर्थस्थान. युधिष्ठिरास धौम्याने दिलेल्या माहितीप्रमाणे प्राचीन काळी सृंजयपुत्र सहदेव राजाने या स्थानी ' शम्याक्षेप ' नामक यज्ञ केला. या यज्ञाच्या फलस्वरूप या राजास चक्रवर्तिपदाची प्राप्ती झाली ( म. आर. ८८.४ ).

**अग्निसत्यपद** ( तीर्थ )-- बदरिकाश्रमान्तर्गत एक तीर्थस्थान ( वराह. १४५. ७ ).

**अग्निसरस्** ( तीर्थ ) -- कोकामुखक्षेत्रान्तर्गत पंचधारांनी युक्त असे एक तीर्थस्थान ( वराह. १४०.३४ ).

२. ( कुंड ) लोहार्गलक्षेत्रान्तर्गत एक पवित्र जलकुंडस्थान ( वराह. १५१.५२ ).

**अग्निहोत्रगृह**( नगर )-- संस्कृत शब्दकोश साहित्यात निर्देशिलेले प्रयाग ( आधु. अलाहाबाद ) नगराचे नामांतर ( कल्पद्रु. ११.२६ ).

**अग्नीज्य** ( लोकसमूह )--मार्कंडेय पुराणात निर्देशिलेले उत्तर भारतातील ( कूर्माच्या वाम कुक्षीतील ) आग्नीध्र लोकसमूहाचे नामांतर ( मार्कं. ५५.४३; आग्नीध्र पहा ).

**अग्नीश** ( लिंग व कुंड )--काशी येथील पवित्र जलकुंडस्थान ( स्कन्द. काशी. ९७.११९-१२० ). या स्थानी असणाऱ्या शिवलिंगाचा निर्देश अन्य पौराणिक साहित्यात आढळतो ( लिंग. तीर्थविवेचन पृ. ६६; ७१ ).

**अग्नीश्वर** ( लिंग )--अवंतिक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंगस्थान ( स्कन्द. आवन्त्य. १.७०.७५ ).

२. ( घाट ) काशी येथील गंगा नदीवरील एक घाट.

**अग्र** ( द्वीप )--बंगाल देशान्तर्गत भागीरथी नदीच्या प्रवाहामध्ये वसलेले एक बेट. हे बेट नवद्वीप ( आधु. नदिया ) जिल्ह्यामध्ये वसले आहे ( इंपि. गॅझे. १.५९ ).

**अग्रमन्दर** ( जैनस्थान )--बिहारमधील चंपापुरी ( आधु. भागलपुर ) गावानजीकचे जैन तीर्थस्थान. जैनांचा बारावा तीर्थंकर श्री वासुपूज्य याचे मुक्तिस्थान या नात्याने हे स्थान जैनधर्मीयात विशेष पवित्र मानण्यात येते. चंपापुरीनजीकच्या राजतमौलिका नदीच्या किनारी हे स्थान वसले असल्याचा निर्देश गुणभद्राच्या उत्तर पुराणात केलेला आढळतो.

भागलपुरच्या दक्षिणेस ३० मैल अंतरावर असणारे आधु. मंदारगिरि नामक पर्वतीय स्थान ते हेच असावे. भागलपुर गावाहून रेल्वेने तसेच बसने या गावी जाता येते.

आधुनिक काळी मंदारगिरि टेकडीवर दिगंबर जैनांची दोन मंदिरे असून या पर्वताच्या पायथ्याशीहि अन्य एक जैन मंदिर आढळून येते. दिगंबर जैनांचे बिहार प्रांतातील हे एक प्रमुख तीर्थस्थान मानण्यात येते.

जैन साहित्यात अन्यत्र श्रीवासुपूज्य या तीर्थंकरास चंपापुरी येथे मुक्ती प्राप्त झाल्याचा निर्देश केलेला आढळतो ( चंपापुरी पहा ).

**अग्निनगर** ( नगर ) --टॉलेमीच्या ग्रंथात निर्देशिलेले नर्मदेच्या पूर्वेस ( अक्षांश २२°-३०′ उत्तर; रेखांश ११८°-१५′ पूर्व) वसलेले एक नगर. यूल यांच्या मते उज्जयिनीच्या ईशान्येस ३० मैल अंतरावर वसलेले आधु. आगर गाव ते हेच असावे.

**अग्रेवण** ( वन )— पाणिनीच्या अष्टाध्यायीत निर्देशिलेले एक वन ( पा. सू. ८.४.४ ). आग्रेय ( = अग्र = पंजाबातील हिस्सार जिल्हा ) जनपदामध्ये अग्रोदक या राजधानीच्या गावाच्या परिसरात कोठेतरी हे वन वसले असावे ( अग्रोदक पहा ).

**अग्रोदक** ( नगर )--पंजाबातील आग्रेय जनपदाच्या इ. स. पू. २ ऱ्या शतकातील नाण्यांमध्ये निर्देशिलेले एक नगर ( आग्रेय पहा ). ' अगोदक अगाच जनपदस ' अशी अक्षरे या नाण्यांवर कोरलेली आढळतात.

पंजाबातील हिस्सार या जिल्ह्याच्या गावापासून १४ मैल अंतरावर हिस्सार-फतेहबाद रस्त्यावर वसलेले आधु. अग्रोहा गाव ते हेच होय ( इंडि. हिस्टॉ. क्वा. २७. १९८-१९९ ).

**टॉलेमीच्या ग्रंथात**--या ग्रंथात या नगराचा निर्देश ' अगर ' अशा नावाने केला असून अम्बस्तै ( = अम्बष्ठ ) देशातील हे गाव अक्षांश २५° उत्तर, रेखांश १२९°-२०′ पूर्व या स्थानी वसले होते.

**पाणिनीच्या अष्टाध्यायीत**--या ग्रंथात अग्रेवण नामक एका वनाचा निर्देश केलेला आढळतो ( पा. सू. ८.४.४ ). हे वन संभवतः अग्र जनपदामध्येच या नगराच्या परिसरात कोठेतरी वसले असावे ( अग्रेवण पहा ).

**मंदिरावशेष**--या गावी आढळणारे हिंदु मंदिरांचे अवशेष इ. स. ८ व्या ९ व्या शतकात प्रतिहार स्थापत्यशैलीने बांधलेल्या मंदिरांचे असावेत.

**उत्खनन**--या गावच्या उत्खननात सापडलेल्या प्राचीन नाणी, मणी, मृत्तिकापात्रे, तसेच शिल्पचित्रे आदींच्या

अवशेषांवरून या स्थानाचे प्राचीनत्व सिद्ध होते (श्रीवास्तव, अग्रोहा उत्खनन, मे. अर्कि. सर्व्हे. क्र. ६१).

**अघपट्टि** (ग्राम)— यादव राजा कन्हर याच्या इ. स. १२४६ मधील ममदापुर शिलालेखात निर्देशिलेले एक ग्राम. हे ग्राम कुंतल देशान्तर्गत कुंडि परगण्यात कोठे तरी वसले असावे (एपि. इंडि. १९२१; कुरुंबेट्ट पहा).

**अघमर्षण** (तीर्थ)—भागवतात निर्देशिलेले विंध्य पर्वताच्या पायथ्याशी वसलेले एक तीर्थस्थान. मानव सृष्टीचा आद्य रचयिता मानल्या जाणाऱ्या दक्ष प्रजापतीने या स्थानी विष्णूची तपस्या केली आणि विष्णुकृपेमुळे मैथुनज सृष्टी निर्माण करण्याची सिद्धी त्यास प्राप्त झाली, असे मानण्यात येते. तपस्यासमयी दक्षाने केलेली विष्णुस्तुती 'हंसगुह्यस्तोत्र' या नावाने ओळखली जाते (भा. ६.४.२३–३४).

२. (तीर्थ) उत्तर प्रदेशान्तर्गत अमुवा गावच्या तीर्थत्रयीचे सामूहिक नाव. हे स्थान सतनकी रघुराजनगर तहसिलीत वसले असून, येथील सिद्धेश्वर महादेवाचे मंदिर (धार), तीर्थकुंड (कुंडी) आणि प्रजापतीची यज्ञवेदी (वेधक) ही तीन स्थाने 'अभरखन' (अघमर्षण) या सामूहिक नावाने ओळखली जातात (ती. १२६).

**अघमोचनी** (नदी)—गया येथील एक नदी (वायु. १०८.८१).

**अघारि** (लिंग)—काशी येथील प्रयोगेश्वराजवळ वसलेले एक शिवलिंगस्थान (स्कन्द. काशी. ६१.४४).

**अघोरेश** (कूप, लिंग)—काशीक्षेत्रान्तर्गत पवित्र तीर्थस्थान आणि शिवलिंगस्थान (स्कन्द. काशी. ९७. ८६).

२. (लिंग) प्रभासक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंगस्थान (स्कन्द. प्रभास. १.९२).

**अघोरेश्वर** (लिंग)—वाराणसी येथील एक शिवलिंगस्थान (लिंग. तीर्थविवेचन पृ. ६०).

**अघ्वान** (लोकसमूह)—अर्मेनियन साहित्यात निर्देशिलेले वायव्य भारतातील अवगन (आधु. अफगाण) या लोकसमूहाचे नामांतर (अवगन पहा).

**अङ्कपाद**—(सांदिपनीआश्रमस्थान) अवंति येथील सुविख्यात तीर्थस्थान आणि सांदिपनी ऋषींचे आश्रमस्थान (नारद. २.७८.२५). आधु. उज्जयिनी येथे शिप्रा नदीच्या काठी हे स्थान आजहि आढळते.

स्कंद पुराणात दिलेल्या माहितीप्रमाणे हे एक विष्णुक्षेत्र असून, त्यामध्ये निम्नलिखित पाच स्थलांचा समावेश होत असे:–१. शंखिन्; २. विश्वरूप; ३. गोविंद; ४. चक्रिन्; ५. अंकपाद (स्कन्द. आवन्त्य. १.२७.१११–१२१).

**अङ्काई** (जैन गुफा)—खानदेशातील सुविख्यात जैन गुफास्थान. समृद्ध नक्षीकामाने युक्त अशा सात गुफा येथे असून इ. स. ११ व्या–१२ व्या शतकात त्या कोरण्यात आल्या आहेत. कालदृष्ट्या त्या नाशिकनजीकच्या चम्हार लेणी आणि पितळखोऱ्यानजीकच्या कन्हर गावच्या लेण्यांशी समकालीन दिसतात (फर्ग्युसन. २.१९).

**अङ्कुश** (तीर्थ)—महाराष्ट्रातील 'मोरेश्वर क्षेत्रा'न्तर्गत (आधु. मोरगाव) एक तीर्थस्थान. कऱ्हा नदीचे उगमस्थान या नात्याने हे तीर्थ विशेष महत्त्वाचे मानतात.

स्थानिक समजुतीनुसार गणपतीने आपल्या हातातील अंकुशाने या स्थानी पृथ्वीवर आघात करून पाण्याचा प्रवाह निर्माण केला. हा प्रवाह 'ब्रह्मकमंडलुगंगा' या नावाने ओळखला जात असून आधु. कऱ्हा नदी ती हीच असावी (ती. २५९).

**अङ्कुशेश्वर** (लिंग)—नर्मदा तीरावरील एक शिवलिंगस्थान (मत्स्य. १९४.१).

**अङ्कोर-थोम्** (बृहत्भारतीय नगर)— बृहत्भारतीय आग्नेय आशियातील सुविख्यात कंबुज (आधु. कंबोडिया) देशाच्या राजधानीचे गाव. 'अंकोर-थोम्' चा शब्दशः अर्थ 'नगर-धाम' (राजधानीचे गाव) असा होतो. या गावाचे उध्वस्तावशेष कंबोडिया येथील मेकाँग नदीच्या खोऱ्यामध्ये 'तोन्ले-सप्' नामक सरोवराच्या १४ मैल उत्तरेस आढळतात.

आज हे नगर संपूर्णतः उद्ध्वस्त झालेले असले तरी दहा मैलांच्या विस्तृत परिसरामध्ये त्याचे अवशेष विखुरलेले दिसतात. कंबुज देशातील ख्मेर राजवंशाच्या सुवर्णयुगात (इ. स. ९ वे–१२ वे शतक) वसविण्यात आलेल्या या नगरात कंबुजस्थापत्यकलेतील भव्यता, कलात्मकता, आणि प्रमाणबद्धता हे सारे गुण एकवटलेले दिसतात. याच स्थापत्यपरंपरेचे इ. स. १२ व्या शतकातील अंतिम विकसित स्वरूप या नगरापासून १ मैल दक्षिणेस असणाऱ्या 'अंकोर-वात्' या सुविख्यात मंदिरामध्ये पहावयास मिळते. अशा तऱ्हेने ख्मेर स्थापत्यकलेच्या सुवर्णयुगाचा प्रारंभ आणि विकास ही दोन्ही अंकोर-थोम् गावाशी संलग्न झाली आहेत.

**नगररचना**--नगररचनेच्या नियमांचे काटेकोर पालन हे या नगराचे प्रमुख वैशिष्टय असून ख्मेर मंदिरांमध्ये पुनःपुन्हा आढळणारी आयताकृती आवारांची रचना येथे पुनरावृत्त केलेली दिसते. या नगराच्या मध्यभागी असणाऱ्या फ्नोम बखेंग् टेकडीवर एक बृहदाकार मंदिर बांधले आहे. या मंदिराच्या समोरच्या अंगास एक पटांगण असून त्याच्या चतुर्दिशांना बांधलेले चार रस्ते नगराच्या बाह्य तटबंदीमधील चार दर्शनी प्रवेशद्वारांना जाऊन मिळत असत. या रस्त्यांच्या योगे या नगराचे आयताकृती आकाराचे चार भाग सहजच पडत असून त्यांमध्ये नगरातील ब्राह्मण, क्षत्रियादि चतुर्वर्णांचे लोक स्वतंत्रपणे निवास करीत असत.

**नगरस्थापनेचा इतिहास**—ख्मेर राजवंशातील निम्नलिखित तीन राजांच्या राज्यकालात (इ. स. ९ वे–१२ शतक) या नगराचे बांधकाम चालू होते :—

(१) जयवर्मन् (द्वितीय) (इ. स. ८०२–८६९)–ख्मेर राजवंशाचा आद्य संस्थापक असणाऱ्या या राजाने आपल्या राज्यकालाच्या १० व्या वर्षी आपल्या साम्राज्यवैभवास साजेशा अशा या प्रचंड नगराचे स्थान आणि त्याची सर्वसामान्य योजना पक्की करून त्याच्या बांधकामास प्रारंभ केला.

या नगरातील मध्यभागी असणारा राजवाडा आणि फिमेअनकस्, बयोन आदि महत्त्वाची मंदिरे याच राजाच्या राज्यकालात बांधण्यात आली. हा राजा जावा देशातून येऊन कंबुजमध्ये स्थायिक झाला असल्याने त्याने बांधलेल्या साऱ्या मंदिरस्थापत्यावर जावामधील इ. स. ७ व्या–८ व्या शतकातील सुविख्यात बोरोबुदुर मंदिराच्या स्थापत्याची छाया पडलेली दिसते.

जयवर्मन् राजाच्या विस्तीर्ण कारकीर्दीमध्ये या नगराचे बांधकाम जरी सतत चालू असले तरी ते पुरे झाले नसावे. कारण त्याच्या राजधान्या अमरेंद्रपुर (आधु. बन्तएशयर) आणि महेंद्र पर्वत (आधु. फ्नोमकुलेन्) गावी असल्याचा निर्देश तत्कालीन शिलालेख साहित्यात आढळतो.

(२) यशोवर्मन् (इ. स. ८८९–९०९)—जयवर्मनाच्या राजघराण्यातील चतुर्थ पुरुष असणाऱ्या यशोवर्मनाने इ. स. ९०० मध्ये कंबुज देशाची राजधानी हरिहरालय (आधु. प्रखान) गावाहून अंकोर-थोम् गावी समारंभपूर्वक हलविली. यशोवर्मन् राजाच्या राज्यकालात हे नगर बांधून पुरे झाले म्हणून त्याला 'यशोधरपुर' अथवा 'कंबुपुर' असे नाव देण्यात आले. यशोवर्मन् राजाच्या मृत्यूनंतर कोरण्यात आलेल्या 'स्दोक-काक्-थोम्' येथील शिलालेखात 'परमभट्टारक परमशिवलोक' (यशोवर्मन्) राजाने 'यशोधरपुर' नगराची स्थापना केल्याचा आणि 'हरिहरालय' गावी असणाऱ्या 'जगत्-ता-राजा' देवतेची उपास्य प्रतिमा या नव्या राजधानीच्या गावी हलविल्याचा निर्देश आढळतो.

(३) सूर्यवर्मन् (प्रथम) (इ. स. १००२–१०४९)–अंकोर-थोम् येथील काही अंतिम मंदिरांची आणि इमारतींची रचना या राजाच्या राज्यकालात करण्यात आली.

इ. स. १० शतकात म्हणजे इ. स. ९२६–९४२ च्या दरम्यान कंबुज देशाची राजधानी अस्थिर राजकीय परिस्थितीमुळे अंकोर-थोम् येथून चोक्–गर्ग्यर (आधु. कोहकेर) गावी हलविण्यात आली होती. त्यामुळे या काळात विशेष नवे बांधकाम या गावी होऊ शकले नाही.

**उत्तरकालीन इतिहास**--कंबुजचा राजा सूर्यवर्मन् (द्वितीय) (इ. स. १११२–११५२) याच्या मृत्यूनंतर नजीकच असणाऱ्या चंपा (आधु. कोचीन-चीन), पेगु, सयाम आदि देशांची आक्रमणे क्रमाक्रमाने सुरु झाली. या अस्थिर राजकीय परिस्थितीत या नगराचे बांधकाम इ. स. ११५२ नंतर संपूर्णतः थंडावले.

वर उल्लेखिलेल्या परकीय आक्रमणात इ. स. १३७५ मध्ये सयाम देशाच्या सैन्याने या नगरास सात महिनेपर्यंत वेढा घातला आणि ते जिंकून घेऊन संपूर्णतः उध्वस्त करून टाकले. यानंतर इ. स. १४६० मध्ये या नगराचा पुनः एकवार नाश करण्यात आला आणि येथील राजधानी कंबुज देशातील विभिन्न नगरांमध्ये क्रमाने हलविण्यात आली. यापैकी अंतिम राजधानी मेकाँग खोऱ्यातील फ्नोम-पेन्ह गावी हलविण्यात आली. कंबोडियाची आधुनिक राजधानीहि याच गावी वसली आहे.

**स्थापत्यावशेष**--हे गाव विस्तीर्ण अशा तटबंदीने वेष्टिलेले असून या तटबंदीच्या बाहेरच्या अंगास ३३०′ रुंदीचा खंदक खोदला आहे. गावासभोवतालची तटबदी आज पडून गेलेली असली तरी पश्चिमेकडील आणि दक्षिणेकडील खंदकाचे अवशेष आजहि पहावयास मिळतात. त्याआधारे या नगराच्या तटाची पूर्व–पश्चिम लांबी १००,००′, उत्तर-दक्षिण रुंदी ९६००′ आणि परिघ ७½ मैल होता असे दिसते.

या नगराच्या स्थानी आढळणारे वैशिष्टयपूर्ण स्थापत्यावशेष पुढीलप्रमाणे होतः—

१. तटबंदी––या गावासभोवतालची तटबंदीची भिंत २२′ उंच असून तीमध्ये एकूण पाच दरवाजे खोदले होते. यापैकी तीन दरवाजे उत्तर, दक्षिण आणि पश्चिम दिशास प्रत्येकी एक याप्रमाणे बांधले असून, पूर्व भागामध्ये एक छोटा आणि एक मोठा असे दोन दरवाजे बांधले होते. यापैकी पूर्वेकडील मोठा दरवाजा 'विजयद्वार' या नावाने ओळखला जात असून त्यास लागून असणारा रस्ता तटबंदीच्या अंतर्भागात असणाऱ्या राजवाड्यात जात असे.

२. राजरस्ते––उपरोक्त प्रवेशद्वारामधून १००′ रुंद आणि १ मैल लांबीचे पाच राजरस्ते नगराच्या मध्यभागी असणाऱ्या बयोन मंदिराकडे आणि अन्य दोन बयोन मंदिराच्या समोरच्या अंगास असणाऱ्या मैदानाकडे जात असत. या रस्त्यांच्या दोन्ही अंगास बांधलेल्या दगडी इमारतींचे अवशेष आजहि पहावयास मिळतात.

३. विजयद्वार––उपरोक्त मुख्य दरवाजाची रचना कंबुज देशातील मंदिरांच्या गोपुरयुक्त प्रवेशद्वारासदृश आढळते. या प्रवेशद्वाराची रुंदी ५२′ असून त्याच्या समभुज चौकोनाकृती मुख्य भागाच्या चारहि दिशांना विस्तारभवने बांधलेली आढळतात.

या प्रवेशद्वाराच्या वरच्या अंगास एकूण तीन मनोरे बांधलेले असून त्यापैकी मध्यभागी एक आणि त्याच्या दोन बाजूस प्रत्येकी एक अशा पद्धतीने त्यांची रचना केली आहे. या मनोऱ्यांच्या वरच्या अंगास चतुर्दिशांना याच गावाच्या बयोन मंदिरासदृश ब्रह्मदेवाची चतुर्मुखे कोरलेली आढळतात.

इ. स. १२९५ मध्ये या गावी आलेल्या एका चिनी प्रवाशाच्या प्रवासवर्णनात या प्रवेशद्वाराचे वर्णन केले आहे. मनोऱ्यांच्या शिरोभागी कोरलेल्या ब्रह्मदेवाच्या प्रतिमांचा निर्देश या प्रवासवर्णनात 'गौतम बुद्धाच्या प्रतिमा' असा चुकीने केला आहे. परंतु ही एक चूक वगळली तर या प्रवेशद्वाराचे उपरोक्त प्रवासवर्णनात केलेले वर्णन हे सद्यःकालीन स्थितीशी तंतोतंत जुळते.

उपरोक्त प्रवासवर्णनात दिलेल्या माहितीप्रमाणे या प्रवेशद्वाराच्या समोरच्या अंगास खंदक ओलांडून जाण्यासाठी प्रशस्त आकाराचा दगडी पूल बांधलेला होता. या पुलाचे दोन्ही अंगास प्रचंड आकाराच्या ५४ मूर्ती असून त्यांचे खांद्यावर ९ फडांनी युक्त अशा नागाची प्रचंड मूर्ती स्थापिलेली होती. या निर्देशावरून नागाच्या शरीराने या पुलाचा कठडा बनलेला असून, पुलाचे आतील टोकास ९ फडांनी युक्त अशा नागाची मूर्ती स्थापिली होती असे दिसते. पुलाच्या दोन्ही अंगास स्थापन केलेल्या मूर्तीपैकी काहींचे अवशेष आजहि आढळतात.

४ पूर्वदरवाजा क्र. २––पूर्वाभिमुख अशा मुख्य प्रवेशद्वारानजीक आणि त्याच्याशी समांतर असा हा दरवाजा बांधण्यात आला असून, त्यामधून नगरातील सुविख्यात बयोन मंदिराप्रत जाता येत असे.

५. अंतर्भाग – या नगराचा अंतर्भाग २ मैल लांब आणि ३½ मैल रुंद असून त्यामध्ये राजवाडा, मुख्य देवमंदिर, धर्ममठ, सरकारी कचेऱ्या याखेरीज ब्राह्मण, क्षत्रियादि उच्चवर्गीय लोकांच्या निवासाची सोय करण्यात आली होती. सर्वसामान्य जनता नगराच्या तटबंदीच्या बाहेरच्या भागात निवास करीत असे.

नगराच्या मध्यभागी बयोनचे सुविख्यात मंदिर बांधलेले असून, त्याच्या समोरच्या अंगास एक बृहदाकार खुले मैदान बांधण्यात आले होते.

मैदानाच्या पाठीमागच्या बाजूस बयोन मंदिर आणि पुढच्या अंगास बपुओन मंदिर बांधण्यात आले होते. त्याच्या पुढच्या बाजूस राजदरबाराची इमारत असून, त्यानजीकच 'तेप्र–नान्' नामक बौद्ध विहार, 'प्राथविथू' नामक विद्यापीठाची इमारत आणि अनेक बौद्धधर्मीय चौथरे बांधण्यात आले होते. या साऱ्या इमारतींचे भग्नावशेष आजहि पहावयास मिळतात.

६. राजवाडा – या गावातील राजवाड्याची मुख्य इमारत नगराच्या मध्यभागामध्ये बांधलेली असून ती २०००′ × ८०००′ आकाराच्या विस्तीर्ण चौकोनी तटबंदीने वेष्टिलेली होती. ही तटबंदी एकाच्या आत एक अशा पद्धतीने बांधलेल्या दोन तटांनी बनलेली असून त्या दोहोंच्या दरम्यान एक खंदक खोदला होता.

तटबंदीच्या अंतर्भागातील पश्चिमेकडील भागात राजवाड्याची मुख्य इमारत बांधण्यात आलेली होती. परंतु ही इमारत आज संपूर्णतः पडून गेलेली दिसते. 'फिमेअनकस्' चे शंकाकृती आकाराचे देवालय, काही मनोरे आणि ओटे एवढेच अवशेष केवळ या आवारात आज आढळतात.

७. मैदान––राजवाड्याच्या या तटबंदीच्या समोरच्या अंगास ८००′×४५′ लांबी, रुंदीचा आणि १५′ उंचीचा एक बृहदाकार कट्टा बांधलेला असून त्याचे भिंतीवर हत्तींची चित्रे कोरली आहेत. या कट्टयाच्या समोरच्या अंगास अन्य कोणत्याहि इमारतींचे अवशेष आढळत नाहीत. त्यावरून या ठिकाणी प्राचीन काळी एक

मोकळे मैदान असून, तेथे होणारे कसरतीचे खेळ राजा आपल्या पौरजनांसह या कट्ट्यावर बसून पहात असे, असे दिसते.

उपरोक्त कट्ट्याच्या उत्तर टोकाला ६०'×३०' आकाराची एक इमारत असून तिच्या दर्शनी भागावर सहा ओळींमध्ये कोरलेल्या विभिन्न शिल्पकृती आढळतात. या इमारतीच्या माथ्यावर फ्रेंच संशोधकांना कंबुज देशाचा महारोगपीडित राजा यशोवर्मन् (इ. स. ८८९–९०९) याचा पुतळा सापडला.

अंकोर–थोम् येथील देवालये—या गावाच्या तटबंदीच्या अंतर्भागात आढळणाऱ्या मंदिरांपैकी निम्नलिखित मंदिरे विशेष महत्त्वाची मानली जातात :—

१. शिवाश्रम (बयोन) मंदिर––अंकोर–थोम् गावाच्या मध्यभागी बांधण्यात आलेल्या या मंदिरात स्थापत्य आणि शिल्प या दोहोंचा इतका भव्योत्कट संगम झालेला दिसतो की ते पहात असताना वेरूळ येथील कैलास मंदिराची स्मृती येते. फरक इतकाच की कैलास मंदिर हे एक गुफामंदिर आहे तर याचे उलट बयोन मंदिर हे माठीव दगडाने बांधलेले मंदिर आहे. केवळ मंदिर–शिल्पाचाच विचार केला तर कितीतरी कैलास मंदिरांना पुरून उरेल इतके समृद्ध शिल्प या मंदिरामध्ये आढळते.

ख्मेर राजवंशाचा आद्य राजा जयवर्मन् (द्वितीय) (इ. स. ८०२–८६९) याने हे मंदिर बांधावयास प्रारंभ केला आणि त्याचा प्रपौत्र यशोवर्मन् (इ. स. ८८९–९०९) याने इ. स. ९०० मध्ये ते पुरे केले.

यशोवर्मनाच्या शिलालेखात या मंदिराचा निर्देश 'शिवाश्रम' या नावाने केला असून, ते 'केंद्रीय पर्वत' अथवा 'यशोधरगिरि' नामक टेकडीवर बांधले होते. यशोवर्मनाचा गुरू वामशिव याने या मंदिरामध्ये पवित्र शिवलिंगाची प्रतिष्ठापना केल्याचा निर्देशहि या शिलालेखात आढळतो.

हे मंदिर एकाहून एक उंच अशा दोन व्यासपीठांवर शंक्वाकृती पद्धतीने बांधलेले असून, त्याची एकंदर रचना अंकोर–वात् मंदिरासदृश आहे (अंकोर–वात् पहा). तत्रापि शिल्पकृतींची भव्यता आणि जोमदारपणा या दोन्ही बाबतीत हे पूर्वोक्त मंदिरापेक्षा सरस आहे.

या मंदिराच्या आवार क्र. १ ची रचना अंकोर–वात् मंदिराप्रमाणे असली तरी त्याच्या आवार क्र. २ ची रचना सर्वस्वी वेगळी दिसते. या आवाराच्या अंतर्भागात आवार क्र. ३ ची रचना करण्याऐवजी येथे द्वितीय क्रमांकाच्या आवाराच्या कोपऱ्यातच चार स्वतंत्र आवारे बांधली आहेत. तसे करण्याने मुख्य मंदिराच्या गर्भागाराच्या उत्तरेस, दक्षिणेस आणि पश्चिमेस स्वतंत्र अशी गोपुरयुक्त प्रवेशद्वारे बांधणे येथे शक्य होते. त्याबरोबरच गर्भागाराच्या पूर्वेस असणाऱ्या मुख्य प्रवेशद्वारास जोडून एकापाठीमागे एक अशा पद्धतीने बांधलेल्या तीन सभामंडपांना आवश्यक ती जागाहि येथे उपलब्ध होते. अशा तऱ्हेने या मंदिरातील गोपुरयुक्त प्रवेशद्वारांची एकूण संख्या पन्नासहून अधिक आहे. या सर्व गुंतागुंतीच्या रचनेमुळे या मंदिरास एक नवी भव्यता प्राप्त झाली आहे.

अंकोर–वात् मंदिराच्या तुलनेने हे मंदिर सद्यःकाली फारच उध्वस्त स्थितीत असून, सुस्थितीत असतांना ते कसे दिसत असेल याची पुरेशी कल्पना आज येऊ शकत नाही. परंतु अंकोर–वात् येथील मंदिर नऊ गोपुरांऐवजी पन्नास गोपुरांनी युक्त बनले तर ते कसे दिसेल, यावरून या मंदिराच्या भव्यतेची कल्पना येऊ शकते.

या मंदिराच्या चौकोनी आकाराच्या प्रत्येक गोपुरावर चतुर्दिशांना तोंड केलेल्या चतुर्मुख ब्रह्मदेवाची मूर्ती कोरली आहे. या मूर्तीच्या जटा अत्यंत कलात्मकतेने कोरल्या असून त्यावर एकेकाळी सोन्याचा मुलामा चढविण्यात आला असावा.

ब्रह्मदेवाच्या या मूर्तीमधील शिल्पकला आणि भाव ईजिप्तमधील पिरॅमिड्सच्या दर्शनीभागी असणाऱ्या जगप्रसिद्ध 'स्फिंक्स'च्या तोडीचे आहेत. या मनोऱ्यांपैकी छोटी गोपुरे ५०' उंचीची असून गर्भागाराच्या शिरोभागी असणारी गोपुरे १३०' हून अधिक उंच आहेत. मुख्य गर्भागाराच्या शिरोभागी असणारी ही गोपुरे अष्टकोनी असून त्यांच्या मध्यभागी ब्रह्मदेवाची अष्टदिशाभिमुख अशी आठ मुख कोरली आहेत.

बयोन मंदिराचे अन्य एक प्रमुख वैशिष्ट्य असे की त्याच्या बाह्य तटबंदीच्या बहिर्भागात तसेच अंतर्भागातहि अखंड शिल्पचित्रमालिका कोरलेली दिसते. अंकोर-वात् येथील मंदिरात अशा तऱ्हेची शिल्पचित्रे बाह्य तटबंदीच्या केवळ बहिर्भागातच कोरली आहेत. या कारणाने बयोन येथील या शिल्पचित्रांची एकूण लांबी ३६०००' म्हणजे अंकोर–वात् मंदिरापेक्षा जवळजवळ दुप्पट भरते. इतकी प्रचंड शिल्पचित्रे असणारे बयोन हे जगातील अद्वितीय मंदिर मानावे लागेल.

उपरोक्त शिल्पचित्रात कंबुज देशाच्या तत्कालीन जीवनातील विभिन्न प्रसंग शिल्पांकित केले आहेत.

भारतीय संस्कृतीची केवढी घनदाट छाया कंबुज देशातील आचारविचारांवर पडली होती, याचे सुस्पष्ट दिग्दर्शन या चित्रामध्ये होते. यापैकी काहीमध्ये जानवे घातलेले जटाजूटधारी ब्राह्मण तपस्या करीत असताना दिसतात. अन्य काही ठिकाणी धोतर नेसलेला आणि गळ्यात रत्नहार घातलेला राजा खिडकीत बसलेला दिसतो. अन्य एका शिल्पचित्रात क्रुद्ध झालेला शिव आपल्या तृतीय नेत्राने कामदेवास भस्म करीत असल्याचे दिसते.

या मंदिराच्या पाठीमागच्या बाजूस कमलपुष्पावर उभ्या असलेल्या अवलोकितेश्वराची एक मूर्ती सापडली आहे. या मूर्तीच्या मुकुटामध्ये अमिताभ आणि हातामध्ये कमल, पुस्तक, माला आणि दर्पण असून, त्याच्या चारहि बाजूस उडत्या अप्सरा कोरल्या आहेत. यावरून प्रारंभी शैवमंदिर असणारे हे मंदिर उत्तरकालामध्ये बुद्ध-मंदिरामध्ये रूपांतरित करण्यात आले असावे.

**२. बपुओन मंदिर**—हे मंदिर अंकोर-थोम् येथील राजवाड्याच्या दक्षिणेस असून कंबुज देशातील शंक्वाकृती मंदिरस्थापत्याचे ते सर्वोत्कृष्ट उदाहरण मानले जाते. या मंदिराची एकंदर रचना बयोन मंदिरासदृश दिसते. फरक इतकाच की त्याची द्वितीय आणि तृतीय क्रमांकाची व्यासपीठे बयोन मंदिराच्या तुलनेने अधिक उंच दिसतात. उदा. बयोन येथील मंदिराच्या प्रथम आणि द्वितीय व्यासपीठांची उंची अनुक्रमे १०′ आणि २६′ आहे. तर याचे उलट बपुओन मंदिराच्या तीन व्यासपीठांची उंची अनुक्रमे २१′, ३७′, ४८′ आहे.

या मंदिराच्या २८ गोपुरांवर बयोन मंदिरासदृश ब्रह्मदेवाची मुखे कोरलेली नाहीत. तसेच त्याच्या 'कॉरिडॉर्स्' च्या भिंतींवर पूर्वोक्त मंदिराप्रमाणे शिल्पचित्रेहि नाहीत. असे असले तरी या मंदिराच्या प्रवेशद्वारावरील शिल्प हे बयोन आणि बस्सक येथील मंदिरशिल्पाइतकेच कलात्मक आहे.

**३. फिमेअनकस् मंदिर**—अंकोर-थोम् येथील अन्य एक महत्त्वाचे शंक्वाकृती मंदिर 'फिमेअनकस्' मंदिर असून ते राजवाड्याच्या आवाराच्या मध्यभागी बांधले आहे. हे मंदिर एकावर एक अशा पद्धतीने स्थापन केलेल्या एकूण तीन व्यासपीठांनी बनलेले असून, त्यांची उंची अनुक्रमे ८′, २३′ आणि २०′ आहे.

इ. स. १३ व्या शतकात या गावी आलेल्या चिनी प्रवाशाने केलेल्या वर्णनाप्रमाणे या मंदिराचे लाकडी शिखर हे ताम्रमिश्रित सोन्याने वेष्टिलेले असून, त्याची उंची बयोन येथील शिखरापेक्षा अधिक होती. आज हे शिखर संपूर्णतः नाहीसे झाले असून, मुख्य देवालयाच्या जोत्याचा भाग केवळ शिल्लक राहिला आहे.

शिलालेख—या नगराच्या परिसरामध्ये यशोवर्मन राजाचे अनेक शिलालेख आढळून येतात. त्यापैकी विशेष उल्लेखनीय शिलालेख पुढीलप्रमाणे होत:—

१ मंदिरलेख—या गावी यशोवर्मनाने बांधलेल्या बपुओन आदि मंदिरामध्ये या मंदिराच्या प्रवेश-नियमांसंबंधी एक शिलालेख आढळतो. त्यामध्ये निर्देशिलेले सारे नियम दाक्षिणात्य मंदिरांसदृश दिसतात.

२. तेपनम् मंदिर शिलालेख—या गावच्या राजवाड्यानजीक असणाऱ्या 'तेपनम्' बौद्ध मंदिरामध्ये यशोवर्मन राजाचा अन्य एक शिलालेख असून, त्यामध्ये पहिल्या दोन पंक्तींमध्ये शिवाचे आणि उर्वरीत पंक्तींमध्ये गौतम बुद्धाचे वंदन केले आहे. तसेच येथील बौद्ध आश्रमाचे नियमहि त्यामध्ये नमूद केले आहेत. ते बहुतांशी सारे दक्षिण भारतातील शैव-आश्रमासदृश दिसतात. यावरून तत्कालीन कंबुज देशामध्ये शैव धर्म आणि बौद्ध धर्म यामध्ये विशेष भेदाभेद केला जात नसे असे दिसते (सांकृत्यायन, बौद्ध संस्कृति पृ. १७५-१७६).

**अङ्कोर-बोरे** (बृहत्भारतीय मंदिरस्थान)—कंबुज (=आधु. कंबोडिया) देशान्तर्गत मेकाँग खोऱ्यातील (फुनान) बौद्ध मंदिरस्थान. या मंदिरामध्ये गुप्त शिल्पशैलीची अनेक शिल्पे सापडली असून, त्यापैकी लोकेश्वर प्रतिमा विशेष उल्लेखनीय मानल्या जातात (गोएट्झ, पृ. १११).

**अङ्कोर-वात्**—(बृहत्भारतीय मंदिरस्थान) बृहत्तर भारतीय आग्नेय आशियातील कंबुज (आधु. कंबोडिया) देशातील जगद्विख्यात मंदिरस्थान. हे स्थान अंकोर-थोम् या राजधानीच्या गावापासून दक्षिणेस १ मैलावर वसले असून, तोन्ले-सप् नामक सरोवराच्या अलिकडील अंगास आहे.

**महत्त्व**—इ. स. ९-१२ व्या शतकात कंबुज देशामध्ये बांधण्यात आलेल्या भारतीय वळणाच्या मंदिरस्थापत्यामध्ये अंकोर-वात् (इ. स. १२ वे शतक) हे मंदिर सर्वोत्कृष्ट असून ते जगातील सर्वाधिक भव्य अश्ममंदिर समजले जाते. हिंदु धर्मश्रद्धेचा अत्युत्कट उन्मेष आणि शिल्पमाध्यमावरील असामान्य प्रभुत्व यांचा अद्वितीय संगम भारतातील सुविख्यात :कैलासमंदिरा-

प्रमाणेच येथेहि पहावयास मिळतो. या मंदिरातील शिल्प-चित्रेहि भारतातील सर्वाधिक सफाईदार अशा अमरावती येथील शिल्पांच्या तोडीची आहेत. म्हणूनच रोम आणि ईजिप्त येथील जगद्विख्यात मंदिरावशेषांना मागे टाकणारी स्थापत्यकृती असे या मंदिराचे सार्थ वर्णन करण्यात येते.

**चिनी प्रवासवर्णनात**—इ. स. १३ व्या शतकात कंबुज देशात आलेल्या शू-ता-कुआन या चिनी प्रवाशाने आपल्या प्रवासवर्णनात अंकोर-वात् चे मंदिर लूपान (विश्वकर्मा) याने एका रात्रीत बांधून पुरे केल्याची आख्यायिका नमूद केली आहे. वेरूळ येथील कैलास-गुफामंदिराच्या बाबतीतहि अशीच आख्यायिका प्रचलित आहे.

**नामव्युत्पत्ती**--'अंकोर-वात्'चा शब्दशः अर्थ 'राजधानीच्या गावाचे मंदिर' (नगर-देवालय) असा होतो. यापैकी 'अंकोर' हा शब्द संस्कृत 'नगर'चे अपभ्रष्ट रूप असून, 'वात्' या सयामभाषीय शब्दाचा अर्थ 'बौद्धमंदिर' असा होतो. अशा तऱ्हेने 'अंकोर-थोम् गावाचे नगर देवालय' असाच अर्थ येथे अभिप्रेत असावा. परंतु त्या गावाच्या तटबंदीच्या अंतर्भागात असणारी मंदिरे ती त्या गावची, आणि तटबंदीच्या बाहेर असणारी मंदिरे त्या गावाबाहेरची, असे मानण्याचा संकेत असल्याने या मंदिरस्थानाची माहिती येथे स्वतंत्रपणे देण्यात आली आहे.

**शोध**—कंबोडियातील मेकाँग आणि मेनान नद्यांच्या खोऱ्यामध्ये दुर्मीळ वनस्पतींच्या शोधार्थ भ्रमण करणाऱ्या हेन्री मोहौत् नामक फ्रेंच निसर्गशास्त्रज्ञाने इ. स. १८५८ मध्ये या मंदिरस्थानाचा शोध लावला. शतकानुशतके घनदाट अशा जंगलामध्ये सहजवश लागलेल्या या शोधामुळे बृहत्तर भारतीय वसाहतींच्या अध्ययनाचे एक नवे पर्व सुरू झाले.

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**—कंबुज देशाचा ख्मेरवंशीय राजा सूर्यवर्मन् (द्वितीय) (इ. स. १११२–११५१) याने आपला राजगुरू दिवाकर पंडित याच्या प्रेरणेने हे मंदिर बांधावयास प्रारंभ केला, आणि त्याचे बहुतांशी बांधकाम पुरेहि केले. या राजाचा उत्तरवर्ती राजा धरणींद्र-वर्मन् (इ. स. ११५२–११८१) याच्या राज्यकालात हे मंदिर पुरे करण्यात आले. या मंदिरात आढळणाऱ्या एका शिलालेखामध्ये सूर्यवर्मन् राजा 'स्वर्गवासी' (परमविष्णु-लोक) झाल्याचा निर्देश आढळतो.

सूर्यवर्मन् राजा हा बौद्धधर्मीय असला तरी आपल्या गुरूच्या प्रेरणेने एक विष्णुमंदिर या नात्याने या मंदिराची रचना त्याने केली व त्यामधील मुख्य गाभाऱ्यात विष्णूची प्रतिमा स्थापन केली. जयवर्मन् (चतुर्थ) (इ. स. ११८१–१२०१) राजाच्या राज्यकालात या मंदिराचे हीनयानपंथीय बौद्धमंदिरात रूपांतर करण्यात आले.

**रचना**--अंकोर-थोम् नगराच्या आवाराच्या १ मैल दक्षिणेस हे मंदिर बांधलेले असून त्याच्या अतिभव्य आकारामुळेच उपरोक्त नगराच्या आवाराच्या बाहेर ते बांधणे क्रमप्राप्त झाले असावे.

या मंदिराचा आणि त्याच्या सभोवतालच्या तीन तट-बंदीचा आकार समभुज चौकोनाकृती असून त्यामधील एकाच्या आत एक असणाऱ्या तटबंदी क्रमाक्रमाने चढत्या अशा शंक्वाकृती पद्धतीने बांधल्या आहेत. या मंदिराच्या सर्वात बाहेरील तटबंदीची लांबीरुंदी प्रत्येकी सुमारे एक मैल (३३००′ × ३२४०′) आहे.

**खंदक**--क्षुद्र अशा ऐहिक जगापासून हे मंदिरस्थान दूर राखण्याच्या प्रेरणेमुळे असो, अथवा नागदेवतांना तृप्त करण्याच्या आकांक्षेमुळे असो, या मंदिराच्या सभोवताली ६४८′ रुंदीचा आणि एकूण २॥ मैल लांबीचा विस्तीर्ण खंदक बांधला आहे. या खंदकाच्या खोदकामातून जो मातीचा अजस्त्र ढिगारा निघाला, तो मंदिराच्या अंतर्भागा-मध्ये टेकडीसारखा उभा करून त्यावर मुख्य मंदिराची आणि त्यासभोवतालच्या तटबंदीची रचना करण्यात आली असावी.

**दगडी पूल**--पश्चिमाभिमुख अशा या मंदिराला अंकोर-थोम् नगराशी जोडण्यासाठी १५००′ लांबीचा, ३६′ रुंदीचा आणि ७′ उंचीचा प्रशस्त दगडी पूल बांधला आहे. कंबुज देशातील बहुतांशी मंदिरे ही पूर्वाभिमुख असतात. परंतु राजधानीकडे तोंड करून हे मंदिर बांधणे आवश्यक असल्याने हे मंदिर पश्चिमाभिमुख बांधले असावे.

**मुख्य प्रवेशद्वार**—या मंदिराच्या पाच मजली मुख्य प्रवेशद्वाराची (गोपुर) रचना दक्षिण भारतातील द्राविड-मंदिरातील गोपुरासदृश असून, त्याच्या दर्शनी भागाची लांबी ६००′ आहे.

बाह्य तटबंदीच्या अंतर्भागात वरच्या बाजूस चढत जाणारा १११०′ लांबीचा अन्य एक छोटा पूल असून तो मंदिराच्या समोरच्या बाजूस असणाऱ्या क्रूसाकृती व्यासपीठास जाऊन मिळतो.

मंदिररचना––स्थापत्यशास्त्रीय दृष्टीने हे मंदिर एकाच्या आत एक अशा पद्धतीने बांधलेल्या तीन तट-बंदींनी बनले आहे. त्यापैकी प्रत्येक आवार हे त्याच्या-बाहेर असणाऱ्या आवारापेक्षा दुपटीने उंच जागी बांधले आहे. याकारणाने या साऱ्या देवालयास शंक्वाकृती असा आकार सहजच प्राप्त होतो.

आवार क्र. १—यापैकी सर्वात बाहेरचे आवार ५९०′ × ७००′ लांबीरुंदीचे असून, त्याचे क्षेत्रफळ ४,१३,००० चौ. फूट आहे. या तटबंदीच्या प्रत्येक दर्शनी बाजूस प्रत्येकी तीन प्रवेशद्वारे असून, या प्रवेश-द्वारांच्या दोन्ही अंगास मंदिराच्या दर्शनी भागात प्रशस्त आकाराचे स्तंभयुक्त 'कॉरिडॉर्स' बांधले आहेत. या कॉरिडॉर्सच्या दर्शनी भिंतीवर विभिन्न भित्तिशिल्पे कोरली असून ती या मंदिराची सर्वात मोठी वैशिष्ट्ये मानली जातात.

आवार क्र. २—आवार क्र. १ मधून पायऱ्यांच्या साह्याने ३०′–४०′ चढून गेल्यानंतर आपण आवार क्र. २ मध्ये जाऊन पोहोचतो. हे आवार २००′ × १८५′ लांबीरुंदीचे असून, त्याच्या सभोवताली असणाऱ्या तटबंदीच्या अंतर्भागात बाहेरील आवाराप्रमाणेच स्तंभयुक्त कॉरिडॉर्स बांधले आहेत. या कॉरिडॉर्सच्या चार कोपऱ्यात चार शिखरे (मनोरे) आहेत.

आवार क्र. ३—येथून पुढे अत्यंत चढ्या अशा जिन्याने वर चढून गेल्यानंतर आपण १३०′ लांबी-रुंदीच्या आवार क्र. ३ मध्ये जाऊन पोहोचतो. या आवाराच्या चार कोपऱ्यात आवार क्र. १ आणि २ सदृश छोट्या आकाराचे मनोरे बांधले असून, या आवाराच्या मध्यभागी उंचच उंच (१६०′) शिखराने युक्त असे मुख्य देवतामंदिर बांधले आहे. या मुख्य मंदिराचा कळस प्रफुल्लित कमलपुष्पाच्या आकाराचा असून, भूभागापासून या विशिष्ट कळसापर्यंतची या मंदिराची एकूण उंची २१०′ आहे.

स्थापत्यवैशिष्ट्ये—स्थापत्यशास्त्रीय दृष्टीने या मंदिराची निम्नलिखित वैशिष्ट्ये उल्लेखनीय मानली जातात:—

१. बृहदाकार—या मंदिराचे एकूण क्षेत्रफळ ४,१३,००० चौ. फूट असून, समोरच्या बाजूने पाहिले असता या मंदिराच्या मध्यवर्ती मनोऱ्याची उंची जमिनी-पासून १८०′ भरते. जगातील सर्वात मोठे समजल्या जाणाऱ्या थेबेस् येथील 'कर्नक' मंदिराचे क्षेत्रफळ ४,३०,००० चौ. फूट आहे. अशा तऱ्हेने आकारमानाच्या दृष्टीने अंकोर-वात् येथील मंदिर हे जगातील द्वितीय क्रमांकाचे मंदिर आणि आग्नेय आशियातील सर्वाधिक मोठे मंदिर ठरते (आग्नेय आशियातील द्वितीय क्रमांकाचे मंदिर–जावा येथील बोरो-बुदुर).

२. साधीसरळ लयबद्ध रचना—या मंदिराची रचना सकृद्दर्शनी अत्यंत गुंतागुंतीची वाटली, तरी ती वस्तुतः अत्यंत साधीसुधी आणि प्रमाणबद्ध आहे.

एकाच्या आत एक अशा पद्धतीने स्थापन केलेली आयताकृती आकाराची तीन आवारे या मंदिरामध्ये असून ही आवारे शंक्वाकृती पद्धतीने एकावर एक बांधलेली आहेत. या दरेक आवाराच्या प्रत्येक कोपऱ्यावर प्रत्येकी एक शिखर अथवा मनोरा बांधला असून मंदिराच्या माध्यानजीक बांधलेले मुख्य मंदिराचे शिखर हे अन्य साऱ्या शिखरांपेक्षा अधिक उंच आणि भव्य आहे.

अशा तऱ्हेने या मंदिराचे सारे स्थापत्यवैशिष्ट्य त्याच्या भव्यतेपेक्षाहि त्याच्या अत्यंत साध्यासुध्या परंतु अत्यंत प्रमाणशीर आणि लयबद्ध रचनेमध्ये आहे. मंदिर–स्थापत्यातील ही लयबद्धता हे साऱ्याच 'ख्मेर' स्थापत्याचे प्रमुख वैशिष्ट्य असून, तिचे अत्यंत परिणत स्वरूप अंकोर-वात् मंदिरामध्ये पहावयास मिळते.

भारतातील रामेश्वरम् मंदिराच्या स्तंभावर खर्ची पडलेली मेहनत ही अंकोर–वात् मंदिराच्यापेक्षा यत्किंचितहि कमी नसली, तरी ते मंदिर रचनादृष्ट्या या मंदिराच्या तुलनेने अतिशय सदोष वाटते (रामेश्वरम् पहा).

३. जलमंदिरसदृश बांधणी––या मंदिरातील मुख्य गर्भा-गाराचे, तसेच तत्रस्थ अन्य शिखरांचे स्थापत्य आणि शिल्पशैली ही दोन्ही सकृद्दर्शनी भारतीय वळणाची भासली, तरी मंदिराच्या एकाच्या आत एक अशा पद्धतीने आणि चढत्या श्रेणीने आवारे बांधत जाण्याची त्याची रचना भारतातील कोणत्याहि उपलब्ध हिंदु मंदिरात आढळत नाही. ही आवारे प्राचीन काळी पाण्याच्या साह्याने तुडुंब भरून तीन बृहदाकार जलाशयांमध्ये त्यांचे रूपांतर करण्यात येत असावे.

थॉम्सन यांच्या मते आजहि पावसाळ्याच्या दिवसात ज्यावेळी या मंदिराचा सारा परिसर जलमय होतो, त्यावेळी हे मंदिर जलमंदिर झाल्याचा देखावा थोड्या वेळापुरता का होईना पहावयास मिळतो. आपल्या वैभवाच्या परमोच्च क्षणी येथील तीनहि आवारे पाण्याने

तुडुंब भरलेली असताना हे जलमंदिर कसे दिसत असेल, याच्या कल्पनेनेच मन थक्क होते.

४. भारतातील जैन मंदिराशी साम्य—येथील मुख्य मंदिराची रचना भारतातील राणपुर येथील जैन मंदिरासदृश असल्याचे मत फर्ग्युसन यांनी व्यक्त केले आहे. परंतु त्यांचा हा तर्क फारच दूरान्वित वाटतो (राणपुर पहा).

५. कॉरिडॉर्स––लांबच लांब 'कॉरिडॉर्स' हे या मंदिराचे स्थापत्यशास्त्रीय दृष्टीने एक प्रमुख वैशिष्ट्य असून या मंदिराच्या एकूण तीन आवारांमध्ये अशा प्रकारचे सुमारे ४३००′ लांबीचे कॉरिडॉर्स आहेत. यापैकी आवार क्र. १ मध्ये असणाऱ्या कॉरिडॉर्सची लांबी २४००′, क्र. २ मधील कॉरिडॉर्सची लांबी १८००′, आणि क्र. ३ मधील कॉरिडॉर्सची लांबी ९००′ भरते. यापैकी ३३०० फूट कॉरिडॉर्सची रुंदी १८′ असून, उर्वरीत १००० फूट कॉरिडॉर्सची रुंदी १०′ किंवा त्याहून कमी आहे.

अंकोर–वात् येथील मंदिराच्या स्थापत्यकारांना मुसलमानी पद्धतीच्या कमानींची रचना अवगत नसल्याकारणाने त्यांच्या मंदिराची सारी छते आडव्या सपाट दगडाची बांधली आहेत. अशा प्रकारच्या दगडांनी युक्त असा कॉरिडॉर ८′–१०′ हून अधिक रुंद बांधणे शक्य नसल्यामुळे शिल्पचित्रांच्या मांडणीसाठी मंदिराच्या सभोवताली लांबच लांब कॉरिडॉर्स त्यांनी बांधले असावेत.

उपरोक्त कॉरिडॉर्सपैकी मंदिराच्या बाह्य तटबंदीच्या दर्शनीभागी बांधलेले कॉरिडॉर्स हे रचनादृष्ट्या विशेष निर्दोष मानले जातात. या कॉरिडॉर्सच्या एका बाजूला तटाची दगडी भिंत असून, दुसऱ्या अंगास म्हणजे बाहेरच्या बाजूस ग्रीक शिल्पशैलीच्या शिरोभूषणाने युक्त अशा चौकोनी स्तंभांच्या एकूण दोन रांगा आहेत. या स्तंभांच्या वरच्या अंगास विभिन्न दगड एकमेकांवर निसुळत्या पद्धतीने रचून तयार करण्यात आलेल्या भारतीय धर्तीच्या दोनपाखी कमानी आहेत.

अत्यंत कडक उन्हाळा आणि तितकाच रौद्र पावसाळा असणाऱ्या कंबुज देशामध्ये बाह्य हवामानापासून मंदिरातील शिल्पकृतींचे रक्षण करण्याच्या दृष्टीने उपरोक्त पद्धतीच्या दोनपाखी कमानी आदर्श वाटतात.

६. दगडी छत—या मंदिराचे आणि त्याच्या कॉरिडॉर्सचे दगडी छत हे एक स्थापत्यशास्त्रीय आश्चर्य मानले जाते. लाकूड आणि कॉंक्रीट या दोन्हीपैकी कशाचेहि साह्य न घेता माठीव दगडांची बांधलेली ही छते पाच शतकांहून अधिक काळ सुस्थितीत राहिली आहेत. या छतांमधील विभिन्न दगडांची सांधमोड इतक्या कौशल्याने केली आहे की त्यामधून पाण्याचा एक टिपूसहि खाली गळत नाही. ईजिप्तमधील जगप्रसिद्ध पिरॅमिड्सचा अपवाद वगळता इतके निर्दोष दगडी बांधकाम जगात अन्यत्र कोठेहि आढळत नाही.

७. शिखरांची रचना—या शिखरांचा सर्वसामान्य आकार उत्तरभारतीय शैलीच्या मंदिरांसदृश असला तरी त्यांच्या दर्शनी भागावरील नक्षीकाम स्वतंत्र धर्तीचे आहे. या शिखरांचा आकार सुरूच्या झाडाप्रमाणे असून त्यावरील एकावर एक अशा पद्धतीने आडव्या बांधणीचे नक्षीकाम हे इ. स. ६ व्या शतकातील 'सुंग्–शान्' (होनान्) येथील बौद्ध 'पॅगोडा' सदृश आहे.

ही शिखरे तळाशी चौकोनाकृती असली तरी त्यांचा वरचा अर्धा भाग तारकाकृती आहे. या शिखरांचा हा आकार, तसेच शिखराच्या दर्शनी भागावरील चैत्य–गवाक्षासदृश असणारे नक्षीकाम द्राविड स्थापत्यशैलीशी मिळतेजुळते दिसते. अशा तऱ्हेने उत्तर भारतीय, द्राविड, आणि चिनी अशा विभिन्न स्थापत्यशैलींच्या संमिश्रणाने या शिखरांची रचना केली आहे.

८. स्तंभांची रचना––या मंदिरामध्ये एकूण १५३२ दगडी स्तंभ असून, या स्तंभांची रचना रोमन स्तंभांची प्रतिकृती डोळ्यासमोर ठेवून करण्यात आली आहे. स्तंभांचा व्यास आणि त्यांची उंची यांचे परिमाण, वरचा व्यास आणि खालचा व्यास यामधील परिमाण, तसेच त्यावरील नक्षीकाम ही सारी रोमन स्तंभांसदृश दिसून येतात. कश्मीरातील सारे स्तंभ ज्याप्रमाणे 'ग्रेशियन–डॉरिक' शैलीने कोरले आहेत, त्याचप्रमाणे 'रोमन-डॉरिक' शैलीचा वापर येथील दरेक स्तंभाच्या शिल्पामध्ये आढळतो.

शिल्पचित्रे—या मंदिराच्या बाह्य आवाराच्या कॉरि–डॉर्सच्या दर्शनी भागात कोरलेली शिल्पचित्रे हे या मंदिराचे सर्वात मोठे वैशिष्ट्य मानले जाते. या आवाराच्या चतुर्दिशांना असणाऱ्या चार प्रवेशद्वारांच्या दोन्ही अंगास प्रत्येकी एक अशा पद्धतीने एकूण आठ उपविभागामध्ये ही शिल्पचित्रे विभागली असून, त्यापैकी प्रत्येक उपविभागाची सरासरी लांबी २५०′–३००′ आणि उंची ६½′ आहे.

या मंदिरातील शिल्पचित्रांची एकूण लांबी सुमारे २०००′ असून, त्यामध्ये चित्रित केलेल्या व्यक्तिमात्रांची आणि प्राण्यांची एकूण संख्या १८०००–२०००० भरते.

ही सारी शिल्पचित्रे 'रिलिफ' पद्धतीने (चित्राचा शिल्पांकित भाग पार्श्वभूमीपासून वर काढून) कोरली असून त्यामधील रचनाकौशल्य ईजिप्तमधील जगद्विख्यात शिल्पचित्रांच्या तोडीचे आहे. ही सारी शिल्पचित्रे त्यांच्या पार्श्वभूमीशी इतक्या मुलायमपणे जोडलेली आहेत की त्यांच्या छायाचित्रांमध्ये ती दगडावरील चित्रे आहेत हे ओळखूहि येत नाही.

**महाभारत आणि रामायण यामधील कथाभाग**—भारतीय चेहऱ्यामोहऱ्याच्या स्त्रीपुरुषांनी युक्त असे युद्धांचे, युद्धचर्चेचे, राजदरबारांचे, जंगली शिकारींचे असे महाभारत-रामायणातील कथाभागांवर आधारीत अनेक प्रसंग या शिल्पचित्रांमध्ये कोरले आहेत. कंबुज देशाचा राजा जयवर्मन् (द्वितीय) (इ. स. ८०२-८५४) याने महाभारत-रामायणादि ग्रंथ कंबुज देशात आणले असे काही अभ्यासक मानतात. याचे उलट इ. स. ४ थ्या-५ व्या शतकात तत्कालीन भारतीय वसाहतकारांनी हे ग्रंथ स्वतःबरोबर या भागात आणल्याचा निर्देश सयामी साहित्यात आढळतो. त्या आधारेच ही शिल्पचित्रे या मंदिरामध्ये कोरण्यात आली असावीत.

उपरोक्त साऱ्या शिल्पचित्रांचा कथाविषय हिंदु धर्मकल्पना आणि देवताशास्त्र याच्याशी सुसंगत असा आहे. ख्मेर राजवंशाचे राज्य या देशावर येण्यापूर्वी या देशामध्ये नागदेवता आणि सर्पदेवता यांची उपासना प्रचलीत होती. त्याऐवजी हिंदु देवतांची उपासना यशोवर्मन् राजाने सुरू केली. या देशातील परंपरागत उपासनाविधींचा त्याग केल्याची शिक्षा म्हणून या राजास महारोगासारखी दुर्धर व्याधी जडली. तरीदेखील ख्मेर राजांनी हिंदु उपासनापद्धती सोडली नाही. ही उपासनापद्धती इ. स. १२ व्या शतकात या देशामध्ये सुस्थिर झाल्याचा भरघोस पुरावा अंकोर-वात् मंदिरातील शिल्पचित्रांमध्ये पहावयास मिळतो.

**पौराणिक कथाभाग**—या मंदिरातील एकमेव पौराणिक शिल्प विष्णूच्या 'कूर्मावतारा'चे असून, त्यामध्ये वासुकि नागाच्या द्वारा समुद्र-मंथन केले जात आहे, आणि अशा तऱ्हेने घुसळल्या जाणाऱ्या समुद्रातून कूर्माच्या मस्तकावर आरूढ झालेली पृथ्वी बाहेर येत आहे, असे दृश्य कोरले आहे. या देशातील पूर्वकालीन नाग-उपासनेस पोषक असा या चित्राचा विषय भासमान झाल्यामुळे की काय हे शिल्पचित्र तसेच अर्धवट सोडून दिले आहे.

**इजिप्शियन शैली**--कथाविषय आणि शिल्पशैली या दोन्ही दृष्टींनी इजिप्शियन शिल्पचित्रांशी मिळतेजुळते असे एक शिल्पचित्र या ठिकाणी आढळते. स्वर्ग, पृथ्वी आणि नरक यांचे रूपकात्मक चित्रण करणाऱ्या या शिल्पचित्रामध्ये वरच्या अंगास एक मिरवणूक कोरली आहे. या मिरवणुकीची एकंदर रचना, या मिरवणुकीतील राजा ज्या पालखीमध्ये बसला आहे तिचा आकार, तसेच या राजाची राजचिह्ने आणि छत्रचामरे ही सारी नाईल नदीच्या खोऱ्यात कोरण्यात आलेल्या ईजिप्तमधील शिल्पचित्रांसदृश दिसतात. या शिल्पचित्रांच्या मध्यभागी एक न्यायाधीश अनेक पंचांसमवेत बसलेला दाखविला असून, त्याने शिक्षा फर्माविलेले गुन्हेगार हे खालच्या अंगास कोरलेल्या नरकामध्ये अनेक प्रकारच्या यातना भोगत असलेले दिसतात. यापैकी नरकाचा भाग हा विशेष कलात्मक असून त्यामध्ये गुन्हेगारांना शिक्षा द्यावयाचे पौर्वात्य देशात तत्काली प्रचलीत असणारे मार्ग मोठ्या रेखीवपणे चित्रित केले आहेत.

**अन्य मंदिरशिल्पाशी तुलना**--अंकोर-वात् मंदिरातील शिल्पचित्रांच्या तोडीची शिल्पे साऱ्या जगात केवळ जावा देशातील बोरो-बुदुर येथे आणि दक्षिण भारतातील हळेबीड येथे दिसून येतात. यापैकी बोरो-बुदुर येथील शिल्पेचित्रे ही अंकोर-वात् येथील शिल्पचित्रांच्या तुलनेने काहीशी ओबडधोबड असून हळेबीड येथील शिल्पशैली अंकोर-वात् येथील शिल्पशैलीहून सर्वस्वी वेगळी दिसते. हळेबीड येथील शिल्पे 'हाय रिलिफ' पद्धतीने कोरली असून त्यापैकी अनेक आकृती पार्श्वभूमीपासून विलग झालेल्या दिसतात. इतक्या की, ही शिल्पचित्रे शिल्प न राहता मंदिरस्थापत्याचा एक अविभाज्य भाग बनतात. याचे उलट अंकोर-वात् येथील मंदिरात शिल्पकला आणि स्थापत्यकला या एकमेकींपासून संपूर्णतः विलग ठेवण्यात आल्या असून, त्या परस्परपूरक असल्या तरी त्यांचे व्यक्तित्व आणि प्रेरणा एकमेकींपासून सर्वस्वी विभिन्न दिसतात. या विशिष्ट दृष्टीने भारतीय स्थापत्यकला 'गोथिक' स्थापत्यपरंपरेसदृश असून कंबोडियन स्थापत्यशैली ही त्याहूनहि पूर्वकालीन अशा ग्रीक स्थापत्यशैलीशी मिळतीजुळती दिसते. या दोहोंमधील तरतमाचा निष्कर्ष वैयक्तिक रुचिभेदावर अवलंबून ठेवणे अधिक योग्य ठरेल.

**नागपूजा**—या मंदिराच्या मुख्य शिल्पचित्रांमध्ये नाग-उपासनेचे एकहि शिल्पचित्र आढळत नसले, तरी मंदिराच्या अन्य भागांमध्ये मात्र सात फडांनी युक्त अशा नागांच्या अनेक प्रतिमा आढळतात. मंदिराच्या छतावर, स्तंभांच्या

वरच्या अंगास असणाऱ्या नक्षीकामयुक्त पट्टीवर, कठड्यावर अशा प्रकारच्या नागप्रतिमा कोरलेल्या दिसतात. या मंदिराच्या मुख्य शिखराच्या कंगोऱ्यावर सोन्याचा मुलामा दिलेल्या नागांच्या आकृती प्राचीन काळी बसविण्यात आल्या होत्या.

मूळचे नागपूजक असणाऱ्या लोकांनी या मंदिराची स्थापना केली होती, या तर्कास पुष्टी देणारा अन्य एक शिल्पशास्त्रीय पुरावा या मंदिरामध्ये उपलब्ध होतो. नागपूजक लोकांमध्ये सुंदर स्त्रिया देवमंदिरास अर्पण करण्याची प्रथा असे. त्या प्रथेनुसार या मंदिरासहि अशा स्त्रिया अर्पण करण्यात येत असाव्यात, असे या मंदिराच्या विभिन्न भागामध्ये खांबावर, तसेच अन्यत्र कोरलेल्या स्त्री-शिल्पांवरून दिसते. अशा प्रकारची सुमारे शंभर शिल्पचित्रे वा पुतळे या मंदिराच्या वास्तूमध्ये कोरले आहेत.

उपरोक्त शिल्पचित्रातील स्त्रिया हबशी स्त्रियांप्रमाणे जाड ओठांच्या, चपट्या नाकाच्या आणि इजिप्शियन लोकांप्रमाणे तिरपे डोळे असलेल्या आहेत. यावरून अंकोर-वात् मंदिर बांधणारे ख्मेर लोक हे मूळचे तुराणीवंशीय असावेत, असे मत फर्ग्युसन यांनी व्यक्त केले आहे.

**आधुनिककाली**--अलिकडच्या काळात या मंदिरावर सयामी बौद्ध भिक्षूंनी ताबा मिळविला आहे. या देवालयातील मुख्य देवमंदिर प्राचीन काळी गौतम बुद्धाचे असून हे मंदिर प्राचीन कालापासून बौद्ध मंदिरच असल्याचा दावा हे बौद्ध भिक्षु करतात. तथापि हे मंदिर प्राचीन काळी बौद्ध मंदिर म्हणून बांधले असल्याची शक्यता दिसत नाही. या मंदिरात बौद्ध स्तूप, विहार अथवा चैत्यमंदिर यांचे काहीहि अवशेष आढळत नाहीत. तसेच येथील शिल्पामध्ये गौतम बुद्धाच्या जीवनाशी दूरान्वयानेहि संबंध लावता येईल असे एकहि शिल्प आढळत नाही.

**शिलालेख**--अंकोर-वात् मंदिराच्या आवार क्र. १ च्या कॉरिडॉर्समध्ये ख्मेर राजांचे निम्नलिखित शिलालेख आढळतात :—

१. येथील एका शिल्पचित्रामध्ये कंबुज राजदरबारातील दृश्य कोरले आहे. त्यामध्ये मध्यभागी भालदार चोपदारांनी परिवेष्टिलेले राजा, राणी आणि राजकुमार बसले असून डोक्यावर जटाजूट आणि कानामध्ये कुंडले घातलेले काही ब्राह्मण राजाला फलोपहार देत असल्याचे दृश्य कोरले आहे. या शिल्पचित्राच्या खालच्या अंगास 'पंडितांकडून राजाला नजराणा' अशी अक्षरे कोरली आहेत.

२. याच आवारामध्ये एक राजा सैन्याला एकत्र होण्याचा हुकूम देत आहे असे दृश्य कोरले असून, त्याचे खालच्या अंगास 'परमभट्टारक पुण्यपाद स्वामी परमविष्णुलोक (सूर्यवर्मन् द्वितीय) शिवपादगिरीवर आपल्या सैन्यास जमा होण्याचा हुकूम देत आहे' असा शिलालेख कोरला आहे.

३. ख्मेर मंत्रिमंडळातील चार मंत्री आणि सेनापती यांच्या शिल्पप्रतिमाहि येथे कोरल्या असून, त्याखाली त्यांची नावे कोरली आहेत.

४. या मंदिरातील अंतिम शिलालेख इ. स. १४ व्या शतकातील इंद्रजयवर्मन् राजाच्या राज्यकालातील असून, त्यामध्ये जयवर्मन् राजाच्या विद्येश नामक आर्यदेशीय (भारत) गुरूने या मंदिरामध्ये स्थापन केलेल्या मठाला (आश्रम) देणगी दिल्याचा निर्देश आढळतो.

५. १५ व्या शतकाच्या प्रारंभीचा एक अशुद्ध संस्कृत शिलालेख येथे असून, त्यामध्ये अवलोकितेश्वराचा निर्देश आढळतो. त्यावरून इ. स. १५ व्या शतकात कंबुज देशामध्ये महायानपंथीय बौद्ध धर्म अस्तित्वात असावा.

**स्थापत्यशास्त्रीय महत्त्व**--कंबुज देशातील ख्मेर स्थापत्यशैलीचे अंतिम आणि परिणत उदाहरण या नात्याने हे मंदिर विशेष महत्त्वाचे मानण्यात येते. योजकता आणि कारागिरी या दोन्ही दृष्टींनी अजोड असणारे हिंदु देवमंदिर आग्नेय आशियातील एका विस्मृतप्राय देशामध्ये बांधलेले आढळते, ही कल्पनाच भारतीय अस्मितेच्या दृष्टीने पोषक अशी आहे. त्यातहि या मंदिरामध्ये परंपरागत नाग-उपासनेवर करण्यात आलेले हिंदु धर्माचे कलम स्थापत्यशास्त्रीय दृष्टीने वैशिष्ट्यपूर्ण असून त्यामधील ग्रीक धर्तीचे स्तंभ आणि इजिप्शियन धर्तीची शिल्पचित्रे यामुळे या कलासंगमाला एक अजोड वैविध्य प्राप्त झाले आहे.

**अङ्कोल** (तीर्थ)—मत्स्य पुराणात निर्देशिलेले गुजरातमधील नर्मदा नदीकाठच्या 'अक्रूरेश्वर' (आधु. अंकलेश्वर) तीर्थाचे नामांतर (मत्स्य. १९१.११८-१२२; अक्रूरेश्वर पहा).

भडोचच्या परिसरातील लाडवा नामक ग्रामापासून १ मैल अंतरावर 'श्वेतवाराहतीर्थ' नामक एक तीर्थस्थान असून, या स्थानी लिंगेश्वराचे शिवमंदिर आढळते. काही

अभ्यासकांच्या मते मत्स्य पुराणात निर्देशिलेले अंकोल तीर्थ ते हेच होय ( ती. ४३८ ).

**अङ्कोलिका** ( ग्राम )—स्वामिराजाच्या कलचुरि संवत् ३२२ ( इ. स. ५७३ ) मधील नगर्धन ताम्रपटात निर्देशिलेले मध्य भारतातील एक ग्राम. नगर्धनपासून ८ मैल आग्नेयेस सूर नदीच्या उजव्या किनाऱ्यावर वसलेले आधु. अरोळी नाव ते हेच होय.

शूल ( सूर ) नदीच्या काठी हे गाव वसले असून ते अचलपुर ( आधु. एलिचपुर ) अग्रहार ग्रामाच्या पश्चिमेस आणि श्रीपर्णिका गावाच्या पूर्वेस वसले असल्याचा निर्देश उपरोक्त ताम्रपटात आढळतो ( कॉर्पस् इन्स्क्रि. ४. २.६१५ ).

**अङ्ग** ( देश )—बिहार प्रांतामध्ये वसलेला आणि बौद्धकालीन भारतातील सोळा महाजनपदामध्ये समाविष्ट होणारा पूर्व भारतातील सुविख्यात देश. प्राचीन संस्कृत, पाली आणि प्राकृत साहित्यामध्ये या देशाविषयी अनेक निर्देश आढळतात. परंतु बिहार प्रांतात वसलेल्या मगध आणि वज्जि देशांइतकी सुसंगत आणि सुसूत्र माहिती या देशाविषयी मिळू शकत नाही.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात:—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. मार्कंडेय पुराण ( ५४.४३ ) | प्रवंग ( वंग देशासमोर वसलेला देश ). |
| २. बृहत्संहिता ( १४.८ ) | जठर–अंग. |
| ३. वाल्मीकि रामायण ( बा. २३.५–२२ ) | कामाश्रम. |
| ४. धम्मपद ( टीका. १.३८४ ) | अंगरट्ट. |
| ५. ह्युएन्त्संग ( वॉटर्स, २.१८१–१८२ ) | चंपा देश. |
| ६. फाहियान् ( लेग, पृ. १०० ) | चंपा देश. |
| ७. बौद्ध साहित्य | चंपा देश. |

अल्बेरुणीच्या मते बृहत्संहितेत निर्देशिलेले जठर–अंग हे अंग देशाचे नामांतर नसून जठर आणि अंग हे दोन स्वतंत्र देश होते.

**जोडनिर्देश**--प्राचीन साहित्यात अंग देशाचा निर्देश निम्नलिखित देशांसमवेत संयुक्तपणे केला असून, त्यावरून ते देश अंग देशाच्या परिसरात वसले असावेत असे दिसते:—

१. **अंग–मगध** ( गो. ब्रा. २.१०; महावस्तु. १. ३४ ); २. **अंग–मलद** ( अंग-मलज ) ( म. भी. १०. ४८; पद्म. सृ. ६.४५ ).३. **अंग–वंग** ( मत्स्य. ११३.४४ ).

**नामव्युत्पत्ती**--या देशास ' अंग ' नाव का पडले, यासंबंधी प्राचीन साहित्यात निम्नलिखित मतांतरे आढळून येतात :—

१. **वाल्मीकि रामायणात**--शिव-संतापाने दग्ध झालेल्या मदनाने आपले शरीर ( अंग ) या प्रदेशात टाकले, म्हणून त्यास ' अंग ' असे नाव प्राप्त झाले ( वा. रा. बा. २३.१४ ).

२. **महाभारतात**--पूर्व हिंदुस्थान देशाचा राजा बलि याच्या राणीस दीर्घतमस् ऋषींपासून ' अंग ', ' वंग ', ' कलिंग ', ' पुंड्र ' आणि ' सुह्म ' असे पाच पुत्र झाले. दीर्घतमसाच्या या पुत्रांनी उत्तरकालात ' अंग ' ' वंग ' आदि पाच देशांची स्थापना केली. त्यापैकी अंग राजाने स्थापलेल्या या देशास ' अंग देश ' असे नाव प्राप्त झाले ( म. आ. ९८.३१–३२; ह. वं. १.३१.३९–४२ ).

३. **बौद्ध ' सुमंगलविलासिनी 'मध्ये**—या देशातील राजपुत्र अत्यंत देखणे होते, म्हणून ते निवास करीत असलेल्या या देशास ' अंग ' असे नाव प्राप्त झाले ( सुमंगल. १.२७९ ).

आधुनिक अभ्यासकांच्या मते अंग देशाच्या नावासंबंधीच्या या साऱ्याच आख्यायिका कल्पनारम्य असून या प्रदेशात निवास करणाऱ्या ' अंग ' लोकसमूहावरून या देशास हे नाव प्राप्त झाले असावे.

**व्याप्ती**– बिहारमधील आधु. भागलपुर, मोंघीर जिल्हे आणि संथाळ परगण्याचा काही भाग मिळून प्राचीन अंग देश बनला असावा.

**भौगोलिक सीमारेषा**— इतिहासाच्या विभिन्न काळी या देशाच्या उपरोक्त व्याप्तीमध्ये थोडाबहुत फरक पडत असावा असे प्राचीन साहित्यातील या देशाविषयीच्या निर्देशावरून दिसते.

या देशाच्या बदलत्या सीमारेषा पुढीलप्रमाणे होत:—

१. **उत्तरेस**-- गंगा नदी.

२. **पश्चिमेस**— बौद्ध ' चंपेय जातक ' च्या मते या देशाची पश्चिम सरहद्द चंपा ( आधु. चांदन ) नदीने बनली

असून, मगध आणि अंग या दोन देशांमधील नैसर्गिक सरहद्दहि हीच नदी मानली जात असे (जा. क्र. ३०६).

यावरून 'चंपेय जातका'च्याकाळी बिहार प्रांतातील आधु. भागलपुर जिल्ह्याचा बहुतांशी सारा भाग मगध देशामध्ये समाविष्ट होत असून, त्या जिल्ह्यातील तसेच संथाळ परगण्यातील फारच थोडा भाग अंग देशामध्ये समाविष्ट होत असावा.

३. पूर्वेस— अंग देशाची पूर्व सरहद्द आधु. भागलपुर जिल्ह्याच्या आग्नेयेस, बिहार आणि पश्चिम बंगाल प्रांतांच्या सरहद्दीवर वसलेल्या तेलीय गढी खिंडीने बनली होती.

प्राचीन काळी राजमहल टेकड्यांच्या प्रदेशामध्ये वसलेली ही खिंड युद्धशास्त्रीय दृष्टीने अत्यंत महत्त्वाची असून, सैन्याची द्रुतगतीने हालचाल करण्यासाठी तिचा उपयोग होत असे.

४. दक्षिणेस— आधु. संथाळ परगण्याचा उत्तरेकडील भाग प्राचीन अंग देशामध्ये समाविष्ट होत असे. त्यामुळे या देशाची दक्षिण सरहद्द संथाळ परगण्याच्या या विशिष्ट भागानेच बनली असावी.

मगध देशाचा समावेश—मगध साम्राज्याचा उदय होण्याच्या अगोदरच्या काळात आधु. बिहारमधील मगध देशाचा बहुतांशी सारा भाग (=संथाळ परगण्याच्या दक्षिणेस असणारा आधु. वीरभूम आणि मुर्शिदाबाद जिल्ह्यांचा प्रदेश) अंग देशामध्ये समाविष्ट होत असे. हा काळ अंग देशाच्या अत्युच्च विस्ताराचा आणि समृद्धीचा असून यावेळी ब्रह्मदत्त राजाचे राज्य या देशावर होते.

तत्कालीन साहित्यात दिलेल्या माहितीप्रमाणे ब्रह्मदत्ताने वत्स देशाच्या राजाच्या मदतीने मगधाच्या भट्टिय राजाचा पराभव केला आणि त्याचा बहुतांशी सारा प्रदेश जिंकून घेतला. श्रीहर्षकृत 'प्रियदर्शिका' नाटकामध्ये मगध देशावर विजय प्राप्त करणाऱ्या अंग देशाच्या राजाचे नाव दधिवाहन दिले असून कौशांबी येथील वत्सराज उदयनाच्या मगध देशावर त्याने विजय प्राप्त केला होता (प्रियदर्शिका. अंक ४).

मगध देशातील विभिन्न स्थळे अंग देशामध्ये समाविष्ट असल्याचे जे निर्देश बौद्ध आणि हिंदु साहित्यात आढळतात, ते संभवतः याच काळातील असावेत. त्यापैकी विशेष उल्लेखनीय निर्देश पुढीलप्रमाणे होत :—

१. विधुरपंडित जातकामध्ये—या ग्रंथाचे मते राजगृह नगर अंग देशामध्ये समाविष्ट होत असे (जा. ५४५).

२. महाभारतामध्ये—अंग देशाच्या राजाने 'विष्णुपद' (आधु. गया टेकडी) येथे एक यज्ञ केल्याचा निर्देश या ग्रंथामध्ये आढळतो (म. शां. २९.३५).

३. कथासरित्सागरामध्ये — समुद्रकिनारी वसलेले विठांकपुर हे गाव अंग देशामध्ये वसले असल्याचा निर्देश या ग्रंथात आढळतो (कथासरित्. पृ. २५; २६; ३५; ११५).

वंग देशाचा समावेश—अंग देशामध्ये वंग देशाचा समावेश होत असल्याचा, तसेच हे दोन देश मिळून एक देशविभाग (विषय) बनत असल्याचा निर्देश महाभारतात आढळतो (म. स. ४४.९). परंतु ही गोष्ट ऐतिहासिकदृष्ट्या शक्य कोटीतील वाटत नाही. वंग (= आधु. आग्नेय बंगाल) देशाची उत्पत्ती ही अंग देशाच्या तुलनेने बऱ्याच उत्तरकालात झाली असून अंग देशाचे सामर्थ्य ज्यावेळी वृद्धिंगत होत होते, त्यावेळी वंग देश अस्तित्वात असेल की नाही, याबद्दल शंका वाटते. तसेच हा सारा प्रदेश जिंकून बलशाली बनलेल्या अंगराजाचा मगधासारख्या छोट्या राज्याचा मांडलीक असणाऱ्या बिंबिसाराकडून पराभव व्हावा, ही गोष्टहि अंग देशाच्या तथाकथित सामर्थ्याविषयी संशय उत्पन्न करणारी वाटते.

इ. स. पू. ६ व्या शतकात मगधाचा राजा बिंबिसार याने अंग देशाचे राज्य जिंकून घेतले आणि अशा तऱ्हेने या देशाचे स्वतंत्र अस्तित्व नाहीसे होऊन ते मगध साम्राज्याचा भाग बनले. असे असले तरी या देशाचा महनीय प्राचीन इतिहास आणि या देशाच्या पूर्वकालीन राजांनी प्राप्त केलेली कीर्ति यामुळे उत्तरकालीन साहित्यात तत्काली अस्तित्वात नसणाऱ्या या देशाच्या भौगोलिक सीमारेषा अतिशयोक्तपणे वर्णिलेल्या आढळतात.

शक्तिसंगमतंत्र या शाक्तांच्या ग्रंथात अंग देश हा 'वैद्यनाथ' (बिहारमधील संथाळ परगण्यातील तीर्थस्थान) पासून 'भुवनेश' (ओरिसामधील भुवनेश्वर) पर्यंत पसरला असल्याचा निर्देश आढळतो (शक्तिसंगम. ७.१६). अंग देशाच्या सरहद्दीचे हे वर्णन उघडउघड अतिशयोक्त आणि पूर्वकालीन परंपरेचा आंधळेपणाने पुनरुच्चार करणारे वाटते.

वैदिक साहित्यात— अंग देशाचा प्राचीनतम निर्देश अथर्ववेदात असून त्यामध्ये 'गंधार', 'मूजवंत', 'मगध' आणि 'अंग' हे भारताबाहेरचे तिरस्करणीय (व्रात्य) लोक मानले आहेत (अ. वे. ५.२२.१४). गोपथ ब्राह्मणात अंग लोकांचा निर्देश मगध लोकांसमवेत केला

असून (गो. ब्रा. २.९), ऐतरेय ब्राह्मणात अंग वैरोचन नामक एका राजाचा निर्देश आढळतो (ऐ. ब्रा. ८.२२).

ऋग्वेदातील एका सूक्ताचे प्रणयन 'अंग उरुपुत्र' नामक आचार्यांने केले असून हा आचार्य संभवतः अंग देशाचाच रहिवासी असावा (ऋ. १०.१३८).

पाणिनीच्या अष्टाध्यायीतहि 'अंग,' 'वंग,' 'कलिंग' आणि 'पुंड्र' हे लोक मध्यदेशात राहात असल्याचा निर्देश आढळतो (पा. सू. २.४.६२; ६.१.१७०).

उपरोक्त साऱ्या निर्देशांवरून अंग लोक हे वैदिककाली पूर्व भारतात निवास करीत होते आणि या लोकांची वसाहत ही मगध वसाहतीच्या पूर्वेस वसली होती असे दिसते. अंग या लोकसमूहवाचक नावावरून कालांतराने अंग हे देशवाचक नाव रूढ झाले असावे.

**वाल्मीकि रामायणात**--या ग्रंथात अंग देश हा गंगा आणि सरयू या दोन नद्यांच्या दरम्यान अयोध्या-मिथिला-मार्गावर वसल्याचा निर्देश आढळतो (वा. रा. बा. २३.१४). ऐतिहासिक काळामध्ये या दोन नद्यांच्या दरम्यान अंग लोक कधीहि राहात नव्हते हे सुविख्यात आहे. प्रागैतिहासिक काळी पश्चिम भारतातून पूर्व भारताकडे संक्रमित होणारे अंग लोक काही काळ गंगा आणि सरयू यांच्या दरम्यान राहिले असावेत, आणि या प्राचीन परंपरेचा निर्देश वाल्मीकि रामायणात करण्यात आला असावा. म्हणूनच वाल्मीकि रामायणातील हा उल्लेख तत्कालीन स्थितीचा द्योतक नसून पूर्वकालीन अस्पष्ट परंपरा नमूद करण्याचा तो एक प्रयत्न दिसतो.

मगध देशाचा उत्तरेकडील भाग हा रामायणकाळी अंग देशामध्ये समाविष्ट होत असे, असे डे म्हणतात (जे. ए. एस्. बी. इ. स. १९१४; पृ. ३१८). परंतु ते बरोबर वाटत नाही.

वाल्मीकि रामायणातील अन्य एका निर्देशावरून बिहार-मधील कोशी नदीच्या प्रदेशावर (कौशिकीक्षेत्र) अंग राजांचे काही काळ अधिराज्य होते असे दिसते (वा. रा. बा. १०).

ऋश्यशृंग वैभांडक या सुविख्यात ऋषींचा आश्रमहि रामायणकाळी अंग देशामध्ये वसला होता. या देशावर अकाली अवर्षणाचे संकट उत्पन्न होताच अंग देशाचा परम-प्रतापी राजा रोमपाद याने ऋश्यशृंग ऋषींच्या साह्याने हे संकट निवारिले आणि तदनंतर आपल्या शांता नामक कन्येचा त्यांच्याशी विवाह करून दिला. रोमपादाचा परममित्र असणाऱ्या अयोध्येच्या दशरथ राजाने अश्वमेध यज्ञ केला, त्यावेळी या यज्ञाचा प्रमुख ऋत्विज या नात्याने ऋश्यशृंग अयोध्या येथे गेला होता.

**महाभारतात**--प्राचीन काळापासून एक स्वतंत्र आणि सुप्रतिष्ठित मानला गेलेला देश या नात्याने या देशाचा निर्देश या ग्रंथात आढळतो. येथील राजघराणे हिंदुस्तानातील ख्यातनाम अशा 'आर्य' राजघराण्याशी विवाहाने व नात्याने संबंधित होते (उदा. ऋक्षमाता 'आंगेयी सुदेवा', म. आ. ९०.२३).

पूर्व भारतातील एक जनपद या नात्याने या देशाचा (म. भी. १०.४४), तसेच 'अंग-मलद' या एक जोडदेशाचा निर्देशहि भीष्मपर्वात आढळतो (म. भी. १०.४८). परंतु या एकाच नामावलीत या देशाचा निर्देश दोन वेळा स्वतंत्रपणे का करण्यात आला असावा ते समजत नाही.

या देशाची राजधानी चंपा गावी असून (म. शां. ५.६-७), या नगरासभोवतालचा प्रदेश 'सूत-विषय' (रथाचे सारथ्यकर्म करणाऱ्या लोकांचा देश) या नावाने ओळखला जात असे (म. आर. २९२.२६).

दुर्योधनादि कौरवांच्या प्रेरणेवरून कर्णाला अंग देशाचे राज्य बहाल करण्यात आले होते (म. आ. १२६. ३५). आपल्या प्रथम तीर्थयात्रेच्यावेळी अर्जुन या देशास आला होता (म. आ. २०७.९). लोमश-तीर्थयात्रेच्या वर्णनातहि या देशाचा निर्देश असून या देशाच्या लोमपाद (रोमपाद) नामक भूतपूर्वकालीन राजाचा निर्देश तेथे आढळतो (म. आर. ११०.१९).

युधिष्ठिराच्या राजसूय-यज्ञप्रसंगी अंग देशाच्या नाग-रिकांनी त्यास नजराणे (उपायन) अर्पण केले होते (म. स. ४८.१५). भारतीय युद्धात आपला राजा कर्ण याच्या-समवेत अंग देशाचे लोक कौरवांच्या पक्षाने लढले होते. श्रीकृष्ण आणि परशुराम यांनी या युद्धात अंग लोकांचा पराभव केला होता (म. द्रो. १०.१५; परि. १.८.८४६). भारतीय युद्धाच्या सोळाव्या दिवशी या देशाच्या वीरांनी अर्जुन आणि धृष्टद्युम्न यांवर हल्ले चढविले होते (म. क. १२. ५९; १७.२).

**स्वभाववर्णन**—अंग देशातील लोकांचे स्वभावातील गुणदोष महाभारतातील कर्ण-शल्य संवादामध्ये वर्णिले आहेत. येथील लोकांची धर्मज्ञता आणि धर्मपरायणता हा त्यांचा सर्वात मोठा गुण असल्याचा निर्देश कर्ण करतो (म. क. ३०.६०; ७५); तर याचे उलट येथील लोक

'आतुर' म्हणजे आसन्नमरण असणाऱ्या व्यक्तींचा त्याग करणारे आणि स्वतःच्या बायका-मुलांची विक्री करणारे असल्याचे दोषवर्णन शल्य करतो (म. क. ३०.८३).

पौराणिक साहित्यात—पूर्वेकडील एक देश या नात्याने पौराणिक साहित्यात (मत्स्य. ११४.४४; वामन. १३. ४४; ब्रह्माण्ड. १६.५१), तसेच राजशेखराच्या काव्यमीमांसेत अंग देशाचा निर्देश आढळतो (काव्य. १७.२२६). पौराणिक साहित्यात अन्यत्र गंगा नदीच्या मार्गावर (ब्रह्माण्ड. १८.५१; मत्स्य. १२१.५०; वायु. ४७.४८; पद्म. सृ. ६.४१), विंध्य पर्वताच्या पूर्वेकडील टोकानजीक (विष्णुधर्म. १.९.४) हा देश वसला असल्याचा निर्देश आढळतो.

अंग देशाच्या प्राचीन राजांची नामावली पौराणिक साहित्यात दिली आहे (मत्स्य. ४८.९१–१०८; वायु.९९. १००–११२). त्यामध्ये निर्देशिलेल्या अंगपुत्र दधिवाहन नामक राजाचा निर्देश जैन वाङ्मयातहि असून त्यामध्ये या राजाचा काल इ. स. पू. ६ वे शतक दिला आहे.

जैन साहित्यात—उपरोक्त दधिवाहन राजाची कन्या चंदना ऊर्फ चंद्रबाला ही जैन धर्मातील पहिली स्त्री धर्मोपदेशिका मानली जाते. महावीराच्या देहांतानंतर थोड्याच दिवसांनी तिने जैन धर्माचा स्वीकार केला. उत्तरकालात कौशांबीचा राजा शतानीक याने दधिवाहनाच्या चंपा या राजधानीच्या नगरीवर हल्ला केला. त्यावेळी चंदनादेवी दरोडेखोरांच्या हाती सापडली. परंतु या आपत्प्रसंगातहि तिने जैन धर्मावरील आपली निष्ठा सोडली नाही.

जैन साहित्यात सर्वत्र कूणिक अजातशत्रु राजाचा निर्देश 'अंग देशाचा राजा' म्हणून केला आहे (निरयावलि सूत्र पृ.३). वस्तुतः हा राजा आपला पिता मगधराज बिंबिसार याचा राजप्रतिनिधी या नात्याने अंग देशावर राज्य करीत होता.

बौद्ध साहित्यात—बौद्ध साहित्यात निर्देशिलेल्या तत्कालीन भारतातील सोळा महान देशविभागांमध्ये (महाजनपद) अंग देशाचा निर्देश आढळतो (अंगुत्तर. १.२१३; ५.२५२; २५६; २६०; महावस्तु. १.३४; १९८; ललित. २४). 'धम्मपद' मध्ये दिलेल्या माहितीनुसार अंग लोकांवरून या देशास हे नाव प्राप्त झाले होते (धम्मपद. अट्ठ. १. ३८४). या देशाची स्वतःची लिपी असल्याचा (ललित. १२५–१२६), तसेच या देशामध्ये ८०,००० ग्रामे असल्याचा निर्देश बौद्ध 'विनय' ग्रंथात आढळतो (विनय १.१७९). परंतु हा ग्रामसंख्येचा निर्देश उघडउघड अतिशयोक्त दिसतो.

वाल्मीकि रामायणातील 'कौशिकीक्षेत्र' प्रदेशाचा निर्देश बौद्ध साहित्यात 'अंगुत्तराप' (अंग देशाच्या उत्तरेस वसलेला जलमय प्रदेश) अशा नावाने केला असून, हा प्रदेश गंगा नदीच्या दोन्ही अंगास पसरला होता (जा. २ ४३७; ४३९; दीघ. अट्ठ. ३.३६३). बिहारमधील आधु. 'पुर्णिया' आणि 'सहस्र' जिल्हे म्हणजे प्राचीन अंगुत्तराप देश होय (अंगुत्तराप पहा). यापैकी सहस्र जिल्हा हा अगदी अलिकडच्या काळापर्यंत भागलपुर जिल्ह्याचाच उत्तरविभाग समजला जात असे. अलिकडच्या काळात तो भागलपुर जिल्ह्यापासून वेगळा काढण्यात आला आहे. हे दोन्ही जिल्हे एकेकाळी अंग देशाचे विभाग असणे सहजशक्य वाटते.

बौद्ध 'महागोविन्द सुत्त' मध्ये अंग देशाच्या 'धतरट्ठ' (धृतराष्ट्र) राजाचा निर्देश आढळतो (बुद्धसंवाद २.२७०). या देशाच्या 'गग्गरा' नामक एका राणीच्या नावावरून या देशातील एका सरोवरास 'गग्गरा' असे नाव प्राप्त झाल्याचा निर्देश या ग्रंथात आढळतो.

गौतम बुद्धाच्या आणि महावीराच्या काळी अंग देश हा मगध साम्राज्यात समाविष्ट झाला असून, त्यावर मगधराज श्रेणिक बिंबिसार राजा राज्य करीत होता.

महाशाला—कोशल देशचा राजा प्रसेनजित् आणि मगधाचा राजा बिंबिसार यांच्या देणगीमधून चालविण्यात येणाऱ्या अनेक 'महाशाला' (स्नातकगृहे) अंग-मगध देशात गौतमबुद्धाच्या जीवनकाली चालविण्यात येत असत. बौद्ध 'महागोविन्द सुत्ता'मध्येहि महागोविन्द राजाने अंग देशामध्ये अशा प्रकारचे अन्य एक स्नातकगृह चालविल्याचा निर्देश आढळतो. या धर्मशालांमधून बौद्धधर्मविषयक शिक्षण देण्यात येत असून त्यापैकी प्रत्येकीमध्ये सरासरी ३०० विद्यार्थी असत (दीघ. १.११४).

बौद्धधर्माचे स्वागत—बौद्ध धर्माच्या स्थापनेनंतर या धर्माचे विशेष उत्साहाने स्वागत करणाऱ्या देशांमध्ये अंग आणि मगध हे दोन देश प्रमुख होते. गौतम बुद्धाने येथील अनेक नागरिकांना बौद्ध धर्माची दीक्षा दिली होती. अंग आणि मगध देशातील अनेक ब्राह्मणांसह बिंबिसार राजाने बौद्ध धर्माचा स्वीकार केला होता (पेतवत्थु टीका. पृ. २२). या देशामध्ये निवास करीत असतानाच गौतम बुद्धाने विशाखा नामक स्त्रीस बौद्ध

धर्माची दीक्षा दिली होती (धम्मपद टीका. १.३८४). गौतम बुद्धाच्या राजगृह-कपिलवस्तु प्रवासामध्ये अंग-मगध देशातील अनेक नागरीक त्याच्यासमवेत कपिलवस्तु गावास गेले होते (जा. निदानकथा पृ. ८७).

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथात या देशाचा निर्देश 'चन्-पो' (चंपा) या नावाने केला असून, राजधानीच्या गावावरून देशनाम व्युत्पन्न करण्याच्या आपल्या पद्धतीनुसार ह्युएन्त्संगने या देशाचा निर्देश 'चंपा' नावाने केला असावा.

हिरण्य पर्वत (आधु. मोंघीर टेकड्या) देशाहून गंगा नदीच्या दक्षिण किनाऱ्याने ६० मैल पूर्वेस गेल्यानंतर ह्युएन्त्संगला हा देश लागला. पूर्वकाली या देशावर अंग-राजाचे राज्य असले, तरी गौतम बुद्धाच्या कालापासून हा प्रदेश मगध साम्राज्यात समाविष्ट झाला होता.

ह्युएन्त्संगच्या मते या देशाचे क्षेत्रफळ ८०० मैल असून गंगा नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर वसलेल्या त्याच्या राजधानीचे क्षेत्रफळ ८ मैल होते. या देशामध्ये १० बौद्ध मठ असून ते मोडकळीस आलेले होते. या मठांमध्ये २०० बौद्ध भिक्षु होते.

चंपा नगरापासून २८–३० मैल पूर्वेस गंगा नदीच्या दक्षिण किनाऱ्यावरील एका लहानशा बेटावर हिंदूंचे एक देवमंदिर होते. नदीच्या पात्रामधून वर आलेल्या दगडी सुळक्यावर हे मंदिर बांधले होते, आणि त्याच्या चहुबाजूंस पाणीचपाणी होते. या पर्वतीय सुळक्याच्या अंतर्भागात अनेक गुफा खोदलेल्या असून, त्यामध्ये अनेक ऋषी तपस्या करीत असत.

कनिंगहॅम यांचे मते आधु. भागलपुर (प्राचीन चंपा) गावापासून २३ मैल अंतरावर वसलेले आधु. कहलगाव म्हणजे ह्युएन्त्संगचे उपरोक्त देवमंदिरस्थान असावे (वॉटर्स, २.१८१–१८२; बील, ४.४०१–४०२).

या देशाहून ८० मैल पूर्वेस गेल्यानंतर ह्युएन्त्संग 'कजंगल' (आधु. राजमहाल टेकड्या) देशास जाऊन पोहोचला.

**फाहियान्च्या प्रवासवर्णनात**–गौतम बुद्धाच्या जीवनाशी संबंधित अशा अनेक पवित्र स्थलांनी युक्त असा चंपा देश पाटलिपुत्र गावापासून १८ योजने (१४४ मैल) अंतरावर वसला होता. यावरून हिरण्य पर्वत हा देश ह्युएन्त्संगच्या काळी अंग देशाहून वेगळा मानला जात असला, तरी फाहियान्च्या काळी मात्र अंग देशाचाच भाग मानला जात असावा.

हिरण्य पर्वतात घडून आलेली 'श्रुतिविंशतिकोटी'ची आख्यायिका चंपा देशातच घडून आल्याचा निर्देश बौद्ध साहित्यात सर्वत्र आढळतो. यावरूनहि हिरण्य पर्वत आणि 'चंपा देश' यांचे अविभाज्यत्व सिद्ध होते.

**विनाश**—एकेकाळी बिहारमधील मगध राज्य हे अंग राज्याचे मांडलीक असल्याचा निर्देश वर आलाच आहे. इ. स. पू. ६ व्या शतकाच्या प्रथमार्धामध्ये मगध राज्य हे अंग देशापासून वेगळे झाले, आणि इ. स. पू. ६ व्या शतकाच्या अखेरीस मगधाचा राजा श्रेणिक बिंबिसार याने अंग देशावर आक्रमण केले (एस्. बी. ई. १७.१; परिशिष्टपर्व. ७.२२). या आक्रमणामध्ये अंग देशाचा पराभव झाला आणि तो मगध साम्राज्याचा भाग बनला. अंग देशाची राजधानी असणाऱ्या चंपा गावी मगध देशाचा युवराज कूणिक अजातशत्रु हा राजप्रतिनिधी या नात्याने राज्य करू लागला (जे. आर. ए. एस्. इ. स. १९१४, पृ. ३२१; निरयावलि सूत्र पृ. ३).

**नाममात्र अस्तित्व**—इ. स. पू. ६ व्या शतकामध्ये अंग देशाचा प्रदेश मगध साम्राज्यामध्ये समाविष्ट होऊन, या देशाचे स्वतंत्र राज्य नाहीसे झाले. तत्रापि त्याच्या भूतपूर्वकालीन उज्ज्वल इतिहासामुळे अंग हे देशनाम उत्तरकालीन इतिहासामध्ये दीर्घकालपर्यंत तसेच रेंगाळत राहिले. मध्ययुगीन कालातील संस्कृत शब्दकोश साहित्यात, तसेच शिलालेखात अंग या देशनामाचा पुनः-पुन्हा निर्देश आढळतो, त्याचे कारणहि बहुधा हेच असावे.

इ. स. ८ व्या शतकाच्या प्रारंभी बंगालच्या 'पाल' राजवंशाची स्थापना करणाऱ्या गोपाल राजाने अन्य मगध साम्राज्याबरोबरच हा देश जिंकून घेतला. यानंतर १२ व्या शतकापर्यंत या देशावर पाल राजांचेच राज्य होते. इ. स. १२ व्या शतकाच्या प्रारंभास कनौजचा राजा गोविंदचंद्र याच्या कुमारदेवी नामक राणीचा पितामह महन हा रामपाल राजाचा राजप्रतिनिधी म्हणून अंग देशावर राज्य करीत होता, असे तत्कालीन शिलालेखांवरून दिसते (बंगाल जे. आर. ए. एस, इ. स. १९०८).

इ. स. १३ व्या शतकाच्या प्रारंभी बंगालच्या पाल राजांच्या अन्य प्रदेशांबरोबरच हा देशहि मुसलमानांनी जिंकून घेतला.

**संस्कृत शब्दकोश साहित्यात**—मध्ययुगीन कालात रचण्यात आलेल्या निम्नलिखित संस्कृत शब्दकोशात 'अंग' या देशनामाचा निर्देश आढळतो:—१. अभिधान–

चिंतामणी ( १३०.९५७ ); २. अनेकार्थसंग्रह ( ४.३० ); ३. विश्वलोचन ( ४७.३ ); ४. नानार्थसंग्रह ( ५.४२ ); ५. औणादिक ( ५२.५४३ ); ६. वैजयंतीकोश ( ३७.६१ ).

**शिलालेख साहित्यामध्ये**—मध्ययुगीन काळातील विभिन्न सम्राटांच्या शिलालेखांमध्ये अंग देश जिंकून घेतल्याचे अथवा त्यावर आपले अधिराज्य प्रस्थापित केल्याचे जे अनेकानेक निर्देश आढळतात, त्याचे स्वरूपहि कल्पनारम्यच मानावे लागेल. यापैकी विशेष उल्लेखनीय शिलालेख पुढीलप्रमाणे होतः—१. भोजनवर्मनाचा बेलाव ताम्रपट ( मुजुमदार, बंगाल शिलालेख ३.१५ ); २. कर्ण राजाचा खेल शिलालेख ( एपि. इंडि. २४, प्लेट ३ ); ३. कनौजची राणी कुमारदेवीचा सारनाथ शिलालेख ( एपि. इंडि. ९.३११ ); ४. अमोघवर्ष ( प्रथम ) चा निल्गुन्द शिलालेख ( एपि. इंडि. ७.२०७ ); ५. अमोघवर्षचा इ. स. ८६६ मधील शिरूर शिलालेख ( एपि. इंडि. ७. २०७ ); ६. कृष्ण ( तृतीय ) चे देवळी दानपत्र ( एपि. इंडि. ५.१९३ ); ७. इ. स. १५ व्या शतकातील नृसिंहराम शिलालेख ( एपि. इंडि. ७.७७ ); ८. इ. स. ९ व्या शतकातील आदिसुर राजाचा शिलालेख ( एपि. इंडि. २९.५३ ).

**राजधानी**—गंगा नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर वसलेल्या या देशाच्या चंपा ( आधु. भागलपुर ) नामक राजधानीचा निर्देश हिंदु, बौद्ध आणि जैन साहित्यात सर्वत्र आढळतो. तत्कालीन भारतवर्षातील हे एक ख्यातनाम नगर मानले जात असून या नगरनामावरूनच हा देश चंपा देश अशा वैकल्पिक नावाने ओळखला जात असे ( वॉटर्स, २.१८१–१८२; लेग, पृ. १००; चंपा पहा ).

**सुविख्यात भौगोलिक स्थाने**—उपरोक्त चंपा नगरीव्यतिरिक्त अंग देशातील निम्नलिखित नगरांचा आणि भौगोलिक स्थानांचा निर्देश प्राचीन साहित्यात आढळतोः—

**१. अस्सपुर**—गौतम बुद्धाने या नगरास भेट दिली होती ( मज्झिम. १.२८१ ).

**२. आपन**—हे गाव आणि अंग देशातील भद्दीयग्राम यांना जोडणारा रस्ता अंगुत्तराप प्रदेशावरून जात असे ( संयुत्त. ५.२२५–२२६ ).

**३. इराण पर्वत** ( हिरण्य पर्वत )—अंग देशातील या पर्वताचा निर्देश ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात आढळतो ( वॉटर्स, २.१८१–१८२ ).

**४. ऋष्यशृंग आश्रम**— बरियारपुर गावापासून ४ मैल नैर्ऋत्येस वसलेले आधु. ऋषिकुण्ड स्थान ते हेच होय.

**५. कर्णगड**—भागलपुरपासून ४ मैल अंतरावर असणारा हा किल्ला अंगराज कर्णाचे निवासस्थान होते.

**६. जह्नु–आश्रम**—आधु. सुल्तानगंज गावी हे आश्रमस्थान वसले होते.

**७. भद्दीय** ( भद्दीय ) ग्राम ( धम्मपद टीका १. ८३४ ).

**८. मंदार टेकडी**—भागलपुरपासून ३२ मैल दक्षिणेस असणारी आधु. बन्सी गावची टेकडी ती हीच होय.

**९. मोदागिरि**—आधु. मोंघीर गाव ते हेच होय.

**१०. शीला संगम** ( विक्रमशिला संघाराम )—कहलगाव विभागातील आधु. पाथरघाटा ते हेच होय.

**अङ्गजन** ( लोकसमूह )—वामन पुराणात निर्देशिलेला मध्यदेशान्तर्गत एक लोकसमूह ( वामन १३.३६ ). हा संभवतः ‘ आवंत ’चा प्रमादजन्य पाठ असावा.

**अङ्गतक** ( देश )—मार्कंडेय पुराणात निर्देशिलेला पश्चिम भारतातील ( कूर्मपुच्छातील ) एक देश ( मार्कं. ५५.३५ ).

**अङ्गद** ( तीर्थ )—दक्षिण भारतातील समुद्रसेतूनजीकचे एक तीर्थस्थान ( स्कन्द. ब्राह्म. १.४२ ).

**अङ्गदीया** (नगर)—वाल्मीकि रामायणात निर्देशिलेले लक्ष्मणपुत्र अंगदाच्या राजधानीचे गाव ( वा. रा. उ. १०२.७–८ ). नामांतर–‘ अश्वनगर. ’

प्राचीन कारुपथ ( कारापथ ) देशात ही नगरी वसली असून, अयोध्या प्रांतातील आधु. शहाबाद गाव ते हेच होय. स्थानिक लोकात आजहि हे गाव ‘ अंगदपुर ’ याच नावाने ओळखले जाते.

**स्थापना**—रामाने आपल्या बंधूंना कोशल देशाच्या उत्तरेकडील प्रदेशात दिग्विजय करण्यास सांगितले आणि अशा तऱ्हेने नव्याने जिंकलेल्या कारुपथ आणि मल्लभूमि प्रदेशांवर अनुक्रमे लक्ष्मणपुत्र अंगद आणि चंद्रकेतु (मल्ल) यांची नियुक्ती केली. यापैकी कारुपथ देशाची राजधानी अंगदीया गावी वसविण्यात आली होती.

**भौगोलिक स्थान**—हे नगर अयोध्या गावाच्या पश्चिमेस वसले असल्याचा निर्देश वाल्मीकि रामायणात आढळतो. परंतु ते अयोध्या नगराच्या उत्तरेस असण्याची शक्यता अधिक वाटते.

डॉ. पांडे यांचे मते अंगदाच्या वंशजांनी उत्तरकालामध्ये अंगदीया नगर सोडले आणि कपिलवस्तु येथे नव्या राजधानीची स्थापना केली. इतकेच नव्हे तर कपिलवस्तु-सभोवतालच्या शाक्य गणराज्याची स्थापनाहि याच लोकांनी केली (पांडे, गोरखपुर जनपद. पृ. ६६; शाक्य पहा).

**अङ्गद्वीप** (अनुद्वीप) — पौराणिक साहित्यात निर्देशिलेल्या भारताच्या सहा 'अनुद्वीपां'पैकी (उपद्वीप) एक (वायु. ४८.१४; ४१). नामांतर-'चाक्रगीरद्वीप' (वैजयंती. ३६.१४-१५). आधु. मलाया द्वीपकल्प म्हणजे हे द्वीप असावे.

वायुमते हे द्वीप अत्यंत विस्तृत असून यात सोने व रत्न यांच्या खाणी होत्या. यात चक्रगिरि नामक एक पर्वत असून येथील बहुसंख्य वस्ती म्लेंच्छांची होती (वायु. ४८.१५-१८).

**अङ्गभूत** (तीर्थ)—एक तीर्थस्थान (मत्स्य. २२.५१).

**अङ्गमणि** (देश)—जंबुद्वीपान्तर्गत केतुमालवर्षातील एक देश (वराह. ८३.२).

**अङ्ग-मगध** (जोडदेश)—गोपथ ब्राह्मणात निर्देशिलेले एक संयुक्त देशनाम (गो. ब्रा. २.१०). अंग आणि मगध या एकमेकांनजीक वसलेल्या देशांचा निर्देश या ठिकाणी अभिप्रेत असावा (अंग; मगध पहा).

बौद्ध महावस्तुमध्येहि या जोडनामाचा निर्देश आढळतो (महावस्तु. १.३४). बौधायन धर्मसूत्रात या संयुक्त देशातील लोक 'संकीर्णयोनि' (संकरज) असल्याचा निर्देश आढळतो (बौधायन. १.१.२.१४).

**अङ्ग-मलद** (जोडदेश)—महाभारतात निर्देशिलेले एक संयुक्त देशनाम (म. भी. १०.४४). अंग आणि मलद या एकमेकांनजीक वसलेल्या देशांचा निर्देश या ठिकाणी अभिप्रेत असावा (अंग; मलद पहा). पाठभेद-'अंग-मलज' (म. भी. १०.४८; पद्म. स्. ६.४५).

**अङ्गरायनकोप्पम्** (ग्राम)—शिलालेख साहित्यात निर्देशिलेले दक्षिण भारतातील एक ग्राम. विरिंचिपुरम्‌पासून ६ मैल उत्तरेस वसलेले आधु. अंगरंकुप्पम् गाव ते हेच होय (साऊथ इंडि. इन्स्क्रि. १.१३३).

**अङ्गलेपा** (नगरी)—वाल्मीकि रामायणात निर्देशिलेली पश्चिम भारतातील एक नगरी. अवंती नगरीसमवेत या नगरीचा निर्देश आढळतो (वा. रा. कि. ४२.१४).

**अङ्गलोकवर** (देश)—वायु पुराणात निर्देशिलेला एक देश. मेरु पर्वतात उगम पावून पश्चिमेकडे वाहात जाणाऱ्या सीता नदीच्या मार्गावर हा देश वसला होता (वायु. ४७.४३).

**अङ्गलोक्य** (देश)—मत्स्य पुराणात निर्देशिलेला एक देश. मेरु पर्वतात उगम पावणाऱ्या पश्चिमवाहिनी सीता नदीच्या मार्गावर हा देश वसला होता (मत्स्य. १२१.४४).

**अङ्गलौकिक** (लोकसमूह)—ब्रह्माण्ड पुराणात निर्देशिलेला वायव्य भारतातील एक लोकसमूह (ब्रह्माण्ड. ४९.४९; वामन. १३.३७).

पाठभेद व नामांतरे—१. वायु पुराण (४५.११५)-प्रियलौकिक; २. ब्रह्म पुराण (२७.४४)-शलौकिक; ३. ग्रीक साहित्य (स्मिथ, पृ. ९७)-अगलस्सोइ (?).

सिकंदरच्या स्वारीमध्ये विशेष प्रामुख्याने निर्देशिलेले आणि त्याच्याशी प्राणपणे लढणारे 'अगलस्सोइ' लोक ते हेच असावेत असे काही अभ्यासक मानतात (डे, पृ. ८). परंतु अन्य काही अभ्यासकांच्या मते दक्षिण पंजाबमध्ये निवास करणाऱ्या 'आग्रेय' लोकसमूहाचा निर्देश सिकंदरच्या स्वारीच्या वर्णनात अभिप्रेत असावा (आग्रेय पहा).

पौराणिक साहित्यात—मत्स्यमते हिमालय पर्वताच्या अंतर्भागात वाहणाऱ्या नद्यांच्या काठी हे लोक रहात असत (मत्स्य. १२१.४४). या लोकांचे रीतिरिवाज काशगर देशातील लोकाप्रमाणेच होते (वॅटर्स, २.२९०).

**अङ्ग-वङ्ग** (जोडदेश)—मत्स्य पुराणात निर्देशिलेले एक संयुक्त देशनाम (मत्स्य. ११३.४४). अंग आणि वंग या एकमेकांनजीक वसलेल्या देशांचा निर्देश या ठिकाणी अभिप्रेत असावा (अंग; वंग पहा).

पाठभेद-'अभ्रारक' (मार्क. ५४.४२); 'अन्ध्रवाक' (वायु. ४५.१२२). हे दोन्ही पाठ उघडउघड चुकीचे दिसतात.

**अङ्गवाहिनी** (नदी)—महाभारतात निर्देशिलेली एक नदी (म. भी. १०.२६ पाठ).

**अङ्गामी** (ग्राम)—नालंदा मुद्रालेखात निर्देशिलेले बिहारमधील एक ग्राम (आर्कि. सर्व्हे. क्र. ६६, पृ. ३३). पाटना जिल्ह्यातील इस्लामपुर पोलिसविभागातील आधु. औंगरि गाव ते हेच होय (बंगाल ग्रामसूचि. २६.६).

**अङ्गार** (तीर्थ)— स्कंद पुराणान्तर्गत काशीखंडात निर्देशिलेले काशी येथील एक तीर्थस्थान (स्कन्द. काशी ४.७४). हे तीर्थ काशी येथील अंगारकेश्वराजवळ असून अंगारकी चतुर्थीच्या दिवशी येथे मोठी यात्रा भरते.

लिंगपुराणात या तीर्थस्थानाचा निर्देश अंगारकुंड या नावाने केला आहे ( लिंग. तीर्थविवेचन पृ. ५६ ).

२. ( देश ) ब्रह्माण्ड पुराणात निर्देशिलेला दक्षिण भारतातील एक देश ( ब्रह्माण्ड. १६. ५९ ). पाठभेद- ' अंगद ' ( म. भी. १०.५९ ).

३. ( ग्राम ) विष्णुगुप्त राजाच्या राज्यकालातील इ. स. ७५५ मधील मंग्राव शिलालेखात निर्देशिलेले बिहार-मधील एक ग्राम. शहाबाद जिल्ह्यातील बक्सर गावापासून १४ मैल नैर्ऋत्येस वसलेले आधु. मंग्राव गाव ते हेच असावे. या गावी असणाऱ्या सुभद्रेश्वराच्या मंदिरास देणगी दिल्याचा निर्देश उपरोक्त शिलालेखात आढळतो ( एपि. इंडि. २६.२४५ ).

**अङ्गारक** ( तीर्थ )—काशी येथील एक तीर्थस्थान ( स्कन्द. काशी. ९७.६७; पद्म. सृ. ११.४४ ).

१. उत्तर प्रदेशातील सत्यव्रतक्षेत्राच्या ( आधु. संभल ) यात्रापरिक्रमेतील एक तीर्थस्थान. या स्थानी मंगळाचे एक देवालय आहे ( ती. ९३ ).

**अङ्गारकेश्वर** ( तीर्थ )—गया येथील एक तीर्थस्थान ( अग्नि. ११६.२९ ).

२. नर्मदा नदीकाठचे एक तीर्थस्थान ( कूर्म. उत्तर. ४१.६; नारद. ७७.१८ ). पाठभेद–'अंगारेश' ( मत्स्य. १९१.५९ ).

३. ( लिंग ) अवंतिक्षेत्रान्तर्गत चौऱ्याऐंशी शिवलिंग-स्थानांपैकी एक ( स्कन्द. आवन्त्य. १.४३ ).

**अङ्गारगर्ता** ( तीर्थ )—नर्मदा नदीवरील एक तीर्थ-स्थान ( नारद. २.७७.६ ).

**अङ्गारज** ( देश )—जंबुद्वीपान्तर्गत केतुमालवर्षातील एक देश ( वराह. ८३.२ ).

**अङ्गारपर्ण** ( वन )—गंगा आणि राका नद्यांचे दरम्यानचे एक वन. येथे निवास करणाऱ्या अंगारपर्ण गंधर्वाच्या नावावरून या वनास हे नाव प्राप्त झाले होते ( म. आ. १५८.१३ ).

भीमाने एकचक्रा नगरीमध्ये बकासुराचा वध केल्या-नंतर पांडव येथे आले. तत्प्रसंगी अंगारपर्ण गंधर्वाने पांडवांचा यथोचित सन्मान केला आणि धौम्य ऋषींना पांडवांनी आपले पुरोहित करावे असे त्याने सुचविले. त्याप्रमाणे पांडवांनी धौम्याश्रमात जाऊन धौम्याला पुरोहित केले, आणि नंतर ते द्रुपदनगरात द्रौपदीस्वयंवरास गेले.

**अङ्गारवाहिका** ( नदी )—पौराणिक साहित्यात निर्देशिलेली एक नदी ( पद्म. सृ. ११.२९; मत्स्य. २२.३५ ).

**अङ्गारवाहिनी** ( नदी )—जंबुद्वीपान्तर्गत भद्राश्व-वर्षातील एक नदी ( वराह. ८२.४ ).

**अङ्गारसेश** ( लिंग )—काशी येथील एक शिवलिंग-स्थान ( स्कन्द. काशी. ९७.२४९ ).

**अङ्गारिता** ( नदी )—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात निर्देशिलेली एक नदी ( मेदिनी. ७१.८० ).

**अङ्गारेशी** ( देवी )—काशीक्षेत्राच्या पश्चिम भागात वसलेले एक देवीस्थान ( नारद. २. ५०.२३ ).

**अङ्गारेश्वर** (तीर्थ)—नर्मदा नदीकाठचे एक तीर्थस्थान ( मत्स्य. १९०.९; पद्म. सृ. १७.६; १८.५६ ).

गुजरातमधील कावी गावाच्या परिसरात नर्मदा नदीच्या उत्तर किनाऱ्यावर वसलेले अंगारेश्वराचे देवालय ते हेच होय. मंगळग्रहाचे तपस्यास्थान या नात्याने हे स्थान महत्त्वाचे मानतात.

२. ( लिंग )—अवंतिक्षेत्रान्तर्गत चौऱ्याऐंशी शिवलिंग-स्थानांपैकी एक ( स्कन्द. आवन्त्य. १.३६.३; ३७.४२ ).

३. प्रभासक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंगस्थान ( नारद. २.७०.७१; स्कन्द. प्रभास. १.४५). पाठभेद–'अंगालेश्वर'.

४. काशी येथील एक शिवलिंगस्थान ( लिंग. तीर्थ-कल्पतरु पृ. ५५; ९८ ).

**अङ्गिरस्** ( तीर्थ )—अंगिरस् ऋषींचे मध्यभारता-तील तपस्यास्थान ( कूर्म. उत्तर. ४१.३१–३३; पद्म. सृ. १८.५० ). नर्मदातीरी वसलेल्या आधु. कंटोई गावानजीक हे स्थान दाखविले जाते.

**अङ्गिरस्–तीर्थयात्रास्थले** ( तीर्थसमूह )—महा-भारतान्तर्गत अनुशासनपर्वामध्ये अंगिरसाने भीष्मास विदित केलेली भारतातील तीर्थस्थानांची एक नामावली आढळते. अंगिरसाने ही नामावली सर्वप्रथम गौतम ऋषीस सांगितली आणि भारतातील प्रमुख तीर्थस्थानांसंबंधीचा हा 'अंगिरस्-गौतम संवाद ' उत्तरकालात भीष्माने युधिष्ठिरास कथन केला. महाभारतकालीन भारतवर्षातील तीर्थस्थाने जाणून घेण्याच्या दृष्टीने अंगिरस्द्वारा कथन केली गेलेली ही तीर्थनामावली विशेष महत्त्वपूर्ण मानली जाते.

या नामावलीत भौगोलिक दृष्टीने कोणताहि विशिष्ट क्रम पाळलेला दिसत नाही. प्रथमतः विंध्य पर्वताच्या दक्षिणेकडील व उत्तरेकडील, आणि तदनंतर पूर्व आणि पश्चिम भारतातील तीर्थांची नावे या नामावलीमध्ये ग्रथित

केली आहेत. यापैकी अनेक तीर्थे दुर्गम असून, तेथे प्रत्यक्ष जाणे शक्य नसेल तर त्यांची मानसिक तीर्थयात्रा (जप) करावी, अशी सूचना या नामावलीच्या अखेरीस दिली आहे:--

यान्यगम्यानि तीर्थानि दुर्गाणि विषमाणि च ।
मनसा तानि गम्यानि सर्वतीर्थसमीक्षया ॥

(म. अनु. २५ ६६).

**तीर्थनामावली**—अंगिरसाने कथन केलेली तीर्थांची नामावली खाली दिली आहे:— १. चंद्रभागा; २. वितस्ता; ३. महानद सिंधु; ४. पुष्कर; ५. प्रभास; ६. नैमिष; ७. सागरोदक; ८. देविका; ९. इंद्रमार्ग; (१); १०. स्वर्णबिंदु; ११. हिरण्यबिंदु; १२. कुशेशय; १३. इंद्रतोया (गंधमादन पर्वताशेजारी); १४. करतोया; १५. कुरंग; १६. गंगाद्वार; १७. कुशावर्त; १८. बिल्वक; १९. नील पर्वत; २० कनखल; २१. अपांह्रद; २२. उत्तरवाहिनी गंगा (तीन ठिकाणी); २३. सप्तगंग; २४. त्रिगंग; २५. इंद्रमार्ग (२); २६. महाश्रम; २७. महाह्रद; २८. भृगुतुंग; २९. कन्याकूप; ३०. बलाका; ३१. देविका (२); ३२. सुंदरिक ह्रद; ३३. अश्विनी; ३४. महागंगा; ३५. कृतिकांगारक; ३६. वैमानिक; ३७. किंकिणिकाश्रम; ३८. अप्सरसूर्तीर्थ; ३९. कालिकाश्रम; ४०. विपाशा; ४१. कृत्तिकाश्रम; ४२. महापुर; ४३. देवदारुवन; ४४. शरस्तंब; ४५. कुशस्तंब; ४६. द्रोणशर्मपद; ४७. अपांप्रपतन; ४८. चित्रकूट; ४९. जनस्थान; ५०. मंदाकिनी; ५१. श्यामाश्रम; ५२ कौशिकी; ५३. मतंगवापी; ५४. अनालंब ५५. अंधक; ५६. नैमिष (२); ५७ स्वर्गतीर्थ ५८. गंगाह्रद; ५९. उत्पलावन; ६०. गंगायमुनातीर्थ; ६१. कालंजरगिरि; ६२. षष्ठिह्रद; ६३. प्रयाग; ६४. मरुद्गण; ६५. पितृआश्रम; ६६. वैवस्वततीर्थ; ६७. ब्रह्मसर; ६८. भागीरथी; ६९. उत्पातक; ७०. अष्टावक्र; ७१. अश्मपृष्ठ; ७२. निरविंद पर्वत (प्रेत पर्वत); ७३. क्रौंचपदी (विष्णुपदी); ७३-अ. कलविंक; ७४. अग्निपुर; ७५. अग्निकन्यापुर; ७६. करवीरपुर; ७७. विशाला; ७८ देवह्रद; ७९. आवर्तनंदा; ८०. महानंदा; ८१. उर्वशी तीर्थ; ८२. लौहित्य; ८३. रामह्रद; ८४. विपाशा (२); ८५. महाह्रद (२); ८६. विंध्य; ८७. नर्मदा; ८८. शूर्पारकोदक; ८९. जंबूमार्ग; ९०. कोकामुख; ९१. अंजलिकाश्रम; ९२. कुमारी (कन्याकुमारी); ९३. कन्याह्रद; ९४. प्रभास (२); ९५. उज्जानक; ९६. आर्ष्टिषेणाश्रम; ९७. पिंगाश्रम; ९८. कुल्या; ९९. पिंडारक; १००. ब्रह्मसर (धर्मारण्यान्तर्गत); १०१. मैनाक पर्वत; १०२. कालोदक; १०३. नंदीकुंड, १०४. उत्तरमानस; १०५. स्वर्गमार्ग; १०६ हिमवत्; १०७. अनाशक.

**अङ्गिरेश** (लिंग)—नर्मदातीरावरील एक शिवलिंगस्थान (मत्स्य. १९१. ५९; कूर्म. उत्तर. ४१.६).

**अङ्गुत्तराप** (देश)--बौद्ध वाङ्मयात निर्देशिलेला बिहारमधील अंग देशाच्या उत्तरेस गंगा नदीच्या परिसरात वसलेला एक देशविभाग (जा. २.४३७; ४३९). बिहारमधील आधु॰ पुर्णिया आणि सहस्र जिल्ह्यांचा प्रदेश म्हणजे हा देश असावा.

**नामव्युत्पत्ती**—'अंगुत्तराप'चा शब्दशः अर्थ 'अंग देशाच्या उत्तरेस वसलेला जलमय प्रदेश' असा होतो. बिहारमधील उपरोक्त दोन्हीहि जिल्हे वर्षाचे बाराहि महिने पाण्यामध्ये बुडलेले आजहि आढळतात. या विशिष्ट दृष्टीने त्यांना बौद्ध साहित्यात देण्यात आलेले 'अंगुत्तराप' हे नाव अन्वर्थक वाटते.

**नामांतरे**--प्राचीन साहित्यात या देशविभागाची निम्नलिखित नामांतरे आढळतात:-- १. वाल्मीकि रामायण (बा. ३४.७-९)-- कौशिकी (क्षेत्र). २. महाभारत (स. २७.४ पाठ.)--जलोद्भव. ३. महाभारत (स. २७.१९-२०)—कौशिकी (क्षेत्र) (कच्छनिलय).

**बौद्ध साहित्यात**—बौद्ध संयुत्तनिकाय या ग्रंथाच्या टीकेत या देशाचा निर्देश 'गंगा नदीच्या उत्तरेस वसलेला अंग राज्याचा एक भाग' म्हणून केला आहे (दीघ. अठ्ठ. ३.३६३). यावरून हा विशिष्ट प्रदेश एके काळी अंग देशाचा भाग मानला जात असावा.

बौद्ध साहित्यात अन्यत्र अंगुत्तराप हा देश मही नदीच्या उत्तरेस वसल्याचा निर्देश आढळतो (सु. नि. अठ्ठ. २.४३७; ४३९). या प्रदेशातील सर्व नद्या उत्तरेकडून दक्षिणेकडे वाहात असल्याने ज्या मही नदीच्या उत्तरेस हा देश वसला होता, ती नदी कोणती असा प्रश्न उपस्थित होतो. पश्चिमेकडून पूर्वेकडे वाहाणाऱ्या गंगा नदीचे विशेषण म्हणून या ठिकाणी 'मही' या संज्ञेचा उपयोग करण्यात आला असावा.

**वाल्मीकि रामायणात**--या ग्रंथात या देशाचा निर्देश 'कौशिकीक्षेत्र' (आधु. कोशी नदीच्या खोऱ्याचा प्रदेश) या नावाने केला आहे. ऋश्यशृंग ऋषींचा

आश्रम 'कौशिकीक्षेत्रा' मध्ये वसला असून अंग देशाचा राजा रोमपाद याने आपल्या नर्तिकांच्याद्वारा ऋष्यशृंग ऋषींना बोलावून घेतले होते ( वा. रा. बा. ३४.७–९ ). यावरून रामायणकाळी हा प्रदेश अंग देशामध्ये समाविष्ट होत असावा. विश्वामित्राचा सिद्धाश्रम नामक आश्रमहि याच देशात वसला होता.

महाभारतात––भीमाने आपल्या पूर्वदिग्विजयात कौशिकी ( कच्छनिलय ) आणि मोदागिरि देशांच्या राजांवर विजय मिळविला होता ( म. स. २९.१९–२० ). यावरून महाभारतकाली हा एक स्वतंत्र देश मानला जात असावा.

जलोद्भव देश––महाभारतात अन्यत्र जलोद्भव नामक पूर्व भारतातील एका देशाचा निर्देश असून, 'पाणथळ प्रदेशात भर टाकून तयार करण्यात आलेला देश' असा अर्थ तेथे अभिप्रेत दिसतो ( म. स. २७.४ ).

रॅायचौधरी यांच्या मते शतपथ ब्राह्मणात निर्देशिलेल्या विदेह देशाचेच 'जलोद्भव' हे नामांतर असावे. विदेघ माथव याने सदानीरा नदीच्या पलीकडच्या भागात असणाऱ्या प्रदेशातील जंगले तोडून आणि या प्रदेशातील दलदलीचे प्रदेश बुजवून टाकून नव्या विदेह देशाची स्थापना केली, असा निर्देश या ग्रंथात आढळतो ( श. ब्रा. १.४.१.१० ). हे वर्णन विदेह देशास तंतोतंत लागू पडते असे रॅायचौधरी म्हणतात. परंतु या ठिकाणी कौशिकी ( आधु. कोशी ) नदीच्या काठी वसलेल्या अंगुत्तराप देशाचा निर्देश अभिप्रेत असण्याची शक्यता अधिक वाटते.

**अचणपुर**—( जैनतीर्थ ) जयसागराच्या तीर्थजयमालेमध्ये निर्देशिलेले एक जैन तीर्थस्थान. पूज्यपादद्वारा वंदित एक 'जिनबिंबप्रतिमा' या स्थानी होती. मात्र हे स्थान कोठे वसले होते ते समजत नाही ( ती. सं. पृ. ११४ ).

**अचल** ( बौद्धमठ )—अजंटा येथील गुफा क्र. २६ मधील शिलालेखात निर्देशलेले अजंटा गुफासमूहाचे प्राचीन नामांतर. दैवी प्रसादामुळे कृतज्ञ झालेल्या 'अचल' नामक स्थविराने हा बौद्धमठ बांधल्याचा निर्देश या शिलालेखात केला आहे ( अर्कि. सर्व्हे. वे. इं. ४.१३५; अजंटा पहा ).

ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात या बौद्धमठाचा निर्देश 'आचार बौद्धमठ' या वैकल्पिक नावाने केला आहे.

२. ( बौद्धमंदिर ) संकाश्य नगराच्या प्रवेशद्वारानजीकचे एक बौद्ध मंदिर ( चैत्यगृह ) ( धम्म. अठ. ३.२२७ ).

**अचलगढ** ( जैनतीर्थ )—गुजरातमधील अर्बुद ( आधु. आबू ) पर्वतावरील जैन मंदिरस्थान ( अर्बुद पहा ).

**अचलपुर** ( नगर )––शिलालेखसाहित्यात निर्देशिलेले मध्यभारतान्तर्गत एक नगर ( एपि. इंडि. २३.१३ ). विदर्भातील अमरावती जिल्ह्यातील अकोल्यापासून ५० मैल उत्तरेस असणारे आधु. एलिचपुर गाव ते हेच होय.

राष्ट्रकूट राजा नन्नराज याच्या इ. स. ६३१ मधील तिवरखेड ताम्रपटात अचलपुर देशविभागाचा निर्देश असून त्यामधील एक ग्राम दान म्हणून दिल्याचा उल्लेख तेथे आढळतो ( एपि. इंडि. २९.१११; १४ ).

२. ( ग्राम ) स्वामिराजाच्या कलचुरि संवत् ३२२ ( इ. स. ५७३ ) मधील नगर्धन ताम्रपटात निर्देशिलेले मध्यभारतातील एक अग्रहारग्राम. हे गाव शूल ( आधु. सूर ) नदीच्या काठी वसले असल्याचा निर्देश या ताम्रपटात असून आधु. नगर्धन गावानजीक कोठेतरी हे वसले असावे ( कॅापर्स्. इन्स्क्रि. ४.२.६१५ ).

**अचला** ( देशविभाग )—शिलालेखसाहित्यात निर्देशिलेला मगध देशातील ( आधु. दक्षिण बिहार ) राजगृहविषयान्तर्गत एक 'नय' ( उपराज्यविभाग ) ( एपि. इंडि. १७.३१०–३२७ ). या देशविभागामध्ये निश्चित कोणता प्रदेश समाविष्ट होत असे ते समजत नाही. तथापि या राज्यविभागात वसलेल्या हस्तिग्राम ( आधु. हथेव विघा ) ग्रामाचा निर्देश शिलालेखसाहित्यात आढळतो. त्यावरून या ग्रामासभोवतालचा प्रदेश या विशिष्ट नावाने ओळखला जात असावा.

२. ( नदी ) कश्मीरातील एक नदी. अनंतह्रद आणि कार्कोटह्रद या सरोवराजवळून ही नदी वहात असे ( हर्चरित. १०.२५६ ).

३. महेन्द्र पर्वतात उगम पावणारी एक नदी ( मत्स्य. ११४. ३१ ).

**अचलेश्वर** ( लिंग )––स्कंद पुराणात निर्देशिलेले अर्बुद ( गुजरातमधील आधु. आबू ) पर्वतावरील शिवलिंगस्थान ( स्कन्द. प्रभास. ३.७.१.४; २०; 'अर्बुद' पहा ). याच ग्रंथात अन्यत्र सरस्वती नदीच्याकाठी वसलेले अर्बुदारण्यातील एक तीर्थस्थान या नात्याने या शिवलिंगाचा निर्देश आढळतो ( स्कन्द. माहेश्वर. २.२९.६८ ).

२. स्कंद पुराणात निर्देशिलेले हाटकेश्वर ( आनंदपुर = गुजरातमधील आधु. वडनगर ) क्षेत्रान्तर्गत एक शिवलिंगस्थान ( स्कन्द. नागर. १३; आनंदपुर पहा ).

३. (कार्तिकेयस्थान) पंजाबातील सुविख्यात कार्तिकेय-स्थान. हे स्थान अमृतसर-पठाणकोट रेल्वेमार्गावरील बटाला रेल्वेस्थानकापासून ४ मैल अंतरावर आहे. पौराणिक साहित्यात या तीर्थस्थानाचा निर्देश कोठेहि आढळत नसला तरी उत्तर भारतातील कार्तिकेयाचे एकमेव स्थान या नात्याने हे मंदिर विशेष महत्त्वपूर्ण मानतात.

आख्यायिका---कार्तिकस्वामी आणि गणेश यांच्यामध्ये श्रेष्ठ कोण यासंबंधी वादविवाद उत्पन्न झाला असता, सर्वात आधी पृथ्वीप्रदक्षिणा करेल तो श्रेष्ठ अशी त्या दोघांमध्ये पैज लागली. गणेशाने आपल्या मातापित्यास प्रदक्षिणा घालून ही पैज जिंकली आणि मग खऱ्याखुऱ्या पृथ्वीप्रदक्षिणेस निघालेला सरळ मनाचा कार्तिकेय अचल-रूपाने या स्थानी समाधिस्थ झाला, अशी स्थानिक समजूत आढळते. उत्तरकालात भगवान शिव या स्थानी कार्तिके-याच्या भेटीस आले. येथील अचलेश्वर शिवलिंग ते हेच होय.

स्थानिक समजुतीनुसार वसु आणि सिद्धगण यांचे यज्ञस्थान आणि गुरू नानकाचे तपस्यास्थान या नात्यानेहि हे स्थान पवित्र मानण्यात येते.

४. लिंग पुराणात निर्देशिलेले एक शिवलिंगस्थान (लिंग. १.९२.१६५). परंतु हे निश्चित कोठे वसले असावे ते समजत नाही.

**अचिन्त** (गुफा)--डे यांच्या मते अजंटा गुफा-समूहाचे प्राचीन नाव (डे, पृ. १; अजंटा पहा).

**अचिरवती** (नदी)--बौद्ध साहित्यात निर्देशिलेल्या उत्तर भारतातील पाच महान नद्यांपैकी एक. वराह पुराणातहि या नदीचा निर्देश याच नावाने आढळतो (वराह. २१४.४७).

उत्तर प्रदेशातील अयोध्या प्रांतातील सरयू नदीची उपनदी मानली जाणारी आधु. राप्ती नदी ती हीच असून कोशल देशाची राजधानी श्रावस्ती हे बौद्धकालीन सुविख्यात नगर या नदीच्या काठी वसले होते.

या कारणानेच सरयू नदीची उपनदी असूनहि गंगा-यमुना आदि मोठ्या नद्यांसमवेत या नदीचा निर्देश प्राचीन बौद्ध साहित्यात 'पंचमहानदियो' म्हणून केला आहे. बौद्ध साहित्यात निर्देशिलेल्या अन्य चार मोठ्या नद्या पुढीलप्रमाणे होत :-- १. गंगा; २. यमुना; ३. सरभू (सरयू); ४. मही (मिलिन्द. पृ. ११०).

या पाचहि नद्या 'अनोतत्त' (अनवतप्त) सरोवरामध्ये उगम पावत असत (पपंचसूदनी. २. ५८६; मनोरथपूरणी २.७५९-७६०; सुत्तनिपात भाष्य. ४३७-४३९).

वस्तुतः ही अत्यंत छोटी नदी असून, बुद्धजीवनाशी संबंधित असल्यामुळे, तसेच श्रावस्ती नगराच्या सान्निध्या-मुळे बौद्ध धार्मिक साहित्यात तीस अवास्तव महत्त्व देण्यात आले असावे.

नामांतरे--प्राचीन साहित्यात या नदीची निम्नलिखित नामांतरे निर्देशिलेली आढळतातः--

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पाणिनीची अष्टाध्यायी (पा. सू. ४. ३.११९) | अजिरवती |
| २. अवदान शतक (१.६३.; २.६०) | अजिरवती |
| ३. धम्मपद (टीका. ४.४१) | ऐरावती |
| ४. चिनी प्रवासी इत्सिंग (पृ.१५६) | अ-चि-लो (अचिरवती) |
| ५. जैन कल्पसूत्र (पृ. १२; बृहत्कल्प-सूत्र ४.३३). | एरावाय |

नामव्युत्पत्ती--चिनी प्रवासी इत्सिंगच्या मते 'अजि' नामक राक्षसाच्या नावावरून या नदीस 'अजिरवती' असे नाव प्राप्त झाले (इत्सिंग, पृ. १५६).

उगम--ही नदी नेपाळातील बुत्वल गावानजीकच्या टेकड्यांमध्ये उगम पावते आणि उत्तर प्रदेशातील बहरैच, गोंडा, बस्ती आदि जिल्ह्यातून वहात जात अखेरीस देवरिया जिल्ह्यातील बहेज-बझार गावानजीक ती सरयू (आधु. घोग्रा) नदीस मिळते. सरयू नदीची ही एक प्रमुख उपनदी मानली जाते.

बौद्ध साहित्यात--गौतम बुद्धाच्या सहवासाने पुनीत झालेली एक नदी या नात्याने बौद्ध साहित्यात या नदीचा निर्देश पुनःपुन्हा आढळतो (विनय. २.२३९; विसुद्धि. १.१०). या नदीकाठच्या मनसाकेट गावाच्या उत्तरेस वसलेल्या आम्रवनामध्ये गौतम बुद्ध अनेक वेळा येऊन राहिला होता. त्याच्या 'तेवज्जसुत्त' नामक सूक्ताचे प्रणयनहि या नदीच्या काठीच झाले होते (दीघ.१. २३५).

प्राचीन बौद्ध साहित्यात निर्देशिलेल्या पाचशे नद्यांपैकी दहा प्रमुख नद्यांमध्ये अचिरवतीचा समावेश असून गंगानदीसमूहापैकी ही एक प्रमुख नदी मानली जात असे.

या समूहातील अन्य नद्यांप्रमाणेच ही नदीहि पूर्ववाहिनीच होती ( संयुत्त. २.१३५ ).

बुद्धशिष्य आनंद आणि सारिपुत्त यांनी या नदीमध्ये स्नान केले होते ( अंगुत्तर. ३.४०२; अंगुत्तरभाष्य. पृ. ३१५ ). कोसल देशचा राजा 'पसेनदी' ( प्रसेनजित् ) याच्या श्रावस्ती येथील राजप्रासादामधून ही नदी दिसत असे ( विनय. ४.१११–११२ ).

अन्य वर्णने—या नदीच्या उपरोक्त माहात्म्यामुळे हिची अनेकविध वर्णने बौद्ध वाङ्मयात आढळतात. या नदीमधील वाळूची ( अंगुत्तर. ४.१०१ ), या नदीकाठच्या गव्हाच्या शेतांची ( सुत्तनिपातभाष्य. पृ. ५११ ), येथील मच्छीमारीची ( उदानभाष्य, पृ. ३६६ ), या नदीच्या काठी होणाऱ्या कुस्त्यांच्या दंगलीची ( जा. २.९६ ), या नदीस येणाऱ्या महापुराची ( जा. १.२३०; दीघ. १.२४४–२४५; धम्म. अट्ठ. ३५९–३६० ) अनेक वर्णने बौद्ध साहित्यात आढळतात. या नदीस आलेल्या महापुरात श्रावस्ती गावचा श्रेष्ठ वणिक अनाथपिंडिक याचे अठरा कोटींचे नुकसान झाले होते ( धम्मपदभाष्य. १.२३० ).

या नदीचे पात्र फार मोठे असल्याने ती पार करण्यासाठी तारवे अथवा वल्ह्याच्या बोटींचा उपयोग करावा लागत असे ( जा. ३.२२८ ). उन्हाळ्याच्या दिवसात ही नदी जवळजवळ शुष्क होऊन जात असे, आणि हिचे दोन्ही किनारे वालुकामय होत असत ( अंगुत्तर. ४.१०१ ). आजहि या नदीचे हे वैशिष्ट्य दिसून येते.

पावसाळ्यात ही नदी अत्यंत रौद्र स्वरूप धारण करीत असे. हीस येणाऱ्या महाभयानक पुरामुळे हिच्या कालव्यामधून नजीकच्या गहू आणि सातू यांच्या शेतीसाठी भरपूर पाणी उपलब्ध होत असे ( सुत्तनिपात. पृ. ५११ ). हिच्या पुराच्या पाण्याचा फुगवटा दोन्ही किनाऱ्यांवर पसरून पिकांची अपरिमित हानीहि अनेकदा होत असे ( जा. ४.१६७ ).

युद्धकथा—कोशल देशाचा राजा 'विडूडभ' ( विदूदर्भ ) याने ही नदी ओलांडून नजीकच असणाऱ्या शाक्य देशावर हल्ला केला. त्यावेळी त्याचे सारे सैन्य या नदीच्या पुरामध्ये वाहून समुद्रात लोटले गेले (दीघ. १.२४४–२४५; जा. ४.१६७; धम्मपद. टीका. १.३६० ). परंतु या वर्णनाच्या ऐतिहासिकतेविषयी शंका वाटते. शाक्य देश हा गौतम बुद्धाची जन्मभूमी असल्यामुळे या देशावर हल्ला करू इच्छिणाऱ्या राजाचा नाश झाला असा तात्पर्यार्थ काढण्याच्या हेतूने या आख्यायिकेची रचना करण्यात आली असावी.

चिनी साहित्यात—इत्सिंगच्या प्रवासवर्णनात या नदीचा निर्देश आढळत असला तरी ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात तो आढळत नाही.

नगरे—या नदीच्याकाठी वसलेल्या निम्नलिखित नगरांचा आणि ग्रामांचा निर्देश प्राचीन बौद्ध साहित्यात आढळतो:—

१. श्रावस्ती—ही नदी श्रावस्ती नगराच्या आग्नेय सरहद्दीवरून वहात असे ( वॉटर्स, १.३९९ ).

२. पण्डुपुर—मच्छीमारीचा व्यवसाय करणाऱ्या लोकांचे हे गाव या नदीच्या काठी वसले असून ( धम्मपद. टीका. ३.४४९ ), या नदीच्या पाण्यात मासे आणि कासवे विपुल प्रमाणात सापडत असत ( उदान. टीका पृ. ३६६ ).

३. दण्डकप्प—हे गावहि या नदीच्या काठी वसले होते ( अंगुत्तर. ३.४०२ ).

उपनद्या—गोरखपुर जिल्ह्यात या नदीस एकूण चार उपनद्या येऊन मिळतात. त्यापैकी तीन प्रमुख उपनद्या डावीकडून आणि एक छोटी उपनदी उजवीकडून मिळते.

बौद्ध वाङ्मयात या नदीच्या सुतनु नामक एका उपनदीचा निर्देश आढळतो. श्रावस्ती गावानजीकच्या या उपनदीत बुद्धशिष्य अनुरुद्धाने स्नान केले होते ( संयुत्त. ५.२९७ ).

बौद्ध साहित्यात निर्देशिलेल्या सुंदरिका आणि रोहिणी या नद्या अचिरवतीच्याच उपनद्या असाव्यात. यापैकी रोहिणी म्हणजे गोरखपुर गावानजीक राप्ती नदीस येऊन मिळणारी आधु. रोवै ( रोहवैनि ) नदी असावी.

**अच्छवत** ( पर्वत )—वासिष्ठीपुत्र पुळुमायि याच्या नाशिक गुफालेखात निर्देशिलेले मध्य भारतातील ऋक्षवत् ( आधु. विंध्य पर्वताचा मध्यभाग ) पर्वताचे नामांतर ( ल्यूडर्स, क्र. ११२३ ).

**अच्छावड** ( देश )—ब्राह्मी शिलालेखसाहित्यात निर्देशिलेले एक भौगोलिक स्थान ( ल्यूडर्स, क्र. ३३९; ३४८; ५८१ ). अच्छवत ( ऋक्षवत् ) पर्वतावर संभवतः हे स्थान वसले असावे ( अच्छवत पहा ). पाठभेद—'अच्छावाट' ( ल्यूडर्स, क्र. ३८८ ).

**अच्छोद** ( सरोवर )—पौराणिक साहित्यात निर्देशिलेले जंबुद्वीपान्तर्गत हिमालय पर्वतातील एक सरोवर ( वायु. ४७.५ ). डे यांच्या मते कश्मीरातील मार्तंडपासून सहा

मैल अंतरावर असणारे अच्छावत् सरोवर ते हेच असावे ( डे. पृ. १ ).

**पौराणिक साहित्यात**—हे सरोवर चंद्रप्रभ पर्वताच्या पायथ्याशी वसले होते ( वायु. ७७. ७६; मत्स्य. १४.३; १२१.७; ब्रह्माण्ड. ३.१३.७७ ).

बाणभट्टाच्या कादंबरीमध्ये, तसेच बिल्हणाच्या विक्रमांकदेवचरिता 'मध्ये या सरोवराचे सविस्तर वर्णन आढळते ( विक्रमाङ्क. १८.५३ ). या सरोवराच्याकाठी सिद्धाश्रम वसला होता ( नारदीय. अ. १ ). अच्छोदा नामक नदीहि या सरोवरापासूनच उगम पावत असे ( वायु. ४७.६; अच्छोदा पहा ).

**२. ( देवी )** एक देवीस्थान. पद्म आणि मत्स्यमते येथील देवीचे नाव अनुक्रमे सिद्धदायिनी आणि शिवकारिणी होते ( पद्म. सृ. १७.२१३; मत्स्य. १३.४९ ).

३. एक विष्णुतीर्थ ( पद्म. उ. १२९.३० ).

**अच्छोदा** ( नदी )—जंबुद्वीपान्तर्गत अच्छोद सरोवरापासून उगम पावणारी एक नदी ( मत्स्य. १२१.७; वायु. ४७. ६; ब्रह्माण्ड. २.१८.६ ) पाठभेद– ' अच्छोदका ' ( ब्रह्माण्ड. ३.१३.८० ).

२. अवंतिक्षेत्रान्तर्गत एक नदी ( स्कन्द. आवन्त्य. १.५९.६ ).

**अच्युतपुरम्** ( ग्राम )—कलिंग देशाच्या गंगवंशीय राजांच्या ताम्रपटांचे आंध्र प्रदेशातील उपलब्धिस्थान. हे गाव गंजम जिल्ह्यातील मुखलिंगम् गावानजीक वसले असून येथे गंग राजा इंद्रवर्मनाचे काही ताम्रपट सापडले आहेत ( एपि. इंडि. ३.१२७ ).

**अच्युतस्थल** ( नगर )—मद्र देशान्तर्गत एक नगर. महाभारतान्तर्गत शल्य–कर्ण संवादात संकरज ( हीन ) लोकांची वस्ती असणारे नगर म्हणून या गावाचा निंदाव्यंजक निर्देश आढळतो ( म. क. ३०.४२ ).

२. ( तीर्थ ) लोमश–तीर्थयात्रेत निर्देशिलेले कुरुक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( म. आर. १२९.९; वामन. ३४.४७ ).

या ठिकाणी युगंधर देशाशी या नगराचा संबंध जोडलेला दिसतो. त्यावरून युगंधर देशामध्ये हे नगर वसले असण्याची शक्यता वाटते ( युगंधर पहा ).

**अज** ( लोकसमूह ) - ऋग्वेदात निर्देशिलेला पूर्व भारतातील एक लोकसमूह. सुदास राजाच्या तृत्सु नामक मांडलीक राजाने दाशराज्ञ युद्धामध्ये यांचा, तसेच शिग्रु आणि यक्षु लोकांचा पराभव केला होता ( ऋ. ७. १८. ६-९ ). त्यावरून हे लोक अनार्य असावेत. मात्र तत्संबंधीचा निर्णायक पुरावा वैदिक साहित्यात कोठेहि उपलब्ध होत नाही.

पतंजलीच्या व्याकरणमहाभाष्यात अजमीढ नामक देशाचा निर्देश आढळतो ( पतञ्जलि. ४.१.१७० ). त्या–आधारे अज लोकांची वसाहत हस्तिनापुरच्या उत्तरेस गंगा नदीच्या पलीकडच्या अंगास वसली असावी, असे काही अभ्यासक मानतात ( अजमीढ पहा ).

२. ( सरोवर ) उत्तर प्रदेशातील एक पवित्र सरोवर. उत्तर रेल्वेच्या दिल्ली–कालका मार्गावरील चंडीगडपासून ७ मैल अंतरावरील खरडगावानजीक हे सरोवर आहे ( ती. ६७ ).

**अजक्रन्द** ( देशविभाग )—पतंजलीच्या व्याकरण-महाभाष्यात निर्देशिलेला साल्व जनपदाचा एक ' अवयव ' ( उपविभाग ) ( पतञ्जलि. ४.१.१७० ). या उपविभागा-समवेत अजमीढ आणि बोध या अन्य दोन उपविभागांचा निर्देश या ग्रंथात आढळतो. अग्रवाल यांच्या मते अज नामक राक्षसाचे नावावरून या देशास 'अजक्रंद' आणि 'अजमीढ' ही नावे प्राप्त झाली असावीत. एक स्थानिक देवता या नात्याने अज राक्षसाची साल्व लोक पूजा करीत असत ( म आ. ६१.१७ ).

काशिका ग्रंथातहि एक छोटे जनपद ( जनपदावधि ) या नात्याने अजक्रंदचा निर्देश आढळतो ( का. ४.२.१२५ ).

**अजगढ** ( दुर्ग )—उत्तर प्रदेशान्तर्गत अजयगढ या दुर्गस्थानाचे नामांतर ( अजयगढ पहा ).

**अजगन्ध** ( लिंग )—पुष्करक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंग-स्थान ( नारद. २.७१.४१ ).

**अजण्टा** ( गुफासमूह )—महाराष्ट्रान्तर्गत मराठवाड्यातील औरंगाबाद जिल्ह्यातील सुविख्यात बौद्ध गुफास्थान. या स्थानी असणाऱ्या गुफा बौद्ध पुरातत्त्वशास्त्राच्या आणि देवताशास्त्राच्या दृष्टीने, तसेच बौद्ध स्थापत्य, शिल्पकला आणि चित्रकला यांच्या शतकानुशतकांच्या उत्क्रांतीच्या इतिहासाच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण मानण्यात येतात.

हे स्थान औरंगाबादपासून ६० मैल वायव्येस आणि भुसावळपासून ३५ मैल दक्षिणेस आहे ( अक्षांश २०° पूर्व; रेखांश ७६° उत्तर ). अजंटा घाटाच्या तळाशी असणाऱ्या फरदपूर गावाहून वर चढून गेले असता हे गुफास्थान लागते. औरंगाबादहून फरदपूरला जाण्यासाठी बसेस मिळतात.

नामव्युत्पत्ती--हे स्थान प्राचीन काळी ' अचल नामक बौद्ध भिक्षूचा मठ ' या नावाने ओळखले जात असे, असे ह्युएन्त्संग म्हणतो. त्याच्या प्रवासवर्णनाचा अपवाद वगळता अन्य कोणत्याहि प्राचीन साहित्यात या गुफांचा निर्देश आढळत नाही.

या स्थानाचे आधुनिक अजंटा हे आंग्लभाषीय नाव ' अचल 'चेच अपभ्रष्ट रूप असावे. मराठी भाषेत 'अजंठा' आणि ' अजिंटा ' अशा वैकल्पिक नावांनी हे स्थान ओळखले जाते.

डे यांच्या मते या स्थानाचे मूळ नाव ' अचिन्त धर्ममठ ' असे असून आधु. ' अजंटा ' हे ' अचिन्त 'चेच अपभ्रष्ट रूप असावे ( डे, पृ. १ ). परंतु या अनुमानास अन्यत्र पुष्टी मिळत नाही.

ऐतिहासिक पार्श्वभूमी--सातवाहन राज्यकालात ( इ. स.पू. १५०–इ.स. २०० ) पश्चिम महाराष्ट्राबरोबरच ( उदा. कार्ले, भाजे ), प्रतिष्ठान ( आधु. पैठण ) या सातवाहनांच्या राजधानीच्या उत्तरेस अनेक बौद्ध गुफा कोरण्यात आल्या. या गुफांमध्ये औरंगाबाद, अजंटा आणि पितळखोरा गावच्या गुफा विशेष सुविख्यात असून, त्यातहि अजंटा येथील गुफा त्यामधील अद्वितीय भित्तिचित्रांमुळे जगद्विख्यात झाल्या आहेत.

सातवाहन राज्यकाली अजंटा हे अत्यंत छोटे बौद्ध मठस्थान असून, तेथे केवळ दोनच चैत्यमंदिरे ( गुफा क्र. ९,१० ) आणि तीन बौद्ध विहार ( गुफा क्र. ८,१२,१३ ) होते. यापैकी चैत्यमंदिरांमध्ये सातवाहन चित्रकलेचे काही दुर्मीळ नमुने असून येथील सातवाहनकालीन विहारांची रचना माळव्यातील धम्नार आणि खोल्वि गावाच्या, तसेच सौराष्ट्रातील सना, जुनागढ आणि तळाजे या गावांच्या बौद्ध विहारांसदृश आहे.

अजंटा येथील बाकी साऱ्या गुफा वाकाटक राज्यकालात ( इ.स. ५ वे–६ वे शतक ) आणि चालुक्य राज्यकालात ( इ.स. ६ वे–७ वे शतक ) कोरल्या असून, त्यांच्या शिल्पांवर आणि भित्तिचित्रांवर गुप्त शैलीची दाट छाया आहे.

महत्त्व—इ.स.पू. २ ऱ्या शतकापासून इ.स. ७ व्या शतकापर्यंतच्या बौद्ध स्थापत्य आणि चित्रकलेचा अत्यंत विदग्ध आणि दुर्मीळ नमुना या दृष्टीने अजंटा येथील गुफांचे आणि त्यामधील चित्रकृतींचे महत्त्व अनन्यसाधारण मानण्यात येते. सातवाहन राज्यकालात कोरलेल्या नासिक येथील गुफांतील भित्तिचित्रे आज नष्ट झाली आहेत. या कारणाने या चित्रकलेचा प्रतिनिधिक नमुना म्हणून अजंटा येथील भित्तिचित्रांचे महत्त्व विशेष वाटते.

वेरूळची लेणी त्यावर कोरलेल्या मूर्तींसाठी जशी सुविख्यात आहेत, तद्वतच अजंट्याची लेणी त्यावर रंगविलेल्या भित्तिचित्रांसाठी विशेष प्रसिद्ध आहेत. अजंट्याच्या बौद्ध कारागिरांनी भित्तिचित्रमाध्यमाला साजेशी गुफाशिल्पांची एक नवी परंपरा निर्माण केली. येथील उत्तरकालीन लेण्यांवर भित्तिचित्रे रंगवावयाची अशी योजना आरंभीच निश्चित करण्यात आली असली पाहिजे. एरवी या गुफांमध्ये एवढ्या सलग शिल्पकृतीविरहित भिंती राहिल्याच नसत्या. या लेण्यांमध्ये अव्वल दर्जाची अनेक शिल्पचित्रे असूनहि येथील भित्तिचित्रेच अधिक प्रभावी वाटतात.

कोणत्याहि विदेशीय कलापरंपरेपासून अजंटा येथील स्थापत्य, शिल्प आणि चित्रकला अलिप्त आहे. या कारणाने इ.स. २ ऱ्या–७ व्या शतकातील कलाविकासाचे तसेच जनमानसाचे प्रामाणिक चित्रण त्यामध्ये होते. महाराष्ट्रातील अन्य फुटकळ बौद्ध गुफांना कालदृष्ट्या आणि परंपरादृष्ट्या एका सूत्रात गोवण्याचे महत्त्वपूर्ण कार्य या गुफा करतात.

अशाच तऱ्हेचे, परंतु अन्य कलामाध्यमातील उल्लेखनीय उदाहरण अमरावती येथील शिल्पचित्रांचे होय. ही शिल्पचित्रे अजंटा येथील भित्तिचित्रांहून खूपच पूर्वकालीन असली तरी कल्पनेचा स्वैरसंचार आणि प्रसंगांचे वैचित्र्य या दोन्ही दृष्टींनी अजंटा येथील भित्तिचित्रांचे माध्यम शिल्पमाध्यमापेक्षा कितीतरी सरस वाटते. बौद्ध जीवनातील विभिन्न प्रसंग सजीवपणे साकार करणारी अजंटा येथील भित्तिचित्रे जगातील धार्मिक चित्रकलेमध्ये अद्वितीय मानली जातात.

**भौगोलिक स्थान**—सह्याद्रीच्या इंध्याद्रि पर्वतश्रेणीमधील अजंटा पर्वतशाखेमध्ये या गुफा कोरल्या आहेत. इंध्याद्रि पर्वतश्रेणीच्या जालना शाखेत वेरूळची लेणी खोदली आहेत. अजंटा आणि जालना हे दोन्ही पर्वत इंध्याद्रि श्रेणीपैकी नसून सातमाळ पर्वतश्रेणीपैकी आहेत असे काही अभ्यासक मानतात.

गोदावरी आणि तापी या महाराष्ट्राच्या दोन महानद्यांच्या खोऱ्यांच्या मध्यभागी इंध्याद्रि आणि सातमाळ श्रेणींची पठारे असून त्यांच्यायोगे खानदेश आणि वऱ्हाडची मैदाने एकमेकांपासून अलग होतात. ' सह्याद्रिवर्णन ' या महानुभावांच्या ग्रंथात अजंटा डोंगराचा निर्देश ' माहुरचा डोंगर ' या नावाने केला आहे.

मध्ययुगीन काळी उल्हास नदीच्या खोऱ्यातून अपरांत देशात उतरणारा सह्य पर्वतातील घाट 'कोंकण दरवाजा' या नावाने आणि अजंटा पर्वताचा घाट 'दक्षिण दरवाजा' या नावाने ओळखला जात असे. उत्तर भारतातून दक्षिण भारतात उतरण्यासाठी हा घाट उपयोगी पडत असल्याने त्याचे 'दक्षिण दरवाजा' हे नाव अन्वर्थक वाटते.

सह्य पर्वतातील दक्षिण दरवाजा आणि कोंकण दरवाजा या मोक्याच्या ठिकाणी इ.स.पू. २ ऱ्या आणि १ ल्या शतकातील अजंटा आणि कोंडाणे येथील लेणी आढळतात. यावरून या दोन्ही गुफांच्या स्थाननिश्चितीमध्ये काही पूर्वयोजना दिसते.

नद्या–अजंटा पर्वतश्रेणीनजीक दोन नद्या उगम पावतातः– १. पूर्णा नदी––ही पूर्ववाहिनी नदी घाटनद्रे गावाजवळ उगम पावून नांदेड गावानजीक गोदावरीस मिळते; २. वाघरा नदी––ही उत्तरवाहिनी नदी अजंटा गुफासमूहानजीक उगम पावून तापी नदीस मिळते.

स्थानवैशिष्ट्य–अजंट्याची लेणी निसर्गरम्य अशा स्थानी खोदलेली आहेत. अजंट्याचे डोंगर आज उघडेबोडके दिसत असले तरी या लेण्यांच्या समृद्धीच्या काळी हा सारा प्रदेश निसर्गसंपत्तीने ओतप्रोत भरला असावा. पठारावर वसलेल्या लेणापुर गावानजीकचा वाघरा नदीकाठचा ¾ मैल लांबीचा अर्धचंद्राकृती आकाराचा कडा तोडून ही लेणी कोरली आहेत.

नदीचा झुळझुळता प्रवाह, या प्रवाहाच्या काठी वसलेला २५०' उंचीचा खडा कडा, प्रवाहाच्या सपाटीपासून सुमारे ५०'–१००' उंचीवर कड्याच्या कुशीत कोरलेली लेणी, भोवताली उंच डोंगर आणि गर्द राईच्या दऱ्या आणि गुफांजवळूनच वाहणारा 'सातकुंड' नामक सात मजली धबधबा अशा निसर्गरम्य परिसरामध्ये ही लेणी कोरली आहेत.

महाराष्ट्रातील अन्य कोणत्याहि गुफासमूहांपेक्षा अजंटा येथील गुफांचा परिसर अधिक निसर्गरमणीय आहे. बेडसा आणि कोंडाणे येथील लेणी पवना आणि उल्हास नद्यांच्या खोऱ्यात गर्द झाडीत कोरली असली तरी या दोन्ही नद्यांच्या पात्रापासून ती बरीच दूर आहेत. भाजे आणि वेरुळ येथील लेण्यांजवळ धबधबे असले तरी नद्या नाहीत. कोंडाण्याच्या लेण्यांच्या आसपास अनेक धबधबे असले तरी यापैकी एक धबधबा प्रत्यक्ष लेण्यावरूनच वाहात असल्याने त्याने त्या लेण्याचा विध्वंस केला आहे. अजंट्याचा धबधबा लेण्यांना धोका देण्याइतका जवळ नाही आणि फार लांबहि नाही. त्यामुळेच या लेण्यांची स्थाननिश्चिती करणाऱ्या, तसेच अर्धवर्तुलाकृती पद्धतीने या गुफांची मांडणी करणाऱ्या स्थापत्यविशारदाचे कौतुक वाटते.

या गुफांप्रत जात असताना एका विशिष्ट क्षणी एखादे विश्वरूपदर्शन व्हावे, तद्वत येथील सारीच्या सारी लेणी दृग्गोचर होतात आणि पाहणारा मनुष्य मंत्रमुग्ध होतो. हजारो वर्षांपूर्वी साकार झालेले धर्मश्रद्धेचे हे चालतेबोलते रूप अश्रद्ध माणसाच्या मनातहि सश्रद्धतेचा एक नवा साक्षात्कार घडविते.

केवळ संख्येचा विचार केला तर कान्हेरी, जुन्नर आणि वेरुळ येथील गुफासंख्या अजंट्याहून किती तरी पटीने अधिक आहे. परंतु कान्हेरी येथील बहुसंख्य लेणी कलादृष्ट्या दुय्यम प्रतीची आहेत. जुन्नरची लेणी वेगवेगळ्या डोंगरांवर पांगलेली आहेत; तर वेरुळ येथील गुफांमध्ये हिंदु, बौद्ध आणि जैन शैलींचे संमिश्रण झाले आहे. हीनयान आणि महायानपंथीय अभिजात बौद्धधर्मश्रद्धेचा विशुद्ध कलात्मक आविष्कार साऱ्या महाराष्ट्रातच नव्हे, तर साऱ्या भारतात केवळ अजंटा येथेच पाहावयास मिळतो.

ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात––या ग्रंथात या गुफांचा निर्देश 'आचार नामक बौद्ध आचार्याचा मठ' या नावाने केला आहे. तथापि अजंटा येथील गुफा क्र. २६ मध्ये या गुफेची (शैलगृह) स्थापना करणाऱ्या बौद्ध आचार्याचे नाव 'अचल' दिले आहे (अर्कि. सर्व्हे. वे. इं. ४.१३५). त्यावरून या अचल भिक्षूचाच निर्देश ह्युएन्त्संगला अभिप्रेत असावा.

ह्युएन्त्संगच्या मते महाराष्ट्रदेशाच्या पूर्व भागामध्ये एक अतिउंच पर्वतश्रेणी असून त्यापैकी एका जलप्रवाहयुक्त कड्यामध्ये आचाराचा उत्तुंग बौद्ध मठ कोरला होता.

या बौद्धमठाच्या स्थापनेविषयी निम्नलिखित आख्यायिका ह्युएन्त्संगने दिली आहे :—पश्चिम भारतातील आचार नामक बौद्ध आचार्याच्या मातेने महाराष्ट्रात पुनर्जन्म घेतला. या नव्या जन्मात तिला बौद्ध धर्माची दीक्षा देण्याच्या हेतूने तिचा शोध करीत आचार महाराष्ट्रात आला. गावोगाव हिंडत असता एका छोट्या गावी लहान बालिकेच्या स्वरूपातील त्याची माता त्यास भिक्षा वाढण्यासाठी सामोरी आली. आपल्या गतजन्मीच्या पुत्रास पहाताच तिच्या लहानखुऱ्या स्तनातून दुग्धधारा स्रवू लागल्या. हा परमेश्वरी चमत्कार पाहून आचार सद्गदित

झाला, आणि त्याने तिच्या स्मृत्यर्थ हा संघाराम स्थापन केला.

अजंटा येथील गुफा क्र. २६ मध्ये दैवी प्रसादाबद्दल कृतज्ञ असणाऱ्या अचलाने हा संघाराम कोरल्याचा निर्देश आढळतो. त्यामध्ये 'दैवी प्रसाद' हे शब्द उपरोक्त परमेश्वरी चमत्काराला उद्देशून उपयोजिण्यात आले असावेत.

ह्युएन्त्संगच्या मते या बौद्धमठामध्ये १००′ उंचीचे एक बौद्ध मंदिर असून त्यामध्ये ७०′ उंचीची गौतम बुद्धाची मूर्ती, तसेच गौतम बुद्धाच्या बोधिसत्त्व जीवनातील विभिन्न प्रसंगचित्रे होती. बर्जेस यांच्या मते अजंटा येथील गुफा क्र. १९ या चैत्यमंदिराचे अतिशयोक्त वर्णन येथे अभिप्रेत असावे. अन्य अभ्यासकांच्या मते या गुफेच्या समोरील अंगास दगडविटांनी बांधलेले अन्य एक चैत्यमंदिर प्राचीन काळी अस्तित्वात असून त्याचे वर्णन ह्युएन्त्संगने येथे केले असावे.

उपरोक्त चैत्यमंदिराच्या उत्तरेस आणि दक्षिणेस दगडी हत्तींच्या दोन बृहदाकार मूर्ती होत्या असे ह्युएन्त्संग म्हणतो. बर्जेस यांच्या मते अजंटा येथील गुफा क्र. १९ च्या दर्शनी भागी कोरण्यात आलेल्या हत्तीचा निर्देश येथे अभिप्रेत असावा.

महाराष्ट्रीय कर्तृत्व—'महाराष्ट्रातील भूमीत महाराष्ट्रातील बौद्ध भिक्षूने स्थापन केलेला बौद्धमठ' असे जे वर्णन ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात आढळते, त्यावरून या गुफांच्या प्रतिष्ठापनेचा आद्य मान महाराष्ट्राचा आहे, असे दिसते.

शोध—बौद्ध धर्माचा ऱ्हास सुरू झाल्यानंतर अजंट्याची लेणी ओसाड पडली. उत्तर भारत आणि दक्षिण भारत यांच्या दळणवळणासाठी नवे रस्ते निघाल्याने अजंटा घाटाचे महत्त्वहि नाहीसे झाले. त्यामुळे या गुफांचा रस्ता ओसाड व जंगलमय झाला. पावसाबरोबर वाहून येणाऱ्या मातीने लेणी भरून गेली. अहिंसक भिक्षूंची जागा हिंस्त्र श्वापदांनी घेतली. या पर्वतश्रेणीमधून दिसणाऱ्या शिल्पांना स्थानिक लोक भुताटकीचा खेळ मानू लागले.

इ. स. १८१९ मध्ये वाघाच्या शिकारीसाठी या प्रदेशात आलेल्या एका ब्रिटिश अधिकाऱ्याला या गुफांचा शोध अचानकपणे लागला आणि शतकानुशतकांच्या अज्ञातवासानंतर अजंट्याची लेणी पुन्हा एकवार प्रकाशात आली.

इ. स. १८२९ मध्ये सर जेम्स अलेक्झांडर यांनी रॉयल एशियाटिक सोसायटीच्या जर्नलमध्ये या गुफांचे प्राथमिक स्वरूपाचे वर्णन दिले आणि इ. स. १८४३ मध्ये फर्ग्युसन यांनी या लेण्यांचा अधिकृत वृत्तांत प्रसिद्ध केला. त्यायोगे साऱ्या सुशिक्षित जगात खळबळ उडाली.

अजंटा येथील भित्तिचित्रांच्या प्रतिकृती सर्वप्रथम मेजर गिल यांनी इ. स. १८४६–१८५८ अशी सतत बारा वर्षे खपून तयार केल्या. परंतु इ. स. १८६६ मध्ये लंडन येथील क्रिस्टल पॅलेसला लागलेल्या आगीत त्या भस्मसात झाल्या.

यानंतरचे काळात इ. स. १८७२–१८८५ च्या काळात ग्रिफिथ यांनी येथील चित्रांच्या ३३५ प्रतिकृती तयार केल्या. परंतु त्यापैकी १६३ चित्रे लंडन येथील केन्सिंग्टन म्युझियमला लागलेल्या आगीत नष्ट झाली आणि अन्य अनेक चित्रे खराब झाली. त्यामुळे इ. स. १८९६ मध्ये ग्रिफिथ यांनी प्रसिद्ध केलेल्या अजंटा चित्रसंग्रहात केवळ १५६ चित्रांच्या प्रतिकृती आढळतात. मध्यंतरीच्या काळात वटवाघळांनी आणि बवे लोकांनी येथील अनेक चित्रांची नासाडी केली.

गुफांची मांडणी—¾ मैल लांबीचा अर्धवर्तुळाकृती आकाराचा पर्वतीय कडा तोडून अजंट्याच्या २९ गुफा खोदल्या आहेत. आग्नेयेकडून नैर्ऋत्येकडे त्यांना १–२९ असे क्रमांक दिले आहेत. येथील पहिल्या आणि शेवटच्या गुफेमध्ये सरळ रेषेतील अंतर सुमारे १८२५′ आहे. यापैकी मध्यभागातील पाच गुफा (गुफा क्र. ८–१३) प्राचीनतम आहेत.

या गुफांची मांडणी खालीलप्रमाणे आहे:—(१) गुफा क्र. १–५—पूर्वाभिमुख गुफा; (२) गुफा क्र. ७–२०—उत्तराभिमुख गुफा; (३) गुफा क्र. २१–२९—पश्चिमाभिमुख गुफा.

उपविभाग—कालदृष्ट्या, तसेच स्थापत्यदृष्ट्या अजंटा येथील गुफांचे निम्नलिखित उपविभाग पडतात:—

| रचनाकाल | गुफा |
|---|---|
| १. सातवाहनकालीन गुफा (इ.स.पू. १ ले शतक) | गुफा क्र. १०, १२, १३. |
| २. वाकाटककालीन गुफा (इ.स.५ वे–६ वे शतक) | गुफा क्र. १६–२०; ६–९. |
| ३. चालुक्यकालीन गुफा (इ.स. ७ वे शतक) | आग्नेयेकडील गुफा क्र. १–५; नैर्ऋत्येकडील गुफा क्र. २१–२६. |

सातवाहनोत्तर कालामध्ये म्हणजे इ. स. १ ले शतक–इ. स. ५ वे शतकपर्यंत अजंटा येथील गुफांच्या उत्खननाचे

## अजंटा येथील गुफांचे उपविभाग




कार्य स्थगित झाले असावे. कारण या काळातील गुफा क्र. ११, १४ आणि १५ आकारमान आणि शिल्पसौंदर्य या दोन्ही दृष्टींनी अत्यंत मामुली दिसतात.

इ. स. ६५० च्या सुमारास मध्य भारतामधील राजकीय अशांततेच्या वातावरणामुळे, तसेच पल्लव आक्रमणामुळे गुफा क्र. ४, १४, २४ आणि २५ या गुफा अपुऱ्या राहिल्या. हे खोदकाम पुरे करण्याइतपत राजकीय आणि आर्थिक स्वास्थ्य बौद्धधर्मीयांस पुन्हा कधीच प्राप्त झाले नाही. अशा तऱ्हेने इ. स. ६५० मध्ये अजंटा येथील शिल्पपर्वाची समाप्ती झाली.

[१] **सातवाहनकालीन गुफा**–अजंटा येथील उपलब्ध गुफांमध्ये गुफा क्र. १० आणि ९ ही चैत्यमंदिरे आणि गुफा क्र. १२ आणि १३ हे बौद्ध विहार सातवाहन-कालीन (इ. स. पू. १ ले शतक) असून त्यांची शिल्प-शैली सांची स्तूपाच्या जगद्विख्यात तोरणामध्ये आढळणाऱ्या प्रातिनिधिक सातवाहन कलेशी मिळतीजुळती आहे.

(अ) **सातवाहनकालीन चैत्यमंदिरे**—अजंटा येथील गुफा क्र. १० आणि ९ ही सातवाहनकालीन चैत्यमंदिरे स्थापत्य आणि शिल्प या दोन्ही दृष्टींनी भाजे, कार्ले, नासिक, कोंडाणे येथील चैत्यमंदिरांसदृश आहेत. सातवाहन-कालीन चित्रकलेचे काही उध्वस्त परंतु दुर्मीळ नमुने या चैत्यमंदिरात आढळतात.

**१. गुफा क्र. १०**—अजंटा येथील प्राचीनतम गुफां-पैकी हे चैत्यमंदिर असून त्याची लांबी, रुंदी, आणि उंची ९६′-६″, ४१′-३″, आणि ३६′ आहे. अशा तऱ्हेने अजंटा येथील तत्कालीन अन्य चैत्यमंदिरापेक्षा आकाराने हे चैत्यमंदिर बरेच मोठे असले तरी कार्ले येथील सुविख्यात चैत्यमंदिरापेक्षा त्याची लांबी-रुंदी अनुक्रमे $\frac{1}{4}$′ ने आणि ४$\frac{1}{2}$′ ने कमी आहे.

या गुफेचे प्रवेशद्वार अत्यंत साधे आणि अनलंकृत असून भाजे, कोंडाणे आणि पितळखोरे येथील चैत्यमंदिरांप्रमाणे हिच्या प्रवेशद्वारात, तसेच चैत्यगवाक्षात लाकडी जाळी बसविण्यात आली असावी. मात्र या लाकडी जाळीचे काहीहि अवशेष आज येथे सापडत नाहीत.

या गुफेच्या प्रवेशद्वाराच्या उजव्या बाजूस इ. स. पू. २ ऱ्या शतकाच्या प्रथमार्धातील मौर्य अक्षरवाटिकेतील एक शिलालेख कोरला आहे. त्यामध्ये 'कटहादि वासिष्ठी-पुत्र' नामक आंध्र राजकुमाराने हे प्रवेशद्वार देणगी दिल्याचा निर्देश आढळतो (अर्कि. सर्व्हे. वे. इं. ४.११६).

या मंदिराच्या मुख्य सभागृहात दोन्ही बाजूस अष्टकोनी आकाराचे नक्षीकामविरहित असे आतील बाजूस ५॥″ नी झुकलेले ७८ स्तंभ आहेत. स्थापत्यशास्त्रीय दृष्टीने काष्ठ-शिल्पाकडून अश्मशिल्पाकडे बौद्ध चैत्यमंदिरांचे ज्या काळी संक्रमण होत होते, त्या काळातील ही गुफा दिसते.

या गुफेच्या दोन्ही बाजूंच्या भिंतींवर सातवाहनकालीन भित्तिचित्रे कोरलेली असून त्यापैकी उजव्या भिंतीवरील 'छदंत जातका'चे चित्रमय दर्शन विशेष महत्त्वाचे आहे.

या गुफेच्या डावीकडील भिंतीवर प्राचीनकालीन अक्षरवाटिकेमध्ये रंगविलेला एक भित्तिलेख आहे. तो या चित्रांच्याचकाळी रंगविण्यात आला असावा.

या मंदिराच्या स्तंभांवर गौतम बुद्धाची विभिन्न मुद्रेतील चित्रे, तसेच संस्कृत भाषेतील अनेक देणगीलेख रंगविले आहेत. ही चित्रे आणि चित्रलेख गुफेच्या मानाने खूपच उत्तरकालातील म्हणजे इ. स. ५ व्या-६ व्या शतकातील असावेत.

२. गुफा क्र. ९—हे चैत्यमंदिर उपरोक्त गुफा क्र. १० च्या निकटवर्ती असून, अजंटा येथील अन्य चैत्यमंदिरांच्या तुलनेने हे अत्यंत छोटे म्हणजे ४५′ × २२¾′ × २३′ आहे.

फर्ग्युसन यांच्या मते नासिक येथील चैत्य गुफा क्र. १८ पेक्षा हे चैत्यमंदिर अधिक पुरातन असावे. कारण त्याच्या स्तंभांचा झुकाव हा भाजे आणि बेडसा येथील चैत्य-मंदिरांच्या दरम्यानच्या काळातील दिसतो.

या चैत्यमंदिराचा दर्शनी भाग नासिक येथील उपरोक्त चैत्यमंदिरापेक्षाहि अधिक साधासुधा आणि अनलंकृत आहे. मात्र या दर्शनी भागावर कोरण्यात आलेल्या गौतम बुद्धाच्या मूर्ती उत्तरकालीन महायानपंथाच्या दिसतात.

या मंदिराच्या बाजूच्या भिंतीवर सातवाहनकालीन आणि सातवाहनोत्तर काळातील भित्तिचित्रांची सरभेसळ झाली आहे:—

१. सातवाहनकालीन चित्रे — (१) दर्शनी भिंतीच्या अंतर्भागात या भिंतीपासून डाव्या खिडकीपर्यंतच्या भागात रंगविलेले चित्र; (२) दर्शनी भिंतीपासून डावीकडील भिंतीपर्यंत रंगविलेले अन्य एक चित्र; (३) पाठीमागच्या भिंतीवर रंगवलेल्या चित्राचा एक तुकडा.

२. सातवाहनोत्तर चित्रे—या मंदिरातील स्तंभांवर, तसेच भिंतींच्या अन्य भागांवर रंगविलेली चित्रे आणि भित्तिलेख इ. स. ५ व्या–६ व्या शतकातील आहेत. अशा तऱ्हेचे वीसहून अधिक संस्कृतभाषीय देणगीलेख या मंदिराच्या भिंतींवर आणि स्तंभांवर रंगविले आहेत.

या मंदिराच्या पाठीमागच्या भिंतीवरील एक पालीभाषीय चित्रलेख मात्र सातवाहनकालीन आहे.

(ब) सातवाहनकालीन विहार—अजंटा येथील गुफा क्र. १२ आणि १३ हे बौद्ध विहार सातवाहनकालीन आहेत. त्याची रचना माळव्यातील भम्मार आणि खोल्वि आणि सौराष्ट्रातील सना, जुनागढ आणि तळाजे या गावांच्या बौद्ध विहारांसदृश म्हणजे साधीसुधी आणि अनलंकृत आहे.

१. गुफा क्र. १३—या विहाराची रचना अत्यंत ओबडधोबड असून त्याच्या भिंती बिहारमधील अशोककालीन गुफांप्रमाणे रोगण लावून गुळगुळीत केल्या आहेत. त्यावरून भित्तिचित्रे कोरण्याच्या कल्पनेचा उदय होण्यापूर्वी या गुफेची रचना झाली असावी.

या विहाराचे १३½′ × १६½′ × ७ आकाराचे स्तंभरहित सभागृह (उपाश्रय) तेवढे आज शिल्लक आहे. या सभागृहाच्या सभोवती सात छोट्या खोल्या खोदल्या असून, त्यापैकी प्रत्येकीमध्ये शयन-ओट्याची रचना केली आहे.

२. गुफा क्र. १२—या विहाराची रचना भाजे येथील विहारासदृश असून, त्याचे चौकोनाकृती स्तंभरहित मुख्य सभागृह ३६′-८″ आकाराचे म्हणजे गुफा क्र. १३ पेक्षा खूपच मोठे आहे.

या विहाराच्या मुख्य सभागृहाभोवती बारा छोट्या खोल्या खोदल्या असून, त्यांच्या सभागृहाभिमुख प्रवेश-द्वारांशी घोड्याच्या नाळाच्या आकाराच्या कमानी, तसेच वेदिकाशिल्प कोरले आहे.

या विहारातील खोल्यांमध्ये प्रत्येकी दोन शयन–ओटे आहेत. स्तंभविरहित सभागृह आणि शयन-ओटे हे सातवाहनकालीन बौद्ध विहारांचे प्रमुख वैशिष्ट्य गुफा क्र. १३ आणि १२ या विहारांमध्ये पहावयास मिळते.

[२] गैरमहत्त्वाचे बौद्ध विहार—इ. स. पू. १ ल्या शतकानंतर सुमारे चारशे वर्षेपर्यंत अजंटा येथील गुफांच्या उत्खननाचे काम थंडावले. या काळामध्ये खोदण्यात आलेले गुफा क्र. ११,१४ आणि १५ हे विहार कलादृष्ट्या निकृष्ट, तसेच संमिश्र आणि संकरज शैलीचे आहेत. महायानपंथीय लोकांनी या गुफांमध्ये उत्तरकाळात स्थापन केलेल्या बौद्ध मूर्तींमुळे या विहारांचे मूळ रूप अधिकच संमिश्र स्वरूपाचे झाले आहे.

[३] वाकाटकालीन गुफा—अजंटा येथील गुफा क्र. १९ हे चैत्यमंदिर आणि गुफा क्र. १६,१७,१८,२०,६, ७ हे विहार वाकाटक राज्यकालामध्ये (इ. स. ५–६ शतक) कोरले असून गुप्त स्थापत्यशैलीचे अत्यंत परिणत स्वरूप त्यामध्ये पहावयास मिळते. हीनयानपंथाचा लोप आणि महायानपंथाचे वाढते प्राबल्य या गुफामध्ये प्रकर्षाने दिसते.

(अ) वाकाटककालीन चैत्यमंदिर (गुफा क्र. १९)—शिल्प आणि चित्र या दोन्ही दृष्टींनी अत्यंत समृद्ध अशी ही गुफा गुप्त स्थापत्य, शिल्प आणि चित्रकलेचा प्रतिनिधिक नमुना मानली जाते. इ. स. पू. १ ल्या शतकातील संन्यासप्रधान मूर्तिपूजाविरोधी बौद्ध धर्माचे इ. स. ५ व्या शतकात गौतम बुद्धाच्या मूर्तीचे बडिवार माजविणाऱ्या मूर्तिपूजक बौद्ध धर्मामध्ये जे स्थित्यंतर झाले, त्याचेहि अत्यंत नाट्यपूर्ण दर्शन या चैत्यगृहामध्ये होते.

सातवाहनकालीन चैत्यशिल्पामध्ये बौद्ध देवतामूर्तींना संपूर्ण मज्जाव होता. मंदिरास देणगी देणाऱ्या दात्याची अथवा त्याच्या पत्नीची मूर्ती फार तर तेथे कोरली जात असे (उदा. कार्ले, कोंडाणे). याचे उलट एक उपास्य दैवत या नात्याने गौतम बुद्धाच्या अनेकानेक मूर्ती या चैत्यमंदिरात कोरल्या असून, मंदिरातील मुख्य स्तूपाच्या समोरच्या अंगासहि गौतम बुद्धाची एक दैवतप्रतिमा खोदली आहे.

या मंदिराचे गुप्त शिल्पशैलीचे प्रवेशद्वार पूर्वकालीन चैत्यमंदिराहून सर्वस्वी वेगळे आहे. वेदिकाशिल्पाचा येथे संपूर्ण लोप झाला असून चैत्यगवाक्षाच्या नक्षीचे धार्मिक महत्त्व येथे नाहीसे झाले आहे. शिल्पकृतींच्या दरम्यान खोदलेल्या शिल्पपट्टीवर निर्जीव नक्षीकाम म्हणून त्यांचा प्रयोग येथे केला आहे.

चैत्यमंदिराच्या प्रमुख चैत्यगवाक्षाच्या दोन्ही अंगास दोन बृहदाकार व्यक्तिप्रतिमा खोदल्या असून त्यापैकी डावीकडील प्रतिमा कुबेराची आणि उजवीकडील प्रतिमा कोणा अज्ञात देवतेची आहे.

प्रवेशद्वाराच्या दोन्ही अंगास असणाऱ्या चित्रचौकटी-मध्ये गौतम बुद्धाचीच विभिन्न रूपे कोरली आहेत. या शिल्पचित्रांपैकी दोन विद्याधर गौतम बुद्धाला राजमुकुट चढवीत आहेत; हाती भिक्षापात्र धरलेल्या गौतम बुद्धाला एक लहान मूल भिक्षा वाढत आहे; नागदेवता गौतम बुद्धाची पूजा करीत आहेत, आदि शिल्पे विशेष उल्लेखनीय आहेत.

हे चैत्यमंदिर गुफा क्र. ९ या सातवाहनकालीन चैत्य-मंदिराप्रमाणेच आकाराने अत्यंत छोटे (४६′–४″ × २३′–७″ × २४′–४″) असले तरी त्याच्या अंतर्भागाची रचना पूर्वोक्त गुफेपेक्षा सर्वस्वी वेगळी आहे. या गुफेमध्ये लाकूडकामाचा लवलेशहि नसून, दरेक ठिकाणी लाकूडकामाची जागा दगडकामाने घेतली आहे.

या नव्या जातीच्या चैत्यमंदिरात भित्तिचित्रांऐवजी शिल्पकृतींचा उपयोग वाढत्या प्रमाणात केला असून, गौतम बुद्धाच्या विभिन्न आसनातील शिल्पकृतींचे तेथे आधिक्य दिसते.

या मंदिराच्या स्तंभांच्या शिरोभूषणांवर मध्यभागी गौतम बुद्धाच्या शिल्पप्रतिमा कोरल्या असून, त्यास जोडून कोरलेल्या ब्रॅकेट्सवर उडत्या देव-गंधर्वांच्या अथवा संगीत-कारांच्या प्रतिमा आहेत. संगीतकारांच्या या शिल्पप्रतिमा बाघ येथील गुफातील भित्तिचित्रांसदृश आहेत.

या चैत्यमंदिरातील स्तूप प्रमाणाबाहेर उंच असून त्यावर बुद्धाच्या विभिन्न मूर्ती कोरल्या आहेत. त्याची पाच छत्रांनी युक्त अशी उंचच उंच दगडी छत्रावलीहि शोभिवंत परंतु मूळ धार्मिक हेतूशी विसंगत आहे. गंधार देशातील सुल्तानपुर स्तूपाचे अनुकरण करून या स्तूपाची रचना करण्यात आली असावी (सुल्तानपुर पहा).

(ब) वाकाटककालीन विहार—अजंटा येथील गुफा क्र. १६, १७, १८, २०, ६ आणि ७ या विहारांची रचना वाकाटक राज्यकाली म्हणजे इ. स. ५–६ व्या शतकात करण्यात आली. यापैकी विहार क्र. १६ आणि १७ हे अजंटा येथील सर्वाधिक नयनरम्य विहार असून, त्यामधील भित्तिचित्रे सर्वोत्कृष्ट आहेत.

१. गुफा क्र. १६—या विहाराच्या व्हरांड्याच्या डावी-कडील बाह्य भिंतीवर वाकाटक राजा हरिषेण (इ. स. ५००–५२०) याचा अमात्य वराहदेव याने ही गुफा देणगी दिल्याचा गुफालेख आढळतो. या गुफेची काल-निश्चिती करण्याच्या दृष्टीने, तसेच अजंटा येथील अन्य गुफांचा कालानुक्रम ठरविण्याच्या दृष्टीने हा शिलालेख महत्त्वाचा मानला जातो. या शिलालेखामध्ये विंध्यशक्ति (इ. स. २८५–३१०) पासून हरिषेणापर्यंतच्या वाकाटक राजांची वंशावलीहि सविस्तरपणे दिली आहे. मध्य भारतातील या ख्यातनाम राजघराण्याच्या इतिहासांवर प्रकाश टाकण्याच्या दृष्टीनेहि हा शिलालेख महत्त्वपूर्ण वाटतो.

या विहाराचे मध्यवर्ती चौरस सभागृह ६५′ लांबीरुंदीचे आणि २० स्तंभांनी युक्त असून, त्याच्या अंतर्भागात १६ छोट्या खोल्या खोदल्या आहेत. यापैकी पाठीमागच्या मध्यवर्ती खोलीत गौतम बुद्धाची एक मूर्ती आहे.

मध्यवर्ती सभागृहाच्या भिंतीवर आणि छतावर समृद्ध नक्षीकाम आणि बौद्ध जातकातील कथाभागांवर आधारित भित्तिचित्रे रेखाटली असून, त्यामधील रंग सुसंवादी आणि सौंदर्यपूर्ण आहेत.

२. गुफा क्र. १७ ( धर्मचक्र गुफा )—वाकाटक राजा हरिषेण याच्या एका मांडलीक राजाच्या प्रधानाने ही गुफा खोदली असे त्यामधील शिलालेखावरून दिसते. अशा तऱ्हेने हा विहार गुफा क्र. १६ शी समकालीन ( इ. स. ५००-५२० ) आहे.

या विहाराच्या व्हरांड्याच्या डाव्या कोपऱ्यातील बौद्ध भवचक्राच्या भित्तिचित्रामुळे ही गुफा प्रारंभीच्या काळी ' धर्मचक्र गुफा ' या नावाने ओळखली जात असे. वस्तुतः हे चित्र बौद्ध धर्मचक्राचे नसून भवचक्राचे आहे.

गुफा क्र. १६ प्रमाणेच या विहाराचे प्रमुख आकर्षणहि त्यामधील भित्तिचित्रे असून बौद्ध जीवनातील आणि साहित्यातील विभिन्न प्रसंग त्यामध्ये प्रचंड संख्येने कोरले आहेत.

या गुफेतील शिलालेखामध्ये येथील रत्नसदृश सभागृहा-( विहार ) नजीक एक जलकुंड खोदल्याचा, तसेच विहाराच्या पश्चिमेस एक सुंदर गंधकुटी ( देवालय ) कोरल्याचा निर्देश आढळतो. या विहारनजीकच्या गुफा क्र. १८ च्या तळाशी असणाऱ्या जलकुंडाचा निर्देश येथे अभिप्रेत असावा. विहाराच्या पश्चिमेकडील तटबंदीवर गौतम बुद्धाची विभिन्न शिल्पे कोरली असून त्यांचाच निर्देश या शिलालेखात ' देवमंदिर ' म्हणून केला असावा.

३. गुफा क्र. १८, २०—कालदृष्ट्या या दोन्ही गुफा उपरोक्त विहाराच्या उत्तरकालीन असून त्यांची रचना इ. स. ६ व्या शतकाच्या प्रथमार्धात करण्यात आली असावी.

४. गुफा क्र. ६—अजंटा येथील हा एकमेव दुमजली विहार आहे. परंतु दगडाच्या कमकुवतपणामुळे, तसेच आर्द्रतेमुळे हा सारा विहार आज उध्वस्त झाला आहे.

५ गुफा क्र. ७—चौकोनी आकाराच्या मध्यवर्ती सभागृहाऐवजी या गुफेच्या व्हरांड्याभोवतीच येथे छोटया खोल्या आणि प्रवेशमंडप कोरले आहेत. प्रवेशमंडपाच्या उजवीकडील भिंतीवर गौतम बुद्धाच्या पद्मासनाधिष्ठित ६५ मूर्ती सात रांगांमध्ये कोरल्या आहेत.

या गुफेमध्ये बोधिसत्त्वाची मूर्ती मात्र एकहि नाही. त्यावरून ही गुफा चालुक्यपूर्वकालीन दिसते.

[ ४ ] चालुक्यकालीन गुफा—अजंटा येथील गुफा क्र. २६ हे चैत्यमंदिर, आणि गुफा क्र. १–५; २१–२५ आणि २७ हे विहार चालुक्य राज्यकालातील ( इ. स. ६ वे-७ वे शतक ) असून येथील बौद्धमठाची इतिश्रीहि याच काळात झाली असावी. कारण यापैकी गुफा क्र. ३, २४ आणि २५ अपूर्ण आहेत.

या गुफांची शिल्पशैली चालुक्य राजांनी वातापि ( आधु. बदामी ) या राजधानीच्या गावी बांधलेल्या ' मलेगित्ति मंदिरा 'सदृश आहे. पल्लव स्थापत्य आणि गुप्त–चालुक्य शिल्प यांचे त्यामध्ये संमिश्रण दिसते.

उपरोक्त गुफांपैकी गुफा क्र. १ या विहारामध्ये चालुक्य राजा पुलकेशिन् ( द्वितीय ) याच्या दरबारात पर्शियाच्या राजा खुस्रू ( द्वितीय ) याने पाठविलेल्या वकिलातीचे एक भव्य भित्तिचित्र रंगविले आहे. चालुक्य राजांच्या वैभवाचे मानचिह्न म्हणूनच नव्हे तर, अंजटा येथील विभिन्न चित्रांची कालनिश्चिती करण्याच्या दृष्टीने हे चित्र महत्त्वाचे वाटते.

( अ ) चालुक्यकालीन चैत्यमंदिर ( गुफा क्र. २६ )—अश्मक राजाचे अमात्य देवराज आणि भव्विराज यांचा धर्मगुरू बुद्धभद्र याने हे चैत्यमंदिर खोदले, असे या मंदिराच्या व्हरांड्याच्या पाठीमागच्या भिंतीवरील शिलालेखावरून दिसते. या शिलालेखाच्या अक्षरवटिकेवरून ही गुफा इ. स. ६ व्या शतकाच्या अखेरीस अथवा ७ व्या शतकाच्या प्रारंभी खोदली असावी. अचल नामक बौद्ध भिक्षूने अजंटा येथील बौद्ध मठाची आद्य स्थापना केल्याचा निर्देशहि या शिलालेखात आढळतो.

या चैत्यमंदिराच्या प्रवेशद्वारावर गौतम बुद्धाच्या प्रतिमांची इतकी रेलचेल झाली आहे की अन्य परंपरागत नक्षीकामाची जागाहि येथे लहान मोठ्या आकाराच्या आणि विभिन्न मुद्रांच्या बुद्धप्रतिमांनी घेतली आहे. आपल्या विनाशकाली बौद्धधर्म किती कमालीचा मूर्तिवेडा बनला होता याचे प्रात्यक्षिक या मंदिराच्या प्रवेशद्वारावरील, तसेच अंतर्भागातील शिल्पांमध्ये पहावयास मिळते. गुप्तकालीन शिल्पातील प्रमाणबद्धता आणि सुबकपणाहि येथे संपूर्णतः नाहीसा झाला आहे.

या चैत्यमंदिराचा आकार मध्यममोठा ( ६७'-१०"× ३६'-३" × ३१'-३" ) असून त्यामधील स्तंभ आणि त्यावरील आडवी पट्टी ( ट्रायफोरियम ) यावर अत्यंत बारीक असे नक्षीकाम केले आहे. यापैकी आडव्या पट्टीवर गौतम बुद्धाच्या विभिन्न मूर्ती कंटाळवाणेपणे पुनरावृत्त केल्या आहेत.

या चैत्यमंदिराच्या अंतर्भागात डाव्या भिंतीनजीक गौतम बुद्धाची निर्वाणप्राप्त अवस्थेतील २३'–३" लांबीची एक प्रचंड मूर्ती आहे. गौतम बुद्धाच्या निर्वाणप्राप्त अवस्थेतील मूर्ती सिलोनमधील पोलोन्नरुव आदि स्थानी आढळत असल्या तरी भारतात मात्र क्वचित् आढळतात. नाशिक आणि साष्टी येथे आढळणाऱ्या अशाच तऱ्हेच्या

मूर्तींच्या तुलनेने या मंदिरातील मूर्ती सर्वाधिक मोठी आहे. या साऱ्याच मूर्ती मध्ययुगीन काळातील, म्हणजे गौतम बुद्धाच्या मूर्तिपूजेची कल्पना प्रस्थापित झाल्यानंतरच्या काळातील आहेत.

**( ब ) चालुक्यकालीन विहार—१. ( गुफा क्र. १ )—** चालुक्यकालीन सर्वोत्कृष्ट विहारांमध्ये या विहाराची गणना होत असून, त्यामधील स्तंभांचे आणि अन्य नक्षीकाम साऱ्या भारतात सर्वोत्कृष्ट मानले जाते. इ. स. ६०० च्या सुमारास त्याचे खोदकाम सुरू झाले आणि इ. स. ६५० च्या सुमारास ते संपले. परिपूर्ण अवस्थेतील अजंटा येथील हा शेवटचा विहार असून त्याची शिल्पशैली औरंगाबाद येथील विहारांशी मिळतीजुळती आहे.

या विहारातील २० स्तंभांनी युक्त अशा मुख्य सभागृहाच्या तीन बाजूंस १४ छोट्या खोल्या खोदल्या आहेत. येथील स्तंभाचे व त्यांच्या शिरोभूषणांचे नक्षीकाम अत्यंत समृद्ध आणि कलात्मक आहे.

या विहाराच्या स्तंभयुक्त व्हरांड्याच्या दर्शनी भागी गौतम बुद्धाच्या जीवनातील काही नाट्यमय प्रसंगांचे चित्रण अखंड चित्रपट्टीच्या रूपाने केले आहे. ज्या चतुर्विध जीवनापदांच्यायोगे संसारत्यागाची प्रेरणा गौतम बुद्धाला झाली, तिचे अत्यंत कलात्मक दर्शन येथे घडते.

या गुफेच्या छताचे चार चौकोनी भाग पाडले असून चालुक्य राजा पुलकेशिन् ( द्वितीय ) हा इराणचा राजा खुस्रू याच्या वकिलाचे स्वागत करीत असल्याच्या प्रसंगाची चार विभिन्न दृश्ये त्यामध्ये रंगविली आहेत. त्यामधील इराणी व्यक्तींची चेहरेपट्टी आणि पोषाख अत्यंत यथातथ्य आहे. आज हे चित्र बहुंशी उध्वस्त झाले आहे.

**२. गुफा क्र. २—**गुफा क्र. १ प्रमाणेच हा विहारहि उत्कृष्ट नक्षीकामासाठी आणि शिल्पासाठी सुविख्यात आहे. त्याचे मुख्य सभागृह १२ स्तंभांनी युक्त असून त्याच्या भोवताली १२ छोट्या खोल्या खोदल्या आहेत. मुख्य सभागृहाच्या पाठीमागील बाजूस एक स्वतंत्र बौद्धमंदिर कोरले आहे. हे मंदिर बुद्धपूजेच्या अतिरिक्त अवडंबराचे प्रातिनिधिक उदाहरण मानले जाते.

सभागृहाच्या बाजूच्या दोन छोट्या खोल्यांमध्ये अन्य दोन बौद्धमंदिरे आहेत. यापैकी उजवीकडील मंदिराच्या पाठीमागच्या भिंतीवर बुद्धपिता शुद्धोदन आणि माता महाप्रजापति यांचे शिल्पचित्र कोरले असून महाप्रजापतीच्या मांडीवर तान्हा सिद्धार्थ दाखविला आहे.

**( क ) अपूर्ण अवस्थेतील विहार—**अजंटा येथील अपूर्णावस्थेतील चालुक्यकालीन विहारांमध्ये गुफा क्र. ४ आणि २४ हे प्रमुख असून ते पुरे होते तर अजंटा येथील सर्वोत्कृष्ट विहारामध्ये त्याची गणना झाली असती.

**अजंटा येथील चित्रकला—**अजंटा येथील लेण्यांपैकी गुफा क्र. १. २, ९, १०, १६, १७, १९ आणि २१ या गुफांच्या भिंतींवर, खांबांवर व छतांवर चित्रे रंगविली आहेत. यापैकी गुफा क्र. १, २, १६,१७ या विहारातील भित्तिचित्रे सर्वाधिक ख्यातनाम आहेत.

बुद्धाच्या जीवनातील तसेच त्याच्या पूर्वजन्मातील नानाविध प्रसंग आणि जातकात वर्णिलेले तत्कालीन लोकजीवनातील प्रसंग हे या भित्तिचित्रांचे प्रमुख चित्रविषय आहेत.

**भित्तिचित्रे रंगविण्याचे तंत्र—**गुफेच्या दगडी पृष्ठभागावर माती, शेण, ताग आणि तूस यांच्या वस्त्रगाळ मिश्रणाचा गुळगुळीत गिलावा चढवून त्यावर शिंपल्यापासून तयार केलेल्या चुन्याचा चकचकीत थर चढवायचा, आणि हा गिलावा ओला असतानाच त्यावर रंगचित्रे काढावयाची, असे अजंटा येथील चित्रकारांचे चित्रतंत्र होते. बारीक टोकाच्या वर्तिकेने गेरूच्या रंगात चित्राची बाह्यरेषा काढून नंतर त्यात रंग भरण्यात येत असत.

अजंटा येथील भित्तिचित्रात पांढरा, काळा, पिवळा, हिरवा, तांबडा आणि निळा असे केवळ सहा रंग उपयोजिले आहेत. निळ्या रंगाचा उपयोग येथे क्वचित्‌च केला आहे. येथील काळा रंग काजळापासून तयार केला असून अन्य सारे रंग दगडमातीपासून तयार केले असावेत. हे रंग इतके उत्कृष्ट आहेत की १५०० वर्षे लोटली तरी त्यांची तकाकी बऱ्याच अंशी आजहि ताजीतवानी दिसते.

**उपविभाग—**अजंटा येथील शिल्पांप्रमाणेच तेथील भित्तिचित्रांचेहि कालदृष्ट्या तसेच कलादृष्ट्या निम्नलिखित तीन उपविभाग दिसतात:—

**१. सातवाहन राज्यकाल ( इ. स. पू. १ ले–इ. स. १ ले शतक )—**या कालात कोरलेल्या सातवाहनकालीन चैत्यमंदिरात ( गुफा क्र. ९, १० ) सातवाहन चित्रकलेचे काही दुर्मीळ नमुने पाहावयास मिळतात. त्यामध्ये रंगविलेल्या जातककथांची चित्रशैली अत्यंत नैसर्गिक आणि सांची स्तूपासभोवताली सातवाहनांनी कोरलेल्या शिल्पचित्रासदृश दिसते. सद्यःकाली ही चित्रे अत्यंत उध्वस्त झाली आहेत.

२. वाकाटक राज्यकाल ( इ. स. ५ वे–६ वे शतक )—अजंटा येथील गुफा क्र. १६ आणि १७ मधील कलादृष्ट्या सर्वोत्कृष्ट चित्रे अंतिम वाकाटक राजा हरिषेण ( इ. स. ४७५-५०० ) याच्या राज्यकालात रंगविली आहेत.

३. चालुक्य राज्यकाल ( इ. स. ७ वे शतक )—अजंटा येथील उत्तरकालीन गुफांमधील सारी चित्रे चालुक्य राजा पुलकेशिन् ( द्वितीय ) ( इ. स. ६०९–६४२ ) याच्या राज्यकालातील असून, त्यामध्ये उतरणीस लागलेल्या गुप्त चित्रकलेतील दोष सुस्पष्टपणे दिसतात.

कलावैशिष्ट्ये—अजंटा येथील बहुसंख्य भित्तिचित्रे इ. स. ५ व्या–७ व्या शतकातील असून परिणत गुप्त चित्रकलेची निम्नलिखित गुणवैशिष्ट्ये त्यांमध्ये प्रकर्षाने दिसतात:-

१. बाह्यरेषा—या चित्रांच्या बाह्यरेषा सुस्पष्ट, दृढ आणि सौष्ठवयुक्त असल्या तरी त्या डोळ्यास खुपत नाहीत. ही रेखाचित्रे काढणाऱ्या चित्रकाराचा हात कोठेहि चाचरत नाही. अशी सफाई प्राचीन, मध्ययुगीन अथवा अर्वाचीन काळातील फारच थोड्या चित्रांमध्ये दिसते.

या चित्रातील विभिन्न रेषा, तसेच संकलित आकृतिबंध यामध्ये नादमयता आणि आलंकरण याकडे विशेष लक्ष दिलेले दिसते. या चित्रांची पार्श्वभूमी मुख्य चित्रापासून कटाक्षाने अलग ठेवली आहे. एकावर एक अशा पद्धतीने प्रसंगांची अथवा व्यक्तिसमूहांची स्थापना करणे येथील चित्रकारांना विशेष आवडते. दूरची वस्तू आकाराने छोटी दाखवून अंतराचा आभास आधुनिक चित्रकार निर्माण करतात. हाच आभास दूरच्या व्यक्ती उंचावर दाखवून अजंट्याचे चित्रकार निर्मितात.

२. रंगसंगती—कलात्मक आणि सुसंवादी रंगसंगती हे या भित्तिचित्रांचे प्रमुख वैशिष्ट्य आहे. या चित्रांमधील रंग मुळातच अतिशय सौम्य असून त्या रंगाची स्थित्यंतरे मुलायम अशा शेडिंगच्या साह्याने, तसेच कुरळे केस, विभिन्न अलंकार आदि नैसर्गिक साधनांच्या साह्याने डोळ्यास खुपणार नाहीत अशा पद्धतीने येथे केली आहेत. त्यामुळे संकलितरीत्या या चित्रांची रंगसंगती अत्यंत सुखद वाटते.

या चित्रांमधील बहुतांशी सारे रंग आज फिक्के झाले आहेत. त्यामुळे कोणती विशिष्ट रंगसंगती अजंटा चित्रकारांना विशेष प्रिय होती ते समजत नाही. तथापि गडद बदामी, निळा, हिरवा आणि पांढरा या रंगांची संगती साधणारी चित्रे येथे आधिक्याने आढळतात.

३. भावदर्शन—भावनेने ओथंबलेली व्यक्तिचित्रे हे परंपरागत गुप्तचित्रकलेचे वैशिष्ट्य अजंटा येथेहि पाहावयास मिळते. विशिष्ट भावना सूक्ष्म अंगविक्षेपाच्या साह्याने व्यक्त करण्यात अजंटा येथील चित्रकारांचा हातखंडा दिसतो. मानवी तसेच पशुपक्ष्यांच्या शरीरशास्त्राचे सूक्ष्मातिसूक्ष्म असे ज्ञान, सभोवतालच्या सृष्टीचे सूक्ष्म निरीक्षण, तसेच पोषाख आणि आविर्भाव यांच्या साह्याने व्यक्तीचा पेशा आणि प्रसंगाचे वैशिष्ट्य व्यक्त करण्याची अपूर्व कला यांच्या मनोहारी संगमाने अजंटा येथील व्यक्तिचित्रे आणि प्रसंगचित्रे अद्वितीय वाटतात.

येथील चित्रांमध्ये समाजाच्या विभिन्न थरातील हजारो व्यक्तींची चित्रे रंगविली आहेत. परंतु स्वभावभेदानुसार, तसेच सामाजिक स्थानानुसार यांपैकी प्रत्येक व्यक्तीची आकृती, आसन, आणि वर्ण वेगळा दिसेल, अशी काळजी चित्रकाराने घेतली आहे. यामधील साऱ्या व्यक्ती चित्रकारांना चिरपरिचित जगामधील असल्याने त्या नैसर्गिक आणि सजीव भासतात. मध्ययुगीन युरोपियन धार्मिक भित्तिचित्रातील व्यक्ती बोजड लाकडी बाहुल्यांसदृश भासतात. याचे उलट अजंटा येथील चित्रातील-प्रत्येक व्यक्ती हाडामांसाची वाटते. हेच येथील भित्तिचित्रांच्या सौंदर्याचे प्रमुख गमक मानता येईल.

या विशिष्ट दृष्टीने अजंटा येथील विशेष उल्लेखनीय व्यक्तिचित्रे पुढीलप्रमाणे होत:—स्वर्गीय किन्नरींचा समूह; संभाषणात रंगून गेलेली प्रणयी युगुले; राजशाही थाटामाटाने राजवाड्याच्या बागेमध्ये सहल करणारे राजाराणी आणि त्यांचे अनुचर; आपल्या अनुचरांच्या खांद्यावर पहुडलेली मरणोन्मुख राजकन्या.

अजंटा येथील प्रसंगचित्रांचे प्रातिनिधिक उदाहरण या नात्याने येथील गुफा क्र. १ मधील नागराजाचे द्रवीड राजाशी संभाषण हे चित्र उल्लेखनीय आहे. या चित्रात राजाच्या शेजारी राणी गंभीरपणे उभी आहे; राजाची उपपत्नी त्याच्याशी लगट करून त्याच्या मांडीवर दंड ठेवून संभाषणात भाग घेत आहे; भोवताली तत्पर सेविका उभ्या आहेत; त्यापैकी एकीच्या हाती असणाऱ्या मिष्टान्नाच्या ताटातील काही पदार्थ राजाचा विदूषक उचलून घेत आहे; आणि हे पाहणाऱ्या दासी अंगुलिविक्षेपाने त्याची चेष्टा करीत आहेत. चित्रकाराची मार्मिक निरीक्षणशक्ती आणि सूक्ष्म विनोदबुद्धी यांचा मनोहारी संगम या चित्रामध्ये झाला आहे.

४. निसर्गचित्रे—अजंटा येथील चित्रांमध्ये निसर्गाचे चित्रण अत्यंत निरीक्षणपूर्वक केलेले असले तरी निसर्गदृश्य या सदरात मोडेल अशा तऱ्हेचे एकहि चित्र येथे आढळत नाही.

५. स्त्रीप्रतिमा-अजंट्याच्या भित्तिचित्रांमधील स्त्रियांच्या सर्वच प्रतिमा अत्यंत मोहक आणि विविधतापूर्ण आहेत. अप्सरेपासून नागकन्येपर्यंत आणि राजकन्येपासून चामरधारिणीपर्यंत हरतऱ्हेच्या स्त्रियांची चित्रे येथे रंगविली आहेत. देशोदेशी प्रवास करून आलेल्या चित्रकारांनी ही चित्रे काढली असावीत.

अजंटा येथील गुफा क्र. १७ मधील राजकन्येचे प्रसाधन हे भित्तिचित्र या दृष्टीने प्रातिनिधिक वाटते. तिच्या डाव्या हातात वाटोळा आरसा आहे व उजव्या हाताच्या बोटाने ती कपाळावर कुंकुमतिलक लावण्याच्या तयारीत आहे. तिच्या शेजारी प्रसाधनसाधनांचे तबक घेतलेली दासी उभी असून दुसऱ्या बाजूस चामरे ढाळणारी अन्य एक दासी आहे. यापैकी प्रत्येक स्त्रीची उभे राहण्याची ऐट वेगळी आहे. प्रत्येकीची आकर्षकता वेगळी आहे. या तीन स्त्रियांच्या रूपाने तत्कालीन जगातील स्त्रीसौंदर्याची तीन स्वतंत्र प्रतीके चित्रकाराने साकार केली आहेत.

६. पशुचित्रे—व्यक्तिचित्रांप्रमाणेच अत्यंत गुणवत्तापूर्ण पशुचित्रे हेहि अजंटा येथील भित्तिचित्रांचे प्रमुख वैशिष्ट्य आहे. निर्दोष आकृती, चित्रप्रसंगाला उठाव देणारी रंगसंगती आणि सुसंवादी पार्श्वभूमी हे अजंटा येथील व्यक्तिप्रतिमांचे वैशिष्ट्य येथील पशुचित्रांमध्येहि आढळते.

अजंटा येथील गुफा क्र. १ मधील बैलांच्या टकरीच्या चित्रात प्रचंड वशिंडांच्या आणि पुष्ट शरीराच्या चवताळलेल्या बैलांचे अंगविक्षेप आणि चेहऱ्यावरील भाव यथातथ्यपणे चित्रांकित केले आहेत. याचे उलट गुफा क्र. १७ मधील गजजातकाच्या प्रसंगात हत्ती, हत्तीण आणि

## अजंटा गुफासमूहातील शिलालेख

| शिलालेख क्रमांक | उपलब्धिस्थान | संभाव्यकाल | शिलालेखकर्ता | शिलालेख |
|---|---|---|---|---|
| १. | गुफा क्र. १० | इ. स. पू. २ रे शतक | वसिष्ठीपुत्र कटहादि. | गुफेच्या प्रवेशद्वाराची (घरमुख) देणगी. |
| २. | | ,, ,, | धनामदड नामक व्यापारी. | चैत्यमंदिर (ठानक), निवासगुफा (उवरक) आणि सभामंडप (उपाश्रय) याची देणगी. |
| ३. | गुफा क्र. १६ | | वाकाटक राजा हरिषेण याचा प्रधान वराहदेव. | गुफा क्र. १६ ची देणगी [ वाकाटक वंशातील विंध्यशक्ति ( इ. स. २८५–३१० ) पासून हरिषेण ( इ. स. ५००–५२० ) पर्यंतच्या राजांची प्रशस्ती ]. |
| ४. | गुफा क्र. १७ | इ. स. ५ वे शतक (अन्त) | वाकाटक राजा हरिषेण याच्या मांडलीक राजाचा प्रधान. | वाकाटक वंशाची धृतराष्ट्र-कृष्णदास पर्यंतची वंशावळ. |
| ५. | गुफा क्र. २० चा स्तंभ | | कृष्णदत्ताचा पुत्र उपेन्द्रगुप्त | सभागृहाची ( मंडपाची ) देणगी. |
| ६. | गुफा क्र. २६ | | अश्मक देशाच्या देवराज आणि भव्विराज नामक अमात्याचा बौद्ध धर्मगुरू बुद्धभद्र | 'अचल' बौद्ध भिक्षूने स्थापलेल्या बौद्ध मठामध्ये विहाराची देणगी. |
| ७. | गुफा क्र. २६ चा बहिर्भाग | | भदन्त गुणकर | शाक्य भिक्षूच्या मूर्तीची देणगी. |
| ८. | गुफा क्र. २६ चा अंतर्भाग | | शाक्य भिक्षु संघमित्र | शिल्पाची देणगी. |

( बर्जेस, आर्कि. सर्व्हे. वे. इं. ४.११६–१३६ ).

## अजंटा भित्तिचित्रामधील चित्रलेख

अजंटा येथील भित्तिचित्रांचा खालच्या अंगास वर्तिकेने रंगविलेले काही संस्कृतभाषीय चित्रलेख असून ते इ. स. ५ व्या-६ व्या शतकातील महायानपंथीय बौद्ध भिक्षूंनी कोरले आहेत. अशा प्रकारचे वीसहून अधिक चित्रलेख एकट्या गुफा क्र. ९ या चैत्यमंदिरामध्ये असून अन्य गुफातहि काही लेख सापडले आहेत. यापैकी विशेष उल्लेखनीय चित्रलेख पुढीलप्रमाणे होत :—

| चित्र-लेख क्रमांक | उपलब्धिस्थान | संभाव्यकाल | चित्रलेखकर्ता | चित्रलेख |
|---|---|---|---|---|
| १. | गुफा क्र. ९ (भित्तिलेख) | इ. स. ५ वे शतक | शाक्य भिक्षु संघप्रिय | भिक्षुप्रतिमेची देणगी. |
| २. | ,, (स्तंभलेख) | ,, ,, | उपासक जसदेव | उभ्या बुद्धप्रतिमेची देणगी. |
| ३. | ,, ,, | ,, ,, | बौद्ध भिक्षु धर्मसेन | ,, ,, |
| ४. | ,, (भित्तिलेख) | ,, ,, | (उध्वस्त) | स्तूपप्रतिमेची देणगी. |
| ५. | ,, (स्तंभलेख) | ,, ,, | शाक्य भिक्षु भद्रसेन | उभ्या बुद्धप्रतिमेची देणगी. |
| ६. | गुफा क्र. १० | सातवाहन-कालीन | | ,, ,, |
| ७. | ,, (स्तंभलेख) | इ. स. ६ वे शतक | सचिव येथील......नामक आचार्य | ,, ,, |
| ८. | ,, ,, | | शाक्य भिक्षु दृढधर्म | ,, ,, |
| ९. | ,, ,, | | चेतिकयरिक | ,, ,, |
| १०. | ,, ,, | | सुदत्त | स्तंभाची देणगी. |
| ११. | ,, ,, | | शाक्य भिक्षु संघगुप्त | बुद्धप्रतिमेची देणगी. |
| १२. | ,, ,, | | शाक्य भिक्षु शीलभद्र | ,, ,, |
| १३. | ,, ,, | इ. स. ६ वे शतक | शाक्य भिक्षु दापुक | ,, ,, |
| १४. | ,, ,, | ,, ,, | शाक्य भिक्षु धर्मदत्त | ,, ,, |

याशिवाय गुफा. क्र. २, १७ आणि २२ मध्येहि काही चित्रलेख रंगविले आहेत (बर्जेस, अर्कि. सर्व्हे. वे. इं. १३६-१३८).

त्यांचा छावा यामधील वात्सल्यप्रसंग कलात्मकतेने रंगविला आहे. प्रेमात आलेले हत्ती परस्परांच्या गंडस्थलावर कमळे ठेवीत असल्याचे, तसेच एकमेकांना सोंडेने कुरवाळीत असल्याचे दृश्य येथे दिसते.

७. जातककथा—बुद्धाच्या पूर्वजन्मावरील जातककथा चित्रित करणारी अनेक चित्रे अजंटा येथे आढळतात. त्यापैकी गुफा क्र. १० मध्ये सातवाहन शैलीने चित्रित केलेला 'छदन्त जातका'चा प्रसंग विशेष कलात्मक असून त्यामध्ये हत्ती आणि हत्तिणी यांच्या जंगलातील लीला, शिकार, दंतप्राप्ती, राणीची मूर्च्छा व सांत्वन हे सारे ऐतिहासिक प्रसंग सजीवपणे चित्रित केले आहेत.

८. बुद्धजीवनातील प्रसंग—अजंटा येथील भित्तिचित्रांमधील बुद्धजीवनातील निम्नलिखित प्रसंगचित्रे उल्लेखनीय आहेत :—१. गृहस्थाश्रमी बुद्धाला झालेले जरा, आजार, मृत्यु आदि जीवनापदांचे दर्शन; २. गौतम बुद्धाने मिळविलेला मारविजय. ३. देवदत्ताने पिसाळलेल्या हत्तीद्वारा केलेला बुद्धहत्त्येचा प्रयत्न. ४. गौतम बुद्ध आपल्या घरी भिक्षा मागण्यासाठी आला असता त्याचा पुत्र राहुल याने केलेले भिक्षादान.

उपरोक्त चित्रांपैकी क्र. ४ चे चित्र अजंटा येथील सर्वोत्कृष्ट चित्र मानले जाते. या चित्रामध्ये गौतम बुद्धाची सुमारे १३′ उंचीची प्रतिमा असून, त्याच्या समोरच्या

अंगास बुद्धपत्नी यशोधरा आणि पुत्र राहुल यांच्या छोट्या प्रतिमा रंगविल्या आहेत. एका अज्ञात भिक्षूला भिक्षा वाढण्यासाठी यशोधरा आणि राहुल घराबाहेर आले आणि गौतम बुद्धाचे त्यांना दर्शन झाले. या प्रसंगातील नाट्य या चित्रामध्ये अत्यंत यशस्वीपणे चित्रांकित केले आहे.

**उत्तरकालीन चित्रे**--अजंटा येथील गुफा क्र. १,२,१९, आणि २१ या उत्तरकालीन गुफांतील भित्तिचित्रे चालुक्य राज्यकालातील (इ. स. ७ वे शतक) आहेत. ही चित्रे इ. स. ४ थ्या-५ व्या शतकातील चित्रांप्रमाणेच सुबक असली तरी त्यामधील व्यक्तींचे हावभाव अनैसर्गिक आहेत. अर्धे मिटलेले डोळे, वक्र हातपाय, अत्यंत सडपातळ शरीरे आणि त्यांवरील प्रमाणाबाहेर मोठे स्तन यांमुळे ही चित्रे कमालीची कृत्रिम वाटतात. या चित्रांपैकी बहुतांशी चित्रे रंगचित्रे न वाटता रेखाचित्रे वाटतात. त्यापैकी अनेक चित्रे स्टेन्सिल्सच्या साह्याने रंगविली असावीत.

चित्रातील उपरोक्त सारी वैगुण्ये नेत्रदीपक वासनामयता, आणि कुरळे केस, रत्नालंकार आणि सुंदर कपडे या बाह्यालंकरणाच्या साह्याने लपविण्याचा प्रयत्न येथे दिसतो. ज्या भिक्षुगृहांच्या सजावटीसाठी ही चित्रे रंगवली आहेत, त्यामधील तापसी जीवनाला सर्वस्वी विशोभित अशी ही चित्रे आहेत. या चित्रातील प्रणयी युगुले आणि त्यांचे प्रणयासक्त वर्तन ही जातककथांशी दूरान्वयानेहि संबंधित नाहीत. ठराविक मुदतीत गुफांमधील चित्रकलेचे काम संपविण्यासाठी येथील कलाकारांनी वेश्यागृहात उपयोजिण्याचे ठराविक साच्याचे प्रसंग येथे यांत्रिक पद्धतीने चित्रांकित केले असावेत, असे काही अभ्यासक मानतात. तसे नसेल तर ही सारी चित्रे तत्कालीन बौद्ध धर्माच्या नैतिक अवनतीची प्रात्यक्षिके मानावी लागतील.

**गुफालेख आणि चित्रलेख**--अजंटा येथील गुफांमध्ये अनेक उल्लेखनीय शिलालेख आणि चित्रलेख सापडले आहेत. त्यापैकी शिलालेख ऐतिहासिक दृष्टीने विशेष महत्त्वाचे आहेत (परिपत्रके पहा).

**अजतुङ्ग** (तीर्थ)--एक तीर्थस्थान (वायु. ७७. ४८).

**अजनाभ** (वर्ष)--पौराणिक साहित्यात निर्देशिलेले भारतवर्षाचे नामांतर (भा. ५.४.३;७.३). 'अजनाभ'चा शब्दशः अर्थ 'ब्रह्मदेव' असा होतो. त्याचे नावावरून भारतवर्षास हे नाव प्राप्त झाले असावे.

कालांतराने आग्नीध्र राजाच्या नऊ पुत्रांपैकी नाभि नामक पुत्रास या देशाचे राज्य प्राप्त झाले. तेव्हापासून हा विशिष्ट देश 'नाभिवर्ष' या नावाने ओळखला जाऊ लागला (विष्णु. २.१; भारतवर्ष पाहा).

२. (पर्वत) वायव्य भारतातील अंजनागिरि नामक पर्वताचे नामांतर (म. अनु. १६५.३२; अंजनागिरि पहा).

**अजपथ** (मार्ग)—बृहत्कथेमध्ये निर्देशिलेला सुवर्णभूमी (ब्रह्मदेश) देशाच्या मार्गावर वसलेला एक अरुंद मार्ग (बृहत्कथा. १८.४१६).

**नामव्युत्पत्ती**--'अजपथ'चा शब्दशः अर्थ 'केवळ बोकडच प्रवास करू शकतील इतका अरुंद रस्ता' असा होतो. पाणिनीच्या अष्टाध्यायीमध्ये दिलेल्या विभिन्न पथप्रकारांमध्ये अजपथचा निर्देश आढळतो (पा. सू. ५.३.१००).

कात्यायनाच्या वार्तिकातहि या पथप्रकाराचा निर्देश असून या विशिष्ट रस्त्याने आणलेला माल 'अजपथिक' या नावाने ओळखला जात असे. पाली 'महानिद्देस' ग्रंथातहि 'अजपथ'चा निर्देश आढळतो (महा. १.१५४-१५५; २.४१४-४१५).

बृहत्कथेमध्ये—सुवर्णभूमी देशाकडे पर्वत आणि दरीखोरी यांमधून जाणाऱ्या पर्वतीय रस्त्याचा अरुंद भाग 'अजपथ' नावाने ओळखला जात असे. आपल्या बरोबरचे सामान बोकडांवर लादून व्यापारी प्रवाशांना या रस्त्यामधून मार्गक्रमण करावे लागत असे. म्हणून त्यास अजपथ हे नाव प्राप्त झाले होते (मुजुमदार, सुवर्णद्वीप १.५६-६०).

**अजपुर** (देशविभाग)— शिलालेखसाहित्यात निर्देशिलेला दक्षिण बिहारमधील राजगृह विषयातील एक 'नय' (उपराज्यविभाग) (एपि. इंडि. १७.३१०-३२७). नालंदा गावानजीकच्या आधु. अजपुर गावासभोवतालचा प्रदेश या उपविभागात समाविष्ट होत असावा. या राज्यविभागात मनिवाटक (आधु. मनिअवन) नामक ग्राम वसले होते.

गुप्त सम्राट स्कंदगुप्ताच्या बिहार स्तंभलेखातहि बिहार (पटना जिल्ह्यातील आधु. बिहार) गावी उभारलेल्या एका 'यूपा' प्रीत्यर्थ या गावातील उत्पन्नाचा काही भाग दान दिल्याचा निर्देश आढळतो (फ्लीट, कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.५२).

**अजबिल** ( तीर्थ )--श्री पर्वतावरील एक तीर्थस्थान ( लिंग. १.९२.१५३ ).

**अजमती** ( नदी )--बौद्ध साहित्यात निर्देशिलेले बिहारमधील अजयमती ( आधु. अजया ) नदीचे नामांतर ( अजयमती पहा ).

**अजमीढ** ( देशविभाग )—पतंजलीच्या व्याकरण-महाभाष्यात 'अजक्रंद' देशासमवेत निर्देशिलेला साल्व जनपदाचा एक 'अवयव' ( उपविभाग )( पतञ्जलि. ४.१. १७०; अजक्रंद पहा ). काशिका ग्रंथातहि एक छोटे जनपद ( जनपदावधि ) या नात्याने या देशाचा निर्देश आढळतो ( का. ४.२.१२५ ).

**अजमेर राष्ट्र** ( देशविभाग )—भविष्य पुराणात निर्देशिलेला भारतवर्षाचा एक देशविभाग ( भवि. प्रति. २.१२ ). राजस्थानमधील अजमेर नगराच्या परिसरातील भाग म्हणजे हा देश असावा. अजयमेरु ( आधु. अजमेर ) नगरावरून या प्रदेशास 'अजमेर राष्ट्र' हे नाव प्राप्त झाले असावे ( अजयमेरु पहा ).

शिलालेखसाहित्यात या देशाचा निर्देश 'सपादलक्ष' ( सव्वा लाख ग्रामांनी युक्त ) या नावाने केला आहे ( एपि. इंडि. २.४२२; सपादलक्ष पहा ).

**अजय** ( देश )—पूर्व भारतातील एक देश ( ब्रह्माण्ड. १६.५३ ).

२. ( नदी )--दंडिमहादेवी राणीच्या इ. स. ७८६ मधील संतिरग्राम ताम्रपटात निर्देशिलेली नैर्ऋत्य बंगाल-मधील बरद्वान परगण्यातील एक नदी. या नदीच्या खोऱ्यात 'राधा' देश वसला असून, तेथील जयावली नामक राजकन्येचा विवाह ओरिसातील भौमकरवंशीय शिवकर ( प्रथम ) राजाशी झाला होता ( एपि. इंडि. २९.८१ ).

**अजयगढ** ( देशविभाग )--उत्तर प्रदेशातील एक देशविभाग. देवदत्त भांडारकर यांच्या मते इ. स. १२ व्या शतकात उत्तर प्रदेशान्तर्गत बांदा जिल्ह्याचा प्रदेश अजयगढ प्रदेश या नावाने ओळखला जात असे ( इंडि. अँटि. १९.३७ ).

स्थानिक समजुतीनुसार रघुवंशातील सुविख्यात अज राजाच्या नावावरून त्या प्रदेशास 'अजगढ' अथवा 'अजयगढ' असे नाव प्राप्त झाले होते. बांदा जिल्ह्यातील आधु. अजयगढ गावी इ. स. ११८७ चा एक शिलालेख सापडला आहे. तसेच या प्रदेशाच्या दक्षिण भागात बौद्ध, जैन, हिंदु देवतामूर्तींचे अनेक शिल्पावशेष सापडले आहेत.

अजयगढ गावी खजुराहो स्थापत्यशैलीने बांधलेली चार मंदिरे आणि तीन सरोवरे असून येथील पर्वताच्या माथ्यावर 'अज सरोवर' नामक एक सरोवर आहे.

येथील पर्वताच्या उतारावर एका विशाल गुफेमध्ये भूतेश्वर नामक एक शिवलिंग असून अज राजाचे तपस्या स्थान म्हणून ते पवित्र मानतात.

**अजयपुर** ( बौद्धस्थान )--गया जिल्ह्यातील बोधगया गावानजीकचे एक बौद्धस्थान. बोधगया गावाच्या समोरच्या अंगास लिलजन नदीच्या पूर्व किनाऱ्यावर वसलेले आधुनिक बक्रोर गाव ते हेच होय ( आर्कि. सर्व्हे. १.१२ ).

या स्थानाचे प्राचीन नाव अजयपुर असावे असे कनिंगहॅम म्हणतात. परंतु त्यासंबंधीचा ग्रांथिक पुरावा अन्यत्र कोठेहि सापडत नाही.

या ठिकाणी बौद्धकालीन स्तंभांनी युक्त बौद्ध वास्तूंचा 'कतनि' नामक अवशेषसमूह आढळतो. तसेच गौतम बुद्धाच्या प्रतिमा कोरलेल्या अनेक मुद्राहि या ठिकाणी सापडतात. यावरून बोधगया येथील बोधिमंदिराशी या स्थानाचा प्राचीन काळी काही ना काही संबंध असावा (पांडे, बिहार पृ. १३४ ).

**अजयमती** ( नदी )--बिहारमधील एक नदी. संथाळ परगण्यातून वाहात जाणारी आणि बंगालमधील बरद्वान जिल्ह्यातील कटवा गावानजीक भागीरथी नदीस जाऊन मिळणारी आधुनिक अजया नदी ती हीच होय. बंगालमधील बरद्वान आणि वीरभूम जिल्ह्यांची नैसर्गिक सरहद्द या नदीमुळे बनते.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नदीची निम्नलिखित नामांतरे आढळतातः--१. अजया, अजयी, अजस (गालव तंत्र, एशियाटिक रिसर्चेस् १४.४०२ ); २. अम्यस्तिस् ( ग्रीक साहित्य, मेगॅस्थेनिस ); ३. अजमती ( बौद्ध साहित्य ).

**मेगॅस्थेनिसच्या ग्रंथात**--या ग्रंथात या नदीचा निर्देश 'अम्यस्तिस्' नावाने केला असून ही नदी 'कतदुप' ( संस्कृत 'कतद्वीप' = आधु. कटवा ) गावाजवळून वाहात असे ( अरियन, इंडिका ४; मॅक्रिंडल, पृ. १९१ ). या ग्रंथात निर्देशिलेले 'अम्यस्तिस्' हे नाव संस्कृत 'अजयमती'चे अपभ्रष्ट रूप असावे.

**जयदेवाचे जन्मस्थान**--सुविख्यात संस्कृत कवी जयदेव याचा जन्म या नदीच्याकाठी वसलेल्या वीरभूम जिल्ह्यातील केंदुलि गावी झाला होता.

**अजयमेरु** ( नगर )—चाहमाण राजा सोमेश्वर याच्या इ. स. ११४८ च्या बिझोली शिलालेखात निर्देशिलेले मध्य भारतातील एक नगर (एपि. इंडि. २६. ९३–१०७). राजस्थानमधील आधु. अजमेर गाव ते हेच होय. स्थानिक समजुतीनुसार हे गाव तत्पूर्वकाली ‘अवभृतिपुरी’ या नावाने ओळखले जात असे.

अन्य एका शिलालेखाच्या मते चाहमाण राजा अजयदेव ऊर्फ अजयराज याने इ. स. ११००–११२५ च्या दरम्यान या नगराची स्थापना केली ( इंडि. अँटि. १६. १६३). अजयराजच्या नावावरूनच या नगरास ‘अजयमेरु’ असे नाव प्राप्त झाले असावे.

उषवदाताच्या नासिक गुफालेखात ( शिलालेख क्र. १० ) आधु. अजमेरपासून ६ मैल पश्चिमेस असणाऱ्या पोक्षर ( आधु. पुष्कर ) सरोवराचा निर्देश आढळतो ( ल्यूडर्स, क्र. ११३१; एपि. इंडि. ७.५८ ). त्यावरून इ. स. २ च्या शतकाच्या काळापासून अजमेर गावाचा परिसर पवित्र तीर्थस्थान या नात्याने सुविख्यात दिसतो. भविष्य पुराणात या परिसराचा निर्देश ‘अजमेर राष्ट्र’ या अर्वाचीन नावाने केला आहे ( भवि. प्रति. २.१२ ).

**अर्जया** ( नदी )--गालवतंत्रात निर्देशिलेले बिहारमधील अजयमती ( आधु. अजया ) नदीचे नामांतर ( विल्फोर्ड, एशियाटिक रिसर्चेस् १४.४०२; अजयमती पहा ). अन्य नामांतरे–‘अजेयी’; ‘अजस्’.

**अजस्तुन्द** ( नगर )-- पाणिनीच्या अष्टाध्यायीत निर्देशिलेले एक नगर ( पा. सू. ६.१.१५१ ).

**अजागन्धकुण्ड** ( तीर्थ )--अवंतिक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( स्कन्द. आवन्त्य. १.२८.४५ ).

**अजाद** ( देश )--पाणिनीच्या अष्टाध्यायीत निर्देशिलेले एक जनपद ( पा. सू. ४.१.१७१ ). याच्या नावावरून हा प्रदेश बकऱ्यांसाठी प्रसिद्ध असावा असे दिसते. आधु. इटावा प्रदेश तो बहुधा हाच असून जमनापारी जातीच्या बकऱ्यांसाठी आजहि तो सुविख्यात आहे.

**अजादेवी** ( देवी )—प्रभासक्षेत्रान्तर्गत एक देवी (ज्ञानशक्ति) स्थान ( स्कन्द. प्रभास. १.५९ ).

**अजापालेश्वरी** ( देवी )--प्रभासक्षेत्रान्तर्गत देवी ( क्रियाशक्ति ) स्थान ( स्कन्द. प्रभास. १.५८ ). स्कंद पुराणात अन्यत्र या स्थानाचे माहात्म्य सविस्तरपणे दिले आहे ( स्कन्द. प्रभास. १.२८७ ).

२. हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक देवीस्थान ( स्कन्द. नागर. ९५ ).

**अजावन** ( नगरदेवता )--कुरुक्षेत्रान्तर्गत चार नगरदेवतांपैकी एक. अन्य तीन नगरदेवतांची नावे पुढीलप्रमाणे होत :--१. नृपति; २. महादेव; ३. पावक ( वामन. २२.४१ ).

**अजितवती** (नदी)--उत्तर प्रदेशातील सरयू नदीच्या हिरण्यवती ( आधु. छोटी गंडक ) नामक उपनदीचे नामांतर.

बौद्ध साहित्याच्या मते ही नदी कुशीनगर ( आधु. कसिय ) या बुद्धपरिनिर्वाणस्थानाच्या उत्तरेस वाहात असे ( हिरण्यवती पहा ).

**अजिरवती** ( नदी )--पाणिनीच्या अष्टाध्यायीत निर्देशिलेले उत्तर भारतातील ‘अचिरवती’ (आधु. रावी) नदीचे नामांतर ( पा. सू. ६.३.११९; अवदान शतक. १.६३; २.६०; अचिरवती पहा ).

**अजीगर्तेश्वर** ( लिंग )-- प्रभासक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंगस्थान ( स्कन्द. प्रभास. १.१९१ ).

**अजेश्वर** ( लिंग )--वाराणसी येथील एक शिवलिंगस्थान ( लिंग. १.९२.१३६ ).

**अझगरमलै** (वैष्णवस्थान)--तामीळनाडमधील मदुरा गावानजीकचे सुविख्यात पर्वतीय विष्णुमंदिरस्थान. मदुरेपासून १२ मैल ईशान्येस असणाऱ्या या टेकडीवर ‘सौंदरराज पेरुमल’ ऊर्फ ‘अझगर’ (सुंदर) याचे देवालय बांधलेले आहे. हे मंदिर अत्यंत निसर्गरम्य अशा वातावरणात असून त्याच्या दक्षिणेस १० मैल लांबीची आणि १०००′ उंचीची टेकडी आहे.

**नामांतर**– कल्लझगर ( कल्ल जमातीचे आराध्य दैवत).

**महाभारतात**— स्थानिक समजुतीनुसार महाभारतात निर्देशलेले ‘वृषप्रस्थगिरि’ हे तीर्थस्थान ते हेच होय. यमाने या स्थानी यमधर्माच्या ( वृष ) रूपाने विष्णूची उपासना केली म्हणून या स्थानास ‘वृषप्रस्थगिरि’ असे नाव प्राप्त झाले. या स्थानाचे माहात्म्य कथन करणारा ‘वृषप्रस्थमाहात्म्य’ नामक एक माहात्म्यग्रंथहि उपलब्ध आहे.

**विष्णुप्रतिमा**--या स्थानी असणारी विष्णुप्रतिमा सुदर्शन चक्रप्रक्षेपण करीत असल्याच्या अवस्थेतील असून ती अपरंजि नामक दुर्मीळ सोन्यापासून बनविली आहे. दक्षिण भारतामध्ये त्रिवेंद्रम् गावीच केवळ अशा प्रकारच्या सोन्याची प्रतिमा आढळते.

**तिरुमल नायकाचे स्थापत्य**—मदुरा येथील सुविख्यात राजा तिरुमल नायक याचा या टेकडीच्या परिसरामध्ये ‘अझगपुरी’ नामक राजप्रासाद होता. या राजप्रासादा-

सभोवताली एक तटबंदीयुक्त नगरहि त्याने वसविले होते. अझगरमलै मंदिराच्या रस्त्यावर या नगराचे अवशेष आजहि आढळतात.

येथील मंदिराच्या आवारात तिरुमल नायकाने बांधलेला सभामंडप असून त्याची रचना मदुरा येथे याच राजाने बांधलेल्या मंडपासदृश आहे. मंदिराच्या पश्चिमेस सिलंबर नामक छोटी नदी वहाते.

आळवारांचे तीर्थस्थान--'परिपाडल' (इ. स. १-४ शतक) या तामीळ ग्रंथात या मंदिराचा निर्देश असून दक्षिण भारतातील बारा आळवार वैष्णव संत या तीर्थस्थानाच्या दर्शनार्थ आले होते. त्यांनी अझगर विष्णूच्या स्तुत्यर्थ रचलेली एकशे तेवीस कवने तामीळ-भाषीय वैष्णवपंथीयांचा वेदग्रंथ 'नलयिर दिविय प्रबन्दम्' या स्तोत्रसंग्रहात समाविष्ट केली आहेत.

पांड्य राजांचे उपास्य दैवत—मदुरेचे पांड्य राजे आणि उत्तरकालीन नायक राजे अझगर विष्णूचे परम उपासक असून त्यांनी येथील मंदिरे बांधण्यासाठी अगणित द्रव्य खर्च केले होते. इ. स. १८ व्या शतकाच्या मध्यास हैदरअलीने हे मंदिर लुटले. त्यामुळे शतकानुशतके संचित झालेली या मंदिराची सारी चीजवस्तू नष्ट झाली.

अन्य मंदिरे--या टेकडीवर मुख्य विष्णुमंदिराशेजारीच सुब्रह्मण्याचे (कार्तिकेय) एक मंदिर आहे. दक्षिण भारतातील सुब्रह्मण्याच्या सहा प्रमुख मंदिरांमध्ये त्याची गणना होते. याखेरीज गणपती, कालभैरव आदि देवतांची छोटी मंदिरेहि या स्थानी आहेत (दास, तामीळनाड पृ. ८८-९३).

**अझारा** (जैनस्थान)--सुमतिसागराच्या तीर्थजयमालेमध्ये निर्देशिलेले श्वेतांबर जैनांचे सौराष्ट्रातील तीर्थस्थान. सौराष्ट्राच्या दक्षिण परिसीमेवरील उना या रेल्वेस्थानकापासून हे स्थान दोन मैल अंतरावर आहे.

या स्थानी पार्श्वनाथाचे एक देवालय असून इ. स. ९६४ मधील एक शिलालेख तेथे कोरला आहे (तीं. सं. पृ. ११४).

**अञ्चेश्वर** (लिंग)--तापी नदीकाठचे एक शिवलिंग-स्थान (तापीमाहात्म्य).

**अञ्चोलद्विचर** (देश)--मेरु पर्वतावर उगम पावणाऱ्या सप्तगंगांपैकी पश्चिमवाहिनी सीता नदीच्या मार्गावरील एक देश (ब्रह्माण्ड. १८.४५).

**अञ्जन** (तीर्थ)--ब्रह्मपुराणान्तर्गत गौतमी नदीच्या माहात्म्यात निर्देशिलेले दक्षिण भारतातील एक तीर्थस्थान (ब्रह्म. ८४.२; ४). गौतमी नदीच्या उगम नजीकच्या ब्रह्मगिरि पर्वताजवळ हे तीर्थस्थान होते. नामांतर—'पैशाचक तीर्थ'.

२. (पर्वत) वायव्य भारतातील अंजनागिरी पर्वताचे नामांतर (बृ. सं. १४.५; मार्कं. ५२.१०; अंजनागिरि पहा).

**अञ्जनवन** (वन)--बौद्ध साहित्यात निर्देशिलेले साकेत नगरामधील एक वन (मललसेकर, १.४०-४१; संयुत्त. १.५४; ५.३३). या ठिकाणी असणाऱ्या मृग-वनात गौतम बुद्ध कधीकधी विश्रांतीसाठी येऊन बसत असे. अनेक जातीच्या वृक्षांनी हे वन बहरले होते (समन्त. १.११).

गौतम बुद्धाच्या 'साकेत सुत्त' आणि 'साकेत जातक' चे प्रणयन याच वनामध्ये झाले होते (संयुत्त. ५.२१९; जातक. १.३०८); तसेच कुंडलिय नामक एका फिरस्त्या साधकाशी धर्मचर्चाहि केली होती (संयुत्त. १.५४).

**अञ्जना** (नदी)--एक पवित्र नदी (ब्रह्म. सू. ११.३९).

**अञ्जनागिरि** (पर्वत)-- पाणिनीच्या गणपाठात निर्देशिलेला वायव्य भारतातील एक पर्वत (पा. सू. ६. ३. ११७). अग्रवाल यांच्या मते वायव्य भारतातील आधु. सुलेमान पर्वत तो हाच असून प्राचीन साहित्यात निर्देशिलेला 'त्रिककुद' पर्वत म्हणजे याच पर्वताच्या तीन शाखा होत.

जयचंद्र विद्यालंकार यांच्या मते आधु. सुलेमान पर्वत आणि त्याच्याशी समांतर वसलेले शीनगर आणि टोबा-काकड हे तीन पर्वत वैदिक काळी 'त्रिककुद पर्वत' या नावाने ओळखले जात असत (जयचंद्र, भारतभूमी पृ. १२९; त्रिककुद पहा).

पाठभेद आणि नामांतरे--प्राचीन साहित्यात या पर्वत-नामाचे निम्नलिखित पाठभेद आणि नामांतरे आढळतातः-

१. अंजनगिरि (बृ. सं. १४.५); २. अंजन (मार्कं. ५२.१९); ३. अजनाभ (म. अनु. १६५.३२).

नामव्युत्पत्ती--या पर्वतावर उत्पन्न होणाऱ्या अंजना-मुळे या पर्वतास हे नाव प्राप्त झाले होते (अग्रवाल, पाणिनी. पृ. ४५).

पाणिनीच्या गणपाठात--भारताच्या वायव्य परिसीमेवर अफगाणिस्तानपासून बलुचिस्तानपर्यंत उत्तरदक्षिण पसर-लेल्या बृहदाकार पर्वतमालिकेचा अंजनगिरि हा एक भाग असून, पाणिनीच्या गणपाठात निर्देशिलेले या पर्वतमालिके-तील विभिन्न पर्वत पुढीलप्रमाणे होतः- १. शाल्वकागिरि

( आधु. ङ्गाला पर्वत ); २. अंजनागिरि ( आधु. सुलेमान पर्वत ); ३. भंजनागिरि ( आधु. कोह–इ–बाबा पर्वत ); ४. लोहितागिरि ( आधु. हिंदुकुश पर्वत ); ५.कुक्कुटागिरि (आधु. अफगाणिस्तानमधील छोट्या टेकड्यांची मालिका).

**भौगोलिक माहिती**--डेरा इस्माईलखानपासून अरबी समुद्रापर्यंतचे सिंधु नदीचे खोरे ( वायव्य सरहद्द प्रांत आणि पंजाब ) आणि बलुचिस्तान यांच्या दरम्यान पसरलेल्या वायव्य भारतातील बृहदाकार पर्वतसमूहाचे उत्तरेकडील टोक अंजन पर्वताने बनले असून, प्राचीनकाळी ही सारी पर्वतश्रेणी हिमालय पर्वताचा भाग मानली जात असे.

सुलेमान पर्वत हा उत्तरेस गोमल नदी आणि दक्षिणेस सिंधु नदी यांच्या दरम्यान पसरलेला आहे. हा पर्वत उत्तरेस विशेष उंच असून दक्षिणेस त्याची उंची क्रमाक्रमाने कमी होत जाते. बलुचिस्तान आणि भारत यांना जोडणाऱ्या अनेक खिंडी या पर्वतामध्ये असून 'तक्त-इ-सुलेमान' (उंची. ११२९५') हे त्याचे सर्वोच्च शिखर मानले जाते.

**बृहत्संहितेमध्ये**—या ग्रंथात, तसेच बार्हस्पत्य अर्थशास्त्रात कूर्माच्या मुखानजीक ( पूर्व भारतात ) वसलेला एक पर्वत या नात्याने अंजन पर्वताचा निर्देश आढळतो ( बृ. सं. १४.५; ५५.११ ). अग्रवाल यांच्या मते हा पर्वत, तसेच त्यांच्या पाठोपाठ निर्देशिलेला माल्यवत्‌गिरि हे दोन पर्वत वस्तुतः पश्चिम भारतातील असून, पूर्व भारतातील पर्वत या नात्याने बृहत्संहितेमध्ये करण्यात आलेला त्यांचा निर्देश चुकीचा आहे. कारण पाणिनीय गणपाठाच्या परंपरेचे अनुकरण करूनच या दोन पर्वतांचा निर्देश बृहत्संहितेमध्ये केलेला दिसतो.

**बौद्ध आणि जैन साहित्यात**--महावनान्तर्गत एक पर्वत या नात्याने या पर्वताचा निर्देश बौद्ध जातकात आढळतो ( जा. ५.१३३ ). जैन आवस्सक-चूरणी ग्रंथातहि या पर्वताचा निर्देश केला आहे ( आवस्सक. पृ. ५१६ ).

**पौराणिक साहित्यात**--मेरूच्या पश्चिम भागात वसलेला एक पर्वत या नात्याने या पर्वताचा निर्देश पौराणिक साहित्यात आढळतो ( मार्कं. ५२.१०; वायु. ३६.२८ ). हा पर्वत सुवर्णयुक्त असून (स्कन्द. माहेश्वर. १.३६–४८), येथे असित ऋषीने युधिष्ठिराला उपदेश केला होता ( म. स. ६९.१३ ).

या पर्वतावर निवास करणारे आपले अनुयायी सुग्रीवाने सीताशोधाच्या कार्यार्थ बोलावून घेतले होते ( वा. रा. कि. ३७.५ ).

**अञ्जनावती** ( नगर )—शिलालेखसाहित्यात निर्देशिलेले मध्य भारतातील एक नगर. विदर्भातील अमरावती गावापासून २२ मैल पूर्वेस चांदूर तालुक्यामध्ये हे गाव वसले आहे ( एपि. इंडि. २३.८ ).

**अञ्जनी** ( पवित्र गुफा )--मध्य भारतान्तर्गत छोटा नागपूर जिल्ह्यातील हनुमज्जन्मस्थान. छोटा नागपूर जिल्ह्यातील टोटोग्रामपासून ३ मैल अंतरावरील आंजनग्राम येथे ही गुफा असून स्थानिक समजुतीनुसार ती हनुमानाचे जन्मस्थान मानली जाते ( ती. १७८ ).

२. ( पवित्र पर्वत ) दक्षिण भारतातील एक पर्वतीय तीर्थस्थान. म्हैसूर राज्यातील हंपे गावानजीकच्या पंपा सरोवरापासून १ मैल अंतरावर हा पर्वत असून तो हनुमत्माता अंजनीचे निवासस्थान मानला जातो ( ती. ३०८ ).

३. ( मंदिरस्थान ) हनुमत्माता अंजनी हिचे हरिद्वार येथील मंदिरस्थान ( ती. ६४ ).

**अञ्जनेरि** ( शिलालेखस्थान )-- पृथ्वीचंद्र भोगशक्ती राजांच्या ताम्रपटांचे महाराष्ट्रातील नासिक जिल्ह्यातील उपलब्धिस्थान. आधुनिककाली हे तालुक्याचे गाव आहे ( एपि. इंडि. २५.२२५ ).

**अञ्जलिकाश्रम** ( तीर्थ )—अंगिरस्-तीर्थयात्रेत निर्देशिलेले एक तीर्थस्थान ( म. अनु. ५५.५२ ).

**अञ्जसी** ( नदी )—ऋग्वेदात निर्देशिलेली एक नदी ( ऋ. १.१०४.४ ).

**अटक** ( देश )—नकुलाच्या पश्चिम दिग्विजयात निर्देशिलेला वायव्य पंजाबातील एक देश. या दिग्विजयाचे वर्णनात निर्देशिलेले 'वृंदाटक' हे संभवतः एका जोडदेशाचे नाव असून, त्यामध्ये 'अटक' देशाचा निर्देश अभिप्रेत असावा ( म. स. २९.१०; वृंदाटक पहा ).

**अटलि** ( देश )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात निर्देशिलेला पश्चिम भारतातील एक देश. 'ओ–च–लि' नावाने या देशाचा निर्देश त्याने केला असून माळव देशाच्या नैर्ऋत्येकडील एका नदीचे मुख ओलांडून ५०० मैल वायव्येस गेल्यानंतर हा देश त्यास लागला. ह्युएन्त्संगच्या जीवनचरित्रात माळव देशाच्या वायव्येस हा देश वसल्याची मोघम माहिती दिली आहे.

**आधुनिक स्थान**—ह्युएन्त्संगने दिलेल्या संदिग्ध माहितीमुळे या देशाच्या भौगोलिक स्थानाविषयी निम्नलिखित मतांतरे आढळतात :—

**१. बील यांच्या मते**—कच्छच्या उत्तरेकडील आधु. उच्छ आणि बहवालपूर प्रदेशामध्ये हा देश वसला असावा.

२. कनिंगहॅम यांच्या मते--वायव्य भारतातील मुलतान गावानजीकचे आधु. अतरि गाव ते हेच असावे. वायव्य भारतातील ब्राह्मणाबाद गाव ते हेच असावे, असाहि तर्क कनिंगहॅम यांनी अन्यत्र व्यक्त केला आहे.

परंतु मध्य भारतातील मालव देश सोडून ह्युएन्त्संग एकाएकी वायव्य भारतात जाण्याची शक्यता फारच कमी वाटते.

३. वॉटर्स यांच्या मते--ह्युएन्त्संग या देशात प्रत्यक्ष गेला नसून, केवळ सांगोवांगी माहितीवर त्याने याची माहिती नमूद केली असावी.

ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात--ह्युएन्त्संगच्या मते या देशाचे एकूण क्षेत्रफळ १२०० मैल असून, त्याच्या राजधानीचे क्षेत्रफळ ४ मैल होते. येथील जमीन खारी आणि वालुकामय असून, हवा उबदार आणि वादळी होती. या देशातील लोक व्यापारी पेशाचे असून त्यांची भाषा आणि आचारविचार मालव देशातील लोकांप्रमाणे होते. येथे बौद्ध धर्माचा प्रसार फारच थोड्या प्रमाणात होता ( बील. २.४५६; वॉटर्स. २.२४३–२४४ ).

**अटवी** ( तीर्थ )—नर्मदा नदीकाठचे एक तीर्थस्थान ( पद्म. सृ. २१.३० ).

२. (नगर) सहदेवाच्या दक्षिण.दिग्विजयात निर्देशलेले कलिंग देशाच्या दक्षिणेस वसलेले एक नगर ( म. स. २८.४८. पाठ ).

**अटवीपाटक** ( ग्राम )—गुर्जर राजा दद्द ( द्वितीय ) याच्या इ. स. ६४२ मधील संखेडा ताम्रपटात निर्देशिलेले गुजरातमधील एक ग्राम. ताम्रपटातील निर्देशावरून हे गाव संगमखेटक (बडोदा जिल्ह्यातील आधु. संखेडा) गावानजीक वसले होते. यावरून आधु संखेडा गावाच्या परिसरातच कोठेतरी हे गाव वसले असावे (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.७६).

**अटवींशबर** (देश )--भरतखंडान्तर्गत एक देश ( म. भी. १०.४६ ). पाठभेद-' अटवीशेखर ' ( पद्म. सृ. ६.४३ ).

**अटव्येश्वर** ( लिंग )—तापी नदीकाठचे शिवलिंग-स्थान ( तापीमाहात्म्य ).

**अटेश्वर** ( लिंग )--हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंगस्थान ( स्कन्द. नागर. १२८ ).

**अट्टखण्डिक** ( देश )—उत्तर भारतान्तर्गत चर्मखडिक देशाचे नामांतर ( मत्स्य. १२४.४०; चर्मखंडिक पहा ).

**अट्टविरे** ( देशविभाग )—शिलाहार राजा भोज याच्या इ. स. ११९१ मधील एका दानपत्रात निर्देशिलेला महाराष्ट्रातील एक देशविभाग ( कंपण ). रत्नागिरी जिल्ह्यातील आधु. आडिवरे गाव ते हेच होय. या देशविभागातील कसेली नामक ग्रामाचा निर्देश उपरोक्त दानपत्रात आढळतो ( भा. इ. सं. मंडळ पत्रिका, शके १८३५, पृ. २२० ).

**अट्टहास** ( लिंग )—स्कंद पुराण काशीखंडात निर्देशिलेले ' त्रिलोचना 'च्या उत्तरेस वसलेले एक शिवलिंगस्थान. येथील महादेवाचे नाव महानादेश्वर असून, हे शिवलिंग उत्तरकालात काशी येथे आले ( स्कन्द. काशी. ६९.२२ ). येथील शिवलिंग 'अट्टहास' अशा वैकल्पिक नावाने ओळखले जात असे ( स्कन्द. काशी. ९७.३०; लिंग. तीर्थविवेचन. पृ. ४७ ).

स्कंद पुराण काशीखंडाच्या टीकाकाराने ' अट्टहास 'चे स्पष्टीकरण ' क्षेत्रविशेष ' असे दिले आहे.

२. ( शक्तिपीठ ) पूर्व भारतातील सुविख्यात शक्तिपीठ ( देवीस्थान ). बंगालमधील पूर्व रेल्वेच्या अहमदपूर–बरद्वान रेल्वेरस्त्यावरील आधु. लाभपूर गाव ते हेच होय. लाभपूर रेल्वेस्थानकानजीकच येथील देवीचे मंदिर आहे.

भारतातील एकावन्न शक्तिपीठांमध्ये या स्थानाची गणना होत असून, या स्थानी सतीचा अधरोष्ठ पडला ( पद्म. सृ. ११.६१; कुब्जिकातन्त्र. ७ ). येथील देवीचे नाव ' फुल्लरा ' आणि भैरवाचे नाव ' विश्वेश ' आहे.

३. ( पर्वत ) पौराणिक साहित्यात निर्देशिलेला हिमालय पर्वतान्तर्गत एक पर्वत ( वायु. २३.१९१ ). शिवाचे अवतारस्थान म्हणून हा पर्वत पवित्र मानण्यात येत असे ( शिव. शत. ५.२६ ).

४. ( देवीस्थान ) स्कंद पुराण अरुणाचलमाहात्म्यामध्ये निर्देशिलेले दक्षिण भारतातील अरुणाचलक्षेत्रान्तर्गत एक देवीस्थान. येथील देवीचे नाव ' अट्टाहासा ' होते ( स्कन्द. अरुणाचल. २.२ ).

५. वराह पुराणात निर्देशिलेले एक रुद्रस्थान ( वराह. १२२.१२; मत्स्य. २२.६८ ).

**अट्टाटहास** ( योगिनीस्थान )--स्कंद पुराणात निर्देशिलेल्या चौऱ्याऐंशी योगिनीस्थानांपैकी एक ( स्कन्द. काशी. ४५.४१ ).

**अट्टालय** ( देवीस्थान )—गुजरातमधील एक देवीस्थान. धर्मारण्यात मही–सागरसंगमानजीक वसलेले आधु. अट्टालज ग्राम ते हेच होय ( स्कन्द. माहेश्वर. २.६६. १०८–११० ).

पाठभेद—'अट्टालज'; 'अट्टालयाज'; 'अट्टालयिज'; 'अडालिज'; 'अड्यालज'; 'लुहाण'.

**अट्टालिका** (ग्राम)--राजतरंगिणीमध्ये निर्देशिलेले कश्मीर देशान्तर्गत लोहर (आधु. लोहरिन्) देशातील एक गाव (राज. ८.८३१; १८१९; १९९४). स्टाइन यांच्या मते लोहरिन् आणि गार्गि खोऱ्याच्या सीमारेषेवर लोहरिन् गावापासून ८ मैल दक्षिणेस लोहरिन् दुर्गस्थानानजीक वसलेले आधु. अटोलि गाव ते हेच होय.

याच ग्रंथात अन्यत्र 'अट्टिलिकापण' (अट्टिलिका गावाचा बाजार) नामक एका स्थानाचा निर्देश आढळतो (राज. ८.१९९१). स्टाइन यांच्या मते आधु. अटोली गावानजीक वसलेले मंडी गाव ते हेच असावे. 'मंडी' चा अर्थ पंजाबी आणि पहाडी भाषेत 'बाजार' असाच होतो (स्टाइन, राज. २.२९६).

**अट्ठकनगर** (नगर)—बौद्ध साहित्यात निर्देशिलेले वृजि संघराज्यातील अठ्ठिकनगराचे नामांतर (अठ्ठिकनगर पहा).

**अट्ठायिस-खण्ड** (देशविभाग)-- पूर्व गंग राजा राजराज (तृतीय) याच्या इ. स. ११९८ मधील दासगोबा ताम्रपटात निर्देशिलेला उत्कल (आधु. ओरिसा) देशान्तर्गत एक देशविभाग. पुरी जिल्ह्यातील कोणार्क भागातील आधु. अठाइसी परगणा तो हाच होय.

'अठ्ठायिस-खण्ड'चा शब्दशः अर्थ 'अठ्ठावीस गावांनी युक्त देशविभाग' असा होतो. हा देशविभाग 'उत्कल' देशातील 'सायिलो' उपविभागामध्ये वसला होता (एपि. इंडि. ३१.२५०; २५२-२५३).

**अठ्ठावय** (पर्वत)—जैन साहित्यात निर्देशिलेले 'कैलास' पर्वताचे नामांतर (कैलास पहा).

**अठ्ठिकनगर** (ग्राम)--बौद्ध आणि जैन वाङ्मयात निर्देशिलेले वृजि (आधु. उत्तर बिहार) संघराज्यातील एक ग्राम (मज्झिम. १.३४९; अंगुत्तर. ५.३४२). नामांतरे– 'अठ्ठकनगर'; 'अठ्ठियगाम'; 'अठ्ठिगाम'.

बागमती नदीच्या काठावर वसलेले आधु. हथगाव म्हणजे प्राचीन अठ्ठिकनगर असावे असे काही अभ्यासक मानतात (वीरविहारमीमांसा पृ. २३). परंतु उत्तर बिहारमधील ज्या मुजफ्फरपुर जिल्ह्यात हे गाव वसल्याचा निर्देश प्राचीन साहित्यात आढळतो, त्या भागातून बागमती नदी आजच नव्हे तर प्राचीन काळीहि वाहात नसल्याने हा तर्क विश्वसनीय वाटत नाही.

नामव्युत्पत्ती--जैन ग्रंथांच्या मते या ठिकाणी अस्थींच्या ढिगाऱ्यावर एक देवतामंदिर बांधले असल्याने या नगरास 'अठ्ठिगाम' (अस्थिग्राम) म्हणत असत (महावीरचरित्र पृ. ३३).

बौद्ध साहित्यात-- बौद्ध भिक्षु आनंद हा वैशाली नगरानजीकच्या वेलुवग्रामात येऊन राहिला असता अठ्ठकनगर येथील गौतम बुद्धाचा गृहस्थाश्रमी शिष्य देसम त्यास भेटला होता. त्यासमयी त्या दोहोंमध्ये झालेला संवाद 'अठ्ठकनगरसुत्त'मध्ये दिला आहे (मज्झिम. १.३४९–३५३; अंगुत्तर. ५.३४२-३४७).

भौगोलिक स्थान—हे ग्राम गंगा नदीच्या काठावर वसल्याचा निर्देश जैन साहित्यात आढळतो. परंतु पावा आणि वैशाली गावाच्या रस्त्यावर हे वसल्याचा निर्देशहि अन्यत्र आढळतो (श्रमण भगवान महावीर २.१.२९८–३००). त्यामुळे हे गाव गंगातटवर्ती असण्याची शक्यता वाटत नाही.

**अडिङ्ग** (तीर्थ) — व्रजमंडल-यात्रापरिक्रमेतील एक तीर्थस्थान.

**अडेल** (तीर्थ)—प्रयाग येथील गंगा-यमुना संगमानजीकचे वल्लभबैठकस्थान (ती. ५७६).

**अणहिलपाटक** (नगर)— शिलालेखसाहित्यात निर्देशिलेले गुजरातमधील अनहिलपट्टन (आधु. अनावडा) नगराचे नामांतर (इंडि. अँटि. १०.१५९–१६०; ११. ७१; २४२; अनहिलपट्टन पहा). अन्य नामांतरे— १. 'अणहिलपुर;' 'अणहिलवाडपाटन.'

**अणिघो** (जैनस्थान)—जयसागराच्या तीर्थजयमालेमध्ये निर्देशिलेले बागड प्रदेशातील जैनांचे तीर्थस्थान. या स्थानी पार्श्वनाथाचे एक मंदिर होते (ती. सं. पृ. ११४).

**अण्णीगेरि** (जैनस्थान)—दक्षिण भारतातील धारवाडा जिल्ह्यातील सुविख्यात जैनमंदिरस्थान. इ. स. १० व्य शतकात बांधलेल्या एका जैन मंदिराचे अवशेष येथे आहेत. इ. स. ११ व्या शतकात चोल राजा राजेंद्र याने हे मंदिर उध्वस्त केले, आणि त्यानंतर इ. स. १०७० च्या सुमारास ते पुनः बांधून काढण्यात आले (फर्ग्युसन. २.२३).

**अतल** (पाताल)--पौराणिक साहित्यात निर्देशिलेल्य; सप्तपातालांपैकी एक. प्रथम क्रमांकाचे पाताल म्हणून या ग्रंथात 'अतल'चा निर्देश सर्वत्र आढळतो (भा. ५.२४.७; विष्णु. २.५.२; शिव. उमा. १५.२२; वायु. ५०.११-

ब्रह्म. २१.२; ब्रह्मवै. १.७.१३; ब्रह्माण्ड. २०.११ ). पाठभेद—' तल ' ( भविष्य. १२६.१५ ).

मयपुत्र बल नामक मायावी असुर या पातालामध्ये निवास करीत असे ( भा. ५.२४.१६; पाताल पहा ).

**अतसी तिलकवन** ( वन )--जंबुद्वीपान्तर्गत मेरु पर्वतावरील एक वन ( वायु. ३८.६९ ).

**अतिकृष्णा** ( नदी )--भरतखंडातील एक नदी ( म. भी. १०.२३ ).

**अतिबलिन्** ( लिंग )--सातारा जिल्ह्यातील कृष्णा, वेण्या आदि नद्यांच्या उगमानजीकच्या 'महाबलेश्वर' शिवलिंगाचे नामांतर ( पद्म. उ. ११३.२९; महाबलेश्वर पहा ).

**अतिलाङ्गल** ( देश )--भरतखंडातील एक देश. स्कंद मते या देशात एक लक्ष पंचवीस हजार गावे होती (स्कन्द. माहेश्वर. २.३९.१३८ ).

**अतिसिन्धु**—भरतखंडातील एक देश. स्कंदमते या देशात दहा हजार गावे होती ( स्कन्द. माहेश्वर. ३९.१४६ ).

**अत्तिली** ( नगर )—शिलालेखसाहित्यात निर्देशिलेले दक्षिण भारतातील एक नगर. गोदावरी जिल्ह्याच्या पश्चिम भागातील तनुकु तालुक्यातील आधु. अत्तिली गाव ते हेच होय. चोल राजा अण्णदेव याने या नगराच्या सरहद्दीवर दक्षिण भारतातील अन्य साऱ्या राजांचा पराभव केला, आणि तदनंतर या गावाच्या तटबंदीच्या अंतर्भागात लपून बसलेल्या शत्रूच्या सैन्यापैकी दहा हजार लोकांना अभय दिले ( एपि. इं डि. २६.३७ ).

**अत्युग्रपुर** ( देश व नगर )--राजतरंगिणीमध्ये निर्देशिलेला कश्मीरच्या पश्चिम सरहद्दीवर वसलेला लढवय्ये लोकांचा एक देश ( राज. ८.३४०२ ). या देशाची राजधानीहि अत्युग्रपुर गावीच वसली होती.

कश्मीरच्या पश्चिमेस कृष्ण पर्वतानजीक उरशा ( आधु. हजारा ) देशाच्या वायव्य सरहद्दीवरील आधु. अग्रौर परगणा म्हणजे हाच देश होय. या प्रदेशाची राजधानीहि आधुनिक काळी अग्रौर याच नावाने ओळखली जाते.

प्राकृत साहित्यात या देशाचा निर्देश'ऐत्यगुर'या नावाने केलेला आढळतो.

**नामव्युत्पत्ती**--स्टाइन यांच्या मते या देशाचे आणि नगराचे आधु. 'अग्रौर' हे नाव संस्कृत अत्युग्रपुर → अत्त्युग्रपुर→प्राकृत आत्तुगौर →आयुग्रौर→औग्रौर → अग्रौर अशा पद्धतीने व्युत्पन्न झाले असावे (स्टाइन, राज. २.४३४ ).

**देश**—या देशातील शहदौर गावी शक राजा दमिजद आणि शिवरक्षित यांचे अनुक्रमे इ. स. पू. २५ आणि इ. स. १५ मधील खरोष्ठी शिलालेख आढळतात. त्यावरून या प्रदेशात आणि त्याशी संलग्न अशा हजारा देशात इ. स. १ ल्या शतकात शक साम्राज्य असावे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२१३ ).

**टॉलेमीच्या ग्रंथात**—उरशा देशातले एक गाव. या नात्याने या नगराचा निर्देश टॉलेमीने केला असून ते तक्षशिला ( आधु. शाहजी–की–ढेरी ) गावाच्या ईशान्येस अक्षांश ५५ उत्तर आणि रेखांश ४०° पूर्व; येथे वसले होते ( मॅक्रिंडल, टॉलेमी. ७.१.४५ ).

आधुनिक काळी शाहजी–की–ढेरीपासून अग्रौर हे गाव उत्तरेस ४०° अक्षांशावर वसलेले आढळते. तक्षशिलेपासून अग्रौराला जाणारा रस्ता ॲबटाबादवरून पूर्वेकडे वळून अग्रौरला जाऊन पोहोचतो. त्यामुळे टॉलेमीची उपरोक्त माहिती बरोबर वाटते.

**राजतरंगिणीमध्ये**—कश्मीरचा राजा जयसिंह (इ. स. ११२८–११४९ ) याने उरशा देशाच्या द्वितीय नामक राजाशी युद्ध करून हे नगर जिंकून घेतले होते ( स्टाइन, राज. २.२६७ ).

**अत्यन-बकेल** ( देश )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात निर्देशिलेला वायव्य भारतातील एक देश. ' अ तिएन्-पो-चि-लो ' नावाने या देशाचा निर्देश त्याच्या प्रवासवर्णनात केलेला असून आधु. सिंधु नदीचा त्रिभुज प्रदेश म्हणजे हा देश होय.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—सिंधु ( आधु. सिंध ) देशाहून ३००-३२० मैल नैर्ऋत्येस गेल्यानंतर ह्युएन्त्संग या देशास पोहोचला. ह्युएन्त्संगच्या जीवनचरित्राच्या मते सुराष्ट्र ( आधु. सौराष्ट्र ) देशाहून पश्चिमेस गेल्यानंतर तो या देशास जाऊन पोहोचला.

वॉटर्स आणि कनिंगहॅम यांच्या मते या देशाचे संस्कृतभाषीय नाव अनुक्रमे ' आदीनव-चिल ' आणि ' औदुम्बतिर ' असे असावे. प्राचीन सिंध देशाचा एक प्रांत म्हणजे हा देश असून त्याची राजधानी कच्छेश्वर या कच्छ देशास लागून असणाऱ्या गावी असावी, असे कनिंगहॅम म्हणतात.

**भौगोलिक वर्णन**—ह्युएन्त्संगच्या मते या देशाचे क्षेत्रफळ १००० मैल असून त्याच्या राजधानीचे क्षेत्रफळ

६ मैल होते. सिंधु नदीच्या पश्चिम किनाऱ्यावर समुद्राच्या काठी हा देश वसला असून सिंध देशाचाच तो मांडलीक मानला जात असे. समुद्राच्या सान्निध्यामुळे येथे दर्यावर्दी व्यापार पुष्कळच चालत असे. येथील जमीन सखल, दमट आणि क्षारयुक्त असून घरे सुबक बांधणीची होती.

या देशामध्ये ८० बौद्ध मठ असून त्यामध्ये हीनयान-पंथीय सम्मतीय संप्रदायाचे ५००० बौद्ध भिक्षु होते. गौतम बुद्धाच्या जीवितकाली या देशामध्ये त्याने अनेक वेळा संचार केला असून त्याचे स्मृत्यर्थ अशोकाने या देशात सहा बौद्ध स्तूप बांधले होते. या देशाच्या राजधानी-मध्ये महेश्वर शिवाचे एक सुंदर देवालय होते.

या देशातून ९०० मैल पश्चिमेस गेल्यानंतर ह्युएन्त्संग लॅंगीर देशास जाऊन पोहोचला (वॉटर्स. २.२५६–२५७).

**अत्याकरालगोज्वाल** ( देश )— जंबुद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील त्रेपन्न जनपदांपैकी एक (वायु. ४४.१२).

**अत्युग्रनरसिंह** (नृसिंहस्थान)—काशी येथील एक देवतास्थान ( स्कन्द. काशी. ६१.१९३ ).

**अत्रयोथ**— मत्स्य पुराणात निर्देशिलेले उत्तर भारतातील आत्रेय लोकसमूहाचे नामांतर. पाठभेद–' क्षत्रयोथ ' ( मत्स्य. ११४.१-५५ ).

**अत्रि-आश्रम** ( आश्रम )—भागवतात निर्देशिलेले पश्चिम भारतातील एक तीर्थस्थान ( भा. ४.१.१४-१५ ). नर्मदा नदीच्या उत्तरेस असणाऱ्या ऋक्ष पर्वतामध्ये निर्विंध्या नदीच्या किनाऱ्यावर हा आश्रम वसला होता.

चित्रकूट पर्वतानजीकच्या सीतापुर गावापासून ८ मैल दक्षिणेस असणाऱ्या डोंगरामध्ये हे आश्रमस्थान आजहि दाखविले जाते. या स्थानी सांप्रत अनसूया, दत्तात्रेय, दुर्वासस् आणि चंद्र यांच्या मूर्ती स्थापन केल्या असून आश्विन शुद्ध सप्तमीच्या दिवशी येथे यात्रा भरते.

वाल्मीकी रामायणात–चित्रकूट पर्वतानजीक वसलेल्या या आश्रमास रामाने आपल्या वनवासकाली सीता आणि लक्ष्मण यांच्यासमवेत भेट दिली होती, आणि येथे अनसूयेसह निवास करणाऱ्या अत्रि ऋषींचे दर्शन घेतले होते ( वा. रा. अयो. ११७.५ ).

पौराणिक साहित्यात सर्वत्र ' अत्रि–आश्रम ' आणि ' अनसूया–तीर्थ ' यांचा संयुक्तपणे निर्देश आढळतो ( अनसूयातीर्थ १. पहा ).

२. संभलक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान. हे स्थान चिमन-सराईनजीक वसले असून, संभलतीर्थाच्या परिक्रमेमध्ये त्याचा अंतर्भाव होतो. भाद्रपद शुद्ध पंचमीला येथे यात्रा भरते ( ती. ९४ ).

३. केदारनाथ–बद्रीनाथ मार्गावरील सुविख्यात तीर्थ-स्थान ( ती. ५७ ).

४. गुजरातमधील चाणोद गावाच्या परिसरातील एक तीर्थस्थान. ' कोटीश्वर ' तीर्थाच्या समोरच्या अंगास नर्मदा नदीच्या द्वीपामध्ये हे स्थान असून आधुनिक काळी ' अनसूयातीर्थ ' या नावाने ते ओळखले जाते. अत्रिपत्नी अनसूयेचे एक देवालयहि येथे आहे ( ती. ४३६ ).

**अत्रि देश** ( देश )—बृहत्संहितेमध्ये निर्देशिलेला दक्षिण भारतातील एक देश ( बृ. सं. १४. १४ ).

२. पौराणिक साहित्यात निर्देशिलेला उत्तर भारतातील एक देश ( ब्रह्माण्ड. १६.५०; मत्स्य. ११४.४३ ). या ठिकाणी संभवतः ' आत्रेय ' लोकसमूहाच्या नावाचा निर्देश अभिप्रेत असावा, असे त्याच्या अनेकवचनी निर्देशावरून दिसते ( आत्रेय पहा ).

**अत्रीश्वर** ( लिंग )—काशी येथील शिवलिंगस्थान ( स्कन्द. काशी. ९७.१२; लिंग तीर्थविवेचन पृ. ४३ ).

२. मही-सागरसंगमक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंगस्थान ( स्कन्द. माहेश्वर.२.५२ ).

**अदमस्** ( नदी )—टॉलेमीच्या ग्रंथात निर्देशिलेली ' ऑक्सेन्तोन ' ( पूर्व विंध्य ) पर्वतात उगम पावणारी एक नदी. ' अदमस् ' या ग्रीकभाषीय संज्ञेचा शब्दशः अर्थ ' हिरा ' असा होतो.

या नदीच्या भौगोलिक स्थानाविषयी अभ्यासकात निम्नलिखित मतांतरे आढळतात :—

१. लॅसेन यांच्या मते—आधु. सुवर्णरेखा नदी ती हीच असावी.

२. यूल यांच्या मते—आधु. वैतरणी नदी ती हीच असावी.

३. मॅक्रिंडल यांच्या मते—ब्राह्मणी नदीची उपनदी असणारी आधु. संक नदी ती हीच असावी. मोंगल काळात तेथे हिरे सापडत असल्याचा निर्देश आढळतो ( मॅक्रिंडल, इंडि. अँटि. १३.३४४ ).

**अदर्शन** ( तीर्थ )—बौधायनधर्मसूत्रात निर्देशिलेले सरस्वती नदीच्या ' विनशन ' तीर्थाचे नामांतर ( बौ. ध. १.१२.१०; विनशन पहा ).

**अदश्तान** (राजधानी)—अरबी साहित्यात निर्देशिलेले कश्मीर देशाच्या पुराणाधिष्ठान ( आधु. पांद्रेठन ) या प्राचीन राजधानीचे नामांतर ( पुराणाधिष्ठान पहा ).

**अदिगैमानगर** (नगर) — शिलालेखसाहित्यात निर्देशिलेले दक्षिण भारतातील 'अधिराजमंगल्लियपुरम्' (आधु. तिरुवाडि) नगराचे नामांतर (एपि. इंडि. २७.९८; अधिराजमंगल्लियपुरम् पहा).

**अदिति** (तीर्थ)--गंगा नदीकाठचे एक तीर्थस्थान (नारद. २.४१.४८).

२. (वन) कुरुक्षेत्रान्तर्गत सप्तवनांपैकी एक (वामन. ३४.५; १२; नारद. २.६५.११;१३). कुरुक्षेत्रापासून ५ मैल अंतरावर दिल्ली-अंबाला मार्गावरील आधु. अमीन गाव ते हेच होय. या स्थानी आधुनिक काळी वन नसले तरी 'अदितितीर्थ' मात्र दाखविले जाते (ती. ७८).

३. नर्मदेच्या उत्तर तीरावरील अदिति-तपस्यास्थान. मध्य प्रदेशातील लोहाऱ्या गावानजीकचे आधु. ऋद्धेश्वर-स्थान ते हेच होय (ती. २३५).

**अदिस्दर** (नगर)—टॉलेमीच्या ग्रंथात निर्देशिलेले उत्तर प्रदेशान्तर्गत अहिच्छत्र (बरेली जिल्ह्यातील आधु. रामनगर) नगराचे नामांतर (मॅक्रिंडल, टॉलेमी पृ. १३३; अहिच्छत्र १. पहा). 'अधिच्छत्र'चे हे संभवतः ग्रीकभाषीय रूपांतर असावे.

**अदैसथ्र** (नगर)—टॉलेमीच्या ग्रंथात निर्देशिलेले मध्य भारतातील अहिच्छत्र नगराचे नामांतर (अहिच्छत्र २. पहा).

**अदैसथ्रोइ** (पर्वत)--टॉलेमीच्या ग्रंथात निर्देशिलेले सह्य पर्वताच्या एका उपविभागाचे नामांतर. 'खबैरिस्' (कावेरी) नदीचा उगम सह्य पर्वताच्या या उपविभागामधून होत असे (सह्याद्रि पहा).

**अदैसथ्रोन्** (पर्वत)— टॉलेमीच्या ग्रंथात निर्देशिलेले सह्य पर्वताचे नामांतर (सह्याद्रि पहा).

**अदोनि** (दुर्ग)— म्हैसूर देशान्तर्गत विजयनगर राज्यातील सुविख्यात किल्ला. आधु. बेल्लारि जिल्ह्यामध्ये हा किल्ला आढळतो. हा किल्ला विजयनगर राज्याचा बालेकिल्ला मानण्यात येत असून, इ. स. १४ व्या शतकात विजयनगरचा राजा बुक्क (प्रथम) आणि बहामनी सुलतान महंमद यांच्या दरम्यान झालेल्या विभिन्न लढायांमध्ये लष्करी दृष्ट्या या किल्ल्यास विशेष महत्त्व प्राप्त झाले होते (एपि. कर्ना. १२.४३).

इ. स. १७७८ मध्ये मराठे आणि हैदर यांच्यामधील निकराचे युद्धहि याच किल्ल्याच्या परिसरामध्ये झाले होते (सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३०६).

जैन स्थापत्यावशेष—अदोनि येथील किल्ल्यामध्ये पार्श्वनाथाची एक मूर्ती असून, तिच्या खालच्या अंगास एक शिलालेख आढळतो. याच गावी असणाऱ्या बारकिल्ल टेकडीवर तीर्थंकर प्रतिमांनी युक्त असे अन्य एक जैन गुफामंदिर आहे.

अदोनि तालुक्यातील हालहरवि गावी राष्ट्रकूट राजा इंद्र (तृतीय) याच्या राज्यकालातील (इ. स. ९३२) एक जैनधर्मीय शिलालेखहि सापडला आहे (अर्कि. रिपोर्ट. इ. स. १९१६; क्र. ५४०). यावरून प्राचीन काळी अदोनि प्रदेश जैन धर्माचे प्रमुख केंद्रस्थान मानण्यात येत असावा.

**अदोष** (तीर्थ)—मध्य प्रदेशान्तर्गत एक गणेशस्थान. नागपूर-छिंदवाडा रेल्वेमार्गावरील सामनेर रेल्वे स्थानकापासून ५ मैल अंतरावर हे स्थान असून भारतातील बावीस प्रमुख गणेशस्थानांमध्ये याची गणना होते (ती. ४४८).

**अद्दांकि**—कृष्णा नदीच्या दक्षिणेस वसलेला एक सुविख्यात किल्ला. ओरिसाचा राजा प्रताप रुद्र याच्या ताब्यात असणारा हा किल्ला विजयनगरचा राजा कृष्णदेवराय याने इ. स. १५१५ मध्ये जिंकून घेतल्याचा निर्देश शिलालेखसाहित्यात आढळतो (रंगाचारी. २.गुंटूर १४८).

२. नेलोर जिल्ह्यातील एक ग्राम. कोंडवीडु प्रदेशावर इ. स. १४ व्या शतकात राज्य करणारे रेड्डि राजघराण्यातील राजे हे मूळचे अद्दांकि गावचे राहणारे होते. त्याचे मूळ राज्य या गावाभोवतालच्या 'पुंगिनाडु' अथवा 'पाकनाडु' प्रदेशावर होते (एपि. इंडि. ३. २८६; ४.३२१).

**अद्रप्स** (नगर)--स्ट्रॅबोच्या ग्रंथात निर्देशिलेले उत्तर अफगाणिस्तानातील 'बॅक्ट्रियने' (बाह्लीक=आधु. बल्ख) देशातील 'अंदराब' नगराचे नामांतर (मॅक्रिंडल, इंडिया पृ. ९०; अंदराब पहा).

**अद्रि** (तीर्थ)—गौतमी (आधु. गोदावरी) नदीकाठचे तीर्थस्थान (ब्रह्म. १७४.२६).

**अद्रिज** (लोकसमूह)— महाभारतात निर्देशिलेला पंजाबातील एक लोकसमूह (म. द्रो. १५९.५).

नामांतरे--१. अद्रैस्ति (अधृष्ट) (ग्रीक साहित्य). २. अद्रैस्तै (अरियन).

अरियनच्या मते 'अद्रैस्तै' लोक 'ह्यद्रोतेस्' (आधु. रावी) नदीच्या पूर्व किनाऱ्यावर निवास करीत असून पिंप्रामा गावी या लोकांची राजधानी वसली होती. सिकंदरने रावी नदी ओलांडल्यानंतर दुसऱ्या दिवशी हे लोक त्याला

शरण आले. तदनंतर एक दिवस विश्रांती घेऊन सिकंदर संगल ( आधु. गुरुदासपुर जिल्ह्यातील एक गाव ) या कठ लोकांच्या बालेकिल्ल्याच्या गावावर चालून गेला ( स्मिथ, पृ. ७८ ).

**अद्रिजा** ( नदी )--पौराणिक साहित्यात निर्देशिलेली विंध्य पर्वतातून उगम पावणारी एक नदी ( मार्कं. ५४.२१; म. अनु. १६५.२२). सोरेन्सन् यांच्या मते कृष्णा नदीचेच हे नामांतर असावे ( सोरेन्सन् पृ. १६; कृष्णा पहा ).

**अद्रिराज**--( पर्वत ) संस्कृत शब्दकोश साहित्यात निर्देशिलेले 'हिमवत्' पर्वताचे नामांतर (शब्दरत्न.३२७.९; हिमवत् पहा ).

**अद्रिस** ( नदी )--टॉलेमीच्या ग्रंथात निर्देशिलेले पंजाबातील 'इरावती' ( आधु. रावी ) नदीचे नामांतर ( इरावती पहा ).

**अदृश्या** ( नदी )-- संस्कृत शब्दकोशसाहित्यात निर्देशिलेली एक नदी ( मेदिनी. १२५.६८; शब्दरत्न. २४.१.१६ ).

**अद्रैस्तै** ( लोकसमूह )--अरियनच्या ग्रंथात निर्देशिलेले पंजाबातील ' अद्रिज ' लोकसमूहाचे नामांतर ( स्मिथ, पृ. ७८; अद्रिज पहा ).

**अद्रोने** ( ग्राम )—टॉलेमीच्या ग्रंथात निर्देशिलेले वायव्य भारतातील ( अक्षांश ३०°.१०′ उत्तर; रेखांश. १२६°.१५′ पूर्व ) एक गाव. यूल यांच्या मते खबर आणि चित्तांग नद्यांच्या दरम्यान वसलेले आधु. अहरोनि गाव ते हेच असावे. तैमूरलंगाने हे गाव नष्ट केले.

**अद्वैतवट** ( तीर्थ )--वृंदावनान्तर्गत माध्व-गौड संप्रदायाचे तीर्थस्थान.

**अधःकेशी** ( तीर्थ )—काशी येथील एक तीर्थस्थान ( नारद. २.५०.२४ ).

**अधःपटन-मण्डल** ( देशविभाग )--भोजवर्मनाच्या बेलाव ताम्रपटात निर्देशिलेला उत्तर बंगाल प्रदेशान्तर्गत ' पौंड्रवर्धनभुक्ती ' देशाचा एक उपविभाग ( एपि. इंडि. १२.३७-४३ ).

**अधम** ( लोकसमूह )--मार्कंडेय पुराणात निर्देशिलेले उत्तर भारतान्तर्गत 'कंठधान' लोकसमूहाचे नामांतर ( मार्कं. ५५.४४; कंठधान पहा ).

**अधिकारिक** (पर्वत)—क्रौंच द्वीपान्तर्गत वर्षपर्वतांपैकी एक ( कूर्म पूर्व. ४९.२७ ).

**अधिच्छत्र** ( नगर )—ब्राह्मी शिलालेखात निर्देशिलेले अहिच्छत्र ( उत्तर प्रदेशान्तर्गत बरेली जिल्ह्यातील आधु. रामनगर ) नगराचे नामांतर ( ल्यूडर्स, क्र. ९०५; अहिच्छत्र १. पहा ).

आषाढसेनाच्या पभोसा गुफालेखातहि ' अधिच्छत्र ' नगराचा निर्देश आढळतो ( एपि. इंडि. २.४३२ ). अन्य नामांतर-' अधिच्छत्रका ' ( ल्यूडर्स, क्र. १०७ ).

**अधिराज** ( देश )—महाभारतात निर्देशिलेला मध्य भारतातील एक देश. दक्षिण मत्स्य देशाच्या दक्षिणेस वसलेला हा देश सहदेवाने आपल्या दक्षिण दिग्विजयात जिंकला होता ( म. स. २८.३ ).

डे यांच्या मते ' कारुष ' अशा वैकल्पिक नावाने ओळखला जाणारा आधु. रेवा प्रदेश तो हाच असावा ( डे. पृ. १; कारूष १. पहा ). पाठभेद-' अधिराज्य ' ( म. भी. १०.४३ ).

**अधिराजमंगलियपुरम्** ( नगर )-- शिलालेखसाहित्यात निर्देशिलेले दक्षिण भारतातील एक नगर. कद्दलूरपासून १४ मैल उत्तरेस वसलेले आधु. तिरुवाडि गाव ते हेच होय. नामांतर—' अदिगैमानगर ' ( एपि. इंडि. २७.९८ ).

**अधिराजेन्द्रवलनाडु** ( देशविभाग )--शिलालेखसाहित्यात निर्देशिलेला दक्षिण भारतातील एक देशविभाग. हा देशविभाग 'जयकोंड-शोर-मंडल' नामक देशविभागामध्ये वसला होता ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. १.१३४ ).

**अधिराज्यकुशट्ट** ( देश )--भारतवर्षान्तर्गत एक जनपद ( पद्म. स्. ६.३९ ).

**अधिवंश्य** ( तीर्थ )--महाभारतान्तर्गत पुलस्त्ययात्रेत निर्देशिलेले एक तीर्थस्थान ( म. आर. ८२.९८ ). या स्थानी गुह्यक नामक कुबेराची वस्ती होती. पाठभेद-' अधिवंग '.

**अधृष्या** ( नदी )-- भारतवर्षान्तर्गत एक नदी ( म. भी. १०.२३; पद्म. स्. ६.२१ ).

**अध्वकेश** ( लिंग )—काशी येथील एक शिवलिंगस्थान ( स्कन्द. काशी. ९७.९९ ).

**अध्वगा** ( नदी )--संस्कृत शब्दकोश साहित्यात निर्देशिलेले गंगा नदीचे नामांतर ( त्रिकाण्ड. २८.२३; गंगा पहा ).

**अनघा** ( नदी )—शाकद्वीपातील एक नदी ( भा. ५.२०.२६ ).

**अनङ्ग** ( कुंड )—अवंतिक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( स्कन्द. आवन्त्य. १.२८.४२ ).

**अनङ्गा** (नदी)—भरतखंडान्तर्गत 'अरण्या' नदीचे नामांतर (पद्म. सृ. ६.३०; अरण्या पहा).

**अनङ्गेश्वर** (लिंग)--प्रभासक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंग-स्थान (स्कन्द. प्रभास. १.१५८).

**अनद्रुतपालाचल** (टेकडी)--शिलालेखसाहित्यात निर्देशिलेली दक्षिण भारतातील एक टेकडी (साऊथ इंडि. इन्स्क्रि. २.२७३).

**अनन्त** (तीर्थ)--मथुरेतील एक तीर्थस्थान (नारद. २.७८.४६; वराह. १५५.१).

२. कश्मीरातील वितस्ता (आधु. झेलम) नदीकाठचे एक तीर्थस्थान (नीलमत. १५६५).

३. पुरुषोत्तमक्षेत्रान्तर्गत एक वासुदेवस्थान (नारद. २.५६.२). एक वैष्णवस्थान म्हणून अन्य प्राचीन साहित्यातहि याचा निर्देश आढळतो (बार्हस्पत्य. ३.१२०; ब्रह्माण्ड. ३.१३.५८).

**अनन्तगिरि** (पर्वत)—आंध्र प्रदेशातील एक पवित्र पर्वत. मार्कंडेय ऋषींचे तपस्यास्थान असणारा हा पर्वत वाडी-वेझवाडा रेल्वेरस्त्यावरील बिकाराबाद रेल्वेस्थानका-पासून ५ मैलांवर आहे. येथे अनंताचे प्राचीन मंदिर असून पर्वतीय गुफेमध्ये मार्कंडेयाची प्राचीन मूर्ती आहे. मंदिरातील अनंताची मूर्ती आषाढ शुक्ल द्वादशीच्या दिवशी फक्त येथे आणतात. वर्षाचे बाकी दिवस ती पर्वताच्या पायथ्यानजीकच्या आलम्पल्लि गावी असते (ती. २७१).

**अनन्तनाग** (सरोवर)— कश्मीरमधील मार्तंड मंदिर-पठाराच्या पायथ्यानजीकचे एक पवित्र सरोवर (नीलमत. १४०१-१४०२). आजहि हे अनंतनाग याच नावाने प्रसिद्ध आहे. या सरोवराच्या काठी इस्लामाबाद नामक ग्राम असून मुसलमानी राज्यकाळात कश्मीरची राजधानी या गावी होती (स्टाइन, राज. २.४६६-४६७).

स्टाइन यांच्या मते हरचरितचिंतामणीमध्ये निर्देशिलेले 'अनंतभवन' अथवा 'अनंतह्रद' सरोवर ते हेच होय. तथापि अनंतनागाशी त्याचा काहीच संबंध नाही, असे काणे म्हणतात (अनंतभवन पहा).

**अनन्तपुर** (देश)— शिलालेखसाहित्यात निर्दे-शिलेला म्हैसूर राज्यातील एक देशविभाग. चिंतमणि तालुक्यातील इ. स. ९४८ च्या एका ताम्रपटात या देशावर नोलंब राजा इरिवि उर्फ दिलीपैया राज्य करीत असल्याचा निर्देश आढळतो (एपि. कर्ना. १०.४९).

नोलंब पल्लव राजा पोरलचोर (द्वितीय) याच्या इ. स. ९६५ च्या एका शिलालेखातहि या देशाचा निर्देश आढळतो (रंगाचारी, कोलार. १.१२७).

२. (नगर व देशविभाग) दक्षिण भारतान्तर्गत पश्चिम चालुक्य राज्यातील एक नगर. आधु. बेल्लारी जिल्ह्यात हे वसले असावे. पश्चिम चालुक्य राजपुत्र विक्रमादित्य (षष्ठ) याच्या इ. स. १०७० मधील एका शिलालेखात याचा निर्देश आढळतो (अर्कि. सर्व्हे. दक्षिण मंडळ, वार्षिक अहवाल, इ. स. १९२०, क्र. ४५५).

पूर्व चालुक्य राजा राजराज (प्रथम) याच्या इ. स. १०९९ मधील कलिदिंडी ताम्रपटात अनंतपुर देशविभागाचा (विषय) आणि त्यामधील कलिदिंडी ग्रामाचा निर्देश आढळतो (एपि. इंडि. २९.६२).

३. केरळ प्रांतातील 'अनंतशयनम्' (आधु. त्रिवेंद्रम्) या सुविख्यात वैष्णवस्थानाचे नामांतर (डे, पृ. ७; अनंत-शयनम् पहा).

**अनन्तभवन** (सरोवर)— हरचरितचिंतामणीमध्ये निर्देशिलेले कश्मीरातील एक पवित्र सरोवर. हे सरोवर वितस्ता (आधु. झेलम) नदीच्या पात्रामध्ये मध्यावर्त-नागापासून १ कोस अंतरावर होते (हरचरित. १०.२५३; २५६). नामांतर–'अनंतह्रद'.

आधुनिककाळी अनंतनाग या नावाने हे सरोवर सुविख्यात असून स्टाइन यांच्या मते नीलमत पुराणात निर्देशिलेले 'अनंतनाग' ते हेच होय (स्टाइन, राज. २.४६६–४६७). परंतु काणे यांच्या मते ही दोनहि स्थाने सर्वस्वी वेगळी होत (काणे, धर्मशास्त्र. ४.७३२).

**अनन्तवामन** (देवमंदिर)—काशीतील एक देव-मंदिरस्थान (स्कन्द. काशी. ६१.१९८).

**अनन्तशयनम्** (वैष्णव मंदिरस्थान)--केरळ प्रांतातील सुविख्यात वैष्णव मंदिरस्थान. येथील पद्मनाथ विष्णूचा निर्देश पौराणिक साहित्यात सर्वत्र आढळतो (पद्म. उ. ११०.८; २८०.१९).

आधु. केरळ राज्याची आणि पूर्वकालीन त्रावणकोर संस्थानाची राजधानी त्रिवेंद्रम् (अक्षांश ८°–२९′ उत्तर; रेखांश ७६°–५७′ पूर्व) ते हेच होय. नागर–कोइल या मंदिरस्थानापासून हे नगर ४० मैल वायव्येस आणि कन्याकुमारीपासून ५१ मैल वायव्येस आहे. या नगराचे आधु. त्रिवेंद्रम् हे नाव 'तिरुअनंतपुरम्' (अनंताचे पवित्र स्थान) या तामीळभाषीय नगरनामाचे अपभ्रष्ट रूप असून पौराणिक 'अनन्तशयनम्', तामीळ 'तिरु-

अनंतपुरम्' आणि आधु. 'त्रिवेंद्रम्' ही तीनहि नावे अनंत नागावर पहुडलेल्या श्रीविष्णूशी संबंधित दिसतात.

**नामांतरे**--प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतातः- १. अनंतपुर; २. पद्मनाभपुर (हे. पृ. ७); ३. अनंतशैल (शक्तिसंगम. ३. ७.८); ४. अनंतसेनक्षेत्र (वरदराजकृत संस्कृतमंजरी).

**पौराणिक साहित्यात**—स्कंद पुराणान्तर्गत सेतु-माहात्म्यातील दक्षिण भारतातील तीर्थनामावलीत कुंभ-कोणम, रामेश्वरम्, गोकर्ण, विरुपाक्ष (हम्पे), वेंकट (तिरुपति), कांची, मदुरा आदि तीर्थांसमवेत अनंतशयनम् गावच्या पद्मनाभाचा निर्देश आढळतो (स्कन्द. ब्राह्म. १. ५२.१०२-१०५).

पद्ममते अनंतशयनम्, मदुरा, वेंकटाद्रि ही दक्षिण भारतातील सुविख्यात विष्णुतीर्थे असून (पद्म. उ. २८०. १९), यांपैकी अनंतशयनम् येथे श्रीविष्णु अनंत नागावर योगनिद्रा घेत असे (पद्म. उ. ११०.८).

**शक्तिसंगमतंत्रामध्ये**--या ग्रंथामध्ये या स्थानाचा निर्देश 'अनंतशैल' नावाने केला असून 'सर्वेशकेरळ' (आधु. केरळ) देश हा अनंतशैलापासून उडुप (आधु. उडिपी) गावापर्यंत पसरला होता (शक्तिसंगम. ३.७.८).

वरदराजाच्या (इ. स. १७ वे शतक) संस्कृतमंजरीमध्ये या तीर्थाचा निर्देश 'अनंतसेन (अनंतशयन) क्षेत्र' या नावाने केला आहे.

**आख्यायिका**--पद्मनाभाचे स्थान या गावी कसे निर्माण झाले, यासंबंधी स्थानिक लोकांमध्ये निम्नलिखित आख्यायिका आढळतातः—

१. प्राचीन काळी या स्थानी अनंतारण्य नामक वन होते. पुल्य नामक शेतकऱ्याच्या पत्नीला या स्थानी एक बालक सापडले. हे बालक एका झाडाखाली झोपलेले असून पंचफणीधर नागाने त्याचे मस्तकावर छत्र धरले होते. हे बालक साक्षात् विष्णूचा अवतार मानून पुलयपत्नीने नारळाच्या करवंटीतून त्यास दूध व कांजी पाजली.

कालांतराने त्रावणकोरच्या राजाला ही हकीगत समजताच अनंतशयन विष्णूचे हे दैवीस्थान मानून त्याने येथे पद्म-नाभाचे देवालय बांधले.

पुलयाच्या उपरोक्त आख्यायिकेची स्मृती म्हणून आजहि येथील पद्मनाभाला नारळाच्या करवंटीच्या आकाराच्या सुवर्णपात्रातून भाताचा नैवेद्य दाखवतात.

२. बिल्वमंगल नामक स्वामी शाळिग्रामाचे पूजन करीत असता त्यांस बालकृष्णाचे दर्शन झाले. या स्वामींना क्षणभर दर्शन घेऊन बालकृष्ण अंतर्धान पावला आणि अनंतारण्यात जाऊन लपून बसला. त्याचा शोध घेत या अरण्यात स्वामी गेले असता ९ मैल लांबीच्या सहस्र-फणीधर नागावर पहुडलेल्या श्रीविष्णूचे त्यांस दर्शन झाले. भजनपूजनास योग्य असे लघुरूप धारण करण्याची स्वामींनी श्रीविष्णूस प्रार्थना केली आणि नंतर भगवंताच्या आज्ञेवरून नजीकच पडलेल्या एका झाडाच्या ओंडक्या-मधून अनंतशयनाची काष्ठमूर्ती त्यांनी तयार केली.

३. अन्य एका आख्यायिकेनुसार बालकृष्णाने प्रथम दर्शन दिलेल्या ऋषींचे नाव दिवाकर असून या विष्णुभक्त ऋषींच्या घरी बालकृष्ण लहान मुलाचे रूप घेऊन रहावयास आला आणि अनन्तवनामध्ये पुनः एकवार भेटण्याचे आश्वासन देऊन अंतर्धान पावला.

या वनामध्ये बालकृष्णाचा शोध करीत असता दिवाकर ऋषींना एक स्वयंभू विष्णुमंदिर (तिरुआयनपाडि) आणि ब्रह्मदेवाचे मंदिर आढळले. या दोन्ही स्थानांचा अंतर्भाव पद्मनाभयात्रेच्या परिक्रमेमध्ये आजहि केला जातो.

दिवाकर ऋषींच्या घरातून निघालेल्या बालकृष्णाने या वनातील एका कनकवृक्षाच्या ढोलीमध्ये प्रवेश केला आणि हा वृक्ष अचानक उन्मूलून पडला. हा उन्मूलित वृक्ष म्हणजेच अनंतशयन पद्मनाभाचे विराट रूप आहे, असे जाणून दिवाकर ऋषींनी त्यापासून पद्मनाभाची एक काष्ठमूर्ती तयार केली आणि त्यावर सुंदर देवालय बांधले.

दिवाकर ऋषींना दिसलेल्या उन्मूलित वृक्षाची लांबी सहा कोस असून आधु. त्रिवेंद्रम्पासून ३ मैल अंतरावर पद्मनाभाचे मुख, आणि विरुद्ध दिशेस ९ मैल अंतरावर पद्मनाभाचे चरणकमल होते. ही दोन्ही स्थाने त्रिवेंद्रम् येथे आज दाखविली जातात. आडव्या पडलेल्या बृहदाकार पद्मनाभमूर्तीच्या नाभिकमलावर पद्मनाभाचे सध्याचे मंदिर बांधले आहे.

दिवाकर ऋषींनी या स्थानी स्थापन केलेली काष्ठमूर्ती कालांतराने जुनी झाली. त्यावेळी बारा हजार शाळिग्रामांनी युक्त अशी कटुशर्करयोग मिश्रणाची नवी मूर्ती इ. स. १०४९ मध्ये स्थापण्यात आली. मंदिराच्या बाह्यमंडपा-मधील शिलालेखात ही माहिती दिली आहे.

**पद्मनाभमंदिर**—त्रिवेंद्रम् रेल्वेस्थानकापासून अर्ध्या मैलावरील किल्ल्याच्या पूर्व प्रवेशद्वारानजीक पद्मनाभाचे पूर्वाभिमुख मंदिर बांधले आहे.

या मंदिराची गोपुरे चोल स्थापत्यशैलीने ( इ. स. १०–११ वे शतक ) बांधली असून उत्तरकालीन दाक्षिणात्य गोपुरांच्या तुलनेने ती अधिक रुंद आणि उंच दिसतात. यावरून इ. स. १०४९ च्या सुमारास या मंदिराचा जीर्णोद्धार करण्यात आल्याच्या उपरोक्त आख्यायिकेची सत्यता पटते.

या मंदिरातील शेषशायी विष्णूची मूर्ती भारतातील उपलब्ध देवतामूर्तीमध्ये सर्वाधिक प्रचंड आहे. या मूर्तीच्या नाभिकमलामधून उत्फुल्ल कमलपुष्प निघाले असून त्यामध्ये ब्रह्मदेवाची मूर्ती स्थापिली आहे. पद्मनाभाच्या मूर्तीचे मस्तक, वक्षःस्थल आणि पदकमले यांचे दर्शन घेण्यासाठी मंदिरामध्ये तीन स्वतंत्र द्वारे आहेत. मंदिराच्या पूर्वेस सुवर्णखचित गरुडस्तंभ असून त्याच्या समोरील सभामंडपात महत्त्वपूर्ण शिलालेख आहेत.

वराहमंदिर—पद्मनाभ मंदिरापासून अर्धा मैल अंतरावर किल्ल्याच्या पाठीमागच्या बाजूस विवरामध्ये बांधलेले वराहमंदिर आहे. हे मंदिर आकाराने छोटे असले तरी त्यामधील वराहमूर्ती कलात्मक आहे.

शिलालेख—पद्मनाभ मंदिराच्या सभामंडपामध्ये निम्नलिखित शिलालेख आहेत :—

१. इ. स. ११६५ मधील शिलालेख—मंदिरातील या प्राचीनतम शिलालेखात मंदिराची दुरुस्ती केल्याचा निर्देश आढळतो. त्यावरून इ. स. ११६५ च्या पूर्वी हे मंदिर अस्तित्वात असावे.

२. केरळ देशाचा राजा रविवर्मन् ( पंचम ) याचा इ. स. १६०१ मधील शिलालेख--पद्मनाभ मंदिरामध्ये 'तुलापुरुष' ( सुवर्णतुला ) समारंभ केल्याचा, तसेच येथे एक सभामंडप बांधल्याचा निर्देश या शिलालेखात आढळतो ( रंगाचारी, ३ त्रावणकोर. २१३ ).

अर्वाचीनकाळी—इ. स. १७५० मध्ये मार्तंडवर्मन् या केरळ देशाचा राजाने यादवी आणि परचक्राच्या भीतीने आपले सारे राज्य पद्मनाभाच्या चरणी अर्पण केले आणि पद्मनाभाचा राजप्रतिनिधी म्हणून तो राज्य करू लागला. तेव्हापासून केरळ आणि त्रावणकोर प्रदेशाचे राजे स्वतःस 'श्रीपद्मनाभदास' म्हणवून घेऊ लागले. ही परंपरा अगदी अलिकडेपर्यंत अखंडपणे चालू होती.

तीर्थस्थान--हे दक्षिण भारतातील एक प्रमुख वैष्णवस्थान असून या प्रदेशातील एकशे आठ 'तिरुपति' स्थानांमध्ये याची गणना होते. श्रीरामानुजाचार्य, श्रीयमुनाचार्य आदि आचार्यांनी, तसेच अनेकानेक आळवार संतांनी या स्थानास भेट दिली होती.

**अनन्तशैल** ( मंदिरस्थान )—शक्तिसंगमतंत्रात निर्देशिलेले केरळ प्रांतातील 'अनंतशयनम्' (आधु. त्रिवेंद्रम) या वैष्णव मंदिरस्थानाचे नामांतर ( शक्तिसंगम. ३.७.८; अनंतशयनम् पहा ).

**अनन्तसर**--( सरोवर ) जंबुद्वीपान्तर्गत मेरु पर्वतावरील एक सरोवर. हे सरोवर पद्मपाली आणि अधरस्थली यांच्या दरम्यान होते ( वायु. ३८.५९ ).

**अनन्तसेनक्षेत्र** ( मंदिरस्थान )— वरदराजकृत संस्कृतमंजरीमध्ये निर्देशिलेले केरळ प्रांतातील 'अनंतशयनम्' ( आधु. त्रिवेंद्रम् ) या वैष्णव मंदिरस्थानाचे नामांतर ( अनंतशयनम् पहा ).

**अनन्तह्रद** ( सरोवर )—हरचरितचिंतामणीमध्ये निर्देशिलेले कश्मीरातील 'अनंतभवन' सरोवराचे नामांतर ( हरचरित. १०.२५३; २५६; अनंतभवन पहा ).

**अनन्तेश्वर** ( लिंग )--प्रभासक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंगस्थान ( स्कन्द. प्रभास. १.१६१ ).

२. उत्तर प्रदेशान्तर्गत सत्यव्रत ( आधु. संभल ) यात्रापरिक्रमेतील एक शिवलिंगस्थान ( ती. ९४ ).

३. पश्चिम समुद्रकिनाऱ्यावरील रजतपीठक्षेत्रान्तर्गत परशुरामद्वारा स्थापित शिवलिंगस्थान. श्रीमध्वाचार्यांनीहि या शिवलिंगाची उपासना केली होती ( ती. ३११; रजतपीठ पहा ).

**अनर** ( ग्राम )--टॅलेमीच्या ग्रंथात निर्देशिलेले पंजाबातील अम्बस्तै ( अम्बष्ठ ) देशान्तर्गत ( अक्षांश २२°–२०′ उत्तर; रेखांश १२२°–३०′ पूर्व ) एक गाव. हे गाव निश्चित कोठे होते ते समजत नाही.

**अनरक** ( तीर्थ )--कुरुक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( नारद. २.६५.११४; म. आर. ८१.१४६; वामन. ४१. २२–२४ ).

२. नर्मदा नदीकाठचे एक तीर्थस्थान ( कूर्म. उत्तर. ४१.९१; मत्स्य. १९३.१३ ).

३. अवंतिक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( स्कन्द. आवन्त्य. १. २९–३० ).

४. अर्बुदारण्यान्तर्गत सरस्वती नदीकाठचे एक तीर्थस्थान ( स्कन्द. प्रभास. १.३५.४९ ).

५. यमुना नदीनजीकचे एक तीर्थस्थान. नामांतर-'धर्मराजतीर्थ' ( कूर्म. पूर्व. ३९.५; पद्म. सृ. २७.५६ ).

**अनरकेश्वर** ( लिंग )--अवंतिक्षेत्रान्तर्गत चौऱ्याऐंशी शिवलिंगांपैकी एक ( स्कन्द. आवन्त्य. १. ).

२. प्रभासक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंगस्थान ( स्कन्द. प्रभास. १. २२५ ).

३. वाराणसी येथील एक शिवलिंगस्थान ( लिंग. तीर्थ विवेचन पृ. ११३ ).

**अनरुद्र-विषय** ( देशविभाग )--कलिंग देशान्तर्गत दक्षिण तोसल देशातील एक उपविभाग ( जे. बी. बी. आर. ए. एस्. इ. स. १९२८, पृ. २९२-१०६; तोसल पहा ).

**अनर्घवल्ली** ( देशविभाग )--कलचुरि राजा रत्नदेव ( द्वितीय ) याच्या इ. स. ११२७ मधील शेवरिनारायण ताम्रपटात निर्देशिलेला मध्यभारतान्तर्गत एक देशविभाग. मध्य प्रदेशातील बिलासपूर जिल्ह्यातील आधु. जांजगिर तालुका म्हणजे हा देशविभाग होय. या देशविभागामधील तिणेरी नामक गावाचा निर्देश या ताम्रपटात आढळतो ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.४२० ).

कलचुरि राजा प्रतापमल्ल याच्या इ. स. १२१४ मधील पेन्ड्राबंध ताम्रपटात या देशविभागाचा निर्देश 'अनर्घमंडल' या नावाने केला असून त्यामधील 'कायठा' ( पेन्ड्राबंधपासून १५ मैल पश्चिमेस वसलेले आधु. कैटा गाव ) ग्रामाचा निर्देश तेथे केला आहे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.५४५ ).

**अनल** ( तीर्थ )—दक्षिण भारतातील समुद्रसेतूजीकचे एक तीर्थस्थान ( स्कन्द. ब्राह्म. १.४२ ).

२. ( पर्वत ) जंबुद्वीपातील मेरुपर्वतान्तर्गत एक पर्वत. हा पर्वत राक्षसांचे निवासस्थान होता ( वायु. ३९.५३ ).

**अनवतप्त** ( सरोवर )--संस्कृत, पाली आणि चिनी-भाषीय बौद्ध साहित्यात निर्देशिलेले हिमालय पर्वतान्तर्गत एक कल्पनारम्य सरोवर. ह्युएन्त्संगच्या मते हे सरोवर जंबुद्वीपाच्या मध्यभागी, सुमेरु पर्वताच्या माथ्यावर, गंध-मादन पर्वताच्या दक्षिणेस आणि हिमवत् पर्वताच्या उत्तरेस होते. अन्य चिनी साहित्यात हे सरोवर हिमवत् पर्वताच्या माथ्यावर असल्याचा निर्देश आढळतो.

बौद्ध ग्रंथांच्या मते गंगा, सिंधु, वक्षु ( आधु. अमू-दरिया ) आणि सीता ( आधु. यारकंद ) या हिमालय पर्वतातील चार सुविख्यात नद्या याच सरोवरामधून उगम पावत असत. संस्कृत, पाली, तिबेटी, चिनी अशा साऱ्या भाषांतील बौद्ध साहित्यामध्ये या सरोवराचा आणि त्याच्या दैवी गुणांचा निर्देश आढळतो. तथापि हे सरोवर भौगोलिक-दृष्ट्या वास्तव नसून, कल्पनारम्य असण्याची शक्यता अधिक वाटते.

**नामांतरे**--प्राचीन साहित्यात या सरोवराची निम्न-लिखित नामांतरे आढळतातः-

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पाली बौद्ध साहित्य | अनवतत्त |
| २. नागसेनकृत मिलिन्दपन्हो | अनोतत्त दह |
| ३. तिबेटी साहित्य | म-द्रॉस |
| ४. चिनी साहित्य– | |
| (१) ह्युएन्त्संग ( वॉटर्स. १.३१–३५ ) | अ-न-पो-त तो-(अनवतप्त) |
| (२) अन्य चिनी साहित्य | वु-जे-नौ (कधीहि तप्त न होणारे) |
| (३) अन्य चिनी साहित्य | अ-नु-त ( अनोतत्त ) |

**नामव्युत्पत्ती**--'अनवतप्त'चा शब्दशः अर्थ 'कधीहि तप्त न होणारे' ( अन्+अवतप्त ) असा होतो. या सरोवराच्या चिनीभाषीय 'वु-जे-नौ' या वैकल्पिक नावाचा अर्थहि तोच होतो.

ह्युएन्त्संगच्या मते या सरोवरामध्ये निवास करणाऱ्या अनवतप्त नामक जलराक्षसाच्या नावावरून यास हे नाव प्राप्त झाले. हा जलराक्षस उन्हाळा, वादळे आणि गरुड आदींच्या भयापासून अलिप्त होता, म्हणून त्यास 'अनवतप्त' म्हणत असत.

**भौगोलिक स्थान**--या सरोवराच्या भौगोलिक स्थाना-विषयी निम्नलिखित मतांतरे आढळतातः—

१. **तिबेटमधील रावणह्रद**--काही अभ्यासकांच्या मते तिबेटमधील 'रावणह्रद' ( तिबेटीभाषीय 'लंगक्-त्सो'= आधु. रखस्-तल् ) हे सतलज नदीचे उगमस्थान असणारे ५० मैल × २५' लांबीरुंदीचे सरोवर हेच असावे. स्थानिक समजुतीनुसार लंकेचा राजा रावण हा या सरोवरामध्ये प्रत्यही स्नान करत असून नजीकच असणाऱ्या कैलास पर्वतातील होमकुंड नामक स्थानी शिवाची उपासना करीत असे. या सरोवराकाठच्या 'ग्यन्-तँग्' नामक बौद्ध मठात लंकाधिपती रावणाची बृहदाकार मूर्ती आजहि आढळते.

२. **पामीर पर्वतावरील सारिकुल सरोवर**--अन्य काही अभ्यासकांच्या मते पामीर पर्वतावरील सुविख्यात सारिकुल सरोवर ते हेच असावे. काही प्राचीन ग्रंथातहि तशा

अर्थाचा निर्देश आढळतो. परंतु ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात ही दोन सरोवरे सर्वस्वी वेगळी मानली आहेत.

३. तिबेटमधील मानससरोवर--अन्य काही अभ्यासकांच्या मते आधु. मानससरोवर ते हेच असावे.

वॉटर्स यांच्या मते--कधीहि तप्त न होणारे 'अनवतप्त' सरोवर हे भौगोलिक दृष्ट्या वास्तव नसून प्राचीन ग्रीक साहित्यातील ईडनच्या उपवनाप्रमाणेच (गार्डन ऑफ ईडन) कल्पनारम्य स्थान असावे असे वॉटर्स म्हणतात. त्यांच्या मते ईडनच्या उपवनाप्रमाणेच अनवतप्त सरोवराचाहि वास्तवातील कोणत्याहि भौगोलिक स्थानाशी सुतराम् संबंध नाही.

बौद्ध साहित्यात--या ग्रंथाच्या मते ज्यांना अध्यात्मिक आणि दैवी सामर्थ्य प्राप्त झाले आहे, अथवा जे मंत्रविद्येच्या साह्याने मन मानेल तेथे जाऊ शकतात त्यांनाच या सरोवराचे दर्शन होत असे. गौतम बुद्ध आणि त्याचे अर्हत हे आकाशमार्गाने निमिषमात्रात या सरोवराच्या काठी येऊन पोंहचत असत (दिव्य. पृ. ३९९). अशोकाच्या पूर्वकालातील अनेक बौद्ध आचार्य आणि संत या सरोवराच्या काठी येऊन राहिले होते.

या सरोवराच्या काठी पृथ्वीवरील सारे पाप नष्ट करणारा धूप उपलब्ध होत असे. या सरोवराच्या काठी एक स्वर्गीय राजवाडा असून त्याच्या सभोवताली जगदुर्लभ वृक्ष आणि सुवासिक फुले होती.

ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात--ह्युएन्त्संगच्या मते जंबुद्वीपाच्या मध्यभागी असलेल्या या सरोवराचे क्षेत्रफळ १६० मैल असून त्याचा किनारा सुवर्णमंडित आणि रत्नखचित होता. अनवतप्त नामक नागराज या सरोवराच्या अंतर्भागात रहात असून, जंबुद्वीपाच्या सार्‍या भागांना शुद्ध आणि स्वच्छ पाण्याचा पुरवठा या सरोवरांमधून उगम पावणार्‍या निम्नलिखित नद्यांच्या द्वारा होत असेः—

## अनवतप्त सरोवरामधून उगम पावणाऱ्या नद्या

| नदीचे नाव | उगमस्थान | कुंडाचा आकार | प्रवाहाची दिशा |
|---|---|---|---|
| १. गंगा नदी | रौप्यमय पूर्व भाग | वृषभमुख | आग्नेय |
| २. सिंधु नदी | सुवर्णमय दक्षिण भाग | गजमुख | नैर्ऋत्य |
| ३. वक्षु नदी (आधु. अमूदरिया) | नीलमणीमय पश्चिम भाग | अश्वमुख | वायव्य |
| ४. सीतानदी (आधु. यारकंद) | रत्नखचित उत्तर भाग | सिंहमुख | ईशान्य |

उपरोक्त सार्‍या नद्या उगम पावल्यानंतर सरोवरास प्रत्येकी एक संपूर्ण प्रदक्षिणा घालीत असत. सीता नदी भूमिगत अवस्थेमध्ये चीन देशाप्रत वाहात जाऊन या देशातील सिह पर्वतावर पीत नदीच्या रूपाने पुन्हा अवतीर्ण होत असे आणि नंतर पश्चिम चीनमधील कन्सुह प्रांतातून वाहात जात असे.

अन्य बौद्ध साहित्यात--अनवतप्त सरोवरातून उपरोक्त चार नद्या उगम पावत असल्याचा निर्देश अन्य बौद्ध साहित्यातहि आढळतो. सरोवराच्या कोणत्या भागातून कोणती नदी उगम पावते, याच्या तपशिलाच्या बाबतीत केवळ तेथे मतभिन्नता दिसते (वॉटर्स, १.३१-३५).

**अनवद्य** (देश)--महाभारतान्तर्गत् भीमाच्या पूर्व दिग्विजयामध्ये निर्देशिलेला एक देश (म. स. २७.८).

**अनवद्यक** (देश)--मार्केंडेय पुराणात निर्देशिलेला कूर्माच्या डाव्या कुशीतील एक देश (मार्कं. ५५.५१).

**अनवा** (देवी)--महाराष्ट्रातील एक देवीस्थान. या स्थानी तुळजा भवानीदेवी आजुबाई नामक संत स्त्रीच्या रूपाने अवतीर्ण झाली. अजंठ्याजवळील सिवना गावापासून ६ मैल दक्षिणेस हे स्थान आहे (ती. २६८).

**अनसूया** (तीर्थ)--अत्रिऋषींच्या आश्रमस्थानांचे नामांतर (अत्रि-आश्रम पहा).

२. (लिंग)--काशी येथील एक शिवलिंगस्थान (लिंग. तीर्थविवेचन पृ. ४२).

**अनहिलपट्टन** (नगर)—सोळंकी राजघराण्याच्या राजधानीचे गुजराथमधील सुविख्यात नगर. इ. स. १०

व्या शतकांमध्ये पश्चिम भारतातील हे प्रमुख सांस्कृतिक केंद्र व जैन विद्याकेंद्र होते.

उत्तर गुजराथमधील बडोदा जिल्ह्यातील मेहसाणा रेल्वे रस्त्यावरील आधु. पाटन अथवा अनवडा ( अक्षांश २३°–५१′ उत्तर; रेखांश ७१°- १०′ पूर्व ) गाव ते हेच होय. सरस्वती नदीच्या दक्षिण किनाऱ्यावरील आधुनिक पाटन गावाच्या पश्चिमेस पाच मैलांच्या परिसरात हे गाव वसले होते. कुमारपालरस या जैन ग्रंथातहि या गावाचे क्षेत्रफळ १२ 'गौ' ( ५ मैल ) दिले आहे.

**नामांतरे**––प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतातः–१. विरवल्लपट्टन; २. पट्टन; ३. अनहिलवाड; ४. अनहिलपुर; ५. पाटण; ६. नहरवाड.

प्राचीन शिलालेख साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे दिली आहेत :––

( १ ) **अणहिलपाटकनगर**–१. सोळंकी राजा जयसिंह याचा इ. स. १२७४ मधील शिलालेख ( इंडि. अँटि. १० १५९-१६० ); २. सोळंकी राजा भीम ( द्वितीय ) याचा शिलालेख ( इंडि. अँटि. ११.७१ ); ३. वाघेल राजा अर्जुनदेव याचा इ. स. १३९८ मधील शिलालेख ( इंडि. अँटि. ११.२४२ ).

( २ ) **अणहिलपाटकपुर**––सोळंकी राजा कुमारपाल याचा इ. स. १३०३ मधील शिलालेख ( भावनगर इन्स्क्रि. क्र.१८४ ).

( ३ ) **श्रीमत् अणहिलपुर**––१. सोळंकी राजा भीम ( द्वितीय ) याचा वि. सं. १२८७ मधील शिलालेख ( एपि. इंडि. ८.२१९–२२९ ); २. सोळंकी राजा भीम ( द्वितीय ) याचा वि. सं. १२८८ मधील शिलालेख ( बॉम्बे प्रेसिडेन्सी अँटि. रिमेन्स. पृ. ३२८–३४४ ).

( ४ ) **श्रीमत् अणहिलपाटक**––वाघेल राजा सारंगदेव याचा वि. सं. १३४८ मधील शिलालेख ( इंडि. अँटि. ४१.२१ ).

( ५ ) **अणहिलवाडपाटन**––शुल्कि घराण्याच्या प्रमुखाचा इ. स. १० व्या शतकातील शिलालेख ( एपि. इंडि. २९.२६ ).

( ६ ) **पट्टणक** ( एपि. इंडि. २९.४६ ).

**स्थापना**––चावडावंशीय राजा वनराज याने इ. स. ७४६ मध्ये या नगराची स्थापना केली ( मेरुतुंगकृत प्रबंधचिंतामणि अ. १ ). त्याअगोदरच्या काळातील चावडा राजांची राजधानी 'पंचसर' गावी असून कान्यकुब्जचा राजा भुवद् याने इ. स. ६९५ मध्ये ती नष्ट केली, आणि या घराण्यातील जयशिखरि राजाचा वध केला.

जंगलामध्ये लहानाचा मोठा झालेल्या जयशिखरिपुत्र वनराजाने आपले विगत राज्य पुन्हा प्राप्त करून घेतले, आणि आपला गुराखी मित्र 'अनहिल भरवाड' याने दाखविलेल्या जागी आपली नवी राजधानी स्थापिली. आपल्या या मित्राच्या स्मृत्यर्थ या नव्या राजधानीचे नाव 'अनहिलपट्टन' अथवा 'अणहिलपाटक' ठेवले.

**राजकीय इतिहास**—चावडा राजांच्या राज्यकालात स्थापन झालेल्या या नगराचे महत्त्व सोळंकी राजांच्या राज्यकालात वृद्धिंगत झाले. कनौजच्या गुर्जर प्रतिहार राजांचे मांडलीक असणाऱ्या चावडा राजांचे राज्य उत्तर गुजरातपुरते मर्यादित होते. या घराण्यातील अंतिम राजा सामंतसिंग याचे मृत्यूनंतर त्याचा भाचा मूलराज याने सोळंकी राजवंशाची स्थापना केली.

प्रतिहार साम्राज्याच्या विनाशानंतर मूलराज सोळंकीने कच्छ, सौराष्ट्र, चंद्रावती, लाट, सिरोही आदि प्रदेश जिंकले, आणि त्याच्याच घराण्यातील चामुंड, वल्लभ, दुर्लभ, भीमदेव ( प्रथम ), कर्णदेव त्रैलोक्यमल्ल आदि राजांनी हे राज्य अधिक विस्तृत करून अनहिलपट्टन नगराचे वैभव वाढविले. यापैकी कर्णदेवाने या गावी 'कर्णमेरुप्रासाद' राजवाडा बांधला, तसेच कर्णावती या नव्या नगराची स्थापना केली.

कर्णदेवाचा पुत्र सिद्धराज जयसिंह हा सोळंकी घराण्यातील पहिला चक्रवर्ती राजा असून त्याने ५० वर्षे राज्य केले. हा राजा व त्याचा पुत्र कुमारपाल यांच्या राज्यकालात अनहिलपट्टन गाव गुजरात, कच्छ, सौराष्ट्र, माळवा, चितोड, सांभार, डभोई, आदि विस्तीर्ण प्रदेशाचे सत्ताकेंद्र बनले. सुविख्यात जैन आचार्य हेमचंद्र हा जयसिंहाच्या दरबारी होता.

सोळंकी राजांच्या राज्यकालात गुजरातला प्राप्त झालेल्या समृद्धी व सुस्थिरता यामुळे अनहिलपट्टन हे पौर्वात्य आणि आणि पाश्चात्य देशांमधील आयातनिर्यात व्यापाराचे केंद्रस्थान बनले. मोधेरा येथील सूर्यमंदिर आणि सोमनाथ येथील मंदिर, तसेच आबू, गिरनार, शत्रुंजय आदि टेकड्यांवरील जैनमंदिरे याच काळांत बांधण्यांत आली.

प्रारंभीचे सोळंकी राजे शैवपंथीय असले तरी कुमारपाल ( इ. स. ११४२–११७३ ) राजाने जैन धर्माची दीक्षा घेतली. त्यामुळे या नगरात जैनधर्मास राजाश्रय लाभला. वीरधवल राजाच्या वस्तुपाल आणि तेजपाल या

जैनधर्मीय अमात्यांनी गुजरातमध्ये उत्तमोत्तम जैन देवालये बांधली.

मुसलमानी आक्रमणांमुळे सोळंकी राजांचे राज्य क्षीण झाले व ते इ. स. १२४४ मध्ये वाघेल नामक त्यांच्या अमात्यांनी जिंकून घेतले. इ. स. १३०३ मध्ये अनहिलपट्टन येथील अंतिम हिंदु राजा कर्णदेव वाघेल याचा पराभव करून अल्लाउद्दिन खिलजीचा सेनापती अलफ्खान याने हे गाव संपूर्णतः उध्वस्त केले.

इ. स. १४११ पर्यंत गुजरातच्या मुसलमानी सुभ्याची राजधानी अनहिलपट्टन येथेच होती. गुजरातचा सुलतान अहंमदशहा याने अहमदाबाद नगराची स्थापना केल्यानंतर राजधानी या नात्याने अनहिलपट्टन नगराचे महत्त्व कायमचे नाहीसे झाले.

**नगरवर्णन**--' पृथ्वीवरील स्वस्तिक, धर्म आणि न्याय यांचे निधान आणि समृद्धीचे आगर ' असे जयसिंहाच्या राज्यकालातील अनहिलपट्टन नगराचे वर्णन हेमचंद्राच्या ग्रंथात आढळते. येथील लोक शूर असून इंद्रियदमन, शास्त्राध्ययन, षडंगात्मक वेदवेदांगे आणि तत्त्वज्ञान यांमध्ये प्रवीण होते.

ऋषभदासाच्या कुमारपालरस ग्रंथाच्या मते या नगरात चौऱ्याऐंशी चौक आणि चौऱ्याऐंशी बाजार होते. सोने आणि चांदी यांची नाणी पाडण्यासाठी येथे स्वतंत्र टांकसाळी असून निरनिराळ्या व्यापारी संघटनांच्या स्वतंत्र वसाहती होत्या. हे गाव साऱ्या भारतवर्षाचे व्यापारी केंद्रस्थान आणि मौल्यवान वस्तूंची बाजारपेठ होते. या गावच्या प्रचंड लोकसंख्येमुळे त्यास ' मनुष्यमात्रांचा महोदधि ' असे म्हणत असत.

**स्थापत्य**--सोळंकी राजांनी या गावी बांधलेल्या राजप्रासाद, मंदिरे आदींचे वर्णन तत्कालीन साहित्यामध्ये आढळते. यापैकी मूलराजाने बांधलेला 'त्रिपुरुष प्रासाद,' दुर्लभदेवाने बांधलेला 'धवलगृह' राजवाडा आणि 'दुर्लभ सरोवर,' भीमदेवाने बांधलेले ' भीमेश्वर महादेवा 'चे देवालय, कर्णदेवाने बांधलेला ' कर्णमेरुप्रासाद ' आणि कुमारपालाने बांधलेला ' कुमारविहार ' या वास्तू विशेष महत्त्वाच्या होत्या. आज या वास्तू संपूर्णतः नष्ट झाल्या असून त्यांचे दगड आधु. पाटण आणि अहमदाबाद शहराचा काही भाग बांधण्यासाठी उपयोगात आणले आहेत.

**स्थापत्यावशेष**-- सोळंकी राज्यकालीन निम्नलिखित इमारतींचे अवशेष या गावी सापडले आहेत:--

**१. सहस्रलिंग तलाव**- जयसिंह सिद्धराजाने इ. स. ११४० मधील माळव्याच्या यशस्वी स्वारीनंतर बांधलेला हा तलाव अनहिलपट्टन गावाच्या मध्यभागी होता. या तलावाच्या भोवताली १००० शिवमंदिरे, विष्णूच्या दहा अवतारांची दहा मंदिरे, देवीची १०८ मंदिरे, तसेच सिद्धिविनायक, महासेन, नकुलीश, सूर्य, भैरव यांची मंदिरे होती. आधु. पाटण गावच्या वायव्य भागात उपरोक्त तलावाचे आणि त्यासभोवतालच्या मंदिरांचे अवशेष सापडले आहेत.

**२. राणी वाव**--भीमदेव राजाची पत्नी उदयमती हिने ही विहीर खोदली असून, मेरुतुंगाच्या मते ही सहस्रलिंग तलावापेक्षाहि भव्य होती. उत्तरकालात या विहिरीचे दगड बहादुरशहाची विहीर बांधण्यासाठी वापरण्यात आले.

**३. जयसिंहाचा राजवाडा**—या राजवाड्याचे काही अवशेष कालिका मंदिराच्या पाठीमागच्या बाजूस सापडले आहेत.

**४. जयसिंहाचा कीर्तिस्तंभ**--माळव्याच्या यशस्वी स्वारीनंतर जयसिंहाने बांधलेल्या कीर्तिस्तंभाचे काही अवशेष येथील 'विजल कुआ ' नजीकच्या शिवमंदिराच्या भिंतीमध्ये सापडले आहेत.

**जैनमंदिर**--या ठिकाणी वादीपुर पार्श्वनाथाचे इ. स. १५९४ मधील एक जैन मंदिर असून त्याचा सारा अंतर्भाग लाकडी आहे ( फर्ग्युसन, २.४० ).

**जैनविद्याकेंद्र**--सुविख्यात जैन आचार्य हेमचंद्र ह जयसिंह राजाचा मानकरी असून त्याच्या शिष्यांमध्ये रामचंद्र, गुणचंद्र, महेंद्रसूरि, देवचंद्र, उदयचंद्र, यशश्चंद्र, बालचंद्र आदि आचार्य प्रमुख होते.

याशिवाय सोमप्रभ, अंधकवि श्रीपाल, कवि सोमेश्वर, पंडित ननक, अमरचंद्र, वास्तुपाल आदि ग्रंथकारहि सोळंकी राजांच्या दरबारी होते.

**जैन साहित्यकेंद्र**--जैन साहित्याच्या इतिहासात या नगराला विशेष महत्त्व असून जैनांच्या आद्य आगमग्रंथांची रचना मगधात झाली असली तरी हरिभद्रसूरिखेरीज बाकीचे प्रमाणभूत संस्कृत टीकाग्रंथ या गावाच्या परिसरातच लिहिले गेले.

यापैकी विशेष उल्लेखनीय ग्रंथ पुढीलप्रमाणे होत:— १. आचारांग व सूत्रकृतांग सूत्रावरील शीलांकाचार्यांची टीका-अनहिलपट्टननजीकच्या गंभूता ( गांभू ) गावी या टीकेची रचना झाली; २. जैन आगमांच्या

नवांगावरील अभयदेवसूरिकृत आद्य प्रमाणभूत टीका– ही टीका इ. स. ११ व्या शतकाच्या उत्तरार्धात लिहिली असून द्रोणाचार्याने तीवर भाष्य लिहिले आहे; ३. नेमिचंद्रकृत उत्तराध्ययनवृत्ति (इ. स. ११२४); ४. यशोदेवसूरिवृत्ति (इ. स. ११७१); ५. जीतकल्पसूत्रावरील चंद्रसूरीचे भाष्य.

या व अन्य इतर ग्रंथांमुळे 'जैनधर्माचे विद्याकेंद्र' अशी उपाधी‍्या नगरास प्राप्त झाली (जै. गु. पृ. ८–९).

**हस्तलिखित ग्रंथभांडार** — या नगराच्या विनाशानंतरहि या नगरातील जैन आणि जैनेतर हस्तलिखित साहित्याचे भांडार अबाधित राहिले. 'अपभ्रंश' आणि पुरातन गुजराती साहित्यासंबंधीचे ताडपत्रावर लिहिलेले अनेक महत्त्वपूर्ण ग्रंथ, तसेच काही पुरातन चित्रे या भांडारात आहेत. भूतपूर्व बडोदा संस्थानच्या 'गायकवाड ओरिएन्टल सिरीज्' मध्ये यापैकी काही ग्रंथ प्रसिद्ध झाले असून, उर्वरीत अन्य ग्रंथांचे संशोधन करण्यासाठी 'हेमचन्द्र ज्ञानमंदिर' नामक एक संस्था या गावी निघाली आहे.

**अनाकर्ती** (नदी)—भरतखंडातील एक नदी (पद्म. सृ. ६.२०).

**अनाजन्म** (तीर्थ)—कुरुक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान. हे सरकतीर्थाच्या पूर्वेस वसले होते. पाठभेद–'अंबाजन्म' (म. आर. ८१.५७).

**अनादिकल्पेश्वर** (लिंग)—अवंतिक्षेत्रान्तर्गत चौऱ्याऐंशी शिवलिंगांपैकी एक (स्कन्द. आवन्त्य. १.२०.१०).

२. गुजरातमधील एक शिवलिंगस्थान. पश्चिम रेल्वेच्या मुंबई–दिल्ली रेल्वेमार्गावरील विक्रमगड रेल्वेस्थानकानजीकच्या धवलगिरि पर्वतावर हे स्थान आहे. नामांतर– 'धवलेश्वर' (ती. २८८).

**अनारक** (लिंग)—काशी येथील एक शिवलिंगस्थान (स्कन्द. काशी. ९७.५९–६०).

**अनार्य** (देश)—भारतवर्षान्तर्गत एक लोकसमूह व देश.

**पूर्वपीठिका**—इ. स. पू. १४०० च्या सुमारास भारतामध्ये आर्य संस्कृतीच्या लोकांनी सर्वप्रथम प्रवेश केला. त्या अगोदरच्या काळात इ. स. पू. ५००० पासून भारताचे वसाहतीकरण झाले होते असे अलिकडच्या काळातील उत्खननावरुन सिद्ध झाले आहे. आर्यांचा भारतवर्षामध्ये प्रवेश होण्याच्या अगोदरच्या काळात भारतामध्ये सुस्थापित झालेल्या या वसाहती अनार्य लोकांच्या होत्या.

ऋग्वेदात– वैदिक साहित्यामध्ये अनार्य लोकांचा सुस्पष्ट निर्देश नसला तरी या साहित्यात निर्देशिलेले 'दस्यु' लोक म्हणजे अनार्य लोक असावेत. ऋग्वेदामध्ये दस्यु लोकांच्या भेद नामक राजाचा निर्देश असून हा राजा आणि आर्य राजा सुदास यांच्यामध्ये झालेल्या लढाईचा वृत्तांत तेथे दिला आहे. दस्यु लोक हे पर्वतीय गुफांमध्ये निवास करणारे ('इलिविष', ऋ. १.३३.१२), चपट्या नाकाचे ('अनसो' ऋ. ५.२९.१०), हनुवटी नसलेले ('विसिसिप्र', ऋ. ५.४५.६) होते.

ऋग्वेदातील अनार्य लोकांचे हे सारे वर्णन अश्मयुगातील मानवाशी मिळतेजुळते दिसते. अश्मयुगातील मानवाची दगडी अवजारे कश्मीरातील सोहन नदीच्या खोऱ्यामध्ये सापडली आहेत. त्यावरून ऋग्वेदकालीन अनार्य लोकांची प्रमुख वसाहत कश्मीरात वसली असावी.

सर मॉर्टिमर व्हीलर यांच्या मते ऋग्वेदात निर्देशिलेले दस्यु लोक आणि सिंधु नदीच्या खोऱ्यामध्ये निवास करणारे सिंधु संस्कृतीचे लोक हे दोन्ही एकच असावेत. परंतु सिंधु संस्कृतीचे लोक हे अश्मयुगोत्तर काळातील असून ऋग्वेदातील दस्यु लोकांचे कोणतेहि वर्णन त्यांना लागू पडत नाही. म्हणूनच ऋग्वेदात निर्देशिलेले दस्यु लोक सिंधु संस्कृतीच्या लोकांहून वेगळे असण्याची शक्यता अधिक वाटते (दस्यु पहा).

**अनार्यांच्या वेदपूर्वकालीन वसाहती**—उत्खनन आणि वंशशास्त्रीय संशोधन या दोहोंच्या आधारे इ. स. पू. ५००० पासून भारताच्या वसाहतीकरणास प्रारंभ झाला असे दिसते. इ. स. पू. ४००० मध्ये सिंध आणि बलुचिस्तान देशात स्थापन झालेल्या 'अम्रि' वसाहतीच्या आणि इ. स. पू. ३००० मध्ये सिंध आणि पंजाबमध्ये स्थापन झालेल्या 'सिंधु' वसाहतीच्याहि पूर्वकालीन अशा वसाहतींचा शोध अलिकडील काळात लागला आहे. यापैकी प्रमुख वसाहती कालानुक्रमे पुढीलप्रमाणे होतः—

१. **निग्रिटो–पिग्मी वसाहत**—आफ्रिकेतील निग्रो लोकांशी वांशिक साधर्म्य असणारे हे लोक भारतातील आद्य वसाहतकार असून, इ. स. पू. ५००० च्या सुमारास हे सर्वप्रथम भारतात आले. घनदाट अरण्यांनी भरलेल्या या देशात हिंडत असता शिकार करून, तसेच सहजासहजी सापडेल ते अन्न भक्षण करून आपला उदरनिर्वाह ते करू लागले. या लोकांच्या बहुसंख्य वसाहती नद्यांचे काठी अथवा नैसर्गिक गुफांमध्ये असत. या काळातील एका कवटीचे उत्खननावशेषहि सापडले आहेत.

वंशशास्त्रीय दृष्टीने भारतातील निम्नलिखित जमाती या लोकांचे वंशज मानण्यात येतात :— १. अंदमान बेटातील स्थानिक वन्य जमाती; २. दक्षिण भारतातील कादर आणि पुलैय्यान आदि वन्य जमाती; ३. मलायातील सेमंग नामक वन्य जमातीचे लोक; ४. नर्मदा नदीचे खोरे. या प्रदेशात या लोकांची काही गुफाचित्रे सापडली असून, ती फ्रान्स आणि स्पेनमधील आदिवासींच्या चित्रांसदृश आहेत.

२. प्रोटो-ऑस्ट्रेलॉइड वसाहत–निग्रिटो-पिग्मी लोकांच्या उपरोक्त वसाहतीनंतर प्रोटो-ऑस्ट्रेलॉइड लोक भारतात वसाहतीसाठी आले. मध्य आणि दक्षिण भारतातील चेंचु, मलय, कादर, कुरुंब, येरुव आदि वन्य लोक या जमातीचे वंशज असावेत.

३. प्रोटो–मेडिटरेनियन वसाहत—या लोकांमध्ये निग्रो जमातीचे काही गुणधर्म असले तरी उपरोक्त दोन जमातीं-पेक्षा ते अधिक सुधारलेले होते. शेतीची कला या लोकांनी भारतात सर्वप्रथम आणली. हिरकणीसारखा अणकुचीदार पदार्थ लाकडांमध्ये अथवा अस्थींमध्ये बसवून त्यांचे बाण, सुऱ्या, तलवारी आदि बनविण्याची, तसेच दगडाला धार करून त्यापासून शस्त्रे बनविण्याची प्रथा भारतात याच लोकांनी सर्वप्रथम सुरू केली. मृत्तिकापात्रे बनविणे, विणकाम करणे आदि कलाहि या लोकांना अवगत होत्या. ग्रामीण जीवनातील अनेक परंपराहि या लोकांनीच प्रथम सुरू केल्या.

दक्षिण भारतातील द्रविड वंशापैकी अनेक ज्ञातिसमूह या लोकांचे वंशज मानले जातात.

४. ऑस्ट्रो–एशियाटिक वसाहत—यानंतरच्या काळात मंगोलियन वंशाचे ऑस्ट्रो-एशियाटिक लोक पूर्व दिशेने भारतात प्रविष्ट झाले, आणि आसाम, बंगाल, बिहार आणि उत्तर प्रदेश प्रांतांमध्ये त्यांनी वसाहती स्थापिल्या. या प्रांतातील लोकांमध्ये मंगोलियन गुणवैशिष्ट्ये आजहि काही प्रमाणात दिसतात.

मध्य भारतातील जंगलात निवास करणारे गोंड, संताळ, भिल्ल आदि जमातींचे लोक हे यांचेच वंशज मानले जातात.

५. अर्मेनॉइड आणि अल्पाइन वसाहती—यानंतर अर्मेनॉइड आणि अल्पाइन लोक मध्य आशियातून इराण-मार्गे भारतात आले आणि सर्वप्रथम महाराष्ट्रात आणि त्यानंतर दक्षिण भारतातील तामिळनाडमध्ये त्यांनी प्रवेश केला. या दोनहि प्रांतातील लोकांमध्ये त्यांचे काही गुणधर्म आजहि आढळतात.

६. अम्रि संस्कृतीची वसाहत—इ. स. पू. ४००० च्या सुमारास 'अम्रि' संस्कृतीचे लोक मेसापोटेमियामधून भारतातील सिंध आणि बलुचिस्तान प्रांतांमध्ये उतरले आणि त्यांनी या प्रदेशात वसाहती स्थापन केल्या. या ग्रामीण संस्कृतीच्या मृत्तिकापात्रांचे, तसेच शिल्पांचे अनेक अवशेष या दोनहि प्रांतांमध्ये सापडले आहेत (अम्रि पहा).

७. सिंधु संस्कृती—इ. स. पू. २७०० च्या सुमारास सिंध आणि पंजाबामधील सिंधु नदीच्या खोऱ्यात संपूर्णत नागरी अशा सिंधु संस्कृतीचा उगम झाला. या संस्कृतीची प्रेरणा तत्कालीन सुमेर देशातील सुमेरी संस्कृतीपासून निर्माण झाली असून तिची प्रमुख केंद्रस्थाने सिंधमधील मोहेंजोदारो आणि पंजाबातील हरप्पा गावी होती.

सिंधु संस्कृतीची स्थापना करणाऱ्या सुमेरियन लोकांची अन्य एक शाखा महाराष्ट्रमार्गे दक्षिण भारतातील तामिळ-नाड देशामध्ये गेली. या देशातील लोकांमध्ये आढळ-णाऱ्या 'ब्रॅकिसेफॅलस' जातीच्या डोक्याच्या कवट्या, तसेच त्यांची द्राविड भाषा हे या संस्कृतीचेच अवशेष होत.

अन्य काही अभ्यासकांच्या मते सुमेरी संस्कृतीच्या अप्रत्यक्ष प्रभावाप्रमाणेच इराक, इराण, अरबस्तान, ईजिप्त आदि देशांच्या संस्कृतीशी दक्षिण भारताचा जो प्रत्यक्ष संबंध आला, त्या संमिश्र संस्कृतिसंगमामधून दक्षिण भारतीय संस्कृती आणि भाषा यांचा उगम झाला असावा (द्रविड पहा).

८. झुकर संस्कृती—इ. स. पू. २००० चे सुमारास सिंधु संस्कृतीचा ऱ्हास झाला आणि या संस्कृतीचे लोक लहान गावे सोडून मोहेंजोदारो आणि हरप्पा यांसारख्या मोठ्या शहरात केंद्रित झाले. त्यावेळी छन्नुदारोसारखी लहान गावे झुकर संस्कृतीच्या रानटी लोकांनी व्यापली.

९. झंगर संस्कृती—इ. स. पू. १४०० मध्ये सिंधु संस्कृतीचा संपूर्ण नाश झाला आणि या संस्कृतीच्या साऱ्या प्रदेशाचा ताबा अत्यंत रानटी अशा झंगर संस्कृतीच्या लोकांनी घेतला. या लोकांनी बांधलेल्या झोपड्यांचे आणि दफनगृहांचे अवशेष सापडले आहेत.

उत्तरकालामध्ये सिंधु संस्कृतीचे लोक थर वाळवंटातील घग्गर नदीच्या खोऱ्यात, तसेच गुजरात आणि सौराष्ट्र देशात जाऊन राहिले. परंतु तेथेहि आर्य लोकांनी त्यांचा पराभव करून त्यांना नामशेष केले.

वेदोत्तरकालीन साहित्यात- महाभारत, पुराणे आदि साहित्यामध्ये अनार्य देशाचा अथवा लोकांचा सुस्पष्ट निर्देश आढळत नाही. तत्रापि पंजाबपासून पूर्वेकडे क्रमाक्रमाने पसरत गेलेल्या आर्य लोकांच्या वसाहतीचा ( आर्यावर्त ), तसेच शबर, पुलिंद, मूतिब आदि वन्य रानटी टोळ्यांचा निर्देश त्यामध्ये आढळतो. यावरून उत्तरकालामध्ये साऱ्या उत्तर भारताचा प्रदेश आर्य लोकांनी अनार्य लोकांपासून जिंकून घेतला आणि अनार्य लोकांच्या काही फुटकळ वसाहती अथवा लोकसमूह तेवढे शिल्लक राहिले, असे दिसते ( आर्यावर्त पहा ).

मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात— या ग्रंथात एक देशनाम या नात्याने अनार्य देशाचा निर्देश असून ( कल्पद्रु. ५.९ ), त्याची निम्नलिखित नामांतरे तेथे दिली आहेत:— १. प्रत्यन्त ( अभि. १२९.९५२; अमर. २.१.७; कल्पद्रु. ५.९; मंख. २५.३४४ ); २. बर्बर ( शब्दरत्न. २७६.९ ); ३. बर्बरी ( अनेकार्थ. सं. ९६. ६१६ ); ४. म्लेच्छ देश (अमर. २.१.७); ५. म्लेच्छ मंडल ( अभि. १२९.९५२ ); ६. वर्वर ( मेदिनी. १४९.२०९; शब्दरत्न. २७९.११; औणादिक १२१.४०६ ); ७. यवन ( कल्पद्रु. ६.२१; मेदिनी. ९६.९; उणादि. ३५.४; वैजयन्ती. ३७.४७ ); ८. शबर ( शब्दरत्न. २८१.१; वैजयन्ती. ३७.६८ ).

उत्तरकालात भारतामध्ये प्रविष्ट झालेल्या यवन ( ग्रीक ), पह्लव आदि विदेशीय लोकसमूहांचा निर्देशहि उपरोक्त नामावलीत 'अनार्य' याच नावाने केला आहे. परंतु वैदिक आणि वेदपूर्वकालीन अनार्य लोकांशी या लोकांचा काहीहि संबंध नव्हता ( प्रत्यन्त; बर्बर; म्लेच्छ देश; यवन; शबर पहा ).

**अनालम्ब** ( तीर्थ )--महाभारतान्तर्गत अंगिरस्-तीर्थयात्रेत निर्देशिलेले एक तीर्थस्थान ( म. अनु. २५.३२ ).

**अनाशक**( तीर्थ )--महाभारतान्तर्गत अंगिरस-तीर्थयात्रेत निर्देशिलेले तीर्थस्थान ( म. अनु. २५ ). अन्य पौराणिक साहित्यातहि या तीर्थाचा निर्देश आढळतो ( पद्म. सृ. ६.५९; वराह. २१५.८९ ).

**अनिकोठसत्ता**( ग्राम )— नालंदा मुद्रालेखात निर्देशिलेले बिहारमधील पटना जिल्ह्यातील एक ग्राम ( अर्कि. सर्व्हे. क्र. ६६, पृ. ४२ ). हे गाव निश्चित कोठे वसले होते ते समजत नाही.

**अनिखै** ( लोकसमूह )--टॉलेमीच्या ग्रंथात निर्देशिलेला यमुनेच्या दक्षिण भागातील एक लोकसमूह. या लोकसमूहाच्या भौगोलिक स्थानाविषयी मॅक्रिंडल यांनी निम्नलिखित पर्याय सुचविले आहेत:--

१. मणिखै--या लोकसमूहाचे संस्कृतभाषीय नाव 'मणिखै' असे मानले तर यमुना नदीच्या दक्षिण भागातील आधु. माणिकपुर जिल्हा तो हाच असावा.

२. मंग--मध्य हिमालयातील 'मंग' अथवा 'मंगर' नामक लोकसमूहाचा निर्देश टॉलेमीने 'अनिखै' अशा चुकीच्या नावाने केला असावा. ऐन-इ-अकबरीमध्ये या लोकांचा निर्देश 'मन्नेह' नावाने केला असून दिल्लीच्या परिसरात हे लोक रहात असत.

३. ननिख--या लोकसमूहाचे संस्कृतभाषीय नाव 'ननिख' असे मानले तर महाभारत आणि पौराणिक साहित्यामध्ये निर्देशिलेले यमुना नदीच्या परिसरातील 'नैनिष' लोक ते हेच असावेत.

**अनितभा** ( नदी )--ऋग्वेदात निर्देशिलेली एक नदी ( ऋ. ५.५३.९ ). रसा नदीसमवेत 'रसानितभा' अशा संयुक्त नावाने या नदीचा निर्देश आढळतो. यावरून रसा नदीप्रमाणेच ही नदीहि वायव्य भारतातीलच असावी.

अन्य काही अभ्यासकांच्या मते ही सिंधूला पश्चिमेकडून मिळणारी नदी असावी ( मॅक्स मूलर, इंडिया पृ. १६६; १७३ ).

**अनिदाय** ( देश )—दक्षिण भारतातील एक देश ( पद्म. सृ. ६.५९ ).

**अनिनखइ** ( लोकसमूह )--टॉलेमीच्या ग्रंथात निर्देशिलेला ब्रह्मपुत्रा नदीच्या खोऱ्यातील एक लोकसमूह.

**अनिमद्र** ( देश )--मार्कंडेय पुराणात निर्देशिलेले वायव्य भारतातील 'अलिमद्र' देशाचे नामांतर ( मार्कं. ५४.४०; अलिमद्र पहा ).

**अनिमुक्तककोणक** ( ग्राम )--हस्तिन् राजाच्या इ. स. ४८२ मधील खोह ताम्रपटात निर्देशिलेले मध्य भारतान्तर्गत बावेलखंडातील एक ग्राम. हे ग्राम कौर्पंरिक ग्रामाच्या उत्तरेस वसले होते (कॉर्पस्. इन्स्कि. ३.२.१०४).

**अनिरुद्धपुर** (नगर)--अपरांत ( आधु. उत्तर कोकण) प्रदेशान्तर्गत एक नगर. त्रैकूटक राजांच्या राजधानीचे गाव म्हणून व्याघ्रसेन राजाच्या इ. स. ४९० मधील सुरत ताम्रपटात या नगराचा निर्देश आढळतो ( कॉर्पस्. इन्स्कि. ४.१.२७ ). सेंद्रक राजा अल्लशक्ति याच्या बगुम्रा ताम्रपटात या नगराचा निर्देश 'अनिरुद्धपुरी' या वैकल्पिक नावाने केला आहे.

**भौगोलिक स्थान**--या नगराच्या भौगोलिक स्थानाविषयी अभ्यासकात निम्नलिखित मतांतरे आढळतातः--

१. डॉ. हुल्ट्झ यांच्या मते--अपरांत देशाच्या शूर्पारक ( आधु. सोपारा ) नगराचेच हे नामांतर असावे ( शूर्पारक पहा ).

२. डॉ. मिराशी यांच्या मते--बगुम्रा ताम्रपटाचे उपलब्धिस्थान असणाऱ्या दक्षिण गुजरातमधील बगुम्रा गावानजीक कोठेतरी हे गाव वसले असावे.

**अनिलेश्वर** ( लिंग )--प्रभासक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंगस्थान ( स्कन्द. प्रभास. १.१०९ ).

**अनिवास** ( देश व लोकसमूह )--महाभारतान्तर्गत उपायनपर्वामध्ये निर्देशिलेला एक देश आणि लोकसमूह. युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञात हे लोक उपायन घेऊन आले होते ( म. स. ४७.१५ ).

या लोकांच्या नावावरून हे भटक्या जमातीपैकी असावेत, असे दिसते. पाठभेद--' अवास '; ' अंतवास '.

**अनीकट** ( देश )--मार्कंडेय पुराणात निर्देशिलेले पश्चिम भारतातील 'कालीकट ' ( आधु. कालिकत ) देशाचे नामांतर ( मार्कं. ५४.४९; कालीकट पहा ).

**अनीचक** ( देशविभाग )--शाकद्वीपान्तर्गत एक वर्ष ( देशविभाग ) ( मत्स्य. १२२.२३ ).

**अनु** ( लोकसमूह )--पंजाबातील एक सुविख्यात लोकसमूह. पौराणिक साहित्याच्या मते ययातिपुत्र अनूने या वंशाची स्थापना केली.

**आधुनिक स्थान**--कनिंगहॅमचे मते पंजाबातील सॉल्ट रेंज ( सैंधवाचल ) प्रदेशातील मख्याल आदि प्रदेशात निवास करणारे आधु. जजूह लोक म्हणजेच प्राचीन अनुवंशीय ( आनव ) लोक होत ( अर्कि. सर्व्हे. २.१४ ).

**पौराणिक साहित्यात**--अनुपासूनचा सातवा पुरुष महामनस् याने पूर्व भारतात आणि पंजाबात आपल्या राज्याचा विस्तार केला. उत्तरकालात महामनस् राजाच्या दोन पुत्रांपैकी उशीनर राजाकडे पंजाब प्रदेशाचे आणि तितिक्षु नामक पुत्राकडे पूर्व भारताचे राज्य गेले. अशा तऱ्हेने अनु अथवा आनव लोकसमूहाच्या दोन स्वतंत्र शाखा अनुक्रमे ' उशीनर शाखा ' आणि ' तितिक्षु शाखा ' या नावाने ओळखल्या जाऊ लागल्या.

**( १ ) उशीनर शाखा**--उशीनर राजास पाच पुत्र असून त्यांनी पंजाबातील निम्नलिखित पाच राज्यांची स्थापना केली:--

| पुत्र | राज्य |
|---|---|
| १. शिबि | मुलतान प्रदेश |
| २. नृग | योधेय प्रदेश |
| ३. नव | नवराष्ट्र प्रदेश |
| ४. कृमि | कृमिल प्रदेश |
| ५. सुरत | अम्बष्ठ प्रदेश ( पूर्व पंजाब ) |

( २ ) तितिक्षु शाखा--तितिक्षु राजाने पूर्व बिहारमध्ये स्वतंत्र राज्याची स्थापना केली आणि या राज्यामधूनच उत्तरकालात अंग, वंग, कलिंग, पुंड्र आणि सुह्म या पूर्व भारतातील सुविख्यात राज्यांची निर्मिती झाली.

**शिबि राज्याच्या उपशाखा**--अनु राजघराण्यापैकी शिबि औशीनर हा सर्वाधिक पराक्रमी राजा असून त्याच्या चार पुत्रांनी पंजाबातील निम्नलिखित चार राज्यांची स्थापना केली:--

| पुत्र | राज्य |
|---|---|
| १. वृषदर्भ | मुलतान प्रदेश |
| २. सौवीर | सिंध प्रदेश |
| ३. केकय | कश्मीरातील झेलम आणि चिनाव दरम्यानचा प्रदेश |
| ४. मद्रक | लाहोर आणि जम्मू प्रदेश. राजधानी--शाकल ( आधु. सियालकोट ) |

पंजाबात निवास करणाऱ्या वांशिकदृष्ट्या एकसंध अशा विभिन्न लोकसमूहांना एका सूत्रात गोवण्याचा प्रयत्न पौराणिक साहित्यातील अनु आणि त्याचे पुत्र यांच्यासंबंधीच्या उपरोक्त आख्यायिकेमध्ये केलेला दिसतो.

**शिलालेखसाहित्यात**-- मौखरि राजा अनंतवर्मनाच्या नागार्जुनी गुफालेखात या राजाचा पिता यज्ञवर्मन् याचा निर्देश ' अनु ' ( अनुवंशीय ) म्हणून केला आहे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.२२५ ).

**अनुगङ्ग** ( देश )--उत्तरकालीन पौराणिक साहित्यात निर्देशिलेले उत्तर भारतातील एक जनपद. प्राचीन कोशल देशाचे ( आधु. अयोध्या प्रांत ) हे नामांतर असावे. या प्रदेशाची दक्षिण आणि नैर्ऋत्य सरहद गंगा नदीने बनली असल्याने त्यास ' अनुगंग ' हे नाव प्राप्त झाले असावे ( पार्गिटर, कलि एज. पृ. ५३; कोशल पहा ).

**अनुगोदावरीतीर** ( लिंग )--अरुणाचल पर्वतावरील शिवस्थान ( स्कन्द. माहेश्वर. ३.२.२ ).

**अनुतप्ता** ( नदी )--प्लक्षद्वीपान्तर्गत एक नदी ( कूर्म. पू. ४९.७; ब्रह्माण्ड. १९.१९; वायु. ४९.१७; विष्णु. २.४.११ ).

२. शाकद्वीपान्तर्गत एक नदी ( वायु. ४९.९३ ).

**अनुत्तर वङ्ग** ( देशविभाग )-- पूर्व भारतातील वंग देशान्तर्गत एक देशविभाग. आधु. दक्षिण बंगाल म्हणजे हा देश असावा. वैद्यदेवाच्या कमौलि ताम्रपटात या देशविभागाचा निर्देश आढळतो ( एपि. इंडि. २.३४९; वंग पहा ).

**अनुद्वीप** ( द्वीपसमूह )--भारताच्या दक्षिणेस वसलेल्या सहा छोट्या द्वीपांचे सामूहिक नाव. पाणिनीच्या अष्टाध्यायीत समुद्रकिनाऱ्याजवळ वसलेल्या बेटांना उद्देशून 'अनुसमुद्रद्वीप' ही संज्ञा प्रयुक्त केली आहे ( पा. सू. ४.३.१० ). त्या अर्थानेच भारताच्या दक्षिणेस वसलेल्या सहा द्वीपांचा निर्देश पौराणिक साहित्यात केला आहे.

पौराणिक साहित्यित निर्देशिलेली सहा अनुद्वीपे पुढीलप्रमाणे होत :— १. अंगद्वीप; २. यमद्वीप; ३. मलयद्वीप; ४. शंखद्वीप; ५. कुशद्वीप ( कुमुदद्वीप ); ६. वराहद्वीप. या प्रत्येक द्वीपाचे वर्णनहि तेथे दिले आहे. ( वायु. ४८. १—१८; ३४—३५ ).

**अनुपर्वासिक** ( देश )—भारतवर्षान्तर्गत एक देश ( म. भी. १०.४२ ).

**अनुपावृश्च** ( देश )—भारतवर्षान्तर्गत एक देश ( म. भी. १०.४७ ). पाठभेद- 'अनुपावृत' ( पद्म. सू. ६. ४३ ).

**अनुपिय-अम्बवन** ( वन)—बौद्ध साहित्यात निर्देशिलेले मल्ल देशान्तर्गत अनुपिया नगरातील सुविख्यात आम्रवन ( जा. १. ६५-६६; अनुपिया पहा ).

**अनुपिया** ( ग्राम )--कोशल देशान्तर्गत मल्ल गणराज्यातील एक प्रमुख ग्राम ( चुल्लवग्ग. ७.१.१ ). हे गाव कपिलवस्तु गावाच्या पूर्वेस असून येथील आम्रवनामध्ये ( अनुपिय-अंबवन ) गौतम बुद्ध परमज्ञानाच्या प्राप्तीनंतर सात दिवस येऊन राहिला होता ( जा. १. ६२-६६ ). पाठभेद-' अनोपिय '; ' अनूपिय ' ( जा. १. १४० ).

**बौद्ध साहित्यात**—हे गाव राजगृह गावापासून तीस योजनें अंतरावर वसले होते ( जा. १.६५-६६ ). या गावी 'सुखविहारि' जातकाचे प्रणयन केल्यानंतर गौतम बुद्ध राजगृह येथे गेला ( जा. १. १४० ). गौतम बुद्धाच्या 'पातिकसुत्त'चे प्रणयनहि याच गावी झाले होते (दीघ. ३.१).

या गावी असणारे आम्रवन मल्ल राजांच्या मालकीचे असून त्यांनी या वनामध्ये गौतम बुद्धाच्या वास्तव्यासाठी एक निवास बांधला होता ( उदान. १६१ ).

बौद्ध साहित्यात निर्देशिलेली अनोमा नदी ही स्वतंत्र नदी नसून ते अनुपिया नगराचेच नामांतर असावे असे सिद्ध करण्याचा प्रयत्न थॉमस यांनी केला आहे. परंतु कपिलवस्तु आणि राजगृह नगरांचे अनुपिया नगरापासूनचे अंतर लक्षात घेता थॉमस यांचे हे अनुमान अग्राह्य वाटते ( अनोमा पहा ).

**अनुमकुण्डपट्टन** ( नगर )-- शिलालेखसाहित्यात निर्देशिलेले तेलंगणाच्या ' अनुमकोंड ' नामक राजधानीचे नामांतर ( अनुमकोंड पहा ). नामांतर- ' अनुमकुंडपुर ' ( जे. ए. एस. बी., इ. स. १८३८, पृ. ९०३ ).

**अनुमकोण्ड** ( नगर )— इ. स. १२ व्या शतकातील काकतीय राजांच्या तेलंगण देशातील राजधानीचे गाव. आंध्र प्रदेशातील वारंगळ या किल्ल्याच्या गावापासून ४ मैल वायव्येस वसलेले आधु. हनमकोंड गाव ते हेच होय.

या नगरनामावरून या गावासभोवतालचा प्रदेशहि 'अनुमकोंड देश ' या नावाने ओळखला जात असे, असे काकतीय राजा प्रोल ( द्वितीय ) याच्या शिलालेखावरून दिसते ( एपि. इंडि. ९.२.६ ). इ. स. १११०-१३२३ पर्यंत या नगरावर काकतीय राजांचे राज्य होते.

हे गाव वारंगळपासून केवळ चार मैल अंतरावर असल्याने उत्तरकालीन साहित्यात अनुमकोंड आणि वारंगळ ही दोन्ही एकच मानलेली दिसतात. काकतीय राजांची राजधानी अनुमकोंड गावी असली तरी वारंगळ (= प्राचीन एकशिला ) येथील किल्ला लष्करीदृष्ट्या या राजधानीचा बालेकिल्ला मानला जात असे (एकशिला पहा).

**नामांतरे**—प्राचीन शिलालेखसाहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात :— १. अनुमकुंडपुर ( रुद्रदेवाचा शिलालेख, जे. ए. एस. बी., इ. स. १८३८, पृ. ९०३ ); २. अनुमकुंडपट्टन ( अन्य शिलालेखसाहित्य ).

**राजकीय इतिहास**—स्वतःस करिकाल चोल राजाचा वंशज म्हणविणाऱ्या दुर्जयाने अनुमकोंड येथील काकतीय राजवंशाची स्थापना केली. प्रारंभीच्या काळी हे राजे पश्चिम चालुक्य राजांचे मांडलीक होते. परंतु प्रतापरुद्र ( प्रथम ) ( इ. स. ११६३-११९९ ) राजाच्या कारकिर्दीत ते स्वतंत्र झाले. चालुक्य राजवंशाच्या विनाशानंतर त्या

साम्राज्याचा बहुतांशी सारा प्रदेश प्रताप रुद्राच्या ताब्यात आला.

अंतिम काकतीय राजा विनायक याचा महंमदशहा बहामनी याने इ. स. १३६४ मध्ये खून करून त्याचे सारे राज्य ताब्यात घेतले.

शिव, विष्णु आणि सूर्य यांचे मंदिर—इ. स. ११६३ मध्ये काकतीय राजा प्रतापरुद्र यास या गावी राज्याभिषेक करण्यात आला ( इंडि. ॲंटि., इ. स. १८८२, पृ. ९ ). तत्स्मृत्यर्थ त्याने परंपरागत चालुक्य शैलीने हे देवतात्रयीचे बृहदाकार मंदिर बांधावयास घेतले. आज हे मंदिर अपूर्णावस्थेत असून, इ. स. १३१० मध्ये या प्रदेशावर झालेल्या मुसलमानी आक्रमणामुळे त्याचे बांधकाम अर्धवट सोडून देण्यात आले असावे.

या मंदिरामध्ये शिव, विष्णु आणि सूर्य या तीन देवतांची स्वतंत्र मंदिरे मुख्य सभामंडपाच्या तीन बाजूंस बांधली आहेत. या सभामंडपाच्या बाहेरच्या अंगास विस्तीर्ण असा बाह्यमंडप असून त्यामध्ये १३२ स्तंभ आहेत. या सभामंडपाच्या वरच्या अंगास अष्टकोनी आकाराचे छत बांधण्याची कल्पना असावी. परंतु छताचे हे बांधकाम हाती घेण्याच्या आधीच मंदिराचे काम अपुरे सोडून देण्यात आले. या कारणाने काळ्या ग्रॅनाइट जातीच्या दगडाचे हे नक्षीकामाविरहित स्तंभ आज वरच्या छताविना तसेच उभे दिसतात.

मंदिराचा मुख्य सभामंडप आणि बाह्यमंडप यांच्या दरम्यान विस्तीर्ण नंदीमंदिर असून त्यामध्ये काळ्या दगडाच्या बृहदाकार नंदीमूर्तीची स्थापना केली आहे. हे नंदीमंदिर आज संपूर्णतः पडून गेले असून त्याच्या इतस्ततः विखुरलेल्या स्तंभावशेषांमध्ये नंदीची मूर्ती एकाकीपणे विराजमान झाली आहे.

येथील मुख्य मंदिर पूर्व-पश्चिम १०२′ लांब असून त्याची उत्तर दक्षिण रुंदी ८३′-८″ आहे. चहुबाजूंनी १०′ रुंद अशा व्यासपीठावर या मंदिराची रचना केली आहे.

शिल्पशास्त्रीय दृष्टीने या मंदिराच्या गर्भागाराची प्रवेशद्वारे विशेष कलात्मक असून त्यांच्या रचनेमध्ये शिल्पकारांनी आपले सारे कलासर्वस्व ओतले आहे. या मंदिराची छिद्रयुक्त दगडी गवाक्षेहि अन्य चालुक्य मंदिरांप्रमाणेच कलापूर्ण आहेत. या मंदिराच्या छताचे तसेच मुख्य सभामंडपातील मध्यवर्ती चार स्तंभांचे नक्षीकामहि प्रेक्षणीय आहे ( फर्ग्युसन. १.४३२-४३५ ).

**अनुमती** ( नदी )--शाल्मलद्वीपान्तर्गत एक नदी ( भा. ५.२.१० ).

**अनुराधपुर** ( नगर )--सिलोनमधील सुविख्यात नगर व बौद्धस्थान. इ. स. पू. ४ थ्या-इ. स. ८ व्या शतकात सिलोनची राजधानी या गावी असून सिलोनमधील प्राचीनतम आणि सर्वाधिक महत्त्वपूर्ण बौद्ध स्थापत्यावशेष येथे सापडतात. उत्तर-मध्य सिलोनमधील कोलंबो-जाफना रेल्वेमार्गावर हे गाव आहे.

ऐतिहासिक पार्श्वभूमी --इ. स. पू. ३७० मध्ये म्हणजे गौतम बुद्धाच्या परिनिर्वाणानंतर शंभर वर्षांनी या नगराची स्थापना झाली, आणि इ. स. पू. २४० मध्ये ते आग्नेय आशियातील एक प्रमुख बौद्धधर्मपीठ बनले. इ. स. ८ व्या शतकापर्यंत या नगराचे हे महत्त्व तसेच अबाधित राहिले. अशा तऱ्हेने अकरा शतकांहून अधिक काळ ऐश्वर्यशिखरावर राहिलेले अनुराधपुर हे भारतातील आणि बृहत्तर भारतातील अद्वितीय नगर होय.

इ. स. ९ व्या शतकाच्या प्रारंभी केरळदेशीय लोकांच्या आक्रमणामुळे सिलोनची वैकल्पिक राजधानी पोलोन्नरुव गावी स्थापन करण्यात आली, आणि नंतर इ. स. ९ व्या -१३ व्या शतकात ती तेथेच राहिली. या काळात अनुराधपुरचे महत्त्व क्रमशः कमी होऊन कालांतराने ते सर्वस्वी उजाड बनले.

सद्यःस्थिती— हे नगर अलिकडेपर्यंत घनदाट जंगलात विजन आणि विस्मृत अवस्थेत असून शतकानुशतकांच्या शत्रूच्या आक्रमणामुळे, तसेच प्रतिकूल निसर्गजन्य परिस्थितीमुळे येथील बौद्ध वास्तू नष्टप्राय झाल्या; इमारतींचा गिलावा आणि नक्षीकाम घनदाट जंगलाने खाऊन टाकले; येथील दगडी इमारतीहि खिळखिळ्या झाल्या.

गेल्या काही वर्षात येथे पुनः मनुष्यवस्ती झाली असून सध्या सिलोनच्या उत्तर-मध्य प्रांताची राजधानी या गावी आहे.

महत्त्व—या गावचे बौद्ध स्थापत्यावशेष निम्नलिखित कारणांमुळे महत्त्वपूर्ण मानण्यात येतात :--

१. इ. स. पू. ३७० पासून इ. स. ८ व्या शतकापर्यंत या गावी नवीनवी बौद्ध मंदिरे आणि राजप्रासाद सतत बांधले जात होते. यामुळे अकरा शतकांच्या दीर्घ कालावधीतील बौद्ध स्थापत्यशास्त्रीय उत्क्रांती येथे पहावयास मिळते.

२. इ. स. १० व्या-१९ व्या शतकापर्यंतच्या विस्मृतावस्थेच्या काळात सिलोन देशावर बौद्धधर्मीयांचेच राज्य असल्याने येथील स्थापत्यावशेष बुद्धिपुरःसर विनष्ट कर-

ण्याचा प्रयत्न कोणीहि केला नाही. या नगराशी समकालीन असणारी भारतातील वैशाली, कपिलवस्तु, पाटलिपुत्र ही नगरे उत्तरकालीन यादवी युद्धामुळे आणि मुसलमानांच्या आक्रमणामुळे नष्ट झाली. या विशिष्ट दृष्टीने हे गाव फारच भाग्यवान मानावे लागेल.

३. सिलोनी महावंश आदि प्राचीन ग्रंथात या गावी बांधण्यात आलेल्या इमारतींचे सविस्तर वर्णन दिले आहे. त्यायोगे येथील प्रत्येक इमारतीचा संभाव्य रचनाकाल आणि बांधणीचा इतिहास उपलब्ध होतो.

**स्थापत्यावशेष**--कालदृष्ट्या तसेच स्थापत्यशास्त्रीय-दृष्ट्या अनुराधपुर येथील स्थापत्यावशेषांचे निम्नलिखित उपविभाग दिसतातः--१. अशोककालीन स्थापत्यावशेष--(इ. स. पू. ३०० )--येथील थूपाराम स्तूप या शैलीने बांधला आहे. २. सातवाहनकालीन स्थापत्यावशेष ( इ. स. पू. १६१-इ. स ३६१ )--येथील रुवनवेलि आणि मिरिसवेतिय हे स्तूप या शैलीने बांधले आहेत; ३. गुप्तकालीन स्थापत्यावशेष ( इ. स. ४ थे-५ वे शतक )--येथील रत्नप्रासाद आदि राजप्रासाद या शैलीने बांधले आहेत; ४. पल्लवकालीन स्थापत्यावशेष ( इ. स. ७ वे-८ वे शतक )--सिलोनचा राजा मानवर्मन् हा पल्लव राजा नृसिंहवर्मन् ( प्रथम ) 'मामल्ल'च्या साह्याने गादीवर आला. या कारणाने त्याने बांधलेल्या स्थापत्यावर पल्लव-कलेचा फार मोठा प्रभाव दिसतो. त्याचे काळातील अनेक बौद्ध मूर्तीहि या गावी उपलब्ध झाल्या आहेत.

उपरोक्त उपविभागांची संकलित माहिती सोबतच्या परिपत्रकात दिली आहे.

**शिल्पशैली**--येथील प्रारंभीच्या शिल्पांमध्ये सातवाहनांच्या शैलीचे एकसुरी अनुकरण केलेले दिसते ( उदा. पायरीजवळ बसविलेला अर्धचंद्राकृती आकाराचा 'पद्मशिला' नामक दगड, स्तूपाच्या प्रवेशद्वारानजीक स्थापन केलेल्या नागराजाच्या प्रतिमा, पूर्णघट प्रतिमा ).

येथील उत्तरकालीन शिल्पात सातवाहन शैलीचा आधार न सोडता भारतातील विभिन्न उत्तरकालीन शिल्पशैलींची भर त्यामध्ये घातलेली दिसते. या सर्व शिल्पात सिलोनचे स्वतःचे असे काहीच वैशिष्ट्य दिसत नाही.

**बौद्ध स्थापत्यावशेष**--स्थापत्यशास्त्रीय दृष्टीने या गावी सापडणाऱ्या बौद्ध स्थापत्यावशेषांचे निम्नलिखित चार उपविभाग पडतात :--

| स्थापत्यप्रकार | अवशेष |
|---|---|
| १. मोठे स्तूप | रुवनवेलि, अभयगिरि, जेतवनाराम मिरिसवेतिय दागब. |
| २. छोटे स्तूप | थूपाराम, लंकाराम, कुज्जतिस्साराम, अम्बस्थाल आणि महासेय दागब. |
| ३. बौद्ध संघाराम | लोहमहाप्रासाद, रुवनवेलि विहार, विजाराम विहार. |
| ४. अन्य इमारती | दलदा मालिगाव ( गौतम बुद्ध-दन्तावशेष मंदिर ), इसुरुमुनिय मंदिर, बोधिवृक्ष मंदिर. |

[ १ ] मोठे स्तूप--बृहदाकार बौद्ध दागब ( स्तूप ) हे अनुराधपुरचे प्रमुख वैशिष्ट्य असून येथील सर्वात मोठ्या अभयगिरि स्तूपाचा व्यास १६५′ आणि उंची २७०′ आहे,(भारतातील सर्वाधिक मोठा स्तूप-'अमरावती', व्यास १६२ ). एका मध्यम आकाराच्या नगराइतके अथवा ईजिप्तमधील गिझेह गावच्या मेंकौर या तृतीय पिरॅमिड-इतके बांधकामसाहित्य त्या एका स्तूपाच्या रचनेसाठी खर्ची पडले आहे.

या प्रचंड विस्तारामुळे अनुराधपुर येथील बौद्ध स्तूप मानवनिर्मित न वाटता निसर्गनिर्मित टेकड्यांप्रमाणे भासतात. पर्वत आणि टेकड्या यासंबंधी बौद्धधर्मीयांस वाटणारे आकर्षण या स्तूपामध्ये साकारलेले दिसते.

भारतातील अमरावती, सांची येथील स्तूपांसदृश बौद्ध जीवनातील विभिन्न प्रसंगांचे रेखाटन करणारी शिल्पचित्रे येथील स्तूपांमध्ये आढळत नाहीत. यावरून शिल्पकौशल्या-पेक्षा भव्यतेकडे आणि निसर्गसादृश्याकडे येथील स्तूप-रचनाकारांचे विशेष लक्ष दिसते.

अनुराधपुर येथील प्रमुख मोठे स्तूप पुढीलप्रमाणे होतः--

( १ ) रुवनवेलि दागब--सातवाहन स्थापत्यशैलीने बांधलेला हा स्तूप अनुराधपुर येथील बृहदाकार स्तूपांमध्ये प्राचीनतम आणि म्हणूनच पवित्र मानण्यात येतो. सिलोनचा राजा दुत्थगामनि याने इ. स. पू. २ ऱ्या शतकात ( इ. स. पू. १६१-१३७ ) तो बांधला. या स्तूपाच्या बांधकामाचे तसेच गौतम बुद्धाच्या ज्या शरीरावशेषांवर हा स्तूप बांधण्यात आला त्याचे सविस्तर वर्णन महावंशात आढळते ( महा. २८-३१ ).

या स्तूपाच्या वर्तुळाकृती जोत्याचा भाग केवळ आज सुस्थितीत असून त्याचा व्यास २५२′-८″ आहे. महा-

## अनुराधपुर येथील स्थापत्यावशेष

| रचनाकर्त्या राजाचे नाव | मोठे स्तूप | छोटे स्तूप | संघाराम आणि विहार | राजप्रासाद आणि अन्य बौद्धमंदिरे |
|---|---|---|---|---|
| **१. अशोककालीन स्थापत्यावशेष** | | | | |
| १. देवानांपिय तिस्स (इ. स. पू. ३ रे शतक) | — | १. थूपाराम<br>२. अम्बस्थाल<br>३. महासेय<br>४. लंकाराम | — | — |
| २. अशोकपुत्र महेंद्र | — | | — | बोधिवृक्षमंदिर |
| ३. लज्जि तिस्स (इ. स. पू. ५५) | | कुजातिस्साराम (सेल चैत्य) | | |
| **२. सातवाहनकालीन स्थापत्यावशेष** | | | | |
| १. दुत्थगामनि (इ. स. पू. १६१ --१३७) | १. रुवनवेलि (व्यास २५५'–८") २. मिरिसवेतिय (व्यास १३३') | थूपाराम स्तूपाचे परिवर्धन | १. लोहप्रासाद (लोह महापाय) २. रुवनवेलि विहार | — |
| २. दुत्थगामनि अभय (इ. स. पू. ८९–७७) | १. अभयगिरि (व्यास ३२८') | — | | १. एलाल सोहोने<br>२. नुवर वेव |
| ३. महासेन (इ. स. ३३४–३६१) | १. जेतवनाराम (बांधणीस प्रारंभ) (व्यास ३२५') | जेतवन बौद्धमठ | — | मिन्नेरीय सरोवर |
| **३. गुप्तकालीन स्थापत्यावशेष** | | | | |
| १. महासेन | — | — | — | राजप्रासाद<br>१. रत्नप्रासाद; २. राज्ञी-प्रासाद; ३. राज्ञी पुष्करिणी; ४. तिस्स वेवनजीकची राजाची बाग; ५. लोहप्रासादा-नजीकचे पोकुन.<br>अन्य मंदिरे<br>१. इसुरुमुनिय मंदिर<br>२. दल्दा माल्गािव |
| २. कित्ति-सिरि-मेघ-वन्न (इ. स. ४ थे शतक) | जेतवनाराम (परिपूर्ती) | — | — | — |

वंशाच्या मते या स्तूपाची उंची २७०′ होती. या उध्वस्त स्तूपाची सद्य:कालीन उंची १८४′ – ७″ ( जोते ५′ – ७″ + स्तूप १७९′ ) असून त्याची उत्तर-दक्षिण लांबी आणि पूर्व-पश्चिम रुंदी अनुक्रमे ४७५′ × ४७३′ आहे.

या स्तूपाच्या तळाशी प्रत्येकी ५′ उंचीचे तीन वर्तुळाकृती पासाद (व्यासपीठे) असून त्यायोगे स्तूपाच्या तळाशी दोन 'प्रदक्षिणापथ' तयार होतात. या प्रदक्षिणापथांसह जोत्याची एकूण उंची १५′ भरते.

या स्तूपाच्या अंडाकृती तळाशी चार बाजूस बांधलेले चार नक्षीकामयुक्त 'वहल्कद' (उपमंदिर) हे सिलोनी स्तूपांचे प्रमुख वैशिष्ट्य मानले जाते. स्तूपातील या एकुलत्या एक नक्षीकामयुक्त भागात सिलोनी शिल्पकारांनी आपले सारसर्वस्व ओतले आहे. अमरावती येथील स्तूपातील स्तंभयुक्त 'आर्यक'ची प्रेरणाहि सिलोनी 'वहल्कद'वरूनच घेण्यात आली असावी.

या स्तूपाचा मजबूत पाया दुत्थगामनि राजाने कसा भरला याचे सविस्तर वर्णन महावंशात दिले आहे. आपल्या सैनिकांच्याकरवी प्रचंड आकाराचे दगड या राजाने स्तूपाच्या जागी आणले आणि पायांना कातडी चढाव बसविलेल्या हत्तींच्या द्वारा हे दगड आणि त्यावर शाडूच्या चिखलाचा एक थर त्याने बसविला. त्यानंतर लोखंडी गजांची मजबूत जाळी अंथरून तीवर 'हलिळ' जातीच्या दगडांचा एक थर त्याने हत्तींच्याकरवी ठोकून बसविला.

दुत्थगामनि राजाने उपयोजिलेली उपरोक्त बांधकाम-पद्धती आधुनिक सिमेंट-कॉंक्रीटशी मिळतीजुळती दिसते.

यानंतर राजाने मोठ्या समारंभाने स्तूपाच्या वर्तुलाकृती व्यासपीठांचे बांधकामास प्रारंभ केला. स्तूपाचे दर्शनी दगडी बांधकाम चिखलमातीने करुन, त्याच्या अंतर्भागात विटा, दगड आणि चिखल यांचे मिश्रण त्याने भरले. यानंतर बांधलेल्या 'वहल्कद'मध्ये बौद्ध शरीरावशेष त्याने दगडांच्या साह्याने पुरले.

स्तूपाचे बांधकाम पुरे झाल्यानंतर राजाने त्यावर पांढऱ्या चुन्याचा गिलावा चढविला. 'वहल्कद'वरील नक्षीकामहि या चुन्याच्या साह्यानेच त्याने केले आणि अशा तऱ्हेने पुन्या झालेल्या स्तूपाला आकर्षक रंगांनी सजविले.

(२) मिरिसवेतिय दागब—रुवनवेलि स्तूपापेक्षा उत्तरकालीन आणि आकारदृष्ट्या छोटा असणारा हा स्तूपहि दुत्थगामनि (इ. स. पू. १६१–१३७) राजानेच बांधला. या घंटाकृती स्तूपाचा व्यास १३३′ असून, त्याच्या तीन बाजूस १३′ × ६′ × १६′ लांबीरुंदी-खोलीचे 'वहल्कद' आहेत. पूर्वेकडील 'वहल्कद' नष्ट झाले आहे.

इ. स. १८९० मध्ये सुरू करण्यात आलेले या स्तूपाच्या जीर्णोद्धाराचे काम पैशाच्या अभावी अपूर्ण राहिले.

(३) अभयगिरि दागब--सातवाहन स्थापत्यशैलीने बांधलेला हा स्तूप येथील सर्वात मोठा स्तूप (परीघ ११००′) आहे. सुस्थितीमध्ये असताना याची उंची ३६०′ असून त्यापैकी २३२′ चा भाग आज उभा आहे. महावंशामध्ये या स्तूपाची उंची १२० क्युबिट (=१२०×२′–३″=२७०′) दिली आहे.

सिलोनचा राजा वत्तगामनि अभय ऊर्फ वलगमबाहु याने इ. स. पू. १ ल्या शतकामध्ये १५ वर्षांच्या पदच्युति-समातीनंतरच्या: आनंदाप्रीत्यर्थ पूर्वकाळी जैन मंदिर असणाऱ्या या स्थानी हा स्तूप व नजीकचा एक बौद्ध विहार बांधला (महा. ३५). सिलोनचा राजा गजबाहु (प्रथम) याने इ. स. २ ऱ्या शतकात हा स्तूप संवर्धित करून त्याच्या चार बाजूस चार प्रवेशद्वारे बांधली.

हा स्तूप ५८०′ लांबीरुंदीच्या आणि ९॥′ उंचीच्या चौकोनी दगडी व्यासपीठावर अधिष्ठित असून त्याप्रत चढून जाण्यासाठी चारी बाजूस प्रत्येकी २७′ लांबीच्या पायऱ्या आहेत. स्तूपाच्या घुमटाच्या तळाशी चतुर्दिशांना चार 'वहल्कद' असून त्यामध्ये ध्यानी बुद्धाची छोटी देव-मंदिरे बांधली आहेत. फर्ग्युसन यांच्या मते या देव-मंदिरांची रचना सांची स्तूपातील 'वैरोचन' देवमंदिरा-सदृश आहे (जे. आर. ए. एस्., इ. स. १९०२; पृ. ३२).

(४) जेतवनाराम दागब—सातवाहन स्थापत्यशैलीचा अनुराधपुर येथील हा अंतिम स्तूप सिलोनचा राजा महासेन याने इ. स. ४ थ्या शतकात बांधण्यास प्रारंभ केला आणि त्याच्या उत्तरकालीन कित्ति-सिरि-मेघवन्न राजाने तो पुरा केला. आकारमान आणि व्याप्ती या दोन्ही दृष्टींनी हा स्तूप अभयगिरि स्तूपासदृश परंतु अधिक सफाईदार असून त्याचा व्यास ३१०′ आणि उंची २४५′ आहे.

[२] छोटे स्तूप—अनुराधपुर येथील छोट्या आकाराच्या स्तूपांची रचना मोठ्या स्तूपांहून सर्वस्वी वेगळी दिसते. या स्थानी असणारे प्रमुख छोटे स्तूप पुढील-प्रमाणे होत :—

( १ ) थूपाराम दागब--अशोककालीन स्थापत्यपद्धतीचे दुर्मीळ उदाहरण मानला जाणारा हा स्तूप त्याचे मूळ स्वरूपात देवानांपिय तिस्स याने इ. स. पू. २४६ मध्ये गौतम बुद्धाचे मानेचे उजवे हाड ठेवण्यासाठी बांधला. यानंतर सिलोनचा राजा दुत्थगामनि ( इ. स. पू. १६१-१३७ ) याने या स्तूपाचे परिवर्धन केले.

बौद्ध ग्रंथांच्या मते आकाशमार्गे तिस्स राजाच्या मुकुटावर अधिष्ठित झालेली गौतम बुद्धाची पवित्र अस्थि त्याने या स्तूपामध्ये प्रतिष्ठापित केली.

हा स्तूप घंटाकृती असून त्याच्या मूळ स्वरूपामध्ये तो अत्यंत प्रमाणबद्ध होता. इ. स. १९ व्या शतकात करण्यात आलेल्या जीर्णोद्धारामुळे तो आता अत्यंत विद्रुप झाला आहे.

या स्तूपाचा व्यास ५५′ असून तो ११′ उंचीच्या व्यासपीठावर बांधला आहे. या स्तूपाच्या सभोवताली नाजूक दगडी स्तंभांच्या एकूण चार रांगा असून स्थापत्यशास्त्रीयदृष्ट्या ते या स्तूपाचे, तसेच नजीकच असलेल्या लंकाराम स्तूपाचे प्रमुख वैशिष्ट्य आहे. आतून बाहेर अशा क्रमाने या स्तंभांची मांडणी खालीलप्रमाणे केलेली दिसते:--

| रांग क्रमांक | स्तंभसंख्या | उंची |
|---|---|---|
| १ | ५२ | २२′-४″ |
| २ | ३६ | २१′-४″ |
| ३ | ४० | १९′-१०″ |
| ४ | ४८ | १४′ |

हे सारे स्तंभ एकसंधी दगडाचे घडविले असून, त्यांच्या शिरोभूषणांवर विभिन्न मनुष्याकृती, पर्णफुले, तसेच बुटक्या व्यक्तींच्या आकृती कोरल्या आहेत.

( २ ) लंकाराम दागब—सिलोनी ग्रंथात या स्तूपाचा निर्देश नसला तरी त्याच्या अशोककालीन स्थापत्यपद्धतीवरून तो थूपाराम स्तूपाशी समकालीन असावा. त्याच्या परिसरात अनुराधपुर येथील सुविख्यात नगरंगन विहार होता, असे आता सिद्ध झाले आहे ( जे. आर. ए. एस्., २०.१७५ ).

थूपाराम स्तूपाप्रमाणेच या स्तूपासभोवताली आतून बाहेर अशा क्रमाने खालीलप्रमाणे स्तंभ उभारले आहेत. या स्तंभाची शिरोभूषणे वरच्या अंगास सपाट असून त्यांच्या मध्यवर्ती पट्टीवर सिंहप्रतिमा कोरल्या आहेतः—

| रांग क्रमांक | स्तंभसंख्या | उंची |
|---|---|---|
| १ | २० | १९′-६″ |
| २ | २८ | १९′-१″ |
| ३ | ४० | १४′-६″ |

थूपाराम आणि लंकाराम या स्तूपांच्या सभोवतालचे स्तंभ बौद्ध स्तूपस्थापत्यामध्ये अद्वितीय असून त्यांचे निश्चित प्रयोजन काय असावे ते समजत नाही. काही अभ्यासकांच्या मते स्तूपावरील छताला आधार म्हणून हे स्तंभ उभारले असावेत. परंतु या स्तंभांचा अत्यंत नाजूक आकार आणि अस्ताव्यस्त मांडणी लक्षात घेता तशी शक्यता कमी वाटते.

फर्ग्युसन यांच्या मते भारतीय स्तूपातील वेदिका-( कठडा ) स्तंभासदृश या स्तंभांची रचना असून त्यांच्या दरम्यानचा भाग 'प्रदक्षिणापथ' म्हणून उपयोजिला जात असावा. या स्तंभावर धर्मचक्र, त्रिरत्न आदि विभिन्न बौद्ध प्रतीके प्राचीनकाळीं बसविली असावीत.

( ३ ) कुज्जतिस्साराम अथवा सेल चैत्य दागब--रुवनवेलि आणि अभयगिरि स्तूपांच्या दरम्यान असणारा हा उध्वस्तावस्थेतील स्तूप अशोककालीन स्थापत्यपद्धतीने बांधला आहे.

सिलोनचा राजा लज्जि तिस्स याने इ. स. पू. ५५ च्या सुमारास बांधलेला ' सिल स्तूप ' तो हाच असावा. शाक्य मुनि बुद्धाच्या पूर्वकालीन कश्यप बुद्धाच्या पदस्पर्शाने पवित्र झालेल्या भूमीवर हा स्तूप बांधण्यात आला.

इ. स. १८९५ मध्ये या अर्धवर्तुलाकृती स्तूपाचे उत्खनन करण्यात आले. त्यावरून त्याच्या मूळ स्वरूपात याची उंची आणि व्यास अनुक्रमे १५′ व ३७′-५″ असून ४६′ ९″ लांबी-रुंदीच्या आणि ६′-६″ उंचीच्या चौकोनी व्यासपीठावर तो बांधला असावा, असे दिसते. त्याच्या सभोवताली एक दगडी भिंतहि बांधण्यात आली होती.

सिलोनचा राजा पराक्रमबाहु (इ. स. ११५३-११८६) याने या स्तूपाचे परिवर्धन केले. इ. स. १८ व्या शतकात हा स्तूप पुन्हा दुरुस्त करण्यात आला. या कारणाने त्याचे मूळ रूप आज नाहीसे झाले आहे.

सद्यःकालीन ३८′ व्यासाचा हा स्तूप ९′ उंचीच्या व्यासपीठावर बांधला असून या स्तूपासभोवतालची स्तंभांची

रांग तसेच मुख्य स्तूपाचा खालचा ४′ उंचीचा भाग उत्तरकालीन दिसतो.

(४) अंबस्थाल दागब आणि महासेय दागब—हे दोन्ही स्तूप अनुराधपुर गावापासून ८ मैल पूर्वेकडील मिहिंतले टेकडीवर असून भौगोलिक, तसेच स्थापत्यशास्त्रीयदृष्ट्या ते अनुराधपुर येथील अवशेषसमूहाचाच भाग समजले जातात ( मिहिंतले पहा ).

[ ३ ] बौद्ध संघाराम—अनुराधपुर येथे निम्नलिखित बौद्ध संघारामांचे अवशेष सापडतात :--

(१) लोह महापाय (लोहप्रासाद) संघाराम—सिलोनचा राजा दुत्थगामनि याने इ. स. पू. २ ऱ्या शतकात बांधलेल्या या संघारामाचे अवशेष आधुनिककाळी ' मयुर राजवाडा ' अथवा ' ब्रॉंझ राजवाडा ' या नावाने ओळखले जातात. सातवाहन स्थापत्यपद्धतीने बांधलेल्या या संघारामाचे सविस्तर वर्णन महावंशात आढळते.

महावंशाच्या मते हा नऊ मजली संघाराम २३० फूट लांबी-रुंदीचा आणि तितक्याच उंचीचा असून त्यामध्ये उपासनामंदिर, प्रवचनगृह आणि भिक्षुनिवासाच्या १०० खोल्या होत्या.

इ. स. ४ थ्या शतकात सिलोनचा राजा महासेन याने हा संघाराम संपूर्णतः उध्वस्त केला. त्यानंतर त्याच्या मुलाने त्याच स्थानी नवा पाच मजली संघाराम बांधला. येथून पुढे या संघारामाचे महत्त्व हळूहळू कमी होत गेले आणि इ. स. १३ व्या शतकात तो सर्वस्वी विजन झाला.

आज या संघारामाच्या तळमजल्याचे सुमारे १६०० दगडी स्तंभ तेवढे उभे दिसतात. प्रत्येकी १२ उंचीचे आणि ६′ अंतरांवरील हे स्तंभ चाळीसच्या गटाने हरेक दर्शनी भागात स्थापिले आहेत. या स्तंभांच्या वरच्या अंगास प्राचीन काळी लाकडी तुळयांचा सांगाडा असून त्यावर आधुनिक ब्रह्मी बौद्धमठाप्रमाणे आठ मजल्यांची उभारणी करण्यात आली असावी.

या विहाराच्या प्रत्येक मजल्यावर १०० खोल्या असल्याचे महावंशातील वर्णन बौद्ध वास्तुशिल्पाचा तौलनिक विचार करता शक्य कोटीतील वाटत नाही. ह्युएन्त्संग अथवा फाहियान् यांनी वर्णिलेल्या दक्षिणभारतीय बौद्ध विहाराच्या धर्तीवर अथवा मामल्लपुरम् येथील रथमंदिरांप्रमाणे या संघारामाची रचना करण्यात आली असावी. या संघारामातील सारे मजले एकसारख्या आकाराचे नसून ते क्रमाने निमुळते होत गेले असावे. हवामानाच्या दृष्टीनेहि मागच्या बाजूस क्रमाने कमी होत गेलेल्या खोल्या आणि पुढील बाजूस रात्रीच्यावेळी निजण्यासाठी अथवा शतपावलीसाठी गच्ची ही व्यवस्था अधिक शक्यकोटीतील वाटते.

पर्सी ब्राऊन यांच्या मते दक्षिण भारत आणि सिलोन यामधील उत्तरकालीन संघारामस्थापत्याचे आद्य उदाहरण म्हणजे हा संघाराम असून मामल्लपुरम् येथील ' धर्मराज रथ ' हे मंदिर याचेच अनुकरणाने कोरले आहे.

या संघारामाच्या ब्रॉंझ धातूच्या घुमटाकृती नक्षीकामयुक्त छपरामुळे त्यास ' लोहप्रासाद ' असे नाव प्राप्त झाले होते. या संघारामाचा प्रचंड आकार आणि त्याच्या छतावरील सुंदर नक्षीकाम यामुळे साऱ्या बौद्ध मंदिरांमध्ये ती सर्वोत्कृष्ट इमारत मानली जात असे.

उत्तरकालामध्ये या संघारामाच्या शिखरास लावण्यात आलेला ब्रॉंझचा पत्रा लोकांनी चोरून नेला; लाकडाचे केलेले वरचे मजले काळाच्या ओघात विनष्ट झाले. या कारणाने या संघारामापैकी अविनाशी दगडी स्तंभ तेवढे आज बाकी राहिले आहेत.

(२) रुवनवेलि विहार—रुवनवेलि स्तूपाच्या परिसरात आढळणाऱ्या दगडी स्तंभांच्या, तसेच पोकन (पुष्करिणी), प्रार्थनामंदिर आदींच्या अवशेषांवरून सातवाहन स्थापत्यशैलीचा एक विहार या स्थानी अस्तित्वात असावा असे दिसते.

जमिनीपासून उंच अशा व्यासपीठावर बांधलेल्या या विहाराप्रत चढून जाण्यासाठी कलात्मक पायऱ्या असून त्यांच्या तळाशी सातवाहन शैलीचा ' पद्मशिला ' संज्ञक अर्धवर्तुळाकृती नक्षीकामयुक्त दगड बसविला आहे ( पद्मशिला भौ. पहा ).

या विहाराची रचना भारतातील बौद्ध विहारांप्रमाणेच असली तरी त्याच्या विभिन्न उपविभागांची सिलोनी भाषेतील नावे मात्र वेगळी दिसतात ( विहार भौ. पहा ).

(३) महासेन विहार—गुप्तकालीन स्थापत्यशैलीने बांधलेल्या या तटबंदीयुक्त विहारात गौतम बुद्धाच्या मूर्तीने युक्त एक मध्यवर्ती प्रार्थनागृह असून त्याच्या चार बाजूस चार छोट्या इमारती आहेत. या विहारातील ' उपोसथ घरम् ' ( सेवागृह ) वैशिष्ट्यपूर्ण आहे.

(४) विजाराम विहार—मध्यवर्ती मंदिराच्या जोडीला येथे एक छोटा स्तूप आणि उपदेशगृह बांधले असून उपदेशश्रवणासाठी स्थानिक बौद्धधर्मीय लोक या उपदेशगृहामध्ये एकत्र होत असत.

[ ४ ] अन्य इमारती--अनुराधपुर येथील अन्य बौद्धधर्मीय इमारती पुढीलप्रमाणे होतः—

( १ ) दलदा मालिगाव ( गौतम बुद्धाचे दंतावशेष मंदिर )—हे मंदिर थूपाराम स्तूपाच्या व्यासपीठाच्या आग्नेयेस आहे. इ. स. ४ थ्या शतकाच्या प्रारंभी ओरिसामधील ' दंतपुर ' ( आधु. जगन्नाथपुरी ) येथील गौतम बुद्धाचे दंतावशेष ( डावा सुळा ) सिलोनमध्ये आणून त्यांची स्थापना थूपाराम स्तूपाच्या आवारातील दंतावशेष-मंदिरामध्ये समारंभपूर्वक करण्यात आली ( दंतपुर पहा ).

( २ ) इसुरुमुनिय मंदिर—गुप्तशैलीने बांधलेले हे मंदिर अंशतः कोरीव गुफेच्या स्वरुपाचे आणि अंशतः दगडविटांनी बांधले असून, फर्ग्युसन यांच्या मते ते इ. स. ६ व्या–७ व्या शतकात बांधले असावे.

( ३ ) बोधिवृक्ष--हा वृक्ष बौद्धधर्मीय व्यक्तींच्या दृष्टीने या गावचे पूजनीय यात्रास्थान मानला जातो. या नगराच्या विजन आणि वैराण अवस्थेतहि बोधिवृक्षाच्या पूजेची परंपरा अबाधित राहिली असून, गेली २००० वर्षे ती अखंडपणे चालू आहे. बौद्ध जगामधील प्राचीनतम उपास्य दैवतांमध्ये या वृक्षाची गणना केली जाते.

बोधिवृक्षाची शाखा अनुराधपुर येथे कशी आली यासंबंधी महावंशात निम्नलिखित आख्यायिका दिली आहे :-- अशोकाचा पुत्र ' महिंद ' अनुराधपुर येथे बौद्धधर्मप्रचारार्थ आला असता सिलोनचा राजा ' देवानांपिय तिस्स ' याने त्याचे अत्यंत आदरपूर्वक स्वागत करून या गावच्या महामेघ उद्यानात त्याची राहाण्याची व्यवस्था केली. राजाच्या भावजयीने आणि अन्य शंभर राजस्त्रियांनी बौद्ध धर्माची दीक्षा घेण्याची इच्छा दर्शविली. तेव्हा महिंदाने आपली भगिनी संघामित्रा हिला बोधिवृक्षाची एक शाखा बरोबर घेऊन सिलोनला बोलावून घेतले. ही शाखा तोडण्यासाठी अशोक बोधगया येथे गेला. तेव्हा या वृक्षाची एक शाखा आपोआपच झाडापासून सुटून त्याच्या हाती आली.

अनुराधपुर येथील महामेघ उद्यानात मुद्दाम तयार केलेल्या सोन्याच्या कुंडीत बोधिवृक्षाचे समारंभपूर्वक शाखारोपण करण्यात आले. 'देवानांपिय तिस्स' राजाने या वृक्षास आपले सारे राज्य अर्पण केले. या वृक्षारोपणाच्या वेळी तो सदैव हिरवागार राहील; तसेच त्याचा आकार शतकानुशतके एकसारखा राहील; तो कधीहि वाढणार नाही अथवा वठणार नाही, ' अशी आकाशवाणी झाली.

अनुराधपुर येथील बोधिवृक्ष आजहि टवटवीत आणि त्याच्या दीर्घकालीन आयुष्याच्या मानाने अत्यंत आटोपशीर आणि मर्यादित वाढीचा आहे.

या वृक्षासभोवताली ' उदमलुव ' ( महाविहार ) नामक एक शंक्वाकृती मंदिर ३६' उंचीच्या व्यासपीठावर बांधले असून, या मंदिराच्या वरच्या टोकातून बोधिवृक्ष बाहेर फुटलेला दिसतो. हे मंदिर बरेच उत्तरकालीन आणि म्हणूनच स्थापत्यशास्त्रीय दृष्टीने वैशिष्ट्यहीन आहे.

महावंशात निर्देशिलेली बौद्धस्थाने--या ग्रंथात निर्देशिलेली अनुराधपुर येथील अन्य बौद्धस्थाने पुढीलप्रमाणे होतः —

१. इसिभुमंगनन--अशोकपुत्र महिंद याचे या स्थानी दहन करण्यात आले.

२. घंटाकर विहार--बोधिवृक्षानजीक असणाऱ्या या महाविहारामध्ये बुद्धघोषाने ( इ. स. ४१०–४३२ ) ' विसुद्धिमग्ग ' नामक सुविख्यात ग्रंथाची रचना केली.

उपरोक्त मंदिरांचे काहीहि अवशेष या गावी आज आढळत नाहीत.

नागरी स्थापत्य--या गावच्या नागरी स्थापत्यामध्ये महासेन ( इ. स. ३३४–३६१ ) राजाच्या राज्यकालातील सातवाहन आणि गुप्त स्थापत्यशैलीचे निम्नलिखित स्थापत्यावशेष विशेष उल्लेखनीय आहेतः—१. सातवाहन शैलीचे स्थापत्य–मिन्नेरीय तलाव. २. गुप्त शैलीचे स्थापत्य– १. रत्नप्रासाद; २. महासेनाच्या राणीने बांधलेला राज्ञी-प्रासाद ( या प्रासादाची रचना अजंटा येथील भित्तिचित्रातील लाकडी प्रासादासदृश आहे ); ३. राज्ञी–पुष्करिणी ( कुत्तम् पोकुन ); ४. तिस्स वेवनजीकची राजाची बाग आणि पुष्करिणी; ५. लोहप्रासादानजीकचे ' पोकुन. '

शिल्पकृती--या गावी सापडलेल्या बौद्ध शिल्पकृतींचे निम्नलिखित उपविभाग दिसतातः—

१. गुप्त शैलीच्या शिल्पकृती--रुवनवेलि दागबानजीक सापडलेला महासेन राजाचा पुतळा, तसेच बोधिसत्त्वाच्या ब्रॉंझ धातूच्या मूर्ती गुप्त शिल्पशैलीने कोरल्या आहेत.

२. पल्लव शैलीच्या शिल्पकृती—इ. स. ७ व्या–८ व्या शतकातील पल्लव शैलीने कोरलेल्या गौतम बुद्धाच्या अनेक शिल्पकृती येथे सापडल्या आहेत.

विनाश--महावंशाच्या मते सिलोनचा राजा शीलामेघ सेन अथवा सेन ( प्रथम ) याच्या राज्यकालात इ. स. ८३० मध्ये पांडय राजा श्रीमार याने सिलोनवर ससैन्य हल्ला केला आणि अनुराधपुर येथील सारे राजवाडे उध्वस्त केले

( महा. ५०.५.१९ ). यावरुन इ. स. ९ व्या शतकात क्रमाक्रमाने विजन होत चाललेल्या अनुराधपुर गावाचे वैभव या काळात नष्ट झाले, असे दिसते. यानंतर इ. स. १०६४ मध्ये चोल राजा वीर राजेंद्र याने या नगराचे उरलेसुरले वैभव नष्ट केले ( महा. ५८.५.५७ ).

**अनुविंद्ध** ( देश )—बृहत्संहितेत निर्देशिलेला ईशान्य भारतातील एक देश ( बृ. सं. १४.३१ ).

**अनुविश्व** ( लोकसमूह )—बृहत्संहितेत निर्देशिलेला ईशान्य भारतातील एक लोकसमूह ( बृ. सं. १४.३१ ). हे लोक वस्तुतः उत्तर भारतात निवास करणारे असून, नेपाळमधील वन्य जमातींपैकी असावेत. पाठभेद–' अन्नदारक ' ( मार्क. ५५.५१ ).

**अनुष्णा** ( नदी )—महाभारतात निर्देशिलेली भारतवर्षान्तर्गत एक नदी ( म. भी. १०.२३ पाठ ).

**अनुष्णी** ( नदी )—पद्म पुराणात निर्देशिलेली भारतवर्षान्तर्गत एक नदी ( पद्म. सृ. ६.२० ).

**अनूप**—प्राचीन भारतातील एक देश. ' अनूप ' संज्ञक अनेक देश प्राचीन मध्य, पश्चिम, दक्षिण आणि पूर्व भारतात अस्तित्त्वात होते.

**भौगोलिक संज्ञा**—' अनूप 'चा शब्दशः अर्थ ' पाण्याजवळ वसलेला दलदलीचा प्रदेश ' असा होतो. समुद्राच्या पाण्याने वेळीअवेळी भरणाऱ्या पाणथळ प्रदेशाला उद्देशून ' अनूप ' अथवा ' सागरानूप ' म्हणत असत. यापैकी पश्चिम समुद्रास लागून असणारा ' अनूप ' अथवा ' सागरानूप ' देश विशेष प्रसिद्ध होता.

समुद्राने वेष्टिलेल्या प्रदेशाप्रमाणेच नदीने वेष्टिलेला प्रदेशहि ' अनूप ' याच नावाने ओळखला जात असे. मध्य भारतातील माहिष्मती नगरासभोवतालचा प्रदेश ' अनूप ' अथवा ' नर्मदानूप ' या नावाने प्रसिद्ध होता. या देशाच्या महान पराक्रमी हैहय राजांमुळे मध्य भारतातील हा अनूप देश प्राचीन साहित्यात सर्वाधिक प्रसिद्ध दिसतो. इतकेच नव्हे, तर प्राचीन साहित्यातील बहुतांशी सारे निर्देश या देशासंबंधीचेच दिसतात.

**विभिन्न अनूप देश**—असे असले तरी महाभारत आणि रामायणकाळी ' नर्मदानूप ', ' समुद्रानूप ', ' पश्चिमसागरानूप ' आणि ' गोमती-अनूप 'असे विभिन्न स्वतंत्र देश अस्तित्वात असल्याचे त्यांच्या स्वतंत्र निर्देशावरून दिसते. या देशांची माहिती खाली क्रमशः दिली आहे:–

**[ १ ] नर्मदानूप**—पौराणिक साहित्यात निर्देशिलेला मध्य भारतातील ऋक्षवत् पर्वताच्या छायेतील एक देश. नर्मदा ( रेवा ) नदीकाठच्या माहिष्मती नगरासभोवतालचा प्रदेश ' अनूप देश ' अथवा ' नर्मदानूप देश ' अशा वैकल्पिक नावांनी ओळखला जात असे ( ह. वं. २.३८.१४-१९ ). हा देश सुराष्ट्र ( आधु. सौराष्ट्र ) देशाच्या दक्षिणेस वसला असल्याचा निर्देश शिलालेखसाहित्यात आढळतो. या देशाची राजधानी माहिष्मती गावी होती ( रघु. ६.४३; माहिष्मती पहा ).

**नामांतरे आणि पाठभेद**—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आणि पाठभेद आढळतात:–

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. रुद्रदामनाचा जुनागढ शिलालेख ( ल्यूडर्स, क्र. ९६५ ) | अनूप-निवृत् |
| २. हरिवंश ( २.३८.१४-१९ ) | नर्मदानूप |
| ३. ,, ( २.३७.३० ) | समुद्रानूप ( गिरिपुरसन्निध ) |
| ४. मार्कंडेय पुराण ( ५४.५५ ) | अन्नज |
| ५. मत्स्य पुराण ( ११४.५४ ) | अरूप |
| ६. महाभारत ( आर. ४८.१९ ) | अनूपग |
| ७. ,, ( भी. १०.४२ ) | अनूपवासिक |

उपरोक्त पाठभेदांपैकी ' अन्नज ' आणि ' अरूप ' हे पाठ उघडउघड चुकीचे वाटतात.

**महाभारतात**—एक जनपद या नात्याने महाभारतात अनूप देशाचा निर्देश आढळतो ( म. स. ४७.२० पाठ. ) हैहय राजे कार्तवीर्य आणि नील यांचा निर्देश महाभारतात अनुक्रमे 'अनूपपति' आणि 'अनूपाधिपति' या नावांनी केला आहे ( ' अनूपपति '–म. आर. ११६.१९; ' अनूपाधिपति '–म. भी. ९०.२७ ). यापैकी माहिष्मतीचा राजा नील हा कौरवपक्षात सामील असून, अन्य एक नील राजा पांडवपक्षात होता.

महाभारतात निर्देशिलेले ' अनूपवासिक ' हे जनपद ते बहुधा हेच असावे ( म. भी. १०.४२ ). अनूप देशाचे योद्धे कौरवपक्षात सामील असून, भीष्माच्या ' क्रौञ्चारुण व्यूहा 'च्या ग्रीवेमध्ये उभे होते ( म. भी. ४६.४६ ).

महाभारतात अन्यत्र ' अनूपग ' देशाचा ( म. आर. ४८.१९ ) आणि ' अनूपवासिक ' जनपदाचा ( म. भी. १०.४२ ) निर्देश आढळतो. या दोन्ही ठिकाणी ' नर्मदानूप ' देशाचाच निर्देश अभिप्रेत असावा.

पौराणिक साहित्यात--विंध्य पर्वताशी संबंधित एक देश या नात्याने पौराणिक साहित्यात या देशाचा निर्देश असून तेथे याला 'विंध्यपृष्ठवासि' ( ब्रह्माण्ड. १६.६५ ). 'विंध्यमूलवासि' ( वामन. १३.५६ ); आणि 'विंध्यवासि' ( वायु. ४५.१३४ ) म्हटले आहे.

शिलालेखसाहित्यात--गौतमी बलश्रीच्या नासिक शिलालेखात हा देश अपरांत आणि विदर्भ यांच्या दरम्यान वसला असल्याचा निर्देश आढळतो ( एपि. इंडि. ८.४१; ६१ ).

रुद्रदामनाच्या जुनागढ शिलालेखात 'अनूप निवृत्' हा देश आकर-अवंति ( पूर्व आणि पश्चिम माळवा ) आणि आनर्त या दोन देशांच्या दरम्यान वसल्याचा, तसेच सातवाहन राजांकडून तो जिंकून घेतल्याचा निर्देश आढळतो ( ल्यूडर्स, क्र. ९६५ ).

उपरोक्त दोन्ही शिलालेखात माहिष्मती नगरासभोवतालच्या 'अनूप' देशाचा निर्देश अभिप्रेत दिसतो.

[ २ ] समुद्रानूप-- खंबायतच्या आखाताच्या पूर्वेस वसलेला एक सागरवर्ती देश. नामांतरे:- १. पश्चिमानूप ( म. उ. ४.१५ ); २. सागरानूप ( ह. वं. २.३७.३० ).

हरिवंशात--या ग्रंथाच्या मते आनर्त, सुराष्ट्र आणि अनूप ही सारी एकाच देशाची नामांतरे असून, हा देश पश्चिम समुद्राला लागून वसला होता ( ह. वं. २.३७.३१–३२; ३९–४० ). समुद्राने भूषित असा हा देश गोधनाने समृद्ध ( गोसमृद्ध ) असून, गिरिपुर नामक दुर्ग ( आधु. गिरनार पर्वत ) तेथे होता ( ह. वं. २.३७.३०–३१ ).

यावरून 'समुद्रानूप' अथवा 'पश्चिमानूप' अशा नावांनी निर्देशिलेला हरिवंशातील अनूप देश म्हणजे गुजरात प्रांतातील सुराष्ट्र ( आधु. सौराष्ट्र ) देश दिसतो.

महाभारतात--'पश्चिमानूप' देश आणि लोकसमूह या नावाने या देशाचा निर्देश या ग्रंथात आढळतो. भारतीय युद्धात हे लोक पांडवांच्या पक्षात सामील असून, या देशाचा राजा 'अनूपाधिपति' नील हा अश्वत्थाम्याकडून मारला गेला ( म. उ. ४.१५ ).

महाभारतात दुर्धर्ष नामक 'अनूप' राजाचा निर्देश आढळतो ( म. स. ४.२५ ). हा राजा निश्चित कोणत्या अनूप देशाचा राजा असावा ते मात्र समजत नाही.

[ ३ ] पश्चिम सागरानूप--महाभारतात निर्देशिलेले दक्षिण भारतातील पांड्य देशाचे नामांतर ( म. आर. २०९. १७ ). नामांतर-'सागरानूप' ( म. उ १९.९ ).

[ ४ ] गोमती अनूप-- वाल्मीकि रामायणात निर्देशिलेला गोमती नदीच्या परिसरात वसलेला देश ( वा. रा. अयो. ४९.११ ).

२. ( नगर ) उत्तर भारतातील गंगानदीकाठचे एक नगर. आधु. बुलंद शहर रेल्वेस्थानकापासून थोड्या अंतरावर हे नगर असून येथे अनेक पुरातन देवालये आणि साधुआश्रम आहेत ( ती. ८९ ).

**अनूपग** ( देश )--महाभारतात निर्देशिलेले मध्य भारतातील अनूप ( माहिष्मती नगरासभोवतालचा प्रदेश ) देशाचे नामांतर ( म. आर ४८.१९; अनूप १. पहा ). अन्य नामांतरे--'अनूप-निवृत्' ( ल्यूडर्स, क्र. ९६५ ); 'अनूपवासिक' ( म. भी. १०.४२ ). पाठभेद--'रूपवाहिक'.

**अनूपा** ( नदी )--ऋक्षवत् पर्वतातून उगम पावणारी एक नदी ( ब्रह्माण्ड. २.१६.१८ ).

**अनेकाक्ष** ( देशविभाग )--श्रीवरांच्या ग्रंथात निर्देशिलेला कश्मीरातील एक देशविभाग ( श्रीवर. ३.१८४ ). अनंतनाग ( आधु. इस्लामाबाद ) च्या परिसरातील आधु. अन्येच् परगणा तो हाच होय ( स्टाइन, राज. २.४६७ ).

**अनोतत्त दह**--मिलिंदपन्होमध्ये निर्देशिलेले 'अनवतप्त' सरोवराचे नामांतर ( अनवतप्त पहा ).

**अनोपाल-शिला** ( तीर्थ )--त्र्यंबकजवळील गंगाद्वार पर्वतावरील नाथसांप्रदायाचे तीर्थस्थान ( ती. २४८ ).

**अनोम** ( पर्वत )--बौद्ध साहित्यात निर्देशिलेला हिमालय पर्वतानजीकचा एक पर्वत ( आपादान. ३४२ ).

**अनोमा** ( नदी )--बौद्ध साहित्यात निर्देशिलेली कोशल ( आधु. अयोध्या ) देशातील एक पवित्र नदी. आपल्या महाभिनिष्क्रमणानंतर ( राज्यत्याग ) गौतम बुद्ध कपिलवस्तु गावाहून सर्वप्रथम या नदीकाठी आला होता.

भौगोलिक स्थान--कनिंगहॅम यांच्या मते बस्ति जिल्ह्यामध्ये उगम पावून उत्तर प्रदेशान्तर्गत गोरखपुर जिल्ह्यातील सोहगौर गावानजीक रावी नदीस येऊन मिळणारी आधु. औमि नदी ती हीच होय ( कनिंग, पृ. ४२३ ).

उत्तर प्रदेशातील बस्ति जिल्ह्यातील आधु. कुडव नदी ती हीच होय, असे कार्लाईल म्हणतात ( अर्कि. सर्व्हे. २२.२२४ ). परंतु त्यांचे हे मत स्वीकरणीय वाटत नाही.

नामांतरे--प्राचीन साहित्यात या नदीची निम्नलिखित नामांतरे आढळतात:--१ हो-नन्-चिअँग ( चिनी बौद्ध-साहित्य ); २. अनोम (ब्राह्मी बौद्धसाहित्य); ३. अनोमिय, अनुवनिय, अनुमनिय ( पाली बौद्धसाहित्य ).

नामव्युत्पत्ती--जातकाच्या मते ' अनोम 'चा शब्दशः अर्थ 'दैदीप्यमान' असा होतो ( जा. १.६४ ). 'छोटी नदी' अशा अर्थाने हिला हे नाव प्राप्त झाले असावे, असे कनिंगहॅम म्हणतात.

बौद्ध साहित्यात—या नदीच्याकाठी बुद्धाने आपली राजवस्त्रे उतरून च्छंदक नामक नोकराकरवी ती कपिलवस्तु गावी परत पाठविली. आपला कंथक नामक घोडाहि बुद्धाने च्छंदकाला दिला. यानंतर डोक्यावरील केसांची श्मश्रु करून आणि घटिकार नामक ब्रह्मदेवाने अर्पिलेली कषाय वस्त्रे ग्रहण करून बुद्धाने आपल्या तापसी जीवनाला प्रारंभ केला ( बुद्धचरित. काव्य. ५; धम्म. टीका. १.८५ ).

बौद्ध साहित्यातील उपरोक्त वर्णनावरून ही नदी कपिलवस्तु या शाक्य राजधानीपासून विशेष लांब नव्हती असे दिसते. बौद्ध ललितविस्ताराच्या मते ही नदी कपिलवस्तुपासून सहा योजने अंतरावर होती ( ललित. १४ ). कनिंगहॅम यांनीहि हे अंतर ग्राह्य मानले आहे ( कनिंग, पृ. ४२३ ).

अनुपिया नगराचे नामांतर—बौद्ध धर्मग्रंथ आणि टीका यांच्या मते ही नदी मल्ल देशातील अनुपिया गावाजवळून वहात असे. त्याआधारेच अनोमा हे नदीचे नाव नसून मल्ल देशातील अनुपिया नगराचे नामांतर असावे, असे थॉमस म्हणतात. त्यांच्या मते अनोमा हे नगरनाम ' अनुपिया 'चे अपभ्रष्ट रूप असून ते अनुमनिय अनुवनिया )→ अनोमिया→ अनोमा अशा क्रमाने सिद्ध झाले असावे.

परंतु शाक्य राजधानी कपिलवस्तु आणि मल्ल राजधानी अनुपिया यामध्ये तीस कोसांचे ( लीग ) अंतर होते. तसेच हे अंतर गाठण्यासाठी शाक्य, कोलिय आणि मल्ल या तीन देशांमधून प्रवास करावा लागत असे. मध्यरात्रीपासून सकाळपर्यंत ज्या मर्यादित वेळेमध्ये गौतम बुद्धाने एवढा मोठा प्रवास केला असणे अशक्य असल्याने थॉमस यांचे उपरोक्त मत अग्राह्य वाटते ( अनुपिया पहा ).

**अनौओई** ( देश )—ग्रीक वाङ्मयात निर्देशिलेला इ. स. १ ल्या शतकातील पर्शियन साम्राज्यान्तर्गत एक देश. हा देश अरिया ( वायव्य प्रदेशातील आधु. हेरात प्रदेश ) देशाचा एक उपविभाग असून त्याची राजधानी प्रग ( आधु. फर्रा ) गावी होती ( स्मिथ, झेड्. डी. एम्. जी., इ. स. १९०६, पृ. ५७ ).

**अन्तःशिरा** अथवा **अन्तःशिला** ( नदी )—पौराणिक साहित्यात निर्देशिलेले अन्तःशीला ( आधु. तिक्किरा ) नदीचे नामांतर ( अन्तःशीला पहा ).

**अन्तःशीला** ( नदी )—पौराणिक साहित्यात निर्देशिलेली विंध्य पर्वतातून उगम पावणारी एक नदी ( वायु. ४५.१०३; कूर्म. पूर्व. ४७.३३ ). ब्राह्मणी नदीची उपनदी असणारी ओरिसामधील आधु. तिक्किरा नदी ती हीच होय ( पार्गि., मार्क. पृ. ५१ ).

पाठभेद—पौराणिक साहित्यात या नदीचे निम्नलिखित पाठभेद निर्देशिले आहेत:—१. अन्तःशिरा ( मार्क. ५४.२५ ); २. अन्तःशिला ( म. भी. १०.२९; पद्म. स्व. ६.२५ ); ३. अन्त्यगिरा ( वराह. ८५.५ ).

भौगोलिक स्थान—पौराणिक साहित्यात निर्देशिलेल्या विंध्यपर्वताश्रयी सान्या नद्या कलिंग देशातील असल्याने ही नदीहि त्याच देशातील असावी.

आधु. तिक्किरा नदी संबळपुर जिल्ह्यातील मंदार टेकड्यांमध्ये उगम पावते आणि अंगुल गावाच्या पूर्वेस ब्राह्मणी नदीस जाऊन मिळते (लॉ, रिव्हर्स. पृ. ४३–४४ ).

**अन्तःशिवा**—विंध्यपाद पर्वतामधून उगम पावणारी एक नदी ( मार्क. ५४.२५ ).

**अन्तकेश्वर** ( लिंग )—काशी येथील एक शिवलिंगस्थान ( नारद. २.४९.६; स्कन्द. काशी. ६८.६९;९७.३२; लिंग. तीर्थकल्पतरु पृ. ७५ ). पाठभेद–' अन्तिकेश्वर '.

**अन्तरत्रा**—वलभी राजा धरसेन ( द्वितीय ) याच्या इ. स. ५७१ मधील मालिया ताम्रपटात निर्देशिलेले काठेवाड प्रांतातील एक ग्राम. हे ग्राम ' शिवपद्रक ' विभागात वसले होते ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.१७० ).

**अन्तरद्वीप** ( द्वीप )—पौराणिक साहित्यात निर्देशिलेले भारताच्या दक्षिणेकडील महार्णव नामक समुद्रामधील एक द्वीप. या द्वीपामध्ये विद्युत्वन्त नामक एक कुलपर्वत असून हे द्वीप धर्मभ्रष्ट आदिवासी लोकांनी व्यापले होते ( वायु. ४८.१० ).

**अन्तरनर्मद** ( देश )—पौराणिक साहित्यात निर्देशिलेला दक्षिणापथान्तर्गत एक देश ( मत्स्य. ११४.५०; वायु. ४५.१३० ). पाठभेद – ' उत्तरनर्मद '; ' सुनर्मद '.

**अन्तरपाट** ( ग्राम )—कलचुरि राजा लक्ष्मणराज ( इ. स. ९४०–इ. स. ९६५ ) याच्या कारितलाइ शिलालेखात निर्देशिलेले मध्य भारतान्तर्गत एक ग्राम. जबलपुर जिल्ह्यातील मुर्वाडा तहसिलीतील कारितलाइ गावापासून ७ मैल पूर्वेस वसलेले आधु. अमतुर्रा गाव ते हेच होय ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.१८८ ).

**अन्तरवर** ( नगर )—टॉलेमीच्या ग्रंथात निर्देशिलेले सिंधु नदीच्या पूर्ववर्ती प्रदेशातील ( अक्षांश. २७°.२० उत्तर; रेखांश. १२२° पूर्व ) एक नगर. हे गाव निश्चित कोठे वसले होते ते समजत नाही.

**अन्तरिक्ष पार्श्वनाथ** ( जैनस्थान )—जैन साहित्यात निर्देशिलेले विदर्भातील 'श्रीपुर' ( आधु. सिरपुर ) या तीर्थस्थानाचे नामांतर ( ती. सं. पृ. ११९; श्रीपुर पहा ).

**अन्तरिक्षावतीर्ण** ( तीर्थ )—पुष्करक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( नारद. २.७१.३३ ).

**अन्तरुद्र** ( विषय )—पूर्व गंग राजघराण्याच्या इ. स. १२३० मधील ताम्रपटात निर्देशिलेला एक देशविभाग. पुरी जिल्ह्यातील सदर उपविभागातील आधु. अंतरोध परगणा तो हाच होय.

या देशविभागातील 'उडैकामम्' गावाचा निर्देश उपरोक्त ताम्रपटात आढळतो ( एपि. इंडि. ३१.९४ ).

**अन्तरेश्वरी** ( देवीस्थान )—काशी येथील एक देवीस्थान ( नारद. २.५०.२२ ).

**अन्तर्गिरि** ( पर्वत )—पाणिनीच्या अष्टाध्यायीत निर्देशिलेला हिमालय पर्वताचा एक भाग ( पा. सू. ५.४. ११२ ). डॉ. अग्रवाल यांच्या मते हिमालय पर्वताचा सर्वात उत्तरेकडील आणि सर्वात उंच भाग ( बृहत् हिमालय = ग्रेट सेंट्रल हिमालय ) म्हणजे हा पर्वत होय.

**नामांतरे**--प्राचीन साहित्यात या पर्वतश्रेणीची निम्नलिखित नामांतरे आढळतातः—१. अंतर्गिरम् ( सेनककृत अष्टाध्यायीभाष्य, पा. सू. ५.४.११२ ); २. महाहिमवंत ( पाली साहित्य ).

**भौगोलिक स्थान**—अग्रवाल यांच्या मते प्राचीन साहित्यात हिमालय पर्वताचे 'उपगिरि,' 'बहिर्गिरि' आणि 'अंतर्गिरि' असे पश्चिमेकडून पूर्वेकडे पसरलेले तीन उपविभाग कल्पिले असून, त्यांची व्याप्ती खालीलप्रमाणे होतीः—

१. उपगिरि--हिमालय पर्वताच्या पायथ्याशी वसलेला तराईचा प्रदेश म्हणजे हा पर्वत होय.

२. बहिर्गिरि—डेहराडूनच्या उत्तरेस पसरलेला आधु. 'लेसर हिमालय' (पाली-'चुल्ल हिमवंत') पर्वत तो हाच असून, मसुरी, नैनिताल, सिमला आदि गावे याच पर्वतश्रेणीमध्ये वसली आहेत.

३. अंतर्गिरि—हिमालयाचा सर्वात उत्तरेकडील भाग ( सरासरी उंची १८०००'–३००००' ) या पर्वतश्रेणीमध्ये समाविष्ट असून, कांचनगंगा, गौरीशंकर, धवलगिरि, नंदादेवी, नंगा पर्वत आदि हिमालयातील सुविख्यात शिखरेहि याच भागात आहेत.

पाणिनीच्या अष्टाध्यायीत—या ग्रंथात हिमालय पर्वताचे 'उपगिरि' आणि 'अंतर्गिरि' असे दोनच भाग दिले असून, या दोहोंच्या दरम्यान वसलेला बहिर्गिरि त्याच्या काळी अंतर्गिरीमध्येच समाविष्ट होत असावा.

महाभारतात—अर्जुनाने आपल्या उत्तर दिग्विजयात हिमालय पर्वताचे अंतर्गिरि, बहिर्गिरि आणि उपरिगिरि हे तीन भाग जिंकल्याचा निर्देश या ग्रंथात आढळतो ( म. स. २४.२ ).

पाणिनीची अष्टाध्यायी आणि महाभारत ग्रंथांच्याकाली हिमालय प्रदेशाचे भौगोलिक ज्ञान अस्पष्ट असल्याने अंतर्गिर्यादि पर्वतांची निश्चित व्याप्ती त्यामध्ये कोठेहि निर्देशिलेली नाही. तसेच या पर्वतामध्ये निवास करणारा 'अंतर्गिरि' नामक लोकसमूह कधी उत्तर भारतात, तर कधी पूर्व भारतात निवास करीत असल्याचा निर्देश तेथे केला आहे ( अंतर्गिरि २; ३. पहा ). हिमालय पर्वताचा काही भाग उत्तर भारतात आणि काही भाग पूर्व भारतात होता हे लक्षात घेता या घोटाळ्याचा उलगडा होतो.

२. बृहत्संहितेमध्ये निर्देशिलेला उत्तर भारतातील पर्वतमय प्रदेश ( बृ. सं. ५.४२ ). अंतर्गिरि ( बृहत् हिमालय ) पर्वताच्या उत्तरेकडील भागामध्ये हा देश कोठेतरी वसला असावा. पाठभेद-'अंतःशैलज.'

अर्जुनाच्या उत्तर दिग्विजयात प्राग्ज्योतिषच्या उत्तरेस वसलेल्या या देशाचा निर्देश आढळतो ( म. स. २४.२ ).

**भौगोलिक स्थान**--या देशाच्या भौगोलिक स्थानाविषयी निम्नलिखित मतांतरे आढळतातः--

( १ ) डॉ. लॉ यांच्या मते--उत्तर आसाम प्रदेशामध्ये हिमालय आणि नेपाळतराई यांच्या उतारावर हा देश वसला असावा.

( २ ) कर्न यांच्या मते—हिमालय पर्वतापैकी कुमाऊँ अथवा त्याचे पूर्वेस असणारा प्रदेश म्हणजे हा देश असावा.

३. अंग देशाच्या आग्नेयेस वसलेला पूर्व भारतातील एक देश व लोकसमूह ( म. भी. १०.४८; पद्म. स. ६.५४ ). पाठभेद-'अंतगिर'; 'स्वंतगिरि'.

मत्स्य पुराणात तसेच बृहत्संहितेतहि या देशाचा एकवचनी निर्देश आढळतो (मत्स्य. ११७; बृ. सं. १४.५).

लोकसमूह—अंतर्गिरि देशामधील 'अंतर्गिर्य' लोकांचा निर्देश पौराणिक साहित्यात आढळतो ( वायु. ४५.१२२;

ब्रह्माण्ड. ४९.५६; पद्म. सृ. ६.४४ ). पाठभेद–' बल्लक ' ( ब्रह्म. २७.५१ ).

मार्कंडेय पुराणात ' अंतर्गिरि ' लोकांचा निर्देश मुदकर आणि प्रवंग यांच्या दरम्यान केला आहे. पार्गिटर यांच्या मते बिहारमधील राजमहाल टेकड्यांच्या अंतर्भागात ' अंतर्गिरि ' आणि बहिर्भागात ' बहिर्गिरि ' लोक निवास करीत असावेत ( पार्गि, मार्कं. पृ. ३२६ ). मुजफरअलि यांच्या मते हे दोन्ही लोकसमूह राजमहाल पठारावर रहात असून, त्यापैकी ' अंतर्गिरि ' लोक राजमहाल व हजारीबाग पर्वतश्रेणीच्या दरम्यानच्या पर्वतीय भागात रहात असावेत ( मुजफरअलि, जिऑ. पृ. १५४ ).

**अन्तर्गिर्य**—पौराणिक साहित्यात निर्देशिलेले पूर्व भारतातील ' अंतर्गिरि ' लोकसमूहाचे नामांतर ( पद्म. सृ. ६.४४; अंतर्गिरि ३. पहा ).

**अन्तर्गृह** ( तीर्थ )— अवंति येथील क्षेत्रस्थान ( नारद. २.७८.४३ ).

**अन्तर्जलचर** ( देश )—पूर्व भारतातील एक देश ( वा. रा. कि. ४०.२८ ).

**अन्तर्द्वीप** ( देश )--बृहत्संहितेत निर्देशिलेला उत्तर भारतातील ( कूर्माच्या वाम कुक्षीतील ) त्रिगर्त देशानजीकचा एक देश ( बृ. सं. १४.२५; मार्कं. ५५.४३ ). पाठभेद–' अंतर्द्वीपिन.'

**नामव्युत्पत्ती**--' अंतर्द्वीप 'चा शब्दशः अर्थ ' दोन नद्यांच्या संगमस्थानानजीक वसलेला दुआबाचा प्रदेश ' असा होतो.

**भौगोलिक स्थान**--पंजाबातील रावी आणि चिनाब या दोन नद्यांच्या दरम्यानचा आधु. रेच्न दुआबाचा प्रदेश म्हणजे हा देश असावा.

**अन्तर्नर्मदा** ( देशविभाग ) -- भरुकच्छ विषयाचा सामंत संगमसिंह याच्या इ. स. ५४१ च्या सुनेव कुल्ला ताम्रपटात निर्देशिलेला पश्चिम भारतातील एक देशविभाग ( विषय ). नर्मदा नदीच्या उभय किनाऱ्यावरील प्रदेश म्हणजे हा देश असावा.

**नामव्युत्पत्ती**--डॉ. मिराशी यांच्या मते अन्तर्नर्मदामधील ' अन्तर् 'चा शब्दशः अर्थ ' नदीच्या उभय किनाऱ्यावरील प्रदेश ' असा होतो. जसे–' अंतर्मंडली ', ' अंतर्वेदि '.

**शिलालेखसाहित्यात**-- या देशविभागातील शोणव्वा ( भडोचपासून १८ मैल नैर्ऋत्येस असणारे आधु. सुनेव कुल्ला ) गाव दान म्हणून दिल्याचा निर्देश उपरोक्त ताम्रपटात आढळतो ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.३४ ).

**अन्तर्भव** ( देश )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात निर्देशिलेले उत्तर अफगाणिस्तानातील ' अंदराब ' देशाचे नामांतर ( वॉटर्स, १.२६८-२६९; अंदराब पहा ).

**अन्तर्मण्डली** ( देशविभाग )--त्रैकूटक राजा दाहरसेन याच्या इ. स. ४५७ मधील पारडी दानपत्रात निर्देशिलेला गुजरात प्रांतातील एक देशविभाग.

**आधुनिक स्थान**--या देशाच्या भौगोलिक स्थानाविषयी निम्नलिखित मतांतरे आढळतात :—

१. डॉ. फ्लीट यांच्या मते—उत्तरेस मंडली ( आधु. मेंढोला ) आणि दक्षिणेस पूर्णा या नद्यांच्या दरम्यान हा देश असावा ( एपि. इंडि. १०.५३ ).

२. डॉ. मिराशी यांच्या मते--मंडली नदीच्या उभय किनाऱ्यावरील प्रदेश म्हणजे हा देश असावा ( कॉर्पस् इन्स्क्रि. ४.१.२४; अंतर्नर्मदा पहा ).

**अन्तर्वेद** ( देश )--पौराणिक साहित्यात निर्देशिलेले उत्तर भारतातील ' अंतर्वेदी ' देशाचे नामांतर ( नारद. ५६.७४०; अंतर्वेदी १. पहा ). अन्य नामांतर–' अंतर्वेदि ( अभिधान. १२९.४९ ).

**अन्तर्वेदी** ( देश )—बृहत्संहितेमध्ये निर्देशिलेला उत्तर भारतातील एक देश ( बृ. सं. ५.६५ ). गंगा आणि यमुना नद्यांचे दरम्यानचा दुआबाचा प्रदेश तो हाच असून आजहि तो याच स्थानिक नावाने ओळखला जातो.

**नामांतरे**--प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात:—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. बृहत्संहिता ( ६९.२६ ) | गंगा-यमुना-आंतराळ |
| २. नारद पुराण ( १.५६.७४० )<br>३. भविष्य पुराण ( ३.२ ) | अंतर्वेद |
| ४. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य | |
| अ. अभिधानचिंतामणि ( १२९.४९ )<br>कल्पद्रुकोश ( ५.१० )<br>त्रिकांडशेष ( ३१.७ ) | अंतर्वेदि |
| ब. त्रिकांडशेष ( ३१.७ ) | कुशस्थली |
| क. कल्पद्रुकोश ( ५.१० )<br>अभिधानचिंतामणि ( १२९.४९ ) | शमस्थली |
| ड. हेमकोश | अंतर्वेद |

नामव्युत्पत्ती--'अंतर्वेदी'चा शब्दशः अर्थ 'दोन नद्यांच्या दरम्यान वसलेला दुआबाचा प्रदेश' असा होतो. तत्रापि ही संज्ञा विशेषेकरून गंगा-यमुना नद्यांच्या दुआबाच्या प्रदेशास लावण्यात येते.

पौराणिक साहित्यामध्ये—राजशेखराच्या काव्यमीमांसेच्या मते हा देश विनशन आणि प्रयाग यांच्या दरम्यानच्या गंगा-यमुना नद्यांच्या दुआबाच्या प्रदेशात वसला होता ( काव्य. १७.२२८ ). हा देश मध्यबिंदु धरूनच भारताचे पूर्व, पश्चिम, दक्षिण आणि उत्तर देशविभाग प्राचीन काळी पाडले जात असत. अंतर्वेद आणि पंचाल हे देश कूर्माच्या नाभिमंडलात वसले असल्याचा निर्देश नारद पुराणातहि आढळतो ( नारद. १.५६.७४० ). परंतु महोदय नगर ( कान्यकुब्ज नगर = आधु. कनौज ) हा मध्यबिंदु कल्पून भारताचे देशविभाग कल्पिणे अधिक शास्त्रशुद्ध होईल, असे राजशेखर म्हणतो.

भविष्यमते भारतवर्षाच्या अठरा देशविभागांमध्ये अंतर्वेदी राष्ट्राचा समावेश होत असे ( भवि. प्रति. २.१२ ).

तीर्थस्थान--स्कंदमते हे एक पवित्र तीर्थस्थान असून इंद्राने वृत्राचा वध केल्यामुळे त्यास ब्रह्महत्त्येचे पातक लागले, ते या स्थानी केलेल्या तपस्येमुळे नष्ट झाले ( स्कन्द. माहेश्वर. १.१७.२७४-२७५ ).

शिलालेखसाहित्यात—गुप्तसम्राट स्कंदगुप्ताच्या राज्यकालातील इ. स. ४६५ मधील इंदोर ताम्रपटात त्याचा मांडलीक राजा शर्वाग हा अंतर्वेदी विषयावर राज्य करीत असल्याचा निर्देश आढळतो. ज्या इंद्रपुर ( इंदोर ) गावाहून देवविष्णु नामक ब्राह्मणाने हा ताम्रपट काढला होता, ते गावहि अंतर्वेदी विषयातच समाविष्ट होत असे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.६९ ).

२. ( तीर्थ ) वसिष्ठा या गोदावरी नदीच्या उपनदीच्या मुखानजीकचे एक तीर्थस्थान. आंध्र प्रदेशान्तर्गत गोदावरी जिल्ह्यातील नर्सापुर या तालुक्याच्या गावापासून ७ मैल दक्षिणेस हे असून 'अंत्रवेदी' अशा वैकल्पिक नावाने हे प्रसिद्ध आहे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.७० ). गोदावरी नदीकाठच्या सात अंतिम पवित्र तीर्थांमध्ये याची गणना होते ( इंपि. गॅझे. १.२०४ ).

३. ( ग्राम ) उच्चहरा गावापासून ३० मैल पश्चिमेस वसलेले एक ग्राम. आधु. अंतर्वेद ( अक्षांश. २४°-२५' उत्तर; रेखांश ८०°-१३' पूर्व ) गाव तेच होय ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.७० ).

**अन्तवास** ( लोकसमूह )—महाभारतात निर्देशिलेले 'अनिवास' लोकसमूहाचे नामांतर ( म. स. ४५.१५; अनिवास पहा ).

**अन्ताखी** ( नगर )—महाभारतात निर्देशिलेले दक्षिण भारतातील 'आटवीपुरी' नगराचे नामांतर ( म. स. २८.४९; आटवीपुरी पहा ).

**अन्तिका** ( ग्राम )—शिलालेखसाहित्यात निर्देशिलेले पश्चिम भारतातील एक ग्राम. बडोदा जिल्ह्यातील पाद्रा तालुक्यातील आधु. आम्ति गाव ते हेच होय ( बडोदा शिलालेख. १.२० ).

**अन्त्यगिरा** ( नदी )—वराहपुराणात निर्देशिलेले कलिंग देशान्तर्गत 'अन्तःशीला' (आधु. तिक्किरा) नदीचे नामांतर ( वराह. ८५.५; अन्तःशीला पहा ).

**अन्त्या** ( नदी )--विंध्यपाद पर्वतातून उगम पावणारी एक नदी ( वराह. ८.५.५ ).

**अन्त्रमालिनी** ( तीर्थ)—काशी येथील एक योगिनीतीर्थ ( स्कन्द. काशी. ४५.३८ ).

**अन्दमान** ( द्वीप )--भारताच्या आग्नेयेस बंगालच्य उपसागरात वसलेले सुविख्यात बेट. चोल राजा राजेंद्र ( प्रथम ) याने इ. स. १०२५ च्या सुमारास हे बेट जिंकले होते ( स्मिथ, पृ. ४८७; इंन्द्रद्युम्नद्वीप पहा ).

**अन्दराब** ( देश ) — ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात निर्देशिलेला मध्य आशियान्तर्गत कुंदुझच्या आग्नेयेकडील एक देश. संस्कृत साहित्यान्तर्गत बाह्लीक ( आधु. बल्ख ) देशाचा एक उपविभाग हा देश असून उत्तर आफगणिस्तानातील आधु. अंदराब ( अक्षांश. ३५°-४०' उत्तर; रेखांश ६९°-२७' पूर्व ) गावाच्या परिसरामध्ये तो वसला असावा. बाबरच्या आत्मचरित्रातहि या देशाचा निर्देश आढळतो.

नामांतरे—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतातः—१. अन्-त-लो-फो ( अंतर्भव = अंदराब ) ( ह्युएन्त्संग, वॉटर्स, २.२६८-२६९ ); २. अद्रप्स ( स्ट्रॅबो, मॅक्रिंडल, इंडिया. पृ. ९० ).

स्ट्रॅबोच्या ग्रंथात--उत्तर अफगणिस्तानातील बॅक्ट्रियने ( बाह्लीक = आधु. बल्ख ) देशातील अद्रप्स नामक नगराचा निर्देश स्ट्रॅबोच्या ग्रंथात आढळतो ( मॅक्रिंडल, इंडिया. पृ. ९० ). यावरून स्ट्रॅबोच्या काळी एक देशविभाग या नात्याने अंदराब प्रदेश अस्तित्वात असावा.

ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात--या ग्रंथात या देशाचा निर्देश 'अन्-त-लो-फो' ( अंतर्भव ) अशा संस्कृत-

भाषीय नावाने केला असून, त्यावरुन त्याचे काळी स्थानिक बौद्ध भिक्षूंमध्ये हे देशनाम प्रचलीत असावे. मात्र सामान्य लोकात हा देश त्याकाळी, तसेच तत्पूर्वकाळात 'अंदराब' याच नावाने प्रसिद्ध होता.

भारतास येतेवेळी, तसेच चीनला परत जातेवेळी ह्युएन्त्संगने या देशाचा निर्देश केला आहे. यापैकी प्रथमप्रसंगी या देशाचा केवळ मोघम उल्लेख त्याने केला असून दुसऱ्या खेपेस तो तेथे पाच दिवस राहिल्याने त्याने या देशाचे सविस्तर वर्णन दिले आहे.

ह्युएन्त्संगच्या जीवनचरित्राच्या मते वृजिस्थान गावाहून तो कपिशा (आधु. काफिरिस्तान) देशाच्या सरहद्दीवर गेला, आणि मग उत्तरेकडे वळून हिंदुकुश पर्वतातील खावक खिंड ओलांडून तो अंदराब देशामध्ये प्रविष्ट झाला.

व्याप्ती–ह्युएन्त्संगच्या मते हा देश पूर्वकालीन तुखार (आधु. तोखार) राज्यामध्ये समाविष्ट असून, त्याचे क्षेत्रफळ ६०० मैल आणि त्याच्या राजधानीचे क्षेत्रफळ ३ मैल होते. यूल यांच्या मते ह्युएन्त्संगचे हे दोन्ही आकडे अतिशयोक्त असून अंदराब देश याहून फारच छोटा होता. ह्युएन्त्संगच्या काळी या देशावर तुर्कांचे राज्य होते.

**भौगोलिक माहिती**--हा देश विभिन्न टेकड्यांनी बनला असून, त्यांचे दरम्यानच्या खोऱ्यामध्ये शेते होती. येथील थंड हवा पीकपाण्याच्या दृष्टीने अनुकूल होती. येथील बहुसंख्य लोक हिंस्र स्वभावाचे असून ते हिंदु देवतांची पूजा करीत असत. बौद्ध महासांघिक सांप्रदायाचे तीन मठ, तसेच अशोकाचा एक स्तूप या देशामध्ये होता. तथापि बौद्ध धर्माचे या देशातील अस्तित्त्व नाममात्रच होते (वॉटर्स, २.२६८–२६९; बील, १.१०८).

**अन्दरे** (देश)--ग्रीक साहित्यात निर्देशिलेले 'अंध्र' देशाचे नामांतर (इंडि. अँटि., इ.स. १८७७, पृ. ३३९; अंध्र १. पहा).

**अन्दारि** (नगर)--पश्चिम गंग राजा राचमल्ल (द्वितीय) याच्या इ. स. ९०३ मधील दानपत्रात निर्देशिलेले दक्षिण भारतातील एक नगर. राचमल्लाचा पूर्वज दुर्विनीत याने या गावी यशस्वीपणे युद्ध केले होते (एपि. कर्ना. १०.९०).

**अन्द्रपन** (ग्राम)--टॉलेमीच्या ग्रंथात निर्देशिलेले वायव्य भारतातील (अक्षांश ३०°–४०' उत्तर; रेखांश १२१°–१५' पूर्व) एक गाव. कनिंगहॅम यांचे मते डेरा-इस्माइलखान गावानजीकचे आधु. द्रबंग (देराबंद) गाव ते हेच असावे.

**अन्ध** (नदी)--पौराणिक साहित्यात निर्देशिलेली एक नदी (दे. भा. ८.११.१६). डे यांच्या मते भागलपुर गावानजीक गंगा नदीस येऊन मिळणारी आधु. चांदन अथवा अंधिला नदी ती हीच होय (डे, पृ. ७).

नामांतरे--प्राचीन साहित्यात या नदीची निम्नलिखित नामांतरे आढळतात:-- १. अंदोमतिस् (अरियन); २. चंद्रावती (डे, पृ. ४७).

२. (नद) भागवत पुराणात निर्देशिलेला एक नद (महानदी) (भा. ५.१९.१८). डे यांच्या मते ब्रह्मपुत्रा नदीचेच हे नामांतर असावे (डे, पृ. ७; ब्रह्मपुत्रा पहा).

३. (देश) पद्म पुराणात निर्देशिलेले एक जनपद (पद्म. सृ. ६.४४).

४. (देश) पौराणिक साहित्यात निर्देशिलेले 'अंध्र' देशाचे नामांतर (मार्क. ५७.४८–४९; अंध्र १. पहा).

**अन्धक** (देश)--महाभारतात तसेच बौद्ध साहित्यात निर्देशिलेले 'अंध्र' देशाचे नामांतर (म. उ. १८.५८६; सुत्त टीका. २.५८१; अंध्र १. पहा).

२. मध्य देशान्तर्गत एक देश (मत्स्य. ११४.३६).

३. (तीर्थ) महाभारतान्तर्गत अंगिरस्-तीर्थयात्रेत निर्देशिलेले एक तीर्थस्थान (म. अनु. २५.३२).

**अन्धकवर्त** (देशविभाग)--काशिका ग्रंथात निर्देशिलेला वायव्य भारतातील एक देशविभाग. 'अन्धकवर्तीय' नामक पर्वतीय आयुधजीवी संघाचे आद्य निवासस्थान हा देश असून ईशान्य अफगाणिस्तानातील आधु. अंदखुर्द प्रदेश तो हाच असावा.

**अन्धकविन्द** (ग्राम)--बौद्ध साहित्यात निर्देशिलेले मगध देशातील एक ग्राम. गौतम बुद्धाचा मुक्काम या गावी असताना ब्रह्मा सहपति नामक एका ब्राह्मणाने बुद्धस्तुतीची काही कवने त्यास गाऊन दाखविली होती (संयुत्त. १. १५४). हे गाव आणि राजगृह यामध्ये बौद्धकाळी एक कच्चा रस्ता अस्तित्वात होता (विनय. महावग्ग. १.१०९).

**अन्धकारक** (देशविभाग)--क्रौंचद्वीपान्तर्गत एक वर्ष (देशविभाग) (ब्रह्माण्ड. १९.६७.७२; मत्स्य. १२२.८१; म. भी. १३.१७; लिंग. ५३.१४; वायु. ४९.६१; विष्णु. २.४.५०).

प्राचीन साहित्यात काही ठिकाणी 'वर्ष' म्हणून (लिंग. ४६.३३; वायु. ४९.६७; विष्णु. २.४.४८),

आणि काही ठिकाणी ' देश ' म्हणून ( मत्स्य. ११२. ८५; म. भी. १३.२१ ) याचा निर्देश आढळतो.

**अन्धकेश** ( लिंग )—वाराणसी येथील एक शिवलिंग-स्थान ( लिंग. तीर्थविवेचन. पृ. ६५ ).

**अन्धपुर** ( नगर )—अंध्र देशाच्या प्राचीनतम राजधानीचे गाव. ' अंध्रपुर 'चे हे प्राकृतभाषीय रूप असून मद्रास राज्य आणि मध्य प्रदेश यांच्या सीमारेषेवरील आधु. तेल अथवा तेलिन्गिरि गाव ते हेच होय ( रॉय-चौधरी पृ. १९६; अंध्र १. पहा ).

**अन्धल** ( प्रांत )—भरतखण्डान्तर्गत एक प्रांत. स्कंदमते यात चाळीस लक्ष गावे होती ( स्कन्द. माहेश्वर. २.३९. १२८ ). पाठभेद-' अमल '.

**अन्धवन** ( वन )—बौद्ध वाङ्मयात निर्देशिलेले श्रावस्ती गावापासून एक ' गवूत ' अंतरावर वसलेले एक वन ( मललसेकर, १.१११ ). या घनदाट वनात बौद्धकाळी अनेक चोरदरवडेखोर रहात असत.

नामव्युत्पत्ती—या वनातील दरवडेखोरांनी सोरत नामक बौद्ध भिक्षूचे डोळे काढून त्यास ठार मारले. या पापामुळे ते सारे दरवडेखोर अंध बनून ते रहात असलेले वन ' अंधवन ' म्हणून प्रसिद्ध झाले ( पपंच. १. ३३६ ).

बौद्ध साहित्यात—या वनातील दरवडेखोरांनी कोशल देशाच्या प्रसेनजित् राजाला लुटले. तेव्हा रागावून त्याने त्या साऱ्या दरवडेखोरांचा निःपात केला ( मललसेकर, १.१११ ). बुद्धशिष्य अनुरुद्ध ( ( प्रथम ) या वनामध्ये आजारी पडला होता ( संयुत्त. ५.३० ).

**अन्धापतिय** ( देश )—शिलालेखसाहित्यात निर्देशिलेले 'अंध्र' देशाचे नामांतर ( एपि. इंडि. ६.८८; अंध्र १. पहा ).

**अन्धेर** ( बौद्धस्थान )—मध्य प्रदेशातील सांची ( आधु. भिलसा ) स्तूपसमूहान्तर्गत एक स्तूपसमूह. भोजपुरपासून ५ मैल पश्चिमेस हा असून त्यामध्ये तीन महत्त्वपूर्ण स्तूप आहेत ( सांची पहा ).

**अन्धोन** ( तीर्थ )—नर्मदातीरावरील एक तीर्थस्थान ( पद्म. स्व. १८.११०-११३ ).

**अन्ध्र** ( देश )—दक्षिण भारतातील सुविख्यात देश. गोदावरी आणि कृष्णा नद्यांचे दरम्यान वसलेला तेलगुभाषीय लोकांचा हा देश मौर्यकालापासून ( इ. स. पू. ४०० ) ' अंध्र देश ' या नावाने प्रसिद्ध असून तेलंगण, पूर्वघाट, रायलसीमा आदि प्रदेशहि त्यामध्ये समाविष्ट होत असे. अशा तऱ्हेने आधु. आंध्र प्रदेश म्हणजेच प्राचीन अंध्र होय.

द्रविड लोकसमूहापैकी तेलगुभाषीय लोक ' अंध्र लोक ' या नावाने ओळखले जात असून, त्यांचेच नावावरून या देशास ' अंध्र ' ( आंध्र ) नाव प्राप्त झाले असावे. मात्र प्राचीन साहित्यात सर्वत्र या देशाचा आणि लोकसमूहाचा निर्देश ' अंध्र ' नावाने केला असून, ' अंध्र देशात राहणारे लोक ' अशा अर्थाने 'आंध्र' हे लोकनाम आणि देशनाम उत्तरकाळात प्रचारात आले असावे. अंध्र लोक हे तामीळ, कन्नड, मलयालम् आदि अन्य द्रविडवंशीय लोकांच्या तुलनेने बहुसंख्य असून ऐतिहासिक दृष्टीनेहि प्राचीनतम आहेत.

इ. स. पू. २३७ मध्ये कलिंग राज्याची अधिसत्ता अशोकाने नष्ट केल्यानंतर अंध्र लोकांनी आपले स्वतंत्र राज्य प्रस्थापित केले आणि अशोकाच्या साम्राज्याच्या दक्षिण परिसीमेवरील मित्रराष्ट्र या नात्याने ते सुविख्यात झाले. उत्तरकाली या देशात प्रस्थापित झालेल्या सातवाहन, इक्ष्वाकु, काकतीय, गजपति आदि एकापेक्षा एक पराक्रमी राजघराण्यांमुळे या देशास एक नवे ऐतिहासिक महत्त्व प्राप्त झाले. राज्यव्यवस्था, स्थापत्य, शिल्पकला, साहित्य अशा हरेक बाबतीत येथे स्वतंत्र परंपरा उत्पन्न झाल्या. या कारणाने केवळ भौगोलिक दृष्टीनेच नव्हे, तर सांस्कृतिक दृष्टीनेहि अंध्र हा दक्षिण भारतातील एक महत्त्वपूर्ण देश मानला जातो.

नामांतरे—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा ).

व्याप्ती—या देशाच्या व्याप्तीविषयी सुस्पष्ट निर्देश प्राचीन साहित्यात आढळत नाही. मध्ययुगीन शक्ति-संगमतंत्रामध्ये या देशाच्या सीमारेषा खालीलप्रमाणे दिल्या आहेत:—१. उत्तरस—जगन्नाथ ( ओरिसामधील आधु. जगन्नाथपुरी ); २. दक्षिणेस—भ्रमरांबिका ( श्रीशैल पर्वतावरील भ्रमरांबा शक्तीपीठ ).

तैलंग आणि कलिंग या दोन देशांचा या ग्रंथात स्वतंत्रपणे निर्देश केला आहे. त्यावरून हे दोन देश त्याकाळी अंध्र देशाहून वेगळे मानले जात असावेत.

' अनर्घराघव ' नाटकाच्यामते ' सप्तगोदावरी ' नद्या अंध्र देशातून वहात असून, भीमेश्वर महादेव हे या देशाचे कुलदैवत मानले जात असे ( अनर्घ. अंक ७ ).

प्राचीन अंध्र देशाची दक्षिण सरहद्द कृष्णा नदीने बनली होती असे मानण्यात येते. या प्रदेशातील पाल्किगुंड,

मास्कि, येर्रगुडि या स्थानी सापडलेल्या अशोकशिलालेखावरूनहि हीच गोष्ट सिद्ध होते ( अशोक-शिलालेखस्थले पहा ).

मूळ वसतिस्थान--श्रीनिवास अय्यंगार यांच्या मते अंध्रलोक हे मूळचे विंध्यपर्वतवासी आणि प्राकृतभाषीय असून, उत्तरकालात ते कृष्णा आणि गोदावरी नद्यांच्या खोऱ्याच्या प्रदेशात स्थलांतरीत झाले. तेथेच ते तेलगूभाषीय बनले ( इंडि. अँटि., इ. स. १९१३, पृ. २७६-२७८ ). ब्राह्मण ग्रंथात—अंध्र लोकांचा प्राचीनतम निर्देश ऐतरेय

## अंध्र देशाची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. प्लिनी (इंडि. अँटि., इ. स. १८७७; पृ. ३३९) | अंदरे |
| २. इ. स. २३४ मधील मयिदवोलु ताम्रपट ( एपि. इंडि. ६.८८ ). | अंधापतिय ( अंध्रापथ ) |
| ३. मार्कंडेय पुराण ( ५४.४८-४९ ) | अंध |
| ४. वायु पुराण ( ४५.१२७ ) | अंध |
| ५. महाभारत ( उ. १९.१७ ) | अंधक |
| ६. बौद्ध सुत्तनिपात ( टीका, २. ५८१ ) | अंधक |
| ७. मध्ययुगीन शिलालेख-साहित्य ( एपि. इंडि. २. प्रस्ता. पृ. ४ ). | आंध्र |
| ८. महाभारत (आर. ४८.१८) | आंध्र |
| ९. " ( स. ३१.११ ) | आंध्रक |
| १०. " ( आर. ४८. १८ ) | अंध्रक |
| ११. ह्युएन्त्संग ( वॉटर्स, २. २०९-२१४ ) | अन्-तो-लो (= अंदर) |
| १२. पाल राजा नारायणदेव याचा इंडियन म्युझियम शिलालेख. | अंध्रविषय |
| १३. इ. स. १६ व्या शतकातील मुसलमानी शिलालेख | तेलिंगन |
| १४. इ. स. १५८९ मधील गोवळकोंड्याच्या सुल्तानाचा शिलालेख ( रंगाचारी. १. गंजम १५ ). | अंध्र-त्रिलिंग-मध्यम |

ब्राह्मणात असून अंध्र, शबर, पुलिंद, मूतिब आदि 'दस्यु' (अनार्य) लोकांच्या उत्पत्तीविषयी निम्नलिखित आख्यायिका तेथे दिली आहे :- विश्वमित्राने शुनःशेपाला आपला पुत्र मानले. ही गोष्ट ज्यांनी अमान्य केली, त्यांना विश्वमित्राने नीच जातीचे बनविले व त्यांना देशाच्या सरहद्दीबाहेर ( उदान्त्यः ) रहावयास लावले. अशा तऱ्हेने नीच बनविलेल्या लोकांमध्ये अंध्र लोक प्रमुख होते ( ऐ. ब्रा. ७.१८ ).

शांखायन श्रौतसूत्रातहि अंध्र लोकांचा निर्देश पुंड्र, शबर, आणि मूतिब आदि अनार्य लोकांसमवेत केला आहे ( शां. श्रौ. १५.२६ ).

महाभारतात--या ग्रंथाच्या मते अंध्र हे दक्षिण भारतातील एक जनपद असून ( म. भी. १०.४८ ), तेथे निवास करणारे लोक 'अंध्रक' नावाने ओळखले जात ( म. शां. २००.३९-४१ ). याच ग्रंथात अन्यत्र अंध्रक, गुह, शबर, पुलिंद, चूचुप, मुद्रक आदि लोकांना 'दक्षिणापथजन्मानः' ( दक्षिणापथमध्ये जन्मलेले ) आणि 'पापकृत्' ( अनार्य ) म्हटले आहे ( म. शां. २००.३९ ).

युधिष्ठिराच्या राजसूयासमयीच्या दक्षिण दिग्विजयात सहदेवाने हा देश जिंकला होता ( म. स. २८.४८ ). युधिष्ठिराच्या मयसभेमध्ये 'अंध्रक' नामक राजा उपस्थित होता ( म. स. ४.४७*; ३१.११ ). पांडवपक्षात सामील झाल्यास अंध्र लोकांचे अधिराज्य प्राप्त होण्याचे प्रलोभन कृष्णाने कर्णाला दाखवले होते ( म. उ. १३८.२५ ).

महाभारत आश्वमेधिक पर्वामध्ये अंध्र देशाचा निर्देश द्रविड, माहिषिक आदि देशांसमवेत आढळतो ( म. आश्व. ८४.११ ). याच पर्वात अन्यत्र या देशाचा निर्देश काशि, कोशल आदि उत्तरभारतीय देशांसमवेत आढळतो ( म. आश्व. ८४.४ ). यावरून अंध्र लोकांची अन्य एक वसाहत महाभारतकाली उत्तर भारतात वसली असावी ( अंध्र २. पहा ).

हरिवंशात—मथुरा येथील मल्लयुद्धात बलरामाने मारलेल्या मुष्टिक नामक मल्लाचा निर्देश या ग्रंथात 'अंध्र', 'अंध्रमल्ल' अशा वैकल्पिक नावांनी केला आहे ( ह. वं. २.३०.८; १८-१९ ). त्यावरून तो अंध्र देशातील असावा.

वाल्मीकि रामायणात—या ग्रंथात गोदावरी नदीच्या दक्षिणेस वसलेल्या लोकसमूहांमध्ये अंध्र, पुंड्र, चोल, पांड्य आदींचा अंतर्भाव केला आहे ( वा. रा. कि.

४१.१२). यापैकी पुंड्र म्हणजे अशोकआज्ञालेखात निर्देशिलेले पारिंद्र लोक असावेत.

बृहत्संहितेमध्ये—या ग्रंथात, तसेच मार्कंडेय पुराण कूर्मविभागात आग्नेय भारतातील एक देश आणि लोकसमूह या नात्याने 'अंध्र'चा निर्देश आढळतो (बृ. सं. १४.८; १६.११; १७.२५; मार्क. ५५.१६). या देशाचा राजा 'अंध्रपति' या उपाधीने ओळखला जात असे.

पौराणिक साहित्यात—या ग्रंथात सर्वत्र दक्षिणापथातील एक देश या नात्याने 'अंध्र'चा निर्देश आढळतो (वायु. ४५.१२७; ब्रह्माण्ड. १६.५९; मार्क. ५४.४८; वामन. १३.५०). अंध्र लोकांच्या पूर्व भारतातील अन्य एका स्वतंत्र वसाहतीचा निर्देश वायु पुराणात आढळतो (वायु. ४५.१२७; अंध्र २. पहा).

अंध्र देशाच्या सातवाहन राजांचा निर्देश पौराणिक साहित्यात 'आंध्रभृत्य' (अंध्र देशाचे सेवक) अशा गौरवोपाधीने केला असून, या राजवंशाच्या एकूण पाच उपशाखांची माहिती तेथे दिली आहे (वायु. ९९.३५८). यापैकी चुटु शातकर्णी शाखेचे अनेक शिलालेख आणि नाणी उपलब्ध झाली आहेत. मात्र यापैकी कोणत्याहि शिलालेखात या राजांच्या 'आंध्रभृत्य' या पौराणिक गौरवोपाधीचा उपयोग केलेला दिसत नाहीत.

बौद्ध साहित्यात—या साहित्यात अंधक लोकांचा निर्देश मुंडक, कोलक आणि चीन लोकांसमवेत आढळतो (अपादान. २.३५९; कथावत्थु, जे. ए. आर. एस्., इ. स. १८९२, पृ. ९). या देशाच्या अस्सक आणि अलक नामक दोन राजांचा निर्देश सुत्तनिपात टीकेमध्ये आढळतो (सु. नि. अट्ठ. २.५८१). तक्षशिला येथे विद्यार्जन केलेला एक ब्राह्मणकुमार अंध्र देशात येऊन राहिला होता (जा. १.३५६).

प्लिनीच्या ग्रंथात— अंध्र देशासंबंधीचा प्राचीनतम ऐतिहासिक निर्देश या ग्रंथात (रचनाकाल इ. स. २६) असून, त्यामध्ये चंद्रगुप्त मौर्याच्या काली या देशाचे निम्नलिखित लष्करी सामर्थ्य असल्याचे मेगॅस्थेनिसचे उद्धरण आढळतेः– १. तटबंदीयुक्त नगरे—३०; २. पायदळ—१ लाख; ३. घोडदळ—२ हजार; ४. गजदळ—१ हजार (प्लिनी, ६.२१-२३).

बर्जेस् यांच्या मते प्लिनीच्या काळी अंध्र देशाची राजधानी श्रीकाकुलम् (अक्षांश २०-२८′ उत्तर; रेखांश ८५°-५५′ पूर्व) गावी असून, आधुनिक काळी हे गाव कृष्णा नदीच्या पात्रामध्ये वाहवले गेले आहे.

अशोकाच्या आज्ञालेखात—अशोकाच्या लघुआज्ञालेख क्र. १३ मध्ये अंध्र, राष्ट्रिक, पेतेणिक (पितिनिक्य) आणि पारिंद लोकांचा निर्देश 'अपरांत' नावाने केला असून, अशोकाच्या मांडलीक राज्यामध्ये यांचा समावेश होत असावा. राजगृहाहून पैठणला जाणाऱ्या जुन्या व्यापारी हमरस्त्याच्या पश्चिम (नैर्ऋत्य) टोकाला हे सारे देश वसले असून (अपरांत १. पहा) या लोकांमध्ये बौद्ध धर्माचा प्रसार करणे कठीण होते (कॉर्पस् इन्स्क्रि. १.२.४४).

सातवाहन राजघराणे—अशोकोत्तर कालामध्ये मगध साम्राज्याची छकले झाली. त्या परिस्थितीचा फायदा घेऊन इ. स. पू. २३० मध्ये अंध्र देशामध्ये सातवाहन राजांनी स्वतंत्र राज्याची स्थापना केली. यानंतर ४५० वर्षेपर्यंत (इ. स. पू. २३०– इ. स. २२९) या देशावर याच राजघराण्याचे राज्य होते. ब्रह्माण्ड, भागवत, विष्णु, तसेच मत्स्य पुराणात या राजघराण्याचा राज्यकाल अनुक्रमे ४५६ वर्षे आणि ४६० वर्षे दिला आहे.

सातवाहन राजे अंध्रवंशीय असले, तरी प्रारंभीच्या काळी त्यांचे सारे राज्य महाराष्ट्रातच होते. या राजघराण्याचा आद्य सम्राट सिमुक (इ. स. पू. २३०–२०७) याची राजधानी महाराष्ट्रातील प्रतिष्ठान (आधु. पैठण) गावीच होती. या राजघराण्यातील द्वितीय पुरुष कण्ह (इ. स. पू. २०७-१८९) याने कलिंग देशापासून नासिकपर्यंतचा सारा प्रदेश पादाक्रांत केला, आणि तृतीय पुरुष यज्ञश्री शातकर्णी (इ. स. पू. १८९-१७२) याने पश्चिम माळवा देशातील उज्जैन आणि विदिशा ही दोन्ही नगरे जिंकून घेतली. तत्रापि यज्ञश्री राजाची पत्नी नागनिका हिने कोरलेला त्याचा प्रशस्तिलेख महाराष्ट्रातील जुन्नर गावानजीकच्या नाणेघाटात असून, त्यामध्ये या राजाचा निर्देश 'अंध्रपथ देशाचा सम्राट' असा न करता 'दक्षिणापथचा सम्राट' असा केला आहे

खारवेलाच्या शिलालेखात—खारवेलाच्या इ. स. पू. १७१ मधील हाथीगुंफा शिलालेखात शातकर्णी राजाशी युद्ध केल्याचा आणि त्याच्या राठिक आणि भोज या मांडलीक राजांचा पराभव केल्याचा निर्देश आढळतो (जे. बी. ओ. आर. एस् ३.४२५; ५०७). यावरूनहि शातकर्णी (द्वितीय) (इ. स. पू. १७२–११६) राजाच्या राज्यकालात महाराष्ट्र प्रदेश हाच सातवाहनांचा बालेकिल्ला मानला जात असे, असे दिसते. सातवाहन राजघराण्यातील १७ वा राजा हाल (इ. स. २०-२४) याने लिहिलेला

'गाथासप्तशती' हा ग्रंथहि महाराष्ट्री प्राकृतात लिहिलेला आहे.

सातवाहन राजा गौतमीपुत्र शातकर्णी (इ. स. ८०–१०४) याची राजधानी कोल्लापुर (आधु. कोल्हापुर) गावी असून, त्याच्या मृत्यूनंतर १९ वर्षांनी त्याची माता गौतमी बलश्री हिने कोरलेला त्याचा प्रशस्तिलेखहि नासिक येथेच आढळतो. विदर्भापासून वनवासीपर्यंतचा सारा प्रदेश शक क्षत्रपांकडून जिंकून घेतल्याचा निर्देश या शिलालेखात असला, तरी प्रत्यक्ष अंध्र देशाचे राज्य मात्र त्याच्या ताब्यात नसावे.

गौतमीपुत्राचा उत्तराधिकारी पुळमायि (इ. स. १०४–१२८) याची राजधानी पूर्वापार प्रतिष्ठान गावी असली, तरी त्याची नाणी अंध्र प्रदेशातील गोदावरी आणि गुंतूर जिल्ह्यांमध्ये सापडली आहेत. त्यावरून महाराष्ट्र, पश्चिम राजपुताना आणि माळवा यांवरील सातवाहनांची पकड याकाळी कमी होऊ लागली असावी.

**अंध्र प्रदेशात स्थलांतर**--सातवाहन राजा यज्ञश्री शातकर्णी (इ. स. १७०–१९९) याचे राज्यकालात पुणे–नासिक प्रदेशांवर चुटु शातकर्णी या शक राजाच्या मांडलीक राजवंशाचे राज्य सुरू झाले. या कारणाने यज्ञश्री राजास आपली राजधानी अंध्र प्रदेशातील धान्यकटक गावी हलविणे भाग पडले. इ. स. २२९ मध्ये सातवाहन राज्याचा नाश होईतो या राजघराण्याची राजधानी त्याच गावी होती.

अंध्र प्रदेशातील या स्थलांतराच्या काळात सातवाहन राजांनी या देशात अनेकानेक बौद्ध मंदिरे आणि स्तूप बांधले. त्यापैकी अमरावती येथील स्तूप सातवाहन स्थापत्यशैलीचे सर्वोत्कृष्ट उदाहरण मानला जातो.

**इक्ष्वाकु राजवंश**--सातवाहन राज्याच्या पतनानंतर स्वतःस 'श्रीपर्वतीय,' 'आंध्रभृत्य' म्हणविणाऱ्या इक्ष्वाकु राजवंशाचे राज्य या देशावर आले. या राजघराण्यातील सात राजांनी ५७ वर्षेपर्यंत राज्य केले असले तरी त्यांपैकी फारच थोड्या राजांची नावे शिलालेखसाहित्यात उपलब्ध होतात.

या राजघराण्यांपैकी वीरपुरुषदत्त हा सर्वाधिक सुविख्यात राजा असून, या राजाच्या चुलतीने बोधिश्री नामक उपासिकेच्या साह्याने नागार्जुनकोंड येथील सुविख्यात स्तूप, विहार आणि मंडप बांधले.

इहुदुल चांतमूल या अंतिम इक्ष्वाकु राजाच्या राज्यकालात नागार्जुनकोंड येथील 'देवीविहार' आणि 'सीहलविहार' (सिंहली बौद्ध भिक्षूंच्या सोयीसाठी बांधलेला विहार) यांचे बांधकाम पुरे करण्यात आले. या स्थापत्यामध्ये ग्रीक शिल्पशैली आणि महायान धर्मप्रवृत्ती यांचे संमिश्रण दिसते.

**बृहत्पालायन राजे**--इक्ष्वाकु राजांनंतर अंध्र देशावर बृहत्पालायन गोत्राच्या राजांचे राज्य सुरू झाले. यापैकी जयवर्मन् राजाचे ब्राह्मणांना अग्रहार ग्रामे दान देणारे ताम्रपट दक्षिण भारतातील तत्सम ताम्रपटात प्राचीनतम आहेत. त्यावरून या काळी या देशातील बौद्ध आणि जैन धर्मास उतरती कळा लागली असावी.

**समुद्रगुप्ताच्या राज्यकाली**--समुद्रगुप्ताच्या राज्यकाली (इ. स. ४ थे शतक) अंध्र देशाचे एकछत्री राज्य नाहीसे होऊन त्याऐवजी निम्नलिखित स्थानिक छोटी राज्ये निर्माण झाली:– १. वेंगी (कृष्णा जिल्ह्यातील एलोर गावानजीकचे आधु. पेद्दवेगि गाव)–या प्रदेशावर सालंकायनगोत्रीय हस्तिवर्मन् राजाचे राज्य होते (वेंगी पहा). २. कोट्टूर (आधु. गंजम जिल्ह्याचा काही भाग); ३. अवमुक्त (आधु. गंजम जिल्ह्याचा काही भाग); ४. देवराष्ट्र (आधु. विशाखपट्टनम् जिल्ह्याचा काही भाग); ५. पल्लक व कुस्थलपुर (पूर्व समुद्रकिनाऱ्यानजीकचे छोटे देश.); ६. कुराल (आधु. कोलैर सरोवराचा परिसर).

**सालंकायन राजघराणे**—या छोट्या राज्यांपैकी वेंगी देशावरील सालंकायन राजघराणे पल्लव घराण्याचे नातेवाईक होते. त्यामुळे पल्लवांनी अंध्र देशातील इतर राज्ये जिंकली तरी त्यांचे राज्य मात्र अबाधित राहिले. त्यांच्या ताम्रपटाची लिपी इंडोचायना, आणि मलाया या बृहद्भारतीय देशातील भारतीय वसाहतकारांच्या शिलालेखांशी जुळते. त्यावरून त्या वसाहतीच्या स्थापनेमध्ये अंध्र लोकांचा काहीना काही हात असावा.

**चालुक्य राज्यकालात**--इ. स. ७ व्या शतकात चालुक्य राजा पुलकेशिन् (द्वितीय) याचा भाऊ व चालुक्यांचा राजप्रतिनिधी विष्णुवर्धन याने अंध्र देशात पूर्व चालुक्यांच्य स्वतंत्र राज्याची स्थापना केली. त्यांचे हे राज्य पाच शतकेपर्यंत टिकले. यानंतर काही काळ चोल आणि धरणीकोट येथील जैन राजांचे राज्य या प्रदेशावर आले. इ. स. १६ व्या शतकात गोवळकोंड्याच्या मुसलमान सुल्तानाच्या ताब्यात हा प्रदेश गेला.

इ. स. १८५९ मधील एका मुसलमानी शिलालेखात 'अंध्र–त्रिलिंग–मध्यम' देशातील चौऱ्याऐंशी किल्ल्यांवर गोवळकोंड्याच्या सेनापतीचे आधिपत्य असल्याचा निर्देश

आढळतो ( रंगाचारी, १. गंजम. १९ ). या काळात हा देश ' तेलिंगन ' नावाने सुविख्यात असून रायचुर आणि वारंगळ आदि प्रदेश त्यामध्ये समाविष्ट होत असत ( इंडि. अँटि., इ. स., १८९९ पृ. २३८ ).

ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात--या ग्रंथात या देशाचा निर्देश 'अन्-तो-लो' नावाने केला असून वॉटर्स यांच्या मते ते टॉलेमीच्या ग्रंथातील ' अंदर 'चे चिनीभाषीय रूप असावे.

दक्षिण कोशल देशाहून १८० मैल दक्षिणेस जंगलमय प्रदेशातून वाटचाल केल्यानंतर ह्युएन्त्संग या देशास पोहोचला. त्याच्या मते या देशाचे आणि त्याच्या राजधानीचे क्षेत्रफळ अनुक्रमे ६०० मैल व ४ मैल होते. या देशाची जमीन सुपीक, हवा दमट आणि लोक तामसी आणि शीघ्रकोपी होते. त्यांची भाषा मध्यदेशाहून वेगळी असली तरी लिपी मात्र त्या देशासदृशच होती. या देशात २० बौद्धमठ आणि ३००० बौद्ध भिक्षु होते.

बौद्धस्थाने— ह्युएन्त्संगने निर्देशिलेली या देशातील प्रमुख बौद्धस्थाने पुढीलप्रमाणे होत :—

१. आचार बौद्धमठ—हा अनेकमजली मठ राजधानीच्या गावानजीक असून त्यामध्ये गौतमबुद्धाची एक मूर्ती आणि शेकडो फूट उंचीचा एक बौद्ध स्तूप होता. मठाच्या नैर्ऋत्येस बुद्धप्रवचनाच्या स्मृत्यर्थ अशोकाने एक स्तूप बांधला होता.

२. दिङ्नाग ग्रंथरचनास्थान—आचारमठाच्या ४ मैल नैर्ऋत्येस एकाकी टेकडीवर दिङ्नाग नामक कालिदासाच्या समकालीन आचार्याच्या ग्रंथरचनेचे स्थान होते. त्या आचार्याच्या ' प्रज्ञापारमिता ' शास्त्रविषयक ग्रंथाची रचना या स्थानी झाली असून तत्स्मृत्यर्थ येथे एक स्तूप बांधला होता.

अंध्र देशातून २०० मैल दक्षिणेस जंगलमय प्रदेशातून गेल्यानंतर ह्युएन्त्संग धनकटक देशास जाऊन पोहोचला ( वॉटर्स, २.२०९-२१४; बील, ४.४२०-४२३ ).

अल्बेरुणीच्या ग्रंथात—अल्बेरुणीच्या मते अंध्र लोकांची एक वसाहत दक्षिण भारतात आणि एक वसाहत पूर्व भारतात वसली होती ( अल्बेरुणी, १.२९९-३०० ). ही माहिती वायु पुराणातून उद्धृत केलेली दिसते.

शिलालेखसाहित्यात-- अंध्र देशाचे शिलालेख-साहित्यातील प्रमुख निर्देश पुढीलप्रमाणे होत:--१. इ. स. २३४ मधील मयिदवोलु ताम्रपट--पल्लव राजपुत्र शिवस्कंदवर्मन् याच्या या ताम्रपटात ' अंधापतिय ' ( अंध्रापथ ) देशाचे सारे राज्य, तसेच त्याची राजधानी धन्नकड ही या राजाने सातवाहनांकडून जिंकून घेतल्याचा निर्देश आढळतो. अंध्र देशाचा हा प्राचीनतम शिलालेखीय निर्देश मानतात ( एपि. इंडि. ६.८४ ); २. इ. स. ५५४ मधील हराहा शिलालेख--मौखरि राजा कुमारगुप्त ( तृतीय ) याच्या या शिलालेखात ' अंध्राधिपति 'ने आपल्या प्रचंड हस्तिदलाने त्यास संत्रस्त केल्याचा निर्देश आढळतो. ( एपि. इंडि. १४.११० ). रॉयचौधरी याच्या मते विष्णुकुंडिन् घराण्यातील माधववर्मन् ( प्रथम ) राजाचा निर्देश येथे अभिप्रेत असावा ( रॉयचौधरी, पृ. ५०९ ); ३. मौखरि राजा ईश्वरवर्मन् याचा जौनपुर शिलालेख--अंध्र देशावर विजय प्राप्त करून तेथील राजास विंध्य पर्वतात पळवून लावल्याचा निर्देश या शिलालेखात आढळतो. आपला पूर्वज कुमारगुप्त ( तृतीय ) याच्या पराभवाचा बदला घेण्यासाठी हा हल्ला ईश्वरवर्मनाने केला असावा; ४. वाकाटक राजा हरिषेण याचा शिलालेख--अंध्र आणि कलिंग देश जिंकल्याचा निर्देश ( जे. आर्. ए. एस्., इ. स. १९१४, पृ. १३७ ); ५. चोल राजा राजराज ( प्रथम ) याचा ११ व्या शतकातील ताम्रपट--अंध्र देशावर स्वारी केल्याचा निर्देश ( एपि. इंडि. २९.६२ ); ६. वेलनाडु देशाचा राजा गोंक ( द्वितीय ) याचा द्राक्षाराम शिलालेख–'आंद्र', मराट, लाट देश जिंकल्याचा निर्देश ( रंगाचारी, २. गोदावरी. १७९ ); ७. विजयनगर राजा बुक्क ( प्रथम ) याचा इ. स. १३५५ मधील शिलालेख--तुरूक ( अंध्र ), सेवुण, पांडय, होयसल आदि राजांवर विजय प्राप्त केल्याचा निर्देश ( एपि. कर्ना. ११. २-३ ); ८. बहामनी सुलतान महंमदशहा ( तृतीय ) याचा इ. स. १४७६ मधील शिलालेख--सेनापती निजामुल्मुल्क बहारी यास ' तेलिंगन ' प्रांताचा सुभेदार नेमल्याचा निर्देश ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. २२८ ).

राजधान्या--अंध्र देशाच्या प्रमुख प्राचीन राजधान्या पुढीलप्रमाणे होत:--

१. श्रीकाकुलम्-- प्लिनीच्या काळी अंध्र देशाची राजधानी या गावी होती. आधुनिक काळी हे गाव कृष्णा नदीच्या पात्रामध्ये लुप्त झाले आहे.

२. अंधपुर ( अंध्रपुर )---रॉयचौधरी यांच्या मते अंध्र देशाची प्राचीनतम राजधानी अंधपुर ( तेलवाह नदीकाठचे आधु. तेल अथवा तेलिन्गिरि ) गावी वसली होती ( रॉयचौधरी, पृ. १९६ ).

३. धन्नकड ( धनकटक )-इ. स. ३ ऱ्या शतकात अंध्र देशाची राजधानी धनकटक ( आधु. बेझवाडा ) गावी

असल्याचे मयिदवोलु ताम्रपटावरून दिसते. सातवाहन राजांची राजधानी याच गावी होती ( धनकटक पहा ).

४. विंगिल ( विगिर )— ह्युएन्त्संगच्या काळी या देशाची राजधानी 'विंग–कि–लो' ( विंगिल ) गावी होती. फर्ग्युसन यांच्या मते कृष्णा आणि गोदावरी नद्यांच्या दरम्यान असलेले आधु. वेंगी हे पूर्व चालुक्यांच्या इतिहासप्रसिद्ध राजधानीचे गाव ते हेच होय ( जे. आर. ए. एस्. ६.२६१ ).

स्थापत्यावशेष––इ. स. २ऱ्या शतकात सातवाहनांनी अंध्र प्रदेशात स्थलांतर केल्यानंतर हा देश, आणि त्यातहि त्यांपैकी कृष्णा–गोदावरी नद्यांच्या त्रिभुज प्रदेशाचा भाग बौद्ध धर्माचे फार मोठे केंद्र बनला. या प्रदेशामध्ये गुफामंदिररचनेस अत्यावश्यक असणारे डोंगर अत्यंत कमी असल्याने पश्चिम महाराष्ट्रात गुफामंदिरे कोरणाऱ्या सातवाहन राजांनी येथे अर्धवट पर्वतात खोदलेली आणि अर्धवट दगडांनी बांधलेली मंदिरे, बौद्ध स्तूप आणि विहार बांधले. सातवाहन शैलीने बांधलेल्या तीनशेहून अधिक बौद्ध स्तूपांचे ( तेलगु–'दिब्बा' ) अवशेष एकट्या कृष्णा जिल्ह्यामध्ये सापडले आहेत.

अंध्र प्रदेशातील सातवाहन शैलीचे प्रमुख बौद्ध स्थापत्यावशेष पुढीलप्रमाणे होतः––

## अंध्र प्रदेशातील बौद्ध स्थापत्यावशेष

| गावाचे नाव | भौगोलिक स्थान | संभाव्य काल |
|---|---|---|
| ( १ ) स्तूप | | |
| १. अमरावती | वेझवाडा गावापासून १८ मैल पश्चिमेस | इ. स. १ ले व २ रे शतक |
| २. नागार्जुनकोंड | कृष्णा नदीचे खोरे | इ. स. ३ रे शतक (इक्ष्वाकु राजा वीर पुरुषदत्त याच्या राज्यकालात ) |
| ३. भट्टिप्रोलु | रेप्पले गावापासून ६ मैल उत्तरेस | इ. स. पू. २०० |
| ४. गुडिवाड | मसुलिपतम्पासून २० मैल वायव्येस | इ. स. १ ले–३ रे शतक |
| ५. जग्गयपेट्ट ( बेटवोलु ) | अमरावतीपासून ३० मैल वायव्येस | इ. स. २ रे शतक |
| ६. घंटशाला | मसुलिपतम्पासून १३ मैल पश्चिमेस | ,, ,, ,, |
| ( २ ) गुंफामंदिरे | | |
| १. जिल्लिगेरगुदेम | गुंतुपल्ले गावानजीक | इ. स. पू. २०० |
| ( ३ ) दगड–विटांनी बांधलेली चैत्यमंदिरे | | |
| १. चेझर्ले | कृष्णा जिल्ह्यातील नरसरावुपेट गावापासून १४ मैल ईशान्येस | इ. स. ४–५ वे शतक |
| २. विद्याधरपुरम् | वेझवाडा गावानजीक | ,, ,, |
| ३. शंकरम् | कृष्णा–गोदावरी नद्यांचे खोरे | इ. स. २ रे शतक |

याशिवाय अल्लूरु, गोलि आणि गुम्मडिडुर्रु येथील सातवाहन शैलीच्या स्तूपांचे, तसेच गुरुभक्तकोंड, दुर्गकोंड, विजयवाड ( आधु. वेझवाडा ), सल्हिंडम्, सेंगमेडु येथील सातवाहन मंदिरांचे अवशेष महत्त्वपूर्ण आहेत.

या स्थापत्यावशेषांमध्ये अमरावती येथील स्तूप, आणि या स्तूपाच्याच अनुकरणाने उत्तरकालात बांधण्यात आलेला नागार्जुनकोंड येथील स्तूप आणि विहार हे सातवाहन स्थापत्यशैलीचे सर्वाधिक परिणत उदाहरण मानले जातात ( अमरावती; नागार्जुनिकोंड पहा ).

सातवाहनकालीन राज्यव्यवस्था––सातवाहनकालीन अंध्र देशाचे राज्यकारभाराच्या सोयीसाठी निम्नलिखित उपविभाग पाडले होते, असे तत्कालीन शिलालेखसाहित्यातील निर्देशावरून दिसते. राजकीय, तसेच भौगोलिक दृष्टीने हे उपविभाग महत्त्वाचे वाटतात :—

| राज्यविभागाचे नाव | अधिकारी |
|---|---|
| १. राष्ट्र | राजा (राज्यप्रतिनिधी; नाणी पाडण्याचा अधिकार) |
| २. भुक्ति | महाभोज आणि महारथी |
| ३. आहार | अमात्य |
| ४. ग्राम | ग्रामिक |

इक्ष्वाकु राज्यकालात 'आहार' हा देशविभाग 'राष्ट्र' या नावाने ओळखला जाऊ लागला. या देशविभागाचा अधिकारी इक्ष्वाकु आणि बृहत्पालायन राजांच्या राज्यकालात अनुक्रमे 'महाराज' आणि 'वापतम्' (व्यापृत) या नावाने ओळखला जात असे.

नगरे--सातवाहनकालीन नगरे विटा आणि चुना यांनी बांधलेल्या तटबंदींनी युक्त असत. या नगरांच्या प्रवेशद्वारी सांची स्तूपांच्या प्रवेशद्वारांसदृश तोरणे असत.

व्यापारी बंदरे--गोदावरी आणि कृष्णा नद्यांच्या त्रिभुज प्रदेशाचा निर्देश टॉलेमीच्या ग्रंथात 'मैसोलिय' नावाने केला असून, त्यामधील व्यापारी बंदरांमधून मलाया द्वीपकल्प आणि अर्चिपेलॅगो देशात जाण्यासाठी व्यापारी गलबते सुटत असत. ही सारी बंदरे सातवाहन राज्यकाली भारताच्या पश्चिम किनाऱ्यावरील भरुकच्छ, शूर्पारक, कल्याण आदि बंदरांइतकीच महत्त्वपूर्ण मानण्यात येत असत.

व्यापारी गावे--सातवाहन राज्यकाली अंध्र देशातील धान्यकटक, विजयपुर आणि नरसेल ही प्रमुख व्यापारी गावे असून, पश्चिम महाराष्ट्रातील प्रतिष्ठान, जुन्नर, तगर, करहाटक, नाशिक, वैजयंती आदींच्या तुलनेने दुय्यम प्रतीच्या या गावांमधून निम्नलिखित वस्तूंची आयातनिर्यात होत असे :--१. निर्यात--कापड, हिरेमाणके, मलमल; २. आयात--मद्य, तलम कापड, सौंदर्यप्रसाधने आणि काचेच्या वस्तू.

२. पूर्व भारतातील एक देश आणि लोकसमूह (वायु. ४५.१२७; अल्बेरुणी, १.२९९-३००). महाभारतात काशि, कोसल, किरात, तंगण आदींसमवेत यांचा निर्देश आढळतो (म. आश्व. ८४.४).

**अन्ध्रक** (देश)--महाभारतात निर्देशिलेले 'अंध्र' देशाचे नामांतर (म. आर. ४८.१८; अंध्र १. पहा).

**अन्ध्र-त्रिलिङ्ग-मध्यम** (देश)--शिलालेख साहित्यात निर्देशिलेले 'अंध्र' देशाचे नामांतर (रंगाचारी, १. गंजम १५; अंध्र १. पहा).

**अन्ध्रवाक** (देश)--पौराणिक साहित्यात निर्देशिलेले 'अंध्र' देशाचे नामांतर (ब्रह्माण्ड. १६.५३).

**अन्ध्रापथ** (देश)--शिलालेखसाहित्यात निर्देशिलेले 'अंध्र' देशाचे नामांतर (एपि. इंडि. ६.८८; अंध्र १. पहा).

**अन्नकूट** (पर्वत)--मथुरेतील 'गोवर्धन' पर्वताचे नामांतर (वराह. १६४.२६; गोवर्धन पहा).

**अन्नग्राम** (ग्राम)--हरिश्चंद्र घराण्यातील भोगशक्ति राजाच्या इ. स. ७०९ मधील अंजनेरी ताम्रपटात निर्देशिलेले महाराष्ट्रातील एक गाव. जयपुर (नासिक जिल्ह्यातील आधु. जर्वर) येथील भोगेश्वर नारायणाच्या पूजाविधीसाठी हे गाव दान दिले होते (कॉर्पस. इन्स्क्रि. ४.१.१४९).

**अन्नगृहा** (देवतास्थान)--हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक देवतास्थान (स्कन्द. नागर. १३२).

**अन्नज** (देश)--पौराणिक साहित्यात निर्देशिलेले मध्य भारतातील 'अनूप' देशाचे नामांतर (मार्क. ५४.५५; अनूप १. पहा).

**अन्नद** (पर्वत)--शाल्मलिद्वीपान्तर्गत एक वर्षपर्वत (कूर्म. पूर्व. ४९.१४).

**अन्नदारक** (लोकसमूह)--पौराणिक साहित्यात निर्देशिलेले ईशान्य भारतातील 'अनुविश्व' लोकसमूहाचे नामांतर (मार्क. ५५.५१. अनुविश्व पहा).

**अन्नदेववरम्** (ग्राम)--शिलालेखसाहित्यात निर्देशिलेले दक्षिण भारतातील एक 'ब्राह्मदेय' (अग्रहार) ग्राम. हे गाव विसरिनाडु देशविभागामध्ये पिन्नसानि आणि गंगा (गोदावरी) नद्यांचे संगमस्थानी वसले होते (एपि. इंडि. २६. प्लेट १.).

**अन्नवरनाथ** (वैष्णवस्थान)--ओरिसामधील सुविख्यात वैष्णवस्थान. पुरीपासून १४ मैल अंतरावरील आधु. अलालनाथ नामक तीर्थस्थान ते हेच होय.

येथे रामानुजाचार्यद्वारा पूजित जनार्दनाचे एक देवालय असून येथील एका शिलेवर श्रीचैतन्यांनी जनार्दनाला साष्टांग प्रणिपात केला होता. ती शिला गौड ब्राह्मण विशेष पवित्र मानतात (ती. पु. २०२-२०३).

**अन्नवरम्** (वैष्णवस्थान)--आंध्र प्रदेशातील पूर्व गोदावरी जिल्ह्यातील सुविख्यात वैष्णवमंदिरस्थान. सत्यनारायणस्वरूपी विष्णूचे देवतामंदिर या स्थानी असून,

शरपंजरी पडलेल्या भीष्माने युधिष्ठिरास विष्णुसहस्त्रनाम सांगितले, तो भीष्म एकादशीचा दिवस येथे विशेष महत्त्वाचा मानतात. त्या दिवशी विष्णुसहस्त्रनामावर आधारीत ' सत्यनारायणव्रत 'हि येथे करतात.

दक्षिण रेल्वेच्या अन्नवरम् रेल्वे स्थानकापासून २ मैलांवरील रत्नगिरि नामक टेकडीवर हे विष्णुमंदिर बांधले आहे. टेकडीच्या पायथ्यापासून सुमारे २५० पायऱ्या चढून गेल्यानंतर हे मंदिर लागते. टेकडीच्या पायथ्याशी पंपा नदी असून तीमध्ये स्नान करूनच यात्रेकरू दर्शनार्थ वर जातात.

येथील विष्णूची आणि लक्ष्मीची मूर्ती अनुक्रमे ' श्रीवीरवेंकट सत्यनारायणस्वामी वारू ' आणि ' अनंतलक्ष्मी सत्यवती अम्मावारू' या नावांनी सुविख्यात असून, तामीळनाडमधील तिरुपतिइतकेच हे स्थान पवित्र मानले जाते.

मंदिर--येथील सत्यनारायणाचे मुख्य मंदिर रथाकृती असून, सप्त पाताळ आणि सप्त स्वर्लोक यांचा स्वामी असणाऱ्या विश्वनियंत्याचे प्रतीक मानून येथील मुख्य देवतामूर्तीची रचना केली आहे. मंदिराच्या रथचक्राची चाके सूर्यचंद्राने बनलेली दाखविली आहेत.

मुख्य मंदिरानजीक वनदुर्गा आणि कनकदुर्गा नामक दोन देवीमंदिरे असून, सत्यनारायणमंदिराच्या आवारात त्रिपाद विभूतिनारायण उपनिषदातील वर्णनानुसार बांधलेले एक अद्वितीय विष्णुमंदिर आढळते.

शिलालेखसाहित्यात--तेलगु चोड राजा अण्णदेव याचे राजमहेंद्री म्युझियम ताम्रपट या गावी सापडले आहेत ( एपि. इंडि. २६, प्लेट १ ).

२. ( ग्राम ) चालुक्य राजा विक्रमादित्य ( प्रथम ) याच्या इ. स. ८ व्या शतकातील शिलालेखात निर्देशिलेले एक अग्रहारग्राम ( एपि. इंडि. २९.१६१ ).

**अन्नादि** ( नद )--जंबुद्वीपान्तर्गत मेरु पर्वतामधील एक नद ( भा. ५.१६.२४ ).

**अन्यजन्म** ( सरोवर )—कुरुक्षेत्रान्तर्गत एक पवित्र सरोवर ( नारद. २.६५.७० ).

**अन्यतः प्लक्ष** ( सरोवर )--कुरुक्षेत्रान्तर्गत एक कमलयुक्त सरोवर ( श. ब्रा. ११.५.१.४). पिशेल यांच्या मते आधु. सिरमोर सरोवर ते हेच होय ( वेदिशे स्टूडियेन. २.२१७ ). उर्वशी-पुरुरवा आख्यानाचा कथाभाग या स्थानी घडला.

**अन्यूप** ( देश )-- ' अवंती ' ( माळव ) देशाचे नामांतर ( शब्दरत्न. २१२.१; अवंती १. पहा ).

**अन्विन्द्र** ( तीर्थ )—गया येथील तीर्थस्थान ( ब्रह्म. १४०. ३८ ).

२. गौतमी ( गोदावरी ) नदीकाठचे एक तीर्थस्थान.

**अन्सि** ( लोकसमूह )--काबुल देशातील पार्थियन लोकांची एक वसाहत. हे संभवतः ' अर्सक ' ( पार्थिया ) या देशनामाचे चिनीभाषीय रूपांतर असावे ( कॉर्पस् इन्स्क्रि. २.१.१.२९ ). कुशाण राजा कुजूल कद्फिसेस याने ' अन्सि ' आणि ' कौफु ' ( काबुल ) देश पादाक्रांत केल्याचा निर्देश प्राचीन साहित्यात आढळतो ( कॉर्पस् इन्स्क्रि. २.१.१.६२ ).

**अपकर** ( देश )—पाणिनीच्या अष्टाध्यायीत निर्देशिलेले सिंधु जनपदानजीकचे एक जनपद ( पा. सू. ४.३. ३२ ). येथील लोक ' अपकरक ' नावाने ओळखले जात असत. अग्रवाल यांच्या मते सिंधमधील मियाबालि जिल्ह्यातील आधु. भक्खर गावासभोवतालचा प्रदेश म्हणजे हा देश होय.

गझनीवरून गोमल खोऱ्यातून सिंधला जाणाऱ्या रस्त्यावर हा देश असून, गझनीच्या महंमदाच्या भारतावरील साऱ्या स्वाऱ्या याच रस्त्याने झाल्या होत्या. म्हणूनच लष्करी आणि व्यापारी दृष्टीने भक्खर घाटाचा हा प्रदेश महत्त्वपूर्ण मानण्यात येत असे.

**अपग** ( लोकसमूह )--पौराणिक साहित्यात निर्देशिलेला उत्तर भारतातील एक लोकसमूह ( वायु. ४५. १२०; ब्रह्माण्ड. ४९.४९ ). अफगाणिस्तानात निवास करणाऱ्या ' अवगन ' ( अफगाण ) लोकांचा निर्देश येथे अभिप्रेत असावा ( अवगन पहा ).

**अपघन** ( लोकसमूह )— ऐन्-इ-अकबरीमध्ये निर्देशिलेले वायव्य भारतातील ' अवगन ' ( आधु. अफगाण ) लोकसमूहाचे नामांतर ( ऐ. अ. २.४०३; अवगन पहा ).

**अपथ** ( लोकसमूह )--पौराणिक साहित्यात निर्देशिलेले ' तंगण ' या पर्वताश्रयी लोकसमूहाचे नामांतर ( मत्स्य. ११४.५५; तंगण पहा ). पाठभेद–' गुर्गण ' ( मार्क. ५७.५६ ).

**अपप्रावरण** ( देश )—पौराणिक साहित्यात निर्देशिलेला एक पर्वताश्रयी देश ( ब्रह्माण्ड. १६.६७ ).

**अपर** ( देशसमूह )--बृहत्संहितेत, तसेच वाल्मीकि रामायणात निर्देशिलेले ' अपरांत ' देशसमूहाचे नामांतर

(बृ. सं. १४.२०–२१; वा. रा. कि. ४३.२३; अपरांत २. पहा ).

**अपरकरवडि** ( ग्राम )—गौतमीपुत्र श्रीसातकर्णीच्या नासिक गुहालेख क्र. ३ मध्ये निर्देशिलेले एक ग्राम. पश्चिमेकडील 'करवडि' गावाचा निर्देश येथे अभिप्रेत असावा. नासिकच्या परिसरातच कोठेतरी हे गाव वसले असावे ( मुंबई. गॅझे. १६.६३८ ).

**अपरकाशि** ( लोकसमूह )—पौराणिक साहित्यात निर्देशिलेला भारतवर्षान्तर्गत मध्य देशातील एक लोकसमूह ( म. भी. १०.४०; पद्म. सृ. ६.३७; स्व. ३.३८ ). वाराणसी येथे निवास करणाऱ्या काशी लोकसमूहाचीच ही एक उपशाखा असावी.

**अपरकुन्ति** ( देश )—पौराणिक साहित्यात निर्देशिलेले एक जनपद ( पद्म. सृ. ६. ३८; म. भी. १०.४१ ).

**अपरकुलिन्द** ( लोकसमूह )—महाभारतात निर्देशिलेली उत्तर भारतान्तर्गत कुलिंद लोकांची एक वसाहत ( म. स. २३.१४ ). हिमालयाच्या दक्षिण उतारावर ही वसाहत असून, कुलिंद लोकांचा मुख्य देश यमुना आणि सतलज या नद्यांच्या दरम्यान सिवालिक टेकड्यांच्या पायथ्याशी वसला होता ( कुलिंद पहा ).

**अपरगन्धिक** ( देश )—संस्कृत शब्दकोश साहित्यात निर्देशिलेला एक देश ( वैज. ३५.१५ ). आधु. तुर्कस्थान देश तो बहुधा हाच असावा.

**अपरगन्धिका** ( देशविभाग )—संस्कृत शब्दकोश साहित्यात निर्देशिलेले 'भद्राश्ववर्षा'चे नामांतर ( वैज. ३५. १५; भद्राश्ववर्ष पहा ).

**अपरगया** ( ग्राम )—बौद्ध साहित्यात निर्देशिलेले गया गावानजीकचे एक ग्राम. सुदर्शनाच्या विनंतीवरून गौतम बुद्धाने या गावास भेट दिली होती ( महावस्तु. ३. २२४–२२५ ).

**अपरगोदान** ( द्वीप )—बौद्ध साहित्यात निर्देशिलेल्या पृथ्वीच्या चतुर्द्वीपांपैकी एक. केतुमालवर्षाचा प्रदेश या भूभागामध्ये समाविष्ट होत असे ( वॉटर्स, १.३१–३६; पृथ्वी पहा. ). नामांतर–'अपरगोयान'.

बुद्धघोषाच्या मते सुमेरु पर्वत आणि जंबुद्वीपाच्या पश्चिमेस पश्चिमसमुद्रापर्यंत पसरलेला पृथ्वीचा भूविभाग 'अपरगोयान' अथवा 'अपरगोदान' या नावाने ओळखला जात असे. या देशातील लोकांची भारतातील वसाहत म्हणजेच 'अपरांत' होय ( बारुआ, अशोक शिलालेख. पृ. २५८; अपरांत १. पहा ).

**अपरताल** ( पर्वत )—वाल्मीकि रामायणात निर्देशिलेला भरताच्या अयोध्या-केकय प्रवासातील एक पर्वत ( वा. रा. अयो. ६८.१२ ).

**अपरद्वारका** ( देवीस्थान )—पश्चिम भारतातील महीसागर संगमक्षेत्रान्तर्गत एक देवीस्थान ( स्कन्द. माहेश्वर. २. ५३.२६–३४ ).

**अपरनन्दा** ( नदी )—महाभारतात निर्देशिलेले 'अलकनंदा' नदीचे नामांतर ( म. आ. ११०.१,२१५.७; अनु. १६६.२८; अलकनंदा पहा ).

**अपरनारायण** ( तीर्थ )—पश्चिम भारतातील प्रभासक्षेत्रान्तर्गत एक देवतास्थान ( स्कन्द. प्रभास. १.३०७ ).

**अपरन्तक** ( देश )—बौद्ध महावंशात निर्देशिलेले 'अपरांत' देशाचे नामांतर ( महा. १२.५; दीप. ८. ७; अपरांत ३. पहा ). नामांतरे-'अपरंत;' 'अपरंता' ( अपादान. २.३५९ ); 'अपरंध्र' ( म. भी. १०.४६ ).

**अपरपतन** ( देश व नगर )—नकुलाच्या पश्चिम दिग्विजयात जिंकलेला पश्चिम भारतातील एक देश व नगर ( म. स. ३१६ * ).

**अपरपर्पट** (देश)—वाल्मीकि रामायणात निर्देशिलेला भरताच्या अयोध्या–केकय प्रवासातील एक देश ( वा. रा. अयो. ७१.३ ).

नकुलाने आपल्या पश्चिम दिग्विजयात हा देश जिंकला होता ( म. स. २९.१० ). पाठभेद–'अपरपर्यट'

**अपरबल्लव** ( देश )—महाभारतात निर्देशिलेले 'अपरवर्तक' देशाचे नामांतर ( म. भी. १०.६१; अपरवर्तक पहा ).

**अपरमण्डल** ( देश )—कल्चुरि राजा पृथ्वीदेव ( प्रथम ) याच्या इ. स. १०६९ मधील रायपुर ताम्रपटात निर्देशिलेला मध्यप्रदेशान्तर्गत एक देश. आधु. बिलासपुर गावासभोवतालचा प्रदेश तो हाच होय. 'असौठा' आणि 'वसहा' नामक ग्रामे या देशात वसली होती ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.३९९; ४०३ ).

**अपरमत्स्य** ( देश )—मत्स्य देशाच्या पश्चिमेस वसलेला दक्षिण भारतातील एक देश (म. स. २८.२–४). सहदेवाने आपल्या दक्षिण दिग्विजयात मत्स्य, अधिराज, अपरमत्स्य, पटच्चर, नवराष्ट्र, कुंतिभोज हे देश जिंकले होते.

**अपरमद्र** ( देशविभाग )—पंजाबातील मद्र देशाचा एक उपविभाग. चंद्रभागा (आधु. चिनाब) पासून वितस्ता ( आधु. झेलम ) पर्यंतचा प्रदेश म्हणजे हा देश होय ( मद्र पहा ).

**अपरम्लेच्छ** (देशसमूह)--महाभारतात निर्देशिलेले म्लेंच्छ लोकांच्या जनपदांचे सामूहिक नाव ( म. भी. १०.६३; म्लेंच्छ पहा ).

**अपरवर्तक** ( देश )--दक्षिण भारतातील एक देश ( म. भी. १०.६१; पद्म. सृ. ६.५७ ). पाठभेद-' अपरबल्लव '.

**अपरविदेह** ( देश )--बौद्ध साहित्यात निर्देशिलेला पूर्व भारतातील एक देश. बंगालमधील आधु. रंगपुर आणि दिनाजपुर जिल्ह्यांचा प्रदेश म्हणजे हाच देश असावा ( ललित., मित्र अनुवाद. पृ. ५२ ).

**अपरशिला** ( बौद्धस्थान )-- ह्युएनत्संगच्या प्रवासवर्णनात निर्देशिलेला दक्षिण भारतातील एक बौद्धमठ ( वॉटर्स, २.२१५-२१८; धनकटक पहा ).

**अपरसुह्म** ( देश )—भीमाच्या पूर्वदिग्विजयात निर्देशिलेला एक देश ( म. स. १४.२३; २७ ). पाठभेद- ' प्राच्यसुह्म '.

**अपरसेक** (देश)--सहदेवाच्या दक्षिण दिग्विजयात निर्देशिलेला एक देश ( म. स. २८.२९७ * ). नर्मदा नदीनजीकच्या सेक देशाच्या पश्चिमेस हा देश असावा ( सेक पहा ). पाठभेद-'अपरमेक '.

**अपराजिता** ( देवीस्थान )—मथुरा येथील एक देवीस्थान ( वराह. १६०.१५ ).

२. ( नदी ) शाकद्वीपान्तर्गत एक नदी ( भा. ५.२०. २६ ).

**अपरान्त** ( देश )-- पश्चिम भारतामधील एक देश अथवा देशसमूह या नात्याने ' अपरांत 'चा निर्देश प्राचीन साहित्यात आणि शिलालेखात आढळतो. या देशाच्या व्याप्तीविषयी तेथे एकवाक्यता नसून, तत्संबंधीचे निम्नलिखित चार स्वतंत्र मतप्रवाह दिसतात :--

| साहित्य | व्याप्ती |
|---|---|
| १. अशोक शिलालेख | उत्तरापथ व दक्षिणापथ या राजरस्त्याच्या पश्चिम टोकाचे देश. |
| २. महाभारत, बृहत्संहिता आदि पौराणिक साहित्य | विंध्य पर्वताच्या पश्चिमेस वसलेले देश. |
| ३. उत्तरकालीन पौराणिक साहित्य | पश्चिम समुद्रकाठचा कोकणपट्टी प्रदेश. |
| ४. ,, ,, ,, | सौवीर देशाच्या उत्तरेस वसलेला देश ( उदीच्य अपरांत ). |

उपरोक्त विभिन्न अपरांत देशांची माहिती अपरांत १, २, ३ आणि ४ अशा क्रमाने खाली दिली आहे.

**नामव्युत्पत्ती**--' अपरांत 'चा शब्दशः अर्थ ' पश्चिमेकडील अथवा पश्चिम सरहद्दीवरील देश ' असा होतो. डॉ. भगवानलाल इंद्रजी यांच्या मते या देशाचे मूळ नाव ' अपरांतिका ' असे असून, ' अवरातिका ' आणि ' अवरैका ' ही प्राकृतभाषीय, आणि ' अरिअके ' हे ग्रीकभाषीय देशनाम त्याचेच अपभ्रष्ट रूप होय ( इंडि. अँटि. ७.२५९ ).

' अपरांत ' च्या ' अवरन्त ' या पालीभाषीय रूपाचा निर्देश बौद्ध शिलालेखसाहित्यात आढळतो ( एपि. इंडि. २०.२२ ).

**पश्चिम शब्दाची व्युत्पत्ती**--महाभारतान्तर्गत गरुड-गालव संवादात ' पश्चिम ' शब्दाची काव्यमय व्युत्पत्ती खालीलप्रमाणे दिली आहे :-- सूर्य येथे आपला प्रकाश संपवितो. येथे वरुणाचे राज्य सुरू होते. येथे कश्यपाने वरुणाला अभिषेक केला. येथे अंधःकार नाहीसा करणारा चंद्र तरुण झाला. येथे दैत्य नाहीसे झाले. येथे पर्वतात सूर्य नाहीसा होतो, म्हणून येथील पर्वताला अस्तगिरि म्हणतात.

रात्रीचा आरंभ, दिवसाचा क्षय आणि प्राण्याचे अर्धे आयुष्य नाहीसे करणारी निद्रा येथे सुरू होते. येथे दितीचा गर्भ इंद्राने बाहेर काढला व त्यातून मरुद्गण उत्पन्न झाले. येथे हिमवताचे मूळ असणारा लांबलचक असा मंदर पर्वत आहे. येथे समुद्रतीरावर सुरभि दूध पान्हवते. येथे समुद्रामध्ये चंद्रसूर्याला ग्रहण लावणाऱ्या स्वर्भानूचे ( राहू ) कबंध दिसते. येथे गाणाऱ्या हिरण्मुखाचा ध्वनी ऐकू येतो. येथे हरिमेधाची मुलगी ध्वजवती सूर्याने आज्ञा केल्यावरून राहते. येथे वायु, अग्नि, जल, आकाश यांचा रात्री किंवा दिवसा त्रास होत नाही.

येथे सूर्याची गती तिरकस होते. येथे सर्व प्रकाश सूर्यात विलीन होतो. येथे सोम-सूर्य अठ्ठावीस दिवस सह प्रवास करतात, नंतर वेगळे होतात. येथे नद्यांचे उगमस्थान असणारा समुद्र प्रकट होतो. येथे पन्नगराज अनंत रहात असून त्यावर विष्णूचे स्थान आहे. येथे अग्नि राहतो. येथे मारिचकश्यपाची वस्ती आहे ( म. उ. १०८ ).

[ १ ] अपरान्त १.— अशोकाच्या शिलालेखा ' अपरांत ' या सामूहिक नावाने ओळखल्या जाणाऱ्या देशांचे भौगोलिकदृष्ट्या निम्नलिखित दोन प्रमुख उपविभाग दिसतात: —

( १ ) वायव्य भारतातील देश--१. यवन; २. कंबोज; ३. नाभक; ४. नाभपंक्ति.

( २ ) नैर्ऋत्य भारतातील देश--१. अंध्र; २. पारिंद; ३. भोज; ४. पितिनिक; ५. राठिक ( राष्ट्रिक ).

स्पष्टीकरण--बारुआ यांच्या मते श्रावस्तीपासून तक्षशिलेपर्यंत जाणारा उत्तरापथ आणि राजगृहापासून प्रतिष्ठानपर्यंत जाणारा दक्षिणापथ या अशोककालीन दोन प्रमुख राजरस्त्यांच्या संदर्भात 'अपरांत' या दोन स्वतंत्र देशसमूहांचा निर्देश अशोक शिलालेखात करण्यात आला असावा. उत्तरापथ आणि दक्षिणापथच्या पश्चिमेस वसलेल्या देशाचा निर्देश तेथे अनुक्रमे 'वायव्य भारतातील' आणि 'नैर्ऋत्य भारतातील अपरांत' या नावांनी केलेला दिसतो. यापैकी तक्षशिला नगराच्या परिसरात वसलेले वायव्य भारतातील यवन, कंबोज आणि गंधार हे अपरांत देश अशोककाली विशेष सुविख्यात असून, अशोकाच्या तक्षशिला येथील राजप्रतिनिधीच्या नियंत्रणाखाली ते येत असत.

बौद्ध अपण्णक जातकामध्येहि उत्तरापथच्या पूर्व आणि पश्चिम टोकास वसलेल्या देशसमूहांचा निर्देश अनुक्रमे 'पूर्वांत देश' आणि 'अपरांत देश' या नावांनी केला असून, राजपुताना वाळवंटाच्या पश्चिम आणि वायव्य सरहद्दीस लागून वसलेल्या देशांस तेथें 'अपरांत' म्हटले आहे.

अन्य स्पष्टीकरणे--अशोककालीन अपरांत देशसमूहाचे बारुआकृत स्पष्टीकरण तर्कशुद्ध असून, अन्य कोणतेहि स्पष्टीकरण तेथे लागू पडत नाही. ही अन्य स्पष्टीकरणे खाली दिली आहेत :—

१ शब्दशः अर्थ--अशोक-नामावलीतील अंध्र, पारिंद आदि मौर्य साम्राज्याच्या पश्चिम सरहद्दीवरील देशांना 'अपरांत'चा शब्दशः अर्थ लागू पडत असला तरी यवन कंबोज आदि वायव्य भारतातील देशांना ही संज्ञा लागू पडत नाही. आधु. अफगाणिस्तानात वसलेल्या या देशांना प्राचीन काळी 'उदीच्य उत्तरापथ' ( उत्तरेकडील देश ) म्हणत असत. अशा स्थितीत 'अपरांत'चा केवळ शब्दशः अर्थ अशोक-आज्ञालेखात अभिप्रेत नसावा.

२. बौद्ध पपंचसूदनीमध्ये--या ग्रंथाच्या मते मूळ अपरगोदान ( पृथ्वीचा पश्चिम खंड ) देशातील जे रहिवासी उत्तरकालात भारतात स्थायिक झाले ते 'अपरांत' या नावाने सुविख्यात झाले.

'अपरांत'चे हे स्पष्टीकरण यवन, कंबोज आदि लोकांना लागू पडत असले, तरी नैर्ऋत्य भारतातील अंध्र, राष्ट्रिक आदि लोकांना ते लागू पडत नाही.

३. देवदत्त भांडारकर यांच्या मते--'राज्याच्या सरहद्दीवरील लोकसमूह' असा 'अपरांत'चा मोघम अर्थ घेणे योग्य होईल ( भांडारकर, अशोक पृ. ३३ ). परंतु 'अपरांत'मधील पश्चिम दिशेचा संकेत अत्यंत स्पष्ट असल्याने हा मोघम अन्वयार्थ स्वीकरणीय वाटत नाही.

अशोककालीन 'दक्षिण अपरांत'च्या मर्यादा-- या प्रदेशात उपलब्ध झालेल्या अशोकशिलालेखांच्या निम्नलिखित उपलब्धिस्थानांवरून अशोककालीन दक्षिण भारतीय अपरांत देशाच्या सीमारेषांचा अंदाज करता येतोः--

( १ ) उत्तरेस--१. सुराष्ट्रमधील गिरनार; २. राजस्थानमधील जयपूर प्रदेशातील बैराट गाव; ३ मध्य प्रदेशातील जबलपूर जिल्ह्यातील रूपनाथ; ४. बिहारमधील शहाबाद जिल्ह्यातील सहस्राम.

( २ ) दक्षिणेस-१. ठाणे जिल्ह्यातील सोपारा; २. अंध्रप्रदेशातील हैद्राबाद प्रदेशाच्या नैर्ऋत्य टोकास कोपबल गावानजीकचे पाल्किगुंडु; ३. अंध्र प्रदेशातील हैद्राबादनजीकचे रायचुर जिल्ह्यातील मास्कि; ४. चोल देशाच्या उत्तर सरहद्दीवर वसलेले कर्नूल जिल्ह्यातील येरंगुडि.

महाभारतात, तसेच मार्कंडेय पुराणात दक्षिण अपरांत लोकांचा निर्देश 'आटव्य' नावाने केला असून, तेथे त्यास 'जनपद दक्षिणः' ( दक्षिण भारताचे रहिवासी ) म्हटले आहे ( म. भी. १०.४६-४७ ).

[ २ ] अपरांत २.--महाभारतात, बृहत्संहितेत, तसेच पौराणिक साहित्यात विंध्य पर्वतास भारताचा मध्यबिंदु कल्पून ( मध्य देश ) त्याच्या उत्तरेस, पश्चिमेस, दक्षिणेस आणि पूर्वेस वसलेल्या देशांचा निर्देश अनुक्रमे 'उदीच्य', 'अपरांत', 'दाक्षिणापथ' आणि 'प्राच्य' या नावांनी केला आहे. या व्याख्येनुसार विंध्य पर्वताच्या पश्चिमेस आणि नैर्ऋत्येस वसलेले देश म्हणजे अपरांत देश होत.

ही दिशावार विभागणी निश्चित होण्यास शतकानुशतकांचा कालावधी लोटल्याकारणाने विभिन्न ग्रंथातील 'अपरांत' देशांच्या नामावलीमध्ये एकवाक्यता आढळत नाही. एकाच देशाचा निर्देश एका ग्रंथात 'अपरांत' म्हणून, आणि दुसऱ्या ग्रंथात 'उदीच्य' म्हणून केलेला आढळतो.

नामांतरे--प्राचीन साहित्यात या देशसमूहाची निम्नलिखित नामांतरे आढळतातः--१. अपर देश ( बृ. सं. १४.२०-२१ ); २. पश्चिमायाम् ( पराशरतंत्र ); ३. पश्चिम ( वा. रा. कि. ४२ ).

महाभारतामध्ये-- या ग्रंथात दोन विभिन्न स्थानी अपरांत देशाचा निर्देश आढळतोः--

१. महाभारत भीष्मपर्वात--या पर्वामध्ये उर्ध्व (उत्तर) दक्षिण, प्राच्य आणि उदीच्य उत्तरापथ ( वायव्य भारत ) या देशविभागामध्ये वसलेल्या देशांची नामावली दिली असून (म. भी. ९.३८-७० ), त्याआधारे अपरांत देशविभागातील देशांविषयी तर्क करता येतो. परंतु ही नामावली बृहत्संहिता आणि अन्य पुराणातील नामावलीशी जुळत नाही.

२. महाभारत सभापर्वात—महाभारत सभापर्वान्तर्गत नकुलाच्या पश्चिम दिग्विजयात अपरांत देशांची नामावली पुढीलप्रमाणे दिली आहे:--१. रोहीतक; २. मत्तमयूरक; ३. मरुभूमि; ४. बहुधान्यक; ५. शैरीषक; ६. महेच्छ; ७. शिबि; ८. त्रिगर्त; ९. अंबष्ठ; १०. मालव; ११. पंचकर्पट; १२. मध्यमिका ( नगरी ); १३. वाटधान ( देश ); १४. पुष्करारण्य; १५. उत्सवसंकेतण; १६. सिंधुकूलाश्रित ग्रामणेय; १७. शूद्राभीरगण ( सरस्वतीतीरस्थ ); १८. मत्स्य; १९. पर्वतवासी; २०. पंचनद; २१. अपरपर्यट; २२. उत्तर ज्योतिक; २३. वृंदाटकपुर; २४. द्वारपाल; २५. रमठ; २६.हारहूण; २७. दशराज्य (?); २८. शाकल ( मद्राणां पुटभेदनं-शल्य ); २९. सागरकुक्षिस्थ म्लेंच्छ; ३०. पल्लव; ३१. बर्बर ( म. स. २९ ).

महाभारताच्या 'तारांकित' आवृत्तीमध्ये निम्नलिखित देशनामे अधिक आढळतात:—१. दशार्ण; २. लिलिट; ३. पाटन; ४. वेल्लातट; ५. अपरपत्तन; ६. अरण; ७. रोम; ८. यवनपुर-अनेक; ९. लंबानुज देश; १०. बंधक.

नकुलाचा हा पश्चिम विजय कार्तिकेयाच्या रोहीतक नगरापासून सुरू झाला. तेथे मत्तमयूरक लोकांशी युद्ध झाले. नंतर मरुभूमि, बहुधान्यक, शैरीषक, शिबि, त्रिगर्त, अंबष्ठ, मालव, पंचकर्पट, मध्यमिका, वाटधान, पुष्करारण्य, सिंधुतीर, सरस्वती, रमठ, हारहूण, समुद्रतीरस्थ पह्लव, बर्बर अशा क्रमाने स्थळे येतात. यात पंजाब देशानंतर समुद्रतीराचा उल्लेख आढळतो. नंतर पंजाबच्या उत्तरेस असणारे पह्लव-बर्बर यांचा निर्देश तेथे आढळतो. यावरून पश्चिम व उत्तर दिशांचे चमत्कारीक मिश्रण या वर्णनात झालेले दिसते ( म. स. २९ ).

वाल्मीकि रामायणात--या ग्रंथातील सुषेणकृत सीताशोधवर्णनात निम्नलिखित देशांचा निर्देश पश्चिम भारतातील म्हणून आढळतो. मात्र तेथे 'अपरांत' या संज्ञेचा निर्देश आढळत नाही:--१. सौराष्ट्र; २. बाह्लीक; ३. मुरचीपत्तन; ४. जटापुर; ५. अवंतिनगर; ६. अंगलेपा नगर; ७. आलक्षितवन; ८. सिंधु-सागर-संगम; ९. सोमगिरि;

बृहत्संहिता-परंपरेच्या ग्रंथात निर्देशिलेले

## पश्चिम भारतातील देश

| बृहत्संहिता (१४.२०-२१) | पराशरतंत्र | मार्कंडेय पुराण ( कूर्मविभाग (५८.३४ ) |
|---|---|---|
| अपरांतक | ... | अपरांतिक |
| अस्तगिरि | ... | अस्तगिरि |
| कनक | ... | ... |
| क्षुरार्पण | क्षुरार्पण | क्षुराद्रि |
| जृंग | ... | ... |
| तारक्षिति | ... | तारक्षुर |
| पंचनद | ... | पंचनदक |
| पारत | ... | अवर |
| प्रशस्तद्रि | ... | विप्रशस्तक |
| मणिमत् | ... | ... |
| मेघवत् | ... | ... |
| म्लेंच्छ ( निमर्याद ) | ... | ... |
| रमठ | ... | वमन |
| वनौघ | ... | खंजय |
| वैश्य | वसति | ... |
| वोक्काण | ... | कोंकण |
| शक | ... | ... |
| शांतिक | ... | शांतिक |
| हैहय | ... | ... |
| ... | काशी-ब्रहा | ... |
| ... | गुड-वासिज | ... |
| ... | चक्रबद् | ... |
| ... | ताजिक | ... |
| ... | पार्श्व | ... |
| ... | मन्दितार | ... |
| ... | वायव्य | ... |
| ... | वेतकक | ... |
| ... | शिबि | ... |
| ... | सक्तंग्य | ... |
| ... | हूण | ... |
| ... | ... | १. अंगतक; २. अश्वकेश; ३. एकेक्षण; ४. कल; ५. गुरुश्वर; ६. गुरुह; ७. घोर; ८. दीर्घग्रीव; ९. फल्गुलुक; १०. फाल्गुनक; ११. वाजिकेश; १२. वेणुमती नदीच्या काठचे लोक; १३. शर्कर; १४. शालमवेश्मक; १५. सचूलक. |

१०. पारियात्र पर्वत; ११. वज्रमत्त पर्वत; १२. चक्रवत पर्वत; १३. वराह पर्वत; १४. प्राग्ज्योतिष पर्वत; १५. मेघ पर्वत; १६. मेरु पर्वत ( वा. रा. कि. ४२ ).

या नामावलीचा प्रारंभ सौराष्ट्राने झालेला असला, तरी नजीकच असलेला पारियात्र पर्वत बराच नंतर आला आहे. उत्तर भारतातील प्राग्ज्योतिष आणि मेरु पर्वतहि येथे घेतले आहेत. त्यावरून या नामावलीत पश्चिम भारत आणि उत्तर भारतातील स्थळांची गल्लत झालेली दिसते.

बृहत्संहितेत—या ग्रंथामध्ये 'अपर' ( अपरांत्य ) देशातील निम्नलिखित भौगोलिक स्थलांचा निर्देश आढळतो :—

( १ ) देश—१. तारक्षिति ( तारक्षुर ); २. पंचनद ३; रामठ; ४. कनक.

( २ ) अरण्य—१. वनौघ नामक अरण्यांचा समूह.

( ३ ) पर्वत—१. अस्तगिरि; २. क्षुरार्पण; ३. मणिमत्; ४. मेघवत्; ५. प्रशस्त.

( ४ ) जातिविशेष—१. अपरांतक; २. हैहय; ३. जृंग; ४. म्लेंच्छ; ५. पारत; ६. शक; ७. शांतिक; ८. वैश्य; ९. वोक्काण ( बृ. सं. १४.२०-२१ ).

बृहत्संहितेतील उपरोक्त नामावली पराशरतंत्र आणि मार्कंडेय पुराण कूर्मविभागातील नामावलीशी बऱ्याच अंशी मिळतीजुळती दिसते.

मार्कंडेय पुराण कूर्मविभागामध्ये—बृहत्संहितानुगामी अशा या ग्रंथामध्ये अपरांत देशातील २७ देशांची नामावली दिली आहे ( मार्कं. ५८.३४ ). ही नामावली बऱ्याच अंशी सदोष असून, दोन देशनामांचे एकत्रीकरण करणे ( उदा. मणिवत् + मेघवत्=मणिमेघ ), काही नावे अजिबात गाळणे, तसेच अन्य देशविभागातील देश या देशविभागात घालणे, असे अनेक दोष या नामावलीत आढळतात. या नामावलीत निर्देशिलेले फल्गुलक, एकक्षण, दीर्घग्रीव आणि चूलिक हे देश वस्तुतः वायव्य भारतातील असून, ते येथे चुकीने समाविष्ट करण्यात आले आहेत.

पराशरतंत्रामध्ये—या ग्रंथामध्ये अपरांत देशातील २७ देशांची नामावली दिली असली, तरी त्यापैकी १३ नावेच केवळ विश्वसनीय वाटतात.

ब्रह्माण्ड आणि वायु पुराणामध्ये—या ग्रंथात निर्देशिलेली पश्चिम भारतातील देशनामे बृहत्संहितासमूहाहून सर्वस्वी वेगळी असून ( ब्रह्माण्ड. ४९.६३; वायु. ४५.१२९ ), त्या ग्रंथातील एकाहि देशाचे नाव या नामावलीत आढळत नाही.

अन्य पौराणिक साहित्यात निर्देशिलेली अपरांत देशांची नामावली बव्हंशी वायुपुराणानुसारी दिसते. ही नामावली शूर्पारकपासून सुरू होते आणि अर्बुद देशाच्या निर्देशाने संपते. या नामावलीपैकी तालिटक, नासिकाव्य, भारुकच्छ, कच्छीय, आनर्त या देशांचा निर्देश बृहत्संहितेमध्ये दक्षिण भारतातील देश म्हणून केला आहे.

वायु पुराणात निर्देशिलेली अपरांत देशांची नामावली पुढीलप्रमाणे आहे :— १. शूर्पारक; २. कोलावन; ३. दुर्ग; ४. तालिकट; ५. पुलेय ( पुलिंद ); ६. सुराल; ७. रूपस्; ८. तापस; ९. कुरुमिन; १०. कारस्कर; ११. नासिकाव्य; १२. नर्मदा; १३. भारुकच्छ; १४. माहेय; १५. सारस्वत; १६. कच्छीय; १७. सुराष्ट्र; १८. आवंत्य; १९. अर्बुद.

मत्स्य आणि ब्रह्म पुराणांमध्ये—या ग्रंथातील अत्यंत छोट्या अशा अपरांत देशांच्या नामावलीत वायुपुराण नामावलीतील सुरुवातीचा आणि द्वितीयार्धाचा भाग अनुक्रमे गाळलेला दिसतो ( मत्स्य. ११४.५०; ब्रह्म. २७.२८ ). त्यावरून या दोन्ही नामावली प्रक्षिप्त असाव्यात.

मार्कंडेय आणि वामन पुराणांमध्ये—या ग्रंथातील नामावली उपरोक्त दोन ग्रंथांच्या तुलनेने खूपच मोठी असली तरी ती सदोष दिसते ( मार्कं. ५७.५० ). मार्कंडेय पुराणातील पाठ अनेक ठिकाणी अपभ्रष्ट आणि अप्रस्तुत आहेत; तर वामन पुराणातील बहुतांशी सारी नावे उघड-उघड चुकीची आहेत.

गरुड आणि कूर्म पुराणांमध्ये—या ग्रंथात 'अपरांत' म्हणून निर्देशिलेली अनेक देशनामे बृहत्संहितेमध्ये 'नैर्ऋत्य भारतातील' म्हणून निर्देशिली आहेत. त्यामुळे ही नामावली विश्वसनीय वाटत नाही.

[ ३ ] अपरांत ३—पौराणिक साहित्यात निर्देशिलेला पश्चिम भारतातील एक सुविख्यात देश. पश्चिम घाट आणि अरबी समुद्र यांच्या दरम्यानचा आधु. कोंकणपट्टी प्रदेश म्हणजे हा देश होय. सह्य पर्वत हा या देशाचा कुलपर्वत मानला जात असे.

आधुनिक काळी हा प्रदेश महाराष्ट्राचा अंगभूत भाग मानला जात असला, तरी प्राचीन काळी 'महारठ्ठ' आणि 'अपरांतक' हे दोन स्वतंत्र देश मानले जात असत, असे सिलोनी महावंशातील निर्देशावरून दिसते ( महा. १२. ५ ). अशोकाच्या राज्यकाली या देशास योनक धम्मरक्खित ( यवन धर्मरक्षित ) नामक बौद्ध भिक्षु बौद्धधर्म प्रसारार्थ पाठविण्यात आला होता ( दीप. ८.७ ).

## वायुपुराण–परंपरेतील ग्रंथात निर्देशिलेले पश्चिम भारतातील देश

| वायु | पुराण | | परंपरेतील | | ग्रंथ | | अन्य | ग्रंथ |
|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ब्रह्माण्ड (१६.६०-६२)<br>वायु (४५. १२९-१३२) | मत्स्य (११४.५०) | मार्कण्डेय (५७.५०) | ब्रह्म (२७.५८) | वामन (१३.५१-५३) | गरुड (१.५५.१५) | कूर्म (१.४७)<br>विष्णु (२.३.१६-१६) | नाट्यशास्त्र (जे. ए. एस्. बी.इ.स.१९०९;पृ.२६०) | काव्यमीमांसा (पृ. ९४) |
| १. अर्बुद | ... | ... | ... | ... | ... | ... | आर्बुद | ... |
| २. आनर्त | आवन्त्य | आवन्त्य | ... | आवन्त्य | ... | ... | आनर्त | ... |
| ३. आन्तरनर्मद | ... | उत्तर नर्मद | ... | सुनर्मद | ... | ... | ... | ... |
| ४. आभीर | ... | ... | आभीर | ... | ... | आभीर | ... | ... |
| ५. उर्ध्वमरु | ... | ... | मारुक | ... | ... | ... | ... | ... |
| ६. कच्छीय | काच्छीक | काश्मीर | ... | वात्सीय | ... | ... | ... | कच्छीय |
| ७. कालीतट (वायु–तालिटक | ... | चामीकट | तालिकट | चालीकट | ... | ... | ... | ... |
| ८. कोलावन (कलिवन) | ... | कालिबल | कालिधन | वारिधान | ... | ... | ... | ... |
| ९. तापस (तापक) | ... | स्वापद | ... | तामस | ... | ... | ... | ... |
| १०. तुरसित | ... | कुरुमिन | ... | ... | ... | ... | ... | ... |
| ११. दुर्गाल (दुर्ग) | ... | दुर्ग | लोल | दुर्ग | ... | ... | ... | ... |
| १२. नासिक | ... | नासिक्य | पारसीक | नासिकान्त | ... | पारसीक | ... | ... |
| १३. परक्षर | ... | कारस्कर | ... | कारस्कर | ... | ... | ... | ... |
| १४. पौलेय | ... | पुलिंद | ... | पुलीय | ... | ... | ... | ... |
| १५. भारुकच्छ | ... | भीरुकच्छ | ... | दारुकच्छ | ... | ... | ... | भृगुकच्छ |
| १६. माहेय | ... | माहेय | ... | सुमाहेय | ... | ... | ... | ... |
| १७. रुपक (रुपस) | ... | रुपप | ... | तापस | ... | ... | ... | ... |
| १८. शाश्वत | सारस्वत | सारस्वत | ... | सारस्वत | ... | ... | ... | ... |
| १९. सुराल | ... | सुमीन | ... | असिनील | ... | ... | ... | ... |
| २०. सुराष्ट्र | सौराष्ट्र | सुराष्ट्र | सौराष्ट्र | सुराष्ट्र | ... | सौराष्ट्र | ... | सुराष्ट्र |
| २१. सूर्य्यारक | ... | सूर्यारक | ... | शूर्पारक | स्त्रीराज्य | ... | ... | ... |
| ...<br>... | ...<br>... | ...<br>... | ...<br>... | ...<br>... | १. माथुर; २. यवन;<br>३. सैंधव. | ...<br>... | ...<br>... | यवन |
| ... | ... | ... | शाकल, शूद्र | ... | १. मद्राराम; २. शूद्र | ... | ... | ... |
| ...<br>...<br>... | ...<br>...<br>... | ...<br>...<br>विदिश | ...<br>मालव<br>... | ...<br>...<br>... | ...<br>...<br>... | ...<br>...<br>... | १. आवन्त्य; २.दशार्ण;<br>३. मालव; ४. मृत्तिका;<br>५. विदिशा; ६ सौवीर. | ...<br>...<br>... |
| ...<br>... | ...<br>... | ...<br>... | ...<br>... | ...<br>... | ...<br>... | ...<br>... | ...<br>... | १. दशेरक; २. देवसभा;<br>३. ब्राह्मणवाह. |

नामांतरे—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे निर्देशिली आहेत :—

## अपरान्त देशाची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. बृहत्संहिता— | |
| अ. (५.७०) | अपरांतक |
| ब. (५.४०; ९.१४) | अपरांत्य |
| २. मार्कंडेय पुराण (५५.३४) | अपरांतिक |
| ३. महाभारत— | |
| अ. (भी. १०.४७) | कुट्टापरांत |
| ब. (भी. १०.४६) | अपरंध्र |
| क. (शां ४९.५९) | शूर्पारक |
| ४. प्राकृत साहित्य | अव्वरातिका अथवा अवरंका |
| ५. बौद्ध अपादान (२.३५९) | अपरंता |
| ६. बौद्ध महावंश (१२.५) | अपरंतक (अपरंत) |
| ७. बौद्ध दीपवंश (८.७) | अपरंतक (अपरंत) |
| ८. अन्य बौद्ध साहित्य (मज्झिम. ३.२६८; संयुत्त. ४.६१) | सुनापरांत |
| ९. बौद्ध शिलालेख (एपि. इंडि. २०.२२) | अवरम्त |
| १०. संस्कृत शिलालेख (एपि. इंडि. १४.१५०) | अवरंत विषय |
| ११. ग्रीक साहित्य (टॉलेमी, पेरिप्लस) (इंडि. अँटि. ७.२५९). | अरियके (अपरांतिका) |
| १२. मथुरा येथील नाणी (ॲलेन, पृ. ८१-८२) | अपलत |
| १३. ह्युएन्त्संग (वॉटर्स, २. २३७-२३८) | कुंग्-कन्-न-पु-लो (कोंकणपुर) |

व्याप्ती—या देशाच्या व्याप्तीविषयी अभ्यासकांमध्ये निम्नलिखित मतांतरे आढळतात :—

**१. रामकृष्ण भांडारकर यांच्या मते**—सह्याद्रीच्या पायथ्याशी वसलेला उत्तर कोंकण देश म्हणजे प्राचीन अपरांत होय, हे रामकृष्ण भांडारकर यांनी इ. स. १८७४ मध्ये सर्वप्रथम सिद्ध केले (द्वितीय आंतरराष्ट्रीय प्राच्यविद्या परिषद अहवाल, इ. स. १८७४, पृ. ३१२).

**२. फ्लीट यांच्या मते**—आधु. कोंकण, उत्तर गुजरात, काठेवाड, कच्छ आणि सिंध असा विस्तृत प्रदेश मिळून प्राचीन अपरांत देश बनला होता (इंडि. अँटि. २२.१७३).

**३. भगवानलाल इंद्रजी यांच्या मते**—आधु. कोंकण म्हणजे प्राचीन अपरांत देश असून, काठेवाड्यातील प्रभासपट्टण आणि कोंकणातील शूर्पारक (आधु. सोपारा) ही त्यामधील प्रमुख नगरे होती (इंडि. अँटि. ७.२५९).

**४. ह्युएन्त्संगच्या मते**—आधु. सिंध, पश्चिम राजपुताना, कच्छ, गुजराथ आणि नर्मदा नदीच्या दक्षिणेकडील समुद्रकिनाऱ्याचा प्रदेश मिळून प्राचीन अपरांत देश बनला होता (कनिंग., पृ. ६९०).

यावरून अपरांत देशाची व्याप्ती निश्चित नसून इतिहासाच्या विभिन्न काळी ती बदलत गेली होती, असे दिसते.

**पौराणिक साहित्यात**—वायु आणि मत्स्यमते उत्तरेस कच्छचे रण आणि आबू पर्वत आणि दक्षिणेस सोपारा व नासिक शहर यांच्या दरम्यानचा प्रदेश म्हणजे अपरांत देश होय (वायु. ४५.१२९; मत्स्य. ११४.५०-५१; मार्कं. ५७.४९).

पद्म आणि मार्कंडेय पुराणात या देशाचा निर्देश अनुक्रमे 'अपरांत' आणि 'अपरांतिक' नावाने आढळतो (पद्म. सृ. ६.४२; मार्कं. ५५.३४). काही अभ्यासकांच्या मते येथे 'उदीच्य अपरांत' नामक स्वतंत्र देशाचा निर्देश अभिप्रेत असावा (अपरांत ४. पहा).

**महाभारतात**—या ग्रंथात 'अपरांत'चे वैकल्पिक नाव 'शूर्पारक' असे दिले असून, या देशाच्या निर्मितीविषयी निम्नलिखित तेथे आख्यायिका दिली आहे:—परशुरामाने निःक्षत्रिय पृथ्वी केल्यानंतर पापक्षालनार्थ त्याने सारी पृथ्वी कश्यप ऋषींना दान म्हणून दिली. त्यामुळे स्वतःचे निवासासाठी त्यास कोणतीहि जागा उरली नाही. तेव्हा समुद्राने हा प्रदेश त्याचे निवासासाठी उपलब्ध करून दिला (म. शां. ४९.५९).

महाभारतातील अर्जुनाच्या प्रथम वनवासाच्या वर्णनात त्याचा प्रवासमार्ग गोकर्ण → अपरांत तीर्थ → प्रभासपट्टन → रैवतक → द्वारका असा दिला आहे (म. आ. २०९-२१०). महाभारत भीष्मपर्वातील जनपदांच्या नामावलीमध्ये या देशाचा निर्देश 'कुट्टापरांत' आणि 'अपरंध्र' अशा वैकल्पिक नावांनी केला आहे (म. भी. १०.४६-४७).

उपरोक्त निर्देशांवरून महाभारतकालीन अपरांत देशामध्ये आधु. कोंकणपट्टीचा सारा प्रदेश समाविष्ट होत असावा.

**रघुवंशात**--या ग्रंथातील रघु-दिग्विजयाच्या वर्णनात केरळ ( आधु. मलबार ) देशातून रघु मुरला नदीच्या दक्षिणेस वसलेल्या अपरांत देशास गेल्याचा आणि तेथून खुष्कीच्या मार्गाने पारसीक देशास जाऊन पोहोचल्याचा निर्देश आढळतो ( रघु. ४.५२-५९ ). यावरून मलबार-पासून सिंधपर्यंतचा पश्चिम समुद्रपट्टीचा सारा प्रदेश रघु-वंशकाली अपरांत नावाने ओळखला जात असावा.

**कौटिलीय अर्थशास्त्रात**-अवंति आणि अश्मक देशांच्या तुलनेने अपरांत देशात बेसुमार पाऊस पडत असल्याचा, तसेच येथील पावसाचे प्रमाण हिमालय प्रदेशासदृश असल्याचा निर्देश या ग्रंथात आढळतो (कौ. अ. २.१५). अपरांत देश म्हणजे आधु. कोंकण असल्याचा सुस्पष्ट निर्देश भट्टस्वामीच्या ' अर्थशास्त्रभाष्या 'त आढळतो.

**वात्स्यायनाच्या कामसूत्रात**--या ग्रंथात अपरांत देश हा सिंधु, सौराष्ट्र आणि लाट देशाहून स्वतंत्र मानला असून, तेथील स्त्रियांची लैंगिक वैशिष्टये दिली आहेत ( का. सू. पृ. ३०० ). याच ग्रंथात अन्यत्र एकदा अंध्र, वत्सगुल्म, विदर्भ आणि सौराष्ट्र देशांसमवेत आणि दुसऱ्यांदा लाट आणि सिंधु देशांसमवेत अपरांतचा निर्देश आढळतो.

**काव्यमीमांसेत**--या ग्रंथाच्या मते देवसभा ( आधु. अरवली ) पर्वताच्या पश्चिमेस अपरांत देश वसला होता ( काव्यमी. १७.२२७ ).

**ग्रीक साहित्यात**--टॉलेमी आणि पेरिप्लस या दोहों-च्याहि ग्रंथात या देशाचा निर्देश ' अरियके ' या नावाने केला असून, ते अनुक्रमे 'अपरांतिक' आणि 'आरण्यक'चे ग्रीकभाषीय रूपांतर असावे. पेरिप्लसच्या मते हा देश खंबायतच्या आखातापासून आभीर देशाच्या उत्तर परिसीमेपर्यंत पसरला होता.

टॉलेमीच्या मते हा देश ' नेर्बुद ' ( नर्मदा ) नदीच्या दक्षिणेस असून, तो ' अरियके अंद्रोन् पायरेटोन ' (चाच्यांचा अपरांत देश ) या वैकल्पिक नावाने ओळखला जात असे. प्राचीन काळापासून मंगलोरपर्यंतचा कोंकणपट्टीचा किनारा सागरी व्यापारासाठी प्रसिद्ध असून, या वाढत्या व्यापाराबरोबरच येथे चाच्यांचा वाढता उपद्रव होऊ लागला होता, असे टॉलेमीच्या निर्देशावरून दिसते. ईजिप्तमधून पश्चिम भारतात व्यापारासाठी येणारी गलबते स्वतःसमवेत सशस्त्र सैनिक आणत असल्याचा निर्देश प्लिनीच्या ग्रंथात आढळतो.

टॉलेमीच्या काळी अपरांत देशाची राजधानी 'बॅरिगझ' ( आधु. भडोच ) गावी असून, ' कलिअन ' ( आधु. कल्याण ) हे या देशातील प्रमुख व्यापारी बंदर मानले जात असे.

**बौद्ध साहित्यात**--महावंशमते अशोकाने या देशास पाठविलेल्या ' योन धम्मरक्खित ' नामक आचार्याने ' अग्गिखण्डोपमा सुत्ता 'चा उपदेश करून येथील ३७ हजार लोकांना बौद्ध धर्माची दीक्षा दिली ( महा. १२.३४-३६ ).

बौद्ध साहित्यात अन्यत्र या देशाचा निर्देश 'सुनापरांत' या नावाने केला असून, या देशाची राजधानी आणि प्रमुख बंदर ' सूर्पारक ' होते ( मज्झिम. ३.२६८; संयुत्त. ४.६१; दीप. ८.७; महा. १०.५ ). मिलिंद पन्होमध्ये अपरांतक देशाचा अनेकवचनी निर्देश आढळतो ( एस्. बी. ई. ३६.२११ ). त्यावरून तेथे कोंकणपट्टी-ऐवजी पश्चिम भारतातील विभिन्न अपरांत देशांचा निर्देश अभिप्रेत दिसतो ( अपरांत २. पहा ).

**रुद्रदामनाच्या जुनागढ शिलालेखात**--या शिलालेखात मरु ( आधु. जोधपुर प्रदेश ), कच्छ, सिंधु-सौवीर (आधु. सिंध ), कुकुर ( आधु. पश्चिम राजपुताना ), निषाद ( आधु. हिस्सार ) आदि देशांसमवेत 'अपरांत'चा निर्देश आढळतो. त्यावरून इ. स. १५० च्या सुमारास उत्तर सिंध आणि उत्तर राजपुताना यांचा या देशात समावेश होत असावा ( एपि. इंडि. ८.४४ ).

**गौतमी बलश्रीच्या नासिक शिलालेखात**--या शिला-लेखात सुरथ, कुकुर, अपरांत अशा क्रमाने पश्चिम भारतातील देशांचा निर्देश आढळतो. त्यावरून राजपुता-न्याच्या दक्षिणेस वसलेल्या देशाचा निर्देश येथे अपरांत या नावाने केला असावा ( एपि. इंडि. ८.६१ ).

**अन्य शिलालेखसाहित्यात**--कान्हेरी गुफालेख क्र. २३ मध्ये 'अपरांत' देशाच्या भोजक आणि दामिला नामक राजाराणींचा निर्देश असून, यापैकी दामिला ही मूळ ' कलिअन ' ( कल्याण ) ची रहिवासी होती ( आर्कि. सर्व्हे. वे. इं. ५.८४ ). त्रैकूटक राजा व्याघ्रसेन याच्या इ. स. ४९० मधील सुरळ ताम्रपटात 'अपरांत' देशाचा राजा त्याचा मांडलीक असल्याचा निर्देश आढळतो ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.२६ ). एका मध्ययुगीन शिला-

लेखात ' अवरम्त ' नामक विषयाचा ( देशविभाग ) निर्देश आढळतो ( एपि. इंडि. १४.१५० ).

ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात—या ग्रंथात निर्देशिलेला ' कोंकणपुर ' देश हा अपरांत देशाचाच एक उपविभाग असून, ह्युएन्त्संगच्या मते तो द्रविड देशाच्या ४०० मैल उत्तरेस होता. सुमारे १००० मैल क्षेत्रफळाच्या या देशाची हवा ऊष्ण असून, लोक ओबडधोबड पण ज्ञानोपासक होते. येथे १०० बौद्ध मठ आणि १००० बौद्ध भिक्षु होते. या देशाच्या ४८०–५०० मैल वायव्येस महाराष्ट्र देश होता.

ह्युएन्त्संगच्या मते या देशाची राजधानी कोंकणपुर गावी होती ( वॉटर्स, २.२३७–२३८; कोंकणपुर पहा ).

अल्बेरुणीच्या ग्रंथात—या ग्रंथाच्या मते कोंकण प्रांत हा ' महरट्ठ ' देशापासून २५ ' फर्सख ' अंतरावर असून, त्याची राजधानी ' तन ' ( आधु. ठाणे ) गावी होती ( अल्बेरुणी, १.२०३ ).

महाराष्ट्राहून वेगळा देश—इ. स. ७ व्या शतकातील चालुक्य राजाच्या ऐहोळे शिलालेखात महाराष्ट्र देशाचे महाराष्ट्र, कुंतल आणि विदर्भ असे तीन उपविभाग वर्णिले असून, त्यामध्ये 'अपरांत'चा अंतर्भाव केलेला दिसत नाही ( इंडि. अँटि. ८.२०१ ). ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात, तसेच अल्बेरुणीच्या ग्रंथातहि अपरांत हा महाराष्ट्राहून वेगळा देश मानला आहे ( बील, २.२५५ ).

**महाराष्ट्राशी सांस्कृतिक संबंध**—' अपरांत ' हा महाराष्ट्राहून वेगळा देश असला तरी या दोन देशांमध्ये फार प्राचीन काळापासून ऐतिहासिक, व्यापारी आणि सांस्कृतिक संबंध होते. या देशातील सोपारा आणि चौल बंदरांशी महाराष्ट्रातील प्रमुख व्यापारी नगरांचा संबंध असल्याचा निर्देश नाणेघाट शिलालेखात आढळतो. हा प्रदेश दीर्घकालपर्यंत महाराष्ट्रातील सातवाहन राजांच्या ताब्यात होता. उत्तरकालात चालुक्य सम्राट कीर्तिवर्मन् आणि पुलकेशिन् ( द्वितीय ) यांनी कोंकण देशातील मौर्य राजांचा पराभव केला ( इंडि. अँटि. ८.२४२ ). ठाणे येथील शिलाहार राजे स्वतःस राष्ट्रकूटांचे मांडलीक म्हणवून घेत असत.

**राजधानी**—रघुवंशाच्या मल्लिनाथकृत टीकेमध्ये या देशाची राजधानी शूर्पारक ( आधु. सोपारा ) गावी असल्याचा निर्देश आढळतो ( रघु. ४.४३; इंडि. अँटि. ७.२५९; शूर्पारक पहा ).

[ ४ ] अपरांत ४—पौराणिक साहित्यात निर्देशिलेला उदीच्य अपरांत देश तो हाच होय ( ब्रह्माण्ड. १६.४६; मार्कं. ५४.३६; वामन. १३.३८ ). सिंधु आणि सौवीर देशांच्या उत्तरेस हा देश वसला असून, आधु. उत्तर सिंध आणि पश्चिम राजपुताना प्रदेश म्हणजे हा देश असावा ( अर्कि. सर्व्हे. १४.१३६–१३७ ).

नाणी—अपरांत देशाची विभिन्न नाणी उत्तर सिंध आणि पश्चिम राजपुताना देशांमध्ये उपलब्ध झाली आहेत. त्यावरून हा विशिष्ट अपरांत देश या प्रदेशापुरताच मर्यादित दिसतो ( अर्कि. रिपोर्ट. १४.१३७ ).

मथुरा येथे उपलब्ध झालेल्या काही नाण्यांवर 'महारजस अपलतस ' ( महाराजस्य अपरान्तस्य ) अशी अक्षरे कोरलेली आढळतात. ॲलेन यांच्या मते ' अपरांत ' हे येथे देशनाम नसून व्यक्तिनाम असावे ( ॲलेन पृ. ८१–८२ ).

**अपरान्तक** ( देश )—बृहत्संहितेत निर्देशिलेले ' अपरांत ' देशाचे नामांतर ( बृ. सं. ५.७०; अपरांत ३. पहा ). अन्य नामांतरे–' अपरांतिक ' ( मार्कं. ५५.३४ ); ' अपरांत्य ' ( बृ. सं. ५.४०; ९.१४ ).

**अपरीत** ( देश )—पौराणिक साहित्यात निर्देशिलेले ' आप्रीत ' ( गंधार ) देशाचे नामांतर ( वायु. ४१.११५; आप्रीत पहा ).

**अपलत** ( देश )—नाण्यांमध्ये निर्देशिलेले 'अपरांत' देशाचे नामांतर (ॲलेन. पृ. ८१–८२; अपरांत ४. पहा).

**अपसर्पण** ( तीर्थ )—महाभारतात निर्देशिलेले रौप्या नदीकाठचे ऋचीकपुत्र जमदग्नीचे आश्रमस्थान ( म. आर. १२९.७ ). नीलकंठाच्या मते या स्थानाचे मूळ नाव ' असर्पण ' ( संचारभूमी ) असे होते.

**अपाच्य** ( लोकसमूह )—ऐतरेय ब्राह्मणमते पश्चिम भारतातील एक ' नीच्य ' ( हीनकुलीन ) लोकसमूह ( ऐ. ब्रा. ८.१४ ).

**अपापपुरी** ( जैनस्थान )—बिहारमधील ' पावापुरी ' या जैन तीर्थस्थानाचे नामांतर ( पावापुरी पहा ).

**अपास्कुञ्ज** ( तीर्थ )—सरस्वती नदीकाठचे एक तीर्थस्थान ( म. श. ४०.१९ ).

**अपाम्प्रपतन** ( तीर्थ )—अंगिरस्–तीर्थयात्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( म. अनु. २५.२८ ).

**अपांह्द** ( तीर्थ )—अंगिरस्–तीर्थयात्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( म. अनु. ३५.१४ ).

**अपोकोप** ( पर्वत )--टॉलेमीच्या मते पश्चिम भारतातील ' अर्बुद ' पर्वताचे नामांतर ( टॉलेमी, पृ. ७८; अर्बुद पहा ).

**अप्सरःकुण्ड** ( तीर्थ )—अवंती येथील तीर्थस्थान (नारद. २.७८.८; स्कन्द. आवन्त्य. १.८.२७). नामांतर– ' अप्सरस्तीर्थ '.

२. हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( स्कन्द. नागर. १५३; १८२ ).

३. मथुरा येथील गोवर्धन पर्वताजवळचे एक तीर्थस्थान ( वराह. १६४.१९ ).

**अप्सरस्** ( तीर्थ )—कश्मीरातील वितस्ता ( आधु. झेलम ) नदीकाठचे एक तीर्थस्थान ( नीलमत. १५२८ ). याच नावाचे अन्य एक तीर्थस्थान कश्मीरात होते ( नीलमत. १४६० ).

**अप्सरस्निवास** ( तीर्थ )--अंगिरस्–तीर्थयात्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( म. अनु. २५.२३ ).

**अप्सरा** ( नदी )—गौतमीमाहात्म्यात निर्देशिलेली एक नदी ( ब्रह्म. १००.३ ). गौतमी ( गोदावरी ) आणि अप्सरा नद्यांचा संगम पवित्र मानला जात असे ( ब्रह्म. १४७.१ ).

**अप्सरेश्वर** ( लिंग ) - नर्मदा नदीकाठचे एक शिवलिंगस्थान ( पद्म. सृ. १६; मत्स्य. १९४.१६; कूर्म. उत्तर. ४२.२४ ).

२. काशी येथील शिवलिंगस्थान आणि पवित्र कूप ( स्कन्द. काशी. ६६.२ ) नामांतर– ' सौभाग्योदय कूप '.

३. अवंती येथील ८४ शिवलिंगांपैकी एक.

**अप्सरोयुग** ( तीर्थ )--गौतमी ( गोदावरी ) नदीकाठचे एक तीर्थस्थान ( ब्रह्म. १४७.१; ४; २१ ).

**अफसण्ड** ( शिलालेखस्थान )--गुप्त सम्राट आदित्यसेनाच्या इ. स. ७ व्या शतकातील अफसंड शिलालेखाचे उत्तर प्रदेशान्तर्गत उपलब्धिस्थान. हे गाव गया जिल्ह्यातील नवादा या तहसिलीच्या गावापासून १५ मैल ईशान्येस आहे.

या गावच्या वराहमंदिरानजीकच्या स्तंभावर उपरोक्त शिलालेख कोरला असून, आदित्यसेनाची माता श्रीमती आणि पत्नी कोणदेवी यांनी येथे अनुक्रमे धर्ममठ आणि तलाव खोदल्याचा निर्देश त्यामध्ये आढळतो ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.२०२ ).

**अबरातिका** ( देश )--प्राकृत साहित्यात निर्देशिलेले ' अपरांत ' देशाचे नामांतर ( अपरांत ३. पहा ).

**अबला** ( नदी )--महेंद्र पर्वतातून उगम पावणारी एक नदी ( ब्रह्माण्ड. १६.३७ ).

**अबस्तनोइ** ( देश )—अरियनच्या मते पंजाबातील ' अंबष्ठ ' जनपदाचे नामांतर ( अंबष्ठ पहा ).

**अबार** ( देश )—चिनी साहित्यात निर्देशिलेले ' गंधार ' देशाचे नामांतर ( वॉटर्स, १.२००; गंधार पहा ).

**अबिरिय** ( लोकसमूह )—टॉलेमीच्या मते ' आभीर ' लोकसमूहाचे नामांतर ( आभीर पहा ).

**अबिसरेस्** ( देश )—अरियनच्या मते ईशान्य भारतातील ' अभिसार ' देशाचे नामांतर ( मॅक्रिंडल, मेगॅस्थेनिस्, पृ. १९६; अभिसार पहा ).

**अबौ** ( ग्राम )-- टॉलेमीच्या ग्रंथात निर्देशिलेले दक्षिण भारतातील सौरेतइ या दर्यावर्दी प्रदेशातील ( अक्षांश १६° उत्तर; रेखांश १२९° पूर्व ) गाव. उत्तर अर्काट जिल्ह्यातील आधु. अंबूरदुर्ग गाव ते हेच होय.

**अब्जक** ( तीर्थ ) --गौतमी ( गोदावरी ) नदीकाठचे तीर्थस्थान ( ब्रह्म. १२९.२ ). नामांतर–' गोदाहृदय ' ( ब्रह्म. १२९.३७ ).

**अब्जारण्य** ( तीर्थ )--दक्षिण भारतातील उडुपीनजीकचे तीर्थस्थान. येथे चंद्राने शिवदर्शनाप्रीत्यर्थ तपस्या केली होती ( ती. ३१८ ).

**अब्धि** ( नगर )— संस्कृत शब्दकोश साहित्याच्या मते ' द्वारका ' नगरीचे नामांतर ( त्रिकाण्ड. ३२.१४; द्वारका पहा ).

**अब्बलूर** ( नगर )— शिलालेखसाहित्यात निर्देशिलेले दक्षिण भारतातील एक नगर. धारवाड जिल्ह्यातील कोड या तालुक्याच्या गावापासून २ मैल पश्चिमेस वसलेले आधु. अब्लूर गाव ते हेच होय.

**अब्बसहिब्बीन** ( बौद्धस्थान ) --स्वात नदीच्या खोऱ्यातील सुविख्यात बौद्ध स्तूपस्थान. येथील स्तूप उत्तरकालीन गंधार स्थापत्यशैलीचे असून, त्यामधील छोट्या आकाराचे अर्धवर्तुळाकृती मुख्य स्तूप, चार मजली व्यासपीठ आणि अनेक मजली हर्मिका यांच्या दरम्यान बांधले आहेत ( गोएट्झ, पृ. ७२ ).

**अभय** ( देश )— महाभारतात निर्देशिलेला एक देश ( म. भी. २७.८ पाठ ).

२. ( देशविभाग ) प्लक्षद्वीपान्तर्गत एक वर्ष ( देशविभाग ) ( भा. ५.२०.३ ).

**अभयपद** (वैष्णवस्थान)--एक विष्णुतीर्थ (पद्म. उ. १२९.२१).

**अभया** (नदी)--क्रौंचद्वीपान्तर्गत एक नदी (भा. ५.२०.२१).

**अभयेश्वर** (लिंग)--अवंती येथील ८४ शिवलिंगांपैकी एक (स्कन्द. आवन्त्य. १.३५.५; ३६.२; ३७.३१).

**अभिमन्यु** (पर्वत)--उत्तर भारतातील ठाणेश्वर गावापासून ५ मैल आग्नेयेस असणारी पवित्र टेकडी. ही टेकडी आधुनिक काळी अमीन टेकडी या नावाने सुविख्यात असून, स्थानिक समजुतीनुसार ती अभिमन्यु-वधाचे आणि अदितितपस्येचे स्थान मानली जाते. नामांतर-'चक्रव्यूह'.

आजहि या टेकडीवर अदितीचे एक देवालय असून, नजीकच्या सूर्यकुंडात स्त्रिया पुत्रप्राप्त्यर्थ स्नान करतात (ती. ८१).

**अभिमन्युपुर** (ग्राम)--कश्मीरचा राजा अभिमन्यु (प्रथम) याने स्थापलेले कश्मीरातील एक नगर (राज. १.१७५). स्टाइन यांच्या मते श्रीनगरपासून ४ मैल नैर्ऋत्येस दलदलीच्या प्रदेशात वसलेले आधु. बिम्युन (अक्षांश ३४°-४' उत्तर; रेखांश ७४°-९' पूर्व) गाव ते हेच होय (स्टाइन, राज. १.३१).

२. कश्मीरची राणी दिद्दा हिने आपला मृत पती अभिमन्यु याच्या स्मरणार्थ स्थापिलेले एक नगर (राज. ६.२९९). हे गाव कोठे वसले होते ते समजत नाही.

**अभिमन्युस्वामिन्** (वैष्णवस्थान)--कश्मीरची राणी दिद्दा हिने आपला मृत पती अभिमन्यु याच्या स्मरणार्थ बांधलेले विष्णुमंदिर (राज. ६.२८८). हे मंदिर कोठे होते ते समजत नाही.

**अभिसार** (देश व लोकसमूह)—बृहत्संहितेमध्ये निर्देशिलेला उत्तर भारतातील एक देश आणि लोकसमूह (बृ. सं. १४.२९; ३२.१९). बृहत्संहितेत याचा निर्देश (ऐशान्य) (ईशान्येकडील) देश म्हणून केला असला तरी वस्तुतः तेथे 'उत्तर' दिशेचा निर्देश अभिप्रेत आहे (ऐशान्य देश पहा). दार्व नामक लोकसमूहासमवेत या लोकांचा संयुक्त निर्देश (दार्वाभिसार) राजतरंगिणीमध्ये सर्वत्र आढळतो (राज. ३.१००).

**आधुनिक स्थान**—या देशाच्या भौगोलिक स्थानाविषयी निम्नलिखित मतांतरे आढळतात :—

१. **स्टाइन यांच्या मते**--कश्मीरातील झेलम आणि चिनाब या दोन नद्यांच्या दरम्यानचा आधु. राजौरी आणि भिंभर हा डोंगराळ प्रदेश म्हणजे हाच देश होय. विष्णुमते या देशाची पूर्व सरहद्द चंद्रभागा (आधु. चिनाब) नदीने बनली होती (विष्णु. विल्सन, ४.२२३).

२. **जयचंद्र यांच्या मते**--प्राचीन गंधार देशाच्या पूर्वेस केकय देश असून, त्या देशाच्या उत्तरेस अभिसार देश होता (जयचंद्र, इतिहासप्रवेश. पृ. २१८).

३. **मॅक्रिंडलच्या मते**--कश्मीरातील आधु हजारा प्रदेश म्हणजे प्राचीन अभिसार देश होय (मॅक्रिंडल, अलेक्झांडर, पृ. ६९). परंतु आधु. हजारा प्रदेश म्हणजे प्राचीन उरशा (=ग्रीक 'अर्सकेस्') देश असून, अभिसार देशाशी त्याचा काहीहि संबंध नव्हता.

४. **अरियनच्या मते**- सिंधु नदीची पूर्वेकडील उपनदी 'सोनोस्' (आधु. सोहन्) ही नदी 'अबिस्सरीअन' (अभिसार) लोकांच्या देशामध्ये उगम पावत असे. त्यावरून आधुनिक रावळपिंडी टेकड्यांचा प्रदेश प्राचीन काळी 'अभिसार देश' या नावाने ओळखला जात असावा (मॅक्रिंडल, मेगॅस्थेनिस्. पृ. १९६).

**नामांतरे**--प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. मार्कंडेय पुराण (५५.४९) | अभिसारजन |
| २. महाभारत (भी. १०.५२) | अभीसार |
| ३. पद्म पुराण (स्व. ६.४९) | अभीसार |
| ४. महाभारत (स. २४.१८) | अभिसारी (नगरी) |
| ५. अरियन (मॅक्रिंडल, मेगॅस्थेनिस. पृ. १९६) | अबिसरेस् (अबिस्सरीअन लोक) |
| ६. शिवसेन क्षत्रपाचा पंजाब ताम्रमुद्रिकालेख (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.१०३) | अभिसर |

**सिकंदरस्वारीच्या वर्णनात**—या ग्रंथात या देशाचा निर्देश 'अबिसरेस्' नावाने केला असून, नजीकच्या कश्मीर देशाचा स्वतंत्र निर्देश तेथे आढळत नाही. यावरून सिकंदरच्या काळी अभिसार हा एक महत्त्वपूर्ण देश असून, कश्मीर हा संभवतः त्याचाच उपविभाग मानला जात असावा.

'अस्सकेनिय' (अश्मक लोक) लोकांचा आणि तक्षिला देशाचा पाडाव केल्यानंतर सिकंदरने तक्षिला देशाच्या अंभी राजाच्या साह्याने या देशावर आणि नजीकच्या

पोरस् राजाच्या राज्यावर (कश्मीरातील आधु. झेलम, गुज्रात आणि शहापुर प्रदेश) हल्ला केला.

डिओडोरसच्या मते अभिसार देशाच्या राजाने सिकंदरच्या तक्षिला येथील दरबारी आपले वकील पाठवून तहाची बोलणी केली. तत्रापि अंतर्यामी पोरस्च्या साह्याने सिकंदरशी प्राणपणे लढण्याचा या राजाचा निश्चय अटळ होता (डिओडोरस्, १७.८७).

यानंतरच्या रक्तरंजित लढाईमध्ये पोरस्बरोबरच अभिसार देशाच्या राजाचाहि संपूर्ण पराभव झाला. आपल्या मायदेशी परत जाण्यापूर्वी सिकंदरने या राजाला अभिसार आणि उरशा प्रदेशांचा 'सत्रप' नेमले (स्मिथ, पृ. ९२).

**राजतरंगिणीमध्ये**--या ग्रंथाच्या मते 'दार्वाभिसार' देशामध्ये राजपुरी (आधु. रजौरी) आणि त्याच्या उत्तरेकडील घोरमूलक (आधु. गौरमूल्क) प्रदेशाचा समावेश होत असे (राज. ८.१५३१; १८६१). कश्मीरच्या अस्थिर राजकीय परिस्थितीमध्ये हा कधी त्या देशाचा भाग, तर कधी स्वतंत्र देश मानला जात असे (राज. ४.७१२; ५.१४१). 'दार्वाभिसार' देशातील लोक निर्दय आणि सहानुभूतीशून्य होते (राज.८. १५३१; दार्वाभिसार पहा).

**महाभारतात**--या ग्रंथातील जनपदनामावलीमध्ये या देशाचा निर्देश 'अभीसार' नावाने केला असून (म. भी. १०.५२; पद्म. आदि. ६.४९), भारतीय युद्धात येथील राजा चित्रसेन हा श्रुतकर्मन् राजाकडून मारला गेला (म. क. १०.१३-१५). भारतीय युद्धाच्या चौदाव्या दिवशी 'दार्वाभिसार' लोकांशी अर्जुनाची लढाई झाली होती (म. द्रो. ९३.३३८०*).

अर्जुनाच्या उत्तर दिग्विजयामध्ये त्याने या देशाच्या राजधानीचे 'अभिसारी' नगर जिंकले होते (म. स. २४.१८).

**पौराणिक साहित्यात**--विष्णुधर्मोत्तर पुराणातील ईशान्य भारतीय देशनामावलीत या देशाचा अंतर्भाव असून (विष्णुधर्म. १.९.१०), मार्कंडेय पुराणातील 'अभिसारजन' लोक ते हेच असावेत (मार्क. ५५.४९).

**शिलालेखसाहित्यात**— शिवसेन क्षत्रपाच्या पंजाब ताम्रमुद्रिकालेखात या देशाचा आणि त्यामधील प्रमुख नगराचा निर्देश अनुक्रमे 'अभिसर' आणि 'अभिसर-प्रस्थ' नावाने केला आहे (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.२.२. १०३).

**अभिसारजन** (देश)—पौराणिक साहित्यमते ईशान्य भारतातील 'अभिसार' देशाचे नामांतर (मार्क. ५५.४९; अभिसार पहा).

**अभिसारी** (नगर)—अभिसार देशाच्या राजधानीचे गाव (म. स. २४.१८; अभिसार पहा).

**अभीर** (लोकसमूह)—आभीर' लोकसमूहाचे नामांतर (आभीर पहा).

**अभीषाह** (लोकसमूह)--'उत्तर भारतातील एक वन्य लोकसमूह (ब्रह्माण्ड. १६.४८). हे शूर आणि प्राणपणे लढणारे लोक भारतीय युद्धात कौरवपक्षात सामील असून (म. भी. १८.१२), भीष्माच्या रक्षणाचे काम हे करीत होते (म. भी. १८-१२-१४). युद्धाच्या चौदाव्या दिवशी जयद्रथसंरक्षणार्थ या लोकांनी शर्थीचे प्रयत्न केले, परंतु त्यामध्ये यांचाच संहार झाला (म. द्रो. ६६.३७). युधिष्ठिराने व भीमाने यांचा संहार केला (म. द्रो. १३२.२४;१३६.४).

**अभीसार** (देश)--पौराणिक साहित्याच्या मते 'अभिसार' देशाचे नामांतर (म. भी. १०.५२; पद्म. सृ. ६.४९; अभिसार पहा).

**अभोणा** (ताम्रपटस्थान)—कलचुरि राजा शंकरगण याच्या इ. स. ५९७ मधील ताम्रपटाचे महाराष्ट्रान्तर्गत उपलब्धिस्थान. हे गाव नासिक जिल्ह्यातील कळवण तालुक्यामध्ये आहे (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.४०).

**अभ्यन्तरकोट्ट** (नगर)—कश्मीरचा राजा जयापीड याने स्थापिलेल्या कश्मीरमधील 'जयपुर' (आधु. अंदरकोट) नगराचे नामांतर (राज. १.५११). 'अभ्यंतरकोट्ट'चा शब्दशः अर्थ 'अंतर्भागातील किल्ला' असा होतो (जयपुर पहा).

**अभ्यर्थितेश्वर** (लिंग)--अवंति येथील एक शिवलिंग (स्कन्द. आवन्त्य. १.२३.२६).

**अभ्रारक** (देश)--मार्कंडेय पुराणमते पूर्व भारतातील एक देश (मार्क. ५४.४२). येथे संभवतः 'अंध्रवाक' अथवा 'अंगवंग' देशाचा निर्देश अभिप्रेत असावा (पार्गि, पृ. ३२४).

**अमकतिस्** (नगर)--टॉलेमीच्या ग्रंथात निर्देशिलेले लाहोरच्या नैर्ऋत्य भागातील (अक्षांश ३२°-२०′ उत्तर; रेखांश. १२८-°१५′ पूर्व) एक नगर. कनिंगहॅम यांचे मते लाहोरपासून २५ मैल अंतरावरील आधु. 'अंब' आणि 'कपि' या जोडगावांचे अवशेष म्हणजे हेच नगर होय.

' अंब ' आणि ' कपि ' या दोन भावांच्या लढाईमध्ये त्यांच्या कति नामक बहिणीने मध्यस्थी केल्याचा निर्देश एका स्थानिक दोहऱ्यामध्ये आढळतो.

**अमर** ( तीर्थ )—वाराणसी येथील एक तीर्थस्थान ( मत्स्य. १८१.२६ ).

**अमरकण्टक** ( पर्वत )—पौराणिक साहित्यात निर्दे-शिलेला विंध्य पर्वताचा ( = आधु. विंध्य पर्वताचा पूर्व भाग ) क्षुद्र पर्वत ( उपपर्वत ). नर्मदा, शोण आणि महा-नदी या तीन अत्यंत महत्त्वाच्या नद्यांचे उगमस्थान, तसेच शिवाचे निवासस्थान या नात्याने हा पर्वत पवित्र मानतात.

विंध्य पर्वत आणि सातपुडा पर्वत यांना जोडणाऱ्या मेकल अथवा मैकल ( आधु. मिकुल ) पर्वताचे गोंडवनातील सर्वात पूर्वेकडील टोक ( अक्षांश. २२°.४१′ उत्तर; रेखांश. ८१°–४८′ पूर्व ) म्हणजे हा पर्वत होय. मध्य प्रदेशातील बिलासपुर जिल्ह्यामध्ये खैरागढ आणि रेवा गावांच्या दरम्यान हा पर्वत आढळतो. त्याची समुद्रसपाटीपासून उंची ३४९३′ आहे.

बिलासपुर–कटनी रेल्वेमार्गावरील पेंद्र रेल्वे स्थानका-पासून ७ मैल आणि शहादोलपासून २५ मैल अंतरावर अमरकंटक पर्वताचे स्थान असून या दोन गावामधील बसचा रस्ताहि याच पर्वताच्या पायथ्याजवळून जातो.

या पर्वताच्या दक्षिणेस आणि पूर्वेस छत्तिसगढचा विस्तीर्ण आणि सुपीक प्रदेश असून, त्यामधील वन्य लोकांची वसाहत ही भारतातील प्राचीनतम मानली जाते. उत्तर भारतीय शैलीच्या अनेक मंदिरांचे अवशेष या प्रदेशात सापडले आहेत ( कझिन्स्, ॲन्टि. रिमेन्स सेंट्रल प्रॉव्हिन्सेस् ).

उत्तरवाहिनी शोण नदी, ईशान्यवाहिनी महानदी आणि पश्चिमवाहिनी नर्मदा नदी या भारतील तीन सर्वश्रेष्ठ नद्या या पर्वतातून उगम पावत असल्याने भौगोलिक दृष्ट्याहि हा पर्वत विशेष महत्त्वाचा मानतात.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या पर्वताची निम्न-लिखित नामांतरे आढळतात :— १. सोमपर्वत; सुरथाद्रि ( मार्के. ५७ ); २. आम्रकूट ( मेघ. १.१७ ); ३. मेकल ( अमरकोश ); ४. सिद्धिक्षेत्र ( पद्म. सृ. ६.३६ ).

**नामव्युत्पत्ती**—स्कंदपुराण आवंत्य खंडाच्या रेवा उपखंडामध्ये ' अमरकंटक 'चा शब्दशः अर्थ ' देवांचे शरीर ' ( अमर + कट ) असा दिला आहे. या पर्वता-वरील देवांच्या शरिरावर नर्तन करीत नर्मदा नदी उगम पावत असे. येथील आम्रवृक्षांमुळे यास ' आम्रकूट ' हे वैकल्पिक नाव प्राप्त झाले असावे.

**विंध्य पर्वताचा उपविभाग**—टॉलेमीच्या मते ही टेकडी विंध्य पर्वताचा भाग असून, स्कंदमते ती ऋक्ष पर्वताचा भाग मानली जात असे ( स्कन्द. आवन्त्य. ३.४. ४६–४८; ५.५१ ).

नर्मदा नदीच्या दक्षिणेस आणि उत्तरेस वसलेला विंध्य पर्वताचा पूर्व भाग आणि मध्य भाग पौराणिक काळी अनुक्रमे ' विंध्य पर्वत ' आणि ' ऋक्ष पर्वत ' अशा नावांनी ओळखला जात असे. या विशिष्ट दृष्टीने अमर-कंटक टेकडी विंध्य पर्वतान्तर्गत असल्याचे टॉलेमीचे विधान अधिक शास्त्रशुद्ध वाटते.

**नर्मदा नदीचे उगमस्थान**—मत्स्यमते कलिंग देशाच्या पश्चिमेकडील अमरकंटक पर्वतामधून नर्मदा नदी उगम पावत असे ( मत्स्य. १८६.१२; कूर्म. उत्तर. १३.३२; ३६; ३९; ४०.९ ). याच ग्रंथात अन्यत्र हा पर्वत महेश्वर शिवाचे निवासस्थान असल्याचा ( मत्स्य. १८८.९१ ), तसेच रुद्रशिवाच्या शरिरामधून नर्मदा नदी उगम पावत असल्याचा ( मत्स्य. १९०.७० ) निर्देश आढळतो. या कारणानेच नर्मदा नदी ' रुद्रसुता ' या वैकल्पिक नावाने ओळखली जात असे.

अमरकंटक पर्वतातून उगम पावणाऱ्या नर्मदा नदी-संबंधीची निम्नलिखित आख्यायिका स्कंद पुराणात दिली आहे:—ऋक्ष पर्वतावर तपस्या करीत असताना शिवाच्या शरिरावर उत्पन्न झालेल्या घर्मबिंदूमधून नर्मदा नदीचा उगम झाला. या नदीने स्त्रीरूप धारण करून शिवाची सेवा आरंभिली. या सेवेने प्रसन्न होऊन शिवाने नर्मदा नदीला पवित्र आणि सदैव प्रवाहीत रहाण्याचा वर दिला ( स्कन्द. आवन्त्य. ३.४; नर्मदा पहा ).

**पौराणिक साहित्यात**—शिवाने भस्म केलेल्या बाणासुराच्या तीन नगरांपैकी ( त्रिपुर ) दोन नगरे अनुक्रमे अमरकंटक पर्वत आणि नजीकच असणाऱ्या जालेश्वरा-जवळील श्रीशैल येथे पडली ( मत्स्य. १७८.७८–८२; पद्म. १५. ६७–७१ ). येथे निर्देशिलेला श्रीशैल हा अमरकंटक पर्वतावरील जालेश्वराचाच एक भाग असून, आंध्र प्रदेशातील श्रीशैलाशी त्याचा काहीहि संबंध नाही.

**अन्य प्राचीन साहित्यात**—मेघदूतात या पर्वताचा निर्देश ' आम्रकूट ' नावाने केला असून, चित्रकूट पर्वतावर थोडी विश्रांती घेतल्यानंतर उर्वरीत विश्रांती अमरकंटक पर्वता-वर घेण्याचा आदेश या काव्यग्रंथात मेघाला दिला आहे

(मेघ. १.१७). महाभारतान्तर्गत नकुलाच्या पश्चिम दिग्विजयातहि एक देशनाम या नात्याने अमरकंटक (पाठभेद–'अपरपर्यटक')चा निर्देश आढळतो (म. स. २९.१०).

राजकीय इतिहास—ऐतिहासिक दृष्टया अमरकंटक पर्वताचा परिसर हा गोंड लोकांचे निवासस्थान असून कालांतराने या प्रदेशावर रत्नपुरनिवासी हैहय राजांचे राज्य आले. या राजघराण्यातील नीलध्वज आणि हंसध्वज नामक राजांनी अनुक्रमे माहिष्मती आणि चंद्रपुर राज्यांची स्थापना केली. परंतु ही राज्ये कालांतराने नष्ट होऊन रत्नपुर येथील हैहयांचे आद्य राज्यच केवळ दीर्घकाळपर्यंत टिकून राहिले. या राजघराण्यातील अंतिम राजा रघुनाथसिंग यास मराठ्यांनी इ. स. १७४५ मध्ये पदच्युत केले.

हैहय राजघराण्यातील करणपाल (इ. स. ११५–१९४) राजाने या पर्वतावरील अमरकंटक नगराची स्थापना केली. नर्मदा नदीच्या उगमस्थानी असणारे कुंड, तसेच नजीकच असणारे अपूर्णावस्थेतील करणमंदिर ही दोन्हीहि याच राजाने बांधली.

अमरकंटक नगर—करणपाल राजाने वसविलेले अमरकंटक नगर एका लहान ग्रामाच्या रूपाने अमरकंटक पठारावर आजहि अस्तित्वात असून कलचुरि राज्यकालातील इ. स. ११७१ मधील एक मूर्तिलेख या गावी सापडला आहे. देवतोपासनेमध्ये तल्लीन झालेल्या एका उपासकमूर्तीच्या व्यासपीठावर हा लेख कोरला असून, रत्नपुर येथील माधवाक्ष नामक लेखनाध्यक्षाच्या नारायण नामक पुत्राची ही शिल्पप्रतिमा असल्याचे या मूर्तिलेखावरून दिसते.

डॉ. मिराशी यांच्या मते ही मूर्ती मूळ रत्नपुर गावची असून उत्तरकालात ती अमरकंटक गावी हलविण्यात आली असावी (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.५८७).

तीर्थस्थान—शिवाचे निवासस्थान आणि नर्मदा नदीचे उगमस्थान असणारा अमरकंटक पर्वत एक पवित्र तीर्थस्थान असून (नारद. २.७७.४; पद्म. सृ. १३.८;१८.२५), त्यामध्ये स्नान केले असता ब्रह्महत्त्येचे पातक नष्ट होत असे (मत्स्य. १८९.८९;९८). या तीर्थाची क्षेत्रमर्यादा १ मैल होती.

तीर्थनामावली—या पर्वतावरील निम्नलिखित शिवस्थानांचा निर्देश स्कंद पुराणात आढळतो:– १. जालेश्वर हृद; २. दारुवन; ३. चरुकासंगम; ४. चरुकेश्वर; ५. दारुकेश्वर; ६. व्यतीपातेश्वर; ७. पातालेश्वर; ८. अमरेश्वर; ९. वरुणेश्वर; १०. सिद्धेश्वर; ११. यमेश्वर; १२. केदार; १३. ब्रह्मेश्वर; १४. सप्तसारस्वत; १५. रुद्राष्टक; १६. सावित्र; १७. सोमतीर्थ (स्कंद. आवन्त्य. ३.२१. २१–५५).

पद्ममते अमरकंटक हे वैष्णवतीर्थ असून, तेथील वैष्णव देवतेचे नाव 'चांड' होते (पद्म. उ. १२९.२२). येथे चंडिकेचे एक पीठहि होते (पद्म. सृ. १७.२०७)

देहत्याग—कायावाचामने पवित्र असणाऱ्या व्यक्तीने अमरकंटक पर्वतावर जलसमाधी, अग्निप्रवेश अथवा प्रायोपवेशन यांच्या साह्याने देहत्याग केला असता त्यास मुक्ती प्राप्त होत असल्याचा निर्देश स्कंद पुराणात आढळतो. या पर्वतावरील नर्मदा नदी आणि जालेश्वर हृद येथील श्राद्धकर्महि अत्यंत पुण्यदायक मानले जाते (पद्म. सृ. ११. २०; विष्णुस्मृति. ८५.६).

शाळिग्राम––या पर्वतावरील नर्मदा नदीमध्ये सापडणाऱ्या दगडांची (शाळिग्राम) शिवलिंग म्हणून पूजा करण्यात येते. अशाच एका 'ॐकार' नामक शाळिग्रामाची स्थापना काशी येथील 'पिपिलिका' तीर्थानजीक करण्यात आली होती (स्कन्द. काशी. ६९.१६७).

सद्यःकालीन तीर्थस्थाने––अमरकंटक पर्वतावरील सद्यःकालीन तीर्थस्थाने पुढीलप्रमाणे होत :––

१. नर्मदा नदीचे उगमस्थान––या स्थानी एक जलकुंड आणि शिवाची अनेक देवालये बांधली आहेत. नर्मदा नदीची प्रदक्षिणा करणारे यात्रेकरू भडोचहून निघून पायी प्रवास करीत नर्मदा नदीच्या उगमस्थानी येतात. तदनंतर या नदीच्या दुसऱ्या किनाऱ्याने रेवा-सागर संगमापर्यंत जाऊन प्रदक्षिणाविधी पुरा करतात.

२. करण मंदिर––हैहय राजा करणपाल (इ. स. ११५–१९४) याने बांधावयास घेतलेले हे मंदिर अपूर्ण, विजन आणि परित्यक्त अवस्थेत दिसते. कनिंगहॅम यांच्या मते या मंदिराची रचना खजुराहो येथील सुबक आणि प्रमाणबद्ध छोट्या मंदिरासदृश आहे.

३. जालेश्वर हृद––अमरकंटक पर्वताच्या पश्चिम भागातील या सरोवराच्या काठचे श्राद्धकर्म पुण्यकारक मानतात.

**अमरकहृद** (सरोवर)––वाराणसी येथील एक पवित्र सरोवर (लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. ५३).

**अमरकुण्ड** ( कुंड )--वायव्य भारतातील कटाक्षराज तीर्थक्षेत्रान्तर्गत एक पवित्र जलकुंड ( ती. ७४; कटाक्षराज पहा ).

**अमरनाथ** ( लिंग )--कश्मीरातील सुविख्यात शिव-मंदिरस्थान. येथील अमरेश्वराचे हिमलिंग भारतातील शिवोपासकांचे एक प्रमुख आराध्य दैवत मानले जाते. नामांतर-- ' अमरेश्वर '.

**भौगोलिक स्थान**--हे हिमलिंग हिमालय पर्वतान्तर्गत हरमुकुट पर्वतश्रेणीतील भैरवघाटी नामक १७०००' उंचीच्या हिमाच्छादित पर्वतीय गुफेमध्ये असून, ते श्रीनगरपासून ८६ मैल ईशान्येस पहलगामनजीक आहे ( अक्षांश ७५°-३३' उत्तर; रेखांश ३४°-१३' पूर्व ). हे पर्वतशिखर ' कैलास ' अशा स्थानिक नावाने ओळखले जाते.

' अंबुरनाथ ' अशा स्थानिक नावाने ओळखले जाणारे हे तीर्थस्थान सद्यःकाली कश्मीरातील सर्वाधिक लोकप्रिय यात्रास्थान असले, तरी प्राचीन काळी श्रीनगर-नजीकचे ' अमरेश्वर मंदिर ' हे अधिक प्रसिद्ध होते असे दिसते ( राज. ७.१८३; अमरेश्वर १. पहा ).

**हिमलिंग**—अमरनाथ गुफेच्या छतामधून झिरपणाऱ्या पाण्याचे पारदर्शक हिमखंडात रूपांतर होते आणि अशा तऱ्हेने स्वयंभूपणे निर्माण झालेल्या या शिवलिंगाकृती हिमखंडाची ' अमरेश्वर शिव ' म्हणून पूजा केली जाते. या तीर्थाची यात्रा अत्यंत दुर्घट असूनहि श्रावण ( जुलै-आगस्ट ) महिन्यात येथे मोठी यात्रा भरते.

**नामव्युत्पत्ती**—स्थानिक समजुतीनुसार शिवाने या स्थानी आपल्या माथी असणाऱ्या चंद्रातील अमृत देवांना देऊन त्यांस अमर बनविले. तदनंतर देवांच्या विनंतीवरून या स्थानी शिव हिमलिंगाच्या रूपाने निवास करू लागला. या कारणाने येथील हिमलिंगास ' अमरनाथ ' अथवा ' अमरेश्वर ' असे नाव प्राप्त झाले.

**प्राचीन साहित्यात**--राजतरंगिणीच्या मते अमरनाथ-यात्रेच्या मार्गामध्ये सुश्रवस् नागाने बांधलेले दुग्धाब्धिधवल जलाने युक्त असे सरोवर लागत असे ( राज. १. २६७ ). अमरनाथ यात्रेच्या मार्गावर लागणारे आधु. शेषनाग सरोवर ते हेच होय.

नीलमत पुराणात या शिवस्थानाचा निर्देश असून ( नीलमत. १५३५ ), प्रतिपदेच्या दिवशी बर्फाच्या बुडबुड्याप्रमाणे छोटे दिसणारे 'अमरनाथ' येथील शिवलिंग पौर्णिमेच्या दिवशी ६' हून उंच होत असल्याच्या नैसर्गिक चमत्काराचा निर्देश ऐन-इ-अकबरीमध्ये आढळतो ( ऐ. अ. २.३६० ). जोनराजाच्या ग्रंथात कश्मीरचा सुल्तान झैनुल आबिदीन याने या तीर्थस्थानास भेट दिल्याचा निर्देश असून ( जोनराज. १२३३ ), ' अमरनाथ माहात्म्या 'त या स्थानाचे, तसेच अमरनाथ- यात्रामार्गाचे सविस्तर वर्णन दिले आहे.

**स्थानवर्णन**—या स्थानी असणारी गुफा ५०' रुंद आणि २५' उंच असून, तिच्या भिंती ' जिप्सम ' जातीच्या दगडाच्या आहेत. तिच्या छताला सर्वत्र झिरपे लागले असून, तिच्या उत्तरेकडील भिंतीतील दोन मोठ्या छिद्रातून अखंडपणे पाणी निथळत असते. हे पाणी बाहेर येताच त्याचे बर्फ बनून त्यामधूनच हिमलिंगसदृश आकृती तयार होते. अमरनाथ येथील परमपवित्र हिमलिंग ते हेच होय.

हे हिमलिंग गुफेच्या प्रवेशद्वारापासून २५' अंतर्भागात असून, त्याची आणि त्याच्या शाळुंकेची उंची अनुक्रमे २' आणि ३' असते. शाळुंकेचा व्यास ७'-८' असतो.

स्थानिक समजुतीनुसार येथील शिवलिंग शुक्ल प्रतिपदे-पासून पौर्णिमेपर्यंत क्रमाने मोठे होत जाऊन, तदनंतर कृष्ण प्रतिपदेपासून अमावास्येपर्यंत ते क्रमाक्रमाने छोटे होते. थंडीच्या दिवसात हे हिमलिंग संपूर्णतः गोठून जाते. उन्हाळ्याच्या दिवसात त्याचा आकार काहीसा छोटा होतो. मात्र ते संपूर्णतः नाहीसे कधीच होत नाही.

गुफेच्या बाहेर मैलोगणती ठिसूळ बर्फ असते. परंतु येथील शिवलिंग आणि शाळुंका मात्र दगडासारख्या बर्फाची बनलेली दिसते. हा निसर्गचमत्कार अश्रद्ध माणसालाहि सश्रद्ध बनविणारा आहे. गुफेचे मुख्य प्रवेशद्वार दक्षिणाभिमुख असल्याने येथील हिमलिंग सूर्यप्रकाशापासून सदैव संरक्षित रहाते. त्यामुळे हे हिमलिंग न वितळता जसेच्या तसे रहात असावे. अन्य काही अभ्यासकांच्या मते हवेच्या विशेष गतीमुळे हा चमत्कार घडून येत असावा.

गुफेच्या अंतर्भागात एकसारख्या ठिबकणाऱ्या पाण्यामुळे तसेच रानटी कबुतरांमुळे तेथील वातावरण अत्यंत रौद्रगंभीर वाटते. यात्रेच्या शेवटच्या दिवशी कबुतराच्या एक किंवा दोन जोड्या या गुफेमध्ये अचानकपणे अवतीर्ण होतात. शिव आणि पार्वतीची अवतारस्वरूपे मानून यात्रेकरू त्यांची पूजा करतात आणि त्यांना दाणे खाऊ घालतात.

या गुफेतील हिमलिंगाच्या डाव्या अंगास ' गणेशपीठ ' आणि उजव्या अंगास 'पार्वतीपीठ' आणि 'भैरवपीठ' अशी

अन्य तीन तीर्थस्थाने आहेत. यापैकी 'पार्वतीपीठ' हे भारतातील ५१ शक्तिपीठांपैकी एक असून तेथे सतीचा कंठ पडला होता (शक्तिपीठ पहा).

अमरनाथ गुफेच्या डाव्या अंगास अन्य एक छोटी गुफा असून त्यामधील भस्म अमरेश्वर शिवाचा प्रसाद म्हणून भक्तजन कपाळी लावतात.

या गुफेच्या पश्चिमेस अमरगंगा (अमरौति) नामक एक छोटी नदी असून तीमधील अमर विभूति (पांढऱ्या शाडूची माती) शरिरास चोपडली असता थंडीची बाधा होत नाही, अशी स्थानिक समजूत आढळते.

**अमरनाथयात्रा**--येथील शिवाचा अवतारदिन श्रावण पौर्णिमा असून, त्या दिवशी हिमलिंगाचे दर्शन विशेष पुण्यप्रद मानतात. त्याआधी आणि नंतर येथील रस्ते हिमवृष्टीमुळे दुर्गम असल्याने श्रावण महिना हाच यात्रेच्या दृष्टीने सोयिस्कर असतो.

साधु, बैरागी आणि यात्रेकरू यांचा अमरनाथयात्रेचा मेळा दर वर्षी श्रावण शुक्ल पंचमीला शारदापीठाच्या शंकराचार्यांच्या नेतृत्वाखाली श्रीनगरहून पायी निघतो. श्रीनगर, अवंतिपुर, ब्रिजविहार, अनंतनाग, मार्तंड, पहलगाम, चंदनवाडी, वावजन, पंचतरणी अशा मार्गाने प्रवास करीत हा मेळा श्रावण पौर्णिमेला अमरनाथ येथे पोहोचतो. यापैकी चंदनवाडी आणि वावजन यांच्या दरम्यान राजतरंगिणीमध्ये निर्देशिलेले 'शेषनाग सरोवर' आहे.

२. कश्मीरातील सुविख्यात शिवलिंगस्थान. हे पूंच-पासून १४ मैल अंतरावर असून, 'बूढा अमरनाथ' या स्थानिक नावाने ओळखले जाते. येथील शिवलिंगाच्या खालच्या भागात एक जलप्रवाह वाहतो (ती. ४५).

**अमरनिर्झर** (तीर्थ)--बिहारमधील एक तीर्थस्थान. हे राजगृह गावाजवळील यतीकोल गावापासून एक मैल पूर्वेस आहे (ती. १६९).

**अमरपुर** (बृहत्भारतीय नगर)--ब्रह्मदेशाच्या उत्तरकालीन राजधानीचे गाव. इ. स. १२८६ मध्ये कुबलाईखानाने 'पगान' हे ब्रह्मदेशाच्या राजधानीचे गाव नष्ट करून तेथील शतकानुशतकांची ब्रह्मी स्थापत्य-परंपरा उद्ध्वस्त केली. यानंतरच्या काळात मेरव्वय, अवा, सगैंग, अमरपुर आणि अखेरीस मंडाले गावी ब्रह्मदेशाची राजधानी स्थलांतरीत करण्यात आली.

**स्थापत्यावशेष**--अमरपुर येथील स्थापत्यावशेष (इ. स. १४ वे-१८ वे शतक) पगान येथील पूर्वकालीन स्थापत्यावशेषांच्या तुलनेने अत्यंत दुय्यम प्रतीचे असून, त्यावर चिनी 'पॅगोडा' स्थापत्यशैलीचा विशेष प्रभाव पडलेला दिसतो.

**क्यौक्-तौग्यी मंदिर**--चिनी पॅगोडा शैलीने बांधलेले हे मंदिर मिंगून येथील मिंगून-पया मंदिराप्रमाणे इ. स. १९ व्या शतकातच बांधले असून, ब्रह्मदेशचा राजा पगान-मिन् याने पगान येथील आनंद मंदिराची (इ. स. ११ वे शतक) प्रतिकृती डोळ्यासमोर ठेवून ते बांधले.

या मंदिराच्या दर्शनी भागी पाच भव्य प्रवेशद्वारे असून वरच्या अंगास क्रमाक्रमाने छोटी होत जाणारी पाच व्यासपीठे आहेत. मंदिराचे शिखर, कळस आणि छत्रावली यांची रचना पगान येथील आनंद मंदिराबरहुकूम असून, त्याचे नक्षीकामहि त्या मंदिराप्रमाणेच सावेसुधे पण सुबक आहे.

फर्ग्युसन यांच्या मते इ. स. ११ व्या शतकापासून इ. स. १९ व्या शतकापर्यंतच्या काळात ब्रह्मी समाजाची धार्मिक प्रेरणा आणि स्थापत्यकला अभिजात राहिल्याचे प्रात्यक्षिक या मंदिरात पहावयास मिळते (फर्ग्युसन, २. ३५१-३५२).

**अमरपुर येथील अन्य धार्मिक इमारती**--येथील 'पितकत्-तैक' (धार्मिक ग्रंथालय) आणि 'श्वे-दैक' (पवित्र संग्रहालय) या दोन्ही इमारतींची रचना पगान येथील तत्सम इमारतीसदृश असली तरी उंच व्यासपीठे आणि प्रशस्त पायऱ्या यामुळे त्या काहीशा वेगळ्या वाटतात. या दोन्ही इमारती दोन मजली उंच असून, त्यांचे छत सपाट आकाराचे आहे.

**अमरपुर-निकाय बौद्ध पंथ**--सिलोनचा ब्राह्मणधर्मीय राजा कीर्तिश्रीराजसिंह (इ. स. १७४८-इ. स. १७७८) याने ब्राह्मणेतर लोकांना बौद्ध धर्माची दीक्षा घेण्यास बंदी केली. त्यामुळे इ.स.१८०० मध्ये अंबगहपति नामक आचार्याच्या नेतृत्वाखाली काही सिलोनी तरूण अमरपुर येथे दीक्षा-प्राप्त्यर्थ आले आणि ज्ञानाभिवंश नामक आचार्याने त्यांना दीक्षा दिली. या गावाचे नावावरून या बौद्ध संघास 'अमरपुर-निकाय' असे नाव प्राप्त झाले (सांकृत्यायन, बौद्ध संस्कृति पृ. ६४).

**अमररथ** (देश)--पद्ममते भारतवर्षान्तर्गत एक जनपद (पद्म. सृ. ६. ४९).

**अमरह्रद** (सरोवर)--कुरुक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान (म. आर ८१.८९; पद्म सृ. २६.९९).

**अमरावती** ( बौद्धस्थान )--आंध्र प्रदेशातील कृष्णा नदीकाठचे सुविख्यात बौद्ध आणि हिंदु मंदिरस्थान. या स्थानी असणाऱ्या सातवाहन राज्यकालीन ( इ. स. २ रे शतक ) बौद्ध स्तूपामुळे हे स्थान आणि पर्यायाने आंध्र शिल्पकला साऱ्या जगात ख्यातनाम बनली आहे.

**भौगोलिक स्थान**--गुंतूर जिल्ह्यातील सत्तनपल्ले तालुक्यातील धरणिकोट गावाच्या दक्षिणेकडील आधु. अमरावती गावापासून १ मैल पूर्वेस हे स्तूपस्थान आहे. गुंतूर गावापासून २० मैल वायव्येस, बेझवाडा गावापासून १८ मैल पश्चिमेस, आणि कृष्णा नदीच्या मुखापासून ६० मैल अंतर्भागात हे स्थान आहे.

मद्रास-दिल्ली रेल्वेमार्गावरील विजयवाडा या स्थानकावर उतरून तेथून पुढे बसने प्रथमतः गुंतूरला आणि नंतर अमरावती गावाला जाता येते. कृष्णा नदीच्या मार्गाने विजयवाडा-अमरावती अंतर २० मैल पडते.

**आंध्र राजधानी**--कनिंगहॅम आणि बर्जेस यांच्या मते अमरावती स्तूपानजीकचे आधु. धरणिकोट म्हणजे प्राचीन धनकटक ( धान्यकटक ) हे आंध्र राजधानीचे स्थान होय. ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात निर्देशिलेला पूर्वशिला अथव अपरशिला या धनकटक येथील पर्वतीय संघारामाचा एक भाग अमरावती स्तूप ते मानतात. याचे उलट धनकटक म्हणजे आधु. बेझवाडा गाव असून, अमरावती येथील स्तूपाचा पूर्वशिला आणि अपरशिला संघारामांशी काहीहि संबंध नव्हता, असे वॉटर्स आणि स्मिथ म्हणतात ( धनकटक पहा ).

ते काहीहि असले तरी सातवाहन स्थापत्य आणि शिल्पशैलीचे अत्यंत परिणत आणि विकसित स्वरूप त्यांच्या अमरावती स्तूपामध्ये पहावयास मिळते.

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**--सातवाहन राज्यकालाच्या अंतिम कालखंडात महाराष्ट्रातील अधिसत्ता संपुष्टात आल्यानंतर आंध्र प्रदेशातील आपली सत्ता त्यांनी सुसंघटित केली. या काळात म्हणजे इ. स. २ऱ्या-३ऱ्या शतकात त्यांनी बांधलेल्या बौद्ध स्तूपांमध्ये ' अमरावती ' येथील स्तूप सर्वाधिक महत्त्वपूर्ण मानण्यात येतो.

या स्थानी सापडलेल्या संगमरवरी शिल्पावशेषांमध्ये विभिन्नकाली हा स्तूप कसा दिसत असे हे दर्शविणारी शिल्पचित्रे आढळतात. त्यावरुन अमरावतीच्या, तसेच अन्य सातवाहनकालीन स्तूपस्थापत्याची यथार्थ कल्पना येते.

**शोध**--येथील बौद्ध स्तूपाचा सर्वप्रथम शोध इ. स. १७९६ मध्ये वेंकटाद्रि नायडु नामक संस्थानिकाने लावला, आणि त्याचे संगमरवरी दगड इमारतसाहित्य म्हणून वापरले. अशा तऱ्हेने अर्धवट उध्वस्त झालेल्या या स्तूपाचे कर्नल मॅकेंझी यांनी इ. स. १८१६ मध्ये उत्खनन केले. इ. स. १८४० मध्ये सर वॉल्टर इलियट यांनी या स्तूपाच्या पश्चिम प्रवेशद्वाराचे अवशेष शोधून काढले. इ. स. १९०५ आणि १९०८ मध्ये या स्तूपाचे पुन्हा एकवार उत्खनन करण्यात आले ( आर्कि. सर्व्हे. रिपोर्ट. इ. स. १९०५, पृ. ११६; इ. स. १९०८, पृ. ८८ ).

येथील स्तूपांचे संगमरवरी शिल्पावशेष लंडनमधील ब्रिटिश म्युझियममध्ये ठेवले असून, त्यावरुन त्यांच्या भव्यतेची आणि शिल्पसौंदर्याची यथार्थ कल्पना येते.

**आकारमान**--सुस्थितीत असताना या स्तूपाची उंची आणि व्यास अनुक्रमे ५०′ आणि १६२′ असावा. सिलोनचा अपवाद वगळता साऱ्या भारतात मोठ्या आकाराचा अन्य स्तूप आढळत नाही ( सांची स्तूप-व्यास १०६′ ).

**रचना**--या स्तूपाच्या तळातील चौकोनी अवशेषगृह आणि प्रदक्षिणापथानजीकचा दर्शनी भाग हे विटांचे बांधले असून, त्यांना जोडणाऱ्या वर्तुलाकृती भागात सूर्यकिरणांसदृश आकाराच्या उभ्या भिंती बांधलेल्या होत्या. दरम्यानच्या भागात राडेरोडे आणि माती भरली होती.

**प्रदक्षिणापथ**--या स्तूपाच्या दर्शनी भागाच्या तळाशी दोन मजलेपर्यंत संगमरवरी शिल्पचित्रे वर्तुलाकृती पद्धतीने बसविली असून, त्याच्या बाहेरच्या अंगास तळाशी एक आणि वरच्या अंगास एक असे दोन प्रदक्षिणापथ होते. मात्र या दोन्ही प्रदक्षिणापथांना उत्तर भारतीय स्तूपासदृश दगडी कठडा नव्हता.

**प्रवेशद्वार**--स्तूपाच्या सभोवताली वेदिकेचेच परिवर्धन करून बांधलेली चार लंबचौकोनाकृती आवारे असून त्यांच्या दर्शनी भागी चार प्रवेशद्वारे बांधली होती. या प्रवेशद्वारांच्या दोन्ही अंगास सिंहप्रतिमांनी युक्त लोहस्तंभ होते.

मुख्य प्रवेशद्वाराच्या अंतर्भागात स्तूपाच्या प्रदक्षिणापथाप्रत जाणारा जिना असून त्याच्या दर्शनी भागी स्तूपाच्या अधिष्ठाच्या नागराजाचे बृहदाकार शिल्पचित्र होते. या शिल्पाच्या पाठीमागच्या अंगास एक सज्जा असून, त्याच्या शिरोभागी स्वर्गलोकी निवास करणाऱ्या पाच बुद्धाचे

(ध्यानी बुद्ध) प्रतीकरूप असे पाच स्तंभ ('आर्यक') उभारण्यात आले होते.

**वेदिका**--आकारमान आणि कलात्मकता या दोन्ही दृष्टींनी अमरावती येथील स्तूपाची 'वेदिका' (कठडा) ही भारतातील उपलब्ध वेदिकाशिल्पात अद्वितीय आणि भर्हुत वेदिकेहूनहि सरस मानली जाते.

या वेदिकेचा व्यास १९२′ म्हणजे भर्हुत वेदिकेपेक्षा दुप्पट असून तिच्या दर्शनी भागावर (उंची १४′), तसेच अंतर्भागावर (उंची १२′) समृद्ध नक्षीकाम होते. स्तूपाच्या दर्शनी नक्षीकामापेक्षा (उंची ६′) कठड्याच्या नक्षीकामावर येथील शिल्पकारांनी आपले लक्ष अधिक केंद्रित केले होते.

या कठड्याच्या दर्शनी भागातील सर्वात खालच्या आडव्यात पट्टीवर विभिन्न प्राणी आणि बुटकी मुले यांच्या प्रतिमा कोरल्या असून, सर्वात वरच्या आडव्या पट्टीवर कापडाचा मोठा तागा खांद्यावर घेतलेल्या व्यक्तींची शिल्पचित्रे कोरली होती. ब्रह्मदेशात बौद्ध आचार्याच्या स्मशानयात्रेच्या वेळी रंगीत कापडाचा भला मोठा तागा खांद्यावर घेतलेल्या भिक्षूंची दुतर्फा रांग आजहि दिसते.

या कठड्याच्या उभ्या लंबचौकोनाकृती स्तंभावर गोल चकत्या कोरल्या असून, मधल्या तीन आडव्या पट्ट्यांवर कमलपुष्पांच्या आकाराच्या वर्तुळाकृती चकत्या होत्या. या विभिन्न चकत्यांच्या दरम्यान शिल्पचित्रे कोरली होती.

कठड्याच्या अंतर्भागाचे नक्षीकाम दर्शनी भागापेक्षाहि अधिक कलाकुसरीचे असून, त्यांच्या उभ्या स्तंभांवरील, तसेच आडव्या पट्ट्यांवरील चकत्यांवर शिल्पचित्रे होती. सर्वात वरच्या कठड्याच्या अंतर्भागावर सुमारे ६००′ लांबीचे एक अखंड शिल्पचित्र कोरले होते.

स्तूपाच्या प्रवेशद्वारानजीकच्या कठड्याच्या उभ्या स्तंभांवर दोन चकत्यांमधील मोकळ्या जागेत दोन बाजूस अतिविशाल शिल्पचित्रे कोरली होती. यापैकी एका शिल्पचित्रात एका राजाचे घोडदळ, पायदळ आणि हत्तीदळ शत्रूशी सामना करीत असून, ही युद्धवार्ता एक दूत महालात बसलेल्या राजाला येऊन सांगत असल्याचे दृश्य कोरले होते.

वेदिकाशिल्पाच्या इतिहासात अमरावती येथील स्तूपाची वेदिका हे या शिल्पपरंपरेतील अंतिम आणि सर्वश्रेष्ठ प्रातिनिधिक उदाहरण मानण्यात येते. उत्तरकालीन गंधार आणि सारनाथ स्तूपामध्ये 'प्रदक्षिणापथ' आणि 'वेदिका' दोन्ही आढळत नाहीत (गंधार, सारनाथ पहा).

**संगमरवरी नक्षीकाम**—येथील स्तूपाच्या दर्शनी भागी ६′ उंचीपर्यंत संगमरवरी शिल्पप्रतिमा हारीने बसविण्यात आल्या होत्या. या शिल्पचित्रांमध्ये अमरावती आणि अन्य समकालीन (इ. स. १ ले–२ रे शतक) स्तूपांच्य प्रतिकृती अधिक संख्येने असून अशा तऱ्हेची ४८ शिल्पचित्रे आजवर उपलब्ध झाली आहेत.

गौतम बुद्धाच्या जीवनातील विभिन्न प्रसंगांचे चित्रण करणारी अन्य अनेक संगमरवरी प्रसंगचित्रेहि येथे असून, त्यामध्ये गौतम बुद्धाच्या हीनयानपंथीय निर्गुण उपासनेची (इ. स. पू. १ ले शतक), तसेच उत्तरकालीन सगुण उपसनासांप्रदायाची (इ. स. २ रे शतक) अशी दोन्ही तऱ्हेची चित्रे आढळतात.

**कालानुक्रम**—अमरावती येथील शिल्पचित्रांची रचना इ. स. पू. १ले–इ. स. २ रे शतक या कालखंडात झाली असून, त्यांचे निम्नलिखित उपविभाग दिसतातः---

१. इ. स. पू. १ ले–इ. स. १ ले शतक--या कालातील शिल्पे अत्यंत ओबडधोबड आणि प्राथमिक अवस्थेतील असून, शिल्पदृष्ट्या भाजे चैत्यमंदिरातील शिल्पांशी त्यांचे साम्य दिसते.

स्तूपाच्या तळाशी आढळणाऱ्या या तऱ्हेच्या प्रातिनिधिक शिल्पचित्रात बुद्ध, धर्म आणि संघ ही बौद्धधर्माची तीन उपास्य दैवते रूपकात्मक पद्धतीने चित्रित केली आहेत. नागराजमंडित स्तूप, धर्मचक्र आणि बौद्ध धर्मसंघाचे प्रतीक म्हणून बोधिवृक्ष आणि सिंहासनाधिष्ठित बौद्ध शरिरावशेष यांच्या प्रतिकृती तेथे एकाखाली एक कोरलेल्या आढळतात.

२. इ. स. १ ले–२ रे शतक--ही शिल्पे कार्ले, नासिक, सांची येथील सातवाहन शिल्पांसदृश असून, त्यांच्या शिरोभागी सिंह आणि हत्ती आदींवर आरूढ झालेल्या दानशूर व्यक्तींची शिल्पचित्रे कोरली आहेत. गौतम बुद्ध आणि त्याचे उत्तरकालीन विभिन्न शिष्य यांची शिल्पेहि याच काळातील आहेत.

**३. इ. स. २ ऱ्या शतकाचा प्रारंभ**--या काळातील शिल्पचित्रांमध्ये मानवस्वरूपी गौतम बुद्धाच्या सगुण उपासनेवर भर दिला असून, विभिन्न उपदेवता, यक्ष आणि यक्षिणी यांनी वेष्टिलेल्या देवदेवेश्वराच्या स्वरूपात त्याचे येथे शिल्पांकन केले आहे. हजारो सुंदर स्त्रिया आणि नोकरचाकर यांनी वेष्टिलेला स्वरूपसुंदर राजकुमार अथवा देवतांद्वारा पूजिला जाणारा विश्ववंद्य तापस, असे त्याचे

येथे प्रातिनिधिक स्वरूप दिसते. या चित्रांच्या सभोवताली कमलपुष्पे आणि विभिन्न प्राणी याचे समृद्ध नक्षीकाम कोरले आहे. शिल्पातील मनुष्यप्रतिमा अतिरिक्त सड-पातळ आहेत.

४. इ. स. २ ऱ्या शतकाचा मध्य--सातवाहन राजा वासिष्ठीपुत्र पुळुमायि याच्या राज्यकालातील या शिल्पचित्रां-मध्ये कमनीय आकृतीच्या आणि आकर्षक हालचालींच्या व्यक्ती, गुंतागुंतीचा आकृतिबंध आणि नैसर्गिक निसर्गदृश्ये ही परिणत सातवाहन कलेची सारी वैशिष्ट्ये दिसतात.

शक चेहऱ्यामोहऱ्याची किंवा पोषाखाची एखादी व्यक्ती या चित्रांमध्ये अचानकपणे डोकावते; तर कधी रोमन चित्रपरंपरेतील सारेच्या सारे चित्र येथे जसेच्या तसे नक्कललेले दिसते. यावरून ही चित्रे कोरणारे कारागीर रोमन कलेशी परिचित असून, शिल्पचित्रांच्या आकृति-बंधाची कला त्यांनी रोमन विजयतोरणांवरून अथवा थडग्यांवरून उचलली असावी.

विदेशी प्रभाव--अरिकमेडु विरमपतनम् या व्यापारी बंदराद्वारे, तसेच वायव्य भारतातील कुशाण साम्राज्याच्या मार्गाने रोम व पार्थिया देशांशी या नगराचा फार मोठा व्यापार चालत असे. त्या मार्गाने रोमन शिल्पकलेचा परिचय स्थानिक शिल्पकारांना झाला असावा.

मात्र अन्य अनेक देशीविदेशी परंपरा सामावून घेण्या-इतपत सामर्थ्य सातवाहन कलापरंपरेत असून, उपरोक्त विदेशी संमिश्रणाने तिच्या स्वयंभूपणास बाध न येता ती अधिक समृद्ध बनलेली दिसते.

कालनिर्णय-- इ. स. पू. २०० पासून इ. स. २०० पर्यंतच्या विभिन्न काळातील शिल्पचित्रांची या स्तूपाच्या शिल्पामध्ये जी सरभेसळ दिसते, त्यावरून मूळ इ. स. पू. २०० मध्ये बांधलेला हा स्तूप उत्तरकालात तीन वेळा पुन्हा बांधून काढण्यात आला असावा :--

१. इ. स. पू. २००-- मौर्यकालातील काही शिलालेख कोरलेली शिल्पे या स्थानी सापडली असून, त्यावरून मौर्य राज्यकाळी हा स्तूप छोट्या स्वरूपात अस्तित्वात असावा.

२. इ. स. पू. १००--या काळात हा स्तूप पुन्हा बांधण्यात येऊन गौतम बुद्धाच्या शरिरावशेषपूजनाची, तसेच 'त्रिरत्न' पूजनाची शिल्पे स्तूपवेदिकेवर नव्याने बसविण्यात आली.

३. इ. स. १५०--आंध्र राजा वासिष्ठीपुत्र पुळुमायि याच्या राज्यकालात स्तूपाच्या दर्शनी भागातील बौद्ध-जीवनातील चित्रे नव्याने बसविण्यात आली. या राजाच्या इ. स. १५० मधील एका शिलालेखात या स्तूपाचा निर्देश 'चैतिक' अथवा 'पूर्वशैली सांप्रदायाचा महान स्तूप' म्हणून केला आहे.

ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात--ह्युएन्त्संग या स्तूप-स्थानी प्रत्यक्ष आला नव्हता असे वॉटर्स म्हणतात. अन्य अभ्यासकांच्या मते पूर्वशैल संघारामाच्या प्रवासप्रसंगी शंभर वर्षांहून अधिक काळ ओसाड पडलेल्या या स्तूपस्थानी तो आला असावा.

अमरेश्वर मंदिर--अमरावती येथील अमरेश्वर मंदिर हे कृष्णा नदीच्या उजव्या किनाऱ्यावर असून, पूर्ववाहिनी कृष्णा नदी ज्या स्थानी तात्पुरती दक्षिणाभिमुख होते त्या स्थानी हे मंदिर बांधले आहे.

सद्यःकालीन अमरेश्वराचे मंदिर वेंकटाद्रि नायडु नामक संस्थानिकाने इ. स. १८ व्या शतकात बांधलेले असले, तरी प्राचीन काळापासून या स्थानी एक देवालय होते असे कोंडवीडूचा राजा अन वेम रेड्डी याच्या इ. स. १३०६ मधील शिलालेखावरून दिसते. या देवालया-नजीकच वेंकटाद्रि नायडूच्या राजवाड्याचे अवशेष आहेत.

द्राविड स्थापत्यशैलीचे हे गोपुरयुक्त मंदिर पूर्वकाली बौद्ध मंदिर असून नंतर हिंदु देवमंदिरात त्याचे रूपांतर झाले असावे. या मंदिराच्या जोत्यावर, तसेच गर्भागाराच्या भिंती-वर बौद्ध धर्तीचे संगमरवरी शिल्प कोरलेले असून, १५' उंचीच्या बौद्ध 'आर्यक' स्तंभाचीच येथे शिवलिंग म्हणून स्थापना केली आहे.

स्थानिक 'स्थलपुराण'मते हे मंदिर कृष्णा नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर श्रीशैलम्च्या आग्नेयेस असल्याने ते विशेष पवित्र मानतात.

धरणिकोट किल्ला--अमरेश्वर मंदिराच्या १ मैल पश्चिमेस कृष्णा नदीकाठी धरणिकोटचा प्राचीन किल्ला असून, कोंडवीडु येथील रेड्डी राजांचे पूर्वज इ. स. १३ व्या शतकामध्ये तेथे रहात असत. काही अभ्यासकांच्या मते आंध्र देशातील सुविख्यात धनकटक नगर ते हेच होय (धनकटक पहा).

शिलालेखसाहित्यात--अमरावती स्तूप, अमरेश्वर मंदिर आणि अमरावती देशविभाग याविषयी शिलालेख-साहित्यात निम्नलिखित निर्देश आढळतात :—

(१) अमरावती स्तूप :—१. कोटकेत (द्वितीय) राजाचा इ. स. ११८२ मधील स्तंभलेख—स्तूपाच्या पूजेप्रीत्यर्थ देणगी दिल्याचा निर्देश (एपि. इंडि .६.१४६);

२. नातवाडी देशाच्या रुद्र राजाच्या बय्यला नामक कन्येचा इ. स. १२३४ मधील शिलालेख--स्तूपानजीक दिवा लावण्यासाठी देणगी दिल्याचा निर्देश ( एपि.इं डि. ६.१५७ );

( २ ) अमरेश्वर मंदिर– १. राजमहेंद्री येथील काटैय वेम ( तृतीय ) राजाचा इ. स. १३८६ मधील शिलालेख —मंदिरास देणगी दिल्याचा निर्देश ( रंगाचारी, २. गुंतूर ६२५ ); २. विजयनगरचा राजा कृष्णदेवराय याचा इ. स. १५१५ मधील शिलालेख--युद्धात मिळालेल्या विजयाप्रीत्यर्थ या मंदिरास देणगी दिल्याचा, तसेच स्वतःची सुवर्णतुला केल्याचा निर्देश ( रंगाचारी, २. गुंतूर ६३२;६३८; एपि. इंडि. ७.१७ ); ३. पेद्द अप्परय्य गारु याचा इ. स. १६२६ मधील शिलालेख--देवालयाचा जीर्णोद्धार केल्याचा निर्देश; ४. वेंकटाद्रि नायडु याचा इ. स. १८१३ मधील ध्वजस्तंभलेख-अमरावती येथील स्तूप उध्वस्त करून, त्याचे साहित्यातून अमरेश्वर मंदिराचा जीर्णोद्धार केल्याचा निर्देश ( सेवेल, मद्रास. ५.६३–६४ ); ५. काकतीय राजा गणपतीची कन्या गणपंबिका हिचा इ. स. १२४९ मधील शिलालेख-अमरावती गावी एक मंदिर बांधल्याचा निर्देश ( एपि. इंडि. ३.९४ );

( ३ ) अमरावती देशविभाग -- १. इ. स. ३ ऱ्या शतकातील नागार्जुनकोंड प्रतिमालेख—अमरावती देशविभागाचा निर्देश ( एपि. इंडि. २९.१३८ ).

२. ( नगर ) पौराणिक साहित्यात निर्देशिलेले इंद्राच्या राजधानीचे नगर. जंबुद्वीपान्तर्गत मेरु पर्वताच्या पूर्व भागात मानस सरोवराच्या काठी हे वसले होते ( लिङ्ग. ४८.९; कूर्म. १.४१.३५ ). अन्य पौराणिक साहित्यातहि या नगराचा निर्देश आढळतो ( म. आर. ४३.३८; विष्णुधर्म. १.६.११; ७.१२; नृसिंह. ३०.७; कूर्म. १. ४६.१० ).

नामांतरे--पौराणिक साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात :-- १. देवधानी ( भा. ५.२१.७ ); २. वस्वौकसारा ( वायु. ५०.८७; मत्स्य. १२४.२१; कूर्म. १.४६.१३ ); ३. माहेंद्री ( भवि. ब्राह्म. १२६.५ ).

३. ( नगर ) विदर्भातील सुविख्यात प्राचीन नगर. भुसावळ-नागपूर रेल्वेमार्गावरील बडनेरा गावापासून ६ मैलांवरील आधु. अमरावती गाव ते हेच होय.

येथील ‘ एकवीरा ’ मंदिरात रुक्मिणी देवतापूजनास आली असता कृष्णाने तिचे हरण केले. त्यानजीकच अंबाजीचे अन्य एक मंदिर आहे ( ती. २३८ ).

४. ( देवीस्थान ) अवंती येथील एक देवीस्थान ( नारद. २.७८.३६ ).

**अमरेन्द्रपुर** ( बृहत्भारतीय नगर )--आग्नेय आशियातीय कंबुज ( आधु. कंबोडिया ) देशाच्या ख्मेरवंशीय जयवर्मन् ( द्वितीय ) राजाच्या राजधानीचे गाव. अंकोर-थोम् या कंबुज देशाच्या उत्तरकालीन राजधानीच्या गावापासून १०० मैल वायव्येस असणारे आधु. बन्तऐशयर ( शब्दशः अर्थ–‘ मार्जारदुर्ग ’ ) गाव ते हेच होय.

उध्वस्तावशेष–एका वालुकामय मैदानामध्ये या गावाचे उध्वस्तावशेष आढळतात. तेथील एका कृत्रिम सरोवरामध्ये कालव्याच्या साह्याने पाणी आणून सोडले असून, त्याच्या मध्यभागी एक जलमंदिर बांधले आहे.

राजवाडा—उपरोक्त सरोवराच्या पश्चिम किनाऱ्यावर जयवर्मन् ( इ. स. ८०२–८६९ ) राजाने बांधलेली १॥ मैल × ४। मैल लांबीरुंदीची ‘ पुरी ’ ( राजवाडा आणि मंदिर ) असून, तिच्या तटबंदीच्या बाहेरच्या अंगास परंपरागत ख्मेर पद्धतीचा खंदक आणि चार प्रवेशद्वारे आहेत.

या प्रवेशद्वारांच्या दर्शनी भागी बृहत्काय गरुडाच्या शिल्पाकृती असून, त्यांच्या शिरोभागी ब्रह्मदेवाच्या चतुर्मुखांनी युक्त मनोरे आहेत. प्रवेशद्वारामधून आत जाणारे रस्ते संपूर्णतः दगडी असून, त्यांच्या दर्शनी भागी सिंहाच्या दगडी प्रतिमा आहेत.

मंदिर--अंतर्भागातील मुख्य मंदिर चौकोनाकृती असून, त्यावरील हिंदु आणि बौद्धधर्मीय शिल्पचित्रे अंकोर–वात् आणि बयोन मंदिराइतकीच समृद्ध आहेत. याखेरीज कंबुज देशाच्या तत्कालीन जीवनातील अनेक प्रसंगचित्रेहि ( पालखीमध्ये बसून जाणाऱ्या राजकुमारी, संचलन करणारी सेना, नौकायुद्ध ) तेथे आहेत. शैव उपासनापद्धतीची छाया असलेले हे बौद्ध महायानपंथीय मंदिर कंबुज देशातील अंकोर–वात् आणि बयोनखालोखाल महत्त्वाचे मानण्यात येते.

आपल्या कारकिर्दीच्या उत्तरकालात जयवर्मन् राजाने आपली राजधानी महेंद्र पर्वत ( आधु. फ्नोमकूलेन् ) गावी हलविली ( सांकृत्यायन, बौद्ध संस्कृति. पृ. १७१ ).

**अमरेलि** ( ताम्रपटस्थान )--खरग्रह ( प्रथम ) राजाच्या ताम्रपटाचे आधु. दक्षिण काठेवाड प्रदेशातील उपलब्धि—

स्थान. आधुनिक काळी हे एक जिल्ह्याचे गाव आहे ( बडोदा शिलालेख १.७ ).

**अमरेश्वर** ( तीर्थ )--राजतरंगिणीमध्ये निर्देशिलेले कश्मीरातील एक तीर्थस्थान ( राज. ७.१८३ ). श्रीनगरच्या ४ मैल उत्तरेस अंचिआर सरोवराकाठचे आधु. अंबुऱ्हेर गाव ते हेच होय.

अमरेश्वर शिवलिंग--येथील अमरेश्वर शिवलिंगाची माहिती कश्मीर तीर्थसंग्रहात दिली असून, कश्मीरच्या अनंत राजाची राणी सूर्यमती हिने या देवालयास ग्रामे आणि मठ दान दिले होते ( राज. ७.१८५ ).

आधुनिक काळी अमरेश्वर मंदिर संपूर्णतः उध्वस्त झाले असून, त्याच्या भग्नावशेषापासून बांधलेले 'फरुखाझाद-साहिब झिरात ' केवळ अस्तित्वात आहे. या झिराताच्या पश्चिमेस अंचिआर सरोवराच्याकाठी दोन पवित्र जलाशय असून, त्यापैकी ' गंगानागा 'चे दर्शन हरमुकुट पर्वत-यात्रेचे यात्रेकरू घेतात ( स्टाइन, राज. २.४५६ ).

लष्करी महत्त्व--हे स्थान लष्करीदृष्ट्या महत्त्वाच्या अशा श्रीनगर-सिंद खोरे रस्त्यावर असल्याने अनेक प्राचीन लढाया या गावी झाल्या होत्या. यापैकी प्रमुख संग्राम पुढीलप्रमाणे होत:-१. गर्ग-सुःशल संग्राम ( राज. ८.५०६; ५९० ); २. लहर गावचे डामर-सुःशल संग्राम ( राज. ८.७२९ ); ३. सुःशल-मल्लकोष्ठ संग्राम ( राज. ८. ११२४ ). परकीय राजाचे श्रीनगरवर आक्रमण झाल्यास या गावानजीकच्या प्रवेशद्वाराजवळ सैन्य उभे केले जात असे ( राज. ८.७५६ ).

२. कश्मीरातील अमरनाथ या सुविख्यात हिमलिंग-स्थानाचे नामांतर ( अमरनाथ पहा ).

३. ( शिवस्थान ) नर्मदा नदीच्या किनाऱ्यावरील सुविख्यात शिवमंदिरस्थान ( मत्स्य. १८६.२; पद्म. सू. १५.८० ). खांडवा रेल्वेस्थानकापासून ३२ मैल वायव्येस आणि मर्तोक रेल्वेस्थानकापासून ११ मैल पूर्वेस हे स्थान आहे.

नर्मदा नदीच्या उत्तर किनाऱ्यावरील ओंकारनाथ या सुविख्यात ज्योतिर्लिंगस्थानाचा अर्धभाग हे स्थान मानतात. शिवपुराणमते अमरेश्वर आणि ओंकारेश्वर मिळून एक ज्योतिर्लिंग बनत असे ( शिव. शत. रुद्र. ४२.२; १८-२२ ). शिवपुराणात अन्यत्र या स्थानाचे माहात्म्य सविस्तरपणे दिले आहे ( शिव. कोटि. रुद्र. १८; ओंकारेश्वर पहा ).

४. हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंगस्थान ( स्कन्द. नागर. १४५-१४६ ).

५. प्रभासक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंगस्थान ( स्कन्द. प्रभास. १.१९४ ).

६. निषध पर्वतान्तर्गत एक शिवलिंगस्थान ( वामन. तीर्थविवेचन. पृ. २३६ ).

७. काशीक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंगस्थान ( नारद. २. ५०.५७; लिङ्ग. १.९२.३७; तीर्थविवेचन. पृ. ९३ ).

८. श्रीपर्वतान्तर्गत एक शिवलिंगस्थान ( लिङ्ग. १.९२. १५१ ).

९. ( जैनतीर्थ )हरिषेणाच्या बृहत्कथाकोशामध्ये निर्देशिलेले नर्मदा नद्यन्तर्गत एक जैन तीर्थस्थान. येथे संभवतः ओंकार मांधाता तीर्थाचा निर्देश अभिप्रेत असावा ( ती. सं. पृ. ११५; ओंकार मांधाता पहा ).

**अमलकटक** ( ग्राम )—शिलालेखसाहित्यात निर्देशिलेले पश्चिम भारतातील एक ग्राम. बडोदा जिल्ह्यातील पाद्रा तालुक्यातील आम्ति गावापासून १२ मैल नैर्ऋत्येकडील आधु. अमोद गाव ते हेच होय ( बडोदा शिलालेख. १.२० ).

**अमलपुरम्** ( देशविभाग )--वेलावंति राजेंद्र चोड राजाच्या इ. स. ११६९ मधील नंदुरि ताम्रपटांत निर्देशिलेला आंध्र प्रदेशातील एक देशविभाग. कोनमंडल ( गोदावरी नदीच्या दक्षिणेकडील उपनद्यांचा प्रदेश ) देशाचा हा उपविभाग मानला जात असे. नामांतर-' अमलापुरम्. '

इ. स. १५ व्या शतकातील काटैय्य वेम राजाच्या शिलालेखाच्या मते हा देशविभाग कोंडवीडु देशामध्ये समाविष्ट होत असे ( रंगाचारी, २. गोदावरी. १४ ).

**अमलसह्याद्रि** ( तीर्थ )--एक तीर्थस्थान ( नृसिंह. ६६.३७ ).

**अमलेश्वर** ( लिंग )—नर्मदा नदीकाठचे शिवलिंग-स्थान. भडोचनजीकच्या भारभूत गावापासून ४ मैलांवर नर्मदेच्या उत्तर किनाऱ्यावर हे स्थान आहे ( ती. ४३९ ).

**अमळङ्गवल्लि-अत्तिमल्लचतुर्वेदिमङ्गलम्** ( ग्राम )-पृथ्वीगंगरैयर राजाच्या इ. स. ९५३ मधील शोळपुरम् शिलालेखात निर्देशिलेले चोल देशान्तर्गत एक ग्राम. चार छोट्या गावांचे एकत्रीकरण करून हे ग्राम बनले होते.

**अमिततोसल** ( देश )--' गौडव्यूह ' ग्रंथात निर्देशिलेले दक्षिणापथ देशातील एक जनपद. लेवी यांच्या

मते कलिंग देशान्तर्गत 'दक्षिण तोसल' देशाचे हे नामांतर असावे (लेवी, प्रीआर्यन इंडिया. पृ. ६८; तोसल पहा).

**अमीझरो** (जैनस्थान)--सुमतिसागरकृत तीर्थ-जयमालामते गुजरातमधील 'वडाली' या जैन तीर्थस्थानाचे नामांतर (ती. सं. पृ. ११५; वडाली पहा).

**अमृत** (कुंड)--केदार-बदरी मार्गावरील पवित्र जलकुंड (ती. ५७).

२. (तीर्थ) काशी येथील तीर्थस्थान (स्कन्द. काशी. ६१.५).

३. (देशविभाग) प्लक्षद्वीपान्तर्गत एक वर्ष (देश-विभाग) (भा. ५.२०.३).

४. (वापी) दक्षिण भारतातील समुद्रसेतूनजीकची एक पवित्र वापी. नामांतर–'एकांतरामनाथक्षेत्र' (स्कन्द. ब्राह्म. १.१३; नारद. २.७६.१०).

**अमृतगुफा** (गुफा)—मध्य भारतातील उदयगिरि टेकडीमधील एक गुफा (कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.२५८; उदयगिरि पहा).

**अमृतभुवन** (बौद्धस्थान)--राजतरंगिणीमध्ये निर्देशिलेला कश्मीरातील एक बौद्ध विहार. कश्मीरच्या मेघवाहन राजाची राणी अमृतप्रभा हिने परदेशातून येणाऱ्या भिक्षूंच्यासाठी (देश्य) हा विहार बांधला होता (राज. ३.९). श्रीनगराच्या परिसरातील विचारनाग गावाच्या पूर्वेकडील 'लछमकुल' (प्राचीन 'लक्ष्मीकुल्या') काल्व्या काठचे आधु. आंतबवन ते हेच असून तेथे या विहाराचे अवशेष आढळतात.

चिनी प्रवासी यू-काँग याच्या प्रवासवर्णनात या विहाराचा निर्देश 'गो–मि–तो–पो–वन' (प्राकृत – 'अमितभवन'=अन्तभवन) या नावाने केला असून आधु. 'आंतबवन 'हे प्राकृत 'अमितभवन'चेच अपभ्रष्ट रूप असावे.

**अमृतसर** (सरोवर व तीर्थ)--पंजाबातील शिखांचे सुविख्यात सुवर्णमंदिरस्थान.

आख्यायिका—या स्थानाच्या 'अमृतसर' नावाविषयी निम्नलिखित स्थानिक आख्यायिका आढळते :-- रामाच्या अश्वमेध यज्ञसमयी रामपुत्र कुशलवांनी रामसैन्याशी केलेल्या युद्धात मृत सैनिकांना पुन्हा जीवित करण्यासाठी स्वर्गीचे अमृत आणले, आणि सैन्याला जीवित करून उरलेले अमृत या स्थानी टाकून दिले. त्यामधून उत्पन्न झालेले पवित्र जलकुंड 'अमृतसर' या नावाने प्रसिद्ध झाले.

अकबर बादशहाच्या राज्यकाळात या जलकुंडाच्या स्थानी शिखांचे सुविख्यात सुवर्णमंदिर बांधण्यात आले.

**अमृता** (नदी)--प्लक्षद्वीपान्तर्गत एक नदी (कूर्म. १. ४९.८; ब्रह्माण्ड. १९.९; वायु. ४९.१७; विष्णु. २.४.११).

२. शाकद्वीपान्तर्गत एक नदी (मत्स्य. १२२.३४).

३. महाराष्ट्रातील प्रवरा नदीचे नामांतर (ब्रह्म. १०६; प्रवरा पहा)

**अमृतेश** (लिंग)—काशी येथील एक गुप्तलिंगस्थान (मत्स्य. १८१.२६).

**अमृतेश्वर** (लिंग)--काशी येथील 'लिंगाष्टक' शिवलिंगापैकी एक (स्कन्द. काशी. ९४.१४-१९; ३५).

२. तापी नदीकाठचे शिवलिंगस्थान (तापीमाहात्म्य).

३. आणेग्रामान्तर्गत शिवलिंगस्थान(पद्म. उ. १८९.३८).

**अमृतोद्भवा** (तीर्थ)—अवंती येथील एक तीर्थस्थान (स्कन्द. आवन्त्य. १.५१).

**अमृतौघा** (नदी)--क्रौंचद्वीपातील एक नदी (भा. ५.२०.२१).

**अमैयनभावि** (ग्राम)--चालुक्य राजा पुलकेशिन् (द्वितीय) याच्या इ. स. ५६६ मधील शिलालेखात निर्देशिलेले एक ग्राम. पलसिगे (आधु. खानापुर) प्रांतातील 'कुंदूर ५००' या राज्यविभागात हे अग्रहार ग्राम होते. धारवाडच्या ईशान्येस ६ मैलांवरील आणि हल्सी गावाच्या पूर्वेस ३० मैलांवरील खानापुर तालुक्यातील आधु. 'अमींभावि' गाव ते हेच होय (एपि. इंडि. ७.२१२).

**अमोघपद** (तीर्थ)—गया येथील तीर्थस्थान (अग्नि. ११६.६).

**अमोघा** (नदी)-- जंबुद्वीपान्तर्गत केतुमालवर्षातील एक नदी (मार्क. ५६.१५; ५९.१५).

**अमोदा** (ताम्रपटस्थान)--कलचुरि राजा पृथ्वीदेव (प्रथम) याच्या इ. स. १०७९ मधील अमोदा ताम्रपटाचे उपलब्धिस्थान. मध्यप्रदेशातील बिलासपुर जिल्ह्यातील जांजगिर या तालुक्याच्या गावापासून १० मैल आग्नेयेस हे गाव आहे (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.४०२–४०३).

या गावी कलचुरि राजांचे निम्नलिखित अन्य ताम्रपटहि सापडले आहेत :–१. पृथ्वीदेव (द्वितीय) याचा इ. स. ११४९ मधील ताम्रपट (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.४७५); २. जाजल्लदेव (द्वितीय) याचा इ. स. ११६७ मधील ताम्रपट (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.५३०).

**अमोहक** ( तीर्थ )--नर्मदा नदीकाठचे एक तीर्थस्थान (पद्म. सृ. १८.९७; मत्स्य. १९१.१०५ ).

**अम्बग्राम** ( आम्रग्राम )--वैशाली नगराच्या वायव्येकडील वृजि संघराज्यान्तर्गत एक ग्राम. येथील विपुल आम्रवृक्षांमुळे गंडक नदीकाठच्या या गावास हे नाव प्राप्त झाले असावे. वैशाली-कुशिनारा रस्त्यावरील या गावी आपल्या परिनिर्वाणपूर्व यात्राप्रसंगी गौतम बुद्ध काही काळ थांबला होता ( दीघ. २.१२२-१२६; सुत्त. १९४ ).

**अम्बपालिवन** ( वन )--बौद्ध साहित्यात निर्देशिलेले वैशाली गावानजीकचे सुविख्यात आम्रवन. आम्रपाली नामक गणिकेने हे वन गौतम बुद्धास दान दिले होते ( दीघ. २.९४; वैशाली पहा ).

**अम्बर** ( लोकसमूह )-- बृहत्संहितेमध्ये निर्देशिलेला उत्तर भारतातील एक लोकसमूह. मालव लोकांची उपशाखा असणारे ' मल्ल ' ( ग्रीक-' मल्लि ' ) लोक ते बहुधा हेच असावेत. बृहत्संहितेमध्येहि 'मालव' आणि 'अंबर' या लोकांचा एकत्र निर्देश आढळतो ( मल्ल पहा ).

सिंकदरस्वारीसंबंधीच्या ग्रीक साहित्यात या लोकांचा निर्देश ' अंब्रि ' नावाने केला असून यांनी ' सिगंब्रि ' नामक लोकांसमवेत ८० हजार पायदळ, आणि ६० हजार घोडदळ गोळा करून सिकंदरशी निकराने सामना दिला होता ( मॅक्रिंडल, अलेक्झांडर पृ. ३२४; चौधरी, पृ. ११५ ).

२. ( नगर ) जयपुर देशाच्या मध्ययुगीन ( इ. स. १०-११ वे शतक ) राजधानीचे गाव. जयपुरपासून ५ मैल ईशान्येस असणारे आधु. अमेर ते हेच असून, जयपुर प्रदेशाची कालदृष्ट्या तृतीय क्रमांकाची राजधानी या गावी होती. हे गाव उध्वस्त झाल्यानंतर ती जयपुर येथे हलविण्यात आली.

**नामव्युत्पत्ती**--या गावास ' अंबर ' असे नाव का प्राप्त झाले यासंबंधी निम्नलिखित मतांतरे आढळतात:--

**१. स्थानिक समजुतीनुसार**--मांधातृ राजाच्या अंबरीष नामक पुत्राने या नगराची स्थापना केल्याने त्यास ' अंबरीषनगर ' असे नाव प्राप्त झाले. त्याचेच अपभ्रष्ट रूप म्हणजे ' अंबर ' होय ( अर्कि. सर्व्हे. रिपोर्ट. क्र. २ ).

**२. कनिंगहॅम यांच्या मते**— येथे असणाऱ्या अंबिकेश्वराच्या मंदिरावरून यास ' अंबर ' नाव प्राप्त झाले असावे ( सहानी, अर्कि. रिमेन्स्. बैराट. पृ. ९ ).

**३. डे यांच्या मते**--या नगराचे प्राचीन नाव ' अंबावती ' असून, महाभारतात निर्देशिलेल्या 'उज्जानक' ( धुंधु राक्षसाचा देश ) देशाची राजधानी या गावी होती ( म. आर. १९५.७ ). या नगरासभोवतालचा प्रदेश महाभारतकाली ' धुंड देश ' या नावाने ओळखला जात असावा ( डे, पृ. ५७; उज्जानकमरु पहा ).

**राजवाडा**-- अंबरचा राजा मानसिंग ( द्वितीय ) ( इ. स. १५९२-१६१५ ) आणि सवाई जयसिंग यांनी मोंगल स्थापत्याच्या अनुकरणाने बांधलेला एक राजवाडा या गावी असून, तो ग्वाल्हेर येथील सुविख्यात किल्ल्याप्रमाणेच वैशिष्ट्यपूर्ण आहे. खोल दरीमधून एखाद्या कमलपुष्पासदृश बाहेर येणारा हा राजवाडा ग्वाल्हेरच्या डोंगरी किल्ल्याहून वेगळा भासतो. या राजवाड्याच्या पायथ्याशी सरोवर असून, त्याचे विविध अंगांनी दर्शन व्हावे अशा खुबीने येथील महाल बांधले आहेत. या सरोवराकाठी मानसिंगाने बांधलेले ' दिलाराम ' नामक उपवन आहे.

या राजवाड्याचे शिल्प जोमदार आणि ठसठशीत असून, उत्तरकालीन मोंगल शिल्पाचा तकलादू नाजूकपणा त्यामध्ये नाही. फत्तेपुर सिक्री येथील अकबराच्या राजवाड्यात पानाफुलांच्या निर्जीव नक्षीची रेलचेल दिसते. त्या तुलनेने या राजवाड्यातील हत्तीप्रतिमायुक्त स्तंभशिरोभूषणे, तसेच पशुपक्षी आणि मानवी व्यक्ती आदींच्या शिल्पप्रतिमा कितीतरी आकर्षक वाटतात. चित्रविचित्र रंग आणि बिलोरी आरसे यामुळे या शोभेत भर पडते. तत्कालीन हिंदु राजमंदिरस्थापत्याचे प्रतिनिधिक उदाहरण म्हणून तो महत्त्वाचा मानतात.

या राजवाड्यात जसरेश्वरी कालीदेवीचे एक मंदिर असून, तेथील देवीची मूर्ती मानसिंगाने जेसोरच्या प्रतापादित्य राजाकडून जिंकून आणली. राजवाड्याप्रमाणेच हे मंदिरहि आज उध्वस्तावस्थेत आहे.

**गालव ऋषींची तपोभूमी**--या गावानजीकच्या एका सप्तकुंडयुक्त टेकडीवर गालव ऋषीचे तपोभूमिस्थान दाखविले जाते.

३. ( देवीस्थान ) जम्बुद्वीपान्तर्गत एक देवीस्थान. येथील देवीचे नाव 'विश्वकाया' होते (पद्म. सृ. १७.१९१; मत्स्य. १३.२७ ).

४. ( नद ) जंबुद्वीपान्तर्गत मेरु पर्वतावरील एक नद ( महानदी ) ( भा. ५.१६.२४ ).

५. ( पर्वत व वैष्णवस्थान ) पद्ममते एक पवित्र पर्वत आणि विष्णुस्थान. येथील विष्णूचे नाव 'विष्णुकाय' होते ( पद्म. उ. १२९.८ ).

**अम्बरनाथ** ( लिंग )—महाराष्ट्रातील एक सुविख्यात शिवमंदिरस्थान. येथील अंबरेश्वर महादेवाचे मंदिर कल्याणपासून ४ मैल आग्नेयेस आणि अंबरनाथ रेल्वे-स्थानकापासून १ मैल पश्चिमेस आहे.

ऐतिहासिक पार्श्वभूमी-- इ. स. ११ व्या शतकात कोंकणचा शिलाहार राजा मांबाणि याने बांधलेले हे मंदिर त्या विशिष्ट स्थापत्यशैलीचे कालदृष्ट्या प्राचीनतम आणि कलादृष्ट्या सर्वोत्कृष्ट मंदिर मानले जाते. या विशिष्ट स्थापत्यशैलीची महाराष्ट्रातील प्रमुख देवालये पुढीलप्रमाणे होत :—

## शिलाहार स्थापत्यशैलीची मंदिरे

| काल | मंदिरे |
|---|---|
| १. इ. स. ११ वे शतक | १. अंबरनाथ येथील अंबरेश्वर मंदिर.<br>२. खानदेशातील बलूसने आणि महेश्वर येथील मंदिरे. |
| २. इ. स १२ वे शतक | १. नासिक जिल्ह्यातील सिन्नर येथील गोंदेश्वर मंदिर.<br>२. नासिक जिल्ह्यातील झोग्डा येथील मंदिर.<br>३. अहमदनगर जिल्ह्यातील पेडगाव येथील लक्ष्मी-नारायण मंदिर. |
| ३. इ. स. १३ वे शतक | १ महाराष्ट्रातील औंढा येथील नागनाथ मंदिर.<br>२. महाराष्ट्रातील हेमाडपंती पद्धतीची देवालये ( १. लोणार येथील दैत्यसूदन मंदिर; २. सातगाव येथील विष्णुमंदिर; ३. मेहेकर येथील मंदिर ). |

इ. स. ८–११ व्या शतकात उत्तर कोंकण प्रदेशावर महाराष्ट्रातील राष्ट्रकूट आणि गुजराथेतील चालुक्य राजांचे मांडलीक असणाऱ्या शिलाहार राजांचे राज्य होते. या राजांनी बांधलेल्या मंदिरात गुजराथेतील सोळंकी आणि महाराष्ट्रातील चालुक्य शैलीचे संमिश्रण दिसते.

शिलालेख--या मंदिराच्या सभामंडपाच्या उत्तराभिमुख प्रवेशद्वाराच्या आडव्या पट्टीवर आतील बाजूस महा-मंडलेश्वर मम्वनिराजदेव ( मम्मुनिराजदेव ) याचे राज्य-कालात ( इ. स. १०६० ) खोदलेला एक शिलालेख आढळतो ( जे. बी. बी. आर. ए. एस्., १२.३२९ ).

मंदिर – तारकाकृती आणि त्रिदिश प्रवेशद्वारांनी युक्त असे हे मंदिर ८४′ × ३१′ आकाराचे असून, सभामंडप आणि गर्भागार अशा दोन उपविभागांमध्ये ते विभागले आहे. त्याच्या सभोवतालचा १५०′ × १०५′ आकाराचा तट आता उध्वस्त झाला आहे.

मंदिराचा मुख्य सभामंडप २३′ × २३′ आकाराचा असून, त्याच्या चार मुख्य स्तंभांच्या देवादिक आणि पर्णपुष्पयुक्त नक्षीकामात शिल्पकारांनी आपले सारे कसब ओतले आहे. आबू पर्वतावरील विमल मंदिरातील संगमरवरी स्तंभांच्या अनुकरणाने या स्तंभाची रचना करण्यात आली असली, तरी पूर्वोक्त मंदिराच्या तुलनेने येथील नक्षीकाम अधिक संयत आणि कलात्मक आहे.

या मंदिराच्या मंडपाच्या छतावर, तसेच प्रवेशद्वारा-नजीकच्या अन्य स्तंभांवर अशाच पद्धतीचे परंतु काहीसे साधेसुधे नक्षीकाम आढळते. या मंडपाच्या दर्शनी भागाच्या आडव्या पट्टीवर शैव उपासनेशी संबंधित देवतांची ( महिषासुरमर्दिनी, अष्टभुज कामदेव, दुर्गा, महाकाली, मोहिनी ) शिल्पचित्रे कोरली आहेत.

या मंदिराच्या तीन बाजूंना तीन प्रवेशद्वारे आणि तीन उघडे प्रवेशमंडप असून, त्यांच्या प्रत्येकी दोन स्तंभांवरील नक्षीकामहि मंडपाच्या मुख्य स्तंभांप्रमाणेच अत्यंत समृद्ध आहे.

गर्भागार--या मंदिराचे पश्चिमाभिमुख गर्भागार ( १३′ × १३′ ) देवालयाच्या सभामंडपापेक्षा ७′–९″ खोल भागात बांधले असून, जमिनीच्या अंतर्भागातील हे पश्चिमाभिमुख गर्भागार साऱ्या महाराष्ट्रात अद्वितीय मानले जाते. त्यामधील स्वयंभू शिवलिंग २′–४″ × ४′ आकाराचे आहे. या गर्भागाराचे शिखर आज बहुतांशी उध्वस्त झाले आहे.

**अम्बरीष** ( तीर्थ )--काशी येथील आदित्यकेशवा-नजीकचे एक तीर्थस्थान (स्कन्द. काशी. ६१.१२; ८४.१६).

**अम्बरीष-आश्रम** ( आश्रम )--पश्चिम भारतातील अर्बुद ( आधु. आबू ) पर्वतावरील आश्रमस्थान ( ती. ३९८ ).

२. ( टेकडी ) महाराष्ट्रातील अंमळनेर गावानजीकची एक टेकडी. येथे वरुणेश्वर नामक शिवमंदिर आहे ( ती. २४० ).

**अम्बरीषेश्वर** ( लिंग )--तापी नदीकाठचे एक शिवलिंगस्थान ( तापीमाहात्म्य ).

२. काशी येथील एक शिवलिंग ( लिङ्ग. तीर्थकल्पतरु. पृ. ११८ ).

**अम्बलट्ठिका** (वन)—बौद्ध साहित्यमते बिहारमधील राजगृह–नालंदा मार्गावरील सुविख्यात आम्रवन ( दीघ. १.१; २.७२; विनय. २.२८७ ). 'अंबलट्ठिका' हे 'अंबयष्टिका' ( आम्रवन ) चे पालीभाषीय रूप असून, हे राजगृह गावाच्या ईशान्येस वसले होते.

मगधाचा राजा बिंबिसार याने या वनामध्ये राजकारक नामक सुरम्य उपवनप्रासाद बांधला होता ( सुमङ्गल. १.४१ ).

२. बौद्ध साहित्यात निर्देशिलेले मगध देशान्तर्गत खानुमत ग्रामानजीकचे आम्रवन ( डे, पृ. ५ ).

**अम्बवती** ( तीर्थ )—कुरुक्षेत्रान्तर्गत 'अंबुकाय' तीर्थाचे नामांतर ( वामन. ३५. ४२; अंबुकाय पहा ).

**अम्बवन** ( वन )—बौद्ध साहित्यमते बिहारमधील राजगृह गावचे एक आम्रवन. मगध देशाच्या जीवक नामक राजवैद्याच्या मालकीच्या या वनात गौतम बुद्धाने काही काळ निवास केला होता. मगधाचा राजा अजातशत्रु येथे गौतम बुद्धाच्या दर्शनार्थ आला होता ( दीघ. १.४७; ४९ ).

२. कोशल देशातील मनसाकट गावानजीकचे एक उपवन. अचिरवती ( आधु. राप्ती ) नदीकाठच्या या वनात गौतम बुद्ध काही काळ राहिला होता ( दीघ. १.२३५ ).

**अम्बवाडीविषय** (देशविभाग)--शिलालेखसाहित्यमते कलिंग देशाचा एक राजकीय उपविभाग ( इंडि. अँटि. १८.१६७-१६८; कलिंग पहा ).

**अम्बष्ठ** (देश)—पाणिनीच्या अष्टाध्यायीत निर्देशिलेले उत्तर भारतातील एक जनपद ( पा. सू. ८.२.९७ ). ऐतरेय ब्राह्मण काळापासून 'आंबष्ठ्य' लोकांची वसाहत पंजाबात चिनाब नदीच्या खालच्या अंगास असून, उत्तरकालात हे लोक बंगाल आणि बिहार प्रांतांमध्ये स्थलांतरीत झाले. अंबष्ठ नामक कायस्थ लोक आजही त्या प्रांतामध्ये आढळून येतात.

नामांतरे--प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतातः—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. सिकंदर स्वारीसंबंधीचे ग्रीक साहित्य | आंबष्ठ |
| २. टॉलेमी<br>मेगॅस्थेनिस् (मॅक्रिंडल, पृ. १५३) | अंबस्तै |
| ३. अरियन ( मॅक्रिंडल, अलेक्झांडर, पृ. २९२ ) | अबस्तनोइ |
| ४. कर्टियस ( ९.८ ) | सबर्कए |
| ५. ओरोसियस | सबग्रए |
| ६. डिओडोरस | संबस्तै |

भौगोलिक स्थान--या देशाच्या भौगोलिक स्थानाविषयी प्राचीन साहित्यात निम्नलिखित निर्देश आढळतात :-

१. सिकंदर स्वारीसंबंधीच्या ग्रीक साहित्यमते--या लोकांचे गणराज्य दक्षिण पंजाबमध्ये सिंधु आणि चिनाब नद्यांचे संगमानजीक ( अक्षांश २८° उत्तर; रेखांश ७०- पूर्व ) क्षत्‍‌ृ आणि वसाति जनपदांनजीक वसले होते.

२. मेगॅस्थेनिसच्या मते—हे लोक असिक्नी ( अकेसिनेस् ) नदीच्या काठी रहात असत ( मॅक्रिंडल, मेगॅस्थेनिस्, पृ. १५३ ).

३. टॉलेमीच्या मते—अंबस्तै लोकांची वसाहत परोपनिसदै ( हिंदुकुश पर्वताच्या दक्षिणेस व पूर्वेकडील देश ) देशाच्या पूर्वेस होती.

४. बार्हस्पत्य अर्थशास्त्रमते —हे लोक कश्मीर आणि सैंधव ( आधु. सॉल्ट रेंज ) देशात रहात असत ( बार्हस्पत्यसूत्र. १०३ ).

५. मार्कंडेय पुराणमते--हा देश कूर्माच्या वामकुक्षीत ( उत्तर भारतात ) होता ( मार्क. ५५.४५ ).

६. पार्गिटरच्या मते--पौराणिककालीन अंबष्ठ लोक पंजाबच्या पूर्व सरहद्दीवर रहात असावेत ( पार्गि. पृ. १०९ ).

७. संस्कृत शब्दकोश साहित्यमते--हा देश उत्तर भारतात होता ( विश्वलोचन. ८८.११; मेदिनी. ४१.११; नानार्थ.४.३३; शब्दरत्न. ९४.३ ).

पाणिनीच्या अष्टाध्यायीत--या ग्रंथाच्या मते अंबष्ठ ( आंबष्ठ ) देश हा राजाधिष्ठित ( एकराज ) जनपदांपैकी एक असून; 'वाहीक' गणामध्ये ( देशसमूह ) त्याची

गणना होत असे. पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यातहि या जनपदाचा निर्देश आढळतो (पतञ्जलि. ४.१.१७० ).

**ग्रीक साहित्यात**--आपल्या देशास परत जात असताना सिकंदरने या लोकांना जिंकले होते. या लोकांचे आयुधजीवी ( लष्करी ) गणराज्य असून, लष्करीदृष्ट्या हे लोक अत्यंत प्रबळ होते ( स्मिथ, १०४ ).

**ऐतरेय ब्राह्मणात**--आंबष्ठ्य नामक राजाने अन्य नऊ राजांसमवेत स्वतःस ऐंद्र महाभिषेक करवून घेतल्याचा निर्देश या ग्रंथात आढळतो ( ऐ. ब्रा. ८.२१-२३ ).

**टॉलेमीच्या ग्रंथात**--टॉलेमीच्या ग्रंथात पंजाबात वसलेल्या अंबष्ठ लोकांचा निर्देश अभिप्रेत दिसतो. परंतु कर्न यांच्या मते तेथे पूर्व भारतातील अंबष्ठ लोकांचा निर्देश अभिप्रेत असावा ( अंबष्ठ २. पहा ).

**महाभारतात**--या ग्रंथान्तर्गत वायव्य भारतीय लोकसमूहांच्या नामावलीमध्ये अंबष्ठ, शिबि, क्षुद्रक, मालव आदि लोकसमूहांचा निर्देश आढळतो ( म.स. ५२.१४-१५ ).

नकुलाच्या पश्चिम दिग्विजयामध्ये त्याने अंबष्ठ, शिबि त्रिगर्त आणि मालव लोकांचा पराभव करून, या देशाच्या श्रुतायु राजाकडून करभार वसूल केला होता ( म. स. ३२.७ ).

भारतीय युद्धात अंबष्ठ देशाचे शूर रथी वीर कौरवपक्षात सामील असून, भीष्मरक्षणाच्या कामी त्यांची नियुक्ती झाली होती ( म. भी. १८. १३ ). या देशाच्या श्रुतायु राजाचा अभिमन्यूने ( म. भी. ९२.१७ ) आणि सात्यकीने ( म. द्रो. ९७.४० ) पराभव केला होता.

**पौराणिक साहित्यात**--या ग्रंथात अंबष्ठ, यौधेय आणि शिबि हे 'आनव क्षत्रिय' जातीचे लोक उशीनरपुत्र सुव्रत राजाचे वंशज असल्याचा निर्देश आढळतो. विष्णु पुराणातहि या देशाचा निर्देश आढळतो ( विष्णु. २.३.१८ ).

**संकरज लोकसमूह**--पौराणिक साहित्यात, तसेच महाभारतात अंबष्ठ लोकांना क्षत्रिय म्हटले असले तरी पाणिनीच्या अष्टाध्यायीमध्ये मात्र यांना संकरज लोकसमूह म्हटले आहे ( पा. सू. ८.३.९७ ). गौतमधर्मसूत्रमते ब्राह्मण पिता आणि क्षत्रिय, वैश्य अथवा शूद्र माता यांची संतती म्हणजे अंबष्ठ, उग्र, निषाद, दौष्यंत आणि पाराशर लोक होत ( गौतम धर्मसूत्र. ४.१६ ). मेदिनी कोशातहि यांना ब्राह्मण आणि वैश्य यापासून जन्मलेली संकरज संतती म्हटले आहे ( मेदिनी. ४१.११ ). दीघ निकायान्तर्गत 'अंबट्ठ सुत्त' मध्ये अंबट्ठ ( अंबष्ठ ) नामक एका व्यक्तीस 'ब्राह्मणकुलोत्पन्न' म्हटले आहे ( दीघ. १. ८८ ).

**व्यवसाय**--हे लोक शेतीचा व्यवसाय करीत असत ( जा. ४.३६३ ). मनुस्मृतीमते, तसेच भरतकृत अमरकोश टीकामते हे लोक वैद्यकी, व्यापार आणि जनावरांच्या पैदाशीचा व्यवसाय करीत ( मनु. १०.४७ ). हे वर्णन टॉलेमीच्या ग्रंथातील अंबष्ठ लोकांशी तंतोतंत जुळते.

**मतांतरे**--संकरज संतती मानले गेलेले अंबष्ठ लोक कोणत्या वर्णाचे असावेत यासंबंधी अभ्यासकांमध्ये निम्नलिखित मतांतरे आढळतातः--

( १ ) श्री. एस्. एन्. मुजुमदार यांच्या मते--हे लोक ब्रह्मक्षत्रिय म्हणजे जन्माने ब्राह्मण परंतु पेशाने क्षत्रिय असावेत ( कनिंग., पृ. ६७० ).

( २ ) रॉयचौधरी यांच्या मते--हे लोक प्रारंभीच्याकाळी क्षत्रियाचे कार्य करीत असले, तरी यापैकी काही लोक उत्तरकालात भिक्षुकी, शेती आणि वैद्यकीचा व्यवसाय करू लागले असावेत ( रॉयचौधरी, पृ. २०७ ).

( ३ ) अन्य काही अभ्यासकांच्या मते--हे लोक सर्वप्रथम ब्राह्मण असून, उत्तरकालामध्ये आचारभ्रष्टतेमुळे हीन मानले गेले असावेत.

२. ( लोकसमूह ) बृहत्संहितेत निर्देशिलेला मध्य भारतातील एक लोकसमूह ( बृ. सं. १४.७ ). 'मेकल-अंबष्ठ' आणि 'मेखलामुष्ट' ( मेकलंबष्ठ ) अशा जोडनामांनी या देशाचा निर्देश बृहत्संहितेत आणि मार्कंडेय पुराणात ( मार्क.५८.१४ ) केला असून पर्वतनिवासी अंबष्ठ लोकांची ही उत्तरकालीन वसाहत मेकल पर्वताच्या (=नर्मदा नदीचे उगमस्थान ) परिसरामध्ये वसली असावी.

भारतीय युद्धामध्ये अंबष्ठ संज्ञक एका योद्ध्याने कौरवपक्षीय चेदि राजाचा वध केला होता ( म. द्रो. २४.४७-४८ ). येथेहि संभवतः मध्य भारतान्तर्गत अंबष्ठ लोकसमूहाचा निर्देश अभिप्रेत असावा.

३. ( देश ) ब्रह्ममते पश्चिम भारतातील ( पर्शांत्य ) एक देश ( ब्रह्म. १९.१८ ). आजहि अंबष्ठ संज्ञक कायस्थ जातीचे लोक पश्चिम भारतात आढळतात.

४. ( देश ) बृहत्संहितामते नैर्ऋत्य भारतातील एक देश ( बृ. सं. १४.१७; विष्णुधर्म. १.९.६ ).

लॅसेनच्यामते टॉलेमीने निर्देशिलेले दक्षिण भारतातील 'बेत्तिगोइ' ( मलय पर्वत ) पर्वतनिवासी 'अंबस्तै' लोक ते हेच असावेत ( लॅसेन, इंडिशे. पृ. १५९; १६१ ).

५. ( लोकसमूह ) भट्टिकाव्याच्या भरत मल्लिककृत टीकेमध्ये निर्देशिलेला पूर्व भारतातील एक लोकसमूह. स्वतःस ' अंबष्ठ कायस्थ ' म्हणवणारे लोक आजहि बिहार-मध्ये असून, बंगालमधील वैद्यकीचा व्यवसाय करणारे काही लोक स्वतःस ' अंबष्ठकुलोत्पन्न ' म्हणवितात.

बृहत्संहितेमध्ये अन्यत्रहि अंबष्ठ लोकांचा निर्देश अनेक वेळा आढळतो ( बृ. सं. ११.१९; १६.२२ ). परंतु हे लोक निश्चित कोठे रहात असत ते समजत नाही.

**अम्बसण्डा** ( ग्राम )--बौद्ध साहित्यमते बिहारमधील राजगृह गावाच्या पूर्वेकडील एक हिंदुधर्मीय ग्राम. संस्कृत ' आम्रखंड 'चे हे बहुधा पालीभाषीय रूप असावे. या गावानजीक विस्तृत आम्रवने होती ( सुमङ्गल. ३.६९७ ). वेदीयक पर्वत आणि इंद्रशाला गुहा यांच्या उत्तरेस हे ग्राम वसले होते ( दीव. २.२६३ ).

**अम्बस्तै** ( देश )--टॉलेमीच्या मते पंजाबातील 'अंबष्ठ' जनपदाचे नामांतर ( अंबष्ठ १. पहा ).

**अम्बा** ( तपस्यास्थान )--महाभारतमते गंगायमुना नद्यांच्या दुआबातील एक तीर्थसमूह. काशीराजाची कन्या अंबा हिने भीष्मांशी आपला विवाह व्हावा यासाठी निम्न-लिखित स्थानी तपस्या केली होती :—१. वत्सभूमि; २. नंदाश्रम; ३. उलूकाश्रम; ४. च्यवनाश्रम; ५. ब्रह्मस्थान; ६. प्रयाग ( देवयजन ); ७. भोगवती; ८. कौशिकाश्रम; ९. मांडव्याश्रम; १०. दिलीपाश्रम; ११. रामह्रद; १२. पैलगार्ग्याश्रम ( म. उ. १८७.२३–२७ ).

२. ( नदी ) वत्स देशातील एक नदी. महाभारतमते काशीराजाची कन्या अंबा ही भीष्ममाता गंगा नदीच्या शापाने ' अंबा ' नामक सुसरींनी युक्त पावसाळी नदी बनली ( म. उ. १८७.३९ ). वत्स देश आणि अंबातपस्यास्थाने ही दोन्ही आधु. गंगायमुना दुआबात वसली होती.

**अम्बाजन्म** ( तीर्थ )--कुरुक्षेत्रान्तर्गत सरक तीर्थाच्या पूर्वेकडील एक नारदीय तीर्थस्थान ( म. आर.८३.८१ ).

**अम्बाजी** ( देवीस्थान )--गुजरातमधील ' आरासन ' ( आधु. आरासुर ) टेकडीवरील अंबिकास्थानाचे स्थानिक नामांतर ( आरासन पहा ).

२. राजपुतान्यातील जयपुर जिल्ह्यातील सुविख्यात हिंदु देवमंदिरस्थान. दांता गावाच्या १५ मैल ईशान्येकडील या स्थानी अंबा ( दुर्गा ) देवीची सुविख्यात मूर्ती आहे.

**जैन तीर्थस्थान**--जैनांच्या नेमिनाथनामक बाविसाव्या तीर्थंकराच्या अंबा नामक अनुचरी यक्षिणीचे प्रतीकरूप मानून जैनधर्मीय लोक या हिंदु देवतेची पूजा करतात ( फर्ग्युसन, २.३८ ).

३. (शक्तिपीठ) दक्षिण भारतामधील मल्लिकार्जुन गावा-नजीकचे शक्तिपीठ. येथील देवीचे नाव ' भ्रमरांबिका ' होते ( भ्रमरांबिका पहा ).

**अम्बापाटक** ( ग्राम )—शिलालेखसाहित्यमते गुजराथ-मधील एक ग्राम. नवसरी गावापासून ५ मैल अंतरावरील पूरवी ( पूर्णा ) नदीकाठचे आधु. आमडपुर गाव ते हेच होय. नामांतर–' आम्रपुर ' ( एपि. इंडि. २१ ).

**अम्बापुर** ( जैनस्थान )—जयसागरकृत तीर्थजयमाला-मते मराठवाड्यातील ' आम्रपुरी ' नामक जैन तीर्थस्थानाचे नामांतर ( ती. सं. पृ. ११९; आम्रपुरी पहा ).

**अम्बारेवती** ( तीर्थ )--हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( स्कन्द नागर. ११.६ ).

**अम्बालिका** ( देवीस्थान )—अवंती येथील एक देवी-स्थान ( स्कन्द. आवन्त्य. १.३१.८ ).

**अम्बाली** ( देवीस्थान )—मध्य प्रदेशातील नर्मदा नदीच्या उत्तर किनाऱ्यावरील एक देवीस्थान. पश्चिम रेल्वेच्या चाणोद–मालसर रेल्वेरस्त्यावर सीनोर गावानजीक हे असून, काशीराजाची कन्या अंबालिका हिचे तपस्या-स्थान म्हणून हे पवित्र मानतात ( ती. ४३२ ).

**अम्बिका** (गुफासमूह)--पुण्यानजीकच्या जुन्नर येथील एक बौद्धधर्मीय गुफासमूह ( जुन्नर पहा ).

२. ( तीर्थ ) लिंगमते एक तीर्थस्थान ( लिङ्ग. १. ९२. १६३ ).

३. ( तीर्थ ) पद्ममते एक ब्रह्मदेवस्थान. येथील ब्रह्म-देवाचे नाव सुदर्शन होते ( पद्म. सृ. २९.१५६ ).

४. ( देवीस्थान ) द्वारका येथील देवीस्थान आणि भृगुतपस्यास्थान ( स्कन्द. प्रभास. ३.१६.१६ ).

५. ( शिखर ) गिरनार पर्वताचे सुविख्यात शिखर. भारतातील ५१ शक्तिपीठांमध्ये त्याची गणना होते ( गिरनार पहा ).

६. ( नदी ) शरभंगाश्रमाने पुनीत झालेली एक नदी. पश्चिम रेल्वेच्या उनाई–बासदा रोड यारेल्वेस्थानका-नजीकच्या उनाई गावाजवळून ही नदी वाहते ( ती. ४४१; शरभंगाश्रम पहा ).

७. ( वन ) सरस्वती नदीकाठचे एक वन ( भा. १०. ३४.१–२ ).

**अम्बिकेय** ( पर्वत )— शाकद्वीपातील एक पर्वत ( ब्रह्माण्ड. १९.८९ ).

**अम्बिकेश्वर** ( लिंग )—तापी नदीकाठचे शिवलिंग-स्थान ( तापीमाहात्म्य ).

**अम्बिपाटक** ( ग्राम )—त्रिपुरी येथील कलचुरि राजा युवराजदेव ( द्वितीय ) याच्या इ. स. ८ व्या शतकातील बिल्हरि शिलालेखमते मध्य प्रदेशातील एक गाव. जबलपुर जिल्ह्यातील बिल्हरि गावापासून ८ मैल ईशान्येकडील आधु. आमुखि गाव ते हेच होय. युवराजदेवाची राणी नोहला हिने बिल्हरि येथे बांधलेल्या शिवमंदिरास हे ग्राम दान दिले होते ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.२०८ ).

**अम्बिवले** ( गुफास्थान )—महाराष्ट्रान्तर्गत कुलाबा जिल्ह्यातील कोंडाणेनजीकचे बौद्ध गुफास्थान. कर्जत गावाच्या उत्तरेकडील जांबुर्ग गावानजीक हे गुफास्थान असून, बर्जेस यांच्या मते इ. स. १ ल्या शतकात ही विहारगुफा कोरली असावी.

विहार—या विहाराची (४२′ × ३९′ × १०′) रचना, तसेच तेथील कुंभाकृती शिरोभूषणांनी युक्त स्तंभ नासिक येथील गुफा क्र. ३ प्रमाणे असून, त्याच्या तीन बाजूस प्रत्येकी चार अशा एकूण १२ छोट्या खोल्या कोरल्या आहेत.

अलिकडच्या काळात या विहाराचे रूपांतर हिंदु देव-मंदिरामध्ये झाले असून, पाठीमागच्या बाजूस असणाऱ्या सहा छोट्या खोल्यांमध्ये हिंदु देवतामूर्ती स्थापन केल्या आहेत ( बर्जेस्, आर्कि. सर्व्हे. ४.१०-११ ).

**अम्बुतीर्थ** ( तीर्थ )—म्हैसूर राज्यान्तर्गत शिमोगा जिल्ह्यातील शरावती नदीच्या उगमस्थानानजीकचे तीर्थस्थान ( ती. ३१६ ).

**अम्बुवश्य** ( तीर्थ )—कुरुक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( म. आर. ८१.४६ ). पाठभेद–' अंबुवती. '

**अम्बुवाहिनी** ( नदी )—भारतातील एक पवित्र आणि नामस्मरणयोग्य नदी ( पद्म. सृ. ६.२२; म. भी. १०. २६; अनु. १६५.२० ).

**अम्बे-अवङ्गण** ( ग्राम )—हरिश्चंद्र घराण्यातील भोगशक्ति राजाच्या इ. स. ७०९ मधील अंजनेरी ताम्रपट-मते महाराष्ट्रातील एक ग्राम. नासिक जिल्ह्यातील दिंडोरी तालुक्यातील जयग्राम ( आधु. जयखेरा ) गावापासून ३ मैल पश्चिमेकडील आधु. आंबेगाव ते हेच होय.

जयपुर ( नासिक जिल्ह्यातील आधु. जवेर बुद्रुक ) येथील भोगेश्वर नारायणाच्या मंदिरासाठी हे गाव भोगशक्ति राजाने दान दिले होते ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१:१४९ ).

**अम्भा** ( नदी )—कुशद्वीपान्तर्गत एक नदी ( ब्रह्माण्ड. १९.६२; विष्णु. २.४.४३ ).

**अम्मलपुण्डि** ( ग्राम )—शिलालेखसाहित्यात निर्देशि-लेले दक्षिण भारतातील एक ग्राम. ताडिकोंड गावापासून १२ मैल आग्नेयेकडील आधु. अनमलंपूंडि नामक अग्रहारग्राम ते हेच असावे ( एपि. इंडि. २३.१६३-१६९ ).

**अम्मवारू** (मंदिरस्थान)—अंध्र प्रदेशातील सुविख्यात देवालयस्थान. कृष्णा जिल्ह्यातील सत्तनपल्ले या तालुक्याच्य गावापासून ११ मैल आग्नेयेकडील आधु. अमीनाबाद गाव ते हेच होय.

या गावच्या देवालयामध्ये अनुक्रमे इ. स. १११४ आणि १५८० मधील दोन शिलालेख आढळतात ( सेवेल, मद्रास. पृ. ६४ ).

**अम्मुण्डि** ( ग्राम )—शिलालेखसाहित्यमते पालार नदीच्या उत्तरेकडील आधु. उत्तर अर्काट जिल्ह्यातील एक ग्राम. इ. स. १२३८ च्या सुमारास केरळमधील राम नामक व्यापाऱ्याने हे गाव शेंगेणिवंशीय शंबुवरैय्यण राजाकडून विकत घेऊन एका स्थानिक देवालयास दान दिले ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. १.८७ ).

**अम्यास्तिस्** ( नदी )—मेगॅस्थेनिस्च्या मते बिहार मधील ' अजयमति ' नदीचे नामांतर ( अरियन, इंडिका. ४; मॅक्रिंडल, १९१; अजयमति पहा ).

**अम्रि** ( उत्खननस्थान )—सिंधमधील कराची जिल्ह्यातील सुविख्यात उत्खननस्थान ( अक्षांश ६८° उत्तर; रेखांश २६° पूर्व ). येथील उत्खननात इ. स. पू. ४००० मधील ' अम्रि ' नामक संस्कृतीचा शोध लागला आहे.

व्याप्ती—ही संस्कृती सिंध आणि बलुचिस्तानमधील निम्नलिखित स्थानी अस्तित्वात होती :—( १ ) सिंध–१. अम्रि; ( २ ) बलुचिस्तान–१. कुल्लि; २. नंदना; ३. रणघुंडै; ४. क्वेटा.

कृषिप्रधान संस्कृती—ही कृषिप्रधान संस्कृती उत्तर मेसापोटेमिया ( इराण ) मधील ' तेल–हलफ् ', मध्य मेसापोटेमियामधील ' जेम्देत, ' व ' नस्र, ' आणि दक्षिण मेसापोटेमियामधील ' उरुक् ' या गावच्या संस्कृतीशी मिळतीजुळती असून, येथील लोक सातू आणि गहू पिकवीत व गोधनाचे संवर्धन करीत.

या लोकांची शस्त्रे ब्रॉंझ धातूची असत. हे लोक कुंभारांच्या चाकावर आकार दिलेली नक्षीकामयुक्त रंगीत मृत्तिकापात्रे वापरीत. विपुल संततिप्राप्तीसाठी नग्न 'मातृका' देवीची ते उपासना करीत.

मृत्तिकापात्रे--या संस्कृतीच्या मृत्तिकापात्रावशेषांचे निम्नलिखित उपविभाग दिसतातः—

१. कुल्लि मृत्तिकापात्रे--या स्थानी काळ्या अथवा लाल रंगाने बैल, सिंह, पक्षी, वृक्ष आदींची चित्रे काढलेल्या सुरया, बशा, पुष्पपात्रे सापडली आहेत. या चित्रांच्या खालच्या आणि वरच्या अंगास नागमोडी रेषांचे अथवा वर्तुळांचे नक्षीकाम केले आहे. ही चित्रकला आणि नक्षी भूमितीय आकृतियुक्त ग्रीक अथवा नैर्ऋत्य इराणी मृत्तिकापात्रांसदृश दिसते.

२. रणघुंडै मृत्तिकापात्रे—या मृत्तिकापात्रात विभिन्न प्राण्यांऐवजी जाड आकाराच्या उभ्या, आडव्या, तिरप्या रेषा, तसेच लंबचौकोनी, त्रिकोणी भूमितीय रेखाचित्रे अधिक दिसतात.

३. नल मृत्तिकापात्रे--या मृत्तिकापात्रांवर मासे, पक्षी आदि प्राण्यांची चित्रे काढली असून, त्यांच्या दरम्यान बुद्धिबळाच्या पटाच्या आकाराची अथवा एकमेकांस छेद देऊन जाणाऱ्या वर्तुळांची नक्षी काढलेली दिसते.

४. अत्रि आणि नंदना मृत्तिकापात्रे--या मृत्तिकापात्रात 'कुल्लि' आणि 'नल' येथील चित्रकलाशैलींचे संमिश्रण दिसते.

मृत्तिकाशिल्पे--लाल अथवा काळ्या रंगांनी रंगविलेल्या जनावरांच्या आणि स्त्रियांच्या मृत्तिकाशिल्पांचे अवशेषहि येथे विपुल प्रमाणात सापडले आहेत. यापैकी काही स्त्रिया नग्न असून, काही अंगात सलवार घातलेल्या आणि केसांभोवती रुमाल गुंडाळलेल्या आहेत. अन्य काही नग्न मूर्तींच्या गळ्यामध्ये सोन्याचे आणि रत्नांचे दागिने कोरले आहेत. यापैकी नग्न स्त्रियांच्या मूर्ती या 'मातृका' देवीच्या असून ही उपासनापद्धती नैर्ऋत्य आशियामधून येथे आली असावी.

शिल्पतंत्र—या मूर्तींचे शिल्पतंत्र अत्यंत साधे आणि प्राथमिक अवस्थेतील असून, शाडूचा गोळा हाताने थापून तयार केलेल्या मुख्य प्रतिमेला शिरोभूषणे, डोळे, अलंकार आदि येथे नंतर चिकटविलेले दिसतात.

**अम्लु** (नदी)—कुरुक्षेत्रातील एक पवित्र नदी (वामन. ३४.७).

**अम्लूक दर्रा** (बौद्धस्थान)—गंधार (आधु. अफगाणिस्तान) देशान्तर्गत एक बौद्ध स्तूपस्थान. प्राचीनतम गंधार स्थापत्यशैलीचे प्रातिनिधिक उदाहरण म्हणून येथील स्तूप महत्त्वाचा मानतात. येथील अर्धवर्तळाकृती मुख्य स्तूप तितक्याच उंचीच्या वर्तुळाकृती घुमटावर स्थापला असून, स्तूपाचे चौकोनी व्यासापीठ घुमटाच्या मानाने फारच बुटके आहे (गोएट्झ, पृ. ७१).

**अम्वार**—अजिंठ्यानजीकचे जैन स्थापत्यशैलीचे हिंदु देवमंदिरस्थान. या मंदिराच्या सभामंडपाचा अर्धवर्तुळाकृती घुमट हिंदु मंदिरस्थापत्याच्या इतिहासात अद्वितीय मानला जातो.

मंदिर—या मंदिराचे गर्भागार नाहीसे झाले असून, वीस स्तंभांवर आधारलेला त्याचा सभामंडप केवळ उभा आहे. निमुळत्या होत जाणाऱ्या आडव्या दगडांच्या साह्याने बांधलेला त्याचा २१′ व्यासाचा घुमट अत्यंत प्रमाणबद्ध आणि सुबक नक्षीकामयुक्त आहे. फर्ग्युसन यांच्यामते आबू पर्वतावरील विमल मंदिराच्या अनुकरणाने हा घुमट बांधला असावा (फर्ग्युसन, २.५७; अर्बुद पहा).

**अयन** (तीर्थ)—काशी येथील एक तीर्थस्थान (नारद. २.४८).

**अयुधा** (नगर)--बौद्ध साहित्यमते 'अयोध्या' नगराचे नामांतर (अयोध्या १. पहा).

**अयोगन्धकुण्ड** (कुंड)—काशी येथील 'अयोगंधेश्वर' शिवलिंगाचे मत्स्योदरीच्या उत्तरेकडील आद्य वसतिस्थान (स्कन्द. काशी. ६९.२२).

**अयोगन्धेश्वर** (लिंग)—काशी येथील शिवलिंगस्थान (स्कन्द. काशी. ६९.२२).

**अयोगासिद्धि** (देवीस्थान)--वाराणसी येथील देवीस्थान (लिङ्ग, तीर्थविवेचन. पृ. ९८).

**अयोज्झा** (नगर)—बौद्ध साहित्यमते 'अयोध्या' नगराचे नामांतर (संयुत्त. ३.१४०; ४.१७९; अयोध्या १. पहा).

**अयोधन** (नगर)--सिकंदरस्वारीसंबंधित ग्रीकसाहित्यमते वायव्य भारतातील एक नगर. पंजाबातील मॉंटगोमेरी जिल्ह्यातील रावी नदीच्या पश्चिम किनाऱ्यानजीकचे आधु. पाकपत्तन गाव ते हेच होय. ४०′-५०′ उंचीच्या छोट्या टेकडीवरील या गावी तटबंदीचे आणि बुरुजांचे प्राचीन अवशेष आढळतात. फरिउद्दीन शकरगंजची कबर या गावी आहे (डे, पृ. १४).

**अयोध्या** (तीर्थ व नगर)--सुविख्यात हिंदु, बौद्ध व जैन तीर्थस्थान, आणि प्राचीन कोशल देशाच्या राजधानीचे गाव. उत्तर रेल्वेवरील फैजाबाद रेल्वेस्थानकापासून ४ मैल ईशान्येस सरयू (आधु. घोग्रा) नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर हे आहे (अक्षांश २६°-४८′ उत्तर; रेखांश ८२°-

१३′ पूर्व ). 'अवध' अथवा 'औध' अशा वैकल्पिक नावांनी सध्या हे प्रसिद्ध आहे.

**सद्यःस्थिती**--पुराणान्तरी भारतातील महान नगर म्हणून सुविख्यात असलेले अयोध्या सद्यःकाली जिल्ह्याच्या आणि तालुक्याच्या गावापासून दूर असे कुग्राम बनले आहे.

**तीर्थस्थान**--सूर्यवंशीय इक्ष्वाकु राजघराण्याच्या राजधानीचे गाव आणि दाशरथि रामाच्या जन्मभूमीचे आणि कर्मभूमीचे पावन क्षेत्र म्हणून वाल्मीकि रामायणात, आणि अन्य प्राचीन हिंदुधर्मीय साहित्यात अयोध्या हे भारतातील सात मोक्षदायक पावन तीर्थांपैकी एक मानले आहे–

अयोध्या मथुरा माया काशी काञ्ची ह्यवन्तिका ।
एताः पुण्यतमाः प्रोक्ताः पुरीणामुत्तमोत्तमाः ॥
( ब्रह्माण्ड. ४.४०.९१ ).

अन्य पुराणांतहि हीच नामावली थोड्याफार फरकाने दिली असून ( स्कन्द. काशी. ६.६८; गरुड. प्रेत. ३८.५–६ ), तेथे त्यास 'सिद्धक्षेत्र' आणि 'वल्लभबैठक' म्हटले आहे.

**इक्ष्वाकु राजाची राजधानी**—कोशल देशाची प्राचीनतम राजधानी अयोध्या येथे असून ( वा. रा. बा. ५; ६ ), दाशरथि रामाच्या मृत्यूनंतर त्याचा पुत्र लव याने ती शरावती ( श्रावस्ती ) गावी हलविली. बौद्धकाळीहि ती तेथेच होती.

राजकीय महत्त्व नाहीसे झाल्यानंतरहि बौद्ध आणि जैन काळात एक पुण्यक्षेत्र म्हणून अयोध्येचे महत्त्व उत्तरोत्तर वाढत गेले. बौद्ध साहित्यातील 'साकेत' हे महान तीर्थ अयोध्येचेच एक उपनगर असून, जैनांच्या अनेक तीर्थकरांचे ते जन्मस्थान आहे.

इ. स. १ ल्या शतकामधील वैष्णवपंथीय विचारधारेनुसार दाशरथि राम श्रीविष्णूचा अवतार मानला जाऊन त्याची जन्मभूमी आणि कर्मभूमी म्हणून अयोध्येचे महत्त्व वृद्धिंगत झाले. हिंदु, बौद्ध आणि जैन अशा तिन्ही धर्मियांकडून ते पूजिले जाऊ लागले.

**नामव्युत्पत्ती**—'अयुध्य' ( अजेय ) अशा अर्थाने या नगरास 'अयोध्या' हे नाव प्राप्त झाले असावे.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा ).

**व्याप्ती**--या नगराच्या व्याप्तीसंबंधी प्राचीन साहित्यात निम्नलिखित निर्देश आढळतातः—

**१. वाल्मीकि रामायणमते**--या नगराची लांबीरुंदी १२ × ३ योजने होती ( वा. रा. बा. १.५–७ ).

## अयोध्या नगरीची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. प्राचीन हिंदु साहित्य | |
| १. पतंजलि व्याकरण महाभाष्य ( १.२८१ ) | साकेत |
| २. रघुवंश ( १३.७९ ) | साकेत |
| ,, ,, | कोशला |
| ,, ,, | नंदिनी |
| २. बौद्ध साहित्य | |
| १. संयुत्त निकाय ( ३.१४०; ४.१७९ ) | अयोज्झा |
| २. अभिधम्मपदीपिका | साकेत |
| ३. अन्य बौद्ध साहित्य | अयुधा |
| ३. जैन साहित्य | |
| १. आवस्सक भाष्य ( पृ. २४४ ) | विनीता |
| २. आदिपुराण ( १२.७८ ) | विनीता |
| ,, ( १२.७७ ) | साकेत |
| ,, ( १२.७३ ) | कोशला(सुकोशला) |
| ३. विविधतीर्थकल्प ( पृ. २४ ) | कोशला(सुकोशला) |
| ,, ,, | रामपुरी |
| ,, ,, | इक्ष्वाकुभूमि |
| ४. आवस्सक निर्युति ( ३८२ ) | इक्ष्वाकुभूमि |
| ४. चिनी प्रवासी | |
| १. ह्युएन्त्संग ( वॉटर्स, १. ३५४ ) | अ-यु ( = अयुधा अथवा अयोध्या ) |
| २. फाहियान | श-चे ( श-कि = सकेत् ) |
| ५. टॉलेमी | सोगेद |
| ६. नाणी | विशाखा |
| ७. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य | |
| १. कल्पद्रुकोश ( १०.१५ ); त्रिकांडशेष ( ३१.१२ ); शाश्वतकोश ( ५२.२६ ) | उत्तर कोशला |
| २. ,, ,, ( ५२.२६ ) | कोसला |
| ३. कल्पद्रुकोश ( १०.१४ ) | शाकेत |

**२. स्कंदमते**--हे नगर मत्स्याकृती असून, त्याची लांबीरुंदी प्रत्येकी १ योजन होती. या नगराची पश्चिम आणि उत्तर परिसीमा अनुक्रमे सरयू आणि तमसा नद्यांनी बनली होती ( स्कन्द. वैष्णव. ८.१.६४–६५ ).

३. जैन त्रिषष्टिशलाकापुरुषचरित आणि विविध-तीर्थकल्पमते--या नगराची लांबीरुंदी १२ × ९ योजने होती ( त्रिषष्टि. १.२. ९१२; विविधतीर्थ. ३४ ).

४. ह्युएन्त्संगच्या मते--या नगराची व्याप्ती ४ मैल होती ( वॉटर्स, १.३५४-३५९ ).

या गावाची विभिन्न उपनगरे आणि बागा जमेस धरुनहि त्याच्या व्याप्तीविषयीची उपरोक्त माहिती अतिशयोक्त दिसते. या नगराऐवजी तत्कालीन अयोध्या प्रांताची लांबी १२ योजने असावी.

कनिंगहॅम यांच्या मते या नगराची लांबी १२ कोस असून ( कनिंग. प्राचीन भूगोल. पृ. ४०१ ), त्याभोवतालची सद्यःकालीन सारी तीर्थस्थाने प्राचीन काळी या नगराचाच भाग असावीत.

स्थापना-- या नगरीची स्थापना पृथ्वीचा पहिला राजा मनु (इ. स. पू. ३१००) याने केली ( वा. रा. बा. १.५-६ ). या नगरास आठ चक्रे ( चौक ) आणि नऊ द्वारे असून ( अ. वे. १०.२.३२ ), ब्राह्मण ग्रंथातहि या नगराच्या वैभवाचा निर्देश आढळतो ( ऐ. ब्रा. ७.३; शां. श्रौ. १५.१७-२५ ).

इक्ष्वाकु वंशाचे पासष्ट राजे--अयोध्येच्या इक्ष्वाकु ते राम दाशरथिपर्यंतच्या पासष्ट इक्ष्वाकुवंशीय राजांची नामावली पौराणिक साहित्यात दिली असून, या घराण्याचा आद्य संस्थापक इक्ष्वाकु हा मनूच्या नऊ पुत्रांपैकी एक होता. मनूने इक्ष्वाकूस मध्य देशाचे राज्य प्रदान केल्याने अयोध्या येथील ' सूर्यवंश ' हा ' इक्ष्वाकुवंश ' या नावाने सुविख्यात झाला. या राजघराण्यामध्ये मांधातृ ( इ. स. पू. २७२४ ), हरिश्चंद्र ( इ. स. पू. २५४० ), सगर, भगीरथ, दिलीप खट्वांग, रघु, दशरथ, राम दाशरथि ( इ. स. पू. १९५० ) हे पराक्रमी चक्रवर्ती सम्राट झाले. या राजांनी शास्त्राधारानुसार राज्य करण्याच्या ( मन्त्रश्रुत्यं चरामसि ) मांधातृ राजाच्या प्रतिज्ञेचे निष्ठेने पालन केले. दाशरथि रामाच्या राज्यकालात इक्ष्वाकु कुलाची आणि अयोध्या नगराची कीर्ति साऱ्या भारतवर्षात पसरली. महर्षि वाल्मीकीचे रामायण दाशरथि रामाची जीवनकथा सांगण्यासाठीच लिहिले गेले.

वाल्मीकि रामायणात-- या ग्रंथातील अयोध्येच्या रेखीव आणि वस्तुदर्शी वर्णनावरून वैभवकाळी हे नगर कसे दिसत असेल याची कल्पना येते.

या गावातील रस्ते सुव्यवस्थित आणि सुशोभित होते. येथील गगनचुंबी इमारतींचे कळस लांब अंतरावरून दिसत. याच्या सभोवताली अनेक प्रवेशद्वारयुक्त विस्तीर्ण तट असून, त्यावर नगरसंरक्षणार्थ ' शतघ्नी ' आदि अश्म-प्रक्षेपक यंत्रे आणि अस्त्रे बसविली होती. या तटाच्या बाहेरच्या अंगास पाण्याने तुडुंब भरलेला खंदक होता.

या समृद्ध नगरात शाल आणि आम्रवृक्षांच्या अनेक बागा, तसेच केवळ स्त्रियांनी चालविलेल्या अनेक नाट्यसंस्था होत्या. दशरथाच्या राज्यकाली ही नगरी वैभवाच्या शिखरावर असून, त्याच्या मांडलीक राजांनी ती सदैव गजबजलेली असे ( वा. रा. बा. ५-६ ).

या नगराच्या दक्षिणेकडील नंदिग्राम गावाहून भरताने चौदा वर्षेपर्यंत रामाचा राजप्रतिनिधी म्हणून कोशल देशाचे राज्य चालविले होते ( वा. रा. बा. १.३९ ). लॉ यांच्या मते ते गाव अयोध्येपासून १ कोस अंतरावर होते ( गंगानाथ झा रिसर्च इन्स्टि. जर्नल, १.४२३ ).

अयोध्येहून केकय देशाकडे जाणाऱ्या मार्गाचे सविस्तर वर्णन वाल्मीकि रामायणात आढळते ( वा. रा. अयो. ७१.१८-२१ ).

रामराज्य--दाशरथि रामाच्या अयोध्या येथील ' रामराज्या 'त न्याय आणि नीति यांचे पालन आणि समाजातील हरेक व्यक्तिमात्राला सुखी ठेवण्याचा प्रयत्न दिसतो.

वाल्मीकिमते रामाच्या राज्यात कोणीहि स्त्री अकाली विधवा होत नसे. रोगराई अथवा सर्पदंश यांची भीति लोकांना वाटत नसे. कोणीहि चोरी करीत नसे. बालकांचा अकाली मृत्यु होत नसे. सारे वृक्ष फळाफुलांनी लहडलेले असत. पाऊस पुरेसा पडत असे. समाजातील चारहि वर्णांचे लोक आपापली नियत कर्तव्ये निष्ठेने पार पाडीत असत. धर्मनिष्ठ, सत्यवचनी आणि ध्येयनिष्ठ प्रजेची आपल्या राजावर नितांत श्रद्धा असून, सर्वत्र त्याची स्तुती गायली जात असे ( वा. रा. यु. १३१.९८-१०६ ).

विजनावस्था--दाशरथि रामाच्या मृत्यूनंतर या नगराचे सारे वैभव नष्ट होऊन उत्तर आणि दक्षिण कोसल देशांच्या राजधान्या रामपुत्र लव-कुशांनी अनुक्रमे शरावती ( श्रावस्ती ) आणि कुशावती गावी हलविल्या, आणि अशा तऱ्हेने या नगराचे सारे महत्त्व नष्ट झाले ( वा. रा. उ. १०७.७; १७; १०८.५ ). या काळातील अयोध्येचे काव्यमय वर्णन कालिदासाच्या रघुवंशात दिले आहे.

विजन आणि ऐश्वर्यरहित अशी ही नगरी ' कुशावती ' येथील कुश राजाच्या स्वप्नात जाऊन त्यांस म्हणाली, ' एकेकाळी इंद्राच्या स्वर्गीय अलकावतीप्रमाणे वैभवसंपन्न

असणारी मी आज एखाद्या अरण्याप्रमाणे विजन बनले आहे. माझ्या कुशीत विसावलेल्या इमारतींवर आणि राजप्रासादांवर आज झाडझाडोरा माजला असून, माझ्या रस्त्यांवर दिवसा वाघसिंह आणि कोल्हीकुत्री हिंडत आहेत' (रघु. १६.५–२२).

पुनर्वसन — उपरोक्त विलापाने द्रवून कुशाने सपरिवार 'कुशावती' नगराचा त्याग केला आणि अयोध्या येथे पुन्हा आपली राजधानी आणली (रघु. १६.३८). वाल्मीकि रामायणमते सूर्यवंशीय ऋषभ राजाने अयोध्येचे पुनर्वसन केले (वा. रा. उ. १११.१०).

रामोत्तर काळातील अयोध्येच्या विजनावस्थेचे रघुवंशातील वर्णन यथातथ्य असले, तरी कुशाने केलेले तिच्या पुनर्वसनाचे उपरोक्त वर्णन अवास्तव वाटते. श्रावस्ती नगराच्या उदयानंतर अयोध्येचे राजकीय महत्त्व नाहीसे झाले असावे.

महाभारतात—या ग्रंथात या नगराचा निर्देश 'पुण्यलक्षणा' (शुभलक्षणांनी युक्त) अशा उपाधीने केला असून (म. आ. १७७.३८), त्यामधील 'षोडश राजकीय' आख्यानातील सोळा श्रेष्ठ राजांपैकी मांधातृ, सगर, भगीरथ, अंबरीष, दिलीप खट्वांग आणि दाशरथि राम हे सहा राजे 'अयोध्यासम्राट' होते (म. शां. २९).

युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञप्रसंगीच्या दिग्विजयात दीर्घयज्ञ नामक अयोध्या नगराच्या इक्ष्वाकुवंशीय सम्राटास पांडवांनी प्रेमाने वश केले होते (म. स. २७.२). त्यावरून महाभारतकाळी अयोध्या नगरी सुस्थितीत असावी.

कल्माषपाद राजासमवेत वसिष्ठ ऋषी या गावी आले होते (म. आ. १६८.१६–२१). या नगराच्या श्रावस्त राजाने श्रावस्ती (आधु. सहेत्–महेत्) नगराची स्थापना केली होती (म. आर. १९३.४).

बौद्ध साहित्यात--या साहित्याच्या मते गंगा नदीकाठच्या 'अयोज्झा' गावी गौतम बुद्ध दोन वेळा गेला होता (संयुत्त. ३.१४०; ४.१७९). या निर्देशावरून बौद्धकाली गंगा नदीच्या काठी 'अयोज्झा' नामक अन्य एक गाव असल्याचे अनुमान काही अभ्यासक काढतात (मललसेकर, १.१६५). परंतु या विधानास अन्यत्र पुष्टी मिळत नाही.

बौद्धकाळी अयोध्येचे उपनगर साकेत समृद्धावस्थेत असले, तरी प्रत्यक्ष अयोध्या नगराचा निर्देश मात्र तेथे क्वचितच आढळतो. उत्तरकालीन बौद्ध साहित्याच्या मते कालसेन आणि अरिंदम राजांची राजधानी 'अयोज्झा' गावी होती (जा. ४.८२; दीप. ३.१५).

फाहियानच्या प्रवासवर्णनात— या ग्रंथात 'श-चे' (श-कि = सकेत्) गावी गौतम बुद्धाने एक अमरवृक्ष लावल्याचा निर्देश आढळतो. गौतम बुद्धाचा हा अमरवृक्ष अयोध्या येथे असल्याचा निर्देश अन्य बौद्ध साहित्यात आढळतो. यावरून साकेत हे गाव फाहियानच्या काळी अयोध्या नगराचेच उपनगर मानले जात असावे.

ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात--या ग्रंथात 'अ-यु-ते' (अयुधा = अयोध्या) हे गाव गंगा नदीच्या दक्षिणेस १ मैलावर असल्याचा निर्देश आढळतो.

हे वर्णन शिरोधार्य मानून गंगा नदीकाठचे हे गाव शोधून काढण्याचा प्रयत्न कनिंगहॅम यांनी केला (कनिंग., प्राचीन भूगोल. पृ. ३८५). फत्तेपूरच्या २९ मैल आग्नेयेकडील आधु. 'अफुइ' म्हणजे ह्युएन्त्संगचे 'अ-यु-ते होय असे स्मिथ म्हणतात. परंतु हे दोन्ही तर्क चुकीचे असून, 'अ-यु-ते' म्हणजे 'अयोध्या' असण्याची शक्यता अधिक वाटते.

बौद्धस्थाने--कान्यकुब्ज नगराहून १२० मैल आग्नेयेकडील या गावी ह्युएन्त्संगला निम्नलिखित बौद्धस्थाने आढळली :--

१. वसुबंधु मठ--या पुरातन बौद्ध मठात वसुबंधु बोधिसत्त्वाने महायान आणि हीनयानपंथीय शास्त्रग्रंथांची रचना केली होती. या बौद्ध मठाशेजारच्या सभामंडपात वसुबंधूने विदेशीय राजपुत्रांना आणि ब्राह्मणांना धर्मप्रवचने दिली होती.

२. अशोक स्तूप--या गावापासून १ मैल उत्तरेस गंगा नदीकाठच्या एका बौद्ध मठात बुद्धप्रवचनस्मृत्यर्थ बांधलेला अशोकस्तूप होता.

३. श्रीलब्ध मठ—उपरोक्त बौद्ध मठाच्या पश्चिमेस बुद्धशरिरावशेषांनी युक्त एक बौद्ध स्तूप आणि सौत्रांतिक संप्रदायाच्या 'विभाषाशास्त्र' ग्रंथाची रचना करणाऱ्या श्रीलब्ध आचार्याचा मठ होता.

४. असंग बोधिसत्त्वाचा संघाराम--अयोध्या गावाच्या १। मैल नैर्ऋत्येकडील आम्रवनामध्ये वसुबंधु बोधिसत्त्वाचा ज्येष्ठ बंधु असंग याच्या प्रवचनाने पुनीत झालेला धर्ममठ होता. तुषित स्वर्गलोकात मैत्रेय बोधिसत्त्वाकडून प्राप्त झालेल्या निम्नलिखित शास्त्रांचे ज्ञान असंगाने आपल्या शिष्यांना येथे दिले होते :—१. योगाचार्य-भूमि-शास्त्र; २. महायान सूत्रालंकार टीका; ३. मध्यांत-विभाग-शास्त्र.

५. वसुबंधु बोधिसत्त्वाचे पुनरावतरण क्षेत्र--उपरोक्त आम्रवनाच्या १००' वायव्येस बुद्ध शरीरावशेषांनी युक्त असा स्तूप आणि वसुबंधु बोधिसत्त्वाचे पुनरावतरणस्थान होते. वसुबंधु आणि असंग या गंधारदेशीय बंधूंमध्ये प्रथम मृत होणाऱ्या भावाने आपल्या जिवंत भावास 'तुषित स्वर्गा'ची हकीगत सांगण्याचे ठरले होते. त्यानुसार प्रथम मृत झालेला वसुबंधु या स्थानी पुन्हा अवतीर्ण झाला.

६. वसुबंधु महायान पंथस्वीकृतिस्थान--असंग संघारामाच्या ८ मैल वायव्येकडील पुरातन बौद्ध मठात वसुबंधूने महायान पंथाचा स्वीकार केला ते स्थान होते.

देशवर्णन—ह्युएन्त्संगच्या मते या देशाचे क्षेत्रफळ १००० मैल असून, येथील हवामान सुखदायी आणि पीकपाणी, फळेफुले विपुल होती. येथील लोक सुसंस्कृत आणि सत्कर्मांचे चाहते असून, येथे १०० बौद्धमठ आणि १० हिंदु देवमंदिरे होती.

या देशाच्या ६० मैल पूर्वेस गंगा नदी ओलांडून गेल्यानंतर ह्युएन्त्संग 'अयोमुख' (अयोध्या प्रांतातील आधु. प्रतापगढ आणि रायबरेली जिल्हे) देशास पोहोचला (वॉटर्स, १.३५४-३५९; बील, २.२४७-२५०).

अयोध्या-साकेत परस्परसंबंध-- दाशरथि रामोत्तरकालात विजन अयोध्येच्या परिसरात 'साकेत' या नव्या गावाची स्थापना करण्यात आली. काही अभ्यासकांच्या मते सरयू नदीचा प्रवाह अचानकपणे बदलल्यामुळे नष्ट झालेल्या या नगराच्या स्थानी 'साकेत' या नव्या नगराची स्थापना करण्यात आली असावी.

हिंदु आणि जैन साहित्यात, तसेच कालिदासाच्या रघुवंशात 'अयोध्या' आणि 'साकेत' ही दोन्ही एकाच गावाची नामांतरे मानली आहेत (एशियाटिक रिसर्चेस्. २०.४४२; डे, पृ. १७४; रघु. १३.७९; १४.१३). रघुवंशाच्या मल्लिनाथकृत टीकेत, तसेच बृहत्संहितेत अयोध्या, साकेत, कोशली आणि नंदिनी ही चारहि नगरनामे समानार्थक मानली आहेत (बृ. सं. १४.४).

बौद्ध साहित्यात मात्र भारताच्या सहा श्रेष्ठ नगरांमध्ये गणले जाणारे 'साकेत' हे अयोध्येहून वेगळे गाव मानले आहे (दीघ. २.११६). ऱ्हाइस डेव्हिड्स यांच्या मते साकेत नगर अयोध्येच्या परिसरातीलच परंतु कालदृष्ट्या उत्तरकालीन नगर होते (साकेत पहा).

जैन तीर्थस्थान—जैनांच्या प्रथम चार आणि चौदाव्या तीर्थकरांचा जन्म अयोध्या येथे झाला होता. या तीर्थकरांची नावे पुढीलप्रमाणे होतः- १. ऋषभदेव (आदिनाथ अथवा कोशलीय); २. अजितनाथ; ३. अभिनंदननाथ; ४. सुमतिनाथ; ५. अनंतनाथ (त्रिषष्टि. जॉन्सन अनुवाद, २.२८; २५५; २७७; उत्तरपुराण. ५०.६९; आवस्सक. ३२३; ३८२).

या तीर्थंकरांपैकी ऋषभदेव हा इक्ष्वाकुवंशीय नाभि राजाचा पुत्र असून, या गावानजीकच्या 'अष्टबट' पर्वतावर त्यास आत्मज्ञान प्राप्त झाले होते. जैनांचे अन्य एकवीस तीर्थंकरहि इक्ष्वाकुवंशीयच होते.

सुविख्यात जैनधर्मीय सम्राट भरत, सगर, मघवा, सनत्कुमार आणि सुभौम यांची राजधानी या गावी होती (पद्म. सर्ग. २०; हरिवंश, सर्ग. ६०; उत्तरपुराण. सर्ग ४८; ६१; ६५). महावीराच्या अचलभ्राता नामक नवव्या गणधराचा जन्म येथे झाला होता (विविधतीर्थ. पृ. २४).

कुमारपाल राज्याच्या राज्यकालात देवेंद्रसूरि नामक जैन आचार्याने या गावच्या तीन महावीरमूर्तींची सेरीसय गावी स्थापना केली होती.

जैन विद्यापीठ--हेमचंद्रसूरि आचार्यांच्या 'त्रिषष्टिशलाकापुरुषचरित' मध्ये अयोध्येच्या इ. स. पू. ६०० मध्ये स्थापलेल्या जैन विद्यापीठाची माहिती आढळते. येथे पुरुषविद्यार्थ्यांना ७२ विद्या आणि स्त्रीविद्यार्थ्यांना ६४ विद्या शिकवण्याची व्यवस्था होती. स्त्रीपुरुष विद्यार्थ्यांचे सहशिक्षण येथे प्रचलीत असून ऋषभपुत्र सगराने येथे धनुर्वेद आणि युद्धकलेप्रमाणेच निम्नलिखित शस्त्रास्त्रांचे शिक्षण प्राप्त केले होतेः- १. धनुष्यबाण; २. तलवारीचे सर्व प्रकार; ३. ढालीचे सर्व प्रकार; ४. बरची; ५. जंबिया; ६. कुऱ्हाडी; ७. भूसंधि; ८. अश्मप्रक्षेपण; ९. त्रिशूल. यावरून येथील शिक्षणक्रमाची कल्पना येते.

अल्बेरुणीच्या ग्रंथात-- या ग्रंथाच्या मते हे गाव कनौजपासून १५० मैल आग्नेयेस होते. कनौजपासून २० फर्संख पूर्वेस बारि गाव असून, त्या गावाहून गंगा नदीच्या किनाऱ्याने २५ फर्संख अंतर गेल्यानंतर हे गाव लागत असे (वॉटर्स, १.३५५; ३५८).

शिलालेखसाहित्यात--निम्नलिखित शिलालेखांमध्ये या नगराचा निर्देश आढळतोः--१. समुद्रगुप्ताचा इ. स. ८ व्या शतकातील बनावट गया ताम्रपट-सरयू नदीकाठच्या अयोध्या गावाहून हा शिलालेख काढल्याचा निर्देश (कॉर्पस. इन्स्क्रि. ३.२.२५५); २. पुष्यमित्र शुंगाचा शिलालेख-या राजाने या गावी दोन अश्वमेध यज्ञ केल्याचा निर्देश. त्यावरून त्याच्या साम्राज्यामध्ये या नगराचा समावेश होत असावा; ३. इ. स. १२ व्या

शतकातील शिलालेख--सरयू आणि घर्घरा नद्यांच्या संगमावर हे नगर वसल्याचा निर्देश (एपि. इंडि. ७.८६-८७; १४.१९६); ४. विग्रहपाल (तृतीय) राजाचा इ. स. १०५० चा बनगाव शिलालेख-- अयोध्येच्या ५९ निनावी राजांचा निर्देश (एपि. इंडि. २९.५९).

नाणी--या गावच्या अवशेषसमूहात येथील धनदेव आणि विस्सखदत्त नामक सावकारांनी कोरलेली काही नाणी सापडली आहेत.

मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात--या ग्रंथामध्ये 'अयोध्ये'चा (अभिधान. १३२.९७५; कल्पद्रु. १०.१५; त्रिकाण्ड. ३१.१२; शाश्वत. ५२.२६); तसेच त्याच्या 'कोशला' (कल्पद्रु. १०.१६; अभिधान. १३२.१७५). आणि 'साकेत' (अभिधान. १३५.९७५; कल्पद्रु. १०.१५; त्रिकाण्ड. ३१.१२; शब्दरत्न. १५६.१२; वैज. १५६.१०), या नामांतरांचा निर्देश अनेक वेळा आढळतो.

अयोध्यामाहात्म्य--अग्नि आणि स्कंद पुराणात (अग्नि. १०९.२४; स्कन्द. वैष्णव. ८), 'रुद्र यामल' या तंत्र शास्त्रीय ग्रंथात, तसेच जिनसेनाच्या आदिपुराणात (आदि. अ. १२) अयोध्या तीर्थाचे माहात्म्य वर्णिले आहे.

तीर्थस्थाने--प्राचीन साहित्यात अयोध्या येथील निम्नलिखित तीर्थस्थानांचा निर्देश आढळतोः--

(१) महाभारतात--१. ऋषभतीर्थ (म. आ. ८३. १०); २. कालतीर्थ (म. आर. ८३.११).

(२) स्कंद पुराणात--१. उर्वशीकुंड; २. ऋणमोचन-तीर्थ; ३. कुसुमायुधकुंड; ४. क्षीरकुंड. ५. क्षीरोदकतीर्थ; ६. गयाकूपतीर्थ; ७. गुप्तहरिस्थान; ८. गोप्रतारतीर्थ; ९. गौतम आश्रम; १०. घर्घरा-सरयू संगम; ११. घोषार्क-कुंड; १२. चक्रतीर्थ; १३. चक्रहरिस्थान; १४. चंद्रहरिक्षेत्र; १५. च्यवनाश्रम; १६. जटाकुंड; १७. तमसा-तिलोदकी-सरयू संगम; १८. दुर्भरतीर्थ; १९. धनयक्षतीर्थ; २०. धर्म-हरिक्षेत्र; २१. पराशर आश्रम; २२. पापमोचनतीर्थ; २३. पिंडारक; २४. पिशाचमोचनतीर्थ; २५. विभीषण सरोवर; २६. बृहस्पतिकुंड; २७. ब्रह्मकुंड; २८. भरतकुंड; २९. मत्त-गजेंद्र ३०. मंत्रेश्वरतीर्थ; ३१. महाभर सरोवर; ३२. महारत्न-कुंड; ३३. मांडव्य आश्रम; ३४. मानसतीर्थ; ३५. योगिनी-कुंड; ३६. रतिकुंड; ३७. रम्यसरोवर; ३८. रुक्मिणी-कुंड; ३९. वसिष्ठकुंड; ४०. विघ्नेश्वर; ४१. विष्णुहरिस्थान; ४२. शुभतीर्थ; ४३. सरयू नदी; ४४. सहस्रधारातीर्थ; ४५. सागरकुंड; ४६. सिद्धपीठक्षेत्र; ४७. सीताकुंड; ४८. सुग्रीवकुंड; ४९. सुरसा; ५०. स्वर्गद्वारतीर्थ; ५१. स्वर्णखनितीर्थ; ५२. हनुमत्कुंड; ५३. हरिस्मृतिस्थान (स्कन्द. वैष्णव. ८.१-१०).

सद्यःकालीन तीर्थस्थाने--या गावची प्रमुख सद्यःकालीन हिंदु, बौद्ध आणि जैन तीर्थस्थाने खाली दिली आहेत.--

(१) हिंदुधर्मीय तीर्थस्थाने--या गावातील दाशरथि रामाच्या जीवनाशी संबधित तीर्थांमध्ये ऐतिहासिक आणि उत्तरकालीन (इ. स. १ले-२रे शतक) तीर्थांची सरमेसळ दिसते. गुप्तसम्राट विक्रमादित्याने (इ. स. २ रे शतक) जीर्णोद्धार केलेल्या या गावाच्या मंदिरांपैकी फारच थोडी मंदिरे आज शिल्लक असून, बाकी सारी मंदिरे उत्तर-कालीन आणि म्हणूनच स्थापत्यदृष्ट्या वैशिष्ट्यहीन आहेत.

अयोध्या येथील दाशरथि रामाच्या जीवनाशी संबंधित प्रमुख तीर्थस्थाने पुढीलप्रमाणे होतः--

१ कनकभवन--मध्यप्रदेशान्तर्गत ओरछाच्या राजाने बांधलेले हे राममंदिर येथील प्रमुख यात्रास्थान असून, त्यामधील रामपंचायतनमूर्ती पुरातनकालीन आहेत.

२. रामजन्मस्थान--कनकभवनाच्या समोरच्या अंगास रामजन्माच्या स्थानी विक्रमादित्याने बांधलेले मंदिर असून, त्याजागी सध्या बाबराने बांधलेली मशीद आहे. या मशिदीच्या आवारात रामाचे एक छोटे मंदिर असून, त्याच्या परिसरात सीतारसोई, चोवीस अवतार, कोपभवन, रत्नसिंहासन, आनंदभवन, रंगमहाल, साक्षीगोपाल आदि अन्य छोटी मंदिरे आहेत.

३. चीरोदक (चीरसागर)--दशरथाच्या पुत्रकामेष्टि यज्ञाचे स्थान.

४. त्रेता-की-ठाकुर--रामाच्या अश्वमेध यज्ञाचे स्थान. परंतु हा यज्ञ गोमती नदीकाठच्या नैमिषारण्यात झाल्याचा निर्देश वाल्मीकि रामायणात आढळतो (वा. रा. उ. ९१. १५; पद्म. उ. २७१.१३-१४).

५. रत्नमंडप--रामदरबाराचे स्थान (मुक्ति. उ.१).

६. स्वर्गद्वार (सर्गद्वार)--रामाचे दाहकर्मस्थान. हे आधु. फैजाबाद येथे आहे.

७. गोप्रतारतीर्थ (आधु. गुप्तार घाट)--रामाचे हे अन्य एक दाहकर्मस्थान अयोध्येपासून ९ मैलांवर सरयूच्या पश्चिम किनाऱ्यावर दाखविले जाते.

८. लक्ष्मणकुंड--लक्ष्मणमृत्यूस्थान. हे सरयूनदीकाठी आहे.

९. मझौरा--श्रावणवधस्थान. हे फैजाबाद जिल्ह्यात आहे.

१०. रामाचा राजवाडा--याचे अवशेष हनुमानगढी, सुग्रीवटीला, अंगदटीला, मत्तगजेंद्र ( मॅंगगंड ) या स्थानी दाखविले जातात.

११. तुलसीचौरा—तुलसीरामायणाचे रचनास्थान. हे कनकभवनाच्या समोरच्या अंगास आहे.

१२. सुवर्णखनितीर्थ ( आधु. सोनखर )—येथील सोन्याच्या खाणीमधून रघु राजाने सोने काढून ते कौत्स ऋषींस गुरुदक्षिणा म्हणून दिले. अन्य समजुतीनुसार कुबेराने येथे केलेल्या सुवर्णवर्षावामधून रघूने गुरुदक्षिणा दिली.

१३. घोषार्क कुंड ( आधु. सूर्यकुंड )—स्कंद पुराणात निर्देशिलेले एक तीर्थस्थान ( स्कन्द. वैष्णव. ८.७ ). हे सरयूकाठी रामघाटापासून ५ मैलांवर दाखविले जाते.

१४. जनकौरा ( आधु. जनौरा )—जनक राजाचे निवासस्थान. हे फैजाबाद- सुल्तानपुर मार्गावर आहे.

१५. नंदिग्राम-रामवनवासकाळातील भरताचे निवासस्थान. हे फैजाबादपासून १० मैलांवर आहे.

१६. दशरथतीर्थ—दशरथाचे दाहकर्मस्थान. हे सरयू नदीच्या काठी रामघाटापासून ८ मैलांवर आहे.

१७. छपैया--स्वामिनारायण संप्रदायाचे संस्थापक स्वामी सहजनंदांचे जन्मस्थान. हे अयोध्येपासून ६ मैलांवर सरयूकाठी आहे.

सरयूकिनारीचे घाट--अयोध्या येथील निम्नलिखित घाट विशेष उल्लेखनीय आहेत :--१. ऋणमोचन; २. सहस्रधारा; ३. लक्ष्मण; ४. स्वर्गद्वार; ५. गंगामहल; ६. शिवाला; ७. जटाई; ८. अहल्याबाई; ९. धौरहरा; १०. रूपकला; ११. नया; १२. जानकी; १३. राम.

यात्रापरिक्रमा--स्कंदपुराणात अयोध्येची दोन दिवसांची यात्रापरिक्रमा खालीलप्रमाणे दिली आहे :--विष्णुहरि→ स्वर्गद्वार→ पापमोचनक→ ऋणमोचनक→ सहस्रधारा→ चंद्रहरि→ धर्महरि→ चक्रहरि→ ब्रह्मकुंड→ महाविद्या ( रात्रिजागरण )→ स्वर्गद्वार→ रुक्मिणीतीर्थ ( स्कन्द. वैष्णव. ८.१००-११४ ).

आधुनिककालीन परिक्रमा--आधुनिक काळी अयोध्या तीर्थाची यात्रा दोन प्रकारे केली जाते :--

१. बृहत्परिक्रमा--स्वर्गद्वार→ सूर्यकुंड→ जनौरा→ निर्मलकुंड→ गोप्रतार घाट→ स्वर्गद्वार.

२. लघुपरिक्रमा ( अंतर्वेदी परिक्रमा )--रामघाट→ सीताकुंड→ अग्निकुंड→ विद्याकुंड→ लक्ष्मणघाट→ स्वर्गद्वार→ रामघाट.

( २ ) बौद्धधर्मीय तीर्थस्थाने--या गावची प्रमुख बौद्ध तीर्थस्थाने पुढीलप्रमाणे होत :--

१ मणि पर्वत-अयोध्या रेल्वेस्थानकानजीकच्या तुलसीचौरापासून १ मैल अंतरावरील या टेकडीवर ह्युएन्त्संगने निर्देशिलेल्या अशोकस्तूपाचे ( उंची-१००′ ) अवशेष आहेत.

२. सुग्रीव पर्वत-कनिंगहॅमच्या मते सिलोनी महावंशात निर्देशिलेल्या कालकाराम ऊर्फ पूर्वाराम बौद्धमठाचे स्थान.

३. कुबेर पर्वत--या टेकडीवर बुद्ध शरिरावशेषांच्या स्तूपाचे अवशेष आहेत ( कनिंग., अर्कि. सर्व्हे. १ ).

४. दतूनकुंड--गौतम बुद्धाच्या दंतप्रक्षालनाचे मणिपर्वतानजीकचे स्थान. फाहियानच्या काळी या स्थानी ७′ उंचीचा एक पवित्र वृक्ष असून, सध्या तेथे एक छोटे स्मारकमंदिर बांधले आहे.

( ३ ) जैनधर्मीय तीर्थस्थाने--येथील प्रमुख तीर्थंकर-मंदिरे पुढीलप्रमाणे होत :--१. आदिनाथ मंदिर-हे स्वर्गद्वारानजीकच्या मुराई टेकडीवर आहे; २. अजितनाथ मंदिर-हे इटावा ( सप्तसागर )च्या पश्चिमेस आहे; ३. अभिनंदननाथ मंदिर-हे अयोध्या-सराईनजीक आहे; ४. सुमतिनाथ मंदिर- हे रामकोट अवशेषसमूहामध्ये असून, तेथे पार्श्वनाथ आणि नेमिनाथ यांच्याहि मूर्ती आहेत; ५. अनंतनाथ मंदिर-हे गोलघाटाच्या नाल्याजवळील उंच टेकडीवर असून, तेथे तीर्थंकरांची चरणचिह्ने आहेत.

‘ विविधतीर्थकल्प ’ मध्ये येथील निम्नलिखित जैन तीर्थांचा निर्देश आढळतो :--१. पार्श्वनाथवाटिका; २. सिताकुंड; ३. सहस्रधारा ( विविधतीर्थ. पृ. २४ ).

२. ( देश ) ‘ कोसल ’ देशाचे नामांतर. या देशाच्या अयोध्या या राजधानीमुळे त्यास हे नाव प्राप्त झाले असावे ( म. स. २७.२; कोशल पहा ).

३. ( बृहत्भारतीय नगर ) आग्नेय आशियातील ‘ सयम् ’ ( सयाम = आधु. थायलंड ) देशाच्या भूतपूर्व राजधानीचे नगर. भारतातील अयोध्येच्या अनुकरणानेच या नव्या नगराचे नामकरण बृहत्भारतीय वसाहतकारांनी केले असावे. सयामी नामांतर-‘अयुथिया’.

ऐतिहासिक पार्श्वभूमी—इ. स. १३५०-१६५० या तीन शतकांच्या काळात सयाम देशाची राजधानी या गावी असून, नंतर ती बँकॉकला हलविण्यात आली.

हृदयराज नामक थायीवंशीय राजाने इ. स. १४ व्या शतकात स्थापलेले हे नगर तत्कालीन सयामचे सांस्कृतिक केंद्र ( पूर्वेकडील 'व्हेनिस' ) मानले जात असे. पोर्तुगीज आणि डच प्रवाशांच्या ग्रंथांवरून त्याच्या वैभवाची कल्पना येते.

स्थापना— इ. स. १० व्या शतकात कंबोडियामधील 'मेकाँग्'-नदीचे खोरे कोरडे आणि मनुष्यवस्तीयोग्य झाल्यानंतर या खोऱ्याच्या उत्तरेकडील सयमदेशीय थाय लोक दक्षिणेकडे वळले, आणि प्रथम 'मेनाम्' नदीकाठच्या सुखोथाई ( सुखोदय ) गावी आणि नंतर इ. स. १३५० मध्ये समुद्रकिनाऱ्यापासून ५० मैल अंतरावरील 'द्वारवती' गावी त्यांनी आपल्या राजधान्या स्थापल्या. यापैकी 'द्वारवती'चे त्यांनी 'अयुथिया' असे नवे नामकरण केले.

रामाधिपती सुवर्णदोल हा अयोध्या येथील पहिला राजा होय. इ. स. १५४८ मध्ये वर्दीरराज राजाच्या राज्यकालात ब्रह्मदेशाने या नगरावर प्रथम स्वारी केली आणि नंतर इ. स. १७६७ मध्ये ब्रह्मी आक्रमकांनी हे नगर संपूर्णतः उध्वस्त केले.

स्थापत्यावशेष—लाकूडविटांनी बांधलेली येथील बहुतांशी मंदिरे उंबराच्या झाडांनी उध्वस्त झाली आहेत. यापैकी वीसहून अधिक मंदिरांचे नकाशे सुविख्यात फ्रेंच संशोधक फर्नेरिओ यांनी इ. स. १८९१ मध्ये तयार केले असून, त्यायोगे सयामी मंदिरस्थापत्याच्या जडणघडणीची कल्पना येते.

बौद्ध मंदिरे—कंबुजदेशीय स्थापत्यशैलीने बांधलेली येथील प्रमुख बौद्ध मंदिरे पुढीलप्रमाणे होतः—

१. वात्-था-सौ मंदिरसमूह--या मंदिराचे आवार आणि मध्यवर्ती बृहदाकार 'फ्र' (स्तूप) ही दोन्ही कंबुज देशातील अंकोर-वात् आणि बेंगमेअलेआ मंदिरासदृश असून, त्यामधील कॉरिडॉर्स आणि मीनारयुक्त प्रवेशद्वारे यावर कंबुज स्थापत्यशैलीची छाप दिसते.

येथील 'फ्र-प्रंग' स्तूपाची रचनाहि कंबुज आणि जावा देशातील मुख्य मंदिरासदृश आहे. मंदिराच्या दर्शनीभागी क्रमाने चढत गेलेल्या उंचच उंच पायऱ्या असून अन्य तीन बाजूंस तीन छोटी देवालये आहेत.

या मंदिरसमूहातील २२८' × ४९' आकाराचे 'बोत्' ( बौद्ध भिक्षूंचे दीक्षागृह ) सयाममधील सर्वात मोठे मानले जाते.

२. वात्-फु-तै मंदिरसमूह—येथील सर्वात आतील आवाराच्या सभोवताली 'कॉरिडॉर्स' बांधले असून त्याप्रत जाणाऱ्या रस्त्याच्या दोन्ही अंगास दोन 'विहान' ( बौद्ध विहार ) बांधले आहेत. मंदिराच्या पूर्व प्रवेशद्वारानजीकचा 'बोत्' येथे मंदिराच्या पाठीमागे म्हणजे पश्चिम प्रवेशद्वारानजीक बांधला आहे.

शिल्पकृती— गंधार शिल्पशैलीच्या अनुकरणाने ( उदा. बामियान गुफामंदिरे ) चुन्यात कोरलेल्या गौतम बुद्धाच्या अनेक बृहदाकार मूर्ती या गावी आढळतात.

४. ( तीर्थ ) काश्मीरातील एक तीर्थस्थान ( नीलमत. १२३७ ).

५. ( तीर्थ ) नर्मदा नदीकाठचे एक तीर्थस्थान ( पद्म. सृ. १८.८८ ). हे नर्मदातीरी दिलवाडा येथे आहे.

६. ( तीर्थ ) नृसिंहमते लोकनाथ नृसिंहाचे तीर्थस्थान ( नृसिंह. ६५.१९ ).

७. ( तीर्थ ) एक ब्रह्मदेवस्थान. येथील ब्रह्मदेवाचे नाव राघव होते ( पद्म. सृ. २९.१३९ ).

**अयोनिसम्भव** ( तीर्थ )--नर्मदा नदीकाठचे तीर्थस्थान ( पद्म. सृ. १८.५८ ).

**अयोमुख** ( देश )--ह्युएन्संग, तसेच मध्ययुगीन शिलालेखसाहित्यमते उत्तर भारतातील अयोध्या नगराच्या पूर्वेकडील एक देश. 'अ-ये-मु-क' ( अयमुख ) या नावाने ह्युएनत्संगने निर्देशिलेला हा देश अयोध्या प्रांतातील आधु. प्रतापगढ आणि रायबरेली जिल्ह्यांमध्ये वसला असावा.

कनिंगहॅम यांच्या मते अलाहाबादपासून १०४ मैल वायव्येकडील आधु. दौंडिय खेरा गावी या देशाची राजधानी असावी. परंतु ते बरोबर वाटत नाही.

नामव्युत्पत्ती--वॉटर्स यांच्या मते या देशाचे मूळ संस्कृतभाषीय नाव 'हयमुख' ( अश्वमुखसदृश आकाराचा ) अथवा 'आयमुख' ( समुद्राच्या खाडीच्या आकाराचा ) असावे. किल्हॉर्न यांच्या मते 'अयोमुख' नामक राक्षसाच्या अथवा पर्वताच्या नावावरून या देशास हे नाव पडले असावे ( एपि. इंडि. ७.८६ ).

काशिकेमध्ये--या ग्रंथात 'अयोमुख' नावानेच या देशाचा निर्देश आढळतो.

ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात--ह्युएन्त्संगजीवनचरित्रमते तो बोटीच्या साह्याने गंगा नदी ओलांडून अयोध्येच्या पूर्वेकडील अयमुख देशास गेला. वाटेत ठग लोकांनी त्यास दुर्गादेवीस बळी देण्यासाठी पकडले. परंतु ऐनवेळी झालेल्या वादळामुळे त्याची सुटका झाली.

भौगोलिक वर्णन--ह्युएन्त्संगच्या मते या देशाचे आणि गंगा नदीकाठच्या त्याच्या राजधानीचे क्षेत्रफळ अनुक्रमे ५०० मैल आणि ४ मैल होते. अयोध्येसदृश हवामान आणि पीकपाणी असलेल्या या देशातील लोक सदाचरणी आणि अभ्यासू असून, येथे पाच बौद्धमठ आणि दहा हिंदु देवमंदिरे होती.

बौद्धवास्तू--ह्युएन्त्संगच्या मते या देशातील बौद्धवास्तू पुढीलप्रमाणे होत:—

१. अशोकस्तूप--राजधानीच्या आग्नेयेस गंगा नदीच्या काठी बुद्धप्रवचनस्मृत्यर्थ बांधलेला एक अशोकस्तूप ( उंची २००′ ) आणि गडद निळ्या दगडांचा बौद्ध शरिरावशेषस्तूप होता.

२. बुद्धदास धर्ममठ--उपरोक्त स्तूपानजीक बुद्धदास आचार्याच्या 'वर्म-विभाषा' शास्त्रग्रंथाच्या रचनास्थानी बांधलेला एक बौद्धमठ होता. या मठाच्या मनोऱ्यावर व सज्जावर सुंदर नक्षीकाम असून अंतर्भागात धीरगंभीर बुद्धमूर्ती होती.

शिलालेखसाहित्यात--कलचुरि राजा सोढदेव याच्या इ. स. १०७९ मधील कहल ताम्रपटाच्या मते कार्तवीर्य अर्जुनाच्या घराण्यातील एका उत्तरकालीन राजाने कालंजर आणि अयोमुख देश जिंकले होते ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.३८९ ).

२. ( द्वीप ) संस्कृत शब्दकोशसाहित्यमते एक द्वीप ( वैज. ३६.२० ).

३. ( पर्वत ) दक्षिण भारतातील एक पर्वत ( वा. रा. कि. ४१.१३ ).

**अय्यपोलिल्** ( नगर )-- तामीळ साहित्यमते 'अय्यावोले' ( आधु. ऐहोळे ) गावाचे नामांतर ( एपि. इंडि. २३, प्लेट ७; ऐहोळे पहा ).

**अय्यावोले** ( नगर )--इ. स. ६३४ मधील ऐहोळे शिलालेखात निर्देशिलेले 'ऐहोळे' या कर्नाटकातील चालुक्य राजधानीचे नामांतर ( इंडि. अँटि. ८.२४३; ऐहोळे पहा ).

**अरकोसिय** ( देश )--ग्रीक साहित्यमते पूर्व अफगाणिस्तान देशान्तर्गत हेल्मांद नदीच्या खोऱ्यातील एक देशविभाग. आधु. कंदाहार प्रांत तो हाच होय. या देशाची राजधानी 'अलेक्झांड्रोपोलिस' ( आधु. कंदाहार ) गावी होती ( स्मिथ, झेड्. डी. एम्. जी., इ. स. १९०६, पृ. ५७ ).

नामांतरे—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—१. त्सौकुट ( ह्युएन्त्संग, वॉटर्स, २.२६६ ); ३. श्वेत भारत ( पार्थियनभाषीय स्थानिक नाव ); ४. जागुड ( म. आर. ५१.२५ ).

नामव्युत्पत्ती--मॅक्रिंडल यांच्या मते 'अरकोस' हे ग्रीकभाषीय देशनाम 'हरक्वैति' (संस्कृत–'सरस्वती') या पर्शियनभाषीय नदीनामाचे अपभ्रष्ट रूप आहे. वैदिक आर्यांनी अफगाणिस्तान देशात वसाहत स्थापन करतेवेळी तेथील 'हेल्मांद' नदीस 'सरस्वती' असे नाव दिले, आणि या नदीनामावरूनच या देशास 'अरकोसिय' हे ग्रीकभाषीय नाव प्राप्त झाले असावे.

डॅरियसच्या शिलालेखात--इ.स.४७९मधील या शिलालेखाच्या मते डॅरियस–साम्राज्याच्या विसाव्या उपविभागात भारत देशान्तर्गत अरकोसिय ( आधु. कंदाहार ), गंदरिय ( आधु. वायव्य पंजाब ) आणि अरिय ( आधु. हेरात ) प्रदेशांचा समावेश होत असे. यावरून सिंध आणि सिंधूच्या पूर्वेकडील पंजाबचा भाग यापुरते डॅरियसचे भारतीय साम्राज्य मर्यादित असावे.

सिकंदरस्वारीच्या वर्णनात—आपल्या भारतस्वारीहून परत जातेवेळी सिकंदरने आपले बहुतांशी सारे सैन्य अरकोसिय ( आधु. कंदाहार ) आणि द्रंगियाना ( आधु. सैस्तान )च्या मार्गाने क्रतेरोस् नामक सेनापतीच्या नेतृत्वाखाली कर्मेनिय देशास पाठविले. उत्तरकालात ( इ. स. पू. ३०३ ) त्याने सिबिर्तिओस् यास या देशाचा क्षत्रप नेमले. चंद्रगुप्त मौर्याच्या दरबारातील ग्रीक वकील मेगॅस्थेनिस हा प्रारंभी या देशातच नोकरीस होता.

पार्थियन साम्राज्यात समावेश--इ. स. पू. १ ल्या शतकात हा देश पार्थियन सम्राट मिथ्रदतेस् ( द्वितीय ) च्या साम्राज्याचा भाग बनला. या लोकांमध्ये तो 'श्वेत भारत' या स्थानिक नावाने ओळखला जात असे (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.१.३० ).

टॉलेमीच्या ग्रंथात--या ग्रंथाच्या मते या देशाच्या सीमारेषा खालीलप्रमाणे होत्या :—१. पश्चिमेस–द्रंगियाना देश; २. उत्तरेस—परोपनिसदै देश; ३. पूर्वेस–भारतवर्ष; ४. दक्षिणेस–गेद्रोसिय देश.

टॉलेमीच्या मते अफगाणिस्तानचा बराचसा प्रदेश या देशामध्ये समाविष्ट होत असून, या देशाची पश्चिम आणि पूर्व सरहद्द अनुक्रमे कंदाहार नगर आणि सिंधु नदीपर्यंत पसरली होती. उत्तरेस आणि दक्षिणेस पसरलेल्या हिंदुकुश आणि बैतियन पर्वतश्रेणींनी हा देश परोपनिसदै

आणि गेद्रोसिय देशांपासून विभक्त झाला होता. भारतातून इराणकडे जाणारा व्यापारी रस्ता या संपन्न आणि दाट लोकवस्तीच्या देशातून जात असे.

नद्या--या देशातील हेल्मांद ही प्रमुख नदी काबूलच्या पश्चिमेकडील कोह-इ-बाबा पर्वतामध्ये उगम पावून नैर्ऋत्य दिशेने या देशात प्रविष्ट होते. अर्गेदाब नदीच्या संगमानंतर ही नदी झराह सरोवरास जाऊन मिळते.

राजधानी--टॉलेमीच्या मते या देशाची राजधानी 'अरखोर्तोस्' गावी असून, या नगराच्या भौगोलिक स्थानाविषयी अभ्यासकात निम्नलिखित मतांतरे आढळतात :--

१. व्हॉक्स यांच्या मते—शिकारपुर रस्त्यावर कंदाहारनजीक असणारे अवशेष याच गावाचे असावेत.

२. रॉलिनसन यांच्या मते—प्लिनीने निर्देशिलेले 'कोफेन नगर' (आधु. उलान् रोबात्) ते हेच असून, या गावावरूनच त्याच्या परिसरास 'कि-पिन्' असे नाव प्राप्त झाले होते. यावरून उलान् रोबात्च्या परिसरातील अवशेष म्हणजेच हे गाव असावे (जिऑ. सो.आ. जर्नल. १२.११३).

ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात--या ग्रंथात, तसेच महाभारतात या देशाचा निर्देश अनुक्रमे 'त्सौकुट' (संस्कृत–'जागुड') आणि 'जागुड' (केशर) नावांनी केला आहे. त्यावरून खिस्तशकोत्तर कालामध्ये या देशाचे 'अरकोसिय' हे नाव मागे पडून, तो 'जागुड' या संस्कृतभाषीय नावाने ओळखला जाऊ लागला असावा (जागुड पहा).

**अरञ्जरगिरि** (पर्वत)-- बौद्ध जातकमते मध्यभारतान्तर्गत (मज्झिम देश) निबिड अरण्यातील एक पर्वतश्रेणी (जा. ३.४६३).

वेस्संतर नामक बौद्ध भिक्षु हा पर्वत ओलांडून वंकगिरि येथे गेला होता. जातकमते निम्नलिखित स्थाने एकमेकांपासून प्रत्येकी पाच योजने अंतरावर होती:—जेतुत्तर→ सुवर्णगिरिताल सरोवर → कुंतिमार → अरंरजगिरि → दुन्निविष्ठ (जा. ६.५१४).

**अरण** (नगर)--पश्चिम भारतातील एक नगर. हे नकुलाने जिंकले होते (म. स. ३२०*).

२. (ग्राम) स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थस्थान अहमदनगरच्या ५ मैल दक्षिणेकडील आधु. अरणगाव ते हेच होय (स्था. पृ. ३९).

**अरण्य** (वन)—देवी पुराणमते भारतातील नऊ पवित्र अरण्यांचा समूह. ही अरण्ये पुढीलप्रमाणे होत:— १. सैंधव; २. दंडकारण्य; ३. नैमिष; ४. कुरुजांगल; ५. उपलावृत (उत्पलारण्य); ६. अरण्य; ७. जंबुमार्ग; ८. पुष्कर; ९. हिमालय (देवीपुराण. ७४).

कुरुक्षेत्रान्तर्गत सात वनांची नामावली वामन पुराणात दिली आहे (वन पहा).

मध्यप्रदेशान्तर्गत अठरा अरण्यराज्यांचा (अष्टादश आटवीराज्य) निर्देश गुप्त शिलालेखात आढळतो (गुप्त इन्स्क्रि. पृ. ११६; आटवीराज्य पहा).

**अरण्यवाह** (नदी)--जैन साहित्यमते बिहारमधील 'चंदना' नदीचे नामांतर (एशियाटिक रिसर्चेस्. १४. ४०१; चंदना पहा).

**अरण्या** (नदी)--भारतवर्षान्तर्गत एक नदी (म. भी. १०.३३). पाठभेद--'अनंगा' (पद्म. सृ. ६. ३०).

**अरन्तुक** (नगरदेवता)--कुरुक्षेत्राची एक संरक्षक नगरदेवता (म. आर. ८१.१७८; श. ५२.२०). कुरुक्षेत्रान्तर्गत बहादूरपुरनजीकच्या सीसग्राममध्ये ही आहे. पाठभेद—'मचक्रुक' (म. आर. ८१.७); 'मचक्नुक' (पद्म. सृ. २७.८५).

**अरव** (देश)—बृहत्संहितामते नैर्ऋत्य भारतातील एक देश (बृ. सं. १४.१७).

**अरवालो** (सरोवर)—सिलोनी महावंशमते कश्मीरातील 'महापद्म' (आधु. वूलर) सरोवराचे नामांतर (गैगर, महा. पृ. ७२; महापद्म पहा).

**अरविन्दक** (टेकडी)—गया येथील एक टेकडी (वायु. १०९.१५; नारद. २.४७.८३).

**अरशिल** (नदी)— शिलालेखसाहित्यमते दक्षिण भारतान्तर्गत अरशिलेयारु प्रदेशातील एक नदी. नामांतर–'अरिशिल' (साऊथ इंडि. इन्स्क्रि. २.५२).

**अरशूर** (नगर)--शिलालेखसाहित्यमते दक्षिण भारतातील 'अरैशूर' (आधु. अंबासमुद्रम्) नगराचे नामांतर (एपि. इंडि. ७.१६६; अरैशूर पहा).

**अरसवल्लि** (सूर्यमंदिरस्थान)-- आंध्र प्रदेशातील सुविख्यात सूर्यमंदिरस्थान. मद्रास–कलकत्ता रेल्वेरस्त्यावरील श्रीकाकुलम् या जिल्ह्याच्या गावापासून १ मैलावर हे आहे. आंध्र प्रदेशातील एकमेव सूर्यदेवतास्थान म्हणून या मंदिराचे महत्त्व विशेष मानतात.

प्राचीनत्व— येथील सद्यःकालीन सूर्यमंदिर हे येलमंचिलि पुल्लाजि पंतुलु याने इ. स. १७७८ मध्ये बांधले असले, तरी पूर्व कलिंग राजघराण्यातील (इ. स. ४ थे–

१४ वे शतक ) आदित्य विष्णुवर्मनाच्या, तसेच त्याच्या श्रीकरण नामक सेनापतीच्या शिलालेखावरून हे स्थान बरेच पुरातन दिसते. या राजाच्या नारायणभट्ट नामक पित्याने या देवतेची उपासना केल्याचा, तसेच विद्यार्थ्यांच्या संस्कृत शिक्षणासाठी आणि निवासासाठी जमीन दिल्याचा निर्देश तेथे आढळतो.

स्थानवर्णन--येथे मध्यभागी सूर्य ( आदित्य ) मंदिर असून, त्याच्या सभोवती अंबिका, विष्णु, गणेश, महेश्वर अशी सूर्यपंचायतनाची रचना केली आहे.

येथील सप्ताश्वरथयुक्त आणि कमलहस्त सूर्यमूर्ती काळ्या दगडाची असून, तिच्या शिरोभागी आदिशेष नागाचे छत्र आहे. मूर्तीच्या एका अंगास उषा, पद्मिनी आणि छाया या तीन सूर्यपत्नींच्या मूर्ती आहेत. पायथ्याशी पिंगल आणि दंड हे द्वाररक्षक असून, सनक आणि सानंद हे उपासक सूर्यनारायणाला चामरे ढाळीत आहेत.

स्थानिक समजुतीनुसार येथील सूर्यनारायणाच्या उपासनेने महारोग, अंधत्व, वंध्यत्व हे शरीरदोष दूर होतात.

**अरि** ( लोकसमूह )— अल्बेरुणीच्या मते मध्यदेशान्तर्गत ‘ अरिमेद ’ लोकसमूहाचे नामांतर ( अल्बेरुणी, १.३००; अरिमेद पहा ).

**अरिकमेडु-विरमपतनम्** ( व्यापारी बंदर ) -- आंध्र प्रदेशातील सुविख्यात व्यापारी बंदर. हे पाँडिचेरीपासून २ मैल दक्षिणेस असून, सातवाहन राज्यकाली ( इ. स. पू. १ ले-इ. स. २ रे शतक ) भारत आणि रोम यांच्या दरम्यानच्या सागरी व्यापाराचे हे प्रमुख केंद्रस्थान होते. तत्कालीन सातवाहन कलेवरील रोमन प्रभावहि या दळणवळणामधूनच प्रादुर्भूत झाला असावा ( अमरावती पहा ). नामांतर ( ग्रीक साहित्य )-‘ पोदुके एम्पोरियम ’.

उत्खनन--या स्थानाचे सर्वप्रथम उत्खनन फ्रेंच संशोधक जी. ड्युवेरिल यांनी इ. स. १९३७ मध्ये केले. त्यानंतर इ. स. १९४५ मध्ये सर मॉर्टिमर व्हीलर यांनी या स्थानाचे सांगोपांग उत्खनन केले.

या उत्खननामध्ये इ. स. पू. १ ल्या-२ ऱ्या शतकातील व्यापारी बोटींचे आणि माल साठविण्याच्या कोठारांचे अवशेष सापडले असून, दक्षिण भारतातील प्रागैतिहासिक उत्खननावशेषांच्या कालनिर्णयाच्या दृष्टीने ते महत्त्वाचे मानले जातात.

अवशेष—येथील अवशेषांचे भौगोलिक दृष्ट्या दोन उपविभाग असून, त्यापैकी उत्तरेकडील भागात ४५ मीटर लांबीचे गुदामाचे अवशेष सापडले. भरतीच्या पाण्याने हा प्रदेश जलमय झाल्याने गुदामाची ही जागा सोडून देण्यात आली असावी.

दक्षिण उपविभागामध्ये परदेशी पाठवावयाचे मलमलीचे कापड तयार करण्यासाठी वापरात येणारे पाण्याचे दोन मोठे हौद सापडले.

मृत्तिकापात्रे—प्राक्कालीन किरमिजी रंगाची मृत्तिकापात्रे येथे बहुसंख्येने सापडली. उत्तरकालात रक्तवर्णीय मृत्तिकापात्रांनी या किरमिजी मृत्तिकापात्रांना संपूर्णतः मागे टाकले. कालांतराने या मृत्तिकापात्रांचीहि अवनती झाली. कृष्ण आणि रक्तवर्णीय मेगॅलिथिक जातीची काही मृत्तिकापात्रेहि येथे सापडली आहेत.

कालनिर्णय--उपरोक्त अवशेषांवरून इ. स. पू. १ ल्या शतकाच्या अखेरीस या बंदराचा रोमशी सर्वप्रथम संबंध आला असावा. भूमध्यसमुद्रातील प्रदेशाच्या प्रतिनिधिभूत अशा मद्याच्या सुरया, रुंदट आकाराच्या नक्षीकामयुक्त बशा, तसेच ‘ अरेझो ’ संज्ञक अन्य अनेक मृत्तिकापात्रे येथे सापडली आहेत. ही सारी मृत्तिकापात्रे इ. स. २०-५० या काळातील असावीत.

याशिवाय ग्रीक-रोमन जातीची काही रत्ने, रोमन धर्तीचा एक दिवा आणि काही काचपात्रेहि येथे सापडली आहेत ( देशपांडे, रिव्ह्यू. पृ. ४४७-४४८ ).

**अरिष्टपुर** ( नगर )—जातकमते वायव्य भारतातील ‘ अरिष्टपुर ’ नगराचे नामांतर ( जा. ४.२५०; अरिष्टपुर पहा ).

**अरिमर्द** ( लोकसमूह )—काकतीय राजा गणपतिदेव याच्या शिलालेखमते मध्यदेशान्तर्गत ‘अरिमेद’(अरिमेढ) लोकसमूहाचे नामांतर ( हैद्राबाद. अर्कि. सिरीज, क्र. ४; अरिमेद पहा ).

**अरिमर्दनपुर** ( बृहत्भारतीय नगर )--ब्रह्मदेशान्तर्गत ताम्रद्वीप ( तांबद्वीप ) देशाच्या राजधानीचे गाव. तिबेटी-द्रविड संमिश्र वंशाच्या ब्रह्मदेशवासी भ्रम लोकांनी या राजधानीची स्थापना केली.

ब्रह्मपुत्रा नदीकाठचे आद्य रहिवासी असणाऱ्या भ्रम लोकांनी इ.स.९ व्या-१० व्या शतकात ब्रह्मदेशातील पगान येथे स्वतंत्र राज्याची स्थापना केली. अरिमर्दनपुर हे त्यांच्या प्रांतिक राजधानीचे गाव असावे ( डॉ. परमेश्वरीलाल गुप्त, प्राचीन भारत. पृ. ४७६-४७७ ).

**अरिमाण्डव्य** ( देश )—मार्कंडेयमते मध्य भारतातील एक देश ( मार्कं. ५५.६ ).

**अरिमेद** (लोकसमूह)--बृहत्संहितामते मध्य-देशान्तर्गत एक लोकसमूह (बृ. सं. १४.२). आधु. मेवाड अथवा उदेपूर प्रदेशात हे लोक रहात असावेत.

**नामांतरे**--प्राचीन साहित्यात या लोकसमूहाची निम्न-लिखित नामांतरे आढळतात :--

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. अल्बेरुणी (१.३००) | अरि आणि मेद लोकसमूह |
| २. मार्कंडेय पुराण (कूर्म. ५८.६). | वेदमंत्र |
| ३. काकतीय राजा गणपतिदेवाचा शिलालेख (हैद्राबाद अर्कि. सिरीज्. क्र. ४.) | अरिमर्द |
| ४. मध्ययुगीन शिलालेखसाहित्य (एपि. इंडि. १४.३०७) | मेद |
| ५. समरसिंह राजाचा आबू शिलालेख (इंडि. अँटि. १६.३४७) | मेदपाट |
| ६. देवपालदेव राजाचा मुंगीर ताम्रपट (एपि. इंडि १८. ३०६) | मेदांद्रक |

**नामव्युत्पत्ती**--'अरिमेद' (अरिमर्द) चा शब्दशः अर्थ 'शत्रूंचे हवन करणारा' असा होतो. त्यावरून हे कोणी रणशूर लोक दिसतात.

**पौराणिक साहित्यात**--बृहत्संहिता आणि मार्कंडेयमते हे (वेदमंत्र) लोक कूर्माच्या मध्यात (मध्य देश) निवास करीत असत (मार्कं. ५८.६).

**अल्बेरुणीच्या ग्रंथात**--या ग्रंथात अरि आणि मेद हे चुकीने दोन स्वतंत्र लोकसमूह मानले आहेत (अल्बेरुणी, इंडिया १.३००).

**शिलालेखसाहित्यात**--मेद लोक उत्तर राजपुतान्यामधील मेदपाट (आधु. मेवाड अथवा उदेपुर) देशात रहात असत (एपि. इंडि. १४.३०७). समरसिंह राजाच्या वि. सं. १३४२ मधील माऊंट आबू शिलालेखमते या देशावर बप्प राजाने स्थापिलेल्या गुहिल राज-घराण्याचे अधिराज्य होते (इंडि. अँटि. १६.३४७). बूलरच्या मते 'मेदपाट'चा शब्दशः अर्थ 'मेद (आधु. मेर) लोकांचा देश' असा असून 'मेदपाट'चेच प्राकृत रूप 'मेवाड' होय. आधुनिक काळी मेर लोक मेवाडच्या सरहद्दीवरील अरवली पर्वतात रहातात (इंडि. अँटि. ६.१९१).

**भौगोलिक स्थान**--उपरोक्त निर्देशांवरून रजपूतवंशीय मेद लोक हे बृहत्संहितेमधील अरिमेद लोकांशी संबंधित असून, ते प्राचीन कालापासून याच प्रदेशात रहात असावेत. ऋग्वेदात निर्देशिलेले पौरवकुलोत्पन्न प्रियमेढ लोकहि अरिमेदांप्रमाणेच 'मेढ' जमातीपैकीच असावेत (ऋ. १.१३९.९; ८.५.२५).

**मूळ स्थान**--मेद लोकांच्या आद्य निवासस्थानाविषयी अभ्यासकात निम्नलिखित मतांतरे आढळतात :--

**१. डॉ. जे. जे. मोदी यांच्या मते**--हे लोक इ. स. ५ व्या शतकात भारतात आलेल्या हूण लोकांचे वंशज होते (चतुर्थ ओरिएन्टल कॉन्फरन्स्, अध्यक्षीय भाषण, पृ. १०). काकतीय राजा गणपतिदेव याच्या शिलालेखात अरिमर्द, हूण आणि मगध देशांचा संयुक्त निर्देश आढळतो (हैद्राबाद अर्कि. सिरीज् क्र. ४).

**२. ग्रीक साहित्यमते**--मेदि अथवा मेद लोक हे इ. स. पू. ४०-३० मध्ये पंजाबातील हायडेस्पस् (वितस्ता) नदीकाठी निवास करीत असत. बृहत्संहितेत या लोकांचा निर्देश पंजाबातील भद्र (भद्रकार) लोकांसमवेत आढळतो. यावरून अरिमेद लोकहि पंजाबातच कोठेतरी रहात असावेत.

इ. स. ८ व्या शतकातील कुमाऊँ ताम्रपटातहि मेद लोक पंजाबात रहात असल्याचा निर्देश आढळतो (अट्किन्सन, हिमालय इतिहास. ३.४३).

**३. मुसलमानी ग्रंथांच्या मते**--मेद लोक इ. स. ७ व्या शतकात जाट लोकांसमवेत एका ब्राह्मण राजघराण्याच्या छत्राखाली सिंधमध्ये रहात असत (ग्लॉसरी. २.२६२).

**४. अन्य अभ्यासकांच्या मते**-महाभारतात निर्देशिलेले 'बोध' लोक ते हेच असावेत (बोध पहा).

या सर्व निर्देशांवरून मेवाडमधील रजपूत लोक बरेच प्रदेश हिंडत अखेरीस राजपुतान्यात स्थायिक झाले असे दिसते.

**अरिय** (देश)--ग्रीक साहित्यमते भारताच्या वायव्य सरहद्दीपलीकडील एक देश. या देशाची राजधानी अलेक्झांड्रिया (आधु. हेरात) गावी असून, आधु. हेरातच्या परिसरातील छोटा प्रांत म्हणजे हा देश असावा.

**डॅरियसच्या शिलालेखात**--पर्शियन सम्राट डॅरियसच्या इ. स. पू. ४७९ च्या शिलालेखमते त्याच्या साम्राज्याच्या

विभाग्या उपविभागात अरिय, अरकोसिय (आधु. वायव्य कंदाहार), गंदरिय (आधु. वायव्य पंजाब) हे देश होते.

सिकंदरच्या साम्राज्यात समावेश--इ. स. पू. ४ थ्या शतकात या देशाचा समावेश सिकंदरच्या साम्राज्यात होत असून, त्याचा उत्तराधिकारी सेल्युकस निकेटर याने 'अरियान' या सामूहिक नावाने ओळखले जाणारे वायव्य भारतातील 'अरिय', 'परोपनिसदै' (काबुल), 'अरकोसिय' (कंदाहार) आणि गेद्रोसिय (मक्रान) हे देश चंद्रगुप्त मौर्यास तोडून दिले होते.

ग्रीक साहित्यमते 'अनौओइ' देश या देशाचा उपविभाग होता (स्मिथ, झेड्. डी. एम्. जी. इ. स. १९०६, पृ. ५७).

टॉलेमीच्या ग्रंथात—या ग्रंथाच्या मते 'अरिय' देश अरियान देशाचा उपविभाग असून, त्याची लांबीरुंदी २००×३०० स्टेडिया होती. त्याआधारे हा देश आधु. मेरुदपासून हेरात गावापर्यंत पसरला असावा.

भौगोलिक सीमारेषा--टॉलेमीच्या मते या देशाच्या भौगोलिक सीमारेषा खालीलप्रमाणे होत्या :- १. उत्तरेस-ह्यर्कनिय, मर्गियन, बॅक्ट्रिया आदि देश; २. दक्षिणेस-द्रंगियाना देश.

या देशातील पर्वत, दऱ्या, हवामान आणि पीकपाणी मर्गियन देशाप्रमाणेच असून, येथे द्राक्षाचे मळे होते.

या देशातील ३५ ग्रामांची नामावली टॉलेमीने दिली असून, विल्सन याच्या मते यापैकी बहुतांशी सारी ग्रामे मेरुद-हेरात रस्त्यावर विखुरली असावीत.

राजधानी--अरियनच्या काळी या देशाची राजधानी अर्तकोअन् (आधु. अर्तकन) गावी असून, उत्तरकालात ती अलेक्झांड्रिया गावी हलविण्यात आली (मॅक्रिंडल, इंडि. अँटि. १३.४०६-४०७).

**अरियके** (देश)--टॉलेमीच्या मते पश्चिम भारतातील 'अपरांत' देशाचे नामांतर (इंडि. अँटि. ७.२५९; अपरांत ३. पहा).

**अरियकेसदिनोन्** (देश)—स्ट्रॅबोच्या मते 'महाराष्ट्र' देशाचे नामांतर (महाराष्ट्र पहा).

**अरियन** (देश)—स्ट्रॅबोच्या मते मध्य आशियातील 'आर्य' (आर्यांची आद्य वसाहत) देशाचे नामांतर (आर्यावर्त पहा).

**अरियान** (देशसमूह)--ग्रीक साहित्यमते वायव्य भारतातील एक देशसमूह. आधु. अफगाणिस्तान, पेशावर, पश्चिम पंजाब प्रदेशांचा समावेश या देशामध्ये होत असे.

सिकंदरचा ग्रीक सेनानी सेल्युकस निकेटर आणि चंद्रगुप्त मौर्य यांच्यामधील इ. स. पू. ३०३ च्या तहनाम्यात या देशसमूहात निम्नलिखित देशांचा अंतर्भाव आढळतो:-- १. अरिय (हेरात); २. परोपनिसदै (काबुल); ३. अरकोसिय (कंदाहार); ४. गेद्रोसिय (मक्रान) (स्मिथ, पृ. १५८).

नामव्युत्पत्ती—'अरियान'चा शब्दशः अर्थ 'आर्य (सुसंस्कृत) लोकांचा देश' असा होतो. टॉलेमीच्या मते या देशातील 'अरैयस्' नदीच्या नावावरून त्यास हे नाव पडले होते.

भौगोलिक परिसीमा—टॉलेमीच्या मते या देशाच्या भौगोलिक परिसीमा खालीलप्रमाणे होत्या:-१. उत्तरेस-मर्गियन, बॅक्ट्रियन देश; २. पश्चिमेस-पार्थिया देश आणि कर्मेनियन वाळवंट; ३. दक्षिणेस-द्रंगियाना देश; ४. पूर्वेस-परोपनिसदै देश.

नगरे—टॉलेमीने निर्देशिलेली या देशातील बहुतांशी नगरे आज ओळखू येत नाहीत (मॅक्रिंडल, इंडि. अँटि. १३.४०६-४०७).

स्थापत्यावशेष—वायव्य भारतातील गंधार स्थापत्यशैलीचे बहुतांशी सारे स्थापत्यावशेष आणि १०० हून अधिक बौद्ध स्तूप या देशात सापडले असून, त्यास 'अरियान स्तूप' असे सामूहिक नाव विल्सन यांनी प्रारंभी दिले. परंतु हे स्तूप 'गंधार'मध्ये (अरियान देशाचा पूर्वभाग) असल्याने 'गंधार स्तूप' या नावानेच ते अधिक सुविख्यात आहेत (गंधार पहा).

या देशाच्या पश्चिम भागातील बॅक्ट्रिया (बल्ख), खोतान आणि अमूदरिया खोरे या प्रदेशातहि इ. स. ५ व्या-७ व्या शतकात बौद्ध धर्माचे बरेच प्राबल्य असल्याचे ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनावरून दिसत. यापैकी खोतान देशातील प्राचीन बौद्ध वास्तूंचे उत्खनन डॉ. स्वेन हेडन आणि डॉ. ऑरेल स्टाइन यांनी केले आहे (फर्ग्युसन, १.८५; गंधार पहा).

**अरिष्ट** (कुंड)--वृंदावन येथील पवित्र जलकुंड (नारद. २.८०.६७).

**अरिष्टपथक** (देशविभाग)—चालुक्य राजा भीम (द्वितीय) याच्या इ. स. १२०९ च्या शिलालेखमते उत्तर गुजरात देशान्तर्गत एक देशविभाग (इंडि. अँटि ६.२०२).

**अरिष्टपुर** (नगर)—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते वायव्य भारतान्तर्गत शिबि (आधु. स्वात नदीचे खोरे) देशाच्या राजधानीचे गाव (पा. सू. ६.२.१००). शिबि

लोकांची मुख्य वसाहत पंजाबातील शोरकोट विभागात असली तरी जातकमते अरिष्टपुर हे गाव मात्र स्वात नदीच्या खोऱ्यात होते ( जा. ५.१०७; ६.२१५ ). त्यावरून त्या प्रदेशात ( प्राचीन उद्यानदेश ) शिबि लोकांची अन्य एक वसाहत असावी.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—१. अरिष्टपुर ( जा. ४.२५० ); २. अरिस्तोबोथ्र ( टॉलेमी ).

**बौद्ध जातकात**—या ग्रंथाच्या मते या देशात राजप्रतिनिधी म्हणून काम करणारा एक शिबिदेशीय राजकुमार आपल्या पित्याच्या मृत्यूनंतर या नगराचा आणि सभोवतालच्या शिबि देशाचा राजा झाला. या धर्मप्रवण राजाने या नगराच्या चार द्वारांनजीक चार आणि आपल्या राजवाड्याच्या प्रवेशद्वारानजीक दोन अशी एकूण सहा दानगृहे बांधली. प्रतिदिनी सहा लाख रौप्यमुद्रिकांचा दानधर्म तो करीत असे ( लॉ, जिऑग्रफी. पृ. ६६ ).

**अरिष्टा** ( देवीस्थान )—श्रीमालक्षेत्रान्तर्गत एक देवीस्थान ( श्रीमालमाहात्म्य ).

**अरिष्टोत्सादन** ( ग्राम )—राजतरंगिणीमते कश्मीरातील एक ग्राम. कश्मीरच्या बलादित्य राजाच्या बिंबा राणीने येथे बिंबेश्वर नामक शिवमंदिर बांधले होते ( राज. ३.४८२ ).

माक्षाश्रम ( आधु. मांचहौम ) परगण्यातील आधु. रतसुन् (अक्षांश ७४°–३८′ उत्तर; रेखांश ३४°–४′ पूर्व) गाव ते हेच होय. मात्र बिंबेश्वर मंदिराचे अवशेष आज तेथे सापडत नाहीत ( स्टाइन, राज. २.४७७ ).

**अरिस्तोबोथ्र** ( नगर )—टॉलेमीच्या मते वायव्य भारतातील ' अरिष्टपुर ' नगराचे नामांतर (अरिष्टपुर पहा).

**अरुङ्गनगरम्** ( ग्राम )—गंगाधिपती अत्तिमल्लर राजाच्या इ. स. ९४९ मधील शिलालेखमते दक्षिण भारतातील एक ग्राम. आधु. अर्काट तालुक्यामधील या गावी कल्लिनंगै नामक कन्येच्या स्मृत्यर्थ या राजाने एक जलकुंड बांधले होते ( एपि. इंडि. ७.१९५ ).

**अरुण** ( पर्वत )—' अरुणाचल ' नावाने सुविख्यात असणारे मद्रास राज्यातील शिवतेजोलिंगस्थान. उत्तर अर्काट जिल्ह्यातील विल्लुपुरम्–धर्मवरम् रेल्वेमार्गावरील तिरुवण्णामलै ( अक्षांश १२°–१४′ उत्तर; रेखांश ७९°–४′ ) हे तालुक्याचे गाव ते हेच होय. विल्लुपुरम्‌पासून ४२ मैल अंतरावर कंपा नदीच्या काठी हे असून, येथील अष्टकोनी आकाराची टेकडी शिवाच्या पाच भौतिक लिंगांपैकी एक मानतात.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या शिवस्थानाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. स्कंद पुराण ( माहेश्वर. पूर्व. १–१३ ) | अरुणाचल |
| २. अन्य पौराणिक साहित्य | शोणाचल (रक्तपर्वत) |
| ३. ,, ,, ,, | गौतम–आश्रम |
| ४. मध्ययुगीन शिलालेख साहित्य | तिरुवण्णामलै |
| ५. अन्य शिलालेखसाहित्य | अरुणगिरि |

**नामव्युत्पत्ती**—या टेकडीच्या ' अरुणाचल ' आणि ' तिरुवण्णामलै ' या संस्कृत आणि तामीळभाषीय नावांचा शब्दशः अर्थ ' पवित्र अग्निशिखायुक्त टेकडी ' असा होतो. येथील शिवाच्या तेजोलिंगामुळे तीस हे नाव मिळाले असावे.

**पौराणिक साहित्यात**—महेंद्र पर्वताचा (आधु. पूर्वघाट) ' क्षुद्रपर्वत ' असणाऱ्या या टेकडीचे माहात्म्य स्कंद पुराण माहेश्वर खंडान्तर्गत ' अरुणाचल माहात्म्या 'त निम्नलिखित पद्धतीने वर्णिले आहे :—१. अरुणाचलमाहात्म्य ( पू. ५ ); २. तीर्थनामावली ( पू. ७ ); ३. प्रदक्षिणामाहात्म्य ( पू. ९ ); ४. शिवक्षेत्रनामावली ( उ. २ ); ५. अरुणाचलमाहात्म्य ( उ. ३–४ ) ( स्कन्द. माहेश्वर. ३.५९–६१ ).

**स्थान**—स्कंदमते शिवाचे महाक्षेत्र आणि गौतमस्थान अशी ही टेकडी दक्षिण भारतान्तर्गत द्रविड देशात असून तिचा आकार अष्टकोनी आणि व्याप्ती तीन योजने आहे.

**रूपे**—स्कंदमते भिन्न युगांमध्ये या टेकडीने धारण केलेली विभिन्न रूपे खालीलप्रमाणे होत :—१. कृतयुग–अग्निशिखायुक्त टेकडी; २. त्रेतायुग–रत्नजडित टेकडी; ३. द्वापारयुग–सुवर्णमय टेकडी; ४. कलियुग–मर्कटाकृती टेकडी.

ज्वालामुखीच्या लाव्हारसापासून बनलेल्या या टेकडीच्या बदलत्या रंगाचे रूपकात्मक वर्णन उपरोक्त आख्यायिके-

मध्ये केले असून, आजहि ही टेकडी ताम्रसदृश लालसर रंगाची दिसते. म्हणूनच 'शोणाचल' (रक्तवर्णीय पर्वत) हे तिचे नाव सार्थ वाटते.

आख्यायिका—येथील तेजोलिंगस्थानाच्या निर्मिती-विषयी स्कंद पुराणात निम्नलिखित आख्यायिका दिल्या आहेत :—

१. विष्णु आणि ब्रह्मा यांचे दरम्यानच्या श्रेष्ठते-विषयीच्या वादात मध्यस्थी करण्यासाठी शिव अग्नि-शिखेच्या रूपाने प्रगट झाला. ही अग्निशिखा ओलांडून जाण्यासाठी वराह आणि हंस ही रूपे धारण करून विष्णु आणि ब्रह्मा यांनी या शिखेचे खालचे-वरचे टोक शोधण्याचा अयशस्वी प्रयत्न केला. अखेरीस शिव हा अनादि अनंत आहे हे जाणून शरणागत विष्णु-ब्रह्मांनी शिवास 'स्थवर' (स्थिर) लिंगरूप धारण करण्याची प्रार्थना केली. हेच लिंग 'अरुणाचल' नावाने सुविख्यात झाले.

२. शिव-पार्वती यांच्या क्रीडासमयी पार्वतीने शिवाचे सूर्य, चंद्र आणि अग्निरूपी तीन नेत्र झाकल्याने साऱ्या सृष्टी-मध्ये हाहाकार माजला. या पापाच्या प्रायश्चित्तार्थ पार्वतीने प्रथम कांचीनजीकच्या एकाम्रक्षेत्रामध्ये आणि नंतर अरुणाचल टेकडीवरील गौतम ऋषींच्या आश्रमी आगम-शास्त्रीय पद्धतीने तपस्या केली. या तपस्येने प्रसन्न होऊन शिवाने अग्निशिखेच्या रूपाने तीस कार्तिकी पौर्णिमेस दर्शन दिले.

या विशिष्ट दिवशी या टेकडीवर एका पात्रात प्रचंड प्रमाणात कापूर पेटवतात. त्यामधून उत्पन्न होणाऱ्या आकाशगामी ज्वालेला शिवाचे अग्नितत्त्वालिंग मानून त्याचे दर्शनपूजन करतात. या शिवस्वरूपी टेकडीला लोक प्रदक्षिणा घालून तीवर दीप लावतात.

**गौतम ऋषींचा आश्रम**—स्कंदमते या टेकडीच्या माथ्यावर गौतम ऋषींचा आश्रम होता (स्कन्द.अरुणाचल. ४).

**शिलालेखसाहित्यात**—या साहित्यमते होयसळ राजा बल्लाळ (तृतीय) याची दोरसमुद्र नामक राजधानी इ. स. १३२७ मध्ये महंमद तुघ्लकाने जिंकल्यानंतर त्याने आपली राजधानी तिरुवण्णामलै येथे हलवली (एपि. कर्ना. ९.१४; १८.३१).

विजयनगरच्या कृष्णदेवराव राजाचा इ. स. १५१६ मधील एक शिलालेखहि येथे आढळतो (रंगाचारी, १. उत्तर अर्काट. ५.३०).

मंदिर—स्कंदमते या टेकडीच्या पायथ्यानजीकच्या शिव-मंदिराची आद्य स्थापना ब्रह्मा आणि विष्णु यांनी केली (स्कन्द. अरुणाचल. १६). या मंदिराचे अकरा मजली गोपुर विजयनगरचा राजा कृष्णदेवराय आणि तंजौरचा राजा अच्युताप्प नायर यांनी इ. स. १५६०-१५८२ मध्ये बांधले (मद्रास एपि. रिपोर्ट, इ. स. १९०४, पृ. ५७).

तीर्थस्थाने—अरुणाचल माहात्म्यमते या पर्वतावरील प्रमुख तीर्थस्थाने पुढीलप्रमाणे होत :—

१. दिशातीर्थे—या टेकडीच्या विभिन्न दिशांकडील पर्वतावर या तेजोलिंगाच्या निम्नलिखित उपासकदेवतांची दिशातीर्थे आहेत :—

| दिशा | पर्वत | देवता |
|---|---|---|
| १. पूर्वेस | भास्कर पर्वत | इंद्र |
| २. पश्चिमेस | दंडाचल | वरुण |
| ३. दक्षिणेस | अरुणाचल | यम |
| ४. उत्तरेस | त्रिशूलाचल | सिद्ध आणि विष्णु |

२. खड्गतीर्थ—शिवभक्त महिषासुराचा पार्वतीने या पर्वतावर खड्गाने वध केला. तदनंतर गौतम ऋषींच्या सूचनेवरून तिने हे खड्ग या तीर्थामध्ये पुरून महिषा-सुराच्या मस्तकी असणाऱ्या शिवलिंगाची तेथे स्थापना केली (स्कन्द. माहेश्वर. १.७). या पापनाशन लिंगाची आजहि पूजा करतात.

**३-४. प्रवालाचलेश्वर आणि महिषासुरमर्दिनी**—ही तीर्थे मंत्रसिद्धिकारक मानतात.

**रमण महर्षींचा आश्रम**—टेकडीच्या पायथ्यानजीकच्या रमण महर्षींच्या आधुनिककालीन आश्रमामुळे या पौराणिक स्थानाचे महत्त्व वाढले आहे.

२. (पर्वत) पौराणिक साहित्यमते जंबुद्वीपान्तर्गत कैलास पर्वताचा उपपर्वत (ब्रह्माण्ड. १८.१८; वायु. ४७. १७). आधु. कैलास पर्वताचा पश्चिम भाग म्हणजे हा पर्वत असावा (पार्गि. मार्के. पृ. ३५१).

वायुमते शैलोदका (हिमालयाच्या उत्तरेकडील उत्तर कुरु देशातून वाहणारी आधु. शैलोदा नदी) नदी या पर्वतातून उगम पावत असे (वायु. ४७.१७).

३. (पर्वत) ह्युएन्त्संगच्या मते मध्य आशियान्तर्गत कपिश (आधु. काफिरिस्तान) देशातील एक पर्वत. हा (अ–लु–नो) पर्वत कपिश राजधानीच्या ६ मैल दक्षिणेस होता. बील यांच्या मते आधु. चेहल दुख्तरन् पर्वतशिखर ते हेच असावे.

उंची--ह्युएन्त्संगच्या मते या पर्वताची उंची दरवर्षी वर्षारंभदिनी शेकडो फुटांनी वाढत जाऊन तो त्सौकुट (आधु. कंदाहार) देशातील त्सुनगिर (शुनःशिल) पर्वताच्या रोखाने पाहू लागे आणि कालांतराने त्याची उंची कमी होऊन तो पूर्वस्थितीस येई.

आख्यायिका-- उपरोक्त भौगोलिक चमत्काराच्या स्पष्टीकरणार्थ निम्नलिखित आख्यायिका ह्युएन्त्संगने दिली आहेः–त्सौकुट देशातील शुनःशिल पर्वतावरील शुन ही कृषिदेवता अरुण पर्वतावर निवास करण्यासाठी आली असता याने तीस हाकलून दिले. तेव्हा क्रुद्ध होऊन तिने या पर्वतास शाप दिला, 'दरवर्षी नववर्षारंभी त्सौकुट पर्वतावर ज्यावेळी लोक माझी पूजा करतील, त्यावेळी तू शरमेने मान खाली घालशील.'

वॉटर्स यांच्या मते कपिश (आधु. काफिरिस्तान) आणि त्सौकुट (आधु. सेविस्तान) या दोन देशातील देवतोपासनेच्या झगड्याचा रूपकात्मक निर्देश उपरोक्त आख्यायिकेमध्ये अभिप्रेत असावा (वॉटर्स, १.१२६).

**अरुणगिरि** (तीर्थ)—शिलालेखसाहित्यमते दक्षिण भारतातील 'अरुण' पर्वताचे नामांतर (एपि. इंडि. ३.२४०; अरुण १. पहा).

**अरुणा** (नदी)— महाभारतमते कुरुक्षेत्रान्तर्गत सरस्वती नदीची एक उपनदी (म. श. ४२.२४). पृथूदक (आधु. पेहोवा) गावानजीक सरस्वती आणि दृषद्वती यांच्या दरम्यान ही वहात असे (म. श. ४३.३०–३५). कनिंगहॅम यांच्या मते उत्तर प्रदेशातील आधु. मार्कंड नदी ती हीच होय (आर्कि. सर्व्हे. १४.१०२).

**अरुणा-सरस्वती संगम**--महाभारत आणि पौराणिक साहित्यमते हा संगम कुरुक्षेत्रातील एक पवित्र तीर्थस्थान होता (म. आर. ८१.१३१-१३२; पद्म. सृ. २७.३९; वामन. ४०.४३–४४). हे संगमस्थान आधु. पेहोवा गावापासून ३ मैल ईशान्येस आहे. नामांतर–'अरुणासंगम' (नारद. २.६५.१०९).

महाभारतमते राक्षसांचे ब्रह्महत्त्येचे आणि इंद्राचे नमुचिवधाचे पातक धुवून काढण्यासाठी अरुणा आणि सरस्वती यांचा हा पवित्र संगम झाला असून, स्कंदाचा देवसेनापत्यभिषेक येथेच झाला होता (म. श. ४२.२७–४१).

२. महाभारतमते कौशिकी (आधु. कोशि) नदीची एक शाखानदी (म. आर. ८४.१५६; पद्म. स्व. १९; कौशिकी पहा). नेपाळमधील 'सप्तकोशि' नदीसमूहापैकी आधु. अरुणा नदी ती हीच होय.

३. गौतमी (गोदावरी) नदीची एक उपनदी (ब्रह्म. ८९.१; पद्म. उ. १७६.५९).

**अरुणा–वरुणा संगम**--ब्रह्ममते गोदावरी नदीच्या या दोन उपनद्यांचा गौतमी नदीनजीकचा हा संगम पवित्र तीर्थस्थान होता (ब्रह्म. ८९.४५). पद्ममते या संगमस्थानी गोदावरी नदी गुप्त रूपाने उपस्थित होती. (पद्म. उ. १७६.५९).

४. प्लक्षद्वीपान्तर्गत एक नदी (भा. ५.२०.४).

**अरुणाचल** (पर्वत)--स्कंदमते दक्षिण भारतातील 'अरुण' पर्वताचे नामांतर (स्कन्द. माहेश्वर. १–१३; अरुण पर्वत १. पहा).

**अरुणादित्य** (आदित्यस्थान)—काशी येथील द्वादश आदित्यस्थानांपैकी एक (स्कन्द. काशी. ५१).

**अरुणावती** (नदी)--जंबुद्वीपान्तर्गत भद्राश्ववर्षातील एक नदी (वायु. ४६.२९).

**अरुणा–वरुणा संगम** (तीर्थ)— एक तीर्थस्थान. हे महाराष्ट्रात अरुणा आणि वरुणा नद्यांच्या संगमस्थानी होते (ब्रह्म. ८९.४५; अरुणा ३. पहा).

**अरुणा–सरस्वती संगम** (तीर्थ)--एक तीर्थस्थान. हे कुरुक्षेत्रात सरस्वती आणि अरुणा नद्यांच्या संगमस्थानी होते (म. आर. ८१.१३१–१३२; अरुणा १. पहा). नामांतर– 'अरुणासंगम' (नारद. २.६५.१०९).

**अरुणीश्वर** (लिंग)—काशी येथील एक शिवलिंगस्थान. अरुणीने स्थापलेले हे लिंग ज्येष्ठेश्वरानजीक होते (स्कन्द. काशी. ६५.१०; लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. ६०).

**अरुणेश्वर** (लिंग) —अवंती येथील ८४ शिवलिंगांपैकी एक (स्कन्द. आवन्त्य. २.७६).

**अरुणोद** (सरोवर)--जंबुद्वीपान्तर्गत मेरु पर्वताच्या पूर्व भागातील एक सरोवर (ब्रह्म. १८.३१; मत्स्य. ११३.४६; लिङ्ग. ४९.३८; वायु. ३६.१६; विष्णु. २.२.२४). पौराणिक साहित्यमते मेरुपर्वतोद्भव चतुर्गंगांपैकी पूर्ववाहिनी सीता नदीच्या मार्गावर हे होते (मार्कं. ५३.६; वायु. ४२.१५).

लिंगमते या पवित्र सरोवराच्या काठी 'कार्तिकेयक्षेत्र' नामक तीर्थस्थान होते ( लिङ्ग. ४९.४० ). पाठभेद– 'वरुणोद'.

२. अलकनंदा नदीद्वारा सिंचित एक देश. डे यांच्या मते आधु. गढवाल प्रदेश तो हाच असून, याची प्राचीन राजधानी श्रीनगर गावी होती ( डे, पृ. ११ ).

**अरुणोदा** ( नदी )--जंबुद्वीपान्तर्गत इलावृत वर्षातील मंदरगिरोद्भव एक नदी ( भा. ५.१६.१७ ).

**अरुन्धतीवट** ( पवित्र वटवृक्ष )--महाभारतान्तर्गत पुलस्त्ययात्रेत निर्देशिलेले वाराणसी येथील तीर्थस्थान ( पद्म. सृ. ३२.६; स्कन्द. काशी. ६१.१६८–१६९ ).

महाभारतमते येथे आणि नजीकच्या 'सामुद्रक तीर्थ' मध्ये तीन रात्री उपास आणि स्नान केले असता गोसहस्त्रदानाचे आणि अश्वमेध यज्ञाचे पुण्य मिळत असे ( म. आर. ४१२.७; ८२.३७ ).

**अरुबूर** ( ग्राम ) -- शिलालेखसाहित्यमते दक्षिण भारतातील एक ग्राम. वेलूरनजीकचे आधु. अरियूर गाव ते हेच होय ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. १.७१ ).

**अरुमडल** ( ग्राम )—शिलालेखसाहित्यमते दक्षिण भारतातील एक ग्राम. पांड्यकुलाशनिवलनाडु प्रदेशान्तर्गत किरैंगिलिनाडु उपविभागामधील हे ग्राम आधुनिक काळीहि 'अरुमडल' याच नावाने प्रसिद्ध आहे ( साउथ इंडि. इन्स्क्रि. २.४७९ ).

**अरुम्बाक्कम्** ( ग्राम )—इ. स. ९५४ च्या तिरुनमल्लूर शिलालेखात निर्देशिलेले दक्षिण भारतातील एक ग्राम. दक्षिण अर्काट जिल्ह्यातील तिरुक्कोवलूर गावापासून २ मैल दक्षिणेकडील आधु. तिरुनमल्लूर गाव ते हेच होय ( एपि. इंडि. ७.१३३; १३७ ).

**अरुप** ( देश )--मत्स्यमते मध्य भारतातील 'अनूप' देशाचे नामांतर ( मत्स्य. ११४.५४; अनूप १. पहा ).

**अरेम्बौर** ( ग्राम )--टॉलेमीच्या मते दक्षिण भारतातील ( अक्षांश १६°–२०′ उत्तर; रेखांश १२१° पूर्व ) एक गाव. लॅसेन यांच्या मते आधु. ऊरुपुरम् गाव ते हेच असावे. परंतु मॅक्रिंडल त्याच्याशी सहमत नाहीत.

**अरैशूर** ( नगर ) — शिलालेखसाहित्यमते दक्षिण भारतातील दक्षिण पेन्नार नदीकाठचे एक नगर. तिनेवेल्लि जिल्ह्यातील आधु. अंबासमुद्रम् गाव ते हेच असावे. नामांतर ( चिदंबरमंदिरलेख )–'अरशूर'; ( अन्य शिलालेखसाहित्य )–'इळंगोयकुड्डि' ( इळंगोयकुड्डि पहा ).

पांड्य राजा वरगुण ( द्वितीय ) याच्या इ. स. १०१४ मधील शिलालेखात या नगराचा निर्देश आढळतो ( एपि. इंडि. ९.८४६;साऊथ इंडि. इन्स्क्रि. २.४१ ).

**अरौर्नोई**--टॉलेमीच्या मते दक्षिण भारतातील एक देश. 'मैसोलोस्' नदीच्या दक्षिणेस 'त्यन' नदीच्या खोऱ्यात हा देश असून पोदुके आणि मेलंगे ही दोन व्यापारी बाजारपेठांची गावे त्यामध्ये होती. मॅक्रिंडल यांच्या मते आधु. पेन्नार अथवा कृष्णा नदीचे खोरे म्हणजे हा देश होय.

नद्या--या देशातील नद्यांविषयी अभ्यासकात निम्नलिखित मतांतरे आढळतात:--

१. यूल यांच्या मते—त्यन आणि मैसोलोस् म्हणजे आधु. पेन्नार आणि कृष्णा नद्या असाव्यात.

२. लॅसेन यांच्या मते—आधु. कृष्णा आणि गोदावरी नद्यांचा निर्देश येथे अभिप्रेत असावा.

**अर्क** ( कुंड )--काशी येथील 'बर्करीकुंड' तीर्थाचे नामांतर ( स्कन्द. काशी. ४७.१; ५६; बर्करीकुंड पहा ).

**अर्कक्षेत्र** ( तीर्थ )—ऐन्–इ–अकबरीमते ओरिसामधील 'कोणार्क'चे नामांतर ( ऐ. अ. २.१६; कोणार्क पहा ).

**अर्कवन** ( नगर )--शुलिक राजघराण्याच्या इ. स. १० व्या शतकातील मासेर शिलालेखमते मध्यप्रदेशान्तर्गत भिलसा जिल्ह्यातील एक नगर. याचे भौगोलिक स्थान समजत नाही ( एपि. इंडि. २९.२०; २६–२८ ).

**अर्कस्थल** ( कुंड )--मथुरा येथील पवित्र जलकुंड ( वराह. १५७.११; १६०.२० ).

२. ( तीर्थ ) प्रभासक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( स्कन्द. प्रभास. १.१३; १७; १७५; नारद. २.७०.६ ).

**अर्गाविषय** ( देशविभाग )—भोजवंशीय कपालिवर्मन् राजाच्या इ. स. ६ व्या शतकातील शिलालेखमते दक्षिण भारतातील एक देशविभाग. कारवारच्या दक्षिणेस ४ मैल अंतरावरील अर्गा येथील देवालयात हा शिलालेख आढळतो. यावरून या गावाच्या परिसरातील प्रदेश म्हणजेच हा देश असावा ( एपि. इंडि. ३१. २३२ ).

**अर्घन्** ( देश )—संस्कृत साहित्यमते मध्य आशियातील 'चकुक' ( आधु. यारकंद ) देशाचे नामांतर ( जे. ए. एस्. बी. ५४.१९३; वॉटर्स, २.२९४; चकुक पहा ).

**अर्घ्यतीर्थ** ( तीर्थ )--गरुडमते एक तीर्थस्थान ( गरुड. १.८१.७ ).

**अर्घ्येश्वर** ( लिंग )—प्रभासक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंग-स्थान ( स्कन्द. प्रभास. १.६६ ).

**अर्जुनकोणसरण** ( ग्राम )--कलचुरि राजा जाजल्लदेव ( प्रथम ) याच्या इ. स. ११२४ मधील रतनपुर शिलालेखमते मध्य प्रदेशातील एक गाव.

बिलासपुर जिल्ह्यातील जांजगिरपासून १४ मैल पश्चिमेकडील आधु. अर्जुनी गाव ते हेच असावे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.४११ ).

**अर्जुनगिरि** ( पर्वत )—विंध्य पर्वताचे बिहार प्रांतातील एक पवित्र पर्वतशिखर. हे उत्तर प्रदेशान्तर्गत आरा जिल्ह्यातील शोणभद्र गावापासून ३/४ मैल अंतरावर आहे ( ती. १५८ ).

**अर्जुनग्राम** ( देशविभाग )--राष्ट्रकूट राजा नन्न याच्या इ. स. ६९३ मधील संगलूद ताम्रपटमते मध्य प्रदेशान्तर्गत एक देशविभाग. आधु. अकोला जिल्ह्याच्या परिसरात कोठेतरी हा असावा ( एपि. इंडि. २९.१११ ).

**अर्जुन-परिभ्रमणस्थले** ( स्थलसमूह ) --अर्जुन-जीवनाशी संबंधित निम्नलिखित स्थलांचा निर्देश महाभारतात आढळतो :—

**१. प्रथम वनवास**---द्रौपदी व युधिष्ठिर यांच्या एकांतभंगाच्या पापक्षालनार्थ अर्जुन बारा वर्षेपर्यंत वनवासास गेला. या काळातील त्याचा प्रवासमार्ग खालीलप्रमाणे होता :-- इंद्रप्रस्थ→ गंगाद्वार ( उलूपीविवाह )→ हिमवत्पार्श्व→ अगस्त्यवट→ वसिष्ठ पर्वत→ भृगुतुंग→ हिरण्यबिंदु तीर्थ→ ( पूर्व दिशेस ) उत्पलिनी नदी→ नैमिषारण्य→ नंदा→ अपरनंदा→ कौशिकी→ महानदी →गया→ गंगा→ अंग→ वंग→ कलिंग→ ( समुद्र-तीराने दक्षिण दिशेस ) अगस्त्यतीर्थ→ सौभद्र→पौलोम→ सुपावन→ कारंधम→ भारद्वाजतीर्थ→ नारीतीर्थ ( पंचाप्सरस् तीर्थ ) → मणुलूरपुर→ ( पश्चिमेस ) गोकर्ण→ अपरांत तीर्थ→ प्रभास→रैवतक पर्वत→द्वारका ( सुभद्राविवाह )→इंद्रप्रस्थ ( म. आ. २०५-२१३ ).

**२. द्वितीय वनवास**--पांडवांच्या वनवासकाळी अर्जुनाचा हिमालयभागातील वनवासमार्ग खालीलप्रमाणे होता :-- हिमवत्पृष्ठ→ इंद्रकील→ बदरी→ मंदर पर्वत → अमरावती →सुरवीथी → नरनारायणाश्रम → शक्रलोक (स्वर्ग) (म. आर. ३९.१६-२६; ४४.१२; ४९.१९;४९).

**३. पाशुपतास्त्र-प्राप्तिस्थान**--स्थानिक समजुतीनुसार दक्षिण भारतातील चिदंबरम्‌नजीकच्या 'तिरुवेट्कलम्' येथे अर्जुनाला पाशुपतास्त्राची प्राप्ती झाली.

**४. अश्वरक्षणयात्रा** -- युधिष्ठिराच्या अश्वमेधीय अश्वाच्या रक्षणासाठी अर्जुनाने खालील मार्गाने प्रवास केला:--त्रिगर्त→ प्राग्ज्योतिष→सैंधव→मणिपूरेश्वर→ राजगृह→ मागध→ गांधार→ चेदी ( राजधानी-'शुक्तीसा' )→ काशी→ आंध्र→ कोसल→ किरात→ तंगण→ दशार्ण→ निषादराजविषय→ दक्षिण सलिलार्णव→ द्रविड→ अंध्र→ माहि→ कोल्लगिरेय→ सुराष्ट्र→ गोकर्ण→ द्वारवती→ समुद्र पश्चिमदेश→ गांधार ( म. आश्व. ७३-८५ ).

**५. द्वारका-इंद्रप्रस्थ प्रयाणमार्ग**--श्रीकृष्णनिर्याणानंतर यादव स्त्रीपरिवारासह अर्जुन खालील मार्गाने द्वारकेहून इंद्रप्रस्थास गेला :-- द्वारका→ पंचनद→ आभीर→ कुरुक्षेत्र ( म. मौ. ८ ).

**अर्जुनतीर्थ** ( तीर्थ )--मत्स्यमते एक तीर्थस्थान ( मत्स्य. २२.४३ ).

२. ( तीर्थ ) द्वारका येथील एक तीर्थस्थान ( स्कन्द प्रभास. ४.१६.३९ ).

३. ( तीर्थ ) वेंकटाचलक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( स्कन्द. वेङ्कटाचल. २९ ).

**अर्जुनी** ( नदी )--संस्कृत व्याकरण आणि शब्दकोश-साहित्यमते उत्तर भारतातील 'बाहुदा' ( आधु. धुमेला ) नदीचे नामांतर ( उणादि. ४७.६; औणादिक. १३७. १६३; अभिधान. १०८.१९८६; शब्दरत्न. १९०.१२; बाहुदा पहा ).

**अर्जुनीया** ( नदी ) -- देवलस्मृतिमते एक नदी ( तीर्थकल्प पृ. २४९ ). डे यांच्या मते हे संभवतः 'बाहुदा' नदीचेच नामांतर असावे. परंतु देवलस्मृतीमध्ये बाहुदा आणि अर्जुनीया यांचा स्वतंत्र निर्देश आढळतो ( बाहुदा पहा ).

**अर्जुनेश्वर** ( लिंग )--तापी नदीकाठचे शिवलिंगस्थान ( तापीमाहात्म्य ).

**अर्णव** ( तीर्थ )-- भागवतमते ईशान्य भारतातील समुद्रकिनारीचे एक तीर्थस्थान. बलरामतीर्थयात्रान्तर्गत या स्थानी सगरपुत्रांना पाताळलोकी दडलेला अश्वमेधीय अश्व दिसला होता ( भा. १०.७९.१७ ).

महाभारतान्तर्गत लोमशतीर्थयात्रेतहि याचा निर्देश आढळतो ( म. आर. १०४.२-३; १०५.२४ ).

**अर्तोअर्त** ( नगर )—टॉलेमीच्या मते सिंधु नदीच्या खोऱ्यातील कोफेस् ( कुभा = आधु. काबुल ) नदीच्या संगमानजीकचे एक नगर ( अक्षांश ३१°–१५′ उत्तर; रेखांश १२१°–३०′ ).

**अर्त्तणिविषय** ( देशविभाग )--शिलालेखसाहित्यमते कलिंग देशातील दक्षिण तोसल उपविभागान्तर्गत कोंगोद-मंडलातील एक देशविभाग ( एपि. इंडि. ६. १४१–१४२; कोंगोद मंडल पहा ).

**अर्थऊर** ( ग्राम )--चालुक्य राजा त्रिभुवनपाल याच्या इ. स. १२२१ मधील शिलालेखमते उत्तर गुजरात देशान्तर्गत दंडाहीपथक देशविभागातील एक ग्राम. उत्तर गुजरातमधील आधु. ऐथोर ग्राम ते हेच होय ( इंडि. अँटि. ६.२०८–२१० ).

**अर्थकारक** ( देशविभाग )--क्रौंचद्वीपान्तर्गत एक देशविभाग ( वर्ष ) ( मार्कं. ५०.२३ ).

**अर्थप** ( देश )--मध्यप्रदेशान्तर्गत एक देश ( वायु. ४५.१११ ).

**अर्थूण** ( नगर )--शिलालेखसाहित्यमते राजपुतान्यामधील एक नगर. हे बन्सवाड गावापासून २८ मैल पश्चिमेस आहे ( एपि. इंडि. १४.२९५ ).

**अर्दन** ( देश )--मार्कंडेयमते उत्तर भारतातील ( कूर्माची वामकुक्षी ) एक देश ( मार्कं. ५५.४३ ).

**अर्धकील** ( तीर्थ ) —सरस्वती–अरुणा संगमानजीकचे एक तीर्थस्थान ( म. आर. ८३.१५३–१५७ ).

**अर्धगङ्गा** ( नदी )--हरिवंश आणि संस्कृत शब्दकोशसाहित्यमते दक्षिण भारतातील ' कावेरी ' नदीचे नामांतर ( ह. वं. १.२७; त्रिकाण्ड. २९.२५; कावेरी पहा ).

**अर्धचन्द्र** ( तीर्थ )—मथुरा येथील तीर्थस्थान ( वराह. १६९.३; १७५.१५ ).

**अर्धजाह्नवी** ( नदी )--संस्कृत शब्दकोशसाहित्यमते ' कावेरी ' नदीचे नामांतर ( अभिधान. १४८.१०८४; हारावली. २२४.५१; कावेरी पहा ).

**अर्धनारीश्वर** ( लिंग )--कश्मीरातील व्रिंग परगण्यातील एक शिवस्थान. भेडर ( आधु. विदर ) गावाच्या १॥ मैल आग्नेयेकडील आधु. नारु गाव ते हेच होय.

**शिवमंदिर**--येथील निर्झरामध्ये अर्धनारीश्वर शिवाचे वास्तव्य असून, नजीकच जीर्णोद्धार केलेले एक पुरातन विष्णुमंदिर आहे.

**श्वेदनाग निर्झर**--येथून अर्धा मैल नैर्ऋत्येस श्वेदनाग नामक एक पवित्र निर्झर असून, ऐन्–इ–अकबरीमते तो कुक्कुटेश्वर ( आधु. कुकरनाग ) आणि त्रिसंध्या ( आधु. सुंदब्रार ) निर्झरानजीक होता.

येथील सप्तप्रवाहयुक्त निर्झरावर एक देवालय असून, तेथील धगधगत्या अग्निकुंडात तापसी लोक देहत्याग करीत. या निर्झराच्या उत्तरेकडील टेकडीमध्ये लोखंड सापडत असे ( ऐ. अ. २.३५६ ). श्वेदनागाच्या उत्तरेकडील सोप् टेकडीमध्ये आजहि लोखंड सापडते.

**अर्धवन** ( देशविभाग )--जोनराजाच्या मते कश्मीरातील कराल ( =आधु. आडविन ) परगण्याचे नामांतर ( जोनराज. १३३०; कराल पहा ).

**अर्प्पाकम्** ( जैनस्थान )--दक्षिण भारतातील एक जैन तीर्थस्थान. कांजीवरम् रेल्वेस्थानकापासून ९ मैल दक्षिणेकडील या स्थानी ' आदिनाथ ' तीर्थंकराचे देवालय आहे ( ती. ३९८ ).

**अर्बुक** ( देश व लोकसमूह )-- महाभारतान्तर्गत सहदेवाच्या दक्षिण दिग्विजयात निर्देशिलेला दक्षिण भारतातील एक देश व लोकसमूह (म. स. परि. १.१३.८).

**अर्बुद** ( पर्वत )--पश्चिम भारतातील सुविख्यात पर्वत राजस्थान आणि गुजरातच्या सीमेवरील सिरोहि प्रदेशातील आधु. आबूचा पहाड तो हाच होय. पश्चिम रेल्वेच्या अहमदाबाद–दिल्ली मार्गावरील आबूरोड स्थानकापासून १७ मैलांवर हा आहे.

हिंदूंचे आणि जैनांचे सुविख्यात तीर्थस्थान म्हणून हा पर्वत प्राचीन काळापासून सुविख्यात असून, त्याचे पठार, त्यामधील अरण्य, तसेच त्याच्या परिसरातील ' अर्बुद देश ' ही सारीच पवित्र मानण्यात येतात. सरस्वती आणि साभ्रमती नद्यांचे उगमस्थान, तसेच वसिष्ठाश्रमाचे स्थान म्हणून पौराणिक साहित्यात ' अर्बुद तीर्थ ' आणि ' अर्बुदक्षेत्र ' सुविख्यात असून, या पर्वतपठारावरील नखी तलावापासून १॥ मैल अंतरावर दिलवारा येथे जैनांची सुविख्यात मंदिरे आहेत.

या पर्वताची खडी चढण, आडबाजूचे स्थान, तसेच ' शत्रुंजय ' अथवा ' गिरनार ' टेकड्यांच्या तुलनेने कमी मंदिरसंख्या, यामुळे जैन तीर्थस्थान म्हणून या पर्वताची लोकप्रियता कमी झाली असली, तरी स्थापत्यशास्त्रीय दृष्टीने येथील मंदिरे महत्त्वाची आहेत.

**भौगोलिक स्थान**—समोवतालच्या सपाट वालुकामय प्रदेशातून अचानकपणे वर येणारा या पर्वताचा सुळका हा अरवली पर्वताचा भाग असून, तो ७ मैल वायव्ये-

कडील मुख्य पर्वतापासून एका अरुंद दरीच्यायोगे विभक्त झाला आहे.

या पर्वताचे १४×३ मैल लांबीरुंदीचे पठार समुद्रसपाटीपासून ४०००′ उंचीवर असून, त्याच्या अत्युच्च शिखराची समुद्रसपाटीपासूनची उंची ५०००′ आहे. त्याच्या चारीहि बाजूस अत्यंत निमुळती चढण असून, अरुंद दऱ्यांमधून पर्वतमाथ्यावर जाण्यासाठी वाट आहे.

स्कंदपुराणान्तर्गत 'अर्बुदमाहात्म्या' त या पठाराची (अर्बुदक्षेत्रै ) व्याप्ती आणि उंची अनुक्रमे १० आणि ( योजने असल्याचा अतिशयोक्त निर्देश आढळतो. ५ स्कन्द. प्रभास. ३.३६.६१ ).

या पठारावर काळ्या ग्रॅनाईट दगडांचे चित्रविचित्र आकाराचे प्रचंड सुळके असून त्यांच्या दरम्यान घनदाट वृक्षराजी आहे. तिचाच निर्देश प्राचीन साहित्यात 'अर्बुदारण्य' नावाने केला असावा.

**नामांतरे**--प्राचीन साहित्यात या पर्वताची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा ).

**नामव्युत्पत्ती**--'अर्बुद 'चा शब्दशः अर्थ 'बुद्धीची टेकडी' (अर् + बुद्ध) असा होतो. या पर्वताच्या 'अर्बुद' नावाविषयीची निम्नलिखित आख्यायिका स्कंद पुराणात दिली आहे:— नंदिवर्धन ( उत्तरकालीन 'अर्बुद' ) पर्वतावरील वसिष्ठाश्रमाशेजारी एकदा एक खोल खड्डा पडून त्यामध्ये वसिष्ठकामधेनू नंदिनी जाऊन पडली. वसिष्ठाने सरस्वती नदीचा प्रवाह या खड्ड्यामध्ये सोडून नंदिनीस बाहेर काढले आणि नंतर हिमालयपुत्र नंदिवर्धनाने आपला मित्र अर्बुद नाग याच्या साह्याने हा खड्डा बुजविला. म्हणूनच या खड्ड्याच्या स्थानी निर्माण झालेल्या पर्वतास 'अर्बुद' नाव प्राप्त झाले ( स्कन्द. प्रभास. ३.२ ).

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**--परमार, सोळंकी, प्रतिहार आणि चौहान या राजपुतान्यातील चार सुविख्यात अग्निवंशीय राजवंशांचे जन्मस्थान म्हणून अर्बुद पर्वत राजकीय दृष्ट्या विशेष महत्त्वाचा मानला जातो. 'आग्नीध्र' विश्वामित्राने येथे प्रज्वलीत केलेल्या यज्ञकुंडामधून हे लोक उत्पन्न झाले, म्हणून त्यांस 'आग्नीध्र' असे सामूहिक नाव प्राप्त झाले ( आग्नीध्र पहा ). मध्ययुगीन शिलालेखसाहित्यमते येथील अग्निकुंडातून माळव्यातील परमार राजवंशाचा आद्य पुरुष निर्माण झाला ( एपि. इंडि. ९.१०; १९. परि. पृ. १३३ ).

इ. स. १२ व्या शतकातील जैन साहित्यातहि या आख्यायिकेचा पुनरुच्चार आढळतो ( इंडि. अँटि. ४. २६७ ). बृहत्संहिता आणि भागवतामध्ये अनुक्रमे 'अग्नीध्र' आणि 'माल्व' लोकांना या पर्वताशी संलग्न केले आहे. ( भा. १२.१.३८ ).

**अर्बुद पर्वताची नामांतरे**

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. महाभारत | अर्बुदगिरि |
| २. ,, ( आर. ८०.७४-७५ ) | वसिष्ठाश्रम |
| ३. ,, ( ,, ,, ) | हिमवत्सुत |
| ४. पद्म पुराण ( सृ. २४.४ ) | हिमवत्सुत |
| ५. ,, ( उ. १३१.७ ) | अर्बुदारण्य |
| ६. स्कंद पुराण ( प्रभास. ३.३. ३९ ) | नंदिवर्धन |
| ७. ,, ( प्रभास. ३.३६.६१ ) | अर्बुदाचल |
| ८. अग्नि पुराण ( १०९.१० ) | अर्बुदतीर्थ |
| ९. टॉलेमी ( पृ. ७८ ) | अपोकोप |
| १०. अरियन ( मॅक्रिंडल, इंडिया पृ. १४७ ) | कपितलिय |
| ११. काव्यमीमांसा ( १७.२२७ ) | देवसभा |
| १२. मध्ययुगीन शिलालेख-साहित्य | |
| १. भीम (द्वितीय) याचा इ. स. १२०९ मधील शिलालेख ( एपि. इंडि. ८. २२२ ) | आबुयग्राम |
| २. ,, ,, ( एपि. इंडि. ८.२१९ ) | श्रीमत्-अर्बुद |
| ३. भीम ( द्वितीय ) याचा इ. स. १२१० मधील शिलालेख ( सांकलिया, पृ. १८६ ) | अर्बुदाचल महातीर्थ |
| ४. अन्य एक शिलालेख- ( एपि. इंडि. ११.६७ ) | हिमाद्रिभव |

**परमार राजघराणे**--इ. स. ७ व्या शतकापासून या प्रदेशावर गुजरातच्या सोळंकी राजांचे मांडलीक असणाऱ्या परमार राजांचे राज्य आहे. उत्तरकालात माळव्याच्या परमार राजांशी संधान जोडण्याचा प्रयत्न हे राजे करू लागताच सोळंकी राजा भीमदेव ( प्रथम ) याने आपल्या विमलशाह नामक अमात्यास परमार राजा धंधुक यावर देखरेख करण्यासाठी पाठविले. आबू पर्वतावरील बहुतांशी सारी जैन मंदिरे विमलसाहने बांधली आहेत ( अर्बुद २. पहा ).

येथील अन्य काही उत्तरकालीन जैन मंदिरे गुजरातच्या वीरधवल राजाच्या तेजपाल नामक अमात्याने या देशाच्या सोमसिंह राजाच्या राज्यकालात ( इ. स. १२३० ) बांधली आहेत.

लोकवस्ती--या पर्वताच्या दुर्लंघ्यतेमुळे येथे कधी लोकवस्तीने गजबजलेले गाव वसले असण्याची शक्यता वाटत नाही. याच्या दक्षिणेकडील सपाटीवर 'चंद्रावती' नगराचे अवशेष सापडले असून, या पर्वताशी संबंधित सारी लोकवस्ती या गावी निवास करीत असावी ( चंद्रावती पहा ).

मेगॅस्थेनिस आणि अरियनच्या ग्रंथात--या ग्रंथांमध्ये या पर्वताचा निर्देश 'कपितलिय' ( देहान्तशासनाचे शिखर ) ( उंची ६५००' ) या नावाने केला असून, तो अरवली पर्वताचे अत्युच्च शिखर मानला जात असे ( मॅक्रिंडल, इंडिया. पृ. १४७ ).

टॉलेमीच्या ग्रंथात--या ग्रंथात या पर्वताचा, तसेच अरवली पर्वताचा निर्देश 'अपोकोप' ( सुळक्याच्या आकाराचा पर्वत ) या नावाने केला आहे. आफ्रिकेतील 'अझनिय' किनाऱ्यास समांतराकृती तुटक टेकड्यांच्या रांगेसहि पेरिप्लसमध्ये 'अपोकोप' म्हटले असून त्याचा संस्कृतभाषीय प्रतिशब्द तेथे 'माऊंट अर्बुद' असाच दिला आहे ( लॅसेन, इंडि. अल्टि. ३.१२१-१२२ ).

मॅक्रिंडल यांच्या मते भूकंपामुळे अथवा ज्वालामुखीमुळे अर्बुद पर्वताचा भाग अरवली पर्वतश्रेणीपासून विभक्त झाला असून, नंदिनी गायीसंबंधीच्या पौराणिक आख्यायिकेत हाच निर्देश अभिप्रेत असावा.

महाभारतात--या ग्रंथात या पर्वताचा निर्देश 'हिमवत्सुता' नावाने केला असून, वसिष्ठाश्रमाची आणि त्याच्जीकच्या भूछिद्राची ( भूविवर ) स्कंद पुराणातील आख्यायिका येथेहि दिली आहे ( म. आर. ८०.७४-७५ ).

पौराणिक साहित्यात--स्कंद पुराणान्तर्गत प्रभासखंडातील 'अर्बुदाचलमाहात्म्य' नामक ६३ अध्यायांच्या प्रकरणात या पर्वताच्या परिसरातील तीर्थस्थानांची सविस्तर माहिती दिली आहे. त्यापैकी अनेक तीर्थस्थाने आजहि आढळतात.

पौराणिक साहित्यात अन्यत्र या पर्वतावरील वसिष्ठाश्रम आदि तीर्थस्थानांचा निर्देश आढळतो. ( म. आर. ८०.७५; मत्स्य. २२.३८, पद्म. सृ. २४.४; नारद. २. ६०. २७; अग्नि. १०९.१० ).

पौराणिक साहित्यात 'अर्बुदतीर्थ' आणि 'अर्बुदारण्य' ही स्वतंत्र तीर्थे मानली असली, तरी तेथे 'अर्बुद' पर्वताचाच निर्देश अभिप्रेत दिसतोः—

१. अर्बुद तीर्थ—या तीर्थाचा ( हिमवत्सुत ) निर्देश महाभारतान्तर्गत पुलस्त्ययात्रेत, तसेच अन्य पौराणिक साहित्यात आढळतो ( म. आर. ८०.७४; अग्नि. १०९. १०; नृसिंह. ६६.३; पद्म. सृ. २४.४ ).

२. अर्बुदारण्य--पद्ममते सरस्वती नदीकाठच्या या वनात कश्यपाने तप करून 'काश्यपी गंगा' ( आधु. साभ्रमती ) आणली ( पद्म. उ. १३१.२; ७; १३; २० ).

सरस्वती नदीचे उगमस्थान—स्कंदमते सरस्वती नदीचा उगम अर्बुदारण्यात होत असून तत्रस्थ तीर्थांची नामावली या पुराणान्तर्गत 'प्रभासक्षेत्रमाहात्म्या'त दिली आहे ( स्कन्द. प्रभास. १.३५ ).

शिलालेखसाहित्यात—समरसिंहाच्या आबू पर्वत शिलालेखात 'देवांकडून उपासला जाणारा कुलपर्वत' ( देवसेवित कुलाचल ) म्हणून या पर्वताचा निर्देश असून ( इंडि. ॲंटि. १६.३५० ), त्यावरून काव्यमीमांसेमध्ये निर्देशिलेला 'देवसभा पर्वत' तो हाच असावा. कालांतराने ही उपाधी साऱ्याच आदर्श ( आधु. अरवली ) पर्वतास लावण्यात येऊ लागली ( आदर्श पहा ). अन्य एका शिलालेखात यास 'हिमाद्रिभव' म्हटले आहे ( एपि. इंडि. ११.६७; १४.३०३ ).

निम्नलिखित शिलालेखातहि या पर्वताचा निर्देश आढळतो:-१. भीनमाल येथील रज्जिल सामंताचा इ. स. ६२५ मधील वसंतगढ शिलालेख--आबू पर्वतावर राज्य करीत असल्याचा निर्देश; २. कलचुरि राजा कोकल्लदेव याचा इ. स. १० व्या शतकातील गुर्गी शिलालेख--अर्बुदाचलापासून महेंद्र पर्वतापर्यंत प्रबोध शिव आचार्यांची कीर्ति पसरल्याचा निर्देश ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.२२७ ); ३. परमार राजा नरवर्मन् याच्या कारकिर्दीतील ( इ. स. ११ वे शतक ) शिलालेख—अर्बुद पर्वताचे, तसेच तेथील वसिष्ठ ऋषींच्या यज्ञाचे सविस्तर वर्णन ( एपि. इंडि. ३१.२५ ); ४. चालुक्य राजा भीम ( द्वितीय ) याचा इ. स. १२०९ मधील शिलालेख--या पर्वताचा आणि त्याच्या परिसरातील गावाचा 'श्रीमत् अर्बुद' आणि 'आबुयग्राम' नावांनी निर्देश ( एपि. इंडि. ८.२१९; २२२ ); ५. चालुक्य राजा भीम ( द्वितीय ) याचा इ. स. १२१० मधील शिलालेख--या शिला-

लेखात या पर्वतांचा निर्देश ' महातीर्थ ', ' अर्बुदाचल ' या नावांनी केलेला आढळतो (सांकलिया, पृ.१८६ ).

तीर्थस्थाने--' अर्बुदाचल ' आणि ' अर्बुदारण्य ' मधील निम्नलिखित तीर्थांची सविस्तर नामावली स्कंद पुराणात दिली आहे:–

( १ ) अर्बुदाचलावरील तीर्थस्थाने—स्कंदपुराणान्तर्गत प्रभासखंडातील ' अर्बुदमाहात्म्या 'मध्ये ही नामावली निम्नप्रकारें दिली आहे -- १. अग्नितीर्थ ( ३०.१ ); २. अचलेश्वर ( ७.१; ४.२०. ); ३. अर्बुद पर्वत (१.९; ३.१९, २९; ५.४; ३६.८० ); ४. अविमुक्तक्षेत्र ( ५७ ); ५. ईशानी शिखर ( ५२.१ ); ६. उद्दालकेश्वर ( ४२.१ ); ७. उमामहेश्वरतीर्थ ( ५८ ); ८. एकहंस ( ३१.१७ ); ९. क ( कं ) टेश्वर ( ६२.१ ); १०. कनखल तीर्थ ( २६.१ ); ११. कपालमोचनतीर्थ ( ३१.१४ ); १२. कपिलातीर्थ ( २९.१ ; १३. कात्यायनीस्थान ( २४.१ ); १४. कामेश्वरतीर्थ ( ४०.१ ); १५. कालाभीष्ट तीर्थ ( ४०.७ ); १६. कुलसंतारणतीर्थ ( ४८.१; ३७ ); १७. कृमिजांगलतीर्थ ( ३१.१७; ४०. ७ ); १८. कृष्णतीर्थ ( ३४.१ ); १९. केदारतीर्थ ( ९.१; ४०.६ ); २०. कोटितीर्थ ( ५०.१; ६ ); २१. कोटीश्वर ( ११ ); २२. गंगाद्वार ( ४०.७ ); २३. गंगाधरतीर्थ ( ६१ ); २४. गंगेश्वर ( ६२.२ ); २५. गजतीर्थ ( ४४.१ ); २६. गयाशीर्ष ( ४०.७ ); २७. गुहेश्वर ( ५६ ); २८. गोकर्ण ( ४०.७ ); २९. गोमतीकुंड ( गोमुखी ) ( ६.२ ); ३०. गोमती नदी ( ३.४२; ६.३ ); ३१. गौतमाश्रम ( ४७.१ ); ३२. चंडिकाश्रम ( ३६.१ ); ३३. चंद्रप्रभासतीर्थ ( २०.१ ); ३४. चंद्रोद्भेद ( ५१.१ ); ३५. जंबूतीर्थ ( ६० ); ३६. त्रिनेत्र लिंग ( ८.१–२ ); ३७. त्रिपुष्करतीर्थ ( ४०.६; ५४.१ ); ३८. त्रिविष्टपतीर्थ ( १८.१३ ); ३९. देवखाततीर्थ ( ४५.१ ); ४०. नंदिवर्धन पर्वत ( ३.४ ); ४१. नागतीर्थ ( ३.२९; ५.७; १० ); ४२. नागह्रद ( ३७.१ ); ४३. नैमिषतीर्थ ( ४०.६ ); ४४. पंगुतीर्थ ( १७.१ ); ४५. पंचनदतीर्थ ( ३१.१८ ); ४६. पार्थेश्वर लिंग ( ३३.१ ); ४७. पिंडारकतीर्थ ( २५.१; १४, १५ ); ४८. पिंडोदकतीर्थ ( २१.१ ); ४९. पुण्यप्लारिप्लव तीर्थ ( ३१.१८ ); ५०. पुष्करतीर्थ ( ५०.४ ); ५१. प्रभासतीर्थ ( ४०.७ ); ५२. प्रयागतीर्थ ( ४०.६ ); ५३. ब्रह्मपदतीर्थ ( ५३.१ ); ५४. भद्रकर्ण महाह्रद ( ८.१; १४; ४०.६ ); ५५. मणिकर्णिकसज्ञतीर्थ ( १६.१; २८ ); ५६. मणिकर्णिकेश्वर ( १५ ); ५७. मंदाकिनी नदी ( ४.१८; ९.२ ); ५८. महाविनायकक्षेत्र ( ३२.१ ); ५९. महेश्वर ( ३९ ); ६०. महौजस ( ५९ ); ६१. मानुषह्रद ( २८.१ ); ६२. मामुह्रद ( ३५.१, ३३ ); ६३. मार्कंडेय आश्रम ( ४१.१ ); ६४. मुद्गलेश्वर ( ३५.५३ ); ६५. मैनाक पर्वत ( ३.९ ); ६६. यमतीर्थ ( १८.१ ); ६७. रक्तानुबंध तीर्थ ( ३१.१ ); ६८. रम्य पर्वत ( ३७.१; ५३.८ ); ६९. रामतीर्थ ( ४९.१; ८ ) ७०. रुद्रकोटि ( ३१.१८ ) ७१. रुद्रह्रद ( ५५.१ ); ७२. रूपतीर्थ ( १२.१ ); ७३. वटेश्वरतीर्थ ( ४०.७ ); ७४. वसिष्ठाश्रम ( १.८; ३.११; ४.१; म. आर. ८०.७५ ); ७५. वाराहतीर्थ ( १९.१ ); ७६. विरुपाक्षतीर्थ ( ३१.१८ ); ७७. व्यासेश्वर लिंग ( ४६.१ ); ७८. शिवलिंग कुंड ( ३८.१ ); ७९. शुक्रेश्वर लिंग ( १५.१ ); ८०. शुक्लतीर्थ ( २३.१ ); ८१. शोभनकुंड ( ४३.२ ); ८२. श्रीमातास्थान ( २२ ); ८३. सरस्वती नदी ( ९.२ ); ८४. सिद्धलिंग ( ४३.१ ); ८५. सिद्धेश्वर कुंड ( ४३ ); ८६. सिद्धेश्वर लिंग ( १४.१ ); ८७. सोमतीर्थ ( ३१.७ ); ८८. हृषिकेश तीर्थ ( १३.४३–५५ ); ८९. पृथिवीछिद्र ( ज्वालामुखी मुख ) ( म. आर. ८०.७४ ).

( २ ) अर्बुदारण्यातील तीर्थस्थाने--स्कंद पुराणान्तर्गत प्रभासखंडातील प्रभासक्षेत्रमाहात्म्यामध्ये अर्बुदारण्यातील सरस्वती तीरावरील तीर्थांची नामावली निम्नप्रकारे दिली आहे :--१. अनरकतीर्थ; २. आनंदेश्वर ( कूष्मांडमुनि-आश्रम ) ३. आमर्दकी संगम; ४. आमर्दकी–संगमेश्वर ५. उदुंबरवन ( तण्डितपःस्थान ); ६. उद्गमवट ७. एकद्वार; ८. कपिला ( नदी ); ९. कामतीर्थ; १०. कुम्भकक्षिगिरि; ११. कूष्मांडेश्वर; १२. कृतसर; १३. कोटीश्वर; १४. कोल्लादेवी; १५. गुहेश्वर; १६. गंगा-समागम; १७. गोवत्स; १८. गंगोद्भेद; १९. गोलांगूल तीर्थ; २०. तरत्तरंग; २१. द्वारावती; २२. धारेश्वर; २३. नरतीर्थ; २४. न्यंकु ( नदी ); २५. पिंडतारक; २६. पीलुकवर्णिक; २७. पुंडरीक; २८. मातृतीर्थ; २९. प्राचीनेश्वर; ३०. मदनसानु; ३१. महालय; ३२. मांडव्येश्वर; ३३. मुंडीश्वर; ३४. रुद्रावतार; ३५. रुल्लपुर; ३६. रुलह्रद; ३७. लोहयष्टिका; ३८. वज्रिणी ( नदी ); ३९. वटलन ( वसिष्ठतपःस्थान ); ४०. वटेश्वर; ४१. वालखिल्येश्वर; ४२. शंभुकुंडेश्वर; ४३. सरस्वती

(नदी); ४४. सिद्धवट; ४५. हरिणी (नदी) (स्कन्द. प्रभास. १.३५).

सद्यःकालीन तीर्थस्थाने-- या पर्वतावर सद्यःकाळी निम्नलिखित हिंदुदेवमंदिरे आणि तीर्थस्थाने आढळतात :-

१. हृषिकेश मंदिर--आबू पर्वताप्रत जाणाऱ्या जुन्या मार्गावर आबू रेल्वेस्थानकानजीक हे मंदिर आहे. मथुरेहून द्वारकेस जात असताना श्रीकृष्ण एक रात्र येथे थांबला होता. या मंदिराच्या परिसरामध्ये प्राचीन चंद्रावती नगराचे अनेक अवशेष आढळतात. नामांतर-' द्वारकाद्वार '.

२. अम्बरीष आश्रम--अम्बरीष राजाचे हे तपस्यास्थान हृषिकेश मंदिरानजीकच आहे.

३. मणिकर्णिका तीर्थ आणि सूर्यकुंड--नव्या मार्गावर ही दोन्ही तीर्थस्थाने आहेत.

४. कर्णेश्वर शिवमंदिर--हे सूर्यकुंडानजीक आहे.

५. वसिष्ठाश्रम--हे कर्णेश्वर मंदिरापासून ३ मैलावर आहे.

६. अचलेश्वर महादेव--परमार आणि चौहान राजघराण्याचे हे कुलदैवत आबू पठारावर दिलवारापासून ४ मैल, तसेच ओरियापासून १ मैल अंतरावर शांतिनाथ जैनमंदिराच्या समोरच्या अंगास आहे. स्कंदमते अर्बुदारण्यातील सरस्वती नदीकाठचे हे सर्वश्रेष्ठ शिवस्थान आहे (स्कन्द. प्रभास. ३.७.१-४; २०; माहेश्वर. २.२९.६८).

मेवाडच्या समरसिंह राजाने बांधलेल्या या मंदिरामध्ये पंचधातूचे स्वयंभू शिवलिंग असून मंदिराच्या पाठीमागच्या बाजूस अर्जुन व महिषासुरप्रतिमांनी युक्त ' मंदाकिनी कुंड ' आहे.

मंदिराच्या प्रवेशद्वारानजीक एका बाणाच्या फटकाऱ्याने तीन बैलांचा वध करणाऱ्या आबू प्रदेशाच्या धरावर्ष राजाची शिल्पप्रतिमा आहे.

७. भृगु-आश्रम--हा उपरोक्त शिवमंदिरापासून मैलावर आहे.

८. अर्बुदादेवी मंदिर--आबू पर्वताच्या कुलदेवतेचे हे गुफामंदिर आबू कँप- दिलवारा रस्त्यावर आहे.

९. कोटेश्वर महादेव--स्कंद पुराणात ' कोटीश्वरी ' नावाने निर्देशिलेले (स्कन्द. प्रभास. ३.११) हे मंदिर दिलवारानजीकच्या ओरिय गावी आहे.

१०. गुरुशिखर--आबू पर्वताच्या या सर्वोच्च शिखरावर (५६५०') दत्तपादुका आहेत.

११. नखी तलाव--आबू पठारावरील बाजारानजीकचा $\frac{1}{2} \times \frac{1}{4}$ मैल लांबीरुंदीचा हा तलाव स्थानिक समजुतीनुसार देवादिकांनी नखांच्या साह्याने खोदला. म्हणून त्यास हे नाव प्राप्त झाले. या तलावाच्याकाठी रामानंदस्वामींच्याकाळी रघुनाथजी राजाने बांधलेले एक मंदिर आहे.

जैन मंदिरे--नखी तलावानजीकच्या दिलवारा येथे जैन मंदिरांचा समूह असून त्यापैकी पांढऱ्या संगमरवराने बांधलेली ' ऋषभनाथ ' आणि ' लूनिग वसति ' ही मंदिरे विशेष प्रसिद्ध आहेत.

या पर्वताच्या २०-३० मैलांच्या परिसरामध्ये पांढरा संगमरवरी दगड कोठेहि आढळत नसल्याने आग्नेयेकडील भाकर जिल्ह्यातील जाखिव येथील संगमरवरी खाणीतून ते आणले असावेत. मात्र प्रचंड आकाराचे हे दगड एवढ्या उंच पर्वतावर कसे चढविले असावेत ते समजत नाही.

आबू पर्वतावरील प्रमुख जैनमंदिरे पुढीलप्रमाणे होत :-

(१) ऋषभनाथ मंदिर--सोळंकी स्थापत्यशैलीचे हे संगमरवरी मंदिर सोळंकीवंशीय राजा भीम (प्रथम) चा जैनधर्मीय प्रधान विमलसाह याने इ. स. १०३१ मध्ये बांधले. इ. स. १४ व्या शतकातील मुसलमानी आक्रमणानंतर इ. स. १३२१ मध्ये ते पुन्हा बांधून काढण्यात आले. त्यावेळी कोरलेल्या मंदिरलेखात येथील मूळ मंदिर विमलसाहने अंबादेवीच्या आशीर्वादाने बांधल्याचा निर्देश आढळतो (एपि. इंडि. ९.१४८).

भीम (प्रथम) राजा जैन लोकांच्या साह्याने गादीवर आला असल्याने त्याच्या प्रेरणेने लक्षावधी रुपयांचे हे जैन मंदिर बांधण्यात आले असावे. त्याचे स्थापत्य सोळंकी परंपरेतील परंतु तत्कालीन हिंदु देवमंदिराहून सर्वस्वी वेगळे आहे. लंबचौकोनाकृती आवारातील मुख्य देवतामंदिराසभोवताली येथे विभिन्न तीर्थंकरांची उपमंदिरे आणि मजबूत तटबंदी बांधली आहे.

गुजराथ, सौराष्ट्र आणि दक्षिण राजपुताना देशातील तत्कालीन जैन मंदिरांमध्ये हे मंदिर प्राचीनतम, सर्वोत्कृष्ट आणि परिपूर्ण असून, सोळंकी राजा कुमारपाल याच्या राज्यकालातील (इ. स. ११४३-११७३) कुंभरिय, जालोर, नाग्दा, चितोडगढ, तरंगा टेकडी, शत्रुंजय टेकडी येथील उत्तरकालीन मंदिरे त्याच्याच अनुकरणाने बांधली आहेत. परंतु ऋषभनाथ मंदिराचे साधेसुधे आणि संयत नक्षीकाम त्यामध्ये आढळत नाही. म्हणूनच हे मंदिर या सर्व मंदिरांमध्ये आजहि सर्वोत्कृष्ट मानले जाते.

या मंदिराचे प्रवेशमंडपयुक्त प्रवेशद्वार पूर्वाभिमुख असून त्याच्या समोरच्या भागातील आयताकृती

इमारतीमध्ये देवाळयाकडे निघालेल्या विमलसाह आणि त्याचे कुटुंबीय यांच्या गजारूढ संगमरवरी मूर्ती आहेत. यापैकी सहा प्रतिमा इ. स. ११४९ मधील आणि अन्य चार इ. स. ११८० मधील असल्याचे त्यावरील मूर्तिलेखावरून दिसते. उत्तरकालीन मुसलमानी आक्रमणात या व्यक्तिप्रतिमा विच्छिन्न झाल्या असून चार फूट उंचीचे संगमरवरी हत्ती केवळ शिल्लक राहिले आहेत.

विमलशाहची चुन्यात बांधलेली एक नवी गजारूढ मूर्ती येथे नव्याने बसविण्यात आली असून, तिच्या पाठीमागे तीन व्यासपीठांनी युक्त जैन स्तूप ( समोसरन ) आहे.

या मंदिराच्या गवाक्षरहित आणि अंधाऱ्या गर्भागारात जैन तीर्थंकर आदिनाथ ( ऋषभनाथ ) याची पद्मासन घातलेली मूर्ती आहे. या गर्भागाराच्या वरच्या अंगास निमुळत्या आकाराचे छोटे शिखर आहे.

गर्भागाराच्या समोरच्या अंगास बंदिस्त बाह्यमंडप आणि अष्टस्तंभाधारित घुमटयुक्त प्रवेशमंडप आहे. या प्रवेशमंडपाच्या सभोवताली ४८ स्तंभांचा लंबचौकोनाकृती उघडा मंडप आहे. अशा तऱ्हेचा लंबचौकोनाकृती मंडप हे आबू येथील मंदिरस्थापत्याचे प्रमुख वैशिष्ट्य दिसते.

या मंदिराच्या सभोवताली लंबचौकोनाकृती ( १२८′ × ७५′ ) विस्तीर्ण अंगण असून त्याच्या सभोवताली ५२ छोट्या खोल्या ( कुलिका ) आहेत. या खोल्यांमध्ये तसेच मंदिर-आवाराच्या नैर्ऋत्य कोपऱ्यातील उपमंदिरांमध्ये पद्मासन घातलेल्या ठराविक ठशाच्या जिनमूर्तींची स्थापना केली आहे. या साऱ्या आवाराची रचना बौद्ध विहारासदृश असून बौद्ध भिक्षुनिवासाची जागा येथे जिनमंदिरांनी घेतलेली दिसते.

या मंदिराचे बाह्यांग संपूर्णतः नक्षीकामविरहित असून त्यावरून त्याच्या अंतरंगातील समृद्ध नक्षीकामाची कल्पना येत नाही. म्हणूनच मंदिराच्या अंतर्भागात शिरताच मन क्षणभर थक्क होते.

या मंदिराच्या सभामंडपाचे संगमरवरी छत आणि स्तंभ शिल्पदृष्ट्या अद्वितीय आहेत. स्तंभांवरील नक्षीकाम प्रमाणबद्ध आणि समृद्ध असून त्यांच्या वरच्या अंगास ब्रॅकेट्स आहेत. या ब्रॅकेट्सच्या वरच्या अंगास अन्य एक बुटका स्तंभ असून त्याच्या वरच्या अंगास घुमटाला आधार देणाऱ्या दगडी तुळया आहेत. या तुळयांवरील छताचा भार कमी करण्यासाठी स्तंभांच्या दरम्यान सूक्ष्मातिसूक्ष्म नक्षीकामाने युक्त आडव्या संगमरवरी कमानी बसविल्या आहेत. उत्तरकालीन मोंगल स्थापत्यात एक आलंकरण म्हणून अशा तऱ्हेच्या कमानींचा विपुलपणे वापर आढळतो.

या मंदिराच्या अष्टकोनी छताच्या प्रत्येक कोनात उभ्या शिल्पप्रतिमा कोरल्या असून, त्यांच्या दरम्यान वर्तुळाकृती नक्षीकामाच्या विभिन्न रांगा आहेत. यापैकी द्वितीय रांगेच्या वरच्या अंगास उभ्या शिल्पप्रतिमांची अन्य एक रांग असून, त्यांच्या वरच्या अंगास घुमटाच्या मध्यभागी संगमरवरी लोंबते झुंबर कोरले आहेत. या श्वेतवर्णीय संगमरवरी घुमटामधील नक्षीकाम साऱ्या जगात अद्वितीय असून, वेस्ट मिनिस्टर ( इंग्लंड ) येथील ७ व्या हेन्रीच्या प्रार्थनामंदिरातील 'गोथिक' शैलीच्या छताच्या तुलनेने ते कितीतरी सरस आहे.

( २ ) अंबामंदिर— ऋषभनाथ मंदिराच्या नैर्ऋत्य कोपऱ्यात उंच व्यासपीठावर अंबादेवीचे इ. स. १११ व्या शतकातील एक छोटे मंदिर आहे. अंबा ही हिंदु देवता असली, तरी हे मंदिर मात्र जैनांचा २२ वा तीर्थंकर नेमिनाथ याच्या 'अंबा' नामक यक्षिणीचे आहे.

( ३ ) लूनिग वसति मंदिर—ऋषभनाथ मंदिराहून उत्तरकालीन असे हे नेमिनाथ मंदिर गुजराथच्या वीरधवल राजाच्या तेजपाल आणि वस्तुपाल नामक 'पोरवाड' जैनधर्मीय अमात्यांनी इ. स. १२३० मध्ये बांधले. आबू प्रदेशावर राजप्रतिनिधी म्हणून काम करीत असता सापडलेल्या गुप्तधनामधून त्यांनी आबू, शत्रुंजय आणि गिरनार येथील जैन देवालये बांधली. या मंदिर-रचनेची आद्य प्रेरणा तेजपालाची साध्वी पत्नी अनुपमादेवी आणि आध्यात्मिक गुरू नगेंद्रमुनि यांनी दिली.

या मंदिरातील एका मंदिरलेखात तेजपालाने आपला बंधु वस्तुपाल याच्या स्मरणार्थ या मंदिराची रचना केल्याचा निर्देश असून, वस्तुपालाच्या नावावरूनच यास 'लूनिग वसति' हे नाव प्राप्त झाले.

या मंदिराची सर्वसामान्य रचना ऋषभनाथ मंदिरासदृशच असली तरी त्यामधील मनुष्याकृती निर्जीव आणि ठराविक ठशाच्या, व नक्षीकामहि नको इतके समृद्ध आणि प्रसंगी मुख्य मनुष्याकृतींना गुदमरून टाकणारे आहे . त्यामुळे या नक्षीकामाचा संकलित परिणाम निर्जीव आणि कंटाळवाणा वाटतो.

येथील मंदिरसंस्थापकाची मिरवणूक ही ऋषभनाथ मंदिराप्रमाणे दर्शनी भागी नसून ती मंदिर-आवाराच्या

पूर्व कोपऱ्यात आहे. येथे उत्कृष्ट नक्षीकामयुक्त चौमुख प्रतिमेच्या दोन्ही अंगास प्रत्येकी पाच हत्ती असून त्यावरील व्यक्तिप्रतिमा मुसलमान हल्लेखोरांनी उद्ध्वस्त केल्या आहेत.

या मंदिरासभोवतालच्या खोल्यांमध्ये ऋषभनाथ मंदिरासदृश तीर्थंकरप्रतिमा असून या खोल्यांच्या प्रवेशद्वारावर तेजपाल आणि त्याचे कुटुंबीय यांनी कोरलेले (इ. स. १२३०–१२३६) ४६ शिलालेख आहेत. त्यामध्ये विभिन्न तीर्थंकरांच्या सन्मानार्थ या 'कुलिकां'ची रचना केल्याचा निर्देश आढळतो (एपि. इंडि. ८.२००–२२९).

(४) आदिनाथ मंदिर––हे मंदिर लूनिग वसति मंदिराच्या आग्नेयेस असून त्याच्या सभोवतालच्या 'कुलिका' अपूर्णावस्थेत आहेत.

(५) चौमुख मंदिर–आदिनाथाचे हे तीनमजली चौमुख मंदिर इ. स. १५ व्या शतकातील असून, त्याच्या चार अंगास घुमटयुक्त उघडे प्रवेशमंडप आहेत. यापैकी पश्चिमाभिमुख प्रवेशद्वार प्रमुख मानतात. या मंदिराच्या अंतर्भागात ७६ स्तंभ आहेत.

(६) अचलगढ मंदिरसमूह–अचलेश्वर मंदिरानजीकच्या अचलगढ टेकडीवर ऋषभनाथ मंदिराच्या उत्तरकालीन श्वेतांबर जैनांची अनेक देवालये आहेत. यापैकी चौमुख मंदिरातील पंचधातूची मुख्य मूर्ती १२० मण वजनाची आहे. नेमिनाथाचे एक भव्य मंदिरहि येथे आहे.

या टेकडीवर 'कर्पूरसागर' नामक तलाव आणि हनुमानाचे एक देवालयहि आहे.

२. (देश) शिलालेखसाहित्यमते पश्चिम भारतातील एक देश. 'अर्बुद' पर्वतासभोवतालचा प्रदेश (भूमम्दलम्) या देशात समाविष्ट होत असे (एपि. इंडि. ९.११). नामांतर–'अर्बुदमंडल' (जे. बी. बी. आर. ए. एस. २३.७८).

**पौराणिक साहित्यात**––या ग्रंथमते 'अपरांत' (पश्चिम भारतातील देश) देशसमूहामध्ये 'अर्बुद' देशाची गणना होत असे (बृ. सं. ५.६८; १६.३१; ३२.१९; कूर्म. ४७.४२; ब्रह्म. १९.१७; ब्रह्माण्ड. १६.६२; मत्स्य. ११४.५१; मार्क. ५४.२५; वामन. १३.५३; विष्णु. २.३.१६; काव्यमी. १७.२२७).

अन्य पौराणिक साहित्यमते हा देश दक्षिण भारतात (वायु. ४५.१३१) अथवा मध्य देशात (मार्क. ५४.३३) होता. परंतु भौगोलिकदृष्टच्या ही माहिती बरोबर वाटत नाही.

**राजकीय इतिहास**––इ. स. ७ व्या शतकापासून या देशावर परमार राजघराण्याचे राज्य असून, इ. स. ६२५ मधील वसंतगढ शिलालेखमते भीनमाळ येथील वर्मलाट राजाचा सामंत रज्जिल हा या देशावर राज्य करीत होता. गौरीशंकर ओझा यांच्यामते रज्जिल हाहि परमारवंशीय राजा असावा. या राजांची राजधानी आबू पर्वताच्या पायथ्याजवळील चंद्रावती गावी होती (चंद्रावती पहा).

इ. स. ११ व्या शतकात या देशाचे परमार राजे गुजरातच्या सोळंकी राजांचे मांडलीक बनले. येथील धुंधुक राजाच्या दरबारी राजप्रतिनिधी म्हणून अचलगढ येथे निवास करीत असतानाच सोळंकी राजा भीमदेवाचा अमात्य विसलसाहने आबू पर्वतावरील ऋषभनाथ मंदिर बांधले.

या देशाच्या धरावर्ष राजाने गुजरातचा सरसेनापती म्हणून इ. स. ११७८ मध्ये शहाबुद्दिन घोरीशी आणि इ. स. ११९७ मध्ये कुतुबुद्दिन ऐबकाशी युद्ध केले होते. या पराक्रमी राजाची शिल्पप्रतिमा अचलेश्वर महादेवमंदिराच्या दर्शनीभागी आहे. या राजाच्या प्रह्लादन नामक कनिष्ठ भावाने 'प्रह्लादनपुर' (आधु. पालनपुर) नगराची स्थापना केली.

धरावर्षपुत्र सोमसिंहाच्या राज्यकालात गुजरातच्या वीरधवल राजाच्या तेजपाल नामक जैनधर्मीय अमात्याने आबू पर्वतावरील लूनिग वसति मंदिर बांधले.

३. (कुंड) अवंतीक्षेत्रान्तर्गत पवित्र जलकुंड (स्कन्द. आवन्त्य. १. ६५.१८).

**अर्बुदतीर्थ** (तीर्थ)––अग्निमते पश्चिम भारतातील 'अर्बुद' पर्वताचे नामांतर (अग्नि. १०९.१०; अर्बुद पहा).

२. (तीर्थ)–एक ब्रह्मदेवस्थान. येथील ब्रह्मदेवाचे नाव वसिष्ठ होते (पद्म. सृ. २९.१४४).

**अर्बुदागिरि** (पर्वत)––महाभारतमते पश्चिम भारतातील 'अर्बुद' पर्वताचे नामांतर (अर्बुद पहा). अन्य नामांतरे–१. 'अर्बुदाचल' (स्कन्द. प्रभास. ३.३६.६१); २. 'अर्बुदाचल महातीर्थ' (शिलालेखसाहित्य); ३. 'अर्बुदारण्य' (पद्म. ३.१३१.७).

**अर्मगर** (ग्राम)—टॉलेमीच्या मते दक्षिण भारतातील ननगौन (आधु. तापी) नदीकाठचे एक ग्राम (अक्षांश १४°–२०′ उत्तर; रेखांश ११४°–२० पूर्व).

**अर्स** (देश)--टॉलेमीच्या मत पंजाबातील 'उरशा' देशाचे नामांतर (उरशा पहा).

**अलकनन्दा** (नदी)--उत्तरप्रदेशान्तर्गत गढवाल-हिमालय प्रदेशातील गंगा नदीची सुविख्यात उपनदी. गंगा नदीचा हिमालय प्रदेशातील आद्य प्रवाह म्हणजे ही नदी होय.

**भौगोलिक माहिती**--विष्णुगंगा (धवलगंगा=धौलि) आणि सरस्वतीगंगा या दोन नद्यांच्या संगमातून बनलेल्या या नदीला कर्णप्रयाग गावानजीक पिंडरगंगा (आधु. पिंडा) नदी येऊन मिळते. तेथून तेहरी-गढवाल प्रदेशातून पश्चिमेकडे वहात असता रुद्रप्रयाग आणि देवप्रयाग गावानजीक तीस अनुक्रमे मंदाकिनी (कालिगंगा) आणि भागीरथी नद्या येऊन मिळतात. अलकनंदा-भागीरथी यांचा संयुक्त प्रवाह 'गंगा-भागीरथी' नावाने ओळखला जातो (भा. ४.६.२४; ५.१७.५).

**उगम**--स्कंदमते हिमालयातील वसुधारा कुंडद्वारा या नदीचा उगम होतो (स्कन्द. वैष्णव. ३.६). कॅप्टन रेपर यांनी या नदीचा 'बिशनगंगा' नामक आद्य प्रवाह उत्तरेकडील कामेत शिखरापर्यंत (२५४३१') शोधला असून या नदीचा उगम या पर्वतातच कोठेतरी होत असावा (एशि. रिसर्चेस्. ११).

बद्रिनाथनजीकच्या नारायण पर्वताच्या पायथ्याशी ही नदी मैदानी प्रदेशात येते. म्हणून येथेच या नदीचा उगम झाला असे मानतात.

**नामांतरे**--प्राचीन साहित्यात या नदीची निम्नलिखित नामांतरे आढळतातः--

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. महाभारत (आ. १५८.१८-१९) | अलकनंदा (देवलोकातील नामांतर) |
| ,, | वैतरणी (पितृलोकातील नामांतर) |
| ,, | गंगा (मनुष्यलोकातील नामांतर) |
| २. महाभारत (आ. २०७.७; अनु. १६५.२८) | अपरनंदा |

**महाभारतात**--या ग्रंथमते अलकनंदा हे गंगेचे देवलोकातील नामांतर असून (म. आ. १५८.१८), ही प्रातःस्मरणीय नदी (म. अनु. १६५.२८) हेमकूट पर्वतामध्ये उगम पावत असे (म. आर. १०९.१-२). यावरून गंगा नदीचा प्रारंभीचा भाग अलकनंदा नावाने ओळखला जात असावा. ही नदी सप्तमुखांनी समुद्रास जाऊन मिळत असे (म. आ. १५८.१७). या ठिकाणी गंगा नदीच्या सात मुखांचा निर्देश अभिप्रेत असावा.

याच ग्रंथात अन्यत्र अर्जुनाच्या प्रथम वनवासात, तसेच लोमश-यात्रेत 'नंदा' नदीसमवेत या नदीचा निर्देश आढळतो (म. आ. २०७.७; आर. १०९.१).

**पौराणिक साहित्यात**--या साहित्यमते गंगा नदीच्या चार आद्य प्रवाहांपैकी दक्षिणवाहिनी अलकनंदा ही एक असून ती सप्तमुखांनी समुद्रास मिळते (विष्णु. २.२.३२; २.८.११४; वायु. ४२.२७; कूर्म. पूर्व. ४६.२९-३१; शिव. उमा १७.२९).

भागवतमते ब्रह्मसदन (मेरुपर्वत) येथे उगम पावणारी ही नदी हेमकूट पर्वताची दक्षिणेकडील शिखरे ओलांडून दक्षिणोदधीला (बंगालचा उपसागर) जाऊन मिळत असे (भा. ५.१७.९).

नारदमते स्वर्गावतरित गंगा नदी सर्वप्रथम अलकनंदा या नावाने सुविख्यात असून, भगीरथाने कैलास पर्वतानजीकच्या बिंदु सरोवरानजीक तपश्चर्या करून तीस दक्षिणवाहिनी बनविले. भगीरथाच्या रथाच्या मागे मागे दक्षिणेकडे जाणारी ही नदी गंगा-भगीरथी या नावाने सुविख्यात झाली.

अन्य पुराणात गंगा-भागीरथी नदीच्या उपरोक्त दक्षिणवाही प्रवाहाचा, तसेच हरिद्वारनजीकच्या गंगा नदीचा निर्देश 'अलकनंदा' नावाने आढळतो (कूर्म. पूर्व. ४६.३१; पद्म. उ. २२.१७; शिव. उमा. १७.२९).

**नदीकाठचे प्रदेश**--पौराणिक साहित्यमते या नदीच्या दक्षिणानुगामी प्रवाहाकाठी निम्नलिखित देश होतेः--

१. उत्तर मानस सरोवर (वायु. ४२.२७; मार्कं. ५३.८); २. कलिंग शिखर (वायु. ४२.२८); ३. कैलास पर्वत (वायु. ४२.३२); ४. गंगा नदी (वायु. ४२.३९); ५. गंधमादन पर्वत (वायु. ४२.२५; मार्कं. ५३.७); ६. गंधमादन वन (नंदन) (वायु. ४२.२७); ७. ताम्राभ पर्वत (वायु. ४२.२९); ८. त्रिशिखर पर्वत (वायु. ४२.२८; मार्कं. ५३.८); ९. दक्षिणोधि (वायु. ४२.३५); १०. देवशृंग (वायु. ४२.३१);

११. नंदनवन (मार्क. ५३.८; वायु. ४२. २७); १२. निषध पर्वत (वायु. ४२.२९); १३. पंचकूट पर्वत (वायु. ४२.३२); १४. पिशाचक पर्वत (वायु. ४२.३१); १५. महाशैल (वायु. ४२.३१); १६. रुचक पर्वत (वायु. ४२.२९); १७. वसुधार पर्वत (वायु. ४२.३०); १८. श्वेतोदरगिरि (वायु. ४२.३०); १९. सुमूल पर्वत (४२.३०); २०. हिमवत् पर्वत (वायु. ४२.३९; मार्क. ५३.१०); २१. हेमकूट पर्वत (वायु. ४२.३१; भा. ५.१७.९).

तीर्थस्थाने--पद्ममते अलकनंदा ही अत्यंत पवित्र नदी असून (पद्म. उ. २२.१७), या नदीकाठची सद्यःकालीन प्रमुख तीर्थस्थाने पुढीलप्रमाणे होतः –१ बद्रीनाथ –अलकनंदा नदी या स्थानी सर्वप्रथमअवतीर्ण होते; २–३. भीमशिला आणि मानसोद्भेद–ही दोन्ही स्थाने अलकनंदा–सरस्वती संगमानजीकच्या केशवप्रयागनजीक आहेत.

अलकनंदा नदीचे संगम—या नदीची निम्नलिखित संगमस्थानेहि अत्यंत पवित्र मानली जातातः—

| संगम | तीर्थस्थान |
|---|---|
| १. अलकनंदा–गरुडगंगा संगम | जोशीमठ |
| २. ,, वसुधारा ,, | अलकापुरी शिखराजवळ |
| ३. ,, भागीरथी ,, | देवप्रयाग |
| ४. ,, मंदाकिनी ,, | रुद्रप्रयाग |
| ५. ,, पिंडरगंगा ,, | कर्णप्रयाग |
| ६. ,, नंदा ,, | नंदप्रयाग |
| ७. ,, विष्णुगंगा ,, | विष्णुप्रयाग |
| ८. ,, सरस्वती ,, | केशवप्रयाग |

नारदमते अलकनंदा आणि भागीरथी नद्यांचा संगम बदरिकाश्रमानजीक होत असे (नारदीय. २.६७. ७२–७३).

उपनद्या—या नदीच्या निम्नलिखित प्रमुख उपनद्या होत :—

१. पिंडरगंगा (आधु. पिंडा) नदी--या नदीकाठी गढवालमधील आधु. श्रीनगर गाव आहे.

२. मंदाकिनी नदी--गढवाल प्रदेशातील केदार पर्वतामध्ये उगम पावणारी आधु. कालिगंगा नदी ती हीच असून, या नदीच्या संगमावर आधु. रुद्रप्रयाग गाव आहे.

तेथून पुढे अलकनंदा नदी संपून गंगा–भागीरथी नदी सुरू होते (लॉ, रिव्हर्स. पृ. २१).

२. (नगर) बौद्ध साहित्यमते देवांची कल्पनारम्य नगरी. कोशल देशातील कुशावती (कुशिनारा) नगर पुराणप्रसिद्ध अलकनंदा गावाप्रमाणेच वैभवसंपन्न होते (दीघ. २.११६; १३४; जा. १.३९२; चरिय पिटक. १.४).

**अलकन्द** (नगर)--कौटिलीय अर्थशास्त्रमते बर्बर देशातील एक व्यापारी नगर. श्रोतसी नदीकाठचे हे गाव पाणीदार मौक्तिकांसाठी विशेष प्रसिद्ध होते (श्यामशास्त्री, कौ. अ. पृ. ८६; ९०).

भौगोलिक स्थान--या नगराच्या भौगोलिक स्थानाविषयी अभ्यासकांमध्ये निम्नलिखित मतांतरे आढळतातः-

१. मुजुमदारशास्त्री यांच्या मते--ग्रीक साहित्यात निर्देशिलेले 'सिकंदरचे नौबंधनस्थान' (अलेक्झांडर्स हेवन) ते बहुधा हेच असावे (कनिंग., पृ.६९२-६९४).

२. स्मिथ यांच्या मते--हे नगर आधु. कराची गावानजीक असून, तेथील अवशेषसमूहात कौटिलीय अर्थशास्त्रात निर्देशिलेल्या श्रीवंट सरोवराचे अवशेष आढळतात (स्मिथ, पृ. ११०).

**अलकन्द-आहार**--जयचंद्र यांच्या मते सिकंदरने स्थापिलेल्या दक्षिण अफगाणिस्थानातील 'अलेक्झांड्रिया अपुद् कॉकेसम्' (आधु. कंदहार) नगराचे नामांतर (अलेक्झांड्रिया पहा).

**अलकन्दा** (नगर)--बौद्ध साहित्यमते 'अलका' नामक कुबेरराजधानीचे नामांतर (दीघ. २.१४७; अलका पहा).

**अलका** (नगर)--महाभारतमते कुबेरराजधानीचे नगर (म. आ. ८०.८३.*; स. १०.८). भागवतमते ही नगरी कैलास पर्वतावर नंदा आणि अलकनंदा या दोन नद्यांच्या दरम्यान होती. नामांतर–'अलकंदा.

बौद्ध साहित्यात—या साहित्यमते हे गाव उत्तर कुरु देशामध्ये होते (दीघ. ३.२०१; चुल्ल वग्ग. ३९.५).

याच साहित्यात अन्यत्र 'समृद्ध नगर' अशा सर्वसामान्य अर्थाने 'अलकंदा' या नगरनामाचा प्रयोग आढळतो (चुल्ल वग्ग. ३७.१०६;८१.३). बुद्धघोषाच्या टीकाग्रंथात 'अलकंदा'चा अर्थ 'मनुष्यवस्तीने गजबजलेले नगर' असा दिला आहे.

२. (पुष्करिणी) महाभारतमते अलका नगरातील एक पुष्करिणी (म. आ. ८०.८३*).

३. ( तीर्थ ) एक ब्रह्मदेवस्थान. येथील ब्रह्मदेवाचे नाव धनाधिप होते ( पद्म. सृ. २९. १५४ ).

**अलनाडु** ( देशविभाग )--शिलालेखसाहित्यमते दक्षिण भारतातील मदुरा जिल्ह्यातील एक देशविभाग. हा अरुमोरि-देववळनाडु नामक देशविभागात असून त्यामध्ये राज-चूडामणिच्चतुर्वेदिमंगलम् नामक एक ग्राम होते ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. ८.३३३.; रंगाचारी, मदुरा. क्र. ३२६ ).

**अलन्दतीर्थ** ( ग्राम )--पूर्व चालुक्य राजा विष्णुवर्धन ( प्रथम ) याच्या सातारा ताम्रपटमते महाराष्ट्रातील एक ग्राम. भीमरथी ( आधु. भीमा ) नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर श्रीनिलय भोगामध्ये अणोपत्य नामक अग्रहार ग्रामाच्या उत्तरेस हे गाव होते ( इंडि. अँटि. १९.३०३-३०४ ).

फ्लीट यांच्या मते पुणे जिल्ह्यातील भोर गावापासून ५ मैल ईशान्येकडील आणि साताऱ्यापासून ३५ मैल उत्तरेकडील आधु. आळंद गाव ते हेच असावे. अन्य अभ्यासकांच्या मते पुणे जिल्ह्यातील 'आळंदी' क्षेत्राचा निर्देश येथे अभिप्रेत असावा. परंतु हा तर्क बरोबर वाटत नाही.

**अलर्कपुरी** ( तीर्थ )--उत्तर प्रदेशान्तर्गत प्रयाग नजीकचे एक तीर्थस्थान. यमुना नदीच्या दक्षिण तीरावरील आधु. अरैल गाव ते हेच होय. येथे सोमेश्वर शिवाचे आणि वेणीमाधव विष्णूचे देवालय आहे ( प्रयागप्रदीप. पृ. २५३ ).

**अलर्केश** ( लिंग )--काशी येथील शिवलिंगस्थान ( स्कन्द. काशी. ९७.३३० ).

**अलवर** ( जैनस्थान )-- पद्मनंदीच्या पार्श्वनाथ स्तोत्रमते राजस्थानमधील जैन तीर्थस्थान. जयपुर-दिल्ली रेल्वेमार्गावरील अलवर रेल्वेस्थानकापासून ४ मैल अंतरावर एका टेकडीवरील या स्थानी रावणपार्श्वनाथाचे सुविख्यात मंदिर आहे. नामांतरे-'उपप्लव्यपुर'; 'हरिश्चंद्रपुर.'

सुमतिसागरकृत 'तीर्थजयमाला', जयसागरकृत 'तीर्थ-जयमाला' आदि उत्तरकालीन जैन धार्मिक साहित्यातहि या स्थानाचा निर्देश आढळतो ( ती. सं. पृ. ११६ ).

**अलस** ( देश )--वामनमते एक उदीच्य ( उत्तर भारतान्तर्गत ) देश ( वामन. १३.४२ ).

**अलसन्दक**--बौद्ध साहित्यमते एक लोकसमूह ( अपादान. १.३५९; अलेक्झांड्रिया पहा ).

**अलसन्दा** ( नगर )--सिलोनी महावंशमते वायव्य भारतान्तर्गत 'योन' ( यवन ) देशातील अलकंद ( अलेक्झाड्रिया अपुद् कॉकेसम् ) नगराचे नामांतर (महा. २९.४०; अलेक्झांड्रिया पहा ). नामांतर—'अलेक्झांड्रिया' ( ग्रीक साहित्य ).

२. ( द्वीप ) बौद्ध मिलिंदपन्होमते मध्य आशियातील एक द्वीप. या ग्रंथमते चीन, वाराणसी, गंधारप्रमाणेच हे प्रमुख बौद्ध केंद्र असून ( मिलिन्द. पृ. ३२७ ), कुशाण राजा मिलिंद ( मेनँडर ) याचा जन्म या द्वीपातील कलसी गावी झाला होता. सांगलपासून २-३ कोस अंतरावर हे द्वीप होते ( मिलिन्द. पृ. ८२-८३ ).

केंब्रिज हिस्टरीच्या मते हे द्वीप बॅक्ट्रिया देशामध्ये सिंधु नदीच्या काठी असावे ( केंब्रिज हिस्टरी, पृ. ५५० ).

**अलाबु** ( तीर्थ )--विरजक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( ब्रह्म. ४२.६ ).

**अलि** ( तीर्थ )--नर्मदा नदीकाठचे एक तीर्थस्थान ( कूर्म. उत्तर. ४२.३७ ).

**अलिकपृष्ठ** ( ग्राम )--नालंदा मुद्रालेखमते बिहार-मधील पटना जिल्ह्यातील एक गाव ( आर्कि. सर्व्हे. क्र. ६६, पृ. ४८ ).

**अलिकेश्वर** ( लिंग )--पश्चिम भारतातील नर्मदा नदीकाठचे एक शिवलिंगस्थान. आधु. बिसोदग्राम ते हेच असून 'अलिका' नामक गंधर्वकन्येच्या तपस्येमुळे त्यास हे नाव प्राप्त झाले होते ( ती. ४३८ ).

**अलिन** ( देश )—ह्युएन्त्संगच्या मते मध्य आशियातील वक्षु ( अमूदरिया ) नदीच्या दक्षिण किनाऱ्यावरील तुखार ( आधु. तोखारिस्तान ) राज्यान्तर्गत एक देश. भारताहून चीन देशास परत जातेवेळी मुंगकन् ( आधु. तालिकान् ) देशाच्या उत्तरेस 'अ-लि-नि' देश त्यास लागला.

**भौगोलिक स्थान**--या देशाच्या भौगोलिक स्थानाविषयी अभ्यासकांमध्ये निम्नलिखित मतांतरे आढळतात:-

१. यूल यांच्या मते--प्राचीन अहरेंग् ( आधु. हजरत इमाम ) गावासभोवतालचा प्रदेश म्हणजे हा देश होय ( अहरेंग् पहा ).

२. वॉटर्स यांच्या मते—प्राचीन तुखार देशामध्ये हा देश वसला असावा. 'कि-पिन्' ( आधु. काबुल आणि कश्मीर प्रदेश ) देशात प्रचलीत असणाऱ्या 'अलिन' नामक जलराक्षसाच्या कथेशी या देशनामाचा संबंध असावा.

**देशवर्णन**--ह्युएन्त्संगच्या तुखार देशाचा उपविभाग असणारा हा देश वक्षु नदीच्या उभय किनाऱ्यांवर वसला होता. या देशाचे आणि त्याच्या राजधानीचे क्षेत्रफळ

अनुक्रमे ६० मैल आणि ३ मैल असून, येथील पीकपाणी, लोकाचार कुभोह (कुंदुझ्) देशाप्रमाणेच होते (वॉटर्स, २.२७२–२७३).

**अलिना** (शिलालेखस्थान)--वलभी सम्राट शिलादित्य (सप्तम) याच्या इ. स. ७६६ मधील अलिना ताम्रपटाचे गुजरात प्रांतातील उपलब्धिस्थान. खेडा जिल्ह्यातील नडियाद या तालुक्याच्या गावापासून १४ मैल ईशान्येस हे ग्राम आहे (कॉर्पस्. इन्स्क्रि.३.२.१७१).

**अलिमद्र** (लोकसमूह)—पौराणिक साहित्यमते उत्तर भारतातील एक लोकसमूह (वायु. ४५.१२०; ब्रह्माण्ड. ४९.४९). पाठभेद–'अनिमद्र' (मार्के. ५४.४०).

पेशावर जिल्ह्यातील युसुफझाइ उपविभागातील काबुल नदीच्या उत्तरेकडील आधु. मर्दान प्रदेश तो हाच होय. हा देश लंपाक (आधु. लघमन) देशाच्या पूर्वेस आणि काबुल-सिंधु संगमाच्या उत्तरेस असून, येथे अनेक महत्त्वपूर्ण बौद्ध आणि ग्रीक–बॅक्ट्रियन स्थापत्यावशेष सापडले आहेत.

'अलिमद्र' हे संभवतः 'अरिमर्दन' चे अपभ्रष्ट रूप असावे (चौधरी, पृ. १०१).

**अली मस्जिद** (बौद्धस्थान)—गंधार (आधु. अफगाणिस्तान) देशान्तर्गत पेशावर खोऱ्यातील सुविख्यात बौद्ध स्तूपसमूह. खैबरखिंडीपासून ½ मैलावरील एका टेकडीवर या स्तूपसमूहाचे अवशेष आढळतात. इ. स. ३ ऱ्या शतकातील उत्तरकालीन गंधार स्थापत्यशैलीचे प्रातिनिधिक उदाहरण म्हणून हे अवशेष महत्त्वपूर्ण आहेत.

**स्थापत्यवैशिष्ट्ये**—येथील छोट्या आकाराचे बहुसंख्य अर्धवर्तुळाकृती स्तूप, १–४ मजली घुमट आणि अनेक मजली हार्मिका यांच्या दरम्यान बांधले आहेत.

**मुख्य स्तूप**--कनिंगहॅम यांनी इ. स. १८७९ मध्ये उत्खनन केलेल्या येथील मुख्य स्तूपाच्या व्यासपीठाचा भाग केवळ आज उभा दिसतो. या व्यासपीठावरील पद्मासन घातलेल्या बुद्धप्रतिमांचे नक्षीकाम अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण आहे.

कुशाणवंशीय वसुदेव राजाची तीन नाणी या स्तूपामध्ये सापडली आहेत. तत्रापि हा स्तूप त्यापेक्षा बराच उत्तरकालीन (इ. स. ३ रे शतक) असावा.

**अलु** (तीर्थ)--धर्मारण्यातील एक पवित्र गाव (स्कन्द. ब्राह्म. २.३९.३१).

**अलुखल** (तीर्थ)--धर्मारण्यातील एक पवित्र गाव (स्कन्द. ब्राह्म. २.३९.२३३).

**अलेक्झाण्ड्रिया** (नगर)—मध्य आशियान्तर्गत अफगाणिस्तानमध्ये सिकंदरने स्थापलेल्या नगरांचे ग्रीकभाषीय नामांतर. 'सिकंदरने स्थापलेली' अशा अर्थाने त्यांना हे नाव प्राप्त झाले असून त्यापैकी विशेष उल्लेखनीय नगरे पुढीलप्रमाणे होत:--

१. अलेक्झांड्रिया अपुद् कॉकेसम्--अफगाणिस्तानातील कोह–इ–दामन् खोऱ्यामधील हे नगर सिकंदरने भारतस्वारीचा पहिला टप्पा म्हणून स्थापले असून, खावक्, कौशान आणि हिंदुकुश पर्वतांच्या खिंडीवर नियंत्रण ठेवण्याच्या दृष्टीने ते महत्त्वाचे होते.

नामांतरे--१. 'अलसंदा' (सिलोनी महावंश २९.४०); २. 'अलकंद' (स्थानिक लोकात).

इ. स. पू. ३२७ मध्ये बॅक्ट्रियाविजयानंतर हिंदुकुश (ग्रीक–'कॉकेशस') पर्वतामधील खावक् आणि कौशान खिंडीच्या मार्गाने सिकंदर या पर्वताच्या पायथ्याशी आला आणि त्याने परोपनिसदै देशामध्ये हे नगर स्थापले. या नगरापासून काबुल नदीपर्यंतच्या विस्तीर्ण प्रदेशावर त्यरिअस्पेस् नामक क्षत्रपाची नियुक्ती करून आपला परत फिरण्याचा रस्ता त्याने निर्धोक केला आणि मग काबुल रस्त्याने भारतावर आक्रमण केले.

**भौगोलिक स्थान**--या नगराच्या भौगोलिक स्थानाविषयी अभ्यासकात निम्नलिखित नामांतरे आढळतात:-

(१) स्मिथ यांच्या मते--काबुलपासून ३० मैल उत्तरेकडील चारिकर गावानजीकचे आधु. ओपियान (हुपियन) गाव ते हेच असावे (स्मिथ, पृ. ५२). पाणिनीच्या अष्टाध्यायीत निर्देशिलेल्या पर्शु देशाची राजधानी याच गावी होती (जे. ए. एस्. बी., इ. स. १८३८; पृ. १६६).

(२) जयचंद्र यांच्या मते--ग्रीक साहित्यातील अरकोसिय देशाची राजधानी असणारे दक्षिण अफगाणिस्तानातील आधु. कंदहार शहर ते हेच असावे. अलेक्झांड्रिया→अलकंद आहार→कंदहार अशा पद्धतीने या गावास हे नाव प्राप्त झाले असावे (जयचंद्र, इतिहास प्रवेश पृ. ११५).

कंदहार गावच्या 'शहर-इ-कून' नामक स्थानी अशोकाचा ग्रीक–अरेमिक द्विभाषीय लघु-आज्ञालेख सापडला आहे. त्याचे काळी हे गाव वायव्य भारत आणि ग्रीस यांच्या दरम्यानच्या व्यापारी दळणवळणाचे केंद्रस्थान

होते. पाटलीपुत्र – तक्षशिला – काबुल – कंदहार यांना जोडणारा एक व्यापारी हमरस्ता अशोककाली अस्तित्वात असून, येथून एक रस्ता हेरातमार्गे एक्बतन गावी आणि अन्य एक रस्ता इराणमधील पर्सेपोलिसमार्गे सूस गावी जात असे. या कारणाने अशोककाली या नगरास अनन्यसाधारण व्यापारी महत्त्व प्राप्त झाले होते ( थापर, अशोक पृ. २३२ ).

( ३ ) मॅकिंडल यांच्या मते—आधु. बामियान गाव ते हेच असावे ( मॅकिंडल, अलेक्झांडर पृ. ५८ ). परंतु ते बरोबर वाटत नाही.

( ४ ) गैगर यांच्या मते—आधु. काबुल नगर ते हेच असावे ( गैगर, महा. पृ. १९४ ).

महावंशात—या ग्रंथमते अनुराधपुर गावी दुत्थगामनि राजानेआयोजिलेल्या स्तूपपायाभरणीप्रसंगी अलसंदा गावचा ' योनक महाधम्मरक्खित ' नामक आचार्य आपल्या तीस हजार बौद्ध शिष्यांसह उपस्थित होता.

अपादानमध्ये—या ग्रंथात ' अलसंदक ' नामक एका लोकसमूहाचा निर्देश असून ( अपादान. १.३५९ ), अलसंदा नगरात निवास करणाऱ्या लोकांचा निर्देश तेथे अभिप्रेत असावा.

२. अलेक्झांड्रिया अरियोन— अफगाणिस्तानातील हेरा (ग्रीक-' अरिय ') देशात हे नगर असून, आधु. हेरात गाव ते हेच होय. नामांतरे—१. ' अरैय ' ( टॉलेमी ); २. ' अर्तकोअन ' ( ग्रीक साहित्य ); ३. ' औनोंस ' ( ग्रीक साहित्य ).

विल्सन यांच्या मते ' अर्तकोअन ', ' अलेक्झांड्रिया ' आणि ' अरिय ' ही तीनहि गावे आधु. हेरातमध्येच समाविष्ट झाली आहेत. मॅकिंडल यांच्या मते बॅक्ट्रिया-देशातील ' औनोंस ' नगर ते हेच होय ( मॅकिंडल, अलेक्झांडर पृ. ३६–३९ ). स्थानिक समजुतीनुसार या नगराची आद्य स्थापना लोहरस्प याने केली, गुस्तास्प याने त्याचे परिवर्धन केले, बहमनने त्याची सुधारणा केली आणि अलेक्झांडरने त्याला पूर्णत्व आणले.

३. पंजाबातील सतलज आणि चिनाब नद्यांच्या संगमानजीकचे नगर. पंजाबातील बहवालपुर प्रदेशान्तर्गत आधु. ' उच् ' गाव ते हेच होय. नामांतर ( फार्सी साहित्य )— ' सिकंदरिया '.

४. कौटिलीय अर्थशास्त्रमते बर्बर देशान्तर्गत 'अलकंद' नगराचे नामांतर ( श्यामशास्त्री, कौ. अ. पृ. ८६; अलकंद पहा ).

**अलेश्वर** ( लिंग )—श्रीपर्वतान्तर्गत ' ब्रह्मेश्वर ' शिवलिंगाचे नामांतर ( कूर्म. उत्तर. ४१.१८; ब्रह्मेश्वर पहा ).

**अलोए** ( नगर )—टॉलेमीच्या मते दक्षिण भारतातील ( अक्षांश १७° उत्तर; रेखांश १२०°–२० पूर्व ) एक नगर. कारवार जिल्ह्यातील आधु. यल्लापुर गाव ते हेच असावे.

**अलोसङ्ग** ( नगर )—टॉलेमीच्या मते पूर्व भारतातील ( अक्षांश २४°–५' उत्तर; रेखांश १५२° पूर्व ) मैंद्रोस पर्वताच्या उत्तरेकडील एक नगर. विल्फोर्ड यांच्या मते डाक्क्याच्या वायव्येकडील लोझुंग नदीकाठचे आधु. एल्लसिंग गाव ते हेच असावे.

**अलौरा** ( ग्राम )—चंदेल राजा त्रैलोक्यमल्ल याच्या इ. स. १२१२ मधील धुरेति ताम्रपटमते मध्य भारतातील एक गाव. रेवा गावाच्या ६ मैल आग्नेयेकडील आधु. धुरेति गावाच्या परिसरात हे असावे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.३७१ ).

**अल्पा** ( सरोवर )—गुजरात देशान्तर्गत सिद्धपुर गावचे पवित्र सरोवर ( ती. ४०२ ).

**अल्लकप्प** ( नगर )—बौद्ध साहित्यमते बुलि ( बिहारमधील आधु. मुजफ्फरपुर आणि शहाबाद जिल्ह्यांचा प्रदेश ) जनपदाच्या राजधानीचे गाव. बुद्धपरिनिर्वाणानंतर बुलि लोकांनी या गावी एक शरिरावशेषस्तूप बांधला होता ( दीव. २.१६७ ). बिहारमधील शहाबाद जिल्ह्यातील मसेर–वैशाली रस्त्यावरील प्राचीन वेठदीप गावानजीक हे असावे.

बौद्ध साहित्यमते या नगराची क्षेत्रमर्यादा १० योजने असून, येथील राजा वेठदीप नगराच्या वेठदीपक राजाचा नातेवाईक होता ( धम्मपद टीका, हार्वर्ड सिरीज. पृ. २४७ ).

**अल्लूरक** ( ग्राम ) — चालुक्य राजा श्रियाश्रय-शिलादित्याच्या इ. स. ६९३ मधील सुरत ताम्रपटमते गुजरातमधील एक गाव. सुरत जिल्ह्यातील उंभेल गावाच्या ४ मैल पूर्वेकडील आधु. अलूरा गाव ते हेच होय ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.१३४ ).

**अल्लोसिग्ने** ( ग्राम )—टॉलेमीच्या मते दक्षिण भारतातील गोदावरी नदीच्या मुखाच्या ४० मैल दक्षिणेकडील व्यापारी बाजारपेठेचे गाव ( अक्षांश ११°–२०' उत्तर; रेखांश १३५°–४०' पूर्व ). पेरिप्लसच्या मते टॉलेमीची माहिती ऐकीव स्वरूपाची असून, गोदावरी नदीच्या मुखापासून २३० मैल दक्षिणेकडील आधु. कोरिंग (कोरंजा) बंदर ते हेच असावे.

**अवकीर्ण** ( तीर्थ )--पौराणिक साहित्यमते कुरुक्षेत्रान्तर्गत सरस्वती नदीकाठचे पृथूदकनजीकचे एक तीर्थस्थान ( नारद. २.६५.१०७; वामन. ३९.२४-३२; पद्म. सृ. २७.४१ ). महाभारतमते दर्भि ऋषीने हे निर्माण केले ( म. आर. ८१.१३३ ). नामांतर ( नारदपुराण )- ' अवकिर्ण '; ( महाभारत )- ' अवतीर्णतीर्थ '.

आधुनिक स्थान--कुरुक्षेत्रान्तर्गत सरस्वती नदीकाठचे अवकीर्ण नामक ब्रह्मदेवतीर्थ ते हेच असून, बक दाल्भ्य ऋषींचे तपस्यास्थान म्हणून ते पवित्र मानतात ( ती. ८४ ).

**अवगन** ( लोकसमूह )--बृहत्संहितामते वायव्य भारतातील जागुड ( आधु. गझनी ) देशानजीकचा एक लोकसमूह ( बृ. सं. ११.६१ ). डे यांच्या मते आधु. अफगाण लोक ते हेच असावेत ( डे, पृ. ९ ).

बृहत्संहितामते 'अवगन' आणि 'अश्मक' ( अश्वक ) हे स्वतंत्र लोक होते. त्यावरून ' अवगन ' लोक हे ' अश्वकायन ' ( अश्मक अथवा अस्सकेनोइ ) लोकांहून वेगळे असावेत ( मॅक्रिंडल, मेगॅस्थेनिस. पृ. १५७-१५८; अश्मक पहा ).

नामांतरे--प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :--

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. ऋग्वेद ( ७.१८.७ ) | पक्थ |
| २. हिरोडोटस् ( वेलो, पृ. ५६-५७ ) | पक्टयूस |
| ३. ह्युएन्त्संग | ओ-पो-किएन् ( अवघन ) |
| ४. पौराणिक साहित्य ( वायु. ४५.११५; ब्रह्माण्ड. ४९. ४९; ५४ ) | अपग ( अवगहन ) |
| ५. अर्मेनियन साहित्य | अव्वान् |
| ६. बृहत्संहिता ( कर्न आवृत्ती ) | आवगाण |
| ,, ,, | आवकाण |
| ,, ,, | आवंगण |
| ,, ,, | कवंकण |
| ,, ,, | आवगन |
| ७. ऐन्-इ-अकबरी ( २.४०२ ) | अपघन् |

नामव्युत्पत्ती--' अवगन 'च्या नामव्युत्पत्तीविषयी अभ्यासकात निम्नलिखित मतांतरे आढळतात :--

१. डॉ. बेलो यांच्या मते--अफगाण हे ज्ञातिनाम अर्मेनियनभाषीय ' अव्वान् ' (= गिर्यारोहक ) चे पर्शियनभाषीय रूप असून, व्यवसायनिदर्शक या नावास उत्तरकालात ज्ञातिवाचक अर्थ प्राप्त झाला ( मॅक्रिंडल, अलेक्झांडर. पृ. ३३४ ).

२. ऐन्-इ-अकबरीमते--' अफघन् ' नामक इराणी व्यक्तीपासून उत्पन्न झाल्याने या लोकांस हे नाव मिळाले ( ऐ. अ. २.४०२ ).

३. ह्युएन्त्संगच्या मते--या लोकांचे खरे नाव ' ओ-पो-किएन् ' ( अवकन् अथवा अवघन् ) होते.

४. पौराणिकसाहित्यमते--या लोकांचे मूळ नाव ' अवगहन ' अथवा ' अपगहन ' ( अरण्याच्या अधोभागातील ) असून, त्याचेच उत्तरकालीन रूप अवघन्→ अवागन→ अफगाण असे झाले असावे.

५. बृहत्संहितामते--या लोकांचे मूळ संस्कृतभाषीय नाव ' अवगहन ' ( पर्वताच्या उतारावर रेहाणारे लोक ) असून त्याचेच उत्तरकालीन रूप ' अवगाण ' झाले असावे ( बृ. सं. ११.६१ ). या लोकांची अन्य सारी नामांतरे 'अवगाण 'चीच अपभ्रष्ट रूपे होत.

व्याप्ती--कनिंगहॅमच्या मते अफगाण लोकांची आद्य वसाहत आग्नेय अफगाणिस्तानात ( ह्युएन्त्संगनिर्दिष्ट 'ओ-पो-किएन् '=अवघन् ) असून, त्याचे काळी उर्वरीत अफगाणिस्तान ' कौ-फु ' नावाने सुविख्यात होते. उत्तरकालात हा साराच देश ' अवघन् ' ( अवगन ) नावाने ओळखला जाऊ लागला.

ऋग्वेदात--दाशराज्ञ युद्धामध्ये ' तृत्सु-भरत ' लोकांशी युद्ध करणारे ' पक्थ ' लोक ( ऋ. ७.१८.७ ) म्हणजे अफगाण लोक असावेत.

झीमर यांच्या मते हिरोडोटसने निर्देशिलेले ' पक्ट्यूस ' ( पूर्व अफगाणिस्तानातील आधु. पख्तून ) लोक ते हेच असावेत ( झीमर, अल्टिंडिशे लेबेन. पृ. ४३०-४३१ ). या लोकांच्या पक्थ राजाने अश्विनीकुमारांच्या कृपापात्र च्यवान नामक आर्य राजाशी युद्ध केले होते ( ऋ. ८.२२.१०;४९.१०;१०.६१.१ ). यावरून ऋग्वेदकाळापासुन कुभा ( आधु. काबुल ) नदीच्या खोऱ्यामध्ये हे लोक रहात असावेत.

ऐतिहासिक माहिती--या देशाचा सुसंगत राजकीय इतिहास गझनीच्या महमदाच्या वारीपासुन ( इ. स. १०२४ ) उपलब्ध होतो. परंतु त्याहिपूर्वीच्या दुराणी राज्यकालात एक देशविभाग म्हणून हा देश अस्तित्वात

असून, त्याच्या भौगोलिक सीमा पुढीलप्रमाणे होत्या :-- १. पूर्वेस--पंजाब देश; २. पश्चिमेस-- इराण देश; ३. उत्तरेस-अमूदरिया नदी; ४. दक्षिणेस-बलुचिस्तान.

प्राचीन संस्कृत साहित्यात निर्देशिलेल्या अनेक जातिसमूहांचे निवासस्थान म्हणून हा विस्तीर्ण भूप्रदेश आणि त्यातहि उत्तर अफगाणिस्तान महत्त्वाचा मानतात.

बृहत्संहिता आणि वायु पुराण या दोन स्वतंत्र ग्रंथपरंपरातील 'अवगन' देशान्तर्गत लोक, नगरे, नद्या आदींच्या संस्कृतभाषीय नावांवरून या ग्रंथांच्याकाळी अफगाणिस्तान आणि भारत यांचे परस्परसंबंध अधिक जवळिकीचे दिसतात. यापैकी अनेक लोकसमूहांचा निर्देश सिकंदरस्वारीसंबंच्याधी ग्रीक साहित्यात 'परोपनिसदै (आधु. काबुलखोरे) देशनिवासी' म्हणून आढळतो. 'आर्यावर्त' आणि 'काबुलखोरे' यांच्या भौगोलिक आणि सांस्कृतिक संबंधांच्या दृष्टीने हे निर्देश महत्त्वाचे वाटतात.

जनपदे--या देशातील निम्नलिखित जनपदे विशेष सुविख्यात मानली जात :--

१. गंधार जनपद--पूर्वेस तक्षशिला नगरी आणि पश्चिमेस कुणार नदी यांच्या दरम्यान हे असून, त्याची दक्षिण सरहद्द काबुल नदीने बनली होती (गंधार पहा).

२. कापिश जनपद (आधु. काफिरिस्तान)--कुणार नदी आणि हिंदुकुश पर्वत यांच्या दरम्यान हे असून, हिंदुकुश पर्वताने ते बाह्लीक देशापासून विभक्त झाले होते (कापिश पहा).

३. कंबोज जनपद--वक्षु (आधु. अमूदरिया) नदीच्या खोऱ्यात पामीर-बदक्षन् प्रदेशात हे असून, त्याची राजधानी द्वारका (आधु. दर्वाझ) गावी होती (कंबोज पहा).

**उत्तर अफगाणिस्तान अथवा अफगाण तुर्कस्तान**--या देशविभागामध्ये निम्नलिखित देशांचा समावेश होत असे :--१. बाह्लीक (आधु. बल्ख); २. खुल्म (आधु. ताशकुर्घान); ३. कुंदुझ्; ४. कतघन् (आधु. कतघन्); ५. बदक्षन्; ६. वखन्.

उपरोक्त देशांपैकी कतघन्, बदक्षन् आणि वखन् हे तीन देश म्हणजे आधु. तुर्कस्तान (प्राचीन 'तुखारिस्तान') असले तरी प्राचीन तुखारिस्तानमध्ये वक्षु (अमूदरिया) नदीचे खोरे आणि पश्चिम अफगाणिस्तानच्या बहुतांशी साऱ्या प्रदेशाचा समावेश होत असे.

**भौगोलिक उपविभाग**--भौगोलिक दृष्ट्या अफगाणिस्तान देश वक्षु (आधु. अमूदरिया), सरस्वती (आधु. हेल्मांद) आणि कुभा (आधु. काबुल) या तीन नद्यांच्या खोऱ्यांमध्ये विभागला आहे. यापैकी काबुल नदीचे खोरे हेल्मांद आणि अमूदरिया खोऱ्यांपासून अनुक्रमे पवमन आणि हिंदुकुश पर्वतांनी विभक्त झाले आहे.

**अवघन** (लोकसमूह)--ह्युएन्त्संगच्या मते वायव्य भारतातील 'अवगन' लोकसमूहाचे नामांतर (अवगन पहा).

**अवघापुर** (जैनस्थान)--ज्ञानसागराच्या 'सर्वतीर्थवंदन' मते महाराष्ट्रातील सुविख्यात जैन तीर्थस्थान. परभणी जिल्ह्यातील आधु. औंढा गाव ते हेच असून, येथील नागनाथाच्या सुविख्यात देवालयामुळे ते 'औंढा नागनाथ' या वैकल्पिक नावाने ओळखले जाते.

सहस्रकूट जिनमंदिर--सर्वतीर्थवंदनमते गुणधराने बांधलेल्या या जिनमंदिरात वासुपूज्य, मालि, नेमि, पार्श्व आणि महावीर या पाच कुमार तीर्थंकरांच्या खड्गासनाधिष्ठित मूर्ती होत्या. या कारणाने 'पंचकुमारमंदिर' या वैकल्पिक नावाने ते प्रसिद्ध आहे (ती. सं. पृ. ११६).

**अवघ्रातेश्वर** (लिंग)—काशी येथील शिवलिंगस्थान (स्कन्द. काशी. ७.५७).

**अवटोदा** (नदी)—भारतवर्षान्तर्गत एक नदी (भा. ५.१९.१८).

**अवति** (देश)—गौतमी बलश्रीच्या नाशिक शिलालेखमते मध्य भारतातील 'पश्चिम अवंती' देशाचे नामांतर (एपि. इंडि. ८.६१; अवंती १. पहा).

**अवत्तगाम** (ग्राम)--वर्धमान महावीराच्या आगमनाने पुनीत झालेले पूर्व भारतातील एक ग्राम (जैन कॅनन्स. पृ. २७८). बिहारमधील आधु. छोटा नागपुर प्रदेशात हे असावे.

**अवदैयार कोइल** (शिवमंदिरस्थान)--तामीळनाडमधील सुविख्यात शिवमंदिरस्थान. तंजौर जिल्ह्यातील अरंतंगि रेल्वेस्थानकापासून ८ मैलांवर हे असून, द्राविड शिल्पशैलीच्या प्राचीनतम आणि सर्वोत्कृष्ट शिवमंदिरात त्याची गणना होते. नामांतर-'तिरुप्पेरुंतुरै.'

स्थापना—स्थानिक समजुतीनुसार माणिकवचकर नामक संतपुरुषास पांड्य राजाने दिलेल्या द्रव्यामधून त्याने हे मंदिर बांधले. आपल्या आयुष्याचा बराच काळ या संतपुरुषाने या मंदिरातच व्यतीत केला. या संताची एक मूर्ती या मंदिरात असून, मुख्य देवतामूर्तीसमवेत तिची पूजा करतात.

शिल्पसौंदर्य—येथील सभामंडपातील स्तंभांच्या वरच्या अंगाची दगडी नक्षीकामयुक्त पट्टी (कॉर्निस) दक्षिण भारतात सर्वोत्कृष्ट असून, काष्ठशिल्पाचा बारकावा त्यामध्ये आढळतो (अन्य उदाहरण-वेलूर मंदिराचा 'कल्याण-मंडप'). हे शिल्प दगडातच कोरल्याची खात्री करुन घेण्यासाठी एका इंग्रज व्यक्तीने त्यावर बदुंकीची गोळी मारली असता ती १ इंचावरच अडली.

स्थलवृक्ष—या मंदिराबाहेरील 'कोत्रै' वृक्षाची 'स्थलवृक्ष' म्हणून पूजा करतात. पाऊसवाऱ्यापासून त्याचे रक्षण करण्यासाठी त्याच्या बुंध्यावर तांब्याचा पत्रा ठोकला आहे (फर्ग्युसन, १.३९६; दास, तामीळनाड. पृ. ८४).

**अवधूतेश** (लिंग)—काशी येथील शिवलिंगस्थान (स्कन्द. काशी. ९७.१८०; लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. ९३).

**अवन्ति** (देश)—वाल्मीकि रामायणमते मध्य भारतातील 'पश्चिम अवंती' देशाचे नामांतर (वा. रा. कि. ४१.१०; अवंती १. पहा).

**अवन्ति-अश्मक** (जोडदेश)—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते एक संयुक्त देशनाम (पा. सू. ६.२.३७). अवंती आणि अश्मक या देशद्वयाचा निर्देश येथे अभिप्रेत असावा (अवंती १.; अश्मक २. पहा).

**अवन्तिका** (देश)—ब्रह्माण्डमते मध्य देशान्तर्गत 'अवंती' देशाचे नामांतर (ब्रह्माण्ड. ४.४०.९१; अवंती १. पहा).

२. (नगर) संस्कृत शब्दकोशसाहित्यमते 'उज्जयिनी' नगराचे नामांतर (कल्पद्रु. ११.२२; अभिधान. १.२. ९७६; उज्जयिनी पहा).

३. (देवीस्थान) 'अवंतिमाहात्म्य'मते अवंती (उज्जयिनी) क्षेत्रान्तर्गत एक देवीस्थान (नारद. २. ७८.३५).

**अवन्तिगा** (नदी)—संस्कृत शब्दकोशसाहित्यमते उज्जयिनी नगराजवळील 'क्षिप्रा' नदीचे नामांतर (क्षिप्रा पहा).

**अवन्ति दक्षिणापथ** (देश)—बौद्ध साहित्यमते नर्मदा नदीच्या दक्षिणेकडील 'माहिष्मती' (अवन्ती) देश-विभागाचे नामांतर (डॉ. भांडारकर, कार्मायकेल लेक्चर्स. पृ. ४५; अवंती १. पहा).

**अवन्तिपुर** (नगर)—अवंतिवर्मन् राजाने इ. स. ९ व्या शतकात स्थापलेले कश्मीरातील होलडा (आधु. वुलर) जिल्ह्यातील सुविख्यात नगर. श्रीनगर-इस्लामाबाद रस्त्यावरील झेलम नदीच्या उजव्या किनारीचे आधु. वांतिपोर (अक्षांश ७५°-४′ उत्तर; रेखांश ३३°-५५′ पूर्व) गाव ते हेच होय.

वांतिपोरच्या पूर्वेकडील डोंगरी उतारावर २ मैलापर्यंत या गावाचे अवशेष आढळतात. त्यामध्ये 'अवंतिस्वामिन्' आणि 'अवंतीश्वर' हे विष्णु आणि शिवमंदिरांचे अवशेष विशेष महत्त्वाचे आहेत.

पुण्यक्षेत्र—राजतरंगिणीमते 'विश्वैकसार' नामक तीर्थस्थानी 'परमसुखनिधान' अशा या नगराची स्थापना अवंतिवर्मनाने केली (राज. ५.४४). यावरुन एक पुण्यक्षेत्र म्हणून या स्थानाची पूर्वापार ख्याती असावी (विश्वैकसार पहा).

राजकीय महत्त्व—राजतरंगिणीमते कश्मीरच्या निम्न-लिखित राजांच्या राज्यकालात 'अवंतिपुर' हे महत्त्वपूर्ण गाव होते:—१. कलश (इ. स. १०६३-१०८९) (राज. ७.२९९; ३३७; ३६८); २. हर्ष (इ. स. १०८९-११०१) (राज. ७.१३६६); ३. सुःशल (इ. स. ११२१-११२८) (राज. ८.९७०; १०००; ११४४); ४. जयसिंह (इ. स. ११२८-११४९) (राज. ८.१४७४; १४७६; १४७९; १५८०; २२२४).

जोनराज आणि श्रीवराच्या ग्रंथातहि या नगराच्या राजकीय महत्त्वासंबंधीचे अनेक निर्देश आढळतात (जोनराज. ३२१; ३३०; श्रीवर. १.३३८; ३.४२).

मंदिरे—राजतरंगिणीमते अवंतिवर्मन् राजाने गादीवर येण्यापूर्वी येथे 'अवंतिस्वामिन्' विष्णूचे आणि गादीवर आल्यानंतर 'अवंतीश्वर' शिवाचे अशी दोन मंदिरे बांधली (राज. ५.४४-४५). या मंदिरांचे प्रांगण दगडी तटबंदीने संरक्षिले असून (राज. ८.१४७६), कश्मीरच्या जयसिंह राजाचा सेनापती तेथे लपला होता (राज. ७.१४२९).

कलश राजाच्या राज्यकालात या मंदिराच्या जहागिरी जप्त झाल्या होत्या (राज. ७.५७०).

स्थापत्यावशेष—आधु. वंतिपोर गावातील मंदिरावशेष अवंतिस्वामिन् विष्णुमंदिराचे (१७२′ × १४६॥′) असून गावाच्या अर्धा मैल वायव्येकडील जौब्रार येथील अवशेष अवंतीश्वर शिवमंदिराचे (१९१′ × १७१′) आहेत असे कनिंगहॅम म्हणतात. परंतु या दोन्ही मंदिरांची गर्भागारे उध्वस्त झाल्याने तत्संबंधी निश्चित काहीच सांगता येत नाही.

मंदिरवर्णन—येथील मंदिरस्थापत्यात आणि शिल्पात मध्ययुगीन हिंदु आणि ससानियन-पर्शियन शैलीचे

संमिश्रण दिसते. अवंतीश्वर मंदिराची रचना आणि आकारमान काश्मीरातील मार्तंड मंदिराप्रमाणे असून, त्याच्या चहुबाजूला त्या मंदिरासदृश स्तंभ होते. परंतु शहाजहान बादशहाने श्रीनगर येथील शालिमार बागेसाठी ते काढून नेले. अवंतिस्वामिन् मंदिराचे अवशेष दीर्घकालपर्यंत मातीच्या ढिगाऱ्याआड राहिल्याने ते अधिक सुस्थितीत दिसतात.

शिल्प—मार्तंड मंदिराच्या तुलनेने येथील मंदिराचे नक्षीकाम अधिक समृद्ध आणि सुबक असून, त्यावर हिंदु मंदिरशिल्पाचा प्रभाव अधिक दिसतो. फर्ग्युसन यांच्या मते येथील स्तंभ मायसेनीच्या दफनमंदिरातील स्तंभाच्या अनुकरणाने कोरले आहेत. पेलोपोन्नेसोस् आणि काश्मीर या देशांना जोडणारा महत्त्वपूर्ण दुवा म्हणून हे नक्षीकाम महत्त्वाचे वाटते ( फर्ग्युसन, १.२६४–२६५ ).

**अवन्ती** ( देश )—बृहत्संहितामते मध्य देशान्तर्गत एक देश ( बृ. सं. १४. १०–१६ ). विंध्य पर्वताच्या उत्तरेकडील आधु. माळवा, निमाड आणि त्यालगतचा मध्य प्रदेशाचा भाग म्हणजे हा देश होय.

नामांतरे —प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. इ. स. २ ऱ्या शतकातील शिलालेखसाहित्य | आकरावंती |
| २. उषवदाताचा नासिक शिलालेख ( ल्यूडर्स, क्र. ११३१ ) | मालय ( मालव ) |
| ३. जैन भगवतीसूत्र ( डी. के. डी. आय. पृ. २२५ ) | अवाह |
| ४. ब्रह्माण्ड पुराण ( ४.४०.९१ ) | अवंतिका |
| ५. बृहत्संहिता | आकरवेणावंतिका |
| ६. ह्युएन्त्संग | उ-शे-यन्-न ( उज्जेन ) |

ऱ्हाइस डेव्हिड्स यांच्या मते इ. स. ७ व्या–८ व्या शतकात येथे नव्याने रहावयास आलेल्या मालव लोकांमुळे या देशास ' मालव ' नामांतर प्राप्त झाले ( बुद्धिस्ट इंडिया. पृ. २८ ). तथापि उषवदाताच्या नासिक शिलालेखातील ' मालय ' ( मालव ) लोकांच्या निर्देशावरून इ. स. २ ऱ्या शतकापासूनच हे नाव प्रचलीत दिसते.

भौगोलिक स्थान—नर्मदा नदीच्या दोन्ही अंगास हा देश असून त्याची उत्तर आणि दक्षिण सीमा अनुक्रमे राजपुताना देश आणि तापी नदी यांनी बनली होती.

या देशाची राजधानी प्राचीन भारतीय संस्कृतीचे केंद्रस्थान अशा उज्जयिनी ( आधु. उज्जैन ) गावी होती ( कथा. १.६९; २४२ ). या देशामध्ये राहणाऱ्या ' अवंती ' ( अवंति, अवंत, आवंतक, आवंतिक, आवंत्य ) लोकसमूहांचा निर्देश बृहत्संहितेमध्ये आढळतो ( बृ. सं. ९.१८; २१ ).

व्याप्ती—नर्मदा नदीच्यायोगे या देशाचे दक्षिण आणि उत्तर अवंती असे दोन उपविभाग पडले असून, त्याच्या भौगोलिक सीमा पुढीलप्रमाणे होत्या :—

१. **दक्षिण अवंती** (अवंती दक्षिणापथ)—बौद्ध साहित्यमते हा देश नर्मदा नदीच्या दक्षिणेस असून, त्याची राजधानी माहिष्मती ( पाली–माहिस्सती ) गावी होती ( दीघ. २.२३५ ). उत्तरकालात हा माहिष्मती देश मुख्य अवंती ( उत्तर अवंती ) देशाहून वेगळा बनला, आणि नर्मदा नदीच्या उत्तरेकडील प्रदेशापुरतीच अवंती देशाची व्याप्ती मर्यादित झाली, असे जयसिंहसूरिकृत ' कुमारपालचरित ' ( इ. स. १४ वे शतक ) वरून दिसते ( डी. एच्. एन्. आय्. २.९८५–९८६; माहिष्मती पहा ).

२. **उत्तर अवंती** (मालव देश)—नर्मदा नदीच्या उत्तरेकडील मालव ( आधु. माळवा प्रदेश ) हा खऱ्या अर्थाने अवंती देशाचा बालेकिल्ला असून, त्याची राजधानी क्षिप्रा नदीच्या उजव्या किनाऱ्यावरील उज्जयिनी ( आधु. उज्जैन ) गावी होती. अभिधानचिंतामणीमते मध्य भारताचा हा पठारी प्रदेश ' अवंती ' आणि ' मालव ' अशा दोन्ही नावांनी ओळखला जात असे ( अभिधान. पृ. ३८१ ).

उपविभाग—उत्तर अवंती ( मालव ) देशाचे निम्नलिखित दोन उपविभाग होते:—

१ **पूर्व अवंती**—भोपाळ प्रदेशाचा पूर्व भाग म्हणजे हा देश असून, त्याची राजधानी विदिशा गावी होती.

२. **पश्चिम अवंती**—उज्जयिनी गावासभोवतालचा प्रदेश म्हणजे हा देश असून, त्याची राजधानी त्याच गावी होती.

नामांतरे—प्राचीन साहित्यात आणि शिलालेखात पूर्व आणि पश्चिम अवंती देशाची निम्नलिखित

नामांतरे आढळतात:—

| प्राचीन साहित्य | पूर्व अवंती | पश्चिम अवंती |
|---|---|---|
| १. वाल्मीकि रामायण (४.४१.१०) | आवंती | अवंति |
| २. गौतमी बलश्रीचा नासिक शिलालेख (एपि. इंडि ८.६१) | आकर | अवति (अवंती) |
| ३. रुद्रदामनाचा जुनागढ शिलालेख (एपि. इंडि. ८.४१) | ,, | अवंती |

मालव आणि अवंती यांचा विभेद--वात्स्यायन कामसूत्र, भागवत आणि भरतकृत नाट्यशास्त्रमते (इ. स. ३ रे शतक) 'मालव' आणि 'अवंती' हे दोन स्वतंत्र देश असून, त्यापैकी अवंती देशाच्या सीमारेषा पुढीलप्रमाणे होत्या :– १. पश्चिमेस—चंबळ नदी; २. पूर्वेस--पार्वती नदी; ३. दक्षिणेस--नर्मदा नदी; ४. उत्तरेस--राजपुताना देश (भा. १२.१.२८; आयू. एच्. क्यू. २४.१७६). उत्तर अवंतीपैकी फारच मर्यादित प्रदेश येथे अभिप्रेत दिसतो.

अवंतिमंडल--गौन्त्रि राजाच्या इ. स. ९८२ मधील ताम्रपटमते 'अवंतिमंडल' देशविभागात निम्नलिखित प्रदेशाचा समावेश होत असे :—१. मध्धुक-भुक्ती (इंदूरनजीकचे आधु. महू गाव); २. उज्जयनी-विषय (आधु. उज्जैन गावासभोवतालचा प्रदेश) (एपि. इंडि. २३.१०२). यावरून इतिहासाच्या विभिन्न काळी अवंती देशाच्या सीमा बदलल्या असल्या, तरी उज्जयिनी नगर हा त्याचा स्थायीभाव दिसतो.

वसाहत—सिंधु खोऱ्यातील आर्य लोकांनी कच्छच्या स्थापासून पूर्वेकडे वळून इ. स. पू. ३ऱ्या शतकामध्ये या देशाची वसाहत स्थापिली असावी. कारण बौद्धकाली अवंती देश आणि उज्जयिनी नगर वैभवाच्या परिसीमेवर होते.

ऐतिहासिक पार्श्वभूमी--पौराणिक साहित्यमते या देशातील लोक हैहयकुलोत्पन्न असून (मत्स्य. ४३), मथुरेच्या राज्याधिदेवी नामक यादव राजकन्येचा विवाह येथील एका हैहय राजासमवेत झाला होता (विष्णु. ४. १२; अग्नि. २७५). याच वंशातील अवंतीसम्राट विंद आणि अनुविंद हे भारतीय युद्धात कौरवपक्षात असून कौरवसेनेपैकी १/२ सेना एकट्या अवंती देशाची होती (म. स. २८.१०; उ. १६३.६).

प्रद्योतवंशीय चंड प्रद्योत हा गौतम बुद्धाच्या समकालीन होता. या राजघराण्याच्या लष्करी सामर्थ्याच्या धास्तीने मगधराज अजातशत्रूने राजगृह नगरासभोवती तटबंदी बांधली होती. येथील राजकन्या वासवदत्ता हिचा विवाह वत्सराज उदयनाशी होऊन, वत्स आणि अवंती देश स्नेही बनले होते.

इ. स. पू. ४ थ्या शतकात हा देश मगध साम्राज्यात समाविष्ट होऊन, राजकुमार अशोक येथील राजप्रतिनिधी बनला (दीप. ६.१५; महा. ५.३९; १३.८; स्मिथ, अशोक. पृ. २३५).

गुप्तसम्राट विक्रमादित्याने शकांची हकालपट्टी करून येथे नवे साम्राज्य स्थापले. याच घराण्यातील समुद्रगुप्ताच्या राज्यकालात राजपुतान्यातील मालव लोक या देशातील मंदसोर प्रदेशामध्ये रहावयास आले (मालव पहा).

इ. स. ९ व्या शतकामध्ये उपेंद्र (कृष्णराज) राजाने या देशात परमार राजघराण्याची स्थापना केली. या घराण्यातील (इ. स. ९ वे–१३ वे शतक) मुंज, भोज हे राजे प्रसिद्ध असून, त्यांची राजधानी धारा गावी होती. तोमर आणि चाहमाण राजांच्या अल्पकालीन राज्यानंतर इ. स. १४०१ मध्ये हा देश मुसलमानांच्या ताब्यात गेला.

महाभारतात—या ग्रंथमते या जनपदाची (म. भी. १०.४२) दक्षिण सरहद्द ऋक्ष पर्वताने (म. आर. ५८.२०) आणि नर्मदा (पयोष्णी) नदीने (म. आर. १२०.३०) बनली होती. यावरून नर्मदा नदीच्या उत्तरेस वसलेल्या अवंती देशाचा निर्देश येथे अभिप्रेत दिसतो. मात्र या देशाच्या उत्तर सरहद्दीचा काहीहि निर्देश तेथे आढळत नाही.

पौराणिक साहित्यात—या साहित्यात अवंती जनपदाचा (पद्म. सृ. ६.३८) आणि लोकसमूहाचा निर्देश अनुक्रमे 'अवंतिका' (ब्रह्माण्ड. ४.४०.९१), आणि 'विंध्यवासी', 'विंध्यपृष्ठनिवासी', 'विंध्यमूलनिवासी' अशा नावांनी आढळतो (ब्रह्माण्ड. १६.६५; मत्स्य. ११४.५४; मार्कं. ५४.५५; वामन. १३.५६; वायु. ४५.१३४). भागवतमते अवंती आणि मालव लोक पारियात्र पर्वतामध्ये रहात असत (भा. १२.१.३६; ब्रह्म. १९.१७). मार्कंडेय आणि नारदमते हा देश कूर्माच्या दक्षिण कुशीमध्ये (दक्षिण भारतात) द्रविड आणि भिल्ल देशानजीक होता (मार्कं. ५५.२२; नारद. १.५६.७४२).

वाल्मीकि रामायणात—या ग्रंथात यास दक्षिण आणि पश्चिम भारतातील देश (वा. रा. कि. ४१.१०; ४२.१४)

म्हटले असून नर्मदा नदीच्या दक्षिणेकडील विस्तीर्ण प्रदेशाचा निर्देश येथे अभिप्रेत दिसतो.

**बौधायन धर्मसूत्रात**—या ग्रंथामध्ये अवंती लोकांस 'संकीर्णयोनि' (संकरज लोक) म्हटले आहे (बौ. ध. १.१).

**पाणिनीच्या अष्टाध्यायीत**--या ग्रंथात अवंती आणि अश्मक देशांचा संयुक्त निर्देश 'अवंति-अश्मक' नावाने केला असून (पा. सू. ६.२.३७), त्यापैकी अवंती देशाची राजधानी उज्जयिनी गावी होती (पा. सू. ४.१.१७६). पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यात 'अवंति देशाची राजकन्या' अशा अर्थाने 'अवंती' संज्ञेचा प्रयोग आढळतो (पतञ्जलि. १.२२५;२.२०६).

**प्राचीन शिलालेखसाहित्यात**--अशोकाच्या धौलि स्वतंत्र आज्ञालेख क्र. १ मध्ये देशनाम आणि नगरनाम म्हणून 'उज्जेनी' (उज्जयिनी) चा निर्देश असून त्याचा एक पुत्र (कुमार) येथे राजप्रतिनिधी होता.

रुद्रदामनाच्या जुनागढ शिलालेखमते आकर (पूर्व माळवा) आणि अवंती (पश्चिम माळवा) देशांच्या राजधान्या अनुक्रमे 'विदिशा' आणि 'उज्जयिनी' गावी असून, अनूप (माहिष्मती), आनर्त (उत्तर काठेवाड), सुराष्ट्र (दक्षिण काठेवाड), अपरांत (उत्तर कोकण) देशानजीक हे दोन देश होते (इंडि. अँटि. ७.२६२).

नासिक येथील गौतमीपुत्र सातकर्णीच्या प्रशस्तिलेखात, तसेच अजंटा येथील समकालीन गुफालेखात 'आकर' आणि 'अवंती' देशांचा निर्देश आढळतो (अर्कि. सर्व्हे. वे. इं. ४.१०९; १२७). नहपानाच्या नासिक शिलालेखात अवंती लोकसमूहाचा निर्देश 'मालय' नावाने केला आहे.

**बौद्ध साहित्यात**—बौद्ध अंगुत्तर निकायमते तत्कालीन भारतातील सोळा महाजनपदांमध्ये 'अवंती'ची गणना होत असे (अङ्गुत्तर. १.२१३; ४.२५२; २५६; २६०). मगध, कोसल आणि वत्स या अन्य तीन राज्यांप्रमाणेच हे राज्यहि उत्तरकालात मौर्य साम्राज्याचा भाग बनले.

बौद्ध मिलिंदपन्होमते जंबुद्वीपाचे 'अवंती', 'प्राची' आणि 'दक्षिणापथ' असे तीन प्रमुख उपविभाग होते (मिलिन्द. २ २५०). रेणु राजाने केलेल्या पृथ्वीच्या विभिन्न उपविभागांपैकी 'अवंती' एक असून तेथे वेस्सभू राजा राज्य करीत असे (दीघ. २.२३५-२३६).

अंगुत्तरनिकायमते 'अवंती' हा एक ऐश्वर्यसंपन्न देश असून (अङ्गुत्तर. ४.२६१), हीनयान पंथाच्या पाली या ग्रंथभाषेचा विकास सर्वप्रथम अवंती आणि गंधार देशामध्ये झाला होता (इलियट, हिन्दुइझम अँड बुद्धीझम. १.२८२).

'थेरगाथा'मते बौद्ध धर्माचे निम्नलिखित आचार्य अवंतीदेशीय होते :-- १. अभयकुमार (३९); २. इसिदासी (२६१-२६४); ३. इसिदत्त (१२०); ४. धम्मपाळ (२०४); ५. सोणकूटिकण्ह (३६९); ६. महाकात्यायन (संयुत्त. ३.९). या आचार्यांपैकी उज्जयिनी नगराचा महाकात्यायन विशेष सुविख्यात होता (उज्जयिनी पहा).

**जैन साहित्यात**--जैन भगवतीसूत्रमते तत्कालीन भारतातील षोडश महाजनपदांपैकी 'अवाह' (अवंती) हे महावीराचे तपःसाधनास्थान म्हणून विशेष सुविख्यात होते (डी. के. डी. आय. पृ. २२५).

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**--या ग्रंथमते वु-शे-येन्-न (उजयन = उज्जेनी) देश गुर्जर (आधु. मध्य आणि उत्तर राजपुताना) देशाच्या ५६० मैल आग्नेयेस असून त्याचे व त्याच्या राजधानीचे क्षेत्रफळ अनुक्रमे १२०० मैल आणि ६ मैल होते.

मनुष्यवस्तीने गजबजलेल्या या देशाचे पीकपाणी, तसेच लोकाचार सुराष्ट्र (सौराष्ट्र) देशाप्रमाणेच असून येथील बहुतांशी बौद्धमठ उध्वस्तावस्थेत होते. येथील राजे हिंदुधर्मीय असुन येथे विपुल हिंदु देवमंदिरे होती.

या देशाहून २०० मैल ईशान्येस गेल्यानंतर ह्युएन्त्संग 'जिझोति' (जेजाकभुक्ति = आधु. बुंदेलखंड) देशास पोहोचला (वॉटर्स, २.२५०-२५१; बील, ४४.६०).

**शक्तिसंगमतंत्रात**— या ग्रंथमते ताम्रपर्णी नामक स्थानिक नदीच्या उत्तरेकडील टेकड्यांपर्यंत (विंध्य पर्वताचा पश्चिम भाग) हा देश असून येथे कालिकादेवीचे सुविख्यात स्थान होते (शक्तिसङ्गम. ३.७.१७). ही कालिकादेवी म्हणजे उज्जयिनी येथील महाकाल मंदिरानजीकची देवी असावी.

**उत्तरकालीन पौराणिक साहित्यात**—या साहित्यात 'अवंती' हे उज्जयिनी नगराचे नामांतर मानले असले (अवंती २. पहा), तरी मेघदूतात मात्र एक देशनाम म्हणूनच 'अवंती'चा निर्देश आढळतो (मेघ. १.१७).

**व्यापारी केंद्र**-- पेरिप्लसच्याकाळी हा देश मध्य भारतातील एक महत्त्वाची बाजारपेठ असून, पश्चिम समुद्रकिनाऱ्यावरील भृगुकच्छ आणि शूर्पारक, दख्खन-

मधील पैठण, आणि कोशल देशातील श्रावस्ती येथील तीन प्रमुख व्यापारी हमरस्ते उज्जयिनी गावी एकत्रित होत असत. येथील हिरे-माणके, चिनी मातीची भांडी, मलमल आणि रंगीत सुती कापड आदि वस्तूंची निर्यात भृगुकच्छ बंदरातून होत असे ( पेरिप्लस. ४८ ).

विद्याकेंद्र—हा देश व्यापाराप्रमाणेच विद्या आणि कला यांचे केंद्र असल्याचे विक्रमादित्य ( दशपुरचा सम्राट यशोवर्मन् ) राजाच्या दरबारातील नवरत्नांच्या वर्णनावरून दिसते

राजधानी--इतिहासाच्या विभिन्नकाळी या देशाची राजधानी निम्नलिखित गावी होती :--

| काळ | राजधानी |
|---|---|
| १. बौद्धकाळी | माहिष्मती |
| २. बौद्धोत्तरकाळी ( मेघ. १.३१ ). | उज्जयिनी (विशाला) |
| ३. परमार राज्यकाळी ( इ. स. १० वे शतक ) | धारा |
| ४. इ. स. ११३८ मध्ये ( उज्जैन शिलालेख, डी. एस्.एन्. आय्. २.९६६ ). | अणहिलपाटक |

अन्य नगरे— बौद्ध आणि जैन साहित्यात, तसेच बृहत्संहितेमध्ये या देशातील 'कुरर्घर,' 'सुदर्शनपुर,' आणि दशपुर ( आधु. मंदसोर ) नगरांचा निर्देश आढळतो ( लॉ, बौद्ध भूगोल. पृ. २२; बृ. सं. १४.१०–१६ ).

२. (नगर) अवंती ( मालव ) देशाच्या 'उज्जयिनी' नामक राजधानीचे नामांतर ( ब्रह्म. ४३.२४; अग्नि. १०९.२४; लिङ्ग. १.९२.७–८ ). स्कंदपुराणातहि उज्जयिनी येथील शिवलिंगांचा आणि तीर्थस्थानांचा निर्देश 'अंवतीक्षेत्रान्तर्गत' म्हणून केला आहे (उज्जयिनी पहा).

३. ( नदी ) पौराणिक साहित्यमते पारियात्र पर्वतामध्ये उगम पावणारी एक नदी ( वायु. ४५.९८; मत्स्य. ११४.२४; ब्रह्माण्ड. २.१६.२९; विष्णुधर्म. १.१०.९ ). पाठभेद– 'अवर्णी' ( मार्क. २४.२० ); 'वपंती' ( वराह. ८५ ).

पार्गिटर यांच्या मते महू गावाजवळ उगम पावून चंबळ नदीस मिळणारी आधु. क्षिप्रा नदी ती हीच होय. अवंती ( उज्जयिनी ) नगराजवळून वहात असल्यामुळे तीस हे नाव प्राप्त झाले असावे ( पार्गि., मार्क. पृ. २९५ ).

**अवन्तीश्वर** ( लिंग )--उत्तर प्रदेशातील सत्यव्रत ( आधु. संभळ ) क्षेत्रान्तर्गत एक शिवलिंगस्थान ( ती. ९२ ).

**अवन्द** ( देश )-- ह्युएनत्संगच्या मते वायव्य भारतातील एक देश. अ–फन्–तु ( ओफंच ) या नावाने त्याने निर्देशिलेला हा देश म्हणजे आधु. मध्य सिंध देश असावा. ह्युएनत्संगच्या मते 'सिंधु' ( आधु. सिंध ) देशाहून हा स्वतंत्र असला तरी परंपरागत प्राचीन साहित्यात मात्र तो सिंधु देशाचाच भाग मानला आहे (कनिंग., पृ. ३०१; सिंधु पहा ).

**भौगोलिक स्थान**—या देशाच्या भौगोलिक स्थानाविषयी अभ्यासकांमध्ये निम्नलिखित मतांतरे आढळतात:–

१. **कनिंगहॅम यांच्या मते**--आधु. मध्य सिंध (विचल) देश तो हाच असून त्याची राजधानी आधु. ब्राह्मणाबाद गावी होती ( कनिंग., पृ. २७० ).

२. **जनरल हेग यांच्या मते**— आधु. खैरपुर प्रदेश म्हणजेच हा देश असावा.

३. **वॉटर्स यांच्या मते**--बौद्ध साहित्यात सम्मतीय सांप्रदायाचे केंद्रस्थान मानलेला अवंतक देश तो हाच असावा.

ह्युएनत्संगाच्या प्रवासवर्णनात--या ग्रंथमते पिताशिला ( आधु. थर पार्कर प्रदेश ) देशाहून ६० मैल ईशान्येस गेल्यानंतर ह्युएनत्संगला लागलेल्या या देशाचे आणि त्याच्या राजधानीचे क्षेत्रफळ अनुक्रमे ४८० मैल आणि ४ मैल होते. हा देश सिंध राज्याचा भाग असून येथे २० बौद्ध मठ आणि सम्मतीय सांप्रदायाचे २००० बौद्ध भिक्षू होते. या देशात हिंदूंच्या पाशुपत सांप्रदायाची ५ देवमंदिरे होती.

**बौद्धस्थाने**--ह्युएनत्संगच्या मते येथील प्रमुख बौद्धस्थाने पुढीलप्रमाणे होत :—

१. **वेणुवन**--राजधानीच्या वायव्येकडील या वनातील एका बौद्ध मठात गौतम बुद्धाने आपल्या शिष्यास पादत्राणे वापरण्याची प्रथमच परवानगी दिली होती. बौद्ध विनयग्रंथमते हा विशिष्ट प्रसंग राजगृह गावी घडला होता ( राजगृह पहा ).

२. **अशोक स्तूप**--उपरोक्त बौद्ध मठानजीक १००' उंचीचा अशोकस्तूप आणि गौतम बुद्धाची गडद निळ्या रंगाची दगडी मूर्ती होती.

३. अशोक स्तूप क्र. २--उपरोक्त बौद्ध मंदिराच्या ८०० पावले दक्षिणेस बुद्धभेटीच्या स्मृत्यर्थ बांधलेला लाकडी अशोकस्तूप होता. बौद्ध भिक्षूंनी रात्रीच्यावेळी एका उत्तरीय वस्त्राऐवजी दोन उत्तरीय वस्त्रे पांघरली तरी चालतील अशी सवलत गौतम बुद्धाने या स्थानी जाहीर केली होती.

बौद्ध विनयग्रंथमते उपरोक्त सवलत वैशाली गावी जाहीर झाली होती. अशा तऱ्हेने या नगराशी संबंधित दोनहि आख्यायिका उत्तरकालीन व कल्पनारम्य दिसतात.

ह्युएन्त्संगच्या मते या देशाच्या १८० मैल ईशान्येस वरण देश होता ( वॉटर्स, २.२५९-२६१ ).

**अवभूतिपुरी** ( नगर )--राजस्थानमधील 'अजयमेरु' नगराचे नामांतर ( अजयमेरु पहा ).

**अवयाणिज** ( ग्राम )--उत्तर गुजरातचा चालुक्य राजा भीम ( द्वितीय ) याच्या इ. स. १२०५ मधील शिलालेखमते उत्तर भारतान्तर्गत चाळीसापथक मधील एक ग्राम ( इंडि. अँटि. ६.१९९-२०० ).

**अवर** ( देश )--मार्कंडेयमते पश्चिम भारतान्तर्गत 'पारद' देशाचे नामांतर ( मार्क. ५५.३१; पारद पहा ).

**अवरन्तविषय** ( देश )--संस्कृत शिलालेखसाहित्य-मते 'अपरांत' देशाचे नामांतर ( एपि. इंडि. १४.१५०; अपरांत ३. पहा ). नामांतर ( बौद्ध शिलालेखसाहित्य )-'अवरम्त'; ( प्राकृत साहित्य ) -'अवरैका'.

**अवरोधनगर** ( जैनस्थान )--मदनकीर्तिकृत 'शासन-चतुस्त्रिंशिका'मते सुव्रत जिनाचे एक जैन मंदिरस्थान. काही अभ्यासकांचे मते महाराष्ट्रातील 'प्रतिष्ठान' ( आधु. पैठण ) नगराचे हे नामांतर असावे ( ती. सं. पृ. ११७; प्रतिष्ठान पहा ).

**अवर्णी** ( नदी )--मार्कंडेयमते उज्जयिनीनजीकच्या 'अवंती' ( आधु. क्षिप्रा ) नदीचे नामांतर ( मार्क. २४.२०; अवंती ३. पहा ).

**अवला** ( ग्राम )--कलचुरि राजा पृथ्वीदेव ( द्वितीय ) याच्या इ.स. ११४९ च्या अमोदा ताम्रपटमते मध्यमंडला-न्तर्गत एक गाव. जांजगिर तहसिलीतील ( जि. बिलासपुर ) अमोदा गावापासून ४ मैल पूर्वेकडील आधु. औरदि गाव ते हेच होय. हिरालाल यांच्या मते याचे मूळ नाव 'आमलक' होते ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.४७५ ).

**अवसान** ( तीर्थ )--महाभारतातील पुलस्त्य-तीर्थ-यात्रान्तर्गत एक तीर्थस्थान. नामांतर-'सत्रावसान' ( मुनीच्या सत्रांचे समाप्तिस्थान ) ( म. आर. ८०. १३३ ).

**अवारमाता** ( देवीस्थान )--मध्य प्रदेशातील सागर गावानजीकचे दुर्गास्थान. हे छत्तरपुर जिल्ह्यातील हिरापुर गावानजीक आहे ( ती. २१० ).

**अवाह** ( देश )--जैन भगवतीसूत्रमते मध्य प्रदेशान्तर्गत 'अवंती' देशाचे नामांतर ( डी. के. डी. आयु. पृ. २२५; अवंती १. पहा ).

**अविघ्न** ( तीर्थ )--गोदावरी नदीकाठचे एक तीर्थस्थान ( ब्रह्म. ११४.२५ ).

**अविज्ञात** ( पर्वत )--भारतवर्षान्तर्गत एक पर्वत ( ब्रह्माण्ड. १६.२० ).

२. ( वर्ष ) शाल्मलिद्वीपान्तर्गत एक वर्ष ( देशविभाग ) ( भा. ५.२०.९ ).

**अविद्धकर्ण** ( बौद्धमठ )--ह्युएन्त्संगच्या मते उत्तर प्रदेशान्तर्गत युद्धपति ( आधु. गाझीपुर ) नगराच्या ४० मैल पूर्वेकडील एक बौद्ध मठ. कनिंगहॅमच्या मते बालिया गावापासून १ मैल पूर्वेकडील आधु. विकपुर गाव ते हेच होय.

नामव्युत्पत्ती--'अविद्धकर्ण'चा शब्दशः अर्थ 'कान न टोचलेला' असा असून तुखार देशातील बौद्ध श्रमणांच्या संदर्भात या मठास हे नाव दिले असावे.

पार्श्वभूमी --ह्युएन्त्संगच्या मते हिमालयाच्या उत्तरे-कडील तुखार देशातील तीन बौद्ध आचार्य बौद्ध तीर्थ-स्थानांच्या दर्शनार्थ भारतात आले. या परदेशी लोकांना कोणत्याहि बौद्ध मठात प्रवेश न मिळून भुकेने व्याकूळ होऊन ते इतस्ततः हिंडू लागले. युद्धपति देशाच्या राजाला त्यांची दया येऊन या 'अविद्धकर्ण' परदेशी बौद्ध भिक्षूंसाठी आपल्या राज्यात त्याने एक बौद्धमठ बांधला.

अमरावती येथील स्तूपाच्या एका शिल्पामध्ये ताडाच्या झाडाखाली हीनदीन होऊन बसलेल्या दोन परदेशीय भिक्षूंचे शिल्पचित्र आढळते. ते संभवतः या भिक्षूंचेच असावे ( बील, ३.३०४-३०५ ).

मठवर्णन--ह्युएन्त्संगच्या मते या छोट्या बौद्ध मठाच्या मनोऱ्यांवरील आणि सज्जावरील नक्षीकाम कलात्मक असून त्यासभोवताली सुंदर बाग होती. बागेतील जलाशयामध्ये मठांच्या मनोऱ्यांची हालती-डोलती प्रतिबिंबे दिसत असत. येथील बौद्ध आचार्य धीरगंभीर आणि स्वकार्यदक्ष होते.

**अविनाश** ( लिंग )--अरुणाचलक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंगस्थान ( स्कन्द. माहेश्वर. ३.२.२ ).

**अविमुक्त** ( तीर्थ )--पौराणिक साहित्यमते 'वाराणसी' नगराचे नामांतर ( मत्स्य. १८१.१५-२७; विष्णु. ५. ३४.३०; अग्नि. १२२.२; कूर्म. पूर्व. ३१.२४; २७; ३०; ३४; ४४; पद्म. सृ. ३३.१४; १७; स्कन्द. काशी. ६१.५; ११७.८४-१०३; शिव. सनत्कुमार. ४१; वाराणसी पहा ).

२. वाराणसी येथील शिवलिंगस्थान ( लिङ्ग. १.९२.६; नारद. २.४९.५३-५५; स्कन्द. काशी. ३३.१६९ ). येथे कुक्कुटाची पूजा करतात.

३. अवंती येथील ८४ शिवलिंगांपैकी एक ( स्कन्द. आवन्त्य. १ ).

**अवियोगाभिधा** ( कूप )—पुष्करक्षेत्रान्तर्गत एक वापी ( नारद. २.७१.३८ ).

**अविस्थल** ( नगर )—महाभारतमते कुरुक्षेत्रान्तर्गत 'कुशस्थल' ग्रामाचे नामांतर ( म. उ. ७०.१५; कुशस्थल पहा ).

**अव्रिसर** ( देश )--शिवसेन क्षत्रपाच्या पंजाब ताम्रमुद्रिकालेखमते ईशान्य भारतातील 'अभिसार' देशाचे नामांतर. प्रमुख नगर-'अव्रिसरप्रस्थ' ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.१०३; अभिसार पहा ).

**अव्हाण**-- स्थानपोथीमते महाराष्ट्रातील औरंगाबाद जिल्ह्यातील महानुभावपंथीय तीर्थस्थान. वैजापूर तालुक्यातील नेवाशाच्या ६ मैल उत्तरेकडील गोदावरी नदीकाठचे आधु. ममदापुर गाव ते हेच होय ( स्था. पृ. ६९ ).

**अशी** ( नगर )—शिलालेखसाहित्यमते मध्यभारतान्तर्गत 'महल्ल-लाट' देशाच्या राजधानीचे गाव ( एपि. इंडि. २४.२६३ ). बेलोरापासून १० मैल आग्नेयेकडील आधु. अष्टी गाव ते हेच असावे.

**अशोक** ( पर्वत )--बौद्ध अपादानमते हिमालयानजीकचा एक पर्वत ( अपादान. पृ. ३४२; ३४५ ).

२. ( पर्वत ) जंबुद्वीपान्तर्गत केतुमालवर्षातील एक कुलपर्वत ( वराह. ८३.१; वायु. ४४.४ ).

३. ( कूप) उत्तर भारतातील सत्यव्रतक्षेत्रान्तर्गत ( आधु. संभळ ) एक वापी ( ती. ९२ ).

४. ( तीर्थ ) काशीक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( स्कन्द. काशी. ३३.१८०;८३.९२;९६.१४८ ).

५. ( तीर्थ ) महाभारतातील धौम्य-तीर्थयात्रेत निर्देशिलेले दक्षिण भारतातील शूर्पारक ( आधु. सोपारा ) नजीकचे एक तीर्थस्थान ( म. आर. ८६.१० ). येथे बहुलाश्रम होता.

**अशोकवनिका** ( उद्यान )--लंका येथील सुविख्यात उपवन. या वनामध्ये रावणाने सीतेला कैदेत ठेवले होते. सीताभेटीनंतर हनुमानाने या वनाची यथेच्छ नासधूस केली ( वा. रा. सुं. १५.१५; म. आर. २६४.४१ ). नामांतर-'अशोकवन.'

२. ( उद्यान ) अयोध्येतील राम आणि सीता यांचे विहारस्थान ( वा. रा. उ. ४२.१७ ).

३. ( वन ) प्रयागनजीकच्या प्रतिष्ठान गावचे एक वन. ययाति राजा देवयानीसह येथे रहात असे ( मत्स्य. ३१. २-१० ).

४. ( तीर्थ ) नर्मदा नदीकाठचे एक तीर्थस्थान ( नारद. २.७७.५ ).

**अशोक-विरक्तिस्थल** ( बौद्धस्थान )--ओरिसामधील भुवनेश्वरनजीकचे एक बौद्धस्थान. हे अश्वत्थामन पर्वतावर आहे ( अश्वत्थामन् पर्वत १. पहा ).

**अशोक-शिलालेखस्थले** ( स्थलसमूह )--हिंदुस्तानातील उपलब्ध शिलालेखसाहित्यामध्ये अशोकाचे इ. स. पू. ३ ऱ्या शतकामधील शिलालेख प्राचीनतम आहेत. भारतातील बहुतांशी सारे शिलालेखसाहित्य गुप्तशकोत्तर ( इ. स. ४ थे-५ वे शतक ) असल्याने इ. स. पू. ३ ऱ्या शतकातील भौगोलिक स्थले, राज्यव्यवस्था, धार्मिक आणि राजकीय इतिहास यांच्या माहितीचे एकमेव विश्वसनीय साधन म्हणून अशोक-शिलालेखांचे महत्त्व विशेष वाटते.

उपविभाग--भारताच्या विभिन्न भागांमध्ये उपलब्ध झालेल्या अशोकाच्या सुमारे ४० शिलालेखांचे निम्नलिखित उपविभाग दिसतात :--

१. बृहत्-आज्ञालेख--बौद्ध धर्माची मूलतत्त्वे सांगणाऱ्या अशोकाच्या १४ धर्माज्ञा या शिलालेखात ग्रथित केल्या असून, प्रादेशिक राजधान्यांच्या गावी ( उदा. धौलि ), तसेच साम्राज्याच्या सीमाबिंदूवर त्या कोरल्या होत्या.

या बृहत् आज्ञालेखांची संपूर्ण प्रत गिरनार, धौलि, शहाबाझगढी येथे सापडली आहे.

२. लघु-आज्ञालेख-- बृहत्-आज्ञालेखान्तर्गत १४ धर्माज्ञांपैकी केवळ तीन-चारच धर्माज्ञा लघु-आज्ञालेखात असून, रूपनाथ, सहस्राम, बैराट आदि गावी असे आज्ञालेख सापडले आहेत.

# अशोकाचे उपलब्ध शिलालेख

| शिलालेखाचे नाव | प्राचीन स्थलनाम | आधु. भौगोलिक स्थान | स्थानिक नाव | शिलालेख |
|---|---|---|---|---|
| | | **१. बृहत्-आज्ञालेख** | | |
| १. गिरनार | गिरिनगर | काठेवाडमधील जुनागढ गावानजीक. | ... | १४ आज्ञालेख |
| २. कालसि | ... | उत्तर प्रदेशातील डेहराडून जिल्ह्यात. | ... | १४ आज्ञालेख |
| ३. धौलि | तोसली | ओरिसातील भुवनेश्वरनजीक. | अस्वस्तम | आज्ञालेख क्र. १–१०; १४; |
| ४. जौगड | खेपिंगल टेकडी | आंध्र प्रदेशातील गंजम जिल्ह्यात. | ... | स्वतंत्र आज्ञालेख क्र. १–२ |
| ५. सोपारा | शूर्पारक | महाराष्ट्रातील ठाणे जिल्ह्यात. | ... | ,, ,, ,, १–१० |
| ६. शहबाझगढी | ... | पेशावर जिल्ह्यात मर्दाननजीक. | ... | आज्ञालेख क्र. ८ चा $\frac{1}{3}$ भाग |
| ७. मानसेहरा | ... | वायव्य प्रांतातील हजारा जिल्ह्यात. | ... | १४ आज्ञालेख |
| ८. येर्रगुडि | ... | सिद्दापूरपासून ८० मैल ईशान्येस. | ... | ... |
| | | **२. लघु-आज्ञालेख** | | |
| १. रूपनाथ | ... | मध्यप्रदेशातील जबलपुर–कटनी रस्त्यावर. | ... | धर्मनिष्ठ होण्याचा आदेश |
| २. सहस्राम | ... | द. बिहारमधील शहाबाद जिल्ह्यात. | चिरागदान दगड | ,, ,, ,, |
| ३. बैराट | विराटपुर | राजस्थानमधील जयपुरच्या ईशान्येस. | भीम–की–डुंग्री | ,, ,, ,, |
| ४. बैराट ( कलकत्ता ) | ,, | ,, ,, ,, | बीजक पहाड | बौद्ध धर्माच्या दुर्मीळ ग्रंथांची नामावली |
| ५. सुवर्णगिरि (मस्कि) | मोसंगि | आंध्रप्रदेशातील रायचूर जिल्ह्यात. | ... | धर्मनिष्ठ होण्याचा आदेश |
| ६. गाविमठ | ... | ,, ,, कोप्बाळ जिल्ह्यात. | ... | ,, ,, ,, |
| ७. पाल्किगुंडू | ... | ,, ,, ,, ,, | ... | ,, ,, ,, |
| ८. ब्रह्मगिरि | ... | म्हैसूर राज्यातील चितळदुर्ग जिल्ह्यात. | अक्षरगुंडु | १. धर्मनिष्ठ होण्याचा आदेश; |
| ९. सिद्दापुर | ... | ,, ,, ,, ,, | येनमन तिम्मय्यन गुंडु | २. माता-पित्यांची आज्ञा पाळण्याचा |
| १०. जतिंग ( रामेश्वर ) | ... | ,, ,, ,, ,, | बालेगार गुंडु | आदेश देणारा पाच ओळींचा नवा शिलालेख |
| ११. बराबर | खलतिक | दक्षिण बिहारमधील गया गावाच्या उत्तरेस. | ... | आजीवक भिक्षूंना गुफादान |
| १२. गुजर्र | ... | मध्य प्रदेशान्तर्गत दतिया जिल्ह्यातील झांशीनजीक. | ... | ... |
| १३. शहर–इ–कून | ... | दक्षिण अफगाणिस्तानातील कंदहार शहरानजीक. | ... | ... |
| १४. रजूल मंडगिरि | ... | म्हैसूर राज्यातील येर्रगुडीनजीक. | ... | ... |
| | | **३. स्तंभलेख** | | |
| १. तोप्रा ( दिल्ली ) | तोव्र | दिल्ली येथील फिरोजशहा–का–कोटला | भीमसेन–का–खम्भा | आज्ञालेख क्र. १–६ |
| २. मीरत ( दिल्ली ) | ... | दिल्लीच्या वायव्य भागातील फिरोजशहा राजवाडा | ... | स्वतंत्र आज्ञालेख क्र. ७ |
| ३. कोसम-अलाहाबाद | कौशांबी | अलाहाबाद किल्ला | भीमसेन–की–गदा | आज्ञालेख क्र. १–६ |
| ४. रामपूर्वा | ... | बिहारमधील चंपारण्य जिल्ह्यात | ... | ,, ,, ,, |
| ५. लौरिया अरराज | ... | ,, ,, ,, | ... | ,, ,, ,, |
| ६. लौरिया नंदनगढ | ... | ,, ,, ,, | भीमसेन–का–लिंग | ,, ,, ,, |
| ७. लंपाक | ... | जलालाबादनजीकचे काबुल नदीकाठचे आधु. लमघन. | ... | ... |
| | | **४. लघु-स्तंभलेख** | | |
| १. सांची | सांची | मध्यप्रदेशातील भोपाळनजीक | ... | बौद्ध संघातील दुहीचा निषेध |
| २. सारनाथ | इसिपतन मृगदाव | उत्तरप्रदेशातील वाराणसीनजीक | ... | ,, ,, ,, ,, |
| ३. रुम्मिनदेइ | लुंबिनीवन | नेपाळी तराईमध्ये | ... | समक्ष भेट दिल्याचा निर्देश |
| ४. निगलि–सागर | कोनाकमन बुद्धाचे जन्मस्थान | ,, ,, | भीमसेन–की–निगलि | स्तूप मोठा केल्याचा निर्देश |

३. स्तंभलेख-- बुद्धजीवनाशी संबंधित महत्त्वपूर्ण स्थली ( उदा. कौशांबी ), तसेच जेथे खडक उपलब्ध नाही अशा स्थली ( उदा. तोप्रा, मीरत ) उभारलेल्या स्तंभांवर हे स्तंभलेख आढळतात. स्थानमाहात्म्यवर्णन अथवा आज्ञालेखाचे ग्रथन हे त्यांचे उद्दिष्ट असून, स्थापत्यशास्त्रीयदृष्ट्या त्यामध्ये असिरिया आणि इराणमधील अश्मस्तंभाचे अनुकरण दिसते.

४. लघु-स्तंभलेख--बुद्धजीवनाशी संबंधित स्थानी अशोकाने उभारलेल्या स्तंभावर हे लेख आढळतात ( उदा.--सांची, सारनाथ, रुम्मिन्देइ ).

अशोक साम्राज्याच्या भौगोलिक मर्यादा--उपलब्ध शिलालेखांवरून अशोकाचे साम्राज्य वायव्य भारतातील कंबोज ( बदक्षन्-पामीर ) पासून दक्षिण भारतातील कर्नाटकापर्यंत पसरले होते असे दिसते. इतकेच नव्हे तर कंबोजच्या पूर्वेकडील पामीर प्रदेशातील खोतान, नामक आदि प्रदेशात अशोकाने नव्या वसाहती स्थापन केल्या होत्या.

अशोकाचे हे साम्राज्य निम्नलिखित पाच उपविभागात ( चक्र ) विभागले होते:-

## अशोकाचे साम्राज्य

| विभाग | भौगोलिक मर्यादा | राजधानी |
|---|---|---|
| १. मध्य देश ( मध्यमंडल ) | आधु. उत्तर आणि मध्य प्रदेश आणि बिहार | पाटलिपुत्र |
| २. प्राची ( प्राच्य देश ) | आधु. ओरिसा, बंगाल प्रांत | तोसली ( आधु. धौलि ). |
| ३. दक्षिणापथ | नर्मदेच्या दक्षिणेकडील प्रदेश | सुवर्णगिरि ( मस्कि ?.) |
| ४. अपर देश | आधु. राजस्तान, सिंध, गुजरात आणि कोकण प्रदेश | उज्जयिनी |
| ५. उत्तरापथ | आधु. पंजाब, कश्मीर, काबुल | तक्षशिला |

भाषा--शहर-इ-कून ( कंदहार ) येथील ग्रीक-अरेमिक द्वीभाषीय शिलालेखाचा अपवाद वगळता अशोकाचे अन्य सारे शिलालेख पाली भाषेत आहेत.

लिपी--वायव्य भारतातील शहाबाझगढी आणि मानसेहरा येथील खरोष्ठी लिपीबद्ध शिलालेखांचा अपवाद वगळता, अशोकाचे अन्य सारे शिलालेख ब्राह्मी लिपीमध्ये आहेत. यावरून ज्या प्रदेशात जी भाषा अथवा लिपी प्रचलीत असेल, तीमध्ये आपले शिलालेख कोरण्याचा अशोकाचा कटाक्ष दिसतो.

शिलालेखांचा कर्ता--अशोकाच्या बहुतांशी शिलालेखांमध्ये स्वतःचा निर्देश 'देवानंपिय पियदसि लाजा' ( देवानांप्रिय प्रियदर्शी राजा ) असा केला असून, त्याचेच वैकल्पिक रूप काही ठिकाणी 'देवानां प्रियः' ( धौलि, जौगड ) अथवा 'प्रियदर्शी राजा' ( कलकत्ता-बैराट ) असे आढळते. 'देवानांप्रिय अशोक' असा स्पष्ट निर्देश केवळ मस्कि शिलालेखात आढळतो.

अशोक-शिलालेखातील 'देवानंपिय' राजा म्हणजे सिलोनचा राजा 'देवानंपिय तिष्य' नसून, दीपवंशामध्ये 'प्रियदर्शिन्' नावाने निर्देशिलेला मगधराज अशोक आहे, असे जेम्स प्रिन्सेप यांनी इ. स. १८३७ मध्ये सिद्ध केले ( जे. ए. एस्. बी. इ. स. १८३७, पृ. ४७२; ५६६; ६७६ ). कालांतराने मस्कि शिलालेखामध्ये अशोकाचा सुस्पष्ट निर्देश आढळला.

'देवानां प्रियः' चा शब्दशः अर्थ 'देवांना प्रिय असणारा' असा असला, तरी पाणिनीय व्याकरणात 'षष्ठ्या आक्रोशे' या सूत्रानुसार तो एक कुचेष्टावाचक शब्द मानला आहे ( पा. सू. ६.३.२१ ). सिद्धांतकौमुदी, तसेच अभिधानचिंतामणीमध्ये 'देवानांप्रिय' चा अर्थ 'मूर्ख' असा दिला आहे. संस्कृत व्याकरणसाहित्यातील हा विशिष्ट संकेत बौद्धधर्मविरोधी प्रतिक्रियेमधून निर्माण झाला असावा.

कालनिर्णय--अशोकाच्या राज्यकालाच्या १२ व्या वर्षापासून २८ व्या वर्षापर्यंत ( इ. स. पू. २५३-२३७ ) अशोकशिलालेख कोरले असून, त्यापैकी कलकत्ता-बैराट शिलालेख हा प्राचीनतम ( इ. स. पू. २५३ ), आणि सारनाथ, कौशांबी आणि सांची स्तंभलेख हे सर्वाधिक उत्तरकालीन ( इ. स. पू. २३७ ) आहेत ( परिपत्रक पहा ).

## अशोक-शिलालेखांचा कालानुक्रम

| रचनाकाल | शिलालेख |
|---|---|
| १. इ. स. पू. २५३ (राज्यकालाचे १२ वे वर्ष) | बैराट ( कलकत्ता ) |
| २. इ. स. पू. २५२ (राज्यकालाचे १३ वे वर्ष) | ( १ ) धर्मश्रावण लेख<br>१. रूपनाथ<br>२. बैराट<br>३. सहस्राम<br>४. मस्कि<br>५. ब्रह्मगिरि<br>६. सिद्दापूर<br>७. जतिंग रामेश्वर<br>( २ ) बराबर गुफा क्र. १–२<br>( ३ ) धर्मलिपी लेख<br>१. गिरनार<br>२. काल्सी<br>३. शहाबाझगढी<br>४. मानसेहरा<br>५. धौलि<br>६. जौगड |
| ३. इ. स. पू. २४५ (राज्यकालाचे २० वे वर्ष) | बराबर गुफालेख क्र. ३ |
| ४. इ. स. पू. २४४ (राज्यकालाचे २१ वे वर्ष) | १. रुम्मिनदेइ स्तंभलेख<br>२. निगलीसागर |
| ५. इ. स. पू. २३८ (राज्यकालाचे २७ वे वर्ष) | ( १ ) स्तंभलेख क्र. १–६<br>१. तोप्रा<br>२. मीरत<br>३. लौरिया अरराज, लौरिया नंदनगढ<br>४. कौशांबी<br>५. रामपूर्वा |
| ६. इ. स. पू. २३७ (राज्यकालाचे २८ वे वर्ष) | १. तोप्रा स्तंभलेख क्र. ७<br>२. सारनाथ, सांची बौद्धसंघ स्तंभलेख<br>३. कौशांबी बौद्धसंघ स्तंभलेख |

**निर्वाचन**—अशोक-शिलालेखांची ब्राह्मी लिपी शतकानुशतके अनाकलनीय असल्याचे ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनावरून दिसते.

या लिपीचे सर्वप्रथम निर्वाचन जेम्स प्रिन्सेप यांनी इ. स. १८३७ मध्ये केले ( दिल्ली-तोप्रा स्तंभलेख ) आणि अशा तऱ्हेने अशोक-शिलालेखांचे आणि पर्यायाने साऱ्या ब्राह्मी लिपीचे कोडे उलगडले.

शिलालेखस्थले--आजवर उपलब्ध झालेल्या अशोक-आज्ञालेखांची आणि स्तंभलेखांची माहिती पृ. १६० वरील परिपत्रकामध्ये दिली आहे.

**अशोकाराम** ( बौद्धमठ )-- सिलोनी महावंशमते पाटलिपुत्र येथील बौद्धमठ ( महा. ५.८० ). अशोकाने आयोजिलेली तृतीय बौद्धधर्मपरिषद येथे झाली होती ( समन्तपासादिका. १.४८–४९; पाटलिपुत्र पहा ).

**अशोकेश** ( तीर्थ )--नर्मदा नदीकाठचे एक तीर्थस्थान ( नारद. २.७७.२२ ).

**अश्म** ( नगर )--सप्तपातालांपैकी रसातलातील एक नगर आणि कालकेय असुराचे निवासस्थान ( वा. रा. उ. २३.१७ ).

**अश्मक** ( देश )--बृहत्संहितामते वायव्य भारतातील गौरी ( आधु. पंजकोर ) आणि सुवास्तु ( आधु. स्वात ) नद्यांच्या खोऱ्यातील एक देश आणि लोकसमूह ( बृ. सं. ५.३९; ७३; ७४; ९.१८; २७; १४.२२; १६.११; ३२.१५ ). अरियनच्या मते सुवास्तु ( आधु. स्वात ) नदीच्या दक्षिणेकडील या देशाच्या भौगोलिक सीमा पुढीलप्रमाणे होत्या:-- १. उत्तरेस–स्वात नदी; २. पश्चिमेस–पंजखोर नदी; ३. दक्षिणेस–काबुल नदी.

काही अभ्यासकांच्या मते वायव्य भारतातील आणि दक्षिण भारतातील अश्मक लोक वांशिक दृष्ट्या एकच असावेत. परंतु त्यासंबंधी निर्णायक पुरावा मिळत नाही ( अश्मक २. पहा ).

नामांतरे--प्राचीन साहित्यात या लोकसमूहाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :–

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पद्मपुराण ( स्व. ३.४० ) | अश्वक |
| २. पाणिनी अष्टाध्यायी ( ४.१.९९ ) | अश्वक (आश्वकायन) |
| ३. अरियन ( ४.२७ ) | अस्सकेनोस् |
| ४. कर्टियस | अस्सकेनस् |
| ५. अन्य ग्रीक साहित्य | अस्सकेनोइ |
| ६. पाली साहित्य | अस्सक |

नामव्युत्पत्ती--सेंट मार्टिन यांच्या मते 'दगडांचा देश' (अश्मक) अथवा 'घोडयांचा देश' (अश्वक) अशा अर्थाने या देशास हे नाव मिळाले असावे. परंतु 'अश्मक' आणि 'अश्वक' ही दोन्ही नावे संभवतः प्राकृतभाषीय 'अस्सक'ची अपभ्रष्ट रूपे असून, तत्संबंधीच्या साऱ्या आख्यायिका उत्तरकालीन असाव्यात.

सिकंदरस्वारीसंबंधीच्या ग्रीक साहित्यात—या ग्रंथात या लोकांचा निर्देश 'अस्सकनि,' 'अस्सकेनोइ,' 'अस्सकान' (आधु. अफगाण) नावांनी केला असून हे लोक स्वात नदीच्या खोऱ्यात पूर्व काबुलीस्तान प्रदेशात निवास करीत असत. या पराक्रमी लोकांनी सिकंदरला जोराचा सामना देऊन पळवून लावले होते.

अरियनच्या मते काबुल नदीच्या खोऱ्यातील गौरैओइ (संस्कृत-'गुरुह') देश आणि गौरैओइ (पंजखोर) नदी ओलांडून सिकंदरने निवडक घोडदळासह या देशातील 'मस्सग' (मस्सनगर = मशकावती) या राजधानीच्या गावास वेढा घातला (मॅक्रिंडल, इंडिया. पृ. ३३). सिकंदरस्वारीच्या या वर्णनात स्वात नदीचा निर्देश आढळत नाही. त्यावरून स्वात-पंजखोर संगमाच्या खालच्या अंगास त्याने पंजखोर नदी ओलांडली असावी.

वीस हजार घोडदळ, तीस हजार पायदळ आणि तीस हत्ती यांसह या लोकांनी सिकंदरशी सामना दिला. नऊ दिवसांच्या सतत वेढ्यानंतर सिकंदरने मस्सग गाव जिंकून घेतले. या प्रसंगीच्या रक्तरंजित लढाईत या नगराचे रक्षण करणाऱ्या सात हजार वाहीकदेशीय 'भृत' (भाडोत्री) सैनिकांचा सिकंदरने विश्वासघाताने वध केला (मशकावती पहा).

पाणिनीच्या अष्टाध्यायीत—या ग्रंथातील 'नडादि' गणामध्ये निर्देशिलेले 'अश्वक' अथवा 'आश्वकायन' लोक (पा. सू. ४.१.९९) बहुधा हेच असावेत.

बृहत्संहितेमध्ये--या ग्रंथात वायव्य भारतातील या देशाच्या राजाचा निर्देश 'अश्मकनाथ', 'अश्मकनरेंद्र', 'अश्मकप' या नावांनी केला आहे (बृ. सं. ११.५४-५५; १७.१५).

नगरे--या देशातील निम्नलिखित नगरांचा निर्देश ग्रीक साहित्यात आढळतो:--१. मस्सम (मशकावती = आधु. मत्कनै)- स्वात नदीच्या दक्षिण किनाऱ्यावरील मल्कंद खिंडीनजीकच्या या गावी या देशाची राजधानी होती; २. पेउकेलैतिस (पुष्कलावती)-अरियनच्या ग्रंथात या नगराचा निर्देश आढळतो (मॅक्रिंडल, मेगॅस्थेनिस, पृ. १८४).

२. बृहत्संहितामते मध्य देशान्तर्गत एक देश (बृ. सं. १४.३). महाराष्ट्र देशाच्या विदर्भ, कुंतल आणि महाराष्ट्र या तीन उपविभागांपैकी (इ. स. पू. २ रे-इ. स. ६ वे शतक) महाराष्ट्रात हा देश समाविष्ट होत असे. खानदेशापासून गोदावरी नदीपर्यंतचे आधु. नासिक, अहमदनगर जिल्हे, तसेच खानदेश, वऱ्हाड आणि मराठवाड्याचा काही भाग मिळून हा देश बनला होता. अन्य काही अभ्यासकांच्या मते गोदावरी नदीच्या उत्तर किनाऱ्यावरील नासिक आणि औरंगाबाद जिल्हे या देशाचा बालेकिल्ला होते.

नामांतरे--प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात:—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. कौटिलीय अर्थशास्त्र (श्यामशास्त्री, पृ. १४३) | अस्सक |
| २. दीघनिकाय (२.२३५; १९.३६) | अस्सक |
| ३. सुत्तनिपात (एस्. बी. ई. १०. १८४) | अस्सक |
| ४. गौतमी बलश्रीचा नासिक शिलालेख (एपि. इंडि. ८.६१) | असक |

नामव्युत्पत्ती--महाभारतमते इक्ष्वाकुवंशीय 'अश्मक' राजाने स्थापल्यामुळे या देशास हे नाव प्राप्त झाले.

व्याप्ती--या देशाच्या व्याप्तीसंबंधी अभ्यासकांमध्ये निम्नलिखित मतांतरे आढळतात :—

१. कौटिलीय अर्थशास्त्राचा भाष्यकार भट्टस्वामिन्च्या मते--उत्तरकालीन महाराष्ट्र म्हणजेच प्राचीन अश्मक देश होय (डे, पृ. १३). परंतु हे विधान अतिशयोक्त वाटते.

२. डॉ. भगवानलाल इंद्रजी यांच्या मते--आधु. खानदेश म्हणजेच प्राचीन अश्मक देश होय (इंडि. अँटि. १६. ९८-९९). परंतु आधु. खानदेशापेक्षा बराच मोठा प्रदेश या देशामध्ये समाविष्ट होत असावा.

३. डॉ. दिनेशचंद्र सरकार यांच्या मते--आंध्र प्रदेशातील नांदेड आणि निजामाबाद जिल्हे म्हणजे मूळ अश्मक

देश होय. उत्तरकालामध्ये मूलक देश (औरंगाबाद जिल्ह्यातील पैठण प्रदेश) या देशात समाविष्ट होऊन त्याच्या सीमारेषा कलिंग, विदर्भ, अपरांत देशास जाऊन भिडल्या. भट्टस्वामीच्या भाष्यामध्ये या 'बृहद्-अश्मक' देशाचा निर्देश अभिप्रेत दिसतो.

**ऐतिहासिक 'पार्श्वभूमी**--आंध्रभृत्य (सातवाहन) राजांची राजधानी प्रारंभीच्या काळी प्रतिष्ठान (आधु. पैठण) गावी होती. त्यावरून अश्मक देशाचा सारा प्रदेश सातवाहन-साम्राज्यामध्ये समाविष्ट होत असावा.

उत्तरकालात 'वत्सगुल्म' येथील वाकाटक राजांचे राज्य अश्मक देशावर (उत्तर मराठवाडा आणि दक्षिण वऱ्हाड) असून राष्ट्रकूट राजांच्या शिलालेखामध्ये त्या राजांवर विजय प्राप्त केल्याचा निर्देश आढळतो.

**पाणिनीच्या अष्टाध्यायीत**--या ग्रंथात अश्मक लोकांना 'दाक्षिणात्य' आणि 'कलिंग' म्हटले असून (पा. सू. ४.२.९८; ४.१.१७०), ऱ्हाइस डेव्हिड्स यांच्या मते प्रारंभी अवंतीच्या वायव्येस रहाणाऱ्या या लोकांची एक वसाहत उत्तरकालात गोदावरी नदीकाठी स्थायिक झाली असावी. (बुद्धिस्ट इंडिया. पृ. २७-२८).

**बौद्ध साहित्यात**—या ग्रंथातील षोडश महाजनपदांच्या नामावलीमध्ये 'अश्मक' आणि 'अवंती' जनपदांचा एकत्र निर्देश असून बौद्धकाळी हे जनपद शूरसेन आणि अवंती यांच्या दरम्यान वसले होते (अङ्गुत्तर. १.२१३; ४.२५२; २५६). यावरून अश्मकांची आद्य वसाहत अवंतीच्या वायव्येस असल्याच्या ऱ्हाइस डेव्हिड्स यांच्या तर्कास पुष्टी मिळते.

सुत्तनिपातमते 'अस्सक देश' गोदावरी नदीकाठी होता (एस्. बी. ई. १०.१८४). दीघनिकायमते तत्कालीन पृथ्वीच्या (भारतवर्ष) सात प्रमुख उपविभागात 'अस्सक'ची गणना होत असे. या देशाची राजधानी पोतन (आधु. पैठण) गावी होती (जे. आर. ए. एस्., इ. स. १९०७, पृ. ६५३). या नगराच्या 'अस्सक' नामक राजाचा निर्देश 'चुल्लकालिंग जातका'त आढळतो (जा. ३.१).

प्रारंभीच्या बौद्ध साहित्यात गोदावरी नदीच्या दक्षिण व उत्तर किनाऱ्यावरील 'अश्मक' आणि 'मूलक' हे दोन स्वतंत्र देश मानले आहेत (सु. नि. ५.९७७). मातवाहन राजा गौतमीपुत्राच्या राज्यकाळानंतर (इ. स. १०६-१३०) मूलक देश अश्मक देशामध्ये समाविष्ट होऊन या महाजनपदाची उत्तर सीमा नर्मदा नदीस जाऊन भिडली. उत्तरकालीन बौद्ध साहित्यमते मूलक देशाची राजधानी प्रतिष्ठान गावीच होती (सु. नि. टीका. श्लोक ९७७; १०१०-१०११).

सुत्तनिपातमते अश्मक देशातील गोदावरी नदीकाठी बावरी नामक धर्मगुरू स्थायिक झाला होता. या आचार्याचे शिष्य उत्तर भारतास जात असता मूलक देशाची राजधानी प्रतिष्ठान आणि नर्मदा नदीकाठचे माहिष्मती नगर त्यांस लागले होते (रॉयचौधरी, पृ. १२१-१२२).

**कौटिलीय अर्थशास्त्रात**—या ग्रंथमते दक्षिण भारतातील अश्मक आणि अपरांत देशात विपुल पाऊस पडत असे (कौ. अ. २.११५).

**महाभारतात**--या ग्रंथात या देशाचा निर्देश 'पांडुराष्ट्र', 'गोपराष्ट्र' आणि 'मल्लराष्ट्र' समवेत केला असून (म. भी. ९.४४), हे सारे देश महाराष्ट्रातच कोठेतरी वसले असावेत.

महाभारतात तसेच बृहद्नारदीय पुराणात अश्मक आणि मूलक देशांची स्थापना इक्ष्वाकुवंशीय कल्माषपादपुत्र अश्मकाने केल्याची आख्यायिका दिली आहे. वसिष्ठशापाने कल्माषपाद राजा राक्षस बनला. कालांतराने त्याची राणी मदयंती हिला अश्मक नामक पुत्र झाला. त्याने आणि त्याचा पुत्र मूलक याने अनुक्रमे अश्मक आणि मूलक देशांची स्थापना केली (म. आ. १६८.२५; बृहद्नारदीय. ९).

सहदेवाच्या दक्षिण दिग्विजयात आपल्या दूताकरवी त्याने हा देश जिंकला होता (म. स. ३०७*). या ग्रंथातील कर्णदिग्विजयात 'अश्मक', 'वत्स', 'कलिंग', आणि 'ऋषिक' लोकांचा एकत्र निर्देश आढळतो (म. क. ५.२०). भारतीय युद्धामध्ये अश्मक देशाचा राजा (अश्मकेश्वर) आणि त्याचा अन्य एक नातेवाईक (अश्मकदायाद) हे कौरवपक्षात सामील होते (म. भी. १०.४२).

**पौराणिक साहित्यात**--दक्षिणापथमधील एक जनपद म्हणून 'अश्मक'चा निर्देश या साहित्यात आढळतो (पद्म. सृ. ६.३९; ब्रह्माण्ड. १६.५८; मार्कं. ५४.४८; वामन. १३.४९; वायु. ४५. १२७; विष्णुधर्म. १.९.५; काव्यमी. १७.२२६). बृहत्संहितेमध्ये 'त्रिपुर' आणि 'विदर्भ' देशांसमवेत या देशाचा निर्देश आढळतो (बृ. सं. ५.३९; ९.२७). मगधाच्या शिशुनाग राजांशी समकालीन अशा पंचवीस अश्मकनृपांची नामावली मत्स्य पुराणात दिली आहे (मत्स्य. २७२).

अन्य संस्कृत साहित्यात—दशकुमारचरितमते हा देश विदर्भ देशानजीक असून नर्मदा नदीकाठी या दोहोंची लढाई झाली होती ( दशकुमार. उत्तर. पृ. २८० ). भामहाच्या मते 'अश्मकवंश' नामक काव्य वैदर्भ शैलीमध्ये लिहिले होते ( भामह. १.३३ ).

शिलालेखसाहित्यात--गौतमीपुत्र सातकर्णीच्या नासिक प्रशस्तिलेखात 'असक' ( अश्मक ) देशाचा निर्देश विदभ ( विदर्भ ) आणि अनूप देशांसमवेत आढळतो ( जे. बी. बी. आर. ए. एस्. ५.३५-४१ ).

अजंटा येथील एका गुफालेखात 'सुगताचे निवासस्थान' असणारी एक गुफा अश्मकराजाच्या भव्विराज नामक अमात्याच्या पुण्यप्राप्तीसाठी बुद्धभद्र आचार्याने कोरल्याचा निर्देश आढळतो ( जे. बी. बी. आर. ए. एस्. ७.६१-६२ ). यावरुन प्रस्तुत गुफालेखाच्या काळी अजंटा प्रदेश अश्मक देशामध्ये समाविष्ट होत असावा.

राजधानी—या देशाची राजधानी 'पौदन्य' ( पाली—पोतलि=निजामाबाद जिल्ह्यातील आधु. बोधन ) गावी होती. अन्य अभ्यासकांच्या मते पैठण गाव ते हेच असावे ( पौदन्य पहा ).

**अश्मन्वती** ( नदी )—ऋग्वेदात निर्देशिलेले 'दृषद्वती' नदीचे नामांतर (ऋ. १०.५३.८; दृषद्वती पहा). डे यांच्या मते मध्य आशियातील 'वक्षु' ( अमूदरिया ) नदीचे हे नामांतर असावे (डे, पृ. १३). परंतु ते बरोबर वाटत नाही.

आश्वलायन गृह्यसूत्रात—या ग्रंथमते नववधूला बोटीमधून सासरी पाठवितेवेळी ऋग्वेदातील अश्मन्वती नदीची ऋचा मंत्र म्हणून म्हणत असत ( आश्व. गृ. १.८.२-३ ). 'अश्मन्वती नदी वहात आहे, तिला तरून जा' हा ऋचेचा प्रथमार्ध नववधू बोटीमध्ये पदार्पण करतेवेळी, आणि 'सुखकर अन्न प्राप्त करण्यासाठी आम्ही अश्मन्वती नदी तरून जातो' हा ऋचेचा द्वितीयार्ध वधूच्या जलप्रवाससमाप्तीच्या वेळी म्हटला जातो.

**अश्मपृष्ठ** ( तीर्थ )--महाभारतान्तर्गत अंगिरस्-तीर्थयात्रेमध्ये निर्देशिलेले गया येथील तीर्थस्थान. येथील पवित्र दगडाच्या दर्शनाने ब्रह्महत्त्येचे पातक नष्ट होत असे ( म. अनु. २५.४२ ).

गया येथील रामशिलेपासून ४ मैल पश्चिमेकडील आधु. प्रेतशिला ते हेच होय. आधुनिक काळी येथे दगड नसून ३००'-४००' उंचीच्या टेकडीचीच प्रेतशिला म्हणून पूजा करतात. नामांतरे— 'प्रेतपर्वत'; 'रामशिला' ( गया गॅझेट., पृ. २३५ ).

**अश्व** ( तीर्थ )— महाभारतमते कान्यकुब्ज ( आधु. कनौज ) गावानजीकचे गंगा-यमुना नद्यांचे संगमावरील तीर्थस्थान ( म. आर. ९३.३ ).

नामव्युत्पत्ती—च्यवनपुत्र ऋचीकाच्या अश्वप्राप्तीचे स्थान म्हणून या तीर्थास हे नाव प्राप्त झाले ( म. आर. ११५.१६ ).

महाभारतात—या ग्रंथमते च्यवनपुत्र ऋचीक भार्गव ऋषीने कान्यकुब्ज देशाच्या गाधिराजाच्या सत्यवती नामक कन्येशी विवाह करण्याची इच्छा दर्शविली. निष्कांचन ऋचीकाला अवमानित करण्याच्या हेतूने गाधिराजाने त्याजकडे कन्याशुल्क म्हणून एक हजार श्यामकर्ण शुभ्रवर्णीय अश्व मागितले. तेव्हा तपःसिद्ध ऋचीकाने कान्यकुब्ज नगराजवळील गंगा नदीतून एक हजार अश्व निर्माण करून सत्यवतीची प्राप्ती करून घेतली. त्यामुळेच या स्थानास 'अश्वतीर्थ' नाव प्राप्त झाले ( म. अनु. ४. ६-२१; विष्णु. ४.७.१५ ).

पौराणिक साहित्यात--या ग्रंथात एक तीर्थ म्हणून या स्थानाचा निर्देश आढळतो ( कालिका. ८५.५१-५७; वामन. ८३.२५; कूर्म. उत्तर. ३५.३८ ).

२. ब्रह्ममते गोदावरी नदीकाठचे अश्विनीकुमारजन्माचे तीर्थस्थान ( ब्रह्म. ८९.४३ ).

३. नर्मदा नदीकाठचे एक तीर्थस्थान ( मत्स्य. १९४. ३; पद्म. सृ. २१.३ ).

४. कश्मीरातील वितस्ता ( आधु. झेलम ) नदीकाठचे एक तीर्थस्थान ( नीलमत. १५३० ).

५. हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( स्कन्द. नागर. १६५ ).

६. वराहमते लोहार्गलक्षेत्रान्तर्गत एक मूर्तिस्थान ( वराह. १५१.२२ ).

७. ( नदी ) महाभारतमते कुंतिभोज ( आधु. सौराष्ट्र ) देशातून वाहाणारी चर्मण्वती ( आधु. चंबळ ) नदीची एक उपनदी ( म. आर. २९२.२५; बृ. सं. १०.१५ ). चंबळ नदीची उपनदी असणारी आधु. कुमारी नदी ती हीच असावी. पाठभेद—'अश्वरथा.'

महाभारतात— या ग्रंथमते ही नदी कुंतिभोजक नगराजवळून वहात असे. कुंतिभोजकन्या कुंतीला कौमार्यावस्थेमध्ये झालेला कर्ण नामक पुत्र तिने एका पेटीत बंद करून या नदीत सोडला.

अश्वनदी चर्मण्वती ( चंबळ )ला, चर्मण्वती यमुनेला, आणि यमुना गंगेला मिळत असल्याने गंगा नदीतून ती पेटी चंपा नामक सूतनगरीला आली. तेथील अधिरथ सूताने कर्णाची सुटका केली ( म. आर. २९२.२५-२६).

८. ( पर्वत ) मार्कंडेयमते मेरूच्या पूर्व भागातील एक पर्वत ( मार्कं. ५२.४ ).

९. योगिनीतंत्रमते पूर्व भारतातील एक पर्वत ( योगिनी. उत्तर. ३ ). डे यांच्या मते आसाममधील गौहत्तीनजीकच्या कामाख्या ( प्राचीन प्राग्ज्योतिषपुर ) गावचा आधु. अश्वक्रांता पर्वत तो हाच होय ( डे, पृ. १३ ).

**अश्वक** ( देश )—पाणिनीची अष्टाध्यायी, तसेच पद्ममते वायव्य भारतातील 'अश्मक' देशाचे नामांतर ( पा. सू. ४.१.९९; पद्म. स्व. ३.४०; अश्मक १. पहा ).

**अश्वकालनंद** ( देश )--मार्कंडेयमते कूर्मचक्राच्या वायव्यपादातील एक देश ( मार्कं. ५५.३८ ).

**अश्वकूट** ( देश )--मध्य भारतातील एक देश ( मार्कं. ५४.३२ ).

**अश्वकेश** ( देश )--मार्कंडेयमते पश्चिम भारतातील ( कूर्मपुच्छातील ) एक देश ( मार्कं. ५५.३७ ).

**अश्वतर** ( तीर्थ )—महाभारतमते प्रजापतीचे वेदिस्थान ( म. आर. ८३.७२ ). मत्स्यमते प्रयाग येथील यमुना नदीकाठच्या या तीर्थस्थानी दोन नाग होते ( मत्स्य. १०६.२७; ११०.८ ).

**अश्वत्थ** ( तीर्थ )--गौतमी ( गोदावरी ) नदीकाठचे एक तीर्थस्थान ( ब्रह्म. ११८.१ ).

२. ( तीर्थ ) कूर्ममते हयग्रीवअवताराचे तीर्थस्थान ( कूर्म. उत्तर. ३५.३८ ).

३. ( देवीस्थान ) मत्स्यमते 'वंदनीया' नामक देवीचे स्थान ( मत्स्य. १३.५१ ).

४. ( देश ) बृहत्संहितामते मध्य देशान्तर्गत एक देश ( बृ. सं. १४.३ ).

**अश्वत्थवृक्ष** ( वृक्ष )-- द्वारका येथील एक पवित्र वृक्ष. वराहमते हा वृक्ष विष्णुसंक्रमणक्षेत्रान्तर्गत जलकुंडाच्या दक्षिणेस होता ( वराह. १४९.८६ ).

**अश्वत्थस्थान** ( तीर्थ )—कुरुक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( वामन. ३६.३३; ३९ ).

**अश्वत्थामन्** ( पर्वत )— ओरिसातील बौद्धस्थान. भुवनेश्वरपासून २ मैल अंतरावरील आधु. धवलगिरि पर्वत हाच होय. कलिंगयुद्धोत्तर अशोकाचे हृदयपरिवर्तनस्थान म्हणून हा पर्वत पवित्र मानतात. येथे 'अश्वत्थामन् विहार' नामक बौद्ध गुफा आहे.

२. ( तीर्थ ) उत्तर प्रदेशान्तर्गत कानपुरनजीकच्या राजापुर गावचे एक तीर्थस्थान. स्थानिक समजुतीनुसार येथील क्षीरेश्वर ( आधु. खेरेश्वर ) महादेवाची स्थापना अश्वत्थाम्याने केली. येथून ½ मैलावर अश्वत्थाम्याचे मंदिर आहे.

३. ( दुर्ग ) उत्तर प्रदेशान्तर्गत एक दुर्गस्थान. फतेहपुरपासून १४ मैल आग्नेयेकडील यमुना नदीकाठचे आधु. असोथर ते हेच होय ( ती. ११४ ).

**अश्वत्थामागिरि** ( दुर्ग )--मध्य प्रदेशान्तर्गत 'असेर' ( आधु. अशीरगढ ) या दुर्गस्थानाचे नामांतर ( अर्कि. सर्व्हे. रिपोर्ट. ९; असेर पहा ).

**अश्वनगर** ( नगर )—उत्तर प्रदेशान्तर्गत अंगदराजधानी 'अंगदीया' ( आधु. शहाबाद ) नगराचे नामांतर ( अंगदीया पहा ).

**अश्वमुख** ( लोकसमूह )-- बृहत्संहितामते पूर्व भारतातील एक लोकसमूह ( बृ. सं. १४.३५ ). भारताच्या पूर्व समुद्रकिनाऱ्यावरील अर्धरानटी लोकांचा निर्देश येथे अभिप्रेत असावा.

नामांतरे—प्राचीन साहित्यात या लोकसमूहाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :--

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. बृहत्संहिता ( १४.६ ) | अश्ववदन |
| २. ,, ( १४.२५ ) | तुरगानन |
| ३. पराशरतंत्र | वाजिमुख |
| ४. मार्कंडेय पुराण (५५.११ ) | वदनदंतुर |
| ५. पेरिप्लस | हिप्पोप्रोसौपोइ |

नामव्युत्पत्ती—'अश्वमुख'चा शब्दशः अर्थ 'अश्वसदृश मुख असणारे लोक' असा होतो.

पौराणिक साहित्यात—मत्स्यमते सप्तगंगांपैकी पूर्वेकडे वहात जाणाऱ्या पावनी नदीकाठी हे लोक होते ( मत्स्य. १२१.५८ ). वायुमते पूर्व भारतातील नलिनी नदीकाठी हा देश होता ( वायु. ४७.५७ ). या देशात १०,००० गावे होती ( स्कन्द. माहेश्वर. २.३६.१४६ ).

२. उत्तरापथ देशान्तर्गत (कूर्माच्या वामकुक्षींतील) एक लोकसमूह (मार्कं. ५९.४३).

**अश्वमेध** (तीर्थ)--प्रयाग येथील एक तीर्थस्थान (अग्नि. १११.१४).

२. (नगर) महाभारतमते पूर्व भारतातील एक नगर. आपल्या पूर्व दिग्विजयात भीमाने येथील रोचमान राजास जिंकले होते (म. स. २६.८).

**अश्वमेधकर** (नगर)-- एक पवित्र नगर आणि शार्ङ्गधरस्थान (पद्म. उ. १७६.४०).

**अश्वमेधाङ्गसर** (तीर्थ)—ओरिसामधील जगन्नाथ-क्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान (स्कन्द. वैष्णव. २.३४).

**अश्वरथा** (नदी)--आर्ष्टिषेण–आश्रमाने पुनीत झालेली गंधमादन पर्वतावरील एक नदी (म. आर. १५७. १९).

२. महाभारतमते पश्चिम भारतातील 'अश्व' नदीचे नामांतर (अश्व ७. पहा).

**अश्ववती** (नदी)--महाभारतमते एक नदी (म. अनु. १६५.२५).

**अश्ववदन** (लोकसमूह)--बृहत्संहितामते पूर्व भारतातील 'अश्वमुख' लोकसमूहाचे नामांतर (बृ. सं. १४.६; अश्वमुख पहा).

**अश्ववन्ती** (देश)--दक्षिण भारतान्तर्गत एक देश (वा. रा. कि. ४१.१०).

**अश्वशिरःस्थान** (तीर्थ)--हिमालयपर्वतान्तर्गत एक तीर्थस्थान. पाशुपतास्त्र-प्राप्तीसाठी कृष्णार्जुन येथे आले होते (म. द्रो. ५७.२८).येथे बृहदाश्वाने युधिष्ठिराला द्यूतविद्या शिकविली होती (म. आर. ७८.१७).

२. महाभारतान्तर्गत नलोपाख्यानात निर्देशिलेले एक तीर्थस्थान (म. आर. ७८.२१).

**अश्वाहिरण्मय** (देशविभाग)--भविष्यमते 'हैरण्यक-वर्षा'चे नामांतर (भविष्य. म. ४.१२; हैरण्यकवर्ष पहा).

**अश्वातक** (देश व लोकसमूह)--महाभारतमते एक देश आणि लोकसमूह. भारतीय युद्धात हे लोक कौरव-पक्षात असून भीष्मरक्षणाचे काम त्यांकडे सोपविण्यात आले होते (म. भी. ४७.१५).

**अश्वितीर्थ** (तीर्थ)—कुरुक्षेत्रान्तर्गत 'अश्विनेश्वर' तीर्थाचे नामांतर (नारद. २.६५.३०; अश्विनेश्वर १. पहा).

**अश्विनीकुमार** (तपोभूमी)—उत्तर प्रदेशान्तर्गत अश्विनीकुमारांचे तपस्यास्थान. फतेहपुर रेल्वेस्थानकापासून ३ मैल अंतरावरील गंगा नदीच्या काठचे आधु. असनी गाव ते हेच होय (ती. ९१).

२. नर्मदा नदीकाठच्या झाडेश्वर येथील एक तीर्थस्थान (ती. ४३७).

**अश्विनीतीर्थ** (तीर्थ)--तापी नदीकाठचे एक तीर्थस्थान (तापीमाहात्म्य).

२. देविका नदीकाठचे एक तीर्थस्थान (म. अनु. २५.१).

**अश्विनेश्वर** (तीर्थ)--महाभारतान्तर्गत अंगिरस्-तीर्थयात्रेत निर्देशिलेले कुरुक्षेत्रातील एक तीर्थस्थान (म. अनु. २५.११; पद्म. आ. २६.१५; वामन. ३४.११). याच ग्रंथातील पुलस्त्य–तीर्थयात्रेत निर्देशिलेले वृद्ध व्यक्तीला रूपयौवनाची पुनःप्राप्ती करून देणारे 'अश्विनोः तीर्थ' ते हेच असावे (म. आर. १.१४). नामांतर–'अश्वितीर्थ' (नारद २.६५.३०).

कुरुक्षेत्रातील आधु. आसनग्राम ते हेच असून, स्थानिक समजुतीनुसार ते च्यवन ऋषींच्या तारुण्यप्राप्तीचे स्थान मानतात (ती. ८५).

२. (लिंग) प्रभासक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंगस्थान (स्कन्द. प्रभास. १.१६४).

३. (लिंग) वाराणसी येथील शिवलिंगस्थान (लिङ्ग तीर्थविवेचन. पृ. ५२).

**अष्टकुलेश्वर** (लिंग)--प्रभासक्षेत्रान्तर्गत एक शिव-लिंगस्थान (स्कन्द. प्रभास. १.१६२).

**अष्टग्राम** (ग्राम)--शिलालेखसाहित्यमते पश्चिम भारतातील एक ग्राम (एपि. इंडि. ८.२३१). बूलर यांच्या मते गुजराथमधील नौसारीपासून ७ मैल आग्नेयेकडील आधु. अस्तगाव ते हेच असावे (इंडि. अँटि. १७.१९८). नामांतर–'आसट्टिग्राम' (एपि. इंडि. ८.२२९).

**अष्टतीर्थी** (तीर्थ)—अवंतीक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान (नारद. २.७८.४६).

२. विरजक्षेत्रान्तर्गत आठ तीर्थांचे सामूहिक नाव (ब्रह्म. ४२.६; विरजक्षेत्र पहा).

**अष्टद्वार** (देशविभाग)--कोसलराज महानन्नराज याच्या इ. स. ६ व्या शतकातील दानपत्रमते मध्य भारतातील एक देशविभाग. बिलासपुर जिल्ह्यातील सक्ति तह-सिलीतील आधु. अढभार (अर्भार) गावाच्या परिसरात हा देश वसला असावा. या देशविभागात कोंतिणीक नामक ग्राम होते (एपि. इंडि. ३१.२१९–२२०).

**अष्टवक्रा** (तीर्थ)--काशी येथील योगिनीस्थान (स्कन्द. काशी. ४५.३५).

**अष्टापद** ( पर्वत )--जैन विविध तीर्थकल्पमते 'कैलास' पर्वताचे नामांतर ( लॉ, जैन सूत्राज्. पृ. १७४; कैलास पहा ).

**अष्टावक्र-आश्रम** ( आश्रमस्थान )--महाभारतान्तर्गत लोमश-तीर्थयात्रेत निर्देशिलेले समंगा ( मधुविला ) नदीकाठचे एक तीर्थस्थान ( म. आर. १३४.३८ ). अष्टावक्रा ( प्राचीन- समंगा ) नदीने पुनीत झालेले हरिद्वारपासून ४ मैल अंतरावरील आधु. रैल ( राहुग्राम ) गाव ते हेच होय.

**महाभारतात**--या ग्रंथात अष्टावक्र ऋषीने आपल्या आश्रमस्थानापासून हिमालय पर्वतापर्यंतचा प्रवासमार्ग निम्नलिखित पद्धतीने दिला आहे:--अष्टावक्र-आश्रम→ धनद→महापार्श्व पर्वत→बाहुदा नदी→अशोकतीर्थ→ कैलास पर्वत→गांधर्व विषय→मंदर पर्वत→कैरातस्थान →हिमालय पर्वत ( म. अनु. १९ ).

त्यावरून हा आश्रम उत्तर प्रदेशात हिमालयाच्या दक्षिणेस असल्याच्या तर्कास पुष्टी मिळते. वदान्य ऋषींच्या सुप्रभा नामक कन्येच्या प्राप्त्यर्थ अष्टावक्र या मार्गाने हिमालय पर्वतास गेला होता.

महाभारतान्तर्गत अंगिरस्-तीर्थयात्रेतहि या तीर्थाचा निर्देश असून ( म. अनु. २५.४१ ), येथे बारा दिवसपर्यंत अनशनव्रत केले असता नरमेधाचे पुण्य प्राप्त होत असे.

२. गढवालमधील श्रीनगर गावानजीकच्या पौरि गावचे अष्टावक्राचे आश्रमस्थान आणि पवित्र पर्वत (डे, पृ. १२).

३. पूर्व भारतातील राकेश्वर गावचे अष्टावक्राचे आश्रमस्थान आणि ५१ शक्तिपीठांपैकी एक. येथे वक्रेश्वर शिवमंदिर आणि पापहरण कुंड आहे.

**अष्टिग्राम** ( तीर्थ )--आदिपुराणमते कृष्णसखी राधिकेचे व्रजदेशान्तर्गत जन्मस्थान. येथे निवास करणाऱ्या सुर्भानु नामक आपल्या मामाच्या घरी राधिकेचा जन्म झाला ( आदि. १२ ). मथुरा जिल्ह्यातील आधु. रावल गाव ते हेच असावे ( जे. ए. एस्. बी. इ. स. १८७४, पृ. ३५२ ).

**अष्टोत्तरशतकूट** ( पर्वत )--पश्चिम भारतातील 'शत्रुंजय' नामक जैन तीर्थस्थानाचे नामांतर ( शत्रुंजय पहा ).

**असक** ( देश )--गौतमी बलश्रीच्या नासिक शिलालेखमते दक्षिण भारतातील 'अश्मक' देशाचे नामांतर ( एपि. इंडि. ८.६१; अश्मक २. पहा ).

**असकुण्ड** ( तीर्थ )-- मथुराक्षेत्रान्तर्गत यमुना नदीकाठचे निंबार्क संप्रदायाचे तीर्थस्थान ( ती. ५५९ ).

**असङ्ख्यातेश्वर** ( लिंग )-- अवंतीक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंगस्थान ( स्कन्द. आवन्त्य. १.७०.८३ ).

**असथीपाटक** ( ग्राम )--कलचुरि राजा सोढदेव याच्या इ. स. १०७९ च्या कहल ताम्रपटमते उत्तर प्रदेशातील एक गाव. उत्तर प्रदेशातील टीकरि गावापासून २ मैलांवरील आधु. अवस्थि गाव ते हेच होय ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२; ३८५ ).

**असम** ( देश )-- मध्ययुगीन साहित्यमते 'प्राग्ज्योतिष' ( आधु. आसाम ) देशाचे नामांतर. या देशाचे आधु. आसाम हे नाव 'असम' या आसामीभाषीय शब्दाचेच इंग्रजी रूप असावे.

नामव्युत्पत्ती--या देशास 'असम' नाव का पडले, यासंबंधी अभ्यासकात निम्नलिखित मतांतरे आढळतात:--

**१. असम म्हणजे अजिंक्य**--इ. स. १२२८ मध्ये आसाम देश जिंकणारे आहोम् लोक स्थानिक लोकांमध्ये 'असम' 'अचम', 'आसम', 'आसाम' ( अजिंक्य ) अशा नावांनी प्रसिद्ध झाले. अन्य अभ्यासकांच्या मते 'असम' हे 'आचाम' ( अजिंक्य ) या आहोम्भाषीय शब्दाचे संस्कृत रूपांतर असून, उत्तरकालात हेच विशेषण देशनाम म्हणून प्रचलीत झाले.

**२. वज्रयान बौद्धपंथ**--बौद्ध साधनामालामते 'असम' हे 'वज्रयान बौद्धपंथा'चे नामांतर असून, त्याचेच नावावरून या पंथाचा स्वीकार करणाऱ्या या देशास 'असम' नाव प्राप्त झाले असावे ( आय्. एच्. क्यू. ३.४२१ ).

**३. बौद्ध भिक्षूंचा देश**--सयाम देशाचे प्राचीन नाव 'आशान्' ( बौद्ध भिक्षूंचा देश ) असून, आसाममध्ये स्थलांतरित झालेल्या या 'शान्' ( बौद्ध भिक्षु ) मुळेच या देशास 'असम' नाव प्राप्त झाले ( जे. आर. ए. एस्. २.१०२-१०४ ).

**४. सखल प्रदेश**--चौधरी यांच्या मते हे देशनाम तिबेटो-बर्मनवंशीय बोडोसभाषीय 'हा-कोन्' ( सखल प्रदेश ) चे अपभ्रष्ट रूप असावे. तसे असेल तर आहोम् लोकांच्या अगोदरच्या काळापासून ( इ. स. १३ वे शतक ) हे देशनाम प्रचलीत असावे.

**५. खाचखळग्यांचा प्रदेश**--काही अभ्यासकांच्या मते 'उंचसखल प्रदेश' ( अ+सम ) अशा अर्थाने या देशास हे नाव प्राप्त झाले असावे.

प्राचीन साहित्य आणि शिलालेखात सर्वत्र या देशाचा निर्देश 'प्राग्ज्योतिष' नावानेच आढळतो (प्राग्ज्योतिष पहा).

**असर्तु** (नगर)—ह्युएन्त्संगच्या जीवनचरित्रमते चीनच्या पूर्व सरहद्दीनजीकचे मध्य आशियातील एक नगर. या ('इ-गु') गावी 'कौ-चँग्' नामक छोट्या राज्याची राजधानी होती.

ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात--चीनच्या पूर्व सरहद्दीवरील 'युह-मेन्' गावाहून इ. स. ६२९ मध्ये भारतयात्रेसाठी निघालेला ह्युएन्त्संग 'मो-हो-येन्' वाळवंटाच्या रस्त्याने या गावी आला. येथून तुर्फान देशाच्या उत्तरेकडील कगन स्तूपाच्या (आधु. बिशूबलिक ग्राम) हमरस्त्याने भारतात जाण्याचा त्याचा विचार होता. परंतु 'कौ-चँग' देशाच्या तुर्की राजाच्या आज्ञेवरून प्रथम तो त्या देशास गेला (वॉटर्स, २.३३१).

**असर्पण** (तीर्थ)—नीलकंठाच्या मते 'अपसर्पण' नामक तीर्थस्थानाचे नामांतर (अपसर्पण पहा).

**असविल** (नगर)—अल्बेरुणीच्या मते पश्चिम भारतातील 'कर्णावती' नगराचे नामांतर (अल्बेरुणी, १. २०९; कर्णावती पहा).

**असाला** (ग्राम)--धर्मारण्यक्षेत्रान्तर्गत एक ग्राम (स्कन्द. ब्राह्म. २.३९.३२).

**असि** (नदी)— पौराणिक साहित्य, तसेच ऐन-इ-अकबरीमते वाराणसी येथील गंगा नदीची एक उपनदी (पद्म. सृ. ६.२६; १४.१९; मत्स्य. १८३.६२; ऐ. अ. २.१५८). नामांतर–'शुष्कासरित्' (स्कन्द. काशी. ९७. २५३).

२. (तीर्थ) मथुरा येथील यमुना नदीकाठचे एक तीर्थस्थान (नारद. २.७९. ३५-३६; वराह. १६०.६०; १६३.१३; १६६.१; २६; पद्म. उ. २०४.४२).

**आसिक** (लोकसमूह)--गौतमी बलश्रीचा नासिक शिलालेख, तसेच बृहत्संहितामते दक्षिण भारतातील एक लोकसमूह (एपि. इंडि. ८.६१; बृ. सं. ११.५६).

**भौगोलिक स्थान**--या लोकांच्या भौगोलिक स्थानाविषयी अभ्यासकात निम्नलिखित मतांतरे आढळतात :—

१. डॉ. भगवानलाल इंद्रजी यांच्या मते—हे (आर्षिक) लोक इराणच्या अर्सकवंशीय राजघराण्याचे (इ. स. पू. २५०-इ. स. २५०) वंशज असावेत, पेरिप्लसच्या मते इ. स. २४७ पर्यंत हे (पार्थियन) लोक सिंधु नदीच्या खोऱ्यामध्ये राज्य करीत होते (बॉंबे, गॅझे. २६.६२९.६३०).

२. अन्य अभ्यासकांच्या मते--नर्मदा खोऱ्यातील 'ऋषिक' लोकांचे हे नामांतर असावे (ऋषिक पहा).

**असिक्नी** (नदी)-ऋग्वेदान्तर्गत नदीस्तुतीमते पंजाबातील एक सुविख्यात नदी (ऋ. ८.२०.२५; १०.७५.५). सिंधु नदीची सर्वात पूर्वेकडील उपनदी आधु. चिनाब ती हीच होय. आजच्याप्रमाणेच ऋग्वेदकालीहि ही पंजाबातील मोठी नदी मानली जात असावी.

**नामांतरे**--प्राचीन साहित्यात या नदीची निम्नलिखित नामांतरे आढळतात :-- १. अकेसिनेस् (ग्रीक साहित्य–झीमर, अल्टिंडिशे लेबेन. १२); २. चंद्रभागा (पौराणिक साहित्य; यास्ककृत निरुक्त. ९.२६). या नदीचे आधु. 'चिनाब' नावहि 'चंद्रभागा'चेच काश्मीरी-भाषीय रूप असावे.

**नामव्युत्पत्ती**—यास्काच्या निरुक्तमते या नदीच्या कृष्णवर्णीय (असिक्नी) पाण्यामुळे तीस हे नाव मिळाले होते (नि. ९.२६).

**सिकंदरस्वारीच्या ग्रीक साहित्यात**--या साहित्यमते सिकंदरने ही (अकेसिनेस्) नदी ओलांडून सांगल किल्ल्यानजीकच्या कठ लोकांशी युद्ध केले. या युद्धानंतरच त्याच्या सैन्यात बेदिली सुरू झाली.

**पौराणिक साहित्यात**--या साहित्यकाळी या नदीचे 'असिक्नी' हे वैदिक नाव मागे पडून त्याची जागा 'चंद्रभागा' या नव्या नावाने घेतली (चंद्रभागा पहा). तत्रापि पौराणिक आणि मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात क्वचित् 'असिक्नी' नदीनामाचा निर्देश आढळतो (पद्म. सृ. ६.१९; भा. ५.१९.१८; म. मी. १०.२२; मेदिनी. ९०.३३; शब्दरत्न. १९०.१५).

**असि-गङ्गासङ्गम** (तीर्थ)--काशी येथील एक तीर्थस्थान (स्कन्द. काशी. ८३.६०).

**असिग्राम** (ग्राम)--टॉलेमीच्या मते वायव्य भारतातील (अक्षांश २९°-३०′ उत्तर; रेखांश १२३° पूर्व) एक ग्राम. हे गाव निश्चित कोठे होते, ते समजत नाही.

**असित** (पर्वत)—महाभारतान्तर्गत धौम्य तीर्थयात्रेमध्ये निर्देशिलेला पश्चिम भारतातील एक पवित्र पर्वत. आनर्त देशान्तर्गत नर्मदा नदीकाठच्या या पर्वतावर च्यवन आणि कक्षसेन ऋषींचे आश्रम होते (म. आर. ८७.९). नामांतर–'योगाचार्य असिताचा पर्वत' (वायु. ७७.३९; ब्रह्माण्ड. १३.३९).

२. ( आश्रम ) यमुना नदीच्या उगमानजीकचे ( जम्नोत्री ) असित ऋषींचे आश्रमस्थान ( ती. ५१ ).

**असित देवल** ( आश्रम )--महाभारतान्तर्गत बलराम–तीर्थयात्रेत निर्देशिलेले सरस्वती नदीकाठचे असित-देवल ऋषींचे आश्रमस्थान. महाभारतमते हे आदित्य-तीर्थ आणि जैगीषव्य आश्रमानजीक होते ( म. श. ४९. ६; २९६ * ).

**असितंञ्जन** (नगर)–जातकमते उत्तरभारतान्तर्गत कंस देशातील महाकंस राजाच्या राजधानीचे नगर (जा.४.७९).

**असितमसा** ( नगर )--भर्हुत् शिलालेखमते मध्य भारतातील एक नगर. येथील 'वलमित' ( वलामित्र ) ने भर्हुत् स्तूपास देणगी दिली होती ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.२. २७ ). कनिंगहॅम यांचे मते मध्य प्रदेशातील रेवा प्रदेशात तमसा ( आधु. तोन्स् ) नदीकाठी हे असावे.

वामन पुराणात निर्देशिलेला असिनील देश बहुधा हाच असावा ( वामन. १३.५१ ).

**असिता** ( नदी )--पौराणिक साहित्यमते योगाचार्य असिताच्या आश्रमाने पुनीत झालेली एक नदी ( वायु. ७७.३९; ब्रह्माण्ड. ३.१३.३९ ).

**असिताङ्ग** ( भैरव )--काशी येथील भैरवस्थान (स्कन्द. काशी. ६८.७१ ).

**असितोद** ( सरोवर )--जंबुद्वीपान्तर्गत मेरु पर्वताच्या पश्चिमेकडील एक सरोवर ( ब्रह्म. १८.३१; विष्णु. २.२. २४ ).

**असिधारपुर** (देशविभाग)--पल्लव राजा नृसिंहवर्मन् याच्या रेवूरु ताम्रपटमते दक्षिण भारतातील रेयूरु गावाच्या दक्षिणेकडील एक देशविभाग. नेलोर जिल्ह्यातील आधु. रेवूरु गावाच्या दक्षिणेस हा असावा ( एपि. इंडि. २९. २४; रेयूरु पहा ).

**असिनील** ( देश )--वामनमते पश्चिम भारतातील एक देश ( वामन. १३.५१ ). हे बहुधा 'असितमसा' देशाचे नामांतर असावे ( असितमसा पहा ).

**असिन्द** ( नगर )--टॉलेमीच्या मते सिंधु नदीच्या पूर्वेकडील ( अक्षांश २२° उत्तर; रेखांश ११४°–१५′ पूर्व ) एक नगर. सेंट मार्टिन यांच्या मते गुजरातमधील सरस्वती नदीकाठचे आधु. सिद्धपुर गाव ते हेच असावे ( इंडि. अँटि. १३.२४६–२४७ ).

**असिपत्रवन** ( नरक )--महाभारतमते एक नरक. याच्या मायामयी स्वरुपाचे दर्शन युधिष्ठिराला झाले होते ( म. स्व. २.२३ ).

२. (वन) यमलोकातील एक वन ( म. शां. ३०९.३१ ).

**असिलदुर्ग** ( नगर )--राजस्थानी लोकसाहित्यमते पश्चिम भारतातील 'गिरिनगर' ( आधु. जुनागढ ) नगराचे नामांतर ( डे, पृ. १२; गिरिनगर पहा ).

**असिसङ्गम** ( तीर्थ )--काशी येथील असि-गंगा-संगमानजीकचा पवित्र घाट.

**असिसम्भेद** ( तीर्थ )— काशी येथील एक तीर्थस्थान ( स्कन्द. काशी. ४७.६० ).

**असुरगिरिप्रस्थ** ( तीर्थ )--वामनपुराणान्तर्गत प्रह्लाद –तीर्थयात्रेतील एक तीर्थस्थान (वामन. ८२.४०).

**असुरेन्द्रलोक** (पृथ्वीविभाग)--बौद्ध ललित विस्तार-मते पृथ्वीच्या चतुर्लोकांपैकी एक. पृथ्वीच्या अन्य तीन लोकांची नावे पुढीलप्रमाणे होत:–१. मनुष्यलोक; २. देवलोक; ३. गंधर्वलोक. या चारहि लोकातील विभिन्न लिप्यांमध्ये बोधिसत्त्व पारंगत होता (ललित् . लेफ्मान आवृत्ति. पृ. १४६ ).

**असेकतिन्** ( ग्राम )--कलचुरि राजा शंकरगणदेव याच्या इ. स. ८ व्या शतकातील छोटी देवडी शिला-लेखमते मध्य प्रदेशातील एक ग्राम. जबलपुर जिल्ह्यातील मुर्वाड तहसिलीमधील आधु. छोटी देवडी गावाच्या परिसरात हे असावे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.१७७ ).

**असेर** ( दुर्ग )--पृथ्वीराज रासोमते मध्य प्रदेशातील एक दुर्गस्थान. 'अश्वत्थामागिरि' चे हे बहुधा अपभ्रष्ट रूप असावे ( आर्कि. सर्व्हे. रिपोर्ट ९ ). निमाड जिल्ह्यातील बऱ्हाणपुर या तहसिलीच्या गावापासून ११ मैल ईशान्ये-कडील आणि खांडव्यापासून २९$\frac{1}{2}$ मैल नैऋत्येकडील आधु. अशीरगढ किल्ला तो हाच होय.

मौखरि सम्राट शर्ववर्मन् याचा एक ताम्रपट–मुद्रालेख या गावी सापडला आहे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.२२०–२२१ ).

**असौठा** ( ग्राम )—कलचुरि राजा पृथ्वीदेव ( प्रथम ) याच्या इ. स. १०७९ मधील रायपुर ताम्रपटमते मध्य प्रदेशान्तर्गत अपरमंडल देशातील ( आधु. बिलासपुर जिल्हा ) एक गाव ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.३९९ ).

**अस्तकप्र** ( ग्राम )—टॉलेमीच्या मते गुजरातमधील 'हस्तकवप्र' ( आधु. हताब ) गावाचे नामांतर ( मॅक्रिंडल, इंडि. अँटि. ५.२०४; हस्तकवप्र पहा ).

**अस्तगिरि** ( पर्वत )--पश्चिम भारतातील एक पर्वत ( बृ. सं. १४.२०; मार्कं. ५५.३४ ). शब्दशः अर्थ- 'पश्चिम दिशेचा पर्वत' ( म. उ. ११८.६ ).

वाल्मीकि रामायणमते हें ' आदर्श ' (आधु. अरवली) पर्वताचे नामांतर असावे ( वा. रा. कि. ४२.५१-५२; आदर्श पहा ).

संस्कृत शब्दकोश साहित्यात— या ग्रंथात या पर्वताची निम्नलिखित नामांतरे आढळतात:-१. अस्त ( अभि. १४०. १०२७; मेदिनी. ५१.२; ५४.२; अमर. २.३.२; मङ्ख. २२.२९९; वैज. ४१.११); २. अस्ताद्रि (त्रिकाण्ड. ३५.३ ); ३. चरमाचल (त्रिकाण्ड. ३५.३); ४. चरमाद्रि ( अभि. १४०.१०२७ ); ५. विपुल ( मेदिनी. १६७.१३२; शब्दरत्न. ३०९.१९ ).

२. शाकद्वीपान्तर्गत एक वर्षपर्वत ( ब्रह्माण्ड. १९.८९; मत्स्य. १२२.१४; वायु. ४९.८३ ).

**अस्तकम्प्र** ( ग्राम )--पेरिप्लसमते गुजरातमधील ' हस्तकवप्र ' ( आधु. हताब ) गावाचे नामांतर ( हस्तकवप्र पहा )

**अस्तमन** ( तीर्थ )--मथुरा येथील एक तीर्थस्थान ( वराह. तीर्थविवेचन. पृ. ३९१ ).

**अस्त्रस्सोस्** (नगर)--टॉलेमीच्या मते मध्य भारतातील ( अक्षांश ३४°-१५′ उत्तर; रेखांश १३१°-२५ पूर्व ) एक नगर. मॅक्रिंडल यांच्या मते कनौज राज्यातील आधु. अत्रस् गाव ते हेच असावे. नामांतर ( इद्रीसी )-'अत्रस.'

**अस्थिपुर** ( तीर्थ )-- पद्ममते कुरुक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( पद्म. सृ. २७.६२ ). भारतीय युद्धातील वीरांचे हे दाहकर्मस्थान स्थाणुतीर्थ ( आधु. थानेसर ) च्या पश्चिमेस आणि औजसघाटाच्या दक्षिणेस आहे.

ह्युएन्‌त्संगच्या मते येथे अस्थींचा मोठा ढिगारा होता ( कनिंग., पृ. ३३६; अर्कि. सर्व्हे. १४.८६-१०६ ).

२. ह्युएन्‌त्संगच्या मते मध्य आशियातील ' हिला ' ( आधु. हिड्डा ) गावाचे नामांतर ( वॉटर्स, १.१८४; हिला पहा ).

**अस्थिसरोवर** ( सरोवर )—वेंकटाचलक्षेत्रान्तर्गत एक पवित्र सरोवर ( स्कन्द. वैष्णव. १ ).

**अस्सक** (देश)—पाली साहित्यमते वायव्य भारतातील ' अश्मक ' देशाचे नामांतर ( अश्मक १. पहा ). अन्य नामांतरे ( कर्टियस् )-' अस्सकेनस् '; ( अरियन, ४.२७ ) -' अस्सकेनोस् '; ( ग्रीक साहित्य )-' अस्सकेनोइ. '

२. बौद्ध साहित्यमते दक्षिण भारतातील ' अश्मक ' देशाचे नामांतर ( दीघ. २.२३५; एस्. बी. ई. १०.१८४; श्यामशास्त्री, कौ. अ; पृ. १४३; अश्मक २. पहा ).

**अस्सपुर** ( व्यापारी नगर )--बौद्ध साहित्यमते पूर्व भारतान्तर्गत अंग देशातील एक ' निगम ' ( बाजारपेठेचे गाव ) ( मज्झिम. १.२७१; २८१ ). विहारमधील आधु. भागलपुर जिल्ह्यात हे असावे.

जातकमते चेदिराज उपरिचर वसूच्या द्वितीय पुत्राने या नगराची स्थापना केली (जा. ३.४६० ). पूर्व भारतातील साऱ्याच नगरांची स्थापना चेदिराजांनी केल्याची कल्पनारम्य आख्यायिका बौद्ध साहित्यात आढळते.

२. चेदि जातकमते ' सोवत्थी ' नामक चेदि राजधानीच्या दक्षिणेकडील एक नगर ( जा. ३.४६० ).

**अहडापाड** ( ग्राम )--कलचुरि राजा जयसिंह याच्या इ. स. ११७५ मधील रेवा ताम्रपटमते मध्य भारतातील ' खंडगहा पत्तल ' मधील एक गाव. हे गाव कोठे असावे ते समजत नाही ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.३४१ ).

**अहतीर्थ** ( तीर्थ )—कुरुक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( म. आर. ८१.८४ ). नामांतर- ' अहःतीर्थ ' ( पद्म सृ. २६.९३ ).

**अहद** ( ग्राम )—चालुक्य राजा भीम ( द्वितीय ) च्या शिलालेखमते पश्चिम भारतातील मेदपाट मंडलान्तर्गत ( आधु. मेवाड ) एक ग्राम ( ओरिएंटल कॉन्फरन्स् रिपोर्टस्. ७.६४३ ). उदयपुरनजीकचे आधु. अहड गाव ते हेच होय.

**अहरेङ्ग** ( नगर )--बील यांच्या मते वक्षु (अमूदरिया) नदीच्या दक्षिण किनाऱ्यावरील अलिन देशाच्या राजधानीचे नगर. कुंदुझ्‌पासून २६ मैल उत्तरेकडील आधु. हजरत इमाम गाव ते हेच असावे ( बील, १.१०७ ). परंतु वॉटर्स या तर्काशी सहमत नाहीत ( वॉटर्स, २.२७२-२७३; अलिन पहा ).

**अहल्यातीर्थ** ( तीर्थ )--नर्मदा नदीकाठचे एक तीर्थस्थान ( कूर्म. उत्तर. ४१.४३; पद्म. सृ. १८.८४; मत्स्य. १९१.९० ).

**अहल्या-सङ्गम** ( तीर्थ )--महाराष्ट्रातील त्र्यंबकेश्वरानजीकचे जटिला-गोदावरी नद्यांचे संगमस्थान ( ब्रह्म. ८७. १; ७० ). हे त्र्यंबकपासून २ फर्लांगावर आहे. नामांतर- ' इंद्रतीर्थ '.

**अहल्यासर** ( सरोवर )--मही-सागर-संगमक्षेत्रान्तर्गत एक पवित्र सरोवर ( स्कन्द. माहेश्वर. २.५२ ).

**अहल्याह्रद** (तीर्थ ) --महाभारतान्तर्गत पुलस्त्य-तीर्थयात्रेत निर्देशिलेले गोदावरी नदीकाठचे गौतमवनातील एक

तीर्थस्थान (म. आर. ८२.९३). नामांतर- 'अहिल्या-ह्रद' (पद्म. सृ. ३८.२६).

२. (तीर्थ) बिहारमधील राजगृह गावानजीकचे बाणगंगा नदीकाठचे एक तीर्थस्थान (ती. १६८).

३. (ह्रद) श्रीमालक्षेत्रान्तर्गत एक पवित्र सरोवर (श्रीमालमाहात्म्य).

**अहल्येश्वर** (लिंग)--हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक शिव-लिंगस्थान.

**अहल्योद्धार** (तीर्थ)--गौतमपत्नी अहल्येच्या उद्धाराचे बिहारमधील तीर्थस्थान. शहाबाद जिल्ह्यातील बक्सर गावचा आधु. अहल्याघाट तो हाच होय.

रघुवंशात--या ग्रंथमते रामलक्ष्मणांनी वामनाश्रमातील विश्वामित्राचा यज्ञ निर्विघ्नपणे पार पाडला, आणि नंतर मिथिलेस जात असता गंगातीरावरील गौतमाश्रमी रामाने अहल्येचा उद्धार केला (रघु. ११.३३-३४). हे वर्णनहि आधु. अहल्याघाटाशी तंतोतंत जुळते.

२. (तीर्थ) उत्तर प्रदेशातील गंगा नदीकाठच्या अनूप नगरानजीकचे एक तीर्थस्थान. स्थानिक समजुतीनुसार श्रीविष्णूंचे वराहअवतारस्थान, तसेच जनमेजयसर्पसत्रस्थान म्हणून हे पवित्र मानतात (ती. ८९; जनमेजयसर्पसत्र-स्थान पहा).

**अहार** (जैन मंदिरस्थान)--मध्य प्रदेशान्तर्गत एक जैन तीर्थस्थान. टीकमगडपासून ९ मैलांवरील या स्थानी तीन जैन मंदिरे असून, त्यापैकी एकामध्ये श्रीशांति-नाथाची २१′ उंचीची मूर्ती आहे (ती. ५४१).

**अहिक्षत्र** (नगर)--महाभारतमते उत्तर प्रदेशान्तर्गत 'अहिच्छत्र' नगराचे नामांतर (म. आर. परि. २४.१. ४४; अहिच्छत्र १. पहा). अन्य नामांतर-'अहिक्षेत्र' (म. आर. २५२).

**अहिच्छत्र** (नगर)--उत्तर पंचाल (उत्तर प्रदेशातील आधु. पूर्व रोहिलखंड) देशाच्या राजधानीचे गाव आणि मौर्यपूर्वकालीन भारतवर्षातील तीन प्रमुख नगरांपैकी एक. अन्य दोन नगरे-'पाटलिपुत्र'; 'वैशाली'.

बरेली जिल्ह्यातील आवला गावापासून ८ मैलावरील आधु. रामनगर ते हेच होय. या गावच्या 'अल्मपुर कोट' आणि 'नसरतगंज' या अर्धउध्वस्त स्थानी प्राचीन काळी हे गाव असून येथील मौर्यकालीन किल्ल्याचे अवशेष स्थानिक लोकात 'आदिकोट' (आदि राजाचा किल्ला) नावाने सुविख्यात आहेत. त्यानजीकच 'पांडु-का-किल्ला' नामक अन्य एक पुरातन दुर्ग आहे.

नामांतरे--प्राचीन साहित्यात या नगराची निम्न-लिखित नामांतरे आढळतातः--

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. महाभारत (आ. १५४.२१) | छत्रवती |
| २. ,, (आ. १२८.१८) | अहिच्छत्रा |
| ३. ,, (आर. २५२) | अहिक्षेत्र |
| ४. ,, (आर. परि. २४. १.४४) | अहिक्षत्र |
| ५. ब्राह्मी शिलालेख (ल्यूडर्स, क्र. ९०५) | अधिच्छत्र |
| ६. आषाढसेनाचा पभोसा गुफालेख (एपि. इंडि. २.४३२) | अधिच्छत्र |
| ७. ब्राह्मी. शिलालेख (ल्यूडर्स, क्र. १०७) | अधिच्छत्रका |
| ८. टॉलेमी (मॅक्रिंडल, पृ. १३३) | अदिस्द्र (अधिच्छत्र) |
| ९. जैन विविधतीर्थकल्प (पृ. १४) | संख्यावती |
| १०. ह्युएन्त्संग (वॉटर्स, १.३३१-३३२) | ओ-हि-चि-त-लो |
| ११. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य (अभि. १३०.९६०) | प्रत्यग्रथ |

नामव्युत्पत्ती-- संस्कृत साहित्यमते द्रोणाचार्याने येथील आदि नामक आभीरवंशीय निद्रिस्त गुराख्यास 'अहिच्छत्र' (नागफणी) अवस्थेत पाहिल्याने या नगरास हे नाव मिळाले. ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनातील नागतलावाच्या वर्णनातहि या आख्यायिकेचा अस्पष्ट निर्देश आढळतो (कनिंग., आर्कि. सर्व्हे. १.२५९).

जैन साहित्यमते कमठासुर नामक असुराने पार्श्वनाथास ठार मारण्याचा प्रयत्न केला असता धरणेंद्र नागाने आपल्या १००० फण्यांच्या साह्याने त्याचे या गावी रक्षण केले. तेव्हापासून या नगरास 'अहिच्छत्रा' नाव मिळाले.

उपरोक्त आख्यायिकांवरुन या नगराचे मूळ नाव 'अहिच्छत्र' (नागफणी) हेच असावे. मूळ पौराणिक साहित्यातील या नगरनामासंबंधीची आख्यायिका उत्तर-कालीन बौद्ध आणि जैन साहित्यात थोड्याफार फरकाने घेतलेली दिसते.

स्थापत्यावशेष--येथील स्थापत्यावशेषांचे प्राथमिक संशोधन कनिंगहॅम यांनी इ. स. १८६२ मध्ये आणि

सांगोपांग उत्खनन इ. स. १९४०–१९४४ मध्ये रा. ब. कृ. ना. दीक्षित यांनी केले. त्यावरून या नगराचा समृद्धीकाल इ. स. पू. १०००–इ. स. ११०० पर्यंत दिसतो.

अहिच्छत्र येथील किल्ल्याचा सर्वप्रथम शोध कॅप्टन हॉज्सन यांनी लावला. त्यांचे मते पक्क्या विटांनी बांधलेल्या या किल्ल्याचा तट अनेक मैल परिघाचा आणि ४०–५०' उंचीचा असून त्यास मोठ्या आकाराचे ३४ बुरूज होते. किल्ल्याच्या अंतर्भागात मध्यभागी एक मंदिर असून गावातील सर्व प्रमुख रस्ते त्याप्रत जात असत.

**महाभारतात**—उत्तर आणि दक्षिण पंचाल (गंगा नदीच्या उत्तर आणि दक्षिण किनाऱ्यावरील देश) देशांची राजधानी अहिच्छत्र आणि कांपिल्य (आधु. कंपिल) गावी असून (म. आ. १२८.१७), या नगराचे नावावरून उत्तर पंचाल देश 'अहिच्छत्र' या वैकल्पिक नावाने ओळखला जात असे (म. आ. १५४.२४).

हरिवंशमते अर्जुनाने पंचालाधिपती द्रुपदाचा पराभव करून जिंकलेली अहिच्छत्र आणि कांपिल्य ही नगरे आपला गुरू द्रोण यास गुरुदक्षिणा म्हणून दिली. यापैकी अहिच्छत्र राज्य द्रोणाने स्वतःकडे ठेवून कांपिल्य राज्य द्रुपदास परत दिले (ह. वं. २०.७४–७५). 'उत्तर पंचालाधिपती द्रोणाची राजधानी' म्हणूनच या नगराचा निर्देश महाभारतात सर्वत्र आढळतो (म. आ. १२८.११;१७;१८).

कर्णाने आपल्या उत्तरदिग्विजयात हे नगर जिंकले होते (म. आर. परि. २४.१.४४). भारतीय युद्धप्रसंगी कौरवसेनेचे शिबिर हस्तिनापुरपासून अहिच्छत्रपर्यंत पसरले होते (म. उ. १९.२९).

**पाणिनीच्या अष्टाध्यायीत**—या ग्रंथात 'प्रत्यग्रथ' (पंचाल) या देशनामाचा (पा. सू. ४.१.१७३) आणि त्यामधील 'रथस्था' (आधु. रामगंगा) नदीचा (पा. सू. ६.१.१५७) निर्देश आढळतो. मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते 'प्रत्यग्रथ' हे 'पंचाल' देशाचेच नामांतर असून त्याची राजधानी अहिच्छत्रा गावी होती (वैजयन्ती. पृ. २१४; अभिधान. ४.२६).

**पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यात**—या ग्रंथात 'आहिच्छत्री' (अहिच्छत्र गावी जन्मलेली स्त्री) संज्ञेचा निर्देश आढळतो (पा. सू. ४.३.२४; पतञ्जलि. २.३३.३). कुमारिलभट्टकृत तंत्रवार्तिकमते अहिच्छत्र आणि मथुरा येथील ब्राह्मण स्त्रिया मद्यपान करीत असत (काणे, धर्मशास्त्र. ३.८४८).

**टॉलेमीच्या ग्रंथात**—या ग्रंथात अनुक्रमे उत्तर आणि मध्य भारतातील 'अदिस्दर' (अदिसद्र) आणि 'अदैसथ' नामक दोन स्वतंत्र गावांचा निर्देश आढळतो. त्यावरून अहिच्छत्र नावाची दोन स्वतंत्र गावे टॉलेमीच्या काळी अस्तित्वात असावीत (अहिच्छत्र २. पहा).

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते 'ओ-हि-चि-त-लो' (अहिच्छत्र) देश हा मतिपुर (रोहिलखंडातील आधु. बिजनौर प्रदेश) देशाच्या आग्नेयेस असून, त्याचे आणि त्याच्या राजधानीचे क्षेत्रफळ अनुक्रमे ६०० मैल आणि ३॥ मैल होते. येथे उत्तर पंचाल देशाचा निर्देश 'अहिच्छत्र' नावाने केलेला दिसतो (पंचाल पहा).

ह्युएन्त्संगच्या मते या नगराच्या बाहेरच्या अंगास नागराजाचा एक तलाव असून, त्यानजीक बुद्धप्रवचनास्मृत्यर्थ बांधलेला अशोकस्तूप आणि अन्य चार छोटे स्तूप होते (वॉटर्स, १.३३१–३३२; बील, २.२२८).

**शिलालेखसाहित्यात**—निम्नलिखित शिलालेखात अहिच्छत्र नगराचा निर्देश आढळतो:–१. मथुरा ब्राह्मी शिलालेख–अहिच्छत्र गावी रहाणाऱ्या (अधिच्छत्रका) व्यक्तीचा निर्देश (ल्यूडर्स, क्र. १०७); २. आषाढसेनाचा इ. स. १ ल्या शतकामधील पभोसा गुफालेख–अधिछत्रा (अधिच्छत्रा) येथील बहसतिमित्र, भागवत, त्रैवर्णी, वंगपाल, शौनकायन आदि राजांचा निर्देश (ल्यूडर्स, क्र. ९०५; एपि. इंडि. २.४३२); ३. समुद्रगुप्ताचा अलाहाबाद प्रशस्तिलेख–अहिच्छत्र येथील अच्युत नामक महापराक्रमी राजाचा निर्देश; ४. शिलाहार राजा भोज (द्वितीय) याचा इ. स. ११८२ मधील शिलालेख–अहिच्छत्र गावाहून दक्षिण भारतात आलेल्या ब्राह्मणाचा निर्देश (एपि. इंडि. २९.१४).

**जैन साहित्यात**--जैनांचा २३ वा तीर्थंकर पार्श्वनाथ याचे उपसर्गस्थान (ज्ञानप्राप्तिस्थान) म्हणून श्वेतांबर आणि दिगंबरपंथीय जैन लोक हे गाव पवित्र मानतात. 'विविधतीर्थकल्पा' मध्ये संख्यावती (अहिच्छत्र) या क्षेत्राविषयी एक स्वतंत्र 'कल्प' (प्रकरण) दिले आहे (विविधतीर्थ. पृ. १४). कमठासुराच्या उपसर्गाला दाद न देता पार्श्वनाथांनी येथे तप करून परमज्ञानाची प्राप्ती केली (विविध तीर्थ, पृ. १४). येथील पार्श्वनाथ आणि अंबादेवीच्या मंदिराचे वर्णनहि या ग्रंथात आढळते.

**उत्खनन**--येथील उत्खननात सापडलेली मृत्तिकापात्रे हरप्पा आणि मोहेंजोदरो येथील मृतिकापात्रांच्या खालो-

खाल महत्त्वाची असून, त्यायोगे इ. स. पू. १०००–इ. स. ११०० पर्यंतच्या या नगराच्या स्थापत्यशास्त्रीय इतिहासावर प्रकाश पडतो. या मृत्तिकापात्रांचे कालदृष्ट्या निम्नलिखित नऊ उपविभाग आहेतः––

(१) स्तर क्र. १ (इ. स. पू. १०००)––स्थापत्यावशेषविरहित अशा या थरातील 'चित्रांकित तपकिरी' (पेंटेड ग्रे) जातीची मृत्तिकापात्रे इ. स. पू. १००० मधील असल्याचे आता सिद्ध झाले आहे.

(२) स्तर क्र. २ (इ. स. पू. ३००–२००)––या थरातील चकचकीत काळ्या रंगाची मृत्तिकापात्रे, कच्च्या विटांच्या इमारती आणि ओतीव तांब्याची नाणी स्तर क्र. ३ शी मिळतीजुळती दिसतात. यावरून या संस्कृतीची उत्क्रांत अवस्था म्हणजेच स्तर क्र. ३ असावा.

(३) स्तर क्र. ३ (इ. स. पू. २००–१००)––या थरातील मृतिकापात्रे आणि अन्य अवशेष स्तर क्र. २ चेच उत्क्रांत स्वरूप दिसतात.

(४) स्तर क्र. ४ (इ. स. पू. १००–इ. स. १ ले शतक)––या थरामध्ये पक्क्या विटांच्या घराचे अवशेष आणि पंचाल देशाची नाणी प्रथमच आढळली. नगरासभोवतालची कच्च्या विटांची तटबंदीहि या काळात पक्क्या विटांनी पुन्हा बांधण्यात आली.

(५) स्तर क्र. ५ (इ. स. १ ले शतक–इ. स. १००)––या थरामध्ये स्तर क्र. ४ मधील संस्कृतीचे उत्क्रांत स्वरूप दिसते.

(६) स्तर क्र. ६ (इ. स. १००–इ. स. ३५०)––या थरामध्ये खडबडीत आकारांची जलपात्रे, कुशाण नाणी आणि विटांच्या घराचे काही अवशेष सापडले.

(७) स्तर क्र. ७ (इ. स. ३५०–इ. स. ७५०)––या थरामध्ये गुप्त स्थापत्याच्या देवतामंदिराचे आणि शाडूच्या देवतामूर्तीचे अवशेष, तसेच समुद्रगुप्तकालीन अच्युत राजाची नाणी सापडली आहेत. पर्णफुलांचे सुंदर नक्षीकाम केलेली काही मृतिकापात्रेहि या थरात सापडली.

(८) स्तर क्र. ८ (इ. स. ७५०–इ. स. ८५० )––नक्षीकामविरहित साधीसुधी मृत्तिकापात्रे या थरात सापडली.

(९) स्तर क्र. ९ (इ. स. ८५०–इ. स. ११००)––या थरामध्ये नव्याने बांधलेल्या विटांच्या घरांचे अवशेष, तसेच आदिवराह आणि विग्रह राजांची नाणी सापडली.

शिल्पावशेष––येथील किल्ल्याच्या उत्खननात सापडलेल्या गुप्तकालीन मंदिरात गुप्तशैलीची शिल्पचित्रे आणि नक्षीकामयुक्त विटा आढळतात. अहिच्छत्र गावाहून 'वोदमयूता' गावी पंचालराजधानी स्थलांतरित होईपर्यंत या मंदिराची पूजाअर्चा व्यवस्थितपणे चालू होती (देशपांडे, रिव्ह्यू. पृ. ४३०–४३२).

२. (नगर) टॉलेमीच्या मते मध्य भारतान्तर्गत वेत्तिगोइ प्रदेशातील एक नगर (अक्षांश २४°–३०′ उत्तर; रेखांश १२८°–३०′ पूर्व). यूल यांच्या मते हे 'अदैसथ्र' नगर विंध्य पर्वतामध्ये नर्मदा नदीकाठी कोठेतरी असावे. शिलालेखसाहित्यमते हे नगर सिंधु (माळव्यातील आधु. कालिसिंध) नदीकाठी होते (सिंधु. २. पहा).

यूल यांच्या मते अहिच्छत्र नामक दोन स्वतंत्र गावांचा निर्देश टॉलेमीने पौराणिक साहित्यातील विस्मृत परंपरेच्या आधारे केला असावा.

३. (तीर्थ) एक ब्रह्मदेवस्थान. येथील ब्रह्मदेवाचे नाव जयानंद होते (पद्म. सृ. २९.१३६).

**अहिच्छत्रा** (नगरी)—महाभारतमते 'अहिच्छत्र' नगराचे नामांतर (म. आ. १५४.२४; अहिच्छत्र १. पहा).

**अहिन्पोष** (बृहत्भारतीय बौद्धस्थान)––गंधार (आधु. अफगाणिस्तान) देशातील दारंता स्तूपसमूहान्तर्गत एक सुविख्यात बौद्ध स्तूप. येथील स्तूप गंधार देशातील स्तूपांमध्ये सर्वाधिक मोठा (परीघ–२५०′, व्यास–८०′) आहे (दारंता पहा).

या स्तूपाचे १००′×१००′×२३′ आकाराचे चौकोनी व्यासपीठ केवळ आज शिल्लक असून, त्याच्या उत्तरेस आणि दक्षिणेस मुख्य जिने आणि पूर्वेस आणि पश्चिमेस छोटे जिने आहेत. या व्यासपीठाच्या पूर्व-पश्चिम दर्शनी भागावर चुन्यात कोरलेले प्रत्येकी १४ स्तंभ आहेत.

अवशेष––या स्तूपाच्या अवशेषकरंडकामध्ये खालील नाणी सापडली :––१. रोमन राजा डोमिटियन (इ. स. ८१–९६); ट्रोजन आणि रोमन राणी हॅड्रिअन (इ. स. ११७–१३८) यांचे प्रत्येकी एक नाणे; २. कुशाण राजे कनिष्क, हुविष्क आणि कद्फिसेस् यांची एकूण १७ नाणी.

यावरून हा स्तूप इ. स. २ ऱ्या–३ ऱ्या शतकातील असावा.

**अहिपुर** (नगर)––स्थानिक संस्कृत पंडितांच्या मते बेळगाव जिल्ह्यातील आधु. 'संपगाव'चे संस्कृतभाषीय नामांतर. फ्लीट यांच्या मते मूळ कानडी नावाचे हे संस्कृतभाषीय रूपांतर असावे (कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.७९).

**अहिरमल** (पवित्र टेकडी)--स्थानपोथीमते महाराष्ट्रातील महानुभावपंथीय तीर्थस्थान. ही टेकडी औरंगाबाद जिल्ह्यातील करंडगावपासून १० मैल दक्षिणेस आहे (स्था. पृ. ४९).

**अहिस्थला** (नगर)–काशिकामते कुरुक्षेत्रानजीकच्या 'आसंदीवत्' नगराचे नामांतर (काशिका. ८.२.१२; आसंदीवत् पहा).

**अहोबलम्** (पर्वत) – आंध्र प्रदेशान्तर्गत नृसिंहमंदिरस्थान आणि वैष्णवमठस्थान (एपि. इंडि. ७.८७;१३. १२४;१९.९०;२६.३३). हे कर्नूल जिल्ह्यातील सिर्वेल तालुक्यातील अल्लगेड्डु गावानजीक असून, मुंबई–मद्रास रेल्वेमार्गावरील कुडाप्पा स्थानकापासून ४० मैलांवर आहे.

**नामांतरे**--प्राचीन साहित्यात या स्थानाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :–

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. शिलालेखसाहित्य (एपि. इंडि. १.३६८; ३.११६; ११.३१३) | अहोबिलम् |
| २. आळवार भक्तिगीते | सिंगवेल–कुंद्रम् |
| ३. स्थानिक नामांतर | पंचक्रोशतीर्थ |

येथील नऊ नृसिंहमंदिरे पाच क्रोसांच्या परिघात असल्याने यास 'पंचक्रोशतीर्थ' हे नामांतर प्राप्त झाले असावे.

**नामव्युत्पत्ती**—या स्थानाच्या 'अहोबलम्' नावाविषयी निम्नलिखित आख्यायिका आढळतात :—

(१) येथे नृसिंहाचा रौद्रावतार प्रकट झाल्यानंतर आश्चर्यमुग्ध देवगणाने त्याची निम्नप्रकारे स्तुती केली :—

नरसिंहं परमं देवं अहो बलं अहो बलम्।

या स्तुतीमुळेच या स्थानास 'अहोबलम्' नाव प्राप्त झाले असावे.

(२) या टेकडीवरील 'अहोबिल' गुफेमध्ये गरुडाने विष्णुदर्शनार्थ तपस्या केली. या गुफेच्या नावावरूनच या टेकडीस हे नाव मिळाले.

**स्थानमाहात्म्य**--आळवार संत तिरुमंगै याच्या 'तिरुवैमोझि' नामक स्तोत्रमते आंध्र प्रदेशातील नल्लमलै टेकड्यांचा कर्नूलपासून चित्तूरपर्यंतचा भाग आदिशेष नागाचा अवतार असून, या नागाचे पुच्छ, मध्य आणि मस्तक ही अनुक्रमे 'श्रीशैलम्', 'अहोबलम्' आणि 'तिरुपति' ही तीर्थे होत.

स्थानिक समजुतीनुसार या टेकडीवरील उग्र नृसिंहाच्या मंदिराच्या जागी हिरण्यकशिपुसंहारार्थ नृसिंहावतार अवतीर्ण झाला असून, या देवशत्रु असुराची राजधानीहि येथेच होती. याशिवाय नृसिंहाचे नवावतार (नऊ रूपे) दर्शविणारी 'नव–नृसिंह' मंदिरेहि येथे असून साऱ्या भारतात ती अद्वितीय आहेत.

अहोबलम् पठारावर 'गरुडाद्रि,' 'वेदाद्रि' आणि 'अचलछायामेरु' नामक तीन टेकड्या असून, त्या अनुक्रमे गरुडतपस्यास्थान, वेदवरप्राप्तिस्थान आणि नृसिंहावतारस्थान म्हणून पवित्र मानतात. यापैकी गरुडाद्रि आणि वेदाद्रि टेकड्यांमधून भवनाशनी नदी वाहते.

**नृसिंहमंदिरे**— येथील दहा नृसिंहमंदिरे पुढीलप्रमाणे होत:—

(१) **प्रल्हादवरद नृसिंह**--विजयनगर स्थापत्यशैलीने बांधलेले हे मंदिर अहोबलम् टेकडीच्या पायथ्याशी असून तेथे प्रह्लादवरदायी नृसिंहाची मूर्ती आहे.

(२) **छत्रवत् नृसिंह**--उपरोक्त मंदिरापासून १½ मैलावरील या मंदिरात पिंपळाच्या झाडाखाली काटेरी झुडपात बसलेली नृसिंहमूर्ती आहे.

(३) **करंद नृसिंह**--टेकडीच्या पायथ्यावरून ६ मैलांवरील अहोबलम् पठारावर (उंची २८००') हे मंदिर आहे.

(४) **योगानंद नृसिंह**--योगज्ञान देणारी ही नृसिंहमूर्ती गोभिल व भरद्वाज ऋषींच्या तपस्यास्थानी आहे.

(५) **उग्र नृसिंह**—अहोबलम् टेकडीच्या दक्षिण उतारावरील या भव्य गोपुरयुक्त मंदिरात रौद्रस्वरूपी नृसिंहमूर्ती आहे.

(६) **गुह नृसिंह**—स्थानिक समजुतीनुसार या स्थानी नृसिंह खांब फोडून बाहेर आला आणि नजीकच्या उग्र नृसिंह मंदिराच्या जागी त्याने हिरण्यकशिपूचा वध केला. या घटनेच्या स्मृत्यर्थ या मंदिराच्या प्रवेशद्वारानजीक एक स्तंभ उभारला आहे.

(७) **क्रोध नृसिंह**--येथे वराहस्वरूपी नृसिंहमूर्ती आहे.

(८) **मलोल नृसिंह**—क्रोधनृसिंहापासून दोन मैलांवरील या मंदिरात शांतस्वरूपी नृसिंहमूर्ती आहे. काकतीय

राजा प्रताप रुद्र याने देणगी दिलेल्या येथील सुवर्णमयी उत्सवमूर्तींची स्थानिक संन्यासी लोक मनोभावे पूजा करतात.

(९) उग्रकाल नृसिंह-- हिरण्यकशिपुसंहारानंतर क्रोधाविष्ट झालेली नृसिंह मूर्ती या मंदिरात आहे.

(१०) पावन नृसिंह--येथील नृसिंहमूर्ती शाक्तस्वरूपी आहे.

प्राचीनत्व--पश्चिम चालुक्य राजा विक्रमादित्य (इ.स. १०७६-११०६) याने येथील नृसिंहाची उपासना केली होती. काकतीय राजा प्रताप रुद्र हा श्रीशैलम् येथून परत जात असता अहोबलमपासून १६ मैलांवरील रुद्रवरम् येथे त्याने येथील 'मलोल नृसिंहा'ची सोन्याची मूर्ती ओतून घेतली आणि स्वतःच्या 'प्रताप रुद्रीयम्' काव्याची रचना केली.

शिलालेखसाहित्यात--कोंडवीडु देशाचा राजा प्रोल वेम रेड्डी याने इ. स. १३२७ मध्ये या मंदिराच्या पायऱ्या बांधल्या (एपि. इंडि. ११.३१३).

विजयनगरचा राजा कृष्णदेवराय याने कलिंगच्या स्वारीहून परत जात असता येथील मंदिरास एक रत्नहार, हस्तकंकणे, सोन्याची थाळी आणि १००० सुवर्णमुद्रिका अर्पण केल्या होत्या (रंगाचारी, २. कर्नूल ४५५).

इम्मडि नृसिंह यांच्या इ. स. १५०५ च्या देऊळपल्लि ताम्रपटात, तसेच पांड्य राजा नंद्याल औबल याच्या इ. स. १५४८ च्या शिलालेखात या मंदिरास देणगी दिल्याचा निर्देश आढळतो (एपि. इंडि. ७.८४; रंगाचारी २. कर्नूल. ५९५).

गोवळकोंड्याचा सुलतान इब्राहिम कुतुबशहा याचा सरदार मुरारीराव याने इ. स. १५७९ मध्ये हे देवालय लुटले. तदनंतर इ. स. १५८४ मध्ये विजयनगरचा राजा श्रीरंग (प्रथम) याने हे देवालय कुतुबशहाच्या हातून मुक्त केले (रंगाचारी २. कर्नूल. ५८४).

माहात्म्य--श्रीमत् शंकराचार्य आणि चैतन्यप्रभु यांनी या स्थानास भेट दिली होती (चैतन्यचरितामृत. ९). स्थानिक आख्यायिकेनुसार राम-लक्ष्मण, अर्जुन आणि आळवार संत यांचे येथे आगमन झाले होते.

रामानुज सांप्रदायाचे पीठ--रामानुज- सांप्रदायाचा येथील एक धर्ममठ केशवाचार्य (शठकोपाचार्य) (जन्म-इ. स. १३७९) नामक देवगिरिनजीकच्या तिरुनारायण-पुरम् येथील आचार्याने स्थापला. गेली कित्येक शतके या मठाची संतपरंपरा अखंड असून, सुविख्यात संगीतकार तल्लपक अण्णमाचार्य हा याच मठाचा अनुयायी होता.

आदिवासींची देवता--या टेकडीच्या परिसरात चेंचु नामक आदिवासी लोक रहात असून, विष्णूच्या नृसिंहावतारप्रसंगी लक्ष्मीने चेंचुवंशीय राजकन्येचे रूप घेतले असे ते मानतात. येथील नृसिंहदेवतेची ते निष्ठापूर्वक उपासना करतात.

## आ

**आईयामलीआ-तियाश्रीआ** (ग्राम)--स्कंदमते धर्मारण्यातील एक ग्राम (स्कन्द. ब्राह्म. २.३९.२८; १२६). या ग्रामनामाचे शुद्ध रूप काय असावे ते समजत नाही (धर्मारण्य पहा).

**आकर** (देश)—बृहत्संहितामते दक्षिण भारतातील एक देश (बृ. सं. १४. १२). कर्न यांच्या मते 'आकर' चा शब्दशः अर्थ 'खाणींच्या नजीकचा देश' असा होतो. पाठभेद (मार्कंडेयपुराण)—'आकारिन्.'

बृहत्संहितेमध्ये 'वेणा' (आधु. सागर जिल्हा) आणि 'अवंती' (आधु. पश्चिम माळवा) देशासमवेत या देशाचा निर्देश आढळतो. त्याआधारे आधु. पूर्व माळवा (राजधानी-'विदिशा') म्हणजे प्राचीन आकर देश होय, असे रामकृष्ण भांडारकर म्हणतात (भांडारकर, महाराष्ट्र. पृ. २५).

शिलालेखसाहित्यात--गौतमी बलश्रीच्या नासिक शिलालेखात, तसेच रुद्रदामनाच्या इ. स. १६ मधील जुनागढ शिलालेखात 'अवती' (अवंती) देशासमवेत या देशाचा निर्देश आढळतो (ल्यूडर्स, क्र. ११२३; ९६५). यावरून इ. स. पू. १ल्या शतकात गौतमीपुत्र शातकर्णी राजाच्या ताब्यात असणारा हा देश उत्तरकाळात शक क्षत्रप रुद्रदामनाने जिंकून घेतला असावा.

**आकरवेणावन्तिका** ( देश )—बृहत्संहितामते मध्य-देशातील 'अवंती' देशाचे नामांतर ( बृ. सं. १४.३३; अवंती १. पहा ). 'आकर' ( पूर्व माळवा ), 'वेणा' ( सागर जिल्हा ), आणि 'अवंतिका' ( पश्चिम माळवा ) मिळून तो देश बनल्याने त्यास हे संयुक्त नाव प्राप्त झाले होते. अन्य नामांतर ( गौतमीपुत्राचा नासिक शिलालेख, रुद्रादामनाचा जुनागढ शिलालेख )—'आकरावन्ती'.

**आकर्ष** ( लोकसमूह )—युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञात उपस्थित असणारा एक लोकसमूह ( म. स. ३१.११ ).

**आकवलीय** ( ग्राम )—सोळंकी राजा भीम ( द्वितीय ) याच्या वि. सं. १२६६ च्या शिलालेखमते प्राचीन सुराष्ट्र-मंडलातील एक ग्राम. दक्षिण काठेवाडान्तर्गत जुनागढ प्रदेशातील आधु. आंकलग्राम ते हेच होय ( इंडि. अँटि. १८.११२–११४ ).

**आकारिन्** ( देश )—मार्कंडेयमते दक्षिण भारतातील 'आकर' ( अवंती ) देशाचे नामांतर ( मार्कं. ५५.२२; आकर पहा ).

**आकाश** ( तीर्थ )—वाराणसी येथील एक तीर्थस्थान ( कूर्म. पू. ३५.३; पद्म. आ. ३७.३ ).

**आकाशगङ्गा** ( कुंड व तीर्थ )—स्कंदमते दक्षिण भारतातील वेंकटाचलावरील एक तीर्थस्थान ( स्कन्द. वें. २१–२२ ). या तीर्थाचे सविस्तर माहात्म्यहि तेथे दिले आहे. आधुनिक बालाजी मंदिरापासून हे २ मैलांवर आहे.

२. ( तीर्थ ) वायुमते गया येथील एक तीर्थस्थान ( वायु. ११२.२५; अग्नि. ११६.५ ). आधुनिक काली गया येथील हनुमान मंदिरानजिक हे आहे. त्यानजिकच पाताल-गंगा आणि कपिलधारा नामक अन्य दोन तीर्थस्थाने आहेत.

३. ( तीर्थ )—सह्य पर्वतान्तर्गत आमलक तीर्थातील एक उपतीर्थ ( नृसिंह. ६६.३५ ).

**आकाशपुष्कर** ( तीर्थ )—पुष्करक्षेत्रान्तर्गत एक तीर्थस्थान ( नारद. उ. ७१.२६ ).

**आकाशलिङ्ग** ( लिंग )—वाराणसी येथील एक शिवलिंगस्थान ( लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. ५१ ).

**आकीर्ण** ( तीर्थ )—सरस्वती नदीकाठचे एक तीर्थस्थान ( म. श. ४०.१ ).

**आकुर्वती** ( नदी )—वाल्मीकि रामायणमते अयोध्या–केकय मार्गावरील एक नदी. भरताला केकय देशास जाताना ही लागली होती ( वा. रा. अयो. ७१.३ ).

**आक्सिद्रकाइ** ( लोकसमूह )— सिकंदरस्वारीशी संबधित ग्रीक साहित्यमते 'क्षुद्रक' लोकसमूहाचे नामांतर ( मॅकिंडल, अलेक्झांडर. पृ. २३८; क्षुद्रक पहा ).

**आक्सेन्तोन** ( पर्वत )—टॉलेमीच्या ग्रंथमते दक्षिण भारतातील सप्तकुलाचलांपैकी 'ऋक्ष' पर्वताचे नामांतर ( ऋक्ष पहा ).

**आखु** ( देश )—बृहद्देवतामते एक देश. या ग्रंथमते ऋग्वेदातील सोभरि काण्व ऋषींच्या दानस्तुतीत निर्देशिलेला चित्र ( ऋ. ८.२१.१७–१८ ), हा आखु देशाचा राजा होता ( बृहद्दे. ६.५९–६० ). हे संभवतः खारवेलाच्या हाथीगुंफा शिलालेखात निर्देशिलेल्या 'मूषिक' देशाचे नामांतर असावे ( मूषिक पहा ).

**आखुलगाम्ब** ( राज्यविभाग )—सोळंकी राजा अजय-पाल याच्या वि. सं. १२३१ च्या शिलालेखमते मध्य गुजरातमधील नर्मदातटमंडलान्तर्गत पूर्णे पथकातील एक राज्यविभाग. येथे संभवतः 'आमाखुलगाम्ब' पाठ अभिप्रेत असावा. आलविडगाम्ब नामक ग्राम या राज्यविभागात होते ( इंडि. अँटि. १८.८२ ). या राज्यविभागाचे आधु. स्थान समजत नाही.

**आखोर्बिल** ( जलप्रपात )—नीलमतमते कश्मीरातील एक जलप्रपात ( नीलमत. २७१; २८३ ). विशोका नदीच्या क्रमसरस् ( आधु. कौनसर ) सरोवरात उत्पन्न होणारा सिदौ ( प्राचीन सिद्धपथ ) गावानजिकचा आधु. अहर्बल जलप्रपात तो हाच होय.

'आखोर्बिल' आणि 'अहर्बल' या दोन्हींचा शब्दशः अर्थ 'उंदराचे बीळ' असा होतो (स्टाइन, राज. २.४१५).

**आगलदेव** ( जैनस्थान )—मराठवाड्यातील धाराशिव ( आधु. उस्मानाबाद ) येथील गुफामंदिरातील पार्श्वनाथ मूर्तीचे नाव ( धाराशिव पहा ).

**आगलि** ( राज्यविभाग )—पश्चिम गंग राजा श्रीपुरुष मुत्तरस याच्या इ. स. ७६६ मधील कोलार ताम्रपटमते म्हैसूर राज्यातील एक राज्यविभाग. आधु. कोलार प्रदेशानजिक हा असावा ( एपि. कर्ना. १०.८० ).

**आग्निशार्म** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते प्राचीन भारतातील एक ग्राम ( पा. सू. ४.२. १३८ ).

**आग्नीध्र** ( लोकसमूह )—बृहत्संहितामते उत्तर भारता-तील एक लोकसमूह. अर्बुद, भोगप्रस्थ आणि आर्जुनायन लोकांसमवेत यांचा निर्देश तेथे आढळतो ( बृ. सं. १४.२५ ). राजपुतान्यातील अबू पर्वताच्या परिसरातील परमार, सोळंकी, प्रतिहार आणि चौहान या सुविख्यात रजपूत राज-घराण्यांचे हे संभवतः सामूहिक नाव असावे.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. महाभारत ( आर. २५३. १९–२० ) | आग्नेय |
| २. मार्कंडेय पुराण ( ५८. ४३ ) | अग्नीज्य |
| ३. बृहत्संहिता ( पाठभेद ) | अग्नीन्य, अग्नीत्य |
| ४. अल्बेरुणी ( १.३००–३०३ ) | अग्नीत्य |

**नामव्युत्पत्ती**—'आग्नीध्र' ( शब्दशः अर्थ – यज्ञाग्नि प्रज्वलित करणारा ) ही विश्वामित्र ऋषींची गौरवोपाधी असून, त्यांनी अर्बुद पर्वतावर प्रज्वलित केलेल्या यज्ञाग्नीमधून या लोकांची उत्पत्ती झाली. म्हणून यांस 'आग्नीध्र' हे नाव प्राप्त झाले.

**जन्मभूमी**—या लोकांपासून उत्पन्न झालेले उत्तरकालीन रजपूत लोक अर्बुद पर्वत ( आधु. अबूचा पहाड ) ही आपली जन्मभूमी मानत असत.

**प्राचीन साहित्यात**—बृहत्संहितेत आणि महाभारतात या लोकांचा निर्देश अनुक्रमे आर्जुनायन आणि मालव लोकांसमवेत आढळतो. हे सारे लोक, तसेच यौधेय लोक बृहत्संहिताकाली राजपुतान्यामध्ये निवास करीत असून, या देशातील उत्तरकालीन समस्त रजपूत राजघराण्यांची उत्पत्ती त्यांच्यापासूनच झाली होती.

आग्नीध्र हे उपरोक्त लोकसमूहांपैकी मालव लोकांची उपशाखा असावेत ( चौधरी, पृ. ९५–९६ ).

**आग्नेय** ( देशविभाग )—मार्कंडेय पुराण कूर्मविभाग आणि बृहत्संहितामते भारतवर्षाच्या नऊ उपविभागांपैकी एक. नामांतर ( मार्कंडेय पुराण )–' कूर्म पूर्वदक्षिणपाद '; ' विंध्यवासिन् '.

**बृहत्संहितेत**—या ग्रंथात निर्देशिलेल्या भारताच्या नऊ भागांमध्ये आग्नेय भागाचा स्वतंत्र निर्देश आढळतो. पौराणिक साहित्यात आग्नेय भागाचा सुस्पष्ट निर्देश आढळत नाही. परंतु त्यामध्ये दिलेली विंध्याचल पर्वतनिवासी वीस देशांची आणि लोकसमूहांची नामावली बव्हंशी बृहत्संहितेतील आग्नेय भारतातील देशांशी जुळते. पौराणिक साहित्यातील विंध्याचल भाग आणि बृहत्संहितेतील आग्नेय भाग हे दोन्ही एकच असल्याचा सुस्पष्ट निर्देश गरुड पुराणात आढळतो.

## आग्नेय भारतातील देश आणि लोकसमूह

| बृहत्संहिता ( १४.८–१० ) | मार्कंडेय पुराण, कूर्म विभाग ( ५५.१६–१८ ) |
|---|---|
| १. आंध्र ( देश ) | आंध्र |
| २. उपवंग ( देश ) | — |
| ३. ऊर्ध्वकंठ ( लोक ) | ऊर्ध्वकर्ण ( उत्तमार्ण ) |
| ४. — | ऐलीक |
| ५. कंटकस्थल ( नगर ) | कटकस्थल |
| ६. कलिंग ( देश ) | कलिंग |
| ७. — | काकुलालक |
| ८. किष्किंधा ( नगर ) | कैष्किंध्य ( किष्किंधक ) |
| ९. कोशल ( देश ) | कोशल ( कोसल ) |
| १०. चर्मद्वीप | — |
| ११. चेदिक ( देश ) | चेदि |
| १२. जठरांग ( लोक ) | जठर |
| १३. त्रिपुरी ( नगर ) | त्रैपुर ( त्रैपुर ) |
| १४. दाशार्ण ( लोक ) | दशार्ण ( दशार्ण ) |
| १५. — | धर्मद्वीप |
| १६. नग्नशबर ( लोक ) | नग्न |
| १७. नालिकेर ( द्वीप ) | नारिकेल |
| १८. — | निषध ( निषध ) |
| १९. निषादराष्ट्र | — |
| २०. पर्णशबर ( लोक ) | पर्णशबर |
| २१. पुरिक ( लोक ) | — |
| २२. — | मत्स्य |
| २३ महाग्रीव ( लोक ) | महाग्रीव |
| २४. — | मूषिक |
| २५. वंग ( देश ) | वंग |
| २६. वत्स ( लोक ) | — |
| २७. विदर्भ ( देश ) | विदर्भ |
| २८. विंध्याचलासमीप ( पर्वत ) | — |
| २९. वृषभ ( नगर ) | — |
| ३०. व्यालग्रीव ( लोक ) | व्याघ्रग्रीव |
| ३१. शौलिक ( लोक ) | — |
| ३२. श्मश्रुधर ( लोक ) | श्मश्रुधारिन् |
| ३३. — | हारिक |
| ३४. हेमकूट ( नगर ) | हैमकूट |

( '**विंध्यान्तरनिलया देशाः पूर्वदक्षिणतः स्मृताः**'; गरुड. ५५.१३; विंध्य पहा ).

**देशनामावली**—बृहत्संहिता आणि मार्कंडेय पुराण कूर्म-

विभाग यामधील आग्नेय देशान्तर्गत देश, लोकसमूह, नगर, आदींची नामावली सोबतच्या परिपत्रकात दिली आहे. त्याशी मिळतीजुळती अशी वायु पुराणातील (वायु. ४५. १०७) 'विंध्याचलनिवासी' लोकांची नावेहि तुलनेसाठी कंसात दिली आहेत.

**आग्नेय** (देश)—महाभारतान्तर्गत कर्णदिग्विजयात निर्देशिलेले उत्तर भारतातील मालव देशानजिकचे (दक्षिण पंजाब) एक गणराज्य (म. आर. परि. २४.१.६७). नामांतर (सिंकदरकालीन ग्रीक साहित्य)—'अगलस्सोइ'.

राजधानी—या जनपदाची राजधानी अग्रोदक (हिस्सार जिल्ह्यातील आधु. अग्रोहा) गावी असून तेथे या जनपदाची इ. स. २ ऱ्या शतकातील काही नाणी उपलब्ध झाली आहेत. त्यावर 'अगोदक अगाच जनपदस' (अग्रोदक आग्रेय जनपदस्य) अशी अक्षरे आढळतात (अग्रोदक पहा). त्यावरून पंजाबातील शिबि जनपदाच्या पूर्वेस आधु. झंग मघियाना प्रदेशामध्ये हे जनपद असावे.

**पाणिनीच्या अष्टाध्यायीत**—या देशातील अग्रेवण नामक वनाचा निर्देश या ग्रंथात आढळतो (पा. सू. ८.४.४; अग्रेवण पहा).

**ग्रीक साहित्यात**—या साहित्यमते या लोकांचे सामर्थ्यशाली गणराज्य सिबोइ (शिवि) देशाच्या ईशान्येस 'ह्यदस्पेस्' आणि 'अकेसिनेस्' नदीसंगमाच्या खालच्या अंगास होते (मॅक्रिंडल, अलेक्झांडर. पृ. २८५). डिओडोरसमते सिकंदरने मायदेशी परत जातेवेळी शिबि लोकांनंतर या लोकांवर हल्ला करून ३० मैल अंतर्भागातील यांची राजधानी जिंकून घेतली. त्या वेळी ४०,००० पायदळ आणि ३,००० अश्वदळासह यांनी त्याचा प्राणपणे प्रतिकार केला.

अखेरीस सिकंदरचाच विजय होणार हे जाणून या लोकसमूहातील वीस हजार लोकांनी स्वनगरास आग लावून त्यामध्ये आत्मबलिदान केले. या अग्निकांडामध्ये शहराच्या मनोऱ्याचे रक्षण करणारे तीन हजार लोक फक्त वाचले. त्यांना सिकंदरने जीवदान दिले (डिओडोरस्, १७.९६; कर्टियस् ९.४). अशी रौद्र आत्माहुती देणारे अन्य अनेक रणशूर लोकसमूह सिंकदरच्या स्वारीमध्ये त्यास भेटले होते (स्मिथ, पृ. ९७–९८).

**आघाटपत्तन** (नगर)—इ. स. ११ व्या शतकातील मेवाड देशाच्या वैरिसिंह राजाचे राजधानीचे नगर. त्याने या नगराभोवती तट उभारला होता. मेवाडमधील आधु. आटपुर (आहार) गाव ते हेच होय (एपि. इंडि. ३१.२४०).

**आङ्गणवाडा** (ग्राम)—चालुक्य राजा भीम (द्वितीय) याच्या वि. सं. १२८८ च्या शिलालेखमते उत्तर गुजरातेतील सारस्वत मंडलान्तर्गत वालैय पथकातील (आधु. पाटण महाल) एक ग्राम (इंडि. अँटि. ६.२०३-२०४). पाटण महालाच्या उत्तर सरहद्दीवरील आधु. अंगणवाडा ग्राम ते हेच होय (सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २६३).

**आङ्गले-गव्हाण** (ग्राम)—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थस्थान (स्थान. पृ. ५५). औरंगाबाद जिल्ह्यातील हिरडपुरी (प्राचीन हिरण्यपुर) गावाच्या पश्चिमेकडील आधु. आंगले गाव ते हेच होय.

**आङ्गिरस** (तीर्थ)—नर्मदा नदीकाठचे एक तीर्थस्थान (कूर्म. उत्तर २.४१.३१-३३; पद्म. आदि. १८.५).

२. कश्मीरातील वितस्ता (आधु. झेलम) नदीकाठचे एक तीर्थस्थान (नीलमत. १५५५; १५६७).

३. पौराणिक साहित्यमते गोदावरी नदीकाठच्या 'कपिलतीर्था'चे नामांतर (कपिल १०. पहा).

**आङ्गिरसी** (नदी)—प्लक्षद्वीपातील एक नदी (भा. ५. २०.४).

**आङ्गिरसेश** (लिंग)—वाराणसी येथील एक शिवलिंग (लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. ११७).

**आङ्गेय** (देश)—पूर्व भारतातील एक देश (वामन. १३.४५).

**आचार बौद्धमठ** (गुफासमूह)—ह्युएन्‌त्संगच्या प्रवासवर्णनमते 'अजंटा' गुफासमूहाचे नामांतर (वॉटर्स, २.२४०; अजंटा पहा).

**आचारवेदी** (देश)—संस्कृत शब्दकोश साहित्यमते 'आर्यावर्त' देशाचे नामांतर (अभिधान १.२९.९४८; कल्पद्रु. ५.१०; आर्यावर्त पहा).

**आजमीढा** (नदी)— महाभारतान्तर्गत लोमशतीर्थयात्रेत निर्देशिलेली कनखल तीर्थानजिकची एक पवित्र आणि पापविमोचक नदी (म. आर. १३५.६).

**आजीविक** (संन्यासी संघ)—सम्राट अशोकाच्या स. २५२ च्या बराबर गुफालेख क्र. १ आणि २ मते एक संन्यासी संघ (कॉर्पस्. इन्स्क्रि. १.२.१८१). हा वैष्णव धर्मसंप्रदाय गौतम बुद्ध आणि महावीर यांच्या समकालीन गोशाल नामक आचार्याने स्थापिला (इंडि. अँटि. २०. ३६१).

खलतिक (आधु. बराबर) पर्वतामधील तीन गुफा या संघाला वर्षाकालीन निवासासाठी अशोकाने दान दिल्या होत्या. या गुफासमूहातील 'लोमशऋषी–गुफा' संज्ञक चतुर्थ गुफाहि अशोकाने या संघासाठीच बांधली असावी.

परंतु तसा स्पष्ट निर्देश तेथे आढळत नाही ( कॉर्पस् इन्स्क्रि. १.२.१८१–१८२ ).

बराबर टेकड्यांनजिकच्या नागार्जुनी टेकडीमध्ये अशोक-पौत्र दशरथाने 'भदंत' (पूजनीय) 'आजीविकां'साठी कोरलेल्या अन्य तीन गुफा आढळतात. बराबर आणि नागार्जुनी टेकड्यातील आजीविकांसंबंधीचे शिलालेख मौखरि राजा अवंतिवर्म्याने उत्तरकालात फोडले.

**सांप्रदाय**—गौतम बुद्धकाली हे लोक 'नंगे साधू' (अचेरक, नग्न प्रव्रजित) नावाने सुविख्यात असून, नंदवत्स, कृषसांकृत्य मस्करी, गोशाल हे त्यांचे प्रमुख तीर्थंकर होते. 'परमाथ्थ जोतिका' या उत्तरकालीन बौद्ध ग्रंथात पुराण काश्यप, पकुध काल्मायन, अजित केशिकंबलिन् आणि संजय बेलथ्थपुत्त या तीर्थंकरांचा निर्देश आढळतो (परमाथ्थ. २.३७२ ).

**अशोकाच्या स्तंभलेखात**—अशोकाच्या स्तंभलेख क्र. ७ मध्ये ब्राह्मण आजीविक लोकांचा निर्देश आढळतो. रामकृष्ण भांडारकर यांच्या मते आजीविक संप्रदायाचे ब्राह्मण आणि अब्राह्मण असे दोन प्रकार असून त्यापैकी 'ब्राह्मण आजीविक' हे मांसाहारी होते. परंतु बौद्ध वाङ्मयात सर्वत्र आजीविक आणि निर्ग्रंथ (जैन) लोकांना 'अब्राह्मण' आणि 'प्रव्रजित' (संन्यासी) मानले आहे ( परमाथ्थ २.३७२ ). कौटिलीय अर्थशास्त्रातहि शाक्य आजीविक लोकांना 'वृषल-प्रव्रजित' (शूद्र लोकांना सामावून घेणारे) म्हटले आहे (कौ. अ. ३.२०). अशोकपिता बिंदुसार आणि स्वतः अशोक हे भस्मचर्चित आजीविक आणि निर्ग्रंथ (जैन) परिव्राजकांचे उपासक होते. यावरून आजीविक संघ हा हिंदु ब्राह्मण आणि बौद्ध लोकांहून स्वतंत्र संन्यासी संघ दिसतो.

**अशोकाचे सौहार्द**—महावंश . टीकामते 'जनसान' (जरसान) नामक आजीविक साधूने अशोक हा महान सम्राट होणार असल्याचे भविष्य वर्तविले होते ( मललसेकर, १.९३६ ). बौद्ध 'दिव्यावदान' मते हे भविष्य पिंगलवत्स नामक आजीविक राजज्योतिषाने वर्तविले होते ( बारुआ, अशोक शिलालेख. पृ. ३७६; ३८४–३८५ ).

**शिलालेख साहित्यात**—चोल राजा राजराज ( तृतीय ) याच्या इ. स. १२२ च्या शिलालेखात आजीविक लोकांच्या भरणपोषणासाठी वसूल करण्यात येणाऱ्या 'आजीविक काशु' (आशुविगल्काशु ) नामक कराचा निर्देश आढळतो. दक्षिण भारतात आजहि उदासीन संप्रदायाच्या संन्याशांच्या भरणपोषणासाठी अशा प्रकारचे निधी गोळा केले जातात ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. १३७ ).

**आजुरबाइजान** ( देश )—इराणी धर्मसंस्थापक जरदुष्ट्राची जन्मभूमी असणारा मध्य आशियातील देश. आधुनिक इराणमध्ये हा आहे. स्वतःच्या जन्मभूमीमध्ये धर्मप्रचारकार्यार्थ यश न मिळाल्याने जरदुष्ट्र उत्तरकालात पूर्व इराणमधील खुरासान प्रांतात गेला ( सांकृत्यायन, मध्य एसियाका इतिहास, पृ. १५१ ).

**आज्यद्वीप** ( बेट )—भारताच्या पश्चिम किनाऱ्या-वरील गोपराष्ट्राशी समांतर एक बेट. उत्तर कॅनरापासून दोन मैलांवरील आधु. आंजेदिव ( अक्षांश १४° उत्तर; रेखांश ७४° पूर्व ) बेट ते हेच होय. हिरव्या झाडीचे हे बेट समुद्र-जलावर तरंगत्या ठिपक्याप्रमाणे दिसत असल्याने स्थानिक लोकात ते 'तरते बेट' नावाने ओळखले जाते. नामांतर– 'आदिद्वीप'; ( ग्रीक साहित्य )– 'एजिडिओरम् इन्शुला.'

**नामव्युत्पत्ती**—काही अभ्यासकांच्या मते पृथ्वी एकवीस वेळा निःक्षत्रिय केल्यानंतर परशुरामाने अश्वमेध यज्ञ आरंभिला. तत्प्रसंगी अन्यत्र कोठेहि न मिळालेले आज्य ( घृत ) त्यास या बेटात सापडले. म्हणून यास 'आज्यद्वीप' नाव प्राप्त झाले. अन्य काही अभ्यासकांच्या मते परशुरामाने समुद्रापासून प्राप्त केलेल्या 'परशुराम देश' ( आधु. कोंकण ) पेक्षाहि हे प्राचीन असल्याने यास 'आदिद्वीप' आणि 'आद्यद्वीप' नावे प्राप्त झाली. या बेटानजिक पाच बेटे असल्याने यास 'अंचेदीव' नाव प्राप्त झाल्याचे काही अभ्यासक मानतात. परंतु या बेटानजिक सध्या तीनच बेटे दिसतात.

**अजादेवी**—येथील 'अजा' देवीच्या मंदिरातील प्रतिमा स. १३१२ च्या सुमारास मुसलमानी आक्रमणामुळे कारवार किनाऱ्यावरील अंकोला येथे नेण्यात आली. ती देवी अद्यापहि अंकोला येथेच आहे. या देवीच्या नावावरून या बेटास 'आज्यद्वीप' नाव पडले असण्याची शक्यता वाटते.

**ग्रीक साहित्यात**—या साहित्यात माल उतरविण्याचे एक स्थान म्हणून या बेटाचा निर्देश आढळतो.

**परिसर**—या बेटानजिकच त्रिशूलाकृती 'मलपीचे डोंगर' आहेत. त्यांच्या त्रिशूलाकृतीमुळे पोर्तुगीजांनी त्यास 'सेंट मेरीज् आइल्स' नाव दिले आहे.

**अवशेष**— डॉम फ्रन्सिस्को दि अलयेदा हा पोर्तुगीज गव्हर्नर स. १६०५ मध्ये किल्ला बांधीत असता त्यास येथील भूगर्भात काही काष्ठमय व धातुमय नीलवर्णीय त्रिशूल सापडले. अभ्यासकांच्या मते ज्योतिषवेधाकरिता तयार केलेली ही त्रिशूलाकृती शंकाकृती वेधयंत्रे असावीत. अशी वेधयंत्रे भारतात अनेक ठिकाणी आढळतात.

**आज्यपेश्वर** ( लिंग )—काशी येथील एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ९७.१६२ ).

**आज्योद** ( समुद्र )—कुशद्वीपातील एक समुद्र ( विष्णु-धर्म. १.६.६ ).

**आञ्जनग्राम** ( हनुमानजन्मस्थल )—पूर्व भारतातील छोटा नागपूर जिल्ह्यातील लोहरदगा रेल्वे स्थानकानजिकचे एक तीर्थस्थान. येथील ' अंजनीगुफे 'मध्ये हनुमानाचा जन्म झाल्याची स्थानिक समजूत आढळते ( ती. पृ. १७८ ).

**आञ्जनि** ( ग्राम )—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील महानुभावपंथीय तीर्थस्थान ( स्थान. पृ. १० ). बुलढाणा जिल्ह्यान्तर्गत मेहेकर तालुक्यातील मेहेकरच्या ६ मैल पूर्वेकडील आधु. ' अंजनी बुद्रुक ' गाव ते हेच होय.

**आञ्जनेरी** ( तीर्थ )—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील महानुभावपंथीय तीर्थस्थान ( स्थान. पृ. ३० ). नाशिक जिल्ह्यातील त्र्यंबकेश्वरपासून चार मैलांवरील आधु. आंजनेर ग्राम ते हेच होय. या गावानजिकचा आंजनेर डोंगर हनुमज्जन्मस्थान मानला जातो. येथील मंदिरांमध्ये पार्श्वनाथाच्या मूर्ती आहेत.

**आञ्जीकूल** (ग्राम )—पाणिनीच्या गणपाटमते प्राचीन भारतातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.१२७ ).

**आटविक** ( देश )—समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद प्रशस्ति-लेखमते मध्य भारतातील एक देशविभाग. देवदत्त भांडारकर यांच्या मते आधु. बाघेलखंडापासून ओरिसाच्या समुद्रकिनाऱ्या-पर्यंतचा जंगलमय प्रदेश या देशात समाविष्ट होत असे ( आय. एच्. क्यू. १.२५६ ). नामांतर ( खोह ताम्रपट )—' अष्टादश आटवी राज्य '; ( अन्य शिलालेखसाहित्य )—' विंध्याटवी.'

इ. स. ५२८ च्या खोह ताम्रपटात हस्तिन् राजा ' अष्टादश आटवि राज्य ' ( बाघेलखंड, रेवा, विंध्य प्रदेश ) प्रदेशावर राज्य करीत असल्याचा निर्देश आढळतो ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.११४ ). मात्र अठरा आटवी राज्यांची नामावली प्राचीन साहित्यात आढळत नाही. मोनियर विल्यम्स-मते ' विंध्याटवी ' म्हणजे मथुरेपासून नर्मदा नदीपर्यंतचा जंगलमय प्रदेश ( आधु. मध्य प्रदेश ) होय.

' वनराष्ट्र ' संज्ञक ईशान्य भारतातील अन्य एका देश-समूहाचा निर्देश बृहत्संहितेमध्ये आढळतो ( बृ. सं. १४.१०; २९–३०; वनराष्ट्र पहा ).

**महाभारतात**—या ग्रंथमते पश्चिम भारतातील हा देश कर्णाने जिंकला होता ( म. आर. २५४.१९ ). येथील लोक युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञात उपायन घेऊन उपस्थित होते ( म. स. ४७.४६७* ).

२. ( नगर ) महाभारतमते दक्षिण भारतातील ' आटवी-पुरी ' नगरीचे नामांतर ( म. स. २८.१०; परि. १.१३.९; आटवीपुरी पहा. )

**आटवीग्राम** ( ग्राम )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते उत्तर प्रदेशान्तर्गत युद्धपति ( आधु. गाझीपुर ) देशातील एक ग्राम. हे स्थान ' महाशाल ' ( आधु. मसार ) गावापासून ६ मैल पूर्वेस होते. फाहियेन्च्या मते हे स्थान वाराणसीपासून ९६ मैल ( १२ योजने ) पूर्वेस होते. नामांतर ( ह्युएन्त्संग, फाहियेन् )–' क्वँग–ये ' ( ओसीड प्रदेश ). कनिंगहॅम यांचे मते उत्तर प्रदेशातील आधु. खेलगंज गाव ते हेच होय.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते येथे निवास करणाऱ्या ' आटवि ' नामक नरमांसभक्षक राक्षसाचे गौतम बुद्धाने हृदयपरिवर्तन घडवून आणले. या घटनेच्या स्मृत्यर्थ अशोकाने येथे एक स्तूप आणि सिंहप्रतिमायुक्त स्तंभ उभारला. त्या स्तंभावर आटवि राक्षसाच्या हृदयपरिवर्तनाची हकीगत कोरली होती ( वॉटर्स, २.६१ ).

**आटवीपुरी** ( नगर )—महाभारतमते दक्षिण भारतातील एक नगर. सहदेवाने दक्षिण दिग्विजयात हे जिंकले होते ( म. स. २८.४९; नृसिंह. २८.१० ). पाठभेद ( भांडारकर संहिता )–' अन्ताखी; ' ( महाभारत परिशिष्ट )–' आटविक. '

**आटव्य** ( लोकसमूह )—अशोक आज्ञालेख क्र. १३ मते दक्षिण भारतातील एक लोकसमूह. अशोक साम्राज्याच्या ' अपरांत ' भागातील या लोकसमूहात निम्नलिखित लोक समाविष्ट होत असत :— १. रिष्टिक; २. रिष्टिक-पितिनिक ३. भोज; ४. भोज-पितिनिक; ५. अंध्र; ६. पारिंद.

**पौराणिक साहित्यात**—या साहित्यात विंध्य पर्वताच्या परिसरातील एक वन्य लोकसमूह म्हणून शबर, पुलिंद, मौलेय, वैदर्भ, दंडक आदि लोकांसमवेत यांचा निर्देश आढळतो ( ब्रह्माण्ड. १६.५७; मत्स्य. ११४. ४६–४८; वायु. ४५. १२६; मार्कं. ५७.४७; आटविक २. पहा ). हे लोक विंध्य पर्वताच्या आणि गोदावरी नदीच्या दक्षिण भागात रहात असावेत.

**आढ्यक्षेत्र** ( विष्णुतीर्थ )—एक विष्णुपदतीर्थस्थान ( नृसिंह. ६५.२० ).

**आणेग्राम** ( शिवस्थान )—एक शिवस्थान. येथील शिवाचे नाव ' अमृतेश्वर ' होते ( पद्म. उ. १८९.३८ ).

**आतुमा** ( बौद्धस्थान )—कुशिनारा व श्रावस्ती यांच्या दरम्यानचे एक नगर. येथे मुक्कामासाठी असताना भिक्षूने

पूर्वाश्रमीची हत्यारे जवळ बाळगणे निषिद्ध असल्याचा नियम गौतम बुद्धाने केला.

**आण्डलि** ( ग्राम )— पंपराजदेवाच्या स. १२१४ च्या तहंकापार दानपत्रमते मध्य प्रदेशातील एक ग्राम. छत्तिसगढ परगण्यातील कांकेर गावाच्या ६ मैल पूर्वेकडील आधु. आंदणि ग्राम ते हेच असावे(कॉर्पस्. इन्स्क्रि.४.२.६००).

**आण्डीवत्** (ग्राम)—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते प्राचीन भारतातील एक ग्राम ( पा. सू. ४.२. ८०.१३ ).

**आतप** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते प्राचीन भारतातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.९० ).

**आतुकूर** (ग्राम)—चालुक्य राजा विष्णुवर्धन ( द्वितीय ) याच्या दानपत्रमते आंध्र प्रदेशातील एक ग्राम. गुंटूर जिल्ह्यातील आधु. अंदुकूरू गाव ते हेच होय ( एपि. इंडि. ३१.७९-८० ). परांतक चोल राजाच्या इ. स. ९४९ च्या शिलालेखातहि या गावाचा निर्देश आढळतो ( एपि. इंडि. ७. १३३ ).

**आत्तखण्डिक** ( देश )—वायव्य ( उदीच्य ) भारतातील एक देश ( मत्स्य. ११४.४० ).

**आत्म** ( तीर्थ )—गौतमी ( गोदावरी ) नदीकाठचे एक तीर्थस्थान ( ब्रह्म. ११७.१; २०;१४०.१;३६;३८ ).

**आत्मछन्दा** ( देवी )—श्रीमालक्षेत्रातील एक देवी ( श्रीमालमाहात्म्य ).

**आत्रेय** ( तीर्थ )—गौतमी ( गोदावरी ) नदीकाठचे एक तीर्थस्थान ( ब्रह्म. १४०.१ ).

**२.** ( लोकसमूह ) पौराणिक साहित्यमते भारताच्या उदीच्य ( वायव्य ) भागातील एक लोकसमूह. भरद्वाज लोकांसमवेत यांचा निर्देश तेथे आढळतो ( वायु. ४५.११५; ११९; ब्रह्माण्ड. ४९.४९; मार्कं. ५४.३९; वामन.१३.४१; पद्म. आदि. ६.६३ ). पाठभेद (मत्स्य पुराण)–'क्षत्रयोथ'; ' अत्रयोथ. '

महाभारत भीष्मपर्वमते वायव्य भारतातील म्लेंच्छ लोकसमूहांपैकी हे एक होते ( म. भी. १०.६७ ). वायव्य भारतात सिंधु नदीच्या पश्चिमेस कोठेतरी हे रहात असावेत.

**आत्रेयजाङ्गल** ( देश )—एक जनपद ( पद्म. आदि. ६.३४ ).

**आत्रेयी** ( नदी )—कामाख्यतंत्र आणि मध्ययुगीन कोशसाहित्यमते पूर्व भारतातील एक नदी ( कामाख्य. ७; त्रिकाण्ड. १९८.३०६; मेदिनी १२६.४; शब्दरत्न. २४२. ६ ). वरुणसभेतील एक नदी म्हणून महाभारतातहि हिचा निर्देश आढळतो ( म. स. १०४ * ).

डे यांच्या मते राजशाही जिल्ह्यात छोट्या यमुना नदीस मिळणारी दिनाजपुर जिल्ह्यातील आधु. अत्रै नदी ती हीच होय. नटोर गावाच्या पूर्वेस या नदीचे दोन भाग पडतात. त्यापैकी मुख्य भाग बोअलिया ( जि. राजशाही ) गावाच्या आग्नेयेस गंगा नदीस आणि उर्वरित छोटा भाग करतोया नदीस मिळतो.

**आदर्श** ( पर्वत )—पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यमते पश्चिम भारतातील एक सीमापर्वत ( महाभाष्य. ४.२.१२५; ६.३.१०९ ). आर्यावर्ताची पश्चिम परिसीमा तेथे ' प्राक् आदर्शात् ' (आदर्श पर्वताच्या पूर्वेस) दिली आहे ( पतञ्जलि. २.४.१० ). पश्चिम भारतान्तर्गत राजस्थानमधील आधु. अरवली ( आरवली = आडावळा, अक्षांश २४०°–२७०′ उत्तर; रेखांश ७२°–७५′ पूर्व ) पर्वत तो हाच होय. ' आडावळा ' ( इंग्रजी ' अरवली ' ) चा शब्दशः अर्थहि ' सीमारेषेवरील मार्ग अडविणारा पर्वत ' असाच होतो.

भूगर्भशास्त्रीय दृष्टीने हा भारतातील प्राचीनतम पर्वतांपैकी एक असून, हिमवत् पर्वताच्या समकालीन आणि विंध्य पर्वताच्या पूर्वकालीन मानला जातो. हा पर्वत राजस्थानमधील विंध्य पर्वताच्या पश्चिम टोकापासून दिल्लीपर्यंत पसरलेला दिसतो. उदीच्य भारतातील पर्वत म्हणून बृहत्संहितेमध्येहि याचा निर्देश आढळतो ( बृ. सं. १४.२५ ).

पौराणिक साहित्यात अरवली पर्वत आणि भोपाळच्या पश्चिमेकडील विंध्य पर्वताचा भाग या दोहोंना ' पारियात्र ' म्हटले असून, त्यामधून उगम पावणाऱ्या नद्यांचाहि तेथे संयुक्त निर्देश आढळतो ( पारियात्र पहा ). परंतु पतंजलीच्या महाभाष्यकाळी अरवली ( आदर्श ) हा विंध्य पर्वताहून स्वतंत्र पर्वत मानला जात असे. उत्तरकालात विंध्य पर्वताचे ऋक्ष ( सातपुडा पर्वत ) आणि विंध्य असे दोन भाग पडल्यानंतर विंध्य पर्वताच्या पश्चिम भागाची सांगड अरवली पर्वताशी घालून त्यास ' पारियात्र ' हे नवे नाव देण्यात आले.

**विनशन तीर्थाचे नामांतर**—वासुदेवशरण अग्रवाल यांच्या मते पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यात निर्देशिलेले ' आदर्श ' हे पर्वतनाम नसून, सरस्वती नदीच्या 'विनशन' अथवा ' अदर्शन ' ( वाळूमध्ये लुप्त होण्याचे स्थान ) स्थानाचे नामांतर आहे. काशिका ग्रंथामध्येहि ' आदर्श ' एक जनपद मानले आहे ( काशिका. ४.२.१२४ ). भाष्यकार नागेशाच्या ग्रंथामध्ये मात्र ' आदर्श ' हे पर्वतनामच मानले असून, तो कुरुक्षेत्रामध्ये असल्याची चुकीची माहिती दिली आहे.

अन्य काही अभ्यासकांच्या मते ' आदर्श ' म्हणजे वायव्य

भारतातील अंजन ( आधु. सुलेमान ) पर्वत असावा. परंतु पतंजलीच्या काळी आर्यावर्ताची सीमा संकुचित होऊन गंधार, बाह्लीक देशांचा समावेश त्यामध्ये होत नसे ( आर्यावर्त पहा ). त्यामुळे हे अनुमान यथायोग्य वाटत नाही.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या पर्वताची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पतंजलि व्याकरण महाभाष्य, काशिका ( ४.२.१२५ ). | आदर्शक |
| २. बृहत्संहिता ( १४.२० ) | अस्तगिरि |
| ३. वाल्मीकि रामायण (कि. ४२.५१-५२) | अस्ताचल |
| ४. काव्यमीमांसा ( १७.२७ ) | देवसभा ( देवशाप ) |
| ५. टॉलेमी ( मॅक्रिंडल, पृ. ३५५ ) | अपोकोप |
| ६. मध्ययुगीन साहित्य | आडावळा |

**नामव्युत्पत्ती**—या पर्वतातील संगमरवरी दगडांच्या थरांवरून परावर्तित होणाऱ्या सूर्यप्रकाशाच्या रंगीबेरंगी किरणांमुळे यास ' आदर्श ' नाव प्राप्त झाले असावे. ' पश्चिम दिशेकडील पर्वत ' अशा अर्थाने ' अस्ताचल ' आणि ' अस्तगिरि '; मार्ग अडविणारा पर्वत ' अशा अर्थाने ' अडावला '; ' स्वर्गचुंबक पर्वत ' अशा अर्थाने ' देवसभा ' ( देवशाप, ग्रीक-अपोकोप ) ही नामांतरे त्यास प्राप्त झाली असावीत. या पर्वताचे मध्ययुगीन ' आडावळा ' ( आधु. अरवली ) हे संस्कृत ' आदर्शावलि 'चे अपभ्रष्ट रूप असावे. याच्या ' देवसभा ' आणि ' अपोकोप ' नावांवरून प्राचीन काळी हा गगनचुंबी पर्वत असावा. वारे आणि पाऊस यांच्या शतकानुशतकांच्या माऱ्यामुळे त्याचा आकार सध्या खूपच कमी झाला आहे.

**आधुनिक स्थान**—दिल्लीपासून राजस्थानमधील सिरोही गावापर्यंत ईशान्य-नैर्ऋत्य पसरलेला ३०० मैल लांब आणि ६ ते ६०० मैल रुंद अरवली पर्वत हा राजस्थानचा भौगोलिक मानबिंदू आहे. पश्चिम आणि उत्तर राजपुतान्याचा वालुकामय प्रदेश ( थरचे वाळवंट ) आणि पूर्व राजस्थानचा सुपीक प्रदेश यांच्या सीमारेषेवरील या पर्वतामुळे राजस्तानचे दोन ठळक भाग पडतात. या पर्वताचा दिल्लीपासून जयपूरपर्यंतचा भाग छोट्या टेकड्यांनी बनला असून तेथून पुढे त्याची उंची क्रमाने वाढत जाते. अखेरीस मारवाडच्या पलीकडे ती ४३१५′ होते. सिरोही गावाच्या आग्नेयेस हा पर्वत संपतो.

भौगोलिकदृष्ट्या या पर्वताचे दोन ठळक भाग दिसतात. यापैकी पहिला भाग सिरोहीपासून उदयपूरपर्यंत पसरला आहे. द्वितीय भाग ईशान्येकडे बनास नदीच्या दक्षिणेस आणि समांतर असून तोंक गावानजिक ही नदी या पर्वतास ओलांडून चंबळ नदीस मिळते. तेथून पुढे हा पर्वत गंभीरा नदीस ( भरतपुर प्रदेश ) आणि नंतर यमुना नदीस समांतर पसरलेला दिसतो. दीग प्रदेशातून अलवारपर्यंत गेल्यानंतर पूर्वेकडील अनेक शाखापर्वत त्यास येऊन मिळतात आणि या दोहोंचा मिळून एक विस्तृत डोंगराळ प्रदेश बनतो. याच डोंगराची एक शाखा दिल्लीनजिक यमुना नदीस जाऊन भिडते.

**शाखापर्वत**—या पर्वताशी समांतर पसरलेल्या थरच्या वाळवंटामध्ये या पर्वताचे अनेक शाखापर्वत घुसले असून त्यापैकी उत्तर टोकानजिक ७ मैल वायव्येस असणारा अबूचा पहाड ( प्राचीन-अर्बुद पर्वत; उंची ५६४६′ ) सर्वाधिक उंच आहे. एका अरुंद खोऱ्याने तो मुख्य पर्वतापासून विभक्त झाला आहे ( अर्बुद पहा ).

**शिखरे**—या पर्वताची प्रमुख शिखरे पुढीलप्रमाणे होत:- १. अबूचा पहाड ( ५६४६′ ); रघुनाथगढ ( ३४५०′ ); ३. हरसनाथ ( २९६८′ ); ४. तारागढ ( अजमेरनजिक ). याशिवाय चितोडगढ, हळदीघाट, नाथद्वारा आदि इतिहास-प्रसिद्ध स्थानेहि या पर्वतातच आहेत.

**२.** ( देश ) काशिका ग्रंथमते एक जनपद ( काशिका ४.२.१२४ ). आदर्श पर्वताच्या परिसरातील प्रदेश या जनपदामध्ये समाविष्ट होत असावा ( आदर्श १. पहा ).

**३.** ( तीर्थ ) डॉ. अग्रवाल यांच्या मते पंजाबातील ' विनशन ' तीर्थाचे नामांतर ( आदर्श १. पहा ). पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यात बौधायन धर्मसूत्रातील आर्यावर्ताची व्याख्या जशीच्या तशी घेतली असून, ' अदर्शन ' (विनशन तीर्थ ) ऐवजी ' आदर्श ' संज्ञेचा प्रयोग तेथे केला आहे. त्यावरून ' आदर्श ' हे ' विनशन तीर्था 'चे नामांतर असण्याच्या अनुमानास पुष्टी मिळते.

**आदर्शक** ( पर्वत )—पतंजलीचे व्याकरण महाभाष्य आणि काशिकामते ' आदर्श ' पर्वताचे नामांतर ( पा. सू. ४.२.१२५; आदर्श १ पहा ).

**आदान**—महाभारतमते ' पृथ्वी 'चे नामांतर ( म. अनु. ६२.३११४; पृथ्वी पहा ).

**आदि** ( तीर्थ )—गंगा नदीकाठचे एक तीर्थस्थान ( पद्म. स. २७.१३८; नारद. उत्तर. ४०.९० ).

**आदिकेशव** ( देवता )—काशी येथील पापविमोचक तीर्थानजिकचे एक वैष्णवस्थान ( स्कन्द. काशी. ३३.१४१;

८४.५; ९७.१५). तार्क्ष्यकेशव (स्कन्द. काशी. ६१) आणि भगीरथ स्थानांसमवेत (स्कन्द. काशी. ८४) याचा निर्देश आढळतो.

**आदिगदाधर** (देवता)—काशी येथील एक देवता-स्थान (स्कन्द. काशी. ३३.१४२).

२. (देवता) गया येथील 'गदाधर' देवतेचे नामांतर (वायु. १०६.५५–६०; गदाधर पहा).

**आदिगया** (तीर्थ)—गयेमधील एक तीर्थस्थान. हे मुंडपृष्ठाच्या नैर्ऋत्येस आहे (ती. पृ. १६२; गया पहा).

२. (क्षेत्र) संभलतीर्थान्तर्गत एक क्षेत्रस्थान (ती. पृ. ९४; संभल पहा).

३. (तीर्थ) अवंती येथील एक तीर्थ (स्कन्द. आवन्त्य. अ. ५७.३०; ५९.४).

**आदिचनलूर** (प्रागैतिहासिक वसाहत)—दक्षिण भारतान्तर्गत तिन्नेवेल्ली जिल्ह्यातील प्रागैतिहासिक वसाहत-स्थान. सुवर्णमुकुट, तसेच लोखंड आणि ब्राँझ यांची आयुधे यांनी युक्त असा एक दग्धावशेषकरंडक येथे सापडला असून, पॅलेस्टाईनमधील गझ आणि गेरर गावच्या, तसेच सायप्रस-मधील ब्राँझ युगातील अवशेषांशी त्यांचे साम्य दिसते. त्यावरून प्रागैतिहासिक काळी त्या देशांशी दक्षिण भारताचा संबंध असावा (गोएट्झ, पृ. ३४).

**आदितीर्थ** (तीर्थ)—महाभारतमते 'पुष्करक्षेत्रा'चे नामांतर (म. आर. ८०.४१; पद्म. सृ. २७.१३८–१३९; पुष्करक्षेत्र पहा).

**आदित्य** (आश्रम)—गुजरातेतील श्रीमालक्षेत्रान्तर्गत सूर्यस्थान. येथे आत्माधार नामक किरातवेषधारी सूर्य-प्रतिमा आहे. महारोगपीडित ब्राह्मणांची रोगव्याधी भिल्ल-वेषधारी सूर्याने येथे नाहीशी केली. म्हणून उपासक आरोग्य-प्राप्तीसाठी भिल्लवेष धारण करून येथे सूर्योपासना करतात (श्रीमालमाहात्म्य. ४४.१०–४९).

२. कुरुक्षेत्रातील एक सूर्यस्थान (म. आर. ८१.१६०; पद्म. आदि. २७.७०).

**आदित्य** (तीर्थ)—महाभारत आणि पौराणिक साहित्य-मते कुरुक्षेत्रातील सरस्वती नदीकाठचे एक तीर्थस्थान (म. श. ४८.१६; वामन. ४३.३६). याच ग्रंथात अन्यत्र (म. श. ५०), तसेच देवलस्मृतिमध्ये या तीर्थाचे माहात्म्य सविस्तरपणे आढळते (तीर्थकल्प. पृ. २५०). स्थानेश्वर-पासून ५ मैल आग्नेयेकडील अभिमन्यु पर्वतावरील अदितीचे स्थान ते हेच असावे (अभिमन्यु पर्वत पहा).

**महाभारतात**—या ग्रंथमते या स्थानी सूर्याने तप करून जगातील समस्त प्रकाशमान वस्तूंचे आधिपत्य मिळविले. मधु आणि कैटभ नामक दैत्यांचा वध केल्यानंतर श्रीविष्णूने येथे स्नान केले. या तीर्थामध्ये स्नान केल्याने व्यासांना, तसेच असित देवल ऋषींना योगशक्ती आणि सिद्धी प्राप्त झाली.

२. पद्ममते साभ्रमती–सागर संगमानजिकचे एक तीर्थस्थान (पद्म. उ. १६७.१).

३. प्रयाग येथील यमुना नदीच्या उत्तर किनाऱ्यावरील एक तीर्थस्थान (मत्स्य. १८.२९). प्रयाग येथील अंतर्वेदीपारिक्रमे-मध्ये आधुनिक काळी समाविष्ट असणारे आधु. आदित्यतीर्थ हेच असावे (ती. पृ. ११८).

४. नर्मदा नदीकाठच्या दहा तीर्थांचे सामूहिक नाव (नारद. उत्तर. ७७.१६).

५. पौराणिक साहित्यमते गोदावरी नदीकाठच्या 'कपिल' तीर्थाचे नामांतर (कपिल १०. पहा).

६. (देवता) हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक देवतासमूह. यामध्ये निम्नलिखित तीन देवता समाविष्ट होत्या :— १. मुंडीर; २. कालप्रिय ३. मूलस्थान (स्कन्द. नागर ७६).

७. (पर्वत) 'आदित्यबंधन' नामक पर्वतशिखराचे नामांतर (आदित्यबंधन पहा).

८. (वन) कुरुक्षेत्रातील एक वन (नारद. उत्तर. ६५. ११५).

**आदित्यकेशव** (तीर्थ व देवता)—काशी येथील एक तीर्थस्थान (स्कन्द. काशी. ३३.१४१;८४.१७).

**आदित्यबन्धन** (शिखर)—शिवाचे पर्वतीय तपस्या-स्थान (म. शां. ३१४.१९). नामांतर—'आदित्य पर्वत'. या पर्वताच्या पूर्वेस व्यास-आश्रम असून तेथे व्यास आपल्या सुमंतु आदि शिष्यांसह वेदाध्ययन करीत. व्यासांनी आपला वेदप्रचार येथे सुरू केला. मिथिला येथील जनकभेटीनंतर व्यासपुत्र शुक येथे आला होता (म. शां. ३१४.२६–४८).

**आदित्यायन** (तीर्थ)—नर्मदा नदीच्या उत्तर किनाऱ्या-वरील एक तीर्थस्थान (कूर्म. उत्तर. ४१.३८; मत्स्य. १९१. ५; ७७; पद्म. आदि. १८.७१–७२).

**आदित्येश** (तीर्थ)—नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ-स्थान (मत्स्य. १९१.५).

**आदित्येश्वर** (लिंग)—नर्मदा नदीकाठचे एक शिवलिंग (पद्म. आदि. १८.५).

२. प्रभासक्षेत्रातील एक शिवलिंग (स्कन्द. प्रभास. ४३).

**आदिदाय** (देश)—दक्षिण भारतातील एक देश (म. भी. १०.६२).

**आदिद्वीप** ( द्वीप )—प्राचीन साहित्यमते 'आज्यद्वीपा' चे नामांतर ( आज्यद्वीप पहा ).

**आदिनगर** ( नगर )—चोल राजा राजेंद्र ( प्रथम ) याच्या तिरुमलै टेकडी शिलालेखमते त्याने जिंकलेले उत्तर भारतातील एक नगर ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. १.९५; २.१३९; एपि. इंडि. ९.२२९ ). ओरिसा प्रांतातील कटक जिल्ह्यातील आधु. जजपुर गाव ते हेच असावे ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ९५ ).

**आदिनारायण** ( विष्णुस्थान )—प्रभासक्षेत्रातील एक विष्णुस्थान ( नारद. उत्तर. ७०.२२; स्कन्द. प्रभास. ८४ ).

**आदिपालगिरि** ( पर्वत )—गया येथील एक पर्वत ( वायु. १०८.६५; १०९.१५ ).

**आदिपुरीश्वर** ( शिवमंदिर )—मद्रासपासून ८ मैलांवरील शिवमंदिरस्थान. तामीळ नाव—'तिरुवत्तियूर' ( ती. पृ. ३४९ ).

**आदिबद्री** ( शिवस्थान )—हिमालय प्रदेशान्तर्गत तिबेटातील सुविख्यात शिवमंदिरस्थान. येथील बदरीनाथाची मूर्ती आद्य शंकराचार्यांनी उत्तरकालात भारतातील बदरीनारायण येथे हलविली. तिबेटी नामांतर—'धुलिंगमठ'.

बदरीनाथहून माता घाट ओलांडून या स्थानी जाता येते. याशिवाय नीनीघाटाच्या कैलास पर्वतगामी मार्गाने शिवचूलमूहून येथे पोहोचता येते ( ती. पृ. ४० ).

२. कपालमोचन तीर्थानजिकचे शिवमंदिरस्थान. हे कपालमोचनापासून १२ मैलांवर आहे ( ती. पृ. ६६ ).

३. ( वैष्णवस्थान ) मथुरावृंदावन येथील व्रजपरिक्रमेतील एक तीर्थस्थान. कृष्णाने आपल्या गोपसख्यांना येथे बदरीनारायणाचे दर्शन घडविले होते ( ती. पृ. १०२ ).

**आदिराष्ट्र** ( देश )—महाभारतमते एक जनपद ( म. भी. १०.४३ ).

**आदिवास** ( ग्राम )—चालुक्य राजा पृथ्वीजयसिंह वल्लभ ( प्रथम ) याच्या इ. स. ६५९ च्या गुडिवाड ताम्रपटमते आंध्र प्रदेशातील प्लक्की विषयातील एक अग्रहार ग्राम. विशाखापट्टण जिल्ह्यातील गुडिवाड गावाच्या परिसरात कोठेतरी हे असावे ( एपि. इंडि. ३१.१२९; १३१ ).

**आदिस्थान** ( नगर )—वायव्य भारतातील 'मूलस्थान' ( आधु. मुलतान ) नगराचे नामांतर ( मूलस्थान पहा ). अन्य नामांतर—'आद्यस्थान'.

**आद्य** ( लिंग )—काशी येथील प्रयागेशनजिकचे एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ६१.४४ ).

**आद्यब्रह्म** ( सरस् )—कुरुक्षेत्रातील एक पवित्र सरोवर ( वामन. ३२. २४ ).

**आद्यस्थान** ( नगर )—वायव्य भारतातील 'मूलस्थान' ( आधु. मुलतान ) नगराचे नामांतर ( मूलस्थान पहा ).

**आधिवाडा** ( ग्राम )—सोळंकी राजा जयंतसिंह याच्या वि. सं. १२८० मधील शिलालेखमते उत्तर गुजरातेतील वर्द्धिपथक ( आधु. विरमगाम तालुका ) देशविभागातील एक ग्राम. विरमगाम तालुक्यातील आधु. आदिवाडा गाव ते हेच होय ( इंडि. अँटि. ६.१९६–१९९ ).

**आनकदुन्दुभि** ( तीर्थ )—द्वारकेतील एक तीर्थस्थान ( स्कन्द. प्रभास. द्वा. १६.३७ ).

**आनडुह** ( तीर्थ )—दक्षिण भारतान्तर्गत सह्य पर्वतातील करवीरपुर–गोमंतक मार्गावरील एक तीर्थस्थान ( ह. वं. २.३९.५५–६४ ).

**आनडुह्य** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते प्राचीन भारतातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.१३ ).

**आनन्तवासिन्** ( देश )—नैर्ऋत्य भारतातील एक देश ( विष्णुधर्म. १.९.६ ).

**आनन्द** ( तीर्थ )—ब्रह्ममते 'नंदीतट' तीर्थाचे नामांतर ( ब्रह्म. १५२.४०–४२ ).

२. ( वर्ष ) प्लक्षद्वीपातील एक देशविभाग ( ब्रह्माण्ड. १९.१६; मार्क. ५०.३०; लिङ्ग. ४६.४३; वायु. ४९.१४; विष्णु. २.४.५ ).

३. ( वर्ष ) शाकद्वीपातील एक देशविभाग ( मत्स्य. १२२.२३ ).

**आनन्दकमल** ( तीर्थ )—एक श्राद्धयोग्य तीर्थस्थान ( पद्म. सृष्टि. ११.४४ ).

**आनन्दकानन**—'काशी'चे नामांतर ( स्कन्द. काशी. ३२.८५; कल्पद्रु. ११.२१; काशी पहा ). अन्य नामांतर—'आनन्दवन'.

**आनन्द-जल** ( सरोवर )—वायुमते जंबूद्वीपान्तर्गत निषध वर्षातील एक पवित्र सरोवर. उत्तर कुरु देशाच्या दक्षिण सरहद्दीवरील जरुधि ( आधु. अल–तौ ) पर्वतामध्ये हे होते ( वायु. ४१.७२ ). मध्य आशियातील आधु. इस्सिक-कुल सरोवर ते हेच होय.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या सरोवराची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| प्राचीन साहित्य | नामांतर | शब्दशः अर्थ |
|---|---|---|
| १. तुर्की | इस्सिक कुल | ऊष्ण पाण्याचा समुद्र |
| २. चिनी | जौ-हे | ,, ,, ,, |
| ३. ह्युएन्त्संग | हिंग | स्वच्छ पाण्याने युक्त |
| ४. मंगोलियन | तेमुर्तु-नोर | लोहकणांनी युक्त |

**नामव्युत्पत्ती**—ह्युएन्त्संगच्या जीवनचरित्रमते ९०००' उंचीच्या लिंग्-शन् पर्वताचा ( हिमपर्वत ) बर्फमय प्रदेश उतरून या सरोवराप्रत स्नानासाठी आलेल्या प्रवाशास येथील पाणी गरम असल्याचा भास होत असे. त्यामुळे या सरोवरास 'ऊष्ण पाण्याचा समुद्र' अशा अर्थाची उपरोक्त रूपकात्मक नावे प्राप्त झाली होती. वॉटर्स यांच्या मते 'कधीहि न गोठणारे सरोवर' अशा अर्थाने त्यास हे नाव प्राप्त झाले असावे.

**व्याप्ती**—वायुमते या सरोवराचा व्यास तीस योजने होता. ह्युएन्त्संगच्या मते या सरोवराची लांबीरुंदी ११२×३८ मैल होती. वॉटर्स यांच्या मते ह्युएन्त्संगने वर्णिलेली या सरोवराची व्याप्ती ऐकीव माहितीवर आधारित आणि म्हणूनच अतिशयोक्त आहे. अन्य चिनी साहित्यात या सरोवराची व्याप्ती २५-३० मैल आढळते.

**वायु पुराणात**—या ग्रंथमते या सरोवराचे पाणी स्फटिकाप्रमाणे स्वच्छ असून, त्याचे काठी सुंदर घाट होते. या सरोवरात निळ्या रंगाची कमळे, तसेच हंस, बदक आदि पक्षी होते ( वायु. ४१.६६-७३ ).

चंद्र नामक शतमुखी नागराज या सरोवरात निवास करीत असल्याची आख्यायिका वायु पुराणात आढळते. तिएन्-शन् नामक हिमाच्छादित पर्वताच्या उत्तरेस जलराक्षसाचे एक सरोवर असल्याचा निर्देश चिनी साहित्यातहि सर्वत्र आढळतो. त्यावरूनच वायु पुराणातील ही आख्यायिका अनुसृत केली असावी.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—चीनमधून मध्य आशियाच्या मार्गाने भारतास निघालेला ह्युएन्त्संग कौ-चँग ( तुर्फान ), अग्नि ( कारा शहर ), कु-चिह ( कूच ), बाल्का ( अक्षु ) आदि देशातून प्रवास करीत लिंग्-शन् ( हिमपर्वत ) पर्वतापासून ८० मैल ईशान्येकडील या सरोवराप्रत आला. या सरोवराच्या पूर्व आणि उत्तर किनाऱ्यावरून म्हणजे करकोल गावाहून जाणाऱ्या लांबच्या मार्गाने न जाता दक्षिण किनाऱ्यावरील दुर्गम परंतु जवळच्या मार्गाने येथे तो आला असावा. येथून पुढे १०० मैल वायव्येकडील सु-शे ( आधु. तोक्मक् ) गावी तो गेला.

**भौगोलिक माहिती**—ह्युएन्त्संगच्या मते हे सरोवर चहुबाजूंनी पर्वतांनी वेष्टिलेले असून, त्यामधील पाणी पारदर्शक, निळसर काळ्या रंगाचे आणि तुरट चवीचे होते. सभोवतालच्या पर्वतातील अनेक जलप्रपात या सरोवराप्रत येऊन मिळत असल्याने तेथे उसळत्या लाटांचे तांडव सदैव चालू असे. अनेक जलराक्षस या सरोवरात निवास करीत असून, त्यांची खवल्याखवल्यांनी युक्त मस्तके अधूनमधून पाण्याबाहेर दिसत असत. या राक्षसांच्या भयामुळे या सरोवराकाठचा प्रवास आणि त्यामधील मासेमारी अत्यंत धोक्याची बनली होती.

वॉटर्स यांच्या मते ह्युएन्त्संगने दिलेली उपरोक्त सारी माहिती सांगोवांगी स्वरूपाची असून, तो या स्थानी प्रत्यक्ष आला नव्हता. अन्य प्रवाशांच्या मते या सरोवराचे पाणी किनाऱ्यानजिक उष्ण असून, त्याच्या काठी सीरियनवंशीय अनेक वन्य जमातींची वस्ती होती. ते लोक मासे पवित्र मानत असल्याने मासेमारी करीत नसत. या विशिष्ट माहितीचा नामोल्लेखहि ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात आढळत नाही ( वॉटर्स, १.७०; २.३३२; बील, १.१४ ).

**आनन्दपुर** ( नगर )—आनर्त ( उत्तर गुजरात आणि उत्तर काठेवाड ) देशाच्या राजधानीचे गाव, सुविख्यात तीर्थस्थान आणि 'नागर' ब्राह्मणांचे आद्य वसतिस्थान. येथील 'हाटकेश्वरा'चे देवालय हे नागर ब्राह्मणांचे कुलदैवत मानले जाते ( स्कन्द. नागर. १७६.३ ). उत्तर गुजरातेतील सिद्धपुरपासून ७० मैल आग्नेयेकडील आणि मेहेसाण्यापासून २१ मैलांवरील आधु. वडनगर गाव ते हेच होय.

महाभारत आणि पौराणिक काळी आनर्त देशाची राजधानी द्वारका गावी असली, तरी इ. स. ५ व्या शतकानंतरच्या काळात ती या गावी हलविण्यात आली ( आनर्त पहा ).

**इतिहास**—स्थानिक परंपरेनुसार अयोध्येच्या कनकसेन नामक राजपुत्राने इ. स. १४४ मध्ये या नगराची स्थापना केली. गुजरातचा जैन राजा ध्रुवसेन ( द्वितीय ) ( इ. स. ५ वे शतक ) याची राजधानीहि या गावी असून, त्या काळी जैन धर्माचे ते एक प्रमुख केंद्रस्थान बनले. तेव्हापासून हिंदूंचे आणि जैनांचे तीर्थस्थान म्हणून हे सुविख्यात झाले.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात:—

## आनंदपुर नगराची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. चतुर्युगातील नामांतरे ( बाँबे. गॅझे. १.६ ) | |
| ( अ ) सत्ययुग ( स्कन्द नागर. ४०; कूर्म. पू. ३५.१५ ) | चमत्कारपुर |
| ( ब ) त्रेतायुग ,, ,, ,, ,, | आनर्तपुर |
| ( क ) द्वापरयुग | आनंदपुर |
| ( ड ) कलियुग | वृद्धनगर |
| २. मध्ययुगीन शब्द कोश साहित्य ( कल्पद्रु. ११.२४ ) | वृद्धनगर |
| २. स्थानिक आख्यायिका | स्कंदपुर<br>मानपुर |
| ३. पौराणिक साहित्य | |
| ( अ ) भागवत ( ५.२४.१७) | वितल |
| ( ब ) कूर्म पुराण ( पूर्व. ३५.५० ) | कालनगर |
| ( क ) स्कंद पुराण(नागर. ४०) | अर्कस्थलि |
| ,, ,, ( नागर. १.४) | पाताल |
| ,, ,, ( ,, ,,) | नगर |
| ४. मध्ययुगीन शिलालेख साहित्य ( अ ) इ. स. १२१६ चा प्रभासपट्टण शिलालेख | नगर |
| ( ब ) कुमारपाल राजाचा वि. सं. १२२५ चा शिलालेख | श्रीआनंदनगर |
| ( क ) कर्ण ( प्रथम ) चा शिलालेख | श्रीमत् आनंदपुर |
| ५. ह्युएन्त्संग ( वॉटर्स, २.२४८ ) | अ-नन्-तो-पु-लो |

स्थानिक समजुतीनुसार संध्येतील ‘ आचमन ’ हा शब्द ‘ आनंदपुर ’, ‘ चमत्कारपुर ’, ‘ मदनपुर ’ आणि ‘ नगर ’ या ‘ आनंदपुर ’च्या चार नावांच्या आद्याक्षरांचा द्योतक आहे. या स्थानाचे ‘ हाटकक्षेत्र ’ हे नाव येथील हाटकेश्वराच्या मंदिरावरून पडले आहे.

**स्कंद पुराणात**—या ग्रंथाच्या २७९ अध्यायांच्या ‘ नागरखंडा ’त ( रचनाकाल—इ. स. ५ वे शतक ), आनंदपुर तीर्थाचा आणि नागर ब्राह्मणांचा इतिहास, तसेच तेथे करावयाचे धार्मिक विधी यांची सविस्तर माहिती दिली आहे. तेथे दिलेले या नगराशी संबंधित श्राद्धविधी हेमाद्रि आदि उत्तरकालीन धर्मशास्त्रकारांनी प्रमाण मानले आहेत.

**भौगोलिक परिसीमा**—स्कंदमते ५ कोस व्याप्तीचे हे तीर्थ अर्बुद पर्वताच्या नैर्ऋत्येस असून, त्याच्या चतुःसीमा पुढीलप्रमाणे होत्या :— १. पूर्वेस —गयाशीर्ष; २- पश्चिमेस—हरिपद तीर्थ; ३—४ दक्षिणेस व उत्तरेस—गोकर्णेश्वर.

**आख्यायिका**--या नगराच्या विभिन्न नामांतरांविषयी पौराणिक साहित्यात निम्नलिखित आख्यायिका आढळतात :–

**१. हाटकेश्वरक्षेत्र**--सतीच्या मृत्यूनंतर तिच्या विरहामुळे शोकाकुल झालेल्या शिवाने नग्न रूपाने आनर्त देशात नृत्य करण्यास प्रारंभ केला. त्यायोगे तेथील ऋषिपत्नी मोहित झाल्या. तेव्हा ऋषींनी शिवाचे लिंग तोडले आणि ते जमिनीवर पडून थेट पाताळात गेले. पुढे ब्रह्मदेवाच्या विनंतीवरून शिवाने आपले तुटलेले लिंग पुन्हा धारण केले आणि पाताळात सोन्याचे नवे लिंग स्थापन केले. ‘ सोन्याचे लिंग ’ अशा अर्थाने त्या क्षेत्रास ‘ हाटकेश्वर ’ नाव प्राप्त झाले.

चमत्कारपुर ( आनंदपुर ) येथील चित्रशर्मन् नामक वत्सगोत्रीय ब्राह्मणाने पाताळातील हाटक शिवलिंगाची पूजा केली आणि ही उपासनापद्धती त्याने स्वतःच्या गावी आणली. कालांतराने या गावच्या नागर ब्राह्मणांनी ‘ हाटकेश्वर ’ शिवाची अन्य ६८ मंदिरे या गावी बांधली आणि ते ‘ हाटकेश्वरा ’चे निस्सीम उपासक बनले.

येथील आद्य शिवलिंगाची स्थापना चैत्र शुक्ल चतुर्दशीच्या दिवशी झाली, म्हणून त्या दिवशी येथे मोठी यात्रा असते.

**२. पाताल**—स्कंद पुराणातील अन्य एका आख्यायिकेनुसार ऋषींनी तोडलेले शिवाचे लिंग ‘ हाटकेश्वरक्षेत्रा ’चा उपविभाग असणाऱ्या पाताळात जाऊन पडले. या कारणाने ब्रह्मदेवाने तेथे स्थापलेले सोन्याचे लिंगहि ‘ हाटकेश्वर ’ याच नावाने सुविख्यात झाले. हाटकेश्वरक्षेत्रात ‘ पाताल जाह्नवी ’ नामक एक छोटा प्रवाह आजहि दाखविला जातो ( स्कन्द. नागर. १—४ ).

मत्स्य पुराणातहि हाटकेश्वर क्षेत्राचा निर्देश ‘ पाताल ’ नावाने केला असून नर्मदा नदीवर स्नानासाठी गेलेल्या कार्तवीर्य अर्जुनास पाताळात पळवून नेल्याचा निर्देश तेथे आढळतो ( मत्स्य. ४४.३३ ). भागवतातहि ‘ वितल ’ प्रदेशात ‘ हाटकेश्वर मंदिर ’ असल्याचा आणि तेथून जवळच ‘ हाटकी नदी ’ उगम पावत असल्याचा निर्देश आढळतो ( भा. ५.२४.१७ ).

**३. नगर**—स्कंदमते ‘ विप्ररहित ’ ( न + गर = पवित्र ) अशा अर्थाने या गावास ‘ नगर ’ हे वैकल्पिक नाव

प्राप्त झाले होते ( स्कन्द. नागर. १-४ ). 'न गर' अशा मंत्रोच्चाराने सर्प दूर पळवून लावण्याचे सामर्थ्य येथील ब्राह्मणांमध्ये असल्याने यास 'नगर' नाव प्राप्त आल्याची आख्यायिकाहि अन्यत्र आढळते ( स्कन्द. नागर. ११४. ७५-७६; ११९.१०७ ).

**४. वृद्धनगर**—केशवकृत कल्पद्रुकोशात या वैकल्पिक नावाचा निर्देश आढळतो ( कल्पद्रु. ११ २४ ).

**५. चमत्कारपुर**—स्कंदमते आनर्त देशाच्या कुष्ठरोगपीडित चमत्कार नामक राजाने रोगमुक्तीसाठी भारतातील विभिन्न तीर्थांची यात्रा केली. परंतु त्याचा काहीहि उपयोग झाला नाही. अखेरीस 'हाटकेश्वरक्षेत्रा न्तर्गत विश्वामित्र ऋषींच्या आश्रमामध्ये तो गेला आणि तेथील 'शंखतीर्थ' या शंख ऋषींच्या तपस्यास्थानी स्नान करून तो रोगमुक्त झाला. कालांतराने या क्षेत्राच्या परिसरामध्ये 'चमत्कारपुर' नगराची स्थापना करून ते त्याने रोगमुक्तीचा मार्ग दाखविणाऱ्या ब्राह्मणास दान दिले. 'अचलेश्वर' शिवाचे एक देवालयहि राजाने या गावी बांधले ( स्कन्द. नागर. १४.११ ).

'हाटकेश्वरक्षेत्रा'न्तर्गत 'शंखतीर्था'मधील स्नान रोगपरिहारक असल्याची कल्पना आजहि प्रचलित दिसते ( स्कन्द. नागर. १०-११ ).

**६. आनंदपुर**—स्कंदमते चमत्कारपुर गावानजिकच्या 'सारस्वतह्रद' नामक नागव्याप्त सरोवराकाठी मंकण ऋषींनी तपश्चर्या केली. या तपस्येच्या फलस्वरूप खाद्यवनस्पतींचे रस त्यांच्या हातातून स्रवू लागले आणि ते आनंदाने नाचू लागले. तेव्हापासून हे स्थान 'आनंदपुर' नावाने प्रसिद्ध होऊन शिव तेथे 'आनंदेश्वर' नावाने निवास करून लागला.

मंकण ( मंकणक ) ऋषींचे तपस्यास्थान कुरुक्षेत्री असल्याचा निर्देश महाभारतात आढळतो ( म. आर. ८१. ९८-११४; कुरुक्षेत्र पहा ).

'आनंदपुर' नावाने या नगराचा प्राचीनतम निर्देश इ. स. ५४१ मधील शिलालेखात आढळतो. अन्य एका शिलालेखामध्ये 'त्रिनेत्र मंकणा' ने ( मयूरशर्मन् ) अहिच्छत्र गावचे १२००० ब्राह्मण या गावी स्थायिक केल्याचा निर्देश आढळतो.

**नागआक्रमण**—इ. स. ३ ऱ्या शतकात चमत्कारपुर येथील स्थानिक ब्राह्मण नाग लोकांमुळे त्रस्त झाले असता मंकण नामक कर्तबगार व्यक्तीने परप्रांतीय ब्राह्मण येथे आणवून ब्राह्मधर्माचे रक्षण केल्याचा रूपकात्मक निर्देश उपरोक्त आख्यायिकेत अभिप्रेत दिसतो. इ. स. ४ थ्या शतकामध्ये गुजरात प्रदेशावर राज्य करणाऱ्या शक क्षत्रपांचा निर्देश येथे नाग लोक म्हणून केला असावा.

अन्य एका आख्यायिकेनुसार चमत्कारपुर येथील भर्तृका नामक एका ब्राह्मण बालविधवेला नागांनी पळविले. त्यामुळे ब्राह्मण लोकांनी आनर्त देशाच्या प्रभंजन नामक नागराजावर आक्रमण केले. प्रभवदत्त नामक ब्राह्मणाने शिवाची तपस्या करून नागविनाशक 'नागरमंत्र' प्राप्त केला आणि त्याच्या साह्याने नागांचा पराभव केला.

श्री. मानशंकर मेहता यांच्या मते उपरोक्त आख्यायिकेतील प्रभंजन राजा म्हणजे शक क्षत्रप रुद्रदामन् ( द्वितीय ) असून, आनंदपुर येथील नागर ब्राह्मणांशी त्याचा संग्राम स. ३४७ मध्ये झाला. स. ३४८ ( वि. सं. ४०४ ) पासून हे गाव नागर ब्राह्मणांच्या संपूर्णपणे ताब्यात गेले. वि. सं. ४०४ हे वर्ष नागर ब्राह्मणांमध्ये आजहि विशेष महत्त्वाचे मानले जात असून, विवाहप्रसंगी होणाऱ्या 'उवतमणि' समारंभाच्या वेळी या वर्षाचा मंत्रयुक्त निर्देश करतात.

**नागर ब्राह्मण**--आनंदपुर येथील वैदिक धर्मानुयायी नागर ब्राह्मण इ. स. ३-४ या शतकात उत्तर भारतातील कुरुक्षेत्रातून गुजरातेत आले. शिलालेख साहित्यमते शक क्षत्रप नहपानाचा जामात उषवदात याने या ब्राह्मणांस एक गाव दान दिले होते. भारतातील बहुतांशी भागांत प्रचलित असणारी नागरी लिपीहि इ. स. ८-१० व्या शतकात गुजरातमधील राजपुरोहित असणाऱ्या याच ब्राह्मणांनी प्रथम प्रचारात आणली आणि त्यानंतर भारतात ती सर्वमान्य झाली.

वन्थलीच्या वि. सं. १३४६ मधील शिलालेखात 'श्रीमचमत्कारपुरद्विज' या उपाधीने निर्देशिलेल्या नागर ब्राह्मणांनी गुजरातच्या इतिहासात अमात्य, राजपुरोहित आणि राजकवी या नात्याने महनीय कामगिरी बजावली. गुजरातच्या वीरधवल आणि विशालदेव राजांचा पुरोहित कवी सोमेश्वर, मेवाडच्या स्वतंत्र राज्याची स्थापना करणारा बाप्पा रावळ, तसेच कुमारपाल राजाचा अमात्य वल्ल हे सारे नागर ब्राह्मण होते.

**हाटकेश्वर क्षेत्रान्तर्गत तीर्थस्थाने**—स्कंद पुराण नागर खंडांत या क्षेत्राच्या परिसरातील निम्नलिखित तीर्थांची नामावली आढळते. तीर्थांच्या नावापुढे कंसात दिलेले आकडे अध्याय आणि श्लोकांचे आहेत :—

१. अगस्त्यआश्रम ( ३३ ); २. अगस्त्यकुंड ( ५२.४ ); ३. अग्निकुंड ( ११३ ); ४. अग्नितीर्थ ( ९०.६४;९१ ); ५. अचलेश्वर ( १३ ); ६. अजापालेश्वर ( ९५ ); ७. अटेश्वर

( १२८ ); ८. अज्रग्रहादेवता ( १३२ ); ९. अप्सरस् कुण्ड ( १५३.१८२ ); १०. अमरकेश्वर ( १४५ ); ११. अमरेश्वर कुण्ड ( १४६ ); १२. अम्बारेवती तीर्थ ( ११६ ); १३. अश्वतीर्थ ( १६५ ); १४. अहल्येश्वर ( २०८ ); १५. आदित्य ( मुण्डीर, कालप्रिय, मूलस्थान; ७६ ); १६. आनर्त ( आनर्तीय ) तडाग ( १०३.८ ); १७. आनर्तेश्वर ( ६५.२ ); १८. इन्द्रद्युम्नेश्वर ( २७१ ); १९. ईशान ( १३१ ); २०. उज्जयिनीपीठ ( ५३.१ ); २१. उमामहेश्वर ( ४८ ); २२. उषर ( ११२.२–७ ); २३. औदुम्बरी ( १८९ ); २४. कंसारेश्वर ( १७४. १७६ ); २५. कपालेश्वर ( कपालमोचनेश्वर; १८२.४२; २६९ ); २६. कपिला नदी ( ५२.६ ); २७. कर्णोत्पला तीर्थ ( १२५;१२७ ); २८. कलशेश्वर ( ४९;५१ ); २९. कात्यायनी तीर्थ ( ११९.१२१ ); ३०. कुमारिका तीर्थद्वय ( १९४ ); ३१. कुशेश्वर ( १०४ ); ३२. केदारेश्वर ( १२२ ); ३३. केलीश्वरी ( १४९–१५० ); ३४. क्षेमंकरी ( ११८ ); ३५. खण्डशिला ( १३३ ); ३६. गणपति ( स्वर्गद; मर्त्यद, नरकापह; १४२ ); ३७. गरुडेश्वर ( ८२-८३ ); ३८. गर्तक्षेत्र पादुका ( १९४ ); ३९. गर्तातीर्थ ( १९७.७७ ); ४०. गायत्रीतीर्थ ( १८१ ); ४१. गोकर्ण तीर्थ ( २६ ); ४२. गोमुख तीर्थ ( ९३. ); ४३. गोष्पद ( ५२.१२ ); ४४. गौतमेश्वर ( २०८ ); ४५. गौरीकुण्ड ( १५४ ); ४६. चक्रपाणि ( १५२ ); ४७. चन्द्रकूपिका ( १३२.५७ ); ४८. चमत्कारी-दुर्गादेवी ( ६४ ); ४९. चर्ममुण्डा देवी ( ५४ ); ५०. चित्रशिला ( ४०.६४ ); ५१. चित्राङ्गदेश्वर ( १४४ ); ५२. चित्रेश्वरपीठ ( ३५;१५४ ); ५३. चित्रेश्वरीपीठ ( ३६ ); ५४. जलशायी जनार्दन ( ४१ ); ५५. त्रिजातेश्वर ( ११५. ४ ); ५६. त्रिपुष्कर ( ४५ ); ५७. त्रिवेणी ( ५२.११ ); ५८. दीर्घिका ( १३५–१३६ ); ५९. दुःशीलप्रासाद ( ३७ ); ६०. दुःशीलेश्वर ( २७४ ); ६१. देवयजन ( ७४ ); ६२. धन्वन्तरीवापी ( २१२.१२ ); ६३. धर्मराजेश्वर ( १३८ ); ६४. धारातीर्थ ( १६८; १७० ); ६५. धारादेवी ( १६९ ); ६६. धुन्धुमारेश्वर ( ३८ ); ६७. नगर ( ११;११४.७८ ); ६८. नरादित्य ( ६० ); ६९. नलेश्वर ( ५५ ); ७०. नागतीर्थ ( १८३ ); ७१. नागरादित्य ( १६४ ); ७२. नागरेश्वर ( १६४ ); ७३. नागहृदतीर्थ ( ३१ ); ७४. निम्बेश्वर ( २७५ ); ७५. पंचपिंडागौरी ( १३० ); ७६. पंचपिंडिकागौरी ( १७६;१७८ ); ७७. पादुका ( ८९ ); ७८. पितृकूपिका ( १९.२५-३२ ); ७९. पुष्करत्रय ( १७९ ); ८०. पुष्पादित्येश्वर ( १५५–१५६; १६१ ); ८१. बालमण्डन तीर्थ ( शक्रतीर्थ-शक्रेश्वर; १९; २०; २०६ ); ८२. बालसख्य तीर्थ ( २१.८४ ); ८३. ब्रह्मकुण्ड ( ९२ ); ८४. ब्राह्मणीतीर्थ ( १९८ ); ८५. भट्टिका तीर्थ ( ११७ ); ८६. भृङ्गीरीटभैरव ( १५१;२२९ ); ८७. भ्रूणगर्ता ( ५३ ); ८८. ( कुहरवासी ) मण्डणेश्वर ( २६६.३ ); ८९. महाकालेश्वर ( ४७ ); ९०. महालक्ष्मी ( ८५ ); ९१. माहिका-माहीतीदेवी ( १६१.१२–४; २७५ ); ९२. मिष्टान्नदेश्वर ( १४१ ); ९३. मुखार तीर्थ ( १२४ ); ९४. मृगतीर्थ ( २३ ); ९५. यक्ष्मतीर्थ ( १९० ); ९६. यज्ञभूमि ( ७५ ); ९७. ययातीश्वर ( ३९ ); ९८. याज्ञवल्क्याश्रम ( १२९ ); ९९. याज्ञवल्क्येश्वर ( १७५ ); १००. रक्तशृङ्ग ( ७.११–३१ ); १०१. रत्नादित्य ( २१२ ); १०२. राजवापी ( ९६.५; ९८.१४ ); १०३. राजस्वामी ( ९८ ); १०४. रामह्रद ( ६७–६९ ); १०५. रामेश्वर ( ९९. १२० ); १०६. रुद्रकोटि ( ५२.१३ ); १०७. रुद्रशीर्ष ( ७८ ); १०८. रुद्रावर्त ( ५२.२० ); १०९. रूपतीर्थ ( १५३;१८२ ); ११०. रैवतेश्वर ( ११८ ); १११. लक्ष्मणेश्वर ( १०२ ); ११२. लवेश्वर ( १०४ ); ११३. लोहयाष्टि ( ९४ ); ११४. वटिकेश्वर ( १४७ ); ११५. वसिष्ठकुण्ड ( १२८.२४ ); ११६. वसोर्धारा ( ९०.७९–८२ ); ११७. वातकेश्वर क्षेत्र ( २६९ ); ११८. वापी ( ५२.४ ); ११९. वालखिल्याश्रम ( ७९ ); १२०. विजयाकुण्ड ( १५४ ); १२१. विदुरेश्वर ( ५९ ); १२२. विश्वामित्र ( २१२–२१३ ); १२३. विष्णुकूपिका ( १०३ ); १२४. विष्णुपदी गंगा ( २५ ); १२५. विष्णुपदी तीर्थ ( २४ ); १२६. विश्वामित्रेश्वर ( ४४.१९९.५७ ); १२७; शक्ति ( आंब वृद्धा; आम्ना; माहल्या– महत्ता; चमत्कारी; ७१.३२ ); १२८. शक्रतीर्थ ( १९९.५८ ); १२९. शङ्खतीर्थ ( ११; –१३; १६९.७;२११ ); १३०. शङ्खादित्य ( २०९ ); १३१. शङ्खेश्वर ( १६९ ७;१९९.५५ ); १३२. शतानन्देश्वर ( २०८ ); १३३ शर्मिष्ठातीर्थ ( ५७.२२;६२ ); १३४. शाकम्भरी ( १६४ ); १३५ शिवगङ्गा ( ५८ ); १३६. शुक्रतीर्थ ( १२३ ); १३७. शूद्रकेश्वर ( ६६.५९ ); १३८. शूद्रीतीर्थ ( १९८ ); १३९. सप्तर्ष्याश्रम ( ३२ ); १४०. सप्तविंशतिकादेवी ( ८६ ); १४१. सरस्वती तीर्थ ( ४६ ); १४२. सत्यसन्धेश्वर ( १२६ ); १४३. साम्बादित्य ( ५६; २१३ ); १४४. सारस्वतहृद ( ४०.६४ ); १४५. सिद्धक्षेत्र ( ५२.७ ); १४६. सिद्धेश्वरतीर्थ ( २९.२६७ ); १४७. सुपुत्रकुण्ड ( १२८.२९ ); १४८. सुवर्णाख्यतीर्थ ( ८०–८४ ); १४९. सुवर्णेश्वर ( ८२ ); १५०. सोमनाथ ( ६३;८७ ); १५१. सौभाग्य-

कूपिका ( १३३ ); १५२. हराश्रयवेदिका ( ७७ ).

उपरोक्त तीर्थांपैकी 'हाटकेश्वर मंदिर', 'अचलेश्वर मंदिर', 'शंखतीर्थ' आदि काही मोजकीच तीर्थस्थाने आज आढळतात. स्कंद पुराणाच्या रचनाकाली ( इ. स. ५ वे शतक ) ही सारी तीर्थे अस्तित्वात असावीत.

**शिलालेख साहित्यात**—निम्नलिखित मध्ययुगीन शिलालेखात या नगराचा निर्देश आढळतो:— १. सोळंकी राजा कुमारपाल याचा इ. स. १२०८ चा शिलालेख—या नगराभोवती एक खंदक बांधल्याचा निर्देश ( एपि. इंडि. १. २९५–२९९ ). २. परमार राजा श्रीहर्ष ( सीयक ) याचा वि. सं. १००५ चा दानलेख ( एपि. इंडि. १९.२४३ ). ३. वाघेल राजा सारंगदेव याचा शिलालेख ( गुजरात शिलालेख. ३.९७; १०१ ).

सोळंकी राजे कुमारपाल आणि कर्ण ( प्रथम ) यांच्या शिलालेखात या नगराचा निर्देश अनुक्रमे 'श्री आनंद नगर' आणि 'श्रीमत् आनंदपुर' नावांनी आढळतो ( भावनगर शिलालेख क्र. १८४; एपि. इंडि. १.३१७ ).

देवायु नामक ब्राह्मण घराण्याचा इतिहास सांगणाऱ्या इ. स. १२१६ मधील प्रभासपट्टण शिलालेखामध्ये या गावाचा निर्देश 'नगर' नावाने आढळतो. या गावच्या तोरण प्रवेशद्वाराच्या एका स्तंभावर इ. स. ११५२ चा वडनगर प्रशस्तिलेख आढळतो.

**जैन केंद्रस्थान**—जैन 'कल्पसूत्रां'चा कर्ता भद्रबाहु हा आनंदपुर येथील ध्रुवसेन ( द्वितीय ) ( इ. स. ५ वे शतक ) राजाच्या दरबारी होता. स. ४४१ मध्ये 'कल्पसूत्र' ग्रंथाची रचना त्याने केली ( डॉ. स्टीव्हन्सन, कल्पसूत्र प्रस्तावना ). या ग्रंथाच्या टीकाग्रंथमते स. ४५४ मध्ये ध्रुवसेनाचा पुत्र वीरसेन मृत झाल्यानंतर त्यास शांती मिळावी म्हणून या ग्रंथाचे पठण करण्यात आले होते ( जै. गु. १८–१९ ).

**विद्याकेंद्र**—ऋक्प्रतिशाख्य आदि वैदिक ग्रंथांचा भाष्यकार उवट ( इ. स. ११ वे शतक ), तसेच मल्लदेव, लक्ष्मीधर, विनायक, अनंतदेव, चंदु पंडित, नारायण आदि संस्कृत ग्रंथकार या गावचे निवासी होते.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते वलभी ( आधु. वला ) नगरापासून १४० मैल वायव्येस गेल्यानंतर ह्युएन्त्संग 'अ–नन्–तो–पु–लो' ( आनंदपुर ) नगरास पोहोचला. या नगराचे क्षेत्रफळ ४ मैल असून आनंदपुर देशाचे ( बनास आणि साबरमती नद्यांच्या दरम्यानचा त्रिकोणी प्रदेश ) क्षेत्रफळ ४०० मैल होते. हा देश मालव ( आधु. खेडा आणि अहमदाबाद जिल्हे ) देशाचा मांडलिक असून, येथील पीकपाणी, भाषा आणि लोक मालव देशाप्रमाणेच होते. या देशामध्ये दहाहून अधिक बौद्धमठ असून, त्यामध्ये हीनयान पंथाच्या सम्मतीय संप्रदायाचे १००० बौद्ध भिक्षू होते.

या देशाहून १०० मैल पश्चिमेस गेल्यानंतर ह्युएन्त्संग् सुराष्ट्र ( आधु. सौराष्ट्र ) देशास पोहोचला ( वॉटर्स, २.२४८–२४९ ).

**ऐन्–इ–अकबरीमध्ये**—या ग्रंथमते या गावी ३०० मंदिरे होती.

२. वलभी राजा शिलादित्य ( सप्तम ) याच्या इ. स. ७६६ च्या अलीना ताम्रपटमते पश्चिम भारतातील एक नगर ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.१७३ ). खेडापासून २१ मैल आग्नेयेकडील आधु. आनंद हे तालुक्याचे गाव ते हेच होय.

धरसेन ( द्वितीय ) राजाच्या मलिय ताम्रपटात, तसेच कटच्चुरि राजा बुद्धराज याचे इ. स. ६०९ च्या सरसवणी ताम्रपटातहि या नगराचा निर्देश आढळतो ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.५३ ).

३. ( तीर्थ ) वाराणसी येथील एक तीर्थ ( कूर्म. पू. ३५.१५; पद्म. आदि. ३७.१८. )

**आनन्दभैरव** ( देवता )—अवंती येथील एक देवतास्थान ( स्कन्द. आवन्त्य. अ. ६८.५ ).

**आनन्दवन** ( नगर )— स्कंद पुराण आणि मराठी गुरुचरित्रमते 'काशी' नगराचे नामांतर ( काशी पहा ).

**आनन्दा** ( नदी )—गौतमी ( गोदावरी ) माहात्म्यमते एक नदी ( ब्रह्म. १२८.७३ ).

**आनन्दी** ( नदी )—धर्मारण्यातील एक नदी ( स्कन्द. ब्राह्म. ध. ३९.४८;१४९ ).

**आनन्दी-बन्दी** ( देवी )—व्रजमंडलातील एक देवीस्थान ( ती. पृ. १०५ ).

**आनन्दूरु**—शिलालेख साहित्यमते 'आनंदूरु ३००' राज्यविभागाचे प्रमुख गाव. अक्कलकोटपासून २० मैल उत्तरेकडील उस्मानाबाद जिल्ह्यातील आधु. आनंदूरु हे तालुक्याचे गाव ते हेच होय ( एपि. इंडि. २७. ७१ ).

**आनन्देश्वर** ( लिंग )—अवंती येथील ८४ शिवलिंगांपैकी एक ( स्कन्द. आवन्त्य. अ. ३१. १० ).

२. अर्बुदारण्यातील सरस्वती नदीकाठचे एक शिवलिंगस्थान. येथे कूष्मांड मुनींचा आश्रम होता ( स्कन्द. प्रभास. प्र. ३५.८८ ).

३. नर्मदा नदीच्या दक्षिण किनाऱ्यावरील एक शिव-

लिंगस्थान. हे रावेरपासून २ मैलांवर आहे ( ती. पृ. ४३२).

**आनर्न्दीया** ( ग्राम )—धर्मारण्यातील एक ग्राम ( स्कन्द. ब्रह्म. ध. ३९.२९ ).

**आनर्त** ( देश )—पश्चिम भारतातील सुविख्यात देश. आधु. उत्तर काठेवाड ( हालार प्रदेश ) आणि उत्तर गुजरात मिळून हा देश बनला होता. पौराणिक काळी या देशाची राजधानी द्वारका येथे, आणि मध्ययुगीन काळी उत्तर गुजरातमधील आनंदपुर ( आधु. वडनगर ) येथे होती.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशात निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. महाभारत ( भी. १.५० ) | आनर्तनैर्ऋत |
| २. पद्मपुराण ( आदि. ६.४६ ) | आनर्तनैर्ऋत |
| ३. भागवत ( १ १०.३५ ) | द्वारका |
| ४ भविष्यपुराण ( प्रति. १.७ ४ ) | आनर्तमंडल |
| ५. वायुपुराण ( ८६.२४ ) | आनर्त |

**भौगोलिक स्थान**—काही अभ्यासकांच्या मते पौराणिक आणि मध्ययुगीन आनर्त देश हे भौगोलिकदृष्ट्या विभिन्न होते. उत्तर काठेवाडच्या पश्चिम टोकानजिकच्या समुद्रकिनारीच्या द्वारका गावाच्या परिसरातील प्रदेश पौराणिक काली आनर्त म्हणून प्रसिद्ध असून मध्ययुगीन काली उत्तर गुजरातमधील आनंदपुर गावाच्या परिसरातील प्रदेश आनर्त नावाने सुविख्यात झाला ( बॉंबे. गॅझे. १.१.६ ). मध्ययुगीन आनर्त देशाच्या भौगोलिक सीमारेषा पुढीलप्रमाणे होत्याः— १. दक्षिणेस–मही नदी आणि लाट देश; २. पश्चिमेस–कच्छचे रण आणि काठेवाड प्रदेश; ३. उत्तरेस–अंबूचा पहाड; ४. पूर्वेस–माळवा देश ( डॉ. अळतेकर, इंडि. अँटि. स. १९२४; पृ. २ ).

अन्य काही अभ्यासकांच्या मते उत्तर काठेवाड द्वीपकल्पाचा भाग म्हणजेच आनर्त देश असून, दक्षिण काठेवाडमधील सुराष्ट्र देशापासून तो विस्तीर्ण जंगलमय पर्वतश्रेणीने विभाजित झाला होता ( अत्री, पुराणाज़्. पृ. १४६ ).

**सीमारेषा**—डॉ. सांकलिया यांच्या मते आनर्त देशान्तर्गत उत्तर काठेवाड आणि उत्तर गुजरात हे उपविभाग इतिहासाच्या विभिन्न काली कमीअधिक महत्त्व पावले असले तरी भौगोलिक आणि सांस्कृतिकदृष्ट्या हे दोन उपविभाग मिळूनच प्राचीन आनर्त देश बनला होता. त्यांच्या मते संयुक्त आनर्त देशाच्या भौगोलिक सीमारेषा पुढीलप्रमाणे होत्या :— १. दक्षिणेस–खेडा; २. पश्चिमेस–द्वारका; ३. उत्तरेस– पालनपुर अथवा वडनगर ( प्राचीन आनंदपुर ).

**तीन उपविभाग**—पौराणिक साहित्यात, तसेच अशोकाच्या शिलालेखात आधु. गुजरात देशातील आनर्त, सुराष्ट्र आणि लाट या तीन देशांचा निर्देश आढळतो. त्यापैकी सुराष्ट्र आणि लाट देश अनुक्रमे आनर्त देशाच्या ( उत्तर काठेवाड आणि गुजरात ) दक्षिणेस दक्षिण काठेवाड आणि दक्षिण गुजरातमध्ये होते. अशोकाच्या राज्यकाली ( इ. स. पू. ३०० ) आनर्त, सुराष्ट्र आणि लाट या तीन उपविभागांनी बनलेला सारा गुजरात देश मौर्य साम्राज्यात समाविष्ट असून, त्यापैकी सुराष्ट्र देशावर यवन तुषास्प हा राजप्रतिनिधी ( राष्ट्रीय ) म्हणून काम करीत होता. यावरून पौराणिक काळाप्रमाणेच अशोककालीहि आनर्त, सुराष्ट्र आणि लाट हेच तीन प्रमुख उपविभाग दिसतात.

गौतमी बलश्रीच्या नासिक शिलालेखात समस्त काठेवाड देशास 'सुरथ' ( सुराष्ट्र ) म्हटले आहे ( एपि. इंडि. ८.६१ ). परंतु हा एक अपवाद वगळला तर अन्य शिलालेख साहित्यात सर्वत्र काठेवाड देशाचे आनर्त आणि सुराष्ट्र असे दोन स्वतंत्र भाग कल्पिलेले दिसतात ( उदा.–रुद्रदामनाचा जुनागढ शिलालेख, ल्यूडर्स सूची. क्र. ९६५ ).

या देशाची राजधानी द्वारका ही रैवतक ( आधु. गिरनार ) पर्वताच्या पायथ्याशी होती. यावरून आधु. जुनागढ राज्याचा काही भाग आनर्तमध्ये आणि काही भाग सुराष्ट्रमध्ये समाविष्ट असावा ( आय्. एच्. क्यू. १०. ५४१ ).

**नामव्युत्पत्ती**—या देशाच्या 'आनर्त' नावाची व्युत्पत्ती प्राचीन साहित्यात निम्न प्रकारे दिली आहे :

**१. आनर्त राजाचा देश**—हरिवंशमते वैवस्वत मनूचा पौत्र आणि शर्याति राजाचा पुत्र आनर्त याचे नावावरून या देशास हे नाव प्राप्त झाले. कालांतराने कृष्णाने येथे आपले राज्य स्थापिले ( ह. वं. १.१०.३१; २.३७.३२; ३९ ).

**२. अनार्यांचा देश**—अन्य अभ्यासकांच्या मते 'आनर्त' हे देशनाम 'अनृत' ( = ऋतविरोधी = आर्यविरोधी ) नामापासून व्युत्पन्न झाले असून, 'अनार्यांचा देश' अशा अर्थाने या देशास हे नाव प्राप्त झाले होते ( आनंदशंकर ध्रुव, पृ. ४१ ). येथील लोकांच्या 'नैर्ऋतः' या उपाधीचा वैकल्पिक अर्थहि 'दस्यु' अथवा 'राक्षस' असा होतो.

**३. नैर्ऋत्येकडील देश**—बृहत्संहितेत या लोकांचा निर्देश 'नैर्ऋत' ( नैर्ऋत्येकडील ) म्हणून केला असून ( बृ. सं. १४.

१७; ३३; १६.३१; मार्कं. ५५.३० ), 'नैर्ऋत्येकडील देश' अशा अर्थाने त्यास 'आनर्त' नाव प्राप्त झाले असावे.

**४. नर्तकांचा देश**—मेदिनी कोशात 'आनर्त'चा शब्दशः अर्थ 'नृत्यशाला' दिला असून हा देश नृत्यकलेसाठी प्रसिद्ध असल्याचे अनेक निर्देश महाभारत, हरिवंशात आढळतात. शाल्वाच्या या देशावरील आक्रमणसमयी वृष्णि–अंधक सैनिकांच्या मनोरंजनासाठी आनर्त देशातील नट, नर्तक, गायक कृष्णाने पाठविले होते ( म. आर. १५.१२–१३ ). अर्जुनाच्या प्रथम वनवाससमयी त्याच्या स्वागतार्थ या देशातील रैवतक पर्वतावर नृत्यगायनाचा कार्यक्रम श्रीकृष्णाने आयोजित केला होता ( म. आ. २१०.१० ). हरिवंशमते प्रभावती–प्रद्युम्न विवाहाख्यानात निर्देशिलेला भद्र नामक नाट्यमहर्षि या देशातील वज्रपुर गावचा रहिवासी होता ( ह. वं. १.९.१–२ ).

**पाणिनीच्या अष्टाध्यायीत**—या ग्रंथमते या देशाचे रहिवासी 'आनर्तक' नावाने सुविख्यात होते ( पा. सू. ४.२.१२७ ).

**पौराणिक साहित्यात**--या साहित्यमते हा अपरांत ( पश्चिम भारतातील ) देश होता ( ब्रह्माण्ड. १६.६२; मत्स्य. ११४.५१ ).हा पश्चिम भारतात असल्याचा सुस्पष्ट निर्देश काव्यमीमांसेत आढळतो ( काव्यमी. १७.२२७ ). मात्र बृहत्संहितेतील कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या वर्णनात यास नैर्ऋत्येकडील देश म्हटले आहे ( बृ. सं. १४.१७; ३३; १६.३१; मार्कं. ५५.३० ).

वायुमते हा दक्षिण भारतात होता ( वायु. ४५.१३१ ). युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञासमयीच्या उत्तर दिग्विजयात अर्जुनाने हा देश जिंकला होता ( म. स. २३.१४ ).

ज्या तापी नदीच्या जलसंचय प्रदेशात हा देश होता, तो प्रदेश बहुतांशी साऱ्या पुराणात अपरांत देशाचा भाग मानला आहे. मत्स्य आणि वायु पुराणात मात्र हा विशिष्ट प्रदेश दक्षिणापथमध्ये समाविष्ट केला आहे. त्यामुळे हा देश कधी अपरांतमध्ये तर कधी दक्षिणापथमध्ये असल्याचे परस्परविरोधी निर्देश पौराणिक साहित्यात आढळत असावेत ( दक्षिणापथ पहा ).

श्रीकृष्णाच्या आधिपत्याखालील देश म्हणून महाभारतात याचा अनेक वेळा निर्देश आढळतो ( म. आर. १४.१४; २३.४० ). त्याचे काळी हा सारा देश 'द्वारका' या वैकल्पिक नावाने ओळखला जात असे ( म. आर. १६.२९ ). पांडवांची राजधानी इंद्रप्रस्थ आणि कृष्णाची राजधानी द्वारका यांच्या मार्गावर हा देश असल्याने पौराणिक काळी यास विशेष महत्त्व प्राप्त झाले होते ( भा. १.१०.३५; १०.७१. २१ ). स्कंदमते या देशात विभिन्न ऋषी-महर्षींचे आश्रम असून, तेथे अहोरात्र वेदपठण चालू असे ( स्कन्द. प्रभास. १.५–६ ).

**शिलालेख साहित्यात**--रुद्रदामनाच्या जुनागढ शिलालेखात श्वभ्र, भारुकच्छ आणि सुराष्ट्र देशांसमवेत याचा निर्देश आढळतो ( ल्यूडर्स सूची. क्र. ९६५ ). यावरून गुजरात देशाचे हे चार स्वतंत्र विभाग असल्याचे दिसते.

**मध्ययुगीन शब्दकोशसाहित्यात**—या साहित्यात 'आनर्त' गुजरात देशाचे नामांतर मानले आहे ( मेदिनी. ६४.९१; नानार्थ. ९.६; शब्दरत्न. १३७.१६; मंख. २३.३१५ ). यावरून काठेवाड वगळून उरलेला गुजरात देश मध्ययुगीन काली 'आनर्त' नावाने ओळखला जात असावा.

**राजधानी**—काठेवाडच्या पश्चिम टोकावरील समुद्रकाठच्या रैवतक ( आधु. गिरनार ) पर्वताच्या पायथ्यानजिकच्या द्वारका ( द्वारवती, कुशस्थली ) गावी या देशाची राजधानी होती ( ह. वं. २.५५.१२; ५६; पार्गि. मार्कं. ३४० ). उत्तरकालात या देशाची राजधानी उत्तर गुजरातमधील आनंदपुर ( आधु. वडनगर ) गावी स्थलांतरित झाली ( आनंदपुर पहा ).

**नगरे**—या देशातील अन्य प्रमुख नगरे पुढीलप्रमाणे होतः– १. भूद्वर ( स्कन्द. वैष्णव. ७.३२ ); २. चंपकनगर ( आधु. चंपानेर ); ३. अनहिलपट्टण ( आधु. पाटण ); ४. कर्णावती ( आधु. अहमदाबाद ); ५. स्तंभतीर्थ ( महीनगर = आधु. खंबायत ) ( कर्णावती–खंबायत इतिहास, पृ. १४ ).

२. ( तडाग ) हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक तलाव. स्कंदमते हा आनर्तेश्वर शिवलिंगानजिक होता ( स्कन्द. नागर. १०३.८ ).

**आनर्तनैर्ऋत**—( देश ) पश्चिम भारतान्तर्गत 'आनर्त' देशाचे नामांतर ( म. भी. १०.५०; पद्म. आदि. ६.४६; आनर्त १. पहा ).

**आनर्तपुर** ( नगर )—उत्तर गुजरातमधील 'आनंदपुर' ( आधु. वडनगर ) नगराचे त्रेतायुगातील नामांतर ( बॉंबे. गॅझे. १.६; आनंदपुर पहा ).

**आनर्तपुरी** ( नगर )—भागवतमते 'द्वारका' नगरीचे नामांतर ( भा. १.१४.२५; द्वारका पहा ).

**आनर्तमण्डल** ( देश )—भविष्यमते पश्चिम भारतातील आनर्त देशाचे नामांतर ( भवि. प्रति. १.७.४; आनर्त १. पहा ).

**आनर्तेश्वर** (लिंग)—हाटकेश्वरक्षेत्रातील एक शिवलिंग ( स्कन्द. नागर. ६५.२ ).

**आनर्त्तपुर** ( नगर )—पौराणिक साहित्यमते गुजरात मधील 'आनंदपुर' ( आधु. वडनगर ) नगराचे नामांतर ( डे, पृ. ६; आनंदपुर पहा ).

**आनवे** ( ग्राम )—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थस्थान ( स्थान. पृ. ४५ ). औरंगाबाद जिल्ह्यातील पिंपळगाव रेणुका गावाच्या ८ मैल पश्चिमेकडील आणि भोकरधन गावाच्या १० मैल उत्तरेकडील आधु. आनवे ग्राम ते हेच होय.

**आनार्त** ( देश )—वायुमते पश्चिम भारतातील 'आनर्त' देशाचे नामांतर ( वायु. ८६.२४; आनर्त १. पहा ).

**आनीकट** ( देश )—मार्कंडेयमते दक्षिण भारतातील 'कालीकट' ( आधु. कालीकत ) देशाचे नामांतर ( कालीकट पहा ).

**आनुष** ( तीर्थ )—वाराणसी येथील एक तीर्थस्थान ( कूर्म. पूर्व. ३५.३ ). नामांतर—'आर्षभ'.

**आनुसूयेश्वर** ( लिंग )—काशी येथील एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ९७.२१ ).

**आनेमलै** ( पर्वत )—शिलालेख साहित्यमते दक्षिण भारतातील एक पर्वत. विष्णुवर्धन होयसाळ राजाच्या स. ११२२ च्या शिलालेखमते त्याच्या राज्याची दक्षिण सरहद्द या पर्वताने बनली होती ( एपि. कर्ना. ५.१०२ ). त्रावणकोर टेकड्यांच्या उपशाखाभूत आधु. अनमले टेकड्या म्हणजे हा पर्वत होय ( इंपि. गॅझे. १.१९० ). नामांतर —'अगस्त्यमले' ( अगस्त्यमले पहा ).

२. ( नृसिंहस्थान ) मद्रास राज्यातील एक नृसिंहस्थान. हे मदुरेपासून ६ मैल ईशान्येस आहे. 'आनेमले' चा शब्दशः अर्थ 'हस्तिगिरि' असा होतो. या मंदिरानजिकच्या हत्तीच्या आकाराच्या पर्वतामुळे त्यास हे नाव प्राप्त झाले ( ती. पृ. ३८६ ).

**आन्तरनर्मद** ( देश )—पश्चिम भारतातील एक देश ( ब्रह्माण्ड. १६.६१ ). हे संभवतः 'अंतर्नर्मदा' देशाचे नामांतर असावे ( अंतर्नर्मदा पहा ).

**आन्तरी** ( जैन तीर्थस्थान )— ज्ञानसागरमते बागड देशातील एक जैन तीर्थस्थान. स. १६३० च्या शत्रुंजय शिलालेखमते येथील नौतनभद्र मंदिराचा जीर्णोद्धार भोज राजाने केला. भट्टारक नरेंद्रकीर्तीने रणमल्ल राजाच्या ( १३४५–१४०३ ) साह्याने येथील शांतिनाथ मंदिराचा जीर्णोद्धार केला होता ( भट्टारक संप्रदाय. पृ. २५९; ती. सं. पृ. १२० ).

**आन्तर्द्वीपिन** ( देश )—उत्तर भारतातील एक देश ( बृ. सं. १४.२५ ).

**आन्ध्र** ( देश )—मध्ययुगीन शिलालेख साहित्यमते दक्षिण भारतातील 'अंत्र' देशाचे नामांतर ( अंध्र १. पहा ). अन्य नामांतर ( महाभारत )—'आंध्रक'.

२. पश्चिम आशिया खंडाच्या पश्चिम भागातील एक देश. हा मेरुपर्वतोद्भवा पश्चिम दिशानुगामी चक्षु नदीच्या काठी होता.

**आन्यौर** ( पर्वत )—मथुरा–वृंदावन येथील व्रजमंडल–परिक्रमेतील एक पवित्र पर्वत. येथे श्रीवल्लभाचार्यांची बैठक, तसेच केसरीकुंड, गंधर्वकुंड, गोविंदकुंड आदि तीर्थस्थाने आहेत ( ती. पृ. १०१ ).

**आपगा** ( नदी )—महाभारत आणि पौराणिक साहित्य-मते कुरुक्षेत्रातील 'आपया' नदीचे नामांतर ( आपया पहा ).

२. महाभारतान्तर्गत शल्य-कर्ण संवादमते पंजाबातील एक नदी. मद्र देशातील शाकल ( आधु. सियालकोट ) या राज-धानीच्या गावाजवळून ही वहात असे ( म. क. ३०.१४ ). कनिंगहॅम यांच्या मते सियालकोट या ईशान्येकडील जम्मू टेकड्यांमध्ये उगम पावून रावी नदीच्या पश्चिमेस वाहणारी, आणि चिनाब ( प्राचीन चंद्रभागा ) नदीस मिळणारी आधु. अयक नदी ती हीच होय ( कनिंग., पृ. १८५ ).

३. नीलमतमते काश्मीरातील वितस्ता ( आधु. झेलम ) नदीची एक उपनदी ( नीलमत. १५४८ ).

**आपन** ( नगर )—बौद्ध साहित्यमते मगध देशातील ( आधु. दक्षिण बिहार ) एक व्यापारी नगर. प्राचीन उत्तर आणि दक्षिण बिहार यांना जोडणारे हे व्यापारी गाव आधु. पूर्णिय अथवा सहर्स जिल्ह्यात गंगा नदीच्या उत्तरेस कोठेतरी वसले असावे.

**नामव्युत्पत्ती**—'आपन' चा शब्दशः अर्थ 'बाजार' असा होतो. बुद्धघोषाच्या मते या गावी २० हजार बाजार असल्याने त्यास 'आपन' ( संस्कृत–'आपण' ) नाव प्राप्त झाले ( मज्झिम. अट्ठ. २.५८६ ).

**बौद्ध साहित्यात**—संयुत्त निकायमते हे अंग देशात होते ( संयुत्त. ५.२२५ ). मज्झिम निकाय आणि थेर गाथामते अंग देशाच्या अंगुत्तराप नामक देशविभागात हे होते ( मज्झिम. १.३५९; ४४७; २.१४६; थेर. पृ. ३१० ).

**आपया** ( नदी )—वैदिक आणि पौराणिक साहित्य, तसेच महाभारतमते कुरुक्षेत्रातील एक नदी. ऋग्वेदमते ही

सरस्वती आणि दृषद्वती यांच्या दरम्यान वहात असे ( ऋ. ३.२३.४ ). आधुनिक काळी सरस्वती नदीप्रमाणेच ही नदीहि शुष्क झाली असून आपगा सरोवरात ती रूपांतरित झाली आहे. मूळ नदीचा प्रवाह बंद झाल्यानंतर साचलेल्या पाण्याचा हा जलाशय बनला असावा. नामांतर ( महाभारत, पौराणिक साहित्य )–' आपगा '.

**भौगोलिक स्थान**—या नदीच्या भौगोलिक स्थानाविषयी अभ्यासकांत निम्नलिखित मतांतरे आढळतातः—

**१. झीमर यांच्या मते**—ही सरस्वती नदीची उपनदी असून आधु. थानेसर गावाच्या पश्चिमेस वहाणारी आधु. इंद्रमती नदी ती हीच होय ( अल्टि. लेबेन. १८ ).

**२. लुडविग् यांच्या मते**—गंगा नदीचेच हे नामांतर असावे ( लुडविग्, ऋग्वेद अनुवाद. ३.२०० ).

**३. पिशेल यांच्या मते**--महाभारतात निर्देशिल्याप्रमाणे ही कुरुक्षेत्रातीलच नदी असावी ( वेदिशे स्टूडियेन. २.२१८ ).

**४. थॉमस यांच्या मते**—महाभारतात निर्देशिलेल्या ओघवती ( आधु. मार्कंडा ) नदीचेच हे नामांतर असावे ( जे. आर. ए. एस् . १५.३६२; ओघवती पहा ).

आपया नदी ही कुरुक्षेत्रातील सरस्वती नदीची आधुनिक काळी शुष्क झालेली उपनदी असल्याचे झीमर यांचे अनुमान यथायोग्य वाटते.

**महाभारतात**—महाभारतान्तर्गत कुरुक्षेत्रमाहात्म्यमते आपया ही कुरुक्षेत्रातील सात ( नऊ ) पवित्र नद्यांपैकी एक असून ( म. आर. ८१.५५; १५४; वामन. ३४.७; ३६. १–४; पद्म. आदि ३६.१–६ ), तिच्या काठी ब्राह्मणभोजन घालणे पुण्यप्रद मानले जात असे.

**पौराणिक साहित्यात**—नारदमते कुरुक्षेत्रातील ही महानदी ' मानुषतीर्था 'पासून एक कोस अंतरावर होती ( नारद. उत्तर. ६५.५८ ). पद्म पुराणातील तीर्थनामावलीमध्ये या नदीचा ( पद्म. आदि. २६. ६३ ), तसेच ' आपगातीर्था 'चा ( पद्म. आदि. २७.६४ ) निर्देश आढळतो.

**आपव वसिष्ठ-आश्रम** ( आश्रमस्थान )—योगवासिष्ठ रामायणमते आपव वसिष्ठ ऋषींचे हिमालय पर्वतातील आश्रमस्थान ( यो. वा. १ ). हे स्थान दग्ध करणाऱ्या हैहय राजा कार्तवीर्य अर्जुनाला आपव वसिष्ठांनी शाप दिला होता ( वायु. ९४.३९–४७ ).

**आपस्तम्ब** ( तीर्थ )—गौतमी ( गोदावरी ) नदीकाठचे एक तीर्थस्थान ( ब्रह्म. १३०.१ ).

**आपस्तम्बेश्वर** ( लिंग )—काशी येथील एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ९७.१५७ ).

**आपेगाव** ( ग्राम )—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील गोदावरी नदीकाठचे महानुभावपंथीय तीर्थस्थान ( स्थान. पृ. ५२ ). औरंगाबाद जिल्ह्यातील पांचाळेश्वर ग्रामानजिकचे आधु. आपेगाव खुर्द ते हेच होय.

**आप्यायन** ( वर्ष )—शाल्मलिद्वीपातील एक देशविभाग ( भा. ५.२०.९ ).

**आप्रीत** ( लोकसमूह )— पाणिनीच्या गणपाठमते वायव्य भारतातील एक लोकसमूह ( पा. सू. ४.२.५३ ). वायव्य सरहद्द प्रांतातील आधु. अफ्रीडी लोक ते हेच होत. हे लोक सिंधु नदीच्या पश्चिमेकडील आणि काबुल नदीच्या दक्षिणेकडील ' अफ्रीडी तीरा ' प्रदेशात निवास करतात. या लोकांच्या उत्तरेस स्वात आणि कुणार नद्यांच्या दुआबात मोहमंद ( प्राचीन मधुमत ) लोक राहतात. ग्रियर्सन् यांच्या मते आधु. अफ्रीडी लोक आजहि स्वतःच्या नावाचा उच्चार ' अप्रीदी ' असाच करतात ( लिंग्विस्टिक सर्व्हे. १०.५ ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या लोकांची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. ऋग्वेद ( ५.२५.१४ ) | अपरीत |
| २. वायुपुराण ( ४५.११५ ) | अपरीत |
| ३. हिरोडोटस् शिलालेख | अपरिताइ |
| ४. पतंजलीचे व्याकरण महाभाष्य ( १.४.१ ). | त्रीरावतिक |
| ५. काशिका | आप्रीतक |

**अग्रवाल यांच्या मते**—पतंजलीच्या महाभाष्यात निर्देशलेल्या त्रीरावतिक देशात हे लोक निवास करीत असत ( पतञ्जलि. १.४.१ ). ' कुभा ( आधु. काबुल ), वरा ( आधु. बारा ), आणि सिंधु या तीन नद्यांच्या दरम्यानचा प्रदेश ' अशा अर्थाने त्यास हे नाव प्राप्त झाले होते (.अग्रवाल, पाणिनि. पृ. ४६५, त्रीरावतिक पहा ). काशिका ग्रंथमते आप्रीत लोक आप्रीतक देशामध्ये निवास करीत असत.

**आप्सरस** ( कुंड )—मथुरा येथील पवित्र कुंड ( वराह. १६४.२० ).

२. ( सरस् ) वृंदावनातील एक सरोवर ( नारद. उत्तर. ८०.७२ ).

**आवकाण** ( लोकसमूह )--बृहत्संहितामते वायव्य भारतातील ' अवगन ' ( आधु. अफगाण ) लोकसमूहाचे नामांतर ( अवगन पहा ).

**आवुयग्राम** ( पर्वत )--सोळंकी राजा भीम ( द्वितीय ) च्या स. १२०९ च्या शिलालेखमते पश्चिम भारतातील ' अर्बुद ' ( आधु. अबू ) पर्वताचे नामांतर ( एपि. इंडि. ८.२२२; अर्बुद पहा ).

**आव्रवन्ती** ( देश )—वाल्मीकि रामायणमते ' पूर्व-अवंती ' ( आधु. पूर्व माळवा ) देशाचे नामांतर ( वा. रा. कि. ४१.१०; अवंती पहा ).

**आभरण** ( नद )--जंबूद्वीपातील एक नद ( भा. ५.१६.२४ ).

**आभासतल** ( पाताल )—विष्णुधर्ममते सप्तपातालांपैकी तृतीय पाताल ( विष्णुधर्म १.४.२२ ).

**आभीर** ( लोकसमूह )—महाभारतमते उत्तर भारतातील एक लोकसमूह ( म. भी. १०.६६ ). आभीर लोकांची भारतातील प्राचीनतम वसाहत ( इ. स. पू. २ रे शतक ) पंजाबातील हिस्सार जिल्ह्यातील आधु. सिर्सा गावाच्या परिसरात घग्गर नदीच्या शुष्क होण्याच्या स्थानी असल्याचे अनुमान निघते. प्राचीन सरस्वती नदीकाठच्या वाळवंटी प्रदेशाच्या उत्तर भागात हे लोक निवास करीत असून, त्यांची ही वसाहत पूर्वेस ' विनशन ' तीर्थापासून पश्चिमेस पंचनदपर्यंत पसरली होती ( म. मौ. ८.४३–४५ ).

पंजाबातील या आद्य आभीर वसाहतीची एक पर्वताश्रयी शाखा पंजाबच्या उत्तरेकडील आणि पश्चिमेकडील टेकड्यांमध्ये पसरली होती. या वसाहतींचा निर्देश महाभारतात पारद, दस्यु आणि कश्मीर लोकांसमवेत आढळतो ( म. भी. १०.६६ ).

**महाभारतात**—या ग्रंथमते हे लोक मूळचे क्षत्रिय असले तरी परशुरामाच्या भयाने क्षात्रकर्तव्य सोडून उत्तरकालात पर्वताश्रयी, आचारभ्रष्ट, शूद्र आणि दस्यू बनले ( म. आश्व. २९.१६ पाठ ). शूद्र गणांच्या लोकांसमवेत हे लोक सरस्वती नदीकाठी मासेमारीच्या व्यवसायावर उपजीविका करीत असत ( म. स. २९.९ ). या लोकांच्या विद्वेषाने सरस्वती नदी ' विनशन ' क्षेत्री लुप्त झाली होती. पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यातहि शूद्र लोकांसमवेत या लोकांचा निर्देश आढळतो ( पतञ्जलि. १.२.३ ). एक उदीच्य लोकसमूह आणि जनपद म्हणून महाभारतात, तसेच पौराणिक साहित्यात या लोकांचा निर्देश आढळतो ( म. भी. १०.४५; पद्म. आदि. ६.४२; ब्रह्माण्ड १६.४६; मत्स्य. ११४.४०; मार्कं. ५४.३५; वायु. ४५.११५ ). द्वारकेच्या प्रलयानंतर यादव स्त्रियांसमवेत अर्जुन इंद्रप्रस्थास जात असता पंचनद प्रदेशातील आभीरांनी त्याचेवर हल्ला करून यादव स्त्रियांना पळवून नेले होते ( म. मौ. ८.५८ ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या लोकांची निम्नलिखित नामांतरे आढळतात:– १. टॉलेमी–अबिरिया; २. पेरिप्लस–अबेरीय; ३. बायबल–ओफिर; ४. वायु ( ४५.१२६ )–अभिर.

**आद्य वसतिस्थान**—डॉ. सरकार यांच्या मते आभीर लोक हे मूळचे वायव्य भारतातील हेरात आणि कंदाहार यांच्या दरम्यानच्या ' अबिरवन ' स्थानी राहाणारे लोक होते. सिंधु नदीच्या पश्चिमेस वायव्य भारतात हे लोक राहात असल्याचा निर्देश टॉलेमीच्या ग्रंथातहि आढळतो. शक लोकांसमवेत अथवा त्याआधी थोडे दिवस ( इ. स. पू. २ रे शतक ) हे भारतात आले, आणि पंजाबातील हिस्सार जिल्ह्यामध्ये आपली आद्य वसाहत त्यांनी स्थापिली ( आय्. एच्. क्यू. १.३०२ ).

**अन्य वसाहती**—उत्तरकालामध्ये भारताच्या उत्तर, पश्चिम आणि दक्षिणेकडील विभिन्न भागांमध्ये आभीर लोकांनी आपल्या वसाहती स्थापिल्याचे विभिन्न ग्रांथिक निर्देशांवरून दिसते. पूर्व भारतातील आभीर वसाहतींचा निर्देश मात्र आढळत नाही. कालानुक्रमे या वसाहती पुढीलप्रमाणे होत:—

**१. सिंध प्रांतात** ( इ. स. १ ले–२ रे शतक )—टॉलेमीच्या काळी या लोकांची वसाहत सिंधु नदीचे खालचे खोरे ( त्रिभुज प्रदेश ) आणि काठेवाड ( कच्छचे रण ) यांच्या दरम्यानच्या भूप्रदेशात होती. टॉलेमीच्या मते आभीरांची ही वसाहत सिंधु नदीच्या पूर्वेस ही नदी दुभंगून तिचा दुआब बनतो त्या स्थानी होती ( मॅक्रिन्डल, टॉलेमी. पृ. १३६; १४० ). सिंधु नदीच्या मार्गावरील ( ब्रह्माण्ड. १८.४८; वायु. ४७.४६; विष्णु. ५ ) पश्चिम भारतातील लोकसमूह म्हणून पौराणिक साहित्यात या लोकसमूहाचा निर्देश आढळतो ( ब्रह्म. १९.१७; विष्णु. २.३.१६ ). पांडवांच्या राजसूय यज्ञसमयी नकुलाने या लोकांना जिंकले असून युधिष्ठिरप्रीत्यर्थ हे लोक उपायन घेऊन उपस्थित होते ( म. स. ४७.१० पाठ ). भागवतमते द्वारका–इंद्रप्रस्थ मार्गावर ही वसाहत होती ( भा. १.१०.३५ ).

पौराणिक साहित्यमते आभीरांची ही वसाहत सिंधु

नदीच्या पूर्व किनाऱ्यावर सौवीर ( सिंध प्रांतातील आधु. रोहरी–खैरपुर प्रदेश ) देशाच्या दक्षिणेस होती. त्यावरून सिंधु नदीच्या त्रिभुज प्रदेशातील आधु. हैद्राबाद जिल्ह्याच्या पश्चिम भागात ती असावी ( अली, पुराणाज्. पृ. १४४ ). या प्रदेशात हे लोक मच्छिमारीचा व्यवसाय करीत असत.

२. गुजरात प्रांतात ( इ. स. १ ले–२रे शतक )—पेरिप्लसमते आभीर लोकांची एक वसाहत नैर्ऋत्य भारतात दक्षिण गुजरातमध्ये सुरतच्या परिसरात होती ( पेरिप्लस. पृ. ३९; १७५ ). नैर्ऋत्य भारतातील एक लोकसमूह म्हणून बृहत्संहितेमध्येहि या लोकांचा निर्देश आढळतो ( बृ. सं. १४.८ ). इलियट यांच्या मते भारताच्या पश्चिम किनाऱ्यावर नर्मदा नदीच्या मुखानजिक आग्नेय गुजरातमध्ये तापी नदी आणि देवगड यांच्या दरम्यान आभीर लोकांची ही वसाहत होती ( इलियट, ग्लॉसरी. १.२–३ ).

३. महाराष्ट्र आणि उत्तर कोकण प्रांतात ( इ. स. ३ रे शतक )—वात्स्यायन कामसूत्रकाली महाराष्ट्राच्या उत्तर कोकण प्रदेशामध्ये तापी नदीच्या दक्षिणेस आभीरांची एक वसाहत होती ( एन्. एच्. आय्. पी. ६.५१ ).

या प्रदेशातील आभीर राजांच्या अंतःपुरांचा निर्देश वात्स्यायनाच्या कामसूत्रात आढळतो ( का. सू. पृ. २८९; ३०८ ). दक्षिण भारतातील ( मार्कं. ५४. ४७. ) आणि दक्षिणापथातील ( ब्रह्माण्ड. १६.५७; वामन. १३.४८; वायु. ४५.१२६ ) एक लोकसमूह म्हणून पौराणिक साहित्यात या लोकांचा निर्देश आढळतो. बृहत्संहितेतहि या लोकांना कूर्मचक्राच्या दक्षिण भागातील लोक म्हटले आहे ( बृ. सं. १४.१२; मार्कं. ५५.२१ ). मार्कंडेय पुराणात अन्यत्र आभीरांच्या महाराष्ट्रातील वसाहतीचा सुस्पष्ट निर्देश आढळतो ( मार्कं. ५४.४७ ). इ. स. ४ थ्या शतकाच्या मध्यापर्यंत या प्रदेशातील आभीरांची सत्ता अबाधित राहिली. कदंब राजा मयूरशर्मन्च्या इ. स. ४ थ्या शतकातील चंद्रवल्ली शिलालेखात कोकण प्रदेशावर राज्य करणाऱ्या आभीर लोकांचा आणि त्यांच्या त्रैकूटक नामक आतांचा निर्देश आढळतो ( एपि. इंडि. २३.४८; १७२ ). या घराण्यातील ईश्वरसेन राजाने यज्ञश्री शातकर्णीचा पराजय करून पश्चिम महाराष्ट्र जिंकला. डॉ. भगवानलाल इंद्रजी यांच्या मते त्रैकूटक लोक आभीरांपैकीच असून त्यांचे स्वतंत्र राज्य पुणे जिल्ह्याच्या परिसरात होते (बॉंबे. गॅझे. १.५७–५८). नासिक येथील सातवाहन शिलालेखातहि एका आभीर राजाचा निर्देश आढळतो ( आर्कि. सर्व्हे. वे. इं. ४.१०४ ).

इ. स. १४ व्या शतकात आभीर लोकांची अन्य एक वसाहत महाराष्ट्रातील खानदेशात असल्याचे तत्कालीन शिलालेखावरून दिसते ( एपि. इंडि. २५.२०३ ). जयसिंह सूरीच्या कुमारपाल चरितमते ( स. १३५६ ) अनहिलवाड येथील चालुक्य राजाने अवंती देश जिंकल्यानंतर रेवा नदी ओलांडून आभीर विषयाची प्रकाशनगरी नामक राजधानी जिंकून घेतली ( डी. एच्. एन्. आय्. २. ९८५–९८६ ).

४. मध्य भारतात ( इ. स. ४ थे–५ वे शतक )—समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद प्रशस्तिलेखात त्याने मध्य भारतातील आभीर लोकांवर विजय प्राप्त केल्याचा निर्देश आढळतो ( गुप्त. इन्स्क्रि. पृ. १४ ). वायुमते हे लोक विदर्भ आणि पुलिंद लोकांसमवेत निवास करीत असत ( वायु. ४५.१२६ ). हरिवंशमते यमुना नदीपासून द्वारकेपर्यंत गुजरात द्वीपकल्पामध्ये या लोकांची वसाहत असून दैत्य आणि दानव लोक त्यांचेवर राज्य करीत असत मध्य भारतातील भिल्सा आणि झांसी यांच्या दरम्यानच्या आधु. अहिरवाड प्रदेशात ही वसाहत असावी ( जे. आर. ए. एस्., स. १८९७, पृ. ८९१ ). अन्य काही अभ्यासकांच्या मते हे पर्वताश्रयी लोक अरवली पर्वत आणि माळवा टेकड्यांमध्ये निवास करीत असत.

५. राजपुतान्यात ( इ. स. १० वे– १४ वे शतक )—जयसिंह सूरीच्या कुमारपाल चरितामध्ये मालव आणि मेदपाट देशानजिकच्या आभीर देशाचा निर्देश आढळतो ( डी. एच्. एन्. आय्., पृ. ९३३ ). वि. सं. ९१८ च्या जोधपुर शिलालेखमते हे लोक त्यांच्या रौद्र चेहेऱ्यांमुळे भयप्रद वाटत असत ( एपि. इंडि. ९.२७९ ). स्कंद पुराणातहि आभीर दरोडेखोरांचा निर्देश आढळतो ( स्कन्द. आवन्त्य. १.२४.७ ).

अन्य वसाहती—याशिवाय आभीरांच्या निम्नलिखित वसाहतींचे निर्देश प्राचीन साहित्यात आढळतातः—

१. नेपाळ—आभीरांची एक वसाहत नेपाळ देशात होती ( डी. एच्. एन्. आय्. १.१८७–१९१ ).

२. पूर्व पंजाब—पूर्व पंजाबमध्ये गवळ्याचा आणि शेतीचा व्यवसाय करणारे अहिर लोक स्वतःस पुरातन आभीरांचे वंशज म्हणवितात ( ग्लॉसरी. २.४–६ ). पार्गिटर यांच्या मते हिंदुस्थानभर पसरलेले अहिर लोक ते हेच होत ( पार्गि. ३१२–३१३ ).

३. समुद्रकाठी—वाल्मीकि रामायणमते उत्तर भारतातील आभीर संज्ञक वन्य लोक समुद्रकिनारीच्या द्रुमकुल्य देशामध्ये निवास करीत असत ( वा. रा. यु. २२.३२ ).

हे लोक स्वरूपाने आणि कर्माने भयप्रद होते ( वा. रा. यु. २२.३३ ).

**अन्य निर्देश**—भारतीय युद्धात हे शूर लोक ( म. द्रो. १९.७ ) द्रोणविरचित गारुडव्यूहात गरुडाच्या नेत्रस्थानी उभे होते ( म. द्रो. १९.७ ). या लोकांविषयी अनेक ज्योतिषशास्त्रीय निर्देश बृहत्संहितेत आढळतात ( बृ. सं. ५.३८; ४२; ९.१९; १६.३१ ). वायु पुराणातहि एक वन्य जमात म्हणून यांचा निर्देश आढळतो ( वायु. ४५. १२६ ). कलियुगात आभीर, शक आदि म्लेंच्छ लोकांची राज्ये येण्याची भविष्यवाणी मार्कंडेय ऋषींनी वर्तविली होती ( म. आर. १८६.२९–३० ).

**आभीरपल्ली** ( ग्राम )—त्रिपुरी येथील कलचुरि राजा कोकल्लदेव ( द्वितीय ) च्या इ. स. १० व्या शतकातील गुर्गि शिलालेखमते मध्य भारतातील एक ग्राम. आधु. रेवा जिल्ह्यात ते कोठेतरी असावे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.२२६ ).

**आम्र** ( वर्ष )—क्रौंचद्वीपातील एक वर्ष ( भा. ५. २०.२१ ).

**आममीनाशन** ( देश )—पूर्व भारतातील एक देश ( वा. रा. कि. ४०.२७ ).

**आमरथ** ( देश )—एक जनपद ( म. भी. १०.५३ ).

**आमरेश्वर** ( तीर्थ )—प्रह्लादयात्रेतील एक तीर्थस्थान ( वामन. ८३.२४ ).

**आमर्दक** ( ज्योतिर्लिंग )—तीर्थसारमते भारतातील द्वादश ज्योतिर्लिंगांपैकी 'नागेश्वर' ( परभणी जिल्ह्यातील आधु. औंढ्या नागनाथ ) ज्योतिर्लिंगाचे नामांतर ( तीर्थसार. पृ. २१–३० ). 'पापमर्दक' अशा अर्थाने त्यास हे नाव प्राप्त झाले होते ( नागेश्वर पहा ).

२. ( विषय ) शीतांशुवंशीय शिवगुप्त बलार्जुन राजाच्या इ. स. ७ व्या शतकातील सेनकपाट शिलालेखमते मध्य प्रदेशातील एक देशविभाग. या देशविभागातील सद्यः-शिवाचार्यांच्या तपोभूमीमध्ये त्या राजाने शिवमंदिर बांधले होते ( एपि. इंडि. ३१.३४ ).

३. ( तीर्थ ) वि. सं. १०१६ च्या रजोरगड शिलालेखमते राजस्थानातील एक तीर्थस्थान ( एपि. इंडि. ३१.३६ ).

**आमर्दकीसङ्गम** ( तीर्थ )—अर्बुदारण्यातील सरस्वती-नदीकाठचे एक तीर्थस्थान ( स्कन्द. प्रभास. प्र. ३५.७१ ).

**आमर्दकेश्वर** ( लिंग )—तापी नदीकाठचे एक शिवलिंग ( तापीमाहात्म्य ).

**आमलक** ( तीर्थ )—स्तुतस्वामीक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ ( वराह. १४८.६७ ).

२. सह्य पर्वतान्तर्गत वेदगिरि पर्वतावरील एक तीर्थ ( तीर्थसार. पृ. ७८ ).

**आमलकग्राम** ( तीर्थ )—सह्य पर्वतावरील एक तीर्थस्थान ( नृसिंह. ६६.७ ).

**आमलकवारि** ( तीर्थ )—कश्मीरातील एक तीर्थस्थान ( नीलमत. १४७४ ).

**आमसरी** ( ग्राम व जलप्रपात )—महाराष्ट्रातील अजंठ्याजवळील सिवना नदीनजिकचा पवित्र जलप्रपात. येथे नजिकच अमृतेश्वर शिवमंदिर आहे ( ती. पृ. २६८ ).

**आमित्रि** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते प्राचीन भारतातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.१३८ ).

**आमिषि** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते प्राचीन भारतातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८६ ).

**आमुक** ( ग्राम )—गुप्त राज्यकालीन जयनाथ राजाच्या इ. स. ४९६ च्या खोह ताम्रपटमते मध्य भारतान्तर्गत बाघेलखंडातील एक ग्राम ( कॉर्पस् . इन्स्क्रि. ३.२.१२५ ). या गावाचे आधु. स्थान समजत नाही.

**आमूर** ( ग्राम )—दक्षिण भारतातील एक ग्राम. चोल राजा नेडुमुडि किल्लि राजाला शेट्–शेन्नि–नलम् किल्लि नामक बंधूने स. १८० मध्ये या गावी वेढा घातला असता चेर राजा शेंगुत्तुवन याने त्याची सुटका केली. आधु. त्रिचनापल्ली-नजिक हे गाव असावे ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. १५ ).

**आम्बष्ठ** (देश)—सिकंदरस्वारीशी संबंधित ग्रीक साहित्य मते पंजाबातील 'अंबष्ठ' जनपदाचे नामांतर ( स्मिथ, पृ. १०४; अंबष्ठ पहा ).

**आम्बिकेय** ( वर्षपर्वत )—शाकद्वीपान्तर्गत एक पर्वत ( कूर्म. पूर्व. ४९.३४; मत्स्य. १२२.१६; लिङ्ग. ५३.१८; वायु. ४९.८३; विष्णु. २.४.६२; ब्रह्माण्ड. १९.८१–९६ ).

**आम्ब्लोद** ( ग्राम )—गुप्त राज्यकालीन हस्तिन् आणि शर्वनाथ राजांच्या स. ५०८ च्या भुमरा स्तंभलेखमते मध्य भारतान्तर्गत बाघेलखंडातील एक गाव. भूतपूर्व नागोध संस्थानच्या उच्हरा नामक राजधानीच्या गावापासून ९ मैल वायव्येकडील आधु. भुमरा भाव ते हेच होय.

**स्तंभलेख**—'थाडी–पत्थर' ( उभा दगड ) या स्थानिक नावाने ओळखल्या जाणाऱ्या लाल दगडाच्या स्तंभाच्या तळाच्या चौकोनी भागावर येथील स्तंभलेख आढळतो. परिव्राजकवंशीय हस्तिन् राजा आणि उच्छकल्प देशाचा शर्वनाथ राजा यांच्या राज्यांच्या सीमेवर हा स्तंभ उभारल्याचा

निर्देश त्यामध्ये आढळतो. यावरून दोन राज्यांतील सीमा दर्शविण्यासाठीहि प्राचीन काळी स्तंभलेखांचा उपयोग करण्यात येत असावा (फ्लीट, कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.११०–१११ ).

**आम्भीमाता** ( देवीस्थान )— राजस्थानातील चंदवास गावानजिकचे एक देवीस्थान ( ती. पृ. २८६–२८७ ).

**आम्र** ( देशविभाग )—देवगिरीच्या यादवांच्या शके ११५० च्या शिलालेखमते महाराष्ट्रातील वंजरा ( आधु. मांजरा ) नदीकाठचा एक देशविभाग. मराठवाड्यातील बीड जिल्ह्यातील आधु. आंबेजोगाई गावासभोवतालचा प्रदेश म्हणजे हा देश असावा. याची राजधानी आम्रपुर ( आधु. आंबेजोगाई ) गावी असून लघुवाडधी नामक अन्य एक ग्राम त्यामध्ये होते ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २७० ).

**आम्रका** ( ग्राम )—त्रैकूटक राजा दाहरसेनच्या स. ४५७ च्या पारडी ताम्रपटमते गुजरातमधील सुरत जिल्ह्यातील एक ग्राम. सुरत जिल्ह्यातील व्यारा तालुक्यातील कापुर गावच्या २ मैल नैर्ऋत्येकडील आधु. अंबच्छ गाव ते हेच होय ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.२४ ).

**आम्रकूट** ( पर्वत )—कालिदासाच्या मेघदूतमते मध्य भारतातील 'अमरकंटक' पर्वताचे नामांतर ( मेघ. १.१७; अमरकंटक पहा ).

**आम्रद्वीप** ( देश )— बौद्धभिक्षु महानामन्च्या स. ५८८ च्या बोधिगया शिलालेख आणि मूर्तिलेखमते 'लंका' ( आधु. सिलोन ) देशाचे नामांतर ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२. २७५; २७९; लंका पहा ).

**आम्रपुर** ( नगर )—देवगिरीच्या यादव राजांच्या शके ११५० च्या शिलालेखमते महाराष्ट्रातील आम्र देशाच्या राजधानीचे गाव. मराठवाड्यातील बीड जिल्ह्यातील लाड जळगावपासून ४ मैल आग्नेयेकडील आधु. आंबेजोगाई गाव ते हेच होय ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २७० ). नामांतर ( जैन साहित्य )– 'आम्रपुरा'; ( महानुभाव साहित्य )– 'आंब.'

**तीर्थस्थान**–येथे जोगाई देवीचे सुविख्यात मंदिर असून, मुकुंदराज यांनी सन ११८८ मध्ये 'विवेकसिंधु' नामक ग्रंथ याच मंदिरात लिहिला. महाराष्ट्रातील महानुभावपंथीय तीर्थांमध्येहि याची गणना होत असे ( स्थान पृ. ७२ ).

हे जैनांचेहि एक सुविख्यात तीर्थस्थान असून, ज्ञान सागराच्या मते येथे चिंतामणि आणि चूडामणि जिन राजांची मंदिरे होती ( ती. सं. पृ. १२० ).

२. शिलालेख साहित्यमते बडोदा प्रांतातील 'अंब्रापाटक' नगराचे नामांतर ( एपि. इंडि. २१; अंब्रापाटक पहा ).

**आम्रराजी** ( राज्यविभाग )—भोगशक्ति हरिश्चंद्र राजाच्या स. ७१० च्या अंजनेरी ताम्रपटमते मध्य भारतातील एक राज्यविभाग. जयग्राम आदि ग्रामे त्यामध्ये समाविष्ट होती. हा विभाग निश्चित कोठे असावा ते समजत नाही ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.४९. ).

**आम्रवण** ( वन )—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते एक वन ( पा. सू. ८.४.५ ). 'वन' संज्ञेचे 'वण' हे वैकल्पिक रूप होत असल्याचे उदाहरण म्हणून या वनाचा निर्देश तेथे आढळतो. बौद्ध साहित्यात निर्देशिलेले राजगृह गावानजिकचे 'अंब्रवन' बहुधा हेच असावे ( अंब्रवन १. पहा ).

**आम्रवन** ( वन )—कुरुक्षेत्रातील एक वन. लिंगमते हे जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वतावर होते ( लिङ्ग. ४९. ५७; वायु. ३८.१९ ).

**आम्रातकेश्वर** ( तीर्थ )— नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( मत्स्य. १९०.५ ).

२. वाराणसी येथील एक तीर्थ ( अग्नि. ११२.३; मत्स्य. २२.५१; १८१.१८ ). हे विकटाद्विज गणेशाजवळ होते ( स्कन्द. काशी. ६९.६९ ).

३. जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वताच्या उत्तर भागातील एक शिवक्षेत्र ( लिङ्ग. ४९.३७ ).

**आम्रोद** ( पर्वत )—मध्य भारतातील भर्हुत स्तूपाच्या परिसरातील एक पर्वतीय बौद्धस्थान. नामांतर ( भर्हुत शिलालेख )—'अंब्रोद'. भर्हुत येथील एका शिल्पचित्रामध्ये येथील स्तूपाची प्रतिकृती 'अंब्रोद येथील चैत्य' अशा अक्षरवाटिकेसह कोरलेली आढळते. या स्तूपाच्या पार्श्वभूमीस अंध मातेसाठी जल आणणाऱ्या हत्तीचा 'मतिपोसक जातका'तील कथाभाग रेखाटला आहे. ल्यूडर्स यांच्या मते 'आम्रोद' हे पर्वतनाम 'आम्रवत्' या संस्कृत नावाचे प्राकृत रूप असावे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.२.१६५–१६६ ).

**आम्वलिसाढि** ( ग्राम )—चालुक्य राजाच्या शिलालेखमते दक्षिण गुजरातेतील आवलसाढि (आधु. अमलसाड) गावाचे नामांतर ( जे. बी. बी. आर. ए. एस्. २६.२५०; आवलसाढि पहा ).

**आयतन** (क्षेत्र)–अवंती येथील क्षेत्रस्थान (ब्रह्म.४३.९).

**आयिरवेलि–आयिरूर** ( ग्रामद्वय )—पांड्य राजा जटिल परांतकच्या स. ७६९ वेल्विकुडि ताम्रपटमते दक्षिण भारतान्तर्गत कावेरी नदीच्या उत्तर किनाऱ्यावरील ग्रामद्वय ( इंडि. ॲंटि. २२.५७–७५ ). ही ग्रामे निश्चित कोठे होती ते समजत नाही.

**आयुधजीवी संघ** ( लोकसमूह )— पाणिनीच्या अष्टाध्यायीमते पंजाब आणि वायव्य भारतातील लढाऊ पेशाच्या पर्वतीय लोकांचे सामूहिक नाव. शस्त्राधारे उपजीविका करणाऱ्या लोकांना ( आयुधेन जीवति ) या ग्रंथात 'आयुधीय', 'आयुधिक' (आयुधजीवी संघ ) म्हटले आहे ( पा. सू. ४.४.१४ ). अशा चाळीस लोकसमूहांचा निर्देश तेथे आढळतो ( पा. सू. ५.३. ११४– ११७ ). नामांतर (कौटिलीय अर्थशास्त्र )– 'वार्ताशस्त्रोपजीवी संघ'; 'आयुधीय संघ', 'आयुधीयप्राय संघ'; ( पाली साहित्य ) —'योधाजीव'.

**कौटिलीय अर्थशास्त्रात**—या ग्रंथात 'आयुधीयप्राय' आणि 'श्रेणीप्राय' संज्ञक जनपदांचे दोन प्रकार वर्णिले आहेत ( कौ. अ. ७.१ ). याच ग्रंथातील 'संघवृत्त' नामक अन्य एका अध्यायात कंबोज, सुराष्ट्र आदि लोकसमूहांना 'वार्ताशस्त्रोपजीवी' आणि लिच्छवि, वृजि, मल्ल, मद्र, कुकुर, कुरुपंचाल लोकांना 'राजशब्दोपजीवी' म्हटले आहे ( कौ. अ. ११. १ ). यावरून कौटिल्याच्या काळी लिच्छवि आदि प्रगत लोकसमूह राजनियंत्रित असून, कंबोज, सुराष्ट्र आदि 'आयुधीय' अथवा 'शस्त्रोपजीवी' लोक राजनैतिक दृष्टीने मागासलेले असावेत.

**उपविभाग**— पाणिनीच्या अष्टाध्यायीमते तत्कालीन आयुधजीवी संघांचे निम्नलिखित चार उपविभाग होतेः— १. वाहीक देशीय ( पा. सू. ५.३.११४ ); २. पर्वतीय ( पा. सू. ४.३.९१ ); ३. ग्रामणीनियंत्रित पूगसंघ ( पा. सू. ५.३.११२ ); ४. उत्सेधजीवी ( वन्य ) व्रातसंघ ( पा. सू. ५.३.११३ ). राजनैतिक दृष्टीने हे लोक मागासलेले होते ( पा. सू. ५.२.२१ ). या संघांची संक्षिप्त माहिती खाली दिली आहेः—

**१. वाहीक संघ**—पूर्वेस बियास, सतलज आणि पश्चिमेस सिंधु नद्यांच्या दरम्यानच्या वाहीक ( आधु. पंजाब ) देशातील यौधेय, क्षुद्रक, मालव आदि प्रगत गणराज्ये होती.

**२. पर्वतीय संघ**—'त्रिगर्तषष्ठ' नामक पर्वतीय आयुधजीवी संघ त्रिगर्त ( आधु. कुलु कांग्रा प्रदेश ) देशामध्ये होता.

**३. पूग संघ**—सिंधु नदीच्या उभय किनाऱ्यांवर राहाणारे हे लोक ( आधु. कबायली ) ग्रामणी नामक गटप्रमुखाच्या नियंत्रणाखाली होते.

**४. व्रात संघ**—आधु. अफगाणिस्तान, हिंदुकुश, दर्दिस्तान आदींच्या डोंगराळ प्रदेशात हे 'व्रात्य' ( वन्य ) लोक निवास करीत असत.

उपरोक्त संघांपैकी मध्यदेशातील आर्य लोकांनजिकचे संघ सांस्कृतिक दृष्टीने पुढारलेले असून, आर्य लोकांपासून सुदूर अंतरावरील संघ मागासलेले होते.

**उत्तरकालीन व्याकरण साहित्यात**—पाणिनीच्या गणपाठात 'दामन्यादि' ( पा. सू. ५.३.११६ ), 'पर्श्वादि' ( पा. सू. ५.३.११७ ), आणि 'यौधेयादि' ( पा. सू. ५.३.११७ ) आयुधजीवी गणांचा निर्देश आढळतो. उत्तरकालीन व्याकरण साहित्यात निर्देशिलेले अनेक 'संघ' हि आयुधजीवी असण्याची शक्यता वाटते.

**सिकंदराच्या आक्रमणकाळी**—कपिशा देशाहून गंधार देशाप्रत आगेकूच करणाऱ्या सिकंदरला या भागातील आश्वायन, हास्तिनायन, आश्वकायन या आयुधजीवी लोकांनी कडवा प्रतिकार केला होता ( आश्वकायन पहा ).

**आयुर्दा** ( नदी )—शाकद्वीपातील एक नदी ( भा. ५.२०.२६ ).

**आयोध्यक** ( लोकसमूह )— उत्तर भारतातील एक लोकसमूह ( बृ. सं. ४.२४ ). येथे अयोध्या प्रांतातील लोकांचा निर्देश अभिप्रेत असावा.

**आरक्खुरि** ( ग्राम )—जैन आवस्सक निर्जुति ग्रंथमते बिहारमधील चंपापुरी ( आधु. भागलपुर ) गावाच्या सरहद्दीवरील एक ग्राम ( आवस्सक. पृ. १२९७ ). भागलपुर जिल्ह्यात कोठेतरी हे असावे ( पांडे, बिहार पृ. १७८ ).

**आरगराज्य** ( देश )—विजयनगरच्या बुक्क ( प्रथम ) राजाच्या साम्राज्यान्तर्गत दक्षिण भारतातील एक राज्यविभाग. बनवासी १२०००, चंद्रगुत्ति आणि गोवा प्रदेशांचा काही भाग मिळून हा देश बनला होता ( आर्कि. रिपोर्ट. स. १९०७–१९०८; पृ. २३९; इंडि. अँटि. स. १९१४; पृ. ७ ). नामांतर–'मले राज्य'; 'मलेह राज्य.'

इ. स. १४ व्या शतकाच्या प्रारंभी हा प्रदेश होयसाळ साम्राज्यात समाविष्ट असून, विजयनगर साम्राज्याचा आद्य संस्थापक मारप तेथे महामंडलेश्वर होता ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. १८५ ). विजयनगर साम्राज्याच्या स्थापनेनंतर हा प्रदेश त्यामध्ये सामील होऊन बुक्क ( प्रथम ) राजाचा पुत्र विरूपन्न हा तेथे राजप्रतिनिधी म्हणून काम करू लागला. नंतर तो या प्रदेशाचा राजा बनला ( एपि. कर्ना. ८.२० ).

स. १४९९–१७६३ च्या दरम्यान या प्रदेशावर, तसेच त्या नजिकच्या दक्षिण कर्नाटकातील बारकूर आणि मंगळूर प्रदेशावर विजयनगरच्या केलदिवंशीय नायक मांडलिक राजांचे राज्य होते. या राजांची राजधानी प्रथमतः इक्केरि आणि नंतर बेदनूर गावी होती. विजयनगर साम्राज्याच्या

विनाशानंतर ( स. १५६५ ) ते स्वतंत्र झाले. स. १७६३ मध्ये हैदरअलीने हे राज्य स्वसाम्राज्यात समाविष्ट केले ( सेवेल, इन्स्क्रि. ३५९–३६० ).

**आरङ्ग** ( ग्राम )—गुप्त राज्यकालीन महाजयराज राजाच्या आरंग ताम्रपटाचे मध्य भारतान्तर्गत उपलब्धिस्थान. हे गाव रायपुर गावापासून २० मैल पूर्वेस ( अक्षांश. २०°–१२′ उत्तर; रेखांश ८२°–१′ पूर्व ) आहे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३. २.१९१ ).

**आरट्ट** ( देश )—वायव्य भारतातील बाह्लीक लोकांचा देश ( म. क. ३०.४७; बाह्लीक पहा ). महाभारतमते हा सिंधुषष्ठाच्या बाहेरचा ( म. क. ३०.३५–३६; ४०; ४३ ), नष्टधर्म प्रदेश असून तेथे जाणे निषिद्ध मानले जात असे ( म. क. ३०.३६ ). बौधायन धर्मसूत्रातहि हा 'प्रतिषिद्ध-गमन' देश मानला आहे ( बौ. ध. १.१.२.१५ ). येथील लोक 'आरट्टक' नावाने सुविख्यात होते ( म. क. ३०. ७४ ). येथे 'आरट्टक' हे बहुधा 'बाह्लीक'चे नामांतर असावे. वाल्मीकि रामायणातहि या उदीच्य देशाचा निर्देश आढळतो ( वा. रा. कि. ४३.१२ ).

**भारतीय युद्धात**—या युद्धात येथील योद्धे दुर्योधनपक्षात सामील होते. द्रोणवधानंतर ते कृत मेनुसमवेत पळाले ( म. द्रो. १६५.७९ ). युधिष्ठिराने ( म. द्रो. १३२.२५ ), आणि अर्जुनाने ( म. द्रो. १३६.५ ) यांचा संहार केला.

**आरण्य** ( देश )—दक्षिणापथातील एक देश ( वामन. १३.४८ ).

**आरन्तुक** ( द्वारपाल यक्ष )—कुरुक्षेत्रातील एक द्वारपाल यक्ष ( वामन. २२.६०; ३२.२; ३५.३७ ). पाठभेद—'अरंतुक'.

**आरव** ( लोकसमूह )—बृहत्संहितामते नैर्ऋत्य भारतातील एक लोकसमूह ( बृ. सं. १४.१७ ).

**आरवीग्राम** ( ग्राम )—चालुक्य राजा भीम ( द्वितीय ) च्या वि. सं. १२८७ च्या शिलालेखमते दक्षिण राजपुतान्यातील एक ग्राम ( एपि. इंडि. ८.२१९ ). अबू पर्वतावरील आधु. नखी तलावाच्या परिसरात कोठेतरी हे असावे ( सांकलिया, गुजरात. पृ. १८५ ).

**आरसीकेरे** ( जैनतीर्थ )—म्हैसूरमधील चालुक्य स्थापत्य-शैलीचे जैन मंदिरस्थान ( फर्ग्युसन, १.४४२ ). हे हसन जिल्ह्यात पुणे- बंगलोर रेल्वमार्गावरील स्थानक असून, येथे सहस्रकूट नावाचे जीर्णावस्थेतील जैन मंदिर आहे. त्यामध्ये गोमतेश्वराची ( बाहुबली ) धातुमूर्ती आहे. या मंदिरानजिक अन्य काही जैन मंदिरांचे भग्नावशेष आहेत ( ती. पृ. ३२९ ).

**आरा** ( ग्राम )—स. १६९ च्या कुशाण राज्यकालीन 'आरा' खरोष्ठी शिलालेखाचे उपलब्धिस्थान. अटकपासून १० मैल नैर्ऋत्येकडील बाघ निलाब गावापासून २ मैलांवर सिंधु नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर हे आहे ( अक्षांश ३३°-४६′ उत्तर; रेखांश ७२°.१२′ पूर्व ).

**शिलालेख**—येथे सापडलेला सहा ओळींचा उत्तर कुशाण-कालीन खरोष्ठी लिपीतील शिलालेख २′ – ८″ × ९″ आकाराच्या दगडावर असून, कनिष्क संवत् ४१ च्या ज्येष्ठ महिन्यातील २५ व्या दिवशी कनिष्क ( द्वितीय ) राजाच्या कारकीर्दीत तो कोरला आहे. पेशावरवंशीय ( पोषपुरियपुत्र ) दशव्हर याने आपल्या मातापित्यांच्या स्मृत्यर्थ, तसेच आपली पत्नी, पुत्र आणि आपण स्वतः यांच्या कल्याणार्थ एक विहीर ( कूप ) खोदल्याचा निर्देश त्यामध्ये आढळतो. पेशावर म्युझियम शिलालेख क्र. २१ प्रमाणेच त्याच्या शेवटी 'धर्मकृत्याचे पुण्य मला मिळो' ( धर्मस्य भवर्षि अस्तु ) अशी अक्षरे कोरली असावीत. त्यापैकी केवळ 'धर्मस्य' हा शब्दच आज आढळतो.

या शिलालेखात निर्देशिलेला कनिष्क ( द्वितीय ) हा कनिष्क ( प्रथम ) राजाचा नातू आणि कनिष्कपुत्र वाशिष्क ( जुष्क ) चा पुत्र होय ( कॉर्पस्. इन्स्क्रि २.१.२.१६२–१६५ ).

**तत्सम शिलालेख**—पेशावर म्युझियम शिलालेख क्र. ५ हा या शिलालेखासदृश असून त्यामध्ये 'मैत्रेयाने करविले' अशी अक्षरे आढळतात ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.१३३ ).

**आराकन** ( देश )—टॉलेमीच्या मते प्राचीन भारतातील एक देश. पूर्व भारताच्या सरहद्दीवरील आधु. आराकान प्रदेश तो हाच होय. 'आराकन'चा शब्दशः अर्थ 'रौप्य देश' होतो. तथापि या प्रांतात चांदीच्या खाणी नाहीत. या देशाच्या दक्षिणेस पेगू प्रांत ( प्राचीन सुवर्णभूमी देश ) असून 'सुवर्णभूमीनजिकचा देश' अशा अर्थाने या देशास 'रौप्य देश' नाव प्राप्त झाले असावे.

**आराझी** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते प्राचीन भारतातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.१२७ ).

**आरात्**—पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यमते वाहीक देशातील एक ग्राम ( पतञ्जलि. २.२९३–२९८ ).

**आरामनगर** ( नगर )—ह्युएनत्संगच्या मते मगध देशातील एक बौद्ध स्थान. कनिंगहॅमच्या मते बिहारमधील शहाबाद जिल्ह्यातील आधु. अरा गाव ते हेच असावे. स्थानिक आख्यायिकांच्या आधारे, तसेच नामसादृश्यावरून त्यांनी हे अनुमान काढले आहे.

ह्युएन्‌संगच्या प्रवासवर्णनात—या ग्रंथमते गंगा नदीच्या उत्तर किनाऱ्यावरील या गावी गौतम बुद्धाने एका राक्षसाचे दमन केले. तत्स्मृत्यर्थ अशोकाने येथे एक स्तंभ उभारला होता ( वॉटर्स, २.६० ).

आधुनिक अरा गाव ह्युएन्‌त्संग म्हणतो त्याप्रमाणे गंगा नदीच्या उत्तर किनाऱ्यावर नसून दक्षिण किनाऱ्यावर आहे. या प्रदेशातील गंगा नदीचा प्रवाह बदलल्यामुळे किनाऱ्यांची ही अदलाबदल झाली असावी ( पांडे, बिहार. पृ. १५८ ).

**आरासन** ( देवीस्थान )—उत्तर गुजरातमधील सुविख्यात अंबिकास्थान. येथील देवी ‘ अंबाजी ’ या स्थानिक नावाने सुविख्यात असून, उत्तर गुजरातमधील अरवली पर्वताच्या नैर्ऋत्य टोकाजवळील ‘ अर्बुद ’ ( आधु. अबू ) पर्वतानजिकच्या आधु. ‘ आरासुर ’ टेकडीवर हे स्थान आहे. येथील देवी जगन्माता पार्वतीस्वरूपी असून, गुजरातमधील चुन्वल आणि पावागड येथील देवी अनुक्रमे कन्या आणि भद्रकालीस्वरूपी आहे.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या स्थानाची निम्नलिखित नामांतरे आढळतातः—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. भागवत ( १०.३४.१–२ ) | अंबिकावन |
| २. वामन पुराण ( तीर्थकल्प. पृ. २३७ ) | कोटितीर्थ |
| ३. राजकालनिर्णय ( गुजराथी ) | गब्बरगह |
| ४. स्थानिक नाव | अंबाजी |
| ५. शिलालेख साहित्य | आरासुर |

**नामव्युत्पत्ती**—सरस्वती पुराणमते या स्थानी तंड ऋषींनी कृष्णाला ‘ आसन ’ दिल्यामुळे यास ‘ आरासन ’ नाव प्राप्त झाले ( सरस्वती. ९ ).

**स्थानवर्णन**—त्रिभागात्मक सरस्वती नदीपैकी द्वितीय भाग या पर्वतावर उगम पावून सिद्धपुर गावावरून वहात जात कच्छच्या रणामध्ये लुप्त होतो ( सरस्वती पहा ). या टेकडीवरील सरस्वतीच्या उगमानजिक कोटेश्वर महादेवाचे मंदिर असून त्यावरूनच या स्थानास ‘ कोटितीर्थ ’ हे वैकल्पिक नाव प्राप्त झाले.

उपरोक्त स्थानानजिक अंबिकेचे सुविख्यात देवालय आहे. ते आकाराने छोटे असले, तरी त्यासमोरील सभामंडप विशाल आहे. देवीच्या पार्थिव मूर्तीऐवजी देवीच्या दैवी ‘ यंत्रा ’ला वस्त्रालंकारांनी सजवून सिंहारूढ भवानीचे रूप येथे दिलेले आढळते. हे मंदिर इ. स. ८ व्या शतकात वलभी राज्यकालात नागर ब्राह्मणांनी बांधले असून देवीच्या भजन-पूजनात त्यांना अग्रहक्क दिला जातो. दरवर्षी भाद्रपद महिन्यात देवीच्या जन्मोत्सवप्रसंगी येथे मोठी यात्रा भरते.

**पौराणिक साहित्यात**—कालिका पुराणमते ‘ आरासन ’ हे देवीचे शक्तिपीठ असून सतीचे डावे–उजवे स्तनमंडल अनुक्रमे ‘ आरासन ’ आणि ‘ जालंधर ’ येथे पडले. कालिका पुराणाच्या परंपरागत प्रतीमध्ये ‘ आरासन ’चा निर्देश नाही. तेथे सतीचे स्तनयुग्म जालंधर येथे पडल्याचा निर्देश आढळतो ( कालिका. १८.४३ ).

भागवतमते श्रीकृष्णाने आपल्या गोप सवंगड्यांसह येथील ( अंबिकावन ) सरस्वती नदीमध्ये स्नान करून येथील शिव-अंबिकेचे दर्शन घेतले होते ( भा. १०.३४.१–२ ). स्थानिक परंपरामते श्रीकृष्णाचा जावळाचा समारंभहि अंबिका टेकडीपासून ३ मैलांवरील गब्बर टेकडीवर झाला होता. भागवतमते रुक्मिणीहरणाच्या प्रसंगी रुक्मिणीने येथील अंबिका देवीची पूजा करून श्रीकृष्ण पती म्हणून प्राप्त होण्याची प्रार्थना केली होती ( भा. १०.५३ ).

स्कंद पुराणाच्या दोन हस्तलिखित प्रतींमध्ये येथील अंबिकेचे माहात्म्य सांगणारा १२००० श्लोकांचा स्वतंत्र ‘ अंबिका खंड ’ आढळतो ( एग्लिंग, इंडिया ऑफिस कॅटलॉग. ६, पृ. १३२१; हरप्रसादशास्त्री, बंगाल रॉयल एशि. सोसा. कॅटलॉग ५ क्र. ३९२१–३९२२ ).

**वलभी राज्यकालात**—या राज्यकालात ( इ. स. ८ वे शतक ) हे स्थान दंत देशामध्ये समाविष्ट असून राजाश्रयामुळे आणि स्थानिक नागर ब्राह्मणांमुळे त्यास विशेष महत्त्व प्राप्त झाले. वलभी येथील राजांचे अंबिका हे कुलदैवत असून स. ७४६ मधील वलभी नगराच्या मुसलमानकृत नाशासमयी शिलादित्य सम्राटाची राणी पुष्पावती या देवीस शरण गेली होती ( बॉम्बे. गॅझे. ५.४४३ ).

**शिलालेख साहित्यात**—गुजरातच्या धरावर्षदेव राजाच्या स. १२०० च्या कुंभरिय मंदिरलेखात आरासुर येथे एक ‘ वाव ’ ( विहीर ) खोदल्याचा निर्देश आढळतो. मालदेव राजाच्या स. १३५९ च्या मानसरोवर शिलालेखमते अंबिकादेवीचा अपमान करणाऱ्या सोळंकीराज अमात्य विमलसाहाच्या ३६० देवालयांपैकी ३५५ देवालये देवीने नष्ट केली. तेव्हा शरणागत विमलसाहाने अर्बुद पर्वतावरील दिलवारा मंदिर बांधतेवेळी ( स. १०३२ ) अंबिकेची आराधना केली.

अंबिकामंदिरातील बहुतांशी सारे शिलालेख इ. स. १६ व्या शतकातील आहेत. त्यापैकी एकामध्ये राव भरमल राजाच्या राणीने या मंदिरास देणगी दिल्याचा निर्देश आढळतो.

गब्बरगढ—अंबिकामंदिरापासून ३ मैलांवरील या टेकडीवर झोपाळ्यावर बसलेल्या देवीची मूर्ती आहे. 'राजकालनिर्णय' मते रावपालजी (इ. स. ८०९) राजाच्या जसराज नामक १५ व्या वंशजाने गब्बरगढ येथे राजधानी स्थापिली. त्यावरून या काळी या प्रदेशास राजकीय महत्त्व प्राप्त झालेले दिसते.

**अंबिका देवीची तलवार**—येथील अंबिका देवीच्या हातातील तलवार राणा प्रतापाने भेट दिलेली आहे. इदरगढावरील आपल्या इदर नामक राणीस भेटण्यासाठी राणा प्रताप निघाला असता अकबराने गडाला वेढा घातला. तत्प्रसंगी अंबिका देवीच्या कृपेने तो किल्ल्यापर्यंत पोहोचला. या घटनेच्या स्मृत्यर्थ त्याने आपली तलवार देवीला भेट दिली.

**आरुन्धतेयक** (तीर्थ)—काशी येथील एक तीर्थस्थान (स्कन्द. काशी. ८३.७).

**आरुमुरुगम्**—मद्रास राज्यातील एक गाव. पुलिकतच्या उत्तरेकडील आधु. अर्मगाव ते हेच होय. या गावी स. १६२५ मध्ये इंग्रजांनी आपली पहिली वखार काढली. परंतु येथील राजकीय अस्थिरतेमुळे त्यांनी उत्तरकाळात ती दक्षिण भारताच्या पूर्व किनाऱ्यावरील सेंट जॉर्ज किल्ल्यामध्ये (आधु. मद्रास) हलविली (सेवेल, इन्स्क्रि. पृ. २७७).

**आरेवक** (देश)—एक देश. येथील योद्धे भारतीय युद्धात भीष्मरक्षणाचे कार्य करीत होते (म. भी. ४७.७). पाठभेद—'आरोचक'.

**आर्क** (तीर्थ)—गौतमी नदीकाठचे एक तीर्थस्थान (ब्रह्म. १०३.९).

**आर्चीक** (पर्वत)—महाभारतान्तर्गत लोमशतीर्थयात्रामते एक पर्वत (म. आर. १२५.१३;१७). सैंधवारण्यानजिकच्या या पर्वतावर च्यवन-सुकन्या आख्यानाचा कथाभाग घडला होता.

**आर्जीक** (देश)—ऋग्वेदमते एक देश. यामध्ये शर्यणावत् सरोवर होते (ऋ. ८.६४.११; ९.६५.२३; ११३.२). नामांतर—'आर्जीकीय' (ऋ. ८.७.२९). सायणाचार्योच्यामते हे कुरुक्षेत्राचे प्राचीन नाव होय (कुरुक्षेत्र पहा).

**आर्जीकीया** (नदी)—ऋग्वेदमते सिंधूला पूर्वेकडून मिळणारी नदी. वितस्ता (झेलम) व सुषोमा नद्यांच्या दरम्यान हिचा निर्देश आढळतो (ऋ. १०.७५.५). यास्काचार्यांच्या मते हे विपाशा (आधु. बियास) नदीचे नामांतर असून 'ऋजीक पर्वतातून उगम पावणारी' अशा अर्थाने तीस हे नाव प्राप्त झाले. पुरातनकाली ही नदी उरुंजिरा या नावाने ओळखली जात असे (नि. ९.२६; विपाशा पहा).

**आर्जुनायन** (लोकसमूह)—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते उत्तर भारतातील एक लोकसमूह. उदुंबर, संप्रिय आदि लोकसमूहांसमवेत यांचा निर्देश तेथे आढळतो (पा. सू. ४. २.५३). इंडोग्रीक सत्तेच्या विनाशानंतर (इ. स. १ ले शतक) पूर्व राजपुताना आणि माळवा प्रदेशात स्थायिक झालेल्या लोकांमध्ये आर्जुनायन, मालव आणि आभीर हे प्रमुख असल्याचे त्यांच्या उपलब्ध नाण्यांवरून दिसते. ॲलेन यांच्या मते दिल्ली, आग्रा आणि जयपूर गावांच्या त्रिकोणी प्रदेशात जयपुर आणि अलवार देशाच्या पूर्व भागात या लोकांची वसाहत होती (ॲलेन, पृ. ७९; ८३). समुद्रगुप्ताच्या राज्यकालीहि (इ. स. ४ थे शतक) हे लोक यौधेय लोकांसमवेत याच प्रदेशात निवास करीत होते. पाठभेद (बृहत्संहिता; समुद्रगुप्ताचा अलाहाबाद प्रशस्तिलेख)—'अर्जुनायन'.

इ. स. पू. २ च्या शतकापासून इ. स. ३ च्या शतकापर्यंत आपले स्वातंत्र्य अबाधित ठेवणाऱ्या लोकसमूहांमध्ये हे आणि यौधेय लोक प्रमुख होते.

**ऋग्वेदात**—या ग्रंथात 'अर्जुनेय' हे कुलनाम दिले आहे (ऋ. १.११२.२३; ४.२६.१). परंतु 'अर्जुनायन' लोक महाभारतकालीन अर्जुनाचे वंशज असण्याची शक्यता अधिक वाटते.

**पाणिनीच्या अष्टाध्यायीत**—या ग्रंथात विषय (देश) म्हणून याचा निर्देश असला तरी 'यौधेय', 'मद्र', 'मालव' यांप्रमाणेच येथे 'गण' पद्धतीचे राज्य असावे. इंडोग्रीक साम्राज्याच्या विनाशानंतर उत्तर भारतातील एक प्रभावी सत्ता म्हणून हे गणराज्य अस्तित्वात आले. शक आणि कुशाण राज्यकालात या लोकांची सत्ता मर्यादित झाली असली, तरी त्या साम्राज्याच्या विनाशानंतर यांनी आपली सत्ता पुन्हा एकवार सुस्थापित केली.

**समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद प्रशस्तिलेखात**—या शिलालेखात पूर्व राजपुतान्यातील मद्रक, आभीर, यौधेय (बहवालपुर प्रदेश) लोकांसमवेत यांना जिंकल्याचा निर्देश आढळतो (गुप्त. इन्स्क्रि. पृ. १४). यावरून गुप्त साम्राज्याच्या वायव्य सरहद्दीवर यौधेय लोकांनजिक हे लोक

निवास करीत असावेत.

**गणराज्य**—या लोकांच्या उपलब्ध साऱ्या नाण्यांमध्ये, तसेच वाङ्मयीन आणि शिलालेखीय निर्देशांमध्ये यांस 'गण' उपाधी लावलेली दिसते. या लोकांची राजसत्ताक राज्ये युद्धकौशल्यावर उपजीविका करणाऱ्या लष्करी पेशाच्या लोकांची (आयुधजीवी संघ) असावीत.

**बृहत्संहितेत**—या ग्रंथमते हा उदीच्य (वायव्य भारतातील) लोकसमूह होता (बृ. सं. ४.२५; ११.५९; १४.२५; १६.२२; १७.१९).

**नाणी**—या लोकांचे एक नाणे प्रिन्सेपला सापडले होते (प्रिन्सेपकृत निबंध. २.२२३). ॲलेनच्या ग्रंथातहि या लोकांच्या नाण्यांचा सविस्तर परामर्ष आढळतो.

**आर्जुनाव** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाठमते प्राचीन भारतातील एक ग्राम (पा. सू. ४.२.१२७).

**आर्पाक्कम्** (मंदिरस्थान)— चोल राजा राजराजाच्या स. ११६७ च्या दानपत्रमते दक्षिण भारतातील एक ग्राम. चिंगलपेट जिल्ह्यातील आधु. अर्पाक्कम् गाव ते हेच होय. पांड्य राज्याच्या प्राप्तीसाठी कुलशेखर आणि पराक्रम यांच्या दरम्यानच्या युद्धप्रसंगी कुलशेखराने येथील मंदिरात अनुष्ठान केल्याचा निर्देश या दानपत्रात आढळतो. या अनुष्ठानाच्या फलस्वरूप पांड्य राजा पराक्रम याच्या साह्यार्थ आलेले सिलोनच्या पराक्रमबाहु राजाचे सैन्य सिलोनला परत गेले (रंगाचारी १. चिंगलपेट. २४८).

**आर्य** (लोकसमूह)—बृहत्संहितामते आर्यावर्तामध्ये निवास करणारा एक लोकसमूह (बृ. सं. ७.४२; आर्यावर्त पहा).

**आर्यक** (लोकसमूह)—बृहत्संहितामते दक्षिण भारतातील एक लोकसमूह (बृ. सं. १४.१५).

**आर्यका** (नदी)— क्रौंचद्वीपातील एक नदी (भा. ५.२०.२१).

**आर्यवैजम्** (देश)—अवेस्तामते मध्य आशियातील आर्यांच्या आद्य वसतिस्थानाचा एक देश. नामांतर (ग्रीक साहित्य)—'ऐरियन वेजो'; स्ट्रॅबो—'अरियन' (आर्यवीन). 'आर्यवैजम्'चा शब्दशः अर्थ 'आर्य बीज' असा होतो. डे यांच्या मते इराणी साहित्यातील 'मेदिय' (मद्र) देशाचा 'अझेर्बिजन्' नामक देशविभाग 'आर्यवैजम्'चेच अपभ्रष्ट रूप असावे (डे, आय्. एच्. क्यू. १३१).

**आधुनिक स्थान**—गोएट्झ यांच्या मते आधु. रशियन तुर्कस्तान प्रदेश तो हाच असून आर्य लोकांच्या तीन शाखा येथून निघाल्या. त्यापैकी अफगाणिस्तानमार्गे भारतात आलेले आर्य लोक 'भारतीय आर्य' नावाने, इराणमध्ये गेलेले 'इराणी आर्य' नावाने, आणि इ. स. पू. १४०० च्या सुमारास उत्तर मेसापोटेमियात गेलेले 'इंडोयुरोपीय' नावाने सुविख्यात झाले (गोएट्झ, पृ. ३५; आर्यावर्त पहा).

**आर्याकूप** (तीर्थ)—श्रीमालक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ (श्रीमालमाहात्म्य).

**आर्याचण्डी** (देवी)—श्रीमालक्षेत्रान्तर्गत एक देवी (श्रीमालमाहात्म्य).

**आर्यावर्त** (देश)—'आर्यांचे वसतिस्थान' अशा अर्थाने प्राचीन साहित्यात निर्देशिलेले एक सामूहिक देशनाम. आधु. उत्तर भारतास उद्देशून या संज्ञेचा उपयोग तेथे केलेला आढळतो. समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद प्रशस्तिलेखात (इ. स. ४ थे शतक) तसेच बृहत्संहितेत याच अर्थाने या संज्ञेचा, तसेच तेथील राहणाऱ्या 'आर्य' लोकांचा निर्देश आढळतो (बृ. सं. ७.४२). ह्युएन्त्संग आणि इत्सिंग् यांच्या प्रवासवर्णनात मात्र समस्त 'भारतवर्षा'चे नामांतर म्हणून हे प्रयुक्त केले आहे (वॉटर्स, पृ. ५२; भारतवर्ष पहा).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतातः—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. ह्युएन्त्संग (वॉटर्स. १.१३१–१४०)<br>२. इत्सिंग् (पृ. ५२) | अ-लि-य-ति-श (आर्यदेश) |
| ३. अभिधान चिंतामणि (१२९.९४८)<br>४. कल्पद्रु कोश (५.१०) | आचारवेदी |
| ५. अभिधान चिंतामणि (१२९.९४८) | पुण्यभू |
| ६. अमरकोश (२.१.७)<br>७. वैजयंती कोश (३६.२३; ४५) | पुण्यभूमि<br>ब्रह्मवेदि |

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**—आर्य (भारतीय आर्य) हे मूळ इंडोयुरोपीय जमातीपैकी असून इ. स. पू. ३००० च्या सुमारास ते उरल पर्वताच्या दक्षिणेकडील स्टेपीज् प्रदेशात रहात असत. आपल्या या मूळ वसतिस्थानापासून निघून हे लोक युरोप, नैर्ऋत्य आशिया आणि मध्य आशियात (चीन सरहद्द) पसरले. अवेस्तामते इ. स. पू. २००० च्या सुमारास

आर्य लोकांच्या या टोळीचे 'ऐरियन वेजो' ( आधु. रशियन तुर्कस्तान ) प्रदेशामध्ये तीन भाग होऊन त्यापैकी भारतीय आर्य अफगाणिस्तानमार्गे भारतात आले, दुसरे इराणी आर्य इराणमध्ये स्थायिक झाले, आणि तिसरे मितन्नी लोक उत्तर मेसापोटेमिया देशात स्थायिक झाले. यापैकी इराण आणि भारतातील लोक आर्य नावाने, आणि युरोपातील लोक 'इंडो-युरोपियन' अथवा अथवा 'इंडोजर्मन' नावाने सुविख्यात झाले. भारतीय आर्य लोकांनी इ. स. पू. १४००–१००० च्या सुमारास भारतातील तत्कालीन सिंधु संस्कृतीचा उच्छेद करून त्या जागी स्वतःच्या संस्कृतीची स्थापना केली.

जोमदार भटक्या जमातीमध्ये जन्मलेले आर्य लोक पशू आणि अश्वांच्या संवर्धनकलेमध्ये प्रवीण असून शेतामधून सातूचे पीक काढण्याची कलाहि त्यांना अवगत होती. तटबंदीयुक्त काष्ठमय ग्रामामध्ये ते रहात असत. विभिन्न जातीजमातींच्या अनेक टोळ्यांनी त्यांची वसाहत बनली असून जोमदार आणि युद्धपिपासू देवतांची ते पूजा करीत. ते युद्धकलेमध्ये प्रवीण असून युद्धप्रसंगी कातडी चिलखते, ब्राँझ धातूच्या तलवारी आणि धनुष्यबाणांचा उपयोग करीत. त्यांच्या हलक्या वजनाच्या रथाला द्रुतगामी अश्व जोडलेले असत. सिंधु संस्कृतीच्या भालाधारी लोकांपेक्षा ते युद्धशास्त्रीय दृष्टीने अधिक चपळ आणि बलवत्तर होते. त्या लोकांशी, तसेच आपसामध्ये युद्ध करीत आर्य लोक वायव्य भारतातून उत्तर भारतात पसरले, आणि सिंधु संस्कृतीच्या तटबंदीयुक्त नगरांचा ( पुर ) फडशा पाडत, दिसेल त्या शत्रूला ठार मारीत त्यांनी आपली आगेकूच चालू ठेवली. अशा तऱ्हेने इ. स. पू. १४००–१००० च्या दरम्यान उत्तर भारताचा सारा प्रदेश त्यांनी जिंकून घेतला.

**नामव्युत्पत्ती**–प्राचीन पर्शियन लोक, तसेच ऋग्वेदाचे सूक्तद्रष्टे ऋषी स्वतःस आर्य म्हणवून घेत असल्याने इराण आणि भारतवर्षातील लोकांना 'आर्य' नाव प्राप्त झाले.

**आर्यवंश**–भारत, पर्शिया ( इराण ), ग्रीस, तसेच प्राचीन इतिहासातील स्लाव, केल्ट आणि जर्मन हे सारे लोक एकाच आर्यवंशातील असल्याचा शोध सर विल्यम जोन्स यांनी स. १७६८ मध्ये लावला. भारतीय आर्यांची संस्कृत भाषा, आणि पर्शिया, ग्रीस, रोम, केल्ट आणि जर्मन लोकांच्या भाषा या भाषाभगिनी असल्याचे, तसेच चिनी, अरबी, निग्रो आणि ऑस्ट्रेलियन भाषासमूहाहून त्या सर्वस्वी वेगळ्या असल्याचे त्यांनी सिद्ध केले. त्याआधारे आर्य लोक हे मध्य आशियामध्ये एकत्र रहात असल्याचा सिद्धांत मॅक्स मूलर यांनी इ. स. १८६१ मध्ये प्रस्थापित केला.

**इंडोआर्यन भाषाभगिनी**–संस्कृत, पार्शियन, अर्मेनियन, स्लाव, ग्रीक, लॅटिन, केल्ट आणि ट्यूटॉनिक या भाषा एकाच मूळ भाषेमधून निर्माण झाल्याचे त्यांमधील परस्पर साम्यावरून दिसते. या भाषांतील पिता, माता, बंधु, भगिनी, कन्या, पुत्र, श्वशुर, यांसारखे कौटुंबिक नातेनिदर्शक शब्द; गाय, अश्व, श्वान यासारख्या प्राणिसंज्ञा; १ ते १०० पर्यंतचे आकडे; 'मी', 'तू', 'तो' सारखे सर्वनामवाचक शब्द; खाणे, रहाणे, चाटणे, शिवणे यांसारखी क्रियापदे एकसारखी दिसतात. यावरून उत्तरकालात दूरवर पसरलेल्या या साऱ्या भाषांची जननी आणि ती बोलणारे हे सारे लोक एकच असल्याच्या तर्कास पुष्टी मिळते.

**तुलनात्मक देवताशास्त्र**—भारतवर्षातील प्राचीनतम 'ऋग्वेद', इराणी लोकांचा 'झेंद अवेस्ता' आणि युरोपियन लोकांचे प्राचीन ग्रंथ यांमधील देवता एकसारख्या दिसतात. मॅक्स मूलर यांच्या मते वैदिक आणि ग्रीक साहित्यातील एकसारख्या देवता पुढीलप्रमाणे :—१.सरण्यू ( एरिनिस ); २. गंधर्व ( सेंतौर ); ३. सूर्य ( हेलिओस आणि सोल ); ४. उषस् ( इओस् ); ५. वरुण ( उरणस् ); ६. द्यौ ( झेउस् ); ७. पितर ( ज्युपिटर ). याचे उलट वैदिक आणि इराणी देवताशास्त्रातील यम, त्रित, मित्र, वायु, शर्व, इंद्र, वृत्रहन्, नासत्य, असुर या देवता एकसारख्या आहेत. या दोन्ही धर्मांमध्ये यज्ञात सोमाहुती देत असून ती अर्पिणाऱ्या ऋत्विजांना 'होतृ' आणि 'अथर्वण' म्हणतात. वैदिक आणि स्लाव देवताशास्त्रामध्ये भग ( बोगु ) आणि पर्जन्य ( पेर्कुनुस् ) देवतांचा निर्देश आढळतो.

उपरोक्त देवता मूलतः एकच असल्या, तरी कालविभेद आणि देशकालपरिस्थितीनुसार त्यामध्ये अनेक बदल घडलेले दिसतात ( उदा. युरोपातील 'सूर्य', आणि भारतातील 'पर्जन्य' ). याच कारणामुळे वैदिक कालातील देवतांचे माहात्म्य उत्तरकालात नाहीसे झाले असावे. ऋग्वेदकालीन द्यौः देवतेची जागा उत्तरकालात वरुण-इंद्रांनी, आणि नंतर विष्णु आणि शिव देवांनी घेतली. खिस्ती, मुस्लीम आणि बौद्ध धर्मांचे प्रचंड आक्रमण झालेल्या इटली, पर्शिया आणि सिलोन देशातील देवताशास्त्रातहि असेच क्रांतिकारक बदल झालेले दिसतात.

**ऋग्वेदात**—या ग्रंथात आर्य लोकसमूहाचा ( ऋ. १.५९. २; ७७.३; ५१.८; ९६.३; ३.३४.९; ७.५.६; १८.७ ), तसेच सिंधु, वितस्ता ( झेलम ), असिक्नी ( चिनाब ), परुष्णी ( रावी ), विपाशा ( बियास ), शतद्रु ( सतलज ), कुभा ( काबुल ), सुवास्तु ( स्वात् ), क्रुमु ( कुर्रम् ), सरस्वती;

दृषद्वती, यमुना आणि गंगा या नद्यांचा निर्देश आढळतो. हिमवंत ( हिमालय ) पर्वतहि त्यांना ज्ञात होता. यावरून तत्कालीन आर्य लोक अफगाणिस्तान, पंजाब, काश्मीर, तसेच राजपुताना व सिंधचा काही भाग यांमध्ये निवास करीत असावेत. विंध्य पर्वत आणि नर्मदा नदी यांचा निर्देश ऋग्वेदात आढळत नाही. त्यावरून या प्रदेशापर्यंत ते पोहोचले नसावेत. भारतातील गंगा या सर्वश्रेष्ठ नदीचा निर्देश ऋग्वेदात फक्त एकदाच आढळतो. पूर्व भारतातील वनराज व्याघ्राचा, तसेच तांदुळ या मुख्य अन्नाचा निर्देशहि ऋग्वेदात आढळत नाही. यावरून गंगा नदीशी त्यांचा ओझरता परिचय असून ही नदी त्यांच्या वसाहतीची पूर्वेकडील मर्यादा असावी.

मुख्य केंद्र—ऋग्वेदातील उषासूक्तांसारखी काही सूक्ते सुंदर प्रातःकालयुक्त पश्चिम पंजाबात सिंधु नदीकाठी रचली असली, तरी तत्कालीन आर्य वसाहतींचे मुख्य केंद्र कुरुक्षेत्रातील सरस्वती नदीच्या काठी असावे. ऋग्वेदातील बहुसंख्य सूक्ते या नदीकाठी रचली असून, तेथे तिला सिंधु नदीहून पवित्र मानले आहे. यावरून ऋग्वेदरचनाकाळीच पश्चिम पंजाबचे महत्त्व क्रमशः कमी झाल्याचे दिसते.

अथर्ववेदात—या ग्रंथातील एका सुविख्यात सूक्तामध्ये 'तक्मन' ( ज्वर ) हा गंधार, मूजवंत, अंग आणि मगध या देशांप्रत घालविण्याची प्रार्थना आढळते (अ. वे. ५.२२). याच ग्रंथात अन्यत्र मगध लोकांना 'व्रात्य' ( अपरिचित भाषा बोलणारे भटके लोक ) म्हटले आहे. यावरून याकाळी अंग आणि मगध या अनार्य लोकसमूहांशी आर्य लोक प्रथमच परिचित झालेले दिसतात.

अथर्ववेदात गंधार आणि मूजवंत या वायव्य भारतातील देशांना तिरस्करणीय मानले आहे. यावरून सिंधु खोऱ्यातील लोक या काळात हलक्या प्रतीचे मानले जात असावेत.

उपरोक्त साऱ्या निर्देशांवरून वैदिक आणि उत्तर वैदिक कालात सिंधु आणि गंगा नद्यांची खोरी आर्यांच्या वसाहतींनी व्यापली असून तत्कालीन आर्यावर्ताच्या भौगोलिक सीमा पुढीलप्रमाणे असाव्यात—१. वायव्येस–हिंदुकुश पर्वत; २. पश्चिमेस–सिंधु नदी; ३ उत्तरेस–हिमालय पर्वत; ४. पूर्वेस–ब्रह्मपुत्रा नदी; ५. दक्षिणेस–विंध्य पर्वत.

पाणिनीच्या अष्टाध्यायीत—या ग्रंथात पश्चिमेस गंधार-पासून पूर्वेस मगध देशापर्यंत पसरलेल्या विस्तीर्ण भूप्रदेशाचा समावेश आर्यावर्तात केला आहे. पाणिनीच्या काळी वायव्य आणि उत्तर भारताचा सारा प्रदेश 'उदीच्य' ( = गंधार आणि वाहीक ) आणि 'प्राच्य' या देशविभागांमध्ये विभागला असून त्या दोहोंची परिसीमा शरावती ( पंजाबातील आधु. घग्गर ) नदीने बनली होती. हा सारा प्रदेश त्याचे काळी आर्य संस्कृतीचा आणि संस्कृत भाषेचा बालेकिल्ला मानला जात असे ( उदीच्य पहा ).

पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यात—पाणिनीच्या नंतर दोन शतकांनी म्हणजे पतंजलीच्या काळी शक-यवनांच्या आक्रमणांमुळे बाह्लीक आणि गंधार देश राजकीय आणि सांस्कृतिक दृष्टीने भारतापासून विलग झाले. त्यामुळेच पतंजलीच्या व्याकरणमहाभाष्यात हे दोन देश आर्यावर्ताच्या आणि प्रौढ संस्कृत भाषेच्या सीमेबाहेरचे मानले आहेत.

पतंजलीच्या मते तत्कालीन आर्यावर्ताच्या चतुःसीमा पुढीलप्रमाणे होत्याः—१. उत्तरेस–हिमालय पर्वत; २. दक्षिणेस–पारियात्र पर्वत; ३. पश्चिमेस–आदर्श पर्वत; ४. पूर्वेस–कालकवन ( पतञ्जलि. १.४७५; ३.१७४ ). यावरून पतंजलीच्या काळी आर्यावर्ताची सीमा पाणिनिकालीन प्राच्य आणि उदीच्य देशांहून बरीच संकुचित झालेली दिसते.

ब्राह्मण ग्रंथांच्या काळी—या ग्रंथांच्या रचनाकाळी आर्य लोक दक्षिणेस विंध्य पर्वतापर्यंत, पूर्वेस बंगालपर्यंत, आणि पश्चिमेस माळवा आणि गुजरातमार्गे महाराष्ट्रापर्यंत पसरले असावेत याकाळी आर्य संस्कृतीचा केंद्रबिंदूहि सरस्वती नदी आणि गंगा–यमुना संगम यांच्या दरम्यानच्या मध्यदेशाप्रत स्थलांतरित झाला. या काळात कोसल ( अयोध्या ), काशी, विदेह ( उत्तर बिहार ) हे पूर्वेकडील नवे प्रदेश आर्य संस्कृतीच्या कक्षेत आले, आणि त्याबरोबर पंजाब आदि पश्चिमेकडील देशांचे महत्त्व क्रमशः कमी झाले.

शतपथ ब्राह्मणामध्ये 'विदेघ' ( विदेह देशातील ) माथव नामक आचार्याने यज्ञीय अग्नि ( यज्ञसंस्था ) सरस्वतीतीराहून कोसलमार्गे सदानीरा ( आधु. गंडक ) नदीपर्यंत आणि नंतर त्या नदीपलीकडील विदेह देशात नेल्याचा निर्देश आढळतो ( श. ब्रा. १.४.१.१४–१७ ). यावरून आर्य वसाहतींचा ओघ सदानीरा नदीनजिक काही काल कुंठित होऊन नंतर त्या नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर विदेह या नव्या आर्य वसाहतीची स्थापना झाल्याचे दिसते.

ऐतरेय ब्राह्मणात—या ग्रंथमते आंध्र, पुंड्र, शबर, पुलिंद, आणि मूतिब हे लोक आर्य वसाहतीच्या सीमारेषेवर होते ( ऐ. ब्रा. ७.१८ ). यापैकी आंध्र, शबर (ओरिसा ), आणि पुलिंद हे दक्षिण भारतातील लोक असून पुंड्र ( आधु. पोंड ) लोक बंगालमध्ये रहात असत.

जैमिनीय उपनिषद् ब्राह्मण आणि ऐतरेय ब्राह्मणात अनुक्रमे विदर्भ देश ( आधु. वऱ्हाड ) आणि त्या देशाच्या भीम राजाचा निर्देश आढळतो ( जै. उ. ब्रा. २.४४०; ऐ. ब्रा.

७.३४.९ ). यावरून ब्राह्मण ग्रंथांच्या अखेरच्या पर्वात विदर्भ देश आर्य वसाहतीत सामील झाला असावा.

**ऐतरेय आरण्यकात**—या ग्रंथात वंग, वगध ( मगध ) आणि चेर ( विंध्य प्रदेश ) या लोकांना 'पक्षी' ( पक्ष्याप्रमाणे अज्ञात भाषा बोलणारे लोक ) म्हटले आहे ( ऐ. आ. २.१.१ ).

**कौषीतकि उपनिषदात**—या ग्रंथात उशीनर ( उत्तर पंजाब ), वत्स, मत्स्य, कुरू, पंचाल, काशी आणि विदेह ( उत्तर बिहार ) लोकांना आर्य म्हटले आहे ( कौ. उ. ६. १ ). यावरून तत्कालीन आर्य देशाच्या पश्चिम आणि पूर्व सरहद्दी अनुक्रमे पूर्व पंजाब आणि उत्तर बिहार यांनी बनल्या असून पश्चिम पंजाब आणि त्यापलीकडचे सिंधु नदीचे खोरे याकाळी अनार्य मानले जात असावे.

उपरोक्त निर्देशांवरून इ. स. पू. ८०० च्या सुमारास दक्षिण बिहारपर्यंतचा उत्तर भारताचा सारा भाग आर्य वसाहतींनी व्यापला असून त्या देशात, तसेच दक्षिण भारतातील विदर्भ देशात आर्य-वसाहतीकरणास प्रारंभ झाला असावा.

**महाभारतात**—या ग्रंथकाळी आर्यावर्ताची वाढ होत होत तत्काली ज्ञात असणारा समस्त भारतवर्ष त्यामध्ये समाविष्ट होऊ लागला. या ग्रंथमते व्यासांनी मिथिलानरेश जनकाप्रत पाठविलेला शुक मेरु पर्वताहून आकाशमार्गाने हरिवर्ष आणि हैमवत वर्ष ओलांडून भारतवर्ष ( आर्यावर्त ) देशातील मिथिला नगरीस आला ( म. शां. ३१२.१४–१५ ).

**बौधायन धर्मसूत्रात**—अशा तऱ्हेने आर्यांच्या वसाहतीकरणाची भौगोलिक मर्यादा एकीकडे वाढत असतानाच या संस्कृतीचे पावित्र्य अबाधित राखण्यासाठी आर्यावर्ताची भौगोलिक परिसीमा संकुचित करण्याचा प्रयत्न तत्कालीन धर्मशास्त्रकारांनी केला. बौधायन धर्मसूत्रातील आर्यावर्ताच्या तीन व्याख्यांवरून या ग्रंथकाली आर्यावर्ताच्या सीमा व्याकरण महाभाष्यकालाहूनहि संकुचित बनविलेल्या दिसतात. या ग्रंथमते पश्चिमेस सिंधु नदी आणि पूर्वेस उदय पर्वत यांच्या दरम्यानचा कृष्णमृगगामी, ब्रह्मवर्चसयुक्त प्रदेश हा व्यापक अर्थाने आर्यावर्त असला, तरी पश्चिमेस विनशन तीर्थ आणि पूर्वेस कालकवन यांच्या दरम्यानचा प्रदेश खऱ्या अर्थाने आर्यावर्त होय ( बौ. ध. १.१.२.१० ). गंगा आणि यमुना यांच्या दरम्यानचा प्रदेश आर्यावर्त असल्याची अन्य एक अतिसंकुचित व्याख्याहि बौधायनाने दिली आहे ( बौ. ध. १.१.२.११ ).

**मनुस्मृतीत**—पंजाबातील विनशन तीर्थाच्या पूर्वेकडील दोन समुद्रांच्या दरम्यानचा प्रदेश आर्यावर्त म्हणून ओळखला जात असल्याचा सुस्पष्ट निर्देश मनुस्मृतीमध्ये आढळतो—

आ समुद्रात्तु वै पूर्वात्, आसमुद्रात्तु पश्चिमात्।
तयोरेवान्तरं गिर्योः आर्यावर्तं विदुर्बुधाः ॥

( मनु. २.२२ ).

मनुस्मृतीमध्ये अन्यत्र गंगा-यमुना नद्यांच्या दुआबांच्या मर्यादित प्रदेशास 'आर्यावर्त' म्हटले आहे.

**अन्य साहित्यात**—दोन बाजूंस समुद्र, उत्तरेस हिमवत् आणि दक्षिणेस विंध्य यांच्या दरम्यानचा प्रदेश 'आर्यावर्त' असल्याचा निर्देश राजशेखराच्या काव्यमीमांसेत ( काव्यमी. १७.२२६ ), अमरकोशात ( अमर. २.१.७ ), तसेच मानवधर्मसूत्रामध्ये ( मानवधर्म. २.२२ ) आढळतो. राजशेखराच्या बालरामायणामध्ये विंध्य पर्वताच्या दक्षिण परिसीमेवरून वाहणारी नर्मदा नदी आर्यावर्त आणि दक्षिणापथ यांमधील सीमारेषा मानली आहे ( बा. रा. ६ ). शक्तिसंगमतंत्रातहि या देशाचा निर्देश आढळतो ( शक्तिसङ्गम. ३.७.३९ ).

**स्थापत्य**—इ. स. पू. १४००–३००हा आर्य स्थापत्याचा कालखंड मानला जातो. या काळातील स्थापत्याचे काहीहि अवशेष आज उपलब्ध नसले तरी आर्यांच्या महाभारत-रामायणादि ग्रंथांमध्ये, तसेच पौराणिक साहित्यामध्ये मूर्ती आणि भित्तिचित्रयुक्त राजवाड्यांचा, तसेच मजबूत तटबंदी, प्रमाणबद्ध रस्ते आणि समृद्ध निवासस्थानयुक्त नगरांचा निर्देश आढळतो. हे सारे वर्णन 'बायबल', 'इलियड', 'ओडीसी' ग्रंथांप्रमाणेच भूतकालीन म्हणून केलेले असले, तरी त्याच्या ऐतिहासिकतेविषयी शंका वाटत नाही.

**लाकूड आणि शाडूचे बांधकामसाहित्य**—आर्यांचे सारे स्थापत्य माती आणि लाकूड यांचे असावे. उत्तर भारताच्या मैदानी प्रदेशात इमारतीचा दगड उपलब्ध होत नाही. हिमालयाच्या पायथ्याशी मिळणारा दगड ठिसूळ आणि म्हणूनच इमारतीसाठी निरुपयोगी असतो. पंजाबमधील पंचनद्यांच्या खोऱ्यामध्ये शाडूची माती आणि लाकूड मुबलक असून त्या माध्यमातच शिल्परचना करणे आर्यांना क्रमप्राप्त होते. लाकडाच्या आणि कच्च्या विटांच्या इमारती बांधल्याचे अनेक निर्देश प्राचीन साहित्यात आढळतात. मेगॅस्थिनिसच्या मते पाटलिपुत्र नगराची रचनाहि उभे लाकडी खांब आणि मातीची तटबंदी यांमध्ये केली होती.

**मंदिरस्थापत्य**—या काळातील देवतामूर्ती मातीच्या,

तसेच मंदिरस्थापत्य मातीच्या कच्च्या विटांचे आणि लाकडी तुळयांचे असे. आजहि भारतातील विभिन्न उत्सवमूर्ती मातीच्या करुन उत्सवानंतर त्यांचे पाण्यामध्ये विसर्जन करतात. आर्यकालीन मृत्तिकामय देवतास्थापत्याचे हे प्रतीक मानावे लागेल.

**गृहस्थापत्य**— आर्य लोकांच्या एकमजली अथवा दुमजली झोपड्या वाटोळ्या किंवा चौकोनी आकाराच्या असून त्यांचे उभे स्तंभ आणि आडव्या तुळया बांबूच्या (वश) असत. या झोपड्यांच्या सभोवताली संरक्षणासाठी लाकडी आडोसा अथवा मातीचा तट असे.

**गृहस्थापत्याची उत्क्रांती**—आर्य लोक गंगा नदीच्या खोऱ्यात स्थायिक झाल्यानंतर ते अनेक खोल्यांनी युक्त समृद्ध निवासस्थाने (हर्म्य) बांधू लागले. या निवासस्थानांमध्ये यज्ञीय अग्नीसाठी (गार्हपत्य), आणि स्त्रियांसाठी (पत्नीनां सदनम्) दोन स्वतंत्र खोल्या असत. ही सारी घरे त्या काळीहि बांबूचीच असून चार बाजूंच्या उभ्या बांबूच्या दरम्यान उभ्या बांबूच्याच गवतमिश्रित मातीचा गिलावा केलेल्या भिंती असत. या भिंतींवर गवताचे आणि वेताचे नक्षीकाम करीत. इमारतींची छते बहुशः गवताची असत.

**गृह्यसूत्रकाळी** (इ. स. पू. ८ वे–४ थे शतक)—या ग्रंथकाळी पूर्वकालाहूनहि अधिक मोठी घरे आर्य लोक बांधू लागले. अतिथिअभ्यागतांच्या स्वागतार्थ दिवाणखाने, शयनागारे, कोठीची खोली, लहान मुलांची स्वतंत्र खोली, शौचकूप, तसेच घराभोवती बागा, पाण्याचे तलाव आणि विहिरी बांधल्या जाऊ लागल्या. ही घरे कशी बांधावीत यासंबंधीच्या सविस्तर सूचना गृह्यसूत्र साहित्यात आढळतात.

**नागरी स्थापत्य**—गृहस्थापत्याप्रमाणेच रस्ते, पूल, चौक आदि नागरी स्थापत्यासंबंधीच्या सविस्तर सूचनाहि गृह्यसूत्रात आढळतात. घरामध्ये वापरावयाच्या बशा, कप आणि चमचे सोन्याचे अथवा चांदीचे असून, लोखंडी सुऱ्या, सुया, आरसे आणि विविध अलंकार त्याकाळी प्रचारात होते. देवतामूर्तींची रचना त्याकाळी सुरू झाली असली, तरी त्यांना त्याकाळी मानवी रूप दिले जात नसावे.

**शस्त्रावशेष आणि मृत्तिकापात्रावशेष**—या काळातील ब्रॉंझ धातूची निम्नलिखित शस्त्रास्त्रे सिंधु नदीच्या खोऱ्यात उपलब्ध झाली असून रचनादृष्ट्या नैर्ऋत्य आशियातील तत्कालीन शस्त्रांशी ती मिळतीजुळती दिसतातः— १. फोर्ट मन्रो येथील तलवार; २. शलोझन् गावचे अस्त्रावशेष; ३. शाही तुंप आणि मोहेंजोदारो गावच्या कुऱ्हाडी. याशिवाय या काळातील तपकिरी रंगाच्या मृत्तिकापात्रांचे आणि नग्न देवतांचे काही अवशेषहि उपलब्ध झाले आहेत.

**मगध साम्राज्याचा उदय**—इ. स. पू. ६ व्या शतकाच्या मध्यास बौद्धकाली उत्तर भारतातील विभिन्न छोटी राज्ये नष्ट होऊन त्यांची जागा मगध साम्राज्याने घेतली. मगध देशाचा राजा बिंबिसार (इ. स. पू. ५४४–४९३) याने राजगृह गावी नव्या राजधानीची स्थापना केली. त्याने आणि त्याचा उत्तरवर्ती राजा अजातशत्रु (इ. स. पू. ३९३–४६२) याने राजगृह गावाच्या सभोवताली बांधलेल्या तटबंदीचे अवशेष (जरासंध-की-बैठक) आज अस्तित्वात आहेत (राजगृह पहा). नंद राजांच्या काळात मगधची राजधानी पाटलिपुत्र येथे हलविण्यात आली. या गावचे आज उपलब्ध होणारे बहुतांशी सारे अवशेष मौर्यकालीन असले, तरी या गावी अजातशत्रु राजाने एक लाकडी किल्ला बांधल्याचा निर्देश आढळतो. मौर्यकाली आर्य स्थापत्याचा कालखंड समाप्त होऊन नव्या बौद्धजैन संमिश्र कालखंडास प्रारंभ होतो.

**कारागीर-संघटना**—जातकमते इ. स. पू. ३ ऱ्या शतकाच्या काळी स्थापत्यशास्त्रीय कारागिरांच्या एकूण १८ विभिन्न संघटना होत्या. काष्ठकार, चित्रकार, हस्तिदंती कारागीर, लोहकार आदींचा त्यामध्ये समावेश असे (गोएट्झ, पृ. ३७–४०).

**आर्षभ** (तीर्थ)—वाराणसी येथील 'आनुष' तीर्थाचे नामांतर (पद्म. आदि. ३७.३; आनुष पहा).

२. (द्वीप)—मध्ययुगीन शब्दकोशसाहित्यमते भारतवर्षातील एक द्वीप (वैजयन्ती. ३६.१९; ऋषभतीर्थ पहा).

**आर्ष्टिषेणाश्रम** (आश्रमस्थान)—हिमालय प्रदेशातील गंधमादन पर्वतातील अश्वरथा नदीकाठचे आर्ष्टिषेण ऋषींचे आश्रमस्थान (म. आर. १५७.१९). वनवासी पांडव वृषपर्व्याने सांगितलेल्या मार्गाने हिमालयातील वृषपर्वाश्रमातून या आश्रमात आले (म. आर. १५५.८९). येथून पुढचा प्रदेश धोक्याचा असल्याने पुढे न जाता अर्जुनाची वाट पाहत येथेच रहाण्याचा सल्ला आर्ष्टिषेणांनी त्यांना दिला (म. आर. १५६). कालांतराने अस्त्रप्राप्त अर्जुन येथे परत आला (म. आर. १६१). अंगिरसूतीर्थयात्रेतहि याचा निर्देश आढळतो (म. अनु. २५.५५).

२. कुरुक्षेत्रान्तर्गत आर्ष्टिषेण ऋषींचे आश्रमस्थान. हा आश्रम सरस्वती नदीच्या उत्तर तीरावरील पृथूदक तीर्थस्थानी होता. येथे आर्ष्टिषेणांनी तपस्या करून ज्ञान प्राप्त केले. तदनंतर तपःप्रवृद्ध होऊन ते स्वर्गलोकी गेले (म. श. ३८.३१–३२; ३९.९–२८).

**आलक** (नगर)—बृहत्संहितामते इक्ष्वाकु नगरानजिकचे

एक नगर. तेथील राजाला आलकनाथ म्हणत असत. कर्नमते कुबेराच्या अलकानगरीचा निर्देश येथे अभिप्रेत असावा ( बृ. सं. ११.५८ ). अन्य अभ्यासकांच्या मते येथे ' रलक ' अथवा ' रूलक ' नगरीचा निर्देश असावा. परंतु ही नगरनामे अन्यत्र कोठेहि आढळत नाहीत.

**आलक्षि** ( वन )—पश्चिम भारतातील एक वन ( वा. रा. कि. ४२.१४ ).

**आलत्तूर** ( नगर )—पश्चिम गंग राजा राचमल्ल ( द्वितीय ) च्या स. ९०३ च्या दानपत्रमते दक्षिण भारतातील एक नगर ( एपि. कर्ना. १०.९० ). या गावाचे आधुनिक स्थान समजत नाही.

**आलविडगाम्ब** (ग्राम)—सोळंकी राजा अजयपालाच्या वि. सं. १२३१ च्या शिलालेखमते मध्य गुजरातेतील नर्मदातट मंडलान्तर्गत पूर्णपथकातील एक ग्राम. आखुलगाम्ब नामक राज्यविभागात हे होते ( इंडि. अँटि. १८.८२–८४ ). या गावाचे आधुनिक स्थान समजत नाही.

**आलवी** ( ग्राम )—फाहियेन् आणि जातकमते मध्य भारतातील एक बौद्धस्थान. या गावानजिकच्या अग्गलव नामक मंदिरात गौतम बुद्धाने धर्मप्रवचन दिले होते ( जा. १.१६० ). या मंदिराचा निर्देश फाहियेन्च्या प्रवासवर्णनात ' अग्गलव चेतिय ' नावाने आढळतो ( अग्गलव चेतिय पहा ). कनिंगहॅम आणि होर्नुल यांच्या मते उत्तर प्रदेशातील उनाव जिल्ह्यातील आधु. नेवल ( नवल ) गाव ते हेच होय. अन्य अभ्यासकांच्या मते उत्तर प्रदेशातील इटावा गावच्या २७ मैल ईशान्येकडील आधु. अविव गाव ते हेच असावे ( लॉ, पृ. ६९ ).

**आलिङ्ग्यायन** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते प्राचीन भारतातील एक ग्राम ( पा. सू.४.२.८२ ).

**आलीना** ( ग्राम )—वलभी राजा शिलादित्य ( सप्तम ) च्या स. ७६६ च्या अलीना ताम्रपटाचे उपलब्धिस्थान. गुजरात प्रांतातील खेडा जिल्ह्यातील नडियाद गावापासून हे १४ मैल ईशान्येस आहे ( कॉर्पस्. इन्स्क्रि.३.२.१७१–१७२ ). नामांतर–' अलीणा '.

**आलुपगाम्बे** ( ग्राम )—यादव राजांच्या शके ११९३ च्या पैठण ताम्रपटमते महाराष्ट्रातील सेऊण देशातील एक ग्राम ( इंडि. अँटि. १४.३१५ ). औरंगाबाद जिल्ह्यातील वदठेण गावाच्या पश्चिमेकडील आधु. अवळगाव ते हेच असावे ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २७७ ).

**आलुप** ( लोकसमूह )—दक्षिण भारतातील एक लोकसमूह. या लोकसमूहाचे राजे इ. स. ६ व्या शतकात चालुक्य राजांचे मांडलिक असून, कदंबमंडलात ( उत्तरकालीन वनवासी देश ) यांनी चालुक्य राजांच्या संमतीने आपले राज्य स्थापन केले ( एपि. इंडि. ९.१५; इंडि. अँटि. १९.१४७ ).

स. ७५३ मध्ये राष्ट्रकूट राजा दंतिदुर्गाने या लोकांना वनवासी प्रदेशातून हाकलले. तेव्हा म्हैसूर राज्यातील शिमोगा जिल्ह्यातील नगर तालुक्यात त्यांनी स्वतंत्र राज्य स्थापन केले. या लोकांच्या नावावरून ते ' आलुवखेड ६००० ' नावाने सुविख्यात झाले, आणि ते इ. स. ११ व्या शतकाच्या अखेरीपर्यंत टिकले. या राज्याची राजधानी पोंबुच्छ ( आधु. हुम्च ) गावी होती ( आलुवखेड ६००० पहा ).

या लोकांच्या आलुपेंद्र कुलशेखर नामक राजाचे इ. स. १३ व्या शतकात दक्षिण कर्नाटकावर राज्य असल्याचा निर्देश तत्कालीन शिलालेखात आढळतो ( रंगाचारी, २. दक्षिण कर्नाटक १२४ ).

उपशाखा—या लोकांच्या निम्नलिखित दोन प्रमुख उपशाखा होत्याः— १. कोंगाल्व–इ. स. ११ व्या शतकात कूर्ग प्रदेशावर या लोकांचे राज्य असून, ते चोल राजा राजेंद्र ( प्रथम ) याचे मांडलिक होते; २. चंगाल्व–कूर्गच्या दक्षिणेकडील प्रदेशावर या लोकांचे राज्य होते.

इ. स. १२ व्या शतकात होयसाळ राजांनी या लोकांची सारी राज्ये जिंकून घेतली ( सेवेल. इन्स्क्रि. पृ. ३६२ ).

**आलुवखेड ६०००**—दक्षिण भारतान्तर्गत म्हैसूर राज्यातील एक देश. ' आलुप लोकसमूहाचे राज्य ' ( इ. स. ७ वे–११ वे शतक ) अशा अर्थाने त्यास हे नाव प्राप्त झाले असावे. उत्तर म्हैसूर प्रांतातील शिमोगा जिल्ह्यान्तर्गत नगर तालुक्यातील पोंबुच्छ ( आधु. हुम्च ) गावी या लोकांची राजधानी होती ( एपि. कर्ना. ६.३७ ). त्यावरून या गावासभोवतालचा आधु. शिमोगा जिल्ह्याचा प्रदेश म्हणजे हा देश असावा ( आलुप पहा ).

डॉ. हुल्ट्झ यांच्या मते ' आलुवखेड ' नावातील ' आल् ' या आद्याक्षराचा अर्थ द्रविड भाषेत ' राज्य करणे ' असा होतो ( उदा.–' कोंगाल्व ', ' चंगाल्व ', ' नाडाल्व '; आर्कि. रिपोर्ट. स. १९०७–१९०८, पृ. २३८ ).

**आलेगाव** ( ग्राम )—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील महानुभावपंथीय तीर्थस्थान ( स्थान. पृ. १०; २१ ). अमरावती जिल्ह्यातील बाळापूर तालुक्यातील पातुर ( प्राचीन पातुरडी ) गावाच्या ७ मैल नैर्ऋत्येकडील आधु. आलेगाव ते हेच होय.

**आल्मकामेय** ( विषय )—पाणिनीच्या गणपाठमते

प्राचीन भारतातील एक विषय ( देशविभाग ) ( पा. सू. ४. २.५३ ).

**आल्वखेड** ( देश )—होयसाळ राजा बल्लाळ ( प्रथम ) च्या स. ११०१ च्या शिलालेखमते 'कर्नाटक' देशाचे नामांतर. त्याच्या राज्याच्या सरहद्दीवर तो देश होता ( एपि. कर्ना. ५.१९९; कर्नाटक पहा ).

**आव** ( देश )—दक्षिण भारतातील एक देश. हा देश तामीळ देशाचे प्रवेशद्वार मानला जात असून याची राजधानी पिथुंड गावी होती. खारवेलाने तिचा संपूर्ण नाश केला ( जयचन्द्र, पृ. १५० ).

**आवगन**—बृहत्संहितमते वायव्य भारतातील 'अवगन' ( आधु. अफगाण ) लोकसमूहाचे नामांतर ( अवगन पहा ). अन्य नामांतरे ( बृहत्संहिता )–'अवगाण'; 'आवंगण'.

**आवनीमठ** ( शंकरमठ )—शृंगेरी येथील एक उपमठ.

**आवन्त** ( लोकसमूह )—बृहत्संहिता आणि मत्स्य-मते अवंती देशनिवासी एक लोकसमूह ( बृ. सं. १४. ३३; मत्स्य. ११४.३६ ). नामांतरे–'आवंतक' ( बृ. सं. १४. १२; ५.७३ ); 'आवंतिक' ( बृ. सं. ५.६४; ८.६२ ); 'आवंत्य' (मार्क. ५४.५२; वामन. १३.५३; अवंती पहा ).

**आवन्ति** ( नगर )—महाभारतमते मध्य भारतातील 'उज्जयिनी' नगराचे नामांतर ( म. स. २८.१०; उज्जयिनी पहा ).

**आवर्त** ( तीर्थ )—नर्मदा नदीकाठचे एक तीर्थस्थान ( नारद. उत्तर. ७७.१७ ).

**आवर्तक** ( देश )—दक्षिण भारतातील एक देश ( बृ. सं. १४.१२ ).

**आवर्तन** ( उपद्वीप )—जंबूद्वीपाचे एक उपद्वीप ( भा. ५.१९.३० ).

**आवर्तनन्द** ( तीर्थ )—महाभारतान्तर्गत अंगिरस्–तीर्थयात्रामते एक तीर्थ ( म. अनु. २५.४५ ).

**आवलगाव** ( ग्राम )—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील गोदावरी नदीकाठचे महानुभावपंथीय तीर्थस्थान ( स्थान. पृ. ३५ ). औरंगाबाद जिल्ह्यातील नागमठाणा गावाच्या २ मैल आग्नेयेकडील आधु. आवलगाव ते हेच होय.

**आवलसाढि** ( ग्राम )—सोळंकी राजा कर्ण ( प्रथम ) च्या वि. सं. ११३१ आणि शके ९९६ च्या शिलालेखमते उत्तर गुजरातेतील लाट देशान्तर्गत नागसारिका विषयातील एक ग्राम. दक्षिण गुजरातेतील आधु. अमलसाड गाव ते हेच होय ( जे. बी. बी. आर. ए. एस्. २६.२५० ). नामांतर–'आम्वलिसाढि'.

**आवशीर** ( देश )—महाभारतान्तर्गत कर्णदिग्विजय-मते एक देश ( म. आर. परि. २४.१.४४ ).

**आवसथ्यपद** ( तीर्थ )—गया येथील एक तीर्थ ( वायु. १११.५२ ).

**आवापुर** ( जैनतीर्थ )—जयसागरमते जैनांचे सुविख्यात तीर्थस्थान. येथे चिंतामणि जिनमंदिर होते (ती. सं. पृ. १२०).

**आविद्धा** ( देशविभाग )—कुलस्तंभ राजाच्या इ. स. १० व्या शतकातील ताम्रपटमते भारतातील एक देशविभाग ( एपि. इंडि. २९.१६७; १६९ ). याचे निश्चित स्थान समजत नाही.

**आशा** ( लिंग )—श्रीपर्वतावरील एक शिवलिंग ( लिङ्ग. १.९२.१४८ ).

**आशापल्ली** ( नगर )—इ. स. ११ व्या शतकातील गुजरातमधील भिल्ल राज्याच्या राजधानीचे गाव. चालुक्य राजा कर्ण ( स. १०६४–१०९४ ) याने या नगरावर हल्ला करून ते जिंकले, आणि त्यानजिकच कर्णावती नामक नव्या नगराची स्थापना केली. अहमदाबादनजिकचे असावल ग्राम म्हणजे चालुक्यकालीन आशापल्ली असून, आधु. अहमदाबाद म्हणजे प्राचीन कर्णावती होय. नामांतर ( मुसलमानी साहित्य )–'येस्सवल'; ( जैन साहित्य )–'राजनगर.'

**मंदिरे**—कर्ण राजाने येथील कोच्छ्रबा देवीचे नवे मंदिर बांधले. त्याचप्रमाणे जयंतीदेवी आणि कर्णेश्वर महादेव ही नवी मंदिरेहि बांधली.

**जैनस्थान**—जैन धर्मांचे हे एक प्रमुख केंद्र असून अरिष्टनेमीचे एक मंदिर येथे होते. येथील देवसूरि नामक सुविख्यात जैन आचार्याला भेटण्यासाठी कुमुदचंद्र येथे आला होता. देवचंद्राचार्य नामक आचार्याच्या देखरेखीखाली हेमचंद्राचे शिक्षणहि याच गावी झाले होते. जैन साहित्यात सुविख्यात असणारे राजनगर ते हेच होय.

**अहमदाबादची स्थापना**—या गावाचे भौगोलिक स्थान आणि हवापाणी यांनी प्रसन्न होऊन अहमदशाह ( प्रथम ) याने आपली राजधानी या गावी हलविली आणि नजिकच अहमदाबाद या नव्या नगराची स्थापना केली. आधु. अहमदाबाद ते हेच होय ( इंडि. अँटि. स. १९२४; पृ. १६; कर्णावती पहा ).

**सेठ हाथीसिंग जैनमंदिर**—धर्मनाथ नामक १५ व्या जैन तीर्थंकराचे हे मंदिर हाथीसिंग नामक जैन व्यापाऱ्याने १९ व्या शतकात बांधले असून ते अर्वाचीन जैन मंदिर-स्थापत्याचे प्रातिनिधिक उदाहरण मानले जाते ( फर्ग्युसन., २.६४–६६ ).

२. सोळंकी राजा विशालदेवाच्या वि. सं. १३१७ च्या शिलालेखमते उत्तर गुजरातेतील वर्द्धिपथकातील एक गाव. या गावातील पल्लडिका नामक स्थानाचा निर्देश उपरोक्त शिलालेखात आढळतो. आधु. असलालि गाव ते हेच असावे ( इंडि. अँटि. ६.११० )

**आशापुरी** ( देवीस्थान )—गुजरातमधील पेटलाद गावाजवळील एक देवीस्थान. गुजरातमधील अनेक लोकांची ही कुलदेवता असून या देवतेची अन्य अनेक मंदिरे या प्रांतात आहेत. यापैकी पेटलादजवळील हे मंदिर मुख्य आहे ( ती. पृ. ४२७ ).

**आशारम्य** ( जैनतीर्थ )—निर्वाणकांड ग्रंथमते एक जैन तीर्थस्थान. सुव्रतदेव नामक मुनी येथे निवास करीत असत ( ती. सं. पृ. १२० ).

**आशाविनायक** ( गणेशस्थान )—काशी येथील गणेशस्थान ( स्कन्द. काशी. ३३.१७६ ).

**आश्रम** ( तीर्थ )—वृंदावनातील एक तीर्थस्थान ( नारद. उत्तर. ८०.१३ ).

**आश्रम-महा-रोझै** ( बृहद्भारतीय बौद्धस्थान )—आग्नेय आशियान्तर्गत कंबुज ( आधु. कंबोडिया ) देशातील मेकाँग नदीच्या खोऱ्यातील ( फुनान ) एक बौद्ध मंदिरस्थान. येथील मंदिर प्रारंभीच्या गुप्त स्थापत्यशैलीने बांधले आहे ( गोएट्झ, पृ. १११ ).

**आश्रमक** ( ग्राम )—गुप्त राज्यकालातील शर्वनाथ राजाच्या स. ५१२ च्या खोह ताम्रपटमते मध्य भारतान्तर्गत बाघेलखंडातील तमसा (आधु. तोन्स) नदीच्या उत्तर किनाऱ्यावरील एक ग्राम. याचे आधुनिक स्थान समजत नाही (कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.१२६ ).

**आश्वकायन** ( लोकसमूह )—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते वायव्य भारतातील एक लोकसमूह ( पा. सू. ४.१.९९ ). या लोकांची राजधानी मशकावती ( ग्रीक–'मस्सग' ) गावी होती ( काशिका. ४.२.८५ ). अग्रवाल यांच्या मते आधु. स्वात् आणि पंजकोरा नद्यांच्या दरम्यानच्या स्वात् खोऱ्यामध्ये या लोकांची वसाहत होती. आधु. तक्षशिला गावाच्या परिसरात या लोकांची काही नाणी उपलब्ध झाली आहेत. नामांतर ( पाणिनि )–'अश्वक'; ( सिकंदरकालीन ग्रीक साहित्य )–'अस्सकेनोइ'; 'अस्सकोई'.

**नामव्युत्पत्ती**—'उत्तम अश्वांचा देश' अशा अर्थाने यास 'आश्वकायन' नाव प्राप्त झाले असावे.

**ग्रीक साहित्यात**—कपिशा देशाहून पूर्वेकडे सिंधु नदीच्या दिशेने आगेकूच करणाऱ्या सिकंदरला क्रमाक्रमाने अस्तकेनोइ ( हास्तिनायन ), अस्पेसिओइ ( आश्वायन ), आणि अस्सकेनोइ ( आश्वकायन ) या लढाऊ लोकांशी सामना करावा लागला. यापैकी सर्वाधिक निकराची लढाई आश्वकायन लोकांनी केली असून या युद्धात पुरुषांच्या बरोबरीने स्त्रियांनीहि भाग घेतला होता.

**किल्ला**—परकीय आक्रमणाच्या वेळी हे लोक स्वात् नदीच्या पूर्वेकडील सिंधु खोऱ्यातील 'एओरनस्' ( वरणा = आधु. ऊंगरा ) नामक डोंगरी किल्ल्यात स्थलांतरित होत असत ( पा. सू. ४.२.८२ ).

**राजधानी**—स्वात् नदीच्या दक्षिणेकडील बाजोर गावापासून २४ मैल अंतरावरील आधु. मजग म्हणजे आश्वकायन राजधानी मशकावती नगर होय.

२. पाणिनीच्या अष्टाध्यायीमते वायव्य भारतातील 'अश्मक'देशाचे नामांतर (पा. सू. ४.१.९९; अश्मक१. पहा).

**आश्वायन** ( लोकसमूह )—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते वायव्य भारतातील एक आयुधजीवी लोकसमूह ( पा. सू. ४.१.११० ). अग्रवाल यांच्या मते आधु. चित्रळ अथवा अलीशंग ( प्राचीन 'कुणार' = ग्रीक 'युअस्पला' ) नदीच्या खोऱ्यामध्ये हे लोक रहात असत. नामांतर ( सिकंदरकालीन ग्रीक साहित्य )–'अस्पेसिओइ'.

अन्य काही अभ्यासकांच्या मते वायव्य भारतातील लंपाक देशामध्ये ( आधु. लमगान अथवा लघमान ) हे लोक निवास करीत असून, यांच्या वसाहतीच्या भौगोलिक चतुःसीमा पुढीलप्रमाणे होत्याः— १. पूर्वेस–कुणार नदी; २. पश्चिमेस–आलिंगार नदी; ३. दक्षिणेस–कुभा ( आधु. काबुल नदी ); ४. उत्तरेस–पामीर पठार ( लंपाक पहा ).

**ग्रीक साहित्यात**—या साहित्यमते कपिशा देशाहून सिंधु नदीप्रत आगेकूच करणाऱ्या सिकंदरला खोएस ( संस्कृत–'सु-अश्व'; अवेस्ता–'ह्वस्प' = आधु. चेरखेल ) नदीच्या खोऱ्यातील अस्पेसिओइ या लढाऊ जातीशीं युद्ध करावे लागले ( मोदी, एशियाटिक पेपर्स. २.२०७ ).

अग्रवाल यांच्या मते 'उत्तम अश्वांचा देश' अशा अर्थाने या देशास 'आश्वायन' नाव प्राप्त झाले होते. हे लोक डोंगराळ किल्ल्यामध्ये रहात असून यांचे अंडक, गौरी, आरिगायन आदि किल्ले विशेष सुविख्यात होते. या देशाच्या दक्षिणेकडील काबुल नदीच्या परिसरातील प्रदेश सिकंदराच्या मार्गावर होता. परंतु तेथे विशेष विरोध न झाल्यामुळे त्याचा निर्देश आढळत नाही. या देशाहून सिकंदर नीसा ( आधु. नगरहार, जलालाबाद ) देशास गेला ( अग्रवाल, पाणिनि. पृ. ४६६ ).

**आश्विनतीर्थ** (तीर्थ)—कुरुक्षेत्रातील एक तीर्थ (म. आर. ८१.१४; पद्म. आदि. २६.१५).

**आश्विनेश्वर** (लिंग)—काशी येथील शिवलिंग (स्कन्द. काशी. ९७.४४).

**आश्विलिया** (नगर)—सोळंकी राजा जयसिंहाच्या वि. सं. ११९६ व १२०२ च्या शिलालेखमते प्राचीन गुजरातेतील गोद्रहक मंडलान्तर्गत उभलोड पथकातील एक नगर. मध्य गुजरातमधील गोध्रा प्रदेशातील आधु. सिम्नाल्या ग्राम ते हेच होय (इंडि अँटि. १०.१५९–१६०).

**आषाढी** (तीर्थ)—कश्मीरातील वितस्ता (आधु. झेलम) नदीकाठचे एक तीर्थ (नीलमत. १५४९).

२. नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ (मत्स्य. १९४.३०).

३. अरुणाचलावरील एक तीर्थ. येथे 'आषाढीश' व 'रतिशा' या देवता होत्या (स्कन्द. अरुणाचल. २.२).

**आषाढीश्वर** (लिंग)—काशी येथील एक शिवलिंग (स्कन्द. काशी. ९७.१७७; लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. ९३).

**आष्ट्रक धन्व** (वाळवंट)—पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यमते एक वालुकामय प्रदेश (पतञ्जलि. ४.२. १२१). 'धन्व' (वाळवंट) अंत्यशब्दयुक्त स्थाननामाचे उदाहरण म्हणून याचा निर्देश तेथे केला आहे. नामांतर (महाभारत)–'अरक'.

अग्रवाल यांच्या मते वायव्य पंजाबातील आधु. अटक जिल्ह्याचा प्रदेश म्हणजे हा देश होय. आजहि हा रेताड प्रदेश 'धन्नी' स्थानिक नावाने ओळखला जातो. हे आणि त्या नजिकचे डोंगराळ पृथु जनपद (आधु. रावळपिंडी प्रदेश, स्थानिक नाव–'पोठोवार') हे दोन्ही गंधार देशात समाविष्ट होत असत. 'धन्नी–पोठोवार' हे देशद्वय आजहि स्थानिक लोकात प्रचलित आहे (अग्रवाल, पाणिनि. पृ. ५६; पृथु पहा).

**महाभारतात**—या ग्रंथातील नकुलाच्या पश्चिम दिग्विजयात 'वृंदारक' (वृंद + अरक) देश जिंकल्याचा निर्देश आढळतो (म. स. २९.१०). येथे संभवतः बुनेर आणि अटक जिल्ह्यांचा निर्देश अभिप्रेत असावा.

**आष्टी** (ग्राम)—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थस्थान (स्थान. पृ. २५). उमरावती जिल्ह्यातील वलगावपासून ५ मैलांवरील आणि उमरावतीपासून १२ मैलांवरील आधु. आष्टी ग्राम ते हेच होय.

२. स्थानपोथीमते महाराष्ट्रातील महानुभावपंथीय तीर्थस्थान (स्थान. पृ. ३७). बीड जिल्ह्यातील मातुकुली गावाच्या ८ मैल पश्चिमेकडील आधु. आष्टी ग्राम ते हेच होय. हे अहमदनगरपासून ३६ मैलांवर आहे.

**आसट्टिग्राम** (ग्राम)—चालुक्य राजकुमार श्रियाश्रय शिलादित्याच्या स. ६५६ च्या नवसारी ताम्रपटमते गुजरातमधील एक गाव. बाहीरिका विषयातील कण्हवल आहारात (बार्डोलीनजिकचे आधु. कणिह) हे गाव होते. सुरत जिल्ह्यातील कणिह गावाच्या १० मैल नैर्ऋत्येकडील आधु. अस्तगाम ते हेच होय (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.१२४).

जयशक्ति राजाच्या स. ६८० च्या मुंदखेडे ताम्रपटातहि याचा निर्देश आढळतो (एपि. इंडि. २९.११८).

२. शिलालेख साहित्यमते 'अष्टग्राम'चे नामांतर (एपि. इंडि. ८.२२९; अष्टग्राम पहा).

**आसन** (नद)—जंबूद्वीपातील एक नद (भा. ५.१६.२४).

**आसावली** (ग्राम)—धर्मारण्यातील एक ग्राम (स्कन्द. ब्राह्म. ध. ३५.४३; ३९.५१; २६४). पाठभेद–'असाला'.

**आसन्दि ५००** (देशविभाग)—होयसाळ राजा विष्णुवर्धनाच्या स. ११३६ च्या आरसीकेरे ताम्रपटमते म्हैसूर राज्यातील 'आसंदिनाड' देशविभागाचे नामांतर (आसंदिनाड पहा).

**आसन्दिनाड** (देशविभाग)— होयसाळ राजा बल्लाळ (प्रथम) च्या स. ११०३ च्या काडूर शिलालेखमते म्हैसूर राज्यातील एक देशविभाग. म्हैसूर प्रांतातील कडूर जिल्ह्यातील आधु. आसंदिनाड प्रदेश तो हाच असून, इ. स. ८ व्या शतकात येथे पश्चिम गंग राजा विजयादित्य राज्य करीत. असे (एपि. कर्ना. ६.१४५). सिंदगेरे प्रदेश या देश विभागात समाविष्ट होत असे (एपि. कर्ना. ६.१६०). नामांतर (शिलालेख साहित्य)–'आसंदि ५००'.

इ. स. ९ व्या शतकात नोलंबवंशीय राजांचे राज्य या प्रदेशावर होते (एपि. कर्ना. ६.१४१). परंतु उत्तरकालात होयसाळांचे मांडलिक असणाऱ्या गंग राजांचे राज्य या प्रदेशावर प्रस्थापित झाले (रंगाचारी, २. कडूर. २२).

**आसन्दीवत्** (नगर)—पाणिनीच्या अष्टाध्यायी आणि गणपाठमते उत्तर भारतातील एक नगर (पा. सू. ८.२.१२; ४.२ ८६). कात्यायन श्रौतसूत्रमते हे कुरुक्षेत्रानजिक होते (का. श्रौ. २४.२२६). नामांतर–(कात्यायन श्रौतसूत्र, काशिका. ८.२.१२)–'अहिस्थल'; (महाभारत)—'आसंदी'; (महाभारत मुंबई प्रत)–'माकंदी'.

**ब्राह्मण साहित्यात**—जनमेजय पारिक्षित राजाची राजधानी या गावी असून त्याने येथे अश्वमेध यज्ञ केला होता

( ऐ. ब्रा. ८.२१; श. ब्रा. १३.५.४.२ ).

महाभारतात—भारतीय युद्ध टाळण्यासाठी पांडवांनी मागितलेल्या पांच गावांपैकी हे एक होते ( म. उ. ७०.१५; ८०.७ ).

**आसा** ( शिवस्थान )—नर्मदेच्या दक्षिण तीरावरील एक शिवस्थान. येथे कपालेश्वर शिवाचे मंदिर आहे ( ती. पृ. ४३३ ).

**आसिका** ( नगर )—शिलालेख साहित्यमते उत्तर भारतातील एक नगर ( भांडारकर सूची. क्र. ३२९ ). पंजाबातील आधु. हासी गाव ते हेच होय ( अग्रवाल, पाणिनि. पृ. ८६ ).

**आसित** ( वर्ष )—शाकद्वीपातील एक वर्ष ( मत्स्य. १२२.२४ ).

**आसुति** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते प्राचीन भारतातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८६ ).

**आसुरि** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते प्राचीन भारतातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.१३८ ).

**आसुरीश्वर** ( लिंग )—वाराणसी येथील एक शिवलिंग ( लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. ६७ ).

**आस्तोबलसर** ( नगर )—टॉलेमीच्या ग्रंथमते उत्तर प्रदेशातील ' स्थानेश्वर ' ( आधु. थानेसर ) नगराचे नामांतर ( मॅक्रिन्डल, टॉलेमी, पृ. ३३१ ).

**आस्थकेश** ( देश )—वायव्य भारतातील एक देश ( बृ. सं. १४.२३ ).

**आहवनीयपद** ( तीर्थ )—गया येथील एक तीर्थ ( अग्नि ११५.५१; वायु. १११.५१ ).

**आहिंसी** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते प्राचीन भारतातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.१३८ ).

**आहिराणा** ( ग्राम )—चालुक्य राजा त्रिभुवनपालाच्या वि. सं. १२९० च्या शिलालेखमते उत्तर गुजरातेतील सारस्वत मंडलान्तर्गत विषय पथकातील ( आधु. कडी महाल ) राजपुरी गावाच्या दक्षिणेकडील एक ग्राम ( इंडि. अँटि. ६.२०८–२१० ). डॉ. सांकलिया यांचे मते कडी महालातील आधु. इराणा गाव ते हेच होय ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २५९ ).

**आहुक** ( देश )—पूर्व भारतातील एक देश ( ब्रह्माण्ड. १६. ५२ ).

२. उदीच्य ( वायव्य ) भारतातील एक देश ( वायु. ४५.१२१ ). ब्रह्मांडमते हे ' कुहक ' लोकसमूहाचे नामांतर असावे ( ब्रह्माण्ड. ४९.४९; कुहक पहा ).

**आहृतिपुर** ( नगर )—दक्षिण भारतातील एक नगर. पांडवांच्या राजसूय यज्ञसमयीच्या दक्षिण दिग्विजयात सहदेवाने हे जिंकले होते ( म. स. २८.३९ ).

**आह्व** ( तीर्थ )—कुरुक्षेत्रातील एक तीर्थ ( नारद. उत्तर. ६५.८८ ).

**आह्वरकन्थम्** ( नगर )—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते प्राचीन भारतातील एक नगर ( पा. सू. २.४.२० ). या नगरनामाच्या ' कंथम् ' या अंत्यशब्दावरून हे नगर उशीनर ( आधु. झंग. मघियाना ) देशात असावे ( पा. सू. २.४ २० ).

**आळन्दी** ( क्षेत्र )—पुण्याजवळील इंद्रायणी नदीकाठचे वारकरी क्षेत्रस्थान. येथे श्रीज्ञानेश्वर महाराजांनी जिवंत समाधी घेतली.

**नामांतरे**—स्कंद पुराणाच्या सह्याद्रि खंडात या क्षेत्राची निम्नलिखित नामांतरे आढळतातः— १. वारुणा; २. अलका; ३. कणिका; ४. आनंद; ५. सिद्धक्षेत्र ( स्कन्द. सह्याद्रि. ६४ ).

**चांगदेव पासष्टी**—ज्ञानेश्वर महाराजांच्या मातोश्री रखमाबाई या आळंदीच्या सिधोपंत कुलकर्ण्यांच्या कन्या असून आजोळचे गाव या नात्याने त्यांचा या गावामध्ये बालपणापासून वावर होता. नामदेवादि महाराष्ट्रीय संतमंडळींसमवेत हिंदुस्थानभर तीर्थयात्रा केल्यानंतर ज्ञानेश्वर महाराज आळंदीस परत आले. स्वतःच्या योगसामर्थ्याच्या चमत्कारांनी भाबड्या भक्तांवर भुरळ टाकणाऱ्या चांगदेवाला निर्जीव भिंत चालविण्याचा चमत्कार दाखवून ज्ञानेश्वरांनी त्यास लज्जित केले. तत्प्रसंगी, ज्ञानेश्वरांनी चांगदेवास केलेला ६५ ओव्यांचा उपदेश ' चांगदेव पासष्टी ' नावाने सुविख्यात आहे. आळंदी येथील श्रीज्ञानेश्वरांच्या निवासस्थानानजिक या भिंतीचे स्थान आजहि दाखविले जाते. या स्थानी अरुगारी सध्याची भिंत स. १८९८ मध्ये बांधली आहे.

**जिवंत समाधी**—आळंदी येथे श्री ज्ञानेश्वर महाराजांनी जिवंत समाधी घेतली असून ते स्थान आधुनिक काळी ' देऊळवाडा ' नावाने ओळखले जाते. समाधीच्या गाभाऱ्यामध्ये एकावर एक चार लहान शिळा असून त्यांच्या अंतर्भागातील गुहेमध्ये श्री ज्ञानेश्वरांनी स. १२९३ मध्ये ( कार्तिक वद्य १३, शके १२१५ ) जिवंत समाधी घेतली. गळ्यात हार घातलेल्या आणि कपाळी केशरी गंध लावलेल्या ज्ञानेश्वरांना त्यांचे ज्येष्ठ बंधु निवृत्तिनाथ यांनी गुहेमध्ये उत्तरेकडे तोंड करून आसनावर बसविले. तदनंतर ज्ञानेश्वरांनी निम्नलिखित प्रार्थना करून उपस्थित संत मंडळींचा निरोप घेतला—

ज्ञानदेव म्हणे सुखी केले देवा।
पादपद्मी ठेवा निरंतर ॥

उपरोक्त प्रार्थनेनंतर गुहेची शिळा बंद करून तीवर फुले वाहण्यात आली. ज्ञानेश्वरांच्या या समाधीवरील सध्याचा गाभारा पुरंदर येथील श्री. देशपांडे यांनी स. १७५० मध्ये बांधला असून त्यावरील शिखर स. १८७१ मध्ये बांधले आहे. गाभाऱ्यात समाधीजवळ विठ्ठल-रखुमाईच्या मूर्ती आहेत ( नेऊरगावकर, आळंदी. पृ. २३–२४ ).

**आळवार तिरुनगरी** ( क्षेत्र )—दक्षिण भारतातील श्रीवैकुंठम्‌पासून ३ मैलांवरील वैष्णवस्थान ( ती. पृ. ३९० ).

**ऑक्सिकनोस्** ( लोकसमूह )— सिकंदरस्वारीशी संबंधित ग्रीक साहित्यमते वायव्य भारतातील एक लोकसमूह. या लोकांची दोन नगरे सिकंदरने लुटली. अन्य गावे स्वतः होऊन शरण आली. नामांतर ( कर्टियस )–' प्रसेति '.

कनिंगहॅमच्या मते सिंधु नदीच्या पश्चिमेकडील लारखाना प्रदेशानजिक हे लोक रहात असावेत ( केंब्रिज हिस्टरी. १.३७७ ). अन्य अभ्यासकांच्या मते महाभारतातील ' प्रोष्ठ ' लोक हेच असावेत ( प्रोष्ठ पहा ).

**ऑक्सोअमिस्** ( नगर )—टॅलेमीच्या मते सिंधु नदीच्या पूर्व भागातील एक नगर ( अक्षांश २२°–२०' उत्तर ). सेंट मार्टिन यांच्या मते अरबी समुद्रापासून २५ मैल अंतर्भागातील सरस्वती नदीच्या पूर्वेकडील ' सूमी ' हे मुसलमान राजधानीचे गाव ते हेच होय. यूल यांच्या मते आधु. अजमेर गाव ते हेच असावे.

**ऑर्ग्यालिक** ( आखात )—टॅलेमीच्या मते रामेश्वरम् आणि सिलोन यांना जोडणाऱ्या कोल्खिक आखातानजिकचे एक आखात. रामेश्वरम् आणि त्यानजिकच्या छोट्या द्वीपांनी ते कोल्खिक आखातापासून विभक्त झाले होते. पेरिप्लसमते हे भारतभूमीच्या अंतर्भागात असून येथे मलमलीचे कापड आणि मोती उत्पन्न होत असत. या आखाताच्या उत्तर टोकास ' कलिमीर ' भूशिर होते.

## इ

**इअबदिओस** ( बृहद्‌भारतीय बेट )—टॅलेमीच्या ग्रंथमते आग्नेय आशियातील ' यवद्वीप ' ( आधु. जावा ) चे नामांतर ( इंडि. अँटि. १३.३८६; यवद्वीप पहा ).

**इआतौर** ( नगर )—टॅलेमीच्या मते दक्षिण भारतातील अर्वरनोई प्रदेशातील एक नगर. कडप्पाच्या पश्चिमेकडील आधु. येतूर गाव ते हेच असावे.

**इऔमौस** ( नगर )—टॅलेमीच्या मते रावी नदीकाठच्या पंडूओइ देशातील सिंधु-पाटलिपुत्र रस्त्यावरील एक महत्त्वपूर्ण नगर ( अक्षांश. ३०°; रेखांश. १२०°.१५′ ). येथील राजा उत्तर भारतातील पाच प्रमुख राजांपैकी एक मानला जात असे. मॅक्रिंडल यांच्या मते वायव्य भारतातील आधु. जम्मा नगर ते बहुधा हेच असावे.

**इक्कट** ( ग्राम )— पाणिनीच्या गणपाठमते प्राचीन भारतातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.४; ७ ).

**इक्कुरु** ( मंदिरस्थान )—आंध्र प्रदेशान्तर्गत कृष्णा जिल्ह्यातील नरसरावुपेट तालुक्यातील एक मंदिरस्थान. येथील मंदिरात कुलोत्तुंग ( प्रथम ) चोल राजाच्या स्वास्थ्यप्राप्त्यर्थ कोरलेला स. १११६ चा दानलेख आढळतो ( सेवेल, मद्रास. पृ. ६९ ).

**इक्केरि** ( नगर )—म्हैसूर राज्यातील एक नगर. स. १४९९–१५७४ च्या दरम्यान पश्चिम म्हैसूर आणि दक्षिण कर्नाटक देशावर राज्य करणाऱ्या केलडिवंशीय राजांची राजधानी या गावी होती. या राजांपैकी चौडप्प राजाने स. १५११ मध्ये येथे एक किल्ला बांधला होता ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३५९ ).

**इक्षरकी** ( आहार )— त्रैकूटक राजा व्याघ्रसेनच्या स. ४९० च्या सुरत ताम्रपटमते गुजरातमधील एक देशविभाग. मुख्य ग्रामे–१. इक्षरकी; २. पुरोहितपल्लिका. आधु. सुरतपासून ९ मैल अंतरावरील अच्छारन गावाच्या परिसरातील प्रदेश म्हणजे हा देशविभाग असावा ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.२७ ).

**इक्षिका** ( देशविभाग )—श्रीवरमते कश्मीरातील एक देशविभाग ( श्रीवर ३.२५ ). नागाम ( प्राचीन् नाग्राम ) परगण्याच्या उत्तरेकडील आणि श्रीनगरच्या दक्षिणेकडील

आधु. येच् परगणा तो हाच होय. या परगण्याच्या मध्यभागी 'दामोदरसूद' (आधु. दामदर उडर) नामक खडकाळ पठार होते (राज. १.१५६; दामोदरसूद पहा).

**ऐतिहासिक स्थाने**—या परगण्यात निम्नलिखित इतिहास-प्रसिद्ध स्थाने होती :–१. समरस्वामिन् (विष्णुमंदिर-स्थान, राज. ५.२५; वितस्ता नदीच्या डाव्या किनाऱ्यावरील आधु. सोमखुग); २. शालास्थल (राज. ७.१५९; आधु. हलथूल वस्ती) (स्टाइन, राज. २.४७५).

**इक्षीक** (देश)—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते दक्षिणापथच्या उत्तरेकडील एक देश (वैजयन्ती. ३७.६८). पाठभेद–'इषीक'.

**इक्षु** (नदी)—नर्मदा नदीची एक उपनदी (मत्स्य. १९१.४९; कूर्म. उत्तर. ४१.२८; पद्म. आदि. १८.४७).

२. हिमालयातून उगम पावणारी एक नदी (मत्स्य. ११४.२२; वायु. ४५.९६).

३. शाकद्वीपातील एक नदी (ब्रह्माण्ड. १९.९६; मत्स्य. १२२.३३; वायु. ४९.९३; विष्णु. २.४.६६). नामांतर– 'इक्षुका' (कूर्म. पूर्व. ४९. ३५); 'ऋतु' (वायु. ४९.९३). हे बहुधा मध्य आशियातील 'चक्षु' (आधु. अमूदरिया) नदीचे नामांतर असावे (चक्षु पहा).

४. (समुद्र) सप्तसमुद्रांपैकी 'इक्षुरसोद' नामक द्वितीय समुद्राचे नामांतर (इक्षुरसोद पहा).

५. (नदी) पाणिनीच्या गणपाठमते उत्तर भारतातील 'इक्षुमती' नदीचे नामांतर (पा. सू. ४.२.८६; ९१; इक्षुमती १. पहा).

६. (ह्रद) जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वतातील एक सरोवर (भा. ५.१६.१३).

**इक्षु-नर्मदा-सङ्गम** (तीर्थ)– एक तीर्थ (इक्षु १. पहा).

**इक्षुका** (नदी)—पूर्व भारतातील महेंद्र पर्वतावर उगम पावणारी एक नदी (मार्कं. ५४.२८). नामांतर– 'इक्षुला' (वायु. ४५.१०६; वराह. ८५.६; विष्णुधर्म. १.१०.३); 'इक्षुदा' (मत्स्य. ११४.३१); 'इक्षुमालिनी' (म. भी. १०.१६). ओरिसा प्रांतातील गंजम जिल्ह्यामध्ये कोठेतरी ही असावी (पार्गि., मार्कं. ३०४).

**इक्षुमती** (नदी)—काशिका ग्रंथमते उत्तर भारतातील कुरुक्षेत्रातील एक नदी (काशिका. ४.२.८५). अष्टाध्यायी भाष्यग्रंथातहि या नदीचा निर्देश आढळतो (पा. सू. ४.२.७१; काशिका. ६.१.२१९; ३.११९). नामांतर (पाणिनि गणपाठ. ४.२.८५–८६)–'इक्षु'.

अग्रवाल यांच्या मते फरुखाबाद जिल्ह्यातील आधु. ईखन नामक गंगा नदीची उपनदी नदी ती हीच होय (अग्रवाल, पाणिनि. पृ. ५५).

**पौराणिक साहित्यात**—वाल्मीकि रामायणमते कुशध्वज जनकाची सांकाश्य नामक राजधानी या नदीकाठी होती (वा. रा. बा. ७७.३; ७). अयोध्या–केकयमार्गे प्रवास करीत असता भरताला ही कुरुक्षेत्र ओलांडल्यानंतर लागली होती (वा. रा. अयो. ६८.१७). गंगा नदीची पवित्र उपनदी म्हणून पौराणिक साहित्यात हिचा निर्देश आढळतो (मत्स्य. २२.१७; पद्म. सृ. ११.१३). महाभारतमते तक्षक आणि अश्वसेन नामक दोन नाग हिच्या तीरावर रहात असत (म. आ. ३.४५).

२. सिंधुसौवीर देशातील एक नदी. या नदीच्या काठी कपिल ऋषींचा आश्रम असून सौवीर राजाने इहलोकांतील सर्वांत पुण्यप्रद गोष्टीसंबंधी कपिल ऋषींना पृच्छा केली होती (विष्णु. २.१३.५३–५४). हिच्या तीरावर सिंधु-सौवीराधिपति रहूगण राजाच्या अनुचरांनी जड भरताला पालखी परिवहनार्थ पकडले होते (भा. ५.१०.१).

३. बृहत्संहितामते भारतवर्षातील एक नदी (बृ. सं. १६.४).

४. (तीर्थ) एक श्राद्धयोग्य तीर्थ (पद्म. सृष्टि. ११.१३).

**इक्षुमालिनी** (नदी)—पूर्व भारतातील 'इक्षुका' नदीचे नामांतर (म. भी. १०.१६; इक्षुका पहा).

**इक्षुरसोद** (समुद्र)—पौराणिक साहित्यमते पृथ्वीच्या सप्तसमुद्रांपैकी प्लक्षद्वीपासभोवतालचा समुद्र. 'इक्षुरसोद'चा शब्दशः अर्थ 'उसाच्या रसाचा समुद्र' असा होतो. त्यावरून मुबलक फळांच्या रसाच्या देशामध्ये हा समुद्र असावा. नामांतर–'इक्षु'.

**मनकड यांच्या मते**—'लघु आशिया' (आशिया मायनर) देशाच्या परिसरातील पर्शियन सामुद्रधुनी, रक्त आणि कृष्ण समुद्र, एगियन समुद्र आणि कॅस्पियन समुद्र आदि समुद्रांचा निर्देश येथे अभिप्रेत असावा (मनकड, ए. बी. ओ. आर. आय. १८.२३७).

**इक्षुला** (नदी)—पूर्व भारतातील 'इक्षुका' नदीचे नामांतर (वराह; ८५.६; वायु. ४५.१०६; म. भी. १०.१६; इक्षुका पहा).

**इक्षुवण** (वन)—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते प्राचीन भारतातील एक वन (पा. सू. ८.४.५). नामांतर (ग्रीक साहित्य)–'ऑक्सिमगी'. अग्रवाल यांच्या मते फरुखाबाद जिल्ह्यातील इक्षुमती (आधु. ईखन) नामक गंगा नदीच्या उपनदीच्या काठी हे वन असावे (अग्रवाल, पाणिनि. पृ. ४९).

**इक्षुवर्धनिका** ( नदी )—शाकद्वीपातील एक नदी ( म. भी. १२.३० ).

**इक्ष्वाकु** ( देश )—पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यमते ' उत्तर कोशल ' देशाचे नामांतर ( पतञ्जलि. ४.२.१०४; १९०; बौ.श्रौ. २.५.५ ).

२. बृहत्संहितामते एक देश ( बृ. सं. ५.७५; ९.१७; ११.५८ ).

**इक्ष्वाकुभूमि** ( नगर )—जैन साहित्यमते ' अयोध्या ' नगरीचे नामांतर ( आवस्सक. ३८२; विविधतीर्थ. पृ. २४; अयोध्या पहा ).

**इङ्गलीश्वर** ( ग्राम )—महादेव यादव राजाच्या इंगलेश्वर शिलालेखमते कर्नाटकातील तर्दवाडी १००० ( आधु. विजापुर जिल्हा ) देशविभागातील एक गाव ( आय्. एन्. के. के. क्र. २० ). बागेवाडी तालुक्यातील आधु. इंगलेश्वर गाव ते हेच होय ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २७८ ).

**इच्छाङ्गल** ( ग्राम )—बौद्ध साहित्यमते उत्तर भारतान्तर्गत कोशल देशातील एक ब्राह्मणग्राम ( दीघ. अम्बठ्ठ-सुत्त. १.९७ ). येथील वनात गौतम बुद्ध काही काळ राहिला होता ( अङ्गुत्तर. ३.३०; ३४१ ). नामांतर—' इच्छंगल ' ( सुत्त. १.१५ ).

**इच्छामती** ( नदी )—मुक्तत्रिवेणी स्थानी विभाजित झालेल्या ' यमुना ' नदीचे नामांतर. ही कलकत्याजवळील चक्रदहपासून ५ मैल अंतरावरून वेगळी वाहते ( ती. पृ. १८०; यमुना पहा ).

**इटखेड** ( महानुभाव तीर्थ )—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थस्थान ( स्थान. पृ. २८ ). औरंगाबाद जिल्ह्यातील माटेगावपासून ५ मैल पश्चिमेकडील आधु. विटखेड गाव ते हेच होय.

**इटिला** ( ग्राम )—चालुक्य राजा जयंतसिंहच्या वि. सं. १२८० च्या शिलालेखमते गुजरातमधील गंभूतापथकातील एक गाव उत्तर गुजरातेतील आधुनिक इंद्राद गाव ते हेच होय ( इंडि. अँटि. ६.१९६.–१९८ ).

**इट्टाहक**—बनगाव ताम्रपटमते ( इ. स. १२ वे शतक ) बिहारमधील एक ग्राम. पाठभेद—' इत्रिहोक '. सहर्स जिल्ह्यातील सुपौल तालुक्यातील आधु. इतहरि गाव ते हेच होय ( एपि. इंडि. २९.४८–५६ ).

**इडवै**—पांड्य राजा वरगुण ( द्वितीय ) च्या स. ८७७ च्या अरैगूर शिलालेखमते दक्षिण भारतातील कावेरी नदीकाठचे एक गाव. वरगुणाने चोल आणि गंग राजांचा या गावी पराजय केला होता ( एपि. इंडि. ९.८४ ).

**इडा** ( नदी )—काशीमाहात्म्यमते एक नदी ( नारद. उत्तर. ४८.२१ ).

**इडास्पद** ( तीर्थ )—कुरुक्षेत्रातील एक तीर्थ ( वामन. ३६.२४ ).

**इडैत्तुरैनाडु** ( देशविभाग )—चोल राजा राजेंद्र ( प्रथम ) च्या स. १०१७ च्या तंजोर शिलालेखमते दक्षिण भारतातील एक देशविभाग. फ्लीट यांच्या मते कृष्णा आणि तुंगभद्रा नद्यांच्या दरम्यानचा आधु. रायचूर दुआबाचा प्रदेश म्हणजे हा देश होय ( साऊथ. इंडि. इन्स्क्रि. २.९२ ).

**इण्डिया**—हिरोडोटसमते ' भारतवर्ष ' देशाचे नामांतर. नामांतर ( डॅरियसकृत पर्सेपोलिस् शिलालेख )—' हिंदुस् '. डॅरियस्च्या पर्शियन साम्राज्यामध्ये हा समाविष्ट असून राजपुताना वाळवंटापर्यंतचा सिंधु नदीच्या खोऱ्याचा निर्देश येथे अभिप्रेत दिसतो ( केंब्रिज हिस्टरी. १.३३५; भारतवर्ष पहा ).

**इण्डोसीथिया** ( देशसमूह )—टॉलेमीच्या मते सिंधु-काबुल संगमापासून सिंधु नदीच्या मुखापर्यंत पसरलेला वायव्य आणि पश्चिम भारतातील एक देशसमूह. या प्रदेशातील शक लोकांच्या वसाहतींवरून यास हे नाव प्राप्त झाले असावे ( शक पहा ). पाताळ, सुराष्ट्र, आणि आभीर आदि देशांचा त्यामध्ये समावेश होत असे ( सिंधु पहा ).

**इतखोरि** ( बौद्धस्थान )—बिहारमधील हजारीबाग जिल्ह्यातील बौद्ध अवशेषस्थान. गयेहून दक्षिण बिहारकडे जाणाऱ्या रस्त्यावर हे गाव आढळते. या स्थानाचे प्राचीन नाव समजत नाही ( पांडे, बिहार. पृ. १८५ ).

**इतर** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते प्राचीन भारतातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.७५ ).

**इत्तगि**—म्हैसूर राज्यातील चालुक्य शिल्पशैलीचे सुविख्यात शैव मंदिरस्थान. हे स्थान धारवाड जिल्ह्यातील गदगपासून २१ मैल ईशान्येस असून येथे शिवाचे एक मोठे आणि अन्य काही छोटी देवालये आहेत.

**मुख्य शिवमंदिर**—स. ११**१२** मध्ये बांधलेले हे मंदिर पश्चिम चालुक्य स्थापत्यशैलीचे उत्कृष्ट उदाहरण असून त्यावरील नक्षीकाम गदग येथील चालुक्य शैलीच्या मंदिरापेक्षाहि अव्वल दर्जाचे आहे. ' ग्रीन स्टोन ' जातीच्या दगडाच्या या मंदिरावरील नक्षीकाम सोन्याचांदीच्या नक्षीकामापेक्षाहि अधिक कलाकुसरीचे आहे. या मंदिराचे दगड शिल्पकारांनी कोठून आणले, आणि कोणत्या हत्यारांनी इतके बारीक नक्षीकाम त्यांनी केले, याचा उलगडा आज

होत नाही.

**स्थापत्यशैली**—स्थापत्यदृष्ट्या द्राविड आणि चालुक्य यांच्या संधिकाळी बांधलेले हे मंदिर परंपरागत चालुक्य शैलीप्रमाणे तारकाकृती नसून द्राविड मंदिरांप्रमाणे लंब-चौकोनाकृती आहे.

**मंडप**—या मंदिराच्या दर्शनी भागी बाह्य मंडप असून त्याचे अंतर्भागात २७′ लांबीरुंदीचा सभामंडप आहे. या सभामंडपाच्या चार बाजूस चार दरवाजे असून त्यापैकी पूर्वेकडील आणि पश्चिमेकडील दरवाजे अनुक्रमे बाहेरील मंडपामध्ये आणि अंतर्भागामध्ये, आणि उत्तरदक्षिण दिशांकडील दरवाजे देवालयाच्या बहिर्भागामध्ये उघडतात. अंतर्भागात देवालयाचे गर्भागार असून त्याचा समभुजचौकोनाकृती घुमट, सभोवतालची जाळी, तसेच वरच्या भागातील उतरत्या आकाराची नक्षीकामयुक्त पट्टी आज उद्ध्वस्तावस्थेत आहे. यापैकी उतरत्या आकाराची पट्टी ही या देवालयाच्या प्राचीनत्वाची निशाणी मानली जाते.

**नक्षीकाम**—या मंदिराच्या प्रवेशद्वाराच्या चौकटीच्या उभ्याआडव्या दगडांवर, तसेच छतावर सुंदर नक्षीकाम आहे. मंदिराच्या गर्भागाराच्या दर्शनी भागातील उभ्या खोबणीवर देवालयाच्या कळसाची आकृती कोरली आहे. या खोबणीच्या बाजूला बसविलेली शैव शिल्पचित्रे आज उद्ध्वस्त झाली आहेत. या मंदिराचा चालुक्य शैलीचा कळस क्रमाने लहान होणाऱ्या बसक्या शंकूंनी बनला आहे.

**तारकाकृती स्तंभ**—उघड्या मंडपातील मध्यवर्ती चार स्तंभ, तसेच मंदिराच्या बाजूच्या प्रवेशद्वारांचे प्रत्येकी दोन स्तंभ तारकाकृती पद्धतीने उभारले आहेत. स्तंभांची ही तारकाकृती मांडणी चालुक्य स्थापत्यकारांना विशेष प्रिय असून दोड्डा बसवण्णा निर्मित उत्तरकालीन दंबल मंदिरातहि तिचा प्रयोग आढळतो.

**गर्भागार**—गर्भागाराच्या छतामध्ये ८′–५″ लांबीरुंदीचा नटेश शिवाची प्रतिमा असलेला एक समभुज चौकोनाकृती दगड बसविला आहे. हा दगड क्रमाक्रमाने छोट्या होत जाणाऱ्या ३′×११″ लांबीरुंदीच्या पाच चौकोनाकृतींनी बनला असून त्याच्या माथ्यानजिकच्या चौकोनात नटेश शिवाची प्रतिमा आढळते.

**अन्य मंदिरे**—या स्थानी चालुक्य स्थापत्यशैलीची अन्य काही वैशिष्ट्यहीन छोटी मंदिरे आढळतात ( फर्ग्युसन. १. ४२४–४२५ ).

**इत्नमुपुरि देशम्** ( बृहद्भारतीय देश )—चोल राजा राजेंद्र ( प्रथम ) च्या स. १०२४ च्या मालुर शिलालेखमते त्याने जिंकलेला आग्नेय आशियातील एक बृहद्भारतीय देश. नामांतर ( मार्को पोलो )–' लंब्री '. सुमात्रा देशाच्या उत्तर टोकानजिकचा आधु. लामुरि देश तो हाच असावा. उत्तर सुमात्रामधील ' लम् ' आद्याक्षरयुक्त अन्य आधुनिक गावे–' लम् बरो ', ' लम् जमो ' ( एपि. कर्ना. ९.८२. आर्कि. सर्व्हे. बर्मा. स. १९११, पृ. ६. ).

**इथगौरोस्** ( देश )—टॉलेमीच्या मते सिंधु नदीच्या खोऱ्यातील सरिका प्रदेशान्तर्गत एक देश ( अक्षांश ३०° २०′ उत्तर; रेखांश १२५° ४०′ पूर्व ). सेंट मार्टिन यांच्या मते दर्दिस्तान प्रदेशातील आधु. डागोर ( डांगोर ) टोळ्यांच्या लोकांचा निर्देश येथे अभिप्रेत आहे.

**इनिमेल्ल** ( देवालयस्थान )—आंध्र प्रदेशान्तर्गत कृष्णा जिल्ह्यातील विनुकोंड गावापासून १६ मैल ईशान्येकडील एक देवमंदिरस्थान. या गावी पाच पुरातन देवालये असून त्यापैकी एकामध्ये गणपति राजा प्रतापरुद्रच्या राज्यकालातील ( स. १२५४ ) एक शिलालेख आढळतो ( सेवेल, मद्रास. पृ. ६६ ).

**इन्दपे** ( दुर्गस्थान )—बिहार प्रांतातील मोंघीर जिल्ह्यातील जमुइ गावानजिकचे एक दुर्गस्थान. येथे पाल राज्यकालीन एका किल्ल्याचे अवशेष सापडले आहेत. या गावाचे प्राचीन नाव समजत नाही ( पांडे, बिहार. पृ. १६२ ).

**इन्दबर** (नगर)—टॉलेमीच्या मते भारतातील 'इंद्रप्रस्थ' ( आधु. दिल्ली ) नगराचे नामांतर ( इंद्रप्रस्थ पहा ).

**इन्दसाल** ( गुफा )—पाली साहित्यमते ' इन्द्रशाल ' गुफेचे नामांतर ( इन्द्रशाल पहा ).

**इन्दाना–नर्मदा सङ्गम** ( नदीसंगम )—मध्य भारतातील ऑंवरीघाटपासून तीन मैलांवरील संगमस्थान. येथे चतुर्मुख शिवाचे मंदिर आहे ( ती. पृ. २२९ ).

**इन्दिरा** ( नदी )—गयामाहात्म्यमते गया येथील एक नदी ( वायु. १०८.७९ ).

**इन्दिला** ( ग्राम )—भीम ( द्वितीय ) चालुक्य राजाच्या वि. सं. १२६३ च्या शिलालेखमते उत्तर गुजरातेतील गंभूतापथकातील एक ग्राम ( इंडि. ॲंटि. ६.१९३ ). उत्तर गुजरातेतील आधु. इंदल् गाव ते हेच होय ( सांकलिया, गुजरात. पृ. १९१ ).

**इन्दु** ( देश )—चिनी साहित्यमते ' भारतवर्ष ' देशाचे नामांतर. भारतवर्षाचे ' यिन्-तु ' ( इंदु ) हे नाव तांग राज्यकाली प्रचलित असून ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात सर्वत्र याच नावाचा प्रयोग आढळतो.

**नामव्युत्पत्ती**—ह्युएन्त्संगच्या मते बौद्ध धर्मरूपी सूर्य

अस्तंगत झाल्यानंतर भारतातील विद्वान आचार्यांनी जगाला आध्यात्मिक अंधारातून मुक्त करण्याची आपली परंपरा सूर्यास्तानंतर प्रकाशमान होणाऱ्या चंद्राप्रमाणे पुढे चालू ठेवली. म्हणून या देशास हे नाव प्राप्त झाले. उत्तरकालीन चिनी साहित्यमते भारतवर्ष हा तत्कालीन अन्य देशांमध्ये श्रेष्ठ असल्याकारणाने त्यास हे नाव प्राप्त झाले.

भारतवर्षाचा आकार इंदुकलेसदृश ('यिन्-ते-क-लो') असल्याचे भौगोलिक ज्ञान ह्युएन्त्संगला असून त्याचे कल्पनारम्य स्पष्टीकरण त्याने वर सांगितल्याप्रमाणे केले असावे (वॉटर्स, १.१३८–१४०).

**इन्दुजा** (नदी)—'नर्मदा' नदीचे नामांतर (अभिधान. १४८.१०८३; नर्मदा पहा).

**इन्दुप्रस्थ** (नगर)—'इंद्रप्रस्थ' नगराचे नामांतर (कल्पद्रु. ११.२५; इंद्रप्रस्थ पहा).

**इन्दूर** (नगर)—मध्य भारतातील सुविख्यात नगर. कलचुरि राज्यकालीन (स. ३१७) स्वामिदास राजाचा एक ताम्रपट या गावी सापडला आहे (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४. १.७). त्यावरून तत्काली हे गाव प्रसिद्ध असावे. याचे प्राचीन नाव समजत नाही.

**इन्द्रकील** (पर्वत)—उत्तर भारतातील एक पवित्र पर्वत (भा. ५.१९.१६; काव्यमी. १७.२२७; नीलमत. १४.४३). हे संभवतः 'मंदार' पर्वताचे नामांतर असावे (अभिधान. १४०.१०३०).

**महाभारतात**—या ग्रंथमते हा हिमालयाचा उपपर्वत असून येथे अर्जुनाने इंद्राच्या आदेशावरून पाशुपतास्त्राच्या प्राप्त्यर्थ तपश्चर्या केली होती. हिमालय → गंधमादन → इंद्रकील अशा मार्गाने अर्जुन येथे आला (म. आर. ३८.२९–३०). अर्जुनाची सत्त्वपरीक्षा घेण्यासाठी किरातरूपाने येथे अवतीर्ण होऊन वराहरूपधारी मूक दानवाच्या शिकारीच्या मिषाने त्याच्याशी युद्ध केले. तत्प्रसंगी अर्जुनाच्या युद्धनैपुण्याने प्रसन्न होऊन शिवाने त्यास पाशुपतास्त्र दिले (म. आर. ३८.३०; ४१.१३). महाभारतात अन्यत्र किरात-अर्जुन युद्ध बर्फाच्छादित भृगुतुंग पर्वतावर झाल्याचा निर्देश आढळतो (म. आर. १६३.१०; १४).

**पौराणिक साहित्यात**—पद्ममते या पर्वतावर इंद्राने नमुचि राक्षसाचा वध केला (पद्म. सृष्टि. ११). मत्स्य पुराणात याचा 'पितृतीर्थ' म्हणून निर्देश आढळतो (मत्स्य. २२.५३).

**इन्द्रकोश** (स्थान)—तांड्य ब्राह्मणमते भारतवर्षातील एक स्थान (तां. ब्रा. १३.५.१५).

**इन्द्रखण्ड** (देश)—भारतवर्षाचा एक उपविभाग (द्वीप) (वराह. ८५.१). येथे 'द्वीप' ऐवजी 'खंड' शब्द सुबोधतेसाठी उपयोजिलेला दिसतो.

**इन्द्रगोप** (पर्वत)—गौतमी (गोदावरी) नदीकाठचा एक पर्वत (ब्रह्म. १७४.२५)

**इन्द्रग्राम** (तीर्थ)—साभ्रमती नदीकाठचे एक तीर्थ. नमुचिवधाने इंद्राला लागलेले ब्रह्महत्येचे पातक येथे स्नान करून नष्ट झाले. इंद्राने येथे 'इंद्रेश्वर' शिवलिंगाची स्थापना केली (पद्म. उ. १४४.१).

**इन्द्रतीर्थ** (तीर्थ)—गौतमी (गोदावरी) नदीकाठचे एक तीर्थ (ब्रह्म. ९६.१; १२२.१०१). हे त्र्यंबकेश्वर येथे कुशावर्तानजिक आहे (ती. पृ. २४८).

२. 'अहल्यासंगमतीर्था'चे नामांतर (ब्रह्म. ८७.७०; अहल्यासंगमतीर्थ पहा).

३. अवंती येथील एक तीर्थ (स्कन्द. आवन्त्य. अ. ३१.६).

४. प्रह्लादयात्रान्तर्गत एक तीर्थ (वामन. ८३.७). हे सरस्वती नदीकाठी असावे.

५. सरस्वती नदीकाठच्या बदरीपाचन तीर्थाजवळील एक तीर्थ (म. श. ४७.१७; ६१; ४८.१–६). स्रुचावतीची सत्त्वपरीक्षा घेण्यासाठी आलेला इंद्र येथे काही काळ राहिला होता. नामांतर–'शक्रतीर्थ' (म. श. ४७.६१).

६. पश्चिम भारतातील नर्मदा नदीच्या दक्षिण तीरावरील गरुडेश्वरानजिकचे इंद्रतपस्यास्थान. आधु. इंद्रवाणी ग्राम ते हेच होय. येथे इंद्राने शक्रेश्वर महादेवाची स्थापना केली. नामांतर–'शक्रतीर्थ' (ती. पृ. ४३२).

७. पश्चिम भारतातील नर्मदा नदीच्या दक्षिण तीरावरील एक तीर्थ. कोठिया गावापासून २ मैलांवरील आधु. इंदौरघाट तो हाच होय. येथील इंद्रेश्वर मंदिराच्या स्थानी इंद्राने वृत्रवधानंतर तपश्चर्या केली होती (ती. पृ. ४३३).

**इन्द्रतोया** (नदी)—अंगिरस्तीर्थयात्रेतील एक पवित्र नदी. ही गंधमादन पर्वतानजिक आहे (म. अनु. २५.११).

**इन्द्रदेश** (देश)—पूर्व भारतान्तर्गत इंद्रपर्वतानजिकचा प्रदेश (इंद्रपर्वत १. पहा).

**इन्द्रद्युम्न** (द्वीप)—विष्णुधर्ममते 'इंद्रद्वीपा'चे नामांतर (विष्णुधर्म. १८.५; शिव. उमा. १८.४).

२. (महातीर्थ) काशी येथील एक तीर्थ (स्कन्द. काशी. ८४.६८).

३. (सरोवर) सप्तगंगांपैकी पूर्वगामिनी पावनी नदी-

काठचे एक सरोवर ( ब्रह्माण्ड. १८.५६; वायु. ४७.५४ ).

४. सप्तगंगांपैकी पूर्वगामिनी नलिनी नदीकाठचे एक सरोवर ( मत्स्य. १२१.५५ ).

५. ओड्र ( ओरिसा ) देशान्तर्गत पुरुषोत्तम ( जगन्नाथ ) क्षेत्रातील एक सरोवर ( ब्रह्म. ५१.२९; नारद. उत्तर. ५४; ६०; स्कन्द. जगन्नाथ. ३१.३४ ).

६. द्वारका नगरीजवळील एक सरोवर ( म. स. परि. १.२१.१२७४ ).

७. हिमलियान्तर्गत गंधमादन पर्वतातील एक सरोवर. कुंती-माद्रीसह मुनिवृत्तीने निवास करणाऱ्या शापप्राप्त पांडूने हिमालय → गंधमादन → इंद्रद्युम्न सरोवर → शतशृंग पर्वत अशा मार्गाने प्रवास केला होता (म. आ. ११०.४५).

८. ( सरोवर ) अवंतिका नगरीतील एक जलाशय ( ब्रह्म. ४३.१४ ).

**इन्द्रद्युम्नेश्वर** ( लिंग )—अवंती येथील ८४ शिवलिंगांपैकी एक. नामांतर–' महाकाल ' ( स्कन्द. आवन्त्य. अ. ७०. ७१–९४ ).

२. हाटकेश्वरक्षेत्रातील एक शिवलिंग. स्कंदमते इंद्रद्युम्नेश्वर नावाची सात लिंगे या क्षेत्रात होती ( स्कन्द. नागर. २७१ ).

३. महीसागरसंगमक्षेत्रातील एक शिवलिंग ( स्कन्द. माहेश्वर. कौ. १३.२११ ).

**इन्द्रद्वीप** ( द्वीप )— पौराणिक साहित्यमते भारतवर्षाच्या नऊ उपविभागांपैकी ( खंड, द्वीप, भेद ) एक ( अग्नि. ११८. ३; कूर्म. पू. ४७.२४; ब्रह्म.१९.२६; ब्रह्माण्ड. १६.९; मत्स्य ११४. ८; मार्क. ५४.६; लिङ्ग. ५२.२७; वामन. १३. ९; वायु. ४५.७९; विष्णु. २.३.६; काव्यमी. १७.२२३ ). पूर्वघाट ( प्राचीन महेंद्र पर्वत ) आणि ब्रह्मपुत्रा नदीच्या पूर्वेकडील ब्रह्मपुत्रा खोऱ्याचा प्रदेश म्हणजे हा देश असावा. नामांतरे ( वराह.८५.१ )– ' इंद्रखंड '; ( शिव. १८.४ )– ' इंद्रद्युम्न '; ( गोलाध्याय, भुवनकोश प्रश्न. ४१ )–' ऐंद्रखंड '.

**नामव्युत्पत्ती**—उत्तर भारतातील गंगा खोऱ्यातील मॉन्सूनचा पाऊस बंगालच्या उपसागरातून म्हणजे पूर्वेकडून येणाऱ्या मोसमी वाऱ्यांनी पडतो. हे वारे गंगा नदीच्या त्रिभुज प्रदेशाच्या मार्गाने प्रथम ब्रह्मपुत्रेच्या आणि नंतर गंगा नदीच्या खोऱ्यात येतात. त्यामुळेच ' पाऊस आणणारा प्रदेश ' अशा अर्थाने ब्रह्मपुत्राखोऱ्यास ' इंद्रद्वीप ' नाव प्राप्त झाले असावे. वैदिक साहित्यात इंद्र हा पर्जन्य-देवता मानली असून, आजहि ब्रह्मपुत्राखोऱ्याचा प्रदेश मोसमी वादळासाठी सुविख्यात आहे.

**पौराणिक साहित्यात**—ब्रह्माण्डमते समुद्रकिनारीचे हे द्वीप पूर्वेकडील सप्तगंगांपैकी दक्षिण समुद्रगामिनी पावनी नदीकाठी होते ( ब्रह्माण्ड. १८.५८; वायु. ४७.५५ ). मत्स्यमते सप्तगंगांपैकी समुद्रगामिनी नलिनी नदीच्या काठी हे असून या द्वीपानजिक पूर्वगामिनी नलिनी लवणोदधीस जाऊन मिळते ( मत्स्य. १२१.५७ ). हे द्वीप भारतवर्षाचा एक भाग असल्याचा सुस्पष्ट निर्देश वायु पुराणात आढळतो ( वायु. ४५.७९ ). पृथ्वीजेत्या कार्तवीर्य सहस्रार्जुनाने इंद्रद्वीप, कशेरु, ताम्रद्वीप, गभस्तिमत्, गांधर्व, वारुण, आणि आर्ष या द्वीपांवर अधिराज्य प्रस्थापित केले होते ( म. स. २७.१३ ).

**मतांतरे**—अलबेरुणीच्या मते हे पौराणिक मध्यदेशांचे नामांतर असावे ( इंडिका. १.२९६ ). ऐन्-इ-अकबरी-मते हे लंका आणि महेंद्र पर्वत यांच्या दरम्यान होते ( ऐ. अ. २.३१ ). मुजुमदार यांच्या मते आधु. ब्रह्मदेश म्हणजे हा देश होय. अन्य काही अभ्यासकांच्या मते हे ' अंदमान ' द्वीपाचे नामांतर असावे. परंतु हे द्वीप भारतवर्षाचा भाग असल्याचा वायु पुराणातील सुस्पष्ट निर्देश लक्षात घेता हे ब्रह्मपुत्रा नदीचे खोरे असण्याची शक्यता अधिक वाटते ( अली, पुराणाज् पृ. १२६–१२७; भारतवर्ष पहा ).

**इन्द्रध्वज** ( तीर्थ )—मथुरा येथील एक तीर्थ ( वराह. १६४. ४० ).

**इन्द्रनदी** ( नदी )—जंबूद्वीपान्तर्गत भद्राश्व वर्षातील एक नदी ( वायु. ४३.२६ ).

**इन्द्रनील** ( तीर्थ )—एक श्राद्धयोग्य तीर्थ ( पद्म. सृष्टि. ११.४६ ).

२. ( पर्वत ) भारतवर्षातील एक पर्वत ( भा. ५.१९. १६ ).

३. जंबूद्वीपान्तर्गत एक पर्वत. हा मेरुपर्वतोद्भवा चतुर्गंगांपैकी उत्तरवाहिनी भद्रसोमा नदीच्या काठी होता ( वायु. ४२.६७ ).

**इन्द्रनीलमयी** ( प्रतिमा )—पुरुषोत्तमक्षेत्रातील एक देवतामूर्ती ( नारद. उत्तर. ५२.८४ ).

**इन्द्रपद** ( तीर्थ )—द्वारका येथील एक तीर्थ ( स्कन्द. प्रभास. द्वारका. १४.२३ ).

२. ( देश ) पश्चिमवाहिनी सिंधु नदीकाठचा एक देश ( ब्रह्माण्ड. १८.४८ ).

३. ( सर ) द्वारका येथील एक सरोवर ( स्कन्द. प्रभास. द्वारका. १४.२१ ).

**इन्द्रपर्वत** ( पर्वत )— महाभारतमते हिमवत् पर्वताचा

एक क्षुद्र पर्वत. हा पूर्व भारतात विदेह देशानजिक होता. पांडवांच्या राजसूय दिग्विजयसमयी भीमाने या पर्वतानजिकच्या सात किराताधिपतींना जिंकले होते ( म. स. २७.१३ ).

२. जंबूद्वीपान्तर्गत मेरूच्या उत्तर भागातील महाभद्र सरोवरानजिकचा एक पर्वत ( लिङ्ग. ४९.५०; वायु. ३६. ३१ ).

**इन्द्रपुर** ( पुर )—' मथुरा ' नगरीचे नामांतर ( मथुरा पहा ).

२. स्कंदगुप्ताच्या स. ४६६ च्या ताम्रपटमते वायव्य भारतातील इंद्रपुरक नगराचे नामांतर ( सरकार., इन्स्क्रि. क्र. २७; इंद्रपुरक १. पहा ).

३. गौतमी ( गोदावरी ) नदीकाठचे एक नगर ( ब्रह्म. १४७.७ ).

४. शिलालेख साहित्यमते बृहत्तर भारतातील चंपा ( आधु. इंडोचायना ) देशाच्या राजधानीचे गाव. जयचंद्र यांच्या मते चंपा देशातील अमरावती प्रदेशात हे गाव असून स. १९२ मध्ये उरोज नामक राजाने याची स्थापना केली. इ. स. ८ व्या शतकातील गंग राजांच्या, तसेच इ. स. ९ व्या शतकातील इंद्रवर्मन् राजाच्या राज्यकाली या देशाची राजधानी याच गावी होती ( जयचन्द्र, पृ. ३२५ ). कंबूज देशाच्या जयवर्मन् ( द्वितीय ) ( स. ८०२–८६९ ) राजाच्या शिलालेखातहि या नगराचा निर्देश आढळतो.

**इन्द्रपुरक** ( नगर )—स्कंदगुप्तकालीन ( स. ४६५ ) इंदोर ताम्रपटमते उत्तर भारतातील एक नगर. उत्तर प्रदेशातील बुलंदशहर जिल्ह्यातील दिभाई या तालुक्याच्या गावापासून पाच मैल वायव्येकडील आधु. इंदोर हे ओसाड गाव ते हेच होय. नामांतर–' इंद्रपुर '; ' इंद्रापुर '.

या गावचे ' इंद्रपुरक ' हे ' इंद्रपुर 'चेच पाठभेदात्मक रूप असावे. येथील ताम्रपटात या गावच्या पूर्वेकडील एका सूर्यमंदिराचा निर्देश आढळतो ( फ्लीट, कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.७० ). आनंदगिरीकृत शंकरविजय ग्रंथात निर्देशिलेले ' इंद्रप्रस्थपुर 'हि बहुधा हेच असावे.

**इन्द्रपुरी** ( तीर्थ )—एक ब्रह्मदेवस्थान. येथे देवनाथ ब्रह्मदेव निवास करीत असे ( पद्म. सृष्टि. २९. १५२ ).

**इन्द्रप्रथइ** ( देश )—टॉलेमीच्या मते पूर्व भारतातील एक देश. मॅक्रिंडल यांच्या मते इंद्रप्रस्थ ( आधु. दिल्ली ) गावच्या रहिवाश्यांनी या वसाहतीची स्थापना केल्यामुळे त्यास हे नाव प्राप्त झाले असावे ( इंद्रप्रस्थ पहा ).

२. टॉलेमीच्या मते उत्तर प्रदेशातील ' इंद्रप्रस्थ ' नगराचे नामांतर ( मॅक्रिंडल, पृ. १२१; इंद्रप्रस्थ पहा ).

**इन्द्रप्रयाग** ( क्षेत्र )—भागीरथी–व्यासगंगा संगमाचे पवित्र तीर्थ ( प्रयाग पहा ).

**इन्द्रप्रस्थ**— ( नगर )—महाभारतकालापासून ( इ. स. पू. १४०० ) आजतागायत चौतीसशे वर्षे भारताची राजधानी म्हणून सुविख्यात असणारे उत्तर भारतातील ख्यातनाम नगर. गंगा-यमुना दुआबान्तर्गत पाच जनपदांपैकी कुरु जनपदाच्या राजधानीचे हे नगर यमुना नदीच्या उजव्या किनाऱ्यावर असून, त्या राज्याची हस्तिनापुर नामक अन्य राजधानी गंगा नदीकाठी होती. कुरु राजवंशातील पांडु शाखेच्या युधिष्ठिर राजाने या नगराची स्थापना केली. त्यामुळे टॉलेमी आदि उत्तरकालीन ग्रंथकारांच्या साहित्यात 'पांडवांची राजधानी' म्हणून याचा निर्देश आढळतो. मुसलमानी राज्यकालातील दिल्ली हे राजधानीचे नगर ' इंद्रप्रस्था'च्याच नगरावशेषांवर उभारले आहे. मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते इन्द्रप्रस्थ आणि दिल्ली समानार्थक होत ( कल्पद्रु. ११.२५ ).

**नामांतरे**— प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. महाभारत ( आदि. १९९.२६ ) | शक्रप्रस्थ<br>शतक्रतुप्रस्थ<br>शक्रपुरी |
| ( आदि. २१३.१३ ) | खांडवप्रस्थ<br>बृहत्स्थल |
| २. टॉलेमी ( मॅक्रिन्डल, पृ. १२१ ) | इंदबर<br>इंद्रप्रथइ |
| ३. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य | योगिनीपुरी,<br>इंदुप्रस्थ |
| ४. शिलालेख साहित्य | इंद्रस्थान |

**स्थानमाहात्म्य**—वायव्य भारत आणि पंजाब हिमालय हा पर्वतमय प्रदेश ओलांडून येणाऱ्या परकीय आक्रमकांच्या बलाबलाची सुवर्णपरीक्षा दिल्लीच्या मैदानातच सर्वप्रथम होते. त्यावरूनच दिल्लीवरील विजय म्हणजे भारतवर्षावरील विजय असे समीकरण प्रस्थापित झाले. त्यामुळेच भारताचा इतिहास बदलणारी सारी महायुद्धे या गावाच्या परिसरातील पानिपत ( प्राचीन कुरुक्षेत्र, स्थानेश्वर) येथे झाली.

वैदिक आणि पौराणिक काळातील दोन महायुद्धे इंद्रप्रस्थ गावाच्याच परिसरात झाली. अभ्यासकांच्या मते ऋग्वेदकालीन आर्य राजा सुदास पैजवन आणि तत्कालीन अन्य दहा आर्य राजे यांच्या दरम्यानचे ' दाशराज्ञ युद्ध, ' तसेच महाभारत-

कालीन कौरव-पांडवांच्या दरम्यानचे 'भारतीय युद्ध' इंद्रप्रस्थाच्या उत्तरेकडील कुरुक्षेत्र ( आधु. पानिपत ) येथेच झाली.

मध्ययुगीन कालातील पानिपतची तीन युद्धेहि पौराणिक कुरुक्षेत्र आणि स्थानेश्वर ( आधु. थानेसर ) च्या परिसरात झाली. शहाबुद्दीन घोरी आणि पृथ्वीराज चौहान यांच्या दरम्यानच्या स. ११९६ च्या पानिपतच्या पहिल्या युद्धाने भारतातील हिंदु साम्राज्य लयास जाऊन मुस्लीम साम्राज्याचा उदय झाला. इब्राहिम लोदी आणि बाबर यांच्या दरम्यानच्या स. १५२६ च्या पानिपतच्या दुसऱ्या युद्धाने भारतातील अफगाण सत्ता लयास जाऊन तिची जागा मोंगल साम्राज्याने घेतली. याचे उलट स. १७६१ मध्ये मराठे आणि अहंमदशाहा अब्दाली यांच्या दरम्यानचे पानिपतचे तिसरे युद्ध मराठा साम्राज्याची नांदी ठरले.

**नामव्युत्पत्ती**— अर्जुनाने खांडववन दग्ध करून या नगराची स्थापना केल्याने यास 'खांडवप्रस्थ', तसेच हे नगर इंद्रनगरीसदृश सुशोभित असल्याने यास 'इंद्रप्रस्थ' अथवा 'शक्रप्रस्थ' नावे प्राप्त झाली ( म. आ. १९९.१९८७*; २००.१; २१३.१३; ५७ ). पद्ममते या स्थानी इंद्राने अनेक यज्ञ केल्यामुळे यास 'इंद्रप्रस्थ' नाव प्राप्त झाले ( पद्म. उत्तर. २००.१७–१९ ). स्थानिक समजुतीनुसार मौर्य सम्राट 'दिलू'च्या नावावरून यास 'दिल्ली' नाव प्राप्त झाले.

**पंचप्रस्थ**—कृष्णशिष्टाईच्या वेळी पांडवांनी कौरवांकडे मागितलेली निम्नलिखित पाच गावे इंद्रप्रस्थाचीच उपनगरे होती :— १. इंद्रप्रस्थ ( आधु. इंद्रपत=पुराना किल्ल्याचा परिसर.); २. पाणिप्रस्थ ( कुरुक्षेत्रानजिकचे आधु. पानिपत ); ३. सोनप्रस्थ ( दिल्लीपासून २५ मैल उत्तरेकडील आधु. सोनपत ); ४. तिलप्रस्थ ( तुघ्लकाबादच्या ६ मैल नैर्ऋत्येकडील आणि कुतुबमीनारच्या १० मैल आग्नेयेकडील आधु. पीलपत ); ५. भगप्रस्थ ( मीरत गावापासून ३० मैल पाश्चिमेकडील आधु. बागपत ).

**व्याप्ती**—पद्ममते यमुना नदीच्या दक्षिण किनाऱ्यावरील या नगराची उत्तर-दक्षिण लांबी दोन योजने ( ८ कोस ) आणि पूर्व-पश्चिम रुंदी एक योजन ( ४ कोस ) होती ( पद्म. उत्तर. १९६.७५–७६ ). जातकमते या नगराची व्याप्ती सात योजने होती ( जा. ५३७ ). यावरून आधु. दिल्ली गावाच्या दोन मैल दक्षिणेकडील फिरोजशाहा कोटला आणि हुमायूनची कबर यांच्या दरम्यानच्या भागात महाभारतकालीन इंद्रप्रस्थ असावे.

**स्थापना**— द्रौपदीस्वयंवरानंतर पांडव द्रुपदपुरीत प्रकट झाल्यावर धृतराष्ट्राने त्यांस हस्तिनापुरी आणविले आणि पुत्रकलहनिवारणार्थ त्यांस अर्धे राज्य देऊन खांडववन ( =इंद्रवण, आधु. बुलंदशहर व सहारानपुर प्रदेश ) दग्ध करून वसविलेल्या ( म. आ. २१४.१ ) जागी त्यांस रहावयास सांगितले. त्यानुसार पांडवांनी येथे येऊन कृष्णद्वैपायन व्यासांनी सांगितलेल्या मुहूर्तावर या नगराची स्थापना केली. पांडवांच्या प्रार्थनेवरून विश्वकर्म्याने या नगराची रचना केली. याच्या स्थापनेनंतर हस्तिनापुरचे महत्त्व क्रमशः कमी होत गेले ( हस्तिनापुर पहा ).

**नगरवर्णन**—इंद्रनगरीसदृश ( महेंद्रनगर ) वैभवसंपन्न असे हे नगर ( म. आ. २००.१ ), तीक्ष्ण शतघ्न अंकुश, यांत्रिक अस्त्रे ( यंत्रजाल ) आणि लोहमय महाचक्रे यांनी सुसज्ज होते ( म. आ १९९.३२–३३ ). या नगराच्या 'वर्धमानपुर' नामक प्रवेशद्वारातून युधिष्ठिराने सपरिवार प्रवेश केला ( म. आर. परि. १.१०९.७ ).

**राजसूय यज्ञ**—युधिष्ठिराचा राजसूय यज्ञ याच नगरात झाला असून, तत्समयी त्याने येथे मयसभेची निर्मिती केली ( म. स. १.१२ ). आपल्या राजसूय दिग्विजयासाठी पांडव याच नगराहून निघून येथेच परत आले (म. स. २३–२५). आपल्या प्रथम द्वादशवार्षिक वनवासानंतर अर्जुन येथेच परत आला. भारतीय युद्धानंतर युधिष्ठिराने आपली राजधानी मीरतपासून २२ मैल ईशान्येकडील हस्तिनापुर येथे हलवून कृष्णपौत्र व अनिरुद्धपुत्र वज्राला इंद्रप्रस्थ येथे राज्याभिषेक केला ( म. मौ. ७.७२. ).

**उत्तरकालीन राजे**—युधिष्ठिराच्या मृत्यूनंतर अर्जुनाचा पौत्र परीक्षित आणि त्याचे २९ वंशज यांनी इंद्रप्रस्थ येथे राज्य केले. त्यानंतर विशर्व गौतम आणि मौर्य राजघराण्याची राज्ये या प्रदेशात क्रमशः आली. इ. स. पू. १ ल्या शतकामध्ये मौर्य राजा दिलु याने या परिसरात दिल्ली या नव्या नगराची स्थापना केली.

**पौराणिक साहित्यात**—भागवतात, तसेच अन्य पौराणिक साहित्यात या नगराचा निर्देश आढळतो ( भा. १०.५८.१; ७३.३३; ११.३०.४८; ३१.२५; विष्णु. ५.३८.३४; पद्म. उत्तर. ६०.७५–७६; १९६.५ ).

**इ. स. ४ थ्या शतकात**—या काळात इंद्रप्रस्थ नगराच्या परिसरामध्ये धव राजाचे राज्य असल्याचे या राजाच्या कुतुबमिनारनजिकच्या लोहस्तंभावरून दिसते. हा स्तंभ २३´ उंचीचा असून सुमारे १६०० वर्षानंतरहि तो आज न गंजलेल्या अवस्थेत आढळतो. धव राजाने पंजाबातील वाह्लिकांवर विजय प्राप्त केल्याचा निर्देश त्यावरील शिला-

लेखात आढळतो. अन्य काही अभ्यासकांच्या मते हा स्तंभ इ. स. ५ व्या शतकातील चंद्र ( गुप्त सम्राट कुमारगुप्त ) याने उभारला असावा.

**उत्तरकालीन इतिहास**—इ. स.४ थ्या ५ व्या शतकामध्ये वैभवाच्या शिखरावर असणारे दिल्ली गाव त्यानंतर काही शतके उजाड बनले. राठोड राजांनी कनोज जिंकल्यानंतर कनोजचा राजा अनंगपाल याने दिल्ली येथे आपली नवी राजधानी वसवली. पृथ्वीराज चौहान हा दिल्लीचा शेवटचा हिंदु राजा असून स. ११९३ नंतर पठाण राजघराण्याचे राज्य स्थापन झाले.

**शिलालेख साहित्यात**—गोविंदचंद्राच्या वि. सं. ११८४ च्या कमौली ताम्रपटात या नगराचा निर्देश ' इंद्रस्थान ' नावाने आढळतो ( एपि. इंडि. २६.७१; इंडि. अँटी. १५.८ ).

**टॉलेमीच्या ग्रंथात**—या ग्रंथात या नगराचा निर्देश ' इंदबर ' ( अक्षांश ३०° उत्तर; रेखांश १२७.°–१५′ ) नावाने आढळतो. लॅसेन यांच्या मते इंद्रप्रस्थच्या ' इंदबत्त ' या प्राकृतभाषीय नावाचे ' इंदबर ' हे ग्रीक रूपांतर असावे ( लॅसेन, ३.१५१ ). टॉलेमीच्या ग्रंथात अन्यत्र ' इंदप्रथइ ' नामक पूर्व भारतातील देशाचा निर्देश आढळतो. मॅक्रिंडल यांच्या मते इंद्रप्रस्थ नगरीच्या लोकांनी पूर्व भारतातील ब्रह्मपुत्रा नदीच्या खोऱ्यात हा देश स्थापिला असावा.

**कालनिर्णय**—महाभारतमते कलियुगाच्या ( युधिष्ठिर शक ) ६५३ व्या वर्षी युधिष्ठिराने या नगराची स्थापना केली. आर्यभट्ट आणि वराहमिहीर यांच्यामते कलियुगाचा प्रारंभ इ. स. पू. ३१०१ त झाला असून त्या हिशोबाने इंद्रप्रस्थाची स्थापना इ. स. पू. २४४८ त झाल्याचे ठरते. परंतु आधु. अभ्यासकांच्या मते भारतीय युद्धाचा काल इ. स. पू. १४०० मानला असल्याने या नगराची स्थापनाहि त्याच सुमारास झाली असावी.

**अवशेष**— पुरातन इंद्रप्रस्थ आणि तदनुषंगिक अन्य नगरांचे अवशेष आधु. दिल्लीच्या सभोवतालच्या ४५ चौरस मैलांच्या परिसरात आढळतात. आधु. यमुना नदीचे पात्र दरम्यानच्या काळात एक मैल पूर्वेस सरकले आहे. महाभारतकालीन इंद्रप्रस्थानजिकच्या यमुना नदीने क्रमाक्रमाने पूर्व दिशेप्रत आपला प्रवाह बदलल्याने या परिसरात नवनवीन नगरे वसविणे तत्कालीन राज्यकर्त्यांना क्रमप्राप्त झाले. यमुना नदीच्या काठावरील निगमबोध घाट, त्यानजिकचे शहाजहानकालीन निगमबोध प्रवेशद्वार, तसेच युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीचे ' नीलछत्री मंदिर ' या वास्तू महाभारतकालीन इंद्रप्रस्थामध्ये समाविष्ट होत असत. निगमबोध घाटानजिकची यमुना नदी प्रयागक्षेत्राइतकीच पवित्र मानली जात असून जुन्या दिल्लीतील ' पुराना किल्ला ' ( इंद्रपत ) आजहि ' युधिष्ठिराचा किल्ला ' म्हणून ओळखला जातो.

युधिष्ठिराच्या किल्ल्याच्या पुरातन अवशेषांवर हुमायूनने ' दिनूपनाह ' नामक नवा किल्ला स. १५३३ मध्ये बांधण्यास प्रारंभ केला आणि सात वर्षांनंतर शेरशहाने तो पुरा केला ( आर्कि. सर्व्हे. ४ ). या किल्ल्यामध्ये सध्या ' कीला कोणी ' नामक मशिदीचे, आणि ' शेर मंझिल ' नामक शेरशहाच्या राजवाड्याचे अवशेष आढळतात.

स्थानिक समजुतींनुसार शेर मंझिलच्या स्थानी पांडवांचा खलबतखाना असून त्यानजिकच्या मोकळ्या जागेत युधिष्ठिराचा राजसूय यज्ञ झाला होता. ' कीला कोणी ' मशिदीच्या स्थानी यज्ञीय अश्वरक्षणार्थ अर्जुन उभा होता. शेरशहाच्या पराजयानंतर तख्तारूढ झालेल्या हुमायून बादशहाचे ग्रंथालय शेर मंझिलमध्ये असून त्यास तेथेच अपघाती मृत्यु आला.

**उत्तरकालीन नगरे**—१६ मैल लांबीचे आधु. दिल्ली शहर शहाजहान बादशहाने वसविले असून त्यामधील दिल्लीगेट आणि अजमेरगेट यांच्या दरम्यानच्या विभिन्न भूभागांत महाभारतोत्तर कालातील सम्राटांनी वसविलेल्या राजधान्यांची संक्षिप्त माहिती खाली दिली आहे:—

**१. फिरोजाबाद**—दिल्लीगेटनजिक फिरोजशहा बादशहाची फिरोजाबाद ( स. १३५४ ) राजधानी असून तेथे आज ' फिरोजशहा कोटला ' आढळतो. त्यामध्ये अशोकाचा एक स्तंभ आहे ( जे. ए. एस्. बी. स. १८३७; पृ. ५७७ ). तो फिरोजशहाने सुघ्न गावाहून आणून येथे बसविला. दिल्ली येथील अन्य एक अशोकस्तंभ १८५७ च्या स्वातंत्र्ययुद्ध स्तंभानजिक असून तो मीरत गावाहून तेथे आणविण्यात आला. इंद्रपत ( प्राचीन इंद्रप्रस्थ ) येथील किल्ल्यांच्या बाहेर शेरशहाने स्थापिलेल्या दिल्लीचे 'लाल दरवाजा' ( मध्ययुगीन– ' काबुली दरवाजा ' ) नामक प्रवेशद्वार आहे. या प्रवेशद्वाराच्या अंतर्भागात एक पुरातन मशीद आहे.

लाल दरवाज्यापासून थोड्याच अंतरावर अकबराने बांधलेले हुमायूनचे थडगे असून त्या इमारतीतच हमीदाबानू बेगम, फरुकसियर, आलमगीर ( द्वितीय ), आणि दारा यांच्या कबरी आहेत.

**२. निजामुद्दीन**—उपरोक्त स्थानानजिक घियासुद्दीन तुघलकच्या समकालीन निजामुद्दीन अवलियाचे ' निजामुद्दीन ' गाव असून त्यामध्ये निजामुद्दीन, मुहंमदशहा, जहाँ आरा

बेगम, खुस्रू यांच्या संगमरवरी कबरी आहेत. अल्लाउद्दीन बादशहाने बांधलेला जमातखानाहि या खेड्यात आहे.

या गावानजिकच्या 'चौसठ खंबा' नामक स्थानी अकबराचा मानलेला भाऊ आणि सेनापति अझीझखान यांची थडगी आहेत. त्यानजिकच अयोध्येच्या सफ्तरजंग नबाबाची त्याचा पुत्र सुजाउद्दौलाने बांधलेली कबर आहे.

**३. तुघ्लकाबाद**—स. १३२० मध्ये घियासुद्दीन तुघ्लकाने स्थापिलेल्या या गावी त्या बादशहाचा किल्ला असून, त्याच्या दक्षिण प्रवेशद्वाराच्या बाहेर मुहंमद तुघ्लकनिर्मित घियासुद्दीन तुघ्लकाची कबर आहे. थोड्याच अंतरावर कुतुबशहाने बांधलेला कुतुबमिनार असून त्यानजिकच पृथ्वीराजाची यज्ञशाळा आणि त्यामधील सुविख्यात लोहस्तंभ आहे. या यज्ञशाळेचे सध्या मशिदीत रूपांतर झाले आहे. स्थानिक समजुतीनुसार निजामुद्दीन अवलियाने दिलेल्या शापामुळे हे नगर उजाड बनले.

पृथ्वीराजकालीन दिल्ली तुघ्लकाबादच्याच परिसरात असून, त्यानजिकचे 'लालकोट', 'योगमाया मंदिर', 'बुतखाना' आणि 'अल्तमशाची कबर' हे सारे स्थापत्यावशेष दिल्लीच्या याच भागात आहेत.

**४. जहाँपनाह**—तुघ्लक राजघराण्यातील महंमद तुघ्लकाने जुनी दिल्ली आणि सिरि यांना जोडणारी एक नवी भिंत बांधून 'जहाँपनाह' हे नवे राजधानीचे नगर वसविले.

**५. अल्लाउद्दीनची राजधानी**—कुतुबमीनारनजिकच 'अलै दरवाजा' हे अल्लाउद्दीनच्या राजधानीचे प्रवेशद्वार असून, त्यानजिकच हुमायूनचा आध्यात्मिक गुरू इमाम झमीन याची कबर आहे. अजमेर गेटनजिक जयपुरच्या जयसिंगाने बांधलेली 'जंतरमंतर' नामक वेधशाळा आहे.

**६. शहाजहानाबाद**—शाहजहानने वसविलेल्या दिल्लीमध्ये (आधु. दिल्ली) त्याने बांधलेला सुविख्यात लाल किल्ला आहे. त्या किल्ल्यामध्ये 'दिवाण-इ-आम', 'रंगमहाल', 'मुमताजमहाल', 'शाहपुर राजवाडा', 'मोती मशीद', 'जुम्मा मशीद' या मोंगलकालीन स्थापत्याच्या उत्कृष्ट वास्तू आहेत. याच भागातील कोतवालीनजिक रोशउद्दौलाने बांधलेली 'सोनारी मशीद' असून, नादिरशहाने दिल्लीच्या कत्तलीचा हुकूम तेथूनच फर्माविला होता.

**कुतुबमिनार**—२३०' उंचीचा हा पाच मजली विजयस्तंभ दिल्लीच्या कुतुबशहाने स. ११९३ त बांधण्यास प्रारंभ केला आणि स. १२०० त त्याचे बांधकाम पुरे झाले. इब्न बतूताच्या ग्रंथात कुतुबमिनारच्या सौंदर्याचे मुक्त कंठाने वर्णन केलेले आढळते. काही अभ्यासकांच्या मते हा विजयस्तंभ रायपिठोरा नामक हिंदु राजाने स्वकन्येला दूरवर्ती यमुना नदीचे दर्शन घडविण्यासाठी बांधला असून पठाण राज्यकालात त्याचे मुसलमानी वास्तूमध्ये रूपांतर करण्यात आले.

**उत्खनन**—या गावाच्या इंद्रपद आणि यमुना नदीच्या दरम्यानच्या प्रदेशातील उत्खननात हस्तिनापुर आणि रुपार गावासदृश पिंगट मृत्तिकापात्रे सापडली आहेत. त्यावरून हे गाव हस्तिनापुराशी समकालीन असल्याच्या पौराणिक अनुमानास पुष्टी मिळते.

२. (क्षेत्र) पौराणिक साहित्यमते एक पवित्र देश. या देशाचा मध्यबिंदु इंद्रप्रस्थ नगर असून पूर्वेस मथुरा आणि पश्चिमेस द्वारका यांच्या दरम्यानचा आधु. मीरत जिल्ह्याचा ईशान्य भाग आणि काठेवाडचा नैर्ऋत्य भाग म्हणजे हा देश होय. या देशाच्या उत्तर आणि दक्षिण सरहद्दी अनुक्रमे हस्तिनापुर आणि गदावर्त तीर्थ यांनी बनल्या होत्या. मथुरा, वृंदावन, आणि गोकुळ ही वैष्णवस्थाने या देशाच्या पूर्व भागात होती. शक्तिसंगमतंत्रमते हा अश्वपतींचा (राजांचा) देश होता (शक्तिसङ्गम. ३.७.२३).

**इन्द्रचेष्टा** (जैनतीर्थ)—म्हैसूर राज्यातील 'श्रवणबेलगोल' तीर्थाचे नामांतर (श्रवणबेलगोल पहा).

**इन्द्रमरु** (देश)—पश्चिम भारतातील सिंधु नदीतीरावरील एक देश (मत्स्य. १२१.४७).

**इन्द्रमार्ग** (तीर्थ)—कुरुक्षेत्रातील एक तीर्थ (म. आर. ८१.१५८; पद्म. आदि. २७.६८). अंगिरस्तीर्थयात्रेत याचा निर्देश आढळतो (म. अनु. २५.९; १६).

**इन्द्रमार्गा** (नदी)—एक पवित्र नदी. पद्ममते रामाने वनवासगमनसमयी येथे जटा बांधल्या (पद्म. सृ. २८. १८१).

**इन्द्रलोक** (आश्रम)—बदरिकाश्रमाजवळील एक आश्रमस्थान (वराह. १४०.१०).

२. (लोक) 'स्वर्गलोका'चे नामांतर (स्वर्गलोक पहा).

**इन्द्रवक्त्र** (देश)—काशिका ग्रंथमते प्राचीन भारतवर्षातील एक देश (काशिका. ४.२.१२६). 'वक्त्र' या अंत्यशब्दाचा शब्दशः अर्थ 'नदीच्या मुखानजिकचा प्रदेश' होतो. अग्रवाल यांच्या मते सिंधु नदीच्या पश्चिमेकडील आधु. बलुचिस्तानचा वालुकामय प्रदेश तो हाच होय.

**नामव्युत्पत्ती**—या देशाची शेती पर्जन्यावलंबी (इंद्रमातृक) असल्याने यास हे नाव प्राप्त झाले असावे.

**महाभारतात**—या ग्रंथमते समुद्रकिनारीचा हा देश सिंधु नदीच्या पलीकडे (पारेसिंधु) असून त्यामधील निम्न-

लिखित लोक युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयी उपस्थित होते:— १. लांगर ( मक्रानजिकचे आधु. लंग ); २. वराम ( ग्रीक साहित्य–' रंबक ); ३. पारद ( आधु. हिंगुल प्रदेशीय लोक ); ४. कितव ( मक्रान प्रदेशातील आधु. केज लोक ) ( म. स. ५१.११-१२; अग्रवाल, पृ. ७९ ).

**इन्द्रवती** ( नगरी )—इंद्रपाल हविर्होमाने स्थापिलेली एक नगरी ( भवि. प्रति. ४.१ ).

**इन्द्रवन** ( वन )—जंबुद्वीपातील एक वन ( वायु. ३९.२६ ).

**इन्द्रवर्ता** ( नदी )— जंबूद्वीपान्तर्गत भद्राश्ववर्षातील एक नदी ( वराह. ८२.४. ).

**इन्द्रवर्धन**—बौद्ध साहित्यमते ' भारतवर्ष ' ( =सिएन् तु = सिंधु ) देशाचे नामांतर. ' इंद्रोपासनेचा देश ' अशा अर्थाने त्यास हे नाव प्राप्त झाले असावे ( इत्सिंग, पृ. ५२; वॉटर्स, १.३४; भारतवर्ष पहा ).

**इन्द्रवाट** ( तीर्थ )—श्रीमालक्षेत्रातील एक तीर्थ ( श्रीमालमाहात्म्य ).

**इन्द्रशङ्कुपथ** ( देश)—जंबूद्वीपान्तर्गत मेरुपर्वतोद्भवा सप्तगंगांपैकी पूर्वगामिनी पावनी नदीच्या मार्गावरील एक देश ( वायु. ४७.५४ ).

**इन्द्रशाल** ( गुफा )—बौद्ध साहित्यमते विहारमधील राजगृह ( आधु. राजगिर ) नगराच्या पूर्वेकडील वेद्यक ( = पाली वेदीयक = आधु. गिरियक ) टेकडीमधील एक पवित्र गुफा. या गुफेच्या नावावरून त्या टेकडीस ' इंद्रशाल ' हे वैकल्पिक नाव प्राप्त झाले होते. नामांतर ( पाली साहित्य )- ' इंद्रसाल ', ( ह्युएन्त्संगचे प्रवासवर्णन, घोश्रव शिलालेख )–' इंद्रशैल '.

**नामव्युत्पत्ती**—दीघनिकायमते या गुफेमध्ये गौतम बुद्धाने इंद्राच्या बेचाळीस धर्मविषयक शंकांचे निवारण केल्यामुळे तीस ' इंद्रशाल ' नाव प्राप्त झाले ( दीर्घ. २.२६३–२६४ ).

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते वैद्यक पर्वताच्या दोन शिखरांपैकी पश्चिमेकडील शिखराच्या दक्षिण उतारावर ही गुफा असून पूर्वेकडील शिखरावर ' हंस संघाराम ' नामक बौद्ध विहार होता. या गुफेमुळेच वैद्यक पर्वत सुविख्यात झाला.

या गुफेमध्ये इंद्राने गौतम बुद्धास धर्मविषयक पृच्छा केल्याची आख्यायिका ह्युएनत्संगनेहि दिली असून त्याचे मते गौतम बुद्धाने इंद्रास दिलेल्या लेखी उत्तरांचे अस्पष्ट ठसे येथे दिसत असत. या इंद्र-बुद्ध संवादाच्या स्मृत्यर्थ गौतम बुद्धाची एक प्रतिमाहि येथे बसविली होती ( वॉटर्स, २.१७३ ).

**फाहियेन्च्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथात एकाकी पर्वत-शिखरामधील एका गुफेचा निर्देश आढळतो. कनिंगहॅम यांच्या मते येथे इंद्रशैल गुफेचाच निर्देश अभिप्रेत आहे ( कनिंग., आर्कि. सर्व्हे. १५.७ ). फर्ग्युसन यांच्या मते येथे अन्य पर्वताचा निर्देश अभिप्रेत आहे.

**घोश्रव शिलालेखात**—या शिलालेखमते वीरदेव राजाने इंद्रशैल ( वैद्यक ) पर्वतामध्ये दोन बौद्ध चैत्य खोदले होते ( जे. ए. एस्. बी. स. १८४८; पृ. ९२, वैद्यक पहा ).

**इन्द्रशैल** ( पर्वत )—वायुमते मेरु पर्वत ( आधु. पामीर पठार ) आणि महाभद्र सरोवर ( आधु. सोनकुल ) यांच्या उत्तरेकडील भद्रसोमा ( आधु. सिरदरिया ) नदीकाठचा एक पर्वत. अली यांच्या मते किर्गिस्तान देशातील लिएन्–शन् ( प्राचीन नील ) पर्वताचे उत्तरेकडील दोन मुळके म्हणजे हा पर्वत असून त्यामध्ये उगम पावणारी करदरिया नदी कर्धन् खोऱ्यामध्ये नरीन नदीस ( सिरदरिया नदीची उपनदी ) मिळते. त्याच संदर्भात भद्रसोमा नदी या पर्वतावर अवतरत असल्याचा निर्देश पौराणिक साहित्यात केला असावा ( अली, पुराणाज्. पृ. ७९ ).

२. ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते राजगृह गावाच्या पूर्वेकडील ' इंद्रशाल ' गुफेचे नामांतर ( इंद्रशाल पहा ).

**इन्द्रसर** ( सर )—धर्मारण्यातील एक सरोवर ( स्कन्द. ब्राह्म. ध. १९.१ ).

**इन्द्रसेन** ( पर्वत )—प्लक्षद्वीपातील एक पर्वत ( भा. ५.२०.४ ).

**इन्द्रस्थान** ( नगर )—शिलालेख साहित्यमते ' इंद्रप्रस्थ ' नगराचे नामांतर ( इंद्रप्रस्थ पहा ).

**इन्द्रहास** ( देश )— जंबूद्वीपान्तर्गत मेरुपर्वतोद्भवा सप्तगंगांपैकी पश्चिमवाहिनी चक्षु नदीच्या तीरावरील एक देश ( वायु. ४७.४५ ).

२. सप्तगंगांपैकी पश्चिमवाहिनी सिंधु नदीच्या तीरावरील एक देश ( वायु. ४७.४५ ).

**इन्द्राणी** ( तीर्थ )—गंगा नदीकाठचे एक तीर्थ ( नारद. उत्तर. ४१.५० ).

२. ( स्थान ) दक्षिण भारतातील इंद्राणी–तपस्यास्थान. हे कर्नाटकात उडूपीपासून तीन मैल पूर्वेस असून येथे एका पहाडावर दुर्गेचे मंदिर आहे ( ती. पृ. ३१८ ).

**इन्द्रापुर** ( नगर )—प्राचीन साहित्यमते ' इंद्रपुरक ' नगराचे नामांतर ( इंद्रपुरक पहा ).

**इन्द्रावड** ( ग्राम )—चालुक्य राजा त्रिभुवनपालाच्या वि. सं. १२९० च्या शिलालेखमते उत्तर गुजरातेतील सारस्वत मंडलान्तर्गत विषय पथकातील ( आधु. कडीमहाल ) राजपुरी ( आधु. राजपुर ) गावाच्या आग्नेयेकडील एक ग्राम (इंडि. अँटि. ६.२०८–२१०). कडी महालातील आधु. इंद्राद गाव हेच असावे ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २५९ ).

**इन्द्रिय** ( तीर्थ )--नर्मदा नदीकाठचे एक तीर्थस्थान ( नारद. उत्तर. ७७.१७ ).

**इन्द्रेश्वर** ( कुंड, तीर्थ व लिंग )--द्वारका येथील एक शिवलिंग ( स्कन्द. प्रभास. द्वा. १४.२३ ).

२. धर्मारण्यातील एक शिवलिंग ( स्कन्द. ब्राह्म. ध. १९.१ ).

३. प्रभासक्षेत्रातील एक शिवलिंग ( स्कन्द. प्रभास. प्र. २२४.२९५ ).

४. अवंती येथील ८४ शिवलिंगांपैकी एक ( स्कन्द. आवन्त्य. अ. ३१.६ ).

५. वस्त्रापथक्षेत्रातील एक शिवलिंग ( स्कन्द. प्रभास. व. ३.४; ६.२; १६.७२ ).

६. काशी येथील एक शिव लिंग ( स्कन्द. काशी. ९७०. ११६; लिङ्ग, तीर्थविवेचन. पृ. ७१.१०५ ).

७. जुनागढ स्थानकापासून ३ मैलांवरील एक शिवस्थान. येथील मंदिरात नरसी मेहताने मगवाट शिवाची आराधना केली होती ( ती. पृ. ४२२–४२३ ).

८. श्रीपर्वतावरील एक शिवलिंग ( लिङ्ग. १.९२.१५२ ).

**इन्द्रोली** ( ग्राम )—मथुरा येथील व्रजमंडलपरिक्रमेतील एक तीर्थस्थान ( ती. पृ. १०२ ).

**इन्ध्याद्रि** ( पर्वत )—महाराष्ट्रातील अजंटा गुफासमूहाच्या टेकडीचे स्थानिक नाव. हे संभवतः ' विंध्याद्रि 'चे अपभ्रष्ट रूप असावे. पौराणिक साहित्यात सातपुडा पर्वत विन्ध्य पर्वताच्या सात पुत्रांनी ( पापुद्यांनी ) बनल्याची आख्यायिका आढळते ( रॉयचौधरी, अॅन्टि. पृ. ११२; विंध्य पहा ).

**इबा**—उषवदाताच्या नासिक शिलालेखमते ( क्र. १० ) दक्षिण भारतातील एक नदी. या नदीमध्ये जलवाहतुकीची मोफत सोय केल्याचा निर्देश तेथे आढळतो. डॉ. भगवानलाल इंद्रजी यांच्या मते दक्षिण गुजरातमधील बान्सड टेकड्यात उगम पावणारी आधु. अंबिका नदी ती हीच होय ( इबा → इबिका → अंबिका ). ही नदी वलसाड गावाच्या १० मैल उत्तरेस समुद्रास मिळत असून तिच्या मुखाच्या १० मैल आतपर्यंत समुद्राच्या भरतीचे पाणी येते. त्या दृष्टीने तीमधील जलवाहतुकीचा शिलालेखीय निर्देश अन्वर्थक वाटतो ( बॉम्ब. गॅझे. १६.६३४ ).

**इबैरिङ्गइ** ( लोकसमूह )—टॉलेमीच्या मते प्राचीन भारतातील एक आदिवासी लोकसमूह.

**इम्तह्वर**— स. ५२ च्या तक्षशिला रौप्यपटमते वायव्य भारतातील एक लोकसमूह. या लोकसमूहापैकी ( इम्तह्वरियपुत्र ) ' उरसक ' नामक व्यक्तीचा निर्देश या रौप्यपटात आढळतो ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.७४ ).

**इमाउस** ( पर्वत )—टॉलेमीच्या ग्रंथमते ' हिमवत् ' पर्वताचे नामांतर ( हिमवत् पहा ).

**इमिलियन** ( देवी )— उत्तर प्रदेशातील प्रयागच्या बहिर्वेदिपरिक्रमेतील एक देवीस्थान. हे यमुनेच्या मध्यभागीच्या एका डोंगरावर आहे ( ती. पृ. ११९ ).

**इरा** ( नदी )—गयामाहात्म्यमते गया येथील एक नदी ( वायु. १०८.७९ ).

**इराण** ( देश )—झेंद अवेस्तामते पृथ्वीच्या सात प्रमुख विभागांपैकी एक ( अवेस्ता. १.३०; २.३५७; ३६३; ४०९ ). मध्य आशियातील आधु. पर्शिया देश तो हाच होय ( अली, पुराणाज्. पृ. ३० ).

**इरामा** ( नदी )—महाभारतमते एक महानदी. मार्कंडेय ऋषींना बालमुकुंदाच्या उदरातील विश्वरूपदर्शनसमयी ही नदी दिसली होती. पाठभेद–'कमला'; 'इरा' (म.आर. १८६.९५).

**इरावती**— ( नदी ) काशिका ग्रंथमते वाहीक ( आधु. पंजाब ) देशातील सिंधु नदीच्या पूर्वेकडील उपनद्यांपैकी एक. आधु. रावी नदी ती हीच होय. मत्स्य पुराणातील ' ऐरावती' या नामांतराचे ' रावी ' हे लघु रूप होय. पश्चिम पाकिस्तानातील आधु. लाहोर शहर याच नदीकाठी असून पंजाबातील पाच प्रमुख नद्यांमध्ये हिची गणना होते. सिंधु नदीस पूर्वेकडून येऊन मिळणाऱ्या पंजाबातील पाच नद्या पुढीलप्रमाणे होतः— १. वितस्ता ( आधु. झेलम ); २. असिक्नी ( पौराणिक चंद्रभागा, आधु. चिनाब ); ३. इरावती ( आधु. रावी ); ४. विपाशा ( आधु. बियास ); ५. शुतुद्री ( आधु. सतलज ).

**नामांतरे**— प्राचीन साहित्यात या नदीची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा ).

**नामव्युत्पत्ती**— कालिकामते या नदीचा उगम ' इरा ' सरोवरात होत असल्याने हिला ' इरावती ' नाव प्राप्त झाले ( कालिका. २४.१४० ).

**वैदिक साहित्यात**– निरुक्तमते ऋग्वेदातील नदीस्तुतीमध्ये निर्देशलेली ( ऋ. १०.७५.५ ), सिंधु नदीची परुष्णी नामक उपनदी ती हीच होय ( नि. ९.२६ ).ऋग्वेदमते सुदास पैजवन

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. ऋग्वेद (१०.७५.५) | परुष्णी |
| २. सिकंदरकालीन ग्रीक साहित्य | अद्रौतिस् |
| ३. टॉलेमी | अद्रिस्, ऱ्हौवदिस |
| ४. अरियन | ह्यद्रौतेस् |
| ५. स्ट्रॅबो | ह्यरौतिस् |
| ६. विष्णुस्मृति (८५.४९) | ईरावती |
| ७. मत्स्य पुराण (२२.१९) | ऐरावती |

राजाने या नदीच्या काठी कुत्स आदि शत्रूंशी युद्ध केले होते (ऋ. ७.८८.८–९). ऋग्वेदात अन्यत्रहि या नदीचा निर्देश आढळतो (ऋ. ५.५२.९; ८.७४.१५).

काशिका ग्रंथात—या ग्रंथामध्ये 'उद्धय-इरावती' आणि 'भिद्य–इरावती' नामक जोडनदीनामांचा निर्देश आढळतो. अग्रवाल यांच्या मते या नदीद्वयापैकी 'उद्धय' आणि 'भिद्य' या दोनहि नद्या इरावती नदीच्या उपनद्या असून गुरुदासपुर जिल्ह्यामध्ये रावी नदीस मिळणाऱ्या आधु. उझ आणि बई नद्या त्या याच होत (अग्रवाल, पाणिनि. पृ. ५२).

पौराणिक साहित्यात—या साहित्यमते ही एक पवित्र नदी आणि तीर्थस्थान असून (मत्स्य. २२.१९; विष्णुधर्म. ८५.४९; नीलमत. १४९; १२३९), हिच्या तीरावर वामनावताराचे रूपधार नावाचे स्थान होते (वामन. ९०.५). वामन पुराणात अन्यत्र इरावती–नड्वला संगमाचा निर्देश आढळतो (वामन. ७९.५१). ही नदी हिमालयोद्भवा असल्याबद्दल सर्व पुराणांचे एकमत दिसते (कूर्म. पू. ४७.२९; ब्रह्माण्ड. १६.२५; मार्क. ५४.१७; वामन. १३.२१; वायु. ४५.९५; काव्यमी. १७.२२७; वराह. ८५.४). पौराणिक साहित्यात अन्यत्र, तसेच बृहत्संहितेतहि या नदीचा निर्देश आढळतो (वामन ७९.७; ८१.१; पद्म. आदि. ६.१३; बृ. सं. १६.२७).

टॉलेमीच्या ग्रंथात—या ग्रंथमते ही नदी अक्षांश ७०° उत्तर आणि रेखांश १३०° पूर्व येथे उगम पावते. ही नदी बिदस्पेस (आधु. झेलम) नदीला जाऊन मिळत असल्याची चुकीची माहिती तेथे आढळते. वस्तुतः ही अकेसिनेस् (आधु. चिनाब) नदीला मिळते.

अरियनच्या ग्रंथात—या नदीच्या ह्यफसिस्, सरंगेस्, न्युद्रोस् नामक तीन उपनद्या असल्याची माहिती या ग्रंथात आढळते (इंडिका. ४). परंतु ती यथायोग्य वाटत नाही. कारण यापैकी ह्यफसिस् नदी रावी–चिनाब संगमाच्या खालच्या अंगास चिनाब नदीला मिळते.

महाभारतात—या ग्रंथमते कुरु देशाहून वाहीक देशास जाणाऱ्या प्रवाशाला शतद्रु आणि इरावती या दोन नद्या ओलांडाव्या लागत असत (म. क. ३०.२१). सिंधुपृष्ठ देशातील या नदीच्या काठी कृष्णाने गोपति व तालकेतु असुरांना ठार मारले होते (म. आर. १३.३०). वरुण-सभेमध्ये ही उपस्थित असून (म. स. ९.१९), स्त्रीधर्म वर्णन करतेवेळी पार्वतीने हिचा सल्ला घेतला होता (म. अनु. १४६.१८).

आधुनिक काली—ही नदी लघु हिमालयातील 'बन्गहल्' पर्वताच्या दरीमध्ये उगम पावते. पीर पंत्साल पर्वताच्या दक्षिणेकडील आणि धवलधार पर्वताच्या उत्तरेकडील उतार यामधील जल एकत्र करून ही नदी दुर्गम दरीच्या द्वारे बन्गहल् पर्वतातून बाहेर पडते. या नदीच्या हिमालय पर्वतान्तर्गत भागाची एकूण लांबी १३०' असून हिमालयातील ३००० चौरस मैल प्रदेशातील पाणी ती एकत्र करते.

काश्मीरातील 'चंबा' प्रांताच्या नैर्ऋत्य भागात हिमालय प्रदेश सोडून ही नदी ईशान्य आणि आग्नेय अशा द्विविध प्रवाहांनी बाहेर पडते. चंबा गावापासून नैर्ऋत्य दिशेने वहात जाऊन आणि लाहोर शहर ओलांडून अखेरीस ती अहमदपुर आणि सरैसिंधु गावांच्या दरम्यान चिनाब (प्राचीन वितस्ता आणि चंद्रभागा यांचा संयुक्त प्रवाह) नदीस मिळते (लॉ, माउंटन्स. पृ. १३).

**२.** गरुडमते उत्तर भारतातील एक नदी (गरुड. ८१). अयोध्या प्रांतातील आधु. राती नदी ती हीच होय. 'राती' हे संभवतः 'रेवती'चे अपभ्रष्ट रूप असावे.

**३.** (नगर) सिकंदरकालीन ग्रीक साहित्यमते वायव्य भारतातील एक नगर. हे पुष्कलावती (आधु. चारसद्दा) गावाच्या पश्चिमेस असून त्या गावाहून उद्भांडपुर (आधु. ओहिंद) गावी जात असता सिकंदरला हे लागले होते. नौशेर गावानजिकच्या लांडी नदीच्या डाव्या किनाऱ्याजवळील आधु. अखुत्त गावाच्या परिसरात हे असावे. नामांतर—'ऐरावती'.

**इरावती-नड्वला-सङ्गम**—पंजाबातील इरावती (आधु. रावी) नदीचे संगमस्थान (वामन. ७९.५१).

**इरिलपाडु** (मंदिरस्थान)—आंध्र प्रदेशातील कृष्णा जिल्ह्यातील नरसरावुपेट गावाच्या ६ मैल आग्नेयेकडील एक शिवमंदिरस्थान. येथे चोल राज्यकालीन (स. १०२३–

१२२८ ) एक शिवमंदिर आहे ( सेवेल, मद्रास. पृ. ६९ ).

**इलङ्गाशोकम्** ( बृहद्भारतीय देश )—चोल राजा राजेंद्र ( प्रथम ) च्या स. १०२४ च्या मालूर शिलालेखमते त्याने जिंकलेला आग्नेय आशियातील एक बृहद्भारतीय देश. मलाया द्वीपकल्पातील आधु. लेंगसुक देश बहुधा हाच असावा ( एपि. कर्ना. ९.८२; आर्कि. सर्व्हे. बर्मा, स. १९११; पृ. ६ ).

**इला** ( ग्राम )—चालुक्य राजा भीम ( प्रथम ) च्या वि. सं. ११२० च्या शिलालेखमते उत्तर गुजरातमधील धाणदाहार पथकातील ( आधु. पालनपुर प्रदेश ) एक ग्राम. आधु. पालनपुर गावाच्या परिसरात हे असावे ( एपि. इंडि. २१.१७१–१९२ ).

**इलावृत वर्ष** ( वर्ष )—पौराणिक साहित्यमते जंबूद्वीपान्तर्गत ( आधु. आशिया खंड ) नऊ वर्षापैकी ( उपविभाग ) एक ( मत्स्य. ११३.१९ ). मध्य आशियातील वक्षु आणि तारीम नद्यांच्या खोऱ्यांच्या दरम्यानचे आधु. पामीर पठार म्हणजे हे वर्ष असावे.

ब्रह्माण्डमते हे जंबूद्वीपाच्या मध्यभागी मेरु पर्वताच्या सभोवतालच्या भागात असून ( ब्रह्माण्ड. ३५.२५ ), त्याच्या भौगोलिक चतुःसीमा पुढीलप्रमाणे होत्याः–१. पूर्वेस–भद्राश्व वर्ष; २. पश्चिमेस–केतुमाल वर्ष; ३. दक्षिणेस–निषध पर्वत; ४. उत्तरेस–नील पर्वत. यापैकी भद्राश्व आणि केतुमाल वर्षे या देशविभागापासून माल्यवत् आणि गंधमादन पर्वतांनी विभक्त झाली होती ( विष्णु. २.२.२२ ).

**नामांतरे**—पौराणिक साहित्यात या वर्षाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :–१. **मेरुवर्ष** ( मार्क. ५७.७ ); २. **इलावृत द्वीप** ( लिङ्ग. ४७.४ ); ३. **मध्य द्वीप** ( लिङ्ग. ४७.४ ); ४. **पुरूरवस् देश** (भा. ९.१; ब्रह्माण्ड. ३.५९).

**नामव्युत्पत्ती**— पौराणिक साहित्यमते जंबूद्वीपाचा आद्य सम्राट आग्नीध्र याच्या नऊ पुत्रांपैकी 'इलावृत नामक पुत्राचा देश' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले ( विष्णु. २.१ ).

**आकार**—चौकोनी आकाराच्या मेरु पर्वताच्या चतुर्दिशांकडील हे द्वीप ( विष्णुधर्म. १.७-२२; काव्यमी. १७.२२३ ) चौकोनी आकाराचे होते ( विष्णुधर्म. १.७.३१ ). मार्कंडेयमते हे द्वीप अर्धचंद्राकृती (पेल्याच्या आकाराचे) होते ( मार्क. ५१.१३ ). पौराणिक साहित्यमते पेल्याच्या आकाराच्या ( शराव, परळ ) मेरु पर्वताच्या अंतर्भागातील या द्वीपामध्ये सूर्य, चंद्र, तारे आदींचा प्रकाश पोहोचत नसे. मात्र तेजोमय मेरु पर्वताच्या प्रकाशाने हे न्हाऊन निघे ( विष्णुधर्म. १.७. २६–२७ ).

**वर्षपर्वत**—या वर्षाच्या वर्षपर्वताचे ( प्रमुख पर्वत ) नाव पौराणिक साहित्यात आढळत नाही. त्यावरून मेरु पर्वत हाच या वर्षाचा वर्षपर्वत असावा.

**उपविभाग**—विष्णुधर्ममते या वर्षाचे निम्नलिखित 'भेद' ( उपविभाग ) होते :–१. भद्राश्व; २. जंबुमाल ( गंधमाल ); ३. केतुमत्; ४. कुरु ( विष्णुधर्म. १.७.२३ ). जंबूद्वीपाच्या नऊ वर्षापैकी चार वर्षांना येथे इलावृत वर्षाचे उपविभाग मानले असून जंबूद्वीपाची नववर्षात्मक विभागणी चतुर्वर्षात्मक बनविण्यासाठी हे केले असावे.

**नद्या**—या द्वीपाच्या मध्यभागाचा भेद करून जंबू नदी वहात असे ( ब्रह्माण्ड. १७.२२; भा. ५.१६.१९; मत्स्य. १२१.६७; म. भी. ८.२२; मार्क. ५१.२७–२९; वायु. ३५.२९; ४७.६६; विष्णु. २.२.१८; विष्णुधर्म. १.७.२५). त्यामधील अन्य नद्या पुढीलप्रमाणे होत्या :–१. अरुणोदा ( भा. ५.१६–१७ ); २. चक्रावर्ता ( मार्क. ५२.७ ); ३. शंखावती ( मार्क. ५२.७ ).

**पौराणिक साहित्यात**—या साहित्यमते गणाधिपती शिवाच्या या निवासस्थानी समस्त देवांचा जन्म, विवाह आणि ऋतुजातकर्मादि संस्कार झाले होते. बलि वैरोचन असुराचा यज्ञ, तसेच वामनावतारी विष्णूचा बलिबंधनाचा पराक्रमहि येथेच झाला होता ( मत्स्य. १३५.२–५ ). तारक ( मय ), आणि त्रिपुर असुरांचे पारिपत्यहि याच देवभूमीमध्ये झाले होते ( मत्स्य. १२९–१४०; १३५.६४ ).

**मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात**—या साहित्यात जंबूद्वीपाचा एक भूविभाग म्हणून याचा निर्देश आढळतो ( त्रिकाण्ड. ३०.३; शारदीय. ९१२; नानार्थ. १.१०; वैजयन्ती. ३५.७;१३ ).

**इलास्पद** ( तीर्थ )—महाभारतमते 'इळस्पद्' ( आधु. उत्तरवेदि कुरुक्षेत्र ) तीर्थाचे नामांतर (म. आर. ८१. ६३; इळस्पद पहा ).

**इल्वलपुर** ( नगर )—दक्षिण भारतातील 'वातापिपुर' नगरीचे नामांतर ( वातापिपुर पहा ).

२. ( गुफा ) पौराणिक साहित्यमते दक्षिण भारतातील 'एलापुर' गुफास्थानाचे नामांतर ( एलापुर पहा ).

**इश्पोल** ( बौद्ध स्तूप )—गंधार ( आधु. अफगाणिस्तान ) देशान्तर्गत खैबर खिंडीतील एक सुविख्यात बौद्ध स्तूपस्थान. स्वात खोऱ्यातील लालाबेग गावानजिक अली मस्जिद स्तूपापासून काही अंतरावर एका टेकडीवर हा आहे. येथील वर्तुलाकृती घुमटावरील अर्धवर्तुलाकृती स्तूप पूर्वकालीन

गंधार स्थापत्यशैलीने बांधला आहे. नामांतर–' पीरबुलक स्तूप '.

स्तूप – कमी उंचीच्या वर्तुलाकृती ग्रीवेवर स्थापिलेला हा अर्धवर्तुलाकृती स्तूप सुविख्यात माणिक्याल स्तूपाइतकाच मोठा ( व्यास–१२७′ ) आहे. ग्रीवेच्या खालच्या अंगाच्या चौकोनी आणि लंबचौकोनी आकाराच्या व्यासपीठां-पैकी चौकोनी व्यासपीठाच्या दर्शनी भागी चुन्या-मध्ये कोरलेले कॉर्निथियन शिरोभूषणयुक्त चौदा स्तंभ आहेत. त्यांच्या खोबणीमध्ये गौतम बुद्धाच्या मूर्ती बसविल्या असाव्यात. खालच्या आयताकृती व्यासपीठाच्या दर्शनी भागी बौद्ध प्रतिमांची ( उंची–१८″ ) रांग कोरली असून, या व्यासपीठाप्रत जाण्यासाठी एक जिनाहि स्तूपाच्या पूर्वभागा-मध्ये आहे. आज हा स्तूप बहुंशी उद्ध्वस्त झाला आहे ( फर्ग्युसन, १.९२–९३ ).

**इष्टका** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारत-वर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८६ ).

**इसन्द्रोल** ( ग्राम )—कृष्णा नदीच्या दक्षिणेकडील वेल्नाडु देशाच्या राजधानीचे गाव ( वेलनाडु पहा ).

**इसिगिलि**—बौद्ध साहित्यमते बिहारमधील गिरिव्रज गावानजिकच्या ' ऋषिगिरि ' टेकडीचे नामांतर ( मज्झिम. ३.६८; ऋषिगिरि पहा ).

**इसिपतन मृगदाव ( मृगवन )**—सारनाथ येथील 'ऋषिपट्टण मृगदाव' चे नामांतर ( ऋषिपट्टण मृगदाव पहा ).

**इसिल** ( नगर )—अशोकाच्या ऋषिगिरि–ब्रह्मगिरि शिलालेखमते दक्षिण भारतातील ' ऋषिल ' नगराचे नामांतर ( ऋषिल पहा ).

**इसुकार**—बौद्ध साहित्यमते कुरु राज्यातील 'ऋषिकार' नगराचे नामांतर ( उत्तराध्ययन सूत्र. १५.१२; ऋषिकार पहा ).

**इस्फिद्‌जब** ( नगर )—अरबी साहित्यमते मध्य आशियातील एक नगर. ' इस्फिद्‌जब'चा शब्दशः अर्थ ' श्वेतजलयुक्त नगर ' होतो. रशियन तुर्कस्तानमधील ताश्कंद गावाच्या ईशान्येकडील आणि चिम्कंदपासून ६$\frac{1}{2}$ मैल पूर्वे-कडील आधु. सैरम् गाव ते हेच होय (वॉटर्स, १.८३–८४).

**इस्सिककुल** ( सरोवर )—तुर्की साहित्यमते मध्य आशियातील ' आनंदजल ' सरोवराचे नामांतर ( आनंदजल पहा ).

**इळङ्कोयकुडि** ( अग्रहार ग्राम )—पांड्य राजा वरगुण-च्या अंबासमुद्रम् शिलालेखमते दक्षिण भारतान्तर्गत मुळ्ळिनाडु प्रदेशातील एक अग्रहार ( ब्रह्मदेय ) ग्राम ( एपि. इंडि. ९.८४; १५.३५ ). तिनेवेल्लि जिल्ह्यातील ताम्रपर्णी नदीकाठचे आधु. अंबासमुद्रम् गाव ते हेच होय. नामांतर ( पांड्य शिलालेख )–' अरैशूर ' ( अरैशूर पहा ).

या गावी सापडलेल्या चोल राजा राजराज ( प्रथम ) च्या स. ९९४ च्या शिलालेखात त्यास ' मुम्मडि चोल ( दक्षिण भारतातील तीन महान साम्राज्ये जिंकणारा ) म्हटले आहे ( एपि. इंडि. ५.४८–१२४ ).

**इळस्पद** ( तीर्थ )—ऋग्वेद आणि पौराणिक साहि-त्यमते यज्ञयोग्य (उत्तरवेदि) 'कुरुक्षेत्र' तीर्थाचे नामांतर ( ऋ. १.१२८; १०.१९१.१; म. आर. ८१.६३; पद्म, आदि. २६.७३ कुरुक्षेत्र पहा ). नामांतर ( महाभारत, पद्म पुराण )–' इलास्पद ', ( नारद पुराण )–' ईहास्पद '.

---

# ई

**ईआम्ली** ( ग्राम )—धर्मारण्यातील एक ग्राम ( स्कन्द. ब्राह्म. ध. ३५.४१ ).

**ईजिक** ( देश )—उदीच्य ( वायव्य ) भारतातील एक जनपद ( पद्म. आदि. ६.४७; ब्रह्माण्ड. १६.५० ).

**ईपूरु** ( देवमंदिरस्थान )—आंध्र प्रदेशान्तर्गत कृष्णा जिल्ह्यातील विनुकोंड गावापासून १३ मैल उत्तरेकडील एक देवमंदिरस्थान. येथे इ. स. १३ व्या शतकातील ' विश्वेश्वर-स्वामिन् ', ' गोपालस्वामिन् ' आदि सात देवालये आहेत ( सेवेल, मद्रास. पृ. ६६ ).

**ईरावती** ( नदी )—पंजाबातील ' इरावती ' नदीचे नामांतर ( विष्णुस्मृति. ८५.४९; इरावती पहा ).

**ईलम्** ( देश )—चोल राजा परांतक ( प्रथम ) च्या स. ९४६ च्या कुर्रम दानपत्रमते ' सिंहलद्वीप ' (आधु. सिलोन)चे नामांतर ( सिंहलद्वीप पहा ).

**ईश** ( तीर्थ )—नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( पद्म. आदि. २०.६९ ).

२. ( सरस् ) श्रीमालक्षेत्रातील एक सरोवर ( श्रीमाल-माहात्म्य ).

**ईशबलारी** ( शिवस्थान )—ऐन्-इ-अकबरीमते कश्मीरातील 'ईशेश्वर' शिवस्थानाचे नामांतर. अन्य नामांतर—'ईशाबारी' ( ईशेश्वर पहा ).

**ईशान्** ( क्षेत्रपाल )—जगन्नाथक्षेत्रातील आठ क्षेत्र-पालांपैकी एक ( स्कन्द. जगन्नाथ. ४. ).

२. ( गणपति ) हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत वररुचिस्थापित एक गणेशप्रतिमा ( स्कन्द. नागर. १३१ ).

३. ( तीर्थ ) काशी येथील एक तीर्थ ( स्कन्द. काशी. ६१.१३९; ८४.१०४ ).

४. अवंती येथील एक तीर्थ ( स्कन्द. आवन्त्य. अ. २३.१२ ).

५. (पर्वत) शाकद्वीपातील एक पर्वत (भा. ५.२०.२६).

६. ( लिंग ) काशी येथील महाल्यायतन शिवलिंगांपैकी एक ( स्कन्द. काशी. ७३.६०; लिङ्ग. १.९२.१०६; १३७; तीर्थविवेचन. पृ. १८५ ).

७. ( शिखर ) केदार पर्वताचे एक शिखर ( देवीपुराण; तीर्थविवेचन. पृ. २३० ). येथे ईशान नामक तीर्थ आहे.

**ईशानपुर** ( बृहद्भारतीय देश )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते आग्नेय आशियातील 'कंबूज' ( आधु. कंबोडिया ) देशाचे नामांतर ( कंबूज पहा ). नामांतर ( ह्युएन्त्संग ) —'इ-शॅग्-न-पु-लो'; (इत्सिंग्)— 'पोह नान' ( फुनान ).

२. ( बृहद्भारतीय नगर ) बृहद्भारतीय 'कंबूज' ( आधु. कंबोडिया ) देशाच्या राजधानीचे गाव.

**ईशानाध्युषित** ( तीर्थ )—महाभारतान्तर्गत पुलस्त्य-यात्रामते वल्मीक तीर्थापासून सहा 'शम्यानिपात' अंतरावरील एक तीर्थ ( म. आर. ८२.७; पद्म. आदि. २८.२९ ).

**ईशानी** ( शिखर )—अर्बुद पर्वतावरील एक शिखर ( स्कन्द. प्रभास. अर्बुद. ५२.१ ).

**ईशानेश** ( लिंग )—काशी येथील एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ९७.२१४).

**ईशानेश्वर** ( लिंग )—अवंती येथील ८४ शिवलिंगां-पैकी एक ( स्कन्द. आवन्त्य. च. १६ ).

**ईशान्य** ( देशसमूह )—ईशान्य भारतातील 'ऐशान्य' देश आणि लोकसमूहांचे नामांतर ( ऐशान्य पहा ).

**ईशरपुर** ( ग्राम )—चालुक्य राजा सोमेश्वर ( तृतीय )च्या स. ११२७ च्या शिलालेखमते वायव्य म्हैसूरमधील एक ग्राम. बनवासी आणि सांतर देशांच्या सीमेवर हे असावे ( एपि. कर्ना. ८.१४१ ).

**ईशेश्वर** ( शिवस्थान )—राजतरंगिणीमते कश्मीरच्या संधिमत् ( आर्यराज ) राजाने बांधलेले दल सरोवराकाठचे एक शिवमंदिरस्थान ( राज. २.१३४ ). ईशान नामक गुरूच्या नावावरून यास हे नाव प्राप्त झाले. स्टाइन यांच्या मते निशात बागेपासून ½ मैल अंतरावरील दल सरोवरच्या ईशान्य किनाऱ्यावरील आधु. इशबार गाव ते हेच होय. ( ईशेश्वर>इशबोर>इशबार ). नामांतर ( ईशेश्वरमाहात्म्य)—'ईशालय'; 'ईशविहार'; (ऐन्-इ-अकबरी)—'ईशबलारी' ( ईशाबारी ).

मंदिरावशेष—इशबार गावच्या गुप्तगंगा नामक जिवंत झऱ्याच्या पार्श्वभागीच्या ३०′ × ८′ उंचीच्या उंचवटयावर हे मंदिर होते. मात्र तेथे या मंदिराचे काहीहि अवशेष सध्या आढळत नाहीत.

ऐन्-इ-अकबरीमध्ये—या ग्रंथमते हे मंदिर 'सूर्यसर' सरोवराभोवती होते. येथे 'सुरेश्वरी तीर्था'शी या स्थानाची गल्लत केलेली दिसते.

ईशेश्वरमाहात्म्य—'ईशेश्वरमाहात्म्य' नामक उत्तर-कालीन माहात्म्यग्रंथात याचे माहात्म्य वर्णिले आहे ( स्टाइन, राज. १.६७ ).

**ईश्वरपुर** ( बृहद्भारतीय नगर )—आग्नेय आशिया-तील कंबूज ( आधु. कंबोडिया ) देशातील एक नगर. अंकोर-थोम् गावापासून १६ मैल ईशान्येकडील आधु. बंतै-श्री गाव ते हेच होय. कंबूज देशाच्या श्रीन्द्रवर्मन् ( इ. स. १२९६-१३०७ ) राजाने येथे बांधलेले 'त्रिभुवन महेश्वरा'चे शिव-मंदिर ख्मेर मंदिरस्थापत्यशैलीचे उत्कृष्ट अंतिम उदाहरण आहे ( सांकृत्यायन, पृ. १८७ ).

२. ( विष्णुतीर्थ ) एक विष्णुतीर्थ. येथील विष्णूचे नाव 'स्वाहा' होते ( पद्म. उत्तर. १२९.२२ ).

**ईश्वरवासक** ( ग्राम )—गुप्त सम्राट चंद्रगुप्त ( द्वितीय )च्या स. ४१२ च्या सांची शिलालेखमते 'काकनादबोट' ( आधु. सांची ) च्या बौद्ध भिक्षूंना दान दिलेले एक गाव ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.३१; काकनादबोट पहा ).

**ईश्वरीपुर** ( शक्तिपीठ )—भारतातील एक्कावन्न शक्ति-पीठांपैकी एक. हे सध्या पूर्व पाकिस्तानातील खुलना जिल्ह्यात आहे. येथे सतीचा वामहस्त पडला ( ती. पृ. १८९ ).

**ईहास्पद** ( तीर्थ )—नारदमते 'इळस्पद' ( उत्तरवेदी कुरुक्षेत्र ) तीर्थाचे नामांतर ( कुरुक्षेत्र पहा ).

# उ

**उ-चँङ्ग** ( देश )—फाहियेन्च्या प्रवासवर्णनमते वायव्य भारतातील ' उद्यान ' देशाचे नामांतर. अन्य नामांतर ( ह्युएन्त्संग )–' उ-चँग्-न ' ( उद्यान पहा ).

**उक्कट्ठा** ( ग्राम )—बौद्ध साहित्यमते कोशल सम्राट प्रसेनजिताने दान दिलेले कोशल देशातील एक अग्रहार ग्राम ( दीघ. ९७ ).

**उक्कल** ( ग्राम )—स. ९५५ च्या बावाजी टेकडी शिलालेखमते पृथ्वीपति ( द्वितीय ) गंग राजाकडून त्रिभुवन-धीर पल्लव राजाने विकत घेतलेले दक्षिण भारतातील एक ग्राम ( एपि. इंडि. ४.८१ ). उत्तर अर्काट जिल्ह्यातील आधु. उक्कल गाव ते हेच होय. राष्ट्रकूट राजा कृष्ण ( तृतीय ) चा स. ९५२ चा शिलालेखहि येथील मंदिरात आढळतो ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. ३.११ ).

२. ( देश ) जातकमते पूर्व भारतातील ' उक्कल ' देशाचे नामांतर ( जा. १.८० ). अन्य नामांतर–' उक्कला ' ( अपादान. २.३५९; उत्कल पहा ).

**उक्काचेला** ( नगर )—बौद्ध साहित्यमते वृजि ( पाली–वज्जि ) देशातील गंगा नदीकाठचे राजगृह–वैशाली मार्गा-वरील एक बौद्धधर्मीय नगर ( उदानटीका. ३२२ ). सांकृत्यायन यांच्या मते उत्तर बिहारमधील मुजफ्फरपुर जिल्ह्यातील गंगा–गंडक संगमावरील पटना शहरानजिकचे आधु. हाजीपुर गाव ते हेच होय. नामांतर–' उक्कचेला '; ' उक्कावेला ' ( मज्झिम. टीका. १.४४७ ).

**नामव्युत्पत्ती**—बुद्धघोषमते येथील लोक कपड्यांच्या चिंध्यांच्या ( चेला ) पलित्यांच्या ( उक्का ) साह्याने मच्छिमारी करीत असल्याने त्यांस हे नाव प्राप्त झाले ( मज्झिम. टीका. १.४४७ ). आजहि या गावचे लोक मच्छि-मारीचाच व्यवसाय करतात.

**बौद्धकाली**—गौतम बुद्धाने या गावी रचलेल्या ' चुल्ल-गोपालक सुत्त 'मध्ये गंगा नदीमार्गाने मगध देशाहून विदेह देशास धेनुसंघ आणणाऱ्या गोपालांचा निर्देश आढळतो ( मज्झिम. १.२२५ ). बौद्ध भिक्षु सारिपुत्ताने या गावी परिव्राजक सामंदकास निर्वाणप्राप्तीचा उपदेश केला होता ( संयुत्त. ४.२६१ ). सारिपुत्त आणि मुग्गलानच्या मृत्यू-नंतर गौतम बुद्धाने येथे त्यांच्या गौरवपर भाषण केले होते ( संयुत्त. ५.१६३ ).

**उखलद** ( जैनतीर्थ )—महाराष्ट्रातील पूर्णा नदीकाठचे एक जैनतीर्थ. परभणी जिल्ह्यातील मनमाड–पूर्णा रेल्वेच्या मीरखेत रेल्वे स्थानकापासून ४ मैल उत्तरेकडील आधु. उखलद गाव ते हेच होय. विश्वभूषण आणि ज्ञानसागराच्या ग्रंथांत येथील नेमिनाथमंदिराचा निर्देश आढळतो ( जैन तीर्थयात्रादर्शक. पृ. १९९; ती. सं. पृ. १२१ ).

**उग्गनगर** ( नगर )—बौद्धसाहित्यमते श्रावस्ती नजिकच्या ' उग्रपुर ' नगराचे नामांतर ( धम्मपदभाष्य. १८४ ). अन्य नामांतर–' उग्गपुर ' ( उग्रपुर पहा ).

**उग्र** ( लोकसमूह )—उत्तर बिहारमधील वृजि ( वज्जि ) संघराज्यातील वैशाली नगराच्या परिसरातील एक लोकसमूह ( अङ्गुत्तर. १.२२; ३.४९; ४५१; ४.२०८–२१२ ). नामांतर ( पाली साहित्य )–' उग्ग '.

**उत्पत्ती**—जैन सूत्रकृतांग ग्रंथामध्ये लिच्छवि आणि उग्र लोकांना उच्चकुलीन म्हटले असले ( सूत्र. पृ. ७१ ), तरी मनुस्मृतीमध्ये त्यांना क्षत्रिय पिता आणि शूद्र माता यांची संकरज संतती मानले आहे. बिळातील प्राणी मारून हे लोक उपजीविका करीत असत ( मनु. १०.९.४९; अभिधान. ५.८९६ ). जैन साहित्यमते हे लोक आद्य जैन तीर्थंकर ऋषभनाथनियुक्त नगररक्षकाचे वंशज होते ( एस्. बी. ई. ४५.७१ ).

होर्नुल यांच्या मते उग्र लोक हे मूळचे तिबेटमधील ' उंग ' अथवा ' उइघूर ' या तार्तार जमातींपैकी होते ( आर्कि. सर्व्हे. २.६२ ). परंतु वैशाली जनपदाचे प्राचीनत्व लक्षात घेता त्यांचे हे मत यथायोग्य वाटत नाही.

**आधुनिक काली**—मारवाड–सिंध देशांच्या सरहद्दीवरील मल्लनि प्रदेशामध्ये ' उग ' नामक रजपूत जमात आजहि आढळते ( राजपुताना गॅझे. पृ. २७५ ). बंगालमधील ' आगुरी ' नामक कृषिव्यवसायी लोक स्वतःस उग्र क्षत्रिय म्हणवीत असून त्यांचे ' जाना ' आणि ' सूत ' असे दोन उपविभाग होते. त्यापैकी ' सूत ' या संकरज जातीचा निर्देश मनुस्मृतीमध्ये आढळतो ( मनु. १०.११.१७ ).

**लिपी**—ललितविस्तारमते विश्वामित्राने गौतम बुद्धाला शिकविलेल्या चौसष्ट लिप्यांमध्ये उग्र लोकांची लिपी प्रमुख होती ( ललित. इंग्रजी अनुवाद. पृ. १८३ ).

**वसाहती**—वैशालीनिवासी उग्र लोकांच्या गंगा नदीच्या खोऱ्यामध्ये निम्नलिखित वसाहती होत्याः—

( १ ) **काशी आणि विदेह**—बृहदारण्यक उपनिषदात

काशीविदेहनिवासी 'उग्रपुत्र' (उग्रकुलोत्पन्न) क्षात्रोपजीवी व्यक्तीचा निर्देश आढळतो (बृ. उ. ३.८.२).

(२) पोलासपुर—जैन 'उवास गदसौ' मते कांपिल्य आणि वाणिज्य ग्रामांच्या दरम्यानच्या या गावच्या उग्ग आणि भोग लोकांनी जैन धर्माची दीक्षा घेतली होती. पांचाल, कोशल अथवा वज्जि देशांमध्ये हे असावेत (होर्नुल, उवास गदसौ. २. परिशिष्ट. ५५–५७).

(३) उग्गपुर—या गावच्या उग्र लोकांना गौतम बुद्धाने बौद्ध धर्माची दीक्षा दिली होती (धम्मपदटीका. पृ. १८४). (रॉकहिल, बुद्धचरित्र. पृ. ७०–७१; हार्डी, मॅन्युअल ऑफ बुद्धिझम. पृ. २२६–२३४).

(४) हत्थिगाम—बौद्ध अंगुत्तरनिकायमते हे उग्र लोकांचे नगर होते (अङ्गुत्तर. ४.२१२–२१६).

२. (नगर) शिन्नामालूर दानपत्रमते पांड्य राजा परांतक वीरनारायण (इ. स. ९ वे शतक) याने जिंकलेले दक्षिण भारतातील एक नगर (रंगाचारी, २.३६७).

३. (लिंग) काशी येथील एक शिवलिंग. नामांतर—'केदार' (पद्म. आदि ३७.१५).

४. (ब्रह्मदेवस्थान) पद्ममते एक ब्रह्मदेवस्थान. येथील ब्रह्मदेवाचे नाव 'पद्महस्त' होते (पद्म. सृ. २९.१३५).

**उग्रतारा** (शक्तिपीठ)—बिहारमधील मिथिलेनजिकचे एक शक्तिपीठस्थान. स्थानिक समजुतीनुसार येथे सतीचा नेत्र पडला (ती. पृ. १५३).

**उग्रनाथ** (शिवस्थान)—बिहारमधील मिथिला गावाजवळील भवानीपुर येथील शिवस्थान. महाकवी विद्यापति येथे निवास करीत असे (ती. पृ. १५०).

**उग्रपुर** (नगर)—बौद्ध साहित्यमते उत्तर भारतातील उग्र लोकांचे एक नगर. गौतम बुद्धाने येथील उग्र लोकांना बौद्ध धर्माची दीक्षा दिली होती. श्रावस्ती, साकेत, अथवा चंपा यांपैकी एका नगराचा निर्देश येथे अभिप्रेत असावा. नामांतर (पाली साहित्य)—'उग्गपुर'; (धम्मपद टीका)—उग्गनगर (रॉकहिल, बुद्धचरित्र. पृ. ७०–७१; उग्र पहा).

**उग्रशेखरा** (नदी)—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते 'गंगा' नदीचे नामांतर (त्रिकाण्ड. २८.२३; शाश्वत. १.१२२०; गंगा पहा).

**उग्रसेन** (तीर्थ)—द्वारका येथील एक तीर्थ (स्कन्द. प्रभास. द्वा. १६.३८).

**उग्रसेनेश्वर** (लिंग)—प्रभासक्षेत्रातील एक लिंग (स्कन्द. प्रभास. प्र. १२९).

**उग्रेश्वर** (कुंड व लिंग)—काशी येथील एक तीर्थ (स्कन्द. काशी. ९७.११३; लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. ७०).

**उचडिया** (सप्तर्षि-तपोभूमी)—पश्चिम भारतातील नर्मदा नदीच्या दक्षिण किनाऱ्यावरील सप्तर्षींची तपोभूमी. ही ग्वाली गावापासून २ मैलांवर आहे (ती. पृ. ४३७).

**उचानघाट** (उच्चैःश्रवस्-तपस्यास्थान)—मध्य प्रदेशातील नर्मदा नदीकाठचे उच्चैःश्रवस् ऋषींचे तपस्यास्थान. हे बाग्दीसंगमापासून १ मैलावर आहे (ती. पृ. २३०).

**उचेनगर** (नगर)— शिलालेख साहित्यमते उत्तर भारतातील एक गाव. मीरत जिल्ह्यातील गंगा-यमुना नद्यांच्या दुआबातील काली नदीकाठचे आधु. बुलंद शहर (उंचानगर) गाव ते हेच होय (एपि. इंडि. १.३८१). आधु. 'उंचानगर' हे नाव 'उचेनगर'चेच अपभ्रष्ट रूप असावे (चौधरी, पृ. ५४).

**उच्च** (देश)—दक्षिण पंजाबमधील भाट लोकांचा देश. सतलज-सिंधु संगमाच्या वरच्या भागातील सतलज नदीच्या (पंचनद नदी) ईशान्येकडील या देशाची राजधानी उच्च (उचापुरी) गावी होती. मूलस्थान (आधु. मुलतान)–उचापुरी व्यापारी रस्ता अस्तित्वात होता (जयचंद्र, पृ. ३७२).

गझनीच्या महंमदाने पंजाब जिंकल्यानंतर उचापुरी देशातील विजयराम राजास ठार मारून स. ९९७ मध्ये हा देश जिंकला (जयचंद्र, पृ. ३०६). स. ११७८ मध्ये शहाबुद्दीन घोरीने या देशाच्या राणीला जिंकले होते. त्यावरून मध्यंतरीच्या काळात येथे पुन्हा एकवार हिंदु राज्य प्रस्थापित झाले असावे (जयचंद्र, पृ. ३२३).

**उच्चरित** (पर्वत)—वायुमते जंबूद्वीपान्तर्गत उत्तर कुरु वर्षातील (आधु. पश्चिम सैबेरिया) मेरु पर्वताच्या उत्तरेकडील एक कुलपर्वत. हा आणि सुमहत् पर्वतांच्या दरम्यान उत्तर कुरुवर्ष होते (वायु. ४५). अली यांच्या मते मध्य सैबेरियाचे पठार म्हणजे हा पर्वत असून त्या पठारातील आधु. उरल म्हणजे पौराणिक सुमहत् पर्वत होय (अली, पुराणाज्. पृ. ८५; सुमहत् पहा).

**उच्चेश** (तीर्थ)—कश्मीरातील वितस्ता (आधु. झेलम) नदीकाठचे एक तीर्थ (नीलमत. १५३६).

**उच्चैःशीर्ष नाग** (पवित्र निर्झर)—हरमुकुटमाहात्म्यमते कश्मीरातील एक तीर्थ. लाट (प्राचीन–'लहर') परगण्यातील मणिग्राम (प्राचीन–'मयग्राम') गावानजिकच्या मोहंदमर्ग पर्वताच्या पायथ्यानजिकचा आधु.

वुतशन निर्झर तो हाच होय ( स्टाइन, राज. २.७९ ).

**उच्चैठ** ( दुर्गादेवीस्थान )—कालिदासाने उपासिलेले उत्तर भारतातील दुर्गास्थान. हे मिथिलेपासून ३२ मैलांवर आहे ( ती. पृ. १५३ ).

**उच्चैश्वर** ( लिंग )—तापी नदीकाठचे एक शिवलिंग ( तापीमाहात्म्य ).

**उच्छकल्प** ( नगर )—गुप्त राज्यकालीन शर्वनाथ राजाच्या स. ५१२ च्या खोह ताम्रपटमते बाघेलखंडातील ( मध्यभारत ) एक नगर. 'उच्छकल्प'चा शब्दशः अर्थ 'कमी उंचीचा' असा होतो. यावरून हे गाव टेकडीवर असावे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.१२६ ). नामांतर—'शर्वनाथ-भोग' ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.११० ).

निम्नलिखित ताम्रपटातहि या नगराचा निर्देश आढळतोः— १. जयनाथ राजाचे स. ४९३ आणि ४९६ चे खोह आणि कारीतलाई ताम्रपट ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.११७;१२१ ); २. शर्वनाथ राजाचे स. ५३३ आणि ५३६ चे खोह ताम्रपट ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.१३०;१३३;१३५ ).

या नगराच्या जयनाथ आणि शर्वनाथ राजांचे राज्य तमसा नदीच्या उत्तर किनाऱ्यावरील खोह खोऱ्यात डभाला ( आधु. बुंदेलखंड ) देशाच्या परिव्राजकवंशीय हस्तिन् राजाच्या राज्यास लागून होते ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२. १३६ ).

**उच्छङ्गि** ( दुर्गस्थान )—कदंब राजा शिवरथाच्या स. ५४१ च्या हॉल्स ताम्रपटमते पांड्य ( आधु. उत्तर म्हैसूर ) देशातील एक दुर्गस्थान ( इंडि. ॲंटि. ६.३० ). म्हैसूर प्रांताच्या उत्तर परिसीमेवरील आधु. उच्छंगि गाव ते हेच होय. या गावासभोवतालचा प्रदेश पांड्य राज्यकाली ( इ. स. १० वे–११ वे शतक ) 'उच्छंगि–द्रुग' नावाने ओळखला जात असे ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ८७ ).

**शिलालेखीय निर्देश**—इ. स. १० व्या शतकात नोलंब पल्लवांच्या नोलंबवाडी देशाची राजधानी या गावी असून स. ९७० मध्ये गंग राजा मारसिंह ( तृतीय )ने ते जिंकून घेतले ( एपि. इंडि. ५.१५७ ). विष्णुवर्धन होयसाळ राजाच्या स. १११८ च्या शिलालेखात त्याने स्वतःस 'उच्छंगिजेता' म्हटले आहे ( एपि. कर्ना. ४.३१ ). विजयनगरच्या बुक्क ( प्रथम ) राजाच्या स. १३६० च्या शिलालेखमते त्याने हा किल्ला जिंकला होता ( एपि. कर्ना. ५.१९ ).

**उजेनि**—ब्राह्मी शिलालेख आणि जैन साहित्यमते 'उज्जयिनी' नगराचे नामांतर. पाठभेद—'उजेनी' ( इंडि. ॲंटि. १९.८५; उज्जयिनी पहा )

**उज्जन** ( देश )—प्राकृत साहित्यमते वायव्य भारतातील 'उद्यान' देशाचे नामांतर ( उद्यान पहा ).

**उज्जनक** ( ज्योतिर्लिंगस्थान )—उत्तर प्रदेशान्तर्गत नैनिताल जिल्ह्यातील कोसी नदीकाठचे एक ज्योतिर्लिंगस्थान. हे काशीपुरापासून १ मैलावर असून येथे भीमशंकर नामक ज्योतिर्लिंग आहे ( ती पृ. ४१ ).

**उज्जन्त**—जैन साहित्यमते काठेवाडमधील 'ऊर्जयत्' ( आधु. गिरनार ) पर्वताचे नामांतर ( ती. सं. पृ. १२१; ऊर्जयत् पहा ). अन्य नामांतर—'उज्जयंत'.

**उज्जयनी** ( नगर )—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते 'उज्जयिनी' नगराचे नामांतर ( कल्पद्रु. ११.२२; उज्जयिनी पहा ).

**उज्जयन्त** ( तीर्थ )—कुमारपाल आणि भीम ( द्वितीय ) चालुक्य राजांच्या इ. स. १३ व्या शतकातील शिलालेखमते काठेवाडातील 'ऊर्जयत्' ( आधु. गिरनार ) पर्वताचे नामांतर ( बॉंबे. ॲंटि. रिमेन्स. ३५६; ऊर्जयत् पहा ).

**उज्जयिनी** ( नगर )—मध्य भारतातील अवंती (आधु. माळवा ) देशाच्या राजधानीचे गाव, आणि हिंदू, बौद्ध, आणि जैन धर्मीयांचे सुविख्यात तीर्थस्थान. गौतम बुद्धकालीन ( इ. स. पू. ३ रे शतक ) चंडप्रद्योत राजाच्या राज्यकालापासून गुप्त राज्यकाळापर्यंत ( इ. स. ५ वे शतक ) अवंती ( इ. स. ४ थ्या शतकानंतर—'मालव' ) देशाच्या राजधानीचे गाव म्हणून हे नगर राजकीय, धार्मिक, सांस्कृतिक, आणि व्यापारी दृष्ट्या वैभवाच्या शिखरावर होते. बुद्धकालीन षोडश जनपदांपैकी अवंती जनपदाची, तसेच उत्तरकालीन नंद, मौर्य, शुंग, माळव, शक, वाकाटक, परमार राजघराण्यांची राजधानी याच गावी होती. कथासरित्सागरमते प्राचीन भारतीय संस्कृतीचा परमोत्कर्ष या गावी झाला असून ( कथा. १.६९; २४२ ), जैन 'अभिधम्मप्पदीपिका' मते भारतातील वीस श्रेष्ठ नगरांपैकी हे एक होते. अवंती नगराचे 'उज्जयिनी' नामांतर जैन कालातच प्रस्थापित झाले.

माळवा प्रदेशातील क्षिप्रा नदीच्या उजव्या किनाऱ्यावरील कोटा–रतलाम रेल्वेमार्गावरील आधु. उज्जैन गाव ते हेच होय. या गावाच्या १ मैल उत्तरेस प्राचीन उज्जयिनी नगराचे विस्तृत अवशेष आढळतात.

**भौगोलिक स्थान**—नर्मदेच्या उत्तरेकडील दख्खन पठार 'माळवा पठार' नावाने सुविख्यात असून यापैकी चंबळ नदीच्या उगमानजिकचा आणि क्षिप्रा आणि कालीसिंध उपनद्यांचा प्रदेश पौराणिक काली अवंती नावाने आणि नदीचा

नलसंचय प्रदेश 'मालव' नावाने ओळखला जात असे. कालांतराने हा साराच प्रदेश मालव नावाने सुविख्यात झाला. या देशाची राजधानी उज्जयिनी गावी होती. पश्चिम भारतातील भारुकच्छ (आधु. भडोच) आणि शूर्पारक (आधु. सोपारा), दक्षिण भारतातील प्रतिष्ठान (आधु. पैठण) आणि नासिक, तसेच उत्तर भारतातील कोशल (आधु. उत्तर प्रदेश) यांमधून पूर्व भारतातील पाटलीपुत्र (आधु. पटना) गावाकडे जाणारे तीन व्यापारी हमरस्ते या गावी एकत्र होत असत. निषध–दक्षिणापथ मार्गावरीलहि हे एक प्रमुख नगर मानले जात असे (म. आ. ५८.२०; ब्रह्म. ४३.२४). या गावाचे राजकीय महत्त्व नाहीसे झाल्या-नंतरहि (इ. स. ५ वे शतक) माळव्यातील प्रमुख व्यापारी नगर म्हणून त्याचे महत्त्व अबाधित राहिले.

अभिधान चिंतामणामध्ये 'उज्जयिन' आणि 'अवंती' ही नगरनामे समानार्थक मानली आहेत (अभिधान. १९०). परंतु 'अवंती' हे देशनाम म्हणून आणि 'उज्जयिनी' हे नगरनाम म्हणून प्राचीन साहित्यात विशेष प्रसिद्ध आहे. बृहत्संहितामते 'उज्जयिनी' हे देशनाम असून त्या देशाचे रहिवासी 'औज्जनिक' नावाने सुविख्यात होते (बृ. सं. १०.१५; १२.१४. ६९.३०).

**पावित्र्य**—स्कंदमते महापुण्या, गंधवती, नवनदी आणि नीलगंगा या चार नद्यांच्या संगमामुळे अवंतीक्षेत्रास (उज्जयिनी) पावित्र्य प्राप्त झाले होते (स्कन्द. आवन्त्य. अ. च. लिं. १.११–१२; अवन्ती. ७०.२९–३०). या ग्रंथा-तील 'अवंतीक्षेत्रमाहात्म्या'त या नगरातील तीर्थस्थाने वर्णिली आहेत (स्कन्द. आवन्त्य. अ. १.५.१–७१; च. लिं. १–८४).

**नामांतरे**—स्कंद आणि नारदमते या नगराची सप्तकल्पां-तील सप्त नामांतरे पुढीलप्रमाणे होती :—१. कुशलस्थली; (नारद–'कुमुद्वती'); २. पद्मावती; ३. स्वर्णशृंगारिका (नारद–'कनकशृंगा'); ४. अवंतिनी; ५. अमरावती; ६. उज्जयिनी; ७. विशाला (स्कन्द. आवन्त्य. २६.२८–३४; नारद. उत्तर. ७८.३५–३६). या नावाची व्युत्पत्तीहि तेथे दिली आहे.

उज्जयिनी नगराची अन्य नामांतरे सोबतच्या परिपत्रकात दिली आहेत.

**नामव्युत्पत्ती**—स्कंदमते 'दानवावर जय मिळविणारी' अशा अर्थाने (उज्जितो दानवो यस्मात्; स्कन्द आवन्त्य. अ. ४३.५३); अथवा 'पापापासून मुक्त करणारी' (पापाद् अवन्ती सा विश्रम्; स्कन्द. काशी. ७.९२). अशा

## उज्जयिनी नगराची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. ब्रह्माण्ड पुराण (४.४०.९१) | अवंतिका |
| १ अ. स्कन्द पुराण (माहेश्वर. कौ. ४०). | कालभीतिक्षेत्र<br>महाकालक्षेत्र |
| २. पौराणिक साहित्य (ब्रह्म. ४३. २४; अग्नि. १०९.२४).<br>वाल्मीकि रामायण (कि. ४२.१४).<br>बृहत्संहिता (५.४०; ९.१७; ११.३५) | अवंती, अवंति |
| ३. बौद्ध पाली साहित्य<br>जैन अभिधम्मप्पदीपिका | उज्जेनी |
| ४. पेरिप्लस (पृ.४८)<br>टॉलेमी (मॅक्रिंडल, पृ. ६३) | ओजेने (उज्जयिनी) |
| ५. ह्युएन्त्संग (बील, २.२७०) | वु–शे–येन्–न (उजयन) |
| ६. अशोकाचा स्तंभलेख (इंडि. अँटि. १९.८५).<br>सांची येथील ब्राह्मी शिला-लेख<br>नासिक शिलालेख (आर्कि. सर्व्हे. वे. इं. ४.१०). | उजेनि, उजेनी |
| ६ अ. जैन साहित्य<br>७. नारदीय पुराण<br>मेघदूत (१.३०)<br>अभिधान. (१३२.९७६)<br>कल्पद्रु. (११.२२)<br>त्रिकाण्ड (३२.१६)<br>मेदिनी (१६८.१३३)<br>उणादि (१९.४) | विशाला |
| ७ अ. चालुक्य राजांचे शिलालेख (भावनगर. इन्स्क्रि. १८६). | उज्जेनी |
| ८. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य | |
| अ. (कल्पद्रु. ११.२२; त्रिकाण्ड. ३२.१६) | उज्जयनी |
| ब. (कल्पद्रु. ११.२२; अभिधान. १३२.९७६) | अवंतिका |
| क. (औणादिक. १३६. १४८. | अवंती |
| ड. (अभिधान. १३२. ९७६; कल्पद्रु. ११.२२) | पुष्पकरंडिनी |

अर्थाने या नगरास 'उज्जयिनी' अथवा 'अवंती' नाव प्राप्त झाले.

पौराणिक साहित्यात—एक तीर्थ म्हणून अवंतीक्षेत्राचा निर्देश या साहित्यात (अग्नि. १०९.२४; ब्रह्म. ४५.२४; नारद. उत्तर. ७८.३), प्रह्लादतीर्थयात्रेत (वामन. ८३.१८), तसेच महाभारतान्तर्गत धौम्यतीर्थयात्रेत (म. आर. ८७.१) आढळतो. ब्रह्माण्डमते अवंतिका (उज्जयिनी) ही भारतातील सात पवित्र तीर्थक्षेत्रांपैकी (सप्तपुरी) एक होती (ब्रह्माण्ड.४.४०.९१). पौराणिक साहित्यात सर्वत्र या नगरीचा निर्देश 'अवंती' अथवा 'अवंतीपुर' नावाने केला असून (लिंग. १.९२.७–८), श्रीकृष्ण आणि बलराम यांचा गुरु सांदीपनि याच गावचा रहिवासी होता (ब्रह्म. १९४.१९).

तीर्थस्थाने—निम्नलिखित देवतांची तीर्थस्थाने या गावी होती:—

१. देवीस्थान— नारद पुराणान्तर्गत अवंतीमाहात्म्य-मते उज्जयिनी हे देवीस्थान असून (नारद. उत्तर. ७८.३६), तंत्रचूडामणिमते भारतातील एक्कावन्न शक्तिपीठांपैकी एक अशा या गावी सतीचे 'कूर्पर' (कोपर) पडले होते. येथील देवीचे नाव 'मांगल्य चंडिका' असून भैरवाचे नाव 'कपिलांबर' होते. शक्तिसंगमतंत्रातहि एक सिद्धक्षेत्र म्हणून याचा निर्देश आढळतो (शक्तिसङ्गम. ३.७.११). आधु. उज्जैन येथील रुद्रसागरानजिकच्या हरसिद्धी देवी-मंदिरात सतीच्या कोपराचीच पूजा प्रत्यही केली जाते.

२. नृसिंहस्थान—नृसिंह पुराणमते येथे त्रिविक्रम संज्ञक, नृसिंहाचे स्थान होते (नृसिंह. ६५.१८).

३. ब्रह्मदेवस्थान—पद्ममते येथे पितामह संज्ञक ब्रह्म-देवाचे स्थान होते (पद्म. सृ. २९.१३८).

४. वामनस्थान—वामनमते येथे धिष्ण्य नामक वामनाचे स्थान होते (वामन. ९०.१३).

५. ज्योतिर्लिंग—या गावचे महाकालेश्वराचे मंदिर भारतवर्षातील बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक मानले जाते.

६. वल्लभबैठक—श्री वल्लभाचार्यांनी येथे भागवतसप्ताह केल्यामुळे वल्लभसांप्रदायी वैष्णवांचेहि हे प्रमुख तीर्थ (वल्लभबैठक) मानले जाते.

वैभव— कालिदासाच्या मेघदूतात (मेघ. १.३१), रघुवंशात (रघु. ६.३४), तसेच बाणाच्या कादंबरीत या नगरीच्या वैभवाचे काव्यात्मक वर्णन आढळते (काणे, जे. बी. बी. आर. ए. एस्. २७.३८).

राजकीय पार्श्वभूमी—गौतम बुद्धाच्या काली उज्जयिनी येथे मगधराज अजातशत्रु, कोसलराज प्रसेनजित् आणि कौशांबी (वत्स) सम्राट उदयन यांचा समकालीन चंड-प्रद्योत राजा राज्य करीत होता या राजाच्या भयाने अजात-शत्रूने राजगृह या आपल्या राजधानीसभोवती संरक्षक तट बांधला. प्रद्योताची कन्या वासवदत्ता वत्सराज उदयनाची पत्नी होती.

नंद राज्यकाली उज्जयिनी ही मगध साम्राज्यात समाविष्ट असून चंद्रगुप्त मौर्याने येथे मौर्य साम्राज्याच्या पश्चिम भागाची उपराजधानी स्थापिली. सम्राट अशोक युवराज असताना या गावी राजप्रतिनिधी म्हणून काम करीत असे. याकाळी हे नगर पूर्व युरोप आणि आशिया देशांच्या विदेश व्यापाराचे प्रमुख केंद्र होते.

मौर्य साम्राज्याच्या विनाशानंतर पंजाबातील मालव लोकांनी उज्जयिनी येथे राज्य स्थापिले. त्यामुळे हा प्रदेश 'मालव' नावाने ओळखला जाऊ लागला. मालवकुलोत्पन्न विक्रमा-दित्य राजाने शकांचे परकीय आक्रमण परतवून लावून त्या विजयाच्या स्मरणार्थ नवा 'विक्रम संवत्' (मालव संवत्) सुरू केला. उत्तर भारतात आजहि तो संवत् प्रचारात आहे.

कालांतराने मालव राजवंशाचा पराजय करून शक क्षत्रप चष्टानने उज्जयिनी येथे शक राज्याची स्थापना केली. शक राज्यकालीन उज्जयिनीचे सविस्तर वर्णन टॉलेमी आणि पेरिप्लस यांच्या साहित्यात आढळते.

गुप्त राज्यकाली मालव देश गुप्त साम्राज्याचा भाग बनून उज्जयिनी त्या साम्राज्याची उपराजधानी बनले. गुप्त सम्राट आपला बहुतांशी काल येथेच व्यतीत करीत. याकाळी उज्जयिनी हे जागतिक व्यापाराचे केंद्र बनून आग्नेय आशिया आदि पौर्वात्य आणि राम, ईजिप्त आदि पाश्चिमात्त्य देशांशी येथून व्यापार होऊ लागला. गुप्त सम्राट चंद्रगुप्ताच्या (विक्रमादित्य) येथील नवरत्न दरबारापैकी महाकवी कालिदास हा उज्ज-यिनीचा रहिवासी असून त्याच्या काव्यामध्ये या नगराचे आणि त्यामधील क्षिप्रा नदीकाठच्या महाकाल शिवमंदिराचे वर्णन आढळते. हे मंदिर आजहि अस्तित्वात आहे.

चीनमधील हूण लोकांच्या आक्रमणाने गुप्त साम्राज्य नष्ट होऊन उज्जयिनी येथे हूणांचे राज्य आले. परंतु अल्पाव-काशातच मौखरि सम्राट यशोवर्मनने हूणांचा पराजय करून उज्जयिनी येथे स्वतःचे राज्य स्थापिले. कालांतराने राजस्थानमधील गुर्जर–प्रतिहार, दक्षिण भारतातील राष्ट्रकूट आणि गुजरातमधील परमार राज्यांची राज्ये उज्जयिनी येथे आली. यापैकी परमार घराण्यातील मुंज आणि भोज राजांची राजधानी माळव्यातील धारा गावी असली, तरी त्यांच्या राज्य-कालात उज्जयिनी एकवार समृद्ध नगरी बनली.

अल्लाउद्दीन खिलजीचा सेनापती मलिक काफूरने उज्जयिनी-वर आक्रमण करून तेथील हिंदु सत्ता नष्ट केली. मेवाडचा राजा राणा कुंभने गुजराथ आणि माळव्यांच्या 'सुलतानांचा पराजय करून उज्जयिनीवर काही काळ सत्ता प्रस्थापित केली असली, तरी हुमायूनने हा सारा प्रदेश परत जिंकून घेतला. अशा तऱ्हेने येथील हिंदूंची सत्ता संपुष्टात आली.

उज्जयिनी येथील राजवंश—जैन साहित्यमते महावीराच्या मृत्युसमयी उज्जयिनी येथे पलाक राजा राज्य करीत असून त्यानंतरच्या काळात येथे निम्नलिखित राजवंश राज्यारूढ झाले :–१. पलाक वंश–६० वर्षे; २. नंद वंश–१५५ वर्षे; ३. मौर्य वंश–१०८ वर्षे; ४. शुंग वंश–३० वर्षे; ५. बलमित्र आणि भानुमित्र वंश–६० वर्षे; ६. नहवहन वंश–४० वर्षे; ७. गर्दभिल्ल वंश–१३ वर्षे; ८. शक वंश–४ वर्षे; (इ. स. पू. ६९–५६) (स्टेन कोनो, कॉर्पस् इन्स्क्रि. २१.१.२८).

ब्राह्मी शिलालेखात—अशोकाच्या धौली स्वतंत्र आज्ञालेख क्र. १ मते त्याच्या दोन प्रांतिक राजधान्या 'उजेनि' आणि 'तक्खसिला' (तक्षशिला) गावी असून (इंडि. अँटि. १९.८५–८६; कॉर्पस्. इन्क्रि. १.१.३७), त्याचा एक राजपुत्र (कुमार) या गावी राजप्रतिनिधी म्हणून काम करीत असे.

अशोकसाम्राज्याच्या पश्चिम भागाची (अपरांत) राजधानी या गावी असून, अशोकाची देवी नामक राणी याच गावच्या धनिकाची कन्या होती. स्वतः अशोक आणि त्याचा पुत्र महेंद्र हे या गावी राजप्रतिनिधी म्हणून काम करीत असत (दीप. ६.१५; विनय. ८.१; २७; महा. ५.३९; १३.८). हीच परंपरा गुप्त राज्यकालीहि तशीच चालू ठेवण्यात आली.

उषवदाताच्या नासिक शिलालेखमते त्याने 'उजेनि' येथील मंदिरांना आणि ब्राह्मणांना देणगी दिली होती. त्यावरून तीर्थ म्हणून हे नगर इ. स. पू ३ ऱ्या शतकापासून सुविख्यात असावे.

सांची देणगी लेखांपैकी ३१ लेख 'उजेनि' गावच्या दात्यांनी कोरलेले असून, त्यापैकी २७ लेखांमध्ये या गावाचा, आणि अन्य चार लेखांमध्ये 'उजेनिक' (उज्जयिनी गावचा) उपाधीचा निर्देश आढळतो (ल्यूडर्स सूची. क्र. १७२–१७३; २१०; २१२; २१६; २१८; २१९–२२७; ३०२; ३०७; ३५९; ४०५–४१५; ५६०; उजेनिक–३८५; ४००; ४५१; ५०९). या देणगीदारांमध्ये बौद्ध भिक्षू, अर्हत, रज्जुक (भूमिमापक), उपासक आदि अनेक वर्गांचे लोक दिसतात. त्यावरून सातवाहन राज्यकाली हे नगर बौद्ध धर्माचेहि मोठे केंद्र असावे.

बौद्ध साहित्यात—सिलोनी महावंशात उज्जयिनी येथील बौद्ध मठाविषयी अनेक निर्देश आढळतात (महा. १३.५; २९.३५). या ग्रंथमते चंद्रगुप्त मौर्याचा पौत्र 'आश' (अशोक) यास त्याच्या पित्याने उज्जयिनी येथे राजप्रतिनिधी म्हणून पाठविले. त्यानंतर दीडशे वर्षांनी (इ. स. पू. १५७) या गावच्या दख्खनगिरि मंदिरातील बौद्ध महागुरूने चाळीस हजार शिष्यांना सिलोनला नेले. त्या बौद्ध भिक्षूंनी अनुराधपूर येथील सुविख्यात बौद्ध मंदिराची रचना केली. यानंतर शंभर वर्षांनी (इ.स.पू. ५७) उज्जयिनीच्या विक्रमादित्य सम्राटाने शक लोकांचा पाडाव करून त्या विजयाच्या स्मृत्यर्थ स्वतःचा 'विक्रम संवत्' सुरू केला.

पाणिनीय व्याकरण साहित्यात—पाणिनीच्या गणपाठात या नगराचा निर्देश आढळतो (पा. सू. ४.२.८२. वरणादि; १२७ धूमादि). पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यमते अत्यंत त्वरेने दौड केली असता रात्रिसमयी उज्जयिनीहून निघालेला प्रवासी सूर्योदयसमयी माहिष्मती नगरास जाऊन पोहोचत असे (महा. २.३५). यावरून या दोन नगरांमध्ये पतंजलीच्या काळी दळणवळण चालू असावे.

ग्रीक साहित्यात—टॉलेमी आणि पेरिप्लसमते नर्मदेच्या पूर्वेकडील 'ओजने' गाव अक्षांश २०° उत्तर आणि रेखांश ११७° पूर्व येथे होते. टॉलेमीच्या मते पूर्वकाळी शक क्षत्रप चष्टनाची (ग्रीक–तियस्तनेस्) राजधानी या गावी होती. सेवेल यांच्या मते स. १२५ च्या सुमारास शक क्षत्रप चष्टनाने नर्मदेच्या उत्तरेकडील आंध्र साम्राज्याचा प्रदेश जिंकून तो उज्जयिनी गावाहून राज्य करू लागला. उज्जयिनी येथील शक क्षत्रपांची ही शाखा नाशिक शाखेहून वेगळी असून स. ३७० पर्यंत त्यांचे हे राज्य टिकले. या घराण्याचा आद्य संस्थापक घसमोटिक असून चष्टन (स. १२५–१३०) आणि रुद्रदामन् (स. १४०–१५८) हे या घराण्यातील विशेष पराक्रमी राजे होते (सेवेल, इन्स्क्रि. १४; ३२१).

शक क्षत्रप हे जन्माने विदेशी असले, तरी त्यांनी भारतीय चालीरीती आणि भाषा आत्मसात करून उज्जयिनीची प्रतिष्ठा वृद्धिंगत केली. त्यांच्या राजकालातच ज्योतिषाचे महान केंद्र म्हणून उज्जयिनीला नवी प्रतिष्ठा प्राप्त होऊन देशोदेशींचे ज्योतिर्विद येथे येऊ लागले. शकांनी संस्कृत ही आपली राजभाषा बनवून आपले शिलालेख त्या भाषेत कोरले. शक क्षत्रप रुद्रदामनूचा गिरनार शिलालेख तत्कालीन विदग्ध

संस्कृत भाषाशैलीचे नमुनेदार उदाहरण आहे.

**पेरिप्लसमध्ये**—या ग्रंथमते पूर्व भारतातील पाटलीपुत्र गावाहून पश्चिम भारतातील भृगुकच्छ ( आधु. भडोच ) आणि शूर्पारक ( आधु. सोपारा ) या बंदराप्रत, तसेच दक्षिण भारतातील प्रतिष्ठान ( आधु. पैठण ) या व्यापारी बाजारपेठेप्रत जाणाऱ्या व्यापारी हमरस्त्यावर उज्जयिनी गाव होते. 'शिवधातू' संज्ञक रत्ने, चिनी मातीच्या वस्तू ; मलमल, मुलायम रंगाचे कापड आदी वस्तूंची प्रमुख बाजारपेठ या गावी असून बॅरिगझ ( भृगुकच्छ ) मार्गे या वस्तू येथून उत्तर भारतात रवाना होत असत. याचे उलट उत्तर भारतातील सौंदर्यप्रसाधने आणि औषधी द्रव्यांची आयात उज्जयिनी येथे होत असे ( पेरिप्लस ४८ ). यावरून पेरिप्लसच्या काळी उज्जेनीचे राजकीय महत्त्व नाहीसे झाले असले तरी तिचे व्यापारी महत्त्व अबाधित असावे.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथात या नगराचा निर्देश 'उजयन' ( वु-शे-येन्-न ) नावाने केला असून पाली 'उज्जेनि' चे ते चिनीभाषीय रूपांतर असावे. ह्युएन्त्सगच्या प्रवासवर्णनमते या नगराची व्याप्ती ६ मैल असून त्याचे काळी येथे बौद्ध धर्माचे विशेष प्राबल्य नव्हते. गावामध्ये केवळ २-३ बौद्ध मठ असून हिंदु देवमंदिरे मात्र अनेक होती. येथील ब्राह्मण वेदविद्येमध्ये निपुण असून गावाच्या मध्यभागी विक्रमादित्याचा संगमरवरी पुतळा होता. येथे राजप्रतिनिधी असताना अशोकाने या नगराबाहेर कैद्यांच्या देहदंडासाठी बांधलेल्या कारागृहाच्या स्थानी उत्तरकालात एक स्तूप बांधला होता ( वॉटर्स, २.२५०-५५ ).

**जैन साहित्यात**— सुमतिसागरमते या गावी अवंति पार्श्वनाथाचे मंदिर होते. ज्ञानसागरमते येथे सिद्धसेनाचार्याने एका शिवलिंगातून पार्श्वनाथाची मूर्ती प्रकट करवून विक्रमादित्य राजाला प्रभावित केले होते. हरिषेणमते येथील 'कलकलेश्वर' स्थानी अवंतिसुकुमाल मुनींचे देहावसान झाले होते. काकंदी देशाच्या राजाने येथे तपस्या करून अभयघोष मुनी नाव प्राप्त केले. विविधतीर्थकल्पमते जिनप्रभुसूरीने येथील शिवलिंगोद्भव पार्श्वनाथ प्रतिमेचे 'कुडुंगेश्वर नाभेयदेव' असे नामकरण केले ( विविध. पृ. ८८; ती. सं. पृ. १२१ ).

स्थानिक समजुतीनुसार जैनांच्या महावीर संज्ञक चोविसाव्या तीर्थंकराने येथील स्मशानामध्ये तपस्या केली असून श्रुतकेवलि भद्रबाहु नामक जैन आचार्य येथे निवास करीत असे. आजहि उज्जयिनी हे जैनाचे महापवित्र तीर्थस्थान ( अतिशयक्षेत्र ) असून दिगंबर आणि श्वेतांबरपंथीय लोक ते सारखेच पूज्य मानतात. येथे अनेक भग्न जैन मूर्ती सापडतात.

**शिलालेख साहित्यात**— कलचुरि राजा शंकरगणाच्या स. ५९७ च्या अभोणा ताम्रपटात या नगराचा निर्देश असून ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.४० ), चालुक्य राजा विक्रमादित्य ( प्रथम )च्या शके ६८० च्या तुरिमेल्ल शिलालेखात 'उजेनि पिशाच' संज्ञक आलकुमारपुत्र राजपुत्राचा निर्देश आढळतो ( एपि. इंडि. २९.१६२ ). राष्ट्रकूट राजा गोविंद ( चतुर्थ ) च्या शके ८५२ च्या खंबायत शिलालेखमते उज्जयिनी येथील 'कालप्रियदेवा'च्या ( महाकालेश्वर ) सन्मानार्थ भवभूतीच्या तीन नाटकांचे प्रयोग झाले असून राष्ट्रकूट राजा इंद्र ( तृतीय ) ने उत्तर भारत दिग्विजयसमयी या देवाचे दर्शन घेतले होते ( एपि. इंडि. ७.३० ). चालुक्य राजांच्या वि. सं. १२२५ च्या शिलालेखात मालवकान्यकुब्ज विषयातील एक नगर म्हणून अवंती ( उज्जयिनी ) नगराचा निर्देश आढळतो ( भावनगर प्राकृत अँड संस्कृत इन्स्क्रि. १८६ ).

**ज्योतिषाभ्यास केंद्र**—ज्योतिषाच्या अभ्यासाचे उज्जयिनी हे एक महत्त्वपूर्ण केंद्र असून, वराहमिहिराने आपली वेधशाळा येथेच तयार केली होती. गुप्त राज्यकालानंतर भारतीय ज्योतिषी या नगराला मध्य ( शून्यबिंदू ) मानून अक्षांश-रेखांश मांडीत असत.

**मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात**— या साहित्यात 'उज्जयनी' ( कल्पद्रु. ११.२२; त्रिकाण्ड. ३२.१६ ). व 'उज्जयिनी' ( त्रिकाण्ड. ३२.१६; कल्पद्रु. ११.२२, अभिधान. ३२.९७५ ) वैकल्पिक नावांनी याचा निर्देश असून याची 'अवंतिका' 'अवंती', 'पुष्पकरंडिनी', 'विशाला' आदि नामांतरेहि तेथे आढळतात.

**प्रेक्षणीय स्थले**—आधु. उज्जैन गावाच्या परिसरात धार्मिक आणि सांस्कृतिक महत्त्वाची निम्नलिखित स्थले आढळतात:—१. महाकालमंदिर; २. हरसिद्धि देवी; ३. गणेशमंदिर; ४. गोपालमंदिर; ५. गदकालिका; ६. भर्तृहरि गुहा; ७. कालभैरव; ८. सांदीपनि आश्रम ( अंकपाद ); ९. सिद्धवट; १०. मंगलनाथ; ११. वेधशाळा; १२ क्षिप्रा नदी; १३. कालियादेह नामक सूर्यमंदिर ( ती. पृ. ११४ ).

**उत्खनन**—एस्. आर. बानर्जी यांच्या स. १९५८ च्या उज्जैन येथील 'धर-कलिका' अवशेषसमूहाच्या उत्खननात लोहयुगाच्या प्रारंभकालीन ( इ. स. पू. ७०० ) तटबंदीयुक्त नगराचे अवशेष सापडले. येथील प्रमुख उत्खननस्तर पुढीलप्रमाणे होत:—

(१) स्तर क्र. १ ( इ. स. पू. ७००-५०० )—या स्तरामध्ये लोखंडाची बाणाग्रे, भाले आदि अवजारे, लोखंडी

सुया, तसेच काळी, तांबडी आणि ओबडधोबड खवल्यांची मृत्तिकापात्रे सापडली.

(२) स्तर क्र. २ (इ. स. पू. ५००–२००)—या स्तरामध्ये विपुल विविधरंगी एन्. बी. पी. मृत्तिकापात्रे, तसेच हस्तिदंती मुद्रा, नाणी, टेराकोट्टा मृत्तिकाशिल्पे, स्त्रियांची आभूषणे, आणि तांब्याची व हस्तिदंती कर्णभूषणे सापडली. यावरून या काळात हे गाव समृद्धावस्थेत असावे. कौलारू छपराची एक मातीची झोपडीहि या स्तरात सापडली असून अस्थींची बाणाग्रे, विणकामाच्या सुया, तसेच दगडी मणी तयार करण्याचे काम तेथे केले जात असावे. पक्ष्याच्या रक्ताने माखलेले एक बाणाग्रहि तेथे सापडले.

(३) स्तर क्र. ३ (इ. स. पू. २००–इ. स. ३००)—या स्तरामध्ये रोमन शैलीची पोकळ टेराकोट्टा शिल्पचित्रे, साबण ठेवण्याच्या डब्या, हस्तिदंती कंगवे, केसाच्या पिना, दगडी स्नानपात्रे आदि अवशेष सापडले.

(४) स्तर क्र. ४ (इ. स. १० वे शतक)—मध्य भारतातील परमार राजांच्या अखेरीच्या आणि मुसलमानी राज्याच्या प्रारंभीच्या काळातील अनेक अवशेष या स्तरात सापडले.

**संरक्षक तटबंदी**—स्तर क्र. १ च्या काळी (इ. स. पू. ७००–५००) १॥ × १ किलोमीटर लांबीची, ७८ मीटर रुंदीची आणि १३ मीटर उंचीची पिवळ्या आणि काळ्या शाडूच्या मातीची एक संरक्षक तटबंदी या गावासभोवती बांधण्यात आली. तिच्या बाहेरच्या अंगास २४ मीटर रुंदीचा खंदक होता. नगराच्या पश्चिम आणि उत्तर सरहद्दीवरून क्षिप्रा नदी वहात असल्याने त्या भागात खंदक बांधला नव्हता. मात्र पुराच्या पाण्यापासून तटबंदीचे रक्षण करण्यासाठी तेथे तटाला लाकडी तुळयांचा आधार दिला होता. इतकी काळजी घेऊनहि संरक्षक तटबंदी उत्तरकालात अनेकवेळा कोसळल्याचे उपलब्ध अवशेषांवरून दिसते (देशपांडे, रिव्ह्यू. पृ. ४४१).

**अन्य उत्खनन**—उज्जैन गावापासून चार मैल ईशान्येकडील 'कुंभार टेकडी' अवशेषसमूहाच्या उत्खननात इ. स. पू. ३ च्या शतकातील दहन आणि दफनभूमीचे अवशेष सापडले (एन्शन्ट इंडिया. ९. पृ. १६०).

**तीर्थस्थाने**—पौराणिक साहित्यात अवंती येथील तीर्थस्थानांच्या निम्नलिखित तीन स्वतंत्र नामावली आढळतात:—

(१) स्कंदपुराण अवंतीक्षेत्रमाहात्म्यात—१. अक्षयवट (५९.५); २. अखण्डसर (६८.३४); ३. अखण्डेश्वर (६८.३५); ४. अङ्घ्रपाद (विष्णुक्षेत्र) (२७.१११); ५. अच्छोदा (५९.६); ६. अजागन्धकुण्ड (२८.४५); ७. अनङ्गकुण्ड (२८.४२); ८. अनरकतीर्थ (२९; ३०); ९. अप्सरस्तीर्थ (अप्सरः कुण्ड) (८.२७); १०. अभ्यर्थितेश्वर (२३.१६); ११. अमृतोद्भवातीर्थ (५१); १२. अम्बालिका (३१.८०); १३. अर्बुदकुण्ड (६५.१८); १४. आदिगया (५७.३०; ५९.४); १५. आनन्दभैरव (६८.५); १६. इन्द्रतीर्थ (३१.६); १७. इन्द्रेश्वर (३१.६); १८. ईशानतीर्थ (२३.१२); १९. एकानंशा (१८); २०. एलापत्रकुण्ड (६५.१७); २१. कपालमोक्षण तीर्थ (६); २२. कपिलधारा (३१.५८); २३. कम्बलकुण्ड (६५.१७); २४. करीकुण्ड (२७. ११५; २८.४४); २५. कर्कराज (४९.३; ६९.२); २६. कर्कोटककुण्ड (६५.१७); २७. कर्कोटकेश्वर (२०.१४); २८. कलहनाशनकुण्ड (८.८–९); २९. कामोदक (३१.८९); ३०. कायावरोहणेश्वर (२६.७.); ३१. कालभैरव (६४.४); ३२. कालेश्वर (२३.२५); ३३. किम्पुनक (३१.५५); ३४. कुटुम्बिकेश्वर (१०; ६७.१); ३५. केशवादित्य (३३); ३६. कोटितीर्थ (३४.९१); ३७. कोटीश्वर (३४.९१); ३८. कोटेश्वर (२२.५; २३.२); ३९. कौशिकी नदी (६१.११); ४०. क्षातासङ्गम (५६.१); ४१. खगर्तासङ्गम (६३.३); ४२. गङ्गातीर्थ (३१.७५); ४३. गणेश (२८.२१); ४४. गदाधरपद (५९.५); ४५. गयाणेश्वर (२३.१५); ४६. गयातीर्थ (४९.४;५९.६७); ४७. गर्गेश्वर (२५.३); ४८. गयाकोष्ठ (५९.५); ४९. गाङ्गरी गुहा (१९.११); ५०. गुह्यमहाकाल (२३.२२); ५१. गोपतीर्थ (३१.८); ५२. गोपीन्द्र (३१.७१); ५३. गोपेश्वर (३१.८); ५४. गोमतीकुण्ड (४९.४; ६२); ५५. गोविन्द (विष्णुक्षेत्र) (२७.१११); ५६. घृततीर्थ (३१.५१); ५७. चक्रतीर्थ (२८.४६); ५८. चक्रिण (विष्णुक्षेत्र) (२७.१११); ५९. चण्डिका (२०.१२); ६०. चण्डीश्वर (२५.८); ६१. चतुर्मुखधरलिङ्ग (६६.८); ६२. चर्पटमाता (३४.८२; ३६.२; ३७.२४); ६३. चामुण्डा (३८.३४–३७; ४३.३६–४१); ६४. चिपिटातीर्थ (३१.९); ६५. चूडामणीश्वर (२५.७); ६६. च्यवनाश्रम (४९; ५६.६१; ५७; ८५.५९); ६७. च्यवनेश्वर (५६.६१); ६८. जटाशृङ्ग (३१.४); ६९. जयेश्वर (२८.२९); ७०. ज्वरघ्नीतीर्थ (४९.४१); ७१. तक्षककुण्ड (६५.१७); ७२. दण्डापाणि (२३.२०); ७३. दशाश्वमेधतीर्थ (१७); ७४. देवप्रयाग (६८.१); ७५. धनञ्जयकुण्ड (६५.१७);

७६. धर्मसर ( ४९.४ ); ७७. धारातीर्थ ( ३१.५८ ); ७८. धूतपाप ( ३७.९–१२ ); ७९. नरदीप ( ३६.४३–७३ ); ८०. नवनदी ( ३१.८८ ); ८१. नागतीर्थ ( ६५.१ ); ८२. नागालय ( ४९.४ ); ८३. निम्नगा ( ५९.६ ); ८४. नीलगङ्गा ( ४९.३ ); ८५. नील ( लीन ) गङ्गा ( ५२.६६; ५४ ); ८६. नीलगन्धवती ( १६ ); ८७. नीलग्रीव ( ४४. ३३ ); ८८. नृसिंहतीर्थ ( ६६ ); ८९. पञ्चेश ( २६.११–२७ ); ९०. पद्मकुण्ड ( ६५.१८ ); ९१. पन्नगकुण्ड ( ६५.१७ ); ९२. पापनाशिनी ( ५० ); ९३. पावक ( ३६.१ ); ९४. पिशाचक तीर्थ ( २०.२ ); ९५. पिशाच-मोचन ( ४९.३ ); ९६. पिशाचमोचनेश ( ५३.५६ ); ९७. पुण्येश्वर ( ३१.८३ ); ९८. पुरुषोत्तमगिरि ( ५७. २९ ); ९९. पुरुषोत्तमसर ( ४९.५; ५२.६७;६० ); १००. पुष्कर ( ४९.४; ५९.६७ ); १०१. पुष्पकरण्ड ( ३१.७६ ); १०२. पैपलेश्वर ( २३.९ ); १०३. पौलमाता ( ३४.८३ ); १०४. प्रयागेश ( ३१.९० ); १०५. प्राचीसरस्वती ( ५७. ३१ ); १०६. प्राणीश ( २३.१८ ); १०७. प्रेतमुक्ति-करीशिला ( ५९.६ ); १०८. फल्गु ( ५७; ५९.४ ); १०९. बलिआश्रम ( ६५.२९ ); ११०. बिन्दुसर ( ७०.६ ); १११. बिल्वेश ( २६.७ ); ११२. बुद्धगया ( ५७; ५९.४ ); ११३. ब्रह्मवापी ( ३५.२ ); ११४. ब्रह्मसर ( २८.३६ ); ११५. ब्रह्माणी ( २८.३३ ); ११६. ब्रह्मोत्तरस्थान ( २६. ५७ ); ११७. भद्रकाली ( ६७.९ ); ११८. भद्रवट ( ३४. ७७ ); ११९. भार्गवरामतीर्थ ( ६१.१० ); १२०. भूतेश्वर ( ३१.७८ ); १२१. भैरव ( ६७.१० ); १२२. मन्दाकिनी-कुण्ड ( २६.५९–१२० ); १२३. मर्कटेश्वर ( १२.१ ); १२४. महाकाल ( २३.१७; २६.१; ३६.१ ); १२५. महादुर्गा ( २३.२४ ); १२६. महेश्वर ( ६१.७ ); १२७. माहिषकुण्ड ( ९ ); १२८. यज्ञकुण्ड ( ५६.५६ ); १२९. यज्ञवापी ( २८.३७ ); १३०. यमेश्वर ( २२.१ ); १३१. योगीश्वरी ( ३१.५२ ); १३२. रत्नकुण्ड ( ४४.३० ); १३३. रमासर ( ६५.२८ ); १३४. रम्यसर ( ७०.२ ); १३५. राजस्थलतीर्थ ( १४ ); १३६. रुद्रपुर ( २८.४०; ३१.७९; ५६.५१ ); १३७. रुद्रसर ( २१.२०; २२.४ ); १३८. रूपकुण्ड ( २८.४१ ); १३९. लकुलीश ( २३.१४ ); १४०. वटमाता ( ३४.८२; ३६.२; ३७.२४ ); १४१. वटयक्षिणी ( २०.१ ); १४२. वागन्वक ( ३६.३७ ); १४३. वामनकुण्ड ( ६३.८ ); १४४. वासुकिकुण्ड ( ६५.१७ ); १४५. विद्याधर ( ११ ); १४६. विधीश ( २३.२६ ); १४७. विधूमार्चिस् ( ६९.४ ); १४८. विन्ध्यवासिनी ( ५५.३० ); १४९. विमलोद ( ५५.३० ); १५०. विश्वरूप ( विष्णुक्षेत्र ) ( २७.१११ ); १५१. विष्णुवापी ( ३५.४ ); १५२. विष्णुषोडशपदी ( ५७.३०; ५९.४ ); १५३. वीरभद्र ( २०.१२ ); १५४. वैश्वानरेश्वर ( २३.१३ ); १५५. शक्तिधर ( ३४.९६ ); १५६. शक्तिभेद ( ३४ ); १५७. शङ्करवापी ( १५.१ ); १५८. शङ्करादित्य ( १५.१९ ); १५९. शङ्खावर्त ( ३१.५३ ); १६०. शङ्खिन ( विष्णुक्षेत्र ) ( २७.१११ ); १६१. शङ्खोद्धार ( २७.११३ ); १६२. शङ्खोद्धारण ( ३६. ७४–८२ ); १६३. शनैश्चर स्थावरेश ( ५६.३; ५३; ५९.४ ); १६४. शिप्राङ्केश्वर ( २०.५ ); १६५. शिवद्वार ( २८.३० ); १६६. शिवपद ( ३६.१ ); १६७. शीतला ( देवी ) ( १२.४ ); १६८. षोडशीवेदिका ( ५९.६ ); १६९. सङ्गमतीर्थ ( ४९.४ ); १७०. सुधेश्वर ( ३१.५४ ); १७१. सुधोदक ( ३१.५४ ); १७२. सुन्दरकुण्ड ( ४९; ५२.५९; ५३ ); १७३. सूर्यसंस्कृत ( ३१.६७ ); १७४. सोमतीर्थ–सोमवती-तीर्थ ( २८.५०–२०२ ); १७५. सौभाग्यतीर्थ ( ३१.५० ); १७६. स्थाविर विनायक ( ३१.८६ ); १७७. स्वर्गद्वार ( १२.१३ ); १७८. स्वर्गद्वारतीर्थ ( चतुर्दशतीर्थ ) ( २०.१६ ); १७९. स्वर्णक्षुर ( ३५.१ ); १८०. हरसिद्धि ( देवी ) ( १९ ).

( २ ) **नारद पुराण उत्तरखंडात**—या ग्रंथाच्या ७८ व्या अध्यायात निम्नलिखित तीर्थनामावली आढळते. कंसातील आकडे श्लोकांचे आहेत:— १. अंकपाद ( सांदीपनि आश्रम ) ( २५ ); २. अक्रूरेश ( २४ ); ३. अगस्त्येश ( ३३ ); ४. अन्तगृहक्षेत्र ( ४३ ); ५. अप्सरः-कुण्ड ( ८ ); ६. अमरावती ( ३६ ); ७. अवन्तिक्षेत्र ( ३ ); ८. अवन्तिका ( ३५ ); ९. अष्टतीर्थी ( ४६ ); १०. आयतन ( ४३.९ ); ११. उज्जयिनी देवी ( ३६ ); १२. ओङ्कारेश ( ३३ ); १३. कर्कराजतीर्थ ( ४२ ); १४. कनकशृङ्गा ( ३५ ); १५. कपालमोचन ( ६ ); १६. करमेश्वर ( २६ ); १७. कलकलेश्वर ( ७ ); १८. कालवन ( १२ ); १९. कालारण्य ( ४६ ); २०. कुटुम्बेश्वर ( ४० ); २१. कुण्डेश्वर ( १० ); २२. कुमुद्वती ( ३६ ); २३. कुशस्थलीक्षेत्र ( २३ ); २४. कुशस्थली देवी ( ३५ ); २५. कुसुमेश ( २७ ); २६. केदारेश ( ३० ); २७. केशवार्क ( ३१ ); २८. गन्धवती ( १६ ); २९. गोमतीकुण्ड ( ३८ ); ३०. चन्द्रादित्य ( २५ ); ३१. दशाश्वमेधिक ( १७ ); ३२. नरकेश ( ३० ); ३३. नरादित्य ( ३१ ); ३४. नीलगङ्गा ( १६ ); ३५. पञ्चेश ( २३ ); ३६. पद्मावती

( ३६ ); ३७. पिशाचक ( १९ ); ३८. प्रतिकल्पा ( ३६ ); ३९. प्रयागसर ( ४१ ); ४०. मन्दाकिनीनदी ( २४ ); ४१. महाकालवन ( ५; ३४ ); ४२. महिषाख्यकुण्ड ( ९ ); ४३. मार्कण्डेश ( २७ ); ४४. यज्ञवापी ( २७ ); ४५. यातनाकलन ( २९ ); ४६. राजस्थल ( १४ ); ४७. रामेश्वर ( ३० ); ४८. रुद्रसर ( ९;४५ ); ४९. रुद्रसरोवर ( २० ); ५०. लङ्काप्रियविघ्नेश ( २६ ); ५१. वामनकुण्ड ( ३८ ); ५२. वाल्मीकेश्वर ( २१ ); ५३. विद्याधराह्वय ( ११ ); ५४. विशालाख्या ( ३६ ); ५५. वीरेशसर ( ३९ ); ५६. शक्तिभेद ( ३२ ); ५७. शङ्खवापी ( १५ ); ५८. शङ्करादित्य ( १६ ); ५९. शिप्रा ( ३७ ); ६०. शिवकुण्ड ( ६६ ); ६१. शीतला ( १२ ); ६२. शुभेश्वर ( २२ ); ६३. श्रीधर ( ३९ ); ६४. सामुद्रिक ( १४ ); ६५. सोमवती ( २८ ); ६६. सौभाग्येश ( ३१ ); ६७. स्वर्गद्वार ( १३ ); ६८. स्वर्णक्षुरब्रह्मवापी ( ३२ ); ६९. हनुमत्केश्वर ( २० ); ७०. हरसिद्धी ( १९ ).

३. ब्रह्म पुराणात—या ग्रंथाच्या ४३ व्या अध्यायात निम्नलिखित तीर्थनामावली आढळते. कंसातील आकडे श्लोकाचे आहेत :— १. अवन्ती ( २४ ); २. इन्द्रद्युम्नसर (१४); ३. गोविन्दस्वामिन् ( ७७ ); ४. पञ्चतीर्थ ( १२ ); ५. महाकाल ( ६६ ); ६. मालव ( २४ ); ७. विक्रम-स्वामिन् ( ८२ ); ८. शिप्रानदी ( ७५ ); ९. शिवकुण्ड ( ६६ ).

चौऱ्याऐंशी शिवलिंग—अवंतीक्षेत्रातील ८४ शिव लिंगांच्या दोन स्वतंत्र नामावली स्कंद पुराणात असून त्यापैकी ४४ नावे एकसारखी आहेत. द्वितीय नामावलीतील ४० नावे सर्वस्वी नवी आहेत. त्यावरून विभिन्न काळातील शिवलिंगे त्यामध्ये ग्रथित केली असावीत.

**( १ ) नामावली क्र. १**— स्कंद पुराण चतुरशीति लिंगमाहात्म्यमते अवंती येथील चौऱ्याऐंशी लिंगे पुढीलप्रमाणे होत. कंसातील आकडे अध्यायाचे आहेत :— १. अक्रूरेश्वर ( ३९ ); २. अगस्त्येश्वर ( १ ); ३. अङ्गारकेश्वर ( ४३ ); ४. अनरकेश्वर ( २७ ); ५. अनादिकल्पेश्वर ( ५ ); ६. अप्सरेश्वर ( १७ ); ७. अभयेश्वर ( ४८ ); ८. अरुणेश्वर ( ७६ ); ९. अविमुक्तेश्वर ( ७८ ); १०. आनन्देश्वर ( ३३ ); ११. इन्द्रद्युम्नेश्वर ( १५ ); १२. इन्द्रेश्वर ( ३५ ); १३. ईशानेश्वर ( १६ ); १४. उत्तरेश्वर ( ४४;८४ ); १५. ओङ्कारेश्वर ( ५२ ); १६. कण्टेश्वर ( ५४ ); १७. कन्थडेश्वर ( ३४ ); १८. कपालेश्वर ( ८ ); १९ करभेश्वर ( ७३ ); २०. कर्कटेश्वर ( २२ ); २१. कर्कोटेश्वर ( १० ); २२. कल्कलेश्वर ( १८ ); २३. कामेश्वर ( १३ ); २४. कायावरोहणेश्वर ( ८२ ); २५. कुक्कुटेश्वर ( २१ ), २६. कुटुम्बेश्वर ( १४ ); २७. कुण्डेश्वर ( ४० ); २८. कुसुमेश्वर ( ३८ ); २९. केदारेश्वर ( ६७ ); ३०. खण्डेश्वर ( अखण्डेश्वर ) ( ३१ ); ३१. गङ्गेश्वर ( ४२ ); ३२. गुहेश्वर ( २ ); ३३. घण्टेश्वर ( ५७ ); ३४. चन्द्रादित्येश्वर ( ७२ ); ३५. च्यवनेश्वर ( ३० ); ३६. जटेश्वर ( २८ ); ३७. जल्पेश्वर ( ६६ ); ३८. डमरुकेश्वर ( ४ ); ३९. ढुण्ढेश्वर ( ३ ); ४०. त्रिलोचनेश्वर ( ४५ ); ४१. त्रिविष्टपेश्वर ( ७ ); ४२. दुर्धर्षेश्वर ( ७० ); ४३. धनुःसाहस्रेश्वर ( ६३ ), ४४. नागचण्डेश्वर ( १९ ); ४५. नूपुरेश्वर ( ४७ ); ४६. पतनेश्वर ( ३२ ); ४७. पशुपतीश्वर ( ६४ ); ४८. पिङ्गलेश्वर ( ८१ ); ४९. पिशाचेश्वर ( ६८ ); ५०. पुष्पदन्तेश्वर ( ३७ ); ५१. पृथूदकेश्वर ( ४९ ); ५२. प्रतीहारेश्वर ( २० ); ५३. प्रयागेश्वर ( ५८;७१ ); ५४. बिल्वेश्वर ( ८३ ); ५५. ब्रह्मेश्वर ( ६५ ); ५६. मतङ्गेश्वर ( ६० ); ५७. महालयेश्वर ( महाकालेश्वर ) ( २४ ); ५८. मार्कण्डेयेश्वर ( ३६ ); ५९. मुक्तीश्वर ( मुक्तेश्वर ) ( २५ ); ६०. मेघनादेश्वर ( २३ ); ६१. राजस्थलेश्वर ( ७४ ); ६२. रामेश्वर ( २९ ); ६३. रूपेश्वर ( ६२ ); ६४. रेवतेश्वर ( ५६ ); ६५. लुम्पेश्वर ( ४१ ); ६६. लोकपालेश्वर ( १२ ); ६७. वडलेश्वर ( ७५ ); ६८. विश्वेश्वर ( ५३ ); ६९. वीरेश्वर ( ४६ ); ७०. शिवेश्वर ( ३७ ); ७१. शूलेश्वर ( ५१ ); ७२. सङ्गमेश्वर ( ६९ ); ७३. सिंहेश्वर ( ५५ ); ७४. सिद्धेश्वर ( ११; ५९ ); ७५. सोमेश्वर ( २६ ); ७६ सौभाग्येश्वर ( ६१ ); ७७. स्वप्नेश्वर ( ८० ); ७८. स्वर्गद्वारेश्वर ( ९ ); ७९. स्वर्णजलेश्वर ( ६ ); ८०. स्थावरेश्वर ( ५० ); ८१. हनुमत्केश्वर ( ७९ ).

**( २ ) नामावली क्र. २**—स्कंद पुराण अवंतीक्षेत्रमाहात्म्यात निम्नलिखित नव्या शिवलिंगांचा निर्देश आढळतो:— १. अग्नीश्वर; २. असङ्ख्यातेश्वर; ३. उग्रेश्वर; ४. कपिलेश्वर; ५. कर्णेश्वर; ६. केतुतीर्थ; ७. केशवार्केश्वर; ८. कोटेश्वर; ९. खर्परेश्वर; १०. गदाधरेश्वर ११. गुप्तेश्वर; १२. घुष्मेश्वर; १३. चञ्चलेश्वर; १४. चन्द्रेश्वर; १५. ज्वालेश्वर; १६. दशाश्वमेधिकेश्वर; १७. दुर्वासेश्वर; १८. देवेश्वर; १९. द्वादशार्केश्वर; २०. नरादित्येश्वर; २१. नीलकण्ठेश्वर; २२. पातालेश्वर; २३. पुरुषोत्तमेश्वर; २४. बिन्दुकेश्वर; २५. बुधेश्वर; २६. बृहस्पतीश्वर २७. भीमशङ्कर; २८. भीमेश्वर; २९. मङ्गलेश्वर; ३०. मनःकामेश्वर; ३१. योगयोगेश्वर; ३२. राहुतीर्थ; ३३. वालुकेश्वर; ३४.

वाल्मीकेश्वर; ३५. विघ्नहस्तेश्वर; ३६. विमलेश्वर; ३७. वैजनाथेश्वर; ३८. शक्तिभेदेश्वर; ३९. शुक्रेश्वर; ४०. सोमनाथेश्वर ( स्कन्द. आवन्त्य. अ. ७०. ७१–९४ ).

सूर्यमंदिर— विक्रमादित्यकालीन एका सूर्यमंदिराचे अवशेष या गावी आढळतात. मुसलमानी राज्यकालात तेथे मशीद बांधण्यात आली होती. आधुनिक काळी त्या स्थानी ग्वाल्हेरच्या महाराजांचा 'कालियादेह' नामक राजवाडा आहे.

२. ( विषय ) गोविंद राजाच्या स. ९८२ च्या ताम्रपटमते 'अवन्ति–मंडल' देशविभागाचा एक उपविभाग (एपि. इंडि. २३.१०२). नामांतर (सांची स्तूप शिलालेख)— 'उजेनीहार' ( उज्जयिनी आहार ). यामध्ये नवग्राम नामक एक ग्राम होते ( ल्यूडर्स सूची. क्र. २६८ ).

उज्जहान ( देश )—बृहत्संहितामते मध्यप्रदेशातील 'उज्जिहान' देशाचे नामांतर ( उज्जिहान पहा ).

**उज्जानक** ( वालुकासमुद्र व तीर्थ )—महाभारतमते हिमालय पर्वतान्तर्गत गंधमादन पर्वतातील एक वालुकासमुद्र ( वाळवंट ) आणि पवित्र तीर्थ ( म. आर. १९३. १५ ). हरिवंशमते 'जलवर्जित' आणि 'जनवर्जित' अशा या प्रदेशानजिकच्या 'सममरुधन्व'मध्ये ( सपाट वालुकामय प्रदेश ) उत्तंक ( उदक ) ऋषींचा आश्रम होता. या ऋषींच्या प्रेरणेवरून कुवलाश्व राजाने उज्जानक देशवासी धुंधु राक्षसाचा वध करून या प्रदेशात आर्यसंस्कृतिप्रसाराची मुहूर्तमेढ रोवली. नामांतर–'उज्जालक'.

**भौगोलिक स्थान**—डॉ. सुखटणकर यांच्या मते हिंदुकुश पर्वताच्या दक्षिणेकडील चित्रक आणि सिंधु नद्यांच्या खोऱ्यांच्या दरम्यानचा आधु. दर्दीस्तान आणि स्वात नदीच्या खोऱ्याचा पर्वतमय प्रदेश म्हणजे हा देश होय. पार्गिटर, डे आणि पुसाळकर यांच्या मते राजपुतान्यातील मरुधन्व ( आधु. मारवाड ) देशातील वालुकामय प्रदेश म्हणजे हा देश होय ( डे, पृ. ५७ ).

धुंधुवध—महाभारतमते या देशात मधुकैटभपुत्र धुंधु जलराक्षसाचे वालुकान्यात निवासस्थान होते. स्वतःच्या अग्निज्वालामय फुत्कारांनी धूम्र, अग्नि आणि राख यांचा वर्षाव करून तो मनुष्यमात्रांस त्रस्त करीत असे. उज्जानकनिवासी उत्तंक ऋषींच्या प्रार्थनेवरून अयोध्याराज बृहदश्वाने आपल्या कुवलाश्व नामक पुत्रास त्याच्या २१००० पुत्रांसह ( सैन्य ) धुंधु राक्षसाच्या वधार्थ या देशास पाठविले. ब्रह्मपुराण आणि हरिवंशात कुवलाश्वाची पुत्रसंख्या १०० दिली आहे ( ब्रह्म. ७.७४; ह. वं. १.११.४४ ).

कुवलाश्वाने वाळूच्या अंतर्भागातील धुंधु दैत्याची गुहा उकरून काढण्यास प्रारंभ करताच त्या दैत्याने स्वमुखातील अग्निज्वालांनी कुवलाश्वाचे सारे सैन्य दग्ध केले. श्रीविष्णुकृपेने प्राप्त झालेल्या योगसामर्थ्याने कुवलाश्वाने धुंधूचे जल प्राशन करून आणि त्याच्या मुखातील अग्नि शांत करून त्या जलराक्षसास त्याच्या स्वतःच्याच जलामध्ये जलसमाधी दिली. या पराक्रमांमुळे कुवलाश्वाला 'धुंधुमार' उपाधी प्राप्त झाली ( म. आर. १९३. २१–२५; वायु. ९.३२; ह. वं. १.११.३१–५५; विष्णुधर्म. १.१६; विष्णु. ४.२.४२; भा. ९.६.२३; ब्रह्म. ७.५६; ब्रह्माण्ड. ३.६३.३० ).

स्पष्टीकरण—उपरोक्त आख्यायिकेचे स्पष्टीकरण विभिन्न अभ्यासकांनी निम्नप्रकारे दिले आहे :—

१. **डॉ. सुखटणकर यांच्या मते**—पर्वतीय प्रदेशामध्ये उत्पन्न होणाऱ्या ज्वालामुखी अथवा समुद्रकिनारीच्या पाणथळ जागेतील विषारी वायूंना निर्देश येथे अभिप्रेत असून, कुवलाश्वाने या ज्वालामुखीचा अथवा वायूचा उपशम केला असावा.

२. **पार्गिटर यांच्या मते**—धुंधु दैत्याची गुहा राजपुताना वाळवंटाच्या दक्षिण भागात असून धुंधुकथेत निर्देशिलेला जलप्रपात म्हणजे त्या प्रदेशातील उथळ समुद्र असावा ( पार्गिटर, पृ. २६०–२६१ ).

३. **डॉ पुसाळकर यांच्या मते**—राजपुतान्याच्या दक्षिण आणि पश्चिम भागातील आर्य संस्कृतीच्या प्रसाराचे रूपकात्मक वर्णन धुंधुकथेत आहे. असुऱ्यात राजपुताना प्रदेशातील आर्यसंस्कृती प्रसाराच्या उत्तंक ऋषींच्या कार्याची परिपूर्ती कुवलाश्व राजाने केली. त्याचे दृढाश्व, चंद्राश्व आणि कपिलाश्व हे तीन पुत्र सोडून, अन्य सारे एकवीस हजार सैन्य या सांस्कृतिक युद्धात मारले गेले ( वेदिक एज, पृ. २७१ ).

४. **डॉ. लॉ यांच्या मते**—धुंधु दैत्याची गुहा हे ज्वालामुखीचे रूपक असून, समुद्रोद्भव जलप्रपाताने तो विझला असावा ( लॉ, ट्राईब्ज, पृ. १२१ ). त्यांच्या या अनुमानात कुवलाश्वाच्या कर्तृत्वाचे स्पष्टीकरण होत नसल्याने ते असंभव वाटते ( पाठक, कोशल. पृ. ११८–१२० ).

तीर्थ—महाभारतमते हे तीर्थ आर्ष्टिषेण आश्रमानजिक असून ( म. अनु. २५.५५ ), लोमशतीर्थयात्रामते येथे वसिष्ठ ऋषी, अरुंधती आणि पावकपुत्र स्कंदाला मनःशांती प्राप्त झाली होती ( म. आर. १३०.१४ ).

**उज्जानक मरु** ( देश )—सप्तगंगांपैकी पूर्वगामिनी नलिनी नदीच्यामार्गावरील पूर्व भारतातील एक देश ( मत्स्य. १२१.५६. ).

**उज्जिहान** ( लोकसमूह आणि ग्राम )—बृहत्संहिता-

मते कूर्मचक्रान्तर्गत भारतवर्षाच्या मध्यभागातील एक लोकसमूह (बृ. सं. १४.२-४; मार्क. ५५.६). पाठभेद (वाल्मीकि रामायण)-'उज्जिहान'; (मार्कंडेय पुराण)-'उज्ञहान'

वाल्मीकि रामायणमते राजगृह- अयोध्या मार्गावरील गंगा नदीच्या उत्तर खोऱ्यातील हे गाव राजगृहाहून अयोध्येला जाणाऱ्या भरताला गंगा नदी ओलांडल्यावर लागले होते (वा. रा. अयो. ७१.१२). उत्तर प्रदेशातील बुदौन गावाच्या ८ मैल पश्चिमेकडील आधु. उज्झानी गाव ते हेच होय.

या गावच्या 'प्रियक' (कदंब) वृक्षाचा निर्देश वाल्मीकि रामायणात असून (वा. रा. अयो. ७१.१२), स्थानिक परंपरेनुसार आधु. उज्झानीचे प्राचीन नाव 'पिपरिया' (पिंपळाच्या वृक्षांनी युक्त) होते (इंपि. गॅझे. २४.११४).

**उज्जुवलिया** (नदी)—जैन कल्पसूत्रमते पूर्व भारतातील 'ऋजुपालिका' नदीचे नामांतर (ऋजुपालिका पहा).

**उज्जेनी** (नगर)—प्राकृत साहित्यमते मध्य भारतातील 'उज्जयिनी' नगराचे नामांतर. अन्य नामांतर-'उजेनी' (स्कन्द. काशी. ६९.१८; उज्जयिनी पहा).

**उज्जैन** (देश)—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते मध्य भारतातील 'अवंती' देशाचे नामांतर (अवंती पहा).

**उज्जैनीपीठ** (तीर्थ)—हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ (स्कन्द. नागर. ५३.१).

**उज्यपुरी** (ग्राम)—तम्मुसिद्धि राजाच्या शके ११२९ च्या शिलालेखमते त्याने गरुडाकृतियुक्त जयस्तंभ उभारलेले दक्षिण भारतातील एक ग्राम. कोइमतूर जिल्ह्यातील कोळ्ळेगालच्या १८ मैल आग्नेयेकडील आधु. ऊजीपुरम् (उज्जपुरम्) गाव ते हेच होय (एपि. इंडि. ७.१२१.).

**उटजेश्वर** (लिंग)—काशी येथील एक शिवलिंग (स्कन्द. काशी. ६५.८६).

**उड** (देश)—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते पूर्व भारतातील 'उड्र' देशाचे नामांतर (उड्र पहा).

**उडण्डपुर** (बौद्ध विद्यापीठस्थान)—शिलालेख साहित्यमते बिहारमधील 'उदंतपुरी' बौद्ध विद्यापीठस्थानाचे नामांतर. अन्य नामांतर (बौद्ध साहित्य)-'उडंडपुरी' (उदंतपुरी पहा).

**उडिलियक** (लोकसमूह)—स. २७५ च्या जमालगढी शिलालेखमते एक बौद्ध सन्मित्रसंघ (सहाय) (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.११२).

**उडुप** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू. ४.२.७२).

२. (देश) भविष्यमते भारतवर्षातील एक देश (भविष्य. २.१३).

**उडुपपुर** (तीर्थ)—शक्तिसंगमतंत्रमते सर्वेश केरळ देशाच्या सीमारेषेवरील एक तीर्थ (शक्तिसङ्गम. ३.७.८). म्हैसूर राज्यातील दक्षिण कॅनरा जिल्ह्यातील आधु. उडुपी गाव ते हेच होय. (अक्षांश १३°-२१' उत्तर; रेखांश ७४°-४५' पूर्व). शक्तिसंगमतंत्रमते उत्तरेस गोकर्ण आणि दक्षिणेस कन्याकुमारी यांच्या दरम्यानच्या परशुरामक्षेत्रातील हे एक प्रमुख तीर्थ असून, माध्व वैष्णव संप्रदायाचे ते एक प्रमुख धर्मपीठ आणि वैष्णव मंदिरस्थान मानले जाते. श्रीमत् मध्वाचार्यांची (इ. स. १३ वे शतक) जन्मभूमी आणि कर्मभूमी म्हणून माध्व संप्रदायी लोक यास पवित्र मानतात.

**नामांतरे**—स्थानिक लोकांमध्ये या तीर्थाची निम्नलिखित नामांतरे प्रचलित आहेत :—१. रजतपीठ; २. रौप्यपीठ; ३. शिवाली; ४. वद्भांडेश्वर.

**नामव्युत्पत्ती**— 'उडुप'चा शब्दशः अर्थ 'चंद्रमा' असून स्थानिक आख्यायिकेनुसार दक्षशापित चंद्राने येथील 'चंद्र-पुष्करिणी' सरोवराकाठी शिवाराधना केली. चंद्रमौलीश्वराच्या स्वरूपात अवतीर्ण होऊन शिवाने त्यास अभय दिल्यामुळे हे स्थान 'उडुपपुर' नावाने सुविख्यात झाले.

अन्य एका आख्यायिकेनुसार रामभोज या परशुरामभक्त राजाच्या तपस्येने प्रसन्न होऊन परशुरामाने त्यास त्याचे या गावचे यज्ञवेदीस्थान 'रौप्यपीठ' बनण्याचा वर दिला. तेव्हापासून या स्थानास 'रौप्यपीठ' वैकल्पिक नाव प्राप्त झाले. या गावानजिकच्या 'रजतपीठ' गावी मध्वाचार्यांचा जन्म झाल्यामुळे या क्षेत्रास 'रजतपीठ' वैकल्पिक नाव प्राप्त झाले असावे.

**कृष्णमंदिर**—येथील मुख्य मंदिरातील गोदोहनमग्न बालकृष्णाची मूर्ती शाळिग्राम दगडाची असून त्याचे चोल स्थापत्यशैलीचे मंदिर चोळ राजे कुलोत्तुंग (द्वितीय आणि तृतीय) यांच्या राज्यकालातील (इ. स. १० वे शतक) आहे. नायक राजा केळडि वेंकटप्प (स. १६१३) आणि बसवण्ण (स. १७४४) यांनी या मंदिरास देणगी दिली होती (रंगाचारी, २. दक्षिण कर्नाटक. २३१; २४०).

स्थानिक आख्यायिकेनुसार ही मूर्ती मूळची द्वारका येथील असून द्वापरयुगात रुक्मिणी तिची पूजा करीत असे. द्वारका नगरी समुद्रात बुडाल्यानंतर काही खलाश्यांनी ती उडुपीनजिकच्या वद्भांडेश्वर स्थानी आणली. येथे मध्वाचार्यांनी सागरी वादळापासून खलाश्यांच्या बोटीचे रक्षण केल्यामुळे त्यांनी कृतज्ञताबुद्धीने ती मूर्ती मध्वाचार्यांना अर्पिली.

त्यांनी या मूर्तींची येथे समारंभपूर्वक प्राणप्रतिष्ठा केली.

माध्वमठ—मध्वाचार्य (जन्म स. १२३८) हे उडुपी नजिकच्या 'रजतपीठ' गावचे निवासी असून मयुरवर्मन् राजाने अहिच्छत्रहून तौळव (आधु. तुळु) देशात आणविलेल्या बत्तीस ब्राह्मण कुटुंबांपैकी नदुमणे घराण्यात त्यांचा जन्म झाला होता. शंकराचार्यांच्या अद्वैत तत्त्वज्ञान-विरोधी द्वैत तत्त्वज्ञानाचे ते जनक असून, या विचारप्रणालींचे उडुपी हे आद्यपीठ मानले जाते. मध्वाचार्यांचा स्वतःचा 'कृष्णमठ' आणि 'माध्वसरोवर' या गावी असून त्यांच्या निम्नलिखित आठ शिष्यांनी स्थापिलेले आठ मठहि येथे आहेत :–१. पलिमर; २. अदमर; ३. कृष्णपुर; ४. पुत्तिगे; ५. सिरूर; ६. सोडे; ७. कनियुर; ८. पेजवर. या मठांमध्ये श्रीविष्णूच्या राम, कृष्ण, नृसिंह, विठ्ठल, भूवराह आदि अवतारांचे पूजन केले जाते. येथील मुख्य बालकृष्णाच्या पूजनाचा अधिकार या मठांना प्रत्येकी दोन वर्षे आलटून पालटून मिळतो. ही पाळी बदलण्याचा 'पर्याय उत्सव' दर दोन वर्षांनी जानेवारी महिन्यात होतो. मध्वाचार्यांच्या अवतारसमाप्तीचा 'माध्वनवमी' चा उत्सवहि येथे प्रतिवर्षी करतात (ती. पृ. ३१७).

अन्य मंदिरे—सुब्रह्मण्यमंदिर, दुर्गामंदिर, बभांडेश्वर-मंदिर आदि मंदिरेहि येथे आहेत (ती. पृ. ३९९). उडुपी-पासून ४ मैलांवरील वदभांडेश्वर येथे मध्वाचार्यांनी स्थापिलेली बलराममूर्ती आहे (ती. पृ. ३१९).

**उडैयारपालयम्** (नगर)—चोल राजा राजराज (तृतीय) च्या स. १२२७ च्या शिलालेखमते त्याच्या राज्यातील एक नगर. आधु. त्रिचनापल्ली जिल्ह्यातील उडैयारपालयम् गाव हेच होय (आर्कि. सर्व्हे. दक्षिण विभाग स. १९२०, क्र. ५७). पांड्य राजा जटावर्मन् सुंदर (प्रथम) चा स. १२५३ चा एक शिलालेखहि येथे आहे (एपि. इंडि. ६.३०६).

**उड्डियान** (देश)—बौद्ध साहित्यमते वायव्य भारता-तील 'उर्दि' (आधु. स्वात नदीचे खोरे) देशाचे नामांतर (उर्दि पहा).

२. (शक्तिपीठ) एक शक्तिपीठ. कालिकामते येथे सतीचे उरुयुग्म पडले (कालिका. १८.४२). येथील देवीचे नाव 'कात्यायनी' होते (कालिका. १८.५०).

**उड्र** (देश आणि लोकसमूह)—महाभारत आणि बृहत्संहितामते पूर्व भारतातील एक देश व लोकसमूह (म. आर. ४८.१८; बृ. सं. ५.३५; १४.६). अंग, वग, पुंड्र या पूर्वेकडील लोकसमूहांसमवेत महाभारतात यांचा निर्देश आढळतो. 'उड्र,' 'ओड्र,' 'उत्कल' या देशनामांचा निर्देश मध्ययुगीन (इ. स. ९ वे शतक), आणि त्यानंतरच्या साहित्यात आधु. ओरिसा प्रांताला उद्देशून केला असला, तरी त्यापूर्वीच्या काळी वैतरणी आणि सुवर्णरेखा नद्यांच्या दरम्यानचा दक्षिण ओरिसा (दक्षिण तोसल) देशाचा गंजम, पुरी जिल्ह्यांचा मर्यादित भाग त्यामध्ये समाविष्ट असून पूर्वगंग राज्यकाली हाच प्रदेश 'कोंगोद मंडल' नावाने ओळखला जात असे. महानदी आणि ऋषिकुल्या यांच्या दरम्यानचा उत्तर ओरिसा (उत्तर तोसल = उत्कल) हा उड्र देशाहून स्वतंत्र देश मानला जात असे. बृहत्संहिता आणि महाभारतकालीन उड्र देश उत्तर तोसल देशाच्या वायव्येस असून त्याची राजधानी कटक गावी होती. मध्ययुगीन काली उत्तर तोसल आणि दक्षिण तोसल हे दोन्ही देश 'उड्र' अथवा 'उत्कल' या व्यापक नावाने सुविख्यात झाले.

डॉ. सरकार यांच्या मते इ. स. ६ व्या शतकापूर्वी उड्र लोक उत्कल देशाच्या दक्षिणेस असून उत्तरकालात त्यांनी उत्कल देश जिंकल्यामुळे ही देशनामे समानार्थक बनली. इ. स. ६ व्या शतकात उड्र-उत्कल संयुक्त लोकांनी नैर्ऋत्य ओरिसाचा समुद्रकिनाऱ्याचा प्रदेश जिंकल्याने उत्तरेस चिल्का सरोवरापासून दक्षिणेस सुवर्णरेखा नदीपर्यंतचा आधु. ओरिसाचा सारा प्रदेश 'ओड्र', 'उड्र' अथवा 'उत्कल' नावाने सुविख्यात झाला (इंपि. गॅझे. १९.२४९; सरकार, पृ. १४३).

नामांतरे—प्राचीन साहित्यातील या देशाची नामांतरे सोबतच्या परिपत्रकात दिली आहेत.

ऐतिहासिक पार्श्वभूमी—स. ५७९ च्या सोरो ताम्रपट-मते इ. स. ६ व्या शतकात उत्तर तोसली (उत्कल) आणि दक्षिण तोसली (ईशान्य कलिंग) प्रदेशावर मानवंशीय राजांचे राज्य असून, त्यांच्या नावावरूनच आधु. मानभूम, सिंहभूम प्रदेशांस 'मानभूमी' नाव प्राप्त झाले (एपि. इंडि. २३.२०१). विग्रहवंशीय लोकविग्रह राजाच्या स. ५९९ च्या शिलालेखमते त्याचे याच प्रदेशावर अधिराज्य होते. यावरून इ. स. ६ व्या शतकाच्या अखेरीस विग्रह आणि मान घराण्यांमध्ये संघर्ष होऊन मान घराण्याचे राज्य येथे प्रस्थापित झाले असावे. मूळ मानभूम, सिंहभूम, तसेच त्यानजिकच्या ओरिसा प्रदेशाच्या निवासी अशा या उड्रवंशीय घराण्याने प्रथम उत्तर तोसली (उत्कल) आणि नंतर दक्षिण तोसली (उड्र) देश जिंकल्यामुळे इ. स. ६ व्या शतकाच्या अखेरीस 'उड्र' ही संज्ञा सर्वप्रथम बलासोर जिल्ह्यास आणि नंतर कटक, पुरी, गंजम प्रदेशास उपयोजिली जाऊ लागली.

## उड्र देशाची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. प्राचीन साहित्य | औड्रीय |
| २. महाभारत (स. ४७.१९) | उड्र |
| (द्रो. ४.३२*) | ओड्र |
| ३. मनुस्मृति<br>अ. ब्रह्मपुराण (२८.१-२)<br>आ. बृहत्संहिता (५.७४) | ओड्र |
| इ. बृहत्संहिता पाठभेद | औड्र, ओड्र |
| ४. अपादान (२.३५८) | ओड्का |
| ५. तारानाथ बौद्ध इतिहास (इंडि. अँटि. ४.३६५) | ओड्विश (ओडी-विशा=ओड्रविषय) |
| ६. प्लिनी | ओरेतेस |
| ७. राजेंद्र चोलाचा तिरुमलै शिलालेख | ओड्ड विषय |
| ८. मध्ययुगीन शिलालेख | |
| अ. (इंडि. अँटि. ४.३६४) | ओड्रविश |
| आ. (एपि. इंडि. ५.१०८३) | ओड्डवाडि |
| इ. (एपि. इंडि. ४.२७०) | ओड्डिय |
| ई. (एपि. इंडि. २१.२८६) | वोड्डिय-राय |
| ९. ह्युएन्त्संगचे प्रवासवर्णन | वु-तु (उड) |
| १०. जैमिनि भारतम् (एपि. इंडि. ७.७७) | ओड्डि |
| ११. तेलगु शिलालेख (एपि. इंडि. २५.२९८) | ओड्डाडि |
| १२. पोर्तुगीज इतिहास (डी.एच.एन्.आय. १.४९१) | ओर्य |
| १३. मध्ययुगीन साहित्य (इंपि. गॅझे. १९.२४९) | ओड्र |

इ. स. ७ व्या शतकाच्या प्रारंभी कर्णसुवर्णच्या (आधु. मुर्शिदाबाद) गौड राजा शशांकने ओरिसादेशीय मानवंशाचा पराजय करून पुरी आणि गंजम जिल्ह्यांच्या सरहद्दीवरील कोंगोद देशामध्ये आपली सत्ता स्थापिली. इ. स. ७ व्या शतकाच्या अखेरीस कनोजच्या हर्षवर्धनाने गौड राजाचा पराजय केल्यामुळे कोंगोद (आधु. पुरी-गंजम प्रदेश) देशातील शैलोद्भव आणि बलासोर कटक प्रदेशातील दत्त राजघराण्यातील मांडलिक राजे स्वतंत्र झाले. यापैकी दत्त राज्यकालीन उड्र देशाचे वर्णन ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात आढळते.

इ. स. ८ व्या शतकात उड्र देशावर कोंगोद देशाच्या शैलोद्भववंशीय राजांच्या समकालीन शुभकरसिंह राजाचे राज्य होते. स. ८३१ मध्ये भौमकारवंशीय राजांनी उड्र देश जिंकून विरजा (आधु. जाजपुर) गावानजिक गुहेश्वरपाटक नामक नवी राजधानी स्थापिली आणि शैलोद्भव राजांचे कोंगोद राज्य जिंकून घेतले. इ. स. १८ व्या शतकात भौमकर साम्राज्याचा नाश होईपर्यंत त्यांची राजधानी विरजा येथेच होती.

इ. स. १२ व्या शतकात गंग राजा अनंतवर्मन् चोडगंगने स्थानिक सोमवंशी राजांकडून पुरी, कटक, बलासोर प्रदेश जिंकून घेतला (कलिंग पहा).

नामव्युत्पत्ती—'उड्र अथवा ओड्र लोकांचा देश' अशा अर्थाने या देशास 'औड्रीय विषय' नाव प्राप्त झाले. आधु. ओरिसा देश उडिया भाषेत 'उडिशा' नावाने सुविख्यात असून डॉ. सरकार यांच्या मते उड्र > ओड्डी-विसा > ओडी-विसा > ओडिशा अशा क्रमाने हे नाव व्युत्पन्न झाले असावे. यापैकी 'ओडी-विसा' नावाचा निर्देश तारानाथाच्या तिबेटी ग्रंथात आढळतो (इंडि. अँटि. ४.३६५-३६६). 'उड्र' आणि 'ओरिसा' यामध्ये अशा तऱ्हेने भाषिक संगती असली तरी प्राचीन 'उड्र', 'ओड्र' अथवा 'औड्र' म्हणजे आधु. ओरिसा नव्हे (कलिंग पहा).

मनुस्मृतीमध्ये—या ग्रंथमते ओड्र लोक पौंड्रक, द्राविड, कंबोज, यवन, शक, पारद, पह्लव, चीन, किरात, दरद, आणि खश लोकांप्रमाणेच म्लेंच्छ (अनार्य) होते. धर्मकृत्यांच्या लोपामुळे, तसेच ब्राह्मणांचा सहवास सुटल्यामुळे हे मूळचे क्षत्रिय लोक 'वृषल' (म्लेंच्छ) बनले (मनु. १०.४४). ओड्र लोकांचा हा प्राचीनतम निर्देश असून पद्म पुराणात, तसेच जैन प्रज्ञापना ग्रंथातहि त्याची पुनरुक्ती आढळते (पद्म. ब्राह्म. ३.५३; इंडि. अँटि. २०.३७५). ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमतेहि ओड्र लोक असंस्कृत, कृष्णवर्णीय आणि मध्यदेशाहून वेगळी भाषा बोलणारे होते (वॉटर्स, २. १९३).

महाभारतात—युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या दक्षिण दिग्विजयात सहदेवाने हा देश दूतांकरवी जिंकला असून (म. स. २८.४८), युधिष्ठिराच्या यज्ञसमयी उड्र लोक उपायने घेऊन उपस्थित होते (म. स. ४७.१९). या ग्रंथात अन्यत्र या लोकांचा निर्देश उत्कल, मेकल, कलिंग आणि आंध्र लोकांसमवेत आढळतो (म. आर. ४८.१८; भी. १०.५६; द्रो. ४.३२*).

बृहत्संहितेत—या ग्रंथात पूर्व भारतातील एक देश आणि लोकसमूह म्हणून 'उड्र' (ओड्र, औड्र) चा निर्देश आढळतो (बृ. सं. ५.७४; १४.६).

पौराणिक साहित्यात—ब्रह्ममते ओंड्र देश उत्तरेस व्रजमंडल (आधु. जाजपुर) पर्यंत असून त्यामध्ये 'पुरुषोत्तम' (श्रीक्षेत्र), 'सवितृ (अर्कक्षेत्र), आणि 'विरजा' (वैतरणी नदीसिंचित) संज्ञक तीन क्षेत्रे होती (ब्रह्म. २८.१-२; ९-१०).

बौद्ध साहित्यात—अपादान ग्रंथात या लोकांस 'ओड्डका' म्हटले आहे (अपादान. २.३५८).

प्लिनीच्या ग्रंथात–या ग्रंथात मलेउस् पर्वतातील 'मोनेदेस्' आणि सुभ्ररि लोकांनजिकच्या 'ओरेतेस्' लोकांचा निर्देश आढळतो. कनिंगहॅम यांच्या मते आधु. मुंड आणि सुभ्रर लोकांनजिकच्या उडिया लोकांचा निर्देश येथे अभिप्रेत आहे.

भरताच्या नाट्यशास्त्रात—या ग्रंथात उड्र देशाचा निर्देश आढळतो.

ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात—या ग्रंथमते कर्णसुवर्ण (आधु. रंगामाटी) गावापासून १४० मैल नैर्ऋत्येस गेल्यानंतर ह्युएन्त्संग 'वु-तु' (उड) देशास पोहोचला. या देशाचे आणि त्याच्या आग्नेय सरहद्दीवरील समुद्रकिनाऱ्यानजिकच्या चरित्रपुर नामक राजधानीचे क्षेत्रफळ अनुक्रमे १४०० आणि ४ मैल असून, येथील सुपीक जमिनीत नानाविध फळेफुले पिकत असत. या देशात १०० बौद्धमठ, ५० हिंदु देवमंदिरे आणि असंख्य महायानपंथीय बौद्ध भिक्षू होते. गौतमबुद्धाच्या प्रवचनाच्या स्मृत्यर्थ अशोकाने उभारलेले दहा बौद्धस्तूप येथे होते.

ह्युएन्त्संगच्या मते या देशाच्या चार हजार मैल दक्षिणेकडील सिलोन देशातील गौतम बुद्धाच्या दंतावशेषस्तूपाच्या शिरोभागीचा दैदीप्यमान मोती निरभ्र रात्री चरित्रपुर गावाहून दिसत असे.

पुष्पगिरि संघाराम—या देशाच्या नैर्ऋत्येकडील या पर्वतीय बौद्धमठातील स्तूपद्वयाच्या दर्शनास दूरचे लोक येत असत.

या देशाहून २४० मैल नैर्ऋत्येस गेल्यानंतर ह्युएन्त्संग कोंगह (कोंगोदमंडल= आधु. गंजम किनारा) देशास पोहोचला (वॉटर्स, २.१९३–१९६; बील, ४.४१०-४१२).

ह्युएन्त्संगच्या उपरोक्त वर्णनावरून त्याचे काळी उत्तर तोसल देश 'ओड्र' नावाने सुविख्यात असावा. ओड्रच्या नैर्ऋत्येकडील कोंगोद आणि कलिंग देश एकमेकांस खेटून असल्याने ओड्र आणि कोंगोद यांच्या दरम्यानच्या २४० मैल अंतराचा त्याचा निर्देश चुकीचा वाटतो.

तिबेटी साहित्यात—तारानाथाच्या तिबेटी ग्रंथमते इ. स. ८ व्या शतकात ओड्विश, वंग आदि पूर्व भारतातील पाच देशांतील यादवी (मात्स्यन्याय) गोपाल राजाने नष्ट केली. उत्तरकालीन देवपाल राजाने वरेंद्र आणि ओड्विश देशांना शरण आणले (इंडि अँटि. ४.३६५). या ग्रंथातील 'ओड्विश' हे 'ओड्र विषय'चे तिबेटी रूप असावे.

शिलालेख साहित्यात—या साहित्यात विषय (देशविभाग) आणि 'देश' अशा उभय नात्यांनी 'उड्र'चा निर्देश आढळतो :—

(१) विषय—निम्नलिखित शिलालेखांत 'उड्र विषया'चा निर्देश आढळतो :–१. बलासोर ताम्रपट (एपि. इंडि. २३.१९९); २. तल्चेर दानपत्र (जे. ए. एस्. बी. १२.२९३); ३. बंगाल रॉयल एशियाटिक सोसायटीचे दानपत्र (ओड्र विषयातील कुरुवाभट ग्रामाचा निर्देश; जे. ए. एस्. बी. ५.३४७–३५०); ४. स. ८९९ चे दानपत्र (एपि. इंडि. २५. १५९); ५ चोल राजा राजेंद्र (प्रथम) चा तिरुमलै शिलालेख (सोमवंशीय ययाति राजाच्या ताब्यातील ओड्र विषय जिंकल्याचा निर्देश; एपि. इंडि. २९.४७).

(२) देश—निम्नलिखित शिलालेखात 'उड्र' देशाचा निर्देश आढळतो :–१. चोल राजा राजराजाचा शिलालेख; २. अनंतवर्मनचा इ. स. ११ व्या शतकातील अलगुम शिलालेख (ओड्र आणि उत्कल समानार्थक असल्याचा निर्देश; एपि. इंडि. २९.१७३); ३. पल्लवराज चोडचंद्राचा इ. स. ११ व्या शतकातील द्राक्षाराम शिलालेख (ओड्र आणि आंध्र देशांच्या सीमेवर जयस्तंभ उभारल्याचा निर्देश; एपि. इंडि. २९.१७३).

मध्ययुगीन कालातील अन्य शिलालेखमते पर्लकिमेडि प्रदेश (जे. ए. एच्. आर. एस्. १०.१६७), तसेच पुरुषमंडप आणि शिलाभंपजतीर ही ग्रामे (एपि. इंडि. ३.१५३; ८.१४) उड्र देशामध्ये समाविष्ट होत असत.

इ. स. १६ व्या शतकातील 'जैमिनि–भारतम्' ग्रंथमते विजयनगरच्या नृसिंहराज राजाने 'ओड्डि' देश जिंकला होता (एपि. इंडि. ७.७७).

मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात—या साहित्यात ओड्र देशाचा निर्देश अनेक वेळा आढळतो (अनेकार्थ. ३३. ४१०; मेदिनी. १२३.११; त्रिकाण्ड. ३१.११; शब्दरत्न. २५१.१७).

राजधानी—या देशाच्या राजधानीसंबंधी अभ्यासकांत निम्नलिखित मतांतरे आढळतात:—

१. वॉटर्स आणि वॅडेल यांच्या मते—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनातील चरित्रपुर (चित्रतोल) हे या देशाच्या

राजधानीचे गाव म्हणजे कटकपासून १६ मैल दक्षिणेकडील महानदीकाठचे आधु. नेद्र गाव होय.

२. फर्ग्युसन यांच्या मते--चरित्रपुर हे या देशातील प्रमुख बंदर असून याची राजधानी आधु. मिदनापुर गावी असावी ( जे. ऑर. ए. एस्. ६.२४९ ).

३. अन्य अभ्यासकांच्या मते--वैतरणी नदीकाठच्या आधु. जाजपुर गावी या देशाची राजधानी असावी.

**उड्र--केरल** ( देशद्वय )—युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या दक्षिण दिग्विजयात सहदेवाने जिंकलेला एक जोडदेश ( म. स. २८.४८ ). हा केरल देशाच्या परिसरात असावा.

**उण्टिकवाटिका** ( ग्राम )— अभिमन्यु राष्ट्रकूटाच्या दानपत्रमते दक्षिण भारतातील एक ग्राम ( एपि. इंडि. ७.२१६ ).

**उण्ड** ( नगर )— मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते वायव्य भारतातील 'उद्भांडपुर' ( आधु. ओहिंद ) नगराचे नामांतर ( उद्भांडपुर पहा ).

**उण्डवल्लि** ( गुफामंदिरस्थान )–गुफा दक्षिण भारतातील पल्लव स्थापत्यशैलीचे गुफामंदिरस्थान. येथील गुफामंदिर उत्तरकालीन पल्लव स्थापत्यशैलीने खोदले आहे.

येथील अनेक मजली मुख्य गुफामंदिरानजिक अन्य छोटी स्मृतिमंदिरे खोदली आहेत. या मंदिरांच्या प्रवेशद्वारानजिक नाजूक स्तंभ असून वरच्या कमी उंचीच्या मजल्यात कमानाकृती खिडकी आहे ( गोएट्झ, १.११६–११७ ).

**उण्ड्र** ( देश )—महाभारतमते पूर्व भारतातील 'उड्र' देशाचे नामांतर ( म. स. ४७.१९; उड्र पहा ).

**उतथ्यवामदेवेश** ( लिंग )— काशी येथील एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ९७.२०२ ).

**उत्कण्ठेश्वर** ( शिवमंदिरस्थान )— गुजरातमधील कपडवणजपासून १० मैल अंतरावरील एक पर्वतीय शिवमंदिरस्थान. हे 'उँटडिया महादेव' स्थानिक नावाने ओळखले जाते ( ती. पृ. ४२६ ).

**उत्खण्ड** ( नगर )— ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते वायव्य भारतातील गंधार देशाच्या 'उद्भांडपुर' ( आधु. ओहिंद ) या राजधानीच्या गावाचे नामांतर ( वॉटर्स, १. ११४; २२१; उद्भांडपुर पहा ).

**उत्कर** ( ग्राम )— पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.९० ).

**उत्कल** ( देश )— पौराणिक साहित्यमते पूर्व भारतातील विंध्य पर्वताच्या पूर्व आणि आग्नेय उतारावरील ब्राह्मणी आणि महानदी नद्यांच्या जलसंचय प्रदेशातील एक जनपद ( म. भी. १०.३९; वायु. ४५.१३२; मत्स्य. ११४.५२; मार्क. ५४. ५३; पद्म. आदि. ६.३६ ). या देशाच्या 'विंध्यवासी', 'विंध्यपृष्ठवासी' ( ब्रह्माण्ड. १६.६३ ) अथवा 'विंध्यमूलवासी' ( वामन १३.५४ ) या उपाधींपैकी 'विंध्यमूलवासी' हे वर्णन भौगोलिक दृष्ट्या यथायोग्य वाटते. बृहत्संताहिमते हा पूर्व भारतात असून ( बृ. सं. १४.७; काव्यमी. १७.२२६ ), वाल्मीकि रामायण आणि ब्रह्माण्डमते हा अनुक्रमे दक्षिण आणि मध्यदेशात होता ( वा. रा. कि. ४१.१०; ब्रह्माण्ड १६.४२ ).

अली यांच्या मते ओरिसा प्रांताच्या ईशान्य समुद्रपट्टीनजिकचा आधु. बलासोर प्रदेश तो हाच असून, अशोकाच्या राज्यकाली हा देश 'उत्तर तोसली' नावाने कलिंग देशाचा उपविभाग मानला जात असे. डॉ. सरकार यांच्या मते या देशाच्या पूर्व सरहद्दीवरून कपिशा ( आधु. कशाइ ) नदी वहात असून त्यापलीकडे वंग देश होता. कपिशा आणि वैतरणी या दोन नद्यांच्या दरम्यानच्या या देशात आधु. बलासोर जिल्हा, तसेच कटक आणि मिदनापुर जिल्ह्यांचा काही भाग यांचा समावेश असून पुरी, गंजम आणि कटक जिल्हे कलिंग देशात समाविष्ट होत असत. पार्गिटर यांच्या मते छोटा नागपुरचा दक्षिण भाग, ओरिसाचा उत्तर भाग आणि बलासोर जिल्हा मिळून हा देश बनला होता.

महाभारतमते हा देश कलिंग देशाचा भाग असून, त्याची पश्चिम आणि उत्तर परिसीमा अनुक्रमे मैकल पर्वत ( छत्तिसगढच्या उत्तर आणि पश्चिमेकडील टेकड्या ), आणि वैतरणी नदीने बनली होती ( म. आ. ११४ ). उत्कल आणि मेकल लोकांचा एकत्र निर्देश त्या ग्रंथात अनेक वेळा आढळतो ( म. द्रो. ४.३२ *; क. १७.२० ). ब्रह्म पुराणात आणि रघुवंशात उत्कल आणि कलिंग हे दोन स्वतंत्र देश मानले असून ( ब्रह्म. ४७.७; रघु. ४.३८ ), कालिदासाच्या काळी मेदिनीपुरापासून कपिशा नदीपर्यंतचा कलिंग देशाच्या उत्तरेकडील प्रदेश या देशात समाविष्ट होत असे. या काळी हा देश ओरिसा आणि ताम्रलिप्त यांच्या दक्षिणेस असून, त्याची उत्तर सरहद्द कपिशा ( आधु. कशाइ ) नदीने बनत असावी.

इ. स. ७ व्या शतकात दक्षिणेकडील उड्र लोकांनी हा देश जिंकल्यामुळे 'उड्र' आणि 'उत्कल' हे समानार्थक मानण्यात येऊ लागले, आणि नंतर ओरिसाचा समुद्रकिनारीचा प्रदेशहि या राज्यांत समाविष्ट होऊन 'उड्र' आणि 'उत्कल' ही आधु. ओरिसा देशाची वैकल्पिक

नामांतरे बनली ( उड्र पहा ). मध्ययुगीन साहित्यात ही दोन्ही देशनामे आधु. ओरिसा देशास उद्देशून उपयोजिली असली, तरी प्राचीन काळी बलासोर प्रदेशाच्या मर्यादित भागास 'उत्कल' म्हणत असावेत ( जे. ए. एस्. बी. ११.७; उड्र पहा ). महाभारतकाली या मागासलेल्या आणि वन्य जमातींच्या लोकांशी अन्य सुधारलेले लोक संबंध ठेवीत नसत.

नामांतरे:—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात:—

| ग्रंथ | नामांतरे |
|---|---|
| १. पाली साहित्य. | |
| अ. ( अपादान. २.३५९ ) | ओक्कल; उक्कला |
| ब. ( जा. १.८० ) | उक्कल |
| २. उडियाभाषीय हस्तलिखित ( एच्. ए. आय्. बी. पृ. २७ ). | ओत्कल |
| ३. इ. स. १२ व्या शतकातील शिलालेख ( एपि. इंडि. २९.१७३ ). | उत्कल देश, औड्र उत्कल विषय |
| ४. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य ( अनेकार्थ. ३३.४१०; मेदिनी. १२३.११; त्रिकाण्ड. ३१.११; शब्दरत्न. २५१.१७ ). | ओड्र |

नामव्युत्पत्ती—'उत्कल'चा शब्दशः अर्थ 'कलिंग देशाच्या उत्तरेकडील देश' ( उत्+कल ) असून, या दृष्टीने हा देश कलिंग आणि वंग यांच्या दरम्यान कलिंग देशाच्या उत्तरेस असल्याचा रघुवंशातील निर्देश अन्वर्थक वाटतो ( रघु. ४.३८ ). पद्ममते 'सुद्युम्नपुत्र उत्कलाचे वंशज' अशा अर्थाने या लोकांस हे नाव मिळाले ( पद्म. आदि. ९.१२२; ब्रह्म. ७.१८; १७–१९ ).

स्थापना—पौराणिक साहित्यमते मनूच्या दहा पुत्रांपैकी इल सुद्युम्न राजाचे उत्कल, विनताश्व आणि गय नामक तीन पुत्र अनुक्रमे उत्कल, पूर्व भारतातील अज्ञात देश आणि गया देशांचे अधिपती बनले ( पार्गि., पृ. २५३–२५४ ). सुद्युम्नपुत्रांचे गया–ओरिसा प्रदेशातील हे राज्य 'सौद्युम्न' नावाने सुविख्यात झाले ( ब्रह्म. ७.१८ ).

वाल्मीकि रामायणात—या ग्रंथमते उत्कल, मेकल आणि दशार्ण या दक्षिण भारतातील देशांप्रत सुग्रीवाने सुषेण वानराला सीताशोधार्थ पाठविले होते ( वा. रा. कि. ४१.९ ).

महाभारतात—या ग्रंथात या लोकांचा निर्देश उड्र, मेकल, कलिंग आणि आंध्र लोकांसमवेत असून ( म. भी. १०.३९ ), कर्णाने आपल्या पूर्व दिग्विजयात या तीन लोकांना पौंड्र, आणि निषध लोकांसमवेत जिंकले होते ( म. द्रो. ४.३२* ). यावरून महाभारतकाली कलिंग, उड्र आणि उत्कल हे स्वतंत्र देश मानले जात असावेत. या ग्रंथात केवळ एकाच ठिकाणी 'उत्कल'ला कलिंगाचा उपविभाग मानले आहे ( म. आर. ११४ ).

वाल्मीकि रामायण आणि महाभारतातील उत्कल आणि मेकल देशांच्या एकत्र निर्देशावरून उत्कल लोक प्रारंभी कोशल देशान्तर्गत मैकल पर्वतामध्ये ( छत्तिसगढ परगण्याच्या पूर्वेकडील आणि उत्तरेकडील सातपुडा पर्वताचा भाग ) मेकल लोकांसमवेत निवास करीत असावेत. पार्गिटर यांच्या मते आधु. उत्तर ओरिसा आणि छोटा नागपुर प्रदेशात महाभारतकालीन उत्कल लोकांची वसाहत असावी ( पार्गि., मार्कं. पृ. ३७० ). कालिदासाच्या रघुवंशमतेहि उत्कलची पश्चिम सरहद्द मेकल देशानेच बनली होती ( रघु. ४.३८ ).

समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद प्रशस्तिलेखातील 'कुशल' देशाचा 'उत्कल' आणि 'मेकल' या 'कल' अंत्यशब्दयुक्त देशनामाशी काहीनाकाही संबंध असावा ( आय. एच्. क्यू. १.६८५ ).

पौराणिक साहित्यात—ब्रह्म पुराणात उत्कल आणि कलिंग यांचा स्वतंत्र निर्देश आढळतो ( ब्रह्म. ४७.७ ). पार्गिटर यांच्या मते मत्स्य पुराणातील 'सुह्मोत्तर' हे 'सुह्मोत्कल'चे अपभ्रष्ट रूप असून त्याकाळी उत्कल लोक सुह्म देशाच्या ( बंगालमधील आधु. बांकुर, मिदनापुर आणि मानभूम जिल्हे) दक्षिणेस असावेत. वायुमते उत्कल लोक करुष, मेकल, उत्तमार्ण आणि दशार्ण लोकांसमवेत विंध्य पर्वतात निवास करीत असत. छोटा नागपुर टेकड्या विंध्य पर्वताचाच विस्तारित भाग असल्याने वायु पुराणातील हा निर्देश भौगोलिक दृष्ट्या यथायोग्य वाटतो.

बौद्ध साहित्यात—अपादान ग्रंथात उत्तरापथातील 'ओक्कला' ( उक्कला ) लोकांचा निर्देश मेकल लोकांसमवेत असून ( अपादान. २. ३५९ ), महावस्तुमते 'उक्कला' देशातील तपुस्स आणि भल्लिक नामक दोन व्यापारी गौतम बुद्धाच्या दर्शनार्थ उरुवेला गावी गेले होते (महावस्तु. ३.३०३; विनय. १.३–४). पाचशे गाड्यांसह मज्झिम (मध्य) देशाप्रत

जाणाऱ्या उक्कल देशाच्या व्यापाऱ्यांचा निर्देश जातकात आढळतो ( जा. १.८० ). या देशातील वस्स आणि भण्ण नामक दोन अब्रह्म नास्तिक कुविख्यात होते ( अङ्गुत्तर. २.३; संयुत्त. ३.७३; मज्झिम. ३.७८; कथावत्थु. १.१४१ ).

शिलालेख साहित्यात--समुद्रगुप्ताच्या स. ५६९ च्या ताम्रपटात उत्कलऐवजी केवळ कलिंग देशाचाच निर्देश आढळतो ( एपि. इंडि. २९.१७३ ). त्यावरून त्याचे काळी हा कलिंग देशामध्ये समाविष्ट असावा. महाशिवगुप्ताच्या इ. स. ११ व्या शतकातील मरंजमुर दानपत्रात कलिंग, कोंगोद ( उड्र ) आणि उत्कल देशांचा स्वतन्त्र निर्देश असून, त्याकाळी महानदी ऋषिकुल्या नद्यांच्या खोऱ्याचा प्रदेश कोंगोद नावाने आणि महानदीच्या उत्तरेकडील आणि ऋषिकुल्या नदीच्या दक्षिणेकडील प्रदेश अनुक्रमे उत्कल आणि कलिंग नावाने सुविख्यात असावेत ( जे. बी. ओ. आर. एस्. २.४५ ). दंडीमहादेवीच्या इ. स. ८ व्या शतकातील संतिरग्राम ताम्रपटमते उत्कलाधिपती शुभंकर ( प्रथम ) राजाने कलिंग देश जिंकला होता ( एपि. इंडि. २९.८१ ).

मध्ययुगीन काली—इ. स. ६ व्या शतकानंतर उड्र आणि उत्कल देशांचा मर्यादित स्वतंत्र अर्थ नाहीसा होऊन नैर्ऋत्य ओरिसाचा समुद्रकिनारीचा सारा प्रदेश 'उड्र' अथवा 'उत्कल' या वैकल्पिक नावांनी सुविख्यात झाला. ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात याच व्यापक अर्थाने उड्र देशाचा निर्देश असून, तत्कालीन ओडिया हस्तलिखितात ओत्कल देशान्तर्गत खंडगिरि पर्वताचा निर्देश आढळतो ( एच्. आर्. आय्. बी. पृ. २७ ). त्रिकांडशेषमध्ये 'ओड्र' आणि 'उत्कल' समानार्थक मानले असून, त्यानंतरच्या काळात ओरिसाचे 'उत्कल' हे देशनाम आणि 'उड्र' हे लोकनाम प्रचलित झाले.

मध्युगीन शिलालेख साहित्यात—इ. स. ११ व्या शतकातील 'रामचरितम्' या संस्कृत ग्रंथात उत्कल आणि कलिंग हे स्वतंत्र देश मानले असले तरी तत्कालीन शिलालेख साहित्यात नैर्ऋत्य ओरिसा प्रदेशाचा निर्देश सर्वत्र 'उत्कलदेश' अथवा 'उत्कलविषय' नावानेच आढळतो ( एपि. इंडि. ११.२०–२६ ). गाहडवाल राजा गोविंदचंद्राच्या इ. स. १२ व्या शतकातील शिलालेखात उत्कल देशनिवासी शाक्यरक्षित नामक बौद्ध पंडिताचा निर्देश असून त्याच्या समकालीन नृसिंह ( प्रथम ) राजाच्या भुवनेश्वर शिलालेखमते त्याच्या चंद्रिका नामक भगिनीने उत्कल विषयान्तर्गत एकाम्र ( आधु. भुवनेश्वर ) येथे एक विष्णुमंदिर बांधले होते. ( एपि. इंडि. १३.१५०–१५५ ). नारायणपालाच्या भागलपुर दानपत्रमते त्याने उत्कल राजास पळवून लावले असून, गुडवमिश्राच्या बादल स्तंभलेखमते बंगालच्या देवपाल राजाने उत्कल, हूण, द्राविड लोकांचा पराजय केला होता.

त्रिपुरी येथील कलचुरि राजा कर्णाच्या स. १०४२ च्या गोहरवा ताम्रपटमते कर्णपिता गांगेयदेवाने उत्कल राजास पराभूत केले होते ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.२२५ ). अनंतभीम ( तृतीय ) राजाच्या इ. स. १३ व्या शतकातील चाटेश्वर मंदिरलेखात त्याने स्वतःस 'उत्कलाधिपति' म्हटले असून ( एपि. इंडि. २९.१२४ ), महानन्न राजाच्या अढभार शिलालेखमते त्याचा पिता तिवरराज इ. स. ६ व्या शतकात कोसल आणि उत्कल देशांचा अधिराज होता ( एपि. इंडि. ३१. २२० ). स. १८५९ मध्ये या प्रदेशावर शाळुव नरसिंह राजा राज्य करीत असून, कलिंग आणि राजमहेंद्री प्रदेश त्यामध्ये समाविष्ट होत असे ( रंगाचारी, १. गंजम. १५ ).

शक्तिपीठ--शक्तिसंगमतंत्रमते जगन्नाथपुरीच्या सरहद्दीवरील प्रदेश 'उत्कल' नावाने सुविख्यात असून ( शक्तिसङ्गम ३.७.४२ ), येथे सतीची नाभी पडली होती. तंत्रचूडामणिमते पुरी आणि याजपुर (आधु. जाजपुर) ही या देशातील देवीस्थाने एकमेकानजिक होती. जगन्नाथपुरी येथील आधु. विमलादेवी अथवा जाजपुर येथील विरजादेवी ही या देशातील शक्तिस्थाने मानली जातात.

मराठ्यांचे राज्य--इ. स. १८ व्या शतकात या प्रदेशावर मराठ्यांचे राज्य होते. स. १८०३ मध्ये इंग्रजांनी हा प्रदेश जिंकून घेतला ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३१२ ).

ओरिसा स्थापत्यशैली—इ. स. ८ व्या १२ व्या शतकात या देशातील जगन्नाथपुरी, भुवनेश्वर आणि कोणादित्य ( आधु. कोणार्क ) गावी बांधलेल्या मंदिरांतून ओरिसा स्थापत्यशैली उत्क्रांत झाली ( भुवनेश्वर पहा ).

**उत्कलक्षेत्र** ( तीर्थ )—ब्रह्ममते उत्कल देशातील 'जगन्नाथपुरी' (पुरुषोत्तमक्षेत्र) चे नामांतर ( ब्रह्म. ४२.४६; जगन्नाथपुरी पहा ). अन्य नामांतर-'विरजतीर्थ'.

**उत्कोचक** ( तीर्थ, धौम्य–आश्रम )—महाभारतमते भागीरथी नदीकाठचे धौम्य ऋषींचे आश्रमस्थान ( म. आ. १७४.२–७; धौम्य–आश्रम पहा ).

**उत्तङ्क–आश्रम** ( आश्रमस्थान )—महाभारतमते उज्जानक देशातील ( वालुकामय निर्जल प्रदेश ) 'सममरुधन्व' ( सपाट वालुकामय प्रदेश ) प्रदेशातील उत्तंक ( उदक ) ऋषींचे आश्रमस्थान ( म. आर. १९३.१५ ). येथील

धुधु दैत्यकृत अत्याचारांनी त्रस्त होऊन उत्तंक ऋषींनी कुवलाश्व राजाकरवी त्या राक्षसाचा वध केला ( ह. वं. १.११.३१-५५; वायु. ९.३२; विष्णुधर्म. १.१६; उज्जानक पहा ).

**उत्तङ्कस्वामिन्** (तीर्थ)—कश्मीरातील वितस्ता ( आधु. झेलम ) नदीकाठचे एक तीर्थ ( नीलमत. १५६६ ).

**उत्तङ्केश्वर** ( लिंग )—प्रभासक्षेत्रातील एक शिवलिंग ( स्कन्द. प्रभास. प्र. ७७ ).

**उत्तम** ( देश )—महाभारतमते विंध्यपर्वतीय उत्तमार्ण देशाचे नामांतर ( म. स. २७ ३; उत्तमार्ण पहा ). नामांतर ( मार्कंडेय, वामन पुराण )–'उत्तमर्ण', ( ब्रह्माण्ड पुराण )– 'उत्तमार्ण'.

२. ( पर्वत )—शाल्मलिद्वीपातील एक वर्षपर्वत (ब्रह्माण्ड. १९.३६; लिङ्ग. ५३.५ ).

**उत्तसवत्** ( देश )— ह्युएन्त्संगच्या पूर्वकालीन चिनी साहित्यमते 'कुरु' (उत्तर) देशाचे नामांतर ( कुरु २. पहा ).

**उत्तमाद्रि** ( पर्वत )—शिलालेख साहित्यमते दक्षिण राजपुतान्यातील एक पर्वत. दक्षिणेस बारोली व भैनसरोर आणि उत्तरेस जहाजपुर यांच्या दरम्यानचे आधु. उपरमाळ पटार ते हेच होय ( एपि. इंडि. २६.१०१ ).

**उत्तमार्ण** (देश)—ब्रह्माण्डमते एक विंध्यपर्वतीय देश ( ब्रह्माण्ड. १६.६४; वायु. ४५.१३२ ). नामांतरे— १. 'उत्तम' ( म. स. २७.३; भी. १०.४२; पद्म आदि. ६.३६ ); २. उत्तर' ( म. भी १०.३९ ); ३. 'उत्तमर्ण' ( मार्कं. ५४.५४; वामन १३.५४ ); ४. 'उत्तमौजस' ( म. भी. १०.३९ ); ५. 'औड्रामाश' (मत्स्य. ११४.५२). महाभारतमते सहदेवाने युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या दक्षिण दिग्विजयात हा जिंकला होता.

**उत्तमेश्वर** ( लिंग )—वाराणसी येथील एक शिवलिंग ( लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. १०२ ).

**उत्तमौजस्** ( देश )— महाभारतमते विंध्यपर्वतीय 'उत्तमार्ण' देशाचे नामांतर ( म. भी. १०.३९; उत्तमार्ण पहा ).

**उत्तर** ( देश )—बृहत्संहितामते नवविभागात्मक भारतवर्षाच्या 'उदीच्य' ( वायव्य ) देशविभागाचे नामांतर ( बृ. सं. १४.२; उदीच्य पहा ).

२. ( तीर्थ ) वाराणसी येथील एक तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.३४; पद्म आदि. ३७.१७ ), येथे गोपाल संज्ञक वामनाचे स्थान होते ( वामन ९०.११ ).

३. ( देश ) पद्ममते विंध्यपर्वतीय 'उत्तमार्ण' देशाचे नामांतर ( पद्म. आदि. ६.३९; उत्तमार्ण पहा ).

४. जंबूद्वीपान्तर्गत भद्राश्ववर्षातील एक देश ( वायु. ४३.२२ ).

५. ( देशविभाग ) राजतरंगिणीमते कश्मीरातील क्रमराज्य विभागाच्या वायव्य टोकानजिकचा एक राज्यविभाग ( राज. ६.२८१ ). आधु. उत्तर परगणा तो हाच होय. नामांतर– 'उत्तरक' ( लोकप्रकाश. २ ). यातील घोष ( आधु. गश ) गावी 'शारदा' तीर्थयात्रेचा प्रारंभ होत असे ( स्टाइन, राज २.४८५ ).

६. ( मंडल ) वैन्यगुप्त राजाच्या स. ५०७ च्या गुनैघर शिलालेखमते पूर्व भारतान्तर्गत समतट देशातील एक राज्यविभाग ( आय्. एन्. क्यू. ६.४० ). आधु. कोमिल्ल गावाच्या परिसरातील प्रदेश तो हाच होय ( चौधरी, पृ. १६९ ).

**उत्तर अपरान्त** ( देश )–उत्तर भारतातील एक देश ( मार्कं. ५४.३६; अपरांत पहा ).

**उत्तर उलूक** ( देश )—उत्तर भारतातील 'उत्तर कुलूत' देशाचे नामांतर ( उत्तर कुलूत पहा ).

**उत्तर ऋषिक** ( देश )—युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या उत्तर दिग्विजयात अर्जुनाने जिंकलेला हिमालयातील एक देश ( म. स. २४.२४–२६; ऋषिक पहा ).

**उत्तर काशी** ( तीर्थ )— उत्तराखंडातील यमुना नदी नजिकचे एक तीर्थ ( काशी पहा ).

**उत्तर कुरव** ( देश )—बृहत्संहितामते 'कुरु' ( उत्तर ) देशाचे नामांतर ( बृ. सं. १४.२४; कुरु २. पहा ). अन्य नामांतर–' उत्तर कुरव ' ( वा. रा. कि. ४३.३८ ).

**उत्तर कुरु** ( तीर्थ )— प्रयागक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ ( पद्म. आदि. ४२.२२. मत्स्य. १०५.२० ). प्रह्लादयात्रेत ( वामन. ८४.३२ ), लोमशयात्रेत ( म. आर. १४५. १५ ), तसेच तीर्थनामावलीत ( पद्म. सृ. १४.१६७ ) याचा निर्देश आढळतो. वामनमते येथे पद्मनाभ नामक वामनाचे वास्तव्य होते ( वामन. ९०.२२ ).

२ ( देवीस्थान ) पद्ममते एक देवीस्थान. येथे ओषधि देवीचे वास्तव्य होते ( पद्म. आदि १७.२१४; मत्स्य. १३. ५० ).

३. ( वर्ष ) पौराणिक साहित्यमते ' कुरु ' ( उत्तर ) देशाचे नामांतर ( विष्णु. २२. ३९; कुरु पहा ).

**उत्तर कुलूत** ( देश )— अर्जुनाने उत्तर दिग्विजयात जिंकलेला उत्तर भारतातील एक देश ( म. स. २४.१०; कुलूत पहा ). पाठभेद-' उत्तर उलूक. '

**उत्तर कोशल** (देश)— वाल्मीकि रामायणमते उत्तर भारतातील 'कोशल' (आधु. अयोध्या प्रांत) देशाचे नामांतर (वा. रा. उ. १०७.७; १७; ब्रह्माण्ड ३.६३.२००; कोशल पहा). नामांतर (पतंजलीचे व्याकरण महाभाष्य)– 'इक्ष्वाकु' (पतञ्जलि. ४.२.१०४); (महाभारत)– 'कांति कोशल' (म. भी. १०.३८).

**उत्तर कोशला** (तीर्थ)— कालिंदी नदीकाठचे एक तीर्थ (पद्म. उत्तर. २०८.४७)

२. (नगरी) मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते 'अयोध्या' नगरीचे नामांतर (कल्पद्रु. १०.१५; त्रिकाण्ड. ३१.१२; शाश्वत. ५२.२६; अयोध्या पहा).

**उत्तर गङ्गा** (नदी)—कश्मीरातील 'हरमुकुट गंगा' (आधु. गंगबल) नदीचे नामांतर (हरमुकुट. ४.५४; हरमुकुट गंगा पहा).

**उत्तर गोकर्ण** (तीर्थ)— दक्षिण भारतातील एक तीर्थ (वराह. २१३.७; गोकर्ण पहा).

**उत्तर जलधि** (समुद्र)— जंबूद्वीपाच्या उत्तरेकडील 'उत्तर समुद्रा'चे नामांतर (उत्तर समुद्र पहा).

**उत्तर जाह्नवी** (नदी)— कश्मीरातील एक नदी (हरमुकुट. १२.४९; जाह्नवी पहा). हे संभवतः वक्रीभूत 'वितस्ता' नदीचे नामांतर असावे.

**उत्तर तोसली** (देशविभाग)— शिलालेख साहित्यमते उड्र (आधु. ओरिसा) देशान्तर्गत एक देशविभाग. ओरिसामधील आधु. बलासार–कटक प्रदेश, तसेच पश्चिम बंगालमधील मिदनापुर जिल्हा तो हाच होय (एपि. इंडि. २९.८५). भौमकरवंशीय शुभाकर राजाच्या स. ६६० च्या नेउलपुर ताम्रपटमते स. ६४२ मध्ये येथे त्याच्या वंशाचे राज्य होते (एपि. इंडि. २९.२१४–२१५).

**उत्तर द्वारका** (देवी)—स्कंदमते महीसागरसंगम क्षेत्रातील एक नदी (स्कन्द. माहेश्वर. कौ. ५३.२६–३४; द्वारका पहा).

**उत्तर पर्वत** (पर्वत)— 'हिमवत्' पर्वताचे नामान्तर (वा. रा. बा. ६३.१३; १५; ७४.१; हिमवत् पहा).

**उत्तर पाञ्चाल** (देश)—गंगा खोऱ्यातील पांचाल देशाचा एक उपविभाग (म. आ. १२८.१७–१८; पांचाल पहा).

**उत्तर पारियात्र** (पर्वत)—हिमालय पर्वतातील अर्जुनाचे जन्मस्थान (म. आ. २९७; पारियात्र पहा).

**उत्तर भोज** (लोकसमूह)—भोज लोकांची उत्तर भारतातील वसाहत (म. स. १३.२४; भोज पहा).

**उत्तर मत्स्य** (देश)—उत्तर भारतातील एक देश (वा. रा. अयो. ७१.५; मत्स्य पहा).

**उत्तर मद्र** (देश)—ऐतरेय ब्राह्मणमते मद्र लोकांची वायव्य भारतातील एक वसाहत (ऐ. ब्रा. ८.१४; मद्र पहा).

**उत्तर मथुरा** (नगर)—बौद्ध घटजातकमते 'मथुरा' नगरीचे नामांतर (जा. ४; मथुरा पहा).

**उत्तर मानस** (सरोवर)—हिमालयातील सुविख्यात पवित्र सरोवर (म. अनु. २५–६०; मानस पहा).

२. (तीर्थ) गया येथील एक तीर्थ (वायु. ७७.१०८; मानस पहा).

३. (सरोवर) हिमालयातील 'मानस' सरोवराचे नामांतर (मत्स्य. १२१.६९; मानस पहा).

**उत्तर समुद्र** (समुद्र)—जंबूद्वीपाच्या उत्तरेकडील एक समुद्र. वायुमते हा मेरु पर्वत (आधु. पामीर पठार) आणि उत्तर कुरुवर्ष यांच्या उत्तरेस होता (वायु. ४२.७७; ४५.११). अली यांच्या मते आधु. आर्क्टिक समुद्र तो हाच होय (अली, पुराणाज् पृ. ७८). नामांतर–'उत्तरजलधि'.

भागवतमते कुरु देशातील भद्रसोमा (आधु. सिरदरिया) नदीची एक शाखानदी (आधु. इर्त्यश) या समुद्रास मिळत असे (भा. ५.१७.८).

२. (देश) कीर्तिपालदेवाच्या वि. सं. ११६७ च्या ताम्रपटमते त्याच्या आधिपत्याखालील उत्तर भारतातील एक देश. आधु. गोघ्रा आणि गंडकी नद्या व नेपाळ यांच्या दरम्यानचा प्रदेश तो हाच होय (एपि. इंडि. ७.९४–९५).

**उत्तर सरकार** (देश)—मध्ययुगीन शिलालेख साहित्यमते पूर्व समुद्रकिनाऱ्यानजिकचा एक देश. आधु. गंजम, विजगापट्टम, गोदावरी, कृष्णा आणि गुंटूर जिल्ह्यांचा समावेश त्यामध्ये होत असे. स. १७६६ मध्ये हैद्राबादच्या निजामाने हा प्रदेश इंग्रजांना तोडून दिला (सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३०४).

**उत्तर हरिवर्ष** (देश)—युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या दिग्विजयसत्रात अर्जुनाने जिंकलेला उत्तर भारतातील एक देश (म. स. २५.७).

**उत्तरकूल** (देशविभाग)—वनमलवर्मदेव राजाच्या इ. स. ९ व्या शतकातील ताम्रपटमते पूर्व भारतातील प्राग्ज्योतिष (आधु. आसाम) देशाचा एक उपविभाग. हपोसग्राम नामक ग्राम या देशात होते (एपि. इंडि. २९ १४७; १५१–१५२). ब्रह्मपुत्रा नदीच्या उत्तर किनाऱ्या-

वरील प्रदेश हाच होय. 'उत्तरकूल' चा शब्दशः अर्थ 'उत्तर किनारा' असा होतो. बलवर्मनाच्या शिलालेखमते ब्रह्मपुत्रा नदीच्या दक्षिण किनाऱ्याचा प्रदेश 'दक्षिणकूल' नावाने सुविख्यात होता (कामरूपशासनावली. पृ. ७२).

२. (विष्णुतीर्थ) एक विष्णुतीर्थ. येथील विष्णूचे नाव 'औषध्य' होते (पद्म. उ. १२९.३०).

**उत्तरकोटि** (तीर्थ)—मथुरा येथील एक तीर्थ (वराह. १६०.५२०).

**उत्तरगा** (नदी)—अयोध्या-केकय मार्गावरील एक नदी (वा. रा. अयोध्या. ७१.१४).

**उत्तरगिरि** (पर्वत)—शतपथ ब्राह्मण आणि कौषीतकि उपनिषद्‌मते 'हिमवत्' पर्वताचे नामांतर (श. ब्रा. १.१४. १.१४; कौ. उ. २.८; रघु. १५.१०३; हिमवत् पहा).

२. (पर्वत) मेरु पर्वतोद्भवा चतुर्गंगांपैकी उत्तरवाहिनी भद्रा नदीकाठचा एक पर्वत (कूर्म. पू. ४६.३३; विष्णु. २.३.३६).

**उत्तरज्योतिष** (देश)—युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या पश्चिम दिग्विजयात नकुलाने जिंकलेला एक देश (म. स. २९.१०).

**उत्तरतीर** (तीर्थ)—महाभारतान्तर्गत लोमशयात्रामते वैतरणी नदीच्या उत्तर तीरावरील एक तीर्थ (म. आर. ११४.५).

**उत्तरद्वीप** (द्वीप)—महाभारतमते शाकद्वीपाच्या उत्तरेकडील एक द्वीप (म. भी. ६.१३१; ब्रह्माण्ड. १५. १५).

**उत्तरनर्मद** (देश)—मार्कंडेयमते 'आंतरनर्मद' देशाचे नामांतर (मार्कं. ५४.५१; आंतरनर्मद पहा).

**उत्तरपथ** (मार्ग)—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते उत्तर भारतातील सुविख्यात व्यापारी आणि राजकीय हमरस्ता (पा. सू. ५.१.७७). हा रस्ता पूर्व भारतातील मगध- (आधु. बिहार) राजधानी राजगृह गावापासून वायव्य भारतातील गंधारराजधानी तक्षशिला गावापर्यंत पसरला असून, उत्तर भारतातील आधु. ग्रँड ट्रंक रोड तो हाच होय नामांतर (मेगॅस्थेनिस्)–'नॉर्दर्न रूट'; (मोंगल राज्यकालीन साहित्य)–'राह-इ-आजम' (महामार्ग).

कालांतराने उपरोक्त हमरस्त्याच्या उभय अंगांना पसरलेला उत्तर भारताचा प्रदेश (पाणिनीय व्याकरणातील उदीच्य आणि प्राच्य देश) 'उत्तरापथ' नावाने ओळखला जाऊ लागला (उत्तरापथ पहा). 'उत्तरपथ' हे पथनाम आणि 'उत्तरापथ' हे देशनाम यांमधील विभेद प्राचीन साहित्यात सर्वत्र कटाक्षाने पाळलेला दिसतो.

व्याप्ती—आधुनिक काळी हा मार्ग वाराणसी-सहसाम-गया मार्गे धनबादपर्यंत जातो. इ. स. १६ व्या- ११ व्या शतकापर्यंत हा मार्ग पूर्व भारतातील राजगृह, पाटलिपुत्र- गावांवरून ताम्रलिप्ती (आधु. तामलुक) बंदरापर्यंत जात असे. उत्तरकालात या तीनहि गावांचे महत्त्व कमी झाल्यामुळे आधुनिक काळी हा रस्ता धनबादनजिक संपतो.

अशोकाच्या राज्यकाली—मौर्य राज्यकाली पूर्व भारतातील प्रमुख बंदर ताम्रलिप्ती आणि मगधराजधानी पाटलिपुत्र (आधु. पटना) नगरांना वायव्य भारतातील उपराजधानी पुरुषपुरशी (आधु. पेशावर) जोडण्याचे महत्त्वपूर्ण कार्य हा मार्ग करीत असे. आर्यावर्तातील बहुतांशी साऱ्या प्रमुख गावांवरून जाणाऱ्या या मार्गाने उत्तर भारताच्या या टोकापासून त्या टोकापर्यंत (पेशावरपासून गंगा नदीच्या खोऱ्यापर्यंत) जाता येत असे. उत्तर भारतावर वायव्य दिशेने झालेली सारी परकीय आक्रमणेहि याच रस्त्याने झाली होती. या दृष्टीने मेगॅस्थेनिसच्या ग्रंथातील या मार्गाचे 'नॉर्दर्न रूट' नाव अन्वर्थक वाटते (इंडिका. २.९.७).

अशोक शिलालेखमते त्याने या मार्गावर यात्रिकांसाठी धर्मशाळा, विहिरी आणि छायासंपन्न वृक्ष आदि सुखसोयी केल्या असून, हरएक कोसावर अंतरसूचक फलक होते.

बौद्ध साहित्यात—राजगृह आणि तक्षशिला यांच्या दरम्यानच्या या राजरस्त्यावर (विनय. २६७; २८०), कोशल देशातील साकेत आणि श्रावस्ती ही महत्त्वपूर्ण नगरे असून, त्यामधील सहा योजनांचे (४८ मैल) अंतर सात वेळा रथ बदलून एका दिवसात तोडता येत असे (मज्झिम. पृ. ९६). या मार्गावर पांथस्थांना आणि बौद्ध भिक्षूंना लुटणारे अनेक दरोडेखोर असले (विनय. १२७), तरी तो सदैव मनुष्यवस्तीने गजबजलेला असे. दरोडेखोरांच्या बंदोबस्तासाठी त्यावर अनेक पहारेकरी गस्त घालीत असत (विनय. २६७).

बौद्ध सुत्तनिपातमते राजगृह आणि तक्षशिला यांना जोडणाऱ्या या हमरस्त्याप्रमाणेच श्रावस्ती आणि कौशांबी गावांना दक्षिण भारतातील प्रतिष्ठान (आधु. पैठण) नगरांशी जोडणारा अन्य एक राजमार्गहि अस्तित्वात होता. या राजमार्गांच्या सम्मीलनस्थानाहून वायव्येस आणि दक्षिणेस जाणारे हमरस्ते उत्तरकालात 'उत्तरापथ' आणि 'दक्षिणापथ' नावांनी सुविख्यात झाले.

पाणिनीच्या अष्टाध्यायीत—या ग्रंथमते हा रस्ता पाटलिपुत्र, वाराणसी, कौशांबी, शाकल, मथुरा, साकेत, तक्षशिला,

पुष्कलावती, कपिश या राजधानीच्या नगरांवरून बाह्लीक देशास जात असे या मार्गाने जाणारा माल आणि प्रवाशांना 'औत्तरपथिक' म्हणत (पा. सू. ५.१.७७).

अग्रवाल यांच्या मते पाणिनीच्या काळी 'उत्तरापथ' चा एक भाग वक्षु (आधु. अमूदरिया) नदीच्या खोऱ्यातून काश्यपीय समुद्राच्या (आधु. काळा समुद्र) मार्गे युरोपला जात असून, दुसरा भाग गंधारराजधानी पुष्कलावतीहून भारतास येत असे. वायव्य आणि उत्तर भारतातील सिंधु, शतुद्रि आणि यमुना नद्या, तसेच हस्तिनापुर, कान्यकुब्ज, प्रयाग, पाटलिपुत्र गावांवरून हा मार्ग अखेरीस पूर्व भारतातील ताम्रलिप्ती येथे संपत असे. याच मार्गाची एक शाखा तक्षशिला → पुष्कलावती → कपिश मार्गाने बाह्लीक देशात कंबोजमार्गे चीनहून येणाऱ्या कौशेय रस्त्यास मिळत असे. चीन आणि युरोप या पूर्व-पश्चिम देशांना जोडणाऱ्या या व्यापारी मार्गाने भारताचा चीन आणि युरोपमधील निर्यात व्यापार होत असे (अग्रवाल, पाणिनि. पृ. १४६, २३६).

अकबराच्या राज्यकाली--अकबर आणि शेरशहाच्या राज्यकाली गंधार, इंद्रप्रस्थ (दिल्ली) आणि पाटलिपुत्र यांना जोडणारा हा रस्ता 'राह–आजम' (महामार्ग) नावाने सुविख्यात होता.

**उत्तरराम** (बौद्धस्थान)—तक्षिला येथील ताम्रपळीलेखमते स्थविर संप्रदायाच्या काश्यपीय लोकांचे तक्षशिला येथील एक बौद्धस्थान. 'उत्तरराम' या संस्कृत स्थाननामाचे हे पालीभाषीय रूप असावे. येथील चतुर्दिश संप्रदायाच्या बौद्ध भिक्षूंना तांब्याच्या दोन पळ्या दान दिल्याचा निर्देश या लेखात आढळतो. आधु. सिरकप गावाच्या उत्तरेस हे असावे (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.८८).

**उत्तरवल्लि विषय** (राज्यविभाग)—शिलालेखसाहित्यमते दक्षिण कोशल देशान्तर्गत एक राज्यविभाग. सोनपुर प्रदेशातील आधु. उत्तरतीर प्रदेश हाच असावा (एपि. इंडि. १२.२४०).

**उत्तरवाहिनी गङ्गा** (नदी)—काशी माहात्म्यमते गंगा नदीचा एक उपविभाग (नारद. उत्तर. ४८.२९; ५१.६; ७; १०; स्कन्द. काशी. ८१; म. अनु. २५.१५). काशी येथील दशाश्वमेध घाटानजिकची गंगा बहुधा हीच असावी (गंगा पहा).

**उत्तरवेदि** (क्षेत्र)--'कुरुक्षेत्रा'चे नामांतर (वामन. २२.६०; कुरुक्षेत्र पहा).

**उत्तरशृङ्ग वर्ष** (देश)--पौराणिक साहित्यमते 'कुरु (उत्तर)' देशाचे नामांतर (लिङ्ग. ४७.५; ४९.९; कुरु २. पहा).

**उत्तरसेन** (स्तूप)--ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते गंधार (आधु. अफगाणिस्तान) देशातील एक बौद्ध स्तूप (बील, १.१२६–१२७; १३२–१३३). फौचर यांच्या मते स्वात खोऱ्यांतील चकदर्रा दरीपासून ९ मैल उत्तरेकडील आधु. चरिकोट स्तूप तो हाच असावा (चरिकोट पहा).

**उत्तरसोत्तम** (देश)--युधिष्ठिराच्या राजसूय दिग्विजयप्रसंगी पांडवांनी जिंकलेला पूर्व भारतातील एक देश (म. स. २७.३).

**उत्तराखण्ड** (देशविभाग)—हिमालय पर्वतान्तर्गत कैलास पर्वताच्या परिसरातील एक देशविभाग. उत्तर प्रदेशातील तिबेटच्या सरहद्दीवरील आधु. चामोली, उत्तर काशी आणि पिठोरगड हे तीन जिल्हे या देशविभागात समाविष्ट होतात. संरक्षणाच्या दृष्टीने हा प्रदेश महत्त्वाचा मानण्यात येतो (कैलास पहा).

**उत्तराज** (शिवस्थान)— पश्चिम भारतातील नर्मदा नदीकाठचे भडोचनजिकचे एक शिवस्थान. येथील उत्तरेश्वर शिवमंदिराचे स्थानी शशबिंदु राजाच्या कन्येने तपस्या केली होती (ती. पृ. ४३८).

**उत्तरादिमठ** (धर्ममठ)— माध्वसांप्रदायाचा एक धर्ममठ (ती. पृ. ५६४).

**उत्तरापथ** (देश)— बृहत्संहिता, तसेच राजशेखराच्या काव्यमीमांसामते भारतवर्षाचा एक प्रमुख देशविभाग (बृ. सं. ९.४१; १७.२२७). कुरुक्षेत्रातील पृथूदक (आधु. पेहोवा) गावाच्या उत्तरेकडील प्रदेशास तेथे 'उत्तरापथ' म्हटले आहे. उत्तरकालात या देशविभागाची व्याप्ती विस्तृत होऊन विंध्य पर्वताच्या उत्तरेकडील उत्तर भारताच्या साऱ्या प्रदेशाला हे नाव प्राप्त झाले. विंध्य पर्वताच्या दक्षिणेकडील भागाला 'दक्षिणापथ' म्हणत असत. नामांतर (प्राचीन संस्कृत साहित्य)–'उदीचीपथ'; (नासिक शिलालेख, आर्कि. सर्व्हे. वे. इं. ४.११४)–'ओतराह' (औतरापथ).

नामव्युत्पत्ती— 'उत्तरपथ संज्ञक पूर्व, उत्तर आणि वायव्य भारतातील व्यापारी हमरस्त्याच्या उभय अंगानजिकचा प्रदेश' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले असावे (उत्तरपथ पहा). अन्य काही अभ्यासकांच्या मते इ. स. पू. ५००– इ. स. ५०० च्या दरम्यान रूढ झालेल्या नर्मदा नदीच्या दक्षिणेकडील 'दक्षिणापथ' देशनामाच्या अनुकरणाने हे नाव रूढ झाले असावे

पौराणिक साहित्यात— महाभारतमते 'उत्तरापथ'

( उत्तर भारत ) देशातील योन ( यवन ), कांबोज, गांधार बर्बर हे लोक पापी ( पापकृत् ) आणि किरात ( स्वध्यक्ष, किरात ) असून ( म. शां. २००.३८-४० ), या देशातील पन्नास राजांची नामावली हरिवंशात आढळते ( ह. वं. १. ११.१४ ). बाणकृत हर्षचरितमते राज्यवर्धन राजा हूणांच्या संहारार्थ या देशास गेला होता ( हर्ष. पृ. २१० ).

प्राचीन शिलालेख साहित्यात--खारवेलाच्या हाथीगुंफा शिलालेखात ' उत्तर भारत ' अशा अर्थाने या देशाचा निर्देश असून ( ल्यूडर्स सूचि. क्र. १३४५ ), नासिक शिलालेखात यास ' ओतराह ' म्हटले आहे ( आर्कि. सर्व्हे. वे. इ. ४.११४). 'ओतरापथ'चे ते प्राकृतभाषीय रूपांतर असावे.

मध्ययुगीन शिलालेख साहित्यात--चालुक्य राजा पुलकेशिन् ( द्वितीय ) च्या शिलालेखमते त्याने ' उत्तरापथेश्वर ' हर्षवर्धनास पराभूत केले होते ( जे. बी. बी. आर. ए. एस्. १४.२६; इंडि. अँटि. ६.८७; ८.४६ ). इ. स. १० व्या शतकातील एका बौद्ध शिलालेखातहि या देशाचा निर्देश आढळतो ( इंडि. अँटि १७.३०७-३०९).

२. वात्स्यायन कामसूत्र टीका, तसेच बौद्ध विनय ग्रंथमते ' बाह्लीक ' देशाचे नामांतर ( का. सू. २.५; बाह्लीक पहा ).

३. घटजातकमते महाकंस राजाच्या आधिपत्याखालील कंस देशाचा एक उपविभाग ( कॉवेल, ४. पृ. ५०; ).

**उत्तराम** ( ग्राम )--धर्मपालदेवाच्या नालंदा ताम्रपटमते नगरभुक्ति देशविभागातील ( आधु. गया जिल्हा ) जंबूनदी राज्यविभागातील (वीथी) एक ग्राम (एपि. इंडि. २३.३१०-३२७ ). गया जिल्ह्यातील जेहनबाद परगण्यातील जमुवन जिल्ह्यातील कुर्थ पोलीस विभागातील आधु. उजवन गाव हेच असावे (बंगाल ग्रामसूचि. २७.१९८; पांडे, विहार. पृ. १३०).

**उत्तरार्क** ( देवता )--प्रभासक्षेत्रातील एक देवतास्थान ( स्कन्द. प्रभास. प्र. ३१३ ).

२. ( कुंड ) काशी येथील एक कुंड (स्कन्द. काशी. ४७).

**उत्तराश्मन्** ( ग्राम )--पाणिनीच्या गणपाटमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.३ ).

**उत्तरेश** ( तीर्थ )-- नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( नारद. उत्तर. ७७.२२ ).

**उत्तरेश्वर** ( लिंग )--प्रभासक्षेत्रातील एक शिवलिंग ( स्कन्द. प्रभास. प्र. ३०३ ).

२-३. (लिंग) अवंती येथील ८४ शिवलिंगांपैकी ४४ आणि ८४ क्रमांकाचे लिंगद्वय (स्कन्द. आवन्त्य. अ.२६.८;३१.७७).

**उत्तिर-लाट** ( देश )--चोल राजा राजेंद्र ( प्रथम ) च्या तिरुमलै टेकडी शिलालेखमते भारतवर्षातील एक देश. आधु. उत्तर गुजरात देशाचा निर्देश येथे अभिप्रेत असावा ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. १.९५; २.१३९; एपि. इंडि. ९.२२९ ). अन्य अभ्यासकांच्या मते बंगाल प्रांतातील राढ ( आधु. बरद्वान प्रदेश ) देशाचे हे वैकल्पिक नाव असावे ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ६५ ).

**उत्तेली** ( ग्राम )--विजयादित्य अम्म राजाच्या इ. स. १० व्या शतकातील कलुचुंबरस् शिलालेखमते दक्षिण भारतातील अत्तिलिंनाडु विषयातील एक ग्राम. मद्रास प्रांतातील गोदावरी जिल्ह्यातील तनुकु तालुक्यातील आधु. उत्तेली ग्राम हेच होय ( एपि. इंडि. ७.१७९ ).

**उत्थुका** ( राज्यविभाग )--भौमकार राजघराण्यातील त्रिभुवनमहादेवीच्या इ. स. ९ व्या शतकातील ताम्रपटमते ओरिसा देशातील दंडभुक्ति मंडलातील एक राज्यविभाग. मिदनापुर जिल्ह्यातील आधु. कोटै परगणा हाच होय ( एपि. इंडि. २९.२११; २१५ ).

**उत्पलपुर** ( नगर )--राजतरंगिणीमते कश्मीरच्या अजितापीड राजाच्या उत्पल नामक अमात्याने वसविलेले कश्मीरातील एक नगर. येथे ' उत्पलस्वामिन् ' नामक एक विष्णुमंदिर त्याने बांधले होते ( राज. ४.६९५ ). राजतरंगिणीच्या ' क्षेत्रपालपद्धति ' भाष्यग्रंथमते श्राठ ( प्राचीन-श्रीराष्ट्र ) परगण्यातील वितस्ता नदीच्या डाव्या किनाऱ्यावरील आधु. ताकपोर भैरवस्थान हेच होय. पीर पंत्साल पर्वताच्या शुपियाण घाटामधून येणाऱ्या मालाची वितस्ता नदीमधील ने-आण या गावाहून होत असे.

**अवशेष**--येथील विष्णुमंदिराच्या उत्खननात हे मंदिर उत्तरकालात नव्याने बांधल्याचे सिद्ध झाले. जोनराजाच्या ग्रंथातहि तसा निर्देश आढळतो ( जोनराज. १११; ३६९; ११४२; स्टाइन, राज. १.१८३; २.४७४ ).

**उत्पलाक्ष** (विष्णुतीर्थ)--पद्ममते एक विष्णुतीर्थ. येथील विष्णूचे नाव सहस्राक्ष होते ( पद्म. उत्तर. १२९.१५ ).

**उत्पलावत** ( तीर्थ )--महाभारत अंगिरसतीर्थयात्रा ( म. अनु २५.३४ ), तसेच धौम्ययात्रामते पूर्व भारतातील पांचाल देशातील एक तीर्थ ( म. आर. ८५.११ ). येथे विश्वामित्राने यज्ञ केला होता. पाठभेद-' उत्पलावन. ' डे यांच्या मते कानपूरपासून १४ मैलावरील आधु. ब्रह्मावर्त ( बिठूर ) ते हेच होय ( डे, पृ. २१३ ).

**उत्पलावतक** ( वन )--मार्कंडेयमते एक वन. येथे रहाणाऱ्या अद्रिपुत्र बलाक नामक राक्षसाने विशालपुत्र सुशर्मनूपत्नीचे हरण केले ( मार्कं. ६६.६९; ६७.१ ).

**उत्पलावती** ( नदी )--दक्षिण भारतातील एक नदी

( काव्यमी. १७.२२६ ); पौराणिक साहित्यमते ही मलय पर्वतातून उगम पावत असे ( कूर्म. पू. ४७.३७; ब्रह्माण्ड. १६. ३६; मत्स्य. ११४.३०; मार्क. ५४.२७; वराह. ८५.६; वायु. ४५.१०५; विष्णुधर्म. १.१०.४ ). महाभारतमते ही सह्य पर्वतोद्भवा होती ( म. भी. १०.३३ ).

२. शुक्तिमत् पर्वतोद्भवा एक नदी ( वामन. १३.३२ ).

३. ( तीर्थ ) पद्ममते एक ब्रह्मदेवस्थान. येथील ब्रह्मदेवाचे नाव नारद होते ( पद्म. आदि. २९.१४४ ).

**उत्पलावर्तक** ( देवीस्थान )—पद्ममते एक देवीस्थान. येथील देवीचे नाव लोला होते ( पद्म. सृ. १७.२०९; मत्स्य. १३.४५ ).

२. ( वन ) नारदमते एक पवित्र वन ( नारद. उत्तर. ६० २५; तीर्थविवेचन पृ. २४४ ).

**उत्पलिनी** ( नदी )—महाभारतान्तर्गत अर्जुनवनवासवर्णनमते पूर्व भारतातील नैमिषारण्यातील एक नदी ( म. आदि. २०७.६ ).

**उत्पातक** ( तीर्थ )—महाभारत अंगिरसयात्रामते एक तीर्थ ( म. अनु. २५.४१ ).

**उत्पातिक** ( देश )—युधिष्ठिराच्या राजसूय दिग्विजयप्रसंगी अर्जुनाने जिंकलेला उत्तर भारतातील एक देश ( म. स. २४.२७९* ).

**उत्पादक** ( तीर्थ )—नीलकंठ टीकामते साभ्रमती नदी काठच्या 'कपोतक' तीर्थाचे नामांतर ( कपोतक २. पहा ).

**उत्पुट** ( ग्राम )—पाणिनी या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.७५ ).

**उत्रास** ( ग्राम )—राजतरंगिणीमते काश्मीरातील कपटेश्वर परगण्यातील एक ग्राम ( राज. ७.१२५४ ). कुरहार परगण्यातील शांगस ( प्राचीन–शांमांगासा ) गावानजिकचे आधु. उतरस ( अक्षांश ७५°–२२ उत्तर; रेखांश ३३°४३° पूर्व ) गाव हेच होय ( स्टाइन, राज. २.४६८ ).

**उत्स** ( लोकसमूह )—महाभारतमते दक्षिणापथातील एक पापकृत् किरात लोकसमूह ( म शां. २००.३९ ).

**उत्सव सङ्केत** ( लोकसमूह )—युधिष्ठिराच्या राजसूय दिग्विजयसत्रात अर्जुनाने जिंकलेला उत्तर भारतातील एक लोकसमूह. या लोकांच्या सात गणांवर अर्जुनाने विजय प्राप्त केला होता ( म. स. २४.१५ ). नामांतर ( बृहत्संहिता )- 'संख्यात' ( बृ. सं. १४.२–४ ).

२. युधिष्ठिराच्या राजसूय दिग्विजयसत्रात नकुलाने जिंकलेला पश्चिम भारतातील एक लोकसमूह ( म. स. २९.८ ).

३. दक्षिण भारतातील एक जनपद ( म. भी. १०.५९; पद्म. आदि. ६.५६ )

**उत्स्थल** ( द्वीप )—बृहत्कथामते एक बृहद्भारतीय द्वीप. भारताच्या पूर्व समुद्रानजिक बंगालच्या उपसागरामध्ये हे असावे. शक्तिदेव नामक ब्राह्मण समुद्रतटवर्ती अंग (आधु. पूर्व बंगाल ) देशाच्या विटकपुर नामक राजधानीहून नौकामार्गाने या द्वीपास गेला होता (फडके, नवभारत लेख. २२.६.२५).

**उथण्ड** ( नगर )—वायव्य भारतातील 'उद्भांडपुर' नगराचे नामांतर ( उद्भांडपुर पहा ).

**उदक** ( देश )—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते एक देश ( वैजयन्ती. ३५.१६ ).

**उदकधार** ( देश )—वामनमते उदीच्य भारतातील एक देश ( वामन. १३.३९ ).

**उदकपथ** ( ब्रह्मदेवस्थान )—पद्ममते एक ब्रह्मदेवस्थान. येथील ब्रह्मदेवाचे नाव उमापति होते (पद्म. आदि. २९.१५४).

**उदखण्ड** ( नगर )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते वायव्य भारतातील 'उद्भांडपुर' नगराचे नामांतर ( वॉटर्स, १.११४; उद्भांडपुर पहा ).

**उदञ्चन** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.१ ).

**उदन्तपुरी** ( बौद्ध विद्यापीठस्थान )—बिहारमधील सुविख्यात बौद्ध विद्यापीठ ( महाविहार ) स्थान. तिबेटी आणि नेपाळी बौद्ध साहित्यातील 'ओदंतपुरी महाविहार' (इ. स. ९ वे १२ वे शतक) तो हाच होय. पाटना गावाच्या ४० मैल ईशान्येकडील आणि नालंदापासून ८ मैलांवरील आधु. बिहार-शरीफ ( शब्दशः अर्थ-महाविहार ) गावानजिकच्या टेकडीवर हे होते. नालंदा येथील बौद्ध विद्यापीठाच्या अस्तानंतर हे उदयास आले. आधुनिककाळी या विद्यापीठाच्या अवशेषसमूहावर एक मोठा दर्गा आढळतो.

नामांतर—प्राचीन आणि मध्ययुगीन साहित्यात या स्थानाची निम्नलिखित नामांतरे आढळतात. 'उडंडपुरी महाविहार' या पालीभाषीय नावाची ती रूपांतरे आहेतः—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. तिबेटी साहित्य | ओदंतपुरी |
| २. बौद्ध पाली साहित्य | उडंडपुरी |
| ३. संस्कृत साहित्य | दंडपुर, उद्दंडपुर |
| ४. नयपाल आणि शूरपाल मूर्तिलेख | उडंडपुर |
| ५. घोषवर बौद्ध शिलालेख | यशोवर्मपुर |
| ६. बख्त्यार खिलजीकालीन मुसलमानी साहित्य ( १२ वे शतक ) | बिहार शरीफ |

**नामव्युत्पत्ती**—बेग्लर यांच्या मते ' दंडी नामक तापसांचे निवासस्थान ' अशा अर्थाने या स्थानास ' दंडपुर ' नाव प्राप्त झाले ( अर्कि. सव्हें. ८.२५ ). परंतु दंडी हा हिंदु तापसी संप्रदाय असल्याने हा तर्क असंभव वाटतो.

गुप्तकालीन नगर—येथील गुप्त सम्राट कुमारगुप्त आणि स्कंदगुप्तांच्या स्तंभांवरून गुप्तकाली हे महत्त्वाचे नगर असावे.

यशोवर्मन्‌ची राजधानी—कनोजच्या यशोवर्मन् मौखरि राजाने ( इ. स. ८ वे शतक ) बिहार देशावरील दिग्विजय-समयी या नगरांचे ' यशोवर्मपुर ' असे नवे नामकरण केले ( घोषवर बौद्ध शिलालेख, अर्कि. सव्हें. ३.३८–३९ ). परंतु यशोवर्म्याची सत्ता संपुष्टात येताच हे पुन्हा एकवार ' उदंतपुरी ' ( उडंडपुरी ) नावाने प्रसिद्ध झाले.

बौद्ध महाविहार—पाल राजांची ( इ. स. ८ वे– १२ वे शतक ) प्रारंभीची राजधानी या गावी असून ( अर्कि. सव्हें. ८.७५ ), नयपाल ( स. १०३२–१०३६ ) आणि शूरपाल ( इ. स. १०८२–१०८४ ) राजांच्या शिलालेख-मते त्याकाळी हे ' उडंडपुर ' नावाने प्रसिद्ध होते ( इंडि. अँटि. स. १९१८, पृ. ११०, जे. ए. एस्. बी. ४ ). चिनी प्रवाशांच्या प्रवासवर्णनातील या महाविहारासंबंधीच्या मौना-वरून उत्तरकालीन पाल राजांच्या आश्रयाखाली ( इ. स. ९ वे शतक ) तो भरभराटीस आला असावा. नालंदा आणि विक्रमशिला विद्यापीठात प्रवेश नाकारलेले छात्र येथे विद्यार्जना-साठी येत असत. नालंदा विद्यापीठाच्या विनाशानंतर यास नवी प्रतिष्ठा प्राप्त झाली.

**विद्यापीठ**—बौद्ध साहित्यमते या विस्तीर्ण तटबंदीयुक्त विद्यापीठात दुर्मिळ हस्तलिखितांचे ग्रंथालय असून, भारतीय धर्म, विद्या आणि विज्ञान यांचे शिक्षण येथे दिले जात असे.

**विनाश**—इ. स. १२ व्या शतकात मुहम्मद बिन बख्त्यार खिलजीने काशी आणि मगध देशांच्या आक्रमण-समयी या विद्यापीठाचा आणि ग्रंथसंग्रहांचा नाश करून या स्थानाचे ' बिहार शरीफ ' असे नवे नामकरण केले. या विनाशसत्रानंतर येथील आचार्य नेपाळ, तिबेट, चीन आणि दक्षिण भारतात पांगल्याचे उत्तरकालीन बौद्ध ग्रंथांवरून दिसते.

**उदपान** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारत-वर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.११० ).

२. ( तीर्थ ) सरस्वती नदीकाठचे एक तीर्थ ( म. श. ३४.८०–८१ ).

३. सरस्वती नदीकाठचे अन्य एक तीर्थ ( म. श. ३५.१; ५ ). पुलस्त्ययात्रेतील ' उदपान ' तीर्थद्वयाच्या निर्देशावरून ( म. आर. ८२.९४; १०८ ), महाभारतकाली या नावाची दोन तीर्थे असावीत. प्रह्लादयात्रेत ( वामन. ८३.६ ), तसेच पद्म पुराणातील तीर्थनामावलीत, याचा निर्देश आढळतो ( पद्म. आदि. ३८.२७; ४२ ).

महाभारतमते येथील अदृश्य सरस्वती नदीचे अस्तित्व येथील ताज्या औषधी व स्निग्ध भूमीमुळे जाणवत असे.

**उदयगिरि** ( टेकडी व गुफासमूह )—कलिंगराज खारवेलकालीन ( इ. स. पू. १५५ ) ओरिसामधील सुविख्यात जैन गुफासमूह. स्थापत्य, शिल्प आणि रचनावैचित्र्य या तीनहि दृष्टींनी महत्त्वपूर्ण अशा या गुफा भारतातील प्राचीनतम गुफांपैकी एक, तसेच उपलब्ध जैनधर्मीय गुफांमध्ये प्राचीनतम आहेत. त्यापैकी ' हाथी-गुंफे 'तील खारवेलाचा शिलालेख अशोक शिलालेखाप्रमाणेच भारतातील महत्तम प्राचीन शिलालेख मानला जातो. नामांतर ( हाथीगुंफा शिलालेख ) ' कुमारी टेकडी ' ( एपि. इंडि. २०.८० ); ( जैन साहित्य )–' कुमारीगिरि '.

ओरिसामधील भुवनेश्वर गावापासून ६ मैल वायव्येकडील हे स्थान भुवनेश्वर–चंदक रस्त्याच्या पूर्व बाजूस असून, खंडगिरि हा उत्तरकालीन जैन गुफासमूह या रस्त्याच्या पश्चिमेस आहे. समोरासमोर या या दोन टेकड्यांच्या नावां-वरूनच हे गुफासमूह ' उदयगिरि–खंडगिरि ' संयुक्त नावाने ओळखले जातात ( खंडगिरि पहा ). वर्धमान महावीराच्या पदस्पर्शाने पुनीत झालेले हे पर्वतद्वय जैनांचे ' अतिशयक्षेत्र ' म्हणून सुविख्यात आहे

ऐतिहासिक पार्श्वभूमी— खारवेलराजधानी भुवनेश्वर-नजिक ही टेकडी असल्याने या गुफासमूहातील स्याच्या गुफा कलिंगराज खारवेल ( हाथीगुंफा ), त्याची राणी ( छोटी हाथीगुंफा ), त्याचा पिता वक्रदेव आणि त्याचा उत्तरवर्ती राजा वधुक यांनी कोरलेल्या आहेत.

**प्राचीन साहित्यात**—बौधायन धर्मसूत्रमते आर्यावर्ताची पूर्वसीमा ( पूर्व मर्यादा ) या पर्वताने बनत असे ( बौ. ध. १.१.२.१३ ). मार्कंडेयमते कूर्मचक्रात्मक भारताच्या मुखामध्ये ( पूर्वेस ) हा पर्वत असून ( मार्कं. ५५.१३ ), पूर्वेकडील पर्वत म्हणून वाल्मीकि रामायणातहि याचा निर्देश आढळतो ( वा. रा. कि. ४०.५४–६९ ). या पर्वताच्या परिसरातील प्रदेश ' उदयगिरि देश ' नावाने सुविख्यात होता ( बृ. सं. १४.७; २८.३ ). पूर्व भारतातील एक क्षुद्र पर्वत ( उपपर्वत ) म्हणून निर्देशिलेला पौराणिक उदयगिरि पर्वतहि हाच असावा ( उदयगिरि २. पहा ).

**जैनतीर्थ**—जैन साहित्यमते या ' अतिशयक्षेत्र ' स्थानी कलिंगनिवासी ५०० जैन मुनींना मुक्ती प्राप्त झाली होती.

## उदयगिरि येथील गुफा

| गुफा क्र. | गुफा | नामांतर | गुफावैशिष्ट्य | शिलालेखकर्ता | शिलालेख | संभाव्य काल |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | राणी हंसपुरी | राणी-का-नौर, राजराणी | गृहसदृश प्रवेशद्वार | -- | -- | इ. स. पू. २ रे शतक |
| ४ | छोटा हाथी | अल्कापुरी | -- | क्षुद्रकर्मन्, कर्मन् आणि हरखिना | कोठा आणि 'जेय' खोदल्याचा निर्देश | -- |
| ५ | अलकापुरी | स्वर्गपुरी | — | खारवेलाची पट्टराणी, लाल्क राजाची कन्या | कलिंगदेशीय श्रमणांच्या निवासासाठी गुफा | -- |
| ६ | जयविजय | जोदेव-गर्भगुफा | -- | — | -- | इ. स. पू. २ रे शतक |
| ९ | पातालपुरी | मंचपुरी | — | — | -- | — |
| १० | मंचपुरी | पातालपुरी | गृहसदृश प्रवेशद्वार | कलिंगराज वक्रदेव, राजपुत्र वडुरव | गुफा | -- |
| ११ | गणेश | -- | -- | -- | -- | इ. स. पू. २ रे शतक |
| १३ | हाथी | -- | गृहसदृश प्रवेशद्वार | कलिंगराज खारवेल | पराक्रमांची नामावली, कुमारीगिरि टेकडीवरील जैन अर्हतांच्या वसतीनजिक जयस्तंभ | इ. स. पू. १५५ |
| १४ | सर्प | — | सर्पाकृती प्रवेशद्वार | क्षुद्रकर्मन् | गुफा | -- |
| १५ | व्याघ्र | — | व्याघ्राकृती प्रवेशद्वार | भूति नामक न्यायाधीश | गुफा ( लेणे ) | इ. स. पू. १ ले शतक |
| १६ | जंबेश्वर | — | — | महामदपत्नी नागी | गुफा | — |
| १७ | हरिदास | पवनगुफा | — | क्षुद्रकर्मन् | कोठा आणि 'जेय' खोदल्याचा निर्देश | — |

उदयगिरि येथील अन्य गुफा पुढीलप्रमाणे होतः—२–३. व्रजदारगुफा; ७. ठाकुराणीगुफा; ८. पनसगुफा; १२. धानघरगुफा; १८. जगन्नाथगुफा (ल्यूडर्स सूची. क्र. १३४२–१३५२).

कालनिर्णय—या गुफासमूहातील हाथीगुंफा या प्राचीनतम गुफेच्या प्रवेशद्वारावर कलिंगराज खारवेलाचा इ. स. पू. १५५ चा शिलालेख आढळतो. डॉ. भगवानलाल इंद्रजी यांच्या मते ( स. १८८४ ) अशोकाच्या धौलि आणि जौगड शिलालेखांसदृश लिपीमध्ये लिहिलेला हा शिलालेख त्या दोन शिलालेखांशी समकालीन आहे ( एपि. इंडि. २.८८–८९). येथील अन्य गुफा सांची तोरणांच्या आणि भाजे येथील छोट्या विहारांच्या ( इ. स. पू. २ रे शतक ) कालातील आहेत.

जैनधर्मीय गुफा—हाथीगुंफा आणि स्वर्गपुरी ( वैकुंठ ) येथील गुफालेखात जैन पद्धतीचे देवतावंदन, गजलक्ष्मी, सर्प, वृक्ष, स्वस्तिक आदि जैनधर्मीय चिह्ने, तसेच जैन तीर्थंकरांच्या आणि त्यांच्या अनुचरांच्या प्रतिमा आढळतात. ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमतेहि इ. स. ७ व्या शतकात कलिंग देश हा जैन धर्माचा बालेकिल्ला होता ( बील, २.२०८ ).

शिल्पशैली—सांची येथील सातवाहन तोरणांशी समकालीन अशा या गुफांच्या कमानीवर आणि सज्जांवर सातवाहनशैलीची विस्कळित आकृतिबंधयुक्त शिल्पचित्रे आढळतात. अज्ञात जैन आचार्यांची जीवनचरित्रे, तसेच घरगुती, शिकारी आणि युद्धजीवनातील प्रसंग त्यांमध्ये असून, त्यांमधील मनुष्याकृती सांची शिल्पांच्या तुलनेने विशाल आणि जोमदार आहेत.

स्थापत्यशैली—बराबर टेकड्यांमधील समकालीन अशोक गुफांहून वेगळ्या स्थापत्यशैलीच्या या गुफांपैकी काहींचा दर्शनी भाग राहत्या घरांसदृश ( उदा. हाथीगुंफा, मंचपुरीगुफा, राणी–का–नौरगुफा ), तर अन्य काहींचा वाघ, नाग, बेडूक यांच्या मुखांसदृश आहे ( उदा. व्याघ्रगुफा, सर्पगुफा ). या रचनावैचित्र्यामुळे, तसेच त्यांमधील शिलालेखांमुळे भारतातील महत्त्वपूर्ण गुफासमूहांमध्ये त्यांची गणना होते ( परिपत्रक पहा ).

गुफा—उदयगिरि गुफासमूहातील विशेष उल्लेखनीय गुफा पुढीलप्रमाणे होतः—

( १ ) हाथीगुंफा—पातालपुरी गुफेच्या वरच्या अंगाकडील ही निसर्गनिर्मित गुफा उदयगिरि गुफासमूहातील प्राचीनतम गुफा असून, तिच्या शिरोभागी खारवेल राजाचा शिलालेख आहे. ठिसूळ आणि कमकुवत दगडामुळे ही आज बहुंशी उद्ध्वस्त झाली आहे.

( २ ) सर्पगुफा—हाथीगुंफेनजिकच्या या समकालीन छोट्या गुफेच्या प्रवेशद्वाराच्या दर्शनी भागी त्रिफणायुक्त नागाचे विशाल शिल्प असून त्यामधील शिलालेखमते चूलकम ( क्षुद्रकर्मन् ) ने ही गुफा खोदली आहे.

( ३ ) हरिदासगुफा—हाथीगुंफेच्या पश्चिमेकडील या क्षुद्रकर्मननिर्मित गुफेमध्ये बाह्यमंडप आणि आयताकृती गाभारा आढळतो. नामांतर ( किट्टो )–' पवनगुफा '.

( ४ ) गणेशगुफा—हाथीगुंफेखालोखाल महत्त्वपूर्ण अशा या दोन खोल्यांच्या ( प्रत्येकी ३०′ × १०′ ) छोट्या गुफेच्या बाहेरच्या अंगास पंचस्तंभयुक्त बाह्यमंडप आहे. वरच्या व खालच्या अंगास चौकोनी आणि मध्यभागी अष्टकोनी अशा या स्तंभांच्या शिरोभागी, तसेच आतील दोन खोल्यांच्या प्रवेशद्वारांनजिक भर्हुत शिल्पातील काष्ठमय बौद्ध चैत्यमंदिरासदृश अश्वनालाकृती कमानी आहेत. या कमानींच्या दरम्यान विभिन्न शिल्पचित्रे असून त्यापैकी त्रिशिखरयुक्त निवासस्थानाचे शिल्प उल्लेखनीय आहे.

या गुफेच्या अंतर्भागात जगन्नाथ देवतेचा उत्तरकालीन शिलालेख आणि त्यानजिकच एक गणेशप्रतिमा आहे.

शिल्पचित्रे—या, तसेच नजिकच्या राणी हंसपुरीगुफेतील अज्ञात जैन कथाभागांवर आधारित भर्हुत शिल्पपरंपरेतील शिल्पचित्रे ग्रीक धर्तीची, परंतु त्यामधील स्त्रीपुरुषांचे पोषाख मात्र भारतीय धर्तीचे आहेत. भर्हुतच्या तुलनेने ही शिल्पे अधिक सुबक परंतु अधिक ग्रीक वळणाची आहेत. फर्ग्युसन यांच्या मते ही शिल्पे भर्हुत येथील अभिजात भारतीय शिल्पपरंपरेतील अंतिम आणि म्हणून त्या परंपरेपासून सर्वाधिक दुरावलेली चित्रे आहेत.

या गुफेतील जैन धार्मिक साहित्यातील अज्ञात कथाभागावर आधारित चित्रमालिकांपैकी एकामध्ये झाडाखाली बसलेल्या जोडप्यापैकी पत्नीला एक पुरुष पळवून नेत असल्याचा कथाभाग चितारला असून नजिकच्या राणीगुफेमध्ये हाच प्रसंग पुनरावृत्त आढळतो. अन्य एका शिल्पात पंधरा स्त्री-पुरुष व्यक्ती आणि दोन हत्ती यांचा कथाभाग आढळतो.

( ५ ) राणी हंसपुरीगुफा—गणेशगुफेइतकीच सुविख्यात अशी ही दोन मजली गुफा स्थानिक समजुतीनुसार भुवनेश्वरच्या ललाटेंद्र केसरी राजाच्या ( इ. स. ७ वे शतक ) राणीने खोदली. फर्ग्युसन यांच्या मते ती यापेक्षा पूर्वकालीन म्हणजे गणेशगुफेशी समकालीन ( इ. स. पू. २ रे शतक ) असावी. तिचे बाह्यमंडप आज नष्ट झाले आहेत.

या गुफेच्या खालच्या आणि वरच्या मजल्यांच्या ( लांबी ४३′ आणि ६३′ ) पाठीमागे तीन आणि चार खोल्या असून त्यांच्या आतील बाजूस झुकलेल्या प्रवेशद्वारस्तंभांवरून ही गुफा खिस्तशतकापूर्वीची असावी. या गुफेच्या बाह्यमंडपातील स्तंभ आणि शिल्पचित्रे आज उद्ध्वस्त झाली आहेत. गुफेच्या

दोन्ही अंगास जैन श्रमणांच्या निवासार्थ ओवऱ्या ( लांबी ४०′, ३०′ ) आणि छोट्या खोल्या खोदल्या आहेत.

**शिल्पचित्रे**— भर्हुत शिल्पासदृश अभिजात भारतीय शैलीची शिकार, लढाया, नृत्य, मद्यपान आणि स्त्री-पुरुष-प्रणय आदि कथाभागांवर आधारित अनेक शिल्पे प्रस्तुत गुफेत आढळतात. जैन श्रमणानिवासास साजेशा धार्मिकतेचा त्यामध्ये अभाव असला, तरी तत्कालीन प्रमत्त लोकजीवनाचे प्रतिबिंब त्यामध्ये दिसते.

येथील एका शिल्पात सिंहारूढ स्त्रीच्या पाठीमागे उभ्या असणाऱ्या रोमन पेहरावातील सैनिक आणि विदेशी चेहरेपट्टीची स्त्री यांच्या प्रतिमा आढळतात. भर्हुत येथील बौद्ध-स्तूपपूजक विदेशी व्यक्तींच्या शिल्पांशी त्याचे साम्य दिसते.

**( ६ ) जयविजयगुफा**—उपरोक्त दोन गुफांशी समकालीन अशा या गुफेच्या दर्शनी भागी स्त्री-पुरुष द्वारपालांची शिल्पे असून बाह्यमंडपाच्या अंतर्भागांतील छोट्या खोल्यांच्या दर्शनी भागी भक्तपूजित वेदिकावेष्टित पवित्र वृक्षाचे शिल्प आढळते.

**( ७ ) व्याघ्रगुफा**—या सफाईदार छोट्या ($7\frac{3}{4}' \times 6\frac{1}{4}'$) गुफेच्या दर्शनी भागी जबडा पसरलेले अक्राळविक्राळ व्याघ्रमुख आहे. आतील बाजूस झुकलेल्या या गुफेच्या प्रवेशद्वारस्तंभांच्या शिरोभूषणांवर पंखयुक्त हत्ती, तसेच व्यासपीठावर पुष्पपात्रे कोरली आहेत. ख्रिस्तशतकापूर्वीचे काही शिलालेखहि येथे आहेत.

**( ८ ) अलकापुरीगुफा**—या दोन मजली गुफेचा निर्देश राजेंद्रलाल मित्रांच्या ग्रंथात ' स्वर्गपुरी ' या चुकीच्या नावाने आढळतो.

**( ९ ) छोटा हाथीगुंफा**—राजेंद्रलाल मित्रांच्या ग्रंथात या गुफेचा नामोल्लेख ' अलकापुरी ' या चुकीच्या नावाने आढळतो ( फर्ग्युसन, २.९–१७ ).

**२. ( गुफासमूह ) गुप्त शिल्पशैलीचा ( इ. स. ५ वे शतक )** प्रारंभिक आविष्कार घडविणारा माळव्यातील भिलसानजिकचा सुविख्यात हिंदु आणि जैन गुफासमूह. येथे एकूण वीस गुफा असून त्यापैकी अठरा हिंदु आणि दोन जैनधर्मीय आहेत. यापैकी एका गुफेत गुप्तसम्राट चंद्रगुप्त ( द्वितीय ) चा स. ४०१ चा शिलालेख असून फ्लीट यांच्या मते चंद्रगुप्त ( द्वितीय ) विरचित या सर्वाधिक प्राचीन गुफा होत ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.३५ ). परंतु चंद्रगुप्ताच्या याहूनहि पूर्वकालीन गुफा रेवा राज्यातील बंधोगढ येथे आता उपलब्ध झाल्या आहेत. ( एपि. इंडि. ३१.१७३; बंधोगढ पहा ).

मध्य प्रदेशातील ईसागढ जिल्ह्यातील भिलसा गावाच्या २ मैल वायव्येकडील उदयगिरि गावानजिकच्या उदयगिरि टेकडीमध्ये हा गुफासमूह आढळतो.

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**—गुप्त सम्राट चंद्रगुप्त ( द्वितीय ) ने इ. स. ५ व्या शतकाच्या प्रारंभी उज्जयिनी येथील ग्रीक महाक्षत्रपावर विजय प्राप्त करून तत्स्मृत्यर्थ भरविलेल्या विजयदरबारात गुप्त शिल्पशैलीचा शुभारंभ झाला. या शैलीचा सर्वप्रथम आविष्कार उज्जयिनीनजिकच्या उदयगिरि टेकडीवरील गुफांमध्ये दिसतो. मुखलिंग ( शिव ), स्कंद, गणेश, दुर्गा, विष्णु, नारायण आदि गुप्त आराध्यदैवते येथे ओबड-धोबड, परंतु जोमदार शैलीने कोरली असून, एका नव्या शिल्पशैलीचा प्रारंभीचा उद्रेक म्हणून ती महत्त्वाची मानली जातात.

**गुफा**—या गुफासमूहातील उल्लेखनीय गुफा पुढीलप्रमाणे होत :—

**( १ ) चंद्रगुप्तगुफा**—उदयगिरि गावाच्या दक्षिणेकडील आणि टेकडीच्या पूर्वेकडील या वैष्णवपंथीय गुफेच्या दर्शनी भागी चंद्रगुप्त ( द्वितीय ) राजाचा स. ४०१ चा गुफालेख असून, गुफेच्या माथ्यावरील तव्याच्या आकाराच्या सपाट दगडामुळे तिला ' तवागुफा ' असेहि म्हणतात ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.३५ ).

चंद्रगुप्ताच्या शिलालेखाच्या ( $2\frac{1}{2}' \times 1\frac{1}{2}'$ ) खालच्या अंगास विष्णु आणि द्वादशभुजा लक्ष्मीच्या प्रतिमा असून, मनकानीक नामक चंद्रगुप्ताच्या मांडलिक राजाने ही गुफा खोदल्याचा निर्देश तेथे आढळतो.

**( २ ) शिवमंदिर गुफा**—चंद्रगुप्तगुफेच्या अंतर्भागातील चंद्रगुप्त ( द्वितीय ) राजाच्या अन्य एका शिलालेखात उदयगिरि येथील मुख्य शिवमंदिरगुफा चंद्रगुप्ताच्या वीरसेन नामक अमात्याने खोदल्याचा आणि चंद्रगुप्ताने त्या गुफेस भेट दिल्याचा निर्देश आढळतो ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.३५ ).

**( ३ ) अमृतगुफा**—उदयगिरि टेकडीवरील गुफा क्र. ९ म्हणजे ही गुफा होय.

**( ४ ) जैनगुफा**—अमृतगुफेपासून ३००′ अंतरावरील उदयगिरि टेकडीच्या वायव्य टोकानजिकच्या या गुफेच्या पूर्व प्रवेशद्वारावरील गुप्त सम्राट कुमारगुप्ताच्या स. ४२५ च्या शिलालेखात त्याने येथे पार्श्वनाथप्रतिमा स्थापिल्याचा निर्देश आढळतो. या शिलालेखामुळेच ही गुफा ' जैनगुफा ' नावाने ओळखली जाते ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.२५८ ).

**( ५ ) वराहगुफा**—या गुफेमध्ये वराहावतारी विष्णु स्वनासिकेवर पृथ्वी पेलून धरीत असल्याचे दृश्य देवगण अनिमिष

नेत्रांनी पहात असल्याचे शिल्प आढळते. गुप्त शिल्पशैलीचा अद्वितीय आविष्कार म्हणून ते प्रसिद्ध आहे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.२२ ).

३. ( पर्वत ) पौराणिक साहित्यमते पूर्व भारतातील एक क्षुद्रपर्वत ( उपपर्वत ). ओरिसामधील आधु. उदयगिरि टेकडी ती हीच असावी ( उदयगिरि १. पहा ). अन्य अभ्यासकांच्या मते उदयगिरि आणि अस्तगिरि हे कल्पनारम्य पर्वतद्वय सूर्योदय आणि सूर्यास्ताशी संबंधित दिक्पर्वत असावेत. नामांतरे ( मध्ययुगीन शब्दकोश साहित्य ) —१. उदय ( अनेकार्थ सं. ८८.५१२; मेदिनी. ११८.-७५; शारदीय. ९१४; मंख. ४७.६५१; वैजयन्ती ४१.११ ). २. उदयाद्रि ( शारदीय. २१८ ); ३. दिनमूर्धन् ( त्रिकाण्ड. ३५.३ ); ४. पूर्वाद्रि ( अभिधान. १४०.१०२७; त्रिकाण्ड. ३५.५ ).

४. ( दुर्ग व राज्यविभाग ) पल्लव राजा नृसिंहवर्मन् रेयरूच्या शके ७११ च्या ताम्रपटमते मद्रास राज्यातील नेलोर प्रदेशातील एक देशविभाग. पल्लव राज्यकाली नेलोर जिल्ह्यातील आधु. उदयगिरि तालुक्याचा मर्यादित प्रदेश म्हणजे हा देश असला ( एपि. इंडि. २९.९४ ), तरी विजयनगर राज्यकाली आधु. नेलोर आणि कुडाप्पा जिल्ह्यांचा सारा प्रदेश यामध्ये समाविष्ट होत असे ( इंडि. अँटि. स. १९१४, पृ. ७ ). उदयगिरिदुर्ग येथे याची राजधानी होती. नामांतर— ' पाकविषय '; ' मुलिकि देश '.

**उपविभाग**— विजयनगरच्या हरिहर ( द्वितीय ) राजाच्या शके १३२४ च्या शिलालेखमते ऐरवनाडु उपविभाग यामध्ये समाविष्ट होता ( एपि. इंडि. २९.१६३ ). नृसिंहवर्मन्‌च्या शिलालेखमते नंदकुरु ( आधु. नंदवरम् ) ग्राम या देशातच होते.

**शिलालेख साहित्यात**—स. १२४५ मध्ये तेलगु चोड राजा तिक्क ( प्रथम ) च्या ताब्यात हा दुर्ग होता ( रंगाचारी, २. नेलोर. ७४० ). स. १३२३ मध्ये हा दुर्ग काकतीय राजांच्या ताब्यात असून, तदनतर काही काळ रेड्डी राजांच्या आणि नंतर तो विजयनगर साम्राज्याच्या ताब्यात गेला. स. १३५२ मध्ये विजयनगरचा राजकुमार सावण हा येथे राजप्रतिनिधी होता ( रंगाचारी, १. कुडाप्पा. ६०४ ).

इ. स. १६ व्या शतकाच्या प्रारंभी ओरिसा देशाच्या प्रतापरुद्र राजाच्या ताब्यात हा दुर्ग होता ( मद्रास. एपि. रिपोर्ट. स. १९२१ ). विजयनगरच्या कृष्णदेवरायाच्या स. १५१४ च्या अमरावती शिलालेखमते कृष्णा नदीच्या दक्षिणेकडील प्रतापरुद्राच्या अन्य किल्ल्यांसमवेत हा किल्लाहि त्याने जिंकून घेतला ( एपि. इडि. ७.१९ ). या युद्धाचे सविस्तर वर्णन उदयगिरि किल्ल्यातील कृष्णदेवरायाच्या एका शिलालेखात आढळते ( रंगाचारी, २. नेलोर. ७९१ ). या दुर्गातील कृष्णप्रतिमा कृष्णदेवरायाने विजयनगरास नेऊन तेथे तिची समारंभपूर्वक प्रतिष्ठापना केली ( रंगाचारी, २. नेलोर. ७८८ ). स. १३६९ मध्ये बुक्क राजाचा पुत्र भास्कर भावदूर या देशाचा राजप्रतिनिधी होता ( एपि. इंडि. १४. ९७ ). स. १५८० मध्ये गोवळकोंड्याच्या इब्राहिम कुतुबशहाने हा किल्ला विजयनगरच्या व्यंकटपति ( प्रथम ) राजाकडून जिंकून घेतला ( रंगाचारी, २. गुंतूर. ७६४ ).

५. ( वर्षपर्वत ) शाकद्वीपातील एक वर्षपर्वत ( कूर्म. पूर्व. ४९.३४; ब्रह्माण्ड. १९.८४; मत्स्य. १२२.२०; लिङ्ग. ५३.१७; वायु. ४९.७८; ८५; विष्णु. २.४६२ ). नामांतर ( वायुपुराण )–' जलद '.

६. ( पर्वत ) बिहारमधील राजगृह गावासभोवतालच्या पाच टेकड्यांपैकी एक. यावर नाटकेश्वर मन्नक शिवमंदिर, तसेच दोन जैनमंदिरे आहेत ( ती. पृ. १६८ )

७. ( पर्वत ) महाभारतमते गया येथील ' उद्यंत ' नामक पवित्र पर्वताचे नामांतर ( म. आर. ८२.८१; उद्यंत पहा ).

८. ( तीर्थ ) कुरुक्षेत्रातील एक वामनतीर्थ ( वामन. ५२.४६ ). येथील वामनाचे नाव शशी होते ( वामन. ९०. २१ ).

**उदयन्त** ( पर्वत )— स्कंदमते पश्चिम भारतातील ' ऊर्जयत् ' पर्वताचे नामांतर ( स्कन्द. प्रभास. व. १.६८; नागर. २.११.११; ऊर्जयत् पहा ).

**उदयपुर** ( मंदिरस्थान )—मध्य भारतान्तर्गत माळव्यातील सुविख्यात नगर आणि शिवमंदिरस्थान. मध्यप्रदेशातील भिल्सा गावापासून ४० मैल ईशान्येस हे आहे. या नगराची स्थापना करणाऱ्या उदयादित्य परमार राजाचे अनेक शिलालेख येथे सापडले आहेत ( एपि. इंडि. ५. ५८ ). येथील नीलकंठेश्वराचे मंदिर इ. स. ११ व्या शतकातील परमार स्थापत्यशैलीचे सर्वोत्कृष्ट उदाहरण आहे.

**नीलकंठेश्वरमंदिर**— या मंदिरातील शिलालेखमते माळव्याच्या उदयादित्य परमार ( स. १०५९–१०८० ) राजाने हे मंदिर बांधले. याचा सभामंडप सिन्नर येथील गोंदेश्वर मंदिरासदृश असून त्याच्या पायऱ्यापायऱ्यांनी युक्त शंकाकृती शिखरावर ओरिसा शैलीच्या मंदिरासदृश चतुर्दिशांना उभे पट्ट कोरले आहेत. या उभ्या पट्टयांच्या दरम्यान पाच उभ्या रांगांमध्ये शिखराच्या ३५ छोट्या प्रतिकृती कोरल्या

आहेत. शिखराच्या शिरोभागी ओरिसा मंदिरासदृश 'आमलक' (आमलशिला) आहे. हे सारे भाग अत्यंत प्रमाणबद्ध असल्याने हे मंदिर परमार स्थापत्यशैलीचे सर्वोत्कृष्ट उदाहरण मानले जाते.

**जगन्नाथमंदिर**—स. १६५१ मध्ये बांधलेले हे जैन-मंदिर उतरणीस लागलेल्या परंपरागत जैन स्थापत्यशैलीचे प्रातिनिधिक उदाहरण आहे (फर्ग्युसन, २.१४७).

२. (नगर) राजस्थान देशाच्या उत्तरकालीन राजधानीचे नगर. स. १४६८ मध्ये या नगराची स्थापना करणाऱ्या उदयसिंह गुहिलोताच्या नावावरून या नगरास हे नाव प्राप्त झाले. चितोड– एकलिंगजी मार्गावरील भूतपूर्व उदयपुर संस्थानच्या राजधानीचे आधु. उदयपुर ते हेच होय. राजपुतान्यातील हळदीघाट, नाथद्वारा आदि सुविख्यात स्थाने या नगराच्या परिसरातच आहेत.

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**—इ. स. १५ व्या शतकात अकबराने मेवाडच्या चितोडगढ या राजधानीवर तिसऱ्यांदा हल्ला केल्यानंतर राणा कुंभवंशीय उदयसिंहाने आपली राजधानी या गावी हलविली. डोंगरी किल्ल्याला वारंवार वेढा पडून रसद तुटण्याचा धोका असल्याने त्याने हे गाव बेडस नदीकाठी मैदानी प्रदेशात वसविले. हे गाव बांधून होईपर्यंत त्याची राजधानी कुंभलगढ गावी होती.

मेवाडच्या राजांनी येथे बांधलेले राजवाडे चितोडगढपेक्षाहि अधिक वैभवसंपन्न आहेत. येथील मुख्य राजवाडा चित्र-विचित्र आकाराच्या टेकड्यांच्या कुशीत विस्तीर्ण सरोवरा-काठी असून, याच सरोवरात जगनिवास आणि जगमंदिर नामक अन्य दोन राजवाडे आहेत.

**छत्र्या**—मृत राजांच्या स्मृत्यर्थ येथे उभारलेल्या स्मृतिमंदिरांमध्ये (छत्री) संग्रामसिंह (द्वितीय) (मृत्यु स. १७३४) राजाची छत्री सर्वोत्कृष्ट आहे. छप्पन्न स्तंभांवर आधारित मुख्य सभामंडपावर येथे अष्टस्तंभाधारित छत्री बांधली आहे. समकालीन मुसलमानी कबरीतील उदासवाणे-पणा येथे खुबीने टाळला आहे. मेवाडच्या अमरसिंह (द्वितीय, मृत्यु स. १७११) राजाची छत्रीहि उल्लेखनीय आहे. परंतु ती स्थापत्यशास्त्रीय दृष्टीने काहीशी डावी आहे.

**राजसमुद्र धरण**—उदयपुरच्या राजसिंह राजाने स. १६५३ मध्ये बांधलेले हे धरण (लांबी ३७६′) मध्ययुगीन धरणस्थापत्याचे प्रातिनिधिक उदाहरण आहे. त्यामध्ये उतरून जाण्यासाठी संगमरवरी पायऱ्या आहेत. पार्श्व-भागीच्या टेकडीवर येथील राजवाडे आहेत.

३. (नगर) भविष्यमते न्यूहवंशीय उदय राजाने स्थापिलेले एक नगर (भवि. प्रति. ४.३.).

**उदयेन्दिरम्** (शिलालेखस्थान)—चोल राजा परांतक (प्रथम) च्या स. ९२१ च्या ताम्रपटाचे मद्रास राज्यातील उत्तर अर्काट जिल्ह्यातील उपलब्धिस्थान (रंगाचारी, १. उत्तर अर्काट. ३६७).

**उदवाडा** (पारसीतीर्थ)— मुंबई–खाराघोडा रेल-मार्गावरील पारसी लोकांचे अग्निमंदिरस्थान. स्थानिक सम-जुतीनुसार इराणहून भारतात आलेल्या पारसी लोकांनी स्वतःसमवेत आणलेला अग्नि आजहि येथे प्रज्वलित आहे. 'आदर' आणि 'अरदीबेहस्त' महिन्यात पारसी लोकांची येथे मोठी यात्रा भरते (ती. पृ. ४४३).

**उदव्रज** (देश)—ऋग्वेदमते एक देश. दिवोदास राजाच्या प्रार्थनेवरून शंबर आणि वर्चिन् नामक दस्यूंना इंद्राने येथे ठार मारले (ऋ. २.१२.११; ६.४७.२१). 'उदव्रज'चा शब्दशः अर्थ 'पाणथळ प्रदेश' असा होतो.

**उदान** (देश)—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते वायव्य भारतातील 'उद्यान' देशाचे नामांतर (उद्यान पहा).

**उदावड** (नगर)—स. ७८३ च्या म्हैसूर वीरकाल मूर्तिलेखमते राष्ट्रकूट राज्यान्तर्गत उडीपी देशातील एक नगर. आलूप राजा चित्रवाहनाने राष्ट्रकूट राजा गोविंद (तृतीय) पासून हे जिंकून घेतले होते (एपि. कर्ना. ८.१०). याचे आधुनिक स्थान समजत नाही.

२. (परशुरामस्थान) राजस्थानातील एक पर्वतीय परशुरामस्थान. हे चार भुजाजी मंदिरापासून ७ मैलांवर आहे (ती. पृ. २९७).

**उदी** (तीर्थ)—नारदमते एक तीर्थ (नारद. उत्तर. ४४.६२).

**उदीची** (तीर्थ)—गया येथील एक तीर्थ (वायु. १११.६).

**उदीचीपथ** (देश)—संस्कृत साहित्यमते 'उत्तरापथ' देशाचे नामांतर (उत्तरापथ पहा).

**उदीच्य** (देशविभाग)—बृहत्संहिता आणि मार्कंडेय पुराण कूर्मविभाग, तसेच पौराणिक साहित्यमते भारत-वर्षाच्या अनुक्रमे नऊ आणि सात उपविभागांपैकी एक. वायव्य भारतान्तर्गत सिंधु नदीचे खोरे, तसेच हिंदुकुश पर्वतापर्यंतचे काबूल नदीचे खोरे म्हणजे हा देशविभाग होय. पंजाब आणि वायव्य भारतातील सिंधु नदी आणि तिच्या उपनद्यांचा जलसंचय प्रदेश, तसेच त्यानजिकचा मक्रान किनाऱ्याच्या प्रदेशांचा समावेश या देशविभागात होत असे. या देशाच्या भौगोलिक सीमारेषा पुढीलप्रमाणे होत :— १. पूर्वेस

सतलज नदीचा जलसंचय प्रदेश; २. पश्चिमेस – काबूल नदीचा जलसंचय प्रदेश; ३. उत्तरेस – सिंधु नदीचे सर्वात उत्तरेकडील टोक; ४. दक्षिणेस – अरबी समुद्रकिनारा आणि त्याच्या पश्चिमेकडील पर्वतश्रेणी. या प्रदेशातील सुमारे दीडशे देशांची आणि लोकसमूहांची नामावली पौराणिक साहित्यात आणि पाऊणशे देशांची नामावली बृहत्संहितान्तर्गत कूर्मचक्र-वर्णनात आढळते.

**नामांतरे**––प्राचीन साहित्यात या देशविभागाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :–– १. मार्कंडेय पुराण (कूर्मविभाग)– '**कूर्म वामकुक्षीतील देश**'; २. बृहत्संहिता– 'उत्तर देश'.

**आर्यांचे वसाहतीकरण**––भारतवर्षातील आर्यांची-सर्वाधिक प्राचीन वसाहत या देशातील असून, उत्तरकालात उत्तर भारताचा प्रदेश जसजसा मनुष्यवस्तीयोग्य बनला तशी या वसाहतीची पूर्वेकडील (प्राच्य) सीमा विस्तारत गेली (भारतवर्ष पहा). पाणिनीच्या अष्टाध्यायीमते भरत जनपद (आधु. कुरुक्षेत्र) हे भारतवर्षाच्या 'उदीच्य' आणि 'प्राच्य' देशविभागांची सीमारेषा असून, पतंजलीच्या व्याकरणमहाभाष्यमते उदीच्य जनपदाच्या पूर्वेस प्राच्य देशविभाग होता (पतञ्जलि. २.४.६६). भाष्यकार नागेश याच्या मते शरावती नदी (अंबाला जिल्ह्यातील आधु. घग्गर) ही प्राच्य आणि उदीच्य देशांची सीमा असून, अमरकोशमते या नदीच्या वायव्येस 'उदीच्य' आणि आग्नेयेस 'प्राच्य' देश होते (अमर. २.१.६–७). काव्यमीमांसामते पृथूदक (आधु. पेहोआ) ही उदीच्य देशाची आग्नेय परिसीमा होती (काव्यमी. १७.२२६).

**उत्तर दिशेची व्युत्पत्ती**––महाभारतान्तर्गत गरुड–गालव संवादात 'उत्तर' शब्दाची काव्यमय व्युत्पत्ती निम्नप्रकारे दिली आहे :—पापतारकत्वामुळे 'उत्तरा' नावाने सुविख्यात असणारी ही दिशा पूर्व आणि पश्चिम दिशांच्या दरम्यान निवास करते. या अधार्मिकविरहित दिशेतील बदरिकाश्रमामध्ये ब्रह्मदेव, नारायण, कृष्ण, आणि अर्जुन, तसेच हिमवत्पृष्ठावर शंकर निवास करतात. चंद्राचा राज्याभिषेक येथेच झाला असून आकाशातून भूतली अवतीर्ण झालेली गंगा शिवाने येथेच धारण केली. शिव-प्राप्तीसाठी पार्वतीने येथे तपस्या केली. काम, क्रोध, पर्वत आणि उमा येथेच प्रकट झाले. या द्रव्यनिधि दिशेमध्ये यक्ष, राक्षस आणि गंधर्वाधिपती कुबेराला राज्याभिषेक झाला. चैत्ररथ आणि सौगंधिक वने, वैखानसाश्रम, मंदाकिनी नदी, जांबूनद सरोवर, मंदार पर्वत, सेच कैलास, कुबेरस्थान, विष्णुपद आदि पवित्र तीर्थे येथेच आहेत. त्यांचे ही दिशा नैर्ऋत्य राक्षसांपासून रक्षण करते. शार्द्वल देवता, संतानक वृक्ष, सिद्धांची विमाने, तसेच सप्तर्षि आणि अरुंधती–युक्त अशा या दिशेमध्ये स्वाती नक्षत्र उदय पावते. सूर्य-चंद्रांना नक्षत्रे येथेच प्रदक्षिणा घालतात. यज्ञकर्ता पितामह, तसेच अशरीरी आणि अदृश्य धाम नामक मुनी येथे निवास करतात. या दिशेस जो जो पुढे जावे तो तो अगम्य प्रदेश लागतो. विद्युत्प्रभा संज्ञक दशाप्सरयुक्त अशा या दिशे-मधील 'उशीरबीज' नामक स्थानी मरुत्ताने आपला यज्ञ केला. जीमूत नामक विप्रर्षींना येथे सापडलेले सुवर्ण 'जीमूतधन' नावाने सुविख्यात झाले. तेव्हापासून उत्तर म्हणजे सर्वोत्कृष्ट असे समीकरण रूढ झाले (म. उ. १०९).

**निरुक्तात**––यास्काच्या निरुक्तात 'प्राच्य' आणि 'उदीच्य' या देशविभागवाचक पारिभाषिक संज्ञांचा निर्देश आढळतो (नि. २.२).

**ब्राह्मण साहित्यात**––शतपथ ब्राह्मणमते स्वैदाय शौनक आदि उदीच्य देशनिवासी ब्राह्मणांनी कुरुपंचालनिवासी उद्दालक आरुणि नामक आचार्याचा तत्त्वचर्चेत पराजय केला होता (श. ब्रा. ११.४.१.१; गो. ब्रा. १.३.६). या देशातील लोकांची भाषा कुरुपंचाल देशाइतकीच विशुद्ध असून (श. ब्रा. ३.२.३.१५) कौषीतकि ब्राह्मणमते तत्कालीन ब्राह्मण लोक या देशात अध्ययनार्थ जात असत (कौ. ब्रा. ७.६). बौद्धकालीहि या देशातील तक्षशिला हे विद्याध्ययनाचे प्रमुख केंद्र होते (बुद्धिस्ट इंडिया. ८.२८). ब्राह्मण साहित्यकाली या देशान्तर्गत काश्मीर देश संस्कृत भाषेचे प्रमुख केंद्र होता.

**पाणिनीच्या अष्टाध्यायीत**—या ग्रंथमते (इ. स. पू. २००) उत्तर भारताच्या प्राच्य आणि उदीच्य देशविभागांची सीमा शरावती (कुरुक्षेत्रातील आधु. घग्गर) नदी होती. अग्रवाल यांच्या मते 'गंधार' (तक्षशिलेपासून काबूल-पर्यंतचा प्रदेश) आणि 'वाहीक' (सिंधूपासून शतद्रु नदीपर्यंतचा मद्र, उशीनर, आणि त्रिगर्त देशांचा प्रदेश) हे दोन देशविभाग मिळून पाणिनिकालीन 'उदीच्य' देश बनला होता. या देशातील संस्कृत भाषा त्याचे काळी विद्वन्मान्य असून तिच्या आधारेच त्याने आपल्या व्याकरण-ग्रंथाची रचना केली.

पतंजलीच्या व्याकरणमहाभाष्यकाळी (इ. स. पू. ३००) शकयवनांच्या आक्रमणामुळे बाह्लीक आणि गंधार देश राजकीय सांस्कृतिक, आणि भाषिक दृष्टींनी आर्यावर्तापासून विलग झाले. म्हणूनच या ग्रंथात आर्यावर्ताची (=उदीच्य देशाची)

## बृहत्संहिता ग्रंथपरंपरेतील उदीच्य देश

| बृहत्संहिता (१४.२४-२८) पराशरतंत्र | मार्कंडेयपुराण (कूर्मविभाग) (५५.४१-४७) | बृहत्संहिता (१४.२४-२८) पराशरतंत्र | मार्कंडेयपुराण (कूर्मविभाग) (५५.४१-४७) |
|---|---|---|---|
| १. कैलास | कैलास | २७. कैलावत | — |
| २. हिमवत् | — | २८. कंठधान (दशधान) | अधम |
| ३. वसुमत् | — | २९. अंबर | अंबाल |
| ४. धनुष्मत् (मधुमत्) | धनुष्मत् | ३०. मद्रक | मद्र |
| ५. क्रौंच | क्रौंच | ३१. मालव | — |
| ६. मेरु | बक | ३२. पौरव | — |
| ७. उत्तर कुरु | कुरु | ३३. केच्छार | — |
| ८. क्षुद्रमीन | क्षुद्रवीण | ३४. दंडपिंगलक | बदंतिकपिंगल |
| ९. कैकेय | कैकेय | ३५. माणहल | मानकलह |
| १०. वसाति | -- | ३६. हूण | — |
| ११. यामुन | — | ३७. कोहल | कोहलक |
| १२. भोगप्रस्थ | — | ३८. सातक (साकल) | — |
| १३. आर्जुनायन | रसाल्य | ३९. मांडव्य | — |
| १४. आग्नीध्र | अग्नीज्य | ४०. भूतपुर | भूतियुवक |
| १५. आदर्श | -- | ४१. गंधार लोक | — |
| १६. अंतर्द्वीपी | अंतर्द्वीप | ४२. यशोवती | यशोमाल्य |
| १७. त्रिगर्त | -- | ४३. हेमताल | हेमतारक |
| १८. तुरगानन | अश्वमुख | ४४. राजन्य | — |
| १९. श्वमुख | शवधान | ४५. क्षेचर (क्षचर) | खरसागरवासी |
| २०. दीर्घकेश | — | ४६. गव्य | — |
| २१. चिपिटनासिक | चिबिड | ४७. यौधेय | — |
| २२. दासेरक | दासेरक | ४८. दासमेय | दासमेय |
| २३. वाटधान | -- | ४९. श्यामक | — |
| २४. शरधान | सारदन | ५०. क्षेमधूर्त | — |
| २५. तक्षशिला | तक्षशील | ५१. — | प्रास्तवेणुक |
| २६. पुष्कलावती (लवनवती) | पुष्कल | | |

उपरोक्त परिपत्रकातील बृहत्संहिता नामावलीच्या कंसातील पाठभेद पराशरतंत्रातील आहेत. याशिवाय निम्नलिखित नव्या 'उदीच्य' देशांची नावेहि त्या ग्रंथात आढळतात :— १. शूरसेन; २. चेलूक (वायु—चूलिक; मार्क—शूलिक; वामन—कुलूत); ३. मत्स्य; ४. दर्व; ५. फलपल; ६. प्रस्थल (मार्क; ब्रह्म—पुष्कल); ७. हव्य; ८. मुरदंड; ९. ववंधि; १०. सुवास्तु; ११. मणिवती; १२. नगरसर; १३. कैरात.

बृहत्संहितेतील नामावलीपैकी निम्नलिखित देशनामे थोड्या फरकाने पौराणिक साहित्यात पुनरावृत्त आढळतात :— १. दासेरक (वायु, मार्क. कुशेरुक); २. वाटधान (वामन—वाटधानक); ३. शरधान (वामन—शाव्यधानक); ४. अंबर (कूर्म, विष्णु—अंबष्ठ); ५. मद्रक (वामन—भद्र).

पश्चिम सीमा आदर्श देश (पंजाबातील सरस्वती नदीचे विनशन स्थान) मानली आहे (आर्यावर्त पहा).

**बृहत्संहिता आणि पौराणिक साहित्यात**——बृहत्संहिता आणि वायुपुराणातील उदीच्य देशांची नामावली सहा देशांचा अपवाद वगळता सर्वस्वी वेगळी असून, प्राचीन साहित्यातील दोन स्वतंत्र परंपरांचा अंतर्भाव त्यामध्ये आहे. पराशरतंत्र आणि मार्कंडेयपुराण (कूर्मविभाग) मधील देशनामावली बृहत्संहिता परंपरेतील असून, मत्स्य, मार्कंडेय, ब्रह्म, वामन, गरुड, आणि कूर्मपुराणातील नामावली वायुपुराणपरंपरेतील आहे.

देशसंख्या——बृहत्संहिता आणि पौराणिक साहित्यमते उदीच्य देशातील देशसंख्या पुढीलप्रमाणे होती :—१. बृहत्संहिता (५०); २. पराशरतंत्र (५४); ३. मार्कंडेय

पुराण कूर्मविभाग ( ४७ ); ४. वायुपुराण ( ४९ ); ५. मत्स्यपुराण ( ३० ); ६. मार्कंडेयपुराण ( ४७ ); ७. ब्रह्मपुराण ( ४६ ); ८. वामनपुराण ( ५४ ); ९. गरुड-पुराण ( ६ ); १०. कूर्मपुराण ( १० ); ११. काव्यमीमांसा ( २० ). मार्कंडेयपुराणात 'उदीच्य' देशांची संख्या २५ दिली असली तरी त्यामध्ये वायव्य म्हणून निर्देशिलेले २२ देश हेहि वस्तुतः 'उदीच्य'च आहेत. त्यामुळे या ग्रंथातील 'उदीच्य' देशसंख्या ४७ धरली आहे.

बृहत्संहितेमध्ये—या ग्रंथातील 'उदीच्य' देशांची नामावली सर्वाधिक शुद्ध आणि शास्त्रीय आहे. 'कैलास' पर्वताने प्रारंभ होऊन 'क्षेमधूर्त' ने ती समाप्त होते ( परिपत्रक पहा ).

मार्कंडेयपुराण कूर्मविभाग आणि पराशरतंत्रामध्ये—या ग्रंथातील 'उदीच्य' देशनामे बृहत्संहितानुसारी असली तरी पराशरतंत्रातील काही नावे वायुपुराणपरंपरेतील, आणि मार्कंडेयपुराण कूर्मविभागातील काही नावे अविश्वसनीय आहेत.

वायुपुराणात—या ग्रंथातील बृहत्संहितेहून सर्वस्वी वेगळ्या परंपरेतील 'उदीच्य' देशनामावली सोबतच्या परिपत्रकात दिली आहे ( परिपत्रक पहा ).

मत्स्यपुराणात—या ग्रंथातील उदीच्य देशनामावलीपैकी पहिली तेवीस नावे वायुपुराणानुसारी असून उर्वरित नावे अशुद्ध आहेत. काही महत्त्वाची देशनामे त्यामध्ये गाळली आहेत.

मार्कंडेय आणि ब्रह्मपुराणात— मार्कंडेयपुराणातील उदीच्य देशनामावली वायुपुराणानुसारी असली तरी 'वायव्य देश' ( १–२२ ), आणि 'सरहद्दीबाहेरचे देश' ( २३–३९ ) असे अशास्त्रीय उपविभाग तेथे पाडले आहेत. पौराणिक साहित्यात अन्यत्र कोठेहि हे उपविभाग आढळत नाहीत. ब्रह्मपुराणातील नामावली मार्कंडेयपुराणानुसारी असली तरी तिचा पाठ मात्र बहुंशी अशुद्ध आणि त्यामधील काही नावे नवी आहेत.

वामनपुराणात—या ग्रंथातील पुनरुक्त, अशुद्ध, परंतु विस्तृत देशनामावलीचा उपयोग वायुपुराणातील नामावली तपासून पहाण्यासाठी होतो. सर्वस्वी नवीन अशी काही नावेंहि त्यामध्ये आढळतात.

काव्यमीमांसेत—या ग्रंथातील नामावली सर्वस्वी नवीन असली तरी सर्वांशाने नवी देशनामे त्यामध्ये आढळत नाहीत.

गरुड आणि कूर्मपुराणात—या ग्रंथातील उदीच्य देश-नामावली अपूर्ण आणि निरुपयोगी आहे.

**भौगोलिक उपविभाग**—मुजफ्फर अली यांच्या मते पौराणिक साहित्यातील उदीच्य देशसमूहाचे ( सिंधु नदीचा जलसंचय प्रदेश ) निम्नलिखित दोन प्रमुख उपविभाग दिसतातः—१. वायव्य भारतातील डोंगराळ प्रदेश ( आधु. मकरान, बलुचिस्तान आणि वझिरीस्तान प्रदेश ); २. उत्तर भारतातील पर्वतीय प्रदेश ( आधु. काबूल आणि सिंधु नद्यांच्या पश्चिमेकडील आणि पूर्वेकडील उपनद्यांचा, तसेच या नदीच्या पूर्व आणि पश्चिम किनाऱ्याचा प्रदेश; परिपत्रक पहा ). अत्यंत कमी पावसाच्या या प्रदेशातील साऱ्या वसाहती नद्यांच्या काठच्या असून, यापैकी सिंधु नदीच्या पश्चिमेकडील वालुकामय आणि डोंगराळ प्रदेशातील वसाहती ( जनपदे ) आकाराने लहान आणि पर्वताचे सुळके आणि वाळवंटे यांनी एकमेकांपासून विभक्त झालेल्या दिसतात. त्यांच्या दुर्गमतेमुळे त्यांचे पृथक् अस्तित्व शतकानुशतके अबाधित राहिले ( उदा. पौराणिक साहित्यातील दरद—ग्रीक 'दरदै'; औरस—ग्रीक 'अर्स'; लंपाक—ग्रीक 'लंबतै' ).

याचे उलट मोठ्या नद्यांच्या किनारीच्या उंच प्रदेशातील विशाल, समृद्ध आणि नदीविभाजित वसाहतींना परकीय आक्रमणांच्या उपद्रवामुळे परिवर्धन, स्थलांतर अथवा विनाश या राजकीय स्थित्यंतरांचे भय अधिक असे. म्हणूनच या वसाहतींच्या महाभारत, काव्यमीमांसा, पुराणे, तसेच अरबी आणि ग्रीक साहित्यातील वर्णनात कमालीचा परस्परविरोध आढळतो. उदा. महाभारतातील शूद्र आणि आभीर लोकांची वसाहत टॉलेमीच्या 'सोद्रै' आणि 'अबिरिय' वसाहतीहून सर्वस्वी वेगळी आहे.

महाभारतात—या ग्रंथातील युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या अर्जुनाच्या उत्तर दिग्विजयात निम्नलिखित 'उदीच्य' देश आणि लोकसमूहांचा निर्देश आढळतोः—१. कुलिंद; २. आनर्त; ३. कलकूट; ४. सुमंडल; ५. शाकलद्वीप; ६. प्रतिविंध्य; ७. सप्तद्वीप; ८. प्राग्ज्योतिष ( आधु. आसाम ); ९. कुबेरराज्य; १०. उलूक; ११. देवप्रस्थ नगर; १२. मोदापुर; १३. उत्तर उलूक; १४. पंचगण; १५. पौरव; १६. उत्सवसंकेतगण; १७. काश्मीर; १८. लोहित; १९. त्रिगर्त; २०. दार्व; २१. कोकनद; २२. अभिसारी नगरी; २३. उरगा नगरी; २४. सिंहपुर नगर; २५. सुह्म; २६. चोल; २७. बाहीक; २८. कांबोज; २९. दरद; ३०. दस्यु; ३१. लोह; ३२. परम कांबोज; ३३. उत्तर ऋषिक; ३४. निष्कुट; ३५. श्वेत पर्वत; ३६. किंपुरुषावास; ३७. हाटक; ३८. मानस सरोवर; ३९. गंधर्व; ४०. हरिवर्ष ( म. स. २३–२५ ).

धौम्य आणि लोमश ऋषींच्या तीर्थयात्रेत उदीच्य देशातील तीर्थांचे ( उत्तर तीर्थ ) विवरण असून ( म. आर.

# वायुपुराण ग्रंथपरंपरेतील उदीच्य देश

| वायु ( ५.११५-१२१ ), ब्रह्माण्ड ( ४९ ) | मार्कंडेय (५७.३५-३८) | ब्रह्म ( २७.४४ ) | वामन ( १३.३७ ) | मत्स्य ( ११४-४० ) | काव्यमीमांसा ( पृ. ९४ ) |
|---|---|---|---|---|---|
| १. पारित ( पारद ) | पारद | पारद | पारवत | -- | — |
| २. बाह्लीक | -- | बाहीकर | वेण | -- | — |
| ३. आभीर | — | सुतीर | अभीर | — | — |
| ४. काल्तोयक | काल्तोयक | काल्तोयद | कालतोयद | काल्तोयक | — |
| ५. अपरीत | अपरांत | अपरांत | अपरांत | पुरंध्र | — |
| ६. शूद्र | — | -- | — | -- | — |
| ७. पह्लव | — | पह्लव | — | — | वल्लभ |
| ८. चर्मखंडिक | — | केरल | कटक | आत्मखंडित | -- |
| ९. यवन | गबल | -- | — | — | — |
| १०. सिंधु | सुद्र | -- | — | — | — |
| ११. सौवीर | — | — | — | — | — |
| १२. शक | शतद्रु | शतद्रुह | शतद्रव | -- | — |
| १३. कुलिंद | कलिंग | कलिंग | ललित्थ | पुलिंद | — |
| १४. हारपुरिक ( हूणक ) | हारभूषिक | हारमुषिक | मूषक | हारमूर्तिक | हारहूण |
| १५. रामट | माठर | माथर | माठर | रामठ | रामट |
| १६. रुद्रकटक | -- | कनक | उदकधार | कंटकार | करकंठ |
| १७. दशमाणिक (दशमालिक) | दशमालिक | दम्वमालिक | दशन | दशनामक | — |
| १८. उपनिवेश | — | — | — | — | — |
| १९. कंबोज | कंबोज | — | कांबोज | — | कांबोज |
| २०. दरद | -- | विर | — | -- | — |
| २१. बर्बर | — | — | — | — | -- |
| २२. प्रियलौकिक (अंगलौकिक) | हर्षवर्धन | शलौकिक | अंगलौकिक | — | -- |
| २३. पिन (चिन ) | — | — | — | -- | — |
| २४. तुषार | तुखार | तुखार | तुखार | -- | — |
| २५. क्षतोधर ( बाह्यतोदर ) | बहुभद्र | बह्लिकस | बहुदा बाह्यतोदर | — | -- |
| २६. आत्रेय | आत्रय | -- | आत्रेय | -- | -- |
| २७. भरद्वाज | — | — | — | -- | -- |
| २८. लपाक | शूल्कार | -- | — | -- | लिंपाक |
| २९. स्तनप | — | शनशोक | स्तावक | सैनिक | — |
| ३०. पीडिक | चुलिक | कुलिक | चूडिक | — | -- |
| ३१. जुहुड | जागुड | जागल | आराम | — | सहुड |
| ३२. अपग | औपध | औषध्य | अलस | — | -- |
| ३३. अलिमद्र | अनिमद्र | चलचंद्र | अलिभद्र | — | -- |
| ३४ तोमर | तामस | तोमर | तापस | — | — |
| ३५. हंसमार्ग | — | -- | कर्ममार्ग | — | — |
| ३६. कश्मीर | — | — | सुपार्श्व | — | -- |
| ३७. तंगण | — | करुण | — | तल्गान | -- |
| ३८. आहुक | कुहक | कुहक | कुहिक | — | हूहुक |
| ३९. पूर्ण (ऊर्ण ) | — | मगध | तुर्ण | — | -- |

उपरोक्त परिपत्रकाच्या वायुपुराण नामावलीच्या कंसातील पाठभेद ब्रह्माण्ड पुराणाचे आहेत. याशिवाय निम्नलिखित नव्या ' उदीच्य ' देशांची नावे वामन, कूर्म, विष्णुपुराण आणि काव्यमीमांसेत आढळतातः—( १ ) वामनपुराण–१. कुकुट; २. पाणविय; ( २ ) कूर्म-विष्णुपुराण—१. साल्व; २. कान्यनिवासिन; ३. अंध्र; ४. पारसिक; ( ३ ) काव्यमीमांसा— १. वोक्कण; २. ह्लाणायूज; ३. तुरुष्क.

## उदीच्य जनपदाचे भौगोलिक विभाजन

| देश | आधुनिक स्थान |
|---|---|
| **(१) वायव्य भारतातील पर्वतीय प्रदेश** | |
| **(अ) मक्रान किनारा** | |
| १. अंगलोक | हिंगोल नदीचा जलसंचय प्रदेश |
| २. पह्लव | परिकन् नदीचे खोरे |
| ३. दशमाणिक | दश्त नदीचे खोरे |
| ४. बहुभद्र | बहु नदीचे खोरे |
| ५. हारमूषिक | पुरबी नदीचे खोरे |
| ६. चर्मखंडिक | हब् नदीच्या मुखानजिकचा प्रदेश |
| **(ब) बलुचिस्तान** | |
| १. कालतोयक | मल नदीचे खोरे |
| २. बाह्लीक | बोलन्, नरी व गोख नद्यांची खोरी |
| **(क) वझिरीस्तान** | |
| १. वाटधान | गोमल नदीच्या खोऱ्याचा वरचा भाग |
| २. तङ्गान | कुर्रम नदीच्या खोऱ्याचा वरचा भाग |
| ३. तुषार | तोची नदीचे खोरे |
| ४. अपरीत | पेशावर गावाच्या परिसरातील देश |
| **(२) उत्तर भारतातील पर्वतीय प्रदेश** | |
| **(अ) काबूल नदीचा जलसंचय प्रदेश** | |
| १. गंधार | काबूल नदीच्या खोऱ्याचा खालचा भाग |
| २. शतद्रुग | स्वात नदीचे खोरे |
| ३. दार्व | पंजकोरा नदीचे खोरे |
| ४. कंबोज | कुणार नदीचे खोरे |
| ५. लंपाक | काबूल नदीच्या खोऱ्याचा वरचा भाग |

| देश | आधुनिक स्थान |
|---|---|
| **(ब) सिंधु नदीच्या पश्चिमेकडील उपनद्यांचा प्रदेश** | |
| १. औरस | हजारा प्रदेश |
| २. दरद | किशनगंगा नदीचे खोरे |
| ३. कश्मीर | झेलम नदीचा जलसंचय प्रदेश |
| **(क) सिंधु नदीच्या पश्चिम किनाऱ्यावरील देश** | |
| १. वाटधान | कुर्रम नदीच्या खोऱ्याचा प्रदेश |
| २. पारद | पंजाबातील डेरा गाझीखान प्रदेश |
| ३. सिंधु | सहवन् गावाच्या परिसरातील प्रदेश |
| **(ड) सिंधु नदीच्या पूर्व किनाऱ्यावरील देश** | |
| १. शूद्र | सरस्वती (हक्रा) नदीचे खोरे |
| २. सौवीर | सिंधमधील रोहरी-खैरपुर प्रदेश |
| ३. आभीर | सिंधु नदीचा त्रिभुज प्रदेश |
| **(इ) पंजाबातील पाच नद्यांच्या खोऱ्यातील देश** | |
| १. गंधार | सिंध-सागर दुआबाचा वायव्य भाग |
| २. सैनिक | सोहन नदीचा जलसंचय प्रदेश |
| ३. जागुड | झेलम-चिनाब दुआबाचा खालचा भाग |
| ४. केकेय | झेलम-चिनाब दुआबाचा वरचा भाग |
| ५. मद्रक | रावी-चिनाब दुआब |

८८.२–२३; १५३). त्यापैकी धौम्ययात्रावर्णनात सरस्वती, बदरी आदि तीर्थांचा प्रामुख्याने निर्देश आढळतो.

**वाल्मीकि रामायणात**—या ग्रंथातील सुग्रीवदूत शतबल वानरकृत सीताशोधवर्णनात उत्तर भारतातील निम्नलिखित देशांचा निर्देश आढळतो:—१. म्लेंच्छ; २. पुलिंद; ३. शूरसेन; ४. प्रस्थल; ५. भरत; ६. कुरु; ७. मद्रक; ८. कांबोज; ९. यवन; १०. शकपतन; ११. वरद; १२. हिमवत् पर्वत; १३. लोध्रपद्मकखंड; १४. देवदारुवन; १५. सोमाश्रम; १६. कालपर्वत; १७. हेमगर्भपर्वत; १८. सुदर्शन-पर्वत; १९. देवसखपर्वत (पतगालय); २०. कैलास; २१. कुबेरभवन; २२. क्रौंचगिरि; २३. क्रौंचबिल; २४. क्रौंचगुहा; २५. दर्दर; २६. कामशैल (अनुस्त्र); २७.

मानस (विहगालय); २८. मैनाक (मयभवन); २९. वैखानससर; ३०. शैलोदा नदी; ३१. उत्तर कुरु; ३२; शैलेंद्र; ३३. सीमगिरि; ३४. अगम्य प्रदेश (वा. रा. कि. ४३).

**उदीच्य अपरान्त** (देश)—मार्कंडेयमते उत्तर भारतातील एक देश (मार्कं. ५४. ३६).

**उदुम्बर** (देश)— पाणिनीच्या गणपाठमते पंजाबातील 'साल्व' जनपदान्तर्गत सहा अंगभूत (अवयव) उपविभागांपैकी एक (पा. सू. ४.३.५३). या देशातील लोक 'औदुंबर' (बृ. सं. १४.४), अथवा 'औदुंबरक' (पा. सू. ४.२.५२) नावांनी सुविख्यात असून जलंधर लोकांसमवेत त्यांचा निर्देश पाणिनीच्या गणपाठात आढळतो (पा. सू. ४.२.५३) नामांतर (महाभारत)–'औदुंबर.'

अग्रवाल यांच्या मते पंजाबच्या उत्तरकडील पर्वतीय प्रदेशातील बियास आणि रावी नद्यांच्या दरम्यानचे आधु. गुरुदासपुर, पठाणकोट आणि नूरपुर जिल्हे म्हणजे हा देश असून 'प्रतिष्ठान' अथवा 'पतानप्रस्थ' (पंजाबातील गुरुदासपुर जिल्ह्यातील आधु. पठाणकोट) गावी त्यांची राजधानी होती (इंडि. कल्च. ६. १३५) प्राचीन त्रिगर्त (आधु. कांग्रा) देशाकडे जाणारा रस्ता हे याच देशातून जात असे.

**नाणी**—औदुंबर लोकांचे इ. स. पू. १ ल्या शतकातील नाणी वितस्ता (आधु. बियास) नदी या खोऱ्यामध्ये, तसेच रावी आणि बियास नद्यांच्या दुआबातील कांग्रा, गुरुदासपुर आणि होशियारपुर जिल्ह्यांच्या पूर्व भागात सापडली आहेत. त्यावरून दक्षिणेस बियास आणि उत्तरेस रावी नद्यांच्या दुआबातील पर्वतश्रेणींमध्ये, प्राचीन त्रिगर्त देशाच्या प्रवेशद्वारामध्ये (आधु. गुरुदासपुर प्रदेश), तसेच सतलज आणि रावी नद्यांच्या दरम्यानच्या भागात 'उदुंबर' देश असावा (ॲलेन, पृ. ८४; ८७).

'औदुंबर' लोकांच्या नाण्यांमध्ये 'रण' हा ग्रीक राजपदवीनिदर्शक शब्दप्रयोग, तसेच 'महादेवस रण शिवदसस ओदुम्बरिस' अशी अक्षरे आढळतात. त्यापैकी 'महादेवस' या रुद्र शिवाच्या उपाधीवरून त्याचा प्रतिनिधी म्हणून येथील राजा राज्य करीत असावा (आय. एच्. क्यू. २७. २०३-२०४). पाणिनीच्या गणपाठात या लोकांचे 'जनपद' अथवा 'गणराज्य' असल्याचा निर्देश आढळतो.

**पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यात**—या ग्रंथात 'उदुंबरावती' नदीचा निर्देश असून (पतञ्जलि. ४.२.७१), तिच्या काठी या देशाची राजधानी असावी.

**बृहत्संहितेत**—या ग्रंथमते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या मध्यदेशात (पंजाबातील सरस्वती नदीचे खोरे) हा देश असून (बृ. सं. ५.४०; १६.३; मार्कं. ५४.९), येथील लोक 'औदुंबर' नावाने सुविख्यात होते (बृ. सं. १४.४). महाभारतमते 'उदुंबर' (औदुंबर) देशीय राजकुमार युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञात उपायनांसह उपस्थित होते (म. स. ४८.१२). मध्ययुगीन शब्दकोश साहित्यातहि 'उदुंबर' देशाचा निर्देश आढळतो (वै यन्ती. ३८.६७).

**शिलालेख साहित्यात**—या साहित्यात 'उदुंबर'; 'उदुंबर–विषय'; 'औदुंबरीक–विषय'; 'उदुंबरपुर'; 'उदुंबरगर्ता' आदि अनेक देशनामांचा निर्देश आढळतो. 'औदुंबर' लोकांच्या विभिन्न वसाहतींचा निर्देश तेथे अभिप्रेत असावा.

२. प्लिनीच्या ग्रंथमते पश्चिम भारतातील एक लोकसमूह. 'आदोंबोरइ' नावाने निर्देशिलेले हे लोक आधु. कच्छमध्ये निवास करीत असावेत (मॅक्रिन्डल, मेगॅस्थनेस. पृ. १४९). नामांतर (टॉलेमी)–'ओर्दबरि' अथवा 'ओबंदरी'.

टॉलेमीच्या मते सिंधु नदीच्या पूर्वेकडील ग्रामसमूहामध्ये हे प्रमुख होते (अक्षांश ११५° उत्तर; रेखांश २२° पूर्व). मॅक्रिंडल यांच्या मते टॉलेमीने निर्देशिलेले 'ओर्बदरि' हे प्लिनीच्या 'ओदोंबोरइ'चे अपभ्रष्ट रूप असावे. प्लिनीच्या ग्रंथात 'होरतइ' लोकांसमवेत याचा निर्देश आढळतो.

३. (विषय) भोजदेवाच्या स. ८३६ च्या ताम्रपटमते कान्यकुब्जभुक्ति (आधु. कनौज) देशातील कालंजर मंडलातील एक राज्यविभाग (विषय) (एपि. इंडि. १९. १५). नामांतर (जयनाग दानपत्र)–'औदुंबरीक विषय.' जयनाग राजाच्या वप्पघोषवत दानपत्रमते हा गंगा नदीच्या दक्षिणेस आणि भागीरथी नदीच्या पश्चिमेस असून (एपि. इंडि. १९.२८६), मुसलमानी राज्यकालातहि तो 'औदुबर' नावानेच सुविख्यात होता (चौधरी, पृ. ५७–५८).

४. (नदी) पश्चिम भारतातील नर्मदा नदीची एक उपनदी. आधु. नौगवाँ नदी ती हीच होय (ती. पृ. ४३७).

**उदुम्बरगर्ता** (राज्यविभाग)—सुबंधु राजाच्या माहिष्मती दानपत्रमते नर्मदा नदीच्या परिसरातील एक राज्यविभाग (पथक) (एपि. इंडि. १९.२६२). 'सोहजनापद्रक' नामक उपविभाग त्यामध्ये असून याची राजधानी उदुंबरगर्ता (मध्यप्रदेशातील बरवानी जिल्ह्याच्या पश्चिम सीमेवरील आधु. उमरबार) गावी होती (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१. १८).

सांचीदानलेखात—सांची येथील तीन दानलेखात 'उदुंबरघरिय (उदुंबरनिवासी) लोकांची भेट' असा शब्दप्रयोग

**उदुम्बरपुर** (नगर)—मगध जनपदातील एक नगर (लॉ, ट्राइब्ज्. पृ. ३५५).

**उदुम्बरवन** (वन)—स्कंदमते अर्बुदारण्यातील सरस्वती नदीकाठचे वन आणि तंडि ऋषींचे तपस्यास्थान. नामांतर–'मेरुपाद' (स्कन्द. प्रभास. प्र. ३५.३९).

२. जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वतातील एक वन (लिङ्ग. ४९.५५७; वायु. ३८.३).

३. पद्ममते हिमालय पर्वतातील एक वन आणि सरस्वती नदीचे उगमस्थान. हे संभवतः 'प्लक्षप्रस्रवण' तीर्थाचे नामांतर असावे (पद्म. आदि. २७.७९; प्लक्षप्रस्रवण पहा).

**उदुम्बरावती** (नदी)—काशिका आणि अष्टाध्यायी भाष्यग्रंथमते भारतवर्षातील एक नदी (काशिका. ४.२.८५; ६.१.२१९; ३.११९). अग्रवाल यांच्या मते उत्तर भारतातील उदुंबर देशामध्ये (पंजाबातील बियास आणि रावी नद्यांच्या दरम्यानचा प्रदेश) ही असावी (अग्रवाल, पाणिनि. पृ. ५४; उदुंबर पहा).

**उदेग्राम** (दुर्ग)—गंधार (आधु. अफगाणिस्तान) देशान्तर्गत स्वात नदीच्या खोऱ्यातील एक कुशाण दुर्गस्थान. आयताकृती तटबंदीच्या अंतर्भागात लष्करी तळासदृश बांधलेला येथील कुशाण स्थापत्यशैलीचा (उदा. तक्षशिला–सिर्सुख) दुर्ग खीव गावच्या दुर्गाच्या अनुकरणाने कुशाणांनी बांधला असावा (गोएट्झ, पृ. ७३).

**उदैपुर** (बौद्धस्थान)—लडाख देशान्तर्गत लाहुल प्रदेशांतील बौद्ध मंदिरस्थान. आधु. मरोल गाव ते हेच होय. येथील मंदिराचा दर्शनी भाग कश्मीरी काष्ठमंदिराच्या अनुकरणाने कोरला असून कश्मीरच्या अनंतवर्मन् (स. १०२८–१०६३) राज्यकालीन तिबेटी शैलीचे एक लाकडी मखर येथे आहे. त्यामधील व्यक्तिचित्रे मंगोलियन चेहऱ्यामोहऱ्याची आहेत (गोएट्झ, पृ. १४३).

**उद्गमवट** (पवित्र वटवृक्ष)—अर्बुदारण्यान्तर्गत प्रभासक्षेत्रातील सरस्वती नदीकाठचा एक पवित्र वटवृक्ष. येथील सरस्वती नदी 'वंशगुल्मसंभवा' व 'दक्षिणमुखी' उपाधींनी सुविख्यात होती (स्कन्द. प्रभास. प्र. ३५.४३).

**उद्दण्ड** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू. ४.२.८०.१).

**उद्दण्डपुर** (बौद्धविद्यापीठ)—संस्कृत साहित्यमते बिहारमधील 'उदंतपुरी' बौद्ध विद्यापीठस्थानाचे नामांतर (उदंतपुरी पहा).

**उद्दालक–आश्रम** (आश्रम)—बिहार प्रांतातील उद्दालक ऋषींचे आश्रमस्थान. बक्सरनजिकच्या उनवाव गावानजिक हा असून सिद्धाश्रमातीर्थाच्या परिक्रमेत याचा समावेश होतो. येथे उद्दालकतीर्थ आहे (ती. पृ. १५७).

**उद्दालकतीर्थ** (तीर्थ)—कुरुक्षेत्रातील एक तीर्थ (वामन. ५२.४६).

**उद्दालकेश्वर** (लिंग)—अर्बुद पर्वतावरील एक शिवलिंग (स्कन्द. प्रभास. अर्बुद. ४२.१).

२. काशी येथील एक शिवलिंग (स्कन्द. काशी. ९७.८३; लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. ५९).

**उद्देहिक** (लोकसमूह)—बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या मध्यदेशातील एक लोकसमूह (बृ. सं. १४.२–४). पाठभेद–'औदेहिक;' 'औद्देहिक.' राजस्थानमधील रायरा गावी 'उद्देहकि' ब्राह्मी अक्षरपंक्तियुक्त नाणी (इ. स. पू. २ रे शतक) सापडली आहेत. त्यावरून या लोकांची वसाहत त्या भागात असावी (ॲलेन, कॉईन्स. पृ. १४१).

अल्बेरुणीच्या ग्रंथात—या ग्रंथमते उद्देहिक लोक कनौजच्या ११२ मैल नैर्ऋत्येकडील 'बझान' (चितोडपासून १२५ मैल उत्तरेकडील आधु. नारायणग्राम) गावानजिक रहात असत (इंडिका. १.२०२). दीक्षित यांच्या मते जयपूर राज्यान्तर्गत गंगपुर तहसिलीतील नारायणग्रामपासून ९८ मैल आग्नेयेकडील आणि रायरापासून ४० मैल ईशान्येकडील आधु. बरी उदई गावानजिक हे लोक रहात असावेत (चौधरी, पृ. ४८).

**उद्धरे** (ग्राम)—कदंब राजा कामदेवाच्या स. ११९१ च्या शिलालेखमते धारवाड जिल्ह्याच्या उत्तरेकडील एक ग्राम. या गावच्या स. ११९० च्या होयसाळ राजा बल्लाळ आणि देवगिरीचा राजा भिल्लमच्या युद्धात बल्लाळ विजयी झाला (एपि. कर्ना. ८.४३९; मलप्रभा पहा).

**उद्धव** (तीर्थ)—द्वारका येथील एक तीर्थ (स्कन्द. प्रभास. द्वा. १६.४०).

**उद्ध्य** (नद)—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते पंजाबातील भिद्य (आधु. बई) नदीनजिकचा एक नद (पा. सू. ३.१.११५). अग्रवाल यांच्या मते पंजाबातील आधु. उझ नामक रावी नदीची उपनदी ती हीच होय. काशिका ग्रंथातहि या नदीचा निर्देश इरावती (आधु. रावी) नदीसमवेतच आढळतो.

रघुवंशात—या ग्रंथात राम-लक्ष्मणांच्या अभेद्य जोडीस 'उद्ध्य-भिद्य' नदीद्वयाची उपमा दिली आहे (रघु. ११.८).

या नदीचा निर्देश प्राचीन साहित्यात अन्यत्र कोठेहि आढळत नाही. त्यावरून पंजाबातील दोन पावसाळी नद्यांना 'नद' ही गौरवोपाधी पाणिनीने दिली असावी.

आधुनिक काळी—जम्मू प्रदेशातील जसरौटा जिल्ह्यातून उगम पावणारी आधु. उझ नदी पंजाबातील गुरुदासपुर जिल्ह्यामध्ये रावी नदीस उजव्या बाजूने मिळते. या नदीच्या १५ मैल पश्चिमेकडील बई (प्राचीन भिद्य) नदी गुरुदासपुर जिल्ह्यातच रावी नदीस मिळते (अग्रवाल, पाणिनि. पृ. ५२-५३).

**उद्भस** (देश व लोक)—भारतीय युद्धात नकुल-सहदेव-धृष्टद्युम्नरचित क्रौंचव्यूहाच्या डाव्या भागात खडा असणारा एक लोकसमूह (म. भी. ४६.५१ पाठ).

**उद्भाण्डपुर** (नगर)— राजतरंगिणीमते अफगाणिस्तानातील सुवास्तु (आधु. स्वात) नदीच्या खोऱ्यातील गंधार देशाच्या राजधानीचे गाव (राज. ५.१५२). कनिंगहॅम आणि स्मिथ यांच्या मते अटक गावाच्या १५ मैल उत्तरेकडील आणि सिंधु नदीच्या पश्चिम किनाऱ्यावरील सिंधु-काबूल नद्यांच्या संगमस्थानानजिकचे आधु. ओहिंद (उंद) गाव ते हेच होय (अक्षांश ३४°-२ उत्तर; रेखांश ७२° २७ पूर्व).

सिकंदर, ह्युएन्त्संग, आणि राजतरंगिणीकाली काबूल खोऱ्यातून भारताप्रत येणारा रस्ता पुरुषपुर (आधु. पेशावर) → पुष्कलावती → होती-मर्दान → शहाबाझगढी → उद्भांडपुर अशा वर्तुलाकृती पद्धतीने अटक आणि तक्षशिला गावी येत असे. सिंधु नदीच्या पलीकडच्या प्रदेशातील (पारे सिंधु, म. स. ५१.११) सारे व्यापारी रस्ते उद्भांडपुर येथे एकत्र होत असून, सिंधु नदी ओलांडण्यास आवश्यक तो उतारहि येथेच मिळत असे. गंधार देशाच्या पुष्कलावती आणि तक्षशिला या पश्चिमेकडील आणि पूर्वेकडील राजधान्यांना जोडणारा रस्ताहि याच गावावरून जात असे. त्यामुळे या गावास अनन्यसाधारण व्यापारी, लष्करी आणि राजकीय महत्त्व प्राप्त झाले होते.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात (परिपत्रक पहा).

आधुनिक काळी हे स्थान पंजाबी आणि पुश्तु भाषेत अनुक्रमे 'उंद' आणि 'हंद' नावांनी, तसेच स्थानिक लोकात 'कुंद' आणि 'भटिंडा' नावांनी सुविख्यात असून, त्यापैकी 'भटिंडा' हे अरबी 'वहिंद' (ओहिंद) चे, 'उंद' हे ह्युएन्त्संगच्या 'उदखंड' चे, आणि 'उदखंड' हे संस्कृत 'उद्भांडपुर' चे अपभ्रष्ट रूप आहे. स्टाइन यांच्या

## उद्भाण्डपुरची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. ह्युएन्त्संग (वॉटर्स, १. ११४) | उ-तो-किय-हन्-चा (उदखंड) |
| २. मुहंमद गझनीकालीन मुसलमानी साहित्य | उंड, ओहिंद |
| ३. अरबी साहित्य | वहिंद (ओहिंद) |
| ४. फरिश्ता | विथंड |
| ५. अल्बेरुणी (१.२०६) | वैहंद |
| ६. अन्य अभ्यासक | उथंड, उहंड |

मते या नगराचे आधु. उंद हे नाव उद्भांडपुर>उदखंड >उयहंड>उयैहंड>वैहंद>उहंद अशा क्रमाने व्युत्पन्न झाले असावे (स्टाइन, राज. २.३३७).

**नामव्युत्पत्ती**—स्टाइन यांच्या मते या स्थानी सिंधु नदीस उतार प्राप्त होत असल्याने यास 'उदखंड' (शब्दशः अर्थ—उदकपात्र) नाव प्राप्त झाले असावे.

**खरोष्ठी शिलालेखात**—या गावच्या स. १८९ च्या कुशाण राज्यकालीन खरोष्ठी शिलालेखमते (लांबी—२६½") कुशाण संवत् ६१ च्या चैत्र अष्टमीला पूर्वाषाढ नक्षत्रामध्ये सविर लोकांनी येथे एक विहीर खोदली होती (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.११७).

**सिकंदरस्वारीच्या वर्णनात**—स्मिथ यांच्या मते पुष्कलावती नगराहून ऐरावती नदीच्या मार्गाने सिकंदर सिंधु नदीच्या पश्चिम किनाऱ्यावरील या गावी आला आणि येथे ३० दिवस त्याने विश्रांती घेतली. तदनंतर या गावच्या एओलिमा स्थानी सिंधु नदीवर पूल बांधून तो तक्षशिलेस गेला (स्मिथ, पृ. ६३).

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते गंधार देशातील व्यापारी महत्वाचे हे (उ-तो-किय-हन्-चा = उदखंड) गाव भीमल पर्वताच्या ३० मैल आग्नेयेस आणि शलातुर गावाच्या ४ मैल नैर्ऋत्येस होते. सिंधु नदीच्या उत्तर किनाऱ्यावरील या गावाचे क्षेत्रफळ ४ मैल असून, पूर्वकाळी कपिशा (आधु. काबूल) देशाची उपराजधानी, आणि त्या देशाच्या सम्राटाचे निवासस्थान येथे होते. कालांतराने सभोवतालच्या राजांनी हे नगर जिंकून कपिशा साम्राज्य नष्ट केले. ह्युएन्त्संगच्या काळी गंधार देशाची पुरुषपुर नामक राजधानी तुर्क आणि अरब आक्रमकांच्या भयाने ओस पडली असून, कपिशा देशाचे क्षत्रिय प्रांतपाल उद्भांडपुर येथे राज्य करीत असत.

या गावाहून ह्युएन्त्संग शलातुर→उद्यान→दरद मार्गाने बोलोर (आधु. बाल्टिस्तान) देशास गेला. तेथून पुन्हा परत या गावी येऊन तो सिंधु नदीमार्गाने तक्षशिलेस गेला (वॉटर्स, १.११४).

राजतरंगिणीमध्ये—या ग्रंथमते स. ८७५-८९० मध्ये या गावी 'शाही' (हिंदु) वंशीय लल्लिय राजाचे राज्य असून (राज. ५.१५२-१५५), या वंशातील भीम नामक राजाने कश्मीरात भीमकेशव विष्णुमंदिर बांधले होते (राज. ७.१०८१; भीमकेशव पहा). कश्मीरच्या गोपालवर्मन् राजाने या देशाच्या एका शाहीवंशीय राजाचा पराजय केला होता (राज. ५.२३२). जोनराजमते कश्मीरच्या शहाबुद्दीन सुलतानाने उद्भांडपुरच्या सिंधु आणि गंधारसम्राट गोविंदखान राजाचा पराजय केला होता.

अल्बेरुणीच्या ग्रंथात—ह्युएन्त्संगच्या चार शतके उत्तरकालीन अशा या ग्रंथमते सिंधु नदीच्या पश्चिम किनाऱ्यावरील आणि अटक गावच्या उत्तरेकडील सिंधु-काबूल संगमानजिकच्या 'कंधार' (गंधार) देशाच्या या राजधानीच्या गावी हिंदु शाहीवंशीय राजांनी गझनीच्या मुहंमदास अटकाव करण्याचा निकराचा प्रयत्न केला. या युद्धातील गझनीच्या मुहंमदाच्या विजयामुळे (इ. स. १००९) पंजाब-आक्रमणाचा त्याचा मार्ग खुला झाला (इलियट, २.३३; ४४६).

'हुडुद-अल-आलम' नामक अरबी ग्रंथमते कनौज देशाच्या जयपाल नामक मांडलिक राजाच्या राज्यकाली हे नगर समृद्धावस्थेत असून, तत्काली येथे फारच थोडी मुस्लीम वस्ती होती. फरिश्ताच्या मते 'वैहिंद' दुर्गनिवासी जयपाल राजा शाहीवंशीय अष्टपाल राजाचा पुत्र असून, त्याचे राज्य सरहिंदपासून लम्वानपर्यंत आणि कश्मीरपासून मुलतानपर्यंत होते. गझनीच्या मुहंमदाच्या आक्रमणानंतर त्याने आपली राजधानी लाहोर येथे हलविली.

अवशेष—येथील पुरातन अवशेषांचे आद्य संशोधन रणजितसिंगाच्या दरबारातील जनरल कोर्ट यांनी केले असून (जे. ए. एस्. बी. ५.३९५), येथील वास्तुशिल्पांचे, तसेच शक आणि हिंदु नाण्यांचे संशोधन कनिंगहॅम यांनी केले (कनिंग, पृ. ५२). येथील शारदा लिपीतील संस्कृत शिलालेख बर्न्स यांनी स. १८३७ मध्ये, आणि मशिदीतील एक शिलालेख स्टाइन यांनी शोधला. हे शिलालेख सध्या कलकत्ता आणि लाहोर म्युझियममध्ये आहेत.

या गावापासून अनुक्रमे २० आणि ३० मैल वायव्येस कपूर्दगढी आणि जमालगढी ही ऐतिहासिक स्थाने असून, त्यापैकी कपूर्दगढीपासून १३ मैल इशान्येस 'तख्त-इ-बहै' हे बौद्ध स्तूपस्थान आहे (बील, १.१६३).

**उद्भिद** (देश)— दक्षिण भारतातील एक देश (मार्कं. ५४.४८; वायु. ४५.१२७).

२. (वर्ष) कुशद्वीपान्तर्गत एक वर्ष (उपविभाग) (ब्रह्माण्ड. १९.५७; मार्कं. ५०.२५; लिङ्ग ४६.३६; वायु. ४९.५२; विष्णु २४.३६). नामांतर-'औद्भिद'.

**उद्यन्त** (पर्वत)— महाभारत पुलस्त्ययात्रा, तसेच पौराणिक साहित्यमते गया येथील एक पर्वत (म. आर. ८२.८१; वायु. १०९.१५; पद्म. आदि. ३८.१३). नामांतर 'उद्यन्तक' (वायु. १०८.४३); 'उदयगिरि' (म. आर. ८२. ८३; नारद. उत्तर. ४७.५१).

महाभारतमते गया येथील ब्रह्मयोनि टेकडीनजिकच्या या पर्वतावर गायनाचा सुस्वर ध्वनी ऐकू येत असे (समारोहण पहा). येथील सावित्रपद (सूर्यपद) नामक सूर्यस्थानी संध्यावंदन केले असता द्वादशवर्षीय संध्यावंदनाचे पुण्य मिळत असे. योनिद्वार नामक अन्य एक तीर्थहि येथे होते (म. आर. ८२.८१-८२).

**उद्यान** (देश)—वाल्मीकि रामायणमते अयोध्या-केकय मार्गावरील (अफगाणिस्तानातील) एक देश (वा. रा. अयो. ७१.१२). फाहियेन् आणि ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते हा देश पेशावरच्या उत्तरेस शुभवास्तु (स्वात्) नदीकाठी होता. पेशावरच्या उत्तरेकडील प्रदेश म्हणजे हा देश परंपरेने मानण्यात येत असला तरी ह्युएन्त्संगच्या काळी हिंदुकुश पर्वत आणि दरद देशाच्या दक्षिणेकडील चित्रळपासून सिंधु नदीपर्यंतचा आधु. पंजकोर, बिजावर, स्वात्, आणि बुनिर जिल्ह्यांचा विस्तृत प्रदेश त्यामध्ये समाविष्ट होत असे.

नामांतरे—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतातः—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. फाहियेन् | उ-चँग् (उदा) |
| २. ह्युएन्त्संग | उ-चँग्-न (उदान) |
| ३. प्राकृत साहित्य | उज्जन |
| ४. पाली साहित्य | उय्यान |

नामव्युत्पत्ती—ह्युएन्त्संगच्या जीवनचरित्रमते 'सम्राट अशोकाचा आवडता थंड हवेचा देश (बगीचा)' अशा अर्थाने या देशास हे नाव प्राप्त झाले होते. वॉटर्स यांच्यामते या देशाचे 'उद्यान' (पाली-उय्यान) हे 'उद'

स्थानिक नावाचे अपभ्रष्ट रूप असावे.

**फाहियेन्च्या प्रवासवर्णनात**—उदीच्य (वायव्य) भारतातील या देशात उन्हाळ्याचे तीन महिने राहिलेल्या फाहियेन्ने याचे निसर्गसौंदर्य, सुपीक जमीन आणि बौद्ध धर्मोपासना यांचे सविस्तर वर्णन केले आहे. त्याच्या काळी या बौद्धधर्मीयात देशात हीनयानपंथाचे ५०० मठ होते (लेग, फाहियेन्. पृ. २८-२९).

**सुंगयुंगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते उत्तरेस त्सुंग-लिंग् (पामीर पठार) आणि दक्षिणेस भारतवर्ष यांच्या दरम्यान हा देश होता.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—मिहिरकुलाच्या आक्रमणामुळे या देशातील सुखसमृद्धीचे आणि बौद्धधर्माचे उच्चाटन झाल्यानंतर ह्युएन्त्संग या देशास आला. बील यांच्या मते फाहियेन्च्या नंतर थोड्याच दिवसांनी सिंह नामक तेविसाव्या राजाच्या राज्यकालात (स. ४२०) मिहिरकुलाने हा देश उद्ध्वस्त केला.

ह्युएन्त्संगच्या मते या देशातील शुभवास्तु नदीकाठचे १४०० महायानपंथीय बौद्ध मठ उद्ध्वस्त झाले असून, त्यामधील १८,००० बौद्ध भिक्षू परागंदा झाले होते. येथील उर्वरीत बौद्ध भिक्षू हीनयानपंथीय धर्मगुप्त, कश्यपीय, सर्वास्तिवादिन्, आणि महासांघिक विनयग्रंथांचे पठण करीत असत. येथील लोक कद्रू, दगलबाज आणि जादूटोण्याचे भोक्ते असून, त्यांना अध्ययनाचा कंटाळा होता. येथील शेती देशोधडीस लागली होती.

**भौगोलिक साहिती**—ह्युएन्त्संगच्या मते दऱ्याखोऱ्यांनी भरलेल्या या देशात दलदलीचा प्रदेश आणि रमणीय उपवने यांची रेलचेल होती. येथील हवा समशीतोष्ण आणि पाऊस बेताचा असून, येथे विपुल द्राक्षे, फळे, फुले आणि केशर होत असे. ऊस त्या मानाने कमी पिकत असे. सोन्याचांदीच्या काही खाणीहि येथे होत्या. येथील लोक सुती कपडे वापरीत असून त्यांची बोलीभाषा भारतासदृश आणि लिपी अपरिपक्व अवस्थेत होती.

**गौतम बुद्धाच्या पादुका**—ह्युएन्त्संगच्या मते स्वात नदीच्या उगमानजिकच्या अपलाल-नाग निर्झराच्या ६ मैल नैर्ऋत्येकडील आणि मंगकिल (आधु. मिंगलौर) गावाच्या ५० मैल ईशान्येकडील एका सपाट दगडावर गौतम बुद्धाच्या पादुका असून, त्यांचा आकार भक्ताच्या श्रद्धेनुरूप लहान-मोठा दिसत असे. स्वात-कोहिस्तान सरहद्दीवरील स्वात नदीच्या उगमानजिकच्या आधु. तीरथ गावच्या दरीमध्ये सर हॅरॉल्ड डीन यांना गौतम बुद्धाच्या पादुका आणि इ. स. पू. ५० चा खरोष्ठी शिलालेख सापडला. या अशोक शिलालेखासदृश अक्षरवाटिकायुक्त शिलालेखात 'शक्यमुणिस बोधस पदणि' (शाक्यमुनि बुद्धाच्या पादुका) अशी अक्षरे आढळतात (कॉर्पस्. इन्स्कि. २.१.२.९).

**नगरे**—ह्युएन्त्संगच्या मते या देशामध्ये चार-पाच मजबूत तटबंदीयुक्त नगरे असून, त्यापैकी 'मंग्-चिएह्-लि' (=मंगकिल=आधु. मिंगलौर) गावी याची राजधानी होती (वॉटर्स, १.२४०).

२. (लोकसमूह) गंधार देशातील वासुदेव कनिष्क (द्वितीय) राजकालीन एक लोकसमूह. या लोकांचे 'उयोन' नाव 'उद्यान'चे शकभाषीय रूप असावे. मूळचे इर्तिश-आमूर दुआबातील हे लोक उत्तरकालात सुग्ध दुआबात स्थायिक झाले. नामांतर (चिनी साहित्य)-'जुआन-जुआन'; (फार्सी साहित्य)-'खिओन'.

**उद्यानक** (देश)-- महाभारतमते 'उज्जानकमरु' देशाचे नामांतर (म. आर. १९३; उज्जानकमरु पहा).

**उद्यानमकर** (देश)--मेरु पर्वतोद्भवा सप्तगंगापैकी पूर्ववाहिनी पावनी नदीकाठचा एक प्राच्य देश (वायु. ४७.५५).

**उद्द्वारस्थान** (ग्राम)--नालंदा मुद्रालेखमते पूर्वभारतातील एक ग्राम (अर्कि. सर्व्हे. ६६.३२). येथे संभवतः 'उदुंबरकस्थान' ग्रामाचा निर्देश अभिप्रेत असावा. गया जिल्ह्यातील मखदुंपुर पोलीस विभागातील बराबर (प्राचीन खलतिक) टेकड्यांच्या पायथ्यानजिकचे आधु. उदेरथन गाव ते हेच होय (पांडे, बिहार. पृ. १२९).

**उद्वर्तन सरस्** (तीर्थ)--कश्मीरातील एक तीर्थ (नीलमत. १४७४).

**उनपदेव** (शरभंग-आश्रम, तप्तकुंड)—विदर्भातील यवतमाळ जिल्ह्यातील आदलाबादनजिकचे शरभंग ऋषींचे आश्रमस्थान. येथील ऊष्ण पाण्याच्या झऱ्यामध्ये स्नान केल्याने शरभंग ऋषी कुष्ठरोगमुक्त झाले. स्थानिक आख्यायिकेनुसार शरभंग ऋषींच्या प्रार्थनेवरून श्रीरामाने बाणाच्या साह्याने या कुंडाची निर्मिती केली. या स्थानानजिक ऊनकेश्वर शिवमंदिर आहे (ती. पृ. २३८; २४०).

**उनाव** (सूर्यचक्रस्थान)— मध्यप्रदेशातील झांसीपासून ६ मैल अंतरावरील पहूजा नदीकाठचे सूर्यचक्रस्थान. येथील सूर्यप्रतिमा 'बालाजी' स्थानिक नावाने सुविख्यात आहे (ती. पृ. २०८).

**उन्झा** (ग्राम)— त्रिभुवनपाल चालुक्याच्या वि. सं. १२९० च्या शिलालेखमते उत्तर गुजरातमधील सारस्वत मंडलान्तर्गत दंडाहि पथकातील भांबर (आधु. भाखर)

गावाच्या पश्चिमेकडील एक ग्राम (इंडि. अँटि. ६.२०८–२१०). अजयपाल राजाच्या वि. सं. १२३१ च्या शिलालेखातहि याचा निर्देश आढळतो (पूना. ओरि. १.४.४०). सांकलिया यांच्या मते सिद्धपुर तालुक्यातील भाखर गावाच्या पश्चिमेकडील आधु. उंझा गाव ते हेच होय (सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २५९).

**उन्दिरा** (ग्राम)— भीम (द्वितीय) चालुक्य राजाच्या वि. सं. १२८८ च्या शिलालेखमते उत्तर गुजरातमधील सारस्वत मंडलान्तर्गत वालौय पथकातील (आधु. पाटणमहाल) एक ग्राम (इंडि. अँटि. ६.२०३–२०४). सांकलिया यांच्या मते पाटणमहालाच्या उत्तर सरहद्दीवरील आधु. उद्रा ग्राम ते हेच होय (सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २६३).

**उन्नत** (पर्वत)— कुशद्वीपातील एक पर्वत. नामांतर–'हेम' (मत्स्य. १२२.५३).

२. (वर्ष) कुशद्वीपातील एक वर्ष (उपविभाग). नामांतर–'श्वेत' (मत्स्य. १२२.६५).

३. (वर्षपर्वत) शाल्मलिद्वीपान्तर्गत एक वर्षपर्वत (वायु. ४९.१३; विष्णु. २.४.२६).

४. (विघ्नराज) प्रभासक्षेत्रान्तर्गत एक गणेशस्थान (नारद. उत्तर. ७०.६७). येथील गणेशाचे नाव 'उन्नतविनायक' होते (स्कन्द. प्रभास. प्र. ३२९).

५. (स्थान) प्रभासक्षेत्रातील एक पवित्र स्थान (स्कन्द. प्रभास. प्र. ३१९).

६. (ग्राम) धरसेन (द्वितीय) वलभी राजाच्या स. ५७१ च्या मालिया ताम्रपटमते काठेवाड प्रांतातील एक ग्राम (कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.१७०).

**उन्नतस्वामी** (देवता)—प्रभासक्षेत्रान्तर्गत एक देवतास्थान (स्कन्द. प्रभास. प्र. ३२५).

**उन्नत्यक** (देश)—महाभारतमते दक्षिण भारतातील 'कर्नाटक' देशाचे नामांतर (म. भी. १०.५७; कर्नाटक पहा).

**उन्नाट** (देश)—युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या दिग्विजयसत्रात भीमसेनाने जिंकलेला पूर्व भारतातील एक देश (म. स. २७.५). पाठभेद–'मल्लाट'; 'उल्लाट'. हे संभवतः 'लाट' देशाचे नामांतर असावे (लाट पहा).

**उन्हेरे** (झरा)—कोकणातील पालीपासून २ मैलांवरील ऊष्ण पाण्याचा झरा. येथे मार्गशीर्ष महिन्यात विठोबाची यात्रा भरते.

**उपक** (देश)—मेरुपर्वतोद्भवा सप्तगंगांपैकी पूर्ववाहिनी ह्लादिनी नदीकाठचा एक देश (मत्स्य. १२१.५२).

**उपकृतगण** (लोकसमूह)—राजसूय यज्ञसमयीच्या दिग्विजयसत्रात सहदेवाने जिंकलेला दक्षिण भारतातील एक लोकसमूह (म. स. २८.४३).

**उपगिरि** (पर्वत)—महाभारतमते युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या उत्तर दिग्विजयात अर्जुनाने जिंकलेला हिमालय पर्वतान्तर्गत एक पर्वत. 'अंतर्गिरि' आणि 'बहिर्गिरि' पर्वतांसमवेत अर्जुनाने हा जिंकला होता (म. स. २४.२). पाणिनीच्या अष्टाध्यायीतहि याचा निर्देश आढळतो (पा. सू. ५.४.११२). नामांतर (सेनकभाष्य)-'उपागिरम्.'

अग्रवाल यांच्या मते हिमालय पर्वताच्या तीन समांतर पर्वतश्रेणींपैकी आधु. तराई हा दक्षिणतम पर्वत हाच होय.

नामव्युत्पत्ती— 'उपगिरि'चा शब्दशः अर्थ 'हिमालयाच्या पायथ्यानजिकचा उपपर्वत' असा होतो.

भौगोलिक वर्णन—हिमालयाच्या पायथ्यानजिकचा हा दलदलीचा मैदानी प्रदेश नेपाळमध्ये 'तराई', नैनिताल जिल्ह्यामध्ये 'भाभर', आणि डेहराडून प्रदेशात 'दून' (संस्कृत–'द्रोणी') नावांना ओळखला जातो. यापैकी 'भाभर' नाव नैनिताल जिल्ह्यातील विशिष्ट जातीच्या गवतावरून पडले आहे. तराई प्रदेशाची सरासरी उंची १०००'–२००० असून हरिद्वारपासून डेहराडूनपर्यंतच छोट्या टेकड्यांच्या चढणीचा प्रदेश त्यामध्ये समाविष्ट होतो (अग्रवाल, पाणिनि. पृ. ४३–४४).

**उपगूढ** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू ४.२.८०.३).

**उपजङ्घनि** (लिंग)—काशी येथील ज्येष्ठेश्वरानजिकचे एक शिवलिंग (स्कन्द. काशी. ६५.८).

**उपजला** (नदी)—महाभारत लोमशयात्रामते यमुना नदीनजिकची एक पवित्र नदी. हिच्या काठी यज्ञ करणाऱ्या उशीनर राजाला इंद्राहूनहि श्रेष्ठ पदाची प्राप्ती झाली (म. आर. १३०.१७).

**उपज्योतिष** (देश)—बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या मध्यभागातील एक देश (बृ. सं. १४.३). पाठभेद–'औपज्योतिष'.

**उपतिश्श** (ग्राम)—बिहारमधील 'नालग्राम'संज्ञक बौद्ध तीर्थाचे नामांतर (वॉटर्स, २.१७२; नालग्राम पहा;).

**उपत्यक** (देश)—महाभारतमते भारतवर्षान्तर्गत एक देश (म. भी. १०.५४). 'उपत्यक'चा शब्दशः अर्थ 'पर्वताच्या उताराच्या प्रदेश' असा होतो.

**उपनिवेश** (नगर)—संस्कृत साहित्यमते वायव्य भारतातील एक नगर. काबूल खोऱ्यातील काबूल गावाच्या ३० मैल

उत्तरेकडील चारिकर गावानजिकचे आधु. ओपियान गाव ते हेच असून 'उपनिवेश 'चेच ते अपभ्रष्ट रूप असावे. नामांतर ( ग्रीक साहित्य )–' अलेक्झांड्रिया अपुद् कॉकेसम् ' ( अलेक्झांड्रिया पहा ).

प्राचीन ' कपिशा ' ( आधु. काफिरिस्तान ) देशाहून बाह्लिक ( आधु. बल्ख ) देशाप्रत हिंदुकुश पर्वताच्या बरमती खिंडीहून ( आधु. बामियन खिंड ) जाणाऱ्या पर्वतीय रस्त्याच्या कापिश देशाभिमुख्य प्रवेशद्वारानजिक हे गाव होते. त्यामुळे लष्करी दृष्ट्या ते महत्त्वाचे मानले जात असे. ओपियान गावी विपुल स्थापत्यावशेष सापडतात ( चौधरी, पृ. ९९ ).

**उपनन्दन** ( देश )—महाभारतमते एक देश. भारतीय युद्धात येथील लोक भीष्मरक्षणाचे कार्य करीत होते ( म. भी. ४७.८ ).

**उपमन्यु–ईश** ( लिंग )—काशी येथील एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ९७.१९२; लिंग. तीर्थविवेचन. पृ. ६७ ).

**उपप्लव्य** ( नगर )—महाभारतमते प्राचीन मत्स्य ( विराट ) देशातील सरस्वती नदीकाठचे एक नगर ( म. वि. ६७.१४; श. ३४.५; ७ ). मत्स्यराजधानी विराटनगरापासून ( राजस्थानमधील आधु. बैराट ) थोड्याच अंतरावर हे गाव असून भारतीय युद्धकाली पांडवांची राजधानी या गावी होती. जयचंद्र यांच्या मते राजस्थानमधील आधु. अलवार गाव ते हेच होय. नामांतर ( ऐन्–इ–अकबरी )–' पल्लव '; ' अपलेव '.

महाभारतकाली या गावाचे हस्तिनापुराशी सदैव दळणवळण चालू असून हे अंतर तोडण्यास एक दिवस लागत असे. वाटेमध्ये रात्रीचा मुक्काम वृकस्थल येथे करण्यात येई. घोड्याचा रथ एका दिवसात ५६ योजने ( ११२ मैल ) जातो असे मानल्यास महाभारतकालीन या दोन नगरांमध्ये १०० मैल अंतर असावे.

**महाभारतात**—या ग्रंथमते अज्ञातवासानंतर पांडव याच नगरात प्रकट झाले. त्यांचे आप्तेष्ट, अभिमन्यू आदि पुत्र-पौत्रादि परिवार, तसेच श्रीकृष्ण आदि सुहृद त्यांस येथेच येऊन भेटले ( म. भी. ६७.१५–३८; ११५०* ). उत्तरा आणि अभिमन्यु यांचा विवाहहि याच गावी झाला. भारतीय युद्ध संपेपर्यंत पांडव याच गावी असून भारतीय युद्धकाली द्रौपदी आदि त्यांची कुटुंबीय मंडळी येथेच रहात असत.

**कृष्णदौत्य**— भारतीय युद्धाप्रीत्यर्थ पांडव सैन्य एकत्र करीत असता धृतराष्ट्राने संजयाला दौत्यकर्मासाठी येथेच पाठविले ( म. उ. २२.१ ). पांडवांच्या दौत्यकर्मासाठी कृष्ण येथूनच हस्तिनापुरी गेला ( म. उ. ८३.१८ ). रात्री वृकस्थल येथे मुक्काम करून ( म. उ. ८३.२० ), दुसऱ्या दिवशी तो हस्तिनापुरी पोहोचला ( म. उ. ८४.१ ). हस्तिनापुरी तो विदुराकडे राहिला ( म. उ. ९० ). भारतीय युद्धानंतर गांधारीच्या सांत्वनार्थ कृष्ण एक दिवसाचा प्रवास करून उपप्लव्याहून हस्तिनापुरी गेला होता ( म. शां. ६१.३८–६२ ).

**भारतीय युद्धात**—या युद्धकाली पांडवांचे अंतःपुर ( शिबिर ) उपप्लव्यानजिकच्या हिरण्वती ( आधु. हिरण ) नदीकाठी होते. हे शिबिर आणि उपप्लव्यच्या दरम्यानच्या ओघवती नदीकाठी पांडव आणि कृष्ण रहात असत ( म. श. ६१.३७ ). पांडवांच्या शिबिरातील अश्वत्थामनकृत रात्रिसंहाराची हकीगत धृष्टद्युम्नाच्या सारथ्याने पांडवांना आणि द्रौपदीला सांगितली ( म. उ. २२.१ ). या संहाराची वार्ता अंतर्ज्ञानाने ज्ञात झालेला श्रीकृष्ण त्वरेने हस्तिनापुराहून उपप्लव्य येथे आला ( म. श. ६२.६८ ).

**ऐन्–इ–अकबरीमध्ये**—या ग्रंथमते अकबराच्या राज्यकाली पल्वल ( उपप्लव्य ) हे तालुक्याचे ( महाल ) गाव असून, या गावापासून लुधियानापर्यंतचा प्रदेश दिल्ली सुभ्यामध्ये समाविष्ट होत असे ( ऐ. अ. २. २७८; २८६ ).

**उपप्लव्यपुर** ( जैनस्थान )—राजस्थानातील 'अलवर' जैनस्थानाचे नामांतर. अन्य नामांतर–' हरिश्चंद्रपुर ' ( अलवर पहा ).

**उपबर्हिण** ( पर्वत )—क्रौंचद्वीपातील एक पर्वत ( भा. ५.२०.२१ ).

**उपभाग** ( देश )—मेरु पर्वतोद्भवा सप्तगंगांपैकी पूर्ववाहिनी ह्लादिनी नदीकाठचा एक देश ( ब्राह्माण्ड. १८.६३ ). पाठभेद–' उपभोग ' ( वायु. ४७.५१ ).

**उपमन्यु वैयाघ्रपद्य-आश्रम** ( आश्रमस्थान )—हिमालय पर्वतातील गंगा नदीकाठचे उपमन्यु वयाघ्रपद्य ऋषींचे आश्रमस्थान ( म. अनु. १४.४४–५५ ).

**उपमेरु** ( देश )—हिमवत् पर्वतताच्या उत्तरेकडील पर्वतानजिकचा पर्वतमय प्रदेश. याची उत्तर–दक्षिण परिसीमा बिंदुसरोवर आणि निषधपर्वत यांनी बनली असून, हेमशृंग शिखर याच देशात होते ( भारतस्थलादर्श. पृ. १२३ ).

**उपराज** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४. २. ११६ ).

**उपरिगिरि** ( देश )—महाभारतमते हिमालय पर्वतान्तर्गत ' उपगिरि ' पर्वताचे नामांतर ( म. स.

२४.४; उपगिरि पहा ).

**उपरिपत्तन** ( राज्यविभाग )—वनमलवर्मदेवाच्या इ. स. ९ व्या शतकातील पर्वतीय ताम्रपटमते पूर्व भारतातील प्राग्ज्योतिषपुर ( आधु. आसाम ) नजिकचा एक राज्यविभाग. प्राग्ज्योतिषाधिपती भगदत्ताच्या वज्रदत्त नामक बंधूने या देशविभागावर स्वामित्व प्राप्त केले होते. चिनी साहित्यमते हा पर्वतीय प्रदेश प्राग्ज्योतिष देशाच्या पूर्वेस होता ( एपि. इंडि. २९.१४; १५२ ).

**उपरिशियन** ( पर्वत )—इराणी साहित्यमते अफगाणिस्तानातील 'कुक्कुटागिरि' ( आधु. कोहेबाबा ) पर्वताचे नामांतर ( कुक्कुटागिरि पहा ). ग्रीक नामांतर—'परोपमिसस्.'

**उपवङ्ग** ( देश )—बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या आग्नेय भागातील एक देश ( बृ. सं. १४.८ ). वंग देशाचा हा विभाग गंगा नदीच्या त्रिभुज प्रदेशात असावा ( चौधरी, पृ. १८२; वंग पहा ).

**उपवत्तन सालवन** ( वन )—मल्ल देशातील एक शालवन. येथे गौतम बुद्धाचे महापरिनिर्वाण झाले ( दीघ. २.१६९; मल्ल पहा ) 'उपावर्तन शालवन' चे हे रूपांतर असावे.

**उपवास्य** ( देश )—एक जनपद ( पद्म. आदि. ६.४० ).

**उपवितान्तर** ( तीर्थ )—दक्षिण भारतातील रामाच्या सेतूनजिकचे एक तीर्थ ( स्कन्द. ब्राह्म. सेतु. ४२.८ ).

**उपशान्त** ( लिंग )—वाराणसी येथील एक शिवलिंग ( कूर्म. पूर्व. ३५.१४ ). नामांतर—'महान्त्यायतन' ( स्कन्द. काशी. ७३.६१; ९७.४९; पद्म. आदि. ३७.१७; लिङ्ग. १.९२.१०७ ).

**उपहालक** ( देश )—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते कर्नाटकातील 'कुंतल' देशाचे नामांतर ( अभिधान १३०.९६१; कुंतल पहा ).

**उपारथ्या** ( नदी )—गौतमी ( गोदावरी ) नदीनजिकची एक नदी ( ब्रह्म. १०५.२५ ).

**उपावृश्व** ( देश )—एक जनपद ( म. भी. १०.४७ ). पाठभेद—'उपावृत्' ( पद्म. आदि. ६.४३ ).

**उपास्नान** ( तीर्थ )—पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यामते एक तीर्थ ( पतञ्जलि. १.४३० ). पाठभेद—'उपस्नात.'

**उ-पिन** ( नगर )—ह्युएन्त्संग पूर्वकालीन चिनी साहित्यमते वायव्य भारतातील 'कपिशा' नगरीचे नामांतर ( कपिशा पहा ).

**उपेन्द्रा** ( नदी )—भारतवर्षातील एक नदी ( म. भी. १०.२६; पद्म. आदि. ६.२२ ).

**उप्पलहेट** ( राज्यविभाग )—वलभी राजा शिलादित्य ( सप्तम ) च्या स. ७६६ च्या अलीना ताम्रपटमते पश्चिम भारतातील खेटक आहारान्तर्गत ( आधु. खेडा जिल्हा ) एक राज्यविभाग ( पथक ). महिलाबालि नामक ग्राम यामध्ये होते. गुजरातमधील खेडा गावाच्या ३५ मैल पूर्वेकडील आधु. उप्लेट ( उप्लेटा ) गावाच्या परिसरात हा असावा ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.१७३ ).

**उप्पिलिअप्पन् कोइल** ( विष्णुक्षेत्र )—दक्षिण भारतातील एक विष्णुक्षेत्र. भारतातील १०८ वैष्णवस्थानांमध्ये याची गणना होते. मायावरमपासून १७ मैलांवरील तिरुनागेश्वरम् रेल्वेस्थानकानजिकचे हे स्थान तिरुपतिइतकेच पवित्र मानतात ( ती. पृ. ३६२ ).

२. ( लक्ष्मीक्षेत्र ) दक्षिण भारतातील एक लक्ष्मीक्षेत्र. कुंभकोणमपासून ४ मैल आग्नेयेकडील या मंदिरात विष्णु, श्रीदेवी ( लक्ष्मी ) आणि मार्कंडेय ऋषींच्या प्रतिमा आहेत. स्थानिक समजुतीनुसार मार्कंडेय ऋषींनी भगवान विष्णु आणि लक्ष्मी यांचा विवाह येथे लावला ( ती. पृ. ३६७ ).

**उप्पुनोल्लि** ( ग्राम )—स. ९६५ च्या एंग्रादि शिलालेखमते 'पुलिनाडु' ( आधु. चित्तर जिल्हा ) देशातील एक गाव. याचे आधुनिक स्थान समजत नाही ( रंगाचारी. १.२०१-२०७ ).

**उप्पूर** ( तीर्थ )—दक्षिण भारतातील एक गणेशस्थान. रामनाथपुर ( आधु. रामनाद ) च्या २० मैल उत्तरेकडील या स्थानी दाशरथी रामाने सेतुबंधनापूर्वी स्थापिलेली गणेशमूर्ती आहे ( ती. पृ. ३८२ ).

**उभडा ( लघु )** ( ग्राम )—चालुक्य राजा भीम ( द्वितीय ) च्या वि. सं. १२९६ च्या शिलालेखमते उत्तर गुजरातमधील वार्द्धिपथकातील एक ग्राम. आधु. नाना उभडा गाव ते हेच होय. या गावच्या 'लघु' उपाधीवरून 'बृहत् उभडा' संज्ञक अन्य एक ग्राम असावे ( इंडि. ॲंटि. ६.२०६-२०९ ).

**उभलोड पथक** ( राज्यविभाग )—सोळंकी राजा जयसिंहच्या वि. सं. ११९६ च्या शिलालेखमते मध्य गुजरातमधील गोद्रहक महामंडल ( आधु. गोध्रा ) देशविभागातील एक राज्यविभाग ( इंडि. ॲंटि. १०.१५९ ). या राजाच्या वि. सं. १२०२ च्या अन्य एका शिलालेखमते कोडग्राम, अश्विलिया ( आधु. सिम्नलिया ) आदि ग्रामे

यामध्ये होती. दोहादच्या ६ मैल दक्षिणेकडील आधु. उमलोद गावाच्या परिसरातील प्रदेश तो हाच होय (सांकलिया, गुजरात. पृ. २०१).

**उमङ्ग** (नगरी)—स. १४३९ च्या मुंगादेव शिलालेखमते बिहार प्रांतातील एक नगर (जे. ए. एस्. बी. १६. ६५७). गया जिल्ह्यातील औरंगाबाद उपविभागातील ग्रँड-ट्रंक रोडच्या १०७ व्या मैलाच्या एक मैल दक्षिणेस उमगा पर्वतावर या गावाचे स्थापत्यावशेष आढळतात.

**सूर्यमंदिर**— कैमुर पर्वताच्या शाखाभूत अशा उमगा पर्वतावर उमंगदेव (आधु. मुंगादेव) नामक एक सूर्यमंदिर (उंची ६०′) असून, त्याच्या परिसरात अन्य छोटी बावन्न मंदिरे, तसेच पर्वताच्या अत्युच्च शिखरावर गौरीशंकरमंदिर आढळते. विजयादशमी आणि शिवरात्रीला येथे यात्रा भरते.

उमंगदेव मंदिरातील इ. स. १५ व्या शतकातील शिलालेखमते या टेकडीवरील उमंग नगरीची स्थापना सोमवंशीय दुर्दम राजाने केली. या वंशातील बारा राजांची नामावलीहि तेथे आढळते. या राजघराण्याचा निर्देश अन्यत्र आढळत नाही. त्यावरून हा स्थानिक राजवंश असावा. या टेकडीवरील अरबी भाषेतील शिलालेखावरून मुसलमानी राज्यकालातहि याचे महत्त्व अबाधित असावे (पांडे, बिहार. पृ. १२७).

**उमरखेल** (स्तूप)—गंधार (आधु. अफगाणिस्तान) देशान्तर्गत जलालाबाद स्तूपसमूहातील एक बौद्ध स्तूपस्थान. दारंता गावानजिकचा हा स्तूप गंधार देशातील अन्य स्तूपांच्या तुलनेने (सरासरी परीघ १००′) खूपच मोठा (परीघ ३००′) आहे (फर्ग्युसन, १.९०; दारंता पहा).

**उमरथा** (ग्राम)— अजयपाल चालुक्याच्या वि. सं. १२२९ च्या शिलालेखमते माळवा देशातील भृंगारिक ६४ पथकातील एक ग्राम. याचे आधुनिक स्थान समजत नाही (इंडि. अँटि. १८.३४७–३४८).

**उमा** (नदी)—प्रवरसेन (द्वितीय) वाकाटक राजाच्या कोठुरक दानपत्रमते मध्यभारतातील कोठुरक गावाच्या पूर्व सरहद्दीवरील एक नदी. नागपुर जिल्ह्यातील आधु. बुन्ना नदी ती हीच होय (एपि. इंडि. २६.१५५).

**उमाकुण्ड** (तीर्थ)— लोहार्गलक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ (वराह १५१.६४–६६).

**उमागुरु** (पर्वत)— मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते 'हिमवत्' पर्वताचे नामांतर (त्रिकाण्ड. ३५.१; हिमवत् पहा).

**उमाचल** (टेकडी)—भौम राजा महेंद्रवर्मन्च्या (स. ४७०–४९४) शिलालेखमते पूर्व भारतातील गौहत्तीनजिकची एक टेकडी. बलभद्र (बलराम) देवाप्रीत्यर्थ त्याने येथे एक लेणे खोदले होते (एपि. इंडि. ३१.६७–६८).

**उमातीर्थ** (तीर्थ)—काशी येथील एक तीर्थ (स्कन्द. काशी. ८४.८४).

**उमातुङ्ग** (तीर्थ)—एक श्राद्धयोग्य तीर्थ (कूर्म. उत्तर. ३७.३२; वायु. ७७.८१–८२).

**उमापति** (शिवस्थान)—प्रभासक्षेत्रान्तर्गत देविकेनजिकचे एक शिवस्थान (स्कन्द. प्रभास. २७६).

**उमापुर** (नगर)—गुजरातमधील हाटकेश्वर (आधु. वडनगर) क्षेत्रानजिकचे एक नगर (स्कन्द. नागर. पृ. ५० टीप). आधु. उंझा ग्राम बहुधा हेच असावे.

**उमामहेश्वर** (मंदिरस्थान)—आंध्र प्रदेशातील गुंतूर जिल्ह्यातील बेझवाडा येथील कृष्णा नदीकाठचे एक मंदिरस्थान. अम्मराज (द्वितीय) चालुक्य राजाच्या स. ९५८ च्या मंदिरलेखमते हे मंदिर पूर्व चालुक्य राजा विजयादित्य–नरेंद्र मृगराज याने स. ८५० मध्ये बांधले (रंगाचारी, २. गुंतूर. ८१३.)

२. (लिंग) हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंग (स्कन्द. नागर. ४८).

**उमावन** (वन)—हिमालय पर्वताच्या दक्षिण भागातील शिवपार्वतींच्या लीलांनी पुनीत झालेले एक वन. वायुमते हे किन्नरयुक्त वन जंबूद्वीपात कैलास पर्वतावर निषधपर्वताच्या पूर्वेस होते (वायु. ४१.३६). ब्रह्मपुराणान्तर्गत गौतमीमाहात्म्यातहि याचा निर्देश आढळतो (ब्रह्म. १०८. २५). नामांतर–'शरवण'.

**व्याप्ती**—मत्स्यमते या वनाचा परीघ 'दशमंडल योजन' (दहा योजने = ४० मैल) होता (मत्स्य. ११.४४–४७; १२.६).

**शिवलीला**—वायुमते पार्वतीने शिवप्राप्त्यर्थ येथे तपस्या केली असून, येथेच त्यांचा विवाह झाला. किरातवेषाने पार्वतीशी क्रीडा करणाऱ्या शिवाने येथूनच जंबूद्वीपावलोकन केले. आपले अर्धनारीनटेश्वर रूपहि शिवाने येथेच प्रकट केले. येथे जन्मलेल्या षडानन स्कंदाने क्रौंचशैलवनावर शक्ति फेकून क्रौंचभेद केला. स्कंदाची 'पांडुशिल' आदि क्रीडास्थाने येथे असून, देवांनी त्यास सैनापत्याभिषेकहि येथेच केला (वायु. ४१.२७–३७).

**महत्त्वपूर्ण स्थाने**--या वनाच्या पूर्व भागात सिद्धांची 'कलापग्राम' संज्ञक वसाहत असून त्यानजिकच मृकंड, वसिष्ठ, नल, विश्वामित्र, उद्दालक आदि ऋषींचे आश्रम होते (वायु. ४१.३८–४८).

चमत्कार—जैमिनि अश्वमेधमते तपस्यामग्न पार्वतीने येथे प्रवेश करणाऱ्या पुरुषास स्त्रीरूप प्राप्त होण्याचा शाप दिला होता ( जै. अ. २१.६४ ). येथे आलेला मनुपुत्र सुद्युम्न या शापानुसार इला नामक स्त्री बनला ( वायु. ८५.२७ ).

**उमाहक** ( तीर्थ )—नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( कूर्म. उत्तर. ४१.५७ ).

**उम्टौया** ( ग्राम )—त्रिभुवनपाल चालुक्याच्या वि. सं. १२९० च्या शिलालेखमते उत्तर गुजरातेतील सारस्वत मंडलान्तर्गत विषयपथकातील ( आधु. कडी महाल ) राजापुरी ( आधु. राजपुर ) च्या वायव्येकडील एक ग्राम ( इंडि. अँटि. ६.२०८–२१० ). कडी महालातील आधु. उटाव गाव ते हेच होय ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २५९ ).

**उम्पाक** ( देश )—मेरु पर्वतोद्भवा चतुर्गंगांपैकी पश्चिमवाहिनी चक्षु नदीकाठचा एक देश ( वायु. ४७.४४ ).

**उम्बर** ( देश )—विंध्य पर्वतान्तर्गत एक देश ( वामन. १३.५५ ).

**उम्भतक** ( सभागृह )—मल्ल लोकांनी कुशीनारा ( आधु. कसिया ) गावी बांधलेले एक सभागार ( सभागृह ). गौतम बुद्धाने याचे उद्घाटन केले होते ( दीघ. ३.२०७ ).

**उम्भि** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.९५ )

**उम्मत्तूर** ( नगर )—देप्पन्न वोडियार राजाच्या स. १४८५ च्या शिलालेखमते त्याच्या स्वामित्वाखालील दक्षिण म्हैसूरातील धारापुरम्नजिकचे एक नगर. कोईमतुर जिल्ह्यातील चामराजपुरम् तालुक्यातील आधु. उम्मत्तूर गाव ते हेच होय. इ. स. १६ व्या शतकात हे नगर विजयनगरच्या मांडलिक राजांच्या ताब्यात होते ( एपि. इंडि. ७.१७ ). नामांतर ( मुसलमानी साहित्य )–' कतुइर ' ( काडव ). या देशाच्या काडव राजवंशावरून यास ' काडव ' नाव प्राप्त झाले असावे ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. २३८ ).

**उम्बरणी** ( ग्राम )—चालुक्य राजा भीम ( द्वितीय )-च्या वि. सं. १२८७ च्या शिलालेखमते दक्षिण राजपुतान्यातील एक ग्राम. देलवाडा ( अबू पर्वत ) गावाच्या ७ मैल नैर्ऋत्येकडील आधु. उमर्णी गाव हेच होय ( एपि. इंडि. ८.२२० ).

**उय्यान** ( देश )—पाली साहित्यमते वायव्य भारतातील ' उद्यान ' देशाचे नामांतर ( उद्यान पहा ).

**उरःसङ्कीर्ण भौमक** ( देश )— जंबूद्वीपान्तर्गत भद्राश्ववर्षातील एक देश ( वायु. ४३.२१ ).

**उरग** ( देश ).—महाभारतमते हिमालय प्रदेशातील एक जनपद ( म. भी. १०.५३; पद्म. आदि. ६.४९ ). पौराणिक साहित्यमते हे गंगा नदीच्या पश्चिम किनाऱ्यावर होते ( ब्रह्माण्ड. १८.४९; मत्स्य. १२१.४८; वायु. ४७.-४७ ). महाभारतकाली उरगा गावी याची राजधानी असून, येथील रोचमान राजास अर्जुनाने युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या उत्तर दिग्विजयात जिंकले होते ( म. स. २४.१८ ).

**उरगपुर** ( नगर )—रघुवंशमते दक्षिण भारतातील पांड्य देशाच्या राजधानीचे नगर ( रघु. ६.५९ ). शिलालेखसाहित्यमते चोल राजा परांतक ( प्रथम ) ची राजधानी या गावी असून ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. २.२५२; ३७५; ४५९ ), पांड्य राजा अरिकेसरीने स. ७०० मध्ये या गावा सभोवतालच्या तटाची पुनर्बांधणी केली होती ( इंडि. अँन्टि. ८.१९८; २७३ ). त्रिचनापल्लीच्या आग्नेयेकडील कावेरी नदीच्या दक्षिण किनाऱ्यावरील आधु. उरैय्यूर ( ओरैयूर ) गाव ते हेच होय. जयचंद्र यांच्या मते तामीळ देशाची राजधानी ' तिरुचिरापल्ली ' ( आधु. त्रिचनापल्ली ) हीच होय ( जयचन्द्र, पृ. १५० ). चोल साम्राज्याच्या परमोत्कर्षकाली ( इ. स. ११ वे शतक ) चोल देशाची राजधानी याच गावी असून, समस्त तामीळ प्रदेशाचा, तसेच पांड्य ( आधु. दक्षिण त्रावणकोर ) प्रदेशाचा कारभार येथूनच चालत असे. या गावचे लक्ष्मीदेवीचे देवालय या भागातील प्रमुख यात्रास्थान आहे ( ती. पृ. ३०४ ).

नामांतरे—प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात :–

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. टॉलेमी | ओर्थौर |
| २. मध्ययुगीन शिलालेख साहित्य | उरइयूर, ओरैयूर |
| ३. तामीळ शिलालेख साहित्य | कोरी, कोलि |
| ४. रघुवंश ( मल्लिनाथ भाष्य ) | नागपुर |
| ५. पेरिप्लस | अरगु |
| ६. पवनदूत | भुजनगर |

नामव्युत्पत्ती—' उरगपुर'चा शब्दशः अर्थ ' नागांचे शहर ' असून, त्याआधारे हे पांड्यराजधानी मदुरेचे ( तामीळ–अरवय = सर्प ) नामांतर असल्याचे अनुमान काही अभ्यासक काढतात. परंतु ते भौगोलिकदृष्ट्या यथायोग्य वाटत नाही.

टॉलेमीच्या ग्रंथात—या ग्रंथमते सोरिंगै ( प्लिनी-सिरिनै = चोर = चोल ) लोकांचा 'पांडे' (पांड्य) आणि 'देरंगै' (द्राविड) देशांच्या दरम्यानच्या राज्याच्या दोन राजधान्या 'ओथौंर' (उरगपुर), आणि 'अर्कतोस्' (आधु. अर्काट) गावी होत्या. देवदत्त भांडारकर यांच्या मते टॉलेमीच्या, तसेच शकसम्राट युक्रतिदेसच्या काळी चोल लोकांची उत्तर आणि दक्षिण चोल संज्ञक दोन राज्ये अस्तित्वात असून, त्यांच्या राजधान्या या दोन गावी असाव्यात.

शिलालेख साहित्यात--चोल राजा नेडुमुडि किल्लीला शेट्शेन्नि-नलम् किल्ली नामक त्याच्या बंधूने स. १८० मध्ये येथे वेढा घातला असता चेर राजा शेंगुत्तुवनने त्याची सुटका केली ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. १५ ). पांड्य राजा मारवर्मन् अरिकेसरीने स. ६५० मध्ये हे गाव जिंकले होते ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३७७ ). विक्रमादित्य ( प्रथम ) चालुक्याच्या स. ६७४ च्या गढवाल ताम्रपटमते त्याने कांची देशानंतर पांड्यराजधानी उरगपुरावर आक्रमण केले ( एपि. इंडि. १०.१०१ ). हुल्ट्झ यांच्या मते येथे उरैय्यूरच्या ऐवजी भारताच्या पूर्व किनाऱ्यावरील नागपट्टणम् (आधु. नेगपतम्) नगराचा निर्देश येथे अभिप्रेत आहे ( एपि. इंडि. १०.१०२; नागपट्टणम् पहा ).

पल्लव अधिसत्ता--या गावच्या स. ६०० च्या पल्लव राजा महेंद्र (प्रथम) च्या प्रशस्तिस्तंभात हा राजा चोलसत्तेच्या त्रिचनापल्ली टेकडीरूपी गंडस्थलाकडे काकदृष्टीने पहात असल्याचा निर्देश आढळतो. यावरून या काळी पल्लवांनी कावेरी नदी ओलांडून हे नगर ताब्यात घेतले असावे ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. १.२८ ). या प्रदेशातील पल्लव राजांच्या त्रिचनापल्ली, वल्लम्, शीयमंगलम्, दलावानर, महेंद्रवाडी, मंडगपट्ट आदि गुफामंदिरांवरून इ. स. ७ व्या शतकात हा सारा प्रदेश त्यांच्या ताब्यात असावा ( मद्रास. एपि. रिपोर्ट. स. १९०४-१९०५ ). इ. स. ६ व्या शतकात चालुक्य राजांनी प्रतिष्ठान प्रदेशातून हद्दपार केलेल्या पल्लव राजांनी या प्रदेशावर नवे राज्य प्रस्थापित केले असावे.

पांड्य शिलालेख—पांड्य राजा वरगुण ( द्वितीय ) चा स. ८७२ चा एक गुफालेख ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३७ ), तसेच स. ८७४ चा एक मंदिरलेख या गावी आढळतो ( एपि. इंडि. ११.२५३; रंगाचारी, ३. त्रिचनापल्ली. ६८३ ).

चोल शिलालेख—चोल राजा राजेंद्र ( प्रथम ) चा स. १०१४ चा एक मंदिरलेख ( रंगाचारी, ३. त्रिचनापल्ली. २८३ ), तसेच राजाधिराज ( प्रथम ) चा स. १०४४ चा एक शिलालेख या प्रदेशात आढळतो ( रंगाचारी, ३. त्रिचनापल्ली. ८८४ ).

उत्तरकालीन शिलालेख— स. ११००-१२९२ कालातील उत्तर म्हैसूरचे 'चोलमहाराज 'वंशीय राजे स्वतःस 'ओरैयूर ( उरैयूर ) चे सम्राट' म्हणवीत असत ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३६९ ). कल्याणी येथील बिज्जल राजाच्या स. ११६१ च्या शिलालेखमते हा प्रदेश त्याच्या मांडलिकत्वाखाली होता ( आर्कि. सर्व्हे. स. १९१७. क्र. १५ ). सदाशिवरायाच्या शके १४६७ च्या श्रीरंगम् ताम्रपटमते चिंतामणी ग्रामाची पश्चिम परिसीमा उरइयूर-कृष्णराय अलवंदपुर ( आधु. अम्ममंदपुर ) रस्त्याने बनली होती. हा रस्ता आजहि त्रिचनापल्लीनजिक अस्तित्वात आहे.

मध्ययुगीन काली—स. १७४० मध्ये मराठ्यांनी येथील चंदासाहेब नामक सुलतानाचा पराजय करून येथे मुरारीराव नामक सुभेदार नेमला ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. २९७ ). स. १७५४ मध्ये मुरारीरावाने या गावी इंग्रजांचा फार मोठा पराजय केला ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३०० ).

**उरगा** ( नगर )—महाभारतमते हिमालय प्रदेशातील 'उरग' देशाच्या राजधानीचे गाव ( उरग पहा ).

**उरण** (ग्राम )—शिलालेख साहित्यमते पश्चिम भारतातील एक ग्राम. मुंबईनजिकचे आधु. उरण गाव हेच होय ( एपि. इंडि. २३.२७९ ).

**उरत्ति** ( ग्राम )—राजराज ( तृतीय ) चोल राजाच्या स. १२२१ च्या चित्तूर शिलालेखमते दक्षिण भारतातील एक ग्राम. चिंगलपेट जिल्ह्यातील आधु. ओरत्ति गाव हेच होय ( रंगाचारी, १. चित्तूर २८६ ).

**उरश** ( देश )—पाणिनीच्या गणपाठमते वायव्य भारतातील 'उरशा' देशाचे नामांतर ( पा. सू. ४.१.१५४; उरशा पहा ).

**उरशा**—( देश )—पाणिनीच्या गणपाठमते उदीच्य भारतातील ईशान्य हिमालयीन प्रदेशातील एक जनपद ( पा. सू. ४.२.८२; ३.९३ ). सिंधु, कृष्णगंगा आणि वितस्ता ( आधु. झेलम ) नद्यांच्या आणि पश्चिम गंधार आणि अभिसार ( आधु. पूंच, राजौरी प्रदेश ) देशांच्या दरम्यानचा आधु. हजारा जिल्हा आणि त्यालगतचा सिंधु नदीपर्यंतचा प्रदेश मिळून हा देश बनला होता. राजतरंगिणीमते या देशाच्या वायव्य सरहद्दीवर लढवय्ये लोकांचा अत्यग्रपुर ( आधु. अग्रोर ) देश होता ( राज. ८.३४०२; अत्यग्रपुर पहा ).

स्टेन कोनौ यांच्या मते हजारा परगण्यातील आधु.

अग्रोर खोरे हा उरशा लोकसमूहाचा बालेकिल्ला असून, त्या खोऱ्यातील शहदौर गावी स. ६० चे दोन खरोष्ट्री शिलालेख सापडले आहेत (एपि. इंडि. १९.१९८). या देशाच्या हजारा जिल्ह्याबाहेरील प्रदेशात तमौलि, हस्सरझै, अकझै आदि टोळ्यांचे लोक सध्या निवास करतात.

कनिंगहॅम यांच्या मते पंजाबातील मुजफ्फराबादच्या पश्चिमेकडील पखावर प्रदेशातील अटकपर्यंतचा सिंधु नदी-काठचा आधु. रश् जिल्हा म्हणजे हा देश असावा. परंतु त्यांचे हे अनुमान यथायोग्य वाटत नाही.

**नामांतरे**---प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. ह्युएन्त्संग् (वॉटर्स, १.२५६) | वु-ल-शिह |
| २. महाभारत (म. द्रो. १०.१६) | उरगा, औरस, (औरसिक) |
| ३. राजतरंगिणी (५.२१६) | उरस |
| ४. पाणिनि (सू. ४.१. १५४) | उरश |
| ५. पौराणिक साहित्य (मत्स्य. १२१.४६). | औरस |
| ६. दिओन्योसस् (मॅक्रिंडल, इंडिया. १९९). | अर्सनियन लोक |
| ७. टॉलेमी | अर्स |
| ८. प्लिनी | अर्सगलितै |
| ९. ऐन्-इ-अकबरी (२.३९०) | पखलि |
| १०. सिकंदरस्वारीशी संबंधित ग्रीक साहित्य | अर्सकेस् (उरसा) |

**खरोष्ट्री शिलालेखात**---स. ५२ च्या तक्षिला रौप्यपटात 'उरसक' (उरशा देशनिवासी) संज्ञेचा प्रयोग आढळतो. स्टेन कोनौ यांच्या मते येथे 'शक (= शक्तिसंपन्न) जमातीपैकी' असा अर्थ अभिप्रेत आहे (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.७४).

मानसेहरा गावाच्या १४ मैल वायव्येकडील बेदादि खरोष्ट्री ताम्रपळीलेखात संघरक्षित नामक व्यक्तीने उरशादेशीय चतुर्दिशसंघीय काश्यपीय भिक्षूंना दान दिल्याचा निर्देश आढळतो. यावरुन तक्षशिला येथील काश्यपीय संघाची एक शाखा या देशात असावी (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.८८; काश्यपीय पहा).

**सिकंदरस्वारीशी संबंधित ग्रीक साहित्यात**-- या साहित्यमते तक्षशिला देशाच्या उत्तरेकडील 'अर्सकेस्' (उरसा) देशाहून सिकंदर पूर्वेकडील अभिसार देशात गेला (लॅसेन, इंडि. अल्टि. २.१५५; १७५). दिओन्योससच्या ग्रंथमते 'अर्सनियन' (उरशा) लोक सिरंदिओइ (किरात) लोकांसमवेत निवास करीत असत (मॅक्रिन्डल, इंडिया. पृ. १९९).

**पाणिनीच्या गणपाठात**-- या ग्रंथात 'उरश' ही संज्ञा 'लोकसमूह' आणि 'नगर' अशा उभय अर्थांनी उपयोजिली आहे (पा. सू. ४.१.१५४; २.८२; ३.९३).

**टॉलेमीच्या ग्रंथात**— या ग्रंथमते 'अर्स' (उरशा) देश बिदस्पेस (वितस्ता) आणि सिंधु नद्यांच्या दरम्यान असून, 'इथगौरोस्' आणि 'तक्षिला' ही या देशातील प्रमुख नगरे होती (मॅक्रिन्डल, टॉलेमी. ७. १;४५). टॉलेमीचे 'अर्स' आणि 'गिलिजट' (संस्कृत-'गहलथ') यांच्या संमिश्रणाने बनविलेल्या या देशाच्या 'अर्सगलितै' नावाचा निर्देश प्लिनीच्या ग्रंथात आढळतो.

**महाभारतात**— महाभारतमते अभिसारी आणि सिंहपुर (आधु. सॉल्ट रेंज) यांच्या दरम्यानच्या 'उरगा' लोक-समूहाची पर्वतीय राजधानी उरगा गावी असून, तेथील रोचमान राजास अर्जुनाने युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञ-समयीच्या उत्तर दिग्विजयात जिंकले होते (म. स. २४. १८). महाभारत भीष्मपर्वात 'उरग' जनपदाचा (म. भी. १०.५३), आणि रघुवंशात 'उरग नगरा'चा निर्देश आढळतो (रघु. ६.५९). श्रीकृष्णाने जिंकलेले औरसक (औरसिक) लोकहि बहुधा हेच असावेत (म. द्रो. १०.१६).

**पौराणिक साहित्यात**--मत्स्यमते मेरु पर्वतोद्भवा सप्तगंगां-पैकी पश्चिमवाहिनी सिंधु नदीकाठी 'औरस' लोकसमूह रहात असे (मत्स्य. १२१.४६).

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**--या ग्रंथमते 'वु-ल-शिह' हा कश्मीरच्या वायव्येकडील देश ह्युएन्त्संगच्या काळी कश्मीरचाच भाग मानला जात असे. तक्षशिला देशाहून १०० मैल ईशान्येकडील या देशाचा फेरफटका करून ह्युएन्त्संग २०० मैल आग्नेयेकडील कश्मीर देशास गेला.

ह्युएन्त्संगच्या मते या देशाचे आणि त्याच्या राजधानीचे क्षेत्रफळ अनुक्रमे ४०० मैल व १$\frac{2}{3}$ मैल होते. येथील लोक असंस्कृत आणि दगलबाज असून, बौद्धेतर धर्मांचे येथे प्राबल्य होते. या देशाच्या राजधानीच्या गावापासून एक

मैलावर एक अशोकस्तूप (उंची २००′), आणि एक महायान बौद्धमठ होता (वॉटर्स, १.२५६-२५७; बील, १.१८७-१८८).

**राजतरंगिणीमध्ये**—या ग्रंथमते काश्मीरच्या पश्चिम सरहद्दीवरील हा देश राजतरंगिणीकाली काश्मीरहून स्वतंत्र मानला जात असे. काश्मीरच्या कलश राजाने कृष्णा (आधु. कृष्णगंगा) नदी ओलांडून या देशाच्या अभय राजास कैद करून स्वदरबारात आणले (राज. ७.५८५-५८९). कलश राजाचे हे आक्रमण मुजफ्फराबाद येथील किशनगंगा-वितस्ता संगमाच्या उत्तरेकडील रस्त्याने झाले असावे. कालांतराने अभय राजाने काश्मीरच्या भोज राजकुमारास आपली कन्या देऊन तह घडविला (राज. ८.१६). या देशाचा संगट नामक अन्य एक राजाहि काश्मीरसम्राट कलशाला शरण आला होता (राज. ७.५८८-५९०; ८.२१७८). काश्मीरच्या सुस्सल आणि जयसिंह राजांनीहि या देशावर विजय प्राप्त केला होता (राज. ८.५७४; ३४०२).

काश्मीरचा राजा शंकरवर्मन् या देशावरील आक्रमण-प्रसंगी मृत झाला. स्टाइन यांच्या मते शंकरवर्म्याचे हे आक्रमण काश्मीरसरहद्दीवरील 'बोल्ल्यासक' (आधु. बुलिआस) →मुफ्फराबाद→गढी हबिबुल्ला→मानसेहरा→हजारा परगण्यातील ॲबटाबाद मार्गाने झाले असून त्याचा मृत्यु ॲबटाबाद टेकड्यांमध्ये झाला असावा.

**राजधानी**—या देशाची प्राचीनतम राजधानी हरिपुर गावी असून त्या गावच्या मनोऱ्यानजिकच्या पीर-मामक नामक दर्ग्याच्या जागी येथील प्राचीनतम वसाहत होती (इंडि. ॲंटि. २.३३६). कनिंगहॅम यांचे मते ॲबटाबाद आणि मानसेहराच्या दरम्यानच्या आधु. मंगलि गावी या देशाची राजधानी होती (कनिंग., १. पृ. १०४).

**ऐन्-इ-अकबरीमध्ये**—या ग्रंथमते अकबराच्या राज्यकाली पूर्वेस काश्मीर आणि पश्चिमेस सिंधु नदी यांच्या दरम्यानचा हा देश 'पखिल' नावाने सुविख्यात असून किशनगंगा आणि तिच्या उपनदीच्या खोऱ्याचा खालचा भाग, तसेच काज्नाग पर्वत यांचा समावेशहि त्यामध्ये होत असे (ऐ. अ. २.३९०). ब्रिटिश राज्यकालात या देशाचा उत्तर भाग काश्मीर राज्याचाच भाग मानला जाऊ लागला (हजारा गॅझेटियर. स. १८८३, पृ. १९; स्टाइन, राज. १.२१५; २.४३४).

**उरिसो** (राज्यविभाग)—नृसिंह (द्वितीय) राजाच्या स. १२९४ च्या अल्लपुर ताम्रपटमते ओरिसामधील एक राज्यविभाग (परकोणा). या राज्यविभागाच्या पश्चिम सरहद्दीवर 'यन्त्रचापटीग्राम' होते. जगत्सिंगपुर जिल्ह्यातील आधु. उरिसा गावाच्या परिसरातील प्रदेश म्हणजे हा राज्यविभाग असावा (एपि. इंडि. ३१.१९-२१).

**उरुकर्म** (देश)—वायव्य भारतातील एक देश (मार्के. ५५.४०).

**उरुञ्जिरा** (नदी)—निरुक्तमते 'विपाशा' (आधु. बियास) नदीचे पूर्वकालीन नामांतर (नि. ९.२६; विपाशा पहा).

**उरुमुण्ड** (टेकडी)—मथुरा नगराच्या पूर्व भागातील सुविख्यात बौद्ध टेकडी. या टेकडीवरील उपगुप्त नामक बौद्ध आचार्याच्या धर्ममठाचा निर्देश ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात 'पर्वतीय बौद्धमठ' नावाने आढळतो.

**पूर्वेतिहास**—मथुरा प्रांताविषयी गौतम बुद्धाचे चांगले मत नसल्याने तेथे त्याने बौद्धधर्मप्रसार केला नाही. ते कार्य उत्तरकालामध्ये या टेकडीवर बौद्धमठ बांधून उपगुप्ताने केले. नट आणि बट नामक बंधूंनी बांधलेल्या या महान उपगुहाच्या काळी १८०० बौद्धभिक्षू होते. ह्युएन्त्संगच्या मते या टेकडीच्या आग्नेयेकडील 'महावना'मध्ये सारिपुत्र आदि १२५० बुद्धशिष्यांनी तपस्या केली होती.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात उपगुप्ताच्या बौद्धमठाची निम्नलिखित नामांतरे आढळतातः-१. 'गुहाविहार' (मथुरा सिंह-स्तंभलेख; जे. आर. ए. एस. स. १८९४, पृ. ५२६); २. '**नटबट विहार**'; ३. '**नटिक संघाराम**' ४. **नटभटिकारण्यायतन** (दिव्यावदान २६); ५. 'यि-इन्-क-लन्' (पर्वतीय बौद्धमठ; ह्युएन्त्संग); ६. '**नटिक ग्राम बौद्धविहार**' (चिनी साहित्य; वॉटर्स, १.३०६-३०८).

**उरुवेला** (जंगलमय प्रदेश आणि नगर)—बौद्ध साहित्य-मते गौतम बुद्धाच्या वास्तव्याने पुनीत झालेले बिहारमधील अरण्य (संयुत्त. १.१०३; १३६; ५.१६; १८५; २३२). हे गया येथील 'गयाशीर्ष' (ब्रह्मयोनि) पर्वताच्या दक्षिणेस नैरांजना (आधु. फल्गु) नदीच्या उभय किनाऱ्यांवर होते. बोधिगया गावानजिकचे आधु. 'उरेल' गाव ते हेच होय (अर्कि. सर्व्हे. स. १९०८, पृ. १४४;). नामांतर-'उरुविल्व.'

बौद्ध साहित्यमते बोधिगया येथे परमज्ञानप्राप्त गौतम बुद्ध येथे तपस्येसाठी आला. येथील निसर्गरम्य वातावरणाने प्रसन्न होऊन तो येथील अजपाल वटवृक्षाखाली सहा वर्षे राहिला (ललित. पृ. ३११; संयुत्त. १.१०३; १२२; ५.१६७ १८५), येथे काही ब्राह्मणांशी त्याने धर्मचर्चा केली

(अङ्गुत्तर. २.२० ). सारनाथ येथील मृगवनामध्ये काही काल राहिल्यानंतर तो पुन्हा एकवार येथे आला (जा. १८६ ). येथे जटिल नामक तीन बंधूंना त्याने बौद्धधर्माची दीक्षा दिली ( जा. ४.१८० ).

नामव्युत्पत्ती--' उरुवेला ' नावाची व्युत्पत्ती बौद्ध साहित्यात निम्नप्रकारे दिली आहे :—

१. वाळूचा ढिगारा--महावंश टीकामते ' वाळूचा ढिगारा ' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले असून ( महावंश. टीका. १.१२.८४ ), फल्गु नदीने आणून टाकलेल्या वाळूचे ढिगारे आजहि येथे दिसतात.

२. बेलवृक्षांचे वन--डॉ. राजेंद्रलाल मित्र यांच्या मते येथील बेलवृक्षांच्या वनामुळे यास हे नाव प्राप्त झाले ( मित्रा, बोधिगया. पृ. ८ ). आधु. काळी येथे बेलाचे एकहि झाड आढळत नाही.

३. विस्तृत किनारा--महावंश टीकामते ' उरुवेला'चा शब्दशः अर्थ ' विस्तृत किनारा ' असून, फल्गु नदीच्या विस्तृत किनाऱ्यामुळे यास हे नाव मिळाले असावे.

अन्य निर्देश--बौद्ध साहित्यमते या गावच्या ' उरुविल्व' ' गया ' आणि ' नदी ' नामक तीन अग्निपूजक ब्राह्मण बंधूंनी बौद्धधर्माचा स्वीकार केला. हे गाव आणि राजगृह यांच्या दरम्यानच्या अराड कालाम आणि उद्र रामपुत्र नामक दोन आचार्यांनी येथे योगशिक्षणाच्या पाठशाला सुरू केल्या. ( मज्झिम. १.१६३; जा. १.६६; मनोरथपूरणि. १. २.९७ ).

ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात--या ग्रंथात ' काश्यपाचे गाव ' अशा मोघम नावाने याचा निर्देश असून, येथील काश्यपाच्या स्मृतिस्तूपामुळे त्यास हे नाव मिळाले होते. या स्तूपाच्या दक्षिणेस ' गया ' आणि ' नदी कश्यप ' नामक बंधूंचे स्मृतिस्तूप होते ( वॉटर्स, २.१११–११२ ).

महत्त्व--गया गावाचा निसर्गरम्य परिसर गौतम बुद्धाच्या काळी ' उरुवेला ' स्थानिक नावाने सुविख्यात असून, उत्तरकालात हाच प्रदेश बोधिगया नावाने प्रसिद्ध झाला ( कॉर्पस्, इन्स्क्रि. १.५९; बोधिगया पहा ).

**उरुशृङ्ग** ( पर्वत )—शाकद्वीपातील एक पर्वत ( भा. ५.२०.२६ ).

**उर्ग** ( बौद्धस्थान )—मंगोलियातील सुविख्यात बौद्धस्थान. येथील बौद्धमठात बोधिसत्त्वाचे अवतारभूत असे तारानाथ नामक दलाई लामा निवास करतात. प्रमुख दलाई लामा तिबेटराजधानी ल्हासानजिकच्या पोतल बौद्धमठात रहातात ( फर्ग्युसन, १.२९३; पोतल १. पहा ).

**उर्जन्त** ( पर्वत )—ब्रह्माण्डमते पश्चिम भारतातील ' ऊर्जयत् ' पर्वताचे नामांतर ( ब्रह्माण्ड. १३.५३; ऊर्जयत् पहा ).

**उर्दि** ( पर्वत )—पाणिनीच्या भाष्यवार्तिकमते वायव्य भारतातील एक देश ( पा. सू. ४.२.११; ९९ ). अग्रवाल यांच्या मते प्राचीन गंधार महाजनपदामध्ये ( आधु. अफगाणिस्तान ) समाविष्ट होणारा हा देश सुवास्तु ( आधु. स्वात ) आणि गौरी ( आधु. पंजकोरा ) नद्यांच्या दरम्यानच्या स्वात खोऱ्यात होता. या देशाची डावी सरहद्द सिंधु नदी आणि उरशा ( आधु. हजारा ) जनपद यांनी बनली होती. नामांतर ( बौद्ध साहित्य )–' उड्डियान; ' ( पतंजलीचे व्याकरण महाभाष्य )–' और्दायनी. '

लोकसमूह--'उर्दि देशनिवासी' अशा अर्थाने येथील लोक ' और्दायनी ' ( पा. सू. भाष्य. २ २९२ ) नावाने सुविख्यात होते. या देशातील घोंगड्या पाणिनीच्या काळी पांडुकंबल ' नावाने सुविख्यात असून, भारतवर्षान्तर्गत मध्यदेशातील ( पंजाबातील सरस्वती नदीकाठचा प्रदेश ) सैनिकांसाठी त्या आयात करीत असत. स्वात नदीच्या खोऱ्यातील कांबळी आजहि सुविख्यात आहेत ( अग्रवाल, पाणिनि. पृ. ४७ ).

शक्तिपीठ—कालिकामते येथे सतीचे उरुयुग्म पडले ( कालिका. १८.४२ ). येथील देवीचे नाव कात्यायनी होते ( कालिका. १८.५० ).

**उर्धस्थान** ( देश )—संस्कृत साहित्यमते ' कुभातल ' ( आधु. काबूल ) देशाचे नामांतर ( कुभातल पहा ).

**उर्वशी** ( कुंड, तीर्थ )--बदरिकाश्रमातील एक तीर्थ ( नारद. उत्तर. ६७.६५; वराह. १४१.५१–६४; स्कन्द. बदरी. ७ ). सध्या हे बदरीनाथानजिकच्या पर्वतावर चरणपादुकांनजिक आहे ( ती. पृ. ६० ).

२. अयोध्या येथील एक तीर्थ (स्कन्द. वैष्णव. अयोध्या).

३. गौतमी ( गोदावरी ) नदीकाठचे एक तीर्थ ( ब्रह्म. १७१.१ ). पुलस्त्ययात्रेत ( म. आर. ८२.१३६ ), तसेच अंगिरस्यात्रेत याचा निर्देश आढळतो ( म. अनु. २५.४६; पद्म. आदि. १.३८.६४ ).

४. ( लिंग ) वाराणसी येथील एक शिवलिंग ( लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. ६६–७२ ).

**उर्वशीपुलिन** ( तीर्थ )—महाभारतमते प्रयाग येथील एक श्राद्धयोग्य तीर्थ ( म. अनु. २५.४६; अग्नि. १११.१३; पद्म आदि. ११.५९; ४३.३४; मत्स्य. २०.६६; १०६.३४–३५ ).

**उर्वशीरमण** ( तीर्थ )—प्रयाग येथील एक तीर्थ

(मत्स्य. १०६.३४).

**उर्वीमाया** (नगरी)—भविष्यमते परिहरवंशीय महीपति राजाने स्थापिलेले भारतवर्षातील एक नगर (भवि. प्रति. ३.२२ ४.४).

**उल** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू. ४.२.८०.११).

**उलखद** (जैनतीर्थ)—विदर्भातील परभणी जिल्ह्यातील पूर्णा रेल्वेस्थानकापासून १७ मैलांवरील पूर्णा नदीकाठचे एक जैनतीर्थ. येथे नेमिनाथाचे एक मंदिर आहे (ती. पृ. २७६).

**उलङ्ची** (नगर)—वायुमते पश्चिम निषध पर्वतातील एक नगर (वायु. ४१.४८–६५). हिंदुकुश पर्वतातील आधु. दारकोट गाव हेच होय (निषध पहा).

**उलन्द** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू. ४.२.८०.१).

**उलिग्राम** (ग्राम)—चालुक्य राजा भीम (द्वितीय) च्या वि. सं. १२५६ च्या शिलालेखमते उत्तर गुजरातमधील 'पुलिग्राम' (आधु. पिलुद्र) ग्रामाचे नामांतर (इंडि. अँटि. ११.७१; पुलिग्राम पहा).

**उलुवा** (ग्राम)—रत्नदेव (तृतीय) कलचुरि राजाच्या स. ११८१ च्या शिलालेखमते मध्यप्रदेशातील एक ग्राम. रायपुर जिल्ह्यातील आधु. उल्वा ग्राम ते हेच होय (कॉर्पस्. इन्स्क्रि ४ २.५३६).

**उलूक** (आश्रम)—वत्स देशान्तर्गत उलूक ऋषींचे आश्रमस्थान. येथे अंबेने भीष्मवधार्थ तपस्या केली (म. उ. १८७.२५). नामांतर–'नंद आश्रम'.

२. (तीर्थ) नर्मदा नदीकाठचा एक तीर्थसमूह. नारदमते यामध्ये सातशे उपतीर्थे समाविष्ट होती. आधुनिक मोरवाडीपासून ४ मैल अंतरावर हे आहे. येथून ४ मैलांवर 'शूलपाणिवन' समाप्त होते (ती. पृ. ४३१).

३. (देश) मार्कंडेयमते वायव्य भारतातील 'कुलूत' देशाचे नामांतर (मार्क. ५५.४०; कुलूत पहा).

४. (लोकसमूह) हिमालय पर्वतामधील एक लोकसमूह (म. आर. १९१.४–१०). महाभारतकाळी या लोकांच्या नेपाळमधील स्वतंत्र राज्याचा प्राकारकर्ण नामक 'कैतव' प्रमुख होता (म. उ. १६०.९). यावरून 'कर्णप्रावरण' लोकसमूहाचे हे नामांतर असावे (पार्गि., ३४६; कर्णप्रावरण पहा).

**उलूकिका** (योगिनी)—काशी येथील एक योगिनीस्थान (स्कन्द. काशी. ४५ ३५).

**उलूखलमेखला** (यक्षस्थान)—कुरुक्षेत्रातील एक यक्षस्थान (नारद. उत्तर. ६५.४१; वामन. ३४.४५).

**उलूखिनःयूप** (तीर्थ)—महाभारत लोमशयात्रामते एक तीर्थ (म. आर. १२९.१४)

**उलूत** (देश)—ब्रह्माण्डमते वायव्य भारतातील 'कुलूत' देशाचे नामांतर (ब्रह्माण्ड. १६.४८; म. भी. १०.५२; कुलूत पहा).

**उल्केश्वर** (लिंग)—तापी नदीकाठचे एक शिवलिंग (तापीमाहात्म्य).

**उल्वमेरु** (तीर्थ)—कुरुक्षेत्रातील एक तीर्थ (वामन. ४३.३७).

**उल्लन** (ग्राम)—भुलुंड राजाच्या स. ३५७ च्या इंदोर ताम्रपटमते महाराष्ट्रातील एक ग्राम. जळगाव जिल्ह्यातील भुसावळच्या ९ मैल पूर्वेकडील तापी नदीकाठचे आधु. उधळी गाव हेच होय (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.९).

**उलिद** (देश)—दक्षिणापथातील एक देश (वामन. १३.५०).

**उवरिवद्र** (ग्राम)—गुर्जर राजा दद्द (तृतीय) च्या स. ६७५ च्या भडोच ताम्रपटमते पश्चिम भारतातील कोरेल्ल चतुरशीति विभागातील एक ग्राम. भडोचच्या ८ मैल दक्षिणेकडील आधु. उमरवारा गाव हेच होय (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.६१९).

**उशिर** (टेकडी)—मथुरेनजिकच्या 'उरुमुंड' (आधु. कंकाली–टिला) टेकडीचे नामांतर (वॉटर्स, १. ३०८; उरुमुंड पहा).

**उशिरगिरि** (पर्वत)—दिव्यावदानमते हिमालय पर्वतान्तर्गत 'उशीरध्वज' पर्वताचे नामांतर (उशीरध्वज पहा).

**उशीनर** (देश)—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते वाहीक (आधु. पंजाब) देशान्तर्गत एक जनपद आणि आयुधजीवी संघ (पा. सू. ४.२.११७–११८). अग्रवाल यांच्या मते पाणिनिकालीन वाहीक देशाच्या तीन प्रमुख जनपदांमध्ये याचा समावेश असून (अन्य दोन जनपदे–केकय, मद्र), रावी आणि चिनाब नद्यांच्या, तसेच मद्र देशाच्या दक्षिणेकडील आधु. झंग मघियाना या संघराज्यातील लोक 'औशीनर' नावाने सुविख्यात होते. उशीनर देशनिवासी स्त्री ऋग्वेदकाळी 'उशीनराणी' नावाने ओळखली जात असे (ऋ. १०.५९ १०). नामांतर (ऐन्–इ–अकबरी)–'शोर'.

पतंजलीच्या काळी हा देश 'शैब विषय' (शिबि देश, पतञ्जलि. ४.२.५२) आणि 'उशीनर' उपविभागात विभागला असून, आधु. झंग आणि मघियाना जिल्हे, उशीनर देशामध्ये आणि त्यांच्या दक्षिणेकडील शोरकोट

जिल्हा शिबि जनपदामध्ये समाविष्ट होत असे. परस्परसंबद्ध लोकसमूहांनी हे उपविभाग व्यापले असून, पाणिनीच्या काळी उशीनर लोकांचे आणि महाभारतकाली शिबि लोकांचे विशेष वर्चस्व या प्रदेशात असल्याचे या ग्रंथातील अनुक्रमे 'शिबि' आणि 'उशीनर' लोकांसंबंधीच्या मौनावरून दिसते. ऐतरेय आणि गोपथ ब्राह्मणमते उशीनर देश मध्यदेशात (पंजाबातील सरस्वती नदीच्या पश्चिमेकडील प्रदेश), आणि उत्तर भारतात होता (ऐ. ब्रा. ८.१४; गो. ब्रा. २.९).

गोसमृद्धी—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते या गोधनसंपन्न देशातील लोकांच्या आहारात दूधदुभत्याची रेलचेल असे (पा. सू. ४.२.११८; ८.४.९.). महाभारतमते शिबि राजाने मेघधारांसदृश अगणित धेनू दान दिल्या होत्या (म. द्रो. ५७.३-७).

नगरे—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते या देशात 'सौशिमिकंथ' आणि 'आह्वरकंथ' संज्ञक दोन 'कंथ' अंत्य शब्दयुक्त नगरे होती (पा. सू. २.४.२०). पाणिनीच्या मते या देशात 'कंथा' अंत्यशब्दयुक्त नगरनामांचे 'कंथ' असे नपुसकलिंगी रूप होत असून त्याने निर्देशिलेली निम्नलिखित अन्य 'कंथ' अंत्यशब्दयुक्त नगरेहि याच देशातील असावीत :—१. चिहणकंथ; २. मडरकंथ; ३. वैतुलकंथ; ४. पटत्कंथ; ५. वैडालिकर्णकंथ; ६. कुक्कुटकंथ; ७. चित्कणकंथ (पा. सू. ६.२.१२५). या देशातील 'सुदर्शन' आणि 'आह्वजाल' नामक अन्य दोन नगरांचा निर्देश काशिकेत आढळतो.

अग्रवाल यांच्या मते 'कथा' हा शकभाषीय नगरवाचक शब्द मध्यआशियातील शाकद्वीपाहून निघून (इ. स. पू. ४ थे शतक) तोची, गोमल खोऱ्यांच्या (प्राचीन वर्णु देश) आणि गझनी-कंदाहार नगरांच्या मार्गे उशीनर देशात आलेल्या शक लोकांनी येथे प्रस्थापित केला. त्यावरून मूळचे अफगाणिस्तानातील उशीनर लोक उत्तरकालात पंजाबात स्थायिक झाले असावेत (अग्रवाल, पाणिनि. पृ. ८३).

बौद्ध साहित्यात—बौद्ध जातकात उशीनर देशाच्या राजांचा अनेकवेळा निर्देश आढळतो (निमि जातक. ६.१९९; नारद-कस्सप जातक. ६.२५१; जा. ४.१८१).

महाभारतात—या ग्रंथमते हे लोक शिबि औशीनर राजाचे वंशज होते (म. आर. १९४.२; द्रो.२८.१). त्या राजाची राजधानी शिबिपुर (झंग जिल्ह्यातील आधु. शोरकोट) गावी असून, त्या गावी आजहि अनेक स्थापत्यावशेष आढळतात (शिबि पहा). बृहत्संहितेमध्येहि 'उशीनर देश' आणि 'औशीनर' लोकांचा निर्देश आढळतो (बृ. सं. ४.२२; १६.२६).

कथासरित्सागरात—या ग्रंथमते गंगा नदीच्या उगमानजिकच्या कनखल तीर्थानजिक उशीनर नामक एक पर्वत होता. त्यावरून ब्राह्मण साहित्यातील उशीनर देश गंगा नदीच्या उगमानजिक कुरु देशाच्या उत्तरेस असावा (केंब्रिज हिस्टरी. १.८४).

ऐन्-इ-अकबरीमध्ये—या ग्रंथामध्ये या देशाचा निर्देश 'शोर' नावाने असून, ते संभवतः 'शिबिपुर'चे अपभ्रष्ट रूप असावे.

२. (तीर्थ) महाभारत लोमशयात्रामते जला, उपजला आणि यमुना नदीकाठचे भृगुतुंग पर्वतानजिकचे एक तीर्थ (म. आर. १३०.१७; १३१. ३१). हे औशीनर शिबि राजाचे यज्ञस्थान आणि निवासस्थान (उशीनरसदन) होते.

**उशीरध्वज** (पर्वत)—विनयपिटकमते उत्तर भारतातील एक पर्वत. कनखल सरोवराच्या उत्तरेकडील हरिद्वारनजिकच्या सिवालिक पर्वतान्तर्गत आधु. उशीरगिरि पर्वत हाच होय (इंडि. अँटि. इ. स. १९०५, पृ. १७९). याच पर्वताच्या मार्गाने गंगा नदी सर्वप्रथम मैदानी प्रदेशात उतरते. नामांतर (पाली साहित्य)-'उशिनारा'; (कथासरित्सागर)-'उशीनरगिरि'; (दिव्यावदान)-'उशिरगिरि.'

**उशीरबीज** (पर्वत)—महाभारत लोमशयात्रामते हिमालय पर्वतातील एक पर्वत (म. आर. १४०.१). येथील जांबूनद सरोवराच्या काठी मरुत्त राजाने यज्ञ केला होता (म. आर. १०९.२०).

**उशीरा** (नदी)—हिमालयोद्भवा एक नदी (वामन १३.२१).

**उषभञ्जनक** (तीर्थ)—मथुरा येथील एक तीर्थ. नामांतर-'ऋषभंजनक' (वराह. तीर्थविवेचन. पृ. १९१).

**उषरक्षेत्र** (तीर्थ)—द्वारका येथील एक तीर्थ (स्कन्द. प्रभास. ४.५४).

२. (तीर्थ) हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ (स्कन्द. नागर. ११२. २३-२७).

**उषरेश्वर** (लिंग)—अवंती येथील एक शिवलिंग (स्कन्द. आवन्त्य. अ. ७०.७८).

**उषावन** (नगर)—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते पूर्व भारतातील 'शोणितपुर' नगराचे नामांतर (त्रिकाण्ड. ३२.१७; शोणितपुर पहा).

**उर्वीमठ** (तीर्थ)—केदारनाथ-बदरीनाथ मार्गावरील एक तीर्थ. हिमवर्षाकाली केदारक्षेत्रातील केदारनाथाची

चलमूर्ती येथे स्थलांतरित करतात. येथील मंदिरात बदरीनाथ, तुंगनाथ, ओंकारेश्वर, केदारनाथ, उषा, अनिरुद्ध, मांधाता आदि देवतांच्या तसेच सत्य, त्रेता, द्वापार आदि युगांच्या मूर्ती आहेत ( ती. पृ. ५६ ).

**उषेश्वर** ( लिंग )—प्रभासक्षेत्रातील एक शिवलिंग ( स्कन्द. प्रभास. प्र. ७१; नारद. उत्तर. ७०.१७ ).

**उष्ट्रकर्ण** ( देश )--मेरु पर्वतोद्भवा सप्तगंगांपैकी पूर्ववाहिनी ह्लादिनी-नदीच्या मार्गावरील एक देश ( वायु. ४७. ५२ ).

**उष्ट्रकर्णिक** ( देश )—दक्षिण भारतातील एक देश. युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या दक्षिण दिग्विजयात सहदेवाने हा जिंकला होता ( म. स. २९.४८ ).

**उष्ट्रग्रीवा** ( योगिनी )—काशी येथील एक योगिनीक्षेत्र ( स्कन्द. काशी. ४५.३४ ).

**उष्णकेश्वर** (लिंग )—तापी नदीकाठचे एक शिवलिंग ( तापीमाहात्म्य ).

**उष्णतीर्थ** ( देवीस्थान )--पद्ममते एक देवीस्थान. येथील देवीचे नाव अभया होते ( पद्म. आदि. १७.२०६; मत्स्य. १३.४२ ).

**उष्णवर्ष** ( वर्ष )—क्रौंचद्वीपातील एक वर्ष ( ब्रह्माण्ड. १९.७२; मत्स्य. १२२.८५; म. भी. १३.२१; मार्कं. ५०.२३; लिङ्ग. ४६.३३; वायु. ४९.६६; विष्णु. २.४. ४८ ). मत्स्य व महाभारतात यास देश म्हटले आहे.

**उष्णीगङ्ग** ( तीर्थ )—महाभारत लोमशयात्रामते ‘ तूष्णीगंगा ’ तीर्थाचे नामांतर ( म. आर. १३५.७; तूष्णीगंगा पहा ).

**उष्णोदक** ( तीर्थ )--कश्मीरातील एक तीर्थ ( नीलमत. १४७५ ).

**उहण्ड** ( नगर )--अफगाणिस्तानातील ‘ उद्भांडपुर ’ नगराचे नामांतर ( उद्भांडपुर पहा ).

**उहा** ( नदी )--बौद्ध साहित्यमते हिमवत् पर्वतातील एक नदी ( मिलिन्द. पृ. ७० ).

---

# ऊ

**ऊञ्चोगाव** (क्षेत्र )— गोकुळ-वृंदावन परिसरातील व्रजमंडलान्तर्गत एक क्षेत्र. ही बलरामाची क्रीडाभूमी, राधा-कृष्णाचे विवाहस्थान, आणि श्री ललितेचे निवासस्थान असून येथे ‘ सयागतीर्थ, ’ श्रीबलदेव—रासमंडल ’ आदि तीर्थे आहेत ( ती. पृ. १०३ ).

**ऊतरच** ( ग्राम )— चालुक्य राजा भीम ( द्वितीय ) च्या वि. सं. १२८७ च्या शिलालेखमते दक्षिण राजपुतान्यातील एक ग्राम. अबू पर्वतावरील देलवाडा गावापासून ५½ मैल ईशान्येकडील आधु. उत्रज गाव हेच होय ( एपि. इंडि. ८.२२ ).

**ऊन** ( देवमंदिरस्थान )—मध्यप्रदेशातील हिंदु आणि जैन देवमंदिरस्थान. हे पश्चिम रेल्वेच्या अजमेर—खांडवा रेलमार्गावरील खांडव्यापासून ३३ मैलांवर आणि निमाड जिल्ह्यातील खरगोन गावापासून १० मैलांवर आहे.

**नामव्युत्पत्ती**--स्थानिक समजुतीनुसार येथे प्रत्येकी ९९ मंदिरे, सरोवरे आणि कूप असल्याने ‘ १०० ला एक कमी ’ अशा अर्थाने यास ‘ ऊन ’ नाव प्राप्त झाले.

**हिंदु देवमंदिरे**—श्रीनीलकंठेश्वर, महाकालेश्वर, हाटकेश्वर, बल्लाळेश्वर, आदि परमार स्थापत्यशैलीची ( इ. स. १०-१२ वे शतक ) शिवमंदिरे येथे असून, गावापासून थोड्याच अंतरावर महालक्ष्मीचे देवालय आहे. त्यामधील महालक्ष्मीप्रतिमा प्रातःकाली, माध्याह्नी आणि सायंकाली विभिन्न रूपे धारण करते. येथील बहुतांशी मंदिरे आज उद्ध्वस्तावस्थेत आहेत.

**जैनमंदिरे**--येथील जैनमंदिरात वि. सं. १२१८ आणि १२५२ मध्ये स्थापिलेल्या वर्धमान महावीराच्या दोन मूर्ती, तसेच परमार राजा उदयादित्याचा इ. स. ११ व्या शतकातील एक शिलालेख आहे. या दोनहि मंदिरांचा जीर्णोद्धार करून या नगराला ‘ पावागिरि ’ असे नवे नाव सध्या देण्यात आले आहे. परंतु ऐतिहासिक दृष्टीने ते चुकीचे वाटते ( ती. सं. पृ. १२२; पावागिरि पहा ).

**ऊना** ( वैष्णवतीर्थ )—गुजरातमधील अबू पर्वतावरील देलवाडापासून ४ मैलांवरील एक वैष्णवतीर्थ. येथील दामोदरमूर्तीची नरसी मेहताने उपासना केली होती ( ती. पृ. ४१७ ).

**ऊपरकोट** ( दुर्ग व बौद्धगुफा )—पश्चिम गुजरातमधील

जुनागढनजिकचे बौद्ध गुफा आणि मूर्तिस्थान (ती. पृ. ४२१; गिरिनगर पहा).

**ऊर्जयत्** (पर्वत)--महाक्षत्रप रुद्रदामनाच्या स. १५८ च्या संस्कृतभाषीय जुनागढ शिलालेखमते पश्चिम भारतातील एक पर्वत. या पर्वताच्या पायथ्यानजिकच्या गिरिनगर (आधु. जुनागढ) येथील अतिवृष्टीने फुटलेला सुदर्शन तलाव पुन्हा बांधून काढल्याचा निर्देश या शिलालेखात आढळतो (ल्यूडर्स सूचि. क्र. ९६५). बृहत्संहितामते हा कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या नैर्ऋत्य भागात असून (बृ. सं. १४.१९), पौराणिक साहित्यमते हा दक्षिण भारतातील ऋक्ष पर्वताचा (विंध्य पर्वताचा पश्चिम भाग) एक क्षुद्रपर्वत (उपपर्वत) होता.

गुजरातमधील काठेवाड द्वीपकल्पातील (प्राचीन सुराष्ट्र) जुनागढ गावापासून १० मैल पूर्वेकडील आधु. गिरनार टेकडी ती हीच होय (अक्षांश २१°-३१′ उत्तर; रेखांश ७०°-४२′ पूर्व; समुद्रसपाटीपासून उंची-३५००′).

**माहात्म्य**--पौराणिक, बौद्ध, आणि जैन साहित्यमते हा पवित्र पर्वत असून, स्कंदमते या पर्वताच्या परिसरात भवनाथ शिवाचे 'वस्त्रापथक्षेत्र' (व्याप्ती ४ योजने) होते (स्कन्द. प्रभास. व. १-१९; वस्त्रापथक्षेत्र पहा). स्कंदमते वस्त्रापथक्षेत्रातील ऊर्जयत् आणि रैवतक पर्वतांवर अनुक्रमे दामोदर विष्णु आणि अंबा निवास करीत असत (स्कन्द. प्रभास. व. ९.२२९-२३०).

जैनांच्या पाच पवित्र टेकड्यांपैकी ही एक असून, शत्रुंजय ही अन्य एक जैनांची पवित्र टेकडी हिचाच भाग मानली जाते. जैनांच्या अन्य तीन पवित्र टेकड्या पुढीलप्रमाणे होतः-१. अर्बुद; २. अष्टापद; ३. समेतशिखर. जैनांचा २२ वा तीर्थंकर नेमिनाथ याचे निर्वाणस्थान म्हणून ही टेकडी जैनधर्मीय पवित्र मानतात.

**आधुनिक काली**--पौराणिक साहित्यात या टेकडीची एकवीस शिखरे वर्णिली असली तरी सध्या हिची निम्नलिखित पाच शिखरे प्रमुख आहेत :-१. अंबामाता (अंबादेवीमंदिरस्थान); २. गोरखनाथ (सर्वाधिक उंच शिखर, उंची ३६६६′); ३. ओघड; ४. गुरु दत्तात्रेय; ५. कालिकामाता (अघोरी तापसांचे निवासस्थान).

या टेकडीसभोवती घनदाट वनराजी असून, तीमधून तिच्या शिखरांचा काळा निष्पर्ण दगड वर डोकावतो. येथील विभिन्न शिखरांच्या माथ्यांवर त्या त्या देवतांची मंदिरे असून, अत्युच्च गोरखनाथ टेकडीवर गोरखनाथाचे मंदिर आहे. टेकडीच्या माथ्यापासून ६००′ खालच्या पठारसदृश भागातील चुडासामा (चावडा) राजांच्या (इ. स. ९-१५ वे शतक) दुर्गात अनेक जैन देवालये असून त्यापैकी जैन तीर्थंकर नेमिनाथाचे मंदिर प्रमुख आहे. टेकडीवर गौमुखी, हनुमानधारा आणि कमंडलु नामक तीन जलकुंडे असून, टेकडीच्या उत्तर टोकाला 'भैरव झाप' नामक निमुळता कडा आहे. तेथून भक्तजन जीवन्मुक्ती प्राप्त करण्यासाठी देहत्याग करीत असत. टेकडीच्या पायथ्याशी 'वामनस्थली' आणि बलिस्थान' नामक अन्य दोन तीर्थे आहेत.

**जैनतीर्थ**--जैनांचे सुविख्यात तीर्थ म्हणून शत्रुंजयमाहात्म्यातील दोन स्वतंत्र अध्यायात या टेकडीचे वर्णन असले (शत्रुञ्जय १०-१२; इंडि. अँटि. ३०.२३९-२५१; २८८-३०८), तरी यात्रेकरू शत्रुंजय टेकडीचे माहात्म्य हिच्यापेक्षा अधिक मानतात. त्या टेकडीच्या तुलनेने ही टेकडी काहीशी खुजी असून, तेथील मंदिरांची भव्यता आणि वैविध्य येथे नाही. तथापि काळ्या ग्रॅनाईट जातीच्या इतस्ततः विखुरलेल्या प्रस्तरराशींमधून अचानकपणे वर येणारी ही टेकडी प्रथमदर्शनीच आकर्षक वाटते.

**गिरनार खोरे**--या टेकडीसभोवतीचे खोरे 'गिरनार खोरे' (पौराणिक-वस्त्रापथक्षेत्र) नावाने सुविख्यात असून, त्यामधील जुनागढ-गिरनार रस्त्यावरील एका अरुंद दरीत सम्राट अशोक, महाक्षत्रप रुद्रदामन् आणि गुप्त सम्राट स्कंदगुप्त यांचे तीन महत्त्वपूर्ण शिलालेख खोदलेला प्रस्तरखंड आहे. भूगर्भशास्त्रीय दृष्टीने गिरनार टेकडीचाच भाग असणारा हा पहाड भौगोलिक दृष्ट्या जुनागढ गावानजिक असल्याने त्यावरील शिलालेख 'जुनागढ शिलालेख' नावाने ओळखले जातात. (गिरिनगर पहा)

**वस्त्रापथक्षेत्र**—स्कंद पुराण प्रभासक्षेत्राच्या 'वस्त्रापथ क्षेत्रमाहात्म्या'त गिरनार पर्वताच्या परिसरातील 'वस्त्रापथक्षेत्रा'च्या भौगोलिक सीमा पुढीलप्रमाणे दिल्या आहेत :-१. उत्तरेस-भद्रा नदी. २. पूर्वेस-गिरनार पर्वतानजिकचा दोन योजने प्रदेश; ३. दक्षिणेस-बलिस्थान; ४. पश्चिमेस-वामनपुर (आधु. वंथली) गावानजिकचा सुवर्णरेखा (आधु. सोनरेख) आणि पलाशिनी नद्यांचा संगम.

**नामांतरे**--प्राचीन साहित्यात या पर्वताची निम्नलिखित नामांतरे आढळतात (परिपत्रक पहा).

**नामस्थित्यंतर**--या पर्वताचे सर्वाधिक प्राचीन संस्कृत नाव 'ऊर्जयत्' असून, ऋग्वेदातील 'ऊर्जयंती' हे त्याचे वैदिक नामरूप आणि जैन साहित्यातील 'उज्जैंत' हे प्राकृतभाषीय रूप आहे. ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनातील 'उज्जंत' आणि पौराणिक साहित्यातील 'दुर्जयंत', 'वैजयंत'

## ऊर्जयत् पर्वताची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. ऋग्वेद ( २.१३.८ ) | ऊर्जयंती |
| २. महाभारत | |
| अ. ( आ. २१०.४ ) | रैवतक |
| आ. ( आर. ८८.२३ ) | उज्जयंती; पुण्यगिरि |
| ३. पौराणिक साहित्य | |
| अ. वायु ( ४५.९२ ) | उज्जयंत |
| आ. ब्रह्माण्ड ( १३.५३ ) | उर्जंत |
| इ. मार्कंडेय ( ५४.१४ ) | दुर्जयंत; पुष्पगिरि |
| ई. ब्रह्म ( २५.२७ ) | वैजयंत; जयंत |
| उ. स्कंद ( प्रभास. व. १.६८; नागर २.११.११ ). | उदयंतम्, वस्त्रापथक्षेत्र |
| ४. जैन साहित्य | |
| अ. विविधतीर्थकल्प ( ५ ) | उज्जयंत |
| आ. कीर्तिकौमुदी ( ९.३७८ ) | रैवत |
| इ. अन्य जैन साहित्य | उज्जंत |
| ५. काव्यमीमांसा | गिरनार; गिरनेर |
| ६. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य | |
| अ. अभिधान ( ४.९७ ) आ. अनेकार्थ ( ३.२७९ ) इ. प्रबंध चिंतामणि | उज्जयंत |
| ई. अभिधान ( ४.९७ ) उ. अनेकार्थ ( ३.२७९ ) ऊ. 'शिशुपालवध' काव्य ( ४.२ ) | रैवत, रैवतक |
| ७. ह्युएन्त्संग ( वॉटर्स, २.२४९ ) | उज्जंत |
| ८. शिलालेख साहित्य | |
| अ. चालुक्य राजा कुमारपालाचा वि सं. १२१५ चा शिलालेख | श्रीमत् उज्जयंत महातीर्थ |
| आ. चालुक्य राजा भीम ( द्वितीय ) चा वि. सं. १३८४ चा शिलालेख | श्रीमत् उज्जयंत तीर्थ |
| इ. उत्तरकालीन शिलालेख | रैवतक |
| ९. जैन कल्पसूत्रांची कौमुदी टीका ( पृ. १६९ ) | गिरिनार |
| १०. स्थानिक नामांतर | गिरि |

'जयंत' ही 'उज्जयंत'चीच अनुक्रमे लघु आणि पाठभेदात्मक रूपे आहेत. पौराणिककाली हा पर्वत 'रैवतक' वैकल्पिक नावाने सुविख्यात असून, इ. स. १३–१४ व्या शतकानंतर त्याचे हेच नाव प्रचारात होते. याचे 'गिरनार' हे आधुनिक नाव राजशेखराच्या काव्यमीमांसेत ( इ. स. १० वे शतक ) सर्वप्रथम आढळते.

पौराणिक साहित्यात 'उज्जयंत' आणि 'रैवत' हे दोन स्वतंत्र पर्वत मानले असले तरी वस्तुतः ती एकाच पर्वताची नावे असल्याचे स्कंदगुप्ताच्या शिलालेखावरून, तसेच कीर्तिकौमुदीवरून दिसते.

**ऋग्वेदात**—या ग्रंथात या पर्वताच्या परिसरातील जंगली प्रदेशाचा ( **ऊर्जयन्त्या अपरिविष्टम् आस्यम्** ) निर्देश असून ( ऋ. २.१३.८ ), त्यावरून पश्चिम भारताच्या या विशिष्ट प्रदेशाशी वैदिक संहिताकार परिचित दिसतात.

**पौराणिक साहित्यात**—ब्रह्माण्डमते अपरांत देशातील या पर्वतात 'योगेश्वरालय' आणि 'वसिष्ठाश्रम' नामक पवित्र स्थाने होती ( ब्रह्माण्ड. १३.५३ ). वायु पुराणात रैवतक आणि उज्जयंत पर्वतांचा स्वतंत्र निर्देश असून ( वायु. ४५.९२; ७७.५२; वामन. १३.१८; ब्रह्माण्ड. १६.२२ ), गिरनार पर्वताच्या दोन स्वतंत्र उपविभागांचा निर्देश येथे अभिप्रेत असावा. मार्कंडेय आणि ब्रह्म पुराणात याचा निर्देश 'दुर्जयंत' ( मार्कं. ५४.१४ ) आणि 'वैजयंत' ( ब्रह्म. २५.२७ ) या पाठभेदात्मक रूपांनी आढळतो. स्कंद पुराण प्रभासखंडमते हा 'मैनाकसहोदर' आणि 'हिमाचलपुत्र' महागिरि ( स्कन्द. प्रभास. व. ३.४, ११.११; १६.१९; १७.१३९ ) 'वस्त्रापथक्षेत्र' ( सिद्धक्षेत्र, पिंडारकक्षेत्र ) मध्ये होता ( स्कन्द. प्रभास. व. १.१–२; ६८ ). अन्य पौराणिक साहित्यात 'अर्बुद' ( वामन. १३.१८; ब्रह्म. २५.२७ ) आणि 'पुष्पगिरि' ( ब्रह्माण्ड. १६.२२ ) समवेत याचा निर्देश आढळतो.

**यादवांची क्रीडाभूमी**—भागवतमते द्वारकानिवासी कृष्णाच्या काळी हा पर्वत यादवांची क्रीडाभूमी आणि योगीजनांची तपोभूमी असून, बलरामाने येथे द्विविद नामक असुराचा वध केला होता ( भा. १०.६७ ).

**महाभारतात**—या ग्रंथातील धौम्ययात्रामते हा महान सिद्धिदायक पर्वत 'पिंडारक' ( वस्त्रापथ ) क्षेत्रात होता ( म. आर. ८६.१८–२० ). प्रभासक्षेत्रानजिकच्या या पर्वतावर श्रीकृष्ण आणि तीर्थयात्रेसाठी निघालेला अर्जुन यांची भेट झाली ( म. आ. २१०.४ ). या पर्वतावरील यादवांच्या उत्सवसमयी अर्जुनाने सुभद्रेचे हरण केले आणि तो तिला रैवतक पर्वतावरील उज्जयंती शिखराहून आनर्तमार्गे इंद्रप्रस्थास घेऊन गेला ( म. आ. २११.६–७; २१२.७ ).

**स्कंदगुप्ताच्या शिलालेखात**—गुप्त सम्राट स्कंदगुप्ताच्या स. ४५७ च्या जुनागढ शिलालेखमते या पर्वताच्या

पायथ्यानजिकचा चंद्रगुप्त मौर्यविरचित 'सुदर्शन' नामक पुरातन तलाव अतिवृष्टीमुळे फुटून त्याचे, तसेच ऊर्जयत् पर्वतोद्भवा पलाशिनी नदीचे पाणी इतस्ततः वाहू लागले (कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.५७; गिरिनगर पहा). हे सरोवर आज नष्ट झाले आहे.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**--या ग्रंथमते सुराष्ट्रराजधानी गिरिनगरच्या बहिर्भागातील 'उज्जंत' पर्वताच्या गुहेमध्ये एक बौद्धमठ असून, त्यास बारामाही जलपुरवठ्याची सोय केली होती. या मठातील भिक्षुनिवासाच्या छोट्या खोल्यांच्या दर्शनी भागी सज्जे होते. दूरदूरचे बौद्ध भिक्षू तेथे अध्ययनासाठी आणि निवासासाठी येत असत (वॉटर्स, २.२४९; बील, ४.४५९). या बौद्धमठाचे काहीहि अवशेष या टेकडीवर सध्या आढळत नाहीत. स. १८८९ मध्ये या टेकडीच्या पायथ्याशी सापडलेला स्तूप बौद्धधर्मीय आहे का जैनधर्मीय ते समजत नाही.

**शिशुपालवध काव्यात**--माघकृत शिशुपालवध काव्याच्या ४ थ्या सर्गात रैवतक पर्वताचे सविस्तर वर्णन आढळते.

**जैन साहित्यात**--या साहित्यात उज्जंत, 'उज्जयंत,' 'रैवतक', 'रेवंत', 'गिरिनगर', 'गिरिनार', 'गिरनेर' अशा वैकल्पिक नावांनी याचा निर्देश आढळतो. गुणभद्रमते या त्रिशिखरयुक्त पर्वतावर जैनांचा बाविसावा तीर्थंकर श्रीकृष्णबंधु नेमिनाथ, श्रीकृष्णपुत्र प्रद्युम्न आणि शंबु, प्रद्युम्नपुत्र अनिरुद्ध, तसेच अन्य कोट्यावधी मुनी मुक्त झाले. समंतभद्रमते येथे इंद्रस्थापित पदचिह्न, निराभरणमूर्ती, तसेच विघ्नहर्ती सिंहारूढ अंबादेवी आहे. ज्ञानसागरमते येथील सात पवित्र शिखरांपैकी एकावर अंबादेवीचे मंदिर, भीमकुंड आणि ज्ञानकुंड आहे. जिनप्रभसूरीने या पर्वताविषयी पाच प्रकरणे लिहिली आहेत (विविधतीर्थ. ६-१०).

इंद्रनंदिकृत 'श्रुतावतार' ग्रंथमते या पर्वतातील चंद्रगुफेमध्ये श्रीधरसेनाचार्यांनी (इ. स. २ रे शतक) पुष्पदंत आणि भूतबलि नामक शिष्यांना परंपरागत श्रुतज्ञानांच्या रक्षणार्थ 'महाकर्मप्रकृतिप्राभृत' (षट्खंडागम) चा उपदेश केला होता (श्रुतावतार श्लोक. १०३).

**नेमिनाथ-निर्वाणस्थान**--जैनांचा बाविसावा तीर्थंकर नेमिनाथ (अरिष्टनेमि) हा सौरियपुर (मथुरा) नरेश उग्रसेनाचा दौहित्र, उग्रसेनकन्या राजमतीचा पुत्र आणि कृष्णाचा मावसभाऊ होता. जुनागढच्या राजुला नामक राजकन्येशी विवाह करण्यासाठी तो गिरिनगर येथे आला असता विवाहमेजवानीसमयीच्या पशुहत्त्येने त्याच्या मनास विरक्ती प्राप्त झाली, आणि तो गिरनार पर्वतावर तपस्यार्थ गेला. याच पर्वतावर त्याचा मृत्यु झाला. या कारणाने दिगंबर जैन लोक या पर्वतास समेतशिखराइतकेच पवित्र मानतात.

**मध्ययुगीन शिलालेख साहित्यात**--चालुक्य राजा कुमारपाल आणि भीम (द्वितीय) च्या स. १२१५ आणि १२८८ च्या शिलालेखात यास 'श्रीमत् उज्जयंत महातीर्थ' आणि 'श्रीमत् उज्जयंत तीर्थ' (बॉंबे प्रेसि. अँटि. रिमेन्स. ३५६), आणि उत्तरकालीन शिलालेखात, तसेच मेरुतुंगकृत प्रबंधचिंतामणिमध्ये यास 'उज्जयंत' म्हटले आहे (आर्कि. सर्व्हे.वे. इं. २.१५४). यावरून मध्ययुगीन कालीहि हा पर्वत पवित्र मानला जात असावा. इ. स. १३ व्या-१४ व्या शतकानंतरच्या शिलालेखात या पर्वताचे 'उज्जयंत' नाव मागे पडून तो 'रैवतक' नावाने सुविख्यात झाला (पुराणोमा गुजरात. पृ. ४७-४९).

**मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात**--या साहित्यात 'उज्जयंत', 'रैवत' आणि 'रैवतक' अशा तीनहि वैकल्पिक नावांनी याचा निर्देश असून (अभिधान. ४.९७; अनेकार्थ. ३.२७९), 'रैवतक' आणि 'गिरनार' हे तेथे समानार्थक मानले आहेत (अभिधान. १४०.१; ३१; त्रिकाण्ड. १५३.१८१; मेदिनी. ६८.४५).

**नद्या**--शिलालेख आणि पौराणिक साहित्यमते या पर्वतातून 'पलाशिनी', 'विह्ला' व 'वेगवती' नद्या उगम पावत असत. परंतु त्यांची आज ओळख पटत नाही (लॉ, रिव्हर्स. पृ. ३९).

**जैनमंदिरे**--गिरनार टेकडीच्या २,५०० पायऱ्या (३०००′) चढून गेल्यानंतर येथील दुर्गतटबंदीवेष्टित जैनमंदिरसमूह (१६ मंदिरे) लागतो. टेकडीच्या माथ्यापासून ६००′ खाली एका कपारीतील या मंदिरांपैकी विशेष उल्लेखनीय पुढीलप्रमाणे होत:--

(१) **नेमिनाथ मंदिर**--गिरनार टेकडीवरील या सर्वाधिक विशाल आणि प्राचीनतम मंदिराचा जीर्णोद्धार स. १२७८ त झाल्याचे त्यामधील शिलालेखावरून दिसते. विशाल आवाराच्या (१९५′ × १३०′) या मंदिराच्या तटबंदीच्या अंतर्भागात ७० छोट्या खोल्यांमध्ये पद्मासनाधिष्ठित तीर्थंकर आणि अनुचर यक्ष यांच्या प्रतिमा आहेत. मुख्य मंदिराच्या आवारात छोटी उपमंदिरे बांधणे हे जैन धर्मात पुण्यकृत्य मानले असून जावामधील प्रंबानन् गावच्या हिंदुमंदिरात या कल्पनेचे अनुकरण आढळते. या उपमंदिरांसमोर बंदिस्त प्रदक्षिणापथ आहे. स्थानिक आख्यायिकामते चालुक्य स्थापत्यशैलीचे हे मंदिर सिद्धराज जयसिंगाचा अमात्य सज्जन याने सौराष्ट्र देशाचे तीन वर्षांचे

संपूर्ण उत्पन्न खर्ची घालून बांधले.

(२) मल्लिनाथ मंदिर—तेजपाल आणि वस्तुपाल नामक चालुक्य अमात्यद्वयाने स. १२३० मध्ये बांधलेले गिरनार दुर्गप्रवेशद्वारानजिकचे हे मंदिर दक्षिण भारतातील त्रिदला-कृती चालुक्य मंदिरांच्या अनुकरणाने बांधले आहे. या मंदिराच्या मध्यवर्ती सभामंडपाच्या तीन बाजूंस देवालये आणि चौथ्या बाजूस प्रवेशमंडप असून, त्यापैकी पाठी-मागच्या देवालयात जैन तीर्थंकर मल्लिनाथाची आणि बाजूच्या दोन मंदिरात जैन 'समोसरन' स्तूपांची प्रतिमा आहे. उत्तर आणि दक्षिण बाजूंची ही समोसरने अनुक्रमे सुमेरु आणि समेत (पारसनाथ) पर्वतांचे प्रतीक आहेत. निमुळत्या आकाराच्या या समोसरनांचा माथा मंदिराच्या छतास भिडला असून त्यांच्या शिरोभागी चौकोनी छत्र आहे. त्यावरून या पवित्र टेकड्यांना जैन लोक सिरियन लोकांप्रमाणे देवतास्वरूप मानत असावेत.

अन्य जैनतीर्थे— गिरनार पर्वताच्या द्वितीय, तृतीय आणि चतुर्थ शिखरांवर अनुक्रमे शंबुकुमार, प्रद्युम्नकुमार आणि नेमिनाथ यांची चरणचिह्ने आहेत. त्यापैकी नेमि-नाथाच्या चरणचिह्नांचे हिंदु लोक दत्तपादुका म्हणून पूजन करतात. पर्वताच्या उत्तर पायथ्यानजिकच्या 'सहस्रावन' (सहस्राम्रवन) येथे नेमिनाथांच्या दीक्षागुरुंच्या पादुका आहेत. जैन साहित्यात निर्देशिलेले या पर्वतावरील जलप्रपात मात्र सध्या येथे आढळत नाहीत (तो. सं. पृ. १२४).

हिंदु देवमंदिरे— या टेकडीवर निम्नलिखित हिंदु देवमंदिरे आहेत :–

(१) अंबाजीमंदिर–गिरनार टेकडीच्या पहिल्या शिखरा-वरील या देवीमंदिराच्या (इ. स. १२ वे शतक) दर्शनार्थ आणि आशीर्वादार्थ नवपरिणीत वधुवर येतात;

(२) गोरखनाथमंदिर— कानफाट्या योगीसांप्रदायाचे संस्थापक गोरखनाथाचे हे मंदिर गोरखनाथ नामक द्वितीय शिखरावर आहे.

२. शाकद्वीपातील एक पर्वत.

**ऊर्जयन्ती** (नगरी)—ऋग्वेदमते नार्मर सहवसु नामक इंद्रशत्रु दस्यूची एक नगरी (ऋ. २.१३.८). ऊर्जयत् (आधु. गिरनार) पर्वताच्या परिसरात कोठेतरी ही असावी.

**ऊर्ण** (देश आणि लोकसमूह)—पौराणिक साहित्यमते उदीच्य (वायव्य) भारतातील एक पर्वताश्रयी देश (ब्रह्माण्ड. १६.६७; ४९.४९; मत्स्य. ११४.५६; मार्के. ५४.४१; ५७). पाठभेद–'पूर्ण' (वायु. ४५.१२१). परंतु हा पाठ चुकीचा वाटतो.

अग्रवाल यांच्या मते अफगाणिस्तानातील आधु. हिंदुकुश पर्वताच्या परिसरात हे लोक असावेत (अग्रवाल, पाणिनि. पृ. ४७). लॅसेनच्या मते गढवालच्या उत्तरेकडील सतलज नदीकाठचा आधु. नरी खोर्सम (हूण) प्रदेश तो हाच होय. (लॅसेन, इंडिशन अल्टि. मॅप्स्). चौधरी यांच्या मते पाणि-नीच्या ग्रंथातील वरणा (स्वात नदीच्या खोऱ्यातील आधु. ऊण) देशाचे हे नामांतर असावे (चौधरी, पृ. ९१; सुवास्तु पहा).

**ऊर्णनाभ** (विषय)—पाणिनीच्या गणपाठमते भारत-वर्षान्तर्गत एक विषय (देशविभाग) (पा. सू. ४.२. ५३).

**ऊर्णाप्लुष्ट** (देश)— एक पर्वताश्रयी देश (वामन. १३.५८).

**ऊर्णावती** (नदी)—ऋग्वेदमते भारतवर्षातील एक नदी (ऋ. १०.७५.८). 'ऊर्णावती'चा शब्दशः अर्थ 'लोकरीने युक्त' असा होतो. काही अभ्यासकांच्या मते हे स्वतंत्र नदीनाम नसून ती सिंधु नदीची उपाधी असावी.

**ऊर्त्ति विषय** (देश)—शिलालेख साहित्यमते पूर्व भारतातील एक देशविभाग. वैतरणी नदीच्या उत्तर किनाऱ्या-वरील खिचिंग गावापासून १२ मैल वायव्येकडील आधु-उर्त्ति गावाच्या परिसरातील प्रदेश हाच होय (एपि. इंडि. २५).

**ऊर्ध्वकण्ठ** (देश)—कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या अग्रदक्षिणपदातील (आग्नेय भाग) एक देश (बृ. सं. १४. ८). पाठभेद–'ऊर्ध्वकर्ण' (मार्के. ५५.१६).

**ऊर्ध्वकेशी** (तीर्थ)—काशी येथील एक देवीतीर्थ. येथील देवीचे नाव शांकरी होते (नारद. उत्तर. ५०.२४).

**ऊर्ध्वदश** (योगिनी)—काशी येथील एक योगिनी-स्थान (स्कन्द. काशी. ४५.४०).

**ऊर्ध्वमरु** (देश)—मेरु पर्वतोद्भवा सप्तगंगांपैकी पश्चिमवाहिनी सिंधु नदीच्या मार्गावरील एक देश (ब्रह्माण्ड. १८.४९; वायु. ४७.४६). पाठभेद–'ऊर्दमरु' (मत्स्य. १२१.४८).

**ऊर्ध्वरेतस्** (तीर्थ)—संभलक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ (ती. पृ. ९२).

**ऊर्ध्वरोमन्** (पर्वत)—कुशद्वीपातील एक पर्वत (भा. ५.२०.१५).

**ऊर्ध्वस्थान** (तीर्थ)—वाराणसी येथील एक तीर्थ (पद्म. आदि. ३२.३९)

**ऊर्व–आश्रम** (आश्रमस्थान)—हिमालय पर्वतातील

'और्वाश्रमा'चे नामांतर ( और्वआश्रम पहा ).

**ऊर्वस** ( देश )--मेरु पर्वतोद्भवा सप्तगंगांपैकी पश्चिम-वाहिनी सिंधु नदीच्या मार्गावरील एक देश ( मत्स्य. १२१.४७ ).

**ऊली** ( विश्वामित्र-तपास्यस्थान )--बिहारमधील आरा जिल्ह्यातील सरस्वती-शोणभद्र संगमानजिकचे विश्वामित्र ऋषींचे तपस्यास्थान. हे डेहरी-रोहतास गावापासून १० मैलांवर आहे. विश्वामित्रांनी सदेह स्वर्गास पाठविलेल्या आणि देवांनी खाली ढकललेल्या त्रिशंकूच्या लाळेतून उत्पन्न झालेली अपवित्र कर्मनाशा नदी येथेच आहे. या स्थानानजिकच शोणभद्रा नदीकाठी रावणाने स्थापिलेले 'दससीसनाथ' (दशशीर्षनाथ) नामक शिवलिंग आहे ( ती. प्र. १५८ ).

**ऊष** ( ग्राम )--पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.८ ).

**ऊषभञ्जनक** ( तीर्थ )--मथुरा येथील एक तीर्थ. पाठभेद-'ऋषभंजनक' ( वराह. तीर्थविवेचन. पृ. ८.१९१ ).

---

## ऋ

**ऋक्ष** ( पर्वत )--पौराणिक साहित्यमते दक्षिण भारतातील सात कुलपर्वतांपैकी ( सप्त कुलाचल ) एक ( ब्रह्माण्ड. १६.१८; मार्क. ५४.१०; वायु. ४५.८८; विष्णु. २.३.३; कूर्म. पूर्व. ४७.२३; वराह. ८५.२; वामन. १३.१४; शिव. उमा. १८.८; भास्कराचार्य, गोलाध्याय. भुवनकोश प्रश्न. ४१ ). अन्य पौराणिक साहित्यातहि एक पर्वत म्हणून याचा निर्देश आढळतो ( ब्रह्म. १९.३; भा. ५.१९.१६; काव्यमी. १७.२२४ ). आधु. विंध्य पर्वताचा मध्य आणि पूर्व भाग, तसेच सातपुडा पर्वताचा काही भाग ( अक्षांश. २२° उत्तर ) तो हाच होय. पौराणिक साहित्यमते ऊर्जयत् ( आधु. गिरनार ) हा या पर्वताचाच क्षुद्रपर्वत ( उपपर्वत ) आहे ( ऊर्जयत् पहा ).

**भौगोलिक स्थान**—पौराणिक साहित्यात विंध्य पर्वताच्या ऋक्ष, पारियात्र, आणि शुक्तिमत् या तीन उपविभागांच्या भौगोलिक स्थानांविषयी परस्परविरोधी निर्देश आढळतात. त्यामुळे तसेच ही पर्वतनामे सध्या प्रचारात नसल्यामुळे त्यांची स्थाननिश्चिती करणे अवघड बनते. या पर्वतातून उगम पावणाऱ्या पौराणिक नदीनामांच्या आधारे त्यांची स्थाननिश्चिती करावी लागते.

पौराणिक साहित्यात पयोष्णी, निर्विंध्या आणि तापी या नद्या कधी विंध्य पर्वतोद्भवा, तर कधी ( विष्णुपुराण ) ऋक्ष पर्वतोद्भवा मानल्या आहेत. यावरून विंध्य आणि ऋक्ष हे परस्परसंलग्न पर्वत असावेत. काही पुराणात या दोन पर्वतातील नद्यांची स्वतंत्र नामावली न देता एकत्रपणे 'उभय पर्वतोद्भवा' म्हणून दिली आहे ( अली, पुराणाज्. पृ. ११२ ). अन्य काही पुराणात निर्विंध्या, तापी आणि पयोष्णी नद्यांना विंध्यपाद ( आधु. सातपुडा ) पर्वतोद्भवा म्हटले आहे. त्यावरून ऋक्ष आणि विंध्यपाद यांचे समानार्थकत्व सिद्ध होते.

पौराणिक साहित्यात ऋक्षपर्वतोद्भवा म्हणून निर्देशिलेल्या नर्मदा आणि शोण नद्या विंध्य पर्वताच्या मध्यभागातील, आणि चित्रोत्पला नदी त्या पर्वताच्या पूर्व भागातील आहेत. याचे उलट निषध-दक्षिणापथ मार्गावरील 'विंध्यपाद' ( अवंती नगर आणि विंध्य पर्वत व पयोष्णी नदी यांच्या दरम्यानचा आधु. सातपुडा ) पर्वत ऋक्षवत् पर्वताचाच भाग असल्याचा निर्देश महाभारतात आढळतो ( म. आर. ५८.२० ). यावरून विंध्य पर्वताचा मध्य आणि पूर्व भाग, तसेच सातपुडा पर्वताचा काही भाग ( =आधु. सोनार नदीच्या उगमापासून सोन नद्यांच्या उगमापर्यंतचा विंध्य पर्वताचा पूर्वेकडील सारा भाग ) म्हणजे पौराणिक ऋक्ष पर्वत असावा. सोन नदीच्या जलसंचय प्रदेशातील ही पर्वतश्रेणी आधु. मांडला पर्वतानजिक शुक्तिमत् आणि विंध्य पर्वतास भिडत असून, तेथे पूर्व-पश्चिम पसरलेल्या दक्षिण, उत्तर आणि मध्य मैकल पर्वतश्रेणी एकत्र येतात.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या पर्वताची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा ).

**नामव्युत्पत्ती**—'ऋक्ष'चा शब्दशः अर्थ 'अस्वल' असून टॉलेमीच्या ग्रंथातील 'आक्सेंतोन' हे पर्वतनाम 'अर्क्तोस' या अस्वलवाचक ग्रीक शब्दाचेच पर्वतवाचक रूप असावे.

## ऋक्ष पर्वताची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पौराणिक साहित्य | |
| अ. (अग्नि. ११८.२; पद्म आदि. ६.७; म. भी. १०.१०; मत्स्य. ११४.१७) | ऋक्षवत् |
| आ. (वायु. ४५.१००–१०१) | ऋक्षपाद |
| इ. (मत्स्य. ११४.२६) | ऋष्यवंत |
| ई. (वायु. ९५.२८–३१; पद्म. सृ. १३.१३-१५ ह. व. १.३६.१५) | ऋक्षवंत |
| उ. अन्य पौराणिक साहित्य | ऋष्यवत् |
| २. काशिका (पा. सू. ४.३.९१) | ऋक्षोद |
| ३. गौतमीपुत्र शातकर्णीचा नासिक प्रशस्तिलेख | अचवत |
| ४. टॉलेमी | आक्सेंतोन (ऋक्षवत) |

**पाणिनीय व्याकरण साहित्यात**—पाणिनीच्या गणपाठात, तसेच काशिकेत या पर्वताचा निर्देश अनुक्रमे 'ऋक्ष' (पा. सू. ४.२.८६), आणि 'ऋक्षोद' (पा. सू. ४.३.९१) नावांनी आढळतो. ल्यूडर्स यांच्या मते 'ऋक्षोद' हे संस्कृत 'ऋक्षवत्'चे अर्धप्राकृत रूप असावे (जसे–अच्छावत् > अच्छोद; कॉर्पस्. इन्स्क्रि. २.२.१६६).

**नासिक शिलालेखात**—गौतमीपुत्र शातकर्णीच्या नासिक शिलालेखात 'अचवत' नावाने या पर्वताचा निर्देश आढळतो (ल्यूडर्स सूची. क्र. ११२३).

**वाल्मीकि रामायणात**—या ग्रथात, तसेच रघुवंशात नर्मदा नदीसमवेत या पर्वताचा निर्देश आढळतो (वा. रा. यु. २७.९; रघु. ५.४२–४४; म. शां. ५२.३२). परंतु स्कंद पुराण रेवाखंडात रेवा आणि नर्मदा स्वतंत्र नद्या मानल्या असल्याने येथे निश्चित कोणत्या नदीचा निर्देश असावा ते समजत नाही. या पर्वतान्तर्गत चित्रकूट पर्वतावर अत्रि ऋषींचा आश्रम होता (वा. रा. अयो. ११७.५; भा. ४.१.१४–१५).

**महाभारतात**—या ग्रंथातील नलोपाख्यानमते हा पर्वत अवंती आणि दक्षिणापथ यांच्या दरम्यान होता (म. आर. ६१.२१).

**पौराणिक साहित्यात**—हरिवंशमते नर्मदानूप देशाची माहिष्मती (आधु. मांधाता) नामक राजधानी ऋक्ष पर्वताच्या छायेत असून (ह. वं. १९३८), ज्यामघ नामक क्रोष्टुवंशीय (यादव) राजा हा पर्वत ओलांडून नर्मदानूप देशान्तर्गत मृत्तिकावतीहून चेदिराजधानी शुक्तिमतीस गेला होता (ह. वं. १.३६.१५; वायु. ९५.२८–३१; पद्म. आदि. १३.१३–१५). यावरून आधु. सागर, तसेच नर्मदा नदीच्या मध्य खोऱ्यातील माहिष्मती नगरासभोवतालचा विंध्य पर्वताचा मध्यभाग पौराणिक 'ऋक्ष' पर्वतात समाविष्ट होत असावा. पद्म पुराणातील तीर्थनामावलीतहि याचा निर्देश आढळतो (पद्म. आदि. २८.५९).

विष्णु आणि ब्रह्म पुराणात तापी, पयोष्णी आणि निर्विंध्या नद्यांना ऋक्ष पर्वतोद्‌भवा म्हटले आहे. याचे उलट कूर्म, मत्स्य, ब्रह्माण्ड, वामन आणि वायु पुराणात या तीन नद्यांना 'विंध्यप्रसूता,' आणि नर्मदा व दशार्णा नद्यांना 'ऋक्ष पर्वतोद्‌भवा' म्हटले आहे. या परस्परविरोधी निर्देशाचा उलगडा टॉलेमीच्या ग्रंथाधारेच केवळ होऊ शकतो.

**टॉलेमीच्या ग्रंथात**—या ग्रंथमते विंध्य पर्वताचा पूर्व भाग म्हणजे 'आक्सेंतोन' (ऋक्षवंत) पर्वत असून आधु. विंध्य पर्वताच्या पूर्वेपर्यंत तो पसरला होता (पश्चिमेस–अक्षांश २२°–२४ उत्तर; रेखांश १४३°–१६३ पूर्व). यावरून मध्य भारतातील शोण नदीच्या दक्षिणेकडील छोटा नागपुर, रामगढ, सिरगुजा आदि पर्वतीय प्रदेश टॉलेमीच्या काळी या पर्वतात समाविष्ट होत असावा.

टॉलेमीच्या ग्रंथात 'आक्सेन्तोन' पर्वतोद्‌भवा निम्नलिखित नद्यांचा सुस्पष्ट नामोल्लेख असून, त्यायोगे विंध्य आणि ऋक्ष पर्वतांच्या भौगोलिक सीमांचा उलगडा होतो :—

| ऋक्ष पर्वतोद्‌भवा नद्या | विंध्य पर्वतोद्भवा नद्या |
|---|---|
| १. दोसरोन् (दशार्णा = सागर-नजिकची आधु. धसन नदी) | १. नमदोच (नर्मदा) |
| २. तौंदिस | २. ननगौन (तापी) |
| ३. अदमस् | — |
| ४. गंगा नदीची एक उपनदी (धर्मोदया = आधु. दमुदा) | — |
| | — |

मॅक्रिंडल यांच्या मते टॉलेमीने निर्देशिलेली गंगा नदीची ऋक्ष पर्वतोद्‌भवा उपनदी म्हणजे रामगढ, बरद्वान प्रदेशातून वाहणारी आणि ताम्रलुकच्या पूर्वेस (अक्षांश २२°–१३

## ऋक्ष पर्वतोद्भवा नद्या

| वाल्मीकि रामायण, (कि .४०.३२) महाभारत (भी. १०.३२) | अन्य पुराणे | आधुनिक नाव | विवरण |
|---|---|---|---|
| १. शोण | शोण | सोन | या नद्या ऋक्ष पर्वतोद्भवा नसून अमरकंटकोद्भवा (सुरथाद्रिजा) आहेत. |
| २. महानदी | महानद (ज्योतिरथा) | महानदी | |
| ३. — | नर्मदा (नंदजा) | नर्मदा | |
| ४. मंदाकिनी | मंदाकिनी | मंदाकिनी | — |
| ५. — | दशार्णा | धसन् | बुंदेलखंडातील नदी |
| ६. — | चित्रकूटा | चित्रकूटा | ,, ,, |
| ७. तपसा | तमसा (तामसी,) | तोन्स | ,, ,, |
| ८. पिप्पलावती | पिप्पलाश्रोणी (पिप्पला, पिप्पलिश्येनी) | पैसुनी | ,, ,, |
| ९. — | पिशाचिका | — | ,, ,, |
| १०. — | करतोया (करमोदा) | कर्मनाशा | ,, ,, |
| ११. चित्रोत्पला | चित्रोत्पला (चित्रोपला, नीलोत्पला) | — | रंगीबेरंगी वालुकायुक्त |
| १२. — | विपाशा, (विशाला विमला,) | बेवस् | मध्यप्रदेशातील बेटवा नदीची उपनदी |
| १३. — | जंबुला, (वंजुलावती वजुका, मंजुला, बंजुला, वंजुला) | जम्नी | ,, ,, ,, ,, |
| १४. — | वालुवाहिनी (बालुवाहिनी, धूतवाहिनी, वास्तुवाहिनी) | बधैन् | यमुना नदीची उपनदी |
| १५. — | सत्संतजा, (सितेरजा सनेरुजा, सुमेरजा) | सोनार-बियर्मा | केन नदीच्या उपनद्या |
| १६. शुक्तिमती | शुक्तिमती | शुक्तिमती | |
| १७. — | मकुणा (पंकिनी, मुकुटा मक्षुणा, सकुली) | साक्री<br>केन | गंगा नदीची उपनदी<br>— |
| १८. त्रिदिवा | त्रिदिवा (ह्रदिका) | — | — |
| १९. — | ऋमु (ऋतु) | — | — |
| २०. भैमरथी | भैमरथी (भीमरथी) | भीमा | ही नदी ऋक्ष पर्वतोद्भवा नसून सह्य पर्वतोद्भवा आहे. |
| २१. — | सुरसा | — | — |

पौराणिक साहित्यमते अन्य ऋक्ष पर्वतोद्भवा नद्या पुढीलप्रमाणे होतः-- १. क्रिया (ब्रह्माण्ड, वामन); २. चक्रिणी (वामन), ३. देविका (वामन); ४. वसु (वामन); ५. विरजा (वराह); ६. सुकुशा (मत्स्य); ७. सुमहाद्रुमा (वायु); ८. क्षमा (मत्स्य).

उत्तर) भागीरथी-हुगळी नदीस मिळणारी आधु. दमुदा (प्राचीन धर्मोदय) नदी असावी. ही नदी अक्षांश २८° उत्तर येथे गंगा नदीस मिळत असल्याची चुकीची माहिती टॉलेमीने दिली आहे.

**शिलालेख साहित्यात**-- या साहित्यमते नर्मदा नदीच्या उत्तरेकडील ऋक्ष पर्वताचा भाग हा आजच्या प्रमाणेच प्राचीन काळीहि बृहत् विंध्य पर्वतामध्ये समाविष्ट होत असे (रॉयचौधरी, अँटि. पृ. १०८-११४; विंध्य पहा).

**नद्या**-- पौराणिक साहित्यातीलऋक्ष पर्वतोद्भवा नद्यांची नामावली सोबतच्या परिपत्रकात दिली आहे (परिपत्रक पहा).

**ऋक्षबिल** (गुफा)— वाल्मीकि रामायणमते विंध्य पर्वताच्या नैर्ऋत्येकडील एक महाभयानक गुफा. सीताशोधार्थ दक्षिण दिशेप्रत निघालेल्या अंगद, हनुमत् आदि वानरांना

ही लागली होती (वा. रा. कि. ५०.३). मध्यप्रदेशान्तर्गत प्रयागपासून १५० मैल आग्नेयेकडील, विंध्य पर्वतातील रामगढ पर्वतानजिकची आधु. सीताबेंगा गुफा हीच असावी (अक्षांश २२°–५३ उत्तर, रेखांश ८२°–५५ पूर्व) या विशाल गुफेच्या (लांबी-४५० ) अंतर्भागात राम, लक्ष्मण व सीता संज्ञक तीन स्वतंत्र नैसर्गिक गुफा आहेत. स्थानिक नामांतर—'हाथीफोड गुहा'.

वाल्मीकि रामायणात— या ग्रंथमते विंध्य पर्वतातील सीताशोधाने श्रांत झालेले वानर वाट चुकून या गुफेत आले (वा. रा. किं. ५०.७; यु. १२६). विंध्य पर्वत→ कंडु आश्रम→ लोध्रवन→ सप्तपर्णवन अशा क्रमाने प्रवास करणारे तृषाक्रांत वानर या गुफेतून बाहेर पडणारे जलसिक्त पक्षी पाहून जलप्राप्तीच्या आशेने तीमध्ये शिरले आणि अंधारात एकमेकांचा हात धरून चालू लागले. अनेक योजने चालूनहि त्यांना बाहेर पडण्याचा मार्ग सापडेना. अखेरीस या गुफेच्या राजवाड्यातील स्वयंप्रभा नामक तापसीने त्यांना गुफेबाहेर आणून सोडले (वा. रा. कि. ५०.२५–३७) गुफेच्या या विंध्य पर्वतानजिकच्या दुसऱ्या टोकामधून प्रस्रवणगिरि आणि समुद्र दिसत असे (वा. रा. कि. ५२.३१–३२). येथून महेंद्र पर्वताप्रत उड्डाण करून हनुमानाने लंका गाठली.

गुफावर्णन— वाल्मीकि रामायणमते या पातालसदृश महाभयानक गुफेमध्ये अनेक दैत्य निवास करीत असत (वा. रा. कि. ५०.१२). सूर्य आणि चंद्रकिरणांचा स्पर्श नसलेली ही गुफा दुर्विगाह्य आणि अंधारी होती (वा. रा. कि. ५०.१७–१८).

मतांतरे-- काही अभ्यासकांच्या मते केरळमधील त्रावणकोरच्या नजिक सह्य आणि मलय पर्वतांच्या दक्षिणतम भागातील स्वयंप्रभातीर्थ आणि विंध्य, महेंद्र आदि स्थानिक नावांच्या टेकड्यांच्या परिसरात ही गुफा असावी. परंतु वाल्मीकि रामायणातील वर्णनासदृश गुफा तेथे नसल्याने ही मध्यप्रदेशातच असण्याची शक्यता अधिक वाटते.

**ऋक्षवत्** (पर्वत)-- पौराणिक साहित्यमते दक्षिण भारतातील 'ऋक्ष' पर्वताचे नामांतर (म. भी. १०.१०). अन्य नामांतर–'ऋक्षवंत' (ऋक्ष पहा).

**ऋक्षाक्षी** (योगिनी)-- काशी येथील एक योगिनीस्थान (स्कन्द. काशी. ४५.३६).

**ऋक्षोद** (पर्वत)— काशिका ग्रंथमते आयुधजीवी संघाचे निवासस्थान, एक पर्वत (पा. सू. ४.३.९१). अग्रवाल यांच्या मते हा सुलेमान (त्रिककुद) पर्वताचा भाग असावा (अग्रवाल, पाणिनि. पृ. ७७). ल्यूडर्स यांच्या मते हे 'ऋक्षवत्' या दक्षिण भारतातील पर्वताचे प्राकृत नामांतर असावे (ऋक्ष पहा).

**ऋचीकाश्रम** (आश्रमस्थान)— वाल्मीकि रामायणमते भृगुतुंग पर्वतातील ऋचीक ऋषींचे आश्रमस्थान. येथे ऋचीकांनी शुनःशेप नामक स्वपुत्रास यज्ञीय पशु म्हणून अंबरीषाला दिले (वा. रा. बा. ६१.११).

**ऋजीक** (देश)— ऋग्वेदमते एक देश. सायणाचार्यांच्या मते कुरुक्षेत्रान्तर्गत शर्यणावत् सरोवराच्या परिसरातील प्रदेश तो हाच होय (ऋ. ८७.२९ सायण). ऋग्वेदात अन्यत्र शर्यणावत् सरोवर आर्जीकीय देशात असल्याचे म्हटले आहे (ऋ. ८.६४.११). त्यावरून हे 'आर्जीकीय' देशाचे नामांतर असावे (आर्जीकीय पहा).

२. (पर्वत) निरुक्तमते एक पर्वत. यामधून विपाशा (आधु. बियास) नदी उगम पावत असे (नि. ९.२६). 'ऋजीक पर्वताशी संबंधित' अशा अर्थानेच 'आर्जीकीया' आणि 'आर्जीकीय' हे नदीनाम आणि देशनाम व्युत्पन्न झाले असावे.

**ऋजुपालिका** (नदी)— शिलालेख आणि जैन साहित्यमते पूर्व भारतातील एक नदी. जैन कल्पसूत्रमते मज्झिमपावा-गावाहून आलेल्या वर्धमान महावीराला या नदीकाठच्या जृंभिकग्रामी कैवल्य प्राप्त झाले (कल्पसूत्र. पृ. २६३). नामांतर–'ऋजुकुला'; 'ऋजुवलिका'; (जैन कल्पसूत्र)– 'उज्जुवालिया.'

बिहारमधील छोटा नागपूर टेकड्यांमध्ये उगम पावून हजारीबाग जिल्ह्यातून वाहणारी आणि बरकर गावी पश्चिम बंगालमध्ये प्रवेश करणारी आधु. बरकर नदी ती हीच होय. या नदीकाठच्या गिरिदिह गावापासून ८ मैलांवरील एका मंदिरात 'ऋजुपालिका' नदीचा निर्देश करणारा शिलालेख आढळतो (डे, पृ. १६८). काही अभ्यासकांच्या मते 'जृंभिकग्राम'हून हा शिलालेख येथे हलविला असावा.

मतांतरे— डॉ. जैन यांच्या मते ही नदी पाटणा जिल्ह्यातील आधु. पावापुरी गावाजवळून वहात असावी (जैन, पृ. २८९). परंतु पारसनाथ टेकडीसभोवतालच्या पार्श्वनाथ निर्वाणस्थानाच्या परिसरात ही नदी असण्याची शक्यता अधिक वाटते. अन्य काही अभ्यासकांच्या मते जृंभिकग्राम म्हणजे दामोदर नदीकाठचे आधु. जंभियगाव असावे. परंतु ऋजुपालिका म्हणजे दामोदर नदी हे समीकरण भौगोलिक दृष्ट्या असंभव वाटते (पांडे, बिहार. पृ. ८१–८२).

**ऋणतीर्थ** ( तीर्थ )— नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( कूर्म. उत्तर. ४१.१९; २९; मत्स्य. १९१.२७ ).

**ऋणप्रमोचन** ( तीर्थ ) गौतमी ( गोदावरी ) नदीकाठचे एक तीर्थ ( ब्रह्म. ९९.१–१२ ).

२. प्रयागक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ. हे यमुनानदीच्या उत्तरेस व प्रयागच्या दक्षिणेस आहे ( पद्म. आदि. ४४. २१; मत्स्य. १०७.२० ).

३. सह्य पर्वतातील एक तीर्थ ( नृसिंह. ६६.२८ ).

**ऋणमुक्तिगुहा** ( तीर्थ )— नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( नारद. उ. ७१.२० ).

**ऋणमुक्तेश्वर** ( लिंग )—पश्चिम भारतातील नर्मदा नदीकाठचे एक शिवलिंग. हे आधु. चाणोद गावी आहे ( ती. पृ. ४३४ ).

**ऋणमोक्ष** ( तीर्थ )— गया येथील एक तीर्थ ( नारद. उत्तर. ४७.७९; अग्नि. ११६.८ ).

**ऋणमोचन** —( तीर्थ ) काशी येथील एक तीर्थ ( स्कन्द. काशी. ३३.११७; ९७.६६ ).

२. तापी नदीकाठचे एक तीर्थ ( तापीमाहात्म्य ).

३. अयोध्या येथील एक तीर्थ (स्कन्द. वैष्णव. ८.९–१०).

४. दक्षिण भारतातील रामाच्या सेतूनजिकचे एक श्राद्धयोग्य तीर्थ ( स्कन्द. ब्राह्म. सेतु. ४२; नारद. उ. ७६. १९; पद्म. आदि. ११.६० ).

५. कश्मीरातील 'कपालमोचन' तीर्थाचे नामांतर ( कपालमोचन पहा ).

६. संभलक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ. हे मनोकामना तीर्थानजिक आहे ( ती. पृ. ९३ ).

७. कुरुक्षेत्रातील एक तीर्थ ( वामन. ४१.६ ).

**ऋणमोचनेश्वर** ( लिंग )—प्रभासक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंग ( स्कन्द. प्रभास. प्र. २२१ ).

**ऋणान्त** ( कूप )—पद्ममते एक पवित्र कूप ( पद्म. आदि. २६.९२ ).

**ऋतम्भरा** ( नदी )— प्लक्षद्वीपातील एक नदी ( भा. ५.२०.४ ).

**ऋतुकुल्या** ( नदी )- वायुमते पूर्व भारतातील 'ऋषिकुल्या' नदीचे नामांतर ( वायु. ४५.१०६; ऋषिकुल्या १. पहा ).

**ऋतुमाला** ( नदी )—पौराणिक साहित्यमते मलयपर्वतोद्भवा 'कृतमाला' नदीचे नामांतर ( कूर्म. पूर्व ४७.३५; कृतमाला पहा ).

**ऋद्धिपुर** (महानुभावतीर्थ)—विदर्भातील एलिचपुरच्या परिसरातील एक महानुभावपंथीय तीर्थ. येथील गोविंदप्रभु नामक गुरूंनी चक्रधरस्वामींना महानुभावपंथाच्या स्थापनेची प्रेरणा दिली.

**ऋद्धेश्वर** ( लिंग )—नर्मदा नदीकाठचे अदितितपस्यास्थान. लोहारा गावनजिकच्या या स्थानी अदितितीर्थ नामक एक तीर्थाह आहे ( ती. पृ. २३५ ).

**ऋषिपथा** ( नदी )—वितस्ता ( आधु. झेलम ) नदीनजिकची एक नदी ( नीलमत. १५१३ ).

**ऋश्य** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.३ ).

**ऋश्यमूक** ( पर्वत )—दक्षिण भारतातील 'ऋष्यमूक' पर्वताचे नामांतर ( ऋष्यमूक पहा ).

**ऋषभ** ( पर्वत )—पौराणिक साहित्यमते महेंद्र पर्वताचा ( आधु. पूर्वघाट ) एक क्षुद्रपर्वत ( उपपर्वत ). डे यांच्या मते मदुरेनजिकचा आधु. पलनी टेकडी हीच होय ( डे, पृ. ११९ ). एक पवित्र पर्वत म्हणून महाभारत पुलस्त्य यात्रा ( म. आर. ८३.१९ ), तसेच भागवतान्तर्गत बलरामयात्रेत ( भा. १०.७९.१५ ) याचा निर्देश असून, महाभारत आणि भागवतमते हा पांड्य देशात कावेरी नदी आणि मदुरा यांच्या दरम्यान होता. पूर्व समुद्रानजिकच्या या पर्वताजवळ गालव आणि गरुड यांना शांडिलि ऋषींचे दर्शन झाले होते ( म. उ. ११०.२२; १११.१; भा. ५.१९.१६ ). पद्मपुराणातील तीर्थनामावलीत याचा निर्देश असून ( पद्म. आदि. ३९.१९ ), नृसिंहमते सह्य पर्वताच्या या उपविभागात महाविष्णूचे एक स्थान होते ( नृसिंह. ६५.८ ). अन्य पौराणिक साहित्यातहि याचा निर्देश आढळतो ( मत्स्य. १२१.७२; १७३ ).

२. वाल्मीकि रामायणमते दक्षिण भारतातील एक पर्वत. येथील गोशीर्षक आदि चतुर्विध चंदनांचे शैलूष, ग्रामणी, शिक्ष, शुक व बभ्रु संज्ञक पाच गंधर्वप्रमुख रक्षण करीत असत ( वा. रा. कि. ४१.४०–४५ ).

३. वाल्मीकि रामायणमते हिमालयान्तर्गत 'ओषधि' पर्वताचे नामांतर ( वा. रा. यु. ७४.३०; ओषधि पर्वत पहा ).

४. वाल्मीकि रामायणमते मानस सरोवरानजिकचा एक पर्वत. येथील शैलूष गंधर्वकन्या सरमा ही बिभीषणाची पत्नी होती ( वा. रा. उ. १२.२४–२५ ).

५. पूर्व भारतातील एक पर्वत ( वा. रा. कि. ४०.४४ ).

६. मेरु पर्वतोद्भवा चतुर्गंगांपैकी पूर्ववाहिनी सीता नदीकाठचा एक पर्वत ( वायु. ४२.१९ ).

७. कैलास पर्वताचा एक उपविभाग. ब्रह्माण्डमते हा जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वताच्या दक्षिणेस होता ( ब्रह्माण्ड. १८.७५ ).

८. जंबूद्वीपातील एक वर्षपर्वत ( मत्स्य. ११३.२३ ).

९. जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वताचा उत्तरेकडील भाग एक पर्वत ( ब्रह्म. १८.३५; भा. ५.१६.२६; विष्णु. २.२.२८ ).

१०. ( देश ) कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या दक्षिण भागातील एक देश ( बृ. सं. १४.१५; मार्क. ५५.२७ ).

११. ( तीर्थ ) महाभारत पुलस्त्ययात्रामते दक्षिण कोशल देशातील एक तीर्थ ( म. आर. ३.१०; पद्म. आदि. ३९.१० ). शिलालेख साहित्यातहि याचा निर्देश आढळतो ( एपि. इंडि. २७.४८ ). मध्यप्रदेशातील रायगड रेल्वेस्थानकापासून ३० मैलांवरील आणि शक्ति रेल्वेस्थानकापासून १४ मैलांवरील आधु. ऋषभतीर्थ ( गुंजीग्राम ) आणि कुंड हेच होय ( ती. पृ. २२० ).

१२. वाराणसी येथील एक तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.३; पद्म. आदि. ३७.३ ).

**ऋषभकूट** ( पर्वत )—महाभारत लोमशयात्रामते हिमाल्यान्तर्गत हेमकूट पर्वताचा एक उपविभाग. नंदा आणि अपरनंदा नद्यांचे उगमस्थान असा हा पर्वत ऋषभ ऋषींच्या शापाने दुर्गम बनला होता ( म. आर. १०९.१२ ).

**ऋषभदेव** (जैनतीर्थ)—राजस्थानातील ‘केशरियाजी’ नामक जैन तीर्थाचे नामांतर ( ती. सं. पृ. १२४; केशरियाजी पहा ).

**ऋषभञ्जनक** ( तीर्थ )—मथुरा येथील ‘ उषभंजनक ’ तीर्थाचे नामांतर ( वराह, तीर्थविवेचन. पृ. १९१; उषभंजनक पहा ).

**ऋषभद्वीप** ( तीर्थ )—महाभारत पुलस्त्ययात्रामते सरस्वती नदीकाठचे एक तीर्थ ( म. आर. ८२.१३९; पद्म. आदि. ३८.६७ ). येथील सरस्वतीचे नाव सुवेणु होते ( म. श. ३७.२४ ).

**ऋषभा** ( नदी )—मत्स्यमते विंध्यपाद पर्वतोद्भवा एक नदी ( मत्स्य. ११४.२७ ).

२. जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक नदी ( वायु. ४४.१९ ).

**ऋषिक** ( देश व लोकसमूह )—कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या दक्षिण भागातील एक देश ( बृ. सं. १४.१५; मार्क. ५५.२७ ). माहिष्मती आणि विदर्भ देशांसमवेत याचा निर्देश वाल्मीकि रामायण आणि महाभारतात अनुक्रमे आढळतो ( वा. रा. कि. ४१.१०; म. भी. १०.६३; क. ५.२९; पद्म. आदि. ६.५९ ). त्यावरून विदर्भ आणि माहिष्मती देशांच्या दरम्यानच्या नर्मदा खोऱ्यात हा असावा.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या लोकसमूहाची निम्नलिखित नामांतरे आढळतात:—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. वाल्मीकि रामायण ( कि. ४१.१० ) | ऋष्टिक |
| २. महाभारत (भी. १०.६३) | ऋषी विदर्भ ( ऋषिक–विदर्भ ) |
| ३. अशोक शिलालेख ( इंडि. अँटि. २०. २४०; २४७–२४८ ) | राष्ट्रिक ( व्रिष्टिक, वाष्टिक ) |
| ४. गौतमी बलश्रीचा नासिक शिलालेख ( एपि. इंडि. ८.६१ ) | असिक |

**शिलालेख साहित्यात**—गौतमी बलश्रीच्या नासिक शिलालेखातील ‘असिक’ लोक बहुधा हेच असावेत ( असिक पहा ). परंतु खारवेलाच्या हाथीगुंफा शिलालेखमते ते लोक कृष्णा–गोदावरी नद्यांचे दरम्यान निवास करीत असत ( सरकार, शिलालेख पृ. १९८ ). कॉलिन्स यांच्या मते रट्ठि ( राष्ट्रिक ) संज्ञक महाराष्ट्राचे आद्य वसाहतकार लोक हेच असावेत ( कॉलिन्स, रघुवंश भूगोल. पृ. ४४ ).

**ऋषिक** ( उत्तर )— युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या दिग्विजयसत्रात अर्जुनाने जिंकलेला उदीच्य ( वायव्य ) भारतातील एक पर्वतीय देश. अर्जुनाला येथे शुक आणि मयूरसदृश चित्रविचित्रवर्णीय अश्व प्राप्त झाले ( म. स. २४.२४–२६ ). उत्तर भारतातील एक देश म्हणून वाल्मीकि रामायणातहि याचा निर्देश आढळतो ( वा. रा. कि. ४३.१२ ).

जयचंद्र यांच्या मते तिबेट आणि मंगोलिया यांच्या दरम्यानच्या कान्-सू प्रदेशातील यू-चि हे शकवंशीय लोक हेच होत. ऋषिक लोकांची ही आद्य वसाहत तुखार देशाच्या पूर्वेस असून, इ. स. पू. १५० मध्ये हूण लोकांच्या भयाने हे दोन्हीहि लोक हिंदुकुश पर्वतमार्गे कंबोज ( आधु. बदक्षन्-पामीर ) देशात स्थलांतरित झाले. या स्थलांतरित वसा-

हतीचाच निर्देश महाभारतात अभिप्रेत आहे ( जयचंद्र, पृ. १५९ ).

२. मेरु पर्वतोद्भवा सप्तगंगांपैकी पूर्ववाहिनी ह्लादिनी नदीकाठचा एक देश ( ब्रह्माण्ड १८.५४; मत्स्य १२१.५३; वायु. ४७.५१ ).

**ऋषिकन्या** ( तीर्थ )—नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( मत्स्य. १९४.१४ ).

**ऋषिका** ( नदी )—शुक्तिमत् पर्वतोद्भवा 'ऋषिकुल्या' नदीचे नामांतर ( विष्णुधर्म. १.१०.६; कूर्म. पूर्व. ४७.३९; वराह. ८५.६; वायु. ४५.१०७; ऋषिकुल्या १. पहा ). नामांतर ( मत्स्य पुराण )–' काशिका. '

**ऋषिकार** ( नगर )—बौद्ध साहित्यमते कुरु देशातील एक नगर. नामांतर– ( उत्तराध्ययन सूत्र. १५.१२ ) ' इसुकार. '

**ऋषिकुण्ड**—( तीर्थ ) पद्ममते एक ब्रह्मदेवस्थान. येथील ब्रह्मदेवाचे नाव मुनि होते (पद्म. आदि. २९.१३६).

२. ( तप्तजलकुंड ) बिहार प्रांतातील जमालपुर रेल्वे-स्थानकापासून दोन मैलांवरील एक पर्वतीय तप्तजलकुंड.

३. उत्तरकाशी—गंगोत्री मार्गावरील एक तप्त जलकुंड ( ती. पृ. ५२ ). स्थानिक नाव–' गंगानानी '.

**ऋषिकुल्या** ( नदी )—पौराणिक साहित्यमते पूर्व-भारतातील महेंद्र पर्वतातून ( आधु. पूर्वघाट ) उगम पावणारी एक नदी ( म. आर. ८४.४९; मार्कं. ५४.२८; पद्म. आदि. ३२.१२; विष्णु. २.३.१३; विष्णुधर्म. १.१०.३; शिव. उमा. १८.१३; मत्स्य. ११४.३१; ब्रह्म. २७.३७; नारद. उत्तर. ६०.३० ). अन्य पौराणिक साहित्यमते ही नदी शुक्तिमत् पर्वतातून उगम पावत असे ( मार्कं ५४.२९; विष्णुधर्म. १.१०.६; कूर्म. पूर्व. ४७. ३८; ब्रह्माण्ड. १६.३८; वराह. ८५.६; वायु. ४५. १०७ ).

ओरिसा प्रांतातील गंजम, तसेच जौगड या अशोक शिलालेखदुर्गांजवळून वहात जाऊन बहिरामपुर गावानजिक बंगालच्या उपसागरास मिळणारी आधु. ऋषिकुल्या नदी हीच होय.

**नामांतरे**—पौराणिक साहित्यात या नदीची निम्नलिखित पाठभेदात्मक नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा ).

**मतांतरे**—लॉ यांच्या मते पौराणिक साहित्यातील महेंद्र पर्वतोद्भवा त्रिसामा ( वायु. ४५.१०६ ) नदी हीच असून, ' त्रिप्रवाहयुक्त ' अशा अर्थाने दिला ते नाव प्राप्त झाले असावे ( लॉ, रिव्हर्स. पृ. ४४–४५ ). परंतु पौराणिक साहित्यात अनेक ठिकाणी त्रिसामा आणि ऋषिकुल्या

## ऋषिकुल्या नदीची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. महाभारत ( भी. १०.३४ ). | काशिका |
| २. पौराणिक साहित्य | |
| अ. ( वायु. ४५.१०६ ) | ऋतुकुल्या |
| ब. ( ब्रह्माण्ड. १६.३७ ) | ऋषीकुल्या |
| क. ( मत्स्य. ११४.३१; पद्म. आदि. ६.३१; ब्रह्म. १९.१४ ) | काशिका |
| ड. ( विष्णुधर्म. १.१०.६; कूर्म. पूर्व. ४७.३९; वराह. ८५.६; वायु. ४५.१०७. | ऋषिका |

नद्यांचा एकत्र निर्देश आढळत असल्याने त्यांचे हे अनुमान असंभव वाटते ( काणे, धर्मशास्त्र. ४.४९७ ).

पार्गिटर यांच्या मते शुक्तिमत् पर्वतोद्भवा ऋषिका आणि महेंद्रोद्भवा ऋषिकुल्या या दोन स्वतंत्र नद्या असून, त्यापैकी ऋषिकुल्या म्हणजे पूर्व भारतातील आधु. कोयल ही ब्राह्मणी नदीची उपनदी होय. पौराणिक साहित्यमते कोयल आणि शंख या शुक्तिमत् पर्वतोद्भवा नद्यांचा संयुक्त प्रवाह म्हणजे ब्राह्मणी नदी होय ( मार्कं. ५८.२४ ). परंतु पार्गिटर यांच्या या अनुमानास अन्यत्र आधार सापडत नाही.

२. युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या दिग्विजयसत्रात अर्जुनाने ओलांडलेली उत्तर भारतातील एक नदी ( म. स. २५.४ ).

३. मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते ' गंगा ' नदीचे नामांतर ( अभिधान. १४८.१०८२; गंगा पहा ).

४. ( तीर्थ ) महाभारत पुलस्त्ययात्रामते भारतवर्षातील एक तीर्थ ( म. आर. ८२.४३–४४ ).

५. कश्मीरातील वितस्ता ( आधु. झेलम ) नदीकाठचे एक तीर्थ ( नीलमत. १५३० ).

६. वाराणसी येथील एक तीर्थ (पद्म. आदि. ३२.१२).

**ऋषिगिरि** ( पर्वत )––महाभारतमते मगध देशातील गिरिव्रज गावासभोवतालच्या पाच पर्वतांपैकी एक ( म. स. १९.२; राजगृह पहा ). बिहारमधील आधु. राजगीर गावाच्या परिसरातील सोनगिरि ही अत्युच्च टेकडी हीच होय ( आर्कि. सर्व्हे. ५८, पृ. २९ ). बौद्ध आणि जैन साहित्यमते ही सिद्धक्षेत्रस्वरूप चौकोनी आकाराची पवित्र टेकडी राजगृह गावाच्या पूर्वेस होती ( यतिवृषभ, जिनसेन ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या टेकडीची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. महाभारत | रत्नगिरि; मातंगगिरि |
| २. बौद्ध साहित्य ( मज्झिम. ३.६८ ) | इसिगिलि |
| ३. जैन साहित्य | ऋष्यद्रि; सवणगिरि; रिसिंसदगिरि |

**महाभारतात**—या ग्रंथमते येथील मातंग ऋषींच्या आश्रमामुळे हिला 'मातंगगिरि' वैकल्पिक नाव प्राप्त झाले होते.

**बौद्ध साहित्यात**—मज्झिम निकायमते या टेकडीवर ( इसिगिलि ) '.इसिगिलि सुत्त 'चे प्रणयन झाले असून, इतिहासाच्या विभिन्न काळात हिचे हे नाव कायम राहिले होते ( मज्झिम. ३.६८ ).

**जैन साहित्यात**—जैनांच्या या सुविख्यात तीर्थस्थानाचा निर्देश पूज्यपादाच्या ग्रंथात 'ऋष्यद्रि' नावाने आणि निर्वाणकांडात 'सवणगिरि' आणि 'रिसिंसदगिरि' नावांनी आढळतो ( जैन साहित्य और इतिहास. पृ. ४३६; ४४९ ).

**ऋषितीर्थ** ( तीर्थ )—नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( कूर्म. उत्तर. ४१.१५; पद्म. आदि. १८.२२;२७; मत्स्य. १९१.२२ ). तृणबिंदु ऋषी येथे शापमुक्त झाले ( मत्स्य. १९३.१३ ).

२. प्रभासक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ ( नारद. उत्तर. ७०.४३; स्कन्द. प्रभास. प्र. २५५ ). येथील कुंड आजहि सुविख्यात आहे.

३. मथुरा येथील तीर्थराजाच्या दक्षिणेकडील एक तीर्थ ( वराह. १५२.६२ ).

४. द्वारका येथील एक तीर्थ ( स्कन्द. प्रभास. द्वा. १५. १२ ).

५. कश्मीरातील वितस्ता ( आधु. झेलम ) नदीकाठचे एक तीर्थ ( नीलमत. १५२९ ).

**ऋषितोया** ( नदी )—प्रभासक्षेत्रातील एक नदी ( नारद उ. ७०.६१; स्कन्द. प्रभास. प्र. २९६–२९७ ).

**ऋषिद्रोण** ( तपस्यास्थान )—गोपथ ब्राह्मणमते द्रोणाचार्यांचे तपस्यास्थान, एक वन ( गो. ब्रा. २.८ ).

**ऋषिपट्टण मृगदाव** ( मृगवन )—गौतम बुद्धाच्या धर्मचक्रप्रवर्तनाने पुनीत झालेले सारनाथ येथील एक मृगवन ( सारनाथ पहा ). नामांतर ( बौद्ध साहित्य )–' इसिपतन मृगदाव '.

**ऋषिवन** ( तीर्थ )—उत्तर प्रदेशातील प्रयागनजिकचे एक दाशरथि रामतीर्थ. भरद्वाजाश्रमातून ( प्रयाग ) मार्गदर्शक म्हणून बरोबर घेतलेले चार मुनिकुमार श्रीरामाने येथून परत पाठविले. प्रयागनजिकचे आधु. मऊळीबो ग्राम हेच असावे ( ती. पृ. ११९ ).

**ऋषिल** ( नगर )— अशोकाच्या दक्षिण राज्यविभागातील एक नगर. नामांतर ( अशोकाचा सिद्दापुर आणि ब्रह्मगिरि लघु आज्ञालेख; सांची स्तूप शिलालेख )– 'इसिल' ( कॉर्पस्. इन्स्क्रि. १.१.३८; १७५;१७८ ).

अशोकाच्या दक्षिण राज्यविभागात 'बनवासी '( म्हैसूर प्रांतातील चितळदुर्ग जिल्हा ) आणि 'महिषमंडल' ( आधु. म्हैसूर ) राज्यांचा समावेश असून, त्यापैकी बनवासी राज्यातील सिद्दापुर गावाच्या परिसरात अशोकाचे सिद्दापुर, ब्रह्मगिरि आणि जतिंग-रामेश्वर लघुआज्ञालेख सापडले आहेत ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१७९ ). त्यावरून आधु. सिद्दापुर ( अक्षांश, १४°.४७′ उत्तर; रेखांश. ७६° पूर्व ) म्हणजे प्राचीन ऋषिलनगर असावे.

**प्रादेशिक ठाणे**— अशोकाच्या राज्यशासनपद्धतीनुसार त्याच्या साम्राज्याचे उज्जयिनी, तोसली आणि सुवर्णगिरि संज्ञक तीन उपविभाग असून, त्यापैकी सुवर्णगिरि विभागाचे प्रादेशिक ठाणे या गावी होते. या गावाच्या परिसरातील तीनहि शिलालेखात अशोकाच्या धर्माज्ञा प्रजेला विदित करण्याची प्रादेशिक अधिकाऱ्यांना ( आर्यपुत्र; महामात्र ) आज्ञा दिलेली आढळते ( एपि. इंडि. ३.१३७ ).

**सिद्दापुर शिलालेखात**—या गावचा अशोकाचा लघु आज्ञालेख सिद्दापुर गावानजिकच्या 'येनमन तिमय्यन गुंडलु' ( शब्दशः अर्थ-तिम्मय टेकडीवरील म्हशींचा कळप ) टेकडीवर असून, 'ब्रह्मगिरि' आणि 'जतिंग रामेश्वर' आज्ञालेख सिद्दापुर टेकडीपासून १ मैल पूर्वेकडील ब्रह्मगिरि टेकडीवर आणि ४ मैल वायव्येकडील जतिंगरामेश्वर टेकडीवर आहेत. येथील आज्ञालेखातील मजकूर उत्तर प्रदेशातील बैराट आणि आंध्र प्रदेशातील कोप्बाळ ( गवीमठ ) शिलालेखांसदृश असून, ७८ मैलांवरील मस्कि ( आंध्र ) शिलालेखाहून मात्र तो सर्वस्वी वेगळा आहे ( जे. आर. ए. एस. स. १९०९, पृ. ९९८; कॉर्पस्. इन्स्क्रि. ११.२७ ).

सिद्दापुर टेकडीच्या माथ्याजवळील दक्षिणाभिमुख सपाटीवर ( १३½′ × ८′ ) अशोकाचा बावीस ओळींचा

आशालेख असून, त्याच्या उत्तरेकडील लोंबत्या दगडामुळे येथे गुरांना बसण्यासाठी नैसर्गिक आडोसा तयार झाला आहे. त्यामुळेच या टेकडीस 'येनमन तिमय्यन गुंडलु' हे स्थानिक नाव प्राप्त झाले असावे.

**ऋषिविहार** ( बौद्धविहार )—मथुरेच्या परिसरातील यमुना नदीच्या पूर्व किनारीचा एक बौद्ध विहार. नामांतर ( चिनी साहित्य )–' सिएन्-जेन् ' ( वॉटर्स, १.३१३ ).

**ऋषिवेद** ( स्थान )—पद्ममते एक ब्रह्मदेवस्थान. येथील ब्रह्मदेवाचे नाव दुराधर्ष होते ( पद्म. आदि. २९.१४६ ).

**ऋषिसङ्गम** ( तीर्थ )—प्रभासक्षेत्रातील एक तीर्थ ( स्कन्द. प्रभास प्र. ३१४ ).

**ऋषिसङ्गेश्वर** ( लिंग )— काशी येथील एक शिवलिंग ( लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. ५४ ).

**ऋषिसत्र** ( तीर्थ )—गौतमी ( गोदावरी ) नदीकाठचे एक तीर्थ ( ब्रह्म. १७३.१ ).

**ऋषीवह** ( ग्राम )—काशिका ग्रंथमते भारतवर्षातील एक ग्राम ( काशिका. ४.२.१२२ ). ' वह ' ( शब्दशः अर्थ–परिवहन करणारा ) अंत्यशब्दयुक्त ग्रामनामाचे उदाहरण म्हणून याचा निर्देश तेथे आढळतो. ऋषींच्या दळणवळणामुळे यास हे नाव प्राप्त झाले असावे ( अग्रवाल, पाणिनि. पृ. ८० ).

**ऋष्टिक** (लोकसमूह)—दक्षिण भारतातील 'ऋषिक' लोकसमूहाचे नामांतर ( वा. रा. कि. ४१.११; ऋषिक पहा ).

**ऋष्यद्रि** ( पर्वत )—जैन साहित्यमते मगध देशातील ' ऋषिगिरि ' पर्वताचे नामांतर ( ऋषिगिरि पहा ).

**ऋष्यमूक** ( पर्वत )—पौराणिक साहित्यमते सह्य पर्वताचा ( आधु. पश्चिम घाटाचा उत्तर भाग ) एक क्षुद्र पर्वत ( उपपर्वत; भा. ५.१९.१६; म. आर. २६.८; मार्क ५४.१४; वराह. ८५.३; वामन. १३.१८ ). बृहत्संहितामते हा कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या दक्षिण भागात असून ( बृ. सं. १४.१३ ), वाल्मीकि रामायणमते दाशरथि राम आणि सुग्रीव यांची प्रथम भेट याच पर्वतावर झाली होती ( वा. रा. कि. ४ ). महाभारत लोमशयात्रेत एक तीर्थ म्हणून याचा निर्देश आढळतो ( म. आर. १४७.२७ ). नामांतर–' ऋश्यमूक '.

**आधुनिक स्थान**—भौगोलिक दृष्ट्या सह्य पर्वताच्या दक्षिण भागाचे ऋष्यमूक आणि मलय असे दोन उपविभाग असून, अहमदनगरपासून नळदुर्ग आणि कल्याणी गावापर्यंतची भीमा आणि मंजिरा नद्यांच्या खोऱ्यांच्या दरम्यानची पर्वतश्रेणी हीच होय. स्थानिक परंपरेनुसार म्हैसूर प्रांतातील आनेगुंदी गावाच्या आठ मैल उत्तरेकडील तुंगभद्रा नदीकाठच्या चित्रकूट आणि जालेंद्र टेकड्यांनजिकच्या हंपे मंदिरानजिकची छोटी टेकडी हीच होय ( इंडि. अँटि. ६.८५; ती. पृ. ३०७ ). या टेकडीमध्ये उगम पावणारी पश्चिमवाहिनी पंपा नदी तुंगभद्रेस मिळते.

**वाल्मीकि रामायणात**— या ग्रंथमते शबरीभेटीनंतर दाशरथि राम पंपा सरोवराच्या पूर्वेकडील ( वा. रा. अर. ७३.३१ ), आणि दक्षिणेकडील ( वा. रा. कि. १.७३ ) मतंग पर्वताच्या शाखाभूत ( वा. रा. कि. ३.१ ) अशा या पर्वतावर सुग्रीवभेटीसाठी आला ( वा. रा. अर. ७५.१३-१४; २६; कि. १.३; २.१४; ५.१ ). मतंगाश्रम आणि मातंग सरोवरानजिकचा हा पर्वत मतंगशापग्रस्त वालिन्‌ला अगम्य असल्याने वानरराज सुग्रीव येथे सुरक्षितपणे निवास करीत असे ( वा. रा. अर. ७५.७; २६ ).

**महाभारतात**—या ग्रंथमते पंपा नदीकाठच्या ( सरोवर ) या पर्वतावर ( म. आर. २६३.४० ) सुग्रीव आपल्या हनुमत् आदि मंत्र्यांसह निवास करीत असे ( म. आर. १४७.४०.२७ ). हनुमानाच्या मध्यस्थीने राम-लक्ष्मणांनी येथे सुग्रीवाशी मैत्री केली ( म. आर. २६४.९–११ ), तसेच मार्कंडेय ऋषींना दर्शन दिले ( म. आर. २६.८ ).

२. गर्गसंहितामते अश्वरूपधारी केशिन् दैत्याचे निवासस्थान, एक पर्वत. हा मथुरेनजिक असावा ( गर्ग. १.६ ).

**ऋष्यवन्त** ( पर्वत )—मत्स्यमते दक्षिण भारतातील ' ऋक्ष ' पर्वताचे नामांतर. अन्य नामांतर–' ऋष्यवत् ' ( मत्स्य. ११४.२६; ऋक्ष पहा ).

**ऋष्यशृङ्ग–आश्रम** ( आश्रमस्थान )—महाभारतमते अंग देशातील कौशिकी संगमानजिकच्या विश्वामित्र, विभांडक आणि कश्यप ऋषींच्या आश्रमानजिकचे ऋष्यशृंग ऋषींचे आश्रमस्थान ( म. आर. ११०.१–२ ). ऋष्यशृंग ऋषी विभांडक काश्यप ऋषींचा पुत्र असल्याने ही आश्रमस्थाने एकमेकांनजिक असावीत. नामांतर ( महाभारत टीका )— ' ऋश्यशृंग–आश्रम. '

महाभारतात अन्यत्र यास ' नाव्याश्रम ' म्हटले असले ( म. आर. १११.१; ३–४; ११३.२५ ), तरी ते नौकास्थित आश्रमस्थान अंगराज रोमपादाने ऋष्यशृंगाला गणिकांच्या साह्याने कामातुर बनविण्यासाठी कौशिकी नदीच्या जलामध्ये स्वतंत्रपणे निर्मिले होते.

**आधुनिक स्थान**—पूर्व रेल्वेवरील जसीदीह–क्यूल रेल-मार्गावरील मननपुर रेल्वेस्थानकापासून पाच मैलावर हे असून, तेथे पंचधारायुक्त प्रपात, तसेच दाशरथी रामाच्या चूडाकरणविधीचे स्थान आहे ( ती. पृ. १७६ ).

**ऋष्यशृङ्ग-तपःस्थली** ( तपस्यास्थान )—गुजरात-मधील भडोचनजिकचे नर्मदानदीकाठचे ऋष्यशृंग–तपस्या-स्थान. हे विमलेश्वरानजिक आहे ( ती. पृ. ४२८ ).

**ऋष्यशृङ्गेश्वर** ( लिंग )—काशी येथील एक शिव-लिंग (स्कन्द. काशी. ९७.२३८). पाठभेद–'ऋष्यशृंगेश्वर' ( लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. ११५ ).

## ए

**एओर्नोस्** ( दुर्गस्थान )—ग्रीक साहित्यमते अफ-गाणिस्तानातील आश्वकायन लोकांच्या 'वरणानगर' नामक पर्वतीय दुर्गस्थानाचे नामांतर ( अग्रवाल, पाणिनि. पृ. ४६६; वरणानगर पहा ).

**एक** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ६.२.८८ ).

**एककर्ण** ( देश )—मत्स्यमते मेरु पर्वतोद्भवा सप्त-गंगांपैकी पूर्ववाहिनी ह्लादिनी नदीकाठचा एक देश ( मत्स्य. १२१.५३ ).

**एकचक्रा** ( नगर )—महाभारतमते उत्तर भारतातील एक नगर. लाक्षागृहदाहातून बचावल्यानंतर पांडव स्वमाता कुंतीसमवेत या गावच्या एका ब्राह्मणाकडे ब्राह्मणवेषाने एक महिना राहिले होते ( म. आर. १३.९८–९९ ). या गावानजिकच्या वेत्रकीय वनातील बकासुराचा वध करून भीमसेनाने येथील लोकांस भयमुक्त केले ( म. आ. १५२.९ ). उत्तर प्रदेशातील इटावा जिल्ह्यातील कांपिल्य ( प्राचीन द्रुपदनगर ) पासून १०० मैल आग्नेयेकडील आधु. चक्रनगर गाव हेच होय.

**नामांतरे**—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतातः—१. एकचक्र; २. हरिगृह ( कल्पद्रु. १०.१५; त्रिकाण्ड. ३१.१२ ); ३. शंभुपुरी ( त्रिकाण्ड. ३१.१२ ).

**शतपथ ब्राह्मणात**—या ग्रंथमते हे नगर पंचाल देशातील परिचक्रा ( गंगा नदीकाठचे आधु. परियर ) गावाहून विभिन्न होते ( श. ब्रा. १३.५.४.७; परिचक्रा पहा ).

**महाभारतात**—या ग्रंथमते लाक्षागृहातून भुयारमार्गे सुखरूप बाहेर पडलेले पांडव वेदाभ्यासपरायण ब्रह्म-चाऱ्यांच्या रूपाने स्वमाता कुंतीसह या गावच्या एका ब्राह्मणगृही रहावयास आले. नजिकच्याच वेत्रकीय वनातील बकासुराने या गावच्या प्रत्येक घरावर आळीपाळीने अन्न आणि मनुष्यबली देण्याचा कर बसविला होता. ती पाळी पांडवांच्या आश्रयदात्या ब्राह्मणावर येताच कुंतीच्या आज्ञे-वरून भीमाने बलिप्राणी म्हणून जाऊन, आणि बकासुराचा वध करून हे नगर भयमुक्त बनविले ( म. आ. ५५. २०–२१ ). येथे एक महिना राहून पांडव द्रौपदी-स्वयंवरासाठी पांचाल देशातील द्रुपदनगरास गेले.

**एकचरण** ( लोकसमूह )—बृहत्संहितामते कूर्मचक्रा-त्मक भारतवर्षाच्या ईशान्य भागातील एक देश ( बृ. सं. १४.३१ ). पाठभेद– 'एकपद' ( बृ. सं. १४.७ ); 'एकपाद' ( मार्कं. ५५.५१ ); 'एकाशन' ( म. स. ४८.३ ). नेपाळमधील आधु. किरात लोक हेच होत ( एन्. एच्. एच्. २.१२; किरात पहा ).

**महाभारतात**—या ग्रंथमते युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयी हे हिमालय पर्वतनिवासी लोक 'पैपीलिक' सुवर्णाचे उपायन घेऊन उपस्थित होते ( म. स. ४८. ३–४ ).

**एकद्वार** ( तीर्थ )—स्कंदमते अर्बुदारण्यातील सरस्वती नदीच्या उत्तर तीरावरील गंगासंगमाच्या नैर्ऋत्येकडील एक तीर्थ ( स्कन्द. प्रभास. प्र. ३५.६७–६८ ).

**एकधार** ( तीर्थ )—साभ्रमती नदीकाठचे एक तीर्थ ( पद्म. उ. १३६.१२ ).

**एकपद**—( लोकसमूह )—बृहत्संहितामते हिमालय पर्वतीय 'एकचरण' लोकसमूहाचे नामांतर ( बृ. सं. १४. ७; एकचरण पहा ).

**एकपर्वतक** ( देश )—महाभारतमते कुरु–मगध मार्गावरील एक देश ( म. स. १८.२७ ).

**एकपाद** (देश)—युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या दक्षिण दिग्विजयात सहदेवाने जिंकलेला दक्षिण भारतातील एक देश (म. स. २८.४७). येथील लोक राजसूय यज्ञसमयी उपायन घेऊन उपस्थित होते (म. स. ४७.१६).

२. (लोकसमूह) मार्कंडेयमते हिमालय पर्वतीय 'एकचरण' लोकसमूहाचे नामांतर (मार्क. ५५.५,१; एकचरण पहा).

३. (देश) स्कंदमते भरतखंडातील एक देश. यामध्ये दहा हजार गावे होती (स्कन्द. माहेश्वर. कौ. ३९.१४७).

**एकपादक** (देश)—मार्कंडेयमते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या पूर्व भागातील एक देश (मार्क. ५५.१४). वाल्मीकि रामायणातहि यास पूर्ववर्ती म्हटले आहे (वा. रा. कि. ४०.२६).

**एकपिङ्गलागिरि** (पर्वत)—कुमारसंभवमते हिमालय पर्वतान्तर्गत 'कैलास' पर्वताचे नामांतर (कुमार. ८.२४; कैलास पहा).

**एकपृष्ठ** (देश)—महाभारतमते भारतवर्षातील एक जनपद (म. भी. १०.४०)

**एकप्रस्थ** (नगर)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक नगर (पा. सू. ६.२.८७). 'प्रस्थ' अंत्यशब्दयुक्त नगरनामाचे उदाहरण म्हणून याचा निर्देश तेथे आढळतो. अन्य 'प्रस्थान्त' नगरांप्रमाणेच हेहि कुरु देशात असावे.

**एकबाहु** (देश)—स्कंदमते भरतखंडातील एक देश. यामध्ये दहा सहस्र गावे होती (स्कन्द. माहेश्वर. कौ. ३९.१४८).

**एकराज** (तीर्थ)—भारतवर्षातील एक तीर्थ (पद्म. आदि. २७.६९; म. आर. ८१.१५९).

**एकलव्य** (देश)—विंध्य पर्वतान्तर्गत एक देश वामन. ५३.५४).

**एकलिङ्ग** (तीर्थ)—वराहमते एक तीर्थ (वराह. १२२.१६).

**एकलिङ्गजी** (शिवमंदिर)—राजस्थानमधील उदयपुर–नाथद्वारा रस्त्यावरील उदयपुरपासून १२ मैलांवरील मेवाडच्या राणांचे कुलदैवतस्वरूप शिवमंदिरस्थान. उदयपुर एकलिंगजी रस्ता पूर्वी इतिहासप्रसिद्ध हळदीघाटातून जात असे. परंतु सध्याचा मोटाररस्ता हळदीघाटापासून दूर अंतरावरून जातो. उदयपुर आणि नाथद्वाराहून बसने हळदीघाटास् जाता येते.

**शिवमंदिर**—मेवाडचे संस्थापक बाप्पा रावळ यांचे, तसेच उत्तरकालीन राण्यांचे एकलिंगजी हे आराध्य दैवत असून, येथील मंदिराचा जीर्णोद्धार वि. स. १५१५ त राणा कुंभाने केला. येथील प्रारंभीचे बाणलिंग नजिकच्या इंद्रसागर सरोवरात विसर्जित झाल्यानंतर येथे एकलिंगजीची चतुर्भुज मूर्ती स्थापिण्यात आली.

एकलिंगजी मंदिराच्या पश्चिम द्वारानजिक पितळी नंदिमूर्ती असून, नजिकच्या इंद्रसागर सरोवराभोवती गणेश लक्ष्मी, डुंटेश्वर, धारेश्वर, वनवासिनी देवी आदि मंदिरे आहेत (ती. पृ. २९८).

**आख्यायिका**—एकलिंगजी पुराणमते या मंदिरानजिकच्या इंद्रसागराकाठी हरित ऋषींचा आश्रम असून, त्यांच्या आशीर्वादानेच मेवाडच्या गुहिलोत राजघराण्याच्या राज्याची स्थापना झाली. परमोत्कर्षकाली मेवाडचे राज्य पेशावरपासून गोदावरी तीरापर्यंत आणि आसामपासून अरबी समुद्रापर्यंत होते.

**एकविलोचन** (लोकसमूह)— बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या वायव्य भागातील एक लोकसमूह (बृ. सं. १४.२३).

**एकशिखर** (पर्वत)— मेरु पर्वतोद्भवा चतुर्गंगांपैकी उत्तरवाहिनी भद्रसोमा नदीकाठचा एक पर्वत (वायु. ४२.७१).

**एकशिल** (देश)— जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वतातील कृष्ण आणि पांडुर पर्वतांच्या दरम्यानचा एक देश (वायु. ३८.४९-५०).

**एकशिला** (नगर)—आंध्र प्रदेशातील सुविख्यात नगर आणि मध्ययुगीन तेलंगण देशाच्या राजधानीचे गाव. आग्नेय रेल्वेच्या वाडी–बेझवाडा मार्गावरील काझीपेठ रेल्वेस्थानकापासून सहा मैलांवरील आधु. वारंगळ हेच होय. इ. स. १२–१३ व्या शतकात काकतीय राजांची राजधानी या गावी असून, येथील किल्ला, तसेच मंदिरावशेष प्राचीन कालापासून सुविख्यात आहेत.

अनुमकोंड (आधु. इनमकोंड) हे तेलंगणाच्या अन्य एका राजधानीचे गाव यापासून ४ मैल वायव्येस आहे (अनुमकोंड पहा).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतातः— १. टॉलेमी– '**कोरुंगकल**'; २. अन्य प्राचीन साहित्य– '**बेनाकटक**'; '**अक्षलिनगर**'.

**टॉलेमीच्या ग्रंथात**— या ग्रंथमते हे गाव (अक्षांश १५° उत्तर, रेखांश १३५° पूर्व) मैसौलोइ (आधु.

मच्छलीपट्टम् ) प्रदेशातील पाच प्रमुख नगरांपैकी एक होते ( मैसौलोइ पहा ).

**मध्ययुगीन काळी**— स. १३०९ मध्ये अल्लाउद्दीन खिलजीच्या मलिककाफूर नामक सेनापतीने या नगरावर हल्ला करून, आणि येथील प्रताप रुद्र ( द्वितीय ) राजाची सारी संपत्ती जिंकून एक हजार उंटांच्या साह्याने ती दिल्लीस नेली ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. १७५-१७६ ). यानंतर महंमद तुघलक ( १३२१ ), महंमद बहामनी ( १३५८, १३६४ ) आदि सुलतानांनी या नगरावर पुनःपुन्हा हल्ले चढविले. त्यापैकी महंमद बहामनीने ( स. १३६४ ) या नगराच्या विनायक नामक राजास धगधगत्या भट्टीमध्ये लोटून हा सारा प्रदेश बहामनी राज्यास जोडला ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. १९६ ).

**शिलालेख साहित्यात**—येथील दुर्गातील एका स्तंभलेखमते ओरिसानरेश कपिलेंद्र गजपतीच्या कपिलेश्वर नामक पुत्राने स. १४५९ मध्ये हा दुर्ग जिंकला होता ( मद्रास एपि. रिपोर्ट. स. १९०२, पृ. ७ ). चित्तबखान नामक हिंदु सरदाराच्या स. १५०३ च्या शिलालेखमते हा किल्ला त्याने मुसलमानांकडून जिंकला होता ( अर्कि. सर्व्हे. वार्षिक अहवाल, स. १९०२, क्र. १०८ ).

**मंदिरे**—येथील मंदिरांत सहस्रस्तंभ मंदिर, पद्माक्षी मंदिर आणि भद्रकाली मंदिर ही प्रमुख आहेत.

**भद्रकाली मंदिर**—गावापासून १ मैलावरील टेकडीवरील या प्राचीनतम मंदिरात भारतातील सर्वाधिक विशाल अष्टभुजा देवीची ९' उंचीची मूर्ती असून काकतीय राजवंशाची ती देवी ( उपास्य दैवत ) होती. कनौजच्या हर्षवर्धन राजाने तिची पूजा केली होती. मंदिरानजिकच भद्री सरोवर आणि एक शिवमंदिर आहे ( ती. पृ. ३३८ ).

**एकशृङ्ग** ( पर्वत )—जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वत, तसेच रुद्रक्षेत्र आणि मानस सरोवर यांच्या दक्षिणेकडील एक पर्वत ( मार्कं. ५२.७; लिङ्ग. ४९.४७; वायु. ३६.२४ ).

**एकसाल** ( ग्राम )—वाल्मीकि रामायणमते अयोध्या-केकय मार्गावरील एक ग्राम. अयोध्येहून केकय देशास जाणाऱ्या भरतास हे लागले होते ( वा. रा. अयो. ७१.१६ ).

२. ( शिवमंदिरस्थान ) गुजरातमधील भडोचनजिकच्या समनी गावापासून दोन मैलांवरील नर्मदा नदीकाठचे एक शिवमंदिरस्थान. येथे 'अप्सरेश्वर' आणि 'डिंडीश्वर' नामक स्वयंभू शिवमंदिरे आहेत ( ती. पृ. ४३९ ).

**एकसाला** ( ग्राम )—बौद्ध साहित्यमते उत्तर भारतान्तर्गत कोशल देशातील बुद्ध प्रवचनाने पुनीत झालेले एक ब्राह्मणग्राम. स्थानिक आख्यायिकामते बुद्धाने माराचा ( कामदेव ) पराजयहि येथेच केला होता. ( संयुक्त १.९६ ).

**एकहंस** ( तीर्थ )—कुरुक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ ( नारद. उत्तर ६५.३५; म. आर. ८१.१६; वामन. ३४.३७ ).

२. अर्बुद पर्वतावरील एक तीर्थ ( स्कन्द. प्रभास. अ. ३१.१७ ).

**एकाक्षा** ( नदी )—जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक नदी ( वायु. ४४.२० ).

**एकादश रुद्र** ( लिंग )—प्रभासक्षेत्रातील एक शिवलिंग ( स्कन्द. प्रभास. प्र. ३६२ ).

**एकानैशा** ( देवी )—अवंती येथील एक देवीस्थान ( स्कन्द. आवन्त्य. अ. १८ ).

**एकान्तराघव** ( तीर्थ )—स्कंदमते दक्षिण भारतातील रामाच्या सेतूनजिकचे एक तीर्थ ( स्कन्द. ब्राह्म. से. १३ ). नामांतर–'अमृतकुंड' ( नारद. उत्तर. ७६.१० ); 'एकांतरामनाथ.'

रामेश्वरपासून ४ मैल दक्षिणेकडील आणि तंकच्चिमठम स्थानकापासून १ मैल पूर्वेकडील आधु. एकांतराघव तीर्थ हेच होय. येथील मंदिरात वार्तालापमग्न राम, लक्ष्मण आणि सीतेच्या मूर्ती असून, नजिकच अमृतवापिका, ऋणविमोचन तीर्थ आदि तीर्थे आहेत ( ती. पृ. ३८० ).

**एकान्ती** ( तीर्थ )— संभलक्षेत्रान्तर्गत चतुःसागरानजिकचे एक तीर्थ ( ती. पृ. ९२ ).

**एकाम्रकक्षेत्र** ( शिवक्षेत्र )—ब्रह्ममते ओरिसामधील वैतरणा नदीकाठच्या उत्कलराजधानी 'भुवनेश्वर' नगराचे नामांतर (ब्रह्म. ४१; भुवनेश्वर पहा). अन्य नामांतर ( ब्रह्म. ४२ )– 'विरजतीर्थ' ( स्कन्द .वैष्णव. ज. १२ )– 'एकाम्रतीर्थ.'

२. ( देवीस्थान ) पद्ममते एक देवीस्थान. येथील देवीचे नाव कीर्तिमती होते ( पद्म. आदि. १७.१९३; मत्स्य. १३.२९; ब्रह्म. ४१.८ ).

**एकाम्रेश्वर** ( क्षितिलिंग )—दक्षिण भारतातील शिवकांची येथील शिवाचे क्षितिलिंगस्थान ( कांची पहा ).

**एकाशन** ( लोकसमूह )— महाभारतमते हिमालय प्रदेशातील 'एकचरण' लोकसमूहाचे नामांतर ( म. स. ४८.३; एकचरण पहा ).

**एकेक्षण** ( देश )— मार्कंडेयमते कूर्मचक्रात्मक भारत वर्षाच्या पश्चिम भागातील एक देश ( मार्कं. ५५. ३७ ).

२. कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या वायव्य भागातील एक देश ( मार्क. ५५.४० ).

**एकेन** ( देशविभाग )—लोकप्रकाशमते कश्मीरातील ' एवेनक ' राज्यविभागाचे नामांतर ( एवेनक पहा ).

**एकेश्वर** ( शिवतीर्थ )—उत्तर भारतातील गढवाल प्रदेशातील चौंदकोट गावचे ( समुद्रसपाटीपासून उंची–६००० ) शिवधारा जलप्रपातानाजिकचे एक शिवमंदिर-स्थान ( ती. पृ. ६१ ).

**एक्कोरि** ( ग्राम )—चोल राजा राजराज ( तृतीय ) च्या स. १२३२ च्या तिरुवेंदिपुरम् शिलालेखमते दक्षिण भारतातील एक ग्राम. दक्षिण चिदंबरम् तालुक्यातील आधु. एक्केरि गाव हेच होय ( एपि. इंडि. ७.१६१–१६२ ).

**एक्बोलिम्** ( नगर )—कर्टियसच्या मते पंजाबातील ' एंब्रोलिम् ' नगराचे नामांतर ( एंब्रोलिम् पहा ).

**एजिडिओरम् इन्शुला** ( बेट )—ग्रीक साहित्यमते दक्षिण भारतातील ' आज्यद्वीप 'चे नामांतर ( आज्यद्वीप पहा ).

**एडेडोरे** ( देश )—नोलंब पल्लव राजा जगदेकमल्ल तुर्मडीच्या स. १०४० च्या शिरूर कानडी शिलालेखमते दक्षिण भारतातील एक देश. फ्लीट यांच्या मते पेर्डोरे ( कृष्णा ) आणि किरुडोरे (तुंगभद्रा) नद्यांच्या दरम्यानचा आधु. रायचुर दुआब हाच होय ( एपि. इंडि. १५.३३४ ).

**एडेनाड** ( देश )—स. १०३२ च्या शिमोगा वीरकाल मृत्युलेखमते म्हैसूर राज्यातील एक राज्यविभाग. याचे आधु. स्थान समजत नाही ( एपि. कर्ना. ८.६०–६४ ).

**एण्णायिरम्** ( विद्यापीठस्थान )—मद्रास राज्यातील दक्षिण अर्कोट जिल्ह्यातील एक मंदिरीय संस्कृत विद्यापीठ-स्थान. या गावच्या चोल राजा राजेंद्र ( प्रथम ) च्या स. १०४१ च्या शिलालेखावरून इ. स. ११ व्या शतकात हे भरभराटीस आले असावे (मद्रास, एपि. रिपोर्ट. ८.२६०).

**विद्यापीठ**—येथील विद्यापीठामध्ये ३४० विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची निम्नलिखित पद्धतीने व्यवस्था होती :—( १ ) ऋग्वेद–७५; ( २ ) कृष्ण यजुर्वेद–७५; ( ३ ) शुक्ल यजुर्वेद–२०; (४) सामवेद–४०; ( ५ ) अथर्ववेद–१०; ( ६ ) रूपावतार–४०; ( ७ ) प्रभाकरमीमांसा–३५; ( ८ ) व्याकरण–२५; ( ९ ) बौधायन धर्मसूत्र–१०; ( १० ) वेदांत–१०.

या वसतिगृहयुक्त विद्यापीठाच्या योगक्षेमासाठी ग्रामस्थांनी ३०० एकर जमीन दान दिली असून, विद्यार्थ्यांना येथे मोफत शिक्षण दिले जात असे. येथील शिक्षकांना विद्यार्थ्यांच्या खर्चाच्या १६ पट वेतन दिले जात असून, व्याकरणाचार्यांला अष्टाध्यायीच्या एक अध्यायाच्या संथेबद्दल ३/५ तोळे सुवर्ण मिळत असे. बौद्ध आणि जैन विद्यापीठांच्या तुलनेने येथील वातावरण कर्मठ आणि संकुचित होते.

**एनाडि** ( मंदिरस्थान )—दक्षिण भारतातील चो स्थापत्यशैलीचे ( इ. स. ९ वे शतक ) एक देवमंदिरस्थान ( गोएट्झ, पृ. १७३ ).

**एनूर** ( जैनतीर्थ )—दक्षिण भारतातील ' वेणूर ' नामक जैनतीर्थाचे नामांतर ( ती. सं. पृ. १२४; वेणूर पहा ).

**एमार मठ** ( रामानुजमठ )— जगन्नाथपुरीयेथी जगन्नाथमंदिराच्या सिंहद्वारानजिकचा रामानुजाचार्यांच्या वास्तव्याने पुनीत झालेला रामानुजमठ. त्यांच्या 'एंब्राडियम नावावरूनच यास हे नाव प्राप्त झाले होते (ती. पृ. २००).

**एम्बोलिम्** ( नगर )—टॉलेमीच्या मते पंजाबातील सिंधु नदीच्या पश्चिमेकडील वालुकाव्याप्त प्रदेशातील एक नगर ( अक्षांश ३१° उत्तर; रेखांश १२४° पूर्व ). अटकपासून ६० मैल अंतरावरील सिंधु नदीकाठचे आधु. ' अंब ' गाव हेच होय. या गावानजिकच्या टेकडीच्या उत्खननात बोलम् लोकांच्या वस्तीचे आवशेष सापडले आहेत. त्यावरून आधु. ' अंब ' हे नगरनाम ' एंब्रोलिम् ' चेच लघुरूप असावे. नामांतर ( कर्टियस् )–' एक्बोलिम् '.

**टॉलेमीच्या ग्रंथात**—या ग्रंथमते येथे सिंधु नदी अरुंद दरीतून बाहेर पडत असल्याने सिंधु नदीचे हे उगमस्थान असल्याचा गैरसमज स्थानिक लोकात रूढ होता. ' एंब्रोलिम् 'चा शब्दशः अर्थहि ' नदीचा उगम ' असाच होतो. या दरीच्या पश्चिम काठावर अंब नामक देरजेंद ग्रामाभिमुख दुर्ग होता.

**अरियनच्या ग्रंथात**—या ग्रंथमते हे गाव ' औनोंस् ' ( अंब गावापासून ८ मैलांवरील आधु. महाबन पर्वत ) पर्वतानजिक होते ( अरियन, ४.२७ ).

**कर्टियसच्या ग्रंथात**—या ग्रंथमते हे स्थान सिंधु नदीपासून १६ दिवसांच्या प्रवासाच्या अंतरावर होते. भौगोलिक दृष्ट्या ही माहिती चुकीची वाटते.

**एरकिन** ( नगर )—सांची स्तूपलेखमते मध्यप्रदेशातील ' ऐरिकिण ' नगराचे नामांतर ( एपि. इंडि. २.३७५; ऐरिकिण पहा ).

**एरण्ड ल्ल** ( देश )—गुप्त सम्राट समुद्रगुप्ताच्या अलहाबाद प्रशस्तिलेखमते दक्षिण भारतातील कोशल देशानजिकचा एक देश. येथील दमन राजास त्याने जिंकले होते ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.७ ).

आधुनिक स्थान—या देशाच्या भौगोलिक स्थानाविषयी अभ्यासकांत निम्नलिखित मतांतरे आढळतात:— (१) एरंडोल—फ्लीट यांच्या मते जळगाव जिल्ह्यातील आधु. एरंडोल गाव हेच असावे (जे. आर. ए. एस्. स. १८९८; पृ. ३६९); (२) एरंडपलि—अन्य अभ्यासकांच्या मते ओरिसामधील गंजम जिल्ह्यातील चिकाकोलनजिकचे आधु. एरंडपलि गाव हेच होय (एपि. इंडि. १२:२१२); (३) येंडिपल्लि—अन्य काही अभ्यासकांच्या मते विजगापट्टम् जिल्ह्यातील गोवळकोंडा तालुक्यातील आधु. येंडिपल्लि गाव हेच असावे (रॉयचौधरी, पृ. ५४०).

अलाहाबाद प्रशस्तिलेखात निर्देशिलेला स्वामिदत्त हा कलिंग देशाऐवजी त्या देशाच्या कोट्टूर नामक उपविभागाचा राजा असून, ओरिसामधील आधु. एरंडपलि गाव बहुधा हेच असावे (डिस्कळकर शिलालेख.२.२३).

**एरण्डवेल** (जैनतीर्थ)—जैनांचे सुविख्यात तीर्थस्थान. ज्ञानसागर आणि जयसागरमते येथे नेमिनाथाचे मंदिर असून, येथील धर्मनाथ चैत्यालयामध्ये स. १५८४ त देवेंद्रकीर्तीने 'अंबिका उत्सव' ग्रंथ लिहिला होता (भट्टारक साम्प्रदाय. पृ. ५१). जळगाव जिल्ह्यातील धुळे–जळगाव मार्गावरील आधु. एरंडोल गाव हेच होय (ती. सं. पृ. १२५).

**एरण्डी** (नदी)—नर्मदा नदीची एक उपनदी (पद्म. आदि. २०.६३; कूर्म. उत्तर. ४१.८५). नामांतर–'ऐरंडी' (मत्स्य. १९१.४२). गुजरात राज्यातील बडोदा जिल्ह्यातील आधु. उरि (ओर) नदी हीच होय (काणे, धर्मशास्त्र ४.७५१).

**एरंडी–नर्मदा संगम**—पौराणिक साहित्यमते एरंडी–नर्मदा संगम 'एरंडी संगमतीर्थ' नावाने सुविख्यात असून (मत्स्य. १९४.३२; कूर्म. उत्तर. ४१.८६; ४२.३१; पद्म. आदि. १८.४१–४२; ४४; २१.३२; नारद. उत्तर. ७७.११), भडोच जिल्ह्यातील सुवर्णशिला गावानजिकचे आधु. धूतपाप तीर्थ हेच होय. तेथे कनकेश्वरी देवीचे मंदिर आहे (ती. पृ. ४३६). नामांतर–'हत्याहरणतीर्थ'.

**एरद विषय** (राज्यविभाग)—शिलालेख साहित्यमते कलिंग देशातील एक द्वादश ग्रामयुक्त राज्यविभाग. यामधील एक ग्राम पल्कोंड तालुक्यातील वर्धमानपुर (आधु. वदम) गावापासून १५ मैलांवर होते (डी. एच्. एन्. आव्. १.४५७; ४९०). त्यावरून आधु. वदम गावाच्या परिसरात हा असावा.

**एरम्बरगे** (नगर)—आंध्र प्रदेशातील सिंध राजघराण्याच्या (इ. स. १२ वे शतक) राजधानीचे गाव. धारवाड जिल्ह्यातील तुंगभद्रा नदीच्या उत्तर किनाऱ्यावरील आधु. येल्बुर्गा गाव हेच होय (एपि. इंडि. ८.१०; १४. २६८; १५ १०९; इंडि. अँटि. स. १८७६, पृ. १७४). इ. स. १२ व्या शतकात होयसाळ राजांनी हे जिंकून घेतले. होयसाळ राजा बल्लाळ (द्वितीय) याने स. ११९५ मध्ये या गावास भेट दिली होती (एपि. कर्ना. ३.३१). देवगिरीच्या भिल्लम राजाशी त्याने येथे युद्धहि केले होते (एन्शंट इंडिया. पृ.२५२; मलप्रभा पहा).

**एरम्बूर** (देवमंदिरस्थान)— दक्षिण भारतातील चोल स्थापत्यशैलीचे (स. ९३५) एक देवमंदिरस्थान (गोएट्झ, पृ. १७३).

**एररस** (नगर)—टॉलेमीच्या मते भारतवर्षातील एक राजधानीचे नगर (अक्षांश–२६°, उत्तर रेखांश–१२३° पूर्व). यूल यांच्या मते हे 'गिरिराज'चे ग्रीकभाषीय रूप असून, गोवर्धन पर्वतावर (आधु. नासिक) हे असावे (इंडि. अँटि. १.२३). सेंट मार्टिन यांच्या मते आधु. वाराणसी नगर हेच असावे.

**एरावाय** (नदी)— जैन साहित्यमते उत्तर भारतातील 'अचिरवती' (आधु. राप्ती) नदीचे नामांतर (कल्पसूत्र. पृ. १२; बृहत् कल्पसूत्र. ४.३३; अचिरवती पहा).

**एरिकिण** (नगर)— श्रीधरवर्मन्च्या एरण स्तंभलेख मते मध्यप्रदेशातील 'ऐरिकिण' नगराचे नामांतर. अन्य नामांतर–'एरिकिन' (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.६०९; ऐरिकिण पहा).

**एरुल** (गुफास्थान)— जैन साहित्यमते महाराष्ट्रातील 'एलापुर' गुफास्थानाचे नामांतर (एलापुर पहा).

**एलंकच्छपुर** (जैनतीर्थ)— मध्य प्रदेशातील एक जैनतीर्थ. झाँसी जिल्ह्यातील मोथ तहसिलीतील आधु. एरछ गाव हेच होय. नामांतर–'दशार्णपुर'.

**एलाङ्गकोन** (नगर)— टॉलेमीच्या मते दक्षिण भारतातील एक व्यापारी बाजारपेठेचे गाव (अक्षांश. १४° उत्तर; रेखांश १२०°-४० पूर्व). केरळ प्रांतातील त्रावणकोर जिल्ह्यातील आधु. कोलनु (क्विलॉन) गाव हेच होय. नामांतर (मुसलमानी साहित्य)–'कुलम्'.

**एलाधान** (ग्राम)—वाल्मीकि रामायणमते अयोध्या-केकय मार्गावरील एक ग्राम. अयोध्येहून केकय देशास जाणाऱ्या भरताला हे लागले होते (वा. रा. अयो. ७१.३).

**एलापत्र** (देश)–बौद्ध दिव्यावदानमते गंधार देशातील एक गुप्तधनयुक्त देशविभाग. येथील गुप्तधनाची माहिती गौतम बुद्धाने श्रावस्ती येथील अनाथपिंडक नामक श्रेष्ठीस सांगितली होती (दिव्य. पृ. ६१). तक्षशिलेपासून १४ मैल वायव्येकडील आधु. एलापत्र तलावाच्या परिसरात हा असावा. त्या तलावाचे नावहि याचेवरूनच पडले असावे (वॉटर्स, १.२४३–२४४; तक्षशिला पहा).

२. (कुंड) अवंती येथील एक पवित्र जलकुंड (स्कन्द. आवन्त्य. अ ६५.१७).

**एलापुर** (गुफास्थान)—दक्षिण भारतातील सुविख्यात हिंदु, जैन आणि बौद्ध गुफामंदिरस्थान, आणि स. ७५३–९७४ च्या दरम्यानचे राष्ट्रकूट राजधानीचे नगर. येथील घृष्णेश्वर शिवमंदिर महाराष्ट्रातील बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक असून, त्या संदर्भातच शिव पुराणात यास 'शिवालय' म्हटले आहे (शिव. विद्या. ३८). अगस्त्य ऋषींनी वधिलेल्या इल्वल आणि वातापि या राक्षसांपैकी इल्वल येथे निवास करीत असे.

या स्थानाचे हे पुरातन धार्मिक महत्त्व लक्षात घेऊनच राष्ट्रकूटांनी आपली राजधानी या गावी स्थापून स्वतःचे कुलदैवतस्वरूप कैलास मंदिर, तसेच अन्य हिंदु, बौद्ध आणि जैन गुफामंदिरे येथे खोदली.

औरंगाबादपासून ७ मैलांवरील आणि मध्य रेल्वेच्या नांदगाव रेल्वेस्थानकापासून ४० मैलांवरील कोल्लेरू सरोवराकाठचे आधु. वेरूळ हेच होय. येथील घृष्णेश्वर मंदिर औरंगाबाद–वेरूळ रस्त्यावरील वेरूळ गावी असून, त्यापासून ¾ मैल पूर्वेस येथील गुफा आहेत.

**अद्वितीयत्व**—धार्मिक सहिष्णुतेचे प्रतीक अशा तुल्य-कौशल्य बौद्ध, हिंदु, जैन गुफा हे वेरूळ गुफासमूहाचे प्रमुख वैशिष्ट्य असून, येथील ३३ गुफांपैकी १९ हिंदु, १२ बौद्ध आणि २ जैनधर्मीय आहेत. नासिक येथील बौद्धजैन गुफांपैकी जैन गुफा कलादृष्ट्या हिणकस असून, बदामी येथील हिंदु-जैन गुफा संख्येने अत्यल्प आहेत. जुन्नर येथील बौद्ध, हिंदु, जैन गुफांपैकी हिंदु-जैन गुफा उत्तरकालीन पुनर्संस्कारांमुळे विशुद्ध स्वरूपात उपलब्ध नाहीत. त्यामुळे हिंदु, बौद्ध आणि जैन शिल्पकलांचा परमोत्कट विलास म्हणून वेरूळ अद्वितीय असून, कांची येथील कैलासनाथ मंदिराची परि-वर्धित प्रतिकृती म्हणून कोरलेले कैलास मंदिर हे त्यापैकी सर्वोत्कृष्ट गुफामंदिर मानले जाते.

राष्ट्रकूट राजा कर्क (द्वितीय) च्या स. ८१२ च्या सिद्धांसि शिलालेखात एलापुर येथील कैलास मंदिराच्या अद्वितीय शिल्पाच्या दर्शनाने स्तिमित झालेल्या अंतरिक्ष-गामी देवांनी हे मंदिर मनुष्यनिर्मित नसून, देवनिर्मित असल्याचे धन्योद्गार काढल्याचे काव्यमय वर्णन आढळते:—

> **एलापुराचलतटाद्भुतसंन्निवेशं,**
> **यद्वीक्ष्यविस्मितविमानचरामरेन्द्राः ।**
> **एतत्स्वयंभु शिवधाम न कृत्रिमे श्रीः,**
> **दृष्टे दृशीति सततं बहु चर्चयन्ति: ॥**

असे शिल्प पुन्हा कोरण्याची असमर्थता प्रगट करीत असता उपरोक्त शिल्पाचा शिल्पकार म्हणतो—

> **भूयस्तथाविधकृतौ व्यवसायहानेः ।**
> **एतन्मया कथमहो कृतमित्यकस्मात ॥**

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या स्थानाची निम्नलिखित नामांतरे आढळतात ((परिपत्रक पहा).

**नामव्युत्पत्ती**—डे यांच्या मते 'इल्वल नामक असुराचे नगर' अशा अर्थाने यास 'इल्वलपुर' नाव प्राप्त झाले. राष्ट्रकूट शिलालेखातील 'एलापुर' हे इल्वल-पुर' चेच अपभ्रष्ट रूप असून, बौद्ध साहित्यातील



## एलापुर गुफास्थानाची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. शिव पुराण ( विद्या १.५८ ) | शिवालय |
| अ. बृहत्संहिता ( १४.१४ ) | वेल्लूर, देव पर्वत |
| २. अन्य पौराणिक साहित्य | इल्वलपुर |
| ३. तेलगु साहित्य | कमलाकरपुर, कोलनु |
| ४. कार्ले बौद्ध शिलालेख ( आर्कि. सर्व्हे. वे. इं. ४.१०१; १०८; ११३ ) | वल्लूरक, वलूरक |
| ५. घटोत्कच लेणे बौद्ध विहार-लेख ( आर्कि. सर्व्हे. वे. इं. ४.१३९ ) | वल्लूर |
| ६. शुल्कि राजवंशाचा स. ९७२ चा मसेर शिलालेख ( एपि. इंडि. २९.२६ ) | ऐलापुर |
| ७. जैन साहित्य | एलूर, एरुल, येरुल |
| ८. महानुभाव साहित्य ( स्थान-पोथी पृ. ४१ ) | एळापूर |
| ९. स्थानिक नावे | वेळापुर, वेरूळ ( एल्लूर ) |

' वल्लूरक, ' ' वेल्लूर ' ही नावे संस्कृत ' एलापुर 'ची प्राकृत आणि तेलगू रूपे आहेत. अन्य अभ्यासकांच्या मते ईलपुरच्या ( विदर्भातील आधु. एलिचपुर ) ईल नामक जैन राजाच्या नावावरून यास हे नाव प्राप्त झाले. ' शिवालय ( कैलास ) मंदिराचे आणि जलकुंडाचे स्थान ' अशा अर्थाने त्यास ' शिवालय ' म्हणू लागले.

**शिवस्थान**—शिवमते शिवालय येथील घृष्णेश शिव बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक असून ( शिव. ज्ञान. ५८ ), अहल्याबाई होळकरांनी या मंदिराचा जीर्णोद्धार केला. बृहत्संहितेत यास ' देव पर्वत ' म्हटले असून ( बृ. सं. १४–१४ ), मत्स्यमते हे एक श्राद्धयोग्य तीर्थ आहे.

**राष्ट्रकूटांची राजधानी**—स. ७३५–८६० च्या दरम्यान राष्ट्रकूट राजांची राजधानी येथे होती. वातापिपुर ( आधु. बदामी ) येथील चालुक्य राजांचे ( इ. स. ७ वे शतक ), तसेच त्यानंतरच्या राष्ट्रकूट राजांचे ( इ. स. ८ वे–१० वे शतक ) राज्य या गावाच्या दक्षिणेस कृष्णा–तुंगभद्रा नद्यां-पर्यंत असून, या दोन घराण्यांच्या राज्यकालात येथील बहुतांशी गुफांची रचना झाली. येथील कैलास संज्ञक स्वयंभू शिवलिंग राष्ट्रकूट राजांचे कुलदैवत असून, त्याचे विशाल आणि समृद्ध गुफामंदिर या राजांनी शतकानुशतके आणि पिढ्यान्‌पिढ्या अखंड मेहनत करून खोदले. राष्ट्र-कूट राजधानी या गावाहून मान्यखेट ( आधु. मालखेड ) येथे स्थलांतरित झाल्यानंतरहि ( स. ८८० ) कुलदैवतस्थान म्हणून याचे महत्त्व तसेच अबाधित राहून इ. स. १० व्या –११ व्या शतकात येथे अनेक गुफामंदिरे खोदण्यात आली.

फर्ग्युसन यांच्या मते राष्ट्रकूट राजा दंतिदुर्गाने ( स. ७३५ ) कैलास मंदिराच्या रूपाने द्राविड स्थापत्यशैली येथे आणली, आणि उत्तरकालात चालुक्य, राष्ट्रकूट आणि गुप्त स्थापत्यशैलींच्या संमिश्रणाने येथील बहुतांशी गुफामंदिरांची रचना राष्ट्रकूटांनी केली.

**शिलालेख साहित्यात**—गुलवाडा येथील घटोत्कच बौद्ध विहारलेखात, तसेच कार्ले येथील तीन गुफालेखात याचा निर्देश अनुक्रमे ' वल्लूर ' आणि ' वल्लूरक ' ( वलूरक ) नावांनी आढळतो ( आर्कि. सर्व्हे. वे. इं. ४.१०१; १०८; ११३; १३९–१४० ). कार्ले शिलालेखमते येथील बौद्ध भिक्षूंना ' कर्जिकग्राम ' दान दिले असून, येथील काही भिक्षू उत्तरकालात कार्ले येथे स्थायिक झाल्यामुळे त्यास ' वल्लूरक ' वैकल्पिक नाव प्राप्त झाले. दंतिदुर्ग राष्ट्रकूटाच्या स. ७४१ च्या ताम्रपटात यास ' एलापुर ' म्हटले आहे ( इंडि. अँटि. १२.२२८ ).

**जैन साहित्यात**—या साहित्यमते एयल राजाने इंद्रा-प्रीत्यर्थ जैन गुफाशिल्प खोदलेले दक्षिण भारतातील हे जैनतीर्थ ' एरुल ', ' येरुल ', ' वेरूळ ' वैकल्पिक नावांनी सुविख्यात होते. सुमतिसागरमते येथील शिल्परचना आश्चर्य-कारक असून, ज्ञानसागरमते कार्तिकी पौर्णिमेला येथे यात्रा भरत असे. हर्षमते पर्वतपार्श्वनाथ हे येथील प्रमुख आराध्य-दैवत असून, स. १२३५ च्या वेरूळ जैन गुफालेखमते चक्रेश्वर नामक व्यक्तीने ते खोदले ( जैन शिलालेखसंग्रह ३.३३५; ती. सं. पृ. १२५ ).

**कालनिर्णय**—येथील विभिन्न गुफांपैकी बौद्ध गुफा ( उदा. विश्वकर्मा चैत्यमंदिर ) सर्वाधिक प्राचीन ( इ. स. ६०० ) असून, हिंदु आणि जैन गुफा उत्तरकालीन ( इ. स. ८–९ वे शतक ) असल्याचे प्रारंभी मानण्यात येत असे. परंतु वातापि ( आधु. बदामी ) येथील गुफा क्र. ३ या वेरूळ हिंदु गुफामंदिरासदृश ( उदा. रामेश्वर मंदिर ) गुफेतील चालुक्य राजा कीर्तिवर्मन् ( प्रथम ) च्या स. ५७८ च्या गुफालेखामुळे वेरूळच्या बौद्ध आणि हिंदु गुफा विजापुर जिल्ह्यातील चालुक्य मंदिरांच्या समकालीन ( इ.

स. ५००–७५० ) असल्याचे, तसेच परधर्मसहिष्णु चालुक्य आणि राष्ट्रकूट राजांनी येथील बौद्ध आणि हिंदु गुफा एकाच वेळी खोदल्याचे सिद्ध झाले.

शैव आणि वैष्णव पंथांच्या बाबतीतहि चालुक्य आणि राष्ट्रकूट राजे समदर्शी असून, वेरूळ येथील 'रावण-की-खाई' आणि 'दशावतार' गुफांच्या गाभाऱ्यात शिवलिंग आणि आवारात शैव-वैष्णव उभय पंथांची शिल्पचित्रे आहेत अनुमानपरंपरेनुसार वेरूळ येथील गुफांचा कालक्रम निम्नलिखित परिपत्रकात दिला आहेः—

## एलापुर येथील प्रमुख गुफांचा कालानुक्रम

| स्थानिक नाव | रचनाकाल |
|---|---|
| **( १ ) बौद्ध गुफा ( गुफा क्र. १–१२ )** | |
| १. घेडवाडा विहार | स. ५८०–६४२ |
| ५. महारवाडा विहार | ,, ,, ,, |
| १०. विश्वकर्मा चैत्यमंदिर | स. ७००–७५० |
| ११. दोनथाळ विहार | ,, ,, ,, |
| १२. तीनथाळ विहार | ,, ,, ,, |
| **( २ ) हिंदु गुफा ( गुफा क्र. १३–२९ )** | |
| १४. रावण की खाई मंदिर | स. ७००–७५० |
| १५. दशावतार मंदिर | ,, ,, ,, |
| १६. कैलास मंदिर | स. ७५०–८५० |
| २१. रामेश्वर मंदिर | स. ६४०–६७५ |
| २५. कुंभारवाडा मंदिर | ,, ,, ,, |
| २७. गोळणगुफा मंदिर | ,, ,, ,, |
| २९. दुमार लेणे मंदिर ( सीता नहाणी ) | स. ५८०–६६० |
| **( ३ ) जैन गुफा ( गुफा क्र. ३२–३३ )** | |
| ३२. इंद्रसभा मंदिर | स. ७५०–८५० |
| ३३. जगन्नाथसभा मंदिर | ,, ,, ,, |

वेरूळ येथील गुफाशिल्पांची खोदाई इ. स. १०–१२ व्या शतकापर्यंत चालू असली, तरी तीमधील जोम इ. स. ८ व्या शतकात ( उदा. कैलास मंदिर ) समाप्त झाला होता. येथील कैलास मंदिरातहि राष्ट्रकूट स्थापत्याऐवजी चालुक्य शैलीचा प्रभाव अधिक असून, ते कांची येथील कैलासनाथ आणि पादकल येथील चालुक्य मंदिरांसदृश आहे.

## बौद्ध गुफा

**बौद्ध गुफा**—वेरूळ येथील बौद्ध गुफांपैकी ( गुफा क्र. १–१२ ) पल्लव–गुप्त संमिश्र स्थापत्यशैलीने कोरलेल्या ५–९ गुफा अधिक पुरातन असून, चालुक्य राजांच्या वातापि येथील मलेगित्ति शिवालयाशी, तसेच अजंटा येथील उत्तरकालीन गुफांशी ( गुफा क्र. १–५; २१–२७ ) त्यांचे साम्य आहे. याचे उलट गुफा क्र. १–१४ आणि ११–१२ या उत्तरकालीन आणि महायानपंथीय आहेत.

या गुफांपैकी गुफा क्र. २ आणि १० ही चैत्यमंदिरे आणि अन्य बौद्ध विहार आहेत. धम्नार आणि खोल्वि येथील बौद्ध गुफांच्या तुलनेने त्या सुबक असून, हिंदु देवमंदिरशिल्पाची त्यावर छाया आहे. पश्चिम महाराष्ट्रातील बौद्ध धर्माच्या अवनतीच्या संधिकाली ( स. ७५० ) या गुफा खोदल्या असून, पर्सी ब्राऊन यांच्या मते येथील विहार स. ५८०–६४२ आणि चैत्यमंदिरे स. ७००–७५० च्या दरम्यान खोदली असावीत.

**चैत्यमंदिरे**—वेरूळ येथील चैत्यमंदिरद्वयापैकी गुफा क्र. १० ( विश्वकर्मा गुफा ) ही सर्वाधिक महत्त्वाची असून, ती अजंटा येथील गुफा क्र. २६ सदृश ( स. ७००-७५० ) आहे. या गुफेच्या दर्शनी भागीच्या काष्ठकाराच्या ( विश्वकर्मा ) शिल्पचित्रामुळे तिला हे नाव प्राप्त झाले. या मंदिरातील प्रदक्षिणापथविरहित विशाल स्तूपाच्या ( उंची २७′ ) दर्शनी भागी खोदलेल्या महायानपंथीय, अनुचरद्वयसहित अवनतपाद बुद्धप्रतिमेची ( उंची ११′ ) काष्ठकार लोक कुलदैवत म्हणून पूजा करतात.

आकाराने विशाल ( ८६′×४३′×४३′ ) अशा या चैत्यमंदिराच्या छतांच्या दगडी तुळया आणि अन्य सारी आलंकरणे काष्ठशिल्पानुसृत असून, त्यामधील नागदेवता शिरोभूषणयुक्त २८ अष्टकोनी स्तंभांवर वर्तुलाकृती छत आहे. स्तंभांच्या माथ्यावरील नक्षीकामयुक्त आडवी पट्टी अजंटा येथील गुफा क्र. १९ आणि २६ सदृश आहे. वेडसा, कार्ले, कान्हेरी येथील पुरातन चैत्यमंदिरांतील दर्शनी भागीच्या अश्वलनाकृती काष्ठ गवाक्षाऐवजी येथे

तीन कप्प्यांची वैशिष्ट्यपूर्ण छोटी खिडकी खोदली आहे.

**बौद्ध विहार**—हिंदु देवमंदिरांच्या अनुकरणाने कोरलेले वेरूळ येथील महायानपंथीय विहार विश्वकर्मा चैत्य-मंदिराच्या दक्षिणेस असून, बुद्धप्रतिमांचे अतिरिक्त अवडंबर त्यामध्ये दिसते. त्यापैकी उल्लेखनीय बौद्ध विहार पुढीलप्रमाणे होत:—

(१) गुफा क्र. ५ (महारवाडा गुफा)—विश्वकर्मा चैत्यमंदिरानजिकच्या परंतु त्यापेक्षा पूर्वकालीन (स. ५८०–६४२) अशा या विहाराची रचना अजंटा, नासिक, बाघ येथील परंपरागत विहारांहून वेगळी आहे.

या विहाराचे सभागृह विशाल (११०'×७०'), आणि कमी उंचीचे छत लाकडी तक्तपोशीसदृश सपाट आहे. फर्ग्युसन यांच्या मते कान्हेरी येथील दरबार गुफेप्रमाणेच भिक्षुभोजनगृह म्हणून याचा उपयोग करीत असावेत. अन्य अभ्यासकांच्या मते येथील छत बौद्ध शिल्पकलेच्या अवनतीचे द्योतक असून, शिल्पकलेच्या प्राथमिक अवस्थेतील (उदा. बेडसा) काष्ठशिल्पानुकरण येथे पुनरावृत्त दिसते.

(२) गुफा क्र. २–४ (धेडवाडा गुफासमूह)—'थेरवाडा' (भिक्षुगृह) नावाच्या 'धेडवाडा' या अपभ्रष्ट रूपाने ओळखला जाणारा हा गुफासमूह गुफा क्र. ६ आणि ९ च्या दक्षिणेस पर्वतशिखरावर आहे. विश्वकर्मा गुफेपेक्षा पूर्वकालीन (स. ५००–६४२) अशा या तीनहि गुफांची शिल्पशैली एकसुरी धर्तीची आहे.

या समूहापैकी अजंटा विहारासदृश गुफा क्र. २ (४८'×४८'×१८') या द्वादश स्तंभयुक्त गुफेच्या दर्शनी भागी द्वारपालद्वय (उंची १४') आहे. त्यापैकी एकाच्या जटांमध्ये बुद्धमूर्ती व हातामध्ये माला, आणि दुसऱ्याच्या शिरस्त्राणावर स्तूप आणि गळ्यात जानवे आहे. सिंहासनावर गंधर्व आणि अनुचरवेष्टित बुद्धमूर्ती आहे. बाजूच्या भिंतीवरहि अवनतपाद बुद्धप्रतिमा असून, स्तंभाची शिरोभूषणे समृद्ध नक्षीकामयुक्त आहेत.

रचनादृष्ट्या गुफा क्र. २ सदृश अशा गुफा क्र. ३ या विहारात (४६'×४६'×११') पद्मासनस्थ, नागफणाधारित बुद्धमूर्ती असून, गुफेच्या भिंतीवर औरंगाबाद गुफेसदृश अवलोकितेश्वर मूर्ती आणि संकटमोचन प्रार्थनापट आहे. मध्यवर्ती दालनाभोवती बारा खोल्या आहेत. गुफा क्र. ४ (३५'×३९') मध्ये अनुचरीवेष्टित पद्मपाणि बुद्धमूर्ती आहे. मूर्तीच्या बाजूस संकटमोचनपट असून स्तंभांच्या शिरोभागी झुलत्या पर्णशाखा कोरल्या आहेत.

(३) गुफा क्र. ११ (दोन थाळ अथवा दुखिया घर विहार)—विश्वकर्मा चैत्यमंदिराच्या उत्तरेकडील आणि धेडवाडा विहाराच्या उत्तरकालीन (स. ७००–७५०) या अपूर्णावस्थेतील तीन मजली विहाराचा तळमजला मातीच्या ढिगाऱ्यात गाडला गेल्याने हा 'दोन थाळ' (दोन मजली) या चुकीच्या नावाने ओळखला जातो. स. १८७७ मध्ये त्याचा तळमजला उकरून काढण्यात आला.

बौद्ध आणि हिंदु शिल्पशैलींच्या संमिश्रणाने बांधलेल्या या विहाराच्या तळमजल्यातील (१०२'×९०') देवमंदिरात पद्मपाणि आणि वज्रपाणिअनुचरवेष्टित गौतम बुद्धाची पद्मासनाधिष्ठित मूर्ती आहे. पहिल्या मजल्यावर स्त्रीपुरुष भक्तजनवेष्टित सिंहासनस्थ बुद्धप्रतिमा असून, दुसऱ्या मजल्यावर पद्मासनस्थ बुद्धप्रतिमा आहे. नजिकच दक्षिण-हस्तामध्ये धनराशी घेतलेल्या स्थूलकाय दात्याची प्रतिमा आहे. मंदिराच्या पार्श्वभागी दोन छोटया खोल्या आहेत.

(४) गुफा क्र. १२ (तीन थाळ विहार)—पाताल, पृथ्वी, स्वर्ग या त्रैलोक्याचे प्रतीकभूत असा हा विशाल तीन मजली विहार रचनादृष्ट्या दोन थाळ गुफेसदृश आहे. भव्य आणि प्रमाणबद्ध तीन मजली रचनेमुळे ते भारतातील सर्वोत्कृष्ट गुफामंदिर समजले जात असून उपासनामंदिर म्हणून त्याचा उपयोग करीत असावेत.

बौद्ध देवताशास्त्राच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण अशा तारादेवी आदि महायानपंथीय स्त्रीदेवतांच्या, तसेच वज्रपाणिअनुचरवेष्टित, कमलाधिष्ठित बुद्धाच्या आणि बोधिसत्त्वाच्या अनेक शिल्पावली येथे असून, चीन-जपानमधील उत्तरकालीन शिल्पांमध्ये त्याचे अनुकरण दिसते. बुद्धाचे सात अवतार व अनेक ध्याने, बुद्धनिर्वाण, चतुर्हस्त ब्राह्मणी देवी, नवग्रह, दंडवज्रधारी व्यक्ती, तसेच वामस्कंधावर धनराशी घेतलेल्या दात्याची प्रतिमा येथे आढळते. तिसऱ्या मजल्यावरील बुद्धप्रतिमेची सध्या दाशरथि राम म्हणून पूजा करतात.

(५) गुफा क्र. ८—विश्वकर्मा चैत्यमंदिरानजिकच्या या महारवाडा विहारासदृश छोट्या विहाराचे हिंदु मंदिरासदृश सभागृह (२८'×२५') आणि गर्भागार (२८'×२७') असे दोन उपविभाग असून, त्याच्या दर्शनी भागी हिंदुदेवमंदिरांसदृश द्वारपाल आहेत. गर्भागारात चतुर्हस्त, पद्मपाणि अनुचरसेवित, पद्मासनाधिष्ठित बुद्धमूर्ती, तसेच मयूरसहित सरस्वती आणि ग्रंथपाठक पंडिताच्या प्रतिमा आहेत.

(६) गुफा क्र. ७— गुफा क्र. ८ नजिकच्या या

चौरसाकृती चतुःस्तंभयुक्त छोटया विहाराच्या स्तंभांवरील शिल्प ' दुखिया घर ' विहारासदृश असून, त्याभोवती अनेक छोटया खोल्या आहेत.

( ७ ) गुफा क्र. ६—उपरोक्त विहारांच्या शिरोभागीच्या टेकडीवरील या अजंटा विहारासदृश अपूर्ण विहारातील तीन दालनांपैकी ( २६'×२९'; २७'×४३'; २७'×२९' ) आतील दालनात पद्मासनाधिष्ठित नऊ बोधिसत्त्वांनी वेष्टिलेली गौतम बुद्धाची अवनतपाद मूर्ती आहे. बुद्धप्रतिमेच्या अधोभागी पद्मासनाधिष्ठित भक्तांच्या पाच मूर्ती, तसेच बुद्धोपासिका तारेची एक मूर्ती आहे. मंदिराच्या द्वारभागी पद्मपाणिसदृश द्वारपाल असून, गर्भागाराच्या गाभाऱ्यात सरस्वती आणि ग्रंथपाठक पंडिताच्या प्रतिमा आहेत.

( ८ ) गुफा क्र. ९—गुफा क्र. ६ नजिकच्या, तसेच त्याच विहाराची प्रतिकृती अशा या विहारात बुद्धाची बाल्यावस्था दर्शविणारे औरंगाबाद-अजंटासदृश शिल्प आहे.

( ९ ) गुफा क्र. ५—या विहारातील दालनाभोवती भिक्षु गृहाच्या वीस कोठडया आहेत. गुफेच्या दालनात मुकुटधारिणी सेविका आणि पद्मपाणिप्रतिमा आहेत

## हिंदु गुफामंदिरे

**हिंदु गुफा**—वेरूळ येथील १९ हिंदु गुफामंदिरे मामल्लपुरम् येथील रथमंदिराच्या स्थापत्य आणि शिल्पपरंपरेतील आहेत. बौद्ध विहारस्थापत्यशैली हिंदु देवमंदिररचनेसाठी ओढून-ताणून प्रयुक्त केल्यामुळे उत्पन्न झालेला मामल्लपुरम् येथील रचनात्मक विस्कळितपणा येथील हिंदु गुफामंदिरात दूर करण्यात आला आहे. त्यामुळे द्राविड मंदिरस्थापत्याचे परिपूर्ण दर्शन त्यामध्ये घडते.

येथील हिंदु गुफांपैकी गुफा क्र. २७ आणि २८ वैष्णव आणि अन्य सारी शैव आहेत. तत्रापि तेथील शिल्पामध्ये शैव आणि वैष्णव असा भेदाभेद अथवा अभिनिवेश नाही. येथील कैलास शिवमंदिरात कृष्णाच्या कालियामर्दन, तसेच गोवर्धनगिरिधारी प्रतिमा असून रावण-की-खाई या शिवमंदिरात शिवपार्वती, शिवतांडव यांच्यासमवेतच रावणकैलासोत्थान, भैरव, गणपति, सप्तमातृका, भवानी, गजलक्ष्मी, वराहाअवतार, विष्णु, लक्ष्मीनारायण आदि विभिन्न शिल्पे आहेत.

वेरूळ येथील प्रमुख हिंदु गुफामंदिरे पुढीलप्रमाणे होतः—

### ( १ ) कैलास मंदिर

**गुफा क्र. १६ ( कैलास मंदिर )**—दशावतार मंदिराच्या उत्तरेकडील हे गुफामंदिर भारतातील सर्वाधिक विशाल ( लांबीरुंदी–१६४' × १०९', आवार–२७६' – १५४' ), शिल्पदृष्ट्या सर्वाधिक समृद्ध, स्थापत्य आणि प्रमाणबद्धता या उभय दृष्टींनी अद्वितीय, आणि म्हणूनच भारतीय गुफामंदिर स्थापत्याचा अत्युत्कृष्ट आविष्कार मानले जाते. स्थानिक नामांतर—' रंगमहाल '.

**मंदिररचनेचा इतिहास**—राष्ट्रकूट राजा कृष्ण ( प्रथम ) ( स. ७५७–७७२ ) च्या प्रशस्तिलेखमते पश्चिम चालुक्य राजा कीर्तिवर्मन् ( द्वितीय ) च्या पराजयाचे त्याचा पिता दंतिदुर्गाने आरंभिलेले कार्य यशस्वीपणे पुरे केल्यानंतर स. ७६० मध्ये एलापुर टेकडीवरील पूर्ववार्ती स्वयंभू शिवलिंगस्थानी एक अद्वितीय शिवमंदिर त्याने कोरले. कैलास मंदिरद्वाराच्या छतावर ' कन्नर ' ( कृष्ण ) अक्षरपंक्तियुक्त शिलालेख आढळतो. त्यावरून कृष्ण ( प्रथम ) ने या मंदिराची प्राणप्रतिष्ठा केल्याचे सिद्ध होते. यानंतरच्या १५० वर्षांच्या राष्ट्रकूट राज्यकालात या मंदिराचे निम्नप्रकारे परिवर्धन करण्यात आले :—

( १ ) दंतिदुर्ग (स. ७३५–७५७)–१. कैलास मंदिरातील शिवलिंगाची प्राणप्रतिष्ठा; २. पर्वतकडयाच्या अंतर्भागातील लिंगासभोवतालच्या खडक फोडून मंदिरआवाराचे संवर्धन; ३. शिवमंदिरासमोरील नंदिमंदिराची रचना.

( २ ) कृष्णराज ( प्रथम, स. ७५७–७७२ )—१. मंदिराच्या पार्श्वभागीचा खडक खोदून गुफामंदिराचे मुख्य पर्वतापासून विभक्तीकरण; २. मामल्लपुरम् येथील रथमंदिरासदृश मुख्य गुफामंदिराची, तसेच कांची येथील कैलासनाथ आणि पत्तद्कल येथील चालुक्य मंदिरासदृश प्रवेशमंडपाची रचना; ३. मंदिरासम्मुख प्रवेशमंडपासाठी जागा नसल्याने पर्वत उभा कोरून, त्याची तळघरात रचना; ४. मुख्य मंदिराप्रत जाण्यासाठी दोन जिने.

(३–५) ध्रुव ( स. ७८०–७९३); **गोविंद** (तृतीय, स. ७९३–८१४ ); **अमोघवर्ष** ( प्रथम, स. ८१४–८८० )–१. मंदिराच्या सभोवतालच्या नदीदेवता आणि मातृका मंदिराचे, तसेच मंदिराच्या आवाराबाहेरील शिवलंकेश्वराच्या आणि अन्य एका अपूर्ण गुफामंदिराचे खोदकाम; २. राष्ट्रकूट राजधानी एलापूरहून मान्यखेटक ( आधु. मालखेड ) गावी स्थलांतरित; तत्रापि राष्ट्रकूट कुलदैवत म्हणुन कैलासमंदिराचे महत्त्व अबाधित.

( ६ ) कृष्ण ( तृतीय, स. ९३९–९६८ )— १. कैलास मंदिराची पुनर्रचना; २. मंदिराच्या तळमजल्याचे आणि जोत्याचे परिवर्धन; ३. वरच्या मंदिराची उंची दुपटीने

वाढवून ते सभोवतालच्या भूपातळीला आणले; ४. कनौज येथील प्रतिहार राजांवरील विजयामुळे प्रतिहार स्थापत्य-शैलीचा परिचय आणि अनुकरण.

(७) अमोघवर्ष (चतुर्थ, स. ९६८–९७२)—१. कैलासमंदिराच्या पुर्नरचनेचे काम पुढे चालू; २. परमार राजांनी राष्ट्रकूट साम्राज्य जिंकून घेण्याआधी मंदिररचनेचे काम पूर्ण.

**स्थापत्यशास्त्रीय वैशिष्ट्य**—दगड-विटांच्या बांधीव मंदिराचा आभास निर्माण्यासाठी हे गुफामंदिर 'आधी कळस मग पाया' पद्धतीने पर्वतमाथ्यावरून अधोभागी खोदले आहे. त्यामुळे अन्य गुफामंदिराप्रमाणे ते खळग्यात रुतल्याप्रमाणे न भासता सपाट जागी बांधलेले वाटते. हे अजस्र गुफामंदिर (व्याप्ती–१॥ लाख घनफूट) खोदण्यासाठी मुख्य मंदिरानजिक १०६′ आणि गोपुरानजिक ५०′ खोल खडक (व्याप्ती–३ लाख घनफूट) येथे खोदला आहे.

**उपविभाग**—परंपरागत हिंदु देवमंदिराकृती अशा या मंदिराच्या दर्शनी भागी गोपुरसदृश प्रवेशद्वार आणि दोन बृहत्काय हत्ती आहेत. प्रवेशद्वाराच्या अंतर्भागातील आयताकृती खोदीव जागेत (२८०′ × १६०′) मुख्य मंदिर (१६४′×१०९′×९६′) खोदले आहे. मध्यवर्ती मंदिराचे विशाल जोते (उंची २०′) सेतूच्या साह्याने प्रवेशद्वाराशी जोडले असून, या चौथऱ्यावर दर्शनी भागी नंदिमंदिर (२६′×२६′) आणि दोन ध्वजस्तंभ (उंची ४९′) आहेत. नंदिमंदिराच्या अंतर्भागात षोडश स्तंभयुक्त चौरसाकृती सभामंडप (५७′ × ५५′) असून, नंदिमंदिराशी तो अन्य एका सेतूने जोडला आहे. मुख्य मंदिराच्या गाभाऱ्याभोवती (१५′ × १५′) प्रदक्षिणापथ आणि पाच उपमंदिरे आहेत.

मंदिराभोवती विस्तीर्ण पटांगण (रुंदी ३०′) असून, त्यापलीकडे विभिन्न देवताशिल्पांसाठी दुमजली ओवऱ्या खोदल्या आहेत. मंदिराच्या जोत्यावर मंदिराचा भार पेलणाऱ्या गज, व्याघ्र, सिंहादिकांच्या अद्वितीय शिल्पमालिका (उंची –५′) आहेत.

**शिल्प**—सेतूच्या अधोभागी कालभैरव, सप्तमातृका आणि महायोगी शिवाच्या प्रतिमा, तसेच उभय बाजूंच्या जिन्यांवर रामायण–महाभारतातील प्रसंग कोरले आहेत. मंदिराच्या सभामंडपाच्या प्रवेशद्वारी भव्य द्वारपालमूर्ती आणि छतावर शिवतांडव शिल्प (व्यास ८′) आहे. गाभाऱ्याच्या प्रवेशद्वारावर गंगा–यमुना नद्यांच्या शिल्पप्रतिमा आहेत. त्यावरून पूर्वकाली हे भवानी देवीचे मंदिर असून, त्यामधील शिवलिंग उत्तरकालीन असावे.

कैलास मंदिराच्या बाह्यांगीच्या नक्षीयुक्त स्तंभांच्या दरम्यान अनेक शिल्पे असून, त्यापैकी सरस्वती आणि मयूरवेष्टित उडत्या गंधर्वांच्या प्रतिमा मोहक आहेत.

मंदिरासभोवतीच्या तीन ओवऱ्यांमध्ये शिवचरित्रातील मुख्य प्रसंग, शिवाची तांत्रिक ध्याने आणि वैष्णव मूर्ती असून, त्यापैकी पूर्व प्राकारातील कांची येथील कैलासनाथ मंदिरशैलीची शिवपार्वती–जीवनावरील चाळीस शिल्पचित्रे आणि त्यातहि शिवपार्वती–विवाहाचा शिल्पपट राष्ट्रकूट शिल्पशैलीचा अद्वितीय नमुना मानला जातो. या शिल्पातील ब्रह्मदेवाकरवी अग्नीच्या साक्षीने विवाहबद्ध होणाऱ्या शिवपार्वतीपैकी लज्जिता, सविनया आणि अधोवदना पार्वतीच्या रूपाने हिंदु नववधूची मूर्तिमंत प्रतिमा शिल्पकाराने साकार केली आहे. रावणकृत कैलासोत्थानाच्या येथील अन्य एका प्रत्ययकारी आणि बोलक्या शिल्पातील रावणाचा वीरश्रीयुक्त आवेश, कैलास पर्वताच्या कंपनाने भयभीत होऊन शिवाला बिलगणारी पार्वती आणि पलायनोत्सुक दासी वैशिष्ट्यपूर्ण आहेत.

मंदिराच्या दक्षिण सोपानानजिकचे नवरात्र नामक सप्तमातृकांचे, उत्तर भिंतीवरील लंकेश्वराचे (१२३′×६०′), तसेच गाभाऱ्याच्या पाठभिंतीवरील त्रिमूर्तीचे शिल्पहि उल्लेखनीय आहे.

**विमान**—मामल्लपुरम् येथील रथमंदिराच्या अनुकरणाने खोदलेल्या मंदिर शिखरावरील (विमान) सिंह आणि हत्तीप्रतिमा प्रेक्षणीय आहेत.

**उपमंदिरे**—मुख्य मंदिराच्या गाभाऱ्याभोवती पाच छोट्या मोकळ्या खोल्या असून पूर्वकाली त्यामध्ये शिवपंचायतनान्तर्गत निम्नलिखित देवताप्रतिमा असाव्यातः— १. दक्षिणेस—सप्तमातृका; २. आग्नेयेस—चंड नामक पापी पुरुष; ३. पूर्वेस—पार्वती; ४. ईशान्येस—भैरव (रुद्र); ५. उत्तरेस—गणेश.

**नदीदेवता मंदिर**—कैलास मंदिराच्या प्रांगणातील उत्तरवर्ती डाव्या कोपऱ्यात गंगा, यमुना (यमी), आणि सरस्वती या नदीदेवतांत्रयाचे राष्ट्रकूट शैलीचे गुफामंदिर (२३½′ × ९′ × ११′) आहे. राष्ट्रकूट शिल्पप्रतिभेने साकारलेल्या या मंदिरातील नदीमूर्ती उन्नत करंडमुकुटधारी, रत्नमेखलावेष्टित, सौंदर्यशालिनी देवतास्वरूपी असून, त्यापैकी डावीकडील गंगा नदी कमलपुष्पारूढ आणि लतावेष्टित असून; मध्यभागीची यमुना नदी मकरारूढ आणि

उजवीकडील सरस्वती नदी कूर्मारूढ, जलोत्पन्न वेलीवेष्टित आणि तोरणालंकृत आहे. भित्तिशिल्पाच्या स्वरूपातील या मूर्ती, तसेच मंदिराबाहेरील द्वारपाल हाडामासाच्या व्यक्ती-सदृश सजीव असून, त्यांचे शिल्प इ. स. ५ व्या शतकातील गुप्तशिल्पांच्या तोडीचे आहे.

नदीदेवता मंदिराच्या प्रवेशद्वाराचे चार षोडशकोनी स्तंभ वैशिष्ट्यपूर्ण असून, त्यांचे पायठे बसक्या आकाराचे आणि शिरोभूषणे गोल तक्क्याप्रमाणे आहेत. स्तंभावरील आडव्या पट्टीवर सात युगुले कोरली आहेत.

प्रवेशद्वार—मुसलमानांनी उद्‌ध्वस्त केलेल्या कैलास मंदिराच्या प्रवेशद्वाराचे स्तंभ उत्तरकालीन गोपुरस्तंभा-सदृश असून या स्तंभावरूनच ते अनुसृत केले असावेत.

ध्वजस्तंभ—नंदिमंडपाच्या उभय अंगांचे त्रिशूल शिरोभूषणयुक्त चौकोनी ध्वजस्तंभ ( उंची ४९′ ) शिल्पदृष्ट्या बौद्ध सिंहस्तंभ आणि जैन चौमुख स्तंभासदृश असून, स्तंभमाथ्यावर धर्मचिह्न कोरण्याची कल्पना तेथे पुनरावृत्त आढळते. या स्तंभाच्या पायथ्यानजिक एक दुर्बोध शिलालेख आढळतो.

**लंकेश्वर मंदिर**—कैलास मंदिराच्या प्रांगणाबाहेरील उत्तरकालीन गुफामंदिरांपैकी लंकेश्वर मंदिर ( इ. स. ११ वे शतक ) उल्लेखनीय आहे. येथील अन्य काही अपूर्ण गुफा इ. स. १२ व्या शतकातील आहेत.

### ( २ ) अन्य हिंदु गुफा

**( १ ) गुफा क्र. १५** ( दशावतार गुफा )— तीन थाळ बौद्ध गुफेनजिकची आणि त्याच शैलीची वेरूळ येथील ही हिंदु शिवमंदिर गुफा राष्ट्रकूट राजा दंतिदुर्ग ( स.७३५–७५७ ) याने कोरली. बौद्ध स्थापत्यानुकरणाने खोदलेल्या या गुफेतील शिल्पे सर्वांशाने हिंदुधर्मीय असून, वेरूळ येथील बौद्ध विहारांवर मात करण्याच्या ईर्ष्येने हे मंदिर खोदले असावे. विष्णूच्या दशावतारांपैकी वराह, नृसिंह, वामन आणि कृष्ण या चार अवतारांची शिल्पे येथे आढळतात.

या गुफेच्या तळमजल्याच्या दर्शनी भागी यज्ञशालायुक्त बाह्यमंडप ( ९५′×३०′ ) असून, त्याच्या उभय अंगास छोट्या खोल्या आहेत. गुफेच्या दुसऱ्या मजल्यात ( ९५′×९७′ ) विभिन्न नक्षीकामयुक्त ४४ चौरसाकृती स्तंभ असून, त्याच्या पाठभिंतीवरील मध्यवर्ती गाभाऱ्यात शिवलिंग, भैरव, मार्कंडेय आदींच्या प्रतिमा आहेत. गुफामंदिराच्या समोर नंदिमंदिर खोदले असून, त्याच्या भिंतीवर राष्ट्रकूट राजांचा एक शिलालेख आहे ( आर्कि. सर्व्हे. वे. इं. ५.८७ ).

**( २ ) गुफा क्र. १४** ( रावण-की-खाई )—विक्रमादित्य ( प्रथम ) च्या राज्यकालातील ( स. ६५४ ) चालुक्य सत्तेच्या पुनरुत्थानानंतर हिंदु देवताप्रधान राष्ट्रकूट स्थापत्य-शैलीत गुप्त आणि चालुक्य शैलीचा प्रभाव दिसू लागला. या तीन शैलींच्या संमिश्रणाने येथील ‘ रावण-की-खाई ’ आणि ‘ दुमार लेणे ’ ( स. ७५०–८५ ) गुफा खोदल्या असून, त्यांची रचना मुंबईनजिकच्या घारापुरी आणि मंडपेश्वर गुफांसदृश आहे.

या आयताकृती गुफेच्या ( ५२′×८७′ ) ⅓ दर्शनी भागात स्तंभयुक्त सभामंडप असून, अंतर्भागात भवानी दुर्गा देवीची प्रतिमा आहे. सभामंडपाच्या डाव्या भिंतीवर शैव, आणि उजव्या भिंतीवर वैष्णव शिल्पचित्रे आहेत. या गुफेमध्ये प्रेतवाहनारूढ सप्तमातृकांची शिल्पमालिका असून, त्यापैकी चामुंडा कौशिकवाहना आहे.

**( ३ ) गुफा क्र. २९** ( दुमार लेणे; सीता-की-नहाणी)—टेकडीच्या कपारीत खोदून तीन बाजूंनी प्रकाशित केलेली ही घारापुरीसदृश गुफा ( १४९′×१४८′×१६′ ) तिच्या अंतर्भागांतील भित्तिचित्रांमुळे, तसेच गर्भागाराच्या दर्शनी भागीच्या भव्य द्वारपालांमुळे ( उंची १६′ ) नेत्रदीपक वाटते. यामधील शिव-पार्वती विवाहाच्या शिल्पामुळे हिला ‘दुमार’ ( = विवाह ) नाव प्राप्त झाले. या नजिकच्या जलप्रपातात भक्तजन आजहि स्नान करतात.

शैव मूर्तिप्रधान अशा या गुफेमध्ये शिव-पार्वतीविवाह, सारीपाट, दक्षयज्ञविध्वंस, रावण कैलासोत्थापन, शिवतांडव, महायोगी शिव आदि शिल्पे असून, येथील वीरभद्र आणि असुरमर्दिनीस्वरूपी शैवमूर्ती भयानक आहेत. भैरवाच्या गळ्यात रुंडमाला, शरीरावर नागमेखला, हातात रत्नासुर-वेधी त्रिशूल व विश्वसंहारी डमरू, आणि पायाशी तृषित कालीला रुधिरपान करविणारा बलिप्राणी असून, कालीच्या हाती कमानदार खंजिर आहे. गुप्तपरंपरेतील ही सारीच शिल्पे भव्य, धीरगंभीर आणि प्रमाणबद्ध आहेत.

या गुफेतील शांत आणि रौद्रस्वरूपी शिव-पार्वती प्रतिमांमध्ये तरल भावुकता आणि कठोर मनोनिग्रहजन्य दैवी निर्विकारपणाचे मनोज्ञ दर्शन घडते. अंतर्यामीचा भावनाकल्लोळ आणि दैनंदिन जगरहाटीसंबंधीची निर्विकारता यांचा मनोहारी संगम तेथे असून, परिसरातील उपदेवता आणि अनुचरांच्या त्रैधातिरपिटीच्या आणि भावनावेगाच्या पार्श्व-

भूमीवर मुख्य देवतांचे हे गांभीर्य आणि स्तब्धता परिणामकारक वाटते.

(४) गुफा क्र. २१ (रामेश्वर) —या गुफेच्या (६९'×२५१'×१५) मध्यवर्ती भिंतीवरील शिव-पार्वती विवाहाचे दृश्य रामविवाहाचे समजून, यास 'रामेश्वर' हे चुकीचे नाव दिले गेले. गुफेच्या (स. ७५०–८५०) डाव्याउजव्या अंगास गंगा-यमुना नद्यांच्या प्रचंड मूर्ती असून, दर्शनी भागीच्या चार स्तंभांवर सुंदर पुष्ट स्त्रियांच्या प्रतिमा आहेत. गुफेच्या बाजूच्या भिंतीवर शिवजीवनातील शिल्पे आहेत.

(५) गुफा क्र. २२—स्थानिक समजुतीनुसार शिवप्रतिमांनी ओतप्रोत भरलेले हे गुफामंदिर मध्ययुगीन शाक्तांचे उपासनाकेंद्र आणि ठगांचे स्फूर्तिस्थान होते.

(६) गुफा क्र. २५ (कुंभारवाडा)—या मंदिरातील सभामंडपाच्या छतावर इसवी सनापूर्वीच्या सूर्यप्रतिमापरंपरेतील रथारूढ सूर्यनारायणाचे आणि त्याच्या संज्ञा व छाया नामक धनुष्यवेधी पत्नींचे शिल्प आहे.

## जैन गुफा

जैन गुफा—परंपरागत जैन स्थापत्यशैलीने खोदलेल्या वेरूळ येथील जैन गुफा येथील अन्य गुफांच्या तुलनेने उत्तरकालीन असून संघप्रार्थनारहित जैन धर्मीयांच्या दुर्मिळ गुफांमध्ये त्यांची गणना होते (अन्य जैनगुफा– उदयगिरि-खंडगिरि, जुनागढ, अंकाई, धाराशिव, नाशिक, पाटण, बदामी). येथील दोन दिगंबरपंथीय दुमजली जैन गुफा रचनादृष्ट्या एकसारख्या आणि अंतर्भागात एकमेकांस जोडलेल्या आहेत. दर्शनी भागी बाह्यमंडप, आत पटांगण आणि सभोवती गुफाशिल्प अशी त्यांची रचना असून, धम्नार येथील बौद्ध गुफांप्रमाणेच उत्तर आणि दक्षिण भारतीय स्थापत्यशैलीचे संमिश्रण त्यामध्ये आढळते.

(१) गुफा क्र. ३२ (इंद्रसभा)—या गुफेच्या द्राविड शैलीचे प्रवेशद्वार, तसेच पटांगणातील छोटे कैलासमंदिर कैलासमंदिराच्या प्रतिकृतीरूप असून, त्यामधील कानडी शिलालेखावरून ते कन्नड शिल्पकारांनी खोदले असावे. या गुफेतील ओवऱ्यांमध्ये इंद्र व इंद्राणी, तसेच पार्श्वनाथ, गोमतेश्वर, महावीर आदींच्या प्रचंड मूर्ती आहेत. त्यापैकी इंद्र हत्त्यारूढ आणि इंद्राणी सिंहारूढ आहे. गुफेच्या पटांगणात उजव्या-डाव्या अंगास विशाल हत्तीप्रतिमा, आणि चौमुख शिरोभूषणयुक्त स्तंभद्वय (उंची ३११⁄२') असून, त्यापैकी उजवीकडील स्तंभ सध्या उद्ध्वस्त झाला आहे. या गुफेच्या माथ्यावर एक शिलालेखयुक्त विशाल मूर्ती (स. १२३५); तसेच अन्य काही जैन प्रतिमा आहेत.

(२) गुफा क्र. ३३ (जगन्नाथसभा)—या गुफेच्या ओवऱ्यात महावीर आणि पार्श्वनाथ यांच्या अनुक्रमे ६०, आणि १० मूर्ती आहेत.

**एलिचपुर** (राज्यविभाग)—यादव शिलालेखमते विदर्भातील 'अचलपुर' राज्यविभागाचे नामांतर (सेवेल, इन्स्क्रि. पृ. १७१; अचलपुर पहा). स. १२९४ मध्ये अल्लाउद्दीन खिलजीने हा देश जिंकला.

**एलूर** (गुफास्थान)—जैन साहित्यमते महाराष्ट्रातील 'एलापुर' (आधु. वेरूळ) गुफास्थानाचे नामांतर (ती. सं. पृ. १२५; एलापुर पहा). अन्य नामांतर–'एल्दुर'.

**एवडी** (राज्यविभाग)—कलचुरि राजा पृथ्वीदेव (द्वितीय) च्या स. ११४४ च्या बिलाइगढ ताम्रपटमते मध्य प्रदेशातील एक राज्यविभाग (मंडल). पंडरतलाइ नामक ग्राम यामध्ये होते. याचे आधु. स्थान समजत नाही (कॉर्पस् इन्स्क्रि. ४.२.१६०).

२. (ग्राम) स्कंदमते धर्मारण्यातील एक ग्राम (स्कन्द. ब्राह्म. ध. ३९.२७८).

**एवेनक** (राज्यविभाग)—राजतरंगिणीमते कश्मीरातील एक राज्यविभाग (विषय, राज. ८.२६९७). वोलूर सरोवराच्या ईशान्य किनाऱ्यावरील खुयहोम (प्राचीन खूयाश्रम) परगण्यानजिक हा असून, आधुनिक काळी त्यामध्येच हा समाविष्ट होतो. तीर्थसंग्रह आणि श्रीवरमते आडग्राम (आधु. आरग्राम) आणि समुद्रकोट (आधु. सुदकौंठ) ग्राम यामध्ये असून, महापद्मनाग सरोवर (आधु. वोलूर) या आणि खुयहोम विषयांच्या सीमेवर होते. शारदा लिपीमध्ये 'क' आणि 'व' एकसारखे दिसत असल्याने 'एकेन' नावानेहि याचा निर्देश आढळतो. नामांतर (तीर्थसंग्रह)–'एवेन'; (लोकप्रकाश)–'एकेन'.

**एळापुर** (गुफास्थान)—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील 'एलपुर' (आधु. वेरूळ) गुफास्थानाचे नामांतर (स्था. पृ. ४१). अन्य नामांतर–'वेळापुर'.

**एळी** (महानुभावस्थान)— स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थ (स्था. पृ. ७३). अहमदनगर जिल्ह्यातील खर्वंडीपासून ४ मैल पश्चिमेकडील, आणि पाथर्डीपासून ९ मैल पूर्वेकडील आधु. एळी गाव हेच होय.

# ऐ

**ऐओइ** ( लोकसमूह )—टॉलेमीच्या मते दक्षिण भारतातील एक लोकसमूह. मॅक्रिंडल यांच्या मते दक्षिण त्रावणकोरमधील अहिपूजक ( नागपूजक ) लोक हेच असावेत. कनिंगहॅमच्या मते दक्षिण भारतातील मलयकूट पर्वतानजिकच्या कलिकौलन गावाच्या परिसरात हे असून, त्यानजिकची खाडी आजहि ' ऐबिक्क ' नावाने सुविख्यात आहे. ' मलयकूट 'चे चिनीभाषीय ' है-अन्-मेन् ' नामांतर ' ऐओइ 'चेच अपभ्रष्ट रूप आहे.

नगरे—टॉलेमीच्या मते या देशात मेलक्यंद (अक्षांश–१४.°–२०′ उत्तर; रेखांश–१२०°–२०′ पूर्व ), कोट्टियर ( अक्षांश–१४° उत्तर; रेखांश–१२१° पूर्व ), बम्मल ( अक्षांश–१४°–१५′ उत्तर; रेखांश–१२०°–२०′ पूर्व ), कोमरिय (अक्षांश–१३°–३०′ उत्तर; रेखांश–१२१°–४५′) आदि नगरे, तसेच एलंगकोर ( अक्षांश–१४° उत्तर; रेखांश–१२०°–४०′ पूर्व ) हे व्यापारी गाव होते.

**ऐकधीरचतुर्वेदि मङ्गलम्** ( ग्राम )—मुनैयदियरैयनच्या शके ८७५ च्या तिरुनमनल्लूर शिलालेखमते दक्षिण भारतातील एक देवालयस्थान. याचे आधु. स्थान समजत नाही ( एपि. इंडि. ७.१३३–१३७ ).

**ऐकयिका** ( ग्राम )—चालुक्य राजा भीम ( प्रथम ) च्या वि. सं. १०८६ च्या शिलालेखमते पश्चिम भारतान्तर्गत कच्छ मंडलातील एक ग्राम. लखपत जिल्ह्यातील आधु. एकलियु गाव हेच होय ( इंडि. अँटि. ६.१९३–१९४ ).

**ऐक्ष्वाक** ( लोकसमूह )—जैन सूत्रकृतांगमते वैशाली येथील वज्जि ( वृजि ) संघराज्यान्तर्गत एक लोकसमूह ( सूत्र. पृ. ३३९ ).

**वांशिक माहिती**—या लोकांच्या मूलस्थानाविषयी अभ्यासकांत निम्नलिखित मतांतरे आढळतातः—

( १ ) **नाभनेदिष्ट वंशज**—हे लोक इक्ष्वाकु राजाचा बंधू नाभानेदिष्टच्या वंशातील सुमति नामक वैशालीनरेशाचे वंशज असावेत. वाल्मीकि रामायणमते वैशालीसंस्थापक राजे इक्ष्वाकुवंशीय असून ( वा. रा. बा. ४७.११–१२ ), महाभारतात इक्ष्वाकु नामक वैशालीनरेशाचा निर्देश आढळतो ( म. आश्व. ४.३ ).

( २ ) **विदेह राजघराण्याचे वंशज**—अन्य अभ्यासकांच्या मते विदेहसंस्थापक इक्ष्वाकुपुत्र निमि राजवंशाची वृजि देशात स्थलांतरित झालेली शाखा म्हणजे हे लोक असावेत.

( ३ ) **इक्ष्वाकु राजघराण्याचे वंशज**—अयोध्या येथील ' इक्ष्वाकु ' राजघराण्याची वृजि देशात स्थलांतरित झालेली शाखा म्हणजे हे लोक असावेत ( जसे– कुरु > कौरव ).

**ऐक्ष्वाकव** ( तीर्थ )—काशी येथील एक तीर्थ (स्कन्द. काशी. ८४.७० ).

**ऐड स्तूप** (बौद्ध स्तूप)—जमालगढी खरोष्ट्री दीपलेखमते वायव्य भारतातील एक बौद्ध स्तूपस्थान ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.११६ ).

**ऐन्द्रखण्ड** ( द्वीप )—भारतवर्षातील ' इंद्रद्वीपा 'चे नामांतर ( भास्कराचार्य, गोलाध्याय. भुवनकोशप्रश्न. ४१. इंद्रद्वीप पहा ).

**ऐन्द्रतीर्थ** ( तीर्थ )—गौतमी ( गोदावरी ) नदीकाठचे एक तीर्थ ( ब्रह्म. १६८.१ ).

२. मथुरेच्या पूर्वेकडील एक तीर्थ ( वराह. १६४.३ ).

**ऐन्द्री** ( देवीस्थान )—प्रयाग येथील दुर्वासाश्रमानजिकचे एक देवीस्थान. तपःरक्षणार्थ आवाहिलेल्या या देवीची भरद्वाज ऋषींनी स्थापना केली. दुर्वासाश्रमापासून ½ मैलांवरील आधु. आनंदीदेवी हीच होय ( ती. पृ. २१९ ).

**ऐमक** ( बृहद्भारतीय बौद्ध गुफास्थान )—गंधार ( आधु. अफगाणिस्तान ) मधील ताश–कुर्घान् रस्त्यावरील गंधार स्थापत्यशैलीचे एक बौद्ध गुफास्थान. फायलाईट जातीच्या ठिसूळ दगडामध्ये खोदलेले येथील बहुतांशी गुफाशिल्प आज नष्ट झाले आहे ( गोएट्झ, पृ. ७१ ).

**ऐयनार** ( क्षेत्र )—तामीळनाडमधील मायावरम् येथील देवीमंदिरानजिकचे एक तीर्थ ( ती. पृ. ३६०; मायावरम् पहा ).

**ऐयावलि** ( नगर आणि हिंदु देवमंदिरस्थान )—चोल राजा कुलोत्तुंग ( तृतीय ) च्या इ. स. १२ व्या शतकातील हेमवती स्तंभलेखमते कर्नाटकातील चालुक्य साम्राज्याच्या राजधानीचे नगर आणि हिंदु आणि जैन मंदिरस्थान. या गावच्या ' नाना देशी ' नामक व्यापारी संघटनेने पेरुंजेरु येथील मंगेश्वर मंदिरास देणगी दिली होती ( एपि. इंडि. ३१.२७४ ). विजापुर जिल्ह्यातील मलप्रभा ( प्राचीन मल्प्रहारिणी ) नदीकाठच्या बदामी ( प्राचीन वातापि ) या उत्तरकालीन चालुक्य राजधानीपासून १५ मैल, आणि पत्तदकल या मंदिरस्थानापासून ७ मैल ईशान्येकडील आधु. ऐहोळे गाव हेच होय ( इंडि. अँटि. ८.२४३ ).

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**—चालुक्य राजवंशाच्या सत्याश्रय पुलकेशिन् (प्रथम, स. ५३५–५६६) नामक आद्य संस्थापक राजाची प्रारंभिक राजधानी या गावी, आणि उत्तरकालीन राजधानी वातापि (आधु. बदामी) येथे होती. त्यामुळेच चालुक्य स्थापत्यशैलीचा आद्य आविष्कार, तसेच तिच्या उत्क्रांतीचे सारे टप्पे येथील मंदिरावशेषांमध्ये दिसतात. फर्ग्युसन यांच्या मते वातापि, पत्तदकल आणि ऐहोळे ही १५ मैलांच्या परिसरातील चालुक्यनगरे स्थापत्यदृष्ट्या वातापि नगराच्या उपशाखाभूत असून, ऐहोळे येथील हिंदु आणि जैन मंदिरे, बदामी येथील गुफा, आणि पत्तदकल येथील ही हिंदु देवमंदिरे स्थापत्यदृष्ट्या एकात्म आहेत.

**वैशिष्ट्य**—गुप्त प्रांतिक राजप्रतिनिधींच्या सहवासाने आणि गुप्त मंदिरस्थापत्याच्या (स. ४५०–६५०) अनुकरणाने उत्क्रांत झालेल्या चालुक्य शैलीच्या हिंदु आणि जैन मंदिरात त्या राजांची धर्मश्रद्धा आणि सर्वंकष जोमदारपणा यांचे संमिश्रण दिसते. दक्षिण भारतीय मंदिरस्थापत्याची पायाभूत अशी ऐहोळे येथील प्रारंभीची शिवमंदिरे गुप्त शैलीच्या बौद्ध विहारांसदृश असून, चेझर्ल आणि तेर येथील बौद्ध चैत्यमंदिरांप्रमाणेच ती पूर्वकालीन बौद्ध चैत्यमंदिरे आणि दाक्षिणात्य द्राविड मंदिरे यांमधील दुवा मानली जातात.

**मंदिरावशेष**—'मंदिरग्राम' अशा सार्थ उपाधीने सुविख्यात असणाऱ्या आधु. ऐहोळे या तटबंदीवेष्टित गावातील ७० मंदिरावशेषांपैकी ३० मंदिरे तटबंदीच्या आत आणि ४० तटबंदीबाहेर असून, पूर्वकालीन (इ. स. ६ वे शतक) चालुक्य शैलीची बहुतांशी सारी प्रातिनिधिक मंदिरे येथे आढळतात. उत्तर भारतीय अथवा द्राविड स्थापत्यशैलीचे अंधानुकरण त्यामध्ये असून (उदा. त्याचा शंकाकृती कळस) फर्ग्युसन यांच्या मते अपरिचित प्रदेशात नव्याने स्थायिक झालेल्या चालुक्य राजांनी स्थानिक स्थापत्याचा तात्पुरता स्वीकार करून ही मंदिरे बांधली. या प्रदेशातील त्यांचे राज्य सुस्थापित झाल्यानंतर वातापि येथे त्यांनी स्वतःची स्थापत्यशैली प्रस्थापित केली. इ. स. ७ व्या शतकात येथील मंदिरग्राम १५ मैलांवरील पत्तदकल गावी स्थलांतरित करण्यात आले.

**स्थापत्यशैली**— येथील बहुतांशी साऱ्या मंदिरांची छते गुप्त शैलीची म्हणजे उतरती आणि सपाट असली, तरी उत्तरकालीन दाक्षिणात्य मंदिरस्थापत्याचा स्थायीभाव असा चालुक्य शैलीचा उपासनोपयोगी स्तंभयुक्त सभामंडप सर्वप्रथम येथेच दिसतो. या सभामंडपाचे विस्तारभवन म्हणून मंदिराचे गर्भागार बांधले असून, त्याची काहीहि खूण मंदिराच्या बहिर्भागात दिसत नाही. उत्तरकालात या गर्भागाराच्या शिरोभागी छोटे शिखर बांधण्याची, तसेच गर्भागाराची स्वतंत्र वास्तू (विमान) बांधण्याची पद्धती सुरू झाली.

**शिल्पशैली**— येथील सारे मंदिरशिल्प गुप्त शिल्पानुसारी असून, त्या शैलीच्या नवथर अनुकरणापासून (मंदिर क्र. ७; ११) तिच्या प्रभुत्वसंपादनापर्यंतच्या (मंदिर क्र. ९; ५३) साऱ्या अवस्था येथे आढळतात.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतातः—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. तामीळ साहित्य (एपि. इंडि. २३.७). | अय्यपोलिल |
| २. स. ६३४ चा ऐहोळे शिलालेख (इंडि. अँटि. ८. २४३). | ऐय्यावोले |

**नामस्थित्यंतरे**—काणे यांच्या मते या नगराचे मूळ नाव 'अय्यावोले' असून अय्यावोले>ऐवलि>ऐहोळे अशा क्रमाने आधु. 'ऐहोळे' नगरनाम सिद्ध झाले असावे (काणे, धर्मशास्त्र. ४.७७८).

**ऐहोळे शिलालेख**—या गावी सापडलेल्या चालुक्य राजा सत्याश्रय पुलकेशिन्च्या स. ६३४ च्या सुविख्यात शिलालेखात तो ९९००० ग्रामयुक्त 'महाराष्ट्रत्रया'चा (विदर्भ, कुंतल, महाराष्ट्र) सम्राट असल्याचा निर्देश आढळतो (इंडि. अँटि. ८.२४१; महाराष्ट्र पहा).

**मंदिरे**—ऐहोळे येथील विशेष उल्लेखनीय मंदिरे पुढीलप्रमाणे होतः—

**(१) लाडखान मंदिर**—प्राचीन भारतीय ग्रामातील 'संथागार' (ग्रामसभागृह) च्या अनुकरणाने बांधलेले ऐहोळे येथील हे प्राचीनतम मंदिर (इ. स. ५ वे शतक) चौरसाकृती (५०×५०) असून त्याच्या तीन बाजू बंदिस्त आणि पूर्वेकडील चौथ्या बाजूस उघडा प्रवेशमंडप आहे. मंदिराच्या अंतर्भागात एकाच्या आत एक चौरसाकृती स्तंभमालिकाद्वय असून, मंदिराच्या मध्यभागी नंदिप्रतिमा आहे.

येथे स्वतंत्र गर्भागार नसून मंदिराच्या पाठीमागच्या भिंतीनजिकच देवतामूर्तीची प्रतिष्ठापना केली असावी. मंदिराचे सपाट छत माठीव दगडाचे आहे. लाडखान नामक मुसलमान शेतकऱ्याच्या नावाने ओळखले जाणारे हे मूळचे विष्णुमंदिर उत्तरकालात शिवमंदिरात रूपांतरित झाल्याचे त्याच्या मध्यवर्ती नंदिमूर्तीवरून दिसते.

पर्सी ब्राऊन यांच्या मते ग्रामसभागृहाच्या अनुकरणाने बांधलेल्या या मंदिरात उघड्या सभामंडपाचे बंदिस्त देवालयात रूपांतर केले असून, ग्रामप्रमुखाच्या उच्चासनी नंदिमूर्ती स्थापिली आहे. या मंदिराच्या आडव्या दगडी तुळयांच्या सपाट छताचे अनुकरण म्हैसूर राज्यातील उत्तरकालीन चालुक्य–होयसाळ मंदिरात (इ. स. १३ वे शतक) आढळते. उत्तरकालात या छतावर गुप्त शैलीचे उपमंदिर बांधले आहे.

या मंदिराच्या प्रवेशस्तंभावर सातवाहन शिल्पशैलीची आणि गुप्त आकृतिबंधाची नदीदेवतांची आणि यक्ष-गंधर्व मिथुनांची शिल्पचित्रे आढळतात.

(२) **कोंतकुडि मंदिर**—लाडखान मंदिरासदृश असे हे मंदिर आकाराने त्यापेक्षा लहान असून त्याचे जोते आणि भिंती नक्षीकामविरहित आहेत. त्याच्या स्तंभांवर कमलपत्रांचे, मौक्तिकमालांचे आणि वेलबुट्टयांचे ओबडधोबड नक्षीकाम असून, त्याच्या रचनेत नवजात स्थापत्य आणि शिल्पकलेचा जोमदारपणा आढळतो.

(३) **दुर्गा मंदिर**—गुप्त शैलीच्या बौद्ध चैत्यमंदिराच्या अनुकरणाने बांधलेले ऐहोळे किल्ल्यातील हे मंदिर (८४'×३६'×३०') लाडखान मंदिराच्या समकालीन (स. ५००), परंतु रचनादृष्टया सर्वस्वी विभिन्न आहे. उंच जोत्यावरील या मंदिरात बौद्ध चैत्यमंदिराच्या अंतर्भागातील स्तंभ बंदिस्त गर्भागारात, आणि बाहेरची भिंत मंदिराच्या चहुबाजूंच्या उघड्या सभामंडपामध्ये रूपांतरित केली आहे. या बौद्ध चैत्याकृती मंदिराचा पायऱ्यापायऱ्यांनी युक्त, निमुळता आणि सरळसोट कळस मात्र सर्वस्वी हिंदु धर्तीचा आहे.

या मंदिराचे बांधकाम सुमारे १०० वर्षे चालू असल्याने गुप्त शैलीच्या नवथर अनुकरणापासून प्रभुत्वप्राप्त अवस्थेपर्यंतचे चालुक्य शिल्पकलेचे नानाविध नमुने त्यामध्ये आढळतात.

(४) **हुच्चिमल्लीगुदि विष्णुमंदिर**—ऐहोळे गावातील शैव गुफामंदिराच्या वायव्येकडील या छोटया आणि साध्यासुध्या मंदिरात दुर्गा मंदिराप्रमाणेचे गुप्तकालीन बौद्ध चैत्यमंदिराचे अनुकरण आढळते. गर्भागार आणि सभामंडपाच्या दरम्यानचा उपासनामंडप (अंतराळ) येथे प्रथमच बांधला असून, त्याच्या प्रवेशद्वारानजिक अनलंकृत स्तंभचतुष्टययुक्त प्रवेशमंडप आणि अंतर्भागात माठीव दगडाचा दोन पाखी आयताकृती सभामंडप आहे. मंदिराच्या दर्शनी भागी पुष्पकरंडकाचे साधेसुधे नक्षीकाम आहे. येथील विष्णुप्रतिमा चालुक्य राजांचे कुलदैवत असून, प्रवेशमंडपाच्या दर्शनी भागी कार्तिकेय, आणि गर्भागारात गरुड या वैष्णव प्रतिमा आजहि आढळतात. या मंदिराचे प्रदक्षिणापथयुक्त गर्भागार सांची येथील चैत्यमंदिरासदृश असून, त्याचे शिखर ओरिसामधील परशुरामेश्वर मंदिराच्या अनुकरणाने बांधले आहे. त्याच्या पूर्वाभिमुख दर्शनी भागातील बौद्ध चैत्यमंदिरसदृश कमानीवर तांडवनृत्यमग्न शिवाचे शिल्प आहे.

या मंदिरात चालुक्य राजा विक्रमादित्य (स. ६५५–६७०), तसेच विजयादित्य (स. ७१८) यांचे देणगीलेख आढळतात (इंडि. अँटि. ८.२८४). फर्ग्युसन यांच्या मते पत्तदकल येथील पापनाथ मंदिराच्या पूर्वकाली विक्रमादित्य राजाने हे मंदिर बांधले असावे (फर्ग्युसन, २.११९–१२०). त्याच्या जोत्यावरील 'पवित्र जैनमंदिर' या कानडी शिलालेखावरून उत्तरकालात याचे जैन मंदिरात रूपांतर झाले असावे.

(५) **मेगुति जैन मंदिर**—गुप्त आणि द्राविड स्थापत्यशैलीच्या सीमारेषेवरील हे महत्त्वपूर्ण जिनेंद्र मंदिर ऐहोळे गावच्या मध्यवर्ती टेकडीवरील मनोऱ्यात असून, त्यामधील शिलालेखमते चालुक्य राजा पुलकेशिन् (द्वितीय)-च्या रविकीर्ति नामक राजकवीने स. ६३४ मध्ये ते बांधले (इंडि. अँटि. ८.२३७).

या मंदिराची रचना ग्रामीण संथागारानुसृत दुर्गामंदिरासदृश असली, तरी त्याचे स्थापत्य आणि शिल्प त्या मंदिराहून अधिक सफाईदार आहे. त्याच्या उत्तराभिमुख दर्शनी भागी षोडश स्तंभयुक्त सभामंडप आणि अंतर्भागात गर्भागार आहे. गर्भागाराभोवती प्रदक्षिणापथाऐवजी बौद्ध विहारसदृश आठ छोटया खोल्या (८'×८') आहेत. यावरून गुफाशिल्पाच्या अनुकरणाने हे मंदिर बांधले असावे. अशीच अन्य दोन शैव आणि जैन गुफामंदिरे या मंदिरानजिक आहेत.

(६) **शैव गुफामंदिर**—मेगुति जैन मंदिरानजिकचे हे गुफामंदिर चालुक्य राजा पुलकेशिन् (द्वितीय) च्या उत्तरवर्ती (स. ६४२) पल्लव राजांनी खोदले. त्याचे

शिल्प आणि चित्रकला पल्लव राजा मामल्लच्या परंपरेतील असून, त्यामधील नटराज शिवाचे शिल्प पल्लव शिल्पकलेचा अत्युत्कृष्ट नमुना आहे.

(७) **जैन गुफामंदिर**—हिंदु गुफामंदिरानजिकचे हे मंदिर बदामी येथील जैन गुफेहून विशाल असून, त्याच्या दर्शनीभागी प्रवेशमंडप (३२′ × ७¾′), तसेच अंतर्भागात सभामंडप (१७′ × १५′), आणि महावीरप्रतिमायुक्त गर्भागार (८¾′ × ८¾′) आहे. सभामंडपाच्या दोन्ही बाजूंस उपमंदिरे आणि गर्भागाराच्या दर्शनी भागी दोन नक्षीकामयुक्त स्तंभ आहेत. प्रवेशद्वाराच्या उभय अंगांस द्वारपालांच्या प्रतिमा (इ. स. ७ वे शतक) आहेत.

(८) **गलगनाथ मंदिर**—ऐहोळे गावाच्या बहिर्भागातील या हिंदु देवमंदिरासम्मुख दोन चौरसाकृती कीर्तिस्तंभ (इ. स. ९वे शतक) आहेत.

**ऐरण्डी** (नदी)—मत्स्यमते उत्तर भारतातील एरंडी' नदीचे नामांतर (मत्स्य. १९१.४२; एरंडी पहा).

**ऐराक** (देश)—शक्तिसंगमतंत्रमते वायव्य भारतातील एक देश. पश्चिम आशियान्तर्गत इराणच्या उत्तरेकडील आधु. इराक देश हाच होय (शक्तिसङ्गम. ३.७.३६).

**ऐरावट्ट** (ग्राम)—देवानंददेव राजाच्या बारिपाडा ताम्रपटमते पूर्व भारतातील एक ग्राम. कटक जिल्ह्यातील बाकी पोलीस विभागातील आधु. रटागड गाव हेच होय (एपि. इंडि. २७.३२८). या गावासभोवतालच्या 'ऐरावट्ट मंडल' नामक राज्यविभाग पटोदा विषयात समाविष्ट होता (एपि. इंडि. २६.७८).

**ऐरावत वर्ष** (वर्ष)—महाभारतमते जंबूद्वीपान्तर्गत नववर्षांपैकी सप्तम वर्ष (देशविभाग; म. भी. ६.३७; ७.३५). महाभारत नीलकंठी टीकेत हे 'उत्तर कुरु' देशाचे नामांतर मानले असले (म. भी. ६.३७ नील.), तरी त्या ग्रंथात, तसेच पौराणिक साहित्यात यास उत्तर कुरु देशाहून स्वतंत्र मानले आहे. पद्ममते उत्तर कुरु, रमणक आणि ऐरावत ही तीन वर्षे मेरु पर्वताच्या उत्तरेस असून (पद्म. आदि. ४.५), महाभारतात या तीन 'मेरु–उत्तर' वर्षांची नावे श्वेत, हैरण्यक आणि ऐरावत दिली आहेत (म. भी. ६.३७).

**भौगोलिक स्थान**— महाभारत आणि पद्ममते हे इलावृत वर्षाच्या उत्तरतम टोकास शृंगवत् पर्वताच्या उत्तरेस समुद्रकिनारी होते (म. भी. ९.१०–२१; पद्म. आदि. ५.१०–११).

**प्राकृतिक वर्णन**—महाभारतमते या सूर्यरहित देशात नक्षत्रावृत चंद्र ज्योतिर्भूत 'आवृतासदृश' दिसत असे. वार्धक्य आणि आहार यांपासून अलिप्त अशा या देशातील मानवांचे आयुष्मान तेरा हजार वर्षे असे (म. भी. ९.११–१४).

२. (पर्वत) भारतवर्षातील एक पर्वत (वराह. ८५.३).

**ऐरावत धन्व** (देश)—काशिकामते उदीच्य भारतातील एक देश (काशिका. ४.२.१२१). महाभारतमते हिमालयाच्या उत्तरेकडील ऐरावत वर्षाच्या परिसरात हा असून (म. भी. ६.७), अग्रवाल यांच्या मते मध्य आशियातील वालुकामय प्रदेशाचा निर्देश येथे अभिप्रेत असावा. 'धन्व' चा शब्दशः अर्थ 'वालुकामय प्रदेश' असाच होतो.

**ऐरावती** (नदी)— मत्स्यमते पंजाबातील हिमालयोद्भवा 'इरावती' (आधु. रावी) नदीचे नामांतर (मत्स्य. ११४.२१; ११६.१; इरावती पहा). अन्य नामांतर– 'हैमवती' (मत्स्य. ११६.६).

२. बौद्ध साहित्यमते उत्तर प्रदेशातील 'अचिरवती' (आधु. राप्ती) नदीचे नामांतर (धम्मपद टीका. ४.४१; अचिरवती पहा). शब्दशः अर्थ– 'ऐरावतमुखोत्पन्न.'

**ऐरावतेश्वर** (कुंड व लिंग)—काशी येथील एक शिवलिंग आणि जलकुंड (स्कन्द. काशी. ९७.१३४).

**ऐरकिण** (नगर)—गुप्त मुद्रालेखमते मध्यप्रदेशान्तर्गत गुप्त साम्राज्यातील एक नगर. महाक्षत्रप श्रीधरवर्मनच्या एरण स्तंभलेखमते हे नगर आहारातील बाहीरिका विभागात होते (कॉर्पस् इन्स्क्रि. ४.२. ६०९). मध्यप्रदेशातील सागर जिल्ह्यातील खुराई गावापासून ११ मैल वायव्येकडील बीना नदीकाठचे आधु. एरण (एहरिन, एरन, ऐरन अथवा एरुन, अक्षांश–२४°.५′ उत्तर; रेखांश–७८′.१५′ पूर्व) गाव हेच होय (कॉर्पस् इन्स्क्रि. ३.२.११).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात (परिपत्रक पहा).

**समुद्रगुप्ताच्या शिलालेखात**–या गावच्या वराह मंदिराच्या पश्चिमेकडील समुद्रगुप्ताच्या स. ४५० च्या एरण शिलालेखमते युद्धविजयानंतर त्याने येथे एक मंदिर बांधले होते. कनिंगहॅम यांच्या मते वराह मंदिराच्या उत्तरेकडील आधु. विष्णुमंदिर हेच होय (आर्कि. सर्व्हे. १०.८९). समुद्रगुप्ताच्या शिलालेखाचा हा दगड सध्या कलकत्त्याच्या नॅशनल म्युझियममध्ये ठेवला आहे.

## ऐरिकिण नगराची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. कनिंगहॅम नाणी | एरिकिन |
| २. सांची स्तूप शिलालेख (एपि. इंडि. २.३७५) | एरकिन |
| ३. श्रीधरवर्मनाचा एरण स्तंभलेख (कॉर्पस. इन्स्क्रि २.६०९) | एरिकिण |

अन्य शिलालेख–या गावी निम्नलिखित अन्य गुप्त स्थापत्यावशेष आणि शिलालेखहि सापडले आहेत :—

( १ ) **बुद्धगुप्तकालीन मातृविष्णु राजाचा स. ४८४ चा स्तंभलेख**–एरणपासून १ मैल पश्चिमेकडील विष्णुमंदिरानजिकच्या या स्तंभलेखमते बुद्धगुप्ताच्या सुरश्मिचंद्र नामक मांडलिक राजाच्या राज्यकाली मातृविष्णु आणि धन्यविष्णु नामक दोन बंधूंनी स. ४८४ च्या आषाढ शुद्ध द्वादशीस जनार्दनाचा ( विष्णु ) हा ध्वजस्तंभ उभारला ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.८८ ).

( २ ) **गोपराजाचा स. ५१० चा स्मृतिस्तंभलेख**–एरणपासून १ मैल आग्नेयेकडील एरण–पेहलेजपुर रस्त्यावरील बीना नदीकाठच्या या स्तंभलेखमते गुप्त सम्राट भानुगुप्ताच्या गोपराज नामक सहवर्ती सरदारास येथे युद्धगती प्राप्त झाली. या स्तंभाच्या ( उंची–५$\frac{3}{4}$′, व्यास–१$\frac{1}{2}$′ ) तळाशी गोपराज आणि त्याच्या परिवाराचे शिल्पचित्र असून, सध्या त्याची शिवलिंग म्हणून पूजा करतात ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.९१ ). कलचुरि आणि महाक्षत्रप श्रीधरवर्मन्कालीन नारायणस्वामिन् नामक भक्ताचा एक उत्तरकालीन स्तंभलेखहि या स्तंभावर आढळतो ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.६०९ ).

( ३ ) **तोरमाण राज्यकालीन धन्यविष्णु राजाचा वराह मूर्तिलेख**—एरणपासून $\frac{1}{2}$ मैल पश्चिमेकडील वराह मंदिरातील वराहावतारी विष्णूच्या ( उंची–११′ ) वक्षःस्थलावरील या मूर्तिलेखमते शक क्षत्रप तोरमाणकालीन धन्यविष्णु नामक राजाने फाल्गुन दशमीला प्रस्तुत वराहावतारी विष्णुप्रतिमा स्थापिली ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.१५९ ).

**उत्खनन**—सागर विद्यापीठाच्या प्रा. के. डी. वाजपेयी यांनी केलेल्या या गावच्या उत्खननात ( स. १९६० ) येथे निम्नलिखित स्तर सापडले:—

( १ ) **स्तर क्र. १** ( इ. स. पू. १५०० )—या स्तरात मध्यप्रदेशातील प्रातिनिधिक अश्मयुगीन ( कॅलिकोलिथिक ) संस्कृतीचे अवशेष, तसेच पांढरा रंग लावलेली कृष्ण आणि रक्तवर्णीय मृत्तिकापात्रे सापडली. तीन बाजूंनी नदीने संरक्षिलेल्या या गावाच्या चौथ्या अंगास संरक्षक मृत्तिकामय तटबंदीहि या काळी बांधण्यात आली होती.

( २ ) **स्तर क्र. २** ( इ. स. पू. ७००–५०० )—सुमारे ७०० वर्षे ओसाड पडल्यानंतर लोहयुगकाली हे गाव पुन्हा वसविण्यात आले. या लोहयुगीन स्तरात पूर्वकालीन खडबडीत रक्तमृत्तिकापात्रांप्रमाणेच नव्या धर्तीची कृष्णवर्णीय एन्. बी. पी. मृत्तिकापात्रे, वन्य जमातींची छिद्रयुक्त नाणी, प्राणिमनुष्यादिकांची टेराकोट्टा मृत्तिकाशिल्पे, शिंपले आणि रत्नजडित कंकणादि अलंकार, तसेच कौलाचे काही तुकडे सापडले. त्यावरून या काळी येथे कौलारू घरे प्रचलित असावीत. मौर्य सम्राट इंद्रगुप्ताचा ‘ राणो इंद्रगुतस ’ असा ब्राह्मी अक्षरपंक्तियुक्त एक शिक्याचा ठसाहि येथे सापडला.

( ३ ) **स्तर क्र. ३** ( स. ६०० )—या स्तरात रोमन धर्तीची चकचकीत रक्तमृत्तिकापात्रे, नाग, इंडोससानियन आणि गुप्त सम्राट रामगुप्ताची नाणी, तसेच पश्चिम क्षत्रपांची एक अर्धभग्न मुद्रा सापडली.

( ४ ) **स्तर क्र. ४** ( स. १६००–१८०० )—या स्तरात मध्ययुगीन भोपाळ आणि ग्वाल्हेर नरेशांची नाणी, तसेच नगरासभोवतालच्या दगडी तटाचे अवशेष सापडले ( देशपांडे, रिव्ह्यू. पृ. ४४२–४४३ ).

**ऐरियन वेजो** ( देश )—ग्रीक साहित्यमते मध्य आशियातील ‘ आर्यवेजम ’ देशाचे नामांतर ( आर्यवेजम पहा ).

**ऐरुद विषय** ( राज्यविभाग )—चालुक्य राजा विक्रमादित्य ( प्रथम ) च्या इ. स. १५ व्या शतकातील तुरिमेल्ल शिलालेखमते मद्रास राज्यातील नेलोर आणि कुडाप्पा जिल्ह्यांच्या सरहद्दीवरील तेलगु चोड राजांच्या आधिपत्याखालील एक राज्यविभाग ( एपि. इंडि. २९.१६१–१६४ ).

**ऐन्हदोइ** ( लोकसमूह )—टॉलेमीच्या मते पूर्व भारतातील ऐन्हदोन ( आधु. ब्रह्मपुत्रा ) नदीकाठच्या ‘ किन्हदिय ’ ( किरात ) लोकसमूहाचे नामांतर ( किरात पहा ).

**ऐन्हदोन** ( नदी )—टॉलेमीच्या मते पूर्व भारतातील

' ब्रह्मपुत्रा ' ( संस्कृत–ह्रदान ) नदीचे नामांतर ( ब्रह्मपुत्रा पहा ).

**ऐल** ( तीर्थ )—गौतमी ( गोदावरी ) नदीकाठचे एक तीर्थ ( ब्रह्म. १५१.२४ ).

**ऐलपत्र** ( दिक्पालनाग )— कश्मीरातील एक नागक्षेत्र (नीलमत. ११९८). आधु. ऐलरतुर गाव हेच होय.

**ऐलापुर** ( नगर )—शुल्कि राजवंशाच्या स. ९७२ च्या मसेर शिलालेखमते महाराष्ट्रातील ' एलापुर ' ( आधु. वेरूळ ) गुफास्थानांचे नामांतर ( एपि. इंडि. २९.२६; एलापुर पहा ).

**ऐलिक** ( देश )—मार्कंडेयमते कूर्मचक्रात्मक भारत-वर्षाच्या आग्नेय भागातील एक देश ( मार्कं. ५५.१७ ).

**ऐवडि मण्डल** ( राज्यविभाग )—कलचुरि राजा पृथ्वीदेवाच्या स. १११४ च्या विलाइगढ ताम्रपटमते मध्य-प्रदेशातील एक राज्यविभाग. यामध्ये पंडरतलाइ नामक ग्राम समाविष्ट होतें. रायपुर जिल्ह्यातील महसमुंद तह-सिलीतील पांद्रितरै गावाच्या परिसरातील प्रदेश हाच असावा ( एपि. इंडि. २९.१९५–१९६ ).

**ऐशान्य** ( देशविभाग )— बृहत्संहितामते भारत वर्षाच्या नऊ उपविभागांपैकी एक (बृ. सं. १४.२). 'उत्तर-पूर्व ' ( ईशान्य भारत ) अशा सुस्पष्ट दिशावाचक उपाधीने याचे वर्णन तेथे आढळत असले, तरी उत्तर भारतातील पर्वतीय देश आणि लोकांचाच अंतर्भाव तेथे आढळतो. भारताचे नवभेदात्मक विभाजन करीत असता, उत्तर आणि ईशान्य भारतातील हिमालयीन लोकांची विभागशः माहिती वराहमिहिरास नसल्याने त्याचे हातून हा घोटाळा झाला असावा. उत्तरकालीन पौराणिक साहित्या-तहि हीच चूक पुनरावृत्त झाली असून, ' पर्वताश्रयिन् ' ' पर्वतनिवासी ' मोघम नावांनी या देशविभागाचा निर्देश तेथे आढळतो.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशविभागाची निम्न-लिखित नामांतरे आढळतातः—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पराशरतंत्र | प्रागुत्तर |
| २. मार्कंडेय पुराण ( कूर्मविभाग ) | कूर्म पूर्वोत्तरपाद, ऐशान |
| ३. अन्य पौराणिक साहित्य | पर्वताश्रयिन् |

**देशसंख्या**—बृहत्संहिता आणि पौराणिक साहित्यात ऐशान्य देशविभागाची देशसंख्या निम्नप्रकारे दिली आहे:— १. बृहत्संहिता ( ३५ ); २. पराशरतंत्र ( २७ ); ३. मार्कंडेय पुराण कूर्मविभाग ( ३३ ); ४. वायु पुराण ( १२ ); ५. मत्स्य पुराण ( १२ ); ६. मार्कंडेय पुराण ( १३ ); ७. ब्रह्म पुराण ( १३ ); ८. वामन पुराण ( १३ );

## वायु पुराण ग्रंथपरंपरेतील ऐशान्य देश

| ब्रह्माण्ड ( ४१.६९ ) वायु ( ४५ १३५ ) | मत्स्य ( ११४.५५ ) | मार्कंडेय ( ५७.५६ ) | ब्रह्म ( २७.६२ ) | वामन ( १३.५७ ) | गरुड ( १.५५.१ ) |
|---|---|---|---|---|---|
| १. निहार | निराहार | — | — | — | निल |
| २. हंसमार्ग | सर्वग | — | तुशमार्ग | — | — |
| ३. कुपथ ( क्षुपण ) | — | कुरु | कुरव | कुरु | कोलभ |
| ४. कर्णप्रावरण ( कुश-प्रावरण | कुथप्रावरण | कर्ण ( कंटाप्रावरण ) | — | — | — |
| ५. हूण | ऊर्ण | ऊर्ण | ऊर्ण | ऊर्ण | — |
| ६. चाहुदक ( साहुदक ) | समुद्गक | सक्रितक | कुंतक | सुहूहूक | — |
| ७. त्रिगर्त | — | — | चित्रमार्ग | — | — |
| ८. मालव ( मालय ) | मंडल | गालव | — | शशिखाद्रिक | — |
| ९. — | — | तामस | तोमर | — | — |

## बृहत्संहिता ग्रंथपरंपरेतील ऐशान्य देश

| बृहत्संहिता ( १४.२९–३१ ) | मार्कंडेय पुराण ( कूर्मविभाग ) ( ५५.४८–५२ ) | बृहत्संहिता ( १४ २९–३१ ) | मार्कंडेय पुराण ( कूर्म विभाग ) ( ५५.४८-५२ ) |
|---|---|---|---|
| १. मेरुक ( मल्ल ) | — | १९. भल्ल | पह्लव |
| २. नष्टराज्य | — | २०. लोल ( पटोल ) | लोल्न |
| ३. पशुपाल ( पशुपाल ) | पशुपाल | २१. जटासुर ( जटासूर ) | कुरुट |
| ४. कीर | किष्णर | २२. कुनह | कौशिक |
| ५. काश्मीर | काश्मीरक | २३. खश | खश |
| ६. अभिसार ( अभिमुर ) | अभिसारजन | २४. घोष | घोष |
| ७. दरद | दरद | २५. कुचिक ( कुचिन्तन ) | कीचक |
| ८. तंगन | त्वंगन | २६. एकचरण | एकपाद |
| ९. कुलूत | कुलट | २७. अनुविश्व | अन्नदारक |
| १०. सैरिंध | सैरिष्ट्र | २८. सुवर्णभू ( सुवर्णभूमि ) | स्वर्गभूमि |
| ११. वनराष्ट्र | — | २९. वसुवन ( देवोद्यान ) | नवग्रक |
| १२. ब्रह्मपुर | ब्रह्मपुरक | ३०. दिविष्ठ ( देवस्थल ) | — |
| १३. दार्व ( दर्व ) | दार्व ( दार्वाद ) | ३१. पौरव ( पारत ) | पौरव |
| १४. डामर ( दिवादिन ) | दमरक | ३२. चीरनिवासन ( चामार ) | चीरप्रावरण |
| १५. वनराज्य ( वैमकैण ) | वनवाह्यक (वनराष्ट्रक) | ३३. त्रिनेत्र | त्रिनेत्र |
| १६. किरात | किरात | ३४. मुंजाद्रि ( सार्यक पर्वत ) | हिंग |
| १७. चीन | येन | ३५. गंधर्व | गंधर्व |
| १८. कौणिन्द ( कुनिण्ड ) | आनन्द | ३६. ( सिंहपुर ) | — |

उपरोक्त परिपत्रकातील बृहत्संहिता नामावलीच्या कंसातील पाठभेद पराशरतंत्रातील आहेत. मार्कंडेय पुराण कूर्मविभागात निम्नलिखित नव्या ऐशान्य देशांचा निर्देश आढळतोः—१. यवन; २. अनवद्यक; ३. अन्न; ४. किन्नरराज्य; ५. कुरट; ६. कौशिकानंद; ७. तनवाह्यक; ८. दारक; ९. मरक; १०. सैरिष्ट; ११. स्वर्गभौम.

बृहत्संहिता नामावलीपैकी निम्नलिखित देशनामे थोड्या फरकाने पौराणिक साहित्यात पुनरावृत्त आढळतातः— १. तंगण ( मत्स्य–अपथ; मार्क.–गुर्गण; गरुड–तंकन ); २. दार्व (ब्रह्म–दर्ध; वामन–पुस्त); ३. खश (मत्स्य–चामार). ९. गरुड पुराण ( ७ ).

**बृहत्संहितेमध्ये**—या ग्रंथातील, तसेच या ग्रंथानुसारी पराशरतंत्र आणि मार्कंडेय पुराण कूर्मविभागातील ऐशान्य देशांची नामावली अन्य कोणत्याहि पुराणापेक्षा मोठी असली, तरी तीमध्ये उत्तर भारतान्तर्गत देशांचाच समावेश दिसतो ( परिपत्रक पहा ). पराशरतंत्र नामावलीत बृहत्संहितेतील अनेक नावे गाळली असून, मार्कंडेय पुराणातील अनेक पाठ अपभ्रष्ट व चुकीचे आहेत. ' यवन ' हे एकच नवे नाव तेथे आढळते. ब्रह्म पुराणात हीच नामावली थोड्या फरकाने दिली आहे.

**वायु पुराणात**—या ग्रंथातील ' पर्वताश्रयिन् ' लोकांची नामावली बृहत्संहितानुसारी असली, तरी अनेक नव्या नावांचा समावेशहि तेथे आढळतो ( परिपत्रक पहा ). अन्य पौराणिक साहित्यात ( उदा. मत्स्य पुराण ) वायु पुराणातील नामावली प्रमाणभूत मानली असली, तरी त्यामधील अनेक पाठ चुकीचे आहेत. गरुड पुराणातील नामावली अत्यंत त्रुटित आणि संक्षिप्त आहे.

**ऐषुकारिभक्त** ( नगर )—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते भारतवर्षातील एक नगर आणि जनपद ( पा. सू. ४. २.५४ ). जैन उत्तराध्ययन सूत्रमते हे कुरु जनपदात होते ( उत्तराध्ययन. १४.१ ). अग्रवाल यांच्या मते पंजाबातील आधु. हिस्सार गाव हेच असावे. अन्य अभ्यासकांच्या मते अरबस्तानमधील आधु. हिस्सार ( = दुर्ग ) किल्ला हाच असावा. नामांतर–' इसुकार ' ( इषुकार ).

# ओ

**ओक्कल** ( देश )—पाली साहित्यमते पूर्व भारतातील 'उत्कल' देशाचे नामांतर ( अपादान. ३.२५९; उत्कल पहा ).

**ओक्षथोइ** ( लोकसमूह )—कर्टियसच्या मते पंजाबातील 'क्षथोइ' ( आधु. खत्रि ) लोकसमूहाचे नामांतर ( क्षथोइ पहा ).

**ओघवती** ( नदी )—महाभारत भीष्मपर्वमते कुरुक्षेत्रातील एक पवित्र नदी ( म. भी. ९.२२; १०.२१ ). महाभारतान्तर्गत सारस्वतोपाख्यानमते वसिष्ठांनी पाचारिलेल्या सप्त सरस्वतींपैकी ही एक होती ( म. श. ३७.४; २४–२५ ). थॉमस यांच्या मते कुरुक्षेत्रातील आधु. मार्कंडा नदी हीच होय ( जे. आर. ए. एस्. १५.३६२; आपया पहा ). नामांतर ( महाभारत )–'सुवेणु'.

पौराणिक साहित्यात—या साहित्यमते ही श्राद्धयोग्य पवित्र नदी असून ( मत्स्य. २२.७१; वामन. ४६.५०; ५७.८३; ५८.११५ ), कुरुक्षेत्रातील स्थाणुतीर्थ ( आधु. थानेसर ) आणि पृथूदक तीर्थ ( आधु. पेहोवा ) हिच्याच काठी होते ( काणे, धर्मशास्त्र. पृ. ७८६ ).

महाभारतात—दुर्योधनवधानंतर कृष्णसूचनेवरून पांडव स्वशिबिरास न जाता हिच्याच काठी एक रात्र राहिल्यामुळे अश्वत्थामनकृत रात्रिसंहारातून त्यांचा बचाव झाला ( म. श. ६१.३७ ). दुसऱ्या दिवशी गांधारीच्या सांत्वनार्थ कृष्ण येथूनच हस्तिनापुरी गेला ( म. श. ६१.३८ ).

या नदीकाठी जयंती देवीचे एक पवित्र स्थान असून ( म. श. ३८०* ), भीष्माचार्य या नदीतीरावरच शरशय्येवर पडले होते ( म. शां. ५०.६० ). त्यांचा राजनीतिविषयक उपदेश श्रवण करण्यासाठी रथारूढ पांडव हस्तिनापुराहून दृषद्वती नदी ओलांडून प्रत्यही येथे येत असत. भीष्मांचा हा उपदेश महाभारत शांतिपर्वात ग्रथित केला आहे ( म. शां. ५२ ).

२. पारियात्र पर्वतोद्भवा एक नदी ( वामन. १३.२५ ).

**ओङ्कार** ( लिंग )— वाराणसी येथील एक गुह्यलिंग ( लिङ्ग. १.९२.१३७; कूर्म. पूर्व. ३२.१२; नारद. उत्तर. ४८.२०; ५०.३६; पद्म. आदि. ३४.१–४ ). पद्ममते हे श्राद्धयोग्य तीर्थ आहे ( पद्म. आदि. ११.२० ).

२. अवंती येथील ८४ शिवलिंगांपैकी एक ( नारद. उत्तर. ७८.३३; स्कन्द. आवन्त्य. अ. ३७.१ ).

३. काशी येथील चतुर्दश महालिंगांपैकी एक ( कूर्म. पूर्व. ३२.११; पद्म. आदि. ३४.१; ९; स्कन्द. काशी. ३३.११८; १६८ ). स्कंद पुराणात याच्या उत्पत्तीची कथा दिली आहे ( स्कन्द. काशी. ७३ ).

**ओङ्कार मान्धाता** ( अर्धज्योतिर्लिंग )— मध्य भारतातील सुविख्यात अर्धज्योतिर्लिंगस्थान. नर्मदा नदीच्या प्रवाहातील 'मांधाता ( शिवपुरी ) नामक डोंगरी बेटावरील स्थान' अशा अर्थाने यास 'ओंकार मांधाता' म्हणतात. पौराणिक साहित्यमते हे, तसेच नर्मदा नदीच्या दक्षिण किनाऱ्यावरील अमलेश्वर ( परमेश्वर ) हे लिंगद्वय मिळून एक ज्योतिर्लिंग बनत असून, ही उभय लिंगे 'अर्धज्योतिर्लिंग' म्हणून ओळखली जातात. नामांतर ( जैन साहित्य )– 'अमरेश्वर'; 'अमलेश्वर'.

माळवा प्रांतातील उज्जयिनी– खांडवा रेलमार्गावरील ओंकारेश्वर रोड रेल्वे स्थानकापासून ७ मैलांवरील नर्मदा नदीतील एका बेटावर हे आहे. 'अमरेश्वर' वैकल्पिक नावाने हे ओळखले जात असले, तरी वस्तुतः अमरेश्वर मंदिर हे ओंकार मंदिरापासून काही अंतरावर आहे.

येथील नर्मदा प्रवाहान्तर्गत जंगलव्याप्त प्रदेशातील स्वयंभू लिंगाप्रत नावेने जावे लागते. मार्गातील भृगुपट्टन नामक उभ्या कड्यावरून नर्मदा नदीमध्ये देहत्याग करण्याची प्रथा पूर्वापार रूढ होती. स. १८२४ मध्ये सतीच्या चालीसमवेत ती कायद्याने बंद करण्यात आली.

नामव्युत्पत्ती—ॐकाराकृती मांधाता पर्वतावरील हे शिवमंदिर ॐकाराधिष्ठित चंद्रकोरीसदृश असल्याने यास हे नाव प्राप्त झाले. भक्तजन मांधाता पर्वताला ॐकारस्वरूप मानून त्यास प्रदक्षिणा घालतात. अन्य आख्यायिकेनुसार इक्ष्वाकुवंशीय मांधातृ राजाने येथे केलेल्या शिवाराधनेमुळे यास हे नाव प्राप्त झाले.

उत्पत्ती—शिवमते विंध्य पर्वताने केलेल्या पाण्मासिक पार्थिव शिवाराधनेने संतुष्ट होऊन शिव ॐकाररूपाने त्या पर्वतातील मांधाता येथे आणि पार्थिव रूपाने अमलेश्वर येथे अवतीर्ण झाला. या अर्धज्योतिर्लिंगद्वयाचे संयुक्त ज्योतिर्लिंग कालांतराने सुविख्यात झाले ( शिव. शत. ४२.२; १८–२२ ).

लिंग—येथील शिवलिंग मंदिराच्या अंधाऱ्या तळघरात नर्मदा नदीच्या प्रवाहात असून, मंदिराच्या वरच्या दालनात

अन्य एक शिवलिंग आहे. ॐकारेश्वराचे सद्य:कालीन मंदिर पेशव्यांनी बांधलेले आहे.

जैन साहित्यात—या साहित्यमते अमरेश्वर हे पर्वतीय स्थान नर्मदा नदीच्या पात्रात असून, हरिषेणमते येथे एका जिनाने आपल्या पूर्वजन्मीच्या गुरूचा सत्कार केला. आधुनिक काळी जैनतीर्थ म्हणून हे प्रसिद्ध नाही ( ती. सं. पृ. ११५ ).

**ओड्कुराल** ( ग्राम )— चालुक्य राजा भीम ( द्वितीय ) च्या वि. सं. १२८३ च्या शिलालेखमते उत्तर गुजरातेतील सारस्वत मंडलान्तर्गत चालीसा पथकातील ( आधु. कडी आणि कलोल महाल ) नटौली गावाच्या उत्तरेकडील एक ग्राम ( इंडि. अँटि. ६.१९९–२०० ). आधु. कलोल महालात कोठेतरी हे असावे.

**ओजस** ( तीर्थ )—पद्ममते कुरुक्षेत्रातील ' औजस ' तीर्थाचे नामांतर ( पद्म. आदि. २७.५२–५३; औजस पहा ).

**ओजेने** ( नगर )—टॉलेमीच्या मते मध्य भारतातील ' उज्जयिनी ' नगराचे नामांतर ( मॅक्रिंडल, पृ. ६३; उज्जयिनी पहा ).

**ओझोअन** ( नगर )—टॉलेमीच्या मते मध्य भारतातील ट्रिलोफिल्लितइ प्रदेशातील एक नगर ( अक्षांश. २०° –३०′ उत्तर; रेखांश १३८°–१५′ पूर्व ). मॅक्रिंडल यांच्या मते नागपूरच्या ६० मैल ईशान्येकडील आधु. सिवनी गाव हेच होय.

**ओझोअबिस्** ( नगर )—टॉलेमीच्या मते प्रपिऔतइ प्रदेशातील एक नगर ( अक्षांश २३°–४०′ उत्तर; रेखांश १२०°–३०′ पूर्व ). याचे आधु. स्थान समजत नाही.

**ओडगाव** ( राममंदिरस्थान )—राजस्थानातील खुर्दीरोड रेल्वेस्थानकापासून ४० मैल अंतरावरील नयागढ गावापासून १० मैलांवरील एक राम मंदिरस्थान. येथे चंदनकाष्ठाची राममूर्ती असून, स्थानिक आख्यायिकेनुसार वनवासी रामचंद्र येथे चंदनवृक्षाखाली एक रात्र राहिले होते. स्थानिक भिल्ल लोकांनी उपास्य दैवत बनविलेल्या या चंनवृक्षापासून नयागढच्या कृष्णचंद्रदेव राजाने राममूर्ती बनविली ( ती. पृ. १९६ ).

**ओड्डका** ( देश )—बौद्ध अपादानमते पूर्व भारतातील ' उड्र ' देशाचे नामांतर ( अपादान. २.३५८; उड्र पहा ). अन्य नामांतरे (मध्ययुगीन शिलालेख साहित्य)—'ओड्डवाडि' ' ओड्डिय ' ( एपि. इंडि.४.२७०; ५.१०८ ( ३ ); राजेंद्र चोलाचा तिरुमले शिलालेख ) –' ओड्डविषय '; ( तेलगु शिलालेख )—' ओड्डाडि ' ( एपि. इंडि. २५.२९८ ); ( जैमिनि भारतम् ) –' ओड्डि ' ( एपि. इंडि. ७. ७७ ).

**ओड्डियाण** ( देशविभाग )—स्कंदमते भारतखंडातील एक देशविभाग. यामध्ये ९ लक्ष ( पाठभेद–७ लक्ष ) ग्रामे होती ( स्कन्द. माहेश्वर. कौ. ३९.१३३ ).

**ओड्र** ( देश )—ब्रह्ममते पूर्व भारतातील ' उड्र ' देशाचे नामांतर ( ब्रह्म. २८.१; उड्र पहा ). अन्य नामांतर ( मध्ययुगीन शिलालेख साहित्य ) –' ओड्विश ' ( इंडि. अँटि. ४.३६४ ).

**ओतगह** ( देश )—नासिक शिलालेखमते ' उत्तरापथ ' देशाचे नामांतर ( आर्कि. सर्व्हे. वे. इं. ४.११४; उत्तरापथ पहा ).

**ओत्कल** ( देश )—उडियाभाषीय हस्तलिखितमते पूर्व भारतातील ' उत्कल ' देशाचे नामांतर ( एच्. ए. आय्. बी. पृ. २७; उत्कल पहा ).

**ओत्तर कोशल** ( देश )—कनौजच्या जयचंद्र राजाच्या दानपत्रमते ' कोशल ' देशाचे नामांतर ( इंडि. अँटि. १८.१३०; कोशल १. पहा ).

**ओदका** ( दुर्गनगरी )—नरकासुराच्या प्राग्ज्योतिषपुर ( आधु. आसाम ) राज्यातील प्राग्ज्योतिषपुरनजिकची एक जलवेष्टित दुर्गनगरी ( ह. वं. २.६३.८७; म. स. परि. १. २१.६५५ ). ' ओदका 'चा शब्दशः अर्थ ' खंदकयुक्त नगरी ' असाच होतो. पाठभेद ( भांडारकरसंहिता )—' औदका '.

महाभारतात— या ग्रंथमते लोहितगंग ( ब्रह्मपुत्रा ) प्रदेशातील मणिपर्वतावरील या गावी नरकासुराचे अंतःपुर असून, तेथे त्याने मुर दैत्याच्या पहाऱ्याखाली सोळा सहस्र अपहृत कन्या ठेवल्या होत्या.

**ओदन्तपुरी** ( बौद्ध विद्यापीठ )—तिबेटी साहित्यमते बिहारमधील ' उदंतपुरी ' बौद्ध विद्यापीठस्थानाचे नामांतर ( उदंतपुरी पहा ).

**ओदम्वालूर** ( देवमंदिरस्थान )—दक्षिण भारतातील चोल स्थापत्यशैलीचे एक देवमंदिरस्थान.

**ओदोम्बोरइ** ( लोकसमूह )—प्लिनीच्या मते पश्चिम भारतातील ' उदुंबर ' लोकसमूहाचे नामांतर ( उदुंबर २. पहा ).

**ओपसाद** ( ग्राम )—बौद्ध साहित्यमते कोशलनरेश प्रसेनजिताने चणकि नामक ब्राह्मणास दान दिलेले उत्तर भारतातील कोशल देशान्तर्गत एक ग्राम. याच्या उत्तरेस

देववन नामक उपवन होते ( मज्झिम. पृ. ३९४ ).

**ओ-पो-किएन्** ( लोकसमूह )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते वायव्य भारतातील 'अवगन' लोकसमूहाचे नामांतर ( अवगन पहा ).

**ओपोतौर** ( ग्राम )—टॉलेमीच्या मते ट्रिलोफिलितई प्रदेशातील एक ग्राम ( अक्षांश २१°–४०′ उत्तर; रेखांश १३७°–३०′ पूर्व ). याचे आधुनिक स्थान समजत नाही.

**ओफिर** ( लोकसमूह )—बायबलमते पंजाबातील 'आभीर' लोकसमूहाचे नामांतर ( आभीर पहा ).

**ओभर** ( ग्राम )—कुशाण राज्यकालीन पेशावर शिलालेख क्र. २१ मते वायव्य भारतातील एक ग्राम. येथील वासुदेव नामक ब्राह्मणाने एक विहीर बांधली होती ( कॉर्पस. इन्स्क्रि. २.१.२.१५७ ).

**ओमल्लिस** ( नदी )—अरियनच्या ग्रंथमते मिथिला ( आधु. बिहार ). देशातील 'कमला' नदीचे नामांतर ( कमला पहा ).

**ओरङ्गल** ( महानुभावतीर्थ )—स्थानपोथीमते आंध्र प्रदेशातील 'अनुमकोंड' ( आधु. वारंगळ ) नगराचे नामांतर ( स्था. पृ. २; अनुमकोंड पहा ).

**ओरछा** ( नगर )—बुंदेलखंडान्तर्गत बेटवा–धसन दुआबातील टिकमगढ जिल्ह्यातील एक मध्ययुगीन राजधानीचे नगर. झाँसीपासून ७ मैलांवरील बेटवा ( प्राचीन वेत्रवती ) नदीकाठचे हे नगर भारतीचंद राजाने स. १५३१ मध्ये वसविले. स. १७८३ पर्यंत या प्रदेशाची राजधानी या गावी असून, विक्रमजित् राजाने ती टिकमगढ गावी हलविली. भारतीचंद, मधुकर साह, वीरसिंहदेव, पहाडसिंग, सानवंतसिंह आदि राजांच्या छत्र्या ( स्मृतिमंदिरे ) या गावी आहेत.

**राममंदिर**—श्रीराममंदिर आणि चतुर्भुजजीमंदिर ही येथील दोन प्रमुख देवालये असून त्यापैकी राममंदिरातील मूर्ती येथील गणेशकुमारी राणीला अयोध्या येथे सरयूस्नानाचे वेळी सापडली. स्थानिक समजुतीनुसार दाशरथि राम येथे काही काळ थांबला होता ( ती. पृ. २१० ).

**ओराइतइ** ( लोकसमूह )—कर्टियसच्या मते उत्तर भारतातील 'वार्त्तेय' आयुधजीवी संघाचे नामांतर ( वार्त्तेय पहा ).

**ओरासा** ( ग्राम )—चालुक्य राजा भीम ( द्वितीय ) च्या वि. सं. १२८७ च्या शिलालेखमते दक्षिण राजपुतान्यातील एक ग्राम. अबू पर्वतावरील आधु. ओरिया गाव हेच होय ( एपि. इंडि. ८.२२२ ).

**ओरी** ( मार्कंडेयस्थान )—गुजरातमधील नर्मदा नदीच्या दक्षिण तीरावरील चाणोदनजिकचे मार्कंडेयस्थान. येथील मार्कंडेश्वर मंदिरस्थानी स्थानिक राजाने मार्कंडेय ऋषींच्या प्रेरणेने तपस्या केली होती ( ती. पृ. ४३५ ).

**ओरेतेस** ( देश )—प्लिनीच्या ग्रंथमते पूर्व भारतातील 'उड्र' देशाचे नामांतर ( उड्र पहा ).

**ओरैयूर** ( नगर )—मध्ययुगीन शिलालेख साहित्यमते दक्षिण भारतातील पांड्यराजधानी 'उरगपुर'चे नामांतर ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३६९; उरगपुर पहा ).

**ओरौदियन** ( पर्वत )—टॉलेमीच्या मते दक्षिण भारतातील 'वैडूर्य' पर्वताचे नामांतर ( वैडूर्य पहा ).

**ओर्झ** ( ग्राम )—टॉलेमीच्या मते उत्तर भारतातील एक ग्राम ( अक्षांश ३३°–२०′ उत्तर; रेखांश १३६° पूर्व ). रामगंगा नदीकाठचे आधु. सर्सि गाव हेच होय.

**ओर्थौर** ( नगर )—टॉलेमीच्या मते दक्षिण भारतातील पांड्यराजधानी 'उरगपुर'चे नामांतर ( उरगपुर पहा ).

**ओर्दबारि** ( लोकसमूह )—टॉलेमीच्या मते पश्चिम भारतातील 'उदुंबर' लोकसमूहाचे नामांतर. अन्य नामांतर—'ओबंदरौ' ( उदुंबर २. पहा ).

**ओर्य** ( देश )—पोर्तुगीज इतिहासमते पूर्व भारतातील 'उड्र' देशाचे नामांतर ( डी. एच्. एन्. आय्. १.४९१; उड्र पहा ).

**ओल्लाङ्ग** ( ग्राम )—शिलालेख साहित्यमते पूर्व भारतातील एक ग्राम. बिहार प्रांतातील केवंजर प्रदेशान्तर्गत आनंदपुर जिल्ह्यातील आधु. देलांग गाव हेच होय ( एपि. इंडि. २५ ).

**ओवना**—राजतरंगिणीमते कश्मीरातील एक ग्राम ( राज. ३०६ ). ख्व ( प्राचीन खडूवी ) परगण्यातील पांपर ( प्राचीन पद्मपुर ) गावापासून ३ मैल ईशान्येकडील आधु. उयन ( अक्षांश ३४°–२′ उत्तर; रेखांश. ७५°–२′ पूर्व ) गाव हेच होय. येथील गंधकयुक्त गरम पाण्याचा झरा सुविख्यात आहे ( स्टाइन, राज. १.२९३ ).

**ओश** ( देश )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते मध्य आशियातील एक देश. सीता ( आधु. सारीकोल ) नदीच्या उत्तर किनाऱ्यावर याची राजधानी होती. मध्य आशियातील आधु. यंगि–हिस्सार देश हाच असून, त्यामधील आधु. चिहिल–गुंबेझ् ( = चाळीस घुमट ) गावी ह्युएन्त्संगच्या काळी या देशाची राजधानी होती. डॉ. स्वेन् हेडिन् यांना येथे घरे आणि तबेल्यांचे अवशेष,

तसेच एक उद्ध्वस्त बौद्ध मंदिर सापडले.

ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात—या ग्रंथमते कबंध (आधु. बाल्टि) देशातील पुण्यशाला नगराहून १६० मैल पूर्वेकडील पामीर पर्वताच्या पलीकडील या (वु–श) देशाचे आणि त्याच्या राजधानीचे क्षेत्रफळ २०० आणि २ मैल होते. ह्युएन्त्संगच्या काळी हा देश कबंध देशाचाच भाग मानला जात असे. या देशातील हवा सौम्य, जमीन समृद्ध आणि पीकपाणी व फळेफुले विपुल असून, कृष्णनीलवर्णीय 'जेड' जातीचे दगड येथे सापडत असत. येथील लोक नाकीडोळी कुरूप, उद्धट, ओबडधोबड, परंतु बौद्ध धर्माचे निष्ठावंत अनुयायी होते. खरखरीत लोकरी आणि कातडी कपडे ते वापरीत असत. येथील लिपी आणि भाषा काशगर देशाप्रमाणेच होती.

बौद्ध मठ—या देशात हीनयान सर्वास्तिवादिन् संप्रदायाचे १० बौद्धमठ आणि १००० भिक्षू होते. याच्या राजधानीपासून ४० मैल पश्चिमेकडील गगनचुंबी पर्वतावर एक बौद्ध स्तूप होता. राजधानीपासून १०० मैल उत्तरेकडील ओसाड वालुकामय प्रदेश ओलांडल्यानंतर ह्युएन्त्संग काशगर देशास पोहोचला (वॉटर्स, २.२८९–२९०).

**ओषधि पर्वत** (पर्वत)—वाल्मीकि रामायणमते हिमालयान्तर्गत ऋषभ आणि कैलास पर्वतांच्या दरम्यानचा एक ओषधियुक्त पर्वत. राम–रावण युद्धसमयी जांबवानाने वानररक्षणार्थ येथील औषधी आणण्याची आज्ञा हनुमानास दिली होती (वा. रा. यु. ७४.२९–३४). रावणशक्तीने मूर्च्छित झालेल्या लक्ष्मणासाठी येथील ओषधी आणण्यास सुषेणाने हनुमानास सांगितले असता, हनुमत् हा पर्वतच घेऊन युद्धस्थानी आला. यावरील औषधी वनस्पतीच्या साह्याने सुषेणाने लक्ष्मणाला शुद्धीवर आणले (वा. रा. यु. १०१.२९–३२).

**ओष्ट्र** (देश)—महाभारतमते भारतवर्षातील एक जनपद (म. भी. १०.५६).

**ओष्ठकर्ण** (देश)—वाल्मीकि रामायणमते पूर्व भारतातील एक देश (वा. रा. कि. ४०.२५). ब्रह्माण्डमते हा मेरु पर्वतोद्भवा सप्तगंगांपैकी पूर्ववाहिनी ह्रादिनी नदीकाठी होता (ब्रह्माण्ड. २.१८.५४). पाठभेद (ब्रह्माण्ड पुराण)–' औष्टकर्ण '.

**ओष्ठकर्णिक** (देश व लोक)—एक किरात लोकसमूह (म. स. २७.२९४*).

**ओसम** (पर्वत)—काठेवाडान्तर्गत गोंडल प्रांतातील महालगाम पाटनवाल गावानजिकचा एक पवित्र पर्वत. याच्या पूर्व भागातील हिडिंबा शिखर नामक उपविभागात पांडवांच्या प्रथम वनवासकाली भीमसेनाने हिडिंब राक्षसाला ठार मारून त्याच्या हिडिंबा नामक भगिनीशी विवाह केला (ती. पृ. ४१५).

**ओसिया** (जैन आणि हिंदु देवमंदिरस्थान)—राजस्थानातील जोधपुरपासून ३२ मैल उत्तरेकडील सुविख्यात जैन आणि हिंदु देवमंदिरस्थान. सध्या बहुंशी उद्ध्वस्तावस्थेत असणारे हे स्थान ओसवाल श्वेतांबर जैनांचे आद्य वसतिस्थान, तसेच प्रतिहार राजांचे (इ. स. ८ वे शतक) लष्करी केंद्र होते. यामुळे गुप्त आणि प्रतिहार शैलीची अनेक मंदिरे येथे आढळतात. या गावी सोळा जैन आणि हिंदु मंदिरे असून, त्यापैकी पूर्वकालीन (इ. स. ८–९ वे शतक) ११ मंदिरे ओसिया गावी, आणि उर्वरित उत्तरकालीन मंदिरे या गावाच्या पूर्वेकडील टेकडीवर आहेत. चार शतकांहून अधिक काळ येथील मंदिररचनेचे कार्य चालू असून, प्रतिहार स्थापत्यशैलीचे सारे टप्पे येथे आढळतात.

**प्रतिहार शैलीची मंदिरे**—गुप्त शैलीच्या अनुकरणाने बांधलेली प्रतिहार शैलीची प्राचीनतम मंदिरे (इ. स. ८–९ वे शतक) या गावी असून, त्यांच्या शिल्पांमध्ये गुप्तकलेचा सुबकपणा आणि प्रारंभिक प्रतिहार कलेचा ओबडधोबड जोमदारपणा यांचे मिश्रण दिसते. त्यापैकी विशेष उल्लेखनीय मंदिरे पुढीलप्रमाणे होतः—

(१) **हरिहर मंदिरे**—या गावच्या हरिहर देवतेच्या तीन मंदिरांपैकी दोन खजुराहो येथील पंचायतन धर्तीची आहेत. त्यांची उत्तुंग जोती खजुराहो मंदिरासदृश, आणि शिखरे ओरिसा धर्तीची आहेत. त्यापैकी मंदिर क्र. २ आणि ३ मंदिरांच्या स्तंभाधिष्ठित उघड्या बाह्यमंडपातील शिल्प नवथर परंतु जोमदार आहे.

(२) **सूर्यमंदिर**—पंचायतन धर्तीच्या या मंदिराचा उघडा प्रवेशमंडप हरिहर मंदिरापेक्षाहि अधिक भव्य आणि कलात्मक असून, त्याच्या दर्शनी भागीच्या ग्रीक धर्तीच्या दोन विशाल स्तंभांवरील शिल्प अधिक संयत शैलीचे आहे.

(३) **महावीर जैनमंदिर**—गर्भागार सभामंडप (इ. स. ८ वे शतक), बाह्यमंडप (नलमंडप; इ. स. १० वे शतक), आणि प्रवेशतोरण (इ. स. ११ वे शतक) यांनी युक्त अशा या मंदिरात प्रतिहार स्थापत्यशैलीच्या उत्क्रांतीचे सारे टप्पे दिसतात. त्यापैकी उत्तरकालीन गुप्त–शैलीने (उदा. ग्यारसपुर, चितोडगढ़) कोरलेले प्रवेश-

मंडपाचे स्तंभ विशेष कलात्मक आहेत.

(४) **पिपलादेवी मंदिर**—प्रतिहार स्थापत्यशैलीच्या अंतिम अवस्थेत (इ. स. १० वे शतक) बांधलेल्या या मंदिराच्या सभामंडपातील तीस स्तंभांच्या निर्जीव पुनरुक्तीयुक्त शिल्पामध्ये प्रतिहार शिल्पकलेच्या अवनतीची प्रसादचिह्ने दिसतात.

**चाहमान शैलीची मंदिरे**—प्रतिहार शैलीच्या अनुकरणाने बांधलेली चाहमान स्थापत्यशैलीची (इ. स. १३ वे शतक) सुबक रचनेची, परंतु निर्जीव शिल्पयुक्त काही मंदिरे येथे आहेत. त्यापैकी सचिया माता नामक अष्टकोनी मंदिर, तसेच त्याचा विभिन्न उपशिखरयुक्त (उरुशृंग) कळस उल्लेखनीय आहे.

**प्रवेशद्वारे**—उपरोक्त मंदिरांच्या गर्भमंडपाच्या प्रवेशद्वाराचे शिल्प अत्यंत समृद्ध असून, पाश्चात्य गोथिक चर्चप्रमाणे प्रतिहार शिल्पकारांनी आपले कलासर्वस्व त्यात ओतलेले दिसते. त्याच्या आडव्या तुळईवर नवग्रह, बाजूच्या खांबावर शेषनाग, आणि तळाशी गंगा-यमुना नद्यांची शिल्पे असून, दरवाजावर विभिन्न पौराणिक कथाप्रसंग कोरले आहेत.

**वासंतिक राजमंदिर**—या गावच्या गुप्त स्थापत्यशैलीच्या वासंतिक राजमंदिराची (इ. स. ८ वे शतक) रचना अजंटा भित्तिचित्रातील विटांनी बांधलेल्या उपवनविहारासदृश आहे. त्याच्या लाकडी स्तंभांवर प्रणयी युगुलांची शिल्पे असून, गुप्त नागरी स्थापत्याचे दुर्मिळ उदाहरण ते मानले जाते.

**ओसुम्भल** (ग्राम)—चालुक्य राजा श्रियाश्रय शिलादित्याच्या स. ६९३ च्या सुरत ताम्रपटमते पश्चिम भारतातील एक ग्राम. सुरत जिल्ह्यातील कामरेज गावापासून ७ मैल दक्षिणेकडील आधु. उंभेल गाव हेच होय (कॉर्पस् इन्स्क्रि. ४.१.१३३).

**ओस्थ** (ग्राम)—टॉलेमीच्या मते प्रपिओतई देशविभागातील एक ग्राम (अक्षांश २३°–३०′ उत्तर; रेखांश १२२°–३०′ पूर्व). या गावाचे आधु. स्थान समजत नाही.

**ओस्सदिओइ** (लोकसमूह)— सिकंदरस्वारीशी संबंधित ग्रीक साहित्यमते पंजाबातील एक लोकसमूह. अकेसिनेस् (चिनाब) आणि सिंधु नद्यांच्या संगमस्थानी हे लोक सिकंदरला शरण गेले होते (मॅक्रिंडल, अलेक्झांडर. पृ. १५६).

**मतांतरे**—या लोकांच्या भौगोलिक स्थानाविषयी अभ्यासकात निम्नलिखित मतांतरे आढळतात:— १. **वसाति**—चौधरी यांच्या मते चिनाब आणि सिंधु नद्यांच्या संगमाच्या त्रिकोणी प्रदेशातील चिनाब नदीकाठचे वसाति लोक हेच होत (चौधरी, पृ. ९०; वसाति पहा); २. **यौधेय**-कनिंगहॅम यांच्या मते सतलज नदीच्या खालच्या भागातील यौधेय (आधु. जोहिय) लोक हेच होत; ३. **बेसतए**-अन्य अभ्यासकांच्या मते पेरिप्लसच्या ग्रंथातील तिबेटच्या गंगटोक प्रदेशातील 'बेसतए' लोकांचे हे नामांतर असावे (पेरिप्लस, पृ. २७८–२७९).

**ओ-हि-चि-त-लो** (नगर) — ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते उत्तर भारतातील 'अहिच्छत्र' नगराचे नामांतर (वॉटर्स, १.३३१. ३३२; अहिच्छत्र पहा).

**ओहिन्द** (नगर)—महंमद गझनीकालीन मुसलमान साहित्यमते वायव्य भारतातील 'उद्भांडपुर' नगराचे नामांतर (उद्भांडपुर पहा).

---

# औ

**औकन** (बौद्ध स्थान)—सिलोनच्या उत्तर-मध्य प्रांतातील 'कलवेव' तलावाच्या पूर्व किनाऱ्यावरील एक बौद्धस्थान. येथील गौतम बुद्धाची विशाल उभी प्रतिमा (उंची–३९′) वायव्य सीलोनमधील सेसेरुव येथील उभ्या, तसेच गल-विहार येथील निर्वाणप्राप्त बुद्धप्रतिमेसदृश (उंची–४६′) विशाल आहे (फर्गुसन, १.२४५).

**औग्रसेना** (देवीस्थान)– मथुरा येथील एक देवीस्थान (वराह. १६०.१६).

**औङ्गेरूमार्ग** (ग्राम)—वेलनांटी राजेंद्र चोडाच्या स. १०९१ च्या ताम्रपटमते आंध्र प्रदेशातील एक ग्राम आणि देशविभाग. गुंतूर जिल्ह्यातील आधु. ओंगोले ग्राम हेच असून, याच्या दक्षिणेकडील तेनलि, गुंतूर, आणि

वमल गावांपर्यंत हा देशविभाग असावा ( एपि. इंडि. २९.२३८ ). चालुक्य राजांच्या पंडरंग नामक सेनापतीचे इ. स. ९ व्या शतकातील तीन शिलालेख येथे सापडले आहेत ( इंडि. अँटि. स. १८८४; पृ. १५ ).

**औजस घाट** ( घाट )—कुरुक्षेत्रातील एक घाट. भारतीय युद्धातील मृत वीरांचे दाहकर्म याच्या दक्षिणेकडील अस्थिपुर येथे करण्यात आले ( अर्कि. सर्व्हे. १४.८६–१०६; अस्थिपुर पहा ).

**औजस तीर्थ** ( तीर्थ )—कुरुक्षेत्रान्तर्गत समंतपंचक क्षेत्राच्या सीमेवरील एक तीर्थ ( म. आर. ८१.१४३; वामन. २२.२१; ५१; ४१.६; ५७.५१; विष्णुधर्मसूत्र. ८५.५२ ). नामांतर–' तैजस '; 'ओजस'; ' वारुण तीर्थ ' ( पद्म. आदि. २७.५२–५३ ).

बलराम तीर्थयात्रेत—महाभारत बलराम–सरस्वती–प्रतिस्रोत यात्रामते सरस्वती नदीकाठच्या या तीर्थस्थानी देवांनी स्कंदाला सैनापत्याचा ( म. श. ४५.९१–९२ ); तसेच कृतयुगी वरुणाला सरिता, सागर आदींच्या इंद्रतुल्य जलाधिपत्याचा अभिषेक केला ( म. श. ४६.५–११ ). वामनमते येथे शंभु अनघ नामक वामनाचे स्थान होते ( वामन. ९०.१७ ).

**औज्जयनिक**—बृहत्संहितामते मध्यभारतातील उज्जयनी देशनिवासी लोकसमूह ( बृ. सं. ११.५६; उज्जयनी पहा ).

**औड्र** ( देश व लोकसमूह )— बृहत्संहितामते पूर्व भारतातील ' उड्र ' ( आधु. ओरिसा ) देशाचे नामांतर ( बृ. सं. ५.७४; उड्र पहा ). अन्य नामांतर–' ओड्र '.

**औड्रम्लेच्छ** ( देश )—पद्ममते एक जनपद ( पद्म. आदि. ६.५२ ).

**औण्ड्र** ( देश )—ब्रह्म आणि मत्स्यमते दक्षिणोदधि आणि विंध्य पर्वतानजिकच्या ' ओड्र ' देशाचे नामांतर ( ब्रह्म. २८.१; मत्स्य. ११४.५२; ओड्र पहा ).

**औण्ड्रामारा**—मत्स्यमते विंध्य पर्वतान्तर्गत 'उत्तमार्ण' देशाचे नामांतर ( मत्स्य. ११४.५२; उत्तमार्ण पहा ).

**औतथ्येश्वर** ( लिंग )— काशी येथील ज्येष्ठेश्वरानजिकचे एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ६५.१२ ).

**औत्कचन** ( नगर )—जंबूद्वीपान्तर्गत. मेरु पर्वताच्या देवकूट नामक मर्यादापर्वतातील एक नगर ( वायु. ४०.१७ ).

**औदका**—प्राग्ज्योतिषपुर नगरानजिकच्या नरकासुरशासित ' ओदका ' नगरीचे नामांतर ( ओदका पहा ).

**औदकि** ( संघ )—पाणिनीच्या गणपाठमते पंजाबातील एक आयुधजीवी संघ ( पा. सू. ५.३.११६ ).

**औदुम्बर** ( लोकसमूह )—बृहत्संहितामते पंजाबातील उदुंबर देशनिवासी लोकसमूह ( बृ. सं. १४.४ ). महाभारतमते या लोकांचे नावावरूनच ' उदुंबर ' देशास ' औदुंबर ' नाव प्राप्त झाले होते ( म. स. ४८.१२ ). नामांतर ( पाणिनि अष्टाध्यायी )–' औदुंबरक ' ( उदुंबर १. पहा ).

**औदुम्बर–आश्रम** ( आश्रमस्थान )—गुजरातमधील ईडर गावाजवळच्या हरिश्चंद्रपुरी येथील औदुंबर ऋषींचे आश्रमस्थान ( ती. पृ. ४२४ ).

२. कुरुक्षेत्रानजिकच्या आधु. पपनावा गावचे निंबार्कशिष्य औदुंबर ऋषींचे आश्रमस्थान ( ती. पृ. ५६३ ).

**औदुम्बरक्षेत्र** ( दत्तस्थान )—गुरुचरित्रमते महाराष्ट्रातील सुविख्यात दत्तात्रेयस्थान आणि नृसिंह सरस्वतींचे तपस्यास्थान ( गुरु. ५१.१५ ). कोल्हापुर जिल्ह्यातील शिरोळ पेट्यातील मिरज–कोल्हापुर रेलमार्गावरील जयसिंगपुर रेल्वेस्थानकापासून ९ मैलांवरील आधु. नरसोबावाडी ( नृसिंहवाडी, वाडी ) गाव हेच होय. येथील औदुंबर वृक्षाखाली नृसिंह सरस्वतींनी बारा वर्षे तपस्या केल्यामुळे यास हे नाव प्राप्त झाले. नामांतर ( गुरुचरित्र )–' भिल्लवडी ' ( गुरु. १८.८ ); ' अमरपुर ' ( गुरु. १८.१९ ).

गुरुचरित्रमते कृष्णा आणि वेण्या नद्यांच्या या संगमस्थानी पंचगंगा नदी ( = शिवा, भद्रा, भोगावती, कुंभी आणि सरस्वती या पाच नद्यांचा संयुक्त प्रवाह ) कृष्णा नदीस मिळते. येथे दक्षिणवाहिनी असणारी कृष्णा नदी येथून एक फर्लांगावरील शुक्लतीर्थ येथे पश्चिमवाहिनी बनते.

**नामव्युत्पत्ती**—अमरेश्वर मंदिरामुळे ' अमरपुर ' नावाने सुविख्यात असणारे हे स्थान उत्तरकालात नृसिंह सरस्वतींच्या तपस्येमुळे ' नृसिंहवाडी ' नावाने सुविख्यात झाले.

**मंदिरे**—येथील कृष्णा–वेण्या संगमस्थानी कृष्णा नदीकाठी दत्तपादुकायुक्त दत्तमंदिर असून, मार्गशीर्ष आणि माघ पौर्णिमांना तेथे यात्रा भरते. वर्षाकाली कृष्णा आणि पंचगंगा नद्यांच्या पुरामुळे हे स्थान जलवेष्टित होत असल्याने पावसाळयात ते बंद असते.

**दत्त सांप्रदाय पीठ**—दत्त सांप्रदायाचे अवतारी पुरुष नृसिंह सरस्वती ( इ. स. १५ वे शतक ) यांचे तपस्यास्थान म्हणून दत्तसांप्रदायी लोक हे पवित्र मानतात.

नृसिंह सरस्वतींच्या 'गुरुचरित्र' या जीवनचरित्रात (अ. ११–५१) विदर्भातील करंजनगर (आधु. कारंजा) येथे जन्म, शिरोळ (औदुंबर) येथे आत्मज्ञानप्राप्ती आणि भीमा नदीकाठच्या गाणगापुर येथे देहत्याग अशी स्वामीजींच्या जीवनाची त्रिस्थली वर्णिली असून, औदुंबर-क्षेत्रास तेथे 'श्री दत्ताची सुखमय राजधानी' म्हटले आहे.

**पादुका**—येथील औदुंबर वृक्षाखाली नृसिंहसरस्वतींच्या शाळिग्राम दगडाच्या पादुका असून, त्यानजिकच 'पापविनाश' 'काम्य' आणि 'सिद्ध' ही तीन तीर्थे, तसेच कृष्णासंगमस्थानी 'शुक्र' 'प्रयाग', 'शक्ति', 'अमर' आणि 'कोटि' संज्ञक पंचतीर्थे आहेत. याशिवाय येथे 'अमरेश्वर' नामक स्वयंभू लिंग, तसेच 'भुवनेश्वरी' नामक चौसष्ट योगिनींचे मंदिर आहे.

**औदुम्बरी** (देवी)—हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक देवी-स्थान (स्कन्द. नागर. १८९).

**औदुम्बरीक विषय** (देश)—शिलालेख साहित्य-मते पंजाबातील 'उदुंबर' देशाचे नामांतर (उदुंबर पहा).

२. जयनाग राजाच्या वप्पघोषवत दानपत्रमते (एपि. इंडि. १९.२८६), तसेच भोजदेव राजाच्या स. ८३६ च्या ताम्रपटमते (एपि. इंडि १९.१५) मध्यप्रदेशातील 'उदुंबर' विषयाचे नामांतर (उदुंबर ३. पहा).

**औदुम्बरीय** (लोकसमूह)—प्लिनीच्या ग्रंथमते पश्चिम भारतातील 'कच्छ' लोकसमूहाचे नामांतर (कच्छ पहा).

**औद्दालक** (तीर्थ)—महाभारतान्तर्गत पुलस्त्ययात्रा-मते भारतवर्षातील एक तीर्थ (म. आर. ८२.१४०).

**औद्भिद** (पर्वत)—ब्रह्माण्डमते कृतमाली नदी-काठचा अगस्त्याश्रमयुक्त एक पवित्र पर्वत. येथे परशुराम-अगस्त्य भेट झाली होती (ब्रह्माण्ड. ३.३५.१६–४२).

२. (वर्ष) कुशद्वीपातील 'उद्भिद' वर्षाचे नामांतर (म. भी. १३.१२; उद्भिद पहा).

**औद्यानक** (तीर्थ)—पद्ममते एक तीर्थ (पद्म. आदि. ३८.६८).

**औद्रायणी**—कात्यायनाच्या वार्तिकमते स्वात-गौरी नद्यांच्या दुआबातील 'सुवास्तु' देशाचे नामांतर (पा. सू. भाष्य. २.२९२; सुवास्तु पहा). अन्य नामांतर–'उड्डियान'.

**औद्रीय** (देश)—संस्कृत साहित्यमते पूर्व भारता-तील 'उड्र' देशाचे नामांतर (उड्र पहा).

**औपक** (देश)—उत्तर भारतातील एक देश (म. भी. १०.६७). पाठभेद–'प्रोषक.'

**औपमन्यव** (तीर्थ)—वाराणसी येथील एक तीर्थ (लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. ९७).

**औपवृत्त** (देश व लोक)—महाभारत सभापर्वमते एक देश व लोकसमूह. येथील राजाने युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञास अनुकूलता विदित केली होती (म. स. ४७३*).

**औपाणि** (ग्राम)—गुप्त राज्यकालीन परिव्राजक-वंशीय संक्षोभ राजाच्या स. ५२८ च्या ताम्रपटमते पिष्टपुरी येथील लक्ष्मीमंदिरास त्याने दान दिलेले मध्य भारतातील एक ग्राम (कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.११३).

**औरङ्गाबाद** (बौद्ध गुफासमूह)—सह्य पर्वतान्तर्गत देवगिरि पर्वतश्रेणीतील तीन गुफासमूहांपैकी एक (अन्य दोन गुफासमूह–वेरूळ, अजंटा). मराठवाड्यातील औरंगा-बादच्या बेगमपुरा नामक उपनगराच्या उत्तरेकडील अजंटा–वेरूळच्या तुलनेने कमी सुविख्यात अशा या तेरा गुफांच्या समूहात (इ. स. २–७ वे शतक) बौद्ध विहारशिल्पाचे काही वैशिष्ट्यपूर्ण नमुने आढळतात. इ. स. ५ व्या शतकात महाराष्ट्रात प्रादुर्भूत झालेल्या महायान पंथाच्या अवनतीचे प्रतिबिंब येथील गुफाशिल्पांच्या कथाविषयात आणि शैलीत दिसते.

**प्राचीन नाव**—स्थानिक समजुतीनुसार या नगराचे प्राचीन नाव खडकी असून, औरंगजेबाच्या नावावरून यास 'औरंगाबाद' नाव पडले. भौगोलिकदृष्ट्या हा गुफासमूह प्राचीन देवगिरीचाच भाग आहे (देवगिरि पहा).

**उपविभाग**—येथील गुफांचे तीन उपविभाग असून, त्यापैकी पूर्व टोकानजिकच्या तिसऱ्या समूहातील गुफा अपूर्णावस्थेत आहेत.

**कालनिर्णय**—गुफा क्र. ४ या प्राचीनतम (इ. स. २–३ रे शतक) चैत्यमंदिराचा अपवाद वगळता, येथील अन्य साऱ्या गुफा बौद्ध धर्माच्या अवनतीच्या काळातील (इ. स. ६–७ वे शतक) आहेत.

**गुणदोष**—चालुक्य राजांनी खोदलेल्या येथील समृद्ध नक्षीकामयुक्त विहारांची स्थापत्यशैली वातापि येथील मलेगित्ति मंदिरासदृश आणि स्तंभशिल्प अजंटा येथील विहारासदृश असून, त्यामध्ये पल्लव स्थापत्य आणि गुप्त–चालुक्य शैलींचे संमिश्रण दिसते. अनुकरणाची आवड आणि कृत्रिमतेची पराकाष्ठा, अलंकारांचे आधिक्य आणि सौष्ठवाचा आभास हे अवनत बौद्ध कलेचे सारे दोष येथील शिल्पांमध्ये प्रकर्षाने असून, उत्स्फूर्त कलाप्रेरणेची

जागा येथे निर्जीव कारागिरीने घेतलेली दिसते. सुवर्णकाराच्या बारकाव्याने खोदलेल्या येथील स्तंभांच्या आणि मूर्तीच्या नक्षीकामात अभिजात कलेची रंगत दिसत नाही. डामडौलाच्या हव्यासात कलासौंदर्य गुदमरविण्याऱ्या येथील शिल्पांमुळे दर्शकाचे मन चकित झाले तरी प्रसन्न होत नाही. अजंटा भित्तिचित्रांची सहजता, सौष्ठव अथवा लालित्य, तसेच वेरूळ येथील शिल्पांचा संयम, गांभीर्य आणि शुचिता यांच्या अभावामुळे एका आसन्नमरण कलापरंपरेच्या अंतिम उच्छ्वसनाचे स्वरूप येथील गुफाशिल्पास प्राप्त होते.

येथील गुफांच्या पहिल्या दोन समूहातील प्रत्येकी दोन हिंदु देवमंदिरसदृश प्रदक्षिणापथयुक्त विहारातील छोट्या खोल्या संपूर्णतः वेगळ्या काढल्या आहेत. गौतम बुद्धाचे अनुचर, द्वारपाल, तसेच स्त्रीप्रतिमा या महायानपंथीय देव आणि व्यक्तिप्रतिमांनी या गुफा ओतप्रोत भरल्या आहेत.

प्रमुख गुफा—औरंगाबाद गुफासमूहातील प्रमुख गुफा पुढीलप्रमाणे होत :—

**( १ ) गुफा क्र. १**—सदोष दगडामुळे बाह्यमंडपाच्या खोदकामानंतर अपुऱ्या सोडलेल्या या विहाराच्या ( ७६½′ × ९′ ) दर्शनी भागी विशाल स्तंभ आणि त्यांच्यावर तुळयांचा आधार म्हणून सांची तोरणासदृश विभिन्न स्त्रीप्रतिमा खोदल्या आहेत. तुळया आणि स्तंभांच्या तुलनेने या स्त्रीप्रतिमा नको इतक्या लहान आणि म्हणूनच क्षुद्र भासतात.

**( २ ) गुफा क्र. २**—या विहारगुफेची (२१½′×१३′) अनेकानेक बुद्धमूर्ती आणि विशाल प्रदक्षिणापथ ही वैशिष्ट्ये असून, त्याच्या दर्शनी भागी वेरूळ येथील गुफा क्र. ८ सदृश दोन महाकाय परंतु बेडौल द्वारपाल आहेत.

**(३) गुफा क्र. ३**—या विहारगुफेचे (४१½′×४२½′) नृत्य, प्रणय, मद्यपान आदि विलासप्रसंगयुक्त शिल्पचौकटी आणि नाजूक नक्षीकामयुक्त स्तंभ हे प्रमुख वैशिष्ट्य असून, मध्यवर्ती बुद्धप्रतिमेच्या समोरच्या भागातील शरणागत भक्तजनांच्या शिल्पप्रतिमा यथार्थ दर्शन आणि प्रसंगानुकूल आविर्भावाच्या दृष्टीने अद्वितीय आहेत. त्यामधील स्त्री-पुरुषांच्या गळ्यात टपोऱ्या मौक्तिकमाल, हाती कडे-तोडे, दंडात बाजूबंद, कानात कुंडले आणि कमरेस मेखल असून, डोक्यावर कृत्रिम केसांचे टोप आहेत. त्यावरून त्या ईजिप्शियन अथवा असिरियन भक्तप्रतिमा असाव्यात. बौद्ध धर्माच्या उत्कर्षकाली भारतात आलेल्या मध्य आशियातील दर्यावर्दी, व्यापारी, प्रवासी आणि बौद्ध भिक्षूंपैकी काही लोकांच्या प्रतिमा येथे कोरल्या असाव्यात. गुफेच्या अंतर्भागातील वरच्या पट्टीवर सुतसोम जातकातील प्रसंग कोरले आहेत.

**( ४ ) गुफा क्र. ४**—औरंगाबाद गुफासमूहातील या प्राचीनतम ( इ. स. २–३ रे शतक ) चैत्यमंदिराच्या ( ४०′×३२′ ) अर्धवर्तुलाकृती छतावर सातवाहनकालीन चैत्यमंदिरासदृश लाकडी तुळया बसविल्या आहेत. त्यामधील स्तूपाची हर्मिकाहि छोटी आहे. कालदृष्ट्या प्राचीन अशा या गुफेच्या स्तंभावर मूर्ती आणि नक्षीकाम यांचे नको इतके आधिक्य, तसेच कलात्मकतेपेक्षा कलाप्रदर्शनाचा सोस अधिक आहे.

**( ५ ) गुफा क्र. ५**—या विहाराच्या ( इ. स. ७ वे शतक ) पाठीमागच्या प्रदक्षिणापथयुक्त खोलीत गौतम बुद्धाची मूर्ती असून, महावीरप्रतिमा म्हणून जैन लोक तिची पूजा करतात.

**( ७ ) गुफा क्र. ७**—या विहारगुफेच्या प्रदक्षिणापथयुक्त सभागृहाच्या ( ३८′×२८′ ) मध्यभागी घारापुरी आणि वेरूळ येथील शैव गुफेसदृश गौतम बुद्धाचे मूर्तिमंदिर आहे.

या विहाराच्या पार्श्वभिंतीवर कमलहस्त आणि बुद्धमूर्तिधारी अवलोकितेश्वर बोधिसत्त्वाची प्रतिमा आणि तिच्या उभय अंगांस बौद्ध स्तोत्रवाङ्मयाधारित अवलोकितेश्वरकृत संकटमोचनाचे विभिन्न प्रसंग कोरले आहेत. या देवतेची भक्तप्रतिपालक, अग्निशामक, शत्रुखड्गनिवारक, दास्यविमोचक, नौकासंकटनिवारक, श्वापदसंहारक, मृत्युविमोचक अशी अनेक रूपे त्यामध्ये असून, वेरूळ येथील गुफा क्र. ३ चा अपवाद वगळता हे माहात्म्यदर्शन भारतीय बौद्ध गुफांमध्ये अद्वितीय आहे.

या विहातील शाक्तोपासनाधरित भृकुटितारा, उग्रतारा आदि गौतम बुद्धाच्या शक्तींची शिल्पे, तसेच स्तंभांवरील हस्तिमालिकाहि वैशिष्ट्यपूर्ण आहे. या गुफेमध्ये दाक्षिणात्य नृत्याधारित एक नृत्यशिल्प असून, नर्तिकेच्या भोवती अनेक स्त्रिया बासरी, मृदंग आदि वाद्ये वाजवीत असल्याचे तेथे दाखविले आहे. अजंटा येथील गुफा क्र. १ मधील राजदरबारातील नृत्यदृश्याच्या तुलनेने ते अधिक नैसर्गिक आणि कलात्मक आहे.

**( ७ ) गुफा क्र. ९**—विशाल प्रवेशमंडपयुक्त ( ८६′×२०′ ) या गुफेच्या ( इ. स. ७ वे शतक ) अंतर्भागातील पाच प्रदक्षिणापथयुक्त दालनांमध्ये गौतम बुद्ध आणि त्याच्या शक्तींच्या प्रचंड मूर्ती आणि दर्शनी

भागी प्रचंड द्वारपाल व उडते गंधर्व कोरले आहेत. या मंदिराच्या छतावरील रंगीत चित्रे आणि नक्षीकाम दगडाच्या सदोषपणामुळे भग्न झाले आहे.

**औरस** ( देश व लोक )— मत्स्यमते मेरु पर्वतोद्भवा सप्तगंगांपैकी पश्चिमवाहिनी सिंधु नदीकाठचा एक देश ( मत्स्य. १२१.४६ ). ईशान्य हिमालयातील ' उरशा ' ( आधु. हजारा ) देशाचे हे नामांतर असावे ( उरशा पहा ). अन्य नामांतर ( म. द्रो. १०.१६ )– ' औरसक '; ' औरसिक '.

**और्दायनी** ( देश )— पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यमते वायव्य भारतातील ' उर्दि ' ( आधु. स्वात खोरे ) देशाचे नामांतर ( उर्दि पहा ).

**और्नोस** ( नगर )—स्ट्रॅबोच्या ग्रंथमते उत्तर अफगाणिस्तानातील बॅक्ट्रिया ( संस्कृत-बाह्लीक; आधु. बल्ख )देशातील एक नगर ( मॅक्रिंडल, अलेक्झांडर. पृ. ३९ ). सिकंदरस्थापित ' अलेक्झांड्रिया अरिओन ' ( आधु. हेरात ) गाव बहुधा हेच असावे ( मॅक्रिंडल, अलेक्झांडर. पृ. ३६-३७; बाह्लीक पहा ).

**और्व-आश्रम** ( आश्रमस्थान )— हिमालय पर्वतातील और्व भार्गव ऋषींचे आश्रमस्थान आणि इक्ष्वाकुवंशीय सगर राजाचे जन्मस्थान ( ब्रह्माण्ड. ३.४७.७१–८७ ). महाभारतात और्व ( ऊर्व; म. अनु. ५६.४; १५३.११ ) ऋषींचा वंशक्रम निम्नप्रकारे दिला आहे:–भृगु→च्यवन→और्व→ ऋचीक→ जमदग्नि→ परशुराम ( म. आ. ६०. ४४–४८). नामांतर–' भार्गवाश्रम ' ( पद्म. उ. २१.१३ ); ' ऊर्व-आश्रम '.

**और्वोपाख्यान**— महाभारतान्तर्गत और्वोपाख्यानमते कार्तवीर्यवंशीय क्षत्रियांच्या आणि भार्गववंशीय ब्राह्मणांच्या पिढीजात शत्रुत्वामुळे भार्गववंशीय ब्राह्मण पश्चिम भारतातून कान्यकुब्ज येथे स्थलांतरित झाले. उत्तरकालात नर्मदेपासून अयोध्येपर्यंतचा प्रदेश कार्तवीर्यवंशीय तालजंघांनी व्यापल्यामुळे भार्गव अयोध्यामार्गे हिमालयात गेले. तेथेहि भार्गवांच्या गर्भस्थ बालकांचा तालजंघांनी संहार आरंभिला. तेव्हा त्यांच्या पारिपत्यासाठी अग्न्यावतार और्व ऋषींचा जन्म झाला ( म. आ. १७८-१८० ).

**सगरजन्म**— तालजंघांनी हद्दपार केलेला भार्गवांचा पक्षपाती इक्ष्वाकुवंशीय बाहु राजा सपरिवार और्वाश्रमी रहाण्यास आला. बाहु राजाच्या मृत्यूनंतर त्याच्या गरोदर पत्नीला येथे सगर नामक पुत्र झाला. और्व ऋषींच्या प्रेरणेने चक्रवर्ती सम्राट सगराने तालजंघ, यवन, शक, हैहय, बर्बर आदींचा पराजय करून त्यांची हर तऱ्हेने विटंबना केली ( भा. ९.८.२–१४ ). अशा तऱ्हेने और्व ऋषींच्या तेजाने तालजंघ नष्ट झाले ( भा. ९.२३.२८ ).

**सगरपुत्रांचा जन्म**— मत्स्यमते और्व ऋषींच्या कृपाप्रसादाने प्रभा आणि भानुमती नामक सगरपत्नींना अनुक्रमे साठ हजार पुत्र आणि असमंजस् नामक वंशकर पुत्र झाला ( मत्स्य. १२.४०; पद्म. आदि. ८.१४४ ).

**औलपि** ( संघ )—पाणिनीच्या गणपाठमते पंजाबातील एक आयुधजीवी संघ ( पा. सू. ५.३.११६ ).

**औवा** ( देवमंदिरस्थान )—राजस्थानमधील हिंदु देवमंदिरस्थान. प्रतिहार स्थापत्यशैलीने ( इ. स. ९ वे शतक ) बांधलेले ' कामतेश्वर ' नामक शिवमंदिर येथे आहे ( गोएट्झ, पृ. १४७ ).

**औशनस** ( तीर्थ )—कुरुक्षेत्रातील सरस्वती नदीकाठचे एक तीर्थ. येथे उशनस् ऋषींना सिद्धी प्राप्त झाली ( मत्स्य. २२.३१; नारद. उत्तर. ६५.१०५; म. आर. ८१.११६; वामन. ३९.१०–११; ४२.२४; म. श. ३८.४ ). पद्म पुराणातील तीर्थावलीतहि याचा निर्देश आढळतो ( पद्म. आदि. २७.२४ ). नामांतर–' कपालमोचन तीर्थ ' ( म. श. ३८.१६–२० ).

**औशनसी** ( तीर्थ )—वाराणसी येथील एक तीर्थ ( पद्म. आदि. ३२.११ ).

**औशीनर** (लोकसमूह)–बृहत्संहितामते उशीनर देशनिवासी एक लोकसमूह ( बृ. सं. ११.५५; उशीनर पहा ).

**औशीर** ( पर्वत )—वायुमते भारतवर्षातील एक पर्वत ( वायु. ७७.२९ ).

**औषध** ( देश )—उदीच्य भारतातील एक देश ( मार्क. ५४.४० ).

२. पश्चिम भारतातील एक देश ( विष्णुधर्म. १.९.७ ).

**औषधसानु** ( क्षेत्र )—एक वामनस्थान. येथील वामनाचे नाव विष्णु होते ( वामन. ९०.८ ).

**औष्ट्रकर्ण** ( देश )—पूर्व भारतातील ' ओष्ट्रकर्ण ' देशाचे नामांतर ( ब्रह्माण्ड. २.१८.५४; ओष्ट्रकर्ण पहा ).

**औष्णीष** ( देश )—भारतवर्षातील एक देश. युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयी येथील लोक उपायन घेऊन उपस्थित होते ( म. स. ४७.१५ ). पाठभेद–' औष्णीक.'

**औसज** (तीर्थ)—दक्षिण भारतान्तर्गत शूर्पारकक्षेत्रातील एक श्राद्धयोग्य तीर्थ ( विष्णुस्मृति. ८५. ५२ टीप ).

**औसस** ( तीर्थ )—कश्मीरातील वितस्ता ( आधु. झेलम ) नदीकाठचे एक तीर्थ ( नीलमत. १५२४ ).

२. सरस्वती नदीकाठचे एक तीर्थ ( म. श. ४५.९२ ).

# क

**कंस** ( वर्ष पर्वत )—शाल्मलि द्वीपातील एक वर्षपर्वत ( कूर्म. पूर्व. ४९.१५ ).

२. ( ग्राम ) पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.३.९३ ).

**कंसवासनिका** ( देवीस्थान )—मथुरेतील एक देवीस्थान ( वराह. १६०.१६ ).

**कंसारिपल्लिका** ( ग्राम )—हरिश्चंद्र भोगशक्ति राजाच्या स. ७०९ च्या अंजनेरी ताम्रपटमते त्याने पुनर्वसित केलेले मध्यप्रदेशातील एक ग्राम. चंद्रपुरी गावापासून ६ मैल ईशान्येकडील आधु. कन्होळी गाव हेच असावे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.१५६ ).

**कंसारीश्वर** ( लिंग )—हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंग ( स्कन्द. नागर. १७४; १७६ ).

**कइलास** ( पर्वत )—जैन साहित्यमते हिमालय पर्वतान्तर्गत ' कैलास ' पर्वताचे नामांतर ( कैलास पहा ).

**ककराज** ( तीर्थ )—अवंतीक्षेत्रातील एक तीर्थ ( नारद. उत्तर. ७८.४२ ).

**ककन्दकुडु** ( विषय )—कलचुरि राजा शंकरगणदेवाच्या इ. स. ८ व्या शतकातील छोटी देवरी शिलालेखमते मध्यप्रदेशातील एक राज्यविभाग ( विषय ). करीकतिन आणि असेकतिन नामक दोन ग्रामे यामध्ये होती. देवरी गावापासून ६ मैल पूर्वेकडील आधु. खुर्दुंडा गाव हेच होय ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.१७७ ).

**कक्करेडी** ( ग्राम )—मध्ययुगीन शिलालेख साहित्यमते मध्यप्रदेशातील ' कक्करेड्डिका ' ग्रामाचे नामांतर ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.३६०; कक्करेड्डिका पहा ).

**ककु** ( नदी )—केतुमाल वर्षातील एक नदी ( वराह. ८३.३ ).

**ककुत्था** ( नदी )—बौद्ध साहित्यमते कोशल ( आधु. नेपाळ तराई ) देशातील बुद्धजीवनाशी संबंधित एक पवित्र नदी. आपल्या निर्वाणपूर्व अंतिम यात्रासमयी पावा गावाहून मल्ल जनपदान्तर्गत कुशीनारा गावी जात असता त्या गावाजवळून वहाणाऱ्या ( उदान. ८.५; दीघ. २.१२९ ) या नदीमध्ये गौतम बुद्धाने स्नान केले होते. ही ओलांडूनच तो कुशीनारा गावी गेला होता ( दीघ. २.१०२ ). या कारणाने बौद्ध धार्मिक साहित्यात या नदीस विशेष महत्त्व दिलेले आढळते. नामांतर ( अरियन )–' ककथिस '.

**नामव्युत्पत्ती**—बौद्ध साहित्यातील ' ककुत्था ' हे ' ककुत्स्था ' या संस्कृत नदीनामाचे पाली रूप असावे. ' ककुत्स्था 'चा शब्दशः अर्थ ' मुखातील तालव्यस्थान ' असा होतो.

**आधुनिक स्थान**—या नदीच्या भौगोलिक स्थानाविषयी अभ्यासकात निम्नलिखित मतांतरे आढळतात :—

**१. गोरखपुर जिल्ह्यातील बर्हि नदी**—कनिंगहॅम यांच्या मते गोरखपुर जिल्ह्यातील कसिया ( प्राचीन कुशीनारा ) गावाच्या ८ मैल दक्षिणेस छोटी गंडक ( प्राचीन हिरण्यवती ) नदीस मिळणारी आधु. बर्हि नदी हीच होय ( कनिंग., पृ. ४३५ ).

**२. गोरखपुर जिल्ह्यातील बधि नदी**—कार्लाइल यांच्या मते गोरखपुर जिल्ह्यातील फजलनगर आणि चेतियौन गांवाजवळून वहाणारी आधु. बधि नदी हीच होय ( आर्कि. सर्व्हे. १८.१०७; २२.४ ).

**३. बिहारमधील बाग्मती नदी**—काही अभ्यासकांच्या मते बिहारमधील बाग्मती ( प्राचीन वाग्मती ) नदी हीच होय. या अनुमानत्रयापैकी कनिंगहॅम यांचे अनुमान यथायोग्य वाटते.

**बौद्ध साहित्यात**—या साहित्यमते चंड कम्मारकडे भोजन केल्यानंतर गौतम बुद्ध या नदीतील थंडगार आणि पवित्र जल प्राशन करून आणि ही नदी ओलांडून कुशीनारा येथे गेला. तेथे अल्पावकाशातच त्याचे परिनिर्वाण झाले.

**अरियनच्या ग्रंथात**—या ग्रंथमते ही नदी अंदोमतिस् ( = मंदभाग्य = आधु. छोटा नागपुर ) प्रदेशातून वहात असे. परंतु भौगोलिक दृष्ट्या हे यथायोग्य वाटत नाही.

**ककुद्** ( वर्ष )—कुशद्वीपातील एक वर्ष. नामांतर–' धृतिमत् ' ( मत्स्य. १२२.६७ ).

**ककुद्मत्** ( पर्वत )—कुशद्वीपातील एक पर्वत. नामांतर–' मंदर ' ( मत्स्य. १२२.६०–६१ ).

२. जंबूद्वीपान्तर्गत कैलास पर्वताच्या पश्चिमेकडील एक पर्वत. येथे रुद्र उत्पन्न झाला ( मत्स्य. १२१. १४–१५ ).

३. ( वर्षपर्वत ) शाल्मलि द्वीपातील एक पर्वत ( कूर्म. पूर्व ४९.१५; ब्रह्माण्ड. १९.४१; लिङ्ग. ५३.६; विष्णु. २.४.२७ ).

**ककुद्मती** ( नदी )—सह्य पर्वतोद्भवा कृष्णावेण्या नदीची एक उपनदी ( पद्म. उत्तर. ११३.२५ ). कराड गावानजिक कृष्णा नदीस मिळणारी आधु. कोयना नदी हीच होय ( तीर्थसार. पृ. ७९ ). 'महाबलेश्वरमाहात्म्य'मते महाबलेश्वर येथे उगम पावणाऱ्या पंचगंगांमध्ये हिचा समावेश होत असे ( जे. बॉं. बी. आर. ए. एस्. १०.१६; महाबलेश्वर पहा ).

**ककुन्दक** ( देश )—भारतवर्षातील एक जनपद ( पद्म. आदि. ६.४८ ).

**ककुभ** ( ग्राम )—गुप्त सम्राट स्कंदगुप्तकालीन स. ४६० च्या कहौम स्तंभलेखमते उत्तर भारतातील एक ग्राम. गोरखपुर जिल्ह्यातील देवरिया तहसिलीतील सलामपुर –मझौली गावापासून ५ मैल पश्चिमेकडील आधु. कहौम ( कहावम; अक्षांश २६°–१६′ उत्तर, रेखांश ८३°–५५′ पूर्व ) गाव हेच होय.

**स्तंभ**—कहौम गावाच्या उत्तरेस मद्र नामक जैन उपासकाने उभारलेला स्कंदगुप्तकालीन चौकोनी स्तंभ असून त्याच्या खालच्या भागात एक, आणि वरच्या भागात चार 'आदिकर्तृ' ( तीर्थंकरांच्या ) नग्न प्रतिमा आढळतात. डॉ. भगवानलाल इंद्रजी यांच्या मते आदिनाथ, शांतिनाथ, नेमिनाथ, पार्श्वनाथ आणि महावीर या पाच जैन तीर्थंकरांच्या प्रतिमा येथे कोरल्या आहेत. स्तंभाच्या वर्तुलाकृती शिरोभागी लोखंडी कळस बसविला आहे. स्तंभाच्या उत्तरेकडील दर्शनी भागी मद्र नामक उपासकाचा देणगीलेख ( २$\frac{1}{2}$′×१$\frac{1}{2}$′ ) आढळतो ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३. २.६६ ).

**२.** ( पर्वत ) भारतवर्षातील एक पर्वत ( भा. ५.१९. १६ ).

**३.** ( वन ) जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वतावरील एक वन ( लिङ्ग. ४९.५६ ).

**ककुरञ्जन** ( देश )–जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक देश ( वराह. ८३.२ ).

**ककोबइ** ( लोकसमूह )—टॉलेमीच्या मते दोबस्स पर्वताच्या पूर्वेकडील सिनै देशानजिकच्या खोकस प्रदेशातील एक लोकसमूह. याचे आधुनिक स्थान समजत नाही.

**ककोलत** ( जलप्रपात )—बिहार प्रांतातील राजगृहानजिकचा एक पवित्र जलप्रपात. हा नवादा उपविभागातील अकबरपुरपासून ६ मैलांवर आहे ( ती. पृ. ७० ).

**कक्करेड्डिका** ( ग्राम )—कलचुरि राजा जयसिंहाच्या स. ११७५ च्या रेवा ताम्रपटमते मध्यप्रदेशातील एक ग्राम. विंध्य प्रदेशातील आधु. कक्रेरी ( अक्षांश–२४°–५५′ उत्तर; रेखांश–८१°.१२′ पूर्व ) गाव हेच होय ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.३४१ ). नामांतर ( कलचुरि राजा विजयसिंहाचा स. ११९३ चा रेवा शिलालेख ) –'कर्करेड्डी;' 'ककरेडी' ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.३४८; ३६० ).

**कक्रक** ( बौद्ध गुफा )—गंधार ( आधु. अफगाणिस्तान ) मधील गंधार स्थापत्यशैलीचे बौद्ध गुफास्थान. 'फायलाईट' जातीच्या ठिसूळ दगडामध्ये खोदल्याने येथील गुफा आज उद्ध्वस्त झाल्या आहेत ( गोएटझ, पृ. ७१ ).

**कक्ष** ( देश )—भारतवर्षातील एक जनपद ( पद्म. आदि. ६.४४ ). पाठभेद–'काक्ष.'

**२.** ( राज्यविभाग ) नारायणपाल राजाच्या भागलपुर ताम्रपटमते बिहारमधील तीरभुक्ति ( आधु. मुजफ्फरपुर आणि दरभंगा जिल्हे ) देशातील एक राज्यविभाग ( विषय ). याचे आधुनिक स्थान समजत नाही ( पांडे, बिहार. पृ. ११४; इंडि. अँटि. १५.३०९; तीरभुक्ति पहा. )

**कक्षसेन–आश्रम** ( आश्रमस्थान )—महाभारत धौम्ययात्रामते असित पर्वतावरील कक्षसेन ऋषींचे आश्रमस्थान ( म. आर. ८७.१० ).

**कगन स्तूप** ( बौद्धस्थान )—ह्युएन्त्संगच्या जीवनचरित्रमते चीन–भारत हमरस्त्यावरील एक नगर आणि चीनच्या पश्चिम सरहद्दीनजिकच्या तुर्फान गावाच्या उत्तरेकडील एक बौद्धस्थान. गुचेन् गावानजिकचे आधु. बिश्बलिक ( चिनी–'पैननिंग' ) गाव हेच होय.

चीनमधील असतु ( इ–गु ) गावाहून निघालेला ह्युएन्त्संग याच गावावरून भारताकडे येणार होता. परंतु तुर्फान देशाच्या राजाच्या आज्ञेवरून त्याने आपला मार्ग बदलला ( वॉटर्स, २.३३१ ).

**कङ्क** ( लोकसमूह )—बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या मध्यदेशातील एक लोकसमूह ( बृ. सं. १४.४ ). भटक्या जमातीसाठी सुविख्यात असणाऱ्या पूर्व तिबेटातील आधु. तिबेट पठारात हे रहात असावेत ( इंडि. अँटि. ४.२३१ ). बृहत्संहितामते उत्तरकालात हे लोक गंगा नदीच्या खोऱ्यात स्थलांतरित झाले ( आय. एच्. क्यू. २.७५९ )

नामांतरे—प्राचीन साहित्यात या लोकसमूहाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतरे |
|---|---|
| १. पराशरतंत्र | कांचन |
| २. वामन पुराण ( वामन. १३. ३६ ) | कौरभ |
| ३. ह्युएन्त्संग ( वॉटर्स. १. ३२९–३३० ) | सुवर्णगोत्र ( पूर्व स्त्रीराज्य ) |
| ४. बृहत्संहिता | सुवर्णभू |
| ५. महाभारत ( शां. ६५.१३ ) | कङ्क |

नामव्युत्पत्ती—ह्युएन्त्संगच्या मते 'श्रेष्ठ प्रतीच्या सुवर्णाचा देश' अशा अर्थाने यास 'सुवर्णगोत्र' वैकल्पिक नाव प्राप्त झाले. वॉटर्स यांच्या मते 'सुवर्णगोत्रीय राजांचा देश' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले.

**महाभारतात**—या ग्रंथमते या केसाळ शिरस्त्राणधारी पर्वताश्रयी लोकांनी शक, तुषार आदि लोकांसमवेत युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञात 'पैपीलिक सुवर्ण' ( मुंग्यांनी गोळा केलेले सुवर्ण ) उपायन दिले होते ( म. स. ४७. २६; ४८.४ ). या निर्देशावरून हे तिबेटचे रहिवासी असावेत.

**पौराणिक साहित्यात**—बृहत्संहितेत निर्देशिलेला ईशान्य भारतातील सुवर्णभू देश हाच असून ( इंडि. अँटि. २२. १९० ), विष्णुमते हे लोक स्त्रीराज्याचे अधियंते होते.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते ब्रह्मपुरच्या ( आधु. गढवाल ) उत्तरेकडील या पर्वताश्रयी देशाच्या भौगोलिक परिसीमा पुढीलप्रमाणे होत्या :— १. **पूर्वेस**–फान राज्य ( तिबेट ); २. **उत्तरेस**–खोतान; ३. **पश्चिमेस**–मलस देश ( सन्–पो–हो ); ४. **दक्षिणेस**–ब्रह्मपुर देश.

ह्युएन्त्संगच्या मते चिनी साहित्यात निर्देशिलेल्या स्त्रीराज्यद्वयापैकी पूर्वेकडील स्त्रीराज्य म्हणजे हा देश असून, मार्को पोलोच्या मते या देशाच्या पश्चिमेस अन्य एक स्त्रीराज्य होते ( यूल, मार्को पोलो. २.३९७ ).

**भौगोलिक वर्णन**—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते या पूर्व-पश्चिम विस्तृत, आणि उत्तर-दक्षिण निमुळत्या देशाची सारी सत्ता राणीच्या आणि अन्य स्त्रीजनांच्या ताब्यात असून, येथील राजा नाममात्र होता. येथील शेतीकाम आणि राज्यरक्षण ही दोनच कामे येथील पुरुष करीत असत ( वॉटर्स, १.३२९–३३०; बील, २.२२७ ).

२. ( पर्वत ) वायुमते जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक पर्वत. हा मेरु पर्वतोद्भवा चतुर्गंगांपैकी चक्षु ( आधु. अमूदरिया ) नदीच्या पश्चिमेस असून, ती नदी या, तसेच सुपक्ष आणि शिखि ( आधु. अलिम्–तौ ) पर्वतांना क्रमाने ओलांडत असे ( वायु. ४२.४९–५० ). मुजफ्फर अली यांच्या मते मध्य आशियातील आधु. दर्वाझ पर्वत हाच असून, त्याच्या दक्षिण उतारावर ताजिकिस्तान देशातील कलै–खंबा गावानजिक सोन्याच्या खाणी आहेत ( अली, पुराणाज्. पृ. ९१ ). पाठभेद–'काल' ( वायु. ३७.२७ ).

३. कुशद्वीपातील एक पर्वत. नामांतर–'कुशेशय' ( मत्स्य १२१.५७–५८ ).

४. शाल्मलि द्वीपातील एक वर्षपर्वत ( ब्रह्माण्ड. १९. ३९; लिङ्ग. ५३.६; वायु. ४९.३६; विष्णु २.४.२७ ).

**कङ्कजोल** ( देश )—मध्ययुगीन साहित्यमते पूर्व भारतातील 'कजंगल' देशाचे नामांतर ( कजंगल पहा ).

**कङ्कट** ( देश )—कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या दक्षिण भागातील एक देश ( बृ. सं. १४.१२ ).

४. ( ग्राम ) पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.७ ).

**कङ्कण** ( देश )—कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या दक्षिण भागातील एक देश ( बृ. सं. १४.१२ ).

**कङ्कणपुर** ( नगर )—कश्मीरराज अभिमन्यु ( कंकणवर्ष ) च्या दिद्दा नामक पत्नीने स्वपतीच्या स्मृत्यर्थ स्थापिलेले कश्मीरातील एक नगर ( राज. ६.१६१;३०१ ). चीरमोचन तीर्थाच्या ३ मैल उत्तरेकडील आणि सिंद नदीच्या उजव्या किनाऱ्यावरील आधु. कंगन ग्राम ( अक्षांश ३४°-१६′ उत्तर; रेखांश ७४–°२७′ पूर्व ) हेच होय ( स्टाइन, राज. २.४९० ).

**कङ्कमारुत** ( देश )—कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या मध्यभागातील एक देश ( मार्कं. ५५.८ ).

**कङ्काद्रि** (लिंग)—अरुणाचलक्षेत्रातील एक शिवलिंग. नामांतर–'कंकेश्वर' ( स्कन्द. अरुणाचल. २.२ ).

**कङ्काल भैरव** ( भैरवस्थान )—काशी येथील एक भैरवस्थान ( स्कन्द. काशी. ६१.१९६ ).

२. ( क्षेत्र ) प्रभासक्षेत्रातील एक भैरवस्थान ( स्कन्द. प्रभास. प्र. १३७ ).

**कङ्काली टीला** ( शिलालेखस्थान )—महाक्षत्रप शुडासच्या स. १५ च्या शक राज्यकालीन ब्राह्मी शिलालेखाचे मथुरा नगराच्या परिसरातील उपलब्धिस्थान

( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.१.३४; मथुरा पहा ).

**कङ्केश** ( लिंग )—काशी येथील ज्येष्ठेश्वरानजिकचे एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ६५.१७ ).

**कङ्केश्वर** ( शिवलिंग )—स्कंदमते अरुणाचलक्षेत्रातील ' कंकाद्रि ' शिवलिंगाचे नामांतर ( स्कन्द. अरुणाचल. २. २; कंकाद्रि पहा ).

**कङ्गवत** ( पर्वत )—मेरु पर्वताच्या पूर्व भागातील एक पर्वत ( मार्क. ५२.४ ).

**कङ्ग्रिन् पोचे** ( पर्वत )–तिबेटी साहित्यमते हिमालय पर्वतान्तर्गत ' कैलास ' पर्वताचे नामांतर ( कैलास पहा ).

**कचनेर** ( जैन तीर्थ )—हर्षे आणि चिमणा पंडितमते महाराष्ट्रातील एक पार्श्वनाथमंदिरस्थान. औरंगाबादपासून २० मैलांवरील आधु. कचनेर गाव हेच होय. नामांतर ' कसनेर ' ( ती. सं. पृ. १२६ ).

**कचावलि** ( ग्राम )—चालुक्य राजा कर्ण ( प्रथम ) च्या शिलालेखमते लाट देशातील नागसारिका विषयातील तलभद्रिका ३६ पथकातील एक ग्राम. दक्षिण गुजरातेतील नवसारी प्रदेशातील आधु. कचोळी गाव हेच होय ( जे. बी. बी. आर. ए. एस्. २६.२५० ).

**कचेश** ( लिंग ) काशी येथील एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ९७.२२८; लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. ११२ ).

**कच्ची** ( नगर ) तामीळ साहित्यमते दक्षिण भारतातील 'कांची' नगराचे नामांतर. अन्य नामांतर–' कंचीपुर ' ( वॉटर्स. २.२२६; कांची पहा ).

**कच्छ** ( देश )— पाणिनीची अष्टाध्यायी आणि पौराणिक साहित्यमते पश्चिम भारतातील सिंधु देशाच्या दक्षिणेकडील पश्चिम समुद्रकिनारीच्या पाणथळ प्रदेशातील एक देश ( पा. सू. ४.२.१३३ ). नर्मदा, साबरमती आणि मही नद्यांच्या त्रिभुज प्रदेशाने बनलेल्या या देशात भारताच्या पश्चिम समुद्रकिनारीचा कच्छच्या रणापासून भडोचपर्यंतचा प्रदेश समाविष्ट होत असे. प्लिनीने निर्देशिलेले ' औदुंबरीय ' ( औदुंबर ) लोक याच देशात रहात असत ( औदुंबर पहा ).

**देशवैशिष्ट्य**—भारताच्या पश्चिम समुद्रकिनाऱ्याचे नाके म्हणून हा देश प्राचीन काळापासून सुविख्यात असून, अरबांची बहुताशी सारी आक्रमणे याच देशमार्गे भारतावर झाली. याच आक्रमणाच्या भयाने कलशविरहित देवालये बांधण्याची पद्धती येथे रूढ झाली. भुसभुशीत वालुकाऱ्यात प्रदेशामुळे कायम वस्तीची शहरे येथे फारच थोडी असून, याच्या पुरातन राजधानीचा ठावठिकाणा समजत नाही. याचे भुज हे राजधानीचे गाव अगदी अलिकडचे आहे. माणसाच्या थाऱ्याला न उभे रहाणारे रानटी गाढव या प्रांतातच आढळते. हिवाळ्यात युरोपातील नानाविध पक्षी येथे आश्रयास येतात. या देशातील कच्छी व्यापारी साऱ्या आग्नेय अशियात वणिक् कौशल्यासाठी सुविख्यात आहेत.

**भौगोलिक परिसीमा**— या देशाच्या भौगोलिक परिसीमा पुढीलप्रमाणे होतः— **१. उत्तरेस**– कच्छचे मोठे रण आणि सिंध प्रांत; **२. दक्षिणेस**– कच्छचे आखात; **३. पूर्वेस**– कच्छचे छोटे रण आणि गुजरातमधील पालनपुर मेहेसाणा प्रदेश; **४. पश्चिमेस**– अरबी समुद्र.

**नामांतरे**–प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. महाभारत ( आर. १५. २३ ) | सागरावर्त प्रदेश, सागरद्वीप |
| २. पौराणिक साहित्य | |
| अ. वायु पुराण (४५.१२९) | कच्छीय, कच्छीक |
| आ. मत्स्य पुराण ( ११४.५० ) | |
| इ. ब्रह्माण्ड पुराण (१६.६२) | कच्छिप |
| ई. स्कंद पुराण ( माहेश्वर. कौ. ३९.१४५ ) | कच्छमंडल |
| उ. भविष्य पुराण ( प्रति. ४.३.२५–३१ ) | श्रीपति देश, भुज देश |
| ३. बृहत्संहिता ( १४.११ ) | भरुकच्छ |
| ४. काव्यमीमांसा (१७.२२७) | कच्छवीय |
| ५. पाणिनीची अष्टाध्यायी ( पा. सू. ४.२.१३४ ) | कच्छक |
| ६. प्लिनी | सिगेर्दिस् (औदुंबरीय लोक) |
| ७. शक्तिसंगमतंत्र (३.७.५१) | संऊण देश |
| ८. ह्युएन्त्संग ( वॉटर्स, २.२४५ ) | की–च |
| ९. वि. सं. १०८६ चा शिलालेख (इंडि. अँटि. ६.१९३ ) | कच्छमंडल |
| १०. मध्ययुगीन शिलालेख साहित्य | |
| ११. मुसलमानी साहित्य | कस्स |

**नामव्युत्पत्ती**—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते 'कच्छ' (= काष्ठ = वन) चा शब्दशः अर्थ 'समुद्रकिनारीचा सखल, पाणथळ आणि वालुकामय प्रदेश' होतो. 'अपरांत' 'अनूप' आणि 'कच्छ' या तीनहि संज्ञा 'सागरवर्ती द्वीप' वाचक असल्या, तरी त्या प्रत्येकीचा भौगोलिक अर्थ वेगळा आहे (पाणिनिनिर्दिष्ट अन्य 'कच्छान्त' देशनामे— दारुकच्छ = आधु. काठेवाड; पिप्पलीकच्छ = आधु. रजपिप्ला; भृगुकच्छ = आधु. भडोच; पा. सू. ४.२.१२६). महाभारतात गंगा आणि समुद्र यांच्या दरम्यानच्या 'गोपालकच्छ'चा निर्देश आढळतो (म. स. २७.३). पंजाबी भाषेतील 'नदीचे वाळवंट' अर्थाची 'कछार' (खादर) संज्ञा 'कच्छ' चेच अपभ्रष्ट रूप आहे (जयचंद्र, पृ. १२१).

**समुद्रद्वीप**—पाणिनीच्या अष्टाध्यायीत यास 'अनुसमुद्रद्वीप' (सागरानजिकचे द्वीप; पा. सू. ४.२.१३३; ३.१०), आणि महाभारत आणि स्ट्रॅबोच्या ग्रंथात यास 'सागरद्वीप' आणि 'सिगेर्डिस' म्हटले आहे. हेमंचंद्राच्या अभिधानचिंतामणीमते हे 'अनुपोम्बुमत्' (पाण्यानजिकचा भूप्रदेश) होते (अभिधान. पृ. ३८०). पेरिप्लसमतेहि कच्छ आणि दारुकच्छ हे संपूर्णतः सागरवेष्टित देश होते (पेरिप्लस. पृ. १७५). टॉलेमी आणि पेरिप्लसच्या मते कंठी आणि बराकेचे आखात (कच्छच्या दक्षिणेकडील आणि काठेवाडच्या उत्तरेकडील आधु. कच्छचे आखात) नौकानयनास अत्यंत धोक्याचे होते. स्ट्रॅबोक्त सिकंदरस्वारीच्या वर्णनातील सिंधु नदीच्या दोन मुखांपैकी एक मुख या आखाताच्या परिसरात असावे.

**भौगोलिक पार्श्वभूमी**—आधु. कच्छ देशाचा बहुतांशी प्रदेश कच्छच्या मोठ्या (भुजप्रदेश), आणि छोट्या (कांडला बंदराच्या आग्नेयेकडील प्रदेश) रणाने (तत वाळवंट) व्यापला असून, पाणिनीच्या अष्टाध्यायीत त्यास अनुक्रमे 'विभुजाग्नि' आणि 'कांडाग्नि' म्हटले आहे (पा. सू. ४.२.१२६). या दोन्ही संज्ञांच्या 'अग्नि' अंत्यशब्दावरून तत वाळवंटाचा निर्देश तेथे अभिप्रेत दिसतो.

काही अभ्यासकांच्या मते महाभारतकाली सिंधु, विपाशा आणि सरस्वती नद्या कच्छ देशामधून पश्चिम समुद्रास मिळत असत. उत्तरकालात या नद्यांचे प्रवाह स्थलांतरित झाल्यामुळे सुजल-सुफल कच्छ देशाचे रेताड रणामध्ये रूपांतर झाले. या तीन नद्यांच्या बदलत्या प्रवाहांची रूपरेषा खाली दिली आहे :—

(१) **सिंधु नदी**—सिकंदर आणि स्ट्रॅबो यांच्या काली सिंधु नदीच्या दोन मुखांपैकी कच्छच्या रणातील कच्छ आखातगामी सुकी नदी (आधु. कोरी खाडी) प्रमुख होती. तिच्याच पाण्यावर कच्छच्या मोठ्या रणाच्या पश्चिम भागात मोठी शेती होत असे. या भागातील नारायण सरोवराकाठी मुक्काम करून सुकी नदीच्या मार्गाने सिकंदर इराकमार्गे स्वदेशी गेला होता. कालांतराने सिंधु नदीच्या प्रवाहातील फेरबदलामुळे या प्रदेशातील सुकी नदी खऱ्या अर्थाने शुष्क बनली. टॉलेमी आणि पेरिप्लसच्या ग्रंथातील सिंधु नदीच्या सात (सध्याच्या अकरा) मुखांपैकी एकहि मुख आज कच्छमध्ये नसून, सारी सिंधमध्ये आहेत.

(२) **विपाशा नदी**—पंजाबातील सतलज, रावी आदि नद्यांचे जल वाहून आणणारी इतिहासकालीन विपाशा नदी थर पार्कर प्रदेशातील मिरपुर खास गावावरून वहात येत कच्छच्या रणामध्ये उतरत असे. त्याकाळी हैद्राबादच्या १७ मैल उत्तरेस द्विभाजित होणाऱ्या सिंधु नदीचा पूर्वेकडील फाटा मिरपुर खास गावाच्या १२ मैल दक्षिणेस विपाशा नदीस मिळून, त्यांचे संयुक्त पाणी कच्छच्या रणास मिळत असे. या पाण्यामुळे कच्छ रणाच्या पूर्व भागात शेती होत असून, विजनावासी हुमायूनला आसरा देणाऱ्या उमरकोटच्या राजाचे राज्य येथेच होते. अकबर बादशहाचा जन्महि उमरकोट गावीच झाला होता.

उत्तरकालात भूकंपामुळे विपाशा नदीचा खालचा प्रवाह सुकून गेल्यामुळे, तसेच सतलज आदि नद्या सिंधु नदीशी सम्मीलित झाल्यामुळे, कच्छच्या रणाच्या पूर्व भागाची सुबत्ता नाहीशी झाली. विपाशा नदीच्या या शुष्क पात्राजवळून (आधु. ईस्टर्न नारा कॅनॉल) तत्कालीन सिंधु नदी वहात असल्याने (मिठणकोट गावानजिकचे दोन नद्यांमधील अंतर–१५ मैल, सक्कर–रोहरी गावानजिक–८ मैल) तिच्या वर्षाकालीन पुराचे काही पाणी या शुष्क पात्रातून प्रारंभी वहात असे. या प्रदेशाची मुसलमान पूर्वकालीन राजधानीहि सिंधु-विपाशा दुआबातील रोहरीनजिकच्याच अरोर गावी होती. या प्रदेशातील सिंधु नदी सिंधमध्ये स्थलांतरित झाल्यानंतर कच्छचे रण संपूर्णतः शुष्क झाले.

(३) **सरस्वती नदी**—विपाशा नदीच्या पूर्वेकडील ही दक्षिणवाहिनी नदी प्राचीन काळी कच्छच्या रणाच्या दक्षिणेकडील उत्तर गुजरातमधील बनासकांठा जिल्ह्यातील सांतलपुर महालातून वहात जाऊन गुजरात आणि सौराष्ट्रच्या सीमेवरील नलकांठा (आधु. नल सरोवर) प्रदेशात उतरत असे. प्राचीन लोथल बंदर याच नदीकाठी होते.

**मध्ययुगीन काली**—कच्छचे मुमरा लोक आणि कच्छचा राजा लाखा फुलाणी यांच्या युद्धसमयी ( इ. स. ११ वे शतक ) कच्छाधिपतीने कच्छ रणातील विपाशा नदीच्या शुष्क पात्राच्या प्रदेशात पिकविलेल्या गव्हाने स्वसैन्याची बेगमी केली होती. हैद्राबाद, सिंध, आणि कच्छच्या युद्धसमयी ( वि. सं. १८१५ ) सिंधच्या गुलामशहा क्लोरा सुलतानाने ईस्टर्न नारा कालवा बंद करुन, तसेच त्यामधील पाणी मरिवाह कालव्याच्या साह्याने सिंधमधील फुलेली कालव्यामध्ये खेचून कच्छचे पाणी बंद केले. त्यामुळे कच्छमधील हजारो एकर कृषिसंपन्न जमीन वैराण बनून, कच्छच्या क्षारयुक्त मोठ्या रणाचा विस्तार अधिकच वाढला. आज हा साराच प्रदेश वैराण आणि निर्मनुष्य बनला असून, १९६७ च्या भारत-पाक युद्धात पाकिस्तानने हक्क सांगितलेला कंजारकोट दुर्ग याच भागात आहे. १८ व्या शतकात बंद झालेले ईस्टर्न नारा कालव्याचे पाणी पुन्हा सुरू करून, कच्छचे रण पुन्हा सुफलित बनविणे, हे पाक आक्रमणाचे प्रमुख उद्दिष्ट होते.

**उत्तर सीमा**—प्राचीन काळी सिंधु आणि विपाशा नद्यांच्या संयुक्त प्रवाहाने बनलेली कच्छची उत्तर सीमा हा प्रवाह बंद झाल्यानंतर विजन आणि ओसाड अशा कच्छ रणाने सध्या बनली आहे. भारत-पाक फाळणीनुसार विरमगावनजिकच्या खारागोडा गावाहून कच्छ रणाच्या पूर्व आणि ईशान्य सरहद्दीवरून सिंधकडे जाणारा रस्ता, तसेच कच्छच्या रणाचा वालुकामय आणि डोंगराळ भाग पाकिस्तानमध्ये गेला आहे. याचे उलट या रणाचा क्षारयुक्त आणि दलदलीचा दळणवळणपथरहित भाग भारताकडे आला आहे. त्यामुळे या सरहद्दीवर गस्त घालणे दुरापास्त झाले आहे.

**पाणिनीच्या अष्टाध्यायीत**— या ग्रंथमते कच्छ देशातील ( पा. सू. ४.२.१३३ ) लोक 'काच्छक' नावाने सुविख्यात होते ( पा. सू. ४.२.१३४ ). काशिकामते येथील लोकांची शेंडी ( काच्छिका चूडा ), तसेच येथील धेनू ( काच्छः. गौः ) वैशिष्ट्यपूर्ण असत. आजहि या देशाची ही वैशिष्ट्ये कायम आहेत.

**महाभारतात**— या ग्रंथात एक जनपद म्हणून ( म. भी. १०.५५ ), तसेच सागरावर्त देश ( म. आर. १५. २३ ) म्हणून याचा निर्देश आढळतो. सौभनगर, शाल्वनगर, मार्तिकावतक आदि नगरे या देशात होती. युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या दक्षिण दिग्विजयात सहदेवाने हा देश ( भरुकच्छ; रुद्रकच्छ; कच्छ ) जिंकला होता ( म. स. २८.५० ). अन्य अभ्यासकांच्या मते येथे केरळ प्रांतातील अन्य कच्छ देशाचा निर्देश अभिप्रेत आहे ( कच्छ २. पहा ).

**पौराणिक साहित्यात**— या साहित्यमते या देशातील लोक 'कच्छीय' ( वायु. ४५.१२९; ब्रह्माण्ड. ४९.६३ ) अथवा 'कच्छीक' ( मत्स्य. ११४.५० ) नावांनी सुविख्यात असून, स्कंदमते 'कच्छमंडल' देशात १४४० गावे होती ( स्कन्द. माहेश्वर. कौ. ३९.१४५ ). आधु. कच्छ प्रांतातील ग्रामसंख्येशी ही संख्या जुळते. त्यावरुन स्कंद पुराणकारांना या प्रांताची सूक्ष्म माहिती असावी. बृहत्संहितेत दक्षिण भारतातील कच्छ देशाचा निर्देश असून ( बृ. सं. १४.१६ ), फ्लीट यांच्या मते येथे पश्चिम भारतातील या देशाचाच निर्देश अभिप्रेत आहे.

**भविष्य पुराणात**— या ग्रंथात सिंधुवंशीय कच्छ लोकांच्या उत्पत्तीची निम्नलिखित आख्यायिका दिली आहे :– सिंधु नदीकाठच्या सिंधु देशाच्या सिंधुवर्मन् राजाच्या श्रीपति नामक पौत्राने कच्छ देशातील पुलिंद आणि यवन लोकांना जिंकून तेथे नव्या श्रीपति देशाची स्थापना केली. श्रीपतिपुत्र भुजवर्मनने कच्छच्याच एका भागातील शबर, भिल्ल आदि लोकांना जिंकून भुज देश स्थापिला ( भवि. प्रति. ४.३.२५–३१ ). यावरून पौराणिक काळी कच्छची उत्तर सरहद्द सिंधपर्यंत पसरली असून, आधु. भुज नगराचा प्रदेश त्यामध्ये समाविष्ट असावा.

**शक्तिपीठ**— शक्तिसंगमतंत्रमते 'कच्छ' ( सेऊण ) संज्ञक शक्तिपीठस्थान गणेश्वराच्या पूर्वेस आणि समुद्राच्या उत्तरेस होते ( शक्तिसङ्गम. ३.७.५१ ). मध्ययुगीन यादवांचे 'सेऊण' साम्राज्य नाशिक, खानदेश आणि दौलताबाद प्रदेशात पसरले असून, कच्छचा प्रदेश त्यामध्येच समाविष्ट असावा. अन्य अभ्यासकांच्या मते येथे पूर्व भारतान्तर्गत स्वतंत्र कच्छ देशाचा निर्देश अभिप्रेत असावा ( कच्छ. ३ पहा ).

आधु. कच्छमधील अघोरा नदीच्या रामबाग दरीतील गुफांमध्ये काली आणि हिंगुला देवींची मंदिरे असून, स्थानिक समजुतीनुसार तेथे राम आणि सीता काही काळ राहिले होते. अरियनच्या ग्रंथांतहि या दरीचा निर्देश आढळतो.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**— या ग्रंथमते मालव ( आधु. खेडा आणि अहमदाबाद जिल्हे ) देशाच्या ६० मैल वायव्येस हा देश होता. येथील वायव्य दिशेचा निर्देश चुकीचा असून, मालव देशाच्या नैर्ऋत्येस कच्छ देश आहे.

ह्युएन्त्संगच्या मते मालव देशाच्या मांडलिक असणाऱ्या या देशाचे आणि त्याच्या राजधानीचे क्षेत्रफळ ६०० मैल आणि ४ मैल असून येथील हवामान आणि पीकपाणी मालव देशासदृशच होते. येथे अनेक हिंदु मंदिरे, दहापेक्षा अधिक बौद्ध मठ आणि १००० बौद्ध भिक्षू होते. येथून २०० मैल उत्तरेस गेल्या नंतर ह्युएनत्संग वलभी ( आधु. मध्य आणि दक्षिण गुजरात ) देशास पोहोचला ( वॉटर्स, २.२४५ ).

**जैन साहित्यात**—मध्ययुगीन जैन साहित्य ( इ. स. १२ वे शतक ) मते हा देश सोरथ ( आधु. सुरत ) देशापासून ३२ कोसांवर होता ( इंडि. अँटि. ४.७४ ).

**शिलालेख साहित्यात**—चालुक्य राजा भीम ( प्रथम ) च्या वि. सं. १०८६ च्या, तसेच भीम ( द्वितीय ) च्या वि. सं. १२५६ च्या शिलालेखात 'कच्छमंडल' देशाचा निर्देश असून ( इंडि. अँटि. ६. १९३–१९४; १८.१०९ –११० ), त्यापैकी भीम ( प्रथम ) च्या शिलालेखात यामधील घदहडिका १२ ( आधु. घधद ) राज्यविभागाचा, तसेच मसूर ग्रामाचा निर्देश आढळतो.

**ग्रामें**—या देशातील निम्नलिखित ग्रामांचा निर्देश शिलालेख साहित्यात आढळतो :—१. **धरवद्रिका** ( आधु. धरेद; भीम प्रथम राजाचा वि. सं. १०८६ चा शिलालेख; इंडि. अँटि. ६.१९३ ); २. **नवनीसक स्थान** ( भीम प्रथम राजाचा वि. सं. १०८६ चा शिलालेख; इंडि. अँटि. ६. १९३ ); ३. **प्रसन्नपुर** ( भीम द्वितीय राजाचा सिंह संवत् ९३ चा शिलालेख; इंडि. अँटि. १८.१०९ ); ४ **प्रज्ञरिका** ग्राम ( भुज प्रदेशातील आधु. प्रग्सर; भीम प्रथम राजाचा वि. सं. १०८६ चा शिलालेख; इंडि. अँटि. ६.१९३ ); ५. **सहसचाणग्राम** ( भीम द्वितीय राजाचा सिंह संवत् ९३ चा शिलालेख; इंडि. अँटि. १८.१०९ ); ६. **वेकरिया** ग्राम ( मांडवी प्रदेशातील आधु. वेरा; भीम द्वितीय राजाचा सिंह संवत् ९३ चा शिलालेख; इंडि. अँटि. १८. १०९ ); ७. **ऐकयिका ग्राम** ( आधु. एकलियु, भीम प्रथम राजाचा वि. सं. १०८६ चा शिलालेख; इंडि. अँटि. ६.१९३ ).

**मध्ययुगीन साहित्यात**—मध्ययुगीन शब्दकोश आणि मुसलमानी साहित्यात 'कच्छमंडल' ( अनेकार्थ. ७.६३ ) आणि 'कस्स' नावाने याचा निर्देश असून, अकबराच्या राज्यकाली हा सिंधचा भाग मानला जात असे.

**राजधानी**—स्थानिक समजुतीनुसार, भुजजवळील कोटीश्वर ( कच्छेश्वर ) गावी या देशाची राजधानी होती. ( कोटीश्वर पहा ).

२. ( देश ) मार्कंडेयमते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या दक्षिण भागातील ताम्रपर्णी नदीकाठचा एक देश ( मार्क. ५५. २८ ). पार्गिटर यांच्या मते केरळ प्रांतातील आधु. कोचीन ( कोच्छी ) प्रदेश आणि नगर हेच होय. जयचंद्र यांच्या मते या देशाचे आधु. 'कोचि' नाव 'कच्छ' चेच अपभ्रष्ट रूप असून, पोर्तुगीजांच्या सानुनासिक उच्चारण-पद्धतीमुळे त्याचे 'कोचिम्' ( कोचीन ) रूप प्रचारात आले ( जयचंद्र, पृ. ४३१ ).

**महाभारतात**—युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या दक्षिण दिग्विजयात सहदेवाने 'भरुकच्छ' ( रुद्रकच्छ ) देश जिंकला होता. येथूनच लंकेच्या पौलस्त्य राजाकडे दूत पाठवून त्याने करभार वसूल केला होता ( म. स. २८.५० ).

**बृहत्संहितेत**—या ग्रंथात दक्षिण भारतातील एक देश म्हणून कच्छचा निर्देश असला ( बृ. सं. १४.१६ ), तरी फ्लीट यांच्या मते येथे पश्चिम भारतातील कच्छचाच निर्देश अभिप्रेत आहे.

**पाश्चात्य वसाहतीकरण**—पार्गिटर यांच्या मते इ. स. १ ल्या शतकात येथे सर्वप्रथम आलेल्या खिस्ती आणि ज्यू लोकांनी इ. स. ८ व्या शतकात आपली पहिली वसाहत येथे स्थापिली ( पार्गि., मार्क. पृ. ३६७ ). इ. स. १५०२ मध्ये पोर्तुगीज वसाहतकारांना येथील राजाने सर्वतोपरी साह्य करून त्यांना येथे दुर्गसदृश बंदिस्त वखारी स्थापिण्यास परवानगी दिली ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. २३४ ). या पोर्तुगीज वसाहतीमुळेच स. १६०० पर्यंत कालिकतच्या सामुरि ( झामोरिन ) राजाशी या देशाचे अखंडपणे युद्ध जुंपले. अखेरीस स. १६६२ मध्ये डचांनी येथील किल्ला पोर्तुगीजांपासून जिंकला ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. २८३ ). स. १६६३ च्या पालैयम् ताम्रपटमते कोचिनच्या राजाने हा किल्ला आणि त्यानजिकची बेटे डचांना स्वरक्षणार्थ बक्षीस दिली ( रंगाचारी. ३. कोचीन. १ ).

**नगर**—या देशाच्या कोचीन या राजधानीच्या गावाच्या मट्टनचेरि राजवाड्यात ( इ. स. १८ वे शतक ) उत्तरकालीन चोल शैलीची अनेक भित्तिचित्रे असून, त्यामधील व्यक्तिप्रतिमा प्रमाणाबाहेर स्थूल आणि नाटकी वळणाच्या आहेत.

३. शक्तिसंगमतंत्रमते भारतवर्षातील गणेश्वरच्या पूर्वे-

कडील आणि समुद्राच्या उत्तरेकडील एक शक्तिपीठस्थान (शक्तिसङ्गम. ३.७.५१). काही अभ्यासकांच्या मते आसाम (प्राचीन कामरूप) देशातील गणेशाद्रीच्या पूर्वेकडील आणि बंगालच्या ईशान्येकडील आधु. कचार (कुचबिहार) प्रदेश हाच होय. मध्ययुगीन साहित्यमते हा देश पूर्व पाकिस्तानातील दिनाजपुर जिल्ह्यातील देवीकोट्टपासून (आधु. बांकुरा) बंगालच्या उपसागरापर्यंत होता. नामांतर (भविष्य पुराण)–'कच्छप'.

**कच्छर्प** (कुबेरस्थान)—हिमालय पर्वतान्तर्गत कैलास पर्वतावरील एक कुबेरनिधिस्थान (वायु. ४१.१०; वामन. ७८.५).

**कच्छमण्डल** (देश)—स्कंदमते पश्चिम भारतातील 'कच्छ' देशाचे नामांतर (स्कन्द. माहेश्वर. कौ. ३९.१४५; कच्छ पहा). अन्य नामांतर–'कच्छवीय' (काव्यमी. १७.२२७).

**कच्छार** (देश)—कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या उत्तर भागातील एक देश (बृ. सं. १४.२७). पाठभेद–'कच्छाग'.

**कच्छिक** (देश व लोक)—पश्चिम भारतातील 'कच्छ' देश आणि लोकसमूहाचे नामांतर (मत्स्य. ११४.५१). अन्य नामांतरे– (ब्रह्माण्ड. १६.६२)–'कच्छिप'; (वायु. ४५.१३१; काव्यमी. १७.२२७)–'कच्छीय'.

**कच्छेश्वर** (तीर्थ)—कच्छ प्रांतातील भुजजवळील 'कोटीश्वर' तीर्थाचे नामांतर (वामन. ३४.२०; कोटीश्वर पहा).

**कजङ्गल** (देश)—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते पूर्व भारतातील चंपा (अंग) देशाच्या पूर्वेकडील एक देश. बिहारमधील झारखंड (आधु. छोटा नागपुर) प्रदेशातील आधु. राजमहाल टेकड्यांचा प्रदेश हाच होय. संथाळ परगण्यातील कजंगल (आधु. कजंगल) गावी या देशाची राजधानी असून, त्याच्या सभोवतालच्या २०० मैलांच्या परिसरात ह्युएन्त्संगकाली हा (क–शंग्–कि–लो = कजंगल) देश होता.

**महाभारत आणि सिलोनी बौद्ध ग्रंथात**—महाभारतात पूर्व भारतातील 'कजिंघ' लोकसमूहाचा, तसेच सिलोनी बौद्ध साहित्यात जंबूद्वीपाच्या पूर्व भागातील 'कजंघेले निवनुगमे' नामक नगराचा निर्देश आढळतो. सेंट मार्टिन यांच्या मते येथे कजंगल देश आणि त्याच्या राजधानीच्या नगराचा निर्देश अभिप्रेत आहे.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. महाभारत | कजिंघ |
| २. बौद्ध साहित्य (जे. आर. ए. एस्. स. १९०४; पृ. ८६) | कजंगला |
| ३. सिलोनी बौद्ध साहित्य | कजंघेले निवनुगमे |
| ४. ह्युएन्त्संग (वॉटर्स, २. १३७) | क–शंग्–कि–लो (कजंगल) |
| ५. मध्ययुगीन साहित्य | कंकजोल |
| ६. रामचरितमानस टीका (बंगाल इतिहास .१.१५७). | कयंगलमंडल |

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**— या ग्रंथमते चंपा (आधु. भागलपुर) देशाहून ८० मैल पूर्वेस हा देश होता. अन्य चिनी साहित्यमते हा देश पुंड्रवर्धनपासून ८० मैल नैर्ऋत्येस, मध्य देशाच्या पूर्वेस आणि गंगा नदीच्या दक्षिणेस होता (कनिंग. पृ. ४७८).

**भौगोलिक वर्णन**— ह्युएन्त्संगच्या मते या सखल आणि आर्द्र देशाचे क्षेत्रफळ ४०० मैल असून, येथील हवा ऊबदार आणि लोक एकमार्गी व सरलस्वभावी होते. या देशात ६-७ बौद्ध मंदिरे आणि ३०० बौद्ध भिक्षू असून, हिंदूंची १० देवमंदिरे होती. साऱ्या देशात हिंदु धर्माचे प्राबल्य होते. या देशाच्या दक्षिण सरहद्दीनजिक वन्य हत्तींचे कळप होते.

ह्युएन्त्संगच्या काळी हा देश नजिकच्या मगध साम्राज्याचा भाग मानला जात असे. या देशाची राजधानी ओस पडली असून सारे लोक खेडोपाडी विखुरले होते. सम्राट शिलादित्याला या देशात दरबार भरविण्यासाठी स्वतःचा तात्पुरता लाकडी राजवाडा बांधणे भाग पडले.

**स्थापत्यावशेष**— या देशाच्या उत्तर भागात गंगा नदीकाठी हिंदू आणि बौद्ध देवतांची शिल्पे कोरलेला एक उंच मनोरा होता. या देशातून १२० मैल पूर्वेस गंगा नदी ओलांडून गेल्यानंतर ह्युएन्त्संग पुंड्रवर्धन (आधु. रंगपुर जिल्हा) देशास पोहोचला (वॉटर्स, २.१८३–१८४; बील, ४०२–४०३).

मध्ययुगीन काली—रामचरितमानस टीकामते (इ. स. १० वे शतक) या (कयंगल मंडल) देशाच्या राजाने झारखंडनजिकच्या कुजवती (= संथाळ परगण्यातील आधु. कुजवती) आणि तैलकंप (= मानभूम जिल्ह्यातील आधु. तल्कुपि) देशांच्या राजांसमवेत मगधाच्या रामपाल राजास मदत केली होती (हिस्टरी ऑफ बेंगॉल. १.१५७).

राजधानी—या देशाची कजंगल नामक राजधानी गौतम बुद्धाच्या काळी समृद्ध नगर होते (विनय. १.१९७). या संपन्न नगरात बौद्ध भिक्षूंना मुबलक भिक्षा मिळत असे (जा. ४.३१०). इ. स. १ ल्या शतकात त्याची समृद्धी नाहीशी होऊन ते एक खेडे बनले. 'मिलिंदपन्हो' मते मज्झिम देशाच्या (मध्यदेश) पूर्व सरहद्दीवरील या ब्राह्मणग्रामी नागसेन नामक भिक्षूचा जन्म झाला होता (मिलिन्द. पृ. १०). ब्राह्मण साहित्यमते मध्य देशाची पूर्व सरहद्द वाराणसी गाव असून त्यानंतरच्या काळात वाराणसीपासून कजंगलपर्यंतच्या प्रदेशातील बौद्ध धर्मप्रसारामुळे हा देश मध्यदेशामध्ये समाविष्ट झाला असावा (मध्यदेश पहा).

**कजुराह** (नगर)— अल्बेरुणीच्या मते मध्यप्रदेशातील 'खर्जुराहक' नगराचे नामांतर (खर्जुराहक पहा). अन्य नामांतर (पौराणिक साहित्य)–'कजूर'; (इब्न बतूता)–'कजुराव'.

**कञ्चण** (नगर)— कलिंग देशाच्या 'कांचनपुर' नामक राजधानीच्या नगराचे नामांतर (इंडि. ॲन्टि. २०. ३७५; कांचनपुर पहा).

**कञ्चन** (पर्वत)—जातकमते उत्तर हिमालयान्तर्गत एक पर्वत (जा. २.३९६; ६.१०१)

**कञ्चनपुर** (लष्करी ठाणे)—इ. स. १२ व्या शतकातील बनगाव ताम्रपटमते बिहारमधील एक 'जयस्कंधावार' (लष्करी ठाण्याचे गाव; एपि. इंडि. २९.४८–५६). आधु. सहर्स जिल्ह्यात हे असावे (पांडे, बिहार. १७२).

**कञ्ची** (नगर)—तामीळ साहित्यमते दक्षिण भारतातील 'कांची' नगराचे नामांतर (कांची पहा).

**कञ्जर महादेव** (शिवस्थान)—कांगडा प्रदेशातील धर्मशाला गावापासून ३ मैलांवरील खनियारा गावचे शिवस्थान. स्थानिक समजुतीनुसार किरात-अर्जुनीय युद्धाचा पौराणिक कथाभाग येथे घडला. 'कंजर'चा शब्दशः अर्थ 'भिल्ल' असाच होतो (ती. पृ. ७३).

**कञ्जलार्म** (ग्राम)—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू. ६.२.९०–९१). 'अर्म' अंत्यशब्दयुक्त ग्रामनामाचे उदाहरण म्हणून याचा निर्देश तेथे आढळतो. 'अर्म'चा शब्दशः अर्थ 'उजाडा झालेले गाव' (विनष्टग्राम) असा होतो (बौ. श्रौ. ९.१–३). यावरून हे तसेच असावे (अग्रवाल. पाणिनि पृ. ८१).

**कञ्ठेठा** (शिवस्थान)—मध्यप्रदेशातील दावापुरपासून एक मैलावरील नर्मदेच्या उत्तर किनाऱ्यावरील शिवस्थान. स्थानिक समजुतीनुसार येथे दक्षकन्या ख्याति, पुंडरिक नाग, दुष्यंतपुत्र भरत, तसेच मेधातिथि ऋषींनी शिवोपासना केली होती (ती. पृ. ४३२).

**कट** (देश)—युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या उत्तर दिग्विजयात अर्जुनाने जिंकलेला उत्तर भारतातील एक देश (म. स. २३.२७०*).

**कटक** (नगर)—शिलालेख साहित्यमते ओरिसा देशाच्या 'कंटकस्थल' नामक राजधानीचे नामांतर (एपि. इंडि. २५.२९८; कंटकस्थल पहा).

**कटकभुक्ति** (विषय)—कलिंग देशातील दक्षिण तोसल उपविभागान्तर्गत कोंगोद मंडलातील एक राज्यविभाग (एपि. इंडि. ११.२८३; २८६; कोंगोद मंडल पहा). आधु. कटक गावाच्या परिसरातील प्रदेश हाच असावा.

**कटकस्थल** (देश)—कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या आग्नेय भागातील एक देश (मार्कं. ५५.१८).

**कटपूतना** (योगिनी)—काशी येथील एक योगिनीस्थान (स्कन्द. काशी. ४५.४१).

**कटवा** (वैष्णवतीर्थ)—नवद्वीपधामापासून २४ मैलांवरील एक वैष्णवतीर्थ. येथे श्रीगौरांग प्रभूंनी संन्यास घेतला (ती. पृ. १८५).

**कटाक्षराज** (तीर्थ–सरोवर)—पश्चिम पाकिस्तानातील लाहोर–पेशावर मार्गावरील खिवडा रेल्वेस्थानकापासून ९ मैलांवरावरील एक पर्वतीय तीर्थस्थान. येथील अमरकुंड नामक तलाव पृथ्वीचा नेत्र मानला जातो (ती. पृ. ७४).

**कटाहद्वीप** (बृहद्भारतीय देश)—वामन पुराणमते भारतवर्षाच्या नवखंडांपैकी (उपविभाग) एक खंड (द्वीप; वामन. १३.१०–११; गरुड. ५५.५). मार्कंडेय पुराणातील 'सौम्य द्वीपा'चा पाठभेद म्हणून याचा निर्देश वामन आणि गरुड पुराणांत आढळतो. आग्नेय आशियातील मलाया द्वीपकल्पाच्या पश्चिम किनाऱ्यावरील

आधु. केदह देश हाच होय ( रायचौधरी. पृ. ८२–८५ ). नामांतर ( तामीळ शिलालेख साहित्य )–' कडारम् '; ' किडारम् '; ' काल्गम् '. ही सारी नावे ' कटाह 'चीच तामीळभाषीय रूपे आहेत.

**बृहत्कथेमध्ये**—या ग्रंथमते सुवर्णद्वीपाच्या ( आधु. सुमात्रा ) पूर्वेकडील या द्वीपातील गुणसागरकन्या गुणवती उज्जयिनीच्या विक्रमादित्य राजाची पत्नी होती ( फडके, नवभारत. २२.६.२६ ).

**मध्ययुगीन कोश साहित्यात**—या साहित्यमते हे भारताचे उपद्वीप होते ( मेदिनी. १६१.१५; शब्दरत्न. ३४२. ९ ).

**मध्ययुगीन शिलालेख साहित्यात**—स. १००५ च्या लेडन दानपत्रमते कटाह आणि श्रीविषय ( आधु. पलेंबंग ) देशांच्या केरळदेशीय विजयोत्तुंग राजाच्या चूडामणि नामक पित्याने नेगपतम् या जन्मग्रामी एक बौद्धमंदिर बांधले होते. त्याच्या योगक्षेमासाठी नेगपतम्नजिकचे एक ग्राम विजयोत्तुंगाने चोल राजा राजराज ( प्रथम ) च्या संमतीने दान दिले ( रंगाचारी. २.८९०; इंडि. अँटि. २२.४५; ७.२२४ ).

चोल राजा राजेंद्र ( प्रथम ) च्या स. १२०४ च्या मालूर शिलालेखमते त्याने हा ( कडारम् ) देश जिंकला होता. स. १२०४ मध्ये या देशाच्या संग्रामविजयोत्तुंग राजाने राजेंद्राची कुरापत काढताच त्याने आपल्या सैन्याकरवी या देशाच्या राजधानीच्या ( सुमात्राच्या पूर्व किनाऱ्यावरील आधु. कत्रिय नगर ) प्रवेशद्वाराचे ' विद्याधर तोरण ', तसेच दोन रत्नजडित दरवाजे लुटून आणले ( एपि. कर्ना. ९.८२ ). अन्य तामीळ शिलालेखांत ' किडारम् ' ( काल्गम ) नावाने याचा निर्देश आढळतो.

२. ( तीर्थ ) वेंकटाचलक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ ( स्कन्द. वेङ्कटाचल. २८ ).

**कटिकर्दम** ( नगर )—टॉलेमीच्या मते ओरिसा देशाच्या ' कंटकस्थल ' ( आधु. कटक ) नामक राजधानीचे नामांतर ( कंटकस्थल पहा ).

**कटुकप्रस्थ** ( नगर )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक नगर ( पा. सू. ४.२.८२; ६.२.८७ ). ' प्रस्थ ' अंत्यशब्दयुक्त नगरनामाचे उदाहरण म्हणून याचा निर्देश तेथे आढळतो. अन्य ' प्रस्थान्त ' नगरांप्रमाणेच कुरुक्षेत्र अथवा कुरुदेशात हे असावे ( अग्रवाल, पाणिनि. पृ. ८१ ).

**कटुबदरी** ( ग्राम )—बदरीबनानजिकचे एक ग्राम ( पद्म. भूमि. १२८ ).

**कटौधन** ( ग्राम )—कल्चुरि राजा सोढदेवाच्या वि. सं. ११३४ च्या कहल ताम्रपटमते मध्य प्रदेशातील एक ग्राम. येथील लोक ' कटौधनग्रामीय ' नावाने सुविख्यात असत. याचे आधु. स्थान समजत नाही ( एपि. इंडि. ७.८७ ).

**कट्टक** ( राज्यविभाग )—दंडीमहादेवीच्या सांतिरग्राम ताम्रपटमते पूर्व भारतातील ' कंटकस्थल ' ( आधु. कटक ) राज्यविभागाचे नामांतर ( एपि. इंडि. २९.७९; कंटक-स्थल पहा ).

**कट्य** ( देश )—महाभारतमते भरतखंडातील एक देश ( म. भी. १०.४८* ).

**कठ** ( देश व लोकसमूह )—सिकंदरस्वारीसंबंधीच्या ग्रीक साहित्यमते पंजाबातील रावी नदीच्या पूर्वेकडील एक देश आणि लढाऊ लोकसमूह. क्षुद्रक आणि माल्वांप्रमाणेच हे ( कठैओइ ) लोकहि लढाऊपणासाठी सुविख्यात असून, पंजाबातील सात प्रमुख गणराज्यांपैकी हे एक होते. जयचंद्र यांच्या मते आधु. अमृतसर पट्टीचा प्रदेश ( स्थानिक नाव–' माझा ' ) हाच होय.

**सिकंदरची स्वारी**—रावी नदी ओलांडल्यानंतर तिसऱ्या दिवशी सिकंदरने या देशाच्या संगल नामक राजधानीवर हल्ला करून हजारो कठ लोकांचा संहार केला. या आक्रमणात सिकंदरसैन्यातील १०० सैनिक मृत आणि १२०० सैनिक जखमी झाल्याने क्रुद्ध होऊन त्याने संगल नगर बेचिराख केले. कनिंगहॅम यांचे मते पाणिनीच्या अष्टाध्यायीतील शाकल ( आधु. सियालकोट ) गाव हेच होय ( शाकल पहा ). स्मिथ यांचे मते सिकंदरकालीन संगल आधु. गुरुदासपुर जिल्ह्यात असावे ( स्मिथ, पृ. ७८ ).

**कठाक्षर** ( देश )—मार्कंडेयमते पश्चिम भारतातील ' कारस्कर ' देशाचे नामांतर ( मार्क. ५४.५०; कारस्कर २. पहा ).

**कठेश्वर** ( लिंग )—नर्मदा नदीकाठचे एक शिवलिंग ( मत्स्य. १९१.६३–६४ ).

**कठोरा** ( हनुमत् तपस्यास्थान )—गुजरातमधील नर्मदा नदीकाठचे चाणोदनजिकच्या कपिस्थितपुर गावचे हनुमत्–तपस्यास्थान. येथे हनुमदीश्वर मंदिर आहे ( ती. पृ. ४३४ ).

**कडक** ( नगर )—मध्ययुगीन शिलालेख साहित्यमते ओरिसा देशाच्या ' कंटकस्थल ' ( आधु. कटक ) नामक राजधानीचे नामांतर (एपि. इंडि.७.१४५;कंटकस्थल पहा).

**कडव** ( ग्राम )—राष्ट्रकूट राजा गोविंद ( तृतीय ) च्या स. ८१३ च्या ताम्रपटाचे मध्य म्हैसूरातील तुम्कुर जिल्ह्यातील उपलब्धिस्थान ( एपि. कर्ना. १२.६१ ).

**कडम्बुर** ( राज्यविभाग )—अनंतवर्मन् चोडगंगच्या स. ११४१ च्या अल्गुम शिलालेखमते दक्षिण भारतातील एक राज्यविभाग. त्रिचनापली जिल्ह्यातील उडैयारपालयम् तालुक्यातील आधु. कडम्बूर गाव हेच होय ( एपि. इंडि. २९.४७ ).

**कडा** ( ग्राम )—चालुक्य राजा भीम ( द्वितीय ) च्या वि. सं. १२५६ च्या शिलालेखमते उत्तर गुजरातमधील दंडाही पथकातील एक ग्राम. उत्तर गुजरातेतील आधु. कर गाव हेच होय ( इंडि. अँटि. ११.७१–७३ ).

२. ( देवीस्थान ) उत्तर प्रदेशातील प्रयागपासून ४० मैलांवरील एक देवीस्थान. येथील शीतला भवानीदेवी खत्रि लोकांची कुलदेवता असून, मंदिरातोल जलकुंडाचीच येथे देवी म्हणून पूजा करतात. मंदिरापासून ½ मैलावरील जाह्नवी कुंडाच्या स्थानी जह्नु ऋर्षींचा आश्रम दाखवितात ( ती. पृ. १२० ).

**कडूर** ( ग्राम )— आलुप राजा चित्रवाहनाच्या स. ६९५ च्या ताम्रपटाचे पश्चिम म्हैसूरमधील उपलब्धिस्थान ( एपि. कर्ना. ६.३७ ).

**कडेठाण** ( महानुभाव तीर्थ )— स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थ ( स्था. पृ. २० ). औरंगाबाद जिल्ह्यातील पैठणच्या ईशान्येकडील आधु. कडेठाण हेच होय.

**कडोव्या** ( ग्राम )— धर्मारण्यातील एक ग्राम ( स्कन्द. ब्राह्म. ध. ३९.२८ ).

**कणझरो** ( जैन तीर्थ )— ज्ञानसागरमते बागड प्रदेशातील एक जैन तीर्थस्थान. येथील मंदिरात ५२ जिनप्रतिमा होत्या ( ती. सं. पृ. १२६ ).

**कणम्बडे ३००** ( राज्यविभाग )— यादव राजांच्या शके ११७५ च्या कोकटनूर शिलालेखमते महाराष्ट्रातील ‘ करहाड २००० ’ देशाचा एक उपविभाग. बेळगाव जिल्ह्यातील अथणी तालुक्यातील आधु. कानमोडी गावाच्या परिसरातील प्रदेश हाच होय. नामांतर ( कल्याणी चालुक्य शिलालेख )– ‘ कळ्ळंबदि ’ ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २७३ ).

**कणवेश्वर** ( लिंग )— काशी येथील ज्येष्ठेश्वरानजिकचे एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ६२.१२ ).

**कणादेश** ( लिंग )— काशी येथील ज्येष्ठेश्वरानजिकचे एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ६५.१५; लिङ्ग. तीर्थ–विवेचन. पृ. ९२ ).

**कण्टक** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठीमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.५ ).

**कण्टकवर्तनी विषय** ( राज्यविभाग )—शिलालेख साहित्यमते कलिंग देशाचा एक राज्यविभाग ( इंडि. अँटि. १८.१७१; कलिंग पहा ).

**कण्टकशृङ्ग** ( पर्वत )—लिंगमते जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वताच्या आणि महाभद्र सरोवराच्या उत्तरेकडील एक पर्वत ( लिङ्ग. ४९.५१ ).

**कण्टकशोधिनी** ( देवी )—प्रभासक्षेत्रातील एक देवीस्थान ( नारद. उत्तर. ७०.२५; स्कन्द. प्रभास. प्र. १०२ ).

**कण्टकशोषणी** ( देवी )—स्कंदमते प्रभासक्षेत्रातील एक देवीस्थान. तेथे हिचे माहात्म्य सविस्तरपणे वर्णिले आहे ( स्कन्द. प्रभास. प्र. ३१७ ).

**कण्टकस्थल** ( देश व नगर )—बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या आग्नेय भागातील एक देश आणि नगर ( बृ. सं. १४.१० ). इ. स. १५ व्या शतकापासून ओरिसा ( प्राचीन ओड्र ) देशाची राजधानी म्हणून सुविख्यात असणारे महानदीकाठचे आधु. कटक गाव हेच होय.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. मध्ययुगीन शिलालेख साहित्य | |
| अ. एपि. इंडि. (७.१४७) | काठक |
| आ. एपि. इंडि. (७.१४५) | कडक |
| इ. एपि. इंडि. (२५.२९८) | कटक |
| ई. दंडी महादेवींचाशांतिग्राम ताम्रपट ( एपि. इंडि. २७७९ ) | कट्टक |
| २. प्राचीन संस्कृत साहित्य ( डी. एच्. एन्. आय्. १.३४१ ) | कोटाटवी |
| ३. टॉलेमी | कटिकर्दम |
| ४. फरिश्ता ( पृ. १६३ ) | कटक |

**राजकीय पार्श्वभूमी**—इ. स. १५ व्या शतकात पूर्व भारतान्तर्गत कलिंग देशातील गंग राजवंशाची सत्ता

संपुष्टात येऊन त्यांचा गजपतिवंशीय कपिलेंद्र नामक अमात्य या देशाचा राजा बनला. त्याने ओरिसा देशाची राजधानी भुवनेश्वराहून कटक येथे स्थलांतरित करून ( स. १४२९ ), कृष्णा नदीपर्यंतचा सारा प्रदेश जिंकून घेतला ( इंडि. अँटि. २०.३९० ). स. १५४१ पर्यंत या देशाची राजधानी याच गावी असून, त्या वंशातील प्रतापरुद्र ( स. १४९६–१५३९ ) हा सर्वाधिक पराक्रमी राजा होता ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३१३ ). स. १५७८ मध्ये अकबराने हा देश जिंकून घेतला ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. २६२ ).

**टॉलेमीच्या ग्रंथात**—या ग्रंथमते हे ( कटिकर्दम ) नगर अक्षांश–१२°-४०′ उत्तर; रेखांश–१३९°–२०′ पूर्व या स्थानी होते. मॅक्रिंडल यांच्या मते जगन्नाथ कटिकर्दमाच्या मंदिरावरून यास हे नाव प्राप्त झाले.

**फरिश्ताच्या ग्रंथात**—या ग्रंथमते स. १४७८ मध्ये बहामनी सुलतान महंमदशहा ( तृतीय ) ने हे नगर बेचिराख केले असता, गजपति राजाने प्रचंड खंडणी देऊन ते पुन्हा मिळविले (फरिश्ता, स्कॉट आवृत्ती. पृ. १६३).

**मध्ययुगीन शिलालेख**—काकतीय राजा रुद्रदेवाच्या अनुमकोंड शिलालेखात ( इंडि. अँटि. ११.११ ), तसेच शके १३७७ च्या अन्य एका शिलालेखात ( इंडि. अँटि. २०.३९२ ) या नगराचा निर्देश आढळतो. दंडीमहादेवीच्या सांतिग्राम दानलेखमते 'कट्टक' राज्यविभागाचा काही भाग उत्तर तोसली आणि काही भाग दक्षिण तोसली देश–विभागात समाविष्ट होत असे ( एपि. इंडि. २९.७९; ८५ ). अन्य शिलालेखात 'काठक' ( एपि. इंडि. ७.१४७ ) 'कडक' ( एपि. इंडि. ७.१४५ ), 'कटक' ( एपि. इंडि. २५.२९८ ) वैकल्पिक नावानी या नगराचा निर्देश आढळतो.

**मंदिरे**—येथील धौलेश्वर महादेवाचे स्वयंभू लिंग सुविख्यात आहे ( ती. पृ. १९२ ).

२. ( व्यापारी पेठ ) टॉलेमीच्या मते दक्षिण भारता–तील एक व्यापारी नगर. त्याने निर्देशिलेले 'कोंतकोस्सिल' हे 'कंटकस्थल'चेच ग्रीकभाषीय रूपांतर आहे ( कांचिकचर्ल पहा ).

**कण्टकार** ( देश )—मत्स्यमते उत्तर भारतातील 'बाहुबाध' लोकसमूहाचे नामांतर ( मत्स्य. ११३.४२; बाहुबाध पहा; पार्गि., ३१७ ).

**कण्टा** ( ग्राम )—धर्मारण्यातील एक ग्राम ( स्कन्द ब्राह्म. ध. ३९.२६ ).

**कण्टेश्वर** (लिंग)—अवंती येथील ८४ शिवलिंगांपैकी एक ( स्कन्द. आवन्त्य. अ. ३७.२८; च. लिं. ५४ ).

**कण्टोई** ( तीर्थ )—पश्चिम भारतातील सीनोरपासून २ मैलांवरील नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ. स्थानिक समजुतीनुसार येथे देवांनी स्कंदाला सैनापत्यपदी अभिषेक केला. येथील 'आंगिरस तीर्थ' नामक स्थानी अंगिरस् ऋषींनी तपस्या केली होती ( ती. पृ. ४३२ ).

**कण्ठक** ( देश )—शक्तिसंगमतंत्रमते पंजाबातील एक देश ( शक्तिसङ्गम. ३.७.५४ ). नामांतर–'श्रीकंठ'.

**कण्ठधान** ( लोकसमूह आणि नगर ) बृहत्संहितामते वायव्य भारतातील एक लोकसमूह आणि नगर ( बृ. स. १४.२६ ). वायव्य भारतातील आधु. कंदाहार देश हाच असून, 'कंठधान' हे संभवतः 'कंठधार'चे अपभ्रष्ट रूप असावे ( अलेक्झांड्रिया, अलसंद पहा ).

प्राचीन गंधार ( आधु. अफगाणिस्तान ) देशान्तर्गत 'वक्षु' ( आधु. ओक्सस् ), 'सरस्वती' ( आधु. हेल्मांद ) आणि 'कुभा' ( आधु. काबूल ) नद्यांच्या खोऱ्यांपैकी अफगाणिस्तानच्या नैर्ऋत्यवर्ती सरस्वती नदीच्या खोऱ्यात उत्तरेस तैमनि, हजारीस्तान आणि गझनी गावांपासून दक्षिणेस बलुचिस्तानपर्यंत हा देश होता. ग्रीक साहित्यमते हा ( अरकोसिय ) देश उत्तरेस सुलेमान पर्वतापासून दक्षिणेस गेड्रोसिय ( आधु. मक्रान ) देशापर्यंत पसरला होता ( मॅक्रिंडल, मेगॅस्थेनिस्. पृ. १५६ ). मॅक्रिंडल यांच्या मते या देशाच्या उत्तरेस हिंदुकुश पर्वत, पूर्वेस सिंधु नदी आणि पश्चिमेस शकस्थान ( आधु. सैस्तान ) देशाची 'फर्राह' नामक राजधानी यांच्या दरम्यान हा देश होता ( मॅक्रिंडल, इंडिया. पृ. ८८ ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :–

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पर्शियन साहित्य | हरौवति |
| २. ग्रीक साहित्य | अरकोसिय |
| ३. बृहत्संहिता | यशोवती |
| ४. प्राचीन संस्कृत साहित्य | सरस्वती |

**नामव्युत्पत्ती**—चट्टोपाध्याय यांच्या मते या देशाच्या पूर्वेकडील सरस्वती ( आधु. हेल्मांद ) नदीवरून या देशास 'सरस्वती' वैकल्पिक नाव पडले असून, हरक्वैति ( हरह्वैति, हरौवति ) आणि 'अरकोसिय' ही त्याचीच

इराणी आणि ग्रीकभाषीय रूपे होत (जे. डी. एल्. १५.४२). ऐन्-इ-अकबरीमते 'हेलमांद' (हिर्मोंद) चा शब्दशः अर्थ 'आशीर्वचनयुक्त' असा होतो' (ऐ. अ. २.३९४). चौधरी यांच्या मते बृहत्संहितेत गंधार देशानजिकचा म्हणून निर्देशिलेला 'यशोवती' लोकसमूह हे 'कंठधान'चेच नामांतर असून, त्यामध्ये 'आशीर्वचनयुक्त' हाच अर्थ अभिप्रेत आहे.

**नगर**--या देशाचे कंदाहार नामक हेल्मांद नदीकाठचे राजधानीचे गाव हेरात, शकस्थान (सैस्तान), घोर, काबूल आणि भारतवर्ष देशातील हमरस्त्यांच्या सम्मीलन-स्थानी असून, ग्रीक साहित्यातील 'अरकोतोस' हे अरकोसियच्या राजधानीचे नगरहि या गावाच्या परिसरातच असावे (मॅक्रिंडल, मेगॅस्थेनिस् पृ. १५६). पाश्चात्य अभ्यासकांच्या मते गंधारदेशीय ग्रीक लोकांनी या नगराची स्थापना केली असून, 'कंदाहार' हे नगरनामहि 'गंधार' चेच अपभ्रष्ट रूप असावे. परंतु ते संस्कृतभाषीय 'कंठधान' चे अपभ्रष्ट रूप असण्याची शक्यता अधिक वाटते.

**कण्ठी** (आखात)— टॉलेमीच्या मते पश्चिम भारतातील 'कच्छ' आखाताचे नामांतर (कच्छ पहा).

**कण्ठेश्वर** (लिंग)— काशी येथील ज्येष्ठेश्वरानजिकचे एक शिवलिंग (स्कन्द. काशी. ६५.१८).

**कण्डयिका** (विषय)— सुभिक्षराजदेव राजाच्या इ. स. १० व्या शतकातील पांडुकेश्वर ताम्रपटमते गढवाल प्रदेशान्तर्गत टंगणपुर देशविभागातील (आधु. जोशीमठ जिल्हा) एक राज्यविभाग (एपि. इंडि. ३१.२९१).

**कण्डरवाड** (ग्राम)—कलचुरि राजा जयसिंहाच्या स. ११७४ च्या जबलपुर शिलालेखमते मध्य प्रदेशातील समुद्रपाट विषयातील एक ग्राम. जबलपुरनजिकचे आधु. कुडा (कुंडन ग्राम) हेच असावे (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.३३३).

**कण्डु-आश्रम** (आश्रमस्थान)—वाल्मीकि रामायणमते विंध्य पर्वत आणि ऋक्षबिलच्या दरम्यानचे कंडु ऋषींचे आश्रमस्थान. दक्षिण दिशेस सीताशोधार्थ निघालेल्या हनुमानास हे लागले होते. आपल्या दशवर्षीय पुत्राच्या अकाली मृत्यूमुळे क्रुद्ध झालेल्या कंडु ऋषींनी याच्या परिसरातील वनास निर्जन होण्याचा शाप दिला होता (वा. रा. कि. ४८.७–१६).

**कण्णगर** (नगर)—टॉलेमीच्या मते ओरिसामधील 'कोणार्क' तीर्थाचे नामांतर (कोणार्क पहा).

**कण्णनूर** (नगर)—होयसाळ राजा नृसिंह (द्वितीय) च्या स. १२२८ च्या बदनालु शिलालेखमते चोल देशातील श्रीरंगम् आणि त्रिचनापल्लीनजिकचे श्रीरंगम् प्रदेशाच्या लष्करी नियंत्रणाच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण नगर (एपि. कर्ना. ३.३६). श्रीरंगमनजिकचे आधु. कन्ननोर गाव हेच होय.

**नामांतरे**--प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. होयसाळ शिलालेख (एपि. इंडि. ३.८) | विक्रमपुर |
| २. अन्य शिलालेखसाहित्य | कण्णनूर--कोप्पम्, कोप्पम् |
| ३. इब्न बतूता | कोब्बन् |
| ४. अन्य मुसलमानी साहित्य (सेवेल. इन्स्क्रि. पृ. १. १८८). | कंदुर |

**नवे नामकरण**—स. १२०० मध्ये होयसाळ राजा सोमेश्वराने याचे 'विक्रमपुर' असे नवे नामकरण करून, येथे एक राजवाडा बांधला (सेवेल, इन्स्क्रि. पृ. १४४). पांड्य राजा जयवर्मनूने तो स. १२५४ मध्ये जाळला (साऊथ इंडिया. पृ. ४६–४७). चोल राजा राजेंद्र (तृतीय) च्या स. १२५२ च्या श्रीरंगम् शिलालेखमते त्याने होयसाळ राजा सोमेश्वरास येथून पिटाळून लावले होते (एपि. इंडि. ७.१७६). परंतु सोमेश्वर राजाच्या स. १२५३ च्या या गावाच्या शिलालेखावरून चोल राजाची ही दर्पोक्ती खोटी ठरते (एपि. इंडि. ३०८).

**मुसलमानी आक्रमण**--अमीर कुस्रूच्या ग्रंथमते अल्लाउद्दीन खिलजीच्या मलिक काफूर नामक सेनापतीने स. १३११ मधील पांड्य देशाच्या स्वारीत हे (कंदुर) नगर, तसेच चिदंबरम् आणि मदुरा देवालये जिंकली होती (सेवेल, इन्स्क्रि. पृ. १७७).

**इब्न बतूताच्या ग्रंथात**--या ग्रंथमते स. १३४२ मध्ये घियासुद्दीन तुघलकाच्या ताब्यातील या (कोब्बन्) नगरावर होयसाळ राजा बल्लाळ (तृतीय) ने (वय ८२) एक लाख सेनेसह हल्ला केला. तत्प्रसंगी घियासुद्दीनने त्याचा कपटाने वध करून, त्याचा मृत देह मदुरा नगरीच्या वेशीवर टांगला (सेवेल, इन्स्क्रि. पृ. १८८).

**कण्व-आश्रम** (आश्रमस्थान)— महाभारतमते हिमालयाच्या पायथ्यानजिकचे मालिनी नदीकाठचे कण्व

ऋषींचे आश्रमस्थान. येथेच शकुंतलेचा जन्म, पालनपोषण, दुष्यंत राजाशी गांधर्व विवाह, तसेच शकुंतलापुत्र भरताचा जन्म झाला ( म. आ. ६४.१८–२४; ६६.१०; ६८; भा. ९.२०.८ ). शतपथ ब्राह्मणात निर्देशिलेले 'नाडपित्' संज्ञक भरतजन्मस्थान संभवतः हेच असावे ( नाडपित् पहा ). पौराणिक साहित्यमते हे श्राद्धयोग्य तीर्थ होते ( अग्नि. १०९.१०; विष्णुस्मृति. ८५.३० ).

**आधुनिक स्थान**— उत्तर भारतातील निम्नलिखित विभिन्न स्थानी कण्वाश्रमाचे पौराणिक स्थान दाखवितात :—

**( १ ) गढवाल प्रदेशात**—जयचंद्र यांच्या मते हस्तिनापुरच्या उत्तरेकडील मेरठ-मुजफ्फरनगर-बिजनौर प्रदेशान्तर्गत गढवाल तराईतील मालन ( प्राचीन मालिनी ) नदीच्या काठी कण्वाश्रम होता. गढवालातील चौकी घाटाच्या उत्तरेकडील किनकसोत नामक कुंजस्थानी सध्या तो दाखवितात ( जयचंद्र, पृ. ६४ ).

**( २ ) बिहारमध्ये**— गयेपासून १५ मैलांवरील तपोवनाच्या २ मैल उत्तरेस कण्वाश्रमाचे, तसेच दुष्यंत-शकुंतला भेटीचे स्थान दाखवितात. यानजिकच राजगृहानजिकचे 'कण्वतीर्थ' आहे ( ती. पृ. १६८ ).

**( ३ ) कश्मीरात**—श्रीनगर-काटद्वाररस्त्यावरील काटद्वारपासून ६ मैलांवर कण्वाश्रमाचे, तसेच भरतजन्माचे स्थान दाखवितात ( ती. पृ. ६१ ).

**२.** महाभारत पुलस्त्ययात्रा ( म. आर. ८०.६४ ), आणि धौम्ययात्रा ( म. आर. ८६.८ ) मते प्रवेणी नदीच्या उत्तर किनाऱ्यावरील कण्व ऋषींचे आश्रमस्थान. पौराणिक तीर्थनामावलीत याचा निर्देश आढळतो ( अग्नि. १०९.१० ). नामांतर– 'धर्मारण्य'.

राजस्थानातील कोट्यापासून ४ मैल आग्नेयेस चंबळ ( प्राचीन चर्मण्वती ) नदीकाठी हा दाखवितात ( डे, पृ. ८९ ). अन्य अभ्यासकांच्या मते हा नर्मदातीरी होता.

**कण्वतीर्थ** ( तीर्थ )— ब्रह्ममते 'गौतमाश्रमा'चे नामांतर ( गौतमाश्रम पहा ).

**२.** ( माध्वमठ ) कर्नाटकातील उडीपी गावापासून ४७ मैलावरील श्रीमज्जेश्वरानजिकचे एक माध्वपीठस्थान ( ती. पृ. ३१९ ).

**कण्हगिरि** ( पर्वत )— गौतमीपुत्र शातकर्णीच्या नासिक प्रशस्तिलेखमते सह्य पर्वतान्तर्गत 'कृष्णगिरि' ( आधु. कान्हेरी ) बौद्ध गुफास्थानाचे नामांतर ( रॅप्सन, आंध्र कॉइन्स. पृ. ३३; कृष्णगिरि १. पहा ).

**कण्हवल** ( आहार )—चालुक्य राजा श्रियाश्रय शिलादित्याच्या स. ६५६ च्या नवसारी ताम्रपटमते उत्तर गुजरातमधील वाहिरिका विषयातील एक आहार ( राज्यविभाग ). आसत्ति नामक ग्राम यामध्ये होते. सुरत जिल्ह्यातील बार्डोली गावाच्या ६ मैल दक्षिणेकडील आधु. कण्ही गाव हेच होय ( कॉर्पस् इन्स्क्रि. ४.१.१२४ ).

**कतखेडाघाट** ( पर्वत )—मध्यप्रदेशातील हिरनफालपासून १२ मैलांवरील नर्मदा नदीकाठचे स्कंदतपस्यास्थान ( ती. पृ. ४३१ ).

**कतद्वीप** ( नगर )—अरियनच्या मते बिहारमधील 'अमिस्तिस्' ( अजया ) नदीकाठचे एक नगर ( अरियन, इंडिका. ४; मॅक्रिंडल, पृ. १९१ ). नामांतर ( अरियन )—' कतदुप. ' बिहारमधील आधु. कटवा गाव हेच होय ( पांडे, बिहार. पृ. ८० ).

**कतपुर** ( शिवमंदिरस्थान )—पश्चिम भारतातील भडोचनजिकच्या वासनोलीपासून ४ मैलांवरील शिवमंदिरस्थान. येथे कोटेश्वर नामक शिवमंदिर आहे ( ती. पृ. ४३८ ).

**कताबैद** ( नदी )—टॉलेमीच्या ग्रंथमते पूर्व भारतातील पेंटॅपोलिस ( = पट्टण = चटग्राम = आधु. चितागाँग ) जवळून वहाणारी एक नदी. विल्फोर्ड यांच्या मते चितागाँगनजिकची सेदोआ प्रदेशातील आधु. कर्णफुली नदी हीच होय. स्थानिक नामांतर—'कातावैझ' ( शब्दशः अर्थ–दुर्गानजिकचे लोक ) ( विल्फोर्ड, एशियाटिक रिसर्चेस्. १४.४५२–४५३ ).

**कतास** ( मंदिरस्थान )—पंजाबातील सॉल्टरेंज प्रदेशातील पिंड दादनखान गावानजिकचे कश्मीरी स्थापत्यशैलीचे एक देवमंदिरस्थान. कश्मीरी आणि हिमालयीन मंदिरस्थापत्यामधील दुवा म्हणून हे महत्त्वाचे मानतात ( तत्सम अन्य मंदिर–कतासपासून १२ मैलांवरील मलोत्; फर्ग्युसन, १.२७०.–२७१ ).

**कतिका** ( नगर )—कश्मीरराज तुंजीन ( प्रथम ) ने स्थापिलेले कश्मीरातील एक नगर ( राज. २.१४ ). बुलर ( प्राचीन होलडा ) परगण्यातील बूस ( प्राचीन भवच्छेद ) गावाच्या दक्षिणेकडील आधु. कई गाव हेच होय ( स्टाइन, राज. २.४६० ).

**कतीमुष** ( ग्राम )— कश्मीरराज तुंजीन ( प्रथम ) ने दान दिलेले कश्मीरातील एक अग्रहार ग्राम. ( राज. २५५ ). आडविन परगाण्यातील वेशा ( प्राचीन विशोका ) नदीच्या पश्चिम किनाऱ्यावरील आधु. कैमुह ग्राम हेच होय. येथील मुसलमानी झिआरातामध्ये हिंदु स्थापत्यावशेष

आढळतात ( स्टाइन, राज. २.४७१ ).

**कत्रि** ( नगर )—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते उत्तर भारतातील एक नगर ( पा. सू. ४.२.९५ ). अल्मोरा जिल्ह्यातील आधु. कत्यूर ( कत्रिपुर ) गाव हेच असावे ( अग्रवाल, पाणिनि. पृ. ८६ ).

**कथा** ( नदी )—कश्मीरातील वितस्ता ( आधु. झेलम ) नदीनजिकची एक पवित्र नदी ( नीलमत. १५२३ ).

**कदप** ( लोकसमूह )—खरोष्ठी शिलालेखमते वायव्य भारतातील 'कुशाण' लोकसमूहाचे नामांतर ( कुशाण पहा ).

**कदम्ब** ( क्षेत्र )—द्वारका येथील एक पवित्र क्षेत्र ( वराह. १४९.५३ ).

२. ( पर्वत ) पश्चिम भारतातील 'शत्रुंजय' टेकडीचे नामांतर ( शत्रुंजय पहा ).

३. ( पर्वत ) बौद्ध साहित्यमते हिमालयानजिकचा एक पर्वत ( अपादान. पृ. ३८२ ).

**कदम्बखण्ड** ( कुंड )—मथुरा येथील एक पवित्र जलकुंड ( वराह. १६४.२६ ).

**कदम्बपद्रक** ( ग्राम )—परमार राजा नरवर्मदेवाच्या, तसेच कल्चुरि राजा युवराजदेव ( द्वितीय ) च्या बिल्हरी दानपत्रमते माळवा देशातील उपेंद्रपुर मंडलातील एक शैवपीठस्थान ( एपि. इंडि. २०.१०५ ). अवंतिवर्मनाच्या राणोद शिलालेखमते येथे पुरंदर नामक साधु निवास करीत असे. नामांतर ( युवराजदेव शिलालेख )–'कदंबगुफा' ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.२०८ ). याचे आधु. स्थान समजत नाही.

**कदम्बपुर** ( गणेशस्थान )—विदर्भातील यवतमाळ-नजिकचे एक चिंतामणिक्षेत्र, आणि महाराष्ट्रातील एकवीस गणेशक्षेत्रांपैकी एक. स्थानिक आख्यायिकेनुसार गौतम शापग्रस्त इंद्राने येथे गणेशाची उपासना केली होती ( ती. पृ. ४४८ ).

**कदम्बपुरी** ( शिवस्थान )—अरुणाचलक्षेत्रान्तर्गत एक शिवस्थान ( स्कन्द. अरुणाचल. २.२ ).

**कदम्बमण्डल** ( देश )—दक्षिण भारतातील पूर्व समुद्रकिनारीच्या 'बनवासी' देशाचे नामांतर ( एपि. कर्ना. ११.६६; बनवासी पहा ).

**कदम्बलिगे १०००** ( राज्यविभाग )—स. ९६४ च्या उत्तर म्हैसूर शिलालेखमते उत्तर म्हैसूरातील राष्ट्रकूट साम्राज्यान्तर्गत एक राज्यविभाग. चितळदुर्ग जिल्ह्यातील होललकेरे तालुक्याचा प्रदेश हाच होय ( एपि. कर्ना. ११. ३० ). नामांतर (होयसाळ शिलालेख)– 'कदंबलिगेनाडु.'

पश्चिम चालुक्य राजा जयसिंह ( तृतीय ) च्या स. १०१८ च्या बागलि शिलालेखमते हा प्रदेश उदयादित्य नोलंब नामक मांडलिक राजाच्या ताब्यात होता ( रंगाचारी, बेल्लारी. १.२७९ ). होयसाळ राजा बल्लाळ ( तृतीय ) च्या स. १३०२ च्या शिलालेखमते त्याने येथे बनवासी देशाच्या कदंब राजासमवेत युद्ध केले होते ( एपि. कर्ना. ८.१०१ ).

**कदम्बेश्वर** ( लिंग )—श्रीपर्वतावरील एक स्कंद-स्थापित शिवलिंग ( लिङ्ग. १.६२.१६१ ).

**कदरगाम** ( सुब्रह्मण्यक्षेत्र )—लंका ( आधु. सिलोन ) देशातील एक सुब्रह्मण्य ( कार्तिकेय ) क्षेत्र ( ती. पृ. ३८३ ).

**कदलमलै** ( मंदिरस्थान )—मद्रास राज्यातील पूर्व समुद्रकिनारीच्या 'मामल्लपुरम्' मंदिरस्थानाचे पूर्वकालीन नामांतर ( गोएटझ्, पृ. ११६; मामल्लपुरम् पहा ).

**कदली** ( नदी )—एक श्राद्धयोग्य नदी ( पद्म. आदि. ११.४५; मत्स्य. २२.५२ ).

**कदलीवन** ( वन )—जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वतावरील एक वन ( वायु.३८.६९ ).

२. श्रीशैल पर्वतावरील एक वन आणि शक्तिपीठ-स्थान.

३. महाभारत लोमशयात्रामते गंधमादन पर्वतावरील कुबेर पुष्करिणीकाठचे एक सौगंधिक कमलवन आणि हनुमानाचे निवासस्थान. येथे सुगंधी कमलपुष्पांसाठी आलेल्या भीमाची हनुमानासमवेत भेट झाली होती ( म. आर. १४६.४२–८० ). नामांतर (महाभारत)– 'कदलीषंड' ( कदलीखंड ).

**कदारम्** ( द्वीप )—तामीळ शिलालेखमते भारत-वर्षान्तर्गत 'कटाह द्वीपा'चे नामांतर ( कटाह द्वीप पहा ).

**कदिरी** ( बृहद्भारतीय नगर )—यवद्वीप ( आधु जावा ) देशातील कदिरी राजवंशाच्या ( स. १०४२–१२२२ ) राजधानीचे नगर. जावामधील आधु. केदिरि गाव हेच होय. नामांतर–'दाहा'.

यवद्वीपसम्राट एकलंगाने कौटुंबिक कलहनिवारणार्थ केलेल्या स्वराज्याच्या कदिरी आणि जंगलराज्य या दोन भागांपैकी कदिरी राजवंशाचा आद्य राजा 'शास्त्रप्रभु' आणि 'जयप्रभु' श्रीजयवर्ष दिग्जय हा असून त्याच्या त्रिगुण नामक दरबार कवीने 'कृष्णायन काव्य लिहिले होते.

जावामधील पनतरन् मंदिरातील कृष्णजीवनाची शिल्पचित्रे याच काव्याधारे कोरली आहेत. या नगराच्या जयभय ( स. ११३५ ) नामक अन्य एका साहित्यप्रेमी राजाच्या राज्यकालात शेदा कवीने लिहिलेल्या 'भारतयुद्ध' नामक वैष्णव काव्यात त्या राजास विष्णुअवतार म्हटले आहे.

**विनाश**—या नगराच्या कृतजय ( स. १२०० ) नामक अंतिम राजाने धर्मगुरूंपेक्षाहि आपण वंदनीय असल्याचा दावा केल्याने राज्यामध्ये वंडाळी माजली. या संधीचा फायदा घेऊन तुमपेलच्या अंकरोक् राजस राजाने हे राज्य जिंकले ( सांकृत्यायन, पृ. ११०–१११ ).

**कदेत** ( उपद्वीप )—विष्णुधर्ममते भारताचे एक उपद्वीप ( विष्णुधर्म. १.८.५ ).

**कद्जौघिर** ( देश )—ह्युएनत्संगच्या प्रवासवर्णनमते कान्यकुब्जच्या हर्षवर्धनाने जिंकलेला पूर्व भारतातील कामरूप ( आधु. आसाम ) नजिकचा एक देश. कनिंगहॅम यांचे मते आसाममधील आधु. कांक्जोर प्रदेश हाच होय ( वॉटर्स, १.३४९ ).

**कड्लूर** ( दुर्गस्थान )—मद्रास राज्यातील दक्षिण अर्काट जिल्ह्यातील सुविख्यात दुर्गस्थान. इंग्रजांनी स. १६८९ मध्ये येथे बांधलेला 'सेंट डेव्हिड' किल्ला या प्रदेशातील इंग्रज सत्तेचा बालेकिल्ला होता ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. २८९ ).

**कद्वार** ( मंदिरस्थान )—सौराष्ट्रातील प्रतिहार स्थापत्य-शैलीचे ( इ. स. ८ वे—९ वे शतक ) हिंदु देवमंदिर-स्थान ( गोएट्झ, पृ. १४७ ).

**कनक** ( गुह्यक्षेत्र )—मथुरा येथील एक गुह्यक्षेत्र ( वराह. तीर्थविवेचन. पृ. १८९ ).

२. ( देश ) बृहत्संहितामते पश्चिम भारतातील जुंग, शक, आणि वैश्य लोकसमूहांनजिकचा एक देश आणि लोकसमूह. 'सुवर्णखनियुक्त' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले होते ( बृ. सं. १४.२१ ).

कर्नच्या मते हा स्वतंत्र देश नसून, 'सुवर्णवर्णीय' शक लोकांची ती उपाधी होती. परंतु बृहत्संहिताभाष्य, तसेच अल्बेरुणीच्या ग्रंथमते हा स्वतंत्र देश होता.

३. ( देश ) पद्ममते दक्षिण भारतातील एक देश ( पद्म. आदि. ६.५५ )

**कनकगिरि** ( जैन तीर्थ )—बुंदेलखंडातील 'सवणा-गिरि' ( आधु. सोनागिरि ) नामक पर्वतीय तीर्थाचे नामांतर ( तीं. सं. पृ. १२६; सवणागिरि पहा ). अन्य नामांतरे–' कनकाचल '; ' कनकाद्रि '; ' सोनगिरि.'

**कनकताल** ( तीर्थ )—दिल्ली–मुरादाबाद मार्गावरील पिलखुआ रेल्वे स्थानकानजिकचे एक लुप्तप्राय तीर्थ. आधु. कंखली नामक या तीर्थस्थानी कंखलेश्वर महादेवाचे मंदिर आहे ( ती. पृ. ८७ ).

**कनकनन्द** ( तीर्थ )—गया येथील एक तीर्थ ( नारद. उत्तर. ४४.६२ ).

**कनकनन्दा** ( तीर्थ )—कूर्ममते एक तीर्थ ( कूर्म. उत्तर. ३७.४१ ).

२. ( देवीस्थान ) प्रभासक्षेत्रान्तर्गत एक देवीस्थान ( नारद. उत्तर. ७०.४९; स्कन्द.प्रभास. प्र. २६२ ).

३. ( नदी ) गया येथील मुंडप्रस्थाच्या उत्तरेकडील एक नदी ( नारद. उत्तर. ४४.६२; वायु. ७७.१०५; कूर्म. उत्तर. ३७.४१–४३ ).

**कनकपीठ** ( अपराजिता देवीपीठ )—बिहारमधील मुराराय रेल्वेस्थानकापासून ३ मैलांवरील अपराजिता देवीपीठ ( ती. पृ. १७२ ).

**कनकपुर** ( महासरस्वतीपीठ )—ओरिसा प्रांतातील कटकनजिकचे महासरस्वती देवीपीठ. सारलादास नामक शूद्र संताच्या नावावरून सुविख्यात असणारी येथील सारलादेवी सध्या नजिकच्या तेंदुलिपदा गावी स्थलांतरित झाली असून, येथे फक्त भग्न मंदिरावशेष आहेत ( ती. पृ. १९२ ).

**कनकभवन** ( मंदिर )—अयोध्या येथील श्रीरामाचे मुख्य मंदिरस्थान. स्थानिक नामांतर–' सीतामहल ' ( ती. पृ. १४३; अयोध्या पहा ).

**कनकमुनि** ( ग्राम )—ह्युएनत्संगच्या प्रवासवर्णनमते नेपाळ तराईतील कपिलवस्तु ( आधु. पिप्रावा ) गावाच्या ६ मैल आग्नेयेकडील एक बौद्ध तीर्थ. 'कनकमुनि ( कोनाकमन ) नामक पूर्वकालीन बुद्धाचे जन्मग्राम' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले होते.

नेपाळी तराईतील तौलिह्वा तहसिलीतील उस्कबझार रेल्वेस्थानकापासून ३८ मैल, रुम्मिनदेई ( प्राचीन लुंबिनीवन ) स्थानापासून १३ मैल आणि भारतीय हद्दीतील पिप्रावा गावापासून ७ मैल वायव्येकडील आधु. निग्लीव ( निगाली सागर ) गाव हेच होय. या गावाच्या १ मैल दक्षिणेकडील निगालीसागर सरोवराच्या डाव्या किनाऱ्यावर फ्यूरर यांना अशोकाचा एक भग्न स्तंभ सापडला ( स. १८९५ ). थापर यांच्या मते हा स्तंभ पूर्वी आधु. निगाली सागरपासून दूर अंतरावर असून, उत्तरकालात तो येथे हलविण्यात आला असावा ( थापर,

अशोक. पृ. २३३ ).

**नामांतरे**— प्राचीन साहित्यात या बौद्धस्थानाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :---

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. अशोक स्तंभलेख | कोनाकमन |
| २. भर्हुत शिलालेख ( इंडि. अँटि. २१.२२९ ). | कोनागमन |
| ३. अन्य बौद्ध साहित्य | कोनाकमुनि |
| ४. ह्युएनत्संगचे प्रवासवर्णन | क-नो-क मो-नि |

**फाहियेन्च्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते हे स्थान कपिलवस्तु ( आधु. पिप्रावा ) पासून १ मैल पश्चिमेस होते. पिप्रावा आणि त्याच्या ९ मैल वायव्येकडील तिलौरकोट गावांना फाहियेन् आणि ह्युएनत्संग यांनी कपिलवस्तु मानल्यामुळे त्या दोघांच्या वर्णनात विरोध उत्पन्न झाला आहे.

**बौद्ध वास्तू**—ह्युएनत्संगच्या प्रवासवर्णनमते येथील कनकमुनि बुद्धाच्या जन्मस्थान, आत्मज्ञानप्राप्तिस्थान आणि निर्वाणस्थान या तीनहि पवित्र स्थानी प्रत्येकी एक स्तूप असून, त्यापैकी आत्मज्ञानप्राप्तिस्थान कनकमुनि गावाच्या ईशान्येस आणि निर्वाणस्थान आत्मज्ञानस्थानाच्या उत्तरेस होते.

**अशोकस्तंभ**—ह्युएनत्संगच्या मते कनकमुनि निर्वाण ( शरीरावशेष ) स्तूपासमोर अशोकाचा सिंहप्रतिमायुक्त स्तंभ ( उंची २०′ ) होता ( वॉटर्स, २.५–६ ).

**आधुनिक काळी**—या स्थानी निमुळत्या आकाराच्या अशोकस्तंभाचे दोन तुकडे ( उंची १४$\frac{3}{4}$′ आणि १०′ ) सापडले असून, त्यावरून ह्युएनत्संगने निर्देशिलेली त्याची २०′ उंची चुकीची दिसते. स्तंभाच्या खालच्या तुकड्यावर अशोकाचा १० ओळींचा स्तंभलेख आणि वरच्या तुकड्यावर मध्ययुगीन रेखाचित्रे आणि अक्षरे आढळतात.

**अशोकाचा स्तंभलेख**—येथील अशोक स्तंभलेखमते आपल्या राज्यकालाच्या चौदाव्या वर्षी अशोकाने येथील कोनाकमन शरीरावशेष स्तूप दुप्पट मोठा केला असून, राज्यकालाच्या विसाव्या वर्षी त्या स्तूपाची स्वतः पूजा करून हा स्तंभ उभारला. मात्र कनकमुनि शरीरावशेष स्तूपाचे काहीहि अवशेष आज येथे आढळत नाहीत ( कॉर्पस् इन्स्क्रि. १.१.२३; २.१६५ ).

**कनकवाहिनी** ( नदी )—राजतरंगिणीमते कश्मीरातील भूतेश्वर ( आधु. बुथिशेर ) शिवस्थानाजवळून वहाणारी एक नदी ( राज. १.१५०; ८.३३५६ ). हरमुकुट पर्वतावरील गंगबल ( = उत्तरगंगा = प्राचीन उत्तर मानस ) आणि नंदकौल ( = नंदिसरस् =प्राचीन कालोदक ) सरोवरांपासून उगम पावणारी आधु. कानकनाई नदी ती हीच होय. नामांतर ( हरमुकुटमाहात्म्य )–‘ करंक ’.

**उगम**—हरमुकुटमाहात्म्यते प्रारंभी ‘ कालोदक ’ नावाने ओळखली जाणारी ही गंगा सरोवरोद्भवा नदी हरमुकुट ( आधु. हरमुख ) पर्वताच्या पूर्व आणि आग्नेय भागातील जल गोळा करीत असे. यावरून कालोदक सरोवर हे कनकवाहिनी नदीचाच भाग मानले जात असावे. नीलमतमते ‘ सोदर ’ तीर्थाच्या दक्षिणेकडून वहाणारी ही नदी अखेरीस चीरमोचन तीर्थस्थानी सिंधु ( आधु. काली सिंध ) नदीस मिळते ( नीलमत. १३३४ ). उत्तर मानस सरोवरातील पवित्र जल सिंधु नदीमध्ये समाविष्ट करणारे हे पवित्र तीर्थ नीलमत पुराणात ‘ कनकवाहिनी संगम ’ ( नीलमत. १५४५ ), आणि ‘ कनकवहिनी–सिंधुसंगम ’ ( नीलमत. १५३९ ), वैकल्पिक नावांनी सुविख्यात होते. कश्मीरच्या जलौक राजाने येथे आपला देह ठेवला ( राज. १.१४९–१५० ).

**हरमुकुटमाहात्म्यात**—या ग्रंथात ही नदी आणि चीरमोचन तीर्थाचा निर्देश ‘ करंक नदी ’ आणि ‘ करंक तीर्थ ’ वैकल्पिक नावांनी केला असून, या ग्रंथमते गरुडाने दधीचि ऋषींच्या अस्थी या संगमस्थानी विसर्जित केल्याने त्यास हे नाव मिळाले ( हरमुकुट. ३.२२१ ). स्टाइन यांच्या मते आधु. ‘ कानकनई ’ च्या ‘ करंक ’ या बनावट संस्कृत रूपाचे स्पष्टीकरण देण्यासाठी रचलेली ही सारीच आख्यायिका कल्पनारम्य स्वरूपाची आहे ( स्टाइन, राज. २.३८१; ४८९ ).

**कनकशृङ्ग** ( पर्वत )—वायुमते मेरु पर्वताच्या उत्तर भागातील एक पर्वत ( वायु. ३६.३२ ).

**कनकशृङ्गा** ( देवीस्थान )—अवंती येथील एक देवीस्थान ( नारद. उत्तर. ७८.३५ ).

**२.** ( नगर ) स्कंदमते मध्य भारतातील ‘ उज्जयिनी ’ नगराचे नामांतर. अन्य नामांतर–‘ सुवर्णशृंगारिका ’ ( स्कन्द. आवन्त्य. अ. २६. २८-३४; उज्जयिनी पहा ).

**कनका** ( नदी )—गया येथील एक पवित्र नदी ( पद्म. आदि. २८.१२३; वायु. १०८.८० ).

**कनकाचल** ( जैन तीर्थ )—बुंदेलखंडातील ‘ सवणा-

गिरि' पर्वतीय जैनस्थानाचे नामांतर. अन्य नामांतर —'कनकाद्रि' (सवणागिरि पहा).

**कनकाधली-फीणाव-फीणा** (ग्राम)—धर्मारण्यातील एक ग्राम (स्कन्द. ब्राह्म. ध. ३५.३९).

**कनकेश** (लिंग)—काशी येथील एक शिवलिंग (स्कन्द. काशी. ९७.१९७; लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. १०४).

**कनकेशपद** (तीर्थ)—गया येथील एक तीर्थ (अग्नि. ११५.५३).

**कनकेश्वर** (लिंग)—कोंकणातील धरमतरनजिकचे एक पर्वतीय शिवलिंग (ती. पृ. ४४३).

**कनखल** (तीर्थ)—महाभारत धौम्य (म. आर. ८८. १९) आणि पुलस्त्य (म. आर. ८२.२६) तीर्थयात्रांमते गंगा नदीकाठचे एक तीर्थ, आणि दक्षयज्ञस्थान. नारद पुराणान्तर्गत गंगामाहात्म्यात याचे सविस्तर वर्णन असून (नारद. उत्तर. ४१. ३६), येथील गंगा नदी विशेष पवित्र मानली आहे. हरिद्वार–हृषिकेश मार्गावरील हरिद्वारपासून २ मैल पूर्वेकडील, तसेच हरी–की–पैडीपासून ३ मैलांवरील नीलधारा–गंगासंगमानजिकचे आधु. कनखल तीर्थ हेच होय. काही अभ्यासकांच्या मते पौराणिक कुब्जाम्रक तीर्थ हेच असावे (कुब्जाम्रक पहा).

**दक्षयज्ञ**—लिंग आणि कूर्म पुराणमते या गंगाद्वार तीर्थस्थानी झालेल्या दक्षयज्ञात सतीने देहार्पण केले (लिङ्ग. १.१००; कूर्म. १.१५). दक्षयज्ञाचे हे स्थान सध्या दक्षेश्वर महादेवाच्या मंदिरामागे दाखविले जाते.

**शिवाचे उग्रलिंग**—येथील शिवाचे उग्रलिंग भारतातील ६८ शिवलिंगांपैकी एक असून, स्कंदमते ते कालांतराने काशी येथील अर्कविनायकानजिक स्थलांतरित झाले (स्कन्द. काशी. ६९.९७).

**पौराणिक साहित्यात**—या साहित्यमते हे श्राद्धयोग्य तीर्थ असून (अग्नि. १०९.१७; कूर्म. उत्तर. ३७.१०; पद्म. आदि. २८.३०.; ३९.८१), वामन पुराणान्तर्गत प्रह्लादतीर्थयात्रेतहि याचा निर्देश आढळतो (वामन. ८४. ३९; ५७). अन्य तीर्थमाहात्म्य कथन करीत असताहि तुलनेसाठी याचा पुनःपुन्हा उल्लेख आढळतो (**अर्बुद-माहात्म्य–स्कन्द.** प्रभास. अ. २६.१; **गयामाहात्म्य–अग्नि.** ११५.२३; वायु. १११.७; **नर्मदा-माहात्म्य–कूर्म.** उत्तर. ४०.७; पद्म. आदि. १८.११; २०.६७; मत्स्य. १९३.६९; **मथुरामाहात्म्य–नारद.** उत्तर. ७९.२७; वराह. १५२.४१).

विष्णुस्मृति आणि योगिनीतंत्रातहि याचा निर्देश असून (विष्णुस्मृति. ८५.१४; योगिनी. २.६), पद्ममते रैभ्य ऋषींचा आश्रम येथेच होता (पद्म. स्व. १३.२०; स्कन्द. अरुणाचल. २.२).

**महाभारतात**—या ग्रंथातील आरण्यक पर्वान्तर्गत तीर्थनामावलीमते हे ऋषिप्रिय तीर्थ गंगा नदी आणि विनशन तीर्थ यांच्या दरम्यान होते (म. आर. १३५.५).

२. स्कंदमते अरुणाचल पर्वतान्तर्गत एक शिवस्थान. येथील शिवाचे नाव उग्र आणि देवीचे नाव उग्रा होते (स्कन्द. अरुणाचल. २.२)

३. त्र्यंबकेश्वर येथील पंचतीर्थांपैकी एक. हे कुशावर्त तीर्थाच्या पूर्वेस आहे.

४. गया येथील एक तीर्थ (वायु. १११.७; अग्नि. ११५.२३; नारद. उत्तर. ४६.४६).

५. (तीर्थ) नर्मदा नदीकाठचे गरुड–तपस्यास्थान, एक तीर्थ (मत्स्य. १८३.६९; पद्म. आदि. २०.६७).

६. (तीर्थ) मथुरा येथील एक तीर्थ (वराह. १५२. ४०–४९).

७. (जैन तीर्थ) अबू पर्वतावरील दिलवारापासून ४ मैलांवरील ओरिया गावचे एक जैन तीर्थ. येथे सुमति राजाने दानधर्म केला असून, सध्या येथे महावीर मंदिर आणि चक्रेश्वर नामक शिवमंदिर आहे (ती. पृ. ३९९).

**कनगोर** (नगर)—टॉलेमीच्या मते मध्य भारतातील 'कान्यकुब्ज' नगराचे नामांतर (कान्यकुब्ज पहा).

**कनडे** (महानुभाव तीर्थ)—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थ (स्था. पृ. ४१). चाळीसगाव रेल्वेस्थानकापासून २० मैल आग्नेयेकडील, आणि हातनूरपासून ६ मैल उत्तरेकडील आधु. कन्नड गाव हेच होय.

**कनवारो** (वैष्णवतीर्थ)—व्रजमंडलान्तर्गत (आधु. मथुरा–वृंदावन) एक वैष्णवतीर्थ. येथे श्रीकृष्ण आणि बलराम यांचा कान टोचण्याचा विधी झाला होता (ती. पृ. १०२).

**कनिष्कपुर** (नगर)—राजतरंगिणीमते तुरुष्कराज कनिष्काने स. ७८ मध्ये स्थापिलेले कश्मीरातील क्रोधन विषय (आधु. क्रुहिन) परगण्यातील एक नगर (राज. १.१६८). कनिष्काची पहिली बौद्धधर्मीय परिषद येथे भरली असून, कनिष्कशकाचा प्रारंभहि या नगरस्थापनेसमवेतच (स. ७८) त्याने केला. बारामूल (प्राचीन वराहमूल)–श्रीनगर रस्त्यावरील बारामूल्यापासून ६ मैलांवरील, आणि

श्रीनगरपासून १० मैल दक्षिणेकडील आधु. कानिस्पोर गाव हेच होय ( अक्षांश ३४°–१४′ उत्तर; रेखांश ७४–२८′ पूर्व ). नामांतर ( राजतरंगिणी टीका, पर्शियन साहित्य )– ' कानेस्पुर '.

**अवशेष**—या गावानजिक कनिष्काच्या राजवाड्याचे अवशेष, तसेच प्राचीन नाणी आणि कोरीव दगड सापडले आहेत ( स्टाइन, राज. १.३०; २.४८२ ).

**कनिष्क विहार** ( बौद्धस्थान )—कनिष्क राजाच्या स. १२८ च्या ' शाहजी–की–ढेरी ' खरोष्ट्री करंडक लेखमते वायव्य भारतातील एक बौद्ध विहार. या विहाराच्या महासेन संघारामातील सर्वास्तिवादिन् भिक्षूंसाठी हा करंडक दान देण्यात आला होता. हा विहार ( कणेष्कस विहार ) आधु. पेशावर गावच्या गंज दरवाजाबाहेरील ' शाहजी–की–ढेरी ' अवशेषसमूहाच्या स्थानी असावा ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.१३७ ).

**कनिष्क स्तूप**—स. १९०८ साली डॉ. स्पूनर यांना येथील विशाल स्तूपाचे अवशेष, तसेच बुद्धशरीरावशेषयुक्त ' कनिष्क करंडक ' (४″×५″) सापडला. पंचधातूच्या या गोलाकृती करंडकाच्या झाकणाच्या ( उंची–२½″ ) शिरोभागी बुद्ध, ब्रह्मा आणि इंद्र यांच्या मूर्ती असून, झाकणावर कमलदलांची आणि हंसांची नक्षी आहे. करंडकावर पुष्पमालात्रयवेष्टित पद्मासनस्थ गौतम बुद्धाची, तसेच सूर्य ( मीरो ), आणि चंद्र ( मव ) यांच्या दरम्यानच्या कनिष्काची प्रतिमा आहे.

**करंडकलेख**—या करंडकाच्या झाकणावरील, तसेच करंडकावरील कनिष्ककृत करंडकलेखमते त्या राजाने कनिष्क संवत् १ मध्ये ' ×× इम ' गावच्या कनिष्क विहारान्तर्गत महासेन संघाराममध्ये ' अगिशल ' नामक स्थापत्यविशारद दासाच्या नेतृत्वाखाली हा करंडक स्थापिला. फौचर यांच्या मते येथील ' अगिशल ' स्थापत्यविशारदासंबंधीचा निर्देश कनिष्कास नकळत घुसडण्यात आला असावा ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.१३५–१३७ ).

**शिलालेखयुक्त विटा**—कनिष्क स्तूपाच्या पश्चिम भागाच्या अवशेषसमूहात सापडलेल्या ' बुधसेण, ' ' दिवस ' ( दिवर ), ' वणस, ' ' अयद, ' ' मरमि ' आदि खरोष्ट्री अक्षरेयुक्त विटा सध्या पेशावर म्युझियममध्ये ठेवल्या आहेत ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.१३८ ).

**कनिष्ठपुष्कर** ( जलाशय )—संभलक्षेत्रान्तर्गत मध्यपुष्करानजिकचा एक जलाशय ( ती. पृ. ९३ ).

**कनीयस्** ( देश )—भारतवर्षान्तर्गत एक देश ( पद्म. आदि. ६.३९ ).

**कनीयस तडाकासारिका** ( ग्राम )—त्रैकूटक राजा दाहरसेनाच्या स. ४५७ च्या पारडी ताम्रपटमते गुजरातमधील अंतर्मंडली विषयान्तर्गत एक ग्राम. गुजरातमधील कापुर गावापासून १५ मैल पश्चिमेकडील मिंधोला–पूर्णा नद्यांच्या दरम्यानचे आधु. तरसारी गाव हेच होय. याचे मूळ नाव ' तडाकासारिका ' असून ' कनीयस ' ही त्याची उपाधी असावी ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.२४ ).

**कनुपर्रु** ( खिस्ती धर्मस्थान )—आंध्र प्रदेशातील कृष्णा जिल्ह्यातील नरसरावुपेट गावापासून ४ मैल आग्नेयेकडील एक खिस्ती धर्मस्थान. या गावाच्या मध्यभागी येशूनाथ स्वामीचा ( येशू खिस्त ) एक पुतळा आढळतो ( सेवेल, मद्रास. पृ. ६९–७० ).

**कनैयकल्लु** ( नगर )—पश्चिम चालुक्य राजा विक्रमादित्य ( षष्ठ ) च्या इ. स. ११ व्या शतकातील शिलालेखमते दक्षिण भारतातील निडुगलवंशीय मंगरस राजाच्या राजधानीचे नगर. याचे आधुनिक स्थान समजत नाही ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३६९ ).

**कनोगिझ** ( नगर )—टॉलेमीच्या मते मध्य भारतातील ' कान्यकुब्ज ' नगराचे नामांतर ( कान्यकुब्ज पहा ). अन्य नामांतर ( फाहियेन् )—' कनोयि '.

**कन्तब्** ( नदी )—प्लिनीच्या ग्रंथमते वाहीक देशातील ' चंद्रभागा ' नदीचे नामांतर ( चंद्रभागा पहा ). अन्य नामांतर–' कंतब्र. '

**कन्तालम्** ( वैष्णव तीर्थ )—दक्षिण भारतातील मद्रास –रायचूर रेलमार्गावरील अदोनि गावापासून १३ मैल वायव्येकडील एक श्रीरंग ( विष्णु ) मंदिरस्थान ( ती. पृ. ३३० ).

**कन्थडेश्वर** ( लिंग )—अवंती येथील ८४ शिवलिंगांपैकी एक ( स्कन्द. आवन्त्य. अ. ६१.१; च. लिं. ३४ ).

**कन्या** ( वामनस्थान )—एक वामनस्थान. येथील वामनाचे नाव मधुसूदन होते ( वामन. ९८.२८ ).

**कन्दरावा** ( ग्राम )—धर्मारण्यातील एक ग्राम ( स्कन्द. ब्राह्म. ध. ३९.२८१ ).

**कन्दर्पेश्वर** ( लिंग )—वाराणसी येथील एक शिवलिंग ( पद्म. आदि. ३४.१० ).

**कन्दलोइ** ( देश )—टॉलेमीच्या मते दक्षिण भारतातील ' कुंतल ' देशाचे नामांतर ( कुंतल पहा ).

**कन्दह** ( ग्राम )—विग्रहपाल ( तृतीय ) राजाच्या इ.

स. १२ व्या शतकातील बनगाव ताम्रपटमते बिहारमधील एक ग्राम. भागलपुर जिल्ह्यातील सहर्स तालुक्यातील आधु. कंदह गाव हेच होय. येथे भवादित्य राजाने बांधलेले एक सूर्यमंदिर आहे (एपि. इंडि. २९.४८).

**कन्दाहार** (देश)—मध्ययुगीन शब्दकोश साहित्य-मते 'गंधार' देशाचे नामांतर (वैजयन्ती. ३७.४७.; गंधार पहा).

**कन्दुकेश्वर** (लिंग)—काशी येथील एक शिवलिंग (स्कन्द. काशी. ६५).

**कन्दुर** (नगर)—अमीर कुस्रूच्या ग्रंथमते श्रीरंगम्-नजिकच्या 'कण्णनूर' नगराचे नामांतर (कण्णनूर पहा).

**कन्दूत** (बृहद्भारतीय नगर)—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते अफगाणिस्तानातील वक्षु (आधु. अमूद-रिया) नदीकाठचे तमस्थिति (आधु. वखन्) देशाच्या राजधानीचे नगर. याचे आधु. स्थान समजत नाही.

ह्युएन्त्संगच्या मते या (हुन्-ते-तो) गावी तमस्थिति देशाच्या राजाने बांधलेल्या बौद्ध मंदिरातील (चिंगशे) बुद्धप्रतिमेच्या शिरोभागीची सोनेरी छत्री प्रदक्षिणामग्न यात्रेकरूंसमवेत भ्रमण करीत असे (वॉटर्स, २.२८०).

**कन्धारपुर** (नगर)—राष्ट्रकूट राजांच्या इ. स. १३ व्या शतकातील हण्णीकेरी शिलालेखमते राष्ट्रकूटांच्या म्हैसूर राज्यातील उपराजधानीचे नगर (मुख्य राजधानी—मान्यखेट=गुलबर्गा जिल्ह्यातील आधु. मालखेड). या गावाचे नावावरूनच राष्ट्रकूट राजा कृष्णकंधर यास 'कंधपुरा-धिपति' उपाधी प्राप्त झाली होती. गुणक विजयादित्य राजाने उद्ध्वस्त केलेले कृष्णपुर गाव हेच असावे. म्हैसूर राज्यातील बेळगाव जिल्ह्यातील संपगावनजिकचे आधु. हण्णीकेरी गाव हेच होय.

**नामव्युत्पत्ती**—'कृष्ण राजाचे नगर' अशा अर्थाने यास 'कंधरपुर' (कंधारपुर) नाव प्राप्त झाले असावे.

**अन्य शिलालेखात**—इ. स. १० व्या शतकातील बहादुरपुर शिलालेखात या गावच्या कालप्रिय आणि कृष्णेश्वर मंदिरांचे, तसेच राष्ट्रकूट राजा कृष्णच्या चातुर्याचे वर्णन आढळते. राष्ट्रकूट राजा गोविंद (चतुर्थ) चा (स. ९२९—९३३) निर्देश त्यामध्ये 'गोज्जीग-सोमनाथ' नावाने आढळतो.

**कन्नगर** (तीर्थ)—टॉलेमीच्या मते ओरिसामधील 'कोणादित्य' सूर्यक्षेत्राचे नामांतर (कोणादित्य पहा).

**कन्नम्बाडि** (नगर)—चोल राजा कुलोत्तुंग (प्रथम) च्या स. ११४ च्या शिलालेखाचे म्हैसूरातील कृष्णराजपेट तालुक्यातील उपलब्धिस्थान (एपि. कर्ना. ४.३४).

**कन्नेगाल** (नगर)—दक्षिण म्हैसूर प्रांतातील एक नगर. चालुक्य राजा विजयादित्याने स. १११७ मध्ये या गावी होयसाळ राजा विष्णुवर्धनाच्या गंगराज नामक सेनापतीचा पराजय केला (अय्यंगार, एन्शन्ट इंडिया. पृ. १४२).

**कन्यकागुण** (देश)—वायव्य भारतातील 'कुन्यता-लडह' देशाचे नामांतर (म. भी. १०.५१; कुन्यता-लडह पहा). अन्य नामांतर—'रस्यकागुण'.

**कन्यकुब्ज** (तीर्थ)—महाभारत धौम्ययात्रामते मध्य भारतातील 'कान्यकुब्ज' नगराचे नामांतर (म. आर. ८५.१२; कान्यकुब्ज पहा). अन्य नामांतर (अभिधान. २.१३२)—'कन्यकुब्जा'; (वराह. १६२.४७)—'कन्यपुर'.

**कन्या** (नदी)—आश्वलायन श्रौतसूत्रमते भारत-वर्षातील एक नदी (आश्व. श्रौ. ३.७). ग्वाल्हेरच्या उत्तरेकडील शिवपुर, मुरैना आणि भिंड जिल्ह्यातून वहाणारी आधु. कॉंरीकुँवारी नामक चंबळ नदीची उपनदी हीच होय.

**प्राचीन साहित्यात**—ऋग्वेदात एके ठिकाणी या नदीचा अस्पष्ट निर्देश आढळतो (ऋ. ६.४९.७). शिवमते हिच्या काठी एक पवित्र शिवलिंग होते (शिव. माहेश्वर. अ. ३.२.१३; वि. १२.१७).

**कन्याकुब्ज** (नगर)—मध्ययुगीन शब्दकोश साहित्य-मते मध्य भारतातील 'कान्यकुब्ज' नगराचे नामांतर (अभिधान. १३२.९७४; कान्यकुब्ज पहा).

**कन्याकुमारी** (तीर्थ)—महाभारतमते दक्षिण भारता-तील 'कुमारीतीर्था'चे नामांतर (म. आर. ८६.१३).

**कन्याकूप** (तीर्थ)—महाभारत अंगिरस्यात्रामते एक कीर्तिप्रद तीर्थ (म. अनु. २५.१९).

**कन्यातीर्थ** (तीर्थ)—महाभारत पुलस्त्ययात्रामते पांड्य देशान्तर्गत दक्षिण समुद्रकिनारीचे सहस्र गोदानाचे पुण्य प्रदान करणारे पापमुक्तिकारक सुविख्यात तीर्थ (म. आर. ८२.११८; ८३.२१). केरळ राज्याचे दक्षिण टोक आणि सिंहलद्वीपाचे उत्तर टोक यांच्या सीमेवरील गंगा—सागर, सिंधु—सागर आणि हिंदी महासागर यांच्या संगम-स्थानीचे आधु. कन्याकुमारी हेच होय. कलकत्त्याच्या कालीघाटातील काली आणि कन्याकुमारी येथील कुमारी ही एकाच दुर्गादेवीची रौद्र आणि शांत रूपे मानतात.

दक्षिण भारतातील दक्षिण रेल्वेच्या तिरुनेल्वेली आणि

त्रिवेंद्रम् रेल्वेस्थानकाहून मोटरबसने येथे जाता येते.

**नामांतरे**— प्राचीन साहित्यात या तीर्थाची निम्नलिखित नामांतरे आढळतातः—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पतंजलीचे व्याकरण महाभाष्य (पतञ्जलि ३.३२९) | कन्यानूप |
| २. महाभारत ( आर. ८६.१३ ) | कुमारी तीर्थ |
| ३. पौराणिक साहित्य ( ब्रह्माण्ड. २.१६.११; मत्स्य. ११४.१०; वायु. ७७.२८ ). | कुमारी तीर्थ |
| ४. टॉलेमी | कोम्परिय |
| ५. पेरिप्लस | कोमर, कोमरै |
| ६. तामीळ साहित्य | कोमरी ( कुमारी ), कन्निम्बलम् ( कुमारी मंदिर ) |
| ७. वस्सफचे प्रवासवर्णन ( सेवेल. इन्स्क्रि. पृ. १६८ ). | कूलम, कौलम् |

**नामव्युत्पत्ती**— या तीर्थाच्या ' कन्या ' आणि ' कुमारी ' या पुरातन नावांचेच ' कन्याकुमारी ' हे देवीनाम आणि तीर्थनाम हे संयुक्त रूप असून, आधु. ' केपकामोरिन ' हे ' कुमारी 'चेच आंग्लभाषीय रूप आहे. पौराणिक साहित्यमते येथील कुमारीस्वरूप देवी ' कुमारी ' अथवा ' पुष्पाक्षी ' नावाने सुविख्यात असून, देवीची उत्सवमूर्ती ' त्यागसुंदरी ' आणि उपवर स्वरूपातील मूर्ती ' श्यामसुंदरी ' नावाने सुविख्यात आहे.

**स्थानमाहात्म्य**— अरबी समुद्र, हिंदी महासागर आणि बंगालच्या उपसागर या समुद्रत्रयाच्या संगमीच्या निसर्गरमणीय तीर्थस्थानी चैत्र पौर्णिमेला एकाच वेळी बंगालच्या उपसागरातील चंद्रोदयाचे आणि अरबी समुद्रातील सूर्यास्ताचे दर्शन घडते. याच्या उलट चैत्र द्वितीयेला बंगालच्या उपसागरातील सूर्योदय आणि अरबी समुद्रातील चंद्रास्त येथे दिसतो. अन्य दिवशीहि येथील सूर्योदयाचे आणि सूर्यास्ताचे दृश्य अविस्मरणीय असते.

**पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यात**— या ग्रंथात निर्देशिलेला 'कन्यानूप' नामक समुद्रवेष्टित प्रदेश (पतञ्जलि ३.३२९ ) संभवतः हाच असावा.

**पौराणिक साहित्यात**—या साहित्यात ' कन्यातीर्थ ' ( कूर्म. उत्तर. ४४.९; पद्म. आदि. २७.१; ३९.२१ ) आणि ' कुमारीतीर्थ ' ( वायु. ७७.२८;ब्रह्माण्ड. २.१६.११; ३.१३.२८; मत्स्य. ११४.१० ) अशा वैकल्पिक नावांनी याचा निर्देश आढळतो. भागवतातील बलरामतीर्थयात्रेत येथील देवीस ' कन्याख्या दुर्गादेवी ' म्हटले आहे.

**महाभारतात**—या ग्रंथातील पुलस्त्य आणि धौम्ययात्रामते पांड्य देशान्तर्गत ' कन्यातीर्थ ' आणि ' कुमारीतीर्थ ' येथे पुण्यकारक कन्या निवास करीत असत ( **कुमार्यः कथिताः पुण्याः**; म. आर. ८२.११८; ८६.१३ ). मात्र याच्या ' कुमार्यः ' बहुवचनी निर्देशाचे कारण समजत नाही.

**टॉलेमीच्या ग्रंथात**—या ग्रंथात ' कोमरिय ' भूशिर नावाने ( अक्षांश १३°–३० उत्तर; रेखांश १२१°–४५' पूर्व ), तसेच पेरिप्लसमध्ये ' कोमर ' ( कोमरै ) नावाने याचा निर्देश आढळतो. ही तीनहि नावे ' कुमारी ' ची ग्रीकभाषीय रूपे असून, पेरिप्लसमते या तीर्थाच्याहि पलीकडे दक्षिणेस भारतवर्ष पसरले होते.

**वस्सफच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते ( इ. स. १३वे शतक ) मलिबर ( आधु. मलबार ) देश या भूशिरापासून ( कुलम् , कौलम् ) खोर ग्रामापर्यंत पसरला होता ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. १६८ ).

**उत्पत्ती**—या स्थानाच्या उत्पत्तीविषयी पौराणिक साहित्यात निम्नलिखित आख्यायिका आढळतात —

**१. कुमारीकथा**–देवगणांच्या प्रार्थनेवरून काशी-विश्वेश्वर शिवाने बाण आणि मूक नामक असुरांच्या वधार्थ स्वपत्नी शक्तीकरवी तिच्या द्विविध रूपांची निर्मिती केली. त्यापैकी रौद्रस्वरूपी काली कालीघाट ( कलकत्ता ) येथे, आणि शांतस्वरूपी कुमारी दक्षिण समुद्ररूपी भुजाद्वय फैलावणाऱ्या कुमारीतीर्थ येथे अवतीर्ण होऊन त्यांनी बाण आणि मूक असुरांचा वध केला. मल्याळम् संवताच्या द्वितीय मासात या घटनेचा ' अंबु चेर्तल ' ( धनुर्युद्ध ) नामक स्मृतिदिन येथे साजरा करतात.

**२. पुष्पाक्षीकथा**—अन्य आख्यायिकेनुसार शिवतपस्येने सायुज्यमुक्ती प्राप्त केलेल्या पुष्पाक्षी नामक कुमारिकेला शिवाने बाणासुरवधार्थ पृथ्वीलोकी पाठविले. बाणासुरवधानंतर स्वर्लोकी परत निघालेल्या पुष्पाक्षीला गोकर्णीपासून कन्याकुमारीपर्यंतच्या प्रदेशाचे वसाहतीकरण करणाऱ्या परशुरामाने कुमारीतीर्थ येथे राहाण्याची प्रार्थना केली. तामीळ आख्यायिकेनुसार परशुरामाने वसाहतयोग्य बनविलेली ही भूमी आद्य तामीळ संगम साहित्याची

जन्मभूमी ( लेमूरिया ) असून, ती भारताच्या दक्षिणेस मादागास्कर आणि आफ्रिका यांच्या दरम्यान अखंडपणे पसरली होती. उसळलेला सागर ही भूमी पुन्हा एकवार गिळंकृत करू लागला असता परशुरामस्थापित दक्षिण दिशाभिमुख कुमारी देवीने सागराचे हे आक्रमण थोपविले.

अन्य एका आख्यायिकेनुसार केवळ कुमारिकेद्वाराच वध होण्याचे शिववरदान प्राप्त झालेल्या बाणासुराच्या वधार्थ देवांनी यज्ञीय अग्निशिखेतून कुमारी देवीची निर्मिती केली. तिच्या त्रिसागर संगमीच्या तपस्येने प्रसन्न झालेला शिव कैलास पर्वताहून कन्याकुमारीप्रत निघाला. परंतु कौमार्यभग्न कुमारी बाणासुरवधास असमर्थ होण्याच्या आशंकेने देवांनी शिवाला शुचींद्रम् येथेच थोपविले आणि कुमारीदेवी कन्यातीर्थ येथे शिवाची प्रतीक्षा करीत राहिली. शुचींद्रम् शिवाला केलेला जलाभिषेक भूगर्भीय मार्गाने येथील देवीप्रत, पोहोचत असल्याची कल्पना आजहि आढळते.

**विवाहविघ्न**—स्थानिक आख्यायिकेनुसार कन्याकुमारीपासून ६ मैलांवरील शुचींद्रम् येथील शिवाने कुमारी देवीच्या दैवी सौंदर्याने आकृष्ट होऊन तिला मागणी घातली. देवांच्या प्रार्थनेवरून या विवाहास मोडता घालण्यासाठी नारदांनी मध्यरात्रीचा मुहूर्त ठरविला, आणि मुहूर्तसमयी कुक्कुटरूप धारण करून स्वरवाने पहाट झाल्याचा आभास निर्मिला. मुहूर्तवेळ चुकल्याच्या समजुतीने शुचींद्रम् शिव स्वस्थानी परत गेला. अपेक्षाभग्न कुमारीदेवीने विवाहसमारंभासाठी सिद्ध केलेल्या भोजनपदार्थांना शंखाशिंपले आणि वालुका बनण्याचा, आणि निम्नलिखित अकरा घाटांमध्ये ती विखुरण्याचा शाप दिला:— १. शुक्रघाट; २. सावित्रीघाट; ३. गायत्रीघाट; ४. कालीघाट; ५. वाणीघाट; ६. गणपतिघाट; ७. कन्निकघाट; ८. मातृघाट; ९. पितृघाट; १०. ब्रह्मघाट; ११. चालीघाट. स्थानिक समजुतीनुसार काशीविश्वेश्वराच्या शक्तीचा अंशभाग अशा या घाटांच्या दर्शनाने काशीयात्रेची परिपूर्ती होते. या घाटातील ' मोनोझाइट ' जातीच्या अनेकरंगी वालुकेमध्ये युरेनियमचा अंश असल्याने, शिवशक्तीचा अंश त्यामध्ये असल्याच्या पौराणिक कल्पनेस पुष्टी मिळते.

**कुमारी मंदिर**—येथील कुमारीदेवी भारतातील एक्कावन्न शक्तिपीठांपैकी एक असून, तंत्रचूडामणीमते येथे सतीचा पृष्ठभाग पडला. येथील देवीचे नाव शर्वाणी आणि भैरवाचे नाव निमिष होते.

येथील कुमारी देवीच्या भव्य मूर्तीच्या हाती जपमाला असून, रात्रिसमयी, तसेच विशेष सणावाराच्या दिवशी तिला रत्नालंकारांचा साजशृंगार करतात. देवीमंदिराच्या प्राकारात इंद्रकांत विनायकाचे इंद्रस्थापित मंदिर असून, मंदिरासमोर समुद्रस्नानासाठी घाट आणि प्रशस्त मंडप आहे. कुमारी देवीच्या निजमंदिराच्या उत्तरेस कुमारी देवीची सखी भद्रकाली हिचे मंदिर आहे.

**मंदिरस्थापत्य**—येथील ' गुहानाथस्वामिन् ' आणि ' विंझिजम् ' मंदिरे चोल–पांड्य स्थापत्यशैलीने ( इ. स. १०–११ वे शतक ) बांधली असून, इ. स. १० व्या शतकापर्यंत येथे पांड्य राजांचे आणि तदनंतर येथे चोल राजांचे राज्य होते. त्यामुळे या दोन्ही मंदिरांच्या स्थापत्य, शिल्प आणि भित्तिचित्रांमध्ये चोल–पांड्य शैलींचे संमिश्रण दिसते ( गोएट्झ, पृ. ११५ ).

**शिलालेख**—चोल राजा राजेंद्र ( प्रथम )च्या स. १०३९ च्या कन्याकुमारी मंदिरलेखमते हे मंदिर चोल राज्यामध्ये समाविष्ट होत असे ( त्रावणकोर, आर्कि. सर्व्हे. १.२३७ ).

**पितृतीर्थ आणि मातृतीर्थ**—भारताच्या दक्षिणतम टोकानजिकच्या समुद्रजलनिमज्जित खडकावरील या तीर्थस्थानी स्नान आणि पिंडदान करतात.

**विवेकानंद शिला** ( श्रीपाद शिला )—येथील त्रिसागरसंगमीच्या कुमारी मंदिरासमोरील एका टेकडीवर स्वामी विवेकानंदांच्या ध्यानधारणेची विवेकानंद शिला आहे.

**अन्य तीर्थे**—येथील देवीमंदिराच्या दक्षिणेस भीमातीर्थ, तसेच पश्चिमेस स्थाणुतीर्थ, आणि उत्तरेस पापविनाशन ( मंडूक ) तीर्थ असून, बंगालच्या उपसागरानजिक सावित्री, गायत्री, सरस्वती, कन्याविनायक आदि तीर्थे आहेत.

**२.** महाभारतमते कुरुक्षेत्रातील सरस्वती नदीकाठचे एक तीर्थ ( म. आर. ८१.९४; १६५ ).

३. नैमिषारण्यातील एक तीर्थ ( म. आर. ९३.३; पद्म. आदि. २७.१ ).

**४.** पुष्करक्षेत्रानजिकचे एक तीर्थ ( पद्म. आदि. १२.५; २७.७५; ३९.३५ ).

**५.** नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( कूर्म. उत्तर. ४२.२१; मत्स्य. १९३.८० ).

**कन्यानूप** ( देश )—पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यमते दक्षिण भारतातील 'कन्यातीर्थ' (आधु. कन्याकुमारी)चे नामांतर ( पतञ्जलि. ३.३२९; कन्यातीर्थ १. पहा ).

**कन्यापुर** ( नगर )—वराहमते मध्य भारतातील

'कान्यकुब्ज' नगराचे नामांतर (वराह. १६२.४७; कान्यकुब्ज पहा).

**कन्याश्रम** (तीर्थ)—महाभारत पुलस्त्ययात्रामते एक तीर्थ. येथे तीन रात्री उपवास केला असता स्वर्लोकाची प्राप्ती होत असे (म. आर. ८३.३४).

**कन्यासंवेद्य** (तीर्थ)—महाभारत पुलस्त्ययात्रामते एक तीर्थ (म. आर. ८२.११७; पद्म. आदि. ३८.५२).

**कन्याह्रद** (तीर्थ)—महाभारत अंगिरस्यात्रामते भारतवर्षातील एक तीर्थ (म. अनु. २५.५३).

**कन्सुह** (राज्यविभाग)—ह्युएन्त्संगच्या जीवन-चरित्रमते चीनमधील शेन्सि प्रांताच्या पूर्वेकडील एक प्रांत. चँग-अन् संज्ञक चीनराजधानीहून निघालेला ह्युएन्त्संग या प्रांतातील त्सिन्-चौ आणि लन्-चौ गावांच्या मार्गे पश्चिम चीनमधील लिअँग-चौ या व्यापारी गावी पोहोचला (वॉटर्स, २.३३०).

**कन्सै** (नदी)—गण राजाच्या इ. स. ३ ऱ्या शतकातील भद्रक शिलालेखमते उत्कल देशातील 'कपिशा' नदीचे नामांतर (एपि. इंडि. २९.२७३; कपिशा पहा).

**कन्हर** (जैन गुफा)—पश्चिम महाराष्ट्रातील पितळखोरा गावानजिकचे जैन गुफास्थान. येथील समृद्ध नक्षीकामयुक्त गुफाद्वय नासिकनजिकची चम्हार लेणी आणि खानदेशातील अंकाई जैन गुफांशी समकालीन (इ. स. ११ वे शतक) आहेत (फर्ग्युसन, २.१९).

**कन्हिआर** (शिलालेखस्थान)—कांग्रा जिल्ह्यातील धर्मशाला गावाच्या ३ मैल पूर्वेकडील मांजी नदीकाठचे इ. स. पू. ६ ऱ्या शतकातील खरोष्ट्री शिलालेखाचे उपलब्धिस्थान. वायव्य भारताबाहेर दुर्मिळ लेखात त्याची गणना होते.

पतिक राजाच्या तक्षिल ताम्रपटासदृश (इ. स. पू. ६ वे शतक) लिपीमध्ये खोदलेल्या येथील चार ओळींच्या शिलालेखाच्या पहिल्या दोन ओळी ब्राह्मी आणि उर्वरित खरोष्ट्री लिपीत आहेत. 'कृष्णयशस्ची वाटिका' (अरम=आराम) अशी अक्षरे त्यामध्ये कोरली आहेत (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.१७९).

**कन्हैरि** (देशविभाग)—यादव राजांच्या शके १२३२ च्या पुरुषोत्तमपुरी ताम्रपटमते महाराष्ट्रातील एक देशविभाग (एपि. इंडि. २५.१९९). याची राजधानी कन्हैरि (जळगाव जिल्ह्यातील चाळीसगाव तालुक्यातील आधु. कन्हेर) गावी होती. आधु. चाळीसगाव तालुका, तसेच औरंगाबाद आणि बीड जिल्ह्यांचा काही भाग म्हणजे हा राज्यविभाग (१००×१८ मैल) असावा.

**उपविभाग**—पुरुषोत्तमपुरी ताम्रपटमते या देशविभागात निम्नलिखित उपविभाग समाविष्ट होत असतः—

**(१) कन्हैरि खंपण** (राज्यविभाग)—आधु. चाळीसगाव तालुक्यातील या राज्यविभागाचे पोखरि॰ (आधु. पोहरि), आणि अडगन (आधु. अदगाव) हे उपविभाग असून, त्यापैकी पोखरि उपविभागात पालि पोखरि, पिंपळगहावण (आधु. पिंपळगाव) आणि सएगहावण (आधु. सायगाव); आणि अडगण उपविभागात पिंपळवाडी (आधु. फुल पिंपळवाडी), काजलकोवी, आणि सौजन ही गावे समाविष्ट होत असत.

**(२) वाघारे** (राज्यविभाग)—मराठवाड्यातील बीड जिल्ह्यातील आधु. वाघुर गावासभोवतालच्या या राज्यविभागात गोले **गहावण** आणि सिंप **विहीरे** गावे समाविष्ट होत असत.

**अन्य गावे**—पुरुषोत्तमपुरी ताम्रपटमते वाघुर गावाच्या परिसरातील निम्नलिखित गावे या राज्यविभागात समाविष्ट होत असत :—१. पुरुषोत्तमपुरी (आधु. पुरुषोत्तमपुरी); २. राजगौ (आधु. राजेगाव); ३. हिवरे (आधु. हिवरे); ४. सादुले (आधु. सडोले); ५. केसवपुरी (आधु. केशवपुरी) (सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २७२–२७३).

**कप** (लोकसमूह)—पल्लव राजा गुडुह्वराच्या शिलालेखमते वायव्य भारतातील 'कुशाण' लोकसमूहाचे नामांतर (कुशाण पहा).

**कपटेश्वर** (तीर्थ)—राजतरंगिणीमते कश्मीरातील प्राचीनतम शिवतीर्थ (राज. १.३२). नीलमतमते हे वितस्ता नदीकाठी होते (नीलमत. १५१५). कश्मीरातील कुतुहर परगण्याच्या दक्षिण भागातील अनंतनागच्या पूर्वेकडील कोठेर गावानजिकचा पापसूदन निर्झर म्हणजे हे तीर्थ होय. आधुनिक 'कोठेर' हे ग्रामनामहि 'कपटेश्वरा'—चेच अपभ्रष्ट रूप आहे (जसे ज्येष्ठेश्वर > ज्येठेर; त्रिपुरेश्वर>त्रिफेर).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या तीर्थाची निम्नलिखित नामांतरे आढळतातः—१. अल्बेरुणी (२.१८१)–'**कुदैशहर**' (कवदेश्वर); २. ऐन्-इ-अकबरी (२.३५८)–'**कोतिहार**'.

**नामव्युत्पत्ती**—नीलमतमते 'छद्मवेषधारी (कपट) शिवावताराचे स्थान' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले. जलनिमज्जित काष्ठाच्या छद्मवेषाने शिव येथे अवतीर्ण झाल्याची आख्यायिकाहि तेथे दिली आहे

(नीलमत. ११५०–११६८; हरचरित. १४). त्या आधारेच उत्तरकालीन कपटेश्वर माहात्म्य रचले आहे.

**तीर्थवर्णन**—येथील वर्तुलाकृती शिवस्वरूपी निर्झराभोवती भोज राजाने बांधलेली दगडी भिंत आणि पायऱ्या आहेत. राजतरंगिणीमते काचपात्रातून आणविलेल्या येथील तीर्थजलाने तो प्रतिदिनी मुखमार्जन करीत असे (राज. ७.१९०). स्टाइन यांच्या मते या सरोवराच्या पूर्वेकडील मंदिरेहि भोज राजानेच बांधली आहेत.

**औषधी गुण**—स्थानिक आख्यायिकामते मुचकुंद नामक दाक्षिणात्य राजाच्या मस्तकी उगवलेली मृगशिंगे या निर्झराच्या स्नानाने नाहीशी झाली. यावरून याच्या जलामध्ये औषधी गुण असावेत.

**अल्बेरुणीच्या ग्रंथात**—या ग्रंथमते वितस्ता–उगमस्थानाच्या दक्षिणेकडील या स्थानी प्रतिवर्षीच्या वैशाख महिन्यात शिवप्रेषित काष्ठखंड अवतीर्ण होत असत (अल्बेरुणी २.१८१). सध्याहि येथील यात्रा वैशाख महिन्यातच भरते. स्थानिक परंपरेनुसार नीलनाग हेच वितस्ता नदीचे उगमस्थान असून, अल्बेरुणीनेहि तिचाच पुनरुच्चार केला आहे.

**ऐन्–इ–अकबरीमध्ये**—या ग्रंथमते या मंदिरवेष्टित निर्झरातील जल कमी होताच त्यामधील चंदनी शिवप्रतिमा अवतीर्ण होत असे (ऐ. अ. २.३५८; स्टाइन, राज. १.६; २.४६७).

**कपडवाणक** (ग्राम)—धर्मारण्यातील एक ग्राम (स्कन्द. ब्राह्म. ध. ३९.२७).

**कपर्दिगणस्थापित शिवलिङ्ग** (लिंग)—काशी येथील एक शिवलिंग (स्कन्द. काशी. ५४).

**कपर्दिचिन्तामणि** (गणेशस्थान)—प्रभासक्षेत्रान्तर्गत एक गणेशस्थान (स्कन्द. प्रभास. प्र. १४१).

**कपर्दिनिवास** (जैनतीर्थ)—पश्चिम भारतातील 'शत्रुंजय' जैन तीर्थाचे नामांतर (शत्रुंजय पहा).

**कपर्दिविनायक** (गणेश)—प्रभासक्षेत्रान्तर्गत एक गणेशस्थान (स्कन्द. प्रभास. प्र. ३८).

**कपर्दीश्वर** (लिंग)—प्रभासक्षेत्रातील एक शिवलिंग (नारद. उत्तर. ७०.९).

२. वाराणसी येथील एक गुह्यशिवलिंग (कूर्म. पूर्व. ३२.१२; ३३.१; ४; १०.२८–४९; १७१; पद्म. आदि. ३५.१).

**कपर्द्यादि गणेश** (गणेश)—काशी येथील एक गणेशस्थान (स्कन्द. काशी. ५४).

**कपाटपुरम्** (नगर)—तामीळ साहित्यमते दक्षिण भारतान्तर्गत पांड्यराजधानी 'मदुरा' नगराचे नामांतर (एपि. इंडि. ३१.२७३; मदुरा पहा).

**कपालदुर्ग** (दुर्ग)—'जैमिनि भारतम्' ग्रंथमते पूर्व भारतातील एक दुर्ग. विजयनगरच्या नृसिंहराय राजाने (स. १४७९) ओरिसा देशानंतर हा जिंकला होता (एपि. इंडि. ७.७७).

**कपालपीठ** (देवीस्थान)—राजस्थानातील 'दधिमती' देवीस्थानाचे नामांतर (ती. पृ. २९४; दधिमती पहा).

**कपालमोक्षण** (तीर्थ)—अवंती येथील एक तीर्थ (स्कन्द. आवन्त्य. अ. ६).

**कपालमोचन** (तीर्थ)—कश्मीरातील एक सुविख्यात तीर्थ (राज. ७.२६६; हरचरित. १०.२४९; १४.१११). रेंब्यार (प्राचीन रमण्याटवी) नदीच्या डाव्या किनाऱ्यावरील देगाम (प्राचीन देग्राम) गावापासून ६० मैल दक्षिणेकडील आधु. नग्बल गाव हेच होय. सध्या येथे काहीहि प्राचीन अवशेष आढळत नाहीत. नामांतर–'ऋणमोचन'.

**नामव्युत्पत्ती**—कपालमोचन माहात्म्यमते 'शिवाचे ब्राह्मणशिर (कपाल) विच्छेदनाचे पातक नष्ट करणारे तीर्थ अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले (स्टाइन, राज. २.४७२).

२. पौराणिक तीर्थावलीमते भारतवर्षातील एक तीर्थ (अग्नि. १०९.१९; पद्म. आदि. १४.१८९; २७.२६).

३. अर्बुद पर्वतावरील एक तीर्थ (स्कन्द. प्रभास. अर्बुद. ३१.१४).

४. अवंती येथील एक तीर्थ (नारद. उत्तर. ७८.६).

५. काशी येथील एक तीर्थ (नारद. उत्तर. २९.३८–६०.; ५०.८; ३५; कूर्म. पूर्व. ३५.१५; स्कन्द. काशी. ३१.३३; ११६; ९७.६६).

६. कुरुक्षेत्रातील एक तीर्थ (नारद. उत्तर. ६५.१०६; म. आर. ८१.११८; वामन. ३९.१४; म. श. ३८.४–८). नामांतर–'औशनस'.

७. साभ्रमती नदीकाठचे एक तीर्थ (पद्म. उत्तर. १३२.३).

८. जगन्नाथक्षेत्रान्तर्गत अष्टपाल तीर्थांपैकी एक (स्कन्द. जगन्नाथ. ४.). हे श्री जगन्नाथमंदिराच्या नैर्ऋत्य कोपऱ्यात आहे (ती. पृ. २००).

९. बदरिकाश्रमातील एक पितृतीर्थ. येथे पिंडदानादि धर्मविधी करतात (स्कन्द. बदरी. ६).

१०. ( देवीस्थान ) पद्ममते एक देवीस्थान. येथील देवीचे नाव शुद्धा ( शुद्धि ) होते ( पद्म. आदि. १७.२१२; मत्स्य. १३.४८ ).

११. हरिद्वारजवळील मायापुरीनजिकचे एक तीर्थ ( पद्म. उत्तर. १२९.२८ ).

१२. मध्य भारतातील मोहिपुरापासून २ मैलांवरील नर्मदेच्या दक्षिण तीरावरील एक तीर्थ. येथे कपालेश्वर शिवमंदिर आहे ( ती. प्र. २३५ ).

१३. ( सरोवर ) उत्तर प्रदेशातील सहारानपुर–अंबाला रेल्मार्गावरील जगाधरी रेल्वेस्थानकापासून १४½ मैलावरील एक सरोवरस्थान. येथे 'कपालमोचन' आणि 'ऋणमोचन' नामक दोन सरोवरे असून भीष्मपंचमीला येथे यात्रा भरते ( ती. प्र. ६६ ).

**कपालमोचनेश्वर** ( शिवलिंग )— स्कंदमते हाटकेश्वरक्षेत्रातील 'कपालेश्वर' शिवलिंगाचे नामांतर (स्कन्द. नागर. २६९; कपालेश्वर ३ पहा ).

**कपालहस्ता** ( योगिनी )— काशी येथील एक योगिनीतीर्थ ( स्कन्द. काशी. ४५.३७ ).

**कपालीभैरव** ( भैरव )— काशी येथील एक भैरवस्थान ( स्कन्द. काशी. ६६.१३ ).

**कपालीश्वर** ( लिंग )— प्रभासक्षेत्रातील एक शिवलिंग ( स्कन्द. प्रभास. प्र. ८९; नारद. उ. ७०.२६ ).

**कपालेश्वर** ( लिंग )— काशी येथील एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ९७.१०८; लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ.५८).

२. अवंती येथील ८४ शिवलिंगांपैकी एक ( स्कन्द. आवन्त्य. अ. २०.१;६ च. लिं. ८ ).

३. हाटकेश्वरक्षेत्रातील एक शिवलिंग ( स्कन्द. नागर. १८२.४२ ). नामांतर– 'कपालमोचनेश्वर' ( स्कन्द. नागर. २६९ ).

४. प्रभासक्षेत्रातील एक शिवलिंग ( स्कन्द. प्रभास. प्र. १०३ ).

५. महीसागरसंगमक्षेत्रातील कपालेश्वरीनजिकचे पातालगंगा नदीकाठचे एक शिवलिंग. ( स्कन्द. माहेश्वर. कौ.३३ ).

६. तापी नदीकाठचे एक शिवलिंग ( तापीमाहात्म्य ).

७. ( शिवमंदिर ) समुद्रसेनाच्या इ. स. ७ व्या शतकातील निर्मंड ताम्रपटमते कुलु खोऱ्यातील निर्मंड गावचे एक शिवमंदिर ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.२.८८; निर्मंड पहा ).

८. ( ग्राम ) अनंतवर्मनूच्या अल्गुम शिलालेखमते पूर्व भारतातील रामंगविषयान्तर्गत अल्गुम्म ग्रामाचा एक उपविभाग ( एपि. इंडि. ४५.४७ ).

**कपि** ( नदी )— पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक नदी ( पा. सू. ६.३.१२० ).

२. ( तीर्थ ) सेतुमाहात्म्यमते दक्षिण भारतातील रामाच्या सेतूनजिकचे एक तीर्थ ( नारद. उत्तर. ७६.१८; स्कन्द. ब्राह्म. से. ३९ ).

**कपिङ्गल** ( नगर व लोकसमूह )—मार्कंडेयमते पूर्व पंजाबातील 'कपिष्ठल' लोकसमूहाचे नामांतर ( मार्क. ५८.६; कपिष्ठल पहा ).

**कपिचित** ( पर्वत )—जुन्नर गुफालेख क्र. १५ मते श्यामलपुत्र शिवभुक्ताने देणगी दिलेले महाराष्ट्रातील एक पर्वतीय बौद्ध संघस्थान ( ल्यूडर्स सूची. क्र. ११७ ). जुन्नरच्या ३ मैल ईशान्येकडील आधु. सुलेमान ( लेण्याद्रि ) पर्वताचा काही भाग हाच असावा ( बर्जेस्, आर्कि. सर्व्हे. वे. इं. ४.९५; जीर्णनगर पहा ).

**कपिञ्जल** ( पर्वत )—वायुमते मेरु पर्वतोद्भवा चतुर्गंगांपैकी भद्रसोमा ( आधु. सिरदरिया ) नदीकाठचा, मेरु पर्वत आणि महाभद्र ( आधु. सोनकुल ) सरोवराच्या उत्तरेकडील एक पर्वत ( वायु. ४२.६७ ).

अली यांच्या मते फर्धन खोऱ्याच्या उत्तर आणि वायव्येकडील आधु. कुरमिन पर्वत हाच होय. सिरदरिया नदीच्या अनेक उपनद्या या पर्वतावर उगम पावत असल्यानेच वायु पुराणात या पर्वतास त्या नदीशी संलग्न केले असावे ( अली, पुराणाज्. पृ. ७९ ).

वसाहत––वायुमते या आणि नागशैल ( आधु. फर्धन पर्वत ) पर्वतांच्या दरम्यान 'मनोहरस्थली' ( आधु. फर्धन खोरे ) नामक वसाहत होती ( वायु. ३८.६६; नागशैल पहा ).

**कपिञ्जला** ( नदी )––भारतवर्षातील एक नदी ( म. भी. १०.२५; पद्म आदि. ६.२१ ).

**कपितलिय** ( पर्वत )—अरियनच्या ग्रंथमते पश्चिम भारतातील 'अर्बुद' पर्वताचे नामांतर ( मॅक्रिंडल, इंडिया. पृ. १४७; अर्बुद पहा ).

**कपित्थक** ( ग्राम )—राष्ट्रकूट राजा गोविंद ( चतुर्थ ) च्या स. ९३० च्या खंबायत ताम्रपटमते गोदावरी नदीकाठचे एक ग्राम. या गावच्या सुवर्णतुलेत प्रस्तुत राजाने १४०० ग्रामे दान दिली होती. याचे आधु. स्थान समजत नाही ( एपि. इंडि. ७.२६ ).

**कपिथ** ( नगर )—ह्युएनत्संगच्या प्रवासवर्णनमते पूर्व भारतातील 'संकाश्य' नगराचे नामांतर ( वॉटर्स, १.३३३; संकाश्य पहा ).

**कपिनर्तना**– बौद्ध साहित्यमते उपालिगुरु थेर कप्पिटक यांचे पूर्व भारतातील वैशाली नगरानजिकचे वन्य आश्रमस्थान ( पेतवत्थु. पृ. ५०; विनय. ४.३०८ ). पाली नामांतर–' कपिनच्चना '. ' मर्कटनर्तनयुक्त ' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले होते ( पेतवत्थु टीका. पृ. २३१ ).

**कपिल** ( देश )— जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक देश ( वराह. ८३.२ ).

२. ( देश ) कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या नैर्ऋत्य भागातील एक देश ( बृ. सं. १४.१७ ).

३. ( द्वीप ) नृसिंहमते एक द्वीप. येथे अनंताचे गुह्यस्थान होते ( नृसिंह. ६५.७; तीर्थविवेचन. पृ. २५१ ).

४. ( वर्ष ) कुशद्वीपान्तर्गत एक वर्ष ( उपविभाग ) ( ब्रह्माण्ड. १९.५९; मत्स्य. १२२.६७; मार्क. ५०.२६; लिङ्ग. पूर्व ४६.३७; वायु. ४९.५३; विष्णु. २.४.३७ ).

५. ( ह्रद ) बाराणसी येथील एक सरोवर ( पद्म. आदि. ३२.४१; नारद. उत्तर. ५०.४६; म. आर. ८४. ७८; ६६.३५; लिङ्ग. पूर्व. ९२.६९–७० ).

६. ( महायक्ष ) कुरुक्षेत्रान्तर्गत एक द्वारपाल यक्षस्थान ( नारद. २.६५.४०; वामन. ३४.४४ ). हा सध्या कुरुक्षेत्राच्या नैर्ऋत्य सीमेवरील जींदनजिक आहे ( ती. पृ. ८६ ).

७. ( ब्रह्मदेवतपस्यास्थान ) मध्य भारतातील नर्मदा नदीच्या दक्षिण तीरावरील ब्रह्मदेवतपस्यास्थान. धर्मपुरीपासून ७ मैलांवरील आधु. खलघाट हेच होय. ब्रह्मदेवाच्या यज्ञकुंडातून उत्पन्न झालेल्या कपिला धेनूमुळे यास हे नाव प्राप्त झाले. याच्या नजिकच्या नर्मदा-साटक संगमस्थानी ६० शिवलिंगे आहेत ( ती. पृ. २३४ ).

**कपिल-आश्रम** ( आश्रमस्थान )— भागवतमते कर्दम-देवहूतिपुत्र कपिल ऋषींचे गुजरातमधील सिद्धपुर ( मातृगया ) नजिकचे बिंदुसर किनारीचे आश्रमस्थान ( भा. ३.३५.५ ). देवी भागवतमते कपिल ऋषींचा जन्म सिद्धपुर येथे झाला असून ( दे. भा. ९.२१ ), येथे स्वमाता देवहूतीला मुक्तिप्रद उपदेश करून, ते पूर्वेस ( प्राक् उदीची ) गेले ( भा. ३.३३.३ ). हरिवंशमते मातृउपदेशानंतर पातालगामी कपिल ऋषींनी सगरपुत्रांना नष्ट केले ( ह. वं. १.१४.१५; भा ९.८.१५. ).

२. कलकत्त्याजवळील सागरद्वीपान्तर्गत गंगासागर-संगम तीर्थानजिकचे कपिल ऋषींचे आश्रमस्थान. साठ सहस्र सगरपुत्रांनी अश्वमेधीय अश्वापहरणाचा वृथा आरोप केलेल्या कपिल ऋषींनी येथे त्यांना दग्ध केले. कालांतराने भगीरथाने गंगोदकाच्या साह्याने येथेच सगरपुत्रांचा उद्धार केला ( गंगासागरसंगम पहा ).

३. हरिद्वार-कनखल रस्त्यावरील कपिल ऋषींचे आश्रमस्थान. स्थानिक आख्यायिकेनुसार कपिल ऋषींनी दग्ध केलेल्या साठ सहस्र सगरपुत्रांना येथे भगीरथाने गंगा नदीच्या ऊर्ध्वगती प्रवाहाने पावन केले.

४. पंजाबातील कुलू खोऱ्यातील त्रिवेणी संगमापासून ½ मैलावरील कपिल ऋषींचे आश्रमस्थान. येथे कपिल मुनींचे मंदिर आणि कलातकुंड नामक ऊष्णोदकुंड आहे ( ती. पृ. ७२ ).

५. नासिक येथील पंचवटीपासून १½ मैलांवरील तपोवनान्तर्गत गौतमाश्रमानजिकच्या कपिला–गोदावरी संगमावरील कपिल ऋषींचे आश्रमस्थान ( ती. पृ. २४६ ).

६. मध्यप्रदेशातील अमरकंटक पर्वतान्तर्गत कबीर चौथऱ्यापासून २½ मैलांवरील कपिलधारा जलप्रपातानजिकचे कपिल ऋषींचे आश्रमस्थान. येथे कपिलपादुका आहेत ( ती. पृ. २२५ ).

७. नर्मदा नदीच्या उत्तरेकडील मांडवापासून २ मैलांवरील दीवेर गावचे कपिल ऋषींचे आश्रमस्थान. येथील कपिलेश्वर मंदिरस्थानी कपिल ऋषींनी वेदपठण करून शिवगणत्व प्राप्त केले ( ती. पृ. ४३१ ).

**कपिल-तपस्यास्थान** ( तीर्थ )—पश्चिम भारतातील नर्मदा नदीकाठचे कपिल ऋषींचे तपस्यास्थान ( पद्म. भू. ८५.२६ ). चाणोदनजिकच्या मणिनागेश्वरपासून दोन मैलांवरील आधु. बासणा गाव हेच होय. येथील कपिलेश्वर तीर्थ आणि मंदिरस्थानी सगरपुत्रदाहक कपिल मुनींनी तपश्चर्या करून, कपिलेश्वर शिवलिंगाची स्थापना केली ( ती. पृ. ४३५ ).

२. नर्मदेच्या उत्तर किनाऱ्यावरील कपिलेश्वर येथील कपिल ऋषींचे तपस्यास्थान ( कपिलेश्वर ७. पहा ).

**कपिल तीर्थ** ( तीर्थ )—वेंकटाचलक्षेत्रातील एक तीर्थ. नामांतर–' कपिलधाराप्रपात.'

२. ( तीर्थ ) कुरुक्षेत्रातील एक शिवतीर्थ ( वामन. ३५.२५ ).

३. ( तीर्थ ) नर्मदेच्या उत्तर किनाऱ्यावरील एक तीर्थ ( नारद. उत्तर. ७७. १६; मत्स्य. १९३.४; कूर्म. उत्तर. ४१.९३–१००; पद्म. आदि. १७.७; तीर्थसार. पृ. १०० ).

४. ( तीर्थ ) द्वारका येथील एक तीर्थ ( स्कन्द. प्रभास. द्वा. १६.४२ ).

५. (नागराज तीर्थ) महाभारत पुलस्त्ययात्रामते भारतवर्षातील एक नागराज तीर्थ (म. आर. ८२.२८; पद्म. आदि. २८.३२).

६. (तीर्थ) काशी येथील एक तीर्थ (स्कन्द. काशी. ६२).

७. (तीर्थ) विरजक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ (ब्रह्म. ४२.६).

८. (तीर्थ) गोदावरी नदीकाठचे एक तीर्थ (ब्रह्म. १५५.१–२). नामांतरे–'आंगिरस तीर्थ'; 'आदित्य तीर्थ'; 'सैंहिकेय तीर्थ'.

९. (तीर्थ) कश्मीरातील कपटेश्वरानजिकचे एक तीर्थ (हरचरित. १४.११३).

१०. (तीर्थ) दक्षिण भारतातील तिरुपतिक्षेत्रान्तर्गत वेंकटाचल पर्वताच्या पायथ्यानजिकचे एक सरोवर. याच्या पूर्वेस कपिलेश्वर आणि वायव्येस नृसिंहमंदिर आहे (ती. पृ. ३४७).

**कपिल धारा** (जलप्रपात)—अमरकंटक पर्वतान्तर्गत नर्मदा नदीच्या उगमानजिकचा कपिला नदीचा ३००' उंचीचा जलप्रपात (वामन. ८४.२४).

२. ओरिसा प्रांतातील संबळपुरपासून ९० मैलांवरील एक जलप्रपात आणि नृसिंहस्थान (ती. पृ. १९३).

३. वेंकटाचलक्षेत्रान्तर्गत 'कपिल्तीर्था'चे नामांतर (कपिल्तीर्थ पहा).

**कपिल पर्वत** (पर्वत)—पौराणिक साहित्यमते जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वताच्या पश्चिमेकडील केतुमाल द्वीपातील एक केसर पर्वत (ब्रह्म. १८. ३४; भा. १६.२६; मार्कं. ५२.९; वायु. ३६.२७; विष्णु. २.२.२७). वायुमते मेरुपर्वतोद्भवा चक्षु (आधु. अमूदरिया) नदी या, तसेच यानजिकच्या कंक (आधु. दर्वाझ) आणि वैदूर्य (आधु. बदक्षन्) पर्वतातून वहात असे (वायु. ४२.५०).

मुजफ्फर अली यांच्या मते अफगाणिस्तानातील आधु. ख्वाजा महमंद पर्वत हाच होय. इश्र कमिश् नामक अमूदरिया नदीची दक्षिणेकडील एक प्रमुख उपनदी याच पर्वतात उगम पावत असल्याने वायु पुराणात या नदीशी त्या पर्वतास संलग्न केले असावे (अली, पुराणाज्. पृ.९१).

२. (पर्वत) जंबूद्वीपान्तर्गत मेरु आणि महाभद्र सरोवराच्या उत्तरेकडील एक पर्वत (लिङ्ग. ४९.५०; वायु. ३६.३१).

३. (पर्वत) कुशद्वीपातील एक पर्वत (भा. ५.२०. १५; लिङ्ग. ४६.३५).

**कपिलकर्णिक** (देश)—जंबूद्वीपान्तर्गत केतुमालवर्षातील एक देश (वायु. ४४.११).

**कपिलधारा** (क्षेत्र)—मध्ययुगीन शब्दकोशसाहित्यमते भारतवर्षातील एक क्षेत्र (अनेकार्थ. १४४. ४५; शब्दरत्न. २९३.९).

२. (तीर्थ) प्रह्लादयात्रामते भारतवर्षातील एक तीर्थ (वामन. ८४.२४).

३. अवंती येथील एक तीर्थ (स्कन्द. आवन्त्य. अ. ३१.५८).

४. प्रभासक्षेत्रान्तर्गत कपिलेश्वरानजिकचे एक तीर्थ (स्कन्द. प्रभास.प्र. ३४३).

**कपिलपुर** (नगर)—बौद्ध साहित्यमते नेपाळ तराईतील 'कपिलवस्तु' नगराचे नामांतर (ललित. पृ. ११४; कपिलवस्तु पहा). अन्य नामांतर–'कपिलवत्थु'.

**कपिलवस्तु** (नगर)—बौद्ध साहित्यमते उत्तर भारतातील शाक्य जनपदाच्या राजधानीचे नगर आणि गौतम बुद्धाचे जन्मस्थानभूत परमपवित्र तीर्थ (दिव्यावदान. पृ. ६७). शाक्य राजधानीच्या या गावी जन्मल्यामुळेच गौतम बुद्ध 'शाक्यमुनि' उपाधीने ओळखला जात असे. नेपाळ तराईतील तौलिवा नामक ठाण्याच्या गावापासून २ मैल आणि निग्लिवपासून ३½ मैल उत्तरेकडील, तसेच पिप्रावा गावापासून ९ मैल वायव्येकडील आधु. तिलौरकोट गाव हेच होय (बुद्धिस्ट इंडिया. पृ. २१५; जे. आर. ए. एस्., स. १९०६; पृ. ५३४).

बौद्धकाली हे गाव आधु. चित्रदेइ, रामघाट, संदवा आणि तिलौर या चार ग्रामांमध्ये पसरले असून, शाक्य राजा शुद्धोदनाचा किल्ला आणि राजवाडा तिलौर गावी होता. बुद्धजीवनाशी संबंधित निम्नलिखित ग्रामे या नगराच्या परिसरात होती:—१. लुंबिनीवन (बुद्धजन्मस्थान; कपिलवस्तूपासून १४ मैल आग्नेयेकडील आधु. रुम्मिनदेई); २. कनकमुनि (कनकमुनि बुद्धाचे जन्मस्थान; कपिलवस्तूपासून ३½ मैलांवरील आधु. निग्लिव); ३. पिप्रावा (शाक्य देशान्तर्गत बौद्ध शरीरावशेष स्तूपस्थान, रुम्मिनदेईपासून ९ मैल नैर्ऋत्येस); ४. सगर्वा (शाक्य संहारस्थान; कपिलवस्तूपासून २ मैल नैर्ऋत्येस).

ह्युएनत्संगच्या मते हे नगर लुंबिनीवनापासून १४ मैल वायव्येस असून, फाहियेन्च्या मते हे त्या वनापासून ९ मैल नैर्ऋत्येस (= आधु. पिप्रावा) येथे होते. यावरून फाहियेन्‌ला पिप्रावा स्तूपाचे स्थान कपिलवस्तु म्हणून नजरचुकीने दाखविण्यात आले असावे. तेथील पिप्रावा करंडकाच्या

आधारे ते प्राचीन कपिलवस्तु असल्याचे अनुमान विभिन्न अभ्यासकांनी व्यक्त केले आहे. परंतु ते यथायोग्य वाटत नाही (फ्लीट, जे. आर. ए. एस्. इ. स.१९०६; पृ. १८०; कनिंग, प्राचीन भूगोल. ७११–७१२; आर्कि. सर्व्हे. २६.१).

उत्तर प्रदेशातील फैजाबादपासून २५ मैल ईशान्येकडील आधु. भुइल दिह, अयोध्या प्रांताच्या उत्तर भागातील आधु. नगरखस, तसेच उस्कबझार रेल्वेस्थानकापासून ३१ मैल वायव्येकडील आधु. निग्लिव म्हणजे प्राचीन कपिलवस्तु असल्याची अनुमानेहि आता अग्राह्य ठरली आहेत.

**शोध**—प्राचीन साहित्यातील या नगराच्या परस्परविरोधी वर्णनामुळे याची भौगोलिक स्थलनिश्चिती दुर्घट बनली होती. स. १८९६ मध्ये नेपाळ तराईतील रुम्मिनदेई या बौद्ध जन्मस्थानाचा शोध लागल्यानंतर (जे. आर. ए. एस्. स. १८९७, पृ. ४२९; ६१५), कपिलवस्तूची स्थाननिश्चिती सुलभ झाली. तिलौरकोट येथील उत्खननाने या गावाचे भौगोलिक स्थान निर्णायकपणे सिद्ध झाले (बुद्धिस्ट इंडिया, पृ. १२; २१५). या गावानजिकच्या निगालीसागर आणि रुम्मिनदेई येथे डॉ. वॅडेल यांना अशोकस्तंभ, तसेच पिप्रावा येथे शाक्य बांधवांची श्रद्धामय देणगी नमूद करणारा स्तूप सापडला आहे (पिप्रावा पहा).

**महत्त्व**—बुद्धजन्मस्थान, तसेच शाक्यराजधानी या द्विविध नात्यांनी बौद्धकाली हे धार्मिक, राजकीय आणि व्यापारी महत्त्वाचे नगर असून, राजगृह-प्रतिष्ठान (आधु. पैठण) व्यापारी हमरस्त्यावर हे होते. प्रतिष्ठाननिवासी बावरि नामक बौद्ध भिक्षु याच नगरमार्गे राजगृहास गेला होता (सुत्तनिपात. पृ. २१२–२१३). कपिलवस्तु-वैशाली हमरस्ताहि बौद्धकाली अस्तित्वात असून (विनय. २.२५२) या गावाच्या उत्तरेस हिमालय पर्वतापर्यंत 'महावन' नामक वन होते (पपञ्च. १.२९८; ४८९).

**नामांतरे**— बौद्ध साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात (परिपत्रक पहा).

**नामव्युत्पत्ती**— बौद्ध साहित्यमते 'कपिल ऋषींच्या कपिलाश्रमानजिकचे नगर' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले (सुमङ्गल. २.२५८).

**स्थापना**— बौद्ध साहित्यमते ओक्काक (इक्ष्वाकु) राजाने हद्दपार केलेल्या शाक्यवंशीय राजपुत्रांनी हिमालयाच्या पायथ्यानजिकच्या कपिलाश्रमासमीपच्या या नगराची स्थापना केली (महावस्तु. १.३४८; दिव्यावदान पृ. ५४८; सौंदरानंद काव्य. अ. १).

## कपिलवस्तु नगराची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. ललित विस्तार (पृ. ११४) | कपिलपुर |
| २. महावस्तु (२.११) | कपिलाह्वयपुर |
| ३. दीघनिकाय (२.१३१) | कपिलवथ्थु |
| ४. ह्युएन्त्संग (वॉटर्स २. १–१९) | कि–पिलो–फ–स–तु |
| ५. बुद्धचरित (१.५.२) | कपिलास्यवस्तु |

**नगरवर्णन**— बौद्ध साहित्यमते योजनाबद्ध पद्धतीने बांधलेल्या या सप्ततटवेदीवेष्टित आणि चतुर्द्वारयुक्त (महावस्तु. २.७५) नगरात आखीव रस्ते, उद्याने आणि भव्य दुकानांची लयलूट होती (ललित. ५८; ७७; ९८; १०१–१०२; ११३; १२३). उंच मनोरे, शोभिवंत कमानी आणि सुशोभित परिसराने नटलेल्या या नगरात विद्वान आणि गुणीजनांचा सन्मान होत असे (बुद्धचरित. २.५). अत्यल्प करपद्धतीमुळे येथील बहुसंख्य प्रजाजन सधन असून, विपन्न लोक फारच थोडे होते (बुद्धचरित. १.४). या, तसेच या नजिकच्या कोलिय शहराला रोहिणी नदीच्या धरणाचा विपुल जलपुरवठा होत असे (धम्मपद भाष्य. ३.२५४). एवंगुणविशिष्ट हे नगर बुद्धावतारास सर्वतोपरी योग्य असेच होते (ललित. पृ. १२५).

**राज्यव्यवस्था**— हिमालयाच्या पायथ्यानजिकच्या आणि कोशल देशाच्या पूर्वेकडील या शाक्यराजधानीचा कारभार नजिकच्याच व्रजि, लिच्छवि आणि मल्ल संघराज्यांप्रमाणेच प्रजासत्ताक पद्धतीचा असून, लोकनियुक्त प्रजामंडळ येथे राज्य करीत असे. प्रजामंडळाचे हे सभासद 'राजा' नावाने सुविख्यात असून, बुद्धपिता शुद्धोदन हा कपिलवस्तूचा राजा होता. बौद्ध साहित्यमते येथील मंत्री सूज्ञ आणि विद्वान असून (सौन्दरानन्द काव्य. अ. १), येथील संथागार नामक सभागृहात शहराच्या राज्यकारभाराचे आणि न्यायदानाचे काम चालत असे (बुद्धिस्ट इंडिया. पृ. १९).

**बौद्ध साहित्यात**— या साहित्यमते अनोमा नदी–राजगृह रस्त्यावरील हे नगर ती नदी आणि नगर यांपासून अनुक्रमे ६ आणि ५४ योजने अंतरावर होते. अनोमा

नदीपासून हे ३० योजनांवर असल्याचा जातकातील निर्देश ( जा. १.६३ ) यथायोग्य वाटत नाही. परमज्ञानप्राप्त गौतम बुद्ध दोन महिन्यांच्या प्रवासानंतर राजगृह गावाहून येथे आला होता ( मललसेकर, १.५१६ ).

फाहियेन्च्या प्रवासवर्णनात—या ग्रंथमते अनेक मनोऱ्यांनी युक्त हे उद्ध्वस्त नगर ( आधु. पिप्रावा ) विजनावस्थेत होते..

ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात—या ग्रंथमते श्रावस्ती नगराच्या १०० मैल आग्नेयेकडील हा छोटया नगरराज्यामध्ये विभागलेला देश ( क्षेत्रफळ-८०० मैल ) दीर्घकाळपर्यंत उजाड आणि निर्मनुष्य होता. त्यामधील दहा विजन नगरांपैकी कपिलवस्तु (क्षेत्रफळ-२ मैल) सर्वाधिक उजाड असून, त्याच्या उद्ध्वस्त तटबंदीचे जोते केवळ शिल्लक होते.

बौद्ध मठ—ह्युएन्त्संगच्या मते या देशात १००० उद्ध्वस्त बौद्ध मठ आणि दोन देवमंदिरे असून, त्यापैकी सम्मतीय सांप्रदायाचा एक बौद्ध मठ ( भिक्षुसंख्या ३० ) कपिलवस्तु गावाच्या आवारातच होता. वॉटर्स यांच्या मते या देशातील बौद्ध मठांचा ह्युएन्त्संगनिर्दिष्ट आकडा अतिशयोक्त आहे.

बौद्धावशेष—ह्युएन्त्संगच्या मते या नगरातील बुद्धजीवनाशी संबंधित वास्तू पुढीलप्रमाणे होत्या :—

( १ ) शुद्धोदनाचा राजवाडा—बुद्धपिता शुद्धोदनाच्या राजवाडयाच्या स्थानी एक शुद्धोदन–भित्तिचित्रयुक्त मंदिर होते.

( २ ) बुद्धमाता महामायेचे शयनागार—उपरोक्त मंदिरानजिक बुद्धमाता महामायेच्या शयनागारस्थानी एक मंदिर आणि स्वर्गलोकाहून मातृगर्भात अवतीर्ण होणाऱ्या गौतम बुद्धाचे भित्तिचित्र होते. त्याच्या आग्नेयेस असितकथित बुद्धजातकाच्या स्मृत्यर्थ उभारलेला स्तूप होता.

( ३ ) नगराच्या दक्षिण प्रवेशद्वारानजिक—येथे गौतम बुद्धाच्या हस्तिप्रक्षेपणाच्या पराक्रमाच्या स्मृत्यर्थ उभारलेला स्तूप आणि गौतम बुद्धाचे भित्तिचित्र होते. स्तूपाच्या अंतर्भागात बुद्धपत्नी यशोधरेच्या शयनागाराच्या स्थानी उभारलेले स्मृतिमंदिर आणि भित्तिचित्र होते.

( ४ ) नगराच्या आग्नेय कोपऱ्यात—येथे अश्वारूढ गौतन बुद्धाच्या नगरनिष्क्रमणाच्या स्मृत्यर्थ उभारलेले गौतन बुद्धाचे भित्तिचित्र होते.

( ५ ) नगराच्या पूर्व प्रवेशद्वाराच्या अंतर्भागात—येथे बालबुद्धाच्या विद्यार्जनाच्या स्मृत्यर्थ उभारलेला स्तूप असून, प्रवेशद्वाराबाहेर शुद्धोदनकुलदैवत ईश्वरदेव यक्षाचे मंदिर, आणि हा यक्ष बुद्धवंदन करीत असल्याचे शिल्प होते.

( ६ ) नगराच्या दक्षिण प्रवेशद्वाराच्या बाह्यांगास—येथे बालबुद्धाच्याच्या धनुर्वेदाध्यायनाच्या स्मृत्यर्थ उभारलेला स्तूप आणि धनुर्धर बुद्धनिर्मित शरकूप नामक-विहीर होती.

वॉटर्स याच्या मते ह्युएन्त्संगवर्णित उपरोक्त सारी स्थाने बुद्धोत्तरकालीन असून, बुद्धाच्या जन्मकाली शाक्य जनपद कोशल साम्राज्यात समाविष्ट असल्याने येथे शुद्धोदन-राजवाडा अस्तित्वात नसावा. अशोकावदान ग्रंथातील तटबंदीयुक्त कपिलवस्तु नगराच्या वर्णनात येथील बुद्धस्मृतिमंदिराचा निर्देश आढळत नाही ( दिव्यावदान. पृ. ३९० ).

परिसरातील बौद्धावशेष—ह्युएन्त्संगच्या मते कपिलवस्तु नगराच्या परिसरात निम्नलिखित बौद्धावशेष होते:—

( १ ) ककुसंध बुद्धाचे जन्मस्थान—कपिलवस्तु नगराच्या १० मैल दक्षिणेकडील या स्थानी एक स्तूप होता (ककुच्छंद ग्राम पहा ).

( २ ) कनकमुनि बुद्धाचे जन्मस्थान—कपिलवस्तु नगराच्या ६ मैल ईशान्येकडील या स्थानी एक स्तूप होता ( कनकमुनि ग्राम पहा ).

( ३ ) बुद्ध समाधिप्राप्तिस्थान—कपिलवस्तु नगरापासून ८ मैल ईशान्येकडील बालबुद्ध समाधिप्राप्तिस्थानी एक स्तूप होता.

( ४ ) शाक्यसंहारस्थान—कपिलवस्तु नगराच्या ईशान्येकडील विरुढकक्रृत शाक्यसंहारस्थानी हजारो छोटे स्तूप होते.

( ५ ) बुद्ध पुनरागमन स्तूप—कपिलवस्तु नगराच्या ¾ मैल दक्षिणेकडील न्यग्रोधवनात बुद्धपदप्राप्त गौतमाने स्थपतीस केलेल्या उपदेशाच्या स्मृत्यर्थ उभारलेला अशोक स्तूप, तसेच गौतम बुद्धाने आठ शाक्य राजकुमार आणि पाचशे शाक्य बांधवांना बौद्ध धर्माची दीक्षा दिल्याच्या स्मृत्यर्थ उभारलेला अन्य एक छोटा स्तूप होता.

( ६ ) लुंबिनीवन—कपिलवस्तूच्या दक्षिण प्रवेश–द्वाराबाहेरील शरकूपपासून १६ मैल ईशान्येकडील या वनात बुद्धाचा जन्म झाला होता (वॉटर्स, २.१.१९; लुंबिनीवन पहा).

इइ–चिंग्–चु च्या प्रवासवर्णनात—या ग्रंथमते या गावच्या वीस बौद्ध धर्मनिष्ठ शाक्य घराण्यांनी या नगराच्या परिसरातील अनेक स्तूपांचा जीर्णोद्धार केला ( पेटेच्, शुइ-

चिग्-चु, पृ. २३ ).

**कपिलवाराह** ( मूर्ती )— मथुरा येथील एक वराह-स्थान ( वराह. १६३.३२ ).

**कपिलस्थ** ( तीर्थ )—कुरुक्षेत्रातील एक तीर्थ ( वामन. ३६.१४ ).

**कपिला** ( नदी )— नर्मदा नदीस दक्षिणेकडून मिळणारी एक उपनदी ( म. भी. १०.२७; कूर्म. उत्तर. ४०.२४; २८; मत्स्य. १८६.४०; पद्म. आदि. १३.१५). उत्तर प्रदेशातील बर्वनि गावानजिक नर्मदेस मिळणारी आधु. कपिला नदी हीच होय ( काणे, धर्मशास्त्र. ४.७६४ ).

**भौगोलिक वर्णन**—मध्य प्रदेशातील अमरकंटक पर्वतातील नर्मदा नदीच्या उगमानजिकच्या 'कपिलधारा' नामक जलप्रपाताच्या रूपाने ही उगम पावते. कपिला—नर्मदा नद्यांच्या संगमस्थानी पुरातन कपिलाश्रम ( कपिल ऋषींच्या पादुका ) आहे.

२. ( नदी ) नासिक–पंचवटीपासून १½ मैलावर गोदावरीस मिळणारी एक नदी. कपिला-गोदावरी नद्यांच्या संगमस्थानी महर्षि गौतमांची तपोभूमी ( तपोवन ) आहे. तेथे लक्ष्मणाने शूर्पणखेचे नाक कापले ( ती. पृ. २४६ ).

३ हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक नदी ( स्कन्द. नागर, ५२.६ ).

४. अर्बुदारण्यान्तर्गत प्रभासक्षेत्रातील सरस्वतीनजिकची एक नदी ( स्कन्द. प्रभास प्र. ३५.९१–१०१ )

५. गया येथील एक नदी ( अग्नि. ११६.५; वायु. १०८.५७–५८; पद्म. आदि. ६.२३ ). महाभारतमते ही अग्नीचे उत्पत्तिस्थान आहे ( म. आर. २१२.२४ ).

६ ( तीर्थ ) कश्मीरातील एक तीर्थ ( नीलमत. १२५७; १४५९; पद्म. आदि. २६.४३;३८.९ ).

७. अर्बुद पर्वतावरील एक तीर्थ ( स्कन्द. प्रभास. अ. २९.२ ).

८. कुरुक्षेत्रातील एक तीर्थ ( म. आर. ८१.३८ ).

९. गौतमी नदीकाठचे एक तीर्थ ( ब्रह्म. १५५.१ ).

१०. नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( कूर्म. उत्तर. ४०.२४ ४१.९३; पद्म. आदि. १३.३५; १७.७; १८.३३; ६८; २०.४; मत्स्य. १८६.४०; १९०.१० ). येथे संभवतः एकाहून अधिक तीर्थांचा निर्देश अभिप्रेत असावा.

**कपिलायतन** ( तीर्थ आणि सरोवर )—राजस्थानातील बिकानेरनजिकचे कपिल आणि याज्ञवल्क्य ऋषींचे आश्रमस्थान, एक तीर्थ. श्रीकौलायतजी रेल्वेस्थानकानजिकचे आधु. कौलायत गाव हेच होय. येथे एक सरोवर आणि श्रीकपिलमहामुनिमंदिर असून, संत ज्ञानेश्वर आणि नामदेव येथे तीर्थयात्रेसाठी आले होते ( ती. पृ. २९५ ).

**कपिलावट** ( तीर्थ )—महाभारत पुलस्त्ययात्रामते एक पवित्र वटवृक्ष (म. आर. ८२.८७; पद्म. आदि. २८. ३१ ). हा कनखलक्षेत्रान्तर्गत नागतीर्थानजिक आहे.

**कपिलासङ्गम** ( तीर्थ )—गोदावरी आणि कपिला नद्यांचे नाशिकनजिकचे संगमस्थान, एक तीर्थ ( ब्रह्म. १३९.१.२९; १४१.१.२८–२९; १५५.१४ ).

२. नर्मदा आणि कपिला नद्यांचे संगमस्थान, एक तीर्थ (नारद. उत्तर. ७७.५; मत्स्य. १८६.४०; पद्म. भूमि. १८.१; ६; २४२.४२ ).

**कपिलास्यवस्तु** ( नगर )—बुद्धचरितमते नेपाळ तराईतील ' कपिलवस्तु ' नगराचे नामांतर ( बुद्धचरित. १.५.२; कपिलवस्तु पहा ).

**कपिलाह्रद** ( तीर्थ )—महाभारत पुलस्त्ययात्रामते काशी येथील पवित्र जलाशय. येथील स्नानाने राजसूय यज्ञाचे फल प्राप्त होत असे ( म. आर. ८२.६९; अनु. २५.२५; नारद. उत्तर. ५०.४६ ).

२. कुरुक्षेत्रातील एक पवित्र जलाशय. येथे कपिल नामक शिवलिंग होते ( नारद. उत्तर. ६५.४७; वामन. ३५.२४ ).

**कपिलाह्वयपुर** ( नगर )—बौद्ध साहित्यमते नेपाळ तराईतील ' कपिलवस्तु ' नगराचे नामांतर ( महावस्तु. २. ११; कपिलवस्तु पहा ).

**कपिलि** ( नगर )—नोलंब पल्लव राजा जगदेकमल्लाचे उत्तर म्हैसूर प्रांतातील निवासस्थान. चितळदुर्ग जिल्ह्यातील मोलक्काल्मुरु तालुक्यातील तुंगभद्रा नदीकाठचे आधु. कंपलि गाव हेच होय ( एपि. कर्ना. ११.१० ).

**कपिलेन्द्र** ( पर्वत )—जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वताच्या उत्तरेकडील एक पर्वत ( मार्क. ५२.१२ ).

**कपिलेश्वर**—( लिंग )—अवंती येथील शिवलिंगद्वय ( स्कन्द. आवन्त्य. अ. २३.७; ७०.७४ ). पाठभेद— ' कपिपालेश्वर. '

२. तापी नदीकाठचे एक शिवलिंग ( तापीमाहात्म्य ).

३. महीसागर संगमानजिकचे एक शिवलिंग ( स्कन्द. माहेश्वर. कौ. ४५.३ ).

४. काशी येथील कपिलकुंडानाजिकचे एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ९७.७७ ). याच नावाची अन्य काही लिंगे काशी येथे असावीत ( स्कन्द. काशी. ३३.१५८;

९७.२१७; लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. ५७–१०७).

५. प्रभासक्षेत्रातील एक शिवलिंग (स्कन्द. प्रभास. प्र. ५३; नारद. उत्तर. ७०.७४).

६. बिहारमधील दरभंग्यानजिकचे एक शिवलिंग. येथून एक मैलावर वनदुर्गा मंदिर आहे (ती. पृ. १५३).

७. नर्मदेच्या उत्तर तीरावरील शूलपाणि तीर्थानजिकचे कपिल ऋषींचे तपस्यास्थान (पद्म. भूमि. ८५.२६). येथील कपिलेश्वर शिवलिंग कपिल ऋषींनी स्थापिले आहे. येथे पुष्करिणी तीर्थ नामक अन्य एक तीर्थहि आहे.

८. (तीर्थ) पश्चिम भारतातील 'कोल्याद' तीर्थाचे नामांतर (ती. पृ. ४३९; कपिलेश्वर पहा).

**कपिलोदक** (तीर्थ)—एक श्राद्धयोग्य तीर्थ (पद्म. आदि. ११.२०).

**कपिशा** (देश)—बेग्राम खरोष्ट्री शिलालेखमते वायव्य भारतातील एक देश (एपि. इंडि. २२.११). पाणिनीच्या अष्टाध्यायीमते हा एक आयुधजीवी लोकसमूह असून (पा. सू. ४.२.९९), सिकंदरच्या भारतआक्रमणाला या आणि गंधार देशापासूनच प्रारंभ झाला. या देशाची राजधानी कपिशा (आधु. बेग्राम) गावी असून, बाल्हीक—बामियान—कपिशा देशांच्या मार्गावरील ते मोठे व्यापारी केंद्र मानले जात असे.

अग्रवाल यांच्या मते हिंदुकुश पर्वताच्या आग्नेयेकडील, आणि त्या पर्वताने बाल्हीक (आधु. बल्ख) जनपदापासून विभक्त झालेला आधु. ईशान्य अफगाणिस्तान म्हणजे हा देश असून; पूर्वेस कुणार नदी आणि पश्चिमेस पंजशिर नदी व हिंदुकुश पर्वत यांच्या दरम्यानचा आधु. काफिरीस्तान–कोहिस्तानचा प्रदेश, तसेच घोरबंद आणि पंजशिर नद्यांची खोरी यांचा समावेश त्यामध्ये होत असे. ह्युएनत्संगच्या मते या देशाचे क्षेत्रफळ ८०० चौ. मैल असून, कनिंगहॅम यांचे मते या देशाच्या भौगोलिक परिसीमा पुढीलप्रमाणे होत्या :—१. उत्तरेस आणि ईशान्येस–हिंदुकुश पर्वत; २. दक्षिणेस–कुभा (आधु. काबूल नदी) आणि कोहिस्तान देश; ३. पश्चिमेस—पंजशिर नदी, हिंदुकुश पर्वत, आणि बल्ख देश; ४. पूर्वेस– कुणार नदी आणि गंधार देश.

प्राचीन साहित्यात सर्वत्र 'कपिश–गंधार' जोड–देशांचा निर्देश असून, जयचंद्र यांच्या मते हिंदुकुशपासून कुणार नदीपर्यंतचा प्रदेश कपिशा देशामध्ये आणि कुणार नदीपासून सिंधु नदीपर्यंतचा प्रदेश गंधार देशामध्ये समाविष्ट होत असे. काही क्वचित ठिकाणी 'कपिश–कंबोज' अशा जोडदेशांचाहि निर्देश आढळतो.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात:—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. ग्रीक साहित्य | |
| अ. सिकंदरकालीन ग्रीक साहित्य | कपिसेने (राजधानी निकाइया |
| आ. टॉलेमी | कपिस (कलिस) |
| इ. प्लिनी | कपिस्सेने |
| ई. सॉलिनस | कॅफुसा |
| २. पाणिनीची अष्टाध्यायी (पा. सू. ४.२.९९) | कापिश (राजधानी कापिशी) |
| ३. पौराणिक साहित्य | काम |
| ४. चिनी साहित्य | |
| अ. ह्युएनत्संगपूर्वकालीन चिनी साहित्य | क–पि–शे–ये (कपिसय) (राजधानी–उ–पि–न = आधु. ओपियान) |
| आ. ह्युएनत्संग् (वॉटर्स, १.१२२). | –पि–शिह कपिश) |
| इ. सॉंग्–युन् (इ. स. ७वे शतक) | कि–पिन् |
| ५. अरबी साहित्य | काफिशीस्तान (काफिरीस्तान) |

**नामव्युत्पत्ती**—जयचंद्र यांच्या मते 'कपिशा-नगरयुक्त' अशा अर्थाने या देशाचे अरबीभाषीय 'काफिशीस्तान' हे देशनाम रूढ झाले असून, आधु. 'काफिरीस्तान' हे त्याचेच अपभ्रष्ट रूप होय. येथील हिंदु राज्यामुळे बाबरच्या राज्यकाली (स. १५१९) याचे 'काफिरीस्तान' हे नाव सर्वप्रथम प्रचारात आले असले, तरी 'काफिर' (कफिर) हे वस्तुतः 'कपिश'चे तुर्कीभाषीय रूप आहे (जसे–कनिष्क> कनेर्क).

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**—तक्षशिला (आधु. सिरकप) नगराची स्थापना करणारा कपिश–गंधाराधिपती शक सम्राट दिमित्रेस् (द्वितीय) ने या नगरीची स्थापना केली. दिमित्रेस् (द्वितीय) चा पुत्र आणि कपिशा देशाचा राजप्रतिनिधी अगथोकल याचे राज्यकाली हा देश बौद्धधर्मीय बनला. तत्कालीन कपिशा साम्राज्यामध्ये सभोवतालच्या दहा देशांचे राज्य समाविष्ट होत असे

(सांकृत्यायन, मध्य एशिया का इतिहास, पृ. १७५–१७६).

**खरोष्ठी शिलालेखात**—माणिकियाला खरोष्ठी करंडक-लेखमते हा लेख 'कविशिय' (= संस्कृत-'कापिशिक'= कपिशादेशीय) नामक क्षत्रपाने कोरला असून, स्टेन कोनौ यांच्या मते हा क्षत्रप बहुधा कपिशा देशाचा राजा असावा (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.१५०).

**सिकंदरकालीन ग्रीक साहित्यात**—या साहित्यात या देशाच्या 'निकाइया' (आधु. बेग्राम) नामक राजधानीचा निर्देश आढळतो. आपल्या भारतस्वारीचा श्रीगणेशा या देशापासून करून, आणि मार्गातील आश्वायन, आश्वकायन आणि हास्तिनायन या तीन आयुधजीवी लोकांना जिंकून सिकंदर गंधार देशावर चालून गेला.

**पाणिनीच्या अष्टाध्यायीत**—या ग्रंथात 'कापिशी' नामक आयुधजीवी संघाचा आणि नगराचा (पा. सू. ४.२.९९), 'कापिशायन' मद्याचा, तसेच 'कापिशायनी' नामक वस्तुविशेषांचा निर्देश आढळतो. कौटिलीय अर्थशास्त्रमते 'कापिश देशनिर्मित' अशा अर्थाने येथील मद्यास 'कापिशायन' नाव प्राप्त झाले होते (कौ. अ. पृ. २४८). आधु काफिरीस्तानमधील 'हरी दाख' नामक हिरवी द्राक्षे आजहि प्रसिद्ध आहेत.

**टॉलेमीच्या ग्रंथात**—या, तसेच सॉलिनसच्या ग्रंथात या देशाचा निर्देश अनुक्रमे 'कपिस' (कलिस) आणि 'कफुस' नावांनी केला असून, प्लिनीच्या ग्रंथात याचे आणि याच्या राजधानीचे नाव अनुक्रमे 'कपिस्सेने' आणि 'कपिस्स' दिले आहे. टॉलेमीच्या मते हा देश 'कबौर' (काबूल) देशापासून १५५ मैलांवर असून, ज्युलियन यांच्या मते आधु. कोहिस्तानच्या उत्तर सरहद्दीवरील पंजशिर आणि तगौ खोऱ्यांचा प्रदेश या देशात समाविष्ट केला, तरच टॉलेमीचे हे अतिशयोक्त विधान खरे ठरू शकेल.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या प्रवासवर्णनात, तसेच पूर्वकालीन चिनी साहित्यात या देशाचा निर्देश अनुक्रमे 'क-पि-शिह' (कपिश) आणि 'क-पि-शे-ये' (संस्कृत–कपिसय) नावांनी आढळतो.

बामियान देशाच्या पूर्वेकडील बर्फाच्छादित पघ्मान पर्वत ओलांडून ह्युएन्त्संग १५ दिवसांच्या प्रवासानंतर या देशास पोहोचला.

**भूवर्णन**—ह्युएन्त्संगच्या मते या देशाच्या (क्षेत्रफळ-८०० मैल). उत्तरेस हिमाच्छादित पर्वत आणि अन्य तीन बाजूंस उघडेबोडके कृष्णवर्णीय पर्वत असून, गहू, फळे, इमारती लाकूड, अश्व आणि केशर यांसाठी हा सुविख्यात होता. मध्य आशियातील प्रमुख बाजारपेठ असणाऱ्या या देशात सभोवतालच्या देशातील अनेकविध पदार्थ आयात होत असत. येथील हवा थंड आणि वादळी वाऱ्यांनी युक्त होती. लोक उद्दट, रागीट आणि असंस्कृत भाषा बोलणारे होते. ते आतून लोकरीचे आणि बाहेरून कातडी कपडे परिधान करीत. येथील लिपी तुखार देशासदृश, परंतु बोलीभाषा, समाजरचना आणि सोन्या-चांदीची नाणी मात्र सर्वस्वी स्वतंत्र होती.

**राजा**—या देशाच्या बौद्धधर्मीय क्षत्रिय राजांचे नजिकच्या दहा देशांवर अधिराज्य असून, वार्षिक बौद्ध मोक्षपरिषदेत तो विपुल दानधर्म, तसेच चांदीच्या विशाल बुद्धप्रतिमेची (उंची १६′) पूजा करीत असे.

**बौद्ध मठ**—या देशात १०० बौद्ध मठ, सुस्थितीतील विशाल स्तूप, तसेच ६००० महायानपंथीय बौद्ध भिक्षू असून, येथे दहाहून अधिक हिंदु आणि जैन देवमंदिरे आणि १००० हून अधिक दिगंबर जैन, तसेच पाशुपत आणि कपालधारिन् शैव लोक होते. यापैकी कपालधारिन् लोक मानवी कवट्यांची शिरोभूषणे घालीत असत.

**राजधानी**—याच्या राजधानीचा निर्देश ह्युएन्त्संगने अनेक वेळा केला असला, तरी त्याच्या भौगोलिक स्थानाची काहीच माहिती तेथे आढळत नाही (कपिशा २. पहा).

**बौद्ध स्थाने**—ह्युएत्संगच्या मते या देशातील प्रमुख बौद्धस्थाने पुढीलप्रमाणे होती:—

**(१) शालाक बौद्ध मठ**—कपिश राजधानीच्या १$\frac{3}{4}$ मैल पूर्वेकडील या पर्वतीय मठात ३०० हीनयानपंथीय बौद्ध भिक्षू असून, ह्युएन्त्संग येथेच मुक्कामासाठी राहिला होता.

ह्युएन्त्संगच्या मते 'त्सुंग्-लिंग्' (पामीर) पर्वताच्या पूर्वेस साम्राज्यसंस्थापना करणाऱ्या कनिष्क राजाकडे पीत नदीच्या पश्चिमेकडील तंगुत्देशीय चिनी राजाने आपला राजकुमार ओलिस ठेवला. त्याच्या वसंत, वर्षा आणि शिशिर ऋतूतील निवासासाठी कपिश, हिंदुस्थान आणि गंधार देशात कनिष्काने बांधलेल्या राजवाड्यांपैकी छोटा राजवाडा (शालाक) म्हणजे हा मठ असून, त्यामध्ये अनुचरवेष्टित चिनी राजकुमाराची भित्तिचित्रे होती. मायदेशी परतलेल्या चिनी राजकुमाराने या मठास अनेक देणग्या पाठविल्या होत्या, येथील सभामंडपातील वैश्रवण प्रतिमेच्या उजव्या पायाखाली मठदुरुस्तीसाठी विपुल धननिधी होता. मठाच्या उत्तरेकडील पर्वतात (आधु. चरिकर पर्वत) राजकुमाराची तपस्यागुफा, आणि तिच्या $\frac{1}{2}$ मैल पश्चिमेस बोधिसत्त्वाची

एक प्रतिमा होती.

( २ ) राहुल विहार--आमात्यनिर्मित राजधानीपासून ६ मैल आग्नेयेकडील या राहुल बौद्ध मठाच्या नजिक बौद्ध स्तूपातून ( उंची १००′ ) कृष्णवर्णीय सुगंधी तेल आणि कर्णमधुर संगीत स्रवत असे.

( ३ ) श्वेतवत् आलय नगर आणि अरुण पर्वत--हे राजधानीपासून अनुक्रमे ८ मैल आणि ६ मैल दक्षिणेस होते.

( ४ ) पीलुसार पर्वत आणि पिंडक विहार--राजधानीच्या वायव्येकडील पीलुसार पर्वतावर अशोक स्तूप असून, पर्वताच्या पायथ्याशी पिंडक नामक बौद्ध विहार होता.

( ५ ) राजविहार--राजधानीच्या वायव्येकडील या विहारात गौतम बुद्धाची कवटी ( उष्णीस ) असून, तिचीच अन्य एक अस्थि हिद्दा ( हि-लो ) देशात होती ( हिद्दा पहा ).

( ६ ) कनिष्क स्तूप--राजधानीच्या ४० मैल वायव्येकडील हिमाच्छादित पर्वताच्या पायथ्याशी कनिष्कनिर्मित एक स्तूप होता.

शालक विहारातील वर्षाकालीन वास्तव्यानंतर ह्युएन्त्संग पंजशिर नदीचे खोरे आणि ' सियाह-कोह ' ( कृष्ण ) पर्वत ओलांडून १२० मैल पूर्वेकडील लम्घान् देशास गेला.

२. ( नगर ) बेग्राम शिलालेखमते कपिशा देशाच्या राजधानीचे नगर ( एपि. इंडि. २२.११ ). ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते कनिष्काच्या कुशाण साम्राज्याची वसंत ऋतुकालीन राजधानी येथे असून, बाह्लीक-बामियान-कपिशा ( आधु. कोहिस्तान- काफिरीस्तान ) व्यापारी हमरस्त्यावरील हे गाव व्यापारी आणि सांस्कृतिक दृष्टीने महत्त्वाचे होते. काबूल नगरापासून ५० मैल ईशान्येकडील, तसेच हिंदुकुश पर्वताच्या दक्षिणेकडील घोरबंद आणि पंजशिर संगमावरील चरिकर प्रदेशातील आधु. बेग्राम गाव हेच होय. येथे पुरातन कपिशा नगरीचे अवशेष सापडले आहेत.

**नामांतरे**—आधु. बेग्राम गाव हेच असल्याचे आता सर्वमान्य झाले असले, तरी पूर्वकालीन अभ्यासकांमध्ये याच्या भौगोलिक स्थानाविषयी निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

**१. ओपियान**—कनिंगहॅम यांच्या मते बामियानच्या १२० मैल पूर्वेकडील आधु. ओपियान् गाव हेच होय. ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात तसा अस्पष्ट निर्देश असून, ह्युएन्त्संगच्या जीवनचरित्रमते या नगरापासून १$\frac{1}{2}$ मैलांवरील किउ-लु-स-पंग गावापर्यंत ह्युएनत्संगला कपिशाधिराज पोहोचविण्यास आला होता.

**२. घोरबंदनजिकचे कुशन्**—वॉटर्स यांच्या मते ओपियान गावापासून १० मैल पश्चिमेकडील आधु. कुशन गाव हेच होय. ह्युएन्त्संगच्या मते कपिशा गाव लम्घान ( लन्-पो ) पासून १० मैल पश्चिमेस, आणि नगरहार ( न-की-लो-हो ) पासून २० मैल वायव्येस असून, वॉटर्स यांच्या मते नगरहार हे काबूल सुर्खर ( सुर्ख-रुद् ) संगमावर असावे.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात:—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. सिकंदरकालीन ग्रीक साहित्य | **निकाइया** |
| २. पाणिनीची अष्टाध्यायी ( पा. सू. ४.२.९९ ) | **कापिशी** |
| ३. ह्युएन्त्संग पूर्वकालीन चिनी साहित्य | उ-पि-न ( आधु. ओपियान ) |

**प्लिनीच्या ग्रंथात**—या ग्रंथमते इराणच्या हखामनिषीय सम्राट कुरुष्ने ( इ. स. पू. ५५८-५३० ) विध्वंसिलेले हे नगर पुन्हा वसविण्यात आले. अखेरीस हूणांनी हे नष्ट केले.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथात याच्या परिसरातील बौद्ध स्थानाचे विवरण आढळते ( कपिशा १. पहा ).

**उत्खनन**—येथील कुशाणकालीन राजमंदिराच्या उत्खननात कुशाणकालीन दुर्गस्थापत्याचे दुर्मिळ अवशेष, तसेच कुशाण राजस्त्रियांच्या अलंकारमंजुषेतील सातवाहन शैलीचा हस्तिदंती करंडक, ग्रीक शैलीची टेराकोट्टा आणि ब्रॉंझ शिल्पे, तसेच सिकंदरकालीन काचपात्र सापडले. यांपैकी हस्तिदंती करंडकावर अंतःपुरातील विभिन्न प्रसंग कोरले असून, त्यावरून सातवाहन शैलीचे ( इ. स. पू. १ ले शतक ) अनुकरण दूरवर्ती प्रदेशातहि प्रचारात असावे ( गोएट्झ, पृ. ६० ).

**नाणी**--पार्थियन सम्राट गुडुव्हर ( इ. स. १ ले शतक ) च्या येथे सापडलेल्या काही नाण्यांवर इंद्रवाहन ऐरावतप्रतिमा

असून, त्यावरून तत्काली येथे इंद्रोपासना प्रचलित असावी (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.१.४४). येथील अन्य काही उत्तर-कालीन नाण्यांवर ग्रीक देवता जियस् (भारतीय इंद्र) ची प्रतिमा आढळते (अग्रवाल, पाणिनि. पृ. ८४).

**३.** (नदी) रघुवंशमते उत्कल आणि वंग देशांच्या सीमेवरील पूर्व भारतातील एक नदी. नामांतर (गणराजाचा भद्रक शिलालेख)–'कन्सै'. पार्गिटर यांच्या मते पश्चिम बंगालमधील मिदनापुर जिल्ह्यातील आधु. कसई नदी हीच होय. लॅसेन यांच्या मते ओरिसाच्या उत्तर सरहद्दीवरील आधु. सुवर्णरेखा नदी हीच असावी.

**रघुवंशात**–– या ग्रंथातील रघु-दिग्विजयवर्णनमते रघूने वंगविजयानंतर ही नदी ओलांडून उत्कल देशात प्रवेश केला (रघु. ४.३८). यावरून उत्तरेस वंग आणि दक्षिणेस उत्कल-कलिंग देशांच्या सीमेवर ही असावी.

**अन्य निर्देश**— काव्यमीमांसामते ही पूर्व भारतातील नदी असून (काव्यमी. १७.२२६), उत्कलाधिपती गणराजाच्या शिलालेखमते त्याच्या राज्याची उत्तर सीमा या आणि वैतरणी नद्यांनी बनत असे (एपि. इंडि. २९.१७३).

**कपिष्ठल** (नगर व लोकसमूह)— पराशरतंत्रमते पूर्व पंजाबातील 'कापिष्ठल' लोकसमूहाचे नामांतर (कापिष्ठल पहा).

**कपिष्ठल केदार** (तीर्थ)— महाभारतमते कुरु-क्षेत्रातील अंतःशुद्धी, ब्रह्मप्राप्ती, जीवनमुक्ती आणि अंतर्धान-विद्याप्रद एक तीर्थ (म. आर. ८१.५९-६१). पाठभेद– 'कपिल'.

**कपिस** (देश)—टॉलेमीच्या मते वायव्य भारतातील 'कपिशा' देशाचे नामांतर. अन्य नामांतर (सिकंदर-कालीन ग्रीक साहित्य)– 'कपिसेने' (कपिशा पहा).

**कपिस्थल** (नगर व लोकसमूह)— पाणिनीच्या अष्टाध्यायीमते पूर्व पंजाबातील 'कापिष्ठल' लोकसमूहाचे नामांतर (पा. सू. ७.२.९१; कापिष्ठल पहा).

**कपीवती** (नदी)—वाल्मीकि रामायणमते अयोध्या-केकय मार्गावरील एक नदी. अयोध्येहून केकय देशास जाणाऱ्या भरताने ही ओलांडली होती (वा. रा. अयो. ७१.१५).

**कपीश्वर** (तीर्थ)—साभ्रमती नदीकाठचे एक तीर्थ (पद्म. उत्तर. १३६.५).

**कपुतन** (बृहद्भारतीय देश)— ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते मध्य अशियातील समरकंदच्या उत्तरेकडील एक देश (की-पो-त-न). वॉटर्स यांच्या मते समर-कंदच्या ३२ मैल वायव्येकडील आधु. मितन गावच्या परिसरातील प्रदेश हाच होय. सेंट मार्टिन यांच्या मते अरबी साहित्यातील मि-मो-होच्या उत्तरेकडील केबुद् (केशबुद) गाव हेच होय. परंतु त्यांचे हे अनुमान यथायोग्य वाटत नाही. नामांतर (चिनी साहित्य)— 'त्साबकुओ' (त्साव राजाचा देश).

**नामव्युत्पत्ती**—ह्युएन्त्संगच्या मते समरकंदच्या शौ-बु नामक शक राजघराण्यातील त्साव राजपुत्राच्या नावा-वरून सुतृष्ण आणि कपुतन देशास 'पूर्व आणि पश्चिम त्साव देश' अशी नावे प्राप्त झाली होती.

**भौगोलिक वर्णन**—ह्युएन्त्संगच्या मते सुपीक खोऱ्यामध्ये वसलेला हा देश पूर्व–पश्चिम चिंचोळा आणि उत्तर–दक्षिण रुंद होता. त्याचे हवामान, पीकपाणी आणि लोकाचार समरकंद देशासदृश होते (वॉटर्स, १.९७; बील, १.१००).

**कपुर्दिगिरि** (अशोक शिलालेखस्थान)—पेशावर-पासून ३० मैल ईशान्येकडील अशोकाचे आज्ञालेखस्थान. येथे अशोकाचे १३ आज्ञालेख सापडले आहेत (फर्ग्युसन, १.८६).

**कपूरथला** (तीर्थ)—पंजाबातील नाथसांप्रदायाचे सुविख्यात तपोभूमिस्थान. येथील डेरा बूसावाल नामक पर्वतवेष्टित स्थानी २०० वर्षांहून अधिक काळ अखंड प्रज्वलित असणारी धुनी आहे. येथील रणधीरसिंह आदि राजे गोरखनाथास आपले कुलदैवत मानतात (ती. पृ. ५८५).

**कपूरी** (देवमंदिरस्थान)—गुजरातमधील गुप्त आणि गुर्जर संमिश्र स्थापत्यशैलीचे (इ. स. ७–८ वे शतक) हिंदु देवमंदिरस्थान. गुप्त आणि गुर्जर स्थापत्यशैलीच्या संधिकालात हे बांधले आहे (गोएट्झ. पृ. १०४).

**कपोत** (तीर्थ)—गौतमी (गोदावरी) नदीकाठचे एक तीर्थ (ब्रह्म. ८०.५; ९२).

**२.** (ग्राम) पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू. ४.२.९१).

**कपोतक** (देश)—वायुमते जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल द्वीपातील एक देश (वायु. ४४). मुजफ्फर अली यांच्या मते मध्य आशियातील आधु. मुर्ग्राब प्रदेश हाच होय.

**२.** (तीर्थ) महाभारत अंगिरस् तीर्थयात्रामते साभ्रमती नदीकाठचे एक तीर्थ (म. अनु. २६.६९). पाठभेद (नीलकंठ टीका)–' उत्पादक.'

३. (तीर्थ) कश्मीरातील वितस्ता नदीकाठचे एक तीर्थ (नीलमत. १५०४).

**कपोतक सङ्घाराम** (बौद्ध संघाराम)—ह्युएन्-त्संगच्या प्रवासवर्णनमते मगध (आधु. दक्षिण बिहार) देशातील इंद्रशैल गुफेच्या (आधु. वैभार पर्वत) ३० मैल ईशान्येकडील एक बौद्ध संघाराम. पाटणा जिल्ह्यातील घोश्रवण गावच्या २ मैल उत्तरेकडील आधु. तित्रवन गाव हेच होय. या गावाचे आधु. तित्रवन हे 'तित्तिरवन' चे हिंदीभाषीय रूप असून, मूळ 'कपोत'चे 'तित्तिर' कसे झाले ते समजत नाही.

कनिंगहॅमच्या मते आधु. 'गिरियक' (प्राचीन इंद्रशैल) पर्वताच्या १० मैल ईशान्येकडील आधु. पर्वति गाव हेच असावे. परंतु त्यांचा हा तर्क यथायोग्य वाटत नाही.

नामव्युत्पत्ती--ह्युएन्त्संगच्या मते एका क्षुधित शिकाऱ्याच्या क्षुधातृप्त्यर्थ गौतम बुद्धाने 'कपोताची (कबुतर) निर्मिती केलेले स्थान' अशा अर्थाने या मठास हे नाव प्राप्त झाले. ही आख्यायिका बौद्ध धर्मतत्त्वांशी विसंगत आणि म्हणूनच अविश्वसनीय वाटते.

**बौद्ध स्थापत्य**—ह्युएन्त्संगच्या मते सर्वास्तिवादिन् सांप्रदायाच्या २०० बौद्ध भिक्षूंनी युक्त अशा या मठाच्या ईशान्येस एक अशोकस्तूप आणि ½ मैल दक्षिणेकडील एका एकाकी टेकडीवर (आधु. शेखपुर पर्वत) सिलोनच्या राजाने बांधलेले अवलोकितेश्वर मंदिर होते. त्यामधील चंदनी प्रतिमेस फुलांच्या साह्याने कौल मागण्याची पद्धती स्थानिक लोकांत रूढ होती. चीनमध्ये अवलोकितेश्वरास असा कौल मागण्याची पद्धती आजहि प्रचलित आहे (वॉटर्स, २.१७५–१७६).

**कपोतवृत्तीश** (लिंग)—काशी येथील ज्येष्ठेश्वरा-नजिकचे एक शिवलिंग (स्कन्द. काशी. ६५.१७).

**कपोतिक** (तीर्थ)—साभ्रमती नदीकाठचे एक तीर्थ (पद्म. उत्तर. ११५.१; ६).

**कपोतिका** (योगिनी)—काशी येथील एक योगिनी-तीर्थ (स्कन्द. काशी. ४५.३७).

**कपोतेश** (क्षेत्र)—जगन्नाथपुरी येथील एक पवित्र क्षेत्र (स्कन्द. जगन्नाथ. १२–१३).

**कपोतेश्वर** (लिंग)—श्रीपर्वतावरील एक शिवलिंग (लिङ्ग. १.९२.१५६).

२. कश्मीरातील 'पापसूदन' तीर्थाचे नामांतर (राज. १.३२; हरचरित. १४.३६; पापसूदन पहा).

**कपस** (लोकसमूह)—खरोष्ट्री शिलालेखमते वायव्य भारतातील 'कुशाण' लोकसमूहाचे नामांतर (कुशाण पहा).

**कबन्ध** (बृहद्भारतीय देश)—ह्युएन्त्संगच्या प्रवास-वर्णनमते मध्य आशियातील एक देश. मध्य आशियातील आधु. सारिकोल प्रदेश हाच असून, मध्ययुगीन काली याची राजधानी ताश् कुर्घान् गावी होती. नामांतर (मध्ययुगीन मुसलमानी साहित्य) 'ताश्–कुर्घान्'.

ह्युएन्त्संगच्या काळी या (की-पन्-त) देशाची राज-धानी सीता (आधु. यारकंद) नदीकाठच्या पर्वतमाथ्यावर असून, मैदानी प्रदेशातील आधु. 'ताश्-कुर्घान्'हून वेगळया स्थानी ती असावी. सेंट मार्टिन यांच्या मते सीता नदी-काठच्या आधु. कर्चु गावाचा निर्देश येथे अभिप्रेत असून, यूल यांच्या मते 'केतचुत्'चे ते अपभ्रष्ट रूप असावे.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—पामीर देशाहून १०० मैल ईशान्येकडील बर्फाच्छादित मार्गाने गेल्यानंतर ह्युएन्त्संग या देशास पोहोचला. त्याचे मते या पर्वतप्रदेशाचे आणि त्याच्या पर्वतीय राजधानीचे क्षेत्रफळ अनुक्रमे ४०० आणि ४ मैल होते. अनेक अरुंद नद्यांनी व्यापलेल्या या देशात गहू आणि कडधान्याखेरीज अन्य पीकपाणी होत नसे. येथे फळझाडे क्वचितच दिसत.

**लोकवर्णन**—येथील पर्वतीय उतार आणि तराईचा प्रदेश बहुंशी निर्मनुष्य असून, शहरे आणि ग्रामेहि तुरळक लोकवस्तीची होती. येथील अशिक्षित, अर्धरानटी आणि वटवटीत नाकडोळयांचे लोक सामाजिक शिष्टाचार अथवा सदसद्विवेक यांना पारखे होते. त्यांची लिपी आणि भाषा काशगर देशासदृश होती.

**बौद्ध धर्म**—येथील बहुतांशी लोक बौद्ध धर्मानुयायी असून, येथे १० बौद्ध मठ आणि हीनयानपंथीय सर्वा-स्तिवादिन् सांप्रदायाचे ५०० बौद्ध भिक्षू होते.

**चिनी राज्य**—ह्युएन्त्संगच्या मते या देशानजिकच्या राजाशी विवाहबद्ध झालेली एक चिनी राजकन्या मार्गातील बंडाळीमुळे येथील एका पर्वतावर आश्रयार्थ राहिली. तेथेच सूर्यदेवापासून तिला गर्भ राहिल्याने ती त्या पर्वतावरच राजवाडा बांधून राहू लागली. तिच्या पुत्राने या देशात चिनी राजवंशाची स्थापना केली. उत्तरकालात या बौद्ध-धर्मीय राजवंशाने पर्वतीय राजवाड्याच्या वायव्येस सौत्रांतिक सांप्रदायस्थापक तक्षशिलनिवासी कुमारलब्ध आचार्यांस बौद्ध मठ बांधून दिला. त्याच्यामुळे या देशाचे नाव बौद्ध जगात अमर झाले.

**बौद्ध स्थाने**—ह्युएन्त्संगच्या मते या देशाच्या राजधानी-पासून ६० मैल आग्नेयेकडील पर्वतीय गुफाद्वयामध्ये दोन अस्थिपंजर बौद्ध अर्हत सात शतकांहून अधिक काळ समाधिस्थ अवस्थेत होते. या गुफांपासून ४० मैल ईशान्येस 'पुण्यशाला' नामक बौद्ध धर्मशाळा होती.

पुण्यशालेहून १६० मैल पूर्वेकडील त्सुंग्-लिंग् (आधु. पामीर) पर्वताचा पूर्व भाग ओलांडून ह्युएन्त्संग ओश् देशास पोहोचला. ह्युएन्त्संगच्या जीवनचरित्रमते कबंध देशातील वीस दिवसांच्या मुक्कामानंतर व्यापारी तांड्या-समवेत ईशान्य दिशेप्रत निघालेल्या ह्युएन्त्संगला दरवडे-खोरांनी लुटले. तेथून १६० मैल प्रवास करून पामीर पर्वत ओलांडल्यानंतर तो 'ओश्' देशास पोहोचला (वॉटर्स, २.२८५–२८९).

**कबीर चौथरा** (तीर्थ)— नर्मदा परिक्रमेतील अमरकंटकपासून ३ मैलांवरील एक पर्वतीय कबीरतीर्थ. येथे कबीर काही काळ राहिला होता (ती. पृ. २२५).

**कबीरमठ** (तीर्थ)—ओरिसामधील जगन्नाथपुरी येथील स्वर्गद्वारानजिकचे एक कबीरतीर्थ. येथील पातालगंगा नामक कूपातीरी कबीर काही काळ राहिला होता (ती. पृ. २०१).

**कबीरवट** (वटवृक्ष)—गुजरातमधील कावीनजिकच्या नर्मदा नदीच्या द्वीपातील शुक्लतीर्थानजिकचा एक वटवृक्ष आणि कबीर मंदिरस्थान. कबीराने दंतप्रक्षालन करून टाकलेल्या काडीतून या वृक्षाची (परीघ–१३५० हात) निर्मिती झाली. दुरून अरण्यसदृश दिसणाऱ्या ३५० पारंब्यांच्या या वृक्षाच्या छायेत एका वेळी ५००० माणसे बसू शकतात.

**कमगुल्य** (लोकसमूह)—स. १७९ च्या वर्दक खरोष्ट्री ब्रॉंझपात्रलेखमते वायव्य भारतातील एक लोकसमूह. यांच्यापैकी वग्रमरेग नामक व्यक्तीने हे पात्र देणगी दिले होते (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.१६७).

**कमठपार्श्वनाथ** (जैन तीर्थ)—'सेलग्राम' नामक जैन तीर्थाचे नामांतर (ती. सं. पृ. १२६; सेलग्राम पहा).

**कमनै** (ग्राम)—टॉलेमीच्या मते नर्मदा नदीमुखाच्या उत्तरेकडील एक ग्राम (अक्षांश १७° उत्तर; रेखांश ११२° पूर्व). पेरिप्लसच्या मते हे नर्मदा मुखाच्या दक्षिणेस होते. नामांतर (पेरिप्लस)–'कम्मोने'.

**कमरूनाग** (सर)—पंजाबातील रिवालसर (रेवासर) नजिकचे एक पवित्र सरोवर (ती. पृ. ७१).

**कमल** (तीर्थ)—श्रीमालक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ (श्रीमालमाहात्म्य).

**कमलनाथ** (शिवमंदिर)—राजस्थानमधील महाराणा प्रतापचे उपास्य शिवमंदिर (ती. पृ. २८८).

**कमलभिदा** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू. ४.२.११०).

**कमला** (नदी)—विष्णुमते मिथिला (आधु. बिहार) देशान्तर्गत गंगा नदीची एक उपनदी (हिस्टरी ऑफ तिर्हुत. पृ. २). पूर्णिया गावाच्या दक्षिणेकडील करगोल गावानजिक गंगेस मिळणारी आधु. घघरी नदी हीच होय. नामांतर (अरियन)–'ओमल्हिस'.

**आधुनिक काळी**—नेपाळमधील महाभारत टेकड्यांमध्ये उगम पावणारी ही नदी तिल्जुग नामक उपनदीसह दरभंगा जिल्ह्यातील मधुबनि प्रदेशातून वहाते. या नदीला दक्षिणे-कडून दोन व उत्तरेकडून पाच उपनद्या मिळत असून, त्यापैकी दोन कोशी नदीच्या शाखानद्या आहेत (पांडे, बिहार. पृ. ६३).

**कमलाकरपुर** (गुफास्थान)—तेलुगु साहित्यमते महाराष्ट्रातील 'एलापुर' गुफास्थानाचे नामांतर (एलापुर पहा).

**कमलाक्ष** (देवीस्थान)—मत्स्यमते एक देवीस्थान. येथील देवीचे नाव 'महोत्पला' होते (मत्स्य. १३.३४).

**कमलाभिद्** (तीर्थ)—गौतमी (गोदावरी) नदी-काठचे एक तीर्थ (ब्रह्म. १२४.१३९).

**कमलालय** (देवीस्थान)—पद्ममते एक देवीस्थान. येथील देवीचे नाव 'कमला' (पद्म. आदि. १७.१९६), अथवा 'कामला' (मत्स्य. १३.३२) होते.

२. (शिवस्थान) अरुणाचलवरील एक शिवस्थान. येथील शिवलिंगाचे नाव 'वल्मीकेश' होते (स्कन्द. अरुणाचल. २.२).

३. (तीर्थ) दक्षिण भारतातील 'तिरुवायूर'तीर्थाचे नामांतर (ती. पृ. ३६२; तिरुवायूर पहा).

**कमिगर** (नगर)— टॉलेमीच्या मते सिंधु नदीकाठचे एक नगर (अक्षांश २६-२०° उत्तर; रेखांश ११९° पूर्व). कोरी नदीकाठचे आधु. अरौर हे स्थापत्यावशेषस्थान हेच होय. मॅक्रिंडल यांच्या मते 'कमिगर' हे 'कमननगर'चे ग्रीकभाषीय लघुरूप असावे. स्थानिक नाव-'कमन'.

**कसुचु** (नगर)— भर्हुत शिलालेखमते मध्य भारतातील एक नगर. या गावच्या (कसुचुक) नागरख्खित (नागरक्षित) नामक व्यक्तीने या स्तूपास देणगी दिली होती (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.२.३५).

**कमुय** ( देश )— मथुरा सिंहप्रतिमालेखमते वायव्य भारतातील 'कंबोज' देशाचे शकभाषीय नामांतर ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.३६; कंबोज पहा ).

**क-मो-लॅङ्ग-क** ( देश )— ह्युएन्त्संगच्या प्रवास-वर्णनमते ब्रह्मदेशान्तर्गत 'कामलंका' देशाचे नामांतर ( कामलंका पहा ).

**कमौली** ( ग्राम )— कनौजच्या गोविंदचंद्र राजाच्या कमौली शिलालेखाचे वाराणसीनजिकचे वारणा-गंगा संगमावरील उपलब्धिस्थान ( वाराणसी पहा ).

**कम्पना** ( नदी )— महाभारत पुलस्त्ययात्रामते भारतवर्षातील एक नदी ( म. आर. ८२.९९; भी. १०.२४; मत्स्य. ११४ ). वायव्य भारतान्तर्गत काबूल खोऱ्यातील आधु. कुनार नदी हीच होय. पौराणिक गुरुह ( =ग्रीक गौरैओइ ) देशाच्या पश्चिम सरहद्दीवरून ही वहात असे ( चौधरी. पृ. ५२; गुरुह पहा ). नामांतर ( ग्रीक साहित्य )–' मलंतॉस '; ' युवस्पल '.

**कम्पलि** ( नगर )— पश्चिम गंग राजा श्रीपुरुषमुत्तरसच्या स. ७५ च्या शिलालेखमते त्याने पल्लवांशी यशस्वीपणे युद्ध केलेले पूर्व म्हैसूरातील तुंगभद्रा नदीकाठचे एक नगर. आनेगुंदीनजिकचे आधु. कंपलि गाव हेच होय ( एपि. कर्ना. ९.२१; १०.२५५ ).

चोल राजा राजराज ( प्रथम )च्या स. १०४६ च्या मणिमंगलम् शिलालेखमते नोलंबवाडी देशाची राजधानी येथे असून ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. ३५१ ), पश्चिम चालुक्यांचा विष्णुवर्धन विजयादित्य नामक मांडलिक राजा येथूनच त्या देशाचे राज्य करीत असे ( एपि. कर्ना. ११.१४१ ).

विजयनगरच्या वेंकटपति ( प्रथम ) च्या स. १५९१ च्या कंपलि शिलालेखमते विजयनगरच्या पतनानंतरहि त्याचे या प्रदेशावरील राज्य टिकून होते ( अर्कि. सर्व्हे. दक्षिण विभाग, स. १९२२; पृ. ७१७ ).

**कम्पिल** ( नगर )—पाणिनीच्या गणपाठमते उत्तर भारतातील ' कांपिल्य ' नगराचे नामांतर ( पा. सू. ४.२.८०.१०; कांपिल्य पहा ). अन्य नामांतर ( जैन साहित्य )–' कंपिला ' ( ती. सं. पृ. १२६ ); ( मध्ययुगीन शब्दकोश साहित्य )–' कंपिल्ल ' ( कल्पद्रु. ७.२५ ).

**कम्बल** ( कुलपर्वत )—जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक कुलपर्वत ( मार्कं. ५६.१२; ५९.१३; वराह. ८३.१; वायु. ४४.४ ).

२. ( देश ) जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल पर्वतातील एक देश ( वराह. ८३.२ ).

३. ( वर्ष ) कुशद्वीपान्तर्गत ' पालन ' नामक चतुर्थ वर्षाचे नामांतर ( म. भी. १३.१२ ).

४. ( कुंड ) अवंती येथील एक पवित्र जलकुंड ( स्कन्द. आवन्त्य. अ. ६५.१७ ).

५. ( नाग ) प्रयागातील यमुना नदीकाठचा एक पवित्र नाग ( मत्स्य. १०६.२७; ११०.८ ).

**कम्बला** ( नदी )—जंबूद्वीपान्तर्गत केतुमालवर्षातील एक नदी ( मार्कं. ५६.१५; वायु. ४४.१७ ).

**कम्बलाश्वतर** ( तीर्थ )—काशी येथील पर्वतेश्वराच्या दक्षिणेकडील एक तीर्थ ( स्कन्द. काशी. ६१.८०; ८४.८२ ).

२. ( नाग ) प्रयागातील यमुना नदीकाठचे एक नागद्वय ( पद्म. आदि. ३९.६९; ४३.२७; मत्स्य. १०६.२७; ११०.८; कूर्म. पूर्व. ३७.१९; अग्नि. १११.५ ).

३. कश्मीरातील एक नागद्वय ( नीलमत. १०५२ ).

**कम्बलाश्वतरेश** ( लिंग )—काशी येथील एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ६१.८१ ). स्कंद पुराणात अन्यत्र ' कंबलाश्वतरेशौ ' असा द्विवचनी निर्देश असून, तेथे संभवतः ' कंबलेश्वर ' व ' अश्वतरेश्वर ' नामक स्वतंत्र लिंगांचा निर्देश अभिप्रेत असावा ( स्कन्द. काशी. ९७.२०३; लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. १०२ ).

२. प्रभासक्षेत्रातील एक शिवलिंग ( स्कन्द. प्रभास. प्र. ३१० ).

**कम्बलिक** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.३.८०.१२ ).

**कम्बलेश्वर** ( ग्राम )—कश्मीरातील क्रमराज्यान्तर्गत मचिपोर परगण्यातील एक ग्राम ( राज. ८.२५१ ). स्वयंभू तीर्थाच्या सहा मैल ईशान्येकडील आधु. क्रंभर गाव हेच होय. या गावाहून स्वयंभू तीर्थाकडे पंजतर नदीच्या जंगलमय खोऱ्यातून जाणाऱ्या रस्त्यावर कश्मीरच्या उच्चल राजाला दरोडेखोरांनी लुटले होते ( राज. ८.२५१ ). आजहि हा प्रदेश धोक्याचाच आहे.

**कम्बिष्ठलोइ** ( नगर व लोकसमूह )—प्लिनीच्या मते पंजाबातील 'कापिष्ठल' लोकसमूहाचे नामांतर ( मॉक्रिंडल, पृ. १९६; कापिष्ठल पहा ).

**कम्बिसोन** ( नदी )—टॉलेमीच्या मते गंगा नदीची सर्वांत पश्चिमेकडील मुखनदी ( अक्षांश. १८°–१५' उत्तर; रेखांश. १४४°–३०' पूर्व ). सेंट मार्टिन यांच्या मते पश्चिम बंगालमधील ताम्रलिप्ति ( आधु. तामलुक ) बंदरा-

जवळून वहाणारी आधु. हुगळी नदी हीच होय. यूल आणि विल्फोर्ड यांच्या मते प्राचीन काळी गंगा नदीची उपनदी म्हणून सुविख्यात असणारी आधु. सुवर्णरेखा नदी हीच असावी.

**कम्बु** ( तीर्थ )—साभ्रमती नदीकाठच्या 'विश्वामित्र' तीर्थाचे नामांतर ( पद्म. उत्तर. १३६. १; विश्वामित्र तीर्थ पहा ).

**कम्बुज** ( देश )—पर्शियन शिलालेखमते वायव्य भारतातील 'कंबोज' देशाचे नामांतर. अन्य नामांतर –'कंबुजिया' ( देवदत्त भांडारकर, पृ. ५४; कंबोज पहा ).

**कम्बुसर** ( सरोबरावर )—द्वारका येथील एक पवित्र सरोवर ( स्कन्द. प्रभास. द्वा. १६.२५ ).

**कम्बूज** ( बृहद्‌भारतीय देश )—शिलालेख साहित्य-मते आग्नेय आशियातील एक बृहद्‌भारतीय देश, आणि भारताच्या पूर्ववर्ती द्वीपकल्पीय प्रदेशाच्या सहा उपविभागां-पैकी एक. ह्युएन्‌त्संग आणि इत्सिंग्‌च्या प्रवासवर्णनमते हा सागरवर्ती देश द्वारवती ( आधु. सयाम ) च्या पूर्वेस आणि समतट ( गंगा नदीचा त्रिभुज प्रदेश ) च्या आग्नेयेस होता. ख्मेर लोकांनी व्यापलेला मेकाँग आणि तोन्ले सप् नद्यांच्या खोऱ्यातील आधु. कंबोडिया, कोचीन चीनचा दक्षिण भाग, तसेच सयामचा उत्तर दिहपर्यंतचा भाग (अक्षांश १७°–३९' उत्तर ) म्हणजे हा देश होय. भारतातील गंगा नदी-प्रमाणेच मेकाँग ही या देशाची जीवनवाहिनी असून, तिच्या काठच्या प्रदेशाचा अपवाद वगळता हा सारा देश शुष्क माळरानमय होता. आधुनिक काळी कंबोडिया आणि कोचीन चीन देशाहून ( क्षेत्रफळ–७० हजार चौरस मैल ) किती तरी विस्तृत प्रदेश या देशाने व्यापला होता.

**नामांतरे**—प्राचीन चिनी साहित्यात या देशाची निम्न-लिखित नामांतरे आढळतातः—१. ह्युएन्‌त्संग–'इ-शॅंग्-न -पु-लो' ( ईशानपुर ) २. इत्सिंग्–'पोह-नान्' ( फुनान ).

**नगरावशेष**—मध्य युरोपीय इतिहासाचे नवे पर्व सुरू करणाऱ्या असीरियन नगरावशेषांप्रमाणेच या देशातील नगरावशेषहि आग्नेय आशियाच्या इतिहासाच्या दृष्टीने सर्वाधिक महत्त्वपूर्ण मानण्यात येतात. भारतीय हिंदु वसाहत-करांनी येथे निर्मिलेल्या नगरांमुळे ( स. १३५०–१४५० ) पौर्वात्य स्थापत्यकलेवर नवा प्रकाश पडतो. तसेच भारतीय स्थापत्यशास्त्रातील अनेक कूट समस्यांची सोडवणूक होते. म्हणूनच विशेष पुरातन नसूनहि स्थापत्यशास्त्रीय दृष्टीने ते अद्वितीय मानले जातात. या देशातील बत्तमूबंग, सिमरीप आणि सिसोफोन हे नगरावशेषसमृद्ध प्रांत अगदी अलिकडेपर्यंत फ्रेंचांच्या ताब्यात होते. दुसऱ्या महायुद्धानंतर हा देश स्वतंत्र झाला.

**नामव्युत्पत्ती**—ख्मेर शिलालेखमते ( इ. स. १० वे शतक ) 'कंबु स्वयंभू नामक भारतीय राजाचा देश' अशा अर्थाने या देशास 'कंबूज' नाव प्राप्त झाले. पत्नीमृत्यूच्या दुःखाने वेडापिसा होऊन आत्महत्त्या करण्यासाठी या देशात आलेल्या या राजाने स्थानिक नागराजाच्या कन्येशी विवाह करून कंबूज राजवंशाची स्थापना केली ( गुप्ते, बृहत्तर भारत. पृ. १५–१६ ). अन्य एका ख्मेर शिलालेखमते कंबु ऋषी व मेरा अप्सरा यांचेपासून कंबूज राजवंशाची उत्पत्ती झाली ( सांकृत्यायन, बौद्ध संस्कृति. पृ. १६१–१६२ ).

**संशोधनाचा इतिहास**—फ्रेंच निसर्गशास्त्रज्ञ मौहोत यांना मेकाँग आणि मेनाम नद्यांचे खोऱ्यातील निसर्ग-संशोधनसमयी ( स. १८५८–१८६१ ) येथील अंकोर-थोम् नगरावशेष सापडले. या देशातील स्थापत्यावशेषांच्या त्यांच्या अहवालामुळे ( स. १८६४ ) सारे जग स्तिमित झाले. त्यानंतर डॉ. अॅडाल्फ बॅस्टियन ( स. १८६६ ), डॉ. मोनियर ( स. १९०१–१९०७ ), डॉ. बेअली ( स. १९०७ ), कॅप्टन लॅग्री ( स. १८७३ ); कॅप्टन डॅलपोर्ट ( स. १८८० ) आदि फ्रेंच संशोधकांनी येथील स्थापत्या-वशेषांची सविस्तर वर्णने प्रसिद्ध केली. कंबूज साम्राज्याच्या परमोत्कर्षकाली ( स. १२९५–१२९७ ) येथे आलेल्या चिनी प्रवाश्यांचे प्रवासवृत्तहि अलिकडे उपलब्ध झाले आहे.

**भारतीय वसाहतीची स्थापना**—स्थानिक आख्या-यिकेनुसार इ. स. पू. ४४३ मध्ये अंकोरवात्‌च्या उत्तरे-कडील चौकन गावी ससैन्य उतरलेल्या इंद्रप्रस्थच्या प्रिअ-त्थांग राजाने येथील नागपूजक लोकांना हिंदु धर्म आणि संस्कृतीचा परिचय घडविला. उत्तरकालात स्थानिक लोकांना जिंकून भारतीय लोक कंबूजचे स्वामी बनले. अन्य एका आख्यायिकामते काही धाडसी तामीळ वसाहतकारांनी ( इ. स. १ ले शतक ) या देशात ब्राह्मणधर्म, संस्कृत भाषा आणि भारतीय रीतीरिवाजांचा प्रसार केला. इ. स. ५–७ व्या शतकात येथे राज्य करणाऱ्या हिंदु राजवटीचा आणि त्यामधील अवंतिवर्मन् नामक राजाचा ( स. ४३५–६८० ) निर्देश तत्कालीन ख्मेर आणि संस्कृत शिलालेखात आढळतो. जयवर्मन् हा या घराण्यातील अंतिम राजा होय.

**जयवर्मन् ( द्वितीय ) राजघराणे**—दोन शतकांच्या यादवीनंतर ( स. ६८०–८०२ ) जयवर्मन् ( द्वितीय ) राजाने येथे नव्या राजवंशाची स्थापन केली. त्यामधील अठरा राजे पुढीलप्रमाणे होते :—१. जयवर्मन् ( द्वितीय, स. ८०२ ); २. जयवर्मन् ( तृतीय, स. ८६९ ); ३. इंद्रवर्मन् ( स. ८७७ ); ४. यशोवर्मन् ( स. ८८९ ); ५. हर्षवर्मन् ( प्रथम, स. ९१० ); ६. ईशानवर्मन् ( स. ९१८ ); ७. जयवर्मन् ( चतुर्थ, स. ९२८ ); ८. हर्षवर्मन् ( द्वितीय, स. ९४२ ); ९. राजेंद्रवर्मन् ( स. ९४४ ); १०. जयवर्मन् ( पंचम, स. ९६८ ); ११. सूर्यवर्मन् (प्रथम; स. १००२ ); १२. उदयादित्यवर्मन् ( स. १०४९ ); १३. हर्षवर्मन् ( तृतीय, स. १०७० ); १४. जयवर्मन् ( षष्ठ, स. १०९० ); १५. धरणींद्रवर्मन् ( प्रथम, स. ११०८ ); १६. सूर्यवर्मन् ( द्वितीय, स. १११२ ); १७. धरणींद्रवर्मन् ( द्वितीय, स. ११५२ ); १८. जयवर्मन् ( सप्तम, स. ११६२–१२०१ ).

**संस्कृती**—जयवर्मन् (द्वितीय) च्या राजवंशाने या देशात हर्षवर्धनकालीन भारतीय संस्कृतीसदृश चातुर्वर्ण्य, संस्कृत अध्ययन, अध्यापन आणि शास्त्रचर्चाप्रधान संस्कृतीची स्थापना करून दक्षिण भारतासदृश विपुल देवमंदिरे बांधली. उत्तरकालात येथील वर्णव्यवस्थेची जागा जातिहीनतेने घेतली, आणि येथे बौद्ध धर्म दृढमूल झाला. आधु. कंबोडियात हिंदु धर्म आणि देवमंदिरे यांचा लवलेशहि नसून, बौद्ध धर्म आणि मंदिरांचे तेथे आधिक्य आहे ( सांकृत्यायन, बौद्ध संस्कृति. १६१–१६३ ).

**स्थापत्यकला**—जयवर्मन् ( द्वितीय ) च्या घराण्याच्या राज्यकालात अंकोरथोम् या राजधानीच्या गावाची, तसेच अंकोरवात् मंदिराच्या उत्तरेकडील फिमिअनक्स, बयोन आदि मंदिरांची निर्मिती होऊन या देशातील मंदिरस्थापत्याची उत्पत्ती आणि विकास झाला. जयवर्मन् ( द्वितीय ) च्या साऱ्या इमारतींवर जावा देशातील बोरोबुदुर ( स. ७–८ वे शतक ) मंदिराची छाप असून, तो स्वतः जावादेशीय असावा. या घराण्याच्या राज्यकालातील ( इ. स. ९–१२ वे शतक ) कंबूज मंदिरस्थापत्याची माहिती सोबतच्या परिपत्रकात दिली आहे ( परिपत्रक पहा ).

चंपा ( आधु. कोचीन चीन ), पेगु आणि सयाम देशांच्या अखंड आक्रमणामुळे या देशातील स्थापत्यरचना स. ११५२ मध्ये विराम पावली, आणि स. १३७५ व १४६० मध्ये अंकोरथोम् हे राजधानीचे नगर नष्ट झाले. उत्तरकालात येथील राजधानी विभिन्न गावी स्थलांतरित होऊन अखेरीस ती मेकाँग खोऱ्यातील फनोम–पेन्ह ( अक्षांश ११°–३३′ उत्तर; रेखांश १४०°–५७′ पूर्व ) या सध्याच्या राजधानीच्या गावी हलविण्यात आली.

**धर्म**—या देशातील मूळ रहिवासी नागपूजक असले, तरी उत्तकालात त्यांनी भारतीय, वैष्णव व शैव धर्मांचा स्वीकार केला. या देशातील दक्षिण भारतीय लोकांची वसाहत जावा देशाशी समकालीन असली, तरी येथील पूर्वकालीन नागपूजेत क्रमाने फेरबदल करीत भारतीय वसाहतकारांनी येथे हिंदुधर्मप्रधान स्वतंत्र धर्माची स्थापना केली. याचे उलट रानटी अवस्थेतील जावा देशाने भारतीयांचा शैव, वैष्णव धर्म, आणि स्थापत्य जसेच्या तसे उचलले.

फर्ग्युसन यांच्या मते कंबूज देशातील नागपूजाप्रधान वैष्णव अथवा शैव धर्म आणि स्थापत्यात बौद्ध धर्मास काहीच स्थान नव्हते. सयामदेशीय बौद्ध साहित्यमते अशोकाचे धर्मप्रचारक, तसेच बुद्धघोष नामक उत्तरकालीन आचार्य येथे आले असले, तरी बौद्ध धर्म, संस्कृती अथवा शिल्प यांचा मागमूसहि येथे दिसत नाही. चिनी प्रवाश्यांच्या प्रवासवर्णनातील ( स. १२९५ ) येथील समृद्धीचा निर्देशहि स्वधर्माभिनिवेशप्रेरित दिसतो ( फर्ग्युसन, २.३९१–३९२ ).

**शैव–वैष्णव धर्म**—या देशातील प्रारंभीचे ( इ. स. ९–१० वे शतक ) शैव पंथाचे प्राबल्य उत्तरकालात ( इ. स. १२ वे शतक ) नाहीसे होऊन त्याची जागा विष्णुउपासनेने ( उदा. अंकोरवात् मंदिर ) घेतली. सांकृत्यायन यांच्या मते जयवर्मन् ( षष्ठ ) पुत्राच्या ( इ. स. १२ वे शतक ) ब्रह्मदेशयात्रेनंतर येथे बौद्ध धर्माचा प्रथम प्रवेश झाला.

**शिलालेख**—येथे सापडलेल्या जयवर्मन् ( प्रथम, इ. स. ७ वे शतक ), तसेच यशोवर्मन् ( इ. स. ९ वे शतक ) राजांच्या अनेक शिलालेखांपैकी यशोवर्मन्च्या लेखात दक्षिण भारतीय पल्लव भाषा व लिपीऐवजी उत्तर भारतीय लिपीचा प्रयोग आढळतो. त्यामधील यमुनातटवासी ब्राह्मणांच्या आगमनाच्या निर्देशावरून उत्तर भारतीय लोक या काळात येथे आले असावेत. महेंद्रवर्मन् राजाच्या व्यांग शिलालेखात आकड्यांच्या साह्याने संख्या व्यक्त करण्याचा प्रयत्न असून, त्याचे अनुकरण भारतातील उत्तरकालीन ( इ. स. ८ वे शतक ) शिलालेखात आढळते. गुप्त अथवा हर्षकालीन शिलालेखांसदृश विशुद्ध संस्कृत भाषेतील १०० हून अधिक श्लोकांचे अन्य अनेक

# कंबूज देशातील नागरी आणि मंदिरस्थापत्य

| राजा | मंदिरे | नागरी स्थापत्य | वैशिष्ट्य |
|---|---|---|---|
| (१) जयवर्मन् (द्वितीय) (स. ८०२–८६९) | अंकोरथोम् गावच्या बयोन, फिमिअनकस् मंदिरांच्या बांधकामास प्रारंभ | प्रह्-खन् गावी राजधानी. अंकोरथोम् नगर बांधणीस प्रारंभ | कंबूज मंदिरस्थापत्य परंपरेचा प्रारंभ. जावा येथील बोरोबुदुर (इ.स. ७ वे–८ वे शतक) मंदिराचे अनुकरण |
| (२) इंद्रवर्मन् (स. ८७७–८८९) | बयोन मंदिर पूर्ण. बकु आणि बकाँग गावची मंदिरे | — | शैव आणि वैष्णव मंदिरे |
| (४) यशोवर्मन् (स. ८८९–९१०) | अंकोरथोम् राजवाड्यातील फिमिअनकस् मंदिर, तसेच कंबूज देशातील लोलै मंदिराची परिपूर्ती | अंकोरथोम् नगराची परिपूर्ती | महारोग झाल्याने राज्यत्याग |
| (५) हर्षवर्मन् आणि ईशानवर्मन् | — | ईशानवर्मनकृत चोक्–गर्ग्यर (आधु. कोहकेर) येथे नवे राज्य व राजधानी | — |
| (९) राजेंद्रवर्मन् (स. ९४४–९६८) | त–प्रोहम आणि बंतै–केदै येथील बौद्ध मंदिरे | अंकोरथोम् येथे राजधानीचे पुनः स्थलांतर | बौद्ध धर्माचा प्रथम प्रवेश |
| (१०) जयवर्मन् (पंचम) (स. ९६८–१००२) | अंकोर थोम् राजवाड्याच्या दक्षिण भागातील बपुओन मंदिर | — | — |
| (११) सूर्यवर्मन् (प्रथम) (स. १००२–१०४९) | फ्नोम–चिसोर, वात–एक, फ्नोम बासेत्, प्रह–विहीर, प्रह–खन् गावची मंदिरे | — | — |
| (१२) उदयादित्यवर्मन् (स. १०४९–१०७०) | बन्तै–त–केअन्, फिमै प्रे–रूप गावची मंदिरे. अंकोरथोमच्या उत्तरेकडील बखेंग पर्वत मंदिर | — | — |
| (१४) जयवर्मन् (षष्ठ) (स. १०९०–११००) | पुसंत् गावचे वात–फु मंदिर, अन्य पुरातन मंदिरांचे जीर्णोद्धार | — | — |
| (१६) सूर्यवर्मन् (द्वितीय) (स. १११२–११५२) | अंकोरवात् विष्णु मंदिराची परिपूर्ती. या मंदिरातील रामायणाधारित शिल्पचित्रे | — | यादवीनंतर राज्याचे सुस्थितीकरण. चंपा (आधु. कोचीन चीन) आणि सयाम देशांचे आक्रमण |

शिलालेख येथे सापडले आहेत.

**चिनी प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते (इ. स. १२ वे शतक) या देशातील लोक बुटके, धडधाकट, श्यामलवर्णीय आणि कर्मठ असून, स्त्रिया उजळ वर्णाच्या होत्या. येथील पुरुष लांब केसांचा अंबाडा बांधीत असून, कानात कुंडले घालीत असत. हे लोक उजवा हात शुद्ध आणि डावा हात अशुद्ध मानीत असून, प्रतिदिनी ते स्नान आणि दंतधावन करीत असत. भोजनोत्तर ते पुन्हा दंतधावन आणि प्रार्थना करीत. भोजनात तूप, मलई, साखर, तांदूळ आणि बाजरीच्या भाकरीचा वापर ते करीत.

**गृहरचना**—येथील प्रारंभीची पूर्वाभिमुख घरे काष्ठमय असून, उत्तरकालात (इ. स. ५ वे शतक) येथे दगडविटांची घरे प्रचारात आली. जयवर्मन् (द्वितीय) च्या काळातील विटांच्या घरांचे काही अवशेष उपलब्ध झाले आहेत.

**गृहजीवन**—येथे अतिथिसत्कारार्थ सुपारी, कापूर आणि अत्तर यांचा उपयोग करीत असत. उघडपणे सुरापान निषिद्ध मानले जाई. पतिपत्नी एकांतात सोमपान करीत असत.

**विवाहविधी**—विवाहात मुलीसमवेत फक्त एक वस्त्र आहेर म्हणून देत असून, तिथिनिश्चयानंतर अहोरात्र नंदादीप तेवत ठेवीत असत. विवाहानंतर मुलगा आपल्या वाटणीच्या घरात वेगळा संसार थाटत असे.

**और्ध्वदैहिकविधी**—घरात मृत्यू झाल्यानंतर येथील लोक अनशन आणि श्मश्रूहीन अवस्थेत सात दिवस सुतक पाळीत. मृताचा हिस्सा वारसाला अथवा तो नसल्यास राजाला दिला जाई. मृताची वाजतगाजत प्रेतयात्रा काढून सुगंधी काष्ठांच्या चितेवर ब्राह्मणाद्वारा त्यास अग्नि दिला जाई. नंतर सुवर्ण, रौप्य, अथवा मृत्तिकापात्रात रक्षा ठेवून ती नदीमध्ये विसर्जन करीत. क्वचित ठिकाणी प्रेत पर्वतमाथ्यावर पशुपक्ष्यांच्या भक्षणार्थ ठेवीत.

**राजधानी**—येथील राजधानीच्या गावी २० हजार कुटुंबे रहात असून, नगराच्या मध्यवर्ती महाशालेत राजदरबार भरे. राज्यातील तीन प्रमुख नगरांचे तीन स्वतंत्र अधिकारी होते.

**मंदिरप्रवेशाचे नियम**—यशोवर्मन् राजाच्या शिलालेखावरून येथील मंदिरप्रवेशाचे नियम दक्षिण भारतासदृश कडक दिसतात. या शिलालेखमते रंगीबेरंगी वस्त्रधारी, तसेच अधू, कुबड्या, कृतघ्न, बुटक्या, महापातकी, ठग, विदेशी, कुष्ठरोगी आणि दंडित व्यक्तींना शिवमंदिरात प्रवेश नसे. आत्मसंयमी, कुलीन, सदाचारी आणि शांतचित्त व्यक्तींनाच तेथे प्रवेश मिळे.

उपरोक्त नियम मोडणाऱ्या राजपुत्रांना २० पल, राजपरिवारातील लोकांना १० पल, सुवर्णदंडमंडित छत्रीधारी सधनांना ५ पल, व्यापाऱ्यांना २½ पल आणि सामान्यजनांस ¾ पल सुवर्ण दंड केला जाई. ब्राह्मणांना दंड न करता गाभाऱ्यातून बाहेर काढले जाई. दंड न देणाऱ्यांना वेताचे फटके मारले जात. मंदिराच्या पूजाविधीमध्ये कुचराई करणाऱ्या पुजाऱ्यांना २० पल सुवर्ण दंड केला जाई.

## मंदिरस्थापत्य

**मंदिरस्थापत्य**—द्राविड मंदिरस्थापत्य, ग्रीक शैलीचे स्तंभ आणि ईजिप्शियन धर्तीची शिल्पचित्रे या तिहींचा समन्वय साधणारी हिंदु देवमंदिरे या देशात आढळत असून, बृहदाकार मंदिररचनेसाठी आवश्यक ती कलादृष्टी, तसेच त्यामधील अंगोपांग स्थापत्यदृष्ट्या बिनचूक आणि निर्दोष घडविणारी कारागिरी या दोहोंचा मनोज्ञ संगम त्यामध्ये दिसतो. त्यामधील स्थानिक नागोपासना आणि नवागत हिंदुधर्म यांचे संमिश्रणहि धर्मशास्त्रीय दृष्टीने महत्त्वपूर्ण आहे (अंकोरवात्, अंकोरथोम् पहा).

या देशातील द्राविड शैलीचे मंदिरस्थापत्य सर्वांशाने भारतीय वळणाचे असले, तरी जयवर्मन् (द्वितीय, इ. स. ७ वे शतक) राजाची प्रारंभीची काही मंदिरे जावा देशातील बोरोबुदुर मंदिराच्या शैलीची आहेत. अंकोरथोम् या राजधानीच्या गावची बयोन, अंकोरवात् मंदिरे; तसेच बेंगमेलिआ गावची मंदिरे स्थापत्यदृष्ट्या वैशिष्ट्यपूर्ण असून, त्यापैकी अंकोरवात् मंदिर हे उत्तरकालीन आणि म्हणूनच सुस्थितीत आहे. दाक्षिणात्य मंदिरांच्या अनुकरणाने बांधलेल्या या मंदिरांची एकापेक्षा अधिक गाभारे आणि सुरूच्या आकाराची शिखरे ही प्रमुख वैशिष्ट्ये आहेत. नागपूजेप्रमाणेच रामायण–महाभारतातील कथाभागावर आधारित शिल्पेहि त्यामध्ये असून, भव्य स्थापत्य आणि सजीव, रेखीव आणि बोलकी शिल्पे हे या मंदिरांचे प्रमुख वैशिष्ट्य आहे. तत्कालीन वायव्य भारतातील ग्रीक स्थापत्यप्रधान भारतीय स्थापत्यकलेचा ठसा येथील मंदिरात असून, येथील नागपूजाप्रधान वैष्णव अथवा शैव मंदिरांचे स्थापत्य सर्वांशाने ग्रीक स्थापत्यप्रधान द्राविड शैलीचे आहे.

**स्थानवैशिष्ट्य**— या देशातील बहुतांशी मंदिरे टेकडीसदृश उंच जागी बांधली असून शेकडो पायऱ्या चढून

त्याप्रत जावे लागते (उदा. फ्नोम् चिसोर मंदिराच्या ३९२ पायऱ्या). येथील 'प्रह-विहिर' मंदिरहि दुर्गसदृश तुटक्या कड्यावर बांधले आहे.

**मंदिरस्थापत्य**— स्थापत्यशास्त्रीय दृष्टीने येथील मंदिराचे निम्नलिखित चार प्रकार दिसतातः—

| मंदिरप्रकार | उदाहरणे |
|---|---|
| १. भूभागाशी समांतर तटबंदी-त्रययुक्त मंदिरे | त-प्रोहम्, बँते केदे प्रे-रूप मंदिरे |
| २. शंक्वाकृती व्यासपीठाधारित शंक्वाकृती मंदिरे | फिमिअनकस, बपुओन मंदिरे |
| ३. शंक्वाकृती व्यासपीठाधारित तटबंदीयुक्त मंदिरे | अंकोरवात्, बयोन मंदिरे |

**तटबंदी**—येथील मंदिरांभोवती नक्षीकामयुक्त दगडी तटबंदी (उंची–८′–१०′) असून, त्यांच्या अंतर्भागात सपाट दगडी छताचा अरुंद प्रदक्षिणापथ (रुंदी–७′–१०′) आढळतो.

**मंदिरमार्ग**—येथील मंदिराप्रत जाण्यासाठी विस्तीर्ण मंदिरमार्ग असून, मेकाँग खोऱ्याचा प्रदेश वर्षाकाली संपूर्णतः जलमय होत असल्याने हे मंदिरमार्ग जमिनी-पासून उंच (१०′–१२′) बांधलेले दिसतात. ख्रिस्ती क्रूसाकृती या मंदिरमार्गांच्या उभय अंगांना सिंहव्याघ्रां-दिकांच्या प्रतिमा आढळतात. मंदिर तटबंदीनजिकच्या खंदकावर दगडी पूल बांधले असून, त्यांचे कठडे महाकाय व्यक्तींच्या स्कंधाधारित सर्पाकृतींनी बनले आहेत. या सर्पाकृती मंदिराच्या प्रवेशद्वारानजिकच्या सतफडायुक्त नागप्रतिमांस हे जाऊन मिळतात.

**पुष्करिणी**—मंदिराच्या तटबंदीच्या परिसरात दाक्षिणात्य मंदिरसदृश अनेक पुष्करिणी (स्रस्) असून, त्यामधील पाण्याचा उपयोग पूजेअर्चेसाठी करीत असत.

**प्रवेशद्वार**—येथील मंदिरांची प्रवेशद्वारे बहुंशी पूर्वाभि-मुख असून (अपवाद–अंकोरवात् मंदिराचे पश्चिमाभिमुख प्रवेशद्वार), दाक्षिणात्य मंदिराप्रमाणेच तीहि 'गोपुर' नावानेच ओळखली जातात. या गोपुरांशी समांतर, तसेच काटकोनात छोट्या इमारती, तसेच समांतर इमारतीत उपप्रवेशद्वारे (गोपुरे) बांधली असून, गोपुरांच्या मनोऱ्यां-वर चतुर्दिशांना ब्रह्मदेवाची चतुर्मुखे आढळतात.

अशाच तऱ्हेची गोपुरे मंदिराच्या तटबंदीच्या चतुर्दिशांना बांधली असून, यापैकी पूर्वेकडील आणि पश्चिमे-कडील गोपुरे तटबंदीच्या मध्यभागी आणि उत्तराभिमुख आणि दक्षिणाभिमुख गोपुरे तटबंदीच्या पश्चिम टोका-नजिक आढळतात. मंदिराच्या दर्शनी भागाच्या परिसरात उपमंदिरे बांधली असून, तटबंदीच्या दरेक कोपऱ्यामध्ये स्वतंत्र गोपुरे काही ठिकाणी आढळतात. अंकोरथोम् येथील बयोन मंदिरात अशा तऱ्हेची एकूण ४० गोपुरे असून, त्यापैकी मुख्य गोपुर १६४′ उंच (व्यासपीठ–३४′, गोपुर–१३०′) आहे.

**व्यासपीठे**—कंबूज मंदिरांची विभिन्न व्यासपीठे प्रत्येकी १५′–२०′ उंचीची असून, त्यामधूनच त्यांचा शंक्वाकृती आकार सिद्ध होतो. त्याप्रत चढून जाण्यासाठी नक्षीकामयुक्त पायऱ्यांची मालिका आढळते.

**वास्तुविशेषांची पुनरावृत्ती**—विभिन्न वास्तुविशेषांच्या पुनरावृत्तीने स्थापत्यशास्त्रीय समृद्धी साधण्याकडे कंबूज स्थापत्यकारांचा कल दिसतो. येथील चौरसाकृती गर्भागाराचे चहुबाजूंस तशाच आकाराचे प्रत्येकी १–२ बाह्यमंडप असून, त्या साऱ्यांच्या शिरोभागी निमुळते होत जाणारे अनेक मजले आढळतात. या साऱ्यांच्या दर्शनी भागी नक्षीकामयुक्त प्रवेशद्वारे, प्रवेशकमानी, आणि सर्पाकृती नक्षीकामयुक्त गोपुरे असून, मूलतः साधी अशी ही रचना तिच्या पुनरावृत्तीने शिल्पसमृद्ध वाटते. मंदिराच्या गर्भा-गारातील, तसेच बाह्यमंडपातील प्रवेशद्वारांपैकी पूर्वाभिमुख द्वार नित्योपयोगात असून, बाकी बंद केलेली दिसतात.

**गर्भागार**—येथील मंदिरांचे मुख्य दगडी गर्भागार (भिंतीची जाडी–६′) तटबंदीतील मुख्य प्रवेशद्वाराशी समांतर असून, त्याच्या चहुबाजूंस बाह्यमंडप आणि शिरो-भागी सुरूच्या आकाराची निमुळती शिखरे आढळतात. ही सारी शिखरे निमुळत्या होत जाणाऱ्या दगडांच्या सांध-मोडीने बांधलेली दिसतात. त्यामध्ये कमानींचा वापर कोठेहि आढळत नाही. दगडांचे थर क्रमाने जवळ घेऊन येथे कमानीचा आभास निर्मिल्याने या कमानींची रुंदी येथे सरासरी १०′ दिसते.

**प्रदक्षिणापथ**—दगडी कमानींची कला कंबूज स्थापत्य-कारांना अवगत नसल्यामुळे कमी रुंदीचे (१६′) लांबच लांब प्रदक्षिणापथ हे या मंदिराचे एक प्रमुख वैशिष्ट्य बनले आहे (उदा. अंकोरवात् मंदिरातील ४३००′ लांबीचे प्रदक्षिणापथ). या प्रदक्षिणापथाचे सिमेंटविना सांधमोड केलेले माठीव दगडाचे छत ५ शतकांहून अधिक काल सुस्थितीत राहिले असून, त्याचे बांधकाम ईजिप्तमधील

पिरॅमिड्सच्या तोडीचे आहे.

अन्य वास्तुविशेष—मंदिरातील मुख्य गर्भागाराच्या समोर आयताकृती दगडी खिडक्यांनी युक्त दप्तरखान्याच्या इमारती असून, त्यापैकी जामदारखान्यात मंदिराचे दागिने, पूजापात्रे ठेवीत असत. भारतातील कैलास (वेरूळ), सिन्नर, धम्नार गावांसदृश उपदेवतांची मंदिरे येथे बांधण्यात येत. या देशातील 'फ्नोम् चिसोर' मंदिरात शैव आणि वैष्णव मूर्तींची अशा तऱ्हेची पाच उपमंदिरे आहेत (फर्ग्युसन, २.३७६–३८०).

## नागरी स्थापत्य

**नागरी स्थापत्य**—या देशाच्या 'अंकोरथोम्' या राजधानीच्या गावी खडबडीत दगडात बांधलेल्या तटबंदीयुक्त नगराचे, तसेच लांबलचक भिंतीच्या काष्ठमय छतयुक्त घरांचे अवशेष सापडले आहेत. नगरतटबंदीची उंची नगराच्या महत्त्वानुसार कमी-अधिक असून, त्याची नक्षीकामयुक्त प्रवेशद्वारे गुळगुळीत दगडांची असत.

**राजवाडे**—या देशातील 'बेंग मेअलिआ' मंदिराच्या बाह्य तटबंदीच्या अंतर्भागात स्थानिक राजाराणीच्या निवासाच्या दोन इमारती सापडल्या असून, फिमिअन्कस मंदिराच्या पश्चिम भागात, तसेच अंकोरथोम् गावी तत्कालीन राजप्रासादाचे काही अवशेष सापडले आहेत. अंकोरथोम् येथे द्वाररहित तटबंदीयुक्त राणीवशाची एक इमारतहि आढळते. बस्सकनजिकच्या वात् फु गावच्या मंदिराच्या पुलासमीप राजवाड्याची एक इमारत असून, फ्नोम-चिसोर गावच्या मंदिराच्या उत्तरेस राजस्त्रियांच्या निवासाची एक इमारत सापडली आहे.

फर्ग्युसन यांच्या मते कंबूजनरेशांचे वैभव लक्षात घेता उपरोक्त छोट्या इमारतींऐवजी अंकोरवात्, बेंग मेअलिआ, त–प्रोहम्, प्रह–खन् या गावच्या बृहदाकार मंदिरांचाच उपयोग राजप्रासाद म्हणून, तसेच त्यामधील सभामंडपांचा उपयोग दरबार हॉल म्हणून करण्यात येत असावा. याचे उलट अंकोरथोम् येथील बयोन मंदिरातील निवासस्थाने पुजारी निवासाची असावीत. लाकडी छताच्या तत्कालीन घरामध्ये दगडी छताचे हे राजप्रासाद आणि मंदिरे उठून दिसतात. येथील राजवाड्यातील काही दरबार हॉल्सना लाकडी कौलारू छते असावीत. परंतु वाळवीमुळे ती आज नष्ट झाली आहेत.

**रस्ते आणि पूल**—येथील दगडी रस्ते आणि पूलहि वैशिष्ट्यपूर्ण असून, त्यापैकी कोरत् नगर–मेकाँग नदी हा वायव्य–आग्नेय रस्ता सर्वात मोठा (लांबी–३०० मैल जमिनीपासून उंची–१०′–१५′) आहे. रोमन रस्त्यासदृश पक्क्या बांधलेल्या या रस्त्यावर असंख्य दगडी पूल असून, त्यापैकी काही (लांबीरुंदी–४००′×५०′) आजहि सुस्थितीत आहेत. त्यांच्या कठड्यावर नागराजाकृती कोरल्या असून, त्यांच्या माठीव दगडाच्या कमानी विषुववृत्तावरील सैतानी जलप्रवाहांना तोंड देत पाच शतकांहूनहि अधिक काल सुस्थितीत राहिल्या आहेत.

अंकोरवात् मंदिरातील शिल्पचित्रात तत्कालीन द्रुतगामी रथांच्या आणि रथचक्रांच्या (उंची–३′–५′) अनेक प्रतिकृती असून, रथचक्रांच्या सोळा आऱ्या आणि धावा धातूच्या करीत असावेत. प्राचीन रोम, ब्रिटन आणि भारतीय संस्कृतींना धातूचे प्रमाणबद्ध रथचक्र साधले नव्हते, हे लक्षात घेता नागरी स्वयंचलनाच्या बाबतीत कंबूज संस्कृती अधिक पुढारलेली असावी.

**कम्बैरिखोन** (नदी)—टॉलेमीच्या मते पूर्व भारतातील गंगा नदीची तृतीय मुखनदी (अक्षांश १८°-४०′; रेखांश १४६°–३०′). विल्फोर्ड यांच्या मते 'कौमारक' (आधु. कोब्बरक) नदीचेच हे नामांतर असावे (कौमारक पहा).

**कम्बोइका** (ग्राम)—चालुक्य राजा मूलराजाच्या वि. सं. १०४३ च्या शिलालेखामते उत्तर गुजरातमधील सारस्वत मंडलान्तर्गत मोधेरा उपविभागातील एक ग्राम. उत्तर गुजरातमधील आधु. कंबोइ गाव हेच होय (इंडि. अँटि. ६.१९१–१९२).

**कम्बोज** (देश)—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते वायव्य भारतातील एक एकराज जनपद. येथील राजा आणि लोक 'कांबोज' नावाने सुविख्यात असून (पा. सू. ४.१.१७५), पौराणिक साहित्यमते हा (कांबोज) देश उदीच्य भारतातील (वायव्य भारतातील सिंधु नदीचा जलसंचय प्रदेश) उत्तरेकडील डोंगराळ प्रदेशात होता (वायु. ४५.११८; ब्रह्माण्ड. १६.४९; मार्क. ५४.३८; पद्म. आदि. ६.६०; म. भी. १०.६४; वामन. १३.४०; काव्यमी. १७.२२७). या देशातील 'कांबोज' लोकसमूहावरूनच पौराणिक 'कांबोज' देशनाम प्रचलित झाले असावे. वायव्य भारतीय सर्वाधिक सुविख्यात लोकसमूहांमध्ये त्यांची गणना होत असे.

अग्रवाल यांच्या मते अफगाणिस्तानातील हिंदुकुश पर्वताच्या ईशान्येकडील वक्षु (आधु. अमूदरिया) नदीच्या वरच्या खोऱ्यातील आधु. बदक्षन् (प्राचीन द्व्यक्ष; पा. सू. ४.२.५४)–पामीर प्रदेश म्हणजे हा देश असून,

हिंदुकुश पर्वताने तो दक्षिणवर्ती भारतवर्षापासून विभक्त झाला होता. प्रकिण्व ( आधु. फर्घान् ) पर्यंत पसरलेल्या पाणिनिकालीन वायव्य भारतातील सिंधु नदीच्या पश्चिमेकडील हिंदुकुश पर्वताच्या परिसरातील प्रमुख महाजनपदे पुढीलप्रमाणे होती :—

| दिशा | देश | आधुनिक स्थान |
|---|---|---|
| १. ईशान्येस | कंबोज | बदक्षन्-पामीर प्रदेश |
| २. वायव्येस | बाह्लीक | उत्तर अफगाणिस्तानातील बल्ख देश |
| ३. नैर्ऋत्येस | गंधार | कुणार नदीपासून तक्षशिलेपर्यंतचा प्रदेश |
| ४. आग्नेयेस | कपिश | ईशान्य अफगाणिस्तानातील काफिरीस्तान–कोहिस्तान |

ऱ्हाइस डेव्हिड्स यांच्या मते बौद्ध पेतवत्थुमध्ये निर्देशिलेल्या द्वारका गावी या देशाची राजधानी होती. आधु. शियपोश लोक स्वतःस कांबोज लोकांचे वंशज म्हणवितात.

**भौगोलिक परिसीमा**—या देशाच्या भौगोलिक परिसीमा पुढीलप्रमाणे होत्या :— १. पूर्वेस–सिंधु नदी; २. पश्चिमेस–काफिरीस्तान; ३. दक्षिणेस–हिंदुकुश पर्वत; ४. उत्तरेस–दर्वाझ ( प्राचीन द्वारका देश ).

**मतांतरे**—काही अभ्यासकांच्या मते आधु. कश्मीर आणि पूर्व अफगाणिस्तान म्हणजे हा देश असून, पूंचच्या आग्नेयेकडील रजौर प्रदेशात कांबोज लोकांची वसाहत होती ( आय्. एच्. क्यू. २६·११८ ). परंतु हे अनुमान यथायोग्य वाटत नाही.

**आद्य वसाहत**—अली यांच्या मते या लोकांची आद्य वसाहत काबूल नदीच्या जलसंचय प्रदेशान्तर्गत कुणार नदीच्या खोऱ्यातील काम देशात ( आधु. काफिरीस्तान ) होती. पौराणिक साहित्यात कांबोज वसाहतींचा मोघम निर्देश असला, तरी सिंधु नदीच्या जलसंचय प्रदेशाशी त्यांना तेथे संलग्न केलेले नाही. त्यावरून काफिरीस्तानमधील आद्य वसाहतींचा निर्देश तेथे अभिप्रेत असावा ( अली, पुराणाज्. पृ. १४३ ). महाभारतमते कांबोज लोकांची आद्य वसाहत हिमालयाच्या उत्तरेकडील ‘ परमकांबोज ’ देशात असून ( म. स. २७.२५ ), उत्तरकालात ते वायव्य भारतात स्थलांतरित झाले.

**वांशिक साधर्म्य**—हरिवंशमते शक, यवन ( ग्रीक ), कांबोज, दरद आणि पह्लव ( इराणी ) लोक वांशिक दृष्ट्या निकटवर्ती असून, यवन आणि कांबोज लोक संपूर्ण मस्तकाचे, आणि शक लोक अर्ध्या मस्तकाचे मुंडण करीत असत. याचे उलट पारद आणि पह्लव लोक अनुक्रमे मस्तकाचे केस आणि दाढी वाढवीत असत ( मॅक्स मूलर, संस्कृत साहित्य इतिहास. पृ. २८ ). पाणिनीच्या गणपाठातहि कांबोज लोकांना ‘ मुंड ’ ( मुंडण केलेले ) म्हटले आहे.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. मथुरा सिंहप्रतिमा खरोष्ठीलेख ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२ ३६ ) | कमुय ( कंबोज ) कौमुइया ( कांबोजक ) |
| २. पर्शियन शिलालेख ( देवदत्त भांडारकर, पृ. ५४ ) | कंबुजिय, कंबुज |
| ३. अशोक आज्ञालेख ( धौलि; गिरनार शिलालेख ); पौराणिक साहित्य | कांबोज |
| ४. बौद्ध साहित्य ( मज्झिम. २. १४९ ) | कांबोज |
| ४अ. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य ( शब्दरत्न. ७८.६ ) | कांबोज |
| ५. कौटिलीय अर्थशास्त्र ( श्यामाशास्त्री, पृ. ४५५ ) | कंबोच |
| ६. वाल्मीकि रामायण ( पाठभेद-वा. रा. बा. ५४.२३; ५५.२ ) | कांभोज |
| ७. ह्युएन्त्संगचे प्रवासवर्णन | कौ–फु ( कंबु ) |

**नामव्युत्पत्ती**—यास्काचार्यांच्या निरुक्तमते ‘ सुखोपभोगांचे सेवन करणारे ( कमनीयभोज ) ’ अशा अर्थाने या लोकांना ‘ कांबोज ’ नाव प्राप्त झाले. ( कमसुख > कंबल > कंबोज > कांबोज ). पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यातहि अशाच अर्थाचा निर्देश आढळतो ( पतञ्जलि. १.१.१; ४.१.१७५ ). भाषाशास्त्रीय दृष्टीने ही व्युत्पत्ती विवाद्य असली, तरी येथील थंड हवामानाचा विचार करता व्यवहारतः ती यथायोग्य वाटते.

**वैदिक साहित्यात**—वंश ब्राह्मणात ‘ कांबोज ’ ( कंबोज देशनिवासी ) औपमन्यव नामक आचार्यांचा निर्देश आढळतो ( वं. ब्रा. २ ). भारतीय आर्यांहून वेगळी बोलीभाषा बोलणारे कांबो लोक ‘ शवति ’ क्रियापद ‘ गमन

करणे' अर्थाने उपयोजित असत (शवतिर्गतिकर्मा कंबोजेष्वेव भाष्यते; नि. २.२). ग्रिअर्सन यांच्या मते 'शवति' (=इराणी 'शुदन') क्रियापदाचा उपयोग करणारे हे अर्धइराणी लोक इराणीमिश्रित संस्कृत भाषा बोलत असावेत (जे. आर. ए. एस्., स. १९११. पृ. ८०१–८०२; कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.१.३७). पामीर–बदक्षनदेशीय भाषेत 'शवति' हा गत्यर्थक धातुप्रयोग आजहि आढळतो.

**खरोष्ट्री शिलालेखात**—मथुरा सिंहप्रतिमालेखात महाक्षत्रप रजुलाच्या अयसिया नामक पत्नीला, तसेच तिच्या खरोष्ट्र नामक पित्याला 'कमुईय' ('कौमुझ्या' = कांबोजक = कंबोज देशनिवासी) म्हटले असून, स्टेन कोनौ यांच्या मतें या शिलालेखातील 'कमुय' या शक खरोष्ट्रीभाषीय रूपावरून हे लोक वायव्य भारतान्तर्गत 'कि-पिन्' निवासी शक लोकांपैकी असावेत (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.३६).

**अशोक शिलालेखात**—अशोकाच्या आज्ञालेख क्र. ५ आणि १३ मध्ये वायव्य (अपरांत) सरहद्दीवरील कंबोज, योन (यवन), गंधार देशांमध्ये नवे धर्मनियम प्रस्थापित केल्याचा, तसेच कांबोज, यवन, नाभक आणि नाभपंक्ति लोकांच्या बौद्धधर्मस्वीकृतीने संतोष वाटल्याचा निर्देश आढळतो. यावरून अशोकराज्यकाली हे लोक काबूल नदीच्या खोऱ्यात काबूल-कंदाहारच्या दऱ्यांमध्ये ग्रीक आणि यवन लोकांसमवेत निवास करीत असावेत (इंडि. अँटि. २०.२३९–२४०; २४७).

**मनुस्मृतीत**—या ग्रंथमते कांबोज, शक, यवन हे मूळचे क्षत्रिय आर्य लोक कालांतराने आचारहीनतेमुळे शूद्र बनले मनु. १०.४४). परंतु बुद्धघोषमते हे लोक इराणी (पारसक वण्ण) असून, भूरिदत्त जातकमतें हे लोक आत्मशुद्धयर्थ सर्प, बेडूक, कृमिकीटक भक्षण करीत असत (जा. ६.२०८; २१०). त्यामुळे यांच्या अवनतीसंबंधीचा मनुस्मृतीतील निर्देश अनैतिहासिक वाटतो.

**गणराज्य**— पाणिनीची अष्टाध्यायी, तसेच महाभारतमते (म. आ. ६७.३२; आर. ४.२२; उ. १६५.१–३) हा देश राजनियंत्रित (एकराज, राजानुवर्ति) असून, कौटिलीय अर्थशास्त्रमते या क्षत्रिय लोकांचे (श्रेणी) वार्ताशस्त्रोपजीवी संघराज्य होते (कौ. अ. ११.१.१५०; श्यामाशास्त्री, पृ. ४५५). यावरून त्या ग्रंथकाली हे लोक शेती, पशुपालन, व्यापार आणि सैनिकी व्यवसाय करीत असावेत.

**बौद्ध साहित्यात**—या साहित्यमते भारतवर्षांतील तत्कालीन षोडश महाजनपदांमध्ये उत्तरापथान्तर्गत कंबोज आणि गंधार देशांचा समावेश होत असे (अङ्गुत्तर. १. २१३;४.२५२;२५६; २६०). जातकमते वायव्य भारतातील हा संस्कृतिभ्रष्ट, रानटी आणि मागासलेल्या लोकांचा देश (जा. ५.२०८; २१०), स्त्रिया-ब्राह्मणांना गमनास निषिद्ध मानला जात असे (अङ्गुत्तर. २.८२; ५२३; मज्झिम टीका. २. ७८४). मज्झिम निकायमते धनी आणि गुलाम या द्वैवर्णिक योनकांबोज देशांत स्वकर्तृत्वानुसार वर्णान्तर करता येत असे (मज्झिम. २.१४९).

**अश्वांचा देश**—बौद्ध साहित्यमते उत्कृष्ट अश्वांचे माहेरघर अशा या देशातील (**अस्सानाम् आयतनम्**; सुमङ्गल. १. १२४; मनोरथ. १.३९९; विसुद्धिमग्ग. ३३२;जा.४.४६४) पाणवठ्यावर मधुसिंचित जलोत्पन्न वनस्पतींच्या साह्याने अश्व पकडीत असत (जा. ५.४४६). चंपेय जातकात कंबोजीय रथाश्वयुक्त काशिराजाचा (जा. ४.४६४), आणि पेतवत्थुमध्ये कंबोज-द्वारका (आधु. दर्वाझ) व्यापारी हमरस्त्याचा निर्देश आढळतो (पेतवत्थु. पृ. २३).

बौद्ध सासनवंसमते बुद्धपरिनिर्वाणाच्या २३५ व्या वर्षी महारक्खित नामक बौद्ध भिक्षु योनक– कांबोज देशास (सासन. पृ. ४९), तसेच कांबोजदेशीय तामलिंद नामक बौद्ध राजपुत्र उत्तराजीव नामक भिक्षूसमवेत सिलोनहून भारतास गेला होता (सासन. पृ. ४०). या देशाच्या सिरिहंस्य राजाने स्तनपुर नगरातील तीन हजार बौद्ध भिक्षूंची कत्तल केली होती (सासन. पृ. १००).

**जैन साहित्यात**—जैन उत्तराध्ययन सूत्रमते या देशातील प्रशिक्षित, द्रुतगती आणि ल्हानमोठ्या आवाजास न बुजणारे अश्व भारतात अग्रेसर होते (जैनसूत्र, एस्. बी. ई. २. ४७).

**वाल्मीकि रामायणात**—या ग्रंथमते या अश्वविख्यात देशात (वा. रा. बा. ६.२२) सुग्रीवाने शतबल वानराला सीताशोधार्थ पाठविले होते (वा. रा. कि. ४३.१२).

**महाभारतात**—या ग्रंथमते यवन, कांबोज आणि गांधार लोकांच्या 'अपरांत' (पश्चिम सरहद्दीपलीकडे) आणि 'परांत' (पश्चिम सरहद्दीच्या अंतर्भागात) या दोन वसाहती असून (म. भी. १.४७), येथे संभवतः या लोकांच्या काफिरीस्तानमधील आद्य आणि उत्तरकालीन वसाहतींचा निर्देश अभिप्रेत असावा. युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या उत्तर दिग्विजयात अर्जुनाने येथील अश्व युधिष्ठिररथासाठी प्राप्त केले होते (म. स. २४.२४; ४९.५). येथील राजाने युधिष्ठिराला कृष्ण आणि आरक्तवर्णीय कदली मृगाची सहस्रावधी मृगचर्मे, मुलायम कांबळी (म. स. ४८.१९), सुवर्णरज्जुकायुक्त रजया, गुफानिवासी श्वापद आणि

मार्जारचर्मे ( म. स. ५१.३ ), तसेच तीनशे चित्रविचित्रवर्णीय, सुंदर नासिकायुक्त देखणे अश्व ( म. स. ५१.४ ) उपायन म्हणून अर्पिले होते.

महाभारतकाली कांबोज हे भारतवर्षातील प्रमुख क्षत्रिय लोकसमूहांपैकी असून ( म. भी. १०.६४ ), भारतीय युद्धात या दुर्योधनपक्षीय लोकांनी मोठा पराक्रम गाजविला होता ( म. भी. ४५.६६-६८;५६.७; ७५.१७;८७.१०; द्रो. ७.१४;१९.७ ). पांडवांनी यांचे रणसाह्य मागितले असले ( म. उ. १८ ), तरी दुर्योधनाच्या गांधार देशाच्या नातेसंबंधामुळे वायव्य भारतातील कांबोजादि सारे लोकसमूह कौरवपक्षात सामील झाले. टोळधाडीप्रमाणे रणभूमी व्यापणे हे या देशाच्या रथी वीरांचे प्रमुख वैशिष्ट्य होते ( म. उ.१६०.४०;१६५.१–३ ).

भारतीय युद्धात दुर्योधनाच्या रथासमोरील निवडक पौरव आणि कलिंग सेनेमध्ये ( म. भी. १७.२६-२७ ), तसेच भीष्मनिर्मित गरुडव्यूहाच्या पुच्छभागी हे उपस्थित होते ( म. भी. ८३.१० ). अर्जुनाने कांबोजराज सुदक्षिणाचा द्वंद्वयुद्धात वध केल्यानंतर ( म. द्रो. ९२.६१;६५ ), सात्यकीसमवेतच्या युद्धात सहस्रावधी कांबोज सैनिकांनी देहार्पण केले होते ( म. द्रो ११९.५१ ). कर्णाच्या सैनापत्यकाली त्याच्या एका आघाडीच्या रक्षणाचे कार्य यांचेकडे असून ( म. क. ३१.१५ ), सुदक्षिणबंधूच्या मृत्यूनंतर ( म. क. ५६ ) यांनी अर्जुनावर निकराचे आक्रमण केले होते ( म. क. ८८; श. १.२६ ).

भारतीय युद्धात येथील क्षत्रिय लोकांचा संहार होऊन येथे रानटी लोकांचे राज्य सुरू झाले ( म. शां. ६५.१४; अनु. ३३.२१ ). आर्य संस्कृतीशी यांची फारकत होऊन उत्तरेकडील असंस्कृत लोकांच्या आक्रमणाला हे बळी पडले. कलियुगात हे म्लेंच्छ बनण्याची भविष्यवाणी व्यासांनी वर्तविली होती ( म. आर. १८६.३० ).

**बृहत्संहितेत**—या ग्रंथमते हे लोक यवन आणि पह्लव लोकांसमवेत कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या नैर्ऋत्य भागात निवास करीत असत ( बृ. सं. ५.३५; ७८; ८०; ११.५७; १३.९; १४.१७; १६.१; १६; मार्कं. ५५.३०; विष्णुधर्मोत्तर. १.९.६ ). येथील नैर्ऋत्य दिशेचा निर्देश चुकीचा असला, तरी यांचे यवन आणि पह्लव लोकांशी सान्निध्य असल्याचा निर्देश यथायोग्य आहे.

**पौराणिक साहित्यात**—वायुमते हैहयसंहारानंतर सगराने वसिष्ठाज्ञेवरून कांबोज, शक, यवन, पह्लव, आदि लोकांवर हल्ला करून, आणि त्यांच्या मस्तकाचे मुंडण करून त्यांना विद्रूप बनविले ( वायु. ८८ ). हरिवंशमते या क्षत्रियकुलोत्पन्न लोकांना सगराने हीनकुलीन बनविले ( ह. वं. १४ ). भागवतात या लोकांचा अनेकवेळा निर्देश असून ( भा. २.७.३५; १०.८२.१३ ), स्कंदमते या देशामध्ये दहा लाख ग्रामे होती ( स्कन्द. माहेश्वर. कौ. ३९.१५४ ).

**रघुवंशात**— या ग्रंथमते वक्षु तटनिवासी हूणांच्या पराजयानंतर रघुराजाने या लोकांवर हल्ला चढविला. हस्तिबंधनाने लवलेल्या अक्रोडवृक्षाप्रमाणे येथील लोक अश्वनजराण्यांसह रघूला शरण आले ( रघु. ४.६९–७० ).

**शक्तिसंगमतंत्रात**— या ग्रंथमते हे लोक नैर्ऋत्येस पांचाल, आणि वायव्येस म्लेंच्छ ( मुसलमान ) यांच्या दरम्यानच्या पंजाब आणि बल्ख ( प्राचीन बाह्लीक ) देशात निवास करीत असत. यावरून या काळी वायव्य भारतातील मुसलमानी प्रदेश ' कांबोज ' नावाने सुविख्यात असावा ( सरकार, शक्तिसङ्गम. ३.७.२४ ).

**मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात**— या साहित्यात या देशाचा अनेक वेळा निर्देश असून ( विश्वलोचन. ६९.१८; त्रिकाण्ड. ११९.८२; मेदिनी. ३२.२० ), ' कांबोज ' ( शब्दरत्न. ७८.६ ) आणि ' अफगाणिस्तान' ही त्याचीच नामांतरे मानली आहेत.

**शिलालेख साहित्यात**— चोल राजा कुलोत्तुंग ( प्रथम ) च्या स. १११४ च्या चिदंबरम् मंदिरलेखमते या देशाच्या राजाने चोल राजाकडे एक मंदिरशिला भेट म्हणून पाठविली होती (एपि. इंडि. ५.१०५; रंगाचारी, द. अर्काट. १.५).

२. ( देश ) शिलालेख साहित्यमते उत्तर आणि नैर्ऋत्य बंगालमधील कांबोज लोकांची एक वसाहत. स. ९८८ च्या बाणगड स्तंभलेखमते येथील राजांनी महीपाल ( प्रथम ) राजाचे राज्य जिंकले होते ( एपि. इंडि. २९.३ ). नामांतर ' बंग-कांबोज ' ( जयचंद्र, पृ. २९४ ).

**कम्बोतिकेश्वर** ( लिंग )—नर्मदा नदीकाठचे एक शिवलिंग ( पद्म. आदि. १८. ६० ).

**कम्मनाडु** ( देश )-वेलनाडु देशाच्या गोंक ( द्वितीय ) राजाच्या स. १००७ च्या त्रिपुरांतकम् शिलालेखमते दक्षिण भारतातील एक देशविभाग. गुंडैक नदीकाठचे चेट्लपाडु गाव यामध्ये होते. याचे आधुनिक स्थान समजत नाही ( एपि. इंडि. २९.२३२ ).

**कम्मोने** ( ग्राम )— पेरिप्लसमते नर्मदा नदीच्या मुखानजिकच्या ' कमनै ' ग्रामाचे नामांतर ( कमनै पहा ).

**कयङ्गल मण्डल** ( देश )—रामचरितमानस टीका-

मते पूर्व भारतातील 'कजंगल' देशाचे नामांतर (बंगाल इतिहास. १.१५७; कजंगल पहा).

**कयलिसमागम** (जैन तीर्थ)—बिहार प्रांतातील भागलपुर जिल्ह्यातील एक जैन तीर्थ. भद्दिय गावाहून निघालेला वर्धमान महावीर या ग्राममार्गे जंबुसंड गावी गेला (जैन कॅनन्स्. पृ. २५८). भागलपुर जिल्ह्यातील आधु. 'कहलगाव' हेच होय (बंगाल ग्रामसूची. ३४. ७०). नामांतर–'कयलिग्राम'.

**कर** (नगर)—शिलालेख साहित्यमते उत्तर भारतातील एक नगर. सिरायूपासून ५ मैल आग्नेयेकडील, आणि अलाहाबादपासून ४१ मैलांवरील आधु. कर गाव हेच होय (एपि. इंडि. २२. ३७).

**करक** (देश)—महाभारतमते 'केकरक' देशाचे नामांतर (म. भी. १०.६०; केकरक पहा).

**करकण्ट** (देश)—उत्तर भारतातील एक देश (काव्यमी. १७.२२७).

**करकुण्ड** (जैन तीर्थ)—तीर्थसंग्रहमते अंग देशातील 'कलिकुंड' नामक जैन मंदिरस्थानाचे नामांतर (ती. सं. पृ. १२६; कलिकुंड पहा).

**करकेश्वर** (लिंग)—तापी नदीकाठचे एक शिवलिंग (तापीमाहात्म्य).

**करङ्क** (नदी)—हरमुकुटमाहात्म्यमते कश्मीर देशातील 'कनकवाहिनी' नदीचे नामांतर (कनकवाहिनी पहा).

**करजिक** (ग्राम)—उषवदाताच्या कार्ले गुफालेखमते वलूरक (आधु. कार्ले) येथील बौद्ध भिक्षूंच्या योगक्षेमासाठी दान दिलेले महाराष्ट्रातील एक ग्राम (ल्यूडर्स, सूची. क्र. १०९९). महाराष्ट्रातील आधु. कर्जत अथवा करंजगाव हेच असावे.

**करञ्ज** (ग्राम)— नालंदा मुद्रालेखमते बिहारमधील एक ग्राम (आर्कि. सर्व्हे. ६६. ३७). पटना जिल्ह्यातील सिलौ पोलिस विभागातील आधु. करंजरगाव हेच होय (बंगाल ग्रामसूची. २६.५८).

**करञ्ज** (तीर्थ)— नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ (मत्स्य. १९०.११).

२. (देवीतीर्थ) विदर्भातील अमरावतीनजिकचे करंज ऋषींचे तपस्यास्थान. येथे देवीआराधना करून करंज ऋषी मुक्त झाले (ती. पृ. २३८).

३. (पर्वत) जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वतातील एक पर्वत, आणि भूतपतिनिवासस्थान (वायु. ३९.४२–४३).

**करञ्जखेड** (तीर्थ)—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थ (स्था. पृ. ४६). औरंगाबाद जिल्ह्यातील सिलोद तालुक्यातील चारनेरच्या १२ मैल पश्चिमेकडील, आणि वाघळीच्या १५ मैल आग्नेयेकडील आधु. करंजखेड गाव हेच होय.

**करञ्जमञ्जस** (देश)—जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक देश (वायु. ४४.१३).

**करञ्जविरक** (नदी)—वाकाटक राजा प्रवरसेन (द्वितीय) च्या सिवनी ताम्रपटमते विदर्भातील एक नदी. ब्रह्मपूरक नामक ग्राम या नदीकाठी होते. हिचे आधु. स्थान समजत नाही (कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.२४८). पाठभेद–'करंजचिरक.'

**करञ्जा** (ग्राम)—कलचुरि राजा यशःकर्णच्या स. १०८४ च्या जबलपुर ताम्रपटमते मध्य भारतातील जाउली पट्टलातील नर्मदा नदीकाठचे एक ग्राम. आधु. जबलपुर जिल्ह्यात हे असावे (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.३००).

**करञ्जासङ्गम** (तीर्थ)—मध्य प्रदेशातील नर्मदा आणि करंजा नद्यांचे संगमस्थान, एक तीर्थ (नारद. उ. ७७.१०).

**करञ्जेश** (तीर्थ)—नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ (नारद. उ. ७७.२०).

**करट** (देश)—महाभारतमते भारतवर्षान्तर्गत 'करंठ' जनपदाचे नामांतर (म. भी. १०.६१; करंठ पहा).

**करडिकल** (नगर)—चोल राजा वीर राजेंद्रच्या स. १०६८ च्या शिलालेखमते त्याने जिंकलेले पश्चिम चालुक्य राज्यातील एक नगर. याचे आधुनिक स्थान समजत नाही (साऊथ इंडि. इन्स्क्रि. ३.२००).

**करण** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू. ४.२.११६).

**करण्टका** (नदी)—जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक नदी (वराह. ८१.३).

**करण्ठ** (देश) भारतवर्षातील एक जनपद (म. भी. १०.६१). पाठभेद–'कुंडल'; 'करट.'

**करण्डगाव** (तीर्थ)—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थ (स्था. पृ. ४९). औरंगाबाद जिल्ह्यातील कोडी रेल्वेस्थानकापासून ५ मैलांवरील आधु. करंडगाव हेच होय (स्था. परि. १. पृ. ८६).

**करतोया** (नदी)—मार्कंडेयमते पूर्व भारतातील एक विंध्य पर्वतोद्भवा नदी (मार्कं. ५४.२५). शतपथ ब्राह्मणमते ही (सदानीरा) नदी कोशल (आधु. अयोध्या) आणि

विदेह देशांच्या सीमेवरून वहात असून ( श. ब्रा. १.४. १.१७ ), महाभारतमते ही कुरंग ( अंग ) देशातून वहात असे ( म. अनु. २५.१२ ). पश्चिम बंगालमधील रंगपुर, दिनाजपुर आणि बोग्रा जिल्ह्यांतून, तसेच आसाम ( प्राचीन कामरूप ) देशाच्या पश्चिम सरहद्दीवरून वहाणारी आधु. राती नदी हीच होय. मात्र ' ब्रह्मपुत्रा खोऱ्यातील ' आणि ' विंध्य पर्वतोद्भवा ' ही दोन्ही विशेषणे या हिमालयोद्भवा नदीस लागू पडत नाहीत.

**नामांतर**—सायणाचार्यांच्या मते शतपथ ब्राह्मणातील ' सदानीरा ' ( श. ब्रा. १.४.१.१७ ) नदी हीच असून, अमरकोशात, अभिधानचिंतामणीत ( अमर. १.१०.२३; अभिधान. १४८.१०८५ ), तसेच स्मृतिचंद्रिकेतील ' करतोये सदानीरे ' या सुविख्यात मंत्रात या दोन्ही नद्या एकच मानल्या आहेत. महाभारत भीष्मपर्वात ( म. भी. ९.२४; ३५ ) मात्र या दोहोंना स्वतंत्र मानले आहे.

सरकार यांच्या मते करतोया ही सदानीरेहून स्वतंत्र नदी असून, हिचे खरे नाव ' करभाक ', ' करभा ' अथवा ' कपिशा ' ( आधु. कोसी ) असावे ( सरकार, भूगोल. पृ. ९५; कपिशा पहा ).

**नामव्युत्पत्ती**—शतपथ ब्राह्मणमते ' सदैव जलयुक्त ' अशा अर्थाने हिला ' सदानीरा ' नाव प्राप्त झाले.

**उगम**—पौराणिक साहित्यमते ही नदी विंध्य पर्वतात ( मार्क. ५४.२५ ), ऋक्ष पर्वतात ( वराह. ८५.५ ), अथवा ऋक्षपाद पर्वतात ( वामन. १३.२६; वायु. ४५. १०० ) उगम पावत असे. ब्रह्ममते सदानीरा नदी पारियात्र पर्वतोद्भवा असून ( ब्रह्म. २७.२८–२९ ), महाभारत सभापर्वमते ती गंडकी आणि सरयू नद्यांच्या दरम्यान वहात असे ( म. स. २०.२७ ).

**पवित्र नदी**—पौराणिक साहित्यात ( अग्नि. १०९. २१; पद्म. आदि. ३९.३; म. स. ९.२२ ), महाभारतान्तर्गत पुलस्त्य आणि अंगिरस्यात्रेत ( म. आर. ८३. ३; अनु. २५.१२ ), तसेच वराह पुराणान्तर्गत उत्तर गोकर्णमाहाम्यात एक पवित्र नदी म्हणून हिचा निर्देश आढळतो. भारतवर्षातील ( पद्म. आदि. ६.३०; म. भी. १०.३४ ), तसेच पूर्व भारतातील ( काव्यमी. १७.२२६ ) ही प्रमुख नदी मानली जात असे.

**भारतवर्षाची मर्यादा**—स्मृतिचंद्रिकामते ही नदी ओलांडल्याने धर्मनाशाचे पातक लागत असून ( गण्डकी बाहुतरणात् करतोयाविलंघनात्; स्मृतिचं. १.१३२ ), त्यावरून तिच्या पलीकडचा पूर्व भारताचा प्रदेश गमननिषिद्ध असावा.

**शक्तिपीठ**—शक्तिसंगमतंत्रमते पूर्व भारतातील या शक्तिपीठस्थानी सतीचा वामतल्प पडला असून, येथील देवीचे नाव अपर्णा आणि भैरवाचे नाव वामन होते. हिंगुलाज ( वायव्य भारत ) पासून या नदीपर्यंतच्या प्रदेशास ' वक्रान्त ' म्हणत असत ( शक्तिसङ्गम. ३.७.३० ).

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते प्राग्योतिष ( आसाममधील गोहत्ती प्रदेश ) आणि पुंड्रवर्धन ( उत्तर बंगाल ) यांच्या सीमेवरून वहाणाऱ्या या नदीच्या पूर्वेस कामरूप ( आधु. आसाम ) देश होता ( वॉटर्स, २.१८५– १८७ ).

**शिलालेख साहित्यात**—गुप्त सम्राट कुमारगुप्ताच्या स. ४४० च्या सुलतानपुर ताम्रपटात या नदीच्या नागर नामक शाखानदीचा निर्देश आढळतो ( एपि. इंडि. ३१.६३ ).

**करनाट** ( देश )—जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक देश ( वराह. ८३.२ ).

**करन्दे** ( ग्राम )—पौराणिक साहित्यमते दक्षिण भारतातील ' कांदे ' ग्रामाचे नामांतर ( कांदे पहा ).

**करन्धमेश्वर** ( लिंग )—काशी येथील एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ९७.२५२ ).

**करन्धर** ( देश )—पश्चिम भारतातील एक देश ( ब्रह्माण्ड. १६.६१ ).

**करपाद** ( शिवस्थान )—वामनमते एक शिवस्थान ( वामन. तीर्थविवेचन. पृ. २३५ ).

**करभञ्जक** ( देश )—उत्तर भारतातील एक देश ( पद्म. आदि. ६.६४; म. भी. १०.६८ ).

**करमेश्वर** ( लिंग )—अवंती येथील ८४ शिवलिंगांपैकी एक ( स्कन्द. आवन्त्य. अ. २८.४; च. लिं. ७३; नारद. उत्तर. ७८.२६ ).

**करमोदा** ( नदी )— मार्कंडेयमते ऋक्ष पर्वतोद्भवा ' करतोया ' ( आधु. राती ) नदीचे नामांतर ( मार्कं. ५४.२२; करतोया पहा ). पार्गिटर यांच्या मते हे ' कर्मनोदा ' ( कर्मनाशा = बिहारमधील आधु. करमनासा ) नदीचे नामांतर असावे ( पार्गि., मार्कं. पृ. २९६ ). परंतु भौगोलिक दृष्ट्या त्यांचे हे अनुमान यथायोग्य वाटत नाही ( कर्मनाशा पहा ).

**करम्भ** ( देश )— जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक देश ( वायु. ४४.११ ). मुजफ्फर अली यांच्या मते मध्य आशियातील आधु. कर्मिन देश हाच होय.

**करवतीर** ( ग्राम )—पतंजलीच्या व्याकरण महाभाष्य-

मते भारतवर्षातील एक ग्राम ( पतञ्जलि. ४.२.१०४ ). 'तीर' अंत्यशब्दयुक्त ग्रामनामाचे उदाहरण म्हणून याचा निर्देश तेथे आढळतो ( अग्रवाल, पाणिनि. पृ. ७९ ).

**करवन्दपुरम्** ( नगर )—पांड्य राजा जटिल परांतकाच्या स. ७६९ च्या वेल्विकुडि ताम्रपटमते त्याने तटबंदी बांधलेले दक्षिण भारतातील एक नगर. याचे आधु. स्थान समजत नाही ( इंडि. अँटि. २२.५७-७५ ).

**करवाट** ( देश )—जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक देश ( वायु. ४४.१२ ).

**करवीर** ( नगर, शक्तिपीठ )—पौराणिक साहित्य-मते दक्षिण भारतातील देवीउपासनेचे आद्यपीठ, आणि महाराष्ट्रातील चार प्रमुख शक्तिपीठांपैकी एक ( दे. भा. १.३८.५; मत्स्य. २२.७६; पद्म. उ. १०८.३; म. अनु. २५.४४ ).

करवीरमाहात्म्यात यास 'दक्षिण काशी' म्हटले आहे. सातवाहन राज्यकालापासून ( इ. स. २ रे शतक ) महाराष्ट्रातील हे समृद्ध नगर असून, शिलाहार राजवंशाच्या करवीर शाखेची राजधानी या गावी होती. यादव राजांच्या शके ११७२ च्या कोल्हापुर शिलालेखात महाराष्ट्रातील एक देशविभाग म्हणून याचा निर्देश आढळतो ( जे. बी. बी. आर. ए. एस्. २.२६४ ). पश्चिम महाराष्ट्रातील पंचगंगा नदीच्या दक्षिण किनाऱ्यावरील मिरजपासून ३६ मैलांवरील आधु. कोल्हापुर गाव हेच होय ( अक्षांश १६°—४१′ उत्तर; रेखांश ७४°—१७′ पूर्व ).

**चार शक्तिपीठे**—देवी भागवतमते महाराष्ट्रातील चार प्रमुख शक्तिपीठस्थाने पुढीलप्रमाणे होत ( परिपत्रक पहा ).

**महालक्ष्मी देवी**—पौराणिक साहित्यमते येथील महा-लक्ष्मी देवी सुविख्यात असून ( **करवीरे** महालक्ष्मीः; मत्स्य. १३.४१; पद्म. उत्तर. १७.२०५ ). मत्स्यमते भारतातील चार प्रमुख देवीस्थानांत तिची गणना होत असे ( अन्य तीन देवीस्थाने—विनायकस्थ उमा देवी; वैद्यनाथस्थ अरोगा देवी, आणि महाकालस्थ महेश्वरी देवी (मत्स्य. १३.४१).

इ. स. १२ व्या शतकापर्यंतच्या काळात महाराष्ट्रात देवी ( शक्ति ) उपासनेचे विशेष प्राबल्य असून, करवीर हे या उपासनेचे आद्यपीठ होते. ज्ञानेश्वर, नामदेव, तुकारामादि संतांनी ( इ. स. १२ वे शतक ) वैष्णव धर्माची प्राणप्रतिष्ठा केल्यानंतरहि महाराष्ट्रातील देवीउपासनापरंपरा तशीच अबाधित राहिली.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा ).

## करवीर नगराची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. महाभारत ( आश्व. ८४.११ ) | कोल्लगिरेय |
| २. पौराणिक साहित्य | |
| अ. बृहत्संहिता ( १४.१३ ) | कोल्लगिरि |
| आ. पद्म पुराण ( उत्तर. १८६.१ ) | रुद्रगया |
| इ. हरिवंश ( २.३९.५० ) | करवीरपुर |
| ई. देवी भागवत ( १.३८.५ ) | कोलापुर |
| ३. शक्तिसंगमतंत्र ( ३.७.११ ) | |
| ४. टॉलेमी | हिप्पोकौर |
| ५. शिलालेख साहित्य | |
| अ. चालुक्य राजा जयसिंह ( द्वितीय ) चा स. १०२४ चा मिरज ताम्रपट ( एपि. इंडि. १२.३०३; इंडि. अँटि. २९.२८० ) | कोल्लापुर |
| आ. शिलाहार भोज ( द्वितीय ) राजाचा शके ११०४ चा कोल्हापुर शिलालेख ( एपि. इंडि. २९.१४ ) | |
| इ. चोल राजा राजेंद्रदेव ( प्रथम ) चा स. १०५२ चा तिरुकोयिलूर शिला-लेख ( एपि. इंडि. ७. १४५; रंगाचारी. १.८५१ ) | कोल्लापुरम् |
| ई. तेर्डाळ शिलालेख ( इंडि. अँटि. १४.१८ ) | |
| उ. तेर्डाळ शिलालेख ( इंडि. अँटि. १४.२३ ) | कोल्लगिरि |
| ऊ. शिलादित्य विजयादित्याचे स. १०६४ चे दानपत्र ( एपि. इंडि. ३.२०७; २१० ) | क्षुल्लकपुर |
| ए. यादव राजांचा शके ११७२ चा कोल्हापुर शिलालेख ( जे. बी. बी. आर. ए. एस्. २.२६४ ) | कोल्हापुर |

**नामव्युत्पत्ती**— स्थानिक आख्यायिकामते 'प्रलयंकर महालक्ष्मीने स्वकराने उत्थापिलेले तीर्थ' अशा अर्थाने यास 'करवीर' नाव प्राप्त झाले. उत्तरकालात करवीर-

## महाराष्ट्रातील चार शक्तिपीठे

| शक्तिपीठ | आधु. भौगोलिक स्थान | देवी | वैशिष्ट्य |
|---|---|---|---|
| १. करवीर | कोल्हापुर | महालक्ष्मी (अंबाबाई) | महाराष्ट्रातील देवीउपासनेचे आद्यपीठ |
| २. मातुःपुर | मराठवाड्यातील माहूर | रेणुका | संत एकनाथांचे कुलदैवत |
| ३. तुळजापुर | ,, तुळजापुर | भवानी | श्रीसमर्थ आणि छत्रपती शिवाजी-महाराजांचे कुलदैवत, देवीद्वारा भवानी तलवारीची प्राप्ती |
| ४. सप्तशृंगी | नासिकनजिकच्या टेकडीवर | सप्तशृंगी | — |

निवासी ज्योतिषाकृत 'कोलासुर–वधस्थान' अशा अर्थाने यास 'कोलापुर' म्हणू लागले. अन्य अभ्यासकांच्या मते आधु. 'कोल्हापुर' हे कानडी 'कोलिह' आणि संस्कृत 'कोल्हार' (=कमल) चे अपभ्रष्ट रूप असून, 'कमल-पुष्पांचे नगर' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले.

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**— येथील ब्रह्मपुरी उंचवट्यावर आंध्रभृत्य राजप्रतिनिधींची (इ. स. १ – २ रे शतक) अनेक नाणी सापडली असून, डॉ. रामकृष्ण भांडारकर यांच्या मते या राजघराण्याची मुख्य राजधानी धनकटक, आणि उपराजधानी करवीर येथे असावी. त्यांचे मते टॉलेमीच्या ग्रंथातील 'बलेओकुरि' (विलियाकुर = गौतमी-पुत्र शातकर्णी) राजाचे 'हिप्पोकौर' नगर हेच होय (हिप्पोकौर पहा).

उत्तरकालात (इ. स. १०–११ वे शतक) या नगरावर स्वतःस नागरक्षक आणि गरुडसंहारक जीमूत-वाहनाचे वंशज म्हणविणाऱ्या गरुडध्वज शिलाहार राजवंशाचे (करवीर शाखा) राज्य प्रस्थापित झाले. श्रीहर्षकृत नागानंदमते शिलाहारांचा पूर्वज जीमूतवाहन राजा अंबा देवीच्या कृपाप्रसादाने पुन्हा जीवित झाला असून, त्यामुळेच जैनधर्मीय असूनहि हे राजे महालक्ष्मीचे अनन्य उपासक होते. '**महालक्ष्मी–लब्धवरप्रसाद**' हे विरुद ते अभिमानाने मिरवीत असत (विजयादित्य शिलाहार राजाचा स. ११४३ चा ताम्रपट; एपि. इंडि. ३.२०७).

यादव राजांच्या शके ११७२ च्या कोल्हापुर शिला-लेखमते कोल्हापुरचे शिलाहार राजे त्यांचे मांडलिक असून, उपलब्ध २६ शिलाहार शिलालेखांतहि यादवांच्या येथील सार्वभौमत्वाचा पुनरुच्चार आढळतो. स. १३४७–१७०० मध्ये येथे मुसलमानांचे राज्य असून, त्यानंतर येथे मराठा राज्य प्रस्थापित झाले.

**पौराणिक साहित्यात**— बृहत्संहिता, तसेच तेर्डाळ शिलालेखमते हे (कोल्लगिरि) दक्षिण भारतातील एक नगर असून (बृ. सं. १४.१३; इंडि. अँटि. १४.२३), महाभारतमते युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या दक्षिण दिग्विजयात हे सहदेवाने जिंकले होते (म. स. २८.४५). या काळी या नगराच्या परिसरातील प्रदेश 'कोल्लक' नावाने सुविख्यात असून, पांडवांच्या अश्वमेधीय दिग्विजयात 'कोल्लगिरेय' नावाने याचा निर्देश आढळतो (म. आश्व. ८४.११). हरिवंशमते सह्य पर्वतान्तर्गत गोमंत टेकडीनजिक हे होते (ह. वं. २.३९.५०–६४).

पद्ममते दक्षिणापथमधील या (रुद्रगया) तीर्थस्थानी महालक्ष्मीचे वास्तव्य होते (पद्म. उ. १७६.४२; १८२.१;११). देवी भागवतातहि येथील महालक्ष्मी मंदिराचा निर्देश असून (दे. भा. ७.३८.५), ब्रह्माण्डमते येथे ललितादेवीचे स्थान होते (ब्रह्माण्ड. ४.४४.९७).

**शक्तिपीठ**— बार्हस्पत्यसूत्र आणि तंत्रचूडामणिमते येथे सतीचे नेत्रत्रय पडले असून (बार्हस्पत्य. ३.१२४), येथील देवीचे नाव महिषमर्दिनी, आणि भैरवाचे नाव क्रोधीश होते. येथील महालक्ष्मी हीच महिषासुरमर्दिनी असून, राष्ट्रकूट राजा अमोघवर्ष (प्रथम) च्या स. ८७१ च्या संजान ताम्रपटमते सामाजिक संकटपरिहारार्थ त्याने आपली वाम करांगुली या देवीस अर्पिली होती (एपि. इंडि. १८.२३५; २४१).

**शिलालेख साहित्यात**—चोल राजा राजेंद्रदेव (प्रथम) च्या स. १०५२ च्या तिरुक्कोयिलूर शिलालेखमते कोप्पम् (बेळगाव जिल्ह्यातील आधु. कोप्पेश्वर) येथील पश्चिम चालुक्यांवरील विजयाप्रीत्यर्थ त्याने या (कोल्लापुर) गावी एक विजयस्तंभ उभारला होता (सेवेल, इन्स्क्रि. पृ. ७३).

**महालक्ष्मी मंदिर**—या गावच्या टेंबलाई, महाकाली,

फिरंगाई ( प्रत्यंगिरस ), यल्लम्मा, विठोबा आदि सुमारे २५० देवालयांमध्ये राजवाड्यानजिकचे महालक्ष्मी मंदिर हे सर्वाधिक प्राचीन आणि महत्त्वपूर्ण आहे. मेजर ग्रॅहॅम यांच्या मते त्या मंदिराभोवती पूर्वी अनेक मंदिरे असून, भूकंपामुळे ती उद्ध्वस्त झाली.या भूकंपाचे दृश्यावशेष भूविवरात गाडलेल्या येथील खंडोबा आणि कार्तिकस्वामी मंदिरात आढळतात. मुख्य महालक्ष्मी मंदिराच्या भिंती, तसेच फरशीहि कमीअधिक उंचीची आहे. मंदिर-परिसराच्या उत्खननात अनेक शिल्पे आणि शिलालेख सापडले असून, पंचगंगा नदीचे पात्रहि पूर्वी सध्यापेक्षा ५०′ उंचीवर असल्याचे उपलब्ध पात्रावशेषांवरून दिसे.

निळया माठीव दगडांमध्ये हेमाडपंती शैलीने बांधलेल्या पश्चिमाभिमुख क्रूसाकृती महालक्ष्मी मंदिराच्या पूर्व शिखराखाली महालक्ष्मीची, आणि उत्तर आणि दक्षिण शिखरांखाली महाकाली आणि महासरस्वतींच्या मूर्ती आहेत. महालक्ष्मी मंदिराच्या विस्तीर्ण प्रदक्षिणापथाच्या परिसरात दत्तात्रेय, विठोबा, काशीविश्वेश्वर, जगन्नाथ, राधाकृष्ण आणि दाशरथि राम यांच्या मूर्ती असून, मंदिरानजिक 'पद्म तीर्थ', 'काशी तीर्थ', 'मणिकर्णिका तीर्थ' आदि तीर्थे आहेत.

महालक्ष्मी मंदिराची स्थापत्यशैली जैन मंदिरासदृश असून, बौद्ध आणि जैन शैलीची अनेक शिल्पेहि त्यामध्ये आहेत. त्याच्या दर्शनी भागी गणेशप्रतिमा नाही. त्यावरून हे मूळचे पद्मावती संज्ञक जैन देवतेचे मंदिर असल्याचे काही अभ्यासक मानतात. गुंडुरादित्य नामक जैन राजाचे (इ. स. ११ वे शतक) काही शिलालेखहि या मंदिरात असून, त्यानेच हे मंदिर बांधल्याचे जैन लोक मानतात. परंतु येथील देवीउपासनेचे पुरातनत्व लक्षात घेता तें यथायोग्य वाटत नाही. स्थानिक आख्यायिकामते या मंदिराचा वरचा भाग संकेश्वराच्या शंकरचार्यांनी बांधला असून, महालक्ष्मी देवीचा निर्देश करणारे काही शिलालेखहि येथे आढळतात.

**पुनःस्थापना**—मुसलमानी आक्रमणकाली अनेक शतके येथील महालक्ष्मीमूर्ती लपवून ठेवली असून, इ. स. १८ व्या शतकात कोल्हापुरच्या संभाजी महाराजांच्या आज्ञेवरून शिदोजी घोरपड्यांनी तिची पुनःस्थापना केली.

**यात्राविधी**—करवीरमाहात्म्यात (स. १७३०) या क्षेत्राचे माहात्म्य सविस्तरपणे वर्णिले असून, नवरात्रात येथे मोठी यात्रा भरते. आश्विन शुक्ल पंचमीला महालक्ष्मी प्रतिमा येथून ३ मैल पूर्वेकडील टेंबलाई देवीच्या भेटीस नेतात. करवीरमाहात्म्यमते ज्येष्ठ भगिनी महालक्ष्मीशी भांडलेली टेंबलाई महालक्ष्मीकडे पाठ फिरवून दूर गेली आहे. वर्षातून एकदा महालक्ष्मी देवी तिची समजूत घालण्यासाठी जाते.

**अन्य मंदिरे**—महालक्ष्मी मंदिरसदृश स्थापत्याचे विठ्ठल मंदिर येथे असून, महाकाली आणि फिरंगाई देवींची मंदिरे गावात, आणि यल्लम्मा मंदिर गावाबाहेर पूर्वेस आहे. संकेश्वरपीठाचे शंकराचार्य, तसेच जैन स्वामींचे मठहि येथे आहेत.

पन्हाळा रस्त्यावरील ज्योतिबाच्या डोंगरावर तीन शिवमंदिरे आणि हिंदु गुफा असून, डोंगरानजिकच बौद्ध गुफा आणि चैत्यमंदिर आहे. गावातील रंकाळा तलावात (व्याप्ती–३ मैल, खोली–३५′) रंकभैरवाचे मंदिर असून, त्यामुळेच त्यास 'रंकालय' (रंकाळे) म्हणतात. स्थानिक समजुतीनुसार महालक्ष्मी मंदिरासाठी केलेल्या खोदकामातून त्याची निर्मिती झाली. नगराभोवतालच्या दगडी तटात ४५ बुरुज आणि ६ वेशींचे अवशेष आढळतात.

**कोल्हापुर-प्रयाग**—कोल्हापुरपासून ४ मैलांवरील या तीर्थस्थानी कासारी, कुंभी, तुळसी, भोगावती आणि पंचगंगा नद्यांचा पंचवेणी संगम असून, तेथे एक दत्तमंदिर आहे.

**स्तूप**—या गावच्या बौद्ध स्तूपाच्या उत्खननात (स. १८७७) अश्मकरंडकस्थापित रत्नजडित बुद्धमूर्ती सापडली असून, तीवर दात्याचे आणि दान स्वीकारणाऱ्या बौद्ध भिक्षूचे नाव कोरले (इ. स. १–२ रे शतक) आहे (फर्ग्युसन, १.१००).

**उत्खनन**—येथील पंचगंगा नदीकाठच्या ब्रह्मपुरी उंचवट्यावर सातवाहनांची नाणी, 'पॉसेडॉन' नामक रोमन सागरदेवतेची ग्रीक-रोमन शैलीची मूर्ती, तसेच ग्रीक कारागिरीची ब्रॉंझ धातुपात्रे सापडली असून, डेक्कन कॉलेजने केलेल्या येथील उत्खननात (स. १९४०) निम्नलिखित अवशेष सापडले :—

(१) **स्तर क्र. १** (इ. स. २ रे शतक)—या सातवाहनकालीन स्तरात पक्क्या विटांनी बांधलेल्या चार खोल्यांच्या घरांचे, तसेच पंचगंगा नदीच्या पात्रातील दगडांनी आणि काळया मातीने बांधलेल्या त्यांच्या पायांचे अवशेष सापडले. त्यामधील स्वयंपाकगृहात मातीच्या चुली, पाण्याचा रांजण, शाडूची ताटे, वाटया आणि जलपात्रे, पक्क्या विटांच्या फरशा, तसेच घरांवर मंगलोरी कौलांचे अवशेष मिळाले. जळलेला भात, नाचणी, हरभऱ्याची डाळ, तसेच मृगास्थी हे खाद्यपदार्थ; सुती कपडे, रत्नालंकार, सोन्याच्या तारात गुंफलेले काचमणी, तसेच मृत्तिका, शिंपा, अस्थी आणि हस्तिदंताच्या बांगडया

आदि अलंकार येथे सापडले. येथील सारी अवजारे लोहमय असून, ताम्र–अश्म अवजारे आढळली नाहीत. येथे सापडलेल्या रोमन शैलीच्या टेराकोट्टा मृत्तिकाशिल्पे, मृत्तिकापात्रे आणि कलाकुसरीच्या वस्तूंवरून तत्कालीन रोमन साम्राज्याशी या लोकांचे व्यापारी दळणवळण आणि सांस्कृतिक संबंध असावेत.

उपरोक्त अवशेष सातवाहनकालीन ( इ. स. पू. २ रे –१ ले शतक ) नागरी जीवनाच्या दृष्टीने महत्त्वाचे असून, इ. स. पू. ३ ऱ्या शतकात या वसाहतीची स्थापना झाली असावी. तत्कालीन काही सातवाहन ताम्रमुद्राहि येथे सापडल्या असून, यापेक्षा पूर्वकालीन महाराष्ट्र वसाहतीचे अवशेष नासिक येथे सापडतात ( सांकलिया, जे. बी. बी. आर. ए. एस्. २७.१००–१०१; गोवर्धन पहा ).

( २ ) स्तर क्र. २ ( इ. स. ८ वे शतक )—या अवशेषांवरून दीर्घकालीन विजनावस्थेनंतर शिलाहार राज्यकालात हे नगर पुन्हा वसविण्यात आले असावे.

( ३ ) स्तर क्र. ३. ( इ. स. ११ वे शतक )—या स्तरात बहामनी राज्यकालीन अवशेष सापडले ( देशपांडे, रिव्ह्यू. पृ. ४४९ ).

२. ( नगर ) कालिकामते ब्रह्मावर्त देशाच्या राजधानीचे दृषद्वती नदीकाठचे एक नगर ( कालिका. ४९.७१; नीलमत. १४७. ). पोष्य राजाची राजधानीहि येथेच होती.

३. ( ग्राम ) पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.९ ).

४. ( तीर्थ ) कुब्जाम्रकक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ ( वराह. १२६.५३ ).

५. ( पर्वत ) जंबूद्वीपातील मेरूच्या उत्तरेकडील एक पर्वत ( भा. ५.१६. २७ ).

६. ( वन ) द्वारकेनजिकचे एक वन ( म. स. परि. १ ).

७. ( विष्णुतीर्थ ) पद्ममते एक विष्णुतीर्थ. येथील विष्णूचे नाव कुरुद्भव होते ( पद्म. उत्तर. १२९.२० ).

**करवीरक** ( लिंग )—स्कंदमते भारतातील अडुसष्ट शिवस्थानांपैकी एक. येथील कपालिन् नामक शिव उत्तरकालात काशी येथे कपालमोचननजिक स्थलांतरित झाला. नामांतर ' करवीरेश्वर ' ( स्कन्द. काशी. ६९.११२; ९७. १४५; लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. ७० ).

२. ( तीर्थ ) कुब्जाम्रकक्षेत्रातील एक तीर्थ ( वराह. १२६.४८–५१ ).

**करवीरपुर** ( तीर्थ )—महाभारत अंगिरसतीर्थयात्रामते एक श्राद्धयोग्य तीर्थ ( म. अनु. २५.४४.;२२३*; पद्म. आदि. ११.६५ ).

२. ( नगर ) ललितशूरदेव राजाच्या स. ८५३ च्या पंडुकेश्वर ताम्रपटमते अल्मोरा जिल्ह्यातील ' कार्तिकेयपुर ' ( आधु. कत्यूर ) नगराचे नामांतर ( एपि. इंडि. ३१. २७९; कार्तिकेयपुर पहा ).

**करवीरेश्वर** ( लिंग )—स्कंदमते 'करवीरक' तीर्थाचे नामांतर ( स्कन्द. काशी, ६९.११२; करवीरक १. पहा ).

**करव्याशिन** ( लोकसमूह )—बृहत्संहितामते नैर्ऋत्य भारतातील एक लोकसमूह ( बृ. सं. १४.१८ ). शब्दशः अर्थ–' कच्चे मांस खाणारे लोक '. पाठभेद–' क्रव्यादानाभीर '; ' क्रव्याख्याभीर '. कर्नचे मते येथे ' क्रव्याद ', आणि ' आभीर ' संज्ञक स्वतंत्र जमातींचा निर्देश अभिप्रेत असावा ( क्रव्याद पहा ).

**करशुद्धि तीर्थ** ( तीर्थ )— विदर्भातील पूर्णा–मेघा–बगाडी संगमावरील एक तीर्थ. हिरण्यकशिपुवधानंतर नृसिंहाने आपले रक्तलांच्छित हस्त येथे धुतले होते. एलिचपुरपासून १४ मैलांवरील आधु. देऊरवाडा हेच होय. स्थानिक आख्यायिकेनुसार येथे ११½ ज्योतिर्लिंगे आहेत.

**करष्ठ** ( देश )— महाभारतमते दक्षिण भारतातील ' कुंडल ' देशाचे नामांतर ( म. भी. १०६१; कुंडल पहा ).

**करस्कर** ( देश )— पश्चिम भारतातील ' कारस्कर ' देशाचे नामांतर ( मार्कं. ५४.५१; कारस्कर पहा ).

**करहकट** ( नगर )— भर्हुत शिलालेखमते दक्षिण भारतातील ' करहाटक ' नगराचे नामांतर ( करहाटक पहा ).

**करहला** ( तीर्थ )— वज्रमंडलान्तर्गत ( आधु. मथुरा–वृंदावन ) ललिता देवीचे जन्मस्थान, एक वैष्णवतीर्थ ( ती. पृ. १०४ ).

**करहाटक** ( नगर )— युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या दक्षिण दिग्विजयात सहदेवाने जिंकलेले दक्षिण भारतातील एक नगर ( म. स. २८.४७ ). भर्हुत आणि कुडा बौद्ध शिलालेख, तसेच यादव शिलालेखमते हे प्रांतिक राजधानीचे नगर असून, शिलाहार राजघराण्याच्या करहाटक शाखेची राजधानी येथे होती. कल्याणी येथील चालुक्य राजांच्या, तसेच यादवांच्या शिलालेखात या नगराच्या परिसरातील प्रदेशाचा निर्देश अनुक्रमे ' करहाट ४००० ' आणि ' करहाड २००० ' नावांनी आढळतो. यावरून इ. स. पू. ३–इ. स. ८ या शतकापर्यंत हे राजकीय आणि सांस्कृतिक दृष्ट्या समृद्धिशिखरावर असावे. सातारा जिल्ह्यातील कृष्णा–कोयना संगमावरील

कोल्हापुरपासून ४० मैल उत्तरेकडील आधु. कराड गाव हेच होय.

देशविभाग—फ्लीट यांच्या मते आधु. सातारा जिल्हा आणि भूतपूर्वकालीन भोर आणि फलटण संस्थानांचा काही भाग मिळून बनलेल्या या चालुक्यकालीन देशविभागाच्या (करहाटक ४०००) भौगोलिक परिसीमा पुढीलप्रमाणे होत्याः— १. दक्षिणेस—कृष्णा नदी; २. उत्तरेस—प्रत्यंडक ४००० देश (आधु. फलटण); ३. पूर्वेस—तर्दवाडी १००० देश (विजापुरच्या ३७ मैल ईशान्येकडील आधु. तद्दुवाडी; इंडि. अँटि. ३०.७८).

यादव शिलालेखात— डॉ. सांकलिया यांचे मते यादव राज्यकालीन 'करहाड २०००' देशविभागात (८०×१६ मैल) सातारा जिल्ह्यातील कराड, विटे, तासगाव, खरकुंडी तालुके; सांगली जिल्ह्यातील मिरज आणि सांगली तालुके; तसेच बेळगाव जिल्ह्यातील अथणी तालुक्याचा समावेश होत असे. या राजाच्या शके ११७५ च्या कोकटनूर शिलालेखमते यामध्ये निम्नलिखित उपविभाग समाविष्ट होते :—१. कणंबडे ३००— (बेळगाव जिल्ह्यातील अथणी तालुक्यातील आधु. कानमोडी गावाच्या परिसरातील प्रदेश). नामांतर (चालुक्य शिलालेख)— 'कळंबदि'; २. कोग्गटन अग्रहार— कानमोडी गावापासून २० मैल नैर्ऋत्येकडील आधु. कोकटनूर ग्राम (सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २७३).

नामांतरे—प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. भर्हुत शिलालेख | करहकट |
| २. कुडा बौद्ध गुफालेख (ल्यूडर्स सूची. क्र. १०५५) | करहाकड |
| ३. कल्याणी येथील चालुक्य राजांचा शिलालेख | करहाट ४०० देश |
| ४. यादव शिलालेख | करहाड; करहाड २००० देश |
| ५. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य (मंख. १४.१८०; अनेकार्थ. ४.४२) | करहाट |

ल्यूडर्स यांच्या मते उपरोक्त नामांतरांपैकी भर्हुत शिलालेखातील 'करहकट' हे प्राचीनतम रूप असून, उत्तरकालीन सारी नावे त्याचीच अपभ्रष्ट रूपे आहेत (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.२.८).

भर्हुत शिलालेखात—भर्हुत येथील निम्नलिखित सहा देणगीलेखांत या (करहकट) नगराचा निर्देश आढळतो :— १. समस्त ग्रामजनांचा देणगीलेख ('करहकट निगमस दान' अशी अक्षरे); २. स्त्री देणगीदाराचा देणगीलेख ('करहकटियायाः दान' अशी अक्षरे); ३. पुरुष देणगीदारांचे देणगीलेख (करहकटच्या 'स्वामिक', 'उत्तर गृध्यक,' 'भूतक' नामक तीन देणगीदारांचा निर्देश).

कुडा गुफालेखात—कुडा येथील गुफालेख क्र. १८ मध्ये या (करहाकड) नगराचा निर्देश आढळतो (ल्यूडर्स सूची. क्र. १०५५).

अन्य शिलालेखात—राष्ट्रकूट राजा कृष्णराज (प्रथम) च्या स. ७६८ च्या तळेगाव ताम्रपटात या नगराचा पुनःपुन्हा निर्देश असून (एपि. इंडि. १३.२७५), स. ३०० च्या पूर्वीची शक क्षत्रपांची अनेक नाणीहि येथे सापडली आहेत.

गुफा—येथील ६३ हिंदु आणि बौद्ध गुफांपैकी नक्षीकामविरहित आणि अनलंकृत बौद्ध गुफा अधिक पुरातन असाव्यात. येथील उल्लेखनीय गुफा पुढीलप्रमाणे होत :—

(१) गुफा क्र. १ (चोखामेळा गुफा)—या दक्षिणाभिमुख विहारगुफेच्या प्रवेशमंडपाच्या स्तंभावर महाड गुफांसदृश दुर्मिळ शिल्पकाम आढळते.

(२) गुफा क्र. ४ (लक्ष्मीची वाडी)—या आग्नेयाभिमुख विहाराच्या मुख्य सभामंडपाच्या (१७ $\frac{1}{2}$'×१८$\frac{1}{2}$×६ $\frac{3}{4}$') उभय अंगांस प्रत्येकी दोन खोल्या खोदल्या आहेत.

(३) गुफा क्र. ५—या चैत्यमंदिराचे (१८'×३२') अर्धवर्तुळाकृती छत पश्चिम महाराष्ट्रात अद्वितीय आहे.

(४) गुफा क्र. १६—या कुडा गुफामंदिरसदृश चैत्याच्या प्रवेशमंडपाच्या अंतर्भागात स्तूपयुक्त उपासनामंदिर आहे.

(५) गुफा क्र. २०—या स्तंभविरहित विहाराच्या (२८'×३५$\frac{1}{2}$') अंतर्भागात दगडी बाके आणि तीन बाजूंस प्रत्येकी चार छोट्या खोल्या आहेत. याचे जुन्नर गुफेसदृश अथवा तळाजे येथील एभल मंडपसदृश काष्ठमय प्रवेशद्वार आज नष्ट झाले आहे.

(६) गुफा क्र २४—शिल्पदृष्ट्या सर्वाधिक परिपूर्ण अशा या विहारगुफेच्या तीन बाजूंस प्रत्येकी चार छोट्या खोल्या, आणि वैशिष्ट्यपूर्ण दगडी जाळ्या आहेत.

(७) गुफा क्र. ३६—या सभामंडपद्वययुक्त (१७' × १३'; ९' × १२') विहाराच्या उभय अंगांस

अनुक्रमे दोन आणि सात खोल्या आहेत.

( ८ ) गुफा क्र. ४७—या काष्ठप्रवेशमंडपयुक्त विहार-गुफेच्या मुख्य सभामंडपाच्या ( १५'×११'×७½' ) पार्श्वभागी आणि डाव्या बाजूस प्रत्येकी एक खोली असून, डाव्या बाजूच्या खोलीवर कुडा गुफेसदृश अक्षरवाटिकेतील 'गोपालपुत्र संघमित्राची देणगी' असा शिलालेख आढळतो.

( ९ ) गुफा क्र. ४८—या चैत्यमंदिर गुफेतील स्तूपा-नजिक वैशिष्ट्यपूर्ण शिल्पे आहेत.

( १० ) गुफा क्र. ६२— या विहारगुफेच्या ( ३०'×३८½' ) तीन बाजूंस १७ छोट्या खोल्या आहेत ( बर्जेस्, आर्कि. सर्व्हे. वे. इं. ४.२०–२२ ).

**मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात**—या ग्रंथात या ( करहाट ) नगराचा निर्देश अनेक वेळा आढळतो ( मंख. १४.१८०; अनेकार्थ. ४.४२ ).

**उत्खनन**—येथील उत्खननात सापडलेल्या पुरातन पात्रावशेष आणि नाण्यांवरुन इ. स. पू. १००० त व्यापारी आणि कृषिव्यवसायी शहर म्हणून हे प्रसिद्ध असावे. येथील लोकांनी जबलपुरनजिकच्या बारुद गावी एक बौद्ध स्तूप बांधला होता.

**करारा** ( सिद्धगुफास्थान )—मध्य प्रदेशातील छत्तरपुर जिल्ह्यातील एक पर्वतीय सिद्धगुफास्थान ( ती. पृ. २०९ ).

**कराल** ( देशविभाग )—राजतरंगिणीमते कश्मीरच्या सुवर्ण राजाने 'सुवर्णमणि' काल्याच्या ( कुल्या ) साह्याने समृद्ध बनविलेला कश्मीरचा एक देशविभाग ( राज. १.९७ ). दिवसर ( प्राचीन देवसरस् ) परगण्याच्या दक्षिणेकडील, आणि खुर–नारवाव ( प्राचीन खरी ) परगण्याच्या पश्चिमेकडील विशोका नदीपर्यंतचा आधु. आडविन परगणा हाच होय. रेंग्यार ( प्राचीन रमण्याटवी ) नदीच्या दक्षिणेकडील झैनपोर ( प्राचीन जैनपुरी ) जिल्हा यामध्येच समाविष्ट असून, झैनुल अबिदीन सुल्तानाने येथे जैनपुरी नगर वसविले होते ( जोनराज. ८६१–८६२; श्रीवर. ३.१९४ ). या परगण्याच्या ईशान्येकडील बोट परगण्यात सिद्धपथ ( आधु. सिदौ ) घाट होता ( स्टाइन, राज. २.४७१ ). नामांतर ( जोनराज )–'अर्धवन'.

**करि** ( कुंड )—अवंती येथील एक जलकुंड ( स्कन्द. आवन्त्य. अ. २७.११५; २८.४४ ).

**करिअङ्गळ** ( देशविभाग )—जयसिंगरस राजाच्या इ. स. १२ व्या शतकातील ताम्रपटमते दक्षिण भारतातील एक देशविभाग. मंगलोरनजिकच्या आधु. अम्मणुजे गावाच्या परिसरातील प्रदेश हाच होय ( एपि. इंडि. २९.२०६ ).

**करिल्लिनी** ( नदी )—गुर्जर राजा जयभट ( तृतीय ) च्या स. ७१० च्या अंजनेरी ताम्रपटमते मध्यप्रदेशातील तोरणक गावाच्या दक्षिणेकडील एक नदी. मध्यप्रदेशातील तोरणक आणि नांदोड गावांच्या उत्तरेकडील आधु. कारजन नदी हीच होय ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.९२ ).

**करीकतिल** ( ग्राम )—त्रिपुरी येथील कल्चुरी राजा शंकरगणदेवाच्या इ. स. ८ व्या शतकातील छोटी देवरी दानपत्रमते स्थानिक शिवमंदिरास दान दिलेले मध्य-प्रदेशातील ककंदकुट विषयातील एक ग्राम. छोटी देवरीच्या ३० मैल पूर्वेकडील आधु. कारितलाई अथवा देवरी मढा गावाच्या ४ मैल दक्षिणेकडील आधु. खुरई गाव हेच असावे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.१७७ ).

**करीगे** ( नगर )—टॉलेमीच्या ग्रंथमते अर्वरनोइ प्रदेशातील एक ग्राम (अक्षांश १५° उत्तर; रेखांश १३२°–४०' पूर्व ). मॅक्रिंडल यांच्या मते मद्रास राज्यातील उत्तर पेन्नार नदीपासून ५ मैल अंतरावरील आधु. कुडाप्पा गाव हेच होय. तामीळ नामांतर–'करिपै.'

**शिलालेख साहित्यात**—पश्चिम चालुक्य राजा विक्रमा-दित्याच्या स. ११२४ च्या कुडाप्पा शिलालेखमते हे नगर रेनान्डु प्रदेशात समाविष्ट असून, स. १३०९ च्या ब्रह्मीदेव राजाच्या शिलालेखमते त्याने येथील मंदिरास देणगी दिली होती ( रंगाचारी, १. कुडाप्पा. ६०७ ). विजयनगरच्या कृष्णदेवरायाच्या स. १५१० च्या शिलालेखमते त्याने येथील नवविवाहित पतिपत्नींकडून घेतला जाणारा 'विवाह-कर' रद्द केला होता ( रंगाचारी, १. कुडाप्पा. ५६३ ).

**करीतक** ( देश )—पश्चिम भारतातील 'पनीतक' देशाचे नामांतर ( ब्रह्माण्ड. १६.६१; पनीतक पहा ). पाठभेद–'करीति'.

**करीर** ( ग्राम )—सोळंकी राजा भीम ( द्वितीय ) च्या वि. सं. १२६३ च्या शिलालेखमते उत्तर गुजरात-मधील सारस्वतमंडलान्तर्गत वर्द्धिपथकातील ( आधु. विरमगाम तालुका ) एक ग्राम. विरमगामच्या दक्षिणेकडील आधु. करेल गाव हेच होय ( इंडि. अँटि. ६.१९४–१९५ ).

**करीफॉन** ( नदी )—टॉलेमीच्या मते दक्षिण भारता-तील एक नदी ( अक्षांश १९°–५०' उत्तर; रेखांश १११°–४०' पूर्व ). कनिंगहॅम यांच्या मते दक्षिण भारता-तील आधु. क्यार नदी हीच होय.

**करीरप्रस्थ** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारत-

वर्षातील एक ग्राम (पा. सू. ६.२.८७). 'प्रस्थ' अंत्यशब्दयुक्त नगरनामाचे उदाहरण म्हणून याचा निर्देश तेथे आढळतो. अन्य 'प्रस्थान्त' नगरांप्रमाणेच हेहि कुरुक्षेत्रातच असावे (अग्रवाल, पाणिनि. पृ. ८१).

**करीषक** (देश)--भारतवर्षातील एक देश (म. भी. १०.५४).

**करीषिणी** (नदी)--महाभारतमते भारतवर्षातील एक नदी (म. भी. १०.१६; पद्म. आदि. ६.१४;१९). पाठभेद–'पारिषेणा' (म. भी. २२).

**करुणेश्वर** (लिंग)--काशी येथील एक गुप्तलिंग (स्कन्द. काशी. ७३. ४५;९४.२०–२८).

**करुणोत्पला** (तीर्थ)— हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ (स्कन्द. नागर. १२५;१२७).

**करूर** (नगर)—द्रविड देशान्तर्गत चेर (आधु. केरळ) देशाच्या राजधानीचे गाव. केरळ देशाच्या प्राचीनतम चेर राजवंशाची राजधानी या गावी होती. कोचीन प्रदेशातील पेरियार नदीकाठचे क्रँगनोर गावानजिकचे आधु. तिरुकरूर गाव हेच होय.

नामांतर—प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. टॉलेमी (७.८६) | करौर |
| २. मल्याळम् शिलालेख साहित्य | वंजि |
| ३. चोल राजा कुलोत्तुंग तृतीयचा शिलालेख (साऊथ. इंडि. इन्स्क्रि. ३.४३) | करुवूर |

**नामव्युत्पत्ती** – मॅक्रिंडल यांच्या मते 'करूर' (मल्याळम् 'करू') चा शब्दशः अर्थ 'अंधारे नगर' असा होतो (जसे–'कारगम्'; 'कडारम्').

**टॉलेमीच्या ग्रंथात**—या ग्रंथमते कावेरी नदीकाठच्या या व्यापारी गावी कैरोबोथ्रोस् (केरळपुत्र) राजाची राजधानी होती (अक्षांश. १६°–२०′ उत्तर; रेखांश. ११९° पूर्व). काल्डवेल यांच्या मते कोइमतूर जिल्ह्यातील कावेरी नदीच्या अमरावती नामक उपनदीच्या डाव्या किनाऱ्यावर हे असून, प्राचीन काळी येथे मोठा दुर्ग होता. परंतु तो आता उद्ध्वस्त झाला आहे.

**शिलालेख साहित्यात**—चेर राजा शेनू–गुत्तुवनने स. १८० मध्ये या (वंजि) गावी चोल राजकुमार नलम्-किल्लीचा पराजय केला होता (सेवेल, इन्स्क्रि. पृ. १६). पांड्य राजा अरिकेसरीने स. ७०० मध्ये येथील तटबंदी पुन्हा बांधली असून (इन्डि. ॲन्टि. ८.१९८), पल्लव राजा परमेश्वर पोतवर्मन् (द्वितीय) ने स. ७१५ मध्ये त्या राजाचा पराजय केला होता (सेवेल, इन्स्क्रि. पृ. २७). चोल राजा राजेंद्रदेव (प्रथम) चा स. १०६० चा एक शिलालेखहि येथे सापडला आहे (साऊथ. इंडि. इन्स्क्रि. ३.३९).

**देशविभाग**—चोल राजा कुलोत्तुंग (तृतीय) च्या स. १२०० च्या शिलालेखमते 'करुवूर' देशविभाग त्याच्या राज्यात समाविष्ट असून आधु. कोईमतूर जिल्हा हाच असावा (साऊथ इंडि. इन्स्क्रि. ३.४३).

२. (क्षेत्र) 'भास्करक्षेत्रा'चे नामांतर (भास्करक्षेत्र पहा).

**करूष** (देश व लोकसमूह)--पौराणिक साहित्य आणि वाल्मीकि रामायणमते विंध्य पर्वताच्या ईशान्य उतारावरील, तसेच काशी आणि वत्स यांच्या दक्षिणेकडील चेदि–मगध देशांच्या दरम्यानचे एक जनपद. वाल्मीकि रामायण आणि ब्रह्माण्डमते या देशातील 'वेदगर्भपुरी' (शहाबाद जिल्ह्यातील आधु. बक्सर) येथे विश्वामित्र ऋषींचा आश्रम होता (ब्रह्माण्ड. १.५). मध्य प्रदेशान्तर्गत शोण–केन दुआबातील बुंदेलखंड–बाघेलखंडातील आधु. रेवा गावाच्या परिसरातील प्रदेश म्हणजे हा देश होय. या देशातील 'कारूष' लोकांचा निर्देश प्राचीन साहित्यात सर्वत्र असून, बाघेलखंडातील आधु. बालंद (टॉलेमी–'बोलिंगे') लोक बहुधा हेच असावेत (आर्कि. रिपोर्ट. २१.९२).

अली यांच्या मते विंध्य पर्वतांगभूत कैमुर पर्वताच्या उत्तर उतारावरील शोण, बेटवा, धसन, केन आणि तोन्स नद्यांच्या दुआबाचा उत्तरेकडील डोंगराळ भाग म्हणजे हे जनपद असून, बाघेलखंडातील नैर्ऋत्य–ईशान्यगामी कैमुर पर्वत हा त्याचा बालेकिल्ला होता. पूर्वेस दक्षिण बिहारला भिडलेल्या या जनपदात बिहारमधील शहाबाद जिल्ह्यातील शोण आणि कर्मनाशा नद्यांच्या दरम्यानचा मिर्झापुरपासून सहस्राम्पर्यंतचा, तसेच रेवा आणि शहाबाद गावांच्या दरम्यानचा पर्वतीय प्रदेश समाविष्ट होत असे.

पौराणिक साहित्यमते 'विंध्यपृष्ठवासी' (विंध्य पर्वतनिवासी) करूष लोक (वायु. ४५.१३२; मत्स्य. ११४. ५२; ब्रह्माण्ड. १६.६३; मार्कण्डेय. ५४.५३; ५७; वामन.

१३.५४), कैमुर पर्वतनिवासी मत्स्य, चेदि, भोज लोकांनजिक निवास करीत असत (विष्णु. २.१५६-१९०). मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात 'कारूष' आणि 'बुंदेलखंड' समानार्थक मानले आहेत (अभिधान. १३०. ९५९; शब्दरत्न. ३३२.४). मध्ययुगीन काली हा देश 'कैर' नावाने सुविख्यात असून, आधु. 'कैमुर' हे 'कैर'चेच अपभ्रष्ट रूप असावे.

**भौगोलिक परिसीमा**--पार्गिटर यांच्या मते या देशाच्या भौगोलिक परिसीमा पुढीलप्रमाणे होत्या :-१. दक्षिणेस-कैमुर पर्वत; २. पश्चिमेस- केन नदी व चेदि देश; ३. उत्तरेस- यमुना नद्याभिमुख विंध्य पर्वतश्रेणी, आणि काशी व वत्स देश; ४. पूर्वेस- मगध देश (आधु. दक्षिण बिहार) (पार्गिटर, जे. ए. एस्. बी., स. १८९५; पृ. २५५; जे. आर. ए. एस्., स. १९१४; पृ. २७१).

**नामांतरे**--प्राचीन साहित्यात या देशाची आणि लोकसमूहाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. वाल्मीकि रामायण (बा. २६.२६) | कारूष, करुश, ताटकावन |
| २. पाणिनीची अष्टाध्यायी<br>३. महाभारत (आ. १८३५*)<br>४. वामन पुराण (१४.५४). | कारुष लोकसमूह |
| ५. मार्कंडेय पुराण (५४.५३) | करूष, कारूषक |
| ६. शिलालेख सहित्य (अर्कि- रिपोर्ट. ३.७०) | कारूष |
| ७. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य<br>अ. (अभिधान. १३०. ९५९; वैजयन्ती. ३८; त्रिकाण्ड. ३१) | बृहद्गृह पर्वत |
| आ. (शब्दरत्न. ३३२.४) | नीवृद्दंतर |
| ८. मध्ययुगीन साहित्य (पांडे, बिहार. पृ. ४८) | कैर |

**नामव्युत्पत्ती**— वाल्मीकि रामायण आणि हरिवंशमते 'इंद्राच्या वृत्रवधोत्तर क्षुधेचे (कारूष) ग्रहण करणारा,' (वा. रा. बा. २४.१७-२०), तसेच 'मनु वैवस्वतपुत्र करुषकुलोत्पन्न' (ह. वं. १.१०.२९; ११.९) अशा अर्थाने या देशास आणि लोकांस हे नाव प्राप्त झाले. स्थानिक आख्यायिकामते 'कारुष दैत्याचा देश' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले (मार्टिन, ईस्टर्न इंडिया. १.४०५).

**स्थापना**— भागवतमते करूष नामक मनु वैवस्वतपुत्राने स्थापिलेल्या या देशातील युद्धप्रवीण लोक भारतातील आद्य क्षत्रिय, तसेच ब्राह्मणधर्म आणि उत्तरापथ देशाचे आद्य रक्षणकर्ते होते (भा. ९.२.१४). उत्तरकालात कौरववंशीय वसु राजाच्या बृहद्रथ, प्रत्यग्रह, कुशांब, ललित्थ आणि मारुत नामक पाच पुत्रांनी मगध, चेदि, कौशांबी, करूष आणि मत्स्य देशांच्या स्वतंत्र राज्यांची स्थापना केल्यानंतर, येथे ललित्थ राजवंशाचे राज्य प्रस्थापित झाले (पार्गिटर, पृ. ११८; २९४).

**पाणिनीच्या अष्टाध्यायीत**— या ग्रंथात शाल्व आणि भर्ग लोकांसमवेत या (कारूष) लोकांचा निर्देश आढळतो (पा. सू. ४.१.१७८).

**वाल्मीकि रामायणात**— या ग्रंथमते हे (कारूष) आणि मलद लोक अयोध्या-मिथिला मार्गावरील जाह्नवी नदीच्या दक्षिणेकडील घनदाट जंगलात निवास करीत असत (वा. रा. बा. २४.१७; २०; २४; २८). अलाहाबादपासून शहाबाद जिल्ह्यापर्यंतच्या गंगा नदीच्या दक्षिणेकडील कैमुर पर्वतान्तर्गत जंगलमय प्रदेशाचा (=बाघेलखंडाचा पूर्व भाग) निर्देश येथे अभिप्रेत असून (इंपि. गॅझे. ६.१८५), आधु. बाघेलखंड, मिर्झापुर, आणि शहाबाद जिल्ह्यांचा प्रदेश वाल्मीकि रामायणकाली कारूष आणि मलद नावांनी सुविख्यात असावा (चौधरी, पृ. ३७-३८).

वाल्मिकि रामायणमते गंगा-शोण दुआबातील (वा. रा. बा. २७) एके काळचा हा समृद्ध देश ताटका आणि ताटकापुत्र मारीचाच्या त्रासामुळे उजाड बनून भर दिवसाहि तेथे प्रवेश करणे धोक्याचे झाले (वा. रा. बा. २४.२०-३२). अखेरीस सिद्धाश्रमस्थानी ताटकावध करून रामाने हा प्रदेश पुनर्वसित केला (वा. रा. बा. २५-२६).

**महाभारतात**—या ग्रंथात चेदि, मत्स्य, काशी, आणि पांचाल या वांशिकदृष्ट्या निकटवर्ती लोकांसमवेत (म. आ. ११४.३१; भी. ४७.५४-५६), तसेच वत्स (वात्स्य) देशासमवेत (म. द्रो. १०.१५) याचा निर्देश आढळतो.

महाभारत पूर्वकाली उपरिचर वसू राजाने जिंकलेल्या या देशाचा वसुपुत्र यदु हा सम्राट असून (म. आ. ५७.२८-२९; द्रो. ९१), या देशाचा 'पाटचरनिहंता' (पटच्चरविजेता) राजा द्रौपदीस्वयंवरास उपस्थित होता (म. आ. १८३५*). या जनपदाचा (म. भी. १०.३९) दंतवक्र नामक मायायुद्धप्रवीण आणि मगधराज जरासंधाचा मांडलिक राजा (म. स. १३.१०; ह. वं.

२.४९.१ ) 'कारूष' ( करूषराज ) नावाने सुविख्यात होता ( म. स. १३.१०; ४२.११ ). महाभारतात अन्यत्र पौंड्रक वासुदेव नामक 'करूषाधिपती'चा निर्देश असून ( म. स. १३.१९ ), युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या पूर्व दिग्विजयसत्रात सहदेवाने त्यास जिंकले होते ( म. स. २८.३ ).

भारतीय युद्धात पांडवांनी रणनिमंत्रण केलेले हे लोक कौरवपक्षात सामील असून भीष्मविरचित गरुडव्यूहात ते उभे होते ( म. भी. ५२.१३ ). श्रीकृष्णाने त्यांना जिंकले होते ( म. द्रो. १०.१५ ).

**पौराणिक साहित्यात**--विष्णु पुराणात मत्स्य, चेदि आणि भोज यांचा निर्देश असून ( विल्सन, विष्णु. पृ. १५६ ), भागवतात दंतवक्रपिता वृद्धशर्मन् नामक 'करूषाधिपती'चा ( भा. ९.२४.३७ ), तसेच बाणभट्टकृत हर्षचरितात या देशाचा निर्देश आढळतो ( कॉवेल, हर्ष. पृ. १९३ ).

**मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात**—या साहित्यमते 'कारूष देश' आणि 'बृहद्गृह पर्वत' समानार्थक असून ( अभिधान. पृ. ३८३; वैजयन्ती. पृ. ३८; त्रिकाण्ड. पृ. २१ ), काव्यमीमांसमते बृहद्गृह पर्वत पूर्व भारतातील बाघेलखंडात होता ( काव्यमी. पृ. ९३; बृहद्गृह पहा ).

**शिलालेख साहित्यात**—इ. स. १९ व्या शतकातील शिलालेखमते हा ( कारूष ) देश म्हणजे आधु. शहाबाद जिल्हा होय ( आर्कि. रिपोर्ट. ३.७० ).

**शाक्त उपासना**—आधु. कैमुर पर्वतातील शक्ति देवीच्या विपुल मंदिरावशेषांवरून हा सारा प्रदेश प्राचीनकाळी शाक्त लोकांनी व्यापला असावा. येथील ताराचंडी मंदिरात प्रतापधवल ऐल राजाचा ( इ. स. १२ वे शतक ) एक शिलालेख आढळतो ( जे. आर. ए. एस्. ६.३४७–३५९ ).

**करेओइ** ( देश )—टॉलेमीच्या ग्रंथमते दक्षिण भारतान्तर्गत कोल्खिक ( आधु. मनार ) आखातातील एक देश. मॅक्रिंडल यांच्या मते आधु. दक्षिण तिनेवेल्ली जिल्हा हाच होय. तामीळभाषीय 'करे' ( किनारा ) चे हे ग्रीकभाषीय रूपांतर असावे.

**करैवलिनाडु** ( देशविभाग )—कोंगु चोल राजा वीर राजेंद्रच्या स. १२०७ च्या कोईमतूर शिलालेखमते दक्षिण भारतातील एक देशविभाग. येथील अनेक युद्धोद्ध्वस्त मंदिरांचा या राजाने जीर्णोद्धार केला होता ( रंगाचारी, १. कोईमतूर. ४४३ ).

**करोधक** ( ग्राम )--कलचुरि राजा कोकल्लदेव ( द्वितीय ) च्या इ. स. १० व्या शतकातील गुर्गी शिलालेखमते मध्यप्रदेशातील एक ग्राम. रेवा जिल्ह्यातील गुर्गी गावाच्या ४ मैल आग्नेयेकडील आधु. करओंडी गाव हेच होय ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.२२७ ).

**करौर** ( नगर )—टॉलेमीच्या मते दक्षिण भारतातील चेरराजधानी 'करूर' नगराचे नामांतर ( मॅक्रिन्डल, टॉलेमी. ७.८६; करूर पहा ).

**करौली ग्राम** ( तीर्थ )—राजस्थानमधील भरतपूरच्या ५० मैल दक्षिणेकडील एक पर्वतीय वैष्णवस्थान. वृंदावन येथील मदनमोहनमूर्ती यवन आक्रमणकाळी येथे स्थलांतरित करण्यात आली असून, गावाबाहेर कैलासी देवीचे मंदिर आहे ( ती. पृ. २७७ ).

**कर्क** ( देश )— इराणी सम्राट दाराच्या बहिस्तून शिलालेखमते इराणमधील शक लोकांच्या निकटवर्ती एक लोकसमूह. पश्चिम इराणमधील सूसा गावानजिकचा आधु. कर्किआ प्रदेश हाच होय. कात्यायनाच्या वार्तिकात या देशातील 'कर्कंधु' नामक विहिरीचा निर्देश असून, अग्रवाल यांच्या मते इराणमधील आधु. 'पर्शियन वेल' संज्ञक रहाटाच्या विहिरीचा निर्देश येथे अभिप्रेत असावा (अग्रवाल, पाणिनि. पृ. ८२ ). नामांतर ( महाभारत )–' कर्कोटक.'

**कर्कखण्ड** ( देश )--महाभारत कर्णदिग्विजयमते उत्तर भारतातील एक देश ( म. आर. परि. २४.१.४३ ).

**कर्कटायाल** ( राज्यविभाग )—सुभिक्षराजदेवाच्या इ. स. १० व्या शतकातील पांडुकेश्वर ताम्रपटमते विष्णुगंगा नदीकाठचा एक राज्यविभाग ( एपि. इंडि. ३१.२९२ ).

**कर्कटेश्वर** ( लिंग )—अवंती येथील ८४ शिवलिंगांपैकी एक ( स्कन्द. आवन्त्य. अ. च. लिं. २२ ).

**कर्कन्ध** ( तीर्थ )—वामनमते एक तीर्थ ( वामन. ५१.५२ ).

**कर्कन्धुमती** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.७७ ).

**कर्कन्धुप्रस्थ** ( नगर )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक नगर ( पा. सू. ६.२.८७ ). 'प्रस्थ' अंत्यशब्दयुक्त नगरनामाचे उदाहरण म्हणून याचा निर्देश तेथे असून, अन्य प्रस्थान्त नगरांप्रमाणे हेहि कुरु देशात असावे ( अग्रवाल, पाणिनि. पृ. ८१ ).

**कर्कर** ( देश व लोक )--महाभारतमते युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयी उपायनांसह उपस्थित असणारा एक लोकसमूह ( म. भी. १०.४२ ). पाठभेद–'कुक्कुर'.

**कर्कराज** ( लिंग )—अवंती येथील एक शिवलिंग ( स्कन्द. आवन्त्य. अ. ४९.३; ६९.२ ).

**कर्कराटक** ( राज्यविभाग )—सुभिक्षराजदेवाच्या इ. स. १० व्या शतकातील पांडुकेश्वर ताम्रपटमते विष्णुगंगा नदीकाठचा एक राज्यविभाग. आसाममधील आधु. रंगणपुर जिल्ह्यात हा असावा ( एपि. इंडि. ३१.२९२ ).

**कर्करेड्डी** ( ग्राम )—कलचुरि राजा विजयसिंहाच्या स. ११९३ च्या रेवा शिलालेखमते मध्यप्रदेशातील 'कक्करेड्डिका' ग्रामाचे नामांतर ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.३४८; कक्करेड्डिका पहा ).

**कर्कश** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.७७ ).

**कर्कीप्रस्थ** ( नगर )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक नगर ( पा. सू. ६.८.८७ ). 'प्रस्थ' अंत्यशब्दयुक्त नगरनामाचे उदाहरण म्हणून याचा निर्देश तेथे असून, अन्य 'प्रस्थान्त' नगरांप्रमाणेच हेहि कुरु देशात असावे ( अग्रवाल, पाणिनि. पृ ८१ ).

**कर्कोट** ( देश ) — महाभारतमते भारतवर्षान्तर्गत कर्कोटक लोकांचा एक विधर्मी देश ( म. क. ३०.४५; कर्कोटक १. पहा ).

२. ( देवीस्थान ) पद्ममते एक देवीस्थान. येथील देवीचे नाव मुकुटेश्वरी होते ( पद्म. आदि. १७.१९७ ).

**कर्कोटक** (लोकसमूह)—महाभारत कर्ण-शल्य संवादमते पंजाबातील एक विधर्मी लोकसमूह ( म. क. ३०. ४५ ). शब्दशः अर्थ–'कर्कोट देशनिवासी.' काही अभ्यासकांच्या मते पश्चिम इराणमधील 'कर्क' ( आधु. कर्कीय देश ) देशाचे हे नामांतर असावे.

२. ( कुंड ) अवंती येथील एक जलकुंड ( स्कन्द. आवन्त्य. अ. ६५.१७ ).

३. ( आदित्य ) प्रभासक्षेत्रान्तर्गत एक आदित्यतीर्थ ( स्कन्द. प्रभास. प्र. ३४६ ).

४. ( वन ) कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या दक्षिण भागातील एक वन ( मार्क. ५५.२१ ).

५. ( शिखर ) उत्तर प्रदेशातील भीमताल येथील एक पर्वतशिखर ( ती. पृ. ४१ ).

**कर्कोटकेश्वर** ( लिंग )—नर्मदा नदीकाठचे एक शिवलिंग ( मत्स्य. १९१.३६ ).

२. प्रभासक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंग ( नारद. उत्तर. ७०.७५ ).

३. अवंती येथील ८४ शिवलिंगांपैकी एक ( स्कन्द. आवन्त्य. अ. २०.१४ ). येथे या नावाची एक वापीहि आहे. पाठभेद–'कर्कोटेश्वर' ( स्कन्द. आवन्त्य. अ. च. लिं. १० ).

४. काशी येथील कर्कोटवापीनजिकचे एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ६६.२३; ९७.११७ ).

**कर्कोटनाग तीर्थ** ( नगर )—तीर्थसंग्रहमते कश्मीरातील 'कार्कोटद्रंग' नगराचे नामांतर ( कार्कोटद्रंग पहा ).

**कर्जिका** ( ग्राम )—शिलालेख साहित्यमते महाराष्ट्रातील एक ग्राम. कार्ले गुफासमूहानजिकचे आधु. कर्जत गाव हेच होय ( एलापुर पहा ).

**कर्णगङ्गा** ( नदी )—उत्तर प्रदेशातील महामृत्युंजय तीर्थापासून २ मैल दक्षिणेकडील एक पवित्र नदी ( ती. पृ. ६१ ).

**कर्णग्राम** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.१३ ).

**कर्णतीर्थ** ( तीर्थ )— तीर्थचिंतामणि, तसेच चंद्रमहाग्राम शिलालेखमते गंगा-विंध्य पर्वत संगमानजिकचे एक तीर्थ ( ती. पृ. २१६; एपि. इंडि. ११.१४५ ).

**कर्णपुर** ( पर्वत )—शिलालेख साहित्यमते दक्षिण भारतातील कारीतलाइनजिकचा एक पर्वत ( कॉर्पस्. इन्स्क्रि. १.२९२ ).

**कर्णपुरी** ( नगर )—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते बिहारमधील एक नगर ( मेदिनी. १३३.९६७; कल्पद्रु. ११.२७; शब्दरत्न. ५२.२६ ). आधु. भागलपुर गाव हेच होय.

२. ( कर्ण राजधानी ) बिहारमधील गंगा नदीकाठचे कुंतीपुत्र कर्णाच्या राजधानीचे नगर. आधु. मुंगेर गाव हेच असून, येथील 'कष्टहारिणी घाट' सुविख्यात आहे ( ती. पृ. १७१ ).

३. ( तीर्थ ) कुरुक्षेत्रातील एक तीर्थ. मिर्झापुरनजिकचे आधु. कर्ण–का–खेडा गाव हेच असून, भारतीय युद्धास जाण्यापूर्वी कर्णाने येथे दानधर्म केला होता ( ती. पृ. ८० ).

४. ( कर्णवधस्थान ) कुरुक्षेत्रातील अभिमन्यु ( आधु. अमीन ) गावानजिकचे कर्णवधस्थान ( ती. पृ. ८१ ).

**कर्णप्रयाग** ( तीर्थ )—उत्तर प्रदेशान्तर्गत केदारखंडातील महामृत्युंजय पर्वतापासून १८ मैलांवरील पिंडरगंगा–अलकनंदा नद्यांचे संगमस्थान ( यू. पी. गॅझे. ३६.१७२; अलकनंदा पहा ).

**कर्णप्रावरण** ( देश व लोक )—महाभारत आणि पौराणिक साहित्यमते ईशान्य भारतातील एक हिमालय

पर्वतनिवासी लोकसमूह (म. स. ४८.४७५*; ब्रह्माण्ड. ४९.६९). आधु. नेपाळ हिमाल्यामध्ये हे लोक रहात असावेत (आय्. एच्. क्यू. ३१.३१३).

**नामांतरे**—पौराणिक साहित्यात या लोकांची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. महाभारत (उ. १५७) | उलूक |
| २. बृहत्संहिता (१४.१८) | कर्णप्रावेय |
| ३. मार्कंडेय पुराण | |
| अ. (५४.५७) | कुंत–प्रावरण |
| आ. (५५.३१) | कर्णप्राधेय |
| ४. वायु पुराण (४५.१३६) | कुशप्रावरण |
| ५. मत्स्य पुराण (१२०.५६) | कुभ–प्रावरण |
| ६. विष्णु पुराण (विल्सन, २.१६१) | कर्णप्रदेय |

**नामव्युत्पत्ती**—'कर्णद्वयाने स्वशरीर अवगुंठिणारे' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले असावे. अशा तऱ्हेचे विशालकर्ण लोक भारताच्या काही भागात रहात असल्याचा निर्देश पाश्चात्य प्रवासवर्णनात आढळतो (प्लिनी, ४.१३; ७.२; मँडविलकृत प्रवासवर्णन. प्र. १९). काही अभ्यासकांच्या मते येथे थंडीमुळे कर्ण वस्त्राच्छादित करणाऱ्या लोकांचा निर्देश अभिप्रेत असावा. फ्लीट त्यांच्या मते या लोकांच्या 'प्रावरण', 'प्रावेणि', 'प्रावेण्य', 'प्रावेय,' या साऱ्या उपाधी समानार्थक आहेत (इंडि. अँटि. २२.१८१).

**वाल्मीकि रामायणात**—या ग्रंथमतें हे लोक पूर्व भारतातील किरातांसमवेत निवास करीत असत (वा. रा. कि. ४०.२५).

**महाभारतात**—या ग्रंथातील उलूकयानपर्वात निर्देशिलेले हिमाल्यनिवासी उलूक लोक, तसेच त्यांचा प्रावारकर्ण नामक राजा बहुधा हेच असावेत (म. उ. १५७–१६०).

**पौराणिक साहित्यात**—या साहित्यमते हे लोक पूर्व भारतातील पूर्ववाहिनी नलिनी (ब्रह्माण्ड. १८.६०; वायु. ४७.५७), अथवा पावनी नदीकाठी निवास करीत असत (मत्स्य. १२१.५८).

**अन्य वसाहती**—प्राचीन साहित्यात या लोकांच्या निम्नलिखित अन्य वसाहतींचा निर्देश आढळतोः—

(१) **दक्षिण भारतात**—या किरात लोकसमूहान्तर्गत (म. स. २७.२९४*) लोकांना युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या दक्षिण दिग्विजयात सहदेवाने जिंकले होते (म. स. २८.४४). त्या यज्ञसमयी हे लोक उपायनांसह उपस्थित होते (म. स. ४८.४७१*). भारतीय युद्धात हे दुर्योधनपक्षीय वीर भीष्मरक्षणाचे कार्य करीत होते (म. भी. ४७.१३).

(२) **नैर्ऋत्य भारतात**—वाल्मीकि रामायणात या वसाहतीचा निर्देश आढळतो.

(३) **लंकेमध्ये**—वाल्मीकि रामायणात लंकानिवासी 'कर्णप्रावरणा' राक्षसीचा निर्देश आढळतो (वा. रा. सुं. १७.५).

**कर्णसुवर्ण** (नगर)—हर्षचरितमते पूर्व भारतान्तर्गत गौड देशाच्या राजधानीचे नगर (कॉवेल, हर्ष. पृ. १८७). मुर्शिदाबाद जिल्ह्यातील बेहरामपुर गावाच्या ६ मैल नैर्ऋत्यकडील आधु. रंगामाटी गाव हेच होय (जे. ए. एस्. बी. ६३.१७२).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. प्राचीन संस्कृत साहित्य | रक्तमृत्तिका |
| २. ह्युएन्त्संगचे प्रवासवर्णन | कि-लो-न-सु-फल-न (किरणसुवर्ण) |
| ३. मध्ययुगीन संस्कृत साहित्य | काण्शोणा |
| ४. जयनाग राजाचा 'वप्प-घोषावत' शिलालेख (एपि. इंडि. १८.६१–६४) | कर्णसुवर्णक (३–४) |
| ५. पाली साहित्य | रत्तमट्टिका |

**नामव्युत्पत्ती**—या नगराच्या 'रक्तमृत्तिका' या वैकल्पिक नावाचा शब्दशः अर्थ 'लाल रंगाची माती' असा होतो. या नगरनावावरूनच येथील ह्युएन्त्संगकालीन बौद्ध मठास 'रक्तमृत्तिका संघाराम' नाव प्राप्त झाले होतें.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते पुंड्रवर्धनपासून १८० मैल आग्नेयेस, आणि ताम्रलिप्ती नगराच्या ईशान्येस हे गाव (क्षेत्रफळ ४ मैल) होते.

**रक्तमृत्तिका संघाराम**—ह्युएन्त्संगच्या मते कर्णसुवर्ण नगरानजिकचा हा सर्वाधिक सुविख्यात आणि विद्वान बौद्ध भिक्षुसंपन्न मठ येथील राजाने एका दक्षिण भारतीय बौद्ध

श्रमणाच्या स्मृत्यर्थ बांधला असून, येथूनच पूर्व भारतातील सारा बौद्ध धर्मप्रसार झाला होता. ताम्रपट्टयाच्या साह्याने स्वतःचे ज्ञान स्वउदरी बंदिस्त करणाऱ्या एका दीपशिखाधारी अहंमन्य हिंदु पंडिताचा पराजय करणाऱ्या बौद्ध श्रमणाची स्मृती या मठाने जागृत ठेवली होती.

येथून १४० मैल पश्चिमेस गेल्यानंतर ह्युएन्त्संग 'उड' (= उड्र = आधु. ओरिसा) देशास पोहोचला (वॉटर्स, २.१९१–१९३; गौड पहा).

**कर्णह्रद** (ह्रद)—काशी येथील गंगा–सरस्वती संगमानजिकचे एक सरोवर (नारद. उत्तर. ४९.२८; पद्म. आदि. ३२.४).

**कर्णाट** (देश) —बृहत्संहितामते दक्षिण भारतातील 'कर्नाटक' देशाचे नामांतर (बृ. सं. १४.१३; मार्क. ५५.२३; कर्नाटक पहा).

**कर्णाढ** (देश)—राजतरंगिणीमते वायव्य भारतातील 'कर्णाह' देशाचे नामांतर (राज. ८.२२२५; कर्णाह पहा).

**कर्णादित्य** (तीर्थ)—काशी येथील नागेश्वराच्या दक्षिणेकडील एक तीर्थ (स्कन्द. काशी. ८४.४५).

**कर्णावती** (नगर)—गुजरातच्या कर्ण (स. १०६४–१०९४) राजाने स्थापिलेले गुजरातमधील आशापल्ली (आधु. असावल) नजिकचे राजधानीचे नगर. सुलतान अहंमदशाहा (प्रथम) स्थापित आधु. अहमदाबाद हेच असून, कर्णावती आणि आशापल्ली नगरांच्या पुराणावशेषांवरच त्याची रचना झाली आहे (अळतेकर, गुजरात. पृ. १६; आशापल्ली पहा).

२. (ग्राम) कलचुरि राजा यशःकर्णच्या स. १०७ च्या खेडा ताम्रपटमते, तसेच जयसिंहाच्या कर्णबेल शिलालेखमते मध्यप्रदेशातील नर्मदा (वैजयंती) नदीकाठचे एक अग्रहार ग्राम. जबलपुर जिल्ह्यातील त्रिपुरी (आधु. तेवार) पासून १ मैलावरील भेडाघाटनजिकचे आधु. कर्णबेल (शब्दशः अर्थ—बेलवृक्षयुक्त) गाव हेच होय (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.२९२; २.६३७).

**कर्णावल** (तीर्थ)— व्रजमंडलान्तर्गत (आधु. मथुरा–वृंदावन) एक तीर्थ. येथे श्रीकृष्णाचा कान टोचण्याचा धर्मविधी झाला होता (ती. पृ. १०५).

**कर्णाह** (देश)—राजतरंगिणीमते कश्मीरच्या पश्चिम सरहद्दीवरील एक पर्वतीय देश (राज. ८.२४८५). कामराज (प्राचीन 'क्रमराज्य') च्या पश्चिमेकडील, आणि मुजफ्फराबादच्या उत्तरेकडील किशनगंगा–कर्णाव खोऱ्यातील आधु. कर्णाव प्रदेश हाच होय. राजतरंगिणीकालापासून शीख राज्यकालापर्यंत राजकीय दृष्ट्या स्वतंत्र असे हे लोक वायव्य कश्मीरची लुटालूट करीत असून, वितस्ता खोऱ्यातील खख (प्राचीन खश) लोकांसमवेत त्यांनी स. १८४६ मध्ये कश्मीर लुटले होते (बेट्स, गॅझेटियर. पृ. २९८). नामांतर—'कर्णाट' (राज. ८.२५२५).

राजतरंगिणीमते येथील लोक खशवंशीय असून (राज. ८.२७०९), आधु. बोम्ब लोक त्यांचे वंशज होत. कश्मीरातील हमल (प्राचीन 'उत्तर') परगण्याप्रत या देशातून जाणाऱ्या पर्वतीय रस्त्याने लोठनने कश्मीरराज जयसिंहावर आक्रमण केले होते (राज. ८.२४९०; २५२५; स्टाइन, राज. १.१९४; ४३४).

**कर्णिक** (देवीस्थान)—पद्ममते एक देवीस्थान. येथील देवीचे नाव पुरुहूता होते (पद्म. आदि. १७.१९४).

२. (देश) जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक देश (वराह. ८३.२).

३. दक्षिण भारतातील 'झल्लिक' देशाचे नामांतर (म. भी. १०.५८; झल्लिक पहा).

**कर्णिकाचल** (पर्वत)—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते 'मेरु' पर्वताचे नामांतर (अभिधान. १४०.१०३१; मेरु पहा).

**कर्णिकारक्षेत्र** (शिवस्थान)—भारतातील अडुसष्ट शिवस्थानांपैकी एक. येथील धरणीवराहाच्या पश्चिमेस गणाध्यक्ष नामक शिवावतार अवतीर्ण झाला (स्कन्द. काशी. ६६).

**कर्णिकारवन** (वन)—जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वताच्या उत्तरेकडील शिव-पार्वतींचे निवासस्थान, एक वन (म. भी. ६.२४; ७.२९).

**कर्णिकासङ्गम** (तीर्थ)—गौतमी (गोदावरी) नदीकाठचे एक तीर्थ (ब्रह्म. १०५.२३).

**कर्णेश्वर** (लिंग)—अवंती येथील एक शिवलिंग (स्कन्द. आवन्त्य. अ. ७०.८२).

**कर्तसिन** (ग्राम)—टॉलेमीच्या मते गंगा नदीच्या परिसरातील एक ग्राम (अक्षांश २१°–४०′ उत्तर; रेखांश १४६° पूर्व). यूल यांच्या मते वेहरामपुरनजिकचे आधु. कर्णसोनगड् गाव हेच होय (जे. आर. ए. एस्. ६.२४८; जे. ए. एस्. बी. २२.२८१).

**कर्तिगन** (ग्राम)—टॉलेमीच्या मते गंगा नदीच्या परिसरातील एक ग्राम (अक्षांश २३° उत्तर; रेखांश १४६° पूर्व). यूल यांच्या मते भागलपुरनजिकचे आधु.

कर्णगढ गाव हेच होय ( जे. आर. ए. एस्. १८. ३९५ ).

**कर्तृतीर्थ** ( तीर्थ )—काशी येथील एक तीर्थ. येथे बलरामाचे सूतवधाचे पातक नष्ट झाले ( स्कन्द. काशी. ८३.७७ ).

**कर्दम** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.५ ).

२. ( तीर्थ ) द्वारका येथील एक तीर्थ ( स्कन्द. प्रभास. द्वा. १६.४२ ).

**कर्दम-आश्रम** ( आश्रमस्थान )— भागवतमते पश्चिम भारतातील सरस्वती नदीकाठचे कर्दम आणि कर्दमपुत्र कपिल ऋषींचे आश्रमस्थान ( भा. ३.२४.९ ). गुजरातमध्ये आधु. सिद्धपुर ( मातृगया ) नजिक हा दाखवितात ( कपिल-आश्रम १. पहा ).

२. मध्यप्रदेशातील कर्दम ऋषींचे तपस्यास्थान. परासनपासून १० मैल पूर्वेकडील, आणि बवीनापासून १० मैल आग्नेयेकडील बरमा–वेत्रवती संगमावरील आधु. कोटेश्वर शिवमंदिरस्थान हेच होय ( ती. पृ. ११३ ).

**कर्दमाल** ( तीर्थ )— गया येथील एक तीर्थ ( अग्नि. ११६.१३; नारद. उत्तर. ६०.२४; मत्स्य. २२.७७ ).

२. प्रभासक्षेत्रातील एक तीर्थ ( नारद. उत्तर. ७०.७९; स्कन्द. प्रभास. प्र. ३५३ ).

३. साभ्रमती नदीकाठचे एक तीर्थ ( पद्म. क्रिया. १६५; ७.१० ).

**कर्दमिल** ( तीर्थ )— महाभारत लोमशयात्रामते समंगा ( मधुविला ) नदीकाठचे भरताचे राज्याभिषेकस्थान, एक तीर्थ ( म. आर. १३५.१ ).

**कर्नाट** ( देश )—विक्रमांकदेवचरितमते कर्नाटकान्तर्गत 'कुंतल' देशाचे नामांतर ( कुंतल पहा ).

**कर्नाटक** ( देश )— पौराणिक साहित्यमते दक्षिणापथ देशान्तर्गत ( सातपुडा-महादेव-मैकल पर्वतश्रेणीच्या दक्षिणेकडील द्वीपकल्पीय प्रदेश ) दख्खन पठारातील एक देश ( पद्म. आदि. ६.५४; म. भी. ९.५९ कुं; विष्णुधर्म. १.९.५ ). बृहत्संहिता आणि मार्कंडेयमते हा कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या दक्षिण भागात होता ( बृ. सं. १४.१३; मार्कं. ५५.२३ ). आधु. म्हैसूर हा कन्नडभाषीय प्रांत हाच होय.

**भौगोलिक परिसीमा**— अली यांच्या मते या देशाच्या भौगोलिक परिसीमा पुढीलप्रमाणे होत्या :– १. उत्तरेस–दख्खन पठार; २. दक्षिणेस–मोयार नदी; ३. पश्चिमेस–पश्चिम घाट; ४. आग्नेयेस–मोयार आणि पालार नदीखोऱ्यांच्या दरम्यानच्या म्हैसूर टेकड्या; ५. ईशान्येस–पेन्नार नदी आणि कुडाप्पा पर्वताच्या दक्षिणेकडील जलसंचय प्रदेश.

कर्नाटक, तेलंगण ( आंध्र प्रदेश ) आणि महाराष्ट्र या तीन देशांच्या सीमारेषेवर कृष्णा आणि तुंगभद्रा नद्यांच्या दरम्यानचा रायचूर दुआब असून, त्याच्या स्वामित्वासाठी या तीन देशांमध्ये अखंडपणे युद्धे चालू असत. कर्नाटकातील तुंगभद्रा नदीकाठचे विजयनगर साम्राज्य, आणि दख्खन प्रदेशातील विजापुर, गोवळकोंडा आणि अहमदनगर येथील मुसलमानी सुलतानांच्या बहुतांशी लढाया याच प्रदेशासाठी झाल्या होत्या.

**शक्तिसंगमतंत्रात**—या ग्रंथमते 'कर्नाट' देशाची मर्यादा रामनाथपासून ( आधु. राम्नद जिल्हा ) श्रीरंगम्पर्यंत ( तंजोरनजिकचे कावेरी नदीकाठचे आधु. श्रीरंगम् ) होती ( शक्तिसङ्गम. ७.३.१६ ). यावरून हा विशिष्ट कानडी भाषीय प्रदेश या देशाचा बालेकिल्ला असून, दख्खन पठाराच्या विस्तृत प्रदेशाला 'कर्नाट' हे व्यापक नाव विजयनगर येथील कानडी राजांच्या राज्यविस्तारकाली पडले असावे ( बॉम्बे. गॅझे. १.२.३७७; ३९७ ).

**यादवकालीन उपविभाग**— यादव शिलालेखमते यादवकालीन कर्नाटकात निम्नलिखित देशविभागांचा समावेश होत असेः– १. कुंडि ( आधु. बेळगाव तालुका ); २. तर्दवाडी ( विजापुर जिल्ह्यातील आधु. इंदि, बागेवाडी, विजापुर आणि बागलकोट तालुके ); ३. तोरगले ( आधु. पारसगड तालुका ); ४. नूले ( बेळगाव जिल्ह्यातील हुक्केरि तालुका ); ५. बनवासी ( उत्तर कर्नाटक जिल्ह्यातील बनवासी गावासभोवतालचा प्रदेश ); ६. बासूर (धारवाड जिल्ह्यातील आधु. हवेरि तालुका ); ७. बेल्वल ( आधु. गदग तालुका आणि रायचूर जिल्ह्याचा पश्चिम भाग ); ८. वेणुग्राम ( आधु. बेळगाव तालुक्याचा काही भाग ); ९. इलसिगे ( बेळगाव जिल्ह्यातील आधु. खानापूर तालुका ); १०. हुलिगेरे ( आधु. लक्ष्मीश्वर गावासभोवतालचा देश ).

उपरोक्त देशविभागांपैकी 'बासूर' आणि 'नूले' देशविभागांचा निर्देश अन्य प्राचीन साहित्यात आढळत नाही. त्यावरून ते यादव राज्यकाली नव्याने निर्माण झाले असावेत ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २८०–२८१ ).

**कर्नाटक साम्राज्य**—स. १३४०–१५६५ च्या दरम्यानच्या विजयनगर राज्यकाली हा देश परमोत्कर्षास पोहोचला. भारताच्या दक्षिणतम टोकानजिकच्या

तिनेवेल्ली ( पांड्य ) प्रदेशाचा अपवाद वगळता, बेळगावपासून पूर्व समुद्रापर्यंतचा निम्नलिखित देशविभाग इ. स. १४ व्या शतकात या साम्राज्यात समाविष्ट होता :—१. उदयगिरि ( आधु. नेलोर आणि कुडाप्पा जिल्हे ); २. पेनुकोंड ( आधु. पेनुकोंड किल्ला ); ३. गुत्ति ( आधु. बेल्लारी, अनंतपुर आणि उत्तर म्हैसूर जिल्हे ); ४. आरग ( बनवासी, चंद्रगुत्ति आणि गोवा प्रदेश ); ५. मुळुवायि ( म्हैसूर राज्य, तसेच सालेम जिल्हा ); ६. तुळु ( भारताच्या पश्चिम किनाऱ्याचा प्रदेश ); ७. राजगंभीर ( दक्षिण अर्काट जिल्हा ) ( इंडि. अँटि. स. १९१८; पृ. ७; विजयनगर पहा ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. बृहत्संहिता ( बृ. सं. १४-१३ ) | कर्णाट |
| २. मार्कंडेय पुराण ( मार्क. ५५.२३ ). | कर्णाट |
| ३. महाभारत ( भी. १०.५७ ) | उन्नत्यक |
| ४. शिलालेख साहित्य | |
| अ. कदंब राजा शांतिवर्मन्चा स. ४५० चा शिलालेख ( एपि. कर्ना. ६.१६२ ) | कर्नाट |
| ब. कुमारपाल राजाचा वि. स. १२१८ चा किराडु शिलालेख ( पूना ओरि. १.२.५० ) | कर्नाट |
| क. बल्लाळ ( प्रथम ) राजाचा स. ११०१ चा शिलालेख ( एपि. कर्ना. ५.१९९ ) | आल्वखेड |

**नामव्युत्पत्ती**—'कर्नाट लोकांचा देश' अशा अर्थाने या देशास हे नाव प्राप्त झाले असून, आधु. 'कन्नड' हे 'कर्नाट' संस्कृत लोकसमूहनामाचे कानडीभाषीय रूप आहे.

**महाभारतात**—या ग्रंथाच्या भांडारकर संहितेत 'उन्नत्यक' देशनामाचे पाठभेदात्मक रूप म्हणून 'कर्णाट'चा निर्देश आढळतो ( म. भी. १०५७ ).

**पौराणिक साहित्यात**—या साहित्यमते दक्षिणापथमधील या देशात १ लक्ष २५ हजार गावे होती ( स्कन्द. माहेश्वर. कौ. ३९.१५२–१५३ ).

**जनपदे**—अली यांच्या मते पौराणिक काली या देशात निम्नलिखित जनपदे समाविष्ट होती :-१. कुंतल ( उत्तर तुंगभद्रा, आणि तिच्या हगरी आणि हिंद्रि नामक उपनद्यांच्या जलसंचय प्रदेशातील आधु. धारवाड आणि बेल्लारी जिल्हे, तसेच आंध्र प्रदेशातील अनंतपुर आणि रायचूर जिल्ह्यांचा काही भाग; राजधानी–विजयनगर ( = आधु. हंपे ); २. माहिषक ( उत्तर कावेरी आणि शिंश नद्यांच्या जलसंचय प्रदेशातील आधु. दक्षिण कर्नाटक प्रदेश ); ३. कुपथ ( कर्नाटकच्या आग्नेय कोपऱ्यानजिकच्या पठारी प्रदेशातील, तसेच चोल आणि पांड्य जनपदांच्या पश्चिमेकडील आधु. कोईमतूर जिल्हा आणि सालेम जिल्ह्यांचा काही भाग ).

**सिलोनी महावंशात**—या ग्रंथमते सिलोनचा राजा महिंदु ( पंचम )च्या राज्यकालात केरळ आणि कर्नाटक लोकांनी सिलोनवर अविरत हल्ले केले होते ( महा. ५५ ). येथे तामीळ लोकांना चुकीने 'कर्नाटक' म्हटलेले दिसते.

**शक्तिपीठ**—तंत्रचूडामणिमते येथे सतीचे कर्णद्वय पडले असून, येथील देवीचे नाव जयदुर्गा आणि भैरवाचे नाव अभीरु होते.

**बौद्ध धर्मपीठ**—सिद्दापूर ( सिद्धपुर ) येथील अशोकाच्या आज्ञालेखावरून येथे अशोककाली बौद्ध धर्मप्रसार झाला असावा. सातवाहन राज्यकाली या देशान्तर्गत बनवासी येथे अनेक बौद्ध विहार बांधण्यात आले. कालांतराने वैदिक व जैन धर्मांच्या प्राबल्यामुळे येथील बौद्ध धर्माचा लोप झाला.

शके १०१७ च्या दंबल ताम्रपटमते विक्रमादित्य ( षष्ठ ) राजाच्या लक्ष्मीदेवी नामक राणीच्या राज्यकाली इ. स. ११ व्या शतकात धारवाड जिल्ह्यातील दंबल गावी नवे बौद्धपीठ निर्माण झाले असून, तत्रस्थ सोळा व्यापाऱ्यांनी बुद्धदेवता तारेचे मंदिर आणि एक विहार, तसेच लोक्किगुंडीच्या संगरमय नामक व्यापाऱ्याने तारेचे अन्य एक मंदिर बांधले होते.

**युद्धकर्तृत्व**—अल्बेरुणीच्या मते ( इ. स. १० वे शतक ) कर्णाट सैनिक साऱ्या भारतात सुविख्यात असून, मगध देशातील पाल राजांच्या सैन्यात ते समाविष्ट होते. स. १०८० मध्ये विजयसेन व नान्यदेव या कर्नाटकी योद्ध्यांनी रामपाल राजापासून बंगाल व तिर्हुत प्रदेश जिंकून तेथे स्वतंत्र राज्य स्थापिले ( जयचंद्र, पृ. ३२१ ).

देवपर शिलालेखमते कर्नाटकनिवासी सेन राजांच्या पूर्वजांनी बंगालमध्ये स्वतंत्र राज्य स्थापिले ( एपि. इंडि. १.३०५–३१५ ). इ. स. १०–११ व्या शतकात चोल

राजांच्या आक्रमक सेनेसमवेत हे लोक सर्वप्रथम मगध, अंग, वंग, आणि राढ देशांस गेले असावेत ( पांडे, विहार. पृ. ५१ ).

**शिलालेख साहित्यात**—कदंब राजा शांतिवर्मन्च्या स. ४५० च्या शिलालेखमते हा राजा समस्त कर्नाट देशाचा अधिपती होता ( एपि. कर्ना. ६.१६२ ). सोळंकी राजा कुमारपालाच्या वि. सं. १२१८ च्या जोधपुर शिलालेखात, तसेच होयसाळ राजा बल्लाळ ( प्रथम ) च्या स. ११०१ च्या शिलालेखात यास अनुक्रमे ' कर्नाट ' आणि ' आल्वकेड ' म्हटले आहे ( पूना. ओरि. १.२.५०; एपि. कर्ना. ५.१९९ ). शिलाहार राजा भोजच्या शके ११०४ च्या कोल्हापुर शिलालेखमते महाराष्ट्रातील सहवासी ब्राह्मण या देशात स्थायिक झाले होते ( एपि. इंडि. २९.१४ ). स. १५४५ च्या शिलालेखमते विजयनगरच्या सदाशिवरायाचा अलिय नामक जामात येथे राज्य करीत असे. ( एपि. कर्ना. ४५८ ). त्रिभुवन महादेवीच्या धेंकनल ताम्रपटमते येथे नागवंशीय सिंद लोक निवास करीत असत ( एपि. इंडि. २९.२२१ ).

**शैव पंथ**—अब्बलूर शिलालेखमते बसवेश्वराहून दोन शतके उत्तरकालीन वीरगोग्गिदेव आणि विरूपरस नामक शैव आचार्यांनी उत्तर कर्नाटकात शैव पंथाचा प्रचार केला होता ( एपि. इंडि. २९.१४४ ).

**कर्नाटक चक्रवर्ती**—विजयनगर सम्राटांना उद्देशून प्रयुक्त केली जाणारी ' कर्नाटक चक्रवर्ती ' ही उपाधी त्या साम्राज्याच्या विनाशानंतर ( इ. स. १७ वे शतक ) मदुरा येथील नायक राजांना लावण्यात येऊ लागली. त्यावरून उत्तरकालात ते या देशाचे राजे बनले असावेत ( म्हैसूर. अर्कि. रिपोर्ट. स. १९१२; पृ. ५७ ).

स. १६९२ मध्ये औरंगजेबाचा झुल्फिकारखान नामक सुभेदार स्वतःस कर्नाटकचा अथवा अर्काटचा नबाब म्हणवू लागला. स. १८१९ मध्ये इंग्रजांनी हा देश जिंकला ( सेवेल, इन्स्कि. पृ. ३२६ ).

**कर्नाटकुण्डि विषय** ( देशविभाग )—शिलालेख साहित्यमते कुन्तल देशान्तर्गत ' कुंडि ' देशविभागाचे नामांतर ( बर्जेस्, केव्ह टेंपल्स. पृ. १०२; कुंडि पहा ).

**कर्नाल** ( शिलालेखस्थान )—उत्तर प्रदेशान्तर्गत कर्नाल खरोष्ट्री शिलालेखाचे यमुना नदीपासून ७ मैलांवरील त्या नदीच्या शुष्क पात्राकाठचे उपलब्धिस्थान ( अक्षांश २९°–४१′ उत्तर; रेखांश–७६° पूर्व ). वायव्य भारताबाहेरील दुर्मिळ खरोष्ट्री शिलालेखस्थानांमध्ये याची गणना होते.

येथील तीन ओळींच्या शिलालेखात ( १$\frac{1}{4}$″ × ५$\frac{1}{2}$″ ) कुशकवि नामक व्यक्तीने येथील बौद्ध वाटिकेत ( अरम = आराम ) पुष्करिणी बांधल्याचा निर्देश असून, शिलालेखाचा हा दगड सध्या लाहोर म्युझियममध्ये आहे ( कार्पस्. इन्स्कि. २.१.२.१७९ ).

**कर्नाली** ( तीर्थ )—पश्चिम भारतातील चाणोदपासून १ मैलावरील ओर–नर्मदा संगमानजिकचे एक तीर्थ. नामांतर–' पश्चिम प्रयाग '; ' सोमेश्वर तीर्थ '. येथील चंद्रतपस्यास्थानी सध्या सोमनाथ मंदिर बांधले असून, नजिकच कुबेर आणि अग्नि तपस्यास्थानी बांधलेली ' कुबेरेश्वर ' आणि ' पावकेश्वर ' मंदिरे आहेत ( ती. पृ. ४३४ ).

**कर्नूल** ( मंदिरस्थान )—काकतीय राजा रुद्र ( प्रथम ) च्या स. ११८५ च्या, तसेच यादव राजा सिंघणाच्या स. १२१५ च्या शिलालेखमते दक्षिण भारतातील कोंडपल्लेनजिकचे एक हिंदु देवमंदिरस्थान ( रंगाचारी, २. कर्नूल. २३१; ३६५ ). चालुक्य राजा विक्रमादित्य ( प्रथम ) चे स. ६५४–६६३ च्या दरम्यानचे अनेक शिलालेख या गावी सापडले आहेत ( इंडि. अँटि. ११.६७; जे. बी. बी. आर. ए. एस्. १६.२३८ ).

**कर्पट** ( ग्राम )—धर्मारण्यातील एक ग्राम ( स्कन्द. ब्राह्म. ध. ३५.३९ )

२. ( देश ) युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या पश्चिम दिग्विजयात नकुलाने जिंकलेला पश्चिम भारतातील एक देश ( म. स. २९.६ ). गुजरातमधील कपडवंजच्या परिसरातील प्रदेश हाच असावा. नामांतर ( महाभारत )–' पंचकर्पट; ' ( शिलालेख साहित्य )–' कर्पटवाणिज्य '. याच्या 'पंचकर्पट' नामांतरावरून पाच लोकसमूह मिळून हा बनला असावा ( जसे–दशार्ण ).

**पौराणिक साहित्यात**—' कपडवाणक—कपडवणज ' देशासमवेत याचा निर्देश आढळतो ( स्कन्द. ब्राह्म. ध. ३५.३९ ).

**शिलालेख साहित्यात**—स. ८६७ च्या कपडवंज दानपत्रमते या देशात ( कर्पट वाणिज्य ) ८४ ग्रामे असून ( एपि. इंडि. १.५५ ), गुजरातमधील व्यापारी हमरस्त्यावरील हे एक प्रमुख गाव होते ( अळतेकर, गुजरात. पृ. १७ ).

**कर्पट–कपडवाणक–कपडवणज** ( ग्राम )—धर्मारण्यातील एक ग्राम ( स्कन्द. ब्राह्म. ध. ३९.१२३ ).

**कर्पटवाणिज्य** (देश)—शिलालेख साहित्यमते पश्चिम भारतातील 'कर्पट' देशाचे नामांतर (कर्पट २. पहा).

**कपिसय** (देश)—मध्य आशियातील 'कपिशा' (आधु. काफिरीस्तान) देशाचे संस्कृतभाषीय नामांतर (वॉटर्स, १.१२४; कपिशा पहा).

**कर्पूरद्वीप** (द्वीप)—बृहत्कथामते कापरासाठी सुविख्यात असणारे एक बृहद्भारतीय द्वीप. इंडोनेशिया द्वीपसमूहान्तर्गत आधु. जावा आदि बेटांपैकी हे एक असावे. या देशातील कर्पूरसंभव नगरातील कर्पूरकन्या कर्पुरिकेच्या प्राप्त्यर्थ कौशांबीनरेश नरवाहनदत्त कांचीनिवासी राज्यधर नामक मित्रासमवेत येथें आला होता (फडके, नवभारत. २२.६.२६).

**कर्पूरिन** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू. ४.२.७७).

**कर्प्पूर** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू. ४.२.८०.५).

**कर्मकोटि** (तीर्थ)—प्रभासक्षेत्रातील एक तीर्थ (स्कन्द. प्रभास. प्र. १८९).

**कर्मदा** (नदी)—पद्ममते एक पवित्र नदी (पद्म. आदि. ३८.३२).

**कर्मधारा** (तीर्थ)—हिमालय पर्वतान्तर्गत बदरीनाथ येथील गंगा नदीकाठच्या वराहशिलेनजिकचे एक तीर्थ (ती. पृ. ५९).

**कर्मन्** (देश)—इराणी साहित्यमते वायव्य भारतातील 'कुरुमीन' देशाचे नामांतर (मॅक्रिंडल, अलेक्झांडर. पृ. १८७; कुरुमीन पहा).

**कर्मनायक** (देश)—कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या दक्षिण भागातील एक देश (मार्क. ५५.२६).

**कर्मनाशा** (नदी)— पौराणिक साहित्यमते पूर्व भारतातील एक विंध्य पर्वतोद्भवा नदी (वायु. ८८.११३). विंध्य पर्वतान्तर्गत कैमुर पर्वतात उगम पावून बिहार प्रांताच्या पश्चिम सरहद्दीवरून वाहणारी, आणि आरा जिल्ह्यातील चौस गावानजिक शोण नदीस मिळणारी आधु. करमनासा नदी हीच होय. स्थानिक आख्यायिकामते दशशीषनाथ नामक शिवलिंगस्थानी शोण नदीस मिळणारी कोईल नदी हीच होय (ती. पृ. १५८).

**नामांतरे**— प्राचीन साहित्यात या नदीची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. मार्कंडेय पुराण (५७) | कर्मोदा |
| २. अरियन (इंडिका. ४; मॅक्रिंडल, पृ. १९१; कनिंग., आर्कि. सर्व्हे. १.१) | कोम्मेनसेस |
| ३. वराह पुराण (८५) | कारतोया |

उपरोक्त नामांतरांपैकी 'कारतोया' ही उत्तर बंगालमधील दक्षिणवाहिनी स्वतंत्र नदी आहे.

**नामव्युत्पत्ती**—वायुमते 'पुण्यवंताचे पुण्य नष्ट करणारी' अशा अर्थाने हिला हे नाव प्राप्त झाले. देवांनी स्वर्लोकाहून खाली ढकलल्या विश्वामित्रकृपाप्राप्त त्रिशंकूच्या मुखरसातून हिची उत्पत्ती झाल्याने ती अपवित्र मानली जात असे (वायु. ८८.१७३). करमनासा– शोण संगमानजिकच्या आधु. ऊली गावी विश्वामित्र ऋषींचा आश्रम होता.

**शापित नदी**—स्थानिक आख्यायिकामते हाती शिवलिंग धारण केलेल्या रावणाच्या लघुशंकेतून ही उत्पन्न झाली. त्यामुळे आजहि ही शापित आणि पुण्यघ्न नदी मानली जाते.

**कर्मनाशिनी** (नदी)— हरिद्वारमाहात्म्यमते एक नदी (पद्म. उत्तर. २३.४). ही संभवतः हरिद्वारक्षेत्राबाहेरील नदी असावी.

**कर्मनीय** (देश)— इराणी साहित्यमते वायव्य भारतातील 'कुरुमीन' देशाचे नामांतर (मॅक्रिंडल, अलेक्झांडर. पृ. १८७; कुरुमीन पहा).

**कर्मभूमी** (तीर्थ)— गौतमी (गोदावरी) नदीकाठचे एक तीर्थ (ब्रह्म. १६१.२३).

**कर्ममार्ग** (देश)—उदीच्य भारतातील एक देश (वामन. १३.४३).

**कर्मराष्ट्र** (राज्यविभाग)— पूर्व चालुक्य राजा विष्णुवर्धन (द्वितीय) च्या स. ६६४ च्या ताम्रपटमते दक्षिणापथ देशान्तर्गत एक राज्यविभाग. उत्तर नेल्लोर व दक्षिण गुंतूर यांच्या दरम्यानचे आधु. ओंगोले आणि बप्तल तालुके हेच होत (एपि. इंडि. २९.९४; इंडि. अँटि. २०.१०६).

**कर्माना** (देश)— डॅरियसच्या सुसा राजवाडा शिलालेखमते वायव्य भारतातील 'कुरुमीन' देशाचे नामांतर (सरकार, शिलालेख. पृ. ४; कुरुमीन पहा).

**कर्मान्त** ( नगर )— देवखड्ग राजाच्या अश्रफपुर शिलालेखमते (इ. स. ७ वे शतक) पूर्व भारतातील समतट देशाच्या राजधानीचे नगर ( एपि. इंडि. १७.३५३ ). डॉ. भट्टसाली यांच्या मते तिप्पेरा जिल्ह्यातील कोमिल्ल गावाच्या १२ मैल पश्चिमेकडील आधु. बड्-काम्ता गाव हेच असावे ( जे. ए. एस्. बी.; स. १९१४; पृ. ८५; समतट पहा ).

**कर्मावरोहण** ( तीर्थ )—मथुरा येथील एक तीर्थ ( वराह. तीर्थविवेचन. पृ. १९० ).

**कर्मासधर्म** ( ग्राम )—बौद्ध साहित्यमते कुरु देशातील एक बुद्ध चरणस्पर्शपुनीत ग्राम ( अङ्गुत्तर. ५. २९-३० ).

**कर्मेश्वर** ( लिंग )—श्रीपर्वतावरील एक शिवलिंग ( लिङ्ग. १.९२.१५२ ).

**कर्मोदा** ( नदी )—विंध्य पर्वतोद्भवा 'कर्मनाशा' नदीचे नामांतर ( मार्कं. ५७; कर्मनाशा पहा ).

**कर्वटाशन** ( पर्वत )—मार्कंडेयमते भारतवर्षातील एक पर्वत ( मार्कं. ५५.११ ). याचे आधु. स्थान समजत नाही ( रॉयचौधरी, अँटि. पृ. १२० ).

**कर्वाट** ( लोकसमूह )—बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या पूर्व भागातील एक देश ( बृ. सं. १४.५; १६.१३ ). युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या पूर्व दिग्विजयात भीमाने ताम्रलिप्ती आणि सुह्म देशांसमवेत हा जिंकला होता ( म. स. २७.२२ ).

डॉ. रॉयचौधरी यांच्या मते पश्चिम बंगालमधील आधु. खवीर लोक हेच असावेत ( डी. यू. बी. एच्. पृ. ९ ). अन्य अभ्यासकांच्या मते हे ताम्रलिप्तीप्रमाणेच सुह्म ( आधु. हौरा आणि मिदनापूर जिल्हे ) देशातील एक नगर आणि जैन तीर्थस्थान असावे ( आय्. एच्. क्यू. ८.५२९–५३० ).

**कर्सनपुरी** ( नाग-तपस्यास्थान )—पश्चिम भारतातील गौघाटपासून ३ मैलांवरील नर्मदा नदीकाठचे एक नाग-तपस्यास्थान. हे संभवतः 'सर्पपुरी'चे अपभ्रष्टरूप असून, येथे सध्या नागेश्वर नामक शिवमंदिर आहे ( ती. पृ. ४३३ ).

**कल** ( देश )—कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या नैर्ऋत्य भागातील एक देश ( मार्कं. ५५.३१ ).

२. कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या अपरान्त भागातील एक देश ( मार्कं. ५५.३६ ).

३. जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक देश ( वायु. ४४.१५ ). अली यांच्या मते मध्य आशियातील आधु. रहत कल प्रदेश हाच होय.

**कलकलेश** ( लिंग )—अवंती येथील एक शिवलिंग ( नारद. उत्तर. ७८.७ ).

**कलकलेश्वर** (लिंग)—प्रभासक्षेत्रातील एक शिवलिंग. पूर्वकालीन नामांतरे—१. कृतयुग—कामेश्वर; २. त्रेतायुग—पुलहेश्वर; ३. द्वापरयुग—नारदेश्वर (स्कन्द. प्रभास. प्र. ७५).

२. अवंती येथील एक शिवलिंग ( स्कन्द. आवन्त्य अ. ८–९ ). आजहि उज्जयिनी येथे हे दाखवितात ( ती. पृ. १२६ ).

३. पश्चिम भारतातील नर्मदा नदीकाठचे नर्मदा रेल्वे-स्थानकानजिकचे एक शिवलिंग. नामांतर— 'जवरेश्वर' ( ती. पृ. ४३७ ).

**कलकूट** ( देश )— पाणिनीची अष्टाध्यायी आणि गणपाठमते भारतवर्षातील एक जनपद ( पा. सू. ४.१.१७३; ४.२.११० ). युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या उत्तर दिग्विजयात अर्जुनाने हे जिंकले होते ( म. स. २३–२५ ).

अग्रवाल यांच्या मते उत्तर प्रदेशातील तमसा-यमुना दुआबातील आधु. डेहराडून—कालसी प्रदेश हाच होय. चौधरी यांच्या मते उत्तर प्रदेशातील काली नदीकाठच्या आधु. मुजफ्फरनगर दुर्गस्थानाच्या ( = प्राचीन काल्कूट नगर ) परिसरातील पूर्वेस गंगा नदी आणि दक्षिणेस मीरत यांच्या दरम्यानचा गंगा नदीच्या दुआबाचा प्रदेश ( = आधु. मुजफ्फरनगर, मीरत, बुलंद शहर, अलीगढ प्रदेश ) यामध्ये समाविष्ट असे.

**नामांतर**—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतातः—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. अथर्ववेद ( ४.९.१० ) | यामुन |
| २. महाभारत ( स. २०.२४ ) | कालकूट |
| ३. बृहत्संहिता ( १४.४ ) | कालकोटि |
| ४. मार्कंडेय पुराण ( ५८.६ ) | काल—कोटिस |

**नामव्युत्पत्ती**—अग्रवाल यांच्या मते हिमालय पर्वतान्तर्गत यामुन प्रदेशातील 'यामुन संज्ञक कृष्णांजनाचा पर्वतीय देश' अशा अर्थाने यास हे ( शब्दशः अर्थ—काळा पहाड ) नाव प्राप्त झाले. चौधरी यांच्या मते

'काली नदीकाठचा प्रदेश' अशा अर्थाने आधु. मुजफ्फर-नगर प्रदेशास 'कालकूट' (कृष्णकूट = कृष्णदुर्ग) नाव प्राप्त झाले.

**अथर्ववेदात**—या ग्रंथात हिमालयोत्पन्न 'यामुन' नामक अंजनाचा निर्देश असून (अ. वे. ४.९.१०), अग्रवाल यांच्या मते तेथे यमुनेच्या उगमानजिकच्या या देशाचा निर्देश अभिप्रेत असावा.

**महाभारतात**—या ग्रंथमते हे कुलिंद देशान्तर्गत जनपद कुरु आणि कुरुजांगल देशांच्या पश्चिमेस असून (म. स. १८.२६; २६.३–४), हस्तिनापुरहून जरासंध-वधार्थ निघालेले अर्जुन, कृष्ण आणि भीम निम्नलिखित मार्गाने मगध देशास गेले होतेः–कुरुदेश → (पश्चिमेस) कुरुजांगल (आधु. रोहटक–हिस्सार) → (उत्तरेस) कुरुक्षेत्र → पद्मसर → कालकूट जनपद → (तराईमार्गे आग्नेयेस) शरयू–गंडक नद्या → मिथिला → (दक्षिणेस) गंगा नदी → गोरथगिरि → राजगृह (मगधराजधानी) (म. स. २०.२४–३०). युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञ-समयीच्या दिग्विजयसत्रात अर्जुनाने आनर्त आणि कुणिंद देशांसमवेत हा जिंकला होता (म. स. २३.१४). कुरु-मगध मार्गावरील या पर्वतीय स्थानी (म. स. १८.२६) भारतीय युद्धसमयी दुर्योधनसेनेचे शिबिर होते (म. उ. १९.३०).

**नगर**—महाभारतमते कुरु देश, अहिच्छत्र नगर आणि गंगा नदीसमीपच्या या (कालकूट) नगराच्या परिसरात निम्नलिखित नगरे होतीः— १. वारण (आधु. बुलंद शहर); २. वाटधान; ३. यामुन (म. उ. १९.३०; चौधरी, पृ. ५३–५४).

**कलचुरि** (लोकसमूह व साम्राज्य)—या राजघराण्याचे इ. स. ७–१२ व्या शतकात मध्यप्रदेशाच्या विभिन्न भागात राज्य असून, कालानुक्रमे त्यांच्या निम्नलिखित तीन प्रमुख शाखा होत्याः—

**(१) कल्याणी शाखा** (स. ६२५–११८४)—यांचे राज्य कल्याणी नगराच्या परिसरात होते.

**(२) त्रिपुरी शाखा** (स. ८५०–११९८)—यांचे राज्य त्रिपुरी नगराच्या परिसरात होते.

**(३) रतनपुर शाखा** (स. ११२४–११९०)—यांच्या राज्यात निम्नलिखित राज्यविभाग समाविष्ट होतेः— **१. अनर्घवल्ली**—(बिलासपुर जिल्ह्यातील आधु. जांजगिर तालुका); **२. अपर** (बिलासपुर जिल्ह्यातील आधु. वसई गावासभोवतालचा प्रदेश); **३. एवडी** (बिलासपुर जिल्ह्यातील आधु. पंडरी गावासभोवतालचा प्रदेश); **४. कोमो** (बिलासपुर जिल्ह्यातील आधु. कोमो गावा-सभोवतालचा प्रदेश); **५. खिमिडी** (ओरिसामधील गंजम जिल्ह्यातील आधु. खिमिडी गावासभोवतालचा प्रदेश); **६. तलहारि** (बिलासपुर तालुक्याचा दक्षिण आणि रायचूर जिल्ह्याचा उत्तर भाग); **७. मध्यप्रदेश** (बिलासपुर जिल्ह्याचा आग्नेय भाग) (सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २८६).

**कलच्छल** (शिलालेखस्थान)—ईश्वरदत्त राजाच्या इ. स. ४ थ्या शतकातील ताम्रपटाचे राजस्थानमधील छोटा उदेपूरपासून १० मैल पश्चिमेकडील उपलब्धिस्थान (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.६०३).

**कलञ्जराद्रि** (दुर्गनगर)—खजुराहो शिलालेखमते मध्य भारतातील 'कालंजर' नगराचे नामांतर (एपि. इंडि. ३१.३११; कालंजर पहा).

**कलतोयद** (देश)—पौराणिक साहित्यमते उदीच्य देशान्तर्गत 'कालतोयक' जनपदाचे नामांतर (वामन. १३.३७; कालतोयक पहा).

**कलन्दकग्राम** (ग्राम)—बौद्ध साहित्यमते वैशाली नगरानजिकचे सुदिन्न नामक बौद्ध भिक्षूचे जन्मग्राम (विनय. ३.११). 'कलंदक गावी जन्मलेला' अशा अर्थाने सुदिन्नास 'कलंदकपुत्त' उपाधी प्राप्त झाली होती (सामन्त. १.२०२).

**नामव्युत्पत्ती**—बुद्धघोषमते 'खारींचे गाव' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले होते (सामन्त. १.२०२).

**बौद्ध साहित्यात**—विनयमते बौद्ध धर्मीयांच्या 'पाराजिका' संज्ञक नियमाचा भंग करून सुदिन्न पुन्हा एकवार या गावी गृहस्थाश्रमी बनला. बीजक नामक एक पुत्रहि त्यास येथे झाला (विनय. ३.११–३१; सामन्त. १.२१५).

**कलन्दकवाप** (वाटिका)—राजगृह येथील वेळुवन संज्ञक वनातील एक वाटिका (मिश्रा, वैशाली. पृ. १८३).

**कलम्बेश्वर** (लिंग)—प्रभासक्षेत्रातील एक शिवलिंग (नारद. उत्तर. ७०.६५).

**कलले** (ग्राम)—म्हैसूरच्या कृष्णराज (तृतीय) राजाच्या स. १७५८ च्या शिलालेखमते म्हैसूर प्रांतातील एक दुर्गग्राम (एपि. कर्ना. ४.२६७).

**कलविङ्क** (तीर्थ)—महाभारत अंगिरस्- यात्रामते एक तीर्थ (म. अनु. २५.४३).

**कलश** (तीर्थ)—गंगा नदीकाठचे एक तीर्थ (नारद. उत्तर. ४१.४४).

**कलशनाडु** (देशविभाग)—वीरदेव राजाच्या स.

१२४७ च्या शिलालेखमते वायव्य म्हैसूरातील एक नगर आणि देशविभाग. काडूर जिल्ह्यातील मुडिगेरे तालुक्यातील आधु. कलश गाव हेच होय ( एपि. कर्ना. ८.१२७; १२९ ).

मंदिरस्थान—विजयनगरच्या बुक्क (प्रथम) पुत्र विरूपन्नाने स. १३७० मध्ये या देशातील एका देवालयास देणगी दिली असून ( एपि. कर्ना. ६.५२ ), या देशाच्या वीर पांड्य नामक राजाने स. १४३१ मध्ये द. कर्नाटकातील कार्कल गावी गोमतेश्वराची जैनमूर्ती स्थापिली होती ( एपि. इंडि. ७.१०९; कार्कल पहा ).

राजकीय इतिहास— शिलालेख साहित्यमते या देशावर निम्नलिखित राजवंशांचे राज्य होते :– १. सांतर राजवंश ( स. ११५४–१२९२ ); २. जीनदत्त राजवंश ( स. १४३१-१४५७ ); ३. भयिरस राजवंश ( स. १४९३–१६०९; सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३५६–३५७ ).

**कलशपोत** (ग्राम)—नारायणपाल राजाच्या भागलपुर ताम्रपटमते त्याने सहस्रस्तंभीय ( सहस्रायतन ) शिवमंदिर बांधलेले बिहारमधील एक ग्राम ( इंडि. अँटि. १५.३०९; एपि. इंडि. २९.२ ).

**कलशेश्वर** ( लिंग )—काशी येथील एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ९७.१९९; पद्म. आदि. ३७.७; लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. ९९ ).

२. हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत धरा नदीकाठचे एक शिवलिंग ( स्कन्द. नागर. ४९; ५१ ).

३. वाराणसी येथील ' कालकेश्वर ' शिवलिंगाचे नामांतर ( कूर्म. पूर्व. ३५.७; कालकेश्वर पहा ).

**कलशोदधि** ( समुद्र )— मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते पृथ्वीच्या सप्तसमुद्रांपैकी ' क्षीरोद ' समुद्राचे नामांतर ( वैजयन्ती. ३६.११; क्षीरोद पहा ).

**कलश्या** ( देवीस्थान )— महाभारतमते कुरुक्षेत्रातील ' कलसी ' देवीस्थानाचे नामांतर ( म. आर. ८१.६६; कलसी २. पहा ).

**कलसङ्ग** ( शिलालेखस्थान )—स. १६ च्या खरोष्ट्री शिलालेखाचे वायव्य भारतातील युसुफझाई देशानजिकच्या खुदुखेल प्रदेशातील महाबन पर्वतश्रेणीमधील पर्वतीय उपलब्धिस्थान. चेरोरई गावानजिक सापडलेल्या या शिलालेखात ( १$\frac{3}{4}$" × ६$\frac{3}{4}$" ) पिपलखा नामक सन्मित्र संघाने शक संवत् १०० मध्ये पक्क्या भिंतीची एक विहीर देणगी दिल्याचा निर्देश आढळतो. या शिलालेखाचा दगड सध्या लाहोर म्युझियममध्ये आहे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१. २.५४ ).

**कलसी** ( तीर्थ )—पद्ममते एक तीर्थ ( पद्म. आदि. २६.७५ ).

२. ( देवीस्थान ) कुरुक्षेत्रातील एक देवीस्थान ( नारद. उत्तर. ६५.६३; वामन. ३६.१८–१९ ). नामांतर– ' कलश्या ' ( म. आर. ८१.६६ ).

**कलसीग्राम** ( ग्राम )— बौद्ध साहित्यमते अलसंद ( अलेक्झांड्रिया ) बेटातील मिलिंद ( मेनँडर ) नामक कुशाण राजाचे जन्मग्राम ( मिलिन्द. पृ.८३ ).

**कलस्वना** ( नदी )—सह्य पर्वतोद्भवा एक नदी ( वामन. १३.३१ ).

**कलहक** ( ग्राम )— हरिश्चंद्रवंशीय भोगशक्ति राजाच्या स. ७०९ च्या अंजनेरी ताम्रपटमते जयपुर येथील भोगेश्वर मंदिरास दान दिलेले महाराष्ट्रातील एक ग्राम. नाशिक जिल्ह्यातील दिंडोरी तालुक्यातील जयखेडा गावाच्या २ मैल पूर्वेकडील आधु. कळसगाव हेच होय ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.१४९ ).

**कलहनाशन** ( कुंड )—अवंती येथील एक जलकुंड ( स्कन्द. आवन्त्य. अ. ८.८–९ ).

**कलाकुण्ड** ( तीर्थ )—प्रभासक्षेत्रातील एक तीर्थ ( नारद. उत्तर. ७०.७४ ).

**कलादरा** ( शिवस्थान )—गुजरातमधील भडोच–जवळील नर्मदा नदीच्या उत्तर किनाऱ्यावरील एक शिवस्थान. येथे कपालेश्वर शिवमंदिर आहे ( ती. पृ. ४३९ ).

**कलापक** ( तीर्थ )—केदारपासून १०० योजने अंतरावरील एक तीर्थ ( स्कन्द. माहेश्वर. कौ. ६.३३–३४ ).

२. ( राज्यविभाग ) धरसेन ( तृतीय ) राजाच्या स. ६२० च्या ताम्रपटमते, तसेच शिलादित्य ( तृतीय ) राजाच्या स. ६६६ च्या जेसोर ताम्रपटमते सुराष्ट्र ( आधु. दक्षिण काठेवाड ) देशान्तर्गत एक राज्यविभाग ( पथक ). पोरबंदरच्या ६० मैल वायव्येकडील आधु. कालावाड गावाच्या परिसरातील प्रदेश हाच होय ( एपि. इंडि. २१.१८३; २१० ). यावरून मध्ययुगीन काली सुराष्ट्र देशाची पश्चिम सरहद्द पोरबंदरने बनत असावी ( चौधरी, पृ. १५४ ).

**कलापग्राम** ( ग्राम )—पौराणिक साहित्यमते भारतवर्षातील एक पुण्यग्राम. कलियुगान्ती पृथ्वीतील समस्त क्षत्रियकुले आणि वर्णाश्रम नष्ट झाल्यानंतर योगसामर्थ्य-जीवित देवापि आर्ष्टिषेण ऋषी, तसेच पौरव, मरु आणि ऐक्ष्वाक राजे कृतयुगारंभी या गावी क्षत्रियकुल आणि वर्णाश्रमाची पुनःस्थापना करणार आहेत (भा. ९.२२.१७–१८;

१२.२.३७–३८; विष्णु. ४.२०.७–९; वायु. ९९.४३८; मत्स्य. २७३.५६–५८; ब्रह्माण्ड. ३.७४.२५१ ). स्कंद पुराणात सुतनु ब्राह्मणाच्या संदर्भात हीच आख्यायिका दिली आहे ( स्कन्द. माहेश्वर. कौ. २.६ ). नामांतर–' कलाप– ग्रामक ' ( ब्रह्माण्ड. १८.५० ).

**भौगोलिक स्थान**—पौराणिक साहित्यमते हे बदरी-नजिक ( वायु. ९१.७; ९९.४३७; भा. १०.८७.७ ), गंगा नदीच्या पश्चिम किनाऱ्यावर आहे (ब्रह्माण्ड. १८.५०; मत्स्य. १२१.४९; वायु. ४७.४७ ). या क्षेत्रान्तर्गत माणाग्राम येथे व्यास गुफा आणि मुचकुंद गुफा आजहि दाखवितात ( ती. पृ. ६० ).

**२.** जंबूद्वीपातील कैलास पर्वतानजिकचे एक ग्राम ( वायु. ४१.४३ ).

**३.** ( ब्रह्मदेवस्थान ) पद्ममते एक ब्रह्मदेवस्थान. येथील ब्रह्मदेवाचे नाव वेधस होते ( पद्म. आदि. २९.१०५ ).

**कलापवन** ( तीर्थ )—पद्ममते एक तीर्थ ( पद्म. आदि. २८.३ ).

**कलाह** ( बंदर )—अरबी साहित्यमते मलाया द्वीप-कल्पातील ' केदह ' बंदराचे नामांतर ( केदह पहा ).

**कलि** ( तीर्थ )—काशी येथील कलशेश्वरानजिकचे एक तीर्थ ( स्कन्द. काशी. ८४.७५ ).

**कलिअण** ( नगर )— गौतमीपुत्र सातकर्णीकालीन कान्हेरी शिलालेख क्र. ५ मते पश्चिम समुद्रकिनारीच्या अपरांत ( आधु. कोकणपट्टी ) देशातील एक व्यापारी बंदर. येथील अंबालिका विहारामध्ये स्वागतगृह ( उपस्थान-शाला ) आणि छोट्या गुफा कोरल्याचा निर्देश या शिलालेखात आढळतो ( ल्यूडर्स सूची. क्र. ९८८ ). मुंबईनजिकचे आधु. कल्याण गाव हेच होय. नामांतर ( जुन्नर शिलालेख )– ' कलिआन ' ( ल्यूडर्स सूची. क्र. ११७७; ११७९ ).

**शिलालेख साहित्यात**— कान्हेरी गुफालेख क्र. २४ मते अपरांतसम्राट भोजकाच्या दामिला नामक कलिअण-निवासी सम्राज्ञीने ते लेणे खोदले होते ( आर्कि. सर्व्हे. वे. इं. ५.८४ ). जुन्नर शिलालेखमते कल्याणनिवासी ( कलिआनक ) संबक नामक सोनाराने आणि सुलसदत्त नामक नागरिकाने तेथील बौद्ध मठास एक पुष्करिणी ( पोधी ) आणि चैत्यगृह देणगी दिली होती ( ल्यूडर्स सूची. क्र. ११७७; ११७९ )

**स.** १५७० मध्ये पोर्तुगीजांनी हे जाळून टाकले. त्यायोगे क्रुद्ध होऊन विजापुर आणि अहमदनगरचे सुलतान, आणि कालिकतच्या झामोरीनने गोव्यावर संयुक्त आक्रमण केले ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. २५९–२६० ).

**कलिकुण्ड** ( जैनतीर्थ )— जिनप्रभसूरि आणि सुमतिसागरमते अंग ( पूर्व बिहार ) देशातील कलि पर्वत आणि कुंड सरोवरानजिकचे करकुंड राजाने स्थापिलेले एक पार्श्वनाथ मंदिरस्थान. सध्या हे स्थान नष्ट झाले आहे. नामांतर( हर्ष )– ' करकुंड ' ( ती. सं. पृ. १२६ ).

**कलिङ्ग** ( देश )—महाभारत आणि पौराणिक साहित्य, तसेच अशोकाच्या आज्ञालेख क्र. १३ मते दक्षिणापथ देशान्तर्गत ( सातपुडा, महादेव आणि मैकल पर्वतांच्या दक्षिणेकडील द्वीपकल्पीय प्रदेश ) दख्खन पठार विभागा-तील पूर्व समुद्राकाठचे एक जनपद ( मत्स्य. ११४.३४; ब्रह्म. २७.४१; वामन. १३.३६; कॉर्पस्. इन्स्क्रि. १.२. २२). त्यावरून इ. स. पू. ३ ऱ्या शतकापासून हे देशनाम प्रचलित असून ( इंडि. ॲंटि. २०.२४७ ), त्याच्या अगोदर कितीतरी शतके पूर्व भारतातील एक सामर्थ्यसंपन्न लोकसमूह म्हणून हे सुविख्यात असावेत.

**भौगोलिक स्थान**—अशोकाच्या काळी ओरिसामधील पुरी आणि गंजम जिल्हे मिळून हा बनला असून, त्याच्या ईशान्य आणि नैऋत्य विभागांची राजधानी अनुक्रमे तोसली ( पुरी जिल्ह्यातील भुवनेश्वरनजिकचे आधु. धौलि ) आणि समापा ( गंजम जिल्ह्यातील आधु. जौगड ) गावी होती. चेट कुलोत्पन्न आर्य महामेघवाहनवंशीय कलिंगराज खार-वेलाची ( इ. स. पू. १५५ ) राजधानीहि तोसली गावीच होती (एपि. इंडि. १०.१६०; कॉर्पस्. इन्स्क्रि. १.१.३८).

अली यांच्या मते ओरिसामधील महानदी आणि गोदावरी नद्यांच्या त्रिभुज प्रदेशाच्या दरम्यानची पूर्व समुद्रकिनाऱ्याची ( आधु. बंगालचा उपसागर ) चिंचोळी पट्टी म्हणजे हा देश होय. उत्तरेस ओरिसा आणि दक्षिणेस तामीळनाडु यांच्या दरम्यानचा आधु. उत्तर सरकार प्रदेश हा या देशाचा बालेकिल्ला असून, अश्मक देशाच्या अक्षांशावरील या देशात ओरिसामधील गंजन जिल्ह्यापासून आंध्र प्रदेशातील गोदावरी जिल्ह्यापर्यंतचा प्रदेश समाविष्ट होत असे ( एपि. इंडि. २४.५० ). या दोन जिल्ह्यांच्या सरहद्दीवरील महेंद्र पर्वत ( आधु. पूर्वघाट ) या देशात समाविष्ट असल्याची कल्पना प्राचीन साहित्यात सर्वत्र असून, रघुवंशात कलिंगाधिपतीस ' महेंद्र-गिरि आणि समुद्र यांचा सम्राट ' म्हटले आहे ( रघु. ६. ५३–५४ ). कथासरित्सागरात ( कथा. १.१५० ), इंद्र-वर्मन्च्या चिकाकोल दानपत्रात, तसेच अन्य शिलालेख-

साहित्यात श्रीकाकुलम् प्रदेशातील 'महेंद्रगिरि पर्वता-समोवतालचा प्रदेश' म्हणजे 'कलिंग' हे समीकरण स्वीकृत केले आहे (इंडि. अँटि. १३.१२०–१२३; एपि. इंडि. १९.१३५; २९.३५).

बृहत् कलिंग—दक्षिणेस गोदावरी, उत्तरेस महानदी आणि ईशान्येस वैतरणी नदीकाठचा ओरिसा देशाचा प्रदेशहि 'बृहत् कलिंग'मध्ये समाविष्ट होत असे. उदा. अशोकाच्या राज्यकाली महानदी-खोऱ्यातील तोसली (आधु. धौली) देशात समाविष्ट असून, महाभारतमते या देशाची ईशान्य परिसीमा वैतरणी नदीने बनत असे (म. आर. १३३). यावरून 'बृहत् कलिंग'च्या भौगोलिक परिसीमा पुढीलप्रमाणे असाव्यातः— १. वायव्येस–इंद्रवती नदीची गौलिय नामक शाखानदी; २. उत्तरेस–महानदी; ३. ईशान्येस– वैतरणी नदी; ४. दक्षिणेस– गोदावरी नदी आणि विजगापट्टम् नगर.

बदलत्या सीमारेषा–शिलालेख साहित्यमते इ. स. ५ व्या शतकात या देशाची नैर्ऋत्य सीमा गोदावरी नदीऐवजी कृष्णा नदीपर्यंत विस्तारित झाली. तत्कालीन कलिंगाधिपती राजांची राजधानी पूर्व गोदावरी जिल्ह्यातील पिष्टपुर (आधु. पिठा-पुरम्) गावी असून, महानदीपासून कृष्णा नदीपर्यंतच्या प्रदेशावर त्यांचे अधिराज्य होते (एपि. इंडि. ३०.१४४). यानंतरच्या काळात कृष्णा आणि गोदावरी दुआबात शालंकायन आणि विष्णुकुंडिन् घराण्यांच्या स्वतंत्र वेंगी राज्याची स्थापना झाली. उत्तरकालात (इ. स. ७ वे शतक) पिष्टपुरसम्राट पूर्व चालुक्य राजांनी विशाखापट्टणम्-पासून गुंटूर जिल्ह्यापर्यंतच्या पूर्व समुद्रकिनारीच्या प्रदेशावर अधिराज्य स्थापिले. या काळात वेंगी राज्यान्तर्गत विशाखा-पट्टणम् जिल्ह्यातील येलमंचिली तालुका 'एलमंचि कलिंग' नावाने ओळखला जात असे.

पूर्व गंग राज्यकाली—इ. स. ५ व्या शतकानंतर आंध्र प्रदेशातील श्रीकाकुलम् जिल्ह्यावर 'कलिंगाधिपति' पूर्व गंग राजघराण्याचे (राजधानी कलिंगनगर=आधु. मुखलिंगम्) राज्य होते. मध्ययुगीन काळी पूर्वकालीन कलिंग देशाचा केंद्रस्थानभूत गंजमपुरी–कटक प्रदेश 'कोंगोद', 'तोसली', 'उड्र' आदि विभिन्न नावांनी सुविख्यात झाल्यामुळे श्रीकाकुलम्चा मर्यादित प्रदेश 'कलिंग' नावाने सुविख्यात झाला. इ. स. १२ व्या शतकात पूर्व गंग राजा अनंतवर्मन् चोड गंगने गोदावरी नदीपासून गंगा नदीपर्यंतचा पूर्वकालीन कलिंगचा सारा प्रदेश जिंकला. परंतु या प्रदेशाचे (= उड्र, उत्कल) 'कलिंग' हे पुरातन नाव पुनःस्थापित होण्या-आधीच गंग राजवंशाने आपली राजधानी श्रीकाकुलम्हून कटक जिल्ह्यात हलविल्याने त्या प्रदेशाचे 'उड्र' हेच नाव कायम राहिले. तथापि कामसूत्राच्या यशोधर भाष्यमते (इ. स. १३ वे शतक) कलिंग देश गौड (उत्तर बंगाल) देशाच्या दक्षिणेसच होता (का. सू. ६.६). तेलगुवंशीय पूर्व गंग राजे ओरिसामध्ये स्थायिक झाल्या-नंतरहि त्यांचे विवाहसंबंध, आणि अधिकारीवर्ग तेलगूच होते.

मध्ययुगीन काळी—मध्ययुगीन हैहय राजे स्वतःस 'त्रिकलिंग' (= कलिंग, वारंगळ, अमरावती) चे राजे म्हणवीत असत. कनिंगहॅम यांच्या मते आधु. 'तेलंगण' हे 'त्रिकलिंग' चेच अपभ्रष्ट रूप होय (त्रिकलिंग > त्रिलिंग > तेलिंगन > तैलंगण > तेलंगण).

महाशिवगुप्ताच्या मरंजमूर दानपत्रमते (इ. स. ११ वे शतक) त्याचे काळी ओरिसाचा (महानदी–ऋषिकुल्या खोरे) बहुतांशी भाग 'कोंगोद' (उड्र) नावाने आणि ऋषिकुल्या नदीच्या दक्षिणेकडील आंध्र देशाचा भाग कलिंग नावाने ओळखला जात असे. महानदीच्या उत्तरे-कडील प्रदेशास उत्कल म्हणत असत (जे. बी. ओ. आर. एस्. २.४५).

इ. स. १५ व्या शतकातील ओरिसाच्या गजपतिवंशीय राजांच्या शिलालेख साहित्यमते त्यांचे आधिपत्याखालील महानदीपासून कृष्णा नदीपर्यंतच्या प्रदेश 'कलिंग' नावाने ओळखला जात असे (एपि. इंडि. ३०.११४). कृष्णा नदीच्या दक्षिणकडील त्यांचा प्रदेश विजयनगरच्या राजांनी जिंकून घेतला.

उत्कल आणि कलिंग यांची वांशिक एकात्मता—कलिंग देशाच्या उत्तर सरहद्दीप्रमाणेच ईशान्य सर-हद्दहि महानदीनेच बनत असून, तिच्या उत्तरेस दक्षिण कोशलचा पूर्व भाग (महानदी खोऱ्यातील आधु. पटना–सोनपुर प्रदेश), आणि ईशान्येस उत्कल देश (ओरिसा-मधील पूर्व समुद्रवर्ती पुरी आणि बलासोर जिल्हे) होता. त्यापैकी उत्कल आणि कलिंग हे वांशिक दृष्ट्या एकात्म असून, उत्कलचा महानदीच्या ईशान्यवर्ती भाग कधीकधी कलिंगमध्ये समाविष्ट होत असे. कलिंग देश कटक जिल्ह्याच्या पूर्व सरहद्दीवरील वैतरणी नदीपर्यंत असल्याचा महाभारतातील निर्देश याच संदर्भात असून, रघुवंशकाली कलिंग आणि वंग यांच्या दरम्यानचा उत्कल देश (रघु. ४.३८) महाभारतकाली कलिंग देशात समाविष्ट असावा.

**प्लिनीच्या ग्रंथात**—या ग्रंथमते गंगारिदै लोक कलिंग-देशीय असून, त्यावरून त्याचे काली कलिंग देशाची उत्तर परिसीमा गंगा नदीपर्यंत विस्तारली असावी. सरकार यांच्या मते येथे गंगा नदीच्या त्रिभुज प्रदेशनिवासी वंग लोकांचा निर्देश अभिप्रेत असून, त्याची पश्चिम सरहद्द कपिशा ( मिदनापुर जिल्ह्यातील आधु. कशाइ ) नदीने बनली होती. यावरून प्लिनीच्या काळी कलिंगाची ईशान्य सरहद्द वंग देशास भिडली असून, तत्कालीन उत्कल देश ( ओरिसा-मधील आधु. बलासोर आणि कटक, तसेच पश्चिम बंगाल-मधील मिदनापुर जिल्हे) या देशामध्येच समाविष्ट असावा.

**मेकल पर्वताचे साहचर्य**—प्लिनीच्या ग्रंथातील कलिंग देशाच्या ' कलिंगे ' आणि ' मक्को–कलिंगे ' नामक दोन उपविभागांपैकी ' मक्को–कलिंगे ' म्हणजे मेकल पर्वताचा भाग असावा. पौराणिक साहित्यात कलिंग आणि मेकल पर्वतांचे साहचर्य पुनःपुन्हा वर्णिले असून, महाभारत आणि पौराणिक साहित्यमते अमरकंटक पर्वत कलिंगच्या पश्चिम सरहद्दीवर होता ( म. आर. ११४; कूर्म. उत्तर. ३९.९; मत्स्य. १८४.१२; स्कन्द. आवन्त्य. रेवा. २१.७ ). मत्स्यमते अमरकंटक पर्वतावरील जलेश्वर तीर्थहि याच देशात होते ( मत्स्य. १८६. १५–३८; १८७.३–५२ ). यावरून कलिंगाची सरहद्द कधी कधी कोशल देशात घुसली असावी.

कलिंगच्या राजकीय परिसीमा इतिहासाच्या विभिन्न काळात अशा तऱ्हेने बदलल्या असल्या तरी भौगोलिक ओरिसामधील महानदी--गोदावरी त्रिभुज प्रदेशातील पूर्व समुद्रकिनारीचा प्रदेश ही त्याची भौगोलिक सीमा सदैव अबाधित राहिली. महाभारत आणि पौराणिक साहित्यातील कलिंग लोकसमूहाची आद्य जन्मभूमीहि हीच होती.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा ).

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**—शिलालेख साहित्यमते इ. स. पू. ३ - इ. स. ५ व्या शतकापर्यंत या देशावर निम्न-लिखित राजवंशांची राज्ये होती:—

**( १ ) मौर्य साम्राज्य**—अशोकाच्या कलिंग आज्ञालेख क्र. १ मते त्याच्या राजप्रतिनिधित्वकाली या देशाची प्रांतिक राजधानी ' तोसली ' ( समापा ) गावी असून, आज्ञालेख क्र. १३ मते आपल्या राज्यकालाच्या आठव्या वर्षी ( इ. स. पू. २५० ) त्याने हा देश जिंकला होता ( कॉर्पस्. इन्स्क्रि. १.२.२२ ). अशोकाच्या मृत्यूनंतर हा देश मौर्य साम्राज्यातून फुटून स्वतंत्र बनला.

## कलिंग देशाची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. बृहत्संहिता ( १४.३२ ) | कालिंग लोकसमूह |
| २. महाभारत | |
| अ. ( आर. ११४.१७ ) | स्वायंभुववन |
| आ. ( आर. ११.२२ ) | वेदी |
| ३. पौराणिक साहित्य | |
| अ. ( वायु. १०७; ब्रह्माण्ड. ४९.४४ ) | त्रिलिंग |
| आ. ( मार्कं. ५७.३३ ) | अर्ककलिंग |
| इ. ( भवि. प्रति. २.१२ ) | कलिंगक |
| ४. मेगॅस्थिनेस् ( इंडि. ॲन्टि. ६.३३८ ) | मोदोगलिंग ( तेलगु-त्रिकलिंग ) |
| ५. प्लिनी | मक्को कलिंगे ( = तेलगु– ' मूडगलिंग '= तामीळ-मुक्कलिंग ) |
| ६. बौद्ध साहित्य ( चुल्लनिद्देस. २.३७ ) | कालिंग; कलिंगे |
| ७. ह्युएन्त्संग (वॉटर्स, २.१९८) | क-लेंग्-क (कलिंग) |
| ८. शिलालेख साहित्य ( एपि. इंडि. ५ ) | त्रिकलिंग |
| ९. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य ( वैजयन्ती. ३७.५२ ) | तैतुल |

**( २ ) चेट राजवंश**—या राजवंशाचे नंद ( इ. स. पू. २१८ ), केतुभद्र ( इ. स. पू. २०८ ) आणि खारवेल हे प्रमुख राजे असून, त्यापैकी खारवेलाच्या हाथीगुंफा शिलालेखमते ( इ. स. पू. १५७ ) त्याने अंग–मगध–देशस्थ जिनसिंहासन या देशास परत आणले. त्यावरून मगधराज बृहस्पतिमित्र ( बृहत्स्वातिमित्र ) राजाच्या मगरमिठीतून त्याने या देशाची मुक्तता केली असावी ( एपि. इंडि. ३१.२३१ ).

**( ३ ) अन्य राजवंश**—स. ४५०–६१५ च्या दरम्यान या देशावर निम्नलिखित राजांचे राज्य होते:— १. पिठा-पुरम्सम्राट वसिष्ठपुत्र शक्तिवर्मन् ( स. ४५०; एपि. इंडि. १२.२ ); २. देंडलूरुसम्राट विष्णुकुंडिन् राजवंश ( स. ५००–६१५; जे. बी. बी. आर. ए. एस्. १६.११६ ); ३. नंदप्रभंजन आणि सामंतवर्मन् राजे ( इंडि. ॲटि. स. १८८४; पृ. ४८; एपि. इंडि. १५.२७ ).

( ४ ) **पूर्व चालुक्य राजवंश**—स. ६१५ मध्ये चालुक्य राजकुमार कुब्जविष्णुवर्धनाने येथे पूर्व चालुक्य राजवंशाची स्थापना केली.

( ५ ) **कलिंग गंग राजवंश**—वीरसिंह राजाने स्थापिलेल्या ( स. ७२० ) या वंशातील कामार्णव ( तृतीय ) राजाने ' कलिंग गंग ' संवताचा ( स. ८७७ ) प्रारंभ केला. स. १४३४ पर्यंत सुस्थितीत असणाऱ्या या राजवंशातील हस्तिवर्मन् ( एपि. इंडि. २३.६५ ), इंद्रवर्मन् ( एपि. इंडि. २५.१९५ ), देवेंद्रवर्मन् ( एपि. इंडि. २६.६३ ) राजांचे शिलालेख ' कलिंगनगरा 'हून, आणि जयवर्मदेव व इंद्रवर्मन् राजांचे शिलालेख 'श्वेतक' ( गंजम जिल्ह्यातील आधु. चिकटी ) गावाहून काढले आहेत ( एपि. इंडि. २३.२६१; २४.२८१; २६.१६७ ).

या राजवंशाचे अन्य उल्लेखनीय शिलालेख पुढीलप्रमाणे होत :– १. देवेंद्रवर्मन्‌चा गंग संवत् १९२ चा त्रिलिंग शिलालेख; २. देवेंद्रवर्मन्‌चा गंग संवत् ३०८ चा इंडियन म्युझियम ताम्रपट ( एपि. इंडि. २३ ); ३. अनंतवर्मन्‌चा गंग संवत् ३५८ चा तेक्कलि ताम्रपट ( एपि. इंडि. २६.१७४ ).

( ६ ) **गजपति राजवंश**— स. १४३४ मध्ये कलिंग गंगवंशीय वीरबाहु राजाच्या कपिलेंद्र नामक अमात्याने ' गजपति ' राजवंशाची स्थापना केली ( सेवेल, इन्स्क्रि. ३५७-३५९ ).

**स्थापना**— महाभारत आणि पौराणिक साहित्यमते दीर्घतमस् ऋषींना बलि आनव सम्राटाच्या सुदेष्णा नामक पत्नीपासून अंग, वंग, कलिंग, पुंड्र, आणि सुह्म नामक पाच पुत्र झाले ( ब्रह्माण्ड. ३.७ ). या ' बालेय क्षत्र ' ( बालेय ब्राह्मण ) पुत्रांनी ( मत्स्य. ४८.२५; विष्णु. ४.१८.१; ब्रह्म. १३.३१; ह. वं. १.३१.३४–३५ ) उत्तरकालात पूर्व भारतात स्वतंत्र राज्ये स्थापिली.

महाभारतात अन्यत्र क्षत्रियांस भूमिदान निषिद्ध असल्याच्या तत्त्वप्रतिपादनार्थ या देशाच्या निर्मितीची आख्यायिका दिली आहे. विश्वकर्मन् भौवन राजाने कश्यप ऋषींना दान दिलेली पृथ्वी क्रुद्ध होऊन रसातळात लपली. कालांतराने कश्यपांनी तिला प्रसन्न करून महेंद्र पर्वताजवळील वैतरणी नदीच्या उत्तरेकडील कलिंग देशस्थानी वर आणले. त्यामुळे या कश्यपप्रेरित देशाला ' वेदी ' अथवा ' स्वायंभुववन ' वैकल्पिक नाव प्राप्त झाले ( म. आर. ११४.१७; २२-२३; २५ ). ब्राह्मण साहित्यमते विश्वकर्मन्‌ने स्वतःच्या ऐंद्राभिषेकसमयी कश्यपास पृथ्वीदान केले असून ( ऐ. ब्रा. ८.११.८; श. ब्रा. १३.७.१.१५ ), या आख्यायिकेच्या महाभारतान्तर्गत परिवर्धित संस्करणात तिचा कलिंगशी नव्याने संबंध जोडलेला दिसतो. अभ्यासकांच्या मते महेंद्र पर्वतनिवासी परशुरामाने पश्चिम दिशावर्ती शूर्पारक देशासमवेतच पूर्व दिशावर्ती कलिंग देश मानवी वसाहतयोग्य आणि वैदिक संस्कृतियुक्त बनविल्याचा निर्देश येथे अभिप्रेत असावा.

**ऐतरेय ब्राह्मणात**— या ग्रंथात आचारभ्रष्ट म्हणून निर्देशिलेले अंध्र, पुंड्र, पुलिंद, मूतिब लोकसमूह ( ऐ. ब्रा. ७.१८ ) कलिंग देशातच निवास करीत असावेत. या ग्रंथकाली नर्मदा नदी ही आर्यावर्ताची दक्षिण परिसीम असून, तिच्या दक्षिणेकडील अनार्य लोकांचा हा प्राचीनतम ग्रांथिक निर्देश होय.

**बौधायनाच्या धर्मसूत्रात**—या ग्रंथमते कलिंग हा अपवित्र, आचारभ्रष्ट ( संकीर्णयोनी ), तसेच गमननिषिद्ध देश असून ( बौ. ध. १.१.१५–१६; ३०–३१ ), ब्रह्माण्डमते हा श्राद्धकर्मास निषिद्ध होता ( ब्रह्माण्ड. ३.१४.३३ ). महाभारतमते येथील क्षत्रिय लोक परशुरामभयाने गिरिकंदरी निवास करून आचारभ्रष्ट आणि शूद्र बनले होते ( म. अनु. ३३.२२ ). जैन प्रज्ञापना ग्रंथमते मात्र येथील लोक ' अरिय ' ( आर्य ) असून, अशोकाच्या आज्ञालेख क्र. १३ मते हा देश ऋषिमुनी, तापसांचे निवासस्थान होता. यावरून आर्य संस्कृतीच्या कक्षेबाहेरील या देशास बौद्ध आणि जैन धर्मांच्या साहचर्याने प्रतिष्ठा प्राप्त झाली असावी.

**कौटिलीय अर्थशास्त्रात**—या ग्रंथमते अंग आणि कलिंग देशातील हत्ती सर्वश्रेष्ठ असून, करूष, दशार्ण आणि अपरांत देशातील हत्ती दुय्यम प्रतीचे, आणि सुराष्ट्रादि पंचजन देशातील हत्ती कनिष्ठ प्रतीचे असत ( कौ. अ. २.२ ).

**पाणिनीच्या अष्टाध्यायीत**—या ग्रंथमते, तसेच पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यमते हे भारतवर्षातील एक जनपद असले ( पा. सू. ४.१.१७०; महा. ३.२.२ ), तरी बौद्ध साहित्यातील षोडश महाजनपदांच्या नामावलीत याचा निर्देश आढळत नाही.

**वाल्मीकि रामायणात**—या ग्रंथमते सुग्रीवाने अंगदाला या देशास सीताशोधार्थ पाठविले होते ( वा. रा. कि. ४१.११ ).

**महाभारतात**—या ग्रंथातील, तसेच पद्म पुराणातील जनपदनामावलीत कलिंग देशाचा निर्देश प्रत्येकी दोनदा आढळतो ( म. भी. १०.३८; ४४; पद्म. आदि. ६.३७; ४१ ). अर्जुनाच्या प्रथम वनवासाच्या वर्णनातहि याचा दोनदा

निर्देश आढळतो (म. आ. २०७.९; १२). यावरून महाभारतकाली पूर्व आणि दक्षिण भारतात दोन स्वतंत्र कलिंग देश अस्तित्वात असावेत. मगधराज जरासंधाने पूर्व भारतातील अंग, वंग, पुंड्र आणि कलिंग लोकांना जिंकले असून (म. स. १३.५८–६८), भारतीय युद्धात वासुदेवाने यांचा संहार केला होता (म. द्रो. १०.१५).

महाभारत आदिपर्वतमते या देशाच्या अनेक राजांनी उत्तर भारतातील आर्य राजकन्यांशी विवाह केले होते (म. आ. १७७.१२). या देशान्तर्गत राजपुर गावच्या स्वयंवरातील राजकन्येचे हरण करण्यास कर्णाने दुर्योधनास साह्य केले होते (म. शां. ५.६–७). युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या दक्षिण दिग्विजयात सहदेवाने हा जिंकला असून (म. स. २८.४८), येथील लोकांनी युधिष्ठिरास दुकूल (रेशमी वस्त्रे), पत्रोर्ण, प्रावर आदि उपायने अर्पिली होती (म. स. ४८.१७). कलिंगराज श्रुतायूने युधिष्ठिरास मणिरत्नादि उपायने दिली होती (म. स. परि. १३३.२६).

पांडवांच्या वनवासकाळी युधिष्ठिर लोमश ऋषींसमवेत अंग, वंग आणि कलिंग देशांस तीर्थयात्रार्थ आला होता (म. आर. ११४.३). यावरून गमननिषिद्ध अशा या देशात लोक तीर्थयात्रेसाठी जात येत असावेत. अंगराज कर्णाने या लोकांना जिंकले असून (म. आर. परि. १.२४.४२), सहदेवाने, तसेच श्रीकृष्णाने दंतकूर गावी कलिंगांचा संहार केला होता (म. उ. २३.२३; ४७.७०). कर्ण-शल्य संवादात येथील लोकांच्या धर्मज्ञतेची आणि धर्माचरणाची प्रशंसा आढळते (म. क. ३०.४५; ६८; ७५).

भारतीय युद्धात दुर्योधनपक्षात सामील झालेले हे लोक भीष्मनिर्मित गरुडव्यूहात (म. भी. ५२.८), तसेच द्रोणनिर्मित गरुडव्यूहाच्या ग्रीवा आणि पृष्ठभागी (म. द्रो. १९.७–११) उपस्थित होते. या देशाच्या भानुमत् राजाला भीमसेनाने ठार मारले होते (म. भी. ५०.३५). परशुरामाने यांचा पराजय केला असला (म. द्रो. परि. १.८.८४६), तरी सात्यकीशी यांनी यशस्वीपणे युद्ध केले होते (म. द्रो. ११६.१०).

**बृहत्संहितेत**—या ग्रंथमते हा देश कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या आग्नेय भागात असून (बृ. सं. ५.३५;७५;७९; ९.१०;२६; १०.१६; १४.८; १६.१; ३; १७.१३; २२; ३२.१५), येथील लोक 'कालिंग' नावाने सुविख्यात होते (बृ. सं. १४.३२). येथे हिऱ्यांच्या अनेक खाणी असून (बृ. सं. ८०.७), येथील राजा 'कलिंगदेशनृपति' (बृ. सं. ५.६९), अथवा 'कलिंगेश' (बृ. सं. ११.५४) नावाने ओळखला जात असे.

**पौराणिक साहित्यात**—मार्कंडेयमते हे दक्षिणापथनिवासी लोक महाराष्ट्र, माहिषक, आभीर, वैशिक्य, शबर, पुलिंद लोकांसमवेत रहात असून (मार्कं. ५४.४६–४७), कुंतल, काशि, कोशल, अथर्व आणि मेकल लोक त्यांचे सहवर्ती होते (मार्कं. ५४.३३). पूर्व भारतातील वंग, जठर, कोशल, चेदि देशांसमवेतहि याचा निर्देश आढळतो (मार्कं. ५५.१६).

पौराणिक साहित्यमते हे दक्षिण भारतनिवासी असून (ब्रह्माण्ड. १६.५७; मत्स्य. ११४.४७; वामन. १३.४८; वायु. ४५.१२५; विष्णु. २.३.१६), क्वचित ठिकाणी यास पूर्व भारतीय देश म्हटले आहे (काव्यमी. १७. २२६; ब्रह्म. १९.१६). कूर्म आणि पद्म पुराणात नर्मदा नदीशी (अमरकंटक पर्वताशी) यास संलग्न केले असून (कूर्म. उत्तर. ४०.९; पद्म. आदि. १३.८), भविष्य पुराणात यास 'कलिंगक देश' म्हटले आहे (भवि. प्रति. २.१२).

**अशोकाच्या शिलालेखात**—ओरिसातील अशोकाचे दोन उपलब्ध शिलालेख कलिंग देशान्तर्गत तोसली (पुरी जिल्ह्यातील भुवनेश्वरपासून ७ मैल दक्षिणेकडील आधु. धौलि) आणि समापा (गंजम गावापासून १८ मैल पश्चिमेकडील आधु. जौगड) गावच्या महामात्रांना उद्देशून काढले असून, त्यावरून ही गावे अशोक राज्यकाली या देशाच्या उपराजधान्यांची गावे असावीत.

अशोकाच्या आज्ञालेख क्र. १३ मते त्याच्या राज्यकालाच्या ८ व्या वर्षी त्याने केलेल्या या देशावरील विजयी आक्रमणात एक लाखाहून अधिक सैनिक मृत, आणि तितकेच सैनिक जखमी झाले. त्यायोगे त्याचे ठायी युद्धजन्य हत्याकांडाविषयी विरक्ती उत्पन्न होऊन तदनंतर दोनच वर्षांनी तो बौद्ध बनला. त्याच्या आज्ञालेखमते कलिंग हत्याकांडाच्या एक सहस्रांश हत्याहि घडू न देण्याविषयी तो सदैव जागरूक राहिला. या देशातील धौलि आणि जौगड गावच्या आज्ञालेखात कलिंग हत्याकांडाचा उल्लेख करणाऱ्या क्र. ११–१३ आज्ञालेखांऐवजी दोन नवे आज्ञालेख लिहिले आहेत. यावरून कलिंग हत्याकांडाची टोचणी अशोकास यावज्जीव लागून राहिली असावी.

**मॅगॅस्थिनेसच्या ग्रंथात**—या, तसेच प्लिनीच्या ग्रंथात निर्देशिलेले 'मोदोगलिंग' बेटनाम संभवतः 'मूडुकलिंग'

( तेलगु– मूडु = तीन ) चे ग्रीकभाषीय रूपांतर असावे ( इंडि. अँटि. ६.३३८ ).

**प्लिनीच्या ग्रंथात**—या ग्रंथमते मोदोगलिंग बेटात मक्को-कलिंगे ( = तामीळ 'मुक्कलिंग' = तेलगु 'मूडुलिंग' ) नामक ब्राह्मण लोकसमूह निवास करीत असे.

प्लिनीच्या मते हे लोक पूर्व भारतातील समुद्रकिनारी आणि गंगारिदे देशाच्या पश्चिमेस आणि मल्ल लोकांच्या दक्षिणेस रहात असून 'मक्कोलिंग' आणि 'मोडोकलिंग' हे याच देशाचे शाखाभूत होते. येथे साठ हजार पायदळ, एक हजार घोडदळ आणि सात हजार गजदळ होते.

**बौद्ध साहित्यात**—जातक साहित्यात या देशाच्या राजांचे अनेक निर्देश आढळतात. कुंभकार जातकमते कलिंगराज करंडु हा विदेहराज निमीच्या समकालीन असून, महागोविंद सुत्तमते कलिंगराज सत्तभू हा मिथिलानरेश रेणु आणि काशिराज धृतराष्ट्राच्या समकालीन होता. चुल्लनिद्देस-मते सिलोनच्या कित्ति-सिरिमेघवन्न राजाच्या राज्यकालात या ( कालिंग ) देशाहून गौतम बुद्धाचे दंतावशेष सिलोनला नेण्यात आले होते ( चुल्ल. २.३७ ).

जातकमते येथील राजा अश्मकराज अरुणाला शरण गेला होता ( जा. २.३७ ). थेरगाथा टीकामते अशोकबंधु तिष्य आपल्या वृद्धापकाळी धर्मरक्षित नामक गुरूसमवेत या देशात राहिला होता (थेरगाथा टीका. १.५०६). महावंशमते कलिंग राजकन्या सुसीमाचा वंग देशाच्या राजाशी विवाह झाला असून (महा. ६.१; दीप. ९.२), या देशाचा माघ नामक राजपुत्र स. १२१५ मध्ये सिलोनच्या पराक्रमबाहु राजास पदच्युत करून विजयबाहु नावाने सिलोनचा राजा बनला (महा.८०). महावंशाच्या चूलवंश नामक टीकामते कलिंग-राजकन्या त्रिलोकसुंदरी ही या राजाची पत्नी असून, या काळी कलिंगराजधानी सिंहपुर गावी होती (चूल.५९.३०). चूलवंशकाली ( इ. स. १२ वे शतक ) कलिंगराजधानी आंध्र प्रदेशातील श्रीकाकुलम् गावी असून, या ग्रंथातील सिंहपुर गावासंबंधीचा निर्देश महावंशाच्या ( इ. स. ४ थे–५ वे शतक ) अंधानुकरणाने केला असावा.

दिव्यावदान आदि उत्तरकालीन बौद्ध ग्रंथातील कलिंग आणि मिथिला देशांच्या संयुक्त निर्देशावरून मिथिला गावी या देशाची राजधानी असल्याचा गैरसमज उत्तरकालीन बौद्ध साहित्यात उत्पन्न झाला. या साहित्यमते कलिंग-राजधानी मिथिला ही भारतातील चार पुण्यक्षेत्रांपैकी एक असून, वस्तुतः येथे विदेहराजधानी मिथिलेचा निर्देश अभिप्रेत आहे.

**जैन साहित्यात**—जैन प्रज्ञापना ग्रंथमते तत्कालीन भारतातील प्रमुख देशांमध्ये या देशाची ( राजधानी–कांचनपुर ) गणना होत असे ( इंडि. अँटि. २०.३७५ ).

**हाथीगुंफा शिलालेखात**—कलिंग देशाच्या चेटवंशीय खारवेल राजाच्या हाथीगुंफा शिलालेखमते ( इ. स. पू. २ रे शतक ) आपल्या राज्यकालाच्या प्रथम वर्षी त्याने या देशाच्या कलिंगनगर ( आधु. मुखलिंगम् ) नामक राजधानीची तटबंदी दुरुस्त केली. इ. स. पू. १६३ मध्ये आंध्रराज पूर्णोत्संगाच्या साह्याने राष्ट्रिक आणि भोजक लोकांचा निःपात करून, आणि मगधराजधानी राजगृहावर हल्ला करून याने पुष्यमित्र शुंगास शरण आणले.

**रघुवंशात**—या ग्रंथमते उत्तरेस उत्तरापथ आणि दक्षिणेस तेलिंग ( तेलगु प्रदेश ) आणि महेंद्रगिरि ( आधु. पूर्वघाट ) यांच्या दरम्यानच्या पूर्व भारतातील समुद्र-किनारीच्या या देशाची वैतरणी ही प्रमुख नदी होती ( रघु. ४.३८–४३ ). यावरून आधु. ओरिसाचा काही भाग, तसेच गंजम आणि विजगापट्टम् जिल्हे कालिदासकालीन कलिंग-मध्ये समाविष्ट असावेत.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते पूर्व भारता-तील एके काळचा घनदाट वस्तीचा हा देश ( क–लेंग्–क ) ऋषिशापामुळे निर्जन आणि उजाड बनला असून, नवी लोकवस्ती तेथे क्रमशः होत होती. 'दंड', 'कलिंग' आणि 'मातंग' देश ऋषिशापामुळे ओसाड बनल्याचा निर्देश बौद्ध साहित्यातहि आढळतो ( मज्झिम. १.३७८ ).

**भौगोलिक वर्णन**—ह्युएन्त्संगच्या मते समृद्ध पीकपाणी आणि युद्धोपयोगी वन्य हत्तींनी युक्त अशा या देशाचे आणि त्याच्या राजधानीचे क्षेत्रफळ अनुक्रमे १००० मैल आणि ४ मैल असून, येथील उद्धट आणि शीघ्रकोपी लोकांचे आचारविचार आणि शब्दोच्चार मध्यदेशाहून वेगळे होते. येथे १०० हिंदु देवमंदिरे, १० बौद्ध मठ आणि ५०० महायान स्थविर सांप्रदायाचे बौद्ध भिक्षू होते. पूर्वकाली हे बौद्ध धर्माचे मोठे केंद्र असून, आत्मबोध-प्रवण बारा देशांमध्ये गौतम बुद्धाने यांची गणना केली होती. परंतु तत्काली येथील बौद्ध धर्म उतरणीस लागला होता.

येथून २६० मैल वायव्येकडील डोंगराळ आणि जंगल-मय प्रदेशातून गेल्यानंतर ह्युएन्त्संग कोशल देशास पोहोचला ( वॉटर्स, २.१९८–१९९; बील, ४.४१३–४१४ ).

**शक्तिसंगमतंत्रात**—या ग्रंथमते जगन्नाथपुरीपासून कृष्णा नदीकिनाऱ्यापर्यंतच्या या देशाच्या दक्षिण सरहद्दी-नजिक 'कालिंग' ( आंध्र प्रदेशातील नेलोर, गुंटूर प्रदेश )

होता ( सरकार, शक्तिसङ्गम. ३.७.४ ).

**शिलालेख साहित्यात**—चंद्रवर्मन्च्या कोमर्ति दानपत्रमते ( इ. स. ५ वे शतक ) तो 'कलिंगाधिपति' असून ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. १८ ), कलिंगाधिपती वसिष्ठपुत्र शक्तिवर्मन्च्या दानपत्रमते त्याने कलिंग विषयातील सकलुव ग्राम दान दिले होते ( एपि. इंडि. १२.१ ). शत्रुदमन राजाच्या पेद्दुगम दानपत्रमते ( इ. स. ५ वे शतक ) दक्षिण आणि मध्य कलिंगातील पिष्ठपुर आणि सिंहपुरच्या राजांमध्ये सदैव संघर्ष चालू असे. समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद प्रशस्तिलेख ( स. ३५० ), तसेच ५६९ च्या बनावट ताम्रपटमते त्याने कलिंगराजास मांडलिक बनविले होते ( एपि. इंडि. ३१. ९०-९१; २९.१७३ ). स. ४५५ नंतर गुप्त सम्राटांची या देशावरील सत्ता संपुष्टात आली.

शिलालेख साहित्यमते इ. स. ५ व्या शतकाच्या अखेरीस मध्य कलिंग देशात गंग राजांचे राज्य प्रस्थापित झाले असून ( एपि. इंडि. २९.४६ ), चाटेश्वर ( जि. कटक ) शिलालेखमते अनंतवर्मन् चोडगंग, अनंगभीम, राजेंद्र आणि अनंगभीम ( द्वितीय ) हे या राजवंशातील प्रमुख राजे होते ( एपि. इंडि. २९.१२३ ). यापैकी अनंतवर्मन् चोडगंगाच्या ( राज्यारोहण स. १०७८ ) राज्यकालाच्या ७२ व्या वर्षी कोरलेले दोन शिलालेख सापडले आहेत ( इंडि. अँटि. १८.१६१; एपि. इंडि. ४. १८३; ६.१९८ ).

कलिंगनगर ( आधु. मुखलिंगम् ) नामक प्रारंभीच्या गंगराजधानीहून काढलेला अनंतवर्मन्चा स. ७२० चा, वज्रहस्त ( तृतीय ) चा स. १०६० चा, तसेच राजराज ( प्रथम ) चा स. १०७० चा ताम्रपट सापडला असून ( एपि. इंडि. ३१.१९९; ३०५; १९३ ), गंगराज मनुजेंद्रवर्मन्चा स. ८८९ चा गलवाल्लि ताम्रपट या नगरातील अधिवासकातून ( राजवाडा ) काढलेला आहे ( एपि. इंडि. ३१.१९० ). राजराज ( प्रथम ) च्या स. १०६४ च्या वाडग्राम ताम्रपटात महेंद्र पर्वतीय गोकर्णस्वामींचा कुलदैवत म्हणून निर्देश आढळतो ( एपि. इंडि. ३१.४५ ).

अनंतवर्मन् चोडगंगने ओरिसामधील पुरी-कटक आणि बलासोर प्रदेश जिंकल्यानंतर त्याचा नातू अनंगभीम ( तृतीय ) च्या नगरी ताम्रपटमते ( इ. स. १३ वे शतक ) त्याने आपली राजधानी 'अभिनव—वाराणसी-कटक' गावी ( आधु. कटक ) हलविली ( एपि. इंडि. २८.२३५ ). त्यापूर्वी काही काळ गंगराजधानी 'गुहेश्वरपाटक' ( ययातिनगर= आधु. जाजपुर ) येथे असून, त्याआधारेच मुसलमानी ग्रंथात ( इ. स. १३ वे शतक ) गंग राज्यास 'जाजपुर राज्य' म्हटले आहे.

**अन्य शिलालेखात**— पुलकेशिन् ( द्वितीय ) च्या ऐहोळे शिलालेखमते ( स. ६३४ ) त्याने कलिंग-कोशल लोकांचा पिष्टपुर किल्ला जिंकला होता ( एपि. इंडि. ६.४ ). राष्ट्रकूट राजा अम्मराज ( द्वितीय ) च्या मंगल ताम्रपटमते ( स. ९५० ) कृष्ण ( तृतीय ) ने विदर्भ, वंग आणि कलिंग राजांना जिंकले होते ( एपि. इंडि. ३१. ३७ ). राष्ट्रकूट राजा दंतिदुर्गाच्या वेरूळ शिलालेखमते त्याने कांची आणि कोशल देशांसमवेत हा देश जिंकला होता ( एपि. इंडि. ९.२४ ). गोविंद ( तृतीय ) राष्ट्रकूटानेहि हा देश जिंकला होता ( एपि. इंडि. २.९७ ). कामरूप सम्राट हर्षच्या नेपाळी शिलालेखमते ( इ. स. ७ वे शतक ) कलिंग, ओड्र आणि गौड देशांचा तो राजा होता ( इंडि. अँटि. ९.१७९ ). इ. स. ९ व्या शतकात येथे आदिसुर राजाचे राज्य असून ( एपि. इंडि. २९. ५३ ), कलचुरि अल्हणदेवीच्या भेडाघाट शिलालेखमते तिच्या लक्ष्मीकर्ण नामक आजेसासऱ्याने वंग-कलिंग देश जिंकले होते ( एपि. इंडि. २.११ ). कलचुरि राजा नृसिंहाच्या कर्ण नामक प्रपितामहानेहि ( स. १०५० ) हा देश जिंकला होता ( कॉर्पस्. इन्स्क्रि. १.१.३१४ ).

रामचरितमते बंगालच्या रामपाल राजाने कलिंग, उत्कल आणि कामरूप देश जिंकले असून ( रामचरित. २.४५ ), गौड राजा लक्ष्मणसेनाने कलिंगराजाकडून करभार वसूल केला होता ( एपि. इंडि. २६.११ ).

चोल राजा राजराज ( प्रथम ) ने ( स. १००३ ) हा देश जिंकला असून ( एपि. कर्ना. १०.१२३ ), राजराज (द्वितीय) आणि राजेंद्र चोडाच्या शिलालेखमतेहि ( इ. स. १२ वे शतक ) त्यांनी हा देश जिंकला होता ( एपि. इंडि. ३१.२७३; २९.२३१ ). चोल राजा कुलोत्तुंग ( प्रथम ) च्या तिरुविडै—मरूडूर शिलालेखमते ( स. १०९० ) त्याने या देशावर आक्रमण केले होते.

**त्रिकलिंग देश**— मद्रास, मध्यप्रदेश, आणि ओरिसाधिपती दाक्षिणात्य राजांच्या शिलालेखात 'त्रिकलिंग' ( =आंध्र, ओरिसा, कोशल ) सामूहिक देशनामांचा निर्देश आढळतो. प्लिनीच्या ग्रंथातहि कलिंग लोकांच्या 'गंगरडे कलिंगे' ( ओरिसा ), 'मक्को—कलिंगे' ( आंध्र प्रदेशान्तर्गत मुखलिंगम् ' आणि 'कलिंगे' ( ओरिसा ) नामक तीन कलिंग वसाहतींचा निर्देश आढळतो ( अंध्र—

## कलिंग देशाच्या राजधान्या

| काल | नगर | आधुनिक स्थान | ग्रांथिक निर्देश |
|---|---|---|---|
| महाभारत | राजपुर | — | (म. शां. ४.३) |
| बौद्ध साहित्य | १. दंतपुर (महाभारत–दंतकूर; प्लिनी–दंदगुल)<br>२. सिंहपुर | —<br>श्रीकाकुलम्‌नजिकचे सिंगुपुरम् | (जा. २.३६७; महा. ३.३६१; दीघ. २.१६७)<br>(महा. ६.३५) |
| जैन प्रज्ञापना ग्रंथ | कांचनपुर | — | (इंडि. अँटि. २०.३७५) |
| सम्राट अशोक (इ. स. पू. ३००) | १. तोसली<br>२. समापा | पुरी जिल्ह्यातील भुवनेश्वरनजिकचे धौलि<br>गंजम जिल्ह्यातील जौगड | अशोकाचा आज्ञालेख क्र. ११-१२<br>" " |
| खारवेल (इ. स. पू. १५०) | कलिंगनगर | गंजम जिल्ह्यातील पर्लकिमेडिपासून २० मैलांवरील वंशधरा नदीकाठचे मुखलिंगम् | हाथीगुंफा शिलालेख (एपि. इंडि. २.७९–८०) |
| वसिष्ठपुत्र शाक्तीवर्मन् | पिष्टपुर | आंध्र प्रदेशातील आधु. पिठापुरम् | (एपि. इंडि. १२.१) |
| भौमकर राजे (इ. स. ९–१० वे शतक). | ययातिनगर (विरजा आणि गुहेश्वर पाटक) | दक्षिण तोसली देशातील जाजपुर (याजपुर) | — |
| गंग राजे | कलिंगनगर | मुखलिंगम् | हस्तिवर्मन्, इंद्रवर्मन्, देवेंद्रवर्मन् आदि गंग राजांचे शिलालेख (इंडि. अँटि. १३.२७३; एपि. इंडि. २३.६५; २५.१९५; २६.६३) |
| उत्तरकालीन गंग राजे (इ. स. १३ वे शतक) | अभिनव-वाराणसी–कटक | कटक | अनंगभीम (तृतीय) राजाचा नगरी ताम्रपट (एपि. इंडि. २८.२३५) |

कलिंग देशाच्या उपरोक्त राजधान्यांपैकी 'तोसली', 'कलिंगनगर', आणि 'वाराणसी-कटक' या कालानुक्रमे विशेष सुविख्यात असून, त्यापैकी 'कलिंगनगर' (आधु. मुखलिंगम्) हे दीर्घकालपर्यंत या देशाच्या राजधानीचे गाव होते (कलिंगनगर पहा).

त्रिलिंग-मध्यम पहा ).

अरबी साहित्यातील 'रमण्ण' देशाचे (आधु. दक्षिण ब्रह्मदेश) 'तलैंग', तसेच मलाया द्वीपकल्पाचे 'क्लिंग' ही नामांतरे अनुक्रमे 'त्रिकलिंग' आणि 'कलिंग'ची अपभ्रष्ट रूपे असावीत (इलियट, ३.२३४).

**मुसलमानी आक्रमण**— तारीख-इ-फिरुझशाहीमते भानू (तृतीय) गंग राजाच्या राज्यकालात (स. १३६०) दिल्लीच्या फिरोजशहा तुघ्लकाने हा (जाजपुर) देश, तसेच वाराणसीकटक (आधु. कटक) ही राजधानी जिंकली. बंगालमधील मुसलमानी राज्याच्या स्थापनेनंतर (इ. स. १३ वे शतक) या देशाची राजधानी बंगाल सरहद्दीनजिकच्या ययातिनगराहून (आधु. विंका) कटक येथे हलविण्यात आली. 'परंतु या काळातहि या देशाचे जाजनगर' हे नाव कायम राहिले.

**राजधान्या**— या देशाच्या विभिन्न राजधान्या पुढीलप्रमाणे होत (परिपत्रक पहा).

**देशविभाग**—शिलालेख साहित्य मते यादेशाचे प्रमुख देशविभाग पुढीलप्रमाणे होतः—**१. पिथूडक विषय** (लक्ष्मणसेनाच्या इंडिया ऑफिस ताम्रपटमते पूर्व समुद्रकिनारी लागुलिया नदीकाठी; एपि. इंडि. २६.११); **२. कामरूप विषय** (पूर्व गंग ताम्रपटमते आधु. आसामच्या परिसरात; एपि. इंडि. २६.६३); **३. नडडाशृंग विषय** (एपि. इंडि. २३.२६१); **४. प्रतिष्ठान विषय** (गोदावरी जिल्ह्यातील आधु पिठापुरम् प्रदेश; एपि. इंडि. २३.२६१); **५. रूपवर्तनी विषय** (नामांतर–'रूप्यवती विषय'; एपि. इंडि. १८.३०९); **६. वराहवर्तनी विषय** (आधु. चिकाकोल आणि तेक्कलि गावांच्या दरम्यानचा प्रदेश; एपि इंडि. २३.६५; नामांतर–'कोलुकवर्तनी विषय'; डी. एच्. एन्. आय्. १.४५८); **७. क्रोष्टुकवर्तनी विषय** (गंजम जिल्ह्यातील वंशधरा नदीच्या उत्तरेस; एपि. इंडि.२६.६६) **८. पुष्यगिरि–पंचाली विषय** (एपि. इंडि. २६.६३); **९. कोरालोडक–पंचाली विषय** (गंजम जिल्ह्यातील पर्लकिमेडि गावापासून ६ मैल दक्षिणेकडील आधु. कोरोशंडा; एपि. इंडि; २१.२४). **१०. खलुगखंड विषय** (एपि. इंडि. २३.२६६–२६८); **११. तेलुवल्लि विषय** (आधु तेल नदीच्या परिसरात; एपि. इंडि. २३.५७.–५९); **१२. जयडा विषय** (एपि. इंडि. २३. २६४); **१३. हेम्वकमटम्व विषय** (एपि.इंडि. २४.२८१); **१४. पुष्करिणी विषय** (एपि. इंडि. २३.७५); **१५. पटणिखंड विषय** (एपि. इंडि. २६.१६७); **१६. अंबवाडी विषय** (इंडि. ॲंटि. १८.१६७-१६८); **१७. कण्टकवर्तनी विषय** (इंडि. ॲंटि. १८.१७१); **१८. गोरसत्त विषय** (आधु. वंशधरा नदीकाठी; एपि. इंडि ११.१४९). **१९. एरद विषय** (वर्धमानपुर गावच्या परिसरात; डी. एच्. एन्. आय. १.४५७); **२०. वेपूरा विषय** (विजगापट्टम् जिल्ह्यातील आधु. पल्कोंड गावाच्या परिसरात; डी. एच्. एन्. आय्. १. ४५७); **२१. लम्वा विषय** (इंडि. ॲंटि. १८.१६५–१७२); **२२. सम्मन विषय** (डी. एच्. एन्. आय्. १.४६६); **२३. गलेल विषय** (इंडि. ॲंटि. १४.११); **२४. जलम्बोर विषय** (गंजम जिल्ह्यातील उर्लम् नगरानजिकच्या आधु. जल्मुरु गावाच्या परिसरात; जे. ए. एच्. आर. एस्. ३.१८४)

**नगरे**—शिलालेख साहित्यमते या देशातील प्रमुख नगरे पुढीलप्रमाणे होतीः— **१. श्वेतक** (जयवर्मन् आणि इंद्रवर्मन् गंग राजांच्या शिलालेखात निर्देश; गंजम जिल्ह्यातील आधु. 'चिकटि'; एपि. इंडि. २३.२६१; २४.१८१; २६.१६७). **२. श्रीपुर** (विशाखवर्मन् राजाच्या इ. स. ५ व्या शतकातील दानपत्रात निर्देश; विजगापट्टम् जिल्ह्यातील पल्कोंड तालुक्यातील आधु. 'सिरिपुरम्'; एपि. इंडि. २१.२४); **३. देवपुर**–(अनंतवर्मन् गंग राजाच्या दानपत्रात निर्देश; आधु. श्रृंगवरपुकोट अथवा चिकाकोल तालुक्यात; एपि. इंडि. २४.५०); **४. पिष्टपुर**– (अनंतवर्मन् गंग राजाच्या दानपत्रात निर्देश; गोदावरी जिल्ह्यातील आधु. पिठापुरम्; एपि. इंडि. २३.५७); **५. सिंहपुर** (चंद्रवर्मन् आणि अनंतशक्तिवर्मन् गंग राजांच्या दानपत्रात निर्देश; चिकाकोलनजिकचे आधु. सिंगपुरम्); **६–७. वर्धमानपुर आणि सुनगर** (उमावर्मन् गंगराजाच्या दानपत्रद्वयात निर्देश; विजगापट्टम् जिल्ह्यातील पल्कोंड तालुक्यातील आधु. वाडम; एपि. इंडि. २४.४९–५०); **८. शोभावती** (कथासरित्सागरामध्ये निर्देश; कथा. २.३५१; ४१२).

**२.** (देश) वाल्मीकि रामायणमते अयोध्या—केकय मार्गावरील एक देश (वा. रा. अयो. ७१.१६). अयोध्येहून केकय देशास जाताना भरतास हा लागला होता. वामनमते हे लोक 'उत्तरापथवासिन्' असून (वामन. १३.३६), अन्य पौराणिक साहित्यातहि यास मध्य देशान्तर्गत (आधु. उत्तर भारत) म्हटले आहे (ब्रह्माण्ड. १६.४२; मत्स्य. ११४. ३६; मार्कं. ५४.३३; ३७; पद्म. आदि. ६.६४). महाभारतमते कर्णाने आपल्या उत्तर दिग्विजयसमयी (म. आर. २५८.८) हे उत्तर

भारतीय जनपद ( म. भी. १०.६७ ) जिंकले होते.

३. ( पर्वत ) जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वताच्या दक्षिणेकडील गंधमादन पर्वतानजिकचा एक पर्वत ( मार्क. ५२.६; वायु. ३६.२२ ). वायुमते हा मेरुपर्वतोद्भवा चतुर्गंगापैकी अलकनंदा नदीच्या मार्गावर होता ( वायु. ४२.८ ).

४. ( बृहद्भारतीय देश ) आग्नेय आशियातील मध्य जावातील सन्नह आणि संजय नामक पितापुत्रांनी ( इ. स. ७ वे शतक ) स्थापिलेली एक बृहद्भारतीय वसाहत. तेथील जंगलात या राजांचा एक शिलालेख सापडला असून, तत्रस्थ देओंग मंदिरहि त्यांनीच बांधले असावे ( सांकृत्यायन, पृ. ९० ).

**कलिङ्गनगर** ( नगर )—कलिंगराज खारवेलाच्या इ. स. पू. १५३ च्या हाथीगुंफा शिलालेखमते कलिंग देशाच्या राजधानीचे नगर (एपि. इंडि. २०.७९–८०). नामांतर–'नगर' ( एपि. इंडि. २.१६५ ). सरकार यांच्या मते ओरिसामधील पुरी जिल्ह्यातील भुवनेश्वरनजिकचे आधु. धौलि गाव हेच होय. अशोकाच्या आज्ञालेख क्र. १३ मध्ये निर्देशलेले तोसली नगरहि संभवतः हेच असावे.

उत्तरकालीन शिलालेख साहित्यात कलिंग देशाच्या विभिन्न राजधान्यांना 'कलिंगनगर' उपाधी लावलेली दिसते ( कलिंगनगर २–५ पहा ).

**हाथीगुंफा शिलालेखात**—या शिलालेखमते वादळी वाऱ्याने उद्ध्वस्त झालेल्या या नगरातील अनेक इमारती, भिंती, आणि प्रवेशद्वारे, 'इसिताल' नामक तलाव, तसेच उध्वस्त बागा खारवलाने दुरुस्त केल्या होत्या. बारुआ यांच्या मते खारवेलाची राजधानी वंशधरा नदीकाठच्या या गावी, आणि निवासस्थान या नजिकच्या खिबिरा गावी होते. खारवेलाच्या ३०० वर्ष पूर्वकालीन नंद राजाने बांधलेला कलिंगनगर-वंशधरा नदीकालवा खारवेलाने या नगराच्या मध्यभागी आणला.

**अवशेष**—उत्तर पुरी जिल्ह्यातून वहात येऊन भुवनेश्वर येथील लिंगराज मंदिराच्या ६ मैल पूर्वेप्रत वहाणाऱ्या आधु. प्राची नदीकाठच्या या गावाच्या भागात खारवेलाच्या राजवाड्याचे अवशेष सापडले आहेत ( बारुआ, जे. इ. एस्. ए. १५.५२ ).

२. पूर्व गंग राजाच्या शिलालेखमते ( इ. स. ११ वे शतक ) गंग राजवंशकालीन कलिंग देशाच्या राजधानीचे नगर. हस्तिवर्मन्, इंद्रवर्मन्, देवेंद्रवर्मन् आदि गंग राजांचे, तसेच अन्य उत्तरकालीन गंग राजांचे शिलालेख या गावच्या विजयी सैन्यतळामधून (विजयवतः) काढले आहेत ( इंडि. अँटि. १३.२७३; एपि. इंडि. २३.६५; २५.१९५; २६.६३; डी. एच्. एन्. आय्. १.४४८; ४८५ ). सरकार यांच्या मते स. ५००–१२११ पर्यंत पूर्व गंग राजांची राजधानी या गावी होती. सुब्बाराव यांच्या मते उत्तर गंग राजांची राजधानीहि येथेच होती ( जे. ए. एच्. आर. एस्. ६.५.६–६२; ८३–८४ ).

ओरिसामधील गंजम जिल्ह्यातील पर्लकिमेडि गावापासून २० मैलावरील वंशधरा नदीकाठचे आधु. मुखलिंगम् हे तीर्थस्थानाचे गाव हेच होय. वंशधरा नदीच्या मुखानजिकच्या आधु. कलिंगनगरपासून २० मैल वायव्येकडील नगरकटकम् गावानजिक हे असून, पूर्व गंग राजा अनंगभीम ( तृतीय ) ने ( इ. स. १३ वे शतक ) या गावाहून ओरिसामधील 'अभिनव-वाराणसी–कटक' ( आधु. कटक ) गावी आपली राजधानी हलविली.

**मतांतरे**—या नगराच्या भौगोलिक स्थानाविषयी निम्नलिखित मतांतरे आढळतात :—

**१. गोदावरी जिल्ह्यातील राजमहेंद्री**— कनिंगहॅम यांचे मते पूर्व चालुक्य राजवंशस्थापित (स. ७५०) आधु. राजमहेंद्री गाव हेच असावे ( कनिंग, पृ. ५१६ ).

**२. गंजम जिल्ह्यातील कलिंगनगर**—फ्लीट यांच्या मते इंद्रवर्मन्‌च्या पर्लकिमेडि शिलालेखात निर्देशिलेले वंशधरा नदीच्या मुखानजिकचे कलिंगपतम् गाव हेच असून, गंग राज्यकाली त्यांचे सारेच राज्य 'कलिंगपतम्' नावाने ओळखले जात असे ( इंडि. अँटि. १६.१३२ ). अनंतवर्मन् चोडगंग राजाच्या ताम्रपटात निर्देशिलेले 'पत्तनभोग' हे 'कलिंगपतम्'चेच नामांतर असावे ( कलिंग–पत्तम् > पत्तन > पत्तनभोग; एपि. इंडि. १४.४९ ).

**शिलालेख साहित्यात**—अनंतवर्मन् चोडगंगाच्या स. १०८१ च्या शिलालेखमते या गावी कलिंग राजधानी असून ( रंगाचारी, ३. गंजम २११ ), इंद्रवर्मन् गंगच्या ( सन १०२४ ), तसेच अन्य दोन गंग राजांच्या ताम्रपटातहि या नगराचा निर्देश आढळतो ( इंडि. अँटि. १०. २४३; एपि. इंडि. २६.६३ ). यापैकी इंद्रवर्मन् हा कलिंग राजवंशाचा १४६ वा राजा होता.

**मंदिरावशेष**— ओरिसा स्थापत्यशैलीचे निम्नलिखित तीन मंदिरावशेष या गावी आढळतात :—

( १ ) **मंदिर क्र. १**—या सर्वाधिक विशाल आणि सुस्थित षष्ठस्तंभयुक्त मंदिराच्या आणि सभामंडपाच्या सपाट छताच्या शिरोभागी ओरिसा पद्धतीचे आमलक

शिलायुक्त शिखर आहे.

या मंदिराच्या पूर्वाभिमुख प्रवेशद्वारात पर्णपुष्प नक्षीकामयुक्त दोन दगडी चौकटी, आणि उभय अंगांस शिल्पप्रतिमायुक्त दगडी स्तंभद्वय आहे. या स्तंभांच्या बाह्य अंगास गुप्त शिरोभूषणयुक्त अन्य एक स्तंभद्वय आहे.

या मंदिराच्या सभोवतीच्या बंदिस्त चौकोनी आवाराच्या पूर्व आणि दक्षिण भागात प्रवेशद्वारे असून, त्यापैकी मुख्य प्रवेशद्वारावर ओरिसा शैलीचे शिखर आहे. मुख्य मंदिरासभोवती अन्य अनेक छोटी मंदिरे आहेत.

(२) **भीमेश्वर मंदिर**-- या गर्भागार आणि सभामंडपयुक्त मंदिराची (इ. स. ११ वे शतक) स्थापत्यशैली भुवनेश्वर येथील मुखलिंगेश्वर मंदिरासदृश असून, त्यामध्ये अनेक शिलालेख आहेत.

(३) **सोमेश्वर मंदिर**—या सर्वोत्कृष्ट मंदिराचे केवळ शिखरच आज शिल्लक आहे. रचना आणि शिल्पदृष्ट्या भुवनेश्वर येथील प्राचीनतम परशुरामेश्वर मंदिरासदृश (स. ६५०–९००) अशा या मंदिराच्या शिखरावर समृद्ध नक्षीकामयुक्त तीन उभ्या खोबणी आहेत (फर्ग्युसन, २. ११४–११५).

३. (नगर) ओरिसाच्या भुवनेश्वर नामक राजधानीचे प्राचीन नाव. ओरिसा देशाच्या ललितेंदुकेसरी (इ. स. ७ वे शतक) राजाने याचे ' भुवनेश्वर ' असे नवे नामकरण केले (भुवनेश्वर पहा).

४. (नगर) वाल्मीकि रामायणमते उत्तर भारतातील गोमती नदीच्या पश्चिम किनाऱ्यावरील एक नगर (वा. रा. अयो. ७१. १४–१५). उत्तर भारतान्तर्गत कलिंग देशाची राजधानी येथे असावी.

**कलिङ्गपुर** (नगर)—शिलालेख साहित्यमते सिलोनच्या ' पोलोन्नरुव ' (आधु. तोपावैव) या मध्ययुगीन राजधानीचे नामांतर (पोलोन्नरुव पहा).

**कलिङ्गे** (देश)—प्लिनीच्या मते दक्षिणापथ देशातील ' कलिंग ' देशाचे नामांतर (कलिंग १. पहा).

**कलिञ्जर** (नगर)—भविष्यमते परिहर राजाचे चित्रकूटनजिकचे राजधानीचे नगर (भवि.प्रति. ११.७). या राजाने येथे १२ वर्षे राज्य केले (भवि. प्रति. ४.४).

२. (पर्वत) मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते एक पर्वत (शब्दरत्न. २८६.१९).

**कलिदिण्डि** (ग्राम)—चोल राजा राजराज (प्रथम) च्या कलिदिंडि ताम्रपटमते (इ. स. १२ वे शतक) कृष्णा जिल्ह्यातील कैकलुर तालुक्यातील एक ग्राम. राजाने येथे ' राजराजेश्वरम् ' नामक शिवमंदिर बांधून याचे ' मधुरांतक नल्लूर ' असे नवे नामकरण केले (एपि. इंडि. २९.६२).

**कलिन्द** (पर्वत)—उत्तर भारतातील एक पर्वत (काव्यमी. १७.२२७).

**कलिन्दपुत्री** (नदी)—' यमुना ' नदीचे नामांतर (शीलोञ्छ. २४०.१८४७).

**कलिन्देश्वर** (लिंग)—काशी येथील एक शिवलिंग (स्कन्द. काशी. ६५.१७).

**कलिमन्थन** (बृहद्भारतीय देश)—आग्नेय आशियातील ' वरुण द्वीपा'चे (आधु. उत्तर बोर्निओ आणि सारावाक प्रदेश) नामांतर (वरुण द्वीप पहा).

**कलिव** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू. ४.२.८०.१५).

**कलिवन** (देश)—ब्रह्माण्डमते अपरांत देशातील ' कल्लावन ' (नासिक जिल्ह्यातील आधु. कवण) देशाचे नामांतर (ब्रह्माण्ड. १६.६०; कल्लावन पहा).

**कलिआन** (नगर)-- जुन्नर शिलालेखमते अपरान्त देशातील ' कलिअण ' बंदराचे नामांतर (ल्यूडर्स सूची. क्र. ११७७; ११७९; कलिअण पहा).

**कुलुगमलै** (जैन गुफा)— दक्षिण भारतातील तिनेवेल्लि जिल्ह्यातील श्रीविलिपुत्तुरपासून ३७ मैल दक्षिणेकडील आणि कन्याकुमारीपासून ७५ मैल उत्तरेकडील चोल स्थापत्यशैलीचे जैन गुफामंदिरस्थान.

**वेत्तुवन कोइल**-- कलुगमलै टेकडीमधील हे जैन गुफामंदिर मामल्लपुरम् येथील रंगमंदिराप्रमाणेच अपूर्णावस्थेत असून, त्याचे मुख्य मंदिर आणि शिखराचे खोदकाम केवळ पूर्ण झाले आहे. कैलास मंदिराच्या उत्तरकालीन (इ. स. ११ वे शतक) हे मंदिर त्याच्या पूर्णावस्थेत भारतातील सर्वोत्कृष्ट जैन मंदिर बनले असते. या मंदिराचे स्थापत्य आणि शिल्प प्रारंभीच्या चौल स्थापत्यशैलीचे (इ. स. १० वे शतक) असून, त्यामधील अनेक शिल्पे जावामधील बोरोदुर मंदिरासदृश आहेत. त्याच्या परिसरातील जैन तीर्थंकरांच्या कोरीव प्रतिमांवरून स. १० व्या शतकात या टेकडीवर जैन श्रमणांची वसाहत असावी. या मंदिरात सध्या सुब्रह्मण्य (कार्तिकस्वामी) ची मूर्ती आहे.

**गणेश मंदिर**-- याच टेकडीच्या अन्य एका भागात गणेशाचे (पिल्लयार) एक प्रदक्षिणापथयुक्त गुफामंदिर आहे (फर्ग्युसन, २.२२).

**कलुगह** ( पर्वतीय खिंड )— ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते अफगाणिस्तानातील कसन्न ( आधु. शहर-इ-सब्ज ) देशाच्या ५५ मैल आग्नेयेकडील एक पर्वतीय खिंड. समरकंदपासून ९० मैल आग्नेयेकडील आणि देर्बंतपासून ८ मैल पश्चिमेकडील आधु. बुझगोलखाना ( अक्षांश ३८°–११′ उत्तर; रेखांश ६६°–५४′ पूर्व ) खिंड हीच होय. 'कलुगह' या मंगोलियनभाषीय शब्दाचा शब्दशः अर्थ 'पर्वतीय खिंड' असाच होतो. नामांतर ( चिनी साहित्य )– 'तिएइ-मेन्-कुआन' ( लोहद्वार खिंड ).

सोग्द आणि तुखारिस्तान ( आधु. बॅक्ट्रिया ) देशांच्या दरम्यानची ही खिंड लष्करी दृष्टीने अत्यंत महत्त्वाची असून, तुखारिस्तानवर चालून आलेल्या तुर्क आणि मंगोलियन लोकांना तुखारी लोकांनी येथे अडविले होते.

**नामव्युत्पत्ती**— ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते हिच्या लोहवर्णीय पर्वतांमुळे, तसेच उभय मुखांनजिकच्या लोहघंटिकायुक्त लोहद्वारामुळे हिला 'लोहद्वार खिंड' नाव प्राप्त झाले. उत्तरकालीन चिनी साहित्यमते हिची लोहमिश्रित दगडांनी बांधलेली प्रवेशद्वारे लोखंडी पत्र्याने मढविली होती. ह्युएन्त्संगच्या जीवनचरित्रमते हिच्या दुर्गमता आणि अजिंक्यतेमुळे हिला हे नाव पडले.

या खिंडीच्या लोहप्रवेशद्वाराचा निर्देश उत्तरकालीन साहित्यात आढळत नसल्याने इ. स. ७ व्या शतकानंतर तो नष्ट झाला असावा.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—मध्य आशियाच्या मार्गे भारताप्रत आलेला ह्युएन्त्संग ४२° रेखांशाच्या पश्चिम दिशाभिमुख प्रवासानंतर येथे आला. येथून आग्नेयेस वळून तो तुखारिस्तानला गेला.

**भौगोलिक माहिती**—ह्युएन्त्संगच्या मते ही खिंड २ मैल लांब आणि ४०′–६०′ रुंद होती. उत्तरकालीन चिनी साहित्यमते ५–३६ पावले रुंदीची ही खिंड पूर्व आणि पश्चिमेस समुद्रसपाटीपासून ३५४०′ आणि ३७४०′ उंचीवर होती. 'बुझगोलखाना बुल्क' नामक धबधबा तीमधून वहात असे.

**अन्य एक लोहखिंड**—तुर्की साहित्यात, तसेच मार्को पोलोच्या प्रवासवर्णनात निर्देशिलेली कॅस्पियन समुद्रतीरावरील दुर्बेंद येथील 'देमिर कपि' लोहखिंड या खिंडीहून सर्वस्वी वेगळी होती ( वॉटर्स, १.१००–१०२; २.३३४; बील, १.१०२–१०३ ).

**कलुञ्जुर** (पर्वतीय दुर्ग)–फरिश्ताच्या मते मध्यप्रदेशातील 'कालंजर' पर्वतीय दुर्गाचे नामांतर ( कालंजर पहा ).

**कलुबरिगा** ( नगर )—शिलालेख साहित्यमते दक्षिण भारतातील एक नगर. म्हैसूर प्रांतातील आधु. गुलबर्गा गाव हेच होय ( एपि. इंडि.१३.१५७ ).

**कलुमलम्** (नगर)—चोल राजा कोच्चेंगनच्या इ. स. ६ व्या शतकातील शिलालेखमते त्याने चेर राजा कनैक्काल इरुंपोरैशी यशस्वीपणे युद्ध केलेले दक्षिण भारतातील एक नगर. याचे आधु. स्थान समजत नाही ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३४० ).

**क-लेङ्ग-क** (देश)—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते पूर्व भारतातील 'कलिंग' देशाचे नामांतर ( वॉटर्स, २. १९८; कलिंग पहा ).

**कलेयूर** ( ग्राम )—चोल राजा राजराज (प्रथम) च्या स. १००१ च्या शिलालेखमते त्याने नागम् नामक होयसाळ मंत्र्याशी यशस्वीपणे युद्ध केलेले कावेरी नदीच्या दक्षिण तीरावरील तलकाड गावानजिकचे एक ग्राम ( एपि. कर्ना. ३.४४ ).

**कलैकरियस्** ( ग्राम )—टॉलेमीच्या मते दक्षिण भारतातील एक समुद्रकिनारीचे ग्राम ( अक्षांश १४° उत्तर; रेखांश ११६°–४०′ पूर्व ). मॅक्रिंडल यांच्या मते या स्थानाची 'करियस्' ही उपाधी 'करै' ( किनारा ) चे ग्रीक रूपांतर असून ( जसे– पेरिंगकरै ), कॅंगनोरच्या ईशान्येकडील आधु. चलकूरी गाव हेच होय.

**कलोद** ( शिवस्थान )—पश्चिम भारतातील नर्मदा नदीकाठचे भडोच–शुक्ल तीर्थ मार्गावरील कावीनजिकच्या मोटासॉंजा गावापासून १ मैलावरील शिवस्थान. येथे गोपराज नंद आणि बाणासुरस्थापित 'गोपेश्वर' आणि 'कोटेश्वर' शिवमंदिरे आहेत ( ती. पृ. ४३७ ).

**कल्कक** ( देश )—दक्षिण भारतातील एक देश ( म. भी. १०.६० ).

**कल्कम्भ** ( ग्राम )—पश्चिम चालुक्य राजा सोमेश्वर ( प्रथम ) च्या स. १०४८ च्या शिलालेखाचे आधु. बेल्लारी जिल्ह्यातील उपलब्धिस्थान ( रंगाचारी, १. बेल्लारी. ७८ ).

**कल्कलेश्वर** ( लिंग )—अवंती येथील ८४ शिवलिंगांपैकी एक ( स्कन्द. आवन्त्य. अ. च. लिं. १८ ).

**कल्प** ( देश )—उत्तर भारतातील एक देश व लोकसमूह ( कूर्म. ४७.४० ). पाठभेद–'बाल्या'.

**कल्पकारण** ( देश )—पद्ममते भारतवर्षातील एक देश ( पद्म. आदि. ६.४७ ).

**कल्पग्राम** ( तीर्थ )—मथुरा येथील कालिंदी नदीकाठचे वराहमंदिरस्थान ( पद्म. उत्तर. २१२.४१; वराह. १६२.५; १६६.१२ ). डॉ. काणे यांच्या मते आधु. काल्पी ग्राम हेच होय.

**कल्पवृक्ष** ( वट )—पुरुषोत्तमक्षेत्रान्तर्गत एक वटवृक्ष ( नारद. उत्तर. ५५.२३; ५६.२५ ).

**कल्पेश्वर** ( शिवक्षेत्र )—हिमालय पर्वतान्तर्गत पंच-केदारांपैकी एक शिवक्षेत्र. आधु. उरगम गाव हेच असून, येथील ध्यानबद्री मंदिरस्थानी महिषरूप शिवाच्या जटा आहेत ( ती. पृ. ५७; केदारनाथ १. पहा ).

**कल्मषनाशन** ( तीर्थ )—कुरुक्षेत्रातील एक तीर्थ ( वामन. ३६.७६ ).

**कल्माष** ( देश )—भारतवर्षान्तर्गत एक देश आणि लोकसमूह ( बृ. सं. ५.६९ ).

**कल्माषी** ( नदी )—महाभारतमते 'यमुना' नदीचे नामांतर ( म. स. ६९.५९६*; यमुना पहा ).

**कल्याणकट्ट** ( तीर्थ )—दक्षिण भारतातील वेंकटाचल ( आधु. तिरुपति ) क्षेत्रान्तर्गत एक तीर्थ. येथील अश्वत्थ वृक्षाखाली मुंडण करतात ( ती. पृ. ३४८ ).

**कल्याणपुर** ( नगर )—दक्षिणापथान्तर्गत पश्चिम चालुक्य राजवंशस्थापित कुंतल देशाच्या राजधानीचे नगर ( राज. ७.११२४ ). चालुक्य राजा आहवमल्ल ऊर्फ सोमेश्वर ( प्रथम; इ. स. ११ वे शतक ) ने स्थापिलेले हे नगर वीरशैव सांप्रदायाचे संस्थापक बसवेश्वरांची कर्मभूमी मानले जाते. मराठवाड्यातील बिदर गावाच्या ३६ मैल पश्चिमेकडील, आणि उमरगा–हुमणाबाद बसमार्गावरील सस्तापुर गावाच्या ३ मैल डावीकडील आधु. कल्याणी ( बसव–कल्याण ) गाव हेच होय. सोलापूरहून उमरग्याला बसने, आणि सस्तापुरहून रिक्षाने येथे जाता येते. नामांतर–'कल्याण'.

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**—इ. स. ७ व्या शतकात दक्षिण भारतातील चालुक्य राज्याचे 'पश्चिम चालुक्य' ( आधु. दख्खन प्रदेश ), आणि 'पूर्व चालुक्य' ( कृष्णा गोदावरी खोऱ्यातील भूतपूर्व पल्लव राज्य ) असे दोन भाग पडले. त्यापैकी पश्चिम चालुक्य राजा सोमेश्वर ( प्रथम ) ने स्व-राज्याची राजधानी मान्यखेट ( आधु. मालखेड ) हून कल्याणपुर या नवस्थापित नगरास हलविली. या गावचे उत्तरकालीन चालुक्य राजे 'कर्नाटाधिपति' नावाने सुविख्यात झाले.

सोमेश्वर ( प्रथम )चा पुत्र त्रिभुवनमल्ल विक्रमादित्य ( द्वितीय, स. १०७६–११२६ ) हा या नगराचा सर्वाधिक पराक्रमी राजा असून, 'मिताक्षरा' कर्ता विज्ञानेश्वर आणि 'विक्रमांकदेवचरित' कर्ता बिल्हण हे त्याच्या दरबारी होते. स. ११५९ मध्ये चालुक्य राजा तैलप ( तृतीय ) चा सेनापती बिज्जल कलचुरि हा येथील राजा बनला. बसव पुराणमते जैनधर्मीय बिज्जलरायाने बसव नामक वीरशैव पंथस्थापक अमात्याचा अनन्वित छळ केला. तेव्हा बसवाने जगदेव नामक अनुयायाकरवी त्या राजाचा खून करून पश्चिम चालुक्य राज्याचा नाश केला. उत्तरकालात राज्यकर्त्यांच्या आपसातील दुहीमुळे या नगराचाहि नाश झाला (बसव पुराण, विल्सन आवृत्ती. पृ. ३११–३२० ). स. ११८४ मध्ये होयसाळ राजा बल्लाळने हे राज्य जिंकले.

बिज्जलपुत्राद्वारा पराभूत झालेल्या बसवाने मलबार किनाऱ्यावरील विरीषपुरी येथे 'उळिवेनु' ( मी मुक्त होईन ) अशी प्रतिज्ञा करून देहत्याग केला. त्यामुळे लिंगायतक्षेत्र विरीषपुरीला 'उळिवी' नाव प्राप्त झाले ( विरीषपुरी पहा ).

काही अभ्यासकांच्या मते पश्चिम चालुक्योत्तर कलचुरि राजांची राजधानीहि येथेच असून, त्या राज्याच्या विनाशानंतर या नगराचे महत्त्व नाहीसे झाले ( डे, पृ. ८६ ).

**नगरवर्णन**—विक्रमांकदेवचरितमते या गगनचुंबी प्रासादयुक्त नगराभोवती अनेक शत्रुदुर्लंघ्य तट असून, त्यावर स्फटिकाचे कळस होते. या नगरातील घरांना स्फटिकाच्याच जमिनी असून, त्याचे रेशमी ध्वजयुक्त गगनचुंबी सौध रात्रिसमयी चंद्रप्रकाशाने न्हाऊन निघत असत. येथील निर्मळ जलयुक्त तडागाभोवती घनदाट वृक्षराजी असून, येथील लक्षावधी दीप आकाशातील कज्जलसदृश काळोखाचा भेद करीत असत.

विज्ञानेश्वरकृत 'मिताक्षरा 'मते हे पृथ्वीवरील अद्वितीय नगर असून, बसव गुरूंच्या चन्नबसवेश्वर नामक भाच्याच्या कल्याणपुर नगरद्वारलेखमते या भूलोकीच्या कैलाससदृश नगराभोवती ( व्याप्ती–१२ योजने ) ४५ परकोट होते. येथे मांडलिक सामंतादींची लक्षावधी घरे, आणि एक लक्ष शहाण्णव हजार शिवमंदिरे असून, त्यापैकी त्रिपुरांतकेश्वर मंदिर प्रमुख होते. येथे सहस्रावधी शैव मठ आणि लक्षावधी शिवानुभवसंपन्न शिवलिंगधारी लोक असून, या गुरु बसवेश्वर चरणस्पर्शपुनीत नगराच्या केवळ स्मरणाने पापमुक्ती होत असे.

**शिलालेख साहित्यात**—चालुक्य राजा विक्रमादित्य

(षष्ठ) च्या शिलालेखद्वयमते (स. १०७९; १०८७) तो या नगराचा अधिपती असून (एपि. कर्ना. ८.१०९; एपि. इंडि. १२.१४२), चोल राजा राजराज (प्रथम) च्या कलिदिंडि ताम्रपटात (स. १०३१) कल्याणी सम्राट चालुक्य राजांची वंशावळ आढळते (एपि. इंडि २९.५९). चालुक्य राजा वीर सत्याश्रयाच्या दानपत्रातहि चालुक्य-राजधानी म्हणून याचा निर्देश असून (इंडि. अँटि. १४. १४०), तैलप राजाच्या मृत्यूनंतर चोल राजा राजराज (द्वितीय) ने येथील कारभारात ढवळाढवळीचा प्रयत्न केला होता (एपि. इंडि. ३१.२७३–२७४). शालुव राजा गुंड (प्रथम; इ. स. १४ वे शतक) येथे निवास करीत असे.

**आधुनिक काळी**—येथे सध्या निम्नलिखित स्थापत्याव-शेष आढळतात :—

(१) **बसवेश्वर मंदिर**—बसवेश्वरानुयायांनी बांधलेल्या या मंदिराचा आता जीर्णोद्धार केला असून, त्यानजिकच बसवेश्वरांच्या निवासस्थानाचे आणि पूजापाठाचे 'बसवे-श्वर अरमने' (राजवाडा) स्थान, आणि अक्कनागम्माची गुफा आहे.

(२) **कुरुष कट्टा**—बसवेश्वरांच्या दलितोद्धाराच्या, समतेच्या आणि अहिंसेच्या या प्रवचनस्थानी सध्या शाळा आहे.

(३) **विज्ञानेश्वर गवी (गुफा)**— याज्ञवल्क्य स्मृतिच्या 'मिताक्षरा' नामक भाष्यग्रंथाचा कर्ता विज्ञाने-श्वर येथे ज्ञानसाधना करीत असे.

याशिवाय 'शिवानुभवमंडप' 'अल्लप्रभु मंदिर' आदि अन्य ऐतिहासिक वास्तूहि येथे आहेत.

२. चोड राजा कामराजाने स्थापिलेले आंध्र प्रदेशातील एक नगर. नामांतर–'कामपुरी' (एपि. इंडि. २६.).

३. राजतरंगिणीमते कश्मीरराज जयापीडाच्या कल्याण-देवी राणीने स्थापिलेले कश्मीरातील एक नगर (राज. ४.४८३). शुक्रु परगण्यातील शुपियण (प्राचीन 'शूर्पायण') श्रीनगर रस्त्यावरील आधु. कलमपोर गाव हेच होय (अक्षांश ७४°–५४' उत्तर; रेखांश ३३°–४८' पूर्व).

**भौगोलिक स्थान**—राजतरंगिणीमते हे रामुश (शूर्पायण–श्रीनगर रस्त्यावरील आधु. रामूह) गावानजिक असून (राज. ८.२८१३), श्रीवरमते हे द्राभग्रामानजिक (कलमपोरपासून २ मैल वायव्येकडील आधु. द्राबग्राम) होते.

**युद्धे**—पीर पंतसाल घाटाकडून श्रीनगराप्रत जाणाऱ्या लष्करीदृष्ट्या महत्त्वाच्या रस्त्यावरील या गावी प्राचीन काळी अनेक महत्त्वपूर्ण युद्धे झाली होती. राजतरंगिणीमते कश्मीरराज सुःशल आणि उत्पल यांचे युद्ध येथेच झाले असून (राज. ८.१२६१), येथील अन्य युद्धांचे निर्देशहि तेथे आढळतात (राज. ८.२८१४; श्रीवर. ४.४६६).

**वैभव**—या गावच्या भवपुत्र विजय नामक सरदाराच्या वैभवशाली निवासस्थानाचे वर्णन राजतरंगिणीत आढळते (राज. ८.१२६३; २३४८–२३५०).

४. (गिरि) राजस्थानमधील पर्वतसर गावापासून ४ मैल उत्तरेकडील पवित्र पर्वत, आणि दादु सांप्रदायाचे आद्यपीठ (ती. पृ. ५८६).

**कल्याणपुरम्** (तीर्थ)—दक्षिण भारतातील 'कुंभ-कोणम्'चे स्थानिक नामांतर (कुंभकोणम् पहा).

**कल्याणीया** (ग्राम)—धर्मारण्यातील एक ग्राम (स्कन्द. ब्राह्म. ध. ३९.२७९).

**कल्लवाल** (ग्राम)—बौद्ध साहित्यमते मगध देशातील राजगृहनजिकचे बौद्ध भिक्षु मोग्गलायन (मौद्गलायन) चरणस्पर्शपुनीत एक ग्राम (अङ्गुत्तर. ४.८५; थेर ३४१; ३८२). बिहार प्रांतातील सिलौ पोलिस विभागातील आधु. कदम्–तल गाव हेच होय. नामांतर–'कल्लवाल–मुत्त' (कल्लवाल मठ) (पांडे, बिहार. पृ. १५२).

**कल्लार** (देवमंदिरस्थान)—पंजाबमधील सुविख्यात देवमंदिरस्थान. कश्मीरराज ललितादित्य (इ. स. ७२५–७५६) निर्मित मंदिराचे अवशेष येथे आढळतात (गोएट्झ, पृ. १४२).

**कल्लावन** (राज्यविभाग)—गौतमीपुत्र शातकर्णीच्या नासिक शिलालेखमते सातवाहन राज्यकालीन महाराष्ट्रातील नासिक देशाचा एक महत्त्वपूर्ण राज्यविभाग. नासिक जिल्ह्या-तील आधु. कळवण गावासभोवतालचा प्रदेश हाच होय.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या राज्यविभागाची आणि लोकसमूहांची निम्नलिखित नामांतरे आढळतात (परिपत्रक पहा).

**पौराणिक साहित्यात**—ब्रह्माण्डमते हा एक अपरांत देश असून (ब्रह्माण्ड. १६.३०), येथील लोक 'कोलावन' नावाने सुविख्यात होते (वायु. ४५.१२९; ब्रह्माण्ड. ३९.६३).

**शिलालेख साहित्यात**—नासिक शिलालेखाव्यतिरिक्त निम्नलिखित शिलालेखांत या राज्यविभागाचा आणि नगराचा निर्देश आढळतो :—१. कल्चुरि राजा शंकर-गणाचा स. ५९७ चा अभोणा ताम्रपट (कॉर्पस् इन्स्क्रि. ४.१.४०); २. हरिश्चंद्र भोगशक्ति राजाचा स. ७०९ चा

## कल्लावन राज्यविभागाची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. वायु पुराण ( ४५.१२९ ) २. ब्रह्माण्ड पुराण ( ४९.६३ ) आ. ( १६.३० ) | कोलावन |
| | कलिवन |
| ३. अ. शंकरगण राजाचा स. ५९७ चा अभोणा ताम्रपट ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.४० ) ब. भोगशक्ति राजाचा स. ७०९ चा अंजनेरी ताम्रपट ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१. १४९ ) | कल्लिवन |

अंजनेरी ताम्रपट ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.१४९ ); ३. सेंद्रक राजपुत्र जयशक्तीचा स. ६८० चा ताम्रपट ( एपि. इंडि. २९.११७; ११९ ).

**कल्लिकोट्टै** ( ग्राम )—तामीळ साहित्यमते दक्षिण भारतातील ' कालिदुर्ग ' ग्रामाचे नामांतर (कालिदुर्ग पहा).

**कल्लिगेरीस्** ( पर्वत )—टॉलेमीच्या मते सह्य पर्वतान्तर्गत कृष्णगिरि ( आधु. कान्हेरी ) पर्वताचे नामांतर ( कृष्णगिरि पहा ).

**कल्लिवन** ( राज्यविभाग )—शंकरगण राजाच्या स. ५९७ च्या अभोणा ताम्रपटमते महाराष्ट्रातील ' कल्लावन ' राज्यविभागाचे नामांतर ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.४०; कल्लावन पहा ).

**कल्लूर** ( ग्राम )—पूर्व चालुक्य राजा पृथ्वीजयसिंह वल्लभ ( प्रथम ) च्या स. ६५९ च्या गुडिवाड ताम्रपटमते आंध्र प्रदेशातील एक ग्राम. याचे आधुनिक स्थान समजत नाही ( एपि. इंडि. ३१.१२९; १३२ ).

**कल्लेश्वर** ( शिवलिंग )—महाराष्ट्रातील सोलापुर जिल्ह्यातील अक्कलकोटपासून १६ मैलांवरील गोगाव येथील शिवलिंगस्थान. येथील वालुकामय लिंग रामाने स्थापिल्याची स्थानिक समजूत आढळते.

**कल्लोलकेश्वर** ( तीर्थ )—नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( कूर्म. उ.४१.८८ ).

**कवक्कूण** ( लोकसमूह )—बृहत्संहितामते वायव्य भारतातील ' अवगन ' लोकसमूहाचे नामांतर ( अवगन पहा ).

**कवचक्षेत्र** ( ग्राम )—कल्चुरि राजा कोकल्लदेव ( द्वितीय ) च्या इ. स. १० व्या शतकातील गुर्गी शिलालेखमते मध्य भारतातील एक ग्राम. याचे आधुनिक स्थान समजत नाही (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.२२६ ).

**कवल** ( पर्वत )—बौद्ध साहित्यमते हिमालय पर्वतानजिकचा एक पर्वत ( अपादान. ४५१ ).

**कवल्लीविवर** ( बिल्द्वारतीर्थ )—नारदमते पुरुषोत्तमक्षेत्रान्तर्गत एक पवित्र पातालगामी भूविवर (नारद. उत्तर. ५५.१०१ ).

**कविलास** ( पर्वत )—यादव राजा महादेवरायच्या सिंगूर शिलालेखमते, तसेच देवराय महारायाच्या शके १३२९ च्या डंगूर शिलालेखमते ' कैलास' पर्वताचे नामांतर ( एपि. इंडि. २३.१९४; कैलास पहा ).

**कविलासपुर** ( नगर )—यादव राजांच्या शके ११८२ च्या अर्जुनवाड शिलालेखमते कर्नाटकातील नूलेनाड्ड ( आधु. हुक्केरि तालुका ) देशविभागातील एक नगर. बेळगाव जिल्ह्यातील हुक्केरि तालुक्यातील नूरगावाच्या ७ मैल पश्चिमेकडील आधु. कविलसपुर गाव हेच होय. उपरोक्त शिलालेखमते याचे मोसरगुत्ति ( कविलसपुरपासून १ मैलावरील आधु. मोगरगुप्पि ) नामक एक उपनगरहि होते ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २७५ ).

**कवीतल** ( नगर व लोकसमूह )— अल्बेरुणीच्या ग्रंथमते पूर्व पंजाबातील ' कापिष्ठल ' लोकसमूहाचे नामांतर ( अल्बेरुणी, १.२०६; कापिष्ठल पहा ).

**कवीयुर** ( गुफास्थान )— दक्षिण भारतातील पांड्य स्थापत्यशैलीचे ( इ. स. ६ वे शतक ) एक हिंदु गुफामंदिरस्थान ( गोएट्झ, पृ. ११५ ).

**कवेश्वर** ( तीर्थ )— मध्य प्रदेशातील खांडव्यानजिकच्या तलवडिया रेल्वेस्थानकापासून ५ मैलांवरील कावेरी नदीच्या उगमानजिकचे निषधराज नलस्थापित एक तीर्थ. येथील कावेरी नदी ओंकार मांधातृनजिक नर्मदेला मिळते. या नजिकच्या कावेरीग्राम येथे दत्तात्रेयाचा तपस्यास्थान स्वरूप ' दत्तात्रेयाश्रम ' आहे ( ती. पृ. २४१ ).

**कश** ( देश )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते मध्य आशियातील ' काशगर ' देशाचे नामांतर ( काशगर पहा ). अन्य नामांतर ( मध्युगीन तुर्की साहित्य )— ' कशगर '.

**कशकार** ( लोकसमूह )— हिमालय पर्वताश्रयी ' खश ' लोकसमूहाचे स्थानिक नामांतर ( खश पहा ).

**कशलोडा विषय** ( देश )— सोमवंशीय राजांच्या दानपत्रमते ' दक्षिण कोशल' देशाचे नामांतर ( एपि. इंडि.

११.१०३; कोशल पहा ).

**कशावीय** ( बौद्ध संघ )—' काश्यपीय ' बौद्ध संघाचे प्राकृत नामांतर. अन्य नामांतर– ' कशवीय ' ( काश्यपीय पहा ).

**कशीर** ( देश )—' कश्मीर ' देशाचे स्थानिक नामांतर ( कश्मीर पहा ).

**कशेरु** (ग्राम)—हरिवंशमते पूर्व भारतातील प्राग्ज्योतिष-पुरनजिकचे एक ग्राम. येथे भौम नरकाने त्वष्टृकन्या रुचिरांगीला मागणी घातली होती ( ह. वं. २.६३.७ ).

**कशेरुक** ( देश )— मार्कंडेयमते उत्तर भारतातील एक देश ( मार्क. ५४.३९ ). वामन पुराण प्रह्लाद-यात्रामते या पवित्र देशात ( वामन. ८३.१४ ), देवेश नामक वामनाचे स्थान होते ( वामन. ९०.१२ ).

**कशेरुद्वीप** ( द्वीप )— पौराणिक साहित्यमते भारत-वर्षाच्या नऊ उपविभागांपैकी ( खंड, भेद ) एक ( ब्रह्माण्ड. १६.९; मत्स्य. १४४.८ ). महाभारतमते कार्तवीर्य अर्जुन राजाने हे जिंकले होते ( म. स. परि. १.२१.४०४ ). कशेरुमत् संज्ञक यवन राजाचे नगरहि यामध्येच असावे ( म. स. ३१.७२ ). अली यांच्या मते गोदावरी आणि महानदी त्रिभुज प्रदेशांच्या दरम्यानचा पूर्वसमुद्रकिनारीचा प्रदेश हाच होय.

**नामांतरे**— पौराणिक साहित्यात या द्वीपाची निम्न-लिखित पाठभेदात्मक नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. ( वामन. १३.९ ) | कशेरुग |
| २. ( मार्क. ५४.६; विष्णु. २३.६ ). | कशेरुमत् |
| ३. ( गोलाध्याय, भुवनकोश. ४१ ). | कशेरुशकल खंड |
| ४. ( ब्रह्म. १९.६ ). | कसेतुमत् |
| ५. ( अग्नि. ११८.३; वायु. ४५.७९; शिव. उमा. १८.४ ). | कसेरु |
| ६. ( लिङ्ग. ५२.२७; वायु. ४५.११९ ). | कसेरुक |
| ७. ( कूर्म. पूर्व. ४७.४ ). | कसेरुकमत् |
| ८. ( काव्यमी. १७.२२३ ). | कसेरुमत् |
| ९. ( वराह. ८५.१ ). | कसेरु खंड |

**मतांतरे**— अल्बेरुणीच्या मते हा मध्यदेशाच्या पूर्वेस असून ऐन-इ-अकबरीमते हा महेंद्र आणि शुक्तिमत् पर्वतांच्या दरम्यान होता. डॉ. मुजुमदार यांच्या मते आग्नेय आशियातील आधु. मलाया द्वीपकल्प हेच असावे. परंतु त्यांचे हे अनुमान यथायोग्य वाटत नाही ( अली, पुराणाज्. पृ. १२६; भारतवर्ष पहा ).

**कश्मर** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारत-वर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.१० ).

**कश्यप** ( तीर्थ )—वायुमते एक श्राद्धयोग्य महातीर्थ. नामांतर–' कालसर्पिस् ', ' काश्यप ' ( वायु. ७७.८९; ब्रह्माण्ड. ३.१३.९८ ).

२. साभ्रमती नदीकाठचे एक तीर्थ ( पद्म. उत्तर. १५७.१ ).

३. अर्बुद पर्वतावरील एक तीर्थ. याच्या माहात्म्यानेच साभ्रमती नदीची उत्पत्ती झाली ( पद्म. उ. १६४ ).

**कश्यप-आश्रम** ( आश्रमस्थान )—कश्यप ऋषींची आश्रमस्थाने भारतातील निम्नलिखित स्थानी दाख-वितात :—

१. **बिहारमध्ये**—हा गयेनजिक असून, नजिकच तारा-देवीचे एक मंदिर आहे. येथे कश्यप ऋषींनी तप करून तारा देवीची स्थापना केल्याचे मानतात ( ती. पृ. १५९ ).

२. **अहमदाबादनजिक**—अहमदाबादपासून १४ मैल नैर्ऋत्येकडील कासंद्रा या साबरमती नदीकाठच्या गावच्या या स्थानी ' भद्रेश्वर ' आणि ' कोटेश्वर ' नामक दोन शिवमंदिरे आहेत ( ती. पृ. ४२४ ).

३. **नर्मदाकाठी**—हा शुक्लघाट येथे आहे.

४. **नर्मदाकाठी**—हा भडोच येथे गौतमेश्वर मंदिरा-नजिक आहे.

**कश्यपतुङ्ग** ( पर्वत )—गोपथ ब्राह्मणमते कश्यप ऋषींचे तपस्यास्थान ( गो. ब्रा. ७.८ ).

**कश्यपद्वीप** ( द्वीप )—महाभारतमते शशचक्रात्मक भारतवर्षाच्या कर्णभागातील एक द्वीप ( म. भी. ७.५२ ).

**कश्यपपद** ( तीर्थ )—गया येथील एक तीर्थ ( वायु. १०९.१८; १११.४९–५८ ).

**कश्यपीसङ्गम** ( तीर्थ )—तापी नदीकाठचे एक तीर्थ ( तापीमाहात्म्य ).

**कश्यपेश्वर** ( लिंग )—तापी नदीकाठचे एक शिव-लिंग ( तापीमाहात्म्य ).

२. प्रभासक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंग ( स्कन्द. प्रभास. प्र. २१३ ).

३. श्रीमालक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंग (श्रीमालमाहात्म्य. ११).

४. वाराणसी येथील एक शिवलिंग ( लिङ्ग. तीर्थ-विवेचन. पृ. ७५ ).

**कश्मीर** ( देश )—पाणिनीची अष्टाध्यायी आणि पौराणिक साहित्यमते उदीच्य ( वायव्य ) भारतातील सिंधु नदीच्या पश्चिमेकडील एक जनपद ( पा. सू. ४.२.७६ ). सिंधु नदीच्या वितस्ता ( आधु. झेलम ) नामक पूर्ववर्ती उपनदीच्या खोऱ्यातील, तसेच उभय किनाऱ्यांवरील पर्वत-वेष्टित आधु. कश्मीर देश हाच होय. स्टाइन यांच्या मते बारामूला खिंडीच्या वरच्या भागातील झेलम नदीच्या आणि तिच्या उपनद्यांच्या खोऱ्यातील या देशात त्या नदीचे मुख्य खोरे, तसेच त्याच्या पर्वतवेष्टित भागाचा समावेश होत असे ( स्टाइन, मेमॉयर. पृ. ६३ ).

**भौगोलिक परिसीमा**—स. १८४६ च्या ब्रिटिश-कश्मीर तहनाम्यानुसार जम्मू-कश्मीर देश सिंधु नदीच्या पूर्वेस व रावी नदीच्या पश्चिमेस असून ( इंपि. गॅझे. १५.७४ ), गेल्या तेरा शतकांहून अधिक काळ कश्मीरच्या या भौगोलिक परिसीमा अबाधित आहेत. ह्युएन्त्संग, अल्बेरुणी, राजतरंगिणी आदि ग्रंथात याच्या याच भौगोलिक मर्यादा वर्णिल्या आहेत. शक्तिसंगमतंत्रमते शारदामठ ( किशनगंगा-गंगोत्री संगमावरील आधु. साद्री ) आणि कुंकुमाद्रि ( श्रीनगरनजिकचे आधु. पांपुरा पठार ) यांच्या दरम्यानचा प्रदेश ( व्याप्ती-५० योजने ) म्हणजे हा देश होय ( शक्तिसङ्गम. ३.७९ ).

**सांस्कृतिक उपविभाग**—भौगोलिक आणि सांस्कृतिक दृष्ट्या कश्मीरचे तीन उपविभाग असून, त्यापैकी चिनाब खोऱ्याच्या दक्षिणेकडील जम्मू विभाग हिंदु वस्तीचा, आणि झेलम खोऱ्याचा भाग मुसलमान वस्तीचा आहे. ईशान्येकडील बौद्ध वस्तीच्या लडाख प्रदेशावर तिबेटी संस्कृतीचा प्रभाव आहे.

**माहात्म्य**—महाभारत आणि ऐन्-इ-अकबरीमते हा मानस सरोवराचे प्रवेशद्वारस्वरूप देश अत्यंत पवित्र असून ( म. आर. १३०.१०-१४; ऐ. अ. २.३५४ ), राजतरंगिणी आणि नीलमतमते तीर्थस्थानांनी ओतप्रोत भरलेल्या या देशात नाग देवतांचे अगणित पवित्र झरे, तलाव आणि सरोवरे होती ( राज. १.३८; नीलमत. ११३०-११३१ ). ऐन्-इ-अकबरीमते येथे महादेवाची ४५, विष्णूची ६४, ब्रह्मदेवाची ३१ आणि दुर्गेची २२ अशी एकूण १३४ देवालये, तसेच नागराजाची ७०० तीर्थे होती ( ऐ. अ. २.३५४ ). राजतरंगिणीमते विद्वत्ता, वैभवशाली रहाणी, केशर, हिमयुक्त जल आणि द्राक्षे या त्रैलोक्यदुर्लभ गोष्टी या नंदनवनसदृश देशाचे वैशिष्ट्य होत्या.

नीलमतमते या उमा ( सती ) स्वरूपी देशातील वितस्ता नदी सतीच्या केशकलापातील भांगासदृश असून, येथील राजा शिवस्वरूप होता ( नीलमत. ४५; ३१३-३१४ ). कूर्ममते वितस्ता नदी साक्षात सतीस्वरूप होती ( कूर्म. उत्तर. ४३.४ ).

राजतरंगिणी, ह्युएन्त्संग आणि अल्बेरुणीमते हा पर्वत-वेष्टित प्रदेश शत्रूंना दुर्लंघ्य असून ( राज. १.३१;३९ ), उत्तरकालीन उत्तर दिशानुवर्ती मुसलमानी आक्रमणा-नंतरहि हीच कल्पना अबाधित राहिली.

**देशनाम**—प्राचीन साहित्यात सर्वत्र याचा आणि येथील लोकांचा निर्देश अनुक्रमे ‘ कश्मीर ’ आणि ‘ काश्मीर ’ ( काश्मीरक = कश्मीरनिवासी ) नावांनी केला असून, स्थानिक लोकात सध्या ‘ कशीर ’ हे देशनाम आणि ‘ काशीर ’ ( काश्वीर ) हे लोकनाम प्रचलित आहे. टॉलेमीच्या ग्रंथातील या देशाचे ‘ कास्पिरिय ’ नावहि प्राकृत ‘ कश्वीर ’चेच ग्रीकभाषीय रूप असावे.

**व्याप्ती**—चहुबाजूंनी उत्तुंग पर्वतश्रेणींनी ( उंची-१३०००′ ) वेष्टिलेला कश्मीर देश भारताचा अविभाज्य भाग असूनहि, भौगोलिक आणि सांस्कृतिक दृष्ट्या तो भारताहून अलग आहे. ३९०० चौरस मैल क्षेत्रफळाच्या ( ११६×७५ मैल ) या देशातील मध्यवर्ती सपाट प्रदेश केवळ १८०० चौ. मैल व्याप्तीचा ( ८४×२५ मैल ) असून, उर्वरित भाग डोंगराळ आहे.

या देशासभोवतालच्या पर्वतवलयांमधून मध्य भागाप्रत धावणाऱ्या साऱ्या नद्या झेलम नदीस मिळत असून, कश्मीरच्या वायव्येकडील वराहमूल खिंडीतून ही नदी या देशाबाहेर पडते. त्यापलीकडील २०० मैलांची चिंचोळी पट्टी ‘ वितस्ता (आधु. झेलम) खोरे ’ नावाने सुविख्यात असून, त्यापैकी ५० मैलांपर्यंत प्राचीन कश्मीरची राजकीय सरहद्द होती.

**नामांतरे**— प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा ).

**नामव्युत्पत्ती**—प्राचीन साहित्यात या देशनामाच्या निम्नलिखित व्युत्पत्ती आढळतात :—

( १ ) **कश्यप-मेरु**—काही अभ्यासकांच्या मते हे देशनाम ‘ कश्यप-मेरु ’चे अपभ्रष्ट रुप असून, नीलमतमते येथील सरोवरजलाचा निचरा करून हा देश वसाहतयोग्य

## कश्मीर देशाची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. महाभारत ( आर. १३०. १० ) | काश्मीर मंडल |
| २. बृहत्संहिता | काश्मीरक |
| ३. स्कन्द पुराण ( माहेश्वर कौ. ३९.१४२ ) | काश्मीर |
| अ. विक्रमांकदेवचरित ( १८.१.१८ ) | काश्मीर |
| ४. नीलमत पुराण ( ६४ ) | सती देश |
| ५. टॉलेमी ( ४.१.४२ ) | कस्पीर ( कश्वीर ) |
| ६. हिरोडोटस् | कस्पत्यरोस् |
| ७. ग्रीक ' बस्सरिक ' काव्य | कस्पैरोइ |
| ८. चिनी साहित्य | कि–पिन् |
| ९. ह्युएन्त्संगचे प्रवासवर्णन | किय–शि-मि–लो |
| १०. कल्चुरि राजा कर्णाचा स. १०४७ चा गोहरवा ताम्रपट ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१. २५५ ). | काश्मीर |
| ११. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य | |
| अ. ( त्रिकाण्ड. ३१.८; वैज.३७.५३ ) | काश्मीर |
| ब. ( त्रिकाण्ड. ३१.८; अनेकार्थ. ३४.४१४ ) | कीर |
| क. ( अभिधान. १३०. ९५८ ) | मधुमत् |
| ड. ( त्रिकाण्ड. ३१.८ ) | शास्त्रशिल्पित |
| इ. ( अन्य ग्रंथ ) | सारस्वत, विकर्णिक |
| १२. प्राकृत साहित्य | कश्चीर |
| १३. स्थानिक नाव | कशीर ( काशीर ) |

बनविण्याचे कार्य कश्यप ऋषींनी केल्यामुळे त्यास हे नाव प्राप्त झाले. कश्यप आणि महामेरूच्या अभेद्यत्वाचा निर्देश तैत्तिरीय आरण्यकातहि आढळतो ( तै. आ. १.७ ).

( २ ) **जलनिष्क्रमित देश**—नीलमतमते ' हरिरूपी परमेश्वराने जल ( कं ) नाहीसे केलेला देश ' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले ( नीलमत. २९२–२९३ ).

( ३ ) **कास लोकांचा देश**—बाबरचे आत्मचरित्र, तसेच ऐन्–इ–अकबरीमते ' कास ( खश ) लोकांचा देश ' अशा अर्थाने यास हे ( कश्मीर = कश लोकांचा पर्वत ) नाव मिळाले ( बाबर, आत्मचरित्र. पृ. ३१३; ऐ. अ. २.३८१ ).

( ४ ) **कश्यपमठ**—हैदर मलिकच्या ग्रंथमते ' कश्यप ऋषींचा मठ ' ( कश्यपमठ ) अशा अर्थाने यास हे नाव मिळाले.

( ५ ) **कश्यपमीर**—बुर्नौफच्या ग्रंथमते ' कश्यपमीर ' ( कश्यप ऋषींचा समुद्र ) अशा अर्थाने यास हे नाव मिळाले.

उपरोक्त सारी अनुमाने भाषाशास्त्रीय अथवा ऐतिहासिक दृष्ट्या असंभव वाटतात.

**उत्पत्ती**–या देशाच्या विशिष्ट आकृतिबंधनाच्या स्पष्टीकरणार्थ पुरातनकाली हा देश ' सतीसरस् ' नामक सरोवर असल्याची आख्यायिका प्राचीन साहित्यात सर्वत्र आढळते. नीलमतमते या ' सतीसरस् 'मध्ये ( व्याप्ती. ६×३ योजने ) गरुडभयाने लपलेल्या वासुकि नागाचे निवासस्थान असून ( नीलमत. १०५–१०७ ), त्याच्याच वंशातील नील नागाला जलोद्भव नामक राक्षस त्रस्त करू लागला. तेव्हा नागपिता कश्यपाच्या प्रार्थनेवरून विष्णूने अनंतनागाकरवी या सभोवतालच्या पर्वतभेदाने सतीसरस् कोरडे करवून, आणि जलोद्भवाचा वध करवून या ( सती ) देशाची निर्मिती केली. कालांतराने येथे मानव आणि नाग एकोप्याने राहू लागले ( राज. १.२५–२७ ). ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात, तसेच ऐन्–इ–अकबरीमध्येहि ही आख्यायिका पुनरुद्धृत असून ( बील, १.१४९; ऐ. अ. २.३८० ), हा देश भूतपूर्वकाली संपूर्णतः अथवा अंशतः पाण्याखाली असल्याचे भूगर्भशास्त्रज्ञांनीहि मान्य केले आहे ( स्टाइन, राज. ३९० ).

**कौटिलीय अर्थशास्त्रात**—या ग्रंथमते हा देश हिऱ्यांसाठी (वज्र ) सुविख्यात होता.

**पाणिनीय व्याकरण साहित्यात**–पाणिनीच्या अष्टाध्यायीत (पा. सू. ४.२.७६), तसेच गणपाठान्तर्गत कच्छादि आणि सिंध्वादि गणात ( पा. सू. ४.२.१३३; ३.९३ ) शाल्व जनपदासमवेत याचा निर्देश असून, पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यातहि ' कश्मीर ' हे देशनामच मानले आहे.

**महाभारतात**—या ग्रंथमते ' काश्मीर ' या उदीच्या जनपदातील ( म. भी. १०.५२; ६२; ६६ ) ' काश्मीरक ' लोकांना युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या उत्तर दिग्विजयात अर्जुनाने जिंकले असून ( म. स. २४.१६ ), येथील राजाने युधिष्ठिरास मद्य आणि मध उपायन म्हणून अर्पिले होते ( म. स. परि. १.३३.२० ). भारतीय युद्धात श्रीकृष्णाने ( म. द्रो. १०.१६ ), तसेच पुरातन

काली परशुरामाने यांना जिंकले होते ( म. ब्रो. परि. १. ८.८४५ ).

महाभारत लोमशयात्रा ( म. आर. १३०.१० ), तसेच अंगिरस्यात्रामते ( म. अनु. २५.८ ), या ( काश्मीर मंडल ) तीर्थस्थानी उत्तर दिशावर्ती ऋषी, नहुषपुत्र ययाति, अग्नि आणि कश्यप ऋषीचा संवाद झाला होता. येथील चंद्रभागा ( आधु. चिनाब ). आणि वितस्ता ( आधु. झेलम ) या सिंधुगामिनी नद्यांतील सप्तदिनात्मक स्नानाने मनुष्यमात्र मुनींप्रमाणे निर्मल बनून स्वर्लोकी जात असे.

**बृहत्संहितेत**—या ग्रंथात ईशान्य भारतातील 'काश्मीर' ( बृ. सं. १४.२९;५.७७–७८;९.५८;१०.१२ ) अथवा 'काश्मीरक' ( कश्मीरदेशनिवासी ) लोकांचा निर्देश आढळतो ( बृ. सं. ५.७०;११.५७ ).

**पौराणिक साहित्यात**—या साहित्यमते सप्तगंगांपैकी पश्चिमवाहिनी सिंधु नदीच्या मार्गावरील ( ब्रह्माण्ड. १८.४७ वायु. ४७.४५ ), हे जनपद ( पद्म. आदि. ६.४८ ) भारताच्या उदीच्य भागात होते (पद्म. आदि. ६.६२; मार्कं. ५४.४१;वायु. ४५.१२०). अन्य पुराणात यास 'ईशान्य' ( विष्णुधर्म. १.९.१० ), अथवा 'कूर्मचक्रात्मक भारत-वर्षाच्या ईशान्य भागातील' म्हटले असून ( बृ. सं. १४. १९; मार्कं ५५.४९ ), मार्कंडेयमते 'काश्मीर' ही संज्ञा देश व लोकसमूह अशा उभय अर्थांनी उपयोजिली जात असे ( मार्कं ५४.४१ ). स्कंदमते या ( काश्मीर मंडल ) देशात ६८ हजार ग्रामे होती ( स्कन्द. माहेश्वर. कौ. ३९.१४२ ).

**शिवस्थान**—स्कंदमते हे भारतातील अडुसष्ट शिवस्थानांपैकी असून, येथील शिवाचे नाव विजयलिंग होते. कालान्तराने तो शिवकाशी येथील शालकंटकटेच्या पूर्वेस स्थलांतरित झाला ( स्कन्द. काशी. ६९.६१ ). पद्ममते येथील 'माणिक्येश्वर' नामक अन्य एक शिवलिंग होते (पद्म उत्तर. १७७.६६.८४ ).

**देवीस्थान, विष्णुतीर्थ आणि ब्रह्मदेवस्थान**—पद्ममते हे एक देवीस्थान, विष्णुतीर्थ आणि ब्रह्मदेवस्थान असून, येथील देवीचे नाव मेधादेवी (पद्म आदि. १७.२११); मत्स्य १३. ४७ ), विष्णूचे नाव पौष्क (पद्म. उत्तर १२९.२७), आणि ब्रह्मदेवाचे नाव हंसवाहन ( पद्म. आदि. २९.१४३ ) होते. योगिनीतंत्रातहि या देशाचा निर्देश आढळतो ( योगिनी. १.३;२.९ ).

**शक्तिपीठ**—तंत्रचूडामणिमते येथे सतीचा कंठ पडला असून, येथील देवीचे नाव महामाया, आणि भैरवाचे नाव त्रिसंध्येश्वर होते. कश्मीरातील अमरनाथ गुफेनजिक हे स्थान सध्या दाखवितात ( अमरनाथ पहा ).

**सिकंदरस्वारीच्या वर्णनात**—तक्षिलेहून 'हैदस्पेस' ( झेलम ) नदीकडे जाणाऱ्या सिकंदरचे सैन्य कश्मीरच्या पश्चिम आणि दक्षिण सरहद्दीवरील 'अर्सकेस्' ( उरशा ) आणि 'अबिसरेस्' ( अभिसार ) देशातून गेल्यामुळे या देशाचा निर्देश या साहित्यात आढळत नाही.

**टॉलेमीच्या ग्रंथात**—या ग्रंथमते 'कस्पेरिय' देश बिदस्पेस ( वितस्ता ), संदबल ( चंद्रभागा ), आणि अद्रिस ( इरावती ) नद्यांच्या उगमांच्या दक्षिणेस ( टॉलेमी, ४.१.४२ ), 'दर्द्द' ( सिंधु नदीकाठचा दरद देश ) आणि 'क्यलिंद्रिन्' ( बियास नदीकाठचा कुलिंद देश ) देशांच्या दरम्यान होता. 'बिदस्पेस' नदीकाठच्या 'पंदूओइ' देशापासून पूर्वेकडील 'औइंदिओन' (विंध्यचे) पर्वतापर्यंत तो होता. पंजाब, वायव्य सरहद्द प्रांत आणि मध्यप्रदेश या साऱ्या प्रदेशांचा अंतर्भाव करणारे टॉलेमीच्या राजतरंगिणीपूर्वकालीन कश्मीरवर्णन भौगोलिक दृष्ट्या अतिव्यात वाटते. या ग्रंथमते मुलतान-नजिकचे 'कस्पैर' नगरहि याच देशात समाविष्ट होते ( मॅक्रिंडल, टॉलेमी. पृ. ३०५ ).

**ग्रीक काव्यात**—'बस्सरिक' नामक ग्रीक काव्यमते 'कस्पैरोइ' लोक अखिल भारतात द्रुतगतीने धावण्याबद्दल सुविख्यात होते ( अल्बेरुणी, १.२०६ ).

**हिरोडोटस्च्या ग्रंथात**—या ग्रंथमते डेरियस राजाने सिंधु नदीचे उगमस्थान शोधण्यासाठी पाठवलेले शिष्टमंडळ गंधार ( आधु. पेशावर जिल्हा ) देशातील 'कस्पत्यरोस' खोऱ्यात उतरले होते. या आधारेच या देशाचे मूळ नाव 'कश्यपुर' असल्याचे अनुमान विल्सन काढतात.

**बौद्ध साहित्यात**—दिव्यावदानमते हे एक सुंदर शहर असून ( दिव्यावदान. पृ. ३९१ ), अवदानशतक आणि बोधिसत्त्वावदान–कल्पलता ग्रंथमते हे नागव्यात होते ( अवदान. पृ. ६७; बोधिसत्त्व पृ. ७० ). येथील एका बौद्ध भिक्षूने 'स्रग्धरास्तोत्र' नामक ग्रंथ लिहिला असून बुद्धशिष्य आनंदाने माध्यंतिक नामक भिक्षूला येथे बौद्ध धर्मप्रसारार्थ पाठविले होते.

**चिनी साहित्यात**—या साहित्यमते 'कि–पिन्' ( काबूल खोरे ) देशनाम क्वचित प्रसंगी या देशाला उद्देशून प्रयुक्त केले जात असून, स. ५४१ च्या तांग राजघराण्याच्या इतिहासमते हा देश उत्तरेकडील हिममय पर्वतांच्या

पायथ्यानजिकच्या खोऱ्यामध्ये होता.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या देशाच्या पश्चिमेकडील ‘उरशा’ देशातून वितस्ता खोरे मार्गाने वराहमूल द्वारातून ह्युएनत्संग येथे येऊन २ वर्षे राहिला. वराहमूलनजिकच्या हुष्कपुर येथे एक दिवस राहून नंतर तो श्रीनगर येथील जयेंद्र विहाराप्रत गेला.

ह्युएन्त्संगच्या मते या पर्वतवेष्टित अरुंद खिंडीच्या देशातील हवा थंड आणि हिममय, आणि जमीन सुपीक होती. येथील लोक देखणे, व्यासंगी, विद्याप्रेमी, चेष्टेखोर, परंतु आतल्या गाठीचे, दुबळे आणि कंजूष होते. अशोकराज्यकाली मौर्य साम्राज्यात समाविष्ट होणारा हा देश तत्काली गंधार साम्राज्यात अंतर्भूत होता.

ह्युएन्त्संगच्या मते मध्यांतिक नामक बौद्ध भिक्षूने येथे सर्वप्रथम बौद्ध धर्मप्रसार केला असून, अशोकाच्या काळी येथे ५०० बौद्ध भिक्षू होते. गंधारराज कनिष्काच्या काळी येथे बौद्ध धर्मपरिषद भरली होती. ह्युएन्त्संगच्या काळी येथील बौद्ध धर्माचा लोप होऊन सारा देश हिंदुधर्मीय बनला होता.

**बौद्ध स्तूप**—ह्युएन्त्संगच्या मते या देशात अशोकाचे चार आणि कनिष्काचा एक स्तूप असून, त्यापैकी श्रीनगर येथील अशोकस्थापित बौद्ध दंतावशेष स्तूप, आणि बौद्ध धर्मपरिषदेत संमत झालेल्या बौद्ध सुत्तांच्या ताम्रपटावर उभारलेला कनिष्क स्तूप प्रमुख होते. हे सारे स्तूप सध्या नष्ट झाले आहेत.

कश्मीर खोऱ्याच्या नैर्ऋत्येकडील पर्वत ओलांडून ह्युएन्त्संग पर्णोत्स आणि राजपुरी देशांस गेला.

**अन्य चिनी साहित्यात**—कश्मीरच्या चंद्रापीड आणि मुक्तापीड (स. ७१३) राजांच्या चीन देशाच्या प्रवासवर्णनात कश्मीरातील महापद्म सरोवर आणि प्रवरपुराचे वर्णन असून, औ–काँग्च्या प्रवासवर्णनमते (स. ७५९) तत्काली या देशात ३०० बौद्ध विहार, चार बौद्ध मठ आणि अनेक स्तूप होते. त्यावरून त्या काळी येथे बौद्ध धर्माचे पुनरुत्थान झाले असावे.

**अल्बेरुणीच्या ग्रंथात**—या ग्रंथमते (स. १०१७–१०३०) मुसलमानी आक्रमणानंतर भारतातील विद्याव्यासंगी लोक कश्मीर आणि वाराणसी प्रदेशात स्थलांतरित झाले (अल्बेरुणी, २.१८१).

अल्बेरुणीच्या मते या देशाच्या दक्षिणेकडील पर्वतराजीनजिक भारतातील पावसाळी वाऱ्यांचा पाऊस अडत असल्याने येथे अत्यंत कमी पाऊस पडे. येथे स्वतंत्र वर्षाऋतू नसून माघापासून चैत्रापर्यंत हिमवृष्टी होई. नंतर थोडा पाऊस पडून वितळलेल्या बर्फाने सारी भूमी स्वच्छ होई. कमी पाऊस आणि सुखद उन्हाळा यांचे वरदान देवांनी या देशाला दिले होते (अल्बेरुणी, १.२११; राज. १.४१; २.१३८).

**राजतरंगिणीत**—कल्हणाच्या राजतरंगिणीत (स. ११४९) इ. स. ९–१२ व्या शतकातील कश्मीरचा इतिहास, भूगोल, तसेच सामाजिक आणि सांस्कृतिक स्थितीचे यथातथ्य चित्रण असून, त्याच्या अनुकरणाने लिहिलेल्या जोनराज आणि श्रीवरकृत ‘राजतरंगिणी’त तसेच ‘लोकप्रकाश’ मध्ये त्यास पूरक माहिती आढळते.

कश्मीरमधील शिलालेखसाहित्याचा अभाव राजतरंगिणी आणि तिच्या परंपरेतील अन्य उत्तरकालीन इतिहासग्रंथांत, तसेच नीलमत पुराण, हरचरितचिंतामणि आदि परंपरागत धार्मिक ग्रंथांनी भरून निघत असल्याचे प्रो. जॉर्ज बूलर यांनी ‘कश्मीर रिपोर्ट’ मध्ये सर्वप्रथम सिद्ध केले. या साहित्यान्तर्गत कश्मीरविषयक भौगोलिक माहितीचे, तसेच कश्मीरमधील तीर्थक्षेत्रे, नगरे, ग्रामे, आणि प्रासंगिक भौगोलिक निर्देशांचे सविस्तर विवेचन प्रस्तुत ग्रंथाच्या ‘प्रास्ताविका’त आम्ही केले आहे. (प्रास्ताविक– ‘प्रादेशिक भूगोल’ पृ. ३१–३४ पहा).

**उपविभाग**—या देशाचे ‘क्रमराज्य’ (श्रीनगरच्या दक्षिणेकडील वितस्ता खोरे = आधु. क्रमाझ) आणि ‘मडव राज्य’ (श्रीनगरच्या उत्तरेकडील वितस्ता खोरे = आधु. मराझ) संज्ञक दोन उपविभाग असून, श्रीनगर गाव ‘मडव राज्या’त समाविष्ट होत असे. राजतरंगिणी–परंपरेच्या ग्रंथातील या देशातील राज्यविभागांची (विषय) नामावली खाली दिली आहे (परिपत्रक पहा).

श्रीनगरच्या पश्चिम, दक्षिण, आणि उत्तर दिशेकडील आधु. अल्शान, बलद आणि अखई जिल्ह्यांचा, तसेच निम्नलिखित अन्य परगण्यांचा निर्देश प्राचीन साहित्यात आढळत नाही:—(१) **क्रमराज्यान्तर्गत परगणे**—१. माचिपोर; २. खुय (किहि); ३. पायीन; ४. माचहौम; **२. मडवराज्यान्तर्गत परगणे**—१. शदाबाद (बन्नहल); २. बोट (ख़ुपियण शहर); ३. सुपरसामुन; ४. शुक्रु; ५. शाउर; ६. च्राठ; ७. बाला.

**लोकप्रकाशमध्ये**—राजतरंगिणी–परंपरेतील कश्मीर परगण्यांची सर्वाधिक, संपूर्ण निम्नलिखित नामावली ‘लोकप्रकाश’ मध्ये आढळते:– १. खोयाश्रमी (खूयाश्रम-राज.); २. शमाला; ३. ल्हरी (लहर-राज.); ४. औलडीय (होलडा–राज.); ५. निलाश (निलाश्व–राज.); ६.

## कश्मीरचे राज्यविभाग ( विषय )

| प्राचीन नाव | आधुनिक नाव | प्राचीन नाव | आधुनिक नाव |
|---|---|---|---|
| ( १ ) क्रमराज्य ( क्रमाझ ) विभाग | | ( २ ) मडवराज्य ( मराझ ) विभाग | |
| १. द्वाविंशति ( लोक. ) | दून्त्स | १. फाखुवा ( श्रीवर | फाख |
| २. बहुरूप ( जोन. ) | बीरु | २. खडूवी ( राज. ) | विही |
| ३. परिहासपुर ( राज. ) | परस्पौर | ३. होलडा ( राज. ) | वुलर |
| ४. अभ्यंतरकोट्ट ( राज. ) | अंदरकौठ | ४. दक्षिणपार ( श्रीवर. ) | दचुनपोर |
| ५. भांगिल ( राज. ) | बांगिल | ५. वामपार्श्व ( जोन. ) | खौवुरपोर |
| ६. पट्टन ( राज. ) | पटन | ६. मार्तंड ( जोन. ) | माटन |
| ७. तैलग्राम ( प्राज्यभट्ट ) | तिलगाम | ७. कपटेश्वर ( राज. ) | कुठहार |
| ८. क्रोधन ( लोक. ) | क्रुहिन | ८. भृंग ( लोक. ) | ब्रिंग |
| ९. शमाला ( राज. ) | हमल | ९. देवसरस् ( राज. ) | दिवसर |
| १०. उत्तर ( राज. ) | उत्तर | १०. कराल ( राज. ) | आडविन |
| ११. लौलाह ( राज. ) | लौलऊ | ११. अर्धवन ( जोन. ) | ? |
| १२. जैनगिरि ( जोन. ) | झैनगीर | १२. जैनपुर ( जोन. ) | झैनपोर |
| १३. खूयाश्रम ( राज. ) | खुयहौम | १३. नागाम ( जोन. ) | नागाम |
| १४. लहर ( राज. ) | लार | १४. इक्षिका ( श्रीवर. ) | येच् |
| | | १५. अनंतनाग ( राज. ) | अन्येच् ( इस्लामाबाद ) |

खडूवीय ( खडूवी–राज. ); ७. एकन ( एवेनक–राज. ); ८. देवसूवी ( देवसरस्–राज. ); ९. क्रोधन ( आधु. क्रुहिन ); १०. द्वाविंशति ( आधु. दून्त्स ); ११. भृंग ( आधु. ब्रिंग ); १२. फागवा ( आधु. फाख ); १३. चालन; १४. वितस्था; १५. सत्रव; १६. स्वनवारी; १७. नील; १८. हारी; १९. जलड्दीय.

ऐन्–इ–अकबरीमध्ये कश्मीर परगण्यांची संख्या ४१ अथवा ३८ दिली असून, स्टाइन यांच्या मते इतिहासाच्या विभिन्न कालखंडात या देशातील ' विषय 'संख्या पुढीलप्रमाणे होती :—१. हिंदु कालखंड–२७ परगणे; २. मोंगल व पठाण कालखंड–३८–४१ परगणे; ३. शीख कालखंड–३६ परगणे; ४. डोग्रा कालखंड–४३ परगणे; ५. ब्रिटिश कालखंड–११ परगणे ( तहसील ). राज्यकारभाराच्या सोयीसाठी ब्रिटिशांनी परगण्यांची संख्या कमी केली असावी.

**शेतीचे कालवे**—राजतरंगिणीमते तांदूळ हे या देशाचे प्रमुख पीक असून ( राज. १.२४६ ), त्यासाठी येथे निम्नलिखित कालवे खोदण्यात आले होते :— १. **सुवर्णमणिकुल्या** ( आडविन परगण्यातील आधु. सुनमणिकुल; राज. १.९७ ); २. **दामोदर उडर** ( दामोदर राजाने बांधलेला, राज. १.१५६ ); ३. **नांदी कालवा** (अवंतिवर्मन राजाच्या सूर्य नामक स्थापत्यविशारदाने नंदक गावानजिक बांधलेला; राज. ५.८७ ).

उपरोक्त कालव्यांव्यतिरिक्त कश्मीरराज ललितादित्याने चक्रधर ( आधु. त्सकदर ) गावानजिक वितस्ता नदीवर ' अरघट्ट ' ( अंभप्रतारण ) संज्ञक अनेक जलप्रक्षेपक चक्रे बसविली होती ( राज. ४. १९१ ). कश्मीर सुलतान झैनुल आबिदीनने पोहुर नदी→ झैनगीर परगणा, तसेच लिदर नदी → मार्तांड उडर कालवे बांधले होते ( जोनराज. ११४१–११५५; १२५७; श्रीवर. १.४१४ ).

**केशराची लागवड**—केशर ( कुंकुम ) आणि द्राक्षे या स्वर्गीय वस्तूंचे विपुल पीक हे कश्मीरचे प्रमुख वैशिष्ट्य असून ( राज. १.४२ ), पद्मपुर ( आधु. पांपर ) गावाचा परिसर त्यासाठी विशेष प्रसिद्ध होता ( ऐ. अ. १.३५७ ).

या देशातील ' काश्मीरी ' नामक द्राक्षे ( राज. १.४२; ४.१९२; ७.४९८ ) मार्तांड भागात विपुल होत असून ( चतुर्थ इतिहास. ८५१;९२८ ), अकबराच्या काळी येथील द्राक्षांचा दर्जा खालावला होता ( ऐ. अ. १.६५; ३४९ ). सध्या येथे फारच थोडी द्राक्षे होतात.

**मंदिरे**—येथील अगणित मंदिरांपैकी कश्मीरराज ललितादित्याने ( इ. स. ८ वे शतक ) बांधलेले इस्लामाबादच्या ३ मैल पूर्वेकडील मार्तांड हे सूर्यमंदिर, तसेच श्रीनगरपासून १९ मैलांवरील, आणि झेलम नदीच्या डाव्या किनाऱ्यापासून ६ मैलांवरील पयेच् मंदिरे विशेष उल्लेखनीय आहेत.

**शैव पीठ**—श्रीमत् शंकराचार्यांच्या अद्वैत तत्त्वज्ञानानुसारी शैव सांप्रदायाचे हे आद्य पीठ असून, त्याच्या 'स्पंदशास्त्र' ( इ. स. ९ वे शतक ) आणि 'प्रत्यभिज्ञानशास्त्र' ( इ. स. १० वे शतक ) या दोन प्रमुख उपशाखा आहेत. कापालिक आणि पाशुपत सांप्रदायान्तर्गत प्राणायाम आणि अघोरी आचरणाऐवजी चित्तशुद्धिद्वारा 'आनव', 'मायियम्' आणि 'काय' मलांचे उत्सर्जन करण्यावर या सांप्रदायाचा कटाक्ष आहे.

राजतरंगिणीमते कश्मीरातील शिवोपासनापरंपरा अत्यंत पुरातन असून, सम्राट अशोकाने येथे दोन शिवमंदिरे बांधली होती. कश्मीरराज दामोदर ( द्वितीय ) हाहि अनन्य शिवोपासक होता. येथील या पुरातन शिवोपासनापरंपरेचे स्पंदशास्त्र आणि प्रत्यभिज्ञानशास्त्रज्ञ आचार्यांनी ( इ. स. १० वे शतक ) पुनरुत्थान केले.

**तीर्थस्थाने**—'नीलमत पुराण', 'राजतरंगिणी', 'हरचरित चिंतामणि' आदि ग्रंथांतील कश्मीर देशान्तर्गत तीर्थांचे सविस्तर विवेचन 'प्रास्ताविका'त आम्ही केले आहे ( प्रास्ताविक–'भारतवर्षांतील' तीर्थे, पृ. ८१.–८२ पहा ). उत्तरकालीन मुसलमानी आक्रमणामुळे येथील बहुतांशी हिंदु देवमंदिरे आज उद्‌ध्वस्त झाली असली, तरी येथील नाग, शैव आणि वैष्णव तीर्थांचे स्थानमाहात्म्य आजहि अबाधित दिसते. येथील निम्नलिखित हिंदु तीर्थस्थानांच्या अवशेषांवर सध्या मुसलमानी धर्मस्थाने आढळतात:—१. भीमकेशव ( राज. ५.१७८ ); २. रणस्वामिन् ( राज. ३.४५३ ); ३. प्रवरेश्वर ( राज. ३.३५० ); ४. भीमस्वामी गणेश ( राज. ३.३५२ ).

**ग्रामसंख्या**—लोकप्रकाश आणि जोनराजमते या देशात ६६०६३ ग्रामे असून ( लोकप्रकाश, इंडिशे स्टूडियेन. १८.३७५; जोनराज, पृ. १५३ ), शरिफ उद्दीनच्या मते ( स. १४०० ) तत्काली येथे एक लाख ग्रामे होती. स्टाइन यांच्या मते प्राचीन काली या देशात सध्यापेक्षा अधिक ग्रामे असावीत.

**शिलालेख साहित्यात**—वीरपुरुषदत्ताच्या नागार्जुनिकोंड शिलालेखात या देशाचा निर्देश असून, कलचुरि राजा कर्णच्या स. १०४७ च्या गोहरवा ताम्रपटमते त्याच्या लक्ष्मणराज ( द्वितीय ) नामक पूर्वजाने हा देश जिंकला होता ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.२५५ ). शिलाहार राजा भोज ( द्वितीय ) च्या शके ११०४ च्या कोल्हापुर शिलालेखमते या देशातील सहवासी ब्राह्मण उत्तरकालात भारतात स्थलांतरित झाले ( एपि. इंडि. २९.१४ ). चंदेल राजा वीरवर्मन्‌च्या वि. सं. १३३७ च्या बंगला ताम्रपटमते त्याच्या मल्लय नामक सेनापतीने सर्धि आणि कश्मीर देश जिंकले होते ( एपि. इंडि. ३२७–३२८ ).

**राजधानी**—प्राचीन साहित्यमते या देशाच्या निम्नलिखित राजधान्या होत्या:—

( १ ) **सेनासिता** ( आधु. बारामूला )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते या देशाची राजधानी 'सि–ना–सि–तो' ( सेनासिता = अन्य चिनी साहित्य –'पो–लो–वु–लो–पु–लो' = वराहमूल ) गावी होती.

( २ ) **अधिष्ठान** ( आधु. श्रीनगर )—ह्युएन्त्संगच्या काळी स्थापन झालेले हे नगर ( अरबी–अदष्टान ) उत्तरकालात या देशाची राजधानी बनले ( इलियट, १.६४ ).

( ३ ) **हिरण्यपुर**—कथासरित्सागरमते या देशाची राजधानी हिरण्यपुर गावी असून, यानजिकचे विजय हे येथील प्रमुख तीर्थ होते ( कथा. २.८२;११३ ).

२. ( देश ) ब्रह्माण्डमते पूर्व भारतातील एक देश ( ब्रह्माण्ड. १६.५१ ).

३. ( देश ) कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या अपरांत भागातील 'कच्छ' देशाचे नामांतर ( कच्छ १. पहा ).

**कष्टहरण** ( पर्वत )—पूर्व भारतातील 'मोदागिरि' पर्वताचे नामांतर ( आर्कि. सर्व्हे. १५.१५–१८; मोदागिरि पहा ).

**कसनेर** ( जैनतीर्थ )—महाराष्ट्रातील 'कचनेर' जैन तीर्थाचे नामांतर ( ती. सं. पृ. १२६; कचनेर पहा ).

**कसन्न** ( देश )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते मध्य आशियातील समरकंदपासून ६० मैल नैर्ऋत्येकडील एक देश. आधु. केश अथवा शहर-इ-सब्ज गावासभोवतालचा प्रदेश हाच होय ( अक्षांश ३९°–२' उत्तर; रेखांश ६६°–५३' पूर्व ). आजहि समरकंद देशाच्या पश्चिमेकडील प्रदेश 'कुसन्निक' स्थानिक नावाने ओळखला जातो.

**नामांतरे**—प्राचीन चिनी साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा )

**शिह राजघराणे**—या देशाच्या 'शिह्–कुओ' ( शिह

## कसन्न देशाची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. ह्युएन्-त्संगचे प्रवासवर्णन | क-श्वंग्-न ( कसौन ) |
| २. अन्य चिनी साहित्य | शिह्-कुओ ( शिह राजाचे राज्य ) कि-शिह् ( केश ) |

राजाचे राज्य ) या वैकल्पिक नावावरून समरकंदाधिपती शक ( यू-चि ) जमातीपैकी शौ-वु वंशीय शिह् राजाचे राज्य येथे असावे.

**राजधानी**—या देशाची राजधानी कि-शिह् ( केश = आधु. 'शहर-इ-सब्ज'=मध्ययुगीन 'कश्क-दरिया'; स्थापना इ. स. ७ वे शतक ) गावी होती.

**भौगोलिक माहिती**—ह्युएन्त्संगच्या मते या देशाचे ( व्याप्ती ३००- मैल ) पीकपाणी आणि लोकाचार समरकंद देशाप्रमाणे असून, यानजिकच्या सु-शे ( चौ ) नदीपर्यंतच्या प्रदेशात ' सु-लि ' लोकसमूह रहात असे.

या देशाच्या ४० मैल नैर्ऋत्येकडील गुझर दुर्ग आणि आग्नेयेकडील गुझर नदीच्या मार्गे ६० मैल प्रवास करून ह्युएन्त्संग कलुगह ( आधु. बुझगोलखाना ) घाटाप्रत पोहोचला ( वॅटर्स, १.१००; बील, १.१०२ ).

**कसरोद** ( तीर्थ )—नर्मदा नदीकाठचे सहस्रयज्ञतीर्थ ( ती. पृ. २३५ ).

**कसिअ** ( लोकसमूह )—टॉलेमीच्या मते हिमालय पर्वताश्रयी ' खश ' लोकसमूहाचे नामांतर ( मॅक्रिंडल, पृ. ३०३; खश पहा ).

**कसुअ** ( देश )—स. ३८ च्या पंजतार खरोष्ट्री शिलालेखमते वायव्य भारतातील एक देश. या देशाच्या पूर्व भागातील पवित्र स्थली ( शिवथल = शिवस्थल ) उर्मुजवंशीय मोईक राजाने दोन वृक्ष ( तरुक ) लावले होते.

स्टेन कोनौ यांच्या मते वायव्य भारतातील महाबन पर्वतश्रेणीच्या पायथ्यानजिकचा सिंधु नदीच्या पश्चिमेकडील आधु. पंजतार ( सलीमपुर ) प्रदेश हाच होय. उपरोक्त शिलालेखकाली कुशाण साम्राज्य सिंधु नदीच्या पूर्वेकडील तक्षशिला नगरापर्यंत पोहोचले नसावे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.६९ ).

**कसेरट** ( नृसिंहस्थान )—सह्य पर्वतान्तर्गत एक नृसिंहस्थान. येथील नृसिंहाचे नाव महाबाहु होते ( नृसिंह. ६५.१४ ).

**कसेरु** ( नगर )—इ-त्सिंगच्या प्रवासवर्णनमते 'काशी' नगराचे नामांतर ( काशी पहा ).

**कसौन** ( देश )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते मध्य आशियातील ' कसन्न ' देशाचे नामांतर ( कसन्न पहा ).

**कस्पिर** ( देश )—टॉलेमीच्या मते वायव्य भारतातील ' कश्मीर ' देशाचे नामांतर. अन्य नामांतर–' कस्पत्यरोस् ' ( कश्मीर पहा ).

**कस्पैर** ( नगर )—टॉलेमीच्या मते कश्मीर देशाच्या राजधानीचे नगर ( कश्मीर पहा ).

**कस्पैरिस्** ( देश )—टॉलेमीच्या मते ' कश्मीर ' देशाचे नामांतर. अन्य नामांतर– ' कस्पैरोइ ' ( कश्मीर पहा ).

**कस्स** ( देश )—मुसलमानी साहित्यमते पश्चिम भारतातील ' कच्छ ' देशाचे नामांतर ( कच्छ १. पहा ).

**कस्सीद** ( नगर )—टॉलेमीच्या मते ' काशी ' नगराचे नामांतर. अन्य नामांतर–' कस्सिदिय ' ( काशी पहा ).

**कहरोर** ( ग्राम )—अल्बेरुणीच्या मते वायव्य भारतातील बियास नदीच्या जुन्या प्रवाहाकाठचे विक्रमादित्य आणि शक यांचे युद्धस्थान, एक ग्राम. मुलतानच्या ५० मैल आग्नेयेकडील आणि बहवालपुरच्या २० मैल ईशान्येकडील आधु. कहरोर गाव हेच होय ( कनिंग., पृ. २७७ ).

**कहला** ( ग्राम )—कलचुरि राजा सोढदेवाच्या स. १०७७ च्या कहला ताम्रपटाचे गोरखपुर जिल्ह्यातील धुरियापुर परगण्यातील गोरखपुर–आझमगढ रेलरस्त्यावरील गोरखपुरपासून २८ मैलांवरील उपलब्धिस्थान ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.३८३–३८५ ).

**कहु** ( बौद्ध स्तूप )—सिंध देशातील मीरपुर खास गावानजिकचे बौद्ध स्तूपस्थान. गौतम बुद्धाच्या प्रतिमा आणि नक्षीकाम कोरलेल्या या स्तूपाच्या विटा हैद्राबाद–उमरकोट रेल्वेच्या बांधकामासाठी नजरचुकीने वापरण्यात आल्या ( फर्ग्युसन, १.१०० ).

**कहोड-आश्रम** ( आश्रमस्थान )—पश्चिम भारतातील साभ्रमती–गौष्करा ( गोखुरा ) संगमावरील कहोड ऋषींचे आश्रमस्थान ( पद्म. उत्तर. १३४.२६ ). पद्ममते पिप्पलादपुत्र कहोड ऋषी दुग्धेश्वरानजिकच्या पिप्पलाद तीर्थस्थानी निवास करीत असत ( पद्म. उत्तर. १५० ).

**कहोलेश** ( लिंग )—काशी येथील ज्येष्ठेश्वरानजिकचे

एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ६५.१८; ९७; २५६ ).

**कङ्क** ( लोकसमूह )—महाभारतमते मध्यदेशान्तर्गत 'कंक' लोकसमूहाचे नामांतर ( म. शां. ९५.१३; कंक पहा ).

**कळ्ळम्वदी** ( देशविभाग )—कल्याणी चालुक्य राज्य-कालीन महाराष्ट्रातील 'कणंवडे ३००' ( आधु. बेळगाव जिल्ह्यातील अथणी तालुका ) देशविभागाचे नामांतर ( कणंवडे ३०० पहा ).

**कॅफुसा** ( देश )—सॉलिनसच्या मते वायव्य भारता-तील 'कपिशा' देशाचे नामांतर ( कपिशा पहा ).

**काउळगाव** ( तीर्थ )—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभवपंथीय तीर्थ ( स्था. पृ. ६९ ). अहमदनगर जिल्ह्यातील नेवासे तालुक्यातील देवळाण्याच्या ३ मैल वायव्येकडील गोदावरीच्या पश्चिम तीरावरील आधु. कारेगाव हेच होय.

**काक** ( तीर्थ )—प्रभासक्षेत्रान्तर्गत अर्बुदारण्यातील सरस्वती नदीकाठचे एक तीर्थ ( स्कन्द. प्रभास. प्र. ३५.४६ ).

**२.** ( द्वीप ) मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते एक द्वीप ( अनेकार्थ. २,४; मेदिनी. २.२०; औणादिक. १३३.२० ).

**काकतियवाद** ( ग्राम )—यादव राजा कन्हराच्या स. १२४६ च्या ममदापुर शिलालेखमते महाराष्ट्रातील एक ग्राम. सांगली जिल्ह्यातील आधु. काकती गाव हेच होय ( एपि. इंडि. १९.२१ ).

**काकतीर** ( नगर )—काशिकामते भारतवर्षातील एक नगर. 'तीर' अंत्यशब्दयुक्त नगरनामाचे उदाहरण म्हणून याचा निर्देश तेथे आढळतो ( काशिका. ४.२. १०६ ).

**काकतुण्डिका** ( योगिनी )—काशी येथील एक योगिनीतीर्थ ( स्कन्द. काशी. ४५.३४ ).

**काकदन्ति** ( आयुधजीवी संघ )—पाणिनीच्या अष्टा-ध्यायीमते वायव्य भारतातील एक आयुधजीवी संघ ( पा. सू. ५.३.११६ ).

**काकनादबोट** ( बौद्ध विहारस्थान )—सम्राट अशोक आणि चंद्रगुप्त ( द्वितीय ) च्या शिलालेखमते मध्य भारतातील 'सांची' स्तूपस्थानाचे नामांतर ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.२६१; सांची पहा ).

**काकन्दी** (ग्राम व जैन तीर्थ)—काशिकामते पूर्व भारता-तील एक नगर. जैन साहित्यमते हे एक महावीर चरण-स्पर्शपुनीत तीर्थ असून, जैनांच्या पुष्पदंत ( सुविधिनाथ ) नामक नवम तीर्थंकाराचे हे जन्मस्थान होते ( आवस्सक. ३८२ ). एक तीर्थस्थान म्हणून बौद्ध साहित्यातहि याचा ( कागंदी, कैंदी ) निर्देश आढळतो ( अङ्गुत्तर. पृ. ६१ ). नामांतर ( भर्हुत शिलालेख )–' काकम्दि. '

**भौगोलिक स्थान**–श्वेतांबर सांप्रदायमते बिहारमधील तो मोंघीर जिल्ह्यातील आधु. काकन गाव हेच असून, दिगंबर सांप्रदायमते गोरखपुर–वाराणसी रेलमार्गावरील नौनखार स्थानकापासून ३ मैलांवरील आधु. खुकुंद गाव हेच होय. येथे जैनांची तीन मंदिरे आढळतात ( सांकृत्यायन, भारतीय विद्या. पृ. ८ ).

**नामव्युत्पत्ती**—' परमाथ्थ जोतिका ' नामक सुत्तनिपात भाष्यग्रंथमते ' काकंद ऋषींचे निवासस्थान ' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले ( परमाथ्थ. पृ. ३०० ).

**काशिका ग्रंथात**—या ग्रंथमते या गावचे निवासी ' काकंदक ' नावाने सुविख्यात होते.

**जैन साहित्यात**—खरतरगच्छकृत ' पट्टावलि ' नामक जैन ग्रंथात याचा निर्देश असून ( इंडि. ॲंटि. ११.२४७ ), जैन कल्पसूत्रमते येथील श्रमणशाखा ' काकंदिका ' नावाने ओळखली जात असे ( ती. सं. पृ. १२६–१२७ ).

**भर्हुत शिलालेखात**—भर्हुत येथील एका देणगीलेखमते या ( काकम्दि ) गावच्या सोमा नामक बौद्ध भिक्षुणीने त्या स्तूपास देणगी दिली होती ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.२.२७ ).

**शिलालेख**—आधु. काकन गावच्या पार्श्वनाथ मंदिरात इ. स. १५ व्या–१९ व्या शतकातील तीन शिलालेख असून, त्यापैकी स. १४४८ च्या पार्श्वनाथ मूर्तिलेख-मते सुविधिनाथाच्या जन्मस्थली हे मंदिर बांधले आहे. येथील अन्य दोन शिलालेखांत ( स. १७६५; १८७६ ) सुविधिनाथाच्या पादुकास्थापनेचा, तसेच मंदिराच्या जीर्णोद्धाराचा निर्देश आढळतो ( सरकार, पृ. २५४ ).

**२.** ( नगर ) संस्कृत साहित्यमते मद्रास राज्यातील ' कावेरीपट्टनम् ' बंदराचे नामांतर ( कावेरीपट्टनम् पहा ).

**काकबलि** ( तीर्थ )—गया येथील एक तीर्थ ( ती. पृ. १६२ ).

**काकभुशुण्डि** ( तीर्थ )—केदार–बद्री मार्गावरील एक तीर्थ ( ती. पृ. ५८ ).

**काकमुख** ( लोकसमूह )—एक किरात लोकसमूह ( म. स. २७.२९४* ).

**काकम्दि** ( नगर )—भर्हुत शिलालेखमते पूर्व भारता-तील ' काकंदी ' जैन तीर्थाचे नामांतर ( काकंदी पहा).

**काकयर** (देश)—कलचुरि राजा पृथ्वीदेव (द्वितीय) च्या स. ११४५ च्या राजिम शिलालेखमते त्याच्या जगपाल नामक सेनापतीने जिंकलेल्या कलचुरि साम्राज्याच्या सात उपविभागांपैकी एक (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.४५३; इंडि. अँटि. १७.१३७–१४०). नामांतर (कलचुरि शिलालेख)–'काकेर'.

छत्तिसगढ प्रदेशातील (प्राचीन दक्षिण कोशल) आधु. कांकेर प्रदेश हाच होय. डॉ. सांकलिया यांच्या मते हा कलचुरि राज्याचा प्रत्यक्ष भाग नसून, सरहद्दीवरील एक मांडलिक देश असावा (सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २८६).

पंपराजाच्या शिलालेखात—कलचुरि राजांच्या पंपराज नामक मांडलिक राजाच्या इ. स. ११ व्या शतकातील तेहंकापार ताम्रपटमते त्याचे हे (कांकेर) राजधानीचे गाव होते (कॉर्पस्. इन्स्क्रि ४.२.५९७).

**काकरुह** (ग्राम)—राजतरंगिणीमते कश्मीरातील क्रमराज्यान्तर्गत शमाला (आधु. हमल) परगण्यातील एक ग्राम. कश्मीरचा भिक्षाचर नामक तोतया राजा येथे आश्रयार्थ लपला होता (राज. ८.१२६४; १५२५). याचे आधुनिक स्थान समजत नाही.

**काकशिला** (तीर्थ)—गया येथील एक पवित्र शिलाखंड (वायु. १०८.७६; अग्नि. ११६.४).

**काकस्थल** (देश)—मध्ययुगीन शब्दकोश साहित्य-मते एक देश (देशि. २.२७)

**काकह्रद** (सरोवर)—एक श्राद्धयोग्य सरोवर (ब्रह्माण्ड. ३.१३.८५).

**काकुपुर** (नगर)—उत्तर प्रदेशातील एक पुरातन दुर्गस्थान. कानपुरपासून २१ मैल वायव्येकडील कनौज आणि शेवराजपुरनजिकचे आधु. छत्रपुर हे उद्ध्वस्त नगर हेच होय. येथे छत्रपाल राजाचा पुरातन दुर्ग, तसेच क्षीरेश्वर महादेव आणि अश्वत्थामन् यांची देवालये असून, गाहड-वाल राजा गोविंदचंद्राचा एक ताम्रपटहि येथे सापडला आहे (भा. स्थ. पृ. ४५).

**काकुलालक** (देश)—कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या आग्नेय भागातील एक देश (मार्कं. ५५.१८).

**काकेर** (देश)—कलचुरि शिलालेखमते मध्य प्रदेशा-तील 'काकयर' राज्यविभागाचे नामांतर (काकयर पहा).

**काक्ष** (देश)—भारतवर्षातील एक जनपद. पाठभेद–'कक्ष' (म. भी. १०.४७).

**कागन्दी** (नगर)—बौद्ध साहित्यमते पूर्व भारता-तील 'काकंदी' नगराचे नामांतर (अङ्गुत्तर. पृ. ६१; काकंदी पहा).

**काङ्करिया** (सरोवर)—मध्य प्रदेशातील नाथद्वारा-काँकरोली मार्गावरील एक पवित्र सरोवर आणि कृष्णमंदिर-स्थान (ती. पृ. २९७).

**काङ्करोली** (वैष्णव तीर्थ)—राजस्थानमधील नाथ-द्वारापासून ११ मैलांवरील वल्लभ संप्रदायाच्या सात उप-पीठांपैकी एक. येथे अंबरीषोपासित श्रीद्वारकाधीशाचे मंदिर आणि वल्लभ संप्रदायाचे विद्याकेंद्र आहे. मेवाडचे राणे येथील मठाचे अनुयायी आहेत (ती. पृ. २९७).

**काङ्ग्रा** (शक्तिपीठ)—हिमालय प्रदेशातील पठाण-कोटपासून ५९ मैलांवरील, आणि कांग्रा मंदिर रेल्वेस्थानका-पासून 1½ मैलावरील शक्तिपीठस्थान. येथे सतीचे विच्छिन्न मस्तक पडले असून, येथील महामाया देवीचे नाव वज्रेश्वरी अथवा विद्येश्वरी आहे. येथे सतीच्या मस्तकाची प्रतिमा असून, तिच्या समोर रजतपीठावर वाग्यंत्र आहे. जालंधर पीठाच्या शक्तित्रिकोणात, तसेच भारतातील ५१ शक्ति-पीठांत याची गणना होते (ती. पृ. ७०). नामांतर–'कोटकांग्रा'.

दुर्ग—येथे प्रतिहार स्थापत्यशैलीचा (इ. स. ९ वे शतक) एक दुर्ग आहे (गोएट्झ, पृ. १४७).

**काच** (देश)—महाभारतमते युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या उत्तर दिग्विजयात अर्जुनाने जिंकलेला उत्तर भारतातील एक देश (म. स. २४.२७९*).

**काचगल** (खिंड)—श्रीवराच्या ग्रंथमते पीर पंत्साल पर्वताच्या मध्यभागातील एक पर्वतीय खिंड (श्रीवर. ४.५८९). तंगतल खिंडीच्या उत्तरेकडील आधु. चित्तपानी खिंड हीच होय. पीर पंत्साल पर्वताच्या उत्तर उतारावरील आधु. काचगुल पठाराचे नावहि हिच्यावरूनच पडले असावे (स्टाइन, राज. २.३९८).

**काचरपल्लिक** (ग्राम)—गुप्त राज्यकालीन शर्वनाथ राजाच्या स. ५३३ च्या खोह ताम्रपटमते त्याने मानपुर येथील पिष्टपुरिका देवीस दान दिलेले मध्य भारतान्तर्गत बाघेलखंडातील मणिनाथ पेठ विभागातील एक ग्राम (कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.१३६). याचे आधुनिक स्थान समजत नाही.

**काचराळा** (तीर्थ)—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थ (स्था. पृ. ४८). औरंगाबाद जिल्ह्यातील जालना गावानजिकचे आधु. काचरेवाडी गाव हेच होय.

**काचल** (देश)— जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील

एक देश ( वायु. ४४.१५ ).

**काच्छ** ( देश )— पद्ममते पश्चिम भारतातील 'कच्छ' देशाचे नामांतर ( पद्म. आदि. ६.५१; कच्छ १. पहा ). अन्य नामांतर (मत्स्य. ११४.५१)– 'काच्छीक'.

**काञ्चन** ( पर्वत )— बौद्ध जातकमते 'उत्तर हिमालय' पर्वताचे नामांतर ( जा. २.३९६–३९७; ३९९; ६. १०१; हिमवत् पहा ).

२. ( लोकसमूह ) पराशरतंत्रमते भारतवर्षाच्या मध्य प्रदेशातील 'कंक' लोकसमूहाचे नामांतर ( कंक पहा ).

**काञ्चनकापुरी** ( नगर )—ब्रह्माण्डमते एक नगर ( ब्रह्माण्ड. ३.७४.१८४–१८६ ). पार्गिटर यांच्या मते विंध्यशक्तिपुत्र प्रवीर (इ. स. ३ रे शतक ) राजाचे 'पुरीम् कांचनिकाम्' नामक राजधानीचे नगर हेच असून, त्याने येथे ६० वर्षे राज्य, तसेच वाजपेय यज्ञ केला होता ( पार्गि., कलि एज, पृ. ५० ). कल्कि पुराणमते हे, तसेच भल्लाट ही नागलोकांची दुर्गनगरे होती ( कल्कि. ३.७.२६; १४.३ ). त्यावरून आधु काशीच्या परिसरात हे असावे ( रॉयचौधरी, अँटि. पृ. १०७ ). नामांतर ( कल्कि पुराण )–'कांचनीपुरी'; ( अन्य पौराणिक साहित्य )– 'चनका'.

**काञ्चनगिरि** ( पर्वत )— भागवत, तसेच मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते 'मेरु' पर्वताचे नामांतर ( भा. ५. १६.२७; अभिधान. १४०; १०३२; औणादिक. १८७. २६९; मेरु पहा ).

२. पश्चिम भारतातील एक पर्वत ( विष्णुधर्म. १.८.७ ).

**काञ्चनपुर** ( नगर )— पद्म पुराण–'परिवर्तिनी एकादशी माहात्म्य' मते भारतवर्षातील एक नगर ( पद्म. ब्रह्म. १६ ).

२. विग्रहपाल ( तृतीय ) राजाच्या इ. स. ११ व्या शतकातील वनगाव ताम्रपटमते त्याच्या राजधानीचे नगर. याचे आधुनिक स्थान समजत नाही ( एपि. इंडि. २९. ५०; ५४ ).

३. जैन प्रज्ञापना ग्रंथमते कलिंग देशाच्या राजधानीचे नगर. नामांतर– 'कंचण' ( इंडि. अँटि. २०.३७५; कलिंग पहा ).

**काञ्चनाक्षी** ( नदी )— महाभारत सारस्वतोपाख्यानमते 'सप्त सरस्वती' नद्यांपैकी एक ( म. श. ३८ ). कुरुक्षेत्रान्तर्गत नैमिषारण्यातून ( लखनौच्या वायव्येकडील प्रदेश ) ही वहात असे ( म. श. ३७.४; १८; नारद. उत्तर. ८५.१०४; वामन. ३७.१८; २८ ). वामन पुराण प्रह्लादयात्रेतहि हिचा निर्देश आढळतो ( वामन. ८३.२ ).

**काञ्चनाभ** ( नगर )— कथासरित्सागरमते हिमालय पर्वतातील एक नगर ( कथा. २.२२ ).

**काञ्चनीपुरी**— कल्कि पुराणमते उत्तर भारतातील 'कांचनकापुरी' नगराचे नामांतर ( कल्कि. ३.७.२६; १४.३; कांचनकापुरी पहा ).

**काञ्चिकचर्ल** ( नगर )— दक्षिण भारतातील कृष्णा नदीकाठचे सुविख्यात व्यापारी नगर ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ९ ). नामांतर ( टॉलेमी )– 'कोंतकोस्सिल'

**टॉलेमीच्या ग्रंथात**—या ग्रंथमते ही व्यापारी पेठ अक्षांश ११०°–४०'; उत्तर; रेखांश १३४'-३०° पूर्व स्थानी असून, यूलच्या मते हे कृष्णा नदीकाठी कोंडपल्लीनजिक असावे. मॅक्क्रिंडल यांच्या मते टॉलेमीचे 'कोंतकोस्सिल' हे 'कंटकस्थल'चे ग्रीकभाषीय रूपांतर असावे ( कंटकस्थल पहा ).

**काञ्ची** ( नगर आणि तीर्थ )—दक्षिण भारतातील द्राविड ( कावेरी नदीचे खोरे ) देशाच्या राजधानीचे गाव, आणि सुविख्यात शिव आणि विष्णुतीर्थ. इ. स. ७ व्या–१२ व्या शतकापर्यंत हे पल्लव राजांच्या, तसेच उत्तरकालात चोल राजांच्या राजधानीचे गाव होते. पौराणिक कालापासून हे शिव आणि विष्णुतीर्थ म्हणून सुविख्यात असून, पल्लव, चोल, विजयनगर राज्यकालीन अनेक मंदिरे येथे आढळतात. येथील 'एकाम्रनाथ मंदिर' दक्षिण भारतातील पंचमहाभूतात्मक भूतलिंगांपैकी पृथ्वीलिंग असून, हे नगर वाराणसीप्रमाणेच श्रेष्ठ विद्याकेंद्र होते. धार्मिक, राजकीय, सांस्कृतिक, शैक्षणिक आणि स्थापत्यशास्त्रीय दृष्टीने दक्षिण भारतातील हे महत्त्वपूर्ण नगर कालिदासाच्या काळी प्राचीन भारतातील सर्वश्रेष्ठ नगर' ( **नगरेषु कांची** ) मानले जात असे.

मद्रास राज्यातील चिंगलपेट जिल्ह्यातील चिंगलपेट-अर्कोणम् रेलरस्त्यावरील मद्रासपासून ४५ मैल नैर्ऋत्येकडील पालार ( प्राचीन 'वेगवती' ) नदीकाठचे आधु. कांचीपुरम् ( इंग्रजी–कांजीवरम् ) गाव हेच होय. 'मंदिरनगर' उपाधीने सुविख्यात असणाऱ्या या गावी १०८ शैव आणि १८ वैष्णव मंदिरे आहेत.

**उपविभाग**—प्राचीन कालापासून याचे 'शिवकांची', 'विष्णुकांची' आणि 'जैनकांची' ( तिरुपतिकुनरम् ) संज्ञक तीन उपविभाग असून, त्यापैकी बृहदाकार शिवकांची कांचीपुरम् रेल्वेस्थानकानजिक, आणि विष्णुकांची हा छोटा विभाग रेल्वेस्थानकापासून ३ मैलांवर आहे. जैनकांची कांची गावापासून २ मैल दक्षिणेकडे वेगवती नदीच्या

दक्षिण तीरावर आहे.

**माहात्म्य**—पौराणिक साहित्यमते हे भारतातील सप्त मोक्षपुरींपैकी ( मोक्षदायिनी सप्तपुरी ) एक असून, या सप्त पवित्र तीर्थांपैकी अयोध्या, मथुरा, द्वारवती ( द्वारका ) ही विष्णूची, मायापुरी ( हरिद्वार ), काशी, आणि अवंतिका ( उज्जयिनी ) ही शिवाची आणि कांचीपुरी हे मात्र 'हरिहरात्मक' म्हणजे विष्णु आणि शिवाचे तीर्थ आहे. कांची, श्रीरंगम्, आणि तिरुमलै ही दक्षिण भारतातील तीन प्रमुख वैष्णवस्थाने, आणि तिरुनारायणपुरम् ( म्हैसूर राज्य ), श्रीरंगम्, तिरुमलै आणि कांची ही प्रमुख शैवस्थाने असून, 'दक्षिण काशी' उपाधीने सुविख्यात असणारी कांची त्यामध्ये सर्वश्रेष्ठ मानतात.

ब्रह्माण्डमते काशी आणि कांची शिवाच्या नेत्रद्वयस्वरूप असून, येथील कामाक्षी मंदिर भारतातील ५१ शक्तिपीठांपैकी एक मानले जाते. स्थानिक समजुतीनुसार येथे सतीचा अस्थिपंजर पडला असून, येथील कामाक्षी मंदिर काशी येथील विशालाक्षी मंदिराइतकेच पवित्र मानतात.

दक्षिण भारतातील बौद्ध आणि जैन धर्मांचे संपूर्ण उच्चाटन करणाऱ्या वैष्णव अल्वार आणि शैव नायनार संतांपैकी ( इ. स. ६ वे शतक ) अनेक संत या गावचे असून, सुंदरमूर्ति नायनारमते दक्षिण भारतातील ६३ शैव संतांपैकी सहा संत 'तोंडैमंडलम्' ( कांची ) देशातील होते. त्यांच्या 'तेवरम्' स्तोत्रामध्ये शिवकांचीचे माहात्म्यवर्णन, तसेच पत्तिनाथदिगल, त्यागराज, सुंदरमूर्ति नायनार आदींच्या काव्यात येथील 'एकाम्रनाथ', 'वरदराज' आणि 'कामाक्षी देवी'चे स्तवन आढळते. 'कंद पुराणम्' आणि 'कांची पुराणम्' या श्रेष्ठ तामीळ ग्रंथांची रचनाहि येथेच झाली असून, श्रीमत् शंकराचार्यांचे 'कामकोटिपीठ' स्थान, तसेच कौटिलीय अर्थशास्त्रकर्ता आर्य चाणक्याचे जन्मग्राम म्हणूनहि हे सुविख्यात आहे.

आद्य अल्वार ( वैष्णव संत ) पोईगैचे हे जन्मस्थान असून, चतुर्थ अल्वार तिरुमझिसै हा येथील रहिवासी होता. वैष्णव आचार्यपरंपरेतील वेदांतदेशिक नामक अंतिम आचार्यांचा जन्महि येथेच झाला होता. पेरुंबदुर गावी जन्मलेल्या वैष्णव आचार्य रामानुजांचे बालपण, शिक्षण आणि आत्मज्ञानप्राप्ती येथील वरदराज मंदिराच्या आवारातच झाली असून, त्याचे समकालीन तिरुकंची नंबी, तसेच अलवंदार हे वैष्णव संत वरदराजाचेच उपासक होते.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

## कांची नगराची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पतंजलीचे व्याकरण महाभाष्य ( २.२९८ ) | कांचीपुर |
| २. ह्युएन्त्संग ( वॉटर्स, २. २२६ ) | कन्–चिह–पु–लो ( कंचीपुर ) |
| ३. टॉलेमी (मॅक्रिंडल, पृ. १८५) | मलंग |
| ४. ब्रह्माण्ड पुराण | सत्यव्रत क्षेत्रम् |
| ५. तामीळ साहित्य | तिरुपतिकुनरम् ( जैन कांची) |
| | कच्चीपेद्दु (कांचीपेड्डु) |
| | कच्ची |
| | कंची |
| | कुरुंभरभूमी ( जंगल भूमी ) |
| ६. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य (नामसंग्रह. १९.७) | पल्लव |

**नामव्युत्पत्ती**—बर्नेल यांच्या मते 'कंजि' या द्रविडभाषीय नगरनामाचे 'कांची' हे संस्कृत रूप आहे ( बर्नेल, साऊथ इंडियन पॅलिओग्राफी. पृ. १० ).

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**—तामीळ साहित्यमते इ. स. २ ऱ्या शतकात तोंडैमान इलन् तिरैयन हा येथील ( तोंडैमंडलम् ) राजा असून, तत्कालीन चोल राज्याच्या उत्तर सरहद्दीवर हा देश होता. इ. स. ३ ऱ्या– ९ व्या शतकात कृष्णा–कावेरी दुआबातील पल्लव राजांची राजधानी येथे असून, समुद्रगुप्ताच्या अलहाबाद प्रशस्तिलेखमते त्याने येथील ( कांचीपूरक ) विष्णुगोप राजाचा पराजय केला होता. चीन, सयाम, फिजी आदि आग्नेय आशियातील देशांशी या नगराचे व्यापारी संबंध असल्याने पल्लवकाली हे समृद्धीच्या शिखरावर होते. पूर्व किनाऱ्यावरील मामल्लपुरम् ( आधु. महाबलीपुरम् ) बंदरातून येथील विदेश व्यापार चालत असे. पल्लवांनी येथे संरक्षक तटबंदी, रस्ते, तसेच अनेक महत्त्वपूर्ण देवाल्ये बांधली असून, ह्युएन्त्संगच्यामते इ. स. ७ व्या शतकात हे दक्षिण भारतातील एक महान आणि समृद्ध नगर होते.

राजा महेंद्रवर्मन् ( प्रथम, स. ६००–६३० ) हा जैनधर्मीय राजा शैव संत अप्पाराच्या प्रेरणेने शैव बनला. 'दक्षिण भारतातील अनेक गुफामंदिरांचा रचनाकर्ता'

अशा अर्थाने त्यास ' चेत्तकरि ' ( मंदिररचयिता ) म्हणत असत. महेंद्रवर्मन्‌पिता सिंहविष्णु हा संस्कृत कवी भारवीचा आश्रयदाता असून, महेंद्रवर्मनपुत्र नृसिंहवर्मन् राजसिंह (स. ६३०–६६८) ने मामल्लपुरम् येथील रथमंदिरे बांधली. त्याचेच राज्यकालात ह्युएन्‌त्संग येथे आला होता.

पल्लव राजा नृसिंहवर्मन् ( द्वितीय; स. ६९५–७२२ ) ने महाबलीपुरम् येथील समुद्रतटमंदिर बांधले असून, महाकवी दंडिन् हा त्याच्या आश्रयाखाली होता. नंदिवर्मन् ( द्वितीय, स. ७३०–८०० ) या वैष्णव राजाने कांची येथील ' मुक्तेश्वर ', ' मतंगेश्वर ' आणि ' वैंकुठ पेरुमाल ' मंदिरे बांधली असून, तिरुमंगे नामक अल्वार संत त्याच्या समकालीन होता.

चालुक्य राजा पुलकेशिन् ( द्वितीय ) आणि विक्रमादित्य ( प्रथम ) यांनी स. ६३० आणि स. ६७४ मध्ये या नगरावर आक्रमण केले असून, त्यांपैकी विक्रमादित्य राजाने येथील कैलासनाथ मंदिराचा जीर्णोद्धार केला होता. स. ८७० मध्ये राष्ट्रकूट राजा कृष्ण ( तृतीय ) ने हे जिंकले असून ( एपि. इंडि. ३.३६०; ४.२८०–२८१), स. ९४९–९७० मध्ये हे राष्ट्रकूटांच्या ताब्यात होते.

इ. स. १० व्या शतकात येथील पल्लव राज्य संपुष्टात येऊन हे चोल साम्राज्याची राजधानी बनले. या राजांचे अनेक शिलालेख येथील मंदिरात आढळतात.

चोल साम्राज्याच्या पतनानंतर हे काही काळ वारंगळ येथील काकतीय, मदुरा येथील पांड्य, आणि नंतर ( इ. स. १४–१७ वे शतक ) विजयनगर राजांच्या ताब्यात गेले. येथील एकाम्रनाथ मंदिराचे शिखर ( उंची–१८०′ ), तसेच वरदराज मंदिराचे सहस्रस्तंभीय सभागृह विजयनगर राजांनी बांधले.

इ. स. १४–१५ व्या शतकात मलिक काफूर, आणि विजापुर सुलतान महंमदशहाने हे लुटले असून, स. १६४५ मध्ये गोवळकोंड्याच्या सुलतानाने, स. १६७५ मध्ये मराठ्यांनी, आणि त्यानंतर औरंगजेबाच्या झुल्फिकारखान नामक सेनापतीने हे जिंकले होते. इ. स. १८ व्या शतकापर्यंत हे मुसलमानांच्या ताब्यात असून, येथील देवाल्यांचा ते किल्ल्यासारखा उपयोग करीत असत. इ. स. १८ व्या शतकात ब्रिटिशांनी हे जिंकले.

**स्थापना**—तामीळ साहित्यमते हे नगर कुलोत्तुंग चोल राजाने ' कुरुंभरभूमी ' नामक जंगलात स्थापिले असून, उत्तरकालात हाच प्रदेश ' तोंडमंडल ' नावाने सुविख्यात झाला.

**पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यात**—या ग्रंथात ' कांचीपुरनिवासी ' अशा अर्थाने ' कांचीपुरक ' संज्ञेचा निर्देश असून ( पतञ्जलि. २.२९८ ), त्यावरून पतंजलीच्या काळी ( इ. स. पू. १५० ) दक्षिण भारतातील या प्रदेशाचे ज्ञान उत्तर भारतीयांस असावे ( काणे, जे. बी. बी. आर. ए. एस्. २७.३८ ). पाणिनीच्या गणपाठातहि या नगराचा निर्देश आढळतो ( पा. सू. ६.२.८८ ).

**तामीळ साहित्यात**—' मणिमेकलै ' आणि ' पेरुंपनत्तुपदै ' या तामीळ ग्रंथांत ( इ. स. १ ले शतक ) या नगराचे वर्णन आढळते.

**पौराणिक साहित्यात**—बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या दक्षिण भागात हा देश असून ( बृ. सं. १४.१५; मार्क. ५५.२७; काव्यमी. १७.२२६ ), पद्ममते हे सप्त मोक्षपुरींपैकी एक होते ( पद्म. पाताल. १७.६७; उत्तर. ११०.५; ब्रह्माण्ड. ४.५.६–१०; ३९.१५; वायु. १०४.७६ ). पद्म पुराणान्तर्गत तीर्थावलीत ( पद्म. आदि. १४.१६७ ), ' क्षेत्रवासमाहात्म्यात ' ( पद्म. आदि. १५.१६ ), तसेच भागवतातील बलराम–तीर्थयात्रेत याचा निर्देश आढळतो ( भा. १०.७९.१४ ). स्कंदमते दक्षिण भारतातील चोल ( कावेरी खोरे ) देशाची राजधानी या गावी होती ( स्कन्द. माहेश्वर. १९–२३ ).

दशकुमारचरितमते द्राविड देशान्तर्गत या नगरातील शक्तिकुमार नामक वणिक्पुत्र सुशील पत्नीशोधार्थ कावेरीच्या दक्षिण तटवर्ती सिरि देशास गेला होता ( दशकुमार. पृ. १५३ ). महाभारतमते भारतीय युद्धात येथील योद्धे दुर्योधनपक्षात सामील होते ( म. उ. १५८.२० ).

**भूतलिंगस्थान**—स्थानिक परंपरामते दक्षिण भारतातील पंचमहाभूतात्मक पाच शिवलिंगांपैकी कांची येथील एकाम्रेश्वर हे पृथ्वीलिंग आहे. अन्य समजुतीनुसार तिरुवालूर येथील त्यागराज हे पृथ्वीलिंग मानतात.

**शक्तिपीठ**—तंत्रचूडामणिमते येथे सतीच्या अस्थी पडल्या असून, येथील देवीचे नाव देवगर्भा आणि भैरवाचे नाव रुरु होते. येथील कामाक्षी मंदिरस्थानी हे शक्तिपीठ असून, श्रीमत् शंकराचार्यांनी तेथे कामकोटिपीठाची स्थापना केली. बार्हस्पत्य सूत्रात, तसेच योगिनीतंत्रातहि एक शक्तिक्षेत्र म्हणून याचा निर्देश आढळतो ( बार्हस्पत्य. ३.१२४; योगिनी. १.१७ ).

**ह्युएन्‌त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते द्राविड देशाच्या राजधानीचे हे ( कन्–चिह–पु–लो ) नगर दक्षिण भारत–सिलोन या तीन दिवसांच्या प्रवासमार्गातील

सर्वाधिक सोयिस्कर बंदर असून, सिलोनमधील अशांत राजकीय परिस्थितीमुळे ह्युएन्त्संग येथे काही काळ थांबला होता. येथील मुक्कामात २०० सिलोनी बौद्ध भिक्षूंशी त्याने स्थविर सांप्रदायिक त्रिपिटकांची आणि योगशास्त्राची चर्चा केली होती. पपंचसूदनीमते बुद्धघोषकालीन कांचीपुर–सिलोन ( तंबपण्णि दीव = ताम्रपर्णि द्वीप ) मार्ग पांड्य राजधानी मधुरसुत्तपट्टन ( आधु. मदुरा ) नगरावरून जात असे ( पपञ्च., अंतिम सूक्ते ).

**बौद्ध केंद्र**—ह्युएन्त्संगच्या मते त्याचे काळी या देशात शेकडो बौद्ध मठ, ऐंशी हिंदु मंदिरे, दहा हजार बौद्ध भिक्षु आणि अनेक जैन सांप्रदायी लोक असून, दिङ्नाग नामक महायान आणि हीनयानपंथीय तत्त्वज्ञाचे, तसेच धर्मपाल नामक बोधिसत्त्वाचे हे जन्मस्थान होते. दिङ्नागाचे ग्रंथ चीन-जपानमध्ये आजहि उपलब्ध आहेत. क्षत्रिय-कुलोत्पन्न धर्मपाल बोधिसत्त्वाचा कांची राजकन्येशी विवाह निश्चित झाला होता. त्या विवाहबंधनातून त्याची मुक्तता करून बुद्धाने त्यास येथून शेकडो मैल दूर नेऊन बौद्ध धर्माची दीक्षा दिली.

**अशोक स्तूप**—या गावाच्या दक्षिणेस गौतम बुद्धाच्या तीर्थिक ( जैन ) विजयाच्या स्मृत्यर्थ बांधलेला अशोक स्तूप होता ( वॉटर्स, २.२२६–२२८ ).

**महायान विद्यापीठ**—इ. स. १–६ व्या शतकात येथील बौद्ध धर्म शैव नायनार आणि वैष्णव अल्वार संतांच्या प्रभावामुळे लुप्तप्राय झाला. तत्रापि येथील बौद्ध मठ ( इ. स. ६.–१३ वे शतक ) भारतातील विक्रमशिला मठाइतकाच सुविख्यात असून बुद्धघोषकृत मनोरथ-पूरणिमते हे दक्षिण भारतातील ख्यातनाम बौद्ध विद्याकेंद्र होते. तंत्रविद्याप्रधान महायान पंथाचे नागार्जुन, वात्स्यायन, बुद्धघोष, दिङ्नाग हे आचार्य या ( तामीळ ) देशातीलच असून, मनोरथपूरणि ग्रंथहि बुद्धघोषाने येथील ज्योतिपाल आचार्यांच्या विनंतीवरून लिहिला होता. बुद्धघोषाशी सम-कालीन कण्हदासकृत ग्रंथमते तत्कालीन चोल राजधानी याच गावी असून, जावादेशीय एका काव्यात या गावच्या सहा बौद्ध मठांचा निर्देश आढळतो ( बटेव्हियन सोसा. जर्नल. स. १९०२, पृ. २६४ ). येथील उत्खननात गौतम बुद्धाच्या पाच मूर्ती सापडल्या आहेत.

**जैन साहित्यात**—या गावापासून दोन मैल दक्षिणेकडील वेगवती नदीकाठचे 'तिरुपतिकुनरम्' दिगंबरपंथीयांचे 'जैनकांची' म्हणून सुविख्यात आहे. तत्रापि जन-सामान्यांच्या आश्रयाभावी येथील जैन धर्मप्रसार मर्यादित राहिला आहे.

**टॉलेमीच्या ग्रंथात**—या ग्रंथात मलंग देशाच्या बस्सरो-नगस् राजाचा निर्देश असून, मॅक्रिंडल यांच्या मते येथे या नगराचाच निर्देश अभिप्रेत आहे ( मॅक्रिंडल, टॉलेमी. पृ. १८५–१८६; मलंग पहा ).

**फरिश्ताच्या ग्रंथात**—या ग्रंथमते बहामनी सुलतान महंमदशहा ( तृतीय ) ने घोंडपुर येथे या नगराच्या समृद्धीची वार्ता ऐकून स. १४८०मध्ये यावर हल्ला चढविला. 'बऱ्हाण-इ-मासिर' मते माल्दर गावी महंमदशहाने या गावच्या समृद्धीची वार्ता ऐकली ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. २२८–२२९ ).

**मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात**—या साहित्यात या नगराचा अनेक वेळा निर्देश आढळतो ( विश्वलोचन. ६०.३; त्रिकाण्ड. ११७.७५; मंख. ११.४०; नामसंग्रह. १९.७ ).

**शिलालेख साहित्यात**—समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद प्रशस्तिलेखमते त्याने या देशाच्या विष्णुगोप राजास जिंकले होते ( गुप्त. इन्स्क्रि. पृ. ३३ ). निम्नलिखित उत्तरकालीन शिलालेखांतहि याचा निर्देश आढळतो :—

**( १ ) पल्लव शिलालेखात**—शिवस्कंदवर्मन्च्या मयि-दवोलु ताम्रपटात, तसेच शांतिवर्मनाच्या तालगुंड शिला-लेखात याचा निर्देश असून ( एपि. इंडि. २५.३१८ ), पल्लव राजा नृसिंहवर्मन्चे स. ७११ चे रेयूरु दानपत्र कांचीपुर राजधानीहून काढले आहे ( एपि. इंडि. २९. ९२ ). नंदिवर्मन् ( तृतीय ) चा स. ८३० चा शिलालेख या गावानजिक ( एपि. इंडि. ६.३१९ ), आणि कांचीनरेश जयवर्मन्चा एक शिलालेख आग्नेय आशियातील कंबूज ( आधु. कांबोडिया ) मध्ये सापडला आहे ( काणे, ४. ७६२ ). पश्चिम गंग राजा श्रीपुरुष मुत्तरसच्या ( स. ७५० ) पूर्व म्हैसूर ताम्रपटात कांची येथील पल्लव नरेशांचा ( काडुवे ) निर्देश आढळतो ( एपि. कर्ना. ९.२१ ).

कांची येथील कैलासनाथ मंदिरातील पल्लव राजांच्या शिलालेखांवरून ( इ. स. ७ वे शतक ) आधुनिक काळी विष्णुमंदिर म्हणून सुविख्यात असणारे हे मंदिर पल्लव राजा नृसिंहवर्मन् राजसिंह ( द्वितीय ) ने शिवमंदिर म्हणून बांधले असावे. डॉ. हुल्ट्झ यांच्या मते या मंदिरलेखातील मजकूर आणि व्यक्तिनामे मामल्लपुरम् येथील धर्मराज मंदिर शिलालेखासदृश असून, त्यावरून ही दोन्ही मंदिरे नृसिंहवर्मन्नेच बांधली असावीत ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. १.१–३; १९;२९; ७७; ११३; ११६; ११८; १२०;

१२३; १२५; १३९–१४१; १४५–१४७). पल्लव राज्यकालीन मंदिररचनेच्या सुवर्णयुगाचा इतिहास कैलासनाथ मंदिरातील पल्लव शिलालेखांमुळे उपलब्ध होतो (फर्ग्युसन, १.३२९).

(२) **चालुक्य शिलालेखात**—पुलकेशिन् (द्वितीय) राजाच्या ऐहोळे शिललेखमते त्याने हे नगर जिंकले असून, चालुक्य राजा विक्रमादित्य (द्वितीय) च्या स. ७३३ च्या कांची मंदिरलेखमते त्याने हे नगर जिंकून, येथील राजसिंहेश्वर मंदिराची मालमत्ता सन्मानपूर्वक परत दिली होती (एपि. इंडि. ३.३५९).

(३) **राष्ट्रकूट शिलालेखात**—राष्ट्रकूट राजा दंतिदुर्गच्या स. ७५४ च्या शिलालेखमते पश्चिम चालुक्य राज्यानंतर त्याने हे नगर जिंकले असून (इंडि. अँटि. स. १९०; पृ. २२८), तिरुमंगै अल्वाराच्या तत्कालीन तामीळ कवितेतहि 'वैरमेघ' (दंतिदुर्ग) राजाने हे नगर जिंकल्याचा निर्देश आढळतो. अन्य एका जैन शिलालेखमते अकलंक नामक जैन धर्मगुरू या काळी येथे रहात असे (एपि. इंडि. ३.१८६).

राष्ट्रकूट राजा गोविंद (तृतीय) च्या स. ८०३ च्या ब्रिटिश म्युझियम ताम्रपटमते त्याने कांची नरेशाचा पराजय केला असून (इंडि. अँटि. ११.१२६), कृष्ण राजाच्या सिद्धलिंगमादम् शिलालेखमते त्याने तंजै (तंजोर) प्रदेशासमवेत हा देश जिंकला होता (मद्रास एपि. संग्रह. स. १९०९; क्र. ३७५).

(४) **चोल शिलालेखात**—चोल राजा कुलोत्तुंग (प्रथम) च्या स. १०७१ च्या कांची मंदिरलेखात त्याच्या पराक्रमाचे वर्णन आढळते (साऊथ इंडि. इन्स्क्रि. ३.१२५; इंडि. अँटि. स. ११९२, पृ. २८१).

(५) **काकतीय शिलालेखात**—वारंगळनरेश गणपतीच्या स. १२५० च्या कांची मंदिरलेखमते त्याने हे नगर जिंकले होते (रंगाचारी, १. चिंगलपेट. २९५).

(६) **विजयनगर शिलालेखात**—विजयनगर राजपुत्र कंपन (द्वितीय) च्या स. १३६४ च्या शिलालेखमते येथील राजप्रतिनिधित्वसमयी त्याने मुसल्मानी कालात बंद पडलेली राजसिंहेश्वराची पूजा पुन्हा सुरू करून देवस्थानच्या जमिनी परत देवविल्या (साऊथ इंडि. इन्स्क्रि. १.११७; १२०; १२१). विजयनगरच्या बुक्क (द्वितीय) राजाच्या स. १४०६ च्या शिलालेखमते त्याने हे नगर जिंकले असून (एपि. इंडि. ६.२२९), त्याच्या राज्यकालातील जैन मंदिरलेखमते पुष्पसेन नामक भक्ताने येथील वर्धमान मंदिराचे सभागृह बांधले होते (एपि. इंडि. ७.११५–११६). विजयनगरच्या अच्युतराय राजाने येथे मौक्तिक तुला केली असून (रंगाचारी, १. अनंतपुर. १८७). 'अच्युताभ्युदयम्' नामक त्याच्या चरित्रग्रंथातहि तिचा पुनरुच्चार आढळतो.

विजयनगरच्या नृसिंहराय राजाच्या (इ. स. १५ वें शतक) शिलालेखमते त्याने पंचाल, द्राविड, अंग, माळव देशातून लुटलेली रत्ने कांची, वेंकट (तिरुपति), आणि काळहस्ति मंदिरांस अर्पिली होती (एपि. इंडि. ७.७७).

(७) **अन्य शिलालेखात**—कोलार देशाच्या शीय गंग राजाच्या स. १२१२ च्या शिलालेखमते त्याने येथे एक मंदिर बांधले असून (अर्कि. सर्व्हे. मद्रास. स. १९१९; क्र. ५८९), तेलगु चोल राजा तिक्क (प्रथम) च्या अमात्यांनी स. १२३५ मध्ये येथील एका मंदिरास देणगी दिली होती (रंगाचारी, १. चिंगलेपट. ३१६). पूर्व गंग राजा अनीयक भीम (तृतीय) च्या कांचीपुरम् ताम्रपटमते (स. १२३५) त्याने हे नगर जिंकले असून (एपि. इंडि. ३१.९४–९६; ९९), कन्नरदेववल्लभ राजाच्या उक्कल विष्णुलेखमते त्याने हा, तसेच तंजोर देश जिंकला होता (एपि. इंडि. ४.८२). तम्मुसिद्धि राजाच्या शके ११२९ च्या तिरुप्पासूर ताम्रपटमते त्याच्या नल्लसिद्धि नामक पूर्वजाने हे नगर जिंकले होते (एपि. इंडि. ७. १२१–१२९).

## कांची येथील मंदिरे

**मंदिरे**—स्थापत्यशास्त्रीय आणि धार्मिक दृष्टींनी महत्त्वपूर्ण अशी पल्लव (इ. स. ७–१० वे शतक), चोल (इ. स. ११–१२ वे शतक), आणि विजयनगर (इ. स. १३ वे–१४ वे शतक) शैलीची मंदिरे येथे आढळतात. दक्षिण भारतातील द्राविड आणि चालुक्य मंदिररचनेच्या सुवर्णयुगातील अंतिम देवालये या नात्याने ती महत्त्वाची आहेत (पत्तदकल पहा).

येथील मंदिरांचे कालानुक्रमे निम्नलिखित तीन उपविभाग दिसतात :—

### (१) पल्लव देवालये

**पल्लव मंदिरे**—मामल्लपुरम् येथील रथमंदिरांच्या अनुकरणाने बांधलेली पल्लव मंदिरे (इ. स. ७–८ वे शतक) कांची येथील प्राचीनतम मंदिरे होत. दगडविटांच्या या मंदिरांचे मूळ स्वरूप उत्तरकालीन जीर्णोद्धारामुळे आज

# कांची येथील देवालये

## (१) पल्लवकालीन देवालये

| देवालय | स्थान | संभाव्य रचनाकाल |
|---|---|---|
| (१) कैलासनाथ (राजसिंहेश्वर) | शिवकांची | नृसिंहवर्मन् राजसिंह (द्वितीय; स. ६८०–७२०) |
| (२) महेंद्रवर्मेश्वर | शिवकांची (कैलासनाथ शेजारी) | महेंद्रवर्मन् (तृतीय; स. ७२५) |
| (३) मतंगेश्वर | शिवकांची | नंदिवर्मन् (द्वितीय; स. ७३१–७९५) |
| (४) मुक्तेश्वर | शिवकांची | ,, ,, |
| (५) वैकुंठ पेरुमाल | विष्णुकांची | ,, ,, |

## (२) चोलकालीन देवालये

| देवालय | स्थान | संभाव्य रचनाकाल |
|---|---|---|
| (१) आलगर कोइल | विष्णुकांची | इ. स. ११–१२ वे शतक |
| (२) ज्वरहरेश्वर | शिवकांची | ,, ,, |
| (३) पांडव पेरुमाल | विष्णुकांची | ,, ,, |

## (३) विजयनगरकालीन देवालये

| देवालय | स्थान | संभाव्य रचनाकाल |
|---|---|---|
| (१) एकाम्रनाथ मंदिराचे शिखर आणि गोपुर | शिवकांची | इ. स. १४–१५ वे शतक |
| (२) अरुवाल पेरुमाल (वरदराज) मंदिर | विष्णुकांची | ,, ,, |

बहुंशी नाहीसे झाले असून, त्यामधील शिल्पचित्रेहि मामल्लपुरम्च्या तुलनेने खुजी, रचनादृष्ट्या कमी पोक्त, आणि कनिष्ठ प्रतीची आहेत. देवादिकांच्या पंचायतनाबरोबरच पल्लव राजांच्या आयुष्यातील कथाभाग कोरण्याच्या अट्टाहासामुळे त्यामधील शिल्पे अनावश्यक प्रसंगांनी आणि व्यक्तींनी नको इतकी गजबजली आहेत (जसे–वैकुंठ पेरुमाल मंदिरातील नंदिवर्मन् द्वितीयच्या जीवनातील प्रसंग). त्यांमधील व्यक्ती आणि प्राण्यांचे चेहरे सुतकी, उभे राहण्याची पद्धत निर्जीव, आणि चित्रबंध ठराविक ठशाचा असून, मामल्लपुरम् येथील शिल्पचित्रातील नवोन्मेष अथवा जीवनोल्हास त्यामध्ये दिसत नाही.

**भित्तिचित्रे**—उपरोक्त शिल्पचित्रांच्या तुलनेने या मंदिरातील पल्लव भित्तिचित्रे (उदा. कैलासनाथ मंदिर) अधिक सरस आणि महेंद्रवमनकालीन शित्तनवाशल जैन मंदिराच्या तोडीची आहेत. येथील प्रातिनिधिक पल्लव मंदिरे पुढीलप्रमाणे होत:—

**(१) कैलासनाथ (राजसिंहेश्वर) मंदिर**—द्राविड शैलीने (इ. स. ७ वे शतक) बांधलेले कांचीपुरम् गावाच्या पश्चिमेकडील हे लाल दगडाचे प्राचीनतम शिवमंदिर सध्या 'कैलासनाथ वैष्णव मंदिर' नावाने ओळखले जाते. त्यामधील मंदिरलेखमते चालुक्य राजा विक्रमादित्य (प्रथम, स. ६५४–६८०) चा समकालीन पल्लव राजा उग्रदंड लोकादित्याचा पुत्र राजसिंह ऊर्फ नरसिंहविष्णूने ते बांधले असून, रचनाकाली ते 'राजसिंहेश्वर' नावाने ओळखले जात असे.

आयताकृती बंदिस्त तटबंदीच्या अंतर्भागातील या मंदिराच्या तटाच्या अंतर्भागात छोट्या खोल्या असून, या मंदिराचे विमान (शिखरयुक्त गर्भमंडप) आणि सभा-

मंडपाच्या पूर्वकालीन स्वतंत्र इमारती उत्तरकालात स्तंभयुक्त अर्धमंडपाने जोडल्या आहेत. मूलतः पूर्वाभिमुख असे हे मंदिर जुन्या प्रवेशमंडपानजिक भिंत बांधून, तसेच अर्धमंडपास नवा दरवाजा खोदून दक्षिणाभिमुख बनविले आहे. त्यायोगे पूर्वकालीन मुख्य सभामंडप गौण बनला आहे.

या मंदिराच्या पूर्वकालीन प्रवेशद्वाराच्या स्थानी उत्तरकाली एक तटबंदीयुक्त उपमंदिर, तसेच अन्य आठ छोटी उपमंदिरे बांधली आहेत. यापैकी पाठीमागची तीन मंदिरे पश्चिमाभिमुख, आणि उभय बाजूंची प्रत्येकी दोन मंदिरे पूर्वाभिमुख असून, त्यांच्या दरम्यान विशाल नंदी आहे. गर्भागाराच्या प्रवेशद्वाराच्या उभय अंगांस अन्य दोन उपमंदिरे असून, वेरूळ येथील कैलास मंदिराप्रमाणे संपूर्ण शिवालय बांधण्याची कल्पना येथे अभिप्रेत दिसते. उपमंदिरांच्या दर्शनी भागी 'व्याली' (शृंगयुक्त सिंह) आधारित प्रत्येकी दोन स्तंभ आहेत.

मंदिराच्या मुख्य तटबंदीच्या अंतर्भागातील छोट्या खोल्यांमध्ये अनेक छोटी शिवमंदिरे असून, त्यांच्या शिरोभागी तटबंदीच्या वर डोकावणारे कळस आणि शिवपार्षद नंदी अथवा हत्तीप्रतिमा आहेत. मंदिराच्या अंतर्भागात आणि बहिर्भागात वेरूळ येथील कैलास मंदिराच्या धर्तीची पार्वतीची शिल्पचित्रे आहेत. त्यापैकी शिवाच्या ऊर्ध्व तांडवनृत्याचे, तसेच हास्यवदना पार्वतीचे शिल्प उल्लेखनीय आहे.

मंदिराच्या तटाच्या पश्चिम भागातील गोपुरयुक्त प्रवेशद्वार सध्या बुजवले असून, मुख्य सभामंडपाचे मामल्लपुरम्‌-रथसदृश छतहि आज नष्ट झाले आहे.

(२) **वैकुंठ पेरुमाल मंदिर**—कैलासनाथ मंदिराप्रमाणेच द्राविड शैलीने बांधलेले कांची गावाच्या पूर्व भागातील हे विष्णुमंदिर आयताकृती (१०८′ × ७९′) अंगणात बांधले आहे. 'विष्णूचे श्रेष्ठ निवासस्थान' (तामीळ 'पेरुमाल' = विष्णु) अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले असावे. पल्लव राजा नंदिवर्मन्‌ (द्वितीय; स. ७३१–७९५) ने पुत्रप्राप्तीच्या आनंदाप्रीत्यर्थ हे बांधले.

या मंदिराच्या अंगणाच्या अरुंद दर्शनी भागात (२८′) मंदिराचा चोवीस स्तंभयुक्त (५०′ × ४′) बाह्यमंडप आहे. त्याच्या अंतर्भागात सभामंडप आणि गर्भागाराची अखंड इमारत आहे.

गर्भागाराच्या चार मजली इमारतीच्या तळमजल्यात एकाच्या आत एक प्रदक्षिणापथद्वय असून, त्यापैकी बाह्य प्रदक्षिणापथाच्या तीन बाजूंस प्रत्येकी एक दरवाजा आणि दोन खिडक्या आहेत. गर्भागाराच्या दुसऱ्या मजल्यावर तळमजल्यापेक्षा विशाल देवालय आणि प्रदक्षिणापथ असून, तिसऱ्या मजल्यावरील देवालयाच्या सभोवती प्रदक्षिणापथाऐवजी उघडी गच्ची, छोटे देवतामंदिर, घुमट आणि शिखर आहे. या मंदिरातील विष्णु आणि लक्ष्मी अनुक्रमे 'वैकुंठ' आणि 'वैकुंठवल्ली' नावाने सुविख्यात आहे.

(३) **अन्य मंदिरे**—पल्लव शैलीची 'महेंद्रवर्मेश्वर', 'मुक्तेश्वर', 'मतंगेश्वर' आदि अन्य काही छोटी आणि स्थापत्यदृष्ट्या वैशिष्ट्यहीन शिवमंदिरे शिवकांची येथे आहेत.

## (२) चोल मंदिरे

येथील 'आलगार कोइल' आणि 'पांडव पेरुमाल' ही विष्णुमंदिरे, तसेच 'ज्वरहरेश्वर शिवमंदिर' उत्तरकालीन चोल स्थापत्यशैलीने (इ. स. ११–१२ वे शतक) बांधली आहेत.

## (३) विजयनगर मंदिरे

(१) **एकाम्रनाथ मंदिर**—धार्मिक दृष्टीने महत्त्वपूर्ण अशा या मंदिरात पंचमहाभूतात्मक शिवाचे पृथ्वीलिंग असून, स्थानिक समजुतीनुसार येथील आम्रवृक्षाखाली पार्वतीने शिवप्राप्त्यर्थ तपस्या केल्यामुळे यास 'एकाम्रनाथ' नाव प्राप्त झाले. मंदिराच्या आवारातील या आम्रवृक्षाच्या चार शाखांना चतुर्वेदांचे प्रतीक मानून त्याची फळे स्त्रिया पुत्रप्राप्त्यर्थ भक्षितात. मंदिराच्या गर्भागारातील शिवलिंगद्वय अनुक्रमे १०८ आणि १००८ अणुलिंगांचे बनले असून, मंदिराच्या आवारात त्रेसष्ट नायनारांच्या (शिवभक्त) प्रतिमा आहेत.

या शिवमंदिराची गोपुरे अत्यंत भव्य असून, त्यांपैकी विजयनगरच्या कृष्णदेवरायाने (स. १५०९–१५३०) बांधलेले दक्षिणेकडील तीन मजली गोपुर (उंची–१८०′) सर्वाधिक विशाल आहे. दक्षिण भारतातील विजयनगर शैलीच्या 'रायेर गोपुरम्‌' मध्ये त्याची गणना होते.

या मंदिरातील मुख्य सभामंडपाच्या जोडीला (स्तंभसंख्या–५००) परंपरागत द्राविड मंदिरशैलीचे अनेक सभामंडप आणि पुष्करिणी आहेत. भक्तजनांच्या शतकानुशतकांच्या भक्तिभावनेचे उद्रेकभूत असे हे उपविभाग स्थापत्यदृष्ट्या विस्कळीत आहेत. येथील एकहि गोपुर वा भिंत सरळ रेषेत, समांतर अथवा काटकोनात नसल्याने रचनादृष्ट्या हे मंदिर चमत्कृतिपूर्ण, परंतु पोरकट वाटते.

( २ ) अरुवाल पेरुमल ( वरदराज स्वामी ) मंदिर— विष्णुकांची येथील हस्तगिरि टेकडीवरील हे मंदिर रामानुजाचार्यांच्या विशिष्टाद्वैत सांप्रदायाचे आद्य पीठ, दक्षिण भारतातील पवित्रतम तीर्थ, आणि अत्यंत श्रीमान मंदिर असून, वरदराजस्वरूपी विष्णूचे अवतारस्थान म्हणून ते पवित्र मानतात. एका यज्ञाने सहस्र यज्ञांचे पुण्य प्रदान करणाऱ्या 'सत्यव्रतक्षेत्रा'त ( कांची ) ब्रह्मदेव यज्ञ करीत असता त्याची सरस्वती नामक पत्नी वेगवती नदीचे रूप धारण करून त्यामध्ये विघ्ने आणू लागली. तेव्हा वरदराजस्वरूपी विष्णूने तिचे निवारण केले.

तेवीस एकर क्षेत्रामध्ये पसरलेल्या या पाच बाह्य मंडपयुक्त, आणि विजयनगर सम्राटनिर्मित पूर्व आणि पश्चिम गोपुरयुक्त देवालयान्तर्गत मुख्य मंदिर येथील अन्य शिवमंदिरांहून छोटेखानी आहे. त्याच्या पश्चिमेकडील सात मजली मुख्य गोपुरावरील ( उंची–१००′ ) नक्षीकाम एकाम्रेश्वर मंदिराच्या तुलनेने साधेसुधे आहे. त्याच्या अंतर्भागात डाव्या बाजूस विजयनगर सम्राटनिर्मित पौराणिक शिल्पचित्रयुक्त सहस्रस्तंभीय सभामंडप आहे. विजयनगर शिल्पशैलीचे सारे गुणदोष त्यामध्ये असून, अश्वारूढ मनुष्याकृतींची त्यामध्ये रेलचेल आहे. सभागृहाच्या उत्तरेस द्राविड मंदिर स्थापत्यशैलीचा 'तेप्पकुलम्' नामक पवित्र जलाशय आहे. मंदिराच्या अंतर्भागात वरदराजपत्नी पेरुंदेवी ( लक्ष्मी ) ची प्रतिमा असून, टेकडीमधील एका गुफेत योगनृसिंहाचे मंदिर आहे.

मध्ययुगीन अल्वार ( वैष्णव संत ) रचित वरदराजस्तोत्रात त्यास कांची येथील अष्टादश 'तिरुपती' मध्ये ( वैष्णव मंदिरे ) सर्वश्रेष्ठ मानले आहे. या मंदिरातील इ. स. १३ व्या शतकातील एका शिलालेखावरून त्या काळी हे अस्तित्वात असावे. काकतीय राजा प्रताप रुद्र ( द्वितीय ) च्या गुप्पिडि नायक नामक सेनापतीच्या स. १३१६ च्या मंदिरलेखमते कांची नगरावरील विजयाप्रीत्यर्थ या मंदिरास त्याने दोन गावे दान दिली होती ( रंगाचारी, १. चिंगलपेट. ३२५; एपि. इंडि. ७.१२८ ).

अन्य मंदिरे—येथील धार्मिकदृष्ट्या महत्त्वाची अन्य मंदिरे पुढीलप्रमाणे होत :—

( १ ) कामाक्षी मंदिर—एकाम्रनाथ मंदिरानजिकच्या या मंदिरातील कामाक्षी देवी मन्मथ ( मुरुग ) अवतारातील असून, शिवशापाने कुरूप बनलेल्या गौरीने येथे कामकोटि अंबिकेच्या स्वरूपात अवतार घेतला होता. येथील 'गायत्री मंडप' नामक सभामंडपाच्या मध्यभागी आग्नेयाभिमुख 'कामाक्षी मंदिर' असून, त्यामधील मूर्तिसन्मुख श्रीचक्र आहे. कामकोटि पीठ म्हणून त्याची पूजा करतात.

मंदिराच्या स्थापत्यशैलीवरून ते इ. स. १२–१३ व्या शतकातील असावे. विजयनगरसम्राट हरिहर ( द्वितीय ) च्या स. १३९३ च्या शिलालेखमते त्याने या मंदिरास एक ताम्रप्रवेशद्वार देणगी दिले होते ( कामकोटि पहा ).

श्रीमत् शंकराचार्य ( इ. स. ८ वे शतक ) हे कामकोटि अंबिकेचे अनन्य भक्त असून, स्थानिक आख्यायिकामते रात्रसंचारी, आणि रौद्रस्वरूपी काली देवीचा क्रोध शांत करून शांतस्वरूपी कामाक्षीरूपाने येथे रहाण्याचे आश्वासन त्यांनी तिच्याकडून मिळविले. कामाक्षी मंदिराच्या आवारातील शंकराचार्य-प्रतिमेची परवानगी घेऊनच येथील देवी उत्सवसमयी बाहेर पडते.

श्रीमत् शंकराचार्यांनी आपले बहुतांशी आयुष्य येथे व्यतीत केले असून, त्यांचा मृत्यूहि येथेच झाल्याचे काही अभ्यासक मानतात. अन्य अभ्यासकांच्या मते हिमालयातील केदारनाथ येथे त्यांनी देह ठेवला. विष्णुकांची येथील शांकर सांप्रदायाचे कामकोटि पीठ तत्रस्थ रामानुज सांप्रदायाच्या वाढत्या प्रभावामुळे उत्तरकालात शिवकांची येथे, आणि स. १७४३ मध्ये कुंभकोणम् येथे हलविण्यात आले.

(२) अवशिष्ट मंदिरे—येथील अन्य उल्लेखनीय मंदिरे पुढीलप्रमाणे होत :— ( १ ) विष्णुकांची—१. यथाक्तकरी मंदिर; २. विलकोली पेरुमाल मंदिर; ३. उलगलंदर मंदिर; ४. अष्टभुजा मंदिर; ५. चित्रगुप्त मंदिर; (२) शिवकांची— १. कुमार कोष्टम् मंदिर; २. सत्यव्रतेश्वर मंदिर; ३. अगस्तीश्वर मंदिर आणि उपनिषद् ब्रह्मेंद्र मठ; ( ३ ) जैनकांची— १. तिरुपतिकुनरम् मंदिर ( तिरुपतिकुनरम् पहा ).

२. ( तीर्थ ) नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( पद्म. आदि. १७.८ ).

३. ( देवीस्थान ) अरुणाचल तीर्थान्तर्गत एक देवीस्थान. येथील देवाचे नाव कामशासन, आणि देवीचे नाव कामाक्षी होते ( स्कन्द. अरुणाचल. २.२ ).

४. ( नदी ) जंबूद्वीपान्तर्गत भद्राश्व वर्षातील एक नदी ( वायु. ४३.२५ ).

५. जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक नदी.

**काञ्चीप्रस्थ** ( नगर ) —पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक नगर. 'प्रस्थ' अंत्यशब्दयुक्त नगरनामाचे उदाहरण म्हणून याचा निर्देश तेथे असून, अन्य

' प्रस्थान्त ' नगरांप्रमाणेच हे कुरु देशात असावे (अग्रवाल, पाणिनि. पृ. ८१).

**काटोपरे** ( महानुभाव तीर्थ )—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थ ( स्था. पृ. ३ ). अमरावती जिल्ह्यातील मोर्शी तालुक्यातील रितपुरपासून ८ मैल पूर्वेकडील आधु. काटपुर गाव हेच होय. पाठभेद– 'काटसरे '.

**काट्टमन्नारगुडी** ( मतंगाश्रम )—तामीळनाडमधील चिदंबरम्‌पासून १६ मैल दक्षिणेकडील मतंग ऋषींचे तपस्यास्थान. येथील भगवान वीरनारायणाच्या मंदिरात श्रीदेवी, भूदेवी, राजगोपाल ( श्रीकृष्ण ), रुक्मिणी, सत्यभामा आदींच्या मूर्ती आहेत ( ती. पृ. ३५९ ).

**काठक** ( नगर )—मध्ययुगीन शिलालेख साहित्यमते आग्नेय भारतातील ' कंटकस्थल ' नगराचे नामांतर ( एपि. इंडि. ७.१४७; कंटकस्थल पहा ).

**काठेरणि** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.१३८ ).

**काडशूर** ( ग्राम )—होयसाळ राजा सोमेश्वराच्या स. १२४६ च्या शिलालेखमते दक्षिण म्हैसूरातील काडव्य–नायक राजाच्या अधिसत्तेखालील एक ग्राम ( एपि. कर्ना. ३.६२ ). याचे आधुनिक स्थान समजत नाही.

**काणशोणा** ( नगर )—मध्ययुगीन संस्कृत साहित्यमते ' कर्णसुवर्ण ' नामक गौड राजधानीचे नामांतर ( कर्णसुवर्ण पहा ).

**काणाद** ( कूप )—काशी येथील कणादेश शिवलिंगानजिकचा एक कूप ( स्कन्द. काशी. ९७.१७५ ).

**काणियूर मठ** ( माध्वपीठ )—दक्षिण भारतातील एक माध्वपीठ ( ती. पृ. ५६४ ).

**काणीसाना** ( ग्राम )—गुजरातेतील सायमा रेल्वेस्थानकापासून दोन मैलांवरील एक देवीस्थान. येथे वालद लोकांच्या लीमच देवीचे मंदिर आहे ( ती. पृ. ४२८ ).

**काणेय** ( विषय )—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते भारतवर्षातील एक विषय (देशविभाग; पा. सू. ४.२.५४).

**काण्डेला** ( शिवमंदिरस्थान )—गुजरातमधील पोरबंदरपासून ७ मैलांवरील समुद्रकाठचे एक शिवमंदिरस्थान. येथे ' रेवतेश्वर ' आणि ' महाकालेश्वर ' नामक शिवमंदिरे आहेत ( ती. पृ. ४१६ ).

**काण्डवारण** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.३.९३ ).

**काण्डाग्नि** ( देश )—काशिकामते भारतवर्षातील एक देश ( काशिका. ४.२. १२६ ). ' अग्नि ' अंत्यशब्दयुक्त ( = शब्दशः अर्थ, ' क्षारयुक्त रेताड जमीन ' = इरिण ) देशनामाचे उदाहरण म्हणून याचा निर्देश तेथे आढळतो. अग्रवाल यांच्या मते कच्छ–भुजच्या ईशान्येकडील आधु. कच्छचे छोटे रण हेच होय. आधु. कांडला बंदर त्यामध्ये आहे ( अग्रवाल. पाणिनि. पृ.७९ ).

**कान्तेपुर** ( नगर )—नेपाळच्या 'काष्ठमंडप' नामक मध्ययुगीन राजधानीचे नामांतर ( राईट, नेपाळ इतिहास. पृ. ९; काष्ठमंडप पहा ).

**कात्यायन** ( लिंग )—काशी येथील ज्येष्ठेश्वरानजिकचे एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ६५.१२; ९७.२५८; लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. १२० ). नामांतर– 'कात्यायनेश ' ( स्कन्द. काशी. ६८.६६ ); ' कात्यायनेश्वर '.

**कात्यायनी** ( तीर्थ )— हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ ( स्कन्द. नागर. ११९.१२१ ).

२. ( देवीस्थान ) अर्बुद पर्वतावरील एक देवीस्थान ( स्कन्द. प्रभास. अ. २४.१ ).

**कात्यायनेश** ( लिंग )—स्कंदमते काशी येथील ' कात्यायन ' शिवलिंगाचे नामांतर ( स्कन्द. काशी. ६८. ६६; कात्यायन पहा ). अन्य नामांतर–' कात्यायनेश्वर. '

**कात्रिपुर** ( देशविभाग )—अलाहाबाद स्तंभलेखमते उत्तर भारतातील एक देशविभाग. आधु. कुमाऊँ, अलमोरा, गढवाल आणि कांगडा प्रदेश हाच होय ( जे. आर. ए. एस; स. १८९८, पृ. १९८ ).

**काथिक** ( देश व लोक )—कनिंगहॅम यांच्या मते चिनाब आणि रावी नद्यांच्या रेच्ना दुआबातील, तसेच उत्तर सिंधमधील एक लोकसमूह. यापैकी उत्तर सिंधमधील लोक उत्तरकालात ( इ. स. ७ वे शतक ) गुजरात द्वीपकल्पात स्थलांतरित होऊन त्यांचेच नावावरून त्या प्रदेशास ' काठेवाड ' नाव प्राप्त झाले ( आर्कि. सर्व्हे. २.३३–३७ ).

**कादम्बक** ( ब्रह्मदेवस्थान )—पद्ममते एक ब्रह्मदेवस्थान. येथील ब्रह्मदेवाचे नाव प्रजाध्यक्ष होते ( पद्म. आदि. २९.१४८ ).

**कादम्बरी** ( ग्राम )—कल्चुरि राजा कर्णच्या स. १०६१ च्या रेवा शिलालेखमते मध्य भारतातील वप्पुल्लराजनिर्मित ' वप्पुल्लेश्वर ' शिवमंदिराचे आणि ' श्रीवत्स ' ( विष्णु ) देवालयाचे मंदिरस्थान. याचे आधुनिक स्थान समजत नाही ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.२८१ ).

**कादिरी** ( तीर्थ )—म्हैसूर राज्यातील अनंतपुर

जिल्ह्यातील धर्मावरम्–पकाला रेल्मार्गावरील पकाला स्थानका पासून ४२ मैलांवरील नृसिंहमंदिरस्थान ( ती. पृ. ३२४ ). विजयनगरच्या कंपन ( द्वितीय ) राजाच्या गोपन नामक सेनापतीने या मंदिरास देणगी दिली होती ( रंगाचारी, १. अनंतपुर. १०४ ).

**काद्रवती** ( तीर्थ )—एक श्राद्धयोग्य तीर्थ ( वायु. ७७.८२ ).

**काद्रवा** ( नदी )—नाशिक जिल्ह्यातील वणिनजिकच्या सह्य पर्वतश्रेणीतील सप्तशृंग पर्वतातून उगम पावणारी एक नदी. दिंडोरी गावावरुन वहात जाऊन गोदावरी नदीस मिळणारी आधु. कादवा नदी हीच होय ( नासिक गॅझेट. स. ११८३; पृ. ३८९ ). ब्रह्म पुराणात काद्रवा–गोदावरी ( गौतमी ) संगमतीर्थाचा निर्देश आढळतो ( ब्रह्म. १००.१ ).

**कानडी** ( तीर्थ )—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थ ( स्था. पृ. ४० ). औरंगाबाद जिल्ह्यातील भालगावच्या १ मैल उत्तरेकडील गोदावरी नदीकाठचे आधु. कानडगाव हेच होय.

**कानन** ( लोकसमूह )—महाभारतमते एक वन्य लोकसमूह. भारतीय युद्धात हे लोक भीष्माच्या गरुडव्यूहात उभे होते ( म. भी. ५२.९ ).

**काननस्थली** ( देश )—वायुमते मेरु पर्वत ( आधु. पामीर पठार ) आणि महाभद्र सरोवराच्या ( आधु. सोनकुल ) उत्तरेकडील महामेघ आणि पुष्पक पर्वतांच्या दरम्यानचा एक देश ( वायु. ३८.७१–७८ ). अली यांच्या मते उज्बेकिस्तानमधील कुरमिन् आणि कर–तौ पर्वतांच्या दरम्यानच्या चिर्चिक नदीच्या खोऱ्यातील आधु. स्टेपीज् प्रदेश हाच होय.

**पौराणिक साहित्यात**—वायुमते या ताडपत्राप्रमाणे शुष्क, उजाड आणि निर्मनुष्य देशात ( व्याती–१००×६० योजने ) वृक्ष, गवत आणि वनस्पतींचा संपूर्ण अभाव असून, त्यामुळेच हा देश भयप्रद आणि धोक्याचा बनला होता.

उपरोक्त वर्णन सूर्यतापाने दग्ध झालेल्या डोंगराळ उतारावरील आधु. स्टेपीज् प्रदेशास लागू पडते. तेथील प्रचंड आकाराच्या भूविवरातील शाडूच्या मऊ मातीचे पट्टे ( तकिर ) सूर्यप्रकाशात आरशाप्रमाणे चकाकत असून, ताश्कंद आणि चिम्कंदच्या परिसरातील पर्वतीय तटबंदीनजिकच्या 'किझिल्–कुम्' प्रदेशातील वाळवंट आजहि कुविख्यात आहे ( अली, पुराणाज्. पृ. ८०–८१ ).

**कानसी** ( तीर्थ )—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील महानुभावपंथीय तीर्थ ( स्था. पृ. ४१ ). चाळीसगाव–पाचोरा रेलमार्गावरील कजगाव रेल्वेस्थानकाच्या ३ मैल उत्तरेकडील, आणि नगर-देवळा रेल्वेस्थानकाच्या ३ मैल पश्चिमेकडील आधु. कनाशी गाव हेच होय.

**कानळदे** ( तीर्थ )—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थ ( स्था. पृ. ३३ ). नाशिक जिल्ह्यातील निफाड तालुक्यातील नांदूर ( नांदौर ) पासून ३ कोसांवरील गोदावरी नदीकाठचे आधु. कानळस ( कानळद ) गाव हेच होय.

**कानाताल** ( पर्वत )—उत्तर काशी-गंगोत्री मार्गावरील एक पवित्र पर्वत. येथून स्वर्ण पर्वताचे ( सुमेरु ) दर्शन होते ( ती. पृ. ५२ ).

**कानाहेरा** ( ग्राम )—शक राजा श्रीधरवर्मन्च्या स. ३१९ च्या कानाहेरा शिलालेखाचे मध्यप्रदेशातील भोपाळ विभागातील सांची गावानजिकचे उपलब्धिस्थान. या 'महासेनस्वामी ( कार्तिकस्वामी ) उपासक' राजाने येथे एक विहीर खोदली होती. त्यावरून या शक राजाने हिंदु धर्माचा स्वीकार केला असावा ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४. १.१३ ).

**कानिज् ढेरी** ( शिलालेखस्थान )—कुशाण राज्यकालीन ( इ. स. ३ रे शतक ) कानिज् ढेरी खरोष्ट्री शिलालेखाचे पेशावर जिल्ह्यातील चारसद्दा तहसिलीतील उमरझई गावानजिकचे उपलब्धिस्थान. या शिलालेखात ( ७½"× ६" ) '××× महिन्याच्या २५ व्या दिवशी' अशी अक्षरे स. २१६ च्या 'मामानी ढेरी' शिलालेखासदृश अक्षरवाटिकेत कोरलेली आढळतात ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.१७३ ).

**कानिफनाथ** ( तीर्थ )—अहमदनगर जिल्ह्यातील पाथर्डी तालुक्यातील मढी येथील एक नाथसांप्रदायी तीर्थ.

**कानेस्पोर** ( नगर )—राजतरंगिणी टीकामते काश्मीरातील 'कनिष्कपुर' नगराचे नामांतर ( कनिष्कपुर पहा ).

**कान्तनगर** ( मंदिरस्थान )—बंगालमधील दिनाजपुर रेल्वेस्थानकापासून १२ मैलांवरील एक हिंदु देवमंदिरस्थान. येथील इ. स. १८ व्या शतकातील मंदिर परंपरागत भारतीय स्थापत्याहून सर्वस्वी वेगळे, आणि म्हणूनच वैशिष्ट्यपूर्ण आहे.

**मंदिर**—बंगालमधील वांबूच्या झोपड्यांच्या अनुकरणाने बांधलेल्या येथील चौरसाकृती मंदिराच्या नऊ शिखरांपैकी मुख्य शिखर ओरिसा शैलीचे, आणि उर्वरित आठ वांबूच्या

झोपडीसदृश आहेत. विटांचे हे अष्टकोनी मंदिर दिनाजपुरच्या महाराजांनी मध्यप्रदेशातील दमोह जिल्ह्यातील कुंदलपुर, तसेच सोनागढ आणि खजुराहो येथील जैन मंदिरांच्या अनुकरणाने, आणि त्याची शिखरे वृंदावन येथील जुगलकिशोर आणि मदनमोहन मंदिरांच्या अनुकरणाने बांधली आहेत.

येथील मुख्य मंदिराच्या चारहि दर्शनी भागी मुसलमानी पद्धतीच्या प्रत्येकी तीन कमानी असून, तत्कालीन बंगाली जीवन, लोकाचार आणि वेषभूषादर्शक अनेक शिल्पचित्रे त्यामध्ये आहेत. पूर्वकालीन ओरिसा आणि म्हैसूर मंदिरांच्या तुलनेने हे शिल्पकाम उजवे, परंतु समृद्ध आहे.

दिनापुजरनजिकच्या गोपालगंज ( स. १७६४ ) येथील, तसेच कलकत्ता येथील 'कृष्णमंदिर' ( ब्लॅक पॅगोडा ) याच्याच अनुकरणाने बांधले आहे ( फर्ग्युसन, २.१५९–१६१ ).

**कान्ता देवी** ( देवीस्थान )—श्रीमालक्षेत्रान्तर्गत एक देवीस्थान ( श्रीमालमाहात्म्य. १३ ).

**कान्तार** ( देश )— कलचुरि राजा पृथ्वीदेव ( द्वितीय ) च्या स. ११४५ च्या राजिम शिलालेखमते त्याच्या जगपाल नामक सेनापतीने जिंकलेला मध्यभारतातील एक जंगलमय प्रदेश ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.४५३ ).

**कान्तारक** (लोकसमूह)—महाभारतमते युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या दक्षिण दिग्विजयात सहदेवाने वेणातट देशासमवेत जिंकलेला दक्षिण भारतातील एक लोकसमूह. वेणा नदीनजिक हे रहात असावेत ( म. स. २८; परि. १.१३.५ ).

**कान्तारेश्वर** ( लिंग )—तापी नदीकाठचे एक शिवलिंग ( तापीमाहात्म्य. ७७ ).

**कान्ति** ( तीर्थ )—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थ ( स्था. पृ. २ ). नागपुर जिल्ह्यातील आधु. काटोल गाव हेच होय.

२. ( नगर ) ऐन्–इ-अकबरीमते उत्तर प्रदेशातील 'कांतिपुरी' नगराचे नामांतर ( ऐ. अ. पृ. ३०५; कांतिपुरी पहा ).

**कान्तिकोशल**–महाभारतमते 'उत्तर कोशल' देशाचे नामांतर ( म. भी. १०.३८; कोशल पहा ).

**कान्तिपुर** ( देश )—स्कंदमते भरतखंडातील एक देश. यामध्ये ९ लक्ष गावे होती ( स्कन्द. माहेश्वर. कौ. ३९.१३२ ).

२. ( नगर ) बृहत्संहितामते भारतवर्षातील एक नगर ( बृ. सं. १६.११ ).

३. सप्तपुरींपैकी 'कांची' नगराचे नामांतर ( कांची पहा).

**कान्तिपुरी** ( नगर )—ब्रह्माण्डमते भारशिव राजघराण्याच्या राजधानीचे नगर (ब्रह्माण्ड. ३.१३.९४–९५). उत्तर प्रदेशातील मिर्झापुर जिल्ह्यातील आधु. कांतिपुर हेच होय. नामांतर ( ऐन्–इ–अकबरी–' कांति' ( ऐ. अ. पृ. ३०५ ).

**पौराणिक साहित्यात**—स्कंदमते येथील अल्लालनाथाचे मंदिर सुविख्यात असून ( स्कन्द. माहेश्वर. कौ. २७.३३ ), विष्णु पुराणाच्या काही संस्करणांत पद्मावती आणि मथुरा नगरांसमवेत याचा निर्देश आढळतो ( जयस्वाल, हिस्टरी ऑफ इंडिया. स. १५०–३५०; पृ. १२३ ).

**कान्तिमती** ( नगर )—कूर्ममते सोम राजाच्या राजधानीचे मेरु पर्वतान्तर्गत नगर ( कूर्म. पूर्व. ४६. २३ ). पाठभेद–' शांतिमती '.

**कान्तीक** ( देश )—दक्षिण भारतातील एक देश ( म. भी. १०.६३ ). पाठभेद—' कुंती '.

**कान्द** ( देश )—राजतरंगिणीमते कश्मीरच्या आग्नेय सरहद्दीवरील एक देश. येथील गंभीरसीह राजा कश्मीरच्या कलश राजास शरण आला असून ( राज. ७.५.९४ ), 'भद्रावकाश' ( आधु. भद्रवाह ) देशाहून कश्मीरप्रत जाणारा रस्ता येथूनच जात असे ( राज. ८.५३८; १३४५ ). यावरून कश्मीरच्या आग्नेयेकडील दुर्गर संज्ञक विस्कळीत देशांपैकी हा एक असावा ( स्टाइन, राज. १.३१५ ).

**कान्दरोल** ( तीर्थ )—गुजरातमधील सीनोरपासून ४ मैलांवरील नर्मदेच्या दक्षिण किनाऱ्यावरील स्कंदतपस्यास्थान. येथील स्कंदेश्वर मंदिरस्थानी स्कंदाने तपस्या केली असून, नजिकच्याच कासरोला गावच्या ब्रह्मेश्वर शिलास्थानी ब्रह्मदेवाने यज्ञ केला होता ( ती. पृ. ४३२ ).

**कान्दलूर–शालई** ( बंदर )—चोल राजा राजराज ( प्रथम ) च्या स. ९९२ च्या शिलालेखमते दक्षिण भारतातील एक बंदर. या राजाच्या मेल्पाडि शिलालेखमते ( स. ९९८ ) आपल्या कुमारवयातच त्याने येथील बोटी उद्ध्वस्त केल्या होत्या ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. ३.२९ ).

टी. ए. गोपीनाथराव यांच्या मते केरळ प्रांतातील आधु. त्रिवेंद्रम् हेच असावे ( त्रावणकोर. आर्कि. सर्व्हे. ३.५ ). हुल्ट्झ यांच्या मते शेरलन् ( चेर ) राजाच्या बोटी राजराजाने बुडविल्याचा निर्देश उपरोक्त शिलालेखात अभिप्रेत

असून, आधु. मलबार किनाऱ्यावर कोठेतरी हे असावे ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. २.२४१ ). परंतु त्यांचे हे मत अग्राह्य वाटते."

**अन्य निर्देश**—चोल राजा राजाधिराज ( प्रथम ) च्या मणिमंगलम् शिलालेख मतें ( स. १४०६ ) त्याने येथील बोटी जाळल्या होत्या ( साऊथ. इंडि. इन्स्क्रि. ३.५१ ).

**कान्दा-डोङ्गर** ( देश )—कलचुरि राजा पृथ्वीदेव ( द्वितीय ) च्या स. ११४५ च्या राजिम शिलालेखमते त्याच्या जगपाल नामक सेनापतीने जिंकलेला मध्य भारतातील एक देश. मध्यप्रदेशातील रायपुर जिल्ह्यातील आधु. बिंद्रा–नवगढ जमीनदारीचा भाग हाच असून, तेथील टेकड्या आजहि 'कांदा' स्थानिक नावाने ओळखल्या जातात ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.४५३ ).

**कान्द्रासेर** (देशविभाग)–शिलालेख साहित्यमते मध्यभारतातील दक्षिण कोशल देशाच्या परिसरातील एक देशविभाग ( इंडि. अँटि. १७.१३७–१४० ). मध्यप्रदेशातील कंकर गावाच्या पूर्वेकडील आधु. सिहोआ गावाच्या परिसरातील प्रदेश हाच होय ( चौधरी, पृ. ६७ ).

**कान्दै** ( ग्राम )—चोल राजा वीर राजेंद्रच्या स. १०६७ च्या मणिमंगलम् शिलालेखमते दक्षिण भारतातील कूडलसंगमम् या चालुक्य–चोल संग्रामस्थलानजिकचे एक ग्राम. पश्चिम चालुक्य राजा सोमेश्वर ( प्रथम ) ने चोल राजास येथे युद्धाचे आह्वान दिले होते ( रंगाचारी. १. ७८७ ). नामांतर–'करंदै'.

**कान्यकुब्ज** ( नगर )—पौराणिक साहित्यमते अमावासु राजवंशाची राजधानी, विश्वामित्र ऋषींचे जन्मस्थान, तसेच एक शक्तिपीठ आणि वामनस्थल म्हणून सुविख्यात असणारे उत्तर भारतातील एक नगर. बौद्धकाली हे दक्षिण पंचाल देशाच्या राजधानीचे गाव असून ( बुद्धिस्ट. इंडिया पृ. २७ ), हर्षवर्धनाच्या काली हे भारतातील बौद्ध धर्मीयांचे आद्य पीठ होते. या गावचे कान्यकुब्ज ब्राह्मण मध्ययुगीन काळी, तसेच आजहि उत्तर भारतात सर्वश्रेष्ठ मानले जातात.

उत्तर प्रदेशातील फरुखाबाद जिल्ह्यातील फतेहगडपासून ३९ मैल पूर्वेकडील, आणि कानपुरपासून ५२ मैल वायव्येकडील काली नदीकाठचे आधु. कनौज गाव हेच होय ( अक्षांश. २७°–३' उत्तर; रेखांश–७९°–५९' पूर्व ). प्राचीन काळी हे गंगा नदीकाठी असले, तरी त्या नदीच्या प्रवाहस्थित्यंतरामुळे सध्या हे तिच्यापासून २ मैल पश्चिमेस आढळते. याच्या ३ मैल दक्षिणेस काली-गंगा नद्यांचा संगम होतो.

**राजधानी**—मौर्य साम्राज्योत्तरकालीन मौखरि ( स. ५५५–७२० ), भंडिकुल ( स. ७४० ), प्रतिहार ( स. ९६६ ), आणि गाहडवाल ( स. १११४ ) राजघराण्यांची राजधानी या गावी असून, त्यापैकी भंडिकुल राजघराण्यातील कान्यकुब्जसम्राट चंद्र, गोविंदचंद्र, आणि विजयचंद्र हे विशेष सुविख्यात होते. या नगराचा सविस्तर इतिहास व्हिन्सेंट स्मिथ यांनी लिहिला आहे ( जे. आर. ए. एस्., स. १९०८, पृ. ७६५–७९३ ).

काही अभ्यासकांच्या मते समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद प्रशस्तिलेखातील 'पुष्पपुर' हे त्याच्या राजधानीचे नगर 'कान्यकुब्ज' चेच नामांतर असावे. भौगोलिक दृष्ट्या हे नगर अलाहाबादपासून पाटलिपुत्रापेक्षा अधिक नजिक असून, ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनातहि यास 'कुसुमपुर' म्हटले आहे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.५ ).

**स्थापत्यावशेष**—प्राचीन कान्यकुब्ज नगराच्या उत्तरवर्ती छोट्या कोपऱ्यात आधु. कनौज गाव असून, उर्वरित कान्यकुब्ज नगर आज उजाड बनले आहे. त्याच्या प्राचीनत्वाच्या मानाने विशेष स्थापत्यावशेष तेथे आढळत नाहीत. गंगा नदीच्या बदलत्या प्रवाहामध्ये ते संभवतः नष्ट झाले असावेत. या गावच्या उद्ध्वस्त मनोऱ्यात अजयपाल आणि जयचंद्र राजांचा पुरातन किल्ला असून, त्यालाच ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात 'कान्यकुब्ज नगर' म्हटले असावे. शहराचा हा विशिष्ट त्रिकोणी आकाराचा भाग तीन बाजूंकडील नाल्यांमुळे निसर्गतःच खंदकयुक्त बनला आहे.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नगरांची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा ).

**नामव्युत्पत्ती**—वाल्मीकि रामायणमते पुरातन काली 'महोदय' ( शब्दशः अर्थ–समृद्धिनगर ) नावाने सुविख्यात असणारे हे नगर कुश राजाच्या अष्टावक्र शतकन्यांमुळे ( कुब्ज + कन्या ) 'कान्यकुब्ज' नावाने सुविख्यात झाले ( वा. रा. बा. ३२.६ ). ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनातहि याची नामव्युत्पत्ती 'कुबड्या कन्यांचे नगर' अशीच दिली असून, त्याचे मते पुरातन काली 'कुसुमपुर' नावाने सुविख्यात असणारे हे नगर ब्रह्मदत्त राजाच्या नव्याण्णव कुबड्या कन्यांमुळे 'कान्यकुब्ज' नावाने प्रसिद्ध झाले.

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**—इ. स. ५ व्या शतकात हे नगर गुप्त साम्राज्यात समाविष्ट असून, कुमारगुप्ताच्या राज्यकाली येथे मौखरि राजघराण्याचे स्वतंत्र राज्य प्रस्थापित झाले.

## कान्यकुब्ज नगराची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. वाल्मीकि रामायण (बा. ३२.६) | महोदय नगर |
| २. महाभारत (आर. ८५.१२; उ. ११७.४) | कन्यकुब्ज |
| अ. (उ. ११७.४) | अश्वतीर्थ |
| ३. वराह पुराण (१६२.४७) | कन्यपुर |
| ४. भागवत (६.१.२१) | अजामिल नगरी |
| अ. काव्यमीमांसा (१७.२२८) | गाधिपुर, गाधिपु |
| ५. समुद्रगुप्ताचा शिलालेख | कुसुमपुर |
| ६. टॉलेमी | कनोगिझ, कनगोर |
| अ. फाहियेन | कनोगि |
| ७. ह्युएन्त्संग | क–नो–कू–शे (कन्याकुब्ज) |
| ८. मध्ययुगीन शिलालेख साहित्य | |
| अ. राष्ट्रकूट राजा गोविंद (चतुर्थ) चा शके ८५२ चा खंबायत शिलालेख (एपि. इंडि. ७.३०) | महोदय, कुशस्थल |
| आ. कनौजच्या गोविंदचंद्र राजाचा वि. सं. ११८४ चा कमौलि ताम्रपट (एपि. इंडि. ८.१४९) | कुशिक, गाधिपुर |

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| ९. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य | |
| अ. (अभिधान. १३२.९७३; शब्दरत्न ५२.५५; ७९.१७; कल्पद्रु. १०.१६) | कन्यकुब्ज |
| आ. (अभिधान. २.१३२) | कन्यकुब्जा |
| इ. (अभिधान. १३२.९७४; कल्पद्रु. ६.२२; १०.१६; शाश्वत. ५२.२४; वैज. १५९.१४) | कन्याकुब्ज |
| ई. (कल्पद्रु. ६.२२; अभिधान. १३२.९७४; त्रिकाण्ड. ३२.१३) | कुशस्थल |
| उ. (अभिधान. १३२.९७४; कल्पद्रु. १६.१६) | कौश |
| ऊ. (शब्दरत्न. ५२.२४) | गाधिपु |
| ए. (अभिधान. १३२.९७३; लिङ्गानु. १४५.४; अनेकार्थ. ४.१५४; कल्पद्रु. १०.१६; नानार्थ. २५.६; शब्दरत्न. २४८; वैज. १५९.१४) | महोदय |

या घराण्यातील ईश्वरवर्मन्, शर्ववर्मन्, आणि सुस्थितवर्मन् हे राजे विशेष सुविख्यात असून, गुहवर्मन् हा अंतिम मौखरि राजा थानेसरच्या हर्षवर्धन राजाच्या राज्यश्री नामक भगिनीचा पती होता.

गुहवर्मन्च्या मृत्यूनंतर उपरोक्त दोन राज्यांचा हर्षवर्धन सम्राट बनला. त्याचे राज्यकाली अयोध्या, हस्तिनापुर, पाटलिपुत्र आदि पुरातन राजनगरांचे वैभव यास प्राप्त झाले. बाण, धक्क, चंद्रादित्य आदि श्रेष्ठ साहित्यिक त्याच्या दरबारी असून, स. १२०० पर्यंत हे भारताचे राजकीय, सांस्कृतिक आणि व्यापारी केंद्रस्थान होते.

**हर्षवर्धनकालीन कान्यकुब्ज**—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनातील हर्षवर्धनकालीन कान्यकुब्जची माहिती बाणाच्या हर्षचरिताशी जुळते (हर्ष. ५). ह्युएन्त्संगच्या मते राज्यवर्धनाच्या अकाली मृत्यूनंतर गंगातीरवर्ती अवलोकितेश्वर बोधिसत्त्वाच्या प्रेरणेने वंशपरंपरेने सूर्योपासक असा हर्षवर्धन कनौजचा सम्राट बनला, आणि त्याने बौद्ध धर्माचा स्वीकार केला. राज्यसुस्थितीनंतर त्याने या प्रांतात गंगा नदीकाठी हजारो बौद्ध स्तूप आणि पुण्यशाला बांधून अनेक पुरातन बौद्ध स्थानांचा जीर्णोद्धार केला. सैन्यसिद्धी करून बाकी उरलेले सारे धन त्याने बौद्ध धर्मास दान दिले.

फरिश्ताच्या ग्रंथमते हर्षवर्धनकाली या गावी ३० हजार पानाची दुकाने, तसेच गायक, गणिकादींची ६० हजार कुटुंबे होती. मसूदी, आयबनहाव (इ. स. ९००) आदींच्या ग्रंथांतहि या नगराच्या वैभवाचे वर्णन आढळते.

**हर्षवर्धनानंतर**—हर्षवर्धनानंतर (स. ६५०–८००) येथे पुन्हा एकवार मौखरि घराण्याचे राज्य सुरू झाले. त्यापैकी यशोवर्मन् राजाच्या दरबारी भवभूति, वाक्पति आदि साहित्यकार होते.

भीनमाळनिवासी गुर्जर प्रतिहार सम्राट नागभट्टने इ. स. ८ व्या शतकात हे राज्य स्वसाम्राज्यास जोडले. इ. स. १० व्या शतकापर्यंत त्यांचे राज्य येथे असून, त्यापैकी मिहिरभोज ( आदिवराह ) या सर्वाधिक पराक्रमी राजाचे राज्य पंजाब, राजपुताना, उत्तर प्रदेश, ग्वाल्हेर, सौराष्ट्र, गुजरात, माळवा या विस्तीर्ण प्रदेशावर होते. 'काव्य-मीमांसा'कर्ता राजशेखर, तसेच स्मृतिकार मेधातिथि त्यांच्या दरबारी होते.

अजयपालनिर्मित कनौज दुर्गात रहाणारा राठोडवंशीय जयचंद हा कनौजचा अंतिम हिंदु सम्राट होय. याच दुर्गातून त्याच्या संयुक्ता नामक कन्येचे पृथ्वीराजाने हरण केले. शहाबुद्दीन घोरीने जयचंदाचा वध करून ( स. ११९४ ), आणि येथील अगणित संपत्ती १४०० उंटांवर लादून नेऊन हे उद्ध्वस्त केले. मुसलमानांच्या भयाने येथील राठोड राजे राजपुतान्यात स्थलांतरित होऊन येथील राजधानी दिल्ली येथे हलविण्यात आली. स. १५४० त या गावी शेरशहाने हुमायूनचा पराजय केला.

**स्थापना**— वाल्मीकि रामायणमते ब्रह्मपुत्र कुश राजास वैदर्भी नामक पत्नीपासून झालेल्या चार पुत्रांपैकी कुश-नाभाने 'महोदय' नगर स्थापिले ( कुश राजाचे अन्य तीन पुत्र– कुशांब–कौशांबी; अमूर्तरयस्–धर्मारण्य; वसु–गिरिव्रज ). कुश राजाच्या कन्यांनी वायूची विवाहाची मागणी नाकारल्याने त्यांस अष्टावक्रत्व प्राप्त होऊन हे नगर 'कान्यकुब्ज' बनले ( वा. रा. बा. ३६ ). ह्युएन्त्संगच्या मते ब्रह्मदत्तकन्यांनी तापसी ऋषींची विवाहमागणी नाकारल्याने त्या अष्टावक्र बनल्या.

**पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यात**— या ग्रंथात 'कान्यकुब्ज नगरोत्पन्न स्त्री' अशा अर्थाने 'कान्यकुब्जी' संज्ञेचा प्रयोग आढळतो ( पतञ्जलि. २.३३३ ).

**वाल्मीकि रामायणात**—या ग्रंथमते हे ( महोदय ) नगर विश्वामित्र ऋषींचे जन्मस्थान होते ( वा. रा. बा. ३२.६ ).

**महाभारतात**— या ग्रंथमते गंगा नदीकाठच्या या गावी गाधि राजाची राजधानी असून ( म. आ. १६५.३ ), याच्या सभोवतालचा देशहि 'कान्यकुब्ज' नावानेच सुविख्यात होता ( म. आर. ११५.१७ ). ऋचीक ऋषींनी गाधिकन्या सत्यवतीला मागणी घातली असता राजाने त्यांजकडे एक सहस्र श्यामकर्ण अश्व मोबदला मागितले. तेव्हा या नगरानजिकच्या 'अश्वतीर्थ' येथे तपस्या करून ऋचीकांनी ते प्राप्त केले ( म. उ. ११७.४ ). धौम्ययात्रा-मते विश्वामित्रांनी येथे इंद्रासमवेत सोमपान केले असून ( म. आर. ८५.१२ ), लोमशतीर्थयात्रेतहि या (कन्यकुब्ज) नगराचा निर्देश आढळतो ( म. उ. ११७.४ ).

**पौराणिक साहित्यात**—भागवतमते अजामिळ राजाची राजधानी येथे असून ( भा. ६.१.२१ ), स्कंदमते या प्रांतात ३६ लाख गावे होती ( स्कन्द. माहेश्वर. कौ. २९. १२९ ). पद्ममते हे विष्णु आणि ब्रह्मदेवाचे तीर्थ असून, येथील विष्णूचे नाव वामन ( पद्म. उत्तर. १२९.९ ), आणि ब्रह्मदेवाचे नाव देवगर्भ ( पद्म. आदि. २९.१३२ ) होते. येथील कुशिक राजाने मथुरा येथे यज्ञ केला होता ( वराह. १६२.४७ ).

**देवीपीठ**— देवी भागवतमते हे भारतातील १०८ शक्तिपीठांपैकी ११ वे देवीपीठ असून, येथील देवीचे नाव गौरी होते. योगिनीतंत्रात, तसेच अन्य पौराणिक साहित्यातहि येथील गौरी देवीचा निर्देश आढळतो (योगिनी. २.४; पद्म. आदि. १७.१९३; मत्स्य. १३.२९).

**टॉलेमीच्या ग्रंथात**— या ग्रंथात 'कनोगिझ' ( अक्षांश ३०°–४०' उत्तर; रेखांश १३५° पूर्व ) आणि 'कनगोर' वैकल्पिक नावांनी याचा निर्देश असून, सेंट मार्टिन यांच्या मते 'कनोगिझ' हे 'कान्यकुब्ज'चे ग्रीकभाषीय, आणि 'कनगोर' हे 'कनोगिझ'चे अपभ्रष्ट रूप आहे. टॉलेमीच्या मते हे ( कनगोर ) नगर आणि देश गंगा नदीच्या कालिंदी नामक उपनदीच्या काठी होते. याच ग्रंथात अन्यत्र 'कनोगिझ' ( अक्षांश ३२° उत्तर; रेखांश-१४३° पूर्व ) गाव 'प्रसिअके' देशात गंगा नदीकाठी असल्याचा निर्देश आढळतो. परंतु येथे निर्देशिलेले कान्यकुब्जचे अक्षांश–रेखांश भौगोलिक दृष्ट्या चुकीचे आहेत ( मॅक्रिंडल, टॉलेमी. ७.२; २२ ).

**फाहियेनच्या प्रवासवर्णनात**— या ग्रंथमते हे ( कनोयि ) नगर आणि देश 'संकाश्य' ( आधु. इटावा जिल्हा ) पासून सात योजने ( ४० मैल ) आग्नेयेस होते. या नगराच्या १½ मैल पश्चिमेस गंगा नदीच्या उत्तर किनाऱ्या-वर एक हीनयान बौद्ध मठ आणि स्तूप होता.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**— या ग्रंथमते हा ( क–नो–कु–शे ) देश संकाश्य देशाच्या ४० मैल वायव्येस होता. परंतु फाहियेनच्या, तसेच सुंगच्या प्रवासवर्णनात हा संकाश्यच्या आग्नेयेस असल्याचा सुस्पष्ट निर्देश असल्याने ह्युएन्त्संगचे दिशावर्णन चुकीचे वाटते.

**भौगोलिक वर्णन**— ह्युएन्त्संगच्या मते या देशाचे आणि त्याच्या राजधानीचे क्षेत्रफळ अनुक्रमे ८०० मैल आणि ४ मैल असून, नगराच्या गंगा नदीसीमित पश्चिम

सरहद्दीवर उंच तटबंदी होती. भव्य इमारती, उपवने आणि तलावांनी युक्त अशा या भारतातील सर्वश्रेष्ठ नगरात देशोदेशींच्या दुर्मिळ वस्तू आयात होत असत. येथील ज्ञानकलाप्रेमी, सुखवस्तु, सुसंस्कृत, तत्त्वचर्चाकुशल आणि श्रीमान लोक चमकदार रेशमी कपडे परिधान करीत असत.

ह्युएनत्संगने निर्देशिलेली या नगराच्या पश्चिम सरहद्दीवरील गंगा नदी म्हणजे कनौजच्या पूर्व सरहद्दीवरील आधु. काली नदी असून, गंगा नदीच्या प्रवाह–स्थित्यंतरामुळे हा दिशाभेद उत्पन्न झाला असावा.

**बौद्ध मठ**—ह्युएनत्संगच्या मते या देशात १०० बौद्ध मठ, २०० हिंदु देवमंदिरे, आणि १०००० हून अधिक हीनयान आणि महायानपंथीय बौद्ध भिक्षू होते.

फाहियेन्च्या काळी येथे दोनच बौद्ध मठ असून, ह्युएन्त्संगच्या उत्तरकालीन सुंग्च्या प्रवासवर्णनकाली येथील बौद्ध भिक्षुसंख्या पुन्हा रोडावली होती. यावरून ह्युएन्त्संगच्या म्हणजे सम्राट हर्षवर्धनाच्या काळी ( इ. स. ६ वे शतक ) येथील बौद्ध धर्म परमोत्कर्षावस्थेत असावा.

**बौद्ध स्थाने**—ह्युएन्त्संगच्या मते या नगराच्या परिसरात निम्नलिखित बौद्ध स्थाने होती :—

( १ ) **अशोक स्तूप**— या नगराच्या वायव्येस गौतम बुद्धाच्या धर्मप्रवचनस्थानी उभारलेला अशोक स्तूप, तसेच गौतम बुद्धाचा शरीरावशेष स्तूप होता.

( २ ) **बौद्ध मठ**—उपरोक्त स्तूपाच्या दक्षिणेकडील गंगा नदीकाठच्या तीन बौद्ध मठांत नयनरम्य आणि बौद्ध भिक्षुसेवित बुद्धप्रतिमा होत्या. या मठानजिकच गौतम बुद्धाच्या दंतावशेषावर ( लांबी– १½′ ) उभारलेला स्तूप असून, एक सुवर्णमुद्रिका शुल्कदानाने त्यामधील दंतावशेषाचे दर्शन होत असे.

( ३ ) **बौद्ध विहार**—उपरोक्त बौद्ध मठाच्या उभय बाजूंच्या दगडविटांच्या विहारात ( उंची–१००′ ) गौतम बुद्धाची रत्नखचित सुवर्णमय मूर्ती, आणि विहारासमोर एक संघाराम होता.

( ४ ) **महाविहार**—येथील मुख्य बौद्ध मठाच्या आग्नेयेकडील दगडविटांच्या महाविहारात ( उंची - २००′ ) ब्राँझची रत्नखचित बुद्धप्रतिमा ( उंची–३०′ ) असून, विहाराच्या भिंतींवर बुद्धाची बोधिसत्त्व जीवनाधारित शिल्पचित्रे होती.

( ५ ) **सूर्य मंदिर आणि महेश्वर मंदिर**—उपरोक्त महाविहाराच्या दक्षिणेकडील सूर्याच्या आणि महेश्वर शिवाच्या नीलवर्णीय दगडी मंदिराच्या भिंतींवर कलात्मक शिल्पचित्रे असून, त्यांच्या स्वच्छतेसाठी २०० सेवक होते. हे मंदिर वाद्यसंगीताने अष्टौप्रहार दुमदुमलेले असे.

( ६ ) **अशोक स्तूप क्र. २**—या नगरीच्या १½ मैल आग्नेयेस गंगा नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर बुद्धप्रवचनाच्या स्मृत्यर्थ उभारलेला अशोक स्तूप ( उंची–२००′ ) होता.

( ७ ) **भद्रविहार**—या नगराच्या अंतर्भागातील या विहारात ह्युएन्त्संग ३ महिने राहिला असून, वीरसेन आचार्याने त्यास येथे बुद्धदासविरचित ‘ धर्मविभाषा ’ ग्रंथाची संथा दिली. येथून तो २० मैल आग्नेयेकडील ‘ नवदेवकुल ’ गावी गेला ( वॉटर्स, १.३४०–३५२; बील, २.२३३–२४६ ).

**बौद्ध धर्मपरिषद**— हर्षवर्धनाने धर्मचर्चेसाठी भरविलेल्या अनेक परिषदांपैकी एका ( स. ६४३ ) धर्मपरिषदेस ह्युएन्त्संग उपस्थित होता. दिवसाच्या २४ तासांपैकी ⅓ वेळ राजकारणासाठी खर्च करून उर्वरित सारा वेळ बौद्ध धर्मप्रसारार्थ व्यतीत करणारा हर्षवर्धन त्यायोगे साऱ्या भारतातील बौद्ध धर्मीयांचा नेता बनला होता.

चीन देशास परततेवेळी कामरूप ( आधु. आसाम ) देशात थांबलेल्या ह्युएन्त्संगला कद्जौधिर ( आधु. कांकजोल ) देशास आक्रमणार्थ आलेल्या हर्षवर्धनाने कनौज देशास पुन्हा नेले. तेथील बौद्ध परिषदेस, तसेच प्रयाग येथील हर्षवर्धनकृत दानविधीस हजर राहून ह्युएन्त्संग मार्गस्थ झाला.

**शिलालेख साहित्यात**—या साहित्यमते हे नगर पंचाल देशात असून ( एपि. इंडि. ४.२४६ ), राष्ट्रकूट राजा गोविंद ( चतुर्थ ) च्या शके ८५२ च्या खंबायत शिलालेखात या नगराच्या ‘ महोदय ’ आणि ‘ कुशस्थल ’ वैकल्पिक नावांचा निर्देश आढळतो ( एपि. इंडि. ७.३०–३१ ). कनौजचा राजा गोविंदचंद्रच्या वि. सं. ११९४ च्या कमौली ताम्रपटात यास ‘ कुशिक, ’ ‘गाधिपुर’, आणि ‘कान्यकुब्ज’ म्हटले असून ( एपि. इंडि. ८.१४९ ), या राजाचे अन्य पाच ताम्रपट आधु. कनौज येथे सापडले ( एपि. इंडि. ९.१ ).

निम्नलिखित शिलालेखांतहि याचा निर्देश आढळतो :— १. चेदि देशनिवासी जाजल्लदेवाचा स. ८६६ चा रत्नपुर शिलालेख (एपि. इंडि. १.३३ ); २ त्रिलोचनपाल राजाचे सुरत दानपत्र; ३. लक्ष्मणपाल राजाचा बदाऊन शिलालेख ( एपि. इंडि. १.६१–६६ ); ४. वत्सहार प्रतिहाराचा ग्वाल्हेर प्रशस्तिलेख ( एपि. इंडि. १८.१०१ ); ५. धर्मपाल राजाचे वणी आणि राधनपुर ताम्रपट ( एपि.

इंडि. ६.२४४ ).

**मध्ययुगीन शिलालेख साहित्यात**—या साहित्यात या नगराच्या विभिन्न नामांतरांचा निर्देश आढळतो :— ( परिपत्रक पहा ).

**उपनगरे**—काव्यमीमांसामते या नगराची निम्नलिखित चार उपनगरे होती :—१.पश्चिमेस–'वामनस्वामिन्'; २. पूर्वेस–'ब्रह्मशिला'; ३. उत्तरेस–'गाधिपुर'; ४. दक्षिणेस–'कालप्रिय' ( काव्यमी. १७.२१८ ).

**कान्यकुब्ज भुक्ति** ( देशविभाग )—भोजदेवाच्या स. ८३६ च्या ताम्रपटमते उत्तर भारतातील एक देशविभाग. या देशविभागातील 'कालंजर मंडला'मध्ये 'उदुंबर विषय' नामक राज्यविभाग समाविष्ट होता (एपि. इंडि. १९.१५). गंगा नदीच्या दक्षिणेस आणि भागीरथी नदीच्या पश्चिमेस हा असावा ( चौधरी, पृ. ५८ ).

**कान्हगिरि** ( पर्वत )—वायुमते वायव्य भारतातील 'कृष्णगिरि' ( आधु. काराकोरम् ) पर्वताचे नामांतर ( वायु. ३६; कृष्णगिरि १. पहा ).

**कापरडा** ( जैन मंदिरस्थान व तीर्थ )—राजस्थानमधील जोधपुर-बिलडा मार्गावरील श्वेतांबर जैन मंदिरस्थान. येथे चतुर्मुख आणि चौमजली श्वेतांबर जैनमंदिर असून, भैरवनाथ ही येथील अधिष्ठात्री देवता आहे ( ती. पृ. २७१ ).

**कापिका** ( देशविभाग )—राष्ट्रकूट राजा गोविंद ( तृतीय )च्या दानपत्रमते लाट देशान्तर्गत खेटक मंडलातील भारुकच्छ विषयातील एक देशविभाग ( पथक ). भडोच जिल्ह्यातील जंबुसर तालुक्यातील खंबायतच्या आखातानजिकचा नर्मदा नदीकाठचा आधु. कावी गावाच्या परिसरातील प्रदेश हाच होय ( इंडि. अँटि. ५.१४५ ). नामांतर ( जयभट्ट राजाचा नवसारी ताम्रपट ) –'काव्यावतार' ( इंडि. अँटि. १३.७७ ); ( शके ८५२ चा ताम्रपट )–'काविका' ( एपि. इंडि. ८.३६ ).

**देशविभाग**—शिलालेख साहित्यमते आधु. कावी गावाच्या परिसरातील निम्नलिखित ग्रामे यामध्ये समाविष्ट होती :—१. केमज्जु ( आधु. किमोज ); २. सिहुग्राम ( आधु. शिगाव ); ३. जंभा ( आधु. जमडी ); ४. रुमणाद ( आधु. रुहनाद ); ५. जत्राण ( आधु. जत्राण ).

**तीर्थ**—गोविंद ( चतुर्थ )च्या खंबायत ताम्रपटमते ( इ. स. ९ वे शतक ) हे एक महातीर्थ ( महास्थान ) होते. गुर्जर राजा जयभट ( चतुर्थ ) चे एक दानपत्रहि ( स. ७३६ ) येथे सापडले आहे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.९६ ).

**जैनतीर्थ**—कुमारपाल राजाच्या राज्यकाली एक जैन तीर्थ म्हणून हे प्रतिष्ठा पावले. एकाच घरातील सासूसुनांनी बांधलेली येथील आदिनाथ आणि रत्नतिलक मंदिरे सुविख्यात असून, त्यापैकी आदिनाथ मंदिरात श्रीधर्मनाथाची मूर्ती आहे. याशिवाय अन्य अनेक स्थापत्यावशेषहि येथे आढळतात ( अळतेकर, गुजरात. पृ. १८ ).

**कापिञ्जल** ( देश )—कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या मध्य देशान्तर्गत एक देश ( मार्कं. ५५.९ ).

**कापिल** ( तीर्थ )—एकाम्रकक्षेत्रातील एक तीर्थ ( ब्रह्म. ४१.९१ ).

२. विरजक्षेत्रातील एक तीर्थ ( ब्रह्म. ४२.६ ).

३. ( ह्रद ) वाराणसी येथील गंगा नदीकाठचे एक पवित्र सरोवर ( कूर्म. पूर्व. ३५.९; नारद. उत्तर. ४१. ३५; स्कन्द. काशी. ९७.१९ ). नामांतरे—१. **मधुस्रवा पुष्करिणी**; २. **कृतकृत्या**; ३. **क्षीरनीरधि**; ४. **वृषभध्वज तीर्थ**; ५. **पैतामहतीर्थ**; ६. **गदाधर**; ७. **पितृतीर्थ**; ८. **कापिलधार**; ९. **सुधाखनि**; १०. **शिवगया** ( स्कन्द. काशी. ६२.५३–६५ ).

४. ( देश ) भारतवर्षान्तर्गत एक देश ( भवि. प्रति. २.११ ).

५. ( वर्ष ) कुशद्वीपान्तर्गत एक वर्ष ( म. भी. १३. १३ ).

**कापिश** ( देश )—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते वायव्य भारतातील 'कपिशा' देशाचे नामांतर ( पा. सू. ४.२. ९९; कपिशा पहा ). अन्य नामांतर–'कापिशी'.

**कापिशी** ( नदी ) पणिनीच्या अष्टाध्यायीमते सिंधु नदीच्या 'कुभा' नामक उपनदीचे नामांतर ( पा. सू. ४.२.९९; कुभा पहा ).

**कापिष्ठल** ( लोकसमूह व नगर )—बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या मध्य देशातील ( आधु. गंगा नदीचे खोरे ) एक लोकसमूह व नगर ( बृ. सं. १४.४ ). पौराणिक साहित्यमते गंगा–यमुना दुआबातील पाच जनपदांपैकी हे एक होते ( वायु. ४५.१०९; मत्स्य. ११४. ३४; ब्रह्माण्ड. १६.४०; पद्म. आदि. ६.५१; म. भी. १०.३७ ). कुरु देशासमवेत याचा सर्वत्र निर्देश असून, त्यावरून कुरु राज्याच्या ईशान्येकडील, आणि काम्यकवनाच्या दक्षिणेकडील निर्मनुष्य प्रदेश हाच असावा.

पूर्व पंजाबातील कर्नाल गावाच्या ३८ मैल पश्चिमेकडील आणि कुरुक्षेत्र–नरवाना रेल्मार्गावरील कुरुक्षेत्रापासून २६

मैलांवरील आधु. कैथल म्हणजे प्राचीन 'कापिष्ठल' नगर असून, त्याच्या पश्चिमेकडील, आणि बियास नदीच्या पूर्व किनाऱ्यावरील आधु. कपूरथला प्रदेशात हे लोक रहात असावेत. आजहि 'कैथल' हे कुरुक्षेत्रान्तर्गत पवित्र तीर्थ असून, त्याच्या परिसरात अनेक ऐतिहासिक स्थले आणि तीर्थे आहेत. हनुमानभूमी म्हणून हे क्षेत्र पवित्र मानतात (ती. पृ. ८४).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या लोकसमूहाची आणि नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पाणिनीची अष्टाध्यायी (७२.९२) | कपिस्थल |
| २. प्लिनी (मॅक्रिंडल, पृ. १९६) | कंबिष्ठलोइ (कापिष्ठल) |
| ३. पराशरतंत्र | कापिष्ठल |
| ४. मार्कंडेय पुराण (कूर्मविभाग) | कपिंगल |
| ५. महाभारत (आर. ४८.१९; ५८.६) | जांगल |
| ६. पौराणिक साहित्य (ब्रह्माण्ड. ४९.४४; मत्स्य. ११४.३४). | जांगल |
| ७. अल्बेरुणी (१.२०६) | कवीतल |

पौराणिक साहित्यात 'कापिष्ठल' या लोकसमूहाची अनेक पाठभेदात्मक रूपे आढळतात.

**नामव्युत्पत्ती**—'कपिस्थल नगरनिवासी' अशा अर्थाने नाव प्राप्त झाले असावे.

**पाणिनीच्या अष्टाध्यायीत**—या ग्रंथात 'स्थल' अंत्य-शब्दयुक्त नगरनामांचे उदाहरण म्हणून याचा (कपिस्थल) निर्देश आढळतो (पा. सू. ७.२.९२).

**प्लिनीच्या ग्रंथात**—या ग्रंथमते या (कंबिष्ठलोइ) लोकांची वसाहत ह्यद्रौतेस नदीच्या वरच्या अंगास होती (मॅक्रिंडल. पृ. १९६). श्वानबेक यांच्या मते 'कंबिष्ठ-लोइ' हे संस्कृत 'कापिष्ठल'चे ग्रीकभाषीय रूपांतर होय.

**महाभारतात**—या ग्रंथमते युधिष्ठिराने भारतीय युद्धापूर्वी कौरवांकडे मागितलेल्या पाच नगरांपैकी हे एक होते (म. आर. ४८.१९).

**राजवंश**—कपिष्ठल नामक एक राजवंश गुजरातमध्ये राज्य करीत असे (इंडि. अँटि. ११.१०२)

**कापी** (नदी)—भारतवर्षातील एक नदी (पद्म. आदि. ६.२०). नामांतर (महाभारत)—'वापा' (म. भी. १०. १९ कुं.).

**कापुर**—(आहार)—उषवदाताच्या नासिक शिलालेख क्र. १२ मते महाराष्ट्रातील एक देशविभाग (आहार). या देशविभागान्तर्गत चिखलपद्र (सुरतच्या दक्षिणेकडील आधु. चिखली) गावची ८००० नारळाची झाडे उषवदाताने दिली होती (ल्यूडर्स सूची. क्र. ११३३). डॉ. भगवानलाल इंद्रजी यांच्या मते सुरतच्या दक्षिणेकडील पश्चिम समुद्रकाठचा प्रदेश हाच होय (बॉंबे. गॅझे. १६. ६३८).

**नगर**—त्रैकूटक राजा दाहरसेनाच्या स. ४५७ च्या पारडी ताम्रपटात गुजरातमधील या नगराचा (व्यारा गावापासून ३ मैल नैर्ऋत्येकडील आधु. कापुर) निर्देश आढळतो (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.२४). डॉ. भगवानलाल इंद्रजी यांच्या मते उषवदातकालीन कापुर आहाराचे मुख्य ठाणे येथे असावे (जे. बी. बी. आर. ए. एस्., पृ. ३४६).

**कापोलि** (ग्राम)—भोज राजा अशंकितवर्मन्च्या कापोलि ताम्रपटाचे (इ. स. ६ वे शतक) बेळगाव जिल्ह्यातील खानापुर तालुक्यातील उपलब्धिस्थान. या ताम्रपटातील वंशवाटक गाव हेच असावे (एपि. इंडि. ३१. २३४–२३५).

**काफिरकोट** (देवमंदिरस्थान)—पंजाबातील सुविख्यात हिंदु देवमंदिरस्थान. आधु. बिल्कोट गाव हेच असून, कश्मीरच्या ललितादित्य (स. ७२५–७५६) राजाने बांधलेल्या मंदिराचे अवशेष येथे आढळतात (गोएट्झ, पृ. १४२).

**काफिरीस्तान** (देश)—अरब साहित्यमते वायव्य भारतातील 'कपिशा' देशाचे नामांतर (जयचन्द्र. पृ. ४०८; कपिशा पहा).

**काम** (देश)—पौराणिक साहित्यमते वायव्य भारतातील 'कपिशा' (आधु. काफिरीस्तान) देशाचे नामांतर (अली, पुराणाज्. पृ. १४३; कपिशा पहा).

२. पाणिनीचा गणपाठ, तसेच शिलालेख साहित्यमते पंजाबातील एक पवित्र देश (पा. सू. ६.२.८८). आधु. कुमाऊँ प्रदेश हाच होय. येथील गंगा नदीमुळे हा देश, तसेच येथील भद्र लोक पवित्र मानले जात असत (इंडि. अँटि. १०.३४३; भद्र पहा).

३. (तीर्थ) महाभारत आणि बार्हस्पत्य सूत्रमते एक सिद्धिप्रद शक्तिक्षेत्र (म. आर. ८०.११३; बार्हस्पत्या

३.१२). हे संभवतः 'कामाख्य तीर्था'चे नामांतर असावे (कामाख्य पहा).

४. नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ (कूर्म. उत्तर. ४१. ५५; गरुड. १.८१.९).

५. कश्मीरातील वितस्ता नदीकाठचे एक तीर्थ (नीलमत. १५२८).

६. (लिंग) काशी येथील एक शिवलिंग (नारद. उत्तर. ४९.२०).

७. (तीर्थ) पश्चिम भारतातील नर्मदा नदीकाठचे कावी गावानजिकचे कामदेव- तपस्यास्थान. येथील 'कुसुमेश्वरतीर्थ' स्थानी कामदेवाने तपस्या केली होती (ती. पृ. ३७).

८. (कुंड) काशी येथील एक जलकुंड (नारद. उत्तर. ५०.२).

९. (कुंड) वृंदावन येथील एक जलकुंड (नारद. उत्तर. ८०.७३).

**काम-आश्रम** (आश्रमस्थान)—वाल्मीकि रामायणमते अयोध्या-मिथिला मार्गावरील सरयू–गंगा संगमानजिकचे कामदेवाचे आश्रमस्थान. येथे शिवाने स्वतःच्या तृतीय नेत्राने कामदेवास दग्ध केले (वा. रा. बा. २३.२२; रघु. २.१३; स्कन्द. आवन्त्य. अ. ३४).

**कामकूट** (पर्वत)—वनमालवर्मदेवाच्या इ. स. ९ व्या शतकातील ताम्रपटमते ब्रह्मपुत्रा नदीकाठच्या हडपेश्वर नगरानजिकचा एक पर्वत. या, तसेच इंद्रपाल राजाच्या गुआकुचि ताम्रपटमते येथे कामेश्वर आणि महागौरीच्या प्रतिमा होत्या (एपि. इंडि. २९.१४७; कामरूप शासनावली. पृ. १३६–१३७).

२. पौराणिक साहित्यमते पूर्व भारतातील 'कामगिरि' पर्वताचे नामांतर (कामगिरि १. पहा).

**कामकोटि** (शक्तिपीठ)—तामीळनाडमधील शिवकांची तीर्थान्तर्गत एकाम्रेश्वर मंदिरानजिकचे एक शक्तिपीठस्थान. दक्षिण भारतातील या सर्वप्रधान शक्तिपीठ स्थानीची कामाक्षी देवी ही आद्याशक्ति भगवती त्रिपुरसुंदरीचीच प्रतिमूर्ती मानतात. नामांतर (ब्रह्माण्ड पुराण)– 'कामकोष्ठक'.

**ब्रह्माण्ड पुराणात**—या ग्रंथमते कामाक्षी देवीचे (ब्रह्माण्ड. ४.४०.१६; ५६.१०) कामकोष्ठकपीठ (त्रिपुरसुंदरीपीठ) ललितेच्या एकावन्न शक्तिपीठांपैकी एक होते (ब्रह्माण्ड. ४.४४.९४).

**मंदिर**—आद्य शंकराचार्यांनी बांधलेल्या येथील कामाक्षी मंदिराच्या प्रवेशद्वारावरील 'कामकोटि–यंत्रा'त आद्यालक्ष्मी, विद्यालक्ष्मी, संतानलक्ष्मी, सौभाग्यलक्ष्मी, धनलक्ष्मी, धान्यलक्ष्मी, वीर्यलक्ष्मी आणि विजयलक्ष्मीचा न्यास असून, येथील मंदिराच्या भिंतीवर श्रीरूपलक्ष्मी-समवेत श्रीवीरमहाविष्णु, तसेच श्रीमहाशास्ता संज्ञक अधिदैवताच्या सुमारे शंभर प्रतिमा आहेत. शिवकांचीची समस्त शैव आणि वैष्णव मंदिरे कामाक्षी मंदिराभिमुख असून, उत्सवप्रसंगी त्या देवमूर्ती कामाक्षी देवीस प्रदक्षिणा घालतात. या मंदिरानजिक अन्नपूर्णा आणि शारदा देवीची मंदिरे, तसेच आद्य शंकराचार्यांची प्रतिमा आहे (कांची पहा).

**कामकोष्णी** (तीर्थ)—भागवत पुराण बलरामतीर्थयात्रामते दक्षिण भारतातील 'कुंभकोणम्' तीर्थाचे नामांतर (भा. १०.७९.१४; कुंभकोणम पहा).

**कामगाम** (ग्राम)—बौद्ध साहित्यमते शाक्य देशाच्या पूर्ववर्ती कोलिय देशाच्या राजधानीचे गाव (जा. ५.२१९).

**कामगिरि** (पर्वत)—पौराणिक साहित्यमते पूर्व भारतातील एक क्षुद्र पर्वत (उपपर्वत; भा. ५.१९.१६; ब्रह्माण्ड. ४.३९.१०५; दे. भा. ८२.२). येथील कामाख्या देवीचे मंदिर भारतातील आद्य शक्तिपीठ आहे (कामाख्या पहा). नामांतर–'कामकूट'; 'कामरूपगिरि.'

२. वाल्मीकि रामायणमते वानरांनी सीताशोधार्थ धुंडाळलेला उत्तर भारतातील एक पर्वत (वा. रा. कि. ४३.१४).

**कामतानाथ** (पर्वत)—प्रयागनजिकच्या 'चित्रकूट' पर्वताचे स्थानिक नामांतर (चित्रकूट १. पहा).

**कामतिपुर** (नगर)—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते समतटराजधानी 'सुंदरबन'चे नामांतर (समतट पहा).

**कामदगिरि** (पर्वत)—उत्तर प्रदेशातील चित्रकूट पर्वतानजिकचा सीतापुरपासून १½ मैलावरील एक पवित्र पर्वत. येथील राम-भरत भेटस्थली सध्या रामपादुका आणि तुलसीदास मंदिर आहे (ती. पृ. १२२).

**कामदवन** (वन)—चित्रकूट पर्वतावरील एक वन. शिवमते चित्रकूट गंगा नदीचे हे उगमस्थान असून (शिव. कोटि. ३–४), आधु. कामदागिरि वन हेच होय.

**कामदागिरि** (पर्वत)—शिवमते प्रयागनजिकच्या 'चित्रकूट' पर्वताचे नामांतर (शिव. कोटि. ३.४; चित्रकूट १. पहा). अन्य नामांतर–'कामतानाथ'.

**कामधेनुपद** (तीर्थ)—गया येथील एक तीर्थ (वायु. ११२.५६).

**कामप्रस्थ** ( नगर )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक नगर. 'प्रस्थ' अंत्यशब्दयुक्त नगरनामाचे उदाहरण म्हणून याचा निर्देश तेथे असून, अन्य 'प्रस्थान्त' नगरांप्रमाणेच हेहि कुरु देशात असावे ( अग्रवाल, पाणिनि. पृ. ८१ ).

**कामर** ( तीर्थ )—व्रजमंडलान्तर्गत ( आधु. मथुरा-वृंदावन ) गोपिका–जलविहारस्थान, एक तीर्थ. येथे गोपी कुंड आणि दुर्वास मंदिर आहे ( ती. पृ. १०४ ).

**कामरूप** ( देश )—पूर्व भारतातील 'प्राग्ज्योतिष' ( आधु. आसाम ) देशाचे नामांतर. संताळ लोकांच्या 'कामरू' नामक देवीनामावरून प्राग्ज्योतिषदेशीय शाक्त लोक 'कामरूप' नावाने, आणि तो देश 'प्राग्ज्योतिष–कामरूप' नावाने सुविख्यात झाला ( चौधरी, आसाम. पृ. ३८; प्राग्ज्योतिष–कामरूप पहा ).

२. शिवमते सह्य पर्वतान्तर्गत एक देश ( शिव. ज्ञान. ४८ ).

३. ( राज्यविभाग ) शिलालेख साहित्यमते कलिंग देशान्तर्गत एक राज्यविभाग. त्या देशाच्या पूर्व सीमेनजिक हा असावा ( एपि. इंडि. २६.६६; कलिंग पहा ).

**कामरूपगिरि** ( पर्वत )—पौराणिक साहित्यमते पूर्व भारतातील 'कामगिरि' पर्वताचे नामांतर ( कामगिरि १. पहा ).

**कामलङ्का** ( देश )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते समतट ( गंगा-नदीचा त्रिभुज प्रदेश ) देशाच्या आग्नेयेकडील एक सागरवर्ती देश. ब्रह्मदेशान्तर्गत इरावदि नदीच्या त्रिभुज प्रदेशातील आधु. 'पेगु' ( प्राचीन हंसवती ) आणि 'रमण्य' ( प्राचीन–आरमण ) प्रदेश हाच होय. नामांतर ( ह्युएन्त्संग )–'क–मो–लँग्–क–त्सु' ( वॉटर्स, २.१८९; बील, ४.४०७ ).

**कामवन** ( वन )—व्रजमंडलान्तर्गत 'काम्यक वना'चे नामांतर ( ती. पृ. १०२; काम्यक वन २. पहा ).

२. ( देश ) नाणेघाट शिलालेख क्र. ९ मते महाराष्ट्रातील एक देश. येथील ( कमवन ) दमघोष नामक व्यक्तीने 'सतगर' ( आधु. नाणेघाट ) पर्वतावर एक विहीर ( पानियपुवा ) खोदली होती ( ल्यूडर्स सूची. क्र. ११२० ).

३. ( वल्लभ तीर्थ ) मथुरेनजिकचे एक वल्लभ तीर्थ. नामांतर–'काम्यक वन' ( ती. पृ. ५७१ ).

**कामाक्षी** ( देवीस्थान )—काशी येथील एक योगिनीतीर्थ ( स्कन्द. काशी. ४५.४१ ).

२. ( शक्तिपीठ ) दक्षिण भारतातील शिवकांची येथील 'कामकोटि पीठा'चे नामांतर ( कामकोटि पहा ).

३. ( देवीस्थान ) पद्ममते अहिच्छत्र येथील सुमद राजस्थापित एक देवीस्थान ( पद्म. पाताल. १२.५४–६० ).

४. पूर्व भारतातील एक देवीस्थान ( नारद. उत्तर. ६९ ).

**कामाख्य** ( तीर्थ )—महाभारत पुलस्त्ययात्रा, तसेच पद्ममते देविका नदीकाठचे एक रुद्रतीर्थ ( म. आर. ८०. ११३; पद्म. आदि. २५.१२ ).

२. ( नृसिंह ) जगन्नाथपुरी येथील एक नृसिंहस्थान ( स्कन्द. जगन्नाथ. ४ ).

**कामाख्या** ( शक्तिपीठ )—कालिकामते प्राग्जोतिष–कामरूप ( आधु. आसाम ) देशातील सुविख्यात शक्तिपीठस्थान. कालिकामते कामरूपगिरीवरील 'कामाख्या पीठ' ( कालिका. १८.४२; ५०; 'कुब्जिकापीठ'– कालिका. ६४.५३–५४; ७१–७२ ) येथे सतीचे योनिमंडल पडले असून, आजहि येथे योनिमंडलस्वरूप देवीचीच पूजा करतात. हे भारतातील शक्तिउपासनेचे आद्य पीठ आणि पाच प्रमुख शक्तिपीठस्थानांपैकी एक असून, कालिकामते येथील देवी कालिकेचे प्रतिरूप होय ( कालिका. ८३.३९; ५१ ). भारतातील अन्य चार प्रमुख शक्तिपीठे–१. उड्डियान ( आधु. काशगर ), २. जालंधर ३. पूर्णगिरि; ४. मातंग ( श्रीशैल ).

पौराणिक साहित्यमते पूर्व भारतातील कामगिरि ( नीलाचल, कामकूट, कामरूपगिरि ) संज्ञक क्षुद्र पर्वतावर हे शक्तिपीठस्थान असून ( भा. ५.१९.१६; ब्रह्माण्ड. ४.३९.१०५; दे. भा. ८.२.२ ), आसामातील गोहत्तीपासून दोन मैल अंतरावरील ब्रह्मपुत्रा नदीकाठची आधु. कामाख्या देवी हीच होय ( रॉयचौधरी, अँटि. पृ. ११९ ).

**शक्तिउपासना**— प्राग्ज्योतिष–कामरूप देश शक्तिउपासनेचे आद्य पीठ असून, कालिकामते नीलाचलीय कामाख्या योनिपीठास पूर्वापार तंत्रोपासनेमध्ये सर्वप्रमुखत्व दिले जात असे ( कालिका. ६४.५९ ). योगिनीतंत्रमते कामाख्या ही ब्रह्मशक्ती कालीचे प्रतिरूप असून ( योगिनी. १.१५ ), देवी पुराणमते 'कामरूप', 'कामाख्या' आणि 'भोट्ट देश' ही शक्तिउपासनेची आद्य केंद्रस्थाने होत ( देवी. ३९. १४;४२.९ ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या शक्तिपीठस्थानाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. तंत्रग्रंथ (पीठनिर्णय) | योनिपीठ |
| २. रघुवंश (४.८१-८२) | हेमपीठ |
| ३. हर-गौरी संवाद (तंत्रग्रंथ) | कामपीठ |
| ४. कालिका पुराण | |
| अ. (६४.५३-५४; ७१-७२) | कुब्जिकापीठ |
| ब. (६६.५०) | त्रिपुरा |
| क. (८३.६६) | ललितकांतिका |

**नामव्युत्पत्ती**—कालिकामते 'कामदा' (इच्छापूर्तिकारक), 'कामिनी' (स्वरूपसुंदर), 'कामांगदायिनी' व 'कामांगनाशिनी' (भुक्ति आणि मुक्तिदात्री) अशा अर्थाने हिला हे नाव प्राप्त झाले—

**कामदा कामिनी कामा, कान्ता कामाङ्गदायिनी।**
**कामाङ्गनाशिनी तस्मात्, कामाख्या तेन चोच्यते॥**
(कालिका. ६४.२).

कालिकामते कामगिरि पर्वतान्तर्गत 'सतीचे योनिमंडल-पतनस्थान' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले. स्थानिक आख्यायिकामते सतीच्या योनिमंडल-पतनाने नीलवर्णीय बनलेल्या या शिवस्वरूप टेकडीला 'नीलगिरि', तसेच शिवपत्नी पार्वतीचे 'कामतृष्णाशमनस्थान' अशा अर्थाने 'कामगिरि' वैकल्पिक नावे प्राप्त झाली.

भाषाशास्त्रज्ञांच्या मते 'कामाख्या' हे ऑस्ट्रिक भाषा समूहान्तर्गत निम्नलिखित शब्दांपैकी एकाचे अपभ्रष्ट रूप असावे :—

| भाषा | संज्ञा |
|---|---|
| १. ख्मेर | कमोइ (राक्षस) |
| २. चाम् | कमोशत् (पिशाच) |
| ३. खासी | कमेत् (प्रेत) |
| ४. संताळ | कोमुइ (स्मशान) |
| | कोमुभोक् (प्रेत) |

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**—'कामाख्या' आणि 'कामरूप'च्या भाषाशास्त्रीय व्युत्पत्तीवरून शक्तिदेवी ही प्रारंभी स्मशानभूमीमधील भूतपिशाचांची देवी असून, खासी, गारो आदि मातृप्रधान ऑस्ट्रिक लोकसमूहांनी तिची उपासना आसाममध्ये आणली असावी. या टेकडीसंबंधीच्या पार्वतीच्या कामतृष्णाविषयक आख्यायिकेवरून आसाममधील शाक्त उपासना हे अनार्यांच्या लिंगपूजेचे उत्क्रांत रूप असावे.

**आख्यायिका**— स्थानिक आख्यायिकामते मिथिला देशाहून आसामला आलेल्या नरकासुराने या देवीची, तसेच शक्तिउपासनेची परंपरा तेथे सुरू केली. कालिकामते मिथिलानरेश जनकाचा पाल्य आणि प्राग्ज्योतिषाधिपती नरकासुराची कामाख्या देवी संरक्षणकर्ती असून, त्याच्याच राज्यकालात त्या देशास 'कामरूप' नाव प्राप्त झाले. महाभारत आणि हरिवंशमते सोळा सहस्र कुमारिकांना बंदिवासी बनविणाऱ्या नरकासुराला शोणितपुराच्या बाणासुराच्या कुसंगतीने कामाख्या देव्युपासनेची विस्मृती घडली. त्यामुळे वसिष्ठशापाने श्रीकृष्णद्वारा त्याचा मृत्यु झाला.

उपरोक्त आख्यायिकेवरून कामरूप (आधु. आसाम) देशातील देवीउपासनेचा आद्य उद्‌गाता नरकासुराच्या मृत्यूनंतर तेथील देवीउपासनेला शाक्त उपासनेचे स्वरूप प्राप्त होऊन देवी पार्वतीची उपासना त्रिपुरा देवीच्या लैंगिक उपासनेमध्ये सम्मीलित करण्यात आली असावी. डॉ. काकती यांच्या मते प्राग्ज्योतिष देशाचे 'कामरूप' हे नवे नामकरण आसाममधील शाक्तोपासनाप्रारंभाचे सूचक असून, तेथील अनार्य संस्कृतीमुळे तत्रस्थ कामाख्या देवीस्थान भारतातील शक्तिउपासनेचे आद्य पीठ बनले.

**शक्तिउपासनेचा प्रसार**—कामाख्यापीठोद्भव शक्तिउपासना उत्तरकालात साऱ्या भारतात पसरल्याची रूपकात्मक आख्यायिका कालिका पुराणात आढळते. या ग्रंथमते दक्षयज्ञदग्ध स्वपत्नी सतीचे मृत शरीर खांद्यावर घेऊन शिव सैरावैरा फिरू लागला असता त्याच्या क्रोधशमनार्थ सुदर्शन चक्रधारी विष्णूने सतीशरीराचे ५१ तुकडे केले. सतीच्या या देहखंडपतनाची भारतातील ५१ विभिन्न स्थाने उत्तरकालात 'शक्तिपीठस्थाने' म्हणून सुविख्यात होऊन, त्यापैकी सतीच्या योनिमंडलपतनाचे कामाख्या हे सर्वश्रेष्ठ शक्तिपीठस्थान बनले. अशा तऱ्हेने उत्तरेस हिमालयापासून दक्षिणेस कन्याकुमारीपर्यंत, आणि पूर्वेस कामाख्यापासून पश्चिमेस प्रभास आणि द्वारवतीपर्यंत आर्यावर्ताच्या साऱ्या भागांत शक्तिउपासना प्रचलित झाली (शक्तिपीठस्थाने पहा).

सतीचे योनिमंडल जगदुत्पत्तीचे अधिष्ठान असल्याचे वर्णन योगिनीतंत्रातहि आढळते. या ग्रंथमते ब्रह्मदेवाचे

जगदुत्पत्तीचे सामर्थ्य देवीद्वारा नष्ट होताच त्याने देवी-आराधनेच्या साह्याने स्वर्गीचा तेजस्वी प्रकाश देवीच्या योनिमंडलात स्थापिला. त्यायोगे प्रसन्न होऊन देवीने जगत्कल्याणार्थ योनिमंडलाकृती कामाख्या देवीची स्थापना कामरूप देशात केली.

**देवीची तीन रूपे**—कालिकामते देवीची पीतवसना आणि श्वेतकमलारूढ 'काम' (कामोत्सुक), खड्गधारिणी आणि कलेवराधिष्ठित 'रौद्र' (प्रलयंकर), आणि सिंहारूढ 'कामदा' (इच्छापूरक) अशी तीन प्रमुख रूपे कामाख्या देवीमध्ये एकवटली असून, सौंदर्यशालिनी 'ललित-कांतिका', तसेच त्रिपुरबाला, त्रिपुरसुंदरी, आणि त्रिपुर-भैरवी संज्ञक त्रिरूपधारिणी 'त्रिपुरा' ही तिचीच रूपे होत.

उपरोक्त देवीरूपांपैकी 'त्रिपुरबाला' या देवीच्या कुमारीरूपाचे पूजन कामाख्या येथे 'दक्षिणाचार' आणि 'वामाचार' पद्धतींनी करीत असून, स्थानिक आख्यायिका-मते कामरूप देशातील हरएक स्त्री त्रिपुरबालेचे, आणि हरएक निष्पाप पुरुष शिवाचे प्रतिरूप होत.

**तंत्र साहित्य**—तंत्र साहित्याचे (इ. स. ६ वे शतक) 'शाक्त', 'शैव' आणि 'वैष्णव' संज्ञक तीन उपविभाग असून, त्याची ग्रंथसंख्या अनुक्रमे ६४, १८ आणि १०८ आहे. 'मंत्र', 'बीज', 'यंत्र', 'मुद्रा', 'न्यास', 'गुरू', 'दीक्षा' आदि उपासना-विधींचे त्यामध्ये प्रतिपादन असून, स्त्रिया आणि शूद्रांना त्यामध्ये मुक्तद्वार आहे. तांत्रिक लोकांचे वैदिक, वैष्णव, शैव, आणि दक्षिण हे 'दक्षिणाचार' सांप्रदाय असून, वाम, सिध्दांत आणि कौल या 'वामाचारी' सांप्रदायात गुप्त आणि गूढरम्य धर्मविधींना प्राधान्य आढळते. बौद्ध आणि नाथ सांप्रदायाचे अनेक योगी कौल सांप्रदायी होते.

**प्राचीन साहित्यात**—कालिदासाच्या रघुवंशात 'हेम-पीठ' नावाने (रघु. ४.८१–८४), तसेच पौराणिक साहित्यात 'कामपीठ' नावाने याचे माहात्म्यवर्णन आढळते (दे. भा. ७.३८; १५; देवी पुराण. १२.३२–३७; कालिका. १८.४३;५०; ६४.२). शक्तिसंगमतंत्रमते हे शक्तिपीठ आसामातील ब्रह्मपुत्रा नदीकाठच्या पर्वतावर असून (शक्तिसङ्गम. ३.८.१३), तंत्रचूडामणिमते या योनि-मंडलयुक्त शक्तिपीठातील देवीचे नाव कामाख्या, आणि भैरवाचे नाव उमानाथ होते. स्थानिक आख्यायिकामते येथील देवीचे नाव कामा, आणि भैरवाचे नाव आनंद आहे.

गरुडमते 'कामरूप' आणि 'कामाख्या' ही श्रेष्ठ तीर्थस्थाने असून (गरुड. ८९), योगिनीतंत्र, कालिका पुराण आणि कौलार्णव ग्रंथांत येथील यात्रानियम आणि उपासनाविधी वर्णिले आहेत. कामाख्यातंत्रात शक्तिउपा-सनेचे वर्णन आहे.

**शिलालेख साहित्यात**—वनमालवर्मदेवाच्या इ. स. ९ व्या शतकातील पर्वतीय ताम्रपटात याचा निर्देश असून (एपि. इंडि. २९.१५२), अन्य शिलालेखमते ही देवी मातृकापूजक सांप्रदायाशी संबंधित होती (एपि. इंडि. २९. १४७).

**आधुनिक काली**—मुसलमानांनी उद्ध्वस्त केलेल्या येथील पुरातन देवीमंदिराचा बिहारच्या नरनारायण राजाने स. १६६५ मध्ये जीर्णोद्धार केला. त्याच्या परिसरात जुन्या मंदिराचे (इ. स. ७–८ वे शतक) उद्ध्वस्त अवशेष विखुरले असून, त्यापैकी पश्चिम प्रवेशद्वारावरील आसामी गृहजीवनाची शिल्पचित्रे उल्लेखनीय आहेत (आर्कि. सर्व्हे. स. १९२४; पृ. १००; स. १९३६; पृ. ५४). येथील देवी-मंदिरानजिक ब्रह्मपुत्रा नदीच्या पात्रात उमानंद भैरवाचे मंदिर आहे (ती. पृ. १८७).

**कामधुरी** (तीर्थ)—गुजरातमधील कामरेज गावा-नजिकचे तापी नदीकाठचे एक तीर्थ. नामांतर– 'चंद्रेश्वर' (तापीमाहात्म्य. ६४).

**कामिका** (तीर्थ)—गंडकी–देविका संगमावरील एक तीर्थ (वराह. १४४.८४–८५).

**कामिनी** (नदी)—जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक नदी (मार्क. ५५.१५; ५९.१५).

**कामेश्वर** (लिंग)—काशी येथील कामदकुंडा-नजिकचे एक महालिंग (स्कन्द. काशी. ३३.१२२; ७३. ३४; ८५; ९७.९६).

२. अवंती येथील ८४ लिंगांपैकी त्रयोदश लिंग (स्कन्द. आवन्त्य. अ. २५.६; च. लिं. १३).

३. प्रभासक्षेत्रातील एक शिवलिंग (स्कन्द. प्रभास. प्र. ६७.९६). हे 'कलकलेश्वर' लिंगाचे कृतयुगातील नामांतर होय (स्कन्द. प्रभास. प्र. ७५; कलकलेश्वर पहा).

४. धर्मारण्यातील एक शिवलिंग (स्कन्द. ब्राह्म. ध. ३१.७६).

५. (तीर्थ) अर्बुद पर्वतावरील एक तीर्थ (स्कन्द. प्रभास. अ. ४१.१).

६. कुरुक्षेत्राच्या पश्चिम भागातील एक तीर्थ (नारद. उत्तर. ६५.५३; वामन. ३५.४२; ८१.६).

७. (पीठ) कालिकामते एक देवीपीठ. येथील यात्रा-

परिक्रमा तेथे दिली आहे (कालिका. ८४).

**कामोदक** (तीर्थ)—अवंती येथील एक तीर्थ (स्कन्द. आवन्त्य. अ. ३१.८९)

**कामोदापुर** (तीर्थ)—गंगाद्वार (हरिद्वार) पासून १० योजने (४० कोस) अंतरावरील गंगा नदीकाठचे एक तीर्थ. येथील कामोदा देवीचे माहात्म्य नारद पुराणात आढळते (नारद. उत्तर. ६८.३; ५; १८).

**काम्पिल** (तीर्थ)— वाराणसी येथील एक तीर्थ (पद्म. आदि. ३७.९).

**काम्पिल्य** (नगर)— उत्तर भारतातील दक्षिण पंचाल देशाच्या राजधानीचे नगर आणि सुविख्यात जैन तीर्थ. गंगा नदीमुळे प्राचीन पंचाल देशाचे उत्तर आणि दक्षिण असे दोन भाग पडले असून, त्यांची राजधानी अनुक्रमे अहिच्छत्र आणि कांपिल्य या गंगा नदीच्या दक्षिण तीरवर्ती गावी होती (म. आ. १२८. १५). हे उत्तर पंचाल देशात असल्याचा जातकातील निर्देश (जा. २.२१४; ६.३९१) भौगोलिक दृष्ट्या चुकीचा वाटतो.

एक समृद्ध नगर म्हणून पाणिनीच्या अष्टाध्यायीत (पा. सू. ४.२.८०), आणि बौद्ध जातकात (जा. २. ३२९; ६.४१०) याचा निर्देश असून, पंचालराज द्रुपदाची राजधानी म्हणून महाभारतकाली यास महत्त्व प्राप्त झाले होते.

उत्तर प्रदेशातील बदायु (मध्य फरुखाबाद) जिल्ह्यातील आग्रा–गोरखपुर रेलमार्गावरील कायमगंज रेल्वेस्थानकापासून ६ मैलांवरील, आणि फतेहगढपासून २८ मैल ईशान्येकडील आधु. कंपिल गाव हेच होय. आधुनिक काळी गंगा नदीचा प्रवाह या गावापासून दूर गेला असून, येथील गंगा नदीचे शुष्क पात्र 'बूढी गंगा' (वृद्ध गंगा) नावाने ओळखले जाते.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात (परिपत्रक पहा).

**नामव्युत्पत्ती**—भागवतमते हर्यश्वपुत्र 'कांपिल्य राजाचे नगर' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले (भा.२२).

**वैदिक साहित्यात**—यजुर्वेद संहिता, तसेच यजुर्वेदीय ब्राह्मण साहित्यमते एक 'कांपिलवासिनी' (कांपिल्य नगर निवासी) पट्टराणी अश्वमेधीय अश्वासन्निध निद्रिस्त झाली होती (तै. सं. ७.४; १९.१; मै. सं. ३.१२.२०; का. सं. ४–८; वा. सं. २३.१८; तै. ब्रा. ३.९.६; श. ब्रा. १३.२.८.३).

## कांपिल्य नगराची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. वैदिक साहित्य (तै. सं. ७.४;१९.१; मै. सं. ३.१२. २०; का. सं. ४–८; वा. सं. २३.१८; तै. ब्रा. ३.९.६; श. ब्रा. १३.२.८.३) | कांपील |
| २. वराह पुराण (१५२.४४) | कांपिल |
| ३. पाणिनीची अष्टाध्यायी (पा. सू. ४.२.८०.१०)<br>४. पद्म पुराण (उ. १२९.१३) | कंपिल |
| ५. जैन साहित्य (ती. सं. पृ. १२६) | कंपिला<br>कंपिल्ल<br>पंचकल्याणक |
| ६. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य (कल्पद्रु. ७.२५) | कांपिल्ल<br>कंपिल्ल<br>कौपिल्य<br>कौपिल्ल |

**पाणिनीच्या गणपाठात**—या ग्रंथातील संकाश्यादि गणात, तसेच काशिकेत कांपिल्य नामक राजधानीच्या नगरीचा निर्देश आढळतो (पा. सू. ४.२. ८०; काशिका. ४.२.१२१).

**वाल्मीकि रामायणात**—या ग्रंथमते ब्रह्मदत्त राजाच्या राजधानीचे हे नगर इंद्रपुरीसदृश शोभायमान असून (वा. रा. बा. ३३.१९), त्या राजाने वातरोगाने अष्टावक्र बनलेल्या शंभर कुशनाभकन्यांची शरीरविकृती दूर करून त्यांच्याशी विवाह केला (वा. रा. बा. ३३.१९; कान्यकुब्ज पहा). पूजनी नामक चिमणीशी संबंधित या राजाची आख्यायिका महाभारतात आढळते (म. शां. १३७).

**महाभारतात**—या ग्रंथमते द्रोणाचार्यांनी द्रुपदापासून उत्तर पंचाल देशाचे राज्य हिरावल्यानंतर द्रुपदाने या गावी आपली राजधानी हलविली. वारणावत येथील जतुगृहदाहातून बचावलेले पांडव द्रुपदकन्या द्रौपदीच्या या गावच्या स्वयंवरसमयी उपस्थित झाले (म. आ. १२८.१५).

दशार्ण राजकन्येशी विवाह झाल्यानंतर द्रुपदपुत्र शिखंडी तिच्यासमवेत येथे आला (म. उ. १९०.१३). त्याच्या नपुंसकत्वाचे वृत्त कळल्यानंतर दशार्णराज हिरण्यवर्मनने या नगरावर हल्ला चढविला (म. उ. १९३.१३). भारतीय

युद्धाच्या अखेरीस अश्वत्थामनने येथील क्षत्रिय वंश नष्ट होण्याचा शाप दिला. स्थानिक आख्यायिकामते आजहि येथे क्षत्रियांची वंशवृद्धी होत नाही.

पौराणिक साहित्यात—या साहित्यमते पंचाल देशातील हे ( कंपिल ) नगर ( वराह. १५२.४४ ) एक विष्णुतीर्थ ( पद्म. उत्तर. १२९.१३ ), आणि ब्रह्मदेवस्थान ( पद्म. आदि. २९.१४२ ) असून, येथील ब्रह्मदेवाचे नाव कनकप्रिय होते. योगिनीतंत्रमते हे देवीस्थान होते ( योगिनी. २.४. १२८-१२९ ). विष्णुमते येथील राजा हर्यश्वपुत्र कांपिल्य 'पंचाल' ( पंचालराज ) गौरवोपाधीने सुविख्यात असून ( विष्णु. २; भा. २२ ), अजनाभवंशीय नीप आणि त्याचा पुत्र समर हेहि येथील अधिराज होते ( विष्णु.४.१९; पार्गि. मार्क. पृ. ३५० ).

बौद्ध साहित्यात—या साहित्यमते या समृद्ध नगराच्या ( जा. ६. ४३३ ) राजाने स्व-राजवाड्यापासून गंगा नदी-किनाऱ्यापर्यंत विटांनी बांधलेले दोन भुयारी मार्ग ( उम्मग्ग ) त्या नदीच्या दर्शनार्थ खोदले होते. त्यापैकी मोठा मार्ग सहस्रावधी सैनिकांनी, आणि छोटा मार्ग सातशे कामगारांनी अहोरात्र खपून खोदला असून, त्यांच्या प्रवेश-द्वारांना यांत्रिक झडपा होत्या. भुयाराच्या अंतर्भागात अनेक छोट्या खोल्या, तसेच प्रकाशयोजनेसाठी अनेक दिवे होते ( जा. २.३२९; ६.४१० ).

जातकमते येथील चूलनि ब्रह्मदत्त राजा ब्राह्मणद्वारा धर्मशिक्षित असून ( जा. ६.३९१ ), येथील अन्य एका राजाला हिमालयनिवासी विद्वान ब्राह्मणाने येथील स्थानिक राजवनात धर्मनिष्ठ जीवन आणि अनशनव्रताचा उपदेश केला होता ( जा. ३.७९ ). गंधार देशाच्या नग्गजि राजाच्या समकालीन अशा येथील दुर्मुख राजाने चार प्रत्येक-बुद्धांच्या उपदेशश्रवणानंतर ऐहिक जीवनाचा त्याग केला होता ( जा. ३.३७९ ).

क्षेमेंद्रकृत 'बोधिसत्त्वावदान-कल्पलता' ग्रंथात येथील सत्यव्रत आणि ब्रह्मदत्त राजांचा निर्देश असून ( बोधिसत्त्व ६६.४; ६८.९; महावस्तु. १.२८३ ), जातकमते येथील अन्य एका धर्मद्वेष्ट्या राजाने आणि त्याच्या धनलोभी प्रधानाने जबर करआकारणीने स्वप्रजेला त्रस्त केले होते ( जा. ५.९८ ).

जैन साहित्यात—या साहित्यमते येथील कृतवर्मन् राज-पुत्र हा जैनांचा तेरावा तीर्थंकर असून, त्याचे अवतरण, बाल्य, राज्याभिषेक, धर्मदीक्षा, आणि जिनपदप्राप्ती हे पाचहि संस्कार घडविणारे हे 'पंचकल्याणक' नगर विशेष पवित्र मानले जात असे. आर्यमित्र नामक कौंडिण्यशिष्याचे मुक्तिस्थान, तसेच गागली नामक पृष्ठीचंपा देशाच्या राजाचे धर्मदीक्षास्थान म्हणूनहि हे सुविख्यात होते. येथील संजय नामक सर्वसंगपरित्यागी राजाने जैन धर्माचा स्वीकार केला होता ( उत्तराध्ययन. १८ ).

जिनप्रभसूरिकृत 'विविधतीर्थकल्पा'मध्ये या नगरा-संबंधी एक स्वतंत्र अध्याय असून, या ग्रंथमते येथील धर्मरुचि नामक आत्मसिद्धिप्राप्त राजाने स्वसेनेसमवेत आकाशमार्गे काशी देशास जाऊन युद्धविजय प्राप्त केला होता ( विविध. पृ. ५० ). जैन पद्म पुराणमते हरिषेण आणि ब्रह्मदत्त नामक दशम आणि द्वादश चक्रवर्ती सम्राट येथे राज्य करीत असून ( पद्म. २०.१८६; १९२ ), बृहत्संहिताकार वराहमिहिराचे हे जन्मस्थान होते. हे श्वेतांबर आणि दिगंबर जैन मंदिरयुक्त ग्राम आजहि जैनांचे प्रमुख तीर्थस्थान मानले जाते ( ती. सं. पृ. १२७ ).

मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात— या साहित्यात या ( कंपिल, कंपिल्ल ) नगराचा अनेक वेळा निर्देश आढळतो ( कल्पद्रु. ७२५ ).

२. ( बौद्ध विहार ) राष्ट्रकूट राजा दंतिवर्मनच्या स. ८६७ च्या, तसेच धरावर्ष राजाच्या स. ८८४ च्या ताम्रपट-मते गुजरातमधील नवसारी गावानजिकचे सिंधु देशान्तर्गत बौद्ध विहारस्थान. पुराणी ( सुरत जिल्ह्यातील आधु. पूर्णा ) नदीमध्ये स्नान केलेल्या दंतिवर्मनने या विहारास ( भिक्षुसंख्या–५०० ) अनेक जमिनी दान दिल्या होत्या. सिंधु देशावरील मुसलमानी आक्रमणामुळे निर्वासित झालेल्या बौद्ध भिक्षूंनी हा बांधला असावा.

**काम्बली** ( ग्राम )—चालुक्य राजा त्रिभुवनपालाच्या वि. सं. १२९० च्या शिलालेखमते उत्तर गुजरातेतील सारस्वत मंडलान्तर्गत दंडाही पथकातील ( आधु. सिद्धपुर तालुका ) भाबर ( आधु. भाखर ) गावाच्या उत्तरेकडील एक ग्राम ( इंडि. अँटि. ६.२०८-२१० ). भाखर गावाच्या वायव्येकडील आधु. कांबोली गाव हेच होय ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २५९ ).

**काम्बा** ( नदी )—जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक नदी ( वराह. ८३.३ ).

**काम्बुव** ( लष्करी ठाणे )— राजतरंगिणीमते कश्मी-रातील पीर पंत्साल घाटातील क्रमवर्त ( आधु. कामेलनकोट ) नजिकचे एक लष्करी निरीक्षणस्थान ( द्रंग ). कश्मीरराज' अवंतिवर्मनाच्या शूर नामक प्रधानाने येथील 'द्रंग' शूरपुर गावी हलविला (राज. ३.२२७; ५.३९; क्रमवर्त पहा).

**काम्बेश्वर** ( लिंग )— गुजरातमधील अबू रोडपासून ५७ मैलांवरील मोरीबेरा रेल्वेस्थानकापासून १½ मैलावरील एक पर्वतीय शिवलिंगस्थान. येथे जाण्यासाठी ४८३ पायऱ्या चढाव्या लागतात ( ती. पृ. ३०० )

**काम्भोज** ( देश )—वाल्मीकि रामायणमते वायव्य भारतातील ' कंबोज ' देशाचे नामांतर ( वा. रा. बा. ५४. २३; कंबोज पहा ).

**काम्यक-आश्रम** ( आश्रमस्थान )—महाभारतमते काम्यक वनातील एक आश्रमस्थान ( म. आर. १४६.६ ).

**काम्यक वन** ( वन )—महाभारत आणि पौराणिक साहित्यमते कुरुक्षेत्रातील सप्त पवित्र वनांपैकी तृणबिंदु सरोवरानजिकचे एक वन ( नारद. उत्तर. ६५.५; ११४; वामन. ३४.५; ४१.३०–३१ ). वनवासी पांडव द्वैतवनातून या वनामध्ये निवासार्थ आले होते ( म. आर.३६.४१).

उत्तर प्रदेशातील पेहोआ रस्त्यावरील ज्योतिसर गावापासून ३ मैलांवरील आधु. कामोधा गाव हेच होय. येथील वन सध्या नाहीसे झाले आहे ( ती. पृ. ७८; ८२ ).

**भौगोलिक वर्णन**—महाभारतमते ' सप्तमरुधन्व मरुभूमी'च्या ( सपाट वालुकामय शुष्क प्रदेश ) शिरोभागीच्या या महावनात ( म. आर. २६१.१ नीलकंठ ) ऋषिमुनी आणि तापसी, तसेच किर्मीरसदृश मनुष्यभक्षक राक्षस निवास करीत असत ( म. आर. ५.३; १२; २४४. १२–१३ ). येथील जलदुर्भिक्ष्यामुळे यात्रेकरूंना उंटावर पाणी लादून प्रवास करावा लागे ( म. आर. ३५.१६–२४).

उपरोक्त वर्णनावरून महाभारतकालीन हे वन राजस्थानमधील आधु. मारवाड प्रदेशात असल्याचे काही अभ्यासक मानतात. त्यामधील सिद्धपुर ( मातृगया ) हेहि उत्तर गुजरातमधील सरस्वती नदीकाठी दाखवितात. परंतु पांडवांच्या हस्तिनापुर–काम्यक वन प्रवासास तीन दिवस लागले होते ( म. आर. १२.३ ), हे लक्षात घेता आधु. गुजरात-मारवाडमध्ये हे असण्याची शक्यता वाटत नाही.

**पांडवांच्या वनवासकाली**—आपल्या वनवासारंभी पांडव हस्तिनापुरहून निम्नलिखित मार्गाने या वनात रहावयास गेले —हस्तिनापुर → वर्धमानपुरद्वार → ( उत्तरेस ) गंगातीर → ' प्रमाण ' संज्ञक वटवृक्ष → ( गंगातीराने ) कुरुक्षेत्र → सरस्वती, दृषद्वती व यमुना नद्या → ( पश्चिमेस ) सरस्वती नदीकाठचा मरुधन्व प्रदेश ( काम्यक वन ) ( म. आर. १.८–९; ३९; ६.१–५ ). येथील वास्तव्यातच विदुर पांडवांच्या भेटीस आला होता.

**द्वितीय वास्तव्य**—द्वैतवनात अष्टमास व्यतीत केल्यानंतर तत्रस्थ मृगांच्या प्रार्थनेवरून युधिष्ठिर पांडवांसमवेत पुन्हा एकवार येथे रहावयास आला, आणि येथेच त्याने वनवासाची उर्वरित अकरा वर्षे व्यतीत केली ( म. आर. २४५.१ ). या वास्तव्यातच कृष्ण, धृष्टद्युम्न, धृष्टकेतु, केकय आदि सुहृद त्यांच्या भेटीसाठी आले ( म. आर.२३.५० ).

**अर्जुन-अस्त्रप्राप्ती**—धौम्य ऋषींच्या सूचनेवरून अर्जुन येथून अस्त्रविद्याप्राप्त्यर्थ पाच वर्षे इंद्रलोकी गेला. तेथून रथाने गंधमादन पर्वतावर परत येऊन पांडवांसमवेत तो पुन्हा या वनात आला ( म. आर. १६१.१५–१९; ८३२* ).

**ऐतिहासिक प्रसंग**—महाभारतमते या वनात पांडवजीवनातील निम्नलिखित महत्त्वपूर्ण प्रसंग घडले होते :– **१. किर्मीरवध** ( म. आर. १२ ); २. **अर्जुन-इंद्रलोकगमन** ( म. आर. ३६; ४८.१२ ); ३. **पांडव–तीर्थयात्रा** ( म. आर. ७८.१७ ); ४. **मार्कंडेय–समस्या** ( म. आर. १८३–२३२ ); ५. **युधिष्ठिराचे मृगस्वप्न** ( म. आर. २४४ ); ६. **व्रीहिद्रौणिक** ( म. आर. २५८ ). ७. **जयद्रथकृत द्रौपदीहरण** ( म. आर. २५२.२४ ); ८. **पांडवकृत जयद्रथ-विमोक्षण** ( म. आर. २९४.४३ ); ९. **परशुरामोपाख्यान** ( म. आर. ११५–११७ ); १०. **सावित्र्युपाख्यान** ( म. आर. २७८–२८३ ); ११. **कर्ण–कुंडलहरण** ( म. आर. २८४–२९४ ). महाभारतान्तर्गत पुलस्त्ययात्रेत निर्देशिलेले ' काम्यक वन ' हि बहुधा हेच असावे ( म. आर. ८४.१६ ).

२. मथुरेच्या परिसरातील द्वादश वनांपैकी चतुर्थ वन ( नारद. उत्तर. ७९.८; वराह. १५३.३७; १६१.७ ). नामांतर–' कामवन '. व्रजमंडलान्तर्गत ( आधु. मथुरा–वृंदावन ) आधु. कामवन हेच असून, येथे गोविंददेव आणि वृंदा देवीची मंदिरे, तसेच अन्य चौऱ्याऐंशी तीर्थे आहेत ( म. आर. ८४.१६ ).

**काम्यकसर** ( सरोवर )— महाभारतमते काम्यक वनातील एक सरोवर ( म. श. ५२.२० ).

**काम्बलौली** ( ग्राम )—चालुक्य राजा भीम ( द्वितीय ) च्या वि. सं. १२६४ च्या शिलालेखमते दक्षिण काठेवाडातील एक ग्राम. तळाजे गावाच्या पश्चिमेकडील आधु. कमलोल गाव हेच होय ( इंडि. अँटि. ११. ३३७–३३८ ).

**काय** ( देश )—पौराणिक साहित्यमते कायस्थ लोकांचे आद्य निवासस्थान, एक देश.

**कायग्राम** ( तीर्थ )—ब्रह्ममते राहूचे कबंध ( काय )–

पतनस्थान, एक तीर्थ (ब्रह्म. १०६). अहमदनगर जिल्ह्यातील आधु. कायगाव हेच होय.

**कायठा** (ग्राम)—कलचुरि राजा प्रतापमल्लच्या स. १२१४ च्या पेंड्राबंध ताम्रपटमते मध्य प्रदेशान्तर्गत अनर्घ-मंडलातील एक ग्राम. जांजगिर तहसिलीच्या दक्षिण सीमे-नजिकच्या पेंड्राबंध गावाच्या १५ मैल पश्चिमेकडील आधु. कैठा गाव हेच होय (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.५४५).

**कायल** (बंदर)—वस्सफ आणि मार्को पोलोच्या प्रवासवर्णनमते दक्षिण भारतातील मानार आखाताच्या मुखानजिकचे सुविख्यात बंदर. आधु. मलबार किनाऱ्यावर हे असावे.

**वस्सफच्या ग्रंथात**— या ग्रंथमते मलिबर (आधु. मलबार) देशाच्या सीमेवरील या बंदरातून पांड्य राजा जटावर्मन् (प्रथम, स. १२७६) तकिउद्दीन अब्दुल रेहमान नामक व्यवस्थापकाच्या साह्याने अरबी घोडे आयात करीत असे (आर्कि. सर्व्हे., दक्षिण विभाग., स. १९०९. पृ. ४१८).

**मार्को पोलोच्या प्रवासवर्णनात**—या प्रवासवर्णनमते (स. १२८८; १२९३) या बंदराच्या परिसरातील मलबार किनारा मलबारी आणि गुजराती चाचे लोकांच्या शेकडो बोटींनी गजबजला असून, लुटण्याजोगी कोणतीहि एकाकी व्यापारी बोट दिसताच सांकेतिक खुणांच्या साह्याने ते तीवर संघटित हल्ला चढवीत. स्थानिक राजांच्या संरक्षणा-खाली चाललेल्या या चाचेगिरीमुळे या बंदरातील अरबी घोड्यांच्या बाजारपेठेचे फार नुकसान होत असे (यूल, मार्को पोलो. ३.२४–२५).

**कायव्य** (देश व लोक)—महाभारतमते युधिष्ठि-राच्या राजसूय यज्ञसमयी उपायनांसह उपस्थित असणारा एक लोकसमूह (म. स. ४८.१२).

**कायशोधन** (तीर्थ)—कुरुक्षेत्रातील एक तीर्थ (म. आर. ८१.३५; नारद. उत्तर. ६५.४४; वामन. ३५.१७–१८; पद्म. आदि. २६.३९).

**कायावरोहण** (शिवस्थान)—पौराणिक साहित्यमते गुजरातमधील लकुलीश शिवाचे स्थान (कूर्म. उत्तर. ४४.७; वायु. २३.२२२). 'पाशुपत संप्रदायसंस्थापक लकुलीश शिवाचे सदेह अवतारस्थान' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले (वायु. २३.२२१–२२२). गुज-रातमधील डभोई तालुक्यातील बडोद्यापासून १५ मैलां-वरील आधु. कार्वान गाव हेच होय (अक्षांश २०°–३०′ उत्तर; रेखांश ७३°–१०′ पूर्व).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या शिवस्थानाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. वायु पुराण (२३.२२२)<br>२. स्कंद पुराण (काशी. ६९.११६) | कायारोहण |
| ३. चित्र प्रशस्ति शिलालेख (एपि. इंडि. १.२८१) | कारोहण |
| ४. लिंग पुराण<br>५. गुर्जर राजा जयभट (तृतीय) चा स. ७०६ चा नवसारी ताम्रपट (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.८४)<br>६. अल्लशक्तीचा स. ६५५ चा नाग्दा ताम्रपट (एपि. इंडि. २९.११८) | कायावतार |
| ७. उत्तरकालीन शिलालेख साहित्य (एपि. इंडि. २९.११८) | कारावन |

**पौराणिक साहित्यात**—मत्स्यमते येथील शिवमंदिरात वास्तव्य करणाऱ्या लकुलीश शिवावताराने माहेश्वरपंथीय धर्मतत्त्वांचे प्रणयन केले (मत्स्य. २२.३०; कूर्म. २.४४.७–८). स्कंदमते भारतातील अडुसष्ट शिवस्थानां-पैकी या स्थानीचे 'नकुलीश्वर' शिवलिंग कालांतराने काशी येथे स्थलांतरित झाले (स्कन्द. काशी. ६९.११६).

**शिलालेख साहित्यात**—बादामी येथील चालुक्य राज-प्रतिनिधी अल्लशक्तीच्या स. ६५५ च्या नाग्दा ताम्रपटात (एपि. इंडि. २९.११८), गुर्जर राजा जयभट (तृतीय) च्या स. ७०६ च्या नवसारी ताम्रपटात (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.८४), तसेच चित्र प्रशस्ति शिलालेखात या शिव-स्थानाचा निर्देश आढळतो (एपि. इंडि. १.२८१).

२. (तीर्थ) वाराणसी येथील एक श्राद्धयोग्य तीर्थ (मत्स्य. १८१.२६; पद्म. आदि. ११.२३).

३. (देवीस्थान) पद्ममते एक देवीस्थान. येथील देवीचे नाव 'माता' होते (पद्म. आदि. १७.२१२; मत्स्य. १३.४८).

**कायावरोहणेश्वर** (लिंग)—अवंती येथील चौऱ्याऐंशी शिवस्थानांपैकी एक (स्कन्द. आवन्त्य. अ. ६७.७; च. लिं. ८२).

**कारकल** (जैन तीर्थ)—ज्ञानसागरमते तूलराज (म्हैसूर) प्रदेशातील सुविख्यात जैन तीर्थस्थान. दक्षिण कॅनरा जिल्ह्यातील मंगलोरपासून ३२ मैलांवरील, आणि मूडबिद्रीपासून १० मैलांवरील आधु. कारकल गाव हेच होय. येथे नेमिनाथ मंदिर, तसेच १८ अन्य जैन मंदिरे असून, नजिकच्या डोंगरावर बाहुबलीची (गोमतेश्वर) विशाल मूर्ती आहे.

**गोमतेश्वर मूर्ती**—येथील पर्वतीय जैन मंदिरातील (बेट्टा) गोमतेश्वराची मूर्ती (उंची ४१′–५″, वजन–८० टन) श्रवणबेळगोळप्रमाणे मंदिरस्थानी कोरली नसून, अन्य कोठून तरी ती आणविली असावी (फर्ग्युसन, २.७२–७३).

जैन धार्मिक साहित्यमते ही मूर्ती (उंची–१० धनुष) भैरसवेरडु राजाने स्थापिली असली, तरी तीवरील शिलालेखमते मात्र कलश देशाच्या सांतरवंशीय भैरवेंद्रपुत्र वीर पांड्य राजाने ललितकीर्ति नामक मुनींद्राच्या सूचनेवरून स. १४३१ मध्ये तिची स्थापना केली (इंडि. अँटि. २.३५३; जैन शिलालेखसंग्रह. ३.४७९; एपि. इंडि. ७.१०९; ८.१२२).

**चतुर्मुख रत्नत्रय मंदिर**—हे पर्वतीय मंदिर भैररस (द्वितीय) राजाने स. १५८६ मध्ये बांधले. 'चतुर्मुख–बसती' स्थानिक नावाने ओळखल्या जाणाऱ्या या मंदिरातील शिलालेखमते (जैन शिलालेखसंग्रह. ३.५४५) याच्या चतुर्दिशांना चार दरवाजे असून, मंदिराच्या अंतर्भागात बारा तीर्थंकर-प्रतिमा (उंची-प्रत्येकी २१′) आहेत. मंदिराच्या पश्चिमेला अन्य अकरा जैन मंदिरे आहेत (ती. पृ. ३३०).

**भट्टारक पीठ**—इ. स. १५ व्या शतकापासून येथे 'भट्टारक पीठ' असून, येथील शास्त्रभांडारसमृद्ध आचार्य 'ललितकीर्ति' नावाने सुविख्यात आहेत (ती. पृ. १२७–१२८).

**शिलालेख साहित्यात**—या साहित्यमते पश्चिम म्हैसूर-मधील घाटपायथ्यानजिकच्या या देशात इ. स. १६ व्या शतकात भैररस नामक स्थानिक राजा राज्य करीत असे (एपि. कर्ना. ६.४७). परंतु हा राजा कोण ते समजत नाही.

**कारकुक्षीय** (देश)— अभिधानचिंतामणिमते पंजाबातील 'शाल्व' जनपदाचे नामांतर (अभिधान. ४. ३३; शाल्व पहा). शब्दशः अर्थ–'सैनिक (कार) गर्भ-धारक' (=सैनिकांची जन्मभूमी).

**कारञ्जा** (जैन तीर्थ)— विदर्भातील मूर्तिजापुर–यवतमाळ मार्गावरील जैन तीर्थस्थान. येथील सेनगण संप्रदायाच्या 'पार्श्वनाथ मंदिर' आणि काष्ठासंघ संप्रदायाच्या 'चंद्रनाथ मंदिरां'मुळे हे विदर्भातील जैन गतिविधींचे केंद्रस्थान मानले जाते. शीलविजयकृत 'तीर्थमाले'त (इ. स. १७ वे शतक) येथील भोज नामक समृद्ध संघ-पतीचे वर्णन आढळते. आज येथील पीठावर कोणीहि भट्टारक नसले, तरी जैन ग्रंथांची समृद्ध भांडारे येथे उपलब्ध आहेत (ती. सं. पृ १२८).

**कारतोय**—(नदी) वराहमते पूर्व भारतातील विंध्य पर्वतोद्भवा 'कर्मनाशा' नदीचे नामांतर (वराह. ८५). आधु. करतोया नदी उत्तर बंगालमध्ये उत्तर-दक्षिण वहात असल्याने हे समीकरण भौगोलिक दृष्ट्या यथायोग्य वाटत नाही (पांडे, बिहार. पृ. ६९; कर्मनाशा पहा).

**कारन्तुक** (तीर्थ)—कुरुक्षेत्रातील एक यक्षस्थान (वामन. २२.६०).

**कारन्धम**—(तीर्थ)—महाभारत अर्जुन–प्रथम तीर्थ-यात्रामते दक्षिण भारतातील समुद्रकिनारीचे एक तीर्थ (म. आ. २०८.३). 'ग्राह' (सुसर) बनलेल्या वर्गा आदि पाच अप्सरांचा येथे उद्धार झाला (म. आ. २०९). नामांतर–'नारी तीर्थ; 'पंचाप्सरस्.'

**कारपचन** (तीर्थ)—सरस्वती नदीकाठचे प्लक्षप्रस्रवण-नजिकचे एक तीर्थ (म. श. ५३.११;१३). पाठभेद–'कारपवन.'

**कारपचव** (देश)—ब्राह्मण आणि श्रौतसूत्र साहित्य-मते यमुना नदीकाठचा एक देश (का. श्रौ. २४.६.१०; तां. ब्रा. २५.१०.२३; आश्व. श्रौ. १२.६). पाठभेद–'कारपवन.' अग्रवाल यांच्या मते हा संभवतः पंजाबातील शाल्व देशाचा लष्करी पेशाच्या लोकांचा उपविभाग असावा (इराणी 'कार'= सेना).

**कारपथ** (देश)— राजतरंगिणीमते वायव्य भारतातील 'कारापथ' देशाचे नामांतर (राज. ८. २४४४; कारापथ पहा). अन्य नामांतर (ब्रह्म. ३.६४. १८८)–'कारयन'.

**कारवती** (तीर्थ)—एक श्राद्धयोग्य तीर्थ (ब्रह्माण्ड. ३.१३.९२).

**कारवार** (शिवमंदिरस्थान)— दक्षिण भारतातील गोकर्णनजिकचे एक शिवमंदिरस्थान. येथे सिद्धेश्वर नामक शिवमंदिर आहे (ती. पृ. ३१२).

**कारस्कर** (देश)—पाणिनि आणि काशिकामते

वायव्य भारतातील एक देश ( पा. सू. ६.१.१५६–१५७ ). धर्मशास्त्र साहित्यमते हा ' गमनवर्ज्य ' देश असून ( बौ. ध. १.१.२.१५; बौ. श्रौ. २०.१३.१४; आप. श्रौ. २२. ६.१८; सत्याषाढ श्रौ. १७.६ ), पौराणिक साहित्यातहि यास ' श्राद्धनिषिद्ध ' म्हटले आहे ( ब्रह्माण्ड. ३–१४–३३; वायु. ७८.२३ ). वायुमते हा ' पापदेश ' असून ( वायु. ६८.६९ ), महाभारत ' कर्ण-शल्य संवादा'तहि कारस्कर, मद्र, आणि केकय लोकांना ' अधार्मिक ' म्हटले आहे ( म. क. ३०.४५ ).

जयचंद्र यांच्या मते अफगाणिस्तानमधील चित्रळ नदी आणि नगरहार गावानजिकच्या काशगर ( आधु. सिकियांग ) देशाचा निर्देश येथे अभिप्रेत असावा ( जयचंद्र, पृ. ३१६; काशगर पहा ). अन्य अभ्यासकांच्या मते येथे ' पारस्कर ' पर्वतीय देशाचा निर्देश अभिप्रेत आहे ( पारस्कर पहा ).

२. ( देश ) वामनमते अपरांत ( नैर्ऋत्य ) भारतातील एक जनपद ( वामन. १३.५१ ). मत्स्यमते हा दक्षिणापथ ( दक्षिण भारत ) मध्ये होता ( मत्स्य. ११४. ४९ ). येथे नर्मदा नदी दक्षिण भारताची परिसीमा मानल्याने तापी नदीच्या जलसंचय प्रदेशातील हा देश तेथे दक्षिण भारतामध्ये समाविष्ट केला असावा. वस्तुतः हा नैर्ऋत्य भारतातच होता.

अली यांच्या मते तापी नदीच्या पूर्णा नामक उपनदीच्या वरच्या खोऱ्यातील उत्तर अमरावती जिल्ह्यातील गविलगढ टेकड्यांच्या दक्षिण पायथ्यानजिकचा एलिचपुर आणि करसगाव गावांच्या परिसरातील प्रदेश हाच होय. तापी नदीच्या खोऱ्यापासून हा गविलगढ टेकडयांनी विभक्त झाला आहे.

**नामांतरे**—पौराणिक साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतातः—१. ' पारस्कर ' ( ब्रह्माण्ड. ४९. ६३; वायु. ४५.१२९ ); ' कठाक्षर ' ( मार्क. ५४.५० ).

**महाभारतात**—या ग्रंथात युधिष्ठिराच्या शासनाखालील एक देश म्हणून ( म स. ४६.२१ ), तसेच भारतवर्षातील एक जनपद म्हणून याचा निर्देश आढळतो ( म. भी. १०. ५०* ). परंतु तेथे निश्चित कोणत्या कारस्कर देशाचा निर्देश अभिप्रेत आहे ते समजत नाही.

**कारापतन** ( तीर्थ )—महाभारत पुलस्त्ययात्रामते एक तीर्थ ( म. आर. ८२.२ ).

**कारापथ** ( देश )—रघुवंशमते लक्ष्मणपुत्र अंगद आणि चंद्रकेतु यांच्या आधिपत्याखालील हिमालयाच्या पायथ्यानजिकचा एक देश ( रघु. १५.९० ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :-

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. वाल्मीकि रामायण ( उ. १०२.५ ) | कारुपथ |
| २. राजतरंगिणी ( ८.२४.४४ ) | कारपथ |
| ३. ब्रह्म पुराण ( ३.६३.१८८ ) | कारयन |

**नामव्युत्पत्ती**—' कारापथ संज्ञक मार्गाच्या परिसरातील देश ' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले असावे (चौधरी, पृ. १३५ ).

**भौगोलिक स्थान**—वाल्मीकि रामायणमते हा कोशल देशाच्या उत्तरेस असून ( वा. रा. उ. १०२.७ ), ब्रह्माण्डमते हा ' हिमवत्पार्श्व ' ( हिमालय पायथा ) प्रदेशात होता ( ब्रह्माण्ड. ३.६३.१८८–१८९ ).

**वाल्मीकि रामायणात**—या ग्रंथमते रामाने आपल्या लक्ष्मणादि बंधूंच्या साह्याने कोशल देशाच्या उत्तरेकडील हा ( कारुपथ ), तसेच मल्लभूमि देश जिंकून लक्ष्मणपुत्र अंगद आणि चंद्रकेतूला त्यांचे राजे बनविले. उत्तरकालात त्यांनी या दोन देशात अनुक्रमे ' अंगदपुर ' ( ब्रह्माण्ड–' अंगदा ' ) आणि ' चंद्रपुरी ' ( ब्रह्माण्ड–' चंद्रचक्रा ' ) नगरे स्थापिली.

हा मल्ल देशाहून स्वतंत्र असल्याचा सुस्पष्ट निर्देश वाल्मीकि रामायण आणि पौराणिक साहित्यात आढळत असल्याने (वायु. ८८-१८७.–१८८; ब्रह्माण्ड. ३.६३. १८९ ), उपरोक्त दोन्ही नगरे एकाच देशात असल्याचे पार्गिटर यांचे अनुमान अयोग्य वाटते ( पार्गि., पृ. २७८ ).

उत्तरकालात अंगदवंशजांनी अंगदपुर नगराचा त्याग करून शाक्य जनपदाची ( राजधानी-कपिलवस्तु ) स्थापना केली ( पांडे, गोरखपुर जनपद. पृ. ६६; शाक्य पहा ).

**कारावन** ( शिवस्थान )—शिलालेख साहित्यमते गुजरातमधील ' कायावरोहण ' शिवस्थानाचे नामांतर ( एपि. इंडि. २९.११८; कायावरोहण पहा ).

**कारियारु** ( नगर )—शिलालेख साहित्यमते चोल राजा नेडुमुंडि किल्लि आणि पांड्य-चेर संयुक्त सैन्याच्या स. १८० च्या युद्धाचे दक्षिण भारतातील एक नगर ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. १५ ).

**कारीतलाइ** ( शिलालेखस्थान )—गुप्त राज्यकालीन जयनाथ राजाच्या स. ४९३ च्या कारीतलाइ ताम्रपटाचे मध्य प्रदेशातील जबलपुर जिल्ह्यातील मुडवारा गावापासून २३ मैल ईशान्येकडील उपलब्धिस्थान. कलचुरि राजा लक्ष्मण राजदेव ( द्वितीय ) चे स. ८४० आणि ९४० चे शिलालेखहि येथे सापडले आहेत ( कॉर्पस. इन्स्क्रि. ४.१.१७८; १८६ ).

**कारु** ( पर्वत )—भारतवर्षातील एक पर्वत ( वायु. ४५.९२ ).

**कारुपथ** ( देश )—वाल्मिकि रामायणमते वायव्य भारतातील 'कारापथ' देशाचे नामांतर ( वा. रा. उ.१०२. ७–१०; कारापथ पहा ).

**कारुवग्राम** ( ग्राम )—शिलालेख साहित्यमते महाराष्ट्रातील एक ग्राम. कृष्णा नदीच्या उजव्या किनाऱ्यापासून ६ आणि ४ मैलांवरील आधु. कोरेगाव किंवा कर्वे गावांपैकी हे एक असावे ( एपि. इंडि. २६.३२३ ).

**कारुवूर** ( ग्राम )—चोल राजा वीर राजेंद्रच्या स. १०६६ च्या कारुवूर शिलालेखाचे आधु. त्रिचनापल्ली जिल्ह्यातील उपलब्धिस्थान ( रंगाचारी, त्रिचनापल्ली. १.२ ).

**कारुष** ( देश )—वामनमते विंध्य पर्वताच्या पायथ्यानजिकच्या 'करूष' देशाचे नामांतर ( वामन. १३.५४ ). अन्य नामांतर–'कारुपक' ( मार्कं. ५४.५३; करूष पहा ).

२. दक्षिणापथामधील एक देश ( मत्स्य. ११४.४८ ).

३. मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते 'चेदि' देशाचे नामांतर ( अभिधान. १३०.९५९; चेदि पहा ).

**कारेयप्टनम्** ( ग्राम )—विजयनगरच्या हरिहर ( तृतीय ) राजाच्या स. १४१७ च्या शिलालेखमते त्याने जिंकलेले म्हैसूर राज्याच्या पश्चिम सीमेवरील एक ग्राम ( एपि. कर्ना. ११.५२ ).

**कारोडा** ( ग्राम )—चालुक्य राजा मूलराज ( द्वितीय ) च्या स. १२३२ च्या शिलालेखमते उत्तर गुजरातमधील सारस्वतमंडलान्तर्गत गंभूता पथकातील ( आधु. चनसम महाल ) एक ग्राम. बडोदा जिल्ह्यातील चनसम महालाच्या ईशान्य कोपऱ्यातील आधु. करोडा ग्राम हेच होय ( सांकलिया, रिव्ह्यू. २६२ ).

**कारोती** ( नदी )—शतपथ ब्राह्मणमते तुर कावषेय ऋषींचे यज्ञस्थान, एक नदी ( श. ब्रा. ९.५.२.१५ ).

**कारोहण** ( शिवस्थान )—चिंत्र प्रशस्तिलेखमते गुजरातमधील 'कायावरोहण' शिवस्थानाचे नामांतर ( एपि. इंडि. १.२८१; कायावरोहण पहा ).

**कार्कोटद्रङ्ग** ( नगर )—कश्मीरातील लोहर–श्रीनगर रस्त्यावरील तोषमैदान घाटाच्या प्रवेशद्वारानजिकचे एक नगर. विरु परगण्यातील तोषमैदान पर्वत-पायथ्यानजिकचे आधु. द्रंग गाव हेच होय ( अक्षांश ३३°–५७′ उत्तर; रेखांश ७४°–३६′ पूर्व ).

**नामांतर**—प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात :–

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. राजतरंगिणी ( ७.९४९ ) | द्वार |
| २. तीर्थसंग्रह | कर्कोटकनाग तीर्थ |
| ३. स्थानिक नामांतर | बर–ब्रल ( संस्कृत–'द्वारबल' = द्वारस्थान ) |

**नामव्युत्पत्ती**—'कर्कोटधर पर्वतान्तर्गत घाटप्रवेश द्वारानजिकचा निरीक्षणस्तंभ' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले असावे ( कश्मीरी 'द्रंग' = निरीक्षण स्तंभ ). तोषमैदान घाटामध्ये 'काकोदर' ( प्राचीन कर्कोटधर ) नामक पर्वतीय सुळका आजहि आढळतो.

**अवशेष**—आधु. द्रंग–तोषमैदान पठार रस्त्यावर पुरातन निरीक्षणस्तंभांचे अवशेष आजहि आढळतात ( स्टाइन, राज. १.२७८; २.३९९ ).

**कार्तस्वराकर** ( पर्वत )—भारतवर्षातील एक पर्वत ( विष्णुधर्म. १.८.४ ).

**कार्तिकेय कुण्ड** ( कुंड )—लोहार्गलक्षेत्रातील एक जलकुंड ( वराह. १५१.६३ ).

२. ( तीर्थ ) गया येथील कार्तिकेय पदचिह्न ( पादुका )-युक्त एक तीर्थ ( अग्नि ११५.५२.११६.२३; वायु. १०९. १९;१११.५४ )

३. गौतमी ( गोदावरी ) नदीकाठचे एक तीर्थ ( ब्रह्म. ८१.१; गरुड. १.८१.९ ).

४. ( देवीतीर्थ ) मत्स्यमते एक देवीतीर्थ. येथील देवीचे नाव यशस्करी ( मत्स्य १३.४५ ), अथवा शांकरी होते ( पद्म. आदि. १७.२०९ ).

**कार्तिकेयपुर** ( नगर )—ललितशूरदेव राजाच्या स. ८५३ च्या पंडुकेश्वर ताम्रपटमते उत्तर प्रदेशातील एक

नगर. अल्मोरा जिल्यातील हझुर तहसिलीतील दानपुर परगण्यातील आधु. बैजनाथ ( वैद्यनाथ ) गाव हेच होय. स्थानिक परंपरामते कत्यूर देशाच्या कत्यूरी राजाने कुमाऊँमधील 'करवीरपुर' नामक प्राचीन नगरावशेषांवर हे वसविले. 'कार्तिकेयपुर' हे संभवतः 'कत्यूर'चेच संस्कृत रूप असावे ( एपि. इंडि. ३१.२७९ ).

**कार्तिकेयस्थान** ( तीर्थ )—महाभारतमते कुरुक्षेत्रातील सरस्वती नदीकाठच्या 'पृथूदक तीर्था ( आधु. पेहोआ ) चे नामांतर ( म. आर. ८१.१२२; पृथूदक तीर्थ पहा ).

२. ( मंदिर ) उत्तर प्रदेशातील रुद्रप्रयाग–मोहनखाल रस्त्यावरील रुद्रप्रयागपासून १६ मैलांवरील कार्तिकेय मंदिरस्थान आणि सिद्धिपीठ.

**अन्य कार्तिकेयस्थाने**—भारतवर्षातील अन्य कार्तिकेयस्थाने पुढीलप्रमाणे होतः– १. करवीरपुर; २. कुमारकोइल ( सुब्रह्मण्यक्षेत्र ); ३. क्रौंच पर्वत ( स्कंद सैनापत्याभिषेकस्थान ); ४. शरवन; ५. सरकतीर्थ; ६. स्कंदस्थान ( आधु. सोंडूर ).

**कार्दम** ( नदी )—कौटिलीय अर्थशास्त्रमते अफगाणिस्तानातील 'कार्दमिक' मोत्यांचे उपलब्धिस्थान, एक नदी ( कौ. अ. पृ. ७६ ). कौटिलीय अर्थशास्त्रभाष्यमते ही इराणमध्ये असून, बोखारा प्रदेशातील बोखारा आणि समरकंद गावांच्या उत्तरेकडील आधु. झरफ्शान नदी हीच असावी.

**नामांतर**—प्राचीन साहित्यात हिची निम्नलिखित नामांतरे आढळतात :– १. ( भागवत )– '**हाटकी**'; २. ( अन्य प्राचीन ग्रंथ )– '**हिरण्यवती**'.

**नामव्युत्पत्ती**— या नदीच्या 'हाटकी' आणि 'हिरण्यवती' या वैकल्पिक नावांचा, तसेच 'झरफ्शन्' या आधुनिक नावाचा शब्दशः अर्थ 'सुवर्णयुक्त ( सुवर्णदायिनी ) नदी' असा होतो. स्थानिक आख्यायिकामते 'परिसरातील प्रदेशास समृद्ध करणारी' अशा अर्थाने हिला 'झरफ्शन्' नाव प्राप्त झाले ( आय्. एच्. क्यू. २. ५३१–५३२ ).

**कार्पासिक** ( देश )—महाभारतमते युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयी सेविकागण पुरविणारा एक देश ( म. स. ४७.७ ).

**कार्मणेयक** ( लोकसमूह )—बृहत्संहितामते नैर्ऋत्य भारतातील एक लोकसमूह ( बृ. सं. १४.१५ ). 'कार्मणेय ( कामणीय, कम्मणिज्ज ) देशनिवासी' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले असावे. बडोदा राज्यातील सुरतपासून १० मैल ईशान्येकडील आधु. काम्रेज नगराच्या परिसरात हे राहत असावेत ( इंडि. अँटि. १७.१८४; १९८ ). नामांतर ( चालुक्य शिलालेख )– 'कामांणेय'.

**शिलालेख साहित्यात**—चालुक्य राजा श्रियाश्रय शिलादित्याच्या स. ६९३ च्या सुरत ताम्रपटात, तसेच गुर्जर राजा अवनिजनाश्रम– पुलकेशीच्या स. ७३६ च्या ताम्रपटात याचा ( विषय, आहार ), तसेच यामधील ओसुंभल आणि पद्रक गावांचा निर्देश आढळतो ( कॉर्पस् इन्स्क्रि. ४.१.१३३; १३९ ).

**कार्य** ( ग्राम )—पश्चिम गंग राजा सत्यवाक्य मारसिंह ( तृतीय ) च्या स. ९६८ च्या शिलालेखाचे म्हैसूरमधील नंजनगूड तालुक्यातील उपलब्धिस्थान ( एपि. कर्ना. ३.१९२ ).

**कार्ले** ( गुफास्थान )—महाराष्ट्रातील सुविख्यात सातवाहन राज्यकालीन ( इ. स. पू. १५० – इ. स. २०० ) बौद्ध चैत्यमंदिरस्थान. पश्चिम महाराष्ट्रातील भाजे, कोंडाणे, बेडसा, पितळखोरे, नासिक आदि गावच्या चैत्यमंदिरांच्या तुलनेने उत्तरकालीन असे येथील चैत्यमंदिर स्थापत्य आणि शिल्पदृष्ट्या त्या सर्वांपेक्षा विशाल, परिपूर्ण आणि सरस आहे. भारतातील उपलब्ध बौद्ध चैत्यमंदिरांत ते सर्वाधिक विशाल असून, शतकानुशतके चैत्यशिल्परचनेने सराईत बनलेल्या शिल्पकारांनी त्याची रचना केल्यामुळे ते निर्दोष बनले आहे.

काष्ठमय चैत्यमंदिरांच्या पर्वतीय गुफाचैत्यातील स्थित्यंतरपरंपरेची अंतिम परिसीमा हे चैत्यमंदिर असून, यासदृश सर्वांगसुंदर चैत्यमंदिर बौद्ध शिल्पकार आधीच्या, तसेच नंतरच्याहि काळात निर्माण करू शकले नाहीत. म्हणूनच 'जंबूद्वीपातील सर्वश्रेष्ठ शैलगृह' हे याचे स्थानिक शिलालेखातील वर्णन यथायोग्य वाटते ( ल्यूडर्स सूची. क्र. १०८७ ). या मंदिरानजिकचे चार बौद्ध विहार त्यामधील उत्तरकालीन फेरबदलामुळे गैरमहत्त्वाचे मानले जातात.

इंद्रायणी खोऱ्याच्या उत्तर भागातील बोरघाटातील कार्ले आणि भाजे या बौद्ध गुफा मुंबई–पुणे रस्त्यावर मुंबईपासून ८५ मैलांवर आहेत. त्यापैकी कार्ले गुफा मळवली रेल्वेस्थानकापासून २½ मैल उत्तरेस, ½ मैल उंचीच्या टेकडीवर असून, भाजे गुफा कार्ल्याच्या उलट दिशेला, म्हणजे मळवली रेल्वेस्थानकापासून १½ मैल दक्षिणेस आहेत.

**नामांतरे**—कार्ले गुफालेखद्वयमते 'वल्लूरक ( आधु.

वेरूळ) गावाच्या बौद्ध भिक्षूंचे उत्तरकालीन निवासस्थान अशा अर्थाने यास 'वल्लूरक' (वलूरक) वैकल्पिक नाव प्राप्त झाले होते (आर्कि. सर्व्हे. वे. इं. ४.१०८; ११३). या गुफासमूहाच्या पायथ्यानजिकच्या आधु. 'विहार' ग्रामनामावरून प्राचीन काळी हे स्थान 'विहार' (शब्दशः अर्थ – बौद्ध विहारस्थान) नावाने सुविख्यात असावे. मात्र ही दोन्ही नामांतरे अप्रसिद्ध असल्याने 'कार्ले' या आधुनिक नावाखालीच याची माहिती आम्ही दिली आहे.

**कालनिर्णय**—महाराष्ट्रातील सातवाहन गुफामंदिरांचे कालानुक्रमे निम्नलिखित तीन प्रमुख उपविभाग पडतात:—

| कालखंड | गुफा |
|---|---|
| १. इ. स. पू. १ ले शतक | भाजे, बेडसा, कोंडाणे |
| २. इ. स. १ ले – २ रे शतक (प्रथमार्ध) | कार्ले, कृष्णगिरि (आधु. कान्हेरी) |
| ३. इ. स. २ रे शतक (उत्तरार्ध) | पांडवलेणे (आधु. नासिक) |

महाक्षत्रप नहपानाच्या उषवदात नामक जामाताच्या या चैत्यमंदिरातील शिलालेखावरून (स. १२०) हे तत्पूर्वकालीन असावे. फर्ग्युसन यांच्या मते इ. स. १ ल्या शतकात हे खोदले असावे.

**स्थापत्यवैशिष्ट्ये**—धीरगंभीर भव्यतेची साकार प्रतिमा असणाऱ्या या गुफाशिल्पांत बौद्ध धर्मप्रतिपादित निवृत्तिमार्ग, तसेच नैसर्गिक जीवनोन्मुखता आणि जीवनोल्हास यांचे मनोज्ञ संमिश्रण आढळते. निर्वाणप्रद निवृत्तिमार्गीप्रमाणेच भौतिक सुख आणि ऐश्वर्यालाहि जीवनात स्वतःचे स्थान असून, त्यांचा आस्वाद घेण्यात कांहीच कमीपणा नसल्याचे तत्त्वज्ञान येथे अभिप्रेत दिसते.

**रचना**—रचनादृष्ट्या खिस्ती चर्चसदृश अशा या अतिविशाल मंदिराच्या (१२४½' × ४५½' × ४५') दर्शनी भागी एक मोठा सभामंडप, आणि अंतर्भागात उभ्या स्तंभांच्या उभय अंगांस खिस्ती चर्चच्याच धर्तीचे अरुंद प्रदक्षिणापथ (रुंदी १०') असून, स्तूपप्रतिमेच्या पाठीमागे ते एकमेकांस मिळतात (रुंदी २५'–७").

आंतरिक गांभीर्य आणि प्रकाशयोजना या उभय दृष्टींनी या मंदिराचा अंतर्भाग अद्वितीय आहे. त्याच्या पिप्पलपर्णाकृती दर्शनी गवाक्षातून येणारा प्रकाशझोत मंदिरातील स्तूपावर अचूकपणे पडून त्याचा बाकी भाग अंधारात रहातो. सभामंडपातील उभय अंगांच्या स्तंभमालिकांमुळे त्याच्या गूढरम्यतेत भर पडून या उंचच उंच स्तंभांनी मंदिराच्या भिंती बनल्याचा भास होतो, आणि प्रेक्षकाचे सारे लक्ष या स्तंभांवर आणि स्तूपप्रतिमेवर केंद्रित होते.

**मंदिर-स्तंभ**—मंदिराच्या अंतर्भागात उभय बाजूंस मुख्य सभामंडप आणि प्रदक्षिणापथ यांच्या दरम्यान प्रत्येकी १५ सरळसोट, अष्टकोनी स्तंभांची मालिका आहे. भाजे चैत्यमंदिराप्रमाणे ते आतील बाजूस झुकलेले नाहीत. या स्तंभांच्या तळाशी पुष्पपात्रसदृश व्यासपीठे, आणि शिरोभागी गोल तक्क्याच्या आकाराची नक्षीकामयुक्त शिरोभूषणे आहेत. या शिरोभूषणांच्या माथ्यावरील आयताकृती व्यासपीठाच्या दोन दर्शनी कोपऱ्यांत गजारूढ पतिपत्नींचे प्रत्येकी एक शिल्प आढळते. या शिल्पांची जडणघडण, त्यामधील व्यक्तींच्या चेहऱ्यावरील भाव, तसेच ओटंगून बसलेले हत्ती सातवाहन शैलीचे (उदा. सांची) आहेत. या शिल्पकृतींमध्ये शिल्पकारांनी आपले कलासर्वस्व ओतले असून, ग्रीक स्थापत्यान्तर्गत नक्षीकामयुक्त पट्टीच्या (कॉर्निस) स्थानी कोरलेल्या या शिल्पामुळे हे मंदिर उंच आणि उभट आकाराचे बनले आहे.

चैत्यमंदिरातील स्तूपामागचे सात अष्टकोनी स्तंभ तुलनेने अनलंकृत, तसेच बैठक आणि शिरोभूषणरहित असून, प्रवेशद्वारानजिकचे चारहि स्तंभ सभागृहातील मुख्य स्तंभाहून वेगवेगळ्या धर्तीचे आहेत.

**छत**—या मंदिराच्या उभट आकाराच्या छतामुळे त्याचा आकृतिबंध अधिकच उभट बनला असून, या छताच्या तुळया चैत्यमंदिराच्या रचनाकालीच बसविल्या आहेत. त्यावरून तत्कालीन काष्ठमय छताचे अनुकरण येथे अभिप्रेत दिसते.

**स्तूप**—या मंदिरातील दुमजली व्यासपीठाधारित नक्षीकामविरहित स्तूपाच्या शिरोभागी दगडी हर्मिका आणि लाकडी छत्रावलीचे अवशेष असून, व्यासपीठाच्या दर्शनी भागी वेदिकाशिल्प कोरले आहे. वेदिकाशिल्पाच्या तळाशी पूर्वी लाकडी नक्षीकाम बसविले असावे. त्याची छिद्रे केवळ आज दिसतात.

**प्रवेशद्वार**—भाजे आणि कोंडाणे येथील उघड्याबोडक्या प्रवेशद्वाराच्या तुलनेने कार्ले चैत्यमंदिराचे तीन

पाख्यांचे कमानीयुक्त प्रवेशद्वार वैशिष्ट्यपूर्ण आहे. त्याचा मधला दरवाजा मुख्य सभामंडपाकडे, आणि उभय बाजूंचे दोन छोटे दरवाजे प्रदक्षिणापथांकडे जातात. प्रवेशद्वाराच्या शिरोभागी वेदिकाशिल्प, वादकगृहाचा सज्जा, आणि भाजे, बेडसा, नासिक चैत्यमंदिरांसदृश अश्वनालाकृती गवाक्ष आहे. या गवाक्षाच्या लाकडी तुळया आणि तक्तपोशी गुफारचनाकालीन असून, चैत्य मंदिराच्या दर्शनी भागातील चैत्यगवाक्ष प्रतिकृतीमध्ये हे लाकूडकाम स्पष्टपणे दिसते. मेहरौली येथील निष्कलंक लोहस्तंभांप्रमाणेच हजारो वर्षांचे हे लाकूडकाम एक स्थापत्यशास्त्रीय चमत्कार मानला जातो.

येथील प्रवेशद्वाराच्या कमानीत काष्ठसदृश जाळीऐवजी शिल्पचित्र कोरले असून, उत्तरकालीन चैत्यमंदिरांत त्याचे पुनःपुन्हा अनुकरण आढळते.

प्रवेशद्वाराच्या दरम्यानच्या भागात चैत्यमंदिराच्या आठ देणगीदात्यांची सपत्नीक शिल्पचित्रे असून, त्यानजिकच्या आंध्र राजा पुळुमायी-राज्यकालीन ( स. १५० ) शिलालेखावरून ती त्या काळातील असावीत. कलात्मक परंतु नवथर शैलीच्या या शिल्पातील व्यक्ती विनम्र आणि धीरगंभीर असून, त्यानजिकच्या बुद्धप्रतिमा उत्तरकालीन आहेत.

**उपसभामंडप**—प्रवेशद्वाराच्या बहिर्भागात रुंदट आकाराचा अष्टकोनी स्तंभद्वययुक्त उपसभामंडप ( १५′×५२′ ) असून, त्याच्या शिरोभागीचा लाकडी सज्जा आज नष्ट झाला आहे. त्याचे चार बुटके स्तंभ केवळ आज शिल्लक आहेत. त्यामधून अंतर्भागातील चैत्यगवाक्षास प्रकाश मिळतो. रचनादृष्ट्या बेडसा आणि कृष्णगिरि चैत्यमंदिरांसदृश अशा या उपसभामंडपाच्या बाजूच्या भिंतींवर अनेक मजली चैत्यगवाक्षयुक्त घराचा दर्शनी भाग आणि हस्तिमालिका कोरली आहे. लाकडी सज्जा सुस्थितीत असताना या मंदिराचा दर्शनी भाग त्याच्या अंतर्भागाप्रमाणेच सर्वांगसुंदर दिसत असावा.

**सिंहप्रतिमायुक्त स्तंभ**—चैत्यमंदिराच्या अंगणात पूर्वकाली दगडी वेदिका, आणि धर्मचक्रधारी सिंहशिरोभूषणयुक्त दोन दगडी वेदिकास्तंभ असावेत. त्यापैकी कासिया येथील अशोकस्तंभासदृश एक चतुःसिंहप्रतिमायुक्त षोडशकोनी स्तंभ आजहि सुस्थितीत असून, त्यामधील सिंहाच्या पाठीवर पूर्वकाली बौद्ध धर्मचक्र असावे. येथील द्वितीय वेदिकास्तंभ आज नष्ट झाला असून, त्या जागी सध्या एकवीरा देवीचे मंदिर आहे. ते या भागातील सुविख्यात देवीपीठ आहे ( ती. पृ. ४४३ ).

**बौद्ध विहार**—कार्ले चैत्यमंदिराशी समकालीन असे एकूण चार नक्षीकामविरहित दुमजली अथवा तिमजली विहार येथे असून, उत्तरकालीन परिवर्तनामुळे त्यांचे मूळ स्वरूप आज नष्ट झाले आहे. त्यांची संक्षिप्त माहिती खाली दिली आहे :—

**( १ ) गुफा क्र. १ आणि २**—या तीन मजली विहाराच्या तिसऱ्या मजल्यावर चतुःस्तंभयुक्त बाह्यमंडप, तसेच एक राजपीठ आणि पाच छोटया खोल्या आहेत.

**( २ ) गुफा क्र. ३**—हा दोन मजली विहार आहे.

**( ३ ) गुफा क्र. ४**—चैत्यमंदिराच्या दक्षिणेकडील या विहारात गौतमीपुत्र पुळुमायीच्या राज्यकालातील एक दानलेख आहे ( एपि. इंडि. ६.४७ ).

**शिलालेख**—या गुफेच्या प्रवेशद्वारातील गुफालेख क्र. २ मतें है चैत्यमंदिर ( सेलघर ) वैजयंती ( वेजयंती ) गावाच्या भू पाल नामक श्रेष्ठीने ( सेतथी ) दान दिले असून ( ल्यूडर्स सूची. क्र. १०८७ ), गुफेसमोरी सिंहस्तंभावरील गुफालेख क्र. ३ मते हा स्तंभ ( सीहथभ ) गोतिपुत्र महारथी अग्निमित्रणकने दान दिला होता ( ल्यूडर्स सूची. क्र. १०८८ ).

येथील अन्य प्रमुख गुफालेख पुढीलप्रमाणे होत ( परिपत्रक पहा ).

**कार्वन** ( देवमंदिरस्थान )—गुजरातमधील प्रतिहार स्थापत्यशैलीचे ( इ. स. ९ वे शतक ) हिंदु देवमंदिरस्थान ( गोएट्झ, पृ. १४७ ).

**कार्षापण** ( लोकसमूह )—पाणिनीच्या गणपाठमते वायव्य भारतातील अशनि लोकसमूहानजिकचा एक आयुधजीवी संघ (पा. सू. ५.३.११७). अग्रवाल यांच्या मते वायव्य सरहद्द प्रांतातील आधु. कार्वुन आणि शिनवारी पठाण लोकसमूहद्वय हेच होत ( इंपि. गॅझे. वायव्य भारतप्र. ७९). त्यापैकी शिनवारी लोक आजहि गोपूजक आणि मूर्तिपूजक असून, पडद्याची चाल ते पाळीत नाहीत ( अफगणिस्तान गॅझेट. पृ. ४९; अग्रवाल, पाणिनि. पृ. ४६२ ).

**कार्ष्यवण** ( वन )— पाणिनीच्या अष्टाध्यायीमते भारतवर्षातील एक वन ( पा. सू. ८.४.५ ). ' वण ' ( वन ) अंत्यशब्दयुक्त संज्ञेचे उदाहरण म्हणून याचा निर्देश तेथे आढळतो ( अग्रवाल, पाणिनि. पृ. ४९ ).

**काल** ( पर्वत )—वायुमते केतुमाल द्वीपातील ' कंक ' पर्वताचे नामांतर ( वायु. ३७.२७; कंक २. पहा )

२. वाल्मीकि रामायण, तसेच महाभारत लोमशयात्रामते उत्तर भारतातील एक पवित्र पर्वत्र ( वा. रा. कि.

## कार्ले येथील प्रमुख गुफालेख

| गुफालेख क्र. | देणगीदार | देणगी |
|---|---|---|
| ४ | बौद्ध भिक्षु इंद्रदेव | दर्शनी भागीची वेदिका आणि हत्तीप्रतिमा |
| ५ | 'धेनुकाकट' निवासी सिंहदत्त नामक सुगंधी | चैत्यमंदिराचे प्रवेशद्वार ( घरमुख ) |
| ६ | भायिला नामक गृहस्था स्त्री | देणगी |
| ७ | 'धेनुकाकट' निवासी श्यामिल नामक सुतार | प्रवेशद्वाराचे दरवाजे |
| ८ | 'धेनुकाकट' निवासी सिहधय ( सिंहध्वज ) नामक यवन | चैत्यमंदिरातील स्तंभ |
| ९–१० | 'सोपारक' निवासी स्वातिमित्र नामक बौद्ध आचार्य | " " |
| ११ | 'धेनुकाकट' निवासी धर्म नामक यवन | देणगी |
| १२ | 'धेनुकाटक' निवासी उषवदातपुत्र मित्रदेवणक | चैत्यमंदिरातील स्तंभ |
| १३ | आषाढमित्रा नामक भिक्षुणी | " " |
| १४ | महाक्षत्रप नहपानाचा जामात उषवदात | 'वल्लूरक' निवासी बौद्ध भिक्षूंना करजिक ग्रामाची देणगी |
| १५ | 'ओखळक' देशीय महारथी सोमदेव | 'वल्लूरक' निवासी बौद्ध भिक्षूंना ग्रामदान |
| १६–१७ | भद्रशर्मन् नामक बौद्ध भिक्षु | चैत्यमंदिरातील दोन मूर्ती |
| १८ | ...नामक श्रमणाची माता | चैत्यमंदिराची वेदिका |
| १९ | घुणिकामाता कोडी नामक बौद्ध भिक्षुणी | " " |
| २१ | 'अबुलामा' निवासी हरफरण नामक महासांधिक | नऊ खोल्यांचा विहार |
| २२ | ...नामक भदंताची शिष्या | विहार |
| | | ( ल्यूडर्स सूची. क्र. १०८७–११०७ ) |

१३.१५; म. आर. १४०.१ ). नामांतर–'कालशैल.'

३. आकाशगामी रावणाने उल्लंघिलेला लंकेतील एक पर्वत ( म. आर. २६१.५३ ).

४. महाभारतमते कृष्णार्जुनांनी उल्लंघिलेला कैलास पर्वताच्या मार्गावरील एक पर्वत ( म. द्रो. ५७.२७ ).

**कालकवन** ( वन )—पतंजलीचे व्याकरण महाभाष्य, तसेच बौधायन धर्मसूत्रमते आर्यावर्ताच्या पश्चिम सरहद्दीवरील एक सीमावर्ती वन ( पतञ्जलि १.४७५; ३.१७४; बौ. ध. १.१.२.१० ). मगधराज जरासंधाचा कालयवन नामक असुर मित्र येथे रहात असे. बिहारमधील धर्मारण्याच्या पूर्ववर्ती आणि दक्षिण मगधाच्या पश्चिमवर्ती आधु. बक्सर प्रदेश हाच असावा.

**नामव्युत्पत्ती**—'कालयवन राक्षसाचे वन' अशा अर्थाने यास हे नाव पडले असावे. या ( प्राच्य मगध ) प्रदेशास पतंजलीनेहि अनार्य देश मानले आहे ( ऐतरेय समालोचना. पृ. ४५ ). अन्य अभ्यासकांच्या मते हे 'ताडकवन'चे अपभ्रष्ट रूप असावे.

**पाली साहित्यात**—या साहित्यमते हे साकेत नगरात समाविष्ट होते ( अग्रवाल, पाणिनि. पृ. ४३ ).

२. ( देश व लोक ) बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या नैर्ऋत्य भागातील एक देश ( बृ. सं. १४. १९ ).

**कालका** ( काली देवीस्थान )—पंजाबातील अंबाल्यापासून ४० मैलांवरील एक काली देवीस्थान. हे 'कालिका'चे अपभ्रष्ट रूप असून, स्थानिक आख्यायिकामते कौशिकी देवीच्या बहिर्निष्क्रमणाने कृष्णवर्णीय बनलेले पार्वतीचे शरीर येथे काली देवीच्या रूपाने स्थिरावले ( ती. पृ. ६८ ).

**कालकाराम** ( बौद्ध मठ )—कालक नामक श्रेष्ठीने बुद्धनिवासार्थ अर्पिलेला साकेत येथील एक बुद्धवास्तव्यपुनीत बौद्ध मठ ( धम्मपद. अट्ठ. ३.४६५; अङ्गुत्तर. अट्ठ. २.४८२ ).

**कालकूट** ( देश )—महाभारतमते उत्तर भारतातील 'कलकूट' देशाचे नामांतर ( म. स. २०.२४; कलकूट पहा ).

२. (पर्वत) कुरु–मगध मार्गावरील कल्कूट जनपदातील एक पर्वत (म. स. १८.२६; कल्कूट पहा).

३. शतशृंगगामी पांडु राजाने उल्लंघिलेला हिमालयातील एक पर्वत (म. आ. ११०. ४३).

**कालकेश** (लिंग)—काशी येथील एक साक्षात्कारी शिवलिंग (स्कन्द. काशी. ९७.२०९).

**कालकेशव** (तीर्थ)—वाराणसी येथील एक विष्णुस्थान (कूर्म. पूर्व. ३५.७).

**कालकेश्वर** (शिवलिंग)—वाराणसी येथील एक शिवलिंग (कूर्म. पूर्व. ३५.७). नामांतर– 'कलशेश्वर'.

**कालकोटि** (देश)—बृहत्संहितामते भारतवर्षातील 'कल्कूट' देशाचे नामांतर. अन्य नामांतर– 'कलकोटिस' (बृ. सं. १४.४; मार्क. ५५.८; कल्कूट पहा).

२. (तीर्थ) नैमिषारण्यातील एक तीर्थ (म. आर. ९३.४). नामांतर– 'वालकोटि'.

**कालगङ्गा** (तीर्थ)—काशी येथील ताम्रवराहानजिकचे एक तीर्थ (स्कन्द. काशी. ८४.६७).

**कालगम्** (द्वीप)—तामीळ शिलालेख साहित्यमते भारतवर्षाच्या नव खंडांपैकी 'कटाह द्वीपा'चे नामांतर (कटाह द्वीप पहा).

**कालचम्पा** (नगर)—बौद्ध साहित्यमते पूर्व भारतातील 'चंपापुरी' नगराचे नामांतर (जा. ६.३२; चंपापुरी पहा).

**कालञ्जर** (तीर्थ व पर्वतीय दुर्ग)--मध्य प्रदेशातील सुविख्यात शिवतीर्थ आणि बुंदेलखंडसम्राट चंदेल राजवंशाच्या उत्तरकालीन (इ. स. ९ – १३ वे शतक) राजधानीचा पर्वतीय दुर्ग (एपि. इंडि. १.२१७; ४.१५३; प्रारंभीच्या राजधान्या– खर्जुराहक = आधु. खजुराहो; महोदयनगर = आधु. महोबा). स. ११८२ मध्ये दिल्लीसम्राट पृथ्वीराज चौहानद्वारा पराभूत झाल्यानंतर चंदेल राजांनी आपली राजधानीया स्थानी कायमची हलविली.

मध्य प्रदेशातील गिर्वान तहसिलीतील बांदा जिल्ह्यातील माणिकपुर-झांसी रेलमार्गावरील बदौस रेल्वेस्थानकापासून १८ मैलांवरील आधु. कालिंजर गावानजिक हा दुर्ग आहे (अक्षांश २५°–१′ उत्तर; रेखांश ८०°–२०′ पूर्व). मध्यप्रदेशातील गोप (आधु. ग्वाल्हेर), चुनार आणि रोहता टेकड्यांप्रमाणेच पश्चिम आणि पूर्व भारताच्या सीमारेषेवरील ही टेकडी या उभय प्रदेशांवरील राजकीय आणि लष्करी नियंत्रणाच्या दृष्टीने महत्त्वाची असून, तिच्या प्राप्त्यर्थ शतकानुशतके युद्धे झालेली दिसतात.

या टेकडीच्या (समुद्रसपाटीपासून उंची– १२३०′; सरासरी उंची–७००′) माथ्यावरील पठारावर (व्याप्ती– ५ मैल) सात तटांच्या अंतर्भागात येथील दुर्ग (व्याप्ती–४ मैल) बांधला आहे. या दुर्गाप्रत जात असता अनेक देवता, कुंडे, गुफा, तसेच शिलालेख आढळतात.

**शिवतीर्थ**—ही टेकडी मध्यप्रदेशातील प्राचीनतम शिवतीर्थ आणि शैव धर्मप्रसाराचे आद्य पीठ असून, तत्रस्थ 'नीलकंठेश्वर' शिवमंदिर आजहि मध्यप्रदेशातील प्रमुख यात्रास्थान आहे. विपुल जलाशय आणि सुरम्य एकांतामुळे हे पूर्वापार शैव तापसांचे आवडते तपस्यास्थान बनले आहे. प्रतिहार (इ. स. ९ वे शतक), कल्चुरि–चंदेल (इ. स. ११–१३ वे शतक) स्थापत्यशैलीची खर्जुराहक (आधु. खजुराहो) आणि सुर्वय गावांसदृश अनेक छोटेखानी, परंतु कलात्मक मंदिरे येथे आढळतात.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या पर्वताची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पौराणिक साहित्य | |
| अ. सत्ययुग | **रत्नकूट** |
| आ. त्रेतायुग | **महागिरि** |
| इ. द्वापरयुग | **पिंगल** |
| २. अन्य पौराणिक साहित्य | **तपस्यास्थान** |
| ३. बृहत्संहिता (१४.११) | **कालाजिन** |
| ४. शिलालेख साहित्य | **कालंजन** |
| ५. खजुराहो शिलालेख (एपि. इंडि. ३१.३११) | **कलंजराद्रि** |
| ६. अन्य नामांतर (डे, पृ. ८४) | **रविचित्र** |
| ७. फरिश्ता, ब्रिग्ज अनुवाद (१.१८९;१९) | **कलुंजुर** |

**नामव्युत्पत्ती**—'कालप्रवाह–नियंत्रणाने मनुष्यमात्रामध्ये जरानिर्मिती करणाऱ्या कालंजर शिवाचे निवासस्थान' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले.

**बृहत्संहितेत**—फ्लीट यांच्या मते या ग्रंथातील 'कालाजिन्' हा दक्षिण भारतीय लोकसमूह आणि नगर (बृ. सं. १४.११) हेच होय.

**महाभारतात**—या ग्रंथमते विंध्य पर्वतान्तर्गत सर्वाधिक बलिष्ठ भागातील या पर्वतात 'हिरण्यबिंदु', 'अगस्त्या-

श्रम ', ' कोटि तीर्थ ' आदि तीर्थे असून ( म. आर. ८३. ३;८५.१५ ), येथील ' देवहृद ' नामक पवित्र सरोवरात स्नान केल्याने सहस्र गोप्रदानाचे पुण्य लाभत असे ( म. आर. ८३.३ पद्म. आदि. ३९.५२–५३ ). पुलस्त्ययात्रेत ( ( म. आर. ८३.५३-५४ ), तसेच अंगिरस्यात्रेत ( म. अनु. २५.३५ ) एक पवित्र पर्वत म्हणून याचा निर्देश आढळतो.

**पौराणिक साहित्यात**—पद्ममते उत्तर भारतातील नऊ पवित्र तीर्थांमध्ये याचा समावेश असून ( पद्म. आदि. ३९ ५३ ), वायुमते या टेकडीवर ( वायु. ७७.९३ ) माहेश्वराचे ( वायु. २३.२०४ ), आणि वामनमते नीलकंठ शिवाचे देवालय होते ( वामन. ९४ ). कालांतराने येथील शिवलिंग काशी येथे स्थलांतरित झाले ( स्कन्द. काशी. ६९.६० ). तीर्थविवेचनातहि या शिवस्थानाचा निर्देश आढळतो ( तीर्थविवेचन. पृ. २४१ ).

**ऐन्-इ-अकबरीमध्ये**—या ग्रंथमते येथील गगनचुंबी दगडी किल्ल्याच्या अंतर्भागात बरीच देवालये असून, त्यामधील कालभैरवप्रतिमेसंबंधी (उंची-१८ क्युबिट) अनेक चमत्कृतिपूर्ण आख्यायिका प्रचलित होत्या. किल्ल्यामध्ये अनेक जिवंत झरे आणि कृत्रिम तलाव होते.

**मध्ययुगीन काली**—पांडुवंशीय उदयन राजाच्या कालंजर शिलालेखमते ( इ. स. ५ वे शतक ) तो या दुर्गाचा अधिराज असून, राष्ट्रकूट राजा कृष्ण ( तृतीय ) च्या शिलालेखमते आपल्या बुंदेलखंडाच्या स्वारीसमयी त्याने कालंजर आणि चित्रकूट किल्ले जिंकले होते. प्रतिहार राजा नागभट्ट ( द्वितीय ) च्या साम्राज्यात राजस्थान, सौराष्ट्र, ग्वाल्हेर, कनौज, तसेच कालंजर दुर्गाचा समावेश होत असे. प्रतिहार राजा भोजच्या स. ८३६ च्या वराह ताम्रपटमते कान्यकुब्ज भुक्तीमधील ' कलंजर मंडल ' त्याच्या राज्यात समाविष्ट होते ( एपि. इंडि. १९.१५ ).

स. ९५४ च्या सुमारास चंदेल राजांनी गुर्जर प्रतिहार राजांकडून हा दुर्ग जिंकून स्वतंत्र राज्याची स्थापना केली. गुर्जर प्रतिहारांच्या या मांडलिक राजांची प्रारंभीची ( इ. स. ९ वे शतक ) राजधानी खर्जुराहक ( आधु. खजुराहो ) गावी असून, जयशक्ति ( जेजक ) राजाच्या नावावरून त्यांचे राज्य ' जेजाकभुक्ति ' ( आधु. बुंदेलखंड ) नावाने ओळखले जात असे. शिलालेख साहित्यमते चंदेलवंशीय यशोवर्मन्‌ने स. ९५४ मध्ये प्रतिहार राजांविरुद्ध बंड करून ' कलंजराद्रि ' येथे आपली राजधानी हलविली ( एपि. इंडि. ३१.३११ ). यशोवर्मन्‌पुत्र धंगच्या वि. सं. १०११ च्या शिलालेखमते त्याच्या पित्याने स. ९३५ मध्ये हा दुर्ग राष्ट्रकूट राजा कृष्ण ( तृतीय ) कडून जिंकून घेतला ( एपि. इंडि. २९. २५ ). यावरून इ. स. १० व्या शतकात प्रतिहार, राष्ट्रकूट आणि चंदेल राजांमध्ये या दुर्गाच्या प्राप्त्यर्थ सदैव युद्धे चालू असावीत. यशोवर्मन्‌पुत्र धंगच्या शिलालेखमते त्याच्या राज्यात कालंजर, भस्वत् ( आधु. भिल्सा ) आणि गोप प्रदेशांचा समावेश होत असे.

**फरिश्ताच्या ग्रंथात**—या ग्रंथमते ' कलुंजर ' प्रदेशातील या डोंगरी दुर्गाची स्थापना केदारनाथाने केली असून, इ. स. ११ व्या शतकात कालंजर, दिल्ली आणि अजमेरच्या राजांनी मुसलमानी आक्रमणाच्या प्रतिकारार्थ मध्यप्रदेशातील शक क्षत्रपांशी तह केला होता. स. १०१९–१०२१ च्या दरम्यान गझनीच्या मुहंमदाने या किल्ल्यास लागोपाठ तीन वेळा घातलेले वेढे चंदेल राजा विद्याधराने परतवून लावले ( ब्रिग्ज, फरिश्ता. १.१८९ ). स. १०९० मध्ये पंजाबच्या मुहंमद सुभेदाराने यावर केलेला हल्लाहि चंदेल राजा कीर्तिवर्मन्‌ने परतवून लावला. उत्तरकालात दिल्लीच्या कुतुबुद्दीन ऐबकने येथे नेमलेल्या हजब्बरउद्दीन नामक सुभेदारासहि चंदेल राजा त्रैलोक्यवर्मन्‌ने पळवून लावले.

स. ११८२ मध्ये दिल्लीसम्राट पृथ्वीराज चौहानकृत पराजयानंतर चंदेल राजा परमर्दीने आपली राजधानी महोदय ( आधु. महोबा ) नगराहून पुन्हा एकवार कालंजर येथे हलविली. त्या राजाच्या वत्सराज नामक अमात्याने सहा संस्कृत नाट्यप्रकारांच्या प्रतिनिधिस्वरूप सहा नाटके लिहिली.

स. १२४७ मधील नझीरउद्दीन मुहंमदच्या हल्ल्याला तोंड देत कित्येक वर्षेपर्यंत हा दुर्ग चंदेलांच्या ताब्यात राहिला. स. १५३० मध्ये हुमायूनने दीर्घकाल वेढा घालून हा जिंकला. अकबराच्या राज्यकाली बिरबलाच्या जहागिरीमध्ये याचा समावेश होत असे. स. १८६६ मध्ये ब्रिटिशांनी या किल्ल्याची संरक्षक तटबंदी नष्ट केली.

**मंदिरे**—या किल्ल्यातील प्रमुख मंदिरे पुढीलप्रमाणे होत :—

( १ ) **नीलकंठ महादेव**—चंदेल राजा परमल ब्रह्मनिर्मित ( इ. स. १२ वे शतक ) या गुफामंदिरात शिवाची विशाल प्रतिमा ( उंची–४' ) असून, तिच्या स्तुतीपर उत्तरकालीन ( इ. स. १६ वे शतक ) शिलालेख येथे आढळतात.

( २ ) कालभैरव—ही अष्टादश भुजायुक्त नररुंड-मालाधारी कालभैरवप्रतिमा चंदेल राज्यकालीन आहे ( अर्कि. सर्व्हे. रिपोर्ट. २१ ).

( ३ ) कोटीतीर्थ—चंदेल राजवंशस्थापक चंद्रवर्मनने याची स्थापना केली.

( ४ ) सीतासेज—कालंजर दुर्गाच्या सातव्या प्रवेशद्वारा-नजिकचे हे स्थान सीतेचे विश्रामस्थान म्हणून पवित्र मानतात.

अन्य तीर्थे—या पर्वतावर निम्नलिखित अन्य तीर्थेहि आढळतात :—१. पाताल गंगा; २. पांडु कुंड; ३. बुद्धि तलाव; ४. सिद्ध–की–गुफा; ५. पानी–की–अयन; ६. मृगधारा; ७. कुंभ तीर्थ.

२. गया येथील एक पवित्र पर्वत ( अग्नि. १५७.५६ ).

३. मथुरा येथील एक पवित्र पर्वत ( वराह. १७५.७ ).

४. कालिंदी नदीकाठचा एक पवित्र पर्वत ( पद्म. उत्तर. १९६.१४. ).

५. ( विष्णुतीर्थ ) पद्ममते एक पवित्र तीर्थ. येथील विष्णूचे नाव पैन्य होते ( पद्म. उत्तर. १२९.१३ ).

६. शिवमते तेविसाव्या श्वेत नामक शिवाचे अवतार-स्थान ( शिव. शत. ५.३३; वायु. २३; शिव. वायु. ९; लिङ्ग. ७ ).

७. पद्ममते एक पवित्र पर्वत. येथील 'वाराणसी तीर्था'त सोमवती अमावास्येस स्नान मोक्षप्रद मानले जात असे ( पद्म. भूमि. ९१.९२ ).

८. जंबूद्वीपान्तर्गत एक पर्वत. ब्रह्ममते हा मेरु पर्वताच्या उत्तरेकडील केसर पर्वत होता ( ब्रह्म. १८,३६; भा. ५.१६ २६; विष्णु. २.२.२८ ).

९. पूर्व भारतातील एक पर्वत. महाभारत धौम्ययात्रेतील अगस्त्य पर्वत ( म. आर. ८५.१३ ) हा याचाच उपपर्वत होता ( अगस्त्य–आश्रम १. पहा ).

१०. जंबूद्वीपान्तर्गत ( देश ) सप्तगंगांपैकी पूर्ववाहिनी ह्लादिनी नदीच्या मार्गावरील एक देश (मत्स्य. १२१.५४).

११. ( देश ) गृहस्थ रत्नाकरमते काश्मीरातील एक डोंगराळ प्रदेश ( गृ. २. ७.१२५६ ).

१२. ( वन ) मत्स्यमते एक वन ( मत्स्य. १८१.२७ ).

**कालञ्जर तीर्थ** ( तीर्थ )—तीर्थकल्पतरुमते एक आयतन तीर्थ ( देवल. पृ. २५० ).

२. श्वेत नामक राजर्षीने शतरुद्रीय मंत्राचा जप केलेले वाराणसी येथील एक तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.१२; पद्म. आदि. ३७.१५ ).

३. गौतमी ( गोदावरी ) नदीकाठचे एक शिवस्थान ( ब्रह्म. १४६.१; ४३ ). नामांतर ( ब्रह्म पुराण )–'यायात तीर्थ.'

४. नर्मदा नदीच्या उगमानजिकचे एक तीर्थ. यामुळेच येथील शिवालयास 'कालंजर,' आणि नर्मदा नदीस 'कालिंजरी' नाव प्राप्त झाले ( तीर्थसार. पृ. ९८ ).

५. वराहमते मथुरा येथील एक तीर्थ. नामांतर–'कालिंजर' ( वराह. १७६.१८ ).

६. प्रह्लाद–तीर्थयात्रा, तसेच अन्य पौराणिक साहित्य-मते एक श्राद्धयोग्य तीर्थ ( वामन. ८४.२८; पद्म. आदि. ११.१७; अग्नि. १०९.२३; कूर्म. उत्तर. ३६.११; ३८).

७. ( देवीस्थान ) पद्ममते एक देवीतीर्थ. येथील देवीचे नाव काली होते ( पद्म. आदि. १७.१९६; मत्स्य. १३.३२ ).

**कालजोषक** ( देश )— महाभारतमते उदीच्य देशान्तर्गत 'कालतोयक' जनपदाचे नामांतर ( म. भी. १०.६१; कालतोयक पहा ).

**कालटी** ( शंकराचार्य–जन्मस्थान )—केरळ प्रांतातील पेरियार ( पूर्णा ) नदीकाठचे आद्य शंकराचार्य-जन्मस्थान. येथे श्रीशंकराचार्य आणि त्यांची माता, तसेच श्रीकृष्ण यांची मंदिरे आहेत ( ती. पृ. ३२२ ).

**शारदांबा मंदिर**— स्थानिक आख्यायिकामते या गावानजिकची पूर्णा नदी शंकराचार्यांनी स्वमातेच्या सोयी-साठी समीप आणली. काश्मीरातील शारदांबेच्या मंदिराच्या चतुर्द्वारांपैकी दक्षिणद्वार शंकराचार्यांच्या काली बंद होते. हा दक्षिण दिशावर्ती धर्मप्रचाराचा कौल मानून शंकराचार्यांनी या गावी शारदांबा– उपासनेचा प्रचार प्रारंभिला. येथील शारदांबा मंदिर या उपासनेचे प्रतीक होय.

**कालतीर्थ** ( तीर्थ )— वाराणसी येथील एक तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.२ ).

२. महाभारत पुलस्त्ययात्रामते कोशला ( अयोध्या ) गावचे एक तीर्थ ( म. आर. ८३.११; पद्म. आदि. ३९.११ ).

**कालतोयक** ( देश ) —पौराणिक साहित्यमते उदीच्य देशान्तर्गत सिंधु नदीच्या पश्चिमेकडील एक पर्वतीय जनपद ( ब्रह्माण्ड. १६.४६; मत्स्य. ११४.४०; मार्कं. ५४.३५; वायु. ४५.११५; वामन. १३.३७; पद्म. आदि. ६.४२; म. भी. १०.४५ ). पाठभेद (म. भी. १०.६१)–'कालजोषक'; ( वामन. १३.३७ )– 'कालतोयद'.

अली यांच्या मते बलुचिस्तानमधील मुल्ल नदीच्या खोऱ्यातील आधु. कलान् हा पर्वतवेष्टित प्रदेश हाच होय

(अली, पुराणाज्. पृ. १४१).

पार्गिटरच्या मते येथे 'बालकाथिक' या संयुक्त लोकसमूहाचा निर्देश अभिप्रेत असून, त्यापैकी 'बाल' लोक उत्तर सिंधमध्ये, आणि 'काथि' लोक चिनाब आणि रावी नद्यांच्या दरम्यानच्या रेच्ना दुआबात निवास करीत असत (पार्गि. ३१३; बाल; काथि पहा).

**कालद** (देश)— दक्षिण भारतातील एक देश (पद्म. आदि. ६.५८; म. भी. १०.६१).

**कालदर्रा** (नदी)—वायव्य भारतातील स. २९ च्या कालदर्रा खरोष्ठी शिलालेखाचे उपलब्धिस्थान, एक नदी. हिच्या मलकंद खिंडीच्या दक्षिणेकडील दरगई गावानजिकच्या पात्रात सापडलेल्या या तीन ओळींच्या शिलालेखात (२७″ × ९″) दतियवंशीय थिओडोरने प्राणिमात्रांच्या (सर्वसपण = सर्व सत्त्वानाम्) पुण्यप्राप्त्यर्थ एक तलाव (पुकरणी) खोदल्याचा निर्देश आढळतो. या शिलालेखाचा दगड सध्या लाहोर म्युझियममध्ये आहे (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.६६).

**कालनगर** (नगर)—कूर्ममते 'आनंदपुर' नगराचे नामांतर (कूर्म. उ. ३५.५०; आनंदपुर पहा).

**कालपिनाक** (ग्राम)—नालंदा मुद्रालेखमते बिहारमधील पाटना जिल्ह्यातील एक ग्राम (अर्कि. सर्व्हे. ६६.४३). याचे आधुनिक स्थान समजत नाही (पांडे, बिहार. पृ. १५५).

**कालप्रिय** (उपनगर)—काव्यमीमांसामते कान्यकुब्ज नगराच्या दक्षिणेकडील एक उपनगर (काव्यमी. १७.२१८). येथील 'कालप्रियनाथ' (कालप्रियानाथ) च्या मंदिरावरून यास हे नाव प्राप्त झाले असून, यशोवर्मन् (स. ७२५–७५२) राजाच्या दरबारातील भवभूति कवीची नाटके त्या मंदिरात होत असत. भवभूतीच्या 'महावीरचरित' आदि नाटकांच्या नांदीमध्ये या देवतेचे वंदन असून, भाष्यकार वीरराघवमते हे शिवाचे (अंबिकापति) नाव होय. कनौजच्या दक्षिणेकडील भवभूतीचे जन्मग्रामस्वरूप पद्मपुर गाव हेच असावे.

२. (मंदिरस्थान) उत्तर प्रदेशातील सुविख्यात देवमंदिर आणि व्यासाश्रमस्थान. जलान जिल्ह्यातील यमुना नदीच्या दक्षिण किनाऱ्यावरील कानपुर-सागर रस्त्यावरील आधु. काल्पी गाव हेच होय (अक्षांश २६°–८′ उत्तर; रेखांश ७९°–४५′ पूर्व). येथील कालप्रियनाथाचे मंदिर प्रसिद्ध असून, स्थानिक परंपरामते येथे व्यास ऋषींचा आश्रम होता.

स्थापना—फरिश्ताच्या ग्रंथमते बहराम घोर राजाच्या समकालीन कनौजसम्राट वासुदेवाने हे नगर स्थापिले. स्थानिक आख्यायिकामते कलिवदेव नामक प्राचीन राजाने हे स्थापिले.

व्यास-जन्मस्थान—या गावानजिकच्या यमुना नदीतील एका द्वीपामध्ये द्वैपायन व्यास ऋषींचा जन्म झाला असून, स्थानिक आख्यायिकामते येथील जौंधर नाल्यानजिकच्या व्यास टेकडीवर व्यास ऋषींचा आश्रम होता. सध्या तेथे व्यास ऋषींचे मंदिर असून, स्थानिक आख्यायिकामते नजिकच्या नृसिंह टेकडीवर प्रह्लादरक्षक नृसिंहाचा अवतार झाला होता (ती. पृ. ११३).

**कालभीतिक्षेत्र** (तीर्थ)— स्कंदमते महाकालक्षेत्र 'उज्जयिनी' नगराचे नामांतर (स्कन्द. माहेश्वर. कौ. ४०; उज्जयिनी पहा).

**कालभैरव** (भैरव)—वाराणसी येथील कपालमोचन तीर्थ नजिकचे भैरवस्थान (स्कन्द. काशी. ३१.३९–४०; ३३.११४; ६१.१८६; लिङ्ग. १.९२.१३२). मार्गशीर्ष वद्य अष्टमीला येथे यात्रा भरते.

२. स्कंदमते अवंती येथील एक भैरवस्थान (स्कन्द. आवन्त्य. अ. ६४.४). उज्जैनपासून ३ मैलांवरील शिप्रा नदीवेष्टित आधु भैरवगड टेकडीवर हे कालभैरव मंदिरस्थान असून, भैरवाष्टमीला येथे यात्रा भरते (ती. पृ. २१५).

३. मध्य भारतातील धर्मपुरीपासून १३ मैलांवरील नर्मदा नदीकाठचे पर्वतीय भैरवगुफास्थान (ती. पृ. २३०).

४. (तीर्थ) प्रभासक्षेत्रातील स्मशानस्थान (स्कन्द. प्रभास. प्र. २०१).

**कालमाधव** (तीर्थ)—काशी येथील एक विष्णुस्थान (स्कन्द. काशी. ६१.१८६).

२. (शक्तिपीठ) तंत्रचूडामणिमते सतीचा वाम नितंब पडलेले एक शक्तिपीठ. येथील देवीचे नाव काली, आणि भैरवाचे नाव असितांग होते. याचे आधु. स्थान समजत नाही.

**कालमेघ** (तीर्थ)—वस्त्रापथक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ (स्कन्द. प्रभास. व. ३.६.१०; १६.१७).

२. प्रभासक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ (स्कन्द. प्रभास. प्र. ३३१).

३. (वैष्णवतीर्थ) दक्षिण भारतातील मदुरेपासून १ मैलावरील एक वैष्णवतीर्थ. येथे शेषशायी विष्णु आणि मोहिनी यांच्या मूर्ती आहेत (ती. पृ. २८६).

**कालय** (वसाहत)—जैन साहित्यमते उत्तर बिहार-

मधील वनीयगामनजिकची एक वसाहत (आवस्सक टीका. पृ. ४५६). बिहारमधील मुजफ्फरपुर जिल्ह्यातील वसई (प्राचीन वैशाली) गावानजिक ही असावी (पांडे, बिहार. पृ. १६८).

**कालराज** (लिंग)—काशी येथील एक शिवलिंग (स्कन्द. काशी. ३३.१६१).

**काललिङ्ग** (लिंग)—काशी येथील एक शिवलिंग (स्कन्द. काशी. ९७.२२१).

**कालवन** (वन) - अवंती येथील एक वन. येथील देवीचे नाव शीतला होते (नारद. उत्तर. ७८.१२;४६).

**कालविमल** (तीर्थ) — हरचरितचिंतामणिमते कश्मीरातील पाच प्रमुख तीर्थांपैकी एक (हरचरित. ४.८३).

**कालशिला** (देवीस्थान)—हिमालयान्तर्गत केदारनाथ–बद्रीनाथ मार्गावरील एक देवीस्थान. येथे विभिन्न देवींची चौसष्ट यंत्रे असून, स्थानिक आख्यायिकामते येथे देवप्रार्थित महाकाली रक्तबीज राक्षसाच्या वधार्थ अवतीर्ण झाली (ती. पृ. ५६).

**कालशैल** (पर्वत)—महाभारतमते हिमालयान्तर्गत उत्तराखंडातील 'काल' पर्वताचे नामांतर (म. आर. १४०.१; काल पर्वत २. पहा).

**कालसर्पिस्** (तीर्थ)—वायुमते 'कश्यप' तीर्थाचे नामांतर (वायु. ७७.८७; कश्यप १. पहा). पाठभेद– 'कालसर्पि'.

**कालहयजव** (देश)—स्कंदमते भरतखंडातील एक देश. यामध्ये १० हजार ग्रामे होती (स्कन्द. माहेश्वर. कौ. ३९.१४९).

**कालहस्ति** (शिवतीर्थ व नगर)—दक्षिण भारतान्तर्गत आंध्र प्रदेशातील (प्राचीन–'वडुगवलि'= पश्चिम आंध्रपथ) सुविख्यात वायुलिंगस्थान आणि प्रमुख नगर (सेवेल, इन्स्क्रि. पृ. ६४). दक्षिण भारतातील अन्य चार पंचमहाभूतात्मक लिंगे पुढीलप्रमाणे होतः—१. पृथ्वीलिंग–कांचीपुर; २. आपोलिंग (जललिंग)- जंबूकेश्वर; ३. तेजोलिंग–अरुणाचल; ४. आकाशलिंग–चिदंबरम्.

आंध्र प्रांतातील चित्तूर जिल्ह्यातील रेणुगुंठा– गुडुर रेलमार्गावरील श्रीपुरम् आणि मुम्मडिचोलपुरम् टेकड्यांच्या दरम्यानचे स्वर्णमुखी नदीकाठचे तिरुपतीपासून ३० मैलांवरील आधु. कालहस्ति गाव हेच होय. स्थानिक आख्यायिकामते हा मेरु पर्वताचा भाग (शेषशैल) असून, आदिशेष–वायुयुद्धात मेरु पर्वताच्या तीन खंडांपैकी एक येथे पडला (अन्य दोन शेषशैलस्थाने– तिरुचिरापल्ली= त्रिचनापल्ली; सिलोनमधील त्रिंकोमाली). अन्य एका आख्यायिकामते शिवपार्षद नंदिकेश्वराने पृथ्वीलोकी स्थापिलेल्या तीन कैलासशिखरांपैकी कालहस्ति टेकडी एक होय.

**नामव्युत्पत्ती** —'कालहस्ति'चा शब्दशः अर्थ 'वृश्चिक आणि हत्ती यांचे नगर' असून, येथील बाणवंशीय राजांच्या राजचिह्नांवरून यास हे नाव मिळाले असावे. स्थानिक आख्यायिकामते 'वृश्चिक ('श्री'), सर्प ('काल'), आणि हत्ती ('हस्ति') संज्ञक आद्य उपासकत्रय–उपासित शिवलिंग' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले असून, येथील संगमरवरी शिवलिंगावर सर्पफणा, हस्तिदंत आणि वृश्चिक यांची अस्पष्ट चिह्ने आजहि आढळतात.

**स्थानमाहात्म्य**--पश्चिमेस उत्तरवाहिनी स्वर्णमुखी नदी आणि अन्य तीन बाजूंस टेकड्यांनी वेष्टिलेल्या या प्रासादिक स्थानातील दक्षिणाभिमुख शिवमंदिरात पश्चिमाभिमुख शिवलिंग स्थापिले आहे. या गावाच्या उत्तरेकडील टेकडीवर दुर्गादेवीचे, तसेच दक्षिणेकडील टेकडीवर कालहस्तीश्वराला नेत्रार्पण करणाऱ्या कण्णप्प भिल्लाच्या स्मृत्यर्थ पाशुपतास्त्रप्राप्त अर्जुनाने स्थापिलेले 'कण्णवेश्वरा'चे मंदिर आहे. श्रीमत् शंकराचार्यकृत 'शिवानंद काव्य'मते स्वमुखी पर्वतीय जल धारण करून कण्णप्प प्रतिदिनी त्या जलाचा अभिषेक कालहस्तीश्वरास करीत असे (शिवानन्द. ६३).

**कालहस्तीश्वर मंदिर**—कालहस्ति टेकडीच्या (स्थानिक नाव–कैलासगिरि) पश्चिमेकडील पायथ्यानजिकच्या या मंदिराच्या प्रवेशद्वाराशी दोन गोपुरे असून, मंदिराच्या अंतर्मंडपातील तळघरात (उंची ३०′) पातालविनायक गणेश मंदिर, आणि मंदिराच्या आवारात शक्तिविनायक, कण्णप्प, तसेच शैव संतांच्या (नायनार) मूर्ती आहेत.

मंदिराच्या मुख्य प्रवेशद्वारानजिकच्या 'विक्षण गलिगोपुरम्'नजिक काशीविश्वनाथ आणि अन्नपूर्णा यांची पूर्वाभिमुख मंदिरे, तसेच मंदिराच्या अंतर्भागातील 'बल ज्ञानानंदगोपुरम्'च्या अंतर्भागात पातालगणपति आणि सूर्यनारायणाचे मंदिर आहे. मंदिराच्या पश्चिम प्रवेशद्वारानजिक सुब्रह्मण्य, सद्योमुक्ति गणपति मंदिरे, तसेच विजयनगरच्या कृष्णदेवरायनिर्मित सहस्रस्तंभीय सभामंडप आहे. मंदिराच्या दक्षिणेकडील कण्णप्प टेकडीच्या पायथ्याशी चतुर्मुख ब्रह्मदेवाचे मंदिर आहे.– मणिकांतेश्वर शिव–

मंदिराच्या आग्नेयेकडील 'मणिगण्णिस गहम्' गुफामंडप-स्थानी शिवाने एका वृद्ध स्त्रीला 'तारक मंत्र' सांगितला असून, आजहि आसन्नमरण रुग्णांना येथे आणून झोपवितात.

कालहस्तीश्वर मंदिराच्या एकाच्या आत एकातील प्रदक्षिणापथद्वयात कार्तिकेय, चित्रगुप्त, यमराज, धर्मराज, सूर्य, बालसुब्रह्मण्य, शनैश्वर, कालभैरव, भूतगणपति, शिव-परिवार आदींच्या मूर्ती आहेत. कालहस्तीश्वराच्या मुख्य दक्षिणाभिमुख मंदिरात दक्षिणामूर्ती शिवावतारस्वरूप शिवलिंग असून, गर्भागाराच्या प्रवेशद्वाराशी शिवभक्त कण्णप्पाची ( अथवा गांडीवधारी अर्जुनाची ) मूर्ती आहे. येथील शिवलिंग समोरून गजशुंडद्वयाकृती, आणि वरून पंचफडाधारी नागाकृती असून, त्याच्या तळाशी वृश्चिक-प्रतिमा कोरली आहे. गर्भागाराच्या भिंतींना खिडकी नसूनहि त्यामधील प्रकाशज्योती वायुतत्त्वलिंगाच्या आस्तित्वामुळे वायुझोताने फडफडल्याप्रमाणे भासते.

**मध्ययुगीन साहित्यात**— स्थानिक आख्यायिकामते येथे तीर्थयात्रेस्तव आलेल्या अर्जुनाला कैलासगिरि-निवासी ( आधु. काल्हस्ति टेकडी ) भरद्वाज ऋषींनी 'काल्हस्तिमाहात्म्य' सांगितले होते. 'उत्तर संगम'-कालीन तामीळ कवी नक्कीरार ( इ. स. पू. ३ रे शतक ) ने यास 'दक्षिण कैलास' म्हटले असून, तामीळ शैव कवी संबंधार, अप्पार, मणिक्कवसागर आणि सुंदर-मूर्ति हे याचे उपासक होते. श्रीमत् शंकराचार्यकृत 'शिवानंद लहरी' काव्यात येथील 'कण्णेश्वर' भक्त कण्णप्पाच्या भक्तीचे निम्नलिखित स्तवन आढळते :—

**किञ्चिद् भक्षितमांसशेषकवलं नव्योपहायते ।**
**भक्तिः किं न करोत्यहो वनचरो भक्तावतंसायते ॥**
( शिवानन्द. ६३ ).

( भक्तमुखातील मांसखंड नैवेद्य म्हणून स्वीकारणाऱ्या कृपाळू शिवाच्या अगाध भक्तीने एक वन्य निषाद भक्त-श्रेष्ठ बनला ).

**स्थापत्येतिहास**—या टेकडीच्या कैलासगिरि पायथ्या-नजिकच्या पल्लव आणि तोंडमान राजनिर्मित काल्हस्तीश्वर मंदिराचा चोल राजा कुलोत्तुंगाने ( इ. स. ११ वे शतक ) जीर्णोद्धार करून येथील दक्षिणाभिमुख 'गलिगोपुरम्' बांधले. उत्तरकालीन वीर नरसिंह यादव राजाने ( इ. स. १२ वे शतक ) मंदिराचा बाह्य सभामंडप, तसेच चार प्रवेश-गोपुरे बांधली. विजयनगरच्या राजांनी येथील अनेक मंडप बांधले असून, स. १५१६ च्या ओरिसा दिग्विजयाच्या स्मृत्यर्थ कृष्णदेवरायाने येथे सहस्रस्तंभीय सभामंडप बांधला ( रंगाचारी, १. चित्तूर. १३५ ). विजयनगरच्या अच्युतरायाने आपला मुख्य राज्याभिषेक येथे, आणि औपचारिक समारंभ विजयनगर येथे केला. देवकोट्टैच्या नातुकोट्टै चेट्टियारनी स. १९१२ मध्ये या मंदिराचा जीर्णोद्धार केला.

**राजकीय इतिहास**—चोल राजा राजाधिराजाचा स. १०४५ चा एक शिलालेख या गावी असून ( रंगाचारी, १. चित्तूर. ७९ ), तेलगु चोड राजा राजेंद्राच्या शके १०९१ च्या नंदूरू ताम्रपटमते तत्कालीन आंध्र प्रदेशाची दक्षिण सीमा या नगराने बनत असे ( एपि. इंडि. २९. २२८ ). तेलगु चोड राजा विजयादित्याच्या स. १२६८ च्या कावेरीपाक्कम् शिलालेखमते त्याने या मंदिरास विपुल दान दिले होते ( रंगाचारी, १. उत्तर अर्काट. १० ). पूर्व चालुक्यवंशीय तेलगु चोड राजे स्वतःस 'काल्हस्ति नगराचे राजे' ( तिरुकालत्ति ) म्हणवीत असत ( रंगाचारी, १. चित्तूर. ६९ ).

**अन्य तीर्थे**—या नगराच्या परिसरातील अन्य तीर्थे पुढीलप्रमाणे होतः—१. **हरहर तीर्थ** ( काल्हस्तीपासून ३ मैल ), २. **कलिंग तीर्थ** ( काल्हस्तीपासून ५ मैल पूर्वेस ); ३. **सहस्रलिंग तीर्थ** ( काल्हस्तीपासून ५ मैल नैर्ऋत्येस ); ४. **मार्कंडेय तीर्थ** ( सहस्रलिंगापासून ६½ मैल ); ५. **मयूर तीर्थ**; ६. **भरद्वाज तीर्थ** ( काल्हस्तीश्वर मंदिरापासून ३½ मैल ); ७. **नारद तीर्थ** ( काल्हस्ति गावाच्या मध्यभागी ); ८. **सरस्वती तीर्थ**; ९. **शुक तीर्थ**; १०. **ब्रह्म तीर्थ**; ११. **मणिकर्णिका तीर्थ**; १२. **तत्त्वप्रकाश तीर्थ**.

**काला** ( नदी )—एक श्राद्धयोग्य नदी ( पद्म. आदि. ११.५३ ).

२. ( ग्राम ) चालुक्य राजा कर्ण ( प्रथम ) च्या शके ९६६ च्या शिलालेखमते लाट देशातील नागसारिका विषयातील 'तलभद्रिका २६' पथकातील एक ग्राम. दक्षिण गुजरातमधील आधु. कलवच्छ अथवा खेडगावपैकी हे एक असावे ( जे. बी. बी. आर. ए. एस्. २६.५० ).

**कालाग्निरुद्रलोक** ( पाताल )—पौराणिक साहित्यमते सप्तपातालांपैकी एक अग्नियुक्त पाताल ( विष्णुधर्म. १. ४.१० ).

**कालाजिन** ( देश )—कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या दक्षिण भागातील 'कालंजर' देशाचे नामांतर ( बृ. सं. १४.११; मार्कं. ५५.२०; कालंजर पहा ). अन्य वैकल्पिक नामांतर ( शिलालेख साहित्य )–'कालंजन.'

**कालापक** ( देशविभाग )—वलभी सम्राट ध्रुवसेन

( द्वितीय ) च्या स. ६२९ च्या, तसेच धरसेन ( तृतीय ) च्या स. ६४५ च्या दानपत्रमते सुराष्ट्र देशान्तर्गत एक देशविभाग ( पथक ). आधु. काठेवाड देश हाच असावा ( इंडि. अँटि. ६.१५; जे. बी. बी. आर. ए. एस्. १०.७९ ).

**कालाभीष्ट** ( तीर्थ )—अर्बुद पर्वतान्तर्गत एक तीर्थ ( स्कन्द. प्रभास. अ. ४०.७ ).

**कालाम्र** ( वृक्ष )—महाभारतमते भद्राश्व वर्षान्तर्गत भद्रसाल वनातील एक योजन उंचीचा फलपुष्पसंपन्न एक पवित्र वृक्ष. याच्या रससेवनाने भद्राश्व वर्षातील स्त्री-पुरुष कमलकांती, चिरतरुण, आणि दशसहस्रायुषी बनले असून, अनेक सिद्धजन येथे निवास करीत असत ( म. भी. ७. १४–१८ ).

**कालिक** ( देश )—मेरु पर्वतोद्भवा चतुर्गंगांपैकी पश्चिमवाहिनी चक्षु नदीच्या मार्गातील एक देश ( मत्स्य. १२१.४५ ).

**कालिका** ( नदी )—एक श्राद्धयोग्य नदी ( मत्स्य. २२.३६; पद्म. आदि. ११.२९ ).

२. ( शिखर ) देवी पुराणमते एक पवित्र शिखर ( देवी पुराण. तीर्थविवेचन. पृ. २४४ ).

३. ( देवी ) काशी येथील एक देवीस्थान ( नारद. उत्तर. ५०.१४ ).

**कालिका-आश्रम** ( तीर्थ )—महाभारत अंगिरस्-यात्रा, आणि नीलमतमते कश्मीरातील वितस्ता नदी-काठचे एक तीर्थ ( म. अनु. २५.२४; नीलमत. १४८ ).

**कालिका तीर्थ** ( तीर्थ )—वस्त्रापथक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ ( स्कन्द. प्रभास. व. ३.३ ).

**कालिका सङ्गम** ( तीर्थ )—महाभारत पुलस्त्ययात्रा-मते एक तीर्थ ( म. आर. ८२.१३५; अग्नि. १०९.२०; पद्म. आदि. ३८.६३ ).

२. महाभारतमते यमुना नदीकाठचे एक तीर्थ ( म. आर. ८४.१५६ ).

•**कालिग्राम** ( ग्राम )—नालंदा मुद्रालेखमते नालंदा गावाच्या परिसरातील एक ग्राम ( आर्कि. सर्व्हे. ६६.३३ ). आधु. गया अथवा पाटना जिल्ह्यात हे असावे ( पांडे, विहार. पृ. १३२ ).

**कालिङ्ग** ( लोकसमूह )—बृहत्संहितामते आग्नेय भारतातील ' कलिंग ' लोकसमूहाचे नामांतर. पाठभेद—' कालींग ' ( बृ. सं. १४.३२; कलिंग पहा ).

**कालिञ्जर** ( तीर्थ )—वराहमते मथुरा येथील ' कालंजर तीर्थां 'चे नामांतर ( वराह. १७६.१८; ७०; ८२; कालंजर तीर्थ पहा ).

२. ( वामनस्थान ) वामनमते एक वामनस्थान. येथील वामनाचे नाव नीलकंठ होते ( वामन. ९०.२७ ).

३. ( देशविभाग ) राजतरंगिणीमते कल्ह आणि पद्मरथ राजांच्या नियंत्रणाखालील कश्मीरच्या दक्षिण सीमावर्ती एक पर्वतीय राज्य ( राज. ७.१२५६; ८.५१९; ५८१; ९१५; १९२३;१९३४;१९७४ ). पूंच ( प्राचीन ' पर्णोत्स ' ) पर-गण्याच्या नैर्ऋत्येकडील जम्मू राज्यान्तर्गत आधु. कोट्ली प्रदेश हाच होय ( स्टाइन, राज. १.३६६; २.४३३ ).

**कालिञ्जरवन** ( तीर्थ )—वाराणसी येथील एक तीर्थ ( मत्स्य १८१.२७ ).

**कालिञ्जल** ( पर्वत )—कुरुक्षेत्रातील एक पर्वत ( वामन. ८६.१४ ).

**कालिदुर्ग** ( नगर )—शिलालेख साहित्यमते दक्षिण भारतातील ' कालीतक ' ( आधु. कालिकत ) बंदराचे नामांतर ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. २.३६४–३७२; कालीतक पहा ).

**कालिन्दी** ( नदी )—पौराणिक साहित्य, तसेच शिलालेख साहित्यमते उत्तर प्रदेशातील ' यमुना ' नदीचे नामांतर ( पद्म. आदि. २१.१; कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.८९; यमुना पहा ).

२. जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक नदी ( वायु. ४४.२१ ).

३. वाल्मीकि रामायणमते पूर्व भारतातील एक नदी ( वा. रा. कि. ४०.२१ ).

४. वामनमते एक नदी ( वामन ७८.८८;७९.१ ).

५. ( तीर्थ ) पद्ममते एक विष्णुतीर्थ. येथील विष्णूचे नाव कामरूप होते ( पद्म. उत्तर. १२९.१९ ).

**कालिन्दीसर** ( सरोवर )—द्वारका येथील एक सरोवर ( स्कन्द. प्रभास. द्वा. १६.१८ ).

**कालिह्रद** ( सरोवर )—मथुरा येथील एक सरोवर ( वराह. तीर्थविवेचन. पृ. १६२; तीर्थप्रकाश. पृ. ५१५ ).

**कालियादेह** ( सूर्यमंदिर )—उज्जयिनी येथील एक सूर्यमंदिरस्थान ( उज्जयिनी पहा ).

**कालियाण** ( ग्राम )— चालुक्य राजा भीम ( द्वितीय ) च्या वि. सं. १२९५ च्या शिलालेखमते गुजरातमधील सारस्वत मंडलान्तर्गत वर्द्धिपथकातील एक ग्राम. उत्तर गुजरातेतील आधु. कालिआन गाव हेच होय ( इंडि. अँटि. ६.२०५–२०६ ).

**कालिवल** ( जनपद )—मार्कंडेयमते अपरांत देशातील 'कोलवन' जनपदाचे नामांतर ( मार्क ५४.४९; कोलवन पहा ).

**काली** ( नदी )— पौराणिक साहित्यमते विंध्य पर्वतोद्भवा 'चर्मण्वती' ( आधु. चंबळ ) नदीची एक उपनदी ( पद्म. आदि. ३४.२ ). मध्यप्रदेशातील पिपर्द गावाच्या उत्तरेस चंबळ नदीस मिळणारी आधु. कालीसिंध नदी हीच असून, पर्वन् ही हिची उजवीकडील प्रमुख उपनदी आहे. नामांतर ( महाभारत )–' दक्षिण सिंधु '.

२. पौराणिक साहित्यमते उत्तर भारतातील एक पवित्र नदी ( मत्स्य. २२.२०; वामन ५७.७९ ). नेपाळ आणि सहारानपुर जिल्ह्याच्या सरहद्दीवरील आधु. घाघरा नदी हीच होय.

कुमाऊँ प्रदेशातील कुठी–यङ्क्ती–कालापानी नदी–संगमाने बनणारी ही नदी कुमाऊँ जिल्ह्याच्या पूर्व सीमेवरून वहात जात बर्मदेव गावानजिक पर्वतातून बाहेर पडते. तेथून पुढे 'शारदा' नावाने, आणि सहारानपुर जिल्ह्यात 'घाघरा' नावाने वहात जात कनौजनजिक ही गंगेस मिळते. सुविख्यात शारदा कालवा हिच्यापासूनच निघतो ( सांकृत्यायन, कुमाऊँ. पृ. ३–४ ).

**उपनद्या**— हिच्या प्रमुख उपनद्या पुढीलप्रमाणे होत :– १. दर्मा ( गंगा ); २. गोरी; ३. सरयू; ४. कुरियाला. ५. पर्वन्

**काली मही** ( नदी )— वाल्मीकि रामायणमते उत्तर भारतातील 'गंडकी' नदीचे नामांतर ( वा. रा. कि. ४०.२०; गंडकी पहा ).

**कालीतक** ( देश )—वायुमते दक्षिण भारतातील एक देश आणि नगर ( वायु. ४५.१२८ ). पार्गिटर यांच्या मते केरळ राज्यातील आधु. कालिकत बंदर हेच असून, त्यासभोवतालचा प्रदेश पौराणिक काळी 'कालीतक देश' नावाने सुविख्यात असावा ( पार्गि., मार्क. ३३८ ). शिलालेख साहित्यातहि दक्षिण भारतातील एक प्रमुख बंदर म्हणून याचा ( कालिदुर्ग ) निर्देश आढळतो ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. २.३६४ ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशाची आणि बंदराची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा ).

**पोर्तुगीज वसाहत**—पोर्तुगीज खलाशी वास्को–द–गामा आफ्रिकेच्या तळानजिकच्या केपला वळसा घालून स. १४९८ मध्ये येथे उतरला. स. १५०० मध्ये पोर्तुगिजांनी

## कालीतक देशाची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पौराणिक साहित्य | |
| अ. ( मार्क. ५४.४९ ) | क्षनीकट, चामीकट |
| ब. ( वामन. १३.५१ ) | चालीकट |
| २. शिलालेख साहित्य ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. २.२६४ ) | कालिदुर्ग |
| ३. तामीळ साहित्य | कल्लिकोट्टै |

येथील झामोरिन् ( सामुरि ) राजावर हल्ला करून आणि स्थानिक 'मापिल्ल' ( मोपला ) व्यापाऱ्यांची कत्तल करून भारतातील पहिली पोर्तुगीज वसाहत स्थापिली ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. २३३–२४० ).

**कालीपीठ** ( शक्तिपीठ )—तंत्रचूडामणिमते पश्चिम बंगालमधील गंगा नदीकाठचे शक्तिपीठस्थान. येथे सतीच्या डाव्या पायाची चार बोटे पडली असून, येथील देवीचे नाव कालिका, आणि भैरवाचे नाव नकुलीश होते. आधु. कलकत्ता गाव हेच असून, तेथील आदिकाली, काली ही देवीमंदिरे, तसेच दक्षिणेश्वर ( रामकृष्ण परमहंस–साधनास्थान ) व बेलूर मठ आजहि सुविख्यात आहेत ( ती. पृ. १७९ ).

**कालीमठ** ( सिद्धपीठ )—केदारनाथ–बद्रीनाथ मार्गावरील उषीमठानजिकचे एक सिद्धपीठस्थान. स्थानिक आख्यायिकामते येथे देवी रक्तबीजसंहारार्थ अवतीर्ण झाली असून, सध्या येथे महाकाली, महालक्ष्मी व महासरस्वतीची मंदिरे आहेत ( ती. पृ. ५६ ).

**कालीमन्दिर** ( देवीस्थान ) — हरिद्वार – हृषिकेश मार्गावरील कौल सांप्रदायाचे कालीमंदिरस्थान ( ती. पृ. ६३ ).

**कालीह्रद** (सरोवर)—सालग्रामक्षेत्रान्तर्गत एक सरोवर ( वराह. १४५.४८ ).

**कालुबक** ( तीर्थ )—कश्मीरातील एक तीर्थ ( नीलमत. १४६२ ).

**कालेनक** ( पर्वतीय घाट )—राजतरंगिणीमते 'लोहरकोट्ट' ( आधु. लोहरिन )–कश्मीर मार्गावरील एक दुर्गम बारमाही घाट ( राज. ८.१८७६–१८७७ ). तोषमैदान आणि चांबर ( प्राचीन 'शारंबर' ) घाट हिमवृष्टीने बंद

होताच प्रवासी या घाटाने प्रवास करीत असत. बंडखोर लोठनने उपरोक्त दोन घाट रोखले असता पराभूत कश्मीरराज जयसिंह याच घाटाने कश्मीरला पळून आला.

स्टाइन यांच्या मते लोहरिन खोऱ्यातील वन (प्राचीन वनिकावास) → लोहरिन नदी → (आम्रेयेस) कुलियन (प्राचीन गालेनक) मार्गे जाणारा मंडी–अटोली (प्राचीन 'अट्टालिका') गावानजिकचा आधु. कुलियन घाट हाच होय.

**कालेरुन** (नदी)—तामीळ साहित्यमते दक्षिण भारतातील मलय पर्वतोद्भवा 'कावेरी' नदीचे नामांतर (कावेरी पहा).

**कालेश** (लिंग)—गया येथील एक शिवलिंग (अग्नि. ११.२३).

**कालेश्वर** (कुंड आणि शक्तिपीठ)—काशी येथील एक पवित्र जलकुंड आणि शक्तिपीठस्थान (नारद. उत्तर. ५०.९; लिङ्ग. १.९२.१३६; तीर्थविवेचन. पृ. ४५;७२; स्कन्द. काशी. ३३. १७०; ८३.९१). काशीचा कालभैरवहि येथेच असावा (शक्तिसङ्गम. ३.७.४०).

२. (तीर्थ) नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ (पद्म. आदि. १८.८०; मत्स्य. १९१.८५).

३. (तीर्थ, लिंग) कामरूप आणि मगध देशांच्या सीमेवरील एक शिवतीर्थ (शक्तिसङ्गम. ३.७.१०).

४. अवंती येथील एक शिवतीर्थ (स्कन्द. आवन्त्य. अ. २३.२५).

**कालेश्वर पृथ्वीनाथ** (शिवस्थान)—राजस्थानातील चंद्वासापासून ५ मैलांवरील एक संगमरवरी शिवमंदिरस्थान (तां. पृ. २८६).

**कालोदक** (तीर्थ)—महाभारत अंगिरस्‌यात्रामते यमुना नदीकाठचे एक श्राद्धयोग्य तीर्थ (म. अनु. २५. ६०; विष्णुस्मृति. ८५. ३५ टीप).

२. (सरोवर) नीलमतमते कश्मीरमधील उत्तर मानस सरोवर मार्गावरील हरमुकुट पर्वतान्तर्गत नंदिक्षेत्रातील एक सरोवर. उत्तर मानस सरोवराच्या दक्षिणेकडील आधु. नंदकौल सरोवर (समुद्रसपाटीपासून उंची–१३०००'; अक्षांश ७५° उत्तर; रेखांश ३४°–२६' पूर्व) हेच होय. नामांतर–'नंदिसरस्.'

**नामव्युत्पत्ती**—नीलमत मते 'शिवपार्षद नंदीचे निवासस्थान' अशा अर्थाने यास 'नंदिसरस्' नाव प्राप्त झाले.

**नीलमत पुराणात**—या ग्रंथमते शिवपार्षद नंदिन्‌च्या या तपस्यास्थानी शिव आणि नंदिन् एकत्र रहात असून, सरोवराचा नीलवर्णीय अंतर्भाग शिवनिवासाचे, आणि हरितवर्णीय बाह्य भाग नंदीनिवासाचे स्थान होय (नीलमत. १०६१–११३१; नंदिक्षेत्र पहा).

**अन्य निर्देश**—महाभारतमते येथील स्नान दीर्घायुष्यप्रद होते (म. शां. १४८.११). नीलमतमते या नावाची अन्य तीन तीर्थे कश्मीरात असून (नीलमत. १२३३;१४५९; १४६१), त्यापैकी एकामध्ये मानस सरोवरोद्भव नदीजल पडत असे (**कालोदकं यत्र याति नदी मानससम्भवा;** नीलमत. १४६१).

३. (तीर्थ) सम्भलक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ (ती. पृ. ९२).

४. (सागर) मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते 'कृष्ण' समुद्राचे नामांतर (वैजयन्ती. ३६.१५; कृष्ण समुद्र पहा).

**कालोद्का** (नदी)—कश्मीरातील वितस्ता नदीनजिकची एक नदी (नीलमत. १५४५).

**कालोदर** (देश)—मेरु पर्वतोद्भवा सप्तगंगांपैकी पूर्ववाहिनी ह्लादिनी नदीच्या मार्गावरील एक देश (ब्रह्माण्ड. १८.५५; वायु. ४७.५२१).

**कालपी** (व्यासाश्रम)—उत्तर प्रदेशातील यमुना नदीकाठच्या 'कालप्रिय' संज्ञक व्यासाश्रमस्थानाचे मध्ययुगीन नामांतर (कालप्रिय पहा).

**काल्सी** (अशोक–शिलालेखस्थान)—उत्तर प्रदेशातील डेहराडून जिल्ह्यातील चक्राता तहसिलीतील मसुरीपासून १५ मैल पश्चिमेकडील अशोक–शिलालेखस्थान. याच्या १½ मैल उत्तरेकडील यमुना-तोन्स नद्यांच्या संगमाच्या वरच्या अंगास यमुनेच्या पश्चिम किनाऱ्यावर अशोकाचे चौदा आज्ञालेख कोरलेली क्वार्ट्झ दगडाची शिला आहे.

**स्थानमाहात्म्य**—हिमालय आणि दिल्ली यांच्या दरम्यानच्या या गावचा 'नाभक' लोकसमूहयुक्त परिसर गंगा खोऱ्याचे प्रवेशद्वार म्हणून लष्करी महत्त्वाचा असून, वायव्य भारत-पूर्व भारत यांच्या दरम्यानचा उत्तरापथ (= आधु. ग्रँड ट्रंक रोड) याच भागातून जात असे. याचे हे महत्त्व जाणूनच हे शिलालेख या गावी कोरले असावेत (थापर, अशोक. पृ. २३२).

**शोध**— या गावच्या अशोक आज्ञालेखाच्या शेवाळाने माखलेल्या दगडाचा शोध फॉरेस्ट यांनी स. १८६० मध्ये लावला. तो स्वच्छ केल्यानंतर स्फटिकसदृश शुभ्र दगडावर तो कोरल्याचे सिद्ध झाले (कनिंग., अशोक शिलालेख. पृ. १२).

**आज्ञालेख**—येथील अशोक-आज्ञालेख विशाल शिलेच्य,

(१०'×१०') आग्नेय भागात (रुंदी–५½') असून, त्यापैकी १-१० लेख बारीक अक्षरात, आणि उर्वरित लेख तिप्पट मोठ्या अक्षरात आहेत. तेराव्या आज्ञालेखाचा अर्धा भाग आणि चौदावा आज्ञालेख हे दक्षिण भागावर स्वतंत्रपणे असून, काही अभ्यासकांच्या मते मूळ शिलालेखाहून ते थोडेसे उत्तरकालीन आहेत.

या दगडाच्या उत्तर भागात धौलि आणि गिरनार अशोक आज्ञालेखसदृश 'गजम्' (श्रेष्ठ हत्ती) अक्षरपंक्तीयुक्त हत्तीचे एक रेखाचित्र आहे. बूलर यांच्या मते हे तीनहि श्वेत हत्ती गौतम बुद्धाचे प्रतीक आहेत.

**कालनिर्णय**—लिपीशास्त्रीय दृष्ट्या येथील आज्ञालेख कौशांबी, सारनाथ, सहस्राम्, आणि मस्कि शिलालेखांशी समकालीन आहेत (कॉर्पस्. इन्स्क्रि. १.१.११).

**उत्खनन**—येथील उत्खननात सम्राट शीलवर्मन् (इ. स. ३ रे शतक) आयोजित चतुर्थ अश्वमेधाच्या यज्ञवेदीचे अवशेष सापडले (एन्शन्ट इंडिया. ९.१४६). त्यावरून तत्काली हे तीर्थक्षेत्र म्हणून सुविख्यात असावे.

**काल्हरी** (ग्राम)—चालुक्य राजा जयंतसिंहाच्या वि. सं. १२८० च्या, तसेच भीम (द्वितीय) च्या वि. सं. १२६३ च्या शिलालेखमते सारस्वत मंडलान्तर्गत गंभूता पथकातील एक ग्राम. उत्तर गुजरातमधील आधु. कालरी गाव हेच होय (इंडि. अँटि. ६.१९४–१९५; १९६–१९८).

**कावन्तण्डलम्** (ग्राम)— चोल राजा कुलोत्तुंग (प्रथम) च्या स. १०७३ च्या शिलालेखाचे दक्षिण भारतातील आधु. कांजीवरम्नजिकचे उपलब्धिस्थान (साऊथ इंडि. इन्स्क्रि. ३.१७२).

**कावलि** (ग्राम)—तेलगु चोड राजा तम्मुसिद्धीच्या स. १२०७ च्या शिलालेखाचे मद्रास राज्यातील नेलोर जिल्ह्यातील उपलब्धिस्थान (सेवेल, इन्स्क्रि. पृ. १२९).

**कावाल** (ग्राम)—नालंदा मुद्रालेखमते, तसेच समुद्रगुप्ताच्या नालंदा ताम्रपटमते बिहारमधील कृमिला विषयातील एक ग्राम (अर्कि. सर्व्हे. ६६.३४; एपि. इंडि. २५. ५०–५३). मोंघीर जिल्ह्यातील आधु. किउल गावानजिक हे असावे (पांडे, बिहार. पृ. १६१).

**काविका** (देशविभाग)—शिलालेख साहित्यमते उत्तर भारतातील 'कापिका' देशविभागाचे नामांतर (एपि. इंडि. ७.३६; कापिका पहा).

**काविरि** (नदी)—तामीळ साहित्यमते दक्षिण भारतातील 'कावेरी' नदीचे नामांतर (कावेरी १. पहा).

**कावीरपट्टन** (बंदर)—बौद्ध साहित्यमते मद्रास राज्यातील 'कावेरीपट्टनम्' बंदराचे नामांतर (जा. ४.३३८). अन्य नामांतर (तामीळ शिलालेख)–'कावीरिपुंपट्टनम्' (साऊथ इंडि. इन्स्क्रि. २.२८७; कावेरीपट्टनम् पहा).

**कावेर** (देश)—काव्यमीमांसामते दक्षिण भारतातील एक देश (काव्यमी. १७.२२६). अली यांच्या मते दक्षिण भारतातील कावेरी नदीच्या मुखानजिक हा असावा (अली, पुराणाज्. पृ. १७२).

**कावेरका** (नदी)—शाकद्वीपातील एक नदी (म. भी. १२.३०).

**कावेरी** (नदी)—दक्षिण भारतातील सुविख्यात मलय पर्वतोद्भवा नदी (वा. रा. कि. ४१.१५; काव्यमी. १७. २२६; बृ. सं. ५.६४; १४.१३; महावीर. ५.३). तामीळ आणि संस्कृत साहित्यात 'मलय' हा स्वतंत्र पर्वत मानला असला, तरी भौगोलिक दृष्ट्या तो सह्य पर्वताचाच (आधु. पश्चिम घाट) भाग आहे. म्हणूनच पौराणिक साहित्यात सर्वत्र हिला सह्य पर्वतोद्भवा म्हटले आहे (कूर्म. पूर्व. ४७.३६; ब्रह्माण्ड. १६.३५; मत्स्य. ११४.२९; मार्क. ५४.२६; वामन. १३.३१; वायु. ४५.१०४).

**महत्त्व**—'दक्षिण गंगा' (नृसिंह. ६५.१६) आणि 'दक्षिण भारताची पोषणकर्त्री माता' म्हणून सुविख्यात असणारी ही नदी दक्षिण भारताची सर्वप्रमुख नदी असून (एकूण सिंचनभूमी–१ कोटी एकर), हिच्या कूर्ग प्रदेशातील उगमापासून पूर्व समुद्रानजिकच्या संगमापर्यंतच्या प्रवाहाकाठी (एकूण लांबी–४७५ मैल) दक्षिण भारतातील अनेक तीर्थे, नगरे आणि औद्योगिक केंद्रे आहेत. बौद्ध साहित्यमते ही मोत्यांसाठी सुविख्यात असून, प्राचीन चोल राज्याचा दक्षिण भाग ही सुफलित करीत असे. त्या राज्याची उरगपुर (आधु. उरैयूर) नामक राजधानी, तसेच कावेरीपट्टण (आधु. पुहार) नामक बंदर हिच्या दक्षिण आणि उत्तर किनाऱ्यावर असून, चोल राजा राजराज (इ. स. ९ वे शतक) स्वतःस 'पोन्नियिन् सेल्वन्' (सुवर्णमयी कावेरीचा प्रिय पुत्र) म्हणवीत असे. म्हैसूर राज्यातील गंग, होयसाळ आणि विजयनगर साम्राज्यांचा विस्तारहि हिच्याच काठी झाला असून, गंग–होयसाळ राजांची श्रीरंगपट्टनम् ही राजधानी हिच्याच काठी होती. आपल्या संकल्पित दिल्ली आक्रमणासाठी टिपू सुलतानाने हिच्यावर एक पूल बांधला होता.

**पावित्र्य**—पौराणिक साहित्यमते ही नदी श्राद्धयोग्य असून (पद्म. आदि. ११.२०; २९.२०; ५७; अग्नि.

१०९.२२; कूर्म. उत्तर. ३७.१६ ), हिच्या काठची श्रीरंगपट्टनम्, शिवसमुद्रम् आणि श्रीरंगम् ही वैष्णवस्थाने, चिदंबरम्, जंबूकेश्वर ( श्रीरंगम् ), तंजोर, तिरुवैयरु, आणि कुंभकोणम् ही शिवस्थाने, तसेच तिरुचिरापल्ली हे जैन तीर्थ आणि शिवस्थान आजहि सुविख्यात आहेत. ज्ञानसंबंधार या तामीळ कवीचे जन्मस्थान, तसेच कंबनकृत 'कंब रामायणा'चे रचनास्थान म्हणूनहि दक्षिण भारताच्या सांस्कृतिक जीवनाशी ही एकरूप झाली आहे.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नदीची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. महाभारत ( आर. ५८१* ) | कावेरि |
| २. बृहत्संहिता ( १४.१३ ) | कावेर्यः |
| ३. पद्म पुराण ( उत्तर. २२४.३–४ ) | मरुद्वृधा |
| ४. नृसिंह पुराण ( ६६.७ ) | दक्षिण गंगा |
| ५. विष्णुधर्मोत्तर पुराण ( १.१०.५ ) | कावेरिका |
| ६. टॉलेमी ( ७.१.३५ ) | खबेरोस |
| ७. तामीळ साहित्य | कावेरि, कालेरुन, पोन्नियिन् |
| ८. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य | |
| त्रिकाण्ड ( २९.२५ ) | अर्धगंगा |
| अभिधान ( १४८.१०८४ ), हारावली ( २२४.५१ ) | हारावली |

उपरोक्त नामांतरांपैकी हिचे 'कावेरी' हे संस्कृतभाषीय आणि 'काविरि' व 'कालेरुन' ही तामीळभाषीय नावे सध्या विशेष प्रचारात आहेत.

**नामव्युत्पत्ती**—अग्निमते 'कवेर राजाची कन्या' अशा अर्थाने हीस हे नाव प्राप्त झाले असून, मॅक्रिंडल यांच्या मते 'केशराच्या मळ्यांनी युक्त' अशा अर्थाने हिला हे नाव मिळाले ( तामीळ 'कावेर' = केशर ). हरिवंशमते 'पितृशापाने दक्षिण भारतात अवतीर्ण झालेला गंगेचा अर्धा भाग' अशा अर्थाने हिला 'अर्धगंगा' नामांतर प्राप्त झाले.

**उगम**—कूर्ग प्रांतान्तर्गत पश्चिम घाटातील ब्रह्मगिरि पर्वतावरील चंद्रतीर्थामध्ये उगम पावणारी ही आग्नेयगामिनी नदी ( अक्षांश १२°–३५′ उत्तर; रेखांश ७५°–३१′ पूर्व ) म्हैसूर प्रांतातून, तसेच मद्रास राज्यातील तंजोर, कोइमतूर, आणि त्रिचनापल्ली जिल्ह्यांतून वहात जाऊन मायावरम् गावानजिकच्या कावेरीपट्टनम् येथे बंगालच्या उपसागरास मिळते. चोल राज्यकाली कावेरीपट्टनम् ( काकन्दि, कावेरीपुंपटनम्, पट्टिनम् = टॉलेमी–'खबेरोस' = आधु. कावेरीपट्टन् ) हे विदेशी व्यापाराचे सुविख्यात बंदर असले, तरी सध्या ते वाळूमध्ये लुप्त झाले आहे.

**उगमाख्यायिका**—पौराणिक साहित्यात हिच्या उत्पत्तीसंबंधी निम्नलिखित आख्यायिका आढळतात :—

(१) **अग्नि पुराणात**—या ग्रंथमते कवेर राजाच्या तपस्येने प्रसन्न होऊन ब्रह्मदेवाने विष्णुमाया नामक स्वकन्या त्यास दत्तक दिली. कालांतराने श्रीविष्णुवराने तिला दक्षिण भारतातील पवित्र नदी, आणि अगस्त्यपत्नी लोपामुद्रा अशी द्विविध रूपे प्राप्त होऊन 'कवेरकन्या' अर्थाने तीस 'कावेरी' म्हणू लागले. अगस्त्याज्ञेवरून दक्षिण भारतातील जलदुर्भिक्ष्य नाहीसे करण्यासाठी लोपामुद्रास्वरूपी कावेरी अगस्त्यकमंडलूमध्ये प्रविष्ट होऊन, सह्य पर्वतातील ब्रह्मगिरि शिखरावर अवतीर्ण झाली. तेथे लोपामुद्रा, कावेरी आणि आमलक वृक्षस्वरूपी श्रीविष्णुपूजनार्थ ब्रह्मदेवाने स्वशंखातून आणलेले कैलास पर्वतोद्भवा वज्र नदीचे जल एकत्र होऊन कावेरी नदीचा उगम झाला. त्यामुळेच या नदीचे उगमस्थान 'आमलक तीर्थ' अथवा 'शंख तीर्थ' नावांनी सुविख्यात झाले.

(२) **स्कंद पुराणात**—या ग्रंथमते विंध्यदमनार्थ दक्षिण भारतात आलेल्या अगस्त्य ऋषींच्या तपःसिध्यर्थ कैलासोद्भवा कावेरी नदी त्यांच्या कमंडलूमध्ये बसून दक्षिणापथात आली. विंध्यदमनानंतर अगस्त्य सह्य पर्वतात तपस्या करीत असता शूरपद्म दैत्याने दक्षिण भारतातील पर्जन्यवृष्टी थांबवून हाहाःकार माजविला. तेव्हा इंद्रप्रार्थनेवरून काकरूपधारी गणेशाने अगस्त्य ऋषींचा कमंडलू पालथा करून त्यामधील कावेरी नदी प्रवाहित केली.

(३) **तामीळ साहित्यात**—'मणिमेकलै' तामीळ ग्रंथमते कांत राजाच्या प्रार्थनेवरून अगस्त्य ऋषींनी ही नदी स्वकमंडलूमधून विमुक्त केली ( मणि. १.९–१२ ).

**वाल्मीकि रामायणात**— या ग्रंथमते दक्षिण भारतातील या दिव्य, प्रसन्नसलिला आणि अप्सरावेष्टित नदीकाठी सुग्रीवाने अंगदाला सीताशोधार्थ पाठविले होते ( वा. रा.

कि. ४१.१४–१५ ).

**महाभारतात** — भारतवर्षातील या पवित्र नदीचा (म. भी. १०.१९) युधिष्ठिर–तीर्थयात्रेत (म. आर. ५८१*), तसेच पुलस्त्ययात्रेत (म. आर. ८३.२०) निर्देश असून, या ग्रंथमते ही नदी अग्नीचे उत्पत्तिस्थान (=पराक्रमी पुरुषांची जननी) होती (म. आर. २१२. २४; स. ९.२०).

**पौराणिक साहित्यात**— पौराणिक साहित्यमते भारतवर्षातील ही पवित्र नदी (पद्म. आदि. ६.१७; भा. ५. १९.१८) 'दक्षिण गंगा' नावाने सुविख्यात असून (नृसिंह. ६६.७), हिच्या काठच्या कावेरीक्षेत्रामध्ये नागशायी नृसिंह आणि शेषशायी (= श्रीरंगम् मंदिर) विष्णु रहात असत (नृसिंह. ६५.१६). पद्ममते या नदीकाठच्या ब्रह्मदेवस्थानी 'सृष्टिकर्तृ' नामक ब्रह्मदेव निवास करीत असे. भागवत पुराण बलराम-तीर्थयात्रेत हिचा निर्देश असून (भा. १०.७९.१४), अमावसुवंशीय 'गंगा नदीपति' जह्नु राजा हिला आपली पत्नी मानीत असे (ह. वं. १. २७.८-१०; ३२.४७-४८).

बृहत्संहितेत हिचा निर्देश 'कावेर्यः' अनेकवचनी नावाने असून (बृ. सं. १४.१३), कालिकामते ही महाकाल सरोवरात उगम पावत असे (कालिका. २४.१३०-१३५). योगिनीतंत्रात, रघुवंशात, तसेच दंडिन्कृत काव्यादर्शात हिच्या काठच्या समृद्ध जमिनींचा निर्देश आढळतो (योगिनी. २.६; रघु. ४.४५; काव्यादर्श. ३.१६६).

**टॉलेमीच्या ग्रंथात**— या ग्रंथमते या अदैसथ्रोन (सह्य पर्वताचा दक्षिण भाग; अक्षांश २२° उत्तर, रेखांश १३२° पूर्व) पर्वतोद्भवा नदीचे मुख 'खबेरिस् एंपोरियम्' (आधु. कावेरीपट्टनम्; अक्षांश १५°-१५′ उत्तर; रेखांश १२९° पूर्व) स्थानी होते (टॉलेमी, ७.१.३५).

**बौद्ध साहित्यात**— अकित्ति जातकमते या नदीकाठचे 'कवीरपट्टन' नगर 'दमिलरट्ठ' (द्रविडराष्ट्र = चोल देश) मध्ये समाविष्ट असून (जा. ४.२३८), हिच्या काठचे उरगपुर नगर बुद्धदत्त नामक बुध्द भिक्षूचे जन्मस्थान होते.

**शिलालेख साहित्यात**— या साहित्यमते ही नदी पल्लवांची 'कामिनी' असून (साऊथ इंडि. इन्स्क्रि. १. २९), हिच्या उभय किनाऱ्यांवरील पल्लव साम्राज्याचा निर्देश येथे अभिप्रेत असावा. चोल राजांच्या शिलालेखमते त्यांच्या साम्राज्याची सत्ता या नदीइतकीच प्रमाथी असून (साऊथ इंडि. इन्स्क्रि. १.३४), चोल राजा कुलोत्तुंग (प्रथम) च्या स. १०७१ च्या कांची शिलालेखमते हिच्या काठच्या गंगैकोंडचोलपुरम् गावी त्याला राज्याभिषेक झाला होता (साऊथ इंडि. इन्स्क्रि. ३.१२५). चालुक्य राजा पुलकेशिन् (द्वितीय) ने या नदीवर हत्तींचा पूल बांधून चोल राज्यात प्रवेश केला होता.

तम्मुसिद्धि राजाच्या शके ११२९ च्या तिरुवालंगाडु शिलालेखमते त्याच्या करिकाल चोल नामक पूर्वजाने या नदीकाठी अनेक 'तीर' (घाट) बांधले होते. 'कलिंगत्तुपरणि', 'विक्किरम्–शोलन्–उला' आदि तामीळ ग्रंथांतहि या विधानास पुष्टी मिळते (एपि. इंडि. ७.१२०).

विजयनगरच्या सदाशिवरायाच्या शके १४६७ च्या श्रीरंगम् शिलालेखमते नलंतिगल नारायण–जियार नामक स्थानिक मंदिर–पुजाऱ्याने या नदीच्या पूरप्रतिबंधनार्थ मंत्रसिद्ध यंत्र नदीमध्ये स्थापिणे, तिच्या उभय किनाऱ्यांवर जाड आणि टोकदार गवताची पेरणी करणे, कालवे खोदणे आदि दैवी आणि व्यावहारिक उपाय योजिले होते (एपि. इंडि. २९.७३–७७). पूर्व चालुक्य राजा विक्रमादित्य (प्रथम) च्या स. ६६० च्या गद्वल ताम्रपटमते त्याने या दक्षिण दिशावर्ती नदीपर्यंत दिग्विजय केला होता. चोल शिलालेखमते चालुक्य राजा पुलकेशिन् (द्वितीय) चे चोल देशावरील आक्रमण या नदीने स्वप्रवाहामध्ये दगडी बंधारा निर्माण करून परतविले होते (साऊथ इंडि. इन्स्क्रि १.३४).

**तामीळ साहित्यात**—'मणिमेकलै' तामीळ ग्रंथमते दक्षिण भारतातील सूर्यपुत्रांच्या सुखसमाधानासाठी अवतीर्ण झालेली ही नदी चोल राजघराण्याची भाग्यदायिनी होती. अनावृष्टीच्या संकटापासून चोल प्रजाजनांचा बचाव करणाऱ्या या नदीच्या वर्षाकालीन जलाचे राजापासून रंकापर्यंत सारेजण सारख्याच उत्साहाने स्वागत करीत असत (मणि. १.९-१२;२३-२४). 'शिलप्पादिकारम्' ग्रंथमते चालुक्य राजांची 'वळवन्' (समृद्ध देशाधिपती) उपाधी या नदीमुळेच त्यांस प्राप्त झाली होती (शिल. १०.१०२).

**तीर्थस्थाने**—मत्स्य आणि अग्नि पुराणात (मत्स्य. १८९) या नदीचे, तसेच तिच्या काठच्या निम्नलिखित तीर्थस्थानांचे माहात्म्य सविस्तरपणे आढळते :–

(१) उगम—कूर्गमधील 'तलै–कावेरी' नामक कावेरी नदीच्या उगम सरोवरस्थानी या नदीचे मंदिर असून, सासरी निघालेल्या या सागरगामी नववधू कूर्गकन्यास्वरूपी नदीचे भक्तजन श्रावण महिन्यात सुवर्णालंकारांनी पूजन करतात. तिरुप्पुर आणि भगमंडल गावी हिला मिळणाऱ्या हेमावती आणि कनकवती उपनद्या तिच्या पाठराखणी मानल्या जातात.

(२) द्वीपे—हिच्या ४७५ मैल लांबीच्या प्रवाहात प्रवाह-विभाजनामुळे 'आदिरंगम्', 'मध्यरंगम्' आणि 'अंतरंगम्' (श्रीरंगम्) नामक तीन पवित्र द्वीपे उत्पन्न झाली आहेत. या तीन द्वीपांमध्ये अनुक्रमे 'श्रीरंगपट्टनम्', 'शिवसमुद्रम्' आणि 'श्रीरंगम्' ही दक्षिण भारतातील शेषशायी विष्णु आणि श्रीनिवास प्रतिमायुक्त तीन सुविख्यात वैष्णवस्थाने आहेत. शिलालेख साहित्यमते कावेरी नदीच्या श्रीरंगम् येथील उत्तर आणि दक्षिण प्रवाहास अनुक्रमे 'कोळिळडम्' आणि 'तंतिरुक्कावेरी' म्हणत असत (एपि. इंडि. २९.७४).

(३) संगमस्थाने—या नदीच्या उपनद्यांची निम्नलिखित संगमस्थाने विशेष पवित्र मानतात :—१. कावेरी–अमरावती संगम (भास्करक्षेत्र; आधु. करूरपासून ६ मैलांवर; ती. पृ. ३२०); २. कावेरी–कपिला संगम (श्रीरंगपट्टनम्-नजिकच्या तिरुमकुल नरसीपुरनजिक; ती. पृ. ३२६); ३. कावेरी–सागर संगम (कावेरीपट्टनम्नजिकच्या मायाबरम् येथील मयूरेश्वर = आधु. मायूर शिवलिंगस्थानी; ती. पृ. ३६०).

(४) शिवस्थाने—या नदीकाठी निम्नलिखित शिवस्थाने आहेत :—१. चिदंबरम्; २. जंबूकेश्वर (श्रीरंगम्नजिकचे आपोलिंग); ३. बृहदीश्वर (तंजोर येथे); ४. तिरुवय्यरु; ५. कुंभकोणम्; ६. महालिंगेश्वर (तिरुविडैमरुडूर); ७. मातृभूतेश्वर (तिरुचिरापल्ली येथे).

कालवे—संगम साहित्यमते या नदीकाठचे प्राचीनतम कालवे, आणि बंधारे चोल राजा करिकाल (स. १५०–१८०) ने बांधले असून, आपली राजधानी उरैयूरहून कावेरीपट्टनम् येथे हलविल्यानंतर त्याने श्रीरंगम्–कावेरीपट्टनम् दरम्यानचे या नदीचे उभय किनारे (लांबी–१०० मैल) पुन्हा बांधले. अनेक बंधारे आणि कालवे बांधून त्याने तिचा पुराचा धोका कमी केला. इ. स. ११ व्या शतकात चोल राजांनी श्रीरंगम् द्वीपाच्या दक्षिणेस कावेरी आणि कोलेरून यांच्या दरम्यानचा बंधारा (व्याप्ती–१०८'×६०') बांधला.

आधुनिक काळी—कावेरी नदीमुळे (लांबी–४७५ मैल; जलसंचय प्रदेश–२८ हजार चौरस मैल) म्हैसूर आणि मद्रास राज्यातील सुमारे १ कोटी एकर जमीन भिजते. म्हैसूर राज्यातील या नदीच्या सुमारे १५ बंधाऱ्यांपैकी म्हैसूर गावानजिकचा 'कृष्णराज बंधारा' (लांबी–८६००'; उंची–१२०'), आणि 'कृष्णराज सागर' तलाव (व्याप्ती–५० चौरस मैल) सर्वधिक मोठा आहे. मद्रास राज्यातील बंधाऱ्यांपैकी 'मेत्तूर बंधारा' (लांबी–५३००'; उंची–२१४') आणि तलाव (व्याप्ती–६० चौरस मैल) सर्वाधिक मोठा आहे.

कावेरी नदीचा प्रवाह एकसारखा नसून, ती पर्वतीय मुलख्यांमधून अरुंद धारेच्या स्वरूपात, आणि सपाट प्रदेशात एक मैलाहून रुंद जलसागराच्या स्वरूपात वहाते. ३००' हून अधिक उंचीचे अनेक प्रपातहि तिच्यामध्ये असून, त्यांपैकी शिवसमुद्रम्नजिकच्या 'गगन चुक्की' धबधब्यावर कावेरी विद्युत्निर्मिती केंद्र आहे. वर्षाकाली या नदीची सरासरी उंची ३०' नी वाढते.

उपनद्या—हिच्या उपनद्यांपैकी डावीकडील दहा आणि उजवीकडील आठ उपनद्या महत्त्वाच्या असून, डावीकडील शिम्सा, आणि उजवीकडील कान्बानि–नुगु, मोयार–भवानी, नोयिल आणि अमरावती उल्लेखनीय आहेत.

२. पौराणिक साहित्यमते नर्मदा नदीची एक उपनदी (मत्स्य. १८९.१२–१३; पद्म. आदि. १६.६). मध्यप्रदेशातील राजपिपला टेकड्यांमध्ये उगम पावणारी ही नदी भडोचपासून १० मैल पूर्वेकडील शुक्ल तीर्थ येथे नर्मदेस मिळते.

कावेरी-नर्मदा संगम—पौराणिक साहित्यातील नर्मदा-माहात्म्यात याचा (कावेरी संगम) निर्देश असून (अग्नि. ११३.३; नारद. उत्तर. ७७.१३; पद्म. आदि. १६.२–२४; मत्स्य. १८९; २; १३; २०), कूर्म पुराणात 'कावेरी–नर्मदा–संगम असा सुस्पष्ट निर्देश आढळतो (कूर्म. उत्तर. ४०.४०). येथे कुबेराने यक्षाधिपत्यप्राप्त्यर्थ तपस्या केली होती. मध्यप्रदेशातील 'चोवीस अवतार'पासून एक मैलावरील कुबेरेश्वरानजिकचे आधु. कुबेर–भंडारी हेच होय (ती. पृ. २३३).

३. जंबूद्वीपान्तर्गत भद्राश्व वर्षातील एक नदी (वराह. ८२.४; वायु. ४३.२६).

४. ऋक्ष पर्वतोद्भवा एक नदी (ब्रह्म. १९.११).

५. पारियात्र पर्वतोद्भवा एक नदी (मत्स्य. ११४.२३).

**कावेरीपट्टनम्** (बंदर)—चोल राज्यान्तर्गत (आधु. तामीळनाड) पूर्व समुद्रकिनारीचे कावेरी नदीच्या मुखानजिकचे विदेशी व्यापाराचे सुविख्यात बंदर. आधु. कावेरीपट्टनम् नामक छोटे ग्राम हेच असून, तेथील बंदर सध्या वाळूमध्ये लुप्त झाले आहे. डॉ. बर्नेल यांच्या मते पुदु कावेरी (नवी कावेरी) नदीच्या मुखानजिकच्या ट्रँक्वेबर (तेलंगबंदी) गावाच्या उत्तरेस हे बंदर असावे (इंडि. अँटि. ७.४०). तंजोर जिल्ह्यातील किलैयूर गावानजिक या बंदराचे अवशेष सापडले आहेत.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या बंदराची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. बौद्ध अकित्ति जातक ( जा. ४.३३८ ) | **कावीरपट्टन** |
| २. टॉलेमी | **खबेरिस् एंपोरियम** |
| ३. प्राचीन संस्कृत साहित्य | **पुहार, काकन्दि** |
| ४. तामीळ साहित्य | **कावेरीपुंपट्टिनम्**<br>**पट्टिनम्** |
| ५. तामीळ शिलालेख साहित्य ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. २.२८७ ) | **काविरिप्पूंबटनम्** |

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**—संगम साहित्यमते चोल राजा करिकाल ( स. १५०–१८० ) ने आपली राजधानी उरगपुरहून या गावी हलविली ( कावेरी पहा ).

**बौद्ध साहित्यात**—बौद्ध अकित्ति जातकमते हे गाव 'दमिलरट्ट' ( द्रविड राष्ट्र = चोल देश ) मध्ये होते ( जा. ४.३३८ ).

**टॉलेमीच्या ग्रंथात**—या ग्रंथमते 'कावेरी ( खबेरोस ) नदीकाठचे बंदर' अशा अर्थाने या व्यापारी पेठेस 'खबेरिस् एंपोरियम' ( अक्षांश १५°–४०′ उत्तर; रेखांश १२८°–३०′ पूर्व ) नाव प्राप्त झाले होते.

**उत्खनन**—येथील उत्खननात ( स. १९६३ ) कृष्ण आणि रक्त मृत्तिकापात्रे, तसेच माल चढविण्यासाठी नदीच्या वाळवंटात बांधलेल्या विटांच्या ओट्याचे ( १८$\frac{1}{4}$′ × ७$\frac{1}{4}$′ ), आणि बोटी बांधण्यासाठी रोवलेल्या काष्ठमय स्तंभद्वयाचे अवशेष सापडले. येथील विटा नागार्जुनिकोंड येथील इक्ष्वाकुकालीन विटांसदृश आहेत.

**रोमन व्यापाराचे केंद्र**—यानजिकच्या 'वेल्लियन इरुप्पु' ( श्वेतवर्णीयांचे निवासस्थान ) स्थानी रोमन लोकांच्या प्राचीन वसाहतींचे अवशेष, तसेच ताम्र रोमन नाणे सापडले. यावरून हे रोमन व्यापाराचे केंद्र असल्याच्या तामीळ साहित्यान्तर्गत वर्णनास पुष्टी मिळते ( देशपांडे, रिव्ह्यू. पृ. ४४८-४४९ ).

**कावेरीपाकम्** ( शिलालेखस्थान )—पांड्य राजा जटावर्मन् ( प्रथम ) च्या स. १२६१ च्या शिलालेखांचे आधु. अर्काट गावानजिकचे उपलब्धिस्थान ( आर्कि. सर्व्हे. दक्षिण विभाग. स. १९०५, पृ. ४०२ ).

**कावेरीपुम्पट्टिनम्** ( बंदर )—तामीळ साहित्यमते मद्रास राज्यातील 'कावेरीपट्टनम्' बंदराचे नामांतर ( कावेरीपट्टनम् पहा ).

**कावेर्यः** ( नदी )—बृहत्संहितामते दक्षिण भारतातील मलय पर्वतोद्भवा 'कावेरी' नदीचे नामांतर ( बृ. सं. १४.१३; कावेरी १. पहा ).

**काव्यावतार** ( देशविभाग )—जयभट्ट राजाच्या नवसारी ताम्रपटमते गुजरातमधील 'कापिका' देशविभागाचे नामांतर ( इंडि. अँटि. १३.७७; कापिका पहा ).

**काश** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.५ ).

**काशकृत्स्न** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.५ ).

**काशगर** ( देश आणि नगर )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते मध्य आशियातील एक देश आणि नगर. मध्य आशियातील काशगर गावाच्या परिसरातील आधु. सिकियांग देश हाच असून, काही अभ्यासकांच्या मते पौराणिक साहित्यातील 'कारस्कर' देश हाच असावा ( कारस्कर पहा ).

**स्थानमाहात्म्य**—मध्य आशियातील पुरातन रेशमपथावरील या गावी फर्गाना, वक्षु ( सुर्खाब ), सोग्द, बाख्तर आदि गावांप्रत जाणारे रस्ते विभक्त होत असत. त्यामुळे या नगरास या साऱ्या प्रदेशाच्या व्यापारी आणि राजकीय नियंत्रणाच्या दृष्टीने महत्त्व प्राप्त झाले होते.

**राजकीय इतिहास**—सोग्द आणि बाख्तर देशांच्या व्यापारी नियंत्रणासाठी इ. स. पू. १ ल्या शतकात चीनने हा देश जिंकला. तांग राजघराण्याच्या राज्यकाली हा देश ( शु–लेह ) चिनी लष्करी प्रशासकाच्या ताब्यात असून, उत्तरकालात खोतानने, आणि तदनंतर शक लोकांनी तो हस्तगत केला. शक राज्यकाली येथे बौद्ध धर्माचा प्रथम प्रवेश झाला. कनिष्कसाम्राज्यात याचा समावेश असून, येथे, तसेच खोतानमध्ये त्याची नाणी सापडली आहेत. कालांतराने येथे पश्चिमी तुर्क राजांचे राज्य सुरू झाले. चिनी तांगवंशीय इतिहासमते इ. स. ५–७ व्या शतकात येथे यहुदी व ख्रिस्ती धर्मगुरू रहात असत.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पौराणिक साहित्य | कारस्कर (?) |
| २. बृहत्संहिता (१४.३०) | खश (?) |
| ३. ह्युएन्त्संग-पूर्वकालीन चिनी साहित्य | शु–लेह (= शिह–लि–की–लि–तो–ति = श्रीकृतति) |
| ४. ह्युएन्त्संग | क–श |
| ५. महायान बौद्ध साहित्य | क–श |
| ६. दिव्यावदान | स्वष |
| ७. मध्ययुगीन तुर्की साहित्य | कशगर |

**नामव्युत्पत्ती** — वॉटर्स यांच्या मते 'काशगर' तुर्कीभाषीय संज्ञेचा शब्दशः अर्थ 'चित्रविचित्रवर्णीय निवासस्थान' असून (मंगोल 'गर' = संस्कृत 'गृह'), याच्या 'शु–लेह' या चिनी नामांतराचा शब्दशः अर्थ 'जलनगरी' आहे. वै आणि तांग राज्यकालीन जलवेष्टित 'क–शिह' (काशगर) नगरनामावरून यास हे नाव पडले असावे. ज्युलियन यांच्या मते 'शु–लेह' हे 'शिह–लि–कि–लि–तो–ति' (संस्कृत 'श्रीकृतति') चे अपभ्रष्ट रूप असावे. परंतु 'श्रीकृतति' देशाचा निर्देश प्राचीन संस्कृत साहित्यात आढळत नाही.

**फाहियेन्च्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते येथील बौद्ध विहारात १००० महायान बौद्ध भिक्षू असून, स. ४६० मध्ये येथील राजाने एक पवित्र बुद्धवस्त्र (चीवर) चीनला पाठविले होते. त्याचे काळी येथे पंचवार्षिक बौद्ध धर्मोत्सव चालू होता.

**ह्युएन्त्संगपूर्वकालीन चिनी साहित्यात**—या साहित्यमते या देशाची 'क–श' नामक राजधानी हान राज्यकाली 'शु–लेह' नावाने सुविख्यात असून, वॉटर्स यांच्या मते मंगोल राज्यकालपर्यंत हे नगर आणि देश त्याच नावाने प्रसिद्ध होते. उत्तरकालात ते 'काशगर' (कशगर) या विदेशी नावाने प्रसिद्ध झाले. तत्रापि उत्तरकालातहि त्याचे 'शु–लेह' वैकल्पिक नाव प्रचारात होते.

**बृहत्संहितेत**—काही अभ्यासकांच्या मते या ग्रंथात निर्देशिलेले ईशान्य भारतनिवासी 'खश' लोक याच देशात रहात असावेत.

**बौद्ध साहित्यात**—महायान बौद्ध साहित्यमते या (क–श) विदेशी देशातील लोक किनऱ्या आवाजाचे असून, बौद्ध 'दिव्यावदान' च्या चिनी अनुवादमते राजकुमार अशोक तक्षशिलेहून या (कश) देशास गेला होता. त्यावरून 'दिव्यावदान' मधील 'स्वष' हे 'खष' (खश = काशगर) चे पाठभेदात्मक रूप असावे.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते 'क–श' देशाच्या १०० मैल उत्तरेकडील हा देश (क्षेत्रफळ–१००० मैल) बहुशी वालुकामय असून, त्याच्या थोड्याशा सुपीक भागात पिके, फळे, आणि फुले होत असत. लोकर आणि लोकरी रग यांसाठीहि हा देश सुविख्यात होता. यावरून ह्युएन्त्संगच्या काळी काशगर देशाची व्याप्ती सध्याहून मोठी असावी.

ह्युएन्त्संगच्या मते येथील लोक असंस्कृत आणि हरित-नेत्र असून, नवजात बालकांची मस्तके थापटून चपटी करण्याची, तसेच शरीरावर गोंदण्याची प्रथा येथे रूढ होती. येथील लोकांची बोलीभाषा स्वतंत्र आणि लिपी भारतीय वळणाची होती.

चिनी साहित्यमते यानजिकच्याच खोतान (कु–चि) देशातहि उपरोक्त चालीरीती प्रचारात असून, तेथील लोकांचे नेत्रहि हिरव्या (किरमिजी) रंगाचे होते. यावरून हे दोन्ही देश वांशिक दृष्ट्या एकात्म असावेत.

**बौद्ध धर्मप्रसार**—ह्युएन्त्संगच्या मते येथील बहुसंख्य लोक बौद्ध धर्मीय असून, येथील शेकडो बौद्ध मठांत १००० हून अधिक सर्वास्तिवादिन् बौद्ध भिक्षू होते. त्यांचे बौद्ध धर्मग्रंथांचे आणि विभाषेचे (टीकाग्रंथ) अध्ययन चांगले असले, तरी त्यांचे मर्म त्यांना अवगत नव्हते. वॉटर्स यांच्या मते पाठांतरावर विशेष जोर देणारे येथील बौद्ध भिक्षू अर्थाकडे दुर्लक्ष करीत असावेत (वॉटर्स, २. २९०–२९३).

**काशपुर** (नगर)— ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते कौशांबी नगराच्या ईशान्येकडील एक नगर. कनिंगहॅमच्या मते उत्तर प्रदेशातील गोमती नदीवेष्टित आधु. सुलतानपुर हेच होय. उनाव जिल्ह्यातील आधु. कौपरी गाव हेच असल्याचे स्मिथ यांचे अनुमान यथायोग्य वाटत नाही. नामांतर (हिंदु साहित्य)—'कुशभवनपुर'; 'कुशपुर'.

**भौगोलिक वर्णन**— ह्युएन्त्संगच्या मते कौशांबी देशातील जलराक्षस गुफेपासून १४० मैल ईशान्येस गंगा नदीच्या उत्तरेस हे (क–शे–पु–लौ; व्याप्ती–२ मैल) नगर असून, त्यानजिकच धर्मपाल बौद्ध आचार्यांचा मठ आणि बुद्धप्रवचनाच्या स्मृत्यर्थ उभारलेल्या अशोक–स्तूपाचे अवशेष होते (वॉटर्स, १.३७२-३७३; बील, २.२५६).

**काशपुरी** (ग्राम)— पाणिनीच्या गणपाठमते भारत-

वर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.९७ ).

**काशह्रद** ( ग्राम )— मैत्रक राजा ध्रुवसेन ( प्रथम ) च्या स. ५२५च्या मोय माचीआला ताम्रपटमते गुजरातमधील एक ग्राम. अहमदाबादच्या वायव्येकडील आधु. कासंद्रा गाव हेच होय ( एपि. इंडि. ३१.३००–३०१ ).

**काशाकुडी** ( शिलालेखस्थान )—पल्लव राजा नंदिवर्मन् ( द्वितीय ) च्या स. ७३८ च्या ताम्रपटाचे दक्षिण भारतातील उपलब्धिस्थान ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. २. ३४२ ).

**काशि** ( देश )—बृहत्संहितामते पूर्व भारतातील एक देश आणि लोकसमूह ( बृ. सं. १७.२५; ५.६९ ). येथील लोक 'काशयः' नावाने, आणि राजा 'काशीश्वर', 'काशिप' अथवा 'काशिराज' नावांनी सुविख्यात होता ( बृ. सं. ९.१९; ११.५९; ७८.१ ). पौराणिक साहित्यमते हा मध्यदेशान्तर्गत ( गंगा नदीचे खोरे ) गंगा-यमुना दुआबातील पाच जनपदांपैकी एक असून ( वायु. १०७; ब्रह्माण्ड. ४९.४४ ), बौद्ध अंगुत्तर निकायमते तत्कालीन भारतातील सोळा महाजनपदांमध्ये आणि सात प्रमुख देशांमध्ये याची गणना होत असे ( अङ्गुत्तर. १.२१३ ). प्राचीन साहित्यात बहुंशी सर्वत्र 'काशि' हे देशनाम आणि 'काशी' हे नगरनाम मानले असून, आम्हीहि तीच नामकरणपद्धती स्वीकारली आहे ( काशी पहा ).

उत्तर प्रदेशातील अलाहाबादपासून ८० मैल आग्नेयेकडील गंगा नदीच्या उत्तर तीरवर्ती काशी ( आधु. वाराणसी ) गावाच्या परिसरातील प्रदेश म्हणजे हा देश असून, गंगा-यमुना दुआबातील वाराणसीच्या परिसरातील प्रदेश, गंगा-गोमती दुआबाचा दक्षिण भाग, तसेच गंगा नदीच्या उत्तरवर्ती जंगलमय प्रदेश मिळून हा बनला होता ( अली, पुराणाज्. पृ. १३५ ).

**भौगोलिक परिसीमा**—या देशाच्या भौगोलिक परिसीमा पुढीलप्रमाणे होत्या:—१. उत्तरेस– कोशल देश ( आधु. सरयू–राप्ती दुआब ); २. पूर्वेस– मगध देश ( आधु. दक्षिण बिहार ); ३. पश्चिमेस– वत्स देश; ४. दक्षिणेस– चेदि आणि करूष लोकसमूह ( जा ३.३०४; ३९१; ५.४१; केंब्रिज हिस्टरी. १.३१६ ).

बुद्धपूर्वकाली भारतातील सोळा महाजनपदांपैकी एक मानला जाणारा हा देश उत्तरकालात उत्तरवर्ती कोशल देशात समाविष्ट झाला. पाणिनीच्या गणपाठात या जनपदाचा निर्देश असला तरी तत्काली तो स्वतंत्र स्वरूपात अस्तित्वात नसावा ( पा. सू. ४.१.११६ ). मगधराज अजातशत्रु आणि बिंबिसारांच्या राज्यकाली हा कधी मगध, तर कधी कोशल देशात समाविष्ट असे.

बौद्ध कालापासून या देशाची राजधानी वाराणसी येथेच होती. पौराणिक काळी 'वाराणसी' ( पौराणिक-काशी )–ला हिंदूंचे तीर्थस्थान म्हणून नवे महत्त्व प्राप्त होऊन, त्याचे 'वाराणसी' नाव मागे पडले ( काशी पहा ). मध्ययुगीन काळी 'वाराणसी' आणि 'काशि' ही उभय नावे देशनामे म्हणून प्रचारात आली. यापैकी 'वाराणसी विषया'त पूर्वकालीन 'काशि' देशाचा सारा भाग समाविष्ट असून, काशी नगरासभोवतालचा 'काशी पथक' त्यामध्येच समाविष्ट असे. इ. स. १० व्या शतकातील बंगाल रॉयल एशियाटिक सोसायटी ताम्रपटमते 'वाराणसी विषय' ( आधु. वाराणसी जिल्हा ) 'प्रतिष्ठान' भुक्तीमध्ये ( आधु. अलाहाबाद आणि वाराणसी जिल्हे ) समाविष्ट असून, 'काशीपार पथक' ( आधु. वाराणसीसभोवतालचा प्रदेश ) त्याचाच एक भाग होते ( इंडि. अँटि. १५.१३८–१४१ ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पद्म पुराण ( ब्रह्म. ३.३८ )<br>२. महाभारत ( भी. १०.४० ) | अपरकाशि |
| ३. बृहत्संहिता ( १४.७ )<br>४. बौद्ध साहित्य | काशी |
| ५. फाहियेन् | पो–लो–न (वरणा) |
| ६. ह्युएन्त्संग ( वॉटर्स, २.४६–४९ ) | पो–लो–नि–स्से ( वाराणसी, वरणासी ) |
| ७. इत्सिग् ( इंडि. अँटि. १३.१५ ) | किय–शि (काशि)<br>पो–लो–नै ( वरणशि )<br>शि–पो–लो–नै ( श्रीवरणशि ) |
| ८. इ. स. १० व्या शतकातील बंगाल रॉयल एशियाटिक सोसायटी ताम्रपट ( इंडि. अँटि. १५.१३८ ) | वाराणसी विषय<br>काशीपंथक |
| ९. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य ( कल्पद्रु. ७.२४; अभिधान. ३८९ ). | काशी, वाराणसी, वराणस, शिवपुरी |
| १०. मुसलमानी साहित्य | बनारस |

**अपरकाशि लोक**—महाभारत भीष्मपर्व, तसेच पद्म पुराणात निर्देशिलेले 'अपरकाशि' लोकहि या देशाचेच रहिवासी असावेत (म. भी. १०.४०; पद्म. ब्रह्म. ३.३८).

**व्याप्ती**—बौद्ध साहित्यमते या समृद्ध आणि सप्तविध संपत्तियुक्त देशाची व्याप्ती ३०० कोस (योजने) होती (अङ्गुत्तर. १.२१३; ४.२५२; २५६; २६०; दीघ. २.७५; जा. ३.३०४; ३९१; ५.४१).

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**—आधुनिक अभ्यासकांच्या मते पवित्रतम गंगा नदीकाठच्या या देशाची स्थापना शिवपूजक अनार्य लोकांनी केली असून, हे लोक येथे शेती, तसेच कापड आणि चांदीचा व्यापार करीत असत. कालांतराने अयोध्यानिवासी इक्ष्वाकु राजवंशाशी समकालीन बृहद्रथ-वंशीय आर्य राजांनी हा देश जिंकून, येथील पूर्वापार शिवोपासनेला नव्या यज्ञयागादि उपासनेची जोड दिली. याच वंशातील तीन काशिराजकन्यांना भीष्माने स्वयंवरात जिंकले होते. येथून पुढे या देशाच्या पूर्वेकडील मगध देश अनार्य लोकांचा बालेकिल्ला बनला.

उपनिषद्काली येथे प्रस्थापित झालेल्या ब्रह्मदत्त राज-घराण्याने क्षत्रियांच्या ज्ञानसाधनेची नवी परंपरा प्रारंभिली. येथील ब्रह्मदत्तवंशीय अजातशत्रु राजा मिथिलानरेश जनकाच्या समकालीन असून, ब्रह्म आणि जीव, जन्म आणि मृत्यु, लोक आणि परलोक यांच्या संबंधीच्या तत्त्वचर्चेत तो विशेष रस घेत असे.

महाभारतकाली हा देश मगधराज जरासंधाच्या साम्राज्यात समाविष्ट असून, जरासंधवधानंतर, तसेच भारतीय युद्धोत्तर कुरु राजांनी वत्स देशान्तर्गत कौशांबी गावी नव्या राज्याची स्थापना केल्यानंतर हा देश वत्स राज्यात समाविष्ट झाला.

गौतम बुद्धकालीन काशिराज अश्वसेनाने वैदिक कर्म-कांडाऐवजी संन्यास धर्म आणि अहिंसेचा नवा पुरस्कार प्रारंभिला. अश्वसेनपुत्र पार्श्वाने राजवस्त्रांचा त्याग करून पित्याची परंपरा पुढे चालविली. याच तत्त्वज्ञानाच्या आधारे उत्तरकालात महावीराने जैन धर्माची स्थापना केली.

बौद्ध काली हा देश परिसरातील मगध, कोशल, वत्स आणि उज्जयिनी या चार प्रमुख राज्यांपैकी एकामध्ये आलटून पालटून समाविष्ट असे. वत्स साम्राज्याच्या विनाशानंतर येथील ब्रह्मदत्त राजघराण्याचे राज्य बुद्ध-पूर्वकालीन कोसलराज कंसाने जिंकून घेतले. त्याच्याच वंशातील महाकोशल राजाने कोशला देवी नामक स्वकन्या मगधराज बिंबिसारास देतेवेळी हा देश त्यास आंदण दिला. उत्तरकालात मगधराज अजातशत्रु आणि कोसलराज प्रसेनजित्च्या दरम्यान या देशाच्या प्राप्त्यर्थ अनेक युद्धे होऊन अखेरीस हा देश पुन्हा एकवार मगध साम्राज्याचा भाग बनला. शिशुनाग, मौर्य, शुंग आणि कण्व राजघराण्यांच्या कालात हा देश त्याच साम्राज्यात होता. यापैकी अशोकाच्या राज्यकालात या देशाच्या उत्तरेकडील सारनाथला गौतम बुद्धाच्या धर्म-चक्रप्रवर्तनामुळे नवे माहात्म्य प्राप्त झाले.

शुंग राज्यकालात संस्कृत भाषा आणि यज्ञकर्मांना नवे महत्त्व प्राप्त होऊन काशि हे त्यांचे प्रमुख केंद्र बनले. पुष्यमित्र शुंगाने बौद्ध मठ भस्मसात करून काशीचे माहात्म्य वाढविले.

उत्तरकालात शक आणि ग्रीक सेनेने पाटलिपुत्रासमवेत हे नगरहि लुटून, कुशाण राजा कनिष्क काही काळ या देशाचा अधिराज बनला. पद्मावतीच्या भारशिव या शिवभक्त आणि शिवलिंगधारी नाग राजांनी या नगराची पारतंत्र्यातून मुक्तता करून, काशी येथे गंगातीरी आधु. दशाश्वमेध घाटावर अनेक अश्वमेध यज्ञ केले.

भारशिव नाग राजांनंतर काशि हा देश गुप्त साम्राज्यात समाविष्ट झाला. गुप्त सम्राट स्कंदगुप्ताने हूणांचा पराजय करून काशी नगराचे पावित्र्य अबाधित ठेवले. या गावा-नजिकच्या स्कंदगुप्ताच्या एका स्तंभलेखात '**हूणैर्यस्य समागतस्य समरे दोर्भ्यां धरा कम्पिता**' असे वर्णन आढळते.

गुप्त साम्राज्याच्या विनाशानंतर हा देश कनौजच्या हर्षवर्धनाच्या साम्राज्यात समाविष्ट होऊन शंकराचार्य आणि कुमारिलभट्टांनी येथे धर्मदिग्विजय केला. शंकराचार्य आणि मंडनमिश्र यांच्या दरम्यानचा वादहि याच गावी झाला.

कनौजच्या गुर्जर प्रतिहार राजांनी बंगालच्या पाल राजांकडून, आणि तदनंतर त्रिपुरी येथील कलचुरि राजा गांगेयदेवाने हा देश जिंकला. गझनीच्या मुहंमदाच्या पंजाबातील नियालतगिन् नामक सुभेदाराचे या देशावरील मुसलमानांचे पहिले आक्रमण त्या राजाने परतवून लावले.

कनौजच्या गाहडवालवंशीय राजांनी स्वसाम्राज्याच्या रक्षणार्थ काशी येथे उपराजधानी स्थापिली. या वंशातील जयचंद या अंतिम राजाचा शहाबुद्दीन घोरीने पराजय करून येथील मंदिरांची प्रचंड लूटमार केली, आणि येथे प्रथमच मुसलमानी अंमल स्थापिला.

घोरी राजघराण्याच्या विनाशानंतर प्रथम जौनपूरच्या

सुलतानाने, आणि नंतर बाबराने हा देश जिंकला. हुमायूनच्या राज्यकालात कबीराने हिंदु आणि मुसलमान धर्मांच्या समन्वयवादाचे प्रतिपादन काशी येथे केले. अकबराच्या राज्यकालात गोस्वामी तुलसीदासांनी 'रामचरितमानस' हा सुविख्यात ग्रंथ काशी येथे गंगा नदीकाठी लिहिला.

काशी येथे नवी मंदिरे बांधण्यास बंदी करणाऱ्या शहाजहान बादशहाच्या राज्यकालात जगन्नाथ पंडितांनी येथील गंगेकाठी 'गंगालहरी' काव्य लिहिले. शहाजहानपुत्र औरंगजेबाने येथील अनेक मंदिरे उद्ध्वस्त करून विश्वेश्वर मंदिराच्या जागी मशीद बांधली. त्याच्या कैदेतून वैराग्याच्या वेषाने दक्षिणेत परत येताना छत्रपति शिवाजीमहाराज काशी येथे दोन दिवस राहिले होते.

मोगलांच्या शहाआलम् नामक अंतिम सुलतानाने बंगाल सुभ्याबरोबरच काशीचे राज्यहि ब्रिटिशांना दिले. येथील चेतसिंह नामक स्थानिक राजाने वॉरन हेस्टिंग्जला पळवून लावण्याचा अयशस्वी प्रयत्न केला. स. १८५७ च्या स्वातंत्र्यसमरात काशी हे बंडवाल्यांचे प्रमुख केंद्र होते.

**वैदिक साहित्यात**–ऋग्वेद सर्वानुक्रमणीमध्ये 'काशिराज' प्रतर्दनाचा ( ऋ. १०.१७९.२ ), आणि अथर्ववेदाच्या पैप्पलाद शाखेत 'काशि' लोकांचा निर्देश आढळतो ( अ. वे. ५.२२.१४ ).

**शतपथ ब्राह्मणात**—या ग्रंथमते या देशाच्या धृतराष्ट्र काश्य नामक राजाने आरंभिलेला अश्वमेध यज्ञ भरत राजा शतानीक सात्राजिताच्या आक्रमणामुळे अपुरा राहिला. त्यायोगे क्रुद्ध होऊन या देशाच्या उत्तरकालीन राजांनी समस्त यज्ञकर्मावर बहिष्कार घालून येथील आर्य संस्कृति-प्रसाराला पायबंद घातला ( श. ब्रा. १३.५.४.१९; १४. ३.१.२२ ).

**उपनिषत्साहित्यात**—या साहित्यात या लोकांच्या अजातशत्रु राजाचा ( बृ. उ. २.१.१; ३.८.२ ), तसेच त्याच्या भद्रसेन आजातशत्रव ( उद्दालक आरुणि आचार्यांच्या समकालीन ) नामक पुत्राचा निर्देश आढळतो ( कौ. उ. ४.१ ).

**श्रौतसूत्र साहित्यात**—या साहित्यमते हे लोक विदेह आणि कोशल लोकांशी सहवर्ती असून ( बौ. श्रौ. १८. ४४;२१.१३ ), या लोकसमूहत्रयाचा पुरोहितहि एकच होता ( शां. श्रौ. १६.२९.५ ). बौधायन श्रौतसूत्रमते परिव्राजकव्रतस्थ काशिराज पुरूरवसपुत्र आयूने काशि, कुरु, आणि पंचाल देशांत पदयात्रा केली होती ( बौ. श्रौ. १८.४४ ).

हिरण्यकेशी गृह्यसूत्रान्तर्गत तर्पणात विष्णु आणि रुद्रस्कंधा-समवेत काशीश्वराचा निर्देश आढळतो ( हि. गृ. २.८. १९.६ ).

**कौटिलीय अर्थशास्त्रात**—या ग्रंथमते या देशाच्या एका राजाला त्याच्या पत्नीने विषप्रयोग करून ठार मारले होते.

**पाणिनीच्या गणपाठात**—या ग्रंथमते या गणराज्याची राजधानी वाराणसी येथे असून ( पा. सू. ४.२.११६ ), 'काशिदेशीय' वस्तुमात्र 'काशीय' नावाने ओळखले जात असत ( पा. सू. ४.२.११३ ). पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यात 'काशि-कोसलीय' संयुक्त देशनामाचा निर्देश आढळतो ( पतञ्जलि. २.२३३ ).

**वाल्मीकि रामायणात**—या ग्रंथमते दशरथाच्या अश्वमेध यज्ञसमयी येथील राजा सहस्र विद्वान ब्राह्मणांसह उपस्थित असून ( वा. रा. बा. १४.२३ ), कैकेयीच्या क्रोधशमनार्थ येथील सुंदर वस्तू देण्याचे आश्वासन दशरथाने तिला दिले होते ( वा. रा. अयो. १०.३७-३८ ). सुग्रीवाने विनत नामक वानरास सीताशोधार्थ येथे पाठविले होते ( वा. रा. कि. ४०.२२ ). या ग्रंथमते पुरूरवस् आणि ययातिपुत्र पूरु हे प्रतिष्ठान देशाचे राजे 'काशिराज' उपाधीने सुविख्यात होते ( वा. रा. उ. ५६.२५;५९.१९ )

**महाभारतात**—या ग्रंथमते काशिराज सर्वसेनकन्या सुनंदा ही दुष्यंतपुत्र भरताची ( म. आ.९०.३४ ) पत्नी असून, या देशाचे हर्यश्व, सुदेव आणि दिवोदास हे पूर्वकालीन राजे सुविख्यात होते ( म. अनु. ३०.१२-१५;३. ११५ ). उत्तरकालात वृषदर्भ उशीनर हा येथील राजा बनला ( म. अनु. ३२.९ ). पांडु राजाने आपल्या दिग्विजयात हा देश जिंकला असून ( म. आ. १०५.१२; भी. १०-४० ), भीमाने येथील बलंधरा नामक राजकन्येशी विवाह केला होता ( म. आ. ९०.८४ ). युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या पूर्व दिग्विजयात भीमाने येथील सुबाहु राजास जिंकले असून ( म. स. २७.६ ), सहदेवाने ( म. उ. ४९.२८ ), अर्जुनाने ( म. आ. १०५.१२), श्रीकृष्णाने ( म. द्रो. १०.१५ ), तसेच कर्णाने ( म. क. ५.१९ ) वेळोवेळी हा देश जिंकला होता. अंबास्वयंवर-प्रसंगी भीष्माने हा जिंकला असून ( म. अनु. ४४.३८ ), युधिष्ठिराचा अश्वमेधीय अश्व येथे आला होता ( म. आश्व. ८४.४ ). उपप्लव्य नगरातील उत्तरा-अभिमन्यु विवाह-समारंभास येथील राजा उपस्थित होता ( म. वि. ६७.१६ ).

येथील वाराणसीनिवासी, सुवर्ण मालाविभूषित अश्वारूढ, महारथी राजा भारतीय युद्धात पांडवपक्षात सामील

असून, शैब्यराजाच्या ३० हजार रथसेनेसमवेत तो पांडवसेनेच्या मध्यभागाचे रक्षण करीत होता (म. भी. ४७.५४). या धर्मयुद्धप्रवीण राजाचे (म. भी. २३.१७) तसेच करूष आणि चेदि देशाचे सैन्य धृष्टकेतूच्या सेनापत्याखाली होते. येथील युधिष्ठिरपक्षीय योद्धे भीष्मविरचित गारुड व्यूहात मृत झाले (म. भी. ५२.१३). 'कर्ण–शल्य संवाद' मते येथील लोक धर्मज्ञ होते (म. क. ३०. ६०–६१).

**बौद्ध साहित्यात**—या देशाच्या विगत राजकीय महत्त्वाच्या आणि वैभवाच्या स्मृती ताज्या असतांना रचलेल्या बौद्ध साहित्यात, तसेच जातकात या देशाचे प्रत्ययकारी वर्णन आढळते. बौद्ध साहित्यमते हा षोडश महाजनपदांपैकी एक देश (राजधानी–वाराणसी; अङ्गुत्तर. १.२१३) गौतम बुद्धाच्या जीवितकाली कोसलराज प्रसेनजित्च्या साम्राज्यात समाविष्ट होता (दीघ. १.२८८; मज्झिम. २.१११). येथील राजाने (काशिकाराज) प्रसेनजित्च्या जीवक नामक बंधूला नजराणा (उत्तरीय वस्त्र) पाठविला असून (विनय. १.१२८; २.१९५), प्रसेनजित्पिता महाकोशलने मगधराज बिंबिसारास कन्यादान करतेवेळी येथील एक ग्राम (कासिगाम) आंदण दिले होते (जा. ४.३४२; २.४०३; संयुत्त अट्ठ. १.११०; १२०).

भद्दसाल आणि धोनसारव जातकमते येथील राजे भारतातील राजमंडलात श्रेष्ठ (**सर्वराजानां अग्रराजाः**) आणि जंबूद्वीपसम्राट असून (जा. ४६५; ३५३), बौद्ध महावग्गातहि या देशाच्या भूतकालीन श्रेष्ठत्वाचे अनेक निर्देश आढळतात (महावग्ग. १०.२.३). भोजाजानिय जातकमते याच्या परिसरातील देश यावर एकसारखे आक्रमण करीत असून (जा. १.२३; १७८), सभोवतालच्या सात राजांनी या देशावर एकदा संयुक्तपणे हल्ला केला होता (जा. १.८१).

**राजनामावली**—महागोविंद सुत्तमते महागोविंदाने स्थापिलेल्या या देशाचा भरतवंशीय धृतराष्ट्र हा आद्य राजा असून (दीघ. २.२३५), तो रेणु राजाचा समकालीन होता.

जातकमते येथील राजे 'ब्रह्मदत्त' परंपरागत नावाने प्रसिद्ध असून, त्यापैकी उदय राजाचा निर्देश गंगमाला जातकात आढळतो (जा. ३.४५२). डॉ. काणे यांच्या मते इ. स. पू. २ ऱ्या शतकात ब्रह्मदत्त घराण्याचे राज्य येथे असावे. मत्स्यमते या राजांची संख्या शंभर असून (मत्स्य. २७३), बौद्ध साहित्यमते हे सारे राजे गौतम बुद्धाचे परम भक्त होते (जा. ३.४०६; दिव्यावदान. १३२). जातकमते हे राजे वैदिक मंत्रांचीहि संथा घेत असत (जा. ३.२८).

कश्यप बुद्धाच्या काळी या देशावर कोकनद राजप्रासादनिवासी किकी (क्रकी) राजाचे राज्य असून (महावस्तु. १.३२५), मज्झिम निकायमध्ये येथील कलाबु राजाचा निर्देश आढळतो (मज्झिम. २.४९). हे सारे राजे 'काशिराज' उपाधीने ओळखले जात असत (जा. ३.३९).

काशि आणि कोशल देशांमध्ये सदैव युद्धे चालू असून (जा. ३.२११; ११५; १.२६२; ४०९), त्यापैकी एका युद्धात काशिराजाने कोशलराज दीधितीचा पराजय केला. परंतु उत्तरकालात दीधितिपुत्र दीघावूने आपले राज्य पुन्हा प्राप्त केले (विनय. १.३३४; जा. ३.४८७; धम्मपद. अट्ठ. १.४६). अन्य एका युद्धात कोशलराजाने काशिराज महासीलवास कैद केले होते (जा. १.२६२; ४०९; उदान. अट्ठ. १२३).

कोसंबी जातक, कुणाल जातक, तसेच महावग्गमते काशीच्या ब्रह्मदत्त राजांनी कोसल देश अनेक वेळा जिंकला होता (जा. क्र. ४२८; ५३६; महावग्ग. पृ. २९४–२९९). ब्रह्मच्छत्त जातकमते अन्य एका काशिराजाने कोशल देशावर आक्रमण केले होते (जा. ३३६).

गौतम बुद्धकाली काशि देश कोशल साम्राज्यात समाविष्ट असून, कोसलराज वंक, दब्बसेन, कंस आदींनी यावर यशस्वी आक्रमणे केली होती. यापैकी वाराणसीचा आद्य यशस्वी आक्रमक कंस राजा 'बाराणसीग्गह' (वाराणसीविजेता) उपाधीने सुविख्यात होता (जा. २.४०३). उत्तरकालात लिच्छवि साह्यप्राप्त मगधराज अजातशत्रूने काशि-कोशल देश जिंकले.

बौद्ध सासनवंसमध्ये अंग, उग्गसेन, उदय, किकी, धनंजय, महासीलव, विस्ससेन, संयम आदि काशिराजांचा निर्देश असून, 'प्रत्येक–बुद्धावस्था' प्राप्त काशिराजांची नामावली 'सुत्तनिपात अट्ठ'मध्ये आढळते. सिलोनी महावंशात काशिराज दुप्पसहाच्या साठ वंशजांचा, समंकर–पुत्र असोक राजाच्या चौऱ्याऐंशी हजार वंशजांचा, तसेच ओक्काक राजाच्या सोळा पूर्वजांचा निर्देश आढळतो (महावंश. अट्ठ. १२७; १२९–१३०). विस्ससेन, उदय, आणि भल्लाटिय राजांचा निर्देश जातकात असून (जा. क्र. २६८; ४५८; ५०४), देवदत्त भांडारकर यांच्यामते पौराणिक साहित्यातील 'विष्वक्सेन', 'उदक्सेन', आणि

'भल्लाट' राजे हेच होत (मत्स्य. ४९.५७; वायु. ९९.१८०; विष्णु. ४.१९.१३). मात्र बौद्ध आणि पौराणिक साहित्यातील अन्य काशिराजांची अशी सांगड घालता येत नाही. या राजांच्या काळी काशि हे सार्वभौम राज्य असावे.

अस्सक जातकमते एका काशिराजाने अश्मकराजधानी पोतलि जिंकली असून (जा. २०७), सोननंद जातकमते मैनाज नामक काशिराजाने कोशल, अंग, आणि मगध देश जिंकले होते (जा. ५३२).

बौद्ध साहित्यमते या व्यापाराचे केंद्रस्थानभूत देशातील विक्रीयोग्य मालांचे काफिले दूर देशाप्रत जात असत. श्रावस्ती आणि राजगृह गावांप्रत जाणारे व्यापारी हमरस्ते येथूनच फुटत असत (विनय. १.२१२; २.१०; महा. ५.११४). उत्तम प्रतीच्या रेशमी कापडासाठी, तसेच अंगरख्यांसाठी हा देश प्रसिद्ध असून, त्यापैकी अनेकांची किंमत दर नगास रु. १ लाख असे (जा. ५.१५१; ४५०). येथील 'काशि-विलेपन' आणि काशि-चंदन' ही सुगंधी उटणी साऱ्या भारतात सुविख्यात होती (अङ्गुत्तर. ३.३९१; उदान अट्ठ. ३३२).

**ग्राम**—बौद्ध साहित्यमते येथील निम्नलिखित ग्रामे बौद्ध काली प्रसिद्ध होती:—१. वासभगाम; २. मच्छिकासंड; ३. कीटागिरि ४. धम्मपालगाम (मललसेकर, १. ५९२–५९३).

**बौद्ध मठ**—बौद्ध साहित्यमते काशी नगराव्यतिरिक्त या देशाच्या अन्य भागांतहि एक-दोन बौद्ध मठ होते. परंतु तत्संबंधी सुस्पष्ट माहिती तेथे मिळत नाही. या मठातील अध्यकासी नामक गणिकेला गौतम बुद्धाने दीक्षा दिली असून (थेरगाथा अट्ठ. ३०–३१), सारिपुत्त, महामोग्गलान, महाकात्यायन, रेवत, उपालि, आनंद, राहुल आदि बौद्ध भिक्षू येथे धर्मप्रसारार्थ आले होते (विनय. २.३५९–३६०).

**मंत्रविद्या**—जातकमते या देशातील लोकांची गंडेदोरे, जारण–मारण आदि मंत्रविद्येवर विशेष श्रद्धा होती (जा. १.४५५; ३.२३३; ४.११५; ३३५).

**बृह संहितेत**—या ग्रंथमते हा देश कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या पूर्व भागात (आधु. बंगाल) होता (बृ. सं. १४.७; १७.२५). त्या भागात या नावाचा अन्य देश नसल्याने येथे गंगा नदीकाठच्याच काशि देशाचा निर्देश अभिप्रेत असावा (मार्क. ५५.१४).

**पौराणिक साहित्यात**—या साहित्यमते हे मध्यदेशान्तर्गत जनपद गंगा नदीच्या मार्गावर असून (वायु. ४७.४८; ब्रह्माण्ड. १६.५१; १८.५१; मार्क. ५४.३२; पद्म. आदि. ६.३७), विष्णुधर्ममते हा पूर्व भारतात होता (विष्णुधर्म. १.९.३).

वायु पुराणात या देशाच्या नहुषवंशीय धर्मवृद्धपुत्र काश राजाचा, तसेच त्याच्या काशर, राष्ट्र आणि दीर्घतपस् नामक पुत्रांचा निर्देश आढळतो (वायु. ९२). हरिवंशमते अनेनस्‌वंशीय काश राजाचे पुत्र 'काशी' वांशिक नावाने सुविख्यात होते (ह. वं. २९). पौराणिक साहित्यात अन्यत्र 'काशि–कोशल' (पद्म. आदि. ६.३५; मत्स्य. ११४.३४; वायु. ४५.११०), आणि 'काशि–मत्स्य' (ब्रह्माण्ड. १८.५१) जोडदेशांचा निर्देश आढळतो.

**चिनी साहित्यात**—फाहियेनच्या प्रवासवर्णनमते या देशाची राजधानी 'पो-लो-न' (वरणा) गावी असून, ह्युएन्‌त्संगच्या प्रवासवर्णनात याचा निर्देश 'पो–लो–नि–स्से' (वाराणसी, वरणासी) नावानेच आढळतो. इत्सिंगच्या प्रवासवर्णनात याची 'किय–शि' (काशि), 'पो–लो–नै' (वरणशि), आणि 'शि–पो–लो–नै' (श्रीवरणशि) वैकल्पिक नावे आढळतात.

**ह्युएन्‌त्संगच्या प्रवासवर्णनात**—ह्युएन्‌त्संगच्या मते या (वाराणसी) देशाची (व्याप्ती–८०० मैल) राजधानी गंगा नदीच्या पूर्व किनाऱ्यावर (व्याप्ती– $3\frac{1}{2} \times 1\frac{1}{4}$ मैल) होती (काशी पहा). या बौद्धेतर व्याप्त देशात ३० बौद्ध मठ, १०० हिंदु देवमंदिरे, आणि सम्मतिय सांप्रदायाचे ३००० बौद्ध भिक्षू असून, येथील लोक सौम्य, विनम्र, आणि ज्ञानोपासक होते. ह्युएन्‌त्संगच्या जीवनचरित्रमते या देशात सर्वास्तिवादिन् सांप्रदायाचे २००० बौद्ध भिक्षू होते.

ह्युएन्‌त्संगच्या मते येथील हिंदु देवमंदिरात १००० हून अधिक श्मश्रुकृत अथवा जटाधारी शैव उपासक असून, येथील भस्मविलेपित नग्न साधू देहदंडसाधनेने जन्म-मरणाच्या दुःखचक्रातून मुक्तीचा प्रयत्न करीत असत.

उपरोक्त वर्णनावरून इ. स. ७ व्या शतकात येथील बौद्ध धर्माचा लोप होऊन, त्यांची जागा हठयोगी हिंदु धर्माने घेतली असावी. येथील ऋजु आणि शालीन श्रीमान लोकांच्या वर्णनावरून तत्काली हा देश समृद्धिशिखरावर असावा.

**इत्सिंगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते हा देश 'किय-वै-लो-युसि' (कपिलवस्तु) देशापासून २९६ मैल दक्षिणेस होता (इंडि. अँटि. १३.१५).

**मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात**—या साहित्यात याची 'काशी', 'वाराणसी', 'वराणस', आणि 'शिवपुरी' नामांतरे दिली आहेत (कल्पद्रु. ७.२४; अभिधान. ३८९; आय्. एच्. क्यू. १९.२१५).

**मुसलमानी साहित्यात**—या ग्रंथकाली 'काशि' हे देशनाम आणि 'वाराणसी' या नगरनामाची जागा 'बनारस' या फार्सी नावाने घेतली (तबक्त् नासिरी. रॅव्हर्टी अनुवाद. पृ. ४७०; ६२७).

**राजधानी**—बौद्ध जातकमते वाराणसीव्यतिरिक्त पोतलि आणि सुरुंधन गावी या देशाची राजधानी होती. यापैकी 'सुरुंधन' हे 'वाराणसी'चे नामांतर असून, 'पोतलि' या दक्षिण भारतातील गावी या साम्राज्याची उपराजधानी असावी (मललसेकर, १.५९२).

**काशि-कोशल** (देशद्वय)—वाल्मीकि रामायण, महाभारत आणि पौराणिक साहित्यमते पूर्व भारतातील एक जनपद (वा. रा. कि. ४०.२२; म. भी. १०.३८; क. ५.१९; पद्म. आदि. ६.३५). काशि आणि त्याच्या पूर्व सरहद्दीवरील कोशल देशांचा संयुक्त निर्देश येथे अभिप्रेत असावा. नामांतर (पौराणिक साहित्य)—'काशि–कोसल'; (गो. ब्रा. २.१०; दीघ. १८)—'काशि–कौशल्य'.

मत्स्यमते हा मध्यदेशात असून (मत्स्य. ११४.३५; वायु. ४५.११०), पूर्व भारतातील आर्य-वसाहतीकरणामुळे हा प्रदेश मध्यदेशात समाविष्ट झाल्यानंतरचा हा निर्देश असावा.

**काशि-मत्स्य** (देशद्वय)—ब्रह्माण्डमते पश्चिम भारतातील गंगा नदीकाठचे एक जनपद (ब्रह्माण्ड. १८.५१). काशि आणि त्याच्या पश्चिम सरहद्दीवरील मत्स्य देशाचा संयुक्त निर्देश येथे अभिप्रेत असावा.

**काशिका** (नगरी)—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते 'काशी' नगराचे नामांतर (शब्दरत्न. १०.१६; काशी पहा).

२. (नदी) मत्स्यमते शुक्तिमत् पर्वतोद्भवा 'ऋषिका' नदीचे नामांतर (मत्स्य. ११४.३२; ऋषिका पहा)

**काशी** (नगर आणि तीर्थक्षेत्र)—बृहत्संहितामते पूर्व भारतातील एक नगर (बृ. सं. ५.७२; १०.४; १३; १४.७; ३२.१९). ब्रह्माण्डमते भारतातील सत मोक्षपुरींमध्ये याचा समावेश होत असे (ब्रह्माण्ड. ४.४०.९१; अयोध्या पहा). महाभारतादि ग्रंथांत 'अमरावती' आणि 'तीर्थराज' गौरवोगाथींनी संबोधिलेले हे नगर (म. अनु. ३०.१६–१८; त्रिकाण्ड. ३२), हिंदु, बौद्ध आणि जैनधर्मीयांचे, तसेच वैदिक, तांत्रिक, लिंगायत आदि हिंदु सांप्रदायांचे प्राचीनतम, श्रेष्ठतम आणि सर्वाधिक लोकप्रिय तीर्थस्थान आहे. राजकीय, धार्मिक, सांस्कृतिक, आणि शैक्षणिक दृष्ट्या हजारो वर्षांचा अखंड इतिहास आणि परंपरा असलेले काशीइतके पुरातन नगर भारतवर्षात अन्यत्र क्वचितच आढळते.

उत्तर प्रदेशातील अलाहाबादच्या ८० मैल आग्नेयेकडील गंगा नदीच्या उत्तर तीरवर्ती गंगा–वारणा संगमस्थानीचे आधु. वाराणसी नगर हेच होय. गंगा नदीच्या ४ मैल लांबीच्या अर्धचंद्राकृती पात्राच्या डाव्या उतारावरील या गावी नदीकिनारा आणि पात्र यांच्या दरम्यान यात्रेकरूस्नानार्थ, तसेच प्रेतदहनार्थ अनेक घाट बांधले आहेत.

या स्थानाचे आधु. 'बनारस' हे फार्सी नावहि 'वाराणसी' चेच अपभ्रष्ट रूप आहे. स्थानिक आख्यायिकामते 'बनार राजस्थापित नगर' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले. परंतु ऐतिहासिक दृष्ट्या ते असंभव वाटते.

पद्ममते या नगराच्या ईशान्य आणि नैर्ऋत्य सरहद्दीवरील वारणा (वैदिक 'वरणावती'; अ. वे. ४.७.१) आणि असि नद्यांचे नावांवरून यास 'वाराणसी' नाव मिळाले (पद्म. आदि. १४.१९१–२१८). यापैकी अलाहाबादच्या उत्तरेकडील वारणा ही तुलनेने मोठी असून (एकूण लांबी—१०० मैल), असि ही निर्झरसदृश छोटी आहे. मॅक्डोनेल यांच्या मते अथर्ववेदकालीन वरणावती नदीकाठच्या या नगराचे 'वाराणसी' नाव अधिक पुरातन असून, 'काशी' नाव पौराणिक म्हणजेच उत्तरकालीन आहे. बौद्ध आणि जैन साहित्यातहि 'वाराणसी' नावानेच याचे वर्णन आढळते. तथापि 'क्षेत्रराज' नात्याने याचे माहात्म्य संवर्धिणाऱ्या पौराणिक साहित्यात यास 'काशी' म्हटल्याने आम्हीहि तेच नाव स्वीकारले आहे.

**महत्त्व**—भारतातील पवित्र शहर म्हणून गेल्या तीन हजार वर्षांहून अधिक काळ सुविख्यात असणारे हे तीर्थ प्राचीनत्व, सातत्य, आणि जनसामान्यांचे श्रद्धास्थान या तीनहि दृष्टींनी अद्वितीय आहे. भारतीयांच्या धर्मभावनेचा उद्रेक, तसेच शुचिता व विद्येची अखंड परंपरा यांचा मनोहारी संगम येथे असून, अनेकविध धार्मिक, सांस्कृतिक आणि राजकीय आक्रमणांना तोंड देऊनहि याचे श्रेष्ठत्व शतकानुशतके अबाधित राहिले आहे. हिंदु धर्माच्या असंख्य पंथांप्रमाणेच बौद्ध आणि जैन धर्मांचेहि हे आद्य

पीठ असून, बोधिगया येथे आत्मसाक्षात्कारप्राप्त गौतम बुद्ध आपल्या नवधर्माच्या उद्घोषार्थ याच गावी आला, यावरून याचे स्थानमाहात्म्य सिद्ध होते.

बौद्ध 'अभिधानप्पदीपिका'मते काशी हे भारतातील वीस पुरातन नगरांपैकी असून, महापरिनिब्बान सुत्तमते कपिलवस्तु, कुशीनारा आणि वाराणसी ही तत्कालीन भारतातील तीन सर्वश्रेष्ठ तीर्थस्थाने होती. गौतम बुद्धाच्या परिनिर्वाणास योग्य नगर म्हणून बुद्धशिष्य आनंदाने याचा निर्देश केला होता ( दीघ. २.१४६ ). यावरून बुद्धाच्या परिनिर्वाणकाली ( इ. स. पू. ५ वे शतक ) चंपा, राजगृह, श्रावस्ती, साकेत, कौशांबीप्रमाणेच हेहि भारतातील एक सुविख्यात नगर असावे ( महासुदस्सन, एस्. बी. ई. ११.२४७ ).

**शिवस्थान**—काशी, प्रयाग आणि गया ही तीन हिंदुतीर्थे 'त्रिस्थली' नावाने सुविख्यात असून, नारायणभट्टकृत ( स. १५१३-१५७० ) 'त्रिस्थलीसेतु' मध्ये त्यांचे माहात्म्यवर्णन आढळते. या तीन क्षेत्रांपैकी काशी हे विश्वेश्वर शिवाचे स्थान सर्वश्रेष्ठ ( तीर्थराज ) असून, स्कंदमते त्रैलोक्यनगराधिपती शिव काशीरूपी राजप्रासादात अखंडपणे निवास करतो—

**त्रैलोक्यनगरे चात्र काशी राजगृहं मम ।**

( स्कन्द. काशी. उ. ७९.४४ ).

**नगरवर्णन**—महाभारतमते ब्राह्मण-क्षत्रियादि चातुर्वर्णीयांनी युक्त असे हे नगर इंद्राच्या अमरावतीप्रमाणे सकल संपत्तिसमृद्ध आणि संपन्न बाजारपेठांनी व्याप्त होते. याची तटबंदी उत्तरेस गोमती आणि दक्षिणेस गंगा नदीपर्यंत भिडली असून ( म. अनु. ३०.१६-१८ ), वाल्मीकि रामायणमते तीमध्ये अनेक भव्य प्रवेशद्वारे होती ( वा. रा. उ. ३८.१७ ). जातकमते या नगराच्या तटबंदीमध्ये चार प्रवेशद्वारे आणि विषय नामक श्रेष्ठीने बांधलेली चार भिक्षागृहे होती ( जा. ३.१२९ ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या क्षेत्राची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा ).

**नामव्युत्पत्ती**—प्राचीन साहित्यात याच्या पाच प्रमुख नामांतरांची व्युत्पत्ती निम्नप्रकारे आढळते :—

( १ ) **काशी**—स्कंदमते 'निर्वाणमार्गावरील प्रकाशदात्री' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले ( संस्कृत 'काश्' = चकाकणे ). 'शिवाच्या दिव्य प्रकाशा'चा अथवा 'शिवप्रसादप्राप्त ब्रह्मप्रकाशा'चा निर्देश येथे अभिप्रेत असावा. अन्य अभ्यासकांच्या मते 'चंद्रवंशीय काशिराजाचे नगर' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले.

( २ ) **वाराणसी**—स्कंदमते 'वरणा आणि असि नद्यांच्या दरम्यानचे नगर' अशा अर्थाने यास हे ( वरणा + असि ) नाव प्राप्त झाले ( स्कन्द. काशी. ३०; वामन. १५.५०. ५३; पद्म. ब्रह्म. १७.५० ). जाबालोपनिषद्मते 'इंद्रियदोषविमोचक (वरणा) आणि पापनाशक (नासि) आत्म्याचे नगर' असा गूढार्थ येथे अभिप्रेत असून, हा आत्मा भृकुटीद्वय ( वरणा ) आणि नासिका ( नासि ) यांच्या दरम्यान निवास करीत असल्याचा श्लेषहि तेथे सांगितला आहे.

( ३ ) **अविमुक्त**—लिंगमते 'पापरहित' ( अवि+मुक्त ) अशा अर्थाने, अन्य पौराणिक साहित्यमते 'शिव-पार्वतींनी कधीहि न त्यजिलेले' ( अ-विमुक्त ) अशा अर्थाने, तसेच अन्य अभ्यासकांच्या मते 'मरणोत्तर मुक्तिप्रद' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले.

( ४ ) **आनंदवन** ( आनंदकानन )—स्कंदमते 'शिवाला आनंदप्रद' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले. स्कंद पुराण काशी खंडमते कैलास पर्वतावर स्थलांतरित झाल्यानंतरहि या प्रिय स्थानी शिवाने आपले प्रतिनिधीभूत लिंग मागे ठेवल्यामुळे याचे 'आनंदवन' ऐवजी 'अविमुक्त' हे नवे नाव रूढ झाले ( स्कन्द. काशी. ३९.७४ ).

**५. महाश्मशान**—स्कंदमते 'विश्वाच्या प्रलयकाली पंचमहाभूते प्रेतवत् ( श्म ) आडवी ( शान ) पडण्याचे स्थान अथवा 'मृत व्यक्तीचे मुक्तिप्राप्तिस्थान' अशा अर्थाने ( स्कन्द. काशी. ३०.२-४; ११ ), आणि पद्ममते 'प्रलयंकर शिवाचे निवासस्थान' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले.

**व्याप्ती**—संभव जातक, सरभ-मिग जातक आणि भूरिदत्त जातकमते या ( वाराणसी ) नगराची व्याप्ती बारा योजने ( ८५ मैल ) असून ( **द्वादशयोजनिकं सकलं वाराणसीनगरम्**; जा. ४८३; ५१५; ५४३ ), तत्कालीन भारतवर्षातील मिथिला आणि इंद्रप्रस्थ या विशाल नगरांहून ( व्याप्ती ७—योजने ) हे दुपटीने मोठे होते ( जा. ४८९; ५४५ ). व्हाइस डेव्हिड्स यांच्या मते वरणा आणि असि नद्यांच्या दरम्यानच्या या नगराच्या साऱ्या उपनगरांचा समावेश येथे अभिप्रेत आहे ( बुद्धिस्ट इंडिया. पृ. ३४ ).

**मतांतरे**—याच्या व्याप्तीसंबंधी प्राचीन साहित्यात निम्नलिखित मतांतरे आढळतात :—

## काशी नगराची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| (१) वाल्मीकि रामायण | |
| १. (उ. ३८.१७) | वाराणसी |
| २. (उ. ३८.१९) | काशेयपुर |
| (२) महाभारत | |
| १. (अनु. ३०.१६–१८) | अमरावती |
| २. (उ. ४८.७६) | काशीपुरी |
| (३) स्कन्द पुराण | |
| १. (काशी. ६;२६.४-५) | काशि |
| २. काशी खंड (२६.४–५) | अविमुक्तक, आनंदवन, महाश्मशान, वाराणसी, रुद्रावास |
| ३. („ ३०.११२) | देवीपुर, विष्णुपुर |
| ४. („ ३२.८५) | आनंदकानन |
| (४) बृहत्संहिता (५.७२;१०४ १३; १४.७; ३२.१९) | काशि |
| (५) पाणिनीचा गणपाठ (४.२.९७) | वाराणसी |
| (६) पतंजलीचे व्याकरण महाभाष्य (२.३९३) | जित्वरी, वाराणशी |
| (७) प्राकृत शिलालेख (ल्यूडर्स सूची. क्र. ९२५) | वाराणसी |
| (८) बौद्ध साहित्य | |
| १. (जा. ५.५४;६.१६५, धम्मपद टीका. पृ.१८७) | काशीनगर, काशीपुर |
| २. दीघ निकाय (३.७५) | केतुमती |
| ३. बुद्धचरित (एस्. बी. ई. १४९.१६९) | वणारा |
| ४. उदय जातक | सुरुंधन |
| ५. सुतसोम जातक | सुदर्शन |
| ६. सोणनंद जातक | ब्रह्मवर्धन |
| ७. खंडहाल जातक | पुष्पवती |
| ८. युवंजय जातक (४.११९) | रम्मनगर |
| ९. संख जातक | मोलिनी (मालिनी) |
| १०. अन्य बौद्ध साहित्य | वरणा, बाराणसी, बारणासी |
| (९) चिनी साहित्य | |
| १. ह्युएन्त्संगचे प्रवासवर्णन | पो–लो–नि–स्से (वाराणसी) |
| २. इ-त्सिंगचे प्रवासवर्णन | कसेरु (काशी) |
| ३. अन्य चिनी साहित्य | नाशि, ति-भिऔ |
| (१०) जैन विविधतीर्थकल्प (पृ. ५२) | वाणारसी |
| (११) टॉलेमी | कस्सिद, कस्सिदिय (काशी), एररस (वाराणसी) |
| (१२) ऐन्–इ–अकबरी | वाराणशी |
| (१३) शिलालेख साहित्य | |
| १. गुप्त मुद्रालेख | वाराणसी |
| २. प्रकटादित्य राजाचा सारनाथ शिलालेख (गुप्त इन्स्क्रि. पृ. २८६) | काशि |
| ३. कुमारपाल राजाचा वि. सं. १२२५ चा शिलालेख (भावनगर इन्स्क्रि. १८६) | वाराणसी |
| (१४) मध्ययुगीन शब्दकोश साहित्य | |
| १. (कल्पद्रु. ११.२१) | आनंदकानन, महाश्मशान, वरणासी, वाराणशी, अविमुक्तक, आनंदवन |
| २. (अभिधान. १३२ ९७४; अभिरत्न. २. १३२, कल्पद्रु. ११.२०–२१; मेदिनी. १७.३, शब्दरत्न. ५२.५२.३५२; ५, उणादि. ७५.१, औणादिक १९२.३३४, वैजयन्ती. ३८.७९) | काशि |
| ३. (शब्दरत्न. १०.१६) | काशिका |
| ४. ( „ ५२.२५) | कासि, कासी, वनारसी, शिवपुरी |
| ५. (कल्पद्रु १०.२०; त्रिकाण्ड. ३२.१५) | जित्वरी, तपोधन |
| ६. (त्रिकाण्ड. ३२.१६) | तीर्थराजी |
| ७. (कल्पद्रु. १०.२०) | पुरिश्रेष्ठा, शिवपू |
| ८. (त्रिकाण्ड. ३२.१६) | वाराणसि |

## काशी नगराची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| ९. ( शब्दरत्न. ५२.२५, अभिधान. १३२. ९७४; कल्पद्रु. ११.२१ ) | वराणसि, वरणासि |
| १०. (शब्दरत्न ३३९.१७) | वारणसि |
| ११. ( वैजयन्ती. १५९.१३ ) | वारणासी<br>वाराणसी |
| १२. ( वैजयन्ती. १५९. १३; अभि. १३२.९७४; त्रिकाण्ड. ३२.१६; शब्द-रत्न. ५२.२५; ३३९. १७; औणादिक. १९२. ३३४ ) | वाराणसी |
| १३. ( कल्पद्रु. ११.२१ ) | वाराणशी |
| १४. ( ,, ११.२२ ) | शिवलिंग |
| १५. ( ,, ७.२४ ) | वराणस |
| १६. ( अनेकार्थ. ४. २०० ) | संयमिनी |
| ( १५ ) गुरुचरित्र | आनंदवन |
| ( १६ ) औरंगजेबकालीन मुसलमानी साहित्य ( शेरिंग, पृ. ३२ ) | मुहंमदाबाद |
| ( १७ ) फार्सी साहित्य | बनारस |

( १ ) **मत्स्य आणि नारदीय पुराणात**— या ग्रंथमते पूर्वेस, दक्षिणेस आणि उत्तरेस अनुक्रमे गंगा, असि आणि वरणा नद्या आणि पश्चिमेस विनायक मंदिर ( आधु. देहली विनायक ) यांच्या दरम्यानच्या या क्षेत्राची लांबीरुंदी २३⁄४ × १⁄२ योजने होती ( मत्स्य. १८३.६१–६२ ).

( २ ) **पद्म आणि अग्नि पुराणात**— या ग्रंथमते या वर्तुलाकृती क्षेत्राची त्रिज्या मध्यमेश्वर लिंग आणि विनायक मंदिरांनी बनली असून ( अग्नि. ११२.६ ), त्यापैकी विश्वेश्वर मंदिराच्या परिसरातील भागास ( त्रिज्या–२०० धनु = १२००′) 'अविमुक्त-क्षेत्र' म्हणत असत (चतुःसीमा– **१. पश्चिमेस**— गोकर्णेश्वर; पूर्वेस– गंगा नदीचा मध्यभाग; **३. उत्तरेस**– भारभूत; **४.** दक्षिणेस–ब्रह्मेश्वर ).

( ३ ) **पद्म आणि स्कंद पुराणात**— पद्ममते दोन योजने लांबीच्या दक्षिणोत्तर गंगा नदीने युक्त अशा या ब्रह्मन्-प्रदत्त शिवस्थानाची व्याप्ती ५ कोस होती. स्कंद पुराण काशी खंडातहि या ( अविमुक्त ) क्षेत्राची व्याप्ती ५ कोसच दिली आहे.

( ४ ) **लिंग पुराणात**—या ग्रंथमते याची व्याप्ती एक योजन ( ४ कोस ) होती.

( ५ ) **जातकात**—या ग्रंथमते याची व्याप्ती १२ योजने होती ( जा. ४.३७७; ६.१६० ).

( ६ ) **ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते याची व्याप्ती ३२⁄३ × १२⁄४ मैल होती ( बील, २.४४ ). यावरून त्याचे काळीहि वारणा आणि असि नद्यांच्या दरम्यानचा प्रदेश यामध्ये समाविष्ट असावा.

( ७ ) **ऐन्-इ-अकबरीमध्ये**—या ग्रंथमते या विशाल धनुष्याकृती नगराच्या दक्षिणेकडील गंगा नदी धनुष्याच्या प्रत्यंचेप्रमाणे होती ( ऐ. अ. २.१५८ ).

**स्थापना**—महाभारत आणि पौराणिक साहित्यमते काशिराज दिवोदास हा या नगराचा संस्थापक असून, इंद्राने दिवोदासाप्रीत्यर्थ नव्वद नगरे जिंकल्याच्या ( ऋ. १.१३०.७ ), अथवा दिवोदासाला शंभर दगडी नगरे प्रदान केल्याच्या ( ऋ. ४.३०.२० ) वैदिक आख्यायिकेच्या आधारेच ही कल्पना रूढ झाली असावी. महाभारतमते दिवोदासपितामह हर्यश्व आणि पिता सुदेव या काशिराजांना वीतहव्य ( हैहय ) राजाने गंगा–यमुना दुआबात ठार मारल्यानंतर दिवोदासाने इंद्राज्ञेवरून गोमती नदीच्या उत्तर किनाऱ्यावरील हे ( वाराणसी ) नगर स्थापिले ( म. अनु. ३०.१६ ). उत्तरकालात वीतहव्याने एक हजार दिवस युद्ध करून दिवोदासाचे हे समृद्ध नगर जिंकले, आणि त्यास भरद्वाज ऋषींच्या आश्रमात पळवून लावले. कालांतराने दिवोदास आणि ययातिकन्या माधवी-पुत्र प्रतर्दनाने वीतहव्याचा पराजय केला ( म. उ. ११५.१–१५; अनु. ३०.३० ).

हरिवंशमते ऐलपुत्र आयुवंशीय शुनहोत्राच्या काश, शल आणि गृत्समद नामक पुत्रांपैकी काश राजापासून 'काश्य' लोक उत्पन्न झाले. काशकुलोत्पन्न धन्वंतरि राजाच्या दिवोदास नामक प्रपौत्राने वाराणसीच्या भद्रश्रेण्य राजास ठार मारून तेथे नवी वसाहत स्थापिली. परंतु शिवाने 'निकुंभ' गणांच्या द्वारा याचा नाश करून आणि हे नगर एक सहस्र वर्षे उजाड आणि उद्ध्वस्त ( अविमुक्त ) राहण्याचा शाप देऊन तो स्वतः येथे राहू लागला.

कालांतराने भद्रश्रेण्यपुत्र दुर्दमाने पुनर्वसित केलेले वाराणसी दिवोदासपुत्र प्रतर्दनाने पुन्हा जिंकले, आणि

त्याच्या अलर्क नामक पुत्राने येथे नवी वसाहत स्थापिली (ह. वं. १.२९.६९–७७).

वायुमते निकुंभ नामक शिवपुत्र गणेशावताराची दीर्घकाल उपासना करूनहि दिवोदासपत्नी सुयशेला पुत्रप्राप्ती झाली नाही. तेव्हा तिने वाराणसी येथील निकुंभ मंदिर उद्ध्वस्त करताच निकुंभाने हे नगर उद्ध्वस्त होण्याचा शाप दिला. त्यानुसार क्षेमक राक्षसाने हे उद्ध्वस्त केले (वायु. ९२.२७–५२; ब्रह्माण्ड. ६७.३०–५५; ब्रह्म. ११.४३). कालांतराने दिवोदासपौत्र अलर्काने क्षेमकाचा वध करून ते पुन्हा वसविले (ब्रह्माण्ड. ३.६७–७२; वायु. २३०.६९).

काही अभ्यासकांच्या मते वाराणसी नगराच्या आर्य वसाहतीकरणाचा, तसेच शिवोपासनास्वीकृतीचा रूपकात्मक निर्देश उपरोक्त आख्यायिकात अभिप्रेत आहे. अनार्यांच्या शिवोपासनेच्या केंद्रस्वरूप वाराणसी नगरातील ही उपासना भारतवर्षातील आर्य वसाहतीकरणानंतरहि चालू असून, अनार्यांच्या उपनिषद्प्रणीत शिवोपासनेचा आर्यांनी स्वीकार केल्यानंतरच येथील आर्य वसाहत सुस्थिर बनली. उत्तरकालातहि आद्य शिवोपासनाकेंद्र म्हणून याचे महत्त्व अबाधित राहिले. डॉ. काणे यांच्या मते येथील आर्य वसाहतीकरण इ. स. ३–४ थ्या शतकात पूर्ण झाले असावे.

**पौंड्रक वासुदेव-आख्यान**—महाभारत, तसेच विष्णु आणि ब्रह्म पुराणातील शिवोपासक काशिराजनिर्मित काशीनगररक्षक कृत्येच्या आख्यायिकेवरून येथील अनार्यांचे प्राबल्य कृष्णाचे काळापर्यंत चालू असावे. विष्णुमते पुंड्र, करूष, आणि वंग देशांच्या पौंड्रक वासुदेव राजाने काशिराजाच्या साह्याने कृष्णावर आक्रमण केले असता, कृष्णाने पौंड्रकाचा आणि काशिराजाचा वध करून त्याचे मस्तक या नगराच्या रोखाने भिरकावले. कालांतराने काशिराजपुत्राने शिवोपासनेच्या साह्याने काशी नगररक्षक कृत्या निर्मिली. तिच्या संहारार्थ कृष्णप्रक्षेपित सुदर्शन चक्राने वाराणसी नगर आणि तेथील राजा व नगरवासी दग्ध झाले. या घटनेमुळे काशी नगर खऱ्या अर्थाने 'अविमुक्त' बनले (विष्णु. ५.१४–३९; ब्रह्म. २०७). महाभारत सभापर्वात, तसेच उद्योगपर्वात या घटनेचा ओझरता निर्देश आढळतो. (म. स. १४.१८–२०; ३४. ११; उ. परि. १.७.२).

भागवतमते पौंड्रक वासुदेववधानंतर कृष्णाने त्याच्या सुदक्षिण नामक मायायुद्धप्रवीण पुत्रास पराजित केले (भा. १०.६६). पद्ममते पौंड्रक वासुदेव आणि शिववरोन्मत्त काशिराज या दोन्ही एकच व्यक्ती असून, कृष्णाने त्याचा शिरच्छेद करून, आणि पौंड्रकपुत्र दंडपाणिनिर्मित कृत्येचा नाश करून हे नगर भस्मसात केले (पद्म. उत्तर. २७८).

**पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यात**—'वाराणसी–निष्क्रामित व्यक्ती' अशा अर्थाने 'निर्वाराणसि' संज्ञेचा प्रयोग या ग्रंथात आढळतो. (जसे–'निष्कौशांबि'; पतञ्जलि. १.२१६; ३०१). या ग्रंथमते गंगा नदीकाठचे हे नगर (पतञ्जलि. १.३८०) वणिक्जनात 'वाराणशी जित्वरी' नावाने प्रसिद्ध होते (पतञ्जलि. २.३९३).

या ग्रंथमते काशी आणि मथुरानिर्मित 'काशिक' आणि 'माथुर' कापडाच्या किंमतीत फार मोठी तफावत असे (पतञ्जलि. २.४१३; काणे, जे. बी. बी. आर. ए. एस्. २७.३८). यावरून इ. स. पू. २०० मध्ये येथील तलम कापड आजच्याप्रमाणेच सुविख्यात असावे. देशनाम आणि नगरनाम वैकल्पिक अर्थांनी 'काशी'चा प्रयोग येथे प्रथमच आढळत असून, याच ग्रंथात अन्यत्र 'वाराणसी' नगरनामाचा निर्देश आढळतो. डॉ. काणे यांच्या मते बौद्ध साहित्य, तसेच शतपथ ब्राह्मणकाली 'काशि' आणि 'वाराणसी' देशनाम आणि नगरनाम म्हणून सुविख्यात असून, पतंजलीच्या महाभाष्यकाली प्रथमच काशिराजधानी' अर्थाने 'काशी' नगरनाम प्रचारात आले. पौराणिक काळी 'वाराणसी' या लुप्तप्राय नगरनामाची जागा 'काशी'ने घेतली.

**अश्वघोषकृत बुद्धचरितात**—या ग्रंथमते गौतम बुद्धाने या (वणारा) गावच्या वृक्षच्छायेत प्रवेश करताच काशीनगरवासीयांनी त्याचे स्वागत केले (एस्. बी. ई. ४९.१६९). यावरून या ग्रंथकाली (इ. स. १ ले शतक) याची 'वाराणसी' आणि 'काशी' ही दोन्ही नावे प्रचारात असावीत.

**फाहियेन्च्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते काशी राज्यातील वाराणसी नगरास फाहियेन् गेला होता (फाहियेन्, लेग अनुवाद. पृ. ९४). यावरून स. ४०० पर्यंत 'काशि' आणि 'वाराणसी' हे अनुक्रमे देशनाम आणि नगरनाम म्हणून प्रचारात असावेत.

**वाल्मीकि रामायणात**—या ग्रंथमते या (वाराणसी) गावी काशिराजांची राजधानी असून (वा. रा. उ. ३८. १७), राम–राज्यारोहणसमयी त्याच्या सत्काराचा स्वीकार करून काशिराज येथे (काशेयपुर) परत आला (वा. रा. उ. ३८.१९).

**महाभारतात**—या ग्रंथात सर्वत्र यास 'वाराणसी' म्हटले असून, एकाच ठिकाणी यास 'काशीपुरी' म्हटले आहे ( म. उ. ४८.७६ ). काशिराजाच्या अंबा, अंबिका आणि अंबालिका या कन्यात्रयाच्या स्वयंवरप्रसंगी भीष्माने समस्त राजांचा पराजय करून या कन्या जिंकल्या ( म. आ. ९६ ). पुलस्त्ययात्रामते येथील कपिलादल सरोवरातील स्नानाने आणि शिवपूजनाने राजसूय यज्ञफल मिळत असून, गोमती–गंगा संगमावर 'मार्कंडेय तीर्थ' नामक अन्य एक तीर्थ होते ( म. आर. ८२.६९–७० ). याच्या 'अविमुक्तक्षेत्र' संज्ञक विश्वेश्वर शिवयुक्त मध्यभागी देहत्याग करणाऱ्या व्यक्तीला मोक्षप्राप्ती होत असे ( म. आर. ८२.४१९; ४२१* ). भारतीय युद्धात येथील राजपुत्रास धृष्टद्युम्नाने वधिले होते ( म. द्रो. ९.५६–५७ ).

पूर्वकाली येथे तुलाधार नामक महाज्ञानी वैश्य रहात असून ( म. शां. २५३–२५६ ), येथील शिवतपस्येच्या फलस्वरूप जैगीषव्य ऋषींना अणिमादि अष्टसिद्धी प्राप्त झाल्या होत्या ( म. अनु. १८.३७ ). येथे प्रतिदिनी शिवदर्शनार्थ येणाऱ्या संवर्त ऋषींना मरुत्त राजाने नारदसूचनेवरून आपला पुरोहित बनविले ( म. आश्व. ६–७ ).

**पौराणिक साहित्यात**—शिवमते हे एक शिवावतारस्थल असून ( शिव. शत. ४.२८; ५.३० ), पद्म पुराणातील तीर्थनामावलीत ( पद्म. आदि. १४.१६७; १५.१६; ६८. ६४ ), तसेच अन्य पुराणांत या ( वाराणसी ) तीर्थाचा निर्देश आढळतो ( अग्नि. १०९.१८; कूर्म. पूर्व. ३१.१; २२; ३५.२०; कूर्म. उत्तर. ४४.१७; पद्म. आदि. ३२. ४०; ३३.४८; पद्म. आदि. १५.१; वराह. १२२.१२; मत्स्य. १०३.१३ ). वायुमते हे महेश्वरक्षेत्र असून ( वायु. २३.१९८ ), नृसिंहमते येथे 'केशव' वामनाचे स्थान होते ( वामन. ९०.१५ ). पद्ममते येथे 'विशालाक्षी' देवीचे ( पद्म. आदि. १९० ), आणि 'शिवप्रिय' ब्रह्मदेवाचे स्थान होते ( पद्म. आदि. २९.१३७ ). पद्ममते हे विष्णुतीर्थ असून ( पद्म. उत्तर. १२९.५ ), स्कंदमते येथे 'वाराणसी' देवीचे स्थान होते ( स्कन्द. काशी. ३३. १२७ ). वामन पुराण प्रह्लादयात्रेत ( वामन. ८३.२९ ), तसेच भागवतात ( भा. ९.२२.२३; १०.५७.३२; ६६. १०; ८४.५५; १२.१३.१७ ), आणि योगिनीतंत्रात ( योगिनी. १.२; २.४ ) या तीर्थाचा निर्देश आढळतो. गणपतिक्षेत्र आणि वल्लभबैठक म्हणूनहि हे सुविख्यात असून, वल्लभाचार्यांनी येथे भागवतसप्ताह केला होता ( ती. पृ. १२७ ).

**शक्तिपीठ**—तंत्रचूडामणिमते येथे सतीचे उजवे कर्णकुंडल पडले असून, येथील देवीचे नाव विशालाक्षी आणि भैरवाचे नाव कालभैरव होते. आधु. अन्नपूर्णा देवीस्थानी हे शक्तिपीठ असावे.

**बौद्ध साहित्यात**—या साहित्यमते बुद्ध धर्मचक्रप्रवर्तनाने पुनीत झालेल्या या नगराचा परिसर कपिलवस्तु, बोधिगया आणि कुशीनाराइतकाच पवित्र असून, याच्या उत्तरेकडील ऋषिपट्टण मृगदाव ( सारनाथ ) येथे गौतम बुद्धाने आपले पहिले धर्मप्रवचन दिले ( दीव. २.१४१ ). बोधिगयेपासून १८ योजनांवरील या स्थानी पूर्वकालीन आकाशगामी बुद्धानेहि धर्मचक्रप्रवर्तन केले होते. उपक नामक आजीविकास भेटण्यास गौतम बुद्ध बोधिगयेहून येथे पायी चालत आला असून, तत्स्मृत्यर्थ अशोकाने येथे एक स्तूप उभारला होता.

डॉ. काणे यांच्या मते बुद्धाच्या आत्मज्ञानप्राप्तीचे गया गाव तत्कालीन आर्यावर्ताच्या सीमारेषेबाहेर असून, स्वतःची नवजात धर्मतत्त्वे जगापुढे मांडण्यासाठी शेकडो मैलांवरील वाराणसी येथे तो आला. यावरून हे गाव तत्काली तत्त्वचर्चेचे आद्य पीठ असावे ( महावग्ग. एस्. बी. ई. १७.२१ ).

बौद्ध साहित्यमते बुद्धपूर्वकालीन जगाच्या पुनरुत्थानकाली जागृत झालेल्या या पुण्यक्षेत्रस्थानी बुद्धपूर्वकालीन अनेक बुद्धांचे वास्तव्य आणि पराक्रम घडले असून, त्यापैकी कश्यप नामक अंतिम बुद्ध काशिराज किकीच्या राज्यकाली ऋषिपट्टण मृगदावमध्ये ( सारनाथ ) राहिला होता. घटिकार कुंभकाराचा ज्योतिपाल नामक मित्र पुढील जन्मी शाक्यमुनि बुद्ध होणार असल्याची भविष्यवाणी कश्यपाने वर्तविली होती ( वॉटर्स, २.४६–५९ ).

**व्यापारी केंद्र**—बौद्ध साहित्यमते उद्योग आणि व्यापाराचे हे केंद्रस्थान श्रावस्ती–तक्षशिला हमरस्त्यावर होते ( विनय. १.२१२; धम्मपद. अठ्ठ. १.१२३; ३.४२९; ४४५ ). यापैकी श्रावस्तीगामी रस्ता भद्दिय गावावरून जात असे ( विनय. १.१८९ ). वेरांजा आणि वाराणसी नगरांना जोडणारे दोन रस्ते बौद्धकाली असून, त्यापैकी सौरेय गावावरून जाणारा रस्ता लांबचा, आणि प्रयाग तीर्थानजिक गंगा नदी ओलांडणारा रस्ता अधिक जवळचा होता. हाच रस्ता पुढे वैशाली नगराप्रत जात असे ( समन्त. १.२०१ ).

सुत्तनिपातमते येथील व्यापारी लोक गाड्यांवर लादलेले कापड सरहद्दीवरील देशांप्रत नेऊन तेथील चंदनी लाकूड

परत आणीत ( सुत्तनिपात अट्ठ. २.५२; धम्मपद अट्ठ. ३. ४२९ ). जातकमते उत्तर भारतातील, तसेच सिंधमधील व्यापारी या गावी विक्रीयोग्य अश्व आणीत असत ( जा. २.२२१; २८७ ). येथे हस्तिदंती कारागिरांची स्वतंत्र वसाहत असून, ( जा. २.१९७ ), येथील काष्ठकारांच्या मुहल्ल्यात एक हजार कुटुंबे रहात असत ( जा. ४.१५९ ). यानजिकच्या 'काष्ठवाहनगर' येथील एका सुताराने उडत्या लाकडी विमानांच्या साह्याने हिमालय प्रदेशावर आक्रमण केले होते ( सुत्तनिपात अट्ठ. ३. ५७५ ). येथील गंगा नदीच्या उभय किनाऱ्यांवरील निषाद ( शिकारी ) लोकांच्या दोन गावांपैकी एकाने येथील राजाला सुवर्णकांती मयूर भेट दिला होता ( जा. २.३६; ६.७१; ).

विनयमते बनारस-राजगृह व्यापारी हमरस्ता अंधकविंद गावावरून जात असून ( विनय. १.२२० ), मगध-काशी मार्गाने मगधराज बिंबिसाराने काशीच्या कोषाध्यक्षपुत्राच्या औषधोपचारार्थ जीवक नामक राजवैद्य पाठविला होता ( विनय १.२७५ ). वाराणसी–कौशांबी ( अंतर–३० योजने ) यांना जोडणारा रस्ता गंगा नदीमार्गाने जात असे ( पपञ्च. २.९२९ ). यावरून बौद्ध काली हे नगर युरोप-मधील प्राचीन बॅबिलोन अथवा मध्ययुगीन रोमप्रमाणे वैभवशिखरावर असावे ( रॉयचौधरी, पृ. ६०-६२ ).

**महत्त्वपूर्ण स्थाने**— जातकमते या गावच्या 'संथागार-साला' नामक सभागृहाचा धर्मवर्चासाठी, तसेच संन्याशांचे विश्रामस्थान म्हणून उपयोग करीत असत ( जा. ४.७४; धम्मपद अट्ठ. १.३९ ). येथील 'सत्तशिरीषक उद्याना'त गौतम बुद्धाने एरकपत्त नागाला धर्मोपदेश केला असून ( धम्मपद अट्ठ. ३.२३० ), त्यानजिकच्या 'खेमिय आम्रवना'त उदेन आणि घोटमुख भिक्षूंची भेट झाली होती ( मज्झिम. २.१५८ ). गंगा नदीच्या पश्चिमेस 'वासवगाम' आणि 'चुदठिल' नामक ग्रामद्वय असून ( पेतवत्थु अट्ठ. १६८ ), भर्हुत शिलालेखमते या गावानजिक चंडत्थिल नामक वस्ती होती ( बारुआ, भर्हुत शिलालेख. पृ. ७;१८ ).

**बुद्धवास्तव्य**— बुद्धभेटीने आणि वास्तव्याने पुनीत झालेल्या या गावी ( अङ्गुत्तर. १.११०; २७९; ३.३९२; ३९९; संयुत्त. १.१०५; ५.४०६; विनय. १.१८९; २१६; २८९ ) गौतम बुद्धाने यश, विमल, सुबाहु, पुण्णजि, गवांपति आदींना बौद्ध धर्माची दीक्षा दिली होती ( विनय. १.१५; १९ ). बुद्धाच्या जीवितकालीच ऋषिपट्टण हे बौद्ध धर्मपीठ बनले असून, तत्रस्थ महा-स्तूपाच्या पायाभरणीसमयी धर्मसेनाच्या नेतृत्वाखाली १२००० बौद्ध भिक्षू उपस्थित होते ( महावस्तु. २९.३१ ).

बुद्धपूर्वकालीन कश्यप बुद्धाचे हे जन्मस्थानभूत नगर ( बुद्धवंश. २५.३३ ) शंख नामक चक्रवर्ती राजाला धर्म-दीक्षा देणाऱ्या भविष्यकालीन मैत्रेय बुद्धाच्या काली 'केतुमती' नावाने प्रसिद्ध झाले ( दीघ. ३.७५ ).

**जैन साहित्यात**—यतिवृषभ आणि रविषेणमते जैनांच्या सुपार्श्वनाथ आणि पार्श्वनाथ या सातव्या आणि तेविसाव्या तीर्थंकरांचे हे ( वाराणसी, वाणारसी ) जन्मस्थान होते. यापैकी पार्श्वनाथ ( जन्म–इ. स. पू. ८१७ ) हा येथील अश्वसेन राजाचा पुत्र असून, जैन कल्पसूत्रमते त्याचा जन्म चैत्र शुद्ध चतुर्थीला, आणि कैवल्यप्राप्ती या गावानजिकच्या एका वृक्षाखाली झाली ( एस्. बी. ई. २२.२७१ ).

जैन विविधतीर्थकल्पमते या नगराचे निम्नलिखित चार उपविभाग होते :—**देववाराणसी** ( विश्वनाथ मंदिर आणि २४ जैन पीठयुक्त ); **२. राजधानी वाराणसी** ( यवन लोकसमूहयुक्त ); **३. मदन वाराणसी; ४. विजय वाराणसी** ( लॉ, जैनसूत्राज्. पृ. १७४–१७५ ).

जैन 'उवासगदसौ' मते या गावच्या महावीरशिष्यां-मध्ये चुलनिपिया आणि त्याची पत्नी समा, तसेच सूरादेव, आर्यरक्षित आणि जयघोष हे प्रमुख होते ( उवास. २.९०–१००; एस्. बी. ई. २.१३६–१३७ ). महावीराच्या उपदेशानुसार येथील अग्निशिखपुत्र नंदन राजा जैनधर्मीय बनला असून ( सूत्रकृताङ्ग. २.८७ ), महावीराच्या निर्वाण-दिनी काशि-कोशल राजांनी उपोषण ( पोषध ) आणि दीपदान केले होते ( एस्. बी. ई, २२.२६६ ).

निर्वाणकांड, श्रुतसागर, जयसागरादि ग्रंथांत येथील पार्श्वनाथप्रतिमेचा निर्देश असून, ज्ञानसागरमते येथील गंगा नदीकाठी दोन जैन मंदिरे होती. जिनप्रभसूरिकृत 'विविधतीर्थकल्प' मध्ये याचे माहात्म्यवर्णन आढळते ( विविधतीर्थ. पृ. ७२ ). उवासगदसौमते जियसंतु राजा काशी, कंपिल्लपुर, पलसपुर आणि आळवी नगरांवर राज्य करीत असे ( उवास. पृ. ८४–८५ ).

श्वेतांबर जैनांचे हे आजहि प्रमुख तीर्थ असून ( प्राचीन तीर्थमाला. १.११–१३ ), येथील भेलुपुर भागात दोन, तसेच भदैनी घाटावर तीन जैन मंदिरे आहेत. त्यापैकी भेलुपुरातील पार्श्वनाथाचे आणि भदैनी मुहल्ल्यातील सुपार्श्वनाथाचे मंदिर विशेष सुविख्यात आहे ( ती. पृ. २३८ ). येथे सध्या स्याद्वाद महाविद्यालय आणि भारतीय ज्ञानपीठ नामक जैन संस्थाहि आहेत ( जैन तीर्थयात्रा-दर्शक. पृ. ११५; ती. सं. पृ. १७३–१७४ ).

**टॉलेमीच्या ग्रंथात**—या ग्रंथमते हे ( कस्सिद ) अक्षांश ३१°-१०′ उत्तर; रेखांश १४९° पूर्व येथे असून, 'कस्सिद' हे 'काशी' चेच ग्रीकभाषीय ( कस्सि + द ) रूप असावे. या ग्रंथात अन्यत्र 'कसैरैओइ' देशातील एररस ( वाराणसी ) नगराचा निर्देश असून, त्यावरून टॉलेमीच्या काळी हे नगर 'काशी' आणि 'वाराणसी' या उभय नावांनी सुविख्यात असावे. 'एररस' हे 'गोवर्धन' चे ग्रीकभाषीय रूपांतर असल्याचे यूल यांचे अनुमान असंभव वाटते.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते कुशीनगर ( गोरखपुरनजिकचे आधु. कसिय ) पासून १०० मैलांवरील या ( पो–लो–नि–स्से = वाराणसी ) नगरासभोवतालचा प्रदेश बौद्ध काली 'काशि देश' नावाने ओळखला जात असे.

**भौगोलिक वर्णन**—या ग्रंथमते गंगा नदीच्या पूर्व किनाऱ्यावरील या नगरातील ( व्याप्ती– ३$\frac{1}{2}$ × १$\frac{1}{4}$ मैल ) लोकवस्ती दाट आणि लोक सधन होते. हे नगर गंगा नदीच्या पश्चिम किनाऱ्यावर असल्याचा सुस्पष्ट निर्देश बौद्ध साहित्यात असल्याने ह्युएन्त्संगकृत हे वर्णन भौगोलिक दृष्ट्या चुकीचे वाटते.

**देवमंदिरे**—ह्युएन्त्संगच्या मते येथे कोरीव दगडांनी आणि लाकडांनी बांधलेली, सुरम्य जलाशय आणि वाटिकायुक्त ३० हिंदु देवमंदिरे असून, त्यापैकी एकामध्ये विशाल शिवप्रतिमा ( लिंग, उंची १००′ ) होती. वॉटर्स यांच्या मते येथे या गावाच्या वायव्य भागातील आधु. बकरीयाकुंड अवशेषसमूहाचा अथवा पंचगंगा घाटावरील औरंगजेबद्वारा उद्ध्वस्त मंदिराचा निर्देश अभिप्रेत असावा. या गावाहून ह्युएन्त्संग ६० मैल पूर्वेकडील युद्धपति ( चॅन–चु, आधु. गाझीपुर ) देशास गेला.

**बौद्ध वास्तू**—वॉटर्स यांच्या मते याच्या परिसरातील अन्य बौद्ध वास्तू पुढीलप्रमाणे होत्या :—

( १ ) **सारनाथ**—याच्या २ मैल ईशान्येस ऋषिपट्टण मृगदाव ( सारनाथ ) हे बुद्धधर्मचक्रप्रवर्तनस्थान होते ( सारनाथ पहा ).

( २ ) **खिद्रकप बौद्ध विहार**—चिनी विनय ग्रंथमते हा ( चि–तो–लो–क–पोह ) या गावचा प्रमुख विहार होता.

**चिनी बौद्ध साहित्यात**—या साहित्यात 'नाशि' आणि 'वाराणसी' वैकल्पिक नावांनी याचा निर्देश असून, इत्सिंगच्या प्रवासवर्णनात यास 'कसेरु' ( शब्दशः अर्थ– तृणपर्ण ) म्हटले आहे ( वॉटर्स, २.४६–५९ ).

**शिलालेख साहित्यात**—कनिष्क राज्यकालीन सारनाथ बौद्ध शिलालेखमते या ( वाराणसी ) गावच्या बुद्धपरिक्रमास्थानी बोधिसत्त्वाची मूर्ती उभारली असून ( ल्यूडर्स सूची. क्र. ९२५ ), कनौजच्या गाहडवालवंशीय भारशिव राजांचे आदिकेशव आणि दशाश्वमेध घाटांवरील स्नान आणि दानधर्म नमूद करणारे सुमारे पन्नास ताम्रपट ( स. १०९७– ११८७ ) या गावच्या परिसरात सापडले आहेत ( जे. आर. ए. एस्. स. १८९६; पृ. ७८७ ). काशिराज प्रकटादित्याच्या सारनाथ वैष्णव शिलालेखात या ( काशी ) नगराचा निर्देश असून ( गुप्त इन्स्क्रि. पृ. २८६; कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.२८५ ), चालुक्य राजा कुमारपालाच्या वि. सं. १२२५ च्या शिलालेखात यास 'वाराणसी' म्हटले आहे ( भावनगर इन्स्क्रि. १८६ ). चंद्रदेवाच्या चंद्रावती दानपत्रमते गाहडवाल साम्राज्य कनौज–वाराणसीपासून अयोध्येपर्यंत असून ( एपि. इंडि. १४.१९३ ), कनौजच्या गोविंदचंद्र राजाच्या वि. सं. ११८४ च्या कमौली दानपत्रात ( एपि. इंडि. २६.७१ ), तसेच जयचंद्रदेवाच्या बोधिगया बौद्ध शिलालेखातहि याचा निर्देश आढळतो ( जे. ए. एस्. बी. ५.४६७ ).

गंगा नदीसान्निध्यामुळे यास प्राप्त झालेल्या पावित्र्याचा, तसेच येथील गंगास्नानमाहात्म्याचा निर्देश अन्य मध्ययुगीन शिलालेखांतहि आढळतो ( इंडि. अँटि. १८.१३६; एपि. इंडि. ८.१५२–१५३ ).

**ऐन्–इ–अकबरीमध्ये**—या ग्रंथात या ( वाराणशी ) नगराचा निर्देश आढळतो.

**मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात**—या साहित्यातील या नगराची विभिन्न नामांतरे परिपत्रकात दिली असून, त्यावरून तत्काली हे 'काशी', 'काशि', 'काशिका', 'कासि', 'कासी' आदि वैकल्पिक नावांनी प्रसिद्ध असावे.

**माहात्म्य**—स्कंद पुराण काशीमाहात्म्य खंडात या क्षेत्राच्या माहात्म्यपर पंधरा हजार श्लोक असून ( स्कन्द. काशी. ६; २६.२–५ ), त्यामध्ये काशीची उत्पत्ती, तिच्या 'अविमुक्त', 'काशी', 'रुद्रावास', 'वाराणसी', 'आनंदकानन', 'महाश्मशान' आदि नावांची व्युत्पत्ती, हे क्षेत्र मोक्षसाधन आणि त्रैलोक्यश्रेष्ठ पूजास्थान बनल्याचा इतिहास, तसेच गंगानद्यागमनापूर्वीची येथील स्थिती आदि विषयांचा परामर्श आढळतो. या ग्रंथमते भगवान शिवाच्या त्रिशूलधारित हे नगर व त्यामधील लोक सृष्टिप्रलयकालीहि नाश पावत नाहीत.

पद्म पुराण आदि खंडामध्ये या क्षेत्राच्या माहात्म्यपर

१७० श्लोक असून ( पद्म. आदि. ३३–३७ ), त्यामध्ये काशीच्या महत्तेचे वैशिष्ट्य, तेथील निवासाचे नियम आणि पुण्यसाधनांचे मार्ग, तसेच त्याच्या भौगोलिक मर्यादा आदि विषयांचा परामर्श आढळतो. अन्य पौराणिक साहित्यातहि याचे सविस्तर माहात्म्य आढळते ( मत्स्य. १८०–१८५; कूर्म. पूर्व. ३१–३५; लिङ्ग. पूर्व. ९२; अग्नि. ११२; नारद. उत्तर. ४८–५१ ).

महाभारत आरण्यकपर्वमते येथील ( अविमुक्त ) विश्वेश्वर प्रतिमेच्या दर्शनाने ब्रह्महत्त्यादि पातकांपासून मुक्ती, तसेच येथील मृत्यूने मोक्षप्राप्ती होते (**काश्यां हि मरणान्मुक्तिः**). भारताच्या कानाकोपऱ्यातील हजारो लोक येथे आजहि देहत्यागार्थ येतात.

मत्स्यमते वाराणसीरूपी शिवगुह्यस्थान प्रयागपेक्षाहि अधिक मोक्षप्रद असून, सहस्र जन्मांतरीची पातके याच्या दर्शनाने नष्ट होतात. ब्राह्मण-क्षत्रियादि चातुर्वर्णिक, संकरज अथवा हीन जन्मज, स्वैराचारी स्त्रिया, चोर, म्लेंच्छ, तसेच पशुपक्षी आणि कृमिकीटक यांपैकी कोणीहि पापी प्राणी येथे मृत झाल्यास जन्ममरणाच्या संसारचक्रातून मुक्त होऊन तो चंद्रमौली, तृतीयनेत्रधारी आणि वृषभवाहन शिवस्वरूप बनतो. आजन्म तपस्यासाध्य योगसिद्धी आणि तज्जन्य मोक्ष येथील वास्तव्याने प्राप्त होत असून, येथे मृत्यू झाल्यास ग्रहनक्षत्रादिकांहूनहि अधिक अचल स्थानाची प्राप्ती होते. येथील वास्तव्याने बुद्ध्या अथवा अजाणता केलेल्या पापांचा लोप होऊन, येथील म्लेंच्छहि अन्य तीर्थक्षेत्रांतील दीक्षित पुण्यवंतांपेक्षा श्रेष्ठतर मोक्षाधिकारी बनतो.

चंद्रग्रहणाच्या पर्वकाळी येथील गंगास्नान विशेष पुण्यदायक असून ( **ग्रहणेषु काशी, मकरे प्रयागः** ), अशा पर्वकाळी येथे लक्षावधी स्नानार्थी एकत्र होतात.

**आध्यात्मिक स्वरूप**—स्कंद पुराण काशी खंडमते योगशास्त्रातील पिंगला, इडा आणि सुषुम्ना नाड्यांच्या प्रतीकरूप अशा वरणा आणि असि नद्या, तसेच अविमुक्तक्षेत्राचे सम्मीलन वाराणसी येथे झाले आहे. लिंगमते येथील असि, वरणा आणि मत्स्योदरी ( गंगा ) नद्या पिंगला, इडा आणि सुषुम्ना नाड्यांचे प्रतीक आहेत.

**संकटमुक्ती**—स्कंदमते येथील विश्वेश्वर-तीर्थप्राशनाने भक्ताची संकट आणि व्याधिनिष्कृती होते.

**पापनिष्कृती**—त्रिस्थलीसेतुमते काशीयात्रेने वर्तमान जन्मातील पापनिष्कृती, आणि येथील तीर्थस्नानाने पूर्वजन्मातील पापनिष्कृती होत असून, काशीयात्रेने वर्तमान आणि पूर्व जन्मातील पापनिष्कृती आणि तेथील तीर्थस्नानाने पापप्रवृत्तिनिष्कृती होत असल्याचे वैकल्पिक मतहि तेथे दिले आहे ( त्रिस्थली. ९८–१०० ).

स्कंदमते संन्याशांच्या प्रतिसांवत्सरिक अष्टमास भ्रमणाच्या नियमास हे क्षेत्र अपवाद असून, येथील कायम वास्तव्य तेथे धर्म्य मानले आहे.

**यात्रेकरूचे आचरण**—काशीवास्तव्येच्छू व्यक्तीला कामक्रोधादि षड्रिपुत्यागाचा नियम येथील शिवाने स्वतःच घालून दिल्याची आख्यायिका स्कंद पुराणात आढळते. या ग्रंथमते क्षुधाक्लांत व्यास ऋषींना काशी येथे कोणीहि भिक्षा न वाढल्याने येथील विद्या, समृद्धी आणि आदरातिथ्य तीन पिढ्यांहून अधिक काल न टिकण्याचा शाप देण्यास ते प्रवृत्त झाले. तेव्हा शिवाने अवतीर्ण होऊन क्रोधव्याप्त व्यक्तीला काशी येथे थारा नसल्याचे त्यांस सांगितले ( स्कन्द. काशी. ९६.१२–८०; ११८–१८०; मत्स्य. १८५.१७–४५ ).

**नित्यविधी**—पौराणिक साहित्यमते काशीनिवासी यात्रेकरूंना ' गंगास्नान ', ' मणिकर्णिकास्नान ' आणि ' विश्वेश्वरदर्शन ' हे तीन आवश्यक विधी होत.

**पापाचरण**—त्रिस्थलीसेतुमते येथील पापाचरणी लोकांना याम नामक शिवगण आणि कालभैरव तीस हजार वर्षे पिशाचयोनीमध्ये ढकलतात. पापक्षालनानंतर पुन्हा एकवार काशी येथे जन्म आणि मृत्यू होऊन ते जीवन्मुक्त होतात ( त्रिस्थली. २६८ ).

**क्षेत्रसंन्यास**—येथील पुण्यप्रद वास्तव्य आणि देहत्याग साधण्यासाठी या क्षेत्राच्या पंचक्रोशीबाहेर न जाण्याचे व्रत ( क्षेत्रसंन्यास ) निम्नलिखित संकल्पमंत्रासहित अनेक भक्तजन करतातः—

**करिष्ये क्षेत्रसंन्यासमिति सञ्चिन्तयेद् बुधः ।**
**पञ्चक्रोशाद् बहिः क्षेत्रान्न गच्छाम्यम्बिकापते ॥**
( तीर्थप्रकाश. पृ. १६५ ).

**यात्राप्रबंध**—काशीसंबंधी यात्राप्रबंधांमध्ये लक्ष्मीधरकृत ' तीर्थकल्पतरु ' ( स. १११०–११२० ), आणि नारायणभट्टकृत ' त्रिस्थलीसेतु ' ( स. १५५०–१५८० ) प्रमुख आहेत ( प्रास्ताविक–भारतवर्षातील तीर्थे, पृ. ८२ पहा ).

## मंदिरे

**मंदिरसंख्या**—हिंदूंच्या सर्वश्रेष्ठ तीर्थस्वरूप काशी येथे असंख्य देवालये आढळतात. पौराणिक साहित्यमते पदोपदी तीर्थे असणाऱ्या या स्थानी शिवलिंगविरहित

तिळमात्रहि भूमी नाही (स्कन्द. काशी. १०.१०२). स्कंद पुराण काशी खंडात यापैकी ६४ प्रमुख शिवलिंगांची नामावली असून (स्कन्द. काशी. १०), ह्युएन्त्संगच्या मते त्याचे काळी (इ. स. ७ वे शतक) येथे १०० देवालये होती. प्रिन्सेप यांच्या मते स. १८२८ मध्ये येथे १००० देवालये आणि ३३३ मशिदी असून, शेरिंग यांच्या मते सद्यःकाली येथे १४५४ मंदिरे आणि २७२ मशिदी आहेत (शेरिंग, पृ. ४१-४२).

या नगराच्या प्राचीनत्वास साजेसे एकहि पुरातन हिंदु देवालय येथे आढळत नाही. येथील विश्वेश्वराच्या इतिहासप्रसिद्ध स्थानावरील सध्याचे मंदिर इ. स. १८ व्या शतकातील असून, याच्या उत्तरेकडील सारनाथचे बौद्ध स्थापत्यावशेष ऐतिहासिक आणि स्थापत्य दृष्ट्या या नगराहून सर्वस्वी स्वतंत्र आहेत. मुसलमानी आक्रमणामुळे (इ. स. १२-१७ वे शतक) येथील अन्य सारी पुरातन मंदिरे नष्ट झाली आहेत.

स. ११९४ मध्ये कनौजसम्राट जयचंद्राच्या पराजयानंतर मुइझुद्दीन घोरीने जिंकलेले हे नगर त्यानंतर ४०० वर्षांहून अधिक काळ (स. ११९४-१६७०) मुसलमानांच्या ताब्यात राहिले. त्या काळात मुसलमानांनी येथील बहुतांशी मंदिरांच्या जागी मशिदी आणि कबरी बांधल्या. कुतुबुद्दीन ऐबक (स. ११९४) आणि अल्लाउद्दीन खिलजीने येथील प्रत्येकी १००० मंदिरे नष्ट केली (इलियट- डाऊसन. २.२२२; शेरिंग, पृ. ३१).

इ. स. १५ व्या शतकात जौनपुर येथील शर्की नबाबांच्या ताब्यातील हे नगर मोगल-अफगाण युद्धात पुन्हा एकवार उध्द्वस्त झाले. याच सुमारास येथील गंगा नदीचे पात्र नैर्ऋत्येस सरकल्यामुळे येथील अनेक मंदिरे नष्ट झाली.

'मासिर-इ-आलमगिरि' मते औरंगजेबाच्या राज्यकाली थत्त, मुल्तान आणि बनारस येथे अनेक नव्या पाठशाळा आणि मंदिरे उत्पन्न झाल्याचे वृत्त ऐकून बादशहाने (स. १७६०) येथील सारी देवालये जमीनदोस्त करण्याचा हुकूम दिला. त्यानुसार याचे 'मुहंमदाबाद' असे नवे नामकरण करण्यात येऊन येथील २० मंदिरांचा अपवाद वगळता अन्य सारी मंदिरे नष्ट करण्यात आली. येथील विश्वेश्वर मंदिराच्या स्थानीहि मशीद बांधण्यात आली (शेरिंग, पृ. ३२).

उपरोक्त साऱ्या पुरातन मंदिरांचे अवशेष वाराणसी आणि सारनाथ यांच्या दरम्यान गाडले गेले असून, अकबरपूर्वकालीन (स. १५५६-१६०५) एकहि मंदिर सध्या येथे आढळत नाही. येथील विद्यमान सारी मंदिरे मराठी आणि ब्रिटिश राज्यकालातील आहेत (फर्ग्युसन, २.१५१-१५३).

प्रमुख मंदिरे—स्थानिक आख्यायिकामते विश्वेश्वर शिव हा या क्षेत्राचा अधिष्ठाता देव, भैरव हा कोतवाल, आणि धुंडिराज गणेश हा नगरपालक आहे. विश्वेश्वर मंदिरानजिकची आणि अक्षय्य वटाच्या पश्चिमेकडील अन्नपूर्णा ही या क्षेत्राची अधिष्ठात्री देवता असून, त्यानजिकच धुंडिराज गणेशाचे मंदिर आहे.

पद्ममते 'विश्वेश्वर', 'बिंदुमाधव', 'मणिकर्णिका' आणि 'ज्ञानवापी' ही येथील प्रमुख तीर्थे असून, शिवमते 'तिलभांडेश्वर', आणि 'दशाश्वमेधेश्वर' ही येथील प्रमुख शिवस्थाने होत.

ज्ञानवापीनजिकच्या औरंगजेब-मशिदीच्या स्थानी विश्वेश्वराचे पुरातन स्थान असून, वारणासंगम घाटानजिक आदिकेशव मंदिर, आणि राजघाट रेल्वेस्थानकानजिक राजघाट हा सुविख्यात घाट आहे. तेथील काशीचा पुरातन किल्ला मुहंमद गझनीने उद्ध्वस्त केला. पंचगंगा घाटावर बिंदुमाधवाचे, आणि लक्ष्मणबल घाटावर लक्ष्मणबल वेंकटेशाचे मंदिर आहे. औरंगजेबाच्या मशिदीनजिकच्या 'काशी करवट' नामक स्थानी भक्तजन पूर्वी देहत्याग करीत असत. भैरवनाथ बोळामध्ये कालभैरव मंदिर आहे.

विश्वेश्वर मंदिर—या नगराचा संरक्षक देव विश्वेश्वर (विश्वनाथ) हा भारतातील बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक असून, त्याचे मंदिर येथील पवित्रतम तीर्थ मानले जाते. पद्म पुराणातील विश्वेश्वर ध्यानाच्या श्लोकात या देवतेचे वर्णन निम्नप्रकारे आढळते :—

अकलङ्कशरत्पूर्णशशाङ्कायुतसप्रभः,
सोमसूर्याग्निनयनो दशबाहुः शशाङ्कभृत् ।
गौरीपरिरब्धतनुर्नानायुधसमुज्ज्वलः ॥

(शारदीय दशसहस्र पूर्णचंद्राप्रमाणे कांतिमान्, सूर्यचंद्र आणि अग्निरूपी त्रिनेत्रयुक्त, दशहस्त, चंद्रमौली, पार्वतीपती, आणि दैवी आयुधयुक्त विश्वेश्वराचे मी स्मरण करतो).

विश्वेश्वराच्या अतिप्राचीन स्थानीचे मंदिर नष्ट करण्याचा प्रयत्न परकीय आक्रमकांनी वेळोवेळी केला असला, तरी भक्तांनी ते पुनःपुन्हा नव्याने बांधून काढले. स. १४९४ मध्ये सिकंदर लोदीने हे जमीनदोस्त करून तेथे नवे मंदिर बांधण्यास बंदी केली. त्यानंतर पाऊणशे वर्षेपर्यंत येथे कोणतेहि मंदिर नव्हते. या काळात दुष्काळ आणि

साथीच्या रोगाचे थैमान या क्षेत्रात सुरू झाल्याने स्थानिक हिंदु-मुसलमान नागरिक नारायणभट्ट नामक विद्वान ब्राह्मणाच्या नेतृत्वाखाली अकबर बादशहाकडे गेले. यज्ञानुष्ठानाच्या साह्याने येथे पर्जन्यवृष्टी घडवून नारायणभट्टाने अकबराच्या संमतीने आणि राजा तोडरमलाच्या साह्याने स. १५८५ मध्ये नवे विश्वेश्वर मंदिर बांधले.

स. १६६९ मध्ये औरंगजेबाने 'कीर्ति-विश्वेश्वरा'चे मंदिर जमीनदोस्त करून तेथे मशीद बांधल्यानंतर शंभर वर्षे येथील शिवलिंग नजिकच्या ज्ञानवापीमध्ये हलविण्यात आले. त्या काळी मंदिराच्या जागेला विश्वेश्वर-प्रतिमा मानून भक्तजन त्यास नमस्कार, पिंडदान, आणि प्रदक्षिणा करीत असत. विश्वेश्वर लिंगाला गंगाजलाचा अभिषेक त्या काळी होऊ शकत नसे. स. १७८३ मध्ये अहल्याबाई होळकरांनी येथे नवे मंदिर पुन्हा बांधले असून, तेच आज अस्तित्वात आहे. या मंदिराच्या कुशीत औरंगजेब मशिदीचे मीनार आहेत.

**सद्यःकालीन मंदिर**—उत्तर भारतीय ओरिसा स्थापत्य-शैलीचे सद्यःकालीन विश्वनाथ मंदिर समोरासमोर स्थापिलेल्या मंदिरद्वयाने (उंची-प्रत्येकी ५१′) बनले असून, त्याच्या शिखराचे नक्षीकाम कलात्मक, रेखीव, परंतु काहीसे तकलादू आणि दुबळे आहे.

येथील मंदिरद्वयाला जोडणाऱ्या उघड्या स्तंभयुक्त बाह्यमंडपाचे मुसलमानी घुमटाकृती शिखर मुख्य मंदिर-शिखराशी विशोभित असून, त्यामुळेच हिंदूंच्या प्राचीनतम तीर्थस्थानीचे सद्यःकालीन विश्वेश्वर मंदिर स्थापत्य आणि शिल्पदृष्ट्या निराशाजनक वाटते.

**विश्वेश्वरमाहात्म्य**—स्थानिक आख्यायिकामते विश्वेश्वर लिंगाच्या तीर्थप्राशनाने भक्तांचे असाध्य रोग आणि मानसिक चिंता नष्ट होत असून, त्रिस्थलीसेतुमते विश्वेश्वर प्रतिदिनी मणिकर्णिका तीर्थामध्ये स्नान करून भक्तस्पर्शोत्पन्न आत्मदोष नाहीसे करतो. विश्वेश्वराच्या या पापविमोचक सामर्थ्यामुळे प्राचीन काळापासून या मंदिरामध्ये अस्पृश्यादिकांना मुक्तद्वार आहे.

## तीर्थे

**पंचतीर्थ**—विश्वेश्वरदर्शनानंतर यात्रेकरू काशी येथील पाच प्रमुख तीर्थांचे (पंचतीर्थ) दर्शन करतात. मत्स्यमते विश्वेश्वराच्या 'आनंदकानना'तील ही पाच 'आवश्यक तीर्थे' पुढीलप्रमाणे होत :—

(१) **लोलक तीर्थ** (गंगा-असि संगम)—स्कंदमते काशीक्षेत्राच्या दक्षिण सीमेवरील या सूर्यमंदिरस्थानी सूर्यदेव या नगरीच्या दर्शनाने चलित ('लोलित') झाल्यामुळे त्यास हे नाव मिळाले. कनौजच्या जयचंद्र गाहडवाल राजाच्या वि. सं. १२३३ च्या शिलालेखमते त्याने या मंदिरास देणगी दिली होती (एपि. इंडि. ६.१४९). येथील असि नदी पावसाळयात ४०′ रुंद होत असली तरी वर्षाचे अन्य दिवस ती शुष्क असते.

(२) **केशव मंदिर आणि आदिकेशव घाट** (वारणा-गंगा संगम)—या नगराच्या उत्तर सरहद्दीनजिकचा 'आदिकेशव घाट' हा या क्षेत्रातील उत्तरेकडील अंतिम घाट होय. या घाटानजिक गंगा नदी हिमालयाच्या (उत्तर) दिशेने तात्पुरते वळण घेते. कनौजच्या विष्णुभक्त गाहडवाल राजांच्या काशी येथील पन्नासहून अधिक ताम्रपटांपैकी (स. १०९७-११८७) बहुतेकांमध्ये या घाटाला देणगी दिल्याचा निर्देश असून, सूर्यग्रहणाच्या पर्वकाळी आपल्या पृथ्वीश्रीका नामक महाराणीच्या स्नानाप्रीत्यर्थ मदनपाल राजाने यास देणगी दिली होती (जे. आर. ए. एस्., स. १८९६ पृ. ७८७). गोविंदचंद्र राजाने स. ११३१ मध्ये (इंडि. अँटि. १९.२४९), तसेच चंद्रादित्य-देव राजाने वि. सं. ११५६ मध्ये (एपि. इंडि. १४.१९७) येथे ब्राह्मणांना दक्षिणा दिली होती. यावरून हा घाट एक हजार वर्षांहून अधिक काळ अस्तित्वात असावा.

(३) **पंचगंगा घाट-बिंदुमाधव मंदिर** (किरणा-धूतपापा-गंगा-यमुना-सरस्वती संगम)—येथील पंचनद्यांपैकी गंगेव्यतिरिक्त अन्य साऱ्या नद्या अदृष्यावस्थेत असून, स्कंद पुराण काशी खंडमते हे स्थान कृतयुगादि चतुर्युगांत 'धर्मनद', 'धूतपातक', 'बिंदुतीर्थ' आणि 'पंचनद' नावांनी सुविख्यात होते (स्कन्द. काशी. १३३). या ग्रंथमते येथे स्नान केल्याने पंचमहाभूतात्मक मानवी शरीरान्तर्गत पुनर्जन्मापासून मुक्ती प्राप्त होत असे (स्कन्द. काशी. ११८-१३३). येथील पंचनद्यांची नाम-व्युत्पत्ती, तसेच त्यांचे माहात्म्यहि तेथे सविस्तरपणे दिले आहे (स्कन्द. काशी. ५९.१०१-१०६; १०८-११३).

या घाटावरील शिवाचे विशाल मंदिर औरंगजेबाने नष्ट केले असून, हॅवेल यांच्या मते ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनातील विशाल शिवप्रतिमायुक्त शिवमंदिर हेच असावे.

४. **दशाश्वमेध घाट**—महाभारत आणि पौराणिक साहित्यमते उत्तरवाहिनी गंगेकाठचा हा घाट अत्यंत पवित्र असून (म. अनु. २५.१५; नारद. उत्तर. ४८.२९; ५१.६-७; १०; स्कन्द. काशी. ८१), हिमालयोद्भवा पंचनद्यांच्या प्रतीकरूप विभिन्न पायऱ्यांच्या पाच मालिका

येथे आहेत.

'दशाश्वमेधी भारशिव राजांचे अवभृथस्नानाचे स्थान' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले. या राजांच्या शिलालेखमते त्यांचे सारे राज्याभिषेक येथील गंगाजलाने होत असून, अश्वमेध यज्ञानंतर ते येथे स्नानार्थ येत असत ( जयस्वाल, भारत इतिहास. पृ. ५ ). स्कंदमते या ( रुद्रसरस् ) तीर्थस्थानी ब्रह्मदेवाने दहा अश्वमेध यज्ञ केल्यामुळे त्यास हे नाव मिळाले ( स्कन्द. काशी. ५२.६६–६८ ). गाहडवाल राजांच्या वि. सं. ११७८ च्या ताम्रपटात येथील ( कपालमोचन घाट ) स्नानाचा निर्देश आढळतो ( एपि. इंडि. ४.९७ ).

पहाटेच्या वेळी या प्रचंड घाटाचे आणि त्याच्या दगडी पायऱ्यांचे दृश्य अश्रद्ध व्यक्तीलाहि सश्रद्ध बनविणारे असून, गंगा नदीचे खरे वैभव तेथे दिसते. स्कंद पुराण काशी खंडात आणि त्रिस्थलीसेतूमध्ये त्याचे माहात्म्य आढळते ( स्कन्द. काशी. ५२.८३; त्रिस्थली. १५९ ).

**५. मणिकर्णिका तीर्थ आणि घाट** ( मुक्तिक्षेत्र )—हा पवित्रतम घाट काशीच्या धार्मिक जीवनाचा केंद्रबिंदु असून, पौराणिक साहित्यमते हरिश्चंद्र–विश्वामित्र संघर्षाचे अंतिम पर्व येथेच घडले ( मार्क. ८–९ ). स्कंदमते श्रीविष्णूने सुदर्शन चक्राने खणलेल्या आणि स्वतःच्या स्वेदबिंदूंनी भरलेल्या वापीतून या तीर्थाची निर्मिती झाली. श्रीविष्णूने येथे १०५० वर्षे (५०,००० वर्षे) केलेल्या तपस्येने प्रसन्न होऊन त्याच्या मस्तकी शिवाने हस्तस्पर्श केला. त्यायोगे विष्णूचे कुंडल या तीर्थात पडल्याने यास 'मणिकर्णिका तीर्थ' नाव प्राप्त झाले ( स्कन्द. काशी. २६.५१–६३; त्रिस्थली. १४५–१४६ ).

याच ग्रंथात अन्यत्र 'इच्छापूरक शिवाचे मरणोन्मुख भक्ताच्या कर्णसंपुटी तारकमंत्र कथनाचे स्थान' अशा अर्थाने या सरोवरास (लांबी–१०५ हात = १६०') 'मणिकर्णिका' अथवा 'मुक्तिक्षेत्र' म्हटले आहे ( स्कन्द. काशी. ९९.५४ ). येथे म्हणावयाचे दोन मंत्र त्रिस्थलीसेतूमध्ये असून ( त्रिस्थली. पृ. १४७ ), त्यापैकी एका मंत्रमते पापी आणि अस्पृश्य भक्ताचे स्पर्शजन्य दोष काशीविश्वेश्वर येथील तीर्थस्नानाने नाहीसा करतो—

**ब्राह्मे मुहूर्ते मणिकर्णिकायां स्नात्वा, समाराधयति स्वमेव ।**
**अस्पृश्यसंस्पर्श विशोधनाय, कलौ नराणां कृपया हिताय ॥**

ब्राह्मण, चांडाल, सुशिक्षित अथवा अशिक्षितादींना येथील स्नान मुक्तिदायक असल्याची कल्पना आजहि आढळते.

आधुनिक काळी—जेमतेम २'–३' खोलीच्या या कुंडात शेकडो यात्रेकरू फुले आणि पैसे वहात असल्यामुळे सध्या ते दुर्गंधीयुक्त बनले आहे. यात्रेकरूंनी वाहिलेले पैसे गोळा करण्यासाठी पुजाऱ्यांनी एकसारखे ढवळल्यामुळे ते डबक्याप्रमाणे चिखलमय आणि गलिच्छ बनते.

या तीर्थानजिकच तारकेश्वराचे मंदिर असून, स्कंदमते तेथेहि शिवाचे तारकमंत्रस्थान आहे ( स्कन्द. काशी. ७.७८; २५.७२–७३; ३२.११५–११६ ).

**परिक्रमा**—विश्वेश्वराच्या दर्शनानंतर यात्रेकरू मणिकर्णिका तीर्थाने प्रारंभ होणारी काशीक्षेत्राची सुमारे ५० मैलांची परिक्रमा ( पंचक्रोशी ) करतात. स्कंद पुराण आणि त्रिस्थलीसेतुमते अविमुक्तेश्वर लिंग हा या परिक्रमेचा पहिला टप्पा होय ( स्कन्द. काशी. १०.९३; त्रिस्थली. पृ. ९६ ). परंतु तीर्थप्रकाशमते मात्र ते 'विश्वेश्वरा'चेच नामांतर आहे ( ती. पृ. १८७ ).

**पंचक्रोशी यात्रा** – मणिकर्णिका घाटासभोवतालच्या या क्षेत्राच्या पाच कोस त्रिज्येच्या अर्धवर्तुळातील ( = ५० मैल ) तीर्थांची परिक्रमा ( पंचक्रोशी ) त्या घाटापासूनच सुरू होते ( स्कन्द. काशी. २६.८०; ११४; ५५.४४ ). लक्ष्मीधरकृत तीर्थकल्पतरुमध्ये तिचा निर्देश नसला, तरी परंपरेने काशीयात्रेचा अविभाज्य भाग मानलेल्या या षड्दिनात्मक परिक्रमेचे प्रमुख टप्पे पुढीलप्रमाणे होतः—

## काशीक्षेत्राची षड्दिनात्मक यात्रापरिक्रमा

| दिवस | अंतर | प्रवास |
|---|---|---|
| प्रथम | ६ मैल | मणिकर्णिका घाट→खांडवग्राम ( गंगा असि संगम ) |
| द्वितीय | १० ,, | खांडवग्राम→धूपचंडी देवीग्राम |
| तृतीय | १४ ,, | धूपचंडी→रामेश्वरग्राम |
| चतुर्थ | ८ ,, | रामेश्वर→शिवपुर |
| पंचम | ६ ,, | शिवपुर→कपिलधारा ( पिंडदान ) |
| षष्ठ | ६ ,, | कपिलधारा→वरणा संगम→ मणिकर्णिका तीर्थ |

मणिकर्णिका तीर्थस्नानाने, तसेच विनायकाच्या दर्शनाने या परिक्रमेची समाप्ती होते.

**अन्य तीर्थे**—या क्षेत्रातील अन्य प्रमुख तीर्थे पुढील-

प्रमाणे होतः—

१. ज्ञानवापी—स्कंदमते विश्वेश्वर मंदिराच्या दक्षिणेकडील ही वापी काशीनिवासी विश्वेश्वर शिवाने नित्यस्नानार्थ स्वतःच्या त्रिशूळाने खोदली. 'ज्ञानरूपी शिवास स्नान घालणारी' अशा अर्थाने दिला शिववराने हे (ज्ञानवापी, ज्ञानोद) नाव प्राप्त झाले (स्कन्द. काशी. ३३; त्रिस्थली. १४८–१५०).

२. दुर्गा मंदिर—स्कंद पुराणात या देवीस्थानाचे ('वज्रपंजर', त्रिकाण्ड. १६१) स्तोत्र आढळते (स्कन्द. काशी. ७२.३७–६५).

३. कालभैरव—विश्वनाथ मंदिरापासून ½ मैल उत्तरेकडील विसेसर गंज भागान्तर्गत या मंदिरातील शिवक्रोधोत्पन्न, श्वानवाहन कालभैरव (भैरवनाथ, आमर्दक, पापभक्षणक, कालराज, दंडपाणि) हा या क्षेत्राचा क्षेत्रपाल (कोतवाल) मानला जातो. त्याच्या मुखावर काजळाचा घट्ट लेप आणि हातामध्ये 'दंड' (सोटा) असून, काशीक्षेत्राची विश्वनाथपूजेने प्रारंभ होणारी यात्रा याच्या पूजनाने संपते. स्थानिक आख्यायिकामते याच्या सन्मुख ज्ञातअज्ञात अपराधांचे प्रायश्चित्त घेतले असता यमदंडापासून मुक्ती मिळते. स्कंद पुराणात याचे माहात्म्य सविस्तरपणे वर्णिले असून (स्कन्द. काशी. ३०), स. १८१७ मध्ये बांधलेल्या येथील सद्यःकालीन मंदिराच्या गाभाऱ्यातील कोनाड्यात भैरवाची कृष्णपाषाणीय चतुर्भुज मूर्ती आहे. दर रविवारी, तसेच कार्तिक वद्य अष्टमीला (कालाष्टमी) येथे यात्रा भरते.

४. **गणेशस्थाने**—स्कंद पुराणात या क्षेत्रातील ५६ गणेशस्थानांचे विवरण असून (स्कन्द. काशी. ५७.५९–११५; त्रिस्थली. ११८–१९९), येथील 'धुंडि' गणेशाची नामव्युत्पत्तीहि तेथे आढळते (स्कन्द. काशी. ५७.३३).

५. **अन्य तीर्थे**—स्कंदमते येथील प्रमुख चौदा महालिंगे पुढीलप्रमाणे होत :—१. ॐकार; २. त्रिलोचन; ३. महादेव; ४. कृत्तिवासस्; ५. रत्नेश; ६. चंद्रेश्वर; ७. केदार; ८. धर्मेश; ९. वीरेश्वर; १०. कामेश; ११. विश्वकर्मेश्वर; १२. मणिकर्णीश; १३. अविमुक्त; १४. विश्वेश्वर (स्कन्द. काशी. ७३.३२–३६; त्रिस्थली. २६४–२६५). दर महिन्याच्या शुद्ध प्रतिपदेस येथे यात्रा होत असून (स्कन्द. काशी. ७३.३९), स्कंद पुराणात अन्यत्र येथील चौदा महालिंगांची (स्कन्द. काशी. ७३.४५–४८), तसेच चौदा 'आयतनां'ची (स्कन्द. काशी. ७३.६०–६२) नामावली आढळते. लिंगमते यापैकी बारा आयतने लिंगस्वरूपच होती (लिङ्ग. पूर्व. ९२.६७–१०७).

स्कंद पुराणात अन्यत्र येथील १२५ तीर्थांचे (स्कन्द. काशी. ८३–८४), तसेच ॐकारादि (१४), दक्षेश्वरादि (८), आणि शैलेशादि (१४) छत्तीस प्रमुख शिवलिंगांचे विवरण आढळते.

येथील शिवलिंगे आणि तीर्थांचे विवरण अन्य पुराणांत आढळते (लिङ्ग. पूर्व. ९२.६७–१००; पद्म. आदि. ३४–३७; कूर्म. पूर्व. ३२; ३५.१–१५; स्कन्द. काशी. १०.८६–९७; ३३; ५३.२७, ५५; ५८; ६१). या लिंगांमध्ये विश्वेश्वर सर्वाधिक फलदायी असल्याबद्दल सर्व पुराणांचे एकमत दिसते.

गाहडवाल राजांच्या स. ११९७ च्या शिलालेखात येथील कृत्तिवासस् देवाचा (एपि. इंडि. ४.९७), तसेच गोविंदचंद्राच्या स. ११५६ च्या पाच ताम्रपटांत येथील कोटितीर्थान्तर्गत उत्तरायण संक्रांतीच्या पर्वकालीन स्नानाचा निर्देश आढळतो (एपि. इंडि. ८.१४८).

**धर्मक्षेत्र**—याच्या ५ मैल उत्तरेकडील 'सारनाथ'चा निर्देश स्कंद पुराणात 'धर्मक्षेत्र' नावाने असून, या पुराणमते या विष्णुनिर्मित स्थानी तो बुद्धरूपाने अवतीर्ण झाला.

**घाट**—स्कंदमते येथील गंगेकाठी घाट बांधून दानधर्म करणे पुण्यप्रद, तसेच वरुणलोकदायक असून, त्यामुळेच हरिद्वारपासून कलकत्त्यापर्यंतच्या गंगा किनाऱ्यापैकी सर्वाधिक घाट येथे आढळतात. नदीच्या उभय अंगाचे हे दगडी पायऱ्यायुक्त विशाल घाट या क्षेत्राच्या नगरस्थापत्याचा अविभाज्य भाग असून, कनौजच्या गाहडवाल राजांच्या शिलालेखमते (इ. स. ११–१२ वे शतक) 'आदिकेशव' (इंडि. अँटि. १९.२४९; एपि. इंडि. १४.१९७), 'कपालमोचन' (एपि. इंडि. ४.१९७), 'वेदेश्वर' (एपि. इंडि. ४.९७) घाट एक हजार वर्षांहूनहि पुरातन आहेत. गाहडवाल राजा गोविंदचंद्राच्या स. ११२२ च्या देणगीलेखात निर्देशिलेला 'कपालमोचन घाट' (एपि. इंडि. ४.११०) म्हणजे संभवतः आधु. कपालमोचन तीर्थ असावे (मत्स्य. १८३.८४–१०३; स्कन्द. काशी. ३३.११६). याच राजवंशाच्या वि. सं. ११९७ च्या अन्य एका शिलालेखात येथील (अविमुक्तक्षेत्र) 'वेदेश्वरघाटा'चा निर्देश आढळतो (एपि. इंडि. ४.९७).

स्नानेच्छू नदीगामी यात्रेकरूंच्या सोयीसाठी बांधलेल्या

या घाटांचे लांबलचक उतरत्या पायऱ्या हे प्रमुख वैशिष्ट्य असून, त्या चढून गेल्यानंतर एक मनोरायुक्त इमारत आढळते. पायऱ्यांच्या मालिकातील स्थापत्यशास्त्रीय एकसुरीपणाच्या परिहारार्थ त्यामध्ये ठराविक अंतरावर छोटी मंदिरे बांधतात.

**मानमंदिर घाट**— अंबरच्या मानसिंगनिर्मित (स. १५९२–१६१५) येथील 'मानमंदिर घाट' याच राजाच्या वृंदावन कृष्णमंदिर, तसेच अंबर राजवाड्या-प्रमाणेच तत्कालीन राजस्थानी स्थापत्यशैलीने (इ. स. १६ वे शतक) बांधला आहे.

**उल्लेखनीय घाट**— या क्षेत्रातील उल्लेखनीय घाट पुढीलप्रमाणे होत–१. अग्नीश्वर घाट; २. असिसंगम घाट; ३. केदार घाट; ४. क्षेमेश्वर घाट; ५. गंगामहल घाट; ६. गाय घाट; ७. चिता घाट; ८. चौकी घाट; ९. चौसष्टी घाट; १०. जानकी घाट; ११. तुलसी घाट; १२. त्रिलोचन-घाट १३. दशाश्वमेध घाट; १४. दुर्गा घाट; १५. नारद घाट १६. पंचगंगा घाट; १७. प्रह्लाद घाट; १८. ब्रह्मा घाट; १९. भोसला घाट; २०. मणिकर्णिका घाट; २१. महता घाट; २२. मानमंदिर घाट; २३. मानसरोवर घाट; २४. मीर घाट; २५. राजघाट; २६. राजमंदिर घाट २७. राजराजेश्वरी घाट; २८. राणामहल घाट; २९. राम घाट; ३०. लक्ष्मण-बाला घाट ३१. ललिता घाट; ३२. लली घाट; ३३. लाल घाट; ३४. वरणासंगम घाट; ३५. वृक्षराज घाट; ३६. शिवाला घाट; ३७. शीतला घाट; ३८. स्मशान घाट; ३९. संकठा घाट ४० सिंधिया घाट; ४१. हनुमान घाट.

**विद्याकेंद्र**— स्कंद पुराणात 'विद्याकेंद्र' म्हणून वर्णिलेल्या (**विद्यानां सदनम् काशी**; स्कन्द. काशी. ९६. १२१), या नगराची विद्यापरंपरा शतकानुशतके अबाधित असून, बौद्ध साहित्यमते अनेक पुरातन पाठशाला येथे होत्या (जा. २.४; धम्मपद अठ्ठ. १. २५०; खुद्दक अठ. १९८). धम्मपदमते तक्षशिलेचे अनेक विद्यार्थी येथे विद्यार्जनार्थ येत असत (धम्मपद अठ्ठ. ३.४४५). ह्युएन्त्संगच्या मते येथील बौद्ध विहारात, हिंदु देवमंदिरात, तसेच अन्य आश्रमस्थानी श्रेष्ठ पंडित आणि ऋषिमुनी देशोदेशींच्या जिज्ञासू विद्यार्थ्यांना ज्ञानदान करीत असत. त्यापैकी हिंदु वैदिक पाठशालांत केवळ ब्राह्मण विद्यार्थ्यांनाच प्रवेश असून, तक्षशिला आणि नालंदासदृश बौद्ध आणि जैन विहारांत कोणाहि विद्यार्थ्यास वेदवेदांग आणि विभिन्न कलांचे शिक्षण देत असत. जातकमते बुद्धाने येथे विभिन्न गायनशास्त्रांचे अध्ययन केले होते.

विद्यादानाची परंपरा अबाधित ठेवणाऱ्या या गावी आजहि मर्यादित विद्यार्थ्यांना संथा देणाऱ्या अनेक छोट्या पाठशाला असून, महाविद्यालयांच्या तोडीची ज्ञान-परंपरा तेथे आढळते. या विद्वत्परंपरेचे सविस्तर विवरण प्रा. अळतेकर यांच्या 'हिस्टरी ऑफ बनारस' मध्ये आढळते (पृ. २३-२४; इंडि. अँटि. ४१.७-१३; २४५–२५३).

**उत्खनन**— या गावाच्या ईशान्यवर्ती राजघाट रेल-मार्गाच्या खोदकामात स. १९४० मध्ये सापडलेल्या गुप्त राज्यकालीन '**वाराणसी अधिष्ठान अधिकरणेश**' (वाराणसी नगराच्या राजव्यवहाराची मुद्रा) मुद्रालेखा-वरून प्राचीन वाराणसी नगर येथे असावे. बनारस हिंदु विश्वविद्यालयाच्या डॉ. ए. के. नारायणकृत या परिसराच्या उत्खननात (स. १९५७) लोहयुगप्रभावित महाजनपद-कालीन (इ. स. पू. ९ वे– इ. स. ८ वे शतक) नागरी संस्कृतीच्या प्रतीकभूत या नगराचे कालानुक्रमे निम्नलिखित सहा स्तर सापडले :—

**(१) स्तर क्र. १** (इ. स. पू. ८००-२००)— या त्रिविभागात्मक मौर्यपूर्वकालीन स्तरामध्ये मुलायम राखी, पिंगट लाल, काळी लाल आणि काळी (एन. बी. पी.) मृत्तिकापात्रे, तसेच तांब्याची ओतीव नाणी, टेराकोट्टा शिल्पचित्रे, लोह आणि अस्थिनिर्मित शस्त्रे आदि अवशेष सापडले.

**(२) स्तर क्र. २** (मौर्योत्तर काल)— या काळात हे नगर आगीच्या भक्ष्यस्थानी पडले असून, अस्थी आणि लोखंड यांची बाणाग्रे, शुंग शैलीची टेराकोट्टा शिल्पचित्रे, तसेच शिल्पांकित मुद्रा येथे सापडल्या.

**(३–४) स्तर क्र. ३–४** (इ. स. १ ले–८ वे शतक)– या स्तरातील पक्क्या विटांच्या इमारतींचे अवशेष, पक्ष्यांच्या आकाराचे मणी, गुप्त शैलीची टेराकोट्टा मृत्तिकाचित्रे, तसेच नानाविध बांगड्यांवरून तत्काली हे नगर आर्थिक आणि सांकृतिक दृष्ट्या समृद्ध असावे.

**(५) स्तर क्र. ५** (इ. स. ७००– १२००)— या स्तरात हिंदु मंदिरांचे अनेक स्थापत्यावशेष सापडले.

**(६) स्तर क्र. ६**—या स्तरात मुस्लीम शैलीची पुष्प-नक्षीकामयुक्त झिलईदार मृत्तिकापात्रे सापडली.

**संरक्षण-व्यवस्था**—स्तर क्र. १ च्या काळी (इ. स. पू. ८००–२००) राजघाटाच्या परिसरात गंगा नदीच्या बाजूस उतरती संरक्षक तटबंदी (उंची– १० मीटर)

असून, नदीच्या पुरात ती अनेक वेळा ढासळली असावी (देशपांडे, रिव्हयू. पृ. ४३५-४३६).

## काशी येथील देवतास्थाने

देवतास्थाने—स्कंद पुराण काशी खंडमते काशी येथील विभिन्न देवतास्थाने पुढीलप्रमाणे होत. कंसातील आकडे अध्याय व श्लोकांचे आहेत :—

(१) आदित्यस्थाने—१. अरुण (५१); २. उत्तरार्क कुंड (४७); ३. कर्ण (८४.४५); ४. केशव (५१); ५. खखोल्क (५०); ६. गङ्गा (५१); ७. द्रौपदी (४९); ८. मयूख (३३.१५३; माहात्म्य. ४९.२५; ९७.१८३); ९. यम (५१); १०. लोलार्क (४६); ११. विमल (५१); १२. वृद्ध (५१; तीर्थ. ८३.९८); १३. साम्ब (४८).

(२) केशवस्थाने—१. आदिकेशव (३३.१४१); २. पादोदक तीर्थ (६१.४; ९७.१५); ३. आदित्यकेशव (३३.१४१; तीर्थ. ८४.१७); ४. अम्बरीष तीर्थ (६१. १२); ५. गङ्गाकेशव तीर्थ (३३.१८०;६१.७३;१८०; तीर्थ. ८६.१०६); ६. ज्ञानकेशव (श्वेतदीप तीर्थ; ६१. ७); ७. तार्क्ष्यकेशव तीर्थ (६१.९); ८. त्रिभुवनकेशव (६१.२६; तीर्थ. ८३.७०); ९. नारदकेशव (३३. १४०; तीर्थ. ६१.१०;८४.१४); १०. निर्वाणकेशव (६१.२५); ११. प्रह्लादकेशव (३३.१४०; तीर्थ. ६१. ११); १२. बलिकेशव (३३.१४०); १३. भार्गवकेशव (६१.१४); १४. भीष्मकेशव (३३.४१; तीर्थ. ६१. २४); १५. भृगुकेशव (३३.१४२); १६. यज्ञवाराह-केशव (३३.१४३); १७. वामनकेशव (३३.४१; तीर्थ. ६१.१५); १८. हयग्रीवकेशव (६१.२३).

(३) गणेशस्थाने—१. कपर्द्यादि गणेश (५७); २. धुंडि गणपति (५७; नामकथन. ६१. १२२; तीर्थ. ८४. १०३); ३. भगीरथादि गणेश (५७); ४. हरिश्चन्द्र गणेश (५७).

(४) क्षेत्ररक्षिका चंडिकास्थाने— तीर्थचिंतामणिमते काशी येथील 'क्षेत्ररक्षिका' चंडिका पुढीलप्रमाणे होतः-१. दक्षिणेस—दुर्गा; २. नैर्ऋत्येस—उत्तरेश्वरी; ३. पश्चिमेस—अंगारेशी; ४. वायव्येस—भद्रकालिका; ५. उत्तरेस—भीमचण्डा; ६. ईशान्येस—महामत्ता; ७. पूर्वेस—शंकरा; ८. आग्नेयेस— अधःकेशी; ९. केंद्रस्थानी— चित्रघण्टा (तीर्थ. पृ. २६२).

(५) देवीस्थाने—१. ज्वालामुखी (६१. १९४); २. बन्दी (३३. १७७); ३. भद्रकाली (९७.१५६); ४. मङ्गलागौरी (३३.१५२; ९७.१८६; मङ्गलोद महाकूप-९७.१९१); ५. महागौरी विजयभैरवी (६६.३०); ६. महादुर्गा (९७.२५२); ७. महामुण्डा (९७.७१); ८. महालक्ष्मी-महालक्ष्मीश्वर लिङ्ग (९७.१०९); ९. योगिनी (६९); १०. ललितागौरी (३३.१७५; तीर्थ. ८३. १०४); ११. वदनप्रेक्षणा (९७.१८८); १२. वाराणसी (३३.१२७); १३. विकटलोचना शुष्कोदरी (६८.७२); १४. विकटा (८३; ९७.४०); १५. विजयभैरवी महागौरी (६६.३०); १६. विशालाक्षी (३३.१७५; ६१.२८; विशाल तीर्थ-८३.१०२) १७. विश्वभुजा (३३.१७७).

(६) नृसिंहस्थाने—१. अत्युग्र नृसिंह (६१.१९३); २. कोलाहल नृसिंह (६१.१९५); ३. खर्व नृसिंह (तीर्थ. ८४.४८); ४. गिरि नृसिंह (६१.१९१); ५. ज्वालामाली नृसिंह (६१.१९४); ६. निर्वाण नृसिंह (३३. १५७; ६१.१८८; ६८.३१; ७०.३१); ७. महाबल नृसिंह (६१.१८९); ८. लक्ष्मी नृसिंह (३३.१४४; तीर्थ. ६१.२०; ८४.२५); ९. विकट नृसिंह (६१. १९७); १०. विदार नृसिंह (३३.१४३; तीर्थ. ६१.१८; ८४.२३).

(७) माधवस्थाने—१. कालमाधव (६१.१८६); २. ज्ञानमाधव (६१.२७); ३. प्रयागमाधव (६१.२९; ३९; तीर्थ. ८३.८९); ४. वीरमाधव (६१.१८५); ५. बिन्दुमाधव (३३.१४८; ६० माहात्म्य); ६. शङ्खमाधव (३३.१४६; तीर्थ. ६१.२२); ७. शेषमाधव (३३. १४५; तीर्थ. ६१.२१); ८. श्वेतमाधव (६१.२८).

(८) वराहस्थाने—१. कोकावराह (६१.२०६; तीर्थ. ८३.६२); २. क्षोणीवराह (८३.९०); ३. ताम्र-वराह (६१.२०२; तीर्थ. ८४.६६); ४. धरणीवराह (६१.२०३); ५. यज्ञवराह (६१.१७).

(९) वामनस्थाने—१. अनन्तवामन (६१.१९८); २. दधिवामन (६१.१९९); ३. बलिवामन (६१.२०१).

(१०) विनायकस्थाने—१. अर्कविनायक (९७.२५१); २. आशाविनायक (३३.१७६); ३. खर्व विनायक (३३.१४५); ४. गौरी विनायक (८०); ५. देहली विनायक (३०.६१; १९१); ६. विघ्नविनायक (९७. २२५); ७. सिद्धिविनायक (९७.२२); ८. सीमाविनायक (६१.७५; १८३); ९. हरिश्चन्द्र विनायक (तीर्थ. ६१. ७४).

तीर्थचिंतामणीमध्ये काशीमधील निम्नलिखित पंच-

विनायकांचा निर्देश आढळतोः— १. ढुण्डि; २. विनायक; ३. दिव्यविनायक; ४. गोप्रेक्ष विनायक; ५. हस्तिदन्ति विनायक ( ती॰वि. पृ. २६२ ).

( ११ ) शिवस्थाने—मत्स्यमते काशी येथील शिवाची अष्ट गुह्यलिंगे पुढीलप्रमाणे होतः—१. आम्रातकेश्वर; २. कृमिचण्डेश्वर; ३. केदार; ४. जालेश्वर; ५. महाभैरव; ६. महालय; ७. श्रीपर्वत; ८. हरिश्चन्द्र ( मत्स्य. १८१.२८–२९ ).

स्कंद पुराणाच्या ९७ व्या ' लिंगाध्याय ' ( काशी-लिंगावली ) नामक अध्यायात काशी येथील प्रमुख शिव-लिंगांची नामावली असून, त्यापैकी पुनरुक्त नावे एकाच नावाच्या अनेक लिंगांची द्योतक आहेत ( स्कन्द. काशी. ९७.२६५ ).

## काशी येथील तीर्थस्थाने

तीर्थनामावली—महाभारत आणि पौराणिक साहित्य-मते काशी येथील प्रमुख तीर्थे पुढीलप्रमाणे होतः– १. अग्नि तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.७ ); २. अङ्गारेशी ( नारद. उत्तर. ५०.२३ ); ३. अधःकेशी ( नारद. उत्तर. ५०.२४ ); ४. अन्तकेश्वर ( नारद. उत्तर. ४९.६ ); ५. अन्तरेश्वरी देवी ( नारद. उत्तर. ५०.२२ ); ६. अमर तीर्थ ( मत्स्य. १८१.२६ ); ७. अमरेश्वर ( नारद. उत्तर. ५०.५७ ); ८. अयन ( नारद. उत्तर. ४८ ); ९. अरुन्धतीवट ( पद्म. आदि. ३२.६ ); १०. असि नदी ( मत्स्य. १८३.६२ ); ११. आकाश तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५,३; पद्म. आदि. ३७. ३ ); १२. आनन्दपुर तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.१५; पद्म. आदि. ३७.१८ ); १३. आनुष ( आर्षभ ) तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.३; पद्म. आदि. ३७.३ ); १४. आम्रतकेश्वर ( अग्नि. ११२.३ ); १५. आम्रातकेश्वर ( मत्स्य. १८१. २८ ); १६. इडानाम्नी नदी ( नारद. उत्तर ४८.२२ ); १७. उत्तरमुखी गङ्गा नदी ( नारद. उत्तर. ५१.१० ); १८. उत्तरवाहिनी गङ्गा नदी ( नारद. उत्तर. ५१.६ ); १९. उत्तराह्वय तीर्थ (कूर्म. पूर्व. ३५.१४); २०. उदाङ्मुखी गङ्गा ( नारद. उत्तर. ४८.२९ ); २१. उपशान्त तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.१४ ); २२. ऊर्ध्वकेशी देवी ( नारद. उत्तर. ५०.२४ ); २३. ऊर्ध्वस्थान ( पद्म. आदि. ३२.३९ ); २४. ऋषिकुल्या तीर्थ ( पद्म. आदि. ३२.१२ ); २५–२६. ओङ्कार ( कूर्म. पूर्व ३२.१२; नारद. उत्तर. ५०.३६ ); २७. ओङ्कारेश्वर लिङ्ग ( कूर्म. पूर्व. ३२. ११; पद्म. आदि. ३४.१; ९ ); २८. औशनसी तीर्थ ( पद्म. आदि. ३२.११ ); २९. कन्दर्पेश्वर लिङ्ग ( पद्म. आदि. ३४.१० ); ३०. कपर्दीश्वर ( कूर्म. पूर्व. ३२.१२; ३३.१; ४; १० ); ३१. कपालमोचन तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.१५; नारद. उत्तर. ५०.८ ); ३२. कपालमोचन सरोवर ( नारद. उत्तर. ५०.३५ ); ३३. कपिल ह्रद ( पद्म. आदि. ३२.४१ ); ३४. कपिला ह्रद ( नारद. उत्तर. ५०.४६ ); ३५. कर्ण ह्रद ( नारद. उत्तर ४९.२८ ); ३६. कापिल तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.९; पद्म. आदि. ३७. ९ ); ३७. काम कुण्ड ( नारद. उत्तर. ५०.२ ); ३८. काम लिङ्ग ( नारद उत्तर. ४९. २० ); ३९ कायावरोहण तीर्थ ( मत्स्य. १८१.२६ ); ४०. कालकेश्वर ( कलशेश्वर ) तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.७ ); ४१. कालञ्जर तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.१२; पद्म. आदि. ३७. १५ ); ४२. काल तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.२ ); ४३. कालिका देवी ( नारद. उत्तर. ५०.१४ ); ४४. कालिञ्जरवन तीर्थ ( मत्स्य. १८१.२७ ); ४५. कालेश्वराख्य कुण्ड ( नारद. उत्तर. ५०.९ ); ४६. काशीपुरी वैष्णवीपुरी ( नारद. उत्तर. ४८.१० ); ४७. किरणा नदी ( नारद. उत्तर. ५१.१५ ); ४८. कुब्जाम्रक तीर्थ ( पद्म. आदि. ३२.५ ); ४९. कुरुक्षेत्र पुण्यस्थान ( कूर्म. पूर्व. ३१.४७ ); ५०. कृत्तिकामघ तीर्थ (पद्म. आदि. ३२.१५ ); ५१. कृत्तिवासस् ( नारद. उत्तर. ४९.८ ); ५२. कृत्तिवासेश्वर ( कूर्म. पूर्व. ३२.१२; १४; १८; २०; नारद. उत्तर. ४९.६; ७; १०; पद्म. आदि. ३४.१० ); ५३. कृमिचण्डेश्वर तीर्थ ( मत्स्य. १८१.२९ ); ५४. केदार ( अग्नि. ११२.५; कूर्म. पूर्व. ३१.४६; ३५.१२; मत्स्य. १८१.२९ ); ५५. केशव ( मत्स्य. १८५.६८ ); ५६. कोकामुख पुण्यस्थान ( कूर्म. पूर्व. ३१.४७ ); ५७. कोटि तीर्थ ( नारद. उत्तर. ५०.७; पद्म. आदि. ३२.३९ ); ५८. खेटकर्ण तीर्थ (कूर्म. पूर्व. ३५.१२ ); ५९. गङ्गा ( कूर्म. पूर्व. ३१.४९); ६०. गङ्गा तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.९; नारद. उत्तर. ४८. २९ ); ६१. गङ्गा–सरस्वती सङ्गम (पद्म. आदि. ३२.३); ६२. गङ्गेश्वर ( नारद. उत्तर. ४९.४६ ); ६३. गङ्गोद्भेद तीर्थ ( पद्म. आदि. ३२.२९ ); ६४. गन्धर्व तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.१०; पद्म. आदि. ३७.१३); ६५. गया पुण्यस्थान ( कूर्म. पूर्व. ३१.४६; ३५.५ ); ६६. गोकर्ण पुण्यस्थान ( कूर्म. पूर्व. ३१.४८; मत्स्य. १८१.२५ ); ६७. गोप्रख्य तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.१३ ); ६८. गोप्रतार तीर्थ ( पद्म. आदि. ३२.३४ ); ६९. गोप्रेक्ष तीर्थ ( नारद. उत्तर. ५०.१४; पद्म. आदि. ३७.१६ ); ७०. गोप्रेक्ष विनायक

( नारद. उत्तर. ५०.१९ ); ७१. गोप्रेक्षक दैवत ( नारद. उत्तर. ५०.४३ ); ७२. गोप्रेक्षेश्वर ( नारद. उत्तर. ५०. ४४ ); ७३. गोमती–गङ्गा सङ्गम (पद्म. आदि. ३२.४२); ७४. गोमती तीर्थ ( पद्म. आदि. ३२.३७ ); ७५. गौरीक्षेत्र ( अग्नि. ११२.२ ); ७६. गौरी तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.३; पद्म. आदि. ३७.३ ); ७७. गौरी देवी ( नारद. उत्तर ५०.१३ ); ७८. घटोत्कच तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.८; पद्म. आदि. ३७.८ ); ७९. चतुर्थेश्वर ( नारद. उत्तर. ४९.६५ ); ८०. चन्द्र तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.११; पद्म. आदि. ३७.१४ ); ८१. चर्म तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५. १४ ); ८२. चित्रघण्टा देवी ( नारद. उत्तर. ५० ); ८३. चित्राङ्गदेश्वर ( कूर्म. पूर्व. ३५.११; पद्म. आदि. ३७.१४); ८४. जम्बुकेश्वर तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.४; पद्म. आदि. ३७.४); ८५. जम्बूक लिङ्ग ( नारद. उत्तर. ५०.६७ ); ८६. ज्येष्ठेश्वर लिङ्ग ( अग्नि. ११२.४ ), ८७. जालेश्वर तीर्थ ( मत्स्य. १८१. २८ ); ८८. जाह्नवीसङ्गम ( नारद. उत्तर. ४८.८६ ); ८९. ज्ञान तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.६ ); ८०. ढुण्ढि विनायक ( नारद. उत्तर ५०.१९ ); ९१. ताल तीर्थ ( पद्म. आदि. ३७.२ ); ९२. तिमिचण्डेश्वर ( नारद. उत्तर. ४८.२० ); ९३. त्र्यम्बक ( नारद. उत्तर. ४९.८ ); ९४. त्रिलोचन तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५. १४; पद्म. आदि. ३७.१७ ); ९५. त्रिस्रोता नदी ( नारद. उत्तर. ५०.२९ ); ९६. दण्डक तीर्थ ( नारद. उत्तर. ४९.५९ ); ९७. दण्डखात तीर्थ ( नारद. उत्तर. ४९.३० ); ९८. दर्वीसंक्रमण तीर्थ ( पद्म. आदि. ३२. ८ ); ९९. दशाश्वमेध तीर्थ ( मत्स्य. १८५.६८ ); १००. दुर्गा देवी ( नारद. उत्तर. ५०.२२ ); १०१. देवी तीर्थ ( पद्म. आदि. ३२.११ ); १०२. देवेश्वर ( नारद. उत्तर. ४८.८८ ); १०३. दौर्वासिक तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५. ११ ); १०४. धर्म तीर्थ ( पद्म. आदि. ३७.४ ); १०५. धर्मनद ह्रद (नारद. उत्तर. ५१.१३); १०६. धर्मनदी तीर्थ ( नारद. उत्तर. ५१.३९ ); १०७. धर्मसमुद्भव तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.१० ); १०८. धूतपापा नदी ( नारद. उत्तर. ५१.१५ ); १०९. धूनपाप तीर्थ ( नारद. उत्तर. ५१.३४ ); ११०. नलकूबरक ईशान ( नारद. उत्तर. ४९. ४३ ); १११. नाग तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.७); ११२. नादेश्वर ( नारद. उत्तर. ५०.३३ ); ११३. नारायण तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.५; पद्म. आदि. ३७.५ ); ११४. नैमिष पुण्यस्थान ( कूर्म. पूर्व. ३१.४६; पद्म. आदि. ३२. २३ ); ११५. पञ्चगौरी ( नारद. उत्तर. ५०.१७ ); ११६. पञ्चनद तीर्थ ( नारद. उत्तर. ५१.२१;३६ ); ११७. पञ्चायत विग्रह (कूर्म. पूर्व. ३२.५); ११८. पञ्चायतन लिङ्ग ( कूर्म. पूर्व. ३२.८–९ ); ११९. पञ्चार्थ लिङ्ग ( कूर्म. पूर्व. ३२.६); १२०. पर्वत तीर्थ (कूर्म. पूर्व. ३५.८ ); १२१. पर्वतेश्वर तीर्थ (मत्स्य. १८३.६२); १२२. पाञ्चनद तीर्थ ( नारद. उत्तर. ५१.२१ ); १२३. पिङ्गला तीर्थ ( नारद. उत्तर. ४८.२१ ); १२४. पितामह तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.८ ); १२५. पिशाचमोचन कुण्ड ( कूर्म. पूर्व. ३३.२; १४; पद्म. आदि. ३५.२ ); १२६. पिशाची देवी ( नारद. उत्तर. ५०.१० ); १२७. पुण्यतोया नदी ( नारद. उत्तर. ५१.१५ ); १२८. पुष्कर पुण्यस्थान ( कूर्म. पूर्व. ३१.४६ ); १२९. पुष्पाग्र पुण्यस्थान ( कूर्म. पूर्व. ३१.४७ ); १३०. प्रभास पुण्यस्थान ( कूर्म. पूर्व. ३१.४८;३५.१२; पद्म. आदि. ३७.१५ ); १३१. प्रयाग पुण्यस्थान ( कूर्म. पूर्व. ३१.४६; ३५.२; पद्म. आदि. ३७.२ ); १३२. प्राजापत्य तीर्थ ( कूर्म. पूर्व ३५.४; पद्म. आदि ३७.४ ); १३३. बहुदा तीर्थ ( पद्म. आदि. ३२.३१ ); १३४. बिन्दु तीर्थ ( नारद. उत्तर. ५१.३६ ); १३५. बिन्दुमाधव तीर्थ ( मत्स्य. १८५.६८ ); १३६. ब्रह्म तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५ ९; पद्म. आदि. ३७.९ ); १३७. ब्रह्महत्याविनाशन तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.१५ ); १३८. ब्रह्मावर्त तीर्थ ( पद्म. आदि. ३२.७ ); १३९. ब्राह्मणिका तीर्थ ( पद्म. आदि. ३२.२२ ); १४०. भद्रकर्ण पुण्यस्थान ( कूर्म. पूर्व. ३१. ४६ ); १४१. भद्रकालिका देवी (नारद. उत्तर. ५०.२३); १४२. भद्रदेह सरोवर ( नारद. उत्तर. ४९.२;५०.५० ); १४३. भीमचण्डा देवी ( नारद. उत्तर. ५०.२३ ); १४४. भीष्मचण्डिक तीर्थ ( मत्स्य. १८३.६२ ); १४५. भीष्मचण्डिका देवी (नारद. उत्तर. ४९.५); १४५. भूतेश्वर तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.१० ); १४६. भूमिचण्डेश्वर लिङ्ग (अग्नि. ११२.४); १४७. भृगुतुङ्ग (पद्म. आदि. ३२.१३); १४८. मणिकर्ण तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.८ ); १४९. मणिकर्णिका (नारद. उत्तर. ४८.६७; ४९.४४; ६८; मत्स्य. १८५.६९); १५०. मणिकर्णीश्वर (नारद. उत्तर. ४९.४५); १५१. मणिकर्ण्य तीर्थ ( पद्म. आदि. ३७.८ ); १५२. मत्स्योदरी नदी ( कूर्म. पूर्व. ३२.११; नारद. उत्तर. ४८.२३; ५०.३०; ३६ ); १५३. मध्यमेश ( कूर्म. पूर्व. ३४.१; पद्म. आदि. ३६.१ ); १५४. मध्यमेश्वर ( कूर्म. पूर्व. ३२.१२; ३४.४; पद्म. आदि. ३४.१० ); १५५. मन्दाकिनी नदी ( कूर्म. पूर्व. ३४.२; नारद. उत्तर. ५०.

२९; पद्म. आदि. ३६.१०); १५६. महाकाल तीर्थ (मत्स्य. १८१.२६ ); १५७. महा तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.५; १३ ); १५८. महानदी तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.५; पद्म. आदि. ३७.५ ); १५९. महाभैरव ( मत्स्य. १८१.२९ ); १६०. महामत्ता देवी ( नारद. उत्तर. ५०.२३ ); १६१. महालय तीर्थ ( अग्नि. ११२.४; पद्म. आदि. ३७.१६; मत्स्य. १८१. २९ ); १६२. महाश्रम तीर्थ ( पद्म. आदि. ३२. १७ ); १६३. महेश्वर ( नारद. उत्तर. ४९.९; पद्म. आदि. ३२.१९ ); १६४. मातलीश्वर ( नारद. उत्तर. ४९.६ ); १६५. मार्कण्डेय तीर्थ ( पद्म. आदि. ३२. ४१ ); १६६. मेरुशृङ्ग ( कूर्म. पूर्व. ३१.१६ ); १६७. यम तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.६; पद्म. आदि. ३७.६ ); १६८. यमुनाप्रभव तीर्थ ( पद्म. आदि. ३२.८ ); १६९. ययाति तीर्थ ( पद्म. आदि. ३७.९ ); १७०. योगपीठ ( नारद. उत्तर. ४८.६७ ); १७१. वंशपुण्यस्थान ( कूर्म. पूर्व. ३१.४७ ); १७२. वरणा नदी ( अग्नि. ११२.६; नारद. उत्तर. ४८.२२; मत्स्य. १८३.६२ ); १७३. वसिष्ठ तीर्थ ( पद्म. आदि. ३२.१२ ); १७४. वस्त्रपद तीर्थ ( मत्स्य. १८१.२५ ); १७५. वापी ( नारद. उत्तर. ४९.५७); १७६. वायु तीर्थ (कूर्म.पूर्व. ३५.५; पद्म. आदि. ३७.५ ); १७७. वाराणसी ( कूर्म. पूर्व. ३१.१; २२; ३५.२२; पद्म. आदि. ३२.४०; ३३.४८–४९ ); १७८. वाराह तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.६; पद्म. आदि. ३७.६ ); १७९. वारिणी–जाह्नवी सङ्गम ( नारद. उत्तर. ५१.६ ); १८०. वाह्नेय तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.१०; पद्म. आदि. ३७.१३ ); १८१. विजयेशान पुण्यस्थान ( कूर्म. उत्तर. ३१.४८ ); १८२. वित्तेश्वर ( नारद. उत्तर. ४९.१७ ); १८३. विद्याधरेश्वर ( कूर्म. पूर्व. ३५.११; पद्म. आदि. ३७.१४ ); १८४. विलविनायक ( नारद. उत्तर. ५०.१९ ); १८५. विपुल ओङ्कार ( कूर्म. पूर्व ३२.१; ३–६ ); १८६. विमलाशोक ( पद्म. आदि. ३२.१३ ); १८७. विमुक्त ( नारद. उत्तर. ४९.५३ ); १८८. विश्वरूप तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.२; पद्म. आदि. ३७.२ ); १८९. विश्वेशानन्द कानन तीर्थ ( मत्स्य. १८५.६८ ); १९०. विश्वेश्वर ( कूर्म. पूर्व. ३१.२; ३२.१२; पद्म. आदि. ३४.१० ); १९१. वीरप्रमोक्ष तीर्थ ( पद्म. आदि. ३२.१४); १९२. वृषध्वजशिव तीर्थ ( नारद. उत्तर. ५०.४६; कूर्म. पूर्व. ३५.१३ ); १९३. वेतसिका तीर्थ ( पद्म. आदि. ३२.२० ); १९४. व्याघ्रेश्वर तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.१४१; नारद. उत्तर. ५०.५६; पद्म. आदि. ३७.१७ ); १९५. व्यासेश ( नारद. उत्तर. ४९.२८ ); १९६. व्योम तीर्थ ( पद्म. आदि. ३७.१४ ); १९७. राम तीर्थ ( पद्म. आदि. ३२.३७ ); १९८. रुद्रकर्ण तीर्थ ( मत्स्य. १८१.२५ ); १९९. रुद्रकर्ण ह्रद ( पद्म. आदि. ३७.१५ ); २००. रुद्रकोटि पुण्यस्थान ( कूर्म. पूर्व. ३१.४७; मत्स्य. १८१.२५ ); २०१. रुद्रावास कुण्ड ( नारद. उत्तर. ५०.३ ); २०२. लक्ष्मणेश्वर ( नारद. उत्तर. ४९.६४ ); २०३. लक्ष्मी कुण्ड ( नारद. उत्तर. ५०.५ ); २०४. ललिता देवी ( नारद. उत्तर. ४९.३२ ); २०५. लोलार्क तीर्थ ( पद्म. आदि. ३७.१७; नारद. उत्तर. ४८.२१; मत्स्य. १८५.६८; कूर्म. पूर्व. ३५.१४ ); २०६. लौकिक तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.१३ ); २०७. शङ्कुकर्णक पुण्यस्थान ( कूर्म. पूर्व. ३१.४८; नारद. उत्तर. ४८.२०; मत्स्य. १८१.२७ ); २०८. शतसाहस्रक तीर्थ ( पद्म. आदि. ३२.८ ); २०९. शालिग्राम पुण्यस्थान ( कूर्म. पूर्व. ३१.४७ ); २१०. शिव तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.१४ ); २११. शुक्रेश्वर तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.१५; नारद. उत्तर. ५०.६५; पद्म. आदि. ३७.१८ ); २१२. शुक्र नदी ( मत्स्य. १८३. ६२ ); २१३. शुष्का नदी ( नारद. उत्तर. ४८.२१ ); २१४. शैवपुरी ( नारद. उत्तर. ४८.१४ ); २१५. शैलेश्वर ( नारद. उत्तर. ५०. ५७.); २१६. श्मशानाख्य तीर्थ (नारद. उत्तर. ४८.६७); २१७. श्री तीर्थ ( पद्म. आदि. ३७.८ ); २१८. श्रीपर्वत ( अग्नि. ११२.४; मत्स्य. १८१.२८ ); २१९. श्रीशैल पुण्यस्थान ( कूर्म. पूर्व. ३१.४६ ); २२०. संवर्त्तक तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.६ ); २२१. सङ्गमेश्वर ( नारद. उत्तर. ४८.८७–८८; ५०.६३ ); २२२. सन्ध्या तीर्थ ( पद्म. आदि. ३३.१६); २२३. सन्निहती (कूर्म. पूर्व. ३४.३०); २२४. सम्मूर्तिक तीर्थ ( पद्म. आदि. ३७ ६ ); २२५. सरस्वती तीर्थ ( पद्म. आदि. ३२.३० ); २२६. सर्वेश्वर ( नारद. उत्तर. ४९.६ ); २२७. सामुद्रक तीर्थ ( पद्म. आदि. ३२.६ ); २२८. सारस्वत तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.१२; पद्म. आदि. ३७.१५ ); २२९. सिन्दूर्य विनायक ( नारद. उत्तर. ५०.२०); २३०. सिन्धुप्रभाव तीर्थ (पद्म. आदि. ३२. १० ); २३१. सिद्धेश्वर महालय तीर्थ ( मत्स्य. १८१.२५ ); २३२. सुगन्ध तीर्थ ( पद्म. आदि. ३२.१ ); २३३. सुनील तीर्थ ( पद्म. आदि. ३७.३ ); २३४. सुन्दरिका तीर्थ ( पद्म. आदि. ३२.३१ ); २३५. सुवर्णाक्ष तीर्थ ( मत्स्य. १८१. २५ ); २३६. सूर्य तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.७ ); २३७. सोम तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.७ ); २३८. सोमेश

तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.९; पद्म. आदि. ३७.९ ); २३९. स्थलेश्वर तीर्थ ( मत्स्य. १८१.२७ ); २४०. स्वर्गद्वार तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.४; पद्म. आदि. ३७.४ ); २४१. स्वर्लील लिङ्ग ( नारद. उत्तर. ५०.५३ ); २४२. स्वर्लीकेश्वर ( नारद. उत्तर. ५०.५७ ); २४३. स्वर्लीन तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.३ ); २४४. हरिश्चन्द्र ( अग्नि. ११२. ३; मत्स्य. १८१.२८ ); २४५. हस्तिपालेश्वर ( नारद. उत्तर. ४९.९ ); २४६. हस्तिहस्तिन् विनायक ( नारद. उत्तर. ५०.१९ ); २४७. हाटकेश्वर पुण्यस्थान ( कूर्म. पूर्व. ३१.४७ ); २४८. हिमालय पुण्यस्थान ( कूर्म. पूर्व. ३१.४६; ३५.१३ ); २४९. हिरण्यगर्भ तीर्थ ( कूर्म. पूर्व ३५. १३; नारद. उत्तर. ५०.५२; पद्म. आदि. ३७. १६ ); २५०. होम ( व्योम ) तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५. ११ ).

**काशी उत्तर** ( तीर्थ ) — उत्तरखंडातील ( आधु. हिमालय प्रदेश ) यम्नोत्री–गंगोत्री मार्गावरील भागीरथी, असि आणि वरणा नद्यांच्या दरम्यानचे गंगोत्रीच्या ३ मैल दक्षिणेकडील एक तीर्थ. येथे एकादश रुद्रमंदिर आणि जड भरत ऋषींचे आश्रमस्थान असून, याच्या पूर्ववर्ती वारणावत्वरील वरणा संगमानजिकच्या विमलेश्वर शिवमंदिरस्थानी याची पंचक्रोशी यात्रा सुरू होते ( ती. प्र. ५१ ).

**काशीनगर** ( नगर )—बौद्ध साहित्यमते ‘ काशी ’ क्षेत्राचे नामांतर ( जा. ५.१४; ६.११५; काशी पहा ).

**काशीपार** ( देशविभाग )—बंगालच्या विनायकपाल राजाच्या इ. स. १० व्या शतकातील दानपत्रमते प्रतिष्ठानभुक्तीमधील ( आधु. अलाहाबाद – वाराणसी जिल्हे ) वाराणशी विषयान्तर्गत एक देशविभाग ( पथक ). आधु. वाराणसी गावाच्या परिसरातील प्रदेश हाच असून, तिक्कारिका ( वाराणसीपासून ११ मैल दक्षिणेकडील आधु. तिकरि ) ग्राम यामध्ये समाविष्ट होते ( इंडि. अँटि. १५.१४१ ).

**काशीपुर** ( तीर्थ )—पद्ममते एक देवीस्थान ( पद्म. पाताल. १२.३९–५६ ). नैनिताल जिल्ह्यातील हस्तिनापुरच्या १० मैल ईशान्येकडील आधु. काशीपुर ( अक्षांश ३०° उत्तर; रेखांश ५° पूर्व ) गाव हेच होय.

**नामव्युत्पत्ती**—चंपावतीच्या देवीचंदमांडलिक ‘ काशीनाथस्थापित नगर ’ अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले.

**अवशेष**—स्थानिक आख्यायिकामते येथून एक मैल पूर्वेकडील ‘ योजन ’ नामक पुरातन दुर्ग, तसेच ‘ द्रोणसागर ’ नामक तलाव ( व्याप्ती–६०० ) पांडवांनी येथील ‘ द्रोणधाम ’ निवासी द्रोणाचार्यांप्रीत्यर्थ बांधला. काही अभ्यासकांच्या मते ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनातील अहिच्छत्र नगर हेच असावे ( वेदधरातल. पृ. ४०; अहिच्छत्र पहा ).

२. बौद्ध साहित्यमते ‘ काशी ’ क्षेत्राचे नामांतर ( जा. ५.१४; ६.११५; काशी पहा ).

**काश्मीर** ( देश )—स्कंदमते उदीच्य भारतातील ‘ कश्मीर ’ देशाचे नामांतर ( स्कन्द. माहेश्वर. कौ. ३९. १४२ ). अन्य नामांतर ( बृहत्संहिता )–‘ काश्मीरक; ’ ( महाभारत )–‘ काश्मीर मंडल ’ ( म. आर. १३०.१०; कश्मीर पहा ).

**काश्यप-आश्रम** ( आश्रमस्थान )—महाभारत लोमशयात्रामते अंग देशान्तर्गत कौशिकी नदीकाठचे काश्यप ऋषींचे आश्रमस्थान ( म. आर. ११०.२; विभांडक आश्रम; ऋष्यशृंग आश्रम पहा ).

**काश्यप तीर्थ** ( तीर्थ )—पौराणिक साहित्यमते ‘ कश्यप ’ नामक श्राद्धयोग्य तीर्थाचे नामांतर ( ब्रह्माण्ड. ३.१३.९८; कश्यप तीर्थ १. पहा ).

२. साभ्रमती नदीकाठचे एक तीर्थ ( पद्म. उत्तर. १५७.२ ).

३. ( ह्रद ) साभ्रमती नदीकाठचे एक सरोवर ( पद्म. उत्तर. १५१.१ ).

**काश्यपी** ( तीर्थ )—साभ्रमती नदीकाठचे एक देवीस्थान ( पद्म. उत्तर. १६८.३ ).

**काश्यपी गङ्गा** ( नदी )—साभ्रमती नदीनजिकची एक नदी ( पद्म. उत्तर. १३५ ).

**काश्यपीय** ( बौद्ध संघ )—तक्षिला ताम्रपळी खरोष्ट्री लेखमते सर्वास्तिवादिन् सांप्रदायान्तर्गत एक स्थविरवादी बौद्ध भिक्षुसंघ. बौद्ध धर्मान्तर्गत धूतनागव्रताचे पालन करणाऱ्या या लोकांचा ‘ उत्तराराम ’ नामक एक मठ तक्षशिला येथे होता ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१ २.८८ ). नामांतर ( प्राकृत साहित्य )–‘ कशविय; ’ ( पालाट्ट ढेरी बरणीलेख )–‘ कशवीय. ’

**वसाहती**—खरोष्ट्री शिलालेखमते या लोकांच्या निम्नलिखित अन्य वसाहती होत्या :—

( १ ) उरशा देशात—वेदादि ताम्रपळीलेखात या देशातील चतुर्दिश संघान्तर्गत काश्यपीय भिक्षूंचा निर्देश आढळतो ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.८८ ).

( २ ) पुष्कलावतीमध्ये—पालाट्ट ढेरी बरणीलेख क्र. २ मते पुष्कलावती ( आधु. हश्तनगर ) येथे बहुश्रुतियक

नामक श्रमणांसमवेत हे रहात असत ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.१२२ ).

( ३ ) सहे-इ-बहलोल गावी — सहे-इ-बहलोल मृत्तिकापात्र लेखमते या गावच्या परिसरात यांची एक वसाहत होती ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.१२२ ).

**काश्यपेश्वर** ( लिंग )—श्रीमालक्षेत्रातील एक शिवलिंग ( श्रीमालमाहात्म्य. २८ ).

**काषाय** ( पर्वत )—उत्तर प्रदेशातील अल्मोडा गावापासून ८ मैलांवरील एक पर्वत.

**काष्ठ** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.९१ ).

२. ( पर्वत ) जैमिनीय ब्राह्मणमते देव आणि असुर लोकांच्या दरम्यानचा एक मर्यादापर्वत ( शब्दशः अर्थ–' मर्यादा '; जैमिनीय ब्राह्मण. १.१८५ ). पंजाबातील सांगला नगरानजिकचा आधु. काठा पर्वत हाच होय. यानजिकचे लोक ' काष्ठीय '; ' काठीय '; ' काठी '; ' कठ ' स्थानिक नावांनी सुविख्यात असून, सिकंदरस्वारीच्या वर्णनातील ' कठ ' लोक हेच असावेत ( वेदधरातल. पृ. १३६; कठ पहा ).

**काष्ठखण्ड** ( तीर्थ )—गौतमी ( गोदावरी ) नदीकाठचे एक तीर्थ ( ब्रह्म. १७०.६७ ).

**काष्ठगिरि** ( पर्वत )—शाकद्वीपान्तर्गत एक वर्षपर्वत ( कूर्म. पूर्व. ४९.३४ ).

**काष्ठमण्डप** ( नगर )—गुणकामदेव राजाने ( स. ७२३ ) स्थापिलेले नेपाळच्या मध्ययुगीन राजधानीचे नगर. बाग्मती आणि विष्णुमती संगमावरील नेपाळच्या विद्यमान राजधानीचे आधु. काठमांडु नगर हेच होय. नामांतर– ' कांतेपुर ' ( राइट, नेपाळ इतिहास. पृ. ९ ).

यापासून २½ मैलांवरील ललितपट्टन ( मंजुपट्टन = आधु. पाटन ) गावी नेपाळची प्राचीनतम राजधानी असून, उत्तरकालात ती अनुक्रमे भातगाव आणि या गावी हलविण्यात आली. यापासून ३ मैल पूर्वेकडील बाग्मती नदीच्या उजव्या किनाऱ्यावर ' पशुपति ' हे ज्योतिर्लिंगस्थान आहे ( फर्ग्युसन, १.२८३; पशुपति पहा ).

**काष्ठवाट** ( देश )—राजतरंगिणीमते उत्तमराज राजाच्या अधिराज्याखालील आणि कश्मीरराज कलशाच्या मांडलिकत्वाखालील कश्मीरच्या आग्नेय सरहद्दीवरील एक पर्वतीय देश ( राज. ७.५९० ). चिनाब नदीच्या वरच्या खोऱ्यातील आधु. किश्टवार देश हाच असून, याच्या पश्चिमेस खश देश होता ( खश ९. पहा ).

उत्तरकालीन कश्मीरी साहित्यात याचा अनेक वेळा निर्देश असून ( जोनराज. ७६. ३१३; श्रीवर. १.४६; चतुर्थ इतिहास. ७३५; ७८४; ८१६; ८२७; ९९१ ), औरंगजेबाच्या कालापर्यंत येथे हिंदु रजपुतांचेच राज्य होते. कश्मीरच्या महाराजा गुलाबसिंगाने हा प्रदेश कश्मीरास जोडला ( स्टाइन, राज. १.३१५; २.४३१ ).

२. ( ग्राम ) राजतरंगिणीमते कश्मीरातील लोहर ( आधु. लोहरिन )–कश्मीर मार्गावरील क्रोधन विषयातील ( आधु. क्रुहिन परगणा ) एक ग्राम ( राज. ६.२०२; ८.३९०; ४६८ ). स्टाइन यांच्या मते क्रुहिन परगण्याच्या पश्चिम भागात अथवा त्यापलीकडील बुनियार आणि नौशेरा पर्वतीय भागात हे असून, त्यानजिकचा रस्ता पूंच ( प्राचीन–पर्णोत्स ) देशाच्या उत्तरवर्ती सद्रन खोऱ्यातून वराहमूलच्या दक्षिणेस वितस्ता खोऱ्यात उतरत असे. हाजीपीर खिंडीतील हा रस्ता आजहि कश्मीर–पूंच दळणवळणाचा प्रमुख रस्ता आहे.

राजतरंगिणीमते कश्मीरचा बंडखोर राजा सुस्सल येथे रहात असून, अभिमन्यु राजाचा फल्गुन नामक अमात्य येथून वराहक्षेत्रास ( आधु. बारामुल्ला ) परतला होता ( राज. ६.२००–२०३ ).

३. ( ग्राम ) कश्मीरातील दूंत्स परगण्यातील नुनर गावानजिकचे एक ग्राम ( अक्षांश ३३°-५८′ उत्तर; रेखांश ७४°-४५′ पूर्व ). आधु. कष्टवार गाव हेच होय ( स्टाइन, राज. ६.२०२ ).

**काष्ठहरण** ( पर्वत )—पौराणिक साहित्यमते पूर्व भारतातील काष्ठहरण घाटानजिकच्या ' हिरण्य ' पर्वताचे ( आधु. मोंघीर टेकड्या ) नामांतर ( बील, ४.३९७; हिरण्य पर्वत पहा ).

**काष्ठील** ( नगरविभाग )—राजतरंगिणीमते कश्मीरातील श्रीनगरच्या वितस्ता नदीच्या डाव्या किनाऱ्यावरील एक नगरविभाग ( राज. ८.११७७ ). झेलम आणि कुलकुल (प्राचीन क्षितिका) नद्यांच्या दरम्यानच्या शेरगढी राजवाडा आणि झेलम नदीच्या द्वितीय पुलामधील आधु. काठूल मुहल्ला हाच होय.

विक्रमांकदेवचरितमते श्रीनगरच्या ब्राह्मणांची घरे येथे असून ( विक्रम. १८.२५ ), यशस्कर राजाची अग्रहारस्थाने येथेच होती ( राज. ६.८९ ). अन्य कश्मीरी साहित्यातहि याचा निर्देश आढळतो ( श्रीवर. ४.२४२; लोकप्रकाश. २; स्टाइन, राज. २.४५१ ).

**कासरगोड** ( तीर्थ )—माध्वविजय ग्रंथमते दक्षिण

भारतातील द्वैत सांप्रदायप्रवर्तक मध्वाचार्य-चरणस्पर्श-पुनीत एक तीर्थ. येथून ३ मैलांवरील विष्णुमंगल स्थानी मध्वाचार्य आले असून ( माध्वविजय. १३.२१ ), जयसिंह राजाने त्यांचे येथे दर्शन घेतले होते ( एपि. इंडि. २९.२०७ ). मद्रास-मंगलोर रेलमार्गावरील मंगलोरपासून २८ मैलांवरील पयस्विनी नदीकाठचे आधु. कासरागोड गाव हेच होय.

तीर्थे--श्रीसमर्थ रामदास आणि पुरंदरदास-चरणस्पर्श-पुनीत या स्थानी सध्या निम्नलिखित अन्य मंदिरे आहेतः— १. कात्यायनी ( महादेवी भगवती ); २. श्रीमल्लिकार्जुन; ३. श्रीलक्ष्मी वेंकटेश्वर; ४. माधुरी देवी; ५. श्रीमहागणपति.

गणेशमंदिर—स्थानिक आख्यायिकामते कासरागोड रेल्वे-स्थानकापासून ५ मैलांवरील या मंदिरातील गर्भागारव्यापी गणेशप्रतिमा ( १०′ × ४½′ ) एका हरिजन स्त्रीस ८०० वर्षांपूर्वी गवत कापताना सापडली असून, ती आजहि प्रतिदिनी वाढत असते ( ती. प्र. ३२२–३२३ ).

**कासवती** ( नदी )--जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक नदी ( वराह. ८३.३ ).

**कासवा** ( तीर्थ )--पश्चिम भारतातील नर्मदा नदी-काठचे भडोचनजिकचे कंबेश्वर शिवमंदिरस्थान ( ती. प्र. ४३९ ).

**कासहृद** ( ग्राम )--चालुक्य राजा भीम ( द्वितीय ) च्या स. १२८७ च्या शिलालेखमते दक्षिण राजपुतान्यातील एक गाव ( एपि. इंडि. ८.२२० ). आधु. अनद्र किंवा वणद्र ग्रामद्वयापैकी हे एक असावे.

**कासा** ( नदी )--जंबूद्वीपान्तर्गत भद्राश्व वर्षातील एक नदी ( वराह. ८२.४ ).

**कासारे** ( शिलालेखस्थान )--सेंद्रक राजा अल्ल-शक्तीच्या स. ६५३ च्या ताम्रपटाचे खानदेशातील धुळ्यापासून ३४ मैलांवरील उपलब्धिस्थान ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.११० ).

**कास्तीर** ( नगर )--पाणिनीच्या अष्टाध्यायीमते अजस्तुंद नगरानजिकचे एक ' तीर ' अंत्यशब्दयुक्त नगर ( पा. सू. ६.१.१५५ ). पतंजलीच्या मते हे वाहीक देशामध्ये होते ( पतञ्जलि. २.२९३–२९८ ).

**कॉन्डेकेतेस्** ( नदी )—मेगॅस्थिनेसच्या मते हिमालय पर्वतोद्भवा ' गंडकी ' नदीचे नामांतर ( मॅक्रिंडल, पृ. ७७; गंडकी पहा ).

**किंयज्ञ** ( तीर्थ )—पद्ममते एक तीर्थ ( पद्म. आदि. २६.७४ ).

**किंरूप** ( तीर्थ )—कुरुक्षेत्रातील एक तीर्थ ( वामन. ३६.२७ ).

**किंशुकवन** ( वन )—जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वताच्या दक्षिणेकडील कैलास व पंचकूट पर्वतांच्या, तसेच वसुधारा आणि रत्नधारा धबधब्यांच्या दरम्यानचे एक वन ( लिङ्ग. ४९.५८; वायु. ३८.२८–३३ ).

**किंशुलकागिरि** ( पर्वत )—पाणिनीच्या गणपाठमते वायव्य भारतातील एक पर्वत ( पा. सू. ६.३.११७ ). अग्रवाल यांच्या मते सिंध आणि बलुचिस्तान सीमेवरील दक्षिणोत्तर हाला ( प्राचीन शाल्वक ) पर्वताच्या पश्चिमवर्ती आधु. मक्रान पर्वत हाच होय. भौगोलिक दृष्ट्या तो अफगाणिस्तानपासून बलुचिस्तानपर्यंतच्या विशाल उत्तर-दक्षिण पर्वतश्रेणीचा भाग असून, भूगर्भशास्त्रीय दृष्टीने तो सिंधु नदीमुळे विलग झालेला हिमालय पर्वताचा उपविभाग आहे.

नामव्युत्पत्ती—' रक्तवर्णीय हिंगुलाचा पर्वत ' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले असून, आजहि याच्या परिसरातील प्रदेश आणि नदी अनुक्रमे ' हिंगुल देश ' आणि ' हिंगुलाज नदी ' या ' किंशुल'च्या प्राकृतभाषीय रूपांनी ओळखली जातात. प्राचीन साहित्यात ' पारद ' नावाने सुविख्यात असणारा हा प्रदेश मध्ययुगीन काली ' हिंगुल ' नावाने सुविख्यात झाला ( कीकट पहा ).

हिंगुलाज तीर्थ—या पर्वताच्या परिसरातील हाब, पुरली आणि हिंगुलाज नद्यांच्या खोऱ्यांपैकी हिंगुलाज खोऱ्यात आरक्तवर्णीय देवीचे ' हिंगुलाज तीर्थ ' आहे. पाकिस्ताननिर्मितीपूर्वी अनेक हिंदु तेथे तीर्थयात्रेसाठी जात असत ( हिंगुलाज तीर्थ पहा ).

**कि-त्वे** ( बौद्ध विहार )--औ-कॉंग्च्या प्रवासवर्णन-मते काश्मीरातील ' कृत्याश्रम ' बौद्ध विहाराचे नामांतर ( कृत्याश्रम पहा ).

**कि-पिन्** ( देश )—चिनी साहित्यमते वायव्य भारतातील एक देश. निम्नलिखित देशविभागांचा निर्देश तेथे अभिप्रेत असावा—

**( १ ) स्वात नदीचे खोरे**—चिनी साहित्यमते 'सिन्-हान्-शु (यू-चि) लोकांनी हद्दपार केलेले बॅक्ट्रिया देशीय शक लोक दक्षिणवर्ती ' हिएन्-तु ' ( लोंबता रस्ता ) मार्गे या देशात स्थायिक झाले. यू-चि खोऱ्याचा निर्देश येथे अभिप्रेत असून, ' कौ-फु ' ( काबूल ) देशहि त्यामध्ये

समाविष्ट असावा. चिनी साहित्यमते याच्या भौगोलिक सीमा पुढीलप्रमाणे होत्या :—१. उत्तरेस– हिंदुकुश पर्वत; २. पूर्वेस आणि ईशान्येस– अर्कोसिया देश; ३. पश्चिमेस– सिंधु नदी.

(२) **कश्मीर देश**— चॅव्हेनीज यांच्या मते चीनमधील हान, तसेच वै राजघराण्यांच्या काळात आधु. कश्मीर देशास हे नाव लावण्यात येत असे.

(३) **काफिरीस्तान देश**—चीनमधील तांग राजघराण्याच्या काळात काफिरीस्तान देशास (= काबूल नदीच्या उपनद्यांचा प्रदेश) हे नाव लावण्यात येत असे (कॉर्पस्. इन्क्रि. २.१.१.२६).

**किकरव** (देश)—विंध्य पर्वतान्तर्गत एक देश (वामन. १४.५४).

**किकर्व** (देश)—पौराणिक साहित्यमते दक्षिण भारतातील 'किष्किंधक' जनपदाचे नामांतर (किष्किंधक पहा).

**किकिसपर्ण** (देश)—जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक देश (वराह. ८३.२).

**किङ्किणीकाश्रम** (तीर्थ)—महाभारतमते एक तीर्थ (म. अनु. २५.२३).

**किञ्जप्य** (तीर्थ)—कुरुक्षेत्रातील एक तीर्थ (म. आर. ८१.६५).

**किटीश्वर** (लिंग)—काशी येथील एक शिवलिंग (स्कन्द. काशी. ६१.२०६)

**किडारम्** (बृहद्भारतीय देश)—तामीळ शिलालेख साहित्यमते भारतवर्षाच्या नवखंडांपैकी 'कटाह द्वीपा'चे नामांतर (कटाह द्वीप पहा).

**किणिहिखेटक** (ग्राम)—वाकाटक राजा प्रवरसेन (द्वितीय) च्या सिवनी ताम्रपटमते विदर्भातील ब्रह्मपूरक गावाच्या पूर्वेकडील एक ग्राम. याचे आधुनिक स्थान समजत नाही (कॉर्पस्. इन्क्रि. ३.२.२४८).

**कितव** (देश व लोकसमूह)—पाणिनीच्या गणपाठमते वायव्य भारतातील एक देश व लोकसमूह (पा. सू. ४.२.९०). अग्रवाल यांच्या मते मक्रान प्रदेशातील आधु. केज लोक हेच होत.

**महाभारतात**—या ग्रंथमते इंद्रवक्त्र (आधु. बलुचिस्थान) देशांतील पारेसिंधु (सिंधु नदीपलीकडचा प्रदेश) देशातील हे लोक युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयी उपस्थित होते (म. स. ५१.११–१२).

**कित्तूर** (दुर्गस्थान)—गंगा (आधु. दक्षिण म्हैसूर) प्रांतातील एक दुर्गस्थान. येथील स. १०७९ च्या शिलालेखमते या प्रदेशाची राजकीय परिस्थिती प्रतिदिनी प्रियकर बदलणाऱ्या व्यभिचारिणी स्त्रीप्रमाणे अस्थिर होती (एपि. कर्ना. ४.५६). देवगिरीच्या बहामनी सुलतान अल्लाउद्दीनने स. १३४७ मध्ये हा किल्ला जिंकला (इंडि. अँटि. स. १८९९).

**किदङ्गुर** (देवमंदिरस्थान)—केरळ प्रांतातील चोल-पांड्य स्थापत्यशैलीचे (इ. स. ११ वे शतक) हिंदु देवमंदिरस्थान.

**किन्दत्तकूप** (तीर्थ)—कुरुक्षेत्रातील एक तीर्थ (म. आर. ८१.८३). पाठभेद–'किंदत्तरूप' (वामन. ३६.६२).

**किन्दान** (तीर्थ)—कुरुक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ (पद्म. आदि. २६.७४; म. आर. ८१.६५).

**किन्दिय** (ग्राम)—टॉलेमीच्या मते मध्य भारतातील एक ग्राम (अक्षांश ३०°–२०′ उत्तर; रेखांश १३७° पूर्व). रोहिलखंडातील आधु. शहाजहानपुर (स्थानिक नाव–कंत) गाव हेच असावे. यूल यांच्या मते गंगा नदीकाठचे आधु. मिर्झापुर गाव हेच होय.

**किन्दुशुकूप** (तीर्थ)—कुरुक्षेत्रातील एक तीर्थ (नारद. उत्तर. ६५.८७).

**किन्नर** (देश व लोकसमूह)—पौराणिक साहित्यमते हिमालय प्रदेशान्तर्गत 'किंपुरुष वर्षा'चे नामांतर (मार्क. ५५.४८; किंपुरुष वर्ष पहा). अन्य नामांतर–'किन्नर खंड' (ऐ. अ. ३.३०–३१). येथे रहाणाऱ्या किन्नर (आधु. कनौर) लोकांमुळे त्या देशास हे नाव मिळाले.

**किन्नरपुर** (नगर)—राजतरंगिणीमते कश्मीरराज नरराजस्थापित कश्मीरातील एक नगर (राज. १.२७४). चक्रधर उडरातील विजब्रौर (प्राचीन–विजयेश्वर) नजिकच्या 'नरपुर'चे हे नामांतर असावे (नरपुर पहा).

**किमेडि** (ग्राम)—आंध्र प्रदेशान्तर्गत गंजम जिल्ह्यातील एक ग्राम. स. १८३४ मध्ये येथील शेतकऱ्यांनी स्थानिक राजाच्या असह्य कराविरुद्ध बंड केले (सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३१५).

**किम्पुनक** (तीर्थ)—अवंती येथील एक तीर्थ (स्कन्द. आवन्त्य. अ. ३१.५५).

**किम्पुना** (नदी)—एक तीर्थस्वरूप नदी (म. स. ९.१०३ *).

**किम्पुरुष वर्ष** (देशविभाग)—पौराणिक साहित्य-मते जंबूद्वीपान्तर्गत मेरु आणि हेमकूट पर्वतांच्या दक्षिणेकडील एक वर्ष (उपविभाग; मार्क. ५६.२९; ६०.७; ब्रह्माण्ड. १५.३२; भविष्य. म. ४.११; भा. ५.१६.९; १९.१; मत्स्य. ११३.२९; ११४.५९; ६२; ६४; १२१.७१; लिङ्ग. ४९.७; वायु. ३४.२८; ४६.५; विष्णु. २.२.१२. काव्यमी. १७.२३३). हिमालय पर्वताच्या उत्तरेकडील आणि गंगा नदीच्या पश्चिमेकडील या देशातील किन्नर लोकांमुळे (ब्रह्माण्ड. १८.४९; मत्स्य. १२१.४८; वायु. ४७.४७) 'किन्नर देश' नावानेहि हे ओळखले जात असे. हिमालय पर्वतामुळे भारतवर्षापासून विभक्त झालेला कश्मीरचा पूर्व नेपाळपर्यंतचा पश्चिम हिमालयाचा भाग हाच असून, तत्रस्थ आधु. 'कनौर' लोक पौराणिक 'किन्नर' लोकांचे वंशज असावेत.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशविभागाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. ऐन्-इ-अकबरी (३.३०-३१) | किन्नर खंड |
| २. महाभारत (भी. ६.७) | हैमवत वर्ष |
| (स. २५.१-२) | किंपुरुषावास |
| ३. पौराणिक साहित्य (ब्रह्माण्ड. ३४.४४; लिङ्ग. ४७.४; मत्स्य. ११३.२९; विष्णुधर्म. १.७.२८) | हेमकूट वर्ष |
| ४. मार्कंडेय पुराण (५५.४८) | किन्नर देश व लोकसमूह |

**नामव्युत्पत्ती**—'किंपुरुष अथवा किन्नर लोकांचा देश' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले असून, सांकृत्यायन यांच्या मते 'किन्नर' चा शब्दशः अर्थ 'दुष्प्रवृत्त व्यक्ती' (= आर्यशत्रु = अनार्य लोक) असा होतो.

**भौगोलिक सीमा**—पौराणिक साहित्यमते हिमालयाच्या उत्तरेकडील तिबेटपर्यंतच्या या देशात 'प्लक्ष खंड' संज्ञक नंदनवनसदृश देश (ब्रह्माण्ड. १७.२), पुरूरवस्-आख्यानान्तर्गत 'प्लक्ष पुष्करिणी', तसेच 'प्लक्ष-प्रस्रवण' (सरस्वती उगमस्थान) आदि स्थाने होती. याखेरीज यामध्ये माध्वी (ब्रह्माण्ड. १८.७३; वायु. ४७.७१), आणि शांती (मत्स्य. १२१.७१, जयह्लदजा; वायु. ४७.७१) नामक नद्या, तसेच हेमकूट नामक वर्ष-पर्वत होता (ब्रह्माण्ड. ३५.३०; अग्नि. १०७.५).

**पाणिनीच्या गणपाठात**—या ग्रंथात या (किन्नर) लोकांचा निर्देश आढळतो (पा. सू. ४.३.९३).

**महाभारतात**—या ग्रंथमते श्वेतगिरि आणि हिमालयाच्या उत्तरेकडील या जंबूद्वीपान्तर्गत खंडात (किंपुरुषावास) द्रुमपुत्राचे राज्य असून, युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या उत्तर दिग्विजयात अर्जुनाने हा जिंकला होता (म. स. २५.१-२). शुकाचार्यांच्या मेरु पर्वत-भारतवर्ष आकाशीय प्रवासात त्यांना हे (हैमवत वर्ष), तसेच हरि वर्ष लागले होते (म. शां. ३१२.१४).

**पौराणिक साहित्यात**—मार्कंडेयमते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या ईशान्येकडील हिमालय प्रदेशातील किन्नर लोकांच्या (मार्क. ५५.४८), या यक्षभूमिसदृश सिद्धि-प्राप्त देशात (मार्क. ५३.३५) मर्त्यलोकान्तर्गत पर्जन्य-वृष्टीऐवजी भूभागातून वर उसळणाऱ्या निर्झरद्वारा जल-निष्पत्ती होत असे. येथील अजर आणि अमर मनुष्य-मात्रांना मानसिक अथवा शारीरिक व्याधीचा स्पर्शहि नसे (मार्क. ५६.२२-२६).

**ऐन्-इ-अकबरीमध्ये**—या ग्रंथमते हा (किन्नरखंड) देश जंबूद्वीपामध्ये होता (ऐ. अ. ३.३०-३१).

**किंपुरुष लोक**—महाभारतमते गंधर्व, यक्ष, रक्षस्प्रमाणेच हे कुबेरसेवक लोक कैलास पर्वतानजिकच्या गंधमादन पर्वतावरील 'पद्मसौगंधिक' पुष्करिणीरक्षणाचे काम करीत असत (म. आर. १५१.८). पूर्वकाली कुबेरासमवेत लंका येथे रहाणारे हे लोक उत्तरकालात त्याच्या समवेतच गंधमादन पर्वतावर स्थलांतरित झाले (म. आर. २५९.३३). अगस्त्यकृत समुद्रपानप्रसंगी हे उपस्थित होते (म. आर. १०२.२०).

**किन्नर लोक**—बौद्ध विमानवत्थु (इ. स. २००) मते कश्मीरातील चंद्रभागा (आधु. चिनाब) नदीकाठी किन्नर लोक रहात असून, या लोकांची 'कनौरी' भाषा आजहि तेथे प्रचारात आहे. या भाषेतील 'शू' (सू = देवता) अंत्यशब्दयुक्त 'धरासू' आदि नगरनामे उत्तर काशी (तेहरी) प्रदेशात आढळतात.

आधुनिक 'कनौर' लोकांची वस्ती तिबेटनजिकच्या हिमालय प्रदेशातील सतलज खोऱ्यातील महासू जिल्ह्या-पुरती (व्याप्ती-७० चौ. मैल; समुद्रसपाटीपासून उंची-

५–११ हजार फूट) मर्यादित असून, सिमला–कोटगड रस्त्याने, अथवा डेहराडून जिल्ह्यातील काल्सी अशोक शिलालेखस्थानावरून यमुना नदीच्या काठाने तेथे जाता येते. आजहि या प्रदेशातील लोक हिमकाली काल्सी येथे येतात.

**किय-शि-मि-लो** (देश)—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते वायव्य भारतातील 'कश्मीर' देशाचे नामांतर (कश्मीर पहा).

**कियौ–हो** (देश)—ह्युएन्त्संगच्या जीवनचरित्रमते चीनच्या पश्चिम सरहद्दीबाहेरील 'कौ-चँग्' (आधु. तुर्फान) देशाच्या राजधानीचे गाव. त्या देशाच्या पूर्व सरहद्दीवरील पिह-लि गावाहून ह्युएन्त्संग येथे आला. येथील कू-वेन्-तै राजाच्या निवासस्थानी एक महिना राहून तो 'अ-कि-नि' (अग्नि) देशास गेला.

तुर्फानपासून ४ मैल उत्तरेकडील आधु. यर-खोतो गाव हेच होय. तुर्फानच्या २७ मैल पूर्वेकडील आधु. करखोजो (हुओ-चौ) गाव हेच असल्याचे अन्य अभ्यासकांचे अनुमान अयोग्य वाटते (वॉटर्स, २.३३१).

**किरण** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू. ४.२.८०.१).

**किरणपुर** (नगर)—पूर्व चालुक्य राजा गुणक विजयादित्य (तृतीय) च्या स. ८६० च्या ताम्रपटमते त्याने दग्ध केलेले दक्षिण भारतान्तर्गत राष्ट्रकूट साम्राज्यातील एक नगर. याचे आधु. स्थान समजत नाही (इंडि. अँटि. ८.५३; २०.१०३; एपि. इंडि. ५.१२२).

**किरणसुवर्ण** (नगर)—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते पूर्व भारतातील 'कर्णसुवर्ण' नगराचे नामांतर (कर्णसुवर्ण पहा).

**किरणा** (नदी)—पौराणिक साहित्य, तसेच वामन पुराण प्रह्लादतीर्थयात्रामते काशी येथील पंचनद तीर्थान्तर्गत एक पवित्र नदी (नारद. उत्तर ५१.१५; स्कन्द. काशी. ५९; वामन. ८४.५).

**किरणेश्वर** (लिंग)—काशी येथील एक शिवलिंग (स्कन्द. काशी. ३३.१५५).

**किराटकूप** (तीर्थ)—चालुक्य शिलालेखमते दक्षिण राजपुतान्यातील एक 'श्री' गौरवोपाधीयुक्त तीर्थ. जोधपुर प्रदेशातील आधु. किराडु गाव हेच होय. चालुक्य राजांच्या निम्नलिखित शिलालेखांत याचा निर्देश आढळतोः—
१. कुमारपालाचे वि. सं. १२१८ आणि १२२५ चे शिलालेख (पूना. ओरि. १.२.५१; भावनगर इन्स्क्रि. १.८४); २. भीम (द्वितीय) चा वि. सं. १२३५ चा शिलालेख (पूना. ओरि. १.२.४४).

**मंदिरे**—उत्तरकालीन चाहमान स्थापत्यशैलीचे (इ. स. १३ वे शतक) मंदिर येथे आहे (गोएट्झ, पृ. १५४).

**किरात** (लोकसमूह)—अथर्ववेद आणि महाभारत भीष्मपर्वमते उत्तर भारतातील एक प्राचीनतम वन्य लोकसमूह (अ. वे. १०.४.१४; म. भी. ४६.४६). प्राचीन साहित्यमते या लोकांच्या उत्तरकालीन वसाहती भारताच्या विभिन्न भागांत असून, तेथे 'पर्वतीय वन्य वसाहत' असा सामान्य अर्थ अभिप्रेत दिसतो.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या लोकांची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. काव्यमीमांसा (पृ. ९४) | कीर |
| २. पराशरतंत्र | कैरात |
| ३. सांची स्तूपलेख | चिरात |
| ४. प्राकृत शिलालेख (एपि. इंडि. २०.२२) | चिलात |
| ५. टॉलेमी (मॅक्रिंडल, पृ. १९१ १९४;२७७) | ऐऱ्हडोइ किऱ्हदिय |
| ६. दिओन्निसस् (मॅक्रिंडल, इंडिया. पृ. १९९). | सिर्रदिओइ |
| ७. प्लिनी, मेगॅस्थिनेस | स्किरिटस |
| ८. पेरिप्लस | किर्रडइ |

**अनेक वसाहती**—महाभारतातील जनपदनामावलीत यांचा (म. भी. १०.५१), तसेच यांच्या अनेक वसाहतींचा (**किरातानां च जातयः**) निर्देश आढळतो (म. भी. १०.६७). त्यावरून यांच्या अनेक वसाहती तत्काली अस्तित्वात असाव्यात.

**वसतीस्थान**—या पर्वतीय आदिवासी लोकांच्या भारताच्या विभिन्न भागांतील वसाहती 'किरात देश' सामान्य नावाने सुविख्यात असून, पर्वतीय आदिवासींच्या सद्यःकालीन वसाहती त्यांचेच अवशेष असाव्यात.

**उपविभाग**—महाभारतमते राज्यशासन दृष्ट्या 'निरध्यक्ष' आणि 'स्वध्यक्ष' उपविभागात विभागलेल्या या

लोकांचे भौगोलिक दृष्ट्या निम्नलिखित दोन उपविभाग होते ( १ ) दक्षिणापथनिवासी– १. उत्स; २. पुलिंद; ३. शबर; ४. चूचुप; ५. मंडप; ६. तलवरांधक; ( २ ) उत्तरापथनिवासी– १. यौन; २. कांबोज; ३. गांधार; ४. किरात; ५. बर्बर ( म. शां. २००.३८-४० ).

याच ग्रंथात अन्यत्र यांचे निम्नलिखित प्रकार वर्णिले आहेत :–१. पुरुषपाद; २. कर्णप्रावरण; ३ काकमुख; ४. तृणमूल; ५. ओष्ठकर्णिक; ६. नरराक्षसयोनि ( म. स. २७.२९* ).

लोकाचार—महाभारतमते हे पशुचर्मधारी, क्रूर आणि रानटी लोक कंदमुळे आणि फळे खात असून, आपल्या बायकांना ते गुलामांसदृश विकीत असत ( म. स. ४८. ८–११ ). वाल्मीकि रामायणमते हे लोक मस्तकावर केसांची जुडी बांधत असून ( वा. रा. कि. ४०.३० ), मनुस्मृतिमते हे मूळचे क्षत्रियकुलोत्पन्न लोक आचार-विचारांच्या अधःपतनामुळे शूद्र बनले होते ( मनु. १०. ४३–४४. ).

महाभारतमते यांच्या काही जमाती सुसंस्कृत आणि मैत्रीयोग्य असून ( म. आर. १४१.२५-२६; उ. ६२. २१ ), मध्ययुगीन शिलालेख साहित्यमते यांच्या काही सुसंघटित आणि अर्धनागरी वसाहतींवर 'किरातराज' संज्ञक राजा राज्य करीत असे ( एपि. इंडि. १८.११२ ).

वसाहती—प्राचीन साहित्यात या लोकांच्या निम्नलिखित वसाहतींचा निर्देश आढळतो :—

( १ ) नेपाळात—महाभारतमते हे लोक लौहित्य ( आधु. ब्रह्मपुत्रा ) नदीच्या परिसरात असून, मॅक्रिंडल यांच्या मते महाभारतकाली हे लोक नेपाळमधील भोट प्रदेशात निवास करीत असावेत. उत्तरकालात ते हिमालयात आणि ब्रह्मपुत्रेच्या परिसरात स्थलांतरित झाले.

नेपाळी साहित्यमते नेपाळमधील दुध-कोशी आणि अरुण ( आधु. कर्कि. ) नद्यांच्या दरम्यानचा प्रदेश 'किरात' नावाने सुविख्यात असून ( लेवी, नेपाळ. २.७२–७८ ), कोसी नदीच्या पश्चिम शाखानदी-पासून दार्जिलिंगपर्यंतचा खंबु, लिंबु, याखा, आदि जमातींचा डोंगराळ प्रदेश आजहि याच ( किरात, किरान्त ) नावाने ओळखला जातो. येथील 'दनुआर', 'ह्यु', 'थामि' आदि हलक्या जातीचे लोकहि स्वतःस किरात म्हणवीत असले, तरी सच्चे किरात त्यांस ज्ञातिबहिष्कृत मानतात ( रिस्ले, कास्ट्स अँड ट्राइब्ज ऑफ बंगाल. १. ४९० ).

बृहत्संहितेतहि ईशान्य भारतातील लोकसमूह म्हणून यांचा निर्देश आढळतो ( बृ. सं. ५.३५; ८०; ९.३५; ११.६०; १४.३०; १६.२; ३२.१९; २२; मार्क. ५५. ५० ).

( २ ) हिमालय पर्वतात—महाभारतमते हिमालय पर्वताच्या दक्षिण भागातील किरात वसाहतीला युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या उत्तर दिग्विजयात अर्जुनाने जिंकले असून ( म. स. २३.१९ ), हे लोक प्राग्ज्योतिषराजातर्फे, तसेच स्वतंत्रपणे अर्जुनाशी लढले होते ( म. स. २४.२७९* ). भारतीय युद्धात हे लोक भीष्मविरचित क्रौंचव्यूहात उपस्थित होते ( म. भी. ४६. ४६ ). पौराणिक साहित्यात यास उत्तरेकडील ( वामन. १३.४२; वायु. ४५.१२० ) हिमालय पर्वतीय देश म्हटले आहे ( मार्क. ५४.५७ ).

महाभारतमते यांची हिमालय पर्वतातील मुख्य वसाहत मानस सरोवराच्या परिसरातील कैलास, मंदार, आणि हैम पर्वतात असून ( म. अनु. १९.५४ ), यांच्या अन्य छोट्या वसाहती आणि त्यांचे दोन स्वतंत्र राजे नजिकच होते ( म. स. ४.२१–२२ ).

महाभारतात अन्यत्र यमुना नदीपासून गढवालमधील शारदा तीर्थापर्यंतच्या 'किरात–तंगण' जोडदेशांचा निर्देश असून ( म. आर. १४० ), मजबूत हाडापेराच्या लहानखुऱ्या अश्वांसाठी हा प्रसिद्ध होता. चमोलीपासून १८ मैल उत्तरेकडील आणि जोशीमठापासून १५ मैल दक्षिणेकडील टंकणी नामक अरुंद पर्वतीय प्रदेश हाच असून, येथील तंगण लोक स्वतःस खशवंशीय म्हणवितात. स्कंद पुराण केदार खंडात 'खसमंडल' ( = खश देश ) आणि 'किरात खंड' समानार्थक मानले आहेत ( स्कन्द. माहेश्वर. के. २०६.१–४ ). कालिदासाच्या 'कुमारसंभवा'त पार्वती निवासस्थानभूत नंदा देवी पर्वतातील किरातांना वंदन केले आहे. या काव्याचा सारा कथाभाग याच परिसरात घडला आहे.

( ३ ) उत्तरापथ देशातील गंगा नदीकाठी—पौराणिक साहित्यमते किरातांची ही वसाहत गंगा नदीच्या पश्चिमेस असून ( ब्रह्माण्ड. १८.५०; वायु. ४७.४८; मत्स्य. १२५. ४९ ), टॉलेमीच्या मते किर्हडोइ ( एर्हडोइ = किरात ) लोकांचा 'किऱ्हदिय' हा उत्तरपथमधील विस्तीर्ण देश गंगा नदीच्या मुखाभोवतालच्या प्रदेशात, तसेच त्या नदीच्या पूर्वेकडील तोकोसन्न ( आधु. आराकान ) नदीच्या उत्तरेस, आणि पेंटॅपोलिस ( चतुरग्राम = आधु. चितागाँग )

च्या दक्षिणेस होता. ( मॅक्रिंडल, टॉलेमी. पृ. २७७ ). मेगॅस्थिनेसच्या मते येथील ' स्किरिटस ' नामक भटके लोक शिकार व चोऱ्यामाऱ्या करून उदरनिर्वाह करीत ( बारुआ, अशोक शिलालेख. पृ. १०० ). मॅक्रिंडल यांच्या मते पूर्व भारतातील आसाम, रंगपूर, मसुरी आणि चित्तागाँग प्रदेशातील तमेरइ लोकांनाच टॉलेमीने चुकीने किरात म्हटले असावे.

टॉलेमीच्या मते किन्हदिय देशात उत्तम प्रतीचे तमालपत्र ( मलब्रथम् ) होत असून, ते नजिकच्या विक्रमपुर बाजारात विक्रीसाठी नेत असत. चित्तगाँगनजिकचा सिल्हेट प्रदेश आजहि तमालपत्रासाठी प्रसिद्ध आहे. पेरिप्लसच्या मते वैतरणी नदीकाठच्या ' दोसरेने ' ( दशार्ण ) देशातून उत्तरेकडील किरंदइ देशाकडे जाणाऱ्या खलाश्यांना नरमांसभक्षक रानटी लोकांचा उपद्रव होत असे. गंगा नदीच्या नैर्ऋत्येकडील किनारपट्टीला किरात देश संबोधण्याची चूक तेथे करण्यात आली असावी.

सेंट मार्टिन यांच्या मते टॉलेमी आणि पेरिप्लसनिर्दिष्ट ' किरंदिय ' देश गंगा नदीच्या मुखाच्या, तसेच मेगॅस्थिनेसनिर्दिष्ट ' स्क्यरितइ ' देशाच्या पश्चिमेस असून, नेपाळच्या पूर्वेकडील त्रिपुरी ( आधु. तिप्पेरा ) प्रदेशात त्यांची मुख्य वसाहत होती. पौराणिक साहित्यातील आर्यावर्ताच्या पूर्व सीमेवरील क्रूर व रानटी लोक हेच असून, तत्रस्थ आदिवासी टोळ्यांमध्ये हे प्रमुख होते. या प्रदेशातील तमेरइ लोक किरातांपैकीच होते.

( ४ ) **विंध्य पर्वतान्तर्गत बिहार टेकड्यांमध्ये**—शक्तिसंगमतंत्रमते या लोकांची एक विंध्यपर्वताश्रयी वसाहत रामक्षेत्रापासून ( मध्यभारतातील रामटेक ) तप्तकुंडापर्यंत ( राजगृह गावची उष्ण जलकुंडे ) होती ( शक्तिसङ्गम. ३.७.२९ ). सरकार यांच्या मते आधु. बिहार टेकड्यांमध्ये ही असावी ( सरकार, भूगोल पृ. ९५ ). वाल्मीकि रामायण, तसेच पौराणिक साहित्यातील प्राच्य ( पूर्वेकडील ) किरात लोकसमूह हाच असून ( वा. रा. कि. ४०.२७; ब्रह्माण्ड. १६.५१ ), युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या पूर्व दिग्विजयात भीमाने येथील किराताधिपतीला, तसेच विदेहातील इंद्र पर्वतानजिकच्या सात स्वतंत्र किरात राजांना जिंकले होते ( म. स. २७.१३ ). महाभारतात अन्यत्र समस्त किरात राजांचा निर्देश असून ( म. आर. ४८.२१ ), ती बहुधा किरातराज सुबाहूची उपाधी असावी ( म. आर. १७४.११–१३ ).

टॉलेमीच्या ग्रंथातील ' मैअंद्रोस् ' ( महेंद्र ) पर्वताच्या परिसरातील किरात लोक हेच असून, शिलालेख साहित्यातहि विंध्य पर्वतानजिकच्या या वसाहतींचा निर्देश आढळतो ( एपि. इंडि. १७० ). सांची येथील एका वेदिकालेखात ' चिरातिय ( किरात ) भिक्षूचे दान ' अशी अक्षरे आढळतात.

( ५ ) **अफगाणिस्तानातील हिंदुकुश पर्वतात**—अग्रवाल यांच्या मते पौराणिक साहित्यातील पर्वताश्रयी किरात लोक ( ब्रह्माण्ड. १६.६८; मत्स्य. ११४.५६; मार्क. ५४.२७; ५७.५७; वामन. १३.५८; वायु. ४५. १३६ ), अफगाणिस्तानातील हिंदुकुश पर्वताच्या परिसरात रहात असावेत ( अग्रवाल, पाणिनि. पृ. ४७ ).

( ६ ) **कश्मीरातील हजारा प्रदेशात**—दिओनिसस्च्या ग्रंथमते ' असैनियन ' ( उरशा ) देशानजिकचे नौकानयनकुशल किरात लोक पशुचर्मांच्या नौका युद्धासाठी वापरीत असत ( मॅक्रिंडल, इंडिया. पृ. १९९ ).

( ७ ) **नैर्ऋत्य भारतात**—बृहत्संहितामते किरातांची एक वसाहत नैर्ऋत्य भारतात असून ( बृ. सं. १४.१८; मार्क. ५५.३१ ), त्यांचा राजपुत्र ' किरातभर्तृ ' अथवा ' किरातपार्थिव ' नावाने सुविख्यात होता ( बृ. सं. ९.१७; ११. ५४ ). ब्रह्माण्डमते हे ' अपरांत ' देशीय होते ( ब्रह्माण्ड. १६.६० ).

(८) **ह्लादिनी नदीकाठी**—ब्रह्माण्डमते या लोकांची एक वसाहत सप्तगंगांपैकी पूर्ववाहिनी ह्लादिनी नदीच्या मार्गावर होती ( ब्रह्माण्ड. १८.५४; मत्स्य. १२१.५३; वायु. ४७. ५२ ).

( ९ ) **मध्यदेशात**—मत्स्यमते किरातांची एक वसाहत मध्यदेशात होती ( मत्स्य. ११४.३५ ).

(१०) **भारतवर्षाबाहेर जंबूद्वीपात**—महाभारत आणि पौराणिक साहित्यमते या लोकांची एक वसाहत भारतवर्षाबाहेर जंबूद्वीपात होती ( म. भी. ४९.५५; पद्म. आदि. ६.४६; ५२; ब्रह्माण्ड. १६. १२ )

२. ( तीर्थ, लिंग ) काशी येथील भारभूतेश्वरानजिकचे एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ९.१५७–१५८ ).

३. ( नगर ) कालिंदी नदीकाठचे एक नगर ( पद्म. उत्तर. २०९.८ ).

४. (देशविभाग) पौराणिक साहित्यमते भरतखंडान्तर्गत ' जय ' देशाचे नामांतर ( जय पहा ).

**किरातगङ्गाकीर्ण** ( देश )—महाभारतमते उत्तर भारतातील ' कुणिंद ' देशाचे नामांतर ( म. आर. १४१ २४–२६; कुणिंद पहा ).

**किरातमार्जारपुरम्** ( शिवस्थान )—दक्षिण भारतातील एक शिवस्थान. तामीळनाडमधील चिंगलपेट जिल्ह्यातील चुनमपेट तालुक्यातील मद्रासपासून ७० मैल दक्षिणेकडील आधु. विल्लिवक्कम् ( तामीळ–'किरातग्राम' ) ग्राम हेच होय. येथील शिवाचे नाव किरातमार्जारेश्वर, आणि देवीचे नाव मुक्तांबिका आहे. पुंडरीक पुष्करिणी नामक पवित्र जलाशयहि येथे आहे. नामांतर–' गंगैकोंडसोळपुरम्.

**किराती** ( नदी )—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते 'गंगा' नदीचे नामांतर ( अनेकार्थ.७०.२७२; गंगा पहा ).

**किरि इन्दि** ( ग्राम )—जैत्रपाल यादव राजाच्या विजापुर शिलालेखमते कर्नाटकातील तर्दवाडी १००० ( आधु. विजापुर जिल्हा ) देशविभागातील एक ग्राम ( आय्. एन्. के. के. क्र. १७ ). विजापुर जिल्ह्यातील आधु. इंदि गाव हेच होय ( सांकलिया, रिव्हू. पृ. २७७ ).

**किरीट** ( शक्तिपीठ )—पश्चिम बंगालमधील खगराघाट रेल्वेस्थानकापासून ५ मैलांवरील आणि वटनगरपासून ३ मैलांवरील हावडा येथील एक शक्तिपीठस्थान. येथे सतीचा किरीट पडला असून, येथील देवीचे नाव विमलाभुवनेशी, आणि भैरवाचे नाव संवर्त आहे.

**किरुडोरे** ( नदी )—नोलंब पल्लव राजा जगदेकमल्ल नुर्मडीच्या स. १०४० च्या शिरूर कानडी शिलालेखमते दक्षिण भारतातील 'तुंगभद्रा' नदीचे नामांतर ( एपि. इंडि. १५.३३४; तुंगभद्रा पहा ).

**किर्थार** ( पर्वत )—बलुचिस्तानातील सिंध व झलवन देशांच्या दरम्यानचा सुलेमान पर्वताच्या दक्षिणेकडील एक पर्वत. हा मूल नदीच्या दरीपासून १९० मैल दक्षिणेस आहे ( लॉ, पृ. ९९ ).

**किर्पा** ( नदी )—अल्बेरुणीच्या मते शुक्तिमत् पर्वतोद्भवा 'कृपा' नदीचे नामांतर ( अल्बेरुणी, १.२५७; कृपा पहा ).

**किर्र्हडोइ** ( लोकसमूह )—टॉलेमीच्या मते उत्तर भारतातील 'किरात' लोकसमूहाचे नामांतर ( मॉक्रिंडल, टॉलेमी. पृ. १९१–९१४; किरात पहा ). अन्य नामांतर–'किन्हदिय'.

**किलकिला** ( नदी आणि देश )—पूर्व बुंदेलखंडातील पन्ना–सतना मार्गावरील एक नदी आणि देश. 'किलकिला नदीकाठचे' अशा अर्थाने पन्ना, नाचणा (प्राचीन–'पुरी कांचनका') प्रदेशातील राजवंशाला आणि त्यांच्या देशाला हे नाव प्राप्त झाले. बुंदेलखंडातील पद्मावती येथील 'विदिशा नाग' राजे कुशाण आक्रमणभयाने विंध्य पर्वताच्या उतारावरील 'पुरी कांचनका' ( पन्ना गावाच्या २५ मैल ईशान्येकडील आधु. नाचणा ) येथे स्थलांतरित होऊन 'भारशिव' ( किलकिला ) नावाने राज्य करू लागले. त्यांचे अनेक शिलालेख, नाणी, ताम्रपट येथे सापडले आहेत. या वंशातील भवनाग राजकन्येचा विवाह वाकाटकवंशीय गौतमीपुत्राशी होऊन हा वंश वाकाटक राजवंशात विलीन झाला.

**किलकिलेश** ( लिंग )—गया येथील एक शिवलिंग ( अग्नि. ११६.३१ ).

**किलिन्द्रिनै** ( लोकसमूह )—टॉलेमीच्या मते हिमालय पर्वतातील 'कुलिंद' लोकसमूहाचे नामांतर ( कुलिंद पहा ).

**किलियारु** ( नदी )—विजयनगरच्या सदाशिवरायाच्या शके १४६७ च्या श्रीरंगम् शिलालेखमते दक्षिण भारतातील कावेरी नदीची एक उपनदी. कावेरी नदीच्या पूरप्रतिबंधनार्थ श्रीरंग मंदिराच्या नलंतिगल नारायण जीयर नामक पुजाऱ्याने हिचा प्रवाह कावेरीपासून विभक्त केला ( एपि. इंडि. २९.७८ ).

**किलोलकुण्ड** ( तीर्थ )—दक्षिण भारतातील एक निंबार्क पीठ ( ती. पृ. २६० ).

**किल्मविलङ्गै** ( गुफास्थान )—पल्लव राजा महेंद्रवर्मन् ( प्रथम; स. ६००–६३० ) निर्मित दक्षिण भारतातील अर्काट गावानजिकचे एक हिंदु गुफामंदिरस्थान ( गोएट्झ, पृ. ११६ ).

**किल्ली** ( देश )—तामीळ साहित्यमते दक्षिण भारतातील 'चोल' देशाचे नामांतर ( चोल पहा ).

**किशनगढ** (वल्लभक्षेत्र)—राजपुतान्यातील अहमदाबाद–दिल्ली रेलमार्गावरील अजमेरपासून १८ मैलांवरील एक वल्लभक्षेत्र. येथे वल्लभ संप्रदायाची अनेक मंदिरे, तसेच चिंतामणिजी जैन मंदिर आहे ( ती. पृ. २८८ ).

**किशरा** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८६ ).

**किशुवोलल्** ( नगर )—पश्चिम चालुक्य सम्राज्ञी लोकमहादेवीच्या स. ७३० च्या पत्तदकल शिलालेखमते चालुक्यराजधानी 'पत्तदकल'चे नामांतर ( इंडि. अँटि. इ. स. १८८१; पृ. १६४; पत्तदकल पहा ).

**किशोरवाटक** ( ग्राम )—गुप्तसम्राट जीवितगुप्त ( द्वितीय ) च्या देववरणार्क शिलालेखमते मध्यभारतातील

वारुणिका सूर्यमंदिरानजिकचे एक ग्राम. याचे आधु. स्थान समजत नाही ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.२१८ ).

**किशोरी कुण्ड** ( कुंड )—वृंदावन येथील एक जलकुंड ( नारद. उत्तर. ८०.७५ ).

**किसुकाड ७०** ( देशविभाग )—पश्चिम चालुक्य राजा विक्रमादित्य ( पंचम ) भगिनी अक्कादेवीच्या स. १०१० च्या सूडि ताम्रपटमते तिच्या आधिपत्याखालील म्हैसूर प्रान्तान्तर्गत एक देशविभाग ( एपि. इंडि. १५.७३ ). आधु. धारवाड जिल्ह्यातील सूडि गावाच्या परिसरातील प्रदेश हाच असून, त्यामधील एक गाव तिने एका जैन मंदिरास दान दिले होते ( एपि. इंडि. १७.१२१ ).

एरंबरगेसम्राट विक्रम ( विक्कय ) च्या शिलालेखमते तो काही काळ ( स. ११६९–११८० ) या देशाचा अधिराज होता ( एपि. इंडि. १५.१०९ ).

**किष्किण्डी-पाण्डुभूमिक** ( देश )—वायुमते जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक देश ( वायु. ४४.१३ ). अली यांच्या मते मध्य आशियातील कश्क-दरिया नदीचा त्रिभुज प्रदेश हाच होय.

**किष्किन्ध** ( पर्वत आणि देवीस्थान )—बृहत्संहिता आणि पौराणिक साहित्यमते आग्नेय भारतातील एक पर्वतीय देवीस्थान ( बृ. सं. १४.१० ). येथील गौरी देवीचे नाव तारा असून ( पद्म. आदि. १७.२१०; मत्स्य. १३.४६ ), मोनियर विल्यम्सच्या मते हे ओड्र देशात असावे

२. ( नगर ) अल्बेरुणीच्या मते दक्षिण भारतातील 'किष्किंधा' नगराचे नामांतर ( किष्किंधा पहा ).

**किष्किन्धक** ( देश )—पौराणिक साहित्यमते नर्मदा नदीच्या उत्तर जलसंचय प्रदेशातील एक विंध्य पर्वतीय जनपद ( ब्रह्माण्ड. १६.६४; मत्स्य. ११४.५२; मार्क. ५४.५४; वायु. ४५.१३२ ). नामांतर ( वामन पुराण )–'किकर्व'.

अली यांच्या मते मध्य प्रदेशातील तुसुर ( आधु. होशंगाबाद जिल्ह्याचा पश्चिम भाग ) देशाच्या पश्चिमेकडील, आणि नर्मदा नदीच्या दक्षिणेकडील आधु. खांडवा मैदानी प्रदेश हाच होय. नर्मदा खोरे → खांडवा → तापी खोरे हमरस्त्यावरील हे जनपद राजकीय आणि लष्करी दृष्ट्या महत्त्वाचे होते ( अली, पुराणाज्. पृ. १६१ ).

**किष्किन्धा** ( नगर आणि गुफा )—वाल्मीकि रामायणमते वानरराज वालिन् आणि सुग्रीवाच्या राजधानीचे दक्षिण भारतातील पंपा सरोवरापासून २ मैल ईशान्येकडील नगर ( वा. रा. कि. ९.५; १४.१; म. आर. २८०. १६ ). म्हैसूर राज्यातील हंपे ( प्राचीन विजयनगर गावानजिकचे तुंगभद्रा नदीकाठचे आधु. अनेगुंदी ) गाव हेच होय ( इंपि. गॅझे. १३.२३५ ). नामांतर ( अल्बेरुणी )–'किष्किंध देश'; ( जैन साहित्य )–'किष्किंध पर्वत'.

**पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यात**—या ग्रंथात, तसेच महाभारतात निर्देशिलेली 'किष्किंधा गुफा' ( पतञ्जलि. १.४४५; ३.९६; म. स. ३१.१७ ) म्हणजे हेच नगर असावे ( काणे, जे. बी. बी. आर. ए. एस्. २७.३८ ). परंतु अग्रवाल यांच्या मते पतंजलीच्या ग्रंथात उत्तर प्रदेशातील अन्य जनपदाचा निर्देश अभिप्रेत असावा ( अग्रवाल, पाणिनि. पृ. ७६; किष्किंधा २. पहा ).

**वाल्मीकि रामायणात**—या ग्रंथमते वानरराज वालिन्च्या या प्रस्रवणगिरीनजिकच्या दुर्गरक्षित राजधानीच्या गावी ( गुफेत; वा. रा. कि. ११.२४; १९.१९; २७.२६ ) सुग्रीव आणि वालिन् यांचे द्वंद्वयुद्ध झाले होते ( वा. रा. बा. १.५ ). या पर्वतवेष्टित नगरीप्रत ( वा. रा. कि. २६.४१ ) श्रीराम वालीवधानंतर सुग्रीवासमवेत आला होता ( वा. रा. कि. १२.१३–१४ ).

**नगरवर्णन**—वाल्मीकि रामायणमते दुर्धर पर्वतीय गुफेतील हे खंदकवेष्टित नगर रत्ने आणि उपवनांनी, तसेच विंध्य आणि मेरु पर्वतसदृश गगनचुंबी प्रासादांनी समृद्ध होते. दिव्यवस्त्रधारी देव आणि गंधर्वपुत्र वानरांचे हे निवासस्थान होते ( वा. रा. कि. ३३.४–८ ).

**संबंधित स्थले**—वाल्मीकि रामायणमते या नगराच्या परिसरात निम्नलिखित स्थले होती :— १. पंपा नदी आणि सरोवर; २. प्रस्रवण पर्वत; ३. मातंगाश्रम; ४. तुंगभद्रा नदी.

**महाभारतात**—या ग्रंथमते वालीच्या मृत्यूनंतर सुग्रीव येथील राजा बनला असून ( म. आर. २६४.३९ ), युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या दक्षिण दिग्विजयात सहदेवाने येथील मैंद आणि द्विविद वानरराजांना जिंकले होते ( म. स. परि. १.१३.१४ ).

**पौराणिक साहित्यात**—वायुमते हे एक शिवस्थान असून ( वायु. ५४.११६ ), बृहत्संहितामते हा आग्नेय भारतीय देश होता ( बृ. सं. १४.१० ).

**अल्बेरुणीच्या ग्रंथात**—या ग्रंथमते हा ( किष्किंध ) वानरांचा देश होता.

**जैन साहित्यात**—हरिषेणमते दक्षिणापथातील या सुविख्यात जैन तीर्थस्वरूप पर्वतातील जल कार्तिकस्वामींच्या तपस्येमुळे रोगनिवारक बनले होते ( ती. सं. पृ.

१२८–१२९ ).

आधु. आनेगुंदी गावापासून ½ मैल आग्नेयेकडील तुंगभद्रा नदीकाठी वालीप्रासाद आणि सप्ततालवेधस्थान असून, त्यानजिकच्या गुफेमध्ये रामाने वालीवधानंतर विश्रांती घेतली होती. त्यासमोर तुंगभद्रा नदीच्या पलीकडच्या किनाऱ्यावर वालीवधाचे आणि वालिन्‌च्या अस्थिस्वरूप श्वेतशिलांचे स्थान असून, त्यानजिकच तारा, अंगद आणि सुग्रीव पर्वतशिखरे आहेत ( ती. पृ. ३८०; कोंकणपुर पहा ).

२. ( देश ) पाणिनीचा गणपाठ आणि पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यमते आर्यावर्ताच्या सीमेबाहेरील गब्दिका देशानजिकचे एक जनपद ( पा. सू. ४.३९३; पतञ्जलि. १.४४५ ). अग्रवाल यांच्या मते गोरखपुर जिल्ह्यातील चंद्रा राज्यान्तर्गत गद्दि ( प्राचीन ' गब्दिका ' ) प्रदेशानजिकचे नोनखार रेल्वेस्थानकापासून १½ मैलावरील आधु. खुखुंदो गाव हेच होय ( अग्रवाल, पाणिनि. पृ. ७६ ). पुष्पदंतपुत्र कल्याणकाचे जन्मस्थान म्हणून जैन लोक ते पवित्र मानतात ( ती. पृ. १४७ ).

३. ( तीर्थ ) गौतमी ( गोदावरी ) नदीकाठचे एक तीर्थ ( ब्रह्म. १५७.१; ३५ ).

४. ( वामनस्थान ) वामनमते एक वामनस्थान. येथील वामनाचे नाव वनमाली होते ( वामन. ९०.१७ ).

**किसण** ( देश )—वायुमते मध्यदेशान्तर्गत एक देश ( वायु. ४५.११० ).

**किसरौली** ( ग्राम )—चालुक्य राजा भीम ( द्वितीय ) च्या वि. सं. १२८७ च्या शिलालेखमते दक्षिण राजपुतान्यातील एक ग्राम. अबू पर्वतातील दिलवाराच्या ८ मैल आग्नेयेकडील आधु. किवर्ली गाव हेच होय ( एपि. इंडि. ८.२२० ).

**किलॉन** ( बंदर )—इब्न बतूतामते केरळ देशातील ' कोल्लपुर ' बंदराचे नामांतर ( इंडि. अँटि. स. १९२३, पृ. १४; कोल्लपुर पहा ).

**की-च** ( देश )—ह्युएन्‌त्संगच्या प्रवासवर्णनमते पश्चिम भारतातील ' कच्छ ' देशाचे नामांतर ( वॉटर्स, २.२४५; कच्छ १. पहा ).

**कीकट** ( देश व लोकसमूह )—ऋग्वेदमते एक गोधनसमृद्ध देश आणि लोकसमूह. अदोग्ध धेनूंनी युक्त अशा या देशाच्या प्रमगंध नामक अनार्य राजाला आर्यांनी पराजित केले होते ( ऋ ३. ५३.१४ ) पंजाबातील आधु. हिंदियन हा गोधनसमृद्ध देश हाच असून, ऋग्वेदकाळी हा अनार्य देश आर्यावर्ताच्या सीमेवर असावा.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. निरुक्त ( ६.३२ ) | टिकट |
| २. महाभारत ( क. ३०.४५ ) | कीकटाटवी |
| ३. शक्तिसंगमतंत्र (३.७०.४०) | तिकट |
| ४. अभिधानचिंतामणि (४.२६) | तिकट |

**अन्य वसाहत**—निरुक्त आणि वायुमते ' टिकट ' आणि ' मगध ' हे समानार्थक असून ( नि. ६.३२; वायु. १०८.७४ ), त्यावरून यांची अन्य एक वसाहत मगध देशात असावी. वायु पुराण टीकामते आधु. गया जिल्हा हाच असून, पार्गिटर यांच्या मते विहारमधील आधु. गया व पाटना जिल्ह्यांचा प्रदेश हाच होय ( पार्गि., पृ. ३३१ ).

**महाभारतात**—'कर्ण-शल्यसंवाद'मते हा (कीकटाटवी) धर्मविरोधी देश होता ( म. क. ३०.४५ ).

**पौराणिक साहित्यात**—गरुडमते या अपवित्र देशातील गया, राजगृह आणि चारण ( अंग ) देश ही तीनच स्थाने केवळ पवित्र होती ( गरुड. १.२३.१ ).

**शक्तिसंगमतंत्रामध्ये**—या ग्रंथमते हा देश चरणाद्रिपासून ( बिहार प्रांतातील मिर्झापुर जिल्ह्यातील आधु. चुनार टेकड्या ) गृध्रकूट पर्वतापर्यंत ( मोंघीर जिल्ह्यातील जमुइ उपविभागातील आधु. गिधौर टेकडी ) पसरला होता ( शक्तिसङ्गम. ३.७.४० ). यावरून या ग्रंथकाली शोण नदीच्या पश्चिमेकडील ( आधु. गया ) आणि पूर्वेकडील ( आधु. पाटना ) प्रदेश अनुक्रमे ' कीकट ' आणि ' मगध ' नावांनी सुविख्यात असावा. उत्तरकालात हे दोन्ही जिल्हे ' बृहन्मगध ' नावाने सुविख्यात झाले ( मार्टिन, ईस्टर्न इंडिया. १.४०६ ).

**मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात**—अभिधानचिंतामणिमते ' तिकट ' आणि ' मगध ' समानार्थक असून ( अभिधान. ४.२६ ), त्यावरून मध्ययुगीन काली मगधाचा काही भाग ' कीकट ' नावाने सुविख्यात असावा ( हिलेब्रांट, वेदिशे मायथॉलॉजी. १.१४.१८; पांडे, बिहार. पृ. १०१–१०२ ).

**कीकटी** ( नदी )—विलफोर्ड यांच्या मते बिहारमधील ' पुनःपुना ' ( आधु. पुनपुन ) नदीचे नामांतर ( एशियाटिक रिसर्चेस्. १४.३७३–४७०; पुनःपुना पहा ).

**कीचक** ( देश )—महाभारत कर्णदिग्विजयमते कर्णाने जिंकलेला वंग देशानजिकचा एक देश ( म. क. ५.१९ ). पाठभेद– 'त्रीरक'.

२. मार्कंडेयमते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या ईशान्य भागातील एक देश ( मार्क. ५५.४८ ). हिडिंबवधानंतर एकचक्रा नगरगामी पांडवांना मत्स्य, त्रिगर्त, पांचाल आदि देशांसमवेत हा लागला होता ( म. आ. १४४.२ ).

**कीचाश्रम** ( बौद्ध विहार )—कश्मीरातील 'कृत्याश्रम' बौद्ध विहाराचे नामांतर ( चतुर्थ. २३४; ३८४; कृत्याश्रम पहा ).

**कीणावाचन** ( ग्राम )—धर्मारण्यातील एक ग्राम ( स्कन्द. ब्राह्म. ध. ३९.१३७ ).

**कीर** ( देश )—बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारत-वर्षाच्या ईशान्य ( उत्तर ) भागातील त्रिगर्त देशाचा उप-विभाग, एक देश ( बृ. सं. ४.२३; १४.२९; ३२.१९ ). डॉ. मुजुमदार यांच्या मते पंजाबातील कांग्रा जिल्ह्यातील कोटकांग्रापासून ३० मैल पूर्वेकडील बियास नदीच्या डाव्या किनाऱ्यावरील आधु. वैजनाथ (=प्राचीन कीरग्राम ) सभोवतालचा आधु. जालंधर जिल्हा हाच होय. काही अभ्या-सकांच्या मते वैजनाथ येथील वैद्यनाथ मंदिर भारतातील बारा ज्योतिर्लिंगांपैकी एक आहे ( वैद्यनाथ पहा ). कर्ण राजाच्या रेवा शिलालेखमते हा देश कांग्रा खोऱ्यात बैज-नाथनजिक असून ( एपि. इंडि. २४.११० ), बैजनाथ प्रशस्तिलेखमते कीरग्रामनिवासी राजनकवंशीय राजे त्रिगर्त राजांचे मांडलिक होते ( एपि. इंडि. १.३३ ).

**लोकसमूह**—काव्यमीमांसामते हे उत्तर भारतनिवासी असून ( काव्यमी. १७.२२७ ), प्राचीन काळापासून यांच्यावर 'शाहि' ( शक ) राजघराण्याचे राज्य होते. धंग चंदेलाच्या खजुराहो शिलालेखात येथील एका 'शाहि' राजाचा निर्देश आढळतो ( एपि. इंडि. १.१२३; १३४ ).

**शिलालेख साहित्यात**—जयसिंह राजाच्या करंबेळ शिलालेखात या देशाच्या राजाचा निर्देश असून ( इंडि. अँटि. १८.२१५; २१७ ), कलचुरि राजा नरसिंहच्या स. ११५५ च्या भेडाघाट शिलालेखमते कर्ण नामक त्याच्या प्रपितामहाने हा जिंकला होता ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.१४ ). जयचंद्र यांच्या मते इ. स. ८ व्या शतकात येथे कनौजसम्राट चक्रायुध राज्य करीत होता ( जयचन्द्र, पृ. २९२ ). पाल राजा धर्मपालाच्या खालिमपुर ताम्रपटमते त्याने हा जिंकला असून ( एपि. इंडि. ४.२४३–२४६ ) यशोवर्मन्‌च्या खजुराहो शिलालेखमते येथील राजाने भोट राजाकडून वैकुंठप्रतिमा प्राप्त केली होती ( एपि. इंडि. १. १२२ ). अल्हणदेवीच्या भेडाघाट शिलालेखात, तसेच साहिल्लदेव राजाच्या चंबा दानपत्रात या देशाचा निर्देश आढळतो (एपि. इंडि. २.११; १५; इंडि. अँटि. १७.८).

**वैद्यनाथ शिवमंदिर**—स. १२०४ च्या वैद्यनाथ मंदिर-लेखमते बिंदुक ( आधु. बिंदु ) नदीकाठचे वैद्यनाथ येथील हे प्रमुख मंदिर त्रिगर्तसम्राट जयचंद्राचा शालक कीर-ग्रामाधिराज लक्ष्मणचंद्राच्या कारकीर्दीत मन्युक आणि आहुक नामक श्रीमान व्यापाऱ्यांनी बांधले ( एपि. इंडि. १.९७–११८; इंडि. अँटि. २०.१५४ ) या मंदिराच्या चतुःस्तंभाधारित सभामंडपाच्या ( २०′ × २०′ ) अंतर्भागात छोटे गर्भागार ( ८′ × ८′ ) असून, सभा-मंडपाच्या प्रवेशद्वाराच्या आतील भिंतींवर अनेक शिलालेख आढळतात. सभामंडप आणि गर्भागाराबाहेर ( ५१′ × ३१′ ) विस्तीर्ण पटांगण (१२०′ × ७५′) असून, त्याच्या अंतर्भागात अन्य काही मंदिरे आढळतात.

स. १७८६ मध्ये संसारचंद्र ( द्वितीय ) राजाच्या राज्यकालीन जीर्णोद्धारात या मंदिराची बहुतेक सारी पुरातन स्थापत्यवैशिष्ट्ये नष्ट झाली असून, त्याचे छत, कळस आणि बाह्यमंडप संपूर्णतः नव्याने बांधण्यात आला.

**जमदग्नि-मंदिर**— मुख्य मंदिरासमोर नंदीचे आणि जमदग्नीचे मंदिरद्वय असून, जमदग्नि मंदिराच्या शिखरावर पुरातन मृत्तिकापात्रांच्या अनुकरणाने खोदलेले अश्व-नालाकृती नक्षीकाम आणि चौरसाकृती पट्ट्या आहेत. फर्ग्युसन यांच्या मते पुरातन वैद्यनाथ मंदिराचे शिखरहि असेच असावे.

**वैद्यनाथ मंदिराचे स्तंभ**—वैद्यनाथ मंदिराच्या प्रवेश-द्वारानजिकचे व्यासपीठयुक्त स्तंभ, तसेच मंदिराच्या चौकोनी जोत्यावरील नक्षीकाम पाश्चात्य आणि हिंदु संमिश्र शैलीचे असून, तेथील हिंदु कॉर्निथिअन स्तंभ-शिरोभूषणात हिंदु कुंभाकृती शिरोभूषणांचा कलात्मक आविष्कार तेथे आढळतो. वर्तुलाकृती स्तंभाला चौकोनी रूप देण्याचे उद्दिष्ट कोणत्याहि पाश्चात्य ( ग्रीक अथवा कॉर्निथिअन ) स्तंभांपेक्षा येथे अधिक कलात्मकतेने साधले आहे.

**जैन मूर्ती**— वैद्यनाथाच्या पूर्वकालीन शिवमंदिरात वर्धमान महावीराची स. १२४० च्या शिलालेखयुक्त एक मूर्ती बसविली होती. ही महावीरप्रतिमाहि सध्या नाहीशी झाली असून, तिच्या व्यासपीठावर या गावच्या सिद्धनाथ मंदिरातील सूर्यप्रतिमा स्थापिली आहे.

**सिद्धनाथ मंदिर**—स्थापत्यदृष्ट्या वैद्यनाथ मंदिराइतकेच महत्त्वपूर्ण असे हे गावाच्या पश्चिम टोकानजिकचे पूर्वाभिमुख मंदिर ( ३३'×२०' × ३५' ) चतुःस्तंभयुक्त सभामंडप आणि गाभारा यांनी युक्त असून, मंदिराच्या गाभाऱ्याच्या चतुर्दिशांना प्रवेशद्वारे आणि प्रदक्षिणापथ आहेत.

मंदिराच्या दक्षिणवर्ती भिंतीमध्ये एक दुर्बोध शिलालेख असून, येथील सूर्यप्रतिमा सध्या वैद्यनाथ मंदिरात हलविली आहे ( फर्ग्युसन, १.२९७–३०१ ).

२. ( देश ) मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते 'कश्मीर' देशाचे नामांतर ( अनेकार्थ. ३४.४१४; त्रिकाण्ड. ३१.८; कश्मीर पहा ).

३. ( देश ) काव्यमीमांसामते उत्तर भारतातील 'किरात' लोकसमूहाचे नामांतर ( काव्यमी. पृ. ९४; किरात पहा ).

**कीर-पण्ढरपुर** ( क्षेत्र )—आंध्र प्रदेशातील चीकलकलापुडि रेल्वेस्थानकापासून ½ मैलावरील एक समुद्रवर्ती विठ्ठलमंदिरस्थान. 'प्रतिपंढरपुर' उपाधीने सुविख्यात असणाऱ्या या चंद्रभागा सरोवराकाठच्या स्थानी नरसिंहदासजी नामक भक्ताच्या प्रार्थनेवरून पंढरीनाथ श्रीविठ्ठल आणि रुक्मिणी अवतरले.

**कीर्ण** ( देश व लोक )—दक्षिण भारतातील एक देश व लोकसमूह ( बृ. सं. १४.११ ).

**कीर्तिपुर** (अशोकस्तूप व भैरवस्थान)—नेपाळमधील थानकोटच्या पूर्वेकडील एक पर्वतीय अशोकस्तूपस्थान. अशोकनिर्मित स्तूपाचे दुर्मिळ उदाहरण असा हा आर्यांच्या अवशेषग्रहाच्या अनुकरणाने बांधलेला अंडाकृती स्तूप उत्तरकालीन अर्धवर्तुलाकृती बौद्ध स्तूपांहून सर्वस्वी वेगळा आहे ( अन्य अशोकस्तूप-ललितपट्टण; गोएट्झ, पृ. ४३ ).

**भैरव मंदिर**—उपरोक्त स्तूपानजिकच्या या मंदिरात व्याघ्रस्वरूपी भैरवाची पूजा करतात ( ती. पृ. १५७ ).

**कील-मुत्तुगूर** ( शिलालेखस्थान ) — चोल राजा परांतक ( प्रथम ) च्या स. ९३५ च्या शिलालेखाचे आधु. उत्तर अर्काट जिल्ह्यातील उपलब्धिस्थान ( एपि. इंडि. ४.१७७; रंगाचारी, १. उत्तर अर्काट. ३२२ ).

**कीलेश्वर** ( शिवस्थान )—गुजरातमधील सुरेंद्रनगर-ओखा रेलमार्गावरील जामनगरनजिकचे एक पांडवकालीन शिवमंदिरस्थान ( ती. पृ. ४७ ).

**कीलपलारु** ( देशविभाग )—शिलालेख साहित्यमते दक्षिण भारतातील कावेरी नदीकाठचा एक देशविभाग ( एपि. इंडि. २९.७६ ).

२. शिलालेख साहित्यमते कावेरी नदीचा एक छोटा कालवा ( एपि. इंडि. २९.७५ ).

**कु-तन्** ( देश )—तुर्की साहित्यमते मध्य आशियातील 'कुस्तन' देशाचे नामांतर ( कुस्तन पहा ).

**कु-तो-नि** ( द्वीप )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते चतुर्द्वीपा पृथ्वीपैकी 'गोधन्य द्वीपा' चे नामांतर ( वॉटर्स, १.३३; गोधन्य द्वीप पहा ).

**कुइयल** ( ग्राम )—चालुक्य राजा त्रिभुवनपालाच्या वि. सं. १२९० च्या शिलालेखमते उत्तर गुजरातमधील सारस्वत मंडलान्तर्गत विषय पथकातील ( आधु. कडी महाल ) राजपुरी ( आधु. राजपुर ) च्या ईशान्येकडील एक ग्राम ( इंडि. अँटि. ६.२०८–२१० ). कडी महालातील आधु. किओल ( कियल ) गाव हेच होय ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २५९ ).

**कुओह** ( देश )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते मध्य आशियातील वक्षु ( आधु. अमूदरिया ) नदीच्या दक्षिण किनाऱ्यावरील एक देश. अफगाणिस्तानातील आधु. कुंदुझ देश हाच होय. नामांतर ( ह्युएन्त्संग )—'हु-ओह'; ( बाबर आत्मचरित्र )—'कुंदेझ.'

**महत्त्व**—या देशाच्या कुओह ( आधु. कुंदुझ ) नामक राजधानीच्या गावी मध्य आशिया–चीन यांना जोडणारे मार्गद्वय एकत्र होत असून, त्यापैकी वायव्येकडील तोखारिस्तान → समरकंद → कुंदुझमार्गे भारतात आलेला ह्युएन्त्संग दक्षिणेकडील खोस्त ( क–वोह–सि–तो ) → कुंदुझ ( हु–ओह ) → पामीर पठार या पूर्वाभिमुखमार्गे चीनला परत गेला. हे दोन्ही रस्ते चीनच्या पश्चिम सीमावर्ती नैन-शे ( अन–सि ) गावी एकत्र होत असून, समरकंदनजिकचा रस्ता चेहकन गावापर्यंत उत्तरेस आणि खोस्त–कुंदुझ रस्ता अखंडपणे पूर्वेस जात असे.

**चिनी साहित्यात**—या साहित्यमते 'कुओह लोकांचा देश' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले असून, प्रारंभी हा देश तुखार देशात, आणि तदनंतर तुर्की साम्राज्यात समाविष्ट झाला. ह्युएन्त्संगच्या काळीहि येथील राजा ( सेनापती ) तुर्की साम्राज्याचा मांडलिक होता.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—'तोखर' देशाच्या आग्नेयेकडील या देशात आलेला ह्युएन्त्संग आपल्या चीन प्रतियात्राप्रसंगी खोस्त देशापासून ६० मैल वायव्येकडील या देशास आणि याच्या पूर्वेकडील त्सुंग्-लिंग् ( पामीर = आधु. बोलोर तघ् आणि काराकोरम् पर्वत ) पर्वताप्रत गेला.

**देशवर्णन**—ह्युएन्त्संगच्या मते या देशाच्या ( व्याती–

६०० मैल) वक्षुतीरवर्ती राजधानीचे क्षेत्रफळ ४ मैल असून, येथील जमीन सपाट, हवा समशीतोष्ण आणि पीकपाणी व फळेफुले समृद्ध होती. येथील लोक प्रामाणिक परंतु अविचारी असून ते जाड लोकरी कपडे वापरीत असत. ते बौद्धधर्मीय असून, हीनयान आणि महायान पंथांचे येथे सारखेच प्राबल्य होते. येथील दहा बौद्ध मठांत शेकडो बौद्ध भिक्षू होते. लोहद्वार खिंडीच्या दक्षिणेकडील साऱ्या प्रदेशावर राज्य करणारा येथील तुर्की राजा आपल्या राज्यात अविरत संचार करीत असे. कौ-चँग् देशाच्या राजाने या राजास ह्युएन्त्संगसाठी एक ओळखपत्र दिले होते. परंतु ते देण्यापूर्वीच हा राजा मृत झाल्याने त्याच्या अंत्यविधीसाठी ह्युएन्त्संग येथे एक महिना राहिला. येथील नव्या राजाच्या सल्ल्यावरून तो या देशाच्या पश्चिमेकडील फो–हो (बल्ख) देशास गेला (वॉटर्स, १.१०६–१०८).

**कुक–त्रप्** (बृहद्भारतीय मंदिरस्थान)— कंबूज (आधु. कंबोडिया) देशान्तर्गत मेकाँग खोऱ्यातील गुप्त शैलीचे एक लोकेश्वर बौद्ध मंदिरस्थान (गोएट्झ, पृ. १११).

**कुकर नाग** (तीर्थ)—ऐन्–इ–अकबरीमते काश्मीरातील 'कुक्कुटेश्वर' तीर्थाचे नामांतर (कुक्कुटेश्वर तीर्थ पहा).

**कुकरीमठ** (शिवस्थान)—मध्य प्रदेशातील नर्मदापरिसरातील दिंडोरीपासून ९ मैलांवरील मचरार नदीकाठचे एक शिवस्थान. येथे शंकराचार्यस्थापित ऋणमुक्तेश्वर मंदिर आहे (ती. पृ. २२५).

**कुकुडिया** (ग्राम)—कलचुरि राजा कोकल्लदेव (द्वितीय) च्या गुर्गि दानपत्रमते (इ. स. १० वे शतक) मध्यप्रदेशातील एक ग्राम. याचे आधुनिक स्थान समजत नाही (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.२२६).

**कुकुमग्राम** (जैन तीर्थ)—उत्तर प्रदेशातील एक जैन तीर्थ. गोरखपुरपासून ४६ मैलांवरील आधु. कहाऊ गाव हेच असून, येथे जैन मंदिरांचे अनेक भग्नावशेष, तसेच गावाच्या उत्तरेस एक मानस्तंभ आहे (ती. पृ. १४७).

**कुकुर** (देश व लोकसमूह)—बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या मध्यभागातील एक लोकसमूह आणि देश (बृ. सं. ५.७१; १४.४; ३२.२२). एक जनपद म्हणून महाभारत आणि पौराणिक साहित्यातहि याचा निर्देश आढळतो (म. भी. १०.५९; पद्म. आदि. ६. ३७). द्वारका नगराच्या परिसरातील आधु. काठेवाड प्रदेश हाच होय. नामांतर–'पार्षंड' (मार्क. ५८.६). 'कौकुर' (म. स. ४८.१४).

**नामव्युत्पत्ती**—हरिवंशमते 'यादववंशीय सात्वत उपशाखेतील अंधकपुत्र कुकुराचे वंशज' अशा अर्थाने यांस हे नाव मिळाले असून (ह. वं. १.३७.१६), महाभारतात भोज, वृष्णि, यदु, अंधक आदि यादव वंशांसमवेत यांचा निर्देश आढळतो (म. स. ४८.१५; आर. ११४. ३२). ल्युलर यांच्या मते 'कुकुर' हे 'गुर्जर'चे चिनीभाषीय रूप असावे (इंडि. अँटि. ७.२६३).

**कौटिलीय अर्थशास्त्रात**—या ग्रंथमते हे पांचाल लोकांप्रमाणेच अत्यंत सामर्थ्यसंपन्न होते.

**महाभारतात**—युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञात हे (कौकुर) लोक उपायनांसह उपस्थित असून (म. स. ४८.१४), भारतीय युद्धात हे भीष्मरक्षणाचे काम करीत होते (म. भी. ४७.७).

**पौराणिक साहित्यात**—भागवतात अंधक आणि वृष्णि लोकांसमवेत यांचा निर्देश असून (भा. ९.२४.१९), वायु आणि भागवतमते यादव राजा उग्रसेन 'कुकुरोद्भव' होता (वायु. ९६. १३४; भा. ९.२४.२१). हरिवंशमते हे बलिष्ठ आणि सामर्थ्यसंपन्न होते (ह. वं १.३७.३३).

**शिलालेख साहित्यात**—गौतमी बलश्रीच्या नासिक शिलालेखमते गौतमीपुत्र श्रीशातकर्णीने सुरथ, कुकुर आणि अपरांत देश क्रमाने जिंकले होते (एपि. इंडि. ८. ६१; आर्कि. सर्व्हे. वे. इं. ४.१०९). यावरून सौराष्ट्र आणि अपरांत यांच्या दरम्यान हा असावा.

रुद्रदामनाच्या जुनागड शिलालेखमते त्याने सातवाहन राजा पुळुमावीकडून सिंधु–सौवीर, कुकुर आणि अपरांत देश क्रमाने जिंकले होते (एपि. इंडि. ८.४४; इंडि. अँटि. ७.२६२). यापैकी अपरांत देश आधु. सोपाऱ्यापासून कच्छच्या रणापर्यंत आणि कुकुर देश कच्छचे रण आणि सिंध यांच्या दरम्यान (= आधु. उत्तर गुजरात) असावा.

**मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात**—त्रिकांडशेष कोशात याचा निर्देश आढळतो (त्रिकाण्ड. पृ. ३१).

**कुकुराङ्गारमारिष** (देश)—पद्ममते दक्षिण भारतातील एक देश (पद्म. आदि. ६.५५). पाठभेद–'कुकुरांगमारिष' (म. भी. १०.५९).

**कुक्कनूर ३०** (राज्यविभाग आणि मंदिरस्थान)—यादव राजांच्या वेहत्ती शिलालेखमते कर्नाटकातील बेल्वल ३०० देशविभागातील एक राज्यविभाग. रायचूर जिल्ह्यातील

गदगपासून २५ मैल ईशान्येकडील आधु. कुक्कनूर हे चालुक्य स्थापत्यशैलीचे सुविख्यात शैव मंदिरस्थान हेच होय ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २७१ ).

**नवलिंग मंदिर**—या गावाभोवतालच्या तटबंदीच्या ( २४६'×२२५'; इ. स. १६ वे शतक ) अंतर्भागातील या मंदिरात तीन स्तंभयुक्त सभामंडपाभोवती नऊ शिवलिंगे असून, त्यावर पत्तदकल येथील चालुक्य मंदिर-सदृश स्वतंत्र शिखरे आहेत. या मंदिरातील वर्तुलाकृती पसरट शिरोभूषणयुक्त स्तंभ, तसेच दर्शनी भागातील शिल्प चालुक्य शैलीचेच आहे. यावरून द्राविड आणि चालुक्य स्थापत्यशैलींच्या संक्रमणकाली हे बांधले असावे. ठिसूळ तांबड्या सँडस्टोनमध्ये बांधल्याने त्याचे सारे नक्षीकाम आज उद्‌ध्वस्त झाले आहे.

**कल्लेश्वर मंदिर**—या गावाच्या नैर्ऋत्येकडील पश्चिम चालुक्य शैलीचे ( इ. स. ११ वे शतक ) हे शिवमंदिर ( ६७' × ३७'; शिखराची उंची–३७' ) नवलिंग मंदिरा-सदृश परंतु त्याहून अधिक परिपूर्ण आहे. त्याच्या शिखराच्या विभिन्न मजल्यांच्या दर्शनी भागी ठसठशीत उभी पट्टी कोरली असून, उत्तरकालीन होयसाळ मंदिरात तिचे पुनःपुन्हा अनुकरण आढळते. इ. स. ११ व्या शतकातील या मंदिरात ऐहोळे आणि पत्तदकल येथील प्रारंभीच्या चालुक्य मंदिरांचे अनुकरण दिसते ( फर्ग्युसन, १.४२६–४२७ ).

**कुक्कुट** ( देश )—उत्तर भारतातील एक देश ( वामन. १३.४३ ).

२. ( पर्वत ) मेरु पर्वताच्या पश्चिमेकडील एक पर्वत ( मार्क. ५२.१० ).

३. ( नगर ) बौद्ध साहित्यमते उत्तर प्रदेशातील श्रावस्तीच्या १२० कोस उत्तरेकडील एक व्यापारी नगर. श्रावस्तीचे व्यापारी येथे व्यापारासाठी येत असत ( मलल-सेकर, १.६१५ ).

४. ( नगर व देशविभाग ) कलचुरि राजा जाजल्लदेव ( प्रथम ) च्या स. १११४ च्या रत्नपुर शिलालेखमते त्याच्या मांडलिकत्वाखालील दक्षिण कोशल देशान्तर्गत एक नगर आणि देशविभाग ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.४११; एपि. इंडि. १.३२–३९). मध्य प्रदेशातील बस्तरराजधानी जगदाळपुरनजिकचे आधु. चित्रकूट गाव हेच होय ( एपि. इंडि. १०.२६ ). नामांतर–' चक्रकूट '; ' शक्करकोट्टम् '.

**कुक्कुटकन्थम्** ( नगर )—पाणिनीच्या अष्टाध्यायी-मते भारतवर्षातील एक नगर ( पा. सू. ६.२.१२५ ). पाणिनीच्या मते येथे ' कंथा ' अंत्यशब्दाचे ' कंथम् ' नपुसकलिंगी रूप होत असे ( पा. सू. २.४.२० ). अग्रवाल यांच्या मते उशीनर ( आधु. झंग मघियाना ) देशात हे असावे.

**कुक्कुटपादगिरि** ( पर्वत )—फाहियेन् आणि ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते मगध (आधु. दक्षिण बिहार) देशातील एक टेकडी. प्राचीन बौद्ध आणि संस्कृत साहित्यात हिचा निर्देश आढळत नसला, तरी चिनी साहित्यमते ही मगध देशातील विदेह ग्रामानजिक होती. गयेपासून २५ मैल पूर्वेकडील गया–कलकत्ता रेलमार्गावरील गुर्प रेल्वेस्थानकानजिकची आधु. गुर्प टेकडी हीच असून, ' गुरुपाद ' चे ते संभवतः अपभ्रष्ट रूप असावे ( जे. ए. एस्. बी., स. १९०६; पृ. ७७–८३ ).

आधु. गुर्प ही त्रिशिखरयुक्त टेकडी घनदाट अरण्यात असून, तिच्या माथ्यावर अरुंद विवर आहे. हे सारे वर्णन ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनाशी मिळतेजुळते असून, त्याचे मते महाकाश्यपाच्या हातातील काठीने हिच्या माथ्यावरील विवर पडले होते. या टेकडीवर अनेक बौद्ध स्तूपावशेष, तसेच बौद्ध शिलालेख असून त्यापैकी काश्यप प्रतिमालेखमते येथे महाकाश्यपाचे निर्वाण झाले होते ( एपि. इंडि. २९.१३४). सध्या येथे ' गुर्पस्वामिनी ' देवीचे मंदिर असून, वर्षाकालारंभी येथे यात्रा भरते.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या टेकडीची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. फाहियेन् | चि-त्सु ( कोकपाद पर्वत ) |
| २. फाहियेन्<br>३. ह्युएन्त्संग<br>४. इ-त्सिंग् | गुरुपाद पर्वत |
| ५. ह्युएन्त्संग | लंग्-चिह ( जंबूकपदचिह्न ) |

**नामव्युत्पत्ती**—ह्युएन्त्संगच्या मते ' कुक्कुटपादाकृती शिखरत्रययुक्त ' अशा अर्थाने हीस ' कुक्कुटपादगिरि ' आणि ' कश्यप बुद्धाचे निवासस्थान ' अशा अर्थाने हीस ' गुरुपाद पर्वत ' नाव प्राप्त झाले.

**फाहियेन्च्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते ही टेकडी

बोधिगया येथील बोधिवृक्षापासून ३ ली ( १/२ मैल ) दक्षिणेस असून ( लेग, फाहियेन. ३३.८२ ), इ-त्सिंगच्या प्रवासवर्णनमते ही ( गुरुपाद ) नालंदापासून सात योजने दक्षिणेस बोधिवृक्षानजिक होती.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते घनदाट जंगलातील ही दुर्गम आणि खोल दऱ्यांनी युक्त टेकडी मही ( मोहना ) नदीपासून २० मैल पूर्वेस होती.

**आख्यायिका**—ह्युएन्त्संगच्या मते बुद्धाचा पट्टशिष्य महाकाश्यप बुद्धशिष्य आनंदास बौद्ध मठाधिपती बनवून येथे तपस्यार्थ आला. उत्तर बाजूने वर चढून आणि नैर्ऋत्येकडील खोल दरी ओलांडून हिच्या माथ्यावरील शिखरांच्या दरम्यान समाधिस्थ अवस्थेत भविष्यकालीन मैत्रेय बुद्धाची प्रतीक्षा तो करू लागला. उत्तरकालात मगधराज अजातशत्रूने त्याच्या स्मृत्यर्थ येथे एक स्तूप बांधला ( वॉटर्स, २.१४३–१४६; बील, ३.३६४ ).

**मतांतरे**—हिच्या भौगोलिक स्थानाविषयी अभ्यासकांत निम्नलिखित मतांतरे आढळतात :—

( १ ) **कुर्किहर टेकडी**—कनिंगहॅम यांच्या मते गया जिल्ह्यातील वझीरगंजनजिकच्या कुर्किहर गावाच्या उत्तरेकडील आधु. कुर्किहर टेकडी हीच होय ( आर्कि. सर्व्हे. १.१५ ).

( २ ) **शोभनाथ टेकडी**—स्टाइन यांच्या मते गया जिल्ह्यातील पुन्व गावापासून दोन मैल दक्षिणेकडील आधु. शोभनाथ टेकडी हीच होय ( इंडि. अँटि., स. १९०१, पृ. ८८ ).

गया जिल्ह्यातील या दोन्ही टेकड्या बौद्धावशेषसंपन्न असल्या, तरी ह्युएनत्संगच्या वर्णनाशी त्या जुळत नसल्याने आधु. गुर्प टेकडी ही असण्याची शक्यता अधिक वाटते ( पांडे, विहार. पृ. ४७–४८ ).

**कुक्कुटवन** ( बौद्ध मठ )—बौद्ध साहित्यमते मगध देशातील पाटलिपुत्र ( आधु. पाटना ) येथील एक बौद्ध मठ ( बील, ३.३६४ ).

**कुक्कुटवल्लिका** ( ग्राम )—गुर्जर राजा दद्द (द्वितीय) च्या स. ६४२ च्या संखेडा ताम्रपटमते गुजरातमधील एक ग्राम. संखेडापासून ८ मैल नैर्ऋत्येकडील आधु. कुकड गाव हेच होय ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.७६ ).

**कुक्कुटविहार** ( बौद्ध विहार )—गया जिल्ह्यातील बौद्ध विहारस्थान. गया जिल्ह्यातील वझीरगंजनजिकच्या आधु. कुर्किहर गावी हा असून, ते नगरनाम 'कुर्कविहार'चे अपभ्रष्ट रूप असावे. नामांतर–' कुर्कविहार '.

**अवशेष** — कनिंगहॅम यांना येथे बौद्ध स्तूपावशेष, बौद्ध मूर्ती, तसेच अनेक शिलालेख ( स. ८००-९०० ) सापडले ( आर्कि. सर्व्हे. १.१४ ). ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनातील ' कुक्कुटपादगिरि ' हाच असल्याचे त्यांचे अनुमान असंभव वाटते ( पांडे, विहार. पृ. १३३; कुक्कुटपादगिरि पहा ).

**कुक्कुटागिरि** ( पर्वत )—पाणिनीच्या गणपाठमते वायव्य भारतीय सरहद्दीनजिकच्या लोहितागिरि ( आधु. हिंदुकुश पर्वत ) नजिकचा एक पर्वत ( पा. सू. ६.३.११७ ). अफगाणिस्तानपासून बलुचिस्तानपर्यंत उत्तरदक्षिण पसरलेल्या बृहदाकार पर्वतश्रेणीचा उपविभागभूत हा पर्वत हिमालय पर्वताचा सिंधु नदीमुळे विभक्त झालेला भाग होता.

अग्रवाल यांच्या मते अफगाणिस्तानातील कोहेबाबा ( प्राचीन भंजनागिरि ) पर्वताच्या पश्चिमेकडील हेरात आणि हरिरुद ( प्राचीन सरयू ) नद्यांशी समांतर आणि उत्तरवर्ती शालापर्वत हाच होय.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. संस्कृत साहित्य | उपरिश्येन ( ? ) |
| २. इराणी साहित्य | उपरिशिएन |
| ३. ग्रीक साहित्य | परोपमिसस् |

**नामव्युत्पत्ती**—' कोंबड्याचा पर्वत ' अशा अर्थाने या छोटेखानी पर्वतास ' कुक्कुटागिरि ', आणि 'श्येन पक्ष्याचा उंचवटा ' अशा अर्थाने यास ' उपरिशिएन ' नावे प्राप्त झाली असून, ' परोपमिसस् ' हे ' उपरिशिएन् 'चेच ग्रीक रूप आहे. अग्रवाल यांच्या मते ' कोहेबाबा पर्वताच्या तुलनेने कमी उंचीचा ' अशा अर्थाने यास ही लघुतानिदर्शक नावे मिळाली असावीत.

**ग्रीक साहित्यात**—या साहित्यमते हा बाह्लीक ( आधु. बल्ख ) देशाच्या दक्षिणेस होता ( अग्रवाल, पाणिनि. पृ. ४६ ).

**कुक्कुटाराम** ( बौद्ध मठ )—उत्तर प्रदेशातील कौशांबीनजिकचा बुद्धकालीन सुविख्यात बौद्ध मठ ( कौशांबी पहा ).

२. मगधराजधानी पाटलिपुत्रच्या आग्नेयेकडील एक

बौद्ध मठ. येथील एक हजार बौद्ध भिक्षूंचा अशोकाने सत्कार केला होता ( वॉटर्स, २.८९; पाटलिपुत्र पहा ).

**कुक्कुटेश** ( लिंग आणि वापी )—काशी येथील एक शिवलिंग आणि वापी ( स्कन्द. काशी. ६६.४; लिङ्ग. तीर्थ-विवेचन. पृ. ९८ ).

२. अवंती येथील चौऱ्याऐंशी शिवलिंगांपैकी एक ( स्कन्द. आवन्त्य. अ. च. लिं. २१ ).

**कुक्कुटेश्वर** ( तीर्थ )—त्रिसंध्यामाहात्म्यमते कश्मीरातील एक निर्झरस्थान. ऐन्–इ–अकबरीमते येथील जल आरोग्यदायक आणि क्षुधावर्धक होते. ब्रिंग ( प्राचीन भृंग ) परगण्यातील बिदर ( प्राचीन भेडर ) गावापासून एक मैल उत्तरेकडील आधु. कुक्कुटेश्वर तीर्थ हेच होय. नामांतर ( ऐन्–इ–अकबरी )–' कुकर नाग ' ( स्टाइन, राज. २.४६९ ).

**कुक्कुर** ( लोकसमूह )—महाभारतमते भारतवर्षातील ' कर्कर ' लोकसमूहाचे नामांतर ( म. भी. १०.४२; कुर्कर पहा ).

**कुक्कुश** ( देश )—महाभारतमते एक जनपद ( म. भी. १०.४१ ).

**कुक्षि** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.१२७ ).

**कुक्षिमत्** ( पर्वत )—महाभारतमते युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या पूर्व दिग्विजयात भीमाने जिंकलेला पूर्व भारतातील एक पर्वत ( म. स. २७.५ ).

**कुखपुर** ( दत्ततीर्थ )—आंध्र प्रदेशातील एक गुह्य दत्ततीर्थ. कृष्णा रेल्वेस्थानकापासून १८ मैलांवरील कृष्णा नदीद्वीपातील आधु. कुरुगड्डी गाव हेच होय. स्थानिक आख्यायिकामते येथील शिवलिंगस्थानी पीठापुरनिवासी दत्तावतार श्रीपादवल्लभ काही काळ राहिले होते. येथे दत्त-पादुकांऐवजी शिवलिंगाचीच पूजा करतात ( ती. पृ. २६६ ).

**कुङ्कणविसय** ( देश )—प्राकृत साहित्यमते पश्चिम भारतातील ' कोंकण ' देशाचे नामांतर ( इंडि. अँटि. ११.२९३; कोंकण पहा ). अन्य नामांतर ( मध्ययुगीन शब्दकोश साहित्य )–' कुंकण '.

**कुङ्कमठ** ( माध्वपीठ )—दक्षिण भारतातील एक माध्वपीठ.

**कुङ्कुमठाण** ( महानुभाव तीर्थ )—महाराष्ट्रातील महानुभावपंथीय ' कोकमठान ' तीर्थाचे नामांतर ( कोकमठान पहा ).

**कुङ्कुमाद्रि** ( पर्वत )—शक्तिसंगमतंत्रमते कश्मीरातील एक पर्वत. तत्कालीन कश्मीर देश या पर्वतापासून शारदामठापर्यंत पसरला होता. श्रीनगरनजिकचे कुंकुम ( अभ्रक ) युक्त आधु. पांपुरा पठार हेच होय ( शक्ति-सङ्गम. ३.७.९; कश्मीर पहा ).

**कुङ्ग** ( देश )—कलचुरि राजा नृसिंहाच्या स. ११५५ च्या भेडाघाट शिलालेखमते त्याच्या कर्ण नामक प्रपितामहाने जिंकलेला दक्षिण भारतातील एक देश. कीलहॉर्न यांचे मते आधु. सालेम आणि कोइमतूर जिल्हे हेच असून, मिराशी यांच्या मते गोदावरी जिल्ह्यातील आधु. कोंगोद प्रदेश हाच असावा ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.३१४ ).

**कुङ्गद मण्डल** ( देशविभाग )—शिलालेख साहित्य-मते कलिंग देशातील ' कोंगोद मंडल ' देशविभागाचे नामांतर ( कोंगोद मंडल पहा ).

**कुच** ( देश )—वायुमते मध्य आशियातील ' कूचवार ' देशाचे नामांतर ( वायु. ४४.१०; कूचवार पहा ).

**कुचरा** ( नदी )—भारतवर्षातील एक नदी. पाठभेद–' कुवीरा ' ( म. भी. १०.२६ ).

**कुचिक** ( देश )—बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या ईशान्य भागातील एक देश ( बृ. सं. १४.३० ). तिबेटच्या पश्चिमेकडील नरि-खोर्सम् प्रदेशातील नरि-खोर्सम् आणि भारतीय सरहद्दीच्या दरम्यान खश लोकांनजिक हे रहात असावेत ( चौधरी, पृ. १२९ ). अन्य अभ्यासकांच्या मते मध्य आशियातील ' कूचा ' देशाचे हे नामांतर असावे ( कूचा पहा ). अन्य नामांतर–' कुज ' ( वैज. ३७.५७ ).

**कुज** ( पर्वत )—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते दक्षिण भारतातील ' क्रौंच ' अरण्याचे नामांतर ( शब्दरत्न. ५६.७०; क्रौंच ५ पहा ).

२. ( देश ) मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते ईशान्य भारतातील ' कुचिक ' देशाचे नामांतर ( कुचिक पहा ).

**कुजवती** (देशविभाग)—रामचरितमानसमते विहारमधील झारखंड (छोटा नागपूर) प्रदेशातील एक देशविभाग ( मंडल; रामचरित. २.५; टीका. पृ. ४२ ). संथाळ परगण्यातील नयदुम्क गावाच्या १४ मैल उत्तरेकडील आधु. कुजवती ग्राम हेच होय. येथील राजाने स. ११२० मध्ये कयंगल ( = राजमहाल टेकड्यांचा दक्षिण भाग ) आणि तेलकंप ( = मानभूम जिल्ह्यातील आधु. तल्कुपि ) देशाधिराजासमवेत मगधराज रामपालास साह्य केले होते ( हिस्टरी ऑफ बेंगॉल. १.१५७ ).

**कुजा** ( तीर्थ )—पश्चिम भारतातील भडोचनजिकचे

नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( ती. पृ. ४३९ ).

**कुजूल** ( लोकसमूह )— कुषाण सम्राट कद्‌फिसेस् (प्रथम) च्या मुद्रिकालेखमते मध्य आशियातील एक लोकसमूह. ल्यूडर्स यांच्या मते 'कुजूलवंशीय' अशा अर्थाने त्या राजास 'कुजूल' उपाधी मिळाली असावी ( ल्यूडर्स, एस्. बी. ए. डब्ल्यू.; सन १९२२; पृ. २६१).

**कुञ्ज तीर्थ** ( तीर्थ )—कुरुक्षेत्रान्तर्गत काम्यकवनाच्या पूर्ववर्ती एक तीर्थ ( वामन. ४२.१ ).

२. नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( मत्स्य. १९४.९ ).

**कुञ्जरदरी** ( देश )—बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारताच्या दक्षिण भागातील एक देश ( बृ. सं. १४. १६ ). याच्या 'कच्छवासिन्' उपाधीवरून हा कच्छमध्ये असावा ( मार्कं. ५५.२८ ).

**कुटकाचल** ( पर्वत )—भागवतमते दक्षिण कर्नाटक देशान्तर्गत कोंकवेंककुटक देशातील एक पर्वत ( भा. ५. ६.७ ). येथे मुक्तावस्थेत भ्रमण करणारा जैन तीर्थंकर ऋषभनाथ दावानलात भस्म झाला ( भा. ५.६.८ ).

**कुटिका** ( नदी )—वाल्मीकि रामायणमते अयोध्या–केकय मार्गावरील एक नदी. केकय देशानुगामी भरतास ही लागली होती ( वा. रा. अयो. ७१.१५ ).

**कुटिकोष्ठिका** ( नदी )—अयोध्या–केकय मार्गावरील एक नदी. केकय देशानुगामी भरतास ही लागली होती ( वा. रा. अयो. ७१. १० ).

**कुटिला** ( नदी )—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते 'गंगा' नदीचे नामांतर ( नामसंग्रह. १८.१०; गंगा पहा ).

**कुटुम्बागि** ( ग्राम )—यादव राजांच्या शके ११७४ च्या मुनवलि शिलालेखमते कर्नाटकातील हलसिगे १२००० देशविभागातील एक ग्राम. बेळगाव जिल्ह्यातील खानापुर तालुक्यातील आधु. कोलबगि गाव हेच होय ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २७२ ).

**कुटुम्बेश्वर** ( लिंग )—अवंती येथील चौऱ्याऐंशी शिवलिंगांपैकी एक ( नारद. उत्तर. ७८.४०; स्कन्द. आवन्त्य. अ. १०. ६७; च. लिं. १४ ). पाठभेद—'कुटुंबिकेश्वर'.

**कुट्ट** ( देश )—महाभारतमते अपरांत देशानजिकचा एक देश ( म. भी. १०.४७; कुट्टापरांत पहा ).

**कुट्टानशिल्ल** ( विभाग )—सुभिक्षराजदेवाच्या इ. स. १० व्या शतकातील पंडुकेश्वर ताम्रपटमते उत्तर भारतातील विष्णुगंगातीरवर्ती एक ग्राम. याचे आधुनिक स्थान समजत नाही ( एपि. इंडि. ३१.२९१–२९२ ).

**कुट्टापरान्त** ( देश )—महाभारतमते 'अपरांत' देशाचे नामांतर ( म. भी.१०.४७; अपरांत ३. पहा ).

**कुट्टिक** ( देश )—उत्तर भारतातील एक देश (वामन. १३.४३ ).

**कुठारगड** ( दुर्गस्थान )—मध्यभारतातील एक दुर्गस्थान. बुंदेलखंडातील जसो गावापासून ७ मैल नैर्ऋत्येकडील आधु. नचने-कि–तलाई गाव हेच होय. यानजिकच्या लखुरा गावी पृथ्वीसेन वाकाटकाच्या व्याघ्रदेव नामक मांडलिक राजाचे दोन वास्तुनिर्मित शिलालेख सापडले. तत्रस्थ 'वास्तू' मात्र आज नष्ट झाली आहे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.२३३ ).

**कुडलदामवाड** ( देशविभाग )—यादव राजांच्या शके ११३६ च्या खिद्रापुर शिलालेखमते महाराष्ट्रातील मिरिंज देशविभागातील एक राज्यविभाग. यादव राजा सिंघणाच्या स. १२१४ च्या दानपत्रमते हे कृष्णावेणी–भेणसी संगमावरील पवित्र तीर्थ होते ( जे. बी. बी. आर. ए. एस्. १२.७ ). भूतपूर्व कुरुंदवाड संस्थानातील आधु. कुरुंदवाड गाव हेच होय. नामांतर ( यादव शिलालेख )–'कूडलदाम्वाळ'.

**कुडली** ( नदीसंगम )—कर्नाटकातील शिमोगापासून १० मैलांवरील तुंगा आणि भद्रा नद्यांचे संगमस्थान. येथे विश्वेश्वर, रामेश्वर आदि शिवमंदिरे, तसेच नृसिंहाचे मंदिर असून, येथील शंकराचार्य-मठात महेश्वर आणि शारदादेवीचे मंदिर आहे ( ती. पृ. ३१५ ).

**कुडा** ( बौद्ध गुफास्थान )—कोंकण प्रांतातील मुंबईच्या दक्षिणेकडील सुविख्यात बौद्ध विहारस्थान. येथील शिल्पदृष्ट्या अनलंकृत छोटेखानी गुफा ( गुफासंख्या–२२ ) तत्रस्थ शिलालेखामुळे महत्त्वपूर्ण मानल्या जातात.

कालनिर्णय—प्रारंभिक हीनयान पंथीयांच्या पाली भाषेतील येथील गुफालेखांची लिपी सातवाहन राज्यकालीन कार्ले, नासिक आणि कान्हेरी गुफालेखांसदृश आहे. त्यावरून या कार्ले गुफांशी समकालीन ( इ. स. ९१ ले शतक ) असाव्यात.

शिलालेख— येथील महाभोजवंशीय स्थानिक राजे, त्यांचे कुटुंबीय आणि नोकर-चाकरांनी कोरलेल्या येथील देणगीलेखांची संक्षिप्त माहिती निम्नलिखित परिपत्रकात दिली आहे ( परिपत्रक पहा ).

**कुडिवाट** ( ग्राम )—दक्षिण भारतातील 'कुलिवाटक' ग्रामाचे नामांतर. अन्य नामांतर–'कुडिवाड' ( कुलि-

## कुडा गुफासमूह

| गुफालेख क्रमांक | उपलब्धिस्थान | देणगीदाराचे नाव | देणगी |
|---|---|---|---|
| १. | गुफा क्र. १ चे प्रवेशद्वार | सुलसदतपुत्र शिवभूति (शिवभुक्ति) | गुफा |
| ३. | गुफा क्र. ५ चा अंतर्भाग | — | दोन जलकुंडे |
| ४. (उद्ध्वस्त) | गुफा क्र. ५ | शिवदत्त स्थविराचा शिष्य | — |
| ५. | ,, ,, ,, | नागनिका स्थविरकन्या पदुमनिका (पद्मनिका) | गुफा आणि जलकुंडे |
| ६. | गुफा क्र. ६ | महाभोजवंशीय मांडवस्कंदपालित-पुत्र आणि स्नुषा | गुफा |
| ७. (संस्कृत) | गुफा क्र. ६ मधील बुद्धमूर्ती | शाक्य उपासिका व्याघ्रका | बुद्धप्रतिमा |
| ८. (संस्कृत) | ,, ,, ,, | शाक्य भिक्षु बुद्धसिंह | ,, |
| ९. (संमिश्र) | ,, ,, ,, | शाक्य भिक्षु संघदेव | ,, |
| ११. | गुफा क्र. ७ | वैद्य सोमदेवपुत्र आणि कन्या | गुफा |
| १२. | गुफा क्र. ७ नजिकचे जलकुंड | मांडव राजपुत्र कुमारमाधव | जलकुंड |
| १३. | गुफा क्र. ९ | ब्राह्मण स्त्री भाजिला | चैत्यमंदिर |
| १४. | गुफा क्र. १० | मालाकार (माळी) शिवप्रीत | गुफा |
| १५. (उद्ध्वस्त) | गुफा क्र. ११ | महाभोज राजकन्या मांडवी | — |
| १६. | गुफा क्र. १२ | हाल राजामात्य कन्या गोतमी | गुफा |
| १७. | गुफा क्र. १३ | महाभोजवंशीय सुदर्शन राजकन्या विजयनिका | ,, |
| १८. | गुफा क्र. १४ | करहाकडनिवासी महिक नामक लोहकार | गुफा |
| १९. | गुफा क्र. १४ नजिकचे जलकुंड | वसुल नामक श्रेष्ठी | स्नानगृह |
| २०. | गुफा क्र. १५ | महाभोजवंशीय कौत्सीपुत्राच्या राज्या-तील अर्धगच्छक रामदत्त | चैत्यमंदिर आणि गुफा |
| २२. | गुफा क्र. १६ चे प्रवेशद्वार | विजय भदंतशिष्या सर्पिला | गुफा |
| २३. | गुफा क्र. १६ न. चे जलकुंड | मालाकार मृगदास | जलकुंड |
| २४. | गुफा क्र. १७ | नाग नामक व्यापारी | गुफा |
| २५. | गुफा क्र. १८ | वसुलणक नामक श्रेष्ठी | ,, |
| २६. | गुफा क्र. २१ | ,, ,, ,, | जलकुंड |
| २७. | गुफा क्र. २३ | वेदमित्र वणिक्पत्नी शिवदत्ता | गुफा |
| २८. | गुफा क्र. २४ | अचलदास वणिक्पुत्र आषाढमित्र | ,, |

(बर्जेस्, अर्कि. सर्व्हे. वे. इं. ८४–८८).

वाटक पहा).

**कुड्मळा** (नदी)—मत्स्यमते एक श्राद्धयोग्य नदी (मत्स्य. २२.४६).

**कुड्या** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाठमते भारत-वर्षातील एक ग्राम (पा. सू. ४.२.९५).

**कुड्लूर** (नगर)—चोल राजा राजराज (द्वितीय) च्या स. १२३१ च्या शिलालेखमते दक्षिण भारतातील चिदं-बरम्–पल्लव देशमार्गावरील एक नगर. मद्रास राज्यातील दक्षिण अर्काट जिल्ह्यातील आधु. कुद्लूर गाव हेच होय (एपि. इंडि. ७.१६०; रंगाचारी, १. दक्षिण अर्काट. ३२९). पश्चिम गंग राजा दुर्विनीताचा स. ५१७ चा दानलेख येथे सापडला आहे (म्हैसूर. आर्कि. सर्व्हे, स.

१९२१; पृ. ९२० ).

**कुणप** ( लोकसमूह )—ईशान्य भारतातील खश समीपवर्ती ' कुनह ' लोकसमूहाचे नामांतर ( कुनह पहा ).

**कुणाल** ( देश )—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते भारतवर्षातील एक देश ( औणादिक. १४२.२१८ ). नामांतर–' कूणाल ' ( उणादि. ४९१० ).

जैन साहित्यमते उत्तर भारतातील ' कोशल ' देशाचे नामांतर ( विविध. पृ. ३०; कोशल पहा ).

**कुणिन्द** ( देश )—युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या उत्तर दिग्विजयात अर्जुनाने जिंकलेला उत्तर भारतातील एक किरात देश ( म. स. २३.१४ ). हिमालय तराईतील बियास–यमुना दुआबातील आधु. बदरीनाथ–केदारनाथ प्रदेश हाच होय ( जयचंद्र, पृ. १५६ ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. महाभारत | |
| अ. ( स. २३.१४ पाठ.) | कुलिंद, पुलिंद |
| ब. (आर. १४१.२४–२६) | सुबाहु विषय |
| २. बृहत्संहिता | |
| अ. ( १४.३० ) | कौणिंद |
| आ. ४.२४ ) | कौलिंद |
| इ. ( १४.३३ ) | कौलिम्द |
| ई. ( १४.३० ) | कौलिम्द्र |

**महाभारतात**—या ग्रंथमते या विपुल हत्ती आणि अश्वयुक्त ( **प्रभूत गजवाजिनम्** ) देशातून वनवासी पांडव अर्जुनाला सामोरे गेले. येथील सुसंस्कृत आणि मैत्रीयोग्य किरातांनी युधिष्ठिराचे उत्तम स्वागत केले ( म. आर. १४१.२४–२६ ). येथील एका व्यक्तीने युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञप्रसंगी शंख ( म. स. परि. १.३३.५ ) आणि अन्य एकाने हिरण्य आणि वस्त्रे उपायन म्हणून अर्पिली होती ( म. स. परि. १.३३.१९ ).

भारतीय युद्धात हे लोक दुर्योधनपक्षात सामील असून (म. क. ५.१९), तंगण, अंबष्ठ, पैशाच आणि समंदरांच्या समवेत यांनी सात्यकीवर हल्ला केला होता ( म. द्रो. ९७.१४ ).

**बृहत्संहितेत**—या ग्रंथमते हे ( कौणिंद ) ईशान्य भारतनिवासी असून ( बृ. सं. १४.३० ), यांचा राजाहि ' कौणिंद ' नावानेच सुविख्यात होता ( बृ. सं. १४.३३ ).

२. वायुमते मेरु पर्वतोद्भवा पश्चिमवाहिनी सीता नदीच्या मार्गावरील एक देश ( वायु. ४७.४३ ).

**कुण्ड** ( पर्वत )—गया येथील एक पर्वत ( वायु. १०८.३२ ).

२. ( कूप ) प्रभासक्षेत्रातील एक कूप ( स्कन्द. प्रभास. प्र. १४८ ).

**कुण्ड-आश्रम** ( आश्रमस्थान )—नर्मदा नदीकाठच्या कोटेश्वरानजिकचे विश्रवसपुत्र कुंड ऋषींचे आश्रमस्थान ( ती. पृ. २३५; कोटेश्वर पहा ).

**कुण्डग्राम** ( नगर )—मध्ययुगीन शब्दकोश साहित्य मते बिहारमधील ' कुंडपुर ' जैन तीर्थाचे नामांतर ( कल्पसूत्र. पृ. २१९ ). अन्य नामांतर ( विविधतीर्थ.; कल्पसूत्र )–' कुंडिनपुर. '

**कुण्डतीर्थ** ( तीर्थ )—एकाम्रक्षेत्रातील एक तीर्थ ( ब्रह्म. ४१.७६ ).

२. मथुरेतील एक तीर्थ ( वराह. १५८.२१ ).

**कुण्डपुर** ( जैन तीर्थ )—जैन साहित्यमते विदेह ( आधु. उत्तर बिहार ) मधील वैशाली नगरान्तर्गत वर्धमान महावीराचे जन्मस्थानभूत उपनगर ( आचाराङ्ग. पृ. १९०–१९१ ). बिहारमधील मुजफ्फरपुरपासून २२ मैलांवरील बसाढ ( प्राचीन वैशाली ) नजिकचे आधु. बसुकुंड गाव हेच होय ( डे, पृ. १०७ ).

**नामांतरे**—जैन साहित्यात या तीर्थाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. कल्पसूत्र ( पृ. २१९ ) | कुंडग्राम |
| २. कल्पसूत्र आणि नवरत्न | कुंडिनपुर |
| ३. अन्य जैन साहित्य | क्षत्रियकुंडग्राम<br>महाकुंडग्राम (?)<br>खत्तियगाम (?)<br>कुंडलपुर<br>कुंडिनपुर |

**जैन साहित्यात**—या साहित्यमते या गावाच्या दक्षिण आणि उत्तर उपविभागात ब्राह्मण आणि क्षत्रिय लोक रहात असून, त्यापैकी क्षत्रिय भागात ( कुंडग्राम, महा-

कुंडग्राम, खत्तियगाम ) महावीर जन्मला होता. ही वैशाली नगराची तीन स्वतंत्र उपनगरे असल्याचे डे यांचे अनुमान अयोग्य वाटते.

यतिवृषभ, पूज्यपाद, रविषेण, जयसिंहनंदि, जिनसेन, गुणभद्र आदींच्या ग्रंथांत या महावीरजन्मस्थानाचे माहात्म्य वर्णिले असून, विजयेंद्र सूरिकृत ' वैशाली ' आणि दर्शन-विजयकृत 'क्षत्रियकुंड' मध्ये याचे सविस्तर वर्णन आढळते.

विद्यापीठ—जैन कल्पसूत्रमते या गावच्या कुंडिनपुर विद्यापीठात (इ. स. पू. ६ वे शतक) महावीर आणि महावीरपिता सिद्धार्थाचे वेदविद्या आणि व्यायामाचे शिक्षण झाले होते. सकलविद्या-पारंगतत्व प्राप्त करण्यासाठी महावीरमातेने त्यास येथे दाखल केले होते. वेदाध्ययनाला प्राधान्य देणाऱ्या या विद्यापीठात सामान्यज्ञान, वेद, वेदांग, इतिहास, आख्यान, यज्ञविधी, सांख्यशास्त्र, षड्दर्शन, तत्त्वज्ञान, गणित, व्याकरण, काव्यशास्त्र, ज्योतिष आदि ७२ विद्या, तसेच स्त्रियांच्या स्वतंत्र चौसष्ट कला शिकविल्या जात असत. प्रारंभिक ज्ञानप्राप्त सोळा वर्षांच्या छात्रांना येथे प्रवेश असे. व्यायामशास्त्राचे सांग शिक्षण हे याचे प्रमुख वैशिष्ट्य असून, महावीरपिता सिद्धार्थ येथील व्यायामशाळेत मल्लविद्या-पारंगत बनला होता.

आधुनिक काली—या अर्धउद्ध्वस्त नगरात सध्या महावीराचे स्मृतिमंदिर, तसेच ' वैशाली प्राकृत जैन विद्यापीठ ' स्थापिण्यात आले आहे.

मतांतरे—काही जैन ग्रंथमते विहारमधील पाटना जिल्ह्यातील आधु. बडगाव ( प्राचीन नालंदा ) हेच असावे. परंतु हे वैशालीचे उपनगर असल्याचा सुस्पष्ट निर्देश सर्वत्र आढळत असल्याने हे अनुमान असंभव वाटते. विहार-मधील लछवाड गावानजिक हे ( क्षत्रियकुंडग्राम ) असल्याची मध्ययुगीन श्वेतांबर जैन परंपराहि ऐतिहासिक दृष्ट्या असंभव वाटते ( ती. सं. पृ. १०९; पांडे, बिहार. पृ. १६७–१६८ ).

**कुण्डल** ( देश )— महाभारतमते दक्षिण भारतातील एक देश ( म. भी. १०.६१ ). नामांतर–' करष. '

**कुण्डलगिरि** ( जैन तीर्थ )—यतिवृषभमते अंतिम केवलज्ञानी श्रीधराचे निर्वाणस्थान, एक जैन तीर्थ. पं. दरबारीलाल यांच्या मते विहारमधील राजगृहानजिकच्या पाच टेकड्यांपैकी ही एक असावी ( अनेकान्त वर्ष. ८. ११५; ती. सं. पृ. १२९–१३० ).

**कुण्डलपुर** ( जैन तीर्थ )—मध्यप्रदेशातील जबलपुरच्या ६४ मैल वायव्येकडील दमोह रेल्वेस्थानकापासून २२ मैलांवरील जैन मंदिरस्थान. ' कुंडलाकार पर्वतान्तर्गत ' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले असावे. बुंदेलखंडातील सोनागढ आणि वऱ्हाडातील मुक्तागिरीप्रमाणेच अर्वाचीन जैन स्थापत्यशैलीने ( इ. स. १६–१७ वे शतक ) बांधलेल्या येथील मंदिरामध्ये मुसलमानी स्थापत्याचे अनुकरण दिसते ( अर्कि. सर्व्हे. २१.१६६–१६७ ).

मंदिरे—येथील महावीराच्या समवशरणस्थानी महावीराचे विशाल प्रतिमायुक्त ( उंची–१०′ ) भव्य मंदिर आहे. तत्रस्थ शिलालेखमते महाराजा छत्रसालाने त्याचा जीर्णोद्धार केला. येथे अन्य ५९ जैन मंदिरे आहेत ( ती. पृ. ५४१ ).

२. महाराष्ट्रातील साताऱ्यानजिकच्या कुंडल रेल्वेस्थानकापासून दोन मैलांवरील एक जैन तीर्थ. येथे पार्श्वनाथ मंदिर असून, नजिकच्या डोंगरावर ' झरी पार्श्वनाथ ' ( शब्दशः अर्थ सदैव जलसिंचित ) व ' गिरि–पार्श्वनाथ ' मंदिरे आहेत ( ती. पृ. २७५; ५४१ ).

**कुण्डला** ( नदी )—भारतवर्षातील एक नदी ( म. भी. १०.२० ).

**कुण्डलेश्वर** ( तीर्थ )—नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( पद्म. आदि. १७.९ ).

२. ( लिंग ) नर्मदा नदीकाठचे एक शिवलिंग ( मत्स्य. १९०. १२ ).

३. श्रीपर्वतावरील एक शिवलिंग.

**कुण्डवन** ( वन )—मथुरा येथील द्वादश वनांपैकी तृतीय वन ( वराह. १५३.३२ ).

**कुण्डेश्वर** ( लिंग )—अवंती येथील एक शिवलिंग ( नारद. उत्तर. ७८. १० ).

**कुण्डि** ( देशविभाग )—स. १२२९ च्या रट्ट शिलालेखमते महाराष्ट्रान्तर्गत कुंतल देशातील एक देशविभाग. आधु. बेळगाव जिल्हा, आणि धारवाड, कोल्हापूर आणि सांगली जिल्ह्यांचा काही भाग हाच असून, फ्लीट यांच्या मते यादव शिलालेखातील ' कुंडि ३००० ' ( आधु. बेळगाव जिल्ह्याचा काही भाग ) देश हा याचाच उपविभाग होता ( इंडि. ॲंटि. १६.१५; कुंडि ३००० पहा ).

नामांतरे—प्राचीन शिलालेख साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा ).

व्याप्ती—फ्लीट यांच्या मते याच्या भौगोलिक परिसीमा पुढीलप्रमाणे होत्या :— १. उत्तरेस–कृष्णा आणि दूधगंगा

## कुंडि देशाची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पश्चिम महाराष्ट्रातील गुफा-लेख ( बर्जेस्, केव्ह टेंपल्स. पृ. १०२ ) | कर्नाटकुंडि विषय |
| २. विक्रमादित्य ( द्वितीय ) चा स. १००८ चा कौथेम दानलेख ( इंडि. अँटि. १६.१५ ) | कुंडिदेश |
| ३. तेर्डाळ जैन शिलालेख (इंडि. अँटि. १४.१६ ) | कुंडि |

नद्या; २. पूर्वेस–निपाणी आणि संकेश्वर; ३. पश्चिमेस–उर्लीग्राम. काणे यांच्या मते या परिसीमा अतिव्याप्त असून, प्राचीन मिरिंज आणि करहाटक देशहि त्यामध्ये समाविष्ट आहेत ( काणे, महाराष्ट्र. पृ. ६५२–६५३ ).

उपविभाग—शिलालेख साहित्यमते याचे निम्नलिखित उपविभाग होते :— **१. कुंडि. ३००** ( आधु. बेळगाव तालुका ); **२. तेरिडाळ** ( सांगली जिल्ह्यातील आधु. तेर्डाळ ); **३. अलगते ७००** ( कोल्हापुर जिल्ह्यातील आधु. आळते ); **४. सुगंधवर्ति** ( आधु. सौंदत्ती ); **५. कुंदरिगे कंपण** ( इंडि. अँटि. १४.२१; १६.१५ ).

**जैन शिलालेखात**—तेर्डाळ जैन शिलालेखमते आधु. सांगली जिल्हा हाच असून, याची राजधानी तेरिडाळ ( आधु. तेर्डाळ ) गावी होती ( इंडि. अँटि. १४.१६ ).

**कुण्डि ३०००** ( देशविभाग )—यादव शिलालेखमते कर्नाटकातील एक देशविभाग. फ्लीट यांच्या मते ' कुंडि ' देशाचा हा उपविभाग असून ( कुंडि पहा ), सांकलिया यांच्या मते आधु. बेळगाव तालुका हाच होय.

**नामांतरे**—प्राचीन शिलालेख साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतात:— १. शके ११७१ चा यादव शिलालेख–' कुहुंडिविषय '; २. शके ११७६ चा शिलालेख–' कुंडिमंडल '.

**उपविभाग**–शिलालेख साहित्यमते याचे निम्नलिखित उपविभाग होते:— **१ संयेय बागेवाडी** ( बेळगाव तालुक्यातील आधु. बागेवाडी; एपि. कर्ना. ११.५० ); **२. हुवळ्ळ १२** ( बागेवाडीपासून १० मैल आग्नेयेकडील आधु. मुगरखन हुवळ्ळि; एपि. कर्ना. ११.५० ); **३. वेणुग्राम विषय** ( आधु. बेळगाव शहर; सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २७४ ).

**कुण्डिका** ( तीर्थ )—सह्य पर्वतावरील एक तीर्थ ( नृसिंह. ६६.२५; २७ ).

**कुण्डिदेश** ( देशविभाग )–विक्रमादित्य ( द्वितीय ) च्या स. १००८ च्या कौथेम दानपत्रमते कुंतल देशातील 'कुंडि ' देशविभागाचे नामांतर ( इंडि. अँटि. १६.१५; कुंडि पहा ).

**कुण्डिनक्षेत्र** ( क्षेत्र )—वामन पुराण प्रह्लादतीर्थयात्रामते एक विष्णुतीर्थ ( वामन ८४.३५; तीर्थविवेचन. पृ. २३९ ). येथील विष्णूचे नाव ' कुंडिनेश्वर ' ( नृसिंह. ६५.१९ ) अथवा ' घ्राणतर्पण ' ( वामन. ९०.२४ ) होते. नामांतर–' विदर्भा ' ( अभिधान. ९६९ ).

२. एक सिद्धक्षेत्र ( ती. पृ. ५२८ ).

**कुण्डिनपुर** ( नगर )––महाभारतमते विदर्भराज आणि रुक्मिणीपिता भीष्मकाच्या राजधानीचे नगर ( म. आर. ६०.१९ ). भीष्मकपुत्र रुक्मिनने ही राजधानी याच्या दक्षिणेकडील भोजकट येथे हलविली ( म. उ. १५५.१४; ह. वं. २.६०.२; ३१–३२ ). विदर्भातील वर्ध्यानजिकच्या आर्वी गावापासून ६ मैलांवरील वर्धा नदीकाठचे आधु. कुंडलपुर हेच होय.

**नामांतरे**—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतात :–

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. ( शीलोञ्छ. १३९.१८३५; कल्पद्रु. ११.२९; शब्दरत्न. ५२.२८ ) | कुंडिनापुर |
| २. ( शब्दरत्न. ५२.२८ ) | कुंडिनी |
| ३. ( उणादि. ३३.६ ) | कुंडीन |
| ४. ( त्रिकाण्ड १६.१० ) | विदर्भ |
| ५. ( अभिधान. १३३.९७९; शब्दरत्न. ५२.२८ ) | विदर्भा |

**पाणिनीच्या गणपाठात**—या ग्रंथात याचा निर्देश आढळतो ( पा. सू. ४.२.९५ ).

**हरिवंशात**—या ग्रंथातील रुक्मिणीहरण– आख्यानमते हे नर्मदा नदीच्या दक्षिणेस असून, रुक्मिणीहरणानंतर द्वारकेस निघालेल्या कृष्णास त्या नदीकाठी रुक्मिन्, क्राथ, अंशुमत्, श्रुतर्वन आदि दक्षिणापथसम्राटांनी गाठले. त्यांचा पराजय करून कृष्णाने द्वारका येथे रुक्मिणीशी विवाह केला ( ह. वं २.६०.६ ).

मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात—या साहित्यात या नगराची विभिन्न नामांतरे दिली आहेत ( नामांतर परिपत्रक पहा ).

आधुनिक काळी—आधु. कुंडलपुरनजिकच्या पर्वतीय अंबिका मंदिराच्या गवाक्षामधून श्रीकृष्णाने पूजामिषाने आलेल्या रुक्मिणीचे हरण केले. याशिवाय येथे विठ्ठल-रखुमाई, तसेच पंचमुखी महादेवाची मंदिरे असून, स्थानिक आख्यायिकामते पंढरपूरचा विठोबा येथे आषाढी आणि कार्तिकी एकादशीला अवतरतो.

मतांतरे—स्थानिक आख्यायिकामते गुजरातमधील पोरबंदरनजिकचे आधु. समझेरा, तसेच उत्तर प्रदेशातील कानपुर-इटावा रेल्मार्गावरील अछल्दा रेल्वेस्थानकापासून ८ मैलांवरील आधु. कुदरकोट येथेहि रुक्मिणीहरणाची स्थाने दाखवितात. परंतु ऐतिहासिक दृष्ट्या ते असंभव वाटते.

२. ( जैन तीर्थ ) विविधतीर्थकल्पमते पूर्व भारतातील वैशालीनजिकच्या 'कुंडग्राम' जैन तीर्थाचे नामांतर ( कुंडग्राम पहा ).

**कुण्डिप्रथ** ( लिंग )—श्रीपर्वतावरील एक शिवलिंग ( लिङ्ग. १.९२.१४८ ).

**कुण्डिमण्डल** ( देशविभाग )—शिलालेख साहित्यमते कर्नाटकातील 'कुंण्डि ३०००' देशविभागाचे नामांतर ( कुंडि ३००० पहा ).

**कुण्डिवृष** ( देश )— महाभारतमते 'पुंड्राविष' देशाचे नामांतर ( म. भी. ५२.९; पुंड्राविष पहा ).

**कुण्डीन** ( देश )—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते मध्य भारतातील 'कुंडिनपुर' नगराचे नामांतर ( उणादि. ३३.६; कुंडिनपुर पहा ).

**कुण्डीमठ** ( मठ )—शृंगेरीच्या शंकराचार्यांचा एक उपमठ.

**कुण्डीविष** (लोकसमूह)—भारतीय युद्धान्तर्गत भीष्मविरचित क्रौंचव्यूहातील दक्षिण पक्षातील एक लोकसमूह (म. भी. ४६.४९ ).

**कुण्डेश्वर** ( कूप )—काशी येथील एक कूप ( स्कन्द. काशी. ९७.५६ )

**कुण्डेश्वर** ( लिंग )—काशी येथील एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ९७.१०५; लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. ६८ ).

२. अवंती येथील ८४ लिंगांपैकी ४० वे शिवलिंग ( स्कन्द. आवन्त्य. अ. ३१.७; च. लिं. ४० ).

३. ( तीर्थ व लिंग ) मध्यप्रदेशान्तर्गत बुंदेलखंडातील टिकमगढपासून ४ मैलांवरील जमदार नदीच्या उत्तर किनाऱ्यावरील एक पर्वतीय शिवलिंग. स्थानिक आख्यायिकामते धंती नामक खाटिक स्त्रीला ( इ. स. १५ वे शतक ) येथील कुंडामध्ये सापडलेले हे लिंग तुंगारण्यात श्रीमद्भागवत-प्रवचनार्थ आलेल्या श्रीवल्लभाचार्यांनी समारंभपूर्वक स्थापिले. 'कुंडात सापडलेले' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले ( ती. प्र. २१० ).

**कुत्तालम्** ( जलप्रपात आणि शिवमंदिर )—तामीळनाडमधील तिनेवेल्ली जिल्ह्यातील तेंकाली गावापासून ३½ मैलांवरील एक जलप्रपात आणि शिवमंदिरस्थान. पांड्य राजा मारवर्मन् वीरपांड्यच्या स. १४६ च्या शिलालेखमते त्याने येथील कुत्तालेश्वर मंदिराची दुरुस्ती केली असून ( रंगाचारी, ३. तिनेवेल्ली. ३४३; त्रावणकोर. आर्कि. सर्व्हे. १.१०२ ), पेशव्यांच्या स. १७५४ च्या तिनेवेल्ली शिलालेखमते त्यांच्या सैन्याने या मंदिरास देणगी दिली होती ( रंगाचारी, ३. तिनेवेल्ली. ३४० ).

**कुथप्रावरण** ( देश )—पौराणिक साहित्यमते पूर्ववाहिनी पावनी ( मत्स्य–'नलिनी' ) नदीच्या मार्गावरील एक देश ( ब्रह्माण्ड. १८.५७; वायु. ४७.५५; मत्स्य. १२१.५६ ).

२. पौराणिक साहित्यमते हिमालय पर्वतान्तर्गत 'कर्णप्रावरण' देशाचे नामांतर ( मत्स्य. ११४.५६; वामन. १३.५८; कर्णप्रावरण पहा ). पाठभेद–'कुंतप्रावरण' ( मार्कं. ५४.२७ ).

**कुथोदॉ** ( बृहद्भारतीय बौद्ध स्थान )—ब्रह्मदेशसम्राट मिंदान मिन्ने ( इ. स. १० वे– ११वे शतक ) बांधलेले ब्रह्मदेशातील सुविख्यात बौद्ध स्तूपस्थान ( शब्दशः अर्थ–सहस्र बौद्ध स्तूप ).

**स्तूप**—परंपरागत ब्रह्मी स्तूपासदृश घंटाकृती आणि अतिउंच कळसयुक्त ( झेदी ) अशा या स्तूपाभोवती छोट्या मंदिरांच्या तीन समांतर रांगा असून, त्यांमध्ये बौद्ध ग्रंथातील बौद्ध प्रवचनांचे संगमरवरी शिलालेख देवतामूर्ती म्हणून स्थापिले आहेत. ही मंदिरे स्तूपापेक्षा उत्तरकालीन ( स. १८५७–१८६४ ) असून, स्तूपाच्या चतुर्दिशांस कंबूज ( आधु. कंबोडिया ) देशीय मंदिरांसदृश चार भव्य कमानी, आणि अंतर्भागात बाह्यमंडप आहेत. मंडपाच्या दोन्ही अंगांस छोट्या खोल्या, आणि माथ्यावर दुमजली इमारत आहे ( फर्ग्युसन, २.३५२ ).

**कुदुमियामलै** ( मंदिरस्थान )—पांड्य राजांनी चोल शैलीने बांधलेले दक्षिण भारतातील एक शिल्पसमृद्ध देवमंदिरस्थान.

**कुदेशहर** ( तीर्थ )—अल्बेरुणीच्या मते कश्मीरातील 'कपटेश्वर' शिवतीर्थाचे नामांतर ( अल्बेरुणी, २.१८१; कपटेश्वर पहा ).

**कुद्राहार** ( देशविभाग )—शालंकायन राजा स्कंदवर्मनाच्या कोनुकोल्लु ताम्रपटमते दक्षिण भारतातील एक देशविभाग. आंध्र प्रदेशातील कृष्णा जिल्ह्यातील आधु. गुडिवाड प्रदेश हाच होय. यामध्ये कोंपर नामक ग्राम होते. नामांतर–'गुद्राहार' ( एपि. इंडि. ३१.९–१० ).

**कुनह** ( लोकसमूह )—बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या ईशान्य भागातील खश देशसमीपवर्ती एक लोकसमूह ( बृ. सं. १४.३० ). चौधरी यांच्या मते गढवालच्या वायव्येकडील आणि कुलू खोऱ्याच्या पूर्वेकडील सतलज खोऱ्यातील आधु. कुनौर ( कुन्वर ) प्रदेश हाच असून, त्यानजिकच खश लोकांचा आद्य वसाहतस्थानस्वरूप आधु. नरि–खोर्सम् प्रदेश आहे ( चौधरी, पृ. १२८ ). नामांतर–'कुनट' ( म. भी. १०.५० ); 'कुनठ'; 'कुनह'; 'कुणप'.

**कुनामत** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.११६ ).

**कुनास** ( देश )—ब्रह्माण्डमते दक्षिणापथमधील 'कुपथ' देशाचे नामांतर ( कुपथ पहा ).

**कुन्तप्रावरण** ( लोकसमूह )—मार्कंडेयमते वायव्य भारतातील 'कर्णप्रावरण' लोकसमूहाचे नामांतर ( मार्कं. ५७.५७; कर्णप्रावरण पहा ).

**कुन्तल** ( देश )—पौराणिक साहित्यमते दक्षिणापथ देशान्तर्गत ( आधु. सातपुडा, महादेव–मैकल पर्वतांच्या दक्षिणेकडील द्वीपकल्पीय प्रदेश ) दख्खन पठारातील कर्नाटकातील एक जनपद ( पद्म. आदि. ६.५४; मार्कं. ५४.४८; वायु. ४५.१२७; काव्यमी. १७.२२६). ब्रह्माण्डमते हा 'अपरांत' असून ( ब्रह्माण्ड. १६.६० ), मध्ययुगीन शिलालेख, तसेच अन्य साहित्यात यास 'कर्नाट' ( कर्नाटक ) म्हटले आहे ( बूलर, विक्रमाङ्क. पृ. २७; कर्नाट पहा ).

आधु. दक्षिण महाराष्ट्र आणि उत्तर कर्नाटकव्यापी हा देश महाराष्ट्राच्या तीन परंपरागत उपविभागांपैकी असला ( अन्य दोन उपविभाग– 'महाराष्ट्र', 'विदर्भ' ), तरी सातवाहन राज्यकाली ( इ. स. २ रे शतक ) त्यांच्या बालेकिल्ल्याचा हा प्रदेश स्वतंत्र देश म्हणून सुविख्यात झाला. पश्चिम चालुक्य, राष्ट्रकूट, वाकाटक आणि यादव राज्यकाली हा त्या त्या साम्राज्यात समाविष्ट असून, कर्नाटकातील हा प्रसिद्ध देश चालुक्य राज्याचा बालेकिल्ला होता. त्यामुळेच ते राजे स्वतःस अभिमानाने 'कुंतलाधिप', 'कुंतलेंद्र' अथवा 'कुंतलेंदु' म्हणवीत असत.

विजयनगर साम्राज्याचाहि हा बालेकिल्ला असून, हरिहर ( द्वितीय ) च्या शके १३०७ च्या शिलालेखमते विजयनगर ( आधु. हंपे ) हे त्याचे राजधानीनगर या देशातच होते.

व्याप्ती—अली यांच्या मते उत्तर तुंगभद्रा, तसेच हगरी आणि हिंद्री संज्ञक तिच्या उपनद्यांच्या जलसंचय प्रदेशांनी बनलेल्या या देशात म्हैसूर प्रांतातील आधु. धारवाड आणि बेल्लारी जिल्हे, तसेच आंध्र प्रदेशातील अनंतपूर आणि रायचूर जिल्ह्यांचा काही भाग समाविष्ट असून, विजयनगर ( आधु. हंपे ) परिसर यांचा बालेकिल्ला होता ( अली, पुराणाज्. पृ. १५४ ).

डॉ. काणे यांच्या मते उत्तरेस भीमा-कृष्णा आणि दक्षिणेस तुंगभद्रा नद्यांच्या दरम्यानच्या प्रदेशातील या देशात आधु. कोल्हापूर, मिरज, बेळगाव, उत्तर कॅनरा आणि धारवाड जिल्हे, तसेच मराठवाडा आणि म्हैसूर प्रांताचा काही भाग समाविष्ट असून, बेळगाव आणि धारवाड जिल्हे याचा बालेकिल्ला होता ( जे. बी. बी. आर्. ए. एस्.; स. १९१७; पृ. ६४४–६४६ ).

**मतांतरे**—याच्या व्याप्तीविषयी अभ्यासकांमध्ये निम्नलिखित मतांतरे आढळतात :—

( १ ) **डॉ. फ्लीट यांच्या मते**—या देशात निम्नलिखित गावांचा समावेश होत असे :— १. उत्तर कॅनरा जिल्ह्यातील बनवासी; २. म्हैसूर राज्यातील हरिहर; ३. बेल्लारी जिल्ह्यातील हंपे ( प्राचीन विजयनगर ); ४. धारवाड जिल्ह्यातील हांगल, लक्ष्मेश्वर, लक्कुंदि आणि गदग गावे; ५. बेळगाव जिल्ह्यातील बेळगाव, सौंदत्ती, मणोलि आणि कुन्नूर गावे; ६. विजापुर जिल्ह्यातील विजापुर, कल्याणी, पत्तदकल आणि ऐहोळे गावे; ७. सांगली जिल्ह्यातील तेर्डाळ ( बॉबे गॅझे. १. ४३१ ).

( २ ) **डॉ. राइस यांच्या मते**—उत्तरेस भीमा आणि दक्षिणेस वेदवती नद्या, तसेच पश्चिमेस पश्चिम घाट यांच्या दरम्यानच्या या देशात म्हैसूर राज्यातील आधु. शिमोगा आणि चितळदुर्ग जिल्हे, कर्नाटकातील बेल्लारी, धारवाड आणि विजापुर जिल्हे, तसेच मराठवाड्याच्या काही

भागांचा समावेश होत असे (जे. आर. ए. एस.; स. १९१४; पृ. ३३०).

(३) डॉ. बर्जेस् यांच्या मते—चालुक्यकालीन कुंतल देशात उत्तरेस नर्मदा आणि दक्षिणेस तुंगभद्रा नद्या, तसेच पश्चिमेस अरबी समुद्र आणि पूर्वेस पूर्वघाट आणि गोदावरी नदी यांच्या दरम्यानच्या प्रदेशाचा समावेश होता (आर्कि. सर्व्हे. वे. इं. ३.७३). विदर्भासहित साऱ्या महाराष्ट्राचा समावेश या व्याप्तीमध्ये होत असल्याने ते असंभव वाटते.

(४) डॉ. रामकृष्ण भांडारकर यांच्या मते—चालुक्योत्तर काळी दक्षिण महाराष्ट्राच्या मर्यादित प्रदेशास हे नाव दिले जात असे (भांडारकर, महाराष्ट्र इतिहास. पृ. १२).

उपविभाग—प्राचीन आणि मध्ययुगीन साहित्यमते या देशाचे निम्नलिखित प्रमुख उपविभाग होते (परिपत्रक पहा).

नामांतरे—प्राचीन साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. टॉलेमी | कंदलोइ |
| २. विक्रमांक देवचरित | कर्नाट |
| ३. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य (अभिधान. १३०.९६१; शब्दरत्न. ४७.३; वैजयन्ती. ३७.६५) | उपहालक |
| ४. वात्स्यायन कामसूत्रटीका | कुंतल विषय |
| ५. चालुक्य राजा सोमेश्वर (चतुर्थ) चा ११८९ चा शिलालेख (एपि. कर्ना. ८. १७९) | कुंतल विषय |
| ६. विजयनगरच्या हरिहर (द्वितीय)चा शके १३०७ चा शिलालेख | कुंतल विषय |

नामव्युत्पत्ती—डॉ. काणे यांच्या मते 'भाला' (कुंत)—युद्धप्रवीण' अथवा 'सुशोभित केश (कुंतल) युक्त' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले असावे. या नाम-सादृश्याधारित उभय व्युत्पत्ती ऐतिहासिक दृष्ट्या असंभव वाटतात.

महाभारतात—या ग्रंथान्तर्गत जनपदनामावलीतील याच्या पुनरुक्त निर्देशावरून (म. भी. १०.३८; ६४; पद्म. आदि. ६.४७) महाभारतकाली दोन कुंतल देश अस्तित्वात असावेत (कुंतल २. पहा). येथील राजा युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयी उपस्थित असून (म. स. ३१.११), श्रीकृष्णाने कर्णाला वश करण्यासाठी या देशाचे राज्य देऊ केले होते (म. उ. १३८. २५). भारतीय युद्धात येथील योद्धे भीष्मरक्षणाचे कार्य करीत होते (म. भी. ४७.१२). यावरून या ग्रंथकाली हा दक्षिण भारतातील महत्त्वपूर्ण देश असावा.

बृहत्संहितेत—या ग्रंथमते हा दक्षिण भारतातील देश असून (बृ. सं. १६.११), काव्यमीमांसामते येथील एका सातवाहन राजाने अंतःपुरातील स्त्रियांना प्राकृत भाषा-व्यवहाराची सक्ती केली होती (काव्यमी. पृ. ५०). काव्यमीमांसा टीकामते येथे हाल सातवाहनाचा निर्देश अभिप्रेत आहे (काव्यमी. टीका. पृ. ९).

पौराणिक साहित्यात—या साहित्यात सर्वत्र (अपवाद-ब्रह्माण्ड पुराण) यास दक्षिणापथमधील देश म्हटले असून, तारातंत्रमते हे 'महाराष्ट्र'चेच वैकल्पिक नाव होते. मत्स्य-मते या देशावर 'महाराष्ट्रचक्रवर्ती' सातवाहनवंशीय कुंतल स्वातिकर्ण (शातकर्णी) राजाचे राज्य असून (मत्स्य. २७३.३), वात्स्यायन कामसूत्र (इ. स. ३ रे शतक) मते या राजाने मलयवती नामक राणीचा कात्रीच्या साह्याने खून केला होता (का. सू. अ. ३). वात्स्यायन कामसूत्रटीकामते 'कुंतल देशोत्पन्न (विषय) शातकर्णी' अशा अर्थाने त्यास हे नाव प्राप्त झाले. जयचंद्र यांच्या मते येथे चुटु शातकर्णी राजाचा निर्देश अभिप्रेत आहे.

अन्य ग्रंथात—दशकुमारचरितमते हा विदर्भ राजाचा मांडलिक देश असून (दशकुमार. ८), राजशेखरकृत कर्पूरमंजरीमते विदर्भ हा या देशाचा मांडलिक होता (कर्पूर. १). दशकुमारचरित, तसेच काव्यमीमांसामते कर्नाटकातील चालुक्य प्रदेश 'कुंतल' नावाने प्रसिद्ध असून, बिल्हणकृत विक्रमांकदेवचरितमते चालुक्य राजा विक्रमादित्य (षष्ठ) 'कुंतलेंदु', 'कुंतलेंद्र', 'कर्नाटेंदु' उपाधींनी सुविख्यात होता. कल्याणी येथील चालुक्य राजे स्वतःस 'कुंतलसम्राट' म्हणवीत असत.

टॉलेमीच्या ग्रंथात—या ग्रंथामध्ये या (कंदलोइ) लोकांची आदिवासी गोंड लोकांशी गल्लत केली असून, यूल यांच्या मते कुंतल देशाचाच निर्देश येथे अभिप्रेत आहे.

शिलालेख साहित्यात—चालुक्य राजा त्रिभुवनमल्लाच्या

## कुंतल देशाचे उपविभाग

| उपविभाग | आधु. भौगोलिक स्थान | अंगभूत गावे | शिलालेखीय निर्देश |
|---|---|---|---|
| १. बनवासी | उत्तर कॅनरा जिल्हा | — | प्रबोधशिव राजाचा गुर्गि शिलालेख ( एपि. इंडि. २२. १३५ ). |
| २. कुंडि देश | सांगली जिल्हा | १. तेरिडाल १२ ( आधु. तेर्डाळ ); २. सुगंधवर्ति ( आधु. सौंदत्ती ) | गोंक राजाचा स. ११२३ चा तेर्डाळ शिलालेख ( इंडि. अँटि. १४.२१ ) |
| ३. बेल्वोळ | धारवाड जिल्ह्यातील नवल्गुंद तालुका | नरुगुंद अग्रहार ( आधु. नवल्गुंद ) | स. ११४७ चा शिलालेख |
| ४. तोरगळे | मलप्रभा ( प्राचीन मलप्रहारी) नदीकाठचा प्रदेश | — | स. ११८७ चा शिलालेख ( इंडि. अँटि. १२.९८ ) |
| ५. लक्किगुंदि | धारवाड जिल्ह्यातील लक्कुंदि | — | स. ११९२ चा शिलालेख ( इंडि. अँटि. २.३०० ) |
| ६. कुहुंडि | हुबळी जिल्हा | हुबळिग्राम ( आधु. हुबळी ) | कन्हर यादवाचे १२४९ चे दानपत्र |
| ७. विजयनगर | हंपे | — | हरिहर ( द्वितीय ) चा स. १३०७ चा शिलालेख |
| ८. अजंटा | अजंटा | — | अजंटा शिलालेख ( आर्कि. सर्व्हे. वे. इं. ४.१२६–१२७ ) |

स. १०७७ च्या येवूर शिलालेखमते या देशातून 'कृष्णवेर्णा' (कृष्णवेणा) नदी वहात असून (इंडि. अँटि. १०.२५०), बनवासीच्या मयूरवर्मन् कदंब राजाच्या शिलालेखमते अठरा अहिच्छत्रनिवासी ब्राह्मण त्याने या देशात आणविले होते ( इंडि. अँटि. १०.२५३ ). यावरून कृष्णवेणा नदी आणि बनवासी देश या देशामध्ये समाविष्ट असावेत. पश्चिम चालुक्य राजा सोमेश्वर ( चतुर्थ )च्या स. ११८९ च्या शिलालेखात यास 'कुंतल विषय' म्हटले असून (एपि. कर्ना. ८.१७९), वाकाटक राजे पृथिविषेण आणि हरिषेणाच्या अजंटा शिलालेखमते त्यांनी हा देश जिंकला होता ( जे. आर. ए. एस्., स. १९१४; पृ. ३२४–३२७ ). यावरून वाकाटककाली अजंटा प्रदेशहि यामध्ये समाविष्ट असावा.

**चोल शिलालेखात**—या शिलालेखमते हे पश्चिम चालुक्य राज्याचे नामांतर असून, चोल राजा कुलोत्तुंग (प्रथम) च्या स. १०७४ च्या कांजीवरम् शिलालेखमते त्याने हा जिंकला होता ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. ३.१२५ ). बिल्हणाच्या विक्रमांकदेवचरितमते कुंतलनरेश पश्चिम चालुक्यसम्राट विक्रमादित्य ( षष्ठ ) ने अधिराजेंद्र चोल नामक मेहुण्याच्या मृत्यूनंतर चोल राजधानीवर हल्ला केला. परंतु सोमेश्वर ( द्वितीय ) नामक ज्येष्ठ बंधूच्या फितुरीमुळे तो तुंगभद्रा नदी ओलांडून स्व-राज्यास परतला. चोल शिलालेखमते पश्चिम चालुक्य आणि चोल राजांची ही लढाई गंग देशान्तर्गत माणलूर येथे झाली ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ८५ ).

**अन्य शिलालेखात**—त्रिपुरी येथील कलचुरि राजा कोकल्लदेव (द्वितीय)च्या इ. स. १० व्या शतकातील शिलालेखमते त्याने ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.२५५ ), तसेच कलचुरि राजा कर्णच्या स. १०४७ च्या गोहरवा ताम्रपटमते त्याचा पिता गांगेयदेवाने हा देश जिंकला होता ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.२९१ ). वेलनांटि गोंक (द्वितीय) च्या स. ११६१ च्या द्राक्षाराम शिलालेखातहि असाच निर्देश आढळतो ( एपि. इंडि. २९.२३५ ).

**मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात**—या साहित्यात

सर्वत्र याचा निर्देश आढळतो ( अनेकार्थ. सं. १०१.६७६; मंख. ६१.८४५; मेदिनी. १६३.७९; अभिधान. १३०. ९६१; त्रिकाण्ड. २२८.३८९; शब्दरत्न. ३०४.८; वैज. ३७.६५; ३८.७९ ).

राजधानी—बर्जेस् यांच्या मते इतिहासाच्या विभिन्न काली याची राजधानी नासिक आणि कल्याणी गावी असून ( इंडि. अँटि. २२.१८२ ), जयचंद्र यांच्या मते याची राजधानी वैजयंती ( उत्तर कॅनरा जिल्ह्यातील आधु. बनवासी ) गावी होती ( जयचंद्र, पृ. २०० ).

२. पौराणिक साहित्यमते भारतवर्षाच्या मध्यदेशातील ( आधु. गंगा नदीखोरे ) काशि जनपदानजिकचा एक देश ( ब्रह्माण्ड. १६.४१; मत्स्य. ११४.३५; मार्कं. ५४.३२; वायु. ४५.११० ). गंगायमुना नद्यांच्या दक्षिणेकडील महत्त्वपूर्ण देशद्वयापैकी हा एक असून ( अन्य देश–मगध ), पार्गिटर आणि कनिंगहॅम यांच्या मते गंगा–शोण दुआबातील ( उत्तर प्रदेशातील आधु. मिर्झापुर जिल्हा ) जंगलव्याप्त चुनार प्रदेश हाच होय.

**महाभारतात**—या ग्रंथमते हा उत्तर भारतीय लोकसमूह कोशल लोकांनजिक रहात असे ( म. भी. १०.६४ ).

३. मेरु पर्वतोद्भवा चतुर्गंगांपैकी पश्चिमवाहिनी सीता नदीच्या मार्गावरील एक देश ( ब्रह्माण्ड. १८.४४; वायु. ४७.४२ ).

**कुन्तलकपुर** ( नगर )—' जैमिनि भारतम् ' तामील ग्रंथमते कुंडलनरेश चंद्रहासाच्या राजधानीचे गाव. जैमिनि अश्वमेधमते हे चंद्रहासपत्नी चंपकमालिनीचे गाव असून, चंद्रहास–राजधानी चंदनावती येथून ६ मैलांवर होती ( जै. अ. ५२ ). म्हैसूर राज्यातील शिमोगा जिल्ह्यातील आधु. कुब्बतूर हे चालुक्य देवमंदिरस्थान हेच असून, यानजिकच्या बल्गामी येथेहि अनेक चालुक्य मंदिरे आढळतात ( फर्ग्युसन, १.४४२ ). नामांतर– ' कुंतलपुर '; ' कौंतलपुर '; 'कौंतलकपुर '.

**मतांतरे**— गुजरातमधील खेडा जिल्ह्यातील आधु. सरताळ गाव हेच असल्याचा कझिन्स यांचा तर्क ( अँटि. रिमेन्स ८.९४ ). भौगोलिक दृष्ट्या असंभव वाटतो. अन्य अभ्यासकांच्या मते नागपूर जिल्ह्यातील आधु. काटोल हेच असून, चंद्रहास–जीवनातील चंडिका मंदिर आजहि तेथे दाखवितात.

**कुन्तलपुर** ( नगर )—शिलालेख साहित्यमते उत्तर भारतातील एक नगर. कनिंगहॅम यांचे मते आधु. ग्वाल्हेर प्रदेशात हे असावे ( आर्कि. सर्व्हे. २०.११२ ).

२. गुजरातमधील ' वटोदरपुरी ' ( आधु. बडोदा ) नजिकचे एक नगर. कनिंगहॅमच्या मते बडोद्यापासून ६ मैलांवरील खेडा जिल्ह्यातील आधु. सरताळ गाव हेच होय.

**कुन्तलेश्वर** ( लिंग ) — काशी येथील ज्येष्ठेश्वरानजिकचे एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ६५.१७ ).

**कुन्ति** ( देश )—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते उत्तर भारतातील एक ' एकराज ' जनपद ( पा. सू ४.१.१७६). अग्रवाल यांच्या मते उत्तर प्रदेशातील यमुना-चंबळ दुआबान्तर्गत ग्वाल्हेर प्रदेशातील मुरैना जिल्ह्यातील आधु. ' कोतवार ' ( प्राचीन ' कुंतिभोजपुरी ' ) गावाच्या परिसरातील प्रदेश हाच होय. मध्ययुगीन काली हा गोपगिरि नावाने प्रसिद्ध झाला ( गोपगिरि पहा ). नामांतर ( महाभारत )–' कुंतिभोज ' ( म. स. २८.६; बृ. सं. १०. १५ ); ' कुंतिक ' ( म. भी. १०.५८ ).

**नामव्युत्पत्ती**— महाभारतमते ' कुंतिभोज राजाचा देश ' अशा अर्थाने यास हे ( कुंति, कुंतिभोज ) नाव प्राप्त झाले ( म. आ. १०४.३; १३;१०५.१.३). 'कुंतिभोज'चा शब्दशः अर्थ ' कुंति लोकांचा श्रेष्ठ देश ' असून, या देशनामावरून कुंतिभोजकन्या पांडवमाता पृथेस ' कुंती ' नाव मिळाले.

**पाणिनीच्या गणपाठात**—या ग्रंथात ' कुंति-सुराष्ट्र ' या देशद्वयाचा निर्देश ' चिंति-सुराष्ट्र ' आणि ' अवंति-अश्मक ' देशद्वयांसमवेत आढळतो ( पा. सू. ६.२.३७ ). अग्रवाल यांच्या मते मही नदीपासून चंबळ नदीपर्यंतचा सारा प्रदेश प्राचीन काळी ' सुराष्ट्र ' नावाने प्रसिद्ध असून, 'बृहत्सुराष्ट्र' देशान्तर्गत कुंति, चिंति, अवंती, अश्मक आणि सुराष्ट्र या पाच देशांचा निर्देश येथे अभिप्रेत आहे. त्यापैकी चंबळपासून तोन्स नदीपर्यंतचा प्रदेश आजहि ' बुंदेलखंड ' सामूहिक नावाने प्रसिद्ध आहे.

**महाभारतात**—या ग्रंथमते अवंती देशानजिकच्या या देशातून अश्व नदी ( चंबळ नदीची आधु. कुमारी नामक उपनदी ) वहात असे. युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसनयीच्या दक्षिण दिग्विजयात सहदेवाने अश्व आणि चर्मण्वती नदीकाठचा हा देश जिंकला असून ( म. स. २८.६ ), मगधराज जरासंधभयाने येथील लोक दक्षिणेस स्थलांतरित झाले होते ( म. स. १३.२५ ). कुंतिभोजकन्या कुंतीने अश्वनदीमध्ये सोडलेला कर्ण अश्व नदी → चर्मण्वती→ यमुना → गंगामार्गे सूत देशान्तर्गत चंपा नगरीप्रत वहात गेला होता ( म. आर. २९२.२५-२६ ).

पांडवांच्या अज्ञातवासकाली इंद्रप्रस्थाच्या दक्षिणेकडील या विस्तीर्ण देशाने (कुंतिराष्ट्र) त्यांना आमंत्रिले होते (म. वि. १३*). महाभारतातील जनपदनामावलीत याचा 'कुंति' (म. भी. १०४१) आणि 'कुंतिक' (म. भी. १०.५८) वैकल्पिक नावांनी निर्देश आढळतो.

अग्रवाल यांच्या मते महाभारतकाली हा देश सुराष्ट्र देशाशी भौगोलिक आणि राजकीय दृष्ट्या संबद्ध असून, कुंतिसम्राट दंतवक्राच्या, तसेच चेदिसम्राट शिशुपालाच्या सुराष्ट्रनिवासी कृष्णप्रमुख यादवकृत पराजयानंतर तत्रस्थ गोप लोक या देशात स्थायिक होऊन या देशद्वयास 'कुंति-सुराष्ट्र' आणि 'चिंति (चेदि)-सुराष्ट्र' संयुक्त नावे प्राप्त झाली. याच्या 'गोपालगिरि' वैकल्पिक नावाचे कारणहि बहुधा हेच असावे (अग्रवाल, पाणिनि. पृ. ७५).

**पौराणिक साहित्यात**—बृहत्संहितेमध्ये 'कुंतिभोज' चा निर्देश असून (बृ. सं. १०.१५), विष्णुधर्ममते हा भारतवर्षान्तर्गत मध्यदेशात होता (विष्णुधर्म. १.२.२). पद्म पुराणान्तर्गत जनपदनामावलीतील याच्या पुनरुक्त निर्देशावरून (पद्म. आदि. ६.३५; ३८) या नावाचा अन्य एक देशहि तत्काली असावा.

**कुन्ति-सुराष्ट्र** (देशद्वय)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षान्तर्गत एक देशद्वय (पा. सू. ६.२.३७, कुंति पहा).

**कुन्ती तीर्थ** (तीर्थ)—उत्तर प्रदेशातील वनवासी कुंतीवास्तव्यपुनीत एक तीर्थ. बाराबंकी जिल्ह्यातील रामनगर–दरियाबाद रेलमार्गावरील बुढवल रेल्वेस्थानकापासून ७ मैलांवरील आधु. किंतूर गाव हेच होय. कृष्णनिर्याणानंतर अर्जुनाने द्वारका येथील पारिजात वृक्ष येथे आणला (ती. पृ. १४१).

२. दक्षिण भारतातील एक तीर्थ. तंजोर जिल्ह्यातील आधु. नल्लूर गाव हेच होय (ती. पृ. ३६८).

३. (नदी) मत्स्यमते परियात्र पर्वतोद्भवा एक नदी (मत्स्य. ११४.२४; विष्णुधर्म. १.१०.९).

**कुन्तीपुर** (तीर्थ)—मध्यप्रदेशातील नर्मदा–हत्याहरण–संगमस्थानानजिकचे वनवासी कुंतीवास्तव्यपुनीत एक तीर्थ. टिघरियापासून ४ मैलांवरील नर्मदा नदीच्या दक्षिण तीरवर्ती आधु. कुलेराघाट हेच होय (ती. पृ. २२९).

**कुन्तीश्वर** (लिंग)—प्रभासक्षेत्रान्तर्गत ऊर्जयंत पर्वतावरील एक शिवलिंग (नारद. उत्तर. ७०.५०; ८६; स्कन्द. प्रभास. प्र. १७४)

२. काशी येथील एक शिवलिंग (स्कन्द. काशी. ९७.१८).

**कुन्त्य** (देश)—दक्षिण भारतातील एक देश (मार्कं. ५४.४५).

**कुन्थुगिरि** (जैन तीर्थ)—निर्वाणकांड आणि मेघराजमते कुलभूषण आणि देशभूषण नामक रानकृपापात्र जैन मुनींचे तपस्यास्थान आणि मुक्तिस्थान, एक जैन सिद्धक्षेत्र. महाराष्ट्रातील कुर्डुवाडी–लातूर रेलमार्गावरील बार्शी रेल्वेस्थानकापासून २२ मैल अंतरावरील आधु. कुंथलगिरि टेकडी हीच होय.

**नामांतरे**— जैन साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतातः—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. निर्वाणकांड | वंशगिरि |
| २. ज्ञानसागर | वांसिनयर (वंशस्थल) |
| ३. जयसागर | वंशगिरि (वंशाचल) |
| ४. रविषेण | } रामगिरि |
| ५. जिनसेन | |

**नामव्युत्पत्ती**— रविषेण आणि जिनसेनमते 'रामनिर्मित जैन मंदिरस्थान' अशा अर्थाने यास 'रामगिरि' वैकल्पिक नाव मिळाले.

**जैन साहित्यात**— जयसागर आणि ज्ञानसागर यांच्या ग्रंथात तेर (आधु. धाराशिव) जैन तीर्थासमवेत याचा निर्देश असून, रविषेण आणि जिनसेनमते हे दंडकारण्यात (गोदावरी-कृष्णा नद्यांचा दुआब) होते. त्यावरून हे महाराष्ट्रातच असल्याचे सिद्ध होते. काही अभ्यासकांच्या मते आधु. बार्शी हे याचेच (वांसिनियर) अपभ्रष्ट रूप आहे.

**आधुनिक काळी**— या जैन संतांच्या चरणपादुकायुक्त स्थानाचा ईडरनिवासी भदंत कनककीर्तींने वि. सं. १९३२ मध्ये जीर्णोद्धार करून येथे दहा मंदिरे बांधली. येथील जैन आश्रमात आचार्य शांतिसागर निवास करीत असत.

**मतांतरे**— प्रा. ज्योतिप्रसाद जैन यांच्या मते आंध्र प्रदेशातील विजगापट्टम् जिल्ह्यातील विजयानगरम् गावानजिकचा जैन गुफामंदिरयुक्त आधु. रामकोंड पर्वत हाच असावा (जैन सिद्धान्तभास्कर. २०.१). उग्रादित्य

आचार्यांच्या 'कल्याणकारक' नामक वैद्यक ग्रंथमते वेंगी साम्राज्यान्तर्गत त्रिकलिंग प्रदेशातील रामगिरि पर्वतावर त्याची रचना झाली (जैन साहित्य और इतिहास. पृ. ४४६–४४७). यावरून आद्य कुंथुगिरि आंध्र प्रदेशात असून, मध्ययुगात महाराष्ट्रातील कुंथलगिरि जैन तीर्थ प्रचारात आले असावे (ती. सं. पृ. १३०–१३२).

**कुन्द** (पर्वत)—भागवतमते शाल्मलि द्वीपातील एक पर्वत (भा. ५.२०.१०).

**कुन्दमान** (देश)— महाभारतमते युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयी उपायनांसहित उपस्थित असणारा भारतवर्षातील एक लोकसमूह (म. स. ४७.१३).

**कुन्दल** (देश)—दक्षिणापथातील एक देश (वामन. १३.५०).

**कुन्दलिकाभल** (देशविभाग)— सेंद्रकराज जयशक्तीच्या शके ६०२ च्या मुंदखेडे ताम्रपटमते महाराष्ट्रातील एक देशविभाग. धुळे जिल्ह्याच्या पश्चिम सीमेनजिकच्या नांदगावपासून १४ मैल पश्चिमेकडील आधु. कुंदलगाव हेच असावे (एपि. इंडि. २९.११९).

**कुन्दवन** (वन)— मथुरा येथील द्वादश वनांपैकी तृतीय वन (वराह. १५३.३५; १६१.६).

**कुन्देझ** (देश)— बाबरच्या आत्मचरित्रमते मध्य आशियातील 'कुओह' देशाचे नामांतर (कुओह पहा).

**कुन्नूर** (नगर)— पांड्य राजा श्रीमारच्या शिन्नमानूर दानपत्रमते त्याने जिंकलेले सिलोनमधील एक नगर (रंगाचारी, २.३६७).

**कुन्यतालडह** (देश)— मार्कंडेयमते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या वायव्य भागातील एक देश (मार्कं. ५५. ३९). नामांतर-'कन्यकागुण'; 'रस्यकागण' (म. भी. १०.५१). पार्गिटर यांच्या मते हे 'कुलूत' (म. क. ८.३५), 'कुलत्थ' (कुंतल; म. भी. १०.६४), अथवा 'लडक' (म. भी. ४६.४९)चे नामांतर असावे (पार्गि., मार्कं. पृ. ३७५).

**कुपथ** (देश)—मत्स्यमते भारतवर्षान्तर्गत दक्षिणापथमधील (आधु. सातपुडा, महादेव, मैकल पर्वतांच्या दक्षिणेकडील द्वीपकल्पीय प्रदेश) दख्खन पठारातील एक जनपद (मत्स्य. ११४.४७). अली यांच्या मते कर्नाटकाच्या आग्नेय कोपऱ्यातील आणि पांड्य–चोल देशांच्या पश्चिमेकडील पठारी प्रदेशातील आधु. कोईमतूर जिल्हा, आणि सालेम जिल्ह्याचा काही भाग म्हणजे हा देश होय (अली, पुराणाज्.पृ. १५४).

नामांतरे—पौराणिक साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. वायु पुराण | कुमन |
| २. ब्रह्माण्ड पुराण | कुनाल |
| ३. मार्कंडेय पुराण | कुसुम |
| ४. अन्य साहित्य | कुमार |

२. सप्तगंगांपैकी पूर्ववाहिनी नलिनी नदीच्या मार्गावरील एक देश (मत्स्य. १२१. ५५).

३. सप्तगंगांपैकी पश्चिमवाहिनी सिंधु नदीच्या मार्गावरील एक देश (मत्स्य. १२१.४७).

४. हिमालयातील एक देश (ब्रह्माण्ड. १६.६७; मत्स्य. ११४.५५; वामन. १३.५७).

**कुपर** (पर्वत)— जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वताच्या पूर्ववर्ती एक पर्वत (लिङ्ग. ४९.४१).

**कुपिका** (ग्राम)—ईश्वरात राजाच्या आज्ञापत्रमते पश्चिम भारतातील एक ग्राम. छोटा उदयपूरच्या २० मैल आग्नेयेकडील आधु. वांकद गावानजिक हे असावे (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४. २.६०४).

**कुप्पे** (ग्राम)— विक्रमादित्याच्या स. ११७७ च्या वायव्य म्हैसूर शिलालेखमते त्याने वेढा घातलेले म्हैसूर प्रांतातील एक ग्राम (एपि. कर्ना. ८.१७४). देवगिरीच्या रामचंद्र यादवकालीन स. १२८४ च्या शिलालेखातहि याचा निर्देश आढळतो (एपि. कर्ना. ८.३१). याचे आधु. स्थान समजत नाही.

**कुबदियन्** (देश)—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते मध्य आशियातील वक्षु (आधु. अमूदरिया) नदीकाठचा एक देश. काफिर्नहन्–कोश दुआबातील आधु. कुबदियन् गावासभोवतालचा प्रदेश हाच होय.

ह्युएन्त्संगच्या मते या देशाच्या (कु–ही–येन्–न; व्याप्ती– ४०×६० मैल) राजधानीची व्याप्ती २ मैल असून, खुल्म गावापासून ५७ मैल ईशान्येकडील आधु. कुबदियन् (अक्षांश ३७°–२१° उत्तर; रेखांश ६८°–९′ पूर्व) गाव हेच होय. या देशाच्या पूर्वेस वख्श देश असून, येथील तीन बौद्ध मठात १०० बौद्ध भिक्षू होते (बील, १.१०५–१०६).

**कुबेर** (देश)—जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील

एक देश ( वायु. ४४.१४ ).

**कुबेरतीर्थ** ( तीर्थ )—महाभारतमते 'कौबेर तीर्था'चे नामांतर ( म. श. ४६.२२–२८; कौबेर तीर्थ २. पहा ).

**कुबेरतुङ्ग** ( तीर्थ )—पौराणिक साहित्यमते एक तीर्थ ( कूर्म. उत्तर. ३७.३१; वायु. ७७.७८; ब्रह्माण्ड. ३.१३.८० ).

**कुबेरनिधि** ( धनागार )—पौराणिक साहित्यमते हिमालय पर्वतान्तर्गत कैलास पर्वतातील विपुला संज्ञक कुबेरसभेतील अष्टधनागारे ( निधी ). वायुमते यांची नावे पुढीलप्रमाणे होती :—१. कच्छप; २. कुमुद; ३. नंदन; ४. नील; ५. पद्म; ६. मकर ७. महापद्म; ८. शंख ( वायु. ४१.१० ).

**कुबेर-भण्डारी** ( कुबेर-तपस्यास्थान )—मध्यभारतील चोवीस अवतारपासून १ मैलावरील कावेरी–नर्मदा संगमावरील कुबेर–तपस्यास्थान. येथे कुबेरेश्वर मंदिर, तसेच येथून चार मैल पश्चिमेस च्यवन ऋषींचा आश्रम आहे ( ती. पृ. २३३ ).

**कुबेरभवन** ( तीर्थ )—नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( पद्म. आदि. १८.८०; मत्स्य. १९१. ८५ ).

**कुबेरवन** ( वन )—कौबेर तीर्थान्तर्गत एक वन ( म. आर. २८.४६. २२–२८ ). वनवासी भीमाने येथे मणिमत् यक्षाचा वध केला ( म. आर. १५७. ४९–५७ ).

**कुबेरशैल** ( पर्वत )—कुमारसंभवमते हिमालय पर्वतान्तर्गत 'कैलास' पर्वताचे नामांतर ( कुमार. ७.१३; कैलास पहा ).

**कुबेरस्थानक** ( तीर्थ )—प्रभासक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ ( स्कन्द. प्रभास. प्र. २९० ).

**कुबेराचल** ( पर्वत )—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते हिमालय पर्वतान्तर्गत 'कैलास' पर्वताचे नामांतर ( त्रिकाण्ड. ३५.१; कैलास पहा ).

**कुबेरेश्वर** ( लिंग )—प्रभासक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंग ( स्कन्द. प्रभास. प्र. २९० ).

**कुब्ज** ( क्षेत्र )—सह्य पर्वतावरील एक वामनस्वरूपी विष्णुतीर्थ ( नृसिंह. ६५.१५ ).

२. ( देश ) जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक देश ( वराह. ८३.२ ).

**कुब्जक** ( विष्णुक्षेत्र )—एक विष्णुक्षेत्र ( नारद. उत्तर ६०.२५; गरुड. १.८१.१० ).

**कुब्जतिन्दुक** ( नगर )—भर्हुत शिलालेखमते मध्य प्रदेशातील एक नगर. येथील ( खजतिदुकीय ) भूतरक्षित नामक बौद्ध भिक्षूने भर्हुत स्तूपास देणगी दिली होती ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.२.२८ ). बारुआ यांच्या मते हे पौराणिक साहित्यातील 'कुब्जाम्रक क्षेत्रा'चे ( कुब्जक ) नामांतर असावे ( बारुआ, पृ. १२८; कुब्जाम्रक क्षेत्र पहा ).

**कुब्जतीर्थ** ( तीर्थ )—गंगा नदीकाठचे एक तीर्थ ( नारद. उत्तर. ४१.३४ ).

**कुब्जा** ( योगिनी )—काशी येथील एक योगिनीतीर्थ ( स्कन्द. काशी. ४५.३५ ).

**कुब्जाकङ्क** ( विष्णुतीर्थ )—पद्ममते एक विष्णुतीर्थ. येथील विष्णूचे नाव त्रिसंध्य होते ( पद्म. उत्तर. १३९.१८ ).

**कुब्जागार** ( क्षेत्र )—नृसिंहमते एक विष्णुक्षेत्र. येथील विष्णूचे नाव हृषीकेश होते ( नृसिंह. ६५.११ ).

**कुब्जातीर्थ** ( तीर्थ )—नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( नारद. उत्तर. ७७.६ ).

**कुब्जाम्रक क्षेत्र** ( तीर्थ )—वराहमते गंगाद्वारच्या परिसरातील ( व्याप्ती–५० मैल ) एक तीर्थ ( वराह. १२६ ). स्थानिक आख्यायिकेनुसार हे हरिद्वारनजिकच्या गंगा नदीकाठच्या क्षेत्राचे नामांतर मानले जाते. परंतु तत्संबंधी निर्णायक पुरावा उपलब्ध होत नाही ( हृषीकेश पहा ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतात:—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पौराणिक साहित्य | |
| अ. ( अग्नि. १०९.१८ ) | कुब्जाम्रतीर्थ |
| आ. ( पद्म. आदि. ११.५९ ) | कुब्जाम्रतीर्थ |
| २. महाभारत ( आर. ८२.३६ ) | कुब्जाम्रतीर्थ |
| ३. वराह पुराण ( १२६.३३ ) | मायापुर |
| ४. अन्य पौराणिक साहित्य | कुब्जक |
| ५. भर्हुत शिलालेख | कुब्जतिंदुक |

**नामव्युत्पत्ती**—वराहमते 'वराहावतारी विष्णूच्या वजनाने वक्र ( कुब्ज ) बनलेल्या आम्रवृक्षाचे स्थान' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले. स्थानिक आख्यायिकामते 'कुब्जशरीरयुक्त रैभ्य ऋषींचे साक्षात्कार–प्राप्तिस्थान' अशा अर्थाने यास हे नाव पडले.

**पौराणिक साहित्यात**—या साहित्यमते ( अग्नि. १०९.

१८; पद्म. आदि. ११.५९ ), तसेच महाभारत पुलस्त्य-यात्रामते हे एक श्राद्धयोग्य तीर्थ असून ( म. आर. ८२. ३६ ), वराहमते हे एक वराहक्षेत्र आणि सिद्धक्षेत्र होते ( वराह. १३७.६ ). पद्ममते हे वाराणसीच्या परिसरातील तीर्थ असून ( पद्म. आदि. ३२.५ ), अन्य पौराणिक साहित्यातहि याचा निर्देश आढळतो ( मत्स्य. २२.६६; पद्म. आदि. ३२.५; कूर्म. उत्तर. २०.३३; ५५.३३; गरुड. १.८१.१०; वराह. १२५.१०१–१३२; १२६. ३३ ).

**भर्हुत शिलालेखात**—बारुआ यांच्या मते या शिला-लेखातील ' कुब्जतिंदुक ' हे बहुधा याचेच नामांतर असावे ( कुब्जतिंदुक पहा ).

**माहात्म्य**—या तीर्थाचे माहात्म्य वराह पुराणात वर्णिले असून, त्याचा काही भाग ' तीर्थविवेचना 'त उद्‌धृत केला आहे ( तीर्थ. पृ. २०६–२०८ ).

**उपतीर्थे**—वराहमते या क्षेत्रातील प्रमुख तीर्थे पुढील-प्रमाणे होत :— ( १ ) **सप्तसामुद्रिक तीर्थ** ( वैशाख शुद्ध द्वादशीला दुग्धधवल, पीत, रक्त, हरित आणि मौक्तिक-वर्णीय; वराह. १२६.९५–१०० ); ( २ ) **वरुणालय तीर्थ** ( अक्षीण जलधारायुक्त; वराह. १२६.९१ ); ( ३ ) **शुक्र तीर्थ** ( दक्षिणवर्ती पंचवृक्षयुक्त; वराह. १२६.८६ ); ( ४ ) **वायव्य तीर्थ महानद** ( अश्वत्थ पर्णयुक्त; वराह. १२६.७९ ); ( ५ ) **अग्नि तीर्थ** ( ग्रीष्मकाली शीत आणि शिशिरकाली ऊष्ण जलयुक्त; वराह. १२६.६७–७७ ); ( ६ ) **पुंडरीक तीर्थ** ( द्वादशीच्या माध्याह्नकाली रथचक्रा-कृती कूर्मयुक्त; वराह. १२६.५९–६१ ); ( ७ ) **पूर्णमुख तीर्थ** ( ऊष्ण जलयुक्त; वराह. १२६.४२ ).

२. विष्णुस्मृतिमते उत्कल प्रांतातील एक तीर्थ ( विष्णु-स्मृति. ८५.१५ टीप ).

३. ( देवीस्थान ) पद्ममते एक देवीस्थान. येथील देवीचे नाव त्रिसंध्या होते ( पद्म. आदि. १७.२०१ ).

**कुब्जावन** ( वन )—पद्ममते एक वन ( पद्म. आदि. ३९.३४ ).

**कुब्जाश्रम** ( विष्णुस्थान )—कूर्ममते एक विष्णुस्थान ( कूर्म. उत्तर. ३५.३३–३५ ).

**कुब्जासङ्गम** ( संगम )—पद्ममते नर्मदा नदीकाठचे एक संगमस्थान ( पद्म. भूमि. ९२.३२ ).

**कुब्जिकापीठ** ( शक्तिपीठ )—कालिकामते आसाम-मधील ' कामाख्या ' देवीपीठाचे नामांतर ( कालिका. ६४. ५३–५४; ७१–७२; कामाख्या पहा ).

**कुभा** ( नदी )—ऋग्वेदमते गंधार ( आधु. अफगाणि-स्तान ) देशान्तर्गत सिंधु नदीची पश्चिमेकडील सुविख्यात उपनदी ( ऋ. ५.५३.९; १०.७५.६ ). अनितभा, क्रुमु, रसा व सरयू नद्यांसमवेत हिचा निर्देश तेथे असून, पंजाबातील अटकनजिकच्या ओहिंद गावी सिंधूला मिळणारी आधु. काबूल नदी हीच होय. सिकंदरच्या आक्रमणकाली भारताची पश्चिम सरहद्द या नदीने बनत असे.

**आधुनिक काळी**—कोह–इ–बाबा पर्वतातील सर–इ–चष्मा ( उडता झरा ) सरोवरात उगम पावणारी आधु. काबूल नदी सुलेमान पर्वतातील एका मोठ्या खिंडीतून वहात येत अटक गावाच्या उत्तरेकडील ओहिंद गावी सिंधु नदीस मिळते. या नदीच्या खोऱ्यात आधु. काबूल देश असून, ' काबूल आदि नऊ नद्यांनी सिंचिलेला प्रदेश ' अशा अर्थाने हा प्रदेश ' निग्रहार ' ( नुनग्निहार ) स्थानिक नावाने ओळखला जातो ( काबूल खोऱ्यातील अन्य आठ नद्याः— १. सुर्खरुद; २. गंडमक; ३. कुर्रुस्सा; ४. चिपारयल; ५. हैहिसरूक; ६. कोटे; ७. मोमंददुर्रेह; ८. कोशकोटे; जे. ए. एस्. बी. स. १८४२; पृ. ११७ ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नदीची निम्नलिखित नामांतरे आढळतातः—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पाणिनीची अष्टाध्यायी ( ४.२.९९ ) | कापिशी |
| २. अरियन ( मॅक्रिंडल, इंडिया. पृ. १७९ ) | कोफेस् |
| ३. प्लिनी | कोफेन् |
| ४. स्ट्रॅबो | खोएस् |
| ५. पौराणिक साहित्य ( मत्स्य. ११४.२१ ) | कुहू |
| ६. टॉलेमी | कोअ |
| ७. पर्शियन साहित्य | खोअस्पेस् |

**पाणिनीच्या अष्टाध्यायीत**—या ग्रंथातील काफिरीस्तान देश आणि त्याच्या राजधानीच्या ' कापिश ' आणि ' कापिशी ' या नामोल्लेखांवरुन ( पा. सू. ४.२.९९ ) त्या देशातीलही नदीहि तत्काली ' कापिशी ' नावानेच सुविख्यात असावी. मॅक्रिंडल यांच्या मते या नदीची ' कोफेन् ' आणि ' कोफेस् ' ही ग्रीकभाषीय नावे संस्कृत ' कापिशी ' चीच अपभ्रष्ट रूपे आहेत ( मॅक्रिंडल, पृ. १९८–१९९ ).

अटकनजिक सिंधु नदी ओलांडणारा पाणिनिनिर्दिष्ट 'उत्तरपथ' नामक राजमार्गीहि (पा. सू. ५.१.७७) याच नदीकाठाने जात असावा.

पतंजलीच्या मते कुभा, वरा (आधु. बारा) आणि सिंधु या नदीत्रयाच्या दरम्यानचा प्रदेश 'त्रीरावतीक' (आप्रीत = आधु. आफ्रीडी) नावाने सुविख्यात होता (पतञ्जलि. १.४.१).

**पौराणिक साहित्यात**—या ग्रंथमते ही (कुहू) हिमालय पर्वतोद्भवा नदी असून (मत्स्य. ११४.२१; वायु. ४५.९५; ब्रह्माण्ड १६.२५; वामन. १३.२१; ५७.८०; ब्रह्म. २७.२६; कूर्म. पूर्व. ४७.२५; मार्क. ५४.१७; वराह. ८५.४; काव्यमी. १७.२२७), मत्स्य पुराणात गांधार आणि औरस लोकांसमवेत निर्देशिलेले कुहू लोकहि (मत्स्य. १२१.४६) हिच्या काठीच रहात असावेत.

**टॉलेमीच्या ग्रंथात**— या ग्रंथमते परोपमिसस्च्या पूर्ववर्ती डोंगरातील सिंधु नदीची ही पश्चिमेकडील उपनदी (कोअ) अक्षांश ३७° उत्तर; रेखांश १२०° पूर्व येथे स्वात नदी-समवेत त्या नदीस मिळत असे. प्रत्यक्षात हा संगम अक्षांश ३३°-५४′ उत्तर येथे सिंधु नदीच्या उगमापासून ८७२ व्या मैलावर होतो. मॅक्रिंडल यांच्या मते काबूल नदीच्या काम (कुणार) नामक उपनदीचा निर्देश येथे अभिप्रेत आहे.

पर्शियन साहित्यमते या (खोअस्पेस्) नदीकाठी पर्शिया देशाचे सूस नामक राजधानीचे गाव होते. स्ट्रॅबोच्या मते बंदोबेने आणि गंदरितेस् गावाजवळून वहाणारी ही नदी (खोएस्) प्लेमेरिऑन गावानजिक कोफेस् (कुभा) नदीस मिळत असे.

**उपनद्या** — पौराणिक साहित्य आणि अरियनच्या ग्रंथमते या नदीच्या प्रमुख उपनद्या पुढीलप्रमाणे होतः— **१–२. सुवास्तु (आधु. स्वात) आणि गौरी (आधु. पंजकोर)**— या दोन नद्यांचा संयुक्त प्रवाह प्रांग् गावानजिक या नदीस मिळतो. यापैकी गौरी नदी स्वातची उपनदी म्हणून सुविख्यात असली, तरी वस्तुतः ती या नदीचीच उपनदी आहे. **३. मलंतोस (आधु. कमेह अथवा खोनर)**— अरियनच्या मते ही या नदीची सर्वात मोठी नदी होती (काणे, ४.७७१–७७२).

काबूल देशामध्ये या नदीस मिळणाऱ्या (अक्षांश ३३° उत्तर; रेखांश १२१°-३०′ पूर्व) परोपमिसस् देशातील एका उपनदीचा निर्देशहि टॉलेमीने केला आहे.

**कुभाकूल** (नगर)—काशिकामते वायव्य भारतातील कुभातल (आधु. काबूल) देशाच्या राजधानीचे नगर (काशिका. ६.२.१२९). 'कुभा तीरवर्ती' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले (अग्रवाल, पाणिनि. पृ. ७९). अफगाणिस्तानमधील काबूल हे राजधानीचे गाव हेच होय.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. टॉलेमी | और्तोस्पाना<br>और्तोस्पन<br>(ऊर्ध्वस्थान)<br>कबूर |
| २. स्ट्रॅबो<br>३. प्लिनी | पॉरदॉस्फॉन |
| ४. चिनी साहित्य | कौ–फु |

**नामव्युत्पत्ती**—अभ्यासकांच्या मते 'उंचवट्यावरील स्थान' अशा अर्थाने यास 'ऊर्ध्वस्थान' हे संस्कृत नाव मिळाले असून, टॉलेमीनिर्दिष्ट 'और्तोस्पन' हे त्याचेच ग्रीक रूपांतर असावे (ऊर्ध्वस्थान > उर्दुस्तान > ऑरदॉसतॉन > ओर्तोस्पन), यानजिकच्या वरधक खिंडी-नजिकच्या वरधक लोकांमुळे यास हे नाम प्राप्त झाल्याचे सेंट मार्टिन यांचे अनुमान असंभव वाटते.

या नगराचे आधु. 'काबूल' नाव संभवत 'कवर' (= टॉलेमी–'कबूर') चे अपभ्रष्ट रूप असावे.

**मिलिंदाची राजधानी**—इ. स. पू. १५६ मध्ये या नगरावर युक्रेतिदेसवंशीय मेनॅंडर (मिलिंद) नामक बौद्ध-धर्मीय राजाचे राज्य होते. 'मिलिंद पन्हो' (मिलिंद प्रश्न) नामक बौद्ध ग्रंथाने तो अमर झाला असून (एस. बी. ई. २५–२६), क्षेमेंद्रकृत 'अवदान–कल्पलता' ग्रंथात त्यास 'मिलिंद्र' म्हटले आहे.

पुष्यमित्र शुंगाच्या राज्यकाली मिलिंदाने सिंकदर-स्वारीच्या अनुकरणाने भारतावर आक्रमण केले. काबूल आणि पंजाब देशांहून निघून, आणि सिंधु नदीचा त्रिभुज प्रदेश, सुराष्ट्र (आधु. काठेवाड), यमुनातीरवर्ती मथुरा, तसेच साकेत (आधु. अयोध्या) जिंकून राजपुतान्यातील मध्यमिका (चितोडनजिकचे आधु. नगरी) नगरास त्याने वेढा घातला. पुष्यमित्राच्या पाटलिपुत्र राजधानीवरहि त्याने हल्ला

चढविला. परंतु पश्चिम भारतातील काही प्रदेश वगळता अन्य सारा प्रदेश त्यास सोडावा लागला ( इंडि. अँटि. स. १९०४; पृ. २१७ ).

**कुभातल** ( देश )—संस्कृत साहित्यमते वायव्य भारतातील कुभा ( आधु. काबूल ) नदीच्या खोऱ्यातील एक देश. वैदिक अथवा पौराणिक साहित्यात याचा सुस्पष्ट निर्देश नसला, तरी बृहत्संहितेतील 'कैलावत' हे 'कुभातल' ( कैवातल ) चेच अपभ्रष्ट रूप असावे ( चौधरी, पृ. ९९ ). अफगाणिस्तानातील आधु. काबूल देश हाच होय.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पराशरतंत्र | लवणवती |
| २. बृहत्संहिता | कैलावत ( कैवातल ) |
| ३. ग्रीक साहित्य ( कनिंग., पृ. ३८ ) | ओर्तोस्पन ( ऊर्ध्वस्थान ) |
| ४. सिकंदरस्वारीशी संबंधित ग्रीक साहित्य | परोपमिसदै |
| ५. टॉलेमी | परोपनिसदै |

**ग्रीक साहित्यात**—या साहित्यातील या देशाच्या 'ओर्तोस्पॅन' आणि 'परोपमिसदै' वैकल्पिक नावांपैकी 'ओर्तोस्पॅन' हे संस्कृत 'ऊर्ध्वस्थान'चे रूपांतर असून, 'परोपमिसदै' हे येथील 'परोपमिसिदै' ( आधु. हिंदुकुश पर्वत ) पर्वतावरून पडले असावे ( मॅक्रिंडल, अलेक्झांडर. पृ. ५८ ).

**राजधानी**—टॉलेमीच्या मते या ( परोपनिसदै ) देशाची राजधानी कबूर ( और्तोस्पन = आधु. काबूल ) गावी होती ( कनिंग., पृ. २१; कुभाकूल पहा ).

**मोगल राज्यकाली**—इ. स. १७ व्या शतकात हा देश मोगल साम्राज्यात समाविष्ट असून, औरंगजेबपुत्र मुअज्जम ( स. १६९३ ) हा येथील सुभेदार होता ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. २९० ).

**कुमटा** ( देवीतीर्थ )—दक्षिण भारतातील गोकर्णानजिकचे शांताकामाक्षी–देवीस्थान ( ती. पृ. ३१२ ).

**कुमन** ( देश )—दक्षिण भारतातील 'कुपथ' देशाचे नामांतर ( वायु. ४५.१२५; कुपथ पहा ).

**कुमार** ( देश )—मेरु पर्वतोद्भवा सप्तगंगांपैकी पूर्ववाहिनी ह्लादिनी नदीच्या मार्गावरील एक देश ( ब्रह्माण्ड. १८.५५; वायु. ४७.५२ ).

२. दक्षिणापथमधील एक देश ( मार्क. ५४.४६; वामन. १३.४७ ). केरळातील कन्या तीर्थ ( आधु. कन्याकुमारी ) प्रदेशाचे हे नामांतर असावे ( कन्या तीर्थ पहा ).

३. युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या पूर्व दिग्विजयात भीमाने जिंकलेला पूर्व भारतातील कोशल देशानजिकचा एक देश. येथील राजाचे नाव श्रेणिमत् असून ( म. स. २७.१ ), येथील लोकांनी युधिष्ठिरास उपायने अर्पिली होती ( म. स. ४८.१३ पाठ ). नामांतर– 'कुमारविषय'.

'शिवपुत्र कार्तिकेयाचा देश' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले असून, क्रौंच पर्वत ( आधु. कुमाऊँ प्रदेश ), तसेच केदारखंड ( आधु. अल्मोरा–गढवाल प्रदेश ) यामध्ये समाविष्ट होते.

४. ( पर्वत ) मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते एक पर्वत ( औणादिक. १५८.३९२ ). श्रीशैलपासून २४ मैलांवरील या स्थानी कार्तिकस्वामीचे मंदिर असून, परशुरामाच्या सप्त मुक्तिक्षेत्रांमध्ये याची गणना होते ( ती. पृ. ३१९ ).

५. ओरिसातील 'उदयगिरि' पर्वताचे नामांतर ( उदयगिरि १. पहा ).

६. दक्षिण भारतातील 'कुपथ' देशाचे नामांतर ( कुपथ पहा ).

**कुमार-कोइल** ( पर्वतीय तीर्थ )—दक्षिण भारतातील नागर–कोइलनजिकचे एक सुब्रह्मण्य ( कार्तिकेय ) तीर्थ आणि मंदिरस्थान ( ती. पृ. ३९४ ).

**कुमारकोटि** ( तीर्थ )—महाभारत पुलस्त्ययात्रा, तसेच पौराणिक साहित्यमते भारतवर्षातील एक तीर्थ ( म. आर. ८०.१२३; अग्नि. १०९.१३; पद्म. आदि. २५.२३ ).

**कुमारगाम** ( जैन तीर्थ )—उत्तर बिहारमधील महावीर चरणस्पर्शपुनीत एक जैन तीर्थ. कुंडपुरहून कोल्लाक गावी निघालेला महावीर येथे काही काळ थांबला होता ( श्रमण भगवान महावीर. २.१.२८२ ). मुजफ्फरपुर जिल्ह्यातील सीतामरी पोलिस विभागातील आधु. कुमार गाव हेच होय ( पांडे, बिहार. पृ. १६७ ).

**कुमारतीर्थ** (तीर्थ)—महाभारत पुलस्त्ययात्रा, तसेच

पौराणिक साहित्यमते एक विष्णुतीर्थ (म. आर. ८२.१२६; पद्म. आदि. ३८.६१; नृसिंह. ६५.१७; तीर्थविवेचन. पृ. २५२).

२. ब्रह्माण्डमते दक्षिण भारतातील 'कौमार तीर्था'चे नामांतर (ब्रह्माण्ड. ३.१३.८६; कौमार तीर्थ पहा).

**कुमारद्वीप** (द्वीप)—वामनमते भारतवर्षाच्या नवद्वीपांपैकी 'कुमारीद्वीपा'चे नामांतर (वामन. १३.२; कुमारी द्वीप पहा).

२. मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते 'जंबूद्वीपा'चे नामांतर (मंख. ५३.७३१. कविजीवन. ९३; जंबूद्वीप पहा).

**कुमारधारा** (तीर्थ)—महाभारत पुलस्त्ययात्रा, तसेच वामन पुराण प्रह्लाद–तीर्थयात्रामते पितामह (पुष्कर) सरोवरोद्भव एक तीर्थ (म. आर. ८२.१२९–१३०; वामन. ८४.२४).

२. वेंकटाचलक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ (स्कन्द. वेङ्कटाचल. १).

३. (नदी) भारतवर्षातील स्वामिनी तीर्थानजिकची एक नदी (कूर्म. उत्तर. ३७.२०)

४. (वामनस्थान) वामनमते एक वामनस्थान. येथील विष्णूचे नाव बाह्लीश होते (वामन. ९०.१६).

५. (जलप्रपात) कश्मीरान्तर्गत क्रौंच पर्वतावरील कुमार (कार्तिकेय) शक्तिप्रहारोत्पन्न एक जलप्रपात (विष्णुस्मृति. ८५.२५ टीप).

६. दक्षिण समुद्रतीरवर्ती इपुपातक्षेत्रान्तर्गत एक जलप्रपात विष्णुस्मृति. ८५.२५ टीप).

**कुमारनाथ** (लिंग)— महीसागर संगमक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंग (स्कन्द. माहेश्वर. कौ. १४.३२).

**कुमारपुर** (ग्राम)—गंग राजा नरसिंह (द्वितीय) च्या स. १३० च्या असंखलि दानपत्रमते ओरिसा देशातील मयूरभंज जिल्ह्यातील कुमारभोग्य विषयाच्या दक्षिणेकडील एक ग्राम (एपि. इंडि. ३१. ११३).

**कुमारवर्ष** (वर्ष)—शाकद्वीपातील एक वर्ष (देशविभाग; मार्क. ५०.३१; विष्णु. २.४.६०).

**कुमारविषय** (देश)—पूर्व भारतातील 'कुनार' देशाचे नामांतर (कुमार ३. पहा).

**कुमारशिखर** (पर्वत)—मेरु पर्वतान्तर्गत एक पर्वतशिखर. रथंतर कल्पातील वामदेव-स्कंद–संवाद येथे झाला होता (शिव. कैलास. २२).

**कुमारसू** (नदी)—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते 'गंगा' नदीचे नामांतर (अभिधान. १४८.१०८१; गंगा पहा).

**कुमारा** (नदी)—शुक्तिमत् पर्वतोद्भवा एक नदी (अग्नि. ११८.८; ब्रह्म. १९.१४; विष्णु. २.३.१३).

**कुमाराभिषेक** (तीर्थ)—कुरुक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ (वामन. ४१.६).

**कुमारिक खण्ड** (खंड)—गोलाध्यायमते भारतवर्षान्तर्गत 'कुमारी द्वीपा'चे नामांतर (गोलाध्याय. भुवनकोश प्रश्न. ४१; कुमारी द्वीप पहा).

**कुमारिका** (देवीस्थान)—प्रभासक्षेत्रान्तर्गत एक देवीस्थान (नारद. उत्तर. ७०.३८).

**कुमारिका क्षेत्र** (सरोवर)—राजस्थानातील कोट्यापासून ४४ मैलांवरील, आणि इंद्रगढ रेल्वेस्थानकापासून ६ मैल आग्नेयेकडील एक उष्णोदक–सरोवर आणि अवशेषस्थान (ती. पृ. २८३).

**कुमारिका तीर्थ** (तीर्थद्वय)—हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत तीर्थद्वय (स्कन्द. नागर. १९४).

**कुमारिका द्वीप** (द्वीप)—स्कंदमते भारतवर्षान्तर्गत 'कुमारी द्वीपा'चे नामांतर (स्कन्द. माहेश्वर. कौ. ३०.६०; कुमारी द्वीप पहा).

**कुमारिका शक्रतीर्थ** (तीर्थ)—महाभारत पुलस्त्ययात्रामते एक तीर्थ (म. आर. ८०.९७; पद्म. आदि. २४.२९).

**कुमारिल तीर्थ** (तीर्थ)—कश्मीरातील वितस्ता (आधु. झेलम) नदीकाठचे एक तीर्थ (वामन. ८१.११).

**कुमारिल द्वीप** (द्वीप)—भारतवर्षान्तर्गत एक द्वीप (काव्यमी. १७.२२३).

२. मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते 'जंबूद्वीपा'चे नामांतर (वैजयन्ती. ३५.१०; मेदिनी. १४३.१३९; जंबूद्वीप पहा).

**कुमारीवडौ** (ग्राम)—बुद्धराज कटच्चुरीच्या स. ६०९ च्या सरसवणी ताम्रपटमते गुजरातमधील गोरज्जाभोगातील बृहन्नारिका ग्रामानजिकचे एक ग्राम. संस्कृत 'कुमारीवाटक'चे हे प्राकृत रूप असावे. गुजरातमधील गोरज गावापासून ११ मैल नैर्ऋत्येकडील आधु. कवारवारा गाव हेच होय (कॉपस्. इन्स्क्रि. ४.१.५३.

**कुमारी** (नदी)—शाक द्वीपातील एक नदी (कूर्म. पूर्व. ३९.३५; ब्रह्माण्ड. १९.९६; म. भी. १२.३०; विष्णु. २.४.६५). नामांतर–'सती' (वायु. ३९.९२).

२. शुक्तिमत् पर्वतोद्भवा एक नदी (म. भी. ९.३४३;

१०.३४; पद्म. आदि. ६.३१; ब्रह्माण्ड. १६.३८; मार्क. ५४.२९; शिव. उमा. १८.१३ ). नामांतर-‘ सुकुमारी ’ ( वायु. ४५.१०७ ); ‘ ऌसतियु ’ ( वराह ८५.६ ).

ओमॅली यांच्या मते बंगालमधील मानभूम जिल्ह्यातील दल्म टेकड्यांमधून वहात येत कासाइ नदीस मिळणारी आधु. कुमारी नदी हीच असून ( ओमॅली, बंकुरा. स. १९०८; पृ. ७. ), महाभारतातील ‘ अश्व नदी ’चेच हे नामांतर असावे ( अश्व नदी ७. पहा ). अली यांच्या मते ओरिसातील सोनपुरनजिक महानदीस मिळणारी आधु. सुक्तेल नदी हीच असावी ( अली, पुराणाज्. पृ. ११३ ).

३. तामीळ साहित्यमते दक्षिण भारतान्तर्गत कन्याकुमारीनजिकची एक नदी ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. १.७७ ).

४. ( टेकडी ) खारवेलाच्या हाथीगुंफा शिलालेखमते ( इ. स. पू. १ ले शतक ) कलिंग आणि आंध्र देशांच्या सीमारेषेवरील एक टेकडी. येथे खारवेलाने आयोजिलेल्या जैन धर्मपरिषदेने जैन धर्मग्रंथ ( अंग ) संकलित केले ( एपि. इंडि. २०.८० ).

पूर्व समुद्रवर्ती भुवनेश्वरनजिकच्या आधु. उदयगिरि, खंडगिरि, आणि नीलगिरि टेकड्या म्हणजे हा पर्वत असावा ( एपि. इंडि. १३.१६६; उदयगिरि पहा ).

**कुमारीतीर्थ** ( तीर्थ )—प्रभासक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ ( स्कन्द. प्रभास. प्र. २४२ ).

२. महाभारत धौम्ययात्रामते पांडय देशान्तर्गत ‘ कन्या तीर्था ’चे नामांतर ( म. आर. ८६.१३; कन्या तीर्थ पहा ).

**कुमारीद्वीप** ( द्वीप )—काव्यमीमांसामते भारतवर्षाच्या नवखंडांपैकी ( भेद ) नवम देश ( काव्यमी. पृ. ९२ ). वायु आणि मार्कंडेय पुराणात याचा सुस्पष्ट नामोल्लेख नसला, तरी त्या ग्रंथमते या समुद्रवेष्टित द्वीपाच्या ( दक्षिणोत्तर व्याप्ती–१००० योजने ) पूर्वेस किरात आणि पश्चिमेस यवन, तसेच अंतर्भागात ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य आणि शूद्र लोक रहात असत ( वायु. ४५.७८–८० ).

विंध्य आणि पारियात्र पर्वताच्या दक्षिणेकडील भारताचा द्वीपकल्पीय प्रदेश म्हणजे हे द्वीप असून, पौराणिक साहित्यातील महेंद्र, मलय, सह्य, शुक्तिमत्, ऋक्ष, विंध्य, आणि पारियात्र हे ‘ सप्तकुलाचल ’ ( कुलपर्वत ) यामध्येच असावेत.

**व्याप्ती**—मार्कंडेयमते याची उत्तर–दक्षिण लांबी १००० योजने होती.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या द्वीपाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. वामन पुराण ( १३.२ ) | कुमार द्वीप |
| २. स्कंद पुराण ( माहेश्वर. कौ. ३०.६० ). | कुमारिका द्वीप |
| ३. गोलाध्याय ( भुवनकोश प्रश्न. ४१ ) | कुमारिका खंड |

**पौराणिक साहित्यात**—स्कंदमते हा महेंद्र आणि पारियात्र पर्वतांच्या दरम्यान असून ( स्कन्द. माहेश्वर. कौ. ३९.११३ ), गरुडमते याच्या दक्षिणेस आंध्र आणि उत्तरेस तुरुष्क लोक होते ( गरुड. ५५. ६ ).

**मतांतरे**—रॉयचौधरी यांच्या मते बृहत्तर भारताच्या उपविभागभूत आधु. भारतवर्षाचा निर्देश येथे अभिप्रेत असून, त्याचे ‘ सागरसंवृता ’ ( सागरवेष्टित ) विशेषण आधु. भारतवर्षाच्या पूर्व, पश्चिम आणि दक्षिण सीमेस लागू पडते. पूर्वेस आणि पश्चिमेस किरात, आणि पश्चिमेस यवन लोकसमूह हे याचे वर्णन परंपरागत भारतवर्षाचेच असून, त्याची उत्तर–दक्षिण व्याप्ती ( १००० योजने ) पेट्रोक्लेस ( १५००० स्टेडिया=१७२४ मैल ) आणि मेगॅस्थिनेसच्या ( २२३०० स्टेडिया=२७८७ मैल ) ग्रंथांतील, तसेच आधुनिक भारतव्याप्तीशी ( १८०० मैल ) कमीअधिक जुळते ( रॉयचौधरी, पृ. ८२–८५; भारतवर्ष पहा ).

**कुमारेश्वर** ( लिंग )—कुरुक्षेत्रातील एक शिवलिंग ( स्कन्द. माहेश्वर. कौ. १४.६; वामन. ४६.२३; स्कंद तीर्थ पहा ).

२. प्रभासक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंग ( स्कन्द. प्रभास. प्र. ७३. २१५ ).

३. महीसागर संगमक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंग ( स्कन्द. माहेश्वर. कौ. ३.९; ३४ ).

**कुमालक** ( देश )—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते ‘ सौवीर ’ ( आधु. उत्तर सिंध ) देशाचे नामांतर ( अभिधान. १३०.९६०; शब्दरत्न. ३५.२; वैजयन्ती. ३७.५५; सौवीर पहा ).

**कुमिध** ( देश )—ह्युएनत्संगच्या प्रवासवर्णनमते मध्य आशियातील वक्षु ( अमूदारिया ) नदीकाठचा त्सुंग्–लिंग्

( आधु. पामीर पठार ) पर्वतान्तर्गत एक देश. रक्त नदीच्या खोऱ्यातील आधु. दर्वाझ प्रदेश हाच असून, बील यांच्या मते दर्वाझ आणि शिग्नन् यांच्या दरम्यानचा आग्नेयवर्ती आधु. रोशन प्रदेशहि यामध्ये समाविष्ट असे ( बील,१. १०६ ). नामांतर ( टॉलेमी )-' कोमेदै '.

**नामव्युत्पत्ती**--' पौर्वात्य देशांचे प्रवेशद्वार ' अशा अर्थाने यास ' दर्वाझ ' नाव प्राप्त झाले असावे.

**टॉलेमीच्या ग्रंथात**—या ग्रंथमते येथून रेशीम लादलेले उंटांचे तांडे पौर्वात्य देशांप्रत जात असत.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते या देशाच्या ( किउ-मि-तो; व्याप्ती-४००X४० मैल ) नैर्ऋत्येस आणि दक्षिणेस अनुक्रमे वक्षु नदी आणि शिग्नन् ( शि-कि-नि ) देश होते.

**राजधानी**—ह्युएन्त्संगच्या मते याच्या राजधानीची व्याप्ती ४ मैल असून, अमूदरिया नदीच्या अब-इ-पिअंज संज्ञक दक्षिणेकडील शाखानदीकाठचे आधु. खुम ( कल-इ-खुम ) गाव हेच होय.

**कुमुञ्ज** ( पर्वत )—वायुमते जंबूद्वीपान्तर्गत भद्राश्व वर्षातील ( आधु. सिकियांग ) मेरु पर्वत आणि अरुणोद ( आधु. कर-कुल ) सरोवराच्या पूर्वेकडील आणि शीतांत ( आधु. काशगर ) पर्वताच्या ईशान्येकडील एक पर्वत ( वायु. ३६.१०-१९; ३९.२८ ). अरुणोद सरोवरोद्भवा सीता ( आधु. किझिल्-सु-तारीम ) नदी शीतांत, कुमुंज आणि सुमंज पर्वतातून क्रमशः वहात असे ( वायु. ४२. १२-१८ ). नामांतर-'मुकुंज'; 'कुमुद' ( वायु. ४२.१८ ).

अली यांच्या मते सिकियांग प्रांतातील आधु. तिएन्शन् पर्वताचे उत्तरेकडील शाखापर्वतद्वय म्हणजे हा, तसेच सुमंज पर्वत असून, त्यापैकी तिएन्-शन् पर्वताशी समांतर वक्षु नदीपर्यंत पसरलेला मोठा पर्वत हाच होय. या पर्वतद्वयातून उगम पावणाऱ्या तारीम नदीच्या उत्तरेकडील दोन उपनद्या काशगर गावानजिक तीस मिळतात.

**खोरे**— वायुमते या, तसेच शीतांत पर्वतांच्या दरम्यान बिल्ववन नामक प्रचंड खोरे ( आधु. काशगर ओएसिस, व्याप्ती-३००X१०० योजने ) होते ( वायु. ३७.१-१५; शीतांत पहा ).

**वसाहती**— वायुमते याच्या माथ्यावर आठ ' दानवपुरी ' ( दानवांची नगरे ) असून, अली यांच्या मते काशगर देश आणि वक्षु नदीच्या उत्तरेकडील तार्तार लोकांचा निर्देश येथे अभिप्रेत असावा. हे लोक आजहि तारीम खोऱ्यातील शेतीवाडीची, तसेच पूर्व-पश्चिम हमरस्त्यावरील उतारूंची लुटालूट करतात ( अली, पुराणाज्. पृ. १९६ ).

**कुमुद** ( देश )-- जंबूद्वीपान्तर्गत भद्राश्व वर्षातील एक देश ( वायु. ४३ २१ ).

२. ( पर्वत ) कैलासान्तर्गत एक कुबेरनिधियुक्त पर्वत ( वायु. ४१.१० ).

३. कुश द्वीपातील एक पर्वत ( मत्स्य. १२२.५२ ). नामांतर-' विद्रुमोच्चय ' ( म. भी. १३.१० ).

४. शाल्मलि द्वीपान्तर्गत एक वर्षपर्वत ( कूर्म. पूर्व. ४९.१४; ब्रह्माण्ड. १९.३५; लिङ्ग. ५३.५; वायु. ४९. ३२; विष्णु. २.४.२६ ).

५. ( ग्राम ) पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.४ ).

६. ( देवीस्थान ) पद्ममते एक देवीस्थान. येथील देवीचे नाव कुमुदा ( सत्यवादिनी ) होते ( पद्म. आदि. १७. २१४; मत्स्य. १३.२७ ).

७. ( पर्वत ) वायुमते जंबूद्वीपान्तर्गत ' कुमुंज ' पर्वताचे नामांतर ( वायु. ४२.१८; कुमुंज पहा ).

**कुमुदतीर्थ** ( तीर्थ )—दक्षिण भारतातील रामाच्या सेतुनजिकचे एक तीर्थ ( स्कन्द. ब्राह्म. से. ४२ ).

२. पद्ममते एक विष्णुतीर्थ. येथील विष्णूचे नाव सत्यवादिन् होते ( पद्म. उत्तर. १२९.३१ ).

**कुमुदद्वीप** ( द्वीप )—वायुमते भारताच्या दक्षिण समुद्रातील ' कुश द्वीप ' नामक अनुद्वीपाचे नामांतर ( वायु. ४८.३४-३५; कुश द्वीप पहा ).

**कुमुदप्रभ** ( पर्वत )—वायुमते जंबूद्वीपान्तर्गत उत्तर कुरु ( आधु. पश्चिम सैबेरिया ) देशाच्या दक्षिणेकडील चंद्रद्वीपातील एक मध्यवर्ती पर्वत, आणि चंद्रावती नदीचे उगमस्थान ( वायु. ४५.५४ ).

अली यांच्या मते दक्षिण सैबेरियातील तुव प्रदेशान्तर्गत येनिसै प्रदेशातील मिनसिंस्क गावाच्या १०० मैल आग्नेयेकडील मध्यवर्ती पर्वतशिखर ( उंची-२४०००' ) हेच असून, त्यापासून येनिसै ( पौराणिक-चंद्रावती ) नदी उगम पावते ( अली, पुराणाज्. पृ. ८७ ).

**कुमुदवन** ( वन )—मथुरा येथील द्वादश वनांपैकी तृतीय वन आणि व्रजपरिक्रमास्थान ( वराह. उत्तर. ७९. ८ ). मधुवनगामी मार्गावरील या वनात सध्या कपिल मुनींचे मंदिर आहे ( ती. पृ १०० ).

**कुमुदवर्ष** ( वर्ष )—मत्स्यमते गोमेदक द्वीपान्तर्गत एक वर्ष ( देश; मत्स्य. १२३.११ ) नामांतर-' सौमन '.

**कुमुदसूत्र** ( राज्यविभाग )—देवपाल राजाच्या इ. स. ९ व्या शतकातील नालंदा ताम्रपटमते दक्षिण बिहार-मधील गया विषयातील एक 'वीथि' ( राज्यविभाग; एपि. इंडि. २३.२६१ ). यामध्ये नालंदा, पलामक आदि ग्रामे असून ( एपि. इंडि. १७.३१०–३२७ ), राजगृह विषयाच्या सरहद्दीवर नालंदानजिक हा असावा. पांडे यांच्या मते गया जिल्ह्यातील आधु. नवद अथवा सदर गावाच्या परिसरातील प्रदेश हाच होय.

**कुमुदाकर** ( तीर्थ )—कुब्जाम्रक तीर्थान्तर्गत एक तीर्थ ( वराह. १२६.२५–२८ ).

**कुमुदाचल** ( पर्वत )—वायुमते केतुमाल द्वीपातील मेरु ( आधु. पामीर पठार ) पर्वतोद्भवा चतुर्गंगांपैकी पश्चिमवाहिनी चक्षु ( आधु. अमूदरिया ) नदीच्या मार्गा-वरील एक पर्वत. या, तसेच कंक, वैदूर्य, कपिल, गंध-मादन, पिंजर पर्वतांना ती नदी ओलांडीत असे ( वायु. ४२.५१ ).

अली यांच्या मते अमूदरिया नदीच्या उत्तरवर्ती काफिरनिगान् आणि वक्षु नद्यांच्या दरम्यानचा आधु. अक्–तौ–रंगन्–तौ पर्वत हाच असून, ग्रीक साहित्यमते कुमेदै ( कुमेद ) नामक शक लोक येथे रहात असत ( कुमेध पहा ).

**पौराणिक साहित्यात**—या साहित्यमते हा मेरु पर्वताचा पश्चिमेकडील आधार असून ( भा. ५.१६.११; वायु. ३६.२८; ३८.६०–६२; ३९.५९; ४१.१० ), यामधील 'सहस्रशिखर' स्थानी शुक्राश्रम होता.

**खोरे**—वायुमते या आणि अंजन पर्वताच्या ( हिस्सार पर्वताचा काफिर–निगान् गावानजिकचा भाग ) दरम्यान 'केसरद्रोणी' नामक केशराच्या मळ्यांचा प्रदेश असून ( वायु. ३८.४५–४९; केसरद्रोणी पहा ), या आणि शैलेंद्र पर्वताच्या ( आधु. हिस्सार पर्वत ) दरम्यान एक हिमाच्छादित पर्वत ( लांबी–१०० योजने ) होता ( वायु. ३८.६०–६२; शैलेंद्र पहा ). या पर्वतावर किन्नरांची एक वस्महतहि होती ( वायु. ३९.५९ ).

**कुमुदाद्रि** ( पर्वत )—कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या दक्षिण भागातील एक पर्वत ( मार्कं. ५५.२६ ).

२. वस्त्रापथक्षेत्रान्तर्गत एक पर्वत ( स्कन्द. प्रभास. व. १७.१३८ ).

**कुमुदाभ** ( देश )—जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक देश ( वायु. ४४.१२ ). अली यांच्या मते मध्य आशियातील आधु. खवर आणि खुज् प्रदेश हाच होय.

**कुमुदोत्तर वर्ष** ( देशविभाग )—महाभारतमते शाक द्वीपान्तर्गत एक वर्ष ( देश; म. भी. १२.२३ ). पाठभेद–' कुसुमोत्कर ' ( मत्स्य. १२२.२४ ).

**कुमुद्वती** ( देवी )—अवंती येथील एक देवीस्थान ( नारद. उत्तर. ७८.३६ ).

२. ( नगर ) स्कंदमते मध्य भारतातील ' उज्जयिनी ' नगराचे नामांतर. शब्दशः अर्थ – ' विपुल कमलयुक्त ' ( स्कन्द. आवन्त्य. अ. ४६.३०; उज्जयिनी पहा ).

३. ( नदी ) क्रौंच द्वीपातील एक नदी ( कूर्म. पूर्व. ४९.२९; ब्रह्माण्ड. १९.७५; मत्स्य. १२२.८८; वायु. ४९.६९; विष्णु. २.४.५५ ).

४. विंध्यपाद पर्वतोद्भवा एक नदी ( कूर्म. पूर्व. ४७.३४; ब्रह्माण्ड. १६.३३; मत्स्य. ११४.२७; मार्कं. ५४.२४; वराह. ८५.५; वामन. १३.२९; वायु. ४५.१०२; विष्णुधर्म. १.१०.८; ब्रह्म. २७.३३ ). पार्गिटर यांच्या मते उत्तर ओरिसातील आधु. सोनरेख अथवा पश्चिम बंगालमधील आधु. दमुदा नदी हीच असावी ( पार्गि., ३०१ ).

**कुमुद्वन** ( वल्लभबैठक )—उत्तर भारतातील एक वल्लभबैठकस्थान.

**कुमुनारी** ( नदी )—कश्मीरातील एक पवित्र नदी ( नीलमत. १४४२ ).

**कुमेध** ( लोकसमूह )—याकूबि आणि इब्न रुस्तच्या मते मध्य आशियातील एक लोकसमूह. याकूबीच्या मते हे रश्त आणि वमीरच्या ( पामीर ) दरम्यान असून, इब्न रुस्तमते हे रश्त नदीच्या खोऱ्यात ( आधु. वख्श-आप् ) रहात असत.

अली यांच्या मते अमूदरिया नदीच्या उत्तरेकडील काफिर–निगान् आणि वक्षु नद्यांच्या दुआबातील आधु. अक्–तौ–रंगन्–तौ ( पौराणिक–कुमुदाचल ) पर्वतात हे रहात असावेत. नामांतर ( ग्रीक साहित्य )–' कुमेदै ', ( हुदूद अल्–आलम् )–' कुम्जि. '

**ग्रीक साहित्यात**—या साहित्यमते हे ( कुमुदै ) पर्वता-श्रयी शक लोक होते.

**मध्ययुगीन साहित्यात**—' हुदूद–अल्–आलम् ' मते हा देश काफिरनिगान् नदीचे उगमस्थान असून, त्यावरून मध्ययुगीन काली वख्श–आप् आणि काफिरनिगान् नद्यांच्या दुआबातील आधु. जित्यम्–तौ–रंगन्–तौ पर्वतीय प्रदेशात चघ्निआन् आणि रक्तुल देशांच्या दरम्यान हे ( तुर्की–कुम्जि ) रहात असावेत.

**कुम्भ** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.७५; ८.१२-१३ )

**कुम्भकक्षिगिरि** ( पर्वत )—प्रभासक्षेत्रान्तर्गत अर्बुदारण्यातील सरस्वती नदीकाठचा एक पर्वत ( स्कन्द. प्रभास. प्र. ३५.५८ ).

**कुम्भकर्णाश्रम** ( तीर्थ )—महाभारत पुलस्त्ययात्रामते एक लोकमान्यतादायक तीर्थ ( म. आर. ८२.१३६; पद्म. आदि. ३८.६४ ).

२. नर्मदा नदीकाठच्या मेघनाद तीर्थानजिकचे एक तीर्थ ( ती. पृ. २३५ ).

**कुम्भकारप्रक्षेप** (नगर)—जैन साहित्यमते सिंधुसौवीर-राजधानी ' वीतभय ' नगराचे नामांतर ( वीतभय पहा ).

**कुम्भकारी** ( नदी )—जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक नदी ( वायु. ४४.२२ ).

**कुम्भकाशी** ( क्षेत्र )—पश्चिम किनारीच्या परशुराम-निर्मित सप्त मुक्तिक्षेत्रांपैकी एक ( सप्त मुक्तिक्षेत्र पहा. )

**कुम्भकोणम्** ( तीर्थ आणि मंदिरस्थान )—दक्षिण भारतातील सुविख्यात तीर्थ (स्कन्द. अरुणाचल. २.२; ब्राह्म. सेतु. ५२.१०१ ), आणि चोल राजधानीचे ( इ. स. ७ वे शतक ) नगर. मद्रासपासून १९४ मैलांवरील तंजोर जिल्ह्यातील कावेरी नदीकाठचे आधु. कुंभकोणम् गाव हेच असून ( अक्षांश १०°-५८' उत्तर; रेखांश ३९°-३२' पूर्व ), दक्षिण भारतातील प्राचीनतम नगरांमध्ये याची गणना होते.

येथील महामाघम् सरोवरस्थानी दर बारा वर्षांनी माघी कुंभमेळा भरत असून, येथे शिवाची बारा, विष्णूची चार आणि ब्रह्मदेवाचे एक मंदिर आहे. धार्मिक दृष्ट्या महत्त्वपूर्ण अशी ही मंदिरे स्थापत्यदृष्ट्या नगण्य असून, उत्तरकालीन पुनर्बांधणीमुळे त्यांचे विदग्ध स्वरूप नाहीसे झाले आहे. त्यामुळे याच्या पुरातनत्वाला साजेशी मंदिरे येथे आढळत नाहीत. तत्रापि येथील नागेश्वर आणि कुंभेश्वर मंदिरे अनुक्रमे प्रारंभिक ( इ. स. १० वे शतक ) आणि उत्तरकालिन ( कुलोत्तुंग द्वितीय आणि तृतीय ) चोल शैलीची प्रातिनिधिक उदाहरणे मानली जातात.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा ).

**भागवतात**—या पुराणातील बलराम-तीर्थयात्रामते बलरामाने द्रविड→वेंकटाद्रि→कामकोष्णी ( कुंभकोणम् ) → कांची क्रमाने दक्षिण भारताची यात्रा केली होती ( भा. १०.७९.१४ ).

### कुंभकोणम् तीर्थाची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. भागवत ( १०.७९.१४ ) | कामकोष्णी |
| २. वायु पुराण ( ७७.४७ ) | कुंभतीर्थ |
| ३. तामीळ साहित्य | मलैकुरम् |
| ४. तामीळ शिलालेख साहित्य | तिरुक्कुडमूक्किल |
| ५. स्थानिक नामांतरे | कल्याणपुरम्<br>देवलोकपट्टनम्<br>शिवविष्णुपुरम्<br>शारंगराजपट्टणम्<br>संत्रादि देवस्थानम्<br>क्षेत्रसरम् |

**आख्यायिका**—पेरियार पुराणात या क्षेत्राच्या निर्मितीविषयी निम्नलिखित आख्यायिका दिली आहेः—पृथ्वीप्रलयसमयी ब्रह्मदेवाने शिवसूचनेवरुन सृष्टीच्या अमृतस्वरूपी आदिबीजाच्या रक्षणार्थ अमृतमिश्रित मृत्तिकेपासून एक कुंभ तयार केला आणि श्रीफल, आम्रपत्रे आणि कुशतृणांनी आच्छादून तो मेरु पर्वतावर ठेवला. प्रलयकाली वहात येणारा हा कुंभ किरातरूपधारी शिवाने फोडताच त्यातील अमृतत्वरूपी आदिबीज दहा कोसपर्यंत विखुरले जाऊन त्यामधून या ( कुंभकोणम् ) क्षेत्राची निर्मिती झाली. येथे ठायीठायी पडलेल्या अमृतबिंदूंमधून येथील विभिन्न तीर्थांची, साकळलेल्या अमृतप्रवाहांपासून ' महामाघम् ' आणि ' पोत्तमरैकुलम् ' ( शारंगपाणि मंदिर ) नामक सरोवरांची, आणि कुंभाच्या विदीर्ण तुकड्यांमधून ' कुंभेश्वर ' शिवलिंगाची निर्मिती झाली.

**पंच शिवतीर्थे**—उपरोक्त आख्यायिकेनुसार या क्षेत्रामध्ये उत्पन्न झालेली पंच शिवतीर्थे ( पंचक्रोश स्थले ) पुढीलप्रमाणे होतः—१. तिरुविडैमरुडूर; २. तिरुनागेश्वरम्; ३. तिरुधरासुरम्; ४. तिरुवोरगम्; ५. तिरुपदल्वनम्. या तीर्थांच्या परिक्रमेनंतरच कुंभेश्वराच्या मुख्य मंदिराचे दर्शन यात्रेकरू घेतात.

**अन्य आख्यायिका**—येथील अन्य एका आख्यायिकामते श्रीविष्णूस केलेल्या लत्ताप्रहाराच्या पापक्षालनार्थ भृगु ऋषींनी गुह नामक भिल्ल आणि हेम नामक ऋषींचा पुनर्जन्म घेऊन मेरु पर्वतनिवासी विष्णूची तपस्या केली. त्याच्या फलस्वरूप विष्णूने त्यांचा जामात बनण्याचा वर देऊन कुंभकोणम् येथील हेमपुष्करिणीमध्ये हेम ऋषींस लक्ष्मीदेवी नामक कन्या प्रदान केली. या 'कमलनिवासिनी,

(कमलवल्ली) कन्येचा विवाह हेम ऋषींनी श्रीविष्णूसमवेत केला. तेव्हापासून या स्थानास 'कल्याणपुर', 'शिवविष्णुपुर', आणि 'शारंगराजपट्टणम्' आदि नावे प्राप्त झाली. येथे लक्ष्मीदेवी श्रीविष्णूच्या आधी अवतीर्ण झाल्यामुळे येथील कमलवल्ली देवीचे दर्शन घेऊन यात्रेकरू शारंगपाणि विष्णूच्या दर्शनास जातात.

शिवमंदिरे—येथील प्रमुख शिवमंदिरे पुढीलप्रमाणे होत :—

(१) कुंभेश्वर मंदिर—चोल राजा कुलोत्तुंग (द्वितीय आणि तृतीय) च्या राज्यकालातील उत्तरकालीन चोल स्थापत्यशैलीचे या गावचे हे मध्यवर्ती पूर्वाभिमुख मंदिर (व्याप्ती– १ लाख ८९ हजार चौरस फूट; गोपुर–उंची– १२८ फूट) येथील पवित्रतम देवालय असून, त्याच्या भोवतालच्या चार प्राकारात विनायक, सुब्रह्मण्यम्, सप्तकन्यका,लक्ष्मी आदींची मंदिरे आहेत. यापैकी सुब्रह्मण्यम्-मूर्ती सहा मस्तके आणि द्वादश हस्तयुक्त असून, कुंभेश्वर मंदिराच्या 'नवरात्री मंडपा'त २७ नक्षत्रे आणि १२ राशियुक्त महाकाय शिला आहे.

(२) नागेश्वर मंदिर—पूर्वकालीन चोल स्थापत्यशैलीचे (इ. स. १० वे शतक) हे शिवमंदिर येथील प्राचीनतम मंदिर असून, त्याच्या गोपुरछिद्रातून शिवलिंगावर वर्षातून तीन वेळा किरणाभिषेक होतो. या मंदिरात सूर्याचे स्वतंत्र मंदिरहि आढळते.

(३) काशी–विश्वनाथ मंदिर—हे महामाघम् सरोवराच्या उत्तरेस आहे.

विष्णुमंदिरे—कुंभकोणम् येथील प्रमुख विष्णु मंदिरे पुढीलप्रमाणे होतः—

(१) शारंगपाणि मंदिर—दक्षिण भारतातील रंगनाथ (श्रीरंगम्) आणि वेंकटाचलपति (तिरुपति) च्या खालोखाल महत्त्वपूर्ण अशा या मदुरानरेशनिर्मित विष्णुमंदिराचे बारा मजली मुख्य गोपुर (उंची–१४६'; व्याप्ती– ९०'×५१'), आणि त्यावरील रेखीव आणि प्रमाणबद्ध नक्षीकाम उत्तरकालीन दाक्षिणात्य गोपुरस्थापत्यात सर्वोत्कृष्ट मानले जाते. या गावच्या उभय अंगांच्या कावेरी आणि अरसलार नद्या या मंदिरानजिकच असून, त्याचे दक्षिण आणि उत्तर प्रवेशद्वार 'दक्षिणायन' आणि 'उत्तरायण' नावाने प्रसिद्ध आहे. यापैकी दक्षिणायन प्रवेशद्वारातून शारंगपाणि विष्णु कमलवल्लीच्या विवाहासाठी गेला होता. येथील समृद्ध नक्षीकामयुक्त लाकडी रथद्वयहि प्रेक्षणीय आहे.

(२) चक्रपाणि मंदिर—स्मशानानजिकच्या या मंदिरामुळेच येथील स्मशान 'चक्रपाणि–थुरै' नावाने प्रसिद्ध आहे.

(३) पाताल श्रीनिवास मंदिर—यामधील श्रीनिवासमूर्ती तिरुपतीहून येथे आणण्यात आली.

अन्य मंदिरे—कुंभकोणम् येथील अन्य मंदिरे पुढीलप्रमाणे होत :—

(१) रामस्वामी मंदिर—तंजोरच्या रघुनाथ नायक राजास (इ. स. १६ वे शतक) दारासुरम् तलावात सापडलेल्या रामसीतेच्या मूर्ती त्याने येथे स्थापिल्या असून, रामायण–कथाभागाधारित अनेक शिल्पचित्रे येथे आहेत. येथील उत्तरकालीन नायक स्थापत्यशैलीचा बाह्य मंडप श्रीरंगम् येथील जंबूकेश्वर मंदिराच्या बाह्य मंडपाच्या अनुकरणाने बांधला आहे.

(२) विनायक मंदिर—हे मंदिर 'करुंबेरियम् विनायक' वैकल्पिक नावाने प्रसिद्ध आहे.

सरोवरे—येथील प्रमुख सरोवरे पुढीलप्रमाणे होतः—

(१) महामाघम् सरोवर—'अनुराधा तीर्थ', 'कन्या तीर्थ' 'पापनाशन तीर्थ' वैकल्पिक नावांनी प्रसिद्ध असणाऱ्या या सरोवराभोवती (व्याप्ती– २० एकर) शोभिवंत सभामंडप असून, गुप्त कूपस्वरूपी अनेक उपतीर्थे येथे आहेत. दर वर्षी माघ महिन्यात येथे कुंभेश्वराचा, तसेच दर तेरा वर्षांनी येथे कुंभमेळ्याचा उत्सव होतो.

(२) हेमपुष्करिणी—शारंगपाणि मंदिराच्या अंगभूत अशा या हेम ऋषींच्या नावावरून सुविख्यात असलेल्या तलावाकाठी (३६१' × २८५') माघ महिन्यात मोठा उत्सव होतो.

सांस्कृतिक महत्त्व—येथील कांची शंकराचार्यांच्या मठात कांची येथील कामकोटि पीठ स. १७४३ मध्ये हलविण्यात आले. त्यायोगे संस्कृत विद्याकेंद्र म्हणून यास नवी प्रतिष्ठा प्राप्त झाली.

**कुम्भरिया** (जैन स्थान)—गुजरातमधील एक जैन मंदिरस्थान. अबू पर्वतावरील ऋषभनाथ मंदिराच्या (स. १०३१) अनुकरणाने बांधलेले पांढऱ्या संगमरवरी दगडाचे एक जैन मंदिर येथे आहे (गोएट्झ, पृ. १५५).

**कुम्भरी** (ग्राम)—कलचुरि राजा जाजल्लदेव (द्वितीय) च्या स. ११६७ च्या मल्लार शिलालेखमते उत्तर प्रदेशातील गंगा नदीकाठचे एक ग्राम. सोमराज नामक ब्राह्मणाने येथे केदार शिवाचे देवालय बांधले होते. याचे आधुनिक स्थान समजत नाही (कॉर्पस्. इन्स्क्रि.

४.२.५१३ ).

**कुम्भारोटक** ( ग्राम )—सोळंकी राजा सीयकाच्या वि. सं. १००५ च्या शिलालेखमते उत्तर गुजरातमधील खेटक मंडलान्तर्गत मोहडावासक विषयातील एक ग्राम. मध्य व उत्तर गुजरातच्या सीमेवरील प्रांतीज तालुक्यातील मोदस गावच्या १३ मैल पूर्वेकडील आधु. काम्रोद गाव हेच होय ( एपि. इंडि. १९.२३६ ).

**कुम्भि** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.९५ )

२. ( लिंग ) काशी येथील ज्येष्ठेश्वरानजिकचे एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ६५.१३ ).

**कुम्भी** ( ग्राम )—कलचुरि राजा विजयसिंहाच्या स. ९३२ च्या ताम्रपटाचे मध्यप्रदेशातील जबलपुर गावापासून ३५ मैल ईशान्यकडील हेरन नदीच्या दक्षिण किनाऱ्यावरील उपलब्धिस्थान ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.६४५ ).

२. ( नदी ) शिलाहार राजा भोज ( द्वितीय ) च्या शके ११०४ च्या कोल्हापुर शिलालेखमते कोल्हापुर विभागातील धामणि नदीच्या पश्चिमेकडील एक नदी ( एपि. इंडि. २९.१५ ).

**कुम्भीश्वर** ( लिंग )— प्रभासक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंग ( स्कन्द. प्रभास. प्र. २६६ ).

२. वस्त्रापथक्षेत्रातील एक शिवलिंग ( स्कन्द. प्रभास. व. ३.४ ).

३. काशी येथील वारणा नदीच्या पूर्व किनाऱ्यावरील एक शिवलिंग ( लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. ४५ ).

**कुम्भोज** ( जैन तीर्थ )—महाराष्ट्रातील मिरज-कोल्हापुर रेलमार्गावरील हातकणंगले रेल्वेस्थानकापासून ४ मैलांवरील एक पर्वतीय जैन तीर्थ. येथील डोंगरावर ५ जैन मंदिरे, तसेच बाहुबली पादुका आहेत ( ती. पृ. २७६ ).

**कुम्रहार** ( शिलालेखस्थान ) — बिहार प्रांतातील पाटणा गावानजिकचे खरोष्ट्री मृत्तिकाशिल्पलेखस्थान. वायव्य भारताबाहेरील दुर्मिळ खरोष्ट्री लेखांमध्ये या शिल्पाची गणना असून, स्टेन कोनो यांच्या मते ते वायव्य भारतातील एखाद्या यात्रेकरूने येथे आणले असावे.

**मृत्तिकाशिल्प**— येथील मंदिर-प्रतिकृतियुक्त मृत्तिकाशिल्पलेखमते कौथुम कुलोत्पन्न संघदासाने हे बौद्धावशेष मंदिर ( किति ) कोरले असून, स्पूनर आणि स्मिथ यांच्या मते ही अनुक्रमे बोधिगया आणि पाटलिपुत्र येथील मंदिरांची प्रतिकृती असावी.

**लिपी**—स. १८–२५ मधील पाजा आणि बंज पर्वत शिलालेखसदृश, तसेच उत्तरकालीन जौलिया शिलालेखसदृश संमिश्र अक्षरपंक्तियुक्त हा लेख इ. स. १ ल्या शतकातील असावा ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.१७८ ).

**कुयिसम्बपालिस** ( देशविभाग )— कलचुरि राजा विजयसिंहाच्या स. ११९५ च्या रेवा ताम्रपटमते मध्यप्रदेशातील ककरेडी गावाच्या परिसरातील एक देशविभाग ( पट्टल ). छिंडोडा नामक एक ग्राम यामध्ये होते. ककेरी ( प्राचीन ककरेडी ) गावापासून १२ मैल आग्नेयेकडील आधु. कूड्या गावाच्या परिसरातील प्रदेश हाच होय ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.३६० ).

**कुरक** ( देश )— दक्षिण भारतातील एक देश ( म. भी. १०.६१ ).

**कुरकुञ्ज** ( देश )—जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक देश ( वराह. ८३.२ ).

**कुरङ्ग** ( क्षेत्र )— महाभारत अंगिरस्यात्रामते करतोया नदीकाठचे एक क्षेत्र ( म. अनु. २५.१२ ).

२. ( पर्वत ) भागवतमते जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वताचा एक केसर पर्वत ( भा. ५.१६.२६ ).

**कुरट** ( देश )— दक्षिण भारतातील एक देश ( पद्म. आदि. ६.५८ ).

२. कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या ईशान्य भागातील एक देश ( मार्क. ५५.५१ ).

**कुरण** ( देश )— ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते मध्य आशियातील वक्षु ( आधु. अमूदरिया ) नदीच्या दक्षिण किनाऱ्यावरील लम्घन् देशाच्या ६०० मैल आग्नेयेकडील एक देश. लजवर्द गावाच्या उत्तरवर्ती कोक्च खोऱ्यातील हिंदकुश पर्वतवेष्टित आधु. कुरन् देश हाच असावा ( बील, १.१०७ ). भारताहून चीनला जातेवेळी ह्युएन्त्संग येथे आला होता.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते हिंदुकुश पर्वत आणि कू–लु नदीने दक्षिण–उत्तर सरहद्द बनलेला हा ( कु–लंग्–न ) देश ( व्याप्ती– ६०० मैल ) पूर्वकाली तुखार देशात समाविष्ट होता. येथील हवामान आणि पीकपाणी लम्घन् देशासदृश असून, येथील असंस्कृत लोकांमध्ये राज्यघटनेचा अभाव होता. येथील राजा बौद्धधर्मीय असला, तरी येथे बौद्ध धर्मप्रसार अत्यल्प आणि बौद्ध मठ तुरळक होते. येथील हु–ति–पो राजाने चीनच्या तांगसम्राट तै–त्सुंग्ला स. ६४६ मध्ये भारतीय लिपीबद्ध पत्र पाठविले होते.

**सोन्याच्या खाणी**—ह्युएन्त्संगच्या मते येथील सोन्याच्या

खाणीत अश्मखंड फोडून सुवर्णकण गाळण्यात येत असत. आजहि हा देश हिऱ्याच्या खाणींसाठी प्रसिद्ध आहे ( वॉटर्स, २.२७८–२७९ ).

**कुरण्ड** ( पर्वत )—जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वताच्या पूर्ववर्ती एक पर्वत ( लिङ्ग. ४९.४१ ).

**कुरर** ( पर्वत )—जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वताच्या पूर्ववर्ती एक पर्वत ( भा. १६.२६ ). पाठभेद–'कुररिन्' ( ब्रह्म. १८.३२; विष्णु. २.२.२५ ).

**कुरर्घर** ( पर्वत )—बौद्ध आणि जैन साहित्यमते अवंती देशातील महाकात्यायन वास्तव्यपुनीत एक पर्वत ( लॉ, माउंटन्स. पृ. १७ ).

**कुरली** ( ग्राम )—चालुक्य राजा त्रिभुवनपालाच्या वि. सं. १२९० च्या शिलालेखमते उत्तर गुजरातेतील सारस्वत मंडलान्तर्गत दंडाहीपथकातील ( आधु. सिद्धपुर तालुका ) भांबर ( आधु. भाखर ) गावाच्या पूर्ववर्ती एक ग्राम ( इंडि. अँटि. ६.२०८–२१० ). सिद्धपुर तालुक्यातील आधु. रणछोडपुर गाव हेच होय ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २५९ ).

**कुरवेश्वर** ( लिंग )—तापी नदीकाठचे एक शिवलिंग ( तापीमाहात्म्य. ८७ ).

**कुरिच्चि** ( ग्राम )—पांड्य शिलालेखमते दक्षिण भारतातील 'मणैक्कुडि' ग्रामाचे नामांतर ( सेवेल, इन्क्रि. पृ. ३७७; मणैक्कुडि पहा ).

**कुरु** ( देश )—पाणिनीची अष्टाध्यायी आणि पौराणिक साहित्यमते भारतवर्षान्तर्गत मध्यदेशातील ( आधु. गंगा नदीचे खोरे ) गंगा-यमुना दुआबातील पाच जनपदांपैकी एक ( पा. सू. ४.१.१७२; वायु. ४७.४८; मत्स्य. १२१.४९ ). महाभारत आणि पौराणिक साहित्यमते हा देश सरस्वती नदीकाठी ( म. श. ५३.१९ ), गंगा नदीच्या पश्चिमेस ( ब्रह्माण्ड. १८.५० ), हस्तिनापुर-कुरु-मगध मार्गावर होता ( म. स. १८.२६ ). या देशाच्या उत्तर सरहद्दीवर शतद्रु आणि इरावती नद्या आणि त्या पलीकडे व्राहीक देश होता ( म. क. ३०.२१ ). अल्बेरुणीच्या मते हे लोक स्थानेश्वर ( आधु. थानेसर ) च्या परिसरात रहात असत.

**वैदिक संस्कृतिकेंद्र**— कुरु, पांचाल, शूरसेन आणि वत्स या वैदिक संस्कृतीच्या केंद्रस्थानभूत चार देशांनी केलेल्या उत्तर भारतातील आर्य संस्कृतीच्या प्रसारामुळे मनुस्मृतिकाळी ते 'ब्रह्मर्षि देश' (पवित्र लोकांचा देश) नावाने सुविख्यात झाले. ब्राह्मण साहित्यमते कुरु आणि कुरु-पांचाल देशद्वय 'आर्य संस्कृतिकेंद्र' अशा अर्थाने 'ध्रुवा मध्यमा दिक्' ( ऐ. ब्रा. ८.१४ ), अथवा 'मध्यदेश' ( ब्रह्माण्ड. १६.४०; विष्णुधर्म. १.९.२ ) नावाने सुविख्यात असून, वैदिक साहित्यात सर्वत्र 'कुरु-पांचाल' जोडदेशाचा निर्देश आढळतो.

ऋग्वेदकालीन सरस्वती या सर्वप्रमुख नदीच्या पूर्वेस सरस्वती, गंगा, यमुना नद्यांच्या परिसरात ( मध्यदेश ) कुरु–पांचाल लोकसमूहांच्या आद्य वसाहती असून, त्यापैकी कुरु लोकांचा बालेकिल्ला ( कुरुक्षेत्र ) सरस्वती–दृषद्वती दुआबात, आणि राजधानी आसंदीवत् येथे होती. ब्राह्मण ग्रंथकाळी सरस्वती नदी लुप्त झाल्यानंतरहि मध्यदेशाची पूर्व सरहद्द याच नदीच्या विनशन तीर्थाने बनत असे.

**भौगोलिक सीमारेषा**—रॅप्सन यांच्या मते गंगा-यमुना दुआबाच्या उत्तर भागातील शूरसेन जनपदानजिकच्या या देशाच्या पूर्वेस उत्तर पांचाल, आणि दक्षिणेस गंगा-यमुना दुआबाच्या दक्षिण भागातील दक्षिण पांचाल देश होता. या दोन नद्यांच्या प्रयाग येथील संगमाच्या परिसरात वत्स देश होता ( एन्शन्ट इंडिया. पृ. १६५ ).

अग्रवाल यांच्या मते 'कुरुराष्ट्र', 'कुरुक्षेत्र' आणि 'कुरुजांगल' संज्ञक उपविभागांत विभागलेला हा गंगा-यमुना-सरस्वती दुआबातील देश दृषद्वतीतीरवर्ती कुरुक्षेत्र आणि पांचाल देशांच्या दरम्यान असून, आधु. दिल्ली, मीरत आणि हिस्सार प्रदेश ( प्राचीन इंद्रप्रस्थ, हस्तिनापुर आणि स्थानेश्वर प्रदेश ) हाच होय. या जनपदाच्या उपविभागांपैकी कुरुराष्ट्र गंगा-यमुना दुआबातील आधु. मीरत प्रदेशात असून, उर्वरित दोन भाग त्याच्या उत्तरेस होते ( कुरुक्षेत्र, कुरुजांगल पहा ).

अली यांच्या मते गंगा-यमुना दुआबान्तर्गत या देशाच्या भौगोलिक परिसीमा पुढीलप्रमाणे होत्या :—१. **पश्चिमेस**–घग्गर नदी; २. **पूर्वेस**–गंगा नदी; ३. **उत्तरेस व दक्षिणेस**–निबिड अरण्य. याच्या इंद्रप्रस्थ आणि हस्तिनापुर संज्ञक राजधान्या गंगा आणि यमुना नद्यांच्या काठी होत्या.

**आद्य वसाहत**—अली यांच्या मते या लोकांची आद्य वसाहत यमुना नदीच्या पश्चिमवर्ती सतलज–गंगा दुआबात ( आधु. दिल्ली शहराचा पार्श्वभाग ) असून, उत्तरकालात ते पूर्ववर्ती यमुना नदीच्या रोखाने गंगा-यमुना दुआबात स्थायिक झाले.

**सांस्कृतिक महत्त्व**—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते वैदिककालीन गृहस्थाश्रमीयांच्या धार्मिक, नैतिक आणि दैनंदिन

जीवनाचा नवा आदर्श (कुरु गार्हपतम्) येथील लोकांनी प्रस्थापित केला (पा. सू. ६.२.४२). भगवद्गीतेतील कर्मप्रधान नीतिधर्माचे, तसेच कुरुधम्म जातकातील धर्मनिष्ठ जीवनाचे (कुरुवत्त धम्म; जा. ३.२७६) नवे आदर्श याच देशाने भारतास प्रदान केले. उपनिषत्साहित्यमते येथील राजे आणि ब्राह्मण आदर्श असून (छां. उ. १.११८), त्यामुळेच भौगोलिक, राजकीय आणि सांस्कृतिक दृष्ट्या हा महत्त्वपूर्ण देश बनला होता.

महाभारतमते ब्रह्मर्षि देशान्तर्गत पाचाल, कुरु, मत्स्य आणि शूरसेन हे अनुक्रमे ब्राह्म, धर्म, सत्य आणि यज्ञ यांचे प्रतीक होते :—

ब्राह्मं पाञ्चाला कौरवेयाः स्वधर्मः ।
सत्यं मत्स्याः शूरसेनाश्च यज्ञः ॥
(म. क. ३०.७३).

**कुरुप्रधान देश**—पौराणिक आख्यायिकामते विहारपासून राजपुतान्यापर्यंतच्या यमुनातीरवर्ती प्रदेशातील मगध, करूष, चेदि, वत्स आणि मत्स्य आदि राजवंश वांशिक दृष्ट्या कुरुकुलोत्पन्न असून, या कुलातील वासववंशीय चैद्योपरिचर (चेदिविजेत्या) वसु राजाच्या निम्नलिखित पुत्रांनी उत्तर भारतातील पाच राज्यांची स्थापना केली:— १. बृहद्रथ–मगध; २. प्रत्यग्रह–चेदि; ३. कुशांब–कौशांबी; ४. ललित्थ–करूष; ५. मारुत–मत्स्य (पार्गि., पृ. ११८; २९४).

महाभारतमते मध्यवर्ती कुरु जनपदाभोवती (परितः कुरून्) उत्तर भारतातील पांचाल, चेदि, मत्स्य, शूरसेन, पटच्चर, दशार्ण, नवराष्ट्र, मल्ल, शाल्व, युगंधर, कुंति, सुराष्ट्र, अवंति आदि जनपदे होती—

'सन्ति रम्या जनपदा बह्वन्नाः परितः कुरून् ।
पाञ्चालाश्चेदिमत्स्याश्च शूरसेनाः पटच्चराः ॥
दशार्णा नवराष्ट्रं च मल्लाः शाल्वा युगन्धराः ।
कुन्तिराष्ट्रं च विस्तीर्णं सुराष्ट्रावन्तयस्तथा ॥
(म. वि. १.९–१०).

उपरोक्त जनपदांपैकी शाल्व, मत्स्य, शूरसेन आणि पांचाल देश कुरु देशाच्या सीमावर्ती असून, चेदि देश मत्स्य, शूरसेन आणि पांचाल देशांच्या पलीकडे होता. सुराष्ट्र, अवंती आणि दशार्ण हे यापासून सुदूर होते. यावरून कुरुप्रधान देशांची ही नामावली सांस्कृतिक स्वरूपाची असून, तत्रस्थ आर्य संस्कृतीचे हे लोक अग्रदूत असावेत.

**नामांतरे**— प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात:—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. बृहत्संहिता (१४.४) | दक्षिण कुरु |
| (१६.३२) | कुरुभूमि |
| (११.५७) | कुरुक्षेत्र, कौरव |
| २. बौद्ध साहित्य | कोरव्य |
| ३. महाभारत (आ. १०५.२१) | कुरुराष्ट्र |
| ४. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य | |
| अ. (मंख. १४.१८६; मेदिनी. ४१.१७; शब्द-रत्न. ९४.१७) | श्रीकंठ |
| ब. (कल्पद्रु. ५.१२) | कुरुजांगल |

**उत्पत्ती**— बौद्ध आख्यायिकामते हे लोक हिमालयाच्या उत्तरवर्ती उत्तर कुरु देशातून गंगा-यमुना खोऱ्यात स्थलांतरित झाले. बौद्ध पपंचसूदनीमते जंबूद्वीपसम्राट महामांधातृ पूर्व विदेह, अपरगोदान, उत्तर कुरु आणि देवलोक जिंकून परत येत असता उत्तर कुरु देशातील बहुसंख्य लोक त्याचे समवेत जंबूद्वीपात येऊन त्यांनी 'कुरुरठम्' (कुरुराष्ट्र) नामक वसाहत स्थापिली (पपञ्च. पृ. २२५-२२६).

वैदिक इंडेक्समते ऋग्वेदात त्रसदस्युवंशज म्हणून निर्देशिलेले (ऋ. ४.३८.१; ७.१९.३) सरस्वतीतीर-निवासी पूरु लोक त्यांच्या तृत्सु-भरत नामक भूतपूर्व शत्रूंमध्ये सम्मीलित होऊन, त्यापासून कुरु लोकांची निर्मिती झाली. पूरु आणि तृत्सु-भरत लोकांनी सरस्वती, दृषद्वती, आणि आपया नद्यांचे काठी संयुक्तपणे अग्नि-प्रज्वलन केल्याचा ऋग्वेदातील निर्देशहि (ऋ. ३.२३), कुरु लोकांच्या कुरुक्षेत्रातील वसाहतीकरणाचा निदर्शक असावा. कोशल, विदेह आणि काशी लोकांच्या तुलनेने कुरु-पांचालांचे हे वसाहतीकरण काहीसे उत्तरकालीन, आणि म्हणूनच काशी-विदेह लोकांना पूर्व दिशेप्रत ढकलून झाले असावे (वे. इं. १.१६८).

महाभारतमतेहि कुरु लोक 'पूरुवंशीय' असून, पुरूरवस् ऐल वंशातील पूरु नामक पाचव्या राजाने 'पूरु' वंशाची आणि संवरणपुत्र कुरु नामक एकादश राजाने 'कुरु' लोकसमूहाची स्थापना केली. त्याचेच नावावरून या देशास हे नाव प्राप्त झाले (म. आ. ७५).

ऋग्वेदात-- या ग्रंथातील कुरुश्रवण (ऋ. १०.३३.४) आणि पाकस्थामन् कौरयाण (ऋ. ८.३.२१). हे राजे कुरुवंशीय असावेत. अथर्ववेदात परिक्षित् नामक कुरु राजाचा निर्देश असून (अ. वे. २०.१२७.७), परिक्षित्पुत्र जनमेजयकृत अश्वमेध यज्ञाचा निर्देश शतपथ ब्राह्मणात आढळतो (श. ब्रा. १३.५.४). यास्काचार्यांच्या निरुक्तमते देवापि आर्ष्टिषेण आणि शंतनु हे 'कौरव्य' (कुरुवंशीय) राजे असून (नि. २.१०), झीमर यांच्या मते ऋग्वेदातील 'वैकर्ण' (ऋ. ७.१८.१) हे 'कुरु-पंचाल' लोकांचेच नामांतर होय.

उत्तरकालीन वैदिक साहित्यात—काठक संहितामते कुरु-पंचालांच्या नैमिषीय यज्ञात कुरु राजा धृतराष्ट्र वैचित्र्य-वीर्याने बक दाल्भ्य ऋषींशी यज्ञविषयक संवाद केला होता (का. सं. १०.६). वाजसनेयी संहितेच्या काण्व शाखामते तत्काली कुरु-पंचाल लोकांचा संयुक्त राजा होता (वा. स. ११.३.३).

ब्राह्मण साहित्यात—या ग्रंथकाली हे लोक तत्कालीन भारतातील सर्वप्रमुख क्षत्रिय लोक असून, बहुतांशी साऱ्या ब्राह्मण ग्रंथांची रचना (इ. स. पू. ८००-६००) या देशातच झाली. ऐतरेय ब्राह्मणातील ऐंद्राभिषेकाच्या वर्णना-वरून त्या ग्रंथाचा कर्ता या देशातीलच असावा. या ग्रंथमते कुरु-पांचाल देश उत्तरकालात 'मध्यदेश' नावाने सुविख्यात झाला (ऐ. ब्रा. ८.१४).

'कुरु-पंचाल' लोकसमूहाचा संयुक्त निर्देश ब्राह्मण साहित्यात अनेक ठिकाणी असून (जै. उ. ब्रा. ३.७.६; ८.७; ४.७.२; गो. ब्रा. १.२.९), या लोकांची भूमी वाणीचे (ज्ञानाचे) परमनिधान (श. ब्रा. ३.२.३.१५), आणि यांची यज्ञपद्धती सर्वश्रेष्ठ होती (श. ब्रा. १.७.२.८). शिशिर ऋतूमध्ये दिग्विजयार्थ निघणारे येथील राजे ग्रीष्म ऋतूत मायदेशी परतून राजसूय यज्ञ करीत असत (तै. ब्रा. १.८.४.१-२; श. ब्रा. ५.५.२.३-५). शतपथ ब्राह्मणमते बाह्लीक प्रातीपीय राजाहि 'कौरव्य' (कुरुकुलोत्पन्न) होता (श. ब्रा. १२.९.३.३).

उपनिषत्साहित्यात—बृहदारण्यक उपनिषद्मते विदेहराज जनकाने कुरु-पांचाल देशीय ब्राह्मणांना विपुल दक्षिणा दिली होती (बृ. उ. ३.१.१). छांदोग्य उपनिषद्मते येथील टोळधाडीच्या संकटामुळे अशुद्ध-अन्नभक्षण-दोष घडलेला चाक्रायण नामक ऋषी स्वतःच्या तपः-सामर्थ्याने इभ्यग्राम येथील यज्ञाचा अध्वर्यु बनला (छां. उ. १.१०.१-७). उपनिषत्साहित्यमते हा देश ब्राह्मणांचे आणि तत्त्वज्ञांचे आगर होता (बृ. उ. ६.१.९; ९.२०; कौ. उ. ४.१).

बौद्ध साहित्यात—या साहित्यमते तत्कालीन भारतवर्षा-तील (जंबूद्वीप) सोळा महाजनपदांपैकी हा एक असून (दीघ. २.२००; अङ्गुत्तर. १.२१३), येथील कम्मास-धम्म गावच्या वनात गौतम बुद्ध अनेक वेळा राहिला होता. दीघनिकायान्तर्गत 'महानिदान' आणि 'महासतिपट्ठान' सूत्रांचे प्रणयन त्याने या देशातच केले होते (पपञ्च. पृ. २२७-२२९).

जातकमते बौद्धकाली या देशाचे राजकीय महत्त्व नाहीसे झाले असले (जा. २.२१४), तरी या देशाचा आणि त्याच्या इंद्रप्रस्थ नामक राजधानीचा विस्तार अनुक्रमे ६०० मैल आणि ७ मैल होता (जा. ५.५७; २२५; ४८४; महावस्तु. १.३४; २.४१९). या ग्रंथकाली येथे युधिष्ठिरगोत्रीय राजवंशाचे राज्य होते (जा. ३.४००; ४.३६१). येथील धनंजय कौरव्य नामक पूर्वकालीन राजाच्या राज्यकाली (जा. २.३६६; ३.४००; ४.३६१; ४७०; ५.४५७; ६.२६०) हा देश उत्तर पांचालपर्यंत पसरला होता (जा. ४.४४४).

पपंचसूदनीमते येथील ध्येयप्रवण लोक ज्ञानाचे आणि आरोग्याचे चाहते असून (पपञ्च. मनोरथ. १.१८४; २.८२०), गौतम बुद्धाने येथे अनेक धर्मप्रवचने दिली होती (अङ्गुत्तर. ५.२९-३२; संयुत्त. २.९२-९३; १०७-१०९; मज्झिम. १.५५; ५०१; २.२६१; दीघ. २.५५; २९०). गौतम बुद्धाची ही सारी प्रवचने कम्मास-धम्म (जयद्दिस बोधिसत्त्वाने कम्मास राजपुत्रास यक्षिणी-पासून मुक्त केलेले स्थान) गावी झाली होती (जा. ५.२१).

धम्मपदटीकामते या देशातील थुल्लकोट्ठिक गावी जन्मलेल्या रट्ठपाल नामक भिक्षूने येथील कौरव्य राजास बौद्ध धर्मदीक्षा दिली होती (धम्मपदटीका. ३.२४१-२४२). कोशलसम्राटाचा अग्निदत्त नामक पुरोहित कुरु-अंग-मगध देशांच्या सरहद्दीवर दहा हजार शिष्यांसमवेत रहात असे (धम्मपदटीका. ३.२४६-२४७).

कुरुधम्मजातकमते या देशातील इंदपत (इंद्रप्रस्थ)— सम्राट धनंजय कौरव्याच्या पोटी बोधिसत्त्वाने जन्म घेतला असून, पंचशीलयुक्त कुरुधर्माच्या पालनामुळे या देशास अपार वैभव प्राप्त झाले होते (जा. ४.२२७-२३१; ५.३१-३७). अन्य जातकातहि या राजाचे अनेक निर्देश आढळतात (जा. ४.३६१; ६.२५५).

**जैन साहित्यात**—उत्तराध्ययन सूत्रभाष्यमते या देशात इषुकार नामक समृद्ध नगर होते ( जैन सूत्राज्. २.६२ ).

**राज्यघटना**—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते हे एकराज जनपद ( पा. सू. ४.१.१७२; १७६; २.१३० ) असून, कौटिलीय अर्थशास्त्रमते या, तसेच पांचाल देशात 'राजशब्दोपजीवि' संघराज्य होते ( कौ. अ. श्यामाशास्त्री, पृ. ४५५ ). याचे उलट काशिका ग्रंथमते येथे अंधकवृष्णि लोकांप्रमाणेच 'राजन्य' ( विभिन्न संघविभाजित ) संघराज्य होते. यावरून या देशाच्या मध्यवर्ती जनपदात ( एकराज ) अंशतः स्वायत्त 'राजन्य' ( आयुधजीवि ) संघ अस्तित्वात असावेत. अग्रवाल यांच्या मते हे संघ यमुना नदी आणि कुरुक्षेत्र यांच्या दरम्यान असावेत ( अग्रवाल, पाणिनि. पृ. ४६३ ).

**महाभारतात**—या ग्रंथकाळी हे लोक उत्तर भारतातील सर्वाधिक सामर्थ्यसंपन्न लोक असून, येथील भीमसेन पांडवाने मगधराज जरासंधाचा वध करून ते साम्राज्य जिंकले. युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या अर्जुन, भीम, नकुल आणि सहदेवाच्या उत्तर, पूर्व, दक्षिण आणि पश्चिम दिग्विजयांच्या महाभारतान्तर्गत वर्णनावरून उत्तर भारतातील बहुतांशी प्रदेश तत्काली या साम्राज्याच्या अंकित असावा.

महाभारतमते विचित्रवीर्यपुत्र धृतराष्ट्र आणि पांडूमुळे कुरु राजवंशाच्या कौरव आणि पांडव संज्ञक दोन उपशाखा भारतीय युद्धापूर्वी निर्माण झाल्या. त्यापैकी पांडूने या साम्राज्याची विगत कीर्ति पुन्हा मिळविली ( म. आ. १०५.२१ ). पांडूच्या मृत्यूनंतर राजा बनलेल्या धृतराष्ट्राने पांडुपुत्रांना इंद्रप्रस्थाचे राज्य देऊन, दुर्योधनादि स्वपुत्रांना हस्तिनापुरचे युवराज बनविले. दुर्योधनाने द्यूतक्रीडेच्या कारस्थानाने पांडवांचे इंद्रप्रस्थाचे राज्य हिरावून त्यांना तेरा वर्षे वनवासास पाठविले.

**भारतीय युद्ध**—वनवाससमाप्तीनंतर पांडवांनी कौरवांशी राज्यप्राप्त्यर्थ केलेले 'भारतीय युद्ध' संज्ञक महायुद्ध कुरु देशाच्या उत्तरेकडील कुरुक्षेत्र उपविभागात झाले ( कुरुक्षेत्र पहा ). या युद्धात धृतराष्ट्राच्या शतपुत्रांचा संहार होऊन कुरु शाखेचा निर्वंश झाला. पांडव राजघराण्यातील युधिष्ठिर, परिक्षित् आणि जनमेजय राजांची सविस्तर माहिती महाभारतात दिली असून, जनमेजयाच्या सर्पसत्राने तेथील कुरु वंशाचा इतिहास समाप्त होतो.

या ग्रंथमते 'कुरु' आणि 'कुरुजांगल' ही देशनामे समानार्थक असून ( म. क. ३०.१९–२० ), कर्ण–शल्य संवादमते तेथील लोक शाश्वत धर्माचे ज्ञाते होते ( म. क. ३०.७; ७५ ).

**बृहत्संहितेत**—या ग्रंथमते हा ( दक्षिण कुरु ) देश कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या मध्यभागात ( बृ. सं. ५.३८३; १४.४; ३२.११ ) असून, येथील ( कुरुभूमि ) लोक आणि राजे अनुक्रमे 'कुरुभूमिज' ( बृ. सं. १६.३२ ), आणि 'कुरुक्षेत्राधिप' ( बृ. सं. ११.५७ ) नावांनी प्रसिद्ध होते.

**पौराणिक साहित्यात**—स्कंदमते भरतखंडान्तर्गत या देशात चौसष्ट हजार ग्रामे होती ( स्कन्द. माहेश्वर. कौ. ३९. १५६ ).

**शक्तिसंगमतंत्रात**—या ग्रंथमते उत्तर कुरु देशाच्या दक्षिणेकडील या देशात हस्तिनापुरच्या परिसरातील प्रदेश समाविष्ट होत असे.

**मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात**—या साहित्यमते हा देश 'श्रीकंठ' ( मङ्ख. १४.१८६; मेदिनी. ४१.१७; शब्दरत्न. ९४.१७ ), आणि 'कुरुजांगल' वैकल्पिक नावांनी प्रसिद्ध होता. यापैकी 'कुरुजांगल' हा या देशाचा उपविभाग होता ( कुरुजांगल पहा ).

**मध्ययुगीन काली**—इ. स. ९ व्या शतकात वंगसम्राट धर्मपालाने येथील राजाच्या संमतीने चक्रायुध राजास कनौजच्या गादीवर बसविले ( स्मिथ, पृ. ४१३ ).

**राजधानी**—उत्तर प्रदेशान्तर्गत मीरत जिल्ह्यातील गंगा तीरवर्ती हस्तिनापुर गावी या देशाची राजधानी असून, महाभारतकाली पांडवांनी यमुना तीरवर्ती इंद्रप्रस्थ ( दिल्लीनजिकचे आधु. इंद्रपत ) गावी नवी राजधानी स्थापिली. यापैकी हस्तिनापुरचे महत्त्व आज नष्ट झाले असून, इंद्रप्रस्थाचा दिल्ली हा नवा अवतार राजधानी म्हणून आजहि सुविख्यात आहे.

**कुरु–मगध मार्ग**—महाभारतकाली मगधराज जरासंधवधार्थ भीम निम्नलिखित मार्गाने या देशाहून मगध देशास गेला होता :—कुरु देश → कुरुजांगलक्षेत्र → पद्मसर तीर्थ → कालकूट पर्वत → गंडकीया नदी → शोण नद → सदानीरा नदी → एकपर्वतक देश → सरयू नदी → पूर्व कोसल देश → मिथिला नगर → माला नदी → चर्मण्वती नदी → गंगा नदी → शोण नद → कुरुच्छंद देश → मगध देशान्तर्गत गोरथगिरि ( म. स. १८.२६–३० ).

**कुरु उत्तर** ( देश )—पौराणिक साहित्यमते जंबूद्वीपाचा उत्तर समुद्र ( आधु. आर्क्टिक समुद्र ) स्पर्शी उत्तरतम देशविभाग, आणि ऋग्वेदपूर्वकालीन आर्यांचे आद्य

निवासस्थान. ऐतरेय ब्राह्मणमते हा देवांचा देश असून ( ऐ. ब्रा. ८.१४ ), वाल्मीकि रामायणमते कुरु ( आर्य ) लोकांच्या जन्मभूमिस्वरूप हा देश चिरंतन स्वर्गतुल्य सुखाचे निधान होता ( वा. रा. कि. ४३.८ ).

ऐतरेय ब्राह्मणमते हा आणि यानजिकचा उत्तर मद्र देश ऋग्वेदपूर्वकालीन आर्यांचे आद्य निवासस्थान असून, जंबूद्वीपान्तर्गत एक उपविभाग या नात्याने पौराणिक साहित्यात यास 'वर्ष' ( विष्णु. २.२.३८ ), 'द्वीप' ( वायु. ४५.२४–६१; म. भी. ७.११ ) आणि 'महाद्वीप' ( वायु. ४१.८५ ) वैकल्पिक उपाधींनी संबोधिले आहे. अली यांच्या मते मध्य आशियातील आधु. सैबेरिया देश हाच असावा.

**भौगोलिक स्थान**––ऐतरेय ब्राह्मणमते हे वर्ष हिमालय पर्वताच्या उत्तरेस ( **परेण हिमवन्तम्** ) आणि उत्तर समुद्राच्या ( आधु. आर्क्टिक समुद्र ) दक्षिणेस असून ( ऐ. ब्रा. ८.१४; वा. रा. कि. ४३.११ ), महाभारतमते हा उत्तर जंबूद्वीपान्तर्गत देश हिमालय आणि मेरु ( आधु. पामीर पठार ) पर्वतांच्या उत्तरेस आणि नील पर्वताच्या दक्षिणेस होता ( म. भी. ८.२; पद्म. आदि. ४.२ ). पौराणिक साहित्यमते जंबूद्वीपाच्या सर्वांत उत्तरेकडील हे द्वीप दक्षिणेस शृंगवत्, जारुधि पर्वत, तसेच दक्षिण समुद्र, आणि उत्तरेस उत्तर समुद्र यांच्या दरम्यान असून ( वायु. ४५.११; २१; मत्स्य. ११३.६९; विष्णुधर्म. १.७.१८–१९ ), भागवतमते शृंगवत् हा याचा मर्यादापर्वत ( सीमापर्वत ) होता ( भा. ५.१६.८ ). मार्कंडेयमते हा हिमालय पर्वताश्रयी देश होता ( मार्कं. ५४.५६ ). विष्णुमते मेरु पर्वताच्या उत्तरेस रम्यक, हिरण्मय आणि उत्तर कुरु ही तीन वर्षे असून त्या पर्वताच्या उत्तरतम टोकाला हे, आणि दक्षिणतम टोकाला भारतवर्ष होते ( विष्णु. २.२.१३ ). पद्ममते मेरूच्या उत्तरेस उत्तर कुरु, हिरण्मय आणि ऐरावत वर्षे असून, 'ऐरावत' हे तेथे 'उत्तर कुरु'चे नामांतर मानले आहे ( पद्म. आदि. ४.५; म. भी. ७.३५; ).

पद्म पुराणान्तर्गत चतुर्महाद्वीपा पृथ्वीवर्णनमते मेरु पर्वताच्या उत्तरेस आणि दक्षिणेस अनुक्रमे उत्तर कुरु आणि जंबूद्वीप ( आधु. भारतवर्ष ) असून ( पद्म. आदि. ३.२९–३० ), उत्तर कुरु वर्षाच्या दक्षिणेकडील इलावृतादि वर्षांचा निर्देश तेथे आढळत नाही. यावरून त्यांचा अंतर्भाव उत्तरकालात सप्तद्वीपा पृथ्वीवर्णनकाली झाला असावा. विष्णुधर्ममते उत्तर कुरु हा इलावृत्त वर्षाचा उपविभाग असून ( विष्णुधर्म. १.७.२३ ), भागवतान्तर्गत सप्तद्वीपा पृथ्वीवर्णनमते हे इलावृत वर्षानजिक होते ( भा. ५.१६.८ ).

महाभारतमते हा देश सिंधु नदीच्या उगमानजिक बद्रीनारायण आणि कैलास पर्वतानजिक असून ( म. आर. १४५.१०–१५ ), येथून पुढील प्रदेश दुर्लंघ्य होता ( म. आर. परि. १.१७.१५ ).

**मतांतरे**––या देशाच्या भौगोलिक स्थानाविषयी अभ्यासकांत निम्नलिखित मतांतरे आढळतातः—

( १ ) **फ्लीट यांच्या मते**—हा देश हिमालय पर्वताच्या पलीकडे उत्तरेस असावा ( इंडि. अँटि. २२.१८२ ).

( २ ) **रॉयचौधरी यांच्या मते**—आधु. उत्तर आशियामध्ये हा असावा.

( ३ ) **अग्रवाल यांच्या मते**—हिंदुकुश पर्वताभोवतालच्या आधु. अफगाणिस्तानात हा असावा ( अग्रवाल, पाणिनि. पृ. ४७. ).

( ४ ) **झीमर यांच्या मते**—या लोकांची कुरुक्षेत्रपूर्वकालीन एक वसाहत कश्मीरात असावी ( वैदिक इंडेक्स. १.८४ ).

( ५ ) **अन्य अभ्यासकांच्या मते**—शक आणि हूण देशांच्या उत्तरेकडील थिपानसान पर्वताच्या पायथ्यानजिकचा आधु. पश्चिम तुर्कस्तान प्रदेश हाच असून, कॅस्पियन समुद्राशी जोडलेल्या अरल समुद्राच्या डाव्या अंगास हा होता ( इंडि. अँटि. स. १९१९, पृ. ६५ ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा )

**नामव्युत्पत्ती**––'गंगा खोऱ्यातील कुरु लोकांचा उत्तरेकडील आद्य देश' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले असावे. पौराणिक साहित्यमते जंबूद्वीपसम्राट आग्नीध्राच्या नऊ पुत्रांपैकी 'कुरु राजाचा देश' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले ( विष्णु. २.१; भा. १.२२; ५.१.३३; ब्रह्माण्ड. ३४; लिङ्ग. ४६.१० ). लिंगमते याच्या सीमावर्ती शृंगवत् पर्वतामुळे यास 'उत्तर शृंगवर्ष' वैकल्पिक नाव मिळाले ( लिङ्ग. ४७.९ ).

**ऐतरेय ब्राह्मणात**— या ग्रंथाच्या 'ऐंद्र महाभिषेक' अध्यायमते हिमालय पर्वताच्या पलीकडील हा देश जिंकण्याचा अत्यराति जानंतपि राजाचा प्रयत्न मानवी प्राण्यास ही देवभूमी ( देवक्षेत्र ) अजिंक्य असल्याने अयशस्वी झाला ( ऐ. ब्रा. ८.२३ ). उत्तरकालात येथे मानवी राजाचे राज्य अस्तित्वात आल्यानंतरहि येथील

## उत्तर कुरु देशाची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. वाल्मीकि रामायण ( कि. ४३.३८ ) | उत्तर कुरु |
| २. महाभारत ( भी. ७.३५ ) | ऐरावत वर्ष |
| ३. बृहत्संहिता ( १४.२४ ) | उत्तर कुरव |
| ४. पौराणिक साहित्य | |
| अ. ( ब्रह्माण्ड. ३४.४७ ) | शृंगवत् वर्ष |
| ब. ( लिङ्ग. ४७.९ ) | उत्तर शृंगवर्ष |
| क. ( वायु. ४२; लिङ्ग. ४६.१० ) | कुरु वर्ष |
| ड. ( विष्णु. २.२.३९ ) | उत्तर कुरु वर्ष |
| इ. ( वामन. २२.६० ) | उत्तरवेदी |
| ५. बौद्ध साहित्य | |
| अ. दीपवंश ( पृ. १६ ) | कुरुद्वीप |
| ब. ललित विस्तर ( पृ. १९ ) | प्रयंतद्वीप |
| क. सासनवंस | उत्तरद्वीप ( कुरुरट्ठम् ) |
| ६. चिनी साहित्य | |
| अ. ह्युएन्‌त्संग–पूर्वकालीन | उत्तमवत् |
| ब. ह्युएन्‌त्संग | कौ–लो ( कुरु ) |
| ७. ग्रीक साहित्य ( मॅक्रिंडल, पृ. ११३ ) | हैपरबोरियन लोक<br>अत्तकोरि देश |

राज्याभिषेकविधी देवलोकासदृशच होते ( ऐ. ब्रा. ८.१४).

कीथ यांच्या मते ऐतरेय ब्राह्मणकाली ऐतिहासिक म्हणून प्रसिद्ध असणाऱ्या या लोकांना उत्तरकालात कल्पनारम्य दैवी स्वरुप देण्यात आले ( वैदिक इंडेक्स. १.१६९ ).

**वाल्मीकि रामायणात**— या ग्रंथमते या स्वर्गतुल्य नंदनवनसदृश देशान्तर्गत चैत्ररथ नामक दिव्य कुबेर-वनातील वृक्षांना दिव्य वस्त्रालंकारांची पर्णराजी असून, दिव्य स्त्रियारूपी फलसंभार त्यावर लटकत असे ( वा. रा. अयो. ९१.१९ ). येथील मधुधारायुक्त वृक्ष साऱ्या ऋतूंमध्ये फलपुष्पांनी लहडलेले असत ( वा. रा. अर. ७३.६ ). येथील हरितवर्णीय कमलपुष्पयुक्त नद्या आणि आरक्त कमलयुक्त जलाशय प्रातःकालीन सूर्याप्रमाणे प्रकाशमान असून, त्यांच्या किनारी हिरे, मोती, आणि सुवर्णाच्या खाणी असत. सूर्यसदृश कांतिमान गंधर्व, किन्नर सिद्ध, नाग, आणि विद्याधर त्यामध्ये विहार करीत असत. जरादुःखादिकांचा स्पर्शहि नसलेल्या या देशात लोकोत्तर गुणांची वृद्धी होत असे ( वा. रा. कि. ४३.३८–५२ ). या सूर्यरहित ( विसूर्य ) देशात नित्याचे सारे व्यवहार संधिप्रकाशात ( ऑरोरा बोरॅलिस ) होत असत ( वा. रा. कि. ४३.५५ ).

सुग्रीवाने सीताशोधार्थ येथे शतबल नामक वानराला ( वा. रा कि ४३.११ ), तसेच अन्य वानर यूथपतींना ( वा. रा. कि. ४३.५८ ) पाठविले होते.

**महाभारतात**—युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या उत्तर दिग्विजयात अर्जुनाने जंबूद्वीपाच्या या उत्तर सीमावर्ती अगम्य देशातून विपुल धन आणले असून ( म. स. २५.११ ), महाभारत भीष्मपर्वमते या सिद्धपुरुषयुक्त देशातील वृक्ष सुगंधित फलपुष्पयुक्त, आणि 'क्षीरी' नामक वृक्ष अमृतमय दुग्ध आणि वस्त्रालंकारयुक्त होते. स्वर्गच्युत पुण्यात्म्यांच्या या देशातील भूमी मणिमय आणि वाळू सुवर्णमय असून, येथील लोक अकरा हजार वर्षे जगत असत. येथील भारुंड नामक पक्षी मृत व्यक्तींची शरीरे दऱ्यांमध्ये फेकीत असत ( म. भी. ८.२–१२ ). पद्ममते येथील दऱ्यांमध्ये फेकलेली मृत शरीरे भारुंड नामक तीक्ष्ण चोचीचे पक्षी भक्षीत असत ( पद्म. आदि. ४.१२ ).

**बृहत्संहितेत**—या ग्रंथमते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या उत्तर भागातील या देशात 'उत्तर कुरव' लोक रहात असून ( बृ. सं. १४.२४ ), कर्न यांच्या मते ग्रीक साहित्यातील 'हैपरबोरियन' लोक हेच असावेत.

**ग्रीक साहित्यात**—मेगॅस्थिनेसकालीन चतुर्द्वीप भूवर्णन-मते भारतसीमेवरील तीन प्रमुख देशांत या देशाची गणना असून, टॉलेमीच्या मते हा आधु. पामीर पठारामध्ये होता.

**बौद्ध साहित्यात**—बौद्ध महावस्तु आणि ललितविस्तर-मते मेरु पर्वताच्या उत्तरेकडील हे द्वीप 'लोकधातू'च्या (पृथ्वी) चार द्वीपांपैकी एक असून, दीपवंशमते हे 'कुरुदीप' नावाने सुविख्यात होते ( दीप. पृ. १६ ). समंतपासा-दिकामते यामध्ये तिदसपुर ( त्रिदशपुर ) नामक नगर असून ( समन्त. पृ. १७९ ), ललितविस्तरमते हे 'प्रयंतद्वीप' वैकल्पिक नावाने प्रसिद्ध होते ( ललित. पृ. १९ ). सासनवंसमते या ( उत्तरद्वीपातील ) रहिवासी 'कुरुरट्ठम्' नावाने प्रसिद्ध होते ( सासन. पृ. १२ ).

**पौराणिक साहित्यात**—या साहित्यमते या देशातील प्रमुख नद्या, पर्वत, आणि उपद्वीपे पुढीलप्रमाणे होती :—

( १ ) नद्या—पौराणिक साहित्यमते मेरु पर्वतोद्भवा

चतुर्गंगांपैकी भद्रा ( भद्रसोमा ) ही समुद्रगामिनी नदी या देशामध्ये असून ( भा. ५.१७.८; विष्णु. २.२.३६; मार्कं. ५३.१८; कूर्म. उत्तर. ४६.३३ ), वायुमते ती याच्या सरहद्दीवरील पर्वतमय प्रदेशातून वहात असे ( वायु. ४५.२५ ). चंद्रकांत आणि सूर्यकांत पर्वतांच्या दरम्यानच्या प्रदेशातून वहाणाऱ्या चंद्रावर्ता आणि सूर्यावर्ता नामक अन्य दोन नद्याहि येथे असून ( वराह. ८४.१०-११ ), वायुमते चंद्रावर्ता नदी चंद्रमस् पर्वतातून वहात असे ( वायु. ४५. ५६-५८ ).

( २ ) पर्वत—चंद्रकांत आणि सूर्यकांत नामक कुलपर्वतद्वय येथे असून ( मार्कं. ५६.२२; वराह. ८४.१०; वायु. ४५.२५ ), शृंगवत् ( शृंगी अथवा त्रिशृंगी ) हा येथील वर्षपर्वत होता ( मार्कं. ५४.९; अग्नि. १०८.२६ ).

( ३ ) उपद्वीपे—वायुमते याच्या दक्षिणेस आणि पश्चिमेस ' चंद्रद्वीप ' आणि ' भद्राकरद्वीप ' नामक समुद्रवेष्टित द्वीपे असून ( वायु. ४५.५२; ६२ ), वराहमते याच्या परिसरात ' चंद्र ', ' भद्राकर ' आणि ' सूर्य ' नामक तीन द्वीपे होती ( वराह. ८४.१०-१२ ).

उपविभाग—अली यांच्या मते भद्रसोमा नदी ( आधु. सिरदरिया ) खोऱ्यातील या मैदानी देशाचे ( वायु. ४२ ) निम्नलिखित दोन उपविभाग होते :—

( १ ) इर्त्यश्नदीचा जलसंचय प्रदेश—सिरदरिया नदीच्या इर्त्यश्, ओब्, इशिम् आणि तोबोल उपनद्यांच्या जलसंचय प्रदेशात ( आधु. पश्चिम सैबेरिया ), तसेच त्याच्या दक्षिणेकडील सयन आणि अल्ते पर्वतात या लोकांची प्रमुख वसाहत असून, इ. स. १६ व्या शतकापर्यंत अज्ञातप्राय अशा या प्रदेशाचे पौराणिक साहित्यात यथातथ्य वर्णन आढळते.

वायुमते येथे बारमाही फळझाडे असून, त्यापैकी ' क्षीरिन् ' वृक्षातून षड्रसयुक्त अमृततुल्य दुग्ध स्रवत असे. काटेकुटे आणि निवडुंग यांपासून हा अलिप्त असून, सिद्धचारणांखेरीज अन्य कोणीहि येथे रहात नसे. येथे सुवर्णरत्नादींच्या खाणी असून, ' सुमहत् ' आणि ' उच्चरित ' नामक सहस्रशिखरयुक्त पर्वतद्वय याचे कुलपर्वत होते ( वायु. ४५ ).

अली यांच्या मते मध्य आशियातील आधु. उरल आणि येनेसै नद्यांच्या उपनद्यांचे उगमस्थानभूत पर्वत हेच असून, त्याच्या दरम्यानच्या इर्त्यश् नदीच्या जंगलमय खोऱ्यात ( पश्चिम सैबेरियामधील आधु. तैगा प्रदेश ) आजहि सोन्या-हिऱ्यांच्या खाणी, तसेच अरण्योद्भव वस्तूपजीवी तुरळक लोकसमूह आढळतात.

( २ ) बल्खश, अले कुल, इस्सिक कुल सरोवरांचा जलसंचय प्रदेश—प्राचीन साहित्यमते उल्-तौ-तर्बगते आणि शृंगवत् पर्वतांच्या दरम्यानच्या भद्रसोमा ( आधु. सिरदरिया ) नदीपासून सुदूर अंतरावरील या प्रदेशात चंद्रकांत आणि सूर्यकांत नामक पर्वतद्वय, तमाल, अगरु, चंदनादींची वने, सुवर्णयुक्त वाळूची वाळवंटे, तसेच अनेक शेते होती. पावसाळी मेघाप्रमाणे रातोरात स्थलांतरित होणाऱ्या भटक्या लोकांच्या अनेक टोळ्या, तसेच त्यांचे मध्यवर्ती नगरहि येथे होते ( वायु. ४५.२५-५० ).

अली यांच्या मते या देशातील भद्रसोमा ( आधु. सिरदरिया ) नदीचे जलदाते चंद्रकांत आणि सूर्यकांत पर्वत म्हणजे आधु. तर्बगते आणि जिंगर-अल्-तौ पर्वत असून, त्यांच्या परिसरात आजहि रशियन, चिनी, मंगोलियन, किर्गीज्, किप्चक, उज्बेक, उइगुर आदि भटके लोक रहातात. मध्य आशियान्तर्गत स्टेपीज् प्रदेशातील शक, मंगोलियन, तुर्क आदि लोकांची दक्षिणेकडील आक्रमणे याच देशमार्गे झाली असून, पुरातन कालापासून हा संमिश्र जातीजमातींचा देश म्हणून प्रसिद्ध आहे.

अन्य निर्देश—पौराणिक साहित्यात अन्यत्रहि याचा अनेक वेळा निर्देश आढळतो ( ब्रह्माण्ड. १५.३४; लिङ्ग. ४९.१०; वायु. ३४.३०; ४५.११ ).

चिनी साहित्यात—या साहित्यात याचा ' उत्तमवत् ' नावाने, आणि ह्युएनत्संगच्या प्रवासवर्णनात ' कौ-लो ' ( कुरु ) नावाने निर्देश आढळतो ( वॉटर्स, १.३३ ).

शिलालेख साहित्यात—गुप्तसम्राट कुमारगुप्ताच्या स. ४२५ च्या उदयगिरि गुफालेखमते हा एक पवित्र देश होता ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.२६० ).

**कुरुक्षेत्र** ( क्षेत्र )—महाभारतमते कुरु देशाचा ' तपःक्षेत्र ' आणि ' धर्मक्षेत्र ' उपाधियुक्त पवित्रतम भाग ( म. भी. १.२; २३.१ ). सरस्वती नदीचे विनशनस्थान, भारतीय युद्धभूमिस्थान, तसेच भगवद्‌गीतेचे जन्मस्थान म्हणून हे भारतीयांचे प्रातःस्मरणीय क्षेत्र मानले जाते.

ऋग्वेदमते हे पृथ्वीतील श्रेष्ठ यज्ञीय स्थान ( उत्तरवेदी; नाभिस्थान ) असून ( ऋ. १.१२८; ३.२३.४; १०.१९१. १ ), ब्राह्मण साहित्यमते हे देवांचे ' यज्ञक्षेत्र ' होते ( श. ब्रा. ४.१.५.१३; तै. ब्रा. ५.१.१; मै. सं. २.१.४ ). ब्रह्मदेवाच्या यज्ञवेदीपंचकापैकी ' उत्तरवेदी ' येथे असून, अन्य चार वेदी प्रयाग, गयाशिरस्, विरज आणि पुष्करक्षेत्र येथे होत्या. ' देवांनाहि देवत्व प्रदान करणारे

पवित्र स्थान' अशा अर्थाने यास मनुस्मृतीमध्ये 'ब्रह्मावर्त देश' म्हटले आहे ( मनु. २.१.७ ).

सरस्वती आणि दृषद्वतीं दुआबातील दिल्ली-अंबाला रेल्मार्गावरील अंबाला रेल्वेस्थानकापासून २५ मैल पूर्वेकडील यमुना नदीच्या पश्चिम किनाऱ्यावरील आधु. सोनपत, कर्नाल, पानिपत आणि अमीन प्रदेश हाच होय. दिल्लीपासून ५५ मैलांवरील कर्नाल जिल्ह्यातील पानिपत हे याचाच भाग असून, आधु. थानेसर त्यापासून १ मैलावर आहे.

महाभारतमते 'युद्धक्षेत्र' आणि 'धर्मक्षेत्र' म्हणून सुविख्यात असणाऱ्या या स्थानी मृत होणाऱ्या योद्ध्याला आणि तपस्यामग्न तपस्व्याला मुक्ती प्राप्त होत असून, येथील ( पानिपत ) युद्ध जिंकणाऱ्या वीराला भारताचे साम्राज्य प्राप्त होत असल्याचा इतिहास अनेक वेळा घडला आहे.

इ. स. ११ व्या शतकापर्यंत याचे पावित्र्य अबाधित असून, स्थानिक आख्यायिकामते स. १०१४ मध्ये गझनीच्या मुहंमदाने हस्तगत केल्यानंतर हे पावित्र्यभ्रष्ट आणि विजन बनले.

**आधुनिक काळी**—कर्नाल-अंबाला रस्त्यावर कुरुक्षेत्राचा विस्तृत मैदानी प्रदेश ( व्याप्ती– ४० मैल ) असून, दिल्ली-कर्नाल रस्त्यावरील पानिपतपासून हे ४० मैलांवर आहे. पानिपत येथील भाऊसाहेब पेशव्यांच्या सैन्य-शिबिराच्या स्थानी 'भाऊ-का-टिला' स्थान असून, त्यानजिकच 'सोनपत' हे इंद्रप्रस्थाचे अन्य एक उपनगर आहे. कर्नाल या महारथी कर्णाच्या गावी 'कर्णतलाव' ( व्याप्ती– २५०′ × ८०′ ), तसेच 'कर्णद्वार' नामक उद्ध्वस्त प्रवेशद्वार असून, त्यापैकी कर्णतलावाच्या चौथऱ्यावर कर्ण प्रतिदिनी सुवर्णदान करीत असे. स्थानिक आख्यायिकामते या मैदानाच्या अठरा विभिन्न भागांत अठरा दिवसांचे भारतीय युद्ध झाले.

मेघदूत आणि मध्ययुगीन साहित्यमते कौरव–पांडवांच्या युद्धभूमिस्वरूप कुरुक्षेत्र आणि स्थानेश्वर ( आधु. थानेसर ) समानार्थक होत ( मेघ. १.४८; अभिधान. १२९.९५०; त्रिकाण्ड. ३१.६; ३२.१४; कल्पद्रु. ५.१२ ). परंतु कुरुक्षेत्र हे स्थानेश्वराच्या नैर्ऋत्येस आणि दिल्लीच्या वायव्येस सरस्वती–दृषद्वती दुआबात असल्याचा सुस्पष्ट निर्देश महाभारतात आढळतो ( म. आर. ८३.४ ).

**तीर्थ**—पौराणिक साहित्यात सर्वत्र या तीर्थाचा निर्दे असून ( अग्नि. १०९.१४; नृसिंह. ६६.३; पद्म. आदि. १५.१६; १६.१–६; ३९.८१ ), त्याचे सविस्तर माहात्म्यवर्णनहि तेथे आढळते ( नारद. उत्तर. ६४.२; १२; वामन. २२.५९–८१; पद्म. आदि. २६–२७ ). या साहित्यातील वाराणसीमाहात्म्यात ( कूर्म. पूर्व. ३१.४७ ), गंगामाहात्म्यात ( नारद. उत्तर. ४०.४५ ), गयामाहात्म्यात ( वायु. १०५.१६; २५ ), नर्मदामाहात्म्यात ( कूर्म. उत्तर. ४०.७; पद्म. आदि. १९.११ ), तसेच प्रयाग-माहात्म्यात ( मत्स्य. १०६.५७ ) याचा निर्देश असून, मत्स्य आणि पद्ममते हे एक त्रैलोक्यश्रेष्ठ ( मत्स्य. १०९.३ ), आणि श्राद्धयोग्य (पद्म. आदि. ११.१४) तीर्थ होते.

महाभारत लोमशयात्रामते हे नाहुष–तपस्यास्थान ( म. आर. १२९.१२ ), आणि सरस्वती नदीकाठचे तीर्थ असून (म. श. ५२.२), वामन पुराण प्रह्लादयात्रेत ( वामन. ८४.१ ), तसेच परशुराम–तपस्यास्थान म्हणून ( वामन. ३४.४०–४२ ) याचा निर्देश आढळतो. महाभारतमते याच्या परिसरातील अन्य साऱ्या देशांहून हा पवित्र होता ( म. क. ३.१० ).

**भौगोलिक स्थान**—तैत्तिरीय आरण्यकमते याच्या भौगोलिक परिसीमा पुढीलप्रमाणे होत्या :— १. दक्षिणेस-खांडववन; २. उत्तरेस–तूर्घ्न; ३. पश्चिमेस–परीणह् ( = अरियन–पेरेनॉस; तै. आर. ५.१.१ ). या क्षेत्राची पूर्व सीमा यमुना नदीने बनली असावी. या ग्रंथमते मरुदेश हा कुरुक्षेत्राचा 'उत्कर' ( उत्कीर्ण मृत्तिकास्थान ) होता ( तै. आर. ५.१.१ ). यापैकी बहुतांशी स्थानांची आज ओळख पटत नाही.

ऋग्वेदमते हे सरस्वती, दृषद्वती, आणि आपया नदी-तीरावर असून ( ऋ. ३.२३.४ ), या तीनहि नद्या आज प्रायः लुप्त झाल्या आहेत.

महाभारतमते हे ( समंतपंचकक्षेत्र ) सेत्र तरंतुक ( पद्म–तरंडक ), अरंतुक ( पद्म–अरंडक ), रामहृद आणि मचक्रुक यांच्या दरम्यान असून ( म. आर. ८१.१७८; श. ५२.२०; पद्म. आदि. २७.९२ ), इंद्रप्रस्थ–द्वारका-मार्ग ( म. मौ. ८.६५; भा. १.१०.३४ ), तसेच इंद्रप्रस्थ-कैलास मार्ग ( म. द्रो. ५७.२७ ) यामधूनच जात असे.

महाभारत आरण्यकपर्वमते 'कुरुक्षेत्र प्रदेश' उत्तरेस सरस्वती आणि दक्षिणेस दृषद्वती नद्यांच्या दरम्यान होता–

दक्षिणेन सरस्वत्या, उत्तरेण दृषद्वतीम् च ।
ये वसन्ति कुरुक्षेत्रे, ते वसन्ति त्रिविष्टपे ॥
( म. आर. ८१.१७५ ).

पौराणिक साहित्यमते हे प्रयागच्या उत्तरेस आणि

सन्निहित सरोवराच्या पश्चिमेस होते ( नारद. उत्तर. ६४.२०; वामन. २२.६० ). शक्तिसंगमतंत्रमते याची पश्चिम आणि दक्षिण सीमा अनुक्रमे पांचाल आणि कुरु देशांनी बनली होती ( शक्तिसङ्गम. ३.७.२३ ).

**क्षेत्रमर्यादा**—महाभारतमते याची व्याप्ती ५ योजने ( २० कोस = ४० मैल ) होती ( म. आर. १२९.२२ ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या क्षेत्राची निम्नलिखित नामांतरे आढळतातः—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. ऋग्वेद ( १.१२८; १०. १९१.१ ). | इळस्पद |
| अ. ( ८.६४.११ सायण-भाष्य ). | आर्जीक |
| २. मनुस्मृति | ब्रह्मावर्त |
| ३. महाभारत | |
| अ. शल्यपर्व ( ५२.२० ) | कुरुक्षेत्रसमंतपंचक |
| आ. ,, ( ५२.१; ५४.५) | समंतपंचक |
| इ. आरण्यकपर्व (१२९.२२) | प्रजापति उत्तरवेदी |
| ई. आरण्यकपर्व ( ८१.६३ ) | इळस्पद, इलास्पद |
| ४. पौराणिक साहित्य | |
| अ. पद्म पुराण ( आदि. ६६.७३ ) | |
| आ. वामन पुराण ( २२. ५१–६० ) | ब्रह्मसर, सन्निहित सर, ब्रह्मणीवेदी, रामह्रद, समंतपंचक, उत्तरवेदी |
| इ. नारद पुराण | ईहास्पद |
| ई. अन्य पौराणिक साहित्य | स्थाणुतीर्थ, ब्रह्मावर्त |
| ५. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य | |
| अ. ( मोदिनी. १३३.१६; शब्दरत्न. २५२.१०; उणादि. ७ ) | कुरु |
| आ. ( वैजयन्ती. ३५.९ ) | कुरुवर्ष |
| इ. (अभिधान. १२९.९५०; कल्पद्रु. ५.१२ ) | धर्मक्षेत्र |
| ई. ( कल्पद्रु. ५.७; १२; त्रिकाण्ड. ३२.१४ ) | विनशन |
| उ. ( वैजयन्ती. ३५.९. ३८.१८ ) | शारंगवन |
| ऊ. ( शारदीय. ९१४ ) | कुरुखंड |

**नामव्युत्पत्ती**—पौराणिक साहित्यमते संवरणपुत्र ‘ कुरु राजाने समतल ( समंत ) होईतो नांगरलेली भूमि ’ अशा अर्थाने यास ‘ कुरुक्षेत्र समंतपंचक ’ नाव प्राप्त झाले ( मत्स्य. ५०.२० ). या कुरु–तपस्येच्या फलस्वरूप इंद्राने येथील मृत योद्ध्यांना आणि तपस्यामग्न तापसांना मुक्ति-प्राप्तीचे वरदान दिले ( म. आ. ८९.४२–४३ ).

महाभारतमते पृथ्वीच्या निःक्षत्रियीकरणानंतर परशु-रामाने येथील पंचकुंडे क्षत्रियरुधिराने भरल्यामुळे यास ‘ रामह्रद ’ नामांतर प्राप्त झाले. कालांतराने पितरांच्या आशीर्वादाने येथील रक्तकुंडांचे जलकुंडांत रूपांतर झाले.

अमावास्येच्या रात्री ‘ पृथ्वीतील समस्त तीर्थांचे सम्मीलनस्थान ’ अशा अर्थाने यास ‘ सन्निहति ’ वैकल्पिक नाव मिळाले.

**ऋग्वेदात**—सायणाचार्यांच्या मते ऋग्वेदातील ‘ आर्जीक ’ देशनाम ‘ कुरुक्षेत्रा ’चेच नामांतर आहे ( ऋ. ८.६४.११ ).

**ब्राह्मण साहित्यात**— तांड्य ब्राह्मणात या क्षेत्राचे प्रदक्षिणामाहात्म्य वर्णिले आहे. या ग्रंथमते इंद्र व रुशम यांच्या पृथ्वीप्रदक्षिणेच्या शर्यतीत रुशमाने कुरुक्षेत्राची व इंद्राने पृथ्वीची प्रदक्षिणा केली. या शर्यतीत रुशमाचा जय झाल्याचा निर्णय देताना देवांनी प्रजापतिवेदी आणि देवयज्ञभूमिस्वरूप कुरुक्षेत्रप्रदक्षिणा पृथ्वीप्रदक्षिणेपेक्षाहि श्रेष्ठ असल्याचे सांगितले ( तां. ब्रा. २५.१३ ).

ऐतरेय ब्राह्मणमते कवष ऐलूष ऋषींप्रीत्यर्थ सरस्वती नदी येथील ‘ परिसारक ’ नामक स्थानी अवतीर्ण झाली ( ऐ. ब्रा. २.१९ ).

**श्रौतसूत्रात**— कात्यायन श्रौतसूत्रमते या क्षेत्रातील ‘ परिणह् ’, ‘सरस्वती–दृषद्वती–संगम’, आणि ‘अहिस्थल’ ही तीर्थे सुविख्यात होती ( का. श्रौ. २४.२२६ ).

**महाभारतात**—या ग्रंथातील आरण्यकपर्वमते येथे निम्न-लिखित ऐतिहासिक यज्ञ झाले होतेः—१. प्रजापतीचे सहस्रवर्षीय सत्र; २. अंबरीष नाभाग राजाचा यमुना नदीकाठचा यज्ञ; ३. ययाति नाहुष राजाचा यज्ञ; ४. भरत राजाचा अश्वमेध यज्ञ; ५. संवर्त ऋषिकृत मरुत्त राजाचा यज्ञ ( म. आर. १२९.१–५; १५–१६ ).

महाभारतमते ययाति राजाच्या यज्ञवास्तूंनी आणि नानाकृती ‘ चितीं ’नी ही भूमी व्याप्त असून ( म. आर. १२९.३–५ ), त्या राजाचे सारस्वत सत्रानंतरचे अवभृथ स्नानाचे स्थान, तसेच जमदग्नि ऋषींचे रौप्या नदीकाठचे अपसर्पण नामक आश्रमस्थान येथेच होते ( म. आर.

१२९.१४; ७). 'समंतपंचक', आणि 'प्रजापतिवेदी' या वैकल्पिक नावांनी हें स्थान सुविख्यात असून, येथे निम्नलिखित तीर्थे होतीः—१. शम्येकपत्रा; २. सरकतीर्थ; ३. रामह्रद; ४. नारायणआश्रम; ५. प्लक्षावतरण; ६. यमुना तीर्थ (म. आर. १२९.६–१३).

या क्षेत्रातील हिरण्यवती नदीकाठी चित्रांगद गंधर्व आणि कौरवांचे युद्ध झाले असून (म. आ ९५.७–१०), येथील इक्षुमती नदीकाठी खांडववनात तक्षक, अश्वसेन आदि सर्प रहात असत (म. आ. ३.१४४–१४५). खांडववनदाहप्रसंगी तत्रस्थ तक्षक नाग आणि तक्षकपुत्र अश्वसेन नजिकच्याच कुरुक्षेत्रात पळाले (म आ. २१८. ४–५).

**भारतीय युद्ध**—येथे झालेले कौरव-पांडवांचे भारतीय युद्ध (इ. स. पू. १५००) वैदिककालीन 'दाशराज्ञ' युद्धाप्रमाणेच एक महायुद्ध असून, तत्कालीन भारतातील बहुतांशी साऱ्या देशांनी आणि लोकसमूहांनी त्यात भाग घेतला होता. स्थूलमानाने मध्यप्रदेशाचा दक्षिण भाग आणि पांचाल देश (= पांडवपक्ष) विरुद्ध अन्य सारा भारतवर्ष (= कौरवपक्ष) असे या युद्धाचे स्वरूप असून, पांडव आणि कौरव सेनेमध्ये अनुक्रमे सात आणि अकरा अक्षौहिणी सैन्य होते (१ अक्षौहिणी = १०९३५० दळपाय, ६५६१० अश्वदल, २१८७० गजदल आणि २१८७० रथदल).

प्रादेशिक दृष्ट्या पांडवपक्षात मध्यदेशान्तर्गत मत्स्य, चेदि, करूष, काशि, पांचाल आदि देश, पूर्व भारतातील पश्चिम मगधादि देश, गुजरातमधील यादव, आणि दक्षिण भारतातील पांड्य राजे समाविष्ट होते. याचे उलट कौरव पक्षात उत्तर आणि आग्नेय भारतातील, तसेच बंगाल आणि पश्चिम आसाममधील सारे देश, मध्यदेशातील शूरसेन, वत्स, कोसलादि देश, वायव्य भारतातील शाल्व–माल्वादि सारे देश, तसेच मध्यभारतातील अवंत्यादि देश सामील होते. या युद्धातील कौरव आणि पांडवपक्षीय देशांचे भौगोलिक विभाजन खाली दिल्याप्रमाणे होते (परिपत्रक पहा).

**युद्धशिबिरे**— पांडवांचे युद्धशिबिर मत्स्यराजधानी उपप्लव्य येथे असून, त्या देशात सर्वत्र त्यांचे सैन्य विखुरले होते. कौरवांचे मुख्य युद्धशिबिर कुरुराजधानी हस्तिनापुर येथे असून, त्यांचे महासागरसदृश प्रचंड सैन्यदल उत्तर कुरुक्षेत्राच्या सीमेवर दक्षिण पंजाबपासून उत्तर पांचाल-पर्यंत अर्धवर्तुलाकृती (लांबी–५ योजने = ४० मैल)

## भारतीय युद्धातील देशांचे भौगोलिक विभाजन

| पांडवपक्ष | कौरवपक्ष |
|---|---|
| **(१) मध्यदेश (उत्तर भारत)** | |
| १. वत्स; २. काशी; ३. चेदि; ४. करूष; ५. दशार्ण; ६. पांचाल; ७. मत्स्य; ८. पूर्व कोशल; ९. विंध्य आणि अरवली पर्वतनिवासी वन्य लोक | १. कोशल; २. शूरसेन |
| **(२) पूर्व भारत** | |
| १. पश्चिम मगध | १. अंगराज कर्णनियंत्रित पूर्व मगध, विदेह, अंग, वंग, कलिंग आदि देश; २. प्राग्ज्योतिष (चीन आणि किरात लोकसमूहांसमवेत); ३. उत्कल, मेकल, आंध्र, आणि तत्रस्थ वन्य लोक |
| **(३) मध्य आणि पश्चिम भारत** | |
| १. गुजरात; २. पूर्व गुजरातमधील यादव राजे | १. माहिष्मती, भोज, अंधकवृष्णि, विदर्भ, निषाद, शाल्व, आणि अवंती येथील यादव राजे; २. बडोद्याच्या दक्षिण आणि आग्नेयकडील यादव राजे; ३. दख्खन-मधील वन्य लोक; ४. मध्य भारतान्तर्गत कुंतल |
| **(४) वायव्य भारत** | |
| १. कश्मीरच्या नैर्ऋत्य अभिसार; २. केकय | १. सिंधुसौवीर; २. गांधार; ३. त्रिगर्त; ४. केकय; ५. शिबि; ६. मद्र; ७. बाह्लीक, ८. क्षुद्रक; ९. मालव; १०. अंबष्ठ; ११. कंबोज; १२. उपरोक्त देशातील वन्य लोक |
| **(५) दक्षिण भारत** | |
| १. पांड्य; २. कर्नाटक | — |

पसरले होते.

युद्ध— अठरा दिवसांचे भारतीय युद्ध मार्गशीर्ष शुद्ध त्रयोदशीला सुरू होऊन, पौष अमावास्येला संपले. त्यात कौरव–पांडवांच्या अठरा अक्षौहिणी सेनेपैकी पांडवपक्षीय पाच पांडव, कृष्ण आणि सात्यकि, तसेच कौरवपक्षीय कृप, कृतवर्मन् आणि अश्वत्थामन् असे केवळ दहा लोक जीवित राहिले ( म. सौ. ९.४७-४८ ). युधिष्ठिर-धृतराष्ट्र संवादमते या युद्धात तीन कोटी लोक मृत झाले असून ( म. स्त्री. २६.९-१० ), हा आकडा सैन्य आणि सैन्येतर लोक धरून असावा. या मृत व्यक्तींचे दहन कुरुक्षेत्रातील 'अस्थिपुर' येथे करण्यात आले.

पौराणिक साहित्यात—नृसिंह आणि वामनमतें श्रीविष्णु या क्षेत्रात विश्वरूपाने ( नृसिंह. ६५,१९ ), अथवा कुरुध्वजरूपाने (वामन. ९०.५) निवास करीत असे. स्कंद-मते येथील स्थाणु नामक शिवलिंग काशी येथील लोलार्क-तीर्थाच्या पश्चिमेस स्थलांतरित होऊन, तत्रस्थ अडुसष्ट महा-शिवलिंगांमध्ये समाविष्ट झाले ( स्कन्द. काशी. ६९.७ ). भविष्य पुराणात याचा ( कुरुक्षेत्रराष्ट्र ) निर्देश आढळतो ( भवि. प्रति. २.११ ).

शक्तिपीठ— तंत्रचूडामणिमते या शक्तिपीठस्थानी सतीचा दक्षिण गुल्म पडला असून, येथील देवीचे नाव सावित्री, आणि भैरवाचे नाव स्थाणु होते. कुरुक्षेत्रातील आधु. द्वैपायनह्रदानजिक हे आहे.

मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात— या साहित्यकाली 'कुरुक्षेत्र' आणि 'कुरुखंड' नावांनी हे सुविख्यात होते ( नामांतर-परिपत्रक पहा ).

मध्ययुगीन काली— इ. स. ७ व्या शतकात या क्षेत्रान्तर्गत स्थानेश्वर ( आधु. ठाणेसर ) नगरास कनौजच्या हर्षवर्धन राजाची उपराजधानी नात्याने नवे महत्त्व प्राप्त झाले ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३५०; स्थानेश्वर पहा ).

मुसलमानी राजकाली— स. १०१४ मध्ये गझनीच्या मुहंमदाने येथील मंदिरे उद्ध्वस्त केली. स. १५२६ मध्ये बाबराने दिल्लीच्या इब्राहिम लोदी या अफगाण सुलतानाचा येथील ( पानिपत ) युद्धात पराजय करून मोंगल साम्राज्य स्थापिले. स. १५५७ मधील पानिपतच्या दुसऱ्या महायुद्धात अकबराने आग्रा येथे स्वतंत्र राज्यस्थापना करणाऱ्या हेमू ( विक्रमादित्य ) नामक अफगाण सुलतान अदिलशहा मोरच्या सेनापतीचा वध केला.

इ. स. १८ व्या शतकात अफगाण आणि मराठ्यांच्या सत्तास्पर्धेची परिणती पानिपतच्या तिसऱ्या महायुद्धात होऊन ( स. १७६१ ), आणि त्यामध्ये त्या दोहोंचीहि सत्ता खिळखिळी होऊन भारतातील ब्रिटिशांचा मार्ग निष्कंटक झाला.

तीर्थे—कुरुक्षेत्रातील विद्यमान प्रमुख तीर्थे पुढीलप्रमाणे होत :—

( १ ) विनशन तीर्थ—सरस्वती नदीच्या विलुप्तिस्थानी हे असून, सिवालिक टेकड्यांमधील 'प्लक्ष-प्रस्रवण' या सरस्वती–उगमस्थानापासून या तीर्थापर्यंतच्या प्रदेशात 'सारस्वत सत्रे' ( यज्ञ ) करतात.

( २ ) ब्रह्मसर ( कुरुक्षेत्र सरोवर ) — कुरुक्षेत्रातील प्राचीन सरोवरांपैकी 'ब्रह्मसर' ( पौराणिक साहित्य–चक्र-तीर्थ ), 'ज्योतिसर' आणि 'कलेसर' ही तीनच सरोवरे सध्या अस्तित्वात आहेत ( चक्रतीर्थ १. पहा ).

( ३ ) ज्योतिसर—या सरोवराकाठच्या अर्जुन–गीतो-पदेशस्थानी सध्या गीतामंदिर आणि गीतोपदेशप्रतिमा असून, तेथून तीन फर्लांगांवरील सरस्वती–दृषद्वती संगम-स्थानी केवळ सरस्वती नदीच दिसते. दृषद्वती, तसेच वैतरणी, आपगा, मधुश्रवा, कौशिकी, हिरण्यवती आदि अन्य पंचनद्या आज लुप्त झाल्या आहेत.

( ४ ) संनिहित तीर्थ ( आधु. संनेथ तीर्थ )— स्थानिक आख्यायिकामते येथील सूर्यग्रहणसमयीच्या स्नानाने सहस्र अश्वमेध यज्ञांचे पुण्य प्राप्त होते. नामांतर– 'रुद्रह्रद'.

( ५ ) व्यासस्थली—येथे शुकाचार्यांच्या मृत्यूनंतर प्राणार्पणउद्यत पुत्रशोकविह्वल वेदव्यासांची देवांनी समजूत घातली.

अन्य तीर्थे—येथील अन्य प्रमुख विद्यमान तीर्थे पुढील-प्रमाणे होत:–१. थानेसर ( प्राचीन स्थानेश्वर; हर्ष राजाची राजधानी ); २. कर्ण–का–टिला ( टेकडी; ज्योतिसर-पासून २ मैल पश्चिमेस; कर्ण–शिबिरस्थान ); ३; कर्ण-वधस्थान ( कुरुक्षेत्रापासून ५ मैलांवरील आधु. अमीन येथे; कर्णवध, द्रोण-चक्रव्यूह, तसेच जयद्रथवधस्थान ); ४. बाणगंगा ( शरपंजरस्थित भीष्मांचे देहावसानस्थान ); ५. वराह तीर्थ ( श्रीविष्णूचे वराहअवतारस्थान ); ६. सप्तसारस्वत ( मंकणक–तपस्यास्थान ); ७.पृथूदक ( आधु. पेहोआ; कुरुक्षेत्रातील पवित्रतम तीर्थ ); ८. तैजस तीर्थ ( वरुण तीर्थ; स्कंद-सैनापत्याभिषेकस्थान ).

वने —पौराणिक साहित्यमते या क्षेत्राच्या परिसरातील सप्त वने पुढीलप्रमाणे होत :— १. काम्यक; २. अदिति; ३. व्यास; ४. फलकी; ५. सूर्य; ६. सीता; ७. मधु. यापैकी

एकहि वन आज अस्तित्वात नाही.

## तीर्थनामावली

वैदिक साहित्य, महाभारत आणि पौराणिक साहित्यातील या क्षेत्राच्या तीर्थनामावली खाली दिल्या आहेत :—

**( १ ) वैदिक साहित्यात**—१. अन्यतःप्लक्ष; २. परिसारक; ३. परिणह; ४. परिणेहि; ५. शर्यणावत्; ६. सरस्वती नदी.

**( २ ) महाभारतात** — या ग्रंथाच्या आरण्यकपर्वात येथील निम्नलिखित तीर्थांचा निर्देश आढळतो :— १. अग्नि तीर्थ ( ८१.११९ ); २. अनाजन्म तीर्थ ( ८१.६७ ); ३. अमर ह्रद ( ८१.८९ ); ४. अम्बुवश्य तीर्थ ( ८१.४६ ); ५. अरन्तुक द्वारपाल ( ८१.१७१ ); ६. अवतीर्ण तीर्थ ( ८१.१३३ ); ७. अह तीर्थ ( ८१.८४ ); ८. आदित्याश्रम ( ८१.१६० ); ९. आपगा महानदी ( ८१.५५; १५४; नारद. उत्तर. ६५.५८; वामन. ३६.१ ); १०. आश्विनी तीर्थ (८१.१४); ११. इन्द्रमार्ग तीर्थ ( ८१.१५८ ); १२. इलास्पद तीर्थ ( ८१.६३ ); १३. एकहंस तीर्थ ( ८१.१६; नारद. उत्तर. ६५.३५; वामन. ३४.३७ ); १४. ओजस् तीर्थ ( ८१.१४३; वामन. ४१.६ ); १५. औशनस तीर्थ ( ८१.११६; नारद. उत्तर. ६५.१०५; वामन. ३९.१०–११; ४२.२४ ); १६. कन्या तीर्थ ( ८१.९४; पद्म. आदि. २७.१ ); १७. कपालमोचन तीर्थ ( ८१.११८; नारद. उत्तर. ६५.१०६; वामन. ३९.१४ ); १८. कपिला तीर्थ ( ८१.३८ ); १९. कलशी तीर्थ ( ८१.६६ ); २०. कायशोधनक तीर्थ ( ८१.३५; वामन. ३५.१७–१८ ); २१. किन्दत्तकूप तीर्थ ( ८१.८३ ); २२. किन्दान तीर्थ ( ८१.६५ ); २३. कुरुक्षेत्र ( ८१.१; १७३; १७५; १७८; नारद. उत्तर. ६४.२; १२; २०; वामन. २२.५९–६०; ३२.२४; ३३.१–२; ७; ३४.४०–४२; ४१.१३;२०; पद्म. आदि. २६.१–२ ); २४. कुलम्पुन तीर्थ ( ८१.८८ ); २५. कूप तीर्थ ( ८१.६३; १५३ ); २६. कृतशौच तीर्थ ( ८१.१७; नारद. उत्तर. ६५.३५; वामन. ३४.३७ ); २७. केदार तीर्थ ( ८१.५९; ६१; नारद. उत्तर. ६५.६९; वामन. ३६.२६ ); २८. कोटिकूप तीर्थ ( ८१.१४; नारद. उत्तर. ६५.२७; ९०; ९५; वामन. ३४.२८; ३६.६५; ७३ ); २९. कोटेश्वर तीर्थ ( ८१.४६ ); ३०. कौशिकी–दृषद्वती सङ्गम ( ८१.८०; नारद. उत्तर. ६५.८४; वामन. ३६.५९ ); ३१. गङ्गाह्रद तीर्थ ( ८१.८५; १५३; १७२ ); ३२. गवाम्भवनम् ( ८१.४० ); ३३. त्रिविष्टप तीर्थ ( ८१.७०; नारद. उत्तर. ६५.७३; वामन. ३६.४२ ); ३४. दधीच तीर्थ ( ८१.१६३ ); ३५. दशाश्वमेध तीर्थ ( ८१.५२; नारद. उत्तर. ६५.५६; वामन. ३५.४९ ); ३६. दृषद्वती नदी ( ३६.४८; ८१.७३; नारद. उत्तर. ६५.८ ); ३७. देव तीर्थ ( ८१.८६; नारद. उत्तर. ६५.५ ); ३८. देवी तीर्थ ( ८१.४१; ७९; १३१; वामन. ३५.३४; ३६.५७ ); ३९. नैमिष तीर्थ ( ८१.१७३ ); ४०. नैमिषकुञ्ज तीर्थ ( ८१.९२; वामन. ३७.७ ); ४१. पञ्चवट तीर्थ ( ८१.१४१; नारद. उत्तर. ६५.११२; वामन. ४१.११ ); ४२. पन्नग ह्रद ( ८१.८८; नारद. उत्तर. ६५.९८; वामन. ३७.१ ); ४३. पाणिखात तीर्थ ( ८१.७५; वामन; ३६.५३ ); ४४. पारिलाव तीर्थ ( ८१.१०; नारद. उत्तर. ६५.१६ ); ४५. पावन तीर्थ ( ८१.१५२ ); ४६. पुष्कर तीर्थ ( ८१.१७३; नारद. उत्तर. ६५.३८; वामन. २२.१९; ३४.४१; ३७.२१ ); ४७. पृथूदक तीर्थ ( ८१.१२२; १२५–१२६; नारद. उत्तर. ६५.१०७; वामन. २२.४४– ४५; ३९.१६; १९; ३० ); ४८. पृथ्वी तीर्थ ( ८१.११; नारद. उत्तर. ६५.१९ ); ४९. ब्रह्मसरक्षेत्र ( ८१.४; नारद. उत्तर. ६४.१२; वामन. २२.५१–५२ ); ५०. ब्रह्मयोनि तीर्थ ( ८१.१२१; वामन. ३९.२३ ); ५१. ब्रह्मोदुम्बर ( ८१.५८; नारद. उत्तर. ६५.६१ ); ५२. मचक्रुक द्वारपाल ( म. आर. ८१.७ ); ५३. मधुवटी तीर्थ ( ८१.७९ ); ५४. मरुत् तीर्थ ( ८१.८८ ); ५५. मातृ तीर्थ ( ८१.४७; नारद. उत्तर. ६५.५४; वामन. ३५.४३ ); ५६. मानुषाह्व तीर्थ ( ८१.५३; नारद. उत्तर. ६५.५७; वामन. ३५.५० ); ५७. मिश्रक तीर्थ ( ८१.७६–७७; नारद. उत्तर. ६५.८१; वामन. ३६.५४–५५ ); ५८. मुञ्जवट तीर्थ ( ८१.१८; नारद. उत्तर. ६५.३६; वामन. ३४. ३८ ); ५९. मृगधूम तीर्थ ( ८१.८५ ); ६०. यक्षी देवीस्थान ( ८१.१९–२० ) ६१. रामह्रद ( ८१. २२–२३; नारद उत्तर. ६४.१२; १७; ६५. ४२; वामन. २२.५९–६०; ३५.१; १४ ); ६२. रुद्रकोटि कूप ( ८१.६३; नारद. उत्तर. ६५.६६; वामन. ३६. २२–२३ ); ६३. रेणुका तीर्थ ( ८१.१३९ ); ६४. लोकोद्धार तीर्थ ( ८१.३७; नारद. उत्तर. ६५.४५; वामन. ३५.२१ ); ६५. वंशमूल तीर्थ ( ८१.३४; नारद. उत्तर. ६५.४४; वामन. ३५.१६ ); ६६. वसिष्ठाश्रम ( ८१.१५६ ); ६७. वामनक तीर्थ ( ८१.८६; नारद.

उत्तर. ६५.९१; वामन. ३६.६६); ६८. वाराह तीर्थ (८१.१५; नारद. उत्तर. ६५.३१ ); ६९. वारुण तीर्थ ( ८१.१४३; वामन. ५२.४६ ); ७०. विष्णुपद तीर्थ ( ८१.८; ८७; नारद. उत्तर. ६५.९२; वामन. ३१.८७; ९०; ३४.१४; ३६.६८ ); ७१. विश्वामित्र तीर्थ ( ८१.१२०; नारद. उत्तर. ६५.१०६ ); ७२. वृषध्वज स्थान ( ८१.७१ ); ७३. व्यासवन ( ८१.७८; नारद. उत्तर. ६५.५; ८२; वामन. ३४.५; ३६.५६ ); ७४. व्यासस्थली ( ८१.८१–८२; नारद. उत्तर. ६५.८५; वामन. ३६.६०; नारदीय. उत्तर. ६५.८५ ); ७५. शङ्खिनी तीर्थ ( ८१.४१ ); ७६. शतसाहस्रक तीर्थ ( ८१.१३७; वामन. ४१.३ ); ७७. शालिशूर्प ( ८१.९० ); ७८. शालूकिनी तीर्थ ( ८१.११; वामन. ३४.२१ ); ७९. श्रीकुञ्ज तीर्थ ( ८१.९१; वामन. ३७.६ ); ८०. श्रीतीर्थ ( ८१.३७; नारद. उत्तर. ६५.४६; वामन. ३५.२३ ); ८१. श्वानलोमापनयन तीर्थ ( ८१.५१ ); ८२. श्वानलोमापह तीर्थ ( ८१.५० ); ८३. सन्निहतसर ( ८१.१६६–१६७; १६९; नारद. उत्तर. ६४.१३; १९; वामन. २२.५३–५६; वा. ४१.९; ४३.१; ४३.३५; ४५.२ ); ८४. सरक तीर्थ ( ८१.६२–६३; नारद. उत्तर. ६५.६४–६५; वामन. ३६.२०–२१ ); ८५. सरस्वती कुञ्ज ( ८१.९३ ); ८६. सरस्वती नदी ( ८१.३; नारद. उत्तर. ६४.८; १८; २८; ६५.७; १००; वामन. २२.४४; ३२.१; ३३.११; ३४.५०; ३७.६; १८; २९; ४२.३ ); ८७. सरस्वती–अरुणा सङ्गम ( ८१.१३१ ); ८८. सर्पदर्वी नाग तीर्थ ( ८१.१२; वामन. ३४.२२ ); ८९. सर्वदेव-तीर्थ ( ८१.७४ ); ९०. साहस्रक तीर्थ ( ८१.१३७ ); ९१. सुतीर्थक ( ८१.४४; नारद. उत्तर. ६५.५२; वामन. ३५.४० ); ९२. सुदिन तीर्थ ( ८१.८४ ); ९३. सोम तीर्थ ( ८१.१६; ९६; १६२; नारद. उत्तर. ६५.३२; १०३; १११; वामन. ३४.३३; ३७.१५; ४१.४; ४३.११ ); ९४. स्थाणुवर तीर्थ ( ८१.१५५; नारद. उत्तर. ६५.१२२; वामन. ४२.३०; ४३.१; ४६.९ ); ९५. स्वर्गद्वार तीर्थ ( ८१.१४५; नारद. उत्तर. ६५.११३ ); ९६. ह्रद तीर्थ ( ८१.६३; वामन. २२.१४ ).

महाभारत आदिपर्वात येथील निम्नलिखित तीर्थांचा निर्देश आढळतो :–१. अनरक तीर्थ ( ८१.१४६; नारद. उत्तर. ६५.११४ ) २. कन्याश्रम ( ८१.१६५ ); ३. कुरु तीर्थ ( ८१.१४४; नारद. उत्तर. ६५.११३ ); ४. तरन्तुक द्वारपाल ( ८१.१३; वामन. २२.६० ); ५. पञ्चनद तीर्थ ( ८१.१३; नारद. उत्तर. ६५.२५; वामन. ३४.२६-२७ ); ६. फलकीवन ( ८१.७२; नारद. उत्तर. ६५.५; ७७; वामन. ३४.५; ३६.४६; ५०-५१ ); ७. बदरीपाचन तीर्थ ( ८१.१५६ ); ८. ब्रह्मणःस्थान ( ८१.९५; नारद. उत्तर. ६५.६१; वामन. ३६.७; ३७.१३; पद्म. आदि. २७.२ ); ९. ब्रह्मवेदी ( ८१.१७७; नारद. उत्तर. ६४.१४; २३ ); १०. ब्रह्मावर्त ( ८१.४३; नारद. उत्तर. ६४.६; ६५.५१; वामन. ३३.९; ३५.३६–३९ ); ११. मधुस्रव तीर्थ ( ८१.१३० ); १२. मनोजव तीर्थ ( ८१.७८; वामन. ३६.५६ ); १३. विमोचन तीर्थ ( ८१.१४० ); १४. वैतरणी नदी ( ८१.७०; नारद. उत्तर. ६५.७; ७४; वामन. ३६.४३ ); १५. शीतवन ( ८१.४८; वामन. ३४.५ ); १६. शूलपाणि स्थान ( ८१.७१ ); १७. सप्तसारस्वत तीर्थ ( ८१.९७; ११४; नारद. उत्तर. ६५.१०३ ); १८. सूर्य तीर्थ ( ८१.३९; नारद. उत्तर. ६५.९७; वामन. ३५.२६; ४३.११ ).

( ३ ) **नारदीय पुराणात**—या ग्रंथाच्या उत्तरकांडातील ६५ व्या अध्यायात येथील निम्नलिखित अतिरिक्त तीर्थांचा निर्देश आढळतो. कंसातील आकडे श्लोकांचे आहेत :— १. अदितिवन ( ११; वामन. ३४.५ ); २. अन्यजन्मसर ( ७० ); ३. अरुणासङ्गम ( १०९; वामन. ४०.४३–४४ ); ४. अवकीर्ण तीर्थ ( १०७; वामन ३९.२४–३२ ); ५. अश्वि तीर्थ ( ३० ); ६. अदितिवन ( ५; वामन. ३४.१२ ); ७. आदित्यवन ( ११५ ); ८. आह्व तीर्थ ( ८८ ); ९. ईहास्पद तीर्थ ( ६७ ); १०. उलूखलमेखला कपिल यक्षपत्नी ( ४१; वामन. ३४.४५ ); ११. कपिला ह्रद ( ४७; वामन. ३५.२४ ); १२. कलशी देवीस्थान ( ६३ ); १३. काञ्चनाक्षी नदी ( १०४; वामन. ३७.१८; २८ ); १४. कामशोधनक तीर्थ ( ४४ ); १५. कामेश्वर तीर्थ ( ५३; वामन. ३५.४२ ); १६. काम्यकवन ( ५; ११४; वामन. ३४.५; ४१.३०–३१ ); १७. किन्दूशु कूप ( ८७ ); १८. कुरुजाङ्गल ( ६४.९; वामन. २२.४७; २३.२; ३३.१२ ); १९. कुलोत्तारणक तीर्थ ( ९७; वामन. ३६.७६; ३७.४ ); २०. कोटीश्वर तीर्थ ( २८; ९६; वामन. ३४.२९ ); २१. कौशिकी नदी ( ८ ); २२. कौशिकी सङ्गम तीर्थ ( १८ ); २३. चतुःप्रवाहाख्य तीर्थ ( ११७ ); २४. ज्येष्ठाश्रम ( ९३; वामन. ३१.३६; ६९ ); २५. ज्वालामालेश्वर तीर्थ ( ३४; वामन. ३४.३६ ); २६. ताडलिङ्ग ( ३४ ); २७. दक्षाश्रम ( २१; वामन. ३४.२० ); २८. दक्षेश्वर लिङ्ग ( २० );

२९. दुर्गा तीर्थ ( ११८; वामन. ४२.१५ ); ३०. नाग तीर्थ ( २३; ७२; वामन. ३२.२४; ३४.२२; ३६.४० ); ३१. नैमिष कुण्ड ( १०१ ); ३२. पाणिघात तीर्थ ( ८० ); ३३. पितृ तीर्थ ( ११९; वामन. ४२.१८ ); ३४. पृथ्वीविवरद्वार गणपति ( ५० ); ३५. प्राची सरस्वती नदी ( १२०; वामन. ४२.२०; ५०.४ ); ३६. ब्रह्म तीर्थ ( १०२; १२२; वामन. ४२.२८ ); ३७. ब्रह्मर्षि कुण्ड ( ६२; वामन. ३६.८ ); ३८. भूतेश्वर तीर्थ ( ३४ ); ३९. मधुवन ( ६; ८३; वामन. ३४.५; ३६.५७ ); ४०. मधुस्रवा नदी ( ८; वामन. ३९.३६–३८ ); ४१. मनोहरी नदी ( १०४ ); ४२. मन्दाकिनी नदी ( ८ ); ४३. मुदित तीर्थ ( ८८ ); ४४. मृगमुच्य तीर्थ ( ८९ ); ४५. रन्तुक यक्ष ( २४; वामन. ३४.११ ). ४६. रसावर्त तीर्थ ( ७५; वामन. ३६.४४ ); ४७. वसिष्ठ तीर्थ ( १०८ ); ४८. विमल तीर्थ ( १४; वामन. ३४.१५ ); ४९. विमलोदका नदी ( १०५; वामन ३७.१८; ३६ ); ५०. विलेपक तीर्थ ( ७६ ); ५१. विशाला ( १०४; वामन. ३७.३० ); ५२. विहार तीर्थ ( ११८; वामन. ४२.१०–१४ ); ५३. वृद्धकेदारक तीर्थ ( ६२ ); ५४. व्यास तीर्थ ( ८३ ); ५५. शालग्राम ( ४६; वामन. ३५.२३ ); ५६. शालङ्किनी तीर्थ ( २२ ); ५७. शाल्होत्र तीर्थ ( १००; वामन. ३७.५ ); ५८. शुक्र तीर्थ ( १२१; वामन. ४६.१ ); ५९. श्रीकुम्भाख्य तीर्थ ( १०० ); ६०. सरस्वती कूप ( ११९ ); ६१. सितान्तक तीर्थ ( ७२ ); ६२. सीतावन ( नारद. ६; ५५; वामन. ३५.४४ ); ६३. सुनन्दा नदी ( १०५ ); ६४. सुप्रभा नदी ( १०४; वामन. ३७.१८ ); ६५. सुवेणु नदी ( १०५ ); ६६. सूर्यवन ( ६; वामन. ३४.५ ); ६७. स्थाणु तीर्थ ( १२२; १३२; वामन. ४०.३; ४२.३०; ४३.१; १९; ४५.४ ); ६८. हनुमत्तीर्थ ( ९९; वामन. ३७.३ ); ६९. हैरण्यवती नदी ( ८ ).

**( ४ ) वामन पुराणात**—या ग्रंथात या क्षेत्रातील निम्नलिखित अतिरिक्त तीर्थांचा निर्देश आढळतोः–१. अच्युतस्थल ( ३४.४७ ); २. अजावन, नृपति, महादेव, पावक नामक द्वारपाल ( २२.४१ ); ३. अम्बवती तीर्थ ( ३५.४२ ); ४. अश्वत्थ स्थान ( ३६.३३; ३९ ); ५. अश्विनी तीर्थ ( ३४.३१ ); ६. आदित्य तीर्थ ( ४३.३६ ); ७. आद्य ब्रह्मसर ( ३२.२४ ); ८. आरन्तुक द्वारपाल ( २२.६०; ३३.२; ३५.३७ ); ९. इडास्पद तीर्थ ( ३६.२४ ); १०. उत्तरवेदी ( २२.६० ); ११. उदय पर्वत ( ५२.४६ ); १२. उद्दालक ( ५२.४६ ); १३. उत्तमेरु ( ४३.३७ ); १४. ऋणमोचन तीर्थ ( ४१.६ ); १५. कलसी देवी ( ३६.१८–१९ ); १६. कल्मषनाशन तीर्थ ( ३६.७६ ); १७. किंरूप तीर्थ ( ३६.२७ ); १८. किन्दत्तरूप तीर्थ ( ३६.६२ ); १९. कुब्ज तीर्थ ( ४२.१ ); २०. कुमाराभिषेक तीर्थ ( ४१.६ ); २१. कुमारेश्वर ( ४६.२३ ); २२. कौशिकीसम्भव तीर्थ ( ३४.१८ ); २३. गयाशिर ( २२.१८ ); २४. गरुडासन ( ५२.४६ ); २५. गर्भोदक समुद्र ( ४३.१७ ); २६. चक्रक तीर्थ ( ४२.५; ४३.११ ); २७. चित्रकूट पर्वत ( ५२.४७ ); २८. जरायु पर्वत ( ४३.३७ ); २९. त्रिकूट पर्वत ( ५२.४७ ); ३०. दक्ष तीर्थ ( ४६.२ ); ३१. दधि तीर्थ ( ३४.२२ ); ३२. दारुवन ( ४४.१७ ); ३३. दृढशृङ्ग पर्वत ( ५२.४७ ); ३४. द्वैतवन ( २२.१२; ३२.४ ); ३५. नकुलगण ( ४६.२ ); ३६. नकुलीशगण ( ४६.१० ); ३७. नरक तीर्थ ( ४१.२२-२३ ); ३८. नरकोद्धारारन्तुक तीर्थ ( ३४.२३ ); ३९. पञ्चह्रद ( ३५.२ ); ४०. पारिप्लवङ्ग तीर्थ ( ३४.१७ ); ४१. पितामह सरोवर ( ४०.१३ ); ४२. पुण्डरिकाम्भस तीर्थ ( ३६.४१ ); ४३. पुष्करस्था सरस्वती ( ३७.२३ ); ४४. पृथूदक स्थान ( ३९.२०; ५०.१ ) ४५. पौण्डरीक तीर्थ ( ३४.३८ ); ४६. प्रयाग ( २२.१८ ); ४७. प्लक्षवृक्ष ( ३२.३ ); ४८. भवानीवन ( ३५.२९ ); ४९. भूतालय ( ३४.४७ ); ५०. भूतेश्वर लिङ्ग ( ३४.३६ ); ५१. मङ्कणक तीर्थ ( ३८.१ ); ५१. मनोहरा ( ३७.३४ ); ५३. मन्दर पर्वत ( ५२.४६ ); ५४. महत्सर ( ४३.३८ ); ५५. महानदी ( ३७.३१ ); ५६. महौजसा ( ३७.२८ ); ५७. मानस ह्रदा ( ३७.१८ ) ५८. यक्ष तीर्थ ( ३४.११ ); ५९. यक्षिणी तीर्थ ( ३४.३९ ); ६०. यज्ञोपवीत तीर्थ ( ४२.४ ); ६१. यमुना नदी ( ४२.८ ); ६२. यायात तीर्थ ( ३९.३६ ); ६३. युगन्धर तीर्थ ( ३४.४७ ); ६४. रम्यग पर्वत ( ५२.४६ ); ६५ रागवती नदी ( ५१.१७ ); ६६. रेणुकाष्टक तीर्थ ( ४१.५ ); ६७. रुद्राकर तीर्थ ( ४६.११ ); ६८. वटेश्वर ( ४६.९ ); ६९. वराह तीर्थ ( ३४.३२.५२.४६ ); ७०. वसिष्ठोद्वाह ( ३९.३९ ); ७१. विरता तीर्थ ( २२.१९ ); ७२. विवरद्वार ( ३५.३३ ); ७३. वेगसानु पर्वत ( ५२.४७ ); ७४. व्योम तीर्थ ( ४६.१ ); ७५. शङ्कुकर्ण ( २२.४१ ); ७६. शुक्तिमत् पर्वत ( ५२.४७ ); ७७. शुनां लोमापह

तीर्थ ( ३५.४६ ); ७८. शृङ्गवत् पर्वत ( ५२.४७ ); ७९. श्वविलोमापह तीर्थ ( ३५.४७ ); ८०. सङ्गम तीर्थ ( ३४.१९ ); ८१. सङ्गिनी तीर्थ ( ३५.३४ ); ८२. सतवने ( १. काम्यक; २. अदिति; ३. व्यास; ४. फलकी; ५. सूर्य; ६. मधु; ७. शीत; ३४.५ ); ८३. समन्तपञ्चक ( २२.१५–१६ ); ८३. सिन्धु नदी ( ४२.८ ); ८५. सीता तीर्थ ( ३७.१२ ); ८६. सुकेश राक्षसेश्वर ( २२.४१ ); ८७. सुप्रभा देवी ( ३७.२१ ); ८८. सुमहत् तीर्थ ( ३६.५२–५४; ७५; ३९.१४–१५ ); ८९. सुवर्णा ( ३७.१८ ); ९०. सोमेश्वर ( ३४.३४ ); ९१. स्थली ( ३६.६१ ); ९२. हेमकूट पर्वत ( ५२.४६ ).

( ५ ) अन्य पुराणात— १. सूर्यपद ( वायु. १११.५४ ).

२. तापी नदीकाठचे एक पवित्र क्षेत्र ( तापीमाहात्म्य. ८६ ).

३. ( तीर्थ ) अरुणाचलक्षेत्रान्तर्गत एक शिवतीर्थ. येथील शिवाचे नाव स्थाणु आणि देवीचे नाव स्थाणुप्रिया होते ( स्कन्द. अरुणाचल. २.२ ).

४. संभलक्षेत्रान्तर्गत संभल-चंदौसी मार्गावरील एक शिवमंदिरस्थान ( ती. पृ. ९२ ).

५. ( देश ) बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या मध्यदेशातील 'कुरु' देशाचे नामांतर ( बृ. सं. ११.५७; कुरु पहा ).

**कुरुक्षेत्रधारा** ( जलप्रपात )— बदरिकाश्रमक्षेत्रान्तर्गत पाच जलप्रपातांपैकी एक ( स्कन्द. बदरी. ७ ).

**कुरुगोड्डु** ( नगर )— शिलालेख साहित्य आणि तामीळ काव्यग्रंथमते पश्चिम चालुक्यांच्या राचमल्ल सिंद ( स. ११३८ ) नामक मांडलिकाच्या राजधानीचे म्हैसूर प्रांतातील एक नगर ( रंगाचारी, १. बेल्लारी. १२८ ). बेल्लारी जिल्ह्यातील आधु. कुरुगोड्डु गाव हेच होय.

**शिलालेख**— या साहित्यमते पल्लव सम्राट नंदिवर्मन्ने येथे यशस्वीपणे युद्ध केले होते ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३४ ). पश्चिम चालुक्य राजा जयसिंह ( तृतीय ) च्या स. १०२७ च्या कुरुगोड्डु शिलालेखमते त्याचे येथे राज्य असून ( मद्रास एपि. रिपोर्ट. स. १९०३–१९०४ ), सोमेश्वर ( चतुर्थ ) च्या स. ११७७ च्या शिलालेखमते त्याच संकम ( शंकर ) नामक बंधू येथे राजप्रतिनिधी होता ( रंगाचारी, १. बेल्लारी. १०८ ). चालुक्य राजवंशासंबंधी निष्ठासूचक दोन ( स. ११८१ ) शिलालेखहि येथे सापडले आहेत ( एपि. इंडि. १४.२६५ ). स. ११९० मध्ये होयसाळ राजा बल्लाळ ( द्वितीय ) ने येथे देवगिरीच्या भिल्लम राजासमवेत विजयी युद्ध केले होते ( एन्शंट इंडिया. पृ. २५२ ).

**मंदिर**— द्राविड शिल्पशैलीच्या विकासाच्या दृष्टीने महत्त्वपूर्ण असे एक हिंदु देवमंदिर येथे आहे ( फर्ग्युसन, १.४०७ ).

**कुरुग्राम** ( जैन तीर्थ )— उत्तर भारतातील एक जैन तीर्थ. झांशी जिल्ह्यातील आधु. कुरुगमा ग्राम हेच होय ( ती. पृ. १०७ ).

**कुरुजाङ्गल** ( अरण्यप्रदेश )— कुरुक्षेत्राचा पूर्ववर्ती उपविभागभूत एक अरण्यमय, वन्य आणि निर्जन प्रदेश ( बृ. सं. ९.२९ ). कुरुक्षेत्रान्तर्गत स्थानेश्वराच्या पूर्वेकडील आणि कुरुक्षेत्राच्या पश्चिमेकडील हा देश म्हणजे पंजाबातील आधु. रोहतक–हिस्सार प्रदेश होय.

कल्पद्रुकोशात हे 'कुरु' देशाचे ( कल्पद्रु. ५.१२ ), आणि नारद व वामन पुराणात हे 'कुरुक्षेत्रा'चे नामांतर ( नारद. उत्तर. ६४.९; वामन. २३.२; ३३.२ ) मानले असले, तरी अन्य साऱ्या साहित्यात यास कुरुक्षेत्राचा उपविभाग मानले आहे. नामांतर ( देवी पुराण )– 'कुरुजांगलारण्य' ( तीर्थविवेचन पृ. २४४ ); ( मध्ययुगीन साहित्य )– 'सरहिंद'.

**नामव्युत्पत्ती**— 'कुरु देशातील जलहीन प्रदेश' ( जांगल ) अशा अर्थाने यास हे नाव मिळाले असावे.

**वाल्मीकि रामायणात**—या ग्रंथमते हा अयोध्या–केकय मार्गावर होता ( वा. रा. अयो. ६८.१३ ).

**महाभारतात**—या ग्रंथातील कर्ण–शल्य संवादमते कुरु–मगध मार्गावरील या देशातून ( म. स. १८.२६ ) शतद्रुका आणि इरावती नद्या वहात असत ( म. क. ३०.१९ ). भारतीय युद्धकाली कौरवसेनेचे शिबिर या देशापासून हस्तिनापुरपर्यंत पसरले होते ( म. उ. १९.२९–३० ).

**पौराणिक साहित्यात**—भागवतमते हा इंद्रप्रस्थ–द्वारका मार्गावर असून ( भा. १.१०.३४ ), वामनमते हा सरस्वती–दृषद्वती दुआबात होता ( वामन. २२.४७ ). वामन पुराण प्रह्लादयात्रामते हे वामनतीर्थ असून ( वामन. ८४.३ ), येथील वामनाचे नाव स्थाणु होते ( वामन. ९०.१७ ). एक श्राद्धयोग्य तीर्थ म्हणूनहि हे सुविख्यात होते ( वायु. ७७.९३; मत्स्य. २१.९; २८; वामन. २२.२७; ८४.३; १७; कूर्म. उत्तर. ३७.३६; भा. ३.१.२४; १०.८६.२०; नृसिंह. ६६.४५ ).

**कुरुतीर्थ** ( तीर्थ )—कुरुक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ ( म. आर. ८१. १४४; नारद. उत्तर. ६५.११३; पद्म. आदि. २७.५३ ).

**कुरुद** ( देशविभाग )—शरभपुरसम्राट नरेंद्राच्या ताम्रपटाचे मध्यप्रदेशातील रायपुरपासून २७ मैल वायव्येकडील आणि आरंगपासून ८ मैलांवरील उपलब्धिस्थान ( एपि. इंडि. ३१.२६३–२६४ ).

**कुरुद्वीप** ( देश )—दीपवंशमते 'कुरु' ( उत्तर ) देशाचे नामांतर ( दीपवंश. पृ. १६; कुरु उत्तर पहा ).

**कुरुपाञ्चाल** ( देशद्वय )—ब्राह्मण, उपनिषद् आणि पौराणिक साहित्यमते भारतवर्षाच्या मध्यदेशान्तर्गत एक देशद्वय ( गो. ब्रा. २.१०; ऐ. ब्रा. ८.१४; ब्र. उ. १; अग्नि. ११८.८; कूर्म. पूर्व. ४७.४१; ब्रह्म. १९.१५; मत्स्य. ११४.३४; वायु. ४५.१०९; विष्णु. २.३.१५ ). उत्तर पांचाल देशान्तर्गत कुरु आणि दक्षिण पांचाल देशान्तर्गत पांचाल या पूरु राजशासित लोकांचा संयुक्त निर्देश येथे अभिप्रेत असावा.

**उपनिषत्साहित्यात**–छांदोग्य उपनिषद्मते कुरु देशातील टोळधाडजन्य अवर्षणामुळे ( **मटचीहतेषु कुरुषु** ) उत्तर पांचाल देशान्तर्गत कुरु लोक हस्तिनापुरहून दक्षिण पांचाल देशान्तर्गत कौशांबी येथे स्थलांतरित झाले. कालांतराने कुरु आणि पांचाल देशद्वय 'कुरुपांचाल' संयुक्त नावाने सुविख्यात झाले ( छां. उ. १.१०.१ ). पौराणिक साहित्यमते अधिसोमकृष्णपुत्र निमिचक्राच्या राज्यकाली गंगा नदीपुरात हस्तिनापुर वाहून गेल्याने त्याने स्वराजधानी कौशांबीस हलविली ( वायु. ९९.२७ ).

उपरोक्त दोन आख्यायिकांमते छांदोग्य उपनिषदातील ( रचनाकाल–भारतीय युद्धानंतर ६ पिढ्या ) दुष्काळाची आख्यायिका ऐतिहासिक दृष्ट्या अधिक विश्वसनीय वाटते. तत्रापि गंगा खोऱ्यातील हस्तिनापुर नगर पुराने संपूर्णतः वाहून गेल्याची शक्यताहि नाकारता येत नाही.

**पाणिनीच्या गणपाठात**—या ग्रंथात या देशद्वयाचा संयुक्त निर्देश आढळतो ( पा. सू. ४.१.८६ ).

**महाभारतात**—या ग्रंथातील भीष्मपर्वात या जोडदेशाचा निर्देश असून ( म. भी. १०.३७ ), 'कर्ण–शल्य संवाद'मते येथील लोक 'अर्धोक्त' ( चाणाक्ष ) आणि धार्मिक होते ( म. क. ३०.६२; ७९; पांचाल पहा ). पद्म पुराणातहि या लोकांचा निर्देश आढळतो ( पद्म. आदि. ६.३४ ).

**कुरुवक** ( देश )—मार्कंडेयमते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या उत्तर भागातील एक देश ( मार्क. ५५.४२ ).

**कुरुभूमि** ( देश )—बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या मध्य देशातील 'कुरु' देशाचे नामांतर ( बृ. सं. १६.३२; कुरु पहा ).

**कुरूमीन** ( देश )—मार्कंडेयमते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या अपरांत ( पश्चिम ) भागातील एक देश व लोकसमूह ( मार्क. ५७.५० ). काही अभ्यासकांच्या मते या मूळच्या इराणदेशीय लोकांच्या पश्चिम भारतातील वसाहतींचा निर्देश येथे अभिप्रेत असावा. चौधरी यांच्या मते 'अपरांत' ही संज्ञा येथे व्यापक अर्थाने उपयोजिली असून, मार्कंडेय पुराणान्तर्गत पारद, तुरुष्क गणांतील या लोकांच्या इराणमधील मुख्य वसाहतींचा निर्देश येथे अभिप्रेत आहे.

मॅक्रिंडल यांच्या मते इराणमधील आधु. लारिस्तान, किर्मन, आणि मोघोस्तान हा समुद्रवर्ती प्रदेश हाच होय ( मॅक्रिंडल, अलेक्झांडर. पृ. १८७ ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पौराणिक साहित्य ( वायु. ४५.१२९; ब्रह्माण्ड. ४९. ६३ ) | तुरसित |
| २. डॅरियसचा सुस राजवाडा शिलालेख ( सरकार, शिलालेख. पृ. ४ ) | कर्माना |
| ३. इराणी साहित्य ( मॅक्रिंडल, अलेक्झांडर. पृ. १८७ ) | कर्मन्; कर्मनीय |

**कुरुम्बेट्ट** ( नगर )—यादव राजा कन्हरच्या स. १२४६ च्या ममदापुर शिलालेखमते दक्षिण भारतातील कुंतल देशान्तर्गत कुंडि विषयातील एक नगर. बेळगाव जिल्ह्यातील गोकाक तालुक्यातील ममदापुरनजिकचे आधु. कुर्बेत गाव हेच होय ( एपि. इंडि. १९.२१ ).

**कुरुम्बरभूमि** ( नगर )—तामीळ साहित्यमते दक्षिण भारतातील 'कांची' नगराचे नामांतर ( कांची पहा ).

**कुरुराष्ट्र** ( देश )— महाभारतमते उत्तर भारतातील 'कुरु' देशाचे नामांतर ( म. आ. १०५.२१; कुरु पहा ).

**कुरुव** ( ग्राम )— पश्चिम चालुक्य राजा विक्रमादित्य ( षष्ठ ) च्या स. १०७६ च्या शिलालेखमते त्याच्या

नन्निय गंग-रक्कस-गंग नामक मांडलिक राजाच्या नेतृत्वाखालील वायव्य म्हैसुरातील एक नगर ( एपि. कर्ना. ७.१४ ).

**कुरुवग्राम भीम** ( देवता )— वेंकटाचलक्षेत्रान्तर्गत एक देवतास्थान ( स्कन्द. वेङ्कटाचल. १० ).

**कुरुवग्रामस्थकुल** ( तीर्थ )— वेंकटाचलक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ ( स्कन्द. वेङ्कटाचल. १० ).

**कुरुवट्टि** ( नगर )— शिलालेख साहित्यमते दक्षिण भारतातील पश्चिम चालुक्य राज्यातील तुंगभद्रा नदीकाठचे एक नगर ( रंगाचारी, १.२९५; एपि. इंडि. ४.२१२ ). धारवाड जिल्ह्यातील तुंगभद्रा नदीच्या उजव्या किनाऱ्यावरील हर्पणहळ्ळी गावापासून १७ मैल पश्चिमेकडील आणि चौडदामपुर नामक चालुक्य मंदिरस्थानापासून ३ मैलांवरील आधु. कुरुवित्ति गाव हेच होय. येथील पश्चिम चालुक्य स्थापत्यशैलीचे मल्लिकार्जुन मंदिर ( इ. स. १२ वे शतक ) सुविख्यात आहे.

**शिलालेख साहित्यात**— या साहित्यमते ज्वरग्रस्त पश्चिम चालुक्य राजा सोमेश्वर ( प्रथम ) ने स. १०६८ मध्ये येथील तुंगभद्रा नदीमध्ये आत्महत्या केली ( एपि. इंडि. ४.२१२ ).

**मल्लिकार्जुन मंदिर**— गदग येथील सोमेश्वर मंदिरसदृश या मंदिराच्या मुख्य सभामंडपाच्या उत्तरेस आणि दक्षिणेस बाह्यमंडप आणि प्रवेशद्वारे आहेत. येथे सध्या मल्लिकार्जुनमूर्ती असली, तरी पूर्वकाली हे शिवमंदिर असावे.

या मंदिराच्या गर्भागाराच्या अंतर्भितीवर उपदैवतांच्या चालुक्य शैलीच्या तीन खोबणी आहेत ( तत्सम अन्य मंदिरे—हुविनहड्गल्ली आणि नगै येथील केशवमंदिरे ). मंदिराच्या चौरसाकृती अंतराळाच्या ( गर्भागार ) समोर सिलोनी पद्धतीचा अर्धवर्तुलाकृती नक्षीकामयुक्त दगड, आणि चतुःस्तंभयुक्त छोटा ( १९'×१९' ) सभामंडप आहे. त्याचे छत आज नष्ट झाले असले, तरी गर्भागाराचे शिखर मात्र सुस्थितीत आहे. मंदिराच्या बाह्यमंडपाबाहेर स्तंभयुक्त बाह्यप्राकार आहे. मंदिराच्या दर्शनी भागावरील उभ्या स्तंभांच्या नक्षीकामाच्या शिरोभागी मंदिरशिखराच्या छोट्या प्रतिकृती अथवा मगरमुखातून बाहेर पडणाऱ्या पुष्पमाला कोरल्या आहेत.

**शिल्प**— या मंदिराच्या दक्षिण प्रवेशद्वारानजिकच्या सुट्या दगडावर ( ६'×४' ) अनुचर स्त्रीचतुष्टयवेष्टित राजपुरुषाचे शिल्प असून, फर्ग्युसन यांच्या मते ते हलेबीड मंदिरशिल्पाहून अधिक सरस आहे. मंदिराच्या पूर्व प्रवेशद्वारानजिकच्या स्त्रीप्रतिमायुक्त कमानीहि हलेबीड मंदिरसदृशच परंतु अधिक सफाईदार आहेत. त्यावरून हे मंदिर हलेबीडच्या उत्तरकालीन असावे ( फर्ग्युसन, १.४२९–४३१ ).

**कुरुवर्णक** ( देश )—पद्ममते 'परवल्लक' जनपदाचे नामांतर ( पद्म. आदि. ६.५१; परवल्लक पहा ).

**कुरुवर्ष** ( देश )—लिंगमते हिमालय प्रदेशातील 'उत्तर कुरु' देशाचे नामांतर ( लिङ्ग. ४७.५; कुरु उत्तर पहा ).

**कुरुविन्द** ( देश )—महाभारतमते उत्तर भारतातील 'पुलिंद' देशाचे नामांतर ( म. भी. ८७.७; पुलिंद पहा ).

**कुरुवेलकप्प** ( ग्राम )—बौद्ध साहित्यमते कोशल देशान्तर्गत मल्ल गणराज्यातील एक प्रमुख ग्राम ( अङ्गुत्तर. ४.४३८ ).

**कुरुहार** ( ग्राम )—कश्मीरराज कुशस्थापित कश्मीरातील एक अग्रहार ग्राम ( राज. १.८८ ). दचूनपोर ( प्राचीन दक्षिणपार ) परगण्यातील लिद्दर (प्राचीन लेदरी) नदीखोऱ्यातील लिवर ( प्राचीन लेवार ) गावापासून ४ मैल उत्तरेकडील आधु. कुलर गाव हेच होय ( स्टाइन, राज. १.१६ ).

**कुर्कविहार** ( बौद्ध विहार )—गया जिल्ह्यातील 'कुक्कुटविहार' नामक बौद्ध विहाराचे नामांतर ( कुक्कुटविहार पहा ).

**कुर्किहार** ( ब्राँझ शिल्पस्थान )—बंगालमधील ब्राँझ शिल्पप्रतिमास्थान. सोन्याचांदीच्या अलंकारांनी मढविलेल्या परिणत पाल शिल्पकलेच्या अनेक ब्राँझ प्रतिमा येथे आहेत ( गोएट्झ, पृ. ३९ ).

**कुर्रम** ( करंडकस्थान )—वायव्य भारतातील कनिष्क राज्यकालीन ( स. १४८ ) कुर्रम खरोष्ट्री ताम्रकरंडकलेखाचे उपलब्धिस्थान. येथील बौद्ध स्तूपाकृती करंडकावरील चार ओळींच्या खरोष्ट्री करंडकलेखमते भगवान शाक्यमुनींचा हा शरीरावशेष–करंडक यशपुत्र श्वेतवर्म्याने नवविहारातील स्तूपात सर्वस्तिवादिन् आचार्यप्रीत्यर्थ स्थापिला. या लेखाच्या अखेरीस बुद्धाचे 'प्रतीत्यसमुत्पाद सुत्त', आणि अखेरीस 'महिफनिय' नामक लिपीकाराची स्वाक्षरी आहे.

उपरोक्त करंडकलेखमते कनिष्क संवत् २० च्या 'अवदुनक' महिन्याच्या २० व्या दिवशी तो कोरला असून, त्याची लिपी कनिष्काच्या 'शाहजी की ढेरी' करंडकलेखासदृश, आणि त्यामधील बुद्धवचन वायव्य भारतातील

प्राकृत बौद्ध ग्रंथातील आहे. त्यावरून संस्कृत भाषाव्यवहाराची आज्ञा कनिष्काने देण्याअगोदरचा हा लेख असावा (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.१५५).

**कुशाण** (लोकसमूह)—खरोष्ठी शिलालेखमते वायव्य भारतातील 'कुशाण' लोकसमूहाचे नामांतर (कुशाण पहा).

**कुल** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू. ४.२.८०.११).

**कुलक** (देश)—दक्षिण भारतातील एक जनपद (म. भी. १०.६१). पाठभेद–'कुलत्थ.'

**कुलकालक** (देश)—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते भारतवर्षातील एक देश (वैजयन्ती. ३.६७).

**कुलकुल्या** (वैष्णवी देवीपीठ)—पूर्व भारतातील कुशीनगरापासून ६ मैलांवरील कुल्या नदीकाठचे एक वैष्णवी देवीपीठ. यानजिकच कुलकुल्येश्वर शिवमंदिर आहे (ती. पृ. १४७). स्थानिक नामांतर–'कुलकुला.'

**कुलजा** (नदी)—महाभारतमते त्रिशिखर पर्वतान्तर्गत भार्गव आणि फेनप ऋषिसहवासपुनीत एक नदी (म. अनु. १२०.२३ कुं.).

**कुलट** (देश)—कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या ईशान्य भागातील एक देश (मार्क. ५५.४९).

**कुलत्थ** (देश)—दक्षिण भारतातील 'कुलक' जनपदाचे नामांतर (कुलक पहा).

**कुलपञ्चाब** (देश)—जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक देश (वराह. ८३.२).

**कुलपाक** (जैन तीर्थ)—उदयकीर्ति, गुणकीर्ति, सुमतिसागर, जयसागर, ज्ञानसागर आणि जिनसेनमते आंध्र प्रदेशातील माणिकस्वामी (माणिक्यस्वामी, माणिकदेव) नामक आदिनाथाचे (ऋषभनाथ) मंदिरस्थान. सिकंदराबाद–वरंगल रेल्वेस्थानकापासून ४ मैलांवरील आधु. कुलपाक ग्राम हेच होय. श्वेतांबर आणि दिगंबर या दोन्ही पंथांचे हे तीर्थस्थान मानले जाते.

**नामांतरे**—प्राचीन जैन साहित्यात या तीर्थाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :– १. कुल्यपाक; २. कुल्लपाक; ३. कोल्लपाक; ४. कुल्लपाख्य.

**आख्यायिका**—जिनप्रभसूरिकृत विविधतीर्थकल्प, तसेच सिंहनंदिकृत काव्यमते येथील भरतराजनिर्मित इंद्रनील मण्याची आदिनाथप्रतिमा रावण आणि रावणपत्नी मंदोदरीने उपासनेसाठी लंकेस नेली. यानंतर अनेक वर्षे ती सागरतळी पडली होती. कर्नाटकदेशीय कल्याण नगरनिवासी कलचुरि नरेश शंकर (संकम द्वितीय; स. ११७७–११८०) ने ती शोधून काढून या गावी मंदिर बांधले. शीलविजयमते ३६० शिवमंदिरांच्या रचनाकर्त्या शंकर राजाने स्वतःच्या जैनधर्मीय पत्नीप्रीत्यर्थ हे मंदिर बांधले (जैन साहित्य और इतिहास. पृ. ४५८).

**जीर्णोद्धार**—केशरकुशलगणीने या मंदिराचा वि. सं. १७६७ मध्ये जीर्णोद्धार केला (ती. सं. पृ. १३२–१३३).

**कुलप्लवन** (तीर्थ)—वाल्मीकि रामायण आणि महाभारत पुलस्त्ययात्रामते दितीचे तपस्यास्थान, एक तीर्थ (वा. रा. बा. ४६.९; म. आर. ८३.३३). नामांतर (वाल्मीकि रामायण)–'कुशप्लव.'

**कुलम्** (नगर)—पांड्य राजा परांतकच्या स. १०९० च्या कन्याकुमारी शिलालेखमते केरळमधील 'कोलनुपुर' (आधु. क्विलॉन) नगराचे नामांतर (त्रावणकोर आर्कि. सर्व्हे. ३.१९; कोलनुपुर पहा).

**कुलम्पुन** (तीर्थ)—कुरुक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ (म. आर. ८१.८८; पद्म. आदि. २६.९७).

**कुलम्पुना** (नदी)—एक प्रातःस्मरणीय नदी (म. अनु. १६५.९).

**कुलसन्तारण** (तीर्थ)—अर्बुद पर्वतान्तर्गत एक तीर्थ (स्कन्द. प्रभास. अ. ४८.१; ३७).

**कुलहा पहाड** (जैन तीर्थ)—बिहारमधील गयेपासून ३ मैलांवरील श्रीशीतलनाथांचे पर्वतीय तपस्यास्थान, एक जैन तीर्थ. नामांतर–'जैनी पहाड' (ती. पृ. १६५).

**कुलाचल** (पर्वतसमूह)—पौराणिक साहित्य आणि काव्यमीमांसामते 'सप्तकुलाचल' सामूहिक नावाने सुविख्यात असणारा भारतवर्षान्तर्गत (कुमारी द्वीप) एक सप्त पर्वतसमूह. हिमालयाचा अपवाद वगळता भारतवर्षातील अन्य साऱ्या प्रमुख पर्वतांचा यामध्ये समावेश होतो.

सप्त द्वीपान्तर्गत विभिन्न वर्षांतील (देश) मर्यादा पर्वतांना पौराणिक साहित्यात 'वर्षपर्वत' म्हटले असून, हीच कल्पना भारतवर्षान्तर्गत 'कुलाचल' मध्ये विस्तारित केली आहे. पौराणिक व्याख्येनुसार हिमवत् हा भारताचा वर्षपर्वत असून, अन्य सात प्रमुख पर्वत 'कुलाचल' (= विभिन्न लोकसमूहांशी संलग्न पर्वत) आहेत. त्यांच्या या महत्त्वामुळेच 'पवित्र पर्वत' हा लौकिकार्थ त्यांस प्राप्त झाला आहे (प्रास्ताविक–पृथ्वीरचनेतील पर्वतांचे महत्त्व, पृ. ४८ पहा).

**टॉलेमीच्या ग्रंथात**— सप्त कुलाचलांपैकी किमान चार पर्वत टॉलेमीस ज्ञात असले, तरी त्यांची भौगोलिक स्थाने

## पौराणिक सप्त कुलाचल

| पर्वतनाम (म. भी. ९.११; मार्क. ५७.१०) | आधुनिक स्थान | बार्हस्पत्य अर्थशास्त्र (थॉमस आवृत्ती. पृ. २०) | टॉलेमी (७.१.१९–२५) | लोकसमूह |
|---|---|---|---|---|
| १. महेंद्र | गोदावरी आणि महानदी दुआबात | — | मैंद्रोस् | कलिंग |
| २. मलय | पश्चिम घाटाचा दक्षिण भाग ( उत्तरेस नीलगिरि आणि दक्षिणेस कन्याकुमारी यांच्या दरम्यान ) | मलय | वेत्तिगो (तामीळ-पोदिगै) | पांड्य |
| ३. सह्य | पश्चिम घाटाचा उत्तर भाग ( उत्तरेस तापी आणि दक्षिणेस नीलगिरीच्या दरम्यान ) | सह्य | अदैसथ्रोन् | अपरांत |
| ४. शुक्तिमत् | पूर्व घाटाचा उत्तर भाग | — | — | भल्लाट् |
| ५. ऋक्ष | विंध्य पर्वताचा मध्य आणि पूर्व भाग; सातपुडा पर्वताचा काही भाग | — | ऑक्सेंतोन | माहिष्मती |
| ६. विंध्य | नर्मदा नदीच्या दक्षिणेकडील विंध्य पर्वताचा पूर्व भाग | विंध्य | औंदिओन | आटव्य |
| ७. पारिपात्र ( परियात्र ) | विंध्य पर्वताचा पश्चिम भाग; अरवली पर्वत | पारियात्र | — | निषाद |
| | | रैवतक | — | |
| | | कुमार | — | |
| | | श्रीपर्वत | — | |

त्यास माहित नसावीत. उदा. त्याचे मते महेंद्र पर्वत हा पूर्व भारतात गंगा नदीच्या पूर्वेस तोसली गावानजिक होता.

**अल्बेरुणीच्या ग्रंथात**— या ग्रंथमते महेंद्र-मलय पर्वत मेरु पर्वताच्या निरगाठी असून, त्यावरून त्याचे काळीहि सप्त कुलाचलांची कल्पना प्रचारात असावी.

**नामावली**— पौराणिक सप्त कुलाचलनामावली निम्न-लिखित परिपत्रकात दिली आहे ( परिपत्रक पहा ).

**कुलाञ्च** ( ग्राम व राज्यविभाग )—कलचुरि राजा कर्णच्या स. १०४८ च्या रेवा शिलालेखमते काचर नामक साधूने स्थापिलेले शांडिल्यगोत्रज सामवेदी कायस्थ ब्राह्मणांचे आद्य वसतिस्थान, एक ग्राम. उत्तर बंगालमधील बोग्रा जिल्ह्यातील आधु. कुलांच गाव हेच होय ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.२६८ ). विग्रहपाल ( तृतीय ) राजाच्या बनगाव ताम्रपटमते या राज्यविभागातील ब्राह्मण उत्तर बिहारमध्ये पूज्य मानले जात असत ( एपि. इंडि. २९.५२–५३ ).

**नामांतरे**—उत्तर प्रदेश, आसाम, बिहार, ओरिसा आणि मध्य भारतातील शिलालेखांत ( इ. स. १०–१२ वे शतक ) याची निम्नलिखित नामांतरे आढळतातः— १. कोलांच; २. क्रोडांची; ३. कोडांज.

**शिलालेख साहित्यात**—कलचुरि राजा सोढदेवाच्या स. १०७९ च्या कहला ताम्रपटात येथील ब्राह्मणांचा निर्देश असून ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.३८६ ), आसामदेशीय ताम्रपटमते हे गौड ( आधु. बंगाल ) मधील श्रावस्ती प्रांतात होते ( कामरूप शासनावली. पृ. १५५ ). राधा आणि वरेंद्र ब्राह्मणांच्या वंशावळीमते त्यांच्या या गावच्या पूर्वजांनी बंगालच्या आदिसुर राजाची यज्ञसिद्धी केली होती.

**कुलार्जक** ( पर्वत ) अल्बेरुणीच्या ग्रंथमते कश्मीरच्या दक्षिण सीमावर्ती राजावरी ( आधु. रजौरी ) राजधानीच्या नगरापासून ३ फर्सख अंतरावरील, तसेच राजगिरि आणि लोहर दुर्गाच्या उत्तर आणि पूर्वेकडील एक पर्वत ( अल्बेरुणी, १.२०७ ). स्टाइन यांच्या मते पीरपंतसाल पर्वतान्तर्गत चोटी गली खिंडीच्या वायव्येकडील आधु. तट-कूटी ( उंची १५५२४'; अक्षांश ३३°-४४' उत्तर; रेखांश ७४°-३२' पूर्व) हा अंडाकृती आणि बर्फाच्छादित अत्युच्च पर्वत तो हाच होय. कश्मीरच्या दक्षिण क्षितिजावरील

हा पर्वत तकेशर (आधु. चिनाब) गावाच्या पूर्ववर्ती सियालकोट, गुजराणवाला आणि लोहार गावांहून दृग्गोचर होतो (स्टाइन, राज. २.२९७-२९८).

**कुलिङ्ग** (लोकसमूह)—महाभारतमते उत्तर भारतातील 'कुलिंद' लोकसमूहाचे नामांतर (म. द्रो. ९७.१४; कुलिंद पहा).

**कुलिङ्गा** (नदी)—केकय देशगामी भरतास लागलेली अयोध्या-केकय मार्गावरील एक नदी (वा. रा. अयो. ७१.६).

२. (नगरी) केकय देशगामी भरतास लागलेली अयोध्या-केकय मार्गावरील एक नगरी (वा. रा. अयो. ६८.१६).

**कुलिन्द** (लोकसमूह)— पौराणिक साहित्यमते उत्तर भारतातील एक पर्वतीय लोकसमूह (वायु. ४५.११६; ब्रह्माण्ड. १६.४८). ॲलेन यांच्या मते पंजाबातील यमुना आणि सतलज दुआबातील सिवालिक (प्राचीन सपादलक्ष) टेकड्यांच्या पायथ्यानजिक, तसेच बियास-सतलजच्या दुआबात हे असावेत (ॲलेन, कॉइन्स. पृ. ११३). महाभारतान्तर्गत 'कुणिंदांचे सर्व देश' शब्दप्रयोगावरून (म. आर. १७४.१२) यांच्या या प्रदेशात अनेक वसाहती असाव्यात.

**वसाहती**—यमुना-सतलज दुआबातील आद्य वसाहतीच्या जोडीला यांच्या निम्नलिखित अन्य वसाहती असाव्यात:—

**(१) कुलू आणि सिमला टेकड्यांमध्ये**— कनिंगहॅमच्या मते सतलज किनाऱ्यावरील कुलू आणि सिमला टेकड्यांमधील आधु. कुनेत लोक हेच असावेत (आर्कि. सर्व्हे. १४.११६; १२५.३०). अर्जुनाच्या उत्तर दिग्विजयप्रसंगी त्यास इंद्रप्रस्थानंतर सर्वारंभी लागलेला कुलिंद देश (म. स. २३.१४) बहुधा हाच असावा.

**(२) अलमोरा टेकड्यांमध्ये**— चौधरी यांच्या मते उपरोक्त वसाहतीच्या पूर्वेस नेपाळ हिमालयाच्या दक्षिण उतारावरील अलमोरा टेकड्यांमध्ये यांची एक वसाहत महाभारतकाली होती.

**(३) कुमाऊँ प्रदेशात**— अग्रवाल यांच्या मते सतलज नदीच्या दक्षिणवर्ती तोन्स नदीपर्यंतच्या आधु. कुमाऊँ प्रदेशात यांची एक वसाहत पाणिनीय गणपाठकाली होती (अग्रवाल, पाणिनि. पृ. ६९).

**(४) हिमालय प्रदेशातील शैलोदा नदीकाठी**— महाभारतमते मेरु-मंदार पर्वतांच्या दरम्यानच्या वेळुवनात खश, पशुप, तंगण, परतंगण आदि लोकांसमवेत हे (कुणिंद, कुलिंद) निवास करीत असत (म. स. ४८.२-६).

**(५) बदरी आणि यमुनाद्रि यांच्या दरम्यान**— महाभारतमते या भागातहि हे रहात असत (म. आर. १७४.११-१५).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या लोकसमूहाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पाणिनीचा गणपाठ (पा. सू. ४.२.११३; ३.९३) | कुलून |
| २. महाभारत | |
| १. (द्रो. ९७. १४) | कुलिंग |
| २. (आर. १७४.१२) | कुणिंद |
| ३. पौराणिक साहित्य | |
| अ. (मत्स्य. ११३.४०) | पुलिंद |
| आ. (मार्क. ५७.३५; ब्रह्म. २७.४४) | कलिंग |
| ४. टॉलेमी (मॅक्रिंडल, पृ. ११०) | किलिंद्रिनै |
| ५. इ. स. पू. १ ल्या शतकातील नाणी | कुणिंद |

**नामव्युत्पत्ती**—'कालिंदी (यमुना) नदीकाठचे लोक' अशा अर्थाने यांस हे नाव मिळाले असावे.

**पाणिनीच्या गणपाठात**—या ग्रंथात दोन ठिकाणी या (कुलून) देशाचा निर्देश असून (पा. सू. ४.२.११३; ३. ९३), त्यावरून तत्काली या लोकांच्या दोन वसाहती असाव्यात.

**महाभारतात**—या ग्रंथमते हिमालय पर्वतीय लोकांसमवेत रहाणाऱ्या या किरात लोकांचा राजा पर्वतामध्येच (पर्वतवासनित्यः) रहात असे (म. आर. १७४.११). चौधरी यांच्या मते या लोकांच्या यमुना नदीच्या उगमानजिकच्या वसाहतीचा निर्देश येथे अभिप्रेत असावा.

युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयी हिमालयीन शैलोदा नदीकाठच्या या (कुणिंद) लोकांनी खश, पशुप, तंगण, परतंगण आदींसमवेत युधिष्ठिराला पिपीलिक सुवर्ण, काळ्या-पांढऱ्या चवऱ्या आणि मध अर्पिले होते (म. स. ४८. २-७). यावरून सोन्याच्या खाणींतील लोकांशी यांचे दळणवळण असावे.

**पौराणिक साहित्यात**—या साहित्यात उत्तर भारतातील

एक देश आणि लोकसमूह म्हणून यांचा निर्देश आढळतो ( ब्रह्माण्ड. १६.४८; वायु. ४५.११६ ).

**टॉलेमीच्या ग्रंथात**—या ग्रंथमते हे ( किलिंद्रिनै ) लोक विपाशा, शतद्रु, यमुना, आणि गंगा नद्यांच्या उगमानजिकच्या हिमालयीन प्रदेशात रहात असत. मॅक्रिंडल यांच्या मते विपाशा नदीच्या वरच्या खोऱ्यातील कुलूत लोकांचा समावेशहि टॉलेमीच्या 'किलिंद्रिनै'मध्ये असावा. परंतु तत्संबंधी निर्णायक पुरावा सापडत नाही ( कुलूत पहा ). कनिंगहॅम यांच्या मते टॉलेमीकालीन हे लोक जालंधर ( आधु. कांगडा ) प्रदेशात रहात असत ( जालंधर पहा ).

**नाणी**—या लोकांची 'कुणिंदस' अक्षरपंक्तियुक्त काही नाणी ( इ. स. पू. १ ले शतक ) सापडली असून, याच्या प्रजासत्ताक गणराज्याचा हा प्राचीनतम निर्देश असावा. यौधेयांसमवेत कुशाण साम्राज्यास शरण गेलेले हे लोक त्या साम्राज्याच्या विनाशानंतर पुन्हा एकवार स्वतंत्र झाले. गुप्त साम्राज्याच्या उदयापूर्वी ( इ. स. ५ वे शतक ) हे यौधेय राज्यात विलीन झाले.

२. ( देश ) ब्रह्माण्डमते मेरु पर्वतोद्भवा सप्तगंगांपैकी पश्चिमवाहिनी सीता नदीच्या मार्गावरील मध्य आशियान्तर्गत एक देश ( ब्रह्माण्ड. १८.४५ ). पाठभेद–'कुलिंदोपत्यक' ( म. भी. १०.५४ ).

३. भारतवर्षान्तर्गत दक्षिणापथ प्रदेशातील एक देश ( म. भी. १०. ६१; पद्म. उत्तर. ५०.५८; ब्रह्माण्ड. १६.६९).

**कुलिवाटक** ( ग्राम )—पूर्व चालुक्य राजा पृथ्वीजयसिंहवल्लभच्या स. ६५९ च्या गुडिवाड ताम्रपटमते आंध्र प्रदेशातील एक ग्राम. कृष्णा जिल्ह्यातील आधु. गुडिवाडनजिक हे असावे. नामांतर–'कुडिवाट'; 'कुडिवाड' ( एपि. इंडि. ३१.१२९; १३१ ).

**कुलिश** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.१३ ).

**कुलिशी** ( नदी )—ऋग्वेदमते एक नदी ( ऋ. १. १०४.४ ).

**कुलीय** ( देश )—मत्स्यमते अपरांत ( नैर्ऋत्य भारत ) देशान्तर्गत एक जनपद ( मत्स्य. ११४.४९ ). अली यांच्या मते तापी आणि नर्मदा नद्यांच्या मुखानजिकचा आधु. किम् नदीच्या खोऱ्याचा पश्चिम समुद्रवर्ती प्रदेश हाच होय ( अली, पुराणाज्. पृ. १४८ ). पार्गिटर यांच्या मते हे 'पुलिंद' लोकांचे नामांतर असावे ( पार्गि., मार्कं. ३३८ ). नामांतर ( वायु, ब्रह्माण्ड पुराण )–'पुलेय'; ( वामन )–'पुलीय'.

**कुलीर** ( पर्वत )—मार्कंडेयमते जंबूद्वीपान्तर्गत मेरु आणि मंदार पर्वतांच्या पूर्ववर्ती एक पर्वत ( मार्कं. ५२. ४ ).

**कुलुट** ( देश )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते उत्तर भारतातील 'कुलूत' देशाचे नामांतर ( कुलूत पहा ).

**कुलुम्बर** ( ग्राम )—पांड्य राजा अरिकेशरि परांतकने ( स. ७०० ) यशस्वीपणे युद्ध केलेले दक्षिण भारतातील एक ग्राम ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३७७ ).

**कुलूत** ( देश )—पौराणिक साहित्यमते उत्तर भारतातील एक देश ( काव्यमी. १७.२२७; वामन. १३.४३ ). बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या ईशान्य ( बृ. सं. १०.१२; १४.२९; १७.१८ ), अथवा वायव्य भागातील ( बृ. सं. १४.२२ ) या देशाचे लोक 'कुलूतक' ( बृ. सं. ४.२२ ) नावाने प्रसिद्ध होते. ह्युएन्त्संगच्या मते प्राचीन कुलिंद देशाच्या उपविभागभूत हा देश जालंधरच्या ईशान्येस होता.

पंजाबातील हिमालय–पायथ्यानजिकच्या कांगडा जिल्ह्यातील सिमल्याच्या वायव्यवर्ती बियास ( प्राचीन विपाशा ) नदीखोऱ्यातील आधु. कुलू खोरे ( = कुलू आणि सिराज तहसिली, तसेच लाहूल आणि स्पिती हिमालयीन प्रदेश; समुद्रसपाटीपासून उंची– ४७००′ ) हाच होय. पठाणकोटपासून १७५ मैलांवरील, तसेच भूमंतरपासून सहा मैलांवरील बियास नदीकाठच्या 'कुलू' गावी याची राजधानी असून विजयादशमीला येथे यात्रा भरते ( ती. पृ. ७२ ).

**नामांतरे** :—प्राचीन साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा )

**नामव्युत्पत्ती**—वॉटर्स यांच्या मते 'एकत्रित करणारे' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले असावे ( संस्कृत– 'कुल'= चिनी –'चि–चि=' गोळा करणे ). चौधरी यांच्या मते याचे आधु. 'कुलू' तसेच स्थानिक 'कोहिल' ( कोलि ) ही नामांतरे बृहत्संहितेतील 'कोहल' ची अपभ्रष्ट रूपे असावीत.

**पाणिनीच्या गणपाठात**—या ग्रंथमते 'कुलून' देशाची राजधानी ( पा. सू. ४.२.१३३;३.९३ ) नगर गावी होती ( पा. सू. ४.२.९ ).

**महाभारतात**—या ग्रंथमते हे एक जनपद असून ( म. भी. १०.५२ ), युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या

## कुलूत देशाची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पाणिनीचा गणपाठ (पा. सू. ४.२.१३३; ३.९३) | कुलून |
| २. वाल्मीकि रामायण (कि. ४३.८) | कोलुक, कोलुट |
| ३. महाभारत (स. २४.१०) | कौलूट, उलूत; उलूक |
| ४. बृहत्संहिता (१०.११) | कौलूत, कुलूतक कोहल |
| ५. चिनी सर्वत विनय ग्रंथ | चि–चि |
| ६. ह्युएन्त्संग | कु-लु-टो (कुलुट) |
| ७. स्थानिक नामांतरे | कोहिल; कोलि |

उत्तर दिग्विजयात अर्जुनाने हे जिंकले होते (म. स. २४.४). याच ग्रंथात अन्यत्र निर्देशिलेला 'उत्तर कुलूत' (म. स. २४.१०) संभवतः याचाच उपविभाग असावा.

**चिनी बौद्ध साहित्यात**—चिनी 'सर्वत विनय' ग्रंथमते तमसावत् (आधु. सुलतानपुर) देशाहून या (चि–चि) देशास आलेल्या गौतम बुद्धाने येथील एका यक्षास बौद्ध धर्माची दीक्षा देऊन त्याचे हस्ते येथे एक बौद्ध मठ आणि बुद्धशरीरावशेष स्तूप बांधविला (स. वि. अ. ९).

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते जालंधर देशापासून १४० मैल ईशान्येकडील या (कु–ल–टो) पर्वतवेष्टित देशाचे आणि त्याच्या राजधानीचे (नगरकोट) क्षेत्रफळ अनुक्रमे ६०० मैल आणि ३ मैल असून, येथील सुपीक भूमीमध्ये मुबलक धान्य आणि फळेफुले पिकत असत. यावरून कुलू खोऱ्याच्या पूर्ववर्ती यमुना नदीपर्यंतचा प्रदेश, तसेच दक्षिणेकडील सुकेत् आणि मंडी प्रदेश त्याचे काळी या देशात समाविष्ट असावा.

ह्युएन्त्संगच्या मते हिमालयाच्या पायथ्यानजिकच्या या देशात विपुल औषधी वनस्पती, तसेच सोने, चांदी, तांबे आणि अभ्रकाच्या खाणी होत्या. येथील हवा थंड, बर्फाळ आणि धुकेमिश्रित होती. कुलू खोऱ्यातील आधु. वझिरीरुपि प्रदेशात चांदी, तांबे, आणि शिशाच्या, तसेच वितस्ता (आधु. झेलम) खोऱ्याच्या उत्तर भागात श्वेतवर्णीय हिऱ्याच्या खाणी असल्याने (इंपि. गॅझे. ७. ३३७–३३८) ह्युएनत्संगची ही माहिती यथायोग्य वाटते.

**बौद्ध मठ**—ह्युएन्त्संगच्या मते या देशात २० बौद्ध मठ, १००० महायान बौद्ध भिक्षू, आणि विभिन्न पंथांची १५ हिंदु देवमंदिरे होती. येथील पर्वतीय गुफांमध्ये अनेक बौद्ध अर्हत आणि हिंदु ऋषी असून, बुद्धभेटीच्या स्मृत्यर्थ उभारलेला एक अशोकस्तूपहि येथे होता (वॉटर्स, १. २९८–२९९; बील, २.२१०–२११).

**शिलालेख साहित्यात**—चंबा दानपत्रात याचा निर्देश आढळतो (इंडि. ॲंटि. १७.८).

**राजधानी**—या देशाची प्राचीन राजधानी नगर (नगरकोट) गावी, आणि मध्ययुगीन राजधानी सर्बरी-बियास संगमावरील सुलतानपुर (स्थानपुर, रघुनाथपुर) या बियास नदीच्या उपनद्यांच्या काठच्या गावी असून, त्यापैकी सुलतानपुर येथील रघुनाथ मंदिर प्रसिद्ध आहे (जे. ए. एस्. बी., स. १८४१, पृ. ३).

**त्रैलोक्यनाथ तीर्थ**—या देशातील चंद्रा–भागा संगमापासून ३२ मैल दक्षिणेकडील चिनाब नदीकाठच्या तूंड गावी त्रैलोक्यनाथ तीर्थ असून, षड्भुजायुक्त अवलोकितेश्वर-मूर्तीची तेथे शिवप्रतिमा म्हणून पूजा करतात (जे. ए. एस्. बी., स. १९०२, पृ. ३५).

**नाणी**—कुणिंद देशीय नाण्यांच्या अक्षरवाटिकेतील '**राज्ञ कुलूतस्य वीरेशस्य**' अक्षरांची काही नाणी (इ. स. १–२ रे शतक) येथे सापडली असून (ॲलेन, कॉइन्स. पृ. १००; आय्. एच्. क्यू. २७.२०६), त्यावरून हे देश निकटवर्ती असावेत.

२. (देश) शिलालेख साहित्यमते दक्षिण भारतातील वेंगी आणि उत्कल देशानजिकचा एक देश (एपि. इंडि. १८.५३; २५.२४४).

**कुलेनूर** (शिलालेखस्थान)—पश्चिम चालुक्य राजा सत्याश्रय (द्वितीय) स्नुषा कुंदलेच्या स. १०२८ च्या शिलालेखाचे वायव्य म्हैसूरातील शिमोगा जिल्ह्यातील शिकारपुर तालुक्यातील उपलब्धिस्थान (एपि. इंडि. १५. ३२९).

**कुलेश्वर** (लिंग)—मथुरा येथील एक शिवलिंग (वराह. १७७.५५).

**कुलोत्तारणक** (तीर्थ)—कुरुक्षेत्रातील एक तीर्थ (नारद. उत्तर. ६५.९७; वामन. ३६.७६; ३७.४). कैथल (प्राचीन कपिस्थल) पासून ३ मैल उत्तरेकडील कुलोत्तारण ग्रामानजिकचे आधु. कुलोत्तारण तीर्थ हेच होय (ती. पृ. ८५).

**कुल्बर्ग** (नगर)—बहामनी राजवंशस्थापक अल्ला-

उद्दीन बहामनीने स. १३४७ मध्ये स्थापिलेले दक्षिण भारतातील एक राजधानीचे नगर. मुहंमद तुघ्लककालीन देवगिरि ( आधु. दौलताबाद ) गावची राजधानी त्याने येथे आणली. आंध्र प्रदेशातील आधु. गुलबर्गा गाव हेच होय ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. १९१ ). स. १५१८ मध्ये बहामनी राज्याचे बीदर, विजापूर, हैद्राबाद, वऱ्हाड आणि गोवळकोंडा संज्ञक पाच तुकडे होईपर्यंत याचे महत्त्व अबाधित होते ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. २२१ ).

**कुल्य** ( देश )—पौराणिक साहित्यमते भारतवर्षान्तर्गत मध्यदेशातील ( आधु. गंगा–यमुना खोरे ) एक देश व लोकसमूह ( वायु. ४५.११०; ब्रह्माण्ड. ४९.४४; मत्स्य. ११४.३५; मार्कं. २४.३२ ). चौधरी यांचे मते गंगा खोऱ्याच्या वरच्या भागातील, यमुना नदीच्या पश्चिमवर्ती बुलंदशहर ( प्राचीन वारण ) आणि इटावा गावांच्या दरम्यानचे आधु. कोल लोक हेच होत. मुसलमानी राज्यकाली अलिगढच्या ईशान्य आणि दक्षिणवर्ती गंगा खोऱ्याचा प्रदेश यामध्ये समाविष्ट होत असे.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात--

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. वामन पुराण ( १३.३६ ) | कुशूद्र |
| २. मुसलमानी ताजुल्-मासिर ( इलियट, २.२२२ ) | कोल |
| ३. ऐन्-इ-अकबरी (२.१८६) | कोइल |

**मतांतरे**—महाभारतादि ग्रंथातील ‘ कुलूट ’ लोक हेच असल्याचे डॉ. लॉ यांचे अनुमान ( लॉ, ट्राइब्ज. पृ. ३९७ ) भौगोलिक दृष्ट्या असंभव वाटते ( आय्. एच्. क्यू. २१.३०१; कुलूट पहा ).

**मुसलमानी साहित्यात**—ताजुल्-मासिर ( इ. स. १२ वे शतक ) मते स. ११९४ मध्ये दिल्लीसुल्तान कुतुबुद्दीनने जून् ( यमुना ) नदी ओलांडून हा ( कोल ) दुर्ग जिंकला ( इलियट, २.२२२; २२४ ). ‘ तारीख-इ–मुबारकशाहा ’ ग्रंथमते खिज्रखानाने स. १४१९ मध्ये येथील बंडखोरांचा बंदोबस्त करून, तदनंतर रहब् आणि संबळ हा जंगली प्रदेश जिंकला ( इलियट, ४.५० ). तदनंतर बरत् गावाहून या ( कोल ) देशात पुन्हा येऊन तो इटावा गावी गेला ( इलियट, ४.५२ ).

**ऐन्-इ-अकबरीमध्ये**—या ग्रंथमते आग्रा सुभ्याच्या १३ उपविभागांपैकी ( सरकार ) एक अशा या ( कोल, कोइल ) राज्यविभागात निम्नलिखित ‘ महाल ’ ( उपविभाग ) समाविष्ट होत असत :—१. अत्रौलि; २. सिकंदर; ३. सोरोन; ४. शिकारपुर ( ऐ. अ. २.१८६ ). अलिगढच्या ईशान्य आणि दक्षिणवर्ती गंगा खोऱ्यातील या उपविभागांच्या निर्देशावरून मोंगल काली आधु. अलिगढ आणि बरेली जिल्ह्यांच्या दरम्यानचा प्रदेश यामध्ये समाविष्ट असावा ( चौधरी, पृ. ५८–५९ ).

२. पौराणिक साहित्यमते दक्षिणापथ ( दक्षिण भारत ) मधील एक देश ( ब्रह्माण्ड. १६.५६; मत्स्य. ११४.४६; वामन. १३.४७; वायु. ४५.१२४ ).

**कुल्या** ( नदी )—महाभारत अंगिरस्यात्रामते एक पवित्र नदी ( म. अनु. २५.५६; तीर्थविवेचन. पृ. २४७ ). यास्काचार्यांच्या मते ‘ कुल्या ’चा ( ऋ. ३.४५.३; ५. ८३.८ ) शब्दशः अर्थ ‘ नदी ’ असाच होतो ( नि. २. २४ ).

**कुवलप्रस्थ** ( नगर )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक नगर ( पा. सू. ६.२.८७ ). ‘ प्रस्थ ’ अंत्यशब्दयुक्त नगरनामाचे उदाहरण म्हणून याचा निर्देश तेथे असून, अन्य प्रस्थान्त नगरांप्रमाणेच हेहि कुरु देशातच असावे ( अग्रवाल, पाणिनि. पृ. ८१ ).

**कुवलाल** ( देशविभाग )—गंग राजा एरेयप्प ( चतुर्थ ) च्या मल्वलि ताम्रपटमते त्याच्या आधिपत्या खालील दक्षिण म्हैसूर प्रांतातील नदगिरीनजिकचा एक देशविभाग ( एपि. कर्ना. ३.३० ). आधु. कोलार गावाच्या परिसरातील प्रदेश हाच असावा.

**राजधानी**—चोल राजा कुलोत्तुंग ( तृतीय ) च्या स. १८८० च्या चित्तूर शिलालेखमते या देशाची राजधानी कुवलालपुर ( आधु. कोलार ) गावी असून ( रंगाचारी, २. तंजोर. १५७ ), गंग राजा शियगंग-अमराभरेण हा या नगराचा राजा होता ( एपि. इंडि. ११.१२३ ).

**कुवीरा** ( नदी )—पद्ममते भारतवर्षातील ‘ कुचरा ’ नदीचे नामांतर ( पद्म. आदि. ६.२२; कुचरा पहा ).

**कुश** ( लोकसमूह )—खरोष्ट्री शिलालेखमते मध्य आशियातील एक लोकसमूह. हे संभवतः पौराणिक ‘ कुश द्वीपा ’त रहात असावेत ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.१.४६; कुश द्वीप पहा ).

**कुश-आश्रम** ( आश्रम )—उत्तर प्रदेशातील कुश ऋषींचे आश्रम आणि सूर्योपासनास्थान ( ती. पृ. २३५ ).

**कुशक** ( देश )— पद्ममते एक जनपद ( पद्म. आदि. ६.४७ ).

२. ( लिंग ) प्रभासक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंग ( स्कन्द. प्रभास. प्र. १७३ ). नामांतर- ‘ कुशकेश्वर ’.

**कुशचीरा** ( नदी )— पद्ममते भारतवर्षान्तर्गत ‘ कुशधारा ’ नदीचे नामांतर ( पद्म. आदि. ६.२१; कुशधारा पहा ).

**कुशट्ट** ( देश )—पद्ममते एक जनपद ( पद्म. आदि. ६.३५ ).

**कुशण** ( लोकसमूह )—खरोष्ट्री शिलालेखमते वायव्य भारतातील ‘ कुशाण ’ लोकसमूहाचे नामांतर ( कुशाण पहा ).

**कुशतर्पण** ( तीर्थ )—गौतमी ( गोदावरी ) नदी-काठचे एक तीर्थ ( ब्रह्म. १६१.१ ). नामांतर–‘ प्रणीता-संगम ’.

**कुशतीर्थ** ( तीर्थ )—नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( कूर्म. उत्तर. ४१.३३ ).

२. द्वारका येथील एक तीर्थ ( स्कन्द. प्रभास. द्वा. १६.२२; २६; २८ ).

**कुशद्वीप** ( द्वीप )—पौराणिक साहित्यमते पृथ्वीच्या सप्त महाद्वीपांपैकी एक. महाभारतात आणि काही पुराणात हे तृतीय क्रमांकाचे ( म. भी. ९.१६; ११.२; १२.६; १३.६; ब्रह्मवै. १.७.७; मत्स्य. १२२; विष्णुधर्म. १.६ ), आणि उर्वरित साऱ्या पुराणांत चतुर्थ क्रमांकाचे महाद्वीप मानले आहे ( वायु. ४९.४७; लिङ्ग. ४६.२; वामन ११.३६; विष्णु. २.४.३५ ). अली यांच्या मते पश्चिम आशियातील मेरु पर्वताचे ( आधु. पामीर पठार ) नैर्ऋत्यवर्ती आधु. इराक–इराण वालुकामय देश हेच होत. नामांतर ( पद्म. आदि. ९६.९ )–‘ **शरद्वीप** ’; ( वैजयन्ती. ३६.१७ )– ‘ **चंपकद्वीप** ’.

**नामव्युत्पत्ती**—मत्स्यमते ‘ कुश तृणयुक्त ’ अशा अर्थाने यास हे नाव मिळाले ( मत्स्य. १२२ ).

**महाभारतात**—या ग्रंथमते हे गौरवर्णीय लोकांचे निवासस्थान होते ( म. भी. १२.१६ ).

**पौराणिक साहित्यात**—मत्स्यमते या फळेफुले आणि एकदल धान्ययुक्त द्वीपातील सात प्रमुख नद्या इंद्रदेवकृत आकाशीय जलवृष्ट्याधारित ( = पावसाळी ) होत्या. येथील बहुतांशी पर्वत उघडेबोडके आणि हिमरहित असून, त्यापैकी एक ‘ महिष अग्नि ’युक्त ( ज्वालामुखी ) होता. ककुद्मत् ( मंदर ), कंक ( कुशेशय ) आदि पर्वतहि येथे होते ( मत्स्य. ४५.७७ ).

भागवतमते येथे कुश तृणाचा एक सूर्यसदृश प्रकाशमान स्तंभ असून, येथील बहुतांशी लोक अग्निपूजक होते. वायुमते याच्या अंतर्भागात दुग्धसागर, आणि बहिर्भागात दधि ( घृत ) समुद्र होता. पद्ममते देवगंधर्वांच्या या भूमीमध्ये दस्यू, म्लेंच्छ, आणि द्विजांचा अभाव होता ( पद्म. आदि. ९.९–१६ ). विष्णुमते येथे ‘ दमिन् ’ ब्राह्मण रहात असत ( विष्णु. २.४.३९ ).

**खरोष्ट्री शिलालेखात**—स्टेन कोनौ यांच्या मते कनिष्क मुद्रांवरील ‘ **कनेष्कि कोशानो** ( कुशानु = कुशकुलोत्पन्न ) ’ अक्षरपंक्तींवरून तो कुशद्वीपाचा रहिवासी असावा ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.१.४६ ). कुमारलाटकृत ‘कल्पनामंडितिका’ संस्कृत बौद्ध ग्रंथमतेहि कनिष्क हा ‘ किउ-श ’ ( कुश ) वंशीयच होता ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.१.४९ ).

**इराणी शिलालेखात**—इ. स. पूर्वकालीन इराणी शिला-लेखात या देशाचा, तसेच ‘ कुशिक ’ लोकांचा अनेकदा निर्देश असून, डेरियसच्या ( इ. स. पू. ५२२–४८६ ) हमदान शिलालेखमते त्याचे राज्य ‘ सोग्दियाना ’ ( अमू-दरिया आणि सिरदरिया दुआबातील आधु. बोखारा प्रदेश ) पासून ‘कुश’ ( आधु. इथिओपिया ) पर्यंत होते ( सिलेक्ट. इन्स्क्रि. पृ. ८–९ ). प्राचीन इराणी साम्राज्यात मुद्राय ( आधु. ईजिप्त ) आणि ‘ कुश ’ देश समाविष्ट होते ( सरकार, भूगोल. पृ. १६४ ).

**उपविभाग, पर्वत आणि नद्या**— महाभारत आणि पौराणिक साहित्यातील कुश द्वीपान्तर्गत उपविभाग, नद्या आणि पर्वतांची नामावली सोबतच्या परिपत्रकांत दिली आहे ( म. भी. १३.९–१६; वायु. ४९.४९–५६; ब्रह्माण्ड. १९.५२–६३; विष्णु. २.४.३६–४४; कूर्म. पूर्व. ४९.२०–२४; शिव. उमा. १८.३९–४५; मत्स्य. १२२. ४८–७७; मार्क. ५०.२५–२६; वराह. ८८; लिङ्ग. ५३. ५–८; भा. ५.२०.१३–१६ ). त्यापैकी बहुतांशी पाठभेद वायु–ब्रह्माण्ड परंपरेतील असून भागवतातील नामावली सर्वस्वी स्वतंत्र आहे.

**मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात**—या साहित्यात या द्वीपाचा अनेक वेळा निर्देश आढळतो ( लिङ्गानुशासन. २५.१५; शारदीय. ९०९; त्रिकाण्ड. ३०.४; मेदिनी. १७७.४; शब्दरत्न. ३२५.७; वैजयन्ती. ३६.१४ ).

**मतांतरे**—याच्या भौगोलिक स्थानाविषयी अभ्यासकात निम्नलिखित मतांतरे आढळतात :—

( १ ) **आधु. इराक–इराण**—अली यांच्या मते पौराणिक

## कुशद्वीपाचे उपविभाग ( वर्षे )

| वायु, ब्रह्माण्ड, लिंग पुराण | विष्णु, मार्कंडेय पुराण | महाभारत | मत्स्य पुराण | भागवत |
|---|---|---|---|---|
| १. उद्भिद | उद्भिद | औद्भिद | श्वेत ( उन्नत ) | वसु, |
| २. वेणुमंडल | वेणुमत् ( मार्क-वैणव ) | वेणुमंडल | लोहित ( वेणुमंडल ) | वसुदान |
| ३. रथाकार ( लिंग-द्वैरथ ) | वैरथ ( मार्क-सुरथ ) | रथकार ( ऐरावत ) | जीमूत (स्वरथाकार) | दढरुचि |
| ४. लवण | लंबन | पालन | हरिक ( लवण ) | नाभिगुप्त |
| ५. धृतिमत् | धृति ( मार्क- धृतिमत् | धृति | ककुद् ( धृतिमत् ) | स्तुत्यव्रत |
| ६. प्रभाकर | प्रभाकर | प्रभाकर | महिष ( प्रभाकर ) | विविक्त |
| ७. कपिल | कपिल | कपिल | कपिल | वामदेव |

## कुशद्वीपातील पर्वत

| वायु, ब्रह्माण्ड, विष्णु कूर्म, शिव पुराण | मत्स्य पुराण | महाभारत | वराह पुराण | लिंग पुराण |
|---|---|---|---|---|
| १. विद्रुम ( शिव–मणिद्रुम ) | कुमुद ( विद्रुमोच्चय ) | कुमुद | कुमुद (विद्रुम ) | विद्रुम |
| २. हेम ( कूर्म–होम ) | उन्नत ( हेम ) | हेम | उन्नत(हेम, द्रोण) | हेम |
| ३. द्युतिमत् | द्युतिमत् ( बलाहक ) | सुधामन् ( द्युतिमत् ) | — | कपिल ( द्युतिमत् ; दुर्धर्ष ) |
| ४. पुष्पवत् | द्रोण | पुष्पवत् | पुष्पवत् ( कंक ) | पुष्पित(द्वैरथ ) |
| ५. कुशेशय | कंक ( कुशेशय) | कुशेशय | कुशेशय (अग्नि) | कुशेशय |
| ६. हरिगिरि | महिष | हरिगिरि | महिष ( हरि ) | हरिगिरि |
| ७. मंदर | ककुद्मत् ( मंदर ) | — | ककुद्म ( मंदर ) | मंदर |

भागवतात कुश द्वीपातील निम्नलिखित पर्वतांची स्वतंत्र नामावली आढळते :— १. चक्र; २. चतुःशृंग; ३. कपिल; ४. चित्रकूट; ५. देवानीक; ६. ऊर्ध्वरोमन्; ७. द्रविण ( भा. ५. २०.१३–१६ ).

## कुशद्वीपातील नद्या

| वायु, ब्रह्माण्ड पुराण | मत्स्य पुराण | शिव, विष्णु पुराण | कूर्म पुराण | भागवत |
|---|---|---|---|---|
| १. धूतपापा | धूतपापा ( योनि ) | धूतपापा | धूतपापा | रसकुल्या |
| २. शिवा | सीता ( निशा ) | शिवा | शिवा | मधुकुल्या |
| ३. पवित्रा ( ब्रह्माण्ड–गौरी ) | पवित्रा ( वितृष्णा ) | पवित्रा | पवित्रा | मित्रविंदा |
| ४. संतति | ह्लादिनी ( चंद्रभा ) | संमिति ( विष्णु–संमती ) | संमिता | श्रुतविंदा |
| ५. द्युतिगर्भा ( ब्रह्माण्ड-विद्युत् ) | विद्युत् ( शुक्ला ) | विद्या ( विष्णु–विद्युत् ) | विद्युत् | देवगर्भा |
| ६. अंभा ( ब्रह्माण्ड ) | पुंड्रा ( विभावरी ) | दंभा ( विष्णु–अंभा ) | प्रभा | घृतच्युता |
| ७. मही ( ब्रह्माण्ड–संध्या ) | महती ( धृति ) | मही | रामा | मंत्रमाला |

वर्णनाधारे हा पावसाळी गवताचा प्रदेश असून, अशा प्रकारचे तृणमय पट्टे मध्य आशियान्तर्गत विषुववृत्तानजिकच्या इराक–इराणमध्ये, तसेच रशियातील टंड्रा (स्टेपीज्) प्रदेशात आढळतात. यापैकी विषुववृत्तानजिकचे आणि अग्निपूजक लोकांचे पौराणिक कुशद्वीप इराक-इराणमध्ये असावे. हे देशद्वय, तसेच त्यानजिकचे नैर्ऋत्य आशियाचे वाळवंट म्हणजे हे द्वीप असावे (अली, पुराणाज्. पृ. ४०–४१).

(२) **इथिओपिया**—सरकार यांच्यामते डेरियस् आदि इराणी सम्राटांच्या शिलालेखातील 'कुश देश' म्हणजे आधु. इथिओपिया असून, आधु. मध्य ईजिप्तचा निर्देश तेथे अभिप्रेत असल्याचा अन्य अभ्यासकांचा तर्क या शिलालेखातील 'मुद्राय' (ईजिप्त) देशाच्या स्वतंत्र निर्देशामुळे असंभव वाटतो (सरकार, भूगोल. पृ. १६४).

(३) **मध्य आशिया**—होल्स्टाइन यांच्या मते मध्य आशियातील कुशाण लोकांचे आद्य वसतिस्थान म्हणजे हा देश असून (जे. आर. ए. एस्., स. १९१४, पृ. ७९–८८), विष्णु पुराणातील कुशद्वीपस्थ दमिन ब्राह्मण म्हणजे टॉलेमीच्या ग्रंथातील सेरिके देशस्थ 'दमनै' लोक असावेत (जे. ए. एस्. बी., स. १९०२; पृ. ५१).

(४) **युरोप खंड**—मनकड यांच्या मते आधु. युरोप खंड म्हणजे हा देश असून, तत्रस्थ सूर्यसदृश प्रकाशमान तृणस्तंभ म्हणजे भूमध्य समुद्रान्तर्गत प्रकाशमान ज्वालामुखी, अथवा टंड्रा प्रदेशातील 'ऑरोरा बोरॅलिस' नामक निसर्गचमत्कार असावा. येथील गौरवर्णीय लोक म्हणजे आधु. युरोपियन लोक असावेत. मनकड यांच्या मते या द्वीपातील पौराणिक स्थलांची (वराह. ८७) आधुनिक स्थाने पुढीलप्रमाणे होत :—

| पौराणिक स्थान | युरोपातील आधु. स्थान |
|---|---|
| १. कुशेशय पर्वत | कॉकेशस पर्वत |
| २. द्रविण (द्रोण) पर्वत | ऱ्होन पर्वत |
| ३. विद्युल्लता नदी | व्होल्गा नदी |
| ४. शिवा नदी | सव्र नदी |
| ५. ह्रादिनी नदी | ऱ्हाईन नदी |
| ६. अभ्रा नदी | एब्रो नदी |

(मनकड, ए. बी. ओ. आर. आय्., पृ. २३४).

२. (अनुद्वीप) वायुमते जंबूद्वीपाच्या दक्षिणवर्ती हिंदी महासागरान्तर्गत भारताच्या सहा अनुद्वीपांपैकी (उपद्वीप) एक (वायु. ४८.४१). अली यांच्या मते पश्चिम आशियाच्या दक्षिणवर्ती अरबी समुद्रातील आधु. अरबी द्वीपकल्प हेच असावे (अली, पुराणाज्. पृ. १८२–१८३). नामांतर—'कुमुद द्वीप' (वायु. ३८.३४).

**नामव्युत्पत्ती**—वायुमते 'शिवभगिनी कुमुदेचे निवासस्थान' अशा अर्थाने यास 'कुमुद द्वीप' वैकल्पिक नाव मिळाले (वायु. ४८.३५).

**पौराणिक साहित्यात**—मत्स्यमते या देवीस्थानातील देवीचे नाव कुशोदका असून (मत्स्य. १३.५०; पद्म. आदि. १७.२१४), पद्ममते या विष्णुस्थानातील विष्णूचे नाव कुशोदक होते (पद्म. उत्तर. १२९.३०).

**कुशधारा** (नदी)—भारतवर्षान्तर्गत एक नदी (म. भी. १०.२३). नामांतर—'कुशचीरा' (पद्म. आदि. ६.२१).

**कुशनगर** (बौद्ध तीर्थ)—प्राकृत साहित्यमते पूर्व भारतातील 'कुशीनारा' बौद्ध तीर्थाचे नामांतर (वॅटर्स, २.२५; कुशीनारा पहा).

**कुशपुर** (नगर)— बील यांच्या मते उत्तर प्रदेशातील 'काशपुर' (आधु. सुलतानपुर) नगराचे नामांतर (काशपुर पहा).

**कुशप्रावरण** (देश)—वायुमते हिमालय पर्वतान्तर्गत 'कर्णप्रावरण' देशाचे नामांतर (वायु. ४५.१३६; कर्णप्रावरण पहा).

**कुशबिन्दु** (देश)—भारतवर्षातील एक जनपद (म. भी. १०.५४; पद्म. आदि. ६.५१).

**कुशभवनपुर** (नगर)— ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते उत्तर प्रदेशातील 'काशपुर' नगराचे नामांतर (काशपुर पहा).

**कुशमती** (नगरी)—विंध्य पर्वतान्तर्गत 'कुशस्थली' नगराचे नामांतर (वा. रा. उ. १०७.१७; वायु. ८८.१९९; कुशस्थली ५. पहा).

**कुशराक्षस** (शिवलिंग)—द्वारका येथील एक शिवलिंग (स्कन्द. प्रभास. द्वा. २०).

**कुशल** (देश)—महाभारतमते भारतवर्षातील एक जनपद (म. भी. १०.५०).

**कुशल वर्ष** (वर्ष)—पौराणिक साहित्यमते क्रौंचद्वीपान्तर्गत एक वर्ष (उपविभाग; ब्रह्माण्ड. १९.७१; मार्क. ५०.२३; लिङ्ग. ४६.३२; वायु. ४९.६६; विष्णु.

२.४.४८). महाभारत आणि मत्स्य पुराणात यास देश म्हटले आहे (म. भी. १३.२०; मत्स्य. १२२.८४).

२. शाल्मलि द्वीपान्तर्गत एक वर्ष (मत्स्य. १२२. ९६).

**कुशलोड** (ग्राम)—चालुक्य राजा भीम (द्वितीय) च्या शिलालेखमते गुजरातमधील एक ग्राम. उत्तर गुजरातेतील आधु. उकलोद गाव हेच होय (इंडि. अँटि. ६. २०८).

**कुशल्य** (देश)—भारतवर्षाच्या मध्यदेशान्तर्गत एक देश (ब्रह्माण्ड. १६.४१).

**कुशवत्** (ह्रद)—महाभारत लोमशयात्रामते मानस सरोवरानजिकच्या उज्जानक प्रदेशाच्या परिसरातील एक पवित्र सरोवर (म. आर. १३०.१५).

**कुशवती** (नगरी)—महाभारतमते देवलोकान्तर्गत एक यक्षकिन्नर नगरी (म. आर. १५८.५१). नामांतर—'कुशस्थली.'

**कुशवीरा** (नदी)—भारतवर्षातील एक नदी (पद्म. आदि. ६.१९).

**कुशस्तम्भ** (तीर्थ)—महाभारत अंगिरस्यात्रामते एक तीर्थ (म. अनु. २५.२८; तीर्थविवेचन. पृ. २४६).

**कुशस्थल** (ग्राम)—भारतीय युद्धापूर्वी पांडवांनी कौरवांकडे मागितलेल्या पाच ग्रामांपैकी एक (म. उ. ७०.१५; ८०.७).

२. (तीर्थ) वराहमते मथुरा येथील पाच पवित्र तीर्थांपैकी (पंचस्थल) एक (वराह. १५७.१७; १६०. २२).

३. (नगर) मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते मध्य भारतातील 'कान्यकुब्ज' नगराचे नामांतर (कल्पद्रु. ६. २२; अभिधान. १.३२; ९७४; त्रिकाण्ड. ३२.१३; कान्यकुब्ज पहा).

४. (ब्रह्मदेवस्थान) पद्ममते एक ब्रह्मदेवस्थान. येथील ब्रह्मदेवाचे नाव शंभु होते (पद्म. आदि. २९.१४३).

**कुशस्थली** (क्षेत्र)—अवंती येथील एक पवित्र क्षेत्र (नारद. उत्तर. ७८.२३).

२. (देवीस्थान) अवंती येथील एक देवीस्थान (नारद. उत्तर. ७८.३५).

३. (नगर) महाभारतमते आनर्तराजधानी 'द्वारका' नगरीचे नामांतर (म. स. १३.४९; ह. वं. १०.३२–३३; कल्पद्रु. १०.२७; द्वारका पहा).

४. स्कंदमते 'उज्जयिनी' नगराचे पूर्वकालीन नामांतर (स्कन्द. आवन्त्य. अ. ४१).

५. दक्षिण कोशल देशान्तर्गत रामपुत्र कुशस्थापित 'कुशावती' नगरीचे नामांतर (वा. रा. उ. १०७.१७; वायु. ८८.१९९; कुशावती पहा).

६. पंजाबातील दशरथि रामपुत्र कुशस्थापित 'कुशावती' नगरीचे नामांतर (कुशावती ३. पहा).

७. पूर्व भारतातील 'कुशीनारा' नगराचे नामांतर (कुश जातक. पृ २४८; कुशीनारा पहा).

८. मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते गंगा-यमुना दुआबातील 'अंतर्वेदि' देशाचे नामांतर (त्रिकाण्ड. ३१. ७; अंतर्वेदि पहा).

९. महाभारतमते यक्षकिन्नरांच्या 'कुशवती' नगरीचे नामांतर (कुशवती पहा).

**कुशा** (नदी)—मार्कंडेयमते शुक्तिमत् पर्वतोद्भवा एक नदी (मार्कं. ५४.३०). रॉयचौधरी यांच्या मते पूर्व भारतातील बाबला नदीची कोपा नामक उपनदी हीच असावी (सरकार, पृ. ५५). महाभारतातील 'कृत्या' नदीचे (म. भी. १०.१७) हे नामांतर असल्याचे अन्य अभ्यासकांचे अनुमान भौगोलिकदृष्ट्या असंभव वाटते (कृत्या पहा).

**कुशाग्रपुर** (नगर)—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते मगधराजधानी 'राजगृह'चे नामांतर (वॉटर्स, २.१४८–१४९; राजगृह पहा).

**कुशाण** (लोकसमूह)—खरोष्ट्री शिलालेखमते वायव्य भारतातील (इ. स. पू. २–इ. स. २ रे शतक) सुविख्यात लोकसमूह. या वंशातील कुजूल आणि विम कद्फिसेस्, तसेच कनिष्क राजाचे राज्य बल्ख (आधु. बॅक्ट्रिया), गंधार (आधु. अफगाणिस्तान), तसेच वायव्य आणि उत्तर भारतात असून, त्यापैकी बौद्ध धर्म आणि संस्कृत भाषाभिमानी कनिष्क आणि त्याचा अश्वघोष नामक आचार्य मध्य आणि पूर्व आशियातील बौद्ध धर्मप्रसाराचे अग्रदूत होते. त्यामुळे मध्य आशियान्तर्गत बृहत्तर भारताच्या इतिहासात हा राजा आणि त्याचे खरोष्ट्री शिलालेख महत्त्वपूर्ण मानले जातात.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या लोकसमूहाची निम्नलिखित नामांतरे आढळतात (परिपत्रक पहा).

**नामव्युत्पत्ती**—स्टेन कोनौ यांच्या मते 'कुश' हा शकभाषीय शब्द असून, 'कुशवंशीय' अशा अर्थाने (कुश + आन) यास हे, तसेच 'कदप' नाव मिळाले. कुजूल राजाच्या 'कद्फिसेस्' उपाधीचा शब्दशः अर्थहि

## कुशाण लोकसमूहाची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. कद्फिसेस् (प्रथम) ची खरोष्ठ्री नाणी | कुशण; खुशण |
| २. स. १४५ चा माणिक्याल शिलालेख (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.१४७) | गुषण |
| ३. कुजूल कद्फिसेस्चा स. ५२ चा तक्षिला रौप्यपट (कॉर्पस्. इन्स्कि. २.१. २.७६) | खुशाण |
| ४. भारतातील खरोष्ठ्री शिलालेख | गुशण; खुशण |
| ५. मध्य आशियातील खरोष्ठ्री शिलालेख | कुशण; कुशंण |
| ६. माट येथील ब्राह्मी शिलालेख | कुशाण |
| ७. चिनी साहित्य | कुई–शुआंग (कुशाण) |
| ८. पह्लव राजा गुदुह्वरचा शिलालेख | कप |
| ९. अन्य खरोष्ठ्री शिलालेख | कद्प, कफ्स |
| १०. शक शिलालेख | असिअनि |

'कुशाणवंशीय' असाच आहे.

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**—वायव्य चीनमधील यू–चि जमातीपैकी हे लोक तुर्की टोळ्यांच्या आक्रमणभयाने प्रथम मध्य आशियात, आणि नंतर शक आक्रमणभयाने बॅक्ट्रियात आले. यांच्या कद्फिसेस् (प्रथम) राजाने बॅक्ट्रियाच्या हर्मैओसचा पराजय करून प्रथम तो त्या देशाचा, आणि नंतर (इ. स. पू. १००) गंधार, तसेच उत्तर भारताचा राजा बनला. तक्षिला येथील उत्खननावरून, तसेच खरोष्ठ्री शिलालेखांवरून पह्लव राजा गुदुह्वरानंतर या प्रदेशात यांचे राज्य सुरू झाले असावे.

या राजवंशाच्या दोन शाखांपैकी कुजूल कद्फिसेस् आणि विम कद्फिसेस् हे प्रथम शाखेचे, आणि कनिष्क (राज्यारोहण–इ. स. पू. ५८) हा द्वितीय शाखेचा आद्य संस्थापक असून, त्यापैकी कनिष्काचे राज्य (राजधानी–पुरुषपुर = आधु. पेशावर) वायव्य भारतापासून पूर्व भारतातील वाराणसीपर्यंत आणि दक्षिणेस सिंधपर्यंत होते. त्याच्या वंशाचे भारतातील राज्य इ. स. २ ऱ्या शतकापर्यंत, आणि वायव्य भारतातील राज्य इ. स. ३ ऱ्या शतकापर्यंत टिकले.

**वांशिक इतिहास**—या लोकांच्या आद्य वंशासंबंधी अभ्यासकांत निम्नलिखित मतांतरे आढळतात :—

१. **तुर्की वंश**—केनेडी यांच्या मते हे लोक तुर्कवंशीय असून, उत्तरकालीन तुर्की गंधारनरेश स्वतःस कनिष्कवंशीय म्हणवीत असत. राजतरंगिणीमते कनिष्क हा 'तुरुष्क' (तुर्की) असून (राज. १.१७०), अभिधानचिंतामणिमते त्याच्या 'शाखि' (शाही) उपाधीचा शब्दशः अर्थ 'तुरुष्क' असाच होता (अभिधान. ९५९). कद्फिसेस् (प्रथम) च्या शिलालेखात 'कुजूल' (तुर्की–'गुज्लु' = सामर्थ्यसंपन्न), 'यौग' (तुर्की– 'जब्गु = राजा) आदि तुर्कीभाषीय उपाधींचा प्रयोग असून, कनिष्क नाण्यांवरील उभट कवटी, गालाची उंच हाडे, भरीव नाक, दाट दाढी ही शरीरवैशिष्ट्ये, तसेच सैल कोट आणि प्रशस्त बूट हा पेहराव तुर्की रानटी राजासदृश आहे.

२. **इराणी वंश**—स्टेन कोनौ यांच्या मते चिनी तुर्कस्तानमधील तक्ल मकान वाळवंटातील होमो अल्पिनस संज्ञक आद्य इराणी लोक हेच असून, तुर्क लोक तेथे नंतर आले. अभिधानचिंतामणि आणि राजतरंगिणीमधील तुरुष्कांसंबंधीचे निर्देश या उत्तरकालीन माहितीवर आधारित असून, 'यौग' आणि 'कुजूल' या उपाधी कुशाणांनी चिनी तुर्कस्तान आणि खोतानमधील शक लोकांकडून घेतल्या असाव्यात.

**चिनी साहित्यात**—या साहित्यमते हे (कुई–शुआंग) लोक 'यू–चि' आणि 'त–हिय' लोकांसमवेत गंधार देशाच्या उत्तरवर्ती समरकंद आणि बोखाराच्या, तसेच चित्रळ आणि पंजशिर देशांच्या दरम्यान रहात असत. यू–चि लोकांचे उपशाखाभूत चिनी तुर्कस्ताननिवासी हे (कुशान) लोक सोग्दियाना देशमार्गे मध्य आशियातील तुखारादि पंचदेशांत स्थलांतरित झाले. 'शक आक्रमक' अर्थाने त्यांस 'असिअनि' नाव प्राप्त झाले असून, अन्य अभ्यासकांच्या मते 'आर्शि भाषीय' (= तुखारी) अर्थाने त्यांस हे नाव मिळाले. स्टेन कोनौ यांच्या मते खोतानमधील 'असिअनि' संज्ञक टोळीप्रमुखाच्या नावावरून यांस हे नाव मिळाले असून, कनिष्कहि याच टोळीमध्ये जन्मला होता.

चिनी साहित्यमते स. २५ मध्ये कुशाण राजा कुजूल कप (कद्फिसेस्) ने 'अन्सि' (काबूलनजिकचे पह्लव राज्य), 'कौ–फु' (काबूल), 'पुत' (तक्षिला) आणि 'कि–पिन्' (पंजाब) देश जिंकले असून, स. ३८ आणि

५२ च्या पंजतार आणि तक्षिला शिलालेखमते या प्रदेशातील विगत शक साम्राज्य त्याने पुनःस्थापित केले. त्याच्या येन्-कव-चेन नामक पुत्राने तियेन्-चु (सिंध प्रदेश) प्रदेश जिंकला.

पेशावरपासून मथुरेपर्यंतच्या प्रदेशात विम राजाचे राज्य असल्याचे त्याच्या नाण्यांवरून सिद्ध झाले असून, 'चुक्स्' (तक्षिला), उत्तर भारत, आणि सुराष्ट्र-माळवा प्रदेशात त्याचे जिहोनीक (झिओन्निसेस), लियक कुसूलक, आणि पश्चिम क्षत्रप नामक राजप्रतिनिधी होते.

कनिष्काचे कर्तृत्व—विम कद्फिसेस्नंतर उतरणीस लागलेली कुशाण सत्ता कनिष्काने पुनःस्थापित केली. त्याच्या पेशावर (स. १२८), आणि सारनाथ (स. ३१) शिलालेखमते त्याने मध्य आशियातून पेशावरमार्गे भारतात येऊन सारनाथपर्यंतचा प्रदेश जिंकला. सारनाथ शिलालेखमते पूर्व भारतात त्याचे खरपल्लान आणि वनसार नामक क्षत्रप असून, जैन 'कल्पनामंडितिका' ग्रंथमते त्याने पूर्व भारत जिंकला होता. कंकाली टीला (मथुरा) शिलालेखातील 'कनिष्क संवता'च्या प्रयोगावरून हीच गोष्ट सिद्ध होते.

पश्चिमेकडील झेद, उत्तरेकडील हिद्दा, दक्षिणेकडील सुइ विहार, तसेच पेशावर प्रदेशात 'कनिष्क संवत्' प्रचारात असून, पेशावरच्या उत्तरेकडील हस्तनगर, जमालगढी, लोरियान तंगई प्रदेशातील 'शक संवता'च्या प्रयोगावरून ते त्याच्या राज्यात नसावेत. कनिष्काच्या स. १५१ च्या अंतिम शिलालेखावरून स. १५२ मध्ये तो मृत झाला असावा.

कनिष्काने शक धर्म, संस्कृती आणि भाषेचा त्याग करून बौद्ध धर्म आणि संस्कृत भाषेचा प्रसार मध्य आणि पूर्व आशियात केला. अश्वघोष नामक धर्मगुरूच्या प्रेरणेने त्याने जालंधरनजिकच्या कु-वन (अथवा कश्मीरातील कुंडलवन) येथे बौद्ध धर्मपरिषद बोलावून बौद्ध धर्मग्रंथ आणि शिलालेख प्राकृताऐवजी संस्कृतमध्ये लिहिण्याचा निर्णय घेतला. त्यामुळे चिनी तुर्कस्तान आदि खरोष्ठी प्रदेशातील उत्तरकालीन सारे शिलालेख संस्कृतात आढळतात (उदा. सुइ विहार, मोहेंजोदरो, तसेच बलुचिस्तानातील तोर ढेरी शिलालेख).

कनिष्कोत्तर वासिष्क, कनिष्क (द्वितीय), आणि हुविष्क राजांचा निर्देश राजतरंगिणीत असून, यापैकी हुविष्क हा अंतिम श्रेष्ठ कुशाण राजा होय (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.१.५२–८२).

**कुशाद्य** (देश)—महाभारतमते 'सुकुट्ट' नामक भारतीय जनपदाचे नामांतर (म. भी. १०.४३; सुकुट्ट पहा).

**कुशावती** (बौद्ध स्थान)—पौराणिक साहित्यमते पूर्व भारतातील 'कुशीनारा' बौद्ध स्थानाचे नामांतर (कुशीनारा पहा).

२ (नगर) वाल्मीकि रामायणमते विंध्य पर्वताच्या पायथ्यानजिकच्या कुश राजधानी 'कुशीनारा' नगराचे नामांतर (वा. रा. उ. १०८.४). अन्य नामांतर—'कुशस्थली'.

३. (नगर) स्थानिक आख्यायिकामते दाशरथि रामपुत्र कुशस्थापित पंजाबातील एक नगर. लाहोरपासून ३२ मैल आग्नेयेकडील आधु. कसूर गाव हेच होय. 'द्वादश दुर्गयुक्त नगर' अशा अर्थाने हे 'बाराकिल्ला' स्थानिक नावाने सुविख्यात असले, तरी सध्या येथे सातच किल्ले आहेत. नामांतर—'कुशस्थली'.

**कुशावर्त** (तीर्थ)— गौतमी (गोदावरी) नदीच्या उगमानजिकचे एक श्राद्धयोग्य तीर्थ (म. अनु. २५.१३; ब्रह्म. ८०.१; पद्म. आदि. ११.६२; मत्स्य. २२.६९). महाराष्ट्रातील नाशिकजवळील आधु. त्र्यंबकेश्वर मंदिरानजिकच्या या सरोवरात गोदावरी नदीचे जल झिरपते. त्र्यंबकेश्वर–कुशावर्त मार्गावर नीलगंगा–गोदावरी संगमानजिक संगमेश्वर, कनकेश्वर, कपोतेश्वर, त्रिभुवनेश्वर आदि मंदिरे आहेत (बॉंबे. गॅझे. १६.६५१; ती. पृ. २४७).

२. हरिद्वारनजिकचे गंगा नदीकाठचे एक तीर्थ (नारद. उत्तर. ४०.७९; ४१.३६; भा. ३.२०.४).

३. (दत्तात्रेय-तपस्यास्थान) हरिद्वार–हृषीकेश मार्गावरील गरुड घाटाच्या दक्षिणवर्ती दत्तात्रेय-तपस्यास्थान. एक सहस्र वर्षे एकपाद अवस्थेत तपस्या करीत असता, नजिकच्या गंगाप्रवाहात दत्तात्रेयांच्या कुश, कमंडलू आदि वस्तू वाहून गेल्या. तत्प्रसंगी त्यांनी येथील नदीजलात आवर्त (भोवरा) निर्माण करून त्या पुन्हा प्राप्त केल्या. त्यामुळे या स्थानास हे नाव प्राप्त झाले (ती. पृ. ६३).

४. (देश) जैन साहित्यमते यमुना नदीकाठचा एक देश. येथील शौरि राजाने 'शौरिपुर' नामक उपविभागाचे राज्य स्वतःच्या सुवीर नामक कनिष्ठ बंधूकडे सोपवून गुजरातमध्ये नव्या कुशावर्त देशाची आणि शौरिपुर नगराची स्थापना केली (जैन साहित्यमां गुजरात. पृ. ४८).

**कुशिक** (देश)— मत्स्यमते मेरु पर्वतोद्भवा सप्तगंगांपैकी पूर्ववाहिनी ह्लादिनी नदीच्या मार्गावरील एक

देश ( मत्स्य. १२१.५४ ).

२. ( नगर ) शिलालेख साहित्यमते मध्य भारतातील 'कान्यकुब्ज' नगराचे नामांतर ( एपि. इंडि. २६.६८; कान्यकुब्ज पहा ).

**कुशिक-आश्रम** ( आश्रमस्थान )— महाभारत पुलस्त्ययात्रामते कौशिकी नदीकाठच्या 'भरत-आश्रमा'चे नामांतर ( म. आर. ८२.११३; भरत-आश्रम पहा ).

**कुशीनारा** ( बुद्ध-परिनिर्वाणस्थान )— बौद्ध साहित्य-मते उत्तर भारतातील मल्ल गणराज्याच्या राजधानीद्वया-पैकी एक ( अन्य राजधानी-पावा; दीघ. २.१३१ ). वाल्मीकि रामायणमते हे ( कुशावती ) रामपुत्र कुशाच्या राजधानीचे नगर असून, बुद्धाच्या महापरिनिर्वाणाचे स्थान म्हणून बौद्ध धर्मीयांमध्ये हे पवित्रतम मानतात. बौद्ध साहित्य आणि फाहियेन्च्या प्रवासवर्णनमते हे पावा गावाहून ३ 'गव्यूत' अंतरावर ( दीघ. २.१३२; सुमङ्गल. २.५८३ ), तसेच रामग्राम आणि रामग्रामदेशीय न्यग्रोधवनापासून १८ योजने ( १४४ मैल ) आणि १२ योजने ( ९६ मैल ) अंतरावर होते. बौद्ध परिनिब्बान सुत्तमते हे राजगृहापासून १२ योजने अंतरावर होते.

उत्तर प्रदेशातील देवरिया जिल्ह्यातील गोरखपुरपासून ३४ मैल पूर्वेकडील, देवरियापासून २१ मैल ईशान्येकडील, आणि पद्रौनापासून १२ मैल नैर्ऋत्येकडील छोटी गंडक नदीकाठचे आधु. कसिया ( कुशीनगर; अक्षांश २६°–४५' उत्तर; रेखांश ८३°-५८' पूर्व ) गाव हेच होय ( कनिंग., पृ. ४३०; आर्कि. सर्व्हे. २२.१६; जे. आर. ए. एस्. स. १९१३, पृ. १५२ ). येथील 'रंभर' आणि 'माता कुंवर-का-कोट' स्थानी गौतम बुद्धाच्या महापरिनिर्वाण-स्तूपाचे आणि चैत्यमंदिराचे अवशेष, तसेच बुद्धाची परिनिर्वाणावस्थेतील एक मूर्ती सापडली ( आर्कि. सर्व्हे. १८.५५ ).

आधु. अभ्यासकांच्या मते या गावानजिकच्या हिरण्यवती नदीतीरवर्ती मल्ल लोकांच्या ज्या सालवनात ( उपवत्तन महासाल ) बुद्धपरिनिर्वाण झाले ( दीघ. २.१०९ ), तेथेच आधु. कसिया गाव असून, मल्लराजधानी कुशीनारा नगर आधु. कसिया गावानजिकच्या खुनअ नाल्याच्या डाव्या किनाऱ्यावरील आधु. अनिरुद्धव गावी होते ( आर्कि. सर्व्हे. स. १८६१; पृ. ७७; स. १८७५, पृ. ९२; स. १९०५, पृ. ७७ ).

ऱ्हाइस डेव्हिड्स यांच्या मते पर्वतीय उतारावरील बुद्ध-कालीन कुशीनारा नगर शाक्य देशाच्या दक्षिणेस आणि वज्जि गणराज्याच्या पूर्वेस होते ( बुद्धिस्ट इंडिया. पृ. २६ ).

**मतांतरे**—स्मिथ यांच्या मते आधु. कसिया गावच्या परिनिर्वाणप्राप्त बुद्धप्रतिमेचा निर्देश फाहियेन् अथवा ह्युएन्-त्संगच्या प्रवासवर्णनात नसल्याने बुद्धकालीन कुशीनारा नगर नेपाळ-तराईमध्ये असावे ( जे. आर. ए. एस्., स. १८९७, पृ. ९१९ ). त्यांच्या मते या नगराजवळून वहाणाऱ्या हिरण्यवती आणि अचिरवती नद्या म्हणजे आधु. छोटी गंडक आणि छोटी राप्ती नद्या असून, वॉटर्स यांच्या मते गोरखपुर जिल्ह्यात घोग्रा ( सरयू ) नदीस मिळणाऱ्या आधु. छोटी गंडक नदीची ही दोन्ही नामांतरे असावीत.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. वाल्मीकि रामायण ( उ. १०७.५ ) | कुशावती |
| अ. पौराणिक साहित्य | कुशावती |
| ब. रघुवंश ( १५.९७ ) | कुशावती |
| २. बौद्ध साहित्य | |
| अ. ( दीघ. २.११६ ) | कुसिनारा |
| ब. ( दीघ. २.१३१ ) | कुसिनारा |
| क. ( संयुत्त. १ ) | अनिरुद्धव |
| ड. ( कुश जातक. पृ. २४८ ) | कुशस्थली |
| ३. अन्य बौद्ध ग्रंथ | कुसावती |
| ४. ह्युएन्त्संग ( वॉटर्स, २-२५ ) | किउ–शि–न–की–लो– ( कुशीनगर ) |
| ५. फाहियेन् | किउ–शि–न–की–लो– ( कुशीनगर ) |
| ६. अन्य साहित्य ( वॉटर्स, २. २५ ) | कुशनगर<br>कुशीग्रामक |

**नामांतर-उत्क्रांती**—दीघ निकायमते हे नगर बुद्धपूर्व-कालीन महासुदर्शन राजाच्या काली 'कुशावती' नावाने ( दीघ. २.१३४ ), आणि बुद्धकाली 'कुसिनारा' ( संस्कृत–कुशीनारा ) नावाने सुविख्यात होते ( दीघ. २.१३२ ). यावरून 'कुशावती' आणि 'कुशीनारा' ही याची राज-सत्ताक आणि प्रजासत्ताक-कालीन नामांतरे असावीत. ही दोन्ही एकाच नगराची नावे असल्याचा सुस्पष्ट निर्देश बुद्ध-भाषणात आढळतो ( दीघ. २.१४६ ). बुद्ध परिनिर्वाणानंतर मल्ल लोकांचे सांत्वन करणाऱ्या बुद्धशिष्य अनिरुद्धाचे नावा-वरून यास 'अनिरुद्धव' नाव प्राप्त झाले ( संयुत्त. १ ).

**नगरवर्णन**—जातकमते महासुदर्शन राजाच्या राज्यकाली हे नगर ( व्याप्ती–१२ × १२ कोस ) देवांच्या अलकनंदे-समान वैभवसंपन्न होते ( जा. १. ३९२; चरिय पिटक. १. ४ ). या वैभवशाली आणि दाट लोकवस्तीयुक्त नगरात ब्राह्मणांना भरपूर दक्षिणा आणि भिक्षेकऱ्यांना भिक्षा मिळत असे ( दीघ. २.१७० ). दीघनिकायमते विभवकाली अतिविशाल असणारे हे नगर ( व्याप्ती–१२ × ७ योजने; दीघ. २.१४६–१४७;१७० ), गौतम बुद्धकाली जंगलमय पाणथळ प्रदेशातील आडवळणाचे गाव बनले होते ( दीघ. २. ११६ ). बुद्ध–बुद्धशिष्य आनंद संवादमतेहि पूर्वकालीन सुविख्यात आणि भव्य असे हे नगर तत्काली जंगलवेष्टित, हीन आणि गलिच्छ कुग्राम बनले होते. मल्ल आणि कुस्तीगीर लोकांच्या या आडवळणाच्या गावी बुद्धाचे परिनिर्वाण होऊ नये, अशी आनंदाची इच्छा होती. परंतु विधिघटनेनुसार ते येथेच झाल्यामुळे यास नवे स्थान-माहात्म्य प्राप्त झाले.

**वाल्मीकि रामायणात**—या ग्रंथमते दक्षिण कोशल-राजधानीचे विंध्य पर्वताच्या दक्षिण उतारावरील हे ( कुशावती ) नगर दाशरथि रामपुत्र कुशाने स्थापिले ( वा. रा. उ. १०७.५; १७; १०८.४; वायु. ८८.१९९ ). रघुवंशमते विंध्य पर्वतान्तर्गत या ( कुशावती ) राजधानीहून कुश विंध्य पर्वत आणि गंगा नदी ओलांडून अयोध्येस परतला ( रघु. १५.९७; १६.२१; ३१;३३ ).

आधु. अभ्यासकांच्या मते कुशराजधानी विंध्य पर्वताच्या दक्षिणेस दक्षिणापथमध्ये असल्याचे उपरोक्त दोनहि निर्देश भौगोलिक दृष्ट्या असंभव असून, कुशराजधानी कुशावती उत्तर भारतान्तर्गत कोशल देशातच होती. कुश जातक-मते या ( कुशावती; कुसावती, ) गावी ओक्काक ( इक्ष्वाकु ) आणि ओक्काकपुत्र कुश आणि जयंपति राजांची राजधानी होती ( जा. ५.२८८–२८९ ). महावंश आणि दीपवंशमते ओक्काककुलोत्पन्न महासामंतवंशीय राजांची राजधानी येथेच ( कुशावती ) होती. या दोन्ही ठिकाणी दाशरथि रामपुत्र कुशाचा निर्देश अभिप्रेत असून, त्याने स्वं-राजधानी अयोध्या येथे हलविल्यानंतर बुद्धपरिनिर्वाण-कालीन मल्ल गणराज्य स्थापन झाले असावे.

**बौद्ध साहित्यात**—या साहित्यमते बुद्धाच्या या परि-निर्वाणस्थानी ( जा. १.२९२; ५.२७८; २८५; २९३–२९४; २९७ ) पूर्वकाली महासुदर्शन राजाची सुंदर राजधानी ( कुशावती; कुसावती ) होती ( दिव्यावदान. पृ. २७० ). येथील संथागारात मल्ल लोक धर्म आणि राज्यकारभारविषयक चर्चा करीत असून, येथील कारभार 'पुरीष' नामक अधिकारी मंडळ पहात असे ( बुद्धिस्ट इंडिया. पृ. ८१ ).

**परिनिर्वाण**—आपल्या परिनिर्वाणकाली, गौतम बुद्ध पावा गावाहून ककुत्था ( आधु. बर्हि ) नदी ओलांडून येथे आला ( सुमङ्गल. २.५७५; दीघ. २.१०७ ). येथील हिरण्यवती ( आधु. छोटी गंडक ) नदीकाठच्या मल्ल लोकांच्या सालवनात ( शाल उपवत्तन ) त्याने देहत्याग केला ( दीघ. २.१०९ ). फाहियेन् आणि ह्युएनत्संगच्या मते हे स्थान या गावाच्या उत्तरेस हिरण्यवती नदीकाठी ३–४ कोसांवर होते ( वॉटर्स, २.२८ ).

निर्वाणसमयी बुद्धाने बोलावून घेतलेल्या कुशीनारा प्रजा-मंडळाच्या सभासदांनी गावाच्या पूर्ववर्ती 'महाकुट निर्बंधन' नामक मंदिरानजिक चक्रवर्ती सम्राटाच्या इतमामाने त्याचा अंत्यविधी करून, स्वतःच्या वाऱ्याच्या बुद्धशरीरा-वशेषांवर स्तूप उभारला.

**फाहियेन्च्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते तत्काली हे गाव संपूर्णतः ओसाड होते.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते रामग्राम ( आधु. धर्मौली )च्या ईशान्येकडील या ( किउ–शि–न–की–लो=कुशीनगर ) बुद्धपरिनिर्वाणनगरास ह्युएन्त्संग रामग्राम देशान्तर्गत न्यग्रोधवनाच्या ईशान्यवर्ती मार्गाने गेला. त्याचे काली हे तटबंदीयुक्त नगर (व्याप्ती–२ मैल ), तसेच त्याच्या परिसरातील अन्य गावे विजन असून फारच थोडे लोक तेथे रहात होते.

**बौद्ध वास्तू**—ह्युएन्त्संगच्या मते याच्या परिसरात निम्नलिखित बौद्ध वास्तू होत्या :—

( १ ) **चंड लोहाराचे घर**— नगरतटबंदीच्या ईशान्य कोपऱ्यातील गौतम बुद्धाच्या अंतिम भोजनाच्या या ऐतिहासिक स्थानी एक अशोकस्तूप असून, त्यानजिकच गौतम बुद्धाची अंतिम जलप्राशनाची विहीर होती. महायान पंथेतर बौद्ध साहित्यमते चंड लोहाराचे निवासस्थान पावा येथे होते ( पावा पहा ).

( २ ) **बुद्ध-परिनिर्वाणस्थान** ( शालवन )— गावाच्या वायव्यवर्ती अचिरवती ( छोटी राप्ती ) नदीच्या पश्चिम तीरावरील शालवनातील बुद्ध परिनिर्वाणस्थानी विटांच्या चैत्यमंदिरात निर्वाणावस्थेतील बुद्धप्रतिमा, तसेच उद्ध्वस्त अशोकस्तूप ( उंची–२००′ ) आणि दगडी स्तंभ होते. दिव्यावदानमते उपगुप्त नामक गुरूने अशोकास हे बुद्धपरि-निर्वाणस्थान दाखविले होते ( दिव्यावदान. पृ. ३८९–

३९४).

( ३ ) **मृगस्तूप आणि सुभद्रस्तूप**—उपरोक्त बुद्धमंदिरानजिक मृगजातकान्तर्गत मृग बोधिसत्त्वाचे, तसेच आसन्नमरण बुद्धाशी धर्मचर्चार्थ आलेल्या सुभद्र नामक ब्राह्मणाचे स्मृतिस्तूप होते.

( ४ ) **वज्रपाणि मूर्च्छा स्तूप**—उपरोक्त स्तूपाशेजारी बुद्धनिर्वाणाच्या आशंकेने मूर्च्छित झालेल्या बुद्धशरीररक्षक वज्रपाणि यक्षाचा स्मृतिस्तूप होता.

( ५ ) **देवोपासना स्तूप**—उपरोक्त स्तूपानजिक निर्वाणगत बुद्धाप्रीत्यर्थ सप्तदिनात्मक उपासनामग्न देवांचा स्मृतिस्तूप, तसेच बुद्धशवपेटिका सात दिवस ठेवली ती जागा होती.

( ६ ) **महामाया विलाप स्तूप**—उपरोक्त स्तूपानजिक स्वर्लोकावतीर्ण बुद्धमाता महामायेच्या विलापाचा स्मृतिस्तूप होता.

( ७ ) **बुद्धदहन स्तूप**—नगराच्या उत्तरवर्ती हिरण्यवती नदीच्या दुसऱ्या किनाऱ्यापासून ३०० पावलांवर बुद्धदहनस्थानी मल्लराजनिर्मित मुकुट–बंधन–चैत्यमंदिर ( मल्लमंदिर ), तसेच मृत बुद्धाने महाकाश्यपास स्वपादुकांचे दर्शन घडविल्याजागी उभारलेला स्मृतिस्तूप होता. तिबेटी साहित्यमते हे स्थान या नगराच्या पूर्व प्रवेशद्वाराच्या बाहेर होते.

( ८ ) **बुद्ध–शरीरावशेष विभाजनस्थान**—उपरोक्त दहनस्थानानजिकच्या बुद्ध–शरीरावशेष विभाजनस्थानी अशोकस्तूप आणि स्तंभ होता. महापरिनिब्बान सुत्तमते येथे बुद्धशरीरावशेषांचे तीन समान भाग देव, जलराक्षस आणि निम्नलिखित लोकसमूहांमध्ये वाटण्यात आले:– १. कुशीनगरनिवासी मल्ल लोक; २. वैशालीनिवासी लिच्छवि लोक; ३. कपिलवस्तुनिवासी शाक्य लोक; ४. अल्लकप्पनिवासी बूलिय लोक; ५. रामग्रामनिवासी कोलिय लोक; ६. पावानिवासी मल्ल लोक; ७. मगधराज अजातशत्रु; ८. वेठद्वीपनिवासी ब्राह्मण लोक. या लोकांनी आपापल्या देशात या अवशेषांवर 'कुंभस्तूप' (द्रोणस्तूप) बांधले.

( ९ ) **पुण्यशाला**—उपरोक्त स्तूपाच्या ४० मैल नैर्ऋत्येकडील गावी बौद्ध भिक्षुनिवासार्थ राहुल ब्राह्मणाने चालविलेली पुण्यशाला होती. शशांक राजाच्या छळामुळे येथील बौद्ध भिक्षूंचे हाल होत असल्याचे वर्तमान राहुलने ह्युएन्त्संगला येथे सांगितले. राहुलने उत्तरकालात भविष्यकालीन बुद्धपुत्र म्हणून जन्म घेतला. येथून १०० मैल प्रवास केल्यानंतर ह्युएन्त्संग वाराणसीला गेला ( वॉटर्स, २.२५–४५ ).

**शिलालेख**—येथील माता कुंवर बुद्ध मंदिराच्या दक्षिणेकडील कसिया शिलालेखमते ( इ. स. १० वे शतक ) हे मंदिर, तसेच त्यानजिकचा विहार 'शेवय' ग्रामनिवासी व्यक्तीने बांधला असून, या शिलालेखाचा दगड सध्या लखनौ म्युझियममध्ये आहे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.३७६ ).

येथील बुद्धनिर्वाण–प्रतिमेनजिकच्या एका विच्छिन्न व्यक्तिप्रतिमेवर 'महाविहारस्वामिन् हरबलची देणगी' अशी अक्षरे असून ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.२७२ ), ती सध्या माता कुंवर-का-कोट मंदिरात आहे.

**आधुनिक काळी**—येथील सद्यःकालीन बुद्धपरिनिर्वाण स्तूप गुप्तकालीन असून, तत्पूर्वकालीन अशोकस्तूप त्याखाली गाडला गेला असावा. अन्य अभ्यासकांच्या मते माता कुंवर-का कोटनजिकचा मौर्यकालीन स्तूप म्हणजेच अशोकस्तूप होय.

स्थानिक आख्यायिकामते येथील रंभर गढीनजिक बुद्धाचे दहन झाले. तेथील स्तूप मात्र आज नष्ट झाला आहे.

**उत्खनन**—कार्लाइल यांनी केलेल्या या स्थानाच्या आद्य उत्खननात ( स. १८७६ ) गौतम बुद्धाचा परिनिर्वाण स्तूप, परिनिर्वाणचैत्य, तसेच ताम्रपट आदि अवशेष सापडले. स. १९०४ मधील येथील उत्खननात कुशाण राज्यकालीन स्तूप, आणि धर्ममठ, तसेच या गावाच्या पूर्वेकडील 'माता कुंवर-का-कोट' स्थानी उत्तराभिमुख पायऱ्यायुक्त एक बृहदाकार स्तूप, मौर्यकालीन दग्ध स्तूपाचे अवशेष, आणि कद्फिसेस् (द्वितीय) व कनिष्क राजांची नाणी सापडली ( अर्कि. सर्व्हे. स. १९०४, पृ. ४३; स. १९०५, पृ. ६; स. १९०६, पृ. ४४; स. १९१०, पृ. ६२; स. १९११; पृ. १३४; जे. आर. ए. एस्., स. १९०७, पृ. ९९५ ).

येथील विहाराच्या अवशेषात '**महापरिनिर्वाण भिक्षुसंघ**' अक्षरपंक्तियुक्त मृत्तिकामुद्रा, तसेच '**श्री महापरिनिर्वाण महाविहारियार्थ भिक्षुसंघस्य**' अक्षरपंक्तियुक्त एक शिलालेख सापडला.

उपरोक्त उत्खननावरून हे मौर्यकालीन नगर गुप्त कालापर्यंत समृद्धावस्थेत असून, येथे जुन्या इमारतींची दुरुस्ती आणि नव्या इमारतींचे बांधकाम अखंडपणे चालू असावे ( देशपांडे, रिव्ह्यू. पृ. ४२५ ).

**कुशीवट** ( वटवृक्ष )—नृसिंहमते एक पवित्र वटवृक्ष ( नृसिंह. तीर्थविवेचन. पृ. २५२ ).

**कुशूद्र** ( देश )—भारतवर्षान्तर्गत मध्य देशातील 'कुल्य' देशाचे नामांतर ( वामन. १३.३६; कुल्य पहा ).

**कुशेशय** ( वर्षपर्वत )—कुशद्वीपान्तर्गत एक वर्षपर्वत ( कूर्म. उत्तर. ४९.२१; ब्रह्माण्ड. १९.५५; मत्स्य. १२२.५७; म. भी. १३.१०; लिङ्ग. ५३.८; वायु. ४९.५०; विष्णु. २.४.४१ ). नामांतर–'कंक' ( मत्स्य. १२२.५८ ).

२. ( तीर्थ ) महाभारत अंगिरस्यात्रा ( म. अनु. २५.११ ), तसेच वामन पुराण प्रह्लादयात्रामते ( वामन. ८३.७ ) एक श्राद्धयोग्य तीर्थ ( मत्स्य. २२.७६ ).

**कुशेश्वर** ( लिंग )—द्वारका येथील एक शिवलिंग ( स्कन्द. प्रभास. द्वा. २१.४ ).

२. हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंग ( स्कन्द. नागर. १०४ ).

३. साभ्रमती नदीकाठचे एक शिवलिंग ( पद्म. उत्तर. १५७.२ ).

४. बिहारमधील दरभंग्यानजिकच्या पिपरा घाटानजिकचे एक शिवलिंग ( ती. पृ. १५३ ).

**कुशोत्तर** ( वर्ष )—शाकद्वीपान्तर्गत एक वर्ष ( उपविभाग; मार्कं. ५०.२१ ).

**कुषवा** ( नदी )—ऋग्वेदमते एक नदी. इंद्रजन्मानंतर माता अदितीने त्यास या नदीत जलसमाधी दिली ( ऋ. ४.१८.८ ). सायणाचार्यांच्या मते ही नदी नसून राक्षसी होती.

**कुष्माण्डेश्वर** ( लिंग )—वाराणसी येथील एक शिवलिंग ( लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. १०३ ).

**कुसट** ( देश )—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते एक देश ( वैजयन्ती. ३८.८० ).

**कुसट्टा** ( नगर )—जैन प्रज्ञापना ग्रंथमते आनर्तराजधानी 'द्वारका' नगरीचे नामांतर ( द्वारका पहा ).

**कुसन्निक** ( देश )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते मध्य आशियातील समरकंदपासून ६० मैल पश्चिमेकडील एक देश. सेंट मार्टिन यांच्या मते पंजशंब जिल्ह्यातील समरकंद आणि बोखाराच्या दरम्यानच्या आधु. कशनिय गावाच्या परिसरात हा असावा. नामांतर ( ह्युएन्त्संग )– 'किउ–श्वंग्–नि–किय'; 'हो–कुओ' ( हो राजाचा देश ).

**नामव्युत्पत्ती**—'किउ–श्वंग्–नि–किय' चा शब्दशः अर्थ 'पश्चिमेकडील देश' असून, याच्या 'हो–कुओ' वैकल्पिक नावावरून समरकंद येथील 'शौ–वु' वंशीय हो राजाचे राज्य येथे असावे. स. ६६० मध्ये येथून चीनला गेलेला संघ नामक भिक्षू 'हो' ( हो देशीय ) नावानेच प्रसिद्ध होता.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमिते या उत्तर-दक्षिण रुंद आणि पूर्व-पश्चिम निमुळत्या नदीखोऱ्यातील देशाचे हवामान, पीकपाणी आणि लोकाचार समरकंद प्रमाणेच होते ( वॉटर्स, १.९७; बील, १.१०० ).

**कुसम्भी ग्राम** ( तीर्थ )—उत्तर प्रदेशान्तर्गत उन्नाव जिल्ह्यातील अजगैन ( प्राचीन अजग्राम ) रेल्वेस्थानकापासून ३ मैलांवरील एक दुर्गस्थान ( ती. पृ. ११२–११३ ).

**कुसावती** ( बौद्ध तीर्थ )—बौद्ध साहित्यमते उत्तर भारतातील 'कुशीनारा' बुद्धपरिनिर्वाणस्थानाचे नामांतर. अन्य नामांतर– 'कुसिनारा' ( दीघ. २.१३१; कुशीनारा पहा ).

**कुसुम** ( पर्वत )—कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या दक्षिण भागातील ( दक्षिणापथ ) एक पर्वत ( बृ. सं. १४.१४ ).

२. ( देश ) मार्कंडेयमते दक्षिणापथमधील 'कुपथ' देशाचे नामांतर ( कुपथ पहा ).

**कुसुमपुर** ( नगर )—वायु पुराण, समुद्रगुप्ताचा अलाहाबाद प्रशस्तिलेख, रघुवंश, तसेच ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते गंगा तीरवर्ती मगधराजधानी पाटलिपुत्र ( आधु. पाटणा ) नगराचे मौर्यपूर्वकालीन नामांतर ( वायु. ९९.२१९; गुप्त. इन्स्क्रि. ३.२.५; रघु. ६.२४; वॉटर्स, २.८७; पाटलिपुत्र पहा ). चिनी नामांतर– 'कु–सु–मो–पु–लो.'

२. ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते मध्य भारतातील 'कान्यकुब्ज' नगराचे नामांतर ( वॉटर्स, १.३४१; कान्यकुब्ज पहा ).

**कुसुमभोग** ( देश )—कलचुरि राजा पृथ्वीदेव ( द्वितीय ) च्या स. ११४५ च्या शिलालेखमते त्याने जिंकलेला मध्य भारतातील एक देश. धमतरी तालुक्यातील राजीमच्या १८ मैल नैर्ऋत्येकडील आधु. कुस्मुर्र गावाच्या परिसरात हा असावा ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.४५३ ).

**कुसुमायुध** ( कुंड )—अयोध्या येथील एक जलकुंड ( स्कन्द. वैष्णव. अ. १–१० ).

**कुसुमासङ्गम** ( तीर्थ )—गौतमी ( गोदावरी ) नदीकाठचे एक तीर्थ ( ब्रह्म. १०५.२३ ).

**कुसुमेश** ( लिंग )—अवंती येथील चौऱ्याऐंशी शिवलिंगांपैकी एक ( नारद. उत्तर. ७८.२७; स्कन्द. आवन्त्य. अ. २८.२८; च. लिं. ३८ ).

**कुसुमेश्वर** ( तीर्थ )—नर्मदा नदीच्या दक्षिण तीरावरील एक तीर्थ ( पद्म. आदि. १८.१०४; मत्स्य. १९१. ११२–११७; १२५ ).

२. ( ग्राम ) चालुक्य राजा श्रियाश्रय शिलादित्याच्या स. ६९३ च्या सुरत ताम्रपटमते पश्चिम भारतातील एक ग्राम. सुरत जिल्ह्यातील कामेज गावापासून ६ मैल नैर्ऋत्येकडील आणि उंभेज गावापासून ३ मैल वायव्येकडील आधु. कोसमारा गाव हेच असावे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४. १.१३४ ).

**कुसुमोत्कर** ( देशविभाग )—मत्स्यमते शाकद्वीपान्तर्गत ' कुमुदोत्तर वर्ष ' देशविभागाचे नामांतर ( मत्स्य. १२२.२४; कुमुदोत्तर वर्ष पहा ).

**कुसुमोत्तर** ( वर्ष )—शाकद्वीपान्तर्गत एक वर्ष ( ब्रह्माण्ड. १९.९२ लिङ्ग. ४६.२५; वायु. ४९.८७ ). नामांतर– ' कुसुमोद ' ( विष्णु. २. ४.६० ).

**कुसुम्बा** ( ग्राम )—कलचुरि राजा कोकल्लदेव ( द्वितीय ) च्या इ. स. १० व्या शतकातील गुर्गी शिलालेखमते गुर्गी शिवमंदिरास दान दिलेले मध्यभारतातील एक ग्राम. याचे आधुनिक स्थान समजत नाही ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.२२६ ).

**कुसुम्भ** ( पर्वत )—भागवतमते जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वताचा एक केसर पर्वत ( भा. ५.१६.२६ ).

**कुसुम्भिका** ( नदी )—गौतमी ( गोदावरी ) नदीनजिकची एक नदी ( ब्रह्म. १०५.२५ ).

**कुसुम्भिवन** ( वन )—द्वारकेनजिकचे एक वन ( म. स. परि. १.२१.११९० ).

**कुस्तन** ( देश )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते मध्य आशियातील एक देश. वॉटर्स यांच्या मते हे ' गोस्थान ' ( धेनुसंघस्थान ) संस्कृत देशनामाचे अपभ्रष्ट रूप असून, आधु. खोतान ( चिनी तुर्कस्तान ) देश हाच होय.

**भौगोलिक पार्श्वभूमी**—मौर्य साम्राज्यान्तर्गत कंबोज ( आधु. बदक्षन्–पामीर ) देशाची पूर्व सरहद्द उत्तर–दक्षिणवर्ती आधु. सारीकोल आणि काशगर पर्वतांनी बनली असून, त्याच्या पूर्व उतारावरील चीन सरहद्दीस भिडलेल्या पठारात हा देश होता. त्याची उत्तर–दक्षिण सरहद्द तिएन्शन् आणि कुन्लुन् व अल्तिन तघ् पर्वतांनी बनली होती. मौर्यकाली हा देश शक, ऋषिक, तुषार आदि भटक्या लोकांनी व्यापला असून, इर्त्येश नदीच्या पूर्ववर्ती सिबिरिया ( आधु. सैबेरिया ) प्रदेशात तुर्की लोक रहात असत. अशोककाली तक्षशिलेहून हद्दपार केलेल्या भारतीयांची मोठी वसाहत येथे होती. पामीर, कुन्लुन् आणि अल्तिन्–तघ् पर्वतांच्या जलसंचय प्रदेशातील तारीम नदी या पठारी प्रदेशातून वहात जाऊन अखेरीस तक्लमकान वाळवंटात व लेपनोर दलदलीत लुप्त होत असे.

**नामांतरे**— प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. संस्कृत नामांतर ( वॉटर्स, २.२९५ ). | गोस्थान (?) |
| २. तुर्की साहित्य | कु-तन् |
| ३. ह्युएन्त्संगपूर्वकालीन चिनी साहित्य | यु-तिएन् |
| ४. ह्युएन्त्संगचे प्रवासवर्णन | कु-स-तन्-न ( कुस्तन ) |

**नामव्युत्पत्ती**—' कुस्तन 'चा शब्दशः अर्थ ' भूमिपुत्र ' ( भूमी + स्तन ) असून, बौद्ध साहित्यमते अशोकराज्यकालाच्या ३० व्या वर्षी त्यास झालेला कुणाल नामक पुत्र कुलक्षणी निपजण्याचे जातक ज्योतिषांनी वर्तविले. त्यामुळे राजाने त्याचा त्याग केला. वैश्रवण बोधिसत्त्वाने भूमीमधून स्तन उत्पन्न करून पालनपोषण केलेला हा पुत्र आणि त्याने स्थापिलेला देश ' कुस्तन ' नावाने सुविख्यात झाले.

वॉटर्स यांच्या मते उपरोक्त आख्यायिका कल्पनारम्य असून, ' गोस्थान ' ( धेनुसंघस्थान ) नामक बौद्ध मठावरून यास हे नाव मिळाले असावे. ' जेड जातीच्या दगडांचा देश ' अशा अर्थाने यास ' यु ( जेड )–तिएन् ' वैकल्पिक नाव मिळाले.

**स्थापना**— बौद्ध साहित्यमते वैश्रवण बोधिसत्त्वाने चीनसम्राटास दत्तक दिलेला राजकुमार कुस्तन स्वतःच्या एक सहस्र अनुयायांसह या देशातील उथेन नदीतीरवर्ती मेस्कर गावी आला असता त्यास अशोकाचा यश नामक हद्दपार मंत्री येऊन मिळाला. त्या उभयतांच्या चिनी आणि भारतीय अनुयायांच्या संमिश्रणाने या देशाची स्थापना झाली.

ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते कुणालास नेत्रविहीन बनविणाऱ्या तक्षशिलेच्या दगाबाज अधिकाऱ्यांना अशोकाने कुस्तन देशाच्या पश्चिमेकडील जंगलात हद्दपार केले. उत्तरकालात चिनी राजपुत्र कुणालाने या लोकांचा पराजय करून नवी वसाहत, तसेच पाशुपत तीर्थिकमार्गदर्शित स्थानी स्वराजधानी स्थापिली. कालांतराने वैश्रवण देवाच्या

भालप्रदेशोत्पन्न कुस्तन नामक पुत्रास त्याने दत्तक घेतल्याने हा देश 'कुस्तन' नावाने प्रसिद्ध झाला.

**फाहियेन्‌च्या प्रवासवर्णनात**— या ग्रंथमते या देशातील चार बौद्ध विहारांपैकी सर्वाधिक विशाल 'गोमती विहारा'त तीन हजार भिक्षू होते. हे भिक्षू, तसेच येथील राजाराणी प्रतिवार्षिक चतुर्दश दिनात्मक रथमहोत्सव साजरा करीत असत. येथील अन्य एका विहाराच्या (उंची–२५०') भिंतीवर सुंदर शिल्प आणि भित्तिचित्रे असून, त्याचे छत रौप्य आणि सुवर्णमय, आणि सभागृहातील स्तंभ, तुळया दरवाजे व खिडक्या सुवर्णपल्लवाच्छादित होत्या. त्याचे बांधकाम सतत ८० वर्षेपर्यंत चालू असून, त्यामधील भिक्षुगृहे अद्वितीय होती.

**ह्युएन्‌त्संगच्या प्रवासवर्णनात**— या ग्रंथमते चकुक देशापासून १६० मैल पूर्वेकडील या देशाचा (व्याप्ती ८०० मैल) निम्याहून अधिक भाग रेताड पर्वतव्याप्त असून, येथील फारच थोड्या शेतजमिनीत फळे आणि धान्य पिकत असे. येथील हवा सौम्य असून, लोकरीचे रग, मखमल, तलम रेशमी कापड, तसेच पांढऱ्या आणि काळ्या 'जेड' दगडांसाठी हा प्रसिद्ध होता. वाळूची आणि मातीची वादळे येथे सदैव होत असत.

**लोक**—ह्युएन्‌त्संगच्या मते येथील लोक सौम्यप्रकृती, हस्तकलानिपुण आणि संगीतनृत्यप्रेमी असून, त्यांचे राहणीमान उच्च आणि रोजगार विपुल होता. रेशमी आणि अर्धरेशमी कपडे ते वापरीत असून, लोकरीचे अथवा कातड्याचे कपडे येथे कमी लोकप्रिय होते. येथील लिपी भारतासदृश, परंतु बोलीभाषा सर्वस्वी स्वतंत्र होती.

**बौद्ध धर्मप्रसार**—या बहुंशी बौद्धधर्मीय देशात १०० बौद्ध मठ आणि ५,००० महायान भिक्षू असून, येथील बौद्ध राजा 'वैश्रवण देवाचा उपासक' उपाधीने प्रसिद्ध होता.

**राजधानी**—याची राजधानी आधु. खोतान नगराच्या पश्चिमेकडील 'कुस्तनक' (चिनी–योत्कन) गावी होती.

**बौद्ध स्थाने**—ह्युएन्‌त्संगच्या मते येथे निम्नलिखित बौद्ध स्थाने होती:—

(१) **वैरोचन बौद्ध मठ**— राजधानीपासून २ मैल दक्षिणेकडील वैरोचन नामक आद्य धर्मप्रसारकाच्या या स्मृतिमठात शोभिवंत बुद्धप्रतिमा होती. स्थानिक आख्यायिकामते कश्मीरनिवासी वैरोचनाने येथील राजास येथे बौद्धधर्मीय बनविले.

(२) **गोशृंग पर्वत**–राजधानीपासून ४ मैल नैर्ऋत्येकडील या (गोशृंग = तिबेटी – 'गोशीर्ष') द्विशिखरयुक्त पर्वताच्या उभ्या कड्यानजिकच्या बौद्ध मठात गौतम बुद्धाची दैदीप्यमान मूर्ती होती. ह्युएन्‌त्संगच्या मते बुद्ध स्वतः या स्थानी आला होता. परंतु अन्यत्र तसा निर्देश आढळत नाही.

(३) **भाग्यनगर**—राजधानीपासून ६० मैल पश्चिमेकडील या गावची (पो–क–इ = भाग्यनगर) गौतम बुद्धाची विशाल प्रतिमा (उंची–७') दैवी चमत्काराने कश्मीरातून येथे आली होती.

(४) **समज्ञा बौद्ध मठ**—राजधानीपासून १⅞ मैल पश्चिमेकडील या बौद्ध मठास अशोककालीन यशस् अमात्याच्या नावावरून हे (= यश) नाव मिळाले.

(५) **लु-शे बौद्ध मठ**—चिनी राजकन्या व खोतानसम्राज्ञी 'लु-शे' प्रेषित रेशमाच्या किड्याचा हा स्मृतिमठ राजधानीच्या आग्नेयेस होता.

(६) **कर्कश नदी**—राजधानीपासून २० मैल अग्नेयेकडील या वायव्यगामी नदीचे कालवे कृषिकार्यार्थ उपयोगात आणले जात असत.

(७) **तक्षशिला–चीन युद्धस्थान आणि भीमानगर**—राजधानीपासून ६० मैल पूर्वेकडील या दलदलीच्या स्थानी तक्षशिला आणि चिनी सैन्याचे युद्धस्थान, आणि त्यापासून ६ मैल पूर्वेस भीमानगर नामक नगर होते (भीमानगर पहा).

(८) **नियनगर**—हे या देशाच्या पूर्व सरहद्दीवर होते (नियनगर पहा).

**वाळवंट**—नियनगरच्या पूर्वेकडील ८० मैलांच्या सरकत्या वाळूच्या वाळवंटातून गेल्यानंतर ह्युएन्‌त्संग 'लघु-तुखार' देशास पोहोचला. ह्युएन्‌त्संग, फाहियेन, तसेच मार्को पोलोच्या प्रवासवर्णनमते या भयानक वाळवंटातील सरकती वाळू वाऱ्याच्या दरेक झुळुकीने नवा आकार घेत असे. प्रवाशांची पदचिन्हे लगोलग नष्ट होत असल्याने रस्ता चुकण्याची येथे सदैव भीती असे. जलाशय अथवा वृक्षांच्या अभावी मृत व्यक्तींचे अस्थिपंजर येथे मैलाचे दगड म्हणून वापरले जात असत. येथे सदैव घोंघावणाऱ्या अतिवेगवान ऊष्ण वाऱ्यांमधून कर्णकटु गायनाचे, रोदनाचे अथवा शिट्ट्यांचे आवाज एकसारखे निघत असत. त्या आवाजांनी, तसेच येथील आक्षितिज वालुकासमुद्राने प्रवाशांचे चित्त सैरभैर होऊन त्यामध्येच अनेकजण मृत होत असत (वॉटर्स, २.२९५–३०४).

**शिलालेख साहित्यात**—मध्य आशियान्तर्गत इराणी

आणि भारतीय शिलालेखमते येथे विषवाहन ( इ. स. ८ वे शतक ) नामक राजा राज्य करीत असे ( क्लासिकल एज्. पृ. ६१७-६१८ ).

**कुह** ( देश )—जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक देश ( वराह. ८३.२ ).

२. ब्रह्माण्डमते मेरु पर्वतोद्भवा सप्तगंगांपैकी पश्चिमवाहिनी सिंधु नदीमार्गावरील एक देश ( ब्रह्माण्ड. १८. ४७ ).

**कुहु** ( देश )—मत्स्यमते वायव्य भारतान्तर्गत गंधार आणि उरशानजिकचे सिंधु नदीजलसिंचित एक जनपद ( मत्स्य. १२१..४६–४७ ). येथील लोक ' कुहक ' ( मार्क. ५४. ४१; ५७.३५; ब्रह्म. २७.४४ ), अथवा ' आहुक ' ( ब्रह्माण्ड. ४९.४९; वायु. ४५.११५ ) नावांनी प्रसिद्ध होते. पश्चिमेस सिंधु नदी आणि पूर्वेस हजारा जिल्ह्याच्या दरम्यानचा आधु. कोहिस्तान देश हाच होय.

**कुहुण्डि विषय** ( देशविभाग )—यादव शिलालेखमते कर्नाटकातील ' कुंडि ३००० ' देशविभागाचे नामांतर ( कुंडि ३००० पहा ).

**कुहू** ( नदी )—पौराणिक साहित्यमते वायव्य भारतातील ' कुभा ' ( आधु. काबूल ) नदीचे नामांतर ( कूर्म. पूर्व. ४७.२९; ब्रह्म. २७.२६; ब्रह्माण्ड १६.२५; मत्स्य. ११४.२१; मार्क. ५४.१७; वराह. ८५.४; वामन. १३.२१; ५७.८०; वायु. ४५.९५; काव्यमी. १७.२२७; कुभा पहा ).

२. शाक द्वीपातील एक नदी ( मत्स्य. १२२.३३ ).

३. शाल्मलि द्वीपातील एक नदी ( भा. ५.२०.१० ).

**कूचवार** ( देश )—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते वायव्य भारतातील एक देश ( पा. सू. ४.३.९४ ). अग्रवाल यांच्या मते मध्य आशियान्तर्गत चिनी तुर्कस्तानातील उत्तर तारीम खोऱ्यातील आधु. कूचा ( चिनी– ' कूची ' ) देश हाच होय. कंबोज ( आधु. पामीर पठार ) देशाच्या पूर्ववर्ती तारीम नदीकाठच्या या देशातून चीन–युरोप देशांच्या दरम्यानचा रेशमाचा व्यापारी हमरस्ता जात असून, चिनी व्यापारी तुर्फान → कूचा → काशगर → कंबोज → बाह्लीक ( आधु. बल्ख ) मार्गे भारतवर्षास येत असत.

सांकृत्यायन यांच्या मते मध्य आशियातील कुशाण लोकांचे हे वसतिस्थान असून, सूत्रालंकाराच्या चिनी अनुवादमते कुशाणसम्राट कनिष्क कुशज्ञातीय होता. उज्बेकिस्तानातील झरफ्शान् प्रदेशात आजहि ' कोशानिया ' लोक असून, त्यावरून बृहत्संहितेतील शक, पह्लव, शूलिक, चीन लोकांचे सहवर्ती कुशिक लोक, तसेच पौराणिक साहित्यातील शक द्वीपानजिकचे कुश द्वीप संभवतः हेच असावे ( बौद्ध संस्कृति. पृ. २४४–२५० ). परंतु तत्संबंधी निर्णायक पुरावा मिळत नाही ( कुशद्वीप; कुशाण पहा ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :–

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. बृहत्संहिता ( १४.३० ) | कुचिक |
| २. वायु पुराण ( ४४.१० ) | कुच |
| ३. ह्युएन्त्संगचे प्रवासवर्णन | कु-चिह ( कूच ) |
| ४. संस्कृत शिलालेख साहित्य (आय. एच क्यू. २९.३१) | कूच |
| ५. चिनी साहित्य | कूची |
| ६. संस्कृत–चिनी कोश साहित्य | कूचिन् |
| ७. मध्ययुगीन शब्दकोश ३७ साहित्य ( वैजयन्ती ३७ ) | कुज |

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**—' अशोकावदाना 'च्या चिनी अनुवादमते सम्राट अशोकाने स्वसाम्राज्यातील हा देश कुणाल नामक पुत्रास देण्याचे ठरविले होते. उत्तरकालात ( स. ४३५ ) हा चिनी साम्राज्यात समाविष्ट होऊन नजिकचा सैरम् आदि प्रदेशहि त्यामध्ये अंतर्भूत झाला.

चिनी हान घराण्याच्या इतिहासमते ( इ. स. पू. १४०–८७ ) या देशाच्या ८१००० लोकसंख्येपैकी २१००० लोक सैनिकी पेशाचे होते. इ. स. पू. ४६ मध्ये चीन सम्राटाने हा जिंकून, चो-लो नामक स्वपुत्रास येथील राजा बनविले. कालांतराने चिनी हूणवंशीय चेंग-तोन हा येथील राजा बनला. उत्तरकालात चिनी लोकांनी या राजाच्या पो नामक पुत्रास येथील राजा बनविले. तेव्हापासून येथे पो राजवंशाचे राज्य सुरू झाले. तत्कालीन शिलालेख साहित्यमते हे राजे स्वतःस ' कूचीश्वर ' ' कूचिमहाराजा ', ' कौचेयनरेंद्र ' म्हणवीत असत.

इ. स. ३ ऱ्या शतकात येथे बौद्ध धर्माचा प्रथमप्रवेश होऊन,अनेक बौद्ध मंदिरे आणि विहारांची येथे रचना झाली. इ. स. ४ थ्या–५ व्या शतकात चीनने यावर पुनःपुन्हा आक्रमण करूनहि हा स्वतंत्रच राहिला. स. ६२७ च्या

तुर्की आक्रमणानंतर हा त्याचा मांडलिक बनला. इ. स. ९ व्या शतकातील इस्लामी आक्रमणामुळे येथील बौद्ध संस्कृती नामशेष झाली. येथील उत्खननात सापडलेली बौद्ध भिक्षूंची छिन्नविच्छिन्न प्रेते, चिरलेली मस्तके, तसेच उद्ध्वस्त इमारती याच काळातील असाव्यात.

**लोकवर्णन**—मध्य आशियातील उत्खननात उलट कॉलरयुक्त लांब डगलेधारी, भुरे केस आणि नीलनेत्रयुक्त कूचा स्त्री-पुरुषांची अनेक भित्तिचित्रे सापडली असून, त्यांच्या अंगरख्यांच्या किनारींना कापडी पर्णपुष्पांचे गोंडे आहेत.

**पाणिनीच्या अष्टाध्यायीत**—या ग्रंथमते या देशातील (कूचवार; पा. सू. ४.३.९४) लोकरी कापड 'कौचप' (कोजव) नावाने प्रसिद्ध होते (अग्रवाल, पाणिनि. पृ. ८५).

**पौराणिक साहित्यात**—बृहत्संहितामते हा (कुचिक) कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या ईशान्य भागात असून (बृ. सं. १४.३०), वायुमते हा (कुच) जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षात होता (वायु. ४४.१०). प्राचीन संस्कृत साहित्यात आणि शिलालेखातहि याचा (कूच) निर्देश आढळतो (आय्. एच्. क्यू. २९.३१).

**फाहियेनूच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते येथे चार हजार हीनयान बौद्ध भिक्षू असून, येथील लोकांमध्ये परस्पर सहकार्य, आणि आतिथ्यशीलतेचा अभाव होता. स्वतःस ज्ञा नामक ब्राह्मणाचे शिष्य म्हणविणारे येथील लोक बासरीवादनात कुशल होते. येथील एकपाठी संगीतकारांना चिनी राजदरबारात फार मान असे.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—'कौ-चँग्' (आधु. तुर्फान्) आणि अग्नि (आधु. काराशहर) देशमार्गे ह्युएन्त्संग येथे आला. 'अग्नि' राजधानी कारा शहरहून खेदु नदीमार्गे ४० मैल नैर्ऋत्येस गेल्यानंतर लागणारी पर्वतराजी (आधु. कुरुघ्तव्) ओलांडून आणि १४० मैल पश्चिमेस जाऊन तो येथे पोहोचला.

**राजधानी**— ह्युएन्त्संगच्या मते या देशाची येन गावची पूर्वकालीन (इ. स. १ ले शतक) राजधानी त्याचे काळी 'कु-चिह' (व्याप्ती-४ मैल; आधु. कूचा) गावी स्थलांतरित झाली होती. 'छोटे राजगृह' वैकल्पिक नावाने सुविख्यात असणाऱ्या त्या गावी 'नवसंघाराम' नामक बौद्ध विद्यापीठ होते.

ह्युएन्त्संगच्या मते या देशात (व्याप्ती- २००×१२० मैल) तांदूळ, मका आदि धान्ये, तसेच द्राक्षे, पीच, ऑल्मंड, पीअर आदि फळे पिकत असत. सोने, तांबे, लोखंड, शिसे, जस्त आदींच्या अनेक खाणीहि येथे होत्या. येथील हवा समशीतोष्ण आणि लोक प्रामाणिक होते. येथील लिपी भारतासदृश, परंतु काहीशी वेगळी होती. येथील तंतुवाद्य-प्रवीण लोकांचे केस आखूड कापलेले असत. ते लोकरी कपडे, तसेच पागोट्याच्या आकाराचे शिरोभूषण घालीत असत. येथे सोने, चांदी आणि तांब्याची नाणी प्रचारात असून, नवजात बालकांच्या मस्तकांचा पार्श्वभाग येथे लाकडी फळीने चपटा करीत असत. प्रधानाच्या तंत्राने वागणाऱ्या येथील 'कु-चिह' वंशीय मंदबुद्धी राजाने स. ६४८ मध्ये तुर्कांशी सख्य जोडण्याचा प्रयत्न करताच चिनी राजांनी त्यास कैद केले.

**बौद्ध मठ**—ह्युएन्त्संगच्या काळी येथे १०० बौद्ध संघाराम आणि ५००० हीनयान सर्वास्तिवादिन् बौद्ध भिक्षू असून, भारतीय भाषांतूनच ते 'सूत्र', 'विनय' आदींचे शिक्षण घेत असत. अग्निदेशीय भिक्षूंप्रमाणेच मांसाशन करणारे हे भिक्षू अन्य बाबतीत पवित्राचरणी होते. येथे अनेक बौद्ध मूर्ती आणि देवमंदिरे असून, बहुतांशी लोक बौद्धधर्मीय होते. येथील महायानपंथीय असणारा राजा ह्युएन्त्संगच्या काळी हीनयानपंथीय बनला होता.

**जलराक्षस तलाव**—राजधानीच्या उत्तरेस या देशाच्या पूर्व सरहद्दीनजिक एक बौद्ध देवमंदिर आणि जलराक्षस तलाव असून, त्यामधील जलराक्षस स्थानिक अश्विनींपासून बलिष्ठ अश्वांची (मार्कोपोलो- 'तुर्क्मेन् अश्व') निर्मिती करीत असत.

स्थानिक आख्यायिकामते येथील सुवर्णपुष्प नामक पूर्वकालीन राजाने उपरोक्त जलराक्षसांना रथास जोडून अदृश्य होण्याची सिद्धी मिळविली. या राक्षसांच्या साह्याने त्याने याच देशात पुन्हा जन्म घेतला.

**जलराक्षस वंश**—ह्युएन्त्संगच्या मते उपरोक्त मनुष्यरूपधारी जलराक्षसांनी जलाशयागत स्त्रियांशी रत होऊन अश्वसदृश संतती उत्पन्न केली. या बंडखोर संततीचा येथील राजाने तुर्कांच्या साह्याने निःपात करून हे गाव उजाड बनविले. बील यांच्या मते येथील आद्य यू-चि लोकांना तुर्कांनी हद्दपार केल्याचा निर्देश येथे अभिप्रेत असावा.

**चौहुलि बौद्ध मठ**—उपरोक्त उजाड गावाच्या ८ मैल उत्तरेकडील पर्वतउतारावरील 'चौ-हु-लि' (काळ्या-पांढऱ्या रंगाचे) बौद्ध मठद्वयात गौतम बुद्धाच्या मूर्ती, तसेच पूर्वेकडील मठाच्या सभागृहात जेड जातीच्या

दगडाची बुद्धपादुका ( $1\frac{3}{4}' \times 8''$ ) होती. शुभ पर्वकाळी तीमधून तेजस्वी प्रकाश निघत असे.

**बौद्ध परिषद**— राजधानीच्या पश्चिम प्रवेशद्वाराबाहेर बौद्ध धर्मपरिषदप्रसंगी उभारलेल्या दोन बुद्धप्रतिमा ( उंची–९०′ ) होत्या. हेमंतकाली येथे भरणाऱ्या प्रतिवार्षिक बौद्ध भिक्षुपरिषदेस राजापासून रंकापर्यंत सारे जण अनशनावस्थेत हजर रहात असत. गावातील समस्त बौद्ध मठ आपापल्या मौक्तिकालंकारखचित बुद्धप्रतिमा तेथे आणीत असत.

**आश्चर्यमठ**—उपरोक्त परिषदस्थानाच्या वायव्येकडील नदीच्या दुसऱ्या किनाऱ्यावरील विस्तीर्ण सभामंडपयुक्त 'आश्चर्य बौद्ध मठा'त देशोदेशीचे विद्यार्थी अध्ययनार्थ येत असत. स्थानिक राजाने आपल्या सर्वसंगपरित्यागी बंधूच्या स्मृत्यर्थ बांधलेल्या या विद्वान बौद्ध भिक्षुयुक्त मठाचा मोक्षगुप्त नामक विनयपिटकाचार्य प्रमुख होता. स. ५८५ मध्ये धर्मगुप्त नामक आचार्य येथे अध्ययनार्थ आला होता. नामांतर ( बौद्ध साहित्य )–' राजविहार ' ( बील, १.८८–९२ ).

या ( कूचा ) गावच्या पश्चिमेकडील तिएन्-शन् पर्वतराजीचा इस्सिककुल सरोवरानजिकचा हिममय भाग शिशिरकाली वाहतुकीस बंद होत असे. हा मार्ग सुरू होण्यासाठी दोन महिने तेथे थांबून, आणि नंतर १२ दिवस नैर्ऋत्येप्रत जाऊन ह्युएन्त्संग ' पोह–लु–क ' ( आधु. अक्ष ) देशास पोहोचला.

**भित्तिचित्रे**—येथील तिएन्-शन् पर्वताच्या दक्षिण उतारावरील गुफांमध्ये गुप्त शैलीची भित्तिचित्रे, संस्कृत हस्तलेख, तसेच कश्मीर शैलीची काही गंधार शिल्पे सापडली आहेत ( गोएट्झ, पृ. ११० ).

**हस्तलिखिते**— ' बावर ' हस्तलिखित संग्रहान्तर्गत कूचादेशीय सात विभागांपैकी तीन वैद्यक शास्त्रासंबंधीचे असून, त्यांची लिपी गुप्त धाटणीची, आणि भाषा प्राकृत-संस्कृत संमिश्र आहे.

**कूट** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.१७ ).

**कूटक** ( पर्वत )—भागवतमते भारतवर्षातील ' कूटशैल ' पर्वताचे नामांतर ( भा. ५.१९.१६; कूटशैल पहा ).

**कूटकम्बलमौषीय** ( देश )—जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक देश ( वायु. ४४.१० ). अली यांच्या मते मध्य अशियातील आधु. कल-खंभ प्रदेश हाच असावा.

**कूटवास** ( देश )—जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक देश ( वराह. ८३.२ ).

**कूटशैल** ( पर्वत )—पौराणिक साहित्यमते भारतवर्षातील एक पर्वत ( ब्रह्माण्ड. १६.२३; मार्क. ५४.१४; वायु. ४५.९२ ). नामांतर–' कूटक ' ( भा. ५.१९.१६ ). काही अभ्यासकांच्या मते हे ' कुटकीचल ' पर्वताचे नामांतर असावे ( कुटकीचल पहा ).

**कूटागार साला** ( बौद्ध मठ )—बौद्ध साहित्यमते वैशाली जनपदान्तर्गत महावनातील सुविख्यात बौद्ध वास्तव्य आणि प्रवचनपुनीत एक बौद्ध मठ ( शब्दशः अर्थ-कळसयुक्त इमारत ). महावग्गमते याच्या सुवर्णकळसामुळे यास हे नाव मिळाले असून ( महावग्ग. ८.१.१.१ ), बुद्धघोषमते येथील देवविमानाकृती अनेक मजली संघारामामुळे यास हे नाव मिळाले होते ( दीघ. अट्ठ. १.३.९ ).

**बौद्ध साहित्यात**—या साहित्यमते ' मर्कटह्रद ' जलाशयाकाठच्या या पूर्वाभिमुख बौद्ध मठाची ( दिव्यावदान. पृ. १३६; महावस्तु. १.३०० ) मुख्य इमारत उत्तर-दक्षिण दिशावर्ती होती ( दीघ. अट्ठ. १.३११ ). याच्या बाहेरील वृक्षाखाली गौतम बुद्ध दुपारची विश्रांती घेत असून, तत्समयी भोजनप्रेषक भिक्षूखेरीज अन्य कोणासहि तो भेटत नसे ( दीघ. १.१५१; अङ्गुत्तर. ३.७५ ).

**फाहिॆनच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते या दुमजली संघारामाच्या स्तंभयुक्त तळमजल्यात प्रार्थनामंदिर, आणि दुसऱ्या मजल्यावर गौतम बुद्धाची बसण्याउठण्याची शिखरयुक्त ( कूट ) ' गंधकुटी ' होती. संघारामाच्या दोन मजल्यांवर दोन सज्जे होते ( बील, १.५२ ).

**अन्य स्थाने**—या नजिकच्या ' सारंदद चेतिय ' आणि ' चापाल चेतिय ' चैत्यगृहांप्रत ( अङ्गुत्तर. ३.१६७; संयुत्त. ५.२५८ ), तसेच ' गिलान साला ' ( ग्लान-शाला ) नामक रुग्णालयात गौतम बुद्ध अधूनमधून जात असे ( अङ्गुत्तर. ३. १४२; संयुत्त. ४.२१० ). तत्रस्थ एका बौद्ध भिक्षूला मृत्यूस धीरोदात्तपणे सामोरे जाण्याचा उपदेश त्याने केला होता ( संयुत्त. ४.२१० ).

**कूडल** ( नदी )— चोल राजा वीर राजेंद्रच्या स. १०६४ च्या तिरुवेंगाडु शिलालेखमते दक्षिण भारतातील एक नदी. हिच्या काठच्या ' कूडलसंगमम् ' नामक स्थानाचा निर्देश तेथे आढळतो. फ्लीट यांच्या मते आधु. कृष्णा नदी हीच असून, बेळगाव जिल्ह्यातील खिद्रापुर गावानजिक कूडलसंगमम् गाव असावे ( एपि. इंडि. १२. २९६; कूडलसंगमम् पहा ).

२. पांड्यराजधानी ' मदुरा ' नगरीचे नामांतर ( इंडि.

अँटि. ८.१९८; २७३; मदुरा पहा).

**कूडलदाम्वाळ** (नगर)—यादव शिलालेखमते महाराष्ट्रातील 'कूडलदामवाड' नगराचे नामांतर (जे. बी. बी. आर. ए. एस्. १२.७; कूडलदामवाड पहा).

**कूडलसङ्गमम्** (ग्राम)—चोल राजा वीर राजेंद्रच्या स. १०६४ च्या तिरुवेंगाडु, तसेच १०६६ च्या करुवूर शिलालेखमते सोमेश्वर (प्रथम) चालुक्य राजाशी त्याने यशस्वीपणे युद्ध केलेले दक्षिण भारतातील एक ग्राम. विक्रमादित्य (षष्ठ) आणि जयसिंह (चतुर्थ) या चालुक्य राजकुमारांना गंगवाडि (आधु. पश्चिम आणि वायव्य म्हैसूर) देशातून हद्दपार केल्यानंतर तुंगभद्रा नदीच्या उत्तरवर्ती या गावी पश्चिम चालुक्य आणि चोल सैन्याचे घनघोर युद्ध झाले (साऊथ इंडि. इन्स्क्रि. ३.३६; एपि. कर्ना. ९.८५).

**आधुनिक स्थान**—याच्या भौगोलिक स्थानाविषयी अभ्यासकांत निम्नलिखित मतांतरे आढळतात :—

१. **बेळगाव जिल्ह्यातील आधु. खिद्रापुर**—फ्लीट यांच्या मते 'कूडल' हे 'कृष्णा' नदीचे नामांतर असून, बेळगाव जिल्ह्यातील खिद्रापुरनजिकच्या कृष्णा नदीच्या संगमस्थान-द्वयापैकी एकाचा निर्देश येथे अभिप्रेत आहे (अन्य संगम-स्थान-'कोप्पम्').

२. **तुंगा आणि भद्रा नदीसंगम**—अन्य अभ्यासकांच्या मते तुंगभद्रा नद्यांच्या संगमस्थानी हे असून, वीर राजेंद्राच्या करुवूर शिलालेखमते तुंगभद्रा नदी ओलांडण्या-पूर्वी कूडलसंगमम् येथील लढाई झाली होती.

३. **कृष्णा-तुंगभद्रा संगम**—कृष्णस्वामी अय्यंगार यांच्या मते कर्नूल जिल्ह्यातील कृष्णा-तुंगभद्रा नद्यांचे संगम-स्थान हेच असावे (एन्शन्ट इंडिया. पृ. १२१).

**कूणाल** (देश)—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते भारतवर्षान्तर्गत 'कुणाल' देशाचे नामांतर (उणादि. ४९.१०; कुणाल पहा).

**कूण्डि** (देश)—जैन शिलालेख साहित्यमते दक्षिण महाराष्ट्रातील 'कुंडि' देशाचे नामांतर (इंडि. अँटि. १४.१६; कुंडि पहा).

**कूप** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू. ४.२.८०.४; ७).

**कूपतीर्थ** (तीर्थ)—महाभारत पुलस्त्ययात्रा, तसेच पद्ममते एक तीर्थ (म. आर. ८२.१०८; १३४; ८३. ६०; पद्म. आदि. २७.६३; ३९.५९).

२. कुरुक्षेत्रातील एक तीर्थ (म. आर. ८१.६३; १५३).

३. प्रयागातील गंगा नदीच्या पूर्व किनाऱ्यावरील एक तीर्थ (मत्स्य. १०६.३०). शब्दशः अर्थ-'पायऱ्या नसलेली विहीर'.

४. सरस्वती नदीकाठचे एक तीर्थ (म. श. ३५.३; ६; २४).

५. महीसागर संगमक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ (स्कन्द. माहेश्वर. कौ. ३५.१२).

**कूपा** (नदी)—वायुमते शुक्तिमत् पर्वतोद्भवा 'कुशा' नदीचे नामांतर (वायु. ४५.१०७; कुशा पहा).

२. (नदी) मत्स्यमते शुक्तिमत् पर्वतोद्भवा 'कृपा' नदीचे नामातर (मत्स्य. ११४.३२; कृपा पहा).

**कूयु** (नगर)—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते मध्य आशियातील हिरव्या वनराजीचे एक नगर (व्याप्ती–१$\frac{1}{4}$ मैल). त्याने निर्देशिलेले या नगराचे 'कुग–यु' नाव तुर्की 'कूयु शहर' (वसंत ऋतूचे गाव) चे चिनी रूप असावे. पै–शुइ–चेंग् (चिम्कंदपासून १५ मैल ईशान्ये-कडील आधु. मन्कन्त) गावाच्या ४० मैल नैर्ऋत्येस प्रवास करून तो या गावी पोहोचला (वॉटर्स, १.८४).

**कूर्ग** (देश)—चोल राजा राजराज (प्रथम) च्या स. ९९८ च्या मेल्पाडि शिलालेखमते त्याने जिंकलेला दक्षिण भारतातील एक देश (साऊथ इंडि. इन्स्क्रि. ३. २९). चोल राजा कुलोत्तुंग (प्रथम) च्या स. १०८३ च्या तिरुक्कलुकुन्रम् शिलालेखातहि याचा निर्देश आढळतो (साऊथ इंडि. इन्स्क्रि. २.२३०; इंडि. अँटि. स. १८९२, पृ. २८१). म्हैसूर प्रांतातील आधु. कूर्ग प्रदेश हाच होय.

**राजकीय इतिहास**—इ. स. ११–१७ व्या शतकात येथे कोंगाल्व आणि चंगाल्व नामक होयसाळ–विजयनगर मांडलिक राजवंशाचे राज्य असून, त्यानंतर (स. १६८७–१८३७) येथे बेडनूराधिपती मुत्तुराज राजवंशाचे राज्य आले. स. १७३४ मध्ये ब्रिटिशांनी हा देश जिंकला (सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३४३).

**शिलालेख**—गंग राजा अविनीतचा स. ४६६ चा मर्कर ताम्रपट (एपि. कर्ना. १.१), तसेच पश्चिम गंग राजा राचमल्ल (द्वितीय) चा स. ८८८ चा कूर्ग शिलालेख (एपि. कर्ना. १.२) येथे सापडले आहेत.

**कूर्म** (पर्वत)—दक्षिण भारतातील 'श्रीकूर्मम्' पर्वताचे नामांतर (श्रीकूर्मम् पहा).

**कूर्मचक्रात्मक भारतवर्ष** (देशसमूह)—मार्कंडेय पुराण कूर्मविभागात वर्णिलेले भारतवर्षाच्या नऊ उप-

विभागांचे सामूहिक नाव. या ग्रंथमते भारतवर्षाचे आकृतिमान पूर्व भारताप्रत मुख आणि अपरांत ( पश्चिम भारत ) देशाप्रत पुच्छ केलेल्या कूर्मासदृश ( कासव ) असून, त्याच्या नऊ विभिन्न अवयवांनुसार भारताचे नऊ उपविभाग तेथे कल्पिले आहेत. कूर्मचक्रात्मक भारतवर्षाचे हे नऊ उपविभाग आणि त्यांच्या पौराणिक स्थानांची माहिती निम्नलिखित परिपत्रकात असून, त्यामधील अंगभूत देशविभागांची सविस्तर माहिती आम्ही त्या त्या दिशावाचक उपविभागात दिली आहे :—

| कूर्मविभाग | पौराणिक देशविभाग |
|---|---|
| १. कूर्म मध्य | मध्यदेश |
| २. कूर्म दक्षिणकुक्षी | दक्षिणापथ |
| ३. कूर्म परदक्षिणपाद | नैर्ऋत |
| ४. कूर्मपुच्छ | अपरांत |
| ५. कूर्म वामपाद | वायव |
| ६. कूर्म वामकुक्षी | उदीच्य |
| ७. कूर्म पूर्वउत्तरपाद | ऐशान |
| ८. कूर्ममुख | पूर्व |
| ९. कूर्म पूर्वदक्षिणपाद | आग्नेय |
| | ( मार्क. ५८.६ ) |

**कूर्मतीर्थ** ( तीर्थ )—बदरीनाथ मंदिराच्या परिसरातील एक पर्वतीय तीर्थ ( ती. पृ. ६० ).

**कूर्मप्रस्थ** ( देश )— शक्तिसंगमतंत्रमते हिमालय पर्वतान्तर्गत एक देश. याच्या भौगोलिक परिसीमा पुढीलप्रमाणे होत्या :—१. दक्षिणेस–नेपाळस्थ गोकर्ण; २. **पूर्वेस**–आसामस्थ कामाख्य; ३. उत्तरेस–उत्तर हिमालयस्थ मानस सरोवर; ४. पश्चिमेस–कश्मीरस्थ शारदामठ ( शक्तिसङ्गम. ३.८.१; १२ ).

**कूर्मवन** ( देश )—पौराणिक साहित्यमते उत्तर भारतातील 'कूर्माचल' देशाचे नामांतर ( कूर्माचल पहा ).

**कूर्मवपुर्धर** ( क्षेत्र )—वामनमते एक क्षेत्र ( वामन. ७८.७ ).

**कूर्माचल**(देश)—स्कंदमते उत्तर भारतातील एक देश (स्कन्द. माहेश्वर. के. २७; जे. ए. एस्. बी. १७.५८०). हिमालयान्तर्गत काली-रामगंगा दुआबातील आधु. कुमाऊँ डोंगराळ प्रदेश हाच असून, याच्या पूर्व सरहद्दीवरील रामगंगा नदीने तो गढवाल प्रदेशापासून विभक्त झाला होता. येथील ब्राह्मण आजहि 'कूर्माचली' नावाने सुविख्यात असून, याचे आधु. 'कुमाऊँ' हे 'कुमारवन' चे अपभ्रष्ट रूप असावे. नामांतर–'कूर्मवन'; 'कुमारवन.'

**राजधानी**—यांची प्राचीन राजधानी कूर्माचल ( आधु. चंपौती ) येथे, आणि आधु. राजधानी अल्मोरा येथे आहे.

**तीर्थस्थाने**—येथील प्रमुख तीर्थस्थाने पुढीलप्रमाणे होत:—( १ ) त्रिशूल पर्वत–पश्चिम सरहद्दीवरील त्रिशूलाकृती पर्वत; ( २ ) पूर्णगिरि–अन्नपूर्णा ऊर्फ पूर्णा देवीस्थान; ( ३ ) लोहाघाट–श्रीविष्णूचे कूर्मावतारस्थान ( जे. ए. एस्. बी. १७.५८० ); ( ४ ) द्रोणाचल पर्वत–आधु. दूनगिरि; ( ५ ) गर्ग-आश्रम–आधु. लोध मूनावन; गगस नदीचे उगमस्थान ( डे, पृ. १०९–११० ).

**कूर्मोद्धार** ( तीर्थ )—बदरिकाश्रमान्तर्गत एक तीर्थ ( स्कन्द. बदरी. ८ ).

**कूल** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.१२७ ).

**कूलम्** ( तीर्थ )—वस्सफच्या प्रवासवर्णनमते दक्षिण भारतातील 'कन्यातीर्थ' ( आधु. कन्याकुमारी ) चे नामांतर ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. १६८; कन्यातीर्थ पहा ).

**कूलारणी** ( नदी )—कश्मीरातील वितस्ता ( आधु. झेलम ) नदीची एक उपनदी ( नीलमत. १६०८ ). नीलमतमते 'कूलारणी-वितस्ता संगम' एक महान तीर्थ होते ( नीलमत. १५५७ ).

**कूलावसण** ( ग्राम )—चालुक्य राजा त्रिभुवनपालाच्या वि. सं. १२९० च्या शिलालेखमते उत्तर गुजरातेतील सारस्वत मंडलान्तर्गत विषय पथकातील ( आधु. कडी महाल ) राजपुरी ( आधु. राजपुर ) गावाच्या ईशान्येकडील एक ग्राम ( इंडि. अँटि. ६.२०८-२१० ). कडी महालातील आधु. झुलमन गाव हेच होय ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २५९ ).

**कूलास** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.७५ ).

**कूष्माण्ड** ( ब्रह्मदेवस्थान )—पद्ममते एक ब्रह्मदेवस्थान. येथील ब्रह्मदेवाचे नाव सुरतप्रिय होते ( पद्म. आदि. २९.१५५ ).

**कूष्माण्डेश** ( लिंग )—काशी येथील एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ९७.२०६ ).

**कूष्माण्डेश्वर** ( तीर्थ )—प्रभासक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ (स्कन्द. प्रभास. प्र. ३५.८६–८७). आधुनिक प्रभासक्षेत्रात हे आढळत नाही.

**कृकलास तीर्थ** ( तीर्थ )—द्वारका येथील एक तीर्थ.

नामांतर–' नृगतीर्थ ' ( स्कन्द. प्रभास. द्वा. १०.१; म. अनु. ६.३८; ७०; वा. रा. उ.५३; तीर्थप्रकाश. पृ. ५४३).

**कृतक लोक** ( सृष्टिविभाग )—विष्णुमते प्रलयोत्तर कालोत्पन्न एक सृष्टिविभाग. त्यामध्ये ' भूः ', ' भुवः ' स्वः ' या त्रैलोक्यांचा समावेश होत असे ( विष्णु. २.७.१९ ).

**कृतकृत्या** ( सरोवर )—स्कंदमते वाराणसी येथील ' कापिल ' सरोवराचे नामांतर ( स्कन्द. काशी. ६२.५३-६५; कापिल ३. पहा ).

**कृतपुण्य** ( तीर्थ )—कुरुक्षेत्रातील एक तीर्थ ( वामन. ३६.६४ ).

**कृतमाला** ( नदी )—पौराणिक साहित्यमते दक्षिण भारतातील मलय पर्वतोद्भवा एक पवित्र नदी ( अग्नि. ११८.८; ब्रह्म. १९.१३; २७.३६; ब्रह्माण्ड. १६.३६; ३५.१७; मत्स्य. ११४.३०; मार्क. ५४.२७; वायु. ४५. १०५; विष्णु. २.३.१२; विष्णुधर्म. १.१०.४; शिव. उमा. १८.१२ ). मद्रास राज्यातील रामनद जिल्ह्यातील आधु. वैगाइ नदी हीच असून, पांड्यराजधानी मदुरा ( दक्षिण मथुरा ) हिच्याच काठी आहे ( चैतन्य चरितामृत. ९; रॉयचौधरी, पृ. १०१ ).

**नामांतरे**—पौराणिक साहित्यात हिची निम्नलिखित नामांतरे आढळतातः–( कूर्म. पूर्व ४७.३५ )–'**ऋतुमाला**'; ( वराह. ८५.६ )–' **शतमाला.** '

**पौराणिक साहित्यात**—भागवत पुराण बलराम तीर्थयात्रामते ही पवित्र नदी असून ( भा. १०.७९.१६ ), द्रविड-देशान्तर्गत या नदीकाठच्या औद्भिद पर्वतावर अगस्त्य-आश्रम होता ( भा. ८.२४.१०–१३ ). हिच्या काठच्या आश्रमस्थानी मनूने मत्स्यावतारी श्रीविष्णूचे पालनपोषण केले होते. त्यामुळेच हिच्या, तसेच पयस्विनी नदीकाठचे लोक पुण्यवान वासुदेवभक्त बनले होते ( भा. ८.२४.१२; ११.५.३९ ).

२. वामनमते शुक्तिमत् पर्वतोद्भवा एक नदी ( वामन. १३.३२ ).

**कृतशौच** ( तीर्थ )—कुरुक्षेत्रातील एक तीर्थ ( म. आर. ८१.१७; वायु. ६५.३५; वामन. ३४.३७ ).

२. ( देवीस्थान ) पद्ममते एक देवीस्थान. येथील देवीचे नाव सिंहिका होते ( पद्म. आदि. १७.२०९; मत्स्य. १३.४५ ).

३. ( वामनस्थान ) वामनमते एक वामनस्थान. येथील वामनाचे नाव नृसिंह होते ( वामन. ९०.५ ).

**कृतखुर** ( देश )—जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक देश ( वराह. ८३.२ ).

**कृतस्थला** ( पर्वत )—भारतवर्षातील एक पर्वत ( वराह. ८५.३ ).

**कृतस्मर** ( पर्वत )—भारतवर्षातील एक पर्वत ( मार्क. ५४.१४; वामन. १३.१८ ). स्कंदमते हा प्रभास-क्षेत्री सागरतीरी होता ( स्कन्द. प्रभास. प्र. ३३.६४–९० ). सध्या मात्र तेथे एकहि पर्वत नाही.

**कृतस्मर तीर्थ** ( तीर्थ )—प्रभासक्षेत्रान्तर्गत अर्बुदारण्यातील सरस्वती नदीकाठचे एक तीर्थ ( स्कन्द. प्रभास. प्र. ३५.९०–१०१ ). याचे, तसेच यानजिकच्या कामकुंडाचे माहात्म्यहि तेथे आढळते ( स्कन्द. प्रभास. प्र. १८७; १९९ ).

**कृता** ( नदी )—प्लक्षद्वीपातील एक नदी ( कूर्म. पूर्व. ४९.७ ).

**कृत्तिक-आश्रम** ( आश्रम )—महाभारत अंगिरस्-यात्रामते एक पापविमोचक आश्रमस्थान ( म. अनु. २५.२५ ).

**कृत्तिकातीर्थ** ( तीर्थ )—गोदावरी ( गौतमी ) नदीकाठचे एक तीर्थ ( ब्रह्म. ८२.१ ).

२. महाभारत पुलस्त्ययात्रामते एक तीर्थ ( म. आर. ८२.४६ ).

३. ( विष्णुतीर्थ ) पद्ममते एक विष्णुतीर्थ. येथील विष्णूचे नाव कार्तिक होते ( पद्म. उत्तर. १२९.२५ ).

**कृत्तिवासस्** ( क्षेत्र )—ब्रह्ममते एकाम्रक्षेत्रातील ( आधु. भुवनेश्वर ) कृत्तिवासस् लिंगासभोवतालचे एक क्षेत्र ( व्याप्ती–२ योजने; ब्रह्म. ४१.७३ ).

२. ( लिंग ) स्कंदमते भुवनेश्वर येथील एकाम्रक्षेत्रातून स्थलांतरित झालेले काशी येथील एक महालिंग ( स्कन्द. काशी. ६९.५५; ७३.३२ ). नामांतर–' **कृत्तिवासेश्वर** ' ( कूर्म. पूर्व. ३२.१२; २३; नारद. उत्तर. ४९.६–१०; पद्म. आदि. ३४.१०; स्कन्द. काशी. ३३.१६१; ६८.४८–४९; लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. ४० ).

३. ( शिवस्थान ) अरुणाचल येथील ' कृत्तिवासेश ' शिवलिंगाचे मंदिरस्थान ( स्कन्द. अरुणाचल. २.२ ).

**कृत्या** ( नदी )—महाभारतमते भारतवर्षातील एक नदी ( म. भी. १०.१७ ).

**कृत्याश्रम** (बौद्ध विहार)—राजतरंगिणीमते कश्मीरच्या वितस्ता खोऱ्यातील अशोकपुत्र जलौकनिर्मित एक बौद्ध विहार ( राज. १.१४७ ). बारामूल्यापासून ५ मैल दक्षिणे-

कडील वितस्ता नदीच्या डाव्या किनाऱ्यावरील आधु. कित्सहोम ( अक्षांश ३४°-१०′ उत्तर; रेखांश ७४°-२०′ पूर्व ) गाव हेच होय. या गावाच्या उत्तरेस या विहाराचे ( व्याप्ती-११५′ × ११५′ ), तसेच एका स्तूपाचे ( उंची-१५′ ) अवशेष आढळतात. नामांतर ( औ-काँग्चे प्रवासवर्णन )-' कि-त्वे '; ( चतुर्थ इतिहास )-' कीचाश्रम ' ( चतुर्थ. २३४; ३८४ ).

**नामव्युत्पत्ती**—राजतरंगिणीमते ' कृत्येच्या आदेशावरून बांधलेला विहार ' अशा अर्थाने यास हे ( शब्दशः अर्थ-कृत्येचे निवासस्थान ) नाव मिळाले ( राज. १.१३१-१४७ ). स्टाइन यांच्या मते आधु. ' कित्सहोम ' हे ' कृत्याश्रम 'चेच कश्मीरी रूप असून ( कृत्याश्रम → प्राकृत 'किच्चास्सम' → कीचासम → कित्सहोम ), चतुर्थ इतिहासान्तर्गत ' कीचाश्रम ' हे ' कित्सहोम 'चे पुनःसंस्कृतीकरण आहे.

**औ-काँग्च्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते हा मठ ' कि-त्वे ' टेकडीवर असून, आजहि हे गाव लहानशा पठारावरच आहे.

**चतुर्थ इतिहासात**—या ग्रंथमते हा ( कीचाश्रम ) मठ वराहमूल नगरानजिक होता ( चतुर्थ. २३४; २४०; ३८४; स्टाइन, राज. १.२६; २.४०४ ).

**कृत्रक** ( देश )—मार्कंडेयमते हिमालय पर्वतान्तर्गत एक देश ( मार्कं. ५४.५८ ).

**कृत्वन्** ( देश )—सायणाचार्यांच्या मते ऋग्वेदातील क्रिवि, कुरु व आर्जीक लोकांशी संबंधित एक देश ( ऋ ९.६५.१३ ).

**कृपा** ( नदी )—पौराणिक साहित्यमते मध्यप्रदेशान्तर्गत शुक्तिमत् पर्वतोद्भवा एक नदी ( ब्रह्माण्ड. १६.३८ ). अली यांच्या मते पूर्व भारतातील महानदीच्या सुनी ( सेवनाथ ) नामक उत्तरवर्ती उपनदीची आधु. अर्पा नामक उपनदी हीच होय. या दोन नद्यांचा उत्तर दिशावर्ती संयुक्त प्रवाह महानदीस मिळतो ( अली, पुराणाज्. पृ. ११३ ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात हिची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा ).

**मतांतरे**—ओ मॅली यांच्या मते पूर्व भारतातील द्वारका ( आधु. बाब्ला ) नदीची आधु. कोपा ( साल ) नामक उपनदी हीच असावी ( ओ मॅली, बीरभूम. स. १९१०, पृ. ५ ).

### कृपा नदीची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. मत्स्य पुराण ( ११४.३२ ) | कृपा |
| २. कूर्म पुराण (पूर्व. ४६.३९) | क्षिप्रा |
| ३. अल्बेरुणी ( १.२५७ ) | किर्पा |

**कृपाणी** ( तीर्थ )—नीलमतमते कश्मीरातील मुंडप्रस्थ टेकडीवरील एक तीर्थ (नीलमत. १२५३; १४६०).

**कृमिचण्डेश्वर** ( शिवस्थान )—मत्स्यमते वाराणसी येथील आठ प्रमुख शिवस्थानांपैकी एक ( मत्स्य. १८१. २९ ).

**कृमिजाङ्गल** ( तीर्थ )—अर्बुद पर्वतावरील एक तीर्थ ( स्कन्द. प्रभास. अ. ३१.१७; ४०.७ ).

**कृमिला** (राज्यविभाग आणि नगर)—देवपालदेवाच्या स. ८४३ च्या मोंघीर ताम्रपटमते बिहारमधील गंगा नदीच्या दक्षिणवर्ती श्रीनगर भुक्तीमधील ( आधु. दक्षिण बिहार ) एक राज्यविभाग ( विषय ). मेषिका नामक ग्राम यामध्ये होते ( इंडि. अँटि. २१.२५४; एपि. इंडि. १८. ३०४ ). सरकार यांच्या मते मोंघीर जिल्ह्यातील लखीसराई आणि मनकथ रेल्वेस्थानकांच्या दरम्यानच्या रजौननजिकच्या आधु. वल्गूदर गावाच्या परिसरातील पाटणा आणि मोंघीरच्या दरम्यानचा प्रदेश हाच होय.

**नामव्युत्पत्ती**—पौराणिक साहित्यमते ' कृमि राजाचे नगर ' अशा अर्थाने यास हे नाव प्राप्त झाले.

**बौद्ध साहित्यात**—अंगुत्तर निकायटीकामते हे नगर गंगा नदीकाठी होते ( अङ्गुत्तर. २.६४२ ).

**शिलालेख साहित्यात**—मध्ययुगीन शिलालेख साहित्यमते या (कृमिला विषय) देशविभागाची राजधानी कृमिला येथेच होती ( एपि. इंडि. १८.३०६; २८.१३७-१४५).

**ग्रामे**—शिलालेख साहित्यमते यामध्ये निम्नलिखित ग्रामे होतीः—१. **कवाल** ( नालंदा मुद्रालेख, अर्कि. सर्व्हे. ६६.३४ ); २. **मेषिका** ( देवपाल राजाचा मोंघीर ताम्रपट; एपि. इंडि. १८.३०६ ).

**प्रतिमालेख**—वल्गूदर ( प्राचीन कृमिला ) गावी निम्नलिखित प्रतिमालेख आढळतातः—१. मदनपालाच्या राज्यकालातील शके १०८३ चा प्रतिमालेख ( कृमिला गावी नारायणप्रतिमेची प्रतिष्ठापना ); २. पार्वती-स्कंद प्रतिमालेख ( कृमिला ' अधिष्ठान'स्थानी नृकट्टद्वारा प्रतिष्ठ

पना ); ३. धर्मपालाच्या राज्यकालातील स. ७८० चा मूर्तिलेख (कृमिला अधिष्ठानस्थानी मूर्तिप्रतिष्ठापना (सरकार, भूगोल. पृ. १९५–१९६ ).

**मतांतरे**—विग्रहपाल ( तृतीय ) राजाच्या तीरभुक्ति ( आधु. तिर्हुत ) प्रदेशान्तर्गत नवलगढ मूर्तिलेखातहि या देशविभागाचा निर्देश आढळतो ( जी. डी. कॉलेज बुलेटिन क्र. १ ). त्यावरुन काही अभ्यासकांच्या मते हा तिर्हुत प्रदेशात असावा. परंतु प्राचीन साहित्यात तसा निर्देश कोठेहि आढळत नाही.

पांडे यांच्या मते मोंघीर जिल्ह्यातील किउल गावाच्या परिसरातील हे गाव गंगा नदीच्या बदलत्या प्रवाहात वाहून गेले असावे. आधु. वल्गूदरपासून गंगा नदी दूर असल्याने, तसेच फुटकळ मूर्तिलेखांव्यतिरिक्त अन्य काहीहि अवशेष तेथे आढळत नसल्याने त्याचे प्राचीनत्व संशयास्पद वाटते ( पांडे, विहार. पृ. ११३; १५९ ).

**कृशरासङ्गम** ( तीर्थ )—गौतमी ( गोदावरी ) नदीकाठचे एक तीर्थ ( ब्रह्म. १०५.२४ ).

**कृशाश्व** ( ग्राम )—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.२ ).

**कृष्ण** ( देवतास्थान )—जगन्नाथपुरी येथील एक देवतास्थान ( स्कन्द. जगन्नाथ. १९ ).

२. ( देश ) जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक देश ( वराह. ८३.२ ).

३. ( नदी ) बृहत्संहितामते दक्षिण भारतातील 'कृष्णवेणा' ( आधु. कृष्णा ) नदीचे नामांतर ( बृ. सं. १४.१४; कृष्णवेणा पहा ).

**कृष्णकर्ण** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.७७ ).

**कृष्णकूप** ( कूप )—संभलक्षेत्रान्तर्गत कल्कि विष्णुमंदिरानजिकचा एक पवित्र कूप ( ती. पृ. ९४ ).

**कृष्णगङ्गा** ( नदी )—नारदमते मथुरा येथील 'यमुना' नदीचे नामांतर ( नारद. उत्तर. ७९.५२; यमुना पहा ).

२. शारदामाहात्म्यमते कश्मीरातील 'कृष्णा' ( आधु. किशनगंगा ) नदीचे नामांतर ( कृष्णा पहा ).

**कृष्णगङ्गोद्भव** ( तीर्थ )—मथुरा येथील एक तीर्थ ( वराह. १७६.१० ). याचे माहात्म्यहि तेथे आढळते ( वराह. १७६.४८ ).

**कृष्णगिरि** ( बौद्ध गुफास्थान )—पौराणिक साहित्यमते सह्य पर्वताचा ( = आधु. पश्चिम घाटाचा उत्तर भाग ) एक क्षुद्र पर्वत ( उपपर्वत ). मुंबईपासून २० मैल उत्तरेकडील, ठाण्यापासून ६ मैल वायव्येकडील आणि पश्चिम रेल्वेच्या बोरीवली स्थानकापासून ६ मैलांवरील साष्टी बेटातील आधु. कान्हेरी टेकडी ( समुद्रसपाटीपासून उंची–१५५०′ ) हीच होय. येथील बौद्ध गुफासमूह (गुफासंख्या १२५ ) पुण्यानजिकच्या जुन्नरचा अपवाद वगळता ( गुफासंख्या–१५० ) महाराष्ट्रात सर्वाधिक विशाल आहे.

येथील कलादृष्ट्या वैशिष्ट्यहीन गुफांची रचना ११ शतकांच्या प्रदीर्घ कालावधीमध्ये ( इ. स. पू. १ ले – इ. स. १० वे शतक ) झाल्याने बौद्ध गुफास्थापत्याच्या उत्क्रांतीच्या दृष्टीने त्या महत्त्वपूर्ण मानल्या जातात. येथील मुख्य चैत्यमंदिर सातवाहन स्थापत्यशैलीच्या द्वितीय कालखंडातील ( इ. स. पू. १ ले – इ. स. २ रे शतक ) म्हणजे कार्ले चैत्यमंदिराशी समकालीन असून, इ. स. ११ व्या शतकापर्यंत येथील विहारगुफांचे खोदकाम अखंडपणे चालू होते.

भारतातील बौद्ध शिल्पकलेची जागा हिंदु शिल्पकलेने घेतल्यानंतरहि या एकाकी बेटावरील बौद्ध गुफांचे खोदकाम चालू असून, मंडपेश्वर आणि जोगेश्वर येथील हिंदु गुफांशी समकालीन अनेक बौद्ध विहार येथे आढळतात. त्यामुळेच बौद्ध गुफा-शिल्पकलेचा ११ शतकांचा विस्तृत आलेख येथे आढळतो. सह्य पर्वतावरील सर्वाधिक उत्तरकालीन गुफा येथेच असून, महाराष्ट्रातील अन्य बौद्ध लेणी ओस पडल्यानंतरहि येथील मनुष्यवस्ती टिकून असावी.

**शोध**— मुंबई आणि वसईसारख्या मोठ्या गावांनजिकच्या या गुफा प्राचीन कालापासून प्रसिद्ध असून, इ. स. १६ व्या शतकातील पोर्तुगीज, तसेच १८ व्या शतकातील अन्य प्रवाशांच्या प्रवासवर्णनात त्याचे सविस्तर वर्णन आढळते. स. १७९५ आणि १८५३ मध्ये डॅनियल आणि वेस्टने यांनी या गुफांची अनेक रेखाचित्रे काढली असून, गुफा क्र. १२ तील शिलालेख अनेक वेळा प्रसिद्ध करण्यात आला.

**नामांतरे**— प्राचीन साहित्यात या पर्वताची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा ).

**वाल्मीकि रामायणात**— या ग्रंथमते येथे रंभ नामक वानर यूथपतीचे निवासस्थान होते. ( वा. रा. यु. २६.३० ).

**पौराणिक साहित्यात**—या साहित्यमते हा सह्य पर्वताचा क्षुद्र पर्वत होता ( ब्रह्माण्ड. २.१६.२२; वायु. ४५.४९ ).

**शिलालेख साहित्यात**— कोकण देशाचा महासामंत पुल्लशक्तीच्या स. ८४३ च्या शिलालेखात याचा निर्देश असून (इंडि. अँटि. १३.१५३ ), गौतमीपुत्र शातकर्णीच्या नासिक शिलालेखात ( जे. बी. बी. आर. ए. एस्.

## कृष्णगिरि गुफास्थानाची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. गौतमीपुत्र शातकर्णीचा नासिक प्रशस्तिलेख ( जे. बी. बी. आर. ए. एस्. ५.४१ ) | कण्हगिरि |
| २. यज्ञश्री शातकर्णीच्या राज्यकालातील कान्हेरी शिलालेख क्र. ३९ ( अर्कि. सर्व्हे. वे. इं. ५.७९ ) | कण्हसेल ( कृष्णशैल ) |
| ३. टॉलेमी | कल्गिेरिस |

५.४१), तसेच गौतमीपुत्र यज्ञश्री शातकर्णीकालीन कान्हेरी शिलालेख क्र. ३९ मध्ये यास अनुक्रमे 'कण्हगिरि' आणि 'कण्हसेल' म्हटले आहे ( अर्कि. सर्व्हे. वे. इं. ५.७९ ). त्रैकूटक राजा बुद्धरुचीच्या स. ४९४ च्या कान्हेरी अवशेषगृह ताम्रपटमते त्याने शारद्वतीपुत्र नामक बौद्ध गुरूच्या दंतावशेषावर येथे एक स्तूप बांधला होता ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.३० ).

**टॉलेमीच्या ग्रंथात**— या ग्रंथमते हे स्थान ( कल्गिेरिस ) अक्षांश १८° उत्तर आणि रेखांश ११८° पूर्व येथे असून, मॅक्रिंडल यांच्या मते मुद्गलच्या अर्धा डिग्री दक्षिणेकडील कण्हगिरि टेकडीचाच निर्देश येथे अभिप्रेत आहे.

**फाहियेनच्या प्रवासवर्णनात**— या ग्रंथमते येथे एक पाच मजली विशाल बौद्ध गुफामंदिर होते.

### गुफा

**ऐतिहासिक पार्श्वभूमी** — गौतमीपुत्र शातकर्णीच्या नासिक शिलालेखातील या टेकडीच्या निर्देशांवरून त्या काळी ( इ. स. पू. १०० ) ही पवित्र मानली जात असावी (बॉम्बे गॅझे. १६.६३२ ). सातेरक नामक कर्दमककुलोत्पन्न महाक्षत्रपकन्येच्या अमात्याच्या संस्कृत शिलालेखासमवेतच ( गुफा. क्र. ५ ) सातवाहन सम्राट यज्ञश्री शातकर्णी आणि वासिष्ठीपुत्र पुळुमायीकालीन अनेक शिलालेख येथे आढळतात. यावरून महाक्षत्रप रुद्रदामनापहृत अपरांत देश यज्ञश्री शातकर्णीने पुन्हा जिंकून घेतल्यानंतरच्या काळात येथील बहुसंख्य गुफांची रचना झाली असावी. शूर्पारक स्तूपातील यज्ञश्री शातकर्णीच्या रौप्यमुद्रिकेमुळे या तर्कास पुष्टी मिळते. त्याचे काळी या बौद्ध मठाचे माहात्म्य सर्वाधिक असून, येथील कार्ले चैत्य मंदिरानुसारी हीनयान चैत्यमंदिर, तसेच बहुतांशी सारे विहार याच काळातील आहेत.

राष्ट्रकूटमांडलिक शिलाहार ( पुरी शाखा ) राजांच्या शके ७६५–९३१ च्या दरम्यानच्या गुफालेखमते त्यांनी येथे अनेक गुफा ( इ. स. ८-१० वे शतक ) खोदल्या. समोर आगाशी आणि आत बसण्याउठण्याची खोली अशा धाटणीच्या येथील बहुतांशी गुफा याच काळातील आहेत. रचनावैचित्र्य अथवा शिल्पसौंदर्याच्या अभावामुळे त्या एकसुरी आणि कलाहीन भासतात.

**धार्मिक संक्रमण**—येथील मुख्य चैत्यमंदिर आणि प्रारंभिक विहार हीनयानपंथीय असून, उत्तरकालीन सारे विहार महायानपंथीय आहेत. हीनयान गुफांना महायान बनविण्याचे प्रयत्नहि येथील अनेक गुफांमध्ये आढळतात. येथील नव्या गुफांचे खोदकाम थांबल्यानंतरहि ( इ. स. १० वे शतक ) अनेक शतकेपर्यंत ( इ. स. १२ वे शतक ) येथील बौद्ध वसाहत अस्तित्वात होती. आजहि या स्थानाचे धार्मिक महत्त्व अबाधित असून ( उदा. गुफा क्र. ६६ मधील जपानी यात्रेकरू लेख ), अनेक गोसावी-बैरागी येथे निवास करतात.

**शिल्पचित्रे**—येथील छोट्या खोल्यांतील महायान बौद्ध देवतांची शिल्पे आणि भित्तिचित्रे महायान देवताशास्त्राच्या उत्क्रांतीतिहासाच्या दृष्टीने महत्त्वाची आहेत ( फर्ग्युसन, १.१९९–२०० ).

**गुफालेख**—येथील प्रमुख गुफालेखांची माहिती सोबतच्या परिपत्रकात दिली आहे ( परिपत्रक पहा ).

### चैत्यमंदिर

**चैत्यमंदिर**—सातवाहन सम्राट यज्ञश्री शातकर्णीकालीन ( स. १८० ) दत्तामित्र-यवनाच्या गजवीर, आणि गजसेन नामक वणिक् बंधुनिर्मित हे चैत्यमंदिर ( ८६$\frac{1}{2}$′ × ३९′ ×३८′ ) कार्ले चैत्याच्या अनुकरणाने कोरले आहे ( अर्कि. सर्व्हे. ५.७५–७६ ). परंतु निकृष्ट दगड, नवशिके कारागीर आणि गुफारचयित्या बोधिक स्थापत्यविशारदांच्या अनभिज्ञतेमुळे स्थापत्य आणि शिल्पदृष्ट्या ते निकृष्ट बनले आहे. कार्ल्याची सजीव कला आणि कल्पनासामर्थ्य या दोहोंचाहि येथे अभाव असून, खर्च अंदाजाबाहेर गेल्यामुळे गुफाकर्त्या वणिक्जनांनी तिचे खोदकाम अर्धवट सोडले असावे.

**प्रवेशद्वार**—कार्ले चैत्याप्रमाणेच येथेहि एकाच्या आत एक अशी दोन प्रवेशद्वारे असून, त्यापैकी आतील प्रवेश-

## कृष्णगिरि येथील प्रमुख गुफालेख

| गुफालेख क्र. | विवरण | देणगीदाराचे नाव | देणगी |
|---|---|---|---|
| ३. | गुफालेख | कल्याणनिवासी स्वामिदत्त नामक सुवर्णकार | जलकुंड |
| ४. | चैत्यमंदिरलेख | गौतमीपुत्र शातकर्णीकालीन गजसेन, गजमित्र आदि व्यापारी ( वाणिजक ) | चैत्यमंदिर |
| ५. | ,, | ( गौतमीपुत्रकालीन ) | बौद्ध भिक्षूंना देणग्या |
| १०. | स्तूपलेख | धर्म खजिनदाराची शिवपालिता नामक पत्नी | स्तूप |
| ११. | — | अमात्य सातेरक (वासिष्ठीपुत्र शातकर्णीकालीन) | जलकुंड |
| १३. | जलकुंडलेख | चेमुलनिवासी रोहिणीमित्र खजिनदाराचा पुत्र सुलसदत्त | जलकुंड |
| १५. | गुफालेख | कल्याणनिवासी धर्म नामक व्यापारी | गुफा, जलकुंड, बसण्याची बाके (आसनपेढिका), पायरस्ते(चक्रम) |
| १६. | ,, | अंतर भदंताचा आनंद नामक बंधू | गुफा |
| १७. | ,, | कल्याणनिवासी ऋषिपाल नामक व्यापारी | गुफा आणि जलकुंड |
| १८. | ,, | कल्याणनिवासी एक व्यापारी | गुफा |
| १९. | ,, | विष्णुनंदिपुत्र (माढरिपुत शकसेन राज्यकालीन) | गुफा |
| २२. | ,, | शूर्पारकनिवासी नागपालित नामक रत्नपारखी ( मणिकार ) | गुफा |
| २३. | ,, | घोष्र भिक्षुणीची पोणकियसणा नामक शिष्या | गुफा आणि जलकुंड |
| २४. | ,, | हालक आचार्याचा कृष्ण नामक शिष्य | ,, |
| ३०. | ,, | अपरांत देशवासिनी दामिला | ,, |
| ३५. | ,, | नंदनिका नामक मातेच्या स्मृत्यर्थ | ,, |
| ३७. | ,, | धेनुकाकटनिवासी सर्पा नामक बौद्ध भिक्षुणी | ,, |
| ३८. | ,, | नागमुला नामक महारथिनी ( चुट्ट शातकर्णी राज्यकालीन ) | गुफा |
| ३९. | गुफा क्र. ८१ | कल्याणनिवासी अपरेणु नामक उपासक ( गौतमीपुत्र शातकर्णीकालीन ) | गुफा, मंगलस्थान, ग्रामातील जमीन |
| ४७. | गुफालेख | कल्याणनिवासी नंद लोहार | बौद्ध विहार पथ |
| ४८. | ,, | चेमुलनिवासी धर्म नामक नागरिक | ,, |

( ल्यूडर्स सूची क्र. ९८४–१०३४ )

उपरोक्त शिलालेखांपैकी अमात्य सातेरकाचा शिलालेख क्र. ११ हा संस्कृतभाषीय, आणि अन्य सारे ब्राह्मी शिलालेख प्राकृतभाषीय आहेत.

द्वारात तीन दरवाजे आहेत. मुख्य दरवाजाच्या उभय अंगांच्या आयताकृती भागात गजवीर, गजसेन या दानकर्त्यांच्या आणि त्यांच्या पत्नींच्या शिल्पप्रतिमा असून, त्यांची वेषभूषा आणि शिरोभूषणे कार्ले चैत्यदात्यांसदृश आणि व्यक्तिशिल्प कुडा येथील गुफा क्र. ६, नासिक येथील गुफा क्र. ३ व १३, आणि अजंटा येथील गुफा क्र. १० मधील शिल्प आणि भित्तिचित्रांसदृश आहे. दगडाच्या टणकपणामुळे ही शिल्पे अन्य गुफांच्या तुलनेने अधिक सुस्थितीत आहेत.

उपरोक्त चित्रचौकटींच्या उभय अंगांस प्राणी–शिरोभूषणयुक्त स्तंभसदृश नक्षीकाम असून, अंतर्द्वारानजिकच्या स्तंभावर गुफाकर्त्या गजसेन आणि गजवीराचा शिलालेख आढळतो. मंदिराच्या दर्शनी भागी कार्ले चैत्यासदृश दुमजली घरांची प्रतिकृती असून, महायान भक्तांनी उत्तरकालात

तेथे अनेक बुद्धप्रतिमा कोरल्या आहेत.

**स्तंभ**—मंदिराच्या अंतर्भागातील नक्षीकाम स्तंभ-शिरोभूषणामध्ये ( स्तंभसंख्या–१७ ) असून, बाकी सारा अंतर्भाग अपुऱ्या खोदकामामुळे ओकाबोका, आणि अनलंकृत आहे. दगडी स्तूपहि तेथे खोदलेला नाही. डावीकडच्या ११ स्तंभशिरोभूषणांचे आणि व्यासपीठांचे नक्षीकाम संपूर्णावस्थेत असून, त्यापैकी एकाच्या शिरो–भूषणावर बोधिवृक्षाच्या आणि वज्रासनस्थापित बुद्ध-पादुकांच्या हस्तिद्वयकृत पूजेचे शिल्प असून, अन्य एकावर हत्तीद्वारा बौद्ध स्तूपपूजनाचे अमरावती आणि भर्हुत शैलीचे शिल्प आहे.

कार्ले मंदिरसदृश सालंकृत शातकर्णी शैलीचे उपरोक्त सारे स्तंभ एकमेकांस समांतर नसल्याने बेतोल आणि लयहीन वाटतात. नासिक येथील नहपान आणि गौतमीपुत्र विहारस्तंभांसदृश त्यांची शिरोभूषणेहि कार्ले चैत्यापेक्षा कमी प्रतीची आहेत.

**तक्तपोशी**—या गुफेच्या लाकडी तक्तपोशीच्या खुंट्या केवळ आज शिल्लक असून, तिच्या प्रवेशद्वारानजिकची कार्ले गुफेसदृश लाकडी जाळी आज नष्ट झाली आहे.

**सिंहस्तंभ आणि वेदिका**—या लेण्याच्या बाह्य प्रांगणाच्या कोपऱ्यात कार्ले गुफेसदृश, परंतु शिल्पदृष्ट्या निकृष्ट असे सिंह आणि यक्षप्रतिमायुक्त स्तंभद्वय आहे. प्रांगणाभोवती अमरावती स्तूपाच्या अथवा नासिक येथील गौतमीपुत्र विहारासदृश कमी उंचीची वेदिका ( कठडा ) आहे. प्रतिकूल हवेमुळे तीवरील शिल्प आज नष्ट झाले आहे.

**भित्तिचित्रे**—बर्जेस् यांच्या मते या मंदिराच्या स्तंभ आणि बाह्य मंडपावरील अजंटा गुफांसदृश भित्तिचित्रे आज नष्ट झाली आहेत. काही स्तंभांवर व्यक्तिप्रतिमांचे पुसट ठसे आजहि दिसतात.

**महायान पंथाचे प्राबल्य**—या मंदिराच्या बाह्य प्रवेश-द्वाराच्या दर्शनी भागी इ. स. ५ व्या शतकातील शिलालेख-युक्त महायान स्तूपाची एक प्रतिकृती असून, तीवरून त्याकाळी येथे महायान पंथाचे प्राबल्य असावे.

**उत्तरकालीन बुद्धप्रतिमा**—मंदिर-आवाराच्या डाव्या अंगाच्या एका छोट्या खोलीत धर्मवत्सशिष्य बुद्धरक्षिताने देणगी दिलेली उभी बुद्धमूर्ती ( इ. स. ६ वे शतक ) आहे ( अर्कि. सर्व्हे. ५.७७ ). चैत्यमंदिराच्या प्रवेशमंडपाच्या उभय भिंतींवरील ( उंची–२१′ ), तसेच अंतर्द्वारातील चित्रचौकटीच्या शिरोभागीची ‘ पद्मपाणि ’, ‘ बोधिसत्त्व ’ बुद्धशिल्पेहि याच काळातील असावीत.

## अन्य गुफा

**अन्य गुफा**—येथील अन्य उल्लेखनीय गुफा पुढीलप्रमाणे होत :—

( १ ) **गुफा क्र. १०** ( दरबार गुफा )—उत्तरकालीन बौद्ध विहारशैलीचा हा दुमजली विहार बाघ गुफासमूहा-न्तर्गत ‘ शाले ’ प्रमाणे धर्मशाला अथवा भिक्षु–भोजनगृह म्हणून खोदला असावा. येथील पसरट आकाराच्या सभागृहाच्या मध्यभागी बौद्ध देवतामंदिर असून, त्या-मधूनच हिंदु मंदिराप्रमाणे सभागृहाच्या मध्यवर्ती बौद्ध मंदिरे बांधण्याची पद्धती उत्तरकालात रूढ झाली असावी.

या विहाराच्या अष्टस्तंभाधारित बाह्यमंडपाच्या डाव्या अंगाकडील मुख्य मंदिरात स्त्री-पुरुष अनुचरवेष्टित सिंहासनाधिष्ठित बुद्धमूर्ती आहे. मुख्य सभामंडपातील चौकोनी स्तंभ बत्तीसकोनी ग्रीवायुक्त आहेत.

या गुफेसमोरच्या जलकुंडावर एक प्राकृत शिलालेख, तसेच बाह्यमंडपाच्या दर्शनी पट्टीवर राष्ट्रकूटसम्राट अमोघ-वर्ष–मांडलिक शिलाहार राजा ‘ कपर्दी ’ ( द्वितीय ) कालीन स. ८५३ चा शिलालेख आढळतो.

( २ ) **गुफा क्र. २**—चैत्यमंदिराच्या उजव्या अंगाची ही गुफा पाच गुफांच्या एकत्रीकरणाने सांधली असून, त्यापैकी मधल्या तीन गुफा चैत्यमंदिरे, आणि बाजूच्या दोन विहार आहेत. त्यांपैकी एका विहारात नासिकनिवासी व्यक्तीने ही दान दिल्याचा, तसेच कल्याणनिवासी सुवर्ण-काराने तीस देणगी दिल्याचे देणगीलेख आढळतात. तीमधील स्तूप आज उद्ध्वस्तावस्थेत आहेत.

( ३ ) **गुफा क्र. ४**—चैत्यमंदिराच्या डाव्या अंगाच्या या गुफेत धर्मपाल आचार्यांने तेथे स्तूप स्थापिल्याचा एक गुफालेख ( इ. स. पू. २ रे शतक ), तसेच उत्तरकालीन अनेक बौद्ध शिल्पे आहेत.

( ४ ) **गुफा क्र. ५**—या क्षत्रपकालीन गुफेतील जलकुंडा-वर ‘ महाक्षत्रप ’ अक्षरपंक्तियुक्त एक शिलालेख आढळतो.

( ५ ) **गुफा क्र. ७**—या गुफेतील जलकुंडावर सोपा-रकनिवासी व्यापाऱ्याचा, तसेच चेमुलनिवासी सुवर्णकाराचा दानलेख आढळतो.

( ६ ) **गुफा क्र. ११**—या बाह्यमंडपयुक्त चैत्य-मंदिराच्या अंतर्भागातील स्तूप बाघ येथील स्तूपासदृश आहे.

( ७ ) **गुफा क्र. १२**—गुफा क्र. ३५ शी समकालीन या पुरातन गुफेच्या दर्शनी भागी ‘ वेदिका ’युक्त बाह्य-

मंडप आहे.

( ८ ) गुफा क्र. १४—हिच्या बाह्यमंडपाच्या छतावर बुद्धाचे भूमिस्पर्श मुद्रेतील, आणि सभामंडपाच्या छतावर तांडवनृत्यमग्न शिवाचे चित्र आहे. हिचे स्तंभ दरबार गुफेसदृश असून, तिच्या समोरील मार्ग कल्याणनिवासी व्यक्तीने दान दिल्याचा दानलेख आढळतो.

( ९ ) गुफा क्र. २१—या स्थापत्य आणि शिल्पदृष्ट्या उत्तरकालीन चैत्यगुफेचे दर्शनी स्तंभ घारापुरी अथवा वेरूळ येथील धेडवाडा गुफेसदृश, आणि अंतर्भागातील स्तंभ अजंटा गुफा क्र. १४ सदृश आहेत. गुफेच्या प्रवेशद्वारानजिक एकादश हस्तयुक्त अवलोकितेश्वराची, तसेच लितनी बुद्धाची तिबेटी धर्तीची मूर्ती असून, मुख्य मंदिराच्या पार्श्वभिंतीवर बुद्धाची विभिन्न मुद्रांतील भित्तिचित्रे आहेत.

( १० ) गुफा क्र. २९—मुख्य चैत्यमंदिराच्या डाव्या बाजूकडील हा दगडी बाके, अनलंकृत अष्टकोनी स्तंभ आणि वेदिकाशिल्पयुक्त प्राचीनतम विहार कल्याणनिवासी एका व्यक्तीने दान दिल्याचा देणगीलेख त्याच्या पार्श्वभिंतीवर आढळतो. नाग अनुचरयुक्त महायान बुद्धाच्या अनेक मूर्ती त्यामध्ये उत्तरकालात स्थापिल्या आहेत.

( ११ ) गुफा क्र. ३५—या विस्तीर्ण सभामंडपयुक्त ( ४०′ × ४५½′ ) विहाराच्या तीन बाजूंस दगडी बाके आणि बाह्यभागात चार छोट्या खोल्या आहेत. त्याच्या सभामंडपाच्या दर्शनी भागी चार अष्टकोनी स्तंभ आणि सभोवती वेदिकाशिल्पयुक्त कठडा आहे. विहाराच्या प्रांगणात भिक्षुविश्रामासाठी दगडी बाके आहेत.

उपरोक्त सभामंडपाच्या आणि प्रवेशमंडपाच्या भिंतीवर महायान बुद्धाची कार्ले, नासिक आणि वेरूळ महायान गुफांसदृश ( इ. स. ६ वे शतक ) अनेक शिल्पे उत्तरकालात कोरली आहेत. त्यांपैकी एकामध्ये पद्मासनाधिष्ठित बुद्धाला पद्मपाणि, तारादेवी, बोधिसत्त्व आणि त्याची शक्ती चवऱ्या ढाळीत असल्याचे दाखविले आहे.

विहाराच्या प्रवेशमंडपाच्या उजव्या कोपऱ्यात दीपंकर बुद्धाच्या स्वागतार्थ स्वजटा जमिनीवर पसरणाऱ्या मेघ नामक भिक्षूची काबूलदेशीय ‘ दीपंकर जातका ’ची कथा शिल्पांकित केली असून, भारतीय गुफांमध्ये ती अद्वितीय आहे.

( १२ ) गुफा क्र. ३६—हिच्या बाह्यमंडपाच्या दर्शनी भिंतीवर आंध्र राजा श्रीसेन माढरीपुत्रकालीन कल्याणनिवासी व्यक्तीचे दोन पाली देणगीलेख आढळतात.

( १३ ) गुफा क्र. ३८—कान्हेरी टेकडीच्या कपारीतील या गुफेत मठवासीयांचे शेकडो शरीरावशेष स्तूप आढळतात.

( १४ ) गुफा क्र. ४२—या दोन सभामंडपे ( १५′× १५′ ), तसेच दोन भिक्षुविश्रामगृहयुक्त विहाराच्या दर्शनी भागी एक प्रवेशमंडप ( लांबी–३७½′ ) आहे. त्याच्या स्तंभशिरोभूषणावर कुडा गुफांसदृश हस्तिव्याघ्रादिकांच्या आकृती असून, उभय भिंतींवर उत्तरकालीन महायानपंथीय बुद्धप्रतिमा आहेत.

( १५ ) गुफा क्र. ४५—या विहाराच्या मुख्य सभागृहाच्या डाव्या बाजूस एक भिक्षुगृह आणि पार्श्वभिंतीवर महायान बुद्धाची भूमिस्पर्श मुद्रेतील उत्तरकालीन प्रतिमा आहे.

( १६ ) गुफा क्र. ५२, ५३ आणि ५६—या विहारगुफांची रचना दर्शनी भागी प्रवेशमंडप आणि पार्श्वभागी सभामंडप ( १४′×१९′ ) अशा एकसुरी धर्तीची असून, गुफा क्र. ५६ च्या सभागृहाच्या पार्श्वभिंतीवर बुद्धप्रतिमेसाठी सिंहासन खोदले आहे.

( १७ ) गुफा क्र. ५९—या गुफेबाहेरील जलकुंडावर, तसेच प्रवेशमंडप–भिंतीवर कल्याणनिवासी बौद्ध भिक्षूचे पाली देणगीलेख आढळतात.

( १८ ) गुफा क्र. ६६—या गुफेच्या दर्शनी स्तंभांवर, तसेच जलकुंडावर पारसी लोकांचे स. १०१९ चे तीन पह्लवी गुफालेख असून, गुफेच्या अंतर्भागात महायान बुद्धाच्या अनेक उत्तरकालीन प्रतिमा आहेत.

( १९ ) गुफा क्र. ६८—या अनलंकृत गुफेच्या सभागृहाच्या ( १३½′×१३½′ ) पार्श्वभागी, तसेच उजव्या बाजूस दगडी बाके असून, तिच्या प्रांगणातील जलकुंडावर एक दानलेख आढळतो.

( २० ) गुफा क्र. ७६—या गुफेच्या उजव्या भिंतीवर ‘ धेनुकाकट ’ व्यक्तीचा दानलेख आढळतो.

( २१ ) गुफा क्र. ७८—दरबार गुफेसमोरच्या ( गुफा क्र. १० ) या गुफेच्या दर्शनी भागी राष्ट्रकूट राजा अमोघवर्षकालीन ( इ. स. ८७७ ) दोन देणगीलेख, तसेच गुफेतील बुद्धप्रतिमा–सिंहासनावर अन्य एक देणगीलेख आढळतो.

( २२ ) गुफा क्र. ८१—या गुफेच्या बाह्यमंडपभिंतीवर सातवाहन राजा यज्ञश्री शातकर्णीकालीन एक देणगीलेख आढळतो.

( २३ ) गुफा क्र. ८६—या विहारगुफेच्या ( २१′×

२१¾′ ) उजव्या भिंतीवर अजंटा गुफा क्र. १७ मधील ‘ झोडिॲक ’ चित्रासदृश एका वर्तुलाकृती भित्तिचित्रात मध्यवर्ती बुद्धप्रतिमेभोवतीच्या आठ भागांत बुद्धजीवन-प्रसंग रंगविले आहेत ( बर्जेस्, आर्कि. सर्व्हे. वे. इं. ४. ६०–७० ).

२. ( पर्वत ) वायुमते मेरु पर्वतोद्भवा ( आधु. पामीर पठार ) चतुर्गंगांपैकी पश्चिमवाहिनी चक्षु ( आधु. अमूदरिया ) नदीच्या मार्गावरील एक पर्वत. कंक, वैदूर्य, कपिल, गंधमादन आणि पिंजर पर्वतातून वाहणारी चक्षु नदी कुमुदाचल, मधुमंत, मुकुट आणि कृष्ण हे पर्वत क्रमशः ओलांडीत असे ( वायु. ४२.५२ ). मार्कंडेयमते हा मेरु-पश्चिम पर्वत होता ( मार्कं. ५२.१०; वायु. ३६.६८ ). नामांतर – ‘ कान्हगिरि ’ ( वायु. ३६ ).

अली यांच्या मते अमूदरिया नदीच्या उत्तरेकडील बाबातघ् आणि हिस्सार पर्वतांच्या, तसेच ताजिकिस्तान आणि उज्बेकिस्तान देशांच्या दरम्यानचा आधु. कारा–तघ् ( काराकोरम ) पर्वत हाच होय. या पर्वतानजिकच्या सुर्खेनदरिया नदीकाठी करतघ् ( कृष्ण पर्वत ) नामक गाव आजहि आढळते ( अली, पुराणाज्. पृ. ९२ ).

**पुरातन पर्वत**—हा पर्वत पश्चिमेस हिंदुकुश पर्वताशी संलग्न असून, भौगोलिक दृष्ट्या तो त्याचाच भाग मानला जातो. भूगर्भशास्त्रीयदृष्ट्या तो ‘ हेर्सिनियन ’ कालखंडातील म्हणजे हिमवत् पर्वतापेक्षाहि पुरातन असून भूगर्भातून बाहेर येतेवेळी त्याच्या पृष्ठभागावर पडलेल्या चुण्या आदि दोष आजहि दृग्गोचर होतात ( लॉ, माउंटन्स. पृ. ७ ).

**खोरी**—वायुमते हा आणि पांडुर ( आधु. देवौ गावानजिकची चुनखडीची टेकडी ) पर्वतांच्या दरम्यान सपाट दगडांचा निष्पर्ण प्रदेश (व्याप्ती–९०×३० योजने) असून, त्याच्या मध्यभागी यक्षकिन्नरांचे निवासस्थानभूत महापद्म नीलकमलांची पाणथळ भूमी होती. या पाणथळ प्रदेशाच्या मध्यवर्ती वटवृक्षावर दैत्यविनाशक नीलांबर देवाचे ‘ अनंतसदन ’ नामक निवासस्थान होते ( वायु. ३८. ४९–५९ ).

अली यांच्या मते कृष्ण–पांडुर पर्वतांचे उपरोक्त खोरे म्हणजे शाडूच्या निष्पर्ण वेटांनी व्यापलेला आधु. सुर्खेन् नदीचा त्रिभुज प्रदेश असून, त्याच्या परिसरातील वर्षाकालीन कमलपुष्पयुक्त तळ्यामध्ये पौराणिक यक्षकिन्नरांचे निवासस्थान असावे. पौराणिक ‘ अनंतसदन ’ आधु. तर्मेज् गावाच्या परिसरात असावे ( अली, पुराणाज्. पृ. ९४–९५ ).

**वसाहती**—वायुमते या पर्वतातील विशाल गुहांमध्ये गंधर्व रहात असत ( वायु. ३९.५९ ).

३. जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक कुलपर्वत ( मार्कं. ५६.१२; ५९.१३; वराह. ८३.१; वायु. ४४.४ ).

४. भारतवर्षातील एक पर्वत ( ब्रह्माण्ड. १६.२२; वराह. ८५.३; वायु. ४५.९१ ).

५. महाभारतमते कुश द्वीपान्तर्गत गोर ( मनःशिलयुक्त ) पर्वताच्या पश्चिमेकडील एक पर्वत ( म. भी. १३.४ ).

६. ( देशविभाग ) हैदरकालीन ( स. १७६८ ) म्हैसूर प्रांतान्तर्गत सहा राज्यविभागांपैकी एक ( अन्य राज्यविभाग–वेंकटगिरि, सालेम, मुल्बागल, कोलार आणि होसूर; सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३०४ ).

**कृष्णगिरि विषय** ( राज्यविभाग )— माधवराज ( द्वितीय ) च्या स. ६१९ च्या दानपत्रमते कलिंग देशान्तर्गत दक्षिण तोसल देशविभागातील कोंगोद मंडलातील एक राज्यविभाग. ओरिसामधील आधु. जगन्नाथ-पुरीच्या परिसरात हा असावा. नामांतर–‘ नीलगिरि ’ ( एपि. इंडि. ६.१४४; कोंगोद मंडल पहा ).

**कृष्णग्राम** ( ग्राम )—बौद्ध ललितविस्तरमते शाक्य देशातील कपिलवस्तु नगरानजिकचे एक ग्राम. सर्वसंग-परित्यागेच्छू गौतम बुद्धाने येथे आपल्या खड्ग, किरीटादि राजचिह्नांचा त्याग केला होता ( लॉ, भूगोल. पृ. १०० ).

**कृष्णतपस्यास्थाने** ( तीर्थसमूह )—पद्म, भागवत, हरिवंश आदि पौराणिक साहित्यात, तसेच महाभारतात कृष्णाच्या विभिन्न तपस्यांचे वर्णन आढळते. तत्संबंधीची माहिती निम्नलिखित परिपत्रकात दिली आहे ( परिपत्रक पहा ).

**कृष्णतीर्थ** ( तीर्थ )—अर्बुदाचलान्तर्गत एक तीर्थ ( स्कन्द. प्रभास. अ. ३४.१ ). कोटिध्वज शिवमंदिरयुक्त आधु. आमपानी तीर्थ हेच होय ( ती. पृ. ३९९ ).

२. मथुरेतील एक तीर्थ ( वराह. १७५.११ ).

३. कुरुक्षेत्रातील एक श्राद्धयोग्य तीर्थ ( वामन. ८१. ९; पद्म. आदि. ११.३१ ).

४. संभलक्षेत्रान्तर्गत देवी रोगप्रतिबंधक एक तीर्थ ( ती. पृ. ९२ ).

५. दक्षिण भारतातील मन्नारगुडि येथी श्रीराजगोपाल मंदिराच्या आग्नेयेकडील एक तीर्थ. यानजिकच शंखतीर्थ,

## कृष्ण–तपस्यास्थाने

| तपस्यास्थान | तपस्याप्रकार | कालमर्यादा |
|---|---|---|
| १. गंधमादन पर्वत (म. आर. १३. १०) | — | दशवर्षसहस्र |
| २. पुष्करक्षेत्र (म. आर. १३. ११) | जलभक्षण | दशवर्षसहस्र (दशवर्षशत) |
| ३. विशाला बद्री (म. आर. १३. १२) | ऊर्ध्वबाहु, एकपाद, वायुभक्षण | शतवर्ष |
| ४. सरस्वती नदी (म. आर. १३. १३) | तपस्या | द्वादशवार्षिक सत्र |
| ५. प्रभास तीर्थ (म. आर. १३. १४) | — | दिव्य वर्षसहस्रक |
| ६. चैत्ररथ वन (म. आर. १३. २१) | — | यज्ञ |
| ७. — (म. अनु. १४. २६-२८) | शिवोपासना (जांबवती पुत्रप्राप्त्यर्थ) | — |
| ८. — (म. अनु. १४. ३२-३३) | शिवोपासना (रुक्मिणी पुत्रप्राप्त्यर्थ) | द्वादशवर्ष |
| ९. सुवर्ण तीर्थ (पद्म. आदि. २८. १९-२१) | शिवोपासना | — |
| १०. वाराणसी येथील मध्यमेश्वर (पद्म. आदि. ३६) | शिवोपासना (पाशुपत दीक्षेसहित) | — |
| ११. बिंदु सरोवर (म. स. ३) | तपस्या | — |
| १२. कैलास बदरिका (ह. वं. ७३.७-९०) | यात्रा | — |
| १३. व्यासाश्रम (म. शां. ३१४. १-२२) | तपस्या (पुत्रप्राप्त्यर्थ, तसेच स्कंदशक्तिनिवारणार्थ) | — |

चक्रतीर्थ आणि दुर्वासतीर्थ नामक अन्य तीर्थे आहेत (ती. प्र. ३६४).

**कृष्णतोया** (नदी)—जंबूद्वीपान्तर्गत भद्राश्व वर्षातील एक नदी (वराह. ८२.४; वायु. ४३.२८).

**कृष्णदेऊळ** (तीर्थ)—मुसलमानी साहित्यमते ओरिसामधील 'कोणादित्य' सूर्यक्षेत्राचे नामांतर (कोणादित्य पहा).

**कृष्णनिर्याणस्थान** (तीर्थ)—भागवतमते प्रभासक्षेत्रान्तर्गत पिप्पल वृक्षतलीचे कृष्णनिर्याणस्थान, एक तीर्थ (भा. ११.३०.२७). येथे 'भालक तीर्थ', 'देहोत्सर्गस्थान' आदि तीर्थे आहेत.

**कृष्णपाद** (देश)—जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक देश (वराह. ८३.२; वायु. ४४.११). अली यांच्या मते मध्य आशियातील काफिरनिगान् नदीकाठच्या आधु. कबदियान् गावासभोवतालचा प्रदेश हाच होय.

**कृष्णपुर** (देवमंदिरस्थान)—ओरिसामधील एक देवमंदिरस्थान. कटकपासून १२ मैल ईशान्येकडील आधु. किसनपुर हेच असून, येथील चाटेश्वर मंदिरलेखात कामांतक शिवलिंगस्थापनेचा निर्देश आढळतो (एपि. इंडि. २९.१२१).

**कृष्णभौम** (देश)—जंबूद्वीपान्तर्गत भद्राश्व वर्षातील एक देश (वायु. ४३.२३).

२. (पाताल) विष्णुधर्ममते सृष्टीच्या सप्तपातालांपैकी सप्तम पाताल (विष्णुधर्म. १.४.३४; शब्दशः अर्थ–कृष्णभूमियुक्त'). नामांतर– 'भीमतल.'

**कृष्णरुक्मिणी विवाहस्थान** (तीर्थ)— द्वारका येथील एक तीर्थ (ह. वं. २.६०.३४; द्वारका पहा).

**कृष्णला** (नदी)—भारतवर्षातील एक नदी (पद्म. आदि. ६.१८).

**कृष्णवर्णा** (नगरी)—जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वतातील एक निर्ऋति देवीनगरी (लिङ्ग. ४८.१७).

२. (नदी) एक श्राद्धयोग्य नदी (पद्म. आदि. ११.३९).

**कृष्णवाट** (ग्राम)—धर्मारण्यातील एक ग्राम (स्कन्द. ब्राह्म. ध. ३५.३८).

**कृष्णवाट–कण्टा–कण्टवाडी** (ग्राम)—धर्मारण्यातील एक ग्राम (स्कन्द. ब्राह्म. ध. ३९.१०).

**कृष्णवेगा** (नदी)—सह्य पर्वतोद्भवा 'कृष्णवेणा,

नदीचे नामांतर ( पद्म. आदि. ६.२३; कृष्णवेणा पहा ).

**कृष्णवेणा** ( नदी )—महाभारत आणि पौराणिक साहित्यमते दक्षिण भारतातील एक सह्य पर्वतोद्भवा नदी ( म. भी. ९.१५; काव्यमी. १७.२२६; वायु. ४५. १०४; मार्कं. ५४.२६; कूर्म. पूर्व. ४७.३६; वराह.८५.५; वामन. १३.३०; शिव. उमा. १८.१२; पद्म. उत्तर. ११. २५; मत्स्य. ११४.२९; विष्णु. २.३.११; ब्रह्माण्ड. १६. ३४; अग्नि. ११८.७ ). महाराष्ट्र, म्हैसूर, आणि आंध्र प्रदेशांची भाग्यदायिनी आधु. कृष्णा नदी हीच होय. महाबळेश्वर येथे उगम पावणाऱ्या नद्यांमध्ये ही सर्वाधिक पुरातन आणि महत्त्वाची मानली जाते.

प्राचीन साहित्यात बहुशः सर्वत्र वेणा ( आधु. येन्ना ) नामक उपनदीसमवेत हिचा ‘ कृष्णवेणा ’ संयुक्त नावाने निर्देश असून ( ब्रह्म. २७.३५; भा. ५.१९ ), हिचा एकाकी निर्देश या साहित्यात क्वचित आढळतो ( ब्रह्म. ७७.५; पद्म. उत्तर. १३.२५; वामन. १३.३० ).

**महत्त्व**—कृष्णा, गोदावरी आणि कावेरी या दक्षिण भारतातील सह्य पर्वतोद्भवा तीन प्रमुख नद्या भारतीय द्वीपकल्पाचा सारा भाग ओलांडून पूर्व सागरास मिळतात. आपल्या अन्य नदीभगिनींप्रमाणेच कृष्णा ही सह्य पर्वतोद्भवा नदीहि दख्खन पठारावरून पूर्व दिशेप्रत वहात जाऊन आणि पूर्व घाटाचा भेद करून बंगालच्या उपसागरास मिळते.

प्राचीन साहित्यात गोदावरी आणि कावेरी नद्यांच्या तुलनेने हिचा निर्देश कमी वेळा असून, भीष्म आणि आरण्यक पर्वांचा अपवाद वगळता तीर्थयात्रादि अन्य पर्वांत हिचा निर्देश आढळत नाही. पार्गिटर यांच्या मते ही जंगलव्याप्त प्रदेशातून वहात असल्याने हिच्या आसपास कोणी फिरकले नसावे ( पार्गि., मार्कं. पृ. ३०२ ).

तत्रापि हिच्या भीमा आणि तुंगभद्रा या महान उपनद्यांमुळे ही दक्षिण भारतातील सर्वाधिक मोठी नदी ( लांबी—८०० मैल ) मानली जाते. ९७,००० चौरस मैलांच्या जल संचय प्रदेशातील जल एकत्र करणाऱ्या या नदीमधून प्रतिवर्षी पन्नास दशलक्ष एकर फूट इतके प्रचंड जल वहाते. या नदीजलापैकी केवळ १८ टक्के पाणी सध्या शेतीकामासाठी वापरले जात असले, तरी तुंगभद्रा प्रकल्पाच्या पूर्तीनंतर हिचे सहा दशलक्ष एकर फूट अधिक पाणी शेतीसाठी उपलब्ध होईल.

**प्रागैतिहासिक काळी**—महाबळेश्वरोद्भवा पंचनद्यांमध्ये सर्वाधिक पुरातन अशा या नदीकाठच्या कराड ( प्राचीन करहाटक ) येथील उत्खननात २००० वर्षांपूर्वीची मृत्तिकापात्रे आणि नाणी सापडली आहेत. त्यावरून कृष्णा खोऱ्यातील प्रागैतिहासिक मानवाचे अस्तित्व सिद्ध होते ( करहाटक पहा ).

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**—प्राचीन ‘ चोल मंडल ’ ( आधु. कारोमंडलच्या परिसरातील पूर्व समुद्रकिनारीचा प्रदेश ) देशाची उत्तर सरहद्द या नदीने बनत असे. कृष्णा नदीच्या उत्तरेकडील खोऱ्याच्या तुलनेने हा खालच्या खोऱ्याचा भाग अधिक समृद्ध असून, दक्षिण भारतातील सातवाहन साम्राज्याचे आणि कलेचे, तसेच बौद्ध संस्कृतीचे ते केंद्रस्थान होते. अमरावती, जग्गयपेट्टा, नागार्जुनिकोंड आदि बौद्ध धर्ममठहि याच प्रदेशात होते ( आंध्र पहा ).

मुसलमानी आक्रमणकाली या नदीच्या दक्षिणेकडील राजांनी विजयनगर येथील बुक्क आणि हरिहर राजांच्या नेतृत्वाखाली संघटित होऊन मुसलमानांशी प्राणपणे लढा दिला. याचे उलट हिच्या उत्तरेकडील फुटीर राजे त्या आक्रमणाने नष्ट झाले.

मध्ययुगात कृष्णा-तुंगभद्रेचा रायचूर आणि मुद्गल दुआब समृद्धिशिखरावर असून, आंध्र, म्हैसूर आणि तामीळनाड प्रांतातील राज्यांमध्ये त्याच्या प्राप्त्यर्थ सदैव युद्धे चालू असत. तुंगभद्रा नदीच्या दक्षिणेकडील विजयनगरचे राजे हा दुआब स्वनियंत्रणाखाली आणण्याचा सदैव प्रयत्न करीत असत ( विजयनगर पहा ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नदीची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा ).

**नामव्युत्पत्ती**—पद्ममते ‘ भगवान कृष्णाचा अवतार ’ अर्थाने हिला हे नाव मिळाले.

**उगम**—महाबळेश्वरमाहात्म्यमते सह्य पर्वतान्तर्गत महाबळेश्वर येथे निम्नलिखित पाच नद्या ( पंचगंगा ) उगम पावतात :—१. कृष्णा; २. वेणी; ३. ककुद्मती ( आधु. कोयना ); ४. सावित्री ( बाणकोटनजिक अरबी समुद्रास मिळणारी आधु. सावित्री ); ५. गायत्री ( सावित्री नदीची उपनदी ) ( जे. बी. बी. आर. ए. एस्. १०.१६ ). विष्णुस्मृतीमध्ये यांस ‘ दक्षिण पंचनद ’ म्हटले असून, भाष्यकार नंदपंडितमते त्यांची नावे पुढीलप्रमाणे होत :—१. कृष्णा; २. वेणा; ३. तुंगा; ४. भद्रा; ५. कोण ( एस्. बी. ई. ५.२५९ ).

**आधुनिक काळी**—सातारा जिल्ह्यातील सह्य पर्वतान्तर्गत महाबळेश्वर पर्वतश्रेणीच्या ( समुद्रसपाटीपासून उंची ४५००′ ) उत्तरेकडील आणि अरबी समुद्रापासून ४० मैल पूर्वेकडील ‘ क्षेत्रमहाबळेश्वर ’ ( स्थानिक नाव—कृष्णाबाई )

## कृष्णवेणा नदीची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. वाल्मीकि रामायण (कि. ४१.९) | |
| २. पौराणिक साहित्य | कृष्णवेणी |
| अ. (विष्णु. २.३.११; मत्स्य. ११४.२९) | |
| ब. (ब्रह्म. १९.१२; म. भी. १०.२७) | कृष्णवेण्या |
| क. (पद्म. आदि. ६.२३) | कृष्णवेगा |
| ड. (पद्म. आदि. २३.२४) | कृष्णवेणिका |
| इ. (ब्रह्म. ७७.५; पद्म. उत्तर. ११३; २५; वामन. १३.३०) | कृष्णा |
| ३. बृहत्संहिता (१४.१४) | कृष्णवेल्लूर |
| ४. महाभारत | |
| (भी. १०.३१) | कृत्या (?) |
| (अनु. १६६.२२) | कृष्ण–वेणा |
| ५. जातक (५) | कण्हपेण्णा |
| ६. विक्रमांक देवचरित (४.३६; १४.१३) | कृष्णवेणि<br>कृष्णवेणी |
| ७. शिलालेख साहित्य | |
| अ. खारवेलाचा हाथीगुंफा शिलालेख (एपि. इंडि. २०.७७) | कण्हबेम्णा |
| ब. राष्ट्रकूट राजा गोविंद (द्वितीय) चा अलस् ताम्रपट (एपि. इंडि. ६.२०८) | कृष्ण–वेर्णा |
| क. वीर राजेंद्राचा स.१०६४ चा तिरुवेंगाडु शिलालेख (एपि. इंडि. १२.२९६) | कूडल |
| ड. विजयनगरच्या कृष्णदेवरायाचा स. १५२६ चा अत्ति शिलालेख (रंगाचारी, १. उत्तर अर्काट. २२७) | कृष्णवेणी |
| इ. अन्य शिलालेख | कृष्णविणी |
| ८. महाबळेश्वरमाहात्म्य (जे. बी. बी. आर. ए. एस्. १०.१६.) | कृष्णा, गंगा |

येथे ही नदी उगम पावते (अक्षांश १७°–५९′ उत्तर; रेखांश ७३°–३८′ पूर्व). तत्रस्थ महादेव–मंदिरातील एका जलकुंडात एका गोमुखाद्वारा हिचा उगम होत असून, तेथेच महाबळेश्वरोत्पन्न अन्य चार नद्यांची स्वतंत्र कुंडे दाखविली जातात.

क्षेत्रमहाबळेश्वरोत्पन्न वेणा (आधु. येन्ना) नदी साताऱ्यापासून ४ मैलांवरील माहुली येथे हिला मिळून हिचे पौराणिक 'कृष्णवेणा' नाव सार्थ होते. या संगमस्थानी चैत्र, आषाढ, श्रावण आणि कार्तिक महिन्यात मोठ्या यात्रा होतात.

महाबळेश्वर पठारात उगम पावणारी ही नदी कराड, सांगली, कुरुंदवाड, विजापुर गावांवरून वहात जाऊन रायचूर येथे दख्खन पठारातून (उंची–४००′) खाली उतरते. तेथून पुढे पूर्वघाटात प्रविष्ट होऊन ही आलमपुर आणि जग्गयपेठ्ठा गावांच्या दरम्यान तेलंगणाच्या दक्षिण सरहद्दीवरून आणि नंतर आंध्र प्रदेशातून १०० मैलपर्यंत वहात जाते. अखेरीस दोन विस्तृत मुखांनी ही बंगालच्या उपसागरास मिळते. हिच्या विस्तृत त्रिभुज प्रदेशाच्या माथ्यानजिकच्या बेझवाडा गावी समुद्रापासून ४५ मैल आत हिच्या पात्रावर (रुंदी–१३००′) एक मोठा बंधारा (३४१४′ × २०′) स. १८५४ मध्ये बांधला आहे. या बंधाऱ्यामुळे हिच्या त्रिभुज प्रदेशात तयार झालेले कालव्यांचे विस्तृत जाळे उत्तरेस गोदावरी कालव्यास, आणि दक्षिणेस बकिंगहॅम कालव्यास मिळते.

**वाल्मीकि रामायणात**—या ग्रंथमते या (कृष्णवेणी) दक्षिण भारतीय नदीकाठी सुग्रीवप्रेषित अंगद सीताशोधार्थ आला होता (वा. रा. कि. ४१.९).

**महाभारतात**—या ग्रंथमते दक्षिण भारतातील या पवित्र नदीकाठच्या देवकुंडातील (जातिस्मर ह्रद) स्नानाने पूर्वजन्मस्मृती होत असे (म. स. ९.२०; आर. ८३.३४–३६; भी. १०.१५). ही नदी अग्नीचे उत्पत्तिस्थान असून (म. आर. २१२.२४), 'कृष्णवेणा' (म. भी. १०.१५), 'कृष्णवेण्णा' (म. आर. २१२.२४), 'कृष्णवेण्या' (म. भी. १०.२७) अशा त्रिविध प्रकारे हिचा या ग्रंथात निर्देश आढळतो. या ग्रंथातील नदीनामावलीत 'कृत्या' नदीचा पाठभेद म्हणून हिचा निर्देश आढळतो (म. भी. १०.३१).

**बृहत्संहितेमध्ये**—या ग्रंथात 'कृष्णवेल्लूर' नामक दाक्षिणात्य नदीचा निर्देश असून (बृ. सं. १४.१४), फ्लीट यांच्या मते कृष्णा नदी आणि वेल्लूर ग्रामांचा संयुक्त निर्देश येथे अभिप्रेत आहे (इंडि. ॲंटि. २२.१८२).

**पौराणिक साहित्यात**—या साहित्यात 'कृष्णवेगा'

## कृष्णवेणा नदीच्या उपनद्या

| भौगोलिक उपविभाग | उपनदी | उगम | वैशिष्ट्य | संगमस्थान |
|---|---|---|---|---|
| (१) महाराष्ट्र | १. वेण्णा (आधु. येन्ना) | महाबळेश्वर पठार | — | साताऱ्यापासून ४ मैलांवरील माहुली |
| | २. कोयना | महाबळेश्वर पठार | कोयना धरण (हेळवाक–पोफळी येथे) | कराड |
| | ३. येर्ला | साताऱ्याच्या उत्तरेकडील सह्य पर्वत | कोयनेची उपनदी | सांगलीच्या उत्तरेस |
| | ४. वारणा | — | — | सांगली |
| | ५. पंचगंगा | — | — | कुरुंदवाड |
| (२) म्हैसूर राज्य | १. मलप्रभा | — | — | विजापुर जिल्ह्यातील हुनगुंद तालुक्यातील कुंडलसंगम |
| | २. घटप्रभा | — | — | मुद्देबिहाल गावाच्या दक्षिणेस |
| (३) तेलंगण | १. धोन | जतच्या पश्चिमेकडील सह्य पर्वत | डावीकडील उपनदी | नलदुर्गनजिक |
| | २. भीमरथी (आधु. भीमा) | पुणे जिल्ह्याचा वायव्य भाग | ,, | रायचूरच्या उत्तरेस |
| | ३. डिंडी | कोंदगल गावच्या पूर्वेकडील टेकड्या | ,, | आम्राबादच्या पूर्वेस |
| | ४. पेद्दवगु | किसमपेटच्या पूर्वेस | ,, | देवकोंडच्या दक्षिणेस |
| | ५. मुसी | मुसी–आलेर संगम-पंगल गावच्या उत्तरेस | राष्ट्रकूट राजा गोविंद द्वितीयच्या ताम्रपटात निर्देश (एपि. इंडि. ६.२०८) | नळगुंद जिल्ह्यातील वझीराबादनजिक |
| (४) आंध्र प्रदेश | १. पालेर | नळगुंद जिल्ह्याच्या उत्तरवर्ती टेकड्या | डावीकडील उपनदी | नंदिगामच्या दक्षिणेस |
| | २. मुनेर | वारंगळ जिल्हा | सर्वाधिक डावीकडील उपनदी | अमरावतीनजिक |
| | ३. तुंगभद्रा | म्हैसूरमधील कुदलि गावानजिक | उजवीकडील उपनदी; मल्लपुरम् येथे नागार्जुन सागर धरण | रायचूर जिल्ह्यातील आलमपुरनजिक |

(पद्म. आदि. ६.२३); 'कृष्णवेणा' (अग्नि. ११८.७; ब्रह्माण्ड. १६.३४); 'कृष्णवेणिका' (पद्म. आदि. २३. २४); 'कृष्णवेण्या' (ब्रह्म. १९.१२); कृष्णवेणी (मत्स्य. ११४.२९; विष्णु. २.३.११); 'कृष्णा' (भा. ५.१९.१८), अशा वैकल्पिक नावांनी हिचा निर्देश आढळतो. पद्म पुराणात हिचा दोनदा निर्देश असून (पद्म.

आदि. ६.१२; २८), यावरून या नावाच्या दोन नद्या प्राचीन काळी असाव्यात.

पद्म पुराणातील नर्मदामाहात्म्यात (पद्म. आदि. २३. २४), तसेच ब्रह्म पुराणातील गौतमीमाहात्म्यात (ब्रह्म. ७७.५) हिचा निर्देश असून, ब्रह्ममते हिचे तुंगभद्रा आणि भीमरथी नद्यांचे संगम पवित्र आणि मोक्षदायक होत (ब्रह्म. ७७.५). महाबळेश्वरमाहात्म्यमते ही साक्षात गंगाच होय (जे. बी. बी. आर. ए. एस्. १०.१६). वामनमते हिच्या काठी हयग्रीव वामनाचे स्थान होते (वामन. ७८. ७; ९०.२).

कृष्णामाहात्म्य—पद्म आणि स्कंद पुराणांत हिचे माहात्म्यवर्णन असून (पद्म. उत्तर. १५३), त्यापैकी स्कंद पुराणातील श्लोक तीर्थसारमध्ये पुनरुद्धृत आढळतात. विधानमालामते ही नदी निम्नलिखित स्थानी भागीरथी-सदृश पवित्र आहे:—१. **महाबळेश्वर**; २. **वैराट**; ३. **वेणीसंगम** (आधु. माहुली); ४. **करहाट** (आधु. कराड) (विधान. पृ. २७९).

**बौद्ध साहित्यात**—जातकात हिचा (कण्हपेण्णा) निर्देश आढळतो (जा. ५).

**शक्तिसंगमतंत्रात**—या ग्रंथमते ही कलिंग देशाच्या दक्षिण सीमेवरून वहात असे (शक्तिसङ्गम. ३.७–४).

**शिलालेख साहित्यात**—खारवेलाच्या हाथीगुंफा शिलालेखात हिचा (कण्हवेम्णा) निर्देश असून (एपि. इंडि. २०.७७), राष्ट्रकूट राजा गोविंद (द्वितीय) च्या स. ७६९ च्या अलस् ताम्रपटात, तसेच चालुक्य राजा विक्रमादित्याच्या स. १०७७ च्या येवूर शिलालेखात हिला (कृष्णविणी) कुंतल देशान्तर्गत म्हटले आहे (एपि. इंडि. ६.२.८). शिलाहार राजा मारसिंहाच्या स. १०५८ च्या शिलालेखमते ही 'मिरिंज' (आधु. मिरज) देशात असून (बर्जेस्, केव्ह टेंपल्स. पृ. १०४), यादव राजा सिंघणाच्या स. १२१४ च्या शिलालेखात (जे. बी. बी. आर. ए. एस्. १२.७) कृष्णविणी–भेणसी संगमावरील कुडलदाम्वाळ (आधु. कुरुंदवाड) चा निर्देश आढळतो.

विजयनगरच्या कृष्णदेवरायाचा स. १५२६ चा कृष्णातीरवर्ती अर्ति शिलालेख विजापूरच्या इस्माइल आदिलशहाच्या युद्धप्रसंगी रायचूरनजिकच्या लष्करी तळातून काढला असावा (रंगाचारी, १. उत्तर अर्काट. २२७). या राजाने ओरिसा दिग्विजयानंतर (स. १५१६) हिच्या काठी एक विजयस्तंभ उभारला होता (एपि. कर्ना. ५. १३).

शिलालेख साहित्यमते ही कलिंग देशाच्या नैर्ऋत्य सीमेवरून वहात असून (एपि. इंडि. ३१.९१), हिच्या मुखानजिकच्या एका तटबंदीयुक्त नगराचे अवशेष कृष्णा जिल्ह्यातील कानुकोल्लु येथे सापडले आहेत (एपि. इंडि. ३१.१).

**उपनद्या**—हिच्या प्रमुख उपनद्या पुढीलप्रमाणे होत (परिपत्रक पहा).

**कृष्णशिला** (तीर्थ)—गोपथ ब्राह्मणमते व्यास नदीतील वसिष्ठाश्रमयुक्त एक तीर्थ आणि वसिष्ठ ऋषी तपस्यास्थान (गो. ब्रा. २.८).

**कृष्णसरोवर** (सरोवर)—श्रीमालक्षेत्रान्तर्गत एक सरोवर. आधु. कालवाराह तीर्थ हेच होय (श्रीमाल. ४)

**कृष्णा** (नदी)—पौराणिक साहित्यमते दक्षिण भारतातील 'कृष्णवेणा' (आधु. कृष्णा) नदीचे नामांतर (ब्रह्म. ७७.५; पद्म. उत्तर. ११३.२५; वामन. १३.३०; कृष्णवेणा पहा).

२. कश्मीरातील सुविख्यात पवित्र नदी (राज. ७.५८६ ८.३४०१; नीलमत. १३९८; हरचरित. १२.४४) आधु. किशनगंगा नदी हीच असून, हिच्या खोऱ्यातील किशनगंगा-मधुमती संगमस्थानी सुविख्यात शारदास्थान (आधु. सार्दी; अक्षांश ७४°–१७′ उत्तर; रेखांश ३४४°–८′ पूर्व) तीर्थ आहे. मुसलमानी राज्यकाली हिचे खोरे (यागिस्तान) कश्मीरहून स्वतंत्र मानले जात असे.

**नामांतरे**— प्राचीन साहित्यात हिची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांत |
|---|---|
| १. राजतरंगिणी (८.२४९२)<br>२. शारदामाहात्म्य (११४; ११८) | सिंधु |
| ३. शारदामाहात्म्य | गंगा, कृष्णगंगा |
| ४. राजतरंगिणी (८.२४९२) | कोटसिंधु |
| ५. ऐन्-इ-अकबरी (२.३६५)<br>६. स्थानिक नामांतर | पद्मती, मद्मती, मधुमती, सिंद |

**नामव्युत्पत्ती**—हिचे मूळ नाव 'कृष्णा' असून, 'गंगा' आणि 'सिंधु' या हिच्या पावित्र्यनिदर्शक उपाधी असाव्यात. कश्मीरातील शिरःशिला 'दुर्गानजिकची नदी' अशा अर्थाने हिला 'कोटसिंधु' वैकल्पिक नाव मिळाले.

**शारदा तीर्थ**—या नदीकाठच्या शारदा तीर्थ (आधु. सार्दी) येथे या नदीस आग्नेयवाहिनी मधुमती आणि

चिलास प्रदेशान्तर्गत हिममय सरस्वती ( आधु. कंकतोरि ) नद्या मिळतात. देवी शारदेच्या अवतारस्वरूप या नदीमुळे त्या तीर्थास हे नाव मिळाले ( राज. १.३७; शारदा तीर्थ पहा ). शारदामाहात्म्यमते शांडिल्य ऋषींनी ओंजळीत धरलेले येथील जल ( महासिंधु ) मधामध्ये रूपांतरित होऊन मधुमती नदीच्या रूपाने वाहू लागले.

हवामान—राजतरंगिणीमते हिच्या पर्वतवेष्टित खोऱ्यात ( समुद्रसपाटीपासून उंची–६५००′ ) मुसळधार पाऊस आणि हिमवृष्टी होत असल्याने तेथील हवा अत्यंत थंड होती ( राज. ८.२५०९–२५१३ ).

शारदामाहात्म्यात—या ग्रंथमते हरमुकुट पर्वतान्तर्गत गंगाबल सरोवरात उगम पावणाऱ्या या नदीजलात विपुल सुवर्णकण असून, त्यामुळेच सुवर्णाला 'गांगेय' वैकल्पिक नाव मिळाले. हिच्या तीरावरील 'सुवर्णांगक' गावी शांडिल्य ऋषींनी स्नान केले असता त्यांचे अर्धे शरीर सुवर्णाचे बनले. हिच्या तीरावरील तेजवन ( आधु. तेहजन ) येथे गौतम ऋषींचा आश्रम होता.

ऐन्–इ–अकबरीमध्ये—या ग्रंथमते दर्दु देशातील या ( पद्मती = मद्मती = मधुमती ) सुवर्णकणयुक्त नदीकाठी शारदा नामक दुर्गा देवीमंदिर होते ( ऐ. अ. २.३६५ ). स्टाइन यांच्या मते येथे 'मधुमती' हे या नदीचेच नामांतर मानले आहे.

सुवर्णयुक्त देवसई पठारातून वहाणाऱ्या आधु. किशनगंगा नदीत आजहि सोने सापडत असून, जोनराजच्या मते हिच्यामध्ये सापडलेल्या सोन्याचा $\frac{1}{2}$ भाग 'सुवर्णद्रंग' ( आधु. सुनद्रंग ) जकातनाक्यावर कश्मीर सुलतान झैनुल अबिदीन राजधन म्हणून वसूल करीत असे ( स्टाइन, राज. १.२८८ ). विक्रमांकदेवचरितमते शारदा देवीचा मुकुट हिच्या वालुकासुवर्णाने ( सैकत ) बनविला होता ( विक्रमाङ्क. १८.५ ).

३. नारदमते मथुरा येथील 'यमुना' नदीचे नामांतर ( नारद. उत्तर. ७९.५२; यमुना पहा ).

४. ( देश ) पूर्व चालुक्य राजा अम्मराज (प्रथम) च्या स. ९४५ च्या ताम्रपटमते दक्षिण भारतातील एक देश. यामधील काही ग्रामे स्वतःच्या राज्यारोहणप्रसंगी त्याने दान दिली होती. कृष्णा खोऱ्यातील आधु. कृष्णा आणि नेलोर जिल्ह्यांचा प्रदेश हाच असावा ( इंडि. अँटि. स. १८९०, पृ. १०२; रंगाचारी, २. नेलोर. ३ ).

५. (तीर्थ) सोलापूरपासून १४४ मैलांवरील कृष्णा नदीकाठचे एक पवित्र तीर्थ ( ती. पृ. २६५ ).

**कृष्णा–मूसि सङ्गम** (संगमस्थान)—राष्ट्रकूट राजपुत्र गोविंद ( द्वितीय ) च्या स. ७७० च्या अलस् ताम्रपटमते कृष्णा आणि मूसि नद्यांचे आधु. पल्नाड तालुक्याच्या सीमेवरील पवित्र संगमस्थान ( एपि. इंडि. ६.२०८ ).

**कृष्णा–वेण्या सङ्गम** ( संगमस्थान )—पद्ममते सह्य पर्वतोद्भवा पश्चिमवाहिनी कृष्णा आणि वेण्या नद्यांचे संगमस्थान, एक तीर्थ ( पद्म. उत्तर. ११३.२; २५–२७; ११८.२७ ). याच्या माहात्म्यपर संपूर्ण अध्याय तेथे आहे ( पद्म. उत्तर. ११३ ). सातारा जिल्ह्यातील आधु. माहुली हेच होय.

**कृष्णाङ्गना** ( नगरी )—वायुमते मेरु पर्वतावरील एक नगरी आणि मंदिरस्थान ( वायु. ३४.८७ ).

**कृष्णाङ्गमणिपुञ्जक** ( देश )—जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक देश ( वायु. ४४.१० ). अली यांच्या मते मध्य आशियातील आधु. करतष् प्रदेश हाच होय.

**कृष्णाद्वीप** ( देश )—कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या दक्षिण भागातील एक देश. येथील निवासी 'कृष्णाद्वीपवासनिवासिन :' नावाने प्रसिद्ध असून ( मार्क ५५.२५ ), आधु. कृष्णा नदीच्या खोऱ्याचा प्रदेश हाच होय.

**कृष्णेश** ( लिंग )—काशी येथील एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ६७.३४ ).

**के–शिह** ( देश )—चिनी साहित्यमते मध्य आशियातील 'कसन्न' देशाचे नामांतर (कसन्न पहा ).

**केकय** ( देश )—बार्हस्पत्य अर्थशास्त्र, तसेच पाणिनीच्या अष्टाध्यायीमते उदीच्य देशान्तर्गत ( वायव्य भारतातील सिंधु नदीचा जलसंचय प्रदेश ) पंचनद प्रदेशातील वितस्ता ( आधु. झेलम ) नदीच्या पूर्वेकडील एक जनपद ( बार्हस्पत्य. पृ. २०-२१; पा. सू. ७.३.२ ). बृहत्संहितामते येथील लोक 'कैकय' नावाने प्रसिद्ध होते ( बृ. सं. ४.२२; ५.६७; ७४; १४.२५; १६.२६; १७.१८ ). अग्रवाल यांच्या मते हे, तसेच उशीनर आणि मद्र जनपदे पाणिनिकालीन वाहीक ( आधु. पंजाब ) देशात समाविष्ट असून ( आय्. एच्. क्यू. २९.१७ ), सिकंदरच्या आक्रमणकाली येथील पौरस ( पूरु ) राजाने सिकंदरला प्राणपणे विरोध केला होता.

अली यांच्या मते पंजाबातील झेलम–चिनाब दुआबाच्या उत्तर भागातील 'खिउडा' सैंधव मिठासाठी सुविख्यात असणारे आधु. झेलम, गुजरात आणि शीहपुर जिल्हे म्हणजे हा देश असून, याच्या भौगोलिक परिसीमा पुढीलप्रमाणे होत्या :– १. पश्चिमेस–गंधार देश; २. पूर्वेस–मद्र

देश; ३. दक्षिणेस—झेलम-चिनाब दुआबाच्या दक्षिण भागातील जागुड देश; ४. उत्तरेस—अभिसार देश.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात याची, तसेच येथील लोकांची निम्नलिखित नामांतरे आढळतात :-

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पाणिनीची अष्टाध्यायी ( पा. सू. ७.३.२ ) | कैकेय लोक |
| २. मार्कंडेय पुराण ( ५४.३७ ) | कैकेय लोक |
| ३. हरिवंश ( १.३९.२९-३० ) | कैकेय लोक |
| ४. बृहत्संहिता ( ४.२२ ) | कैकय |
| ५. मत्स्य पुराण ( ११४.४२ ) | कैकेरय |
| ६. जैन प्रज्ञापना ग्रंथ ( डी. के. डी. आय्. पृ. २२५ ) | कैअध्ध |

**नामव्युत्पत्ती**—हरिवंशमते शिबि औशीनरपुत्र 'केकय-स्थापित देश' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले ( ह. वं. १.३१.२९–३० ). या ग्रंथमते शिबि राजाच्या मद्र, केकय, वृषदर्भ आणि सुवीर नामक पुत्रांनी पंजाबात चार स्वतंत्र राज्ये स्थापिली असून, त्यापैकी उशीनर आणि शिबि लोकांसमवेत याचा निर्देश सर्वत्र आढळतो ( वायु. ९९; मत्स्य. ४८; विष्णु. ४.१८; अग्नि. २७६ ). आजहि या लोकांत वांशिक साधर्म्य दिसते.

**लष्करी महत्त्व**—वायव्य भारत–भारत हमरस्त्यावरील या देशमार्गानेच सिकंदरच्या कालापासून भारतावरील सारी आक्रमणे झाली असून, शतकानुशतकांच्या परकीय आक्रमणांच्या माऱ्यामुळे येथील लोक युध्दप्रवीण बनले होते. भारतीय युद्धात, तसेच सिकंदरस्वारीत यांनी मोठा पराक्रम गाजविला होता.

**राजधानी**—वाल्मीकि रामायणमते याची राजधानी 'राजगृह' येथे असून ( वा. रा. अयो. ६७.७ ), कनिंगहॅम यांच्या मते पंजाबातील झेलम जिल्ह्यातील झेलम नदीकाठचे आधु. गिर्यक ( जलालपुर ) गाव हेच होय ( आर्कि. सर्व्हे. २.१४ ).

**सिकंदरस्वारीच्या वर्णनात**—सिकंदरच्या आक्रमण-काली सिंधु-वितस्ता दुआबात पूर्व गंधार ( राजधानी—तक्षशिला ), आणि वितस्ता नदीच्या पूर्वेस हे जनपद होते. तत्कालीन वाहीक ( आधु. पंजाब ) देशान्तर्गत हे सर्वाधिक सामर्थ्यशाली गणराज्य असून, उत्तरेकडील वितस्ता–असिक्नी ( आधु. चिनाब ) दुआबातील अभिसार ( आधु. पूंच आणि रजौरी ) देशाशी त्याचे मैत्रीचे संबंध होते. स्ट्रॅबोच्या मते या सुपीक आणि विस्तीर्ण देशात तत्काली ३०० शहरे होती.

पूर्व गंधारराज आंभीला वश केल्यानंतर सिकंदर तक्षशिलेहून ऐन उन्हाळयात या देशाच्या पश्चिम सरहद्दी-वरील वितस्ता ( आधु. झेलम ) नदीकाठी आला. वितस्तेच्या पूर्व किनाऱ्यावर केकयराज पोरस् त्याच्या प्रतिकारार्थ ससैन्य आला. प्लुटार्कच्या मते पोरस्च्या सैन्यात वीस हजार पायदळ, दोन हजार अश्वदळ, एक हजार रथ आणि एकशे तीस हत्ती असून, त्यास विरोधून वितस्ता नदी पार करणे सिकंदरला अशक्य होते. तेव्हा पोरस्छावणीच्या वीस मैल दक्षिणेस मध्यरात्रीच्या मुसळधार पावसात सिकंदरने ती नदी ओलांडून पोरस्वर हल्ला चढविला. द्रुतगती अश्वांच्या या अचानक हल्ल्यामुळे पोरस्चा पराजय झाला.

पराजयानंतरहि पोरस् सिकंदरशी बाणेदारपणे वागला. त्यायोगे प्रसन्न होऊन सिकंदरने मांडलिकत्वाच्या अटीवर त्याचे राज्य त्यास परत दिले. या देशाच्या पूर्वेकडील असिक्नी नदीकाठच्या ग्लुचुकायन, तसेच इरावती नदी-काठच्या कठ लोकांवरील आक्रमणात पोरस्ने सिकंदरला साह्य केले. येथील विजयस्मृती म्हणून सिकंदरने येथे निम्नलिखित नगरे स्थापिली :- १. बुकेफला ( वितस्ता नदी ओलांडल्यास्थानी ); २. निकीया ( सिकंदर–पोरस युद्धभूमिस्थानी ).

**शतपथ ब्राह्मणात**—या ग्रंथात या लोकांच्या अश्वपति राजाचा निर्देश असून ( श. ब्रा. १०.६.१–२; छां. उ. ५.११.४ ), वाल्मीकि रामायणातील कैकेयीपिता अश्वपति राजाच्या तो पूर्वकालीन असावा.

**पाणिनीय व्याकरणात**— राजाधीन जनपद म्हणून पाणिनीच्या अष्टाध्यायीत, तसेच गणपाठात याचा निर्देश असून ( पा. सू. ७.३.२; ४.१.१७८ ), येथील लोक ( कैकेय ) स्वतःस क्षत्रियवंशीय म्हणवीत असत.

**वाल्मीकि रामायणात**—या ग्रंथमते हा दशरथपत्नी कैकेयीच्या माहेरचा आणि भरताच्या आजोळचा देश असून ( वा. रा. अयो. ६८.१९.९२ ), येथील विकट नामक ख्यातनाम श्वान केकयराज अश्वपतीने अयोध्यागामी भरतास भेट दिले होते ( वा. रा. अयो. ७०.२३ ).

**अयोध्या-केकय मार्ग**—राम वनवासास गेल्यानंतर भरतास परत बोलावण्यासाठी कैकेयीने या देशास पाठविलेल्या दूतांच्या संदर्भात वाल्मीकि रामायणात तागंतीचा आणि अल्प असा अयोध्या-केकय दुर्गम

पुढीलप्रमाणे वर्णिला आहे :- अयोध्या → हस्तिनापुर → ( गंगा नदी ओलांडून ) पंचाल देश → यमुना नदीच्या पश्चिमेकडील कुरुजांगल देश → ( इक्षुमती नदी ओलांडून पश्चिमेस ) बाह्लीक देश → विपाशा ( आधु. बियास ) नदीच्या काठाने → केकयराजधानी राजगृह ( वा. रा. अयो. ६८.१३-१९ ).

उपरोक्त वर्णनावरून रामायणकाली हा विपाशा तीरवर्ती देश बाह्लीक देश आणि इक्षुमती नदीच्या पश्चिमेस असावा. या मार्गवर्णनात गंधारचा निर्देश आढळत नाही. त्यावरून तत्काली त्याचे महत्त्व नष्ट झाले असावे.

**बृहत्संहितेत**—या ग्रंथमते हे ( कैकय ) उत्तर भारत-निवासी लोक असून ( बृ. सं. ४.२२; ५.६७; ७४; १४.२५; १६.२६; १७.१८ ), येथील राजा 'कैकयनाथ' नावाने सुविख्यात होता ( बृ. सं. ११.६० ). राजशेखरकृत काव्यमीमांसामते हे उत्तरापथमध्ये शक, हूण, कांबोज आदि लोकांसमवेत रहात असून ( काव्यमी. १७.२२७ ), मार्कंडेयमते हा ( केकय ), तसेच मद्र देश कूर्मचक्रात्मक भारताच्या उत्तर भागात होते ( मार्कं. ५५.४२; ४५ ).

**महाभारतात**—या ग्रंथमते या बलाढ्य आणि सुविख्यात देशातील ( म. भी. १०.४७ ) लोक धनुर्विद्येमध्ये प्रवीण होते ( म. स. ४.२७; १२६; पाठभेद-भांडारकर संहिता-'कैकेय' ).

भारतीय युद्धात मद्र लोकांसमवेत पांडवपक्षात सामील असणाऱ्या या लोकांनी द्रोणाचार्यांसमवेत युद्ध केले होते ( म. द्रो. २०.७९९ ). येथील विंद आणि अनुविंद हे राजकुमार मात्र दुर्योधनपक्षात असून ( म. क. २.१८ ), त्यांचे सैनिक भीष्मविरचित गरुडव्यूहात उपस्थित होते ( म. भी. ५२.४ ). या राजकुमारांना सात्यकीने ठार मारले ( म. क. २.१८ ).

**पौराणिक साहित्यात**—या साहित्यात 'कैकेय्य' ( मत्स्य. ११४.४२ ), 'कैकय' ( मार्कं. ५४.३७; वामन. १३.३९ ), 'केकय' ( पद्म. आदि. ६.४३; ब्रह्माण्ड. १६.४८; वायु. ४५.११७ ), आणि 'कैकेय' ( मार्कं. ५४.३७ ) वैकल्पिक नावांनी यांचा निर्देश असून, वायु, ब्रह्माण्डमते हे अनु नामक अनार्य कुलोत्पन्न होते ( वायु. ९९; ब्रह्माण्ड. ३.७४; ब्रह्म. १३ ). विष्णुमते येथे धृष्टकेतु राजा राज्य करीत असे ( विष्णु. ४.१४ ).

**जैन साहित्यात**—जैन प्रज्ञापना ग्रंथमते हे ( कैअध ) प्राचीन भारतातील प्रमुख जनपद असून, याच्या निम्म्या भागात आर्य लोक रहात असत. याची राजधानी सीदिया ( श्वेतांविका ) गावी होती ( इंडि. अँटि., स. १८९१, पृ. ३७५; डी. के. डी. आय्. पृ. २२५-२२६ ).

२. शक्तिसंगमतंत्रमते ईशान्य बंगालमधील ब्रह्मपुत्रा नदी आणि कामरूप ( आधु. आसाम ) देशाच्या दरम्यानची केकय लोकांची ( केकय ) एक वसाहत ( शक्तिसङ्गम. ३.७.४६ ). आसाम आणि मणिपुर प्रदेशातील केकयवंशीय आधु. कुकी लोक हेच होत ( इंडि. कल्चर. स. १९४१, पृ. ५९ ).

३. म्हैसूर प्रांतातील एक लोकसमूह. हे स्वतःस सोमवंशीय आणि अत्रिगोत्रीय म्हणवीत असून, नागार्जुनिकोंड आणि जग्गयपेट्टा शिलालेखान्तर्गत इक्ष्वाकु राजवंशाशी त्यांचे विवाहसंबंध होते ( इंडि. कल्चर. ४.५७६ ).

**केकर** ( देश )—ब्रह्माण्डमते मेरु पर्वतोद्भवा सप्त गंगांपैकी पूर्ववाहिनी ह्लादिनी नदीच्या मार्गावरील एक देश ( ब्रह्माण्ड. १८.५४; मत्स्य. १२१.५३ ).

**केकरक** ( देश )—दक्षिण भारतातील 'करक' देशाचे नामांतर ( म. भी. १०.६० ). नामांतर—'कोकबल'.

**केकराक्षी** ( योगिनी )—काशी येथील एक योगिनी ( स्कन्द. काशी. ४५.३६ ).

**केटारेश्वर** ( लिंग )—हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंग ( स्कन्द. नागर. १२२ ).

**केतकवन** ( वन )—बौद्ध साहित्यमते कोशल देशातील नाल्कपान गावानजिकचे बुद्धप्रणीत 'नालकपान जातका'चे प्रणयनस्थान, एक वन ( मललसेकर, १.६६२; जा. १.१७० ).

**केतकीवन** ( वन )—वैद्यनाथक्षेत्रातील एक वन.

**केतकीसङ्गम** ( क्षेत्र )—मराठवाड्यातील विकाराबाद–परळी वैजनाथ रेलमार्गावरील जहिराबाद रेल्वेस्थानकापासून ८ मैलांवरील ब्रह्मा नदीकाठचे शिवक्षेत्र. स्थानिक आख्यायिकामते सृष्ट्यारंभकाली ब्रह्मदेवाने येथील संगमेश्वर शिवलिंगाची स्थापना करून शिवसाक्षात्कार मिळविला. येथे शिवाची केवड्याच्या पानाने पूजा करतात ( ती. पृ. २७० ).

**केतम्** ( मंदिरस्थान )—पंजाबातील कश्मीरराज ललितादित्य ( स. ७२५–७५६ ) निर्मित एक हिंदु देवमंदिरस्थान ( गोएट्झ, पृ. १४२ ).

**केतलपुत** ( देश )—अशोकाच्या गिरनार आज्ञालेखमते दक्षिणापथमधील 'केरल' देशाचे नामांतर ( कॉर्पस्. इन्स्क्रि. १.२.३; केरल पहा ).

**केतवता** ( ग्राम )—पतंजलीच्या व्याकरण महाभाष्य-

मते वाहीक देशान्तर्गत एक ग्राम (पतञ्जलि. १.४७४; १०.११).

**केतवरम्** (दुर्गस्थान)—आंध्र प्रदेशान्तर्गत कृष्णा जिल्ह्यातील सत्तनपल्लेपासून १२ मैल वायव्येकडील एक दुर्गस्थान. विजयनगरच्या सदाशिवरायाचा स. १५५६ चा एक शिलालेख येथे आहे (सेवेल, इन्स्क्रि. पृ. ६५).

**केतु** (वृक्ष)—जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षातील एक वृक्ष (वायु. ३५.४४).

**केतुग्राम** (तीर्थ)—ब्रह्ममते प्रवरा संगमानजिकचे एक तीर्थ (ब्रह्म. १०६). अहमदनगर जिल्ह्यातील प्रवरा नदीकाठचे नेवासे गावानजिकचे आधु. कायगाव टोके गाव हेच होय.

**केतुतीर्थ** (तीर्थ)—अवंतीक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ (स्कन्द. आवन्त्य. अ. ७०.९४).

**केतुधानघाट** (तीर्थ)—मध्यप्रदेशातील केतुतपस्यास्थान. नर्मदा नदीच्या उत्तर तीरवर्ती खांड नदीसंगमापासून $\frac{1}{2}$ मैलावरील आधु. कोडधान घाट हाच होय. येथील केतुतपस्येच्या केत्वीश्वर मंदिरस्थानी सध्या श्रीराममंदिर आहे (ती. पृ. २२८).

**केतुब्रह्म** (शक्तिपीठ)—पूर्व भारतातील नवद्वीप धामपासून २४ मैलांवरील कटवा रेल्वेजंक्शनच्या पश्चिमेकडील एक देवीस्थान. स्थानिक आख्यायिकामते या शक्तिपीठस्थानी सतीचा वाम बाहू पडला होता (ती. पृ. १८४).

**केतुमत्** (वर्ष)—शाल्मलि द्वीपान्तर्गत एक वर्ष (उपविभाग; मार्क. ५०.२७).

२. विष्णुधर्ममते जंबूद्वीपान्तर्गत 'केतुमाल वर्षा'चे नामांतर (विष्णुधर्म. १.७.२३; केतुमाल वर्ष पहा).

**केतुमती** (नदी)—जातकमते उत्तर भारतातील नालिक टेकडीनजिकची मुंचलिंद सरोवराच्या दक्षिणेकडील एक नदी. हिमालयगामी वेस्संतर राजा हिच्या काठी काही काळ थांबला होता (जा. ६.५१८).

**केतुमाल वर्ष** (वर्ष)—पौराणिक साहित्यमते जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वताच्या (आधु. पामीर पठार) पश्चिमेकडील एक वर्ष (उपविभाग; मार्क. ६०.७). 'महाद्वीप' (वायु. ४१.८५), अथवा 'द्वीप' (म. भी. ६.१३; काव्यमी. १७.२२०) उपाधींनी सुविख्यात असे हे पूर्वपश्चिमवर्ती वर्ष (वायु. ४३.१–२) निषध आणि नील पर्वतांच्या दरम्यान (विष्णुधर्म. १.७.२१); तसेच इलावृत वर्ष आणि गंधमादन पर्वतांच्या पश्चिमेस होते. (मत्स्य. ११३.४९). विष्णुधर्ममते हे इलावृत वर्षामध्ये समाविष्ट (भेद) असून (विष्णुधर्म. १.७.२३), भागवतमते हे मेरु पर्वतोद्भवा चतुर्गंगांपैकी पश्चिमवाहिनी चक्षु नदीच्या मार्गावर होते (भा. ५.१७.७; विष्णु. २.२.३५; वायु. ४२.५७). पद्ममते हे (केतुमाल खंड) अत्यंत पवित्र होते (पद्म. आदि. १४.१२८).

**आधुनिक स्थान**—अली यांच्या मते अफगाणिस्तानमधील अमूदरिया नदीखोऱ्यातील बॅक्ट्रिया (आधु. अफगाणतुर्कस्तान) देश हाच असावा. मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात 'केतुमाल' आणि 'तुर्कस्तान' समानार्थक मानले असून (शारदीय. ९१४; त्रिकाण्ड. ३०.४; नामसंग्रह १.११; वैजयन्ती ३५.७.१४), पौराणिक साहित्यमते चीन, मरु, तुषार, पह्लव, दरद आणि शक देशांतून वहाणारी चक्षु (आधु. अमूदरिया; वायु. ४७.४४–४५) नदी आजहि त्या देशाची प्रमुख नदी मानली जाते.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या वर्षाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. ब्रह्माण्ड पुराण (३४.४८) | गंधमादन वर्ष |
| २. लिंग पुराण (४७.६) | गंधमादन वर्ष |
| ३. विष्णुधर्म पुराण (१.७.२३) | केतुमत् वर्ष |
| ४. पद्म पुराण (आदि. १४.१२८) | केतुमाल खंड |
| ५. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य | तुर्कस्तान |

**नामव्युत्पत्ती**—आग्नीध्रपुत्र 'केतुमाल राजाचे राज्य' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले (कूर्म. पू. ४०.३५; लिङ्ग. ४७.१०; विष्णुधर्म. १.७.२०). 'केतुमाल'चा शब्दशः अर्थ 'चिरप्रफुल्लित पुष्पमाला' असून, वायुमते येथील विपुल पर्वतशिखरस्थ अश्वत्थ वृक्षाला समुद्रमंथनविजयी देवांनी चिरप्रफुल्लित पुष्पमाला अर्पिल्यामुळे त्यास हे नाव मिळाले (वायु. ३५.३३–४१). 'गंधमादन पर्वतानजिकचे' अर्थाने यास 'गंधमादन वर्ष' वैकल्पिक नाव मिळाले.

**मॅगॅस्थिनेसच्या ग्रंथात**—जंबूद्वीपान्तर्गत चार प्रमुख उपविभागभूत या द्वीपाची गणना भारतसीमेवरील तीन प्रमुख देशांमध्ये होत असे.

**भौगोलिक सीमारेषा**—पौराणिक साहित्यमते याच्या भौगोलिक सीमा पुढीलप्रमाणे होत्या :— १. दक्षिणेस—

निषध पर्वत ( आधु. हिंदुकुश–कुनलुन् पर्वत ); २. उत्तरेस—नील पर्वत ( आधु. झरप्शन्, तिएन्‌शन् पर्वत ); ३. पश्चिमेस—पश्चिम समुद्र ( आधु. कॅस्पिअन समुद्र; आणि चक्षु नदी ); ४. पूर्वेस—मेरु पर्वत, अथवा इलावृत वर्ष; ५. वायव्येस–आधु. तुराण वाळवंट. महाभारतकाली पश्चिम इलावृत वर्ष यामध्येच समाविष्ट होते.

**उपविभाग**—उपरोक्त सीमारेषांवरून पौराणिक काळी या वर्षात निम्नलिखित देशांचा समावेश असावा –१. हिंदुकुश पर्वताच्या उत्तरवर्ती आधु. अफगाण–तुर्कस्तान; २. हरिरुद् खोऱ्याचा दक्षिण भाग; ३. अमूदरिया नदीच्या जुन्या पात्राच्या दक्षिणवर्ती आधु. मुर्घाब्–करक नद्यांचा त्रिभुज प्रदेश; ४. उत्तरेस हिस्सार आणि पश्चिमेस झरप्शन् पर्वतांनी वेष्टिलेला आधु. सुर्खन्, काफिर निगान्, वख्श–आप् आणि वक्षु नद्यांचा त्रिभुज प्रदेश.

मध्ययुगीन काली उपरोक्त भूप्रदेशात अमूदरिया नदीच्या दक्षिणेकडील बद्घिस्, घर्चिस्तान, ग्नुज्गन्, तुखारिस्तान, बदक्षन्, रघ् आणि दर्वाझ् देशांचा, तसेच त्या नदीच्या उत्तरेकडील चघ्नियान्, खुत्तल, करतघिन् देशांचा समावेश होत असे. या पौराणिक आणि मध्ययुगीन उपविभागांची तौलनिक माहिती निम्नलिखित परिपत्रकात दिली आहे ( परिपत्रक पहा ).

**अन्य लोकसमूह**—वायुमते ‘ उपरोक्त देशविभागांव्यतिरिक्त या वर्षातील सुवप्रा नदीकाठी ( वायु. ४४.१६ ) निम्नलिखित लोकसमूह रहात असत :— १. अल्याकरालगोज्वाल; २. कपिलकर्णिक; ३. करञ्जमञ्जम; ४. करवाट; ५. काचल; ६. कुबेर; ७. गोदाव; ८. तङ्ग; ९. तत्सुख; १०. धूमज; ११. पित्तल; १२. बकुल; १३. भ्रमर; १४. महानास; १५. महिव; १६. राजीवकोकिल; १७. वङ्ग; १८. वङ्गकामोदक; १९. वनपातक; २०. वाङ्ग; २१. वाचाङ्ग; २२. वाह; २३. विह; २४. श्वेत; २५. श्वेताङ्ग; २६. समुद्रान्तरक; २७. सहोत्कच; २८. सुमौल; २९. सुवर्णकटक; ३०. स्तावक; ३१. हिनान (वायु. ४४.९–१५).

**नद्या**—वायुमते सुवप्रा ही येथील सर्वप्रमुख नदी असून, येथील अन्य नद्या पुढीलप्रमाणे होत :— १. ऋषभा; २. एकाक्षा; ३. कम्बला; ४. काञ्ची; ५. कालिन्दी; ६. कुम्भकारी; ७. कुशावती; ८. चन्द्रावती; ९. चम्पावती; १०. तामसी; ११. दक्षा; १२. दण्डा; १३. दर्भावती; १४. नदनन्दिनी; १५. पलाशा; १६. पीवरी; १७. पुण्या; १८. पुण्योदा; १९. पुष्कला; २०. प्रभञ्जना; २१. बकुला; २२. ब्राह्मी; २३. भद्रा; २४. भारती; २५. भीमा; २६. महिषी; २७. मानुषी; २८. रुषा; २९. वाहा; ३०. विकीर्णा; ३१. विशाला; ३२. शाकवती; ३३. शिखिमाला; ३४. शुक; ३५. श्यामा; ३६. समुद्रमाला; ३७. सीतोदापातिका; ३८. सुमूला; ३९. सुमेधा; ४०. सुवप्रा; ४१. सुवर्णा ( वायु. ४४.१७–२२ ). मार्कंडेयमते या देशात वक्षु, अमोघा, आणि कामिनी नामक नद्याहि होत्या ( मार्कं. ५६.१५ ).

**कुलपर्वत**—पौराणिक साहित्यमते या वर्षातील ‘ सप्तकुलाचल ’ पुढीलप्रमाणे होते :— १. अशोक ( मार्कं.–विशोक ); २. कम्बल; ३. कृष्ण; ४. जयन्त; ५. वर्धमान; ६. विशाल ( वराह–विशाख ); ७. हरि ( वराह–हरित ) ( वायु. ४४.४; मार्कं. ५६.१२–१३; वराह. ३.१ ).

**अन्य पर्वत**—वायुमते या वर्षातील अन्य पर्वत पुढीलप्रमाणे होत ( परिपत्रक पहा ).

## केतुमाल वर्षान्तर्गत उपविभाग आणि लोकसमूह

| पौराणिक उपविभाग ( वायु. ४४.९-१५ ) | मध्ययुगीन साहित्य |
|---|---|
| १. गोमनुष्य | गोनरिध |
| २. जंग | जंग कथ |
| ३. कपोतक | मुर्घाब् |
| ४. क्रौंच | करुण |
| ५. कृष्णांगमणिपुंजक | कर-तब् |
| ६. कूटकंबलमौषीय | कल-खंभ |
| ७. करंभव | कर्मिन |
| ८. कुच | कुझ ( पंज्देह ) |
| ९. कृष्णपाद | कवदियान् ( काफिर निगान् नदीकाठचे ) |
| १०. कुमुदाभ | खवर्–खुज् |
| ११. कल | रश्त्-कल |
| १२. किष्किंडीपांडुभूमिक | करकदरिया नदीचा त्रिभुज प्रदेश |
| १३. मधौरेय | मध्झ् |
| १४. महांग | मशन् |
| १५. माहेयाचलकूटक | मद्य मिच्कुत् |
| १६. मत्तकासिक | करक नदीचा त्रिभुज प्रदेश |
| १७. शुनकास | सुंकस् |
| १८. सुरेचक | सर्खस् |
| १९. श्रवण | सर्वन् |
| २०. वनासगजभूमिक | विसगिर्द ( काफिर निगान् गावानजिक ) |
| २१. यूथ | युलतान ( मेर्व गावानजिक ) |

## केतुमाल द्वीपातील प्रमुख पर्वत

| पर्वत | आधु. नाव | भौगोलिक स्थान | लोकसमूह | संबंधित नदी |
|---|---|---|---|---|
| १. सुपक्ष | जिल्यम् तौ | प्यंदज् नदीच्या उत्तरेस | वैवस्वत, सोम, वायु, नाग | वख्श्–आप् |
| २. शिखि | अलिम् तौ | ,, ,, ,, | — | प्यंदज् |
| ३. कंक | दर्वाझ् | ,, ,, ,, | — | — |
| ४. वैडूर्य | बदक्षन् | प्यंदज् नदीच्या दक्षिणेस | — | कोक्च |
| ५. कपिल | ख्वाजा महंमद | ,, ,, ,, | — | इश्–कमिश् |
| ६. गंधमादन | हिंदुकुश पर्वताचा उत्तर भाग | ,, ,, ,, | — | कुंदुझ् |
| ७. पिंजर | मझर्–इ–शरिफ टेकड्या | ,, ,, ,, | — | बल्ख्–आप् |
| ८. कुमुद | अक्–तौ–रंगन्–तौ | चक्षु नदीच्या उत्तरेस | किन्नर ( कुमेदै ) | काफिर निगान् |
| ९. मधुमंत | बाबा–तघ् | ,, ,, ,, | — | — |
| १०. मुकुट | बैसुन्–तौ | ,, ,, ,, | पन्नग | — |
| ११. कृष्ण | कारा–तघ् | ,, ,, ,, | गंधर्व | सुर्खन्दरिया |
| १२. श्वेतशैल | झिद्दी गावानजिकचा पर्वत | ,, ,, ,, | — | सुर्खन्दरिया नदीची पूर्वेकडील उपनदी |
| १३. सहस्रशिखर | हिस्सार | ,, ,, ,, | दैत्य | वख्श्–आप् |
| १४. पिंगल | — | मेरु पर्वताच्या पश्चिमेस | — | — |
| १५. रुद्र | — | ,, ,, ,, | — | ... — |
| १६. सुरस | — | ,, ,, ,, | — | — |
| १७. पांडुर | देवौ गावानजिकची टेकडी | ,, ,, ,, | विद्याधर | सुर्खन् |
| १८. त्रिशृंग | वशन्–तव्, खन्–तव्, चिम्तर्ग | ,, ,, ,, | — | — |

**वसाहती**—वायुमते येथील बहुतांशी मनुष्यवस्ती कुमुद, अंजन, कृष्ण, मुकुट, आणि पांडुर पर्वतांमध्ये असून, असूदरिया नदीच्या उत्तरवर्ती आधु. ताजिकिस्तान प्रदेश त्या काळी निर्मनुष्य असावा. अली यांच्या मते या देशातील पौराणिक वसाहती हिस्सार पर्वताच्या दक्षिण उतारावरील ( व्याप्ती–१००×२० मैल ) आधु. बैसुन्, देवौ ( मध्ययुगीन–'चघनियान्' ), कारा–तघ्, स्टॅलिनाबाद ( मध्ययुगीन–'शुमन्' ) आणि काफिर निगान् ( मध्ययुगीन–'अज़्दियान' ) प्रदेशात असाव्यात.

पौराणिक साहित्यात वैवस्वत, सोम, वायु, नाग आदींचे निवासस्थान म्हणून निर्देशिलेला वख्श्–आप्, काफिर निगान, सुर्खन्–आला–शिरबाद नद्यांचा त्रिभुज प्रदेश त्याकाळी मनुष्यवस्तीविरहित असावा. वखन, शुघ्नन्, रोशन् आदि नदीखोऱ्यांतील अग्निउपासकांचा निर्देश वायु पुराणात हेतुतः टाळला आहे ( अली, पुराणाज्. पृ. ९६ ).

**केतुमाला** ( नदी )—महाभारत धौम्ययात्रामते पश्चिम भारतातील एक नदी ( म. आर. ८७.१२ ).

**केत्वीश्वर** ( लिंग )—प्रभासक्षेत्रातील एक शिवलिंग ( स्कन्द. प्रभास. प्र. ५१ ).

**केथुन** ( विभीषणस्थान )—राजस्थानातील कोट्यापासून ८ मैलांवरील एक विभीषणस्थान. स्थानिक आख्यायिकामते येथील विभीषणमूर्ती दाशरथि रामाने स्थापिली ( ती. पृ. २८४ ).

**केदह** ( बृहद्भारतीय नगर )—आग्नेय आशियातील मलाया द्वीपकल्पातील एक बृहद्भारतीय नगर. मलेशियातील आधु. केदा नगर हेच होय. गुप्त स्थापत्य आणि

शिल्पशैलीचे अनेक अवशेष येथे सापडले आहेत.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. टॉलेमी | कौलि |
| २. अरबी साहित्य | कलाह |
| ३. तांग राज्यकालीन चिनी साहित्य | को–लो |

**नामव्युत्पत्ती**—सांकृत्यायन यांच्या मते याची 'केदह' आणि 'केद्दा' ही दोन्ही नावे संस्कृत 'कला'ची अपभ्रष्ट रूपे आहेत.

**टॉलेमीच्या ग्रंथात**—या ग्रंथमते या विषुववृत्तावरील गावी ( रेखांश १६०°-२० पूर्व ) चीनगामी ग्रीक आणि अरबी जहाजांचे मार्ग एकत्र होत असून, मलबारमधील कौलम् ( आधु. क्विलॉन ) पासून येथे जाण्यास एक महिना लागे. तत्कालीन यवद्वीपाच्या ताब्यात हे असून, येथे कथलाच्या विपुल खाणी होत्या.

**चिनी साहित्यात**—या साहित्यमते शलाहिट ( आधु. मलाक्का ) सामुद्रधुनीतील हे ( को-लो ) बंदर सयामच्या आखातानजिकच्या कंद्रज खाडीच्या प्रवेशद्वारानजिक ( = मलाया द्वीपकल्पाच्या सुदूर दक्षिणेस ) होते.

**मध्ययुगीन इतिहास**—स. १४७४ मध्ये येमेननिवासी एका फकिराने येथील पोदिसत् राजाला मुसलमान बनवून त्याचे सुल्तान मुलजुफुलशहा नामकरण केले. त्याचा पुत्र मुहंमदशहाने ( स. १४७८–१५१६ ) याचे 'केदा-दारुल्-अमन' असे नामकरण करून यास व्यापारी बाजारपेठेचे गाव बनविले. इ. स. १८ व्या शतकात हे ब्रिटिशांनी जिंकले ( सांकृत्यायन, बौद्ध संस्कृति. पृ. ७६–७८ ).

**अवशेष**—यानजिकच्या केद्दा-शिखर पर्वतावर हिंदु देवमंदिरांचे आणि शिल्पकृतींचे, तसेच इ. स. ४ थ्या शतकातील बौद्ध मंदिराचे अवशेष आणि संस्कृत शिलालेख सापडले आहेत.

**केदार** ( लिंग )—वाराणसी येथील ६८ शिवस्थानांपैकी एक ( अग्नि. ११२.५; कूर्म. पूर्व. ३१.४६; ३५.१२; उत्तर. २०.३४; मत्स्य. १८१.२९; लिङ्ग. १.९२.७; १३४ ). येथील ईशानेश्वर नामक शिवलिंग केदारनाथहून येथे आले ( स्कन्द. काशी. ३३.१७२; ६९.९३; ७३. ३३; ७७; ९७.२५० ). आधु. प्रह्लादकेशव तीर्थाच्या पश्चिमेस केदारघाटानजिक हे आहे.

२. काशी येथील 'उग्र' शिवलिंगाचे नामांतर ( पद्म. आदि. ३१.१५; उग्र पहा ).

३. अवंती येथील ८४ शिवलिंगांपैकी एक ( स्कन्द. आवन्त्य. अ. ३१.१; च. लिं. ६७; नारद. उत्तर. ७८. ३० ).

४. प्रभासक्षेत्रातील एक शिवलिंग ( स्कन्द. प्रभास. प्र. ३९; नारद. उत्तर. ७०.१० ).

५. महीसागर संगमक्षेत्रातील एक शिवलिंग ( स्कन्द. माहेश्वर. कौ. ५७.३–४ ).

६. वस्त्रापथक्षेत्रातील एक शिवलिंग ( स्कन्द. प्रभास. व. १६.५३ ).

७. ( तीर्थ ) कुरुक्षेत्रातील एक तीर्थ ( म. आर. ८१. ५९; नारद. उत्तर. ६५.६९; वामन. ३६.२६; पद्म. आदि. २६.६९ ).

८. पंजाबातील कर्नाल जिल्ह्यातील कैथल गावानजिकचे एक पवित्र सरोवर. याच्या तीरावर सात शिवालये आहेत. नामांतर–'वृद्धकेदार' ( ती. पृ. ८४ ).

९. अर्बुद पर्वतान्तर्गत एक तीर्थ ( स्कन्द. प्रभास. अ. ९.१; ४०.६ ).

१०. श्रीशैल पर्वतान्तर्गत एक तीर्थ ( पद्म. उत्तर. २०.१५ ).

११. महाभारत धौम्ययात्रामते पूर्व भारतातील मतंग आश्रमानजिकचे तीर्थ ( म. आर. ८५.१९ ). पौराणिक तीर्थावलीतहि याचा निर्देश आढळतो ( कूर्म. उत्तर. ३७.५; पद्म. आदि. ११.४; २६.६८; ३९.१५; वराह. १२२.१४; वामन. ७९.२ ).

१२. नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( कूर्म. उत्तर. ४१. ७; नारद. उत्तर. ७७.१७ ). गुजरातमधील आधु. चाणोद-नजिक सध्या हे आहे ( ती. पृ. ४३४ ).

१३. मध्यप्रदेशातील झाँसीनजिकच्या रानीपूरपासून २ मैलांवरील रानी गावचे एक पर्वतीय शिवलिंगस्थान ( ती. पृ. २०९ ).

१४. ( देवीस्थान ) पद्ममते एक देवीस्थान. येथील देवीचे नाव मार्गदायिनी होते ( पद्म. आदि. १४.१९४; मत्स्य. १३.३० ).

१५. ( विष्णुस्थान ) नृसिंहमते एक विष्णुस्थान. येथील विष्णूचे नाव माधव होते ( नृसिंह. ६५.१२; वामन. ९०.३ ).

१६. पद्ममते एक ब्रह्मदेवस्थान. येथील ब्रह्मदेवाचे नाव पद्माध्यक्ष होते ( पद्म. आदि. २९.१५५ ).

१७. ( लिंग ) हिमालयातील गंगोत्री–केदारनाथ मार्गावरील एक शिवस्थान. नामांतर– 'वृद्धकेदार' ( ती. पृ. ५३ ).

१८. ( क्षेत्र ) गया येथील एक पवित्र क्षेत्र ( नारद. उत्तर. ४६.४६ ).

**केदारनाथ** ( अर्धज्योतिर्लिंग )—शिवमते हिमवत्पृष्ठावरील बदरिकाश्रम ( आधु. बदरीकेदार ) येथील एक अर्धज्योतिर्लिंग ( शिव. कोटि. १९; हिमालयातील अन्य अर्धज्योतिर्लिंग–नेपाळमधील पशुपतिनाथ ). गढवाल प्रदेशातील रुद्र हिमालय ( सुमेरु ) पर्वतान्तर्गत नागपुर परगण्यातील पत्ति मल्ल–कालिपत प्रदेशातील आधु. केदारनाथ ( समुद्रसपाटीपासून उंची–११७३५′ ) शिवस्थान हेच होय ( अक्षांश ३४°–४४′ उत्तर; रेखांश ७९°–६′ पूर्व; यू. पी. गॅझे. ३६.१७३ ). येथे महिषपृष्ठभागाकृती त्रिकोणी शिलेची शिवलिंग म्हणून पूजा करतात.

**भौगोलिक स्थान**—रुद्र हिमालयाच्या रुद्र हिमालय, विष्णुपुरी, ब्रह्मपुरी, उद्‌गीरकंठ आणि स्वर्गारोहिणी संज्ञक पाच शिखरांपैकी रुद्र हिमालय ( प्राचीन 'गंधमादन पर्वत' ) आणि महापंथ शिखरांच्या काटकोनातील सुळक्यावर हे आहे.

महाभारतमते बदरिकाश्रमाच्या ईशान्येकडील गंधमादन नामक दुर्लंघ्य पर्वतापलीकडच्या स्वर्गारोहिणी शिखरावर युधिष्ठिराव्यतिरिक्त अन्य पांडवांचे आणि द्रौपदीचे पतन झाले. सत्य युगान्तर्गत उपमन्यूच्या व द्वापर युगान्तर्गत पांडवांच्या या तपस्यास्थानी पांडव अनेक वेळा यात्रेस आले होते ( गंधमादन पहा ).

**माहात्म्य**—महाभारतकाली दुर्लंघ्य मानलेली केदारनाथयात्रा सध्या काहीशी सुलभ झाली असून, पांडवपूजित केदारनाथ आज साऱ्या भारत खंडाचा स्वामी आणि भक्तांचा कामपूरक देवाधिराज बनला आहे—

अस्य खण्डस्य स स्वामी सर्वेशोऽपि विशेषतः।
सर्वकामप्रदः शम्भुः केदाराख्यो न संशयः॥
( शिव. कोटि. १९.२५ ).

**बदरी-केदार संयुक्त यात्रा**—सर्वसामान्य यात्रेकरू केदारनाथ आणि बदरीनारायण या शैव आणि वैष्णवधामांची संयुक्त यात्रा करतात. बदरीनारायण येथे ज्योतिर्मठस्थापना करून केदारनाथ येथे देहत्याग करणारे श्रीमत् शंकराचार्य हे या धामांच्या संयुक्त उपासनेचे आद्य प्रवर्तक मानले जातात. स्कंद पुराण केदार खंडमते केदारनाथाच्या दर्शनाविना बदरीनाथाची यात्रा निष्फल होते–

अकृत्वा दर्शनं वैश्य केदारस्याघनाशिनः।
यो गच्छेद् बदरीं तस्य यात्रा निष्फलतां व्रजेत्॥

**पंचकेदार**—शिवमते नरनारायणांच्या प्रार्थनेवरून ज्योतिर्लिंगस्वरूपी केदारनाथ शिव बदरिकाश्रमी अवतीर्ण झाला. स्वकुलघातक मनःशांतीच्छू पांडव त्याच्या दर्शनास आले असता त्यांच्या पातकाने रुष्ट होऊन केदार महिषरूपाने भूविवरात लुप्त झाला. सत्यस्वरूपज्ञ भीमाने महिषाचा पृष्ठभाग पकडताच प्रसन्नचित्त केदारनाथाने पांडवांना भ्रातृहत्यापातकातून मुक्त केले. हिमालयान्तर्गत पृथ्वीविवरात घुसलेले महिषरूपधारी शिवाचे पाच अवयव 'पंचकेदार' ( व्याप्ती–७०८ मैल ) नावाने सुविख्यात झाले. शिवमते हिमालयान्तर्गत महिषरूपधारी 'पंचकेदार' पुढीलप्रमाणे होत :—

| केदार | शिवायव |
|---|---|
| १. केदारनाथ | पृष्ठभाग |
| २. मध्यमेश्वर | नाभि |
| ३. तुंगनाथ | बाहु |
| ४. रुद्रनाथ | मुख |
| ५. कल्पेश्वर | जटा |
| ६. पशुपतिनाथ ( नेपाळ ) | शीर्ष |

उपरोक्त केदारांपैकी केदारनाथ आणि पशुपतिनाथ ही एकाच शिवाची द्विविध रूपे असल्याने या सहा शिवस्थानांस 'पंचकेदार' म्हणतात.

**केदारखंडाचा अधिपती**—शिवमते या ( बदरिकेश्वर ) क्षेत्राच्या परिसरातील 'केदारखंड' नामक भूप्रदेशाचा केदारनाथ हा अधिपती असून ( शिव. शत. ४२.२६; योगिनी. १.८; ११ ), स्कंद पुराणाच्या केदार खंडात त्याचे माहात्म्य सविस्तरपणे वर्णिले आहे. या ग्रंथमते शिवचरित्रातील निम्नलिखित आख्याने या परिसरात घडली :—१. शिव–पार्वती विवाह; २. स्कंदजन्म; ३. पार्वतीतपश्चर्या; ४. दक्षयज्ञ; ५. पार्वती–शबरी लीला; ६. मदनदहन ( स्कन्द. माहेश्वर. केदार. १–३४ ).

**मंदिर**—उंच जोत्यावरील ( उंची–४′ ) येथील मंदिराभोवती सात–आठशे लोक बसतील एवढा चबुतरा आहे. मंदिराच्या महाद्वारासमोर दगडी नंदी आणि उभय बाजूंस

द्वारपालप्रतिमा आणि उजव्या बाजूस गणेशप्रतिमा आहे. त्यांची पूजा करूनच भक्तजन केदारनाथाच्या दर्शनास जातात. महाद्वारान्तर्गत सभामंडपाच्या मध्यभागी नंदी आणि गरुडाच्या छोट्या प्रतिमा आणि समोरच्या भिंतीवर पाच पांडवांच्या, तसेच द्रौपदी, कुंती, पार्वती आणि लक्ष्मी देवींच्या मूर्ती आहेत. सभामंडपाच्या अंतर्भागातील गाभाऱ्याचा श्रीमत् शंकराचार्यांनी जीर्णोद्धार केला असून, त्यांची एक मूर्तीहि तेथे आहे.

**मूर्ती**—केदारनाथाच्या पर्वतशिखरसदृश शिळेचा (उंची–३′, घेर–१०′) मध्यभाग काहीसा बैठा असून, त्याच्या डाव्या बाजूस वर्षाचे बारा महिने तुपाचा नंदादीप असतो. नोव्हेंबरमध्ये सूर्य कर्क राशीत गेल्यानंतर हिमवृष्टीमुळे येथील पुजारी उखीमठ येथे जातात, आणि मे महिन्यात सूर्य मेष राशीत प्रविष्ट झाल्यानंतर ते येथे पुन्हा परततात. या सहा महिन्यांच्या काळात बंद दरवाज्या-आड येथील नंदादीप अखंडपणे तेवत राहतो.

केदारनाथाच्या शिळेवर सदैव रेशमी वस्त्र चढविले असून, सकाळी बारा वाजेपर्यंत ते भक्तालिंगनासाठी दूर करतात. भक्तजन स्वतःच्या वक्षभागाने या शिळेस आलिंगन देतात (निर्वाणपूजा). संध्याकाळी आरतीच्या वेळी शिळेचे दुरून दर्शन घ्यावे लागते.

**यात्रामार्ग**—गंगोत्री आणि यम्नोत्री (गंगा आणि यमुना नद्यांची उगमस्थाने) येथील जलाभिषेक केदारनाथास करणे पुण्यप्रद मानतात. यामुळे या क्षेत्राचा परंपरागत यात्रामार्ग या क्षेत्रद्वयावरूनच जातो. या क्षेत्राचे प्रमुख यात्रा-मार्ग पुढीलप्रमाणे होत:—

**(१) परंपरागत मार्ग**—हरिद्वार → हृषीकेश → देवप्रयाग → तेहरी → धरासु → यम्नोत्री → उत्तर काशी → गंगोत्री → त्रिजुगीनारायण → गौरी कुंड → केदारनाथ. या मार्गातील गौरी कुंड → केदारनाथ हा ११ मैलांचा अंतिम टप्पा काहीसा दुष्कर आहे.

**(२) हृषीकेश मार्ग**—हृषीकेश → देवप्रयाग → श्रीनगर → रुद्रप्रयाग → उखीमठ → केदारनाथ.

**(३) कठगाव मार्ग**—कठगाव → भीमताल → द्वारहट → कर्णप्रयाग → चमोली → उखीमठ → केदारनाथ.

यात्रेकरू सामान्यतः हरिद्वारमार्गे केदारनाथास जाऊन कठगावमार्गे परत येतात.

**तीर्थे**—या क्षेत्राच्या परिसरातील प्रमुख तीर्थे पुढील-प्रमाणे होत :– १. **गौरी कुंड** (केदारनाथाच्या ११ मैल दक्षिणेकडील उष्णोदक कुंड; कार्तिकेयजन्मानंतर पार्वती-स्नान); २. **त्रिजुगीनारायण** (गौरी कुंडाच्या दक्षिणेस; शिव-पार्वती विवाहस्थान); ३. **मुंडकटा गणेश** (त्रिजुगी-नारायण–केदारनाथ मार्गावर; गणेश शिरच्छेद आणि हस्तिमुखप्राप्तिस्थान); ४. **भैरवझाप** (केदारनाथ मंदिरापासून ४ मैलांवर; जीवन्मुक्त्यर्थ देहत्यागस्थान); ५. **श्रीमत् शंकराचार्य-समाधी** (केदारनाथ मंदिरापासून ४५०′ डावीकडे, धर्मोपदेशक शंकराचार्यांची पूर्णाकृती प्रतिमा); ६. **भिल्लेश्वर राणीबाग** (श्रीनगर रस्त्यावर; अर्जुन पाशुपतास्त्रप्राप्तिस्थान; महाभारतान्तर्गत गंध-मादन पर्वतावरील इंद्रकील टेकडी).

**यात्राविधी**—लक्ष्मीधरकृत 'तीर्थकल्पतरु'मते येथील (केदारक्षेत्र) शिवनिवासपुनीत ईशान शिखरान्तर्गत रेतस्कुंडातील जलप्राशन मुक्तिप्रद असून, यात्रेकरूने येथील मंदाकिनी नदीमध्ये स्नान करून, तसेच शिव, उमा, गणेश आदींचे दर्शन करून या कुंडातील जल प्राशन करावे. तदनंतर पुन्हा केदारशिवाचे दर्शन घ्यावे. असे केल्याने त्याच्या समस्त कुलाचा उद्धार होतो. विष्णुधर्म-सूत्रमते केदारनाथ, महागंगा (बदरीनाथ येथील अलक-नंदा), आणि उत्तर मानस येथील श्राद्धे पुण्यप्रद होत (विष्णुधर्म. ८५. १७; २३; ३६).

**यात्रा**—हरिद्वार येथील द्वादशसांवत्सरिक कुंभमेळा यात्रेच्या वेळी केदारनाथ आणि बदरीनारायणाची यात्रा पुण्यप्रद मानतात. षट्सांवत्सरिक अर्ध कुंभमेळ्याच्या यात्रा-प्रसंगी यात्रेकरू हरिद्वार, केदारनाथ, आणि बदरीनाथाची त्रिस्थली यात्रा करतात.

**पुजारी**—केदारनाथ, बदरीनाथ, गुप्तकाशी, उखीमठ आणि मध्यमेश्वर या पंचतीर्थांची व्यवस्था केदारनाथ येथील जंगम गोसावी सांप्रदायाच्या लिंगायतज्ञातीय रावळ पुजाऱ्यांकडे आहे.

२. (कुंड) बिहारमधील राजगृहनजिकच्या ब्रह्म-कुंडापासून ६००′ अंतरावरील एक पवित्र जलकुंड. येथून ६००′ अंतरावर विष्णुपद तीर्थ, आणि २ मैल पश्चिमेस सोमनाथ पर्वतीय मंदिर आहे. नामांतर–'जीयत कुंड' (ती. पृ. १६७).

३. हरचरितचिंतामणिमते कश्मीरातील विजयेश्वरा-पासून ३ मैलांवरील एक पवित्र जलकुंड (हरचरित. ८.६९).

**केन्दुबिल्व** (ग्राम)—पूर्व भारतातील अजया नदी-काठचे जयदेव कवीचे जन्मस्थान. बंगालमधील सिहुली

रेल्वेस्थानकानजिकचे आधु. केंदुलीग्राम हेच असून, येथे जयदेवाचे समाधिमंदिर आहे ( ती. पृ. १७३ ).

**केन्दूर** ( ताम्रपटस्थान )—पश्चिम चालुक्य राजा कीर्तिवर्मन् ( द्वितीय )च्या स. ७४९ च्या ताम्रपटाचे पुणे जिल्ह्यातील उपलब्धिस्थान ( एपि. इंडि. ७.२३०; ९. १०२ ).

**केन्द्रीय शिखर** ( बृहद्भारतीय मंदिरस्थान )—कंबूजनरेश यशोवर्मन्च्या ( इ. स. १० वे शतक ) शिलालेखमते अंकोरथोम् येथील 'बयोन' मंदिराचे नामांतर. अन्य नामांतर–'यशोधरगिरि' ( सांकृत्यायन, पृ. १७६; अंकोरथोम् पहा ).

**केप सेलवू कौलोब** ( बृहद्भारतीय देश )—टॉलेमीच्या मते एक बृहद्भारतीय भूशिर ( अक्षांश २° उत्तर; रेखांश–१६३° पूर्व ). ग्लॅफर्ड यांच्या मते आधु. पश्चिम मलाया द्वीपकल्प हेच होय.

**केमज्जू** ( ग्राम )—गुर्जर राजा जयभट ( चतुर्थ )च्या स. ७३६ च्या कावी ताम्रपटमते पश्चिम भारतातील भारुकच्छ विषयातील एक ग्राम आणि मंदिरस्थान. भडोच जिल्ह्यातील आधु. किमोज गाव हेच असून, येथील आश्रमदेव ( आधु. असमेश्वर ) मंदिराचा निर्देश उपरोक्त ताम्रपटात आढळतो ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.९८ ).

**केमोतोन** ( देश )—ह्युएन्त्संगच्या भारत-चीन प्रतियात्रा वर्णनमते मध्य आशियातील लघु तुखार देशाच्या १०० मैल पूर्वेकडील एक देश. स्मिथ यांच्या मते आधु. चेर्चेन देश हाच होय. ह्युएन्संगच्या मते हा देश, तसेच त्याची तटबंदीयुक्त नगरे उजाड असून, त्यांच्या २०० मैल ईशान्येस नव-भाग देश होता ( वॉटर्स, २.३०४ ).

**केरल** ( देश )—पौराणिक साहित्यमते दक्षिणापथ देशातील ( सातपुडा, महादेव आणि मैकल पर्वतांच्या दक्षिणेकडील द्वीपकल्पीय प्रदेश ) पश्चिम समुद्रकिनारीचे एक जनपद ( म. भी. १०.५७; वायु. ४५.१२४; ब्रह्माण्ड. १६.५६; मार्कं. ५४.४५; मत्स्य. ११४.२६; पद्म. आदि. ६.५३; वामन. १३.४० ).

अली यांच्या मते कर्नाटकच्या दक्षिणेकडील पश्चिम घाट आणि अरबी समुद्राच्या दरम्यानचा पश्चिम समुद्रकिनारीचा आधु. मलबार प्रदेश हाच होय. बार्नेट यांच्या मते आधु. त्रावणकोर, कोचीन आणि मलबार जिल्हे मिळून हा बनला असून, आधु. कोइमतूर जिल्हा आणि सालेम जिल्ह्याचा दक्षिण भाग ( प्राचीन कोंगु देश ) उत्तरकालात यामध्ये समाविष्ट झाला. इ. स. ३ र्‍या—७ व्या शतकात हा समृद्धिशिखरावर होता.

मलबार किनाऱ्यावरील आधु. कालिकतसभोवतालचा प्रदेश या देशाचा बालेकिल्ला असून, ब्रिटिश राज्यकाली हा देश त्रावणकोर संस्थानात समाविष्ट होत असे.

रामकृष्ण भांडारकर यांच्या मते पौराणिक दक्षिणापथ ( नर्मदा नदीच्या दक्षिणेकडील द्वीपकल्पीय प्रदेश ) चोल, चेर ( केरळ ) आणि पांड्य लोकसमूहांनी व्यापला असून ( भांडारकर, महाराष्ट्र इतिहास. पृ. १ ), हा पांड्य देशाच्या उत्तरेस आणि चोल देशाच्या पश्चिमेस पश्चिम समुद्रकिनारी होता. या देशाची उत्तर परिसीमा होनावर गावाने बनली असून, याच्या पूर्व सरहद्दीवरील पर्वतराजीमुळे चोल आणि पांड्य आक्रमणापासून याचे रक्षण होत असे.

**भौगोलिक वैशिष्ट्य**—अली यांच्या मते भारतीय द्वीपकल्पाच्या दक्षिणतम टोकापर्यंतचा पाणथळ, वालुकामय, आणि उष्ण व दमट हवेचा पश्चिम समुद्रकिनारीचा प्रदेश यामध्ये समाविष्ट असून, त्याच्या पूर्व सरहद्दीवरील वेलदोड्यांच्या टेकड्यांमध्ये पौराणिक 'सेतुक' देश होता. पश्चिमेस समुद्र आणि पूर्वेस पश्चिम घाट यामुळे हे देशद्वय राजकीय आणि सांस्कृतिक दृष्टीने अलग पडले असून, तेथे पिकणारे मिरे आणि वेलदोडे साऱ्या जगात निर्यात होत असत.

**अशोकाच्या राज्यकाली**—देवदत्त भांडारकर यांच्या मते अशोकसाम्राज्याच्या दक्षिण सरहद्दीवरील हा पश्चिम समुद्रवर्ती प्रदेश पांड्य देशाच्या पश्चिमेस, आणि सातियपुत्र ( मदुरा राज्यातील सत्यमंगलम् प्रदेश ) देशाच्या आग्नेयेस असून, आधु. दक्षिण कर्नाटक, कूर्ग, मलबार, वायव्य म्हैसूर आणि उत्तर त्रावणकोरचा समावेश त्यामध्ये होत असे.

**पेरिप्लसच्या काळी**—डॉ. अय्यंगार यांच्या मते पेरिप्लसच्या काळी आधु. कोचीन आणि त्याच्या दक्षिणेकडील समुद्रपट्टीचा समावेश यामध्ये असून, त्याची राजधानी मौझिरिस् ( आधु. क्रंगनोर ) गावी होती. टॉलेमीच्या काळी याची राजधानी कोइमतूर जिल्ह्यातील करौर ( अमरावती नदीकाठचे आधु. करूर ) गावी होती ( इंडि. अँटि. ८.१४५; ३६७ ).

**मतांतरे**—रॉयचौधरी यांच्या मते उत्तरेस सत्य ( कूपक देश ) आणि दक्षिणेस मध्य त्रावणकोरमधील करुनगपल्ली तालुक्यातील कन्नेति गावाच्या दरम्यानच्या या देशाच्या दक्षिणेस मूषिक देश होता. पेरियार ( कौटिलीय अर्थशास्त्र–'चूर्णी' ) ही या देशाची भाग्यदायिनी नदी असून, तिच्या काठच्या कोचीननजिकच्या वंजि ( आधु.

तिरुकरूर ) गावी याची राजधानी होती. उत्तरकालात ती या नदीच्या मुखानजिकच्या तिरुवंजिकुलम् गावी हलविण्यात आली ( रॉयचौधरी, पृ. २७३ ).

बारुआ यांच्या मते उपरोक्त सारी अनुमाने टॉलेमी आणि पेरिप्लसकालीन केरल देशासंबंधीची असून, अशोक-काली हा (केरलपुत्त) देश उत्तरेस सातियपुत्र, आणि दक्षिणेस ताम्रपर्णी नदी यांच्या दरम्यान पांड्य देशाच्या पश्चिमेस होता. यानंतरचे काळात सातियपुत्र आणि केरलपुत्र देशांच्या सरहद्दीमध्ये अनेक फेरबदल झाले. उदा. मार्कंडेय-मते सातियपुत्र ( कुल्य ) देश द्रविड ( ग्रीक–'लिमिरिके' ) देशामध्ये समाविष्ट असून, पेरिप्लसमते द्रविड देश (दमरिके, तमलिकम् ) केरोबोथ्र ( केरलपुत्र ) देशात समाविष्ट होता ( बारुआ, अशोक शिलालेख. पृ. २३५ ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. बृहत्संहिता | |
| अ. ( १४.१२ ) | कैरलक लोकसमूह |
| ब. ( १४.१५ ) | चेर्य, चैर्य |
| २. मार्कंडेय पुराण ( ५७.४५ ) | केवल |
| ३. अशोक आज्ञालेख क्र. २ ( कॉर्पस्. इन्स्क्रि. १.२.३ ) | केरलपुत ( केरलपुत्र ) |
| अ. गिरनार | केतलपुत |
| आ. शहाबाझगढी | केरडपुत्र |
| इ. काल्सी | केललपुत |
| ई. मानसेहरा | केरलपुत्र |
| ४. टॉलेमी | करौर |
| ५. पेरिप्लस ( इंडि. अँटि. ८. १४५ ) | केरोबोथ्र |
| ६. होयसाळ राजा विष्णुवर्धनाचा स. ११२२ चा शिलालेख ( एपि. कर्ना. ५.१०२ ) | चेर |
| ७. शक्तिसंगमतंत्र | हंसकेरल, सर्वेश-केरल, मलयाल |
| ८. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य | |
| अ. (अभिधान.१३०.९६१) | ओंड्र |
| आ. ( अनेकार्थ.९०.५३० ) इ. ( मेदिनी. १२४.९९ ) | मलय |
| ९. स्थानिक नामांतरे | चेरतल, चेरनाडु, मलैनाडु,मलयाली |

**नामव्युत्पत्ती**—'चेर राजवंशनियंत्रित देश' अशा अर्थाने यास 'चेरतल' ( चेरनाडु ) नाव मिळाले असून, 'केरळ' हे 'चेर'चे कानडी रूपांतर असावे ( इंपि. गॅझे. ५.५ ). अन्य अभ्यासकांच्या मते 'केर ( नारळ ) वृक्षांचा देश' अशा अर्थाने यास 'केरल' नाव मिळाले. 'पर्वतीय देश' अशा अर्थाने यास 'मलैनाडु', आणि 'पर्वत ( मलै ) आणि समुद्राच्या ( आली ) दरम्यानचा देश' अशा अर्थाने 'मलयाली' नामांतरे मिळाली. 'पश्चिम समुद्रवर्ती ( मलयवर ) देश' अशा अर्थाने यास 'मलबार' नाव मिळाले ( मलयवर>मलयबर>मलबर>मलबार ). टॉलेमीच्या मते याच्या 'करौर' ( आधु. करूर ) राजधानीच्या गावावरून यास 'करौर' वैकल्पिक नाव प्राप्त झाले.

**उत्पत्ती**—केरलमाहात्म्यमते येथील सागरतीरी तपस्यामग्न परशुरामाला वरुणाने समुद्राचा इष्ट भाग परशूने कापून घेण्यास सांगितले. त्यानुसार परशुरामाने कन्या-कुमारीपर्यंत परशू फेकून हा प्रदेश वसाहतयोग्य बनविला. त्याने येथे वसाहतीसाठी आणलेल्या उदीच्य ब्राह्मणांनी स्थानिक नागपूजक स्त्रियांशी विवाह करून येथील 'नागर' ( शिव ) नामक संमिश्र लोकांची निर्मिती केली.

परशुरामाचे काळापासून येथे नागपूजा आणि वृक्षपूजा प्रचलित असून, हरएक घराच्या बागेच्या नैर्ऋत्य कोपऱ्यात 'नागकोट्ट' ( नागस्थान ) नामक मोकळी जागा आढळते. तेथील नागफणाकृती दगडाच्या ( चित्रकूट कल्लू ) परिसरात वृक्ष आणि नागांना मुक्त प्रवेश असतो. येथे नागहत्या गोहत्येसमान महान पातक असून, ते घडल्यास दहा दिवसांचे अशौच पाळतात. येथील नंबुद्री ब्राह्मण स्वतःस कामपूरक नागदेवाचे पुजारी म्हणवितात. नागपंचमीचा उत्सव येथे सणाप्रमाणे करतात. अभ्यासकांच्या मते येथील मातृपूजा, शक्तिपूजा आणि नागपूजाधारित मातृप्रधान संस्कृती ( मरुमक्कत्तायम् ) नागपूजेच्याच अवशेषस्वरूप आहे ( अन्य नागसंस्कृतिप्रधान देश– 'आसाम' ). या देशाच्या प्राचीन समाजव्यवस्थेतील 'कूट्टम्' ( ग्रामप्रमुख ) आणि 'कुरि' ( ग्रामप्रमुखनिर्णय ) या संज्ञाहि आसाम-मधील नागभाषेसदृशच आहेत.

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**—या देशाच्या प्राचीनतम चेरवंशीय राजांच्या 'पेरुमाल' उपाधीवरून ते मूळचे 'तमिळगम्' ( चोल अथवा पांड्यवंशीय ) असावेत. स्थानिक आख्यायिकामते या वंशाच्या प्रह्लादपुत्र महाबल नामक आद्य राजाची राजधानी आधु. अर्नाकुलमपासून

शंभर मैलांवर होती. चेर राज्यकाली या देशाची बाजारपेठ कोडंगल्लूर गावी असून, तेथे व्यापारासाठी स्थायिक झालेले फोनेशियन व्यापारी उत्तरकालात 'पणिक्कर' नावाने सुविख्यात झाले.

उत्तरकालात येथे येऊन राहिलेल्या आर्य लोकांनी त्रैवार्षिक लोकनियुक्त 'रक्षापुरुषा'द्वारा राज्यशासनाची नवी पद्धती रूढ केली. त्या काळी हा देश 'पेरिचेल्लूर', 'पयन्नूर', 'पेरंपुर' व 'चेन्नियूर' या चार उपविभागांत (कडकम्) विभागला असून, स्वतंत्र रक्षापुरुषांची राज्ये तेथे होती.

इ. स. पू. २ ऱ्या शतकात ब्राह्मण राज्यकर्त्यांमधील दुहीमुळे येथे 'पेरुमाल' संज्ञक क्षत्रिय राजवंशाचे राज्य सुरू झाले. उदयवाणवर्मन् (इ. स. पू. ११३) हा या घराण्यातील पहिला राजा असून, या राजवंशाचा ७५० वर्षांचा राज्यकाल या देशाचे सुवर्णयुग मानले जाते. कला, कृषि, साहित्य, संगीत, व्यापार आदि साऱ्या क्षेत्रांत याकाळी या देशाची प्रगती झाली. द्रविड परिवारातील सर्वाधिक पुरातन अशा संस्कृतप्रधान मल्याळी भाषेचा, तसेच तीमधील 'मणिप्रवालम्' नामक संस्कृतप्रधान काव्यशैलीचा पाया याच काळात घातला गेला. येथील भास्कर रविवर्मन् राजाने स. ८२५ मध्ये 'कोलंबाब्द' (कोल्लवर्ष) नामक शक सुरू केला. चोल साम्राज्याच्या अधःपतनानंतर येथील चेर राजे दक्षिण भारताचे अधिराज बनले. उत्तरकालात त्यांची जागा पांड्य आणि पल्लव राजांनी घेतली.

चेर राजवंशातील कुडक्कोनेडुम्-शेरल्-आदन (प्रथम, स. १२५); पेरु-शेरल्-आदन (द्वितीय, स. १५०); शेन्-गुत्तुवन (स. १७५); यानैक्कट-शेटा (स. २००); पेरुमाल-शेरल्-इरुंबोरै (इ. स. ६ वे शतक) आदि राजांचा निर्देश शिलालेख साहित्यात आढळतो.

स. २४ मध्ये सेंट थॉमस नामक खिस्ती मिशनरी येथे धर्मप्रसारार्थ आला. उत्तरकालात मुसलमान, सीरियन, यहुदी आदि नाना धर्मांचे लोक येथे स्थायिक होऊन मल्याळम् लोकांचा हा देश संमिश्र जातिजमातींचे निवासस्थान बनला.

**उत्तरकालीन केरळ राजे**—नामकल ताम्रपटात इ. स. ७ व्या-८ व्या शतकातील निम्नलिखित चेर राजांचा निर्देश आढळतो :— १. कोट; २. रवि (प्रथम); ३. कंठ (प्रथम); ४. रवि (द्वितीय); ५. कंठ (द्वितीय). इ. स. ९ व्या शतकात येथील चेरुमान पेरुमाल राजाच्या मुसल्मान धर्मस्वीकृतीनंतर येथील चेर वंशाचे राज्य संपुष्टात आले.

स. ९५५-१६०७ च्या दरम्यानच्या या देशाच्या इंदुकोदैवर्मन् आदि राजांची सुसंगत नामावली उपलब्ध असून, त्यापैकी रविवर्मन् कुलशेखर (स. १३०९-१३१६) हा मलिक काफूरच्या आक्रमणकाली मदुरा आणि कांची प्रदेशांचा काही काळ राजा बनला (सेवेल, इन्स्क. पृ. ३६०). येथील केरलवर्मन् राजाचा पराजय करून वॉरन हेस्टिंग्जने हा देश ब्रिटिश राज्यास जोडला.

**पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यात**—या ग्रंथात या देशाचा निर्देश आढळतो (पतञ्जलि. ४.१).

**वाल्मीकि रामायणात**—या ग्रंथमते सुग्रीवाने अंगदास आंध्र, पांड्य, चोल देशांनजिकच्या या देशात सीताशोधार्थ पाठविले होते (वा. रा. कि. ४१.१२).

**महाभारतात**—या ग्रंथमते या दक्षिण भारतीय जनपदातील (म. भी. १०.५७) राजा आणि लोक 'केरल' नावाने सुविख्यात होते. या ग्रंथातील, तसेच पद्म पुराणातील जनपदनामावलीतील या देशाच्या पुनरुक्त निर्देशावरून (म. भी. १०.४३; ५७; पद्म. आदि. ६.३९; ५३) या नावाचे दोन देश तत्काली अस्तित्वात असावेत.

युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या दक्षिण दिग्विजयात सहदेवाने हा, तसेच पांड्य, द्राविड, उड्र आणि आंध्र देश दूतांकरवी जिंकले असून (म. स. २८.४८), येथील राजाने युधिष्ठिरास चंदन, अगरू, मोती, तसेच वैदूर्य आणि चित्रक रत्ने उपायन दिली होती (म. स. ५१.४). आपल्या दक्षिण दिग्विजयात कर्णाने हा जिंकला होता (म. आर. परि. १.२४).

**बृहत्संहितेत**—या ग्रंथमते या दक्षिण भारतीय देशातील (बृ. सं. १४.११; काव्यमी. १७.२२६) लोक 'केरलक' नावाने सुविख्यात होते (बृ. सं. १४.१२).

**पौराणिक साहित्यात**—या साहित्यमते हे, तसेच पांड्य, चोल आणि कुल्य लोक 'दक्षिणापथनिवासी' असून (मार्कं. ५४.४५; वायु. ४५.१२४; मत्स्य. ११४.२६; पाठभेद-'केवल'), हरिवंशमते हे चोल आणि पांड्य लोकांच्या समीपवर्ती होते (ह. वं. ३२.१८३६). भागवत पुराण बलराम-तीर्थयात्रामते हे (केरळक्षेत्र) एक पवित्र तीर्थ असून (भा. १०.७९.१९), नृसिंहमते येथील विष्णूचे नाव बलि होते (नृसिंह. ६.५.२२).

**अशोकाच्या शिलालेखात**—अशोकाच्या आज्ञालेख क्र. २ मते दक्षिण भारतातील केरलपुत (केरलपुत्र), चोल,

सातियपुत ( सातियपुत्र ), आणि तंबपन्नी ( ताम्रपर्णी ), हे स्वतंत्र देश ( अंत ) त्याचे मित्र होते.

अशोकाच्या बहुतांशी शिलालेखांत यांचा अनेकवचनी ( केरलपुताः ) निर्देश असून, निम्नलिखित चार शिलालेखांत यांचा एकवचनी निर्देश आढळतो:—१. गिरनार ( केतलपुतः ); २. शहाबाझगढी ( केरडपुत्रः ); ३. काल्सी ( केललपुतः ); ४. मानसेहरा ( केरलपुत्रः ). हुल्ट्झ यांच्या मते येथे केरळनरेशाचा निर्देश अभिप्रेत असावा ( कॉर्पस्. इन्स्क्रि. १.२.३ ).

**महावंशात**—या ग्रंथमतें इ. स. १० व्या शतकात मलबार किनाऱ्यावरील हे लोक सिलोनचे अधिराज असून, यांच्या भयाने सिलोनसम्राट महिंदु रोहन गावी पळाला ( महा. ५५ ).

**टॉलेमीच्या ग्रंथात**—या ग्रंथमते केरोबोथ्रोस् ( केरलपुत्र ) राजाच्या या ( करौर ) देशामध्ये निम्नलिखित बंदरे होती :—१. तोंडि ( क्विलॉनपासून ५ मैल उत्तरेस अगलप्पुले नदीकाठी ), २. मुचिरि ( पेरियार नदीच्य मुखानजिक ); ३. नेक्करै ( कोट्टायमनजिक ); ४. पलैयूर ( चौघाटनजिक ).

**पेरिप्लसच्या ग्रंथात**—या ग्रंथमते या ( केरोब्रोथ्र = केरलपुत्र ) विशाल देशात दमिरिके ( द्रविड ) देश समाविष्ट असून, याची राजधानी ' मौझिरिस् ' ( मुयिरिकुडु= आधु. क्रंगनोर ) गावी होती.

**शिलालेख साहित्यात**—समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद प्रशस्तिलेखमते त्याने केरलराज ( केरलक ) मंटराजास जिंकले होते ( गुप्त इन्स्क्रि. पृ. १३ ). भास्कर रविवर्मनाच्या स. ९११–१०३६ च्या शिलालेखमते त्याचे या ( = आधु. मलबार, कोचीन आणि त्रावणकोर प्रदेश ) देशावर राज्य होते ( त्रावणकोर अर्कि. सर्व्हे. २.३१ ). होयसाळ राजा विष्णुवर्धनच्या स. ११२२ च्या पश्चिम म्हैसूर शिलालेखमते त्याच्या साम्राज्याच्या दक्षिण सरहद्दीवर हा देश होता ( एपि. कर्ना. ५.१०२ ).

चोल राजा राजेंद्र ( प्रथम )च्या स. १०१८ च्या शिलालेखमते येथील शांदिमत् बेटातील या देशाचा परशुरामस्थापित परंपरागत राजमुकुट त्याने जिंकला होता ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. १.९५ ). बंगालच्या आदिसुर राजाच्या ( इ. स. ९ वे शतक ) शिलालेखमते त्याने हा जिंकला होता ( एपि. इंडि. २९.५३ ).

**शक्तिसंगमतंत्रात**—या ग्रंथमते सुब्रह्मण्यमपासून ( आधु. दक्षिण कॅनरा जिल्हा ) जनार्दन मंदिरापर्यंत ( क्विलॉन आणि त्रिवेंद्रमच्या दरम्यानचे आधु. वर्कलाई मंदिर ) पसरलेल्या या देशाचे ' सिद्धिकेरल, ' ' हंसकेरल, ' ' सर्वेशकेरल ' आणि ' मलयाल ' हे चार उपविभाग होते.

**मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात**—या साहित्यात याच्या ' केरल ', ' मलय ' आणि ' ओंड्र ' नामांतरांचा निर्देश आढळतो ( नामांतर परिपत्रक पहा ).

**धार्मिक महत्त्व**—शंकराचार्य आणि रामानुजाचार्यांची कर्मभूमी म्हणून हा सुविख्यात असून, त्रिवेंद्रमचे ' पद्मनाथपुरम् ' हे ब्रह्मी बौद्ध स्तूपसदृश काष्ठमय मंदिर येथील वैष्णव उपासनेचे आद्य पीठ आहे.

**राजधानी**—या देशाची प्राचीनतम राजधानी कोइमतूर जिल्ह्यातील गुज्झेल्हति घाटाच्या पश्चिमेकडील स्कंदपुर गावी ( जे. आर. ए. एस्., स. १८४६, पृ. ११ ), आणि टॉलेमीच्या काळी ( इ. स. २ रे शतक ) कावेरी नदीच्या अमरावती नामक उपनदीच्या पश्चिम किनाऱ्यावरील क्रंगनोरनजिकच्या करौर ( वंजि ) गावी होती (वंजि पहा).

या देशाची गंग, चोल, आणि होयसाळ राज्यकालीन ( इ. स. ३ रे–९ वे शतक ) राजधानी म्हैसूर नगराच्या २८ मैल नैर्ऋत्येकडील आणि श्रीरंगपट्टमच्या ३० मैल पूर्वेकडील कावेरी नदीच्या उत्तर किनाऱ्यावरील दलवनपुर ( तलकाड = आधु. ताकाड ) गावी होती. इ. स. १० व्या शतकात होयसाळ राजांनी ती म्हैसूर प्रांतातील हसन जिल्ह्यातील द्वारवती ( दोरासमुद्र = आधु. हळेबीड ) गावी हलविली. स. १६३४ मध्ये म्हैसूरच्या राजाने ती जिंकली.

**स्थापत्य**—द्राविड देशातील अन्य कोणाहि देशापेक्षा स्थापत्यदृष्ट्या एकसंध अशा या देशातील उत्तर कॅनरा जिल्ह्यापासून त्रावणकोरच्या दक्षिणेपर्यंतच्या हिंदु मंदिरांची, जैन बस्तींची आणि मुसल्मानी मशिदींची स्थापत्यशैली एकसारखी आहे ( फर्ग्युसन, १.३०५ ).

**जैन धर्मप्रसार**—अन्य दाक्षिणात्य देशांच्या तुलनेने या देशात जैन धर्माचा प्रसार सर्वप्रथम आणि सर्वंकष झाला. प्राचीन काळापासून मध्ययुगीन तुलुव राजघराण्यापर्यंतचे ( इ. स. १६ वे शतक ) येथील बहुतांशी राजे जैनधर्मीय होते. दक्षिण कॅनरा जिल्ह्यातील कार्कल आणि वेनूर येथील जैन मंदिरे, तसेच मूडबिद्री, भटकळ आदि गावच्या जैन ' बस्ती ' स्थापत्यदृष्ट्या वैशिष्ट्यपूर्ण आहेत.

**ज्यू वसाहत**—स. ७१ मध्ये रोमन लोकांनी जेरुसलेम लुटल्यानंतर तेथील निर्वासित ज्यूंपैकी काहींनी मलबार किनाऱ्यावर येथील आद्य ज्यू वसाहत स्थापिली ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ९ ).

२. वायुमते मेरु पर्वतोद्भवा सप्तगंगांपैकी पूर्ववाहिनी ह्लादिनी नदीच्या मार्गावरील भारतवर्षाबाहेरील एक देश (वायु. ४७.२).

३. मार्कंडेयमते विंध्य पर्वताश्रयी 'मेकल' देशाचे नामांतर (मार्कं. ५४.५३).

४. (नगर) महाभारत कर्णदिग्विजयमते त्याने जिंकलेले दक्षिण भारतातील एक नगर (म. आर. परि. २४.१.५६).

**केरलक** (लोकसमूह)—बृहत्संहितामते केरळ देशनिवासी 'केरलक' लोकसमूहाचे नामांतर (केरलक पहा).

**केलवडि** (राज्यविभाग)—विजयनगरच्या सदाशिवरायाच्या स. १५५१ च्या बेविनहळ्ळी दानपत्रमते त्याच्या राज्यातील एक उपराज्यविभाग (नाड). म्हैसूरमधील आधु. केलडि प्रदेश हाच असावा (एपि. इंडि. १४. २१०).

**केलीश्वरी** (तीर्थ)—हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक देवीस्थान (स्कन्द. नागर. १४९–१५०).

**केवञ्ज** (ग्राम)–राष्ट्रकूट राजा गोविंद (चतुर्थ) च्या शके ८५२ च्या खंबायत ताम्रपटमते त्याने दान दिलेले लाट देशान्तर्गत खेटक जिल्ह्यातील एक ग्राम. गुजरातमधील कावीनजिकचे आधु. किमाज (कीमज) ग्राम हेच होय (एपि. इंडि. ७.३६).

**केवल** (देश)—मार्कंडेयमते दक्षिणापथ देशान्तर्गत 'केरल' देशाचे नामांतर (मार्कं. ५७.४५; केरल पहा).

**केशधर** (देश)—बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या उत्तर भागातील एक देश (बृ. सं. १४. २६). नामांतर–'केशधारिन्' (मार्कं. ५५.४३).

**केशप्लवन** (तीर्थ)—महाभारत पुलस्त्ययात्रामते भारतवर्षातील एक तीर्थ (म. आर. ८३.३३).

**केशरन्ध्र** (तीर्थ)—पद्ममते अर्बुदारण्यातील कश्यप ऋषींचे तपस्यास्थान, आणि काश्यपीगंगा (आधु. साभ्रमती) नदीचे अवतरणस्थान (पद्म. उत्तर. १३१.१२; अर्बुद पहा).

**केशरिन्** (पर्वत) — वायुमते शाकद्वीपातील 'केसरिन्' पर्वताचे नामांतर (वायु. ४९.८४; केसरिन् पहा).

**केशरियाजी** (जैन तीर्थ)—राजस्थानातील उदयपुरपासून ४० मैलांवरील धुलिया (ऋषभदेव) गावचे जैन तीर्थ. सुमतिसागरमते 'केशरचर्चित पद्मासनाधिष्ठित ऋषभदेवप्रतिमायुक्त' (उंची–६½') अशा अर्थाने यास हे नाव मिळाले. 'धुलिया मिळास सापडलेली मूर्ती' अशा अर्थाने यास 'धुलिया' वैकल्पिक नाव मिळाले. येथील मंदिरात यशःकीर्ति राजाचा वि. सं. १५७२ चा, आणि चंद्रकीर्ति राजाचा वि. सं. १८३२ चा शिलालेख आहे (ती. सं. पृ. १५२-१५३).

**केशवक** (ग्राम)—नरेंद्र राजाच्या इ. स. ५ व्या शतकातील कुरुंद ताम्रपटमते मध्य प्रदेशान्तर्गत रायपुर जिल्ह्यातील महसमुंद गावापासून ५½ मैल आग्नेयेकडील एक ग्राम. याचे आधुनिक स्थान समजत नाही (एपि. इंडि. ३१.२६४-२६५).

**केशवतीर्थ** (तीर्थ)—वाराणसी येथील एक तीर्थ (मत्स्य. १८५.६८).

२. मथुरेमधील कर्णिका येथील एक तीर्थ (वराह. १६३.१६).

**केशवपर्वत** (वर्षपर्वत)— शाकद्वीपान्तर्गत एक वर्षपर्वत (मत्स्य. १२२.१८).

**केशवप्रयाग** (क्षेत्र)—हिमालयान्तर्गत अलकनंदा–सरस्वती संगमानजिकचे एक क्षेत्र.

**केशवप्रासाद** (प्रासाद)—ब्रह्ममते पुरुषोत्तम क्षेत्रान्तर्गत न्यग्रोधवटवृक्षाच्या उत्तरेकडील एक प्रासादस्थान (ब्रह्म. ४५.५७).

**केशवार्क** (सूर्यस्थान)—अवंती येथील एक सूर्यस्थान (नारद. उत्तर. ७८.३१; स्कन्द. आवन्त्य. अ. ३३).

२. काशी येथील द्वादश आदित्यांपैकी एक (स्कन्द. काशी. ५२).

**केशवार्केश्वर** (लिंग)—अवंती येथील एक शिवलिंग (स्कन्द. आवन्त्य. अ. ७०.७८).

**केशितीर्थ**—गंगा नदीकाठचे एक तीर्थ (तीर्थप्रकाश. पृ. ५१५).

**केशिनीतीर्थ** (तीर्थ)—नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ (पद्म. आदि. २१.४०).

**केसपुत्त** (ग्राम)—बौद्ध साहित्यमते कोशल देशान्तर्गत ओपसाद ग्रामाच्या उत्तरवर्ती एक ग्राम. अशोकपिता बिंबिसारकालीन गणराज्याच्या या बाजारपेठेच्या गावी (निगम) गौतम बुद्धाने 'केसपुतिय सुत्ता' चे प्रणयन केले (अङ्गुत्तर. १.१८८). बुद्धचरितमते आळार नामक तत्त्वज्ञ येथीलच होता (बुद्धचरित. १२.२; लॉ, पृ. ३०).

**केसरद्रोणि** (वन) — वायुमते जंबूद्वीपान्तर्गत

केतुमाल वर्षातील कुमुदाचल आणि अंजन पर्वतांच्या दरम्याने एक केशरवन ( वायु. ३८.४५ ). अली यांच्या मते ताजिकिस्तानमधील आधु. अक्–तौ–रंगन्–तौ आणि हिस्सार पर्वतचांया दरम्यानचा वन्य प्रदेश हाच होय. 'द्रोणि' चा शब्दशः अर्थ 'खिंड' असला तरी 'दोन पर्वतांच्या दरम्यानचे वन' असा व्यापक अर्थ येथे अभिप्रेत आहे.

**वायु पुराणात**—या ग्रंथमते अनेक योजने व्याप्तीचे हे वन चंद्रधवलवर्णीय टपोऱ्या पुष्पांनी बहरलेले असून, येथे एक विशाल त्रैलोक्यविख्यात विष्णुमंदिर होते ( वायु. ३८. ४५–४९ ). अली यांच्या मते हिस्सार पर्वतश्रेणीतील काफिर निगान् त्रिभुज प्रदेशातील आधु. अंझोब् हे सर्वोच्च पर्वतशिखर हेच असावे.

**मध्ययुगीन मुसलमानी साहित्यात**—हुदूद-अल-आलम्च्या ग्रंथमते या प्रदेशातील शुमन् ( आधु. काफिर-निगान् त्रिभुज प्रदेश ) आणि वयशागिर्त ( काफिर निगान् खोऱ्यातील आधु. फैजाबाद ) गावची केशरवने प्रसिद्ध होती ( अली, पुराणाज्. पृ. ९५ ).

**केसरपर्वत** ( पर्वत )—जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वतोद्भवा चतुर्गंगापैकी पूर्ववाहिनी सीता नदीच्या मार्गावरील मेरु पर्वताचा एक शाखापर्वत ( विष्णु. २.२.२६; भा. ५. १७.६ ).

२. दक्षिण भारतातील 'वेंकटगिरि' क्षेत्राचे नामांतर ( कविजीवन. ९४; वेंकटगिरि पहा ).

**केसरिन् पर्वत** ( वर्षपर्वत )—शाकद्वीपान्तर्गत एक वर्षपर्वत ( म. भी. १२.२१; कूर्म. पूर्व. ४९.३४; ब्रह्माण्ड. १९.२०; विष्णु. २.४.६३; लिङ्ग. ५३.१९ ). नामांतर–'आंबिकेय'; ( महाभारत )–'दुर्गशैल'; ( वायु. ४९. ८४ )–'केशरिन्'.

**केसरिया** ( बौद्ध स्थान )–विहारमधील चंपारण्य जिल्ह्यातील बसाढ ( प्राचीन वैशाली ) गावापासून ३३½ मैल वायव्येकडील आणि लौरिया अरराज या अशोक स्तंभलेखस्थानापासून २० मैल आग्नेयेकडील एक बौद्ध स्तूपस्थान. कनिंगहॅम यांच्या मते ह्युएन्त्संगच्या प्रवास-वर्णनात निर्देशिलेले वैशाली गावापासून ३३½ मैल वायव्ये-कडील उजाड बौद्ध स्थान हेच असावे ( कनिंग., अर्कि. रिपोर्ट. १.६४; फर्ग्युसन, १. ७९ ).

**केसवपुरी** ( ग्राम )—यादव राजांच्या शके १२३२ च्या पुरुषोत्तमपुरी ताम्रपटमते महाराष्ट्रातील कन्हैरि ( आधु. चाळीसगाव तालुका ) देशविभागातील एक ग्राम ( एपि. इंडि. २५.११९ ). बीड जिल्ह्यातील वाघुर गावा-नजिकचे आधु. केशवपुरी गाव हेच होय ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २७३ ).

**कैअध्ध** ( देश )— जैन प्रज्ञापना ग्रंथमते वायव्य भारतातील 'केकय' देशाचे नामांतर ( डी. के. डी. आय्. पृ. २२५; केकय पहा ). अन्य नामांतर ( बृहत्सं-हिता )–'कैकय'.

**कैकानन** ( देश )— ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते वायव्य सरहद्द प्रांतातील बरण ( आधु. गोमल नदीचे खोरे देशानजिकचा एक पर्वतीय देश. त्याच्या मते या ( कि–किअँग्–न ) देशात घोडे आणि मेंढ्यांची पैदास होत असे. कनिंगहॅम यांच्या मते आधु. क्वेट्टा आणि पिशिन् गावांच्या परिसरात हा असावा ( वॉटर्स, २.२६२ ).

**कैकेय** ( देश )—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते वायव्य भारतातील 'केकय' देशाचे नामांतर ( पा. सू. ७.३.२ ). अन्य नामांतर–'कैकेय्य' ( मत्स्य. ११४.४२; केकय पहा ).

**कैनस्** ( नदी )— अरियनच्या मते मध्य भारतीय 'शुक्तिमती' ( आधु. केन ) नदीचे नामांतर ( जे. आर. ए. एस्, स. १९१४; पृ. २९०; शुक्तिमती पहा ).

**कैर** ( पर्वतीय देश )— मध्ययुगीन साहित्यमते पूर्व भारतातील 'करूष' ( आधु. कैमूर टेकड्या ) देशाचे नामांतर ( पांडे, बिहार. पृ. ४८–४९; करूष पहा ).

**कैरलक** ( लोक समूह )—बृहत्संहितामते केरळ देश-निवासी 'कैरालक' लोकसमूहाचे नामांतर. अन्य नामांतर ( समुद्रगुप्ताचा अलाहबाद प्रशस्तिलेख )– 'केरलक' ( कैरालक पहा ).

**कैरात** ( देश )—कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या उत्तर भागातील एक देश ( मार्कं. ५५.४४ ).

२. ( लोकसमूह ) पराशरतंत्रमते उत्तर भारतातील 'किरात' लोकसमूहाचे नामांतर ( किरात पहा ).

३. ( सर ) श्रीमालक्षेत्रातील एक सरोवर ( श्रीमाल-माहात्म्य. ७ ).

**कैरालक** ( लोकसमूह )—बृहत्संहितामते दक्षिण भारतान्तर्गत केरल देशनिवासी एक लोकसमूह ( बृ. सं. १४.१३ ). नामांतर ( बृहत्संहिता )–'कैरलक'; 'केरलक'; 'कैरलक' ( समुद्रगुप्ताचा अलाहाबाद प्रशस्तिलेख )– 'कैरलक'; ( गुप्त. इन्स्क्रि. पृ. ७. ).

**कैला देवी** ( सिद्धपीठ )—मध्यप्रदेशातील करौली-पासून १८ मैलांवरील एक गुफामंदिर आणि सिद्धपीठ

( ती. पृ. २७७ ).

**कैलापुर** ( ललितापीठ )—ब्रह्माण्डमते भारतवर्षातील पन्नास ललितापीठांपैकी एक ( ब्रह्माण्ड. ४.४४.९७ )

**कैलावत** ( देश )—बृहत्संहितामते उदीच्य भारतातील एक देश ( बृ. सं. १४.२६ ). हे संभवतः 'कैरात'-चे नामांतर असावे. अन्य अभ्यासकांच्या मते वायव्य भारतातील 'कुभातल' देश हाच होय ( कुभातल पहा ).

**कैलास** ( पर्वत )—पौराणिक साहित्यमते जंबूद्वीपान्तर्गत हिमालय पर्वतश्रेणीतील एक मर्यादापर्वत ( सरहद्दीवरील पर्वत ). हा 'मेरुदक्षिण' पर्वत इलावृत वर्ष आणि भारतवर्षाच्या दरम्यान असून ( मार्कं. ५४.२२–२६; ५९.३-४ ), मेरु पर्वताची दक्षिण सीमा ( मर्यादा ) याने बनली होती ( ब्रह्माण्ड. १८.१; मार्कं. ५२.८; लिङ्ग. ४९.२२; ४७; वायु. ३५.९; ३६.२४; ४१.१२; ४७.१; विष्णु. २.२.४० ). विष्णुधर्मोत्तरमते हा हिमालयाचा पश्चिमेकडील अंगभूत पर्वत ( विष्णुधर्म. १.८.१२ ) मेरूचा विष्कंभ ( = मर्यादा ) पर्वत होता ( मार्कं. ५१.२४ ). वायुमते गंधमादन आणि कैलास हे मर्यादापर्वत त्याच क्रमाने मेरूच्या दक्षिणेस होते ( वायु. ३६.२४ ). मत्स्यमते हा हिमवत् पर्वताच्या पार्श्वभागी ( **हिमवतः पृष्ठे** ) होता ( मत्स्य. १२१.२ ).

महाभारतादि ग्रंथात हिमालयाच्या उत्तरेकडील कुमाऊँ, तसेच गढवाल प्रदेशान्तर्गत हेमकूट पर्वतश्रेणीला हे नाव दिले असून ( म. आर. १५१.१; विक्रमोर्वशीय. ४ ), त्यानुसार हिमालयातील लडाख पर्वतश्रेणीच्या पन्नास मैल उत्तरेकडील समांतर पर्वतश्रेणी आजहि 'कैलास' नावाने प्रसिद्ध आहे. पौराणिक साहित्यातील गंधमादन आणि मानस सरोवरयुक्त वैद्युत पर्वत तिच्याच अंगभूत मानले जातात. काही अभ्यासकांच्या मते 'वैद्युत' हे याचेच नामांतर असून, तिबेटातील ही पर्वतश्रेणी सिंधु, सतलज आणि ब्रह्मपुत्रा नद्यांचे उगमस्थान मानण्यात येते.

वायुमते कैलास हे हेमकूट ( आधु. कैलास ) पर्वतश्रेणीचे एक मध्यवर्ती शिखर असून, त्याच्या माथ्यावर कुबेराची अलकापुरी आणि पूर्वेकडील उतारावर ( आधु. तिबेट ) समृद्ध वसाहती होत्या ( वायु. ४१.१–२६ ). या ग्रंथातील 'गंगावतारवर्णनम्' संज्ञक अध्यायातील हिमालयाच्या उत्तरवर्ती पर्वत, नद्या आणि सरोवरांचे वर्णन हे शिखर मध्यबिंदू कल्पून केले असून ( वायु. ४७; मत्स्य. १२१ ), आलेखनज्ञानाच्या अभावी पर्वतीय मध्यबिंदूच्या आधारे अज्ञात हिमालयीन प्रदेशाचे वर्णन करण्याची पद्धती तेथे अवलंबिली असावी.

मानस सरोवराच्या २५ मैल उत्तरेकडील निति खिंडीच्या पूर्ववर्ती गांधी पर्वतश्रेणीनजिक आधु. कैलास शिखर ( समुद्रसपाटीपासून उंची–२२०००′ ) असून ( जे. ए. एस. बी., स. १८३८; पृ. ३१४ ), गंगोत्रीच्या उत्तरेकडील हे स्थान आजहि पवित्र हिंदु आणि जैन तीर्थ मानले जाते. मात्र स. १९६५ च्या चिनी आक्रमणानंतर तेथे जाणे आज दुष्कर बनले आहे.

**पावित्र्य**—पौराणिक साहित्यमते शिवाचे निवासस्थान, तसेच अलकनंदा, गंगा आणि यमुना नद्यांच्या उगमस्थानस्वरूप हा पर्वत अत्यंत पवित्र असून, एक तीर्थ म्हणून महाभारत लोमशयात्रेत ( म. आर. १०४.९; १४५.१५; १५१.१ ), तसेच पद्म पुराणात (पद्म. आदि. १४.१६६), याचा निर्देश आढळतो. महाभारतमते या श्रेष्ठ पर्वताच्या परिसरात ( म. आर. १०८.५५ ) वैश्रवण कुबेराचे निवासस्थान, सौगंधिक सरोवर आणि वन, तसेच बदरी तीर्थ असून ( म. आर. १५३.१; परि. १.१७; भी. ७.३९ ), वामनमते येथे वृषभध्वज नामक विष्णूचे निवासस्थान होते ( वामन. ९०.३३ ). गुप्त राज्यकालीन बंधुवर्मन् राजाच्या मंदसोर शिलालेखमते हा आणि सुमेरु ( मेरु ) पर्वत पृथ्वीचे स्तनयुग्मस्वरूप होते ( गुप्त इन्स्क्रि. पृ. ८५–८६ ). ब्रह्माण्डमते ललिता देवीच्या पन्नास पीठांपैकी हे एक असून ( ब्रह्माण्ड. ४.४४.९५ ), मत्स्य पुराणातहि या पवित्र पर्वताचा निर्देश आढळतो (मत्स्य. १२१.२–३).

**व्याप्ती**— महाभारतमते हा 'षड्योजनशतान्युत' ( सहाशे योजने ) विशाल होता ( म. आर.१४०.१० ).

**आधुनिक काली**—मानस आणि रावणह्रद सरोवरानजिकचा शिवनिवासस्थानस्वरूप पर्वत म्हणून आधु. कैलास हिमाल्यातील पवित्रतम यात्रास्थान मानला जातो. मानससरोवरापासून २५ मैल उत्तरेकडील हा पर्वत त्या सरोवराच्या दक्षिणवर्ती जोहरमार्गातील कुंगरीबिंगरी उंचवस्थावरून दिसू लागतो. परिसरातील अन्य साऱ्या हिमशिखरांहून दिव्य आणि शिवनिवासाला सर्वथैव योग्य असे हे शिखर दिसते. या शिवलिंगाकृती शिखराच्या सभोवतालचे पर्वत षोडशदलयुक्त कमलासदृश असून, त्या सोळा पर्वतांपैकी चौदा पर्वत सुस्पष्ट दिसतात. याच्या समोरची वाकलेली शिखरे मात्र बारकाईने पाहिली तरच दिसत असून, त्यामधून येथील जल गौरीकुंडात पडते.

काळ्याकभिन्न दगडाचे हे शिखर परिसरातील अन्य शिखरांपेक्षा उंच असून, त्यावरील दुग्धधवल हिमावरणामुळे

सभोवतालच्या ताम्रवर्णीय कमलाकृती पर्वतश्रेणीमध्ये ते उठून दिसते. याच्या चतुष्कोणातील चार छोट्या मंदिराकृती शिखरांमुळे निसर्गतःच याच्या दिव्यत्वात भर पडते.

**परिक्रमा**— या शिखराची खडी चढण गिर्यारोहण-साधनावाचून चढणे अशक्य असल्याने यात्रेकरू यास प्रदक्षिणा ( व्याप्ती–३२ मैल ) घालतात. हा दिनत्रयात्मक परिक्रमामार्ग याच्या सभोवतालच्या कमलाकृती पर्वत-श्रेणींच्या बाहेरून, याच्या पायथ्यापासून १$\frac{1}{2}$ मैल अंतरा-वरुन जातो. याच्या या परिक्रमात्मक दर्शनाने यात्रेकरूंना अद्‌भुत मनःशांती आणि पाविश्य प्रतीत होते. स्थानिक आख्यायिकामते मानस सरोवरोद्‌भवा सतलज, सिंधु, ब्रह्मपुत्रा आणि कर्नाली नद्या येथूनच उगम पावतात.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या पर्वताची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा ).

**नामव्युत्पत्ती**— जैन साहित्यमते ‘ अष्टदिशात्मक शिखरयुक्त ’ ( उंची-२०००′ ) अर्थाने यास ‘ अष्टापद ’ वैकल्पिक नाव मिळाले ( ती. सं. पृ. १३३–१३४ ).

**वाल्मीकि रामायणात**—या ग्रंथमते भारताच्या उत्तरवर्ती निर्जन आणि दुर्गम प्रदेशाच्या पलीकडे हा असून, याच्या दक्षिणेस मानस सरोवर होते ( वा. रा. बा. २४.८ ). या मौल्यवान धातुयुक्त पर्वतस्थानी देवांनी अग्नीला पुत्रोत्पत्ती करण्याची आज्ञा दिली असून ( वा. रा. बा. ३७.१० ), येथील कुबेरप्रासादावर रावणाने आक्रमण केले होते ( वा. रा. अर. ३२.१४ ). येथील एक हजार कोटी वानरांना सुग्रीवाने रामसाह्यार्थ पाचारिले असून ( वा. रा. कि. ३७.२२ ), सुग्रीवाने शतबल वानराला येथे सीता-शोधार्थ पाठविले होते ( वा. रा. कि. ४३.२० ).

**महाभारतात**—या ग्रंथमते कुबेर आणि शिवनिवास-स्थानस्वरूप या पर्वतावर (म. आर. १०४.९) निम्नलिखित साधकांनी शिवतपस्या केली होतीः—१. श्वेतकि ( म. आ. परि. १.११८.४०–४१ ); २. राजर्षि सगर ( म. आर. १०४.९ ); ३. भगीरथ ( म. आर. १०७.२४ ); ४. सुरभि ( म. अनु. ८३.२८-३० ). याच्या उत्तरेकडील मैनाक पर्वतावर मयासुराने रत्नखचित मयसभा बांधली होती. या कुबेरोपासक पर्वतावरील ( म. स. ३.२; परि. १.३.१४ ) कुबेरप्रासादात यक्ष, राक्षस, किन्नर, नाग, गंधर्वांचा निवास असून, यानजिकच्या कुबेरशासित सौगंधिक वनात भीम आला होता ( म. आर. १५३.१ ). त्या वनानजिकच बदरिकाश्रम होता ( म. आर. १४२.

## कैलास पर्वताची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. महाभारत ( भी. ६ ) अ. अभिज्ञान शाकुंतल (७) | हेमकूट |
| २. वायु पुराण ( ४७.२३ ) | गौर |
| ३. ब्रह्माण्ड पुराण ( १८.२४ ) | हिरण्यशृंग |
| ४. भागवत ( ४.५.२२ ) | भूतेशगिरि |
| ५. अन्य पौराणिक साहित्य | वैद्युत् ( ? ) |
| ६. दशकुमारचरित ( पृ. ५४ ) | शंकरगिरि |
| ७. कुमारसंभव ( ७.१३ ) | कुबेरशैल |
| ( ८.२४ ) | एकपिंगलागिरि |
| ८. जैन साहित्य | कैलाश, कइलास, कविलास, अष्टापद, अट्ठावय |
| ९. शिलालेख साहित्य | |
| अ. यादव राजा महादेव रायाचा सिंगूर शिलालेख; आ. देवराय महारायाचा स. १२३९ चा डंगूर शिलालेख ( एपि. इंडि. २३. १९४ ) | कविलास |
| १०. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य | |
| अ. ( अभिधान. १४०. १०२८ ) | अष्टपद |
| आ. ( त्रिकाण्ड. ३५.१ ) | कुबेराचल |
| इ. ( त्रिकाण्ड. ३५.१ ) | गण |
| ई. ( शीलोञ्छ. २२३. १७०१ ) | धनदावास |
| उ. ( वैजयन्ती. ४१.९ ) | महित |
| ऊ. ( त्रिकाण्ड. ३५.१ ) | रजतप्रस्थ |
| ए. ( अभिधान. १४०. १०२८; वैजयन्ती ४१. ९ ) | रजताद्रि |
| ऐ. ( अभिधान. १४०. १०२८ ) | स्फटिकाचल |
| ओ. ( शीलोञ्छ. २२३. १७०१; वैजयन्ती. ४१. ९ ) | हराद्रि |
| औ. ( अमर. २.३.३ ) | हेमकूट |
| ११. तिबेटी साहित्य | कंग्रिन् पोचे |

२२; परि. १.१७).

**पौराणिक साहित्यात**—बृहत्संहितामते हा कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या उत्तर भागात असून (बृ. सं. १४.२४; मार्क. ५५.४१), वायुमते हा मेरु पर्वतोद्भवा चतुर्गंगांपैकी अलकनंदा नदीमार्गावर होता (वायु. ४२.३२). वराहमते या उदीच्य पर्वतातून (वराह. ८५.३) अलकनंदा, गंगा आणि यमुना नद्या उगम पावत असत (वराह. ८२). भागवतमते या (भूतेशगिरि) पर्वताभोवती नंदा (गंगा) नदीचा विळखा असून (भा. ४.५.२२;५.१६. २७), कालिकामते या पवित्र पर्वतावर शिवपार्वती काही काळ राहिले होते (कालिका. १३.२३; १४. ३१). ब्रह्माण्डमते या (हिरण्यशृंग, गौर) हिमालयान्तर्गत पर्वतावर भगीरथाने तपस्या केली असून (ब्रह्माण्ड. १८.२४), वायुमते या (गौर) पर्वताच्या पायथ्याशी बिंदु सरोवर होते (वायु. ४७.२३). वराहमते येथील गौरी शिखर म्हणजेच गौरीशंकर होय (वराह. २१५). परंतु भौगोलिक दृष्ट्या ते असंभव वाटते (कालिदास का भारत. पृ. २३). योगिनीतंत्रातहि याचा निर्देश आढळतो (योगिनी. १.१; १२).

स्कंदमते भारतातील अडुसष्ट शिवस्थानांपैकी एक अशा या पर्वतावरील गणाधिप नामक शिवलिंग उत्तरकालात काशी येथे स्थलांतरित झाले (स्कन्द. काशी. ६९.१३२).

**अन्य संस्कृत साहित्यात**—कालिदासकृत कुमारसंभवमते हा 'कुबेरशैल' आणि 'एकपिंगलागिरि' वैकल्पिक नावांनी (कुमार. ७.१३; ८.२४), तसेच अभिज्ञान शाकुंतलमते हा 'हेमकूट' नावाने (अभिज्ञान. ७) प्रसिद्ध होता. मेघदूतमते हा स्फटिकमय असून (मेघ. ५६), दशकुमारचरितमते या (शंकरगिरि) पर्वतावर इक्ष्वाकुवंशीय वीरशेखराने तपस्या केली होती (दशकुमार. पृ. ५४).

कथासरित्सागरमते सहस्रावधी योजने उंचीच्या या गगनचुंबी पर्वतामध्ये मौल्यवान रत्नांच्या अगणित खाणी होत्या (कथा. १.२; २.४.६९).

**शिलालेख साहित्यात**—गुप्त राज्यकालीन विश्ववर्मन् आणि बंधुवर्मन् राजांच्या गंगधार आणि मंदसोर शिलालेखांत याचा निर्देश असून (गुप्त इन्स्क्रि. पृ. ७८; ८५–८६), रामचंद्र राजाच्या पुरुषोत्तमपुरी ताम्रपटमते हा अत्यंत पवित्र होता (एपि. इंडि. ५). यादव राजा महादेवरायाच्या सिंगूर शिलालेखात, तसेच देवराय महारायाच्या शके १३२९ च्या डंगूर शिलालेखात याचा (कविलास) निर्देश आढळतो (एपि. इंडि. २३.१९४).

**जैन साहित्यात**—जैन उत्तर पुराणमते जैनांच्या ऋषभदेव नामक प्रथम तीर्थंकराच्या या निर्वाणस्थली ऋषभदेवपुत्र भरत राजाने दिव्य मंदिरे बांधली असून, सगरपुत्रांनी याच्या चारहि बाजूंस दंडरत्नांची खोल दरी बनवून हा दुर्लंघ्य बनविला होता (उत्तर. ४८). जैन सूत्र साहित्यमते भरताने येथे 'सिंह निषदीय' नामक चैत्य, तसेच स्वतःसकट चोवीस जिनांच्या मूर्ती उभारल्या (जैन सूत्राज् .पृ. १७४). यापैकी कोणत्याहि मंदिराचे अवशेष आज येथे आढळत नाहीत.

जैन निर्वाणकांडमते त्यानजिकच्या गंगा नदीकाठी तपस्यामग्न भगीरथाने मुक्ती मिळविली. मदनकीर्तीच्या मते येथे सुवर्णवर्णीय दिव्य जैन मूर्ती असून, जिनप्रभसूरिकृत विविधतीर्थकल्पमध्ये याच्या माहात्म्यपर स्वतंत्र अध्याय आढळतो (विविध पृ. ९१; ती. सं. पृ. १३३–१३४).

**मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात**—या साहित्यात याचा (अमर. १.१.७०; अभिधान. १४०.१०२८; शीलोञ्छ. २२३.१७०१; त्रिकाण्ड. ३५.१; वैजयन्ती. ४१.९), तसेच याच्या अनेक नामांतरांचा निर्देश आढळतो (नामांतर परिपत्रक पहा).

**मंदाकिनी नदीचा उगम**—पौराणिक साहित्यमते या पर्वताच्या नंदनवन सरोवरगामी जलातून मंदाकिनी नदी उगम पावत असे. अरियनच्या मते याच्या पूर्ववर्ती गौरी कुंडातून उगम पावणारी आणि मानस सरोवरद्वयापैकी राक्षसताल सरोवरास मिळणारी आधु. 'उमाझोंग्-च्छू' नदी हीच होय.

**अन्य नद्या, पर्वत आणि सरोवरे**—वायुमते याच्या परिसरातील अन्य नद्या, पर्वत आणि सरोवरे पुढीलप्रमाणे होत :—

(१) **ईशान्येस**—याच्या ईशान्यवर्ती चंद्रप्रभ (आधु. सुरुंगे-ला) पर्वतानजिकच्या अच्छोद सरोवरातून अच्छोदा नदी उगम पावून चैत्ररथ अरण्यातून वहात असे. या सरोवरानजिक गुह्यकाधिपती मणिभद्र यक्ष रहात असे. अली यांच्या मते आधु. कोंग्यस् (गौंचे) सरोवर आणि त्याच्या परिसरातील आधु. थोक्चन् लोक हेच असावेत.

पौराणिक साहित्यमते याच्या ईशान्येस पिशंग नामक अन्य एक पर्वत असून, अली यांच्या मते याच्या ३५ मैल ईशान्येकडील सिंधु (तिबेटी—सेंगे खंबेब) नदीच्या उगमानजिकचा आधु. पतचौंग पर्वत हाच होय.

(२) आग्नेयेस—वायुमते याच्या आग्नेयवर्ती लोहित-हेमशृंग (मत्स्य-'सर्वोषध') पर्वतपायथ्यानजिकच्या लोहित सरोवरातून लौहित्य नदी उगम पावत असे. अली यांच्या मते प्रणवानंद नकाशातील ब्रह्मपुत्रा (तिबेटी—चेम-यंग्-ड्रुंग्) नदीचे उगमस्थान असणारा कैलास प्रदेशाच्या आग्नेयवर्ती आधु. कंग्लुंग-कांग्री पर्वत हाच होय. ही नदी प्रथम एका छोट्या सरोवरास (पौराणिक—लोहित सरोवर), आणि नंतर तम्चोक् खंब्ह सरोवरास (ब्रह्मपुत्रा— उगम-स्थान) मिळते. मत्स्यमते ही नदी सर्वोषध पर्वताच्या पायथ्यानजिकच्या सरोवरातून (आधु. तमलुंग्—त्सो) उगम पावत असे.

(३) दक्षिणेस—वायुमते या, तसेच वैद्युत पर्वतांच्या दक्षिणवर्ती कुरसात्विषध पर्वतपायथ्यानजिकच्या मानस-सरोवरातून सरयू नदी उगम पावत असे. अली यांच्या मते आधु. गुर्ला मांधाता पर्वतशिखराचा आणि त्याच्या उत्तर पायथ्यानजिकच्या मानस सरोवराचा निर्देश येथे अभिप्रेत असून, त्या शिखराच्या दक्षिण आणि पश्चिम उतारामधून सरयू नदीची कर्नाली (तिबेटी—'मप-च्छ') नामक प्रमुख उपनदी उगम पावते.

(४) पश्चिमेस—मत्स्यमते या पर्वताच्या पश्चिमेच्या अरुणशृंगवत् नामक दिव्यौषधी, धातू आणि रत्नसंपन्न सहस्रशिखर पर्वतावर धूम्रलोहित नामक पर्वतीय राजा रहात असून, त्या पर्वतपायथ्यानजिकच्या शैलोद सरो-वरातून चक्षु आणि सीता यांच्या दरम्यानची पश्चिम-वाहिनी नदी उगम पावत असे.

अली यांच्या मते लडाख (लेह) पर्वतान्तर्गत (उंची—१९,०००′) आधु. नंगा पर्वतशिखराचा (उंची—२६,६२०′), तसेच कश्मीरमधील आधु. वुलर (प्राचीन शैलोद) सरोवरातून उगम पावणाऱ्या सिंधु (चक्षु) आणि सतलज (सीता) नद्यांच्या दरम्यानच्या पश्चिम-वाहिनी झेलम नदीचा निर्देश येथे अभिप्रेत आहे.

(५) उत्तरेस—या पर्वताच्या उत्तरवर्ती गौर, हिरण्य-शृंग आणि सोम (तिबेटातील आधु. तंग्लह, अलिंग्—कांग्री, आणि न्यचेन् थंग्ल संज्ञक पामीर पठाराचे विस्तार-पर्वत) नामक सुवर्णशिखरयुक्त पर्वतपायथ्यानजिकच्या सरोवरातून निम्नलिखित नद्या उगम पावत असतः— (१) पूर्वेस—१. नलिनी; २. ह्लादिनी; ३. पावनी (आधु. यांगत्सी, मेकाँग आणि साल्वीन नद्या); (२) पश्चिमेस—१. सीता; २. चक्षु; ३. सिंधु (आधु. यार्कंद, श्योक आणि सिंधु नद्या); (३) दक्षिणेस—१. भागीरथी.

पौराणिक साहित्यमते बिंदु सरोवराकाठी तपस्यामग्न भगीरथाने अलकनंदा (भागीरथी) नदीविमोचन केल्याने त्यास 'भगीरथ सरोवर' वैकल्पिक नाव मिळाले.

पौराणिक काळी घनीभूत हिमकणयुक्त अलिंग्—कांग्री आणि न्यचेन् थंग्ल पर्वतांच्या दरम्यानचा प्रदेश हिम-युगोत्तर कालात गंगा नदीचे उगमस्थान बनला. 'तीन पर्वतांतील हिमामध्ये उगम पावणारी' अशा अर्थाने तीस 'त्रिपथगा' नाव मिळाले. या जलसंचय प्रदेशातून गंगा नदी बाहेर पडण्याची नैसर्गिक प्रक्रिया पौराणिक साहित्यात शिवजटाभारोद्भव गंगेच्या रूपकाने वर्णिली आहे (गंगा पहा).

**अंगभूत पर्वत**—मत्स्य पुराणाच्या १२१ व्या अध्याय-मते या पर्वतश्रेणीमध्ये निम्नलिखित पर्वत समाविष्ट होते. कंसातील आकडे श्लोकांचे आहेतः—१. ककुद्मत् (१४); २. चक्र (७२; ७४; ब्रह्माण्ड. १८.७८); ३. चन्द्र (७५); ४. चन्द्रकान्त (७३); ५. जीमूत (७५); ६. त्रिककुद् (१५; ब्रह्माण्ड. १८.२४); ७. द्रावण (७५); ८. द्रोण (७३); ९. नारद (७४; ब्रह्माण्ड. १८.७७); १०. बधिरक (७४); ११. बलाहक (७२; ब्रह्माण्ड. १८.७८); १२. मैनाक (७२; ७५; म. भी. ७.४०; ब्रह्माण्ड. १८.७८); १३. लोहित (११; ब्रह्माण्ड. १८.१०); १४. वरुण (१९); १५. वैद्युत (१६; ब्रह्माण्ड. १८.७४); १६. सुवेल (६); १७. हिरण्य-शृङ्ग (२५; म. भी. ७.४०; ब्रह्माण्ड. १८.६३; वायु. ४७.२३).

महाभारत आणि अन्य पुराणमते याच्या अंगभूत अतिरिक्त पर्वत पुढीलप्रमाणे होते—१. अरुण (ब्रह्माण्ड. १८.१८; वायु. ४७.१७); २. ऋषभ (ब्रह्माण्ड. १८.७५); ३. कैलास शिखर (म. भी. ७. ३९; ब्रह्माण्ड. १८.१; भा. ५.१६.२७; मार्कं. ५१.२४; लिङ्ग. ४९.२२;४७; वायु. ३५.९; ३६.२४; ४१.१; १२; ४७.१; विष्णु. २.२.४०); ४. क्रूरसत्त्व (ब्रह्माण्ड. १८.१३); ५. क्रौञ्चगिरि (वायु. ४१.३९); ६. गोकर्ण (म. भी. ७.४८); ७. गौर (वायु. ४७.२३;); ८. चन्द्रप्रभ (ब्रह्माण्ड. १८.५); ९. धूम्र (ब्रह्माण्ड. १८.७५); १०. मुञ्जवत् (ब्रह्माण्ड. १८.२०); ११. वराह (ब्रह्माण्ड. १८.७७); १२. सञ्जवत् (वायु. ४७. १९); १३. सोमक (ब्रह्माण्ड. १८.७७); १४. हरिशृङ्ग (वायु. ४७.६०); १५. हिमवत् (वायु. ४१.२७).

**कैलास मार्ग**—महाभारत द्रोणपर्वात कृष्णाने मनः-

शांतीप्रीत्यर्थ आणि अर्जुनाने पाशुपतास्त्रप्राप्त्यर्थ केलेल्या कैलासयात्रेच्या संदर्भात निम्नलिखित कैलासमार्गाचे वर्णन आढळते :—हस्तिनापुर (उत्तर दिशा) → श्वेत पर्वत → गंगा नदी → मंदर पर्वत → काल पर्वत → मणिमत् पर्वत (हिमवत्पाद) → ब्रह्मतुंग → शतशृंग → शर्याति वन → अश्वशिरःस्थान → आथर्वणस्थान → वृषदंश पर्वत → महामंदर पर्वत → कैलास पर्वत → वृषभध्वज पर्वत (म. द्रो. ५७.२३–३४).

२. जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वताच्या उत्तरेकडील एक पर्वत (भा. ५.१६.२७).

३. उत्तर प्रदेशातील नैनितालनजिकच्या भीमेश्वरपासून १२ मैलांवरील एक पर्वत. येथे शिवाने पार्वतीला योगप्रणाली सांगितली. स्थानिक नामांतर–'छोटा कैलास' (ती. पृ. ४१).

**कैलासेश** (लिंग)— अरुणाचलक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंग (स्कन्द. अरुणाचल २.२).

**कैशिक** (देश)— महाभारतमते विदर्भराज भीष्मकाने जिंकलेला मध्यभारतातील एक देश (म. स. १३.२०).

**कैष्किन्ध्य** (देश)— आग्नेय भारतातील 'किष्किंधक' देशाचे नामांतर (मार्क. ५५.१८; किष्किंधक पहा).

**कैसन** (ग्राम)— टॉलेमीच्या मते वायव्य भारतान्तर्गत परोपनिसदै देशातील पंजशिर नदीच्या उजव्या किनाऱ्यावरील एक ग्राम (अक्षांश ३४°–२०′ उत्तर; रेखांश १२०° पूर्व). कनिंगहॅम यांच्या मते अफगाणिस्तानातील कोहिस्तान टेकड्यांच्या पायथ्यानजिकचे, पंजशिर आणि घोरबंद नद्यांच्या उजव्या किनाऱ्यावरील आणि काबूलपासून २५ मैलांवरील आधु. बेग्राम गाव हेच होय. येथे सापडलेल्या कुशाण राजा कदफिसेस् (द्वितीय) आणि कनिष्काच्या नाण्यांवरून (इ. स. १-२ रे शतक) हे कुशाण साम्राज्यात असावे. नामांतर (प्लिनी)–'कर्तन'; (युक्रेतिदेस् नाणी)–'करिसिये नगर'.

**प्लिनीच्या मते**— या ग्रंथमते हे चौरसाकृती नगर (टेट्रॅगोनिस्) कॉकेशस् पर्वताच्या पायथ्याशी अलेक्झांड्रिया गावानजिक असून, मॅसनकृत बेग्राम–उत्खननात या पुरातन नगराचे अवशेष सापडले आहेत (कनिंग, पृ. २६-२९).

**कोअ** (नदी)— टॉलेमीच्या मते वायव्य भारतातील 'कुभा' नदीचे नामांतर (कुभा पहा).

**कोइमतूर** (राज्यविभाग)— विजयनगर-राजकुमार सावन्नाच्या स. १३७९ च्या शिलालेखमते त्याच्या राज्यातील एक उपविभाग. मद्रास राज्यातील आधु. कोइमतूर प्रदेश हाच असावा (रंगाचारी, १. कोइमतूर. ४६९).

**कोइल** (देश)— ऐन्-इ-अकबरीमते उत्तर देशातील 'कुल्य' देशाचे नामांतर (ऐ. अ. २.१८६; कुल्य पहा).

**कोकण** (देश)—पद्ममते पश्चिम भारतातील 'कोंकण' देशाचे नामांतर (पद्म. आदि. ६.५५; कोंकण पहा). अन्य नामांतरे–(ह्युएनत्संगचे प्रवासवर्णन)–'कोंकणपुर'; (शिलाहार शिलालेख)–'कोंकण ९००' (शिलालेख साहित्य)–'कोंकण १४००'.

**कोकणक** (पर्वत)— वामनमते भारतवर्षातील एक पर्वत (वामन. १३.१९).

**कोकनद** (देश)— महाभारतमते युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या उत्तर दिग्विजयात अर्जुनाने जिंकलेला उत्तर भारतातील एक देश (म. स. २४.१७).

**कोकपाद** (पर्वत)—चिनी साहित्यमते मगध (आधु. दक्षिण विहार) देशातील 'कुक्कुटपादगिरि'चे नामांतर (वॉटर्स, २. १४४; कुक्कुटपादगिरि पहा).

**कोकबक** (देश)—महाभारतमते दक्षिण भारतातील 'केकरक' देशाचे नामांतर (म. भी. १०.६०; केकरक पहा).

**कोकमठान** (महानुभाव तीर्थ)—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थ (स्था. पृ. ३४). नामांतर–'कुंकुमगण'. अहमदनगर जिल्ह्यातील कोपरगाव तालुक्यातील संवत्सरच्या १ मैल दक्षिणेकडील गोदावरी नदीकाठचे आधु. कोकमठाण हेच होय.

**कोकमण्डल** (देश)—वराहमते हिमालय पर्वतीय कोकामुख तीर्थाच्या परिसरातील एक देश (वराह. १२२. २०; कोकामुख तीर्थ पहा). नामांतर– 'कोकामंडल' (वराह. १४०.१७).

**कोका** (नदी)—वराहमते कोकामुखक्षेत्रान्तर्गत एक नदी (वराह. १४०.७७). या हिमालय पर्वतोद्भवा नदीचा (ब्रह्म. २१९.२०) निर्देश उत्तर गोकर्णमाहात्म्यात (वराह. २१४.४७), तसेच अन्य पौराणिक साहित्यात (म. भी. १०.३३; पद्म. आदि. ६.२९) असून, नेपाळमधील धवलगिरि मंदिराजवळून वाहणारी आधु. कोदरा नदी हीच होय (कोकामुखक्षेत्र पहा).

**कोकामुख** (क्षेत्र आणि तीर्थ)—ब्रह्ममते हिमालय-

मार्गावरील कोका नदीकाठचे श्रीविष्णूचे वराहावतारस्थान, एक तीर्थ (ब्रह्म. ११९.१७; ३९.१०६). याचे माहात्म्यहि तेथे वर्णिले असून, वराह पुराणातील एका स्वतंत्र अध्यायात येथील तीर्थनामावली दिली आहे (वराह. १४०). त्यावरून कोका–कौशिकी संगमस्थानी हे असावे.

सरकार यांच्या मते नेपाळातील काठमांडू गावापासून १२४ मैल आग्नेयेकडील आणि धवलगिरि पर्वताच्या २० मैल दक्षिणेकडील सुन्–कोशी (सुवर्ण कौशिकी) नदीकाठचे आधु. बराह–चत्र (वराह क्षेत्र) गाव हेच होय (अक्षांश २६°–५७′ उत्तर; रेखांश ८७°–४′ पूर्व). येथील श्रीविष्णूच्या वराहावतारी चतुर्भुज मूर्तीनजिक कोबरा (प्राचीन कोका) नदी वहात असून, वराहमंदिरापासून ३ मैलांवर पर्वतीय सूर्यकुंड आहे (ती. पृ. १८५).

अन्य अभ्यासकांच्या मते बिहारमधील नाथपुर गावाच्या उत्तरेकडील कोशी–अरुणा–तंबर संगमावरील आधु. वराहमुख (कोकामुख) तीर्थ हेच होय. स्थानिक नामांतर–'त्रिवेणी' (कौशिकी पहा). सरकार यांच्या मते वराह पुराणात निर्देशिलेले नेपाळमधील आद्य कोकामुखक्षेत्र उत्तर भारतीय लोकांना दूरवर्ती पडू लागल्याने बिहारमधील या क्षेत्राची निर्मिती करण्यात आली.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या क्षेत्राची निम्नलिखित नामांतरे आढळतातः—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. वराह पुराण | |
| अ. (१२२.२०) | कोकमंडल |
| आ. (१४०.१७) | कोकामंडल |
| २. पद्म पुराण (आदि. ११.१०) | सौकरवक्षेत्र |
| ३. स्थानिक नामांतर | वाराहक्षेत्र |

**व्याप्ती**—वराहमते याची व्याप्ती ५ योजने होती (वराह. १४०.८६).

**महाभारतात**—या ग्रंथातील पुलस्त्ययात्रेत (म. आर. ८२.१३७), तसेच अंगिरस्यात्रेत (म. अनु. २५.५२) याचा निर्देश असून, पुलस्त्ययात्रामते येथील स्नानाने पूर्वजन्मस्मृती (जातिस्मरत्व) लाभत असे.

**पौराणिक साहित्यात**—या साहित्यमते हे वराहरूपी श्रीविष्णूचे निवासस्थान असून (वराह. १३७.६; नृसिंह. ६५.७), वराहमते हे हिमालयान्तर्गत तीन श्रेष्ठ विष्णुस्थानांपैकी एक होते (वराह. १४०.४–५; अन्य दोन विष्णुस्थाने–बदरिकाश्रम, लोहार्गल). वामन पुराण प्रह्लादयात्रा (वामन. ४८.२६), तसेच अन्य पौराणिक साहित्यमते हे एक श्राद्धयोग्य तीर्थ असून (कूर्म. पूर्व. ३१.४७; उत्तर. ३५–३६; पद्म. आदि. ११.१०; ३८.६५), ब्रह्म आणि वराह पुराणात या 'सिद्धक्षेत्रा'चे सविस्तर माहात्म्यवर्णन आढळते (ब्रह्म. २१९; वराह. १४०).

**शिलालेख साहित्यात**—गुप्त सम्राट बुद्धगुप्तकालीन (स. ४७७–४९५) दामोदरपुर ताम्रपटत्रयमते हिमवत् पर्वतावर आद्य कोकामुखक्षेत्र असून, बंगालमधील दिनाजपुर जिल्ह्यातील दामोदरपुरनजिकच्या जंगलात याच नावाचे अन्य एक उत्तरकालीन तीर्थ होते. हे तीन ताम्रपट पुढीलप्रमाणे होत :—१. **कोटिवर्ष विषयाच्या गंडक नामक आयुक्ताचा ताम्रपट** (हिमवत् पर्वतातील आद्य कोकामुख क्षेत्रास डोंगाग्राम येथील भूमी विकल्याचा निर्देश; सिलेक्ट इन्स्क्रि. पृ. ३२८–३३०); २. **गुप्त संवत् १६३ चे दानपत्र** (वायिग्राम गावची भूमी आद्य कोकामुखक्षेत्रास दान दिल्याचा निर्देश; सिलेक्ट इन्स्क्रि. पृ. ३२४); ३. **गुप्त संवत् २२४ चा ताम्रपट** (दामोदरपुरनजिकच्या अरण्यातील श्वेतवराह मंदिरास जमीन विकल्याचा निर्देश; सिलेक्ट इन्स्क्रि. पृ. ३३७).

**तीर्थनामावली**—वराह पुराणाच्या १४० व्या अध्यायातील या क्षेत्रान्तर्गत तीर्थनामावली खाली दिली आहे. कंसातील आकडे श्लोकांचे आहेत :–१. अग्निसरस् (३४); २. कोका नदी (७७); ३. कोटिवटक्षेत्र (४७); ४. कौशिकी नदी (५६); ५. कौशिकी–कोका सङ्गम (७६); ६. जलबिन्दु पर्वत (१६); ७. तुङ्गकूट तीर्थ (२९); ८. दंष्ट्रांकुर तीर्थ (७०); ९. धर्मोद्भव तीर्थ (४४); १०. धेनूवटक्षेत्र (४०); ११. पञ्चशिला भूमि (२७); १२. ब्रह्मसरस् क्षेत्र (३७) १३. मत्स्यशिला (११); १४. पापप्रमोचन तीर्थ (५१); १५. मातङ्ग तीर्थ (५९); १६. यमव्यसनक तीर्थ (५६); १७. वज्रभव तीर्थ (६२); १८. विष्णु तीर्थ (७३); १९. विष्णुधारा तीर्थ (१७); २०. विष्णुपदस्थान-वराहस्थान (२१); २१. विष्णुसरस् (२४); २२. शक्रुद्रक्षेत्र (६७); २३. सर्वकामिका शिला (७७); २४. सूर्यधारा तीर्थ (३५); सोम तीर्थ (२६).

या तीर्थांपैकी कौशिकी नदी आणि वराहमूर्तीचा अपवाद वगळता अन्य तीर्थे सध्या नष्ट झाली आहेत.

२. (क्षेत्र) काशी येथील एक पुण्यक्षेत्र (कूर्म. पूर्व. ३१.४७).

३. (पर्वत) भारतवर्षातील एक पर्वत (भा. ५.१९. १६). पाठभेद–'गोकामुख'.

**कोकावराह** (तीर्थ)—काशी येथील एक तीर्थ (स्कन्द. काशी. ६१.२०६; ८३.६२).

**कोकिल** (तीर्थ)—नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ (नारद. उत्तर. ७७.११).

२. काशी येथील एक तीर्थ (पद्म. आदि. ११.१०; ३७.१६).

**कोकिला** (नदी)—विल्फोर्ड यांच्या मते पूर्व भारतातील एक नदी. बिहारमधील छोटा नागपूर टेकड्यांत उगम पावून आणि पलमु जिल्ह्यातून वहात जात शोण नदीस मिळणारी आधु. कोइल नदी हीच होय. हिच्या खालच्या भागास वैतरणी म्हणतात (एशि. रिसर्चेस्. १४.४०२).

**कोकिलाक्षक** (ग्राम)—हरिश्चंद्रवंशीय भोगशक्ति राजाच्या स. ७०९ च्या अंजनेरी ताम्रपटमते त्याने जयपुरच्या भोगेश्वर नारायण मंदिरास दान दिलेले महाराष्ट्रातील एक ग्राम. नासिक जिल्ह्यातील दिंडोरी तालुक्यातील जैखेडा गावाच्या ३ मैल ईशान्येकडील आधु. कोकर गाव हेच होय (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.१४९).

**कोकिलावन** (वल्लभबैठक)—दक्षिण भारतातील एक वल्लभबैठकस्थान.

**कोकी** (बृहद्भारतीय देश)—तारानाथाच्या तिबेटी ग्रंथमते आग्नेय आशियान्तर्गत 'चंपा' (आधु. हिंदचीन) देशाचे नामांतर (इंडि. अँटि. १८.३८४; चंपा पहा).

**कोकुट्टक** (देश)—दक्षिण भारतातील एक देश (पद्म. आदि. ६.५५). पाठभेद–'कौकुट्टक'.

**कोक्कोनगर** (बृहद्भारतीय नगर)—टॉलेमीच्या मते आग्नेय आशियान्तर्गत एक बृहद्भारतीय नगर (अक्षांश २° उत्तर; रेखांश १६०° पूर्व). यूल यांच्या मते हिंदचीन (प्राचीन कोकी) मधील आधु. पेगु गाव हेच होय. अन्य अभ्यासकांच्या मते हे सयाम आखातातील इब्न बतूतानिर्दिष्ट 'काकुल' नगराचे नामांतर असावे (इंडि. अँटि. १८.३८४; काकुल पहा).

**कोक्कोनगै** (लोकसमूह)—टॉलेमीच्या मते पूर्व भारतातील एक आदिवासी लोकसमूह. लॅसेन यांच्या मते छोटा नागपूर प्रदेशातील कोक संज्ञक ताडवृक्षांच्या प्रदेशात हे (संस्कृत–काकमुख) रहात असावेत. यूल यांच्या मते महानदीच्या वरच्या खोऱ्यात हे असावेत.

**कोख्य** (देश)—बौद्ध साहित्यमते उत्तर भारतातील 'कुरु' देशाचे नामांतर (कुरु पहा).

**कोगलि ५००** (देशविभाग)—पश्चिम चालुक्य राजांच्या स. ९४४ च्या बेळारी शिलालेखमते आंध्र प्रदेशातील मासवाडी ४० प्रदेशातील एक देशविभाग. बेळारी जिल्ह्यातील आधु. हद्गली आणि हर्पनहल्ली तालुक्यांचा प्रदेश हाच होय (रंगाचारी, १. बेळारी. २६७).

इ. स. १० व्या शतकात येथे राष्ट्रकूट-मांडलिक काटयर राजाचे (स. ९४४), आणि कदंबराज आदित्यवर्मनचे (स. ९९०; रंगाचारी, १. बेळारी. २९३) राज्य असून, स. १०६८ मध्ये येथे पश्चिम चालुक्य राजा सोमेश्वर (प्रथम) राज्य करीत होता (रंगाचारी, १. बेळारी. २९५; एपि. इंडि. ४.२१२).

**कोग्गटन** (ग्राम)—यादव राजांच्या शके ११७५ च्या कोकटनूर शिलालेखमते महाराष्ट्रातील करहाड २००० देशातील कणंबडे ३०० राज्यविभागातील एक अग्रहार ग्राम. बेळगाव जिल्ह्यातील अथणी तालुक्यातील कानमोडी गावाच्या २० मैल नैर्ऋत्येकडील आधु. कोकटनूर गाव हेच होय (सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २७३).

**कोङ्गबन्द** (ग्राम)—टॉलेमीच्या मते प्रपिऔतइ प्रदेशातील एक ग्राम (अक्षांश २३° उत्तर; रेखांश १२०°–१५ पूर्व). याचे आधुनिक स्थान समजत नाही.

**कोङ्कण** (देश)—बृहत्संहिता आणि मार्कंडेयमते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या दक्षिण (बृ. सं. १४.१२; मार्कं. ५५.२१), अथवा पश्चिम (मार्कं. ५५.३५) भागातील एक देश. महाभारत आणि ब्रह्माण्डमते हा दक्षिणापथामध्ये होता (म. भी. १०.५८; ब्रह्माण्ड. १६. ५९).

पश्चिमेस अरबी समुद्र आणि पूर्वेस पश्चिम घाट यांच्या दरम्यानच्या प्राचीन 'अपरांत' (पश्चिम समुद्रपट्टीचा प्रदेश) देशापैकी उत्तरेस दमणगंगा आणि दक्षिणेस गंगावली नद्यांच्या दरम्यानचा भूप्रदेश पौराणिक आणि मध्ययुगीन काली 'कोंकण' या नव्या नावाने प्रसिद्ध झाला (अपरांत पहा).

कुलाबा जिल्ह्यातील कुंडलिका नदीमुळे याचे 'उत्तर कोंकण' आणि 'दक्षिण कोंकण' असे दोन भाग पडले असून, त्यापैकी दक्षिण विभागात बनवासी आणि गोमंतकाचा समावेश असे. उत्तर कोंकण, बनवासी आणि गोमंतक हे तीनहि मध्ययुगीन देशविभाग भूतपूर्व

' अपरांत 'च्या भूभागामध्ये वसले असून, भौगोलिक दृष्ट्या कोकणचाच अंगभूत असा आधु. गोमंतक हा भूतपूर्व बृहद्गोमंतकाचा अंशभाग आहे ( गोमंतक पहा ).

**उपविभाग**— शिलाहार राजवंशाच्या शिलालेखमते याच्या ' कोंकण १४०० ' ( आधु. उत्तर कोंकण ) आणि ' कोंकण ९०० ' ( आधु. दक्षिण कोंकण, सावंतवाडी आणि गोवा ) संज्ञक दोन उपविभागांपैकी ' कोंकण ९००' विभागावर या राजवंशाचे राज्य होते ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २६९ ).

**यादव राज्यकाली**— सांकलिया यांच्या मते यादव राज्यकाली आधु. ठाणे जिल्हा आणि साष्टी बेटाचा मर्यादित प्रदेश या देशात समाविष्ट असून, त्याचे निम्नलिखित प्रमुख राज्यविभाग होते :— **१. सत्षष्ठी विषय** ( साष्टी बेट ); **२. झरी मंडल** ( ठाणे जिल्ह्यातील उंबरगाव तालुक्यातील आधु. झरी गावासभोवतालचा प्रदेश ); **३. घारपवली**; **४. सुपालि** ( जे. बी. बी. आर. ए. एस्. ५.१८३; एपि. इंडि. २३.२८१ ). यापैकी अंतिम दोन उपविभागांचे आधुनिक स्थान समजत नाही ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २७४ ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या देशाची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा ).

**महाभारतात**— या ग्रंथमते हे दक्षिण भारतीय जनपद होते ( म. भी. १०.५८ ).

**पौराणिक साहित्यात**—बृहत्संहितामते दक्षिण भारतान्तर्गत या ( सप्तकोंकण ) देशातील लोक 'कौंकण' नावाने सुविख्यात असून ( बृ. सं. १६.११ ), पद्म पुराणातहि याचा ( कोकण ) निर्देश आढळतो ( पद्म. आदि. ६.५५ ).

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**— या ग्रंथमते हा ( कुंग्-कन्-न-पु-लो = कोंकणपुर ) देश द्रविड देशाच्या ४०० मैल उत्तरेस असून, ह्युएन्त्संगच्या जीवनचरित्रमते हा द्रविड देशाच्या वायव्येस होता.

ह्युएन्त्संगच्या मते या देशातील ( व्याप्ती–१००० मैल; राजधानीची व्याप्ती– ६ मैल ) हवा ऊष्ण, आणि लोक ओबडधोबड परंतु ज्ञानोपासक होते. येथे १०० बौद्ध मठ आणि १००० बौद्ध भिक्षू होते.

**बौद्ध स्थाने**— ह्युएन्त्संगच्या मते या देशात निम्नलिखित बौद्ध स्थाने होती :—

**( १ ) बौद्ध मठ**— राजधानीनजिकच्या या मठात सर्वार्थसिद्धाचा ( गौतम बुद्ध ) राजमुकुट ( उंची–२' ) असून, यानजिकच्या अन्य एका बौद्ध मठात श्रुणविंशतिकोटि आचार्यनिर्मित मैत्रेय बुद्धाची चंदनी मूर्ती होती. राजधानीच्या नैर्ऋत्येस याच आचार्यांच्या मठावशेषावरील अशोकस्तूप होता.

**( २ ) तालवन**— राजधानीच्या उत्तरेकडील या वनात ( व्याप्ती–६ मैल ) श्रुणविंशतिकोटि आचार्यांचा शरीरावशेषस्तूप होता.

**( ३ ) बुद्ध-प्रवचनस्थान**—राजधानीच्या पूर्वेस बुद्ध-प्रवचनाचा स्मृतिस्तूप होता. याच्या ५०० मैल वायव्येकडील जंगलमय प्रदेश ओलांडून ह्युएन्त्संग महाराष्ट्र देशास पोहोचला ( वॉटर्स, २.२३७-२३८; बील, ४.४४८-४४९ ).

**प्राकृत साहित्यात**— गणधरसार्धशतक नामक प्राकृत ग्रंथात याचा ( कुंकणविसए ) निर्देश आढळतो ( इंडि. अँटि. ११.२९३ ).

**अल्बेरुणीच्या ग्रंथात**— या ग्रंथमते हा पश्चिम समुद्रकिनारीचा देश होता ( अल्बेरुणी, १.३०१; इंडि. अँटि. २२.१८२ ).

**शक्तिसंगमतंत्रात**—या ग्रंथमते हा समुद्रवर्ती देश पश्चिम घाटापासून कोटीश मंदिरापर्यंत असून, सरकार

## कोंकण देशाची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. बृहत्संहिता ( १६.११ ) | सप्तकोंकण<br>कौंकण लोकसमूह |
| २. पद्म पुराण आदि. (६.५५ ) | कोकण |
| ३. ह्युएन्त्संग | कुंग्–कन्–न–पु–लो ( कोंकणपुर ) |
| ४. राष्ट्रकूट राजा कृष्णराजचा स. ८८८ चा शिलालेख ( इंडि. अँटि. ११. २६३ ) | कोंकणविषय |
| ५. शिलाहार शिलालेख ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २६९ ) | कोंकण ९०० |
| ६. अन्य शिलालेख साहित्य | कोंकण १४०० |
| ७. प्राकृत साहित्य ( इंडि. अँटि. ११.२९३ ) | कुंकणविसए |
| ८. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य | |
| अ. शब्दरत्न ( ५१.१६ ) | कुंकण |
| ब. कल्पद्रुकोश ( ७.२४ )<br>क. शब्दरत्न ( ५१.१६ ) | कौंकण |

यांच्या मते कदंब शिलालेखातील सप्तकोटीश्वर मंदिराचा निर्देश येथे अभिप्रेत असावा ( शक्तिसङ्गम. ३.७.४५ ).

**मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात**—या साहित्यात या देशाचा ( विश्वलोचन. १०७.४९; कल्पद्रु. ७.२४ ), तसेच याच्या 'कुंकण' आणि 'कौंकण' नामांतरांचा निर्देश आढळतो ( नामांतर परिपत्रक पहा ).

**शिलालेख साहित्यात**—राष्ट्रकूट राजा अकालवर्ष कृष्णराजाच्या स. ८८८ च्या दानपत्रात याचा ( कोंकण विषय ) निर्देश असून ( इंडि. अँटि. १३.६५ ), यादव राजांच्या ठाणे ताम्रपटमते हा महाराष्ट्राचा एक उपविभाग होता ( जे. बी. बी. आर. ए. एस्. ५.१८३ ). विजयनगरच्या हरिहररायाच्या स. १३७९ च्या शिलालेखमते त्याच्या बैचप्प नामक सेनापतीने येथील बंडाळी मोडून काढली होती ( एपि. इंडि. १५.१२ ).

**राजधानी** — ह्युएन्‌त्संगच्या प्रवासवर्णनमते याची राजधानी कोंकणपुर गावी होती ( कोंकणपुर पहा ).

२. ( ग्राम ) यादव राजांच्या शके १०२० च्या अश्वि ताम्रपटमते महाराष्ट्रातील सेऊण देशान्तर्गत संगेमनेरे ८४ ( आधु. संगमनेर तालुका ) राज्यविभागातील एक ग्राम ( ओ. बी. आय्. एस्. एम्. ३.१.१३ ). संगमनेरपासून ८ मैलांवरील आधु. कोंकण गाव हेच होय ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २७६ ).

**कोङ्कणपुर** ( नगर )—ह्युएनत्संगच्या प्रवासवर्णनमते द्रविड देशाच्या उत्तरवर्ती कोंकणपुर ( आधु. कोंकण ) देशाच्या राजधानीचे नगर. कनिंगहॅम यांचे मते तुंगभद्रा नदीच्या उत्तर तीरवर्ती बेल्लारी जिल्ह्यातील आधु. आनेगुंदि पर्वतीय दुर्गस्थान हेच होय ( कनिंग., पृ. ५५२ ). यानजिकच तुंगभद्रेच्या दक्षिण किनाऱ्यावर वाल्मीकि रामायणकालीन किष्किंधा ग्राम आहे ( किष्किंधा पहा ). नामांतर ( विजयनगर शिलालेख )–'आनैगोंदि'.

**मतांतरे**—याच्या भौगोलिक स्थानाविषयी अभ्यासकांत निम्नलिखित मतांतरे आढळतातः— **१. बनवासी**– सेंट मार्टिन यांच्या मते आधु. बनवासी गाव हेच असावे; **२. कोंकनूर**– बर्जेस् आणि फ्लीट यांच्या मते कांचीपासून ३१० मैलांवरील आधु. कोंकनूर ( ओपल् ) गाव हेच असावे ( इंडि. अँटि. २३.२८ ); **३. म्हैसूर राज्यात**– फर्ग्युसन यांच्या मते आधु. म्हैसूर राज्यात कोठेतरी हे असावे ( जे. आर. ए. एस्. ६.२६७ ).

**विजयनगर राज्याची प्रतिष्ठापना**—स. १३३४ मध्ये मुहंमद तुघ्लकाने येथील हिंदु राजाचा पराजय केल्यानंतर हरिहर आणि बुक्क नामक दोन बंधूंनी या किल्ल्याचे परिवर्धन करून उत्तरकालात याच्या समोर तुंगभद्रा नदीच्या दक्षिण किनाऱ्यावर विजयनगर नामक नवे राजधानीचे नगर स्थापिले ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. १८४; विजयनगर पहा ).

**शिलालेख साहित्यात**—विजयनगरच्या हरिहररायाच्या स. १३३६ च्या शिलालेखमते तो आनेगुंदि प्रदेशाचा सम्राट असून ( रंगाचारी, २. नेलोर. १८९; एपि. कर्ना. १०.७० ), विजयनगर–सम्राट पेद्द वेंकट ( द्वितीय ) च्या स. १६३६ च्या उत्तर अर्काट शिलालेखात त्यास 'आनैगोंदि ( आनेगुंदिनिवासी ) वेंकटपति' म्हटले आहे ( रंगाचारी, १. उत्तर अर्काट. ३२५; इंडि. अँटि. १३. १२५ ).

स. १७७६ मध्ये टिपू सुलतानाने तिरुमल राजाकडून हा प्रदेश जिंकला. स. १७९९ मध्ये इंग्रजांनी टिपूचा वध करून बेल्लारी, हर्पनहल्लि आणि आनेगुंदि प्रदेश निजामास दिला ( सेवेल इन्स्क्रि. पृ. ३११ ).

**कोङ्कनाड** ( देशविभाग )—होयसाळ राजा नृसिंह ( तृतीय ) च्या स. १२७९ च्या दानपत्रमते पश्चिम म्हैसूरातील एक देशविभाग ( एपि. कर्ना. ५.२१ ).

**कोङ्कनाडु** ( ग्राम )—होयसाळ राजा बल्लाळ ( प्रथम ) च्या स. ११०१ च्या शिलालेखमते म्हैसूर राज्याच्या सीमारेषेवरील एक ग्राम याचे आधु. स्थान समजत नाही ( एपि. कर्ना. ५.१९९ ).

**कोङ्कवेङ्ककुटक** ( देश )—भागवतमते दक्षिण कर्नाटकातील एक देश ( भा. ५.६.७-९ ). येथील कुटकाचल पर्वतातील वणव्यात जैन तीर्थंकर ऋषभनाथ दग्ध झाले ( भा. ५.६.८ ).

**कोङ्गारा** ( ग्राम )—पंपराजदेवाच्या इ. स. ११ व्या शतकातील तहंकापार दानपत्रमते मध्य भारतातील एक ग्राम. मध्यप्रदेशातील छत्तिसगढ परगण्यातील कांकेर गावानजिकच्या आधु. देव-कोंगेरा, कोंगेरा-बियास, आणि हाटकोंगेरा या ग्रामत्रयापैकी हे एक असावे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.६०० ).

**कोङ्गु** ( देश )—पांड्य सम्राट जटिल परांतकच्या स. ७८३ च्या मद्रास म्युझियम ताम्रपटमते त्याने जिंकलेला दक्षिण भारतातील एक देश ( इंडि. अँटि. स. १८९३, पृ. ५७ ). सेवेल यांच्या मते सालेम जिल्ह्यातील आधु. धर्मपुरी गावाच्या पश्चिमेकडील या देशाचे 'उत्तर कोंगु' ( कावेरी नदीच्या उत्तरेकडील भाग ), 'दक्षिण कोंगु,

( कावेरी नदीच्या दक्षिणेकडील भाग ), आणि ' मिकोंगु ' ( उत्तर आणि दक्षिण कोंगु देशांच्या दरम्यानचा पर्वतीय प्रदेश ) असे तीन उपविभाग होते ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. १४२ ). आधु. कोइमतूर आणि सालेम जिल्हे याचा बालेकिल्ला असून, चोलसामंत कोंगु-चोल राजांचे ( स. १००६–१२७५ ) अनेक शिलालेख तेथे सापडले आहेत ( रंगाचारी, १. कोइमतूर. ७७–१२१ ).

**शिलालेख साहित्यात**—होयसाळ राजा विष्णुवर्धनाच्या स. १११८ च्या शिलालेखमते त्यास ' कोंगुविजेता ' गौरवोपाधी असून ( एपि. कर्ना. ४.३१ ), स. ११२२ च्या त्याच्या शिलालेखमते त्याच्या राज्याची दक्षिण सरहद्द याने बनली होती ( एपि. कर्ना. ५.१०२ ). वीर चोल राजाच्या स. ११२२ च्या शिलालेखमते तो ' उभय कोंगु ' देशांचा सम्राट होता ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ९८ ).

**कोङ्गोद** ( नगर )—माधवराज ( द्वितीय ) च्या स. ६१९ च्या शिलालेखमते कलिंग देशान्तर्गत दक्षिण-तोसल उपविभागातील कोंगोद मंडलातील शालिम नदीकाठचे एक नगर ( एपि. इंडि. ६.१४४ ). ओरिसामधील जगन्नाथपुरीनजिक हे असावे. नामांतर ( माधववर्मन्‌चा बुगुड ताम्रपट )–' कैंगोद ' ( एपि. इंडि. ३.४४ ).

**कोङ्गोदमण्डल** ( देशविभाग )—शैलोद्भव राजांच्या शिलालेखमते कलिंग देशान्तर्गत दक्षिण तोसल देशातील एक देशविभाग ( एपि. इंडि. ११.३५ ). येथील शशांक राजाने कनौजच्या हर्षवर्धनाचे आक्रमण परतवून लावले होते ( एपि. इंडि. ६.१३६–१४१ ). ओरिसामधील महानदी-ऋषिकुल्या दुआबातील आधु. कटक, खुर्दा, आणि गंजम जिल्ह्यांचा प्रदेश हाच होय.

कनिंगहॅम आणि फर्ग्युसन यांच्या मते ओरिसामधील चिल्का सरोवरानजिकचा उदयगिरि–खंडगिरि गुफांनजिकचा समुद्रतीरवर्ती आधु. गंजम जिल्हा हाच असून, त्या सरोवराच्या उत्तरेकडील कट आणि अस्क गावांच्या दरम्यान याची राजधानी होती.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा ).

**उपविभाग**— शिलालेख साहित्यमते याचे निम्नलिखित उपविभाग होते :—**१. वरडाखंड विषय**— ( दंडी महादेवीचा गंजम ताम्रपट; एपि. इंडि. ६.१३८; २९.८६ ); **२. अर्त्तणिविषय** ( एपि. इंडि. ६.१४१–१४२ ); **३. खिडिन्गहार विषय** ( जे. बी. ओ. आर. एस्. ५.५६४–५७८ ); **४. कटकभुक्ति-विषय** ( एपि. इंडि. ११.२८३; २८६ ); **५. कृष्णगिरि विषय** ( नीलगिरि विषय = आधु. जगन्नाथपुरीसभोवतालचा प्रदेश; एपि. इंडि. ६.१४४ ).

### कोंगोदमंडल देशाची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. बृहत्संहिता ( इंडि. अँटि. २२.१७१; १७९ ) | कुंड्य (हेमकुंड्य ) |
| २. ह्युएन्त्संगचे प्रवासवर्णन ( वॉटर्स, २.१९६ ) | कोंग्-य-तो ( कोन्यध ) |
| ३. शिलालेख साहित्य | कुंगद-मंडल |

**बृहत्संहितेत**— वॉटर्स यांच्या मते बृहत्संहितानिर्दिष्ट ' कुंड्य ' ( हेमकुंड्य ) हा आग्नेय भारतीय देश हाच असावा ( इंडि. अँटि. २२.१७१; १७९ ).

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**— या ग्रंथमते उड्र देशापासून २४० मैल नैर्ऋत्येकडील याचे आणि याच्या राजधानीचे क्षेत्रफळ अनुक्रमे २०० मैल आणि ४ मैल होते.

ह्युएन्त्संगच्या मते कोंगोद ( दक्षिण तोसल ), आणि उड्र ( उत्तर तोसल ) हे सुदूर अंतरावर नसून ते एकमेकांनजिक होते. पुरातन काळी ओड्रच्या नैर्ऋत्य सरहद्दीवरील हा देश मध्ययुगात त्या देशाचा उपविभाग बनला.

**भौगोलिक वर्णन**—ह्युएन्त्संगच्या मते या समुद्रतीरवर्ती पर्वतव्याप्त देशातील पीकपाणी उत्तम, हवा ऊष्ण, आणि लोक कृष्णवर्णीय, धिप्पाड बांध्याचे व शूर होते. त्यांची भाषा मध्यदेशासदृश, परंतु उच्चारपद्धती वेगळी होती. येथे हिंदूंची शंभर आणि तीर्थिकांची ( जैनांची ) दहा हजार देवालये होती.

येथील पर्वतीय उतारावरील सागरतीरी निसर्गरक्षित दहा नगरे असून, त्यावर अजिंक्य सैनिकजन अहोरात्र पहारा करीत असत. ह्युएन्त्संगच्या काळी हा कान्यकुब्जच्या हर्षवर्धनचा मांडलिक असल्याने येथील अजिंक्य सैनिकांचा हा निर्देश अर्थहीन वाटतो. याच्या २८०–३०० मैल नैर्ऋत्येकडील जंगलमय प्रदेश ओलांडून ह्युएन्त्संग कलिंग देशास गेला ( वॉटर्स, २.१९६–१९८; बील, ४.४१२–४१३ ).

**कोच-काम्बोज** ( देशविभाग )— जयचंद्र यांच्या मते वंग देशान्तर्गत एक देशविभाग ( जयचन्द्र, पृ. २९४ ).

**कोचरनाथ** ( तीर्थ )—तिबेटातील कैलास–मानस-

सरोवर मार्गावरील तकलाकोटपासून १६ मैलांवरील एक रामतीर्थ. येथे रामपंचायतनाच्या मूर्ती आहेत ( ती. पृ. ३७ ).

**कोचि** ( बंदर )—जयचंद्र यांच्या मते दक्षिण भारतीय कच्छ देशातील एक बंदर. आधु. कोचीन बंदर हेच होय ( जयचन्द्र, पृ. २९४; कच्छ २. पहा ).

**कोट-काङ्ग्रा** ( दुर्गस्थान )—हिमालय प्रदेशातील 'कांग्रा' दुर्गस्थानाचे नामांतर ( कांग्रा पहा ).

**कोटगढ** ( शिलालेखस्थान )—कलचुरि सम्राट पृथ्वीदेव ( द्वितीय ) आणि रत्नदेव ( द्वितीय ) च्या इ. स. १२ व्या शतकातील शिलालेखाचे मध्य प्रदेशातील बिलासपुर जिल्ह्यातील जांजगिर तालुक्यातील अकलतारा गावापासून १½ मैल उत्तरेकडील उपलब्धिस्थान ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.४३०;४३८ ). मिराशी यांच्या मते प्राचीन विकर्णपुर हेच असावे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.४९६; विकर्णपुर पहा ).

**कोटडि** ( ग्राम )—चालुक्य राजा जयसिंहाच्या वि. सं. १२०२ च्या शिलालेखमते मध्य गुजरातेतील एक ग्राम. अबू पर्वतान्तर्गत दिलवारा गावाच्या ७ मैल दक्षिणेकडील आधु. कोच गाव हेच होय ( एपि. इंडि. ८. २२२ ).

**कोटथल** ( ग्राम )— स. १२०२ च्या जनिविध शिलालेखमते बोधिगया मंदिरान्तर्गत रत्नजडित सिंहासनाच्या योगक्षेमार्थ दान दिलेले गया जिल्ह्यातील एक ग्राम ( जे. बी. ओ. आर. एस्. ४.२७९ ). आधु. बोधिगयेच्या परिसरात हे असावे ( पांडे, बिहार. पृ. १३० ).

**कोटराक्षी** ( योगिनी )—काशी येथील एक योगिनीस्थान ( स्कन्द. काशी. ४५.३५; पद्म. उत्तर. १५४ ).

**कोटरातीर्थ** ( तीर्थ )—साभ्रमती नदीकाठचे एक तीर्थ ( पद्म. उत्तर. १५२.१३ ).

**कोटरावण** ( वन )—पाणिनीच्या अष्टाध्यायी ( पा. सू. ८.४.४ ) आणि गणपाठमते ( पा. सू. ६.३.११७ ) भारतवर्षातील एक वन. 'वन'च्या 'वण' वैकल्पिक रूपाचे उदाहरण म्हणून याचा निर्देश तेथे आढळतो अग्रवाल यांच्या मते उत्तर प्रदेशातील लखीमपुर जिल्ह्यातील साल आणि शिसवी वृक्षांसाठी सुविख्यात अशा आधु. कोटरा प्रदेशात हे असावे ( अग्रवाल, पाणिनि. पृ. ४८ ).

**कोटरी** ( योगिनी )—काशी येथील एक योगिनीस्थान ( स्कन्द. काशी. ४५.४०; शब्दशः अर्थ–'कोटरसदृश स्थूलोदरा' ). स्कंद पुराण टीकामते ही पुरुषोत्तम देशात ( आधु. ओरिसा ) प्रसिद्ध होती.

**कोटवाधाम** ( तीर्थ )—उत्तर प्रदेशातील लखनौ–फैजाबाद रेलमार्गावरील सैदखान रेल्वेस्थानकापासून ६ मैलांवरील सतनामा सांप्रदायतीर्थ ( ती. पृ. १४१ ).

**कोटसिन्धु** ( नदी )—राजतरंगिणीमते कश्मीरातील 'कृष्णा' नदीचे नामांतर ( राज. ८.२४९२; कृष्णा २. पहा ).

**कोटा** ( वल्लभमंदिरस्थान )—राजस्थानमधील मुंबई–दिल्ली रेलमार्गावरील नागदापासून १४० मैलांवरील वल्लभ–मंदिरस्थान. येथे मथुरेश, नवनीत, मदनमोहन आदि अनेक मंदिरे आहेत ( ती. पृ. २८३ ).

**कोटाटवी** ( नगर )—संस्कृत साहित्यमते आग्नेय भारतातील 'कंटकस्थल' नगराचे नामांतर ( डी. एच्. एन्. आय्. १.३४१; कंटकस्थल पहा ).

**कोटाद्रि** ( पर्वत )—राजस्थानमधील बागेश्वरानजिकचा एक पवित्र पर्वत ( ती. पृ. २८१ ).

**कोटालिपाडा** ( बंदर )—पूर्व भारतान्तर्गत फरिदपुर जिल्ह्यातील गुप्त स्थापत्यावशेषस्थान, एक बंदर. येथे गुप्त राजवंशाची अनेक नाणी, तसेच दुर्गावशेष सापडले आहेत ( डी. यू. एच्. बी., पृ ७ ).

**कोटिकाश्लागिर** ( पर्वतीय जैन तीर्थ )—श्रुतसागरमते कलिंग देशातील 'कोटिशिला' जैन तीर्थाचे नामांतर ( कोटिशिला पहा ).

**कोटिकेश्वर** ( तीर्थ )—नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( पद्म. आदि. १८.३६ ).

**कोटिग्राम** ( ग्राम )—बौद्ध साहित्यमते पूर्व भारतान्तर्गत वृजि ( वज्जि ) संघराज्यातील गंगा नदीपासून एक 'गव्यूत' आणि प्रयागपासून १ कोसावरील एक बंदर ( संयुत्त. ५.४३१; महा. अट्ठ. पृ. ५६० ). पांडे यांच्या मते उत्तर बिहारमधील मुजफ्फरपुर जिल्ह्यातील गंडक नदीच्या पूर्व किनाऱ्यावरील आणि गंगा नदीच्या उत्तर किनाऱ्यावरील पटन्यापासून ६ मैलांवर आधु. हाजीपुरच्या परिसरात हे असावे. गंगा नदीच्या प्रवाहात वाहून गेल्यामुळे, अथवा मुसलमानी आक्रमणामुळे त्याचे काहीहि अवशेष आज आढळत नाहीत. नामांतर ( ह्युएन्त्संग )–'कौ–लि' ( कोटि; वॉटर्स, २.८६ ).

**नामव्युत्पत्ती**— बुद्धघोषमते 'महापनाद राजाच्या 'प्रासादशिखरानजिकचे ( कोटि अथवा यूपिका ) ग्राम' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले ( दीघ. अट्ठ. २.५४२;

३.८५६ ). जातकमते या राजाचा गंगानिमज्जित राजवाडा बाहेर काढण्याचा बुद्धकृत चमत्कार याच गावी घडला होता ( जा. २.३३२; थेरगाथा टीका. १.२८७; महावंश. ३१.५ ).

**बौद्ध साहित्यात**—जातकमते आपल्या अंतिम प्रवास-समयी गौतम बुद्ध श्रावस्ती→ भद्दियनगर→ पाटलिगाम-मार्गे या गावी आला ( कॉवेल, जा. पृ. २२९–२३० ). संयुत्तमते 'वज्जा–सुत्त'चे प्रणयनहि त्याने येथेच केले (संयुत्त. ५.४२१ ). वैशाली येथील लिच्छवि ग्रामप्रमुखाच्या, तसेच आम्रपाली नामक गणिकेच्या भेटीनंतर त्याने येथील बौद्ध भिक्षूंना उपदेश केला, आणि आम्रपालीच्या भोजनाचा स्वीकार करून तो नाडिक गावी गेला ( विनय. १.२३०; दीघ. २-९१ ). यावरून गंगा नदी—वैशाली मार्गावर हे, तसेच नाडिक ही विश्रामस्थाने असावीत.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते हे नाडिक गावाच्या दक्षिणेस होते (वॉटर्स, २.८६ ).

**मतांतरे**—जॅकोबी यांच्या मते जैन साहित्यातील कुंडग्राम नामक वैशाली-उपनगर हेच असावे ( एस्. बी. ई. २२.११ ). परंतु गंगा नदीकाठचे हे गाव वैशालीपासून नाडिक लष्करी ठाण्याने विभाजित झाले असल्याने त्यांचा हा तर्क असंभव वाटतो ( मिश्रा, वैशाली. १८४-१८६ ).

**कोटितीर्थ** ( तीर्थ )—महाभारत पुलस्त्ययात्रामते वाराणसी येथील भर्तृस्थानानजिकचे एक तीर्थ ( म. आर. ८२.२४; ६८.१०४; ८३.५८ ). वामन पुराण प्रह्लाद-तीर्थयात्रेत ( वामन. ५१.५३; ८४.११; १७ ), तसेच अन्य पौराणिक साहित्यातहि याचा निर्देश आढळतो ( अग्नि. १०९.१०; पद्म. आदि. २६.१४; ९५; २८. २८; ३८; ३७.३९; ५७ ).

२. महाभारतमते कुरुक्षेत्रातील पृथूदक ( आधु. पेहोआ ) नजिकचे एक शिवक्षेत्र ( म. आर. ८१.१४. १७१; वामन. ३४.२८; ३६.५३;६५; नारद. उत्तर. २७; ९५ ). 'कोट्यवधी भक्तांचे साक्षात्कारदायी तीर्थ' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले असावे.

३. अमरकंटक पर्वताच्या पश्चिम उतारावरील नर्मदा नदीचे उगमस्थान ( कूर्म. उत्तर. ४१.३४; पद्म. आदि. १३.३३; १८.८; मत्स्य. १९७.७ ). येथील एकादशकोनी कुंडामध्ये गोमुखातील नर्मदाजल स्रवत असून, त्यानजिकच नर्मदा नदीचे, तसेच नर्मदेश्वर, अमरकंटकेश्वर, आणि अमरनाथ महादेवाची मंदिरे आहेत ( ती. पृ. २२५ ).

४. हरिषेणमते पूर्व भारन्तातर्गत वरेंद्र देशातील देवकोट नगरानजिकचे एक जैन तीर्थ. श्वेतांबर परंपरामते हे राढ ( उत्तर बंगाल ) देशाच्या राजधानीचे नगर असून, कल्पसूत्रमते कोडिवरिसिया नामक जैन श्रमणाचे हे आद्य-स्थान होते. बंगालमधील दिनाजपुर जिल्ह्यातील आधु. बानगढ हेच गाव असावे. नामांतर—'कोटिवर्ष.'

**नामव्युत्पत्ती**— हरिषेणमते सोमशर्मन् मुनींच्या दारिद्र्यापहारार्थ देवांनी 'कोटी रत्नांचा वर्षाव केलेले स्थान' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले.

**शिलालेख साहित्यात**—या साहित्यमते हा ( कोटीवर्ष विषय ) राज्यविभाग उत्तर बंगालमधील पौंड्रवर्धनभुक्ती-मध्ये समाविष्ट असून, त्यामध्ये 'गोकलिका', 'ब्राह्मणी-ग्राम' आणि 'हलावर्त' उपविभाग ( विषय ) समाविष्ट होते ( एपि. इंडि. १४.३२४–३३३ ). याची राजधानी देवकोट ( आधु. दिवकोट ) गावी होती.

विग्रहपालदेव राजाच्या अम्गाचि दानपत्रात, तसेच मदनपाल राजाच्या मनहलि दानपत्रातहि या देशाचा निर्देश आढळतो ( एपि. इंडि. १५.२९५–३०१; गौड-लेखमाला. पृ. १४७–१५८; पौंड्रवर्धनभुक्ति पहा ).

५. अर्बुद पर्वतावरील एक तीर्थ ( स्कन्द. प्रभास. अर्बुद. ५०.१–६ ).

६. ( ह्रद ) काशी येथील कोटीश लिंगानजिकचे एक पवित्र सरोवर ( नारद. उत्तर. ५०.७; पद्म. आदि. ३२. ३९; स्कन्द. काशी. ९७.६३ ).

७. ( तीर्थ ) गया येथील एक तीर्थ ( अग्नि. ११६.६; ३०; वायु. ११२.३२ ).

८. गौतमी ( गोदावरी ) नदीकाठचे एक तीर्थ ( ब्रह्म. १४८.१; २१; १६४.५४ ). स्कंदमते अहल्या, ऐतरेय, नारद आदींनी येथे तपस्या केली होती ( स्कन्द. माहेश्वर. कौ. ४३–४७ ).

९. पुष्करक्षेत्रातील एक तीर्थ ( नारद. उत्तर. ७१. १५; पद्म. आदि. १२.९ ).

१०. प्रयागक्षेत्रातील एक तीर्थ ( अग्नि. १११.१४; पद्म. आदि. ४३.४४; मत्स्य. १०६.४४ ).

११. मथुरा येथील एक तीर्थ ( नारद. उत्तर. ७९. ३४; वराह. १५२.६५–६६; १५४.३२ ).

१२. दक्षिण भारतातील रामाच्या सेतूनजिकचे एक तीर्थ ( नारद. उत्तर. ७६.१६; स्कन्द. ब्राह्म. से. २७ ).

१३. महीसागर संगमक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ ( स्कन्द. माहेश्वर. कौ. ५२ ).

१४. अवंती येथील एक तीर्थ ( स्कन्द. आवन्त्य. अ.

३४.९१; म. आर. ८०.६८ ).

१५. ( देवीतीर्थ ) पद्ममते एक देवीतीर्थ. येथील देवीचे नाव कोटवी होते ( पद्म. आदि. १७.२०१; मत्स्य. १३. ३७ ).

१६. ( विष्णुतीर्थ ) पद्ममते एक विष्णुतीर्थ. येथील विष्णूचे नाव कौरव होते ( पद्म. उत्तर. १२९.१७ ).

१७. ( तीर्थ ) ओरिसामधील भुवनेश्वरनजिकचे एक तीर्थ. नामांतर–' स्नानतीर्थ ' ( ती. पृ. १९३ ).

१८. ( सरोवर ) शिलाहार राजा भोज ( द्वितीय )च्या प्राचीनतम शिलालेखांचे कोल्हापुरनजिकचे उपलब्धिस्थान, एक सरोवर ( एपि. इंडि. २९.१४ ).

१९. गंगाद्वारनजिकचे एक तीर्थ ( नारद. उत्तर. ६६. २९ ).

२०. पंचनद प्रदेशातील एक तीर्थ ( पद्म. आदि. २६. १४; वामन. ३४.२८ ).

२१. कश्मीरातील एक तीर्थ. वराहमूल ( आधु. बारामुल्ला ) नजिकचे आधु. कोटिसर हेच होय ( कश्मीर रिपोर्ट. पृ. १२ ).

२२. ( देवीस्थान ) वामनमते पश्चिम भारतातील ' आरासन ' देवीस्थानाचे नामांतर ( तीर्थकल्प. पृ २३७; आरासन पहा ).

**कोटिनार** ( शिवतीर्थ )—पश्चिम भारतातील नर्मदा नदीकाठचे चाणोदनजिकचे एक तीर्थ. येथे ' कोटीश्वर ' शिवमंदिर आहे ( ती. पृ. ४३६ ).

**कोटिमाहेश्वरी** ( देवीस्थान )—- हिमालय पर्वतातील केदार-बदरी मार्गावरील कालीमठापासून २ मैलांवरील एक देवीस्थान ( ती. पृ. ५६ ).

**कोटिमेध** ( तीर्थ )—- प्रभासक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ ( स्कन्द. प्रभास. प्र. २३५ ).

**कोटिरूप** ( तीर्थ )—- कुरुक्षेत्रातील एक तीर्थ ( म. आर. ८१.१७१ ).

**कोटिलिङ्गेश** ( लिंग )—- जगन्नाथपुरी येथील एक शिवलिंग ( स्कन्द. जगन्नाथ. १२ ).

**कोटिवट** ( क्षेत्र )—- कोकामुखक्षेत्रान्तर्गत एक वटवृक्ष ( वराह. १४०.४७ ).

२. गोनिष्क्रमणक्षेत्रातील एक वटवृक्ष (वराह.१४७.४४).

**कोटिवर्ष** ( देश व लोकसमूह )—- बृहत्संहितामते एक देश ( बृ. सं. ९.११ ).

२. ( नगर ) मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते पूर्व भारतातील ' शोणितपुर ' नगराचे नामांतर ( त्रिकाण्ड. ३२.१७; कल्पद्रु. ११.२३; शोणितपुर पहा ).

३. ( शिवस्थान ) वायुमते एक महेश्वर शिवतीर्थ ( वायु. २३.२०९ ).

४. ( जैन तीर्थ ) जैन साहित्यमते पूर्व भारतातील ' कोटितीर्थ 'चे नामांतर ( कोटितीर्थ ४. पहा ).

**कोटिशिला** ( पर्वतीय जैन तीर्थ )—- सुमतिसागरमते कलिंग देशातील तारंगा पर्वतातील एक जैन तीर्थ. निर्वाण-कांडमते ' यशोधर राजाच्या अर्धसहस्र पुत्रांचे, तसेच एक कोटी मुनींचे मुक्तिस्थान' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले. ओरिसामधील आधु. उदयगिरि-खंडगिरि पर्वतद्वय बहुधा हेच असावे ( जैन तीर्थयात्रादर्शक. पृ. १४७; उदयगिरि पहा ). नामांतर ( श्रुतसागर )—- ' कोटि-काशिलागिरि '.

**जैन साहित्यात**—-गुणभद्रमते पीठगिरि पर्वतावरील ही शिला लक्ष्मणाने उत्थापिली असून, जिनप्रभसूरिमते हे मगध देशात, अथवा मध्य भारतातील दशार्ण देशात होते. यावरून याच्या भौगोलिक स्थानाविषयी जैन साहित्यात मतभेद दिसतात ( ती. सं. पृ. १३५ ).

**कोटिग्राम** ( ग्राम )—- ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते वृजि देशान्तर्गत वैशाली–पाटलिपुत्र मार्गावरील गंगा नदी-काठचे एक ग्राम. मगधसरहद्दीवरील हे ( कौ-लि ) ग्राम गंगा नदीने त्या देशापासून विभक्त झाले होते ( वॉटर्स, २.८६ ).

**कोटीश्वर** ( लिंग )—-प्रभासक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंग ( नारद. उत्तर. ७०.२६ ).

२. कच्छ प्रांतातील भूजनजिकचे एक शिवलिंग ( शक्तिसङ्गम. ३.७.४५ ).नामांतर– **' कच्छेश्वर '** ( वामन. ३४.२० ); **' सप्तकोटीश्वर '** ( बॉंबे गॅझे. ५.२२९-२३०; सप्तकोटीश्वर पहा ).

३. वाराणसी येथील एक शिवलिंग ( लिङ्ग. कृत्यकल्पतरु. तीर्थविवेचन. पृ. ५४ ).

४. श्रीपर्वतावरील एक शिवलिंग ( लिङ्ग. १.९२. १५७ ).

**कोटेश्वर** ( लिंग )—हिमालयान्तर्गत देवप्रयाग–तेहरी मार्गावरील एक शिवलिंग ( ती. पृ. ५० ).

२. मध्यभारतातील ओंकार मांधातापासून ४ मैलां-वरील नर्मदा नदीकाठचे एक शिवलिंग. यानजिकच्या करंजेश्वर शिवमंदिरस्थानी करंज दानवाने तपस्या केली होती ( ती. पृ. २३३ ).

३. अर्बुद पर्वतावरील आरासुरपासून ३ मैलांवरील

सरस्वतीउगमानजिकचे शिवमंदिरस्थान ( ती. पृ. ३९८ ).

४. मध्यभारतातील नर्मदा नदीकाठचे नर्मदा–उरी-बागली संगमानजिकचे विश्रवसपुत्र कुंड ऋषींचे तपस्या-स्थान ( ती. पृ. २३५ ).

५. पश्चिम भारतातील नर्मदा नदीकाठचे भडोचनजिकचे एक शिवलिंग आणि कोटेश्वरी देवीस्थान ( ती. पृ. ४२६ ).

**कोट्ट** ( दुर्गस्थान )—कश्मीरच्या दक्षिण सीमावर्ती लोहरिन देशातील 'लोहरकोट्ट' पर्वतीय दुर्गाचे नामांतर ( राज. ८.१६३१; १९६६–१९६७; १९७१; १९९४; २००८; २०२२; २०२९; लोहरकोट्ट पहा ).

**कोट्टाप्पाकोण्ड** ( शिवमंदिरस्थान )–आंध्र प्रदेशातील मच्छलीपट्टम्–हुबळी रेलमार्गावरील नरसरावुपेट रेल्वे-स्थानकापासून ८ मैलांवरील पर्वतीय शिवमंदिरस्थान ( ती. पृ. ३३९ ).

**कोट्टारू** ( नगर )—शिलालेख साहित्यमते पांड्य राजा अरिकेसरीने स. ७०० मध्ये चेर राजाशी विजयी युद्ध केलेले दक्षिण भारतातील कन्याकुमारीनजिकचे एक नगर ( एपि. इंडि. १७.२९१ ). त्रावणकोर प्रांतातील कन्याकुमारीपासून १० मैल उत्तरेकडील नागरकोइल-नजिकचे आधु. कोट्टारू गाव हेच होय चोल राजा कुलोत्तुंग ( प्रथम ) च्या स. १०८३ च्या तिरुक्कलुकुन्रम् शिलालेखमते त्याने हे जिंकले होते ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. २.२३०; इंडि. अँटि. स. १८९२, पृ. २८१ ).

**कोट्टिअरिस्** ( नदी )—टॉलेमीच्या मते पूर्व भारतातील एक नदी ( उगम–अक्षांश २° उत्तर; रेखांश-१८०°–४०′ पूर्व; मुख–अक्षांश ७° उत्तर; रेखांश. १७७°–२०′ पूर्व ). मॅक्रिंडल यांच्या मते ब्रह्मदेशातील आधु. कँटन नदी हीच होय ( इंडि. अँटि. १३.३८७ ).

**कोट्यर्क** ( सूर्यस्थान )—गुजरातमधील अहमदाबाद-खेडब्रह्मा रेलमार्गावरील प्रांतीच रेल्वेस्थानकापासून १२ मैलांवरील खडायतग्राम येथील वल्लभ संप्रदायाचे सूर्य-मंदिरस्थान. येथील संगमरवरी चतुर्भुज सूर्यप्रतिमा गुजरातमधील खडायत ब्राह्मण आणि वैश्यांचे कुलदैवत आहे ( ती. पृ. ४२५ ).

**कोट्याश्रम** ( आश्रमस्थान )—शिलालेख साहित्यमते पूर्व भारतातील वसिष्ठ ऋषींचे आश्रमस्थान. बारिपाडा-पासून ३२ मैलांवरील आधु. कुतिंग गाव हेच होय ( एपि. इंडि. २५.१५४ ).

**कोठार** ( जैन मंदिरस्थान )—कच्छ प्रांतातील जैन मंदिरस्थान ( मंदिराची उंची– ७४′; ती. पृ. ४१५ ).

**कोडमदेसरग्राम** ( तीर्थ )—राजस्थानमधील विकानेरपासून १४ मैलांवरील एक तीर्थ ( ती. पृ. २९५ ).

**कोडा** ( ग्राम )—चालुक्य राजा जयसिंहाच्या वि. सं. १२०२ च्या शिलालेखमते मध्य गुजरातेतील उमलोड पथकातील एक ग्राम ( इंडि. अँटि. १०.१५९ ). याचे आधुनिक स्थान समजत नाही.

**कोडाञ्ज** ( ग्राम )—मध्ययुगीन शिलालेख साहित्यमते उत्तर बंगालमधील 'कुलांच' ग्रामाचे नामांतर. अन्य नामांतर–'क्रोडांची' ( कुलांच पहा ).

**कोडिय** ( गणराज्य )—भर्हुत शिलालेख, तसेच जैन कल्पसूत्रमते कोशल देशान्तर्गत 'कोलिय' गणराज्याचे नामांतर ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.२.६९; कोलिय पहा ).

**कोडुम्बालूर** ( देवमंदिरस्थान )—दक्षिण भारतातील चोल स्थापत्यशैलीचे ( इ. स. १० वे शतक ) हिंदु देव-मंदिरस्थान. येथील मूवर कोइल मंदिर प्रसिद्ध आहे ( गोएट्झ, पृ. १७३ ).

**कोड्य** ( गणराज्य )—भर्हुत शिलालेखमते कोशल देशान्तर्गत 'कोलिय' गणराज्याचे नामांतर ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.२.१६९; कोलिय पहा ).

**कोणमण्डल** ( देश )—चोल राजा राजेंद्राच्या स. १०९१ च्या नंदूरु ताम्रपटमते आंध्र प्रदेशातील वासिष्ठी आणि गौतमी या गोदावरीच्या शाखानद्यांच्या दुआबा-तील एक देश. रेड्डी राजा काटय वेम ( द्वितीय ) च्या स. १४११ च्या शिलालेखातहि याचा निर्देश असून, गोदावरी नदीच्या दक्षिण खोऱ्यात अथवा त्रिभुज प्रदेशात हा असावा ( रंगाचारी, २. गोदावरी. १७; एपि. इंडि. ४.३१८ ).

**कोणादित्य** ( तीर्थ )—ब्रह्ममते औंड्र ( ओरिसा ) देशातील लवणोदधीच्या किनारीचे ( आधु. बंगालचा उप-सागर ) सुविख्यात सूर्यक्षेत्र ( ब्रह्म. २८–९; १८; ४७ ). पुरी जिल्ह्यातील जगन्नाथपुरीपासून २१ मैल ईशान्येकडील चंद्रभागा नदीकाठचे आधु. कोणार्क हेच होय ( अक्षांश १९°–५३′ उत्तर; रेखांश ८६°–६′ पूर्व ). ओरिसा-मधील चार प्रमुख तीर्थांमध्ये याची गणना असून, येथील सूर्यरथाकृती सूर्यमंदिर ( इ. स. १३ वे शतक ) मध्य-युगीन ओरिसा स्थापत्यकलेचे जगद्विख्यात उदाहरण आहे. ऐन्–इ–अकबरीमते स्थानिक मुसलमानी खलाशात कृष्णवर्णीय ग्रॅनाइट दगडाचे हे मंदिर 'कृष्ण देऊळ' ( ब्लॅक पॅगोडा ) नावाने सुविख्यात होते ( ऐ. अ. २.१६ ).

**स्थापत्यवैशिष्ट्य**—भुवनेश्वर येथील लिंगराज मंदिर,

पुरी येथील जगन्नाथ मंदिर आणि कोणार्क येथील सूर्य मंदिर या मध्ययुगीन ओरिसा स्थापत्यशैलीच्या प्रातिनिधिक उदाहरणांपैकी कालदृष्ट्या सर्वाधिक उत्तरकालीन असे येथील सूर्यमंदिर गंग राजा नृसिंह (प्रथम) आणि त्याची पत्नी सीतादेवीने स. १२७८ मध्ये बांधले. उत्तरकालीन गंग ताम्रपटमते नृसिंहदेवाने स्वराज्यकालाच्या १८ व्या वर्षी ते बांधले (एशि. रिसर्चेस्. १५.३२७; जे. बी. आर. ए. एस्. ७२.१२४). गंग राजा नृसिंह (द्वितीय) च्या स. १३०२ च्या असंखली ताम्रपटात या स्वपितृनिर्मित भव्य वास्तूस विनयाने 'कुटीरक' (झोपडी) म्हटले आहे (एपि. इंडि. ३१.१११–११५).

ओरिसामधील भुवनेश्वर येथील लिंगराजादि सर्वोत्कृष्ट मंदिरे स. ९००–११०० च्या दरम्यानची असून, त्यानंतरचे काळात येथील स्थापत्यकला उतरणीस लागली (उदा. पुरी येथील जगन्नाथ मंदिर). यानंतरचे काळातील (इ. स. १३ वे शतक) ओरिसा कलेच्या पुनरुत्थानाचे दृश्य फळ म्हणजे हे सर्वांगसुंदर मंदिर होय.

**सूर्योपासना**—उत्तर भारतातील चार प्रमुख सूर्यमंदिरस्थानांमध्ये याची गणना होते (अन्य तीन सूर्यस्थाने–कश्मीरातील मार्तांड; गुजरातमधील मोधेरा; मध्यप्रदेशातील ग्वाल्हेर; आर्कि. सर्व्हे. वे. इं. ९.७३–७४). वैदिककालीन भारतातील सूर्योपासनेचा आविष्कार हृद्रोगादिकांच्या परिहारार्थ आणि बुद्धितेजाच्या प्राप्त्यर्थ रचलेल्या ऋग्वेदातील 'रोगघ्न उपनिषद्' (ऋ. १.५०.१–१३), आणि 'गायत्री सूर्य मंत्रा'मध्ये (ऋ. ३.६२.१०) आढळतो. सूर्योपासनेने कुष्ठरोग बरा होत असल्याची कल्पना पौराणिक साहित्यात सर्वत्र आढळते.

बृहत्संहितामते इराणमधील मग ब्राह्मण हे भारतातील सूर्योपासनेचे आद्य उद्गाते असून (बृ. सं. ६०.१९), स्थानिक आख्यायिकामते शाक द्वीपातील या जरसस्त्र (जरदुष्ट्र) वंशीय लोकांचा आद्य पुरुष सूर्य आणि मिहिरगोत्रीय सुजिह्व ब्राह्मणकन्या निक्षुभेचा पुत्र होता. यावरून मेखला (अव्यंग) कटिबद्ध 'मग' ब्राह्मण हे मूळचे पर्शियामधील असावेत. गुडघ्यापर्यंत बूट आणि कमरेला मेखला हा परंपरागत सूर्यप्रतिमेचा वेषहि इराणी धर्तीचाच आहे. पौराणिक साहित्यमते कुष्ठरोगपीडित कृष्णपुत्र सांबाने शाकद्वीपीय मग ब्राह्मणांना भारतात आणून वैदिक सूर्योपासनेला नवी प्रतिष्ठा प्राप्त करून दिली.

फर्ग्युसन यांच्या मते सूर्योपासनेचे कोणार्क हे अंतिम देवालय असून, यानंतरच्या काळात ही उपासना विष्णु-उपासनेत विलीन झाली.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या तीर्थाची निम्नलिखित नामांतरे आढळतातः—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पौराणिक साहित्य | कोनाकोन, कोन अर्क (कोनरक) |
| २. ऐन्–इ–अकबरी<br>३. कपिल संहिता | अर्कक्षेत्र, पद्मक्षेत्र, मैत्रेयवन |
| ४. मुसलमानी साहित्य | कृष्णदेऊळ (ब्लॅक पॅगोडा) |
| ५. टॉलेमी | कण्णगर |
| ६. गंग राजा नृसिंह (द्वितीय) चा असंखली ताम्रपट (एपि. इंडि. ३१.१११–११५) | कोनाकोण |

**नामव्युत्पत्ती**—'जगन्नाथपुरीच्या ईशान्य कोनातील अर्कक्षेत्र' अशा अर्थाने यास 'कोन अर्क' (कोनादित्य) नाव मिळाले.

**शोध**—बंगालच्या उपसागराच्या रेतीमध्ये बुडालेले हे मंदिर स. १८९३ मध्ये उकरून काढताच त्याच्या अद्वितीय स्थापत्यसौंदर्याने सारे जग मंत्रमुग्ध झाले.

**ब्रह्म पुराणात**—या ग्रंथमते पवित्र आणि प्रसन्न समुद्रकिनारीच्या या वालुकावेष्टित सहस्ररश्मि सूर्यमंदिरस्थानी (कोणादित्य; ब्रह्म. २८.९.१८) माघ शुक्ल सप्तमीला स्नान करणे पुण्यप्रद होते (ब्रह्म. २८.१). स्थानिक आख्यायिकामते या दिवशी कृष्णपुत्र सांबाला येथे सूर्यदर्शन झाले.

**कपिल संहितेत**—पुरीच्या परिसरातील क्षेत्रचतुष्ट्याच्या या माहात्म्यग्रंथात मैत्रेय वनान्तर्गत या सूर्यतीर्थासंबंधी निम्नलिखित आख्यायिका दिली आहेः— नारदाच्या चिथावणीवरून कृष्णपत्नींच्या स्नानगृहामध्ये पापी हेतूने शिरलेल्या कृष्णपुत्र सांबाला कृष्णाने कुष्ठरोगी बनण्याचा शाप दिला. कालांतराने कृष्णाच्याच सूचनेवरून त्याने रोगमुक्त्यर्थ मैत्रेयवनात सूर्योपासना आरंभिली. तिच्या फलस्वरूप एकवीस सूर्यनामांच्या जपासहित येथील चंद्रभागा नदीमध्ये स्नान केल्यानंतर सूर्याने त्यास रोगमुक्तीचे वरदान दिले. या नदीमध्ये सापडलेल्या पद्मासनारूढ सूर्यप्रतिमेवर सांबाने सूर्यमंदिर उभारले.

**उडिया साहित्यात**—'मदल पंजी' नामक उडिया

ग्रंथमते गंगवंशीय नृसिंहदेव राजाने स्वशरीरावरील दैवी प्रकोपजन्य पुच्छ नष्ट करण्यासाठी स. १२७८ मध्ये येथील सूर्यमंदिराचा जीर्णोद्धार केला.

**टॉलेमीच्या ग्रंथात**—या ग्रंथमते हे ( कन्नगर ) गंगेच्या आखातात होते ( अक्षांश १३°–३०′ उत्तर; रेखांश–१३६°–३०′ पूर्व ).

**ऐन्-इ-अकबरीमध्ये**—या ग्रंथमते ओरिसानरेशाने आपल्या राज्याचे प्रतिवार्षिक रु. ३ कोटीचे उत्पन्न बारा वर्षेपर्यंत खर्च करून येथील ( अर्कक्षेत्र, पद्मक्षेत्र ) सूर्यमंदिर बांधले. यावरून रु. ३६ कोटी किंमतीच्या या मंदिराचे बांधकाम बारा वर्षे चालू असावे. स्थानिक आख्यायिकामते १२०० कारागिरांनी अखंडपणे खपून हे बांधले.

ऐन्-इ-अकबरीकाळी येथे मुख्य सूर्यमंदिराखेरीज अन्य २८ देवालये होती. स. ८६० मध्ये हे बांधल्याचा या ग्रंथातील निर्देश ऐतिहासिक दृष्ट्या असं व वाटतो( ऐ. अ. २.१६ ).

**आधुनिक काळी**—सूर्यनारायणाचे सारे मंदिर सूर्यरथाकृती स्वरूपात बांधावयाच्या अद्वितीय स्थापत्यकल्पनेतून स्फुरलेल्या येथील मंदिराचे दगडी जोते केवळ आज विद्यमान असून, त्यामधील मूर्ती, मुख्य मंदिर आणि शिखर नष्ट झाले आहे. या जोत्यावर शुक्ल आणि कृष्णपक्षाच्या प्रतीकरूप प्रत्येकी बारा रथचक्रे ( व्यास–९′–८″; रुंदी–८″; आऱ्यांची संख्या–प्रत्येकी ८ ), आणि त्यांच्या उभय अंगांस अत्युत्कृष्ट मानवी आणि प्राणिशिल्पे आहेत. या रथाला जोडलेले सप्त द्रुतगती, आकाशगामी दगडी अश्व सभामंडपगामी पायऱ्यांच्या उभय अंगांस कोरले आहेत. ही रथचक्रे, सप्त रथाश्व, सारथ्याची बैठक, तसेच भोगमंडपाचा काही भाग आज सुस्थितीत आहे. बाकी सारे मंदिर, तसेच त्यानजिकचे सूर्यपत्नी संज्ञेचे मंदिर नष्ट झाले आहे.

हे मंदिर सुस्थितीत असतांना त्याच्या गर्भागाराचे आणि सभामंडपाचे शिखर अनुक्रमे १८०′ आणि १४०′ असून, या शिखराचा काही भाग स. १८३९ पर्यंत अस्तित्वात होता. उत्तरकालात हे सारे शिखर, तसेच मुख्य सभामंडपाच्या प्रवेशद्वाराच्या शिरोभागीची नवग्रहयुक्त आडवी पट्टी उद्ध्वस्त झाली.

स्थानिक आख्यायिकामते बंगालच्या काळापहाड राजाने ( इ. स. १६ वे शतक ) हे मंदिर उद्ध्वस्त करून त्याच्या शिखराचा ताम्रकलश पळविला. अन्य अभ्यासकांच्या मते येथील मंदिरशिखर त्याच्या पायास न पेलण्याइतके वजनदार झाल्यामुळे ते अपुरे ठेवावे लागले. स्थानिक आख्यायिकामते या मंदिराच्या शिखरस्थानी बसविलेल्या चुंबकीय दगडामुळे समुद्रातील बोटी या मंदिराप्रत आकर्षिल्या जाऊन नष्ट होत असत. या आपत्तीला कंटाळून काही मुसलमान खलाशांनी येथील मंदिरशिखर नष्ट केले. तद्नंतर येथील सूर्यमूर्ती पुजाऱ्यांनी जगन्नाथपुरी येथे हलविली. मुसलमानी आक्रमणामुळे हे मंदिर उद्ध्वस्त झाल्याचा रूपकात्मक निर्देश येथे अभिप्रेत दिसतो.

या मंदिरासमोरचा मोथेरा सूर्यमंदिरसदृश विभक्त सभामंडप आणि ध्वजस्तंभ इ. स. १८ व्या शतकात मराठ्यांनी जगन्नाथपुरी येथे हलविला. जगन्नाथ-मंदिराच्या आवारात तो आजहि आढळतो.

**स्थापत्य**—या मंदिराची रचना, तसेच त्यामधील देवताशिल्पे ओरिसातील वैष्णव देवालयाच्या सभामंडपासदृश ( जगमोहन ) असून, त्याच्या प्रवेशद्वारीच्या आडव्या पट्टीवर भुवनेश्वर येथील लिंगराज मंदिराप्रमाणे नवग्रहप्रतिमा, तसेच सर्पफणायुक्त नागप्रतिमा आढळतात.

**शिल्पकृती**—येथील जोत्यावर मानवी प्राणी आणि वनस्पती–जीवनातील चैतन्यमयी, कलात्मक, आणि जीवनोल्हासपूर्ण अगणित शिल्पप्रतिमा असून, दगडाच्या कडकपणामुळे त्या जणू काल खोदल्याप्रमाणे रसरशीत भासतात. झांजा, बासरी, मृदंगवादनाने सूर्यदेवाचे स्वागत करणाऱ्या अप्सरा, सोंडेने सैनिकांना पाठीवर झेलणारे हत्ती, शत्रुसैन्यनिर्दालक अश्व, लक्ष्यवेधी शिकारी अशी अनेक दृश्ये येथे शिल्पकारांनी कलात्मक बारकाव्याने टिपली असून, बहरलेले वृक्ष, खंडण्या वसूल करणारे राजे, तसेच प्रणयरत सौंदर्यशाली प्रमदा अशा नानाविध विषयांमध्ये ते सारखाच रस घेतात. म्हणूनच 'साहित्याहूनहि अधिक बोलके शिल्प' हे स्व. रवींद्रनाथ टागोरकृत या मंदिराचे वर्णन सार्थ वाटते.

**लैंगिक शिल्पकृती**—ओरिसादेशीय वैष्णव मंदिरानुसारी अनेक उघडीनागडी लैंगिक शिल्पचित्रे येथील जोत्यावर असली, तरी ती खर्जुराहक ( आधु. खजुराहो ) प्रमाणे तांत्रिक धर्मविधीप्रेरित नसून, सूर्यमंदिरास देवदासी अर्पण करण्याच्या पूर्वापार प्रथेची द्योतक आहेत. हीन आणि अधःपतित अभिरुचीची चित्रे ही शिल्पदृष्ट्या ओबडधोबड आणि नवथर घाटणीची आहेत. नृत्यांगनांच्या स्वैर नृत्यांची अनेक शिल्पे मुख्य मंदिरासमोरच्या नृत्यमंडपात आहेत.

मंदिराच्या जोत्यावर खालून वर क्रमाने हस्तिमालिका

सूर्यरथचक्रे आणि यक्षनागादि दुय्यम देवतांची शिल्पचित्रे असून, त्यांच्या पार्श्वभागी लैंगिक चित्रे, तसेच तत्कालीन समाजजीवनातील दृश्ये आहेत.

**शिखर**—या मंदिराचे द्वादशकोनी, तिमजली उद्ध्वस्त शिखर भुवनेश्वर येथील दुमजली लिंगराज मंदिरशिखराहून वेगळ्या धर्तीचे असून, ओरिसा मंदिरस्थापत्याच्या उत्क्रांतीच्या दृष्टीने ते महत्त्वाचे आहे. त्याच्या खालच्या दोन मजल्यांच्या दर्शनी भागी सहा आणि वरच्या मजल्यावर पाच नक्षीकामयुक्त आडव्या पट्ट्या (कॉर्निसेस्) असून, त्यांच्या द्वादश कोपऱ्यांत, तसेच विभिन्न मजल्यांच्या दरम्यान अद्वितीय शिल्पचित्रे आहेत. त्याच्या द्वादशकोनी निमुळत्या आकारामुळे निर्माण होणारे छायाप्रकाशाचे मनोहारी नर्तन भारतीय मंदिरस्थापत्याच्या इतिहासात अपूर्व आहे.

**अंतर्भाग**—या मंदिराचा अंतर्भाग अनलंकृत असून, त्याच्या निमुळत्या सभामंडपाच्या (४०'×४०'×४०') माथ्यावर सपाट दगडाचे छत आहे. त्यास आधार म्हणून नऊ चौकोनी लोखंडी कांबी (लांबी–२३') एकमेकींस समांतर बसविल्या आहेत.

**कोणियानाम** (ग्राम)—कलचुरि राजा बुद्धराजाच्या स. ६१० च्या ताम्रपटमते महाराष्ट्रातील वटनगर भोगान्तर्गत एक ग्राम (वाटक). नासिक जिल्ह्यातील भाटोरा गावाच्या ५ मैल ईशान्येकडील आधु. कन्नुवाडी गाव हेच होय.

**कोण्डकावुरु** (मंदिरस्थान)-विजयनगरच्या कृष्णदेवराय–अमात्य तिम्मरसाच्या स. १५१८ च्या शिलालेखमते आंध्र प्रदेशातील कृष्णा जिल्ह्यातील नरसरावुपेट गावाच्या ८ मैल दक्षिणेकडील हनुमत्‌मंदिरस्थान (सेवेल, मद्रास. पृ. ७०).

**कोण्डपल्लि** (पर्वतीय दुर्गस्थान)—शिलालेख साहित्यमते आंध्र प्रदेशान्तर्गत कृष्णा जिल्ह्यातील सुविख्यात दुर्गस्थान. वेझवाड्यानजिकचे आधु. कोंडपल्लि गाव हेच होय.

इ. स. १२ व्या शतकात हा, तसेच यानजिकचा कोंडवीडु हे आंध्र प्रदेशातील सुविख्यात दुर्ग असून, ओरिसानरेश काकतीय आणि पश्चिम चालुक्य राजांच्या दरम्यान याच्या प्राप्त्यर्थ सदैव संघर्ष चालू असे. पश्चिम चालुक्य राजा विक्रमादित्य (षष्ठ) च्या स. ११२६ च्या त्रिपुरांतक शिलालेखमते त्याच्या अधिराज्याखालील या दुर्गनगरासभोवतालचा कृष्णा नदीच्या उभय किनारीचा प्रदेश 'कोंडपल्लि ३००' नावाने प्रसिद्ध होता (एपि. इंडि. ९.२५६; इंडि. अँटि. स. १८८२, पृ. ९).

चोल राजा कुलोत्तुंग (प्रथम) च्या मृत्यूनंतर चोल साम्राज्यातील अन्य मुलखासमवेत हा देशहि पश्चिम चालुक्य राज्यात समाविष्ट झाला (रंगाचारी, २. कृष्णा. ३५१).

**काकतीय राज्यकाली**—काकतीय राजा प्रतापरुद्र (प्रथम) च्या कर्नूल शिलालेखमते यानजिकचे एक गाव त्याने कर्नूल मंदिरास दान दिले होते. त्यावरून त्या काळी हा त्याच्या ताब्यात असावा (रंगाचारी, २. कर्नूल. ३६५). कोंडवीडुनरेश अनवेमचा स. १३५० चा ताम्रपट येथून काढला असून (रंगाचारी, २. कृष्णा. १०२), त्यावरून त्या देशातहि याचा समावेश कधीकधी होत असावा.

**मुसलमानी राज्यकाली**—बुऱ्हाण-इ-मासिर ग्रंथमते बहामनी सुलतान मुहंमदशहा (तृतीय) च्या निजाम उल्मुल्क बहारि नामक सेनापतीने स. १४७० मध्ये हा, तसेच कोंडवीडु आणि राजमुंद्री प्रदेश ओरिसानरेशाकडून जिंकला (इंडि. अँटि. स. १८९९, पृ. २८५). स. १४७६ मध्ये येथील हिंदु अधिकाऱ्यांच्या बंडाचा सूड म्हणून बहामनी सुलतानाने येथील देवालय आणि तत्रस्थ ब्राह्मणांचा नाश करून तेथे मशीद बांधली (सेवेल, इन्स्क्रि. पृ. २२७–२२८).

**विजयनगर राज्यकाली**—स. १५१५ मध्ये विजयनगरच्या कृष्णदेवरायाने कृष्णा नदीच्या दक्षिणवर्ती उदयगिरि आणि कोंडवीडु, तसेच त्या नदीच्या उत्तरवर्ती कोंडपल्लि किल्ले ओरिसानरेशाकडून जिंकले (एपि. कर्ना. ११.१०७). या राजाच्या स. १५१८ च्या बेझवाडा शिलालेखमते तो या प्रदेशाचा अधिराज असून, स. १५२४ नंतर हा गोवळकोंड्याच्या कुतुबशहाने जिंकला (रंगाचारी, २. कृष्णा. १०३).

**कोण्डमूडि** (शिलालेखस्थान)—पल्लव राजा जयवर्मनच्या स. २३४ च्या ताम्रपटाचे आंध्र प्रदेशातील कृष्णा नदीच्या मुखानजिकचे उपलब्धिस्थान (एपि. इंडि. ६.३१५).

**कोण्डवीडु** (पर्वतीय दुर्ग)—आंध्र प्रदेशान्तर्गत कृष्णा जिल्ह्यातील नरसरावुपेट तालुक्यातील गुंटूरपासून १३ मैल नैर्ऋत्येकडील कृष्णा नदीकाठचे सुविख्यात पर्वतीय दुर्गस्थान. याच्या सभोवतीचा प्रदेश इ. स. ७ व्या शतकात 'कोंडवीडु देश' नावाने प्रसिद्ध असून,

अमरावती स्तूप, धरणीकोट गाव, तसेच कोंडवीडु जिल्हा त्यामध्ये समाविष्ट होते. येथील दुर्ग या गावानजिकच्या टेकडीवर आहे. नामांतर (शिलालेख साहित्य)– 'कौंडिण्यपुर'; 'गिरिपश्चिम'; 'शैलपश्चात्यदीप'; 'कोंडपडमति' (एपि. इंडि. ६.२६८).

**नामव्युत्पत्ती**—'कौंडिण्यपुर'चे हे संभवतः कन्नड रूप असून, याचेच नावावरून याच्या पश्चिमेकडील राज्यास 'कोंडपडमति' (शब्दशः अर्थ– टेकडीच्या पश्चिमेकडील प्रदेश) नाव मिळाले. येथील बुद्ध (प्रथम) नामक आद्य राजाच्या खंदोल मंदिरलेखातील 'गिरिपश्चिमाधिप' आणि 'शैलपश्चात्यदीप' (पश्चिमवर्ती टेकडीचा प्रकाश) ही बिरुदेहि या दुर्गाच्या पश्चिमवर्ती राज्याचीच निदर्शक आहेत (एपि. इंडि. ६.२६८).

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**— शिलालेख साहित्यमते या देशाच्या बुद्ध (प्रथम) नामक आद्य राजाने (इ. स. ७ वे शतक) चालुक्य राजा कुब्जवर्धनकडून हा स्वतंत्र केला. इ. स. १२-१३ व्या शतकात हा वारंगळनरेश काकतीय राजांच्या साम्राज्यात असून, स. १४२७ मध्ये येथे गोवळकोंड्याच्या कुतुबशहाचे आणि स. १५१५ मध्ये विजयनगरच्या कृष्णदेवरायाचे राज्य आले. विजयनगर साम्राज्याच्या विनाशानंतर (स. १६६५) हा पुनः मुसलमानांनी जिंकला.

**कोंडपडमति राज्यकालात**— या राजवंशातील (इ. स. ७-१२ वे शतक) प्रारंभीच्या बुद्ध (प्रथम) राजाव्यतिरिक्त अन्य राजांची नावे उपलब्ध नाहीत (सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३६२).

**रेड्डी राज्यकालात**— स. १३२१ मध्ये मुहमंद तुघ्लककृत काकतीय साम्राज्यविनाशानंतर कोंडवीडुनरेश प्रोलवेम रेड्डीने अमरावती आणि वारंगळ प्रदेश स्वराज्यास जोडला. श्रीशैलम् आणि अहोबिलम् पर्वतीय मंदिरांच्या पायऱ्या त्याने बांधल्या असून, त्याच्या स. १३४४ च्या शिलालेखमते ब्राह्मणोच्छिष्ट सुखे तत्कालीन क्षत्रियांच्या वाट्यास येत असत (एपि. इंडि. ११.३१३). अन्नवोत रेड्डीच्या स. १३५८ च्या शिलालेखमते येथील समुद्रकिनारी जलसमाधिप्राप्त नौकांमधील माल मालकास परत दिला जात असे (रंगाचारी, २. गुंतूर. २). वेम रेड्डी राजाच्या दरबारी श्रीनाथ (स. १३७०) हा सुविख्यात कवी असून (एपि. इंडि. ८.८), वेमयराय रेड्डी राजाने (स. १४१५) येथे अनेक कालवे खोदले होते (रंगाचारी, २. गुंतूर. ७६६).

**ओरिसा राज्यकाली**— स. १४२०-१५१६ च्या दरम्यान हा देश दक्षिणेस त्रिचनापल्ली, चंद्रगिरि आणि कांचीपर्यंत राज्य करणाऱ्या ओरिसाच्या गजपति राजांच्या ताब्यात होता (अर्कि. सर्व्हे. दक्षिण विभाग. स. १९१९, क्र. ५१). बुऱ्हाण-इ-मासिर ग्रंथमते बहामनी सुलतान मुहंमदशहा (तृतीय) ने १४७० मध्ये हा, तसेच कोंडपल्ली प्रदेश ओरिसानरेशांकडून जिंकला (इंडि. अँटि. स. १८९९, पृ. २८५).

**विजयनगर राज्यकाली**— स. १५१४ मध्ये विजयनगर सम्राट कृष्णदेवरायाने कृष्णा नदीच्या दक्षिणवर्ती उदयगिरि, अद्दंकि, वेनुकोंड, बेल्लमकोंड दुर्गासमवेत हा दुर्गहि मुसलमानांकडून जिंकून (एपि. इंडि. ७.१८-१९), गोपन्न नामक स्वसेनापतीस येथील राजप्रमुख नेमले (एपि. इंडि. ६.२३०). नंतर अमरावती येथील अमरेश्वराचे दर्शन घेऊन त्याने कृष्णानदीच्या उत्तरवर्ती कोंडपल्ली दुर्ग जिंकला (रंगाचारी, २. गुंतूर. ६३·). आधु. कोंडवीडु टेकडीच्या पायथ्यानजिक कृष्ण देवरायरचित दुर्गामध्ये गोपन्नाचा स. १५२० चा एक स्तंभलेख आढळतो (एपि. इंडि. ६. २३०).

**गोवळकोंडा राज्यकालात**—स. १५८० मध्ये गोवळकोंड्याच्या कुतुबशहाने गुंतूर प्रदेशातील उदयगिरि, विनुकोंड, बेल्लमकोंड, तंगेडा आदि दुर्गांसमवेत हा जिंकून मुहंमद कुलि नामक स्वपुत्रास येथे राजप्रमुख नेमले (रंगाचारी, २. गुंतूर. ७६४). स. १७५१ मध्ये मोंगलांच्या सलाबतजंग नामक सुभेदाराने हा, तसेच नरसपतम्, निजामपतम् आदि आठ किल्ले प्रथम फ्रेंचांना, आणि नंतर इंग्रजांना खंडणी दिले (सेवेल, इन्स्क्रि. पृ. २).

**स्थापत्यावशेष**—या गावाच्या परिसरात निम्नलिखित स्थापत्यावशेष आढळतात :—

(१) **विष्णुमंदिर**—याच्या तीन मैल पूर्वेकडील विष्णुपद नामक पर्वतीय स्थानी एक विष्णुमंदिर असून, टेकडीच्या पायथ्यानजिकच्या कृष्णदेवरायदुर्गाच्या दक्षिणेस रेड्डी राजनिर्मित अन्य एक विष्णुमंदिर आहे. मुसलमानांनी उद्ध्वस्त केलेल्या या मंदिरात विजयनगरच्या सदाशिवरायाचा स. १५६४ चा शिलालेख आहे (इंडि. अँटि. १.१८३).

(२) **वेमतम्मा मंदिर**—येथील पर्वतीय दुर्गाच्या दक्षिणेकडील या मंदिरात विजयनगरच्या कृष्णदेवरायाचा स. १५२५ चा शिलालेख आहे.

(३) **रामलिंग मंदिर**—गावाच्या उत्तरेकडील या शिव-

मंदिरानजिकच्या ( स. १६६६ ) मशिदीत कोमटि वेंक रेड्डीचा स. १४१५ चा स्तंभलेख आहे.

**कोण्डाणे** ( बौद्ध गुफास्थान )—पश्चिम महाराष्ट्रातील सातवाहन राज्यकालीन ( इ. स. पू. १–इ. स. १ ले शतक ) सुविख्यात बौद्ध चैत्यमंदिर आणि विहारस्थान ( अन्य समकालीन सातवाहन चैत्यगुफा– भाजे, बेडसा ) बर्जेस् यांच्या मते पितळखोरा, भाजे, कोंडाणे, बेडसा आणि अजंटा गुफा क्र. १० ही भारतातील प्राचीनतम चैत्यमंदिरे असून, हे, तसेच बेडसा येथील चैत्य सफाईदार व्यक्तिशिल्पांसाठी सुविख्यात आहेत.

हे गुफास्थान ठाणे जिल्ह्यातील कर्जत रेल्वेस्थानकापासून ७ मैलांवर आणि कार्ले चैत्यमंदिरस्थानापासून १० मैल वायव्येस खंडाळा घाटाच्या उत्तरेकडील मर्कट पर्वताच्या दरीत राजमाची पर्वतश्रेणीच्या तुटलेल्या कड्यामध्ये आहे.

**स्थानमाहात्म्य**–उल्हास नदीखोऱ्यातील अपरांत (आधु. कोकण ) देशगामी घाट बौद्ध काली 'कोकण दरवाजा' नावाने, आणि इंध्याद्रि पर्वतातील अजंटाघाट 'दक्षिण दरवाजा' नावाने प्रसिद्ध होता. सह्य पर्वतातील या प्रवेशद्वारद्वयाच्या मोक्याच्या स्थानी कोंडाणे आणि अजंटा गुफासमूह आहेत.

**चैत्यमंदिर**—येथील काष्ठमय चैत्यशिल्पपरंपरेतील चैत्यमंदिराचे प्रवेशद्वार भाजे चैत्यमंदिराहूनहि अधिक काष्ठचैत्यशिल्पानुसारी असून, त्याच्या दर्शनी भागी भाजे चैत्यासदृश काष्ठगवाक्षाची खोदण आहे. मात्र त्या गवाक्षासदृश लाकडी आलंकरणांचे अवशेष येथे आढळत नाहीत. या गवाक्षाच्या अनेक प्रतिकृती गुफेच्या दर्शनी भागी कोरल्या आहेत

आकाराने भाजे चैत्यमंदिरसदृश ( ६६½′ × २६½′ × २८½′) अशा या गुफेच्या उपासनामंदिराच्या ( रुंदी १४⅔′ ) अंतर्भागात आतील बाजूस झुकलेले तीस काष्ठमय स्तंभ आहेत. हे स्तंभ, तसेच गुफेच्या छतानजिकच्या लाकडी फासळ्या आज उद्ध्वस्त झाल्या आहेत.

**प्रवेशद्वार**—बिहारमधील बराबर येथील लोमश ऋषी गुफेसदृश ( इ. स. पू. ३ रे शतक ) अशा या गुफाद्वाराच्या दर्शनी भागी चैत्यगवाक्ष, वेदिकाशिल्प आणि दगडी ब्रॅकेटस्युक्त सज्जांचे नक्षीकाम असून, प्रवेशकमानींच्या उभय अंगांस वेदिकाशिल्पवेष्टित चार चित्रचौकटी आहेत. त्यामध्ये कोरलेल्या पत्नीद्वयसहित धनुषधारी व्यक्तींच्या ( गुफादात्याच्या ) शिल्पप्रतिमांची ओबडधोबड शिल्पशैली कान्हेरी, कार्ले आणि कुडा ( गुफा क्र. ६ ) या हीनयान गुफांसदृश आणि व्यक्तिशिरोभूषणे कार्ले चैत्यमंदिरासदृश आहेत.

प्रवेशद्वाराच्या मुख्य कमानीच्या डाव्या बाजूकडील गुफादात्याचे अर्धाकृती उद्ध्वस्त शिल्प भारतातील 'शालिक' शिल्पाचे ( पोर्ट्रेट स्टॅच्यू ) प्राचीनतम उदाहरण असून, तिचे शिरोभूषण केवळ आज शिल्लक आहे. त्यानजिकच मौर्यकालीन ब्राह्मी अक्षरपंक्तीतील ( इ. स. पू. २ रे शतक ) '**कण्हशिष्य बलकाची देणगी**' असा देणगीलेख आहे ( अर्कि. सर्व्हे. वे. इं. ४.८३ ). प्रवेशद्वाराच्या उजव्या अंगाकडील देणगीदात्रीची स्त्रीप्रतिमा जलप्रपातामुळे नष्ट झाली आहे.

येथील प्रवेशद्वार पश्चिम भारतातील साऱ्या गुफांमध्ये प्राचीनतम, प्रमाणबद्ध आणि परिपूर्ण असून, त्या तुलनेने भाजे आणि अजंटा गुफा क्र. १० चे प्रवेशद्वार अनलंकृत, आणि अजंटा गुफा क्र. ९, बेडसा, कार्ले, नासिक गुफांची प्रवेशद्वारे तदनुसारी आणि म्हणूनच उत्तरकालीन आहेत ( अर्कि. सर्व्हे. वे. इं. ४.८–१० ).

**अंतर्भाग**—या मंदिरातील स्तंभ आणि बाजूच्या भिंती ( उंची– ११′ ) ५″ आत झुकल्या आहेत.

**स्तूप**—येथील स्तूपाची ( व्यास– ९′ ) हर्मिका भाजे चैत्यासदृश म्हणजे मुख्य स्तूपापेक्षा दुप्पट उंचीची आहे ( फर्ग्युसन, १.१३७ ).

**बौद्ध विहार**—फर्ग्युसन यांच्या मते येथील बौद्ध विहार चैत्यमंदिरकालीन ( इ. स. पू. १ ले शतक ) आहेत ( फर्ग्युसन, १.१७९ ).

**कोण्डिवटे** ( गुफास्थान )—मुंबईनजिकच्या कान्हेरी गुफासमूहापासून ८ मैल दक्षिणेकडील जोगेश्वरी गुफासमूहानजिकच्या मरोलि गावानजिकचे बौद्ध गुफास्थान. येथील कान्हेरी शिल्पशैलीच्या १९ गुफांपैकी १५ गुफा उत्तराभिमुख आणि ४ पूर्वाभिमुख असून, त्यापैकी गुफा क्र. ९ हे महायान चैत्यमंदिर, आणि अन्य सारे विहार आहेत. त्यावरून या उत्तरकालीन असाव्यात ( बर्जेस, अर्कि. सर्व्हे. वे. इं. ४.७०–७१ ).

**कोण्डुकूरु** ( शिलालेखस्थान )—रेड्डी राजा अल्लय दोड्डुच्या स. १४१६ च्या ताम्रपटाचे आंध्र प्रदेशातील उपलब्धिस्थान ( एपि. इंडि. ५.५३; १३.२३७ ).

**कोण्ढणपुर** (देवीस्थान)—महाराष्ट्रातील सिंहगडच्या कल्याणद्वारापासून १½ मैलांवरील देवीस्थान. येथे मार्गशीर्ष

पौर्णिमेस यात्रा असते ( ती. पृ. २५३ ).

**कोतिहार** (तीर्थ)—ऐन्-इ-अकबरीमते कश्मीरातील 'कपटेश्वर' शिवतीर्थाचे नामांतर ( ऐ. अ. २.३५८; कपटेश्वर पहा ).

**कोत्तकोण्ड** (नगर)—स. १३८४ च्या मध्य म्हैसूर शिलालेखमते बहामनी सैन्याने उद्ध्वस्त केलेले काकतीय साम्राज्यान्तर्गत वारंगळच्या ईशान्येकडील एक नगर ( एपि. कर्ना. १२.१५ ).

**कोत्तियर** ( नगर )—टॉलेमीच्या मते दक्षिण भारतातील ऐओइ ( पेरिप्लस–'परलिय' = आधु. दक्षिण त्रावणकोर; अक्षांश–१४° उत्तर; रेखांश– १२०° पूर्व ) देशाच्या राजधानीचे गाव. दक्षिण त्रावणकोरमधील आधु. कौत्तार गाव हेच होय. काल्डवेल यांच्या मते 'कोड' ( पाद ) + आरु ( नदी ) धातूंपासून हे बनले आहे. नामांतर ( प्युटिंजर टेबल्स )–'कोत्तर'.

**कोत्तीस** (ग्राम)—टॉलेमीच्या मते दक्षिण भारतातील मनार नदीच्या उत्तरवर्ती एक ग्राम ( अक्षांश– १२°–१०' उत्तर; रेखांश– १३२°–१२' पूर्व ). याचे आधुनिक स्थान समजत नाही.

**कोदगिनाडु** ( देशविभाग )—होयसाळ राजा बल्लाळ ( द्वितीय ) च्या स. ११९६ च्या वीरकाल मृत्यु-लेखमते म्हैसूर प्रांतातील एक देशविभाग. आधु. कूर्ग प्रदेश हाच होय ( एपि. कर्ना. ६.८३ ).

**कोदण्ड** ( देश )—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते भारतवर्षातील एक देश ( विश्वलोचन. ९४.२९; मेदिनी. ४४.२८ ).

**कोदण्डराम स्वामी** ( तीर्थ )—दक्षिण भारतातील रामेश्वरपासून ५ मैलांवरील उत्तर समुद्रकाठचे विभीषण–राज्याभिषेकस्थान. येथे रामाने विभीषणाला समुद्रजला-भिषेक केला होता. येथील मंदिरात रामपंचायतन आणि विभीषणाच्या मूर्ती आहेत ( ती. पृ. ३८० ).

**कोदा** ( शिवस्थान )—महाराष्ट्रातील अजंठ्यानजि-कच्या सिवना नदीपासून ४ मैल दक्षिणेकडील विद्यादायक कोदेश्वर शिवमंदिरस्थान ( ती. पृ. २६८ ).

**कोदालक** ( देशविभाग )—कुलस्तंभ राजाच्या इ. स. १० व्या शतकातील पुरी शिलालेखमते पूर्व भारतातील एक देशविभाग. ओरिसामधील धेंकनल प्रदेशातील तल्चेरनजिकचा आधु. कोअलु प्रदेश हाच होय (एपि. इंडि. २९.१६७ ).

**कोद्दौर** ( ग्राम )—टॉलेमीच्या मते दक्षिण भारतातील एक ग्राम ( अक्षांश ११°–३०' उत्तर; रेखांश. १३५° पूर्व ). मच्छलिपट्टमनजिकचे आधु. गुद्दु गाव हेच होय.

**कोद्रन** ( ग्राम )—टॉलेमीच्या मते सिंधु खोऱ्यातील कुभा ( कोफेस् ) नदीच्या संगमानजिकच्या पाच ग्रामांपैकी एक ( अक्षांश २९°-२०' उत्तर; रेखांश १२१°-१५' पूर्व ). याचे आधुनिक स्थान समजत नाही.

**कोन अर्क** ( तीर्थ )—पौराणिक साहित्यमते ओरिसा-मधील 'कोणादित्य' सूर्यक्षेत्राचे नामांतर ( कोणादित्य पहा ).

**कोनमण्डल** ( देशविभाग )—वेलनांटि राजेंद्र चोडाच्या स. १०९१ च्या नंदूरु ताम्रपटमते आंध्र प्रदे-शातील एक देशविभाग. गोदावरी नदीच्या त्रिभुज प्रदे-शातील आधु. अमलपुरम्, नरसरावुपुर आणि रझोले तालुक्यांचा प्रदेश हाच होय ( रंगाचारी, २. कृष्णा. ३०७ ).

इ. स. ११-१३ व्या शतकातील शिलालेखमते कार्तवीर्य अर्जुनवंशीय हैहय नामक स्थानिक राजे येथे राज्य करीत असत ( एपि. इंडि. ४.८३ ). स. ११६३ मधील येथील यादवीचा राजेंद्र चोडाच्या देवन्-प्रेग्ग नामक ब्राह्मण सेनापतीने बीमोड केला ( एपि. इंडि. २९.२३६–२३७ ).

देणगीलेख — येथील विभिन्न राजांनी गोदावरी जिल्ह्यातील द्राक्षाराम मंदिरास देणग्या दिल्या असून ( रंगाचारी, २. कृष्णा. १८८; १९४ ), राजमहेंद्रीच्या रेड्डीवंशीय काटय-वेम ( द्वितीय ) राजाने स. १४११ मध्ये येथील एक ग्राम दान दिले होते ( एपि. इंडि. ४. ३१८ ).

**कोनाकमन** ( बौद्धस्थान )— अशोक स्तंभलेखमते ईशान्य भारतातील 'कनकमुनि' ( आधु. निगाली सागर ) बौद्धस्थानाचे नामांतर, ( इंडि. अँटि. २१.२२९; कनकमुनि पहा ). अन्य नामांतर ( बौद्ध साहित्य )– 'कोनाकमुनि'.

**कोनाकोण** ( सूर्यस्थान )— स. १३०२ च्या असंखली ताम्रपटमते ओरिसामधील 'कोणादित्य' ( आधु. कोणार्क ) सूर्यस्थानाचे नामांतर ( एपि. इंडि. ३१.१११–११५; कोणादित्य पहा ). अन्य नामांतर ( पौराणिक साहित्य )– 'कोनाकोन'.

**कोनागमन** ( बौद्ध स्थान )— भर्हुत शिलालेखमते ईशान्य भारतातील 'कनकमुनि' बौद्ध स्थानाचे नामांतर ( इंडि. अँटि. २१.२२९; कनकमुनि पहा ).

**कोनाडु** ( देशविभाग )— पांड्य राजा मारवर्मन् कुलशेखर ( प्रथम ) च्या स. १२७५ च्या शिलालेखमते

तामीळ प्रदेशातील एक देशविभाग ( आर्कि. सर्व्हे. स. १९२२, क्र. ३५७ ). पुदुक्कोटे जिल्ह्यातील आधु. कोडुंबाळूर गावासभोवतालचा प्रदेश हाच होय ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. २.४५८ ).

**कोनिदेव** ( नगर )— तेलगु चोड राजा त्रिभुवनमल्लच्या स. ११४२ च्या शिलालेखमते आंध्र प्रदेशातील तेलगु चोड राजांच्या राजधानीचे नगर. आधु. गुंतूर जिल्ह्यात हे असावे ( रंगाचारी, २. गुंतूर. २३९ ). त्रिभुवनमल्लपुत्र नन्नि राजाच्या स. ११५१ च्या दानलेखमते त्याने येथील भूमी दान दिली होती ( रंगाचारी, २. गुंतूर. ३ ).

**कोनी** ( शिलालेखस्थान )—कलचुरि राजा पृथ्वीदेव ( द्वितीय ) च्या स. ११४८ च्या शिलालेखाचे मध्यप्रदेशातील छत्तिसगड परगण्यातील बिलासपुरच्या १० मैल आग्नेयेकडील अर्पा नदीकाठचे उपलब्धिस्थान. या शिलालेखमते या गावाच्या पश्चिमेस एक पुरातन शिवपंचायतन होते ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.४६५ ).

**कोन्त** ( ग्राम )—टॉलेमीच्या मते उत्तर भारतातील एक ग्राम ( अक्षांश ३४°–४०′ उत्तर; रेखांश १३३°–३०′ पूर्व ). सेंट मार्टिन यांच्या मते यमुना नदीच्या डाव्या किनाऱ्यावरील सहारानपुरच्या आग्नेयेकडील आधु. कुंड गाव हेच होय.

**कोन्तकोस्सिल** ( नगर )—टॉलेमीच्या मते दक्षिण भारतातील 'कांचिकचर्ल' व्यापारी नगराचे नामांतर ( कांचिकचर्ल पहा ).

**कोन्तिणिक** ( ग्राम )—कोसलराज महानन्नराजाच्या इ. स. ६ व्या शतकातील दानपत्रमते मध्य भारतान्तर्गत अष्टद्वार देशविभागातील एक ग्राम ( एपि. इंडि. २१.२१९; अष्टद्वार पहा ).

**कोन्यध** ( देशविभाग )— ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते कलिंग देशातील 'कोंगोदमंडल' देशविभागाचे नामांतर ( वॉटर्स, २.१९६; कोंगोदमंडल पहा ).

**कोपन** ( देश )—दक्षिण भारतातील एक देश ( म. भी. १०.५९ ).

**कोपननगर** ( जैन तीर्थ )—कोप्बाळ चंद्र बंदी कानडी शिलालेख, तसेच कविराजमार्ग ग्रंथमते ( इ. स. ९ वे शतक) आंध्र प्रदेशातील एक जैन तीर्थ. रायचूर जिल्ह्यातील आधु. कोप्बाळ गाव हेच होय. याच्या पूर्व आणि पश्चिम दिशावर्ती अशोकच्या गवीमठ आणि पाल्कींगुंड लघुशिलालेखांवरून अशोककाळी हे सुविख्यात असावे. स्थानिक आख्यायिकामते येथे पूर्वी ७२ जैन बस्त्या ( मंदिरे ) असून, त्यापैकी केवळ दोनच सध्या विद्यमान आहेत.

**जैन तीर्थ**—येथील पर्वतीय दुर्गाच्या सिद्दी बुरुज प्रवेशद्वारानजिकच्या जैन तीर्थंकर-प्रतिमायुक्त चंद्र बंदी शिलेवर चार कानडी शिलालेख आणि प्रवचनश्रावक जैन राजाराणींचे शिल्प आहे. जैनधर्मीय कानडी शिलालेखयुक्त आठ दगडहि या दुर्गात आढळतात.

**मुसलमानी शिलालेखात**—इ. स. १७ व्या शतकातील अनेक मुसलमानी शिलालेख येथे असून, त्यापैकी इब्राहिम आदिलशहा ( द्वितीय ) कालीन स. १६०९ च्या शिलालेखमते गाझीखान नामक भाविकाने येथे एक मशीद बांधली होती.

**कोप्पनाड** ( देशविभाग )–होयसाळमांडलिक मारुदेव संतरच्या स. ११६२ च्या, तसेच भुजबळ राजाच्या शिलालेखमते वायव्य म्हैसुरातील तुंगा नदीकाठचा एक देशविभाग ( एपि. कर्ना. ६.१०;१४ ). म्हैसूरमधील आधु. कोप्पम् गावासभोवतालचा प्रदेश हाच होय. इ. स. १६ व्या शतकात हा कलश राजवंशाच्या ताब्यात असून ( एपि. कर्ना. ६.५७ ), कलशवंशीय पांड्यप्पने स. १५९७ त येथील जैन बस्तीस देणगी दिली होती ( एपि. कर्ना. ६.५० ).

**कोप्पम्** ( नगर )—येवूर शिलालेखमते दक्षिण भारतातील पेरियार नदीकाठचे एक तीर्थ आणि नगर ( एपि. इंडि. १२.२९६ ). शिलालेख साहित्यमते चोल राजा राजाधिराज ( प्रथम ) आणि पश्चिम चालुक्य राजांचे स. १०५२ चे रक्तरंजित युद्ध येथे झाले होते. फ्लीट यांच्या मते बेळगाव जिल्ह्यातील कोल्हापुरपासून ३० मैल पूर्वेकडील कृष्णा–पंचगंगा संगमानजिकच्या खिद्रापुरनजिकचे आधु. कोप्पेश्वर मंदिरस्थान हेच होय.

**युद्ध**—शिलालेख साहित्यमते गंग आणि नोलंब मांडलिकसहित पश्चिम चालुक्य साम्राज्याच्या नाशार्थ चोल सैन्याने केलेल्या येथील युद्धात चोल राजा राजाधिराजाच्या मृत्यूमुळे पश्चिम चालुक्यांचा अंतिम लाभ झाला. विक्रमांकदेवचरितमते या युद्धानंतर चालुक्य सैन्याने चोल राजांचे कांचीनगर जिंकून ते दक्षिण भारताचे सम्राट बनले.

या युद्धामध्ये आहवमल्ल सोमेश्वर ( प्रथम ) पुत्र जयसिंह हा पश्चिम चालुक्यांचा सेनापती असून, हस्त्यारूढ चोल राजा राजाधिराज आणि त्याचा कनिष्ठ बंधु राजेंद्रदेव हे चोल सैन्याचे सेनापती होते ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. २.३०३ ).

स. १०७१ च्या अण्णिगेरे शिलालेखमते या युद्धारंभी चोल सैन्य गंग राजांची म्हैसूर राज्यातील बेल्वोल प्रदेशातील जैन मंदिरे उद्ध्वस्त करून ( एपि. कर्ना. ११.१०८ ), तसेच तुंगा आणि भद्रा नद्या ओलांडून उत्तरवर्ती रट्ट देशात शिरले. तिरुवल्लम् शिलालेखमते युद्धारंभी चालुक्य हस्तिदलाने राजेंद्रदेवाच्या हत्तीला पिटाळून लावून चोल सैन्याची अतोनात हानी केली ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. ३.१११ ). तदनंतर चालुक्य धनुर्धरांनी राजाधिराज चोलाच्या हत्तीचे गंडस्थल फोडून त्या राजास, तसेच त्याच्या अनेक मानकऱ्यांस ठार केले. अखेरीस चोल राजकुमार राजेंद्रदेवाने नव्या कुमकीच्या साह्याने चालुक्य सैन्याचा पराजय करून नजिकच्याच कोल्लापुरम् ( आधु. कोल्हापुर ) येथे जयस्तंभ उभारला. मणिमंगलम् ताम्रपटमते चालुक्य राजकुमार जयसिंह, आणि नोलंबराजा नन्नि–नोलंब या युद्धात मारले गेले ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ७२–७३ ).

२. शिलालेख साहित्यमते त्रिचनापल्लीनजिकच्या ‘ कण्णनूर ’ नगराचे नामांतर ( कण्णनूर पहा ).

**कोप्पर** ( नृसिंहस्थान )—आंध्र प्रदेशान्तर्गत एक नृसिंहमंदिरस्थान ( ती. पृ. २६५ ).

**कोफेस्** ( नदी )—अरियनच्या मते सिंधु नदीच्या ‘ कुभा ’ नामक उपनदीचे नामांतर. अन्य नामांतर–‘ कोफेन् ’ ( मॅक्रिंडल, इंडिया. पृ. १७९; कुभा पहा ).

**कोब्बन्** ( नगर )— इब्न बतूतामते त्रिचनापल्लीनजिकच्या ‘ कण्णनूर ’ नगराचे नामांतर ( कण्णनूर पहा ).

**कोभि** ( नदी )—क्रौंचद्वीपान्तर्गत एक नदी ( कूर्म. पूर्व. ४९.२९ ).

**कोमरिय** ( भूशिर )—टॉलेमीच्या मते दक्षिण भारतातील ‘ कन्यातीर्थ ’ ( आधु. कन्याकुमारी ) चे नामांतर ( कन्यातीर्थ पहा ). अन्य नामांतर ( पेरिप्लस )–‘ कोमरै ’; ‘ कोमर ’.

**कोमर्ति** ( शिलालेखस्थान )— सातवाहनमांडलिक चंडवर्मन् शालंकायनच्या इ. स. ४ थ्या शतकातील ताम्रपटाचे आंध्र प्रदेशातील आधु. गंजम जिल्ह्यातील उपलब्धिस्थान ( एपि. इंडि. ९.५६ ).

**कोमला** ( नगरी ) —ब्रह्माण्डमते निषधराज नलवंशीय मेघ आदि नऊ राजांचे राजधानीचे नगर ( ब्रह्माण्ड. ३.७४.१८८–१८९ ).

**कोमेदै** ( देश )—टॉलेमीच्या मते मध्य आशियातील ‘ कुमिध ’ देशाचे नामांतर ( कुमिध पहा ).

**कोमोउरि** ( पर्वतशिखर )—हिमालयान्तर्गत ‘ गौरीशंकर ’ शिखराचे नामांतर ( गौरीशंकर पहा ). अन्य नामांतर–‘ कोमो कंकर ’; ‘ कोमो लुग्म ’.

**कोमोमण्डल** ( देशविभाग )—कलचुरि राजा पृथ्वीदेव ( प्रथम )च्या स. १०७९ च्या आमोदा ताम्रपटमते मध्य भारतान्तर्गत एक देशविभाग ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.४०४ ). अन्य शिलालेख साहित्यमते हा दक्षिण कोशलान्तर्गत तुम्माण राज्यविभागात ( आधु. बिलासपुर जिल्हा ) होता. बिलासपुर जिल्ह्यातील रत्नपुर गावच्या २५ मैल ईशान्येकडील पेंड्र तहसिलीतील आधु. कोमो गावासभोवतालचा प्रदेश हाच होय ( इंडि. अँटि. १७.१३७; १९.७५ ).

**कोम्पोन् चम्** ( बृहद्भारतीय नगर )—आग्नेय आशियातील ‘ फुनान् ’ ( कंबूज = आधु. कांबोडिया ) देशातील पल्लव ( इ. स. ७–८ वे शतक ) शिल्पावशेषस्थान ( गोएट्झ, पृ. १२२ ).

**कोम्मनाडु** ( देशविभाग )—तेलुगु चोड राजा चोड बल्लुच्या स. १११८ ओंगोल शिलालेखमते त्याच्या राज्यातील एक देशविभाग ( रंगाचारी, २.२५३ ).

**कोम्मेनसेस्** ( नदी )—अरियनच्या मते विंध्य पर्वतोद्भवा ‘ कर्मनाशा ’ नदीचे नामांतर ( अरियन, इंडिका. ४; मॅक्रिंडल पृ. १९१; कर्मनाशा पहा ).

**कोयर्रुर** ( नगर )—शिलालेख साहित्यमते नोलंब पल्लव राजा महेंद्र ( प्रथम ) सेनापती मुत्तर आणि मदुर यांनी स. ८७७ मध्ये नष्ट केलेले दक्षिण भारतान्तर्गत बाण राज्यातील एक नगर ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३८ ).

**कोरक** ( देश )—दक्षिण भारतातील एक देश ( पद्म. आदि. ६.५६ ).

**कोरकोडु** ( ग्राम )—पश्चिम चालुक्य राजा नूर्मडि तैलच्या स. ११५६ च्या शिलालेखमते दुभत्या जनावरांच्या चोऱ्यांसाठी कुविख्यात असणारे वायव्य म्हैसुरातील एक ग्राम ( एपि. कर्ना. ८.१७५ ).

**कोरङ्कोलै** ( लोकसमूह )—टॉलेमीच्या मते गंडकी नदीच्या उगमानजिकचा एक आदिवासी लोकसमूह. विल्फोर्ड यांच्या मते पौराणिक ‘ कोरंकर ’ लोक हेच होत.

**कोरञ्ज** ( कुलपर्वत )—जंबूद्वीपान्तर्गत भद्राश्व वर्षातील एक कुलपर्वत ( वायु. ४३.१४ ). नामांतर ( वराह. ८२.३ )–‘ कोरजरक ’.

**कोरवाङ्गुल** ( मंदिरस्थान )— म्हैसूर प्रांतातील चालुक्य स्थापत्यशैलीचे एक हिंदु देवमंदिरस्थान ( फर्ग्युसन, १.४४१ ).

**कोराटी** ( शिवमंदिरस्थान ) — तामीळनाडमधील तिरुप्पतूरपासून ५ मैलांवरील एक शिवमंदिरस्थान ( ती. पृ. ३२० ).

**कोरासोडक-पञ्चाली** ( विषय )— शिलालेख साहित्यमते पूर्व भारतातील कलिंग देशाचा एक उपविभाग. गंजम जिल्ह्यातील पर्लकिमेडि गावापासून ६ मैल दक्षिणेकडील आधु. कोरोशंडा गावासभोवतालचा प्रदेश हाच होय ( एपि. इंडि. २१.२४ ).

**कोरि** ( नगर )—शिलालेख साहित्यमते दक्षिण भारतातील पांड्य आणि चोल राजधानी ‘ उरगपुर ’ ( आधु. उरैयूर ) चे नामांतर ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. २.३७५; उरगपुर पहा ).

**कोरिलापुर** ( क्षेत्र )—स्कंदमते नर्मदा नदीकाठचे एक क्षेत्र, आणि गुप्ततीर्थ ( स्कन्द. आवन्त्य. रे. २३१.४५ ).

**कोरिल्ला** ( राज्यविभाग )—गुर्जर राजा जयभट ( तृतीय ) च्या स. ७०६ च्या नवसारी ताम्रपटमते गुजरातमधील एक राज्यविभाग (पथक). यामध्ये शमीपद्रक आणि उवीरवद्र नामक ग्रामे होती. भडोचच्या १० मैल ईशान्येकडील नर्मदा नदीकाठच्या आधु. कोरल गावासभोवतालचा प्रदेश हाच होय ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.८५ ). नामांतर (दद्द तृतीयचा भडोच ताम्रपट)—‘कोरेल्ल’ (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.६१९ ).

**कोरुङ्कल** ( नगर )—टॉलेमीच्या मते आंध्र प्रदेशातील ‘ एकशिला ’ नगराचे नामांतर ( एकशिला पहा ).

**कोरुनेल्लि** ( ग्राम )—पूर्व चालुक्य राजा राजराज नरेंद्र ( प्रथम ) च्या स. १०२२ च्या शिलालेखमते त्याच्या राज्यारोहणप्रसंगी दान दिलेले आंध्र प्रदेशातील गोदावरी नदीकाठचे एक ग्राम ( इंडि. अँटि. १४.५७; २३.१३१ ).

**कोरुरा** ( नगर )—टॉलेमीच्या मते चेर ( केरोबोथ्र ) राजधानी ‘ वंजी ’ नगराचे नामांतर ( वंजी पहा ).

२. ( देश ) अल्बेरुणीच्या मते वायव्य भारतातील मुलतान आणि लुनी नद्यांच्या दरम्यानचा प्रदेश. उज्जयिनीच्या विक्रमादित्याने येथील स. ३३ मधील शकउच्छेदनाच्या स्मृत्यर्थ विक्रम संवत् आरंभिला ( अल्बेरुणी, २.६ ).

**कोर्कै** ( नगर व बंदर )—दक्षिण भारतातील प्राचीनतम पांड्यराजधानीचे नगर. करिकाल चोल आणि चेर राजा आदन ( द्वितीय ) च्या समकालीन नेडुंजेलियन पांड्य ( प्रथम; स. १५० ) राजाची राजधानी येथे होती. तिनेवेल्ली जिल्ह्यातील कन्याकुमारीनजिकचे आधु. मारमंगलम् गाव हेच होय. उत्तरकालात पांड्यराजधानी मदुरा गावी हलविण्यात आली. नामांतर ( टॉलेमी, पेरिप्लस )—‘ कोल्चोइ ’; ( अन्य शिलालेख साहित्य )—‘ कोर्लै ’.

**नामव्युत्पत्ती**—तामीळ ‘ कोर्गार ’चे हे संभवतः संस्कृत रूप असावे.

**व्यापारी बंदर**—ताम्रपर्णी नदीकाठच्या कायल गावानजिकचे हे बंदर मोत्यांच्या व्यापारासाठी सुविख्यात असून, चोल राजा कुलोत्तुंग ( प्रथम )चा स. १११६ चा एक शिलालेख येथे सापडला आहे ( रंगाचारी, ३. तिनेवेल्ली. ३१० ).

**कोर्लै** ( नगर )—शिलालेख साहित्यमते पांड्यराजधानी ‘ कोर्कै ’ नगराचे नामांतर ( कोर्कै पहा ).

**कोर्परगर्ता** ( ग्राम )— गुप्त राज्यकालीन हस्तिन् राजाच्या स. ४८२ च्या खोह ताम्रपटमते मध्यभारतान्तर्गत बाघेलखंडातील कौर्परिक गावाच्या पूर्ववर्ती एक ग्राम ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.१०४ ).

**कोल** ( देश )—कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या दक्षिण भागातील एक देश ( मार्कं. ५५.२५ ).

२. ( द्वीप ) पश्चिम बंगालमधील चैतन्यलीलास्थान. नवद्वीपधामनजिकचे आधु. कुलियाद्वीप हेच होय ( ती. पृ. १८४ ).

३. ( देश ) मुसलमानी साहित्यमते उत्तर भारतातील ‘ कुल्य ’ देशाचे नामांतर ( इलियट, २.३२२; कुल्य पहा ).

**कोलक** ( नगर )—टॉलेमीच्या मते सिंधु नदीच्या पश्चिमवर्ती वालुकामय प्रदेशातील एक नगर. अली यांच्या मते आधु. कराची हेच होय ( अली, पुराणाज्. पृ. १४३ ).

**कोलका** ( लोकसमूह )—बौद्ध साहित्यमते दक्षिण भारतातील कावेरी नदीखोऱ्यातील ‘ चोल ’ लोकसमूहाचे नामांतर ( अपादान. २.२५८; चोल पहा ).

**कोलगल्लु** ( ग्राम )—खोट्टिग राजाच्या स. ९६६ च्या शिलालेखाचे आधु. बेळारी जिल्ह्यातील उपलब्धिस्थान ( रंगाचारी, बेळारी. ८४ ).

**कोलगिरि** ( पर्वत )—मार्कंडेयमते दक्षिण भारतातील ‘ कोल्लक ’ पर्वताचे नामांतर ( मार्कं. ५५.२३; कोल्लक पहा ).

**कोलद्वीप** ( ग्राम )—बौद्ध साहित्यमते उत्तर भारतातील कोलियराजधानी 'रामग्राम'चे नामांतर ( दीघ. सुमङ्गल. १.२०६–२६२; रामग्राम पहा ).

**कोलनुपुर** ( नगर )—चोल राजा कुलोत्तुंग ( प्रथम )च्या स. १०९५ च्या तिरुविडैमरुडूर शिलालेखमते दक्षिण भारतातील कोल्लेरु सरोवराकाठचे एक नगर ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. ३.१७८ ). राजेंद्र चोडाच्या शके १०९१ च्या नंदूरु ताम्रपटमते यासभोवतालचा प्रदेश 'कोल्नु विषय' ( सागर विषय ) नावाने प्रसिद्ध होता ( एपि. इंडि. २९.२३३ ).

केरळ प्रांतातील कोल्लेरू सरोवराकाठचे आधु. कोल्नु ( इंग्रजी– 'क्विलॉन' ) गाव हेच असून, येथील जलदुर्ग आजहि 'कोलेरिकोट' नावाने प्रसिद्ध आहे ( एपि. इंडि. २९.२३४ ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. परांतक पांड्यचा स. १०९० चा कन्याकुमारी शिलालेख ( त्रावणकोर अर्कि. सर्व्हे. ३.१९ ) | कुलम् |
| २. टॉलिमी | एलांगकोन्, क्विलँडी |
| ३. इब्न बतूता | क्विलॉन |
| ४. मुसल्मानी साहित्य | कुल |

**शिलालेख साहित्यात**— तिरुविडैमरुडूर शिलालेखमते चोलराज कुलोत्तुंगभयाने येथील जलदुर्गात लपलेल्या या देशाच्या कोल्नांटि भीम राजाला राजेंद्र चोड नामक कुलोत्तुंगमांडलिकाने ठार मारले ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. ३.१७८; एपि. इंडि. ४.३२; ५.९५; ६.१४६ ). राजेंद्र चोडाच्या स. १०९१ च्या नंदूरु ताम्रपटमते येथील (कोल्नु विषय) या राजाचे नाव महामांडलिक कोल्नु भीम (एपि. इंडि. २९.२३३–२३४), आणि तंजोर शिलालेखमते तेल्गु भीम होते ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. २.३०७ ). परांतक पांड्य राजाच्या स. १०९० च्या कन्याकुमारी ताम्रपटमते त्याने या स्वारीत कुलोत्तुंगास साह्य केले होते ( त्रावणकोर अर्कि. सर्व्हे. ३.१९ ). येथील ( कोल्नु ) काटम नायक नामक चोल सेनापतीने स. ११४१ मध्ये द्राक्षाराम मंदिरास देणगी दिली होती ( रंगाचारी, २.१०९ ).

**मुसलमानी साहित्यात**—मार्को पोलोकालीन मुसलमानी साहित्यमते या ( कुल ) गावापासून निलवर ( आधु. नेलोर ) गावापर्यंत मलबार देश होता ( नीलकण्ठशास्त्री, पृ. २१३ ). इब्न बतूताच्या ग्रंथमते स. १३२४ मध्ये या ( क्विलॉन ) बंदरातून जलमार्गाने होनावरला जात असता चाच्यांनी त्यास लुटले होते ( इंडि. अँटि., स. १९२३, पृ. १४ ).

**कोलपट्टण** ( नगर )— बौद्ध मिलिंदपन्होमते दक्षिण भारतान्तर्गत चोलमंडल ( आधु. कारोमंडल ) देशातील एक पूर्व समुद्रतीरवर्ती बंदर ( मिलिन्द. पृ. २५९ ).

२. ( देश ) बारुआ यांच्या मते दक्षिण भारतातील पेन्नार–कावेरी दुआबातील 'चोल' देशाचे नामांतर ( बारुआ, अशोक शिलालेख. पृ. २३१; चोल पहा ).

**कोलवन** ( जनपद )— वायु आणि ब्रह्माण्डमते अपरांत ( नैर्ऋत्य भारत ) देशातील एक जनपद ( वायु. ४५.१२८ ). अली यांच्या मते महाराष्ट्रातील तापी नदीच्या गिरणा नामक उपनदीच्या पठारी खोऱ्यातील आधु. कळवण गावासभोवतालचा प्रदेश हाच असून, त्याच्या दक्षिणेकडील तापीखोऱ्यात तापस ( आधु. खानदेश ) जनपद होते.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतात:—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. मार्कंडेय पुराण | कालिवल |
| २. वामन पुराण | वारिधान |
| ३. अन्य पौराणिक साहित्य | कल्लावन |

**भौगोलिक सीमारेषा**—या जनपदाच्या पूर्व आणि पश्चिम सरहद्दी अनुक्रमे चांदोरी पर्वत आणि पश्चिम घाटाने बनल्या असून, त्याच्या पूर्व-पश्चिम दिशेस अनुक्रमे नासिक्य ( आधु. नासिक ) आणि सुराल ( आधु. सुरत आणि नवसारी प्रदेश ) जनपदे होती. याची दक्षिण सरहद्द खानदेशातील चाळीसगावने बनली होती ( अली, पुराणाज्. पृ. १४८ ).

**कोला** ( नगर )—पौराणिक साहित्यमते पूर्व भारतातील सुरथ राजाच्या राजधानीचे नगर. मार्कंडेय पुराणान्त-

गत देवीमाहात्म्यपर आख्यायिकामते उत्कलनरेश नंदीने पदच्युत केलेला येथील सुरथ राजा पुष्पभद्रा नदीकाठच्या समाधि वैश्यासमवेत पुष्करक्षेत्रातील मेधस् ऋषींच्या आश्रमी गेला. तेथील देवीउपासनेने त्यास पुन्हा राज्यप्राप्ती होऊन पुढील जन्मी तो वैवस्वत मनुपुत्र सावर्णि मनु बनला. समाधि वैश्याला वैष्णवी उपासनेने स्वर्गप्राप्ती झाली ( मार्क. ७८–९०; ब्रह्मवै. २.६२; दे. भा. ५.३२–३५; शिव. उमा ४५ ).

**कोलाच** ( ग्राम )—शिलालेख साहित्यमते उत्तर बंगालमधील ' कुलांच ' ग्रामाचे नामांतर ( कुलांच पहा ).

**कोलापुर** ( तीर्थ )—महाराष्ट्रातील ' करवीर तीर्था 'चे नामांतर ( दे. भा. १.३८.५; शक्तिसङ्गम. ३.७.११; करवीर पहा ).

**कोलाहल** ( पर्वत )— पौराणिक साहित्यमते ऋक्ष ( विंध्य पर्वताचा मध्यभाग ) पर्वताचा एक क्षुद्र पर्वत ( उपपर्वत; वायु. ४५.९०; ब्रह्माण्ड. १६.२१; मार्कं. ५४. १२; ५७; वामन. १३.१६ ). महाभारतातील चेदिराज उपरिचर वसूच्या आख्यायिकेतील याच्या निर्देशावरून हा पूर्व भारतातील चेदि देशात असावा.

स्टाइन यांच्या मते बिहारमधील हजारीबाग जिल्ह्यातील बोधिगयेपासून २६ मैल दक्षिणेकडील जैन प्रतिमावशेषयुक्त आधु. कलुह टेकडी हीच होय. ती ( कलुह ) टेकडी प्राचीन मकुल पर्वत असल्याचे डे यांचे अनुमान ( जे. ए. एस. बी. ७०.२१–३७ ) भाषाशास्त्रीय दृष्ट्या असंभव वाटते.

**महाभारतात**—या ग्रंथमते याने अवरोधिलेला शुक्तिमती ( आधु. केन ) नदीचा प्रवाह उपरिचर वसूने विमुक्त केला. या पर्वताच्या क्षणिक संगामुळे शुक्तिमती नदीला झालेल्या कन्या आणि पुत्रापैकी गिरिका नामक कन्येशी उपरिचर राजाने विवाह केला ( म. आ. ५७.३२–३४ ).

**मतांतरे**—याच्या भौगोलिक स्थानाविषयी अभ्यासकांत निम्नलिखित मतांतरे आढळतात :—( १ ) **कोक्कोल टेकडी**— बेग्लर यांच्या मते गया जिल्ह्यातील आधु. कोक्कोल टेकडी हीच होय ( अर्कि. सर्व्हे. ८ ). परंतु या छोट्या टेकडीवर काहीहि प्राचीन अवशेष नसल्याने त्यांचे अनुमान असंभव वाटते. ( २ ) **बुंदेलखंडातील टेकडी**— पार्गिटर यांच्या मते बुंदेलखंडातील पन्ना आणि बिजवाड गावांच्या दरम्यानची टेकडी हीच होय.

२. गयामाहात्म्यमते गयाक्षेत्रान्तर्गत ' ब्रह्मयोनि ' पर्वताचे नामांतर ( वायु. १०६.५;३२; ब्रह्मयोनि पहा ).

३. ( नगर ) पूर्व गंग राजा राजराज ( तृतीय ) च्या स. १०९८ च्या दास्गोबा ताम्रपटमते तत्पूर्वकालीन अनंतवर्मन् राजाच्या राजधानीचे कलिंग देशान्तर्गत एक नगर. ' कोलाहलसम्राट ' अर्थाने त्यास ' कोलाहल ' उपाधी मिळाली ( एपि. इंडि. ३१.२४९ ).

**कोलाहल नृसिंह** ( तीर्थ )—काशी येथील एक नृसिंहस्थान ( स्कन्द. काशी. ६१.१९५ ).

**कोलि** ( नगर )—पांड्य राजा अरिकेसरीच्या स. ७०० च्या शिलालेखमते दक्षिण भारतातील पांड्य राजधानी ' उरगपुर 'चे नामांतर ( इंडि. अँटि. ८.१९८; साऊथ इंडि. इन्स्क्रि. २.३७५; उरगपुर पहा ).

**कोलिक** ( बौद्धग्राम )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते मगध देशान्तर्गत राजगृहानजिकचे नालंदा संघारामापासून १¾ मैल नैर्ऋत्येकडील आणि बोधिगयेपासून ५६ मैल ( ७ योजने ) ईशान्येकडील एक बौद्ध ग्राम. महावस्तुमते हे राजगृहापासून ४ मैलांवर ( ½ योजन ) होते ( महा. ३.५६; संयुत्त. अठ्ठ १.३२६; दीघ. अठ्ठ. १.७२ ). पांडे यांच्या मते पटना जिल्ह्यातील राजगृहानजिकचे आधु. कोलिय गाव हेच होय ( पांडे, बिहार. पृ. १४९ ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. ह्युएन्त्संगचे जीवनचरित्र | संघारामग्राम |
| २. महावस्तु | कोलितग्रामक |
| ३. स्थानिक नामांतर | कोल |

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते गौतम बुद्धाच्या राजगृहभेटीच्या वेळी मगधराज बिंबिसार या गावाच्या ३¾ मैल पूर्वेपर्यंत त्यास सामोरा आला होता. ' या गावी जन्मलेला ' अशा अर्थानेच मौद्गलायनपुत्र आचार्यास ' कोलिक ' नाव मिळाले असून, त्याचा स्मृतिस्तूप अशोकाने येथे बांधला होता ( वॉटर्स, २.१७१ ).

**कोलिय** ( गणराज्य )—कोशल देशान्तर्गत एक बुद्धकालीन गणराज्य. शाक्य गणराज्याच्या सीमेवरील हे जनपद पूर्वकाळी त्यामध्येच समाविष्ट असून, याच्या रामग्राम नामक राजधानीवरून येथील लोक ' रामग्रामस्थ कोलिय ' नावाने प्रसिद्ध होते.

**भौगोलिक परिसीमा**—बौद्ध साहित्यमते याच्या भौगोलिक परिसीमा पुढीलप्रमाणे होत्या :—१ उत्तरेस—

हिमालयपाथ्यानजिकचा जंगलमय प्रदेश; २. दक्षिणेस— अचिरावती ( आधु. राप्ती ) नदी; ३. आग्नेयेस— पिप्पली-वननिवासी मोरिय गणराज्य; ४. पश्चिमेस—रोहिणी ( आधु. रोवै ) नदी आणि त्या नदीच्या पश्चिमवर्ती शाक्य गणराज्य ( थेरगाथा. ५२९; जा. ५.४१३ ). जातकमते रोहिणीनदीजलावरून शाक्य जनपदांशी यांचे सदैव झगडे चालू असत ( जा. १.३२७; ४.२.७ )

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. भर्हुत शिलालेख ( कॉर्पस्. इन्स्क्र. २.२.१६९ ) | कोडिय, कोड्य |
| २. जैन कल्पसूत्र ( ४; १० ) | कोडिय |
| ३. पाली साहित्य | कोळिय |
| ४. महावस्तु ( १.३५५ ) | व्याघ्रपद्य |

**नामव्युत्पत्ती**—बौद्ध साहित्यमते राम नामक कुष्ठरोग-पीडित काशिराजाने 'कोलवृक्ष तोडून वन्य व्याघ्रपथावर वसविलेला देश' अशा अर्थाने यास 'कोलिय' आणि 'व्याघ्रपद्य' ( व्याघपज्ज ) नावे मिळाली ( दीघ. सुमङ्गल. १.२६०–२६२ ). महावस्तुमते 'कोल ऋषिस्थापित देश' अर्थाने यास हे नाव मिळाले. ल्यूडर्स यांच्या मते 'कोडिय' लोकसमूहाचे हे अपभ्रष्ट रूप असावे ( कोडिय>कोळिय> कोलिय ).

**उत्पत्ती**—बौद्ध साहित्यमते हे काशिराज रामकुलोत्पन्न लोक गौतम बुद्धाप्रमाणेच शाक्यवंशीय क्षत्रिय होते ( दीघ. २.१३१ ). येथील वनस्पतिजन्य औषधांनी रोगमुक्त झालेल्या राम राजाने कुष्ठरोगपीडित शाक्य राजकन्येला याच औषधानी बरे करून या राज्याची, तसेच 'कोलनगर' ( व्यघ्घपज्ज ) नामक राजधानीची स्थापना केली ( सुत्त. अट्ठ. ३५७.१७ ). या राजाच्या बत्तीस पुत्रांपासून हे लोक निर्माण झाले ( महावस्तु. १.३५२-३५३; जा ५.४१३ ). महावस्तुमते शाक्य राजघराण्याशी संबंधित कोल ऋषींनी या देशाची स्थापना केली. यावरून 'कोल' हे वननिवासी 'राम' राजाचेच नामांतर असावे.

दिव्यावदान आणि महापरिनिब्बान सुत्तमते हे ( कोल ) इक्ष्वाकुकुलोत्पन्न लोक नागवंशीय होते. पांडे यांच्या मते वाराणसीसम्राट राम हाहि नागवंशीयच होता ( पांडे, गोरखपुर. पृ. ६८ ). कल्पसूत्रांच्या स्थविरावली टीकामते थेर सुट्ठिय वग्घावच्च ( व्याघ्रपद्य ) नामक जैन आचार्याने या ( कोडिय ) देशाची स्थापना केली ( कल्प. ४.१० ).

**बौद्ध साहित्यात**—या, तसेच शाक्य लोकांच्या संघर्षाचे अनेक निर्देश या साहित्यात असून, धम्मपद टीकामते या उभय देशांतील उसाची पिके दुष्काळामुळे दग्ध झाली असता रोहिणी नदीच्या जलासाठी हे देश भांडू लागले. तत्प्रसंगी शाक्यांनी या लोकांना 'कुष्ठरोगकुलोत्पन्न' म्हणून, तसेच यांनी शाक्यांना 'भ्रातृभगिनीविवाहजन्य' म्हणून हिणविले. अखेरीस बुद्धाने या दोहोंमध्ये सलोखा घडवून त्यांचेकडून प्रत्येकी शंभर कुमार भिक्षू प्राप्त केले ( धम्मपद अट्ठ. ३.२५४; जा. ५.४१३; दीघ. सुमङ्गल. २.६७२ ). जातकमते या दोहोंतील संघर्ष स्त्रीगुलामांच्या मालकी हक्कांवरून उत्पन्न झाला होता ( जा. ५.४७२ ).

बौद्ध, तसेच मौर्यकाली मल्ल आणि वज्जि लोकांप्रमाणेच हेहि कोशल देशाचे मांडलिक असून, उत्तरकालात ते मौर्य साम्राज्यात विलीन झाले.

**कौटिलीय अर्थशास्त्रात**—या ग्रंथकाली या लोकांचे स्वतंत्र गणराज्य होते ( कौ. अ. १२.५–७ ).

**भर्हुत शिलालेखात**—या शिलालेखमते या ( कोडिय, कोड्य ) जमातीतील ( कोडियानी ) नागसेना आणि सकटदेवा ( शकटदेवा ) नामक स्त्रियांनी येथील स्तूपास देणगी दिली होती ( कॉर्पस्. इन्स्क्र. २.२.१९–२० ).

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते या देशातील रामग्राम येथील बुद्धशरीरावशेष-स्तूपातील अवशेष हलविण्याचा सहस्रस्तूपनिर्मात्या सम्राट अशोकाचा प्रयत्न तत्रस्थ नाग लोकांनी हाणून पाडला. या रामग्रामच्या नैर्ऋत्यवर्ती स्तूपाचे रक्षण आणि उपासना स्थानिक नाग लोक मनोभावे करीत असत ( वॉटर्स, २.२० ). यावरून अशोककाली या नागकुलोत्पन्न लोकांचे स्वतंत्र गणराज्य असावे ( पाठक, कोशल. पृ. २६२–२६९ ).

**कोलुक** ( देश )—वाल्मीकि रामायणमते उत्तर भारतातील 'कुलूत' देशाचे नामांतर. अन्य नामांतर— 'कोलूट' ( वा. रा. कि. ४३.८; कुलूत पहा ).

**कोलुवर्तनी विषय** ( देशविभाग )—शिलालेख साहित्यमते कलिंग देशान्तर्गत 'वराहवर्तनी' विषयाचे नामांतर ( डी. एच्. एन्. आय. १.४५८; वराहवर्तनी विषय पहा ).

**कोलेघाट** ( तीर्थ )—व्रजमंडल ( मथुरा–वृंदावन )

क्षेत्रान्तर्गत एक तीर्थ. स्थानिक आख्यायिकामते गोकुलगामी वसुदेवाने बालकृष्णासह येथे यमुना नदी ओलांडली (ती. पृ. १०५).

**कोलेर** (सरोवर)—पश्चिम चालुक्य सम्राट पुलकेशिन् (द्वितीय)च्या स. ६३४ च्या ऐहोळे शिलालेखमते आंध्र प्रदेशान्तर्गत गोदावरी जिल्ह्यातील वेंगीमंडल देशातील कोलनु (आधु. एलोर) नजिकचे एक सरोवर (एपि. इंडि. ६.३०८; ६.१). एलोरनजिकचे आधु. कोलैर सरोवर हेच होय. चोल राजा कुलोत्तुंग (प्रथम) च्या स. १०९५ च्या तिरुविडैमरुदूर शिलालेखमते येथे लपलेल्या कोलनुनरेश तेलगु चोड राजास त्याने ठार मारले (एपि. इंडि. ६.१४६; कोलनु पहा). नामांतर (राजेंद्र चोडाचा स. १०९१ चा नंदूर ताम्रपट)—'कोल्लेरु' (एपि. इंडि. २९.२३३).

**कोलौलपुर** (नगर)—शिलालेख साहित्यमते पूर्व म्हैसुरातील एक नगर. राइस यांच्या मते आधु. कोलार गाव हेच होय (एपि. इंडि. २६.१६७). पश्चिम गंग राजा श्रीपुरुष मुत्तरसच्या स. ७५४ च्या कोलार शिलालेखमते त्याचा दुग्गमार एरेयप्प नामक पुत्र येथे राजप्रतिनिधी होता (एपि. कर्ना. १०.६; ८०).

**कोल्चोइ** (नगर)—टॉलेमीच्या मते दक्षिण भारतातील पांड्यराजधानी 'कोर्कै' नगराचे नामांतर (कोर्कै पहा).

**कोल्याद** (तीर्थ)—पश्चिम भारतातील भडोचनजिकच्या बैंगणी गावापासून १ मैलावरील एरंडा–नर्मदा संगमस्थान, एक तीर्थ. नामांतर–'कपिलेश्वर तीर्थ' (ती. पृ. ४३९).

**कोल्लक** (पर्वत)—कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या दक्षिण भागातील एक पर्वत (बृ. सं. १४.१३; काव्यमी. १७.२२६). आधु. कोल्हापुर (प्राचीन करवीरपुर) नजिकची टेकडी हीच असावी.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतात (परिपत्रक पहा).

**प्राचीन साहित्यात**—महाभारतमते युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या दक्षिण दिग्विजयात सहदेवाने सह्य पर्वताचा हा (कोल्लगिरि, कोल्व) उपपर्वत जिकला होता (म. स. २८.४५). याच्या परिसरातील पश्चिम समुद्रकिनारीचा प्रदेश याच नावाने सुविख्यात असून, बृहत्संहिता, तसेच तेर्डाळ शिलालेखमते कोल्लगिरि नगर यानजिकच होते (करवीर पहा). अग्निमते हा अत्यंत पवित्र होता (अग्नि. १०९.२१).

२. (ग्राम) जैन साहित्यमते बिहारमधील महावीर-

**कोल्लक पर्वताची नामांतरे**

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. महाभारत (स. २८.४५) | कोल्लगिरि, कोल्व |
| २. भागवत (५.१९.१६) | कोल्व |
| ३. मार्कंडेय पुराण (५५.२३) | कोल्लगिर |
| ४. तेर्डाळ शिलालेख (इंडि. ॲंटि. १४.२३) | कोल्लगिरि |

चरणपुनीत एक ग्राम. जैन भगवतीसूत्रमते सुवर्ण खलय गावी जात असता महावीर येथे काही काळ थांबला होता (भगवती. १५). उत्तर बिहारमधील वैशाली नगराचे हे संभवतः उपनगर असावे (पांडे, बिहार. पृ. १३२–१३३).

**कोल्लगिरि** (नगर)—बृहत्संहितामते दक्षिण भारतातील 'करवीर' नगराचे नामांतर (बृ. सं. १४.१३; करवीर पहा). नामांतर (म. आश्व. ८४.११)—'कोल्लगिरेय देश'.

**कोल्लपाक** (जैन तीर्थ)—आंध्र प्रदेशातील 'कुलपाक' जैन तीर्थाचे नामांतर (कुलपाक पहा).

**कोल्लपूरक** (ग्राम)— वाकाटक राजा प्रवरसेन (द्वितीय)च्या सिवनी ताम्रपटमते मध्य भारतातील ब्रह्मपूरक ग्रामाच्या पश्चिमेकडील एक ग्राम. एलिचपुरच्या २१ मैल दक्षिणेकडील आधु. कोलपुर (अक्षांश २०°–५६′ उत्तर; रेखांश ७७°-३४′ पूर्व) गाव हेच होय (कॉर्पस. इन्स्क्रि. ३.२.२४४; २४८).

**कोल्लम्** (नगर)—चोल राजा राजराज (प्रथम) च्या स. १३०३ च्या मुल्बागल शिलालेखमते केरळ प्रांतातील 'कोलनुपुर' (आधु. क्विलॉन) नगराचे नामांतर (एपि. कर्ना. १०.१२३; कोलनुपुर पहा).

**कोल्ला** (देवी)— स्कंदमते प्रभासक्षेत्रान्तर्गत अर्बुदारण्यातील सरस्वती नदीकाठच्या कूष्मांडेश्वर तीर्थानजिकचे एक देवीस्थान (स्कन्द. प्रभास. प्र. ३५.८६–८७).

**कोल्लाक** (जैन तीर्थ)— जैन उवासगदसौमते उत्तर बिहारमधील वैशाली नगराचे उपनगरस्वरूप एक जैन तीर्थ (उवास. २.४). मुजफ्फरपुर जिल्ह्यातील बसाढ गावानजिकचे आधु. कोल्हुह गाव हेच होय (आर्कि. सर्व्हे., स. १९०३; पृ. ८८).

**कोल्लापुर** (नगर)— चालुक्य राजा जयसिंह (द्वितीय) च्या स. १०२४ च्या मिरज ताम्रपटमते महाराष्ट्रातील 'करवीर' नगराचे नामांतर (एपि. इंडि. १२.३०३). नामांतर (राजेंद्रदेवाचा तिरुक्कोयिलूर, तसेच चालुक्य राजांचा तेडीळ शिलालेख)–'कोल्लापुरम्'; (अन्य शिलालेख)–'कोल्हापुर' (करवीर पहा).

**कोल्लिपाक** (नगर)— पश्चिम चालुक्य राजा सोमेश्वर (प्रथम) च्या स. १०६७ च्या शिलालेखमते आंध्र प्रदेशातील एक नगर. हैद्राबादच्या ४५ मैल ईशान्येकडील कृष्णा नदीच्या दक्षिण तीरवर्ती आधु. कुल्पक गाव हेच होय (हैद्राबाद अर्कि. सर्व्हे., स. १९१६; पृ. २८). इ. स. १२ व्या शतकात या तुंगभद्रेच्या दक्षिणवर्ती देशात पश्चिम चालुक्य राजा विक्रमादित्य (षष्ठ) राज्य करीत असे (एपि. कर्ना. ७.६१). नामांतर (चोल शिलालेख)– 'कोल्लिप्पाक्कै'.

**देशविभाग**—चोल राजा राजेंद्र (प्रथम) च्या स. १०१७ च्या तंजोर शिलालेखमते त्याने पश्चिम चालुक्य साम्राज्यान्तर्गत हा देश जिंकला होता (साऊथ इंडि. इन्स्क्रि. २.९२). चोल राजा राजाधिराज (प्रथम) च्या स. १०४६ च्या मणिमंगलम् शिलालेखमते त्याने पश्चिम चालुक्य सम्राट सोमेश्वराची हकालपट्टी करून हे नगर जाळले (साऊथ इंडि. इन्स्क्रि. ३.५१).

**कोल्लेरु** (सरोवर)—राजेंद्र चोड राजाच्या स. १०९१ च्या नंदूरु ताम्रपटमते आंध्र प्रदेशातील 'कोलेर' सरोवराचे नामांतर (एपि इंडि. २९.२३३; कोलेर पहा).

**कोल्व** (पर्वत)—पौराणिक साहित्यमते सह्य पर्वताच्या 'कोल्लक' नामक क्षुद्र पर्वताचे नामांतर (भा. ५.१९. १६; कोल्लक पहा).

**कोल्हापुर** (क्षेत्र)—यादव राजांच्या शके ११७२ च्या कोल्हापुर शिलालेखमते महाराष्ट्रातील 'करवीर' क्षेत्राचे नामांतर (जे. बी. बी. आर. ए. एस्. २.२६४; करवीर पहा).

**कोविदार** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू. ४.२.८०.१५).

**कोविलकोण्ड** (दुर्ग)—विजयनगर सम्राटांनी स. १५५८ मध्ये अहमदनगर सुलतानांकडून जिंकलेले आंध्र प्रदेशातील एक दुर्गस्थान (सेवेल, इन्स्क्रि. पृ. २५५).

**कोविलूर** (नगर)—चोल राजा राजराज (तृतीय) च्या स. १२२३ च्या तंजोर शिलालेखमते त्याच्या आधिपत्याखालील तंजोर प्रदेशातील एक नगर (रंगाचारी, २. तंजोर. ११२५).

**कोशम्ब खण्ड** (देशविभाग)—वाकाटक राजा प्रवरसेनच्या तिरोडी ताम्रपटमते मध्य भारतातील एक देशविभाग. आधु. बालाघाट जिल्ह्यात हा असावा (एपि. इंडि. २२.१६८).

**कोशम्ब-पट्टल** (नगर)—कलचुरि राजा कर्णच्या स. १०४७ च्या गोहरवा ताम्रपटमते उत्तर भारतातील 'कौशांबी' नगराचे नामांतर (कौशांबी १. पहा).

**कोशल** (देश)—पौराणिक साहित्यमते भारतवर्षाच्या मध्यदेशान्तर्गत (गंगा नदीचे खोरे) गंगा-यमुना दुआबातील पाच जनपदांपैकी एक (वायु. १०७; ब्रह्माण्ड. ४९.४४; मार्कं. ५७.३२). वाल्मीकि रामायणकाली सरयू नदीकाठचे हे जनपद अत्यंत विस्तृत आणि धनधान्यसंपन्न असून (वा. रा. बा. ५.५), बौद्धकालीन षोडश महाजनपदांमध्ये हे मगधच्या खालोखाल महत्त्वाचे होते (अङ्गुत्तर. १.२१३; ४.२५२; २५६; २६०). जैन साहित्यमते तत्कालीन भारतवर्षातील २५½ प्रमुख देशांमध्ये याची गणना होत असे (विविधतीर्थ. पृ.७०). बौद्ध संयुत्त निकायमधील एक संपूर्ण निकाय (अध्याय) प्रसेनजित्–राज्यकालीन या देशाच्या वर्णनपर असून (संयुत्त. १.६७-८३), अन्य बौद्ध साहित्यातहि याच्या वैभवाचे वर्णन आढळते (दीघ. ३४.४१;४९; मज्झिम. पृ. ९६; ३६०–३६८; ३९४–३९५; ४१६–४२०; जा. क्र. ५१; ३०३; ३३६; सुत्त. पृ. ५७; ८३). यावरून वाल्मीकि रामायणकालापासून प्रसिद्ध असणाऱ्या या देशास बुद्धकाली नवे राजकीय आणि सांस्कृतिक महत्त्व प्राप्त झाले असावे. ब्राह्मण ग्रंथकाली आर्यावर्तबाह्य मानला जाणारा हा देश (ऐ. ब्रा. ८.१४.३) बौद्धकाली पवित्रतम बनला.

अली यांच्या मते उत्तर प्रदेशातील सरयू-राप्ती दुआबातील आधु. गोंडा आणि बहरैच जिल्ह्यांचा प्रदेश म्हणजे हा देश होय. याची दक्षिण सरहद्द सरयू नदीने बनली असली, तरी त्या नदीच्या दक्षिणेकडील गोमती-गंगा-सरयू नद्यांच्या दुआबातील काशि जनपदाचा प्रदेशहि काही काळ त्यामध्ये समाविष्ट होत असे. चौधरी यांच्या मते आधु. राप्ती नदीच्या खोऱ्यातील या देशाची उत्तर परिसीमा हिमालय पायथ्यानजिकच्या नेपाळ तराईने बनली होती.

**राजधानी**—वाल्मीकि रामायणकाली या देशाची राजधानी सरयू–घर्घरा संगमावरील अयोध्या गावी, आणि

## कोशल देशाची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पाणिनीची अष्टाध्यायी ४.१.१७१ ) | कोसल |
| २. पतंजलीचे व्याकरण महाभाष्य ( ४.२.१०४ ) | इक्ष्वाकु |
| ३. वाल्मीकि रामायण ( उ. १०७.७; ब्रह्माण्ड. ३.६३. २०० ) | उत्तर कोशल |
| ४. महाभारत अ. ( स. २७.१ ) | कोसल, उत्तर कोसल |
| ब. ( स. २०.२८ ) | पूर्व कोशल |
| क. ( भी. १०.३८ ) | कांति–कोशल |
| ५. बृहत्संहिता | |
| अ. ( १४.७ ) | कौशलक लोक |
| ब. ( १०.१४ ) | कौशल |
| क. ( ५.७०; १०.९ ) | कोशलक |
| ६. पौराणिक साहित्य | |
| अ. ( पार्गि., कलि एज पृ. ५३ ) | अनुगंगा |
| ब. वामन पुराण | शोकल |
| क. स्कंद पुराण ( माहेश्वर. कौ. ३९.१५४ ) | उत्तर कोशल |
| ७. ह्युएन्‌त्संगचे प्रवासवर्णन ( वॉटर्स, १.३५४ ) | अयोध्या, श्रावस्ती |
| ८. जैन साहित्य ( विविधतीर्थ. पृ. ७० ) | कुणाल विषय |
| ९. शिलालेख साहित्य | |
| अ. वाकाटक राजा नरेंद्रसेनाचा शिलालेख(एपि. इंडि. ९.२७१ ) | कोसला |
| ब. राजेंद्र चोलाचा तिरुमलै टेकडी शिलालेख (एपि. इंडि. ९.२२९ ) | कोसल |
| क. कलचुरि राजा रत्नदेवाचा स. ११३४ चा पारगाव ताम्रपट(कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.६२४ ) | कोसल |
| ड. कनौजच्या जयचंद्र राजाचे दानपत्र ( इंडि. अँटि. १८.१३० ) | औत्तर कोशल |
| इ. गोविंदचंद्राचा वि. सं. ११८४ चा कमौली ताम्रपट ( इंडि. अँटि. १५.८ ) | उत्तर कोसल |
| १०. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य ( त्रिकाण्ड. पृ. ३१; वैजयन्ती. पृ. १५९; अभिधान. पृ. ३८९ ) | अयोध्या, साकेत |
| ११. मध्ययुगीन साहित्य (सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३१६ ) | अवध (अयोध्या) |

बौद्धकाली बहरैच-गोंडा जिल्ह्यांच्या सरहद्दीवरील राप्ती नदीकाठच्या श्रावस्ती ( बलरामपूरपासून १९ मैलांवरील आधु. सहेत्-महेत् ) गावी होती. उद्ध्वस्त अयोध्या नगराच्या अंशभागावरील साकेत हे बौद्धकाली येथील प्रमुख नगर होते.

संस्कृत साहित्यात 'कोसल' आणि 'कोशल' वैकल्पिक नावांनी याचा निर्देश असला, तरी बौद्ध साहित्यात सर्वत्र यास 'कोशल' म्हटले असल्याने आम्हीहि तोच पाठ स्वीकारला आहे.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा ).

**नामव्युत्पत्ती—बौद्ध** दीघ निकायमते 'कोशल राजपुत्रांचा देश' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले ( दीघ. सुमङ्गल. १.२३९ ). बुद्धघोष टीकामते ( इ. स. ५ वे शतक ) येथील महापनाद नामक उदासचित्त राजपुत्राला हसविण्यासाठी इंद्राने केलेल्या नाटकम् नामक नाट्यप्रयोगाच्या प्रसंगी पौरजनांनी विचारलेल्या '**कच्चि भो कुशलम्**' ( कुमाराचे कुशल आहे ना ? ) या पृच्छेमुळे यास हे नाव मिळाले. ही आख्यायिका उघडउघड उत्तरकालीन आणि म्हणूनच अनैतिहासिक दिसते.

**भौगोलिक परिसीमा**—प्राचीन साहित्यमते याच्या भौगोलिक परिसीमा पुढीलप्रमाणे होत्या :—

( १ ) **पश्चिमेस आणि वायव्येस**—ब्राह्मण ग्रंथकालापासून मगध साम्राज्याच्या उदयापर्यंत याची पश्चिम सीमा पांचाल देशाने बनली होती. ऐतरेय ब्राह्मणमते या, तसेच

विदेह देशाच्या पश्चिमेस पांचाल देश असून, बौद्ध अंगुत्तर निकायमध्येहि कोशल आणि पांचाल देशांचा एकत्र निर्देश आढळतो ( अङ्गुत्तर. १.२१३ ).

( २ ) उत्तरेस—याची उत्तर परिसीमा हिमालय पायथ्यानजिकच्या नेपाळ-तराईस भिडली होती. बौद्ध साहित्यमते नेपाळ-तराईतील शाक्य जनपद ( आधु. राप्ती-रोहिणी नद्यांचा दुआब ), तसेच त्याची कपिलवस्तु नामक राजधानी या देशातच समाविष्ट असून ( दीघ. ३.८३; जा. ४.१४५; अङ्गुत्तर. १.२६० ), शाक्यकुलोत्पन्न गौतम बुद्ध स्वतःस 'कोशलक' म्हणवीत असे ( सुत्त. २.६८–६९; मज्झिम. २.१२४ ).

वाल्मीकि रामायणमते लक्ष्मणपुत्रांनी जिंकलेल्या या देशाच्या उत्तरवर्ती तराई प्रदेशाचा ( वा. रा. उ. ७०–७१ ) स्वतंत्र राज्यविभाग दाशरथि रामाने बनविला होता ( वा. रा. अर. १०१–१०२; रघु. १५.९७; वायु. ३८.१८७– १८८ ). यावरून या देशाची उत्तर सरहद्द पश्चिमेस राप्ती आणि पूर्वेस रोहिणी नद्यांच्या उगमापर्यंतच्या नेपाळ हिमालय पर्वताने बनली असावी.

( ३ ) पूर्वेस— ऐतरेय ब्राह्मणमते याची पूर्व सरहद्द सदानीरा नदीने आणि सदानीरातीरवर्ती विदेह देशाने बनली असून ( ऐ. ब्रा. १.४.११; ८.१४.३; श. ब्रा. १.४.१४.१७ ), त्यावरून उत्तर प्रदेशातील आधु. गोरखपुर आणि सरन जिल्हे यामध्ये समाविष्ट असावेत. लक्ष्मणपुत्र चंद्रकेतूने राप्ती-सदानीरा दुआबात स्थापिलेले मल्ल राज्य ( वा. रा. उ. १०२.९-११; अङ्गुत्तर. १. २१३ ) यामध्येच समाविष्ट होते. याची पूर्व सीमा राप्ती नदीने बनल्याचे अन्य अभ्यासकांचे अनुमान असंभव वाटते ( उपाध्याय, बौद्ध भूगोल. पृ. २३६ ).

( ४ ) दक्षिणेस— वाल्मीकि रामायणमते याची दक्षिण सरहद्द स्यंदिका ( सर्पिका=आधु. साई ) नदीने बनली असून, ती ओलांडल्यानंतर कोशलाधिपती राम मातृभूमी-वियोगकल्पनेने व्याकुळ झाला होता ( वा. रा. अयो. ४९.१५-१८ ). या नदीच्या दक्षिणवर्ती गंगा नदीने याची दक्षिण सरहद्द बनल्याचे रॉयचौधरी यांचे अनुमान ( रॉयचौधरी, पृ. १९९ ) भौगोलिक दृष्ट्या असंभव वाटते.

( ५ ) आग्नेयेस—या देशाची आग्नेय सरहद्द काशि जनपदाने बनली होती. वाराणसी गावाच्या पश्चिमेकडील आणि वायव्येकडील प्रदेश काशि जनपदात, आणि त्या गावच्या ईशान्येकडील उत्तरवाहिनी गंगा नदीकाठचा सदानीरा ( आधु. गंडक )–गंगा दुआबाचा आधु. बलिया जिल्ह्याचा प्रदेश या जनपदात समाविष्ट होत असे.

उपरोक्त वर्णनावरून उत्तर प्रदेशातील आधु. अयोध्या प्रांताचा, तसेच उत्तरकालीन शाक्य जनपदाचा सारा प्रदेश वाल्मीकि रामायणकालीन या देशात समाविष्ट असावा.

**वैदिक साहित्यात**—ऋग्वेदात तसेच अथर्ववेदात या देशाच्या इक्ष्वाकु आणि मांधातृ राजांचा निर्देश आढळतो ( ऋ. ८.३९.९; १०.६०.४; अ. वे. १४.३९.३ ). शतपथ ब्राह्मणमते या, तसेच विदेह देशाच्या सरहद्दीवरून सदानीरा नदी वहात असे ( श. ब्रा. १.४.१.१ ).

उत्तरकालीन वैदिक आणि पौराणिक साहित्यात निम्नलिखित कोशलनरेशांचा निर्देश आढळतो:— १. मांधातृ यौवनाश्व ( गो. ब्रा. १.२.१०; वायु. ८८.६७ ); २. पुरुकुत्स ऐक्ष्वाक ( ऋ. १.६३.७; ११२. ७–१४; १७४.२; ६.२०.१०; श. ब्रा. १३.५.४.५; वायु. ८८.७२ ); ३. त्रसदस्यु ( ऋ. ४.३८.१; १०.१९.३; वायु. ८८.७४ ); ४. त्रैय्यारुण ऐक्ष्वाक ( ऋ. ५.२७; वायु. ८८.७७ ); ५. त्रिशंकु ( तै. उ. १.१०.१; वायु. ८८.१०९ ); ६. हरिश्चंद्र ऐक्ष्वाक ( ऐ. ब्रा. १.७३.१६; वायु. ८८.११७ ); ७. रोहित हरिश्चंद्रपुत्र ( ऐ. ब्रा. ७.१४; वायु. ८८.११९ ); ८. भगीरथ ( भजेरथ ) ऐक्ष्वाक ( ऋ. १०.६०.२; जै. उ. ब्रा. ४.२.१२; वायु. ८८.१६७ ); ९. भानुमत् ( वा. रा. बा. १३.२३ ).

प्राचीन साहित्यमते येथील इक्ष्वाकु राजवंशाच्या शाखा उत्तरकालात वैशाली ( वा. रा. बा. ४७.११–१२ ), मिथिला ( वायु. ८९.३ ), कुशीनारा ( कुसजातक; जा. क्र. ३३१ ) येथे पसरल्या.

**पाणिनीच्या अष्टाध्यायीत**— या ग्रंथमते शरयू नदीकाठच्या या ( कोसल ) राजसत्ताक जनपदावर इक्ष्वाकु राजाचे राज्य होते ( पा. सू. ४.१.१७१; ६.४.१७४ ). येथे विंध्य पर्वताच्या दक्षिणेकडील दक्षिण कोशल देशाचा निर्देश अभिप्रेत असल्याचे रामकृष्ण भांडारकर यांचे अनुमान ( महाराष्ट्र इतिहास. पृ. ११ ) भौगोलिक दृष्ट्या असंभव वाटते ( अग्रवाल, पाणिनि. पृ. ७४ ).

**वाल्मीकि रामायणात**—या ग्रंथमते अयोध्या नगरा-सभोवतालचा सरयूतीरवर्ती सुसंपन्न ग्रामयुक्त ( वा. रा. अयो. ५०.८–१० ) आणि धनधान्यसंपन्न ( प्रभूत

धनधान्यवान्) सुखी आणि समृद्ध प्रदेश म्हणजे हा देश होय (वा. रा. बा. ५.५). कैकेयी–कोपशमनार्थ दशरथाने येथील उत्तमोत्तम वस्तू तिला देऊ केल्या होत्या (वा. रा. अयो. १०.३७–३९). याची दक्षिण सरहद्द ओलांडून राम वनवासास गेला होता (वा. रा. अयो. ४९.८). सुग्रीवाने विनत वानरास येथे सीताशोधार्थ पाठविले होते (वा. रा. कि. ४०.२२). दाशरथि रामाने याचे उत्तर आणि दक्षिण असे दोन भाग करून ते लव–कुशांना वाटून दिले (वा. रा. उ. १०७.१७).

**महाभारतात**—या ग्रंथमते युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञ-समयीच्या पूर्व दिग्विजयात भीमसेनाने या इंद्रप्रस्थाच्या पूर्ववर्ती जनपदाच्या बृहद्बल राजास, तसेच अयोध्येच्या दीर्घप्रज्ञ सम्राटास जिंकले होते (म. स. २७.१–२).

महाभारतकाली कोसल आणि अयोध्या यांची स्वतंत्र राज्ये असल्याचे काही आभ्यासकांचे अनुमान भौगोलिक दृष्ट्या असंभव वाटते. अयोध्यापती दीर्घप्रज्ञ हा कोशल देशाचा युवराज असून, बृहद्बल या (उत्तर कोसल) देशाचा राजा असावा (म. उ. १५८.३८).

महाभारतमते मगधराज जरासंधभयाने येथील क्षत्रिय दक्षिणेस पळाले असून (म. स. १३.२६), हस्तिनापुराहून मगध देशास जात असता भीम, अर्जुन आणि कृष्ण यांना हा लागला होता (म. स. १८.२८). औद्दालक-पाचारित सरस्वती नदी येथे 'मनोह्रदा' (मनोहरा) नावाने अवतीर्ण झाली होती (म. श. ३७.२१–२३). पुलस्त्ययात्रामते या नदीमुळेच हा (कोसल) तीर्थतुल्य पवित्र देश बनला होता (म. आर. ८३.११). 'कोशल देशान्तर्गत' अर्थाने अयोध्या नगरीस 'कोसला' नामांतर प्राप्त झाले होते (म. आर. ८३. १०).

भारतीय युद्धात येथील लोक कौरवपक्षात सामील असून, अभिमन्यूने येथील राजाचा (कोसलाधिपति) वध केला होता (म. द्रो. ४६.२०–२४; भा. ९.१२.८). कर्ण-शल्य संवादमते येथील लोक 'प्रेक्षितज्ञ' (दृष्टिक्षेप-नर्मज्ञ) आणि 'शाश्वतधर्मज्ञ' होते (म. क. ३०.६०–७९). पांडवांच्या अश्वमेधीय दिग्विजयसत्रात अर्जुनाने हा जिंकला होता (म. आश्व. ८४.४).

महाभारतात अन्यत्र येथील क्षेमदर्शिन् नामक पूर्व-कालीन राजाचा निर्देश असून (म. शां. ८३.६), अंबा-स्वयंवरसमयी भीष्माने हा जिंकला होता (म. अनु. ४४. ३८).

**पौराणिक साहित्यात**—बृहत्संहितामते हा (कोसल) कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या पूर्व भागात असून (बृ. सं. १४.७; मार्कं. ५५.१४; काव्यमी. १७.२२६), येथील लोक 'कौशलक', 'कौशल' अथवा 'कोशलक' नावांनी प्रसिद्ध होते (बृ. सं. ५.७०; १०.९; १४). पौराणिक साहित्यमते हा मध्यदेशात (गंगा–यमुना दुआब) असून (ब्रह्माण्ड. १६.४१; मार्कं. ५४.३२), ब्रह्माण्डमते या (उत्तर कोशल) देशातील श्रावस्ती येथे रामपुत्र लवाची राजधानी होती (ब्रह्माण्ड. ३.६३.२००). पद्ममते याचे उत्तर आणि दक्षिण असे दोन भाग असून (पद्म. आदि. ६.३६), याचे अयोध्या (कोसल) हे राजधानीचे नगर महान तीर्थ होते (पद्म. आदि. ३९.११). भागवतमते हा परमपवित्र आणि महत्त्वपूर्ण देश होता (भा. ५.१९.८; ९.१०.४२). स्कंदमते भरतखंडातील या (उत्तर कोशल) देशात दहा लक्ष ग्रामे होती (स्कन्द. माहेश्वर. कौ. ३९. १५४). दशकुमारचरितमते येथे सागरदत्तापति कुसुम-धन्वन् राजा राज्य करीत असे.

**बौद्ध साहित्यात**— या साहित्यमते मगधाच्या वायव्ये-कडील काशि देशानजिकचे हे जनपद बौद्धकालीन षोडश महाजनपदांमध्ये द्वितीय क्रमांकाचे असून (अङ्गुत्तर. १.२१३; ४.२५२), गौतम बुद्धकाली काशि–कोशल साम्राज्यावर पसेनदी (प्रसेनजित्) राजाचे राज्य होते. पूर्वकाली येथे 'अदिच्छ' (आदित्य) वंशाचे राज्य होते (सुमङ्गल. १.२३९).

जातकमते काशि देशासमवेत याची सदैव युद्धे चालू असून (जा. २.२१; ३.११५; २११; ५.३१६;४२५), कोशलनरेश दीघिति (जा. ३.२११), मल्लिक (जा. ३२) आणि चत्त (जा. ३.११६) ज्या काळी या संघर्षाची परमावधी झाली होती. निम्नलिखित कोशल-नरेशांनी काशि देशावर विजय प्राप्त केला होताः–१. दब्बसेन (जा. ३.१३); २. दीघावु (जा. ३.२११); ३. वंक (जा. ३.१६८); ४. कंस (जा. २.४०३). यापैकी कंस राजाने काशि देश संपूर्णतः जिंकल्याने त्यास 'वारणासिग्गाह' (वाराणसीग्राह) उपाधी मिळाली (जा. ५.११२). कोशलराज प्रसेनजित् 'काशि-कोशल सम्राट' उपाधीने सुविख्यात होता (अङ्गुत्तर. ५.५९; काशि पहा).

या देशाचा मगध साम्राज्याशी संघर्ष टाळण्यासाठी कोशलराज प्रसेनजित्ने आपली भगिनी कोसलदेवी मगध-राज बिंबिसारास दिली (जा. २.२३७; ४.३४२). परंतु बिंबिसाराच्या मृत्यूनंतर मगधराज अजातशत्रूने पुन्हा एकवार यावर हल्ला केला. प्रसेनजित्ने त्यास जिवंत पकडले

आणि त्यास वजिरा नामक स्वकन्या देऊन त्याच्याशी तह केला. उत्तरकालात अजातशत्रूने लिच्छवी आणि कोशल देश मगध साम्राज्यास जोडले.

बुद्धकाली श्रावस्ती हे याचे राजधानीचे नगर असून, साकेत हे येथील प्रमुख नगर होते (जा. ३.२७०). त्यानजिकच्या अयोध्येचे महत्त्व तेव्हा नष्ट झाले होते.

याकाळी सरयू नदीमुळे याचे उत्तर आणि दक्षिण असे दोन विभाग पडले असून, अचिरावती (दीघ. १.२३५) आणि सुंदरिका (= स्यंदिका, संयुत्त. १.१६७; सुत्त. पृ. ९७; मज्झिम. १.३९) या येथील अन्य दोन महत्त्वपूर्ण नद्या होत्या.

बुद्धवास्तव्यपुनीत श्रावस्ती आदि अनेक नगरे येथे असून, विनय ग्रंथातील अनेक नियम बुद्धाने येथेच रचले होते. संयुत्तमते या समृद्ध देशात प्रवासी भिक्षूंना भरपूर भिक्षा मिळत असून (संयुत्त. अठ्ठ. १.२२१), तपःसाधनोपयोगी अनेक वने येथे होती (संयुत्त अठ्ठ. १.२२५). बावरी नामक भिक्षू येथेच जन्मला होता (सुत्त. ५.९७६). बुद्धाच्या मृत्यूनंतर त्याचा एक शरीरावशेष-स्तूप (उग्गलोम) येथे बांधण्यात आला (बुद्धवंश. २९. ९.).

**ग्रामे**—बौद्ध साहित्यमते या देशातील निम्नलिखित ग्रामे प्रमुख होती :– १. इच्छांगल (अङ्गुत्तर. ३.३०; ३४१; ४.३४०); २. उक्कठ्ठा (दीघ. १.८७); ३. एकसाला; (संयुत्त. १.११); ४. ओपसाद (मज्झिम. २.१६४); ५. केसपुत्त (अङ्गुत्तर. १.१८८); ६. चंडलकप्प (मज्झिम. २.२०९); ७. तोरणवत्थु (४.३७४); ८. दंडकप्प (अङ्गुत्तर. ३.४०२); ९. द्रोणवस्तुक (महा. ३.३७७); १०. नगरविंद (मज्झिम. ३.२९०); ११. नळकपान (अङ्गुत्तर. ५.१२२; मज्झिम. १.४६२); १२. नालंदा (संयुत्त ४.३२); १३. पंकधा (अङ्गुत्तर. १.२३); १४. मारकरंड (महा. १.३१७). १५. वेनागपुर (अङ्गुत्तर. १.१८०); १६. वेळुद्वार (संयुत्त. ५.३५२); १७. साला (मज्झिम. १.२८५; ४००; संयुत्त. ५.२२७); १८. सालावतिक (दीघ. १.२४४); १९. सेतव्य (दीघ. २.३१६).

**नगरे**—मौर्य सम्राट चंद्रगुप्तअमात्याच्या श्रावस्ती-निष्क्रमित सोहगौर ताम्रपटमते त्या साम्राज्याची प्रांतिक राजधानी श्रावस्ती येथे आणि धान्यकोठारे निम्नलिखित गावी होती :– १. मथुरा (शूरसेन जनपदातील मथुरेहून विभिन्न); २. चंचु (आधु. गाझीपुर); ३. मोदामा; ४ भद्र; ५ त्रिवेणी (एपि. इंडि. २२.२).

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते या (श्रावस्ती, व्याप्ती–१२०० मैल) देशात अनेक उद्ध्वस्त बौद्ध मठ असून (वॉटर्स, १.३७७–३८०), अयोध्या (व्याप्ती– १००० मैल) नामक स्वतंत्र देशाचे वर्णनहि तेथे आढळते (वॉटर्स, १.३५४–३५९). त्यावरून ह्युएन्त्संगच्या काळी याचे उत्तर (राजधानी-श्रावस्ती) आणि दक्षिण (राजधानी–अयोध्या) असे दोन उपविभाग असावेत.

**जैन साहित्यात**—विविधतीर्थकल्पमते हा (कुणाल विषय) तत्कालीन भारतवर्षातील २५ ½ देशांपैकी एक प्रमुख देश होता (विविध. पृ. ७०).

**शिलालेख साहित्यात**—समुद्रगुप्ताच्या बनावट गया ताम्रपटात (कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२५७; इंडि. अँटि. १५.८), आणि गोविंदचंद्राच्या वि. सं. ११८४ च्या कमोली ताम्रपटात आधु. अयोध्या प्रांत अशा अर्थाने याचा (उत्तर कोशल) निर्देश आढळतो.

**मध्ययुगीन कालात**—मध्ययुगीन शब्दकोश साहित्य-काली हा 'अयोध्या' आणि 'साकेत' वैकल्पिक नावांनी (त्रिकाण्ड. पृ. ३१; वैजयन्ती. पृ. १५९; अभिधान. पृ. ३८९), तसेच अयोध्येच्या नबाबांच्या काली 'अवध' नावाने सुविख्यात होता. स. १८५६ मध्ये येथील नबाबांचे राज्य इंग्रजांनी खालसा केले (सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३१६).

**उत्तर कोशल–दक्षिण कोशल**—काही अभ्यासकांच्या मते सरयू नदीमुळे या देशाचे उत्तर (राजधानी–श्रावस्ती) आणि दक्षिण (राजधानी–अयोध्या) असे दोन उपविभाग बनले होते (लॉ, ए. बी. ओ. आर. आय्. १५.१; डे, पृ. १०३; कनिंग., पृ. ४०७–४०८). ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात, तसेच बौद्ध अवदान शतकात हीच माहिती पुनरुद्धृत केली असून, त्यामधील युद्धाचे वर्णनहि तेथे आढळते (मित्रा, बुद्धिस्ट लिटरेचर इन नेपाळ. पृ. २०). कनिंगहॅम यांचे मते 'उत्तर कोशल' आणि 'बनौध' उपविभाग हेच होत.

अन्य अभ्यासकांच्या मते उत्तर आणि दक्षिण कोशल देशांच्या राजधान्या अनुक्रमे श्रावस्ती आणि कुशावती (पाली-कुशीनारा = उत्तर प्रदेशातील देवरिया जिल्ह्यातील आधु. कसिया) गावी होती (डे, पृ. १०३). वाल्मीकि रामायणमते दाशरथि रामाने स्वराज्याचे अयोध्या आणि कुशावती नामक उपविभाग लवकुशांना दिले (वा. रा. उ. १२०.७; १२१.४–५). परंतु सरयू नदीच्या दक्षिण-

वर्ती दक्षिण कोशल देशाची राजधानी कुशावती येथे असणे भौगोलिक दृष्ट्या असंभव वाटते. वाल्मीकि रामायणमते कुशावतीनिवासी कुश कालांतराने अयोध्या येथे स्थलांतरित झाला असला, तरी त्याच्या काली अयोध्याराज लव, तसेच अंगदीयानरेश अंगद आणि चंद्रचक्रानरेश चंद्रकेतु कुशावतीस आद्य राज्य मानीत असत. यावरून वाल्मीकि रामायणकाली या देशाचे उत्तर आणि दक्षिण विभाग अस्तित्वात नसून बौद्धकाली त्यांची निर्मिती झाली असावी.

पौराणिक साहित्यमते श्रावस्तीसम्राट दिवाकराच्या काली श्रावस्ती आणि अयोध्या उपविभागांचे एकछत्री राज्य पुनः स्थापन झाले ( मत्स्य. २७०.५; वायु. ९९.२८२ ).

**नव्या देशाची निर्मिती**—बौद्धोत्तरकालात विंध्य पर्वताच्या दक्षिणवर्ती 'दक्षिण कोशल' ( महाकोशल ) देशाची निर्मिती होऊन आद्य कोशल देश 'उत्तर कोशल' नावाने प्रसिद्ध झाला. भागवतात या देशाचा निर्देश 'उत्तर कोशल' आणि 'कोशल' वैकल्पिक नावांनी असून ( भा. ५.१९.८; ९.१०.४२ ), कालिदासकृत रघुवंशात दिलीप राजास 'उत्तर कोसलेश्वर' म्हटले आहे ( रघु. ९.१७ ).

पार्गिटर यांच्या मते अयोध्यानरेश दाशरथि राम छत्तिसगढ प्रदेशात वनवासास गेल्यानंतर दक्षिण कोशल देशाची स्थापना झाली असावी ( पार्गि., पृ. २७८ ). परंतु ही वसाहत मध्ययुगीन असण्याची शक्यता अधिक वाटते. महाभारतात, तसेच मध्ययुगीन शिलालेख साहित्यात उत्तर कोशल ( म. स. २७.३; एपि. इंडि. १४.१९६; २४.२९३ ), तसेच भोजकटपुरादि छोट्या राज्यांनी युक्त दक्षिण कोशल देशाचा स्वतंत्र निर्देश आढळतो ( म.स. ३१.१२; कोशल दक्षिण पहा ).

**२.** मार्कंडेयमते पश्चिम भारतातील एक देश ( मार्कं. ५४.५१ ).

**कोशल दक्षिण** ( देश )—ब्रह्माण्ड आणि मार्कंडेय पुराण, तसेच शिलालेख साहित्यमते दक्षिणापथ देशान्तर्गत विंध्य पर्वताच्या पूर्व आणि आग्नेय उतारावरील ब्राह्मणी आणि महानदी नद्यांच्या जलसंचय प्रदेशातील एक जनपद ( एपि. इंडि. ३.३५१-३५४ ). अली यांच्या मते मध्यप्रदेशातील आधु. महाकोशल प्रांताचा उत्तर भाग म्हणजे हे जनपद होय ( अली, पुराणाज़्. पृ. १६० ). कनिंगहॅम यांच्या मते ओरिसाच्या नैर्ऋत्यवर्ती महानदी आणि गोदावरी नद्यांच्या वरच्या खोऱ्यातील आधु. गोंडवन प्रदेश हाच असून, फर्ग्युसन यांच्या मते आधु. छत्तिसगढ प्रदेश याचा बालेकिल्ला होता. पार्गिटर यांच्या मते या प्रदेशातील पंचाप्सरस् सरोवराच्या परिसरात दाशरथि रामाने वनवासाची दहा वर्षे घालविली होती ( जे. आर. ए. एस्., स. १८९४, पृ. २४६ ).

मध्यप्रदेशातील आधु. विलासपुर, रायपुर आणि संबळपुर म्हणजे हा देश असल्याची परंपरागत समजूत असली, तरी व्यापक अर्थाने 'बृहद् दक्षिण कोशल' देशाच्या भौगोलिक परिसीमा पुढीलप्रमाणे होत्या :– **१. पश्चिमेस**– वऱ्हाड; **२ पूर्वेस**– ओरिसा; **३. उत्तरेस**– मेकल टेकड्या; **४. दक्षिणेस**– मध्यप्रदेशातील कंकर गाव.

समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद प्रशस्तिलेखात, तसेच ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात यास 'कोशल' म्हटले असून ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.१२; वॉटर्स, २.२०० ), मध्ययुगीन साहित्यकाली याचे हेच नाव प्रचारात होते ( कोशल पहा ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा ).

**नामव्युत्पत्ती**— फ्लीट यांच्या मते याचे मूळ नाव 'कोसल' असून, उत्तर भारतातील कोशल देशाच्या नामसादृश्यामुळे उत्तरकालात हा त्या नावाने प्रसिद्ध झाला. अजंटा शिलालेखात ( आर्कि. सर्व्हे. वे. इं. ४.१२७ ), तसेच गुप्तसम्राट तीवरदेवाच्या राजिम दानपत्रात ( गुप्त इन्स्क्रि. पृ. २९६ ) 'कोसल' नावानेच याचा निर्देश आढळतो.

**देशविभाग**—पश्चिम चालुक्य नरेश सोमेश्वराच्या कुरुस्पल शिलालेखमते दक्षिणेस वऱ्हाडपासून उत्तरेस ओरिसापर्यंत आणि पश्चिमेस अमरकंटकपासून पूर्वेस बस्तरपर्यंत पसरलेल्या या देशात निम्नलिखित देशविभाग समाविष्ट होते :—**१. उड्र** ( आधु. ओरिसा ); **२. लंजि** ( आधु. बालाघाट ); **३. रत्नपुर** ( आधु. विलासपुर ); **४. लेम्न** ( रायपुर जिल्ह्याच्या पूर्व भागातील आधु. लवन ); **५. वेंगी** ( आधु. कृष्णा–गोदावरी दुआब ); **६. भद्रपट्टन** ( आधु. भांडक ); **७. वज्र** ( बस्तरनजिकचा आधु. वैरागढ; एपि. इंडि. १०.२६–२७ ).

**राज्यविभाग**—मध्ययुगीन शिलालेख साहित्यमते या देशाचे प्रमुख राज्यविभाग ( विषय ) पुढीलप्रमाणे होते :– **१. तेलातट्ट विषय** ( पत्न राज्याच्या दक्षिणेकडील तेल नदीकाठचा प्रदेश; जे. ए. एस्. बी., स. १९०५, पृ. ७ );

## दक्षिण कोशल देशाची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. पौराणिक साहित्य अ. वामन पुराण | कोसल शोकल |
| २. ह्युएन्त्संगचे प्रवासवर्णन | किऔ–स–लो ( कोशल ) |
| ३. शिलालेख साहित्य अ. समुद्रगुप्ताचा अलाहाबाद प्रशस्तिलेख ( गुप्त इन्स्क्रि. पृ. ७ ) | कोशल, कौसलक |
| ब. रत्नदेव ( द्वितीय )चा पारगाव ताम्रपट ( कॉर्पस् इन्स्क्रि. ४.२.६२४) | कोसल |
| क. महाशिव तीवर राजाचे दानपत्र ( एपि. इंडि. २३. १९ ) | महाकोसल |
| ड. सोमेश्वर ( द्वितीय )चा पटना म्युझियम ताम्रपट ( एपि. इंडि. १९.९९ ) | सकल कोशल |
| इ. महाभवगुप्ताचा ताम्रपट ( एपि. इंडि. ११.१०३ ) | कशलोडा विषय |
| ई. लक्ष्मणसेनाचा बिल्हरि शिलालेख ( एपि. इंडि. १. २५४; २.३०५ ) | दक्षिण कोशल |
| उ. दाक्षिणात्य शिलालेख ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. १. ९७ ) | कोशलनाडु, कोशलैनाडु |
| ४. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य ( कल्पद्रु. ६.२३; औणादिक. ३८.७४; ७९; वैजयन्ती. ४२.४४१ ) | कोसल |

२. लावडा विषय ( पत्न राज्यातील बोलनगिरपासून ४८ मैल नैर्ऋत्येकडील आधु. लेब्द ग्राम; एपि. इंडि. ११.२०१ ); ३. पोवा विषय ( बोलनगिरपासून १२ मैल ईशान्येकडील आधु. पौ ग्राम; एपि. इंडि. ११.१९९ ); ४. भ्रांड विषय ( जे. बी. ओ. आर. ए. एस्. २.५३ ); ५ सनूला विषय ( पत्न राज्यातील तलगजपासून २२ मैल नैर्ऋत्येकडील आधु. सोइन्तुला ग्राम; एपि. इंडि. ११.२०० ); ६. मरड विषय ( एपि. इंडि. ३.३५२ ); ७. योधा विषय ( कटकनजिकचा आधु. जोध् परगणा; इंडि. अँटि. ५.५५ ); ८. उत्तरवल्लि विषय ( सोनपुर राज्यातील आधु. उत्तरतीर प्रदेश; एपि. इंडि. १२.२४० ); ९. खंगद्यन्हा विषय ( एपि. इंडि. ३.३५६ ); १०. देवीभोग विषय ( रायपुर जिल्ह्याचा दक्षिण सीमावर्ती प्रदेश; एपि. इंडि. ३.३५७ ); ११. टोक्कारा विषय ( रायपुरच्या १४ मैल पूर्वेकडील आधु. टूक्रा ग्राम; आय्. एच्. क्यू. २०.२४७ ).

**महाभारतात**— युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या दक्षिण दिग्विजयात सहदेवाने हा जिंकला होता ( म. स. परि. १.१३.४ ).

**पौराणिक साहित्यात**-- या साहित्यमते हा दक्षिण भारतातील विंध्याश्रयी देश असून ( ब्रह्माण्ड. १६.६४; मत्स्य. ११४.५३; वायु. ४५.१३३; वामन. १३.५५ ), महाभारतमते निषधराज नलाने विदर्भकन्या दमयंतीला या देशाचा मार्ग दाखविला होता ( म. आर. ५८.२२ ), बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या आग्नेय भागातील या देशात ( बृ. सं. ५.६९; ९.२६; १०.४; १३; १४.८; १६.६; १७.२२; मार्कं. ५५.१६ ) हिऱ्याच्या अनेक खाणी होत्या ( बृ. सं. ८०.६ ).

**समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद प्रशस्तिलेखात**— या शिलालेखमते समुद्रगुप्ताने 'कोसलक' ( कोशलराज ) महेंद्रावर विजय मिळविला होता ( गुप्त इन्स्क्रि. पृ. ७. ). हरिषेण राजाच्या अजंटा शिलालेखात कुंतल, अवंति, लाट, आणि कलिंग देशांसमवेत याचा निर्देश आढळतो ( सरकार, सिलेक्ट इन्स्क्रि. १.४२९–४३१ ).

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**— या ग्रंथमते मध्य भारतातील कलिंग देशाहून ६०० मैल वायव्येकडील हा ( कि–औ–स–लो ) पर्वतवेष्टित आणि अरण्यव्याप्त देश उत्तर कोशलहून सर्वस्वी वेगळा असून, याचे आणि याच्या राजधानीचे क्षेत्रफळ अनुक्रमे एक हजार मैल आणि आठ मैल होते. घनदाट लोकवस्तीची अनेक नगरे येथे असून, येथील लोक कृष्णवर्णीय, उंचेपुरे, शूर परंतु उतावीळ स्वभावाचे होते. येथील क्षत्रिय राजा बौद्ध धर्मानुसारी असून, येथे १०० बौद्ध मठ, ७० हिंदु देवमंदिरे आणि १००० महायान भिक्षू होते.

**बौद्ध स्थाने**— ह्युएनत्संगच्या मते येथे निम्नलिखित बौद्ध स्थाने होती :—

( १ ) **नागार्जुन संघाराम**—राजधानीच्या दक्षिणेकडील सातवाहन राजांनी भ्रामरगिरि ( आधु, श्रीशैल ) निवासी नागार्जुनाप्रीत्यर्थ बांधलेल्या या संघारामात अशोक-निर्मित बुद्धप्रवचनस्मृतिस्तूप होता. जलपरिपूर्ण कुंभ-प्रदर्शनाने स्वतःचा ज्ञानसंभार दाखविणाऱ्या गर्विष्ठ

नागार्जुनाला येथे देव बोधिसत्त्वाने सुईच्या अग्राची प्रतिभेट देऊन खजिल केले होते.

ह्युएन्त्संगच्या मते येथील राजाची आयुर्मर्यादा नागार्जुनाशी संलग्न असल्याने तो त्याची प्राणपणे काळजी घेत असे. कालांतराने येथील राजपुत्राच्या प्रार्थनेवरून नागार्जुनाने तृणपर्णाने स्वतःचा शिरच्छेद करून देहत्याग केला.

(२) **भ्रामरगिरि बौद्ध मठ**—राजधानीच्या ६० मैल पूर्वेकडील भ्रामरगिरि पर्वतावर सातवाहन राजनिर्मित हा बौद्ध मठ होता ( भ्रामरगिरि पहा ). येथून १८० मैल दक्षिणेस गेल्यानंतर ह्युएन्त्संग आंध्र देशास पोहोचला ( वॉटर्स, २.२००–२०८; बील, ४.४१४–४२० ).

**शिलालेख साहित्यात**—जाजल्लदेवाच्या रत्नपुर शिलालेखमते 'दक्षिण कोशल मंडल' नामक मर्यादित राज्यविभागाची राजधानी तुम्माण ( बिलासपुर जिल्ह्यातील आधु. तुमन ) गावी असून, त्याच्या परिसरात निम्नलिखित राज्यविभाग होते :–**१. आंध्र मंडल; २. खिम्डि मंडल** ( गंजम जिल्ह्यातील आधु. खिम्डि प्रदेश ); ३. **वैरागर** ( चांदा जिल्ह्यातील आधु. वैरागढ ); ४. **चाहंद** ( आधु. चांदा ); ५. **लंजिक** ( बालाघाट जिल्ह्यातील आधु. लंजि ); ६. **भाणार** ( नागपूरपासून ३८ मैलांवरील आधु. भंडारा ); ७. **तभारि**; ८. **दंडकपुर** ( आधु. बस्तर प्रदेश ); ९. **नंदावली**; **१०. कुक्कुट** ( बस्तरराजधानी जगदाळपुरनजिकचे आधु. चित्रकूट; एपि. इंडि. १.३२–३९ ).

तीवरदेव राजाच्या गंजम ताम्रपट ( इ. स. ८ वे शतक ) मते 'दक्षिण कोशलमंडला'च्या परिसरातील देशविभाग पुढीलप्रमाणे होते :–**१. अमरवद्र** ( आधु. बर्म प्रदेश ); २. **कांतार**; ३. **कुसुमभोग**; ४. **कांदासेर**( आधु. कंकरच्या पूर्वेकडील सिहोआ प्रदेश ); ५. **काकयर** ( मध्यप्रदेशातील आधु. कंकर ); ६. **शरहरागढ** ( रायपुरच्या पूर्वेकडील आधु. सरनगढ; इंडि. अँटि. १७.१३७–१४० ).

**हैहय शिलालेखात**—जाजल्लदेवाच्या रत्नपुर शिलालेखमते पूर्वकालीन हैहय राजाने हा देश जिंकून, तुम्माण ( बिलासपुर जिल्ह्यातील आधु. तुमन ) गावी आपली राजधानी स्थापिली ( एपि. इंडि. १.३४ ). यावरून हैहय राज्यकाली मध्यप्रदेशातील आधु. बिलासपुर जिल्हा या देशाचा बालेकिल्ला असावा.

**सोमवंशीय शिलालेखात**—महाकोशलाधिपती सोमवंशीय राजांच्या ( स. ९५०–११२५ ) मध्यप्रदेशातील उपलब्ध शिलालेखांवरून त्यांचे राज्य महानदी-खोऱ्याच्या दक्षिण भागातील आधु. रायपुर, सोनपुर, पत्न, सरनगढ, आणि संबळपुर प्रदेशात असावे. तीवरदेवपासून महाशिवगुप्त बालार्जुन राजापर्यंतच्या या राजवंशाची, राजधानी श्रीपुर ( रायपुर जिल्ह्यातील महानदीकाठचे आधु. सिरपुर ) गावी होती.

**अन्य शिलालेखात**—लक्ष्मण-राजाच्या बिल्हरि शिलालेखमते त्याने हा जिंकला असून ( एपि. इंडि. १. २५४; २.३०५ ), महानन्न राजाच्या आडभार शिलालेखमते ( इ. स. ६ वे शतक ) त्याचा पिता महाशिव तीवरराज हा या ( सकलकोसल ) देशाचा अधिपती होता. ( एपि. इंडि. ३१.२२० ). तीवरदेवाच्या बलोद ताम्रपटमते ( इ. स. ८ वे शतक ) तो कोसलाधिपती असून ( एपि. इंडि. ७.१०३ ), शिवगुप्त बलार्जुनाच्या सेनाकपाट ताम्रपटमते ( इ. स. ७ वे शतक ) या देशावर पांडुवंशीय राजांचे राज्य होते ( एपि. इंडि. ३१.३२ ). भौमकार राजा शुभाकर ( चतुर्थ ) च्या बौध ताम्रपटमते या ( कोसल ) देशाच्या सोमवंशीय राजांशी त्याचे विवाहसंबंध होते ( एपि. इंडि. २९.१९१; २११ ).

चोल राजा राजेंद्र ( प्रथम )च्या स. १०२३ च्या तिरुमलै टेकडी शिलालेखमते त्याने या देशान्तर्गत ययातिनगरनिवासी सोमवंशीय धर्मपाल राजाचा पराजय केला होता ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. १.९५;एपि. इंडि. ९.२२९; २९.४७ ). कलचुरि राजा रत्नदेव ( द्वितीय )च्या स. ११३४ च्या पारगाव ताम्रपटमते यामध्ये वोडला ग्राम असून ( कॉर्पस् इन्स्क्रि. ४.२.६२४ ), दाक्षिणात्य शिलालेखात यास 'कोशलनाडु' ( कोशलैनाडु ) म्हटले आहे ( साऊथ इंडि. इन्स्क्रि. १.९७ ).

**मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात**—या साहित्यात 'कोशल' आणि 'कोसल' वैकल्पिक नावांनी याचा निर्देश आढळतो ( नामांतर–परिपत्रक पहा ).

**नगरे**—सोमवंशीय राजांच्या शिलालेखमते या देशात निम्नलिखित प्रमुख नगरे होती :—१. **श्रीपुर** ( रायपुर जिल्ह्यातील आधु. सिरपुर; एपि. इंडि. २२.१७ ); २. **शरभपुर** ( रायपुर जिल्ह्यातील आधु. संबळपुर, सरनगढ अथवा सर्पगढ; एपि. इंडि. २३.१९ ); ३. **सतल्लमा** ( संबळपुर जिल्ह्यातील आधु. सतल्म; एपि. इंडि. ११. १०३ ); ४. **निविन्ना** ( सोनपुर जिल्ह्यातील आधु. निविन्ना; एपि. इंडि. ११. १०३ ); ५. **स्वर्णपुर** अथवा **पट्टन–सुवर्णपुर** ( महानदी–तेल संगमावरील आधु. सोनपुर; जे.

बी. बी. आर. ए. एस्., स. १९१६,पृ. ४५ ); ६. लिंजिर ( ओरिसातील सरनगढ प्रदेशात; एपि. इंडि. २२.१३६ ); ७. **मूरसीम** ( सरनगढ प्रदेशातील आधु. मुर्सिंगग्राम; एपि. इंडि. ११.१०२; १९८ ); ८. **वोडला** ( आधु. छत्तिसगढ परगण्यात; कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.६२४ ).

**राजधान्या**—शिलालेख साहित्यमते या देशाच्या निम्न-लिखित राजधान्या होत्या :— १. **सुवर्णपुर** अथवा **स्वर्णपुर** ( महानदी–तेलसंगमावरील आधु. सोनपुर; सोमवंशीय महाशिवगुप्ताचा शिलालेख; इंडि. अँटि. स. १९३३, पृ. १६१–१६६ ); २. **तुम्माण** ( बिलासपुर जिल्ह्यातील आधु. तुमन; हैहय राजा जाजल्लदेवाचा रत्नपुर शिलालेख; एपि. इंडि. १.३४ ).

**मतांतरे**—याच्या राजधानीविषयी अभ्यासकात निम्न-लिखित मतांतरे आढळतात :— १. **भद्रपट्टन**—फर्ग्युसन आणि रायबहादुर हिरालाल यांच्या मते याची राजधानी भद्रपट्टन ( चांदा जिल्ह्यातील आधु. भंडक ) गावी असावी ( जे. आर. ए. एस्. ६.२६०; इंडि. अँटि.,स. १९३३, पृ. १६१ ). येथे पुरातन तटबंदीचे अवशेष आजहि आढळतात ( कनिंग., पृ. ५२० ); २. **बांधोगढ**—जयचंद्र यांच्या मते स. १९१ मध्ये याची राजधानी छत्तिसगढ प्रदेशान्तर्गत रेवा संस्थानातील बांधोगढ गावी होती ( जयचन्द्र, पृ. १९९ ).

**कोशला** ( नगर )—महाभारत पुलस्त्ययात्रामते एक पवित्र नगर. येथे ऋषभ तीर्थ आणि काल तीर्थ नामक तीर्थे होती ( म. आर. ८३.१०–११ ).

२. वामनमते ' अयोध्या ' नगरीचे नामांतर. येथील वामनाचे नाव महादेव होते ( वामन. ९०.२९; अयोध्या पहा ).

३. ( देश ) वायुमते ' दक्षिण कोशल ' देशाचे नामांतर ( वायु. ८८.१९९; कोशल दक्षिण पहा ).

**कोशवर्धन** ( पर्वत )—गुप्त सम्राट आदित्यसेनाच्या अफसंद शिलालेखमते पश्चिम भारतातील एक हनुमत् उड्डाणपुनीत पर्वत ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.२०५ ). राजस्थानातील शेरगढ बौद्ध शिलालेखमते येथे एक दुर्ग होता ( इंडि. अँटि. १४.४६ ). वाल्मीकि रामायणातील हनुमत्उड्डाणाच्या तीन पर्वतांपैकी हा एक असावा.

**कोशाम्ब-पट्टल** ( देश )—कल्चुरिनरेश कर्णच्या स. १०४७ च्या गोहरवा ताम्रपटमते उत्तर प्रदेशातील ' कौशांबी ' नगराचे नामांतर ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१. २५५; कौशांबी १. पहा ).

**कोशिकी** ( तीर्थ )—नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( मत्स्य. १९४.४० ).

**कोषाचीग्राम** ( ग्राम )—यादव राजांच्या शके १०२० च्या अश्वि ताम्रपटमते महाराष्ट्रान्तर्गत सेऊण देशातील संगेमनेरे ८४ उपविभागातील ( आधु. संगमनेर तालुका ) एक ग्राम ( ओ. बी. आय्. एस्. एम्. ३.१. १३ ). संगमनेर तालुक्यातील कोंकणगावच्या ४ मैल आग्नेयेकडील आधु. कोंचीगाव हेच होय ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २७६ ).

**कोष्टेश्वर** ( तीर्थ )—कुरुक्षेत्रातील एक तीर्थ ( म. आर. ८१.४६ ).

**कोष्ठवत्** ( पर्वत )—महाभारतमते एक पर्वत ( म. आश्व. ४३.४ ).

**कोसङ्ग** ( दुर्ग )—कलचुरि राजा वहरच्या कोसगैन शिलालेखमते मध्य प्रदेशातील एक दुर्गराजधानीनगर. मुसलमानी आक्रमणानंतर कलचुरि राजांनी आपली राजधानी रत्नपुरहून येथे हलविली ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.५५९ ). बिलासपुरपासून ४ मैल ईशान्येकडील आधु. कोसगैन गाव हेच होय.

**कोसम्बकुटी** ( कुटी )—कुशाणकालीन सहेत्–महेत् बोधिसत्त्व-मूर्तिलेखमते श्रावस्ती येथील जेतवन विहारांनजिकची एक बुद्धवास्तव्यपुनीत कुटी ( जे. ए. एस्. बी. ६७.२७४; एपि. इंडि. ८.१७९ ).

**कोसम्बी** ( नगर )—भर्हुत शिलालेखमते उत्तर भारतातील ' कौशांबी ' नगराचे नामांतर ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.२.३४; कौशांबी १. पहा ). अन्य नामांतर ( शिलालेख साहित्य )–' कोसम्ब पट्टल. '

**कोसम्बी** ( ग्राम )—कलचुरि राजा जाजल्लदेव ( द्वितीय ) च्या स. ११६७ च्या मल्लार शिलालेखमते मध्य प्रदेशातील एक ग्राम. मिराशी यांच्या मते हे 'कोसंधी' चे अपभ्रष्ट रूप असून, बिलासपुर जिल्ह्यातील मल्लारपासून ८ मैलांवरील आधु. कोसांडिह गाव हेच असावे ( कॉर्पस्. इन्स्क्रि ४.२.५१३ ).

**कोसल** ( देश )—पाणिनीच्या गणपाठमते उत्तर भारतातील ' कोशल ' देशाचे नामांतर ( पा. सू. ४.१. १७१; कोशल १. पहा ).

२. मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते मध्य भारतातील ' दक्षिण कोशल ' देशाचे नामांतर ( कल्पद्रु. ६.२३; वैजयन्ती. ३८.७४; कोशल दक्षिण पहा ).

**कोसला** ( नगरी )—महाभारतमते उत्तर प्रदेशातील

' अयोध्या ' नगरीचे नामांतर ( म. आर. परि. २४.१.४७; अयोध्या पहा ).

२. पद्ममते अयोध्यासमीपवर्ती कालिंदी (यमुना) उपनदी ' सरयू ' नदीचे नामांतर ( पद्म. आदि. ३९.११; उत्तर. १९६.११; २०६.१३; २०७. ३५–३६; २०८. २७; सरयू पहा ).

३. ( देश ) वाकाटकनरेश नरेंद्रसेनाच्या शिलालेखमते उत्तर प्रदेशातील ' कोशल ' देशाचे नामांतर ( एपि. इंडि. ९.२७१; कोशल १. पहा ).

४. ( नदी ) मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते कुरुक्षेत्रान्तर्गत ' सरस्वती ' ( आधु. घग्गर ) नदीचे नामांतर ( शब्दरत्न. ४९.१०३; सरस्वती पहा ).

**कोसि** ( तीर्थ )—व्रजमंडलान्तर्गत ( आधु. मथुरा-वृंदावन ) एक तीर्थ. येथील ' रत्नाकर कुंड, ' ' माया कुंड ' ' विशाखा कुंड ' आणि ' गोमती कुंड ' नामक जलकुंड-स्थानी चैत्र शुद्ध द्वितीया आणि आश्विन शुद्ध दशमीला यात्रा भरते ( ती. प्र. १०४ ).

**कोसिका** ( पर्वत )—बौद्ध अपादानमते हिमाल्यानजिकचा एक पर्वत ( अपादान. पृ. ३८१ ).

**कोसिकी** ( नदी )—बौद्ध जातकमते पूर्व भारतातील ' कौशिकी ' नदीचे नामांतर ( जा. ५.२; कौशिकी पहा ).

**कोसुम्बारण्य** ( वन )—सौराष्ट्र देशातील द्वारका–मथुरा मार्गावरील हस्तिकल्प नगराच्या दक्षिणेकडील कृष्णनिर्याणस्थान, एक वन. यादवीनंतर सांबादिकांच्या दहनानंतर मथुरागामी बलराम व श्रीकृष्ण येथे थांबले असता जर नामक व्याधाचा बाण पायास लागून कृष्णाचे निर्याण झाले.

**कोहल** ( लोकसमूह )—बृहत्संहितामते हिमालय पर्वताच्या पायथ्यानजिकचा एक लोकसमूह ( बृ. सं. १४.२७; मार्कं. ५५.४५ ). नामांतर ( पौराणिक साहित्य )–' कौहल '. चौधरी यांच्या मते हे कुलूत ( आधु. कुलू खोरे ) देशनिवासी असावेत ( कुलूत पहा ). अन्य अभ्यासकांच्या मते हे ' कोशल ' देशाचे नामांतर असावे ( कोशल १. पहा ).

**कोहाटोया** ( ग्राम )—धर्मारण्यातील एक ग्राम ( स्कन्द. ब्राह्म. ध. २९.२८० ).

**कोहेच** ( ग्राम )—धर्मारण्यातील एक ग्राम ( स्कन्द. ब्राह्म. ध. ३५.३९ ).

**कोळ** ( बौद्ध गुफा )—कोकण प्रांतातील महाडच्या आग्नेयेकडील बौद्ध गुफास्थान. येथील महाड गुफांसदृश उद्ध्वस्त गुफा उत्तर आणि दक्षिण उपविभागात विभागल्या असून, त्यांचा मूळ आकार आज नष्ट झाला आहे.

गुफालेख—येथील गुफालेख क्र. ३, ४ आणि ५ मध्ये संघरक्षित नामक श्रेष्ठी, तसेच आम्रातकर्ष ग्रामनिवासी शिवदत्त आणि त्याची पत्नी धर्मश्रीचे देणगीलेख आढळतात ( बर्जेस, आर्कि. सर्व्हे. वे. इं. ४.८९ ).

**कोळगाव** ( महानुभाव तीर्थ )—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभाव तीर्थ. बुलडाणा जिल्ह्यातील चिखली तालुक्यातील दोड विहीरा गावाच्या ७ मैल पश्चिमेकडील आधु. कोळेगाव हेच होय ( स्था. पृ. ७० ).

**कोळत्तूर** ( तीर्थ )—केरळमधील त्रिवेंद्रमपासून ९ मैलांवरील एक तीर्थ. येथे धर्माधर्म नामक जलकुंड आहे ( ती. पृ. ३९५ ).

**कोळिय** ( गणराज्य )—पाली साहित्यमते कोशल देशान्तर्गत ' कोलिय ' गणराज्याचे नामांतर ( कोलिय पहा ).

**कोळ्ळिडम्** ( नदी )— शिलालेख साहित्यमते श्रीरंगमनजिकच्या द्विभाजित कावेरी नदीचा उत्तरेकडील प्रवाह ( एपि. इंडि. २९.७४; कावेरी पहा ).

**कौ–चॅङ्ग** ( देश ) — ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णमते मध्य आशियातील चीनच्या पश्चिमसीमावर्ती एक देश. आधु. तुर्फान् गावासभोवतालचा प्रदेश हाच असून, त्याची राजधानी ' कियौ-हो ' ( तुर्फानच्या ४ मैल पश्चिमेकडील आधु. यर्खोतो ) गावी होती. ह्युएन्त्संगच्या काळी चीनहून मध्य आशियामार्गे भारताप्रत जाणारा हमरस्ता याच्या उत्तरेकडील कगनस्तूप ( तुर्फान्च्या उत्तरेकडील आधु. बिश्बलिक, ) गावावरून जात असे. याच्या पूर्व सरहद्दीवर ' पिह-लि ' ( हमि आणि तुर्फान्च्या दरम्यानचे आधु. पिह-चॅन ) नामक अन्य एक गाव होते.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात** — येथील कू-वेन्-तै नामक तुर्की राजाच्या आज्ञेवरून ह्युएन्त्संग असतुं ( इ-गु ) गावाहून याच्या पूर्व सीमावर्ती ' पिह-लि ' गावी, आणि नंतर कियौ-हो राजधानीस आला. तेथे एक महिनाभर राहून तो स. ६२९ मध्ये ' अ-कि-नि ' ( अग्नि ) देशास गेला.

स. ६३९ मध्ये चिनी सम्राट तै-त्सुंगने हा चिनी साम्राज्यास जोडला. त्यामुळे ह्युएन्त्संगने आपले प्रवास-वर्णन याच्या पश्चिमेकडील अग्नि देशापासून सुरू केले आहे ( वॉटर्स, १.४५ ).

**कौ–लि** ( ग्राम ) — ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते

उत्तर भारतातील 'कोटिग्राम'चे नामांतर (कोटिग्राम पहा).

**कौ-लो** (देश) — ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते 'उत्तर कुरु' देशाचे नामांतर (कुरु उत्तर पहा).

**कौअङ्गक** (नगर)— टॉलेमीच्या मते भारतवर्षातील एक नगर (अक्षांश ३१°–३०′ उत्तर; रेखांश १३८°–२०′ पूर्व). मॅक्रिंडलच्या मते हे संभवतः 'कनकावती' नगरीचे ग्रीक नामांतर असावे (कनकावती पहा).

**कौकण** (लोकसमूह) — बृहत्संहितामते पश्चिम भारतातील 'कोंकण' लोकसमूहाचे नामांतर. अन्य नामांतर (मध्ययुगीन शब्दकोश साहित्य)– 'कौंकण' (कोंकण पहा).

**कौकुट्टक** (देश)— दक्षिण भारतातील 'कोकुट्टक' देशाचे नामांतर (कोकुट्टक पहा).

**कौकुर** (लोकसमूह)—महाभारतमते मध्य भारतातील 'कुकुर'लोकसमूहाचे नामांतर (म. स. ४८.१४; कुकुर पहा).

**कौस्कदीवह** (ग्राम) — पतंजलीच्या व्याकरण-महाभाष्यमते वाहीक देशातील एक ग्राम (पतञ्जलि. २.२९३–२९८).

**कौङ्कण** (देश व लोकसमूह)— बृहत्संहिता आणि काव्यमीमांसामते पश्चिम भारतातील 'कोंकण देश व लोकसमूहा'चे नामांतर (बृ. सं. १६.११; काव्यमी. १७. २२६; कल्पद्रु. ७.२४; कोंकण पहा).

२. (देशविभाग) स्कंदमते भारतवर्षातील एक देश-विभाग. यामध्ये ३६ हजार (षट्त्रिंशत् सहस्र) गावे होती (स्कन्द. माहेश्वर. कौ. ३९.१४३).

३. (ब्रह्मदेवस्थान) पद्ममते एक ब्रह्मदेवस्थान. येथील ब्रह्मदेवाचे नाव भद्राक्ष होते (पद्म. आदि. २९.१४२).

**कौञ्च** (पर्वत)—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते दक्षिण भारतातील 'क्रौंच' पर्वताचे नामांतर (त्रिकाण्ड. ३५.३; क्रौंच ५. पहा).

**कौठार** (बृहद्भारतीय देश)—आग्नेय आशियान्तर्गत चंपा (आधु. इंडोचीन) देशातील इ. स. १ ल्या शतका-तील स्वतंत्र भारतीय वसाहतद्वयापैकी एक (जयचन्द्र, इतिहास प्रवेश. पृ. १८३).

**कौणिन्द** (लोकसमूह)—बृहत्संहितामते ईशान्य भारतातील 'कुणिंद' देशनिवासी एक राजशासित लोक-समूह (बृ. सं. १४.३०. ३४; कुणिंद १. पहा). पाठभेद-'कौलिंद' (बृ. सं. ४.२४); 'कौलिम्द' (बृ. सं. १४.३३); 'कौलिम्द्र' (बृ. सं. १४.३०).

**कौण्डिण्य–आश्रम** (आश्रमस्थान)—पश्चिम भारता-तील हस्तिमती–साभ्रमती नद्यांच्या संगमावरील कौंडिण्य ऋषींचे आश्रमस्थान. हे वाहविणाऱ्या नद्यांना त्या ऋषींनी शुष्क होण्याचा शाप दिला.

**कौण्डिण्य सरोवर** (सरोवर)—नीलमतमते कश्मी-रातील 'क्रमसरस्' सरोवराचे नामांतर (नीलमत. १४८३; क्रमसरस् पहा).

**कौण्डिण्या** (नदी)—नीलमतमते कश्मीरातील क्रम-सरस् सरोवरापासून उगम पावणारी वितस्ता नदीची एक पवित्र उपनदी (नीलमत. १४९४).

**कौण्डिन्यपुर** (नगर)—धरसेन (द्वितीय) च्या स. ५७३ च्या अंतिय ताम्रपटमते सुराष्ट्रातील एक ग्राम. दक्षिण काठेवाडातील आधु. कोडिनार गाव हेच होय (एपि. इंडि. २१.१७९-१८०).

२. कर्नाटकातील 'कोंडवीडु' दुर्गस्थानाचे नामांतर (कोंडवीडु पहा).

३. विदर्भातील 'कुंडिनपुर' नगराचे नामांतर (कुंडिन-पुर पहा).

**कौण्डोपरथ** (आयुधजीवी संघ)—काशिकामते त्रिगर्त (आधु. कांग्रा) देशातील 'त्रिगर्तषष्ठ' संज्ञक आयुधजीवी लोकसमूहांपैकी एक (पा. सू. ५.३.११६).

**कौथुम** (लोकसमूह)— कुम्रहार खरोष्ट्री मृत्तिका-शिल्पलेखमते वायव्य भारतातील एक लोकसमूह. यापैकी (कौथुमस) संघदास नामक व्यक्तीचा देणगीलेख या शिल्पावर आढळतो (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.१७८).

**कौनट** (तीर्थ)—वामनमते एक तीर्थ (वामन. ५१. ५३).

**कौन्तलपुर** (नगर)—दक्षिण भारतातील 'कुंतलक-पुर' नगराचे नामांतर (कुंतलकपुर पहा). अन्य नामांतर—'कौंतलकपुर.'

**कौपिल्य** (नगर)—मध्ययुगीन शब्दकोश साहित्य-मते उत्तर भारतातील 'कांपिल्य' नगराचे नामांतर. अन्य नामांतर–'कौपिल्ल' (कल्पद्रु. ७.२५; कांपिल्य पहा).

**कौब** (नगर)—टॉलेमीच्या मते पश्चिम भारतातील एक नगर (अक्षांश १५° उत्तर; रेखांश ११७° पूर्व). मॅक्रिंडल यांच्या मते गोवाराजधानी आधु. गोवा नगर हेच असावे.

**कौबेर तीर्थ** (तीर्थ)—मथुरेच्या उत्तरवर्ती एक तीर्थ (वराह. १६४.३).

२. महाभारत बलराम-सरस्वतीतीरयात्रामते सरस्वती

नदीकाठचे कुबेरवनस्थान, एक तीर्थ. येथील शिवतपस्येमुळे कुबेराला धनाधिपत्व, लोकपालकत्व, देवत्व, हंसयुक्त पुष्पकविमान, तसेच नलकूबर नामक पुत्र आणि विपुल धन प्राप्त झाले. नामांतर–'कुबेर तीर्थ' (म. श. ४६. २२–२८).

**कौमार** (कुंड)—गौतमी (गोदावरी) नदीकाठचे एक जलकुंड (ब्रह्म. १००.२).

२. (क्षेत्र) दक्षिण भारतातील 'सुब्रह्मण्यक्षेत्रा'चे नामांतर (सुब्रह्मण्यक्षेत्र पहा).

३. (सर) ब्रह्माण्डमते एक श्राद्धयोग्य तीर्थ. नामांतर 'कुमारतीर्थ' (ब्रह्माण्ड. ३.१३.८६).

**कौमारक** (नदी)—क्षेत्रसमासमते गंगा नदीखोऱ्यातील एक नदी. गंगा नदीच्या त्रिभुज प्रदेशातून वहात जाऊन बरगंगा खाडीस मिळणारी आधु. कोब्बरक नदी हीच होय. टॉलेमीच्या मते गंगा नदीचे तृतीय मुख हिने बनले होते. नामांतर (टॉलेमी)– 'कंबेरिखोन.'

**कौमारवर्ष** (वर्ष)—शाकद्वीपातील एक वर्ष (म. भी. १२.२४; वायु. ४९.८६; ब्रह्माण्ड. १९.९२; मत्स्य. १२२.२२; लिङ्ग. ४६.२५).

**कौमारिका खण्ड** (देश विभाग)–स्कंदमते भरतखंडाच्या नऊ उपविभागांपैकी एक (स्कन्द. माहेश्वर. कौ. ३९.११३). पश्चिम भारतातील आधु. खंबायत प्रदेश हाच असून, पारियात्र पर्वताच्या पश्चिमेकडील महीसागरसंगम प्रदेश यामध्ये समाविष्ट असे.

**उत्पत्ती**—स्कंदमते ऋषभपौत्र आणि भरतपुत्र शतशृंग राजाने भरतखंडाच्या स्वराज्याचे नऊ विभाग करून, ते इंद्रद्वीपादि आठ पुत्र आणि कुमारी नामक कन्या यांमध्ये वाटले. यापैकी 'कुमारी' नामक कन्येच्या नावावरून यास हे नाव मिळाले.

उत्तरकालात कुमारीने आपल्या आठ बंधूंच्या प्रत्येकी नऊ पुत्रांमध्ये (एकूण पुत्रसंख्या–७२) स्वतःच्या कौमारिका खंडासह भारतवर्षाच्या नऊ भागांचे राज्य समप्रमाणात वाटले. भारतवर्षाच्या या बहात्तर उपविभागांची सविस्तर माहिती आम्ही 'भारतवर्ष' मध्ये दिली आहे (भारतवर्ष पहा).

**शिवतपस्या**—येथील स्तंभतीर्थावर कुमारीने शिवतपस्या करून तत्रस्थ शिवमंदिराचा जीर्णोद्धार केला. या तपस्येच्या फलस्वरूप कुमारीश शिवाने महाकाल नामक तपस्यामग्न सिद्धाशी तिचा विवाह करवून तिला रुद्रलोकी नेले.

**कौमुइया** (लोकसमूह)—खरोष्ट्री शिलालेखमते वायव्य भारतातील 'कांबोजक' लोकसमूहाचे शकभाषीय नामांतर (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.१.३६; कांबोजक पहा).

**कौमुद** (वन)—जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वतावरील एक वन (लिङ्ग. ४९.५९).

**कौमेदुर** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू. ४.३.६९).

**कौरञ्ज** (पर्वत)—जंबूद्वीपान्तर्गत भद्राश्व वर्षातील एक पर्वत (मार्कं. ५९.५).

**कौरभ** (लोकसमूह)—वामनमते उत्तर भारतातील 'कंक' लोकसमूहाचे नामांतर (वामन. १३.३६; कंक पहा).

**कौरव** (लोकसमूह)—बृहत्संहिता आणि वामनमते उत्तरापथातील कुरु देशनिवासी एक लोकसमूह (बृ सं. ४. २५; ९.३०; ११.५७; वामन. १३.३६; कुरु पहा).

२. बौद्ध साहित्यमते वैशाली येथील वृजि (वज्जि) संघराज्यान्तर्गत एक लोकसमूह. यांच्या उत्पत्तीविषयी अभ्यासकांत निम्नलिखित मतांतरे आढळतात :—

(१) **पांडु आणि भीम यांचे वंशज**–महाभारतमते पांडु राजाने, तसेच भीमाने पूर्व भारतातील विदेह, गंडक, आणि कौशिकी–कच्छ देश जिंकले असून (म. स. २९.४; ३०.२२), त्याच वेळी कुरु लोकांची वैशाली येथील ही वसाहत स्थापन झाली असावी.

(२) **निचक्षु राजाचे वंशज**—निचक्षु–राज्यकालीन हस्तिनापुरविनाशानंतर वत्स देशान्तर्गत कौशांबी येथील कुरु वसाहतीसमवेतच ही स्थापन झाली असावी.

(३) **बौद्धकालीन वसाहत**—रॉयचौधरी यांच्या मते उपस्त चाक्रायण आदि कुरुदेशीय ब्राह्मण बौद्धपूर्वकालापासूनच मिथिला येथे रहात असून, वैशालीनिवासी कौरव हे त्यांचेच वंशज होत (रॉयचौधरी, पृ. १२०).

**कौरवेश्वरी** (देवी)—प्रभासक्षेत्रातील एक देवीस्थान (नारद. उत्तर. ७०.७८; स्कन्द. प्रभास. प्र. ३५०).

**कौरी** (भूशिर)—टॉलेमीच्या मते दक्षिण भारतातील 'धनुष्कोटि' तीर्थाचे नामांतर (धनुष्कोटि तीर्थ पहा).

**कौरेल्लौर** (ग्राम)—टॉलेमीच्या मते केरळमधील बर्डास् आणि स्यूडोस्टोमस् नगरांच्या दरम्यानचे एक ग्राम (अक्षांश १७°–३१′ उत्तर; रेखांश ११९° पूर्व). याचे आधुनिक स्थान समजत नाही.

**कौरौल** (नगर)—टॉलेमीच्या मते दक्षिण भारतातील एक नगर (अक्षांश १६° उत्तर; रेखांश १२८°

पूर्व ). यूल यांच्या मते आधु. कारीकल गाव हेच असावे.

**कौर्णिकी** ( नदी )—भारतवर्षातील एक नदी ( पद्म. आदि. ६.२४ ).

**कौर्परिक** ( ग्राम )—हस्तिन् राजाच्या स. ४८२ च्या खोह ताम्रपटमते मध्य भारतान्तर्गत बाघेलखंडातील एक अग्रहार ग्राम. याच्या भौगोलिक परिसीमा पुढीलप्रमाणे होत्या :— १. पूर्वेस–कोर्परगर्ता; २. उत्तरेस–अनिमुक्त-ककोणक आणि वंगर ग्रामे; ३. पश्चिमेस–नागसरी ग्राम. याचे आधु. स्थान समजत नाही ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२. १०४ ).

**कौलक** ( बंदर )—टॉलेमीच्या मते सिंधु नदीकाठचे एक बंदर ( अक्षांश २०°–४०′ उत्तर; रेखांश–११०°–३०′ पूर्व ). अरबी समुद्रकिनारीचे कराचीनजिकचे आधु. करकल्ल गाव हेच होय. अरियनच्या मते या वालुकामय बेटस्थानी निअर्खोस्च्या गलबतांनी काही काळ मुक्काम केला होता. नामांतर ( टॉलेमी )–‘ कौलल ’; ( अरियन )–‘ कौकल ’.

**कौलम्** ( तीर्थ )—दक्षिण भारतातील ‘ कन्यातीर्था ’चे नामांतर ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. १६८; कन्यातीर्थ पहा ).

**कौलल** ( बंदर )—टॉलेमीच्या मते सिंधु नदी-काठच्या ‘ कौलक ’ बंदराचे नामांतर ( कौलक पहा ).

**कौलि** ( बंदर )—टॉलेमीच्या मते मलाया द्वीपकल्पातील ‘ केदह ’ बंदराचे नामांतर ( केदह पहा ).

**कौलिन्द** ( लोकसमूह )— ईशान्य भारतातील ‘कौणिंद ’ लोकसमूहाचे नामांतर ( बृ. सं. ४.२४; कौणिंद पहा ). अन्य नामांतर–‘ कौलिम्द ’; ‘ कौलिम्द्र ’.

**कौलूट** ( देश )—महाभारतमते उत्तर भारतातील ‘ कुलूत ’ देशाचे नामांतर ( कुलूत पहा ). अन्य नामांतर– ‘ कौलूत ’ ( बृ. सं. १०.११; विष्णुधर्म. १.९१० ).

**कौलेश्वरनाथ** ( शिवस्थान )—उत्तर प्रदेशातील विंध्याचलानजिकचे मोगलसराईपासून १२ मैलांवरील सकलडीहा रेल्वेस्थानकानजिकचे एक शिवस्थान ( ती. पृ. १३७ ).

**कौवाडोल** ( टेकडी )—बिहारमधील ‘ शीलभद्र विहार ’ टेकडीचे नामांतर ( पांडे, बिहार. पृ. ४६; शीलभद्र विहार पहा ).

**कौश** ( नगर )—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते मध्यभारतातील ‘ कान्यकुब्ज ’ नगराचे नामांतर ( अभिधान. १३२.९७४; कल्पद्रु. १६.१६; कान्यकुब्ज पहा ).

**कौशल** (लोकसमूह)—बृहत्संहितामते पूर्व भारतान्तर्गत कोशल देशनिवासी एक लोकसमूह ( बृ. सं. १०.१४; कोशल पहा ). नामांतर–‘ कौशलक ’ ( बृ. सं. १४.७ ); ( समुद्रगुप्त शिलालेख )–‘ कौसलक ’ ( गुप्त इन्स्क्रि. पृ. ७; कोशल पहा ).

२. ( राष्ट्र ) भविष्यमते भारतवर्षान्तर्गत एक देश ( राष्ट्र; भवि. प्रति. २.१३ ).

**कौशाम्बी** ( नगर )—पौराणिक साहित्यमते मध्यदेशान्तर्गत वत्स महाजनपदाच्या ( गंगा-यमुना दुआबातील आधु. अलाहाबाद जिल्हा ) राजधानीचे नगर, तसेच सुविख्यात हिंदु आणि बौद्ध तीर्थ. हस्तिनापुरनरेश निचक्षूच्या राज्यकाली ते नगर गंगा नदीजलात वाहून गेल्यानंतर काही काळ कुरुराजधानी येथे स्थलांतरित झाली असून, बुद्धकाली ( इ. स. पू. ६ वे शतक ) वत्सराज उदयन येथील राजा होता. उत्तरकालीन वैदिक साहित्य, वाल्मीकि रामायण, तसेच मेघदूतात उदयनराजधानी म्हणून याचा निर्देश असून, दक्षिण भारतातील प्रतिष्ठान ( आधु. पैठण ); आणि उत्तर भारतातील श्रावस्ती आणि साकेत यांना जोडणारा व्यापारी हमरस्ता याच नगरावरून जात असे.

अलाहाबाद जिल्ह्यातील मंझनपुर तहसिलीतील करारी परगण्यातील करारी गावापासून ८ मैल दक्षिणेकडील आणि अलाहाबादपासून २८ मैल नैर्ऋत्येकडील यमुना नदीच्या पश्चिम किनाऱ्यावरील आधु. कोसम खिराज ( अक्षांश २५°–२०′ उत्तर; रेखांश ८१°–८७′ पूर्व ) गाव हेच होय. कानपुर–अलाहाबाद रेल्वमार्गावरील भरवारी रेल्वेस्थानकापासून १५ मैलांवरील दुर्गस्थानाच्या पश्चिम आणि पूर्व दिशावर्ती कोसम इनाम आणि कोसम खिराज गावांच्या परिसरात हे असावे. ‘ इनाम ’ आणि ‘खिराज’ चा शब्दशः अर्थ ‘ सारामाफीचे ’ आणि ‘ सारा देणारे ’ होतो ( एपि. इंडि. ११.१४१; कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.२६६ ).

**महत्त्व**— अलाहाबाद किल्ल्यातील अशोक-स्तंभलेख ( इ. स. पू. ३ रे शतक ), तसेच समुद्रगुप्त–प्रशस्तिलेख ( इ. स. ४ थे शतक ) युक्त सुविख्यात अशोकस्तंभ मूळ या गावी असून, त्यामधील मजकूर येथील ( पाली–कौसंबी ) महामात्रांना उद्देशून लिहिला आहे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. १.११६; इंडि. अँटि. १९.३०९ ). त्यावरून अशोककाली हे मगध देशाच्या पश्चिमवर्ती स्वतंत्र प्रांताच्या राजधानीचे गाव, तसेच बौद्ध तीर्थ म्हणून सुविख्यात असावे. ह्युएन्त्संगच्या काळीहि ( इ. स. ६ वे शतक ) हीच परिस्थिती कायम होती ( बील, १.२३५;

एपि. इंडि. ११.१४१ ). समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद प्रशस्तिलेखात त्या स्तंभास ' उच्छरितः स्तंभः ( भव्य स्तंभ ) म्हटले आहे.

कनिंगहॅम यांच्या मते दिल्ली–सुलतान फिरोजशहा तुघ्लकाने दिल्लीस हलविलेल्या पंजाबातील तोप्रा आणि उत्तर प्रदेशातील मीरत येथील अशोकस्तंभांप्रमाणेच येथील स्तंभ मोगल बादशहा अकबराने यमुना नदीमार्गे उपराजधानी अलाहाबादला हलविला ( आर्कि. सर्व्हे. १.२९८ ). अकबराची अलाहाबादनिष्क्रमित काही नाणी येथे सापडली असून (ब्रिटिश म्युझियम कॅटलॉग. पृ. ४८.५३), अकबरपुत्र जहांगीर आणि सचिव बिरबलाचे स्तंभलेख अलाहाबाद–कोसम स्तंभावर आढळतात. येथील स्तंभ अलाहाबाद येथे हलविल्यानंतर ते कोरले असावेत. मात्र समुद्रगुप्ताचा अलाहाबाद प्रशस्तिलेख कौशांबी येथेच खोदला असावा.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नगराची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. अशोक स्तंभलेख (कार्पस्. इन्स्क्रि. १.२.१५९ ) | कौसंबी |
| २. भर्हुत शिलालेख ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.२.३४ ) | कौसंबी |
| ३. ह्युएन्‌त्संग ( वॉटर्स, १. ३६५ ) | किऔ–शँग्–मि ( कोशांबी ) |
| ४. शिलालेख साहित्य | |
| अ. वि. सं. १३४५ चा अजयगढ शिलालेख | कौशाम्ब्यपुर |
| आ. खर दुर्गलेख | कौशांबीपुर |
| इ. कनौजनरेश जयचंद्राचे दानपत्र ( इंडि. अँटि. १८.१३ ) | कोसम्ब पट्टल |
| ई. यशपाल राजाचा कर्र शिलालेख ( एपि. इंडि. ११.१४१ ) | कौशांब-मंडल |
| उ. कलचुरि राजा कर्णाचा स. १०४७चा गोहरवा ताम्रपट | कौशम्ब-पट्टल |
| ५. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य ( त्रिकाण्ड. २.१. १४ ) | वत्सपट्टन |
| ६. स्थानिक नामांतर | भीम–की–गदा |

**नामव्युत्पत्ती**— पौराणिक साहित्यमते पुरूरवसपुत्र ' कुशांबस्थापित नगर ' अर्थाने यास हे नाव मिळाले. अशोकाच्या, तसेच भर्हुत शिलालेखातील ' कोसंबी ' हे संस्कृत ' कौशांबी 'चे प्राकृत रूप असून, बौद्ध परमात्थ जोतिकामते ' कोसंब ऋषींचे निवासस्थान ' अर्थाने यास हे नाव मिळाले ( परमात्थ २.३००; सौन्दरानन्द काव्य. पृ. ९ ). अन्य बौद्ध आणि जैन साहित्यमते ' कोशंब वृक्षांचे निर्मूलनस्थान ( प्रपञ्च. २.३८९ ) अथवा उत्पत्तिस्थान ' ( विविधतीर्थ. पृ. २३ ) अर्थाने यास हे नाव मिळाले.

**स्थापना**— महाभारतमते चेदिराज उपरिचर वसूच्या पंचपुत्रांपैकी कुशांब नामक तृतीय पुत्राने याची स्थापना केली ( म. आ. ५७.२८–३० ). वाल्मीकि रामायणमते कुश आणि वैदर्भी यांच्या चार पुत्रांपैकी कुशांब नामक ज्येष्ठ पुत्राने हे स्थापिले ( वा. रा. बा. ३२.१–६ ). पौराणिक साहित्यमते कौरवसम्राट वसूने वत्स देशाचे राज्य कुशांब ( कश ) नामक पुत्रास दिल्याने त्याचे नगर त्याच्याच नावाने प्रसिद्ध झाले ( पार्गि., पृ. ११८ ).

कुरुसम्राट युधिष्ठिरानंतरचा आठवा पुरुष निचक्नूने ( निमिचक्र ) स्वराजधानी येथे स्थलांतरित केल्याने यास नवे महत्त्व प्राप्त झाले ( रॉयचौधरी, पृ. ५८ ). मत्स्यमते हस्तिनापुरच्या गंगाप्रलय–विनाशानंतर अधिसामकृष्णपुत्र निमिचक्र येथे राहू लागला ( मत्स्य. ५० ). मात्र निमिचक्रापूर्वीच हे अस्तित्वात होते. बुद्धसमकालीन वत्सराज उदयनाच्या राज्यकाली विभवशिखरावर पोहोचलेले हे नगर कनौजसम्राट हर्षवर्धनाच्या कालापर्यंत (इ. स. ६ वे शतक) समृद्धावस्थेत राहिले. हर्षदेव (श्रीहर्ष) रचित (इ. स. १२ वे शतक) 'रत्नावली' नाटकाचे सारे कथानक येथेच घडले आहे.

**ब्राह्मण साहित्यात** — या साहित्यमते उद्दालक आरुणीचा प्रोति कौसुरुबिंदि नामक आचार्य ' कौशांबेय ' ( कौशांबीनिवासी ) होता ( श. ब्रा. १२.२.२.१३; गो. ब्रा. १.४.२४ ).

**पाणिनीय व्याकरण साहित्यात**— पाणिनीच्या गणपाठमते हे एक सुविख्यात नगर असून ( पा. सू. ४.२.९७ ), पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यमते ' कौशांबीनिष्क्रमित व्यक्ती, ' निष्कौशांबि ' आणि ' निष्कौशांबिनी ' या पुल्लिंगी आणि स्त्रीलिंगी नावांनी ओळखली जात असे ( **निष्कौशांबी**–पतञ्जलि. १.२१६; ३०१; ३७८; २.५०; **निष्कौशांबिनी**–१.११६ ).

**बौद्ध साहित्यात**—या साहित्यमते वत्सराजधानीचे हे नगर उत्तर भारतातील प्रमुख व्यापारी केंद्र होते. सुत्तनि-

पातमते प्रतिष्ठान → राजगृह → साकेत → श्रावस्ती या व्यापारी हमरस्त्यावर हे असून, महावग्गमते दक्षिण कोशल आणि मगध देशातील मालाचे आणि प्रवाश्यांचे हे विनिमयकेंद्र होते ( विनय. १.३५२ ). राजगृह–वाराणसी नगरांच्या दरम्यानचा यमुना नदीमार्गहि येथूनच जात असून, या मार्गे वाराणसी नगर येथून २३० मैलावर होते.

बुद्धशिष्य आनंदमते बुद्ध परिनिर्वाणयोग्य सहा प्रमुख नगरांपैकी हे एक असून (दीघ. पृ. १४६; १६९), त्याचे मते असंस्कृत आणि ओबडधोबड 'वंश' (वत्स) लोकांचे हे नगर सर्वश्रेष्ठ होते.

येथील घोषित, कुक्कुट आणि पावारिक नामक तीन श्रेष्ठींच्या निमंत्रणावरून श्रावस्ती येथील जेतवननिवासी बुद्ध येथे आला. बुद्धनिवासार्थ या श्रेष्ठींनी 'घोषिताराम', 'कुक्कुटाराम' आणि 'पावरिकाराम' नामक उपवन विहार बांधले असून, उत्तरकालात तेथे, तसेच त्या नजिकच्या 'बदरिकाराम'मध्ये चार स्वतंत्र बुद्धसंघांची स्थापना झाली ( जा. १६ ).

उपरोक्त तीन संघारामांपैकी 'घोषिताराम' बुद्धास विशेष प्रिय असून, त्याने तेथे मद्यपाननिषेधाचे ( जा. १.३६० ), तसेच असूया परित्यागाचे प्रवचन दिले होते ( मज्झिम. १.३२०; ३.१५३ ). बदरिकारामामध्ये त्याने 'त्रिपल्लथ्थमिग जातका'चे प्रणयन केले असून (जा. १.१६०), मंदिस्स आणि जालिय नामक पांथस्थांना तो येथेच भेटला होता ( दीघ. १.१५७ ). बुद्धशिष्य सारिपुत्त आणि उपवाण घोषितारामामध्ये काही काळ राहिले असून ( संयुत्त. ५.७६ ), बुद्धशिष्य आनंदाने येथे अनेक धर्मप्रवचने दिली होती (संयुत्त. ३.१३३; ४.११३). महावंशमते घोषितारामनिवासी तीस हजार बौद्ध भिक्षू उरुधम्मरक्खितच्या नेतृत्वाखाली इ. स. पू. १ ल्या शतकात बौद्ध धर्मप्रसारार्थ सिलोनला गेले होते ( महा. पृ. २२८ ).

येथील पारिलेय्यक्क वनामध्ये बुद्धाने वर्षाकालाचे काही दिवस व्यतीत केले असून ( संयुत्त. ३.९४ ), घोषितारामनजिकच्या पिलक्ख गुहानिवासी संदक परिव्राजकाला बुद्धशिष्य आनंदाने बौद्ध धर्मदीक्षा दिली होती ( मज्झिम. १.५१३ ). कनिष्कसमकालीन बुद्धमित्रा नामक भिक्षुणीने येथे बोधिसत्त्वप्रतिमा स्थापिली होती.

**तिबेटी बौद्ध साहित्यात**—तिबेटी दुल्व ग्रंथमते कौशांबीनरेश उदयनाचे कनकवती नगरावरील संकल्पित आक्रमण बुद्धोपदेशामुळे स्थगित झाले. उदयनपत्नी सामावतीच्या धर्मनिष्ठेमुळे त्या राजाने बौद्ध धर्माचा स्वीकार केला ( रॉकहिल, बुद्धचरित्र. पृ. ७४ ).

**पौराणिक साहित्यात**—बृहत्संहितामते हे एक सुविख्यात नगर असून ( बृ. सं. १६.३ ), पद्ममते येथे महाबोधि नामक ब्रह्मदेवस्थान होते ( पद्म. आदि. २९.१४१ ). कथासरित्सागरमते येथे वत्स देशाची राजधानी होती ( कथा. २.१ )

**जैन साहित्यात**—अभिधम्मपदीपिकामते जैनांच्या चार प्रमुख तीर्थांपैकी हे एक असून ( अभिधम्म. पृ. ३२ ), विविधतीर्थमते येथे यमुना नदीकाठी अनेक पवित्र वने होती ( विविध. पृ. २३ ). सूर्यचंद्रकृत महावीर तपस्यास्थान, तसेच चंदना नामक उपासिकेचे कैवल्यप्राप्तिस्थान म्हणूनहि हे पवित्र मानले जात असे. येथील पद्मप्रभूच्या मंदिरात चंदनाबालेची मूर्ती होती.

आवस्सकनिर्जुति आणि यतिवृषभमते श्रीपद्मप्रभ नामक ६ व्या जैन तीर्थंकराचे हे जन्मस्थान असून ( आवस्सक. ३८२ ), यानजिकच्या पथोसा पहाडावर आषाढसेन राजाने इ. स. पू. २ ऱ्या शतकात गुफा खोदल्या होत्या. उत्तर पुराणमते जयसेन नामक एकादश चक्रवर्ती राजाची राजधानी येथेच होती ( उत्तर. ६९ ). पांडुवंशीय उदयन हा येथील सर्वप्रमुख राजा होता ( ती. सं. पृ. १३५–१३६ ).

**अशोकस्तंभ**—कॅप्टन जेम्स होअर यांच्या मते येथील अलाहाबाद–कोसम अशोकस्तंभ ( एकूण उंची–४२'; जमिनीबाहेरील उंची ३५' ) स. १८०१ मध्ये अलाहाबाद किल्ल्यामध्ये उभ्या अवस्थेत होता. ले. बर्ट यांच्या मते स. १८३४ मध्ये तो आडवा पडला असून, स. १८३८ मध्ये कॅ. एडवर्ड स्मिथ यांनी त्याची पुनःस्थापना केली ( कनिंग., आर्कि. सर्व्हे. १.३०० ).

याच्या घंटाकृती शिरोभूषणाच्या शिरोभागीची अन्य अशोकस्तंभांसदृश सिंहप्रतिमा अलाहाबाद येथे स्थलांतरित होतेवेळी नष्ट होऊन तेथे शंक्वाकृती दगड बसविण्यात आला. तिफेनेयलर नामक पाद्र्याच्या प्रवासवर्णनात ( इ. स. १८ वे शतक ) निर्देशिलेला हा दगडहि सध्या नष्ट झाला असून, त्याऐवजी तेथे ग्रीक शैलीची वर्तुलाकार कमलाची नक्षी आढळते.

**स्तंभलेख**—येथील अशोकस्तंभावर निम्नलिखित स्तंभलेख आढळतात :—

**( १ ) अशोकाचे आज्ञालेख क्र. १–६** —या ब्राह्मी आज्ञालेखातील मजकूर आणि मांडणी तोप्रा स्तंभलेखा-

सदृश असून, स. १८३४ मध्ये प्रिन्सेप यांनी याच दोन अशोकलेखांचे सर्वप्रथम वाचन केले.

(२) **अशोक–राज्ञीलेख**—अशोक–आज्ञालेखाच्या अधोभागीच्या समुद्रगुप्त–प्रशस्तिलेखाच्या उजव्या अंगाकडील या स्तंभलेखात अशोकाची द्वितीय राज्ञी तीवलमाता कालुवाकी (चारुवाकी) हिचा आम्रवन (आंबा–वडिका), बागा (आलम) आणि दानगृह (दानगह) आदींचा देणगीलेख आढळतो.

(३) **अशोकाचा कौशांबी स्तंभलेख**—राज्ञीलेखाच्या वरच्या भागातील या स्तंभलेखात कौशांबीमहामात्रांना उद्देशून कलहप्रवण भिक्षूंना बौद्ध संघामधून हद्दपार (अनावास) करण्याची आज्ञा आढळते.

(४) **समुद्रगुप्ताचा प्रशस्तिलेख**—अशोक–आज्ञालेखांच्या अधोभागीच्या, तसेच अशोक–राज्ञीलेखाच्या डाव्या अंगाच्या चंद्रगुप्त (द्वितीय) निर्मित (स. ३८०) या लेखात गुप्त सम्राट समुद्रगुप्ताच्या पराक्रमांचे सविस्तर वर्णन आढळते.

(५) **जहांगिराचा स्तंभलेख**—अशोकाच्या आज्ञालेख क्र. ५ मधील पंक्ती क्र. १–८ नष्ट करून त्या जागी खोदलेल्या या लेखात (स. १६०५) जहांगीर बादशहाच्या पूर्वजांची नामावली आढळते.

(६) **उत्तरकालीन नागरी स्तंभलेख**—अशोकाच्या सहा आज्ञालेखपंक्तींच्या दरम्यान अस्ताव्यस्तपणे खोदलेले हे लेख ऐतिहासिक दृष्ट्या कुचकामी आहेत (कॉर्पस्. इन्स्क्रि. १.१.१९–२१)

**भर्हुत शिलालेखात**—येथील एका शिलालेखात 'कोसबेयिका वेनुगामिय' (कौशांबी येथील वेणुग्राम-निवासी) धर्मरक्षिता नामक बौद्ध भिक्षुणीचा देणगीलेख आढळतो. ल्यूडर्स यांच्या मते 'कोसंबी' या प्राकृत नगर-नामाचे हे स्त्रीलिंगी रूप असून, वेणुग्राम हे या नगराचे उपनगर असावे (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.२.३४).

**फाहियेनच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते काशीच्या उत्तरवर्ती मृगवनाहून (सारनाथ) १३ योजने (=१०४ मैल) वायव्येस गेल्यानंतर फाहियेन् येथे पोहोचला. अलाहाबादच्या वायव्येकडील आधु. कोसम गावाशी हे वर्णन तंतोतंत जुळते.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते प्रयागच्या १०० मैल नैर्ऋत्येकडील वन्य प्रदेश ओलांडल्यानंतर ह्युएन्त्संग या (किऔ-शँग्-मि) गावी पोहोचला. येथे वर्णिलेले प्रयाग–कौशांबी अंतर अतिशयोक्त आहे.

ह्युएन्त्संगच्या मते या (वत्स) देशाचे आणि त्याच्या राजधानीचे क्षेत्रफळ अनुक्रमे १२०० मैल आणि ६ मैल असून, यांच्या परिसरात दहा उद्ध्वस्त बौद्ध मठ आणि पन्नास हिंदु देवमंदिरे होती. त्यावरून त्याचे काळी येथील बौद्ध पीठाचे महत्त्व नाहीसे झाले असावे.

**बौद्ध वास्तू**—ह्युएन्त्संगच्या मते याच्या परिसरात निम्नलिखित बौद्ध वास्तू होत्या :—

(१) **बौद्ध मंदिर**—येथील दुर्गाच्या (कुंग्) अंतर्भागातील या मंदिरात (उंची–६०′) उदयनस्थापित दगडी छत्रयुक्त चंदनी बुद्धमूर्ती होती. भारतातील बहुतांशी बुद्धप्रतिमांची ही आद्य उद्गात्री असून, तिची एक प्रतिकृती ह्युएन्त्संगपूर्वकाली चीनला पोहोचली होती.

(२) **घोषिताराम**—या नगराच्या आग्नेय कोपऱ्यात घोषितनिर्मित संघारामाचे उद्ध्वस्तावशेष होते.

(३) **वसुबंधु–निवासस्थान**—उपरोक्त संघारामाच्या आग्नेयवर्ती या दुमजली निवासस्थानी वसुबंधूने 'विद्यामात्र सिद्धिशास्त्र' हा हीनयान ग्रंथ लिहिला होता.

(४) **असंगमठ**—घोषितारामाच्या पूर्ववर्ती आम्र-वनातील या उद्ध्वस्त मठात असंग बोधिसत्त्वाने 'योगाचार्यभूमिशास्त्र' ग्रंथाची टीका लिहिली होती.

(५) **जलराक्षस गुफा**—या नगराच्या १$\frac{1}{8}$ मैल नैर्ऋत्येकडील गुफेतील जलराक्षसाचा वध करून बुद्धाने तेथे आपली छायाप्रतिमा स्थापिली. त्यामुळे हे स्थान पवित्र मानले जात असे. येथून १४० मैल ईशान्येस गेल्यानंतर ह्युएन्त्संग काशपुर गावी पोहोचला.

**विनाश**—बुद्धाच्या महामायासूत्रमते बुद्धपरिनिर्वाणा-नंतर १५०० वर्षांनी येथील बौद्ध धर्माचा नाश होण्याची, तसेच बौद्ध भिक्षू आणि अर्हतांच्या दंगलीत येथील बौद्ध स्तूप–विहारादिकांचा नाश होण्याची भविष्यवाणी बुद्धाने वर्तविली होती. ह्युएन्त्संगच्या काळी बौद्ध धर्माच्या अंतिम केंद्रस्थानस्वरूप कौशांबीविनाशाची घटिका समीप आली असून, त्या जाणिवेने त्याचे मन व्यथित झाले (वॉटर्स, १.३६५–३७३; बील, २.२५४–२५६).

**मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात**—त्रिकांडशेषमध्ये 'वत्सपट्टन' नावाने याचा निर्देश आढळतो (त्रिकाण्ड. २.१.१४).

**मध्ययुगीन शिलालेख साहित्यात**—येथील दुर्गप्रवेश-द्वारावरील प्रतिहारवंशीय कनौजसम्राट यशपालाच्या स. १०३६ च्या शिलालेखमते या देशात (कौशांबी मंडल) पयलास (आधु. प्रास) ग्राम असून, वि. सं. १३४५ च्या

अजयगढ शिलालेखात यास 'कौशाम्यपुर' म्हटले आहे (एपि. इंडि. २८.३). त्रिपुरी येथील कल्चुरि राजा नृसिंहच्या स. ११५९ च्या अल्हघाट शिलालेखात 'कौशांबी-निकाय' (कौशांबीनिवासी) राणक ज्ञातीचा निर्देश असून (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.३२४), कौशांबीनिवासी सहा वैष्णव सुवर्णकारांच्या वि. सं. १०२१ च्या शिलालेखातहि याचा निर्देश आढळतो. वैश्रवण (एपि. इंडि. २४.१४६), तसेच भद्रमाग (एपि. इंडि. २४.६) राजांचे शिलालेखहि येथे सापडले आहेत.

**देशविभाग**—याच्या परिसरातील वत्स देशाचा प्रदेश मध्ययुगात 'कौशांबी देश' नावाने सुविख्यात असून, तत्संबंधीचे प्रमुख निर्देश पुढीलप्रमाणे होत:— १. **कौशांबी देश** (ह्युएन्त्संग आणि इत्सिंग्चे प्रवासवर्णन; वॉटर्स; १.३६५); २.**कोसम्ब पट्टल** (कनौजसम्राट जयचंद्राचे दानपत्र; इंडि. अँटि. १८.१३); ३. **कोशम्ब पट्टल** (कल्चुरिनरेश कर्णचा स. १०४७ चा गोहरवा ताम्रपट; चंदपहा ग्रामाचा निर्देश; कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१. २.५); ४. **कौशांब मंडल** (यशपाल राजाचा कर्र शिलालेख; एपि. इंडि. ११.१४१).

**उत्खनन**—बौद्धकालीन वत्स महाजनपदाच्या आणि हस्तिनापुर-सम्राट निचक्नुलकालीन कुरु देशाच्या या राजधानीच्या गावच्या उत्खननात निम्नलिखित अवशेष सापडले:—

(१) **स्तर क्र. १** (इ. स. पू. ११६५–८८५)— यामध्ये पश्चिम भारतातील नवदतोलि, रंगपुरसदृश लाल मृत्तिकापात्रे सापडली.

(२) **स्तर क्र. २** (इ. स. पू. ८८५–६०५)— यामध्ये निकृष्ट राखी मृत्तिकापात्रे, कृष्ण आणि लाल मृत्तिकापात्रे, तसेच लोखंडी अवजारे सापडली.

(३) **स्तर क्र. ३** (इ. स. पू. ६०५–४५)—यामध्ये राखी मृत्तिकापात्रे आणि तदनुसारी काळी चकचकीत मृत्तिकापात्रे, तसेच स्तर क्र. १. सदृश लाल आणि कृष्ण मृत्तिकापात्रे सापडली.

(४) **स्तर क्र. ४** (इ. स. पू. ४५–इ. स. ८५०)— याकाळी चकचकीत काळ्या एन्. बी पी. मृत्तिकापात्रांचा लोप झाला.

**उदयनप्रासाद**—येथील स्तर क्र. २ मध्ये बुद्धसमकालीन उदयन राजाच्या (इ. स. पू. ६००) दगडी राजवाड्याचे (३१५×१५० मीटर) अवशेष सापडले. उत्तरकालीन प्रद्योत राजांनी या प्रासादाचा जीर्णोद्धार केला.

**घोषिताराम संघाराम**—या संघारामाच्या उत्खननावरून बारा शतकेपर्यंत (इ. स. पू. ६ वे–इ. स. ६ वे शतक) येथे अखंड मनुष्यवस्ती असून, सोळा वेळा त्याचा जीर्णोद्धार झाल्याचे सिद्ध झाले. कुशाण राज्यकालीन एक शिलालेखहि येथे सापडला. येथील हूणराज तोरमाणाच्या अक्षरपंक्तियुक्त मुद्रेवरून हूणांनी हा नष्ट केला असावा.

**तटबंदी**—याच्या मृत्तिकामय तटबंदीच्या (व्याप्ती–६⅓ किलोमीटर; उंची–१३ मीटर) उत्खननावरून स्तर क्र. १ च्या काळी (इ. स. पू. ११६५–८८५) ती बांधली असून, तिच्या दर्शनी भागी विटांचे बांधकाम केले असावे. उत्तरकालात तिच्या बहिर्भागात अनेक बुरुज, मनोरे, आणि निरीक्षणस्थाने बांधली असून, तिच्या पूर्व प्रवेशद्वाराबाहेरील चौकोनी बंदिस्त आवारात पुरुषमेधोपयोगी 'श्येनचिति' (गरुडवेदी) चे अवशेष सापडले (देशपांडे, रिव्ह्यू. पृ. ४३४–४३५).

**नाणी**—या नगराची इ. स. पू. ३– इ. स. ३ च्या शतकापर्यंतची स्वतंत्र नाणी सापडली असून (केंब्रिज हिस्टरी. १.५२५), त्यावरून त्याकाळी हे व्यापारी महत्त्वाचे नगर असावे. येथील राजांची इ. स. ३ च्या शतकातील ब्राह्मी लिपीतील वेदिकावृक्षयुक्त ओतीव नाणी (ब्राऊन, भारतीय नाणी. पृ. १९), तसेच इ. स. पू. २ऱ्या–१ ल्या शतकातील काही ठोकीव नाणी सापडली असून, रचनादृष्ट्या ती अयोध्या, मथुरा, पंचालदेशीय नाण्यांसदृश आहेत (ब्राऊन, पृ. २०).

**शिल्प**—येथील दुर्गातील गुप्त सम्राट चंद्रगुप्त (प्रथम)–कालीन शुंग शिल्पशैलीच्या शिवपार्वती पंचायतनाच्या अधोभागी भीमवर्मन् राजाचा मूर्तिलेख आढळतो (कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.२६६).

२. (नदी) गुजरातमधील साबरमती नदीकाठच्या ब्रह्मखेटक (आधु. खेडब्रह्म) या त्रिवेणीसंगमस्थानीच्या तीन नद्यांपैकी एक (येथील अन्य दोन नद्या–भीमा आणि हिरण्या).

**कौशाम्यपुर** (नगर)— मध्ययुगीन शिलालेख साहित्यमते उत्तर प्रदेशातील 'कौशांबी' (आधु. कोसम) नगराचे नामांतर (एपि. इंडि. २८.३; कौशांबी पहा).

**कौशिक** (नदी)—इ. स. ७ व्या शतकातील निधनपुर ताम्रपटमते पूर्व भारतातील 'कौशिक' (आधु. कोशी) नदीचे नामांतर (एपि. इंडि. १२.६५; कौशिक १. पहा).

२. (आदित्य) श्रीमालक्षेत्रातील एक आदित्यस्थान

(श्रीमालमाहात्म्य).

३. (आश्रम) वत्स देशातील कौशिक ऋषींचे आश्रमस्थान आणि अंबातपस्यास्थान (म. उ. १८७. २६).

४. (देश) मत्स्य पुराण आणि वाल्मीकि रामायणमते मध्य भारतातील 'कान्यकुब्ज' देशाचे नामांतर (मत्स्य. १२१.५०; वा. रा. कि. ४१.११; कान्यकुब्ज पहा).

५. (ह्रद) महाभारत पुलस्त्ययात्रामते कौशिक ऋषी-वास्तव्यपुनीत एक सरोवर (म. आर. ८२.१२३; पद्म. आदि. ३८.५८).

**कौशिका** (नदी)—मार्कंडेयमते पूर्व भारतातील 'कौशिकी' (आधु. कोशी) नदीचे नामांतर (मार्कं. ५७; कौशिकी १. पहा).

**कौशिकानन्द** (देश)—मार्कंडेयमते कूर्मचक्रात्मक भारताच्या ईशान्य भागातील एक देश (मार्कं. ५५.५०). बिहारमधील कौशिकी (कोशी)—गंगा संगमानजिक विश्वामित्र-आश्रमाच्या परिसरात हा असावा.

**कौशिकी** (नदी)—पौराणिक साहित्यमते दक्षिण नेपाळमधील पूर्व हिमालय पर्वतश्रेणीपैकी गौरीशंकर शिखरावरील पवित्रतम जल गंगा नदीमध्ये आणून सोडणारी उत्तर भारतातील, कुरुक्षेत्रातील, तसेच उत्तर बिहारमधील एक पवित्रतम नदी (नारद. उत्तर. ६५.८). पूर्व हिमालय पर्वतातील सप्तकौशिकी (आधु. सप्तकोशी) तीर्थस्थानी उगम पावून, बिहारमधील पूर्णिया जिल्ह्यातील मणिहरिघाट येथे गंगा नदीस मिळणारी आधु. कोशी नदी हीच होय. कौशिकी–गंगा नद्यांचे हे संगमस्थान आजहि बिहारमधील ख्यातनाम तीर्थ असून, वेगवान, धोकादायक आणि अस्थिर प्रवाहाबद्दल ही नदी साऱ्या भारतात कुविख्यात आहे.

**पावित्र्य**—महाभारत लोमशयात्रेत (म. आर. १०९. १९–२०; ११०.१; ११४.१), पुलस्त्ययात्रेत (म. आर. ८२.११३; १२४), अंगिरस्यात्रेत (म. अनु. २५. ३१), अर्जुन तीर्थयात्रेत (म. आर. २०७.७), तसेच भागवतातील बलराम–तीर्थयात्रेत (भा. १०.७९.९) हिचा निर्देश आढळतो. अग्नीचे उत्पत्तिस्थान (म. आर. २१२. २२), श्राद्धयोग्य नदी (पद्म. आदि. ११.५६), तसेच एक तीर्थ (कूर्म. उत्तर ३७.३९; पद्म. आदि. ३८.४८) म्हणून ही नदी सुविख्यात असून, विष्णुस्मृतिमते ही धर्मयोग्य नदी आहे (विष्णुस्मृति. ८५.३१; मत्स्य. २२. ६३).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात या नदीची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. महाभारत (आदि. ७१. ३०–३२) | पारा |
| २. पौराणिक साहित्य | |
| अ. मार्कंडेय पुराण (५७) | कौशिका |
| आ. कालिका पुराण (१४.३१) | महाकौशिकी |
| इ. अन्य पौराणिक साहित्य | सप्तकौशिकी |
| ३. बौद्ध जातक (५.२) | कोसिकी (कुसी) |
| ४. कुमारसंभव (६.३३) | महाकोशी |
| ५. ग्रीक साहित्य | |
| अ. अरियन (४) | कोसौमोस |
| आ. प्लिनी (मॅक्रिंडल, पृ. १९१–१९२) | कोसागुस |
| ६. भास्करवर्मन्‌चा निधनपुर ताम्रपट (एपि. इंडि. १२.६५) | कौशिक |

**नामव्युत्पत्ती**—वाल्मीकि रामायण आणि भागवतमते विश्वामित्रभगिनी 'कौशिकी (सत्यवती) चा पुनरावतार', अर्थाने हिला हे नाव मिळाले (वा. रा. बा. ३४. ७–९; भा. ९.१५.५–१२). वामनमते शिवपत्नी कालीचे 'कोश (कृष्णशरीर) विसर्जनस्थान' अशा अर्थाने हिला हे नाव मिळाले (वामन. ५४.२२–२४). हिचे रौद्र आणि प्रलयंकर स्वरूप शीघ्रकोपी विश्वामित्रभगिनीस साजेसेच आहे.

**उगम**—पूर्व भारतातील हिमालयोद्भवा नदी म्हणून पौराणिक साहित्यात हिचा सर्वत्र निर्देश आढळतो (कूर्म. पूर्व. ४७.३०; ब्रह्माण्ड. १६.२६; मत्स्य. ११४.२२; मार्कं. ५४.१८; वराह. ८५.४; वामन. १३.२२; वायु. ४५. ९४; विष्णुधर्म. १.११.२).

**आधुनिक काळी**—पूर्व नेपाळच्या दक्षिण भागातील पूर्व हिमालय पर्वतातील सप्तकोशी प्रदेशात (अक्षांश २६°–२७′ उत्तर; रेखांश ८७°–६′ पूर्व) सुनकोशी नावाने ही उगम पावत असून, हिच्या निम्नलिखित सहा उपनद्यांसमवेत ही 'सप्तकौशिकी' (सप्तकोशी) सामूहिक नावाने ओळखली जाते :– १. तंबर; २. तम्र; ३. अरुगा (एरण); ४. दूधकोशी; ५. लिखुकोशी; ६. भोतियकोशी.

उपरोक्त उपनद्यांपैकी तम्र, दूधकोशी, तंब्रकोशी आणि भोतियकोशी या तिबेटमध्ये उगम पावत असून, अरुणा आणि तंबर या प्रत्येकी दोन उपप्रवाहांनी बनल्या आहेत. बिहारमधील वराहक्षेत्र येथे सुनकोशी, तंबर आणि अरुणा नद्यांचा संगम होऊन 'सप्तकोशी' नदी सिद्ध होते.

हिमालयाच्या दऱ्याखोऱ्यातून खळाळत्या वेगाने वहाणारी सुनकोशी नदी प्रथम नैर्ऋत्येस, नंतर दक्षिणेस, आणि अखेरीस आग्नेयेस वहात हिमालयातून बाहेर येते. तदनंतर विस्तारित स्वरूपात कधी एकसंधपणे, तर कधी दुभंगलेल्या प्रवाहाने वहात जात बिहारमधील नाथपुर गावाच्या उत्तरेकडील वराहमुख (कोकामुख) गावी (उगमापासूनचे अंतर–१६० मैल) अरुणा आणि तंबर उपनद्यांशी तिचा संगम होतो. विष्णूच्या वराहावताराच्या या कोकामुख तीर्थाचे (स्थानिक नाव–त्रिवेणी) माहात्म्य वराह आणि नृसिंह पुराणात सविस्तरपणे वर्णिले आहे (वराह. १४०; नृसिंह. ६५; कोकामुख तीर्थ पहा).

बिहारमधील भागलपुर जिल्ह्याच्या मैदानी प्रदेशात ही नदी पूर्णिया गावानजिक पश्चिम दिशेस मोठा वळसा घेऊन, आणि नंतर पूर्वेस वळून पूर्णिया जिल्ह्यातील मणिहरि घाट (आधु. मानहरि) येथे गंगा नदीस मिळते.

हिमालयातील २२९०० चौरस मैलांच्या जलसिंचन प्रदेशातील जल बिहारच्या मैदानी प्रदेशात आणणाऱ्या या नदीचे रौद्र स्वरूप वराहक्षेत्रान्तर्गत खिंडीत दिसते. एवढा मोठा जलस्रोत उत्तर भारतात अन्यत्र आढळत नाही.

**वाल्मीकि रामायणात**—या ग्रंथमते गाधिराजकन्या ऋचीक ऋषिपत्नी, जमदग्निमाता आणि विश्वामित्रभगिनी सत्यवती ही ऋचीक ऋषींच्या मृत्यूनंतर सिद्धाश्रमसमीपा हिमालयोद्भवा कौशिकी नदी बनली (वा. रा. बा. ३४.७–९). या पुण्यसलिला नदीकाठी विश्वामित्रांनी सहस्रवर्षीय तपस्या केली असून (वा. रा. बा. ६३.१५), सुग्रीवाने येथे विनत वानराला सीताशोधार्थ पाठविले होते (वा. रा. कि. ४०.२०).

**महाभारतात**—या ग्रंथमते या विश्वामित्रनिर्मित (म. आ. ७१.३०–३२) पापनाशक नदीस्नानाने राजसूय यज्ञाचे फल प्राप्त होत असे (म. आर. ८४.१३२; अनु. २५.३१). हिच्या काठच्या कौशिकीकच्छ देशाच्या राजास भीमाने पूर्व दिग्विजयसमयी जिंकले होते (म. स. ३०.२२).

**पौराणिक साहित्यात**—या साहित्यमते ही कुरुक्षेत्रातील (नारद. उत्तर. ६५.८), तसेच कोकामुखक्षेत्रातील (वराह. १४०.५६) नदी असून, वराहमते ही उत्तर गोकर्णक्षेत्रातहि होती (वराह. २१४.४६). हिच्या काठच्या कौशिकीह्रद नामक सरोवरतीरी विश्वामित्रांस सिद्धी मिळाली असून (म. आर. ८२.१२३–१२५; पद्म. आदि. ३८.५८), वामनमते येथे कूर्मस्वरूपी वामनाचे निवासस्थान होते (वामन. ९०.२). बृहत्संहितेत, भागवतात, तसेच योगिनीतंत्रात हिचा निर्देश असून (बृ. सं. १६. १६; योगिनी. २.४; भा. १.१८.३६; ५.१९.१८; १०. ७९.९), भागवतमते ही 'विश्वामित्रमाता' होती (भा. ९.१५.१२).

वामनमते शिवपत्नी पार्वती-विसर्जित कृष्णवर्णीय शरीरकोश कालांतराने हिच्या ठायी विंध्यवासिनी व्याघ्रारूढ देवीच्या रूपाने अवतीर्ण झाला (वामन. ५४.२२–२८). याच ग्रंथातील प्रह्लादयात्रामते मानस सरोवरान्तर्गत मत्स्यावतारी विष्णुदर्शनानंतर प्रह्लाद हिच्यामधील कच्छपावतारी विष्णुदर्शनार्थ गेला (वामन. ७८.३–५; ९०.१–२).

**बौद्ध साहित्यात**—या साहित्यमते हिमालय प्रदेशातून वहाणाऱ्या गंगा नदीच्या या (कोसिकी, कुसी) हिमालयोद्भवा उपनदीकाठी सफरचंदे आणि खजूर विपुल पिकत असत (जा. ५.२; ५११). यावरून जातककाली हिचे उभय किनारे सुपीक असावेत.

**कुमारसंभवात**—या ग्रंथात हिच्या (महाकोशी) एका जलप्रपाताचा निर्देश असून (कुमार. ६.३३), पांडे यांच्या मते बिहारमधील वराहक्षेत्रातील महान जलप्रपाताचा निर्देश येथे अभिप्रेत असावा.

**ग्रीक साहित्यात**—अरियनच्या मते ही (कोसौमोस) गंगा नदीची जलवाहतूकयोग्य उपनदी 'एरनोबॊस' आणि 'सोनुस' नद्यांच्या दरम्यान वहात असून (इंडिका. ४), प्लिनीने निर्देशिलेली 'कोसौगुस' नदी हीच होय (मॅक्रिंडल, पृ. १९१–१९२).

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथात कामरूप देशमार्गावरील महान नदी म्हणून निर्देशिलेली अनामिक नदी (बील, २.१८५) बहुधा हीच असावी.

**तीर्थस्थाने**—पौराणिक साहित्यमते हिच्या काठची प्रमुख तीर्थे पुढीलप्रमाणे होतः— १. **कौशिकाश्रम** (विश्वामित्र–तपस्यास्थान; राजसूय यज्ञपुण्यप्रद तीर्थ); २. **कौशिक–ह्रद** (विश्वामित्र–तपस्यास्थान; अश्वमेध यज्ञपुण्यप्रद तीर्थ).

**संगमतीर्थे**—महाभारत आणि पौराणिक साहित्यमते या नदीची प्रमुख संगमतीर्थे पुढीलप्रमाणे होतः— १. **कौशिकी–अरुणा सङ्गम** (महाभारत पुलस्त्ययात्रा; म. आर. ८२.१३५; पद्म. आदि. ३८–६३); २. **कौशिकी–**

कोका सङ्गम (कोकामुख देशान्तर्गत; वराह. १४०.७५–७८); ३. कौशिकी–गङ्गा सङ्गम (नारद पुराण गंगामाहात्म्य; नारद. उत्तर. ४१.४६ ); ४. **कौशिकी–ताम्रा–अरुणा सङ्गम** (कोकामुखक्षेत्र; वराहक्षेत्र); ५. **कौशिकी–दृषद्वती सङ्गम** ( कौशिकी सङ्गम; नारद. उत्तर. ६५.१८; 'कौशिकी संभव'–वामन. ३४.१८; कुरुक्षेत्रान्तर्गत–नारद. उत्तर. ६५.८४; म. आर. ८१.८०; वामन. ३६.५९; पद्म. आदि. २६.८९ ).

**बदलता प्रवाह**—हिच्यामधील वाळू, माती, तसेच लहान मोठ्या दगडांच्या अतिरिक्त प्रमाणामुळे हिचा प्रवाह चीनमधील नद्यांप्रमाणे एकसारखा बदलत रहातो ( गेल्या-२०० वर्षांतील पश्चिमवर्ती प्रवाहबदल–७० मैल ). सध्या उत्तर बिहारमध्ये वहाणारी ही नदी पूर्वकाली उत्तर बंगाल-मधून वहात असून, भास्करवर्मन्‌च्या इ. स. ७ व्या शतकातील निधनपुर ताम्रपटात निर्देशिलेली हिच्या ( कौशिक ) काठची सारी गावे जलपैगुरी जिल्ह्यातील आहेत. त्यावरून तत्काली ही पूर्व बंगालमधील ब्रह्मपुत्रा नदीस मिळत असावी.

**मतांतरे**—हिच्या पुरातन प्रवाहासंबंधी अभ्यासकांत निम्नलिखित मतांतरे आढळतात :—

( १ ) **फर्ग्युसन यांच्या मते**— इ. स. १ ल्या शतकात ही, तसेच महानंदा नद्यांचा जोडप्रवाह दक्षिण बंगालमधील ब्रह्मपुत्रा नदीस मिळत असे ( जे. ए. एस्. बी., स. १८९५, पृ. १–२४ ).

( २ ) **हॅमिल्टन यांच्या मते**— तेजपुर गावावरून वहाणारी ही नदी महानंदा नदीची उपनदी असून, बंगाल-मधील आधु. माल्दाच्या उत्तर आणि पूर्ववर्ती सरोवरे या, तसेच महानंदा नदीच्या संयुक्त प्रवाहाचे अवशेषभूत होत ( हॅमिल्टन, ईस्टर्न इंडिया. पृ. ३–१५ ).

( ३ ) **कनिंगहॅम यांच्या मते**—मध्ययुगात गौर गावा-जवळून वहाणाऱ्या या नदीच्या पुरामुळे तत्रस्थ मुसलमान राजे राजमहाल जिल्ह्यात स्थलांतरित झाले ( जे. ए. एस्. बी., स. १८९५, पृ. १०–११). कोशी नदीपासून विभक्त झालेला या भागातील नदीप्रवाह आजहि 'मरा कोशी' ( मृत कौशिकी ) नावाने ओळखला जातो.

( ४ ) **रेनेल यांच्या मते**—इ. स. १८ व्या शतकात बिहारमधील पूर्णिया प्रदेशान्तर्गत ही नदी गंगा–कोशी संगमापासून ४३ मैल दक्षिणेस गंगेस मिळत असे ( रेनेल, पृ. २६५ ). यावरून हे संगमस्थान गेल्या दोन शतकांत ४३ मैल उत्तरेस सरकले असावे. हिचा उत्तर बिहार-मधील प्रवाह आजहि पश्चिमेस सरकत आहे.

**अचानक पूर**—बदलत्या पात्राप्रमाणेच अचानक पुरा-साठीहि ही कुप्रसिद्ध असून, पुराच्या वेळी हिचे पाणी चोवीस तासांत तीस फुटांनी वाढते. स. १८७५ मधील अशाच एका पुरात हिच्या काठचे नाथपुर गाव संपूर्णतः वाहून गेले. पाण्याच्या गढूळपणाने अथवा सोसाट्याच्या वाऱ्यांनी या पुराची पूर्वसूचना मिळते.

**वाळूचे ढिगारे**—उभय किनाऱ्यांवरील वाळूचे प्रचंड ढिगारे हे हिचे अन्य एक वैशिष्ट्य आहे. जातककाली हिच्या उगमानजिकच्या मऊ मातीमुळे, तसेच कमी वेगामुळे हिच्या गाळात शेती होत असे. उत्तरकालात उगमा-नजिकच्या रेताडपणामुळे, तसेच वाढत्या वेगामुळे हिच्यातील रेती, तसेच उभय किनाऱ्यांची धूप वाढून ( प्रतिवर्षीचा गाळ आणि रेती–३७ दशलक्ष टन ) पात्राची रुंदी त्या प्रमाणात कमी झाली. हिच्या उगमानजिकचे विपुल जल तोटक्या पात्रात सामावल्याने हिची रेती मर्यादित प्रदेशातच साठून हिच्या प्रवाहाचा वेग अमर्याद वाढून तेथे शेती अशक्य झाली. हिच्या वाळूमध्ये गावेच्या गावे गडप होऊन हिच्या काठच्या निपाणिया येथील निळीचा कारखाना चार वर्षांत हिच्या रेतीमध्ये बुडून गेला. बंधारे ( उदा. नेपाळमधील हनुमाननगर ), तीरबांधणी, तसेच निकामी पात्रे मूळ नदीस जोडून हिच्या पुराचा धोका अलीकडे कमी करण्यात आला आहे.

**उपनदी**—सौर नामक उपनदी हिच्या मुखानजिक हीस मिळते.

**जलवाहतूक**—वाल्मीकि रामायणमते ऋष्यशृंग ऋषींना अंगदेशीय नर्तिकांनी हिच्या तीरवर्ती अंगुत्तराप देशातील त्यांच्या आश्रमातून अंगराजधानी चंपा गावी नौकेच्या साह्याने नेले होते ( वा. रा. बा. १० ). हा प्रवास या, गंगा नदीमधून झाला असावा ( पांडे, बिहार. पृ. २०४ ).

२. वायुमते गया येथील एक 'ब्रह्मदा' आणि 'ज्येष्ठा' नदी ( वायु. १०८.८१; नारद. उत्तर. ४४.५९ ). महा-भारत धौम्ययात्रामते क्षत्रियकुलोत्पन्न विश्वमित्र ऋषींना ब्राह्मणत्व प्राप्त झाले ( म. आर. ८५.९ ).

३. अवंतीक्षेत्रान्तर्गत एक नदी ( स्कन्द. आवन्त्य. अ. ६१.११ ).

**कौशिकीकच्छ** ( देश )—महाभारतमते बिहारमधील 'अंगुत्तराप' देशाचे नामांतर ( म. स. २७.२०; शब्दशः अर्थ– 'वालुकामय प्रदेश'; अंगुत्तराप पहा ). अन्य नामांतर–'कौशिकीक्षेत्र' ( वा. रा. बा. ३४.७–९ ).

**कौशिकीतीर्थ** ( तीर्थ )—नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( मत्स्य. १९३.४० ).

**कौशिकीसम्भव** ( तीर्थ )—वामनमते कुरुक्षेत्रातील 'कौशिकी–दृषद्वती संगमा'चे नामांतर ( वामन. ३४.१८; कौशिकी १. पहा ).

**कौशिकेश्वर** ( लिंग )—प्रभासक्षेत्रातील एक शिवलिंग ( स्कन्द. प्रभास. प्र. २१४ ).

**कौशिज** ( देश )—महाभारतमते एक जनपद ( म. भी. १०.४० )

**कौषीतक-तपस्यास्थान** ( तीर्थ )–पद्ममते साभ्रमती नदीकाठचे कौषीतक ऋषींचे तपस्यास्थान. नामांतर–'सोमतीर्थ' ( पद्म. उत्तर. १५४ ).

**कौष्ट्रायण** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.१ ).

**कौस** ( नगर )—टॉलेमीच्या मते प्रपिऔतइ ( नर्मदा खोऱ्याचा वरचा भाग ) देशातील हिऱ्यांच्या खाणीचे नगर ( अक्षांश २२°–३०'उत्तर; रेखांश १२१°–२०' पूर्व ). लॅसेन यांच्या मते उत्तर वऱ्हाडातील आधु. बैतुल गावानजिक तापी नदीच्या उत्तरेस हे असावे.

**कौसम्ब** ( बौद्ध धर्मकेंद्र )—टॉलेमीच्या मते पूर्व भारतातील एक बौद्धधर्म केंद्र ( अक्षांश–१८°–१५' उत्तर; रेखांश–१४३°–३०' पूर्व ). मॅक्रिंडल यांच्या मते 'कौशांबीनिवासीस्थापित' अर्थाने यास हे नाव मिळाले असावे. यूल यांच्या मते बिहारमधील आधु. बलासोर गाव हेच असून, लॅसेन यांच्या मते हे बंगालमधील सुवर्णरेखा ( टॉलेमी–अदमस् ) नदीकाठी असावे.

**कौसलक** ( देश )—समुद्रगुप्ताच्या अलाहाबाद प्रशस्तिलेखमते मध्यप्रदेशातील 'दक्षिण कोशल' देशाचे नामांतर ( गुप्त इन्स्क्रि. पृ. ७; कोशल दक्षिण पहा ).

**कौसुमसरस्** ( तीर्थ )—व्रजमंडलान्तर्गत ( आधु. मथुरा-वृंदावन ) एक तीर्थ ( नारद. उत्तर. ८०.९ ).

**कौसुमेश्वर** ( लिंग )—काशी येथील ज्येष्ठेश्वरानजिकचे एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ६५.१३ ).

**कौस्तुभेश्वर** ( लिंग )—काशी येथील एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ९७.८४; तीर्थविवेचन. पृ. ६० ).

**कौहल** ( देश )—बृहत्संहितामते उत्तर भारतातील 'कोहल' देशाचे नामांतर ( बृ. सं. १४.२७; मार्कं. ५५. ४५; कोहल पहा ).

**क्रकुच्छन्द** ( बौद्ध स्थान )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते नेपाळ तराईतील कपिलवस्तु ( आधु. पिप्रावा ) गावाच्या १० मैल दक्षिणेकडील क्रकुच्छंद (पाली–ककुसंध) बुद्धाचे जन्मस्थान, फाहियेन्च्या प्रवासवर्णनमते हे कपिलवस्तूपासून ७ मैल नैऋत्येस, श्रावस्ती गावापासून ९६ मैल आग्नेयेस, आणि कनकमुनि स्तूपापासून ८ मैल दक्षिणेस होते. पिप्रावापासून ७ मैल नैऋत्येकडील आधु. स्तूपद्वयस्थानी हे असावे. नामांतर ( फाहियेन् )–'नाभिक' ( न-पि-क )

**बौद्ध वास्तू**—ह्युएन्त्संगच्या मते येथे निम्नलिखित बौद्ध वास्तू होत्याः–१. क्रकुच्छंद बुद्धाच्या जन्मस्थानीचा स्मृतिस्तूप; २. क्रकुच्छंदाच्या आत्मज्ञान–प्राप्तिस्थानीचा स्मृतिस्तूप ( गावाच्या दक्षिणेस ); ३. क्रकुच्छंदाच्या निर्वाणस्थानीचा अशोकस्तूप ( गावाच्या आग्नेयेस; उंची–३०'; वॉटर्स, २.५ )

**क्रतु** ( तीर्थ )—नर्मदा नदीकाठचे एक तीर्थ ( पद्म. आदि. २१.९ ).

२. ( नदी ) प्लक्ष द्वीपातील एक नदी ( वायु. ४९.१७; विष्णु. २.४.११ ).

३. शाक द्वीपातील एक नदी ( वायु. ४९.९३ ). नामांतर–'इक्षु'.

४. जंबूद्वीपान्तर्गत ऋक्ष पर्वतोद्भवा एक नदी ( ब्रह्माण्ड. १६.३१ ).

**क्रतुक** ( नगर )—यादव राजांच्या शके ११५१ च्या गदग शिलालेखमते कर्नाटकातील बेल्वल ३०० देशविभागातील एक नगर ( एपि. इंडि. ३.२१९ ). आधु. गदग गाव हेच होय ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २७ ).

**क्रत्वीश्वर** ( लिंग )—प्रभासक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंग (स्कन्द. प्रभास. प्र. २१२ ).

**क्रथक** ( देश )—विदर्भनरेश भीष्मकाने जिंकलेला भारतवर्षातील एक देश ( म. स. १३.२० ).

**क्रथकैशिक** ( देश )—मध्ययुगीन शब्दकोश साहित्य मते 'विदर्भ' देशाचे नामांतर ( शब्दरत्न. ४७.१५; काव्यमी. १७.२२६; रघु. ५.३९; ६१; ७.३२; विदर्भ पहा ).

**क्रमवर्त** ( पर्वतीय ठाणे )—राजतरंगिणीमते कश्मीरातील पीर पंत्साल घाटाच्या पायथ्यानजिकचे कांबुव निरीक्षणस्तंभ ( ढक्क ) युक्त एक पर्वतीय नाके ( द्रंग; राज. ३.२२७ ). अवंतिवर्मन्–अमात्य शूरने येथील 'द्रंग' शूरपुर गावी हलविले ( राज. ५.३९ ). स्टाइन यांच्या मते हुरपोर ( प्राचीन–शूरपुर ) च्या ५½ मैल उत्तरेकडील पीर पंत्सालच्या अंतिम मुळक्यातील आधु. कामेलनकोठ ( प्राचीन–क्रमवर्त कोट्ट; उंची–२००' ) हेच

असून, हिच्या माथ्यावरील पूर्वकालीन भग्नावशेषांवर पठाण लोकांनी स. १८१२ मध्ये दोन निरीक्षणस्तंभ (२००′×५०′) बांधले आहेत.

**महत्त्व**—प्राचीन काली मुख्य पीर पंत्साल घाट हिच्या पायथ्याजवळून, तसेच हिच्या ३ मैल उत्तरेकडील हास्तीवंज टेकडीवरून रेंब्यार नदीच्या उजव्या किनाऱ्यावरून जात असे. शूरपुरच्या उत्तरेकडील रेंब्यार नदीच्या डाव्या किनाऱ्यावरील नव्या राजमार्गाची रचना अकबरकाळी झाल्यानंतर याचे महत्त्व कमी कमी झाले (स्टाइन, राज. २.२९१–२९२).

**क्रमराज्य** (देशविभाग)—कश्मीर खोऱ्याच्या दोन प्रमुख उपविभागांपैकी एक (राज. २.१५; अन्य उपविभाग–मडवराज्य). स्टाइन यांच्या मते श्रीनगरच्या दक्षिणेकडील वितस्ता नदीकाठचा आधु. कम्राझ प्रदेश हाच असून, त्या नगराच्या उत्तरवर्ती वितस्ता खोऱ्यातील मराझ प्रदेश म्हणजे प्राचीन मडवराज्य होय. आधुनिककालीन श्रीनगरनजिकचा शेरगढी राजवाडा या उपविभागांच्या सीमेवर होता.

**उपविभाग**—स्थानिक आख्यायिकामते कश्मीर खोऱ्यातील वोलूर सरोवराच्या पश्चिम आणि वायव्येकडील निम्नलिखित परगणे यामध्ये समाविष्ट होत असत :— १. खुयहौम; २. झैनगिर; ३. लौलउ; ४. उत्तर; ५. मच्छिपूर; ६. हमल; ७. क्रुहिन.

**राजतरंगिणीमध्ये**—या ग्रंथमते कश्मीरराज जयापीड राजाला येथे एक तांब्याची खाण सापडली होती (राज. ४.६१७; जोनराज. ८८४).

**ऐनू–इ–अकबरीमध्ये**—या ग्रंथमते कश्मीर देश मराझ–कम्राझ या पूर्व-पश्चिम विभागात विभागला असून (ऐ. अ. २.३६८), अकबराच्या काली कश्मीरच्या ३८ परगण्यांपैकी उत्तर, लौलउ, हमल आणि मच्छिपूर परगणे यामध्ये समाविष्ट होत असत (ऐ. अ. पृ. ३७१).

स्टाइन यांच्या मते उपरोक्त विभाग राज्यशासनाच्या सोयीसाठी मुसलमानी राज्यकाली अस्तित्वात आले असून, त्यामध्ये परिस्थितीनुसार वेळोवेळी बदल होत असे. कश्मीरच्या हिंदु इतिहासकाली ते अस्तित्वात नसावेत.

**क्रमसरस्** (सरोवर)—नीलमतमते कश्मीरातील पीर पंत्साल पर्वतान्तर्गत नौबंधन शिखराच्या पायथ्यानजिकचे एक पवित्र सरोवर (नीलमत. १२१; १२७२; शर्वावतार. ३.१०; ५.१७४). आधु. कौनसर नाग (सरोवर) हेच असून, श्रीवरमते कश्मीरसुलतान झैनुल अबिदीनने याचे दर्शन घेतले होते (श्रीवर. १.४८२).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतात:—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. नीलमत पुराण | |
| अ. (१४८३) | कौंडिण्यसर |
| आ. (१४८१–१४८२) | विष्णुपद |
| २. स्थानिक नामांतर | क्रमसार |

**पवित्र सरोवर**—स्थानिक आख्यायिकामते 'श्रीविष्णूच्या पदक्षेपत्रयापैकी आद्य पदक्षेपाचे (क्रम) स्थान' अशा अर्थाने यास हे नाव मिळाले. नौबंधन यात्रापरिक्रमेत याचा समावेश होतो (स्टाइन, राज. २.३९३).

**क्रमु** (नदी)—ब्रह्माण्डमते वायव्य भारतातील 'क्रुमु' (आधु. कुर्रम्) नदीचे नामांतर (ब्रह्माण्ड. १९.१९; क्रुमु पहा).

२. मार्कंडेयमते ऋक्ष पर्वतोद्भवा एक नदी (मार्कं. ५४. २३).

**क्रव्याद** (देश)—बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या नैर्ऋत्य भागातील एक देश (बृ. सं. १४.१८; शब्दशः अर्थ–'कच्चे मांसभक्षक'). पाठभेद–'क्रव्याशिन्'.

**क्रिया** (नदी)—ब्रह्माण्डमते ऋक्षवत् पर्वतोद्भवा एक नदी (ब्रह्माण्ड. १६.२९; वामन. १३.२५).

**क्रिवि** (लोकसमूह)—ऋग्वेदमते सिंधु आणि असिक्नी नदीकाठचा एक लोकसमूह (ऋ. ८.२०.२४; २२. १२). परिवक्रा गावी अश्वमेध यज्ञ करणारा क्रैव्य पांचाल संभवतः याच लोकांचा राजा असावा (श. ब्रा. १३.५. ४.७). शतपथ ब्राह्मणमते हा प्रदेश उत्तरकालात 'पांचाल' नावाने प्रसिद्ध होऊन (पांचाल पहा), हे लोक पंचाल लोकांमध्ये विलीन झाले (जे. आर. ए. एस्., स. १९१०, पृ. ४८).

झीमर यांच्या मते ऋग्वेदकालीन कुरु लोकांमध्ये हे समाविष्ट होते. नामांतर–'क्रैव्य.'

**क्रिश्म** (देश)—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते मध्य-आशियातील 'खिश्म' देशाचे नामांतर (खिश्म पहा).

**क्रीडाराम** (बौद्ध विहार)—राजतरंगिणीमते कश्मीरराज ललितादित्यस्थापित एक बौद्ध विहार (राज. ४. १८४). 'क्रीडासक्त (क्रीडन्) मनःस्थितीत बांधलेला'

अशा अर्थाने यास हे नाव मिळाले. याचे आधुनिक स्थान समजत नाही (स्टाइन, राज. १.१३९).

**क्रुञ्च** (पर्वत)—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते हिमालयान्तर्गत 'क्रौंच' पर्वताचे नामांतर (अभिधान. १४०.१०२९). अन्य नामांतर–'क्रुण्' (शब्दरत्न. ५६.७०; क्रौंच ५. पहा).

**क्रुञ्चा** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाटमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू. ४.२.९१).

**क्रुमु** (नदी)—ऋग्वेदमते भारताच्या वायव्य सीमेवरील सिंधु नदीच्या पश्चिमेकडील उपनद्यांपैकी एक (ऋ. ५.५३.९; १०.७५.६). सुलेमान पर्वतात उगम पावून आणि त्याचा भेद करून काबूल (प्राचीन कुभा) नदीच्या दक्षिणेकडील इसाखेल गावानजिक सिंधु नदीस मिळणारी आधु. कुर्रम् नदी हीच होय. नामांतर (पौराणिक साहित्य)—'क्रमु'.

अन्य अभ्यासकांच्या मते जलालाबादच्या दक्षिणेस काबूल नदीस मिळणारी आधु. कुणार नदी हीच असावी (डे, पृ. १०५).

**पौराणिक साहित्यात**—या साहित्यमते ही प्लक्ष द्वीपामधून वहात असे (ब्रह्माण्ड. ५३.१९; गरुड. ५६.४).

**उपनद्या**—हिची तचि नामक प्रमुख उपनदी बन्नु गावानजिक हिला मिळते (लॉ, रिव्हर्स. पृ. १५; काणे, धर्मशास्त्र. ४.७७१).

**क्रैव्य** (लोकसमूह)—पौराणिक साहित्यमते सिंधु आणि असिक्नी नदीतीरवर्ती 'क्रिवि' लोकसमूहाचे नामांतर (क्रिवि पहा).

**क्रोञ्च** (द्विप)—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते 'क्रौंच द्वीपा'चे नामांतर (शारदीय. ९०९; क्रौंच द्वीप पहा).

**क्रोड तीर्थ** (तीर्थ)—विरजक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ (ब्रह्म. ४२.६).

**क्रोडाञ्च** (देशविभाग)—शिलालेख साहित्यमते दक्षिण भारतातील 'कोलांच' देशविभागाचे नामांतर (कोलांच पहा).

**क्रोत्तचेरुवुलकोट** (ग्राम)—शिलालेख साहित्यमते स. ११६४ च्या कर्नाट–वेंगी युद्धाचे दक्षिण भारतान्तर्गत वेंगी देशातील युद्धस्थान, एक ग्राम. गुंटूर जिल्ह्यातील विनुकोंड तालुक्यातील आधु. चेरुवुलकोट (कोश्चेर्लकोट) गाव हेच होय (एपि. इंडि. २९.२३७).

**क्रोधन** (देशविभाग)—लोकप्रकाशमते कश्मीरातील एक परगणा (विषय). स्टाइन यांच्या मते वितस्ता नदीकाठचा आधु. क्रुहिन परगणा हाच होय (स्टाइन, राज. २.४८२).

**क्रोधवश** (लोकसमूह)—महाभारतमते वायव्य भारतातील कश्यप आणि क्रोधा कुलोत्पन्न एक लोकसमूह (म. आ. ५९.३१). पार्गिटर यांच्या मते यामध्ये निम्नलिखित प्राचीन देश समाविष्ट होत असतः–१. बाह्लीक; २. मद्र; ३. सौवीर; ४. वाटधान (पार्गि., पृ. ३११).

**क्रोवश्री** (देशविभाग)—गुणक विजयादित्याच्या इ. स. ९ व्या शतकातील सातलुरु ताम्रपटमते आंध्र प्रदेशातील एक देशविभाग. गुंटूर जिल्ह्यातील सत्तनपल्ले तालुक्यातील क्रोसूरु गावासभोवतालचा प्रदेश हाच असावा. नामांतर (नृसिंहवर्मन्चा रेयूरु शिलालेख)–'कुरवश्री' (कुरवशिरि).

**क्रोशोदक** (तीर्थ)—वराहमते एक तीर्थ (वराह. २१५.८७–८८).

**क्रोष्टुकर्ण** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू. ४.३.९३).

**क्रोष्टुकवर्तनी विषय** (देशविभाग)—देवेंद्रवर्मन्च्या चिकाकोल ताम्रपटमते कलिंग देशातील वंशधरा नदीच्या उत्तरेकडील एक देशविभाग (एपि. इंडि. २६.६६). हुल्त्झ यांच्या मते आंध्र प्रदेशातील आधु. चिकाकोल जिल्हा हाच होय (एपि. इंडि. २५.१९६).

**क्रौञ्च** (अरण्य)—वाल्मीकि रामायणमते दक्षिण भारतातील जनस्थानपासून ३ कोसांवरील मातंगाश्रमानजिकचे मेघसमूहसदृश निबिड वन. सीताशोधार्थ आलेल्या रामाने येथे कबंध राक्षसाचा वध केला (वा. रा. अर. ६९.४–८). शापग्रस्त यदु राजा येथे रहात असे (वा. रा. उ. ५९.२०).

२. (देश) कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या उत्तर भागातील एक देश (मार्कं. ५५.४२; बृ. सं. १४.२४).

३. पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यमते आर्यावर्ताबाहेरील एक देश (पतञ्जलि. १.४४५). पौराणिक साहित्यमते हा जंबूद्वीपान्तर्गत केतुमाल वर्षात होता (वायु. ४४. १०; वराह. ८३.२). अली यांच्या मते मध्य आशियातील आधु. करुण प्रदेश हाच होय.

४. (पर्वत) महाभारत आणि पौराणिक साहित्यमते क्रौंच द्वीपातील एक पर्वत (म. भी. १३.१७; वायु. ४९. ६१; ब्रह्माण्ड. १९.६६; मत्स्य. १२२.८१; कूर्म. पूर्व. ४९.२७; लिङ्ग. ५३.१४; विष्णु. २.४.५०).

५. पौराणिक साहित्यमते हिमवत् पर्वताचा एक क्षुद्र-पर्वत ( उपपर्वत ). हरिवंशमते हा हिमालयपौत्र आणि मैनाकपुत्र असून ( ह. वं. १.१८.१३–१४ ), महाभारत-मते हा हिमालयपुत्र होता. वायुमते जंबूद्वीपान्तर्गत कैलास पर्वताच्या उपविभागभूत या पर्वतात कार्तिकेयाचे स्थान होते ( वायु. ४१.३९ ).

पार्गिटर यांच्या मते मानस सरोवराच्या दक्षिणेकडील मैनाक पर्वताच्या (आधु. अल्मोरा टेकड्या) उपविभागभूत हा पर्वत म्हणजे नेपाळच्या वायव्येकडील मानस सरोवर आणि अल्मोरा टेकड्यांच्या ( प्राचीन मैनाक पर्वत ) दरम्यानच्या आधु. गढवाल टेकड्या असून, स्थानिक परंपरामते त्या आजहि मैनाक पर्वताच्या शाखाभूत मानल्या जातात ( पार्गि., मार्कं. पृ. ३७६ ). मोनियर विल्यम्स यांच्या मते पश्चिमेस हिमालय आणि दक्षिणेस आसामच्या दरम्यानचा पर्वतीय भाग म्हणजे हा पर्वत होय.

**नामांतरे**—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. शब्दरत्न ( ५६.७० ) | कुंज, क्रुण् |
| ३. त्रिकांडशेष ( ३५.३ ) | क्रौंच |
| ४. अभिधानचिंतामणि ( १४०.१०२९ ) | क्रुंच |

**तैत्तिरीय आरण्यकात** — या ग्रंथात हिमालयाच्या अपरिचित भागातील या पर्वतासंबंधी चमत्कृतिपूर्ण आख्या-यिका आढळते ( तै. आ. १.३१.२ ).

**वाल्मीकि रामायणात**—या ग्रंथमते कैलास पर्वताच्या उत्तरवर्ती या पर्वतातील दुर्गम गुफांत देवतुल्य ऋषिगण रहात असून, सुग्रीवाने शतबलादि वानरांना येथे सीता-शोधार्थ पाठविले होते ( वा. रा. कि. ४३.२५–३१ ). यामध्ये मानसशैल नामक टेकडी होती ( वा. रा. सुं. २८ ).

**क्रौंचरंध्र**— वाल्मीकि रामायणमते कार्तिकेयाने या दुर्लंघ्य पर्वतात अस्त्र ( शक्ति ) प्रहाराने खोदलेल्या विवरातून ( क्रौंचरंध्र ) पक्षिगण उत्तरेस जात असत ( वा. रा. यु. १२.३३ ). महाभारतमते येथे लपलेल्या बाणासुराला बाहेर काढण्यासाठी कार्तिकेयाने हे विवर ( क्रौंचबिल ) खोदले ( म. श. १७.५१; ४५.७१–७३ ). मेघदूतमते कार्तिकेयनिर्मित विवरातून मानस सरोवरातील राजहंस भारतात येत असून ( मेघ. पूर्व. ५७–५९ ), हा पर्वत मानस सरोवराच्या दक्षिणेस असल्याचा निर्देश येथे अभिप्रेत दिसतो. कैलास पर्वताच्या दक्षिणेकडील कुमाऊँ पर्वतातील भारत-तिबेट रस्त्यावरील आधु. नितिखिंड हीच होय.

**पौराणिक साहित्यात**— या साहित्यमते हिमवत् आणि मेना यांचा हा पुत्र क्रौंच द्वीपसम्राट असून, याचेच नावा-वरून त्या द्वीपास हे नाव मिळाले. मोनियर विल्यम्सच्या मते दधिसमुद्रवेष्टित क्रौंच द्वीप आणि बृहत्संहितेतील क्रौंच पर्वत एकच होत ( इंडि. अँटि. २२.१८२ ). परंतु क्रौंच द्वीपाशी संबंधित पर्वत हिमालयीन क्रौंच पर्वताहून वेगळा असल्याने हे अनुमान भौगोलिक दृष्ट्या असंभव वाटते ( क्रौंच ४. पहा ).

वायु आणि ब्रह्माण्डमते या कार्तिकेयस्थानी ( वायु. ४१.३९ ) स्कंदाला सेनापत्याभिषेक झाला होता ( ब्रह्माण्ड. ३.१०.४८ ). वामनमते येथे पद्मनाभ नामक वामनाचे स्थान असून ( वामन. ९०.४३ ), विष्णुस्मृतिमते काश्मीरातील या पर्वतामध्ये कार्तिकेयकृत शक्तिप्रहाराने 'कुमारधारा' नामक जलप्रपात उत्पन्न झाला ( विष्णुस्मृति. ८५.२५ टीप ).

**मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात** — या साहित्यात याचा अनेक वेळा निर्देश आढळतो ( अनेकार्थ. २.६७; ७.५८; त्रिकाण्ड. ११६.७४; मेदिनी. २८.४; शब्दरत्न. ५६.८०; ७१.६; नामांतर–परिपत्रक पहा ).

६. मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते 'माल्यवत्' पर्वताचे नामांतर ( त्रिकाण्ड. ३५.३; माल्यवत् पहा ).

७. म्हैसूर राज्यातील पुणे–बंगलोर रेल्मार्गावरील तोरनगल्ल रेल्वेस्थानकानजिकच्या सोंडूरपासून ६ मैलां-वरील एक पवित्र पर्वत आणि कार्तिकेयस्थान. येथील कार्तिकेय मंदिर दक्षिण भारतातील प्रमुख कार्तिकेयस्थान असून, स्थानिक आख्यायिकामते याच्या सान्निध्यासाठी शिवपार्वती श्रीशैलम् येथे आले ( ती. पृ. ३१० ).

**क्रौञ्च द्वीप** ( द्वीप )—महाभारत आणि पौराणिक साहित्यमते पृथ्वीच्या सप्त महाद्वीपांपैकी चतुर्थ द्वीप ( म. भी. १२.१७–२४ नीलकण्ठ; पद्म. आदि. ९.१७–२४; मत्स्य. १२२.७८; विष्णुधर्म. १.६.७ ). अन्य पुराणमते हे पृथ्वीचे पंचम द्वीप होते ( वायु. ४९.५९; विष्णु. २. ४.४५; लिङ्ग. ४६.२; वामन. ११.३७; काव्यमी. १७. २२० ). अशी यांच्या मते आधु. भूमध्य सामुद्रिक प्रदेश

हाच होय.

**नामांतरे**—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतात :—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. अनेकार्थसंग्रह ( २.६७; ७.७.५८ ); विश्वलोचन ( ११.४ ); त्रिकाण्डशेष ( ३०.४ ); मेदिनी ( २८.४ ); शब्दरत्न ( ७१.७ ) | कौंच |
| २. शारदीय ( ९०९ ) | क्रौंच |

**भौगोलिक स्थान**—महाभारतमते हे मेन पर्वताच्या पश्चिमेस ( म. शां. १४.२४–२५ ) आणि मेरु पर्वताच्या उत्तरेस ( म. भी. १२ ) असून, बृहत्संहिता आणि वाल्मीकि रामायणमते हे जंबूद्वीपाच्या उत्तरेस होते ( बृ. सं. १४.२४; वा. रा. कि. ४३.२५ ).

पौराणिक साहित्यातील क्रौंच आणि कुश द्वीपांच्या (आधु. इराक, इराण) एकत्र निर्देशावरून ही द्वीपे परस्पर-संलग्न असावीत. मत्स्यमते हे रथचक्राच्या धावेप्रमाणे घृतोद समुद्रासभोवती पसरले असून ( मत्स्य. १२२.७९ ), त्यावरून याच्या अंतर्भागात भूभागवेष्टित बंदिस्त समुद्र असावा.

मत्स्यमते येथे सहस्रावधी नदीप्रवाह असून ( मत्स्य. १२२.८९ ), वायुमते त्यांपैकी सात नद्या प्रमुख होत्या ( वायु. ४९. ६८–६९ ). यावरून येथे विपुल पर्जन्यवृष्टी होत असावी.

**आधुनिक स्थान**—अली यांच्या मते जंबूद्वीपाच्या (आधु. आशिया खंड) वायव्येकडील बाल्टीक, भूमध्य, कृष्ण, कॅस्पियन आणि अरल या पाच भूभागवेष्टित समुद्रांपैकी आधु. कृष्ण समुद्रास क्रौंचद्वीपीय समुद्रवर्णन सर्वांशाने लागू पडते. बाल्टिक, अरल आणि कॅस्पियन समुद्रांच्या उभय अंगांस ओसाड आणि निर्मनुष्य वाळवंटे असल्याने, तसेच तेथील हवा शुष्क आणि पर्जन्यरहित असल्याने तेथे समृद्ध मनुष्यवस्ती असणे असंभव वाटते. याचे उलट भूमध्य समुद्रानजिकच्या विशाल अर्धवालुकामय प्रदेशास 'द्वीप' ही मर्यादित देशविभागवाचक संज्ञा विशोभित वाटते. म्हणूनच कृष्ण समुद्रानजिकचा प्रदेश म्हणजे हे द्वीप असावे ( अली, पुराणाज्. पृ. ४५–४६ ). व्ही. व्ही. अय्यर यांच्या मते या प्रदेशातील आधु. आशिया मायनर प्रदेश हाच असावा ( अय्यर, मिथिकल सोसा. जर्नल. १५.११९–१२७ ).

**मतांतरे**—मनकड यांच्या मते आधु. उत्तर अमेरिका देश हाच असावा. 'क्रौंच'चा शब्दशः अर्थ 'बकसदृश जलचर पक्षी' असून, अमेरिकेतील जलाशयाधिक्यामुळे जलचर पक्ष्याचे नाव यास दिले असावे. आजहि नीलवर्णीय क्रौंच पक्ष्यांसाठी तो देश प्रसिद्ध आहे.

मनकड यांच्या मते येथील क्षीरोद सागरवर्ती क्रौंच पर्वत ( भा. ५.२०.१९ ) म्हणजे पॅसिफिक समुद्रवर्ती आधु. रॉकी पर्वत असून, तत्रस्थ रेड इंडियन लोकांची 'करंकवन्' ( केरेसन् ) भाषा 'क्रौंच'चेच अपभ्रष्ट रूप असावी. येथील लोकांचे 'बहुधा गौर' ( गोरटेले ) हे महाभारतान्तर्गत वर्णन ( म. भी. १२.३३ ) अमेरिकेतील रेड इंडियन लोकांशी जुळते.

पौराणिक साहित्यमते हे 'घृतोद' ( आधु. आर्क्टिक ) आणि 'दधिमंडोद' ( आधु. अटलांटिक ) समुद्रांच्या दरम्यान असून, येथील क्रौंच पर्वत क्षीरोद समुद्राकाठी होता ( भा. ५.२०.१९ ). उत्तर अमेरिकेच्या पश्चिमेकडील पॅसिफिक महासागराचा निर्देश येथे अभिप्रेत असावा ( मनकड, ए. बी. ओ. आर. आय्. १८.२३४–२३५; २३९ ).

**समुद्र**— पौराणिक साहित्यमते येथील प्रमुख समुद्र पुढीलप्रमाणे होत :– घृतोद ( विष्णु; मत्स्य; शिव; ब्रह्माण्ड; कूर्म ); २. दधिमंडोद ( विष्णु; शिव; ब्रह्माण्ड ); ३. घृतोदक ( वायु ); ४. सुरोद-क्षीरोद ( भागवत ).

**चतुर्वर्ण**—पौराणिक साहित्यमते येथील चतुर्वर्णात्मक लोकसमूह पुढीलप्रमाणे होत :– १. पुरुष, वृषभ, द्रविण, देवक ( भा. ५.२०.१८-२२ ); २. पुष्कल, पुष्कर, धन्य, ( कूर्म. पूर्व. ४९.२७–३० ), ३. पुष्कर, पुष्कल; धन्य, तिग्म ( विष्णु. २.४.४६-५७ ). पद्ममते येथे सिद्धचारणादि संकीर्णजन रहात असत ( पद्म. आदि. ९.१७-२४ ).

**उपविभाग, नद्या, आणि पर्वत**—पौराणिक साहित्यमते येथील देश, नद्या आणि पर्वत पुढीलप्रमाणे होत (म. भी. १३.१७-२३; वायु. ४९.६०-६९; ब्रह्माण्ड. १९.६६-७७; मार्क. ५०.२३–२४; मत्स्य. १२२.७८–९०; भा. ५.२०.१८-२२; विष्णु. २.४.४६-५७; पद्म. आदि ९.१७-२४; शिव. उमा. ८.४५–५१; वराह. ८८; कूर्म. पूर्व. ४९.२७-२७; परिपत्रक पहा ). शिव, लिंग आणि कूर्म पुराणात येथील वर्षांची; लिंग, मार्कंडेय आणि पद्म पुराणात नद्यांची;

## क्रौंच द्वीपाचे उपविभाग ( वर्षे )

| मार्कंडेय, विष्णु, ब्रह्माण्ड, लिंग पुराण | महाभारत, वायु, मत्स्य, पद्म पुराण |
|---|---|
| १. कुशल | कुशल |
| २. मनुग (ब्रह्माण्ड–'मनोनुग') | मनोनुग |
| ३. उष्ण | उष्ण |
| ४. पीवर ( मार्कं.–प्राकार; ब्रह्माण्ड–' पीवरक ' ) | प्रावरक ( मत्स्य–' पावनक ' ) |
| ५. अंधकारक ( मार्कं.–' अर्थकारक ' ) | अंधकारक |
| ६. मुनि | मुनि |
| ७. दुंदुभि | दुंदुभिस्वन (पद्म–' दुंदुभि ' ) |

तसेच मार्कंडेय पुराणात पर्वतांची नामावली आढळत नाही. भागवतातील देश-पर्वतादींची नामावली स्वतंत्र परंपरेतील दिसते.

भागवतमते क्रौंच द्वीपाचे उपविभाग पुढीलप्रमाणे होतेः– १. आम ( आम्र ); २. मधुरुह; ३. मेघपृष्ठ; ४. सुधामन; ५. भ्राजिष्ठ; ६. लोहितार्ण; ७. वनस्पति. वराह पुराणात येथील कुशल या एकाच उपविभागाचा निर्देश आढळतो ( परिपत्रक पहा ).

**नद्या**—वायु, मत्स्य, ब्रह्माण्ड, शिव, वराह आणि कूर्म-मते येथील नद्या पुढीलप्रमाणे होत :–१. गौरी ( पुष्पवहा ) २. कुमुद्वती; ३. संध्या; ४. रात्रि; ५. मनोजवा; ६. ख्याति ( शिव–'शान्ति'; कूर्म–'कोभि' ); ७. पुंडरीका ( कूर्म–' पुंडरीकाक्षा ' ).

भागवतात ही नदीनामावली निम्नप्रकारे आढळते :— १. अभया; २. अमृतौघा; ३. आर्यका; ४. तीर्थवती; ५. तृप्ति ( वृत्ति, रूपवती ); ६. पवित्रवती; ७. शुक्ला.

२. कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या दक्षिण भागातील एक द्वीप ( बृ. सं. १४.१३; मार्कं. ५५.२३ ).

**क्रौञ्चनिषूदन** ( तीर्थ )—महाभारतान्तर्गत पुलस्त्य-यात्रामते सरस्वती नदीकाठचे एक तीर्थ ( म. आर. ८२. ३९ ).

## क्रौंच द्वीपातील पर्वत

| वायु, ब्रह्माण्ड, शिव, लिंग पुराण | महाभारत, पद्म पुराण | मत्स्य पुराण | कूर्म पुराण | विष्णु पुराण | वराह पुराण |
|---|---|---|---|---|---|
| १. क्रौंच | महाक्रौंच | क्रौंच | क्रौंच | क्रौंच (महाक्रौंच) | — |
| २. वामनक (शिव, ब्रह्माण्ड–'वामन') | वामनक | पावनक | वामनक | वामन | — |
| ३. अंधकारक | अंधकारक | अंधकारक | अधिकारिक | अंधकारक | अंधकार |
| ४. दिवावृत् (शिव–' दिवावृति ' ) | मैनाक | देवावृत् | देवाब्द | देवावृत् | देवावृत् |
| ५. विविंद ( शिव– ' मन, ' वायु– ' दिविंद '; ब्रह्माण्ड– ' द्विविद ' ) | गोविंद | गोविंद | विवेद | — | — |
| ६. पुंडरीक | पुंडरीक ( महा. ' निविड ' ) | पुंडरीक | पुंडरीक | पुंडरीकवत् | पुंडरीक |
| ७. दुंदुभि | दुंदुभिस्वन ( पद्म ), | देवन | दुंदुभिस्वन | दुंदुभि | — |
| ८. — | गोमंद ( महा. ) | — | — | — | — |
| | | | | | विद्युल्लत, रैवत, मानस |
| — | — | — | — | — | |

भागवतमते येथील प्रमुख पर्वत पुढीलप्रमाणे होत :— १. शुक्ल; २. वर्धमान; ३. भोजन; ४. उपबर्हिण; ५. नन्द; ६. नन्दन; ७. सर्वतोभद्र.

**क्रौञ्चपद** ( पर्वत )—गया येथील 'क्रौंचपाद' पर्वताचे नामांतर ( वायु. १०८.८४; क्रौंचपाद पहा ).

**क्रौञ्चपदी** ( तीर्थ )—महाभारत अंगिरसयात्रामते एक तीर्थ. नीलकंठमते हे विष्णुपदादि तीर्थांचे 'संग्राहक उपलक्षण' आहे ( म. अनु. २५.४२ ).

**क्रौञ्चपाद** ( पर्वत )—गया येथील एक पर्वत ( अग्नि. ११६.७; वायु. १०९.१६; नारद. उत्तर. ४६.५२ ). वायुमते 'क्रौंचरूपधारी मुनिपदस्पर्शयुक्त' अर्थाने यास हे नाव मिळाले ( वायु. १०८.७५ ). पाठभेद–'क्रौंचपद' ( वायु. १०८.८४ ).

**क्रौञ्चपुर** ( नगर )—हरिवंशमते दक्षिण भारतातील सह्य पर्वतानजिकचे करवीरपुर–गोमंत पर्वत मार्गावरील वनवासी देशाच्या राजधानीचे नगर ( ह. वं. २.३९. ५५–६४ ). येथे यादव राजांचे राज्य होते ( ह. वं. २. ४०.६१–६२ ).

**जैन तीर्थ**—हरिषेणमते वनवासी (कर्नाटक) प्रदेशातील या स्थानी चाणक्य मुनींना सिद्धावस्था प्राप्त झाली ( ती. सं. पृ. १३६ ).

**क्रौञ्चबिल** ( पर्वतविवर )—महाभारतमते हिमालयान्तर्गत क्रौंच पर्वतातील एक विवर ( म. श. १७.५१ ). नामांतर–'क्रौंचरंध्र' ( क्रौंच ५. पहा ).

**क्रौञ्चशैल** ( वन )—जंबूद्वीपान्तर्गत कैलास पर्वतातील एक वन ( वायु. ४१.३७ ).

**क्रौञ्ची** ( योगिनी )—काशी येथील एक योगिनीस्थान ( स्कन्द. काशी. ४५.३९ ).

**क्रौष्टकि** ( लोकसमूह )—पाणिनीय व्याकरणमते त्रिगर्त ( आधु. कांग्रा ) देशान्तर्गत 'त्रिगर्तषष्ठ' संज्ञक आयुधजीवी लोकसमूहांपैकी एक ( अग्रवाल, पाणिनि. पृ. ४५८ ).

**क–चौ** ( नगर )—ह्युएन्त्संगच्या जीवनचरित्रमते चीनच्या पश्चिम सरहद्दीवरिल एक नगर. स. ६२९ मध्ये ह्युएन्त्संग चीनराजधानी चँग् अन् येथून या, तसेच 'लिअँग्‌चौ' नगरमार्गे चीनच्या पश्चिम सरहद्दीनजिक आला ( वॉटर्स, २.३३१ ).

**क्षत्रयोथ** ( लोकसमूह )—मत्स्यमते उदीच्य देशातील 'आत्रेय' लोकसमूहाचे नामांतर ( आत्रेय पहा ).

**क्षत्रिय कुण्ड** ( जैन तीर्थ )–'कुंडपुर' नामक जैनतीर्थाचे नामांतर ( कुंडपुर पहा ).

**क्षथ्रोइ** ( लोकसमूह )—कर्टियस्च्या मते सिकंदरने अबस्तनोइ ( आधु. अंबष्ठ ) समवेत जिंकलेला पंजाबातील एक लोकसमूह. मालव देशाच्या दक्षिणेकडील सिंधु, रावी आणि चिनाब संगमावरील आधु. खत्रि लोक हेच होत. नामांतर–'ओक्षथ्रोइ'.

**क्षपण** ( देश )—ब्रह्माण्डमते दक्षिणापथ देशान्तर्गत एक देश ( ब्रह्माण्ड. १६.५६ ).

**क्षमा** ( नदी )—ऋक्ष पर्वतोद्भवा एक नदी ( मत्स्य. ११४.२५ ).

**क्षहरात** ( राजवंश )—शक राजा पतिकाच्या इ. स. पू. ६ च्या तक्षिला ताम्रपटमते शक कुलोत्पन्न एक राजवंश. काठेवाड आणि मालव देशातील शक राजप्रतिनिधी ( क्षत्रप ) या वंशातील असून, स्टेन कोनौ यांच्या मते हे 'क्षहर–रात' ( क्षत्र रात ) चे अपभ्रष्ट रूप असावे ( स्टेन कोनौ, २.१.१.३३; २.२९ ). या लोकांचे हे वंशनाम उत्तरकालात त्यांची सन्माननीय उपाधी बनले.

**शिलालेख साहित्यात**—कुशाण सम्राट विम कद्‌फिसेसचे भूमक, आणि नहपान, तसेच लियक कुसूलक हे पश्चिम व उत्तर भारतातील क्षत्रप या वंशातील असून, त्यापैकी भूमकाच्या नाण्यांवर '**क्षहरातस क्षत्रप**' आणि नहपानाच्या नासिक शिलालेखात '**रानो क्षहरातस क्षत्रप**' अशा अक्षरपंक्ती आढळतात. सातवाहन सम्राट श्रीपुळुमायीच्या नासिक शिलालेखात यास '**खखरात—वस**' ( क्षहरातवंश ) म्हटले आहे ( एपि. इंडि. ८.६० ).

स्टेन कोनौ यांच्या मते मूळचे वायव्य भारतातील हे लोक उत्तरकालात पश्चिम आणि उत्तर भारतात स्थायिक झाले. नहपानाच्या राज्यकाली आंध्र राजांनी पराभूत केलेले हे लोक चश्टन ( स. १३० ) आणि चश्टनपौत्र रुद्रदामनाच्या काळी पुन्हा सुस्थापित झाले ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.१.७०–७१ ).

**क्षाता** ( नदी )—स्कंदमते क्षिप्रा नदीची अमरकंटकोद्भवा एक उपनदी ( स्कन्द. आवन्त्य. अ. ५६.६–१२ ). अवंतीक्षेत्रात ही क्षिप्रेस मिळत असे.

**क्षारवाह** ( ग्राम )—सोळंकी राजा जयसिंहाच्या वि. सं. ११९६ च्या शिलालेखमते गुजरातमधील एक ग्राम. मध्य गुजरातेतील आधु. खाखा ग्राम हेच होय ( इंडि. अँटि. १०.१५९–१६० ).

**क्षारोद** ( सागर )—पौराणिक साहित्यमते पृथ्वीच्या सप्त समुद्रांपैकी प्रथम. या साहित्यमते हा जंबूद्वीप आणि प्लक्षद्वीपाच्या ( वायु, ब्रह्माण्ड आणि मार्कंडेय ) अथवा शाकद्वीपाच्या ( महाभारत, मत्स्य, वराह, स्कंद आणि पद्म ) दरम्यान होता. विष्णुमते हा जंबूद्वीपपरिवेष्टक

समुद्र त्याच्या पूर्वेकडील शाकद्वीपापर्यंत पसरला होता. भास्कराचार्यांच्या मते याच्या उत्तर आणि दक्षिण गोलार्धात अनुक्रमे जंबूद्वीप आणि पृथ्वीतील अन्य सहा द्वीपे आणि सहा समुद्र होते (विल्सन, विष्णु. २.११०.१). भागवतमते भारतवर्षाच्या दक्षिणेकडील या समुद्रास मेरुपर्वतोद्भवा चतुर्गंगांपैकी पूर्ववाहिनी सीता नदी मिळत असे ( भा. ५.१७.६ ). नामांतर–' क्षारसमुद्र '; ' लवणसमुद्र ' ( विष्णु. २.३.३८ ).

अली यांच्या मते भारतवर्षाच्या पूर्वेकडील आधु. बंगालचा उपसागर हाच असून, याच्या आग्नेयेकडील क्षीरसमुद्र आणि शाकद्वीप म्हणजे अनुक्रमे दक्षिण चीन समुद्र आणि आधु. मलाया, सयाम, हिंदचीन आणि दक्षिण चीन होत. मनकड यांच्या मते भारतवर्षाच्या दक्षिणेकडील आधु. हिंदी महासागर हाच असावा ( मनकड, ए. बी. ओ. आर. आय्. १८.२३७ ).

**क्षारोदा** ( नदी )—जंबूद्वीपान्तर्गत भद्राश्व वर्षातील एक नदी ( वायु. ४३.२९ ).

**क्षिपका** ( ग्राम )—पाणिनीच्या अष्टाध्यायीमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.७ ).

**क्षिप्तिकाकुल्या** (कालवा)—राजतरंगिणीमते कश्मीरातील वितस्ता ( आधु. झेलम ) नदीचा श्रीनगरच्या पश्चिम सीमावर्ती प्रवरसेन ( द्वितीय ) राजाच्या जुन्या राजवाड्यानजिकचा एक कालवा ( कुल्या; राज. ८.७३२; ९५५ ). श्रीनगरसभोवतालच्या या खंदकसदृश कालव्याभोवती शत्रूंनी अनेक वेढे घातले होते ( राज. ८.१००६; १०५५; १०६१; १११६; ११६४; २१६५; ३१३० ).

स्टाइन यांच्या मते श्रीनगर येथील शेरगढीपासून सातव्या पुलापर्यंतचा आधु. कुटकुल् कालवा ( लांबी–१½ मैल ) हाच होय ( स्टाइन, राज. २.४५१ ). श्रीनगर येथील झेलम नदीच्या उत्तर–नैर्ऋत्य वळणामुळे होणारी जलवाहतुकीची कुचंबणा या कालव्यामुळे दूर होते ( स्टाइन, राज. २.४१७ ).

**क्षिप्रा** ( नदी )—पौराणिक साहित्यमते मध्य भारतातील उज्जयिनीनजिकची पारियात्र पर्वतोद्भवा पवित्र नदी ( मार्कं. ५४.२०; ब्रह्माण्ड. १६.२९ ). इंदूरपासून १२ मैल आग्नेयेकडील कोक्री बर्डी टेकडीवर उगम पावून ( अक्षांश २२°–३१′ उत्तर; रेखांश. ७६° पूर्व ), काळुखेरी गावानजिक ( अक्षांश २३°–५३′ उत्तर; रेखांश ७५°–३१′ पूर्व ) चबळ नदीस मिळणारी आधु. शिप्रा नदी हीच होय. नामांतर–' शिप्रा ' ( मत्स्य. २२.२४; ११४.२४; वायु. ४५.९८ ); ' अवंती नदी '.

**उगम**—मार्कंडेयमते ही पारियात्र पर्वतोद्भवा असून ( मार्कं. ५४.२० ), अन्य पौराणिक साहित्यमते ही विंध्यपाद पर्वतोद्भवा होती (मार्कं. ५४.२४; ब्रह्माण्ड. १६.३३; मत्स्य. ११४.२७; वामन. ८३.१८–१९ ).

**पौराणिक साहित्यात**—मत्स्यमते ही उत्तरवाहिनी नदी श्राद्धयोग्य असून ( मत्स्य. २२.२४; पद्म. ११.१७ ), वामन पुराणातील प्रह्लाद-तीर्थयात्रेत ( वामन. ८३.१८ ), तसेच स्कंद पुराणातील अवंतीक्षेत्रमाहात्म्यात हिचे, तसेच हिच्या काठच्या उज्जयिनीचे माहात्म्य आढळते ( स्कन्द. आवन्त्य. अ. ४९.५२ ).

**तीर्थे**—पौराणिक साहित्यमते रुद्रसरोवरस्थानीचा क्षता–क्षिप्रा संगम अत्यंत पवित्र असून, हिच्या काठचे महाकाल ( उज्जयिनी ) तीर्थ हे पृथ्वीतील सर्वश्रेष्ठ तीर्थद्वयापैकी एक होते ( अन्य तीर्थ–अविमुक्त = काशी; तीर्थप्रकाश. पृ. १३१ ).

**संस्कृत साहित्यात**—हिच्या तरंगपरिवहित वायुलहरींनी हेलावणाऱ्या उज्जयिनी–वाटिकांचे वर्णन रघुवंशात असून ( रघु. ६.३४–३५ ), मेघदूतात हिच्या परिसरातील सुगंधित वायुलहरींचे वर्णन आढळते ( मेघ. पूर्व. ३५ ).

**ऐनू-इ-अकबरीत**—या ग्रंथमते या श्रीविष्णुरुधिरोत्पन्न नदीमधून पर्वकाळी दुग्धधारा स्रवत असून, हिच्या काठी पदोपदी तीर्थस्थाने, ऋषिआश्रम आणि पौराणिक चमत्कारांची स्थाने होती ( ऐ. अ. २.१९६ ).

**आधुनिक काळी**—ही मालव ( माळवा पठार ) प्रदेशान्तर्गत आग्नेयवाहिनी नदी बहुंशी सखल प्रदेशातून वहात ( अपवाद–मेहिदपुर आणि अलोटच्या दरम्यानचा खडकाळ प्रदेश ) उज्जयिनी येथे ( उगमापासून अंतर–५४ मैल ) येते. तेथे हिच्या काठी अनेक घाट बांधले असून, हिच्या खन् आणि गंभीर नामक उपनद्या हिला अनुक्रमे गोत्रा आणि मुर्ला मर गावी मिळतात.

**यात्रा**— दरवर्षी कार्तिक महिन्यात, तसेच द्वादशवार्षिक कुंभमेळा–पर्वकाली उज्जैन येथे हिच्या काठी भरणाऱ्या यात्रेत यात्रेकरू हिचे स्नान आणि हरसिद्धी देवीचे दर्शन करतात.

२. कूर्ममते पूर्व भारतातील शुक्तिमत् पर्वतोद्भवा 'कृपा' नदीचे नामांतर ( कूर्म. पूर्व. ४७.३९; कृपा पहा ).

**क्षीर** ( समुद्र )— मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते पृथ्वीच्या सप्त समुद्रांपैकी ' क्षीरोद ' समुद्राचे नामांतर

( शारदीय. ९११; क्षीरोद पहा ).

**क्षीरकुण्ड** ( तीर्थ )— स्कंदमते दक्षिण भारतातील रामसेतूनजिकच्या फुल्लग्राम येथील एक सरोवर ( स्कन्द. ब्राह्म. से. ३७–३८ ).

**क्षीरकुण्डी** ( तीर्थ )— अयोध्या येथील एक तीर्थ ( स्कन्द. वैष्णव. अ. १–१० ).

**क्षीरग्राम** ( शक्तिपीठ )— पूर्व भारतातील बरद्वानपासून २० मैल उत्तरेकडील 'युगाद्या' शक्तिपीठाचे नामांतर ( ती. पृ. १७३; युगाद्या पहा ).

**क्षीरचोर गोपीनाथ** (विष्णुस्थान)—ओरिसामधील रेमुणा गावानजिकचे एक वैष्णवस्थान ( ती. पृ. १९० ).

**क्षीरनीरधि** ( सरोवर ) — स्कंदमते वाराणसी येथील 'कापिल' सरोवराचे नामांतर ( स्कन्द. काशी. ६२.५३–६५; कापिल ३. पहा ).

**क्षीरपुर** ( तीर्थ )—राजस्थानमधील एक वैष्णवस्थान. जोधपूर प्रदेशातील बालोतरा रेल्वेस्थानकापासून ५ मैल पश्चिमेकडील लूनी नदीकाठचे आधु. खेडक्षीरपुर हेच होय ( ती. पृ. २९२–२९३ ).

**क्षीरभवानी** ( देवी ) — कश्मीरातील श्रीनगर–मानसबल मार्गावरील एक देवीस्थान ( ती. पृ. ४४ ).

**क्षीरवती** ( नदी ) — महाभारत पुलस्त्ययात्रामते सरस्वती आणि बाहुदा नद्यांनजिकच्या 'चीरवती' नदीचे नामांतर ( म. आर. ८२.६१; चीरवती पहा ).

**क्षीरसर** ( ग्राम )— गुर्जर राजा दद्द ( द्वितीय ) च्या स. ६४२ च्या संखेडा ताम्रपटमते गुजरातमधील एक ग्राम. कुकड गावच्या १ मैल पूर्वेकडील आधु. खरियाकुआ ग्राम हेच होय ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.७६ ).

**क्षीरसरस्** ( तीर्थ ) — कश्मीरातील वितस्ता ( आधु. झेलम ) नदीकाठचे एक तीर्थ (नीलमत. १४८७).

**क्षीरसागर** ( सरोवर )— व्रजमंडलान्तर्गत ( आधु. मथुरा-वृंदावन ) महावनापासून ६ मैलांवरील एक सरोवर ( ती. पृ. ९९ ).

२. महाभारतमते पृथ्वीच्या सप्त समुद्रांपैकी 'क्षीरोद' सागराचे नामांतर ( म. उ. १००.४ ). अन्य नामांतर– 'क्षीराब्धि' ( नृसिंह, ६५.२३; क्षीरोद पहा ).

३. ( तीर्थ ) काशी येथील एक तीर्थ ( स्कन्द. काशी. ८४.७ ).

**क्षीरिका** ( तीर्थ )—वामनमते एक नीलकंठस्थान ( वामन. तीर्थविवेचन. पृ. २३८ ).

**क्षीरिकावास** ( तीर्थ )—वामन पुराण प्रह्लादतीर्थयात्रामते एक तीर्थ ( वामन. ८४.२२ ).

**क्षीरेश्वर** ( शिवलिंग )—उत्तर प्रदेशातील कानपुर–दिल्ली मार्गावरील शिवराजपुर रेल्वेस्थानकापासून ३ मैल उत्तरेकडील अश्वत्थामन्- शिवतपस्यास्थान. येथून ½ मैलावर अश्वत्थामन् मंदिर आहे ( ती. पृ. ११३ ).

**क्षीरोद** ( समुद्र )—महाभारतमते पृथ्वीच्या सप्तसमुद्रांपैकी सहावा समुद्र ( म. आ. २.९१; शां. ३२२.८–१४; ३२३.२३-२६; अनु. १४.२४० ). महाभारतमते जंबूद्वीपाच्या पूर्ववर्ती शकद्वीपासभोवती हे असून ( म. भी. ११.१० ), मत्स्य आणि वराहमते हा शक आणि कुश द्वीपांच्या दरम्यान होता. अन्य पौराणिक साहित्यमते हा शक आणि पुष्कर द्वीपांच्या दरम्यान होता.

अली यांच्या मते आग्नेय आशियातील मलाया, सयाम, हिंद–चीन आणि दक्षिण चीननजिकचा ( प्राचीन 'शकद्वीप' ) दक्षिण चीन समुद्र हाच होय.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतातः—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. महाभारत<br>अ. ( शां. ३२३.२३ ) | क्षीरोदधि |
| ब. ( उ. १००.४ )<br>२. पौराणिक साहित्य<br>अ. ( मत्स्य. १२२.४९; भा. ५.२०.१८; ब्रह्माण्ड. १९.१०.२; वायु. ४९.१०५ ) | क्षीरसागर ( क्षीरनिधि ) |
| ब. ( नृसिंह. ६५.२३ )<br>३. मध्ययुगीन शब्दकोश साहित्य<br>अ. ( वैजयन्ती. ३६.११ ) | क्षीराब्धि |
| ब. ( वैजयन्ती. ३६.११ ) | कलशोदधि |
| क. ( वैजयन्ती. ३६.११; २२ ) | मंथोदधि |
| ड. ( शारदीय. ९११ ) | क्षीर |

**नामव्युत्पत्ती**—वाल्मीकि रामायणमते 'श्वेत मेघवर्णीय दुग्धसदृश जलयुक्त' अर्थाने यास हे ( क्षीरोद–दुग्धसमुद्र ) नाव मिळाले. उसळत्या लाटांच्या फेसाळ दक्षिण चीन समुद्रास हे वर्णन तंतोतंत लागू पडते.

उत्पत्ती—महाभारतमते ब्रह्मदेव-मुखोत्सर्जित रसातल-निवासी सुरभि धेनूच्या अमृतमय दुग्धधारांमधून याची (क्षीरनिधि) निर्मिती झाली (म. उ. १००.४).

भौगोलिक स्थान—वाल्मीकि रामायणमते जंबूद्वीपाच्या पूर्ववर्ती हा समुद्र वैनतेय-निवासपुनीत कूटशाल्मलि आणि ऋषभ पर्वतांच्या दरम्यान होता (वा. रा. कि. ४०.१९–५४). पौराणिक साहित्यमते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या पूर्वेकडील हा समुद्र (बृ. सं. १४.६) शक आणि कुश द्वीपांनजिक (वायु. ४९.९९; ब्रह्माण्ड. १९.१०२; भा. ५.२०.२४; मत्स्य. १२२.४९), अथवा पुष्कर आणि क्रौंच द्वीपांनजिक होता (वायु. ४९.१०५; ब्रह्माण्ड. १९.१०८; विष्णु. २.४.७१; भा. ५.२०.१८). महाभारतमते हा श्वेत द्वीपाच्या दक्षिणेस असून, त्याच्या काठी अनेक लोकसमूह रहात असत (म. शां. ३२२.८–१४; ३२३.२३–२६). नृसिंहमते येथे पद्मनाभ नामक विष्णूचे स्थान होते (नृसिंह. ६५.२३).

मतांतर—मनकड यांच्या मते आधु. प्रशांत (पॅसिफिक) महासागर हाच असून, तुफानी आणि झंझावाती अटलांटिक महासागराच्या तुलनेने अथांग आणि शांत अशा या सागरास 'क्षीरोद' नाव शोभून दिसते (ए. बी. ओ. आर. आय्. १८.२३७).

**क्षीरोदक** (तीर्थ)—अयोध्या येथील एक तीर्थ (स्कन्द. वैष्णव. अ. १–१०).

**क्षीरोदधि** (समुद्र)—महाभारतमते पृथ्वीच्या सप्त समुद्रांपैकी 'क्षीरोद' समुद्राचे नामांतर (म. शां. ३२३.२३; क्षीरोद पहा).

**क्षीरोदा** (नदी)—जंबूद्वीपान्तर्गत भद्राश्व वर्षातील एक नदी (वराह. ८२.४).

**क्षुद्रक** (लोकसमूह)—पाणिनीच्या गणपाठमते वाहीक (आधु. पंजाब) देशातील आयुधजीवी संघ (पा. सू. ५.३.११४). यांचे आणि मालवांचे संघराज्य 'क्षौद्रकमाल्वी' संयुक्त नावाने प्रसिद्ध असून (पा. सू. ४.२.४५), सिकंदरच्या आक्रमणसमयी यांनी त्याचा निकराने प्रतिकार केला होता.

अग्रवाल आणि स्मिथ यांच्या मते पंजाबातील रावी नदीच्या पूर्ववर्ती आधु. अमृतसर-गुरुदासपुर, कांगडा आणि होशियारपुर जिल्ह्यांत हे रहात असून, रावी-चिनाब संगमानजिक मालवांची वसाहत होती (जे. आर. ए. एस्., स. १९०३). नामांतर (ग्रीक साहित्य)–'आक्सिद्रकाइ'; (कर्टियस्)–'सुद्रकाइ'.

सिकंदरच्या आक्रमणकाली—सिकंदरस्वारीशी संबंधित ग्रीक साहित्यात निर्देशिलेले 'आक्सिद्रकाइ' लोक हेच 'क्षुद्रक' असल्याचे रामकृष्ण भांडारकर यांनी सर्वप्रथम सिद्ध केले (मॅक्रिंडल, अलेक्झांडर. पृ. २३८). रामकृष्ण भांडारकर यांच्या मते सिकंदरच्या आक्रमण-समयी हे आणि मालव लोक त्याच्याशी संयुक्तपणे लढले. परंतु पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यातील यांच्या एकाकी प्रतिकाराच्या निर्देशावरून (**एकाकिभिः क्षुद्रकैर्जितम्**; पतञ्जलि. २.४१२), मालवशरणागतीनंतरहि हे प्राणपणे लढले असावेत.

महाभारतात—या ग्रंथात सर्वत्र 'क्षुद्रकमालव' लोकांचा संयुक्त निर्देश असून, युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयी हे उपायनांसह उपस्थित होते (म. स. ४८.१४). शकुनिरक्षणार्थ हे दुर्योधनासमवेत धावले असून (म. भी. ४७.१६), भीष्माज्ञेवरून यांनी अर्जुनावर हल्ला केला होता (म. भी. ५५.७४). द्रोणाचार्यांच्या पांडवसेनेवरील आक्रमणात हे सहभागी असून (म. भी. ८३.७), महाभारतपूर्वकाली परशुरामाने यांना संहारिले होते (म. द्रो. परि. १.८.८४५). अर्जुनाने क्षुद्रक-माल्वांचा संहार केला होता (म. क. ४.४६).

**क्षुद्रमीन** (लोकसमूह) — बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारताच्या उत्तर भागातील एक लोकसमूह (बृ. सं. १४.२४). चौधरी यांच्या मते रजपूतपूर्वकालीन जयपुर प्रदेशातील मेवाडचे सुविख्यात मीन लोक हेच होत. नामांतर–'क्षुद्रवीन' (मार्कं. ५८.४१); 'क्षुद्रवीणा' (मार्कं. ५५.४२).

स्थानिक आख्यायिकामते राजपुतान्याच्या या (मीन) आद्य वसाहतकारांचे जयपुर प्रदेशावर राज्य असून (इंपि. गॅझे. २१.११४), इ. स. १२ व्या शतकात कचवाह रजपुतांनी यांची राजपुतान्यातून हकालपट्टी केली. कनौजच्या जयचंद राजघराण्याशी झालेल्या यांच्या संघर्षाचे वर्णन ऐन्-इ-अकबरीत आढळते (ऐ. अ. २.७०–७१).

**क्षुधा** (तीर्थ)— गौतमी (गोदावरी) नदीकाठचे एक तीर्थ (ब्रह्म. ८५.१;२५).

**क्षुपण** (देश)— हिमालय पर्वतान्तर्गत एक देश (वायु. ४५.१३५).

**क्षुरादि** (पर्वत) — कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या पश्चिम भागातील एक पर्वत (मार्कं. ५५.३४).

**क्षुरार्पण** (देश)—कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या पश्चिम भागातील एक देश (बृ. सं. १४.२०).

**क्षुरिकाबल** (नगरविभाग)—राजतरंगिणीमते कश्मीरातील प्रवरपुर (आधु. श्रीनगर) नगरान्तर्गत महासरित कालव्यानजिकचा एक नगरविभाग. येथील वेताळाच्या प्रेरणेवरूनच कश्मीरराज प्रवरसेन (द्वितीय) ने ते नगर स्थापिले (राज. ३.३४७). स्टाइन यांच्या मते श्रीनगर येथील सुथ बंधाऱ्याच्या पश्चिमवर्ती आधु. खुड्बल नगरविभाग हाच असून, त्याचे हे नाव 'क्षुरिकाबल'चेच अपभ्रष्ट रूप असावे (क्षुरिका> क्षुर > खूर > खुड; स्टाइन, राज. १.१०१; २.४४३).

**क्षुल्लकपुर** (नगर)—शिलालेख साहित्यमते महाराष्ट्रातील 'करवीर' नगराचे नामांतर (एपि. इंडि. ३.२०७; २१०; करवीर पहा).

**क्षेत्र** (तीर्थ)—सह्य पर्वतान्तर्गत एक तीर्थ (नृसिंह. ६५.३–४).

**क्षेत्रपाल** (तीर्थ)—प्रभासक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ (नारद. उत्तर. ७०.३९).

२. (शिवलिंग) गुजरातमधील भडोच जिल्ह्यातील नर्मदा नदीकाठच्या ब्रह्मतीर्थानजिकचे एक शिवलिंगस्थान. येथील शिवाचे नाव ढुंढेश्वर आहे (ती. पृ. ४३६).

**क्षेत्रपालेश्वर** (लिंग)—प्रभासक्षेत्रातील एक शिवलिंग (स्कन्द. प्रभास. प्र. १८१).

**क्षेम** (देश)—शक राजा पतिकाच्या इ. स. पू. ६ च्या तक्षिला ताम्रपटमते वायव्य भारतान्तर्गत तक्षिलेच्या ईशान्येकडील एक देश. स्टेन कोनो यांच्या मते तक्षिला नगरान्तर्गत आधु. सिरकपच्या ईशान्यवर्ती प्रदेश हाच होय (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.२६).

**क्षेमकप्रयाग** (वैष्णव तीर्थ)—उत्तर भारतातील संभलक्षेत्रान्तर्गत पंचप्रयागांपैकी एक वैष्णव तीर्थ (ती. पृ. ९३).

**क्षेमकवर्ष** (वर्ष)—पौराणिक साहित्यमते प्लक्ष द्वीपान्तर्गत एक देशविभाग (वर्ष; ब्रह्माण्ड. १९.१६; भा. ५.२०.३; मार्कं. ५०.३०; लिङ्ग. ४६.४३; वायु. ४९.१४; विष्णु. २.४.५).

२. शाक द्वीपान्तर्गत एक वर्ष (मत्स्य. १२२. २५; ३८).

**क्षेमगिरक** (ग्राम)—हरिश्चंद्रवंशीय भोगशक्ति राजाच्या स. ७०९ च्या अंजनेरी ताम्रपटमते मध्य भारतातील एक ग्राम. याचे आधु. स्थान समजत नाही (कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.१४९).

**क्षेमगौरीश्वर** (मंदिरस्थान)—राजतरंगिणीमते श्रीनगरच्या पश्चिम सीमावर्ती वितस्ता संगमानजिकचे कश्मीरराज क्षेमगुप्तनिर्मित एक शिवमंदिरस्थान (राज. ६.१७२–१७३; विक्रमाङ्क. १८.२३). स्टाइन यांच्या मते श्रीनगर येथील दिद्मर (प्राचीन–दिद्दामठ) नजिकच्या झेलम–चत्सकुल (प्राचीन 'वितस्ता–दुग्धसिंधु') संगमस्थानी हे असावे (स्टाइन, राज. २.४५२).

**क्षेमङ्करी** (देवी)—हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक देवीस्थान (स्कन्द. नागर. ११८).

२. श्रीमालक्षेत्रान्तर्गत एक देवीस्थान (श्रीमाल. १९).

३. राजस्थानमधील बुंदी कोटानजिकच्या इंद्रगढ रेल्वेस्थानकापासून ५ मैलांवरील एक देवीस्थान (ती. पृ. २८३).

**क्षेमधूर्त** (देश)—बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या उत्तर भागातील एक देश (बृ. सं. १४. २८; मार्कं. ५५.४७).

**क्षेमवृद्धिन्** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू. ४.२.१३८).

**क्षेमादित्य** (तीर्थ)—प्रभासक्षेत्रान्तर्गत एक आदित्यतीर्थ (स्कन्द. प्रभास. प्र. ३१६; नारद. उत्तर. ७०.६७).

**क्षेमेश्वर** (लिंग)—काशी येथील एक शिवलिंग (स्कन्द. काशी. ९७.२४९; लिङ्ग. तीर्थविवेचन. पृ. २१७).

२. प्रभासक्षेत्रान्तर्गत एक शिवलिंग (स्कन्द. प्रभास. प्र. १२७;३२३).

३. (घाट) काशी येथील एक घाट

**क्षोणिवराह** (तीर्थ)—काशी येथील एक तीर्थ (स्कन्द. काशी. ८३.९०).

**क्षौन** (नगर)—टॉलेमीच्या मते सिंधु नदीकाठचे एक नगर (अक्षांश २१°–३१ उत्तर; रेखांश १३°–४० पूर्व). यूल यांच्या मते थरचे वाळवंट आणि अरवली पर्वतांच्या दरम्यानच्या भवलिंग देशातील आधु. सेवन गाव हेच होय.

**क्षौमप्रस्थ** (नगर)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक नगर (पा. सू. ६.२.८८). 'प्रस्थ' अंत्यशब्दयुक्त नगरनामाचे उदाहरण म्हणून याचा निर्देश तेथे असून, अन्य प्रस्थान्त नगरांप्रमाणेच हेहि कुरुक्षेत्रात असावे (अग्रवाल, पाणिनि. पृ. ८१).

# ख

**खखून्द नगर** (जैन तीर्थ)— उत्तर भारतातील गोरखपुरपासून ३९ मैल पूर्वेकडील नूनखार रेल्वेस्थानकापासून ३ मैलांवरील एक जैन तीर्थ, आणि पुष्पदंत नामक नवम तीर्थंकराचे जन्मस्थान (ती. पृ. ५३८).

**खखोल्क** (आदित्य)— काशी येथील द्वादशादित्यांपैकी षष्ठ (स्कन्द. काशी. ५०).

**खगतासङ्गम** (नदीसंगम)— अवंतीक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ (स्कन्द. आवन्त्य. अ. ६३.३).

**खङ्गघन्हा विषय** (देशविभाग) —शिलालेख–साहित्यमते दक्षिण कोशल देशान्तर्गत एक देशविभाग (एपि. इंडि. ३.३५६).

**खचर** (लोकसमूह) — बृहत्संहितामते वायव्य भारतातील 'खस्थ' लोकसमूहाचे नामांतर (बृ. सं. १४. २८; खस्थ पहा).

**खञ्जन** (पर्वत)—मार्कंडेयमते भारतवर्षातील एक पर्वत. याचे आधु. स्थान समजत नाही.

**खञ्जनक** (तीर्थ)—द्वारका येथील एक तीर्थ (स्कन्द. प्रभास. द्वा. १६.३४).

**खञ्जनेश्वर** (लिंग)—तापी नदीकाठचे एक शिवलिंग (तापीमाहात्म्य. १३).

**खञ्जय** (पर्वत)—मार्कंडेयमते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या पश्चिम भागातील एक पर्वत (मार्कं. ५५.३४).

**खट्वाङ्गा** (नदी)—हरिवंशमते करवीरपुर–गोमंत पर्वत मार्गावरील एक नदी आणि जलप्रपात (ह. वं. २.३९.५५–६४). वेळगाव जिल्ह्यातील आधु. घटप्रभा नदी हीच असून, तीवरील जलप्रपात म्हणजे गोकाकचा धबधबा असावा.

**खट्वाङ्गेश** (लिंग)—काशी येथील एक शिवलिंग (स्कन्द. काशी. ९७.७१; लिङ्ग. तीर्थविवेचन. ५६).

**खडकुली** (महानुभाव तीर्थ)—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थ (स्था. पृ. ६०). पैठणच्या २२ मैल वायव्येकडील, आणि प्रवरासंगमापासून १२ मैलांवरील सावरखेडच्या ½ मैल पूर्वेकडील आधु. खडकुली ग्राम हेच होय.

**खडा** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू. ४.२.८६).

**खडिव** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू. ४.२.८०.१५).

**खड्डवी** (राज्यविभाग आणि ग्राम)—राजतरंगिणीमते कश्मीरातील मडव राज्यान्तर्गत एक राज्यविभाग आणि ग्राम. ऐन्-इ-अकबरीमते याच्या परिसरात ३६० निर्झर होते (ऐ. अ. २.३५८).

स्टाइन यांच्या मते श्रीनगरच्या आग्नेयवर्ती पुराणाधिष्ठानपासून वस्त्रवनापर्यंतचा आधु. विही परगणा (अक्षांश–३४°–१′ उत्तर; रेखांश. ७५°–४′ पूर्व), आणि त्यामधील ख्रुवग्राम हेच होय (स्टाइन, राज. २.५९). हे ग्राम निर्झरांसाठी आजहि प्रसिद्ध असून, त्याच्या उत्तरेस ज्वालामुखी देवीचे स्वयंभूस्थान आहे (स्टाइन, राज. २.४५९).

**खड्ग** (तीर्थ)—गौतमी (गोदावरी) नदीकाठचे एक तीर्थ. नामांतर–'गुप्ततीर्थ' (ब्रह्म. १३९.१;१९).

२. साभ्रमती नदीकाठचे एक तीर्थ (पद्म. उत्तर. १४०.१).

**खड्गधारा** (तीर्थ)—पद्ममते साभ्रमती नदीकाठचे एक गुप्ततीर्थ (पद्म. उत्तर. १४७.१;६७), आणि खड्गधारेश्वर मंदिरस्थान (पद्म. उत्तर. १४०.३). बॉंबे गॅझेटियरमते हे गुजरातमधील अहमदाबाद येथे आहे (बॉंबे. गॅझे. ४.६).

**खड्गपुच्छ** (नाग)—हरचरित चिंतामणिमते कश्मीरातील एक सरोवर (हरचरित. १०.२५१). अनंतनाग परगण्यातील आधु. खनबल सरोवर हेच होय.

**खड्गवंश** (पर्वत)—हरिषेण आणि जयसेनमते महावीराच्या मेदज्ज (मेदार्य) नामक दशम गणधराचे जीवन्मुक्तिस्थान, एक जैन तीर्थ (अनेकान्त. ८.१०३). राजस्थानमधील खंडेलवाल जैन आणि हिंदु ज्ञातींचे आद्य निवासस्थानभूत आधु. खंडिल्ल नगर हेच होय (ती. सं. पृ. १३६). नामांतर–'खंडिल्लकपत्तन'.

**खण्ड** (ग्राम)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम (पा. सू. ४.२.८०.८; १२७).

**खण्डगहा** (राज्यविभाग)—कलचुरि राजा जयसिंहच्या स. ११७५ च्या रेवा ताम्रपटमते मध्यभारतातील एक राज्यविभाग (पट्टल). यामध्ये अहडापाड नामक ग्राम होते. कक्रेरी गावापासून ६ मैल नैर्ऋत्येकडील आधु. खंडेल्हि गावानजिकचा प्रदेश हाच होय (कॉर्पस्. इन्स्क्रि.

४.१.३४१ ).

**खण्डगिरि** ( जैन गुफा )—ओरिसामधील पुरी जिल्ह्यातील उदयगिरि गुफांनजिकचा जैन गुफासमूह. भुवनेश्वर-चंदक रस्त्यावरील भुवनेश्वरच्या ७ मैल पश्चिमेकडील उदयगिरि गुफांसमोरच्या खंडगिरि टेकडीमधील या गुफा कालदृष्ट्या त्याहून उत्तरकालीन आहेत ( उदयगिरि पहा ). नामांतर ( लोरियान खरोष्ट्री बुद्धमूर्तिलेख )– ' खंडवन. '

**गुफानामावली**—येथील प्रमुख गुफा पुढीलप्रमाणे होत– ( १ ) तात्वागुफा क्र. १ आणि २; ( २ ) अनंतगर्भ; ( ३ ) खंडगिरि; ( ४ ) त्रिशूळ; ( ५ ) ललाटेंद्र; ( ६ ) तेंतुलि; ( ७ ) धानघर; ( ८ ) नवमुनि; ( ९ ) बारभुजी; ( १० ) इंद्रकेसरी. याशिवाय येथे आकाशगंगा, गुप्तगंगा, शाम आणि राधा आदि पाच जलकुंडे, तसेच टेकडीच्या शिखरावर एक जैन मंदिर आणि काही फुटकळ जैन स्तूप आणि भग्न गुफा आहेत.

**उल्लेखनीय गुफा**—येथील उल्लेखनीय गुफा पुढीलप्रमाणे होत :–

**( १ ) अनंतगर्भ गुफा**—रचनादृष्ट्या उदयगिरि येथील गणेश गुफेसदृश, परंतु कालदृष्ट्या तीहून पूर्वकालीन अशा या गुफेच्या दर्शनी भागी उदयगिरि येथील जयविजय गुफेसदृश वृक्षपूजेचे, तसेच कमलपुष्पारूढ देवीचे शिल्पद्वय आहे. त्यापैकी वृक्षपूजा शिल्पाची प्रतिकृती भर्हुत येथे एकदा आणि सांची तोरणांमध्ये दहा वेळा असून, मनुष्याकृती देवतोपासनेची भारतीय शिल्पेतिहासातील प्राचीनतम शिल्पे ती मानली जातात.

हिच्या अंतर्भागातील शिल्प क्र. ३ मध्ये चतुरश्वयुक्त रथारूढ सपत्नीक सूर्यदेवाची, तसेच शिल्प क्र. ४ मध्ये बृहदाकार हत्तीची प्रतिमा असून, यापैकी सूर्यप्रतिमेची प्रतिकृती भाजे येथे आढळते. फर्ग्युसन यांच्या मते ही गुफा ( इ. स. पू. ३ रे शतक ) सूर्यसांप्रदायी ( सौरपाट ) लोकांनी खोदली असावी. या शिल्पचित्रांच्या शिरोभागीच्या कमानींवर, तसेच दरम्यानच्या पट्टीवर उडत्या देवगंधर्वांची, त्रिफणायुक्त नागांची, तसेच प्राण्यांची शिल्पे आहेत.

या गुफेच्या दर्शनी भागी पश्चिम भारतातील गुफा मंदिराप्रमाणे काष्ठसदृश नक्षीकामयुक्त स्तंभ असून, त्यांच्या शिरोभागी ओबडधोबड प्राणी कोरले आहेत.

**( २ ) तात्वागुफा**—खंडगिरि टेकडीच्या उतारावरील अनंतगर्भ गुफेच्या खालच्या अंगाकडील या गुफाद्वयापैकी त्रिप्रवेशद्वारयुक्त गुफा क्र. १ च्या ( १८'×१७'×६' ) प्रवेशद्वारानजिक इराणी शिरोभूषणयुक्त स्तंभ आहेत. त्यांच्या शिरोभागी भर्हुत शिल्पासदृश टोकदार कमानी आणि वेदिकाशिल्प आहे. वेदिकेच्या उभय अंगांस हस्तिप्रतिमा, तसेच खालच्या अंगास मोर, ससे आदि पशुपक्ष्यांची शिल्पे आहेत.

गुफेच्या भिंतींवरील चुन्याच्या गिलाव्यावर लाल रंगाने लिहिलेले काही शिलालेख असून, पार्श्वभिंतीवरील अशा शिलालेखद्वयाच्या दरम्यान सूर्यचंद्रप्रतिमा आहेत.

**( ३ ) अन्य गुफा**—येथील अन्य एका गुफेत चोवीस जैन तीर्थंकरांच्या प्रतिमा आहेत (फर्ग्युसन, २.१५–१८).

**शिलालेख**—येथील अनंतगर्भ गुफेतील शिलालेखत्रयापैकी एकामध्ये कुसुम नामक नोकराचा ( पादमुलिक ) देणगीलेख असून, अन्य दोन शिलालेख दुर्बोध आहेत ( ल्यूडर्स सूचि. क्र. १३४२–१३५२ ).

**खण्डतीर्थ** ( तीर्थ )—साभ्रमती नदीकाठचे एक तीर्थ. नामांतर–' वृषतीर्थ ' ( पद्म. उत्तर. १३७.१२ ).

**खण्डदेश** ( देश )—बृहत्संहितामते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या नैर्ऋत्य भागातील एक देश ( बृ. सं. १४.१८ ). फ्लीट यांच्या मते महाराष्ट्रातील आधु. खानदेश हाच होय ( शब्दशः अर्थ–बुटक्या लोकांचा देश; इंडि. अँटि. २२.१८१ ).

**खण्डपुच्छाश्रम** ( तीर्थ )—कश्मीरातील वितस्ता नदीकाठचे एक तीर्थ ( नीलमत. १५१८ ).

**खण्डवन** ( बौद्ध स्तूपस्थान )—लोरियान खरोष्ट्री बुद्धमूर्तिलेखमते भारतवर्षातील एक बौद्ध स्तूपस्थान. स्टेन कोनौ यांच्या मते ओरिसामधील ' खंडगिरि 'चे हे नामांतर असावे ( कॉर्पस् इन्स्क्रि. २.१.२.१०८; खंडगिरि पहा ).

**खण्डवा** ( जैन तीर्थ )—ज्ञानसागर आणि जयसागरमते भारतातील पार्श्वनाथ मंदिरस्थान. मध्यप्रदेशातील पूर्व निमाड जिल्ह्यातील आधु. खांडवा गाव हेच होय ( ती. सं. पृ. १३७ ).

**खण्डवीरण** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.१ ).

**खण्डशिला** ( तीर्थ )—हाटकेश्वरक्षेत्रान्तर्गत एक तीर्थ ( स्कन्द. नागर. १३३ ).

**खण्डाळा** ( जलप्रपात )— महाराष्ट्रातील मुंबई–पुणे रेलमार्गावरील कर्जतपासून ११ मैलांवरील एक जलप्रपात. यावरूनच बोरघाटास ' खंडाळा ' नाव प्राप्त झाले.

**खण्डिल्लकपत्तन** ( पर्वत )– जैन साहित्यमते राज-

स्थानातील ‘ खड्गवंश ’ जैन तीर्थाचे नामांतर ( खड्गवंश पहा ).

**खण्डु** ( नगर )— पाणिनीच्या अष्टाध्यायीमते मंडु ( आधु. उंड ) गावानजिकचे एक नगर ( पा. सू. ४.२.७७ ). पंजाबातील अटकनजिकचे आधु. खुंड गाव हेच असावे ( लेवी, जर्नल एशियाटिक. १५५.७३ ).

**खण्डेश्वर** ( तीर्थ )— एक श्राद्धयोग्य तीर्थ ( पद्म. आदि. ११.६३ ).

२. अवंती येथील ८४ शिवलिंगांपैकी एक. पाठभेद– ‘ आखंडेश्वर ’ ( स्कन्द. आवन्त्य. अ. च. लिं. ३१ ).

**खत्तियग्राम** ( जैन तीर्थ )— जैन साहित्यमते उत्तर विहारमधील वैशाली नगराच्या तीन उपनगरांपैकी एक ( अन्य दोन उपनगरे– ‘कुंडपुर’, ‘महाकुंडग्राम’ ). बिहार-मधील मुजफ्फरपुर जिल्ह्यातील आधु. बसाढ ( प्राचीन– वैशाली ) नजिक हे असावे ( पांडे, बिहार. पृ. १६७ ).

**खत्रिएओइ** ( देश )— टॉलेमीच्या मते पंजाबातील ह्यद्रौतेस्–ह्यफसिस् ( रावी-बियास ) दुआबातील ‘ मद्र ’ देशाचे नामांतर ( मद्र पहा ). येथील लोक कठैओइ ( कठ= आधु. खत्रि ) नावाने प्रसिद्ध असून, मॅक्रिंडल यांच्या मते हिंदुकुशपासून बंगालपर्यंत आणि नेपाळपासून गुजरातपर्यंत पसरलेल्या कठ लोकांचेच ते शाखाभूत असावेत. उत्तरकालीन साहित्यात ‘ कथी ’, ‘ कत्तिस ’, ‘ कथीय ’, ‘ कत्रि ’, ‘ खत्री ’, ‘ खेतर ’, ‘ कत्तौर ’, ‘ कत्तेर ’, ‘ कत्तक ’ वैकल्पिक नावांनी यांचा निर्देश आढळतो. पंजाबमार्गे सौराष्ट्रात स्थायिक झालेल्या यांच्या एका टोळीमुळेच ( ‘काठी’ ) त्या प्रदेशास काठेवाड नाव मिळाले.

**खदिर** ( ग्राम )— पाणिनीच्या गणपाठमते भारत-वर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.१; ३; १६ ).

**खदिरवण** ( वन )— पाणिनीच्या अष्टाध्यायीमते भारतवर्षातील एक वन. ‘ वन ’ संज्ञेच्या ‘ वण ’ वैकल्पिक प्रयोगाचे उदाहरण म्हणून याचा निर्देश तेथे असून ( पा. सू. ८.४.५ ), हिमालयाच्या पायथ्यानजिकच्या तराई प्रदेशात हे असावे ( शब्दशः अर्थ–‘ कातवृक्षांचे वन ’ ).

**बौद्ध साहित्यात**— या साहित्यमते हिमवंत प्रदेशातील या वनामध्ये ( जा. २.१६२-१६३ ) राहिल्याने रेवत आचार्यांस ‘खदिरवनीय’ उपाधी मिळाली होती ( अङ्गुत्तर. १.१४.१ ). मध्ययुगीन साधनामाला बौद्ध ग्रंथमते ‘ खदिरवनी तारा ’ नामक एक देवीहि येथे होती.

२. मथुरा येथील द्वादश वनांपैकी सप्तम ( वराह. १५३.३९ ).

**खदिरवती** ( नदी ) — काशिकामते भारतवर्षातील एक नदी ( पा. सू. ६.३.११९ ).

**खन्दार** ( गुफास्थान ) — राजस्थानमधील चंदेरी-पासून १ मैलावरील जैन गुफास्थान ( ती. पृ. २७४ ).

**खन्दोहक** ( ग्राम )— चालुक्य राजा अजयपालाच्या वि. सं. १२३१ च्या शिलालेखमते मध्य गुजरातेतील ब्रह्मपाटकानजिकचे एक ग्राम. याचे आधु. स्थान समजत नाही ( इंडि. अँटि. १८.८२–८४ ).

**खब्रथ्** ( द्वीप )—खाल्डियन आणि असीरियन साहित्यमते पृथ्वीच्या सप्तद्वीपांपैकी ‘ खोनरेत्स् बामी ’ द्वीपाचे नामांतर ( खोनरेत्स् बामी पहा ).

**खबेरिस् एम्पोरियम** ( बंदर )—टॉलेमीच्या मते मद्रास राज्यातील ‘ कावेरीपट्टनम् ’ बंदराचे नामांतर ( कावेरीपट्टनम् पहा ).

**खबेरोस्** ( नदी )–टॉलेमीच्या मते मलय पर्वतोद्भवा ‘कावेरी’ नदीचे नामांतर (टॉलेमी ७.१.३५; कावेरी पहा ).

**खम्** ( देश )—तिबेटी साहित्यमते भूतान देशान्तर्गत चीन सरहद्दीनजिकचा एक देशविभाग. आधु भूतान-तिबेट प्रदेश हाच होय ( राहुल, यात्रावली. पृ. २२० ).

**खम्भात** ( जैन तीर्थ )—जैन साहित्यमते गुजरात-मधील ‘ स्तंभतीर्थ ’चे नामांतर ( ती. सं. पृ. १३७; स्तंभतीर्थ पहा ).

**खम्भिल** ( ग्राम )—सोळंकी राजा जयंतीसिंहाच्या वि. सं. १२८० च्या शिलालेखमते गुजरातेतील वर्द्धि-पथकान्तर्गत एक ग्राम. उत्तर गुजरातेतील आधु. खंभेल गाव हेच होय ( इंडि. अँटि. ६.१९६–१९८ ).

**खर–दूषणस्थान** ( तीर्थ )-मध्यप्रदेशातील बिलास-पुरपासून ४० मैलांवरील शबरीनारायणनजिकच्या ‘खरोद’ तीर्थाचे नामांतर ( खरोद पहा ).

**खरगिरि** ( नगर )—पांड्य सम्राट परांतक वीरनारा-यणाच्या स. ९ व्या शतकातील शिलालेखमते त्याने जिंकलेले दक्षिण भारतातील एक नगर ( रंगाचारी, २. ३६७ ).

**खरपथ** ( देश )—मत्स्यमते मेरु पर्वतोद्भवा सप्त-गंगांपैकी पूर्ववाहिनी नलिनी नदीच्या मार्गावरील एक देश ( मत्स्य. १२१.५६ ).

२. वायुमते मेरु पर्वतोद्भवा सप्तगंगांपैकी पूर्ववाहिनी पावनी नदीच्या मार्गावरील एक देश ( वायु. ४७.५४; ब्रह्माण्ड. १८.५७ ).

**खरम्भर** ( देश )—मध्ययुगीन शब्दकोश साहित्य-मते ' चीन ' देशाचे नामांतर ( चीन पहा ).

**खरलग्राम** ( ग्राम )—नृसिंह ( द्वितीय ) राजाच्या स. १२९५ च्या अलल्पुर ताम्रपटमते ओरिसातील कटक जिल्ह्यातील साइलो विषयातील ( आधु. साइलो परगणा ) एक ग्राम. आधु. छतोल गावाच्या पूर्वेस हे असावे ( एपि. इंडि. ३१.१९; २१ ).

**खरवण्डी** ( महानुभाव तीर्थ )—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थ ( स्था. पृ. ७३ ). अहमदनगर जिल्ह्यातील पारेगावच्या ५ मैल नैर्ऋत्येकडील आणि पाथर्डीच्या १५ मैल पूर्वेकडील आधु. खरवंडी गाव हेच होय.

**खरस** ( पर्वत )—मार्कंडेयमते भारतवर्षातील एक पर्वत. याचे आधु. स्थान समजत नाही.

**खरसागरराशि** ( देश )—मार्कंडेयमते कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या उत्तर भागातील एक देश ( मार्क. ५५.४६ ).

**खरानना** ( देवी )—श्रीमालमाहात्म्यमते श्रीमाल-क्षेत्रान्तर्गत एक देवीस्थान.

**खरोद** ( शिलालेखस्थान )—कलचुरि राजा रत्नदेव ( तृतीय ) च्या स. ११८२ च्या देणगीलेखाचे मध्य-प्रदेशातील बिलासपुर जिल्ह्यातील जांजगिर तहसिलीतील शबरीनारायण गावाच्या उत्तरेकडील उपलब्धिस्थान. येथील लवणेश्वर मंदिरात हा शिलालेख असून ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.५३३ ), स्थानिक आख्यायिकामते खर–दूषण राक्षस येथे रहात असत ( ती. पृ. २२० ). नामांतर ' खर–दूषणस्थान '.

**खरोष्ट्री शिलालेखस्थले** ( स्थलसमूह )— मौर्य साम्राज्यविनाशानंतर वायव्य भारताधिराज बनलेल्या यवन, शक आणि पह्लवांनी (इ. स. पू. ३ रे–इ. स. ५ वे शतक) कोरलेला वायव्य भारतातील एक शिलालेखसमूह. असे सुमारे ४५ शिलालेख या प्रदेशात सापडले आहेत.

**उत्पत्ती**—वायव्य भारतातील अकेमेनियन ( ग्रीक ) लोकांची अरेमिक लिपी आणि तत्कालीन लोकव्यवहारातील ब्राह्मी लिपीच्या संमिश्रणाने उर्दूप्रमाणे उजवीकडून लिहिली जाणारी ही अंशतः अभारतीय लिपी सिद्ध झाली आहे. मात्र अकेमेनियन राज्यकालीन खरोष्ट्री शिलालेख अद्यापि अनुपलब्ध आहेत.

**नामव्युत्पत्ती**—स्टेन कोनौ यांच्या मते अरेमिकभाषीय ' लिखित ' अर्थाने हिला हे नाव मिळाले असावे ( अरेमिक ' खरोष्ठ ' = लिहिणे ).

**लेखनिकांची लिपी**—बूलर यांच्या मते ही लिपी लेखनिक लोकांपुरती मर्यादित असून, तत्कालीन ग्रंथकार ब्राह्मी लिपीचा उपयोग करीत असत. त्यामुळे शिलालेख साहित्यापुरता या लिपीचा प्रयोग सीमित दिसतो.

**व्याप्ती**—गंधार देशातील तक्षशिला गावी उत्पन्न झालेली ही लिपी उत्तरकालात अफगाणिस्तानातील हिंदुकुश पर्वतापासून ( अक्षांश ३६° उत्तर; रेखांश ६९° पूर्व ) सैस्तान–कंदाहारपर्यंत ( अक्षांश ३३° उत्तर; रेखांश ७३° पूर्व ) पसरली. उपलब्ध शिलालेखांच्या आधारे हिची व्याप्ती पुढीलप्रमाणे असावी :—**१. पूर्वेस**—पंजाबातील माणिक्याल गाव; **२. पश्चिमेस**—अफगाणिस्तानातील जलालाबाद; **३. उत्तरेस**—स्वात खोऱ्यातील तीरथ्, आणि लडाखमधील खलत्से गावे; **४. दक्षिणेस**—मैरा गाव ( रेखांश ३६° पूर्व ), तसेच त्याच्या दक्षिणवर्ती लाडखान जिल्ह्यातील मोहेंजोदरो.

**शिलालेख**—अशोकाचे मानसेहरा आणि शहाबाझगढी आज्ञालेख ( इ. स. पू. ३ रे शतक ) या लिपीतील प्राचीनतम शिलालेख असून, उर्वरित शिलालेख शक आणि कनिष्ककालीन आहेत :—

(१) **शक संवतातील शिलालेख**—शक संवत् ५७–३९९ ( इ. स. पू. २७–इ. स. ३१५ ) कालीन उपलब्ध खरोष्ट्री शिलालेख पुढीलप्रमाणे होत :— १. मैरा शिलालेख ( इ. स. पू. २७ ); २. शहादौर शिलालेख ( इ. स. पू. २५ ); ३. मानसेहरा शिलालेख ( इ. स. पू. १७ ); ४. फतेहजंग शिलालेख ( इ. स. पू. १७ ); ५. तक्षिला ताम्रपट ( इ. स. पू. ६ ); ६. मुचइ शिलालेख ( इ. स. पू. ४ ); ७. कल संग शिलालेख ( इ. स. १६ ); ८. बंज पर्वत शिलालेख ( इ. स. १८ ); ९. तख्त-इ-बहै शिलालेख ( इ. स. १९ ); १०. पाजा शिलालेख ( इ. स. २७ ); ११. कालदर्रा शिलालेख ( इ. स. २९ ); १२. मार्गुइझ शिलालेख ( इ. स. ३३ ); १३. पंजतार शिलालेख ( इ. स. ३८ ); १४. तक्षिला रौप्यपट ( इ. स. ५२ ); १५. पेशावर म्युझियम शिलालेख क्र. २० ( इ. स. ८४ ); १६. खलत्से शिलालेख ( इ. स. १०३ ); १७. तक्षिला रौप्य पात्रलेख ( इ. स. १०७ ); १८. देवइ शिलालेख ( इ. स. ११६ ); १९. लोरियान् तंगइ शिलालेख ( इ. स. २३४ ); २०. जमालगढी शिलालेख ( इ. स. २७५ ); २१. हश्तनगर शिलालेख ( इ. स. ३०० ); २२. स्कई ढेरी शिलालेख ( इ. स. ३१५ ).

(२) कनिष्क संवतातील शिलालेख—कनिष्क संवत् १–८९ (इ. स. १२८–२१६) कालीन उपलब्ध खरोष्ट्री शिलालेख पुढीलप्रमाणे होत :—१. कनिष्क करंडकलेख (इ. स. १२८); २. सुइ विहार शिलालेख (इ. स. १३९); ३. झेद शिलालेख (इ. स. १३९); ४. माणिक्याल शिलालेख (इ. स. १३९); ५. माणिक्याल करंडक-वेष्टणलेख (इ. स. १४६); ६. कुर्रम शिलालेख (इ. स. १४८); ७. पेशावर म्युझियम शिलालेख क्र. २१ (इ. स. १५१); ८. हिड्डा शिलालेख (इ. स. १५५); ९. शकरदर्रा शिलालेख (इ. स. १६८); १०. आरा शिलालेख (इ. स. १६९); ११. वर्दक शिलालेख (इ. स. १७९); १२. उंड शिलालेख (इ. स. १८९); १३. मामानी ढेरी शिलालेख (इ. स. २१६).

**शकपूर्वकालीन खरोष्ट्री शिलालेख**— शकपूर्वकालीन ग्रीक, तसेच अन्य राजांचे प्रमुख खरोष्ट्री शिलालेख पुढील-प्रमाणे होतः— १. ग्रीक राजा मेरिडर्ख थिओडोरसचा स्वात बौद्धावशेष करंडकलेख; २. ग्रीक राजा मेरिडर्खचा शाहपुर ताम्रपट; ३. पॅरिस पदकलेख; ४. तीरथ् शिलालेख; ५. स्वात शिलालेख; ६. सिद्दो शिलालेख.

**खरोष्ट्री सीमेबाहेरील शिलालेख**— पंजाबातील कर्नाल, उत्तर प्रदेशातील मथुरा, अफगाणिस्तानातील खवत्, बलुचिस्तानातील थळ खोरे, तसेच चिनी तुर्कस्तानमध्ये काही तुरळक खरोष्ट्री शिलालेख सापडले असून, पाटणा येथे एक खरोष्ट्री शिक्का सापडला आहे. वायव्य भारतातील विजेत्या आक्रमकांनी हे कोरले असावेत.

खरोष्ट्री लिपीच्या भौगोलिक सीमेबाहेरी उल्लेखनीय खरोष्ट्री शिलालेख पुढीलप्रमाणे होत :—१. कांग्रा जिल्ह्या-तील कन्हिआर (इ. स. पू. ६ वे शतक) आणि पाथ्यार (इ. स. पू. २ रे–१ ले शतक) शिलालेख; २. उत्तर प्रदेशातील कर्नाल शिलालेख (इ. स. पू. ६ वे शतक); ३. पाटणा येथील कुम्रहार मृत्तिकाशिल्पलेख (कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.१.९१; ९४).

**खर्जुराहक** (नगर आणि मंदिरस्थान)—मध्य-प्रदेशनिवासी रजपूतवंशीय चंदेल राजांच्या जेजाकभुक्ति (आधु. बुंदेलखंड) राज्याचे मध्ययुगीन (इ. स. ९–१३ वे शतक) राजधानीचे नगर, आणि चंदेल–हैहय–प्रतिहार स्थापत्यशैलीचे सुविख्यात शैव, वैष्णव आणि जैन मंदिर-स्थान. ओरिसामधील भुवनेश्वरप्रमाणेच येथील मंदिरेहि (स. ९५४–१०१२) परिपूर्ण स्थापत्यशैली आणि शिल्पसौष्ठवासाठी सुविख्यात असून, त्यांच्या अभिजात कलात्मकतेप्रमाणेच नग्न लैंगिकतेमुळे साऱ्या जगात ती कुतूहलाचा विषय बनली आहेत. पर्सी ब्राऊन यांच्या मते येथील लैंगिक वामाचारप्रभावामुळेच हे मंदिरस्थान चंदेल साम्राज्यविनाशानंतर परित्यक्त आणि ओसाड बनले (तत्सम अन्य उदाहरण–ओरिसामधील कोणादित्य=आधु. कोणार्क).

मध्यप्रदेशातील छत्तरपुर जिल्ह्यातील पन्ना–छत्तरपुर मार्गावरील पन्नाच्या २५ मैल उत्तरेकडील, अलाहाबाद-पासून १४५ मैल नैर्ऋत्येकडील, ग्वाल्हेरपासून १५० मैल आणि हरपालपुरपासून ६० मैल आग्नेयेकडील, महोबाच्या ३४ मैल दक्षिणेकडील, छत्तरपुरच्या २७ मैल पूर्वेकडील, आणि तिराहापासून ७ मैलांवरील आधु. खजुराहो गाव हेच होय. माणिकपुर–झाँसी रेलरस्त्यावरील हरपालपुर रेल्वेस्थानकाहून, तसेच पन्ना, छत्तरपुर, सतना अथवा महोबाहून येथे बसने जाता येते.

खजुराहो सागर (निनोरा ताल) नामक सरोवरा-काठच्या या छोट्याश्या गावी सध्या सुमारे तीस मंदिरे (व्याप्ती–१ मैल) असून, येथील अन्य मंदिरे आज नामशेष झाली आहेत. राष्ट्रकूट राजांनी स. ९१५ मध्ये कान्यकुब्ज (आधु. कनौज) नगरातून हद्दपार केलेल्या प्रतिहार राजांनी या गावी आपली राजधानी स्थापिली. स्वतःच्या परमोत्कर्षकाली त्यांनी बांधलेल्या येथील मंदिरात प्रतिहार स्थापत्यशैलीचे परिणत स्वरूप दिसते.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतातः—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. ह्युएन्त्संग | चिह्–चि–तो (जजहौती, जिझोति) |
| २. शिलालेख साहित्य | खर्जुरवहक |
| ३. अल्बेरुणी (सचौ अनुवाद, १.२०२) | कजुराह |
| ४. इब्न बतूता | कजुराह |
| | कज्राव (खजुराहो) |
| ५. अन्य साहित्य | कजुराह, कजूर |

**नामव्युत्पत्ती**—स्थानिक आख्यायिकामते येथील नगरद्वारी चंदेल राजांनी कोरलेल्या सुवर्णमय खर्जुरवृक्ष-द्वयामुळे यास हे नाव मिळाले. अन्य आख्यायिकामते

'खर्जुरवृक्षयुक्त प्रदेशातील' अर्थाने यास हे नाव मिळाले.

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**—चंद्रात्रेय ऋषींचे वंशज चंदेल राजे (स. ८३१–१३०८; आद्य राजा–नन्नुक) भारतातील छत्तीस प्रमुख रजपूत वंशांपैकी एक असून, प्रारंभी ते कनौजच्या प्रतिहार राजांचे मांडलिक होते. नन्नुकपौत्र जेजक (जयशक्ति) च्या नावावरून त्यांच्या बुंदेलखंडातील राज्यास 'जेजाकभुक्ति' नाव मिळाले. स. ९१५ मध्ये राष्ट्रकूट राजा इंद्र (तृतीय) ने कनौजची प्रतिहार सत्ता खिळखिळी केल्यानंतर चंदेल या प्रदेशाचे सर्वसत्ताधारी राजे बनले. या वंशातील हर्ष राजाने (स. ९००–९२५) प्रतिहार राजा महिपाल (प्रथम) द्वारा कनौजवर स्वामित्व मिळविले. हर्षपुत्र यशोवर्मन्‌ने (स. ९२५–९५०) त्रिपुरी, माळव, दक्षिण कोशल, गौड, मिथिला देशांवरील दिग्विजयानंतर खजुराहो या स्वराजधानीतील मंदिररचनेस प्रारंभ केला. प्रतिहारनरेश देवपालाकडील तिबेटी रामप्रतिमा त्याने येथील 'चतुर्भुज' राम-मंदिरात स्थापिली. खजुराहो आणि कालंजर या राजधानीच्या आणि दुर्गराजधानीच्या गावांना त्याने नवी प्रतिष्ठा प्राप्त करून दिली.

यशोवर्मन्‌पुत्र धंग (स. ९५४–१००२) ने प्रतिहार साम्राज्याचा पूर्ववर्ती भाग जिंकून 'महाराजाधिराज' बिरुद धारण केले. त्याच्या गंड (स. १००२–१०१९) नामक पुत्राने अंतिम प्रतिहार राजा राज्यपालाचा खून करून सार्वभौम चंदेल राज्य स्थापिले. येथील बहुतांशी मंदिरे धंग आणि गंड राजांच्या राज्यकालातील आहेत.

धंगपौत्र विद्याधर चंदेलाचा गझनीच्या मुहंमदाने (स. १०२२) पराजय केल्यामुळे महोत्सवपुर (आधु. महोबा), कालंजर आदि दुर्गस्थानी चंदेलराजधानी क्रमशः स्थलांतरित होऊन या नगराचे महत्त्व कमी झाले. उत्तरकालात चंदेलमांडलिक चेदिदेशीय कल्चुरि राजांनी हे राज्य जिंकले. स. १४९४ मध्ये सिकंदर लोदीने येथील मंदिरे उद्ध्वस्त केली.

**धार्मिक पार्श्वभूमी**—प्रारंभी वैष्णव आणि नंतर शैव बनलेले चंदेल राजे परधर्मसहिष्णु असून, त्यांनी येथे एकाच वेळी शैव, वैष्णव, सूर्य, काली, योगिनी, ब्रह्मदेव, वामन, तसेच जैन मंदिरे बांधली.

श्रीमत् शंकराचार्यप्रतिपादित 'पंचायतन पूजे'चे (शिव, विष्णु, दुर्गा, सूर्य आणि गणेश) चंदेल राजे पुरस्कर्ते असून, त्यांनी बांधलेल्या 'चतुर्भुज मंदिरा'तील श्रीविष्णूच्या मुख्य प्रतिमेभोवतालच्या उपमंदिरांत शिव, दुर्गा, सूर्य आणि गणेशाच्या प्रतिमा आहेत. हिंदु देवताशास्त्रातील अगणित देवतांच्या प्रतिनिधिभूत अशा या पंचदेवतांची हे राजे उपनिषद्‌प्रणित ब्रह्मज्ञानप्राप्तीसाठी उपासना करीत असून अशा पंचायतन–उपासनेची काही दुर्मिळ मंदिरे या गावी आहेत.

चंदेलमांडलिक चेदिदेशीय कल्चुरि (हैहय) राजांनी त्यांना लैंगिक तांत्रिक धर्मविधी आणि कापालिक संप्रदायाधारित स्वैराचारी जीवनाची चटक लावली. येथील लैंगिक मंदिरशिल्पे (उदा. कंदरिय महादेव मंदिर) या तांत्रिक धर्मप्रवृत्तीची आणि स्वैराचारी विलासी जीवनाची प्रतीकभूत आहेत. कापालिक तत्त्वज्ञानानुसार स्त्री-पुरुष लैंगिक संबंधस्वरूपी शिव–शक्तिमीलनातून जीवनमुक्ती प्राप्त होते. या तत्त्वज्ञानानुसार मानवी पशुजीवन–मुक्ति-सोपानाच्या 'पशु', 'वीर' आणि 'दिव्य' संज्ञक तीन अवस्था असून, पशुजीवनाचा आकंठ उपभोग घेतल्याखेरीज अन्य उच्चतर अवस्था अप्राप्य असतात. या कामाचारी तत्त्वज्ञानामुळेच चंदेल साम्राज्याचा नाश झाला.

**उपविभाग**—पर्सी ब्राऊन यांच्या मते विभिन्न धर्मसांप्रदायांना मुक्तद्वारस्वरूप धर्मराजधानी निर्मिण्याच्या प्रेरणेतून येथील खजुराहो तलावाच्या पश्चिमेस, पूर्वेस आणि आग्नेयेस अनुक्रमे ब्राह्मणी (शैव-वैष्णव), वैष्णव आणि जैन मंदिरे बांधली आहेत. या मंदिरसमूहाच्या मध्यभागी मुख्य देवतेचे विशाल मंदिर आणि त्याच्या भोवती त्या सांप्रदायाची छोटी मंदिरे आहेत. येथील मध्यवर्ती देवालये पुढीलप्रमाणे होत :– **१. शैव मंदिरसमूह**– कंदरिय महादेव मंदिर; **२. वैष्णव मंदिरसमूह**– चतुर्भुज मंदिर; **३. जैन मंदिरसमूह**– पार्श्वनाथ (जिननाथ) मंदिर.

**कालनिर्णय**— स्थानिक मंदिरलेखमते येथील बहुतांशी मंदिरे स. ९५४–१००२ या अर्धशतकातील आहेत (अपवाद–चौसष्ट योगिनी आणि घंटे मंदिरे; एपि. इंडि. १.१२१–१५३).

**ह्युएन्‌त्संगच्या प्रवासवर्णनात**— या ग्रंथमते उज्जयिनीपासून २०० मैल ईशान्येकडील आणि महेश्वरपुरपासून १८० मैल दक्षिणेकडील या (चिह्–चि-तो=जिझोति) गावी (व्याप्ती–२ मैल) जिझोति (जेजाकभुक्ति, व्याप्ती–८०० मैल) देशाची राजधानी होती. येथील हिंदुधर्मीय राजा बौद्ध धर्मसहिष्णु होता (वॉटर्स, २.२५१; जेजाकभुक्ति पहा). सध्या येथे विशाल बुद्धप्रतिमेव्यतिरिक्त अन्य कोणतेहि बौद्ध अवशेष आढळत नाहीत. त्यावरून चंदेल-

काली येथील बौद्ध धर्म लुप्त झाला असावा.

**अल्बेरुणीच्या ग्रंथात**— या ग्रंथमते येथे (कजुराह) जेजहुति देशाची राजधानी होती (अल्बेरुणी, १.२०२).

**इब्न बतूताच्या ग्रंथात**— या ग्रंथमते या (कज्राव) गावच्या सरोवराभोवती (व्याप्ती-१ मैल) अनेक मंदिरे आणि देवतामूर्ती असून, शहराच्या तीन मध्यवर्ती मंदिरांत पीतकेश तापसी योगी होते. या भागातील मुसलमानहि त्यांच्याकडे योगविद्या (जादू) शिकण्यासाठी येत असत.

**मंदिरलेख** — येथील प्रमुख मंदिरलेख पुढीलप्रमाणे होत:– १. धंग राजाचा स. १००२ चा विश्वनाथ मंदिरलेख (शंभु मर्कटेश्वराच्या रत्नशिवलिंगस्थापनेचा निर्देश); २. स. ९२२ चा हनुमान मंदिरलेख; ३. यशोवर्मन्‌चा स. १०११ चा लक्ष्मणजी मंदिरलेख (वैकुंठ विष्णुमंदिर-स्थापनेचा निर्देश; एपि. इंडि. १.१३०) ४. धंगचा स. १०५९ चा शिवमंदिरलेख; ५. गृहपतिवंशीय कोकल्ल सरदाराचा स. १००१ चा वैद्यनाथ मंदिरलेख (वैद्यनाथ मंदिरस्थापनेचा निर्देश; एपि. इंडि. १.१५०).

## मंदिरे

**स्थापत्यशैली**—येथील उंच जोत्याची क्रूसाकृती मंदिरे बंदिस्त चौकोनी प्रांगणातील परंपरागत भारतीय मंदिरांहून वेगळ्या धर्तीची असून, त्यामध्ये गर्भागार, सभामंडप आणि बाह्यमंडप हे उपविभाग अखंडपणे बांधले आहेत. ती आकाराने छोटेखानी असली (अधिकतम लांबी–१००′), तरी छायाप्रकाशनर्तनकारी प्रमाणबद्ध आकृतिबंध, तसेच दर्शनी आणि अंतर्भागातील समृद्ध देवता आणि मानवी शिल्पांमुळे (उदा. कंदरिय महादेव मंदिरातील २½′ उंचीच्या ८७२ शिल्पकृती) ती आकर्षक वाटतात. या साऱ्याच शिल्पकृती जीवनोल्हासपूर्ण, प्रमाणबद्ध आणि विदग्ध कारागिरीच्या असून, मंदिरातील उपास्य दैवतानुसार त्यामध्ये फेरफार दिसतात. येथील बहुतांशी सारी मंदिरे स्थापत्यदृष्ट्या एकसुरी असून, त्यांच्या शिल्पकृतींमुळेच त्यांच्या सांप्रदायाचे वेगळेपण प्रतीत होते.

**शिल्पकृती**—येथील मंदिरशिल्पातील मानवी रीरा ा-कृती, तसेच त्यांच्या मुद्रा, पोषाख, अलंकारांचे वैचित्र्य स्तिमित करणारे असले, तरी शिल्पसमुच्चयोद्भव लयबद्धता आणि सुसंवादित्व हे येथील स्थापत्यकाराचे मुख्य साध्य आहे. त्यामुळे येथील अनेक शिल्पे शरीरशास्त्रीय दृष्ट्या सदोष असूनहि संकलित दृष्ट्या आकर्षक वाटतात.

येथील स्थापत्य, तसेच शिल्पकृती एकसुरी आणि पुनरावृत्त असून, फर्ग्युसन यांच्या मते येथील प्रमुख स्थापत्यकाराचे (शिल्पिन्) सहाय्यक शतावधी शिल्पे एकाच वेळी तयार करीत असत. त्यांच्या आकर्षक मांडणीचे कार्य 'शिल्पिन्' नंतर करीत असल्याने येथील अनेक शिल्पे सदोष असूनहि त्यांची मंदिरातील मांडणी मात्र नेहमीच निर्दोष आणि कलात्मक दिसते. या स्थापत्यकारांची नावे आणि बिरुदे येथील मंदिरलेखात आढळतात.

### (१) ब्राम्हणी देवालये

**ब्राह्मणी देवालये**—या वायव्यवर्ती द्विपंक्तिबद्ध मंदिर-समूहात (मंदिरसंख्या-१२) शैव आणि वैष्णव उभयविध मंदिरे असून, त्यापैकी विशेष उल्लेखनीय पुढीलप्रमाणे होत :—

**(१) कंदरिय महादेव मंदिर**—या सर्वाधिक विशाल (१०९′ × ६०′ × ११६′) क्रूसाकृती मंदिरात प्रातिनिधिक प्रतिहार मंदिरातील 'अर्धमंडप', 'मंडप', 'महामंडप' 'अंतराळ', 'गर्भगृह' आणि 'प्रदक्षिणापथ' हे सहाहि उपविभाग आढळतात. उत्तुंग जोत्यावर (उंची–२६′) बांधलेल्या या मंदिराच्या दर्शनी भागी सुमारे ८७२ शिल्पचित्रे (उंची–२½′ – ३′) तीन रांगांमध्ये बसविली असून, त्यांच्या दरम्यान पर्णपुष्पांचे नक्षीकाम आहे. याच्या गर्भागारात संगमरवरी शिवलिंग असून, त्याच्या भोवती बांधलेली चार उपमंदिरे आज नष्ट झाली आहेत. येथील परंपरागत वैष्णव शैलीच्या लैंगिक शिल्पचित्रांवरून पूर्वकाली हे पंचायतन मंदिर असावे.

भुवनेश्वर येथील लिंगराज मंदिरानुसारी ग्वाल्हेर येथील चतुर्भुज मंदिराच्या अनुकरणाने बांधलेल्या या मंदिरात अंतर्भागातील उभ्या–आडव्या खोबणी बाह्यांगी परावर्तित करण्याची, तसेच मंदिरशिखरावर छोट्या शिखरप्रतिकृती आलंकरण म्हणून उपयोजिण्याची पद्धती अवलंबिलेली दिसते. परंतु पूर्वोक्त मंदिरापेक्षा येथील शिल्पप्रतिमा आणि शिखरनक्षीकाम अधिक समृद्ध आणि जोमदार असल्याने रचनादृष्ट्या सदोष असूनहि ते नयनरम्य वाटते. एकसंधी शिखररचना, तसेच नक्षीकामयुक्त कंगोऱ्यांनी साधलेले छायाप्रकाशाचे कलात्मक नर्तन यामुळे हे अद्वितीय बनले आहे.

**(२) विश्वनाथ मंदिर**— कंदरिय मंदिरानुसारी हे शिवमंदिर आकाराने बरेच लहान (८७′ × ४६′) असून, धंग राजाच्या मंदिरलेखमते हे पंचायतन मंदिर त्याने स. १००२ मध्ये बांधले.

(३) चतुर्भुज (लक्ष्मण अथवा रामचंद्र) मंदिर—या विष्णुप्रमुख पंचायतन मंदिराची (८५"×४४') चारहि उपमंदिरे आज अस्तित्वात असून, त्याच्या प्रवेशद्वाराच्या दर्शनी पट्टीवर नवग्रहशिल्पे, आणि अंतर्भागात चतुर्भुज आणि त्रिमुख विष्णुप्रतिमा आहे. तिचे मधले मुख मानवी आणि बाजूची दोन मुखे वराह आणि नृसिंह अवताराची आहेत.

(४) देवी जगदंबा (काळी) मंदिर—श्रीविष्णूच्या या पंचायतन मंदिरातील (७७'×५०') विष्णुप्रतिमेला काजळी लावून त्याची कालीदेवता म्हणून पूजा करतात. या प्रातिनिधिक छोट्या आकाराच्या मंदिरात अर्धमंडप, मंडप, अंतराळ आणि गर्भगृह हे चारच उपविभाग असून, वैष्णव कथाभागाधारित अनेक शिल्पे त्यामध्ये आहेत.

(५) चित्रगुप्त (भरतजी) मंदिर—सूर्यदेवतेच्या या पंचायतन मंदिरात (८७' × ५८') सप्ताश्व रथारूढ सूर्यप्रतिमा (उंची–५') असून, त्याच्या दक्षिणवर्ती उपमंदिरात एकादशमुख विष्णुप्रतिमा आहे. तिचे मध्यवर्ती मुख श्रीविष्णूचे आणि अन्य दहा दशावतारांची आहेत.

(६) मातंगेश्वर शिवमंदिर—या मंदिरात पर्शियन आणि नागरी शिलालेखयुक्त शिवलिंग (उंची–८') असून, त्याच्या समोर वराहावतारी विष्णुप्रतिमा (उंची–९') आहे. याच्या दक्षिणेस 'खजुराहो म्युझियम' नामक शिल्पसंग्रहालय आहे.

(७) ब्रह्मा मंदिर—येथील शिवलिंगाची ब्रह्मदेवप्रतिमा म्हणून पूजा करतात.

## (२) वैष्णव मंदिरे

वैष्णव मंदिरे—खजुराहो सागरतलावाच्या पूर्ववर्ती या मंदिरसमूहातील उल्लेखनीय मंदिरे पुढीलप्रमाणे होत :—

(१) वामन मंदिर—येथे वामनावतारी विष्णुप्रतिमा (उंची–४½') असून, मंदिराच्या दर्शनी भागी बुद्धावतारी विष्णूचे भूमिस्पर्शमुद्रेतील शिल्प आहे. येथील यशोवर्मनच्या स. १०११ च्या मंदिरलेखावरून त्याने हे बांधले असावे.

(२) जावरी मंदिर—येथे श्रीविष्णूची प्रमाणबद्ध मूर्ती आहे.

## (३) जैन मंदिरे

जैन मंदिरे—खजुराहो सागरतलावाच्या या आग्नेयवर्ती समूहातील मंदिरे परंपरागत चंदेल शैलीचीच आहेत. परंपरागत जैन मंदिरातील सभामंडप आणि आयताकृती अंगणाऐवजी हिंदु मंदिरसदृश शिखरासच येथे अधिक महत्त्व दिले आहे. येथील प्रमुख जैन मंदिरे पुढीलप्रमाणे होतः—

(१) पार्श्वनाथ (जिननाथ) मंदिर—या सर्वाधिक विशाल जैन मंदिरात (६२' × ३१') बाह्यमडंप, सभामडंप आणि गर्भागाराभोवती विस्तीर्ण प्रदक्षिणापथ आणि गर्भागाराच्या पार्श्वभागी (पश्चिमेस) बाह्यमंदिर आहे. याच्या प्रवेशद्वाराच्या आडव्या पट्टीवर स. ९५५ चा शिलालेख आहे.

(२) आदिनाथ मंदिर—याच्या गर्भागारात गरुडप्रतिमा आणि छोटी जिनमूर्ती असून, जोत्यावर कोरीव देवीप्रतिमा आहेत. त्यावरून पूर्वकालीन वैष्णव मंदिराचे येथे जिनमंदिरात रूपांतर केले असावे.

(३) चौसष्ट योगिनी मंदिर—जैन देवताशास्त्रान्तर्गत चौसष्ट योगिनींचे (राक्षसी) हे ओबडधोबड मंदिर येथील अन्य मंदिरांहून वेगळे आणि पूर्वकालीन (इ. स. ९ वे शतक) आहे (तत्सम अन्य मंदिरे–पाटणा जिल्ह्यातील रानीपुर झरियाल, जबलपुरच्या दक्षिणेकडील भेडाघाट).

येथील बंदिस्त तटबंदीच्या (१०२'×५९½') अंतर्भागात चौसष्ट दगडी देवालयांची आयताकृती रांग असून, आवारातील मुख्य मंदिर नाहीसे झाले आहे. अन्य अभ्यासकांच्या मते उपरोक्त छोटी देवालये हीच येथील उपास्य दैवते असून, मध्यवर्ती मुख्य देवालय येथे कधीच नव्हते.

(४) घंटै मंदिर—बेलगाम आणि कलद्गि मंदिरांसदृश अशा या मंदिराच्या जोत्यावरील (४५' × २५') शिल्पदृष्ट्या अप्रतिम द्वादश स्तंभ (उंची–१४') केवळ शिल्लक असून, मंदिराच्या भिंती आणि तटबंदी आज नष्ट झाली आहे. या स्तंभांवरील घंटांच्या मालिकेमुळे यास 'घंटै मंदिर' नाव मिळाले (तत्सम अन्य स्तंभावशेष मंदिर- मध्यप्रदेशातील ग्यारसपुर). कनिंगहॅम यांना येथे सापडलेल्या इ. स. ६ व्या शतकातील शिलालेखावरून, तसेच बारा दिगंबर जैन मूर्तींवरून हे जैन मंदिर असल्याचे सिद्ध झाले (आर्कि. सर्व्हे. २.४३१; १०.१६).

येथील द्वादश स्तंभांपैकी दर्शनी चार स्तंभ बाह्यमंडपाचे, मधले चार मुख्य मंडपाचे, आणि पार्श्वभागीचे चार गर्भागाराचे असून, याच्या नैर्ऋत्य कोपऱ्यातील आदिनाथप्रतिमा येथील उपास्य दैवत असावी (फर्ग्युसन, २. ४९–५५).

(५) कुंवरमठ मंदिर—हे शिवमंदिर (६६'×३३') घंटै मंदिराच्या दक्षिणवर्ती कुंवरनाल्यानजिक आहे.

**अन्य मंदिरे**— याच्या १½ मैल दक्षिणेकडील जत्कारी येथे, तसेच रेवा संस्थानातील मरीवाग येथे चंदेल स्थापत्य-शैलीची अन्य मंदिरे आढळतात.

**खर्जूरवन** ( वन )— जंबूद्वीपान्तर्गत मेरु पर्वतावरील एक वन ( वायु. ३८.६८ ).

**खर्परेश्वर** ( लिंग )— अवंती येथील एक शिवलिंग ( स्कन्द. आवन्त्य. अ. ७०.७३ ).

**खर्मक** ( पर्वत )— मार्कंडेयमते भारतवर्षातील एक पर्वत. याचे आधु. स्थान समजत नाही.

**खर्व** ( देश )— महाभारतमते युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयीच्या उत्तर दिग्विजयात अर्जुनाने जिंकलेला एक देश ( म. स. २४.२७९* ).

**खर्वनृसिंह** ( तीर्थ )— काशी येथील एक तीर्थ ( स्कन्द. काशी. ८४.४८ ).

**खर्वविनायक** ( गणेश )— काशी येथील एक गणेशस्थान ( स्कन्द. काशी. ३३.१४५ ).

**खलतिक** ( टेकडी )—अशोकाच्या बराबर गुफालेख क्र. २ आणि ३ मते त्याने राजगृहनिवासी आजीविक भिक्षूं ( भदंत ) साठी गुफा ( कुभा ) खोदलेली मगध ( आधु. दक्षिण विहार ) मधील एक टेकडी ( कॉर्पस्. इन्स्क्रि. १.२.१८१–१८२ ). पतंजलीच्या व्याकरण महाभाष्यात, तसेच कात्यायनाच्या वार्तिकात हिचा, तसेच हिच्याजवळील नागार्जुनि टेकडीचा आणि खलतिक वनाचा निर्देश असून ( पतञ्जलि. १.२.५२; २२९.२–३ ), पौराणिककालीन ' गोमंत ' लोक येथेच रहात असत ( गोमंत पहा ). मगधराजधानी राजगृहानजिकच्या या टेकड्या मौर्यकाली विशेष महत्त्व पावल्या असून, येथील अशोक आणि अशोकपौत्र दशरथनिर्मित गुफा भारतातील प्राचीनतम बौद्ध गुफा मानल्या जातात.

दक्षिण विहारमधील गयेपासून १५ मैल उत्तरेकडील आणि गया–पटना रेलमार्गावरील वेला रेल्वेस्थानकापासून ९ मैलांवरील आधु. बराबर टेकडी हीच होय (कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.२२२). बराबर टेकडीसमूहातील ही अत्युच्च टेकडी असून, हिच्यापासून ½ मैल ईशान्येकडील अशोकपौत्र दशरथनिर्मित गुफायुक्त नागार्जुनि टेकडी भूगर्भशास्त्रदृष्ट्या हिचाच भाग मानली जाते.

स्थानिक आख्यायिकामते बाणासुरराजधानी संध्यागिरि हीच असून, श्रीकृष्णपौत्र अनिरुद्ध आणि बाणासुरकन्या उषेचा विवाह येथेच झाला होता. त्यामुळे, तसेच येथील सिद्धेश्वर मंदिरामुळे ही ' संध्यागिरि ' आणि ' सिद्धेश्वर ' स्थानिक नावांनी प्रसिद्ध आहे.

वेला स्थानक– बराबर टेकडी या जंगलमय मार्गात वन्य लुटारूंचे भय असल्याने यात्रेकरू १०–१५ जणांच्या जथ्याने बंदुका घेऊन येथील यात्रेस जातात. श्रावण महिन्यात, तसेच अनंतचतुर्दशीस येथे यात्रा भरते ( ती. पृ. १६० ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात हिची निम्नलिखित नामांतरे आढळतातः—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. महाभारत ( स. २०. २७–३२ ) | गोरथगिरि |
| २. खारवेलांचा हाथीगुंफा शिलालेख ( सिलेक्ट इन्स्क्रि. पृ. २०८ ) | गोरथगिरि |
| ३. बराबर गुफालेख ( जे. बी. बी. आर. ए. एस्. १.१५९ ) | गोरथगिरि |
| ४. मौर्यकालीन शिलालेख आणि बौद्ध साहित्य | खलतिक पर्वत |
| ५. मौखरि राजा अनंतवर्मन्‌चा बराबर गुफालेख ( अर्कि. सर्व्हे. १.५२ ) | प्रवरगिरि |
| ६. बौद्ध साहित्य | पाषाणक चैत्य |
| ७. स्थानिक नामांतरे | संध्यागिरि<br>स्तवर<br>सिद्धेश्वर |

**नामव्युत्पत्ती**—' खलतिक ' ( निसरडी जागा ) संस्कृत पर्वतनामाचे हे संभवतः अपभ्रष्ट रूप असून, आजहि हिच्या माथ्यावर ' पिछुलिया ' ( शब्दशः अर्थ–' निसरडी जागा ' ) नामक स्थान आहे. ' गोधनसमृद्ध ' अशा अर्थाने हिला ' गोरथगिरि ' नाव मिळाले असून, महाभाष्यनिर्दिष्ट ' खलतिक ' वननामात हाच अर्थ अभिप्रेत दिसतो. कनिंगहॅम यांच्या मते ' श्रेष्ठ टेकडी ' अर्थाने हिला ' प्रवरगिरि ', आणि ' सप्तगृहयुक्त ' ( सप्तगुफायुक्त ) अर्थाने हिला ' स्तवर ' नावे मिळाली ( अर्कि. सर्व्हे. १.५२ ). हिचे आधु. ' बराबर ' नाव मौखरि अनंतवर्मन्‌कालीन ' प्रवरगिरि 'चे (गुप्त इन्स्क्रि. पृ. २२२) अपभ्रष्ट रूप असावे.

**ऐतिहासिक पार्श्वभूमी**—आजीविक आणि हिंदुधर्मीयांची केंद्रस्थानभूत ही टेकडी प्राचीन काळापासून

बौद्ध आणि जैन धर्मीयांपासून अलिप्त होती. त्यामुळेच राजगृहानजिक असूनहि मगधराज अजातशत्रु आणि बिंबिसार, तसेच गौतम बुद्ध आणि महावीर येथे कधीच आले नाहीत. आजीविक–उच्चाटनानंतर अल्पकाळ ही बौद्ध धर्मकेंद्र बनली असून, मगध देशातील 'पाषाणक चैत्य' बौद्ध विहार संभवतः येथेच असावा.

वैष्णवधर्मीय मौखरिसम्राट अनंतवर्मन्‌ने (इ. स. ५ वे शतक) येथील आजीविक आणि बौद्ध वसाहतींचा नाश करून येथील 'सुदामा' आणि 'विश्वझोपडी' (बराबर), तसेच नागार्जुनि टेकडीतील तीनहि गुफांतील देणगीलेखातील 'आजीविकाप्रीत्यर्थ' हे शब्द छिन्नीने फोडले. 'लोमश ऋषी' (बराबर) गुफेतील शिलालेखाच्या जागी स्वतःचा शिलालेख कोरून त्याने तिचे कृष्णमंदिरात रूपांतर केले. नागार्जुनि टेकडीतील दोन आजीविक गुफांना त्याने शिव–पार्वतीची मंदिरे बनवून, कात्यायनी आदि हिंदु देवतांची तेथे स्थापना केली. अनंतवर्मन्‌निर्मित ही सारी मंदिरे आज नष्ट झाली असली, तरी येथील अशोक आणि दशरथाचे देणगीलेख छिन्नीने फोडल्याच्या खुणा आजहि दिसतात. त्यावरून याकाळी ही हिंदु तीर्थे बनली असावी. योगानंद शैव साधूच्या शिलालेखमते (इ. स. ७ वे शतक) तत्काली येथे शिवप्रतिमा असून, आजहि सिद्धेश्वर शिव हेच येथील आराध्य दैवत आहे. फाहियेनूच्या प्रवासवर्णनात हिचा निर्देश नसून, ह्युएनत्संगच्या प्रवासवर्णनात हिचा ओझरता निर्देश आढळतो (वॉटर्स, २.१०७). त्यावरून बौद्धस्थान नात्याने तत्काली ही नगण्य असावी.

खारवेलाच्या हाथीगुंफा शिलालेखमते त्याने हिच्यावर हल्ला करून राजगृह गावी घबराट उत्पन्न केली होती. त्यावरून राजगृहाच्या दक्षिण प्रवेशद्वारानजिकची ही टेकडी संरक्षणदृष्ट्या महत्त्वाची असावी. अन्य अभ्यासकांच्या मते खारवेलाचे आक्रमण येथील आजीविक वसाहतीच्या नाशार्थ होते. तसे असल्यास भारतीय इतिहासातील ते पहिले धार्मिक आक्रमण होय.

**महाभारतात**—या ग्रंथमते कुरु-मगध मार्गावरील गिरिव्रजनजिकच्या या पर्वतस्थानी सुंदर वृक्ष आणि समृद्ध पशुसंपत्ती असून (म. स. १८.३०), जरासंधवधार्थ मगधराजधानी गिरिव्रज येथे आलेल्या भीमार्जुनांनी या (गोरथगिरि) टेकडीवरून त्या नगराची टेहळणी केली होती (म. स. २०.२७–३२).

## गुफा

**बराबर गुफासमूह**— बराबर (४) आणि नागार्जुनि (३) टेकड्यातील सात गुफा, तसेच गयेपासून २५ मैल पूर्वेकडील आणि राजगृहाच्या १३ मैल दक्षिणेकडील सीतामरी गुफा 'बराबर गुफासमूह' नावाने सुविख्यात असून, भारतीय बौद्ध चैत्यमंदिरस्थापत्याचा मूलारंभ या नात्याने त्या महत्त्वपूर्ण मानल्या जातात.

**कालनिर्णय**— इ. स. पू. २५२–२०० दरम्यानच्या या गुफांपैकी सुदामा (निगोप) गुफा प्राचीनतम (अशोक-राज्यकालाचे १२ वे वर्ष = इ. स. पू. २५२) असून, अशोकपौत्र दशरथाने कोरलेली 'गोपिका' ही येथील सर्वात उत्तरकालीन गुफा (इ. स. पू. २००) आहे. येथील लोमश ऋषी गुफेवर कालनिर्णयाची कोणतीहि खूण नसली, तरी अभ्यासकांच्या मते ती अशोकानेच खोदली असून, तत्रस्थ गुफालेख मौखरि अनंतवर्मन्‌ने उद्ध्वस्त केला.

**स्थापत्यशैली**— फर्ग्युसन यांच्या मते काष्ठ आणि अश्म शिल्पांच्या संधिकाली काष्ठशिल्पप्रवीण कारागिरांनी खोदलेल्या या प्रारंभीच्या अश्मगुफांमध्ये कारागिरांचा नवथरपणा आणि दगडाच्या कडकपणामुळे अत्यल्प नक्षीकाम आढळते. गुफांचा अंतर्भाग काचेप्रमाणे चकचकीत करण्यात येथील शिल्पकारांनी आपले कलाचातुर्य ओतले आहे (फर्ग्युसन, १.१३०–१३३).

### (१) बराबर गुफासमूह

**बराबर गुफा**— येथील चार गुफा पुढीलप्रमाणे होतः—

**(१) सुदामा गुफा**—अशोकराज्यकालाच्या १२ व्या वर्षी (इ. स. पू. २५२) खोदलेली ही भारतातील प्राचीनतम गुफा अशोकाच्या उपलब्ध आज्ञालेखांशी समकालीन असून, तत्रस्थ अशोक–देणगीलेखातील 'निगोह कुभा' (न्यग्रोध गुफा) नामनिर्देशावरून ती 'निगोप गुफा' वैकल्पिक नावाने प्रसिद्ध आहे.

या दोन दालनांच्या गुफेतील बाहेरची खोली आयताकृती (३३′ × २०′ × १२ ½′) असून, आतील खोली वर्तुळाकृती (व्यास–१९′, उंची–१२′) आहे. या स्तूप-सदृश अंतर्गृहाचा उपयोग आजीविक उपासनामंदिर म्हणून करीत असावेत.

टेकडीच्या पृष्ठभागाशी समांतर कोरलेल्या या गुफेच्या बाह्यखोलीचे छत झोपडीसारखे दोन पाख्यांचे असून, तिचे प्रवेशद्वार गुफेच्या एका बाजूस आहे. टेकडीचा दगड अपेक्षेपेक्षा कठीण निघाल्यामुळे हे फेरबदल केले

## बराबर गुफासमूह

| गुफा: प्राचीन नाव | गुफा: आधुनिक नाव | उत्खननकर्ता | काल | शिलालेख |
|---|---|---|---|---|
| **(१) खलतिक (आधु. बराबर) टेकडी** | | | | |
| (१) — | कर्णचौपर | अशोक | इ. स. पू. २४४ | आजीविकांसाठी गुफा |
| (२) निगोह (न्यग्रोध) | निगोप (सुदामा) | ,, | इ. स. पू. २५० | ,, ,, |
| (३) विश्वामित्र | विश्वझोपडी | ,, | ,, | ,, ,, |
| (४) — | लोमश ऋषी | अशोक (?) | ? | (मौखरि राजा अनंतवर्मन्‌चा उत्तरकालीन शिलालेख, तसेच 'आचार्य श्री योगानंद' अक्षरे) |
| **(२) नागार्जुनि टेकडी** | | | | |
| (१) वहियका कुभा | वहियका गुफा (वहिजक गुफा) | अशोकपौत्र दशरथ | इ. स. पू. २२० | आजीविकांसाठी गुफा |
| (२) वडथिका कुभा | वदथिका गुफा (वदल्हिक गुफा) | ,, | ,, ,, | ,, ,, |
| (३) — | गोपी का कुभा (गोपिका गुफा) | ,, | इ. स. पू. २०० | ,, ,, |

असावेत. हिच्या दर्शनी भागातील पुढे आलेल्या दोन पाखी झोपडीसदृश छतावरून तत्कालीन बांबूच्या झोपडीच्या अनुकरणाने ही खोदली असावी.

(२) **विश्वामित्र (विश्वझोपडी) गुफा**— सुदामा गुफेशी समकालीन अशी ही गुफा तत्रस्थ शिलालेखमते अशोकाने इ. स. पू. २५२ मध्ये खोदली.

(३) **कर्णचौपर गुफा**—अशोकराज्यकालाच्या १९ व्या वर्षी (इ. स. पू. २४४) खोदलेली ही आयताकृती गुफा (३३½′ × १४′) सुदामा आणि विश्वझोपडी गुफांच्या खालोखाल पुरातन असून (इंडि. अँटि. २०. १६८), तिचे अर्धवर्तुलाकृती छत जमिनीपासून ६′ आणि भिंतीच्या माथ्यापासून ४′–८″ उंच आहे. हिच्या उजव्या कोपऱ्यात देवप्रतिमेचे व्यासपीठ असून, अशोक-स्तंभसदृश गुळगुळीत भिंतीव्यतिरिक्त अन्य कोणतेहि नक्षीकाम येथे नाही.

(४) **लोमश ऋषी गुफा**—अनंतवर्मन् मौखरिकृत शिलालेखयुक्त ही गुफा येथील सर्वाधिक उत्तरकालीन आणि कलात्मक गुफा असून, रचनादृष्ट्या ती अशोक-निर्मित अन्य तीन गुफांसदृशच आहे. मात्र त्याच्या शिलालेखाचे काहीहि अवशेष सध्या येथे आढळत नाहीत.

येथील बौद्ध काष्ठचैत्यगृहानुसारी प्रवेशद्वारामध्ये (उंची–७½′) आतील बाजूस झुकलेल्या स्तंभद्वयावर (उंची–१३′) दोन आडव्या तुळया आणि उभय बाजूंस क्रमाने छोटे होत जाणारे प्रत्येकी तीन स्तंभ अर्धवर्तुलाकृती पद्धतीने स्थापिले असून, त्यावर गुफेचे कमानाकृती छत खोदले आहे. दरवाज्याचा माथा आणि छत यांच्या दरम्यान स्तूपपूजक हस्तिमालिकेचे काचेप्रमाणे गुळगुळीत काष्ठसदृश नक्षीकाम आहे. गुफेच्या अंतर्भागात नक्षीकाम-विरहित आणि अपूर्णावस्थेतील प्रशस्त दालन (३३′×१९′) आणि सुदामा गुफेसदृश वर्तुलाकृती देवतामंदिर आहे.

### (२) नागार्जुनि गुफासमूह

**नागार्जुनि गुफा**—उपरोक्त गुफासमूहाच्या ¾ मैल ईशान्यवर्ती नागार्जुनि टेकडीवरील या गुफासमूहात अशोक-पौत्र दशरथनिर्मित निम्नलिखित आजीविक गुफा (इ. स. पू. २२०–२००) आढळतात (इंडि. अँटि. २०.३६५). अशोक–शिल्पपरंपरेतील या गुफा स्थापत्यदृष्ट्या बराबर गुफांसदृश आहेतः—

(१) **गोपिका (गोपी का कुभा) गुफा**—प्रस्तुत

गुफासमूहातील या सर्वाधिक विशाल गुफेच्या ( ४६१/२′ × १९१/४′ × १०१/२′ ) उभय बाजू, तसेच छत ( भिंतीच्या माथ्यापासून उंची–४′ ) अर्धवर्तुलाकृती असून, तिचे दक्षिणाभिमुख प्रवेशद्वार गुफेच्या लांबट बाजूस आहे. या भिक्षुगृहसदृश गुफेचा अंतर्भाग काचेप्रमाणे गुळगुळीत असून, त्यामध्ये कोणतेहि देवमंदिर नाही. तिच्या प्रवेशद्वारावर अशोकपौत्र दशरथाचा शिलालेख आहे.

( २ ) **वाहियका गुफा**—नागार्जुनि टेकडीच्या उत्तर कोपऱ्यातील या छोट्या गुफेतील ( १६३/४′×११९/४′ ×१०१/२′ ) दशरथाच्या शिलालेखमते तत्काली ती 'वहियका कुभा' ( गुफा ) नावाने प्रसिद्ध असावी ( इंडि. अँटि. २०.३६४ ). एका खोलीच्या या गुफेचे प्रवेशद्वार एका बाजूस असून, अंतर्भागातील भिंती काचेप्रमाणे गुळगुळीत आहेत.

( ३ ) **वदथिका गुफा**—आकारमान आणि रचनादृष्ट्या वाहियका गुफेसदृश या गुफेतील दशरथाच्या शिलालेखमते ही ( वडथिका कुभा ) गुफा आजीविक भदंतांसाठी खोदली होती ( ल्यूडर्स सूची. क्र. ९५६ ).

**मतांतरे**— बेग्लर यांच्या मते महाभारतातील गोरथगिरि म्हणजे राजगृह खोऱ्याच्या ६ मैल पश्चिमेकडील आधु. बैठन टेकडी होय ( आर्कि. सर्व्हे. ८.४६ ). परंतु बराबर गुफालेखात हिच्या 'गोरथगिरि' नामांतराचा सुस्पष्ट निर्देश असल्याने बेग्लर यांचा तर्क असंभव वाटतो ( परिपत्रक पहा ).

**खलत्से** ( शिलालेखस्थान )—कुशाण राजा विम कद्फिसेसच्या स. १०३ च्या खरोष्ट्री शिलालेखाचे, तसेच मौर्यकालीन ( इ. स. पू. २०० ) ब्राह्मी शिलालेखाचे लडाखमधील लेह गावापासून ५२ मैल दक्षिणेकडील उपलब्धिस्थान ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.८१ ).

**खलाजिन** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.९० ).

**खलातिक** ( गुफास्थान )—अशोक शिलालेखमते बिहारमधील 'खलतिक' गुफास्थानाचे नामांतर ( खलतिक पहा ).

**खलिघट्ट** ( ग्राम )—परमार राजांच्या इ. स. १० व्या शतकातील शिलालेखमते मध्यप्रदेशातील रेवा ( आधु. नर्मदा ) नदीकाठचे एक ग्राम ( एपि. इंडि. २९.२६ ).

**खलिनै** ( बेट )—टॉलेमीच्या मते भारताच्या पूर्व समुद्रकिनारीचे एक बेट ( अक्षांश–९°–२०′ उत्तर; रेखांश १४६° पूर्व ). यूल यांच्या मते निकोबार बेटानजिकचे आधु. सलंग बेट हेच असावे. स्थानिक नामांतर– 'सलिने' ( इंडि. अँटि. १३.३८४ ).

**खलुगखण्ड-विषय** ( राज्यविभाग )—शिलालेख साहित्यमते पूर्व भारतान्तर्गत कलिंग देशातील एक राज्यविभाग ( एपि. इंडि. २३.२६६–२६८; कलिंग पहा ).

**खल्वाटिका** ( ग्राम )—कलचुरि राजा हरिब्रह्मदेवाच्या स. १४१५ च्या खलारि मंदिरलेखमते देवपाल नामक चांभाराने नारायण मंदिर बांधलेले मध्यप्रदेशातील एक ग्राम. रायपुरपासून ४५ मैल पूर्वेकडील भीमखोज रेल्वेस्थानकानजिकचे आधु. खलारि देवीमंदिरस्थान हेच होय ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.५७७ ).

**खवणापुर** ( महानुभाव तीर्थ )—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थ ( स्था. पृ. ४८ ). औरंगाबाद जिल्ह्यातील सरवारी रेल्वेस्थानकाच्या ३ मैल पूर्वेकडील आधु. खानापुरी गाव हेच होय.

**खवत्** ( ग्राम )—कुशाण राज्यकालीन स. १७९ च्या वर्दक खरोष्ट्री ब्रॉंझ पात्रलेखमते वायव्य भारतातील एक ग्राम. काबूलपासून ३० मैल पश्चिमेकडील आधु. वर्दक ग्राम हेच होय.

**पात्रलेख**—कनिष्क संवत् ५१ च्या अर्तेमिसिओस् महिन्याच्या १५ व्या दिवशीच्या येथील हुविष्ककालीन ब्रॉंझ पात्रलेख ( १०१/२″×६१/२″ ) मते येथील कमगुल्यवंशीय वग्रमरेगनिर्मित 'वग्रमरेग विहार' संज्ञक महासांघिक विहारातील स्तूपांमध्ये हे बौद्ध शरीरावशेष-पात्र स्थापिण्यात आले होते. प्राणिसृष्टीच्या 'अंडज' बौद्ध वैशेषिक सूत्रांच्या आधारे तेथे प्राणिसृष्टीचे 'अंडज' आणि 'जलयुग' ( जरायुज ) संज्ञक दोन उपविभाग वर्णिले असून, पूर्व भारतातून काबूल खोऱ्यात स्थायिक झालेल्या महासांघिक भिक्षूंसाठी वग्रमरेग नामक इराणी व्यक्तीने हा पात्रलेख खोदला असावा. त्याच्या संस्कृतप्रचुर भाषेवरून त्यास स्थानिक भाषा अनवगत असावी ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.१७० ).

**खश** ( लोकसमूह )—महाभारतमते युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयी पैपीलिक सुवर्णाचे उपायन अर्पिणारा एक हिमालय पर्वताश्रयी लोकसमूह ( म. स. ४८.३–४ ). ही विशिष्ट वसाहत तिबेटच्या पश्चिमेकडील सुवर्णगोत्र देशात असली, तरी पौराणिक काली ( इ. स. ४ थे शतक ) हिमाल्यान्तर्गत गंगा नदीच्या उगमानजिकचा केदारखंडाचा साराच प्रदेश ( **केदारे खसमंडले** ) 'खसमंडल' नावाने प्रसिद्ध असावा. सांकृत्यायन यांच्या

मते मध्य आशियातील काशगर ( खशगिरि ) पासून तिबेटपर्यंतच्या विस्तृत प्रदेशात प्राचीन काळी या लोकांच्या वसाहती होत्या. त्यापैकी कश्मीरच्या दक्षिण आणि पश्चिमवर्ती पर्वतीय प्रदेशातील वसाहतींची माहिती राजतरंगिणीमध्ये, आणि मध्य आशियान्तर्गत काशगरदेशीय वसाहतींची माहिती बृहत्संहितेत आढळते.

**वांशिक पूर्वपीठिका**— महाभारतमते हे शक आणि दरद लोकांप्रमाणेच भारताबाहेरील अर्धरानटी लोक असून ( म. द्रो. ९७.३९ ), हरिवंशमते हे म्लेंच्छ होते ( ह. वं. ९५.६४४० ). मनुस्मृतिमते हे क्षत्रियकुलोत्पन्न लोक आचारभ्रष्टतेमुळे शूद्र बनले (मनु. १०.४३–४४). सांकृत्यायन यांच्या मते हे ( खस ) लोक ऋग्वेदकालीन शंबरादि असुर, किन्नर, किरात, भिल्ल आदि नागवंशीय सम्राटांचे अंतेवासी असून, आर्य–वसाहतीकरणापूर्वीच हे मध्य आशियातील पठारनिवासी लोक गिलजिट्मार्गे नेपाळच्या पूर्व सीमेपर्यंतच्या हिमालय प्रदेशात पसरले होते. हिमाल्यातील बहुसंख्य आदिवासी लोक स्वतःस खसवंशीय म्हणवितात.

**आधुनिक काळी**— हिमालयातील बहुसंख्य आदिवासी लोक खसवंशीय असून, कांगडापासून नेपाळपर्यंतच्या प्रदेशात त्यांची वस्ती आढळते. गढवाल आणि अलमोरा प्रदेशातील टंगणिया रजपूत, काशगरमधील खो, तसेच काबूलमधील कटोरा लोक स्वतःस खसवंशीय म्हणवितात. अट्‌किन्सन यांच्या मते गंगा नदीच्या उगमानजिक, तसेच कश्मीरातील शारदा तीर्थाच्या उत्तरेस या ( तंगण ) लोकांची वसाहत असून, नेपाळपासून कश्मीरपर्यंतच्या प्रदेशात हे ( कश ) आजहि सामर्थ्यसंपन्न म्हणून सुविख्यात आहेत ( अट्‌किन्सन, हिमालय प्रदेश. २. ४४० ). खश लोकांच्या समाध्या लडाख, लाहुल, चंबा, कनौरपासून कुमाऊँ प्रदेशातील द्वारहट, बैजनाथ, बागेश्वरपर्यंत, तसेच कनौर प्रदेशातील लिप्पा कनम्, स्पूपासून तिबेटी सरहद्दीवरील नमग्या या भारतीय गावापर्यंत आढळतात. त्यावरून हा प्रदेश या लोकांचा बालेकिल्ला असावा ( सांकृत्यायन, कुमाऊँ. पृ. २६–३१ ).

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात यांची निम्नलिखित नामांतरे आढळतात ( परिपत्रक पहा )

**उत्पत्ती**—महाभारतमते वसिष्ठधेनू नंदिनीने विश्वामित्र-आक्रमणनिवारणार्थ निर्मिलेल्या लोकसमूहांपैकी हे एक असून ( म. श. ३९.२०–२१; तत्सम अन्य लोक–यवन, हूण, किरात ), हरिवंशमते सगराने यांचा पराजय करून यांना नीच बनविले ( ह. वं. १४.७८४ ).

## खश लोकसमूहाची नामांतरे

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. मार्कंडेय पुराण (५७.५७ ) | खस ( खष ) |
| २. महाभारत ( भी. १०.६६ ) | खशिक |
| ३. राजतरंगिणी ( ८.३९३ ) | खशक |
| ४. टॉलेमी ( मॅक्रिंडल, पृ. ३०३ ) | कसिअ |
| ५. प्लिनी ( मॅक्रिंडल, मेगॅस्थेनिस. पृ. १४५ ) | केसि |
| ६. स्थानिक नामांतरे | कशकार, खसिय, खश–कश |

**महाभारतात**—या ग्रंथमते भारतीय युद्धात या पांडवपक्षीय लोकांनी ( म. भी. १०.६६ ) जयद्रथवधसमयी सात्यकीवर हल्ला केला होता ( म. द्रो. ९७.३९ ).

**वसाहती**—प्राचीन साहित्यात या अभारतीय लोकांच्या निम्नलिखित भारतीय वसाहतींचा निर्देश आढळतो :—

( १ ) **तिबेट**—प्लिनीच्या ग्रंथमते हे ( केसि = खश; चेत्रिबोनि = दीर्घवेणी ) पर्वतीय वन्य लोक सिंधु नदीचा उगम आणि हिमालय पर्वताच्या दरम्यानच्या तिबेटच्या पश्चिम भागात रहात असून, महाभारतमते हे मेरु–मंदार पर्वतांच्या दरम्यानच्या शैलोदा नदीकाठी ( आधु. पश्चिम तिबेट ) रहात असत ( म. स. ४८.३ ). युधिष्ठिराच्या राजसूय यज्ञसमयी यांनी ( खश ) त्यास पैपीलिक सुवर्ण अर्पिले असून, येथील सुवर्णगोत्रदेशीय खाणकामगारांशी यांचा कच्च्या सोन्याचा व्यापार असावा. पौराणिक साहित्यमते हे हिमालय पर्वताश्रयी लोक होते ( मार्कं. ५४.५६; वायु. ४५.१३५; वामन. १३.५७ ).

( २ ) **काशगर**—टॉलेमीच्या मते हे ( कसिअ ) लोक मध्य आशियातील काशगर प्रदेशात हिंदुकुश पर्वतानजिक रहात असून, पौराणिक साहित्यमते हे उदीच्य ( वायव्य ) भारतनिवासी होते (बृ. सं. १४.२२; विष्णुधर्म. १.९.८). ब्रह्माण्ड आणि मत्स्यमते यांची ही वसाहत मेरु पर्वतोद्भवा पश्चिमवाहिनी चक्षु अथवा सीता नद्यांच्या मार्गावर होती ( ब्रह्माण्ड. १८.४६; मत्स्य. ११९.४४ ). अग्रवाल यांच्या मते मार्कंडेय पुराणातील पर्वताश्रयी खश लोक हेच असून ( मार्कं. ५७.५६ ), मध्य आशियातील 'कशकार' ( काशगर ), 'हिंदुकुश' ही त्याचीच अपभ्रष्ट रूपे होत

( अग्रवाल, पाणिनि. पृ. ४७; एन्. एच्. एच्. २.२८–२९ ).

( ३ ) **नेपाल**—ब्रह्माण्डमते यांची ही वसाहत हिमालयोद्भवा पश्चिमवाहिनी गंगा नदीच्या मार्गावर असून ( ब्रह्माण्ड. ९८.५०; वायु. ४७ ), बृहत्संहितेतील ऐशान्य खश ( बृ. सं. १४.३०; मार्कं. ५५.५१ ), तसेच स्थानिक ब्राह्मणांशी विवाह करून नेपाळमधील सर्वश्रेष्ठ लष्करी जमात बनलेले आधु. खस लोक हेच होत ( जे. आर. ए. एस्. ६३.२१७–२२३ ).

( ४ ) **कुमाऊँ**—येथील आधु. खसिय लोक यांचेच वंशज होत ( एन्. एच्. एच्. २.२८ ).

( ५ ) **पंजाब**—महाभारतमते या ( खशिक ) उदीच्य देशनिवासी लोकांची एक वसाहत पंजाबात होती ( म. भी. १०.६६; क. १५.९ ).

( ६ ) **मध्यदेश**—मार्कंडेयमते मध्यदेशात यांची एक वसाहत होती ( मार्कं. ५५.६; ५८.६ )

( ७ ) **पूर्व भारत**—बृहत्संहितामते यांची एक वसाहत कूर्मचक्रात्मक भारतवर्षाच्या पूर्व भागात होती ( बृ. सं. १०.१२; १४.६; ६९.२६; मार्कं. ५५.१२ ).

( ८ ) **सिवालिक टेकड्या**— शिलालेख साहित्यमते यांची एक वसाहत सपादलक्ष ( आधु. सिवालिक टेकड्या ) पर्वतावर होती ( चौधरी, पृ. १२८ ).

( ९ ) **कश्मीर**—बृहत्संहितामते हे लोक कश्मीर-सरहद्दीवरील अभिसार, दार्व, दरद, कीर, कुलूत ( आधु. कुलू ) आणि कौणिंद ( कौलिंद्र ) लोकांसमवेत रहात असून ( बृ. सं. १४.२९. अल्बेरुणी, १.३०३ ), अन्य साहित्यमते हे कश्मीरचे आद्य रहिवासी होते ( इंडि. अँटि., स. १८९३, पृ. १७२; १८१ ).

राजतरंगिणीमते हे ( खश, खशक ) लोक पीरपंत्साल पर्वताच्या पश्चिमेकडील आणि दक्षिणेकडील वितस्ता नदी आणि काष्ठवाट ( आधु. किस्टवार ) देशांच्या दरम्यानच्या अर्धवर्तुलाकृती प्रदेशात रहात असत ( राज. १.३१७; ८.३९३). तत्काली या प्रदेशात निम्नलिखित खश राज्ये होतीः– १. **राजपुरी** ( आधु. रजौरी; राज. ७.९७९; १२७१; १२७६; १२७८; १२८१; ८.८८७; १४६६; १८६८; १८९५ ); २. **पंचगह्वर** ( आन्स नदीखोऱ्यातील आधु. पंचगव्वर; श्रीवर. ४.२१३ ); ३. **बाणशाला** ( बानहल खिंडीच्या दक्षिणवर्ती आधु. बानहल् प्रदेश; राज. ८.१६६५–१७७३ ); ४ **विषलाटा** ( बानहल्पासून चंद्रभागा नदीपर्यंतचा आधु. बिच्लारि प्रदेश; राज. ८.१७७; १०८४ ); ५. **खशाली अथवा खशालय** ( कश्मीरच्या आग्नेय कोपऱ्यातील आधु. खैशाल खोरे; राज. ७.३९९; श्रीवर. ४.४५६; चतुर्थ. ५६; ५८; २८४; २९०; २९९ ).

याशिवाय राजपुरीच्या पश्चिमेकडील वितस्ता खोऱ्यात यांच्या निम्नलिखित वसाहती होत्याः— १. **पर्णोत्स** ( आधु. पूंच; राज. ६.३१८ ); २. **लोहर** ( आधु. लोहरिन्; कश्मीरच्या दिद्दा राणीनंतरच्या खश राजवंशाची जन्मभूमी; राज. ६.१७५; ७.७७३ ); ३. **वीरानक** ( वराहमूलच्या दक्षिणेकडील आधु. वीरन्; राज. ५.२१४ ); ४. **बिल्ववन** ( वराहमूलच्या दक्षिणेस; राज. ८.३९३ ); ५. **कर्नाह** ( वितस्ता नदीच्या उत्तरवर्ती आधु. कर्नाव; राज. ८.२७५६; ३००६; ३०८८ ).

**मध्ययुगीन काली**—उपरोक्त वसाहतींपैकी बिल्ववन प्रदेशातील मुसलमानी रजपूत 'खख' ( पहाडी–खुख ) वसाहत शीख राज्यकालापर्यंत अस्तित्वात असून, आजहि तेथील बहुतांशी संस्थानिक आणि जहागिरदार स्वतःस खखवंशीय म्हणवितात. कर्नाव प्रदेशातील आधु. बोम्ब लोकहि खशवंशीयच ( खाशक; राज. ८.३०८८ ) आहेत ( स्टाइन, राज. २.४३० ). राजतरंगिणीमते या लुटारू लोकांनी ( राज. ८.१६६८; १८९५; श्रीवर. ४४६; ४५६; ४९८; ५७१; ६३८; ६४६; चतुर्थ. ३२६ ) कश्मीरातील भूतेश्वर मंदिर ( राज. ८.२७५६ ), तसेच दिन्नाग्राम ( राज. ८.२९१७; ३००६; ३००८ ) लुटले होते.

**खशाली** ( देशविभाग )—राजतरंगिणीमते कश्मीरच्या आग्नेय सरहद्दीवरील एक खश वसाहत ( राज. ७.३९९ ). नामांतर–'खशालय' ( श्रीवर. ४.४५६; चतुर्थ. ५६; ५८; २८४; २९०; २९९ ). किस्टवार ( प्राचीन काष्ठवाट ) आणि मर्बल खिंडीच्या दरम्यानचे आधु. खैशाल खोरे हेच होय. मर्बल खिंड–विजब्रौर ( प्राचीन विजयेश्वर ) मार्ग यामधूनच जात असे ( स्टाइन, राज. १.४७; ३०० ).

**खशिक** ( लोकसमूह )— महाभारतमते हिमालयनिवासी 'खश' लोकसमूहाचे नामांतर ( म. भी. १०.६६; खश पहा ). अन्य नामांतर– 'खस' ( मार्कं. ५७.५७ ); 'खसिय'.

**खस्थ** ( लोकसमूह )— बृहत्संहितामते वायव्य भारतातील एक लोकसमूह ( बृ. सं. १४.२२ ). अल्बेरुणीच्या मते हे दैवी शक्तियुक्त आणि वृक्षोत्पन्न लोक वृक्षांच्या फांद्यांवर लोंबत असत ( अल्बेरुणी, १.३०२ ). शब्दशः अर्थ–'आकाशनिवासी.' पाठभेद– 'खचर'

( बृ. सं. १४.२८ ); ' दिविस्थ ' ( बृ. सं. १४.३१ ).

**खागि** ( ग्राम )—राजतरंगिणीमते कश्मीरराज खगेंद्र आणि गोपादित्याचे एक अग्रहार ग्राम ( राज. १.९०; ३४० ). क्रमराज्यान्तर्गत बीरु गावापासून ४ मैल नैर्ऋत्येकडील आधु. खाग गाव हेच होय ( अक्षांश ३४° उत्तर; रेखांश ७३°–३६' पूर्व ). नामांतर–' खागिक ' ( राज. १.१४० ).

**खाटोलिका** ( ग्राम )—कल्चुरि राजा कोकल्लदेव ( द्वितीय ) च्या इ. स. १० व्या शतकातील गुर्गी शिलालेखमते त्याने स्थानिक शिवालयास दान दिलेले मध्यप्रदेशातील एक ग्राम. याचे आधु. स्थान समजत नाही ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.२२६ ).

**खाडा** ( ग्राम )—कल्चुरि राजा पृथ्वीदेव ( द्वितीय ) च्या स. ११५८ च्या रतनपुर शिलालेखमते मध्यप्रदेशातील कल्चुरिराजधानी रत्नपुरनजिकचे एक पर्वतीय ग्राम. रतनपुरच्या १½ मैल पूर्वेकडील आधु. कर्रा ग्राम हेच होय ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.४९६ ).

**खाडायन** ( ग्राम )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक ग्राम ( पा. सू. ४.२.८०.१; १३८ ).

**खाडी–विषय** ( देशविभाग )—शिलालेख साहित्यमते उत्तर बंगालमधील पौंड्रवर्धन भुक्तीमधील एक राज्यविभाग. बंगालमधील डायमंड हार्बरच्या परिसरातील आधु. खाडी परगणा ( =चोवीस परगणा, खुल्ना आणि बाकरगंज जिल्हे ) हाच होय ( एपि. इंडि. १५. २७८–२८६; पौंड्रवर्धन भुक्ति पहा ).

**खाण्डवप्रस्थ** ( नगर )—महाभारतमते उत्तर प्रदेशान्तर्गत पांडवराजधानी ' इंद्रप्रस्थ ' चे नामांतर ( म. आ. २०५–२१०; भा. १०.७३.३२; इंद्रप्रस्थ पहा ).

**खाण्डववन** ( वन )—तैत्तिरीय आरण्यक आणि पंचविंश ब्राह्मणमते उत्तर भारतातील कुरुक्षेत्राचे एक मर्यादावन ( तै. आ. ५.१.१; पं. ब्रा. २५.३.६ ). महाभारतमते हे यमुना नदीकाठी इंद्रप्रस्थाच्या सरहद्दीवर असून ( म. आ. २०४.१४ ), याच्यामुळेच त्या नगरास ' खांडवप्रस्थ ' वैकल्पिक नाव मिळाले.

स्थानेश्वरच्या नैर्ऋत्यवर्ती बुलंदशहरपासून सहारानपुरपर्यंतचा आधु. मीरत जिल्ह्याचा पूर्व-पश्चिम पसरलेला कुरुक्षेत्रान्तर्गत प्रदेश हाच होय. महाभारतमते यामधील मयासुरनिवासस्थानस्वरूप ' मयराष्ट्र ' ( दिल्लीपासून ४५ मैलांवरील आधु. मीरत ) नामक उपविभागात कौरवराजधानी हस्तिनापुर होते. यावरून इंद्रप्रस्थपासून ( आधु. दिल्ली ) हस्तिनापुरपर्यंतचा ( =मीरतच्या २२ मैल उत्तरवर्ती गंगा-यमुना दुआबाचा ६७ मैलांचा ) प्रदेश या वनामध्ये अंगभूत असून, डे यांच्या मते मीरतच्या उत्तरवर्ती आधु. मुजफ्फरनगर यामध्येच होते.

अन्य अभ्यासकांच्या मते यमुना–नर्मदा दुआबातील या वनात दिल्लीपासून विंध्य पर्वताच्या दक्षिणवर्ती नर्मदा नदीकाठच्या खांडवा गावापर्यंतचा प्रदेश समाविष्ट होत असे.

**महाभारतात**—महाभारत आदिपर्वातील ' खांडवदाह ' उपपर्वातील खांडवदाह आणि शार्ङ्गोपाख्यान नामक प्रकरणात या वनाच्या पांडवकृत अंशतः वसाहतीकरणाचा आणि इंद्रप्रस्थनगरस्थापनेचा इतिहास दिला आहे ( म. आ. २१४–२२५ ). या वनाच्या उर्वरित भागातील तक्षकादि नाग पांडवांना त्रास देऊ लागताच कृष्णार्जुनांनी हे दग्ध करून, आणि येथील नागराज्य नष्ट करून इंद्रप्रस्थ सुरक्षित केले ( म. आ. २२५.९–१२ ). यावरून पांडवकृत खांडववनदाह हा इंद्रप्रस्थाच्या वसाहतीकरणाचाच भाग असावा. महाभारतमते हे वन सतत सहा ( म. आ. २२५.१४ ), अथवा वीस दिवस ( म. आ. २१९.२१३८* ) जळत असून, या अग्निप्रलयातून तक्षकपुत्र अश्वसेन नाग, मयासुर आणि चार शार्ङ्ग पक्षी केवळ बचावले ( म. आ. २१९.४७ ). या उपकाराप्रीत्यर्थ मयासुराने पांडवांना मयसभा बांधून दिली ( म. स. १.१२ ).

**पौराणिक साहित्यात**—भागवत आणि पद्ममते हे पवित्र वन होते ( भा. १.१५.८; १०.५८.२५–२७; ७१.४५–४६; पद्म. उत्तर. २००.५ ).

**खाण्डिक** ( देश )—पद्ममते उत्तर भारतातील एक देश ( पद्म. आदि. ६.६३ ).

**खाण्डे भडाड** ( महानुभाव तीर्थ )—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थ ( स्था. पृ. ३२ ). नासिक जिल्ह्यातील निफाड तालुक्यातील निफाड–नांदूर मार्गावरील आधु. खांडे भडाड हेच होय.

**खाण्डेगाव** ( महानुभाव तीर्थ )—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थ ( स्था. पृ. ६७ ). अहमदनगर जिल्ह्यातील शेवगाव तालुक्यातील मिरी गावाच्या ७ मैल दक्षिणेकडील आधु. खांडगाव हेच होय.

**खातगाव** ( महानुभाव तीर्थ )—स्थानपोथी मते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थ ( स्था. पृ. ३५ ). अहमदनगर जिल्ह्यातील आवलगावच्या पश्चिमेकडील

गोदावरी नदीकाठचे आधु. खानपुर हेच होय.

**खातिग्राम** ( ग्राम )—यादव राजांच्या शके ११९३ च्या पैठण ताम्रपटमते महाराष्ट्रातील सेऊण देशातील एक ग्राम. याचे आधु. स्थान समजत नाही ( इंडि. अँटि. १४.३१५[८]).

**खादिरवन** ( वन )— मथुरा येथील सप्तवनांपैकी सप्तम वन ( नारद. उत्तर. ७९.१३; वराह. १५३.४२; १६१.८ ).

**खादिरी** ( नगर )—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक नगर ( पा. सू. ४.२.९७ ).

**खाधुनगर** ( जैन तीर्थ )—जयसागरमते शीतलनाथ-मंदिरस्थान, एक जैन तीर्थ. याचे आधुनिक स्थान समजत नाही ( ती. सं. पृ. १३७ ).

**खानुमत** ( ग्राम )— बौद्ध साहित्यमते मगध देशातील राजगृहनजिकचे बुद्धवास्तव्यपुनीत आम्रवनयुक्त एक ब्राह्मणग्राम ( दीघ. १.१२७ ). बिहारमधील पटना जिल्ह्यातील सिलौ पोलीसविभागातील आधु. खानपुर गाव हेच होय ( पांडे, बिहार. पृ. १५१ ).

**खापगा** ( नदी )—मध्ययुगीन शब्दकोश साहित्यमते 'गंगा' नदीचे नामांतर ( अभिधान. १४८.१०८२; गंगा पहा ).

**खाम्बगव्हाण** ( महानुभाव तीर्थ )—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थ ( स्था. पृ. ५१ ). मराठवाड्यातील बीड जिल्ह्यातील शहागडनजिकचे गोदावरी नदीकाठचे आधु. खामगाव हेच होय.

**खाशक** ( लोकसमूह )—राजतरंगिणीमते कश्मीरच्या दक्षिण सरहद्दीवरील 'खश' लोकसमूहाचे नामांतर ( राज. ८.३०८८; खश पहा ).

**खासटा** ( ग्राम )—राजतरंगिणीमते कश्मीरराज गोपादित्याने श्रीनगरच्या धर्मलंड ब्राह्मणांना हद्दपार केलेले श्रीनगरनजिकचे एक ग्राम ( राज. १.३४२ ). श्रीनगरचे आधु. सुदर्बल नामक उपनगर हेच होय.

**खिवनस्थान** ( ग्राम )—चालुक्य राजांच्या वि. सं. १२१७ च्या शिलालेखमते उत्तर गुजरातमधील एक ग्राम. याचे आधुनिक स्थान समजत नाही ( एपि. इंडि. २.२८ ).

**खिङ्गलुङ्ग** ( बौद्ध मंदिर )—हिमालयान्तर्गत कैलास परिक्रमामार्गातील एक बौद्ध मंदिरस्थान ( ती. पृ. ३८ ).

**खिञ्जिङ्गकोट्ट** ( देशविभाग )—शिलालेख साहित्यमते ओरिसानरेश भंज राजवंशाच्या राज्यातील एक देशविभाग. ओरिसामधील आधु. मयूरभंज प्रदेश हाच होय ( एपि. इंडि. २९.८५ ). आध्यात्मिकतेचा लवलेशहि नसलेली कुमारगुप्तकालीन काही शिल्पे येथे आढळतात.

**खिञ्जली-मण्डल** ( देशविभाग )— शिलालेख साहित्यमते ओरिसानरेश भंज राजवंशाच्या राज्यातील एक देशविभाग. ओरिसामधील आधु. बौद-केऊंजर प्रदेश हाच होय ( एपि. इंडि. २९.८५ ).

**खिञ्जिङ्ग** ( ग्राम )— कलचुरि राजा पृथ्वीदेव ( द्वितीय )च्या स. ११४८ च्या कोनी शिलालेखमते मध्य-प्रदेशातील एक ग्राम. याचे आधु. स्थान समजत नाही ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.४६७ ).

**खिडिन्गहार विषय** ( राज्यविभाग )—शिलालेख साहित्यमते पूर्व भारतान्तर्गत कलिंग देशातील दक्षिण तोसल विभागातील कोंगोद मंडलातील एक राज्यविभाग ( जे. बी. ओ. आर एस्. ५.५६४–५७८; कोंगोद मंडल पहा ).

**खिबुथ** ( द्वीप )—असीरियन साहित्यमते पृथ्वीच्या सप्तद्वीपांपैकी 'खोनेरेत्स् बामी' द्वीपाचे नामांतर ( खोनेरेत्स् बामी पहा ).

**खिबेर** ( ग्राम )—फरिश्ताच्या मते विजयनगर सैन्याने स. १५५८ मध्ये भस्मसात केलेले अहमदनगरच्या निजामशाही राज्यातील एक ग्राम ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. २५५ ).

**खिमिडी मण्डल** ( राज्य )—कलचुरि राजा जाजल्लदेव ( प्रथम )च्या स. १११४ च्या रतनपुर शिलालेखमते, तसेच पृथ्वीदेव ( द्वितीय )च्या स. ११४८ च्या कोनी शिलालेखमते दक्षिण कोशल देशान्तर्गत एक राज्य-विभाग ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.२.४११; ४६७ ). ओरिसामधील गंजम जिल्ह्यातील आधु. खिमिडी जमीनदारीचा प्रदेश हाच होय ( इंडि. अँटि. १६.१३१ ). दीवीसि शिलालेखमते हा कोसल देशानजिक होता ( एपि. इंडि. ४.३१४ ).

**खिरडी** ( महानुभाव तीर्थ )—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थ ( स्था. पृ. ७१ ). अहमदनगर जिल्ह्यातील पैठणच्या ६ मैल वायव्येकडील आधु. खिरडी गाव हेच होय.

**खीव** ( दुर्गस्थान )—कुशाण राज्यान्तर्गत एक आयताकृती तटबंदीयुक्त दुर्गस्थान. मध्य आशियातील आधु. खोरेज्म ग्राम हेच होय. गंधार ( आधु. अफगाणिस्तान ) देशातील तक्षिला, कपिशा, बीरकोट, उदेग्राम,

गिरि आदि गावचे कुशाण दुर्ग याच्याच अनुकरणाने बांधले आहेत ( गोएट्झ, पृ. ७३ ).

**खुदच** ( ग्राम )— कुशाण राज्यकालीन स. ८४ च्या पेशावर म्युझियम खरोष्ठी शिलालेखमते गंधार देशातील एक ग्राम. येथील ( खुदचियामि ) बौद्ध विहारात 'त्रवशकुर' सन्मित्रसंघाने एक विहीर (कुए) खोदली असून ( कॉर्पस्. इन्स्क्रि २.१.२.७९ ), माणिक्याल शिलालेखमते वेष्पसि नामक व्यक्ती याच गावची रहिवासी ( खुदचिय ) होती ( कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२.१५० ). याचे आधुनिक स्थान समजत नाही.

**खुदु खेल** ( देश )—अफगाणिस्तानातील महाबन पर्वताच्या पश्चिमवर्ती हश्तनगर ( प्राचीन पुष्कलावती ) नजिकचे कनिष्ककालीन खरोष्ठी मूर्तिलेख आणि शिलालेखस्थान, एक देश. येथे निम्नलिखित अद्वितीय गंधार बौद्ध शिल्पकृती सापडल्या आहेत :—

( १ ) **लिपीसंदर्शन परिवर्त शिल्प**—बोधिसत्त्वाच्या विश्वामित्रप्रदत्त प्रथमसंथेच्या कथाभागावर आधारित या शिल्पामध्ये बोधिसत्त्व धूळपाटीवर 'अ' धुळाक्षराने प्रारंभ होणारे **'अनित्यः सर्वसंस्कारशब्दः'** ( संस्कार अनित्य आहे ) हे सूत्र खरोष्ठी लिपीमध्ये लिहीत असल्याचे दाखविले आहे. सध्या हे शिल्प लाहोर म्युझियममध्ये आहे.

( २ ) **शिल्पसंदर्शन परिवर्त शिल्प**—बोधिसत्त्व जगातील समस्त लिप्यांमध्ये जन्मतःच पारंगत असल्याच्या कथाभागधारित या शिल्पात बोधिसत्त्व धूळपाटीवर '**इहलोकीच्या समस्त लेखनाचा**' ही खरोष्ठी अक्षरे लिहीत असल्याचे दाखविले आहे. सध्या हे शिल्प पेशावर म्युझियममध्ये आहे.

या देशात अन्यत्रहि अनेक खरोष्ठी शिलालेख सापडले आहेत ( उदा. नौग्राम शिलालेख; पेशावर म्युझियम शिलालेख क्र. १. आणि ४; कॉर्पस्. इन्स्क्रि. २.१.२. १२७–१३१ ).

**खुरकर्तरि** ( तीर्थ व लिंग )—काशी येथील एक शिवलिंग ( स्कन्द. काशी. ६१.१६१.; ८३.१०८ ).

**खुराशन** ( देश )—शक्तिसंगमतंत्रमते अफगाणिस्तानातील हिंगुपीठ ( आधु. हिंगुलाज ) आणि मक्केश ( आधु. मक्का )च्या दरम्यानचा एक म्लेंच्छ देश ( शक्तिसङ्गम. ३.७.३१ ). अफगाणिस्तानच्या पश्चिमवर्ती इराणमधील आधु. खुरासान प्रांत ( राजधानी—हेरात ) हाच होय. मात्र याच्या शक्तिसंगमतंत्रवर्णित भौगोलिक परिसीमा अतिव्याप्त म्हणजे मध्ययुगीन पर्शियन साम्राज्याच्या आहेत. बंगाली तांत्रिक साहित्यमते मक्का येथील सुविख्यात काब्याखाली 'मक्केश' नामक शिवलिंग आहे ( मक्केश पहा ).

**खुल्म** ( देश )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते मध्य आशियातील रुइसमन्गन देशाच्या वायव्यवर्ती आणि बोखर ( आधु. बल्ख ) च्या पूर्ववर्ती एक देश. आधु. खुल्म नदीखोऱ्यात हा असावा. ह्युएन्त्संगच्या मते या ( हो–लिन् ) देशात ( व्याप्ती–१६० मैल; राजधानीची व्याप्ती–१ मैल ) दहा बौद्ध मठ आणि ५०० बौद्ध भिक्षू होते ( बील, १.१०८ ).

**खुशाण** ( लोकसमूह )—कद्फिसेस् ( प्रथम ) च्या खरोष्ठी मुद्रिकालेखमते वायव्य भारतातील 'कुशाण' लोकसमूहाचे नामांतर ( कुशाण पहा ). अन्य नामांतर–'खुशाण'.

**खूयाश्रम** ( देशविभाग )—राजतरंगिणीमते कश्मीरातील एक देशविभाग ( राज. ८.२६९८ ). स्टाइन यांच्या मते वोलुर सरोवराच्या उत्तरवर्ती आधु. खुयहौम हा अर्धवर्तुलाकृती जिल्हा हाच होय. वोलुर खोरे – दरद देशमार्ग यामधूनच जात असून, मातृग्राम ( आधु. मात्रगौम; राज. ८. २७७५ ) नामक ग्रामहि यामध्येच होते ( स्टाइन, राज. २.४८८ ). नामांतर–'खोयाश्रम' ( श्रीवर. ३.३५३ ).

**खेचरी** ( तीर्थ )—व्रजमंडलान्तर्गत ( आधु. मथुरा–वृंदावन ) पूतना राक्षसी–निवासस्थान, एक तीर्थ ( ती. पृ. १०१ ).

**खेट** ( राज्यविभाग )—यादव राजांच्या स. ६१० च्या रेवतीद्वीप दानपत्रमते, तसेच स. १२३२ च्या पुरुषोत्तमपुरी ताम्रपटमते महाराष्ट्र देशातील कारेल्लिका ग्रामयुक्त एक राज्यविभाग ( आहार ). रत्नागिरी जिल्ह्यातील आधु. खेड तालुका हाच होय ( जे. बी. बी. आर. ए. एस्. १०.३६५; एपि. इंडि. २५.१९९ ).

**खेटक** ( ग्राम )—राष्ट्रकूट राजा गोविंद ( चतुर्थ )च्या स. ९३० च्या खंबायत शिलालेखमते अमोघवर्षपुत्र अकालवर्षाने लाटनरेशाचा पराजय केलेले लाट देशान्तर्गत खेटक मंडलातील एक नगर. उत्तर गुजरातमधील साबरमती नदीकाठचे आधु. खेडा गाव हेच होय ( एपि. इंडि. ७. २९; खेटक मंडल पहा ). गुर्जर राजा दद्द ( द्वितीय ) चा स. ६२९ चा ताम्रपट येथे सापडला आहे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४. १. ५७ ).

२. पद्ममते मध्य भारतातील वेत्रवती ( आधु. बेटवा )

नदीकाठचे एक नगर ( पद्म. उत्तर. १३०.२० ).

३. ( ब्रह्मदेवस्थान ) पद्ममते एक ब्रह्मदेवस्थान. येथील ब्रह्मदेवाचे नाव 'अन्नदातृ' होते ( पद्म. आदि. २९. १४३ ).

४. ( देश ) वामनमते उत्तर भारतान्तर्गत एक देश ( वामन. १३.३८ ).

**खेटक-मण्डल** ( देशविभाग )— राष्ट्रकूट राजा गोविंद ( चतुर्थ ) च्या स. ९३० च्या खंबायत ताम्रपट-मते लाट ( आधु. उत्तर गुजरात ) देशान्तर्गत एक देश-विभाग ( एपि. इंडि. ७.४०; राजधानी–खेटक = आधु. खेडा ). सांकलिया यांच्या मते गुजरातमधील आधु. अहमदाबाद आणि खेडा जिल्हे, तसेच भडोच जिल्ह्यातील जंबूसर आणि प्रांतीज तालुके मिळून हा बनला असून, त्याच्या भौगोलिक परिसीमा पुढीलप्रमाणे होत्या:— १. **उत्तरेस, वायव्येस आणि ईशान्येस**–साबरमती नदी आणि सारस्वत मंडल; २. **दक्षिणेस, आग्नेयेस आणि नैर्ऋत्येस**–मही नदी आणि बडोदा प्रदेश ( सांकलिया, रिव्ह्यू. पृ. २५५ ). नामांतर ( शिलादित्य सप्तमचा स. ७६६ चा अलीना ताम्रपट )–'खेटक आहार' ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.१७१ ).

**शिलालेख साहित्यात**—निम्नलिखित शिलालेखांत याचा निर्देश आढळतो:— १. चालुक्य राजा सीयकाचा वि. सं. १००५ चा शिलालेख ( एपि. इंडि. १९.२४२ ); २. विजयपालाचा वि. सं. १२३१ चा शिलालेख ( इंडि. ॲंटि. १९.८२ ); ३. शुल्कि राजाचा मासेर शिलालेख ( एपि. इंडि. २९.२३ ).

**उपविभाग**—शिलालेख साहित्यमते यामध्ये निम्न-लिखित उपविभाग समाविष्ट होते :— १. **अकूरेश्वर विषय** ( आधु. अंकलेश्वर प्रदेश; गुर्जर राजा दद्द द्वितीयचा स. ६२९ चा खेडा ताम्रपट; कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.५७ ); २. **उप्पलहेट पथक** ( शिलादित्य सप्तमचा स. ७६६ चा अलीना ताम्रपट; कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.१७१ ); ३. **मोहडावासक विषय** ( सीयक राजाचा वि. सं. १००५ चा शिलालेख; एपि. इंडि. १९.२३६ ).

**ग्रामे**—शिलालेख साहित्यमते यामध्ये निम्नलिखित ग्रामे होती:— १. **काविका** ( एपि. इंडि. ७.४० ); २. **महिलाबलि** ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.१७३ ); ३. **कुंभारोटक** ( प्रांतीज तालुक्यातील आधु. काम्रोद; एपि. इंडि. २९.२३६ ); ४. **ब्राह्मणपाटक** आणि त्यानजिकचे खंदोहक ( इंडि. ॲंटि. १८.८२ ); ५. **मशिलापल्लिका** ( आधु. असलाली ); ६. **वट्टसोमालिका** ( आधु. वंटवल्ली ); ७. **विश्वपल्ली** ( आधु. वांसोल ); ८. **कर्पटवाणिज्य** ( आधु. कपडवंज; गुजरात ऐतिहासिक लेखसंग्रह. १.७३.८५ ).

**खेटकर्ण** ( तीर्थ )—वाराणसी येथील एक तीर्थ ( कूर्म. पूर्व. ३५.१२ ).

**खेड** ( महानुभाव तीर्थ )—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थ ( स्था. पृ. ८ ). उमरावती जिल्ह्यातील मोर्शी तालुक्यातील रितपुरच्या ६ मैल ईशान्येकडील आधु. खेड गाव हेच होय.

**खेडपा** ( तीर्थ )— राजस्थानातील जोधपुरनजिकचे एक रामस्नेही सांप्रदायतीर्थ ( ती. पृ. २९२ ).

**खेडब्रह्मा** ( ब्रह्मदेवस्थान )— गुजरातमधील ईडर-पासून १५ मैलांवरील हिरण्याक्षी नदीकाठचे ब्रह्मवेदीस्थान. स्थानिक आख्यायिकामते येथील हिरण्याक्षी, कोसंबी आणि भीमाक्षी नद्यांच्या संगमस्थानी ( त्रिवेणी ) ब्रह्मदेवाने यज्ञ आणि भृगु ऋषींनी तपस्या केली होती. येथे सध्या ब्रह्म-देवाची चतुर्मुख मूर्ती, तसेच क्षीरजांबा देवीचे मंदिर आहे. पैलतीरी भृगु ऋषींचे आश्रमस्थान आहे ( ती. पृ. ४२५ ). नामांतर– 'भृगुक्षेत्र.'

**खेपिङ्गल** ( अशोक शिलालेखस्थान )—अशोकाच्या जौगड आज्ञालेख क्र. १ मते पूर्व भारतातील समापा देशान्तर्गत एक पर्वत ( कॉर्पस्. इन्स्क्रि. १.१.३८; २.१०१ ). गंजम जिल्ह्यातील बेहरामपुर तालुक्यातील गंजमपासून १८ मैल वायव्येकडील ऋषिकुल्या नदीकाठच्या आधु. जौगड ( = प्राचीन समापा ) तटबंदीयुक्त दुर्ग-स्थानाच्या अंतर्भागातील अशोकशिलालेखयुक्त टेकडी हीच होय.

**नामव्युत्पत्ती**—'खुल्या हवेत बदामीवर्णीय दिसणारी' अशा अर्थाने हिला हे नाव मिळाले असावे. जौगड गावाच्या विस्तीर्ण तटबंदीच्या अंतर्भागातील पर्वताच्या एकाकी त्रिकोणी सुळक्यावर अशोकाचे आज्ञालेख कोरले आहेत ( एका बाजूस–आज्ञालेख क्र. १–५; दुसऱ्या बाजूस– आज्ञालेख क्र. ६–१० आणि १४; तिसऱ्या बाजूस–दोन स्वतंत्र आज्ञालेख ). त्यामधील मजकूर धौलि, गिरनार आणि शहाबाझगढी आज्ञालेखांसदृश असून, या सुळक्याभोवती सध्या लोखंडी कुंपण आणि छोटे छप्पर बांधले आहे ( कॉर्पस्. इन्स्क्रि. १.१.१४ ).

**शिलालेख**— समापानिवासी प्रादेशिक महामात्रांना उद्देशून काढलेल्या येथील आज्ञालेखात या नवप्राप्त प्रदेशातील पुत्रवत् प्रिय प्रजाजनांशी न्यायाने आणि हितबुद्धीने

वागण्याचा आदेश आढळतो.

**खेरामाता** ( सिद्धपीठ )— मध्यभारतातील दतिया-नजिकच्या शुकदेव पर्वतावरील एक सिद्धपीठस्थान ( ती. पृ. २०८ ).

**खेरी** ( देशविभाग )—राजतरंगिणीमते कश्मीरातील देवसरस् ( आधु. दीवसर ) आणि अर्धवन ( आधु. आडविन ) परगण्यांच्या दरम्यानचा एक देशविभाग ( राज. १. ३३५; ८.१२६०; श्रीवर. ३.१९०; ४. ४५२ ). स्टाइन यांच्या मते गुलाबगड आणि मुहि खिंडींच्या दरम्यानचा वेशौ ( प्राचीन विशोका ) नदीपासून २ मैलांवरील आधु. खुर ( अक्षांश ३३°–३७′ उत्तर; रेखांश ७४°–५६′ पूर्व ) गावासभोवतालचा आधु. खुर नारवाव जिल्हा हाच होय.

**स्वायत्तता**—राजतरंगिणीमते हे स्वतंत्र घटकराज्य (कार्य) असून (राज. ८.९६०; १११८; १४८२; १६२४), शीख आणि डोग्रा राज्यकालीहि याचे स्वातंत्र्य अबाधित होते.

**मठ**—राजतरंगिणीमते येथील विभिन्न मठांमध्ये शतकपालेश शिवाच्या आणि मातृकाचक्राच्या प्रतिमा असून ( राज. १.३३५ ), स्टाइन यांच्या मते पीरपंतसाल पर्वतातील गुलाबगड आणि मुहि घाटातील धर्मशाळांचा निर्देश येथे अभिप्रेत असावा ( स्टाइन, राज. १.४९–५० ). श्रीवरमते कश्मीरसुलतान हसननेहि येथे अनेक धर्ममठ बांधले होते ( श्रीवर. ३.१९० ).

**खेर्सोनेसोस्** ( द्वीप )—टॉलेमीच्या मते दक्षिण भारतातील एक द्वीप ( अक्षांश १४°–३०′ उत्तर; रेखांश ११४°–२०′ पूर्व ). मॅक्रिंडल यांच्या मते आधु. गोव्या-नजिक हे असावे. पेरिप्लसच्या मते कैनेतइ ( आधु. सेंट जॉर्ज बेट ) नजिकच्या या स्थानी चाच्यांचा मोठा तळ होता.

**खेलनवन** ( तीर्थ )—व्रजमंडलान्तर्गत ( आधु. मथुरा–वृंदावन ) राधाकृष्णांची क्रीडाभूमी, एक तीर्थ ( ती. पृ. १०५ ).

**खेल्हिश** ( देश )—वामनमते विंध्य पर्वताच्या पायथ्यानजिकचा एक देश ( वामन. १३.५५ ).

**खैबर खिण्ड** ( खिंड )—गझनीच्या मुहंमदाच्या कालापासून विदेशी आक्रमणासाठी सुविख्यात असणारी अफगाणिस्तानातील काबूल आणि वायव्य सरहद्द प्रांतातील पेशावरच्या दरम्यानची एक खिंड. स. १८४२ मध्ये अफगाण लोकांनी येथे इंग्रज सेनापती एल्फिन्स्टनच्या ४५०० सैन्याची आणि १२००० अन्य लोकांची कत्तल केली ( सेवेल, इन्स्क्रि. पृ. ३१५–३१६ ).

**खैर-खाना** ( सूर्यमंदिरस्थान )—गंधार ( आधु. अफगाणिस्तान ) देशातील काबूल गावानजिकचे गंधार स्थापत्यशैलीचे ( इ. स. ४ थे शतक ) पारसीधर्मीय सूर्य-मंदिरस्थान. बौद्धेतर गंधार स्थापत्याचे दुर्मिळ उदाहरण म्हणून हे महत्त्वाचे मानतात.

**खैराळा** ( महानुभाव तीर्थ )—स्थानपोथीमते महा-राष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थ ( स्था. पृ. २३ ). अमरावती जिल्ह्यातील एलिचपुर तालुक्यातील चांदूर-पासून ४ मैलांवरील आधु. खैराळा गाव हेच होय.

**खैऱ्हा** ( शिलालेखस्थान )—कलचुरि राजा यशः-कर्णच्या स. १०७६ च्या खैऱ्हा दानपत्राचे मध्यप्रदेशातील बिलासपुर–कटनी रेलमार्गावरील बुऱ्हार रेल्वेस्थानका-पासून ८ मैल नैर्ऋत्येकडील उपलब्धिस्थान ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.२९० ).

**खैलपाटक** ( ग्राम )—कलचुरि राजा युवराजदेव ( द्वितीय ) च्या बिल्हरि शिलालेखमते त्याच्या नोहला नामक पत्नीने दान दिलेले मध्यप्रदेशातील एक ग्राम ( कॉर्पस्. इन्स्क्रि. ४.१.२०८ ). बिल्हरि गावाच्या ७ मैल ईशान्येकडील आधु. खैलवारा ग्राम हेच होय ( एपि. इंडि. १.२५४ ).

**खोएस्** ( नदी )—ग्रीक साहित्यमते अफगाणिस्ताना-तील ‘ सु–अश्व ’ ( आधु. चेरखेह ) नदीचे नामांतर ( मोदी, एशियाटिक पेपर्स. २.२०७; सु–अश्व पहा ).

**खोकर** (महानुभाव तीर्थ)—स्थानपोथीमते महाराष्ट्रा-तील एक महानुभावपंथीय तीर्थ ( स्था. पृ. ७४ ). अहमद-नगर जिल्ह्यातील नेवासे तालुक्यातील भोकर गावाच्या १ मैल नैर्ऋत्येकडील आधु. खोकर गाव हेच होय.

**खोतल्** ( देश )—ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनमते मध्य आशियातील कुमिध देशानजिकचा वक्षु ( आधु. अमूदरिया ) नदीकाठचा एक देश. त्याचे मते हा ( खो–तो–लो ) देश त्सुंग्–लिंग् पर्वताच्या ( आधु. पामीर ) पश्चिमेस आणि वख्श नदीखोऱ्याच्या उत्तरेस होता ( राजधानीची व्याप्ती– ४ मैल ). यावरून आधु. कुलब् ( प्राचीन शुमन ) देशाच्या ईशान्येस हा असावा. नामांतर ( एद्रिसी )–‘ कुतल् ’ ( बील, १.१०६ ).

**खोनमुष** ( ग्राम )—कश्मीरातील मडव राज्यातील एक अग्रहार ग्राम आणि विक्रमांकदेवचरितकर्ता बिल्हणाचे जन्मस्थान ( विक्रमाङ्क. १.७२; १८.७०–७२ ).

राजतरंगिणीमते कश्मीरराज खगेंद्राने हे स्थापिले होते (राज. १.९०; खगेंद्रस्थापित अन्य अग्रहार ग्राम–खागि). झेवन (प्राचीन जयवन) तीर्थापासून २ मैल ईशान्येकडील आणि पांपरपासून ३ मैल वायव्येकडील आधु. खोनमोह ग्राम हेच होय (अक्षांश ३४°–३′ उत्तर; रेखांश ७५°–१′ पूर्व). येथील प्राथमिक उत्खनन कनिंगहॅम यांनी (कनिंग., पृ. ९८) आणि उत्खननावशेषांचे सविस्तर वर्णन बूलर यांनी केले (बूलर, रिपोर्ट. पृ. ४–५).

**ग्रामवर्णन**—विक्रमांकदेवचरितमते केशराच्या मळ्यांसाठी प्रसिद्ध असणाऱ्या या गावानजिक 'दामोदरनाग' आणि 'भुवनेश्वरीनाग' नामक पवित्र जलाशय असून, त्यापैकी भुवनेश्वरी निर्झर हरेश्वर तीर्थाच्या यात्रामार्गावरील तीर्थ म्हणून आणि दामोदरनाग पुरातन शिल्पावशेषस्थान म्हणून आजहि प्रसिद्ध आहे (स्टाइन, राज. २.४५९).

**खोनेरेत्स् बामी** (द्वीप)—पर्शियन साहित्यमते सप्तद्वीपा पृथ्वीचे मध्यवर्ती द्वीप. पौराणिक जंबूद्वीपसदृश या द्वीपाचे निम्नलिखित उपविभाग होते:—१. इराण वर्झ्; २. कंग्दिझ्; ३. जमगर्द; ४. कश्मीर (रेनॉल्ड, अबुल फिदा. २. ११). नामांतर (खाल्डियन आणि असीरियन साहित्य)—'खत्रथ्;' 'खिबुथ' (अली, पुराणाज्. पृ. ३०).

**खोन्न** (ग्राम)—कलिंगराज अनंतवर्मन् चोडगंगाच्या इ. स. ११ व्या शतकातील कोर्नि दानपत्रमते कलिंग देशान्तर्गत वराहवर्तनी विषयातील एक ग्राम. चिकाकोलपासून २० मैलांवरील कलिंगपतमनजिकचे आधु. कोर्नि गाव हेच होय (डी. एच्. एन्. आय्. १.४६२; चौधरी, पृ. ७९).

**खोन्नालि** (शिलालेखस्थान)—होयसाळ राजा बल्लाळ (द्वितीय) च्या स. ११७५ च्या शिलालेखाचे म्हैसूर राज्यातील उपलब्धिस्थान (एपि. कर्ना. ७. ४५).

**खोयाश्रम** (देशविभाग)—श्रीवरमते कश्मीरातील 'खूयाश्रम' देशविभागाचे नामांतर (श्रीवर. ३.३५३; खूयाश्रम पहा).

**खोरखोट्टाङ्ग** (ग्राम)—सुभिक्ष्यराजदेवाच्या इ. स. १० व्या शतकातील पांडुकेश्वर ताम्रपटमते पूर्व भारतातील हर्षपुर विभागातील एक ग्राम. याचे आधु. स्थान समजत नाही.

**खोरेज्म** (देश)--तुर्की साहित्यमते मध्य आशियान्तर्गत वक्षु खोऱ्यातील समरकंदच्या परिसरातील एक देश. सेंट मार्टिन यांच्या मते मध्य आशियातील खीव लोकांचा आधु. खोरेज्म देश हाच असावा.

**नामांतरे**—प्राचीन साहित्यात याची निम्नलिखित नामांतरे आढळतात:—

| ग्रंथ | नामांतर |
|---|---|
| १. स्ट्रॅबो आणि प्लिनी (प्लिनी, ६.१६) | खोरस्मिय |
| २. ह्युएन्त्संग (वॉटर्स, १.९९) | हुओ-लि-सि-मि (खोरिस्मिक) |
| ३. अन्य चिनी साहित्य | हुओ–सिन्–कुओ (हुओ–सिन् राजाचे राज्य) |

**प्लिनीच्या ग्रंथात**—या ग्रंथमते येथील १५०० अश्वदलयुक्त करस्मनेस् राजाने सिंकदरची भेट घेऊन कोल्चै आणि स्त्रीराज्यानजिकच्या स्व–राज्याची माहिती त्यास सांगितली होती (प्लिनी, ६.१६).

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात** — या ग्रंथमते फ-ति (आधु. दरदंत प्रदेश) देशाच्या १०० मैल वायव्येकडील वक्षु (आधु. अमूदरिया) नदीच्या पश्चिम तीरवर्ती या देशातील (व्याप्ती–१००×६ मैल) पीकपाणी आणि लोकाचार 'फ-ति' देशासदृश आणि भाषा स्वतंत्र होती.

चिनी साहित्यमते या (हुओ-लि-सिन्-कुओ) देशावर समरकंदसम्राट यू-ची वंशीय शौ-वु कुलोत्पन्न हुओ-सिन् राजाचे राज्य होते. चंगीझखानाने या सामर्थ्यशाली राज्याचा नाश केला (वॉटर्स, १.९९; बील, १.१०१–१०२).

**खोल** (ग्राम)-- राजतरंगिणीमते कश्मीरराज गोपादित्यस्थापित एक अग्रहार ग्राम (राज. १.३४०). बुलर (प्राचीन होलडा) परगण्यातील आधु. खुलि गाव हेच होय (अक्षांश ३३°–५५′ उत्तर; रेखांश ७५°–१०′ पूर्व; स्टाइन, राज. २.४६०).

**खोल्वि** (बौद्ध गुफास्थान) -- मध्य भारतातील उज्जैनपासून ६० मैल उत्तरेकडील आणि कोटा-उज्जैन मार्गावरील धम्नारपासून २२ मैल आग्नेयेकडील सुविख्यात बौद्ध चैत्यमंदिरस्थान. येथील गुफा भारतातील सर्वाधिक अर्वाचीन गुफा आहेत.

**गुफा**—येथील मध्यवर्ती टेकडीच्या दक्षिण, पूर्व आणि उत्तरेकडील ४०–५० गुफांपैकी दक्षिणेकडील गुफा विशेष महत्त्वाच्या आहेत. तेथील चैत्यमंदिरातील चौकोनी स्तूपांच्या दर्शनी भागी हिंदु देवमंदिरानुसारी बुद्धप्रतिमा आहे. त्यावरून बौद्ध धर्माच्या अवनतीकाळी ते खोदले असावे.

**चैत्यमंदिरे**—येथील उल्लेखनीय चैत्यमंदिरे पुढील-प्रमाणे होत :—

(१) **अर्जुन मंदिर**—या विशाल स्तूपयुक्त (उंची–२०′) मंदिराच्या अंतर्भागातील एका खोलीमध्ये पद्मासनाधिष्ठित बुद्धमूर्ती आहे. हिंदु देवप्रतिमेसदृश तिची पूजा करीत असावेत.

(२) **चैत्यमंदिर क्र. २** —या मंदिरातील (२६′× १३′) वर्तुलाकृती पोकळ स्तूपाच्या (व्यास–८′) अंतर्भागात बुद्धप्रतिमा स्थापून त्याचे बुद्धमंदिरात रूपांतर केले आहे. याच पद्धतीचे अनुकरण येथील अन्य तीन स्तूपांमध्ये आढळते (फर्ग्युसन, १.१६६–१६७).

**बौद्ध विहार**—बौद्ध विहारसदृश अनेक गुफा येथे असल्या, तरी एकहि संपूर्ण बौद्ध विहार येथे नाही. या गुफांपैकी 'भीमप्रासाद' सभागृहाची (४२′×२२′) रचना बाघ येथील 'शाला' गुफांसदृश असून, त्याच्या मध्यवर्ती सभागृहाभोवती परंपरागत विहारातील छोट्या खोल्या नाहीत.

येथील अन्य विहार-गुफा आकाराने छोट्या आणि स्थापत्यदृष्ट्या वैशिष्ट्यहीन असून, फर्ग्युसन यांच्या मते त्या अजंटा येथील सातवाहन गुफा क्र. ८, १२ आणि १३ शी समकालीन आहेत (फर्ग्युसन, १.२००).

**खोस्त** (देश)—ह्युएन्त्संगच्या मते मध्य आशियातील कुंदुझ् देशाच्या ६० मैल आग्नेयेकडील आणि अंदराबच्या ८० मैल पश्चिमेकडील एक देश. यूल यांच्या मते अफगाणिस्तानातील कुर्रम् खोऱ्याच्या दक्षिण भागातील तलिकन् आणि अंदराब देशांच्या दरम्यानचा आधु. खौस्त (खोस्त) देश हाच होय. बाबरच्या आत्मचरित्रातहि याचे वर्णन आढळते.

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते पूर्वकालीन तुखार राज्यातील आणि तत्कालीन तुर्क साम्राज्यातील या (कुओ–सि–तो) दऱ्याखोऱ्यातील देशाची (व्याप्ती–६०० मैल; राजधानीची व्याप्ती–२ मैल) हवा वादळी आणि थंड असून, येथील लोक हिंस्र आणि रानटी होते. या पीकपाणीसमृद्ध फलपुष्पयुक्त देशात तीन बौद्ध मठ आणि मोजके बौद्ध भिक्षू होते (वॉटर्स, २.२७०; बील, १.१०८).

**खोह** (शिलालेखस्थान)—गुप्त राज्यकालीन हस्तिन् राजाच्या स. ४७५ च्या ताम्रपटाचे मध्यप्रदेशान्तर्गत बावेलखंडातील नागौध प्रदेशातील उचहरा गावापासून ३ मैल नैर्ऋत्येकडील उपलब्धिस्थान. शब्दशः अर्थ–'पर्वतीय खिंड'.

**अन्य शिलालेख**—गुप्त राज्यकालीन निम्नलिखित अन्य शिलालेखहि येथे सापडले आहेतः— १. हस्तिन् राजाचा स. ४८२ चा ताम्रपट (कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.१०२); २. संक्षोभ राजाचा स. ५२८ चा ताम्रपट (कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.११३); ३. जयनाथ राजाचा स. ४९६ चा ताम्रपट (कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.१२१); ४. शर्वनाथ राजाचे स. ५१२, ५१६ आणि ५३३ चे ताम्रपट (कॉर्पस्. इन्स्क्रि. ३.२.१२६; १३३; १३५).

**शिवप्रतिमा**—येथील शिवमंदिरात गुप्त शिल्पशैलीचे मुखलिंग, आणि ध्यानमग्न शिवाची अर्धप्रतिमा असून, त्यापैकी जगदुत्पत्ती–स्थिती–लयकारक शिवप्रतिमेच्या मुद्रेवरील राजवैभव आणि आध्यात्मिक दीप्तीचे मनोज्ञ संमिश्रण गुप्त शिल्पकलेचे अद्वितीय उदाहरण आहे.

**खोलेश्वर** (शिवमंदिरस्थान)—महाराष्ट्रातील अहमदनगरपासून १५ मैलांवरील वांबोरी येथील हेमाडपंती शैलीचे पर्वतीय शिवमंदिरस्थान.

**खौलापूर** (महानुभाव तीर्थ)—स्थानपोथीमते महाराष्ट्रातील एक महानुभावपंथीय तीर्थ (स्था. पृ. २१). विदर्भातील उमरावतीपासून १८ मैल पश्चिमेकडील आधु. खौलापूर हेच होय.

**ख्याती** (नदी)— क्रौंच द्वीपातील एक नदी (ब्रह्माण्ड. १९.१५; मत्स्य. १२२.८८; वायु. ४९.६९; विष्णु. २.५.५५).

**खाडायन** (विषय)—पाणिनीच्या गणपाठमते भारतवर्षातील एक विषय (देशविभाग; पा. सू. ४.२.५४).

**ख्रिश्म** (देश)—ह्युएन्त्संग आणि मार्कोपोलोच्या प्रवासवर्णनमते मध्य आशियातील वक्षु (आधु. अमूदरिया) नदीच्या दक्षिण किनाऱ्यावरील एक देश. बील यांच्या मते तलिकन् देशाच्या ३२ मैल पूर्वेकडील आणि फर्खरच्या उत्तरेकडील आधु. किश्म (ख्रिश्म) देश हाच होय (बील, १.१०७). नामांतर (ह्युएन्त्संग)–'खि–लि–सेह्–मो' (= 'क्रिश्म').

**ह्युएन्त्संगच्या प्रवासवर्णनात**—या ग्रंथमते मुंगकन्

(आधु. तळिकन्) देशाच्या ६० मैल पूर्वेकडील हा (खि-लि-सेह्-मो = क्रिश्म) देश पूर्वकालीन तोखार राज्यात समाविष्ट होता (व्याप्ती-२००×६० मैल; राजधानीची व्याप्ती-३ मैल). येथील पीकपाणी आणि लोकाचार मुंगकन् देशाप्रमाणे, आणि लोक दुष्ट प्रकृतीचे होते. वॉटर्स यांच्या मते ह्युएन्त्संगकृत हे सारे वर्णन ऐकीव माहितीवर आधारित आहे (वॉटर्स, २.२७३-२७४).

**ख्यसोअन्न** (नदी)—टॉलेमीच्या मते ब्रह्मदेशान्तर्गत रंगूनजिकच्या 'सुवर्ण' (आधु. इरावती) नदीचे नामांतर (सुवर्ण नदी पहा).

---

**('प्राचीन भारतीय स्थलकोशा'चा विस्तार अपेक्षेपेक्षा वाढल्याने हा ग्रंथ दोन खंडांऐवजी प्रत्येकी ८०० पृष्ठांच्या तीन खंडांमध्ये प्रकाशित करण्याचा निर्णय घेणे भाग पडत आहे. म्हणूनच प्रास्ताविकात लिहिल्याप्रमाणे 'ण' अखेर-ऐवजी 'ख' अखेरच्या स्थलांचा समावेश प्रस्तुत खंडात केला आहे).**